॥ श्रीः ॥

वाई मोदवृत्त वर्तमानपत्रद्वारा प्रसिद्ध झालेलें

# मराठी भाषांतरासह रामायण.



## युद्धकांड.

भाषांतर कर्ते

काशीनाथ वामन लेले, वाईकर.

वाई मोदवृत्त छापखान्यांत छापिलें.



शके १८२२.

॥ श्रीः ॥

# श्रीमहामुनिवाल्मीकिप्रणीतं श्रीरामायणम् ।

## ६ युद्धकाण्डम् ।

श्रीगणेशायनमः ॥ श्रुत्वा हनूमतो वाक्यं यथावदभिभाषितम् । रामः प्रीतिसमायुक्तो वाक्यमुत्तरमब्रवीत् १ कृतं हनूमता कार्यं सुमहद्भुवि दुर्लभम् । मनसापि यदन्येन न शक्यं धरणीतले [illegible] न हि तं परिपश्यामि यस्तरेत महोदधिम् । अन्यत्र गरुडाद्वायोरन्यत्र च हनूमतः ३ देवदानवयक्षाणां गन्धर्वोरगरक्षसाम् । अप्रधृष्यां पुरीं [illegible] रावणेन सुरक्षिताम् ४ प्रविष्टः सत्त्वमाश्रित्य जीवन्को नाम निष्क्रमेत् । को विशेत्सुदुराधर्षां

श्रीः ॥ ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम् । भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ १ ॥ त्यक्त्वा सुदुस्त्यज सुरेप्सितराज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम् । मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ २ ॥ हनुमानानें केलेलें यथार्थ भाषण श्रवण करून आनंदित झालेला राम त्याला उद्देशून म्हणाला १ "हनुमानानें पृथ्वीमध्यें कोणाच्याही हातून होणें अत्यंत अशक्य असें फारच मोठें कार्य केलें आहे. हें कार्य ह्या भूतलावर दुसऱ्या कोणाकडून मनानेंही होणें शक्य नाहीं २. गरुड, वायु आणि हनुमान् ह्यांशिवाय महासागर तरून जाणारा मला कोणीही दिसत नाहीं ३. देव, दानव, यक्ष, गंधर्व, उरग आणि राक्षस ह्यांनाही जिच्यावर चाल करून जातां येणें शक्य नाहीं व जिचें रावणानें संरक्षण केलेलें आहे अशा लंकानगरीमध्यें ४ धैर्यानें प्रविष्ट झालेला कोण बरें जिवंत बाहेर येणार आहे ? फार कशाला, शत्रूचा जिच्यावर हल्ला होणें फारच दुर्घट आहे आणि राक्षसांनीं जिचें उत्तम प्रकारें रक्षण केलें आहे त्या लंकानगरीमध्यें दुसरा कोण बरें हनुमानाप्रमाणें वीर्यवान् व बलाढ्य नसतांना

सर्वार्था व्यवसीदन्ति व्यसनं चाधिगच्छति ६ इमे शूराः समर्थाश्च सर्वतो हरियूथपाः । त्वत्प्रियार्थं कृतोत्साहाः प्रवेष्टुमपि पावकम् ७ एषां हर्षेण जानामि तर्कश्चापि दृढो मम ८ विक्रमेण समानेष्ये सीतां हत्वा यथा रिपुम् । रावणं पापकर्माणं तथा त्वं कर्तुमर्हसि ९ सेतुरत्र यथा बध्येद्यथा पश्येम तां पुरीम् । तस्य राक्षसराजस्य तथा त्वं कुरु राघव १० दृष्ट्वा तां हि पुरीं लङ्कां त्रिकूटशिखरे स्थिताम् । हतं च रावणं युद्धे दर्शनादवधारय ११ अबद्ध्वा सागरे सेतुं घोरे च वरुणालये । लङ्का न मर्दितुं शक्या सेन्द्रैरपि सुरासुरैः १२ सेतुबन्धः समुद्रे च यावल्लङ्कासमीपतः । सर्वं तीर्णं च मे सैन्यं जितमित्युपधारय ॥ तथा हि समरे वीरा हरयः कामरूपिणः १३ तदलं विक्लवां बुद्धिं राजन्सर्वार्थनाशनीम् । पुरुषस्य हि लोकेऽस्मिञ्शोकः शौर्यापकर्षणः १४ यत्तु कार्यं मनुष्येण शौटीर्यमवलम्ब्यताम् । तदलंकरणायैव कर्तुर्भवति सत्वरम् १५ अस्मिन्काले महाप्राज्ञ सत्त्वमातिष्ठ तेजसा १६ शूराणां हि मनुष्याणां त्वद्विधानां

उत्साहरहित, दीन आणि शोकाकुल चित्तानें युक्त असलेल्या पुरुषाच्या सर्व आशा निष्फळ होतात व त्याला संकटही प्राप्त होतें ६. हे वानरसेनाधिपति शूर व सर्वस्वी समर्थ असून तुझें प्रिय करण्याकरितां अग्नामध्यें प्रवेश करण्यासही उद्युक्त होणार आहेत ७ असें ह्यांच्या हर्षावरूनच मला समजत आहे आणि असा माझा तर्कही पक्का आहे ८. ह्यास्तव, पापकर्म करणाऱ्या रावणशत्रूचा वध करून पराक्रमानें मला सीता आणितां येईल अशारीतीनें तूं उत्साह धर ९. हे राघवा, सागरावर सेतु कसा बांधितां येईल आणि त्या राक्षसराजाची नगरी कोणत्या उपायानें आमच्या दृष्टीं पडेल ह्याचा तूं उपाय योज १०. कारण, त्रिकूटाचलाच्या शिखरावर असलेली ती लंका दृष्टीं पडली म्हणजे तत्क्षणींच संग्रामामध्यें रावणाचा वध झाला असें तूं समज ११. वरुणाचें निवासस्थान असलेल्या घोर समुद्रावर सेतु बांधिल्याशिवाय इंद्रासहवर्तमान देवदैत्यांच्या हातूनही लंकेचा विध्वंस होणें शक्य नाहीं १२. लंकापर्यंत समुद्रावर सेतु तयार होतांक्षणीं माझें सर्वही सैन्य सागर उल्लंघून गेलें व विजयी झालें असें तूं समज १३. सारांश, सर्व आशांचा विघात करणारी ही घाबरट बुद्धि आतां पुरे. हे रामा, ह्या जगतामध्यें शोक, पुरुषाचे ठिकाणीं असलेल्या शौर्याचा नाश करितो १४. पराक्रमानें मनुष्याच्या हातून जें कार्य होण्यासारिखें असतें तच करावें. कारण, तें कार्य सत्वर केलें असतां तें कर्त्याला भूषणावहच होत असतें १५. हे महाप्राज्ञ, ह्या वेळीं तूं तेजाचें व सत्त्वगुणाचें अवलंबन कर १६. कारण, कांहीं हानी अगर झालेलें असो अथवा [illegible]

महात्मनाम् । विनष्टे वा प्रनष्टे वा शोकः सर्वार्थनाशनः १७ तत्त्वं बुद्धिमतां श्रेष्ठः सर्वशास्त्रार्थकोविदः । मद्विधैः सचिवैः सार्धमरिं जेतुं समर्हसि १८ न हि पश्याम्यहं कंचित्त्रिषु लोकेषु राघव । गृहीतधनुषो यस्ते तिष्ठेदभिमुखो रणे १९ वानरेषु समासक्तं न ते कार्यं विपत्स्यते । अचिराद्द्रक्ष्यसे सीतां तीर्त्वा सागरमक्षयम् २० तदलं शोकमालम्ब्य क्रोधमालम्ब भूपते । निश्चेष्टाः क्षत्रिया मन्दाः सर्वे चण्डस्य बिभ्यति २१ लङ्घनार्थं च घोरस्य समुद्रस्य नदीपतेः । सहास्माभिरिहोपेतः सूक्ष्मबुद्धिर्विचारय २२ लङ्घिते तत्र तैः सैन्यैर्जितमित्येव निश्चिनु । सर्वं तीर्णं च मे सैन्यं जितमित्यवधार्यताम् २३ इमे हि हरयः शूराः समरे कामरूपिणः । तानरीन्विधमिष्यन्ति शिलापादपवृष्टिभिः २४ कथंचित्परिपश्यामि लङ्घितं वरुणालयम् । हतमित्येव तं मन्ये युद्धे शत्रुनिबर्हण २५ किमुक्त्वा बहुधा चापि सर्वथा विजयी भवान् । निमित्तानि च पश्यामि मनो मे

---

नाहींसें झालेलें असो, तुझ्यासारिख्या महात्मे पुरुष जर शोक करूं लागले तर तो त्यांचा शोक त्यांच्या सर्वच आशा भस्म करून टाकील १७. यास्तव, बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ आणि सर्व प्रकारच्या शास्त्रांतील गोष्टींमध्यें निपुण असलेला तूं माझ्यासारिख्या सचिवांना बरोबर घेऊन शत्रूचा पराजय कर १८. हे राघवा, हातांत धनुष्य घेतलेल्या तुझ्या समोर संग्रामामध्यें उभा राहणारा त्रैलोक्यांत मला कोणीही दिसत नाहीं १९. वानरांवर सोंपविलेल्या तुझ्या कार्याचा विघात होणार नाहीं. अगाध समुद्र तरून जाऊन तूं लवकरच सीता अवलोकन करशील २०. हे भूपते, आतां शोक पुरे; तूं क्रोधाचें अवलंबन कर. कारण, शत्रूविषयीं क्रोध न धरणाऱ्या क्षत्रियाचें काहींएक चालतनासें होतें आणि योग्य कोप धारण करणाऱ्याला सर्व भीत असतात २१. आम्हांसहवर्तमान नदीपति घोर समुद्राच्या उल्लंघनार्थ तूं आमच्या बरोबर सूक्ष्म बुद्धीनें विचार कर २२. त्या वानरसेना समुद्र उल्लंघून गेल्या असतां त्या विजयी झाल्याच असें तूं पक्कें समज. सारांश, माझें सर्व सैन्य समुद्र तरून गेलें म्हणजे तें विजयी झालेंच अशी तुझी खात्री असू दे २३. संग्रामामध्यें यथेष्ट रूप धारण करणारे हे शूर वानर पाषाण व वृक्ष यांच्या वृष्टींनीं त्या शत्रूंना उडवून देतील २४. कोणत्या तरी उपायानें समुद्राचें उल्लंघन झाल्याचें जर माझ्या दृष्टीं पडलें तर, हे शत्रुनाशका रामा, संग्रामामध्यें त्या रावणाचा वध झालाच असें मी समजतों २५. असो. पुष्कळ बोलून उपयोग काय ? सर्वप्रकारें तूं विजयी आहेस. कारण, शुभसूचक चिन्हें मला होत आहेत व माझें मनही

संप्रहृष्यति २६ [ ४५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
युद्धकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

सुग्रीवस्य वचः श्रुत्वा हेतुमत्परमार्थवत् । प्रतिजग्राह काकुत्स्थो
हनूमन्तमथाब्रवीत् १ तपसा सेतुबन्धेन सागरोच्छोषणेन च । सर्वथापि
समर्थोस्मि सागरस्यास्य लङ्घने २ कति दुर्गाणि दुर्गाया लङ्कायास्तद्ब्रु-
वीष्व मे । ज्ञातुमिच्छामि तत्सर्वं दर्शनादिव वानर ३ बलस्य परिमाणं
च द्वारदुर्गक्रियामपि । गुप्तिकर्म च लङ्काया रक्षसां सदनानि च ४ यथा-
सुखं यथावच्च लङ्कायामसि दृष्टवान् । सर्वमाचक्ष्व तत्त्वेन सर्वथा कुशलो
ह्यसि ५ श्रुत्वा रामस्य वचनं हनूमान्मारुतात्मजः । वाक्यं वाक्यविदां
श्रेष्ठो रामं पुनरथाब्रवीत् ६ श्रूयतां सर्वमाख्यास्ये दुर्गकर्मविधानतः ।
गुप्ता पुरी यथा लङ्का रक्षिता च यथा बलैः ७ राक्षसाश्च यथा स्निग्धा
रावणस्य च तेजसा । परां समृद्धिं लङ्कायाः सागरस्य च भीमताम् ८
विभागं च बलौघस्य निर्देशं वाहनस्य च । एवमुक्त्वा कपिश्रेष्ठः कथ-
यामास तत्त्ववित् ९ हृष्टप्रमुदिता लङ्का मत्तद्विपसमाकुला । महती

---

हर्षयुक्त झालें आहे २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदि-
काव्यांतील युद्धकांडापैकीं दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ २ ॥

सहेतुक आणि गंभीर अर्थानें युक्त असें सुग्रीवाचें भाषण श्रवण केल्यावर त्याला मान
डोलवून ककुत्स्थकुलोत्पन्न राम हनुमानाला ह्मणाला १ " तपश्चर्या, सेतुबंधन,
सागरशोषण वगैरे प्रकारच्या कोणत्याही उपायानें मी समुद्राचें उल्लंघन करण्यास समर्थ
आहें २. हे वानरा, दुर्गम लंकेमध्यें दुर्गम स्थलें किती आहेत हें सर्व प्रत्यक्ष पाहिल्या-
प्रमाणें समजून घेण्याची माझी इच्छा आहे ३. त्याचप्रमाणें, सैन्याचें प्रमाण, द्वारें, किल्ले,
लंकेचा बंदोबस्त आणि राक्षसांचीं घरें ४ हें त्याप्रमाणें तूं यथायोग्य रीतीनें व स्वस्थपणानें
पाहिलें आहेस त्याप्रमाणें तें सर्व खरें खरें तूं मला सांग. तूं सर्वप्रकारें निपुण आहेस " ५.
रामाचें भाषण श्रवण केल्यावर वक्त्यांमध्यें श्रेष्ठ वायुपुत्र हनुमान् रामाला पुनरपि
ह्मणाला ६ " ऐका. किल्ले वगैरे बांधून लंकानगरीचा बंदोबस्त कसा केला आहे,
सैन्यांनीं तिचें रक्षण कसें केलें आहे, राक्षसांचें रावणाचे ठिकाणीं प्रेम कसें आहे,
रावणाचे तेजानें लंकेमध्यें पराकाष्ठेची समृद्धि कशी प्राप्त झाली आहे, सागराची
उग्रता किती आहे, सेनासमुदायाचे विभाग कसे केले आहेत आणि वाहनांची संख्या
किती आहे हें सर्व मी कथन करितो ". असें बोलून लंकेतील खडा आणि खडा
माहित असलेला वानरश्रेष्ठ हनुमान् त्याला ह्मणाला ७, ८, ९ " हर्ष व [illegible]

रथसंपूर्णा रक्षोगणनिषेविता १० दृढबद्धकपाटानि महापरिघवन्ति च ।
चत्वारि विपुलान्यस्या द्वाराणि सुमहान्ति च ११ तत्रेषूपलयन्त्राणि बल-
वन्ति महान्ति च । आगतं प्रतिसैन्यं तैस्तत्र प्रतिनिवार्यते १२
द्वारेषु संस्कृता भीमाः कालायसमयाः शिताः । शतशो रचिता वीरैः
शतघ्न्यो रक्षसां गणैः १३ सौवर्णस्तु महांस्तस्याः प्राकारो दुष्प्रधर्षणः ।
मणिविद्रुमवैदूर्यमुक्ताविरचितान्तरः १४ सर्वतश्च महाभीमाः शीततोया
महाशुभाः । अगाधा ग्राहवत्यश्च परिखा मीनसेविताः १५ द्वारेषु तासां
चत्वारः संक्रमाः परमायताः । यन्त्रैरुपेता बहुभिर्महद्भिर्गृहपङ्क्तिभिः १६
त्रायन्ते संक्रमास्तत्र परसैन्यागते सति । यन्त्रैस्तैरवकीर्यन्ते परिखासु
समन्ततः १७ एकस्त्वकम्प्यो बलवान्संक्रमः सुमहादृढः । काञ्चनैर्बहुभिः
स्तम्भैर्वेदिकाभिश्च शोभितः १८ स्वयं प्रकृतिमापन्नो युयुत्सू राम रावणः ।

---

घोड्यांनीं युक्त असलेली प्रचंड लंका मत्त गजांनीं गजबजलेली आहे, रथांनीं भर-
लेली आहे आणि राक्षसगण तिच्यामध्यें वास्तव्य करीत आहेत १०. तिला फारच
मोठीं मोठीं व विशाल अशीं चार द्वारें आहेत; त्यांना मोठे मोठे अडसर आहेत आणि
त्यांना फळ्याही फारच बळकट लाविलेल्या आहेत ११. बाण व पाषाण फेंकण्याचीं
मोठीं मोठीं बळकट यंत्रें तेथें आहेत आणि त्यांच्या योगानेंच तेथें आलेल्या शत्रुसै-
न्याचें निवारण होत असतें १२. लंकेच्या द्वारावरून शृंगारिलेल्या व साफसूफ केले-
ल्या अशा शेंकडों भयंकर तोफा राक्षसांच्या शूर समुदायांनीं नेऊन ठेविल्या आहेत १३.
त्या लंकेभोंवतीं शत्रूचा हल्ला होण्यास दुर्घट असा एक मोठा सुवर्णाचा तट आहे
आणि त्या तटांत पोवळीं, हिरे, वैडूर्य मणि व मोतीं भरलेलीं आहेत १४. सर्व बाजूंनीं
महाभयंकर अगाध व अतिच अशुभ खंदक खणलेले आहेत १५. त्यांतील उदक
शीतल असून मासे व मकर त्यांमध्यें आहेत; त्या खंदकामध्यें चार द्वारें आहेत आणि
त्या चारी द्वारापासून चार अति विस्तृत मार्ग वरपर्यंत बांधून नेलेले आहेत. नानाप्र-
कारचीं यंत्रें त्या मार्गांतून ठिकठिकाणीं ठेविलेलीं आहेत आणि मोठ्या मोठ्या घरां-
च्या रांगाही त्यांच्या भोंवतीं आहेत १६. शत्रूचें सैन्य आलें असतां कोटावर ठेवि-
लेल्या त्या तोफा वगैरे यंत्रांनीं त्या मार्गांचें रक्षण होत असतें आणि शत्रूचीं सैन्यें त्या
खंदकामध्यें सर्व बाजूंनीं फेंकलीं जात असतात १७. एक मार्ग तर
फारच बळकट व प्रचंड असल्यामुळें त्याला धक्का लागणें शक्यच नाहीं. अनेक सुवर्ण-
स्तंभांनीं व चौकयांनीं तो सुशोभित केलेला आहे १८. हे रामा, रावण स्वतः युद्धा-
विषयीं उत्सुक असूनही स्वस्थचित्त असतो आणि सैन्याची तपासणी करण्याविषयीं नेहमीं

उत्थितश्चाप्रमत्तश्च बलानामनुदर्शने १९ लङ्का पुनर्निरालम्बा देवदुर्गा भयावहा। नादेयं पार्वतं चान्यं कृत्रिमं च चतुर्विधम् २० स्थिता पारे समुद्रस्य दूरपारस्य राघव। नौपथश्चापि नास्त्यत्र निरुद्देशश्च सर्वशः २१ शैलाग्रे रचिता दुर्गा सा पूर्देवपुरोपमा। वाजिवारणसंपूर्णा लङ्का परमदुर्जया २२ परिखाश्च शतघ्न्यश्च यन्त्राणि विविधानि च। शोभयन्ति पुरीं लङ्कां रावणस्य दुरात्मनः २३ अयुतं रक्षसामत्र पूर्वद्वारं समाश्रितम्। शूलहस्ता दुराधर्षाः सर्वे खड्गाग्रयोधिनः २४ नियुतं रक्षसामत्र दक्षिणद्वारमाश्रितम्। चतुरङ्गेण सैन्येन योधास्तत्राप्यनुत्तमाः २५ प्रयुतं रक्षसामत्र पश्चिमद्वारमाश्रितम्। चर्मखड्गधराः सर्वे तथा सर्वास्त्रकोविदाः २६ न्यर्बुदं रक्षसामत्र उत्तरद्वारमाश्रितम्। रथिनश्चाश्ववाहाश्च कुलपुत्राः सुपूजिताः २७ शतशोऽथ सहस्राणि मध्यमं स्कन्धमाश्रिताः। यातुधाना दुराधर्षाः साग्रकोटिश्च रक्षसाम् २८ ते मया संक्रमा भग्नाः परिखाश्चा-

---

दक्ष व उद्युक्त असतो १९. लंका तर भयावह असून देवांनाही दुर्गम आहे. कारण, तिच्यावर जाण्याला आधारभूत असा कांहीं मार्ग नाहीं. त्या कोटाशिवाय नद्यांनीं वेष्टित असा एक कोट आहे, एक पर्वतरूप कोट आहे आणि दुसरा एक कृत्रिमही कोट आहे; असे चार प्रकारचे कोट लंकेमध्यें आहेत २०. हे राघवा, ज्याचें तीर फारच लांब आहे अशा समुद्राच्या पलीकडे ती लंका आहे. नौकेनाही मार्ग तेथें नाहीं आणि त्या समुद्रामध्यें अंतर समजण्याकरितां कांहीं स्थलेंही केलेलीं नाहींत २१. पर्वताच्या शिखरावर बांधिलेली ती दुर्गम लंका देवनगरीप्रमाणें आहे आणि जिंकिली जाण्यास ती अत्यंत दुर्घट असून अश्व व गज यांनीं भरलेली आहे २२. खंदक, तोफा आणि दुसरीं नानाप्रकारचीं यंत्रें त्या दुरात्म्या रावणाची लंका नगरी शोभवीत आहेत २३. त्या लंकेमध्यें पूर्वेच्या द्वाराशीं दहा हजार अजिंक्य राक्षस हातांमध्यें शूल घेऊन राहिलेले आहेत आणि ते सर्वही खड्गाच्या योगानें पुढें सरसावून युद्ध करणार आहेत २४. तेथें दक्षिणद्वाराच्याशीं एक लक्ष राक्षस चतुरंग सैन्यासहवर्तमान राहिलेले आहेत आणि दुसरे अनुपम योद्धेही तेथें आहेत २५. तेथें पश्चिमद्वाराचा आश्रय करून दहा लक्ष राक्षस ढालतरवारी घेऊन राहिलेले आहेत आणि ते सर्वही सर्व अस्त्रांमध्यें निपुण आहेत २६. तेथें उत्तर द्वाराचा आश्रय करून दहा कोट राक्षस राहिलेले आहेत आणि रथी व स्वार असे कुलीन व रावणाला अत्यंत मान्य असलेले दुसरेही योद्धे तेथें आहेत २७. नगरीच्या मध्यभागीं असलेल्या तळावर शेकडों हजारों अजिंक्य राक्षस राहिलेले आहेत आणि दुसरेही एक कोट पंचवीस लक्ष राक्षस तेथें आहेत २८. असो. [illegible]

वपूरिताः। दग्धा च नगरी लङ्का प्राकाराश्चावसादिताः २९ येन केन तु मार्गेण तराम वरुणालयम्। हतेति नगरी लङ्का वानरैरवधार्यताम् ३० अङ्गदो द्विविदो मैन्दो जाम्बवान्पनसो नलः। नीलः सेनापतिश्चैव बलशेषेण किं तव ३१ प्लवमाना हि गत्वा तां रावणस्य महापुरीम्। सपर्वतवनां भित्त्वा सखातां च सतोरणाम्॥ सप्राकारां सभवनामानयिष्यन्ति राघव ३२ एवमाज्ञापय क्षिप्रं बलानां सर्वसंग्रहम्। मुहूर्तेन तु युक्तेन प्रस्थानमभिरोचय ३३ [ ७८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे तृतीयः सर्गः॥ ३॥

श्रुत्वा हनुमतो वाक्यं यथावदनुपूर्वशः। ततोऽब्रवीन्महातेजा रामः सत्यपराक्रमः १ यन्निवेदयसे लङ्कां पुरीं भीमस्य रक्षसः। क्षिप्रमेनां वधिष्यामि सत्यमेतद्ब्रवीमि ते २ अस्मिन्मुहूर्ते सुग्रीव प्रयाणमभिरोचय। युक्तो मुहूर्ते विजये प्राप्तो मध्यं दिवाकरः ३ सीतां हृत्वा तु तद्यातु क्वासौ यास्यति जीवितः ४ सीता श्रुत्वाभियानं मे आशामेष्यति जीविते।

ते चारी मार्ग मीं पाडून टाकून खंदक भरून काढिले आहेत, लंकानगरी दग्ध केली आहे आणि कोटाचाही विध्वंस केला आहे २९. कोणत्या तरी मार्गानें आम्ही समुद्र तरून जाऊं. वानरांनीं लंकानगरींतील राक्षसांचा वध केलाच आहे असें आपण समजा ३०. अंगद, द्विविद, मैंद, जांबवान्, पनस, नल आणि सेनापति नील हे असतांना अवशिष्ट राहिलेलें सैन्य नेऊन कर्तव्य काय आहे ? ३१. हे राघवा, उड्डाण करणारे हे वानर रावणाच्या त्या महानगरीप्रत जातील. पर्वत, वनें, खंदक व कमानी ह्यांसह-वर्तमान तिचा विध्वंसही करितील किंवा कोट व घरें ह्यांसहवर्तमान ती नगरी येथें घेऊनही येतील ३२. सारांश, ह्याप्रमाणें आपण सत्वर आज्ञा करा म्हणजे झालें आणि आपणांला जर सर्व सैन्य बरोबर घेणें असेल तर सुमुहूर्तावरच आपण निघण्याचा बेत करा ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यां-तील युद्धकांडांपैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

हनुमानानें केलेलें भाषण अनुक्रमें इत्थंभूत श्रवण करून महातेजस्वी व सत्यपरा-क्रमी राम त्याला म्हणाला १ "क्रूर राक्षसाच्या ह्या लंकानगरीचा मी सत्वर विध्वंस करून टाकीन असें जें तूं मला सांगत आहेस तें सत्य आहे; तथापि, मी आपलें मत तुला सांगतों २. हे सुग्रीवा, ह्या मुहूर्तावर तूं प्रयाण करण्याचें मनामध्यें आण. कारण, सांप्रत सूर्य मध्यान्हीं आला असल्यामुळें विजय मुहूर्त आहे ३. सीतेला हरण करून त्या राक्षसाला हवें तिकडे जाऊं दे; परंतु, माझ्या हातून हा कोठें वरं

भीममग्रानीकं महाबलाः । कपिसिंहाः प्रकर्षन्तु शतशोऽथ सहस्रशः १५
गजश्च गिरिसंकाशो गवयश्च महाबलः । गवाक्षश्चाग्रतो यातु गवां
दृप्त इवर्षभः १६ यातु वानरवाहिन्या वानरः प्लवतां पतिः । पालयन्द-
क्षिणं पार्श्वमृषभो वानरर्षभः १७ गन्धहस्तीव दुर्धर्षस्तरस्वी गन्धमादनः
यातु वानरवाहिन्याः सव्यं पार्श्वमधिष्ठितः १८ यास्यामि बलमध्येऽहं
बलौघमभिहर्षयन् । अधिरुह्य हनूमन्तमैरावतमिवेश्वरः १९ अङ्गदेनैष
संयातु लक्ष्मणश्चान्तकोपमः । सार्वभौमेन भूतेशो द्रविणाधिपतिर्यथा २०
जाम्बवांश्च सुषेणश्च वेगदर्शी च वानरः । ऋक्षराजो महाबाहुः कुक्षिं
रक्षन्तु ते त्रयः २१ राघवस्य वचः श्रुत्वा सुग्रीवो वाहिनीपतिः । व्यादि-
देश महावीर्यो वानरान्वानरर्षभः २२ ते वानरगणाः सर्वे समुत्पत्य महौ-
जसः । गुहाभ्यः शिखरेभ्यश्च आशु पुप्लुविरे तदा २३ ततो वानरराजेन
लक्ष्मणेन च पूजितः । जगाम रामो धर्मात्मा ससैन्यो दक्षिणां दिशम् २४
शतैः शतसहस्रैश्च कोटिभिश्चायुतैरपि । वारणाभैश्च हरिभिर्ययौ

---

ओघाप्रमाणें असलेलें भयंकर श्रेष्ठ सैन्य बरोबर घेऊन शेंकडों हजारों श्रेष्ठ वानरांनी जाऊं द्या १५. पर्वतप्राय गज, महाबलाढ्य गवय आणि माईनील मत्त बैलाप्रमाणें असलेला गवाक्ष ह्यांना पुढें जाऊं द्या १६. उड्डाण करणाऱ्यांचा अधिपति जो वानरश्रेष्ठ ऋषभनामक वानर तो वानरसेनेच्या दक्षिण बाजूनें रक्षण करीत करीत जाऊं द्या १७. मत्त गजाप्रमाणें ज्याच्यापुढें जाणेंही अशक्य आहे असा वेगवान् गंधमादन वानर वानरसेनेची डावी बाजू रक्षण करून जाऊं द्या १८. ऐरावतावर आरूढ होणाऱ्या इंद्राप्रमाणें हनुमानावर आरूढ होऊन मी सेनासमूहाला हर्षवीत हर्षवीत सैन्याच्या मध्यभागीं राहून जाईन १९. सार्वभौम दिग्गजावर आरूढ होऊन ज्याप्रमाणें धनाधिपति कुबेर गमन करितो त्याप्रमाणें ( शत्रूला ) मृत्युतुल्य असलेल्या ह्या लक्ष्मणानें अंगदावर आरूढ होऊन जावें २०. महापराक्रमी ऋक्षराज-जांबवान्, सुषेण आणि वेगदर्शी वानर ह्या तिघांनीं सैन्याच्या पिछाडीचें रक्षण करावें " २१. रामाचें हें भाषण श्रवण करून महावीर्यवान् व सेनापति वानरश्रेष्ठ सुग्रीवानें सैन्याला आज्ञा केली २२. तेव्हां त्या सर्वही महाबलाढ्य वानरगणांनीं उड्डाण केलें आणि गुहांपासून व शिखरांपासून ते सत्वर उड्डाण करीत चालले २३. तदनंतर वानरराज सुग्रीव आणि लक्ष्मण ह्यांनीं ज्याच्या भाषणाचा आदर केलेला आहे तो धर्मात्मा राम सैन्यासहवर्तमान दक्षिणदिशेस निघाला असतां २४ शंभर शंभर, दहा दहा हजार, लाख लाख आणि कोट कोट अशा गजतुल्य वानरांच्या टोळ्या त्याच्या

परिवृतस्तदा २५ तं यान्तमनुयान्ती सा महती हरिवाहिनी । हृष्टाः प्रमुदिताः सर्वे सुग्रीवेणापि पालिताः २६ आप्लवन्तः प्लवन्तश्च गर्जन्तश्च प्लवङ्गमाः । क्ष्वेलन्तो निनदन्तश्च जग्मुर्वै दक्षिणां दिशम् २७ भक्षयन्तः सुगन्धीनि मधूनि च फलानि च । उद्वहन्तो महावृक्षान्मञ्जरीपुञ्जधारिणः २८ अन्योन्यं सहसा दृप्ता निर्वहन्ति क्षिपन्ति च । पतन्तश्चोत्पतन्त्यन्ये पातयन्त्यपरे परान् २९ रावणो नो निहन्तव्यः सर्वे च रजनीचराः । इति गर्जन्ति हरयो राघवस्य समीपतः ३० पुरस्तादृषभो नीलो वीरः कुमुद एव च । पन्थानं शोधयन्ति स्म वानरैर्बहुभिः सह ३१ मध्ये तु राजा सुग्रीवो रामो लक्ष्मण एव च । बलिभिर्बहुभिर्भीमैर्वृतः शत्रुनिबर्हणः ३२ हरिः शतबलिर्वीरः कोटिभिर्दशभिर्वृतः । सर्वामेको ह्यवष्टभ्य ररक्ष हरिवाहिनीम् ३३ कोटीशतपरीवारः केसरी पनसो गजः । अर्कश्च बहुभिः पार्श्वमेकं तस्याभिरक्षति ३४ सुषेणो जाम्बवांश्चैव ऋक्षै-

---

बरोबर होत्या २५. सारांश, तो जाऊं लागला असतां त्याच्या मागोमाग ती प्रचंड वानरसेना जाऊं लागली. ( रामानें व ) सुग्रीवानेंही रक्षण केलें असल्यामुळें सर्वही वानर हर्षयुक्त व आनंदित झाले २६; आणि सेनेच्या रक्षणाकरितां सभोंवतीं हिंडणारे व मार्गशोधनाकरितां अग्रभागीं गमन करणारे असे वानर उड्या मारीत, सिंहनाद करीत व सामान्य गर्जना करीत करीत दक्षिणदिशेकडे चालले २७. जातां जातां सुगंधी मधु व फळें ते खाऊं लागले आणि मोठ्या मोठ्या वृक्षांवर चढून त्यांवरील पुष्पगुच्छही हातांत घेऊं लागले २८. त्याचप्रमाणें ते मत्त वानर जातां जातां ( विनोदानें ) एकमेकाला एकदम, उचलून वाहून नेऊं लागले, एकमेकाला खालींही टाकून देऊं लागले, कोणी उड्या न मारितां भूमीवरून नुसते चालतच जाऊं लागले, कोणी उड्या टाकीत जाऊं लागले आणि कोणी जातां जातां दुसऱ्यांना पाडूं लागले २९. "रावणाचा आणि त्याचप्रमाणें सर्व राक्षसांचा आम्हांला वध करणें आहे" असें ते वानर रामासमीप गर्जना करूं लागले ३०. सैन्याच्या अग्रभागीं पुष्कळ वानर बरोबर घेऊन ऋषभ, नील आणि वीर कुमुद मार्ग शोधीत शोधीत चालले ३१. शत्रुनाशक राम, लक्ष्मण व राजा सुग्रीव अनेक भयंकर वानरांनीं परिवेष्टित होऊन सैन्याच्या मध्यभागीं राहिले ३२. शतबली वानरवीर दहा कोटि वानरांनीं परिवेष्टित होता आणि सर्व वानरसेना आवरून धरून त्यानें एकट्यानेंच तिचें रक्षण केलें होतें ३३. शंभर कोटि वानर बरोबर घेऊन केसरी व पनस आणि गज व अर्क असे हे चौघे त्या सैन्याच्या एका बाजूचें रक्षण करीत होते ३४. अनेक ऋक्षांनीं परिवेष्टित असलेले सुषेण

र्जाम्बवान् सुग्रीवं पुरतः कृत्वा जघनं संररक्षतुः ३५ तेषां सेनाप-
तिर्वीरो नीलो वानरपुङ्गवः । संपतश्वरतो श्रेष्ठस्तद्बलं पर्यवारयत् ३६
वलीमुखः प्रजङ्घश्च जम्भोऽथ रभसः कपिः । सर्वतश्च ययुर्वीरास्त्वरयन्तः
प्लवङ्गमान् ३७ एवं ते हरिशार्दूला गच्छन्ति बलदर्पिताः । अपश्यन्स्ते
गिरिश्रेष्ठं सह्यं गिरिशतायुतम् ॥ सरांसि च सुफुल्लानि तटाकानि
वराणि च ३८ रामस्य शासनं ज्ञात्वा भीमकोपस्य भीतवत् । वर्जयन्न-
गराभ्याशांस्तथा जनपदानपि ३९ सागरौघनिभं भीमं तद्वानरबलं महत् ।
निःससर्प महाघोरं भीमघोषमिवार्णवम् ४० तस्य दाशरथेः पार्श्वे
शूरास्ते कपिकुञ्जराः । तूर्णमापुप्लुवुः सर्वे सदश्वा इव चोदिताः ४१
कपिभ्यामुह्यमानौ तौ शुशुभाते नरर्षभौ । महद्भ्यामिव संस्पृष्टौ ग्रहाभ्यां
चन्द्रभास्करौ ४२ ततो वानरराजेन लक्ष्मणेन सुपूजितः । जगाम रामो
धर्मात्मा ससैन्यो दक्षिणां दिशम् ४३ तमङ्कगतो रामं लक्ष्मणः शुभया
गिरा । उवाच परिपूर्णार्थं पूर्णार्थप्रतिमानवान् ४४ हतामवाप्य वैदेहीं

---

व जांबवान् सुग्रीवाला पुढें करून सैन्याच्या पृष्ठभागाचें रक्षण करीत होते ३५. गमन करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असा त्यांचा सेनाधिपति वानरश्रेष्ठ वीर नील वक्ष राहून त्या सैन्यासोंवतीं हिंडत हिंडत चालला होता ३६; आणि वलीमुख, प्रजंघ, जंभ व रभस वानर हे वीर सर्व बाजूंनीं वानरांना त्वरा करीत करीत चालले होते ३७. याप्रमाणें सामर्थ्यामुळें वेगवान असलेले ते वानरश्रेष्ठ जाऊं लागले; तों जातां जातां लहान लहान शेंकडों पर्वतांनीं युक्त असा सह्य-नामक श्रेष्ठ पर्वत त्यांनीं अवलोकन केला आणि त्याचप्रमाणें प्रफुल्लित सरोवरें व उत्कृष्ट नद्यांनांही त्यांनीं अवलोकन केलीं ३८. भयंकर कोपानें युक्त असलेल्या रामाची आज्ञा लक्ष्यांत घेऊन त्याची भीति बाळगणारें तें समुद्रतुल्य व प्रचंड भयंकर वानरसैन्य नगरासमीप असलेले प्रदेश आणि त्याचप्रमाणें लोकवस्तीचे देश वर्ज्य करीत करीत पुढें चाललें असतां भयंकर गर्जनेनें युक्त असलेला महाघोर समुद्रच की काय असें दिसूं लागलें ३९,४०. इशारा केला असतां जातिवंत अश्व जसे सत्वर चालूं लागतात तसे ते शूर वानरश्रेष्ठ दाशरथि रामाच्या बाजूनें सत्वर जाऊं लागले ४१. त्या उचलतां पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांना अनुक्रमें हनुमान् व अंगद घेऊन चालले असतां अर्धबिंबापर्यंत राहुकेतुसंज्ञक महाग्रहांनीं स्पर्श केलेल्या सूर्यचंद्रांप्रमाणें दिसूं लागले ४२. तदनंतर वानरराज सुग्रीव आणि लक्ष्मण ह्यांना अतिशय मान्य असलेला धर्मात्मा राम सैन्यासहवर्तमान दक्षिणदिशेस चालू लागला असतां ४३ सुचिन्हांवरून कार्यसिद्धि

क्षिप्रं हत्वा च रावणम्। समृद्धार्थः समृद्धार्थामयोध्यां प्रतियास्यसि ४५
महान्ति च निमित्तानि दिवि भूमौ च राघव। शुभानि तव पश्यामि सर्वा-
ण्येवार्थसिद्धये ४६ अनुवाति शिवो वायुः सेनां मृदुहितः सुखः। पूर्ण-
वल्गुस्वराश्चेमे प्रवदन्ति मृगद्विजाः ४७ प्रसन्नाश्च दिशः सर्वा विमलश्च
दिवाकरः। उशना च प्रसन्नार्चिरनु त्वां भार्गवो गतः ४८ ब्रह्मराशिर्विशु-
द्धश्च शुद्धाश्च परमर्षयः। अर्चिष्मन्तः प्रकाशन्ते ध्रुवं सर्वे प्रदक्षिणम् ४९
त्रिशङ्कुर्विमलो भाति राजर्षिः सपुरोहितः। पितामहः पुरोऽस्माकमि-
क्ष्वाकूणां महात्मनाम् ५० विमले च प्रकाशेते विशाखे निरुप-
द्रवे। नक्षत्रं परमस्माकमिक्ष्वाकूणां महात्मनाम् ५१ नैर्ऋतं नैर्ऋतानां
च नक्षत्रमतिपीड्यते। मूलो मूलवता स्पृष्टो धूप्यते धूमकेतुना ५२
सर्वं चैतद्विनाशाय राक्षसानामुपस्थितम्। काले कालगृहीतानां नक्षत्रं
ग्रहपीडितम् ५३ प्रसन्नाः सुरसाश्चापो वनानि फलवन्ति च। प्रवान्ति
नाधिका गन्धा यथर्तुकुसुमा द्रुमाः ५४ व्यूढानि कपिसैन्यानि प्रकाशन्ते-

---

झाल्याचें जाणणारा लक्ष्मण अंगदावर आरूढ झाला असतांना शुभ वाणीनें रामाशीं अर्थपरिपूर्ण भाषण करूं लागला ४४. (तो ह्मणाला) "रावणानें हरण करून नेलेली वैदेही प्राप्त करून घेऊन आणि रावणाचा सत्वर वध करून मनोरथ परिपूर्ण झालेले असे आपण सत्वर सर्व गोष्टींनीं परिपूर्ण असलेल्या अयोध्येमध्यें जाल ४५. कारण, हे राघवा, स्वर्गामध्यें आणि भूमीवर होत असलेले हे मोठे मोठे शुभ शकुन सर्वच कार्यसिद्धि सुचविणारे आहेत असें मला वाटतें ४६. मंद शीतल आणि सुखकारी असा हितावह वायु सेनेच्या पृष्ठभागानें वहात आहे; ज्यांचा स्वर विघ्नरहित व कानाला मधुर आहे असे हे मृगपक्षी शब्द करीत आहेत ४७; सर्व दिशा प्रसन्न झालेल्या आहेत; सूर्य निर्मल झालेला आहे; भृगुपुत्र शुक्र निर्मल किरणांनीं युक्त असून तुम्हाला अनुकूल आहे ४८; ध्रुव निर्मल आहे; ध्रुवाला प्रदक्षिणा करणारे सर्वही सप्तर्षि निर्मल व किरणांनीं युक्त होऊन प्रकाशत आहेत ४९; महात्म्या इक्ष्वाकूंचा पूर्वज जो त्रिशंकु राजर्षि तो आमच्या पुढें पुरोहितासह वर्तमान निर्मल प्रकाशत आहे ५०; आह्मां महात्म्या इक्ष्वा-कूंचें विशाखा हें जें कुलनक्षत्र त्याचे दोन्हीही तारे निर्मल व उपद्रवरहित प्रकाशत आहेत ५१. राक्षसांचें जें मूलसंज्ञक नैर्ऋत नक्षत्र तें अतिशयच पीडित झालेलें आहे आणि पुच्छयुक्त धूमकेतूच्या योगानें तें नक्षत्र स्पृष्ट झालें असून संतप्त होत आहे ५२. हें सर्वही राक्षसांच्या विनाशाकरितांच उपस्थित झालें आहे. कारण, अंतकालीं मृत्युवश झालेल्यांचें नक्षत्र ग्रहपीडित होत असतें ५३. उदक निर्मल व मधुर आहे; वनें

धिकं प्रभो । देवानामिव सैन्यानि सङ्ग्रामे तारकामये ५५ एवमार्य समीक्ष्यैतत्प्रीतो भवितुमर्हसि । इति भ्रातरमाश्वास्य हृष्टः सौमित्रिरब्रवीत् ५६ अथावृत्य महीं कृत्स्नां जगाम हरिवाहिनी । ऋक्षवानरशार्दूलैर्नखदंष्ट्रायुधैरपि ५७ कराग्रैश्चरणाग्रैश्च वानरैरुद्धुतं रजः । भीममन्तर्दधे लोकं निवार्य सवितुः प्रभाम् ५८ सपर्वतवनाकाशां दक्षिणां हरिवाहिनी । छादयन्ती ययौ भीमा द्यामिवाम्बुदसंततिः ५९ उत्तरन्त्याश्च सेनायाः सततं बहुयोजनम् । नदीस्रोतांसि सर्वाणि सस्यन्दुर्विपरीतवत् ६० सरांसि विमलाम्भांसि द्रुमाकीर्णांश्च पर्वतान् । समान्भूमिप्रदेशांश्च वनानि फलवन्ति च ६१ मध्येन च समन्ताच्च तिर्यक्चाधश्च साविशत् । समावृत्य महीं कृत्स्नां जगाम महती चमूः ६२ ते हृष्टवदनाः सर्वे जग्मुर्मारुतरंहसः । हरयो राघवस्यार्थे समारोपितविक्रमाः ६३ हर्षं वीर्यं बलोद्रेकान्दर्शयन्तः परस्परम् । यौवनोत्सेकजान्दर्पान्विविधांश्चक्रुरध्वनि ६४

फलयुक्त आहेत; वायु मंद व सुगंधयुक्त वहात आहे; वृक्ष ऋतुमानाप्रमाणें पुष्पित झाले आहेत ५४; व, हे प्रभो, सज्ज होऊन चाललेल्या वानरसेना तारकासुराशीं उपस्थित झालेल्या संग्रामाचे वेळीं चाललेल्या देवसैन्यांप्रमाणें अधिक अधिकच प्रकाशत आहेत ५५. हे आर्य, हें अवलोकन करून आपण उल्हास धरा. ह्याप्रमाणें आश्वासनपूर्वक सुमित्रापुत्र लक्ष्मण आनंदानें भ्रात्याला ह्मणाला ५६. तदनंतर नखं व दंष्ट्रा हींच ज्यांचीं आयुधें आहेत अशा श्रेष्ठ श्रेष्ठ ऋक्षवानरांसहवर्तमान ती वानरसेना संपूर्ण पृथ्वी व्याप्त करून चालली असतां ५७ जातां जातां वानरांच्या हातांपायांच्या पुढांनीं भयंकर धूळ उडाल्यामुळें सूर्याची प्रभा कुंठित झाली आणि भूप्रदेश दिसेनासा झाला ५८. मेघपंक्ति ज्याप्रमाणें आकाश आच्छादित करून जाऊं लागते त्याप्रमाणें पर्वत, वनें व आकाश ह्यांसहवर्तमान दक्षिणदिशा आच्छादित करीत करीत ती प्रचंड वानरसेना पुढें चालली ५९. अनेक योजनेंपर्यंत एकसारिखी असलेली सेना उतरून जाऊं लागली असतां सर्वही नद्यांचे प्रवाह ( दाटादाटीनें चाललेल्या सैन्याच्या क्षोभानें कुंठित झाल्यामुळें ) उलट दिशेनें वाहूं लागले ६०. निर्मल जलानें युक्त असलेलीं सरोवरें, वृक्षांनीं व्याप्त झालेले पर्वत, सपाट भूप्रदेश आणि फलयुक्त वनें ६१, ह्यांच्या मध्यें, आसमंतातद्भागीं, अधोभागीं व ऊर्ध्वभागीं वास्तव्य करून ती प्रचंडसेना निकडील संपूर्ण पृथ्वी व्याप्त करून पुढें चालली ६२. आनंदित मुद्रेनें युक्त असलेले ते सर्वही वानर वायुवेगानें जाऊं लागले आणि रामाकरितां मोठे मोठे पराक्रम करण्याविषयीं प्रतिज्ञाही त्यांनीं

तत्र केचिद्द्रुतं जग्मुरुत्पेतुश्च तथापरे। केचित्किलकिलां चक्रुर्वानरा
वनगोचराः ६५ प्रास्फोटयंश्च पुच्छानि संनिजघ्नुः पदान्यपि। भुजा-
न्विक्षिप्य शैलांश्च द्रुमानन्ये बभञ्जिरे ६६ आरोहन्तश्च शृङ्गाणि गिरीणां
गिरिगोचराः। महानादान्प्रमुञ्चन्ति क्ष्वेडामन्ये प्रचक्रिरे ६७ ऊरुवेगैश्च
ममृदुर्लताजालान्यनेकशः। जृम्भमाणाश्च विक्रान्ता विचिक्रीडुः शिला-
द्रुमैः ६८ ततः शतसहस्रैश्च कोटिभिश्च सहस्रशः। वानराणां सुघोराणां
श्रीमत्परिवृता मही ६९ सा स्म याति दिवारात्रं महती हरिवाहिनी।
प्रहृष्टमुदिताः सर्वे सुग्रीवेणाभिपालिताः ७० वानरास्त्वरिता यान्ति सर्वे
युद्धाभिनन्दिनः। प्रमोक्षयिषवः सीतां मुहूर्तं क्वापि नावसन् ७१ ततः
पादपसंबाधं नानावनसमायुतम्। सह्यपर्वतमासाद्य वानरास्ते समारु-
हन् ७२ काननानि विचित्राणि नदीप्रस्रवणानि च। पश्यन्नपि ययौ रामः
सह्यस्य मलयस्य च ७३ चम्पकांस्तिलकांश्चूतानशोकान्सिन्दुवारकान्।

---

केल्या ६३. त्या वानरांचे ठिकाणीं अतिशय बल असल्यामुळें हास्यपूर्वक ते एकमे-
कांला आपआपलें सामर्थ्य दर्शवूं लागले आणि अंगांत स्मरमत असलेल्या तारुण्याच्या
मदानें जातां जातां ते मार्गामध्यें इतरही नानाप्रकारचे चाळे करूं लागले ६४. त्या
सैन्यामध्यें कांहींजण त्वरेत्वरेनें चालतच जाऊं लागले; कांहीं उड्या टाकीत टाकीत
जाऊं लागले; वनामध्यें वास्तव्य करणारे कांहीं वानर किलकिल शब्द करूं लागले ६५;
कांहींजण पुच्छें भूमीवर हपटूं लागले; कांहीं पाय हापटून चालूं लागले; कांहींजण
जातां जातां हात लांब करून पर्वत फोडूं लागले; कांहीं वृक्षच मोडूं लागले ६६; पर्व-
तावर रहाणारे कांहीं वानर जातां जातां पर्वतांच्या शिखरांवर आरोहण करूं लागले;
कांहींजण मोठ्या मोठ्या गर्जना करूं लागले; कांहींजण सिंहनाद करूं लागले ६७.
आपल्या पायांच्या वेगांनीं कित्येक वानर जातां जातां लतासमुदायाचें मर्दन करूं लागले;
कांहींजण जांभया देत चालले आणि कांहीं पराक्रमी वानर पाषाण व वृक्ष यांबरोबर
क्रीडा करूं लागले ६८. सारांश, अत्यंत घोर व भव्य अशा हजारों, लाखों, कोटों वान-
रांनीं तिकडील भूप्रदेश व्याप्त होऊन गेला ६९ आणि ती प्रचंड वानरसेना रात्रंदिवस
चालूं लागली. सुग्रीवानें ज्यांचें रक्षण केलेलें आहे असे ते सर्वही वानर हर्षयुक्त व
आनंदयुक्त होऊन ७० आणि सर्वही युद्धाचा उत्साह बाळगून सत्वर जाऊं लागले;
आणि सीतेला सोडवून आणण्याविषयीं उत्सुक असल्यामुळें मुहूर्तभर देखील ते कोठें
मध्यंतरीं थांबेनासे झाले ७१. तदनंतर वृक्षांनीं आणि नानाप्रकारच्या वनांनीं [illegible]-
[illegible] सह्याद्रीसमीप आल्यावर त्या वानरांनीं त्याच्यावर आरोहण केलें ७२; आणि

तिनिशान्करवीरांश्च भजन्ति स्म प्लवङ्गमाः ७४ अशोकांश्च करञ्जांश्च प्लक्षन्यग्रोधपादपान् । जम्बुकामलकांश्चागान्भजन्ति स्म प्लवङ्गमाः ७५ प्रस्तरेषु च रम्येषु विविधाः काननद्रुमाः । वायुवेगप्रचलिताः पुष्पैरव-किरन्ति तान् ७६ मारुतः सुखसंस्पर्शो वाति चन्दनशीतलः । षट्पदैरनु-कूजद्भिर्वनेषु मधुगन्धिषु ७७ अधिकं शैलराजस्तु धातुभिस्तु विभूषितः। धातुभ्यः प्रसृतो रेणुर्वायुवेगेन घट्टितः ॥ सुमहद्वानरानीकं छादयामास सर्वतः ७८ गिरिप्रस्थेषु रम्येषु सर्वतः संप्रपुष्पिताः । केतक्यः सिन्दुवा-राश्च वासन्त्यश्च मनोरमाः ७९ माधव्यो गन्धपूर्णाश्च कुन्दगुल्माश्च पुष्पिताः । चिरिबिल्वा मधूकाश्च वञ्जुला बकुलास्तथा ८० रञ्जकास्ति-लकाश्चैव नागवृक्षाश्च पुष्पिताः । चूताः पाटलिकाश्चैव कोविदाराश्च पुष्पिताः ८१ मुचुलिन्दार्जुनाश्चैव शिंशपाः कुटजास्तथा । हिन्तालास्ति-निशाश्चैव चूर्णका नीपकास्तथा ८२ नीलाशोकाश्च सरला अङ्कोलाः पद्मकास्तथा । प्रीयमाणैः प्लवङ्गैस्तु सर्वे पर्याकुलीकृताः ८३ वाप्य-स्तस्मिन्गिरौ रम्याः पल्वलानि तथैव च । चक्रवाकानुचरिताः कार-ण्डवनिषेविताः ८४ प्लवैः क्रौञ्चैश्च संकीर्णा वराहमृगसेविताः ।

---

रामही सह्याद्रीवरील व मलयपर्वतावरील चित्रविचित्र वनें आणि नदीप्रवाह अवलो-कन करीत कपींसह चालला ७३. चंपक, तिलक, आम्र, प्रसेक, निर्गुंडी, तिवस, आणि करवीर या वृक्षांवर वानर बसले ७४; व कांहीं अशोक, करंज, प्लक्ष, वट, जंबु आणि आमलक या वृक्षांवर बसले ७५. मनोहर पाषाणांवर असलेले नानाप्रकारचे वनांतील वृक्ष वायुवेगानें कंपित झाले असतां त्या वानरांवर पुष्पवृष्टि करूं लागले ७६. सुगंधानें युक्त असलेल्या त्या वनामध्यें भ्रमर गुंजारव करूं लागले असतां वायुही चंदनासारिखा शीतल व सुखावह वाहूं लागला ७७. तो पर्वतराज धातूंच्या योगानें अतिशयच भूषित झालेला होता. वायुवेगाचा तडाका बसल्यामुळें धातूंपासून निघा-लेल्या रजःकणांनीं तें प्रचंड वानरसैन्य सर्वस्वीं आच्छादित करून टाकिलें ७८. केतकी, निर्गुंडी आणि मनोहर मोगरे सर्व बाजूंनीं त्या रमणीय पर्वतशिखरांवर प्रफुल्लित झाले होते ७९. सुगंधी मोगरे, प्रफुल्लित कुंदाचीं झुडपें, करंज, मोहा, अंबाडा, बकुल ८०, रजक, तिळवा, प्रफुल्लित नागचाफे, आंब, पाडळी, प्रफुल्लित कांचन ८१, मुचुलिंद, अर्जुन, शिसवें, कुडे, हिंताल, तिवस, चूर्णक, कळंब ८२, नील अशोक, सुरु, अंकोल आणि पद्मक हे सर्वही वृक्ष आनंदित झालेल्या वानरांनीं अगदीं हलवून सोडिले ८३. त्या पर्वतावरील रम्य वापी व सरोवरें हीं चक्रवाक आणि कारंडव पक्ष्यांनीं युक्त होतीं ८४

ऋक्षैस्तरक्षुभिः सिंहैः शार्दूलैश्च भयावहैः ८५ व्यालैश्च बहुभिर्भीमैः सेव्य-
मानाः समन्ततः । पद्मैः सौगन्धिकैः फुल्लैः कुमुदैश्चोत्पलैस्तथा ८६
वारिजैर्विविधैः पुष्पै रम्यास्तत्र जलाशयाः । तस्य सानुषु कूजन्ति
नाना द्विजगणास्तथा ८७ स्नात्वा पीत्वोदकान्यत्र जले क्रीडन्ति वानराः।
अन्योन्यं प्लावयन्ति स्म शैलमारुह्य वानराः ८८ फलान्यमृतगन्धीनि
मूलानि कुसुमानि च । बभञ्जुर्वानरास्तत्र पादपानां मदोत्कटाः ८९
द्रोणमात्रप्रमाणानि लम्बमानानि वानराः । ययुः पिबन्तः स्वस्थास्ते
मधूनि मधुपिङ्गलाः ९० पादपानवभञ्जन्तो विकर्षन्तस्तथा लताः । विध-
मन्तो गिरिवरान्प्रययुः प्लवगर्षभाः ९१ वृक्षेभ्योऽन्ये तु कपयो नर्दन्तो
मधुदर्पिताः । अन्ये वृक्षान्प्रपद्यन्ते प्रपतन्त्यपि चापरे ९२ बभूव वसुधा
तैस्तु संपूर्णा हरिपुङ्गवैः । यथा कलमकेदारैः पक्वैरिव वसुंधरा ९३
महेन्द्रमथ संप्राप्य रामो राजीवलोचनः । आरुरोह महाबाहुः शिखरं
द्रुमभूषितम् ९४ ततः शिखरमारुह्य रामो दशरथात्मजः । कूर्ममीन-

पुत्र आणि क्रौंच पक्ष्यांनीं तो व्याप्त असून वराह व मृग ह्यांनीं त्याचा आश्रय केला
होता; आणि त्याचप्रमाणें अस्वलें, तरस, सिंह, भयंकर वाघ ८५ व अनेक
भयंकर सर्प हे त्यांच्या सभोंवतीं रहात होते. प्रफुल्लित पद्म, सौगंधिक, कुमुद, उत्पल
इत्यादि नानाप्रकारच्या कमलांनीं ८६ आणि उदकामध्यें उत्पन्न होणाऱ्या दुसऱ्या
नानाप्रकारच्या पुष्पांनीं त्या महेंद्रासमीप असलेले जलाशय रम्य झाले होते; आणि
नानाप्रकारचे पक्षिगण त्याच्या शिखरावर मधुर स्वर करीत होते ८७ वानर उदका-
मध्यें स्नान करून व जलपान करून क्रीडा करूं लागले आणि पर्वतावर आरोहण
करून एकमेकांना उचलून पाण्यांत टाकूं लागले ८८ वृक्षांवरील अमृततुल्य स्वादिष्ट
फलें, पुष्पें आणि वृक्षांचीं मुळें खातांना ते मदोन्मत्त वानर त्यांचा विध्वंस करूं
लागले ८९. अर्धा अर्धा मणापर्यंत ज्यांमध्यें मध असण्याचा संभव आहे अशा लोंब-
णाऱ्या मोहोळांच्या पोळ्यांतील मध सेवन करून स्वस्थ झालेले ते वानर ९० वृक्ष मोडूं
लागले, लता ओढूं लागले आणि ते वानरश्रेष्ठ पर्वतावरील मोठमोठ्या शिळा
टेकड्यांहीं उडवीत उडवीत जाऊं लागले ९१. मधुप्राशनानें मत्त झालेले
कांहीं वानर वृक्षावरून गर्जना करूं लागले; दुसरे वृक्षावर उड्या मारूं
लागले आणि कांहीं तसेच मधुप्राशनच करूं लागले ९२. पक्व झालेल्या
साळीच्या शेतांनीं ज्याप्रमाणें पृथ्वी भरून जाते त्याप्रमाणें त्या वानरश्रेष्ठांनीं ती पृथ्वी
भरून गेली ९३. महापराक्रमी कमलनयन राम महेंद्रपर्वतानजीक आल्यावर वृक्षांनीं

समाकीर्णमपश्यत्सलिलाकुलम् ९५ ते सह्यं समतिक्रम्य मलयं च महा-
गिरिम् । आसेदुरानुपूर्व्येण समुद्रं भीमनिःस्वनम् ९६ अवरुह्य जगा-
माशु वेलावनमनुत्तमम् । रामो रमयतां श्रेष्ठः ससुग्रीवः सलक्ष्मणः ९७
अथ धौतोपलतलां तोयौघैः सहसोत्थितैः । वेलामासाद्य विपुलां रामो
वचनमब्रवीत् ९८ एते वयमनुप्राप्ताः सुग्रीव वरुणालयम् । इहेदानीं विचिन्ता
सा या नः पूर्वमुपस्थिता ९९ अतः परमतीरोऽयं सागरः सरितां पतिः ।
न चायमनुपायेन शक्यस्तरितुमर्णवः १०० तदिहैव निवेशोऽस्तु मन्त्रः
प्रस्तूयतामिह । यथेदं वानरबलं परं पारमवाप्नुयात् १ इतीव स महा-
बाहुः सीताहरणकर्शितः । रामः सागरमासाद्य वासमाज्ञापयत्तदा २
सर्वाः सेना निवेश्यन्तां वेलायां हरिपुङ्गव । संप्राप्तो मन्त्रकालो नः सागर-
स्येह लङ्घने ३ स्वां स्वां सेनां समुत्सृज्य मा च कश्चित्कुतो व्रजेत् ।

पुष्पित झालेल्या शिखरावर आरूढ झाला ९४; आणि शिखरावर आरोहण करून
त्या दशरथपुत्र रामानें मत्स्यकूर्मांनीं गजबजलेला व उदकानें भरलेला समुद्र अवलो-
कन केला ९५. ते वानर सह्याचल आणि मलयसंज्ञक महापर्वत उल्लंघन गेल्यानंतर
भयंकर गर्जना करीत असलेल्या समुद्रासमीप सैन्याच्या पद्धतीनें बसले ९६. महेंद्रप-
र्वतावरून उतरल्यावर आल्हाद देणाऱ्यामध्यें श्रेष्ठ असलेला राम, सुग्रीव आणि लक्ष्मण
ह्यांसहवर्तमान समुद्रतीरावरील अनुपम वनामध्यें सत्वर प्रविष्ट झाला ९७. नंतर
एकदम उसळलेल्या लाटांमुळें ज्याच्यावरील पाषाण धुवून गेलेले आहेत
अशा त्याच्या त्या प्रचंड तीरावर आल्यानंतर राम ह्मणाला ९८ " हे सुग्रीवा, हे
आपण समुद्रावर आलों. पूर्वी जी आपणाला चिंता पडली होती ती आतां प्राप्त
झाली आहे ९९. येथून ह्या नदीपति समुद्राच्या तीराचा पुढें थांग नाहीं आणि
ह्मणूनच कांहीं तरी उपाय योजिल्यावांचून हा समुद्र तरून जातां येणें शक्य
नाहीं १००. तस्मात्, आज येथेंच मुक्काम होऊं द्या आणि हें वानरसैन्य परतीराला
कोणत्या उपायानें जाईल ह्याचा येथ विचार होऊं द्या " १. ह्याप्रमाणें सीतेचा अप-
हार झाल्यामुळें कृश झालेल्या महापराक्रमी रामानें समुद्रासमीप आल्यावर तेथेंच
वास्तव्य करण्याची सैन्याला आज्ञा दिली २. (आणि तो ह्मणाला) ' हे वानरश्रेष्ठ
सुग्रीवा, समुद्राच्या तीरावरच आज सर्व सैन्यांचा तळ पडूं द्या. कारण, समुद्र उल्लंघन कर-
ण्याविषयीं आपणांला विचार करण्याचा समय येथें प्राप्त झाला आहे ३. आपआपली
सेना सोडून कोणीही कोठें जाऊं नये. शूर वानर सेनांच्या रक्षणाकरितां चारी
दिशेस तयारीनें असूं द्या. कारण, राक्षसांनीं आपणांकरितां येथें कांहीं

गच्छन्तु वानराः शूरा ज्ञेयं छन्नं भयं च नः ४ रामस्य वचनं श्रुत्वा सुग्रीवः सहलक्ष्मणः । सेनां निवेशयत्तीरे सागरस्य द्रुमायुते ५ विरराज समीपस्थं सागरस्य च तद्बलम् । मधुपाण्डुजलः श्रीमान्द्वितीय इव सागरः ६ वेलावनमुपागम्य ततस्ते हरिपुङ्गवाः । निविष्टाश्च परं पारं काङ्क्षमाणा महोदधेः ७ तेषां निविशमानानां सैन्यसन्नाहनिःस्वनः । अन्तर्धाय महानादमर्णवस्य प्रशुश्रुवे ८ सा वानराणां ध्वजिनी सुग्रीवेणाभिपालिता । त्रिधा निविष्टा महती रामस्यार्थपराभवत् ९ सा महार्णवमासाद्य हृष्टा वानरवाहिनी । वायुवेगसमाधूतं पश्यमाना महार्णवम् १० दूरपारमसंबाधं रक्षोगणनिषेवितम् ११ पश्यन्तो वरुणावासं निषेदुर्हरियूथपाः । चण्डनक्रग्राहघोरं क्षपादौ दिवसक्षये १२ हसन्तमिव फेनौघैर्नृत्यन्तमिव चोर्मिभिः । चन्द्रोदये समुद्धूतं प्रतिचन्द्रसमाकुलम् १३ चण्डानिलमहाग्राहैः कीर्णं तिमितिमिङ्गिलैः । दीप्तभोगैरिवाकीर्णं भुजङ्गैर्वरुणालयम् १४

---

गुप्त भय उपस्थित करून ठेविलें असेल असें समजून चाललेंच पाहिजे ४. रामाचें भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मणासहवर्तमान असलेल्या सुग्रीवानें सागराच्या वृक्षयुक्त तीरावर सेनेचा तळ दिला ५. सागराच्या समीप त्या वानरसैन्याचा तळ पडला असतां मधासारिख्या पिंगट वर्णानें युक्त असलेले वानर हेंच ज्यांतील जल आहे, असा तो एक दुसरा भव्य सागरच शोभूं लागला ६. तीरावरील वनांत गेल्यानंतर महासागराच्या परतीराला जाण्याची इच्छा करणारे ते वानर तेथें उतरले ७; आणि ते उतरूं लागले असतां सैन्याच्या हालचालीचा शब्द सागराच्या महागर्जनेला मागें टाकून ऐकूं येऊं लागला ८. सुग्रीवानें रक्षण केलेली ती वानरांची तेथें उतरलेली तिन्ही प्रकारची प्रचंड सेना रामाच्या कार्यसिद्धीविषयीं तत्पर होऊन राहिली ९. महासागरासमीप आल्यावर वायुवेगानें क्षुब्ध झालेला, जलचर प्राण्यांनीं गजबजून गेलेला आणि राक्षसगणांनीं आश्रय केलेला तो अपार महासागर अवलोकन करून ती वानरसेना आनंदित झाली १०,११. दिवस जाऊन रात्र पडण्याच्या सुमाराला प्रचंड नक्ररूप ग्राहांनीं भयंकर झालेला समुद्र अवलोकन करीत करीत ते वानरसेनाधिपति तेथें उतरले १२. फेनसमुदायामुळें तो सागर हास्य करीत आहे कीं काय असा दिसत होता; लाटांच्या योगानें तो नृत्यच करीत आहे कीं काय असा भासत होता; चंद्रोदयसमयीं तो वृद्धिंगत झालेला होता; लाटांमध्यें पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबांनीं तो व्याप्त झाला होता १३; प्रचंड वायूप्रमाणें ज्यांचा वेग आहे अशा मोठ्या मोठ्या जलचर प्राण्यांनीं, तिमि व तिमिंगिल मत्स्यांनीं आणि उज्ज्वल फणांनीं युक्त असलेल्या भुजंगांनीं

अवगाढं महासत्त्वैर्नानाशैलसमाकुलम् । सुदुर्गं दुर्गमार्गं तमगाधमसुरालयम् १५ मकरैर्नागभोगैश्च विगाढा वातलोलिताः । उत्पेतुश्च निपेतुश्च प्रहृष्टा जलराशयः १६ अग्निचूर्णमिवाविद्धं भास्वराम्बुमहोरगम् । सुरारिनिलयं घोरं पातालविषयं सदा १७ सागरं चाम्बरप्रख्यमम्बरं सागरोपमम् । सागरं चाम्बरं चेति निर्विशेषमदृश्यत १८ संपृक्तं नभसाप्यम्भः संपृक्तं च नभोम्भसा । तादृग्रूपे स्म दृश्येते तारारत्नसमाकुले १९ समुत्पतितमेघस्य वीचिमालाकुलस्य च । विशेषो न द्वयोरासीत्सागरस्याम्बरस्य च १२० अन्योन्यैराहताः सक्ताः सस्वनुर्भीमनिःस्वनाः । ऊर्मयः सिन्धुराजस्य महाभेर्य इवाम्बरे २१ रत्नौघजलसन्नादं विषक्तमिव वायुना। उत्पतन्तमिव क्रुद्धं यादोगणसमाकुलम् २२ ददृशुस्ते महात्मानो वाताहतजलाशयम् । अनिलोद्धूतमाकाशे प्रलपन्तमिवोर्मिभिः २३ ततो विस्मयमापन्ना हरयो ददृशुः स्थिताः । भ्रान्तोर्मिजाल-

---

तो समुद्र व्याप्त झालेला होता १४. मोठे मोठे प्राणी त्यांत वास्तव्य करीत होते; नानाप्रकारच्या वृक्षांनीं तो गजबजून गेलेला होता आणि असुरांचें स्थान असलेला तो अगाध समुद्र स्वाभाविकच दुस्तर असून त्यांतील मार्गही दुर्गम होते १५. मकर आणि सर्पांचीं शरीरें ह्यांनीं व्याप्त झालेल्या लाटा वायूनें कंपित होऊन खालींवर होऊं लागल्या १६. मोठ्या मोठ्या फणांनीं देदीप्यमान असलेले मोठे मोठे जलसर्प आंत असल्यामुळें राक्षसांचें निवासस्थान असलेला आणि पातालवासी लोकांना गम्य असलेला तो सागर जसा कांहीं अग्निकणांनीं व्याप्त झाल्यासारिखा होऊन भयंकर भासूं लागला १७. समुद्र आकाशासारिखा दिसूं लागला; व आकाश समुद्रासारिखें दिसूं लागलें. सारांश, सागर आणि आकाश ह्यांमध्यें कांहीं भेदच नाहीं असें दिसूं लागलें १८. आकाश तारागणांनीं आणि समुद्र रत्नसमुदायांनीं व्याप्त असल्यामुळें समुद्र आकाशासारिखा दिसूं लागला आणि आकाश समुद्रासारिखें दिसूं लागलें १९. उद्भवलेल्या मेघांनीं युक्त असलेलें आकाश आणि लाटांनीं व्याप्त होऊन गेलेला समुद्र ह्यांमध्यें कांहींएक भेद दिसेनासा झाला १२०. समुद्राच्या भयंकर गर्जना करणाऱ्या लाटा परस्परांवर आदळून अधिकच गर्जना करूं लागल्या असतां आकाशामध्यें प्रचंड दुंदुभिच वाजत आहेत कीं काय असें भासूं लागलें २१. वायूचे तडाके बसत असल्यामुळें रत्नें बाहेर टाकणाऱ्या लाटांच्या योगानें ध्वनियुक्त होऊन जलचर प्राण्यांनीं व्याप्त झालेला तो सागर क्रुद्ध होऊनच उसळत आहे कीं काय असें दिसूं लागलें २२. वायूचे तडाके बसत असलेला तो समुद्र वायूच्या वेगानें आकाशांत उडवून दिला जात

सन्नादं प्रलोलमिव सागरम् १२४ [ २०२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

सा तु नीलेन विधिवत्स्वारक्षा सुसमाहिता । सागरस्योत्तरे तीरे साधु सा विनिवेशिता १ मैन्दश्च द्विविदश्चोभौ तत्र वानरपुङ्गवौ । विचेरतुश्च तां सेनां रक्षार्थं सर्वतो दिशम् २ निविष्टायां तु सेनायां तीरे नदनदीपतेः । पार्श्वस्थं लक्ष्मणं दृष्ट्वा रामो वचनमब्रवीत् ३ शोकश्च किल कालेन गच्छता ह्यपगच्छति । मम चापश्यतः कान्तामहन्यहनि वर्धते ४ न मे दुःखं प्रिया दूरे न मे दुःखं हृतेति च । एतदेवानुशोचामि वयोस्या ह्यतिवर्तते ५ वाहि वात यतः कान्ता तां स्पृष्ट्वा मामपि स्पृश । त्वयि मे गात्रसंस्पर्शश्चन्द्रे दृष्टिसमागमः ६ तन्मे दहति गात्राणि विषं पीतमिवाशये । हा नाथेति प्रिया सा मां ह्रियमाणा यदब्रवीत् ७ तद्वियोग-

---

असल्यामुळें लाटांच्या योगानें संभाषणच करीत आहे कीं काय असें त्या महात्म्या वानरांना वाटलें २३. तेव्हां इकडे तिकडे उसळत असलेल्या लाटांच्या समुदायामुळें ज्यांत एकसारिखी गर्जना होत आहे आणि लाटांमुळेंच जो चंचल दिसत आहे तो समुद्र अवलोकन केल्याबरोबर वानर विस्मयानें चकित होऊन राहिले १२४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चवथा सर्ग समाप्त झाला ॥ ४ ॥

जिचें रक्षण यथाविधि केलें आहे आणि जिची रचनाही चांगली केलेली आहे अशी ती वानरसेना सागराच्या उत्तरतीरावर नील वानरानें व्यवस्थित उतरविली १; आणि मैंद व द्विविद हे उभयतां वानरश्रेष्ठ त्या सेनेच्या रक्षणार्थ सर्व बाजूंनीं हिंडूं लागले २. ह्याप्रमाणें समुद्रतीरीं सेनेचा तळ पडल्यावर बाजूला असलेल्या लक्ष्मणाला पाहून राम ह्मणाला ३ " कालगतीनें शोक खरोखर कमी होत असतो; परंतु, प्रिया दृष्टीं पडत नसल्यामुळें माझा शोक तर प्रति दिवशीं वृद्धिंगतच होत आहे ४. प्रिया दूर आहे ह्याचें मला दुःख वाटत नाहीं आणि तिला हरण करून नेलें ह्याबद्दलही मी कष्टी होत नाहीं; परंतु, हिचें वय निघून जात आहे एवढ्याच बद्दल, मला दुःख वाटत आहे ५. हे वाता, जिकडे माझी कांता आहे तिकडे तूं जा आणि तिला स्पर्श करून मलाही स्पर्श कर. कारण, चंद्र दृष्टीं पडला असतां ज्याप्रमाणें उष्णतेमुळें झालेला संताप नाहींसा होतो त्याप्रमाणें कांतेच्या शरीराला स्पर्श करून तूं मला स्पर्श केलास ह्मणजे माझा विरहजन्य संताप कांहीं कमी होईल ६. उदरामध्यें विष घेतलें असतां ज्याप्रमाणें तें गात्रें दग्ध करून टाकितें त्याप्रमाणें रावण

न्धनवता तच्चिन्ताविमलार्चिषा । रात्रिन्दिवं शरीरं मे दह्यते मदनाग्निना ८ अवगाह्यार्णवं स्वप्स्ये सौमित्रे भवता विना । एवं च प्रज्वलन्कामो न मां सुप्तं जले दहेत् ९ बह्वेतत्कामयानस्य शक्यमेतेन जीवितुम् । यदहं सा च वामोरूरेकां धरणिमाश्रितौ १० केदारस्येव केदारः सोदकस्य निरूदकः । उपस्नेहेन जीवामि जीवन्तीं यच्छृणोमि ताम् ११ कदा नु खलु सुश्रोणीं शतपत्रायतेक्षणाम् । विजित्य शत्रून्द्रक्ष्यामि सीतां स्फीतामिव श्रियम् १२ कदा सुचारुदन्तोष्ठं तस्याः पद्ममिवाननम् । ईषदुन्नाम्य पास्यामि रसायनमिवातुरः १३ तौ तस्याः संहितौ पीनौ स्तनौ तालफलोपमौ । कदा नु खलु सोत्कम्पौ हसन्त्या मां भजिष्यतः १४ सा नूनमसितापाङ्गी रक्षोमध्यगता सती । मन्नाथा नाथहीनेव त्रातारं

---

हरण करून नेत असतांना "हे नाथ" असें जें ती मला उद्देशून ह्मणाली तें ह्मणणें माझीं गात्रें दग्ध करीत आहे ७. तिचा वियोग हींच एक कोणी इंधनें आणि तिचें चिंतन हीच निर्मल ज्वाला ह्यांनीं युक्त असलेला मदनरूप अग्नि रात्रंदिवस माझें शरीर दग्ध करीत आहे ८. हे लक्ष्मणा, तूं येथेंच उभा रहा. तुझ्यावांचून मी एकटाच समुद्रांत बुडी मारून तेथेंच शयन करितों. ह्मणजे उदकामध्यें मी निद्रिस्थ झालों असतां प्रज्वलित झालेला मदनाग्नि ह्याप्रमाणें मला दग्ध करण्यास समर्थ होणार नाहीं ९. शिवाय, कामुक पुरुषाला निदान एकांतामध्यें शयन करणें हें सुद्धां पुष्कळ बरें वाटत असतें आणि एवढ्यानें जीव जगविणें शक्यही आहे. सारांश, मी आणि ती सुंदरी हे दोघेही एकाच पृथ्वीवर पडलों आहोंत इतकें सुद्धां मज कामुकाला जीव धरून रहाण्यास पुरेसें होणारें आहे १०. उदकरहित शेत उदकयुक्त शेताच्या सांनिध्यानें ज्याप्रमाणें टवटवीत रहातें त्याप्रमाणें ती जिवंत असल्याचें जर माझ्या कानीं पडेल तर तेवढ्यानें सुद्धां मी जिवंत राहीन ११. कमलपत्रासारिखा दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेली आणि समृद्ध लक्ष्मीच कीं काय अशी असलेली सुंदरी सीता शत्रूंना जिंकून मी कधीं बरें पाहीन! १२. अति मनोहर दंत व ओष्ठ ह्यांनीं युक्त असून कमलाप्रमाणें दिसत असलेलें तिचें मुख थोडेसें वर करून रसायन सेवन करणाऱ्या रोग्याप्रमाणें उत्सुकतेनें मी केव्हां बरें सेवन करीन! १३. तालफलांचीच ज्यांना उपमा आहे असे एकमेकाला चिकटलेले, पुष्ट आणि स्फुरण पावत असलेले तिचे स्तन, ती हास्य करीत असतांना माझ्या वक्षस्थलाला, केव्हां स्पर्श करतील? १४. खरोखर कृष्णवर्ण नेत्रप्रांतांनीं युक्त असलेली ती साध्वी, मी तिचा नाथ असूनही राक्षसींच्या मध्यें सांपडली

नाधिगच्छति १५ कथं जनकराजस्य दुहिता मम च प्रिया । राक्षसी-
मध्यगा शेते स्नुषा दशरथस्य च १६ अविक्षोभ्याणि रक्षांसि सा
विधूयोत्पतिष्यति । विधूय जलदान्नीलाञ्शशिलेखा शरत्स्विव १७
स्वभावतनुका नूनं शोकेनानशनेन च । भूयस्तनुतरा सीता देश-
कालविपर्ययात् १८ कदा नु राक्षसेन्द्रस्य निधायोरसि सायकान् ।
शोकं प्रत्याहरिष्यामि शोकमुत्सृज्य मानसम् १९ कदा नु खलु मे
साध्वी सीतामरसुतोपमा । सोत्कण्ठा कण्ठमालम्ब्य मोक्ष्यत्यानन्दजं
जलम् २० कदा शोकमिमं घोरं मैथिलीविप्रयोगजम् । सहसा विप्र-
मोक्ष्यामि वासः शुक्लेतरं यथा २१ एवं विलपतस्तस्य तत्र रामस्य
धीमतः । दिनक्षयान्मन्दवपुर्भास्करोऽस्तमुपागतः २२ आश्वासितो लक्ष्म-
णेन रामः सन्ध्यामुपासत । स्मरन्कमलपत्राक्षीं सीतां शोकाकुली-
कृतः २३ [ २२५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
युद्धकाण्डे पञ्चमः सर्गः ॥ ५ ॥

लङ्कायां तु कृतं कर्म घोरं दृष्ट्वा भयावहम् । राक्षसेन्द्रो हनुमता शक्रेणेव

---

असल्यामुळें अनाथाप्रमाणें झाली असेल आणि कोणीही त्राता तिला दिसत नसेल ! १५. अरे, जनकाची कन्या, माझी प्रिया आणि दशरथाची स्नुषा राक्षसींच्या मध्यें राहून कशी बरें शयन करीत असेल ? १६ शरदृतूमध्यें ज्याप्रमाणें नील मेघ उडवून देऊन चंद्रकला बाहेर पडत असते त्याप्रमाणें अजिंक्य राक्षसांना माझ्या द्वारानें उडवून देऊन ती राक्षसींतून बाहेर पडेल १७. जातीचीच खरोखर कृश असलेली सीता शोकामुळें, उपोषणामुळें व विपरीत काल प्राप्त होऊन भलत्या ठिकाणीं पडला असल्यामुळें अधिकच कृश झाली असेल १८. राक्षसराज रावणाच्या वक्षस्थलीं बाण मारून स्वतःच्या मनांतील दुःख नाहीसें केल्यावर सीतेचें दुःख मी कधीं बरें नाहीसें करीन १९. देवकन्येप्रमाणें असलेली साध्वी सीता उत्सुक होऊन व माझ्या गळ्याला मिठी घालून कधीं बरें आनंदाश्रु ढाळील ! २०. मलिन वस्त्राप्रमाणें ह्या सीतावियोगजन्य घोर शोकाचा मी एकदम कधीं बरें त्याग करीन ! " २१. ह्याप्रमाणें तो विचारी राम तेथें विलाप करीत असतांनाच दिवस संपल्यामुळें सूर्य सौम्य होऊन अस्तास गेला २२; व नंतर लक्ष्मणानें धीर दिल्यावर शोकाकुल झालेल्या रामानें कमलनयना सीतेचें चिंतन करीत करीत संध्योपासना केली २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

महात्मना ॥ अब्रवीद्राक्षसान्सर्वान्ह्रिया किंचिदवाङ्मुखः १ धर्षिता च प्रविष्टा च लङ्का दुष्प्रसहा पुरी । तेन वानरमात्रेण दृष्टा सीता च जानकी २ प्रासादो धर्षितश्चैत्यः प्रवरा राक्षसा हताः । आविला च पुरी लङ्का सर्वा हनुमता कृता ३ किं करिष्यामि भद्रं वः किं वो युक्तमनन्तरम् । उच्यतां नः समर्थं यत्कृतं च सुकृतं भवेत् ४ मन्त्रमूलं च विजयं प्रवदन्ति मनस्विनः । तस्माद्वै रोचये मन्त्रं रामं प्रति महाबलाः ५ त्रिविधाः पुरुषा लोके उत्तमाधममध्यमाः । तेषां तु समवेतानां गुणदोषौ वदाम्यहम् ६ मन्त्रिभिर्हि संयुक्तः समर्थैर्मन्त्रनिर्णये । मित्रैर्वापि समानार्थैर्बान्धवैरपि वाधिकैः ७ सहितो मन्त्रयित्वा यः कर्मारम्भान्प्रवर्तयेत् । दैवे च कुरुते यत्नं तमाहुः पुरुषोत्तमम् ८ एकोऽर्थं विमृशेदेको धर्मे प्रकुरुते मनः । एकः कार्याणि कुरुते तमाहुर्मध्यमं नरम् ९ गुणदोषौ न निश्चित्य त्यक्त्वा दैवव्यपाश्रयम् । करिष्यामीति यः

महात्म्या इंद्राप्रमाणें हनुमानानें लंकेमध्यें केलेलें भीतिप्रद घोर कर्म अवलोकन करून लज्जेनें किंचित् मान खालीं घातलेला राक्षसराज रावण सर्व राक्षसांना उद्देशून ह्मणाला १ "फक्त त्या एकट्या वानरानें दुःसह लंकानगरीमध्यें प्रवेश करून तिला पादाक्रांत केलें आणि जानकी सीतेलाही अवलोकन केलें २. चिरेबंदी प्रासादांवर हल्ला करून श्रेष्ठ श्रेष्ठ राक्षसांचाही हनुमानानें वध केला आणि सर्व लंकेमध्यें त्यानें दाणादाण उडवून दिली ३. आतां तुमचें कल्याण असो, मी करूं तरी काय ? पुढें तुह्मांला काय योग्य दिसत आहे ? आणि आपल्या हातून चांगलें होण्यासारिखें काय आहे तें आह्मांला कथन करा ४. हे महाबलाढ्य, जय मसलतीवर अवलंबून असतो असें विचारी लोक ह्मणत असतात. ह्यास्तव, रामासंबंधानें कांहीं सल्लामसलत करणें मला बरें दिसतें ५. उत्तम, अधम आणि मध्यम असे तीन प्रकारचे पुरुष जगतामध्यें असतात. त्या सर्वांचे गुणदोष मी तुह्मांला कथन करितों ६. सल्लामसलत करणें ती—त्याविषयीं निर्णय करण्यास समर्थ असलेले मित्र, आपल्याप्रमाणेंच अडचणींत सांपडलेले पुरुष आणि बांधव ह्या तिघांच्या मतानें—करण्याचा ज्यानें विचार ठरविलेला असतो अथवा ह्या तिघांपेक्षां अधिकांचेंही मत घेऊन जो कार्यारंभास प्रवृत्त होतो आणि दैव-अनुकूल असतांना यत्न करितो त्यालाच उत्तम पुरुष ह्मणतात ७,८. उपस्थित झालेल्या कार्याचा विचार जो एकटाच करीत असतो, धर्मसंबंधानेंही जो एकटाच विचार करितो आणि व्यावहारिक कार्येंही जो एकट्याच्याच विचारानें करितो त्याला मध्यम पुरुष असें ह्मणतात ९. गुणदोषांचा विचार न करितां आणि दैवाच्या

कार्यमुपेक्षेत्स नराधमः १० यथेमे पुरुषा नित्यमुत्तमाधममध्यमाः । एवं मन्त्रोपि विज्ञेय उत्तमाधममध्यमः ११ ऐकमत्यमुपागम्य शास्त्रदृष्टेन चक्षुषा । मन्त्रिणो यत्र निरतास्तमाहुर्मन्त्रमुत्तमम् १२ बह्वीरपि मतीर्गत्वा मन्त्रिणामर्थनिर्णयः। पुनर्यत्रैकतां प्राप्तः समन्त्रो मध्यमः स्मृतः १३ अन्योन्यमतिमास्थाय यत्र संप्रतिभाष्यते । न चैकमत्ये श्रेयोस्ति मन्त्रः सोधम उच्यते १४ तस्मात्सुमन्त्रितं साधु भवन्तो मतिसत्तमाः । कार्यं संप्रतिपद्यन्तामेतत्कृत्यं मतं मम १५ वानराणां हि धीराणां सहस्रैः परिवारितः । रामोभ्येति पुरीं लङ्कामस्माकमुपरोधकः १६ तरिष्यति च सुव्यक्तं राघवः सागरं सुखम् । तरसा युक्तरूपेण सानुजः सबलानुगः १७ समुद्रमुच्छोषयति वीर्येणान्यत्करोति वा १८ तस्मिन्नेवं विधे कार्ये विरुद्धे वानरैः सह । हितं पुरे च सैन्ये च सर्वं संमन्त्र्यतां मम १९ [२४४]

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षष्ठः सर्गः ॥६॥

---

अनुकूलतेचीही अपेक्षा न धरितां कार्य करावयाचें अशा समजुतीवर त्याचा उपक्रम करून परिणामीं जो त्याची हेळसांड करितो तो अधम पुरुष होय १०. ज्याप्रमाणें हे पुरुष उत्तम, अधम व मध्यम असे सर्वदां ठरलेले आहेत त्याचप्रमाणें मंत्रही उत्तम, अधम व मध्यम अशा तीन प्रकारचा आहे असें समजावें ११. शास्त्रोक्त विचारानें एकमत करून घेऊन ज्या मसलतीविषयीं मंत्री लोक तत्पर झालेले असतात तिला उत्कृष्ट मसलत असें ह्मणतात १२. प्रथमतः पुष्कळच मतभेद पडून शेवटीं ज्या संबंधानें मंत्र्यांचा पुनरपि एकच विचार ठरतो त्याला मध्यम प्रकारची मसलत असें ह्मणतात १३; आणि एकमेकांचें मत घेऊन ज्याविषयीं भाषण चालतें आणि एकमतामध्यें जेथें कल्याण आहे असें समजलें जात नाहीं तिला अगदीं कनिष्ठ प्रकारची मसलत असें ह्मणतात १४. ह्याकरितां, हे महाविचारी राक्षसहो, प्रथम चांगला विचार करूनच आपणांला काय करावयाचें असेल तें करावें. हेंच करणें सांप्रत मला इष्ट दिसतें १५. हजारों धैर्यवान् वानरांनीं परिवेष्टित असलेला राम आह्मांला पीडा देण्याकरितां लंकानगरीवर येत आहे १६. कनिष्ठ भ्राता, सैन्य व अनुयायी ह्यांसहवर्तमान तो राघव अनुरूप अशा स्वसामर्थ्यानें निःसंशय समुद्राचें उल्लंघन सहज करील १७. इतकेंच नव्हे परंतु, वीर्याच्या योगानें तो समुद्रही शुष्क करून टाकील; अथवा दुसरेंही कांहीं करील १८. ह्यास्तव, अशाप्रकारें वानरांसहवर्तमान राम आपल्या विरुद्ध जाण्यास उद्युक्त झाला असतांना माझें नगर आणि सैन्य ह्या उभयतांनाही हितावह असा जो विचार असेल तो करा १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत

इत्युक्ता राक्षसेन्द्रेण राक्षसास्ते महाबलाः । ऊचुः प्राञ्जलयः सर्वे रावणं राक्षसेश्वरम् १ द्विषत्पक्षमविज्ञाय नीतिबाह्यास्त्वबुद्धयः । राजन्परिघशक्त्यृष्टिशूलपट्टिशकुन्तलम् २ सुमहन्नो बलं कस्माद्विषादं भजते भवान् । त्वया भोगवतीं गत्वा निर्जिताः पन्नगा युधि ३ कैलासशिखरावासी यक्षैर्बहुभिरावृतः । सुमहत्कदनं कृत्वा वश्यस्ते धनदः कृतः ४ स महेश्वरसख्येन श्लाघमानस्त्वया विभो । निर्जितः समरे रोषाल्लोकपालो महाबलः ५ विनिपात्य च यक्षौघान्विक्षोभ्य विनिगृह्य च । त्वया कैलासशिखराद्विमानमिदमाहृतम् ६ मयेन दानवेन्द्रेण त्वद्भयात्सख्यमिच्छता । दुहिता तव भार्यार्थे दत्ता राक्षसपुङ्गव ७ दानवेन्द्रो महाबाहो वीर्योत्सिक्तो दुरासदः । विगृह्य वशमानीतः कुम्भीनस्याः सुखावहः ८ निर्जितास्ते महाबाहो नागा गत्वा रसातलम् । वासुकिस्तक्षकः शङ्खो जटी च वशमाहृताः ९ अक्षया बलवन्तश्च शूरा लब्धवराः पुनः । त्वया संवत्सरं

---

श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

ह्याप्रमाणें राक्षसाधिपति रावण त्या महाबलाढ्य राक्षसांना ह्मणाला असतां नीतिबाह्य असलेले ते अविचारी राक्षस शत्रुपक्षाचें बलाबल मनांत न आणितां सर्वही हात जोडून त्या राक्षस राजाला ह्मणाले " हे राजा, परिघ, शक्ति, खड्ग, शूल, पट्टे आणि भाले ह्यांनीं युक्त १, २ असें आमचें प्रचंड सैन्य असतांना आपण खेद कशाकरितां करीत आहांत ? पातालांतील भोगवती नगरीमध्यें जाऊन आपण संग्रामामध्यें भुजंगांचा पराभव केला आहे ३; कैलासशिखरावर वास्तव्य करणारा आणि असंख्य यक्षांनीं परिवेष्टित असलेला कुबेर आपण मोठें प्रचंड युद्ध करून पादाक्रांत केला आहे ४. हे प्रभो, महेश्वराशीं सख्य असल्यामुळें गर्व करीत असणाऱ्या त्या महाबलाढ्य लोकपालाला रागारागानें आपण संग्रामामध्यें जिंकिलें आहे ५. यक्षगणांना क्षुब्ध करून, त्यांचा निग्रह करून व निःपात करून आपण कैलास पर्वताच्या शिखरापासून हें विमान हरण करून आणिलें आहे ६. आपल्या भीतीमुळेंच आपल्याशीं सख्य इच्छिणाऱ्या दानवराज मयासुरानें, हे राक्षसश्रेष्ठ, भार्येकरितां स्वतःची कन्या आपणांला अर्पण केली आहे ७; हे महाबाहो, वीर्यानें मत्त व अजिंक्य असा दानवराजही युद्धानें पादाक्रांत करून आपल्या कुंभीनसीनामक भगिनीला आपण भर्ता करून दिला आहे ८. हे महापराक्रमी, वासुकी, तक्षक, शंख आणि जटी हे नाग आपण रसातलाला जाऊन जिंकिले आहेत आणि आपल्या अधीन करून ठेविले आहेत ९. अक्षय, बलाढ्य, शूर आणि वर प्राप्त झालेले असे जे कालकेय दानव त्यांच्याशीं

युद्ध्वा समरे दानवा विभो १० स्वबलं समुपाश्रित्य नीता वशमरिन्दम । मायाश्चाधिगतास्तत्र बह्व्यो वै राक्षसाधिप ११ शूराश्च बलवन्तश्च वरुणस्य सुता रणे । निर्जितास्ते महाभाग चतुर्विधबलानुगाः १२ मृत्युदण्डमहाग्राहं शाल्मलीद्रुममण्डितम् । कालपाशमहावीचिं यमकिङ्करपन्नगम् १३ महाज्वरेण दुर्धर्षं यमलोकमहार्णवम् । अवगाह्य त्वया राजन्यमस्य बलसागरम् १४ जयश्च विपुलः प्राप्तो मृत्युश्च प्रतिषेधितः । सुयुद्धेन च ते सर्वे लोकास्तत्र सुतोषिताः १५ क्षत्रियैर्बहुभिर्वीरैः शक्रतुल्यपराक्रमैः । आसीद्वसुमती पूर्णा महद्भिरिव पादपैः १६ तेषां वीर्यगुणोत्साहैर्न समो राघवो रणे । प्रसह्य ते त्वया राजन्हताः समरदुर्जयाः १७ तिष्ठ वा किं महाराज श्रमेण तव वानरान् । अयमेको महाराज इन्द्रजित्क्षपयिष्यति १८ अनेन च महाराज माहेश्वरमनुत्तमम् । इष्ट्वा यज्ञं वरो लब्धो लोके परमदुर्लभः १९ शक्तितोमरमीनं च विनिकीर्णान्त्रशैवलम् । गजकच्छ-

---

समरांगणामध्यें एक संवत्सरपर्यंत युद्ध करून, हे प्रभो १० शत्रुदमना, आपण स्वसामर्थ्यानें त्यांना पादाक्रांत केलें आहे; व, हे राक्षसाधिपते, त्यांच्यापासून आपण मायाही पुष्कळ संपादन करून घेतल्या आहेत ११. हे महाभाग्यवान्, ( रथ, गज, अश्व व पायदळ अशा ) चारी प्रकारच्या सैन्यांनीं युक्त असलेले शूर व बलाढ्य वरुणपुत्र आपण संग्रामामध्यें जिंकिले आहेत १२. मृत्युदंडरूप प्रचंड नक्रानें युक्त, शाल्मली वृक्षांनीं भूषित, कालपाशरूप मोठमोठ्या लाटांनीं संपन्न, यमकिंकररूप भुजंगांनीं व्याप्त १३ आणि महाज्वरामुळें अजिंक्य असा जो यमलोकरूप महासागर म्हणजे त्याचा सेनासमुद्र तो उल्लंघून, हे राजा १४, आपणांला मोठा जय प्राप्त झाला आहे; मृत्यूलाही आपण कुंठित केलें आहे आणि उत्कृष्ट युद्धानें तेथें सर्व लोकही आपण संतुष्ट केले आहेत १५. मोठया वृक्षांनीं ज्याप्रमाणें पृथ्वी व्याप्त होऊन जावी त्याप्रमाणें इंद्रतुल्य पराक्रमी अशा असंख्य क्षत्रियवीरांनीं पृथ्वी व्याप्त झालेली होती १६; परंतु, हे राजा, संग्रामामध्यें जिंकण्यास कठीण असलेले ते वीरही आपण एकदम जिंकून टाकिले आहेत आणि राम संग्रामामध्यें वीर्य, गुण व उत्साह ह्यांच्या योगानें त्यांची बरोबरीही करणारा नाहीं १७. तस्मात्, हे महाराज, आपण स्वस्थ रहा. विनाकारण कशाकरितां आपण श्रम घेत आहां ? हे महाराज, हा एकटा इंद्रजितच त्यांचा नाश करील १८. हे महाराजा, ह्या इंद्रजितानें अत्युत्कृष्ट माहेश्वर्य याग करून जगतामध्यें अत्यंत दुर्लभ असा वर प्राप्त करून घेतला आहे १९; आणि शक्ति व तोमर हेच कोणी मत्स्य, अस्ताव्यस्त पडलेलीं आंतडीं

पसंबाधमश्वमण्डूकसंकुलम् २० रुद्रादित्यमहाग्राहं मरुद्वसुमहोरगम् । रथाश्वगजतोयौघं पदातिपुलिनं महत् २१ अनेन हि समासाद्य देवानां बलसागरम् । गृहीतो दैवतपतिर्लङ्कां चापि प्रवेशितः २२ पितामहनियोगाच्च मुक्तः शम्बरवृत्रहा । गतस्त्रिविष्टपं राजन्सर्वदेवनमस्कृतः २३ तमेव त्वं महाराज विसृजेन्द्रजितं सुतम् । यावद्वानरसेनां तां सरामां नयति क्षयम् २४ राजन्नापदयुक्तेयमागता प्राकृताज्जनात् । हृदि नैव त्वया कार्या त्वं वधिष्यसि राघवम् २५ [ २६९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

ततो नीलाम्बुदप्रख्यः प्रहस्तो नाम राक्षसः । अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं शूरः सेनापतिस्तदा १ देवदानवगन्धर्वाः पिशाचपतगोरगाः । सर्वे धर्षयितुं शक्याः किं पुनर्मानवौ रणे २ सर्वे प्रमत्ता विश्वस्ता वञ्चिताः स्म हनूमता । न हि मे जीवतो गच्छेज्जीवन्स वनगोचरः ३ सर्वां सागरपर्यन्तां सशैलवनकाननाम् । करोम्यवानरां भूमि-

---

हेंच शेवाळ, गजरूप कांसवें, अश्वरूप मंडूक २०, रुद्रादित्यरूप मोठेमोठे नक्र, वसुमरुद्गणरूप मोठेमोठे भुजंग, रथ, अश्व व गज एतद्रूप जलप्रवाह आणि पदातिरूप वाळवंट ह्यांनीं युक्त असलेल्या देवांच्या प्रचंड सेनासागरामध्यें जाऊन देवराज इंद्रही ह्यानें बांधून लंकेंत आणिला होता २१, २२; परंतु, हे राजा, चतुर्मुख रुद्राच्या आज्ञेवरून तो ह्याच्या हातून मुक्त झाला आणि सर्व देवांना वंद्य असलेला तो इंद्र स्वर्गामध्यें गेला २३. सारांश, हे महाराज, आपण त्या इंद्रजित् पुत्रालाच पाठवा; ह्मणजे तो लगेच रामासहवर्तमान त्या वानरसेनेचा नाश करून टाकील २४. हे राजा, यःकश्चित् मनुष्यामुळें उद्भवलेलें हें क्षुल्लक संकट आपण मुळीं मनामध्यें सुद्धां आणूं नका. कारण, आपण रामाचा वध करालच २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

तदनंतर नीलमेघाप्रमाणें असलेला प्रहस्तनामक सेनापति शूर राक्षस हात जोडून ह्मणाला १ " देव, दानव, गंधर्व, पिशाच, पक्षी आणि भुजंग ह्या सर्वांचाही माझ्या हातून संग्रामामध्यें पराभव होणें शक्य आहे; मग दोन मानवांची तर गोष्ट कशाला पाहिजे ! २. आह्मी सर्व राक्षस कांहीं भय नाहीं अशा विश्वासावर बेसावध पडून राहिल्यामुळें हनुमानानें आह्मांला फसविलें आहे. मी जिवंत असतांना हा वानर जिवंत जाण्याचा संभव नाहीं ३. मी पर्वत, वनें आणि अरण्यें ह्यांसहवर्तमान सर्व

माज्ञापयतु मां भवान् ४ रक्षां चैव विधास्यामि वानराद्रजनीचर । नागमिष्यति ते दुःखं किंचिदात्मापराधजम् ५ अब्रवीत्तमसंक्रुद्धो दुर्मुखो नाम राक्षसः । इदं न क्षमणीयं हि सर्वेषां नः प्रधर्षणम् ६ अयं परिभवो भूयः पुरस्यान्तःपुरस्य च । श्रीमतो राक्षसेन्द्रस्य वानरेन्द्रप्रधर्षणम् ७ अस्मिन्मुहूर्ते गत्वैको निवर्तिष्यामि वानरान् । प्रविष्टान्सागरं भीममम्बरं वा रसातलम् ८ ततोऽब्रवीत्सुसंक्रुद्धो वज्रदंष्ट्रो महाबलः । प्रगृह्य परिघं घोरं मांसशोणितदूषितम् ९ किं नो हनूमता कार्यं कृपणेन तपस्विना । रामे तिष्ठति दुर्धर्षे सुग्रीवेपि सलक्ष्मणे १० अद्य रामं ससुग्रीवं परिघेण सलक्ष्मणम् । आगमिष्यामि हत्वैको विक्षोभ्य हरिवाहिनीम् ११ इदं ममापरं वाक्यं शृणु राजन्यदिच्छसि । उपायकुशलो ह्येव जयेच्छत्रूनतन्द्रितः १२ कामरूपधराः शूराः सुभीमा भीमदर्शनाः । राक्षसानां सहस्राणि राक्षसाधिप निश्चिताः १३ काकुत्स्थमुपसंगम्य विवृतं मानुषं वपुः । सर्वे ह्यसंभ्रमा भूत्वा ब्रुवन्तु रघुसत्तमम् १४

---

समुद्रवलयांकित पृथ्वी वानररहित करून टाकीन. आपण मला आज्ञा करा ह्मणजे झालें ४. हे निशाचर, वानरांपासून मी तुमचें रक्षणही करीन. सारांश, माझ्या निष्काळजीपणामुळें आपणांला दुःख होणार नाहीं" ५. ह्यावर दुर्मुखनामक राक्षस क्रुद्ध न होतां त्याला ह्मणाला "आह्मां सर्वांचा हा झालेला अपमान कधींही क्षम्य होणार नाहीं ६. श्रीमान् राक्षसराजाचें नगर आणि अंतःपुर ह्यांचा वानरराज हनुमानानें विध्वंस केला आहे हा आमचा मोठा अपमान आहे ७. ह्या क्षणींच मी एकटा बाहेर पडून, वानर भयंकर सागरामध्यें प्रविष्ट झालेले असोत, आकाशामध्यें उडून गेलेले असोत, किंवा रसातलांत निघून गेलेले असोत, त्या सर्वांचा वध करून मी परत येईन" ८. तदनंतर अत्यंत क्रुद्ध झालेला महाबलाढ्य वज्रदंष्ट्र रक्तमांसानें भरलेला घोर परिघ हातांत घेऊन ह्मणाला ९ "अरे, दुर्जय राम आणि लक्ष्मणासहवर्तमान सुग्रीव विद्यमान असतांना ह्या गरीब बिचाऱ्या हनुमानाशीं आपल्याला काय कर्तव्य आहे १० वानरसेनेमध्यें दाणादाण उडवून देऊन मी एकटा सुग्रीव आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान रामाचा परिघानें वध करून आजच परत येईन ११. हे राजा, इच्छा असेल तर माझें हें दुसरेंही भाषण आपण श्रवण करावें. उपाय योजण्यामध्यें जो कुशल असेल आणि जो नेहमीं दक्ष राहील तोच शत्रूंना जिंकील १२. हे राक्षसाधिपते, अत्यंत भयंकर पराक्रम करणारे आणि दिसण्यांतही उग्र असलेले असे यथेष्ट रूप धारण करणारे हजारों शूर राक्षस आपणांपाशीं निःसंशय तयार आहेत १३. ह्यास्तव, अगदीं

प्रेषिता भरतेनैव भ्रात्रा तव यवीयसा । स हि सेनां समुत्थाप्य
क्षिप्रमेवोपयास्यति १५ ततो वयमितस्तूर्णं शूलशक्तिगदाधराः । चाप-
बाणासिहस्ताश्च त्वरितास्तत्र यामह १६ आकाशे गणशः स्थित्वा हत्वा
तां हरिवाहिनीम् । अश्मशस्त्रमहावृष्ट्या प्रापयाम यमक्षयम् १७ एवंचे-
दुपसर्पेतामनयं रामलक्ष्मणौ । अवश्यमपनीतेन जहतामेव जीवितम् १८
कौम्भकर्णिस्ततो वीरो निकुम्भो नाम वीर्यवान् । अब्रवीत्परमक्रुद्धो
रावणं लोकरावणम् १९ सर्वे भवन्तस्तिष्ठन्तु महाराजेन संगताः । अह-
मेको हनिष्यामि राघवं सहलक्ष्मणम् २० सुग्रीवं सहनूमन्तं सर्वांश्चै-
वात्र वानरान् । ततो वज्रहनुर्नाम राक्षसः पर्वतोपमः २१ क्रुद्धः परि-
लिहन्सृक्कां जिह्वया वाक्यमब्रवीत् । स्वैरं कुर्वन्तु कार्याणि भवन्तो
विगतज्वराः २२ एकोऽहं भक्षयिष्यामि तां सर्वां हरिवाहिनीम् । स्वस्थाः
क्रीडन्तु निश्चिन्ताः पिबन्तु मधुवारुणम् २३ अहमेको वधिष्यामि सुग्रीवं
सहलक्ष्मणम् । साङ्गदं च हनूमन्तं सर्वांश्चैवात्र वानरान् २४ [२९३]इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

---

स्पष्टपणें मनुष्यरूप धारण करून सर्वांनीं सावध राहून रघुवंशजश्रेष्ठ ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडे जावें आणि त्याला ह्मणावें १४ " आपल्या भरतनामक कनिष्ठ भ्रात्यानें आह्मांला पुढें पाठविलें आहे. सैन्याची तयारी करून तो सत्वरच येईल " १५. इतकें त्याला सांगितल्यानंतर आपण शूल, शक्ति, गदा, चाप, बाण व खड्ग हातांत घेऊन त्वरेनें लगेच तेथें जाऊं १६; आणि टोळ्याटोळ्यांनीं आकाशामध्यें राहून व पाषाण आणि शस्त्र ह्यांच्या महावृष्टीनें ती वानरसेना मारून आपण यमलोकीं पाठवूं १७. ह्याप्रमाणें जर त्या रामलक्ष्मणांनीं आमच्या ह्मणण्याला अनुमोदन दिलें तर त्यांना अनर्थ प्राप्त होईलच आणि त्या आमच्या कपटामुळें त्यांना प्राणत्याग करणेंच भाग पडेल "१८. तदनंतर कुंभकर्णाचा निकुंभनामक वीर्यवान् व शूर पुत्र अतिशय क्रुद्ध होऊन व लोकांना रडविणाऱ्या रावणाकडे पाहून ह्मणाला १९ " तुह्मी सर्वच महाराजासहवर्तमान स्वस्थ रहा. मी एकटाच लक्ष्मणासह रामाचा, हनुमानासहवर्तमान सुग्रीवाचा आणि त्याचप्रमाणें इतरही सर्व वानरांचा वध करीन ". तदनंतर वज्रहनुनामक एक पर्वततुल्य राक्षस २०, २१ क्रुद्ध होऊन जिभेनें ओष्ठप्रांत चाटीत चाटीत ह्मणाला " तुह्मी निष्काळजी राहून खुशाल आपआपले उद्योग करा २२. मी ती सर्व वानरसेना एकटाच भक्षण करीन. आपण निष्काजीपणानें स्वस्थ क्रीडा करा व मद्यपान करीत रहा २३. मी एकटाच लक्ष्मणासहवर्तमान सुग्रीव, हनुमानासहवर्तमान अंगद आणि

ततो निकुम्भो रभसः सूर्यशत्रुर्महाबलः । सुप्तघ्नो यज्ञकोपश्च महापार्श्वमहोदरौ १ अग्निकेतुश्च दुर्धर्षो रश्मिकेतुश्च राक्षसाः । इन्द्रशत्रुश्च बलवांस्ततो वै रावणात्मजः २ प्रहस्तोथ विरूपाक्षो वज्रदंष्ट्रो महाबलः। धूम्राक्षोथ निकुम्भश्च दुर्मुखश्चैव राक्षसः ३ परिघान्पट्टिशाञ्छूलान्प्रासाञ्शक्तिपरश्वधान् । चापानि च सुबाणानि खड्गांश्च विपुलाम्बुभान् ४ प्रगृह्य परमक्रुद्धाः समुत्पत्य च राक्षसाः । अब्रुवन्रावणं सर्वे प्रदीप्ता इव तेजसा ५ अद्य रामं वधिष्यामः सुग्रीवं च सलक्ष्मणम् । कृपणं च हनूमन्तं लङ्का येन प्रधर्षिता ६ तान्गृहीतायुधान्सर्वान्वारयित्वा बिभीषणः । अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं पुनः प्रत्युपवेश्य तान् ७ अप्युपायैस्त्रिभिस्तात योर्थः प्राप्तुं न शक्यते । तस्य विक्रमकालांस्तान्युक्तानाहुर्मनीषिणः ८ प्रमत्तेष्वभियुक्तेषु दैवेन प्रहतेषु च । विक्रमास्तात सिध्यन्ति परीक्ष्य विधिना कृताः ९ अप्रमत्तं कथं तं तु विजिगीषुं बले स्थितम् । जितरोषं दुराधर्षं तं धर्षयितुमिच्छथ १० समुद्रं लङ्घयित्वा तु घोरं

---

इतरही सर्व वानर ह्यांचा वध करीन २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

तदनंतर निकुंभ, रभस, महाबलाढ्य सूर्यशत्रु, सुप्तघ्न, यज्ञकोप, महापार्श्व व महोदर १, अग्निकेतु, दुर्धर्ष आणि रश्मिकेतु हे राक्षस आणि त्याचप्रमाणें रावणपुत्र बलाढ्य इंद्रजित् २, प्रहस्त, विरूपाक्ष, महाबलाढ्य वज्रदंष्ट्र, धूम्राक्ष, निकुंभ आणि दुर्मुख राक्षस हे परिघ, पट्टे, शूल, भाले, शक्ति, परशु, उत्कृष्ट बाणांसहवर्तमान धनुष्यें आणि निर्मल उदकासारिखें लकलकित खड्ग ३, ४ हातीं घेऊन, अतिशय क्रुद्ध होऊन व उड्डाण करून तेजानें देदीप्यमान असलेले सर्वही रावणाला ह्मणाले ५ " राम, लक्ष्मणासहवर्तमान सुग्रीव आणि ज्यानें लंकेवर हल्ला केला तो दीन हनुमान् ह्यांचा आह्मी आजच वध करून टाकूं " ६. तदनंतर आयुधें घेऊन उठलेल्या त्या सर्वांना थोपवून धरून खालीं बसविल्यावर बिभीषण हात जोडून रावणाला ह्मणाला ७ " बाबारे, साम, दान आणि भेद ह्या तिन्ही उपायांनीं जी गोष्ट साध्य होणें अशक्य आहे ती प्राप्त करून घेण्याकरितां पराक्रमसमय योग्य आहे असें नीतिशास्त्रवेत्ते ह्मणतात ८. बेसावध, दुसऱ्या शत्रूच्या कचाट्यांत सांपडलेले आणि दैवानेंही तडाका दिलेले जे असतील त्यांच्याच ठिकाणीं विचारपूर्वक योग्यरीतीनें गाजविलेले पराक्रम सफल होतात ९. तस्मात् , बेसावध नसलेला, जयशील, दैव अनुकूल असलेला आणि क्रोध जिंकिलेला जो अजिंक्य राम त्याच्यावर हल्ला करण्याची तुह्मी इच्छा करितां कशी? १०

नदनदीपतिम् । गतिं हनूमतो लोके को विद्यात्तर्कयेत वा ११ बलान्यपरिमेयानि वीर्याणि च निशाचराः । परेषां सहसावज्ञा न कर्तव्या कथंचन १२ किं च राक्षसराजस्य रामेणापकृतं पुरा । आजहार जनस्थानाद्यस्य भार्यां यशस्विनः १३ खरो यद्यतिवृत्तस्तु स रामेण हतो रणे । अवश्यं प्राणिना प्राणा रक्षितव्या यथाबलम् १४ एतन्निमित्तं वैदेही भयं नः सुमहद्भवेत् । आहृता सा परित्याज्या कलहार्थे कृते नु किम् १५ न तु क्षमं वीर्यवता तेन धर्मानुवर्तिना । वैरं निरर्थकं कर्तुं दीयतामस्य मैथिली १६ यावन्न सगजां साश्वां बहुरत्नसमाकुलाम् । पुरीं दारयते बाणैर्दीयतामस्य मैथिली १७ यावत्सुघोरा महती दुर्धर्षा हरिवाहिनी । नावस्कन्दति नो लङ्कां तावत्सीता प्रदीयताम् १८ विनश्येद्धि पुरी लङ्का शूराः सर्वे च राक्षसाः । रामस्य दीयतां पत्नी न स्वयं यदि दीयते १९ प्रसादये त्वां बन्धुत्वात्कुरुष्व वचनं मम । हितं तथ्यं त्वहं

---

नद आणि नद्या ह्यांचा घोर अधिपति जो समुद्र त्याचें उल्लंघन करून जाणाऱ्या हनुमानाच्या गतीचें अनुमान अथवा ज्ञान जगतामध्यें कोणाला होणार आहे ? ११. हे निशाचरहो, परपक्षीयांचीं सैन्यें व वीर्यें अतर्क्य आहेत; ह्यास्तव, त्यांची एकाएकीं अवज्ञा करणें उचित नव्हे १२. शिवाय, जनस्थानापासून त्या यशस्वी रामाची भार्या ह्या राक्षसराज रावणानें हरण केली; परंतु, त्या रामानें ह्याचा काय बरें अपराध केला होता ? १३. खर जर मर्यादेबाहेर वागूं लागला होता तर रामानें संग्रामामध्यें त्याचा वध केला. कारण, प्राण्यानें आपल्या प्राणांचें यथाशक्ति रक्षण अवश्य केलें पाहिजे १४. ह्यास्तव, सीता हें आह्मांला एक मोठें भयच होईल. तस्मात्, अपहार करून आणिलेल्या त्या सीतेचा त्याग करावा हें बरें. कारण, कलह हें ज्याचें फल आहे असें कृत्य केल्यानें उपयोग तो काय होणार ? १५. धर्माला अनुसरून वागणाऱ्या त्या वीर्यवान् रामाबरोबर विनाकारण वैर संपादन करणें योग्य नाहीं. तस्मात्, मैथिली त्याला परत द्यावी १६. जोंपर्यंत गज व अश्व ह्यांनीं युक्त आणि विपुल रत्नांनीं भरलेली लंकानगरी रामानें बाणांच्या योगानें विदीर्ण करून टाकिली नाहीं तोंपर्यंत तुह्मी ह्याला सीता अर्पण करा १७. जोंपर्यंत अत्यंत घोर व अजिंक्य अशा प्रचंड वानरसेनेनें आपल्या लंकेचा विध्वंस केला नाहीं तोंपर्यंत सीता देऊन टाका १८. लंकानगरी आणि सर्व शूर राक्षस ह्यांचा नाश होईल ह्याकरितां रामाची पत्नी देऊन टाका. तुला आपण होऊन जर सीता द्यावयाची नसेल तर १९ मी तुझी प्रार्थना करीत आहें आणि बंधुत्वामुळें तूं माझें ह्मणणें ऐक. सारांश, मी तुला हितावह व खरें खरें

ब्रूमि दीयतामस्य मैथिली २० पुरा शरत्सूर्यमरीचिसंनिभान्नवाग्रपुङ्खा-
न्सुदृढान्नृपात्मजः । सृजत्यमोघान्विशिखान्वधाय ते प्रदीयतां दाशरथाय
मैथिली २१ त्यजाशु कोपं सुखधर्मनाशनं भजस्व धर्मं रतिकीर्ति-
वर्धनम् । प्रसीद जीवेम सपुत्रबान्धवाः प्रदीयतां दाशरथाय मैथिली २२
विभीषणवचः श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः । विसर्जयित्वा तान्सर्वान्प्रवि-
वेश स्वकं गृहम् २३ [ ३१६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय
आदिकाव्ये युद्धकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

ततः प्रत्युषसि प्राप्ते प्राप्तधर्मार्थनिश्चयः । राक्षसाधिपतेर्वेश्म भीम-
कर्मा विभीषणः १ शैलाग्रचयसंकाशं शैलशृङ्गमिवान्नतम् । सुविभक्तम-
हाकक्षं महाजनपरिग्रहम् २ मतिमद्भिर्महामात्रैरनुरक्तैरधिष्ठितम् । राक्ष-
सैश्चाप्तपर्याप्तैः सर्वतः परिरक्षितम् ३ मत्तमातङ्गनिःश्वासैर्व्याकुलीकृतमा-
रुतम् । शङ्खघोषमहाघोषं तूर्यसंबाधनादितम् ४ प्रमदाजनसंबाधं

---

तेंच सांगत आहें; ह्यास्तव, ह्या रामाला मैथीली देऊन टाक २०. शरदृतूंतील सूर्य-किरणासारिखे प्रखर, नूतन, अग्रभागांनीं व पिच्छभागांनीं संपन्न आणि अतिशय दृढ असे अमोघ बाण तुझ्या वधाकरितां त्या राजकुमार रामानें सोडिले नाहींत तोंच त्या दशरथपुत्राला सीता देऊन टाक २१. सुख आणि धर्म ह्यांचा नाश करणाऱ्या कोपाचा सत्वर त्याग करून रति व कीर्ति वृद्धिंगत करणाऱ्या धर्माचें अवलंबन कर. तात्पर्य, तूं प्रसन्न होऊन दशरथपुत्र रामाला मैथिली अर्पण कर; ह्मणजे पुत्र व बांधव ह्यांसहवर्तमान आपण जिवंत राहूं " २२. हें बिभीषणाचें भाषण श्रवण केल्यावर राक्षसाधिपति रावण, त्या सर्वांना जाण्याची अनुज्ञा देऊन, स्वगृहामध्यें प्रविष्ट झाला २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

तदनंतर प्रातःकाल प्राप्त झाल्यावर धर्म व अर्थ ह्यांविषयीं निश्चय झालेला व भयंकर कर्म करणारा बिभीषण राक्षसाधिपति रावणाच्या गृहामध्यें प्रविष्ट झाला १. तें गृह पर्वतशिखरांच्या समूहांप्रमाणें दिसत होतें; पर्वतशिखरांप्रमाणें उंच होतें; मोठे मोठे आणि विस्तीर्ण असे चौक त्यामध्यें होते; मोठे मोठे लोक त्याच्या आश्रयाला होते २; अनुरक्त आणि बुद्धिमान् असे मोठे मोठे मंत्री तेथें होते; अनुकूल आणि स्वकर्तव्य करण्यास समर्थ अशा राक्षसांनीं सर्वप्रकारें त्याचें रक्षण केलेलें होतें ३; मत्त गजांच्या श्वासोच्छ्वासांनीं त्यांतील हवा मिश्र झालेली होती; शंखाचा घोष सुरू असल्यामुळें तें दुमदुमून गेलेलें होतें; नृत्यगायनसंबंधी वाद्यसमुदायांनीं तें नादित

प्रजल्पितमहापथम् । तप्तकाञ्चननिर्यूहं भूषणोत्तमभूषितम् ५ गन्धर्वाणामिवावासमालयं मरुतामिव । रत्नसंचयसंबाधं भवनं भोगिनामिव ६ तं महाभ्रमिवादित्यस्तेजोविस्तृतरश्मिवान् । अग्रजस्यालयं वीरः प्रविवेश महाद्युतिः ७ पुण्यान्पुण्याहघोषांश्च वेदविद्भिरुदाहृतान् । शुश्राव सुमहातेजा भ्रातुर्विजयसंश्रितान् ८ पूजितान्दधिपात्रैश्च सर्पिर्भिः सुमनोक्षतैः । मन्त्रवेदविदो विप्रान्ददर्श स महाबलः ९ स पूज्यमानो रक्षोभिर्दीप्यमानं स्वतेजसा । आसनस्थं महाबाहुर्ववन्दे धनदानुजम् १० स राजदृष्टिसंपन्नमासनं हेमभूषितम् । जगाम समुदाचारं प्रयुज्याचारकोविदः ११ स रावणं महात्मानं विजने मन्त्रिसंनिधौ । उवाच हितमत्यर्थं वचनं हेतुनिश्चितम् १२ प्रसाद्य भ्रातरं ज्येष्ठं सान्त्वेनोपस्थितक्रमः । देशकालार्थसंवादि दृष्टलोकपरावरः १३ यदाप्रभृति वैदेही संप्राप्तेह परन्तप । तदाप्रभृति दृश्यन्ते निमित्तान्यशुभानि नः १४ सस्फुलिङ्गः

---

झालेलें होतें ४; तरुणी स्त्रियांनीं तें गजबजून गेलेलें होतें; आंतील मोठमोठ्या मार्गांवरून एकसारिखें बोलणें चाललेलें होतें; उत्कृष्ट सुवर्णाच्या द्वारांनीं तें युक्त होतें; उत्तम भूषणांनीं तें भूषित झालेलें होतें ५; आणि रत्नसमुदायांनीं भरून गेलें असल्यामुळें नागांचें गृह, मरुद्गणांचें निवासस्थान अथवा गंधर्वांचें वसतिस्थानच कीं काय असें दिसत होतें ६. असो. महामेघामध्यें प्रविष्ट होणारा सूर्यच कीं काय अशा रीतीनें तेजोरूप विस्तृत किरणांनीं युक्त असलेला महातेजस्वी वीर बिभीषण ज्येष्ठ भ्रात्याच्या त्या गृहामध्यें प्रविष्ट झाला असतां ७, वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं उच्चारिलेले आणि भ्रात्याचा विजय सुचविणारे पवित्र पुण्याहघोष त्या महातेजस्वी बिभीषणानें ऐकिले ८; व दधिपात्रें, घृत आणि पुष्पाक्षता ह्यांच्या योगानें ज्यांचें पूजन केलें आहे असे मंत्रवेत्ते व वेदवेत्ते ब्राह्मणही त्या महाबलाढ्य बिभीषणानें अवलोकन केले ९. नंतर ह्याप्रमाणें राक्षस त्याची प्रशंसा करीत असतांना आणि आसनावर बसून आपल्या तेजानें झळकत असतांना त्या रावणाला महापराक्रमी बिभीषणानें वंदन केलें १०; आणि आचारामध्यें निपुण असलेला तो बिभीषण रीतीप्रमाणें विनय वगैरे दाखवून राजानें दृष्टीनें दर्शविलेल्या सुवर्णभूषित आसनावर तो बसला ११; आणि मंत्र्यांच संनिध एकांतामध्यें महात्म्या रावणाला उद्देशून अतिशय हितावह आणि युक्तींनीं निश्चित केलेल्या अर्थानें युक्त असें भाषण करूं लागला १२. प्रथमतः सौम्य भाषणानें ज्येष्ठ भ्रात्याचें मन वळविण्याचा प्रयत्न करून वंदनादि उपचार केल्यानंतर जगतांतील बरें वाईट जाणणारा तो बिभीषण देशकालांना अनुसरून ह्मणाला १३

सधूमार्चिः सधूमकलुषोदयः । मन्त्रसन्धुतोऽप्यग्निर्न सम्यगभिवर्धते १५
अग्निष्टेष्वग्निशालासु तथा ब्रह्मस्थलीषु च । सरीसृपाणि दृश्यन्ते हव्येषु
च पिपीलिकाः १६ गवां पयांसि स्कन्नानि विमदा वरकुञ्जराः । दीन-
मश्वाः प्रहेषन्ते नवग्रासाभिनन्दिनः १७ खरोष्ट्राश्वतरा राजन्भिन्नरोमाः
स्रवन्ति च । न स्वभाववतिष्ठन्ते विधानैरपि चिन्तिताः १८ वायसाः
सङ्घशः क्रूरा व्याहरन्ति समन्ततः । समवेताश्च दृश्यन्ते विमानाग्रेषु
सङ्घशः १९ गृध्राश्च परिलीयन्ते पुरीमुपरि पीडिताः । उपपन्नाश्च संध्ये
द्वे व्याहरन्त्यशिवं शिवाः २० क्रव्यादानां मृगाणां च पुरीद्वारेषु सङ्घशः ।
श्रूयन्ते विपुला घोषाः सविस्फूर्जितनिःस्वनाः २१ तदेवं प्रस्तुते कार्ये प्राय-
श्चित्तमिदं क्षमम् । रोचये वीर वैदेही राघवाय प्रदीयताम् २२ इदं च यदि
वा मोहाल्लोभाद्वा व्याहृतं मया । तत्रापि च महाराज न दोषं कर्तुमर्हसि २३
अयं हि दोषः सर्वस्य जनस्यास्योपलक्ष्यते । रक्षसां राक्षसीनां च पुरस्या-

---

" हे शत्रुतापना, सीता येथें आल्यापासून आह्मांला अशुभसूचक चिन्हें दिसूं लागलीं आहेत १४. मंत्रसमुदायानें जरी हवन केलें तरी अग्नि चांगला प्रज्वलित न होतां ठिणग्या, धूमयुक्त ज्वाला आणि धूमयुक्त तेज ह्यांनींच संपन्न असतो १५. अग्निस्थानें, होमशाला आणि वेदाध्ययनस्थलें ह्यांचे ठिकाणीं सर्प दृष्टोत्पत्तीस येऊं लागले असून हवनीय द्रव्यांमध्यें मुंग्या दिसूं लागल्या आहेत १६. गाईचीं दुधें अटून गेलीं आहेत; श्रेष्ठ श्रेष्ठ गजही मदरहित झाले आहेत; अश्व दीन स्वरानें खंखाळत आहेत आणि तृप्ति झाली असतांनाही नव्या वैरणीविषयीं उत्सुक दिसत आहेत १७; गर्दभ, उंट, आणि खेचरें हीं अंगावर कांटा आणून अश्रु ढाळीत आहेत; आणि, हे राजा, औषधि उपचार केला असतांही तीं स्वस्थ होत नाहींत १८. क्रूर काकपक्षी टोळ्या टोळ्यांनीं सभोंवतीं आक्रोश करीत आहेत आणि मोठमोठ्या उंच इमारतीवरूनही एकत्र जुळून टोळ्या टोळ्यांनीं बसत असलेले दिसत आहेत १९. व्यथित झालेले गृध्रपक्षी नगरींतील घरांवरून बसत आहेत आणि खोंकडें अगदीं समीप येऊन दोन्ही संधिसमयीं अशुभ आक्रोश करीत आहेत २०. टोळ्या टोळ्यांनीं संचार करीत असलेल्या मांसभक्षक श्वापदांचे विद्युल्लतेसारिखे प्रचंड ध्वनि नगरीच्या द्वारांशीं कानांवर येत आहेत २१. तस्मात्, हे वीरा, ह्याप्रमाणें कार्य उपस्थित झालें असतांना रामाला सीता देऊन टाकावी हीच निष्कृति मला योग्य दिसत आहे २२. हे महाराजा, मोहामुळें अथवा लोभामुळें मीं हें भाषण केलें आहे असें जरी आपणांला वाटलें तरी आपण त्या भाषणावर दोषदृष्टि करूं नका २३. सीतेचा अपहार करून

न्तःपुरस्य च २४ प्रापणे चास्य मन्त्रस्य निवृत्ताः सर्वमन्त्रिणः । अवश्यं च मया वाच्यं यद्दृष्टमथ वा श्रुतम् ॥ संविधाय यथान्यायं तद्भवान्कर्तुमर्हति २५ इति स्वमन्त्रिणां मध्ये भ्राता भ्रातरमूचिवान् । रावणं रक्षसां श्रेष्ठं पथ्यमेतद्विभीषणः २६ हितं महार्थं मृदु हेतुसंहितं व्यतीतकालायतिसंप्रति क्षमम् । निशम्य तद्वाक्यमुपस्थितज्वरः प्रसङ्गवानुत्तरमेतदब्रवीत् २७ भयं न पश्यामि कुतश्चिदप्यहं न राघवः प्राप्स्यति जातु मैथिलीम् । सुरैः सहेन्द्रैरपि सङ्गरे कथं ममाग्रतः स्थास्यति लक्ष्मणाग्रजः २८ इत्येवमुक्त्वा सुरसैन्यनाशनो महाबलः संयति चण्डविक्रमः । दशाननो भ्रातरमाप्तवादिनं विसर्जयामास तदा बिभीषणम् २९ [ ३४५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

स बभूव कृशो राजा मैथिलीकाममोहितः । असंमानाच्च सुहृदां पापः पापेन कर्मणा १ अतीव कामसंपन्नो वैदेहीमनुचिन्तयन् । अतीतसमये काले तस्मिन्वै युधि रावणः २ अमात्यैश्च सुहृद्भिश्च प्राप्तकाल-

---

तिला येथें ठविलें आहे ह्यांत राक्षस, राक्षसी, नगर आणि अंतःपुर ह्या सर्वच लोकांचा दोष मला दिसत आहे २४. हा उपदेश करण्याविषयीं सर्व मंत्र्यांनीं जरी मागें घेतलें आहे तरी दृष्ट अथवा श्रुत असें जें कांहीं हितावह असेल तें मला अवश्य सांगितलें पाहिजे. माझ्या सांगण्याचा योग्य रीतीनें विचार करून त्याप्रमाणें तूं वाग " २५. ह्याप्रमाणें मंत्र्यांमध्यें भ्राता बिभीषण आपल्या राक्षसश्रेष्ठ रावणनामक भ्रात्याला ह्मणाला असतां २६, गंभीर अर्थ व हेतु ह्यांनीं युक्त, हितावह, भूत, वर्तमान आणि भविष्य अशा तिन्हीं वेळीं योग्य ठरणारें व सौम्य असें तें भाषण श्रवण केल्यावर अतिप्रसंग करणारा तो रावण संतप्त होऊन त्याला ह्मणाला २७ " मला कसलेंही भय वाटत नाहीं आणि रामाला सीता कधींही प्राप्त होणार नाहीं. कारण, इंद्रासहवर्तमान देवांचें साहाय्य असलें तरी सुद्धां संग्रामामध्यें राम माझ्यासमोर उभा राहील कसा ? " २८. ह्याप्रमाणें बोलल्यावर त्या देवसेनानाशक व संग्रामामध्यें भयंकर पराक्रम करणाऱ्या महाबलाढ्य रावणानें हिताचें भाषण करणाऱ्या भ्रात्या बिभीषणाला जाण्याची अनुज्ञा दिली २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

सीतेसंबंधीं कामवासनेनें मोहित झालेला तो पापी रावणराजा सुहृदांच्या अपमानामुळें आणि स्वतःच्या पापकर्मामुळें कृश झाला १; व अतिशय कामसंतप्त होऊन

मनन्यत ३ स हेमजालविततं मणिविद्रुमभूषितम् । उपगम्य विनीताश्वमारुरोह महारथम् ४ तमास्थाय रथश्रेष्ठं महामेघसमस्वनम् । प्रययौ रक्षसां श्रेष्ठो दशग्रीवः सभां प्रति ५ असिचर्मधरा योधाः सर्वायुधधरास्ततः । राक्षसा राक्षसेन्द्रस्य पुरस्तात्संप्रतस्थिरे ६ नानाविकृतवेषाश्च नानाभूषणभूषिताः । पार्श्वतः पृष्ठतश्चैनं परिवार्य ययुस्तदा ७ रथैश्चातिरथाः शीघ्रं मत्तैश्च वरवारणैः । अनूत्पेतुर्दशग्रीवमाक्रीडद्भिश्च वाजिभिः ॥ गदापरिघहस्ताश्च शक्तितोमरपाणयः ८ ततस्तूर्यसहस्राणां संजज्ञे निःस्वनो महान् । तुमुलः शङ्खशब्दश्च सभां गच्छति रावणे ९ स नेमिघोषेण महान्सहसाभिनिनादयन् । राजमार्गं श्रिया जुष्टं प्रतिपेदे महारथः १० विमलं चातपत्रं च प्रगृहीतमशोभत । पाण्डुरं राक्षसेन्द्रस्य पूर्णस्ताराधिपो यथा ११ हेममञ्जरिगर्भे च शुद्धस्फटिकविग्रहे । चामरव्यजने तस्य रेजतुः सव्यदक्षिणे १२ ते कृताञ्जलयः

---

एकसारिखें सीतेचेंच चिंतन करूं लागला. ह्यामुळें त्यावेळीं युद्ध करणें अयोग्य अमतांनाही २ अमात्य आणि सुहृद ह्यांसहवर्तमान त्याला तें योग्यच वाटूं लागलें ३. सुवर्णभूषणांनीं व्याप्त, हिऱ्यांनीं व पोंवळ्यांनीं भूषित आणि शिकविलेले अश्व जोडिलेला असा जो आपला मोठा रथ त्या रथावर तो आरूढ झाला ४; आणि प्रचंड मेघाप्रमाणें गर्जना करणाऱ्या त्या श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन तो राक्षसश्रेष्ठ रावण सभेकडे निघाला असतां ५ ढाल, तरवार आणि इतरही सर्व आयुधें धारण करणार राक्षस योद्धे त्या राक्षसाधिपतीच्या पुढेंच निघाले ६. नानाप्रकारचे वेष त्यांनीं धारण केलेले होते; नानाप्रकारचीं भूषणें त्यांनीं घातलेलीं होतीं आणि बाजूंनीं व पृष्ठभागानें त्याला परिवेष्टित करून ते जात होते ७. सारांश, ते अतिरथी राक्षस रथ, मदमत्त झालेले श्रेष्ठ गज आणि क्रीडा करीत असलेले हत्ती ह्यांच्यावर आरूढ होऊन व आपल्या हातांत परिघ, गदा, शक्ति व तोमर हीं आयुधें घेऊन रावणाच्या मागोमाग धावूं लागले असतां ८, हजारों वाद्यांचा मोठा ध्वनि होऊं लागला आणि त्याचप्रमाणें रावण सभेमध्यें निघाला असतां शंखशब्दही तुमुल होऊं लागला ९. इतक्यांत धावांच्या ध्वनीनें एकदम मार्ग नादित करणारा तो प्रचंड महारथ वैभवानें युक्त असलेल्या राजमार्गावर प्राप्त झाला १०. नंतर राक्षसाधिपति रावणावर धरिलेलें श्वेतवर्ण निर्मल छत्र पूर्णचंद्राप्रमाणें शोभूं लागलें ११; आणि सुवर्णनिर्मित मंजऱ्या ज्यांच्या अंतर्भागामध्यें आहेत व शुद्ध स्फटिकाचा ज्यांचा घांट आहे अशा चौऱ्या व मोरचेलें त्याच्या डाव्याउजव्या बाजूंनीं झळकूं लागलीं १२. तेव्हां भूमीवर हात जोडून उभ्या राहिलेल्या

सर्वे रथस्थं पृथिवीस्थिताः । राक्षसा राक्षसश्रेष्ठं शिरोभिस्तं ववन्दिरे १३ राक्षसैः स्तूयमानः सञ्जयाशीर्भिररिन्दमः । आससाद महातेजाः सभां विरचितां तदा १४ सुवर्णरजतास्तीर्णां विशुद्धस्फटिकान्तराम् । विराजमानो वपुषा रुक्मपट्टोत्तरच्छदाम् १५ तां पिशाचशतैः षड्भिरभिगुप्तां सदाप्रभाम् । प्रविवेश महातेजाः सुकृतां विश्वकर्मणा १६ तस्याः स वैडूर्यमयं प्रियकाजिनसंवृतम् । महत्सोपाश्रयं भेजे रावणः परमासनम् १७ ततः शशासेश्वरवद्दूताँल्लघुपराक्रमान् । समानयत मे क्षिप्रमिहैतान्राक्षसानिति १८ कृत्यमस्ति महज्जाने कर्तव्यमिति शत्रुभिः । राक्षसास्तद्वचः श्रुत्वा लङ्कायां परिचक्रमुः १९ अनुगेहमवस्थाय विहारशयनेषु च । उद्यानेषु च रक्षांसि चोदयन्तो ह्यभीतवत् २० ते रथान्रुचिरानेके दृप्तानेके दृढान्हयान् । नागानेकेऽधिरुरुहुर्जग्मुश्चैके पदातयः २१ सा पुरी परमाकीर्णा रथकुञ्जरवाजिभिः । संपतद्भिर्विरुरुचे गरुत्मद्भिरिवाम्बरम् २२ ते वाहनान्यवस्थाय यानानि विविधानि

---

त्या सर्वही राक्षसांनीं रथावर आरूढ झालेल्या त्या राक्षसश्रेष्ठ रावणाला मस्तकांनीं प्रणाम केला १३; आणि राक्षस स्तुति करून जयसूचक आशीर्वाद देत असतांना तो शत्रुतापन महातेजस्वी रावण तयार केलेल्या त्या सभेमध्यें आला १४. ती सभा रौप्य व सुवर्ण ह्यांनीं भरलेली होती; मधून मधून शुद्ध स्फटिकमणि बसविलेले होते आणि आकारानें ती झळकत असून किनखापी चादर तिच्यावर घातलेली होती १५. सहाशें पिशाच त्या नित्य उज्ज्वल असलेल्या सभेचें रक्षण करीत असत. अशा त्या विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या सभेमध्यें तो महातेजस्वी रावण प्रविष्ट झाला असतां १६, वैडूर्यरत्नमय, प्रियकसंज्ञक हरिणाच्या अजिनानें व्याप्त आणि फारच विशाल असें जें उत्कृष्ट आसन होतें तेथें तो बसला १७; आणि नंतर राजाप्रमाणें त्या राक्षसांना ह्मणाला " शीघ्र गमन करणार राक्षसदूत येथें माझ्याकडे सत्वर घेऊन या १८. शत्रूंसहवर्तमान मोठाच प्रसंग करावा लागेल असें मला वाटतें." हें भाषण श्रवण करून राक्षसदूत लंकेमध्यें हिंडूं लागले १९; आणि प्रत्येक घरीं जाऊन व निर्भयपणें विहारस्थानें शयनस्थानें, व उपवनें ह्यांतही प्रवेश करून राक्षसांना प्रेरणा करूं लागले २०. तेव्हां निमंत्रण केलेले ते राक्षस कांहीं रथावर आरूढ होऊन आणि कांहीं मदमत्त झालेल्या दृढ अश्वावर व गजावर आरूढ होऊन गेले आणि कांहीं पादचारीच चालते झाले २१. त्यावेळीं उड्डाण करणाऱ्या गरुडपक्ष्यांच्या योगानें ज्याप्रमाणें आकाश शोभूं लागतें त्याप्रमाणें रथ, गज

च। सभां पद्भिः प्रविविशुः सिंहा गिरिगुहामिव २३ राज्ञः पादौ गृहीत्वा तु राज्ञा ते प्रतिपूजिताः। पीठेष्वन्ये बृसीष्वन्ये भूमौ केचिदुपाविशन् २४ ते समेत्य सभायां वै राक्षसा राजशासनात् । यथार्हमुपतस्थुस्ते रावणं राक्षसाधिपम् २५ मन्त्रिणश्च यथामुख्या निश्चितार्थेषु पण्डिताः । अमात्याश्च गुणोपेताः सर्वज्ञा बुद्धिदर्शनाः २६ समीयुस्तत्र शतशः शूराश्च बहवस्तथा । सभायां हेमवर्णायां सर्वार्थस्य सुखाय वै २७ ततो महात्मा विपुलं सुयुग्यं रथं वरं हेमविचित्रिताङ्गम् । शुभं समास्थाय ययौ यशस्वी विभीषणः संसदमग्रजस्य २८ स पूर्वजायावरजः शशंस नामाथ पश्चाच्चरणौ ववन्दे। शुकः प्रहस्तश्च तथैव तेभ्यो ददौ यथार्हं पृथगासनानि २९ सुवर्णनानामणिभूषणानां सुवाससां संसदि राक्षसानाम् । तेषां परार्ध्या-गुरुचन्दनानां स्रजां च गन्धाः प्रववुः समन्तात् ३० न चुक्रुशुर्नानृतमाह कश्चित्सभासदो नापि जजल्पुरुच्चैः । संसिद्धार्थाः सर्व एवोग्रवीर्या भर्तुः

---

व अश्व ह्यांनीं अतिशय व्याप्त झालेली ती नगरी शोभूं लागली २२. नंतर समीप गेल्यावर वाहनें आणि नानाप्रकारचीं यानें बाहेर ठेवून पर्वताच्या गुहेमध्यें प्रवेश करणाऱ्या सिंहाप्रमाणें त्या राक्षसांनीं पायांच्याच योगानें सभेमध्यें प्रवेश केला २३. राजाचे पाय धरिल्यानंतर राजानेंही त्यांचा सत्कार केला आणि कांहीं पीठावर, कांहीं वर्तुल आसनांवर व कांहीं भूमीवर असे ते राक्षस तेथें बसले २४. राजाच्या आज्ञेप्रमाणें सभेमध्यें आल्यावर ते राक्षस योग्यरीतीनें राक्षसाधिपति रावणाची शुश्रूषा करूं लागले २५. अर्थनिर्णयाविषयीं कुशल असलेले मुख्य मुख्य मंत्री, सर्व शास्त्रवेत्ते व ज्ञानदृष्टि असे गुणी अमात्य २६ तेथें शेंकडों जुळले आणि सर्व गोष्टींचा निर्णय करण्याकरितां व कल्याणाचा विचार करण्याकरितां सुवर्णासारिख्या उज्ज्वल सभेमध्यें शूरही अनेक आले २७. तदनंतर उत्कृष्ट अश्व आणि सुवर्णानें शृंगारिलेले अवयव ह्यांनीं युक्त असलेल्या विस्तीर्ण, शुभ व श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन महात्मा यशस्वी बिभीषण ज्येष्ठ भ्रात्याच्या सभेमध्यें प्रविष्ट झाला असतां २८, त्या कनिष्ठ भ्रात्यानें ज्येष्ठ भ्रात्याला प्रथम आपलें नांव कळवून नंतर त्याच्या पायांना वंदन केलें. तदनंतर शुक व प्रहस्त ह्यांनींही तसेंच केल्यावर त्या तीघांनाही त्यानें योग्यतेप्रमाणें वेगळीं वेगळीं आसनें दिलीं २९. नानाप्रकारचीं रत्नभूषणें सुवर्णभूषणें, आणि उत्कृष्ट वस्त्रें ह्यांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसांच्या शरीरावरील उत्कृष्ट अगुरु, चंदन आणि पुष्पमाला ह्यांचे सुगंध सभोंवतीं सुटूं लागले ३०. तेथें कोणींही गडबड केली नाहीं; कोणींही असत्य भाषण केलें नाहीं; आणि सभासदांनींही उच्चस्वरानें भाषण केलें

सर्वे ददृशुश्चाननं ते ३१ स रावणः शस्त्रभृतां मनस्विनां महाबलानां समितौ मनस्वी । तस्यां सभायां प्रभया चकाशे मध्ये वसूनामिव वज्रहस्तः ३२ [ ३७७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्ड एकादशः सर्गः ॥ ११ ॥

स तां परिषदं कृत्स्नां समीक्ष्य समितिंजयः । प्रबोधयामास तदा प्रहस्तं वाहिनीपतिम् १ सेनापते यथा ते स्युः कृतविद्याश्चतुर्विधाः । योधा नगररक्षायां तथा व्यादेष्टुमर्हसि २ स प्रहस्तः प्रणीतात्मा चिकीर्षन्राजशासनम् । विनिक्षिप्य बलं सर्वं बहिरन्तश्च मन्दिरे ३ ततो विनिक्षिप्य बलं सर्वं नगरगुप्तये । प्रहस्तः प्रमुखे राज्ञो निषसाद जगाद च ४ विहितं बहिरन्तश्च बलं बलवतस्तव । कुरुष्वाविमनाः क्षिप्रं यदभिप्रेतमस्ति ते ५ प्रहस्तस्य वचः श्रुत्वा राजा राज्यहितैषिणः । सुखेप्सुः सुहृदां मध्ये व्याजहार स रावणः ६ प्रियाप्रिये सुखे दुःखे लाभालाभे हिताहिते । धर्मकामार्थकृच्छ्रेषु यूयमर्हथ वेदितुम् ७ सर्वकृत्यानि युष्माभिः

---

नाहीं. तात्पर्य, मनोरथ परिपूर्ण झालेले आणि प्रचंड वीर्यानें युक्त असलेले ते सर्वही राक्षस आपल्या राजाच्या मुखाकडे पाहूं लागले ३१. तेव्हां वसूंमध्यें ज्याप्रमाणें वज्रपाणि इंद्र शोभूं लागतो त्याप्रमाणें तो बुद्धिमान् रावण शस्त्रधारण करणाऱ्या विचारी व महाबलाढ्य राक्षसांच्या समाजामध्यें ह्मणजे त्या सभेमध्यें प्रभेच्या योगानें शोभूं लागला ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

ती संपूर्ण सभा अवलोकन केल्यावर तो समरविजयी रावण सेनापति प्रहस्ताला ह्मणाला १ "हे सेनाधिपते, अस्त्रशस्त्रविद्येंत निपुण असे जे चारी प्रकारचे योद्धे आपल्यापाशीं आहेत ते नगररक्षणाविषयीं सावध राहतील अशारीतीनें तूं त्यांना अनुज्ञा कर" २. नंतर स्वस्थ अंतःकरणानें युक्त असलेल्या त्या प्रहस्तानें राजाची आज्ञा शेवटास नेण्याकरितां नगराच्या आंत व बाहेर सर्व सैन्य व्यवस्थित रीतीनें ठेविलें ३; आणि अशारीतीनें नगररक्षणार्थ सर्व सैन्य ठेविल्यानंतर तो प्रहस्त राजाचे संमुख बसला आणि ह्मणाला ४ "तुज पराक्रमी राजाचें बलाढ्य असें सैन्य नगराच्या आंत व बाहेर सज्ज केलें आहे. ह्यास्तव, आपल्या जें मनामध्यें असेल त्याची आपण निर्भयपणें सत्वर आज्ञा करा" ५. राज्याचें हित इच्छिणाऱ्या प्रहस्ताचें हें भाषण श्रवण करून सुखाची इच्छा धरणारा तो रावणराजा सुहृदांमध्यें ह्मणाला ६ "प्रिय आणि अप्रिय, सुख आणि दुःख, लाभ आणि हानि, हित आणि अहित व त्याचप्रमाणें धर्म, अर्थ

समारब्धानि सर्वदा । मन्त्रकर्मनियुक्तानि न जातु विफलानि मे ८ ससोम-
ग्रहनक्षत्रैर्मरुद्भिरिव वासवः । भवद्भिरहमत्यर्थं वृतः श्रियमवाप्नुयाम् ९
अहं तु खलु सर्वान्वः समर्थयितुमुद्यतः । कुम्भकर्णस्य तु स्वप्नान्नेमम-
र्थमचोदयम् १० अयं हि सुप्तः षण्मासान्कुम्भकर्णो महाबलः । सर्व-
शस्त्रभृतां मुख्यः स इदानीं समुत्थितः ११ इयं च दण्डकारण्याद्रामस्य
महिषी प्रिया । रक्षोभिश्चरिताद्देशादानीता जनकात्मजा १२ सा मे न शय्या-
मारोढुमिच्छत्यलसगामिनी । त्रिषु लोकेषु चान्या मे न सीता सदृशी तथा १३
तनुमध्या पृथुश्रोणी शरदिन्दुनिभानना । हेमबिम्बनिभा सौम्या मायेव
मयनिर्मिता १४ सुलोहिततलौ श्लक्ष्णौ चरणौ सुप्रतिष्ठितौ । दृष्ट्वा ताम्र-
नखौ तस्या दीप्यते मे शरीरजः १५ हुताग्निरर्चिःसंकाशामेनां सौरी-
मिव प्रभाम् । उन्नसं विमलं वल्गु वदनं चारुलोचनम् १६ पश्यंस्तद-

---

व काम एतद्विषयक असलेंही संकट ह्यासंबंधानें सर्व कांहीं तुह्मांला विदित आहे ७. तुह्मीं मन्त्र व पराक्रम ह्यांनीं युक्त अशीं जी कांहीं कृत्यें आजपर्यंत माझ्याकरितां हातीं घेतलीं तीं कधींही निष्फल झालीं नाहींत ८. चंद्रासहवर्तमान ग्रह व नक्षत्रें ह्यांसहवर्तमान मरुद्गणांनीं परिवेष्टित असलेल्या इंद्राप्रमाणें तुमच्या योगानें परिवेष्टित असलेल्या मला अतिशय वैभव प्राप्त होईल ९. तुह्मां सर्वांच्या मताप्रमाणें वागण्यास मी खरोखर तयार आहें; परंतु, कुंभकर्णाला मात्र तो नेहमीं झोपेंत असल्यामुळें मीं ही गोष्ट कळविली नाहीं १०. शस्त्रधारण करणाऱ्या सर्वांमध्यें श्रेष्ठ असलेला हा महाबलाढ्य कुंभकर्ण सहा महिने निद्रिस्थ होता; तो सांप्रत जागा झाला आहे ११. रामाची ही प्रिय भार्या जनककन्या राक्षसांनीं संचार केलेल्या दंडकारण्यांतून मीं येथें आणिली आहे १२; परंतु, ठमकत ठमकत चालणारी ती सुंदरी माझ्या शय्येवर आरोहण करण्याचें मनामध्यें आणीत नाहीं. तथापि, त्रैलोक्यामध्यें दुसरी कोणतीही स्त्री माझ्या मनामध्यें भरत नाहीं १३. हिचा मध्यभाग कृश असून श्रोणी विशाल आहेत; तिचें मुख शरदृतूंतील चंद्राप्रमाणें आल्हादकारक आहे; सुवर्णनिर्मित मूर्तिच कीं काय अशी तिची कांति आहे; आकारानें ती सौम्य आहे व मयासुरानें निर्माण केलेल्या मायेप्रमाणें ती दिसत आहे १४. ज्यांचे तळवे फारच आरक्तवर्ण आहेत, ज्यांची ठेवणही चांगली आहे आणि ज्यांचीं नखें ताम्रवर्ण आहेत असे तिचे तुळतुळीत पाय अवलोकन केले ह्मणजे तर माझा काम अगदीं प्रदीप्त होऊन जातो १५. ज्वालेप्रमाणें देदीप्यमान असलेली अथवा सूर्याच्या प्रभेप्रमाणें झळकत असलेली ही सीता अवलोकन करितांक्षणीं माझा काम हवनीय द्रव्यें आंत घातलेल्या अग्नीप्रमाणें

वशस्तस्याः कामस्य वशमेयिवान् । क्रोधहर्षसमानेन दुर्वर्णकरणेन च १७ शोकसंतापनित्येन कामेन कलुषीकृतः । सा तु संवत्सरं कालं मामयाचत भामिनी १८ प्रतीक्षमाणा भर्तारं राममायतलोचना । तन्मया चारुनेत्रायाः प्रतिज्ञातं वचः शुभम् १९ श्रान्तोहं सततं कामाद्यातो हय इवाध्वनि । कथं सागरमक्षोभ्यं तरिष्यन्ति वनौकसः २० बहुसत्त्वझषाकीर्णं तौ वा दशरथात्मजौ । अथ वा कपिनैकेन कृतं नः कदनं महत् २१ दुर्ज्ञेयाः कार्यगतयो ब्रूत यस्य यथामति । मानुषान्नो भयं नास्ति तथापि तु विमृश्यताम् २२ तदा देवासुरे युद्धे युष्माभिः सहितोजयम् । ते मे भवन्तश्च तथा सुग्रीवप्रमुखान्हरीन् २३ परे पारे समुद्रस्य पुरस्कृत्य नृपात्मजौ । सीतायाः पदवीं प्राप्य संप्राप्तौ वरुणालयम् २४ अदेया च यथा सीता वध्यौ दशरथात्मजौ । भवद्भिर्मन्त्र्यतां मन्त्रः सुनीतं चाभिधीयताम् २५ न हि शक्तिं

---

प्रदीप्त होत असतो. उन्नत नासिका आणि मनोहर नेत्र ह्यांनीं युक्त असलेलें तिचें निर्मल व सुंदर मुख १६ पहातां पहातां माझें देहभान अगदीं नाहींसें होऊन मी कामाच्या अधीन होऊन जात असतों. क्रोध व हर्ष ह्यांना दाद न देणारा, कांतीचा नाश करणारा १७ आणि शोक व संताप उत्पन्न करणारा जो काम त्यानें मला अगदीं घेरून टाकिलें आहे. परंतु, भर्त्या रामाची प्रतीक्षा करीत असलेल्या त्या दीर्घनयना सुंदरीनें वर्षपरिमित कालावधि माझ्यापाशीं मागितली आहे आणि मनोहर नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या सीतेचें तें शुभ ह्मणणें मीं कबूलही केलें आहे १८, १९. परंतु, मार्ग चालून गेलेल्या अश्वाप्रमाणें कामामुळें मी एकसारिखा जर्जर होऊन गेलों आहें. ( एक वर्ष संपूर्ण झाल्यानंतर सीता मला प्राप्त होईलच. कारण, ) असंख्य जलचर प्राणी व मत्स्य ह्यांनीं युक्त असलेला अगाध समुद्र ते वानर अथवा ते दशरथपुत्र रामलक्ष्मण तरी कसे तरून येतील ? अथवा एकट्या कपीनेंही जर आमची भयंकर कत्तल करून टाकिली आहे तर २०, २१ मनांत आणिलेल्या कार्यांचे परिणाम कसे काय होतील हें सांगतां येत नाहीं. ह्यास्तव, तुमचा काय विचार असेल तो तुह्मी यथामति कळवा. मनुष्यापासून जरी आपणांला भय नाहीं तरी, विचार करणें बरें २२. देवदैत्यांच्या युद्धामध्यें तुह्मांसहवर्तमान मला जय प्राप्त झाला होता आणि तेच तुह्मी त्याप्रमाणेंच माझ्यापाशीं आहांत. सांप्रत सुग्रीवप्रभृति वानरांना २३ पुढें करून सीतेला शोधण्याकरितां समुद्राच्या परतीरावर ते राजकुमार रामलक्ष्मण प्राप्त झाले आहेत २४. तस्मात्, सीता त्यांच्या स्वाधीन न करितां त्या दशरथपुत्रांचा वध कसा होईल

प्रपश्यामि जगत्यन्यस्य कस्यचित् । सागरं वानरैस्तीर्त्वा निश्चयेन जयो मम २६ तस्य कामपरीतस्य निशम्य परिदेविनम् । कुम्भकर्णः प्रचुक्रोध वचनं चेदमब्रवीत् २७ यदा तु रामस्य सलक्ष्मणस्य प्रसह्य सीता खलु सा इहाहृता । सकृत्समीक्ष्यैव सुनिश्चितं तदा भजेत चित्तं यमुनेव यामुनम् २८ सर्वमेतन्महाराज कृतमप्रतिमं तव । विधीयेत सहास्माभिरादावेवास्य कर्मणः २९ न्यायेन राजकार्याणि यः करोति दशानन । न स संतप्यते पश्चान्निश्चितार्थमतिर्नृपः ३० अनुपायेन कर्माणि विपरीतानि यानि च । क्रियमाणानि दुष्यन्ति हवींष्यप्रयतेष्विव ३१ यः पश्चात्पूर्वकार्याणि कर्माण्यभिचिकीर्षति । पूर्वं चापरकार्याणि स न वेद नयानयौ ३२ चपलस्य तु कृत्येषु प्रसमीक्ष्याधिकं बलम् । छिद्रमन्ये प्रपद्यन्ते क्रौञ्चस्य खमिव द्विजाः ३३ त्वयेदं महदारब्धं कार्यमप्रतिचिन्तितम् । दिष्ट्या त्वां नावधीद्रामो विषमिश्रमिवामिषम् ३४ तस्मात्त्वया

---

ही मसलत तुह्मी ठरवा आणि जें कांहीं ठरेल तें निश्चयपूर्वक मला सांगा २५. वानरांसहवर्तमान समुद्राचें उल्लंघन करून आह्मांला जिंकण्याचें सामर्थ्य ह्या जगतामध्यें कोणाचेंही मला दिसत नाहीं. ह्यास्तव, माझा जय हा निःसंशय ठरलेलाच आहे " २६. मदनानें व्याकुल झालेल्या त्या रावणाचें हें दीन भाषण श्रवण करून कुंभकर्ण क्रुद्ध झाला आणि ह्मणाला २७ " जेव्हां लक्ष्मणासहवर्तमान रामाला न जुमानितां सीता बलात्कारानें तूं येथें हरण करून आणिलीस तेव्हां यामुन डोहाचें अवलंबन करणाऱ्या यमुनेप्रमाणें एकदांच काय तो विचार होऊन तुझ्या चित्ताचा निश्चय व्हावयास पाहिजे होता २८. हे महाराज, हें तुझें सर्वच कृत्य अनुचित आहे. प्रथमच जर तूं आमचा विचार घेतला असतास तर आह्मीं हें कर्म शेवटासही नेलें असतें २९. हे दशानना, न्यायाला अनुसरून जो राजकार्यें करितो, तो निश्चित बुद्धीनें युक्त असलेला राजा पश्चात्ताप पावत नाहीं ३०. अविचारानें जीं विपरीत कर्में केलीं जातात तीं होतां होतांच अपवित्र यागांतील हवींप्रमाणें कर्त्याला दूषित करितात ३१. पूर्वीं कर्तव्य असलेल्या कर्मांचा जो मागून विचार करितो आणि त्याचप्रमाणें पुढलीं कार्यें जो आधींच करूं लागतो तो न्यायअन्याय कांहींच जाणीत नाहीं ३२. क्रौंच पर्वत उल्लंघून जाण्याकरितां ज्याप्रमाणें हंसपक्षी त्याच्या छिद्राचें अवलंबन करीत असतात त्याचप्रमाणें संग्रामसंबंधी कृत्यांमध्यें चंचल पुरुषाचें सामर्थ्य अधिक पाहूनही त्याचा निग्रह करण्याकरितां शत्रु छिद्राचेंच अवलंबन करीत असतात ३३. परिणामाचा विचार न करितां तूं ह्या मोठ्याच कार्याला हात घातला आहेस आणि

समारब्धं कर्म ह्यप्रतिमं परैः । अहं समीकरिष्यामि हत्वा शत्रूंस्तवा-
नघ ३५ अहमुत्सादयिष्यामि शत्रूंस्तव निशाचर ३६ यदि शक्रविव-
स्वन्तौ यदि पावकमारुतौ । तावहं योधयिष्यामि कुबेरवरुणावपि ३७
गिरिमात्रशरीरस्य महापरिघयोधिनः । नर्दतस्तीक्ष्णदंष्ट्रस्य बिभीयाद्वै
पुरन्दरः ३८ पुनर्मां स द्वितीयेन शरेण निहनिष्यति । ततोऽहं तस्य
पास्यामि रुधिरं काममाश्वस ३९ वधेन वै दाशरथेः सुखावहं जयं
तवाहर्तुमहं यतिष्ये । हत्वा च रामं सह लक्ष्मणेन खादामि सर्वान्हरियूथ-
मुख्यान् ४० रमस्व कामं पिब चाग्र्यवारुणीं कुरुष्व कार्याणि हितानि
विज्वरः । मया तु रामे गमिते यमक्षयं चिराय सीता वशगा भवि-
ष्यति ४१ [ ४१८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
युद्धकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

रावणं क्रुद्धमाज्ञाय महापार्श्वो महाबलः । मुहूर्तमनुसंचिन्त्य प्राञ्ज-
लिर्वाक्यमब्रवीत् १ यः खल्वपि वनं प्राप्य मृगव्यालनिषेवितम् । न

---

विषमिश्र भोज्य वस्तु ज्याप्रमाणें भोक्त्याचा वध करिते त्याप्रमाणें रामानें तुझा वध केला नाहीं ही तरी मोठ्या भाग्याचीच गोष्ट आहे ३४. आतां ज्याअर्थी शत्रूंसहवर्तमान तूं अनुचित कर्म आरंभिलेंच आहेस त्याअर्थी, हे निष्पाप, तुझ्या शत्रूंचा वध करून मी तें शेवटास नेईन ३५. हे निशाचरा, मी तुझ्या शत्रूंचा उच्छेद करून टाकीन ३६. ते रामलक्ष्मण जरी प्रत्यक्ष इंद्रसूर्य, अग्निवायु अथवा कुबेरवरुण असले तरी सुद्धां मी त्यांच्याशीं युद्ध करीन ३७. पर्वततुल्य शरीर धारण करून मोठ्या परिघानें युद्ध करणाऱ्या आणि तीक्ष्ण दंष्ट्रांनीं युक्त असून गर्जना करीत असलेल्या मज कुंभकर्णाला इंद्रही भिऊन जाईल ३८; परंतु, राम जर माझ्यावर एकदां बाण टाकून पुनरपि दुसरा बाण टाकूं लागेल तर त्याचें मी रक्त प्राशन करीन ह्या विषयीं आपणांला खुशाल खात्री असूं द्यावी ३९. दशरथपुत्र रामाच्या वधानें मी तुला सुखावह विजय प्राप्त करून देण्याचा प्रयत्न करीन आणि लक्ष्मणासहवर्तमान रामाचा वध करून वानर-सैन्यांतील सर्व मुख्य मुख्य वानरांना खाऊन टाकीन ४०. तूं यथेष्ट क्रीडा करून उत्कृष्ट मदिरा सेवन कर आणि मनामध्यें कांहींएक काळजी न करितां आपल्या हिताचीं कृत्यें कर. रामाला मीं यमलोकीं पाठविल्यावर सीता चिरकाल तुझ्या अधीन होऊन राहील ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं बारावा सर्ग समाप्त झाला ॥ १२ ॥

रावण क्रुद्ध झाला आहे असें समजून महाबलाढ्य महापार्श्वानें मुहूर्तभर विचार

पिबन्मधु संप्राप्य स नरो बालिशो भवेत् २ ईश्वरस्येश्वरः कोऽस्ति तव शत्रुनिबर्हण । रमस्व सह वैदेह्या शत्रूनाक्रम्य मूर्धसु ३ बलात्कुक्कुटवृत्तेन प्रवर्तस्व महाबल । आक्रम्याक्रम्य सीतां वै तां भुङ्क्ष्व च रमस्व च ४ लब्धकामस्य ते पश्चादागमिष्यति किं भयम् । प्राप्तमप्राप्तकालं वा सर्वं प्रतिविधास्यसे ५ कुम्भकर्णः महास्माभिरिन्द्रजिच्च महाबलः । प्रतिषेधयितुं शक्तौ सवज्रमपि वज्रिणम् ६ उपप्रदानं सान्त्वं वा भेदं वा कुशलैः कृतम् । समतिक्रम्य दण्डेन सिद्धिमर्थेषु रोचये ७ इह प्राप्तान्वयं सर्वाञ्छत्रूंस्तव महाबल । वशं शस्त्रप्रतापेन करिष्यामो न संशयः ८ एवमुक्तस्तदा राजा महापार्श्वेन रावणः । तस्य संपूजयन्वाक्यमिदं वचनमब्रवीत् ९ महापार्श्व प्रवदतो रहस्यं किंचिदात्मनः । चिरवृत्तं तदाख्यास्ये यदवाप्तं पुरा मया १० पितामहस्य भवनं गच्छन्तीं पुञ्जिकस्थलाम् । चञ्चूर्यमाणामद्राक्षमाकाशेऽग्निशिखामिव ११ सा प्रसह्य मया

---

केला आणि हात जोडून तो ह्मणाला १ " मृग आणि सर्प ह्यांनीं आश्रय केलेलें दुर्गम वन प्राप्त झाल्यावर मध हातीं आला असतां जो सेवन करीत नाहीं तो मूर्ख पुरुष होय २. हे शत्रुनाशका, तुज ईश्वराचा ईश्वर कोण आहे ? शत्रूंच्या मस्तकीं पाय देऊन तूं वैदेहीसहवर्तमान रममाण हो ३. हे महाबलाढ्य, कुक्कुटवृत्तीनें तूं सीतेचा बलात्कारानें उपभोग घेण्यास प्रवृत्त हो. सारांश, बलात्कार करून करून तूं सीतेचा उपभोग घे आणि रममाण हो ४. एकदां तुझी कामना परिपूर्ण झाल्यावर मागून काय बरें भय प्राप्त होणार आहे ? वेळीं अथवा अवेळीं जें कांहीं भय प्राप्त होईल त्या सर्वांचें तूं निवारण करशील ५. आह्मांसहवर्तमान कुंभकर्ण आणि महाबलाढ्य इंद्रजित् हे उभयतां वज्रपाणि इंद्राचाही पराभव करण्यास समर्थ आहेत ६. ह्यास्तव, नीतिकुशल पुरुषांनीं दान, साम अथवा भेद जरी ठरविलेला असला तरी दंडानेंच शत्रूला उलथून पाडून कार्यसिद्धि उरकून घेणें मला बरें दिसतें ७. हे महाबलाढ्य, येथें प्राप्त झालेल्या तुझ्या सर्व शत्रूंना आह्मी शस्त्रांच्या सामर्थ्यानें पादाक्रांत करूं ह्यांत संशय नाहीं ८." ह्याप्रमाणें महापार्श्व ह्मणाला असतां त्याच्या भाषणाची प्रशंसा करीत करीत रावणराजा त्याला ह्मणाला ९ " हे महापार्श्वा, मी तुला कांहीं पुरातन कालीं स्वतःसंबधानें घडलेली एक गुप्त गोष्ट सांगत आहें ( ती तूं श्रवण कर ) १०. आकाशामध्यें असलेली अग्निज्वालाच कीं काय अशी पुंजिकस्थलानामक अप्सरा माझ्या भीतीनें दबकत दबकत ब्रह्मदेवाच्या स्थानाप्रत जात असलेली मीं अवलोकन केली ११; अवलोकन करितांक्षणीं बलात्कारानें

मुक्ता कृता विवसना ततः। स्वयंभूभवनं प्राप्ता लोलिता नलिनी यथा १२
तच्च तस्य तथा मन्ये ज्ञातमासीन्महात्मनः। अथ संकुपितो वेधा मामिदं
वाक्यमब्रवीत् १३ अद्यप्रभृति यामन्यां बलान्नारीं गमिष्यसि। तदा ते
शतधा मूर्धा फलिष्यति न संशयः १४ इत्यहं तस्य शापस्य भीतः प्रम-
ममेव ताम्। नारोहये बलात्सीतां वैदेहीं शयने शुभे १५ सागरस्येव मे
वेगो मारुतस्येव मे गतिः। नैतद्दाशरथिर्वेद ह्यासादयति तेन माम् १६
को हि सिंहमिवासीनं सुप्तं गिरिगुहाशये। क्रुद्धं मृत्युमिवासीनं संबो-
धयितुमिच्छति १७ न मत्तो निर्गतान्बाणान्द्विजिह्वान्पन्नगानिव। रामः
पश्यति संग्रामे तेन मामभिगच्छति १८ क्षिप्रं वज्रसमैर्बाणैः शतधा
कार्मुकच्युतैः। राममादीपयिष्यामि उल्काभिरिव कुञ्जरम् १९ तच्चास्य
बलमादास्ये बलेन महता वृतः। उदितः सविता काले नक्षत्राणां प्रभा-
मिव २० न वासवेनापि सहस्रचक्षुषा युधास्मि शक्यो वरुणेन वा पुनः।
मया त्वियं बाहुबलेन निर्जिता पुरा पुरी वैश्रवणेन पालिता २१

---

मीं तिचा उपभोग घेतला आणि तिला वस्त्ररहित करून सोडून दिलें. तेव्हां कमलिनीप्रमाणें लटलट कांपत कांपत ती ब्रह्मलोकीं गेली १२. तें कृत्य त्या महात्म्या ब्रह्मदेवाला समजून आलें असें मला वाटतें. कारण, हें झाल्यानंतर ब्रह्मदेव क्रुद्ध होऊन मला म्हणाला १३ “आजपासून परस्त्रीचा तूं बलात्कारानें उपभोग घेशील तर तत्क्षणींच तुझ्या मस्तकाचे शेंकडों तुकडे होऊन जातील ह्यांत संशय नाहीं” १४. ह्याप्रमाणें मी त्या ब्रह्मदेवाच्या शापाला अतिशय भिऊन गेलों असल्यामुळें त्या विदेहराजकन्या सीतेचा शुभ शय्येवर उपभोग घेण्यास समर्थ नाहीं १५. असो. माझा वेग सागराप्रमाणें असून गति वायूप्रमाणें आहे हें दशरथपुत्र रामाला विदित नाहीं म्हणून तो माझ्याकडे येत आहे १६. नाहीं तर पर्वताच्या गुहेंत घोरत पडलेल्या आणि साक्षात् क्रुद्ध मृत्यूप्रमाणेंच असलेल्या सिंहाला कोण बरें चेतविण्याची इच्छा करणार आहे ? १७. द्विजिह्व सर्पच कीं काय असे माझ्यापासून सुटलेले बाण संग्राममध्यें रामानें अवलोकन केले नाहींत म्हणून तो माझ्याकडे येत आहे १८. ज्वालांच्या योगानें ज्याप्रमाणें गजाला भाजून टाकितात त्याप्रमाणें धनुष्यापासून सुटलेल्या शेंकडों वज्रतुल्य बाणांनीं मी रामाला पेटवून देईन १९. इतकेंच नव्हे परंतु, प्रचंड सैन्यांनीं परिवेष्टित असलेला मी, उदय पावलेला सूर्य ज्याप्रमाणें दिनसमयीं नक्षत्रांची प्रभा हरण करितो त्याप्रमाणें मी तें त्याचें बल हरण करीन २०. सहस्रनयन इंद्राच्या अथवा वरुणाच्या हातूनही युद्धामध्यें माझा पराभव होणें शक्य नाहीं. कुबेरानें रक्षिलेली

[ ४३१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

निशाचरेन्द्रस्य निशम्य वाक्यं स कुम्भकर्णस्य च गर्जितानि । बिभीषणो राक्षसराजमुख्यमुवाच वाक्यं हितमर्थयुक्तम् १ वृतो हि बाह्वन्तरभोगराशिश्चिन्ताविषः सुस्मिततीक्ष्णदंष्ट्रः । पञ्चाङ्गुलीपञ्चशिरोतिकायः सीतामहाहिस्तव केन राजन् २ यावन्न लङ्कां समभिद्रवन्ति वलीमुखाः पर्वतकूटमात्राः । दंष्ट्रायुधाश्चैव नखायुधाश्च प्रदीयतां दाशरथाय मैथिली ३ यावन्न गृह्णन्ति शिरांसि बाणा रामेरिता राक्षसपुङ्गवानाम् । वज्रोपमा वायुसमानवेगाः प्रदीयतां दाशरथाय मैथिली ४ न कुम्भकर्णेन्द्रजितौ च राजंस्तथा महापार्श्वमहोदरौ वा । निकुम्भकुम्भौ च तथातिकायः स्थातुं समर्था युधि राघवस्य ५ जीवंस्तु रामस्य न मोक्ष्यसे त्वं गुप्तः सवित्राप्यथवा मरुद्भिः । न वासवस्याङ्कगतो न मृत्योर्नभो न पातालमनुप्रविष्टः ६ निशम्य वाक्यं तु बिभीषणस्य

---

हीं नगरी मीं पूर्वी बाहुबलानें जिंकिली आहे २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं तेरावा सर्ग समाप्त झाला ॥१३॥

राक्षसाधिपति रावणाचें भाषण आणि कुंभकर्णाच्या गर्जना श्रवण करून तो बिभीषण राक्षसराजाधिराज रावणाशीं हितावह आणि अर्थानें भरलेलें असें भाषण करूं लागला १. ( तो ह्मणाला ) " हे राजा, हृदय हेंच ज्याचें शरीर आहे, चिंता हेंच ज्याचें विष आहे, ( अनुचित कृत्य पाहून होणारा ) विस्मय ह्याच ज्याच्या तीक्ष्ण दंष्ट्रा आहेत आणि पांच अंगुली हींच ज्यांचीं पांच मस्तकें आहेत असा हा प्रचंड शरीर धारण करणारा सीतारूप महासर्प तूं कशाकरितां जवळ बाळगिला आहेस ?२. दंष्ट्रा व नखें ह्या आयुधांनीं युक्त असून पर्वतशिखरासारिखे धिप्पाड असलेले वानर लंकेवर येऊन कोसळले नाहींत तोंच दशरथपुत्र रामाला सीता देऊन टाक ३. जोंपर्यंत रामानें सोडिलेल्या व वायूप्रमाणें वेगवान् असलेल्या वज्रतुल्य बाणांनीं राक्षसश्रेष्ठांचीं मस्तकें तोडून टाकिलीं नाहींत तोंपर्यंतच त्याला तूं सीता अर्पण कर ४. हे राजा, कुंभकर्ण आणि इंद्रजित्, तसेंच महापार्श्व आणि महोदर, तसेंच निकुंभ आणि कुंभ व त्याचप्रमाणें अतिकाय हे युद्धामध्यें रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहींत ५. सूर्यानें अथवा मरुद्गणांनीं जरी तुझें रक्षण केलेलें असलें अथवा इंद्राच्या किंवा मृत्यूच्या अंकावर जरी तूं बसलेला असलास अथवा आकाशामध्यें किंवा पातालामध्यें जरी तूं प्रवेश केलास तरी रामाच्या हातून जिवंत सुटणार नाहींस " ६. बिभीषणाचें हें भाषण

ततः प्रहस्तो वचनं बभाषे । न नो भयं विद्म न दैवतेभ्यो न दानवेभ्योप्यथवा कदाचित् ७ न यक्षगन्धर्वमहोरगेभ्यो भयं न सङ्ख्ये पतगोरगेभ्यः । कथं तु रामाद्भविता भयं नो नरेन्द्रपुत्रात्समरे कदाचित् ८ प्रहस्तवाक्यं त्वहितं निशम्य बिभीषणो राजहितानुकाङ्क्षी । ततो महार्थं वचनं बभाषे धर्मार्थकामेषु निविष्टबुद्धिः ९ प्रहस्त राजा च महोदरश्च त्वं कुम्भकर्णश्च यथार्थजातम् । ब्रवीत रामं प्रति तन्न शक्यं यथा गतिः स्वर्गमधर्मबुद्धेः १० वधस्तु रामस्य मया त्वया च प्रहस्त सर्वैरपि राक्षसैर्वा । कथं भवेदर्थविशारदस्य महार्णवं तर्तुमिवाप्लवस्य ११ धर्मप्रधानस्य महारथस्य इक्ष्वाकुवंशप्रभवस्य राज्ञः । पुरोस्य देवाश्च तथाविधस्य कृत्येषु शक्तस्य भवन्ति मूढाः १२ तीक्ष्णा न तावत्तव कङ्कपत्रा दुरासदा राघवविप्रमुक्ताः । भित्त्वा शरीरं प्रविशन्ति बाणाः प्रहस्त तेनैव विकत्थसे त्वम् १३ भित्त्वा न तावत्प्रविशन्ति कायं प्राणान्तिका-

---

श्रवण केल्यावर प्रहस्त ह्मणाला " देवांपासून अथवा दानवांपासून आह्मांला भय असल्याचें मुळींच माहीत नाहीं ७; आणि त्याचप्रमाणें संग्रामामध्यें यक्ष, गंधर्व, महोरग, पक्षी व उरग ह्यांपासूनही आह्मांला भय नाहीं. तस्मात्, मानवराजाचा पुत्र जो राम त्याच्यापासून संग्रामामध्यें आह्मांला भय कोठून प्राप्त होणार ? ८. प्रहस्तराक्षसाचें हें अपायकारक भाषण श्रवण केल्यावर धर्म, अर्थ आणि काम ह्या त्रिवर्गाकडेही ज्याची बुद्धि आहे आणि राजाचें हित व्हावें अशी ज्याला इच्छा आहे असा तो बिभीषण गंभीर अर्थानें युक्त असें भाषण करूं लागला ९. ( तो ह्मणाला ) " हे प्रहस्ता, राजा, महोदर, तूं आणि कुंभकर्ण रामासंबंधानें जें ह्मणत आहां तें, पापबुद्धि मनुष्याला ज्याप्रमाणें स्वर्गप्राप्ति होणें अशक्य आहे त्याप्रमाणें, शेवटास जाणें अशक्य आहे १०. अरे प्रहस्ता, आपला मनोरथ सिद्धीस नेण्याविषयीं निपुण असलेला जो राम त्याचा वध माझ्या हातून, तुझ्या हातून अथवा एकत्र जमलेल्या सर्व राक्षसांच्या तरी हातून होणार कसा ? सारांश, लहानशा होडक्याला महासागर तरून जाण्याचें सामर्थ्य येणार कोठून ? ११. धर्म हाच ज्याला मुख्य आहे, इक्ष्वाकुवंशामध्यें जो उत्पन्न झालेला आहे आणि कोणतेंही कृत्य करण्यास जो समर्थ आहे अशा ह्या महारथी रामासमोर युद्धामध्यें देवही गर्भगळित होऊन जातात १२. हे प्रहस्ता, सहन करण्यास फारच अशक्य असे रामानें सोडिलेले तीक्ष्ण कंकपत्रबाण तुझें शरीर भेदून आंत प्रविष्ट झाले नाहींत ह्मणूनच तूं अशा फुशारक्या मारीत आहेस १३. सारांश, हे प्रहस्ता, वज्रासारिखा ज्यांचा वेग आहे असे रामाच्या

स्तेशनितुल्यवेगाः । शिताः शरा राघवविप्रमुक्ताः प्रहृत्त तेनैव विकत्थसे त्वम् १४ न रावणो नातिबलस्त्रिशीर्षो न कुम्भकर्णस्य सुतो निकुम्भः । न चेन्द्रजिद्दाशरथिं प्रवोढुं त्वं वा रणे शक्रसमं समर्थः १५ देवान्तको वापि नरान्तको वा तथातिकायोतिरथो महात्मा । अकम्पनश्चापि समानसारः स्थातुं न शक्ता युधि राघवस्य १६ अयं च राजा व्यसनाभिभूतो मित्रैरमित्रप्रतिमैर्भवद्भिः । अन्वास्यते राक्षसनाशनार्थे तीक्ष्णः प्रकृत्या ह्यसमीक्ष्यकारी १७ अनन्तभोगेन सहस्रमूर्ध्ना नागेन भीमेन महाबलेन । बलात्परिक्षिप्तमिमं भवन्तो राजानमुत्क्षिप्य विमोचयन्तु १८ यावद्धि केशग्रहणात्सुहृद्भिः समेत्य सर्वैः परिपूर्णकामैः । निगृह्य राजा परिरक्षितव्यो भूतैर्यथा भीमबलैर्गृहीतः १९ सुवारिणा राघवसागरेण प्रच्छाद्यमानस्तरसा भवद्भिः । युक्तस्त्वयं तारयितुं समेत्य काकुत्स्थपातलमुखे पतन्सः २० इदं पुरस्यास्य सराक्षसस्य राज्ञश्च पथ्यं

---

हातून सुटलेले प्राणघातक तीक्ष्ण बाण तुझें शरीर भेदून आंत प्रविष्ट झाले नाहींत म्हणूनच तुझ्या ह्या बढाया चालल्या आहेत १४. इंद्रतुल्य रामापुढें संग्रामामध्यें टिकाव धरण्यास अतिबलाढ्य रावण, त्रिशीर्ष, कुंभकर्णाचा पुत्र निकुंभ, इंद्रजित् आणि तूं ह्यांपैकीं कोणीही समर्थ नाहीं १५. त्याचप्रमाणें देवांतक, नरांतक, अतिरथी महात्मा अतिकाय आणि त्याच्याच सारिखा सामर्थ्यवान् अकंपन हेही युद्धामध्यें रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहींत १६. हा राजा संकटांनीं ग्रस्त झालेला असून शत्रुतुल्य असलेले तुम्ही त्याचे मित्र राक्षसांच्या नाशाचा उपदेश त्याला करीत आहांत आणि तो स्वभावतःच तीक्ष्ण असून अविचारानें वागणारा आहे १७. सारांश, सहस्र फणा आणि अपार देहसामर्थ्य ह्यांनीं युक्त अशा भयंकर व महाबलाढ्य नागराजानेंच कीं काय सभोंवतीं आंवळून टाकिलेल्या ह्या राजाला तुम्ही आपल्या सामर्थ्यानें त्यापासून हिसडून सोडवा. ( तात्पर्य, रामाशीं ह्यानें जी वैरबुद्धि धारण केलेली आहे त्या बुद्धीपासून तुम्ही ह्याला परावृत्त करा ) १८. अरे, भयंकर सामर्थ्यानें युक्त असलेल्या भूतांनीं झपाटलेल्या पुरुषाचें, ज्याप्रमाणें त्याचे आप्त सर्व प्रकारचे उपाय योजून, रक्षण करीत असतात त्याप्रमाणें मनोरथ परिपूर्ण झालेल्या तुम्ही सर्व सुहृदांनीं मिळून शेंडी धरण्यापर्यंतचेही उपाय योजून राजाचा निग्रह करा आणि त्याचें रक्षण करा १९. सुचरित्ररूप उत्कृष्ट जलानें युक्त अशा राघवरूप सागरामध्यें बुडत असलेल्या आणि त्याचप्रमाणें काकुत्स्थरूप पातालाच्या मुखामध्यें जाऊन पडत असलेल्या त्या ह्या राजाला तुम्ही सर्व मिळून आपल्या

ससुहृज्जनस्य। सम्यग्घि वाक्यं स्वमतं ब्रवीमि नरेन्द्रपुत्राय ददातु मैथिलीम् २१ परस्य वीर्यं स्वबलं च बुद्ध्वा स्थानं क्षयं चैव तथैव वृद्धिम्। तथा स्वपक्षेप्यनुमृश्य बुद्ध्या वदेत्क्षमं स्वामिहितं स मन्त्री २२ [ ४६१ ]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

बृहस्पतेस्तुल्यमतेर्वचस्तन्निशम्य यत्नेन विभीषणस्य। ततो महात्मा वचनं बभाषे तत्रेन्द्रजिन्नैर्ऋतयूथमुख्यः १ किं नाम ते तातकनिष्ठ वाक्यमनर्थकं वै बहुभीतवच्च। अस्मिन्कुले योपि भवेन्न जातः सोपीदृशं नैव वदेन्न कुर्यात् २ सत्त्वेन वीर्येण पराक्रमेण धैर्येण शौर्येण च तेजसा च। एकः कुलेस्मिन्पुरुषो विमुक्तो विभीषणस्तातकनिष्ठ एषः ३ किं नाम तौ मानुषराजपुत्रावस्माकमेकेन हि राक्षसेन। सुप्राकृतेनापि निहन्तुमेतौ शक्यौ कुतो भीषयसे स्म भीरो ४ त्रिलोकनाथो ननु देवराजः शक्रो मया

---

सामर्थ्यानें तारणेंच योग्य आहे २०. राजपुत्र रामाला रावणानें सीता देऊन टाकावी हें मी, आपल्या मतानें उत्कृष्ट ठरलेलें आणि हें नगर व राक्षस आणि सुहृज्जन ह्यांसहवर्तमान राजा ह्यांना हितावह असलेलें, भाषण करीत आहें २१. अरे, स्वतःचें सामर्थ्य व शत्रूचें वीर्य, ह्यांचा विचार करून व स्वाभाविक स्थिति, उत्कर्ष आणि अपकर्ष हीं सर्व आपल्याकडे व शत्रूकडे कशीं काय आहेत ह्याचाही आपल्या मनाशीं विचार करून जो स्वामीला हितावह आणि योग्य उपदेश करितो तो खरा खरा मंत्री होय २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चवदावा सर्ग समाप्त झाला ॥ १४ ॥

बृहस्पतीसारिखी ज्याची मति आहे अशा बिभीषणाचें तें भाषण मोठ्या दुःखानें ऐकून घेऊन राक्षसगणांतील मुख्य व महात्मा इंद्रजित् ह्मणाला १ "हे पित्याहून कनिष्ठ बिभीषणा, अतिशय भीतीनें युक्त आणि अनर्थावह असें भाषण तूं कशाकरितां करीत आहेस? ह्या कुलामध्यें जो राक्षस उत्पन्न झालेला नसेल तो सुद्धां अशाप्रकारचें भाषण करणार नाहीं आणि अशारीतीनें वागणारही नाहीं १. बल, वीर्य, पराक्रम, धैर्य, शौर्य आणि तेज ह्या गुणांनीं रहित असा एकच पुरुष ह्मणजे पित्याचा कनिष्ठ बंधु हा बिभीषण ह्या कुलामध्यें उत्पन्न झालेला आहे ३. अरे भित्र्या, तूं कशाकरितां आह्मांला भय घालीत आहेस? त्या मानवराजपुत्रांची कथा ती काय ? आमच्यापैकीं अत्यंत दुर्बल अशा एकट्याच राक्षसाच्या हातून ह्या उभयतांचा वध होणें शक्य आहे ४. त्रैलोक्याधिपति समर्थ देवराज इंद्रालाही खाली स्वर्गांतून काढून मीं

भूमितले निविष्टः। भयार्पिताश्चापि दिशः प्रपन्नाः सर्वे तदा देवगणाः समग्राः ५ ऐरावतो निःस्वनमुन्नदन्स निपातितो भूमितले मया तु । विकृष्य दन्तौ तु मया प्रसह्य वित्रासिता देवगणाः समग्राः ६ सोहं सुराणामपि दर्पहन्ता दैत्योत्तमानामपि शोककर्ता । कथं नरेन्द्रात्मजयोर्न शक्तो मनुष्ययोः प्राकृतयोः सुवीर्यः ७ अथेन्द्रकल्पस्य दुरासदस्य महौजसस्तद्वचनं निशम्य । ततो महार्थं वचनं बभाषे विभीषणः शस्त्रभृतां वरिष्ठः ८ न तात मन्त्रे तव निश्चयोस्ति बालस्त्वमद्याप्यविपक्वबुद्धिः । तस्मात्त्वयाप्यात्मविनाशनाय वचोर्थहीनं बहु विप्रलप्तम् ९ पुत्रप्रवादेन तु रावणस्य त्वमिन्द्रजिन्मित्रमुखोसि शत्रुः । यस्येदृशं राघवतो विनाशं निशम्य मोहादनुमन्यसे त्वम् १० त्वमेव वध्यश्च सुदुर्मतिश्च स चापि वध्यो य इहानयत्त्वाम् । बालं दृढं साहसिकं च योद्य प्रावेशयन्मन्त्रकृतां समीपम् ११ मूढो प्रगल्भो विनयोपपन्नस्तीक्ष्णस्वभावोल्पमतिर्दुरात्मा ।

---

भूतलावर ठविलें असतां भयभीत झालेले यच्चयावत् सर्वही देवगण वाट फुटेल तिकडे पळत सुटले होते ५. उच्चस्वरानें गर्जना करणाऱ्या त्या ऐरावताचे मीं बलात्कारानें दांत ओढून त्याला भूतलावर पाडिलें असतां सर्वही देवगण त्रस्त झाले होते ६. तस्मात्, देवांचा दर्प नाहींसा करणारा आणि दैत्यश्रेष्ठांनाही शोक उत्पन्न करणारा तो मी अद्यापी उत्कृष्ट सामर्थ्यानें युक्त असूनही प्राकृत आणि मनुष्य अशा मानवराजपुत्रांचा निग्रह करण्यास कसा बरें समर्थ नाहीं ? " ७. पराजित होण्यास अशक्य अशा त्या महासामर्थ्यवान् व इंद्रतुल्य इंद्रजिताचें तें भाषण श्रवण करून, शस्त्रधारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला बिभीषण गंभीर अर्थानें युक्त असें भाषण करूं लागला ८. ( तो ह्मणाला ) " बा इंद्रजिता, मसलतीसंबंधानें तुझी निपुणता नाहीं. तूं बाल असून तुझी बुद्धिही अद्यापि परिपक्व झालेली नाहीं. ह्यास्तव, अर्थशून्य असें जें तूं पुष्कळ भाषण केलेंस तें व्यर्थ बडबड असून स्वतःच्या नाशालाच कारण होणारी आहे ९. पुत्र ह्मणून प्रसिद्ध असलेला तूं इंद्रजित् मित्रासारिखा जरी भासत आहेस तरी रावणाचा शत्रु आहेस. कारण, रावणाचा अशाप्रकारें रामापासून नाश होईल हें श्रवण करूनही मोहामुळें तूं पुनरपि त्या रावणाला ( पापबुद्धीपासून परावृत्त न करितां ) अनुमोदनच देत आहेस १०. अत्यंत दुर्बुद्धि असलेल्या तुझाच वध करणें योग्य असून ज्यानें तुला येथें आणिलें तोही वधास पात्र आहे. सारांश, बाल व अत्यंत साहसी असलेल्या तुला ज्यानें आज मसलत करणाऱ्या मंत्र्यांचे समीप आणिलें आहे त्याचा वध होणेंच योग्य आहे ११. हे इंद्रजिता, तूं मूढ, अप्रगल्भ,

मूर्खस्त्वमत्यन्तसुदुर्मतिश्च त्वमिन्द्रजिद्बालतया ब्रवीषि १२ को ब्रह्मदण्ड-
प्रतिमप्रकाशानर्चिष्मतः कालनिकाशरूपान् । सहेत बाणान्यमदण्डक
ल्पान्समक्षमुक्तान्युधि राघवेण १३ धनानि रत्नानि सुभूषणानि वासांसि
दिव्यानि मणींश्च चित्रान् । सीतां च रामाय निवेद्य देवीं वसेम राज-
न्निह वीतशोकाः १४ [ ४७५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय
आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥ १५ ॥

सुनिविष्टं हितं वाक्यमुक्तवन्तं बिभीषणम् । अब्रवीत्परुषं वाक्यं
रावणः कालचोदितः १ वसेत्सह सपत्नेन क्रुद्धेनाशीविषेण च । न तु
मित्रप्रवादेन संवसेच्छत्रुसेविना २ जानामि शीलं ज्ञातीनां सर्वलोकेषु
राक्षस । हृष्यन्ति व्यसनेष्वेते ज्ञातीनां ज्ञातयः सदा ३ प्रधानं साधकं
वैद्यं धर्मशीलं च राक्षस । ज्ञातयोप्यवमन्यन्ते शूरं परिभवन्ति च ४
नित्यमन्योन्यसंहृष्टा व्यसनेष्वाततायिनः । प्रच्छन्नहृदया घोरा ज्ञातयस्तु
भयावहाः ५ श्रूयन्ते हस्तिभिर्गीताः श्लोकाः पद्मवने पुरा । पाशहस्ता-

---

उद्धट, स्वभावानें क्रूर, अल्पमति, दुरात्मा, मूर्ख व अत्यंत दुर्मति असून बालपणामुळें असें भाषण करीत आहेस १२, अरे, ब्रह्मदंडासारिखें ज्यांचें तेज आहे आणि प्रलयकालच्या अग्निप्रमाणें ज्यांचें रूप आहे असे राघवानें युद्धामध्यें समक्ष सोडिलेले यमदंडतुल्य व उज्ज्वल बाण सहन करण्यास कोण बरें समर्थ आहे ? १३. हे राजा, संपत्ति, रत्नें, उत्कृष्ट भूषणें, दिव्य वस्त्रें, अद्भुत मणि आणि सीतादेवी रामाला अर्पण करून आपण येथें निर्भय राहूं १४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

सुव्यवस्थित आणि हितावह भाषण करून बसलेल्या बिभीषणाला कालाची प्रेरणा झालेला रावण कठोर शब्दांनीं ह्मणाला १ " शत्रूसहवर्तमान वास्तव्य करावें. क्रुद्ध सर्पाबरोबरही रहावें; परंतु, मित्र ह्मणून प्रसिद्ध असलेल्या आणि शत्रूची शुश्रूषा करणाऱ्या पुरुषाबरोबर कधीं वास्तव्य करूं नये २. हे राक्षसा, त्रैलोक्यामध्यें भाऊबंदांचा स्वभाव कसा असतो हें मी जाणीत आहें. अरे, भाऊबंदांवर संकटें आलीं असतां दुसरे भाऊबंद नेहमींच आनंद मानीत असतात ३. हे राक्षसा, आपल्या कुलामध्यें श्रेष्ठ पदास चढलेला, राज्यरक्षण वगैरे करणारा, ज्ञानी आणि धर्मशील असा जरी कोणी असला तरी भाऊबंद त्याचा अपमान करीत असतात आणि तो जरी शूर असला तरी छिद्र पाहून त्याचा पराजय करीत असतात ४. अरे, एकमेकांच्या घरावर अग्नि ठेवण्यास तयार असलेले आणि एकमेकांच्या विपत्तीमध्यें आनंद मानून आपला आशय गुप्त ठेवणारे

शरान्दृष्ट्वा शृणुष्व गदतो मम ६ नाग्निर्नान्यानि शस्त्राणि न नः पाशा भयावहाः। घोराः स्वार्थप्रयुक्तास्तु ज्ञातयो नो भयावहाः ७ उपायमेते वक्ष्यन्ति ग्रहणे नात्र संशयः। कृत्स्नाद्भयाज्ज्ञातिभयं सुकष्टं विदितं च नः ८ विद्यते गोषु संपन्नं विद्यते ज्ञातितो भयम्। विद्यते स्त्रीषु चापल्यं विद्यते ब्राह्मणे तपः ९ ततो नेष्टमिदं सौम्य यदहं लोकसत्कृतः। ऐश्वर्यमभिजातश्च रिपूणां मूर्ध्नि च स्थितः १० यथा पुष्करपत्रेषु पतितास्तोयबिन्दवः। न श्लेषमभिगच्छन्ति तथानार्येषु सौहृदम् ११ यथा शरदि मेघानां सिञ्चतामपि गर्जताम्। न भवत्यम्बुसंक्लेदस्तथानार्येषु सौहृदम् १२ यथा मधुकरस्तर्षाद्रसं विन्दन्न तिष्ठति। तथा त्वमपि तत्रैव तथानार्येषु सौहृदम् १३ यथा मधुकरस्तर्षात्काशपुष्पं पिबन्नपि। रसमत्र न विन्देत तथानार्येषु सौहृदम् १४ यथा पूर्वं गजः स्नात्वा

---

हे क्रूर भाऊबंद फारच भयंकर आहेत ५. हातांत पाश धारण केलेले पुरुष अवलोकन करून पूर्वी पद्मवनामध्यें हत्तींनीं ह्मटलेले श्लोक प्रसिद्ध आहेत ते तूं माझ्यापासून श्रवण कर ६. " अग्नि, इतर शस्त्रें आणि पाश आह्मांला भय उत्पन्न करणारे नाहींत; परंतु, मनाचे क्रूर असलेले हे स्वार्थसाधु भाऊबंद मात्र आह्मांला भयावह आहेत ७. हे भाऊबंदच आह्मांला पकडून देण्याचा उपाय पारध्यांना सांगतील ह्यांत संशय नाहीं. कोणत्याही भयापेक्षां भाऊबंदांचें भय फारच कठीण हें आह्मांला समजून चुकलें आहे ८. अहो, गाईंचे ठिकाणीं हव्यकव्यसाधनसंपत्ति, ज्ञातींचे ठिकाणीं भय, स्त्रियांचे ठिकाणीं चंचलता व ब्राह्मणाचे ठिकाणीं तप हीं ठरलेलींच आहेत " ९. सारांश, हे विनयसंपन्न बिभीषणा, जगतामध्यें माझा सत्कार होत असून उत्तम कुलामध्यें माझा जन्म झालेला आहे व मी शत्रूंच्या मस्तकीं पाय देऊन उभा आहें, परंतु, हें माझें ऐश्वर्य तुह्माला प्रिय नाहीं १०. कमलपत्रांवर पडलेले जलबिंदु ज्याप्रमाणें त्या पत्रांना चिकटत नाहींत त्याचप्रमाणें दुष्ट पुरुषांचे अंतःकरणांत सौहृद ठरत नाहीं ११. शरदृतूमध्यें मेघ गर्जना करून वृष्टि करूं लागले असतांही ज्याप्रमाणें पृथ्वीवर तें उदक ठरत नाहीं त्याप्रमाणें दुष्ट पुरुषांचे ठिकाणीं मैत्री ठरत नाहीं १२. ज्याप्रमाणें पुष्पाचे ठिकाणीं मकरंद प्राप्त करून घेत असलेलाही मधुकर तेथेंच अभिलाष धरून रहात नाहीं त्याचप्रमाणें दुष्ट पुरुषांचे ठिकाणीं सौहृद ठरत नाहीं. सारांश, तूंही तसाच दुष्ट आहेस १३. ज्याप्रमाणें मधुकर आशेनें काशपुष्पाचें पान करूं लागला असतांही त्याला तेथें रस प्राप्त होत नाहीं त्याचप्रमाणें दुष्ट पुरुषांचे ठिकाणीं मित्रत्व प्राप्त होत नाहीं १४. प्रथमतः स्नान केल्यावर

गृह्य हस्तेन वै रजः । दूषयन्त्यात्मनो देहं तथानार्येषु सौहृदम् १५ योन्यस्त्वेवंविधं ब्रूयाद्वाक्यमेतन्निशाचर । अस्मिन्मुहूर्ते न भवेत्त्वां तु धिक्कुलपांसन १६ इत्युक्तः परुषं वाक्यं न्यायवादी बिभीषणः । उत्पपात गदापाणिश्चतुर्भिः सह राक्षसैः १७ अब्रवीच्च तदा वाक्यं जातक्रोधो बिभीषणः । अन्तरिक्षगतः श्रीमान्भ्राता वै राक्षसाधिपम् १८ स त्वं भ्रान्तोसि मे राजन्ब्रूहि मां यद्यदिच्छसि । ज्येष्ठो मान्यः पितृसमो न च धर्मपथे स्थितः ॥ इदं हि परुषं वाक्यं न क्षमाम्यग्रजस्य ते १९ सुनीतं हितकामेन वाक्यमुक्तं दशानन । न गृह्णन्त्यकृतात्मानः कालस्य वशमागताः २० सुलभाः पुरुषा राजन्सततं प्रियवादिनः । अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः २१ बद्धं कालस्य पाशेन सर्वभूतापहारिणः । न नश्यन्तमुपेक्षे त्वां प्रदीप्तं शरणं यथा २२ दीप्तपावकसंकाशैः शितैः

---

ज्याप्रमाणें गज शुंडेनें धूळ घेऊन आपलें शरीर मलिन करितो ( ह्मणजे स्नानामुळें प्राप्त झालेली निर्मलता नाहींशी करून टाकितो ) त्याप्रमाणें दुष्ट लोक पूर्वी संपादून केलेला स्नेह स्वतःच नाहींसा करून टाकितात १५. हे निशाचरा, दुसऱ्यानें जर कोणीं अशाप्रकारचें भाषण केलें असतें तर ह्या क्षणामध्येंच तो कायम राहिला नसता. परंतु, हे कुलपांसना बिभीषणा, तुला धिक्कार असो " १६. ह्याप्रमाणें रावणानें कठोर भाषण केलें असतां न्यायाला अनुसरून भाषण करणारा तो गदापाणि बिभीषण चार राक्षसांसहवर्तमान तेथून अंतरिक्षामध्यें उडाला १७; आणि अंतरिक्षामध्यें गेल्यावर तो क्रुद्ध झालेला श्रीमान् भ्राता बिभीषण राक्षसाधिपति रावणाला ह्मणाला १८ " हे राजा, तूं भ्रांतिग्रस्त झाला आहेस. ज्याची ज्याची तुला इच्छा असेल तें तूं मला सांग. तूं ज्येष्ठ भ्राता असल्यामुळें पित्याप्रमाणें मला मान्य आहेस; परंतु, धर्ममार्गानें वागणारा नाहींस. ह्यास्तव, तूं ज्येष्ठ जरी असलास तरी ह्या तुझ्या कठोर भाषणाची मी तुला क्षमा करणार नाहीं १९. हे दशानना, हितेच्छु पुरुषानें उत्कृष्ट नीतीला अनुसरूनही केलेलें भाषण कालाच्या तावडींत सांपडलेले अजितेंद्रिय पुरुष स्वीकारीत नाहींत २०. हे राजा, नेहमीं प्रिय भाषण करणारे पुरुष मिळणें सुलभ आहे; परंतु, अप्रिय जरी असलें तरी हित असेल तेंच भाषण करणारा वक्ताही दुर्लभ आहे; आणि तसें भाषण ऐकून घेणारा श्रोताही दुर्लभ आहे २१. तथापि, अग्नीनें प्रदीप्त झालेल्या गृहाची ज्याप्रमाणें कोणी उपेक्षा करीत नाहींत त्याप्रमाणें सर्व भूतांचा संहार करणाऱ्या कालाच्या पाशानें बद्ध होऊन नाश पावत असलेल्या तुझी मी उपेक्षा करणार नाहीं २२. सुवर्णभूषणांनीं युक्त, तीक्ष्ण व प्रदीप्त अग्नीसारिखे देदीप्यमान अशा रामानें

काञ्चनभूषणैः । न त्वामिच्छाम्यहं द्रष्टुं रामेण निहतं शरैः २३ शूराश्च बलवन्तश्च कृतास्त्राश्च नरा रणे । कालाभिपन्नाः सीदन्ति यथा वालुकसेतवः २४ तन्मर्षयतु यच्चोक्तं गुरुत्वाद्धितमिच्छता । आत्मानं सर्वथा रक्ष पुरीं चेमां सराक्षसाम् २५ स्वस्ति तेऽस्तु गमिष्यामि सुखी भव मया विना २६ निवार्यमाणस्य मया हितैषिणा न रोचते ते वचनं निशाचर । परान्तकाले हि गतायुषो नरा हितं न गृह्णन्ति सुहृद्भिरीरितम् २७ [ ५०२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

इत्युक्त्वा परुषं वाक्यं रावणं रावणानुजः । आजगाम मुहूर्तेन यत्र रामः सलक्ष्मणः १ तं मेरुशिखराकारं दीप्तामिव शतह्रदाम् । गगनस्थं महीस्थास्ते ददृशुर्वानराधिपाः २ ते चाप्यनुचरास्तस्य चत्वारो भीमविक्रमाः । तेऽपि वर्मायुधोपेता भूषणोत्तमभूषिताः ३ स च मेघाचलप्रख्यो वज्रायुधसमप्रभः । वरायुधधरो वीरो दिव्याभरणभूषितः ४ तमात्मपञ्चमं दृष्ट्वा

---

सोडिलेल्या बाणांनीं तुझा वध झाला आहे असें पाहण्याची माझी इच्छा नाहीं २३. संग्रामामध्यें शूर, बलाढ्य आणि कृतास्त्र असलेलेही पुरुष कालाच्या तावडींत सांपडले असतां वाळूच्या बंधाऱ्याप्रमाणें खचून जातात २४. ह्यास्तव, तूं ज्येष्ठ भ्राता असल्यामुळें तुझें हित व्हावें ह्या इच्छेनें जें कांहीं मीं भाषण केलें त्याची तूं क्षमा कर आणि आपलें व राक्षसांसहवर्तमान ह्या लंकानगरीचें सर्वप्रकारें रक्षण कर २५. तुझें कल्याण असो; मी जातों. माझ्यावांचून तूं सुखानें रहा २६. हे निशाचरा, तुझें हित व्हावें ह्या इच्छेनें पापबुद्धीपासून मी तुला निवृत्त करीत असतांनाही माझें भाषण तुला रुचत नाहीं ( हें योग्यच आहे ). कारण, ज्यांचें आयुष्य संपलें आहे असे पुरुष सुहृदांनीं केलेलें हितकारक भाषण अंतकालीं ऐकून घेत नाहींत २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सोळावा सर्ग समाप्त झाला ॥ १६ ॥

रावणानुज बिभीषण रावणाशीं ह्याप्रमाणें कठोर भाषण करून जिकडे लक्ष्मणासहवर्तमान राम होता तिकडे एका मुहूर्तामध्यें चालता झाला १. तेव्हां मेरुशिखरासारिखा ज्याचा बांधा आहे असा तो बिभीषण आकाशमार्गानें जाऊं लागला असत देदीप्यमान विद्युल्लताच कीं काय असा तो त्या वानराधिपतींना भासूं लागला २ कवच आणि आयुधें धारण करून उत्कृष्ट भूषणांनीं भूषित झालेले ते चार भयंकर पराक्रमी राक्षसही त्याच्या मागोमाग चालले ३. मेघाप्रमाणें अथवा पर्वताप्रमाणें त्या

सुग्रीवो वानराधिपः । वानरैः सह दुर्धर्षश्चिन्तयामास बुद्धिमान् ५
चिन्तयित्वा मुहूर्तं तु वानरांस्तानुवाच ह । हनुमत्प्रमुखान्सर्वानिदं वच-
नमुत्तमम् ६ एष सर्वायुधोपेतश्चतुर्भिः सह राक्षसैः । राक्षसोऽभ्येति पश्य-
ध्वमस्मान्हन्तुं न संशयः ७ सुग्रीवस्य वचः श्रुत्वा सर्वे ते वानरोत्तमाः ।
शालानुद्यम्य शैलांश्च इदं वचनमब्रुवन् ८ शीघ्रं व्यादिश नो राजन्वधा-
यैषां दुरात्मनाम् । निपतन्ति हता यावद्धरण्यामल्पचेतनाः ९ तेषां संभा-
षमाणानामन्योन्यं स बिभीषणः । उत्तरं तीरमासाद्य खस्थ एव व्यति-
ष्ठत १० स उवाच महाप्राज्ञः स्वरेण महता महान् । सुग्रीवं तांश्च
संप्रेक्ष्य खस्थ एव बिभीषणः ११ रावणो नाम दुर्वृत्तो राक्षसो राक्षसे-
श्वरः । तस्याहमनुजो भ्राता बिभीषण इति श्रुतः १२ तेन सीता जन-
स्थानाद्धृता हत्वा जटायुषम् । रुद्धा च विवशा दीना राक्षसीभिः सुर-
क्षिता १३ तमहं हेतुभिर्वाक्यैर्विविधैश्च न्यदर्शयम् । साधु निर्यात्यतां
सीता रामायेति पुनः पुनः १४ स च न प्रतिजग्राह रावणः कालचोदितः ।

---

बिभीषणाची आकृति होती; वज्रायुधाप्रमाणें त्याची प्रभा होती आणि दिव्य अलंकारांनीं भूषित झालेल्या त्या वीरानें उत्कृष्ट आयुधें धारण केलीं होतीं ४. असो. स्वतः ज्यांत धांवचा आहे अशा त्या बिभीषणाला अवलोकन करून वानराधिपति अजिंक्य व बुद्धिमान् सुग्रीव वानरांसहवर्तमान विचार करूं लागला ५; आणि क्षणभर विचार केल्यावर हनुमान् वगैरे त्या वानरांशीं असें उत्कृष्ट भाषण करूं लागला ६. " चार राक्षसांसहवर्तमान हा राक्षस सर्व आयुधें धारण करून निःसंशय आमचा वध कर-ण्याकरितां येथें येत आहे हें तुह्मी पहा " ७. सुग्रीवाचें हें भाषण श्रवण केल्यावर ते सर्वही वानरश्रेष्ठ शालवृक्ष व पर्वत हातांत घेऊन त्याला ह्मणाले ८ " हे राजा, ह्या दुरात्म्यांच्या वधाची आह्मांला आपण सत्वर आज्ञा करा; ह्मणजे हे अल्पमति राक्षस लगेच वध पावून भूतलावर पडतील " ९. ह्याप्रमाणें ते वानर एकमेकांशीं भाषण करूं लागले असतां बिभीषण समुद्राच्या उत्तर तीरावर येऊन आकाशामध्येंच उभा राहिला १०; आणि आकाशामध्यें राहूनच तो महाविचारी महात्मा बिभीषण सुग्रीवाकडे व त्या वानरांकडे पाहून उच्च स्वरानें ह्मणाला ११ " रावण ह्मणून एक राक्षसाधिपति दुराचारी राक्षस आहे. त्याचा मी बिभीषण ह्मणून प्रसिद्ध असलेला कनिष्ठ भ्राता होय १२. त्या रावणानें जटायूचा वध करून जनस्थानापासून सीता हरण करून नेली आहे आणि पराधीन व दीन झालेल्या त्या सीतेला राक्षसी बंदोबस्तालाठेऊन त्यानें अड-कवून ठेविलें आहे १३. "रामाकडे तूं आपल्या बऱ्या विचारानें सीतेला पाठवून दे" असें

उच्यमानं हितं वाक्यं विपरीत इवौषधम् १५सोहं परुषितस्तेन दासवच्चावमानितः। त्यक्त्वा पुत्रांश्च दारांश्च राघवं शरणं गतः १६ निवेदयत मां क्षिप्रं राघवाय महात्मने । सर्वलोकशरण्याय विभीषणमुपस्थितम् १७ एतत्तु वचनं श्रुत्वा सुग्रीवो लघुविक्रमः । लक्ष्मणस्याग्रतो रामं संरब्धमिदमब्रवीत् १८ प्रविष्टः शत्रुसैन्यं हि प्राप्तः शत्रुरतर्कितः । निहन्यादन्तरं लब्ध्वा उलूको वायसानिव १९ मन्त्रे व्यूहे नये चारे युक्तो भवितुमर्हसि । वानराणां च भद्रं ते परेषां च परन्तपः २० अन्तर्धानगता ह्येते राक्षसाः कामरूपिणः । शूराश्च निकृतिज्ञाश्च तेषां जातु न विश्वसेत् २१ प्रणिधी राक्षसेन्द्रस्य रावणस्य भवेदयम् । अनुप्रविश्य सोऽस्मासु भेदं कुर्यान्न संशयः २२ अथ वा स्वयमेवैषच्छिद्रमासाद्य बुद्धिमान् । अनुप्रविश्य विश्वस्ते कदाचित्प्रहरेदपि २३ मित्राटविबलं चैव मौलभृ-

---

मीं नानाप्रकारच्या युक्तींसहवर्तमान अनेक भाषणांनीं वारंवार त्याच्या निदर्शनाला आणिलें १४; परंतु, मुमूर्षु पुरुष ज्याप्रमाणें औषधाचा स्वीकार करीत नाहीं त्याप्रमाणें मी करीत असलेल्या त्या हितकारक भाषणाचा काळाच्या तावडींत सांपडलेल्या त्या रावणानें स्वीकार केला नाहीं १५. इतकेंच नव्हे परंतु, त्यानें माझ्याशीं कठोर भाषणें केलीं असून दासाप्रमाणें माझा अवमानही केला आहे आणि ह्मणूनच पुत्र व भार्या ह्यांचा त्याग करून मी रामाकडे शरण आलों आहें १६. ह्यास्तव, सर्व लोकांचा आश्रय असा जो महात्मा राम त्याला मी येथें प्राप्त झाल्याचें सत्वर निवेदन करा " १७. हें भाषण श्रवण केल्यावर शीघ्रगामी सुग्रीव लक्ष्मणासमोर क्षुब्ध झालेल्या रामाला ह्मणाला १८" उलूक पक्षी ज्याप्रमाणें छिद्र पाहून काकपक्ष्यांचा वध करितो त्याप्रमाणें एकाएकीं शत्रुसैन्यामध्यें प्रविष्ट झालेला हा राक्षस छिद्र पाहून आमचा वध करील १९. ह्यास्तव, तुझें दैव बरें करो; वानरांवर अनुग्रह आणि शत्रूंचा निग्रह करण्याकरितां कार्याकार्य विचार, सेनासंनिवेश, सेना नेणें आणि हेर पाठविणें ह्यांविषयीं आपण तत्पर असा २०. कारण, यथेष्ट रूप धारण करून गुप्तपणें संचार करणारे हे राक्षस शूर असून मायावी आहेत. ह्यांचा कधींही विश्वास धरितां उपयोगीं नाहीं २१. राक्षसराज रावणाचा हा कोणी तरी हेर असावा. आह्मांमध्यें शिरून हा आमच्या आमच्यांत भेद उत्पन्न करील ह्यांत संशय नाहीं २२. किंवा हा बुद्धिमान् राक्षस छिद्राची वाट पहात पहात आमच्यामध्येंच घुसून राहील आणि आमचा ह्याच्यावर विश्वास बसला ह्मणजे छिद्र पाहून हा आमच्यावर प्रहारही करील २३. मित्रानें पाठविलेलें, अरण्यांत रहाणाऱ्यानें पाठविलेलें, आप्तबंधूंनीं पाठविलेलें आणि पैसे देऊन जुजबी ठेविलेलें असें

रयबलं तथा । सर्वमेतद्बलं ग्राह्यं वर्जयित्वा द्विषद्बलम् २४ प्रकृत्या राक्षसो ह्येष भ्रातामित्रस्य वै प्रभो । आगतश्च रिपुः साक्षात्कथमस्मिंश्च विश्वसेत् २५ रावणस्यानुजो भ्राता बिभीषण इति श्रुतः । चतुर्भिः सह रक्षोभिर्भवन्तं शरणं गतः २६ रावणेन प्रणीतं हि तमवेहि बिभीषणम् । तस्याहं निग्रहं मन्ये क्षमं क्षमवतां वर २७ राक्षसो जिह्मया बुद्ध्या संदिष्टोयमिहागतः । प्रहर्तुं मायया छन्नो विश्वस्ते त्वयि चानघ २८ वध्यतामेष तीव्रेण दण्डेन सचिवैः सह । रावणस्य नृशंसस्य भ्राता ह्येष बिभीषणः २९ एवमुक्त्वा तु तं रामं संरब्धो वाहिनीपतिः । वाक्यज्ञो वाक्यकुशलं ततो मौनमुपागमत् ३० सुग्रीवस्य तु तद्वाक्यं श्रुत्वा रामो महाबलः । समीपस्थानुवाचेदं हनुमत्प्रमुखान्कपीन् ३१ यदुक्तं कपिराजेन रावणावरजं प्रति । वाक्यं हेतुमदत्यर्थं भवद्भिरपि च श्रुतम् ३२ सुहृदामर्थकृच्छ्रेषु युक्तं बुद्धिमता सदा । समर्थेनोपसंदेष्टुं शाश्वतीं भूतिमिच्छता ३३ इत्येवं परिपृष्टास्ते स्वं स्वं मतमतन्द्रिताः । सोपचारं तदा

---

हें सर्व प्रकारनें सैन्य स्वीकारावें; परंतु, शत्रूनें पाठविलेलें सैन्य स्वीकारणें योग्य नाहीं २४. हे प्रभो, हा जातीनें राक्षस असून आपल्या शत्रूचा भ्राता आहे. ह्मणजे प्रत्यक्ष शत्रुच हा प्राप्त झालेला आहे. तेव्हां ह्याच्यावर कसा बरें विश्वास ठेवावा? २५. बिभीषण ह्मणून प्रसिद्ध असलेला रावणाचा कनिष्ठ भ्राता चार राक्षसांसहवर्तमान आपणांला शरण आला आहे २६. परंतु, हा बिभीषण रावणानें पाठविला आहे असें आपण समजा; आणि ह्मणूनच, हे क्षमाशीलांमध्यें श्रेष्ठ रामा, त्याचा निग्रह करावा असें मला वाटतें २७. रावणानें पाठविलेला हा राक्षस कुटिल बुद्धीनें येथें आला आहे; आणि, हे निष्पाप, आपला त्याच्यावर विश्वास बसला ह्मणजे हा मायावी प्रहार करण्यास तयार आहे २८. ह्यास्तव, सचिवांसहवर्तमान तीक्ष्ण दंडानें ह्याचा वध केला पाहिजे. कारण, दुष्ट रावणाचा भ्राता हा बिभीषण होय" २९. संभाषण करण्यामध्यें कुशल असलेला व क्षुब्ध झालेला सेनापति सुग्रीव वक्तृत्वामध्यें निपुण असलेल्या त्या रामाला ह्याप्रमाणें सांगून स्वस्थ बसला ३०. तेव्हां सुग्रीवाचें तें भाषण श्रवण केल्यावर महाबलाढ्य राम हनुमान् आदिकरून समीप असलेल्या वानरांना ह्मणाला ३१ "कपिराज सुग्रीवानें रावणाच्या कनिष्ठ भ्रात्यासंबंधानें युक्तीला अतिशय अनुसरून जें भाषण केलें तें तुह्मींही ऐकिलें आहे ३२. मित्रांचा अक्षय्य अभ्युदय व्हावा अशी इच्छा करणाऱ्या बुद्धिमान् व विचारसमर्थ पुरुषानें कार्याकार्याविषयीं संदेह प्राप्त झाला असतां सुहृदांना उपदेश करणें सर्वदा योग्यच

राममूचुः प्रियचिकीर्षवः ३४ अज्ञातं नास्ति ते किंचित्त्रिषु लोकेषु राघव। आत्मानं पूजयन्राम पृच्छस्यस्मान्सुहृत्तया ३५ त्वं हि सत्यव्रतः शूरो धार्मिको दृढविक्रमः । परीक्ष्यकारी स्मृतिमान्निसृष्टात्मा सुहृत्सु च ३६ तस्मादेकैकशस्तावद्ब्रुवन्तु सचिवास्तव । हेतुतो मतिसंपन्नाः समर्थाश्च पुनस्तथा ३७ इत्युक्ते राघवायाथ मतिमानङ्गदोऽग्रतः । विभीषणपरीक्षार्थमुवाच वचनं हरिः ३८ शत्रोः सकाशात्संप्राप्तः सर्वथातर्क्य एव हि । विश्वासनीयः सहसा न कर्तव्यो विभीषणः ३९ छादयित्वात्मभावं हि चरन्ति शठबुद्धयः । प्रहरन्ति च रन्ध्रेषु सोऽनर्थः सुमहान्भवेत् ४० अर्थानर्थौ विनिश्चित्य व्यवसायं भजेत ह । गुणतः संग्रहं कुर्याद्दोषतस्तु विसर्जयेत् ४१ यदि दोषो महांस्तस्मिंस्त्यज्यतामविशङ्कितम् । गुणान्वापि बहूञ्ज्ञात्वा संग्रहः क्रियतां नृप ४२ शरभस्त्वथ निश्चित्य सार्थं वचनमब्रवीत् । क्षिप्रमस्मिन्नरव्याघ्र चारः प्रतिविधीयताम् ४३ प्रणिधाय हि

---

आहे " ३३. ह्याप्रमाणें आपआपलें मत कथन करण्याविषयीं रामानें त्यांना विचारिलें असतां स्वकार्याविषयीं दक्ष राहून रामाचें प्रिय करण्याची इच्छा धरणारे ते वानर आदरपूर्वक त्याला ह्मणाले ३४ " हे राघवा, त्रैलोक्यामध्यें तुला अविदित असें कांहीं एक नाहीं. परंतु, हे रामा, आह्मांला मान देण्याकरितां ह्मणून केवल मित्रभावानें तूं प्रश्न करीत आहेस ३५. तू सत्यनिष्ठ, शूर, धार्मिक, महापराक्रमी, विचारानें वागणारा, स्मरणशील व मित्रांवर विश्वास ठेवणारा आहेस ३६. तस्मात्, विचारी आणि समर्थ अशा तुझ्या मंत्र्यांनीं युक्तीला अनुसरून आपआपलें मत तुला कथन करावें " ३७. ह्याप्रमाणें ते वानर बोलले असतां विचारी अंगद वानर बिभीषणाच्या परीक्षेकरितां रामाला ह्मणाला ३८. " शत्रूकडून आलेल्या ह्या बिभीषणाविषयीं कांहीच तर्क करितां येत नाहीं. ह्यास्तव, एकाएकीं ह्याच्यावर विश्वास ठेवणें योग्य नव्हे ३९. आपलें स्वरूप गुप्त करून ते कपटबुद्धि राक्षस संचार करीत असतात आणि रंध्र पाहून प्रहार करीत असतात. तस्मात्, ह्यांच्यापासून फारच मोठा अनर्थ प्राप्त होईल ४०. हिताहिताचा विचार करून उद्योगाला आरंभ करावा आणि गुणांचें आधिक्य असल्यास पुरुषाचा संग्रह करावा व दोषांचें आधिक्य असल्यास त्याग करावा ४१. हे राजा, त्या बिभीषणाचे ठिकाणीं जर दोषच फार असले तर निःशंकपणें आपण त्याचा त्याग करावा; परंतु, ह्याचे ठिकाणीं गुण पुष्कळ आहेत असें जर आपणांला समजून आलें तर आपण ह्याचा स्वीकार करावा !" ४२. ह्यानंतर शरभ मनामध्यें निश्चय करून अर्थयुक्त भाषण करूं लागला कीं, " हे पुरुष-

चारेण यथावत्सूक्ष्मबुद्धिना। परीक्ष्य च ततः कार्यो यथान्यायं परिग्रहः ४४ जाम्बवांस्त्वथ संप्रेक्ष्य शास्त्रबुद्ध्या विचक्षणः। वाक्यं विज्ञापयामास गुणवद्दोषवर्जितम् ४५ बद्धवैराच्च पापाच्च राक्षसेन्द्राद्विभीषणः। अदेशकाले संप्राप्तः सर्वथा शङ्क्यतामयम् ४६ ततो मैन्दस्तु संप्रेक्ष्य नयापनयकोविदः। वाक्यं वचनसंपन्नो बभाषे हेतुमत्तरम् ४७ अनुजो नाम तस्यैष रावणस्य विभीषणः। पृच्छ्यतां मधुरेणायं शनैर्नरपतीश्वर ४८ भावमस्य तु विज्ञाय तत्त्वतस्त्वं करिष्यसि। यदि दुष्टो न दुष्टो वा बुद्धिपूर्वं नरर्षभ ४९ अथ संस्कारसंपन्नो हनूमान्सचिवोत्तमः। उवाच वचनं श्लक्ष्णमर्थवन्मधुरं लघु ५० न भवन्तं मतिश्रेष्ठं समर्थं वदतां वरम्। अतिशाययितुं शक्तो बृहस्पतिरपि ब्रुवन् ५१ न वादान्नापि संघर्षान्नाधिक्यान्न च कामतः। वक्ष्यामि वचनं राजन्यथार्थं राम गौरवात् ५२ अर्थानर्थनिमित्तं हि यदुक्तं सचिवैस्तव। तत्र दोषं

---

श्रेष्ठा, हेर सत्वर पाठवावा ४३. हेर पाठवून आणि सूक्ष्मबुद्धि हेराकडून सर्व समजून घेऊन मग यथायोग्य रीतीनें त्याचा स्वीकार करावा " ४४ नंतर शास्त्रदृष्टीनें विचार करून नीतिनिपुण जांबवान् दोषरहित आणि गुणसंपन्न असें भाषण करूं लागला ४५. (तो ह्मणाला) " आपल्याशीं वैर बांधून राहिलेल्या दुष्ट राक्षसराजाकडून ज्याअर्थी हा बिभीषण अयोग्य वेळीं व अयोग्य ठिकाणीं प्राप्त झाला आहे त्याअर्थी ह्याच्यासंबंधानें सर्वस्वीं शंकाच घेतली पाहिजे " ४६. तदनंतर न्याय आणि अन्याय जाणणारा व वक्तृत्वामध्यें कुशल असलेला मैंद विचार करून युक्तीला अधिक धरून असलेलें भाषण करूं लागला ४७. (तो ह्मणाला) " हे राजाधिराज, हा त्या रावणाचा कनिष्ठ भ्राता बिभीषण होय. ह्यास्तव, ह्याला सौम्य रीतीनें व बेताबेतानेंच प्रथम विचारावें ४८. ह्याचा आशय खरा खरा समजल्यानंतर हा दुष्ट आहे किंवा नाहीं हें पाहून, हे पुरुषश्रेष्ठ, आपणांला काय करावयाचें असेल तें करावें " ४९. तदनंतर शास्त्रज्ञानाचा ज्याला संस्कार झालेला आहे असा मंत्रिश्रेष्ठ हनुमान् अर्थानें परिपूर्ण, मधुर, मित व स्पष्ट असें भाषण करूं लागला ५०. (तो ह्मणाला) " बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ आणि वक्त्यांमध्यें उत्कृष्ट व समर्थ अशा आपणांपेक्षां अधिक चांगलें भाषण करण्यास बृहस्पतिही समर्थ नाहीं ५१. ह्यास्तव, कलह, बुद्धि, स्पर्धा अथवा अभिमान हीं मात्र ठिकाणीं यत्किंचितही नसून कार्याच्या महत्त्वामुळें, हे रामराजा, जें कांहीं मला बोलावेंसें वाटत आहे तें मी बोलत आहें ५२. गुणदोषनिश्चयासंबंधानें ज सचिवांनीं आपणांला सांगितलें त्यांत मला दोष दिसत

प्रपश्यामि क्रिया नह्युपपद्यते ५३ अते नियोगात्सामर्थ्यमवबोद्धुं न शक्यते। सहसा विनियोगोपि दोषवान्प्रतिभाति मे ५४ चारप्रणिहितं युक्तं यदुक्तं सचिवैस्तव । अर्थस्यासंभवात्तत्र कारणं नोपपद्यते ५५ अदेशकाले संप्राप्त इत्ययं यद्विभीषणः । विवक्षा तत्र मेस्तीयं तां निबोध यथामति ५६ एष देशश्च कालश्च भवतीह यथा तथा । पुरुषात्पुरुषं प्राप्य तथा दोषगुणावपि ५७ दौरात्म्यं रावणे दृष्ट्वा विक्रमं च तथा त्वयि । युक्तमागमनं ह्यत्र सदृशं तस्य बुद्धितः ५८ अज्ञातरूपैः पुरुषैः स राजन्पृच्छ्यतामिति । यदुक्तमत्र मे प्रज्ञा काचिदस्ति समीक्षिता ५९ पृच्छ्यमानो विशङ्केत सहसा बुद्धिमान्वचः । तत्र मित्रं प्रदुष्येत मिथ्या पृष्टं सुखागतम् ६० अशक्यं सहसा राजन्भावो बोद्धुं परस्य वै। अन्तरेण

---

आहे. कारण, अमुक एक गोष्ट करावी असा त्यांच्या सांगण्यापासून कांहींएक निश्चय ठरवितां येत नाहीं ५३. समागम झाल्यावांचून त्याचा स्वीकार करावा किंवा त्याग करावा हें समजणें शक्य नाहीं; परंतु, एकाएकीं त्याची गांठ घेणेंही मला दोषयुक्तच दिसत आहे ५४. हेर पाठविणें योग्य आहे असें जें मंत्र्यांनीं आपणांला सांगितलें त्याचें प्रयोजन मला दिसत नाहीं. कारण, हेर पाठवून जी गोष्ट साध्य होणार तिचाच येथें असंभव आहे ५५. भलत्याच वेळीं व भलत्याच ठिकाणीं हा बिभीषण प्राप्त झाला आहे असें जें जांबवानानें ह्मटलें आहे त्यासंबंधानेंही हें मला कांहीं यथामति सांगावयाचें आहे तें आपण श्रवण करा ५६. ज्याप्रमाणें आपण येथें योग्य ठिकाणीं व योग्य समयीं प्राप्त झालां आहां त्याप्रमाणें तोही योग्य ठिकाणीं, व योग्य समयींच प्राप्त झाला आहे. रावणापेक्षां आपण उत्तम आहांत असा निश्चय करून आणि उभयतांचे ठिकाणीं असलेले गुणदोष पाहून हा आला आहे ५७. रावणाचे ठिकाणीं दुष्टपणा आणि आपले ठिकाणीं असलेला पराक्रम दृष्टीं पडल्यानंतर त्याचें जें येथें आगमन झालें आहे तें त्याच्या बुद्धीला अनुरूपच आहे ५८. ह्यास्तव, हे राजा, हेरलोकांकडून आपण त्याला विचारावें. असें मैंदानें जें सांगितलें आहे त्याविषयीं माझा कांहीं विचार आहे ५९. बुद्धिमान् पुरुषाला आपण ( कोठून आलां, कां आलां, वगैरे, ) प्रश्न विचारूं लागलों असतां त्याला एकदम शंका उत्पन्न होते आणि कदाचित् ज्याची आपण चौकशी करावयाची तो जर मित्रच असेल तर दुसऱ्याकडून विनाकारण आपली चौकशी कशाकरितां करविली अशी त्याच्या मनामध्यें शंका येऊन त्याची विचारणाऱ्याविषयीं पूर्वीं असलेली मित्रबुद्धि कमी होते ६०. शिवाय, तो जर

स्वरैर्भिन्नैर्नैपुण्यं पश्यतां भृशम् ६१ न त्वस्य ब्रुवतो जातु लक्ष्यते दुष्टभावता । प्रसन्नं वदनं चापि तस्मान्मे नास्ति संशयः ६२ अशङ्कितमतिः स्वस्थो न शठः परिसर्पति । न चास्य दुष्टवागस्ति तस्मान्मे नास्ति संशयः ६३ आकारश्छाद्यमानोऽपि न शक्यो विनिगूहितुम् । बलाद्धि विवृणोत्येव भावमन्तर्गतं नृणाम् ६४ देशकालोपपन्नं च कार्यं कार्यविदां वर । सफलं कुरुते क्षिप्रं प्रयोगेणाभिसंहितम् ६५ उद्योगं तव संप्रेक्ष्य मिथ्यावृत्तं च रावणम् । वालिनं च हतं श्रुत्वा सुग्रीवं चाभिषेचितम् ६६ राज्यं प्रार्थयमानस्तु बुद्धिपूर्वमिहागतः । एतावत्तु पुरस्कृत्य विद्यते तस्य संग्रहः ६७ यथाशक्ति मयोक्तं तु राक्षसस्यार्जवं प्रति । प्रमाणं त्वं हि शेषस्य श्रुत्वा बुद्धिमतां वर ६८ [ ५७० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तदशः सर्गः ॥१७॥

---

शत्रु असेल तर, हे राजा, त्याचा आशय एकाएकीं समजणें शक्य नाहीं. ह्यास्तव, दुसऱ्याशीं त्याचा व्यवहार चालला असतांना भिन्नभिन्न प्रकारच्या त्याच्या भाषणांवरून आपण त्याचा आशय नीट समजून घ्यावा ६१. हा बोलत असतांना ह्याचे ठिकाणीं दुष्टपणा असल्याचें मुळींच आढळण्यांत येत नाहीं; इतकेंच नव्हे परंतु, ह्याची मुद्राही प्रसन्न आहे. तस्मात्, ह्याविषयीं मला तर संशयच नाहीं ६२. कोणीही शठ पुरुष अशा दृढनिश्चयानें व स्वस्थ अंतःकरणानें येथ येणार नाहीं. शिवाय, ह्याच्या वाणींतही दुष्टपणा दिसत नसल्यामुळें मला ह्याची शंका येत नाहीं ६३. अहो, पुरुष आपलें स्वरूप किती जरी गुप्त ठेवू लागला तरी त्याचें खरें खरें स्वरूप जें काय असतें तें सर्वस्वीं गुप्त राहणें अशक्य आहे. कारण, पुरुषांच्या अंतःकरणामध्यें असलेला आशय जो कांहीं असेल तो अंतर्यामी देवता बाहेर पाडीतच असते ६४. हे कार्यवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, योग्य ठिकाणीं आणि योग्य वेळीं प्राप्त झालेलें कार्य चांगल्या रीतीनें केलें असतां तें करणाऱ्याचा मनोरथ सफल करितें ६५. आपला उद्योग पाहून, रावण दुर्वृत्त आहे असें अवलोकन करून आणि आपल्या हातून वालीचा वध होऊन सुग्रीवाला अभिषेक झाल्याचें श्रवण करून ६६. राज्याच्या आशेनें हा समजून उमजून येथें आलेला आहे; आणि असें आहे ह्मणूनच त्याचा संग्रह करणें मला योग्य दिसत आहे ६७. हे बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ, राक्षसाच्या सरळ वर्तनासंबंधानें मला काय सांगावयाचें होतें तें मीं यथामति आपणांला सांगितलें आहे. आतां हें ऐकून घेऊन पुढें काय करावयाचें तें ठरविणें आपणांवरच अवलंबून आहे ६८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत

अथ रामः प्रसन्नात्मा श्रुत्वा वायुसुतस्य ह । प्रत्यभाषत दुर्धर्षः श्रुतवानात्मनि स्थितम् १ ममापि च विवक्षास्ति काचित्प्रति विभीषणम् । श्रोतुमिच्छामि तत्सर्वं भवद्भिः श्रेयसि स्थितैः २ मित्रभावेन संप्राप्तं न त्यजेयं कथंचन । दोषो यद्यपि तस्य स्यात्सतामेतदगर्हितम् ३ सुग्रीवस्त्वथ तद्वाक्यमाभाष्य च विमृश्य च । ततः शुभतरं वाक्यमुवाच हरिपुङ्गवः ४ स दुष्टो वाप्यदुष्टो वा किमेष रजनीचरः । ईदृशं व्यसनं प्राप्तं भ्रातरं यः परित्यजेत् ५ को नाम स भवेत्तस्य यमेष न परित्यजेत् । वानराधिपतेर्वाक्यं श्रुत्वा सर्वानुदीक्ष्य तु ६ ईषदुत्स्मयमानस्तु लक्ष्मणं पुण्यलक्षणम् । इति होवाच काकुत्स्थो वाक्यं सत्यपराक्रमः ७ अनधीत्य च शास्त्राणि वृद्धाननुपसेव्य च । न शक्यमीदृशं वक्तुं यदुवाच हरीश्वरः ८ अस्ति सूक्ष्मतरं किंचिद्यथात्र प्रतिभाति मा । प्रत्यक्षं लौकिकं चापि वर्तते सर्वराजसु ९ अमित्रास्तत्कुलीनाश्च प्रातिदेश्याश्च

---

श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सतरावा सर्ग समाप्त झाला ॥१७॥

नंतर प्रसन्न मनानें युक्त असलेला, अजिंक्य व ज्ञानवान् राम, वायुपुत्र हनुमानाचें तें भाषण श्रवण केल्यावर, आपल्या मनांत काय होतें तें सांगू लागला १. ( तो ह्मणाला ) " बिभीषणासंबंधानें मलाही कांहीं बोलावयाचें आहे; आणि माझें कल्याण चिंतिणाऱ्या तुह्मीं तें श्रवण करावें असा माझा मानस आहे २. त्याचे ठिकाणीं कांहीं दोष जरी असला तरी तो जर मित्रभावानें प्राप्त झाला असेल तर मी त्याचा त्याग कधींही करणार नाहीं. कारण, मित्रभावानें प्राप्त झालेल्याचा त्याग करणें हें सज्जनांनीं निंद्य मानिलें आहे " ३. हें रामाचें भाषण ऐकून घेऊन व त्याचा विचार करून वानरश्रेष्ठ सुग्रीव पूर्वींपक्षां चांगल्या शब्दांनीं ह्मणाला ४ " तो हा राक्षस दुष्ट असो अथवा नसो त्याचा स्वीकार का करितां येणार आहे ? अहो, अशाप्रकारच्या संकटांत सांपडलेल्या भ्रात्याचा जो त्याग करीत आहे ५ तो कोणाचा बरें त्याग करणार नाहीं ?" वानराधिपति सुग्रीवाचें हें भाषण श्रवण करून व सर्वांच्या मुखाकडे पाहून ६ किंचित् हास्य करीत करीत तो ककुत्स्थकुलोत्पन्न सत्यपराक्रमी राम लक्ष्मणाला ह्मणाला ७ " वानराधिपतीनें जें भाषण केलें तें भाषण शास्त्राध्ययनाशिवाय आणि वृद्धांची शुश्रूषा केल्याशिवाय करितां येणें शक्य नाहीं ८. माझ्या समजुतीप्रमाणें ह्या बिभीषणाचे ठिकाणीं कांहीं तरी बरीच सूक्ष्म गोष्ट आहे. कारण, प्रत्यक्षसिद्ध एक आणि लोकप्रसिद्ध एक असा प्रकार कोणत्याही राजाचे ठिकाणीं असतोच ९. राजांना दोन प्रकारचे शत्रु असतात. एक आपल्या कुलांतील आणि दुसरे समीप असलेल्या

कीर्तिताः । व्यसनेषु प्रहर्तारस्तस्माद्यमिहागतः १० अपापास्तत्कुलीनाश्च मानयन्ति स्वकान्हितान् । एष प्रायो नरेन्द्राणां शङ्कनीयस्तु शोभनः ११ यस्तु दोषस्त्वया प्रोक्तो ह्यादानेरिबलस्य च । तत्र ते कीर्तयिष्यामि यथाशास्त्रमिदं शृणु १२ न वयं तत्कुलीनाश्च राज्यकाङ्क्षी च राक्षसः । पण्डिता हि भविष्यन्ति तस्माद्ग्राह्यो बिभीषणः १३ अव्यग्राश्च प्रहृष्टाश्च ते भविष्यन्ति संगताः । प्रणादश्च महानेषोन्योन्यस्य भयमागतम् ॥ इति भेदं गमिष्यन्ति तस्मात्प्राप्तो बिभीषणः १४ न सर्वे भ्रातरस्तात भवन्ति भरतोपमाः । मद्विधा वा पितुः पुत्राः सुहृदो वा भवद्विधाः १५ एवमुक्तस्तु रामेण सुग्रीवः सहलक्ष्मणः । उत्थायेदं महाप्राज्ञः प्रणतो वाक्यमब्रवीत् १६ रावणेन प्रणिहितं तमवेहि निशाचरम् ।

---

देशांतील, हे दोघेही संकट पाहून प्रहार करणारे असल्यामुळें हा (त्यांच्यापासून रक्षण होण्याकरितां ) येथें आला आहे १०. निष्पाप आणि आपल्या कुलांतील जे असतील ते आपलें हित करणाऱ्या ज्ञातिबांधवांना मान देत असतात असें प्रायः लोकांमध्यें दृष्टोपत्तीस येतें. परंतु, हित इच्छिणारा जरी असला तरी आपल्या कुलांतील लोकांविषयीं राजांना शंका येतच असते ११. आतां शत्रूकडील बल स्वीकार करण्यामध्यें जो दोष तूं कथन केलास त्यासंबंधानें मी तुला यथायोग्य उत्तर कथन करीत आहें तें तूं श्रवण कर १२. आह्मी त्याच्या कुलांतील नव्हे ( आणि त्याच्या समीप असलेल्या देशांतीलही नव्हे. ह्यास्तव, राज्यापहार करण्याची आमची इच्छाच नसल्यामुळें तोही छिद्र पाहून आह्मांवर शस्त्र चालविणार नाहीं ) आणि शिवाय त्या राक्षसाला राज्यप्राप्तीची इच्छा आहे; व स्वार्थ साधण्याविषयीं निपुण असलेले पुरुष सर्वत्र असावयाचेच. तस्मात्, बिभीषणाचा स्वीकार केला पाहिजे १३ ज्ञातिजन प्रेमामुळें एकत्र जुळले असतां आनंदित होऊन एकमेकांच्या हिताविषयीं दक्ष असतात; परंतु, ज्यांच्यामध्यें प्रेम नसतें ते परस्परांपासून भिन्न होतात आणि नंतर त्यांत युद्धाची मोठी गडबड सुरू होते आणि असें झालें असतां आपआपसांतच ते परस्परांना भय होऊन बसतात. तस्मात्, असा प्रकार झाल्यामुळें हा बिभीषण येथें आला आहे ( आणि ह्मणूनच त्याचा स्वीकार करणें योग्य आहे) १४ बाबारे, सर्वच भ्रातें भरतासारिखे नाहींत. पित्याचे सर्वच पुत्र माझ्यासारिखे नाहींत किंवा तुमच्यासारिखे मित्रही सर्वांना मिळत नाहींत" १५. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां महाबुद्धिमान् सुग्रीव लक्ष्मणासहवर्तमान नम्र होऊन ह्मणाला १६ " हे क्षमाशीलांमध्यें श्रेष्ठ, तो राक्षस रावणानें पाठविला आहे असें आपण समजा. त्याचा निग्रह

तस्याहं निग्रहं मन्ये क्षमं क्षमवतां वर १७ राक्षसो जिह्मया बुद्ध्या संदिष्टोयमिहागतः । प्रहर्तुं त्वयि विश्वस्ते विश्वस्ते मयि वानघ १८ लक्ष्मणे वा महाबाहो स वध्यः सचिवैः सह । रावणस्य नृशंसस्य भ्राता ह्येष विभीषणः १९ एवमुक्त्वा रघुश्रेष्ठं सुग्रीवो वाहिनीपतिः । वाक्यज्ञो वाक्यकुशलं ततो मौनमुपागमत् २० स सुग्रीवस्य तद्वाक्यं रामः श्रुत्वा विमृश्य च । ततः शुभतरं वाक्यमुवाच हरिपुङ्गवम् २१ स दुष्टो वाप्य-दुष्टो वा किमेष रजनीचरः । सूक्ष्ममप्यहितं कर्तुं मम शक्तः कथंचन २२ पिशाचान्दानवान्यक्षान्पृथिव्यां चैव राक्षसान् । अङ्गुल्यग्रेण तान्हन्या-मिच्छन्हरिगणेश्वर २३ श्रूयते हि कपोतेन शत्रुः शरणमागतः । अर्चि-तश्च यथान्यायं स्वैश्च मांसैर्निमन्त्रितः २४ स हि तं प्रतिजग्राह भार्या-हर्तारमागतम् । कपोतो वानरश्रेष्ठ किं पुनर्मद्विधो जनः २५ ऋषेः कण्वस्य पुत्रेण कण्डुना परमर्षिणा । शृणु गाथा पुरा गीता धर्मिष्ठा सत्यवा-दिना २६ बद्धाञ्जलिपुटं दीनं याचन्तं शरणागतम् । न हन्यादानृशंस्या-

करणें योग्य आहे असें मला वाटतें १७. हे निष्पापा, रावणानें पाठविलेला हा राक्षस विश्वासानें राहिलेल्या माझ्यावर अथवा तुझ्यावर कपटबुद्धीनें प्रहार करण्याकरितां येथें आला आहे १८. हे महापराक्रमी रामा, अथवा लक्ष्मणाचे ठिकाणीं प्रहार करण्याकरितां हा आला असेल. ह्यास्तव, सचिवांसहवर्तमान ह्याचा वध केला पाहिजे. कारण, हा बिभीषण दुष्ट रावणाचा भ्राता आहे " १९. ह्याप्रमाणें संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला सेनाधिपति सुग्रीव रघुवंशजश्रेष्ठ व वक्तृत्वामध्यें कुशल असलेल्या रामाला सांगून स्वस्थ बसला २०. तव्हां सुग्रीवाचें तें भाषण श्रवण करून आणि त्याचा विचार करून त्याच्याहीपेक्षां उत्कृष्ट भाषण तो राम त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाशीं करूं लागला २१. ( तो ह्मणाला ) " हा राक्षस दुष्ट असो अथवा नसो मला अगदीं सूक्ष्म तरी अपाय करण्यास हा समर्थ आहे काय ? २२. हे वानरसेनाधिपते, पृथ्वींतील पिशाच, दानव आणि राक्षस ह्या सर्वांना मनांत आणि-ल्यास एका बोटाच्या अग्रानें मी मारून टाकीन २३. असो. आपल्या निवासस्थाना-समीप आलेल्या शत्रूचेंही कपोतानें योग्यरीतीनें पूजन करून स्वतःचें मांस भक्षण कर-ण्याविषयीं त्यानें त्याची प्रार्थना केल्याचें श्रुत आहे २४. सारांश, हे वानरश्रेष्ठा, भार्या हरण करणारा तो व्याध आला असतांही कपोतानें जर त्याचा आदरातिथ्य केलें तर माझ्यासारिख्या पुरुषानें ह्याचा आदर कसा बरें न करावा ? २५. कण्वमुनींचे पुत्र महर्षि सत्यवादी कण्डु ह्यांनीं पूर्वीं धर्मसंबंधी पठण केलेली गाथा तू श्रवण कर २६.

श्रमपि शत्रुं परन्तप २७ आर्तो वा यदि वा दृप्तः परेषां शरणं गतः
अरिः प्राणान्परित्यज्य रक्षितव्यः कृतात्मना २८ स चेद्भयाद्वा मोहाद्वा
कामाद्वापि न रक्षति । स्वया शक्त्या यथान्यायं तत्पापं लोकगर्हितम् २९
विनष्टः पश्यतस्तस्य रक्षिणः शरणं गतः । आदाय सुकृतं तस्य सर्वं
गच्छेदरक्षितः ३० एवं दोषो महानत्र प्रपन्नानामरक्षणे । अस्वर्ग्यं चाय-
शस्यं च बलवीर्यविनाशनम् ३१ करिष्यामि यथार्थं तु कण्डोर्वचन-
मुत्तमम् । धर्मिष्ठं च यशस्यं च स्वर्ग्यं स्यात्तु फलोदये ३२ सकृदेव प्रप-
न्नाय तवास्मीति च याचते । अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद्व्रतं मम ३३
आनयैनं हरिश्रेष्ठ दत्तमस्याभयं मया । विभीषणो वा सुग्रीव यदि वा
रावणः स्वयम् ३४ रामस्य तु वचः श्रुत्वा सुग्रीवः प्लवगेश्वरः । प्रत्य-
भाषत काकुत्स्थं सौहार्देनाभिपूरितः ३५ किमत्र चित्रं धर्मज्ञ लोक-
नाथशिखामणे । यत्त्वमार्यं प्रभाषेथाः सत्त्ववान्सत्पथे स्थितः ३६ मम

---

हात जोडून व दीन होऊन जीवाची याचना करीत करीत शत्रु जरी आला तरी, हे शत्रुतापना, आश्रितरक्षणरूप धर्म परिपालन करण्याकरितां त्याचा वध करूं नये २७. शत्रु आर्त असो अथवा गर्वयुक्त असो जर शत्रूंना शरण आला असेल तर प्राणत्याग करूनही विचारी पुरुषानें त्याचें रक्षण करावें २८. कामा-मुळें, मोहामुळें अथवा भयामुळें जर स्वसामर्थ्यानें योग्यरीतीनें त्याचें रक्षण न केलें तर त्या रक्षण न करणाऱ्या पुरुषाला त्याचें पाप लागत असून लोकांच्या निंदे-सही तो पात्र होतो २९. रक्षणाकरितां शरण आलेला पुरुष रक्षण न झाल्यामुळें जर नाश पावला तर ज्याच्याकडे तो रक्षणार्थ आला असेल त्याच्या समक्षच त्याचें सर्व पुण्य घेऊन परलोकीं चालता होतो ३०. ह्याप्रमाणें शरणागताचें रक्षण न करणें ह्यांत मोठा दोष असून तें अकीर्तिकारक, स्वर्गप्रतिबंधक आणि बलवीर्यनाशक आहे ३१. कंडुमुनींच्या उत्कृष्ट वचनाप्रमाणें मी अगदीं यथार्थ वागेन. कारण, तसें वागणें परिणामीं यशस्कारक व स्वर्गप्रापक असून धर्माला अतिशय अनुसरून आहे ३२. जो एकदां शरण येऊन व मी तुझा आहें असें ह्मणून याचना करूं लागला त्याचें सर्वांपासून रक्षण करणें हें माझें व्रत आहे ३३. तस्मात् , हे वानरश्रेष्ठा सुग्रीवा, हा बिभीषण असो अथवा प्रत्यक्ष रावणच त्याचें रूप धारण करून आलेला असो मीं ह्याला अभय दिलें आहे. ह्यास्तव, तूं त्याला इकडे घेऊन ये " ३४. रामाचें हें भाषण श्रवण केल्यावर मित्रभावानें व्याप्त झालेला वानराधिपति सुग्रीव ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला ह्मणाला ३५ " हे धर्मवेत्त्या, हे नृपश्रेष्ठा, सत्त्वगुणाचेंच अवलंबन करून जर तूं

चाप्यन्तरात्मायं शुद्धं वेत्ति विभीषणम्। अनुमानाच्च भावाच्च सर्वतः सुपरीक्षितः ३७ तस्मात्क्षिप्रं महास्माभिस्तुल्यो भवतु राघव। विभीषणो महाप्राज्ञः सखित्वं चाभ्युपैतु नः ३८ ततस्तु सुग्रीववचो निशम्य तद्धरीश्वरेणाभिहितं नरेश्वरः। विभीषणेनाशु जगाम संगमं पतत्रिराजेन यथा पुरन्दरः ३९ [ ६०९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टादशः सर्गः ॥ १८ ॥

राघवेणाभये दत्ते संनतो रावणानुजः। विभीषणो महाप्राज्ञो भूमिं समवलोकयत् १ खात्पपातावनिं हृष्टो भक्तैरनुचरैः सह। स तु रामस्य धर्मात्मा निपपात विभीषणः २ पादयोर्निपपाताथ चतुर्भिः सह राक्षसैः। अब्रवीच्च तदा वाक्यं रामं प्रति विभीषणः ३ धर्मयुक्तं च युक्तं च सांप्रतं संप्रहर्षणम्। अनुजो रावणस्याहं तेन चास्म्यवमानितः ४ भवन्तं सर्वभूतानां शरण्यं शरणं गतः। परित्यक्ता मया लङ्का मित्राणि च धनानि च ५ भवद्गतं हि मे राज्यं जीवितं च सुखानि च। तस्य तद्वचनं

---

सन्मार्गानेंच वागणारा आहेस तर सज्जनांना अनुरूप असें भाषण तूं केलेंस ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं ३६. शिवाय, माझा हा अंतरात्माही बिभीषणाला शुद्ध समजत आहे. तेव्हां ह्याची हालचाल आणि माझें अनुमान ह्या दोहोंच्या योगानें सर्व प्रकारें ह्याचें चागलं परीक्षण झालें आहे ३७. तस्मात्, हे राघवा, हा महाप्राज्ञ बिभीषण सत्वर आमच्यासारिखा होवो आणि आमच्याशीं हा सख्य करो " ३८. तदनंतर वानराधिपति सुग्रीवानें केलेलें तें भाषण श्रवण करून मानवाधिपति रामानें, पक्षिराजानें आणिलेल्या विष्णूची भेट घेणाऱ्या इंद्राप्रमाणें, बिभीषणाची सत्वर भेट घेतली ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ १८ ॥

रामानें अभय दिल्यावर रावणाचा कनिष्ठ भ्राता तो महाबुद्धिमान् बिभीषण नम्र होऊन भूमीकडे पाहूं लागला १; आणि आनंदित झालेला तो धर्मात्मा बिभीषण स्वतःचे ठिकाणीं अनुरक्त असलेल्या आपल्या अनुयायांसहवर्तमान भूमीवर रामाच्या पाशीं येऊन पडला २. सारांश, चार राक्षसांसहवर्तमान तो बिभीषण रामाच्या पायांजवळ येऊन पडला आणि युक्तीला धरून व धर्माला अनुरूप असलेलें आणि तत्काल संतोष उत्पन्न करणारें भाषण तो रामाशीं करूं लागला. ( तो ह्मणाला ) " मी रावणाचा कनिष्ठ भ्राता असल्यामुळें माझा अवमान झाला आहे ३,४; परंतु, सर्व भूतांना आधारभूत असलेल्या आपणांला मी शरण आलों आहें. मीं लंका, मित्र

श्रुत्वा रामो वचनमब्रवीत् ६ वचसा सान्त्वयित्वैनं लोचनाभ्यां पिबन्निव । आख्याहि मम तत्त्वेन राक्षसानां बलाबलम् ७ एवमुक्तं तदा रक्षो रामेणाक्लिष्टकर्मणा । रावणस्य बलं सर्वमाख्यातुमुपचक्रमे ८ अवध्यः सर्वभूतानां गन्धर्वोरगपक्षिणाम् । राजपुत्र दशग्रीवो वरदानात्स्वयंभुवः ९ रावणानन्तरो भ्राता मम ज्येष्ठश्च वीर्यवान् । कुम्भकर्णो महातेजाः शक्रप्रतिबलो युधि १० राम सेनापतिस्तस्य प्रहस्तो यदि ते श्रुतः । कैलासे येन समरे मणिभद्रः पराजितः ११ बद्धगोधाङ्गुलित्रश्च अवध्यकवचो युधि । धनुरादाय यस्तिष्ठन्नदृश्यो भवतीन्द्रजित् १२ सङ्ग्रामे सुमहद्व्यूहे तर्पयित्वा हुताशनम् । अन्तर्धानगतः श्रीमानिन्द्रजिद्धन्ति राघव १३ महोदरमहापार्श्वौ राक्षसश्चाप्यकम्पनः । अनीकपास्तु तस्यैते लोकपालसमा युधि १४ दश कोटिसहस्राणि रक्षसां कामरूपिणाम् । मांसशोणितभक्ष्याणां लङ्कापुरनिवासिनाम् १५ स तैस्तु सहितो राजा लोकपालानयोधयत् । सह देवैस्तु ते भग्ना रावणेन दुरात्मना १६

---

व संपत्ति ह्या सर्वांचा त्याग केला आहे ५; आणि माझें राज्य, जीवित व सुख हें सर्व आपणांवरच अवलंबून आहे ". तें त्याचें भाषण श्रवण केल्यावर राम आपल्या भाषणानें त्याचें सांत्वन करून अनुग्रहदृष्टीनें त्याला अवलोकन करीत करीत ह्मणाले " राक्षसांचें बलाबल तूं मला खरें खरें सांग " ६,७. ह्याप्रमाणें निष्पाप कर्म करणाऱ्या रामानें विचारिलें असतां तो राक्षस रावणाचें सर्व बल त्यांना सांगूं लागला ८. ( तो ह्मणाला ) " हे राजपुत्र, गंधर्व, उरग, पक्षी वगैरे सर्व प्राण्यांना तो दशानन ब्रह्मदेवाच्या वरप्रदानामुळें अवध्य झाला आहे ९. माझ्याहून ज्येष्ठ आणि रावणाहून कनिष्ठ असा माझा भ्राता महातेजस्वी कुंभकर्ण युद्धामध्यें बलानें इंद्राची बरोबरी करणारा आहे १०. हे राम, त्याचा सेनापति प्रहस्त आपल्या कानावर आला असेल. त्यानें कैलासपर्वतावर मणिभद्राचा पराजय केलेला आहे ११. गोधारूप अंगुलित्राण धारण केलेला आणि अभेद्य कवचानें युक्त असलेला इंद्रजित् धनुष्य घेऊन संग्रामामध्यें उभा राहिला असतां प्रतिपक्ष्याच्या दृष्टीं पडत नाहीं १२. सैन्याची ज्यांत योग्य व्यवस्था लाविलेली आहे अशा संग्रामामध्यें अग्नीला तृप्त करून अदृश्य रहात असलेला तो वैभवशाली इंद्रजित्, हे राघवा, शत्रूचा वध करीत असतो १३. महोदर, महापार्श्व आणि अकंपन राक्षस हे त्या रावणाचे सेनाधिपति लोकपालांची बरोबरी करणारे आहेत १४. यथेष्ट रूप धारण करणारे, रक्तमांस भक्षण करणारे आणि लंकानगरीमध्यें वास्तव्य करणारे एक निखर्व राक्षस त्या

विभीषणस्य तु वचस्तच्छ्रुत्वा रघुसत्तमः । अन्वीक्ष्य मनसा सर्वमिदं वचनमब्रवीत् १७ यानि कर्मापदानानि रावणस्य विभीषण । आख्यातानि च तत्त्वेन ह्यवगच्छामि तान्यहम् १८ अहं हत्वा दशग्रीवं सप्रहस्तं सहात्मजम् । राजानं त्वां करिष्यामि सत्यमेतच्छृणोतु मे १९ रसातलं वा प्रविशेत्पातालं वापि रावणः । पितामहसकाशं वा न मे जीवन्विमोक्ष्यते २० अहत्वा रावणं सङ्ख्ये सपुत्रजनबान्धवम् । अयोध्यां न प्रवेक्ष्यामि त्रिभिस्तैर्भ्रातृभिः शपे २१ श्रुत्वा तु वचनं तस्य रामस्याक्लिष्टकर्मणः । शिरसा वन्द्य धर्मात्मा वक्तुमेव प्रचक्रमे २२ राक्षसानां वधे साह्यं लङ्कायाश्च प्रधर्षणे । करिष्यामि यथाप्राणं प्रवेक्ष्यामि च वाहिनीम् २३ इति ब्रुवाणं रामस्तु परिष्वज्य विभीषणम् । अब्रवील्लक्ष्मणं प्रीतः समुद्राज्जलमानय २४ तेन चेमं महाप्राज्ञमभिषिञ्च विभीषणम् । राजानं रक्षसां क्षिप्रं प्रसन्ने मयि मानद २५ एवमुक्तस्तु सौमित्रिरभ्यषिञ्चद्विभीषणम् । मध्ये वानरमुख्यानां राजानं राजशासनात् २६

रावणापाशीं आहेत १५; आणि त्यांच्याबरोबर त्यानें लोकपालांशीं युद्ध केलें असतां देवांसहवर्तमान त्या लोकपालांचा त्या दुरात्म्या रावणानें पराजय केलेला आहे " १६. बिभीषणाचें तें भाषण श्रवण करून आणि मनामध्यें त्या सर्वांचा विचार करून रघुवंशजश्रेष्ठ राम त्याला ह्मणाले १७ " हे बिभीषणा, रावणाचे पराक्रम जे तूं खरे खरे सांगितलेस ते मला समजले १८. तथापि, प्रहस्त आणि पुत्र ह्यांसहवर्तमान रावणाचा वध करून मी तुला राजा करीन; हें माझें सत्यवचन तूं श्रवण करून ठेव १९. रावण रसातलामध्यें प्रवेश करो, पातालामध्यें शिरो अथवा ब्रह्मदेवापाशीं गमन करो माझ्या हातून तो जिवंत सुटणार नाहीं २०. पुत्र, स्वजन आणि बांधव ह्यांसहवर्तमान संग्रामामध्यें रावणाचा वध केल्यावांचून मी अयोध्यानगरींत प्रवेश करणार नाहीं; हें त्या तीन भ्रात्यांची शपथ वाहून मी तुला सांगतों " २१. निष्पाप कर्म करणाऱ्या रामाचें तें भाषण श्रवण केल्यावर मस्तकानें प्रणाम करून धर्मात्म्या बिभीषणानें भाषणालाच आरंभ केला २२. " राक्षसांच्या वधाविषयीं आणि लंकेवर हल्ला करण्याविषयीं मी आपणांला यथाशक्ति साहाय्य करीन व रावणाच्या सैन्यामध्येंही प्रवेश करीन " २३. असें तो बिभीषण बोलूं लागला असतां राम आनंदित झाले आणि त्याला कवटाळून धरून लक्ष्मणाला ह्मणाले " समुद्रांतील उदक घेऊन ये २४; आणि, हे मान्य लक्ष्मणा, मी प्रसन्न झालों असल्यामुळें ह्या महाज्ञानी बिभीषणाला राक्षसांचा राजा ह्मणून सत्वर राज्याभिषेक कर " २५. ह्याप्रमाणें रामांनीं लक्ष्मणाला सांगितलें असतां राजाज्ञेप्रमाणें लक्ष्मणानेंही

तं प्रसादं तु रामस्य दृष्ट्वा सद्यः प्लवङ्गमाः । प्रचुक्रुशुर्महात्मानं साधु साध्विति चाब्रुवन् २७ अब्रवीच्च हनूमांश्च सुग्रीवश्च विभीषणम् । कथं सागरमक्षोभ्यं तराम वरुणालयम् ॥ सैन्यैः परिवृताः सर्वे वानराणां महौजसाम् २८ उपायैरभिगच्छाम यथा नदनदीपतिम् । तराम तरसा सर्वे ससैन्या वरुणालयम् २९ एवमुक्तस्तु धर्मात्मा प्रत्युवाच विभीषणः । समुद्रं राघवो राजा शरणं गन्तुमर्हति ३० खानितः सगरेणायमप्रमेयो महोदधिः । कर्तुमर्हति रामस्य ज्ञातेः कार्यं महोदधिः ३१ एवं विभीषणेनोक्तं राक्षसेन विपश्चिता । आजगामाथ सुग्रीवो यत्र रामः सलक्ष्मणः ३२ ततश्चाख्यातुमारेभे विभीषणवचः शुभम् । सुग्रीवो विपुलग्रीवः सागरस्योपवेशनम् ३३ प्रकृत्या धर्मशीलस्य रामस्यास्याप्यरोचत । सलक्ष्मणं महातेजाः सुग्रीवं च हरीश्वरम् ३४ सत्क्रियार्थं क्रियादक्षं स्मितपूर्वमभाषत । विभीषणस्य मन्त्रोयं मम लक्ष्मण रोचते ३५ सुग्रीवः पण्डितो नित्यं भवान्मन्त्रविचक्षणः । उभाभ्यां संप्रधार्यार्थं रोचते यत्तदुच्यताम् ३६

---

वानरश्रेष्ठांमध्यें बिभीषणाला राक्षसांचा राजा ह्मणून अभिषेक केला २६. रामाची ती कृपा अवलोकन करितांक्षणीं तेथें असलले वानर आनंदानें गर्जना करूं लागले आणि त्या महात्म्या रामाला " शाबास, शाबास " असें ह्मणूं लागले २७. तदनंतर हनुमान् आणि सुग्रीव बिभीषणाला ह्मणाले " वरुणाचें निवासस्थान असलेला हा अगाध समुद्र महाबलाढय वानरांचीं सैन्यें बरोबर घेऊन आह्मां सर्वांना कसा बरें तरून जातां येईल ? २८. सैन्यासहवर्तमान सर्वांना वेगानें वरुणाचें निवासस्थान असलेला समुद्र ज्या उपायांनीं तरून जातां येईल असे कोणते उपाय योजून आह्मीं ह्या नदनदीपति समुद्राकडे जावें ? " २९. ह्याप्रमाणें त्यानीं विचारिलें असतां धर्मात्मा बिभीषण ह्मणाला " रघुवंशज रामराजानें समुद्राला शरण जावें ३०. हा अगाध महासागर सगरानें पत्राकडून खणविला आहे. ह्यास्तव, भाऊबंद जो राम त्याचें कार्य हा महासागर करील " ३१. ह्याप्रमाणें विवेकी बिभीषण राक्षसानें सांगितलें असतां लक्ष्मणासहवर्तमान राम जेथें बसले होते तेथें सुग्रीव आला ३२; आणि मोठ्या ग्रीवेनें ( ह्मणजे कंठानें ) युक्त असलेला तो सुग्रीव समुद्राला शरण जाण्यासंबंधानें बिभीषणानें केलेलें शुभ भाषण तेथें सांगूं लागला असतां ३३, स्वभावतःच धर्मशील असलेल्या रामांनाही तें रुचलें आणि ते महातेजस्वी राम बिभीषणाची मानमान्यता राखण्याकरितां कर्तव्यदक्ष वानराधिपति सुग्रीवाला आणि लक्ष्मणाला अनुलक्षून हास्यपूर्वक ह्मणाले " हे लक्ष्मणा, सुग्रीवाचा हा विचार मलाही रुचत

एवमुक्तौ ततो वीरावुभौ सुग्रीवलक्ष्मणौ । समुदाचारसंयुक्तमिदं वचन-
मूचतुः ३७ किमर्थं नौ नरव्याघ्र न रोचिष्यति राघव । विभीषणेन
यत्तूक्तमस्मिन्काले सुखावहम् ३८ अबद्ध्वा सागरे सेतुं घोरेस्मिन्वरुणा-
लये । लङ्का नासादितुं शक्या सेन्द्रैरपि सुरासुरैः ३९ विभीषणस्य शूरस्य
यथार्थं क्रियतां वचः । अलं कालात्ययं कृत्वा सागराय नियुज्यताम् ४०
यथा सैन्येन गच्छाम पुरीं रावणपालिताम् ४१ एवमुक्तः कुशास्तीर्णे
तीरे नदनदीपतेः । संविवेश तदा रामो वेद्यामिव हुताशनः ४२ [६५१]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे एकोन-
विंशः सर्गः ॥ १९ ॥

ततो निविष्टां ध्वजिनीं सुग्रीवेणाभिपालिताम् । ददर्श राक्षसोभ्येत्य
शार्दूलो नाम वीर्यवान् १ चारो राक्षसराजस्य रावणस्य दुरात्मनः । तां
दृष्ट्वा सर्वतोव्यग्रां प्रतिगम्य स राक्षसः २ आविश्य लङ्कां वेगेन राजान-
मिदमब्रवीत् । एष वै वानरर्क्षौघो लङ्कां समभिवर्तते ३ अगाधश्चाप्रमेयश्च

---

आहे ३४, ३५. सुग्रीव नेहमीं पंडित असून तूंही मसलतीमध्यें निपुण आहेस. ह्यास्तव, काय करावें हा उभयतांनीं निश्चय करून जें बरें दिसत असेल तें सांगावें " ३६. ह्याप्रमाणें रामांनीं सांगितलें असतां ते उभयतां वीर सुग्रीव व लक्ष्मण शिष्टाचाराला अनुसरून ह्मणाले ३७ " हे पुरुषश्रेष्ठा राघवा ह्या प्रसंगाला सुखावह असें जें भाषण बिभीषणानें केलें तें आह्मांला कसें बरें रुचणार नाहीं ? ३८. वरुणाचें निवासस्थान असलेल्या ह्या घोर समुद्रामध्यें सेतु बांधिल्यावांचून इंद्रासहवर्तमान देवदैत्यांनाही लंकेच्या समीप जातां येणें शक्य नाहीं ३९. शूर बिभीषणाच्या सांगण्याप्रमाणें यथार्थ वागावें; आतां विलंब पुरे. सागराची प्रार्थना करण्याकडेच आतां आपण आपलें लक्ष्य लावा ४०; आणि सैन्यासहवर्तमान आपणांला रावणरक्षित लंकानगरीमध्यें जातां येईल असा कांहीं तरी विचार काढा " ४१. ह्याप्रमाणें त्यांनीं सांगितलें असतां वेदीमध्यें असलेल्या अग्नीप्रमाणें दर्भ पसरलेल्या समुद्राच्या तीरावर रामांनीं शयन केलें ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकोणिसावा सर्ग समाप्त झाला ॥ १९ ॥

तदनंतर सुग्रीवानें संरक्षण केलेली आणि समुद्राच्या तीरावर उतरलेली सेना शार्दूलनामक वीर्यवान् राक्षसानें तेथें येऊन अवलोकन केली १. तो दुरात्म्या राक्षसराज रावणाचा हेर होता. असो. सर्व प्रकारें सावध असलेली ती सेना अवलोकन करून तो राक्षस परत गेला २; आणि वेगावेगानें लंकेमध्यें प्रवेश करून राजाला

द्वितीय इव सागरः । पुत्रौ दशरथस्येमौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ४ उत्तमं रूपसंपन्नौ सीतायाः पदमागतौ । एतौ सागरमासाद्य संनिविष्टौ महाद्युते ५ बलं चाकाशमावृत्य सर्वतो दशयोजनम् । तत्त्वभूतं महाराज क्षिप्रं वेदितुमर्हसि ६ तव दूता महाराज क्षिप्रमर्हन्ति वेदितुम् । उपप्रदानं सान्त्वं वा भेदो वात्र प्रयुज्यताम् ७ शार्दूलस्य वचः श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः । उवाच सहसा व्यग्रः संप्रधार्यार्थमात्मनः ॥ शुकं साधु तदा रक्षो वाक्यमर्थविदां वरम् ८ सुग्रीवं ब्रूहि गत्वाशु राजानं वचनान्मम । यथासंदेशमक्लीबं श्लक्ष्णया परया गिरा ९ त्वं वै महाराजकुलप्रसूतो महाबलश्चर्क्षरजःसुतश्च । न कश्चनार्थस्तव नास्त्यनर्थस्तथापि मे भ्रातृसमो हरीश १० अहं यद्यहरं भार्यां राजपुत्रस्य धीमतः । किं तत्र तव सुग्रीव किष्किन्धां प्रति गम्यताम् ११ न हीयं हरिभिर्लङ्का प्राप्तुं

ह्मणाला "वानर आणि ऋक्ष यांचें हें सैन्य लंकेवर येत आहे ३. हें अगाध व अनंत असल्यामुळें दुसरा सागरच कीं काय असें भासत आहे. हे दशरथाचे पुत्र भ्राते रामलक्ष्मण ४ उत्कृष्ट व रूपवान् असून सीतेच्या शोधार्थ निघाले आहेत; आणि, हे महातेजस्वी राजा, सागराचे तीरीं हे राहिले आहत ५. हे महाराजा, सर्व बाजूंनीं दहा योजनेंपर्यंत प्रदेश व्याप्त करून त्यांचें खरें खरें सैन्य राहिलेलें आहे. हें वृत्त, हे महाराज, आपणांला विदित असू द्या ६. हे महाराज, आपल्या दूतांनीं त्यांचा वृत्तांत काय असेल तो सत्वर समजून घेतला पाहिजे आणि नंतर सीतेला परत देणें, सुग्रीवाशीं सख्य करणें आणि राम व सुग्रीव ह्यांमध्यें भेद पाडणें ह्यांपैकीं कांहीं तरी आपणांला केलें पाहिजे" ७. शार्दूलानें भाषण श्रवण केल्यावर राक्षसाधिपति रावण एकाएकीं क्षुब्ध झाला आणि आपल्या हिताचा विचार करून अर्थवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या व सन्मार्गानें वागणाऱ्या शुकनामक राक्षसाला ह्मणाला ८ "राजा सुग्रीवाकडे माझ्या सांगण्यावरून तूं सत्वर जा आणि माझ्या निरोपाप्रमाणें भीति न बाळगितां चांगल्या स्पष्ट वाणीनें त्याला सांग कीं ९, हे वानराधिपते, तूं मोठ्या राजकुलामध्यें उत्पन्न झाला असून महाबलाढ्य आहेस आणि ऋक्षरजाचा पुत्र आहेस. ह्यास्तव, रामाला साहाय्य केल्यानें तुझें कांहींही कार्य सिद्धीस जाण्याचा संभव नाहीं; अथवा कांहीं भावी अनर्थही टळण्याचा संभव नाहीं. आतांपर्यंत जरी तूं रामाला अनुसरून वागत आहेस तरी मी तुला आपल्या भ्रात्यासारिखाच मानीत आहें १०. हे सुग्रीवा, बुद्धिमान् राजपुत्र रामाची भार्या मीं हरण केली ह्यांत तुझी काय हानि झाली आहे ? सारांश, तूं आपला किष्किंधा-

शक्या कथंचन । देवैरपि सगन्धर्वैः किं पुनर्नरवानरैः १२ स तदा राक्षसेन्द्रेण संदिष्टो रजनीचरः । शुको विहङ्गमो भूत्वा तूर्णमाप्लुत्य चाम्बरम् १३ स गत्वा दूरमध्वानमुपर्युपरि सागरम् । संस्थितो ह्यम्बरे वाक्यं सुग्रीवमिदमब्रवीत् १४ सर्वमुक्तं यथादिष्टं रावणेन दुरात्मना । तत्प्रापयन्तं वचनं तूर्णमाप्लुत्य वानराः १५ प्रापद्यन्त तदा क्षिप्रं लोप्तुं हन्तुं च मुष्टिभिः । सर्वैः प्लवङ्गैः प्रसभं निगृहीतो निशाचरः १६ गगनाद्भूतले चाशु प्रतिगृह्यावतारितः । वानरैः पीड्यमानस्तु शुको वचनमब्रवीत् १७ न दूतान्घ्नन्ति काकुत्स्थ वार्यन्तां साधु वानराः १८ यस्तु हित्वा मतं भर्तुः स्वमतं संप्रधारयेत् । अनुक्तवादी दूतः सन्स दूतो वधमर्हति १९ शुकस्य वचनं रामः श्रुत्वा तु परिदेवितम् । उवाच मावधिष्टेति घ्नतः शाखामृगर्षभान् २० स च पत्रलघुर्भूत्वा हरिभिर्दर्शितेभयः । अन्तरिक्षे स्थितो भूत्वा पुनर्वचनमब्रवीत् २१ सुग्रीव सत्त्वसंपन्न महाबलपराक्रम ।

---

नगरीला परत जा ११. कोणत्याही उपायानें वानरांना ही लंका प्राप्त होणें शक्य नाहीं. अरे, गंधर्वांसहवर्तमान देवांनाही ती लंका मिळणें अशक्य आहे; मग मानवांना आणि वानरांना प्राप्त होण्याची गोष्ट पाहिजे कशाला ? " १२. ह्याप्रमाणें राक्षसराज रावणानें निरोप सांगितला असतां त्या शुक राक्षसानें शुक पक्ष्याचें रूप धारण करून आकाशामध्यें सत्वर उड्डाण केलें १३. नंतर सागराचे ऊर्ध्वभागीं आकाशमार्गानें दूर जाऊन आणि आकाशामध्येंच राहून त्यानें रावणाचें तें भाषण सुग्रीवाला निवेदन केलें १४. सारांश, दुरात्म्या रावणानें जें त्याला सांगितलें होतें तें सर्व त्यानें सुग्रीवाला कथन केलें; परंतु, तो कथन करीत असतांनाच वानरांनीं सत्वर उड्डाण केलें १५; आणि त्याचे पंख उपटण्याकरितां व त्याला मुष्टिप्रहार करण्याकरितां ते सत्वर त्याच्या समीप प्राप्त झाले. इतकेंच नव्हे परंतु,त्या सर्व वानरांनीं बलात्कारानें त्या राक्षसाला धरिलें १६; आणि नंतर आकाशापासून सत्वरच त्यांनीं त्याला धरून भूतलावर आणिलें. तेव्हां ह्याप्रमाणें वानर पीडा देऊं लागले असतां शुक ह्मणाला १७ " हे ककुत्स्थ कुलोत्पन्ना रामा, दूतांचा कोणी वध करीत नाहींत. ह्यास्तव, चांगल्या रीतीनें आपण वानरांचें निवारण करा १८. स्वामीच्या मताची पर्वा न करितां आपलेंच मत जो दूत सांगूं लागेल तो स्वामीनें न सांगितलेलें बोलत असल्यामुळें वधाला पात्र होतो " १९. शुकाचें हें विलापयुक्त भाषण श्रवण करून राम, त्याला मारीत असलेल्या वानरश्रेष्ठांना, " ह्याचा वध करूं नका " असें ह्मणाला २०. ह्याप्रमाणें वानरांपासून त्याला अभय प्राप्त झालें असतां पक्षांच्या

किं मया खलु वक्तव्यो रावणो लोकरावणः २२ स एवमुक्तः प्लवगाधिपस्तदा प्लवङ्गमानामृषभो महाबलः । उवाच वाक्यं रजनीचरस्य चारं शुकं शुद्धमदीनसत्त्वः २३ न मेसि मित्रं न तथानुकम्प्यो न चोपकर्तासि न मे प्रियोसि । अरिश्च रामस्य सहानुबन्धस्ततोसि वालीव वधार्ह वध्यः २४ निहन्म्यहं त्वां ससुतं सबन्धुं सज्ञातिवर्गं रजनीचरेश । लङ्कां च सर्वां महता बलेन सर्वैः करिष्यामि समेत्य भस्म ॥ न मोक्ष्यसे रावण राघवस्य सर्वैः सहेन्द्रैरपि मूढ गुप्तः २५ अन्तर्हितः सूर्यपथं गतोपि तथैव पातालमनुप्रविष्टः । गिरीशपादाम्बुजसंगतो वा हतोसि रामेण सहानुजस्त्वम् २६ तस्य ते त्रिषु लोकेषु न पिशाचं न राक्षसम् । त्रातारं नानुपश्यामि न गन्धर्वं न चासुरम् २७ अवधीस्त्वं जरावृद्धं गृध्रराजं जटायुषम् २८ किं नु ते रामसांनिध्ये सकाशे लक्ष्मणस्य च । हृता सीता

---

योगानें सत्वर उड्डाण करून आणि आकाशामध्येंच स्थीर राहून तो पुनरपि ह्मणाला २१ " हे सत्त्वशील महाबलाढ्य व महापराक्रमी सुग्रीवा, लोकांना भय उत्पन्न करणाऱ्या त्या रावणाला खरोखर मीं काय बरें निरोप सांगावा ? " २२. ह्याप्रमाणें त्या शुकानें विचारिलें असतां उदार अंतःकरणानें युक्त असलेल्या त्या वानराधिपति व वानरश्रेष्ठ महाबलाढ्य सुग्रीवानें रावणराक्षसाचा हेर जो सन्मार्गानें वागणारा शुक त्याच्याबरोबर रावणाला निरोप सांगितला २३. ( तो ह्मणाला ) " तूं माझा मित्र नाहींस; माझ्या दयेसही पात्र नाहींस; माझ्यावर उपकार करणारा नाहींस आणि मला प्रियही नाहींस. रामाचा तूं शत्रु आहेस आणि ह्मणूनच, हे वधास पात्र असलेल्या रावणा, अनुयायांसहवर्तमान वालीप्रमाणें रामाच्या हातून तुझा वध होईल २४. हे राक्षसाधिपते, पुत्र, बंधु आणि ज्ञातिवर्ग ह्यांसहवर्तमान मीं तुझा वध करीन; आणि सर्व वानरांसहवर्तमान येऊन आणि मोठें सैन्य बरोबर घेऊन सर्व वानरांसहवर्तमान लंकेमध्यें आल्यानंतर त्या सर्व लंकेचें मी भस्म करून टाकीन. हे रावणा, इंद्रासहवर्तमान सर्व देव जरी तुझें संरक्षण करीत असले तरी, हे मूढा, तूं रामाच्या हातून सुटणार नाहींस २५ तूं जरी अदृश्य होऊन अंतरिक्षामध्यें गेलास, पातालामध्यें प्रविष्ट झालास किंवा शंकराच्या चरणकमलीं लीन झालास तरी रामाच्या हातून तुझा पाठच्या भावाबरोबर वध झालाच आहे असें तूं समज २६. त्रैलोक्यामध्यें पिशाच, राक्षस, गंधर्व आणि असुर ह्यांपैकीं कोणीही तुझें रक्षण करणारा मला दिसत नाहीं. २७. जर्जर वृद्ध झालेल्या गृध्रराज जटायूचा तूं वध केलास ह्यावरून तुझा पराक्रम दिसून आला आहे २८. अरे, तुझ्या अंगीं जर सामर्थ्य असतें तर राम अथवा

विशालाक्षी यां त्वं गृह्य न बुध्यसे । महाबलं महात्मानं दुराधर्षं सुरैरपि ।
न बुध्यसे रघुश्रेष्ठं यस्ते प्राणान्हरिष्यति ४० ततोऽब्रवीद्वालिसुतोऽप्यङ्गदो
हरिसत्तमः । नायं दूतो महाप्राज्ञ चारकः प्रतिभाति मे ३१ तुलितं हि
बलं सर्वमनेन तव तिष्ठता । गृह्यतां मागमल्लङ्कामेतद्धि मम रोचते ३२ ततो
राज्ञा समादिष्टाः समुत्पत्य बलीमुखाः । जगृहुश्च बबन्धुश्च विल-
पन्तमनाथवत् ३३ शुकस्तु वानरैश्चण्डैस्तत्र तैः संप्रपीडितः । व्याचु-
क्रोश महात्मानं रामं दशरथात्मजम् ३४ लुप्यंते मे बलात्पक्षौ भिद्यंते
मे तथाक्षिणी । यां च रात्रिं मरिष्यामि जाये रात्रिं च यामहम् ३ एत-
स्मिन्नन्तरे काले यन्मया ह्यशुभं कृतम् । सर्वं तदुपपद्येथा जह्यां चेद्यदि
जीवितम् ३६ नाघातयत्तदा रामः श्रुत्वा तत्परिदेवितम् । वानरानब्रवी-
द्रामो मुच्यतां दूत आगतः ३७ [ ६८८ ]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-
कीय आदिकाव्ये युद्धकाण्डे विंशः सर्गः ॥ २० ॥

ततः सागरवेलायां दर्भानास्तीर्य राघवः । अञ्जलिं प्राङ्मुखः कृत्वा

---

लक्ष्मण सन्निध असतांनाच तूं विशालनयना सीता हरण करून नेली असतीस ! आतां तूं तिला प्रतिबंधांत ठेविलें आहेस; परंतु, आपलें सामर्थ्य किती आहे ह्याचा तुला अदमास नाहीं २९. महाबलाढ्य व महात्म्या रघवंशजश्रेष्ठ रामापुढें शत्रुबुद्धीनें जाण्यास देवही समर्थ नाहींत हें तू जाणीत नाहींस; परंतु, तो तुझा प्राण हरण करील" ३०. तदनंतर वानरश्रेष्ठ वालिपुत्र अंगद सुग्रीवाला ह्मणाला "हे महाप्राज्ञ, हा दूत नव्हे, हा हेर असावा असें मला वाटतें ३१. कारण, ह्यानें येथें राहून आपल्या सर्व सैन्याचा अदाज केला आहे. ह्यास्तव, लंकेमध्यें ह्याला परत न जाऊं देतां ह्याचा निग्रह करावा असें मला वाटतें" ३२. तदनंतर राजानें आज्ञा दिली असतां वानरांनीं उड्डाण केलें आणि अनाथाप्रमाणें विलाप करीत असलेल्या त्या शुकाला धरून बांधून टाकिलें ३३. परंतु, ह्याप्रमाणें त्या प्रचंड वानरांनीं शुकाला पीडा दिली असतां तो दशरथनंदन महात्म्या रामाच्या नांवानें आक्रोश करूं लागला आणि ह्मणाला ३४ "माझे पंख हे वानर उपटीत असून माझे डोळेही फोडीत आहेत. ह्यास्तव, जन्मदिवसापासून तों मरणदिवसापर्यंत माझ्या हातून जें कांहीं पातक घडलें असेल तें सर्व माझा येथें अंत झाल्यास तुला प्राप्त होईल" ३५,३६. शुकाचा तो विलाप श्रवण केल्यावर रामानें त्याचा वध न करितां "हा आलेला दूत सोडून द्या" ह्मणून वानरांना आज्ञा केली ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २० ॥

प्रतिशिश्ये महोदधेः १ बाहुं भुजङ्गभोगाभमुपधायारिसूदनः । जातरूपमयैश्चैव भूषणैर्भूषितं सदा २ मणिकाञ्चनकेयूरमुक्ताप्रवरभूषणैः । भुजैः परमनारीणामभिमृष्टमनेकधा ३ चन्दनागुरुभिश्चैव पुरस्तादभिसेवितम् । बालसूर्यप्रकाशैश्च चन्दनैरुपशोभितम् ४ शयने चोत्तमाङ्गेन सीतायाः शोभितं पुरा । तक्षकस्येव संभोगं गङ्गाजलनिषेवितम् ५ संयुगे युगसंकाशं शत्रूणां शोकवर्धनम् । सुहृदां नन्दनं दीर्घं सागरान्तव्यपाश्रयम् ६ अस्यता च पुनः सव्यं ज्याघातविहतत्वचम् । दक्षिणो दक्षिणं बाहुं महापरिघसंनिभम् ७ गोसहस्रप्रदातारं ह्युपधाय भुजं महत् । अद्य मे तरणं वाथ मरणं सागरस्य वा ८ इति रामो धृतिं कृत्वा महाबाहुर्महोदधिम् । अधिशिश्ये च विधिवत्प्रयतोत्र स्थितो मुनिः ९ तस्य रामस्य सुप्तस्य कुशास्तीर्णे महीतले । नियमादप्रमत्तस्य निशास्तिस्रोभिजग्मतुः १० स

---

तदनंतर समुद्रतीरावर रामांनीं दर्भ पसरिले आणि प्राङ्मुख होऊन समुद्राला हात जोडिल्यावर त्यांनीं तेथें शयन केलें १. शयन करितांना त्या शत्रुनाशक रामांनीं आपला उजवा हात मस्तकाखालीं घातला होता. तो दिसण्यांत भुजंगाच्या शरीराप्रमाणें होता; पूर्वीं सुवर्णमय भूषणांनीं सर्वदां तो भूषित झालेला असे २; हिरे व सुवर्ण ह्यांचीं बाहुभूषणें आणि मोत्यांचे उत्कृष्ट अलंकार ह्यांनीं युक्त असलेल्या श्रेष्ठ स्त्रियांच्या हातांचा ( स्नान वगैरे करिते वेळीं ) त्याला अनेक वेळां स्पर्श होत असे ३; चंदन आणि अगुरु ह्यांची पूर्वीं त्याला उटी लाविलेली असे; बालसूर्याप्रमाणें ज्यांचा वर्ण आहे अशाप्रकारच्या केशरांनीं त्याला पूर्वीं मर्दन केलेलें असे ४; शयनकालीं सीतेच्या मस्तकानें तो पूर्वीं सुशोभित झालेला असे; ( गौरवर्ण आणि पावित्र्य ह्यांनीं युक्त असलेल्या सीतेचा त्याला संबंध असल्यामुळें पूर्वीं ) गंगोदकानें आश्रय केलेल्या तक्षकाच्या शरीराप्रमाणें तो दिसत असे ५; रथाच्या दांडीप्रमाणें तो दीर्घ असून युद्धामध्यें शत्रूंचा शोक वृद्धिंगत करणारा होता; सुहृदांना दीर्घकालपर्यंत तो सुख देणारा होता; समुद्रवलयांकित पृथ्वीचा तो आश्रय होता ६ आणि एकसारिखे बाण सोडीत असल्यामुळें त्याच्यावर प्रत्यंचेच्या आघातानें घट्टे पडलेले होते. अशाप्रकारचा मोठ्या अडसराप्रमाणें असलेला आणि हजारों गोप्रदानें करणारा आपला प्रचंड उजवा हात मस्तकाखालीं घालून स्वभावानें सरळ असलेल्या त्या रामांनीं शयन केलें. आज मी समुद्र तरून तरी जाईन किंवा माझ्या हातून सागराला तरी मृत्यु प्राप्त होईल ७, ८. अशाप्रकारचा निश्चय करून त्या महापराक्रमी जितेंद्रिय राममुनीनें तेथें यथाविधि शयन केलें ९. ह्याप्रमाणें दर्भ

त्रिरात्रोषितस्तत्र नयज्ञो धर्मवत्सलः । उपासत तदा रामः सागरं सरितां
पतिम् ११ न च दर्शयते रूपं मन्दो रामस्य सागरः । प्रयतेनापि रामेण
यथार्हमभिपूजितः १२ समुद्रस्य ततः क्रुद्धो रामो रक्तान्तलोचनः ।
समीपस्थमुवाचेदं लक्ष्मणं शुभलक्षणम् १३ अवलेपः समुद्रस्य न दर्शयति
यः स्वयम् । प्रशमश्च क्षमा चैव आर्जवं प्रियवादिता १४ असामर्थ्यफला
ह्येते निर्गुणेषु सतां गुणाः । आत्मप्रशंसिनं दुष्टं धृष्टं विपरिधावकम् १५
सर्वत्रोत्सृष्टदण्डं च लोकः सत्कुरुते नरम् । न साम्ना शक्यते कीर्तिर्न
साम्ना शक्यते यशः १६ प्राप्तुं लक्ष्मण लोकेऽस्मिञ्जयो वा रणमूर्धनि ।
अद्य मद्बाणनिर्भिन्नैर्मकरैर्मकरालयम् १७ निरुद्धतोयं सौमित्रे प्लवद्भिः
पश्य सर्वतः । भोगिनां पश्य भोगानि मया भिन्नानि लक्ष्मण १८ महा-
भोगानि मत्स्यानां करिणां च करानिह । स शङ्खशुक्तिकाजालं समी-
नमकरं तथा १९ अद्य युद्धेन महता समुद्रं परिशोषये । क्षमया हि

---

पसरलेल्या भूतलावर नियमानें सावधानपूर्वक राम निजले असतां तीन रात्रि गेल्या १०. सारांश ते धर्मवत्सल व नीतिवेत्ते राम नद्यांचा अधिपति जो सागर त्याच्यासमीप त्रिरात्र पडून राहिले ११. परंतु, शुद्ध वर्तनानें युक्त असलेल्या रामांनीं ह्याप्रमाणें जरी समुद्राचा यथायोग्य रीतीनें सत्कार केला तरी त्या मंदबुद्धि सागरानें त्यांना दर्शन दिलें नाहीं १२. तेव्हां आरक्तवर्ण नेत्रप्रांतांनीं युक्त असलेले राम समुद्रावर क्रुद्ध झाले आणि समीप असलेल्या शुभलक्षणसंपन्न लक्ष्मणाला ह्मणाले १३ "ह्या समुद्राला गर्व झाला आहे. कारण, हा अद्यापि दर्शन देत नाहीं. अरे, सज्जनांचे ठिकाणीं असलेले क्षमा, आर्जव आणि प्रियवादित्व हे गुण गुणहीनांचे ठिकाणीं व्यर्थ होतात. खरोखर आत्मप्रशंसा करणारा, दुष्ट, उद्धट, आत्मप्रशंसेकरितां इकडून तिकडे धांवाधांव करणारा १४,१५ आणि प्राणिमात्राला त्रास देणारा असा जो पुरुष असेल त्यालाच लोक मान देत असतात. सौम्य वर्तनानें कीर्ति प्राप्त होणें शक्य नाहीं आणि सामोपचारानें यशही कधीं मिळणें शक्य नाहीं १६; अथवा, हे लक्ष्मणा, सामोपचारानें संग्रामामध्यें इहलोकीं जयही प्राप्त होणें अशक्यच आहे. ह्यास्तव, हे लक्ष्मणा, माझ्या बाणांनीं विदीर्ण झालेल्या मकरांनीं ज्याचें उदक आच्छादित झालें आहे असा हा समुद्र सर्व बाजूंनीं आज तूं अवलोकन कर; आणि, हे लक्ष्मणा, ह्यांत वास्तव्य करणाऱ्या भुजंगांचींही शरीरें माझ्या हातून विदीर्ण झालेलीं आज तूं पहा १७, १८. त्याचप्रमाणें मत्स्यांचीं मोठीं मोठीं शरीरें आणि जलांत वास्तव्य करणाऱ्या गजांच्या शुंडा माझ्या बाणांनीं भिन्न झाल्याचें आज तूं अवलोकन कर. शंख आणि शिंपा ह्यांच्या समूहांनीं

समायुक्तं मामयं मकरालयः २० असमर्थं विजानाति धिक्क्षमामीदृशे जने । न दर्शयति साम्ना मे सागरो रूपमात्मनः २१ चापमानय सौमित्रे शरांश्चाशीविषोपमान् । समुद्रं शोषयिष्यामि पद्भ्यां यान्तु प्लवङ्गमाः २२ अद्याक्षोभ्यमपि क्रुद्धः क्षोभयिष्यामि सागरम् । वेलासु कृतमर्यादं सहस्रोर्मिसमाकुलम् २३ निर्मर्यादं करिष्यामि सायकैर्वरुणालयम् । महार्णवं क्षोभयिष्ये महादानवसंकुलम् २४ एवमुक्त्वा धनुष्पाणिः क्रोधविस्फारितेक्षणः । बभूव रामो दुर्धर्षो युगान्ताग्निरिव ज्वलन् २५ संपीड्य च धनुर्घोरं कम्पयित्वा शनैर्जगत् । मुमोच विशिखानुग्रान्वज्रानिव शतक्रतुः २६ ते ज्वलन्तो महावेगास्तेजसा सायकोत्तमाः । प्रविशन्ति समुद्रस्य जलं वित्रस्तपन्नगम् २७ तोयवेगः समुद्रस्य समीनमकरो महान् । स बभूव महाघोरः समारुतरवस्तथा २८ महोर्मिजाल-

---

व्याप्त असलेला हा समुद्र मत्स्य व मकर ह्यांसहवर्तमान आज मोठ्या युद्धाच्या योगानें मी शुष्क करून ठेवितों. अरे, मीं क्षमेचें अवलंबन केलें असल्यामुळें हा समुद्र मला १९, २० अशक्त समजत आहे [illegible]. अशा पुरुषाचे ठिकाणीं दर्शविलेल्या क्षमेला धिक्कार असो. सामोपचारानें समुद्र मला दर्शन देत नाहीं २१. ह्यास्तव, हे लक्ष्मणा, धनुष्य आणि भुजंगासारिखे तीक्ष्ण बाण तू घेऊन ये. बाणांच्या योगानें मी समुद्र शुष्क करून टाकितों; ह्मणजे वानरांना येथून पायांनींच लंकेमध्यें जातां येईल २२. क्षोभरहित असलेल्याही ह्या सागराला क्रुद्ध झालेला मी आज क्षुब्ध करून टाकीन. तीरांचें उल्लंघन करून जावयाचें नाहीं असा ह्यानें नियम केलेला आहे २३; परंतु, बाणाच्या योगानें हजारों लाटांनीं मी ह्या समुद्राला व्याप्त करीन आणि ह्याच्याकडून मर्यादेचें उल्लंघन करवीन. सारांश, मोठ्या मोठ्या दानवांनीं गजबजून गेलेल्या ह्या महासागराला मी आज क्षुब्ध करून टाकीन " २४. ह्याप्रमाणें बोलल्यानंतर क्रोधानें रामांनीं डोळे वटारिले आणि हातामध्यें धनुष्य घेतलें असतां ते राम प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें जसे कांहीं प्रज्वलितच झाले असल्यामुळें दुसऱ्यानें त्यांच्या समोर जाणेंही अशक्य झालें २५. तदनंतर तें घोर धनुष्य ओढून आणि हळू हळू पृथ्वी कंपित करून इंद्रच वज्रांची वृष्टि करीत आहे कीं काय अशारीतीनें रामांनीं उग्र बाण सोडिले असतां २६, प्रचंड वेगानें युक्त असलेले आणि तेजानें जसे कांहीं प्रज्वलित झालेले ते उत्कृष्ट बाण ज्यांतील भुजंग त्रस्त होऊन गेलेले आहेत अशा समुद्रजलामध्यें प्रविष्ट झाले २७. तेव्हां मत्स्य व मकर ह्यांसहवर्तमान असलेला समुद्राच्या उदकाचा मोठा वेग फारच भयंकर होऊन वायूच्या घोषानेंही युक्त झाला २८. लाटांच्या समूहांनीं तो क्षुब्ध

चरितः शङ्खजालसमावृतः । सधूमः परिवृत्तोर्मिः सहसासीन्महो-
दधिः २९ व्यथिताः पन्नगाश्चासन्दीप्तास्या दीप्तलोचनाः । दानवाश्च
महावीर्याः पातालतलवासिनः ३० ऊर्मयः सिन्धुराजस्य सनक्रमकरा-
स्तथा । विन्ध्यमन्दरसंकाशाः समुत्पेतुः सहस्रशः ३१ आघूर्णिततर-
ङ्गौघः संभ्रान्तोरगराक्षसः । उद्वर्तितमहाग्राहः सघोषो वरुणालयः ३२ ततस्तु
तं राघवमुग्रवेगं प्रकर्षमाणं धनुरप्रमेयम् । सौमित्रिरुत्पत्य विनिःश्वसन्तं
मामेति चोक्त्वा धनुराललम्बे ३३ एतद्विनापि ह्युदधेस्तवाद्य संपत्स्यते वीरत-
मस्य कार्यम् । भवद्विधाः क्रोधवशं न यान्ति दीर्घं भवान्पश्यतु साधुवृत्तम् ३४
अन्तर्हितैश्चापि तथान्तरिक्षे ब्रह्मर्षिभिश्चैव सुरर्षिभिश्च । शब्दः कृतः
कष्टमिति ब्रुवद्भिर्मामेति चोक्त्वा महता स्वरेण ३५ [ ७२३ ] इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकविंशः सर्गः॥२१॥
अथोवाच रघुश्रेष्ठः सागरं दारुणं वचः । अद्याहं शोषयिष्यामि

---

झाला; शंखसमुदायांनीं तो व्याप्त दिसूं लागला आणि लाटा माघाऱ्या वळून तो महासागर एकाएकीं धूमयुक्त दिसूं लागला २९. देदीप्यमान मुखें व नेत्र ह्यांनीं युक्त असलेले भुजंग आणि पातालतलामध्यें वास्तव्य करणारे महावीर्यवान् दानव त्रस्त होऊन गेले ३०. विंध्याद्रि व मंदर पर्वत ह्याप्रमाणें मोठ्या असलेल्या त्या समुद्राच्या हजारों लाटा नक्र व मकर ह्यांनीं युक्त होऊन उसळूं लागल्या ३१. लाटांचे समुदाय एकमेकांवर आपटूं लागले; भुजंग व राक्षस त्रस्त होऊन गेले; मोठे मोठे मकर उलथून पडले आणि वरुणाचें निवासस्थान असलेला तो सागर एकसारिखा गर्जना करीत राहिला ३२. तदनंतर भयंकर वेग धारण करून प्रचंड धनुष्य आकर्षण करीत करीत सुस्कारे टाकीत असलेल्या त्या रामाकडे लक्ष्मण सत्वर गेला आणि " नको, नको " असें ह्मणून त्यानें त्यांचें धनुष्य धरिलें ३३. ( नंतर तो ह्मणाला ) " सागराला ह्याप्रमाणें क्षुब्ध केल्यावांचूनही तुज श्रेष्ठ वीराचें कार्य सिद्धीस जाईल. आपणांसारिखे पुरुष क्रोधाधीन होऊन जात नाहींत. ह्यास्तव, आपण दूरवर विचार करून चांगल्या उपायाचें अवलंबन करावें " ३४. असो. ( ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतां ) अंतरिक्षामध्यें गुप्त राहिलेल्या आणि " काय अनर्थ हा ! असें करूं नको, असें करूं नको " असें उच्चस्वरानें बोलत असलेल्या ब्रह्मर्षींमध्यें व देवर्षींमध्येंही हाहाकार उडून गेला ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २१ ॥

तदनंतर रघुवंशजश्रेष्ठ राम तीक्ष्ण शब्दांनीं सागराला ह्मणाले " पातालासहवर्तमान

सपातालं महार्णवम् १ शरनिर्दग्धतोयस्य परिशुष्कस्य सागर । मया निहतसत्त्वस्य पांसुरुत्पद्यते महान् २ मत्कार्मुकनिसृष्टेन शरवर्षेण सागर । परं तीरं गमिष्यन्ति पद्भिरेव प्लवङ्गमाः ३ विचिन्वन्नाभिजानासि पौरुषं नापि विक्रमम् । दानवालय संतापं मत्तो नाम गमिष्यसि ४ ब्राह्मेणास्त्रेण संयोज्य ब्रह्मदण्डनिभं शरम् । संयोज्य धनुषि श्रेष्ठे विचकर्ष महाबलः ५ तस्मिन्विकृष्टे सहसा राघवेण शरासने । रोदसी संपफालेव पर्वताश्च चकम्पिरे ६ तमश्च लोकमावव्रे दिशश्च न चकाशिरे । प्रतिचुक्षुभिरे चाशु सरांसि सरितस्तदा ७ तिर्यक्च सह नक्षत्रैः संगतौ चन्द्रभास्करौ । भास्करांशुभिरादीप्तं तमसा च समावृतम् ८ प्रचकाशे तदाकाशमुल्काशतविदीपितम् । अन्तरिक्षाच्च निर्घाता निर्जग्मुरतुलस्वनाः ९ वपुःप्रकर्षेण ववुर्दिव्यमारुतपङ्क्तयः । बभञ्ज च तदा वृक्षाञ्जलदानुद्वहन्मुहुः १० आरुजंश्चैव शैलाग्राञ्शिखराणि बभञ्ज च । दिवि च स्म

---

मी आज महासागर शुष्क करून टाकीन १. हे सागरा, माझ्या बाणांनीं उदक दग्ध झाल्यामुळें तूं शुष्क होऊन जाशील; तुझ्यामध्यें वास्तव्य करणारे प्राणी माझ्या हातून वध पावतील आणि येथें प्रचंड धूळ उसळून राहील २. हे सागरा, माझ्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणवृष्टीच्या योगानें तूं शुष्क होऊन गेलास म्हणजे वानर चालतच पैरतीराला जातील ३. हे दानवालया, जलादिकांच्या समृद्धीनें तूं वृद्धिंगत झाला आहेस ह्यामुळें माझ्या प्रयत्नाकडे आणि पराक्रमाकडे लक्ष्य देत नाहींस; परंतु, आज माझ्यापासून तुला संताप प्राप्त होईल " ४. असें बोलल्यानंतर त्या महाबलाढ्य रामांनीं ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रण करून ब्रह्मदंडासारिखा एक बाण श्रेष्ठ धनुष्याला लाविला आणि धनुष्य आकर्षण केलें ५; परंतु, ह्याप्रमाणें रामांनीं एकाएकीं तें धनुष्य ओढिलें असतां स्वर्ग आणि पृथ्वी हे दोन्ही लोक जसे कांहीं विदीर्ण होऊन गेले; पर्वत कंपित झाले ६; अंधकारानें जगत् व्याप्त केलें; दिशा धुंद होऊन गेल्या; नद्या व सरोवरें हीं तत्क्षणीं क्षुब्ध होऊन गेलीं ७; नक्षत्रांसहवर्तमान चंद्रसूर्यही दक्षिणोत्तर मार्गाचेंच अवलंबन करूं लागले; सूर्यकिरणांनीं प्रकाशित झालेलेंही आकाश अंधकारानें व्याप्त होऊन गेलें ८ व कांहीं कांहीं ठिकाणीं तें आकाश शेंकडों ज्वालांनीं प्रदीप्त झाल्यासारिखें दिसूं लागलें. अनुपम ध्वनीनें युक्त असलेल्या विद्युल्लता आकाशांतून निघूं लागल्या ९; दिव्य वायूंचे समुदाय मोठ्या वेगानें वाहूं लागले; वायूच्या वेगानें वृक्ष मोडून पडूं लागले; मेघ एकसारिखे इकडे तिकडे जाऊं लागले १०; पर्वताचे माथे पीडित होऊं लागले; शिखरेंही

महावेगाः संहताः समहास्वनाः ११ मुमुचुर्वैद्युतानग्नींस्ते महाशनयस्तथा। यानि भूतानि दृश्यानि चुक्रुशुश्चाशनैः समम् १२ अदृश्यानि च भूतानि मुमुचुर्भैरवस्वनम् । शिशियरे चाभिभूतानि संत्रस्तान्युद्विजन्ति च १३ संप्रविव्यथिरे चापि न च पस्पन्दिरे भयात् । सह भूतैः सतोयोर्मिः सनागः सहराक्षसः १४ सहसाभूत्ततो वेगाद्भीमवेगो महोदधिः । योजनं व्यतिचक्राम वेलामन्यत्र संप्लवात् १५ तं तथा समतिक्रान्तं नातिचक्राम राघवः। तमुद्धतममित्रघ्नो रामो नदनदीपतिम् १६ ततो मध्यात्समुद्रस्य सागरः स्वयमुत्थितः । उदयाद्रिमहाशैलान्मेरोरिव दिवाकरः १७ पन्नगैः सह दीप्तास्यैः समुद्रः प्रत्यदृश्यत । स्निग्धवैदूर्यसंकाशो जाम्बूनदविभूषणः १८ रक्तमाल्याम्बरधरः पद्मपत्रनिभेक्षणः । सर्वपुष्पमयीं दिव्यां शिरसा धारयन्स्रजम् १९ जातरूपमयैश्चैव तपनीयविभूषणैः । आत्मजानां च रत्नानां भूषितो भूषणोत्तमैः २० धातुभिर्मण्डितः शैलो विविधैर्हिमवानिव

---

मोडून पडूं लागलीं आणि स्वर्गामध्येंही प्रचंड वेगानें युक्त असलेले वायुसमुदाय एकत्र होऊन फारच मोठी गर्जना करूं लागले ११. त्या पडूं लागलेल्या मोठ्या मोठ्या विद्युल्लता विद्युत्संबंधी अग्नि उत्पन्न करूं लागल्या; दृश्य भूतें विद्युल्लतेप्रमाणें गर्जना करूं लागलीं १२; अदृश्यप्राणीही भयंकर शब्द करूं लागले; कांहीं प्राणी अतिशय त्रस्त होऊन गेले; कांहीं उद्विग्न होऊन गेले आणि कांहीं मोहानें ग्रस्त झाल्यामुळें भूमीवर पडून राहिले १३. सारांश, कांहीं प्राणी जरी अतिशय त्रस्त होऊन गेले होते तरी भीतिमुळें हालचाल न करितां स्वस्थ पडून राहिले; आणि त्यामुळें भूतें, जलतरंग, नाग आणि राक्षस ह्यांसहवर्तमान १४ तो महावेगवान् महासागर एकाएकीं वेगावेगानें खवळून गेला आणि भरतीच्या इयत्तेपेक्षांही एक योजनपर्यंत त्यानें तीराचें उल्लंघन केलें १५. नद आणि नद्या ह्यांचा अधिपति जो समुद्र तो क्षुब्ध होऊन अमर्याद झालेला अवलोकन करूनही शत्रुघातक रघुवंशज रामानें अस्त्र परत घेतलें नाहीं १६. तेव्हां महागिरि मेरुसंज्ञक उदयाचलापासून उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें जलाच्या मध्यभागांतून सागर प्रत्यक्ष वर आला १७; आणि देदीप्यमान मुखानें युक्त असलेल्या भुजंगासहवर्तमान दृष्टीं पडूं लागला. त्या सागराची कांति तुळतुळीत वैदूर्य रत्नाप्रमाणें होती; सुवर्णाचीं भूषणें १८, रक्त, पुष्पें आणि वस्त्रें त्यानें धारण केलेलीं होतीं; सर्व प्रकारच्या पुष्पांनीं युक्त अशी दिव्य माला त्यानें मस्तकीं धारण केली होती १९; साधारण व उज्ज्वल सुवर्णाचीं भूषणें आणि स्वतःचेच ठिकाणीं असलेल्या रत्नांचीं उत्कृष्ट भूषणें

आघूर्णिततरङ्गौघः कालिकानिलसंकुलः २१ गङ्गासिन्धुप्रधाना-
भिरापगाभिः समावृतः । सागरः समुपक्रम्य पूर्वमामन्त्र्य वीर्यवान् ॥
अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं राघवं शरपाणिनम् २२ पृथिवी वायुराकाशमापो
ज्योतिश्च राघव । स्वभावे सौम्य तिष्ठन्ति शाश्वतं मार्गमाश्रिताः २३
तत्स्वभावो ममाप्येष यदगाधोऽहमप्लवः । विकारस्तु भवेद्गाध एतत्ते प्रव-
दाम्यहम् २४ न कामान्न च लोभाद्वा न भयात्पार्थिवात्मज । रागान्न-
क्राकुलजलं स्तम्भयेयं कथंचन २५ विधास्ये येन गन्तासि विषहिष्ये-
ऽप्यहं तथा २६ न ग्राहा विधमिष्यन्ति यावत्सेना तरिष्यति । हरीणां
तरणं राम करिष्यामि यथा स्थलम् २७ तमब्रवीत्तदा रामः शृणु मे
वरुणालय । अमोघोऽयं महाबाणः कस्मिन्देशे निपात्यताम् २८ रामस्य
वचनं श्रुत्वा तं च दृष्ट्वा महाशरम् । महोदधिर्महातेजा राघवं
वाक्यमब्रवीत् २९ उत्तरेणावकाशोऽस्ति कश्चित्पुण्यतरो मम ।

---

ह्यांच्या योगानें तो भूषित झालेला होता २०; नानाप्रकारच्या धातूंनीं शृंगारिलेल्या हिमालयपर्वताप्रमाणें तो शृंगारिलेला होता; त्यांतील लाटा इकडे तिकडे आदळत होत्या; मेघ आणि वायु ह्यांनीं तो व्याप्त झालेला होता २१ आणि गंगा, सिंधु वगैरे नद्यांनीं तो परिवेष्टित झालेला होता. अशा प्रकारच्या त्या वीर्यवान् समुद्रानें समीप येऊन प्रथमतः रामाला हाक मारिली आणि हात जोडून तो त्या हातामध्यें बाण घेतलेल्या रामाला ह्मणाला २२ "हे सौम्य रामा, पृथ्वी, वायु, आकाश, उदक आणि अग्नि हे अनादि मार्गाचें अवलंबन करून आपआपल्या धर्मानें वागत असतात २३. त्याचप्रमाणें मी अगाध असून तरून जाण्यास अशक्य आहें, हाही माझा धर्मच आहे. उथळपणा हा माझा विकार होय, हें मी तुला सांगतों २४. हे राजपुत्रा, अभिलाषामुळें, लोभामुळें, भयामुळें अथवा अनुरागामुळें (किंवा ह्या सर्व कारणांमुळेंही) जलचर प्राण्यांनीं व्याप्त झालेल्या आपल्या उदकाचें मी कधींही स्तंभन करणार नाहीं २५. तथापि, तुला जातां येईल अशी मी तजवीज करीन २६. सारांश, हे रामा, वानरांना तरून जाण्याकरितां मी स्थल करीन आणि सेना तरून जाईपर्यंत मकरप्रभृति जलचर प्राणिही वानरांना प्रहार करणार नाहींत २७. ह्यानंतर राम त्याला ह्मणाला "हे वरुणालया, माझें भाषण ऐक. हा अमोघ बाण मी कोणत्या प्रदेशामध्यें टाकूं तें सांग" २८. रामाचें भाषण श्रवण केल्यावर तो मोठा बाण अवलोकन करून तो महातेजस्वी महासागर रामाला ह्मणाला २९ "जगतामध्यें ज्याप्रमाणें तूं प्रसिद्ध आहेस त्याप्रमाणें द्रुमकुल्य ह्मणून जगतामध्यें प्रसिद्ध

द्रुमकुल्य इति ख्यातो लोके ख्यातो यथा भवान् ३० उग्रदर्शनकर्माणो बहवस्तत्र दस्यवः । आभीरप्रमुखाः पापाः पिबन्ति सलिलं मम ३१ तैर्न तत्स्पर्शनं पापं सहेयं पापकर्मभिः । अमोघः क्रियतां राम अयं तत्र शरोत्तमः ३२ तस्य तद्वचनं श्रुत्वा सागरस्य महात्मनः । मुमोच तं शरं दीप्तं परं सागरदर्शनात् ३३ तेन तन्मरुकान्तारं पृथिव्यां किल विश्रुतम् । निपातितः शरो यत्र वज्राशनिसमप्रभः ३४ ननाद च तदा तत्र वसुधा शल्यपीडिता । तस्माद्व्रणमुखात्तोयमुत्पपात रसातलात् ३५ स बभूव तदा कूपो व्रण इत्येव विश्रुतः । सततं चोत्थितं तोयं समुद्रस्येव दृश्यते ३६ अवदारणशब्दश्च दारुणः समपद्यत । तस्मात्तद्बाणपातेन अपः कुक्षिष्वशोषयत् ॥ विख्यातं त्रिषु लोकेषु मरुकान्तारमेव च ३७ शोषयित्वा तु तं कुक्षिं रामो दशरथात्मजः । वरं तस्मै ददौ विद्वान्मरवेऽमरविक्रमः ३८ पशव्यश्चाल्परोगश्च फलमूलरसायुतः । बहुस्नेहो बहुक्षीरः सुगन्धिर्विविधौषधिः ३९ एवमेतैश्च संयुक्तो बहुभिः

---

असलेलें एक माझें अति पवित्र स्थल उत्तरेस आहे ३०. त्या ठिकाणीं आभीरप्रभृति दुष्ट दस्यु माझ्या उदकाचें पान करून राहिले आहेत आणि ते असंख्य असून त्यांच्या मुद्रा व कर्मेंही भयंकर आहेत ३१. पापकर्म करणारे ते दस्यु मला स्पर्श करीत असतात तें पाप मला सहन होत नाहीं. ह्यास्तव, हे रामा, ह्या उत्कृष्ट बाणाचें त्या ठिकाणीं सार्थक कर " ३२. हें त्या महात्म्या सागराचें भाषण श्रवण केल्यावर त्याच्या सांगण्याप्रमाणें तो उत्कृष्ट व उज्ज्वल बाण त्यांनीं सोडिला ३३; आणि मरुकांतार ह्मणून पृथ्वीमध्यें प्रसिद्ध असलेलें जें स्थल तेथें वज्र आणि विद्युल्लता ह्यांप्रमाणें तेजस्वी असलेला तो बाण त्यांनीं पाहिला ३४. तेव्हां बाणांनीं पीडित झालेल्या पृथ्वीनें गर्जना केली आणि बाणाच्या योगानें जेथें पृथ्वीला रंध्र पडलें होतें तेथून रसातलापासून उदक एकदम बाहेर निघालें असतां ३५ व्रण ह्मणूनच प्रसिद्ध असलेला तो कूप झाला. तेथें समुद्राच्या उदकाप्रमाणें एकसारिखें उदक उसळत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत असतें ३६. बाणानें पृथ्वीचें विदारण होऊं लागलें असतां भयंकर शब्द झाला आणि बाणपाताच्या योगानें आसपासच्या सरोवरादिकांचे ठिकाणीं असलेलें उदकही रामानें शोषून टाकिलें. तें स्थल मरुकांतार ह्मणून त्रैलोक्यामध्यें प्रसिद्ध आहे ३७. ह्याप्रमाणें तो प्रदेश शुष्क करून टाकिल्यावर देवतुल्यपराक्रमी दशरथपुत्र ज्ञानी रामानें त्या मरुदेशाला वर दिला ३८. " पशूंना हितकारक, अल्परोगानें युक्त, फळें, मुळें, रस, विपुल स्नेह, क्षीर, सुगंध आणि नानाप्रकारच्या

संयुतो मरुः । रामस्य वरदानाच्च शिवः पन्था बभूव ह ४० तस्मिन्दग्धे तदा कुक्षौ समुद्रः सरितां पतिः । राघवं सर्वशास्त्रज्ञमिदं वचनमब्रवीत् ४१ अयं सौम्य नलो नाम तनयो विश्वकर्मणः । पित्रा दत्तवरः श्रीमान्प्रीतिमान्विश्वकर्मणः ४२ एष सेतुं महोत्साहः करोतु मयि वानरः । तमहं धारयिष्यामि यथा ह्येष पिता तथा ४३ एवमुक्त्वोदधिर्नष्टः समुत्थाय नलस्ततः । अब्रवीद्वानरश्रेष्ठो वाक्यं रामं महाबलम् ४४ अहं सेतुं करिष्यामि विस्तीर्णे मकरालये । पितुः सामर्थ्यमासाद्य तत्त्वमाह महोदधिः ४५ दण्ड एव परो लोके पुरुषस्येति मे मतिः । धिक्क्षमामकृतज्ञेषु सान्त्वं दानमथापि वा ४६ अयं हि सागरो भीमः सेतुकर्मदिदृक्षया । ददौ दण्डभयाद्गाधं राघवाय महोदधिः ४७ मम मातुर्वरो दत्तो मन्दरे विश्वकर्मणा । मया तु सदृशः पुत्रस्तव देवि भविष्यति ४८ औरसस्तस्य पुत्रोऽहं सदृशो विश्वकर्मणा । न चाप्यहमनुक्तो

---

औषधि ह्यांनीं हा देश संपन्न होईल " ३९. रामानें असा वर दिल्यामुळें ह्या बहुगुणांनीं तो मरुप्रदेश युक्त झाला आणि रामाच्या वरप्रदानामुळें तो प्रदेश कल्याणकारक झाला ४०. असो. ह्याप्रमाणें समुद्रांतील तो प्रदेश दग्ध झाला असतां नद्यांचा अधिपति समुद्र सर्व शास्त्रवेत्त्या रामाला ह्मणाला ४१ " हे विनयसंपन्न रामा, हा नलनामक वानर विश्वकर्म्याचा पुत्र आहे; आणि विश्व निर्माण करणाऱ्या तुझ्या ठिकाणीं अनुरक्त असलेल्या ह्या नलाला पित्यानें ( हवी ती वस्तु निर्माण करितां येईल ह्मणून ) वर दिला आहे ४२. तस्मात्, मोठा उत्साह धरणाऱ्या ह्या नलनामक वानरानें माझे ठिकाणीं सेतु बांधावा. हा आपल्या पित्याप्रमाणेंच कुशल आहे. ह्यानें निर्माण केलेला सेतु मी धारण करीन " ४३. असें बोलून समुद्र गुप्त झाला नंतर वानरश्रेष्ठ नल तेथून उठला आणि महाबलाढ्य रामाला ह्मणाला ४४ " महासागरानें माझ्याविषयीं सांगितलें हें खरें आहे पित्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं असल्यामुळें मी ह्या विस्तीर्ण समुद्रामध्यें सेतु बांधीन ४५. जगतामध्यें पुरुषाला दंडच कार्यसाधक होतो असें मला वाटतें. अकृतज्ञ पुरुषांचे ठिकाणीं साम, दान आणि क्षमा ह्यांचा उपयोग करणें व्यर्थ आहे ४६. जलाचें प्रचंड निधान असलेल्या ह्या भयंकर सागराला दंडाच्या भीतीमुळें सेतुकर्म अवलोकन करण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे आणि ह्मणूनच राघवाला सेतु बांधण्याकरितां अवकाश देण्यास हा तयार झाला आहे ४७. " हे देवि, माझ्यासारिखा तुझा पुत्र होईल " ह्मणून विश्वकर्म्यानें मंदरपर्वतावर माझ्या मातेला वर दिला होता ४८. त्याप्रमाणें मी त्याचा औरस पुत्र

वः प्रब्रूयामात्मनो गुणान् ४९ समर्थश्चाप्यहं सेतुं कर्तुं वै वरुणालये । तस्मादद्यैव बध्नन्तु सेतुं वानरपुङ्गवाः ५० ततो विसृष्टा रामेण सर्वतो हरिपुङ्गवाः । उत्पेतुर्महारण्यं हृष्टाः शतसहस्रशः ५१ ते नगाग्रनगसंकाशाः शाखामृगगणर्षभाः । बभञ्जुः पादपांस्तत्र प्रचकर्षुश्च सागरम् ५२ ते सालैश्चाश्वकर्णैश्च धवैर्वंशैश्च वानराः । कुटजैरर्जुनैस्तालैस्तिलकैस्तिनिशैरपि ५३ बिल्वकैः सप्तपर्णैश्च कर्णिकारैश्च पुष्पितैः । चूतैश्चाशोकवृक्षैश्च सागरं समपूरयन् ५४ समूलांश्च विमूलांश्च पादपान्हरिसत्तमाः । इन्द्रकेतूनिवोद्यम्य प्रजह्रुर्वानरास्तरून् ५५ तालान्दाडिमगुल्मांश्च नारिकेलविभीतकान् । करीरान्बकुलान्निम्बान्समाजह्रुरितस्ततः ५६ हस्तिमात्रान्महाकायाः पाषाणांश्च महाबलाः । पर्वतांश्च समुत्पाट्य यन्त्रैः परिवहन्ति च ५७ प्रक्षिप्यमाणैरचलैः सहसा जलमुद्धृतम् । समुत्पसर्प चाकाशमवासर्पत्ततः पुनः ५८ समुद्रं क्षोभयामासुर्निपतन्तः समन्ततः । सूत्राण्यन्ये प्रगृह्णन्ति ह्यायतं शतयोजनम् ५९ नलश्चक्रे महासेतुं मध्ये नदनदीपतेः । स तदा

असून शिल्पविद्येंतही ह्याच्यासारिखा आहें. परंतु, विचारिल्यावांचून मी स्वतःचे गुण तुह्मांला सांगणार नाहीं ४९. मी समुद्रामध्यें सेतु बांधण्यास समर्थ आहें. ह्यास्तव, आजच वानरश्रेष्ठांनीं ( माझ्याविचारानें ) सेतु बांधावा ५०. तदनंतर रामानें सर्व दिशेस वानरश्रेष्ठ पाठविले असतां ते शेंकडों हजारों वानर आनंदित होऊन महारण्यामध्यें गेले ५१. नंतर त्या पर्वतप्राय वानरसेनाधिपतींनीं अचल वृक्ष मोडून समुद्रासमीप आणिले ५२; आणि साल, अश्वकर्ण, धव, वेळू, कुडा, अर्जुन, ताल, तिलक, तिवस, बिल्वक, सात्वण, प्रफुल्लित कर्णिकार, आम्र व अशोक ह्या वृक्षांच्या योगानें त्या वानरांनीं समुद्र भरून टाकिला ५३, ५४. ते वानरश्रेष्ठ समूल व मूलरहित वृक्ष उपटूं लागले आणि इंद्रध्वजाप्रमाणें त्यांना उंच करून आणूं लागले ५५. ताल डाळिंबीचीं झाकरें, नारळी, बेहडे, करीर, बकुल आणि निंब हे वृक्ष ते वानर इकडून तिकडून आणूं लागले ५६. त्याचप्रमाणें ते महाबलाढ्य व धिप्पाड वानर गजतुल्य पाषाण आणि पर्वत उपटून यंत्रांच्या योगानें वाहून नेऊं लागले ५७. ते वानर समुद्रांत पर्वत फेंकूं लागले असतां त्यांतील उदक एकाएकीं उसळून आकाशामध्यें उडूं लागलें आणि पुनरपि तेथून खालीं पडूं लागलें ५८. ह्याप्रमाणें सर्व बाजूंनीं येऊन पडत असलेल्या पाषाणादिकांनीं समुद्र क्षुब्ध करून टाकिला. ह्याप्रमाणें पाषाणवगैरे आंत आणून टाकण्याचें काम चाललें असतांना सेतु सरळ होण्याकरितां कांहीं वानरांनीं

क्रियंत सेतुर्वानरैर्घोरकर्मभिः ६० दण्डानन्ये प्रगृह्णन्ति विचिन्वन्ति तथा-
परे । वानरैः शतशस्तत्र रामस्याज्ञापुरःसरैः ६१ मेघाभैः पर्वताभैश्च
तृणैः काष्ठैर्बबन्धिरे । पुष्पिताग्रैश्च तरुभिः सेतुं बध्नन्ति वानराः ६२
पाषाणांश्च गिरिप्रख्यान्गिरीणां शिखराणि च । दृश्यन्ते परिधावन्तो
गृह्य दानवसंनिभाः ६३ शिलानां क्षिप्यमाणानां शैलानां तत्र पात्य-
ताम् । बभूव तुमुलः शब्दस्तदा तस्मिन्महोदधौ ६४ कृतानि प्रथमेनाह्ना
योजनानि चतुर्दश । प्रहृष्टैर्गजसंकाशैस्त्वरमाणैः प्लवङ्गमैः ६५ द्वितीयेन
तथैवाह्ना योजनानि तु विंशतिः । कृतानि प्लवगैस्तूर्णं भीमकायैर्महा-
बलैः ६६ अह्ना तृतीयेन तथा योजनानि तु सागरे । त्वरमाणैर्महाका-
यैरेकविंशतिरेव च ६७ चतुर्थेन तथा चाह्ना द्वाविंशतिरथापि वा । योजनानि
महावेगैः कृतानि त्वरितैस्ततः ६८ पञ्चमेन तथा चाह्ना प्लवगैः क्षिप्रका-
रिभिः । योजनानि त्रयोविंशत्सुवेलमधिकृत्य वै ६९ स वानरवरः

---

दोऱ्या धरिल्या आणि नंतर नद व नद्या ह्यांचा अधिपति जो समुद्र त्यामध्यें शंभर योजनें लांब असा प्रचंड सेतु बांधण्यास नलानें आरंभ केला. व ( त्याच्या विचारानें ) भयंकर कर्म करणार इतरही वानर सेतु बांधूं लागले ५९, ६०. कांहींजण मोजमाप घेण्याकरितां ( चार चार हात लांबीचे ) दंड हातामध्यें घेऊं लागले; कांहींजण पाषाण वगैरे एकत्र करून ठेवूं लागले आणि अशारीतीनें रामाची आज्ञा शिरसामान्य केलेल्या त्या मेघतुल्य व पर्वतप्राय शेंकडों वानरांनीं तृणांनीं व काष्ठांनीं सेतु बांधण्यास आरंभ केला; आणि कांहीं वानर प्रफुल्लित अग्रांनीं युक्त असलेल्या वृक्षांचीही त्या सेतूमध्यें भर घालूं लागले ६१, ६२. ( ह्याप्रमाणें सेतु बांधण्याचें काम चाललें असतांना ) दानवतुल्य वानर पर्वतप्राय पाषाण व पर्वतशिखरें हातांत घेऊन इकडे तिकडे धांवाधांव करीत असतांना दृष्टीस पडूं लागले ६३; आणि ते वानर त्या महासागरामध्यें शिला फेंकूं लागले असतां व पर्वत टाकूं लागले असतां तुमुल शब्द होऊं लागला ६४. आनंदित होऊन त्वरा करणाऱ्या गजतुल्य वानरांनीं प्रथम दिवशीं चवदा योजनें सेतु बांधिला ६५. त्याचप्रमाणें दुसऱ्या दिवशीं महाबलाढ्य आणि प्रचंड शरीरांनीं युक्त असलेल्या वानरांनीं त्वरा करून वीस योजनें सेतु बांधिला ६६. त्याचप्रमाणें त्वरा करीत असलेल्या त्या धिप्पाड वानरांनीं तिसऱ्या दिवशीं सागरामध्यें एकवीस योजनें सेतु तयार केला ६७. चवथ्या दिवशीं त्या त्वरायुक्त व महावेगवान् वानरांनीं बावीस योजनें सेतु बांधून ६८ पांचव्या दिवशीं त्वरा करणाऱ्या त्या वानरांनीं तेवीस योजनें सेतु बांधिला व परतीराला नेऊन भिडविला ६९.

श्रीमान्विश्वकर्मात्मजो बली । बबन्ध सागरे सेतुं यथा चास्य पिता तथा ७०
स नलेन कृतः सेतुः सागरे मकरालये । शुशुभे सुभगः श्रीमान्स्वातीपथ इवाम्बरे ७१ ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । आगम्य गगने तस्थुर्द्रष्टुकामास्तदद्भुतम् ७२ दशयोजनविस्तीर्णं शतयोजनमायतम् । ददृशुर्देवगन्धर्वा नलसेतुं सुदुष्करम् ७३ आप्लवन्तः प्लवन्तश्च गर्जन्तश्च प्लवङ्गमाः । तमचिन्त्यमसह्यं च ह्यद्भुतं लोमहर्षणम् ७४ ददृशुः सर्वभूतानि सागरे सेतुबन्धनम् । तानि कोटिसहस्राणि वानराणां महौजसाम् ७५ बध्नन्तः सागरे सेतुं जग्मुः पारं महोदधेः । विशालः सुकृतः श्रीमान्सुभूमिः सुसमाहितः ७६ अशोभत महान्सेतुः सीमन्त इव सागरे । ततः पारे समुद्रस्य गदापाणिर्विभीषणः ७७ परेषामभियानार्थमतिष्ठत्सचिवैः सह । सुग्रीवस्तु ततः प्राह रामं सत्यपराक्रमम् ७८
हनूमन्तं त्वमारोह अङ्गदं त्वथ लक्ष्मणः । अयं हि विपुलो वीर सागरो मकरालयः ७९ वैहायसौ युवामेतौ वानरौ धारयिष्यतः । अग्रतस्तस्य

ह्याप्रमाणें विश्वकर्म्याचा पुत्र जो बलाढ्य व भव्य वानरश्रेष्ठ नल त्यानें सागरामध्यें सेतु बांधिला व त्यांत आपल्या पित्याप्रमाणेंच त्यानें कौशल दाखविलें ७०. मकरांचें निवासस्थान असलेल्या सागरामध्यें नलानें बांधिलेला तो भव्य व मनोहर सेतु आकाशांतील स्वातीपथाप्रमाणें शोभूं लागला ७१. तदनंतर गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध आणि महर्षि तें अद्भुत कृत्य अवलोकन करण्याकरितां आकाशामध्यें येऊन उभे राहिले असतां ७२ नलानें बांधिलेला तो अति दुष्कर सेतु दहा योजनें रुंद व शंभर योजनें लांब असल्याचें त्या देवगंधर्वांच्या दृष्टीं पडलें ७३; आणि त्याचप्रमाणें जवळ व लांब उड्या टाकीत असलेले व गर्जना करीत असलेले वानरही त्यांनीं अवलोकन केले. अतर्क्य, अशक्य आणि पहातांक्षणीं अंगावर कांटा आणणारें तें ७४ सागरांतील सेतुबंधन सर्व प्राण्यांनीं अवलोकन केलें व ते हजारों कोट महाबलाढ्य वानर ७५ सेतु बांधीत बांधीत त्या महासागराच्या परतीराला जाऊन पोंचले. विशाल, उत्तम रीतीनें बांधिलेला, भव्य, अतिशय सपाट आणि फारच निश्चल असलेला तो प्रचंड सेतु सागरांतील भांगच कीं काय असा शोभूं लागला. तदनंतर समुद्राच्या परतीरीं शत्रूसमोर चाल करून जाण्याकरितां बिभीषण हातामध्यें गदा घेऊन सचिवांसहवर्तमान उठला असतां सुग्रीव सत्यपराक्रमी रामाला ह्मणाला ७६,७७,७८ " तूं हनुमानावर आरूढ हो आणि लक्ष्मणाला अंगदावर आरूढ होऊं दे. कारण, हे वीरा, 'मकरांचें निवासस्थान असलेला हा सागर प्रचंड आहे ७९. आकाशमार्गानें जाणारे हे

सैन्यस्य श्रीमान्रामः सलक्ष्मणः ८० जगाम धन्वी धर्मात्मा सुग्रीवेण समन्वितः । अग्रे मध्येन गच्छन्ति पार्श्वतोन्ये प्लवङ्गमाः ८१ सलिलं प्रपतन्त्यन्ये मार्गमन्ये प्रपेदिरे । केचिद्वैहायसगताः सुपर्णा इव पुप्लुवुः ८२ घोषेण महता घोषं सागरस्य समुच्छ्रितम् । भीममन्तर्दधे भीमा तरन्ती हरिवाहिनी ८३ वानराणां हि सा तीर्णा वाहिनी नलसेतुना । तीरे निविविशे राज्ञा बहुमूलफलोदके ८४ तदद्भुतं राघवकर्म दुष्करं समीक्ष्य देवाः सह सिद्धचारणैः । उपेत्य रामं सहसा महर्षिभिस्तमभ्यषिञ्चन्सुशुभैर्जलैः पृथक् ८५ जयस्व शत्रून्नरदेव मेदिनीं ससागरां पालय शाश्वतीः समाः । इतीव रामं नरदेवसत्कृतं शुभैर्वचोभिर्विविधैरपूजयन् ८६ [ ८०९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्वाविंशः सर्गः ॥ २२ ॥

निमित्तानि निमित्तज्ञो दृष्ट्वा लक्ष्मणपूर्वजः । सौमित्रिं संपरिष्वज्य इदं वचनमब्रवीत् १ परिगृह्योदकं शीतं वनानि फलवन्ति च । बलौघं

---

उभयतां वानर तुह्मांला धारण करितील ". ह्यानंतर सुग्रीव आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान धनुर्धारी व धर्मात्मा श्रीमान् राम त्या सैन्याच्या अग्रभागीं चालला; मध्यें दुसरे वानर चालले; बाजूनेंही दुसरे जाऊं लागले ८०,८१; कांहीं उदकांत पडूं लागले; कांहीं मार्गावर येऊं लागले आणि कांहीं आकाशामध्यें जाऊन गरुडपक्ष्याप्रमाणें उड्डाण करूं लागले ८२. ह्याप्रमाणें ती भयंकर वानरसेना तरून जाऊं लागली असतां सागरामध्यें उद्भवलेल्या भयंकर ध्वनीला तिनें आपल्या प्रचंड ध्वनीनें मागें टाकिलें ८३. असो. अशारीतीनें नलाच्या सेतूमुळें ती वानरांची सेना तरून गेली असतां रामराजानें विपुल मुळें, फळें व उदक ह्यांनीं युक्त असलेल्या तीरावर तिचा तळ दिला ८४. रघिवाचें तें अद्भुत व दुष्कर कर्म अवलोकन करून सिद्ध, चारण आणि महर्षि ह्यांसहवर्तमान देव एकाएकीं त्याच्या समीप आले आणि अति पवित्र जलांच्या योगानें त्यांनीं पृथक् पृथक् रामाला अभिषेक केला ८५; इतकेंच नव्हे परंतु, " हे प्रजाधिपते, तुझा विजय होवो; समुद्रवलयांकित पृथ्वीचें तूं चिरकाल परिपालन कर" अशा नानाप्रकारच्या शुभ भाषणांनीं त्या देवांनीं मानवांच्या व देवांच्या सत्कारास पात्र झालेल्या त्या रामाची प्रशंसा केली ८६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २२ ॥

नंतर शकुन जाणणारा राम कांहीं शकुन दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें लक्ष्मणाला

संविभज्येमं व्यूह्य तिष्ठेम लक्ष्मण २ लोकक्षयकरं भीमं भयं पश्याम्युपस्थितम् । प्रबर्हणं प्रवीराणामृक्षवानररक्षसाम् ३ वाताश्च कलुषा वान्ति कम्पते च वसुन्धरा । पर्वताग्राणि वेपन्ते पतन्ति च महीरुहाः ४ मेघाः क्रव्यादसंकाशाः परुषाः परुषस्वनाः । क्रूराः क्रूरं प्रवर्षन्ति मिश्रं शोणितबिन्दुभिः ५ रक्तचन्दनसंकाशा संध्या परमदारुणा । ज्वलतः प्रपतत्येतदादित्यादग्निमण्डलम् ६ दीना दीनस्वराः क्रूराः सर्वतो मृगपक्षिणः । प्रत्यादित्यं विनर्दन्ति जनयन्तो महद्भयम् ७ रजन्यामप्रकाशस्तु संतापयति चन्द्रमाः । कृष्णरक्तांशुपर्यन्तो लोकक्षय इवोदितः ८ ह्रस्वो रूक्षोऽप्रशस्तश्च परिवेषस्तु लोहितः । आदित्ये विमले नीलं लक्ष्म लक्ष्मण दृश्यते ९ रजसा महता चापि नक्षत्राणि हतानि च । युगान्तमिव लोकानां पश्य शंसन्ति लक्ष्मण १० काकाः श्येनास्तथा नीचा गृध्राः परिपतन्ति च । शिवाश्चाप्यशुभान्नादान्नदन्ति सुमहाभयान् ११ शैलैः

---

कवटाळून ह्मणाला १ "हे लक्ष्मणा, शीत जल आणि फलयुक्त वनें ह्यांचा आश्रय करून आपण ह्या सेनासमुदायाचे विभाग करूं आणि ह्या सेनासमुदायाला युद्धार्थ सिद्ध करून आपण उभे राहूं २. कारण, लोकक्षयकारक आणि ऋक्ष, वानर व राक्षस ह्या वीरांचेंही नाशक असें भयंकर भय उपस्थित झाल्याचें माझ्या दृष्टीं पडत आहे ३. वायु रजःकणांनें व्याप्त झालेले वहात आहेत; भूकंप होत आहे; पर्वतशिखरें हालत आहेत; वृक्ष उलथून पडत आहेत ४; मेघ राक्षसासारिखे उग्र दिसत असून गर्जनाही भयंकर करीत आहेत आणि ते क्रूर मेघ रक्तबिंदूंनीं मिश्र अशी भयंकर वृष्टिही करीत आहेत ५. रक्तचंदनासारिखी आरक्तवर्ण असलेली अतिभयंकर संध्या प्रज्वलित सूर्यापासून ह्या अग्निमंडलामध्यें येऊन पडत आहे ६. दीन शब्द करीत असलेले सर्वही क्रूर पशुपक्षी दीन होऊन सूर्याभिमुख गर्जना करीत आहेत आणि त्याच्या योगानें मोठें भय सुचवीत आहेत ७. रात्रीं चंद्रमा प्रकाशरहित असून ताप देत आहे आणि कृष्णवर्ण व आरक्तवर्ण किरणांनीं त्याचें मंडल परिवेष्टित झालें असल्यामुळें लोकांच्या नाशार्थच उदय पावला आहे कीं काय असा भासत आहे ८. सूर्याच्या भोंवतीं ऱ्हस्व, रूक्ष आणि आरक्तवर्ण असा अप्रशस्त परिवेष दिसत आहे; व हे लक्ष्मणा, निर्मल सूर्याचे ठिकाणीं नीलवर्ण बिंदुही दृष्टोत्पत्तीस येत आहेत ९. त्याचप्रमाणें, हे लक्ष्मणा, आकाश अतिशय धूळ उडाल्यासारिखें झालें असून नक्षत्रें अगदीं निस्तेज झालेलीं आहेत. तस्मात्, प्रजेच्या संहारकालासारिखें हें चिन्ह तूं अवलोकन कर १०. काक, श्येन आणि तसेच क्षुद्र गृध्र घिरट्या घालीत आहेत व भालूही अत्यंत

शूलैश्च खड्गैश्च विमुक्तैः कपिराक्षसैः । भविष्यत्यावृता भूमिर्मांसशोणित-
कर्दमा १२ क्षिप्रमद्यैव दुर्धर्षां पुरीं रावणपालिताम् । अभियाम जवेनैव
सर्वैर्हरिभिरावृताः १३ इत्येवमुक्त्वा धन्वी स रामः सङ्ग्रामधर्षणः ।
प्रतस्थे पुरतो रामो लङ्कामभिमुखो विभुः १४ सविभीषणसुग्रीवाः सर्वे
ते वानरर्षभाः । प्रतस्थिरे विनर्दन्तो धृतानां द्विषतां वधे १५ राघ-
वस्य प्रियार्थं तु सुतरां वीर्यचालिनाम् । हरीणां कर्मचेष्टाभिस्तुतोष
रघुनन्दनः १६ [ ८२५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्ये युद्धकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥ २३ ॥

सा वीरसमितो राज्ञा विरराज व्यवस्थिता । शशिना शुभनक्षत्रा
पौर्णमासीव शारदी १ प्रचचाल च वेगेन त्रस्ता चैव वसुन्धरा । पीड्य-
माना बलौघेन तेन सागरवर्चसा २ ततः शुश्रुवुराक्रुष्टं लङ्कायां कान-
नौकसः । भेरीमृदङ्गसंघुष्टं तुमुलं लोमहर्षणम् ३ बभूवुस्तेन घोषेण संहृष्टा
हरियूथपाः । अमृष्यमाणास्तद्घोषं विनेदुर्घोषवत्तरम् ४ राक्षसास्तत्प्लवङ्गानां

---

भयंकर अशा अशुभ स्वरानीं गर्जना करित आहत ११. ह्यावरून वानरांनीं व राक्षसानीं
सोडिलेल्या पर्वतानीं, शूलानीं व खड्गांनीं भूमि व्याप्त होईल आणि तिच्यावर रक्तमा-
सांचा चिखल होईल १२. तस्मात्, रावणानें रक्षिल्यामुळें हल्ला होण्यास कठीण
असलेल्या लंकानगरीवर सर्व वानरांसहवर्तमान आजच आपण विलंब न करितां वेगानें
चालून जाऊं " १३. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगून संग्रामामध्यें शत्रूवर हल्ला करणारा
तो धनुर्धर प्रभु राम लंकाभिमुख होऊन पुढें निघाला १४. तऱ्हां बिभीषण आणि
सुग्रीव ह्यांसहवर्तमान ते सर्व वानरश्रेष्ठही दुराग्रही शत्रूंना वध करण्याकरितां गर्जना
करीत करीत त्याच्याबरोबर निघाले १५; आणि राघवाचें प्रिय करण्याकरितां निघा-
लेल्या त्या महावीर्यवान् वानराच्या शारीरिक चेष्टा पाहून तो रघुनंदन राम संतुष्ट
झाला १६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील
युद्धकांडापैकीं तेविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २३ ॥

शुभ नक्षत्रांनीं युक्त असलेली शरदृतूंतील पौर्णिमा ज्याप्रमाणें चंद्राच्या योगानें
शोभते त्याप्रमाणें रामराजानें व्यवस्थित रीतीनें उभी केलेली ती वीरसेना शोभूं
लागली १; आणि सागराप्रमाणें ज्याचा वेग आहे अशा त्या सेनासमुदायानें पृथ्वी
पीडित होऊं लागली असतां त्रस्त होऊन कंपित होऊं लागली २. तों इतक्यांत
दुंदुभि आणि मृदंग ह्यांचा अंगावर कांटा आणण्यासारिखा प्रचंड ध्वनि व लंकेंतील
आक्रोश वानरांनीं ऐकिला असतां ३ त्या वानरसेनाधिपतींना त्या नादानें स्फुरण

शुश्रुवुस्तेपि गर्जितम् । नर्दतामिव दृप्तानां मेघानामम्बरे स्वनम् ५ दृष्ट्वा दाशरथिर्लङ्कां चित्रध्वजपताकिनीम् । जगाम मनसा सीतां दूयमानेन चेतसा ६ अत्र सा मृगशावाक्षी रावणेनोपरुध्यते । अभिभूता ग्रहेणेव लोहिताङ्गेन रोहिणी ७ दीर्घमुष्णं च निःश्वस्य समुद्वीक्ष्य च लक्ष्मणम् । उवाच वचनं वीरस्तत्कालहितमात्मनः ८ आलिखन्तीमिवाकाशमुत्थितां पश्य लक्ष्मण । मनसेव कृतां लङ्कां नगाग्रे विश्वकर्मणा ९ विमानैर्बहुभिर्लङ्का संकीर्णा रचिता पुरा । विष्णोः पदमिवाकाशं छादितं पाण्डुभिर्घनैः १० पुष्पितैः शोभिता लङ्का वनैश्चित्ररथोपमैः । नानापतगसंघुष्टफलपुष्पोपगैः शुभैः ११ पश्य मत्तविहंगानि प्रलीनभ्रमराणि च। कोकिलाकुलखण्डानि दोधवीति शिवोनिलः १२ इति दाशरथी रामो लक्ष्मणं समभाषत । बलं च तत्र विभजच्छास्त्रदृष्टेन कर्मणा १३ शशास कपिसेनां तां बलादादाय वीर्यवान् । अङ्गदः सह नीलेन तिष्ठेदुरसि

---

चढलें आणि ती गर्जना सहन न झाल्यामुळें त्यांनीं त्यांच्याही पेक्षां अधिक उच्चस्वरानें गर्जना केली ४. तेव्हां आकाशामध्यें गर्जना करणाऱ्या मेघाप्रमाणें मत्त होऊन गर्जना करणाऱ्या वानरांची गर्जना त्या राक्षसांनींही ऐकिली ५. तदनंतर चित्रविचित्र ध्वज व पताका ह्यांनीं युक्त असलेली ती लंकानगरी अवलोकन करितांक्षणीं रामाला सीतेचें स्मरण झालें व त्याचें मन व्याकुळ होऊं लागलें ६. "हरिणबालकाप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी ती सीता मंगल ग्रहानें ग्रस्त केलेल्या रोहिणीप्रमाणें रावणानें येथें प्रतिबंधांत ठेविली आहे" ७. असें मनांत आणून रामानें दुःखाचा लांब सुस्कारा टाकिला आणि लक्ष्मणाकडे पाहून तो वीर त्यावेळीं स्वतःला हितकारक असें भाषण त्याच्याशीं करूं लागला ८. (तो ह्मणाला) "हे लक्ष्मणा, पर्वताच्या अग्रभागीं विश्वकर्म्यानें जशी कांहीं मनानें निर्माण केलेली आणि उठून आकाशाचें विदारणच करीत असलेली ही लंका तूं अवलोकन कर ९. सर्वव्यापी वायुरूप विष्णूचें संचारस्थान जें आकाश तें ज्याप्रमाणें श्वेतवर्ण मेघांनीं आच्छादित होतें त्याप्रमाणें पूर्वी निर्माण केलेली ही लंका सात सात मजली अनेक हवेल्यांनीं भरून गेलेली आहे १०; आणि नानाप्रकारच्या पक्ष्यांचे ध्वनि, फळें आणि पुष्पें ह्यांनीं युक्त अशा चित्ररथतुल्य शुभ व प्रफुल्लित वनांनीं ही लंका सुशोभित झाली आहे ११. पहा, हे लक्ष्मणा, कोकिलपक्ष्यांनीं गजबजून गेलेले वृक्षसमुदाय शुभ वायु कंपित करीत आहे. त्या वृक्षसमुदायांचा मत्त भ्रमरांनीं आश्रय केला आहे आणि भ्रमर त्यांचे ठिकाणीं लीन झाले आहेत." १२. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगितल्यावर दाशरथि रामांनीं शास्त्रोक्त पद्धतीनें आपल्या सैन्याचे

दुर्जयः १४ तिष्ठेद्वानरवाहिन्या वानरौघसमावृतः । आश्रितो दक्षिणं पार्श्वमृषभो नाम वानरः १५ गन्धहस्तीव दुर्धर्षस्तरस्वी गन्धमादनः । तिष्ठेद्वानरवाहिन्याः सव्यं पक्षमधिष्ठितः १६ मूर्ध्नि स्थास्याम्यहं यत्तो लक्ष्मणेन समन्वितः । जाम्बवांश्च सुषेणश्च वेगदर्शी च वानरः १७ ऋक्षमुख्या महात्मानः कुक्षिं रक्षन्तु ते त्रयः । जघनं कपिसेनायाः कपिराजोभिरक्षतु १८ पश्चार्धमिव लोकस्य प्रचेतास्तेजसा वृतः १९ सुविभक्तमहाव्यूहा महावानररक्षिता । अनीकिनी सा विबभौ यथा द्यौः साभ्रसंप्लवा २० प्रगृह्य गिरिशृङ्गाणि महतश्च महीरुहान् । आसेदुर्वानरा लङ्कां मिमर्दयिषवो रणे २१ शिखरैर्विकिरामैनां लङ्कां मुष्टिभिरेव वा । इति स्म दधिरे सर्वे मनांसि हरिपुङ्गवाः २२ ततो रामो महातेजाः सुग्रीवमिदमब्रवीत् । सुविभक्तानि सैन्यानि शुक एष विमुच्यताम् २३ रामस्य तु वचः श्रुत्वा वानरेन्द्रो महाबलः । मोचयामास तं दूतं शुकं रामस्य शासनात् २४ मोचितो रामवाक्येन वानरैश्च

---

विभाग केले १३; आणि आपल्या सामर्थ्यानें ती वानरसेना समुद्राचे परतीरीं नेल्यावर त्या वीर्यवान् रामांनीं तिला आज्ञा केली. (ते ह्मणाले) "अजिंक्य अंगदानें नीलासहवर्तमान ( पुरुषव्यूहाच्या ) वक्षस्थलीं उभे रहावें १४; वानरगणानें परिवेष्टित असलेल्या ऋषभ नामक वानरानें वानरसेनेसहवर्तमान दक्षिण बाजूचा आश्रय करून उभें रहावें १५; मत्त गजाप्रमाणें ज्याच्या समोर जाणेंही अशक्य आहे अशा बलाढ्य गंधमादनानें वानरसेनेच्या डाव्या बाजूचा आश्रय करून उभें रहावें १६; आणि मी लक्ष्मणासहवर्तमान सज्ज होऊन शिरोभागीं उभा रहातों. जांबवान्, सुषेण आणि वेगदर्शी १७ ह्या महात्म्या तिन्ही ऋक्षश्रेष्ठांनीं उदरस्थलाचें रक्षण करावें; व तेजस्वी वरुण ज्याप्रमाणें जगताच्या पश्चिमभागाचें रक्षण करितो त्याप्रमाणें कपिराजानें वानरसेनेच्या मागल्या भागाचें रक्षण करावें " १८, १९. अवयव अगदीं भिन्न भिन्न दाखवून पुरुषसंज्ञक महाव्यूहानें उभी केलेली आणि मोठ्या मोठ्या वानरांनीं रक्षिलेली ती सेना मेघांनीं भरून गेलेल्या स्वर्गलोकाप्रमाणें दिसूं लागली २०. तदनंतर पर्वत शिखरें आणि मोठे मोठे वृक्ष हातांत घेऊन संग्रामामध्यें राक्षसांचें मर्दन करण्याच्या हेतूनें वानर लंकेशीं जाऊन भिडले २१. "ह्या लंकेवर पर्वतशिखरें फेंकावीं अथवा मुष्टीनेंच हिच्यावर प्रहार करावे" असे विचार सर्वही वानरश्रेष्ठ मनामध्यें आणूं लागले २२. तदनंतर महातेजस्वी राम सुग्रीवाला ह्मणाला " आपल्या सेनांचें सुव्यवस्थित रीतीनें वर्गीकरण झालें आहे; ह्यास्तव, ह्या शुकदूताला तुह्मी अगदीं सोडा " २३. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर

निष्पीडितः । शुकः परमसंत्रस्तो रक्षोधिपमुपागमत् २५ रावणः प्रहसन्नेव शुकं वाक्यमुवाच ह । किमिमौ ते सितौ पक्षौ लूनपक्षश्च दृश्यसे ॥ कच्चिन्नानेकचित्तानां तेषां त्वं वशमागतः २६ ततः स भयसंविग्नस्तेन राज्ञाभिचोदितः । वचनं प्रत्युवाचेदं राक्षसाधिपमुत्तमम् २७ सागरस्योत्तरे तीरेऽब्रुवं ते वचनं तथा । यथा संदेशमक्लिष्टं सान्त्वयञ्श्लक्ष्णया गिरा २८ क्रुद्धैस्तैरहमुत्प्लुत्य दृष्टमात्रः प्लवङ्गमैः । गृहीतोस्म्यपि चारब्धो हन्तुं लोप्तुं च मुष्टिभिः २९ न ते संभाषितुं शक्याः संप्रश्नोत्र न विद्यते । प्रकृत्या कोपनास्तीक्ष्णा वानरा राक्षसाधिप ३० स च हन्ता विराधस्य कबन्धस्य खरस्य च । सुग्रीवसहितो रामः सीतायाः पदमागतः ३१ स कृत्वा सागरे सेतुं तीर्त्वा च लवणोदधिम् । एष रक्षांसि निर्धूय धन्वी तिष्ठति राघवः ३२ ऋक्षवानरसङ्घानामनीकानि सहस्रशः । गिरिमेघनिकाशानां छादयन्ति वसुन्धराम् ३३ राक्षसानां बलौघस्य वानरेन्द्रबलस्य च । नैतयोर्विद्यते संधिर्देवदानवयोरिव ३४

---

त्याच्या आज्ञेप्रमाणें महाबलाढ्य वानरराज सुग्रीवानें त्या शुकदूताची मुक्तता केली २४. तेव्हां रामाच्या आज्ञेनें सुटलेला तो शुक वानरांनीं पीडिल्यामुळें अतिशय त्रस्त होऊन राक्षसाधिपति रावणाकडे गेला असतां २५ रावण हसत हंसत त्याला ह्मणाला " हे तुझे पख कोणीं बांधिले होते कीं काय ? अरे, तुझे पख उपटिल्यासारिखे दिसत आहेत. तस्मात्, तूं चंचलबुद्धि वानरांच्या तर तावडींत सांपडला नव्हतास नां "? २६. तदनंतर भयानें उद्विग्न झालेला तो शुक त्या राक्षसराजानें प्रश्न केला असतां त्या उत्कृष्ट राक्षसाधिपतीला ह्मणाला २७ " सागराच्या उत्तरतीरावर असतांना मृदु भाषणानें रामाची मर्जी संपादन करीत करीत मीं आपल्या सांगण्याप्रमाणें त्याला निरोप कळविला २८; परंतु, मी दृष्टीं पडतांक्षणीं त्या क्रुद्ध वानरांनीं मला धरिलें आणि माझ्या शरीरावर मुष्टिप्रहार करण्यास व माझे पंख उपटण्यास त्यांनीं आरंभ केला २९. त्यांच्याशीं भाषण करणें शक्य नाहीं आणि त्यांच्या ठिकाणीं कसला विचारही नाहीं. हे राक्षसाधिपते, वानर जातीनेच कोपी व तीक्ष्ण आहेत ३०. शिवाय विराध, कबंध व खर ह्यांचा वध करणारा तो राम सीतेचा शोध लावण्याकरितां सुग्रीवासहवर्तमान इकडे आला आहे ३१. सारांश, सागराचे ठिकाणीं सेतु बांधून तो राम सागर तरून आला आहे आणि राक्षसांना कसपटाप्रमाणें समजून तो धनुर्धारी येथें उभा आहे ३२. पर्वत व मेघ ह्याप्रमाणें असलेले ऋक्षगण व वानरगण ह्यांच्या हजारों सेना पृथ्वी आच्छादित करीत आहेत ३३. देव आणि

पुरा प्राकारमायान्ति क्षिप्रमेकतरं कुरु । सीतां चास्मै प्रयच्छाशु युद्धं वापि प्रदीयताम् ३५ शुकस्य वचनं श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् । रोषसंरक्तनयनो निर्दहन्निव चक्षुषा ३६ यदि मां प्रतियुद्धयेरन्देवगन्धर्वदानवाः । नैव सीतां प्रदास्यामि सर्वलोकभयादपि ३७ कदा समभिधावन्ति मामका राघवं शराः । वसन्ते पुष्पितं मत्ता भ्रमरा इव पादपम् ३८ कदा शोणितदिग्धाङ्गं दीप्तैः कार्मुकविच्युतैः । शरैरादीपयिष्यामि उल्काभिरिव कुञ्जरम् ३९ तच्चास्य बलमादास्ये बलेन महता वृतः । ज्योतिषामिव सर्वेषां प्रभामुद्यन्दिवाकरः ४० सागरस्येव मे वेगो मारुतस्येव मे बलम् । न च दाशरथिर्वेद तेन मां योद्धुमिच्छति ४१ न मे तूणीशयान्बाणान्सविषानिव पन्नगान् । रामः पश्यति सङ्ग्रामे तेन मां योद्धुमिच्छति ४२ न जानाति पुरा वीर्यं मम युद्धे स राघवः । मम चापमयीं वीणां शरकोणैः प्रवादिताम् ४३ ज्याशब्दतुमुलां

---

दानव ह्यांमध्यें सख्य होणें जसें संभवनीय नाहीं तसेंच राक्षसांचा सेनासमुदाय आणि वानराधिपतीचें सैन्य ह्यांमध्येंही सख्य होणें संभवनीय नाहीं ३४. ह्यास्तव, लंकेच्या तटावर ते वानर आले नाहींत तोंच सत्वर दोहोंपैकीं एक कांहींतरी कर. सीता त्या रामाला सत्वर देऊन टाक अथवा त्याच्याशीं युद्ध करण्याला तरी तयार हो " ३५. शुकाचें हें भाषण श्रवण केल्यावर रोषानें नेत्र आरक्तवर्ण झालेला तो रावण दृष्टीनें दग्ध करीत करीतच कीं काय त्याला ह्मणाला ३६. " देव, गंधर्व आणि दानव हे जरी माझ्याशीं युद्ध करण्यास तयार झाले तरी, अथवा सर्व राक्षसप्रजेला जरी भय उपस्थित झालें तरी, मी सीता परत देणार नाहीं ३७. प्रफुल्लित वृक्षाकडे ज्याप्रमाणें मत्त भ्रमर धांवत जातात त्याप्रमाणें माझे बाण केव्हां बरें रामावर धांवून जातील ? ३८. दिवट्यांनीं ज्याप्रमाणें गजाला भाजून काढावें त्याप्रमाणें रक्तानें शरीर भरून गेलेल्या त्या रामाला धनुष्यापासून सुटलेल्या उज्ज्वल बाणांनीं मी केव्हां बरें भाजून टाकीन ? ३९. अरे, उदयाचलावर येणारा सूर्य ज्याप्रमाणें सर्व नक्षत्रांचें तेज लुप्त करून टाकितो त्याप्रमाणें मोठें सैन्य बरोबर घेऊन मी ह्या रामाचें तें सैन्य लुप्त करून टाकीन ४०. सागराप्रमाणें माझा वेग असून वायूप्रमाणें माझें सामर्थ्य आहे हें दाशरथि रामाला विदित नाहीं ह्मणून तो माझ्याशीं युद्ध करण्याचें मनांत आणीत आहे ४१. विषयुक्त भुजंगाप्रमाणें भात्यांत असलेले माझे बाण रामानें अवलोकन केले नाहींत; ह्मणून संग्रामामध्यें तो माझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा धरीत आहे ४२. युद्धामध्यें पूर्वीं मीं प्रकट केलेलें सामर्थ्य त्या रामाला

घोरामार्तगीतमहास्वनाम् । नाराचतलसंनादां नदीमहितवाहिनीम् ४४ अवगाह्य महारङ्गं वादयिष्याम्यहं रणे ४५ न वासवेनापि सहस्रचक्षुषा युद्धेऽस्मि शक्यो वरुणेन वा स्वयम् । यमेन वा धर्षयितुं शराग्निना महाहवे वैश्रवणेन वा स्वयम् ४६ [ ८७१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुर्विंशः सर्गः॥२४॥

सबले सागरं तीर्णे रामे दशरथात्मजे । अमात्यौ रावणः श्रीमानब्रवीच्छुकसारणौ १ समग्रं सागरं तीर्णं दुस्तरं वानरं बलम् । अभूतपूर्वं रामेण सागरे सेतुबन्धनम् २ सागरे सेतुबन्धं तं न श्रद्दध्यां कथंचन । अवश्यं चापि संख्येयं तन्मया वानरं बलम् ३ भवन्तौ वानरं सैन्यं प्रविश्यानुपलक्षितौ । परिमाणं च वीर्यं च ये च मुख्याः प्लवङ्गमाः ४ मन्त्रिणो ये च रामस्य सुग्रीवस्य च संगताः । ये पूर्वमभिवर्तन्ते ये च शूराः प्लवङ्गमाः ५ स च सेतुर्यथा बद्धः सागरे सलिलार्णवे । निवेशं च यथा तेषां वानराणां महात्मनाम् ६ रामस्य व्यवसायं च वीर्यं

---

विदित नाहीं. असो. बाणरूप खुट्या पिरगळून वाजविलें जाणारें, टणत्काररूप मंद्रस्वरानें, आर्तजनविलापरूप मध्यस्वरानें आणि नाराचतलध्वनिरूप तारस्वरानें युक्त असलेलें चापमय वीणावाद्य शत्रुहानिरूप प्रवाहानें युक्त असलेली जी रणनदी तद्रूप महाक्रीडा स्थानामध्यें जाऊन संग्रामांत वाजवीन ४३, ४४, ४५. युद्धामध्यें बाणरूप अग्नीनें माझ्यावर सहस्रनयन इद्राला, प्रत्यक्ष वरुणाला, यमाला अथवा महायुद्धामध्यें प्रत्यक्ष कुबेरालाही हल्ला करितां येणें शक्य नाहीं ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चोविसावा सर्ग समाप्त झाला॥२४॥

शरथनंदन राम सैन्यासहवर्तमान समुद्र तरून गेला असतां श्रीमान् रावण शुक सारण ह्या अमात्यांना ह्मणाला १ " संपूर्ण वानरसैन्य दुस्तर सागर तरून आलें आणि सागरामध्यें रामानें सेतु बांधिला ह्या दोन्हीही गोष्टी आजपर्यंत कधीं झालेल्या नाहींत २. सागरामध्यें सेतु बांधणें हें मला मुळींच विश्वसनीय वाटत नाहीं. तथापि, तें वानरसैन्य किती आहे हें मला अवश्य मोजून पाहिलें पाहिजे ३. ह्यास्तव, तुह्मी कोणाच्या दृष्टोत्पत्तीस न येतां वानरसैन्यामध्यें प्रवेश करा आणि तें सैन्य किती आहे; त्याचें सामर्थ्य किती आहे; त्यांत मुख्य मुख्य वानर कोण आहेत ४; राम आणि सुग्रीव ह्यांच्याबरोबर मंत्री कोण आले आहेत; त्यांत अग्रेसर कोण आहेत; शूर वानर कोण कोण आहेत ५; क्षारोदकानें भरलेल्या समुद्रामध्यें तो सेतु कसा बांधिला आहे; त्या महात्म्या वानरांचा तळ कसा पडला आहे ६; राम आणि वीर लक्ष्मण

प्रहरणानि च । लक्ष्मणस्य च वीरस्य तत्त्वतो ज्ञातुमर्हथः ७ कश्च सेनापतिस्तेषां वानराणां महात्मनाम् । तच्च ज्ञात्वा यथातत्त्वं शीघ्रमागन्तुमर्हथः ८ इति प्रतिसमादिष्टौ राक्षसौ शुकसारणौ । हरिरूपधरौ वीरौ प्रविष्टौ वानरं बलम् ९ ततस्तद्वानरं सैन्यमचिन्त्यं लोमहर्षणम् । संख्यातुं नाध्यगच्छेतां तदा तौ शुकसारणौ १० तत्स्थितं पर्वताग्रेषु निर्झरेषु गुहासु च । तरमाणं च तीर्णं च तर्तुकामं च सर्वशः ११ निविष्टं निविशच्चैव भीमनादं महाबलम् । तद्बलार्णवमक्षोभ्यं ददृशाते निशाचरौ १२ तौ ददर्श महातेजाः प्रतिच्छन्नौ विभीषणः । आचचक्षे स रामाय गृहीत्वा शुकसारणौ १३ तस्यैतौ राक्षसेन्द्रस्य मन्त्रिणौ शुकसारणौ । लङ्कायाः समनुप्राप्तौ चारौ परपुरंजय १४ तौ दृष्ट्वा व्यथितौ रामं निराशौ जीविते तथा । कृताञ्जलिपुटौ भीतौ वचनं चेदमूचतुः १५ आवामिहागतौ सौम्य रावणप्रहितावुभौ । परिज्ञातुं बलं सर्वं तदिदं रघुनन्दन १६ तयोस्तद्वचनं श्रुत्वा रामो दशरथात्मजः । अब्रवीत्प्रहसन्वाक्यं सर्वभूतहिते रतः १७

---

ह्यांचा काय उद्योग चालला आहे, त्यांचें सामर्थ्य किती आहे आणि त्यांच्यापाशीं आयुधें काय काय आहेत हें तुह्मी उभयतां खरें खरें समजून घ्या ७; आणि त्याचप्रमाणें त्या महात्म्या वानरांचा सेनाधिपति कोण आहे हें खरें खरें समजून घेऊन तुह्मी सत्वर परत या ८. ह्याप्रमाणें त्या शुकसारणनामक राक्षसांना आज्ञा झाली असतां वानरांचीं रूपें धारण करून ते वीर वानरसैन्यामध्यें प्रविष्ट झाले ९; परंतु, अचिंत्य आणि अंगावर कांटा आणणारें तें वानरसैन्य मेजण्यास ते शुकसारण समर्थ झाले नाहींत १०. पर्वतशिखरें, झरे, आणि गुहा ह्यांचे ठिकाणीं बसलेलें, कांहीं तरून येत असलेलें, कांहीं तरून आलेलें, कांहीं तरण्याच्या बेतांत असलेलें, कांहीं उतरलेलें आणि कांहीं उतरत असलेलें असें तें महाबलाढ्य व भयंकर गर्जना करणारें सागरप्राय अगाध वानरसैन्य त्या राक्षसांनीं सर्व प्रकारें अवलोकन केलें असतां ११, १२ महातेजस्वी बिभीषणानें वानररूप धारण केलेले ते राक्षस अवलोकन केले आणि त्या शुकसारण राक्षसांना धरून रामाकडे नेल्यावर तो रामाला ह्मणाला १३ " हे शत्रुसमूहविजयी रामा, त्या राक्षसाधिपति रावणाचे हे शुकसारण मंत्री लंकेहून हेर ह्या नात्यानें येथें आले आहेत " १४. इतकें झाल्यानंतर रामाला अवलोकन करितांक्षणीं ते उभयतां राक्षस जीविताविषयीं निराश झाले आणि भयभीत झालेले ते राक्षस हात जोडून रामाला ह्मणाले १५" हे सौम्य रघुनंदना, रावणानें पाठविल्यावरून आह्मी येथें आपलें सर्व सैन्य पहाण्याकरितां आलों आहों " १६. हें त्यांचें भाषण श्रवण केल्यावर

यदि दृष्टं बलं सर्वं वयं वा सुसमाहिताः । यथोक्तं वा कृतं कार्यं छन्दतः प्रतिगम्यताम् १८ अथ किंचिददृष्टं वा भूयस्तद्द्रष्टुमर्हथः । बिभीषणो वा कार्त्स्न्येन पुनः संदर्शयिष्यति १९ न चेदं ग्रहणं प्राप्य भेतव्यं जीवितं प्रति । न्यस्तशस्त्रौ गृहीतौ च न दूतौ वधमर्हतः २० प्रच्छन्नौ च विमुञ्चेमौ चारौ रात्रिंचरावुभौ । शत्रुपक्षस्य सततं बिभीषण विकर्षिणौ २१ प्रविश्य महतीं लङ्कां भवद्भ्यां धनदानुजः । वक्तव्यो रक्षसां राजा यथोक्तं वचनं मम २२ यद्बलं त्वं समाश्रित्य सीतां मे हृतवानसि । तद्दर्शय यथाकामं ससैन्यश्च सबान्धवः २३ श्वः काल्ये नगरीं लङ्कां सप्राकारां सतोरणाम् । रक्षसां च बलं पश्य शरैर्विध्वंसितं मया २४ क्रोधं भीममहं मोक्ष्ये ससैन्ये त्वयि रावण । श्वः काल्ये वज्रवान्वज्रं दानवेष्विव वासवः २५ इति प्रतिसमादिष्टौ राक्षसौ शुकसारणौ । जयेति प्रतिनन्द्यैनं राघवं धर्मवत्सलम् २६ आगम्य नगरीं लङ्कामब्रूतां

---

प्राणिमात्राच्या हिताविषयीं तत्पर असलेले दशरथनंदन राम हंसत हंसत त्यांना ह्मणाले १७ "सर्व सैन्य आपण पाहिलें असल्यास, आह्मी चांगले सावध आहोंत असें आपल्या नजरेस आलें असल्यास आणि आज्ञेप्रमाणें आपल्या हातून कार्य झालें असल्यास आपण खुशाल परत जावें १८. अथवा आपणांला कांहीं पहावयाचें राहिलें असल्यास तें आपण पाहून घ्यावें; किंवा बिभीषणही तुह्मांला सर्व कांहीं पुन्हां दर्शवील १९. अशारीतीनें जरी तुह्मी कचाट्यांत सांपडलां आहां तरी आपल्या जीवाबद्दल भीति बाळगूं नका. कारण, शस्त्र ठेविलेले दूत जरी धरिले गले तरी ते वधास पात्र होत नाहींत २०. तस्मात्, हे बिभीषण, शत्रुपक्षाकडे भेद वगैरे पाडणारे आणि गुप्तपणें छिद्रान्वेषण करीत असलेले हे उभयतां राक्षस हेर तूं सोडून दे २१. प्रचंड लंकेमध्यें प्रवेश केल्यानंतर कुबेराचा कनिष्ठ भ्राता जो राक्षसराज रावण त्याला माझा तुह्मी असा निरोप सांगा कीं २२, " ज्या बलाचें अवलंबन करून तूं सीतेचा अपहार केलास तें आपलें बल, सैन्यें आणि बांधव ह्यांसहवर्तमान तूं उदयीक यथेष्ट दाखीव २३. उद्यां सकाळीं कोट व वेशी ह्यांसहवर्तमान लंकानगरी आणि राक्षससैन्य ह्यांचा माझ्या हातून बाणांनीं विध्वंस झाल्याचें तूं अवलोकन कर २४ हे रावणा, वज्रपाणि इंद्र ज्याप्रमाणें दानवांवर वज्राचा प्रहार करितो त्याप्रमाणें मी सैन्यासहवर्तमान तुझे ठिकाणीं उद्यां सकाळीं भयंकर क्रोधाचा प्रयोग करीन " २५. ह्याप्रमाणें रामानें त्या शुकसारणनामक राक्षसांना सांगितलें असतां " तुझा जयजयकार असो " ह्मणून त्यांनीं धर्मवत्सल रामाचें अभिनंदन केलें २६; आणि लंकानगरीमध्यें येऊन ते राक्षसाधिपति

राक्षसाधिपम् । बिभीषणगृहीतौ तु वधार्थं राक्षसेश्वर २७ दृष्ट्वा धर्मात्मना मुक्तौ रामेणामिततेजसा । एकस्थानगता यत्र चत्वारः पुरुषर्षभाः २८ लोकपालसमाः शूराः कृतास्त्रा दृढविक्रमाः । रामो दाशरथिः श्रीमाँल्लक्ष्मणश्च बिभीषणः २९ सुग्रीवश्च महातेजा महेन्द्रसमविक्रमः । एते शक्ताः पुरीं लङ्कां सप्राकारां सतोरणाम् ३० उत्पाट्य संक्रामयितुं सर्वे तिष्ठन्तु वानराः । यादृशं तद्धि रामस्य रूपं प्रहरणानि च ३१ वधिष्यति पुरीं लङ्कामेकस्तिष्ठन्तु ते त्रयः । रामलक्ष्मणगुप्ता सा सुग्रीवेण च वाहिनी ॥ बभूव दुर्धर्षतरा सर्वैरपि सुरासुरैः ३२ प्रहृष्टयोधा ध्वजिनी महात्मनां वनौकसां संप्रति योद्धुमिच्छताम् । अलं विरोधेन शमो विधीयतां प्रदीयतां दाशरथाय मैथिली ३३ [ १०४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चविंशः सर्गः ॥ २५ ॥

तद्वचः सत्यमक्लीबं सारणेनाभिभाषितम् । निशम्य रावणो राजा पर्यभाषत सारणम् १ यदि मामभियुञ्जीरन्देवगन्धर्वदानवाः । नैव सीतामहं

---

रावणाला ह्मणाले "राक्षसाधिपते, वधाकरितां बिभीषणानें आह्मांला धरिलें असतां २७ अतुलतेजस्वी धर्मात्म्या रामानें महानांक्षणीं आमची मुक्तता केली. चारीही पुरुषश्रेष्ठ एकत्र जुळले आहेत २८ आणि सर्वही लोकपालतुल्य, शूर, अस्त्रविद्येमध्यें निपुण व महापराक्रमी असे आहेत. दाशरथी राम, श्रीमान् लक्ष्मण, बिभीषण २९ आणि इंद्रतुल्यपराक्रमी महातेजस्वी सुग्रीव हे कोट व वेशी ह्यांसहवर्तमान लंकानगरी उपटून दुसरीकडे नेण्यासही समर्थ आहेत; मग इतर सर्व वानर तर बाजूलाच राहूं द्या. फार कशाला, रामाचें स्वरूप आणि आयुधें हीं लक्षांत घेतलीं असतां ते तिघेही बाजूला राहिले तरी तो एकटाच लंकानगरीचा विध्वंस करील. राम, लक्ष्मण आणि सुग्रीव ह्यांनीं रक्षण केलें असल्यामुळें त्या वानरसेनेवर चालून जाणें सर्व देवदैत्यांनाही अति कठीण झालें आहे ३०, ३१, ३२. सारांश, युद्धाची इच्छा धरणाऱ्या महात्म्या वानरांची सेना सांप्रत आनंदित योद्ध्यांनीं युक्त झाली आहे. ह्यास्तव, विरोधभाव सोडून देऊन रामाशीं सख्य करावें आणि मैथिली त्याला परत द्यावी." ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २५ ॥

सारणानें केलेलें तें अर्थयुक्त व सत्य भाषण श्रवण करून रावणराजा सारणाला ह्मणाला-१ "देव, दानव आणि गंधर्व हे जरी माझ्या विरुद्ध युद्ध करण्यास तयार झाले आणि सर्व जगताला जरी भीति उत्पन्न होण्याचा प्रसंग आला तरी मी सीता

द्यां सर्वलोकभयादपि २ त्वं तु सौम्य परित्रस्तो हरिभिः पीडितो भृशम्। प्रतिप्रदानमद्यैव सीतायाः साधु मन्यसे ३ को हि नाम सपत्नो मां समरे जेतुमर्हति४ इत्युक्त्वा परुषं वाक्यं रावणो राक्षसाधिप। आरुरोह ततः श्रीमान्प्रासादं हिमपाण्डुरम् ५ बहुतालसमुत्सेधं रावणोथ दिदृक्षया। ताभ्यां चराभ्यां सहितो रावणः क्रोधमूर्च्छितः ६ पश्यमानः समुद्रं तं पर्वतांश्च वनानि च। ददर्श पृथिवीदेशं सुसंपूर्णं प्लवङ्गमैः ७ तदपारमसह्यं च वानराणां महाबलम्। आलोक्य रावणो राजा परिपप्रच्छ सारणम् ८ एषां के वानरा मुख्याः के शूराः के महाबलाः। के पूर्वमभिवर्तन्ते महोत्साहाः समन्ततः ९ केषां शृणोति सुग्रीवः के वा यूथपयूथपाः। सारणाचक्ष्व मे सर्वं किंप्रभावाः प्लवङ्गमाः १० सारणो राक्षसेन्द्रस्य वचनं परिपृच्छतः। आचचक्षेथ मुख्यज्ञो मुख्यांस्तत्र वनौकसः ११ एष योभिमुखो लङ्कां नर्दंस्तिष्ठति वानरः। यूथपानां सहस्रेण शतेन परिवारितः १२ यस्य घोषेण महता सप्राकारा

---

परत देणार नाहीं २. बिचाऱ्या सारणा, वानरांनीं आज तुला अतिशय त्रास देऊन फारच पीडा दिली असल्यामुळें आजच्या आजच सीतेला देऊन टाकणें तुला बरें वाटत आहे ३. परंतु, समरांगणामध्यें मला जिंकण्यास समर्थ असा शत्रु कोण बरें आहे ?" ४. असें कठोर भाषण करून तो राक्षसाधिपति श्रीमान् रावण बर्फासारिख्या श्वेतवर्ण प्रासादावर आरूढ झाला ५. ह्याप्रमाणें अनेक ताड उंच असलेल्या प्राकारावर रामाचें सैन्य पहाण्याकरितां त्या हेरांसहवर्तमान क्रोधानें ग्रस्त झालेला तो रावण आरूढ झाला असतां ६ तो समुद्र, पर्वत आणि वनें अवलोकन करीत करीत भूप्रदेश वानरांनीं अगदीं भरून गेलेला आहे असें त्यानें पाहिलें ७; आणि अपार व अजिंक्य असें तें वानरांचें प्रचंड सैन्य अवलोकन करून रावणराजा सारणाला ह्मणाला ८ "ह्यांपैकीं कोणते वानर मुख्य आहेत ? कोणते शूर आहेत ? कोणते महाबलाढ्य आहेत ? पुढें कोण जात असतात ? मोठा उत्साह भरून सर्व बाजूंनीं कोण हिंडत असतात ? ९ सुग्रीव कोणाचें ऐकितो ? सेनाधिपति कोण आहेत ? आणि त्याचप्रमाणें ह्या वानरांचें सामर्थ्य काय आहे ? हें सर्व, हे सारणा, तूं मला सांग " १०. ह्याप्रमाणें प्रश्न करणाऱ्या राक्षसाधिपति रावणाला मुख्य मुख्य वानर जाणणारा सारण त्यांतील मुख्य मुख्य वानर सांगूं लागला ११. ( तो ह्मणाला ) " लंकेकडे मुख करून जो हा वानर गर्जना करीत उभा राहिला आहे, शेंकडों हजारों सेनाधिपति ज्याच्या समोंवतीं उभे आहेत १२ आणि ज्याच्या प्रचंड घोषानें

सतोरणा । लङ्का प्रतिहता सर्वा सशैलवनकानना १३ सर्वशाखामृगेन्द्रस्य सुग्रीवस्य महात्मनः । बलाग्रे तिष्ठते वीरो नीलो नामैष यूथपः १४ बाहू प्रगृह्य यः पद्भ्यां महीं गच्छति वीर्यवान् । लङ्कामभिमुखः कोपादभीक्ष्णं च विजृम्भते १५ गिरिशृङ्गप्रतीकाशः पद्मकिंजल्कसंनिभः । स्फोटयत्यतिसंरब्धो लाङ्गूलं च पुनः पुनः १६ यस्य लाङ्गूलशब्देन स्वनन्ति प्रदिशो दश । एष वानरराजेन सुग्रीवेणाभिषेचितः १७ युवराजोऽङ्गदो नाम त्वामाह्वयति संयुगे । वालिनः सदृशः पुत्रः सुग्रीवस्य सदा प्रियः १८ राघवार्थे पराक्रान्तः शक्रार्थे वरुणो यथा । एतस्य सा मतिः सर्वा यद्दृष्टा जनकात्मजा १९ हनूमता वेगवता राघवस्य हितैषिणा । बहूनि वानरेन्द्राणामेष यूथानि वीर्यवान् २० परिगृह्याभियाति त्वां स्वेनानीकेन मर्दितुम् । अनुवालिसुतस्यापि बलेन महता वृतः २१ वीरस्तिष्ठति सङ्ग्रामे सेतुहेतुरयं नलः । ये तु विष्टभ्य गात्राणि क्ष्वेडयन्ति नदन्ति च २२ य एनमनुगच्छन्ति वीराश्चन्दनवासिनः । एषैवाशंसते

---

कोट, वेशी, पर्वत, वनें व उपवनें ह्यांसहवर्तमान सर्व लंका दणाणून गेली आहे १३. तो हा नीलनामक वीर सेनाधिपति सर्व वानरराज महात्म्या सुग्रीवाच्या सैन्याचे अग्रभागीं उभा आहे १४. हात वर धरून जो वीर्यवान् मनुष्याप्रमाणें पायांनींच पृथ्वीवर संचार करीत आहे, लंकेकडे तोंड करून क्रोधानें जो एकसारिखा जांभया देत आहे १५; आकारानें पर्वतशिखरासारिखा असून कमलकेंसराप्रमाणें ज्याची कांति आहे; अत्यंत क्षुब्ध होऊन जो वारंवार आपल्या पुच्छाचा ध्वनि करीत आहे १६ आणि ज्याच्या पुच्छध्वनीनें दशदिशा दणाणून गेल्या आहेत त्या ह्या अंगदनामक वानराला वानरराज सुग्रीवानें यौवराज्याचा अभिषेक केला आहे १७. वालीला अनुरूप असा हा त्याचा पुत्र आहे आणि हा सुग्रीवाला सर्वदां प्रिय असून संग्रामामध्यें तुला आह्वान करीत आहे १८. इंद्राकरितां पराक्रम करण्यास उद्युक्त झालेला वरुणच कीं काय अशारीतीनें रामाकरितां पराक्रम करण्यास हा उद्युक्त झाला आहे आणि रामाचें हित इच्छिणाऱ्या वेगवान् हनुमानानें सीतेला अवलोकन केलें हें सर्व ह्याच्याच बुद्धीचें फल आहे. वानराधिपतींचे अनेक कळप बरोबर घेऊन हा वीर्यवान् वानर स्वतःच्या सैन्यानें तुझा नाश करण्याकरितां तुझ्याकडे येत आहे आणि ह्या वालिपुत्र अंगदाच्या मागोमाग मोठें सैन्य बरोबर घेऊन १९,२०,२१ सेतुला कारणीभूत झालेला वीर नलही संग्रामामध्यें उभाच आहे. अवयव निश्चल ठेवून जे क्रीडा व गर्जना करीत आहेत २२ आणि

लङ्कां स्वेनानीकेन मर्दितुम् २३ श्वेतो रजतसंकाशश्चपलो भीमविक्रमः। बुद्धिमान्वानरः शूरस्त्रिषु लोकेषु विश्रुतः २४ तूर्णं सुग्रीवमागम्य पुनर्गच्छति वानरः। विभजन्वानरीं सेनामनीकानि प्रहर्षयन् २५ यः पुरा गोमतीतीरे रम्यं पर्येति पर्वतम्। नाम्ना संरोचनो नाम नानानगयुतो गिरिः २६ तत्र राज्यं प्रशास्त्येष कुमुदो नाम यूथपः। योसौ शतसहस्राणि सहर्षं परिकर्षति २७ यस्य वाला बहुव्यामा दीर्घलाङ्गूलमाश्रिताः। ताम्राः पीताः सिताः श्वेताः प्रकीर्णा घोरदर्शनाः २८ अदीनो वानरश्चण्डः सङ्ग्राममभिकाङ्क्षति। एषैवाशंसते लङ्कां स्वेनानीकेन मर्दितुम् २९ यस्त्वेष सिंहसंकाशः कपिलो दीर्घकेसरः। निभृतः प्रेक्षते लङ्कां दिधक्षन्निव चक्षुषा ३० विन्ध्यं कृष्णगिरिं सह्यं पर्वतं च सुदर्शनम्। राजन्सततमध्यास्ते स रम्भो नाम यूथपः॥ शतं शतसहस्राणां त्रिंशच्च हरिपुङ्गवाः ३१ यं यान्तं वानरा घोराश्चण्डाश्चण्डपराक्रमाः। परिवार्यानुग-

---

जे ह्या वानराच्या मागोमाग जात आहेत ते सर्वही वानर वीर असून चंदनवृक्षांवर वास्तव्य करणारे आहेत आणि हाच महापराक्रमी व रौप्यासारिख्या कांतीनें युक्त असलेला चपल श्वेत स्वतःच्या सैन्यानें लंकेचें मर्दन करून टाकण्याची इच्छा करीत आहे. हा शूर व बुद्धिमान् वानर त्रैलोक्यामध्यें विख्यात आहे २३, २४ आणि वानरसेना दुभाग करीत करीत व वानरगणांना हर्ष उत्पन्न करीत करीत ह्या वानर सत्वर सुग्रीवाकडे येऊन पुनरपि परत जात आहे २५. संरोचन हें ज्याला दुसरें नांव आहे असा, गोमतीचे तीरीं अनेक वृक्षांनीं युक्त असलेला जो रम्यनामक पर्वत त्याला पूर्वी जो प्रदक्षिणा करीत असे २६ आणि सांप्रतही तेथें जो राज्य करीत आहे तो हा कुमुदनामक सेनाधिपति होय. शेंकडों हजारों शत्रूंना हंसत हंसत जो एकदम ओढीत असतो, ज्याच्या दीर्घ पुच्छावरील केंस ताम्र, पीत व श्वेतवर्ण असून विस्तीर्णांत उग्र, अनेक वांवा लांब व पुच्छाला अतिशय चिकटून राहिलेले आहेत तो हा उदार वानर चंड संग्रामाची इच्छा करीत आहे इतकेंच नव्हे परंतु, स्वतःच्या सैन्यानें लंकेचा विध्वंस करण्याचीही ह्याची इच्छा आहे २७,२८,२९. पिंगटवर्ण, लांब लांब लंव आणि सिंहासारिखी आकृति ह्यांनीं युक्त असलेला जो हा वानर दृष्टीनें दग्ध करण्याच्या उद्देशानेंच कीं काय एकाग्रपणानें लंकेकडे पहात आहे ३० तो, हे राजा, रंभनामक सेनाधिपति असून नेहमीं विंध्य, कृष्णगिरि, सह्य आणि सुदर्शन ह्या पर्वतांवर वास्तव्य करीत असतो. एक कोटि तेहेतीस लक्ष प्रचंड व भयंकर पराक्रमी घोर वानरश्रेष्ठ त्याच्या बरोबर स्वसामर्थ्यानें लंकेचा विध्वंस

च्छन्ति लङ्कां मर्दितुमोजसा ३२ यस्तु कर्णौ विवृणुते जृम्भते च पुनः पुनः । न तु संविजते मृत्योर्न च सेनां प्रधावति ३३ प्रकम्पते च रोषेण तिर्यक् पुनरीक्षते । पश्य लाङ्गूलविक्षेपं क्ष्वेडत्येष महाबलः ३४ महौजसा वीतभयो रम्यं साल्वेयपर्वतम् । राजन्सततमध्यास्ते शरभो नाम यूथपः ३५ एतस्य बलिनः सर्वे विहारा नाम यूथपाः । राजञ्छतसहस्राणि चत्वारिंशत्तथैव च ३६ यस्तु मेघ इवाकाशं महानावृत्य तिष्ठति । मध्ये वानरवीराणां सुराणामिव वासवः ३७ भेरीणामिव संनादो यस्यैष श्रूयते महान् । घोषः शाखामृगेन्द्राणां सङ्ग्राममभिकाङ्क्षताम् ३८ एष पर्वतमध्यास्ते पारियात्रमनुत्तमम् । युद्धे दुष्प्रसहो नित्यं पनसो नाम यूथपः ३९ एनं शतसहस्राणां शतार्धं पर्युपासते । यूथपा यूथपश्रेष्ठं येषां यूथानि भागशः ४० यस्तु भीमां प्रवल्गन्तीं चमूं तिष्ठति शोभयन् । स्थितां तीरे समुद्रस्य द्वितीय इव सागरः ४१ एष दर्दुरसंकाशो विनतो नाम यूथपः । पिबंश्चरति यो वेणां नदीनामुत्तमां नदीम् ४२ षष्टिः

---

करण्याकरितां निघाले आहेत ३१, ३२. जो वारंवार कान उभारून जांभया देत आहे; जो मृत्यूचें भय बाळगीत नाहीं; सेनेवरही चाल करून येत नाहीं ३३ आणि क्रोधानें कंपित होत असून जो वारंवार इकडे तिकडे पहात आहे तो हा शरभनामक सेनाधिपति होय. हे राजा, हा महाबलाढ्य वानर इकडून तिकडे पुच्छविक्षेप करण्याचीच क्रीडा करीत आहे आणि बल मोठें असल्यामुळें निर्भयपणें हा रम्य साल्वेयपर्वतावर वास्तव्य करीत आहे ३४, ३५. हे राजा, एक लक्ष चाळीस हजार जे विहारनामक सेनाधिपति ते सर्वही ह्या बलाढ्य शरभाच्याच आज्ञेप्रमाणें वागणारे आहेत ३६. आकाश व्याप्त करून टाकणाऱ्या मोठ्या मेघांप्रमाणें जो भूप्रदेश व्याप्त करून राहिला आहे, देवांमध्यें श्रेष्ठ असलेल्या इंद्राप्रमाणें जो वानरवीरांमध्यें श्रेष्ठ आहे ३७, ज्याची प्रचंड गर्जना दुंदुभींच्या ध्वनीप्रमाणें कानांवर येत आहे आणि संग्रामाची इच्छा करणाऱ्या ज्याच्या आज्ञेंतील वानराधिपतींचा शब्द ऐकूं येत आहे ३८ तो हा पनसनामक सेनापति होय. हा पारियात्रनामक अनुपम पर्वतावर वास्तव्य करीत असतो आणि युद्धामध्यें शत्रूला सहन होण्यास हा नेहमींच फार कठीण जातो ३९. ज्यांच्या वेगळ्या वेगळ्या सेना आहेत असे पन्नास लक्ष सेनाधिपति ह्या श्रेष्ठ सेनाधिपतीची शुश्रूषा करीत असतात ४०. दुसरा सागरच कीं काय अशा रीतीनें समुद्रतीरावर गर्जना करीत स्थित असलेल्या प्रचंड सेनेला जो शोभा देत आहे ४१ आणि नद्यांमध्यें श्रेष्ठ नदी

शतसहस्राणि बलमस्य प्लवङ्गमाः । त्वामाह्वयति युद्धाय कथनो नाम वानरः ४३ विक्रान्ता बलवन्तश्च यथा यूथानि भागशः । यस्तु गैरिकवर्णाभं वपुः पुष्यति वानरः ४४ अवमत्य सदा सर्वान्वानरान्बलदर्पितः । गवयो नाम तेजस्वी त्वां क्रोधादभिवर्तते ४५ एनं शतसहस्राणि सप्ततिः पर्युपासते । एषैवाशंसते लङ्कां स्वेनानीकेन मर्दितुम् ४६ एते दुष्प्रसहा वीरा येषां सङ्ख्या न विद्यते । यूथपा यूथपश्रेष्ठास्तेषां यूथानि भागशः ४७ [ ९५१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षड्विंशः सर्गः ॥ २६ ॥

तांस्तु ते संप्रवक्ष्यामि प्रेक्षमाणस्य यूथपान् । राघवार्थे पराक्रान्ता ये न रक्षन्ति जीवितम् १ स्निग्धा यस्य बहुव्यामा दीर्घलाङ्गूलमाश्रिताः । ताम्राः पीताः सिताः श्वेताः प्रकीर्णा घोरकर्मणः २ प्रगृहीताः प्रकाशन्ते सूर्यस्येव मरीचयः । पृथिव्यां चानुकृष्यन्ते हरो नामैष वानरः ३ यं पृष्ठतोऽनुगच्छन्ति शतशोथ सहस्रशः । वृक्षानुद्यम्य सहसा लङ्कारोहणतत्परः ४

---

जी कृष्णवेणी तिचें उदक प्राशन करून जो रहात आहे तो हा आकारानें बेडकासारिखा असलेला विनतनामक सेनाधिपति होय ४२. ह्याच्या सैन्यामध्यें साठ लक्ष वानर आहेत. कथननामक वानर युद्धाकरितां तुला आह्वान करीत आहे ४३. ह्याचे सैनिक पराक्रमी व बलाढ्य आहेत आणि त्यांच्या हाताखालीं वेगळे वेगळे वानरगण आहेत. आरक्तवर्ण शरीर धारण करणारा आणि बलाचा गर्व झाला असल्यामुळें सर्व वानरांना सर्वदां तुच्छ मानून राहिलेला गवयनामक तेजस्वी वानर क्रोधानें तुझ्यावर चाल करून येत आहे ४४, ४५. ह्याच्या हाताखालीं एक लक्ष सत्तर हजार इतर सेनाधिपति आहेत आणि हा एकटाच स्वतःच्या सैन्यानें लंकेचा विध्वंस करण्याची इच्छा करीत आहे ४६. सारांश, सेनाधिपतींपैकीं मुख्य असलेले हे असंख्य वीर शत्रूला अतिशय दुःसह आहेत आणि त्यांच्या हाताखालीं वेगळीं वेगळीं सैन्यें आहेत, ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सव्विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २६ ॥

आतां जीवाकडे न पहातां रामाकरितां पराक्रम करणारे जे सेनापति आहेत ते सेना अवलोकन करीत असलेल्या तुला मी कथन करितों १. गुळगुळीत, अनेक वांव लांब, ताम्रवर्ण, कृष्णवर्ण, पीतवर्ण, श्वेतवर्ण व मिश्रवर्ण, पुच्छाबरोबर वर उचलले गेले असतां सूर्यकिरणांप्रमाणें चमकणारे आणि पुच्छाबरोबर पृथ्वीवरून फरफटले जाणारे असे केस ज्याच्या दीर्घ पुच्छावर आहेत तो हा हरनामक वानर होय २, ३.

यूथपा हरिराजस्य किङ्कराः समुपस्थिताः । नीलानिव महा-
मेघांस्तिष्ठतो यांस्तु पश्यसि ५ असिताञ्जनसंकाशान्युद्धे सत्यपराक्रमान् ।
असंख्येयाननिर्देश्यान्परं पारमिवोदधेः ६ पर्वतेषु च ये केचिद्विषयेषु
नदीषु च । एते त्वामभिवर्तन्ते राजन्नृक्षाः सुदारुणाः ७ एषां मध्ये
स्थितो राजा भीमाक्षो भीमदर्शनः । पर्जन्य इव जीमूतैः समन्तात्परि-
वारितः ८ ऋक्षवन्तं गिरिश्रेष्ठमध्यास्ते नर्मदां पिबन् । सर्वर्क्षाणामधिप-
तिर्धूम्रो नामैष यूथपः ९ यवीयानस्य तु भ्राता पश्यैनं पर्वतोपमम् ।
भ्रात्रा समानो रूपेण विशिष्टश्च पराक्रमे १० स एष जाम्बवान्नाम महा-
यूथपयूथपः । प्रशान्तो गुरुवर्ती च संप्रहारेष्वमर्षणः ११ एतेन साह्यं तु
महत्कृतं शक्रस्य धीमता । देवासुरे जाम्बवता लब्धाश्च बहवो वराः १२
आरुह्य पर्वताग्रेभ्यो महाभ्रविपुलाः शिलाः । मुञ्चन्ति विपुलाकारा न

---

ह्याच्या मागोमाग शेंकडों हजारों वानर येत आहेत आणि ते वृक्ष उगारून एकदम लंकेवर आरोहण करण्याविषयीं उत्सुक झालेले आहेत ४. नीलवर्ण प्रचंड मेघांप्रमाणें उभे असलेले जे तूं अवलोकन करीत आहेस ते हे वानरराज सुग्रीवाचे सेनापति व दास येथें प्राप्त झाले आहेत ५. हे सेनापति कज्जलाप्रमाणें कृष्णवर्ण आहेत; युद्धामध्यें ह्यांचा पराक्रम कधींही व्यर्थ जात नाहीं आणि समुद्राच्या प्रचंड तीरावरील वालुकेच्या कणांप्रमाणें ह्यांचें परिगणन अथवा नामनिर्देश करितां येणें शक्य नाहीं ६. हे राजा, पर्वत, देश आणि नद्या ह्यांचे ठिकाणीं जे कांहीं अति भयंकर ऋक्ष वास्तव्य करीत असतात ते हे तुझ्या अंगावर चालून येत आहेत ७; आणि सभोंवतीं मेघांनीं परिवेष्टित असलेला पर्जन्यच कीं काय असा भयंकर नेत्र व उग्र मुद्रा ह्यांनीं युक्त असलेला ह्यांचा राजा ह्यांच्यामध्यें उभा आहे ८. सारांश, नर्मदेचें उदक प्राशन करून पर्वतश्रेष्ठ ऋक्षवानावर वास्तव्य करणारा हा धूम्रनामक सेनापति सर्व ऋक्षांचा अधिपति होय ९. ह्याचा एक कनिष्ठ भ्राता आहे. त्या ह्या पर्वततुल्य भ्रात्याला तुह्मी अवलोकन करा. हा रूपानें आपल्या भ्रात्यासारिखाच असून पराक्रमामध्यें तर त्याच्याहीपेक्षां अधिक आहे १०. हा स्वभावानें शांत आहे; ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेप्रमाणें वागणारा आहे; युद्धामध्यें क्रुद्ध होऊन जाणारा आहे; मोठ्या मोठ्या सेनाधिपतींच्याही समुदायाचें हा रक्षण करणारा आहे आणि जांबवान् हें त्याचें नांव आहे ११. देवदैत्यांचें युद्ध चाललें असतांना ह्या बुद्धिमान् जांबवानानें इंद्राला मोठें साहाय्य करून पुष्कळ वरही मिळविलेले आहेत १२. असो. हे धिप्पाड वानर पर्वतशिखरावर आरोहण करीत असतात; तेथून मोठ्या मोठ्या मेघांसारिख्या प्रचंड शिला फेंकीत असतात

मृत्योरुद्विजन्ति च १३ राक्षसानां च सदृशाः पिशाचानां च रोमशाः ।
एतस्य सैन्या बहवो विचरन्त्यमितौजसः १४ य एनमभिसंरब्धं प्लवमान-
मवस्थितम् । प्रेक्षन्ते वानराः सर्वे स्थितं यूथपयूथपम् १५ एष राजन्सह-
स्राक्षं पर्युपास्ते हरीश्वरः । बलेन बलसंयुक्तो रम्भो नामैष यूथपः १६
यः स्थितं योजनं शैलं गच्छन्पार्श्वेन सेवते । ऊर्ध्वं तथैव कायेन गतः
प्राप्नोति योजनम् १७ यस्मात्तु परमं रूपं चतुष्पात्सु न विद्यते । श्रुतः
संनादनो नाम वानराणां पितामहः १८ येन युद्धं तदा दत्तं रणे शक्रस्य
धीमता । पराजयश्च न प्राप्तः सोयं यूथपयूथपः १९ यस्य विक्रममाणस्य शक्र-
स्येव पराक्रमः । एष गन्धर्वकन्यायामुत्पन्नः कृष्णवर्त्मना २० तदा देवासुरे
युद्धे साह्यार्थं त्रिदिवौकसाम् । यत्र वैश्रवणो राजा जम्बूमुपनिषेवते २१
यो राजा पर्वतेन्द्राणां बहुकिंनरसेविनाम् । विहारसुखदो नित्यं भ्रातुस्ते
राक्षसाधिप २२ तत्रैष रमते श्रीमान्बलवान्वानरोत्तमः । युद्धेष्वकत्थनो

---

आणि मृत्यूला मुळींच भीत नाहींत १३. ह्या वानरराजाचे महातेजस्वी व केसांनीं भरलेले असंख्य सैनिक ( क्रूरतेमध्यें ) राक्षसांची व पिशाचांची बरोबरी करणारे असून इकडे तिकडे संचार करीत आहेत १४. लीलेकरितां वारंवार क्षुब्ध होऊन उड्या टाकीत असलेल्या, पुन्हां पुन्हां स्तब्ध बसत असलेल्या आणि वारंवार उभा रहात असलेल्या ज्या ह्या वानरगणाधिपतींच्या समुदायाचेंही रक्षण करणाऱ्याकडे सर्वही वानर पहात आहेत १५ तो हा, हे राजा, वानरराज इंद्राची उपासना करीत आहे. ह्याचें नांव रंभ असून हा महाबलाढ्य आहे व सेनाधिपति आहे १६. एक योजन लांब असलेल्या पर्वताला जो जातां जातां स्पर्श करीत असतो आणि त्याचप्रमाणें एक योजनपर्यंत ह्याच्या शरीराची उंची असल्यामुळें चार कोस उंच असलेल्याही पदार्थाला जो जातां जातां स्पर्श करीत असतो १७; आणि ज्याच्याहून श्रेष्ठ रूप चतुष्पाद प्राण्यांमध्यें नाहीं तो हा सन्नादननामक वानरांचा पूर्वज प्रख्यात आहे १८. ज्या विचारी वानरानें त्यावेळीं संग्रामामध्यें इंद्राशीं युद्ध करूनही पराजय प्राप्त करून घेतला नाहीं तो हा सेनाधिपतींच्याही समूहाचें रक्षण करणारा सन्नादन होय १९. युद्ध करूं लागला असतां इंद्राप्रमाणें ज्याचा पराक्रम दृष्टोत्पत्तीस येतो तो हा गंधर्वकन्येचे ठिकाणीं देवदैत्ययुद्धप्रसंगीं देवांच्या साहाय्यार्थ अग्नीपासून उत्पन्न झाला आहे. ज्या पर्वतावर वैश्रवणराजा जंबूवृक्षाचा आश्रय करून राहिलेला असतो २०,२१ अनेक किन्नर ज्यांचे सेवक आहेत अशा पर्वताधिपतींचा जो राजा आहे आणि, हे राक्षसाधिपते, तुझ्या भ्रात्याला जो नित्य विहारसुख देणारा

नित्यं कथनो नाम यूथपः २३ वृतः कोटिसहस्रेण हरीणां समवस्थितः।
एषैवाशंसते लङ्कां स्वेनानीकेन मर्दितुम् २४ यो गङ्गामनुपर्येति त्रास-
यन्गजयूथपान् । हस्तिनां वानराणां च पूर्ववैरमनुस्मरन् २५ एष यूथ-
पतिर्नेता गर्जन्गिरिगुहाशयः । गजान्रोधयते वन्यानारुजंश्च महीरु-
हान् २६ हरीणां वाहिनीमुख्यो नदीं हैमवतीमनु । उशीरबीजमाश्रित्य
मन्दरं पर्वतोत्तमम् २७ रमते वानरश्रेष्ठो दिवि शक्र इव स्वयम् । एनं
शतसहस्राणां सहस्रमभिवर्तते २८ वीर्यविक्रमदृप्तानां नर्दतां बाहुशालि-
नाम् । स एष नेता चैतेषां वानराणां महात्मनाम् २९ स एष दुर्धरो
राजन्प्रमाथी नाम यूथपः । वातेनेवोद्धतं मेघं यमेनमनुपश्यसि ३०
अनीकमपि संरब्धं वानराणां तरस्विनाम् । उद्धूतमरुणाभासं पवनेन
समन्ततः ३१ विवर्तमानं बहुशो यत्रैतद्बहुलं रजः । एते सितमुखा घोरा
गोलाङ्गूला महाबलाः ३२ शतं शतसहस्राणि दृष्ट्वा वै सेतुबन्धनम् ।

---

आहे २२. त्या पर्वताचे ठिकाणीं श्रीमान्, बलवान्, व वानरांमध्यें उत्कृष्ट असून युद्धसंबंधानें कधींही आत्मप्रशंसा न करणारा कथननामक सेनापति वास्तव्य करीत असतो २३. स्वकार्याविषयीं दक्ष असलेला हा कथन एक खर्व वानरांनीं परिवेष्टित आहे आणि स्वतःच्याच सैन्यानें लंकेचा विध्वंस करण्याचें हा मनामध्यें आणीत आहे २४. गज आणि वानर ह्यांमध्यें पूर्वी पडलेलें वैर आठवून गजेंद्रांना त्रास देण्याकरितां जो गंगेसमीप फिरत असतो २५ तो हा पर्वताच्या गुहेमध्यें वास्तव्य करणारा, प्रभु व सेनापति प्रमाथी होय. हा वृक्ष मोडून गर्जना करीत करीत वन्य गजांना प्रतिबंध करीत असतो २६. हिमालयावरून वहात येणाऱ्या गंगानदीसमीप असलेला व उशीरबीज ह्या नांवानें प्रसिद्ध असलेला जो मंदरनामक श्रेष्ठ पर्वत, त्याच्या आश्रयाला राहून वानरसैन्यांतील मुख्य २७ व वानरश्रेष्ठ असा हा प्रमाथी स्वर्गांत रममाण होणाऱ्या प्रत्यक्ष इंद्राप्रमाणें रममाण होत असतो आणि दहा कोटी वानर ह्याच्या बरोबर असतात २८. वीर्य व पराक्रम ह्यांच्या योगानें धुंद झालेले आणि बाहुबलानें शोभत असून गर्जना करीत असलेले जे हे महात्मे वानर त्यांचा हा प्रभु आहे २९. सारांश, हे राजा, वायूनें उडविलेल्या मेघाप्रमाणें ज्याला तूं अवलोकन करीत आहेस तो हा शत्रूंच्या तावडींत सांपडण्यास अशक्य असलेला प्रमाथीनामक सेनापति होय ३०. तात्पर्य, बलाढ्य वानरांची सेना ज्याच्या समीप क्षुब्ध होऊन गेलेली आहे आणि ज्याच्या सैन्यामुळें उडालेली धूम्रवर्ण विपुल धूळ वायूच्या योगानें सभोंवतीं वारंवार उडत असलेली दृष्टोत्पत्तीस येत आहे तो हा प्रमाथी होय.

गोलाङ्गूलं महाराज गवाक्षं नाम यूथपम् ३३ परिवार्याभिनर्दन्ते लङ्कां मर्दितुमोजसा ३४ भ्रमराचरिता यत्र सर्वकालफलद्रुमाः । यं सूर्यस्तुल्यवर्णाभमनुपर्येति पर्वतम् ३५ यस्य भासा सदा भान्ति तद्वर्णा मृगपक्षिणः । यस्य प्रस्थं महात्मानो न त्यजन्ति महर्षयः ३६ सर्वकामफला वृक्षाः सर्वे फलसमन्विताः । मधूनि च महार्हाणि यस्मिन्पर्वतसत्तमे ३७ तत्रैष रमते राजन्रम्ये काञ्चनपर्वते । मुख्यो वानरमुख्यानां केसरी नाम यूथपः ३८ षष्टिर्गिरिसहस्राणि रम्याः काञ्चनपर्वताः । तेषां मध्ये गिरिवरस्त्वमिवानघ रक्षसाम् ३९ तत्रैके कपिलाः श्वेतास्ताम्रास्या मधुपिङ्गलाः । निवसन्त्यन्तिमगिरौ तीक्ष्णदंष्ट्रा नखायुधाः ४० सिंहा इव चतुर्दंष्ट्रा व्याघ्रा इव दुरासदाः । सर्वे वैश्वानरसमा ज्वलदाशीविषोपमाः ४१ सुदीर्घाञ्चितलाङ्गूला मत्तमातङ्गसंनिभाः।महापर्वतसंकाशा महाजीमूतनिःस्वनाः ४२

---

सेतुबंधनामध्यें नलाला साहाय्य करणारा गवाक्षनामक गोलांगूलजातीय सेनापति दृष्टी पडतांक्षणीं, हे महाराज, श्वेतवर्ण मुखानें युक्त असलेले हे घोर व महाबलाढ्य एक कोटी गोलांगूल त्याला वेढा देऊन स्वसामर्थ्यानें लंकेचा विध्वंस करून टाकण्याकरितां गर्जना करीत आहेत ३१, ३२, ३३, ३४. सर्वदां फलें व भ्रमर ह्यांनीं युक्त असलेले वृक्ष ज्याच्यावर आहेत, कांतीनें स्वतःचीं बरोबरी करणाऱ्या ज्या पर्वताभोंवतीं सूर्य फिरत असतो ३५, ज्याच्या तेजाच्या योगानें तेथील पशुपक्षीही त्याच वर्णानें युक्त असल्यासारिखे सर्वदां दिसत असतात, ज्याचें शिखर महात्मे महर्षि सोडून जात नाहींत ३६, ज्याच्यावरील सर्वही फलवृक्ष हवा तो इष्ट पदार्थ देणारे आहेत आणि ज्या श्रेष्ठ पर्वतावर उत्कृष्ट उत्कृष्ट मध आहेत ३७ त्या महामेरुसंज्ञक रमणीय सुवर्ण पर्वतावर, हे राजा, वानरश्रेष्ठांतील मुख्य व सेनापति केसरी वास्तव्य करीत असतो ३८. रमणीय सुवर्णपर्वत साठ हजार आहेत व ज्याप्रमाणें राक्षसांमध्यें, हे निष्पापा, तूं श्रेष्ठ आहेस त्याप्रमाणें त्यांमध्यें ( सावर्णिमेरु ह्मणून ) एक श्रेष्ठ पर्वत आहे ३९. त्या पर्वतावर कांहीं कपिलवर्ण, कांहीं श्वेतवर्ण, कांहीं ताम्रमुख आणि कांहीं मधुतुल्य पिंगट वर्णाचे वानर वास्तव्य करीत आहेत. त्यांच्या दंष्ट्रा तीक्ष्ण असून नखें हींच त्यांचीं आयुधें आहेत ४०; सिंहांसारिख्या चार चार दंष्ट्रांनीं ते युक्त आहेत; व्याघ्रांप्रमाणें त्यांच्या समीप जाणेंही अशक्य आहे; सर्वही अग्नीसारिखे तेजस्वी असून तीक्ष्ण भुजंगांप्रमाणें क्रूर आहेत ४१; त्यांचीं पुच्छें फारच दीर्घ व रोमांचयुक्त आहेत; मत्त गजांप्रमाणें त्यांची मुद्रा आहे; मोठ्या मोठ्या पर्वतासारिखीं त्यांचीं शरीरें आहेत; प्रचंड मेघाप्रमाणें ते गर्जना करणारे आहेत ४२; त्यांचे

वृत्तपिङ्गलनेत्रा हि महाभीमगतिस्वनाः । मर्दयन्तीव ते सर्वे तस्थुर्लङ्कां समीक्ष्य ते ४३ एष चैषामधिपतिर्मध्ये तिष्ठति वीर्यवान् । जयार्थी नित्यमादित्यमुपतिष्ठति वीर्यवान् ४४ नाम्ना पृथिव्यां विख्यातो राजञ्शतबलीति यः । एषैवाशंसते लङ्कां स्वेनानीकेन मर्दितुम् ४५ विक्रान्तो बलवाञ्छूरः पौरुषे स्वे व्यवस्थितः । रामप्रियार्थं प्राणानां दयां न कुरुते हरिः ४६ गजो गवाक्षो गवयो नलो नीलश्च वानरः । एकैकमेव योधानां कोटिभिर्दशभिर्वृतः ४७ तथान्ये वानरश्रेष्ठा विन्ध्यपर्वतवासिनः । न शक्यन्ते बहुत्वात्तु संख्यातुं लघुविक्रमाः ४८ सर्वे महाराज महाप्रभावाः सर्वे महाशैलनिकाशकायाः । सर्वे समर्थाः पृथिवीं क्षणेन कर्तुं प्रविध्वस्तविकीर्णशैलाम् ४९ [ १००० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तविंशः सर्गः ॥ २७ ॥

सारणस्य वचः श्रुत्वा रावणं राक्षमाधिपम् । बलमादिश्य तत्सर्वं

---

नेत्र वर्तुलाकार व पिंगटवर्णाचे आहेत; त्यांची गति व गर्जना ह्या फारच भयंकर आहेत आणि ते सर्वही लंका अवलोकन करून जसें कांहीं तिचें मर्दनच करून टाकण्याच्या बेतांत आहेत कीं काय अशारीतीनें उभे राहिले आहेत ४३. हा ह्यांचा वीर्यवान् अधिपति मध्यें उभा आहे; जयप्राप्तीकरितां हा वीर्यवान् वानर नित्य सूर्याची सेवा करीत असतो ४४; हे राजा, पृथ्वीमध्यें शतबली ह्या नांवानें हा प्रख्यात आहे आणि स्वतःच्याच सैन्यानें लंकेचा विध्वंस करून टाकण्याची ह्याची इच्छा आहे ४५. हा वानर पराक्रमी, बलाढ्य व शूर असून स्वतःच्याच पराक्रमावर अवलंबून रहाणारा आहे आणि रामाचें प्रिय करण्याकरितां प्राणाचीही पर्वा करणारा नाहीं ४६. गज, गवाक्ष, गवय, नल आणि नील ह्यांपैकीं प्रत्येक वानर दहा दहा कोट योद्ध्यांनीं परिवेष्टिलेला आहे ४७ व त्याचप्रमाणें विंध्यपर्वतावर वास्तव्य करणारे आणि शीघ्र पराक्रम करणारे असे इतरही वानरश्रेष्ठ आहेत; परंतु, ते पुष्कळच असल्यामुळें त्यांचें परिगणन करितां येणें शक्य नाहीं ४८. सारांश, हे महाराज, सर्वही महापराक्रमी आहेत; सर्वांचींही शरीरें मोठ्या मोठ्या पर्वताप्रमाणें आहेत आणि सर्वही एका क्षणामध्यें पृथ्वीवरील पर्वतांचा विध्वंस करून त्यांना इकडून तिकडे फेंकून देण्यास समर्थ आहेत ४९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २७ ॥

ह्याप्रमाणें सर्व सैन्याविषयीं वृत्तांत सांगून स्वस्थ बसलेल्या सारणाचें भाषण ऐकून

शुको वाक्यमथाब्रवीत् १ स्थितान्पश्यसि यानेतान्मत्तानिव महाद्विपान् । न्यग्रोधानिव गाङ्गेयान्सालान्हैमवतानिव २ एते दुष्प्रसहा राजन्बलिनः कामरूपिणः । दैत्यदानवसंकाशा युद्धे देवपराक्रमाः ३ एषां कोटिसहस्राणि नव पञ्च च सप्त च । तथा शङ्कुसहस्राणि तथा वृन्दशतानि च ४ एते सुग्रीवसचिवाः किष्किन्धानिलयाः सदा । हरयो देवगन्धर्वैरुत्पन्नाः कामरूपिणः ५ यौ तौ पश्यसि तिष्ठन्तौ समानौ देवरूपिणौ । मैन्दश्च द्विविदश्चैव ताभ्यां नास्ति समो युधि ६ ब्रह्मणा समनुज्ञाता अमृतप्राशिनावुभौ । आशंसेते यथा लङ्कामेतौ मर्दितुमोजसा ७ यं तु पश्यसि तिष्ठन्तं प्रभिन्नमिव कुञ्जरम् । यो बलात्क्षोभयेत्क्रुद्धः समुद्रमपि वानरः ८ एषोऽभिगन्ता लङ्कायां वैदेह्यास्तव च प्रभो । एनं पश्य पुरा दृष्टं वानरं पुनरागतम् ९ ज्येष्ठः केसरिणः पुत्रो वातात्मज इति श्रुतः । हनूमानिति विख्यातो लङ्घितो येन सागरः १० कामरूपो हरिश्रेष्ठो बलरूपसमन्वितः । अनिवार्यगतिश्चैव यथा सततगः प्रभुः ११ उद्यन्तं भास्करं दृष्ट्वा बालः

---

केल्यावर राक्षसाधिपति रावणाला शुक ह्मणाला १ " मोठे मोठे मत्त गज, गंगेच्या तीरावरील वटवृक्ष अथवा हिमालयावरील सालवृक्ष ह्यांप्रमाणें उभे असलेले जे हे तूं अवलोकन करीत आहेस २ ते हे वानर, हे राजा, बलाढ्य, दुःसह, यथेष्ट रूप धारण करणारे, देवतुल्य पराक्रमी आणि युद्धामध्यें दैत्यदानवांची बरोबरी करणारे आहेत ३. नऊ हजार कोट, पांच हजार शंकु आणि सातशें वृंद ४ इतके किष्किंधानगरीमध्यें सर्वदा वास्तव्य करणारे वानर सुग्रीवाचे सचिव आहेत; आणि ते सर्वही देवगंधर्वांपासून उत्पन्न झालेले असून यथेष्ट रूप धारण करणारे आहेत ५. देवतुल्य रूप धारण करणारे आणि एकसारिखे असे जे उभे असलेले तूं अवलोकन करीत आहेस ते मैंद व द्विविद असून युद्धामध्यें त्यांची बरोबरी करणारा कोणीही नाहीं ६. ब्रह्मदेवाच्या अनुज्ञेनें उभयतांनींही अमृतप्राशन केलेलें आहे आणि स्वसामर्थ्यानें लंकेचें मर्दन करून टाकण्याची ह्यांची इच्छा आहे ७. मदमत्त गजाप्रमाणें उभा असलेला जो तुझ्या दृष्टीं पडत आहे आणि जो वानर क्रुद्ध झाला असतां बलात्कारानें समुद्रही क्षुब्ध करून टाकण्यास समर्थ आहे ८ तोच हा, हे प्रभो, लंकेमध्यें सीतेकडे व तुझ्याकडे येणारा वानर होय. पूर्वी दृष्टोत्पत्तीस आलेल्या आणि सांप्रत पुनरपि आलेल्या ह्या वानराला तूं अवलोकन कर ९. हा केसरीचा ज्येष्ठ पुत्र वायुपुत्र ह्मणून प्रसिद्ध आहे; हनुमान् ह्मणून हा विख्यात आहे आणि ह्यानेंच समुद्राचें उल्लंघन केलेलें आहे १०. बल व रूप ह्यांनीं युक्त असलेला

किल बुभुक्षितः । त्रियोजनसहस्रं तु अध्वानमवतीर्य हि १२ आदित्य-
माहरिष्यामि न मे क्षुत्प्रतियास्यति । इति निश्चित्य मनसा पुप्लुवे बल-
दर्पितः १३ अनाधृष्यतमं देवमपि देवर्षिराक्षसैः । अनासाद्यैव पतितो
भास्करोदयने गिरौ १४ पतितस्य कपेरस्य हनुरेका शिलातले ।
किंचिद्भिन्ना दृढहनुर्हनूमानेष तेन वै १५ सत्यमागमयोगेन ममैष
विदितो हरिः । नास्य शक्यं बलं रूपं प्रभावो वानुभाषितुम् ॥
एष आशंसते लङ्कामेको मथितुमोजसा १६ येन जाज्वल्यतेऽसौ वै
धूमकेतुस्तवाद्य वै । लङ्कायां निहितश्चापि कथं विस्मरसे कपिम् १७
यस्यैषोऽनन्तरः शूरः श्यामः पद्मनिभेक्षणः । इक्ष्वाकूणामतिरथो लोके
विश्रुतपौरुषः १८ यस्मिन्न चलते धर्मो यो धर्मं नातिवर्तते । यो ब्राह्म-
मस्त्रं वेदांश्च वेद वेदविदां वरः १९ यो भिन्द्याद्गगनं बाणैर्मेदिनीं वापि
दारयेत् । यस्य मृत्योरिव क्रोधः शक्रस्येव पराक्रमः २० यस्य भार्या

---

हा वानरश्रेष्ठ यथेष्ट रूप धारण करणारा असून प्रभु वायूप्रमाणें ह्याच्या गतीला कोठेंही विरोध होत नाहीं ११. हा बाल असतांना एकदां ह्याला क्षुधा लागली असतां "( भूलोकावरील पदार्थांनीं ) आपली क्षुधा शमन व्हावयाची नाहीं; ह्यास्तव, तीन हजार योजनें मार्ग ओलांडून मी सूर्याला घेऊन येईन" असा मनामध्यें निश्चय करून सामर्थ्याचा गर्व झालेल्या ह्या वानरानें उड्डाण केलें १२, १३; परंतु, देव, ऋषि आणि राक्षस ह्यांनाही ज्याच्या समोर मुळींच जातां येत नाहीं त्या सूर्यासमीप न जातांच तो उदयाचलपर्वतावर पडला १४. तेव्हां शिलातलावर पडलेल्या ह्या वानराची हनु किंचित्‌श फुटली; ह्मणून हा दृढहनु वानर हनुमान् ह्या नांवानें प्रसिद्ध झाला १५. सारांश. हनुमान् हें ह्याचें नांव पडण्याला जो पूर्वीचा वृत्तांत कारण झाला आहे त्यासहवर्तमान हा वानर मला खरोखर विदित आहे. ह्याच्या बलाचें, रूपाचें अथवा प्रभावाचें वर्णन करितां येणें शक्य नाहीं हा एकटाच स्वसामर्थ्यानें लंकेचा विध्वंस करून टाकण्याची इच्छा करीत आहे १६. ज्यानें तुझ्या लंकेवर ठेविलेला अग्नि अद्यापि एकसारिखा जळत आहे त्या कपीचें तुला विस्मरण कसें पडेल ? १७. त्या हनुमानाच्या समीपच श्यामवर्ण आणि कमलपत्रासारिख्या विस्तीर्ण नेत्रांनीं युक्त असा जो शूर पुरुष आहे तो इक्ष्वाकुवंशजांतील अतिरथी असून जगतामध्यें पराक्रमाविषयीं प्रख्यात आहे १८. सारांश, ज्याने ठिकाणीं धर्म अस्थिर होत नाहीं; जो धर्माचें अतिक्रमण करीत नाहीं; जो वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असून ब्रह्मास्त्र व वेद जाणीत आहे १९; बाणांच्या योगानें गगनमंडल भेदून टाकण्यास अथवा पृथ्वी

जनस्थानात्सीता चापि हृता त्वया । स एष रामस्त्वां राजन्योद्धुं सम-
भिवर्तते २१ यस्यैष दक्षिणे पार्श्वे शुद्धजाम्बूनदप्रभः । विशालवक्षास्ता-
म्राक्षो नीलकुञ्चितमूर्धजः २२ एषो हि लक्ष्मणो नाम भ्रातुः प्रियहिते
रतः । नये युद्धे च कुशलः सर्वशस्त्रभृतां वरः २३ अमर्षी दुर्जयो जेता
विक्रान्तश्च जयी बली । रामस्य दक्षिणो बाहुर्नित्यं प्राणो बहिश्चरः २४
न ह्येष राघवस्यार्थे जीवितं परिरक्षति । एषैवाशंसते युद्धे निहन्तुं सर्वरा-
क्षसान् २५ यस्य सव्यमसौ पक्षं रामस्याश्रित्य तिष्ठति । रक्षोगणपरि-
क्षिप्तो राजा ह्येष बिभीषणः २६ श्रीमता राजराजेन लङ्कायामभिषेचितः ।
त्वामसौ प्रतिसंरब्धो युद्धायैषोभिवर्तते २७ यं तु पश्यसि तिष्ठन्तं मध्ये
गिरिमिवाचलम् । सर्वशाखामृगेन्द्राणां भर्तारममितौजसम् २८ तेजसा
यशसा बुद्ध्या बलेनाभिजनेन च । यः कपीनतिबभ्राज हिमवानिव
पर्वतः २९ किष्किन्धां यः समध्यास्ते दुर्गां सगहनद्रुमाम् । दुर्गां

---

विदीर्ण करून टाकण्यास जो समर्थ आहे; ज्याचा क्रोध मृत्यूप्रमाणें असून पराक्रम इंद्राप्रमाणें आहे २० आणि ज्याची भार्या सीता जनस्थानापासून तूं हरणही करून आणिली आहेस तो हा राम, हे राजा, युद्ध करण्याकरितां तुझ्यावर चाल करून येत आहे २१. रामाच्या उजव्या अंगाला जो उभा आहे; शुद्ध सुवर्णाप्रमाणें ज्याची कांति आहे; ज्याचें वक्षस्थल विशाल आहे; ज्याचे नेत्र आरक्तवर्ण आहेत आणि ज्याचे केश नीलवर्ण असून कुरळे आहेत २२ तो हा लक्ष्मणनामक रामाचा भ्राता होय. हा भ्रात्याचें प्रिय व हित करण्याविषयीं तत्पर असतो. राजनीति आणि युद्ध ह्या दोहोंमध्येंही हा कुशल आहे; शस्त्रधारण करणाऱ्या सर्वांमध्यें हा कुशल आहे २३; शत्रूचा अपराध ह्याला सहन होत नाहीं; हा पराक्रमी, विजयशील, बलाढ्य, अजिंक्य आणि शत्रूंना जिंकणारा आहे व रामाचा उजवा हात असून शरीराबाहेर नित्य संचार करणारा जसा कांहीं बाह्य प्राणच आहे २४. रामाकरितां हा जीवाची मुळींच पर्वा धरून नाहीं व हाच युद्धामध्यें सर्व राक्षसांचा वध करण्याची इच्छा करीत आहे २५. रामाच्या डाव्या बाजूला राक्षसगणासहवर्तमान जो उभा आहे तो हा राजा बिभीषण होय २६. राजाधिराज श्रीमान् रामचंद्रानें लंकेचा राजा ह्मणून ह्याला अभिषेक केला आहे आणि हा क्षुब्ध होऊन तुझ्यावर चालून येत आहे २७. सर्व वानरराजांचा अधिपति असा जो अतिबलाढ्य आणि पर्वताप्रमाणें अचल असा मध्यें उभा असलेला तूं अवलोकन करीत आहेस २८; पर्वतांना मागें टाकणाऱ्या हिमालयपर्वताप्रमाणें तेज, यश, बुद्धि, बल आणि कुल ह्यांच्या योगानें ज्यानें इतर वानरांना मागें टाकिलें आहे २९;

पर्वतदुर्गम्यां प्रधानैः सह यूथपैः ३० यस्यैषा काञ्चनी माला शोभते शतपुष्करा । कान्ता देवमनुष्याणां यस्यां लक्ष्मीः प्रतिष्ठिता ३१ एतां मालां च तारां च कपिराज्यं च शाश्वतम् । सुग्रीवो वालिनं हत्वा रामेण प्रतिपादितः ३२ शतं शतसहस्राणां कोटिमाहुर्मनीषिणः । शतं कोटिसहस्राणां शङ्कुरित्यभिधीयते ३३ शतं शङ्कुसहस्राणां महाशङ्कुरिति स्मृतः । महाशङ्कुसहस्राणां शतं वृन्दमिहोच्यते ३४ शतं वृन्दसहस्राणां महावृन्दमिति स्मृतम् । महावृन्दसहस्राणां शतं पद्ममिहोच्यते ३५ शतं पद्मसहस्राणां महापद्ममिति स्मृतम् । महापद्मसहस्राणां शतं खर्वमिहोच्यते ३६ शतं खर्वसहस्राणां समुद्रमभिधीयते । शतं समुद्रसाहस्रं महौघमिति विश्रुतम् ३७ एवं कोटिसहस्रेण शङ्कूनां च शतेन च । महाशङ्कुसहस्रेण तथा वृन्दशतेन च ३८ महावृन्दसहस्रेण तथा पद्मशतेन च । महापद्मसहस्रेण तथा खर्वशतेन च ३९ समुद्रेण च तेनैव महौघेन तथैव च । एष कोटीमहौघेन समुद्रसदृशेन च ४० विभीषणेन वीरेण सचिवैः परिवारितः । सुग्रीवो वानरेन्द्रस्त्वां युद्धार्थमनुवर्तते ४१ महाबलवृतो नित्यं महाबलपराक्रमः ४२ इमां महाराज समीक्ष्य वाहिनीमुपस्थितां

---

अरण्यें व वृक्ष ह्यांनीं आणि पर्वतांनीं युक्त असल्यामुळें दुर्गम झालेल्या किष्किंधा नगरीमध्यें जो सेनापति व प्रधान ह्यांसहवर्तमान राज्य करीत आहे ३०. देव आणि मानव ह्यांना इष्ट असलेली, लक्ष्मीनें जिचा आश्रय केलेला आहे अशी ही शंभर कमलांनीं युक्त असलेली सुवर्णमाला ज्याच्या कंठामध्यें झळकत आहे ३१, तो हा सुग्रीव असून रामानें वालीचा वध करून ही माला, तारा व अक्षय्य कपिराज्य हीं त्याच्या स्वाधीन केलीं आहेत ३२. ज्ञानी लोक शंभर लक्षांना एक कोटि असें ह्मणत असतात आणि एक लक्ष कोटींना शंकु असें ह्मणत असतात ३३. एक लक्ष शंकूंना महाशंकु असें ह्मणतात; एक लक्ष महाशंकूंना वृंद असें ह्मणतात ३४; एक लक्ष वृंदांना महावृंद असें ह्मणतात; एक लक्ष महावृंदांना पद्म असें ह्मणतात ३५; एक लक्ष पद्मांना महापद्म असें ह्मणतात ; एक लक्ष महापद्मांना खर्व असें ह्मणतात ३६; एक लक्ष खर्वांना समुद्र असें ह्मणतात आणि एक लक्ष समुद्रांना महौघ असें ह्मणतात ३७. ह्याप्रमाणें सहस्र कोटि, शंभर शंकु, सहस्र महाशंकु, शंभर वृंद ३८, सहस्र महावृंद, शंभर पद्म, सहस्र महापद्म, शंभर खर्व ३९, समुद्र, महौघ आणि एक कोटि महौघ असें सागरतुल्य सैन्य ४०, वीर बिभीषण व सचिव ह्यांनीं परिवेष्टित असलेला वानरराज सुग्रीव युद्धाकरितां तुझ्याकडे येत आहे ४१.

प्रज्वलितग्रहोपमाम् । ततः प्रयत्नः परमो विधीयतां यथा जयः स्यान्न परैः पराभवः ४३ [१०४३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टाविंशः सर्गः ॥ २८ ॥

शुकेन तु समादिष्टान्दृष्ट्वा स हरियूथपान् । लक्ष्मणं च महावीर्यं भुजं रामस्य दक्षिणम् १ समीपस्थं च रामस्य भ्रातरं च विभीषणम् । सर्ववानरराजं च सुग्रीवं भीमविक्रमम् २ अङ्गदं चापि बलिनं वज्रहस्तात्मजात्मजम् । हनूमन्तं च विक्रान्तं जाम्बवन्तं च दुर्जयम् ३ सुषेणं कुमुदं नीलं नलं च प्लवगर्षभम् । गजं गवाक्षं शरभं मैन्दं च द्विविदं तथा ४ किंचिदाविग्नहृदयो जातक्रोधश्च रावणः । भर्त्सयामास तौ वीरौ कथान्ते शुकसारणौ ५ अधोमुखौ तौ प्रणतावब्रवीच्छुकसारणौ । रोषगद्गदया वाचा संरब्धं परुषं तथा ६ न तावत्सदृशं नाम सचिवैरुपजीविभिः । विप्रियं नृपतेर्वक्तुं निग्रहे प्रग्रहे प्रभोः ७ रिपूणां प्रतिकूलानां युद्धार्थमभिवर्तताम् । उभाभ्यां सदृशं नाम वक्तुमप्रस्तवे स्तवम् ८ आचार्या गुरवो वृद्धा वृथा वां पर्युपासिताः । सारं यद्राजशास्त्राणाम-

---

तो मोठ्या सैन्यानें परिवेष्टित असून त्याचें बल व पराक्रम हींही मोठीं आहेत ४२. हे महाराजा, प्रज्वलित ग्रहच कीं काय अशारीतीची ही प्राप्त झालेली सेना अवलोकन करून आपण शत्रूंच्या हातून पराभव न होतां जय प्राप्त व्हावा एतदर्थ उत्कृष्ट यत्न केला पाहिजे ४३. ह्याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २८ ॥

शुकानें सांगितलेले वानरसेनाधिपति, रामाचा उजवा हातच कीं काय असा महावीर्यवान् लक्ष्मण, रामाच्या समीप असलेला भ्राता बिभीषण, भयंकर पराक्रमी व सर्व वानरांचा अधिपति सुग्रीव, इंद्रपुत्राचा पुत्र बलाढ्य अंगद, पराक्रमी हनुमान्, अजिंक्य जांबवान्, सुषेण, कुमुद, नील, वानरश्रेष्ठ नल, गज, गवाक्ष, शरभ, मंद आणि द्विविद, ह्यांना अवलोकन करून १, २, ३, ४ रावण मनामध्यें उद्विग्न झाला; क्रुद्ध होऊन त्यांचें भाषण संपल्यावर त्या वीर शुकसारणांची निर्भर्त्सना करूं लागला ५ आणि नम्र होऊन खालीं मान घातलेल्या त्या शुकसारणांना रागारागानें कठोर शब्दांनीं व क्रोधामुळें गद्गदस्वरयुक्त झालेल्या वाणीनें तो म्हणाला ६ " निग्रहानुग्रह करण्यास समर्थ असलेल्या राजाचे मनाविरुद्ध उपजीविकेकरितां त्याच्यावर अवलंबून रहाणाऱ्या त्याच्या मंत्र्यांनीं भाषण करणें योग्य नाहीं ७. प्रतिकूल शत्रु युद्धाकरितां येत असतांना विचारिल्याशिवाय त्याचें स्तवन करणें तुम्हां उभयतांनाहीं योग्य आहे काय ? ८,

नुजीव्यं न गृह्यते ९ गृहीतो वा न विज्ञातो भारोज्ञानस्य वाह्यते । ईदृशैः सचिवैर्युक्तो मूर्खैर्दिष्ट्या धराम्यहम् १० किं नु मृत्योर्भयं नास्ति मां वक्तुं परुषं वचः । यस्य मे शासतो जिह्वा प्रयच्छति शुभाशुभम् ११ अप्येव दहनं स्पृष्ट्वा वने तिष्ठन्ति पादपाः । राजदण्डपरामृष्टास्तिष्ठन्ते नापराधिनः १२ हन्यामहं त्विमौ पापौ शत्रुपक्षप्रशंसिनौ । यदि पूर्वोपकारैर्मे क्रोधो न मृदुतां व्रजेत् १३ अपध्वंसत नश्यध्वं संनिकर्षादितो मम । न हि वां हन्तुमिच्छामि स्मराम्युपकृतानि वाम् ॥ हतावेव कृतघ्नौ द्वौ मयि स्नेहपराङ्मुखौ १४ एवमुक्त्वा तु सव्रीडौ तौ दृष्ट्वा शुकसारणौ । रावणं जयशब्देन प्रतिनन्द्याभिनिःसृतौ १५ अब्रवीच्च दशग्रीवः समीपस्थं महोदरम् । उपस्थापय मे शीघ्रं चारानिति निशाचरः १६ महोदरस्तथोक्तस्तु शीघ्रमाज्ञापयच्चरान् १७ ततश्चाराः संत्वरिताः प्राप्ताः पार्थिवशासनात् । उपस्थिताः

---

अरे, राजनीतींतील सेवकांना उपयुक्त असं तत्त्व तुह्मीं ग्रहण केलें नाहीं ह्यावरून आचार्य, गुरु, आणि वृद्ध ह्यांची तुह्मीं केलेली शुश्रूषा व्यर्थ झाली आहे असें दिसतें ९. अथवा राजनीतींतील तत्त्व तुह्मांला समजलें असूनही तुह्मी तें विसरून गेलां असाल. तुह्मी अज्ञानाचाच भार वहाणारे आहांत. अशाप्रकारचे मूर्ख मंत्री असतांनाही मी राज्यावर अधिकार चालवीत आहें हें मोठें सुदैवच ह्मणावयाचें १०. अरे, अधिकार चालविणाऱ्या माझ्या जिव्हेच्या स्वाधीन तुमचें बरेंवाईट करण्याचें असतांना माझ्याशीं कठोर भाषण करण्यास तुह्मांला मृत्यूचें भय वाटत नाहीं कीं काय? ११. अरे, अग्नीचा स्पर्श झाला असतां वनांतील वृक्ष कदाचित् कायम राहतात; परंतु, राजाच्या क्रोधाचे तावडींत सांपडलेले अपराधी शिल्लक रहात नाहींत १२. ह्याच्या हातून पूर्वी घडलेल्या उपकारांमुळें माझ्या क्रोधानें जर सौम्य रूपाचें अवलंबन केलें नसतें तर शत्रुपक्षाची प्रशंसा करणाऱ्या ह्या दुष्टांचा मीं वधच केला असता १३. पुनरपि माझ्या सभेमध्यें तुह्मी प्रवेश करूं नका; येथून माझ्या पासून निघून जा. तुमचे उपकार मी स्मरत असल्यामुळें तुमचा वध करण्याचें माझ्या मनांत येत नाहीं. माझ्याशीं दुष्टपणा करणाऱ्या कृतघ्नांचा धिक्कारानें वध झाल्यासारिखाच आहे " १४. ह्याप्रमाणें रावण त्यांना बोलला असतां लज्जित झालेल्या त्या उभयतां शुकसारणांनीं रावणाकडे पाहून जयशब्दानें त्याचें अभिनंदन केलें आणि ते तेथून निघून गेले १५. नंतर रावणराक्षस समीप असलेल्या महोदराला ह्मणाला " हेरांना सत्वर माझ्याकडे घेऊन ये " १६. ह्यानंतर " ठीक आहे " असें ह्मणून महोदरानें हेरांना सत्वर आज्ञा केली असतां १७ राजाच्या आज्ञेवरून हेर सत्वर

प्राञ्जलयो वर्धयित्वा जयाशिषः १८ तानब्रवीत्ततो वाक्यं रावणो राक्ष-
साधिपः । चरान्प्रत्यायिकाञ्शूरान्धीरान्विगतसाध्वसान् १९ इतो गच्छत
रामस्य व्यवसायं परीक्षितुम् । मन्त्रेष्वभ्यन्तरा येस्य प्रीत्या तेन समा-
गताः २० कथं स्वपिति जागर्ति किमद्य च करिष्यति । विज्ञाय निपुणं
सर्वमागन्तव्यमशेषतः २१ चारेण विदितः शत्रुः पण्डितैर्वसुधाधिपैः ।
युद्धे स्वल्पेन यत्नेन समासाद्य निरस्यते २२ चारास्तु ते तथेत्युक्त्वा
प्रहृष्टा राक्षसेश्वरम् । शार्दूलमग्रतः कृत्वा ततश्चक्रुः प्रदक्षिणम् २३
ततस्तं तु महात्मानं चारा राक्षससत्तमम् । कृत्वा प्रदक्षिणं जग्मुर्यत्र
रामः सलक्ष्मणः २४ ते सुवेलस्य शैलस्य समीपे रामलक्ष्मणौ । प्रच्छन्ना
ददृशुर्गत्वा ससुग्रीवविभीषणौ २५ प्रेक्षमाणाश्चमूं तां च बभूवुर्भयवि-
ह्वलाः । ते तु धर्मात्मना दृष्टा राक्षसेन्द्रेण राक्षसाः २६ विभीषणेन
तत्रस्था निगृहीता यदृच्छया । शार्दूलो ग्राहितस्त्वेकः पापोयमिति
राक्षसः २७ मोक्षितः सोपि रामेण वध्यमानः प्लवङ्गमैः । अनृशंसेन

---

तेथें आले आणि जयजयकार करून व हात जोडून उभे राहिले १८. तेव्हां राक्षसा-
धिपति रावण विश्वासू, शूर, धीर आणि निर्भय अशा त्या हेरांना ह्मणाला १९
" रामाचा काय उद्योग चालला आहे हें पाहण्याकरितां तुह्मी येथून जा. प्रेमानें
त्याच्याशीं समागम करून त्याला गुप्तपणें सल्लामसलत कोण देत असतात २०,
त्याची निजण्याची तऱ्हा कशी आहे, जागण्याचा प्रकार कसा काय आहे, आज
काय करण्याचा त्याचा मानस आहे वगैरे सर्व पूर्णपणें समजून घेऊन तुह्मी परत या २१.
कारण, शत्रूची हेराच्या योगानें एकदां माहिती झाली असतां अल्प यत्नानेंच समंजस
राजांना युद्धामध्यें त्याची गांठ घेऊन त्याचा पराभव करितां येतो " २२. ह्यावर
" ठीक आहे " असें त्या राक्षसाधिपतीला सांगून त्या हेरांनीं शार्दूलाला पुढें करून
आनंदानें रावणाला प्रदक्षिणा केली २३. सारांश, तदनंतर त्या महात्म्या राक्षसश्रेष्ठाला
प्रदक्षिणा करून जिकडे लक्ष्मणासहवर्तमान राम होता तिकडे ते हेर चालते झाले २४.
ते गुप्तपणें सुवेलपर्वतासमीप गेले असतां सुग्रीव आणि बिभीषण ह्यांसहवर्तमान 'राम-
लक्ष्मण त्यांच्या दृष्टीं पडले २५; परंतु, ते जेव्हां ती सेना बघूं लागले तेव्हां भीतीनें
गांगरून गेले. तों इतक्यांत राक्षसराज धर्मात्म्या बिभीषणाची त्यांच्याकडे दृष्टि गेल्या-
मुळें तेथल्या तेथेंच त्यानें त्यांना सहज धरिलें. हा अति दुष्ट आहे असें समजून'
शार्दूल राक्षसाला बिभीषणानें धरिलें असता २६,२७ आणि वानर त्याचा वध करूं
लागले असतां रामानें त्यालाही सोडून दिलें आणि त्या दयालु रामानें त्याचप्रमाणें

रामेण मोक्षिता राक्षसाः परे २८ वानरैरर्दितास्ते तु विक्रान्तैर्लघुवि-
क्रमैः । पुनर्लङ्कामनुप्राप्ताः श्वसन्तो नष्टचेतसः २९ ततो दशग्रीवमुप-
स्थितास्ते चारा बहिर्नित्यचरा निशाचराः । गिरेः सुवेलस्य समीप-
वासि तं न्यवेदयन्रामबलं महाबलाः ३० [१०७६] इत्यार्षे श्रीमद्रामा-
यणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकोनत्रिंशः सर्गः ॥ २९ ॥

ततस्तमक्षोभ्यबलं लङ्काधिपतये चराः । सुवेले राघवं शैले निविष्टं प्रत्य-
वेदयन् १ चाराणां रावणः श्रुत्वा प्राप्तं रामं महाबलम् । जातोद्वेगोभव-
त्किंचिच्छार्दूलं वाक्यमब्रवीत् २ अयथावच्च ते वर्णो दीनश्चासि निशा-
चर । नासि कच्चिदमित्राणां क्रुद्धानां वशमागतः ३ इति तेनानुशि-
ष्टस्तु वाचं मन्दमुदीरयन् । तदा राक्षसशार्दूलं शार्दूलो भयविह्वलः ४ न ते
चारयितुं शक्या राजन्वानरपुङ्गवाः । विक्रान्ता बलवन्तश्च राघवेण च
रक्षिताः ५ नापि संभाषितुं शक्याः संप्रश्नोत्र न लभ्यते । सर्वतो रक्ष्यते
पन्था वानरैः पर्वतोपमैः ६ प्रविष्टमात्रे ज्ञातोहं बले तस्मिन्विचारिते ।

---

इतरही राक्षस सोडून दिले २८. तेव्हां शीघ्रगामी व पराक्रमी वानरांनीं जर्जर करून काहींएक मुच्छेनासें होऊन ते राक्षस धापा टाकीत टाकीत लंकेमध्यें परत आले २९. तदनंतर नेहमीं परदेशांत संचार करणारे ते महाबलाढ्य राक्षसहेर रावणाकडे आले आणि सुवेलपर्वतासमीप रामसैन्य असल्याचें त्यांनीं त्या रावणाला निवेदन केलें ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकुणतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ २९ ॥

तदनंतर अजिंक्य सैन्यानें युक्त असलेला राम सुवेल पर्वतासमीप उतरला असल्याचें हेरांनीं त्या लंकाधिपतीला निवेदन केलें असतां १ महाबलाढ्य राम प्राप्त झाल्याचें हेरांपासून ऐकिल्यावर रावण किंचित् उद्विग्न झाला आणि शार्दूलाला ह्मणाला २ " हे निशाचरा, तुझी मुद्रा विकृत दिसत असून तूं अगदीं दीन दिसत आहेस. तस्मात्, क्रुद्ध झालेल्या शत्रूंच्या तावडींत तर तूं सांपडला नाहींस ना ?" ३. ह्याप्रमाणें त्या रावणानें प्रश्न केला असतां भीतीनें गांगरून गेलेला तो शार्दूल राक्षस हलके हलके तोंडांतून शब्द काढीत काढीत राक्षसश्रेष्ठ रावणाला ह्मणाला ४ " हे राजा, हेर पाठवून त्या वानरश्रेष्ठांचा वृत्तांत समजून घेणें शक्य नाहीं. कारण, ते पराक्रमी व बलाढ्य असून रामानें त्यांचें रक्षण केलेलें आहे ५. त्यांच्याशीं संभाषण करणेंही शक्य नसल्यामुळें प्रश्न करण्याला अवसरच तेथें मिळत नाहीं. शिवाय, पर्वततुल्य वानरांनीं मार्गाचेंही सर्व बाजूंनीं रक्षण केलेलें आहे ६. त्या

बलाद्गृहीतो रक्षोभिर्बहुधास्मि विचारितः ७ जानुभिर्मुष्टिभिर्दन्तैस्तलै-
श्चाभिहतो भृशम् । परिणीतोस्मि हरिभिर्बलमध्ये अमर्षणैः ८ परि-
णीय च सर्वत्र नीतोहं रामसंसदि । रुधिरस्राविदीनाङ्गो विह्वलश्चलि-
तेन्द्रियः ९ हरिभिर्वध्यमानश्च याचमानः कृताञ्जलिः । राघवेण परि-
त्रातो मामेति च यदृच्छया १० एष शैलशिलाभिस्तु पूरयित्वा महार्णवम् ।
द्वारमाश्रित्य लङ्काया रामस्तिष्ठति सायुधः ११ गरुडव्यूहमास्थाय सर्वतो
हरिभिर्वृतः । मां विसृज्य महातेजा लङ्कामेवातिवर्तते १२ पुरा प्राकार-
मायाति क्षिप्रमेकतरं कुरु । सीतां वापि प्रयच्छाशु युद्धं वापि प्रदीयताम् १३
मनसा तत्तदा प्रेक्ष्य तच्छ्रुत्वा राक्षसाधिपः । शार्दूलं सुमहद्वाक्यमथो-
वाच स रावणः १४ यदि मां प्रतियुध्यन्ते देवगन्धर्वदानवाः । नैव सीतां
प्रदास्यामि सर्वलोकभयादपि १५ एवमुक्त्वा महातेजा रावणः पुनरब्रवीत् ।

---

सैन्याची बातमी काढण्याकरितां मी त्यांत प्रविष्ट होतांक्षणीं राक्षसांसहवर्तमान बला-
त्कारानें वानरांनीं मला पकडून नानाप्रकारांनीं माझ्याशीं हिसकाहिसकी केली ७;
आणि क्रुद्ध झालेल्या वानरांनीं गुडघे, मुष्टि, दांत व हस्ततल ह्यांच्या योगानें मला
अतिशय ताडण केलें व शेवटीं मला सैन्यामध्येंही नेलें ८. इतकेंच नव्हे परंतु, अंगां-
तून रक्ताचा स्राव चालल्यामुळें सर्व अवयव शोचनीय दिसत आहेत आणि मनामध्यें
कांहींएक सुचेनासें होऊन मी अगदीं भीतीनें गांगरून गेलों आहें अशा अवस्थेमध्यें
सर्व ठिकाणीं मला फिरवून शेवटीं रामाच्या सभेंतही ते मला घेऊन गेले ९; परंतु,
अशारीतीनें वानर मला ताडण करीत असतांना मी हात जोडून प्राणाविषयीं याचना
करूं लागलों असतां " वध करूं नका, वध करूं नका " असें ह्मणून रामानें आपण
होऊनच माझें रक्षण केलें १०. सारांश, पर्वतशिलांनीं महासागर भरून काढून हा
राम आयुधांसहवर्तमान लंकेच्या द्वाराशीं येऊन पोंचला आहे ११. गरुडव्यूह करून
तो सर्व बाजूंनीं वानरांनीं परिवेष्टित झालेला आहे आणि मला जाण्याची अनुज्ञा
देऊन तो महातेजस्वी लंकेकडेच येत आहे १२. ह्यास्तव, लंकेच्या कोटाशीं तो
आला नाहीं तोंच कोणती तरी एक गोष्ट तूं सत्वर कर. सीता तरी लवकर त्याच्या
स्वाधीन कर, किंवा युद्धास तयार हो " १३. हें भाषण श्रवण करून व मनामध्यें
त्याचा विचार करून रावणानें शार्दूलाशीं फारच मोठें भाषण केलें १४. (तो
ह्मणाला ) " देव, गंधर्व आणि दानव जरी माझ्याशीं युद्धाला आले आणि सर्व
लोकांपासून जरी मला भय प्राप्त झालें तरी मी सीता परत देणार नाहीं " १५.
ह्याप्रमाणें शार्दूलाला सांगून महातेजस्वी रावण पुनरपि ह्मणाला " रामाची सेना तूं

चरिता भवता सेना केऽत्र शूराः प्लवङ्गमाः १६ किंप्रभाः कीदृशाः सौम्य वानरा ये दुरासदाः । कस्य पुत्राश्च पौत्राश्च तत्त्वमाख्याहि सुव्रत १७ तथात्र प्रतिपत्स्यामि ज्ञात्वा तेषां बलाबलम् । अवश्यं खलु संख्यानं कर्तव्यं युद्धमिच्छता १८ अथैवमुक्तः शार्दूलो रावणेनोत्तम-श्वरः । इदं वचनमारेभे वक्तुं रावणसंनिधौ १९ अथर्क्षरजसः पुत्रो युधि राजन्सुदुर्जयः । गद्गदस्याथ पुत्रोऽत्र जाम्बवानिति विश्रुतः २० गद्गद-स्याथ पुत्रोऽन्यो गुरुपुत्रः शतक्रतोः । कदनं यस्य पुत्रेण कृतमेकेन रक्ष-साम् २१ सुषेणश्चात्र धर्मात्मा पुत्रो धर्मस्य वीर्यवान् । सौम्यः सोमा-त्मजश्चात्र राजन्दधिमुखः कपिः २२ सुमुखो दुर्मुखश्चात्र वेगदर्शी च वानरः । मृत्युर्वानररूपेण नूनं सृष्टः स्वयंभुवा २३ पुत्रो हुतवहस्यात्र नीलः सेनापतिः स्वयम् । अनिलस्य तु पुत्रोऽत्र हनूमानिति विश्रुतः २४ नप्ता शक्रस्य दुर्धर्षो बलवानङ्गदो युवा । मैन्दश्च द्विविदश्चोभौ बलिना-वश्विसंभवौ २५ पुत्रा वैवस्वतस्याथ पञ्च कालान्तकोपमाः । गजो

---

हिंडून पाहिली आहेस. ह्यास्तव, ह्या सैन्यामध्यें शूर वानर कोण कोण आहेत ? १६. त्यांची मुद्रा कशी काय आहे ? त्यांचा पराक्रम कशाप्रकारचा आहे ? हे विनयसंपन्न शार्दूला, अजिंक्य वानर कोण कोण आहेत आणि, हे सुव्रता, ते कोणाचे पुत्र व पौत्र आहेत हें तूं खरें खरें मला सांग १७; ह्मणजे त्यांचे बलाबल समजून घेऊन मी त्याप्रमाणें उपाय योजीन. युद्धाची इच्छा करणाऱ्यानें प्रथमतः शत्रूकडील सैन्याचा विचार अवश्य केला पाहिजे " १८. ह्याप्रमाणें रावणानें त्या शार्दूलनामक मुख्य हेराला विचारिलें असतां तो रावणाचे समीप असें भाषण करूं लागला १९. ( तो ह्मणाला ) " हे राजा, ऋक्षरजाचा पुत्र युद्धामध्यें अत्यंत दुर्जय आहे. जांबवान् ह्मणून प्रख्यात असलेला गद्गदाचा पुत्र ह्या सैन्यामध्यें आहे २०. गद्गदाचा दुसरा एक पुत्र आहे तो इंद्रगुरु बृहस्पतीचाच पुत्र होय आणि त्याचप्रमाणें एकट्या पुत्रानें पूर्वी राक्षसांचा वध केलेला आहे २१. धर्माचा पुत्र वीर्यवान् धर्मात्मा सुषेण त्या सैन्यामध्यें आहे आणि, हे राजा, स्वभावानें सौम्य असलेला सोमपुत्र दधिमुख वानरही तेथें आहे २२. सुमुख, दुर्मुख आणि वेगदर्शी हे वानर तर खरोखर ब्रह्मदेवानें राक्षसांचे मृत्युच उत्पन्न केलेले आहेत २३. अग्नीचा पुत्र नील हा स्वतः येथें सेनापति असून हनुमान् ह्मणून प्रख्यात असलेला वायूचा पुत्रही येथें आहे २४. इंद्राचा नातु जो बलाढ्य, अजिंक्य व तरुण अंगद तो त्या सैन्यामध्यें असून अश्विनीकुमारांपासून उत्पन्न झालेले मैंद व द्विविद

गवाक्षो गवयः शरभो गन्धमादनः २६ दश वानरकोट्यश्च शूराणां युद्धकाङ्क्षिणाम् । श्रीमतां देवपुत्राणां शेषं नाख्यातुमुत्सहे २७ पुत्रो दशरथस्यैष सिंहसंहननो युवा । दूषणो निहतो येन खरश्च त्रिशिरास्तथा २८ नास्ति रामस्य सदृशो विक्रमे भुवि कश्चन। विराधो निहतो येन कबन्धश्चान्तकोपमः २९ वक्तुं न शक्तो रामस्य गुणान्कश्चिन्नरः क्षितौ । जनस्थानगता येन तावन्तो राक्षसा हताः ३० लक्ष्मणश्चात्र धर्मात्मा मातङ्गानामिवर्षभः । यस्य बाणपथं प्राप्य न जीवेदपि वासवः ३१ श्वेतो ज्योतिर्मुखश्चात्र भास्करस्यात्मसंभवौ । वरुणस्याथ पुत्रोथ हेमकूटः प्लवङ्गमः ३२ विश्वकर्मसुतो वीरो नलः प्लवगसत्तमः । विक्रान्तो वेगवानत्र वसुपुत्रः स दुर्धरः ३३ राक्षसानां वरिष्ठश्च तव भ्राता बिभीषणः । प्रतिगृह्य पुरीं लङ्कां राघवस्य हिते रतः ३४ इति सर्वं समाख्यातं तथा वै वानरं बलम् । सुवेलेधिष्ठितं शैले शेषकार्ये

---

हे उभयतां बलाढ्य वीरही तेथें आहेत २५ गज, गवाक्ष, गवय, शरभ आणि गंधमादन हे काल व अंतक ह्यांची बरोबरी करणारे यमाचे पांच पुत्रही तेथें आहेत २६ आणि युद्धाविषयीं उत्सुक, शूर, वैभवशाली आणि देवपुत्र असे दहाकोट वानर तेथें आहेत. आतां अवशिष्ट सैन्य कथन करण्याची माझी इच्छा नाहीं २७. हा दशरथाचा पुत्र राम तरुण असून ह्याचा बांधा सिंहासारिखा बळकट आहे आणि ह्यानेंच खर, दूषण व त्रिशिर ह्या राक्षसांचा वध केला आहे २८. विराध आणि मृत्युतुल्य कबंध ह्या राक्षसांचा ज्यानें वध केला त्या रामाची पराक्रमामध्यें बरोबरी करणारा ह्या पृथ्वींत दुसरा कोणीही नाहीं २९. जनस्थानामध्यें असलेल्या त्या सर्वही राक्षसांचा ज्यानें वध केला त्या रामाचे गुणवर्णन करण्यास पृथ्वीमध्यें कोणीही पुरुष समर्थ नाहीं ३०. गजांचा अधिपतिच कीं काय असा धर्मात्मा लक्ष्मणही त्या सैन्यामध्यें आहे आणि त्याच्या बाणाच्या आटोक्यांत सांपडलेला इंद्रही जगणें अशक्यच आहे ३१. सूर्यपुत्र श्वेत व ज्योतिर्मुख हे त्या सैन्यांत असून वरुणपुत्र हेमकूट वानरही तेथें आहे ३२. विश्वकर्म्याचा पुत्र वानरश्रेष्ठ वीर नल आणि पराक्रमी व वेगवान् वसुपुत्र दुर्धर हेही तेथें आहेत ३३. इतकेंच नव्हे परंतु, तुझा भ्राता राक्षसश्रेष्ठ बिभीषण रामापासून लंकानगरीच्या राज्यासंबंधानें वचन घेऊन त्याच्या हिताविषयीं एकसारिखा तत्पर आहे ३४. सारांश, सुवेलपर्वतासमीप उतरलेलें सर्वही वानरसैन्य मीं आपणांला कथन केलें आहे. आतां ह्यानंतर काय करावयाचें असेल त्याविषयीं आपण विचार

भवान्गतिः ३५ [ ११०८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्रिंशः सर्गः ॥ ३० ॥

ततस्तमक्षोभ्यबलं लङ्कायां नृपतेश्वराः । सुवेले राघवं शैले निविष्टं प्रत्यवेदयन् १ चाराणां रावणः श्रुत्वा प्राप्तं रामं महाबलम् । जातोद्वेगोभवत्किंचित्सचिवानिदमब्रवीत् २ मन्त्रिणः शीघ्रमायान्तु सर्वे वै सुसमाहिताः । अयं नो मन्त्रकालो हि संप्राप्त इति राक्षसाः ३ तस्य तच्छासनं श्रुत्वा मन्त्रिणोभ्यागमन्द्रुतम् । ततः स मन्त्रयामास राक्षसैः सचिवैः सह ४ मन्त्रयित्वा तु दुर्धर्षः क्षमं यत्तदनन्तरम् । विसर्जयित्वा सचिवान्प्रविवेश स्वमालयम् ५ ततो राक्षसमादाय विद्युज्जिह्वं महाबलम् । मायाविनं महामायं प्राविशद्यत्र मैथिली ६ विद्युज्जिह्वं च मायाज्ञमब्रवीद्राक्षसाधिपः । मोहयिष्यावहे सीतां मायया जनकात्मजाम् ७ शिरो मायामयं गृह्य राघवस्य निशाचर । मां त्वं समुपतिष्ठस्व महच्च सशरं धनुः ८ एवमुक्तस्तथेत्याह विद्युज्जिह्वो निशाचरः । दर्शयामास तां मायां सुप्रयुक्तां स रावणे ९ तस्य तुष्टोभवद्राजा प्रददौ च

---

करा ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३० ॥

तदनंतर अजिंक्य सैन्यानें युक्त असलेल्या रामानें सुवेलपर्वतासमीप तळ दिल्याचें लंकेंतील राजाच्या हेरांनीं त्याला निवेदन केलें १. तेव्हां महाबलाढ्य राम प्राप्त झाला हें हेरांपासून श्रवण केल्यावर रावण कांहींसा उद्विग्न झाला आणि मंत्र्यांना ह्मणाला २ "हे राक्षसहो, आतां आपल्या विचाराचा समय प्राप्त झाला आहे. ह्यास्तव, सर्व मंत्र्यांनीं सत्वर इकडे यावें आणि स्वस्थ अंतःकरणानें असावें" ३. ही त्याची आज्ञा ऐकून मंत्री सत्वर तेथें आले. नंतर तो राक्षसमंत्र्यांसहवर्तमान विचार करूं लागला ४ आणि त्या समयाला योग्य असा विचार करून व मंत्र्यांना निरोप देऊन हार जाण्यास कठीण असलेला तो रावण अंतःपुरामध्यें गेला ५. तदनंतर विद्युज्जिह्वनामक महाबलाढ्य, मायावी व मोठमोठे मायिक प्रयोग करणाऱ्या राक्षसाला बरोबर घेऊन तो जिकडे सीता होती तिकडे गेला ६ आणि माया जाणणाऱ्या त्या विद्युज्जिह्वराक्षसाला तो राक्षसाधिपति ह्मणाला "जनककन्या सीतेला मायेच्या योगानें आपण मोह पाडूं ७. ह्यास्तव, हे राक्षसा, रामाचें मायामय मस्तक, व बाणासहवर्तमान मोठें धनुष्य घेऊन तूं माझ्यासमीप ये" ८. ह्याप्रमाणें रावणानें सांगितलें असतां विद्युज्जिह्वराक्षसानें रावणाला त्या मायेचा उत्कृष्ट रीतीनें प्रयोग करून दाखविला ९.

विभूषणम् । अशोकवनिकायां च सीतादर्शनलालसः ॥ नैर्ऋता-
नामधिपतिः संविवेश महाबलः १० ततो दीनामदीनार्हां ददर्श
धनदानुजः । अधोमुखीं शोकपरामुपविष्टां महीतले ११ भर्तारं समनु-
ध्यान्तीमशोकवनिकां गताम् । उपास्यमानां घोराभी राक्षसीभिरदू-
रतः १२ उपसृत्य ततः सीतां प्रहर्षं नाम कीर्तयन् । इदं च वचनं धृष्ट-
मुवाच जनकात्मजाम् १३ सान्त्व्यमाना मया भद्रे यमाश्रित्य विमन्यसे।
खरहन्ता स ते भर्ता राघवः समरे हतः १४ छिन्नं ते सर्वथा मूलं दर्पश्च
निहतो मया । व्यसनेनात्मनः सीते मम भार्या भविष्यसि १५ विसृजैतां
मतिं मूढे किं मृतेन करिष्यसि । भवस्व भद्रे भार्याणां सर्वासामीश्वरी
मम १६ अल्पपुण्ये निवृत्तार्थे मूढे पण्डितमानिनि । शृणु भर्तृवधं सीते
घोरं वृत्रवधं यथा १७ समायातः समुद्रान्तं हन्तुं मां किल राघवः ।
वानरेन्द्रप्रणीतेन बलेन महता वृतः १८ संनिविष्टः समुद्रस्य पीड्य
तीरमथोत्तरम् । बलेन महता रामो व्रजत्यस्तं दिवाकरे १९ अथाध्वनि

---

तेव्हां रावणराजानें संतुष्ट होऊन त्याला एक अलंकार दिला आणि सीतेला पहा-
ण्याविषयीं उत्सुक झालेला तो राक्षसाधिपति महाबलाढ्य रावण अशोकवनामध्यें
प्रविष्ट झाला १०. तदनंतर कुबेराचा कनिष्ठ भ्राता जो रावण त्यानें दीनावस्थेला
अपात्र असलेली दीन सीता अवलोकन केली. ती शोकाकुल झालेली होती; तिनें मान
खालीं घातली होती; ती भूतलावर बसली होती ११; भर्त्याचें चिंतन करीत होती आणि
अशोकवनामध्यें असलेल्या त्या सीतेसभोंवतीं अगदीं जवळ जवळच घोर राक्षसी बसलेल्या
होत्या १२. तदनंतर आपला विजय झाल्याचें खोटेंच दर्शवीत दर्शवीत तो त्या जनककन्या
सीतेला उद्धटपणानें ह्मणाला १३ " हे कल्याणि, मी समजावीत असतांनाही ज्याच्या
आधारावर तूं आजपर्यंत माझा अपमान करीत आलीस तो खरराक्षसाचा वध करणारा
तुझा भर्ता राम समरांगणामध्यें वध पावला १४. आतां तुझ्या आशेचें मूळ सर्वस्वीं
तुटून गेलें असून तुझा अभिमानही मी नाहींसा केला आहे. तेव्हां संकटांत सांपड-
ल्यामुळें तुला आतां माझी भार्या व्हावें लागेल १५. हे मूढे, हा दुराग्रह तूं सोडून
दे. त्या मृत रामाशीं आतां तुला काय कर्तव्य आहे ? हे कल्याणि, माझ्या सर्व
भार्यांची तूं स्वामिनी हो १६. हे मूढे, हे पंडितमानिनि, हे पुण्यहीन, हे मनोरथ
भग्न झालेले सीते, भयंकर वृत्रवधाप्रमाणें तुझ्या भर्त्याचा वध कसा झाला हें तूं
ऐक १७. वानरराज सुग्रीवानें ज्याचा पुढाकार घेतला आहे असें मोठें सैन्य बरोबर
घेऊन राम खरोखर माझा वध करण्याकरितां समुद्र ओलांडून आला १८ आणि

परिश्रान्तमर्धरात्रे स्थितं बलम् । सुखसुप्तं समासाद्य चारितं प्रथमं चरैः २०
तत्प्रहस्तप्रणीतेन बलेन महता मम । बलमस्य हतं रात्रौ यत्र रामः
सलक्ष्मणः २१ पट्टिशान्परिघांश्चक्रानृष्टीन्दण्डान्महायुधान् । बाणजालानि
शूलानि भास्वरान्कूटमुद्गरान् २२ यष्टीश्च तोमरान्प्रासांश्चक्राणि मुसलानि
च । उद्यम्योद्यम्य रक्षोभिर्वानरेषु निपातिताः २३ अथ सुप्तस्य रामस्य
प्रहस्तेन प्रमाथिना । असक्तं कृतहस्तेन शिरश्छिन्नं महासिना २४
विभीषणः समुत्पत्य निगृहीतो यदृच्छया । दिशं प्रव्राजितः सैन्यैर्ल-
क्ष्मणः प्लवगैः सह २५ सुग्रीवो ग्रीवया सीते भग्नया प्लवगाधिपः ।
निरस्तहनुकः सीते हनूमान्राक्षसैर्हतः २६ जाम्बवानथ जानुभ्यामुत्पत-
न्निहतो युधि । पट्टिशैर्बहुभिश्छिन्नो निकृत्तः पादपो यथा २७ मैन्दश्च
द्विविदश्चोभौ तौ वानरवरर्षभौ । निःश्वसन्तौ रुदन्तौ च रुधिरेण परी-
प्लुतौ २८ असिना व्यायतौ छिन्नौ मध्ये ह्यरिनिषूदनौ । अनुष्टनति
मेदिन्यां पनसः पनसो यथा २९ नाराचैर्बहुभिश्छिन्नः शेते दर्यां

---

सूर्यास्तसमयीं समुद्राचें उत्तरतीर व्यापून मोठ्या सैन्यासहवर्तमान त्यानें तेथें तळ दिला १९. परंतु, मार्गामध्यें श्रांत झालेलें तें रामाचें सैन्य मध्यरात्रीचे सुमारास गाढ निद्रिस्थ झालें आहे अशी मीं प्रथम हेरांकडून वार्ता आणविली २०. आणि लक्ष्मणासहवर्तमान राम ज्या सैन्यामध्यें होता त्या सैन्याचा प्रहस्तानें पुढाकार घेतलेल्या माझ्या मोठ्या सैन्यानें वध केला २१. पट्टे, परिघ, चक्रें, ऋष्टि, दंड, मोठीं मोठीं आयुधें, बाणसमुदाय, शूल, उज्ज्वल मायामय मुद्गर २२, यष्टि, तोमर, प्रास आणि मुसळें हीं आयुधें राक्षसांनीं उगारून उगारून वानरांवर टाकिलीं २३. नंतर हस्तकौशलानें युक्त व शत्रुघातक प्रहस्तानें मोठ्या खड्गाच्या योगानें निद्रिस्थ असलेल्या रामाचें मस्तक साफ तोडून टाकिलें २४. बिभीषण एकाएकीं उठून स्वेच्छेनें चालता झाला असतांही त्याला पकडलें आहे आणि वानरसैन्यासहवर्तमान लक्ष्मण वाट फुटेल तिकडे पळत सुटला आहे २५. हे सीते, वानराधिपति सुग्रीवाची मान मोडून आणि हनुमानाचें हनु तोडून राक्षसांनीं उभयतांचाही वध केला २६. जांबवान् उड्डाण करूं लागला असतां युद्धामध्यें गुडघे धरून त्याचा वध केला आणि तोडलेल्या वृक्षाचे ज्याप्रमाणें तुकडे तुकडे करून टाकितात त्याप्रमाणें अनेक पट्ट्यांनीं त्याचे तुकडे तुकडे करून टाकिले २७. मैंद व द्विविद हे उभयतां वानरश्रेष्ठ रक्तानें भरून गेले आणि सुस्कारे टाकीत टाकीत व रडत रडत २८ ते पडले असतां त्या उभयतांही शत्रुनाशकांचे खड्गाच्या योगानें मध्यभागीं दोन दोन तुकडे करून टाकिले.

दरीमुखः। कुमुदस्तु महातेजा निष्कूजन्सायकैर्हतः ३० अङ्गदो बहुभि-
श्छिन्नः शरैरासाद्य राक्षसैः। परितो रुधिरोद्गारी क्षितौ निपतितोऽङ्गदः ३१
हरयो मथिता नागै रथजालैस्तथापरे। शयाना मृदितास्तत्र वायुवेगै-
रिवाम्बुदाः ३२ प्रसृताश्च परे त्रस्ता हन्यमाना जघन्यतः। अनुद्रुतास्तु
रक्षोभिः सिंहैरिव महाद्विपाः ३३ सागरे पतिताः केचित्केचिद्गगनमा-
श्रिताः। ऋक्षा वृक्षानुपारूढा वानरैर्व्यतिमिश्रिताः ३४ सागरस्य च
तीरेषु शैलेषु च वनेषु च। पिङ्गलास्ते विरूपाक्षै राक्षसैर्बहवो हताः ३५
एवं तव हतो भर्ता ससैन्यो मम सेनया। क्षतजार्द्रं रजोध्वस्तमिदं चास्या-
हृतं शिरः ३६ ततः परमदुर्धर्षो रावणो राक्षसेश्वरः। सीतायामुपशृ-
ण्वत्यां राक्षसीमिदमब्रवीत् ३७ राक्षसं क्रूरकर्माणं विद्युज्जिह्वं समानय।
येन तद्राघवशिरः सङ्ग्रामात्स्वयमाहृतम् ३८ विद्युज्जिह्वस्तदागृह्य शिर-
स्तत्सशरासनम्। प्रणामं शिरसा कृत्वा रावणस्याग्रतः स्थितः ३९

---

पनसवानर फणसाप्रमाणें रडत रडत पृथ्वीवर पडला आहे २९. दरीमुख वानर दरी-मध्यें पडला आहे व अनेक नाराच बाणांनीं त्याचे तुकडे तुकडे झाले आहेत. महा-तेजस्वी कुमुद आक्रोश करितां करितांच बाणांच्या योगानें वध पावला आहे ३०. राक्षसांनीं अंगदाला गांठून अनेक बाणांनीं त्याला छिन्नभिन्न केलें आहे आणि सर्व बाजूंनीं त्याच्या शरीरांतून रक्तस्राव चालला असून तो भूमीवर मरून पडला आहे ३१. वायुवेगांनीं उडविल्या जाणाऱ्या मेघांप्रमाणें गज व रथसमुदाय ह्यांच्या योगानें वानर चुरडून गेले आहेत आणि तेथें वध पावून पडले आहेत ३२. कांहीं वानर राक्षसांचा भडिमार होऊं लागला असतां त्रस्त होऊन पळून गेले आहेत आणि सिंह ज्याप्रमाणें महागजांच्या मागोमाग धांवत जातात त्याप्रमाणें कांहीं वानरांच्या मागोमाग राक्षस धांवत चालले आहेत ३३. कांहीं ऋक्ष समुद्रांत पडले आहेत; कांहींना राक्षसांनीं आकाशांत फेंकून दिलें आहे आणि वानरांसहवर्तमान कांहींजण वृक्षांवर लपून बसले आहेत ३४. विरूप नेत्रांनीं युक्त असलेल्या राक्षसांनीं सागराचीं तीरें, पर्वत आणि वनें ह्यांमध्यें असंख्य वानर मारून टाकिले आहेत ३५. सारांश, माझ्या सेनेनें सैन्यासहवर्तमान तुझ्या भर्त्याचा ह्याप्रमाणें वध केला असून रक्तानें चिंब झालेलें व धुळीनें भरलेलें हें त्याचें मस्तक येथें आणिलें आहे" ३६. तदनंतर शत्रूला हार जाण्यास फारच कठीण असलेला राक्षसाधिपति रावण सीता ऐकत असतांना एका राक्षसीला ह्मणाला ३७ "क्रूरकर्मी विद्युज्जिह्व राक्षसाला घेऊन ये, त्यानें स्वतः संग्रामांतून त्या रामाचें मस्तक आणिलें आहे" ३८ ह्यावर धनुर्बाणासहवर्तमान तें मस्तक

तमब्रवीत्ततो राजा रावणो राक्षसं स्थितम् । विद्युज्जिह्वं महाजिह्वं समीपपरिवर्तिनम् ४० अग्रतः कुरु सीतायाः शीघ्रं दाशरथेः शिरः । अवस्थां पश्चिमां भर्तुः कृपणां साधु पश्यतु ४१ एवमुक्तं तु तद्रक्षः शिरस्तत्प्रियदर्शनम् । उपनिक्षिप्य सीतायाः क्षिप्रमन्तरधीयत ४२ रावणश्चापि चिक्षेप भास्वरं कार्मुकं महत् । त्रिषु लोकेषु विख्यातं रामस्यैतदिति ब्रुवन् ४३ इदं तत्तव रामस्य कार्मुकं ज्यासमावृतम् । इह प्रहस्तेनानीतं तं हत्वा निशि मानुषम् ४४ स विद्युज्जिह्वेन सहैव तच्छिरो धनुश्च भूमौ विनिकीर्यमाणः । विदेहराजस्य सुतां यशस्विनीं ततोऽब्रवीत्तां भव मे वशानुगा ४५ [११५३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकत्रिंशः सर्गः ॥ ३१ ॥

सा सीता तच्छिरो दृष्ट्वा तच्च कार्मुकमुत्तमम् । सुग्रीवप्रतिसंसर्गमाख्यातं च हनूमता १ नयने मुखवर्णं च भर्तुस्तत्सदृशं मुखम् । केशान्केशान्तदेशं च तं च चूडामणिं शुभम् २ एतैः सर्वैरभिज्ञानैरभिज्ञाय

---

येऊन विद्युज्जिह्व तेथें आला आणि मस्तकानें प्रणाम करून रावणाचे समोर तेथें उभा राहिला ३९. तेव्हां मोठ्या जिह्वेनें युक्त असून जवळ येऊन उभा राहिलेल्या त्या विद्युज्जिह्वसंज्ञक राक्षसाला रावणराजा ह्मणाला ४० " दाशरथि रामाचें मस्तक सत्वर पुढें कर. भर्त्याची शेवटली दैन्यावस्था हिला चांगली अवलोकन करूं दे " ४१. ह्याप्रमाणें रावणाची आज्ञा झाली असतां ज्याचें दर्शन सीतेला प्रिय आहे असें तें मस्तक सीतेचे समीप ठेवून तो राक्षस सत्वर अंतर्धान पावला ४२. नंतर " त्रैलोक्यामध्यें विख्यात असलेलें हें रामाचें धनुष्य " असें ह्मणत ह्मणत रावणानें एक मोठें उज्ज्वल धनुष्य तिच्यापुढें टाकिलें आणि तो ह्मणाला ४३ " प्रत्यंचेनें युक्त असलेलें हें तें तुझ्या रामाचें धनुष्य होय. हें धनुष्य त्या मानवाचा रात्रीं वध करून प्रहस्तानें येथें आणिलें आहे " ४४. विद्युज्जिह्व राक्षसानें आणिलेलें तें मस्तक व धनुष्य भूमीवर बरोबरच टाकीत टाकीत तो रावण त्या यशस्विनी विदेहराजकन्या सीतेला ह्मणाला " तूं माझ्या स्वाधीन हो " ४५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३१ ॥

तें मस्तक व तें उत्कृष्ट धनुष्य अवलोकन केल्यावर सीतेला सुग्रीवाशीं रामाचा संबंध झाल्याचें जें हनुमानानें कथन केलें होतें त्याचें स्मरण झालें १ आणि नेत्र, मुखावरील कांति, भर्त्याच्या मुखासारिखें तें मुख, केश, कपाळ आणि तो शुभ चूडामणि २ ह्या सर्व खुणांवरून हें रामाचेंच मस्तक आहे असें ती समजली आणि

सुदुःखिता । वि... कैकेयीं क्रोशन्ती कुररी यथा ३ सकामा भव कैकेयि हतोयं कु...नः । कुलमुत्सादितं सर्वं त्वया कलहशीलया ४ आर्येण किं नु कै...ः कृतं रामेण विप्रियम् । यन्मया चीरवसनं दत्त्वा प्रव्राजितो वनम् ५ एवमुक्त्वा तु वैदेही वेपमाना तपस्विनी । जगाम जगतीं बाला छिन्ना तु कदली यथा ६ सा मुहूर्तात्समाश्वस्य परिलभ्याथ चेतनाम् । तच्छिरः समुपास्थाय विललापायतेक्षणा ७ हा हतास्मि महाबाहो वीरव्रतमनुव्रत । इमां ते पश्चिमावस्थां गतास्मि विधवा कृता ८ प्रथमं मरणं नार्या भर्तुर्वैगुण्यमुच्यते । सुवृत्तः साधुवृत्तायाः संवृत्तस्त्वं ममाग्रतः ९ महद्दुःखं प्रपन्नाया मग्नायाः शोक-सागरे । यो हि मामुद्यतस्त्रातुं सोऽपि त्वं विनिपातितः १० सा श्वश्रूर्मम कौसल्या त्वया पुत्रेण राघव । वत्सला ते यथा धेनुर्विवत्सा वत्सला कृता ११ उद्दिष्टं दीर्घमायुस्ते दैवज्ञैरपि राघव । अनृतं वचनं तेषामल्पा-

---

अत्यंत दुःखित होऊन कुररीप्रमाणें आक्रोश करीत करीत कैकेयीची निर्भर्त्सना करूं लागली ३. ( ती ह्मणाली ) " हे कैकेयि, आतां तुझे मनोरथ परिपूर्ण होऊं दे. ह्या कुलनंदनाचा वध झाला आणि कलहप्रिय असलेल्या तुझ्यामुळें सर्व कुलाचा उच्छेदही झाला ४. अहो, माझ्यासहवर्तमान वल्कलें नेसावयास देऊन वनामध्यें हांकून देण्यासारिखा सज्जन रामानें कैकेयीचा काय बरें अपराध केला होता ?" ५. ह्याप्रमाणें बोलून ती बिचारी विदेहराजकन्या सीता थरथर कांपूं लागली आणि तुटलेल्या केळीप्रमाणें ती बाला एकाएकीं भूमीवर पडली ६. नंतर एका मुहूर्तानें शुद्धीवर येऊन तिनें सुस्कारा टाकिला आणि तें मस्तक आपल्या समीप ठेवून ती विशालनयना सीता विलाप करूं लागली ७. ( ती ह्मणाली ) " हे महापराक्रमि, हे वीरव्रताचें परिपालन करणाऱ्या, माझा घात झाला. तुझा नाश झाल्यामुळें मला ही वैधव्यरूप निकृष्टावस्था प्राप्त झाली आहे ८. भर्त्याचें मरण हाच स्त्रीवर कोसळणारा मुख्य अनर्थ होय; आणि त्याचप्रमाणें सद्वर्तनानें वागणारा तूं सद्वर्तनानें वागणाऱ्या माझ्या आधीं निवर्तला आहेस ९. आतां मोठ्या दुःखामध्यें सांपडून शोकसागरामध्यें मग्न झालेल्या मला मरण येणेंच फार चांगलें आहे. कारण, माझें रक्षण करण्याकरितां उद्युक्त झालेल्या तुझाही राक्षसांनीं वध करून टाकिला आहे १०. हे राघवा, पुत्रवत्सल असलेली ती माझी सासू कौसल्या, हे राघवा, तूं पुत्रच मृत झाल्यामुळें वत्सरहित झालेल्या पुत्रवत्सल धेनूप्रमाणें झाली आहे ११. हे राघवा, ज्योतिःशास्त्रज्ञांनींही तुझें आयुष्य दीर्घ असल्याचें सांगून ठेविलें आहे; परंतु, त्यांचें वचन असत्य झालें. कारण, हे राघवा, तूं

गुरासि राघव १२ अथवा नश्यति प्रज्ञा प्राज्ञस्यापि सतस्तव। पचत्येवं तथा कालो भूतानां प्रभवो ह्ययम् १३ अदृष्टं मृत्युमापन्नः कस्मात्त्वं नयशास्त्रवित्। व्यसनानामुपायज्ञः कुशलो ह्यसि वर्जने १४ तथा त्वं संपरिष्वज्य रौद्रयातिनृशंसया। कालरात्र्या मयाच्छिद्य हृतः कमललोचनः १५ इह शेषे महाबाहो मां विहाय तपस्विनीम्। प्रियामिव यथा नारीं पृथिवीं पुरुषर्षभ १६ अर्चितं सततं यत्नाद्गन्धमाल्यैर्मया तव। इदं ते मत्प्रियं वीर धनुः काञ्चनभूषितम् १७ पित्रा दशरथेन त्वं श्वशुरेण ममानघ। सर्वैश्च पितृभिः सार्धं नूनं स्वर्गे समागतः १८ दिवि नक्षत्रभूतं त्व महत्कर्म कृतं तथा। पुण्यं राजर्षिवंशं त्वमात्मनः समुपेक्षसे १९ किं मां न प्रेक्षसे राजन्किं वा न प्रतिभाषसे। बालां बालेन संप्राप्तां भार्यां मां सहचारिणीम् २० संश्रुतं गृह्णता पाणिं चरिष्यामीति यत्त्वया।

---

अल्पायु असल्याचें आतां उघडच ठरलें आहे १२. अरे, तूं ज्ञानवान् असूनही स्वतः शत्रूच्या तावडींत सांपडण्याइतकी तुझी बुद्धि कशी नाहींशी झाली! अथवा तुला तरी काय म्हणावयाचें आहे भूतांच्या उत्पत्तीला कारणीभूत असलेला हा कालरूप ईश्वरच प्राण्याला त्या त्या कर्मांचें फल देत असतो (आणि ह्यामुळेंच तूं ज्ञानी असूनही मोहित होऊन शत्रूच्या तावडींत सांपडलास) १३. संकटें टाळण्याचा उपाय तूं जाणणारा असून तो योजण्यामध्यें निपुण असतांना आणि नीतिशास्त्र जाणणारा असतांना असा आकस्मिक मृत्यु तुला कसा बरें प्राप्त झाला? १४. अति दुष्ट व क्रूर कालरात्रीनें तुज कमलनयनाला कवटाळून धरिलें आणि बलात्कारानें माझ्यापासून हिसकावून नेलें १५. हे महापराक्रमी पुरुषश्रेष्ठा, मज बिचारीला सोडून देऊन व प्रिय स्त्रीप्रमाणें पृथ्वीलाच आलिंगन देऊन तूं येथें शयन करीत आहेस १६. हे वीरा, सुवर्णानें शृंगारिलेल्या व मला प्रिय असलेल्या ह्या तुझ्या धनुष्याचें मी गंधपुष्पांनीं प्रयत्नपूर्वक नेहमीं पूजन करीत होतें; (परंतु, त्याला आज तुझा वियोग होण्याची पाळी आली) १७ हे निष्पापा, तुझा पिता जो माझा श्वशुर त्याची आणि इतरही सर्व पूर्वजांची खरोखर स्वर्गामध्यें तुला आतां भेट झाली असेल १८. स्वर्गांतील नक्षत्रांप्रमाणें उज्ज्वल असलेला पवित्र राजर्षिवंश व स्वतः केलेलें मोठें कर्म ह्यांची उपेक्षा करून तूं जात आहेस हें योग्य नव्हे १९. हे राजा, तूं बाल असतांनाच ज्या मज बालवयी भार्येला प्राप्त करून घेतलेंस त्या मज सहचारिणीकडे तूं कां बरें पहात नाहींस? आणि भाषणही कशाकरितां करीत नाहींस? २०. माझें पाणिग्रहण करितांना "तुझ्यासहवर्तमानच धर्मादिकांचें आचरण

स्मर तन्नाम काकुत्स्थ नय मामपि दुःखिताम् २१ कस्मान्मामपहाय त्वं गतो गतिमतां वर । अस्माल्लोकादमुं लोकं त्यक्त्वा मामपि दुःखिताम् २२ कल्याणै रुचिरं गात्रं परिष्वक्तं मयैव तु । क्रव्यादैस्तच्छरीरं ते नूनं विपरिकृष्यते २३ अग्निष्टोमादिभिर्यज्ञैरिष्टवानाप्तदक्षिणैः । अग्निहोत्रेण संस्कारं केन त्वं न तु लप्स्यसे २४ प्रव्रज्यमुपपन्नानां त्रयाणामेकमागतम् । परिप्रेक्ष्यति कौसल्या लक्ष्मणं शोकलालसा २५ स तस्याः परिपृच्छन्त्याः वधं मित्रबलस्य ते । तव चाख्यास्यते नूनं निशायां राक्षसैर्वधम् २६ सा त्वां सुप्तं हतं ज्ञात्वा मां च रक्षोगृहं गताम् । हृदयेनावदीर्णेन न भविष्यति राघव २७ मम हेतोरनार्याया अनघः पार्थिवात्मजः । रामः सागरमुत्तीर्य वीर्यवान्गोष्पदे हतः २८ अहं दाशरथेनोढा मोहात्स्वकुलपांसनी । आर्यपुत्रस्य रामस्य भार्या मृत्युरजायत २९ नूनमन्यां मया जातिं वारितं

---

करीन " अशी जी तूं प्रतिज्ञा केली आहेस तिचें तरी स्मरण कर आणि, हे काकुत्स्था, मज दुःखित स्त्रीलाही तूं आपल्याकडे घेऊन जा २१. हे गतिमानांमध्यें श्रेष्ठ, मला सोडून तूं कसा बरें गेलास ! अरे, मज दुःखित स्त्रीचाही त्याग करून तूं ह्या लोकापासून परलोकीं कसा बरें चालता झालास? २२. शुभ चिन्हांनीं मनोहर दिसत असलेल्या तुझ्या शरीराला आजपर्यंत मींच आलिंगन दिलेलें आहे; परंतु, सांप्रत तें तुझें शरीर खरोखर मांसभक्षक प्राणी इकडे तिकडे ओढीत असतील २३. विपुल दक्षिणांनीं युक्त असे अग्निष्टोमादि क्रतु तुझ्या हातून झाले असतांना अग्निहोत्रसंबंधी अग्नीच्या योगानें और्ध्वदेहिक संस्कार तुला कसा बरें प्राप्त होत नाहीं ? २४. वनवासाला गेलेल्या तिघांपैकीं एकटा लक्ष्मणच परत आलेला पाहून कौसल्या शोकाकुल होईल २५. कारण, ती विचारूं लागली असतां तो लक्ष्मण तुझा मित्र जो सुग्रीव त्याच्या सैन्याचा वध झाल्याचें तिला सांगेल आणि खरोखर रात्रीं राक्षसांनीं तुझाही वध केल्याचें तो तिला निवेदन करील २६. सारांश, हे राघवा, निद्रिस्थ असतांना तुझा वध० झाल्याचें आणि मी राक्षसगृहीं असल्याचें ऐकून कौसल्येचें हृदय विदीर्ण होईल व ती नाहींशी होईल २७. अरेरे ! मज दुष्टेकरितां सागर उल्लंघून आलेला निष्पाप व वीर्यवान् राजपुत्र राम पृथ्वीवर उमटलेल्या गाईच्या पावलांमध्यें वध पावला ( सारांश, प्रचंड समुद्रही उल्लंघन करून आलेला राम गाईच्या पावलांप्रमाणें सहज उल्लंघन करितां येण्यासारिखें असलेलें जें राक्षससैन्य त्याच्याशीं प्रसंग पडल्यामुळें वध पावला ) २८. स्वतःच्या कुलाला कलंक लावणारी अशी मी असतांनाही दशरथपुत्र रामानें मोहामुळें माझें पाणिग्रहण केलें ! अरेरे ! आर्यपुत्र रामाला मी भार्याच

दानमुत्तमम् । याहमद्यैव शोचामि भार्या सर्वातिथेरिह ३० साधु घातय मां क्षिप्रं रामस्योपरि रावण । समानय पतिं पत्न्या कुरु कल्याणमुत्तमम् ३१ शिरसा मे शिरश्चास्य कायं कायेन योजय । रावणानुगमिष्यामि गतिं भर्तुर्महात्मनः ३२ इतीव दुःखसंतप्ता विललापायतेक्षणा । भर्तुः शिरो धनुश्चैव ददर्श जनकात्मजा ३३ एवं लालप्यमानायां सीतायां तत्र राक्षसः । अभिचक्राम भर्तारमनीकस्थः कृताञ्जलिः ३४ विजयस्वार्यपुत्रेति सोभिवाद्य प्रसाद्य च । न्यवेदयदनुप्राप्तं प्रहस्तं वाहिनीपतिम् ३५ अमात्यैः सहितः सर्वैः प्रहस्तस्त्वामुपस्थितः । तेन दर्शनकामेन अहं प्रस्थापितः प्रभो ३६ नूनमस्ति महाराज राजभावात्क्षमान्वित । किंचिदात्ययिकं कार्यं तेषां त्वं दर्शनं कुरु ३७ एतच्छ्रुत्वा दशग्रीवो राक्षसप्रतिवेदितम् । अशोकवनिकां त्यक्त्वा मन्त्रिणां दर्शनं ययौ ३८ स तु सर्वं समर्थ्यैव मन्त्रिभिः कृत्यमात्मनः । सभां प्रविश्य विदधे विदित्वा रामविक्रमम् ३९ अन्तर्धानं तु तच्छीर्षं तच्च कार्मुकमु-

---

मृत्युरूप झालें २९. खरोखर पूर्वजन्मीं मीं कांहींएक उत्कृष्ट दान केलें नाहीं. ह्यामुळेंच सर्वांचें आतिथ्य करणाऱ्या रामाची भार्या असूनही मला आजच शोक करण्याची पाळी आली आहे ३०. हे रावणा, रामाच्या नंतर तूं माझाही खुशाल सत्वर वध कर. अरे, पत्नीचा पतीशीं समागम करून दे. हें उत्कृष्ट शुभ कार्य तूं करच ३१. हे रावणा, ह्याच्या मस्तकाशीं मस्तकाचा आणि शरीराशीं शरीराचा तूं समागम करून दे. महात्म्या भर्त्याच्याच मार्गानें मी चालती होणार " ३२. ह्याप्रमाणें दुःखसंतप्त होउन ती विशालनयना जनककन्या सीता विलाप करूं लागली आणि वारंवार भर्त्याच्या मस्तकाकडे व धनुष्याकडे पाहूं लागली ३३. ह्याप्रमाणें सीता एकसारखी विलाप करूं लागली असतांना सैन्यांतील एक राक्षस हात जोडून तेथें आला ३४ आणि " आर्यपुत्रा, विजय असो " असें ह्मणून अभिवंदन केल्यावर सेनापति प्रहस्त आल्याचें त्यानें त्या रावणाला कथन केलें ३५. ( तो ह्मणाला ) " सर्व अमात्यांसहवर्तमान प्रहस्त आपणांकडे आला आहे आणि, हे प्रभो, आपली भेट घेण्याकरितां आलेल्या त्यानेंच मला आपणांकडे पाठविलें आहे ३६. राजकार्याकरितां क्षमेचें अवलंबन करणाऱ्या महाराजा, त्यांचें कांहीं तरी जरूरीचें कार्य आहे. ह्यास्तव, आपण त्यांची भेट घ्या " ३७ राक्षसानें सांगितलेला हा निरोप ऐकून घेतल्यावर रावण मंत्र्यांना भेटण्याकरितां अशोकवनांतून निघून गेला ३८. मंत्र्यासहवर्तमान आपण काय करावयाचें तें सर्व त्यानें ठरविलें आणि रामाचा पराक्रम जाणून सभेमध्यें प्रविष्ट झाल्यावर ठरल्याप्रमाणें

त्तमम् । जगाम रावणस्यैव निर्याणसमनन्तरम् ४० राक्षसेन्द्रस्तु तैः सार्धं मन्त्रिभिर्भीमविक्रमैः । समर्थयामास तदा रामकार्यविनिश्चयम् ४१ अविदूरस्थितान्सर्वान्बलाध्यक्षान्हितैषिणः । अब्रवीत्कालसदृशो रावणो राक्षसाधिपः ४२ शीघ्रं भेरीनिनादेन स्फुटं कोणाहतेन मे । समानयध्वं सैन्यानि वक्तव्यं च न कारणम् ४३ ततस्तथेति प्रतिगृह्य तद्वचस्तदैव दूताः सहसा महद्बलम् । समानयंश्चैव समागतं च न्यवेदयन्भर्तरि युद्धकाङ्क्षिणि ४४ [ ११९७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥ ३२ ॥

सीतां तु मोहितां दृष्ट्वा सरमा नाम राक्षसी । आससादाथ वैदेहीं प्रियां प्रणयिनी सखी १ मोहितां राक्षसेन्द्रेण सीतां परमदुःखिताम् । आश्वासयामास तदा सरमा मृदुभाषिणी २ सा हि तत्र कृता मित्रं सीतया रक्ष्यमाणया । रक्षन्ती रावणादिष्टा सानुक्रोशा दृढव्रता ३ सा ददर्श सखी सीतां सरमा नष्टचेतनाम् । उपावृत्त्योत्थितां ध्वस्तां वडवामिव

---

तो करूं लागला ३९. इकडे रावण निघून जातांक्षणींच तें मस्तक व तें उत्कृष्ट धनुष्य हीं दोन्हींही तेथल्या तेथेंच गुप्त झालीं ४०. नंतर भयंकर पराक्रम करणाऱ्या त्या मंत्र्यांसहवर्तमान राक्षसराज रावणानें रामाविषयीं आपण काय करावयाचें त्याचा निश्चय केला ४१; आणि त्या कालाला अनुरूप असलेला तो राक्षसाधिपति रावण समीपच असलेल्या व आपल्या हित इच्छिणाऱ्या सर्व सेनाधिपतींना ह्मणाला ४२ "उच्च नाद येईल अशारीतीनें दुंदुभि वाजवून माझीं सर्व सैन्यें तुह्मी सत्वर गोळा करा, परंतु, कारण सांगू नका " ४३. तदनंतर " ठीक आहे " असें ह्मणून त्या दूतांनीं तत्क्षणीं तें प्रचंड सैन्य जमा केलें आणि सैन्य जमलें असल्याबद्दल त्यांनीं आपल्या युद्धेच्छु अधिपतीला निवेदन केलें ४४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३२ ॥

सीता मोहित झालेली पाहून तिच ठिकाणीं प्रेम करणारी व तिची सखी झालेली एक सरमानामक राक्षसी त्या प्रिय सीतेच्या जवळ आली १ आणि राक्षसाधिपति रावणानें मोहित करून टाकिल्यामुळें अतिशय दुःखित झालेल्या त्या सीतेचें, ती मृदुभाषण करणारी सरमा, सांत्वन करूं लागली २. कारण, रावणानें सीतेचें रक्षण करण्याविषयीं सरमेला आज्ञा केली असल्यामुळें तिच्या हातून सीतेचें रक्षण होऊं लागलें असतां प्रतिज्ञेप्रमाणें वागणारी ती सरमा सीतेनें आपली सखी केली होती ३. असो. श्रम झाल्यामुळें धुराळ्यामध्यें लोळून उठलेल्या वडवेप्रमाणें

पांसुषु ४ तां समाश्वासयामास सखी स्नेहेन सुव्रताम् । उक्ता यच्च त्वया भर्त्रा वक्त्रेण स्वयं प्रयुक्तश्च स्वयं त्वया ५ लीनया गहने शून्ये भयमुत्सृज्य रावणात् । तव हेतोर्विशालाक्षि न हि मे रावणाद्भयम् ६ स संभ्रान्तश्च निष्क्रान्तो यत्कृते राक्षसेश्वरः । तत्र मे विदितं सर्वमभिनिष्क्रम्य मैथिलि ७ न शक्यं सौप्तिकं कर्तुं रामस्य विदितात्मनः । वधश्च पुरुषव्याघ्रे तस्मिन्नैवोपपद्यते ८ न त्वेवं वानरा हन्तुं शक्याः पादपयोधिनः । सुरा देवर्षभेणेव रामेण हि सुरक्षिताः ९ दीर्घवृत्तभुजः श्रीमान्महोरस्कः प्रतापवान् । धन्वी संनहनोपेतो धर्मात्मा भुवि विश्रुतः १० विक्रान्तो रक्षिता नित्यमात्मनश्च परस्य च । लक्ष्मणेन सह भ्रात्रा कुलीनो नयशास्त्रवित् ११ हन्ता परबलौघानामचिन्त्यबलपौरुषः । न हतो राघवः श्रीमान्सीते शत्रुनिबर्हणः १२ अयुक्तबुद्धिकृत्येन सर्वभूतविरोधिना । इयं प्रयुक्ता रौद्रेण माया मायाविना त्वयि १३ शोकस्ते विगतः सर्वकल्याणं त्वामुपस्थितम् । ध्रुवं त्वां भजते लक्ष्मीः प्रियं

---

भूमीवरून उठलेल्या परंतु बेशुद्ध असलेल्या सीतेला त्या सरमासखीनें अवलोकन केलें ४ आणि प्रेमानें ती सखी सरमा सांत्वन करीत करीत त्या पतिव्रता सीतेला ह्मणाली " रावणानें जें तुझ्याशीं भाषण केलें आणि तूं स्वतः जें त्याच्याशीं भाषण केलेंस ५ तें सर्व रावणाचें भय सोडून गहन वनामध्यें मीं गुप्त राहून एकिलें. हे विशालनयने सीते, तुझ्यामुळें रावणापासून मला भय नाहीं ६. हे सीते, राक्षसाधिपति रावण घाईघाईनें ज्या कारणाकरितां बाहेर गेला होता तें सर्व बाहेर जाऊन मीं समजून घेतलें आहे ७. परंतु, चित्तदोष जिंकिलेल्या त्या रामाचा निद्रावस्थेमध्यें वध होणें शक्य नाहीं. सारांश, त्या पुरुषश्रेष्ठ रामाचा वध होणें संभवनीयच नाहीं ८. त्याचप्रमाणें वृक्षांच्या योगानें युद्ध करणाऱ्या वानरांचाही वध होणें शक्य नाहीं. कारण, सुरश्रेष्ठ इंद्र ज्याप्रमाणें देवांचें रक्षण करीत असतो त्याप्रमाणें रामानें त्यांचे त्यांचे त्याप्रकारें रक्षण केलें आहे ९. दीर्घ व वर्तुलाकृति भुज, वैभव, विशाल वक्षस्थल, प्रताप, धनुष्य आणि शरीरदार्ढ्य ह्यांनीं युक्त असलेला तो राम धर्मात्मा, पराक्रमी, आपलें व दुसऱ्याचें नेहमीं रक्षण करणारा, भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान असलेला, कुलीन आणि नीतिशास्त्रवेत्ता ह्मणून जगतामध्यें प्रसिद्ध आहे १०, ११; आणि अतर्क्य बल व पराक्रम ह्यांनीं युक्त असलेला तो राम शत्रुसेनासमुदायांचा वध करणारा आहे. तात्पर्य, हे सीते, शत्रुघातक श्रीमान् राम वध पावला नाहीं १२. ज्याचे आचारविचार अयोग्य आहेत आणि प्राणिमात्रांशीं जो द्वेष करणारा आहे त्या मायावी व क्रूर राक्षसानें तुझ्या ठिकाणीं हा मायेचा

ते भवति शृणु १४ उत्तीर्य सागरं रामः सह वानरसेनया । संनि-
विष्टः समुद्रस्य तीरमासाद्य दक्षिणम् १५ दृष्टो मे परिपूर्णार्थः काकुत्स्थः
सहलक्ष्मणः । सहितैः सागरान्तस्थैर्बलैस्तिष्ठति रक्षितः १६ अनेन
प्रेषिता ये च राक्षसा लघुविक्रमाः । राघवस्तीर्ण इत्येवं प्रवृत्तिस्तैरिहा-
हृता १७ स तां श्रुत्वा विशालाक्षि प्रवृत्तिं राक्षसाधिपः । एष मन्त्रयते
सर्वैः सचिवैः सह रावणः १८ इति ब्रुवाणा सरमा राक्षसी सीतया सह।
सर्वोद्योगेन सैन्यानां शब्दं शुश्राव भैरवम् १९ दण्डनिर्घातवादिन्याः
श्रुत्वा भेर्या महास्वनम् । उवाच सरमा सीतामिदं मधुरभाषिणी २०
संनाहजननी ह्येषा भैरवा भीरु भेरिका । भेरीनादं च गम्भीरं शृणु तोय-
दनिस्वनम् २१ कल्प्यन्ते मत्तमातङ्गा युज्यन्ते रथवाजिनः । दृश्यन्ते
तुरगारूढाः प्रासहस्ताः सहस्रशः २२ तत्र तत्र च संनद्धाः
संपतन्ति सहस्रशः । आपूर्यन्ते राजमार्गाः सैन्यैरद्भुतदर्शनैः ॥

---

प्रयोग केलेला आहे १३. हे सीते, दुःख नाहींसें होऊन सर्व प्रकारचें सुख तुला प्राप्त होण्याचा समय जवळ आला आहे आणि राज्यलक्ष्मी निःसंशय तुझा स्वीकार करणार आहे. माझ्या तोंडून हा प्रिय वृत्तांत तूं श्रवण कर १४. वानरसेनेसहवर्तमान राम समुद्र उल्लंघन करून आला आहे आणि दक्षिण तीरावर उतरला आहे १५. ज्याचे मनोरथ जवळ जवळ परिपूर्णच झालेले आहेत असा तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम लक्ष्मणासहवर्तमान मीं अवलोकन केला. समुद्रतीरावर एकत्र जळलेल्या सेना त्याचें रक्षण करीत आहेत व तो तीरावर आहे १६. ह्या रावणानें शीघ्र गमन करणारे जे राक्षस पाठविले होते त्यांनीं राम समुद्र उतरून आला अशा प्रकारची बातमी येथें आणिली आहे १७; आणि, हे विशाल नयने सीते, ती वार्ता श्रवण करून तो हा राक्षसाधिपति रावण सर्व मंत्र्यांसहवर्तमान विचार करीत बसला आहे " १८. ह्याप्रमाणें ती सरमा राक्षसी सीतेसहवर्तमान भाषण करीत असतांना सैन्यांमध्यें एकदम सर्व प्रकारची चळवळ सुरू झाल्यामुळें भयंकर शब्द तिच्या कानीं पडला १९. नंतर दंडांनीं ताडित होऊं लागल्यामुळें फारच उच्च स्वरानें गर्जना करणाऱ्या दुंदुभीचा प्रचंड ध्वनि ऐकून ती मधुर भाषण करणारी सरमा सीतेला ह्मणाली २० " हे भित्र्ये सीते, युद्धाच्या तयारीची ही भयंकर नौबद झडत आहे. आतां मेघाप्रमाणें ह्या नौबदीचा गंभीर नाद तूं श्रवण कर २१. मत्त गज युद्धार्थ सज्ज होत आहेत; रथांचे अश्व जोडिले जात आहेत आणि हातांत भाले घेतलेले हजारों स्वार दृष्टीं पडत आहेत २२. हजारों योद्धे ठिकठिकाणीं गोळा होत आहेत

वेगवद्भिर्नदद्भिश्च तोयौघैरिव सागरः २३ शस्त्राणां च प्रसन्नानां चर्मणां वर्मणां तथा २४ रथवाजिगजानां च राक्षसेन्द्रानुयायिनाम् । संभ्रमो रक्षसामेष हृषितानां तरस्विनाम् ॥ प्रभां विसृजतां पश्य नानावर्णसमुत्थिताम् २५ संभ्रमो रक्षसामेष तुमुलं लोमहर्षणम् । श्रीस्त्वां भजति शोकघ्नी रक्षसां भयमागतम् २६ रामः कमलपत्राक्षो दैत्यानामिव वासवः। अवजित्य जितक्रोधस्तमचिन्त्यपराक्रमः २७ रावणं समरे हत्वा भर्ता त्वाधिगमिष्यति २८ विक्रमिष्यति रक्षःसु भर्ता ते सहलक्ष्मणः । यथा शत्रुषु शत्रुघ्नो विष्णुना सह वासवः २९ आगतस्य हि रामस्य क्षिप्रमङ्कगतां सतीम् । अहं द्रक्ष्यामि सिद्धार्थां त्वां शत्रौ विनिपातिते ३० अस्राण्यानन्दजानि त्वं वर्तयिष्यसि जानकि। समागम्य परिष्वक्ता तस्योरसि महोरसः ३१ अचिरान्मोक्ष्यते सीते देवि ते जघनं गताम् । धृतामेकां बहून्मासान्वेणीं रामो महाबलः ३२ तस्य दृष्ट्वा मुखं देवि पूर्णचन्द्रमिवोदितम् । मोक्ष्यसे

---

आणि वेगवान् व गर्जना करणाऱ्या जलप्रवाहांनीं ज्याप्रमाणें समुद्र भरून जावा त्याप्रमाणें दिसण्यांतही अद्भुत असलेल्या सैन्यांनीं राजमार्ग भरून जात आहे २३. निर्मल शस्त्रें, ढाली, कवचें, रथ, अश्व, गज आणि राक्षसाधिपतीच्या मागोमाग जाणारे आनंदित व बलाढ्य राक्षस ह्यांचीही गडबड आहे. अनेक वर्णांनीं युक्त असलेली ह्या शस्त्रादिकांची प्रभा तूं अवलोकन कर २४,२५. ही गडबड राक्षसांचीच आहे आणि अंगावर कांटा येण्यासारिखें भय राक्षसांना प्राप्त झालें आहे. दुःखाचा नाश करणारी राजलक्ष्मी आतां सत्वरच तुझा स्वीकार करील २६. दैत्यांच्या जवळ असलेली लक्ष्मी ज्याप्रमाणें इंद्रानें हरण केली त्याप्रमाणें तो अचिंत्यपराक्रमी व क्रोध जिंकिलेला तुझा भर्ता कमलनयन राम संग्रामामध्यें त्या रावणाला जिंकून व त्याचा वध करून तुला घेऊन जाईल २७, २८. शत्रुनाशक इंद्रानें ज्याप्रमाणें विष्णूसहवर्तमान शत्रूंचे ठिकाणीं पराक्रम गाजविला त्याप्रमाणें तुझा भर्ता राम लक्ष्मणासहवर्तमान राक्षसांचे ठिकाणीं पराक्रम गाजवील २९; आणि शत्रूंचा वध झाल्यानंतर येथें आलेल्या रामाच्या अंकावर मनोरथ परिपूर्ण होऊन बसलेल्या तुज पतिव्रतेला मी लवकरच अवलोकन करीन ३०. हे जानकि, विशाल वक्षस्थलानें युक्त असलेल्या त्या रामानें भेट होतांक्षणीं आपल्या वक्षस्थलाचे ठिकाणीं तुला कवटाळून धरिलें असतां तूं आपल्या नेत्रांतून आनंदाश्रु ढाळशील ३१. हे सीते, हे देवि, कमरेवर पडत असलेली आणि एकदांच घालून पुष्कळ महिनेपर्यंत ठेविलेली ही तुझी वेणी महाबलाढ्य राम लवकरच ( फिरून घालण्याकरितां ) सोडील ३२. हे देवि, नागीण ज्याप्रमाणें कात

शोकजं वारि निर्मोकमिव पन्नगी ३३ रावणं समरे हत्वा न चिरादेव मैथिलि । त्वया समग्रः प्रियया सुखार्हो लप्स्यते सुखम् ३४ सभाजिता त्वं रामेण मोदिष्यसि महात्मना । सुवर्षेण समायुक्ता यथा सस्येन मेदिनी ३५ गिरिवरमभितो विवर्तमानो हय इव मण्डलाशु यः करोति । तमिह शरणमभ्युपैहि देवि दिवसकरं प्रभवो ह्ययं प्रजानाम् ३६ [१२३३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ॥ ३३ ॥

अथ तां जातसंतापां तेन वाक्येन मोदिताम् । सरमाह्लादयामास महीं दग्धामिवाम्भसा १ ततस्तस्या हितं सख्याश्चिकीर्षन्ती सखी वचः । उवाच काले कालज्ञा स्मितपूर्वाभिभाषिणी २ उत्सहेयमहं गत्वा त्वद्वाक्यमसितेक्षणे । निवेद्य कुशलं रामे प्रतिच्छन्ना निवर्तितुम् ३ न हि मे क्रममाणाया निरालम्बे विहायसि । समर्थो गतिमन्वेतुं पवनो गरुडोपि वा ४ एवं ब्रुवाणां तां सीता सरमामिदमब्रवीत् । मधुरं श्लक्ष्णया वाचा

---

टाकून देते त्याप्रमाणें उदय पावलेल्या पूर्णचंद्रासारिखें आल्हादकारक असलेलें त्या रामचंद्राचें मुख अवलोकन करून तूं दुःखाश्रूंचा लवकरच त्याग करिशील ३३. हे सीते, समरांगणामध्यें रावणाचा वध करून लवकरच सुखाला पात्र असलेला तो राम तुज प्रियेसहवर्तमान सुखाचा उपभोग घेईल ३४. सारांश, सुवृष्टीनें युक्त झालेली पृथ्वी ज्याप्रमाणें धान्याच्या योगानें आनंदित होते त्याप्रमाणें महात्म्या रामाच्या हातून लवकरच मानमान्यता पावून तूं आनंदित होशील ३५. ह्यास्तव, पर्वतश्रेष्ठ मेरूचे सभोंवतीं फिरणारा जो सूर्य अश्वाप्रमाणें सत्वर मंडलाकार फिरत असतो त्या सूर्याला, हे देवि, तूं येथें शरण जा. कारण, प्रजाजनांच्या सुखदुःखाचें मूळ तोच आहे ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं तेहतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३३ ॥

दग्ध झालेल्या पृथ्वीला ज्याप्रमाणें उदकाच्या योगानें मेघमाला आनंद देते त्याप्रमाणें संतप्त झालेल्या परंतु, त्या सरमेच्या भाषणानें संतापरहित झालेल्या त्या सीतेला ती सरमा आनंद देऊं लागली १. तदनंतर त्या सखीचें हित इच्छिणारी व हास्यपूर्वक भाषण करणारी आणि वेळ जाणणारी ती सखी सरमा योग्य वेळीं तिला म्हणाली २ " हे कृष्णनयने सीते, कुशलबोधक असें तुझें भाषण गुप्तपणें रामाला जाऊन कळवावें आणि येथें परत यावें अशी माझी इच्छा आहे ३. निराधार आकाशामध्यें मी संचार करूं लागलें असतां गरुड अथवा वायुही माझ्या मागोमाग येण्यास समर्थ

पूर्वशोकाभिपन्नया ५ समर्था गगनं गन्तुमपि च त्वं रसातलम् । अवगच्छाय कर्तव्यं कर्तव्यं ते मदन्तरे ६ मत्प्रियं यदि कर्तव्यं यदि बुद्धिः स्थिरा तव । ज्ञातुमिच्छामि तं गत्वा किं करोतीति रावणः ७ स हि मायाबलः क्रूरो रावणः शत्रुरावणः । मां मोहयति दुष्टात्मा पीतमात्रेव वारुणी ८ तर्जापयति मां नित्यं भर्त्सापयति चासकृत् । राक्षसीभिः सुघोराभिर्यो मां रक्षति नित्यशः ९ उद्विग्ना शङ्किता चास्मि न स्वस्थं च मनो मम । तद्भयाच्चाहमुद्विग्ना अशोकवनिकां गता १ यदि नाम कथा तस्य निश्चितं वापि यद्भवेत् । निवेदयेथाः सर्वं तद्वरो मे स्यादनुग्रहः ११ साप्येवं ब्रुवतीं सीतां सरमा मृदुभाषिणी । उवाच वचनं तस्याः स्पृशन्ती बाष्पविक्लवम् १२ एष ते यद्यभिप्रायस्तस्माद्गच्छामि जानकि । गृह्य शत्रोरभिप्रायमुपावर्तामि मैथिलि १३ एवमुक्त्वा ततो गत्वा समीपं तस्य रक्षसः । शुश्राव कथितं तस्य रावणस्य

---

नाहीं ४. ह्याप्रमाणें ती सरमा भाषण करूं लागली असतां पूर्वीच्या शोकाचें जिच्यांत थोडेंसें मिश्रण आहे अशा स्पष्ट वाणीनें व मधुरस्वरानें सीता तिला ह्मणाली ५ "आकाशामध्येंच काय परंतु, रसातलामध्येंही गमन करण्यास तूं समर्थ आहेस. तथापि, माझ्याकरितां आज जें करणें तुला योग्य आहे तें तूं एकून घे ६. तुझ्या मनांतून जर माझें प्रिय कर्तव्य असेल आणि माझें प्रिय करण्याविषयीं जर तुझी बुद्धि स्थिर असेल तर येथून गेल्यानंतर रावण काय करीत आहे हें समजण्याची माझी इच्छा आहे. ७. कारण, शत्रूंना आक्रोश करूं लावणारा तो रावण क्रूर, दुरात्मा आणि मायाबलानें युक्त असल्यामुळें, सेवन करितांक्षणीं मोह पाडणाऱ्या मदिरेप्रमाणें मला मोह पाडीत आहे ८. अतिक्रूर राक्षसींकडून हा माझा नेहमीं बंदोबस्त करीत असतो; नेहमीं मला धमक्या देववीत असतो व वारंवार माझी निर्भर्त्सनाही करवीत असतो ९. मी उद्विग्न व साशंक असून माझ्या मनाला स्वस्थता नाहीं. मी जरी अशोकवनामध्यें आहें तरी त्याच्या भीतीनें उद्विग्न आहें १०. जें जें कांहीं तेथें चाललें असेल किंवा जें कांहीं त्यांनीं कर्तव्य ह्मणून निश्चित केलें असेल तें जर तूं मला निवेदन करशील तर माझ्यावर तुझा मोठा अनुग्रहच होईल " ११. ह्याप्रमाणें सीता बोलूं लागली असतां मृदु भाषण करणारी ती सरमाही अश्रूंनीं भरून गेलेलें तिचें मुख पुशीत पुशीत तिला ह्मणाली १२ " हे जानकि, हा जर तुझा हेतु असेल तर मी जातें आणि, हे मैथिलि, शत्रूचा अभिप्राय काय आहे तो समजून घेऊन परत येतें " १३. असें सांगितल्यावर ती सरमा त्या राक्षसासमीप गेली आणि मंत्र्यांसहवर्तमान रावणाचें जें

समन्त्रिणः १४ सा श्रुत्वा निश्चयं तस्य निश्चयज्ञा दुरात्मनः । पुनरेवागमत्क्षिप्रमशोकवनिकां शुभाम् १५ सा प्रविष्टा ततस्तत्र ददर्श जनकात्मजाम् । प्रतीक्षमाणां स्वामेव भ्रष्टपद्मामिव श्रियम् १६ तां तु सीता पुनः प्राप्तां सरमां प्रियभाषिणीम् । परिष्वज्य च सुस्निग्धं ददौ च स्वयमासनम् १७ इहासीना सुखं सर्वमाख्याहि मम तत्त्वतः । क्रूरस्य निश्चयं तस्य रावणस्य दुरात्मनः १८ एवमुक्ता तु सरमा सीतया वेपमानया । कथितं सर्वमाचष्ट रावणस्य समन्त्रिणः १९ जनन्या राक्षसेन्द्रो वै त्वन्मोक्षार्थं बृहद्वचः । अतिस्निग्धेन वैदेहि मन्त्रिवृद्धेन चोदितः २० दीयतामभिसत्कृत्य मनुजेन्द्राय मैथिली । निदर्शनं ते पर्याप्तं जनस्थाने यदद्भुतम् २१ लङ्घनं च समुद्रस्य दर्शनं च हनूमतः । वधं स रक्षसां युद्धे कः कुर्यान्मानुषो युधि २२ एवं स मन्त्रिवृद्धैश्च मात्रा च बहु बोधितः । न त्वामुत्सहते मोक्तुमर्थमर्थपरो यथा २३ नोत्सहत्यमृतो मोक्तुं युद्धे त्वामिति

---

भाषण चाललें होतें तें तिनें ऐकिलें १४. सारांश, भाषणांतील मर्म जाणणारी ती सरमा त्या दुरात्म्या रावणाचा निश्चय जाणून पुनरपि शुभ अशोकवनामध्यें सत्वर परत आली १५. परंतु, अशोकवनामध्यें येऊन ती सरमा सीतेला पाहूं लागली तों कमलांचा वियोग झालेल्या लक्ष्मीप्रमाणें उद्विग्न झालेली सीता आपलीच वाट पहात आहे असें तिच्या दृष्टोत्पत्तीस आलें १६. असो. प्रिय भाषण करणारी ती सरमा परत आल्यावर सीतेनें अतिशय प्रेमानें तिला आलिंगन दिलें आणि स्वतः आसन दिल्यावर ती तिला ह्मणाली १७ " येथें बसून तूं त्या दुरात्म्या क्रूर रावणाचा जो कांहीं निश्चय झाला असेल तो सर्व खुलाल खराखरा माझ्यापाशीं सांग" १८. ह्याप्रमाणें थरथर कांपत असलेली सीता तिला ह्मणाली असतां मंत्र्यांसहवर्तमान रावणाचें सर्व कांहीं भाषण तिनें तिला निवेदन केलें १९. ( ती ह्मणाली ) " हे सीते, राक्षसाधिपति रावणाला, तुला सोडून देण्याविषयीं, त्याच्या मातेनें आणि त्याच्यावर अतिशय प्रेम करणाऱ्या एका वृद्ध मंत्र्यानें मोठेंच भाषण करून सांगितलें आहे २०. ( ते ह्मणाले ) " सत्कारपूर्वक प्रजाधिपति रामाला सीता अर्पण करावी. कारण, जनस्थानामध्यें जी अद्भुत गोष्ट घडून आली ती त्याच्या पराक्रमाची तुला अटकळ होण्यास पुरे आहे २१. अरे, समुद्राचें उल्लंघन, हनुमानानें केलेलें सीतेचें दर्शन आणि युद्धामध्यें राक्षसांचा त्यानें केलेला वध हीं कर्में दुसरा कोणता बरें पुरुष युद्धामध्यें करणार आहे ? " २२. ह्याप्रमाणें वृद्ध वृद्ध मंत्र्यांनीं आणि मातेनें जरी त्याला पुष्कळ उपदेश केला तरी

मैथिलि । सामात्यस्य नृशंसस्य निश्चयो ह्येष वर्तते ॥ तदेषा सुस्थिरा बुद्धिर्मृत्युलोभादुपस्थिता २४ भयान्न शक्तस्त्वां मोक्तुमनिरस्तः स संयुगे । राक्षसानां च सर्वेषामात्मनश्च वधेन हि २५ निहत्य रावणं सङ्ख्ये सर्वथा निशितैः शरैः । प्रतिनेष्यति रामस्त्वामयोध्यामसितेक्षणे २६ एतस्मिन्नन्तरे शब्दो भेरीशङ्खसमाकुलः । श्रुतो वै सर्वसैन्यानां कम्पयन्धरणीतलम् २७ श्रुत्वा तु तं वानरसैन्यनादं लङ्कागता राक्षसराजभृत्याः । हतौजसो दैन्यपरीतचेष्टाः श्रेयो न पश्यन्ति नृपस्य दोषात् २८ [१२६१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥ ३४ ॥

तेन शङ्खविमिश्रेण भेरीशब्देन नादिना । उपयाति महाबाहू रामः परपुरंजयः १ तं निनादं निशम्याथ रावणो राक्षसेश्वरः । मुहूर्तं ध्यानमास्थाय सचिवानभ्युदैक्षत २ अथ तान्सचिवांस्तत्र सर्वानाभाष्य रावणः । सभां संनादयन्सर्वानित्युवाच महाबलः ३ जगत्संतापनः क्रूरो

---

द्रव्यलोभी पुरुषाला ज्याप्रमाणें द्रव्य सोडावेंसें वाटत नाहीं त्याप्रमाणें तुझी मुक्तता करण्याचें त्या रावणाच्या मनांत येत नाहीं २३. हे सीते, युद्धामध्यें मरण पावल्यावांचून तुला सोडण्याचा त्याचा मानस नाहीं. अमात्यासहवर्तमान त्या दुष्टाचा हाच निश्चय झालेला आहे. मृत्यूनें मोह पाडिल्यामुळें ह्याच्या बुद्धीचा असा पक्का ग्रहच झालेला आहे २४. सर्व राक्षस आणि स्वतः रावण ह्यांचा वध होऊन युद्धामध्यें पूर्ण नाश झाल्याशिवाय भीतीनें तो तुला सोडून देणार नाहीं २५. हे कृष्णनयने सीते, कांहीं झालें तरी संग्रामामध्यें तीक्ष्ण बाणांनीं रावणाचा वध करून राम तुला अयोध्येंत घेऊन जाईल " २६. असें ह्यांचें भाषण चाललें आहे तोंच दुंदुभि आणि शंख ह्यांच्या शब्दांचें मिश्रण ज्यामध्यें आहे असा सर्व सेनांचा भूतलकंपित करणारा ध्वनि कानावर आला २७. तेव्हां वानरसैन्यांची ती गर्जना श्रवण करून लंकेमध्यें असलेले राक्षसराज रावणाचे सेवक निस्तेज झाले; उद्योगाविषयीं ते उदासीन झाले आणि रावणराजाच्या दोषामुळें त्यांना जीविताचीही आशा दिसेनाशी झाली २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चवतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३४ ॥

शंखांचा ज्यामध्यें ध्वनि मिश्र झालेला आहे असा दुंदुभींचा प्रचंड ध्वनि होऊं लागला व त्याच्या बरोबरच शत्रुसेना जिंकणारा महापराक्रमी राम लंकेकडे चालला १. तो ध्वनि ऐकिल्यावर राक्षसाधिपति रावण क्षणभर विचार करून सचिवांकडे पाहूं लागला २; आणि तेथें असलेल्या त्या सर्व सचिवांना हाक मारून सभा नादित करीत

गर्हयन्राक्षसेश्वरः ४ तरणं सागरस्यास्य विक्रमं बलपौरुषम् । यदुक्त-
वन्तो रामस्य भवन्तस्तन्मया श्रुतम् ५ भवतश्चाप्यहं वेद्मि युद्धे सत्य-
पराक्रमान् । तूष्णीकानीक्षतोन्योन्यं विदित्वा रामविक्रमम् ६ ततस्तु
सुमहाप्राज्ञो माल्यवान्नाम राक्षसः । रावणस्य वचः श्रुत्वा इति माता-
महोऽब्रवीत् ७ विद्यास्वभिविनीतो यो राजा राजन्नयानुगः । स शास्ति
चिरमैश्वर्यमरींश्च कुरुते वशे ८ संदधानो हि कालेन विगृह्णंश्चारिभिः
सह । स्वपक्षे वर्धनं कुर्वन्महदैश्वर्यमश्नुते ९ हीयमानेन कर्तव्यो राज्ञा
संधिः समेन च । न शत्रुमवमन्येत ज्यायान्कुर्वीत विग्रहम् १० तन्मह्यं रोचते
संधिः सह रामेण रावण । यदर्थमभियुक्तोऽसि सीता तस्मै प्रदीयताम् ११
तस्य देवर्षयः सर्वे गन्धर्वाश्च जयैषिणः । विरोधं मा गमस्तेन संधिस्ते
तेन रोचताम् १२ असृजद्भगवान्पक्षौ द्वावेव हि पितामहः । सुराणाम-
सुराणां च धर्माधर्मौ तदाश्रयौ १३ धर्मो हि श्रूयते पक्ष अम-
राणां महात्मनाम् । अधर्मो रक्षसां पक्षो ह्यसुराणां च राक्षस १४

---

करीत व सचिवांची स्तुति करीत करीत महाबलाढ्य, जगताला ताप देणारा व क्रूर राक्षसाधिपति रावण त्यांना ह्मणाला ३,४ " ह्या रामाचा पराक्रम, बल, पौरुष आणि ह्यानें केलेलें समुद्राचें उल्लंघन हें जें तुह्मीं सांगितलेंत तें मीं ऐकिलें ५. युद्धामध्यें तुह्मी अमोघ पराक्रम करणारे आहांत; परंतु, रामाचा पराक्रम ऐकिल्याबरोबर 'एकमे-कांच्या तोंडाकडे पहात पहात स्वस्थ बसलां आहांत हेंही मी जाणीत आहें ६. तदनंतर रावणाचें भाषण श्रवण करून त्याचा मातामह अतिबुद्धिमान् माल्यवान् राक्षस त्याला ह्मणाला ७ " हे राजा, चवदा विद्यांमध्यें निपुण असून जो राजा न्यायानें वागणारा असेल तोच चिरकाल ऐश्वर्याचा उपभोग घेतो आणि शत्रूंना पादाक्रांत करितो ८. समयाला अनुसरून शत्रूंशीं युद्ध करणारा आणि स्वपक्षाची अभिवृद्धि करणारा राजा मोठें ऐश्वर्य मिळवितो ९. जो आपल्या बरोबरीचा अथवा आपल्याहून कमी असेल त्याच्याशीं राजानें तह करावा आणि शत्रूपेक्षां जो स्वतः फारच प्रबल असेल त्यानें युद्ध करावें. परंतु, शत्रूची उपेक्षा करूं नये. १०. ह्यास्तव, हे रावणा, रामाशीं तूं तह करावास आणि जिच्याकरितां तूं हट्ट धरिला आहेस ती सीता रामाला देऊन टाकावीस असें मला वाटतें ११. कारण, देव, ऋषि आणि गंधर्व हे सर्वही त्याच्या जयाची इच्छा करणारे आहेत. ह्यास्तव, त्याच्याशीं विरोधभाव न धरितां तह कर-ण्याचेंच तूं मनामध्यें आण १२. देव आणि दैत्य असे दोन पक्ष भगवान् ब्रह्मदेवानें उत्पन्न केले आहेत व धर्म आणि अधर्म हे अनुक्रमें त्यांच्या आश्रयाला आहेत १३.

धर्मो वै ग्रसतेऽधर्मं यदा कृतमभूद्युगम् । अधर्मो ग्रसते धर्मं तदा तिष्यः प्रवर्तते १५ तत्त्वया चरता लोकान्धर्मोपि निहतो महान् । अधर्मः प्रगृहीतश्च तेनास्मद्बलिनः परे १६ स प्रमादात्प्रवृद्धस्तेऽधर्मोऽहिर्ग्रसते हि नः । विवर्धयति पक्षं च सुराणां सुरभावनः १७ विषयेषु प्रसक्तेन यत्किंचित्कारिणा त्वया । ऋषीणामग्निकल्पानामुद्वेगो जनितो महान् १८ तेषां प्रभावो दुर्धर्षः प्रदीप्त इव पावकः । तपसा भावितात्मानो धर्मस्यानुग्रहे रताः १९ मुख्यैर्यज्ञैर्यजन्त्येते तैस्तैर्यज्ञैर्द्विजातयः । जुह्वत्यग्नींश्च विधिवद्वेदांश्चोच्चैरधीयते ॥ अभिभूय च रक्षांसि ब्रह्मघोषानुदीरयन् २० दिशो विप्रद्रुताः सर्वे स्तनयित्नुरिवोष्णगे । ऋषीणामग्निकल्पानामग्निहोत्रसमुत्थितः २१ आवृत्य रक्षसां तेजो धूमो व्याप्य दिशो दश । तेषु तेषु च देशेषु पुण्येष्वेव धृतव्रतैः २२ चर्यमाणं तपस्तीव्रं संतापयति राक्षसान् । देवदानवयक्षेभ्यो गृहीतश्च वरस्त्वया २३ मनुष्या वानरा ऋक्षा गोलाङ्गूला

---

हे राक्षसा, धर्म हा महात्म्या देवांचा पक्ष असून अधर्म राक्षसांचा व असुरांचा पक्ष आहे १४. जेव्हां कृतयुग होत असतें तेव्हां धर्म अधर्माला ग्रस्त करून टाकीत असतो आणि जेव्हां कलियुग प्रवृत्त होतें तेव्हां अधर्म धर्माला ग्राशीत असतो १५. सारांश, दिग्विजयाकरितां लोकांना पादाक्रांत करितेवेळीं तूं त्या मोठ्या धर्माचा घात करून अधर्माचें अवलंबन केलें आहेस आणि ह्यामुळेंच शत्रु आपणांपेक्षां प्रबल झाले आहेत १६. तुझ्या प्रमादामुळें वृद्धिंगत झालेला अधर्म आमचा ऱ्हास करीत आहे आणि देवांनीं सेवन केलेला धर्म त्यांच्या पक्षाची अभिवृद्धि करीत आहे १७. विषयांचे ठिकाणीं आसक्त राहून यथेष्ट वर्तन करणारा जो तूं त्या तुझ्यामुळें अग्नितुल्य ऋषींना अतिशय उद्वेग प्राप्त झाला आहे १८; परंतु, प्रदीप्त अग्नीप्रमाणें त्यांचा प्रभाव इतरांना सहन होण्यासही अशक्य आहे. कारण, तपश्चर्येच्या योगानें त्यांचीं अंतःकरणें शुद्ध झालीं असून धर्माचा संग्रह करण्याविषयीं ते तत्पर आहेत १९. हे ब्राह्मण नानाप्रकारचे मुख्य मुख्य यज्ञ करीत असतात, अग्नीमध्यें यथाविधि हवन करीत असतात आणि उच्च स्वरानें वेदाध्ययन करीत असतात आणि राक्षसांना न जुमानतां वेदघोषही त्यांनीं केले आहेत २०. ह्यामुळें सर्वही राक्षस वाट फुटेल तिकडे पळून गेले आहेत. अग्नितुल्य ऋषींच्या अग्निहोत्रापासून उत्पन्न झालेला धूम राक्षसांचें तेज नाहींसें करून व दशदिशा व्याप्त करून राहिला आहे. ठिकठिकाणीं पवित्र याम करण्याचें व्रत स्वीकारिलेल्या द्विजांच्या हातून जी तीव्र तपश्चर्या होत आहे तिच्या योगानें राक्षसांना संताप होत आहे. देव, दानव, आणि यक्ष ह्यांच्या हातून अवध्य असून

महाबलाः।बलवन्त इहागम्य गर्जन्ति दृढविक्रमाः २४ उत्पातान्विविधान्दृष्ट्वा घोरान्बहुविधान्बहून् । विनाशमनुपश्यामि सर्वेषां रक्षसामहम् २५ खराभिस्तनिता घोरा मेघाः प्रतिभयंकराः । शोणितेनाभिवर्षन्ति लङ्कामुष्णेन सर्वतः २६ रुदतां वाहनानां च प्रपतन्त्यश्रुबिन्दवः । रजोध्वस्ता विवर्णाश्च न प्रभान्ति यथा पुरम् २७ व्याला गोमायवो गृध्रा वाशयन्ति च सुभैरवम् । प्रविश्य लङ्कामारामे समवायांश्च कुर्वते २८ कालिकाः पाण्डुरैर्दन्तैः प्रहसन्त्यग्रतः स्थिताः । स्त्रियः स्वप्नेषु मुष्णन्त्यो गृहाणि प्रतिभाष्य च २९ गृहाणां बलिकर्माणि श्वानः पर्युपसेवते । खरा गोषु प्रजायन्ते मूषका नकुलेषु च ३० मार्जारा द्वीपिभिः सार्धं सूकराः शुनकैः सह।किंनरा राक्षसैश्चापि समेयुर्मानुषैः सह ३१ पाण्डुरा रक्तपादाश्च विहगाः कालचोदिताः । राक्षसानां विनाशाय कपोता विचरन्ति च ३२ चीचीकूचीति वाशन्तः शारिका वेश्मसु स्थिताः । पतन्ति ग्रथिताश्चापि

---

ब्रह्मदेवापासून तुला वर प्राप्त झाला आहे २१,२२,२३; परंतु, बलाढ्य मनुष्य, वानर, ऋक्ष आणि गोलांगूल हेच येथें आले आहेत आणि ते महापराक्रमी व बलाढ्य मनुष्यादिकच येथें येऊन गर्जना करीत आहेत २४. नानाप्रकारचे हे अनेक घोर उत्पात अवलोकन करून तर सर्व राक्षसांचा विनाशकाल प्राप्त झाला असें मला वाटत आहे २५. प्रचंड गर्जना करणारे असे घोर व अतिभयंकर मेघ लंकेवर सर्व बाजूंनीं उष्ण रक्ताची वृष्टि करीत आहेत २६. रडत असलेल्या वाहनांच्या नेत्रांतून अश्रु गळत आहेत आणि धुळीनें भरून तीं वाहनें निस्तेज झाल्यामुळें पूर्वींसारिखीं दिसेनाशींही झालीं आहेत २७. लंकेमध्यें प्रवेश करून श्वापदें, कोल्हीं व गिधाडें अतिभयंकर शब्द करीत आहेत आणि लंकेंतील उपवनांमध्यें टोळ्याटोळ्यांनी जमत आहेत २८. स्वप्नामध्यें अतिशय कृष्णवर्ण स्त्रिया घरांतील वस्तु हरण करीत असून समोर उभ्या रहात आहेत आणि प्रतिकूल भाषण करून त्या स्त्रिया आपले शुभ्र दांत दर्शवीत दर्शवीत हास्य करीत आहेत २९. घरांतील पूजाद्रव्यांना श्वानांचा स्पर्श होऊं लागला आहे आणि गाईंचे ठिकाणीं गर्दभांची व मुंगसांचे ठिकाणीं उंदरांची उत्पत्ति होऊं लागली आहे ३०. व्याघ्रांशीं मांजरे, श्वानांशीं डुकरें आणि राक्षसांशीं व मनुष्यांशीं किन्नर सुरतक्रीडा करूं लागले आहेत ३१. शरीराचे ठिकाणीं श्वेतवर्ण व पायांचे ठिकाणीं आरक्तवर्ण असलेले कपोतपक्षी कालानें प्रेरणा केल्यामुळें राक्षसांच्या विनाशाकरितां त्यांच्या घरांतून संचार करूं लागले आहेत ३२. घरांमध्यें असलेल्या सारिका चीची, कूची असा शब्द करीत आहेत

निर्जिताः कलहैषिभिः ३३ पक्षिणश्च मृगाः सर्वे प्रत्यादित्यं रुदन्ति च ३४ करालो विकलो मुण्डः पुरुषः कृष्णपिङ्गलः । कालो गृहाणि सर्वेषां काले कालेन्ववेक्षते ३५ एतान्यन्यानि दुष्टानि निमित्तान्युत्पतन्ति च । ज्ञात्वावधार्य कर्माणि क्रियतामायतिक्षमम् ३६ इदं वचस्तस्य निगद्य माल्यवान्परीक्ष्य रक्षोधिपतेर्मनः पुनः । अनुत्तमेषूत्तमपौरुषो बली बभूव तूर्ष्णीं समवेक्ष्य रावणम् ३७ [ १२९८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः ॥ ३५ ॥

तत्तु माल्यवतो वाक्यं हितमुक्तं दशाननः । न मर्षयति दुष्टात्मा कालस्य वशमागतः १ स बद्ध्वा भ्रुकुटिं वक्त्रे क्रोधस्य वशमागतः । अमर्षात्परिवृत्ताक्षो माल्यवन्तमथाब्रवीत् २ हितबुद्ध्या यदहितं वचः परुषमुच्यते । परपक्षं प्रविश्यैव नैतच्छ्रोत्रगतं मम ३ मानुषं कृपणं राममेकं शाखामृगाश्रयम् । समर्थं मन्यसे केन त्यक्तं पित्रा वनाश्रयम् ४ रक्षसामीश्वरं मां च देवानां च भयंकरम् । हीनं मां मन्यसे केन अहीनं सर्वविक्रमैः ५

---

आणि इतर कलहेच्छु पक्ष्यांकडून पराजित होऊन परस्परांत अडखळून पडत आहेत ३३. सर्व पक्षी आणि मृग सूर्याकडे तोंड करून रोदन करीत आहेत ३४ आणि अक्राळविक्राळ मुंड व काळाकभिन्न काळपुरुष आह्मां सर्वांच्या घरांकडे वेळोवेळीं पहात आहे ३५. हे व अशाचप्रकारचे दुसरे घोर उत्पात होत आहेत ह्यांच्याकडे लक्ष्य देऊन आणि रामाचे पराक्रम अवलोकन करून परिणामीं सुखावह होणारें कर्म कोणतें हें ठरवा आणि त्याप्रमाणें करा ३६. माल्यवान् राक्षसानें राक्षसाधिपति रावणाशीं असें भाषण केलें आणि त्याच्या मनाचा कल कसा आहे हें समजून आल्यावर अतुलसामर्थ्यवान् राक्षसांमध्येंही महासमर्थ असलेला तो बलाढ्य माल्यवान् रावणाकडे पाहून स्वस्थ बसला ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पस्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३५॥

माल्यवान् राक्षसानें जरी हिताची गोष्ट सांगितली होती तरी काळाच्या तावडींत सांपडलेल्या त्या दुरात्म्या रावणाला तें त्याचें भाषण सहन झालें नाहीं १. तेव्हां क्रोधाधीन असलेला आणि रागामुळें आंख फिरून गेलेला तो रावण भिंवया चढवून माल्यवानाला ह्मणाला २ " हित करण्याच्या बुद्धीनें जें तूं शत्रुपक्षाचें प्राबल्य स्वीकारून अहितकारक कठोर भाषण करीत आहेस तें माझ्या कानाला रुचत नाहीं ३ मानव कृपण, वानरावर अवलंबून असलेला आणि पित्यानें त्याग केल्यामुळें वनाचा आश्रय करून राहिलेला जो एकटा राम त्याला तूं समर्थ कसा समजत आहेस ? ४

वीरद्वेषेण वा शङ्कं पक्षपातेन वा रिपोः। त्वयाहं परुषाण्युक्तो मम प्रोत्साहनेन वा ६ प्रभवन्तं पदस्थं हि परुषं कोऽभिभाषते । पण्डितः शास्त्रतत्त्वज्ञो विना प्रोत्साहनेन वा ७ आनीय च वनात्सीतां पद्महीनामिव श्रियम् । किमर्थं प्रतिदास्यामि राघवस्य भयादहम् ८ वृतं वानरकोटीभिः ससुग्रीवं सलक्ष्मणम् । पश्य कैश्चिदहोभिश्च राघवं निहतं मया ९ द्वन्द्वे यस्य न तिष्ठन्ति दैवतान्यपि संयुगे । स कस्माद्रावणो युद्धे भयमाहारयिष्यति १० द्विधा भज्येयमप्येवं न नमेयं तु कस्यचित् । एष मे सहजो दोषः स्वभावो दुरतिक्रमः ११ यदि तावत्समुद्रे तु सेतुर्बद्धो यदृच्छया । रामेण विस्मयः कोऽत्र येन ते भयमागतम् १२ स तु तीर्त्वार्णवं रामः सह वानरसेनया । प्रतिजानामि ते सत्यं न जीवन्प्रतियास्यति १३ एवं ब्रुवाणं संरब्धं रुष्टं विज्ञाय रावणम् । व्रीडितो माल्यवान्वाक्यं

---

आणि त्याचप्रमाणें राक्षसांचा अधिपति, देवांना भय उत्पन्न करणारा आणि सर्वप्रकारच्या पराक्रमांनीं परिपूर्ण असा जो मी त्या मला तूं कोणत्या कारणामुळें हीन समजत आहेस ? ५. मला वाटतें मज वीराचा तूं द्वेष करीत असल्यामुळें अथवा शत्रूचा तूं पक्षपात करीत असल्यामुळें किंवा मला प्रोत्साहन देणें हा तुझा उद्देश असल्यामुळें तूं मला उद्देशून कठोर शब्द उच्चारिले आहेस ६. कारण, राज्यावर असून समर्थ असलेल्या पुरुषाला उद्देशून कोण बरें शास्त्रतत्त्ववेत्ता पंडित प्रोत्साहनाशिवाय कठोर भाषण करणार आहे ? ७. कमलहीन लक्ष्मीप्रमाणें वनांतून आणिलेल्या सीतेला मी रामाच्या भीतीमुळें कशाकरितां परत देईन ? ८. फार कशाला ? थोडक्याच दिवसांत कोट्यावधि वानरांनीं परिवेष्टित असलेल्या रामाचा लक्ष्मण आणि सुग्रीव ह्यांसहवर्तमान माझ्या हातून वध झाल्याचें तूं अवलोकन कर ९. अरे, समरांगणामध्यें ज्याच्याशीं द्वंद्वयुद्ध करण्यास देवही तयार होत नाहींत तो रावण युद्धाविषयीं कां बरें भीति बाळगील ? १० प्रसंग पडल्यास माझ्या (कळकाप्रमाणें) दोन चिरफळ्याही होऊन जातील; परंतु, मी कोणाच्याहीपुढें नम्र होणार नाहीं, हा माझा स्वाभाविकच दोष आहे आणि स्वभाव पालटतां येणें अशक्य आहे ११. आतां समुद्रामध्यें रामानें दैव अनुकूल झाल्यामुळें जरी सेतु बांधिला आहे तरी ज्यामुळें तुला भय प्राप्त झालें अशी आश्चर्याची गोष्ट त्यामध्यें कोणती आहे ? १२. वानरसेनेसहवर्तमान राम जरी समुद्र ओलांडून आला आहे तरी तो जिवंत परत जाणार नाहीं हें मी तुला प्रतिज्ञेवर खरें सांगतों " १३. ह्याप्रमाणें रावण बोलूं लागला असतां तो क्षुब्ध व रुष्ट झाला आहे असें समजून माल्यवान् राक्षस

नोत्तरं प्रत्यपद्यत १४ जयाशिषा तु राजानं वर्धयित्वा यथोचितम् ।
माल्यवानभ्यनुज्ञातो जगाम स्वं निवेशनम् १५ रावणस्तु सहामात्यो
मन्त्रयित्वा विमृश्य च । लङ्कायास्तु तदा गुप्तिं कारयामास राक्षसः १६
व्यादिदेश च पूर्वस्यां प्रहस्तं द्वारि राक्षसम् । दक्षिणस्यां महावीर्यौ
महापार्श्वमहोदरौ १७ पश्चिमायामथ द्वारि पुत्रमिन्द्रजितं तदा । व्यादि-
देश महामायं राक्षसैर्बहुभिर्वृतम् १८ उत्तरस्यां पुरद्वारि व्यादिश्य शुक-
सारणौ । स्वयं चात्र गमिष्यामि मन्त्रिणस्तानुवाच ह १९ राक्षसं तु
विरूपाक्षं महावीर्यपराक्रमम् । मध्यमेस्थापयद्गुल्मे बहुभिः सह राक्षसैः २०
एवं विधानं लङ्कायां कृत्वा राक्षसपुङ्गवः । कृतकृत्यमिवात्मानं मन्यते
कालचोदितः २१ विसर्जयामास ततः स मन्त्रिणो विधानमाज्ञाप्य पुरस्य
पुष्कलम् । जयाशिषा मन्त्रिगणेन पूजितो विवेश सोन्तःपुरमृद्धिमन्म-
हत् २२ [१३२०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्ध-
काण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥ ३६ ॥

नरवानरराजानौ स तु वायुसुतः कपिः । जाम्बवानृक्षराजश्च राक्षसश्च

---

लज्जित झाला व कांहींएक बोलेनासा झाला १४. नंतर कांहीं वेळानें राजाला त्यानें विजयसूचक यथायोग्य आशीर्वाद दिला आणि राजाची अनुज्ञा झाल्यावर तो माल्यवान् आपल्या घरीं गेला १५. नंतर रावणराक्षसानें अमात्यांसहवर्तमान मसलत करून व तिचा विचार करून सर्व प्रकारें लंकेचें रक्षण आरंभिलें १६. लंकेंतील पूर्व दरवाजावर प्रहस्तराक्षसाला नेमून दक्षिणदरवाजावर महापार्श्व व महोदर ह्या उभयतां महापराक्रमी राक्षसांना त्यानें नेमिलें १७ आणि त्याचप्रमाणें पश्चिम द्वारावर अनेक राक्षसांनीं परिवेष्टित असलेला महामायावी पुत्र इंद्रजित् नेमून १८ नगरीच्या उत्तरद्वाराशीं शुकसारणांची नेमणूक केल्यावर " इकडे मी स्वतःही जाईन " असें त्या मंत्र्यांना तो ह्मणाला १९. नंतर महावीर्यवान् व महापराक्रमी विरूपाक्ष राक्षसाला दुसऱ्या अनेक राक्षसांसहवर्तमान मधल्या बुरुजावर त्यानें ठेविलें २० आणि ह्याप्रमाणें लंकेमध्यें संरक्षणाची तजवीज केल्यानंतर कालाची प्रेरणा झालेला तो राक्षस स्वतःला कृतकृत्य मानूं लागला २१. तदनंतर नगराच्या रक्षणाविषयीं मंत्र्यांना चांगली आज्ञा केल्यावर त्यानें त्यांना अनुज्ञा दिली आणि मंत्रिगणानें जयसूचक आशीर्वाद देऊन त्याचें अभिनंदन केल्यावर तो आपल्या सर्व प्रकारें समृद्ध असलेल्या मोठ्या अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाला २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं छत्तिसावा सर्ग समाप्त झाला॥३६॥

विभीषणः १ अङ्गदो वालिपुत्रश्च सौमित्रिः शरभः कपिः । सुषेणः सहदायादो मैन्दो द्विविद एव च २ गजो गवाक्षः कुमुदो नलोथ पनसस्तथा । अमित्रविषयं प्राप्ताः समवेताः समर्थयन् ३ इयं सा लक्ष्यते लङ्का पुरी रावणपालिता । सासुरोरगगन्धर्वैः सर्वैरपि सुदुर्जया ४ कार्यसिद्धिं पुरस्कृत्य मन्त्रयध्वं विनिर्णये । नित्यं संनिहितो यत्र रावणो राक्षसाधिपः ५ अथ तेषु ब्रुवाणेषु रावणावरजोऽब्रवीत् । वाक्यमग्राम्यपदवत्पुष्कलार्थं विभीषणः ६ अनलः पनसश्चैव संपातिः प्रमतिस्तथा । गत्वा लङ्कां ममामात्याः पुरीं पुनरिहागताः ७ भूत्वा शकुनयः सर्वे प्रविष्टाश्च रिपोर्बलम् । विधानं विहितं यच्च तद्दृष्ट्वा समुपस्थिताः ८ संविधानं यथाहुस्ते रावणस्य दुरात्मनः । राम तद्ब्रुवतः सर्वं याथातथ्येन मे शृणु ९ पूर्वं प्रहस्तः सबलो द्वारमासाद्य तिष्ठति । दक्षिणं च महावीर्यौ महापार्श्वमहोदरौ १० इन्द्रजित्पश्चिमं द्वारं राक्षसैर्बहुभिर्वृतः । पट्टिशासिधनुष्मद्भिः शूलमुद्गरपाणिभिः ११ नानाप्रहरणैः

---

इकडे मानवराज रामचंद्र, वानरराज सुग्रीव, वायुपुत्र हनुमान् वानर, ऋक्षराज जांबवान्, राक्षस बिभीषण १, वालिपुत्र अंगद, सुमित्रापुत्र लक्ष्मण, शरभ वानर, भ्रात्यासहवर्तमान सुषेण, मैंद, द्विविद २, गज, गवाक्ष, कुमुद, नल आणि पनस हे शत्रूच्या देशामध्यें प्राप्त झाले असतां एकत्र जुळून विचार करूं लागले ३. ( ते ह्मणाले ) ' रावणानें रक्षण केलेली ही लंकानगरी दिसत आहे आणि असुर, उरग व गंधर्व ह्या सर्वांच्याही हातून हिचा पराजय होणें अत्यंत कठीण आहे ४. ह्यास्तवें, आपली कार्यसिद्धि कशी होईल ह्याविषयीं तुह्मी निश्चयपूर्वक काय तो विचार करा. राक्षसाधिपति रावण ह्या लंकानगरीमध्यें नेहमीं वास्तव्य करीत असतो " ५. ह्याप्रमाणें ते बोलूं लागले असतां रावणाचा कनिष्ठ बंधु बिभीषण गंभीर शब्द व विपुल अर्थ ह्यांनीं युक्त असलेलें भाषण करूं लागला ६ ( तो ह्मणाला ) " अनल, पनस, संपाति, प्रमति हे माझे अमात्य लंकानगरीमध्यें जाऊन पुनरपि येथें आले आहेत ७. हे सर्वही अमात्य पक्षी होऊन शत्रूच्या सैन्यामध्यें प्रविष्ट झाले होते आणि तेथें काय काय तजवीज केली आहे ती पाहून सांप्रत ते परत आले आहेत ८. हे रामा, दुरात्म्या रावणाच्या तयारीविषयीं जें त्यांनीं सांगितलें आहे तें सर्व माझ्या तोंडून तूं इत्थंभूत श्रवण कर ९. लंकेच्या पूर्वद्वारावर सैन्यासहवर्तमान प्रहस्त राक्षस आहे; दक्षिणद्वारावर महापार्श्व व महोदर हे उभयतां महावीर्यवान् राक्षस आहेत १०. पट्ट, खड्ग, धनुष्य, शूल आणि मुद्गर हीं आयुधें हातामध्यें घेऊन इतरही नानाप्रकारचीं

शूरैरावृतो रावणात्मजः । राक्षसानां सहस्रैस्तु बहुभिः शस्त्रपाणिभिः १२
युक्तः परमसंविग्नो राक्षसैः सह मन्त्रवित् । उत्तरं नगरद्वारं रावणः
स्वयमास्थितः १३ विरूपाक्षस्तु महता शूलमुद्गरधनुष्मता । बलेन राक्षसैः
सार्धं मध्यमं गुल्ममाश्रितः १४ एतानेवंविधान्गुल्माँल्लङ्कायाः समुदीक्ष्य
ते । मामका मन्त्रिणः सर्वे शीघ्रं पुनरिहागताः १५ गजानां दशसाहस्रं
रथानामयुतं तथा । हयानामयुते द्वे च साग्रां कोटिं च रक्षसाम् १६
विक्रान्ता बलवन्तश्च संयुगेष्वाततायिनः । इष्टा राक्षसराजस्य नित्यमेते
निशाचराः १७ एकैकस्यात्र युद्धार्थे राक्षसस्य विशाम्पते । परीवारः
सहस्राणां सहस्रमुपतिष्ठति १८ एतां प्रवृत्तिं लङ्कायां मन्त्रिप्रोक्तां विभी-
षणः । एवमुक्त्वा महाबाहू राक्षसांस्तानदर्शयत् १९ लङ्कायां सचिवैः
सर्वं रामाय प्रत्यवेदयत् । रामं कमलपत्राक्षमिदमुत्तरमब्रवीत् ॥ रावणा-
वरजः श्रीमान्रामप्रियचिकीर्षया २० कुबेरं तु यदा राम रावणः प्रति-
युध्यति । षष्टिः शतसहस्राणि तदा निर्यान्ति राक्षसाः २१ पराक्रमेण
वीर्येण तेजसा सत्त्वगौरवात् । सदृशा ह्यत्र दर्पेण रावणस्य दुरात्मनः २२

---

आयुधें धारण केलेल्या अनेक शूर राक्षसांनीं परिवेष्टित असलेला रावणपुत्र इंद्रजित् पश्चिमद्वारावर आहे; हजारों राक्षस आणि हातांमध्यें शस्त्रें घेतलेले इतरही अनेक राक्षस ह्यांसहवर्तमान असलेला व अतिशय उद्विग्न झालेला मंत्रवेत्ता रावण स्वतः नगराच्या उत्तरद्वारावर उभा आहे ११,१२,१३; शूल, मुद्गर व धनुष्य हीं आयुधें धारण केलेलें प्रचंड सैन्य बरोबर घेऊन राक्षसांसहवर्तमान विरूपाक्ष मधल्या बुरुजाचा आश्रय करून राहिलेला आहे १४. हे अशाप्रकारचे लंकेंतील बुरूज अवलोकन करून माझे सर्व मंत्री पुनरपि येथें परत आले आहेत १५. दहा हजार गज, दहा हजार रथ, वीस हजार अश्व आणि कोटीपेक्षांही अधिक राक्षस इतकें सैन्य त्यांनीं अवलोकन केलें आहे १६. संग्रामामध्यें शस्त्र धारण करणारे हे राक्षस राक्षसाधिपति रावणाला सर्वदां प्रिय असून सर्वही पराक्रमी व बलाढ्य आहेत १७. हे प्रजाधिपते, हे जे मुख्य मुख्य राक्षस सांगितले त्यांपैकीं प्रत्येक राक्षसाबरोबर दहा दहा लक्ष राक्षस युद्धाकरितां तयार आहेत" १८. ह्याप्रमाणें मंत्र्यांनीं सांगितलेली लंकेंतील वार्ता रामाला कथन केल्यानंतर तो महापराक्रमी बिभीषण रामाला ते राक्षस दर्शवूं लागला १९ आणि लंकेंतील सर्व वृत्तांत सचिवांकडून रामाला कळविल्यावर कमलनयन रामाला तो रावणाचा कनिष्ठ बंधु श्रीमान् बिभीषण रामाचें प्रिय करण्याच्या उद्देशानें स्वतः ह्मणाला २० "हे रामा, रावण जेव्हां कुबेराशीं युद्ध करीत असतो तेव्हां साठ लक्ष राक्षस

अत्र मन्युर्न कर्तव्यः कोपये त्वां न भीषये । समर्थो ह्यसि वीर्येण सुराणामपि निग्रहे २३ तद्भवांश्चतुरङ्गेण बलेन महता वृतम् । व्यूह्येदं वानरानीकं निर्मथिष्यसि रावणम् २४ रावणावरजे वाक्यमेवं ब्रुवति राघवः शत्रूणां प्रतिघातार्थमिदं वचनमब्रवीत् २५ पूर्वद्वारं तु लङ्कया नीलो वानरपुंङ्गवः । प्रहस्तं प्रतियोद्धा स्याद्वानरैर्बहुभिर्वृतः २६ अङ्गदो वालिपुत्रस्तु बलेन महता वृतः । दक्षिणे बाधतां द्वारे महापार्श्वमहोदरौ २७ हनूमान्पश्चिमद्वारं निष्पीड्य पवनात्मजः । प्रविशत्वप्रमेयात्मा बहुभिः कपिभिर्वृतः २८ दैत्यदानवसङ्घानामृषीणां च महात्मनाम् । विप्रकारप्रियः क्षुद्रो वरदानबलान्वितः २९ परिक्रमति यः सर्वाँल्लोकान्संतापयन्प्रजाः । तस्याहं राक्षसेन्द्रस्य स्वयमेव वधे धृतः ३० उत्तरं नगरद्वारमहं सौमित्रिणा सह । निपीड्याभिप्रवेक्ष्यामि सबलो यत्र रावणः ३१ वानरेन्द्रश्च बलवानृक्षराजश्च वीर्यवान् । राक्षसेन्द्रानुजश्चैव गुल्मे भवतु

---

त्याच्याबरोबर बाहेर पडत असतात २१. पराक्रम, वीर्य, तेज, अतिशय धैर्य आणि गर्व ह्यांच्या योगानें ते राक्षस दुरात्म्या रावणाची बरोबरी करणारे आहेत २२. मी रावणसैन्याचें वर्णन करीत आहें तें तुला त्याच्याविरुद्ध कोप आणण्याकरितां करीत आहें; तुला भीति उत्पन्न होण्याकरितां करीत नाहीं. ह्यास्तव, तूं माझ्यावर क्रुद्ध होऊं नको. वीर्यानें तूं देवाचाही निग्रह करण्यास समर्थ आहेस २३. तस्मात्, हें वानरसैन्य व्यवस्थित लावून तूं मोठ्या चतुरंग सैन्यानें युक्त असलेल्या रावणाचा वध करिशील " २४. रावणाचा कनिष्ठ बंधु ह्याप्रमाणें बोलूं लागला असतां शत्रूंच्या वधाकरितां राम ह्मणाला २५ " लंकेच्या पूर्व द्वाराशीं नील नामक वानरश्रेष्ठानें अनेक वानर बरोबर घेऊन प्रहस्ताबरोबर युद्ध करावें २६. वालिपुत्र अंगदानें मोठें सैन्य बरोबर घेऊन लंकेच्या दक्षिणद्वारीं महापार्श्व आणि महोदर ह्यांच्याशीं युद्ध करावें २७. अतर्क्य स्वरूपानें युक्त असलेल्या वायुपुत्र हनुमानानें अनेक वानर बरोबर घेऊन पश्चिमद्वारावरील राक्षसांचा पराजय करून लंकेत प्रवेश करावा २८. वरप्रदानामुळें बल प्राप्त झालें असल्या कारणानें जो नीच दैत्य, दानव व महात्मे ऋषि ह्यांना दुःख देण्यांत आनंद मानीत असतो २९; आणि जो प्रजेला संताप उत्पन्न करीत असून सर्व लोक पादाक्रांत करीत असतो त्या राक्षसाधिपति रावणाच्या वधाविषयीं मींच प्रतिज्ञा केलेली आहे ३०. ह्यास्तव, रावण ज्या ठिकाणीं सैन्यासहवर्तमान आहे त्या नगराच्या उत्तर द्वारावर हल्ला करून मी

मध्यमे ३२ न चैव मानुषं रूपं कार्यं हरिभिराहवे । एषा भवतु नः संज्ञा युद्धेस्मिन्वानरे बले ३३ वानरा एव वश्चिह्नं स्वजनेस्मिन्भविष्यति । वयं तु मानुषेणैव सप्त योत्स्यामहे परान् ३४ अहमेव सह भ्रात्रा लक्ष्मणेन महौजसा । आत्मना पञ्चमश्चायं सखा मम विभीषणः ३५ स रामः कार्यसिद्ध्यर्थमेवमुक्त्वा विभीषणम् ३६ सुवेलारोहणे बुद्धिं चकार मतिमान्प्रभुः । रमणीयतरं दृष्ट्वा सुवेलस्य गिरेस्तटम् ३७ ततस्तु रामो महता बलेन प्रच्छाद्य सर्वां पृथिवीं महात्मा । प्रहृष्टरूपोभिजगाम लङ्कां कृत्वा मतिं सोरिवधे महात्मा ३८ [ १३५८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तत्रिंशः सर्गः ॥ ३७ ॥

स तु कृत्वा सुवेलस्य मतिमारोहणं प्रति । लक्ष्मणानुगतो रामः सुग्रीवमिदमब्रवीत् १ विभीषणं च धर्मज्ञमनुरक्तं निशाचरम् । मन्त्रज्ञं च विधिज्ञं च श्लक्ष्णया परया गिरा २ सुवेलं साधुशैलेन्द्रमिमं धातुशतैश्चितम् । अध्यारोहामहे सर्वे वत्स्यामोत्र निशामिमाम् ३ लङ्कां

---

लक्ष्मणासहवर्तमान आंत प्रवेश करीन ३१. वानराधिपति बलाढ्य सुग्रीव, ऋक्षराज समर्थ जांबवान् आणि राक्षसाधिपति रावणाचा कनिष्ठ भ्राता विभीषण ह्यांनीं सैन्याच्या मधल्या टोळीवर रहावें ३२. युद्धामध्यें वानरांनीं मानुषरूप धारण करावयाचें नाहीं. हा ह्या युद्धामध्यें वानरसेनेविषयीं आपला संकेतच ठरला पाहिजे ३३. सारांश, आपल्या बाजूचा योद्धा कोणता हें ओळखण्याविषयीं वानररूप हेंच चिन्ह आपणांला कायम ठेविलें पाहिजे. आह्मी सात जण मात्र शत्रूंशीं मनुष्यरूपानें युद्ध करूं ३४. महाबलाढ्य भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान मी आणि चार मंत्र्यांसहवर्तमान माझा सखा पांचवा विभीषण असे आह्मी सात जण आहोंत "३५. कार्यसिद्धीकरितां ह्याप्रमाणें विभीषणाला सांगितल्यावर ३६ सुवेलपर्वताचा अति रमणीय उतरता प्रदेश अवलोकन करून त्या बुद्धिमान् प्रभु रामानें सुवेलपर्वतावर आरोहण करण्याचें मनामध्यें आणिलें ३७. तदनंतर प्रचंड सैन्यानें सर्व पृथ्वी आच्छादित करून व शत्रूचा वध करण्याचें मनामध्यें आणून आनंदित झालेला तो महात्मा राम लंकेवर चालून गेला ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

सुवेलपर्वतावर आरोहण करण्याचें मनामध्यें आणिल्यानंतर लक्ष्मणासहवर्तमान राम, सुग्रीव आणि धर्मज्ञ, अनुरक्त, मसलत जाणणारा व कार्यवेत्ता विभीषण राक्षस ह्यांना अतिशय सौम्य वाणीनें ह्मणाला १,२ " शेंकडों धातूंनीं भरलेल्या ह्या सुवेल

चालोकयिष्यामो निलयं तस्य रक्षसः । येन मे मरणान्ताय हृता भार्या दुरात्मना ४ येन धर्मो न विज्ञातो न वृत्तं न कुलं तथा । राक्षस्या नीचया बुद्ध्या येन तद्गर्हितं कृतम् ५ एवं संमन्त्रयन्नेव सक्रोधो रावणं प्रति । रामः सुवेलमासाद्य चित्रसानुमुपारुहत् ६ पृष्ठतो लक्ष्मणश्चैनमन्वगच्छत्समाहितः । सशरं चापमुद्यम्य सुमहद्विक्रमे रतः ॥ तमन्वारोहत्सुग्रीवः सामात्यः सविभीषणः ७ ते वायुवेगप्रवणास्तं गिरिं गिरिचारिणः । अध्यारोहन्त शतशः सुवेलं यत्र राघवः ८ ते त्वदीर्घेण कालेन गिरिमारुह्य सर्वतः । ददृशुः शिखरे तस्य विषक्तामिव खे पुरीम् ९ तां शुभां प्रवरद्वारां प्राकारवरशोभिताम् । लङ्कां राक्षससंपूर्णां ददृशुर्हरियूथपाः १० प्राकारवरसंस्थैश्च तथा नीलैश्च राक्षसैः । ददृशुस्ते हरिश्रेष्ठाः प्राकारमपरं कृतम् ११ तान्दृष्ट्वा वानराः सर्वे राक्षसान्युद्धकाङ्क्षिणः । मुमुचु-

---

नामक गिरिराजावर आपण खुशाल आरोहण करूं आणि सर्वही एवढी रात्र येथें वास्तव्य करूं ३; व तेथून त्या राक्षसाचें निवासस्थान जी लंका ती आपण अवलोकन करूं. त्या दुरात्म्या राक्षसानें माझी भार्या हरण करून नेली असल्यामुळें तो मरेपर्यंत दुःखांतच दिवस कंठण्याची मला पाळी आली आहे ४. सारांश, धर्म, पूर्वापर आचार आणि कुल ह्यांचा विचार न करितां नीच राक्षसीबुद्धीचें अवलंबन करून त्यानें तें ( स्त्रीहरणरूप ) निंद्य कृत्य केलें आहे ५. ह्याप्रमाणें विचार करीत करीत रावणाविषयीं क्रोधबुद्धि धारण करणारे ते राम सुवेलपर्वतापाशीं आले आणि चित्रविचित्र शिखरांनीं युक्त असलेल्या त्या पर्वतावर त्यांनीं आरोहण केलें ६. नंतर मोठा पराक्रम करण्याविषयीं तत्पर असलेला लक्ष्मणही स्वस्थातःकरणानें धनुर्बाण घेऊन त्यांच्या मागोमाग गेला व त्याच्या मागोमाग बिभीषण व अमात्य ह्यांसहवर्तमान सुग्रीवही पर्वतावर चालला ७. वायुवेगाप्रमाणें शीघ्र गतीनें युक्त असलेले व पर्वतावर संचार करणारे ते शेंकडों वानर रामानें अवलंबन केलेल्या त्या सुवेलपर्वतावर चढून गेले ८; आणि ह्याप्रमाणें थोडक्याच वेळांत ते सर्व पर्वत चढून गेले असतां त्याच्या शिखरावर बसल्यानंतर आकाशामध्येंच चिकटून राहिलेली कीं काय अशी एक नगरी त्यांच्या दृष्टीं पडली ९. सारांश, उत्कृष्ट द्वारांनीं युक्त, उत्तम प्राकारानें सुशोभित व राक्षसांनीं भरलेली अशी ती शुभ लंकानगरी त्या वानरसेनाधिपतींनीं अवलोकन केली १० व उत्कृष्ट प्राकारावर असलेल्या नील राक्षसांच्या योगानें लंकानगरीला दुसरा एक प्राकारच झाला आहे कीं काय असें त्या वानरश्रेष्ठांच्या नजरेस आलें ११. ह्याप्रमाणें युद्धार्थ सज्ज असलेल्या त्या राक्षसांना अवलोकन करून सर्वही

विविधाश्चाद्भुतांस्तस्य रामस्य पश्यतः १२ ततोऽस्तमगमत्सूर्यः संध्यया प्रति-
रञ्जितः । पूर्णचन्द्रप्रदीप्ता च क्षपा समतिवर्तत १३ ततः स रामो हरि-
वाहिनीपतिर्विभीषणेन प्रतिनन्द्य सत्कृतः । सलक्ष्मणो यूथपयूथसंवृतः
सुवेलपृष्ठे न्यवसद्यथासुखम् १४ [ १३७२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टत्रिंशः सर्गः ॥ ३८ ॥

तां रात्रिमुषितास्तत्र सुवेले हरियूथपाः । लङ्कायां ददृशुर्वीरा वना-
न्युपवनानि च १ समसौम्यानि रम्याणि विशालान्यायतानि च । दृष्टि-
रम्याणि ते दृष्ट्वा बभूवुर्जातविस्मयाः २ चम्पकाशोकबकुलशालतालस-
माकुला । तमालपनसच्छन्ना नागमालासमावृता ३ हिन्तालैरर्जुनैर्नीपैः
सप्तपर्णैः सुपुष्पितैः । तिलकैः कर्णिकारैश्च पाटलैश्च समन्ततः ४ शुशुभे
पुष्पिताग्रैश्च लतापरिगतद्रुमैः । लङ्का बहुविधैर्दिव्यैर्यथेन्द्रस्यामरावती ५
विचित्रकुसुमोपेतै रक्तकोमलपल्लवैः । शाद्वलैश्च तथा नीलैश्चित्राभिर्व-
नराजिभिः ६ गन्धाढ्यान्यतिरम्याणि पुष्पाणि च फलानि च ।

---

वानर राजाचे समक्ष नानाप्रकारच्या गर्जना करूं लागले १२. इतक्यांत सायंकाल झाल्यामुळें आरक्तवर्ण झालेला सूर्य अस्तास गेला आणि पूर्ण चंद्रानें उज्ज्वल झालेली रात्र सुरू झाली १३ आणि रात्र पडल्यानंतर बिभीषणानें अभिनंदनपूर्वक ज्याचा सत्कार केलेला आहे असा तो वानरसेनाधिपति राम, लक्ष्मण आणि सेनानायकगण ह्यांसहवर्तमान, सुवेलपर्वतावर खुशाल राहिला १४. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३८ ॥

ते वानरसेनाधिपति वीर रात्रीं त्या सुवेलपर्वतावर राहिले असतां लंकेंतील वनें व उपवनें त्यांच्या दृष्टीं पडलीं १; आणि ज्यांची लांबीरुंदी सारिखी आहे, क्रीडा करण्यास जीं योग्य आहेत व दृष्टीलाही मनोहर आहेत अशीं लंकेंतील विशाल स्थलें अवलोकन करून ते वीर विस्मयचकित झाले २. चंपक, अशोक, बकुल, शाल व ताल ह्या वृक्षांनीं ती लंका गजबजून गेलेली होती, तमाल आणि फणस ह्या वृक्षांनीं ती आच्छादित झाली होती आणि नागवृक्षांच्या रांगांनींही ती व्याप्त झाली होती ३. हिंताल, अर्जुनवृक्ष, कदंब, प्रफुल्लित सांतवण, तिलक, कर्णिकार व पाडळा ह्यांच्या योगानें ४ आणि लतांचें ज्यांना परिवेष्टन झालेलें आहे अशा व ज्यांचीं अग्रें प्रफुल्लित झालेलीं आहेत अशा नानाप्रकारच्या दृष्टिमनोहर वृक्षांनींही ती लंका सुशोभित झालेली होती ५. त्याचप्रमाणें चित्रविचित्र पुष्पें व आरक्तवर्ण कोमल पल्लव, नीलवर्ण तृण आणि मनोहर वनपंक्ति ह्यांनींही ती लंका युक्त होती ६. सुवासिक आणि अतिशय रम्य पुष्पें व

धारयन्त्यगमास्तत्र भूषणानीव मानवाः ७ सचैत्ररथसंकाशं मनोज्ञं नन्दनोपमम् । वनं सर्वर्तुकं रम्यं शुशुभे षट्पदायुतम् ८ दात्यूहकोयष्टिबकैर्नृत्यमानैश्च बर्हिणैः । रुतं परभृतानां च शुश्रुवे वननिर्झरे ९ नित्यमत्तविहङ्गानि भ्रमराचरितानि च । कोकिलाकुलषण्डानि विहङ्गाभिरुतानि च १० भृङ्गराजाभिगीतानि कुररस्वनितानि च । विविशुस्ते ततस्तानि वनान्युपवनानि च ११ हृष्टाः प्रमुदिता वीरा हरयः कामरूपिणः १२ तेषां प्रविशतां तत्र वानराणां महौजसाम् । पुष्पसंसर्गसुरभिर्ववौ प्राणसमोनिलः १३ अन्ये तु हरिवीराणां यूथान्निष्क्रम्य यूथपाः । सुग्रीवेणाभ्यनुज्ञाता लङ्कां जग्मुः पताकिनीम् १४ वित्रासयन्तो विहगान्ग्लापयन्तो मृगद्विपान् । कम्पयन्तश्च तां लङ्कां नादैः स्वैर्नदतां वराः १५ कुर्वन्तस्ते महावेगा महीं चरणपीडिताम् । रजश्च सहसैवोर्ध्वं जगाम चरणोत्थितम् १६ ऋक्षाः सिंहाश्च महिषा वारणाश्च मृगाः खगाः । तेन शब्देन वित्रस्ते जग्मुर्भीता दिशो दश १७ शिखरं तु

---

फलें, मानव ज्याप्रमाणें भूषणें धारण करितात त्याप्रमाणें येथील वृक्ष धारण करीत असतात ७. कुबेराच्या चैत्ररथवनाप्रमाणें अथवा इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें मनोहर, सर्व ऋतूंतील फलपुष्पांनीं युक्त, रमणीय आणि भ्रमरांनीं भरलेलें असें तें वन शोभत होतें ८. चक्रवाक, टिट्टिभ, बक आणि नृत्य करणारे मयूर ह्यांनीं केलेला शब्द व कोकिलांचा स्वर त्या झऱ्यांनीं युक्त असलेल्या वनामध्यें ऐकूं येत होता ९. असो. ज्यांच्यांतील पक्षी नित्य मत्त आहेत ज्यांमध्यें भ्रमरांचा संचार आहे, कोकिलांनीं भरलेले वृक्षसमुदाय ज्यांमध्यें आहेत, पक्ष्यांचे ध्वनि ज्यांमध्यें चालले आहेत १०, भृंगराजाचा गुंजारव ज्यांत चालला आहे आणि कुररपक्ष्यांचेही ध्वनि ज्यांमध्यें आहेत अशा त्या वनांत व उपवनांत यथेष्ट रूप धारण करणारे ते वीर वानर हर्षानें व आनंदानें प्रविष्ट झाले ११, १२; आणि ते महाबलाढ्य वानर त्या वनांतून व उपवनांतून प्रवेश करूं लागले असतां पुष्पसंसर्गानें सुगंधित झालेला वायु अगदीं प्राणवायूप्रमाणें मंद वाहूं लागला १३. ह्याशिवाय इतर वानरसेनाधिपति आपल्या सेनेंतून बाहेर पडले आणि सुग्रीवाची अनुज्ञा घेऊन पताकांनीं युक्त असलेल्या लंकेमध्यें ते गेले १४. ते लंकेकडे जाऊं लागले असतां पक्षी त्रस्त होऊं लागले, मृग व गज ह्यांना ग्लानि येऊं लागली आणि गर्जना करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असे वानर आपल्या गर्जनांनीं ती लंका कंपित करूं लागले १५. ते महावेगवान् वानर आपले पाय पृथ्वीवर टाकूं लागले असतां त्यांच्या पायांमुळें उडालेली धूळ एकाएकीं आकाशामध्यें गेली १६; आणि अस्वलें, सिंह, महिष, गज, मृग व पक्षी त्या

त्रिकूटस्य प्रांशु चैकं दिविस्पृशम् । समन्तात्पुष्पसंच्छन्नं महारजतसंनि-
भम् १८ शतयोजनविस्तीर्णं विमलं चारुदर्शनम् । श्लक्ष्णं श्रीमन्महच्चैव
दुष्प्रापं शकुनैरपि ॥ मनसापि दुरारोहं किं पुनः कर्मणा जनैः १९
निविष्टा तस्य शिखरे लङ्का रावणपालिता । शतयोजनविस्तीर्णा त्रिंश-
द्योजनमायता २० सा पुरी गोपुरैरुच्चैः पाण्डुराम्बुदसंनिभैः । काञ्चनेन
च शालेन राजतेन च शोभते २१ प्रासादैश्च विमानैश्च लङ्का परमभू-
षिता । घनैरिवातपापाये मध्यमं वैष्णवं पदम् २२ यस्यां स्तम्भसहस्रेण
प्रासादः समलंकृतः । कैलासशिखराकारो दृश्यते खमिवोल्लिखन् २३
चैत्यः स राक्षसेन्द्रस्य बभूव पुरभूषणम् । शतेन रक्षसां नित्यं यः सम-
ग्रेण रक्ष्यते २४ मनोज्ञां काञ्चनवतीं पर्वतैरुपशोभिताम् । नानाधातुवि-
चित्रैश्च उद्यानैरुपशोभिताम् २५ नानाविहगसंघुष्टां नानामृगनिषेविताम् ।
नानाकुसुमसंपन्नां नानाराक्षससेविताम् २६ तां समृद्धां समृद्धार्थी

---

ध्वनीनें त्रस्त व भयभीत होऊन दश दिशास पळूं लागले १७. त्रिकूटाचलाचें एक शिखर असें कांहीं स्वर्गालाच जाऊन भिडलें आहे कीं काय इतकें उंच आहे; सभोंवतीं तें पुष्पांनीं आच्छादित आहे; सुवर्णासारिखी त्याची कांति आहे १८; शंभर योजनें तें विस्तीर्ण आहे; तें निर्मल असून दिसण्याला मनोहर आहे; तेथें जिकडे तिकडे फरशी केलेली आहे आणि तें मोठें भव्य व सौंदर्यसंपन्न असून पक्ष्यांनाही अगम्य आहे आणि त्याच्यावर आरोहण करणें ही गोष्ट मनुष्याला मनामध्येंही येणें शक्य नाहीं. मग प्रत्यक्ष आरोहण तर मनुष्याच्या हातून कोठून होणार? १९. असो. त्या शिखरावर रावणानें संरक्षण केलेली लंका आहे व ती दहा योजनें रूंद असून वीस योजनें लांब आहे २०; श्वेतवर्ण मेघांसारखीं उंच उंच नगरद्वारें व सुवर्णाचे व रौप्याचे कोट ह्यांच्या योगानें ती नगरी सुशोभित असून २१ ग्रीष्मऋतु संपल्यानंतर मेघांनीं ज्याप्रमाणें आकाश अतिशय भूषित होतें त्याप्रमाणें देवालयांनीं आणि सात सात मजली वाड्यांनीं अतिशय भूषित झाली होती २२. त्या लंकेमध्यें सहस्र स्तंभांनीं भूषित असा एक वाडा आहे व त्याचा आकार कैलासशिखरासारिखा असून आकाश विदीर्णच करून जात आहे कीं काय असें दिसत आहे २३. तेंच नगराचें भूषण व राक्षसाधिपतीचें निवासस्थान आहे आणि संपूर्ण शंभर राक्षस मिळून तिचें नित्य रक्षण करीत आहेत २४. असो. मनोहर, सुवर्णमय, नानाप्रकारच्या धातूंनीं चित्रविचित्र झालेले पर्वत व उपवनें ह्यांनीं सुशोभित २५, नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं नादित, नानाप्रकारच्या मृगांनीं आश्रित, अनेक प्रकारच्या पुष्पांनीं संपन्न, अनेक प्रकारच्या राक्षसांनीं

लक्ष्मीवाँल्लक्ष्मणाग्रजः । नगरीं त्रिदिवप्रख्यां विस्मयं प्राप वीर्यवान् २७
तां रत्नपूर्णां बहुसंविधानां प्रासादमालाभिरलंकृतां च । पुरीं महायन्त्रक-
वाटमुख्यां ददर्श रामो महता बलेन २८ [१४००] इत्यार्षे श्रीमद्रामा-
यणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकोनचत्वारिंशः सर्गः ॥ ३९ ॥

ततो रामः सुवेलाग्रं योजनद्वयमण्डलम् । उपारोहत्ससुग्रीवो हरियूथैः
समन्वितः १ स्थित्वा मुहूर्तं तत्रैव दिशो दश विलोकयन् । त्रिकूटशि-
खरे रम्ये निर्मितां विश्वकर्मणा २ ददर्श लङ्कां सुन्यस्तां रम्यकाननशो-
भिताम् । तस्य गोपुरशृङ्गस्थं राक्षसेन्द्रं दुरासदम् ३ श्वेतचामरपर्यन्तं
विजयच्छत्रशोभितम् । रक्तचंदनसंलिप्तं रक्ताभरणभूषितम् ४ नीलजी-
मूतसंकाशं हेमसंछादिताम्बरम् । ऐरावतविषाणाग्रैरुत्कृष्टकिणवक्षसम् ५
शशलोहितरागेण संवीतं रक्तवाससा । संध्यातपेन संछन्नं मेघराशिमि-

---

आश्रय केलेली २६, सर्व वस्तूंनीं भरलेली, द्रव्याची समाद्धि असलेली आणि स्वर्गाची बरोबरी करणारी अशी ती नगरी अवलोकन करून वीर्यवान् रामाला विस्मय वाटला २७. असो. रत्नांनीं पूर्ण, उपजीविकेच्या अनेक साधनांनीं संपन्न, प्रासादपंक्तींनीं भूषित आणि मोठीं मोठीं कुलपें ज्यांना लाविलेलीं आहेत अशा मोठ्या मोठ्या दरवाजांनीं युक्त असलेली ती नगरी प्रचंड सैन्यासहवर्तमान रामानें अवलोकन केली २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकुणचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३९ ॥

तदनंतर वानरसेनाधिपतींनीं युक्त असलेला राम दोन योजनें ज्याचा विस्तार आहे अशा सुवेलपर्वताच्या शिखरावर सुग्रीवासहवर्तमान आरूढ झाला १; आणि मुहूर्तपर्यंत तेथेंच उभा राहून चोहोंकडे दृष्टि फेंकूं लागला असतां त्रिकूटाचलाच्या रम्य शिखरावर रमणीय वनांनीं सुशोभित, विश्वकर्म्यानें निर्मित आणि उत्कृष्ट रीतीची जिची मांडणी केली आहे अशी नगरी त्यानें अवलोकन केली व त्या लंकानगरीच्या वेशीवरील एका मनोऱ्यावर हार जाण्यास कठीण असलेला राक्षसाधिपति रावणही बसला आहे असें त्यानें पाहिलें २,३. श्वेतवर्ण चामरें त्याच्या सभोंवतीं फिरत होतीं; विजयप्रद छत्रानें त्याला शोभा आलेली होती; आरक्तवर्ण चंदन त्यानें अंगाला लाविलें होतें; आरक्तवर्ण भूषणें त्यानें धारण केलीं होतीं ४; नीलमेघाप्रमाणें त्याची कांति होती; कलाबतूच्या कामानें त्याचें वस्त्र अगदीं भरून गेलेलें होतें; ऐरावत गजानें आपल्या दंताग्रांनीं केलेल्या जखमांच्या खुणा त्याच्या वक्षस्थलावर होत्या ५ आणि शशरक्ताप्रमाणें ज्याचा रंग लाल

ताम्बरे ६ पश्यतां वानरेन्द्राणां राघवस्यापि पश्यतः । दर्शनाद्राक्षसे-
न्द्रस्य सुग्रीवः सहसोत्थितः ७ क्रोधवेगेन संयुक्तः सत्त्वेन च बलेन च ।
अचलाग्रादथोत्थाय पुप्लुवे गोपुरस्थले ८ स्थित्वा मुहूर्तं संप्रेक्ष्य निर्भ-
येनान्तरात्मना । तृणीकृत्य च तद्रक्षः सोऽब्रवीत्परुषं वचः ९ लोकना-
थस्य रामस्य सखा दासोस्मि राक्षस । न मया मोक्ष्यसेद्य त्वं पार्थिवे-
न्द्रस्य तेजसा १० इत्युक्त्वा सहसोत्पत्य पुप्लुवे तस्य चोपरि । आकृष्य
मुकुटं चित्रं पातयामास तद्भुवि ११ समीक्ष्य तूर्णमायान्तं बभाषे तं
निशाचरः । सुग्रीवस्त्वं परोक्षं मे हीनग्रीवो भविष्यसि १२ इत्युक्त्वो-
त्थाय तं क्षिप्रं बाहुभ्यामाक्षिपत्तले । कन्दुवत्स समुत्थाय बाहुभ्यामाक्षि-
पद्धरिः १३ परस्परं स्वेदविदिग्धगात्रौ परस्परं शोणितरक्तदेहौ ।
परस्परं श्लिष्टनिरुद्धचेष्टौ परस्परं शाल्मलिकिंशुकाविव १४ मुष्टि-
प्रहारैश्च तलप्रहारैररत्निघातैश्च कराग्रघातैः । तौ चक्रतुर्युद्धमसह्यरूपं

---

आहे असें आरक्तवर्ण वस्त्र त्यानें परिधान केलें असल्यामुळें सायंकालच्या सूर्यप्रकाशानें व्याप्त झालेलें आकाशांतील मेघपटलच कीं काय असा तो दिसत होता ६. असो. राक्षसाधिपति रावणाचें दर्शन होतांक्षणीं इतर वानराधिपति आणि राम ह्यांची पर्वा न करितां सुग्रीव एकाएकीं उठला ७ आणि क्रोधवेग, उत्साह व बल ह्यांनीं युक्त असलेल्या त्या सुग्रीवानें पर्वतशिखरावरून एकदम रावण बसलेल्या त्या वेशीवर उड्डाण केलें ८. तेथें जाऊन क्षणभर उभा राहिल्यावर निर्भय मनानें त्यानें त्या राक्षसाकडे पाहिलें आणि त्याला कस्पटाप्रमाणें समजून सुग्रीव कठोर शब्दांनीं त्याला ह्मणाला ९ "हे राक्षसा, जगदीश रामाचा मी सखा व दास आहें. त्या राजाधिराजाच्या तेजानें आज तुझी माझ्या हातून सुटका होणार नाहीं" १० असें बोलून सुग्रीवानें एकाएकीं त्याच्या मस्तकावर उड्डाण केलें आणि त्याचा अद्भुत मुकुट ओढून त्यानें पृथ्वीवर पाडिला ११. नंतर पुनरपि तो सुग्रीव सत्वर आपणाकडे येत आहे असें पाहून राक्षस त्याला ह्मणाला "माझ्या दृष्टीआड तूं सुग्रीव आहेस खरा परंतु आतां मात्र तूं हीनग्रीव (ह्मणजे कंठरहित) होऊन जाशील" १२. असें ह्मणून रावण उठला आणि दोन हातांनीं आंवळून त्यानें सुग्रीवाला भूतलावर हपटलें व सुग्रीवानेंही चेंडूसारिखें उड्डाण करून आपल्या हातांनीं रावणालाही भूतलावर पाडिलें १३. एकमेकांचा घाम एकमेकांच्या अंगाला लागला; एकमेकांचें रक्तही एकमेकांच्या शरीराला लागलें; एकमेकांनीं एकमेकांस आंवळून धरिल्यामुळें उभयतांचीही हालचाल बंद झाली आणि शरीर रक्तानें भरून गेल्यामुळें उभयतांही प्रफुल्लित शाल्मलि व पलाश वृक्षांप्रमाणें शोभूं लागले १४. ते उभयतां महाबलाढ्य राक्षसराज

महाबलौ राक्षसवानरेन्द्रौ १५ कृत्वा नियुद्धं भृशमुग्रवेगौ कालं चिरं गोपुरवेदिमध्ये । उत्क्षिप्य चोत्क्षिप्य विनम्य देहौ पादक्रमाद्गोपुरवेदिलग्नौ १६ अन्योन्यमापीड्य विलग्नदेहौ तौ पेततुः सालनिखातमध्ये । उत्पेततुर्भूमितलं स्पृशन्तौ स्थित्वा मुहूर्तं त्वभिनिःश्वसन्तौ १७ आलिङ्ग्य चालिङ्ग्य च बाहुयोक्त्रैः संयोजयामासतुराहवे तौ । संरम्भशिक्षाबलसंप्रयुक्तौ सुचेरतुः संप्रति युद्धमार्गे १८ शार्दूलसिंहाविव जातदंष्ट्रौ गजेन्द्रपोताविव संप्रयुक्तौ । संहत्य संवध्य च तौ कराभ्यां तौ पेततुर्वै युगपद्धरायाम् १९ उद्यम्य चान्योन्यमधिक्षिपन्तौ संचक्रमाते बहु युद्धमार्गे । व्यायामशिक्षाबलसंप्रयुक्तौ क्लमं न तौ जग्मतुराशु वीरौ २० बाहूत्तमैर्वारणवारणाभैर्निवारयन्तौ परवारणाभौ । चिरेण कालेन भृशं प्रयुद्धौ संचेरतुर्मण्डलमार्गमाशु २१ तौ परस्परमासाद्य यत्तावन्योन्यसूदने । मार्जाराविव भक्षार्थेवतस्थाते

---

व वानरराज मुष्टि, हस्ततल आणि बोटें ह्यांचे एकमेकांला प्रहार करून अत्यंत असह्य युद्ध करूं लागले १५. उग्र वेगानें युक्त असलेल्या त्या उभयतां योद्ध्यांनीं पुष्कळवेळपर्यंत वेशीच्या दारांत भयंकर युद्ध केल्यानंतर एकमेकांला वरचेवर उचलून टाकूं लागले आणि आपले देह खालीं वांकून टांगेनें त्यांनीं एकमेकांला वेशीमध्यें पाडिलें १६. एकमेकांला आंवळून धरिल्यामुळें ज्यांचे देह परस्पर संलग्न झालेले आहेत असे ते उभयतां योद्धे कोट आणि उदक ह्यांमध्यें पडले आणि भूतलावर पडल्यानंतर दीर्घ सुस्कारे टाकीत टाकीत क्षणभर तसेच पडून राहिल्यावर ते उठून उभे राहिले १७. एकमेकांला आलिंगन देऊन बाहुरूप रज्जूंनीं संग्रामामध्यें त्यांनीं एकमेकांला आंवळून धरिलें आणि क्रोध, युद्धाचा अभ्यास व स्वाभाविक बल ह्यांनीं युक्त असलेले ते उभयतां योद्धे एकमेकांशीं व्यवस्थित रीतीनें युद्ध करूं लागले १८. व्याघ्र आणि सिंह अथवा दंतयुक्त गजेंद्र आणि दंतयुक्त बालगज ह्यांप्रमाणें एकमेकांशीं भिडून गेलेले ते सुग्रीवरावण हातांनीं एकमेकांला प्रहार करून व चेतवून दोघेही एकदम भूतलावर पडले १९. नंतर उठून ते एकमेकांला कठोर भाषणें करीत करीत एकसारिखे युद्ध करूं लागले; परंतु, युद्धाचा उत्साह, अभ्यास आणि बल ह्यांनीं ते वीर युक्त असल्यामुळें त्या वीरांना सत्वर थकवा आला नाहीं २०. मत्त गजांप्रमाणें दिसत असलेले ते उभयतां योद्धे गजशुंडाप्रमाणें असलेल्या आपल्या उत्कृष्ट हातांनीं एकमेकांचें निवारण करूं लागले आणि चिरकालपर्यंत एकमेकांशीं अतिशय युद्ध केल्यानंतर मंडलाकारगतीनें ते संचार करूं लागले २१. दोन मांजरें ज्याप्रमाणें

मुहुर्मुहुः २२ मण्डलानि विचित्राणि स्थानानि विविधानि च। गोमूत्र-
काणि चित्राणि गतप्रत्यागतानि च २३ तिरश्चीनगतान्येव तथा वक्र-
गतानि च। परिमोक्षं प्रहाराणां वर्जनं परिधावनम् २४ अभिद्रवणमा-
प्लावमवस्थानं सविग्रहम्। परावृत्तमपावृत्तमपद्रुतमवप्लुतम्। २५ उपन्य-
स्तमपन्यस्तं युद्धमार्गविशारदौ। तौ विचेरतुरन्योन्यं वानरेन्द्रश्च रावणः २६
एतस्मिन्नन्तरे रक्षो मायाबलमथात्मनः। आरब्धुमुपसंपेदे ज्ञात्वा तं वान-
राधिपः २७ उत्पपात तदाकाशं जितकाशी जितक्लमः। रावणः स्थित
एवात्र हरिराजेन वञ्चितः २८ अथ हरिवरनाथः प्राप्तसङ्ग्रामकीर्तिर्नि-
शिचरपतिमाजौ योजयित्वा श्रमेण। गगनमतिविशालं लङ्घयित्वार्कसूनुर्ह-
रिगणबलमध्ये रामपार्श्वं जगाम २९ स इति सवितृसूनुस्तत्र तत्कर्म

---

खाण्याकरितां एकाच पदार्थावर टपून बसलेलीं असतात त्याप्रमाणें एकमेकांचा वध करण्याविषयीं तत्पर झालेले ते उभयतां योद्धे वारंवार एकमेकांसमीप जाऊन उभे राहूं लागले २२. विचित्र मंडलें, नानाप्रकारचीं स्थानें, आश्चर्यकारक नागमोडीप्रमाणें गति, हुलकावण्या २३, तिर्यग्गति, वक्रगति, दुसऱ्याचे प्रहार चुकविणें, आपला प्रहार व्यर्थ होण्याचा अजमास दिसल्यास तो मुळींच न करणें, एक उभा असतांना दुसऱ्यानें त्याचे भोंवतीं भ्रमण करणें २४, समोर चालून जाणें, हलकें हलकें जाणें, थांबून थांबून जाणें, प्रहार करून समोर उभें राहणें, तोंड फिरवून जाणें, बाजूनें पलीकडे सरणें, एकमेकांचे पाय वगैरे ओढण्याकरितां एकमेकांकडे वांकून धांवत जाणें, प्रतिपक्ष्याला पादप्रहार करण्याकरितां त्याच्या समोर जाणें २५, दुसऱ्याला आपले हात धरितां येऊं नयेत ह्मणून ते आपल्या वक्षस्थलावर चिकटून ठेवणें आणि प्रतिपक्ष्याचा हात धरण्याकरितां आपला हात पुढें करणें इत्यादि क्लृप्त्या योजून युद्धमार्गामध्यें निपुण असलेले ते उभयतां वानरराज सुग्रीव व रावण एकमेकांशीं युद्ध करूं लागले २६. इतक्यामध्यें आपलें मायाबल स्वीकारण्याचा राक्षसानें उपक्रम केला तोंच त्याला ओळखून युद्धामध्यें कधींही न थकणारा व धापा न देणारा तो वानराधिपति सुग्रीव एकदम आकाशामध्यें उडाला आणि वानरराज सुग्रीवानें अशारीतीनें फसविलेला तो रावण मात्र तेथेंच उभा राहिला २७; २८. असो; वानरश्रेष्ठांचा अधिपति जो सुग्रीव त्यानें अशारीतीनें राक्षसाधिपति रावणाला युद्धामध्यें जेरीस आणून संग्रामसंबंधीं कीर्ति संपादन केली आणि अति विशाल आकाशाचें उल्लंघन करून तो सूर्यपुत्र सुग्रीव वानरगणांच्या सेनेमध्यें रामासमीप जाऊन उभा राहिला २९. सारांश, वायुप्रमाणें शीघ्रगतीनें युक्त असलेला तो सूर्यपुत्र सुग्रीव अशारीतीनें तें कर्म

कृत्वा पवनगतिरनीकं प्राविशत्संप्रहृष्टः । रघुवरनृपसूनोर्वर्धयन्युद्धहर्षं तरुमृगगणमुख्यैः पूज्यमानो हरीन्द्रः ३० [ १४३० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चत्वारिंशः सर्गः ॥ ४० ॥

अथ तस्मिन्निमित्तानि दृष्ट्वा लक्ष्मणपूर्वजः । सुग्रीवं संपरिष्वज्य रामो वचनमब्रवीत् १ असंमन्त्र्य मया सार्धं तदिदं साहसं कृतम् । एवं साहसयुक्तानि न कुर्वन्ति जनेश्वराः २ संशये स्थाप्य मां चेदं बलं चेमं बिभीषणम् । कष्टं कृतमिदं वीर साहसं साहसप्रिय ३ इदानीं मा कृथा वीर एवंविधमरिन्दम । त्वयि किंचित्समापन्ने किं कार्यं सीतया मम ४ भरतेन महाबाहो लक्ष्मणेन यवीयसा । शत्रुघ्नेन च शत्रुघ्न स्वशरीरेण वा पुनः ५ त्वयि चानागते पूर्वमिति मे निश्चिता मतिः । जानतश्चापि ते वीर्यं महेन्द्रवरुणोपम ६ हत्वाहं रावणं युद्धे सपुत्रबलवाहनम् । अभिषिच्य च लङ्कायां बिभीषणमथापि च ७ भरते राज्यमारोप्य त्यक्ष्ये देहं महाबल । तमेवंवादिनं रामं सुग्रीवः प्रत्यभाषत ८ तव भार्यापहर्तारं

---

करून आनंदानें आपल्या सैन्यामध्यें प्रविष्ट झाला असतां रघुवंशजश्रेष्ठ राजकुमाराच्या युद्धसंबंधीं उत्साह वृद्धिंगत होऊं लागला आणि वानरगणांतील मुख्य मुख्य वानर त्या वानरराज सुग्रीवाची प्रशंसा करूं लागले ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४० ॥

तदनंतर सुग्रीवाच्या शरीरावर रक्तप्रभृति युद्धचिन्हें अवलोकन करून रामानें त्याला आलिंगन दिलें आणि तो त्याला ह्मणाला १ "माझ्याशीं विचार न करितां तूं हें साहस केलें आहेस; परंतु, राजे लोक असलीं साहसकर्में करीत नाहींत २. हे साहसप्रिय वीर सुग्रीवा, मला, या सैन्याला आणि बिभीषणाला काळजींत टाकून तूं हें अनुचित कर्म केलें आहेस ३. आतां, हे शत्रुदमना वीरा, पुनरपि असें करूं नको. अरे, तुला जर कांहीं झालें तर सीतेशीं मला काय कर्तव्य आहे ? ४ आणि त्याचप्रमाणें, हे महापराक्रमी शत्रुनाशका सुग्रीवा, कनिष्ठ भ्रात्या लक्ष्मणाशीं, शत्रुघ्नाशीं अथवा स्वतःच्या शरीराशीं तरी मला काय कर्तव्य आहे ? ५. असा विचार तूं येण्यापूर्वी माझ्या मनामध्यें निश्चयपूर्वक येत होता; आणि, हे इंद्रवरुणतुल्य सुग्रीवा, तुझा पराक्रम मी जाणीत असूनही असें होत होतें ६. संग्रामामध्यें पुत्र, सैन्य आणि वाहनें ह्यांसहवर्तमान रावणाचा वध करून, लंकेमध्यें बिभीषणाला अभिषेक करून ७, आणि भरताला राज्यावर बसवून, हे महाबलाढ्य सुग्रीवा, मी देहत्याग करीन "

दृष्ट्वा राघव रावणम् । मर्षयामि कथं वीर जानन्विक्रममात्मनः ९ इत्ये-
वंवादिनं वीरमभिनन्द्य च राघवः । लक्ष्मणं लक्ष्मिसंपन्नमिदं वच-
नमब्रवीत् १० परिगृह्योदकं शीतं वनानि फलवन्ति च । बलौघं
संविभज्यमं व्यूह्य तिष्ठाम लक्ष्मण ११ लोकक्षयकरं भीमं भयं
पश्याम्युपस्थितम् । निबर्हणं प्रवीराणामृक्षवानररक्षसाम् १२ वाता
हि परुषं वान्ति कम्पते च वसुन्धरा । पर्वताग्राणि वेपन्ते नदन्ति
धरणीधराः १३ मेघाः क्रव्यादसंकाशाः परुषाः परुषस्वराः । क्रूराः
क्रूरं प्रवर्षन्ते मिश्रं शोणितबिन्दुभिः १४ रक्तचन्दनसंकाशा संध्या पर-
मदारुणा । ज्वलच्च निपतत्येतदादित्यादग्निमण्डलम् १५ आदित्यमभिवा-
श्यन्ति जनयन्तो महद्भयम् । दीना दीनस्वराः क्रूरा अप्रशस्ता मृग-
द्विजाः १६ रजन्यामप्रशस्तश्च संतापयति चन्द्रमाः । कृष्णरक्तांशुप-
र्यन्तो यथा लोकस्य संक्षये १७ ह्रस्वो रूक्षोऽप्रशस्तश्च परिवेषः सुलो-
हितः । आदित्यमण्डले नीलं लक्ष्म लक्ष्मण दृश्यते १८ दृश्यते न यथावच्च

---

ह्याप्रमाणें राम बोलत असतांना सुग्रीव त्याला ह्मणाला ८ "हे वीरा राघवा, माझा पराक्रम जर मला ठाऊक आहे तर तुझी भार्या हरण करणारा रावण दृष्टीं पडल्यावर मला त्याचा अपराध कसा बरें सहन होईल ?" ९, ह्याप्रमाणें वीर सुग्रीव बोलूं लागला असतां त्याचें अभिनंदन करून वैभवशाली लक्ष्मणाला राम ह्मणाला १० "हे लक्ष्मणा, शीत जल आणि फलयुक्त वनें यांचा आश्रय करून या सेनासमुदायाचे आपण यथायोग्य विभाग करूं आणि युद्धाच्या तयारीनें उभे राहूं ११. कारण, वीर ऋक्ष, वानर आणि राक्षस यांचा नाश व जगताचा क्षय सुचविणारें प्रचंड भय उपस्थित झाल्याचें चिन्ह मला दिसत आहे १२. अरे, वायु भयंकर रीतीनें वाहत आहे; पृथ्वी कंपित होत आहे; पर्वतशिखरें थरथर कांपत आहेत; पर्वत आक्रोश करूं लागले आहेत १३; क्रूर व कठोर स्वरांनीं युक्त असे उग्र मेघ राक्षसांसारिखे दिसत असून रक्तबिंदूंनीं मिश्रित अशी भयंकर वृष्टि करीत आहेत १४. अतिभयंकर संध्या रक्तचंदनासारिखी दिसत आहे; सूर्यापासून अग्नीचें हें प्रदीप्त मंडळ खालीं येत आहे १५; अप्रशस्त व क्रूर पशुपक्षी दीन वदन होऊन दीन स्वरानें सूर्यसंमुख आक्रोश करीत आहेत आणि त्यामुळें मोठें भय सुचवीत आहेत १६; रात्रीं अप्रशस्त दिसणारा चंद्र लोकांना संतप्त करीत आहे आणि प्रलयकालाप्रमाणें कृष्णवर्ण व आरक्तवर्ण किरणांनीं तो परिवेष्टित झालेला आहे १७; चंद्राच्या सभोंवतीं ह्रस्व, रूक्ष, अत्यंत रक्तवर्ण आणि ह्मणूनच अप्रशस्त असें

नक्षत्राण्यभिवर्तते । युगान्तमिव लोकस्य पश्य लक्ष्मण शंसति १९
काकाः श्येनास्तथा गृध्रा नीचैः परिपतन्ति च । शिवाश्चाप्यशुभा वाचः
प्रवदन्ति महास्वनाः २० शैलैः शूलैश्च खड्गैश्च विमुक्तैः कपिराक्षसैः ।
भविष्यत्यावृता भूमिर्मांसशोणितकर्दमा २१ क्षिप्रमद्य दुराधर्षां पुरीं
रावणपालिताम् । अभियाम जवेनैव सर्वतो हरिभिर्वृताः २२ इत्येवं तु
वदन्वीरो लक्ष्मणं लक्ष्मणाग्रजः । तस्मादवातरच्छीघ्रं पर्वताग्रान्महा-
बलः २३ अवतीर्य तु धर्मात्मा तस्माच्छैलात्स राघवः । परैः परमदुर्धर्षं
ददर्श बलमात्मनः २४ संनह्य तु ससुग्रीवः कपिराजबलं महत् । कालज्ञो
राघवः काले संयुगायाभ्यचोदयत् २५ ततः काले महाबाहुर्बलेन महता
वृतः । प्रविष्टः पुरतो धन्वी लङ्कामभिमुखः पुरीम् २६ तौ बिभीषणसु-
ग्रीवौ हनूमाञ्जाम्बवान्नलः । ऋक्षराजस्तथा नीलो लक्ष्मणश्चान्वयुस्तदा २७
ततः पश्चात्सुमहती पृतनर्क्षवनौकसाम् । प्रच्छाद्य महतीं भूमिमनुयाति

---

तळें पडलेलें आहे; हे लक्ष्मणा, सूर्यमंडलामध्येंही काळा डाग दृष्टीं पडूं लागला आहे १८; नक्षत्रांचे ठिकाणीं प्रकाश, गति वगैरे पूर्वीप्रमाणें दृष्टोत्पत्तीस येत नाहींत आणि, हे लक्ष्मणा, जगताचा प्रलयकालच आहे कीं काय असें ह्यावरून सुचित होत आहे १९. काक, श्येन, व गृध्रपक्षी खालीं खालीं येत आहेत; आणि मोठा आक्रोश करणाऱ्या भालूही अशुभ शब्द करीत आहेत २०. ह्यावरून वानरांनीं व राक्षसांनीं फेंकिलेले पर्वत, शूल आणि खड्ग यांच्या योगानें भूमि व्याप्त होऊन जाईल आणि रक्तमांसांचा भूमीवर रेंदा होऊन जाईल २१. अशा रावणानें रक्षण केलेल्या आणि ह्मणूनच हल्ला होण्यास कठीण जाणाऱ्या लंकानगरीवर आपण सर्व बाजूंनीं वानरांनीं परिवेष्टित राहून वेगानें चालून जाऊं" २२. ह्याप्रमाणें लक्ष्मणाचा ज्येष्ठ बंधु महाबलाढ्य वीर राम लक्ष्मणाशीं असें बोलत बोलत त्या पर्वतशिखरापासून सत्वर खालीं उतरला २३; त्या पर्वतावरून खालीं उतरल्यावर आपल्या सैन्याचा शत्रूंच्या हातून पराभव होणें फारच कठीण आहे असें त्या रामाच्या नजरेस आलें २४ व सुग्रीवासहवर्तमान त्या कालवेत्त्या रामानें वानरराजाचें प्रचंड सैन्य सज्ज केल्यावर योग्य कालीं त्यानें त्याला युद्धाची अनुज्ञा दिली २५. तदनंतर ( स्वरशास्त्राचे अनुरोधानें ) युद्धाला योग्य समय पाहून प्रचंड सैन्यानें परिवेष्टित असलेला महापराक्रमी धनुर्धारी राम सैन्याच्या पुढें झाला आणि संमुख राहून लंका नगरीमध्यें प्रवेश करण्यास तो तयार झाला २६. तेव्हां ते बिभीषण, सुग्रीव, हनुमान् जांबवान्, नल, ऋक्षराज नील, आणि लक्ष्मण हे त्याच्या मागोमाग गेले २७.

स्म राघवम् २८ शैलशृङ्गाणि शतशः प्रवृद्धांश्च महीरुहान् । जगृहुः कुञ्जरप्रख्या वानराः परवारणाः २९ तौ त्वदीर्घेण कालेन भ्रातरौ रामलक्ष्मणौ । रावणस्य पुरीं लङ्कामासेदतुररिन्दमौ ३० पताकामालिनीं रम्यामुद्यानवनशोभिताम् । चित्रवप्रां सुदुष्प्रापामुच्चैः प्राकारतोरणाम् ३१ तां सुरैरपि दुर्धर्षां रामवाक्यप्रचोदिताः । यथानिदेशं संपीड्य न्यविशन्त वनौकसः ३२ लङ्कायास्तूत्तरद्वारं शैलशृङ्गमिवोन्नतम् । रामः सहानुजो धन्वी जुगोप च रुरोध च ३३ लङ्कामुपनिविष्टस्तु रामो दशरथात्मजः । लक्ष्मणानुचरो वीरः पुरीं रावणपालिताम् ३४ उत्तरद्वारमासाद्य यत्र तिष्ठति रावणः । नान्यो रामाद्धि तद्द्वारं समर्थः परिरक्षितुम् ३५ रावणाधिष्ठितं भीमं वरुणेनेव सागरम् । सायुधै राक्षसैर्भीमैरभिगुप्तं समन्ततः ३६ लघूनां त्रासजननं पातालमिव दानवैः ३७ विन्यस्तानि च योधानां बहूनि विविधानि च । ददर्शा-

---

तदनंतर अस्वलें आणि वानर ह्यांचा फारच मोठा सेना तो विशाल भूप्रदेश आच्छादित करून रामाच्या मागोमाग चालली २८. शत्रूचें निवारण करणाऱ्या गजतुल्य वानरांनीं शेंकडों पर्वतशिखरें आणि मोठमोठे वाढलेले वृक्ष हातांत घेतले २९ व नंतर थोडक्याच वेळांत ते शत्रुदमन भ्राते रामलक्ष्मण रावणाच्या लंकानगरीच्या समीप गेले ३०. त्या नगरीमध्यें पताकांच्या रांगाच दिसत होत्या; ती दिसण्यांत रम्य होती, उपवनें व वनें ह्यांच्या योगानें तिला शोभा आलेली होती; तिचे तट आश्चर्यकारक होते आणि कोट व वेशी फारच उंच असल्यामुळें तिच्यामध्यें शत्रूचा प्रवेश होणें अतिच दुर्घट होतें ३१. असो. ह्याप्रमाणें देवांचाही हल्ला होण्यास अशक्य असलेल्या त्या लंकेला रामाची आज्ञा झाल्याप्रमाणें वानर वेढा देऊन राहिले ३२. लंकेचें उत्तरद्वार जें पर्वतशिखराप्रमाणें उंच होतें, तें धनुर्धारी रामानेंच लक्ष्मणासह वर्तमान अडवून धरिलें आणि तेथें असलेल्या स्वतःच्या सैन्याचें त्यानेंच रक्षण केलें ३३. सारांश, लक्ष्मण ज्याचा अनुयायी आहे असा तो दशरथपुत्र वीर राम रावणानें रक्षिलेल्या त्या लंकानगरीच्या उत्तरद्वाराचें अवलंबन करून राहिला ३४. कारण, तेथें रावण होता आणि ह्मणूनच रामावांचून त्या द्वाराचा बंदोबस्त करण्यास दुसरा कोणीही समर्थ नव्हता ३५. वरुण ज्याप्रमाणें समुद्रामध्यें रहातो, त्याप्रमाणें त्या भयंकर उत्तरद्वाराचे ठिकाणीं रावण वास्तव्य करीत होता; सशस्त्र व भयंकर राक्षस सर्व बाजूंनीं त्या द्वाराचें रक्षण करीत होते आणि दुर्बलांना भय उत्पन्न करणाऱ्या त्या द्वाराचें दानवांनीं रक्षण केलेल्या पातालाप्रमाणें राक्षसांनीं

युधजालानि तथैव कवचानि च ३८ पूर्वं तु द्वारमासाद्य नीलो हरिच-मूपतिः । अतिष्ठत्सह मैन्देन द्विविदेन च वीर्यवान् ३९ अङ्गदो दक्षिण-द्वारं जग्राह सुमहाबलः । ऋषभेण गवाक्षेण गजेन गवयेन च ४० हनू-मान्पश्चिमद्वारं ररक्ष बलवान्कपिः । प्रजङ्घतरसाभ्यां च वीरैरन्यैश्च संगतः ४१ मध्यमे च स्वयं गुल्मे सुग्रीवः समतिष्ठत । सह सर्वैर्हरि-श्रेष्ठैः सुवर्णपवनोपमैः ४२ वानराणां तु षट्त्रिंशत्कोट्यः प्रख्यातयूथपाः । निपीड्योपनिविष्टाश्च सुग्रीवो यत्र वानरः ४३ शासनेन तु रामस्य लक्ष्मणः सविभीषणः । द्वारे द्वारे हरीणां तु कोटिं कोटीर्न्यवेशयत् ४४ पश्चिमेन तु रामस्य सुषेणः सहजाम्बवान् । अदूरान्मध्यमे गुल्मे तस्थौ बहुबलानुगः ४५ ते तु वानरशार्दूलाः शार्दूला इव दंष्ट्रिणः । गृहीत्वा द्रुमशैलाग्रान्हृष्टा युद्धाय तस्थिरे ४६ सर्वे विकृतलाङ्गूलाः सर्वे दंष्ट्रान-खायुधाः । सर्वे विकृतचित्राङ्गाः सर्वे च विकृताननाः ४७ दशनागबलाः

---

रक्षण केलेलें होतें ३६ ३७. असो. तेथें योद्धयांचे नानाप्रकारचे असंख्य आयुधसमुदाय व कवचें ठेविलेलीं रामानें अवलोकन केलीं ३८. वानरसेनाधिपति वीर्यवान् नील, मैंद आणि द्विविद ह्यांसहवर्तमान पूर्वद्वार रोंखून राहिला ३९. अत्यंत महाबलाढ्य अंग-दानें ऋषभ, गवाक्ष, गज आणि गवय ह्यांसहवर्तमान दक्षिणद्वाराचें अवलंबन केलें ४०. प्रजंघ, तरस आणि इतरही वीर बरोबर घेऊन बलाढ्य हनुमान् वानरानें पश्चिमद्वाराचें रक्षण केलें ४१. उत्तर आणि पश्चिम ह्यामध्यें वायव्य दिशेस असलेला जो बुरूज त्याचें अवलंबन करून सुग्रीव राहिला व त्याच्या बरोबर सुवर्णासारिखी कांति व वायूसारिखी गति ह्यांनीं युक्त असलेले सर्व वानरश्रेष्ठ उभे राहिले ४२. सारांश, सुग्रीववानर जेथें उभा राहिला होता, तेथें विख्यात सेनाधिपति असे छत्तिसकोट वानर लंकेचा तो प्रदेश अडवून उभे राहिले ४३. रामाच्या आज्ञेनें बिभीषणाला बरोबर घेऊन लक्ष्मणानें प्रत्येक द्वारावर मोठे मोठे कोटिकोटि वानर ठेविले ४४. रामाच्या मागें जांबवानासहवर्तमान सुषेण असंख्य सैन्य बरोबर घेऊन मध्य-मार्गीं असलेल्या बुरुजाचें रक्षण करीत राहिला ४५ दंष्ट्रांनीं युक्त असलेले व्याघ्रच कीं काय असे ते वानरश्रेष्ठ हातामध्यें वृक्षांचीं अग्रें व पर्वतशिखरें घेऊन आनंदानें पर्वतशिखरावर उभे राहिले ४६. क्रोधामुळें सर्वांचीं पुच्छें वांकडीं तिकडीं होऊन गेलीं होतीं; दंष्ट्रा व नखें हीं सर्वांचीं ( स्वाभाविकच ) आयुधें होतीं; सर्वांचींही शरीरें विकारयुक्त व चित्रविचित्र झालेलीं होतीं आणि सर्वांच्या मुद्राही फिरून

केचित्केचिद्दशगुणोत्तराः । केचिन्नागसहस्रस्य बभूवुस्तुल्यविक्रमाः ४८
सन्ति चौघबलाः केचित्केचिच्छतगुणोत्तराः । अप्रमेयबलाश्चान्ये तत्रा-
सन्हरियूथपाः ४९ अद्भुतश्च विचित्रश्च तेषामासीत्समागमः । तत्र वान-
रसैन्यानां शलभानामिवोद्गमः ५० प्रतिपूर्णमिवाकाशं संपूर्णेव च मेदिनी।
लङ्कामुपनिविष्टैश्च संपतद्भिश्च वानरैः ५१ शतं शतसहस्राणां पृतनार्क्ष-
वनौकसाम् । लङ्काद्वाराण्युपाजग्मुरन्ये योद्धुं समन्ततः ५२ आवृतः स
गिरिः सर्वैस्तैः समन्तात्प्लवङ्गमैः । अयुतानां सहस्रं च पुरीं तामभ्यवर-
र्तत ५३ वानरैर्बलवद्भिश्च बभूव द्रुमपाणिभिः । सर्वतः संवृता लङ्का
दुष्प्रवेशापि वायुना ५४ राक्षसा विस्मयं जग्मुः सहसाभिनिपीडिताः ।
वानरैर्मेघसंकाशैः शक्रतुल्यपराक्रमैः ५५ महाञ्छब्दोभवत्तत्र बलौघस्या-
भिवर्ततः । सागरस्येव भिन्नस्य यथा स्यात्सलिलस्वनः ५६ तेन शब्देन
महता सप्राकारा सतोरणा । लङ्का प्रचलिता सर्वा सशैलवनकानना ५७

---

गेलेल्या होत्या ४७. कांहीं वानरांना दहा गजांचें बल होतें; कांहींना त्यांच्याहीपेक्षां दसपट बल होतें आणि कांहींचें सामर्थ्य तर सहस्र गजांच्या बरोबरीचें होतें ४८. कांहीं वानराधिपतींना ओघ[1] गजां इतकें बल होतें; कांहींचें सामर्थ्य त्यांच्याहीपेक्षां शंभरपट जास्त होतें आणि कांहींच्या सामर्थ्याला तर सीमाच नव्हती ४९. (उत्पात-कालीं) उद्भवणाऱ्या टोळांप्रमाणें त्या वानरसैन्यांचा अद्भुत व विचित्र समुदाय एकत्र जुळलेला होता ५०. उड्डाण करीत असलेल्या वानरांच्या योगानें आकाश भरून गेलें होतें आणि लंकेसमीप बसलेल्या वानरांच्या योगानें जशी कांहीं पृथ्वी भरून गेली होती ५१. ऋक्ष आणि वानर ह्यांच्या एक कोटी सेना लंकेच्या द्वारासमीप आल्या आणि अवशिष्ट राहिलेले इतरही योद्धे चोहोंबाजूंनीं युद्ध करण्याकरितां लंकेवर आले ५२. तेव्हां तो त्रिकूट पर्वत त्या सर्व वानरांच्या योगानें सर्व बाजूंनीं व्याप्त झाला आणि एक कोटि सेना त्या लंकानगरीभोंवतीं संचार करूं लागल्या ५३. हातामध्यें वृक्ष घेतलेल्या बलाढ्य वानरांनीं ती लंकानगरी सर्व बाजूंनीं व्याप्त झाल्यामुळें वायूचाही तेथें प्रवेश होणें अशक्य झालें ५४. ह्याप्रमाणें इंद्रतुल्य पराक्रमी आणि मेघतुल्य देहधारी वानरांचा एकाएकीं हल्ला झाल्यामुळें राक्षस विस्मयचकित झाले ५५; सेनासमूह लंकेवर लोटूं लागला असतां सेतु भिन्न करणाऱ्या सागराचा ज्याप्रमाणें ध्वनि व्हावा त्याप्रमाणें ध्वनि होऊं लागला ५६; त्या प्रचंड ध्वनीच्या योगानें कोट, वेशी, पर्वत, वनें आणि अरण्यें ह्यांसहवर्तमान सर्व लंका हादरून गेली ५७; आणि

---

१ ओघ हा शब्द संख्यावाचक आहे असें दिसतें; परंतु ही संख्या कोणती हें समजत नाहीं.

रामलक्ष्मणगुप्ता सा सुग्रीवेण च वाहिनी । बभूव दुर्धर्षतरा सर्वैरपि सुरासुरैः ५८ राघवः संनिवेश्यैव स्वसैन्यं रक्षसां वधे । संमन्त्र्य मन्त्रिभिः सार्धं निश्चित्य च पुनः पुनः ५९ आनन्तर्यमभिप्रेप्सुः क्रमयोगार्थतत्त्ववित् । विभीषणस्यानुमते राजधर्ममनुस्मरन् ६० अङ्गदं वालितनयं समाहूयेदमब्रवीत् । गत्वा सौम्य दशग्रीवं ब्रूहि मद्वचनात्कपे ६१ लङ्घयित्वा पुरीं लङ्कां भयं त्यक्त्वा गतव्यथः । भ्रष्टश्रीकं गतैश्वर्यं मुमूर्षो नष्टचेतनम् ६२ ऋषीणां देवतानां च गन्धर्वाप्सरसां तथा । नागानामथ यक्षाणां राज्ञां च रजनीचर ६३ यच्च पापं कृतं मोहादवलिप्तेन राक्षस । नूनं ते विगतो दर्पः स्वयंभूवरदानजः ६४ यस्य दण्डधरस्तेऽहं दाराहरणकर्शितः । दण्डं धारयमाणस्तु लङ्काद्वारे व्यवस्थितः ६५ पदवीं देवतानां च महर्षीणां च राक्षस । राजर्षीणां च सर्वेषां गमिष्यसि युधि स्थिरः ६६ बलेन येन वै सीतां मायया राक्षसाधम । मामतिक्रमयित्वा त्वं

---

राम, लक्ष्मण व सुग्रीव ह्यांनीं रक्षण केलेली ती सेना सर्व देवदैत्यांनाही अतिशय अजिंक्य झाली ५८. राक्षसांच्या वधाकरितां आपलें सैन्य सज्ज केल्यानंतर पुढील उपक्रम करण्याच्या उद्देशानें मंत्र्यांसहवर्तमान वारंवार विचार करून काय करावयाचें हें रामानें ठरविलें आणि युद्धाच्या पूर्वी कोणत्या उपायांचें क्रमानें अवलंबन केलें पाहिजे ह्याचें तत्त्व जाणणारा आणि बिभीषणाच्या अनुमतानें वागणारा तो राम राजधर्म लक्ष्यांत आणून ५९, ६० व वालिपुत्र अंगदाला हाक मारून ह्मणाला:— हे विनयसंपन्न वानरा, लक्ष्मीपासून भ्रष्ट, ऐश्वर्याला मुकलेला आणि मरणोन्मुख दशा प्राप्त झाल्यामुळें कांहीं एक शुद्ध नसलेला जो रावण त्याच्याकडे जाऊन माझ्या आज्ञेनें त्याला असें सांग कीं "हे रावणा, समुद्राचें उल्लंघन करून आणि भीति सोडून देऊन मी स्वस्थपणें लंकानगरीप्रत आलों आहें ६१, ६२ ह्यास्तव, हे निशाचरा राक्षसा, ब्रह्मदेवाचा वर मिळाल्याकारणानें ऋषि, देव, गंधर्व, अप्सरा, नाग, यक्ष आणि राजे ह्यांना तूं मूर्खपणामुळें गर्विष्ठ होऊन जो त्रास दिला आहेस, तो तुझा ब्रह्मदेवाच्या वरप्रदानानें प्राप्त झालेला गर्व आज खरोखर नाहींसा होईल ६३, ६४. स्त्रीचा अपहार झाल्यामुळें दुःखित झालेला मी तुला दंड करणारा आहें आणि दंड करण्याकरितांच लंकेच्या द्वाराशीं येऊन तयार राहिलों आहें ६५. तस्मात्, हे राक्षसा, युद्धामध्यें जर तूं स्थिर राहिलास तर देव, महर्षि आणि सर्व राजर्षि ह्यांना प्राप्त झालेला पुण्यलोक तुलाही प्राप्त होईल. ६६ अरा. हे राक्षसाधमा, माझी पर्वा न करितां ज्या मायेचें अवलंबन करून

हृतवांस्तन्निदर्शय ६७ अराक्षसमिमं लोकं कर्तास्मि निशितैः शरैः । न चेच्छरणमभ्येषि तामादाय तु मैथिलीम् ६८ धर्मात्मा राक्षसश्रेष्ठः संप्राप्तोयं विभीषणः । लङ्कैश्वर्यमिदं श्रीमान्ध्रुवं प्राप्नोत्यकण्टकम् ६९ न हि राज्यमधर्मेण भोक्तुं क्षणमपि त्वया । शक्यं मूर्खसहायेन पापेनाविदितात्मना ७० युध्यस्व मा धृतिं कृत्वा शौर्यमालम्ब्य राक्षस । मच्छरैस्त्वं रणे शान्तस्ततः शान्तो भविष्यसि ७१ यद्याविशसि लोकांस्त्रीन्पक्षीभूतो निशाचर । मम चक्षुःपथं प्राप्य न जीवन्प्रतियास्यसि ७२ ब्रवीमि त्वां हितं वाक्यं क्रियतामौर्ध्वदेहिकम् । सुदृष्टा क्रियतां लङ्का जीवितं ते मयि स्थितम् ७३ इत्युक्तः स तु तारेयो रामेणाक्लिष्टकर्मणा । जगामाकाशमाविश्य मूर्तिमानिव हव्यवाट् ७४ सोत्पत्य मुहूर्तेन श्रीमान्रावणमन्दिरम् । ददर्शासीनमव्यग्रं रावणं सचिवैः सह ७५ ततस्तस्याविदूरेण निपत्य हरिपुङ्गवः । दीप्ताग्निसदृशस्तस्थावङ्गदः कनकाङ्गदः ७६

---

तूं कपटानें सीता हरण केलीस तें बल आतां दाखीव ६७. त्या मिथिल राजकन्या सीतेला आणून जर तूं शरण न येशील तर तीक्ष्ण बाणांच्या योगानें हें जगत् मी राक्षसरहित करून टाकीन ६८. हा धर्मात्मा राक्षसश्रेष्ठ बिभीषण येथें प्राप्त झाला आहे आणि या वैभवशाली बिभीषणाला लंकेचें निष्कंटक आधिपत्य निःसंशय प्राप्त होणार आहे ६९. मी कोण; आपलें सामर्थ्य काय वगैरे स्वतः संबंधाचेंच ज्याला ज्ञान नाहीं आणि ज्याचे साहाय्यकर्तेही मूर्ख आहेत, अशा तुज पाप्याला अतां अधर्मानें एक क्षणभरही राज्याचा उपभोग घेतां येणें शक्य नाहीं ७०. हे राक्षसा, धैर्य धरून आणि शौर्याचें अवलंबन करून तूं माझ्याशीं युद्ध कर; संग्रामामध्यें माझ्या बाणांनीं तुझा अंत झाला असतां तूं पापापासून मुक्त होशील ७१. हे निशाचरा, तूं पक्षी बनून जरी त्रैलोक्यामध्यें कोठेंही प्रवेश केलास तरी माझ्या दृष्टिपथाच्या आड जाणार नाहींस आणि जिवंत सुटणारही नाहींस ७२ असो. आतां, ज्याअर्थी तुझें जीवित माझ्यावर अवलंबन आहे त्याअर्थी लंकानगरी एकदां चांगली पाहून घे आणि परलोकीं उपयोगीं पडणारा कांहीं दानधर्म करावयाचा असल्यास कर. ही तुझ्या हिताची गोष्ट मी तुला सांगत आहें " ७३. ह्याप्रमाणें पापकर्मापासून परावृत्त असलेल्या रामानें तारापुत्र अंगदापाशीं रावणाला निरोप सांगितला असतां मूर्तिमान् अग्नि कीं काय असा तो तेजस्वी अंगद आकाशमार्गाचें अवलंबन करून चालता झाला ७४; आणि एका क्षणामध्यें मार्गाचें आक्रमण करून रावणाच्या मंदिराजवळ आल्यानंतर सचिवांसहवर्तमान सावधपणानें बसलेला रावण त्या श्रीमान्

तद्रामवचनं सर्वमन्यूनाधिकमुत्तमम् । सामात्यं श्रावयामास निवेद्यात्मानमात्मना ७७ दूतोऽहं कोशलेन्द्रस्य रामस्याक्लिष्टकर्मणः । वालिपुत्रोऽङ्गदो नाम यदि ते श्रोत्रमागतः ७८ आह त्वां राघवो रामः कौसल्यानन्दवर्धनः । निष्पत्य प्रतियुध्यस्व नृशंस पुरुषो भव ७९ हन्तास्मि त्वां महामात्यं सपुत्रज्ञातिबान्धवम् । निरुद्विग्नास्त्रयो लोका भविष्यन्ति हते त्वयि ८० देवदानवयक्षाणां गन्धर्वोरगरक्षसाम् । शत्रुमद्योद्धरिष्यामि त्वामृषीणां च कण्टकम् ८१ बिभीषणस्य चैश्वर्यं भविष्यति हते त्वयि । न चेत्सत्कृत्य वैदेहीं प्रणिपत्य प्रदास्यसि ८२ इत्येवं परुषं वाक्यं ब्रुवाणे हरिपुङ्गवे । अमर्षवशमापन्नो निशाचरगणेश्वरः ८३ ततः स रोषमापन्नः शशास सचिवांस्तदा । गृह्यतामिति दुर्मेधा वध्यतामिति चासकृत् ८४ रावणस्य वचः श्रुत्वा दीप्ताग्निमिव तेजसा । जगृहुस्तं ततो घोराश्चत्वारो रजनीचराः ८५ ग्राहयामास तारेयः स्वयमात्मानमात्मवान् । बलं दर्शयितुं वीरो

---

अंगदानें अवलोकन केला ७५. तदनंतर तो सुवर्णबाहुभूषणें धारण केलेला व प्रदीप्त अग्निप्रमाणें उज्ज्वल असलेला वानरश्रेष्ठ अंगद त्या रावणासमीपच उतरून उभा राहिला ७६; आणि कांहीं एक कमीजास्त न करितां रामाचें तें सर्वही भाषण आपण कोण हें प्रथम कळवून त्यानें अमात्यांसहवर्तमान रावणाला कथन केलें ७७. (तो ह्मणाला) "पापकर्मापासून पराङ्मुख असलेल्या कोशलदेशाधिपति रामाचा मी दूत वालिपुत्र अंगद आहें. मी कदाचित् तुझ्या कानावर आलोंही असेन ७८. कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या रघुवंशज रामानें तुला असा निरोप सांगितला आहे कीं; "हे दुष्टा, नगराच्या बाहेर येऊन तूं माझ्याशीं युद्ध कर आणि आपलें शौर्य गाजीव ७९. तुझा वध झाला असतां त्रैलोक्य दुःखरहित होईल; ह्यास्तव, अमात्य, पुत्र, ज्ञाति आणि बांधव ह्यांसहवर्तमान मी तुझा वध करीन ८०. देव, दानव, यक्ष गंधर्व, उरग, राक्षस आणि ऋषि ह्यांचा शत्रु व कंटक जो तूं त्या तुला मी आज उपटून टाकीन ८१. प्रणिपात करून सत्कारपूर्वक तूं जर विदेहराजकन्या सीता परत न देशील तर तुझा वध होऊन बिभीषणाला लंकेचें आधिपत्य प्राप्त होईल" ८२. ह्याप्रमाणें रामाचें तीक्ष्ण भाषण वानरश्रेष्ठ अंगद सांगूं लागला असतां राक्षसगणाधिपति रावण क्रोधाधीन झाला ८३. तदनंतर, क्रुद्ध झालेल्या त्या रावणानें "ह्या दुर्बुद्धि वानराला धरून ह्याचा वध करा" असें अनेक वेळां सचिवांना सांगितलें असतां ८४, रावणाची आज्ञा ऐकतांक्षणीं तेजामुळें प्रदीप्त अग्नि कीं काय अशा त्या अंगदाला चार घोर राक्षसांनीं धरिलें ८५. तेव्हां त्या राक्षससमुदायाला आपलें बल काय

यातुधानमध्ये बद्धा८६स तान्बाहुद्वयासक्तानादाय पतगानिव। प्रासादं शैल-
संकाशमुत्पपाताङ्गदस्तदा ८७ तस्योत्पतनवेगेन निर्धूतास्तत्र राक्षसाः।
भूमौ निपतिताः सर्वे राक्षसेन्द्रस्य पश्यतः ८८ ततः प्रासादशिखरं शैल-
शृङ्गमिवोन्नतम्। चक्राम राक्षसेन्द्रस्य वालिपुत्रः प्रतापवान् ८९ पफाल
च तदाक्रान्तं दशग्रीवस्य पश्यतः। पुरा हिमवतः शृङ्गं वज्रेणेव विदारि-
तम् ९० भङ्क्त्वा प्रासादशिखरं नाम विश्राव्य चात्मनः। विनद्य सुम-
हानादमुत्पपात विहायसा ९१ व्यथयन्राक्षसान्सर्वान्हर्षयंश्चापि वानरान्।
स वानराणां मध्ये तु रामपार्श्वमुपागतः ९२ रावणस्तु परं चक्रे क्रोधं
प्रासादधर्षणात्। विनाशं चात्मनः पश्यन्निःश्वासपरमोऽभवत् ९३ रामस्तु
बहुभिर्हृष्टैर्विनदद्भिः प्लवङ्गमैः। वृतो रिपुवधाकाङ्क्षी युद्धायैवाभिवर्तत९४
सुषेणस्तु महावीर्यो गिरिकूटोपमो हरिः। बहुभिः संवृतस्तत्र वानरैः
कामरूपिभिः ९५ स तु द्वाराणि संयम्य सुग्रीववचनात्कपिः। पर्यक्रामत

---

आहे हें दर्शविण्याकरितां तो विचारी वीर तारापुत्र अंगद आपण होऊनच त्यांच्या स्वाधीन झाला८६.नंतर आपल्या दोन्ही हातांना सर्पाप्रमाणें लगटलेल्या त्या राक्षसांना घेऊन अंगदानें त्या पर्वतप्राय प्रासादावर उडी मारिली असतां ८७ त्याच्या उड्डाणाच्या वेगानें हिसडले गेलेले ते सर्वही राक्षस राक्षसाधिपति रावणाच्या समक्षच भूमीवर पडले ८८. तदनंतर पर्वतशिखराप्रमाणें उंच असलेलें जें त्या राक्षसाधिपति रावणाच्या वाड्याचें शिखर त्याच्यावर तो प्रतापी वालिपुत्र गेला असतां ८९ इंद्राच्या वज्रानें पूर्वी विदीर्ण झालेलें हिमालय पर्वताचें शिखरच कीं काय असें तें शिखर वानराचा दाब बसल्यामुळें रावणाच्या समक्ष विदीर्ण होऊन गेलें९० असो. अशारीतीनें प्रासादाचें शिखर मोडून टाकून आपलें नांव प्रसिद्ध करून आणि फारच उच्च स्वरानें गर्जना करून तो अंगद आकाशमार्गानें तेथून निघाला ९१; आणि सर्व राक्षसांना विषाद व सर्व वानरांना हर्ष उत्पन्न करीत करीत तो अंगद वानरांमध्यें रामाचे समीप आला ९२; अशारीतीनें वाड्यावर हल्ला झाल्यामुळें रावण अतिशय क्रुद्ध झाला आणि आपला विनाशकाल आला आहे असें अवलोकन करून तो एकसारखे सुस्कारे टाकूं लागला ९३. असो. आनंदित होऊन गर्जना करणाऱ्या असंख्य वानरांनीं परिवेष्टित होऊन शत्रुवधाची इच्छा धरणाऱ्या रामानें इकडे युद्धाचीच तयारी चालविली ९४. शरीरानें पर्वतशिखराप्रमाणें असलेला महावीर्यवान् सुषेणही यथेष्ट रूप धारण करणारे असंख्य वानर बरोबर घेऊन तेथें होता ९५; आणि चंद्र ज्याप्रमाणें नक्षत्रांना रोखून राहतो त्याप्रमाणें सुग्रीवाच्या आज्ञेनें लंकेचीं द्वारें रोखून तो अजिंक्य वानर

दुर्धर्षो नक्षत्राणीव चन्द्रमाः १६ तेषामक्षौहिणिशतं समवेक्ष्य वनौकसाम् । लङ्कामुपनिविष्टानां सागरं चाभिवर्ततां १७ राक्षसा विस्मयं जग्मुस्त्रासं जग्मुस्तथापरे । अपरे समरं हर्षाद्दर्पमेवोपपेदिरे १८ कृत्स्नं हि कपिभिर्व्याप्तं प्राकारपरिखान्तरम् । ददृशू राक्षसा दीनाः प्राकारं वानरीकृतम् ॥ हाहाकारमकुर्वन्त राक्षसा भयमागताः १९ तस्मिन्महाभीषणके प्रवृत्ते कोलाहले राक्षसराजयोधाः । प्रगृह्य रक्षांसि महायुधानि युगान्तवाता इव संविचेरुः १०० [१५३०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकचत्वारिंशः सर्गः ॥ ४१ ॥

ततस्ते राक्षसास्तत्र गत्वा रावणमन्दिरम् । न्यवेदयन्पुरीं रुद्धां रामेण सह वानरैः १ रुद्धां तु नगरीं श्रुत्वा जातक्रोधो निशाचरः । विधानं द्विगुणं श्रुत्वा प्रासादं चाप्यरोहत २ स ददर्शावृतां लङ्कां सशैलवनकाननाम् । असंख्येयैर्हरिगणैः सर्वतो युद्धकाङ्क्षिभिः ३ स दृष्ट्वा वानरैः सर्वैर्वसुधां कपिलीकृताम् । कथं क्षपयितव्याः स्युरिति चिन्तापरोभवत् ४

---

सैन्यासभोंवतीं फिरत होता १६ असो. लंकेसमीप तळ दिलेल्या आणि समुद्रापर्यंत प्रदेश व्यापून टाकिलेल्या त्या वानरांचें शेंकडों अक्षौहिणी सैन्य अवलोकन करून १७ कांहीं राक्षस विस्मयचकित झाले; कांहीं त्रस्त होऊन गेले आणि कांहीं रणामध्यें युद्ध करण्याच्या उल्हासामुळें आनंदितही झाले १८. कोट आणि खंदक ह्यांमधील सर्वही प्रदेश वानरांनीं व्याप्त करून टाकिला असल्यामुळें वानरांच्या योगानें लंकेसभोंवतीं एक दुसरा तटच बनला आहे असें त्या दीन राक्षसांना दिसूं लागलें आणि भयभीत होऊन ते राक्षस हाहाकार करूं लागले १९. असो. ह्याप्रमाणें मोठी भयकर गडबड उडून गेली असतां राक्षसाधिपति रावणाचे योद्धे जे राक्षस ते मोठीं मोठीं आयुधें घेऊन प्रलयकालच्या वायूंप्रमाणें संचार करूं लागले १००. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

तदनंतर ते राक्षस रावणाच्या मंदिरामध्यें गेले व वानरांसहवर्तमान रामानें लंकानगरीला वेढा दिल्याचें त्यांनीं त्याला निवेदन केलें १. तेव्हां नगरीला वेढा पडल्याचें ऐकून आणि वानरांच्या गराड्यामुळें लंकेला दुहेरी तटबंदी झाल्याचें श्रवण करून क्रुद्ध झालेला रावण वाड्यावर चढला असतां २ पर्वत, वनें व अरण्यें ह्यांसहवर्तमान लंकानगरी असंख्य युद्धेच्छु वानरगणांनीं सर्व बाजूंनीं व्याप्त झाली आहे असें त्याच्या दृष्टीं पडलें ३. ह्याप्रमाणें सर्व वानरांनीं कपिलवर्ण करून

स चिन्तयित्वा सुचिरं धैर्यमालम्ब्य रावणः। राघवं हरियूथांश्च ददर्शा-
यतलोचनः ५ राघवः सह सैन्येन मुदितो नाम पुप्लुवे। लङ्कां ददर्श गुप्तां
वै सर्वतो राक्षसैर्वृताम् ६ दृष्ट्वा दाशरथिर्लङ्कां चित्रध्वजपताकिनीम्।
जगाम मनसा सीतां दूयमानेन चेतसा ७ अत्र सा मृगशावाक्षी मत्कृते जन-
कात्मजा। पीड्यते शोकसंतप्ता कृशा स्थण्डिलशायिनी ८ निपीड्यमानां
धर्मात्मा वैदेहीमनुचिन्तयन्। क्षिप्रमाज्ञापयद्रामो वानरान्द्विषतां वधे ९ एव-
मुक्ते तु वचसि रामेणाक्लिष्टकर्मणा। संघर्षमाणाः प्लवगाः सिंहनादैरपूरयन् १०
शिखरैर्विकिरामैनां लङ्कां मुष्टिभिरेव वा। इति स्म दधिरे सर्वे मनांसि
हरियूथपाः ११ उद्यम्य गिरिशृङ्गाणि महान्ति शिखराणि च। तरूं-
श्चोत्पाट्य विविधांस्तिष्ठन्ति हरियूथपाः १२ प्रेक्षतो राक्षसेन्द्रस्य तान्य-
नीकानि भागशः। राघवप्रियकामार्थं लङ्कामारुरुहुस्तदा १३ ते ताम्रवक्त्रा

---

टाकिलेली पृथ्वी अवलोकन केल्यावर "ह्या वानरांना येथून कसें घालवितां येईल" अशी त्याला चिंता पडली ४; आणि ह्याप्रमाणें पुष्कळ वेळपर्यंत चिंतन केल्यावर धैर्याचें अवलंबन करून तो विशालनयन रावण पाहूं लागला असतां राम आणि वानरसेनाधिपति हे त्याच्या दृष्टीं पडले ५. इकडे सैन्यासहवर्तमान आनंदानें राम तडकाफडकी लंकेसमीप गेला असतां लंका सर्व बाजूंनीं सुरक्षित व राक्षसांनीं व्याप्त आहे, असें त्याच्या दृष्टीं पडलें ६; आणि चित्रविचित्र ध्वज व पताका ह्यांनीं युक्त असलेली लंका अवलोकन केल्यावर दुःखित अंतःकरणानें युक्त असलेल्या त्या दशरथपुत्र रामाला सीतेचें स्मरण झालें ( आणि तो आपल्याशीं ह्मणाला ) ७ "हरिणाच्या बछड्याप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी ती जनककन्या सीता माझ्याकरितां येथें शोकाकुल व कृश होऊन आणि भूमीवर पडून दुःखानें दिवस काढीत आहे." ८. ह्याप्रमाणें दुःख सोशीत असलेल्या सीतेचें स्मरण होऊं लागलें असतां धर्मात्म्या रामानें शत्रूंचा वध करण्याविषयीं वानरांना सत्वर आज्ञा दिली ९. तेव्हां पापकर्मापासून पराङ्मुख असलेल्या रामानें अशारीतीनें आज्ञा केली असतां एकमेकांवर ताण करणाऱ्या वानरांनीं सिंहनादांच्या योगानें सर्व प्रदेश दुमदुमून टाकिला १०. आणि "शिखरांच्या योगानें अथवा मुष्टींच्या योगानें ह्या लंकेचे आह्मी तुकडे तुकडे उडवून देऊं असा त्या सर्वही वानरसेनाधिपतींनीं मनामध्यें विचार केला ११. नंतर लहान लहान व मोठीं मोठीं पर्वतशिखरें हातांत घेऊन आणि नानाप्रकारचे वृक्ष उपटून ते वानरसेनाधिपति तयारीनें उभे राहिले १२; आणि राक्षसाधिपति रावणाच्या समक्ष त्या सेना रामाचें प्रिय करण्याकरितां टोळ्या

हेमाभा रामार्थे त्यक्तजीविताः । लङ्कामेवाभ्यवर्तन्त सालभूधरयोधिनः १४ ते द्रुमैः पर्वताग्रैश्च मुष्टिभिश्च प्लवङ्गमाः । प्राकाराग्राण्यरण्यानि ममन्थुस्तोरणानि च १५ परिखाम्पूरयन्तश्च प्रसन्नसलिलाशयान् । पांसुभिः पर्वताग्रैश्च तृणैः काष्ठैश्च वानराः १६ ततः सहस्रयूथाश्च कोटियूथाश्च यूथपाः । कोटियूथशताश्चान्ये लङ्कामारुरुहुस्तदा १७ काञ्चनानि प्रमर्दन्तस्तोरणानि प्लवङ्गमाः । कैलासशिखराग्राणि गोपुराणि प्रमथ्य च १८ आप्लवन्तः प्लवन्तश्च गर्जन्तश्च प्लवङ्गमाः । लङ्कां तामभिधावन्ति महावारणसंनिभाः १९ जयत्युरुबलो रामो लक्ष्मणश्च महाबलः। राजा जयति सुग्रीवो राघवेणाभिपालितः २० इत्येवं घोषयन्तश्च गर्जन्तश्च प्लवङ्गमाः । अभ्यधावन्त लङ्कायाः प्राकारं कामरूपिणः २१ वीरबाहुः सुबाहुश्च नलश्च पनसस्तथा । निपीड्योपनिविष्टास्ते प्राकारं हरियूथपाः २२ एतस्मिन्नन्तरे चक्रुः स्कन्धावारनिवेशनम् २३ पूर्वद्वारं तु कुमुदः कोटिभिर्दशभिर्वृतः । आवृत्य बलवांस्तस्थौ हरिभिर्जितकाशिभिः २४

---

टोळ्यांनीं लंकेवर चालल्या १३. सारांश, मोठे मोठे वृक्ष व पर्वत घेऊन युद्ध करणारे ते ताम्रमुख व सुवर्णतुल्य कांतीनें युक्त असलेले आणि रामाकरितां जिवाचीही पर्वा न करणारे ते वानर लंकेवरच चालून गेले १४. प्रथमतः त्या वानरांनीं वृक्ष, पर्वतशिखरें, आणि मुष्टि ह्यांच्या योगानें उत्कृष्ट तटांचा व नगरीच्या द्वारांचा फडशा पाडिला १५; आणि निर्मल जलाशयांनीं युक्त असलेले खंदक धूळ, पर्वतशिखरें, तृण व काष्ठें ह्यांच्या योगानें ते वानर भरून टाकू लागले १६. तदनंतर सहस्र कोटी आणि अब्ज सेना बरोबर घेऊन अनेक सेनाधिपति लंकेवर आरोहण करूं लागले १७. कैलासशिखराप्रमाणें उंच असलेल्या गोपुरांचा विध्वंस करून लंकेंतील सुवर्णमय बाह्य द्वारांचा वानर नाश करूं लागले १८; आणि आसमंतात् भागीं व समोर रोख धरून उड्या टाकीत असलेले व गर्जना करीत असलेले महागजतुल्य वानर लंकेवर धांव घेऊं लागले १९ " महाबलाढ्य राम, महाबलाढ्य लक्ष्मण व रामानें परिपालन केलेला राजा सुग्रीव ह्यांचा जयजयकार असो " २०. असा घोष करीत करीत व गर्जना करीत करीत ते यथेष्ट रूप धारण करणारे वानर लंकेच्या तटावर चालून गेले २१. वीरबाहु सुबाहु, नल आणि पनस हे वानरसेनाधिपति सेनेचा आंत प्रवेश होण्याकरितां अनेक ठिकाणीं तटाला खिंडारें पाडून आंत जाऊन बसले २२; व इतक्यांत इतर सेनाधिपतींनीं सर्व सैन्य व्यवस्थित रीतीनें उभें केलें २३. विजयसूचक मुद्रेनें युक्त असलेले

सहायार्थे तु तस्यैव निविष्टः प्रसभो हरिः । पनसश्च महाबाहुर्वानरैरभिसंवृतः २५ दक्षिणद्वारमासाद्य वीरः शतबलिः कपिः । आवृत्य बलवांस्तस्थौ विंशत्या कोटिभिर्वृतः २६ सुषेणः पश्चिमद्वारं गत्वा तारापिता बली । आवृत्य बलवांस्तस्थौ कोटिकोटिभिरावृतः २७ उत्तरद्वारमागम्य रामः सौमित्रिणा सह । आवृत्य बलवांस्तस्थौ सुग्रीवश्च हरीश्वरः २८ गोलाङ्गूलो महाकायो गवाक्षो भीमदर्शनः । वृतः कोट्या महावीर्यस्तस्थौ रामस्य पार्श्वतः २९ ऋक्षाणां भीमकोपानां धूम्रः शत्रुनिबर्हणः । वृतः कोट्या महावीर्यस्तस्थौ रामस्य पार्श्वतः ३० संनद्धस्तु महावीर्यो गदापाणिर्विभीषणः । वृतो यत्तैस्तु सचिवैस्तस्थौ यत्र महाबलः ३१ गजो गवाक्षो गवयः शरभो गन्धमादनः । समन्तात्परिधावन्तो ररक्षुर्हरिवाहिनीम् ३२ ततः कोपपरीतात्मा रावणो राक्षसेश्वरः । निर्याणं सर्वसैन्यानां द्रुतमाज्ञापयत्तदा ३३ एतच्छ्रुत्वा तदा वाक्यं रावणस्य मुखेरितम् । सहसा भीमनिर्घोषमुद्घुष्टं रजनीचरैः ३४ ततः प्रबोधिता भेर्यश्चन्द्रपाण्डुरपुष्कराः । हेमकोणैरभिहता राक्षसानां

---

दहा कोट वानर बरोबर घेऊन बलाढ्य कुमुद पूर्वेकडील द्वार रोखून राहिला २४ आणि त्याला साहाय्य करण्याकरितां वानरांनीं परिवेष्टित असलेला महापराक्रमी पनस व प्रसभ हेही उभयतां वानर तेथेंच उभे राहिले २५. त्याचप्रमाणें वीस कोट वानरांनीं परिवेष्टित असलेला बलाढ्य व वीर शतबली वानर दक्षिणेचें द्वार रोखून राहिला २६. तारेचा पिता बलाढ्य सुषेण पश्चिमद्वाराकडे गेला आणि कोट्यावधि वानरांसहवर्तमान तें रोखून राहिला २७. लक्ष्मणासहवर्तमान राम उत्तरेच्या द्वारापाशीं येऊन तें व्यापून राहिला आणि वानरराज बलाढ्य सुग्रीवही तेथेंच उभा राहिला २८. धिप्पाड गोलांगूल आणि भयंकर मुद्रेनें युक्त असलेला महावीर्यवान् गवाक्ष हेही उभयतां एक कोटि सैन्य बरोबर घेऊन रामासमीप उभे राहिले २९. ज्यांच्या क्रोध भयंकर आहे असे एक कोटि ऋक्ष बरोबर घेऊन महावीर्यवान् शत्रुनाशक धूम्रही रामाजवळ उभा राहिला ३०; हातामध्यें गदा घेऊन युद्धाकरितां सज्ज झालेला महावीर्यवान् व महाबलाढ्य बिभीषणही सचिवांसवर्तमान तेथेंच उभा राहिला होता ३१; आणि गज, गवाक्ष, गवय, शरभ व गंधमादन हे सभोंवतीं हिंडून वानरसेनेचें रक्षण करीत होते ३२. तदनंतर कोपानें व्याप्त झालेल्या राक्षसाधिपति रावणानें सर्व सैन्यांना सत्वर बाहेर पडण्याची आज्ञा केली ३३. तेव्हां रावणाच्या मुखांतून निघालेली ती आज्ञा ऐकतांक्षणीं राक्षसांनीं एकाएकीं भयंकर गर्जना केली ३४. तदनंतर

समन्ततः ३५ विनेदुश्च महाघोषाः शङ्खाः शतसहस्रशः । राक्षसानां सुघो-
राणां मुखमारुतपूरिताः ३६ ते बभुः शुक्लनीलाङ्गाः सशङ्खा रजनीचराः
विद्युन्मण्डलसंनद्धाः सबलाका इवाम्बुदाः ३७ निष्पतन्ति ततः सैन्या
हृष्टा रावणचोदिताः । समये पूर्यमाणस्य वेगा इव महोदधेः ३८ ततो
वानरसैन्येन मुक्तो नादः समन्ततः । मलयः पूरितो येन ससानुप्रस्थकं-
दरः ३९ शङ्खदुन्दुभिनिर्घोषः सिंहनादस्तरस्विनाम् । पृथिवीं चान्त-
रिक्षं च सागरं चाभ्यनादयत् ४० गजानां बृंहितैः सार्धं हयानां हेषि-
तैरपि । रथानां नेमिनिर्घोषै रक्षसां पदनिःस्वनैः ४१ एतस्मिन्नन्तरे घोरः
सङ्ग्रामः समपद्यत । रक्षसां वानराणां च यथा देवासुरे पुरा ४२ ते
गदाभिः प्रदीप्ताभिः शक्तिशूलपरश्वधैः । निजघ्नुर्वानरान्सर्वान्कथयन्तः
स्वविक्रमान् ४३ तथा वृक्षैर्महाकायाः पर्वताग्रैश्च वानराः । निजघ्नु-
स्तानि रक्षांसि नखैर्दन्तैश्च वेगिनः ४४ राजा जयति सुग्रीव इति शब्दो
महानभूत । राजञ्जयजयेत्युक्त्वा स्वस्वनामकथां ततः ४५ राक्षसास्त्वपरे

---

ज्यांचीं मुखें चंद्रासारिखीं शुभ्र आहेत अशा दुंदुभि, राक्षसांनीं सुवर्णाची टिपरी वर मारिल्यामुळें सर्व बाजूंनीं झडूं लागल्या ३५; अतिघोर राक्षसांनीं मुखवायूनें भरून काढिलेले शकडों हजारों शंख उच्चस्वरानें वाजूं लागले ३६; आणि शुक्लवर्ण व नीलवर्ण देहांनीं युक्त असून हातामध्यें शंख घेतलेले ते राक्षस बलाकपक्ष्यांनीं व विद्युन्मंडलांनीं युक्त असलेल्या मेघांप्रमाणें भासूं लागले ३७. नंतर पर्वसमयीं भरती येत असलेल्या समुद्राच्या लाटांप्रमाणें रावणाची आज्ञा ज्यांना झाली आहे अशीं तीं सैन्यें आनंदानें बाहेर पडूं लागलीं ३८; तों इतक्यांत वानरसैन्याची गर्जना झाल्यामुळें लहानमोठीं शिखरें व गुहा ह्यांसहवर्तमान सर्व बाजूंनीं मलयपर्वत दुमदुमून गेला ३९. शंख व दुंदुभि ह्या वाद्यांचे घोष, बलाढ्य राक्षसांचा सिंहनाद, गजांची गर्जना, अश्वांचें खेंकाळणें, रथांच्या धावांचा शब्द व राक्षसांच्या पायांचा ध्वनि ह्यांच्या योगानें पृथ्वी, अंतरिक्ष व सागर हीं सर्व नादित झालीं ४०,४१ आणि इतक्यांत पूर्वीं देवदैत्यांमध्यें झालेल्या घोर संग्रामाप्रमाणें राक्षस व वानर ह्यांमध्यें घोर संग्राम सुरू झाला ४२. उज्ज्वल गदा, शक्ति, शूल व परशु ह्या आयुधांच्या योगानें त्या राक्षसांनीं आपले पराक्रम कथन करीत करीत सर्व वानरांना प्रहार केले असतां ४३ शरीरांनीं धिप्पाड असलेल्या वेगवान् वानरांनींही वृक्ष, पर्वतशिखरें, नखें व दांत ह्या आयुधांनीं त्या राक्षसांना प्रहार केले ४४. " राजा सुग्रीवाचा विजय आहे " असा मोठा शब्द वानरसैन्यामध्यें ऐकूं

भीमाः प्राकारस्था महीं गतान् । वानरान्भिन्दिपालैश्च शूलैश्चैव व्यदारयन् ४६ वानराश्चापि संक्रुद्धाः प्राकारस्थान्महीं गताः । राक्षसान्पातयामासुः समाप्लुत्य स्वबाहुभिः ४७ स संप्रहारस्तुमुलो मांसशोणितकर्दमः । रक्षसां वानराणां च संबभूवाद्भुतोपमः ४८ [ १५७८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः ॥ ४२ ॥

युध्यतां तु ततस्तेषां वानराणां महात्मनाम् । रक्षसां संबभूवाथ बलरोषः सुदारुणः १ ते हयैः काञ्चनापीडैर्गजैश्चाग्निशिखोपमैः । रथैश्चादित्यसंकाशैः कवचैश्च मनोरमैः २ निर्ययू राक्षसा वीरा नादयन्तो दिशो दश । राक्षसा भीमकर्माणो रावणस्य जयैषिणः ३ वानराणामपि चमूर्बृहती जयमिच्छताम् । अभ्यधावत तां सेनां रक्षसां घोरकर्मणाम् ४ एतस्मिन्नन्तरे तेषामन्योन्यमभिधावताम् । रक्षसां वानराणां च द्वन्द्वयुद्धमवर्तत ५ अङ्गदेनेन्द्रजित्सार्धं वालिपुत्रेण राक्षसः । अयुध्यत महातेजास्त्र्यम्बकेण यथान्धकः ६ प्रजङ्घेन च संपातिर्नित्यं दुर्धर्षणो रणे ।

---

येऊं लागला आणि " हे ( रावण ) राजा, तुझा जयजयकार असो. " असें म्हणून व आपआपलें नांव सांगून प्राकारावर असलेले भयंकर राक्षस, भिंदिपाल व शूल ह्यांच्या योगानें भूमीवरील वानरांना विदार्ण करूं लागले ४५, ४६. हें पाहून पृथ्वीवर असलेल्या वानरांनींही क्रुद्ध होऊन आकाशामध्यें उड्डाण केलें आणि आपल्या बाहूंच्या योगानें प्राकारावरील राक्षसांना ते खालीं पाडूं लागले ४७ आणि अशारीतीनें राक्षस व वानर ह्या उभयतांमध्यें अति अद्भुत व तुमुल युद्ध सुरू होऊन त्यांत रक्तमांसांचा रेंदा होऊन गला ४८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४२॥

महात्मे वानर व राक्षस युद्ध करूं लागले असतां एकमेकांचें सैन्य अवलोकन करून उभयतांनाही अतिभयंकर क्रोध चढला १. तेव्हां प्रथमतः सुवर्णालंकारांनीं शृंगारिलेले अश्व, अग्नीच्या ज्वालेप्रमाणें तेजस्वी गज, सूर्यासारिखे देदीप्यमान रथ आणि मनोहर कवचें ह्यांसहवर्तमान २ वीर राक्षस दशदिशा नादित करीत करीत बाहेर पडले. ते सर्वही राक्षस रावणाच्या जयाची इच्छा करणारे असून भयंकर पराक्रम करणारे होते ३. राक्षस बाहेर पडल्यावर जय इच्छिणाऱ्या वानरांचीही प्रचंड सेना त्या क्रूरकर्मी राक्षसांच्या सेनेवर धांवून गेली ४ व अशारीतीनें ते राक्षस व वानर एकमेकांवर धांवून गेले असतां त्या उभयतांत द्वंद्वयुद्ध सुरू झालें ५. त्रिलोचन शंकरासहवर्तमान ज्याप्रमाणें अंधकासुरानें युद्ध केलें त्याप्रमाणें महातेजस्वी इंद्रजित् राक्षस

जम्बुमालिनमारब्धो हनूमानपि वानरः ७ संगतस्तु महाक्रोधो राक्षसो रावणानुजः । समरे तीक्ष्णवेगेन शत्रुघ्नेन विभीषणः ८ तपनेन गजः सार्धं राक्षसेन महाबलः । निकुम्भेन महातेजा नीलोपि समयुध्यत ९ वानरेन्द्रस्तु सुग्रीवः प्रघसेन सुसंगतः । संगतः समरे श्रीमान्विरूपाक्षेण लक्ष्मणः १० अग्निकेतुः सुदुर्धर्षो रश्मिकेतुश्च राक्षसः । मित्रघ्नो यज्ञकोपश्च रामेण सह संगताः ११ वज्रमुष्टिश्च मैन्देन द्विविदेनाशनिप्रभः । राक्षसाभ्यां सुघोराभ्यां कपिमुख्यौ समागतौ १२ वीरः प्रतपनो घोरो राक्षसो रणदुर्धरः । समरे तीक्ष्णवेगेन नलेन समयुध्यत १३ धर्मस्य पुत्रो बलवान्सुषेण इति विश्रुतः । स विद्युन्मालिना सार्धमयुध्यत महाकपिः १४ वानराश्चापरे घोरा राक्षसैरपरैः सह । द्वन्द्वं समीयुः सहसा युद्ध्वा च बहुभिः सह १५ तत्रासीत्सुमहद्युद्धं तुमुलं रोमहर्षणम् । रक्षसां वानराणां च वीराणां जयमिच्छताम् १६ हरिराक्षसदेहेभ्यः प्रसृताः केशशाड्वलाः । शरीरसंघाटवहाः प्रसुस्रुः शोणितापगाः १७ आजघानेन्द्र-

---

वालिपुत्र अंगदाशीं युद्ध करूं लागला ६. रणामध्यें ज्याच्यावर हल्ला होणें कधींही शक्य नाहीं, तो संपाति प्रजंघ राक्षसाशीं युद्ध करूं लागला; हनुमान् वानरही जंबुमालीशीं युद्ध करूं लागला ७; रावणाचा कनिष्ठ भ्राता जो महाक्रोधी बिभीषण तोही प्रचंड वेगवान् शत्रुघ्न राक्षसाशीं समरांगणामध्यें भिडला ८; तपन राक्षसाशीं महाबलाढ्य गजाचें युद्ध सुरू झालें; महातेजस्वी नीलाचेंही निकुंभ राक्षसाशीं युद्ध जुंपलें ९; वानरराज सुग्रीव प्रघस राक्षसाशीं भिडून गेला; श्रीमान् लक्ष्मण विरूपाक्ष राक्षसाशीं रणामध्यें दोन हात करूं लागला १०; हार जाण्यास अतिकठिण असलेला अग्निकेतु, रश्मिकेतु, मित्रघ्न व यज्ञकोप ह्या राक्षसांची रामाशीं जुंपली ११; वज्रमुष्टि व अशनिप्रभ हे अतिघोर राक्षस मैंद व द्विविद ह्या उभयतां वानरश्रेष्ठांशीं भिडले १२; संग्रामामध्यें हार जाण्यास कठीण असलेला प्रतपननामक वीर व घोर राक्षस रणांगणामध्यें महावेगवान् नलाशीं युद्ध करूं लागला १३. सुषेण म्हणून प्रख्यात असलेल्या धर्मपुत्र महावानरानें विद्युन्मालीसहवर्तमान युद्ध केलें १४; आणि दुसऱ्याही घोर वानरांनीं प्रथमतः अनेक राक्षसांशीं युद्ध करून नंतर इतर राक्षसांसहवर्तमान एकाएकीं द्वंद्वयुद्ध सुरू केलें १५. सारांश, विजयेच्छु राक्षस व वानरवीर ह्यांमध्यें अंगावर कांटा आणणारें असें फारच मोठें तुमुल युद्ध झालें १६. त्यामुळें वानर आणि राक्षस ह्यांच्या शरीरांपासून निघालेल्या रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. त्या नद्या केशरूप शेवाळ्यांनीं युक्त असून शरीररूप काष्ठसमुदाय

न्द्रजित्क्रुद्धो वज्रेणेव शतक्रतुः । अङ्गदं गदया वीरं शत्रुसैन्यविदारणम् १८ तस्य काञ्चनचित्राङ्गं रथं साश्वं ससारथिम् । जघान गदया श्रीमानङ्गदो वेगवान्हरिः १९ संपातिस्तु प्रजङ्घेन त्रिभिर्बाणैः समाहतः । निजघानाश्वकर्णेन प्रजङ्घं रणमूर्धनि २० जम्बुमाली रथस्थस्तु रथशक्त्या महाबलः । बिभेद समरे क्रुद्धो हनूमन्तं स्तनान्तरे २१ तस्य तं रथमास्थाय हनूमान्मारुतात्मजः । प्रममाथ तलेनाशु सह तेनैव रक्षसा २२ नदन्प्रतपनो घोरो नलं सोऽभ्यनुधावत । नलः प्रतपनस्याशु पातयामास चक्षुषी ॥ भिन्नगात्रः शरैस्तीक्ष्णैः क्षिप्रहस्तेन रक्षसा २३ ग्रसन्तमिव सैन्यानि प्रघसं वानराधिपः । सुग्रीवः सप्तपर्णेन निजघान जवेन च २४ प्रपीड्य शरवर्षेण राक्षसं भीमदर्शनम् । निजघान विरूपाक्षं शरेणैकेन लक्ष्मणः २५ अग्निकेतुश्च दुर्धर्षो रश्मिकेतुश्च राक्षसः । मित्रघ्नो यज्ञकोपश्च राममार्दीपयञ्छरैः २६ तेषां चतुर्णां रामस्तु शिरांसि समरे शरैः । क्रुद्धश्चतुर्भिश्चिच्छेद

---

त्यांतून वाहत जात होते १७. वज्रानें प्रहार करणारा इंद्रच कीं काय अशा इंद्रजितानें क्रुद्ध होऊन गदेच्या योगानें शत्रुसैन्य विदीर्ण करणाऱ्या अंगदवीराला प्रहार केला १८. तेव्हां वेगवान् व श्रीमान् अंगद वानरानेंही आपल्या गदेच्या योगानें अश्व व सारथि ह्यांसहवर्तमान सुवर्णानें शृंगारिलेल्या त्याच्या रथावर प्रहार केला १९. प्रजंघ राक्षसानें तीन बाणांनीं संपातीला प्रहार केला असतां संपातीनें सालवृक्ष हातांत घेऊन संग्रामामध्यें प्रजंघाला प्रहार केला २०. रथावर असलेल्या महाबलाढ्य जंबुमालीनें क्रुद्ध होऊन रथावरील शक्तीच्या योगानें समरांगणामध्यें हनुमानाला वक्षस्थलाचे ठिकाणीं प्रहार केला २१; परंतु, वायुपुत्र हनुमानानें त्याच्या रथासमीप जाऊन त्या राक्षसासहवर्तमान त्या रथाचा एका क्षणांतच एका चापटीनें चुराडा करून टाकिला २२. प्रतपनसंज्ञक घोर राक्षस गर्जना करीत करीत नलावर चालून गेला असतां नलानें तो पुढें येतांक्षणींच ( नखांनीं ओरबाडून ) त्याचे नेत्र खालीं पाडिले; परंतु, हस्तलाघवानें युक्त असलेल्या त्या प्रतपन राक्षसानें तीक्ष्ण बाणांच्या योगानें पूर्वीच नलाचें शरीर छिन्नभिन्न करून टाकिलें होतें २३. वानरसेना जशी कांहीं भक्षणच करीत असलेल्या प्रघस राक्षसाचा वानराधिपति सुग्रीवानें सप्तपर्णनामक वृक्षाच्या योगानें वध केला २४. भयंकर मुद्रेनें युक्त असलेल्या विरूपाक्ष राक्षसाला बाणवृष्टीनें जर्जर केल्यानंतर एकाच बाणानें लक्ष्मणानें त्याचा वध केला २५. जिंकण्यास कठीण असणाऱ्या अग्निकेतु, रश्मिकेतु, मित्रघ्न आणि यज्ञकोप ह्या राक्षसांनीं तर बाणांच्या योगानें रामाला असें कांहीं पेटवूनच सोडलें २६; परंतु, क्रुद्ध झालेल्या

घोरैरग्निशिखोपमैः २७ वज्रमुष्टिस्तु मैन्देन मुष्टिना निहतो रणे । पपात सरथः साश्वः सुराट्ट इव भूतले २८ निकुम्भस्तु रणे नीलं नीलाञ्जनचयप्रभम् । निर्बिभेद शरैस्तीक्ष्णैः करैर्मेघमिवांशुमान् २९ पुनः शरशतेनाथ क्षिप्रहस्तो निशाचरः । बिभेद समरे नीलं निकुम्भः प्रजहास च ३० तस्यैव रथचक्रेण नीलो विष्णुरिवाहवे । शिरश्चिच्छेद समरे निकुम्भस्य च सारथेः ३१ वज्राशनिसमस्पर्शो द्विविदश्च समप्रभम् । जघान गिरिशृङ्गेण मिषतां सर्वरक्षसाम् ३२ द्विविदं वानरेन्द्रं तं द्रुमयोधिनमाहवे । शरैरशनिसंकाशैः स विव्याधाशनिप्रभः ३३ स शरैरभिविद्धाङ्गो द्विविदः क्रोधमूर्च्छितः । सालेन सरथं साश्वं निजघानाशनिप्रभम् ३४ विद्युन्माली रथस्थस्तु शरैः काञ्चनभूषणैः । सुषेणं ताडयामास ननाद च मुहुर्मुहुः ३५ तं रथस्थमथो दृष्ट्वा सुषेणो वानरोत्तमः । गिरिशृङ्गेण महता

---

रामानें अग्निज्वालेसारिख्या चार तीक्ष्ण बाणांनीं समरांगणामध्यें त्या चौघांचींही मस्तकें तोडून टाकिलीं २७. मैंद वानरानें संग्रामामध्यें मुष्टीच्या योगानें वज्रमुष्टि राक्षसाला प्रहार केला असतां भूतलावर पडणारें देवांचें विमानच कीं काय अशारीतीनें अश्व व रथ ह्यांसवर्तमान तो भूमीवर पडला २८. सूर्य ज्याप्रमाणें किरणांच्या योगानें मेघाला भेदून टाकितो, त्याप्रमाणें तीक्ष्ण बाणांच्या योगानें निकुंभ राक्षसानें संग्रामामध्यें कज्जलपर्वततुल्य असलेल्या नीलाला भेदून टाकिला २९; आणि पुनरपि हस्तलाघवानें युक्त असलेल्या त्या निकुंभ राक्षसानें संग्रामामध्यें नीलाला वेध करून त्याचा उपहासही केला ३०. तेव्हां त्याच्याच रथाचें चक्र हातांत घेतल्यामुळें विष्णुप्रमाणें दिसूं लागलेल्या त्या नीलानें त्या रथचक्राच्या योगानें रणामध्यें निकुंभाचें व त्याच्या सारथ्यानेंही शीर उडविलें ३१. ज्याचा मुष्टिप्रहार वज्राच्या अथवा विद्युल्लतेच्या प्रहाराप्रमाणें तीक्ष्ण आहे, अशा द्विविद वानरानें सर्व राक्षसांसमक्ष समप्रभ राक्षसाचा पर्वतशिखरानें वध केला असतां ३२. वृक्षांच्या योगानें संग्रामामध्यें युद्ध करणाऱ्या त्या वानरराज द्विविदाला अशनिप्रभ राक्षसानें विद्युल्लतेसारिख्या तीक्ष्ण बाणांनीं वेध केला ३३. तेव्हां बाणांच्या सर्व बाजूंनीं शरीराला जखमा झाल्यामुळें तो द्विविद क्रोधानें व्याप्त झाला आणि एका सालवृक्षाच्या योगानें अश्व व रथ ह्यांसहवर्तमान त्यानें त्या अशनिप्रभ राक्षसाचा वध केला ३४. सुवर्णानें शृंगारिलेल्या बाणांच्या योगानें विद्युन्मालीनें रथावर उभें राहून सुषेणाला ताडण केलें व एकसारिखी गर्जना चालविली ३५. तेव्हां तो रथावर आहे असें पाहून वानरश्रेष्ठ सुषेणानें एका प्रचंड पर्वतशिखराच्या योगानें त्याच्या रथाचा तत्क्षणींच

रथमाशु न्यपातयत् ३६ लाघवेन तु संयुक्तो विद्युन्माली निशाचरः । अपक्रम्य रथात्तूर्णं गदापाणिः क्षितौ स्थितः ३७ ततः क्रोधसमाविष्टः सुषेणो हरिपुङ्गवः । शिलां सुमहतीं गृह्य निशाचरमभिद्रवत् ३८ तमापतन्तं गदया विद्युन्माली निशाचरः । वक्षस्यभिजघानाशु सुषेणं हरिपुङ्गवम् ३९ गदाप्रहारं तं घोरमचिन्त्य प्लवगोत्तमः । तां तूष्णीं पातयामास तस्योरसि महामृधे ४० शिलाप्रहाराभिहतो विद्युन्माली निशाचरः । निष्पिष्टहृदयो भूमौ गतासुर्निपपात ह ४१ एवं तैर्वानरैः शूरैः शूरास्ते रजनीचराः । द्वन्द्वे विमथितास्तत्र दैत्या इव दिवौकसैः ४२ भल्लैश्चान्यैर्गदाभिश्च शक्तितोमरसायकैः । अपविद्धैश्चापि रथैस्तथा साङ्ग्रामिकैर्हयैः ४३ निहतैः कुञ्जरैर्मत्तैस्तथा वानरराक्षसैः । चक्राक्षयुगदण्डैश्च भग्नैर्धरणिसंश्रितैः ४४ बभूवायोधनं घोरं गोमायुगणसेवितम् । कबन्धानि समुत्पेतुर्दिक्षु वानररक्षसाम् ४५ विमर्दे तुमुले तस्मिन्देवासुररणोपमे ४६ निहन्यमाना हरिपुङ्गवैस्तदा निशाचराः शोणितग-

चुराडा करून टाकिला ३६. परंतु, अंगामध्यें चलाखी असलेला तो विद्युन्माली राक्षस रथावरून सत्वर खालीं आला आणि हातामध्यें गदा घेऊन भूमीवर राहिला ३७. तदनंतर, वानरश्रेष्ठ सुषेण क्रोधाविष्ट झाला आणि एक फारच मोठी शिला हातामध्यें घेऊन त्या राक्षसावर धांवला ३८. परंतु, तो अंगावर धांवून येत आहे तोंच विद्युन्माली राक्षसानें त्या वानरश्रेष्ठ सुषेणाला गदेच्या योगानें वक्षःस्थलावर प्रहार केला ३९. तथापि, त्या प्रचंड गदाप्रहाराची पर्वा न करितां त्या वानरश्रेष्ठानें पूर्वीं हातांत घेतलेली गदा कांहीं एक गडबड न करितां महासंग्रामामध्यें त्याच्या वक्षःस्थलावर फेंकिली ४० व अशारीतीनें शिलेच्या प्रहाराचा तडाका बसला असतां तो विद्युन्माली राक्षस हृदयाचा चुराडा झाल्यामुळें गतप्राण होऊन भूमीवर पडला ४१. सारांश, देवांनीं वध करून टाकिलेले दैत्यच कीं काय अशारीतीनें त्या शूर वानरांनीं द्वंद्वयुद्धामध्यें त्या शूर राक्षसांचा वध करून टाकिला ४२. तेव्हां भल्ल व इतर बाण, गदा, शक्ति, तोमर, सामान्य बाण, उलथून पडलेले रथ, संग्रामांतील अश्व ४३, मरून पडलेले मत्त गज, वानर, राक्षस आणि भूमीवर मोडून पडलेलीं चाकें, कणे, जूं व दांडचा ह्यांच्यायोगानें ४४ ती संग्रामभूमि भयंकर दिसूं लागली. कोल्ह्यांचे कळप तेथें येऊं लागले; आणि देवदैत्यांतील रणाप्रमाणें झालेल्या त्या तुमुल संग्रामामध्यें वानरांचीं व राक्षसांचीं कबंधें नृत्य करूं लागलीं ४५, ४६. असो. वानरश्रेष्ठांचे प्रहार होऊं लागल्यामुळें शरीरांतून स्रवणाऱ्या रक्ताच्या गंधानें

न्धमूर्छिताः । पुनः सुयुद्धं तरसा समाश्रिता दिवाकरस्यास्तमयाभि-
काङ्क्षिणः ४७ [ १६२५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्ये युद्धकाण्डे त्रिचत्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

युध्यतामेव तेषां तु तदा वानररक्षसाम् । रविरस्तं गतो रात्रिः प्रवृत्ता
प्राणहारिणी १ अन्योन्यं बद्धवैराणां घोराणां जयमिच्छताम् । संप्रवृत्तं
निशायुद्धं तदा वानररक्षसाम् २ राक्षसोसीति हरयो वानरोसीति
राक्षसाः । अन्योन्यं समरे जघ्नुस्तस्मिंस्तमसि दारुणे ३ हत दारय चैहीति
कथं विद्रवसीति च । एवं सुतुमुलः शब्दस्तस्मिन्सैन्ये तु शुश्रुवे ४
कालाः काञ्चनसंनाहास्तस्मिंस्तमसि राक्षसाः । संप्रदृश्यन्त शैलेन्द्रा
दीप्तौषधिवना इव ५ तस्मिंस्तमसि दुष्पारे राक्षसाः क्रोधमूर्छिताः ।
परिपेतुर्महावेगा भक्षयन्तः प्लवङ्गमान् ६ ते हयान्काञ्चनापीडान्ध्वजांश्चा-
शीविषोपमान् । आप्लुत्य दशनैस्तीक्ष्णैर्भीमकोपा व्यदारयन् । वानरा
बलिनो युद्धेक्षोभयन्राक्षसीं चमूम् ७ कुञ्जरान्कुञ्जरारोहान्पताकाध्व-
जिनो रथान् । चकर्षुश्च ददंशुश्च दशनैः क्रोधमूर्छिताः ८ लक्ष्मणश्चापि

---

कांहीं सुचेनासे झालेले ते राक्षस वेगानें पुनरपि युद्ध सुरू करून सूर्यास्ताची वाट पाहूं लागले ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४३ ॥

त्या वानर आणि राक्षसांचें युद्ध सुरू असतांनाच रवि अस्तास जाऊन प्राण हरण करणारी रात्र प्रवृत्त झाली असतां १ एकमेकांशीं वैर बांधून आपआपल्या जयाची इच्छा करणाऱ्या त्या घोर वानरराक्षसांमध्यें रात्रीं युद्ध सुरू झालें २. तेव्हां "राक्षस आहेस" असें म्हणून वानर आणि "वानर आहेस" असें म्हणून राक्षस त्या भयंकर अंधकारांत समरांगणामध्यें एकमेकांचा वध करूं लागले ३ व त्या सैन्यामध्यें "मारा, तोड, इकडे ये, कसा धांवणार" अशा प्रकारचे अत्यंत तुमुल शब्द ऐकूं येऊं लागले. सुवर्णाचीं कवचें धारण केलेले कृष्णवर्ण राक्षस त्या अंधकारामध्यें उज्ज्वल ओषधिवनांनीं युक्त असलेल्या पर्वतराजांप्रमाणें दिसूं लागले ५ व त्या अगाध अंधकारामध्यें क्रोधानें व्याप्त झालेले ते महावेगवान् राक्षस वानरांना भक्षण करीत सुटले ६. तेव्हां प्रचंड कोप धारण केलेल्या त्या वानरांनीं सुवर्णभूषणांनीं युक्त असलेल्या अश्वांवर आणि सर्पतुल्य ध्वजांवर उड्या मारून तीक्ष्ण दांतांच्या योगानें त्यांचे तुकडे तुकडे करून टाकिले. सारांश, बलाढ्य वानरांनीं संग्राममध्यें राक्षसी सेना क्षुब्ध करून सोडिली ७. वरील योद्ध्यांसहवर्तमान गज व पताका आणि ध्वज ह्यांसहवर्तमान रथ

रामश्च शरैराशीविषोपमैः । दृश्यादृश्यानि रक्षांसि प्रवराणि निजघ्नतुः ९ तुरङ्गखुरविध्वस्तं रथनेमिसमुत्थितम् । रुरोध कर्णनेत्राणि युध्यतां धरणीरजः १० वर्तमाने तथा घोरे सङ्ग्रामे लोमहर्षणे । रुधिरौघा महाघोरा नद्यस्तत्र विसुस्रुवुः ११ ततो भेरीमृदङ्गानां पणवानां च निःस्वनः। शङ्खनेमिस्वनोन्मिश्रः संबभूवाद्भुतोपमः १२ हयानां स्तनमानानां राक्षसानां च निःस्वनः । शस्तानां वानराणां च संबभूवात्र दारुणः १३ हतैर्वानरमुख्यैश्च शक्तिशूलपरश्वधैः । निहतैः पर्वताकारै राक्षसैः कामरूपिभिः १४ शस्त्रपुष्पोपहारा च तत्रासीद्युद्धमेदिनी । दुर्ज्ञेया दुर्निवेशा च शोणितास्रावकर्दमा १५ सा बभूव निशा घोरा हरिराक्षसहारिणी । कालरात्रीव भूतानां सर्वेषां दुरतिक्रमा १६ ततस्ते राक्षसास्तत्र तस्मिंस्तमसि दारुणे। राममेवाभ्यवर्तन्त संहृष्टाः शरवृष्टिभिः १७ तेषामापततां शब्दः क्रुद्धानामपि गर्जताम्। उद्वर्त इव सत्त्वानां समुद्राणामभूत्स्वनः १८ तेषां रामः शरैः षड्भिः षड् जघान निशाचरान् । निमेषान्तरमात्रेण शरैरग्निशिखो-

क्रोधाधीन झालेल्या वानरांनीं ओढिले आणि दांतांनीं त्यांचे लचके लचके तोडिले ८. रामलक्ष्मणांनींही सर्पतुल्य तीक्ष्ण बाणांच्या योगानें दृश्य व अदृश्य अशा श्रेष्ठ श्रेष्ठ राक्षसांचा वध केला ९. घोड्यांच्या टापांनीं व चाकांच्या धांवांनीं उडालेल्या भूमीवरील धुळीनें युद्ध करणाऱ्यांचे कान व नेत्र अगदीं भरून गेले १०; आणि ह्याप्रमाणें अंगावर कांटा आणणारा तो घोर संग्राम चालला असतांना रुधिरप्रवाहानें युक्त अशा भयंकर नद्या वाहूं लागल्या ११. तदनंतर शंख आणि रथांच्या धांवा ह्यांच्या ध्वनींनीं मिश्र झालेल्या नौबदी, मृदंग व पणव ह्यांचा अद्भुत ध्वनि होऊं लागला १२; आणि खेंखाळणारे घोडे, राक्षस व वध पावणारे वानर ह्यांचाही भयंकर ध्वनि ऐकूं येऊं लागला १३. यथेष्ट रूप धारण करणाऱ्या पर्वतप्राय राक्षसांनीं शक्ति, शूल व परशु ह्या आयुधांच्या योगानें जे मुख्य मुख्य वानर मारून टाकिले होते १४. त्यामुळें ती युद्धभूमि ओळखूं येईनाशी झाली; कोण कोठें उभा होता हेंही समजेनासें झालें; शस्त्ररूप पुष्पांनीं ती भूषित होऊन गेली आणि रक्तस्रावाच्या योगानें तिच्यामध्यें चिखल होऊन गेला १५. वानर आणि राक्षस ह्यांचे प्राण हरण करणारी ती रात्रि सर्व प्राण्यांना अनुल्लंघनीय असलेल्या कालरात्रीप्रमाणें भयंकर झाली १६. इतकें झाल्यानंतर त्या घोर अंधकारामध्यें ते राक्षस आनंदित होऊन बाणवृष्टि करीत करीत रामावरच चालून गेले असतां १७ क्रुद्ध होऊन गर्जना करणाऱ्या आणि रामावर चालून जाणाऱ्या त्या राक्षसांचा शब्द प्रलयकालीं समुद्रांतील प्राण्यांच्या शब्दाप्रमाणें

मेः १९ यज्ञशत्रुश्च दुर्धर्षो महापार्श्वमहोदरौ । वज्रदंष्ट्रो महाकायस्तौ चोभौ
शुकसारणौ २० ते तु रामेण बाणौघैः सर्वमर्मसु ताडिताः । युद्धादप-
सृतास्तत्र सावशेषायुषोऽभवन् २१ निमेषान्तरमात्रेण घोरैरग्निशिखोपमैः ।
दिशश्चकार विमलाः प्रदिशश्च महारथः २२ ये त्वन्ये राक्षसा वीरा राम-
स्याभिमुखे स्थिताः । तेऽपि नष्टाः समासाद्य पतङ्गा इव पावकम् २३
सुवर्णपुङ्खैर्विशिखैः संपतद्भिः समन्ततः । बभूव रजनी चित्रा खद्योतैरिव
शारदी २४ राक्षसानां च निनदैर्भेरीणां चैव निःस्वनैः । सा बभूव निशा
घोरा भूयो घोरतराभवत् २५ तेन शब्देन महता प्रवृद्धेन समन्ततः ।
त्रिकूटः कन्दराकीर्णः प्रव्याहरदिवाचलः २६ गोलाङ्गूला महाकाया-
स्तमसा तुल्यवर्चसः । संपरिष्वज्य बाहुभ्यां भक्षयन्रजनीचरान् २७
अङ्गदस्तु रणे शत्रून्निहन्तुं समुपस्थितः २८ इन्द्रजित्तु रथं त्यक्त्वा हताश्वो
हतसारथिः । अङ्गदेन महायस्तस्तत्रैवान्तरधीयत २९ तत्कर्म वालिपुत्रस्य

---

भयंकर होऊं लागला १८. तथापि, त्या राक्षसांपैकीं सहा राक्षसांना अग्निज्वालेप्रमाणें उज्ज्वल असलेल्या सहा बाणांनीं रामांनीं एका निमेषामध्यें वेध केला १९. हार जाण्यास कठीण असलेला यज्ञशत्रु महापार्श्व व महोदर, प्रचंड शरीर धारण करणारा वज्रदंष्ट्र आणि उभयतां शुक व सारण ( हे ते सहा राक्षस होत ) २०. रामानें सोडिलेल्या बाणसमुदायांच्या योगानें ते राक्षस जरी मर्मस्थानीं ताडित झाले होते तरी त्यांचीं आयुष्यें अवशिष्ट राहिलीं असल्यामुळें ते युद्धभूमींतून निघून गेले २१ आणि अशारीतीनें त्या महारथी रामानें एका निमषांत अग्निज्वालातुल्य घोर बाणांनीं सर्व दिशा व उपदिशा निर्मल करून टाकिल्या २२. इतकेंच नव्हे परंतु, रामाच्या संमुख जे इतर वीर राक्षस उभे होते तेही अग्नीची गांठ पडल्याबरोबर नष्ट होणाऱ्या पतंगांप्रमाणें रामाची गांठ पडल्याबरोबर नाहींसे झाले २३; आणि सुवर्णपिच्छांनीं युक्त असलेले बाण चोहोंकडून पडूं लागल्यामुळें काजव्यांच्या योगानें चित्रविचित्र होणाऱ्या शरदृतूंतील रात्रीप्रमाणें ती रात्र चित्रविचित्र दिसूं लागली २४. शिवाय, राक्षसांच्या गर्जना आणि दुंदुभींचे ध्वनि ह्यांच्या योगानें ती रात्रि नुसती भयंकर झाली; इतकेंच नव्हे परंतु, उत्तरोत्तर अतिशय भयंकर होऊं लागली २५. चोहोंकडून अतिशयच वृद्धिंगत झालेल्या त्या प्रचंड शब्दामुळें, गुहांनीं भरलेला तो त्रिकूटाचल जसा कांहीं आक्रोशच करूं लागला २६. ज्यांचा वर्ण अंधकाराप्रमाणें आहे असे धिप्पाड गोलांगूल निशाचरांना कवटाळून धरून खाऊं लागले २७ व अंगदही संग्रामामध्यें शत्रूंचा वध करण्यास तयार झाला २८. तेव्हां अंगदानें अश्व व

सर्वे देवाः महर्षिभिः । तुष्टुवुः पूजनार्हस्य तौ चोभौ रामलक्ष्मणौ ३० प्रभावं सर्वभूतानि विदुरिन्द्रजितो युधि । ततस्तेन महात्मानं दृष्ट्वा तुष्टाः प्रधर्षितम् ३१ ततः प्रहृष्टाः कपयः ससुग्रीवविभीषणाः । साधुसाध्विति नेदुश्च दृष्ट्वा शत्रुं पराजितम् ३२ इन्द्रजित्तु तदानेन निर्जितो भीमकर्मणा । संयुगे वालिपुत्रेण क्रोधं चक्रे सुदारुणम् ३३ सोन्तर्धानगतः पापो रावणी रणकर्शितः । ब्रह्मदत्तवरो वीरो रावणिः क्रोधमूर्च्छितः ३४ अदृश्यो निशितान्बाणान्मुमोचाशनिवर्चसः । रामं च लक्ष्मणं चैव घोरैर्नागमयैः शरैः ३५ बिभेद समरे क्रुद्धः सर्वगात्रेषु राघवौ । मायया संवृतस्तत्र मोहयन्राघवौ युधि ३६ अदृश्यः सर्वभूतानां कूटयोधी निशाचरः । बबन्ध शरबन्धेन भ्रातरौ रामलक्ष्मणौ ३७ तौ तेन पुरुषव्याघ्रौ क्रुद्धेनाशीविषैः शरैः । सहसाभिहतौ वीरौ तदा

---

सारथि ह्यांचा वध करून अतिशय जेरीस आणिलेला इंद्रजित् तर तेथेंच गुप्त झाला २९. असो. प्रशंसेस पात्र असलेल्या वालिपुत्र अंगदाचें तें कर्म पाहून ऋषींसहवर्तमान सर्व देव त्याची व त्या उभयतां रामलक्ष्मणांची प्रशंसा करूं लागले ३०. सारांश, इंद्रजिताचा रणांतील पराक्रम सर्व प्राण्यांना विदित असल्यामुळें त्या अंगदानें त्या महात्म्याला जेरीस आणिलेलें पाहून ऋषींसहवर्तमान सर्व देव संतुष्ट झाले ३१. तदनंतर शत्रूचा पराजय झाला असें पाहून सुग्रीव व बिभीषण ह्यांसहवर्तमान वानर आनंदित झाले आणि "शाबास, शाबास" अशी गर्जना करूं लागले ३२. परंतु, भयंकर पराक्रम करणाऱ्या वालीपुत्र अंगदानें इंद्रजिताचा अशारीतीनें संग्रामामध्यें पराजय केला असतां तो इंद्रजित् अतिशयच क्रुद्ध झाला ३३; आणि रणामध्यें जेरीस आल्यामुळें क्रोधानें व्याप्त झालेला व ब्रह्मदेवापासून वर मिळविलेला तो वीर रावणपुत्र पापी इंद्रजित् गुप्त झाला ३४; इतकेंच नव्हे; परंतु, विद्युल्लताप्रमाणें ज्यांचें तेज आहे असे तीक्ष्ण बाण स्वतः अदृश्य राहून तो सोडूं लागला आणि त्या उभयतां रघुवंशज रामलक्ष्मणांना सर्पतुल्य तीक्ष्ण बाणांनीं समरांगणामध्यें सर्व गात्रांचे ठिकाणीं त्या क्रुद्ध झालेल्या इंद्रजितानें वेध केला व मायेनें युक्त असलेला तो इंद्रजित् संग्रामामध्यें त्या रामलक्ष्मणांना मोह पाडूं लागला ३५,३६. सारांश, मायेचें अवलंबन करून युद्ध करणाऱ्या आणि ह्मणूनच कोणाच्याही दृष्टीं न पडणाऱ्या त्या इंद्रजित् राक्षसानें नागपाशानें अभिमंत्रित केलेल्या शरबंधानें भ्रात्या रामलक्ष्मणांना बांधून टाकिलें ३७. तेव्हां क्रुद्ध झालेल्या त्या इंद्रजितानें सर्पतुल्य बाणांच्या योगानें त्या उभयतां पुरुषश्रेष्ठ वीरांचा वध केला आहे असें वानरांच्या

प्रैक्षन्त वानराः ३८ प्रकाशरूपस्तु यदा न शक्तस्तौ बाधितुं राक्षसराज-पुत्रः । मायां प्रयोक्तुं समुपाजगाम बबन्ध तौ राजसुतौ दुरात्मा ३९
[ १३६४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः ॥ ४४ ॥

स तस्य गतिमन्विच्छन्राजपुत्रः प्रतापवान् । दिदेशातिबलो रामो दश वानरयूथपान् १ द्वौ सुषेणस्य दायादौ नीलं च प्लवगाधिपम् । अङ्गदं वालिपुत्रं च शरभं च तरस्विनम् २ द्विविदं च हनूमन्तं सानुप्रस्थं महाबलम् । ऋषभं चर्षभस्कन्धमादिदेश परन्तपः ३ ते संप्रहृष्टा हरयो भीमानुद्यम्य पादपान् । आकाशं विविशुः सर्वे मार्गमाणा दिशो दश ४ तेषां वेगवतां वेगमिषुभिर्वेगवत्तरैः । अस्त्रवित्परमास्त्रेण वारयामास रावणिः ५ तं भीमवेगा हरयो नाराचैः क्षतविक्षताः । अन्धकारे न ददृशुर्मेघैः सूर्यमिवावृतम् ६ रामलक्ष्मणयोरेव सर्वदेहभिदः शरान् । भृशमावेशयामास रावणिः समितिंजयः ७ निरन्तरशरीरौ तु तावुभौ रामलक्ष्मणौ ।

---

दृष्टोत्पत्तीस आलें ३८. तात्पर्य, आपलें रूप दृश्य ठेवून त्या रामलक्ष्मणांना पीडा करण्यास जेव्हां तो राक्षसराजपुत्र इंद्रजित् समर्थ होईना तेव्हां मायेचें अवलंबन करून त्या दुरात्म्यानें त्या राजपुत्रांना बांधून टाकिलें ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४४ ॥

तदनंतर इंद्रजित् कोणीकडे आहे ह्याचा शोध लावण्याकरितां त्या प्रतापी व अतिबलाढ्य राजपुत्र रामानें मोठ्या मोठ्या दहा वानरांना आज्ञा केली १. सुषेणाचे दोघे पुत्र, वानराधिपति नील, वालिपुत्र अंगद, बलाढ्य शरभ २, द्विविद, हनुमान्, महाबलाढ्य सानुप्रस्थ, ऋषभ आणि ऋषभस्कंध ह्या वानरांना त्या शत्रुतापन रामानें आज्ञा केली असतां ३ दाही दिशा हुडकून काढण्याकरितां ते सर्वही वानर आनंदित होऊन आणि भयंकर वृक्ष हातांत घेऊन आकाशामध्यें प्रविष्ट झाले ४; परंतु, ह्याप्रमाणें ते वानर वेगानें जाऊं लागले असतां त्यांच्याहीपेक्षां अधिक वेगवान् अशा महास्त्ररूप बाणांच्या योगानें रावणपुत्र इंद्रजितानें त्यांच्या वेगाचा निरोध केला ५. तेव्हां प्रचंड वेग धारण करणारे ते वानर इंद्रजिताच्या नाराच बाणांनीं जखमी झाले आणि मेघांनीं आच्छादिलेला सूर्य ज्याप्रमाणें दिसत नाहीं त्याप्रमाणें अंधकारामध्यें तो इंद्रजित् त्यांना दिसेनासा झाला ६. इकडे संग्राम जिंकणाऱ्या त्या रावणपुत्रानें रामलक्ष्मणांचा सर्व देह फोडून काढणारे बाण एकसारिखे त्यांच्यावर टाकण्याचें सुरू

क्रुद्धेनेन्द्रजिता वीरौ पन्नगैः शरतां गतैः ८ तयोः क्षतजमार्गेण सुस्राव रुधिरं बहु । तावुभौ च प्रकाशेते पुष्पिताविव किंशुकौ ९ ततः पर्यन्तरक्ताक्षो भिन्नाञ्जनचयोपमः । रावणिर्भ्रातरौ वाक्यमन्तर्धानगतोऽब्रवीत् १० युध्यमानमनालक्ष्यं शक्रोऽपि त्रिदशेश्वरः । द्रष्टुमासादितुं वापि न शक्तः किं पुनर्युवाम् ११ प्रापिताविषुजालेन राघवौ कङ्कपत्रिणा । एष रोषपरीतात्मा नयामि यमसादनम् १२ एवमुक्त्वा तु धर्मज्ञौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ । निर्बिभेद शितैर्बाणैः प्रजहर्ष ननाद च १३ भिन्नाञ्जनचयश्यामो विस्फार्य विपुलं धनुः । भूय एव शरान्घोरान्विससर्ज महामृधे १४ ततो मर्मसु मर्मज्ञो मज्जयन्निशिताञ्शरान् । रामलक्ष्मणयोर्वीरो ननाद च मुहुर्मुहुः १५ बद्धौ तु शरबन्धेन तावुभौ रणमूर्धनि । निमेषान्तरमात्रेण न शेकतुरवेक्षितुम् १६ ततो विभिन्नसर्वाङ्गौ शरशल्याचितौ कृतौ । ध्वजाविव महेन्द्रस्य

---

ठेविलेंच होतें आणि ह्यामुळें ( थोडक्याच वेळांत ) क्रुद्ध झालेल्या त्या इंद्रजितानें बाणरूप बनलेल्या नागांच्या योगानें त्या उभयतां रामलक्ष्मणांचीं शरीरें सर्वस्वीं भरून काढिलीं ८. तेव्हां त्यांच्या शरीराला झालेल्या जखमांतून अतिशय रक्तस्राव होऊं लागला व त्यामुळें ते उभयतांही प्रफुल्लित पलाशवृक्षांप्रमाणें दिसूं लागले ९. तदनंतर आरक्तवर्णप्रांतांनीं युक्त असे ज्याचे नेत्र आहेत आणि कज्जलाच्या पर्वताप्रमाणें ज्याची कांति आहे असा तो रावणपुत्र इंद्रजित् अदृश्य राहून भ्रात्या रामलक्ष्मणांना ह्मणाला १० " दृष्टोत्पत्तीस न येतां युद्ध करणारा मी देवराज इंद्राच्याही दृष्टीं लागणें शक्य नाहीं मग तुमची गोष्ट कशाला पाहिजे ? ११. आतां बाणसमुदायानें बद्ध करून टाकिलेल्या तुह्मां रघुवंशजांना क्रोधानें व्याप्त झालेला हा मी इंद्रजित् कंकपत्र बाणाच्या योगानें यमलोकीं पोंचवितों " १२. ह्याप्रमाणें भाषण करून तीक्ष्ण बाणांच्या योगानें धर्मवेत्त्या भ्रात्या रामलक्ष्मणांना त्यानें वेध केला आणि आनंदित होऊन तो गर्जना करूं लागला १३. इतकेंच नव्हे परंतु, कज्जलाच्या पर्वताप्रमाणें श्यामवर्ण असलेल्या त्या इंद्रजितानें आपलें प्रचंड धनुष्य आकर्षण करून पुनरपि त्या महारणामध्यें घोर बाण सोडण्याला आरंभ केला १४; आणि युद्धाचें मर्म जाणणारा तो वीर इंद्रजित् रामलक्ष्मणांच्या मर्मस्थानावर तीक्ष्ण बाणांचा प्रहार करीत करीत वारंवार गर्जना करूं लागला १५. तेव्हां बाणरूप नागपाशानें संग्रामामध्यें बद्ध झालेल्या त्या उभयतां रामलक्ष्मणांना एका निमेषामध्यें डोळे उघडून पहाणेंही अशक्य झालें १६. ज्यांचे सर्व अवयव फुटून गेलेले आहेत असे ते बाणरूप शल्यांनीं इंद्रजितानें भरून काढिलेले रामलक्ष्मण कंपित होऊन

रज्जुमुक्तौ प्रकम्पितौ १७ तौ संप्रचलितौ वीरौ मर्मभेदेन कर्शितौ । निपेततुर्महेष्वासौ जगत्यां जगतीपती १८ तौ वीरशयने वीरौ शयानौ रुधिरोक्षितौ । शरवेष्टितसर्वाङ्गावार्तौ परमपीडितौ १९ न ह्यविद्धं तयोर्गात्रे बभूवाङ्गुलमन्तरम् । नानिर्भिण्णं न चाध्वस्तमाकराग्रादजिह्मगैः २० तौ तु क्रूरेण निहतौ रक्षसा कामरूपिणा । असृक्सुस्रुवतुस्तीव्रं जलं प्रस्रवणाविव २१ पपात प्रथमं रामो विद्धो मर्मसु मार्गणैः । क्रोधादिन्द्रजिता येन पुरा शक्रो विनिर्जितः २२ रुक्मपुङ्खैः प्रसन्नाग्रै रजोगतिभिराशुगैः । नाराचैरर्धनाराचैर्भल्लैरञ्जलिकैरपि ॥ विव्याध वत्सदन्तैश्च सिंहदंष्ट्रैः क्षुरैस्तथा २३ स वीरशयने शिश्ये विज्यमाविध्य कार्मुकम् । भिन्नमुष्टिपरीणाहं त्रिनतं रुक्मभूषितम् २४ बाणपातान्तरे रामं पातितं पुरुषर्षभम् । स तत्र लक्ष्मणो दृष्ट्वा निराशो जीवितेऽभवत् २५ रामं कमलपत्राक्षं शरण्यं रणतोषिणम् । शुशोच भ्रातरं दृष्ट्वा पतितं धरणीतले २६

---

रज्जूपासून मुक्त झालेल्या इंद्रध्वजाप्रमाणें दिसूं लागले १७. मर्मस्थानें फुटून गेल्यामुळें जेरीस आलेले महाबलाढ्य व महाधनुर्धारी पृथ्वीपति वीर भूमीवर पडले १८. सारांश, सर्व शरीर बाणांनीं परिवेष्टित झाल्यामुळें अतिशय पीडित व आर्त झालेलें आणि रक्तानें भरलेले ते उभयतां वीर युद्धभूमीवर पडून राहिले १९. कारण, मस्तकापासून तों नखापर्यंत त्यांच्या शरीरावरील कोणताही अंगुलपरिमित प्रदेश सुद्धां बाणांनीं विद्ध, विदीर्ण आणि क्षुब्ध न झालेला असा नव्हता २०. यथेष्ट रूप धारण करणाऱ्या क्रूर राक्षसानें त्यांचा जवळ जवळ वधच करून टाकिला होता; आणि प्रस्रवणपर्वतापासून स्रवणाऱ्या उदकाप्रमाणें त्यांच्या शरीरांतून रक्ताचा प्रचंड स्राव होऊं लागला २१. ज्यानें पूर्वी इंद्राला जिंकिलें होतें त्या इंद्रजितानें रामाला प्रथम मर्मस्थानीं बाणांनीं वेध केला असतां तो भूमीवर पडला २२. सुवर्णपिच्छ आणि निर्मल अग्र ह्यांनीं युक्त असलेल्या आणि रजःकणाप्रमाणें एकदम जाणाऱ्या नाराच, अर्ध नाराच, भल्ल, अंजलिक, वत्सदंत, सिंहदंष्ट्र आणि क्षुर ह्या बाणांनीं इंद्रजितानें रामाला वेध केला असतां २३ ज्याचा मुष्टिप्रदेश फुटून गेला आहे आणि तीन ठिकाणीं जें लवलेलें आहे असें आपलें सुवर्णभूषित परंतु, प्रत्यंचारहित झालेलें धनुष्य टाकून देऊन राम युद्धभूमीवर पडला २४. ह्याप्रमाणें शरशय्येवर पाडिलेल्या पुरुषश्रेष्ठ रामाला अवलोकन केल्याबरोबर लक्ष्मण जीविताविषयीं निराश झाला २५; आणि आश्रय करण्यास योग्य, संग्रामामध्यें संतुष्ट होणारा आणि कमलासारख्या विशाल नेत्रांनीं युक्त असलेला भ्राता राम भूतलावर पडला आहे असें

हरयश्चापि तं दृष्ट्वा संतापं परमं गताः । शोकार्ताश्चुक्रुशुर्घोरमश्रुपूरितलो-
चनाः २७ बद्धौ तु तौ वीरशये शयानौ ते वानराः संपरिवार्य तस्थुः ।
समागता वायुसुतप्रमुख्या विषादमार्ताः परमं च जग्मुः २८ [१६९२]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चचत्वा-
रिंशः सर्गः ॥ ४५ ॥

ततो द्यां पृथिवीं चैव वीक्षमाणा वनौकसः । ददृशुः संततौ बाणै-
र्भ्रातरौ रामलक्ष्मणौ १ वृष्ट्वेवोपरते देवे कृतकर्मणि राक्षसे । आजगा-
माथ तं देशं ससुग्रीवो विभीषणः २ नीलश्च द्विविदो मैन्दः सुषेणः
कुमुदोऽङ्गदः । तूर्णं हनुमता सार्धमन्वशोचन्त राघवौ ३ अचेष्टौ मन्दनिः-
श्वासौ शोणितेन परिप्लुतौ । शरजालाचितौ स्तब्धौ शयानौ शर-
तल्पगौ ४ निःश्वसन्तौ यथा सर्पौ निश्चेष्टौ दीनविक्रमौ । रुधिरस्रावदि-
ग्धाङ्गौ तपनीयाविव ध्वजौ ५ तौ वीरशयने वीरौ शयानौ मन्दचेष्टितौ ।

---

अवलोकन करून तो शोक करूं लागला असतां २६ त्याला पाहून वानरही पराकाष्ठेचे संतप्त झाले आणि शोकाकुल झाल्यामुळें ज्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून गेले आहेत असे वानर भयंकर आक्रोश करूं लागले २७. तात्पर्य, नागपाशांनीं बद्ध झाल्यामुळें युद्धभूमीवर पडलेल्या रामलक्ष्मणांना गराडा देऊन ते वानर तेथें राहिले. वायुपुत्र हनुमान् वगैरे इतर मुख्य मुख्य वानरही तेथें आले आणि पराकाष्ठेचे दुःखित व खिन्न झाले २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४५ ॥

तदनंतर इतर वानर अतिशय भीतीमुळें खालीं वर पाहूं लागले असतां भ्राते रामलक्ष्मण बाणांनीं व्याप्त झालेले त्यांच्या दृष्टीं पडले १; आणि वृष्टि करून ज्याप्रमाणें पर्जन्य थांबतो त्याप्रमाणें हें कर्म करून इंद्रजित् राक्षस स्वस्थ बसला असतां सुग्रीवासहवर्तमान बिभीषण तेथें आला २ व नील, द्विविद, मैंद, सुषेण, कुमुद व अंगद हेही हनुमानासहवर्तमान सत्वर तेथें येऊन त्या उभयतां रघुवंशज रामलक्ष्मणाबद्दल शोक करूं लागले ३. कारण, ते निश्चेष्ट पडले असून त्यांचा श्वासोच्छ्वासही अगदीं सूक्ष्म चालला होता; रक्तानें ते भरून गेलेले होते; बाणसमुदायांनीं ते व्याप्त झालेले होते; कसल्याही प्रकारची हालचाल न करितां बाणरूप शय्येवर ते पडले होते ४; पराक्रम व्यर्थ झाल्यामुळें जरी ते निश्चेष्ट झाले होते तरी सर्पांप्रमाणें आंतल्याआंत ते सुस्कारे टाकीतच होते आणि रक्तस्रावानें सर्व शरीर भरून गेल्यामुळें सुवर्णध्वजाप्रमाणें ते दिसत होते ५. हालचाल अगदीं

यूथपैः स्वैः परिवृत्तौ बाष्पव्याकुललोचनैः ६ राघवौ पतितौ दृष्ट्वा शरजालसमन्वितौ । बभूवुर्व्यथिताः सर्वे वानराः सविभीषणाः ७ अन्तरिक्षं निरीक्षन्तो दिशः सर्वाश्च वानराः । न चैनं मायया छन्नं ददृशू रावणिं रणे ८ तं तु मायाप्रतिच्छन्नं माययैव विभीषणः । वीक्षमाणो ददर्शाग्रे भ्रातुः पुत्रमवस्थितम् ९ तमप्रतिमकर्माणमप्रतिद्वन्द्वमाहवे । ददर्शान्तर्हितं वीरं वरदानाद्विभीषणः १० तेजसा यशसा चैव विक्रमेण च संयुतः । इन्द्रजित्त्वात्मनः कर्म तौ शयानौ समीक्ष्य च ११ उवाच परमप्रीतो हर्षयन्सर्वराक्षसान् १२ दूषणस्य च हन्तारौ खरस्य च महाबलौ । सादितौ मामकैर्बाणैर्भ्रातरौ रामलक्ष्मणौ १३ नेमौ मोक्षयितुं शक्यावेतस्मादिषुबन्धनात् । सर्वैरपि समागम्य सर्षिसङ्घैः सुरासुरैः १४ यत्कृते चिन्तयानस्य शोकार्तस्य पितुर्मम । अस्पृष्ट्वा शयनं गात्रैस्त्रियामा याति शर्वरी १५ कृत्स्नेयं यत्कृते लङ्का नदी वर्षास्विवाकुला । सोयं मूलहरोनर्थः सर्वेषां शमितो मया १६ रामस्य लक्ष्मणस्यैव

---

कमी होऊन ते वीर युद्धभूमीवर पडले असतां अश्रूनीं ज्यांचे नेत्र व्याप्त झालेले आहेत असे मोठे मोठे वानर त्यांच्या भोंवतालीं उभे राहिले ६; आणि रामलक्ष्मण बाणसमुदायांनीं भरून गेलेले व पडलेले अवलोकन करितांक्षणीं बिभीषणासहवर्तमान सर्वही वानर व्यथित झाले ७. वानर अंतरिक्षाकडे आणि सर्व दिशांकडे पाहूं लागले; परंतु, मायेनें गुप्त राहिलेला रावणपुत्र इंद्रजित् संग्रामामध्यें त्यांच्या दृष्टीं पडला नाहीं ८. तथापि, मायेनें अदृश्य झालेला भ्रातृपुत्र इंद्रजित् आपल्या समोरच उभा आहे असें बिभीषण मायेनेंच पाहूं लागला असतां त्याच्या दृष्टीं पडले ९. तात्पर्य, ब्रह्मदेवाच्या वरप्रदानामुळें प्राप्त झालेल्या अंतर्धानविद्येनें अदृश्य झालला आणि संग्रामामध्यें अप्रतिम पराक्रम करून कोणत्याही प्रतिपक्ष्याला आपल्या समोर टिकाव धरूं न देणारा तो वीर इंद्रजित् बिभीषणानें अवलोकन केला १० असो. तेज, यश आणि पराक्रम ह्यांनीं युक्त असलेला इंद्रजित् आपला पराक्रम लक्ष्यांत आणून व ते भूमीवर पडलेले रामलक्ष्मण अवलोकन करून ११ अतिशय संतुष्ट झाला आणि सर्व राक्षसांना आनंद देत देत ह्मणाला १२ "खरदूषणांचा वध करणाऱ्या महाबलाढ्य भ्रात्या रामलक्ष्मणांचा माझ्या बाणांनीं वध केला आहे १३; आणि ऋषिगणांसहवर्तमान सर्व देवदैत्य जरी आले तरी ह्या बाणबंधनापासून ह्यांची मुक्तता होणें शक्य नाहीं १४. ज्यांच्याकरितां माझा पिता दुःखाकुल होऊन एकसारखा काळजी करीत असल्यामुळें शय्येला शरीराचा स्पर्श झाल्यावांचूनच त्याची सर्व रात्रही निघून जाते १५ आणि

सर्वेषां च वनौकसाम् । विक्रमा निष्फलाः सर्वे यथा शरदि तोयदाः १७ एवमुक्त्वा तु तान्सर्वान्राक्षसान्परिपश्यतः । यूथपानपि तान्सर्वांस्ताडयामास च रावणिः १८ नीलं नवभिराहत्य मैन्दं सद्विविदं तथा । त्रिभिस्त्रिभि-रमित्रघ्नस्ततापं परमेषुभिः १९ जाम्बवन्तं महेष्वासो विद्ध्वा बाणेन वक्षसि। हनूमतो वेगवतो विससर्ज शरान्दश २० गवाक्षं शरभं चैव तावप्यमित-विक्रमौ । द्वाभ्यां द्वाभ्यां महावेगो विव्याध युधि रावणिः २१ गोलाङ्गूले-श्वरं चैव वालिपुत्रमथाङ्गदम् । विव्याध बहुभिर्बाणैस्त्वरमाणोऽथ रावणिः २२ तान्वानरवरान्भित्त्वा शरैरग्निशिखोपमैः । ननाद बलवांस्तत्र महासत्त्वः स रावणिः २३ तानर्दयित्वा बाणौघैस्त्रासयित्वा च वानरान् । प्रजहास महाबा-हुर्वचनं चेदमब्रवीत् २४ शरबन्धेन घोरेण मया बद्धौ चमूमुखे । सहितौ भ्रातरावेतौ निशामयत राक्षसाः २५ एवमुक्तास्तु ते सर्वे राक्षसाः कूटयो-धिनः । परं विस्मयमापन्नाः कर्मणा तेन हर्षिताः २६ विनेदुश्च महाना-

---

ज्याच्यामुळें वर्षाऋतूंत खवळून जाणाऱ्या नदीप्रमाणें ही लंकानगरी खवळून गेली आहे तो हा सर्वांच्या नाशाला कारणीभूत असलेला अनर्थच मी नाहींसा करून टाकिला आहे १६; आणि शरदृतूमध्यें ज्याप्रमाणें मेघ निष्फल होतात त्याप्रमाणें राम, लक्ष्मण व सर्वही वानर ह्यांचे पराक्रम सर्व निष्फल झाले आहेत " १७. ह्याप्र-माणें चोहोंकडून आपणाकडे पहात असलेल्या त्या सर्व राक्षसांना सांगितल्यानंतर त्या रावणपुत्र इंद्रजितानें त्या सर्व मुख्य मुख्य वानरांनाही ताडण केलें १८. नीलाला नऊ बाणांनीं वेध करून त्या शत्रुनाशक इंद्रजितानें उत्कृष्ट प्रकारच्या तीन तीन बाणांनीं मैंद व द्विविद ह्यांना वेध केला व तो तसाच पराक्रम करीत राहिला १९. त्या महाधनुर्धारी इंद्रजितानें जांबवानाला वक्षःस्थलाचे ठिकाणीं एका बाणानें वेध करून वेगवान् हनुमानावरही त्यानें दहा बाण टाकिले २०. अतुल पराक्रम करणारे जे उभयतां गवाक्ष व शरभ ह्यांनाही महावेगवान् रावणपुत्र इंद्रजितानें दोन दोन बाणांनीं वेध केला २१. नंतर गोलांगूलाधिपति आणि वालिपुत्र अंगद ह्यांना अनेक बाणांनीं त्या रावणपुत्र इंद्रजि-तानें सत्वर वेध केला २२; इतकेंच नव्हे परंतु, अग्निज्वालेप्रमाणें तीक्ष्ण असलेल्या बाणांच्या योगानें त्या वानरश्रेष्ठांना वेध करून तो महाधैर्यवान् व बलाढ्य रावणपुत्र गर्जना करूं लागला २३. असो. ह्याप्रमाणें बाणसमुदायांनीं त्या वानरांना पीडा देऊन व त्रस्त करून तो महापराक्रमी इंद्रजित् हासूं लागला आणि (राक्षसांना) म्हणाला २४ " हे राक्षसहो, घोर बाणपाशानें मीं संग्रामामध्यें एकदम बांधून टाकि-लेल्या ह्या भ्रात्या रामलक्ष्मणांना तुह्मी अवलोकन करा " २५. ह्याप्रमाणें इंद्रजितानें

दुन्मत्ते ते जलदोपमाः । हतो राम इति ज्ञात्वा रावणिं समपूजयन् २७
निष्पन्दौ तु तदा दृष्ट्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ । वसुधायां निरुच्छ्वासौ हता-
विंत्यन्वमन्यत २८ हर्षेण तु समाविष्ट इन्द्रजित्समितिंजयः । प्रविवेश
पुरीं लङ्कां हर्षयन्सर्वनैर्ऋतान् २९ रामलक्ष्मणयोर्दृष्ट्वा शरीरे सायकैश्चिते।
सर्वाणि चाङ्गोपाङ्गानि सुग्रीवं भयमाविशत् ३० तमुवाच परित्रस्तं
वानरेन्द्रं विभीषणः । सबाष्पवदनं दीनं क्रोधव्याकुललोचनम् ३१ अलं
त्रासेन सुग्रीव बाष्पवेगो निगृह्यताम् । एवंप्रायाणि युद्धानि विजयो
नास्ति नैष्ठिकः ३२ सभाग्यशेषताऽस्माकं यदि वीर भविष्यति । मोह-
मेतौ प्रहास्येते महात्मानौ महाबलौ ३३ पर्यवस्थापयात्मानमनाथं मां च
वानर । सत्यधर्माभिरक्तानां नास्ति मृत्युकृतं भयम् ३४ एवमुक्त्वा तत-
स्तस्य जलक्लिन्नेन पाणिना । सुग्रीवस्य शुभे नेत्रे प्रममार्ज विभीषणः ३५
ततः सलिलमादाय विद्यया परिजप्य च । सुग्रीवनेत्रे धर्मात्मा प्रममार्ज

---

सांगितलें असतां कपटयुद्ध करणाऱ्या त्या सर्वही राक्षसांना पराकाष्ठेचा विस्मय झाला.
त्याच्या त्या पराक्रमानें त्यांना हर्ष झाला २६; मेघतुल्य असलेले ते सर्वही राक्षस
मोठ्या मोठ्या गर्जना करूं लागले आणि रामाचा वध झाला असें समजून त्या राव-
णपुत्राची प्रशंसा करूं लागले २७. असो. रामलक्ष्मण श्वासोच्छ्वास न करितां भूमी-
वर निश्चेष्ट पडले आहेत असें इंद्रजिताच्या दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें त्यांचा वध
झाला असें त्याला वाटलें २८ आणि हर्षानें व्याप्त झालेला व युद्धामध्यें शत्रूचा
पराजय करणारा तो इंद्रजित् सर्व राक्षसांना आनंद देत देत लंकानगरीमध्यें प्रविष्ट
झाला २९. इकडे रामलक्ष्मणांचीं शरीरें व सर्वही बारीकसारीक अवयव बाणांनीं
व्याप्त झाल्याचें अवलोकन करून सुग्रीव भयभीत झाला ३०. तेव्हां क्रोधानें ज्याचे
नेत्र क्षुब्ध झाले आहेत, ज्याच्या मुखावर अश्रु आलेले आहेत आणि जो दीन
होऊन अतिशय त्रस्त झाला आहे त्या वानरराज सुग्रीवाला बिभीषण म्हणाला ३१
"हे सुग्रीवा, आतां भीति नको; तूं रोदनाचा वेग आंवरून धर. कारण, युद्धें प्रायः
अशा प्रकारचींच असतात आणि अमुकच पक्षाला विजय प्राप्त व्हावयाचा असें त्यांत
ठरलेलें नसतें ३२. तस्मात्, हे वीरा, आपल्या पदरीं जर कांहीं पुण्य असेल तर हे
महात्मे व महाबलाढ्य रामलक्ष्मण शुद्धीवर येतील ३३. ह्यास्तव, हे वानरा, तूं
मज दीनाला आणि स्वतःला धीर दे. कारण, सत्यधर्माचे ठिकाणीं निष्ठा ठेवणा-
ऱ्यांना मृत्युसंबंधीं भय नाहीं ३४. असें बोलून बिभीषणानें सुग्रीवाच्या शुभ नेत्रांवरून
पाण्याचा हात फिरविला. तदनंतर आणखीं उदक घेऊन आणि मंत्रानें त्याचें

बिभीषणः ३६ विमृज्य वदनं तस्य कपिराजस्य धीमतः । अब्रवीत्का-
लसंप्राप्तमसंभ्रान्तमिदं वचः ३७ न कालः कपिराजेन्द्र वैक्लव्यमवल-
म्बितुम् । अतिस्नेहोऽपि कालेऽस्मिन्मरणायोपकल्पते ३८ तस्मादुत्सृज्य
वैक्लव्यं सर्वकार्यविनाशनम् । हितं रामपुरोगाणां सैन्यानामनुचिन्तय ३९
अथ वा रक्ष्यतां रामो यावत्संज्ञाविपर्ययः । लब्धसंज्ञौ हि काकुत्स्थौ
भयं नौ व्यपनेष्यतः ४० नैतत्किंचन रामस्य न च रामो मुमूर्षति ।
न ह्येनं हास्यते लक्ष्मीर्दुर्लभा या गतायुषाम् ४१ तस्मादाश्वासयात्मानं बलं
चाश्वासय स्वकम् । यावत्सैन्यानि सर्वाणि पुनः संस्थापयाम्यहम् ४२ एते हि
फुल्लनयनास्त्रासादागतसाध्वसाः । कर्णे कर्णे प्रकथिता हरयो हरिसत्तम ४३
मां तु दृष्ट्वा प्रधावन्तमनीकं संप्रहर्षितम् । त्यजन्तु हरयस्त्रासं भुक्तपूर्वामिव
स्रजम् ४४ समाश्वास्य तु सुग्रीवं राक्षसेन्द्रो बिभीषणः । विद्रुतं वानरानीकं
तत्समाश्वासयत्पुनः ४५ इन्द्रजित्तु महामायः सर्वसैन्यसमावृतः । विवेश

---

अभिमंत्रण करून धर्मात्म्या बिभीषणानें तें पुनरपि सुग्रीवाच्या नेत्रांना लाविलें ३६ आणि ह्याप्रमाणें त्या विचारी वानरराजाच्या मुखावरून हात फिरविल्यावर समयाला अनुरूप असें निर्भय भाषण बिभीषण त्याच्याशीं करूं लागला ३७. ( तो ह्मणाला ) "हे वानरराजाधिराज, खिन्न होऊन बसण्याचा हा समय नव्हे आणि अतिस्नेहमूलक रोदन वगैरेही ह्यावेळीं मृत्यूलाच कारणीभूत होणारें आहे ३८. तस्मात्, सर्व कार्याचा विघात करणारा खेद सोडून देऊन राम ज्याचा पुढारी आहे त्या सैन्यांच्या हिताचा विचार कर ३९. किंवा जोंपर्यंत राम देहभानावर नाहीं तोंपर्यंत त्याचें रक्षण करावें ह्मणजे झालें. कारण, हे ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मण सावध झाले असतां आपलें भय नाहींसें करतील ४०. ह्या मूर्छेपासून रामाला कांहींएक अपाय व्हावयाचा नाहीं आणि राम आसन्नमरणही झालेला नाहीं. कारण, आसन्नमरण झालेल्या लोकांना दुर्लभ असलेली जी कांति ती ह्याला सोडून जात नाहीं ४१. तस्मात्, तूं स्वतः धैर्य धरून आपल्या सैन्यालाही धीर दे; ह्मणजे मी इतक्यांत सर्व सैन्यांचें पुनरपि स्थीरस्थावर करितों ४२. हे वानरश्रेष्ठा, तूं जर धैर्य धरिलें नाहींस तर प्रफुल्लित नेत्रांनीं युक्त असलेले हे वानर भीतीमुळें गांगरून जातील आणि रामावर आलेल्या विपत्तीविषयीं सर्वही एकमेकांच्या कानांमध्यें कुजबुजूं लागतील ४३. सैन्याला धीर देण्याकरितां मी धांवत धांवत जात आहें असें अवलोकन करून हर्षयुक्त झालेले सैन्यांतील वानर निर्माल्य झालेल्या पुष्पमालेप्रमाणें भयाचा त्याग करतील" ४४. ह्याप्रमाणें सुग्रीवाला धीर देऊन राक्षसराज बिभीषणानें पळत सुटलेल्या वानरसैन्याला पुनरपि धीर दिला ४५.

नगरीं लङ्कां पितरं चाभ्युपागमत् ४६ तत्र रावणमासाद्य अभिवाद्य कृताञ्जलिः । आचचक्षे प्रियं पित्रे निहतौ रामलक्ष्मणौ ४७ उत्पपात ततो हृष्टः पुत्रं च परिषस्वजे । रावणो रक्षसां मध्ये श्रुत्वा शत्रू निपातितौ ४८ उपाघ्राय च तं मूर्ध्नि पप्रच्छ प्रीतमानसः । पृच्छते च यथावृत्तं पित्रे तस्मै न्यवेदयत् ॥ यथा तौ शरबन्धेन निश्चेष्टौ निष्प्रभौ कृतौ ४९ स हर्षवेगानुगतान्तरात्मा श्रुत्वा गिरं तस्य महारथस्य । जहौ ज्वरं दाशरथेः समुत्थं प्रहृष्टवाचाभिननन्द पुत्रम् ५० [१७४२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः ॥४६॥

तस्मिन्प्रविष्टे लङ्कायां कृतार्थे रावणात्मजे । राघवं परिवार्याथ ररक्षुर्वानरर्षभाः १ हनुमानङ्गदो नीलः सुषेणः कुमुदो नलः । गजो गवाक्षः पनसः सानुप्रस्थो महाहरिः २ जाम्बवानृषभः सुन्दो रम्भः शतबलिः पृथुः । व्यूढानीकाश्च यत्ताश्च द्रुमानादाय सर्वतः ३ वीक्षमाणा दिशः

---

इतक्यांत महामायावी इंद्रजित् सर्व सैन्य बरोबर घेऊन लंकानगरीमध्यें प्रविष्ट झाला आणि पित्यासमीप गेला ४६. रावणासमीप गेल्यानंतर त्याला अभिवंदन केल्यावर तो हात जोडून उभा राहिला आणि रामलक्ष्मणांचा वध झाला हें प्रिय वृत्त त्यानें आपल्या पित्याला निवेदन केलें ४७. तेव्हां शत्रूंचा निःपात झाल्याचें ऐकिल्याबरोबर राक्षसांमध्यें असलेल्या त्या रावणानें आनंदित होऊन उड्डाण केलें; पुत्राला आलिंगन दिलें ४८ आणि मस्तकीं अवघ्राण करून प्रसन्न मनानें त्यांच्या वधाची हकीकत त्यानें त्याला विचारिली असतां त्राणरूप नागपाशानें ते रामलक्ष्मण निश्चेष्ट व निस्तेज कसे झाले वगैरे प्रकारची इत्थंभूत हकीकत त्यानें त्या पित्याला निवेदन केली ४९; व त्या महारथी इंद्रजिताचें तें भाषण श्रवण केल्याबरोबर रावणाच्या अंतःकरणामध्यें आनंदाचा पूर आला आणि दशरथपुत्र रामामुळें उत्पन्न झालेल्या चिंतेचा त्याग करून आनंदयुक्त वाणीनें त्यानें आपल्या पुत्राचें अभिनंदनही केलें ५०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं शेहेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४६ ॥

तो रावणपुत्र इंद्रजित् कृतार्थ होऊन लंकेमध्यें प्रविष्ट झाला असतां वानरश्रेष्ठ रामाचे भोंवतीं गराडा घालून त्याचें रक्षण करूं लागले १. हनुमान्, अंगद, नील, सुषेण, कुमुद, नल, गज, गवाक्ष, पनस, महाकपि सानुप्रस्थ २, जांबवान्, ऋषभ, सुंद, रंभ, शतबलि आणि पृथु इत्यादि वानर सैन्यांचे व्यूह रचून आणि हातामध्यें वृक्ष घेऊन सर्व बाजूंनीं तयार राहिले ३; सर्व दिशेकडे आणि त्याचप्रमाणें खालीं

सर्वास्तिर्यगूर्ध्वं च वानराः । तृणेष्वपि च चेष्टत्सु राक्षसा इति मेनिरे ४ रावणश्चापि संहृष्टो विसृज्येन्द्रजितं सुतम् । आजुहाव ततः सीतारक्षणी राक्षसीस्तदा ५ राक्षस्यास्त्रिजटा चापि शासनात्समुपस्थिताः । ता उवाच ततो हृष्टो राक्षसी राक्षसाधिपः ६ हताविन्द्रजिताख्यात वैदेह्या रामलक्ष्मणौ । पुष्पकं तत्समारोप्य दर्शयध्वं रणे हतौ ७ यदाश्रयादवष्टब्धा नेयं मामुपतिष्ठते । सोऽस्या भर्ता सह भ्रात्रा निहतो रणमूर्धनि ८ निर्विशङ्का निरुद्विग्ना निरपेक्षा च मैथिली । मामुपस्थास्यते सीता सर्वाभरणभूषिता ९ अद्य कालवशं प्राप्तं रणे रामं सलक्ष्मणम् । अवेक्ष्य विनिवृत्ता सा चान्यां गतिमपश्यती १० अनपेक्षा विशालाक्षी मामुपस्थास्यते स्वयम् ११ तस्य तद्वचनं श्रुत्वा रावणस्य दुरात्मनः । राक्षस्यस्तास्तथेत्युक्त्वा जग्मुर्वै यत्र पुष्पकम् १२ ततः पुष्पकमादाय राक्षस्यो रावणाज्ञया । अशोकवनिकास्थां तां मैथिलीं समुपानयन् १३ तामादाय तु राक्षस्यो भर्तृशोकपराजिताम् । सीतामारोपयामासुर्विमानं पुष्पकं

---

व वर ते वानर एकसारिखे पाहू लागले आणि तृण जरी हाललें तरी राक्षसच आले कीं काय अशी शंका घेऊं लागले ४. इकडे आनंदित झालेल्या रावणानें इंद्रजित् पुत्राला जाण्याची अनुज्ञा देऊन सीतेच्या बंदोबस्ताला असलेल्या राक्षसी बोलाविल्या ५ व त्या राक्षसी त्रिजटेसहवर्तमान आज्ञाप्रमाणें त्याच्या समीप आल्या. तेव्हां आनंदित झालेला तो राक्षसाधिपति रावण त्या राक्षसींना ह्मणाला ६ " इंद्रजितानें रामलक्ष्मणांचा वध केल्याचें तुह्मी सीतेला सांगा आणि त्या पुष्पकविमानामध्यें तिला बसवून तुह्मी संग्रामामध्यें वध पावलेले ते रामलक्ष्मण दाखवा ७. ज्याच्या आश्रयामुळें ही गर्विष्ठ होऊन माझा स्वीकार करीत नव्हती तो हिचा भर्ता भ्रात्यासहवर्तमान संग्रामामध्यें वध पावून पडला आहे ८. ह्यास्तव, ही मिथिलराजकन्या सीता उद्वेग, भीति व रामाची आशा मनामध्यें न धरितां सर्व अलंकारांनीं भूषित होऊन आज माझ्याकडे येईल ९. सारांश, संग्रामामध्यें लक्ष्मणासहवर्तमान कालाच्या तावडींत सांपडलेल्या रामाला अवलोकन करून ती परत फिरेल आणि दुसरी गतिच नसल्यामुळें १० रामाची अपेक्षा न धरितां ती विशालनयना आतां आपण होऊनच माझ्याकडे येईल " ११. हें त्या दुरात्म्या रावणाचें भाषण श्रवण केल्यावर तसें सीतेला सांगून त्या राक्षसी जिकडे पुष्पकविमान होतें तिकडे गेल्या १२. नंतर रावणाच्या आज्ञेनें पुष्पकविमान आणिल्यावर अशोक वनामध्यें असलेल्या त्या सीतेलाही राक्षसी घेऊन आल्या १३; आणि भर्त्याच्या शोकानें विह्वल झालेल्या त्या सीतेला आणिल्यावर

तदा १४ ततः पुष्पकमारोप्य सीतां त्रिजटया सह । रावणश्चारयास पताकाध्वजमालिनीम् १५ प्राघोषयत हृष्टश्च लङ्कायां राक्षसेश्वरः । राघवो लक्ष्मणश्चैव हताविन्द्रजिता रणे १६ विमानेनापि गत्वा तु सीता त्रिजटया सह । ददर्श वानराणां तु सर्वं सैन्यं निपातितम् १७ प्रहृष्टमनसश्चापि ददर्श पिशिताशनान् । वानरांश्चातिदुःखार्तान्रामलक्ष्मणपार्श्वतः १८ ततः सीता ददर्शोभौ शयानौ शरतल्पगौ । लक्ष्मणं चैव रामं च विसंज्ञौ शरपीडितौ १९ विध्वस्तकवचौ वीरौ विप्रविद्धशरासनौ । सायकैश्छिन्नसर्वाङ्गौ शरस्तम्बमयौ क्षितौ २० तौ दृष्ट्वा भ्रातरौ तत्र प्रवीरौ पुरुषर्षभौ । शयानौ पुण्डरीकाक्षौ कुमाराविव पावकी २१ शरतल्पगतौ वीरौ तथाभूतौ नरर्षभौ । दुःखार्ता करुणं सीता सुभृशं विललाप ह २२ भर्तारमनवद्याङ्गी लक्ष्मणं चासितेक्षणा । प्रेक्ष्य पांसुषु चेष्टन्तौ रुरोद जनकात्मजा २३ सबाष्पशोकाभिहता समीक्ष्य

---

राक्षसींनीं तिला त्या पुष्पकविमानामध्यें बसविलें १४. ह्याप्रमाणें त्रिजटेसहवर्तमान सीतेला पुष्पकविमानामध्यें बसवून रावणानें पताका व ध्वज ह्यांनीं युक्त असलेल्या लंकानगरीमध्यें तिला फिरविलें १५; आणि " संग्रामामध्यें इंद्रजितानें रघुवंशज राम व लक्ष्मण ह्यांचा वध केला " अशी त्या आनंदित झालेल्या राक्षसराज रावणानें लंकेमध्यें दंवडीही पिटली १६. इकडे त्रिजटेसहवर्तमान विमानांत बसून गेल्यावर वानरांचें पुष्कळच सैन्य मारून टाकिलेलें सीतेच्या दृष्टीं पडलें १७. राक्षस मनामध्यें आनंदित झाल्याचेंही तिच्या आढळण्यांत आलें आणि रामलक्ष्मणासमीप बसलेले वानर अतिशय दुःखाकुल झालेलेही तिनें पाहिले १८. तदनंतर शरशय्येवर मूर्च्छा येऊन पडलेले व बाणांनीं व्याप्त झालेले उभयतां रामलक्ष्मण तिनें अवलोकन केले १९. त्यावेळीं त्या वीरांचीं कवचें फुटून गेलीं होतीं; धनुष्यें हातांतून गळून पडलीं होतीं; बाणांनीं त्यांचें सर्व शरीर छिन्नभिन्न झालें होतें आणि ते बाणसमूहानें भरून जाऊन भूमीवर पडले होते २०. प्रत्यक्ष स्कंदच कीं काय असे ते उभयतां पुरुषश्रेष्ठ कमलनयन वीर भ्राते भूमीवर पडलेले अवलोकन करून २१ म्हणजे तशा प्रकारची अवस्था प्राप्त झालेले ते पुरुषश्रेष्ठ वीर शरशय्येवर पडलेले पाहून सीता दुःखाकुल झाली आणि करुण स्वरानें अतिशय विलाप करूं लागली २२; भर्ता राम आणि लक्ष्मण हे धुळींत पडले आहेत असें जेव्हां त्या कृष्णनयन सुंदरी जनककन्येनें अवलोकन केलें तेव्हां तर तिला रडेंच कोसळलें २३; आणि अश्रूंनीं कंठ दाटून येऊन शोकानें व्याकुल झालेली व दुःखानें व्याप्त झालेली ती सीता देवकुमाराप्रमाणें

तौ भ्रातरौ देवसुतप्रभावौ । वितर्कयन्ती निधनं तयोः सा दुःखान्विता वाक्यमिदं जगाद २४ [ १७६६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ॥ ४७ ॥

भर्तारं निहतं दृष्ट्वा लक्ष्मणं च महाबलम् । विललाप भृशं सीता करुणं शोककर्शिता १ ऊचुर्लाक्षणिका ये मां पुत्रिण्यविधवेति च । तेद्य सर्वे हते रामे ज्ञानिनोनृतवादिनः २ यज्वनो महिषीं ये मामूचुः पत्नीं च सत्रिणः । तेद्य सर्वे हते रामे ज्ञानिनोनृतवादिनः ३ वीरपार्थिवपत्नीनां य विदुर्भर्तृपूजिताम् । तेद्य सर्वे हते रामे ज्ञानिनोनृतवादिनः ४ ऊचुः संश्रवणे ये मां द्विजाः कार्तान्तिकाः शुभाम् । तेद्य सर्वे हते रामे ज्ञानिनोनृतवादिनः ५ इमानि खलु पद्मानि पादयोर्वै कुलस्त्रियः । आधिराज्येभिषिच्यन्ते नरेन्द्रैः पतिभिः सह ६ वैधव्यं यान्ति यैर्नार्यो-लक्षणैर्भाग्यदुर्लभाः । नात्मनस्तानि पश्यामि पश्यन्ती हतलक्षणा ७ सत्यनामानि पद्मानि स्त्रीणामुक्तानि लक्षणैः । तान्यद्य निहते रामे वितथानि

---

पराक्रमी असलेल्या त्या भ्रात्याकडे पाहून त्यांच्या मरणाविषयीं मनामध्यें तर्क करीत करीत आपल्याशीं बोलूं लागली २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यातील युद्धकांडापैकीं सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४७ ॥

भर्ता राम आणि महाबलाढ्य लक्ष्मण वध पावल्याचें अवलोकन करून शोकाकुल झालेली सीता करुण स्वरानें अतिशय विलाप करूं लागली १. ( ती ह्मणाली ) " सामुद्रिक जाणणारे जे लोक मला पुत्रवती आणि अविधवा असें ह्मणाले होते ते सर्वही ज्ञानी राम वध पावल्यामुळें आज असत्य भाषण करणारे ठरले २. अश्वमेधादि याग व सत्रें करणाऱ्या राजाची तूं पट्टाभिषिक्त स्त्री व पत्नी होशील असें ज्यांनीं माझ्याविषयीं भविष्य सांगितलें होतें ते सर्वही ज्ञानी पुरुष रामाचा वध झाल्यामुळें आज अनृत भाषण करणारे झाले ३. तूं वीर राजांच्या स्त्रियांना पूज्य व भर्त्याला मान्य होशील असें ज्यांनीं मला सांगितलें होतें त्या सर्वही ज्ञानी पुरुषांचें भाषण आज खोटें ठरलें ४. ज्योतिःशास्त्राचा सिद्धांत जाणणारे जे ज्ञानी द्विज माझ्या समीप येऊन तूं अविधवा होशील ह्मणून ह्मणाले त्या सर्वांचेंही भाषण राम वध पावल्यामुळें आज असत्य झालें ५. अरेरे ! जीं कमलें पायांवर असल्यामुळें कुलस्त्रियांना नृपरूप पतीसहवर्तमान राज्याभिषेक होत असतो तींच हीं कमलें माझ्या पायांवर आहेत ६. ज्या कुलक्षणांमुळें भाग्यहीन स्त्रियांना वैधव्य येत असतें तीं लक्षणें स्वतःचे ठिकाणीं असल्याचें मला दिसत नाहीं; इतकेंच नव्हे परंतु, चांगलीं सुलक्षणें असतांनाही तीं आज माझीं निष्फल झालीं आहेत ७. लक्षणें जाणणाऱ्यांनीं

भवन्ति मे ८ केशाः सूक्ष्माः समा नीला भ्रुवौ चासंहते मम ।
वृत्ते चारोमके जङ्घे दन्ताश्चाविरला मम ९ शङ्खे नेत्रे करौ पादौ गुल्फा-
वूरू समौ चितौ । अनुवृत्तनखाः स्निग्धाः समाश्चाङ्गुलयो मम १०
स्तनौ चाविरलौ पीनौ मामकौ मग्नचूचुकौ । मग्ना चोत्सधनी नाभिः
पार्श्वोरस्कं च मे चितम् ११ मम वर्णो मणिनिभो मृदून्यङ्गरुहाणि
च । प्रतिष्ठितां द्वादशभिर्मामूचुः शुभलक्षणाम् १२ समग्रय-
वमच्छिद्रं पाणिपादं च वर्णवत् । मन्दस्मितेत्येव च मां कन्या-
लाक्षणिका विदुः १३ आधिराज्येऽभिषेको मे ब्राह्मणैः पतिना सह ।
कृतान्तकुशलैरुक्तं तत्सर्वं वितथीकृतम् १४ शोधयित्वा जनस्थानं प्रवृ-
त्तिमुपलभ्य च । तीर्त्वा सागरमक्षोभ्यं भ्रातरौ गोष्पदे हतौ १५ ननु
वारुणमाग्नेयमैन्द्रं वायव्यमेव च । अस्त्रं ब्रह्मशिरश्चैव राघवौ

---

आणि लक्षणांचें प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांनीं स्त्रियांचे ठिकाणीं असलेल्या ज्या कमलांचें फल चांगलें यावयाचेंच असें सांगितलें आहे तीं माझ्या शरीरावरील रेखारूप कमलें रामाचा वध झाल्यामुळें आज व्यर्थ झालीं ८. माझ्या मस्तकावरील केश सूक्ष्म, एकसारिखे व कृष्णवर्ण असून माझ्या भिंवया एकमेकांना लागलेल्या नाहींत; पाट्र्या वर्तुल असून त्यांच्यावर लव नाहीं; माझे दांत विरळ नाहींत ९; नेत्रांचे उपांत्य प्रदेश; नेत्र, हात, पाय, घोंटे आणि मांड्या हीं सर्व एकसारिखीं असून मांसल आहेत बोटें तुळतुळीत, सारखीं व वाटोळ्या नखांनीं युक्त आहेत १०; माझे स्तन पुष्ट व अविरल असून त्यांचीं अग्रें आंत डुबलेलीं आहेत; नाभि खोल असून तिच्या भोंवतालचा प्रदेश उन्नत आहे; बरगड्या आणि वक्षस्थल हीं माझीं मांसल आहेत ११; हिऱ्याप्रमाणें माझी कांति उज्ज्वल आहे; माझ्या शरीरावरील रोम मृदु आहेत आणि दहा बोटें व दोन्ही तळवे अशीं माझी बाराही भूमीला स्पष्टपणें लागत असल्यामुळें मी शुभ लक्षणांनीं संपन्न असल्याचें ज्योतिषी लोकांनीं सांगितलें आहे १२. माझे हातपाय उत्कृष्ट कांतीनें युक्त आहेत; बोटें जुळलीं असतां मधून छिद्रें दिसत नाहींत; चारी अंगठ्यांच्या मधल्या पेऱ्यांवर पूर्ण यव आहेत आणि मंद हास्य हेंही सुलक्षण माझे ठिकाणीं आहे. असें कन्येचीं लक्षणें जाणणारे ज्योतिषी समजत असतात १३. पतीसहवर्तमान मला सार्वभौम राज्याचा अभिषेक होईल असें जें ज्योतिःशास्त्रांतील सिद्धांतामध्यें निपुण असलेल्या ब्राह्मणांनीं मला सांगितलें आहे तें सर्व आज व्यर्थ झालें १४. जनस्थान शोधिल्यानंतर बातमी लागतांक्षणीं अगाध समुद्र तरून आल्याबरही हे भ्राते पाण्यानें भरलेलें असें जें

प्रत्यपद्यत १६ अदृश्यमानेन रणे मायया वासवोपमौ । मम नाथावनाथाया निहतौ रामलक्ष्मणौ १७ न हि दृष्टिपथं प्राप्य राघवस्य रणे रिपुः । जीवन्प्रतिनिवर्तेत यद्यपि स्यान्मनोजवः १८ न कालस्यातिभारोऽस्ति कृतान्तश्च सुदुर्जयः । यत्र रामः सह भ्रात्रा शेते युधि निपातितः १९ न शोचामि तथा रामं लक्ष्मणं च महारथम् । नात्मानं जननीं चापि यथा श्वश्रूं तपस्विनीम् २० सा तु चिन्तयते नित्यं समाप्तव्रतमागतम् । कदा द्रक्ष्यामि सीतां च लक्ष्मणं च सराघवम् २१ परिदेवयमानां तां राक्षसी त्रिजटाब्रवीत् । मा विषादं कृथा देवि भर्तायं तव जीवति २२ कारणानि च वक्ष्यामि महान्ति सदृशानि च । यथेमौ जीवतो देवि भ्रातरौ रामलक्ष्मणौ २३ न हि कोपपरीतानि हर्षपर्युत्सुकानि च । भवन्ति युधि योधानां मुखानि निहते पतौ २४ इदं विमानं वैदेहि पुष्पकं नाम नामतः ।

---

भूमीवर उमटलेलें गाईचें पाऊल त्याप्रमाणें अगदींच क्षुल्लक असा राक्षससेनासमुद्रांतील भाग अवशिष्ट राहिला असतां वध पावले १५. अहो, वारुण, आग्नेय, ऐंद्र, वायव्य आणि ब्रह्मशिर हीं अस्त्रें रामलक्ष्मणांना प्राप्त झालेलीं होतीं तीं कोणीकडे गेलीं ? १६ अरेरे ! मायेनें अदृश्य राहणाऱ्या इंद्रजितानें मज अनाथ स्त्रीच्या रामलक्ष्मणरूप इंद्रतुल्य नाथांचा वध केला ! १७. अरे, मनाप्रमाणें वेग धारण करणारा जरी शत्रु असला तरी संग्रामामध्यें रामाच्या दृष्टीं पडल्यावर तो कधींही जिवंत परत जात नसे १८; परंतु, ज्याअर्थी भ्रात्यासहवर्तमान तो राम युद्धामध्यें वध पावून पडला आहे त्याअर्थी कोणतीही दुर्घट गोष्ट घडविणें कालाला मुळींच कठीण नसून त्याला जिंकणें अत्यंत कठीण आहे १९. खरोखर बिचाऱ्या सासूबद्दल जितकें मला दुःख होत आहे तितकें रामाबद्दल, महारथि लक्ष्मणाबद्दल, स्वतःबद्दल अथवा मातेबद्दलही मला दुःख होत नाहीं २०. " चवदा वर्षेपर्यंत स्वीकारिलेलें व्रत संपूर्ण करून रामासहवर्तमान परत आलेल्या लक्ष्मणाला व सीतेला मी कधीं पाहीन " असें ती कौसल्या नित्य चिंतन करीत असते " २१. ह्याप्रमाणें सीता वेलाप करीत असतांना त्रिजटा राक्षसी तिला ह्मणाली " हे देवि, तूं वेनाकारण दुःख करूं नको; हा तुझा भर्ता जिवंत आहे २२. हे देवि, हे भ्राते रामलक्ष्मण जिवंत आहेत ह्याबद्दल अनुभवाला आलेलीं अशीं ठळक ठळक चिन्हें मी तुला सांगतें २३. अधिपतीचा युद्धामध्यें वध झाला असतां योद्ध्यांचीं मुखें ( क्षणोक्षणीं ) क्रोधानें व्याप्त व हर्षानें उत्सुक अशीं कधींही होत नाहींत २४. हे विदेहराज कन्यके, हें नांवाचें ( ह्मणजे अमंगळ प्रकाराची वगैरे कधींही उपेक्षा न करणारें )

दिव्यं त्वां धारयेन्नेदं यद्येतौ गतजीवितौ २५ हतवीरप्रधाना हि गतोत्साहा निरुद्यमा । सेना भ्रमति सङ्ख्येषु हतकर्णेव नौर्जले २६ इयं पुनरसंभ्रान्ता निरुद्विग्ना तपस्विनि । सेना रक्षति काकुत्स्थौ मया प्रीत्या निवेदितौ २७ सा त्वं भव सुविस्रब्धा अनुमानैः सुखोदयैः । अहतौ पश्य काकुत्स्थौ स्नेहादेतद्ब्रवीमि ते २८ अनृतं नोक्तपूर्वं मे न च वक्ष्यामि मैथिलि । चारित्रसुखशीलत्वात्प्रविष्टासि मनो मम २९ नेमौ शक्यौ रणे जेतुं सेन्द्रैरपि सुरासुरैः । तादृशं दर्शनं दृष्ट्वा मया चोदीरितं तव ३० इदं तु सुमहच्चित्रं शरैः पश्यस्व मैथिलि । विसंज्ञौ पतितावेतौ नैव लक्ष्मीर्विमुञ्चति ३१ प्रायेण गतसत्त्वानां पुरुषाणां गतायुषाम् । दृश्यमानेषु वक्त्रेषु परं भवति वैकृतम् ३२ त्यज शोकं च दुःखं च मोहं च जनकात्मजे । रामलक्ष्मणयोरर्थे नाद्य शक्यमजीवितुम् ३३ श्रुत्वा तु वचनं

---

पुष्पकविमान आहे. तेव्हां हे रामलक्ष्मण जर मृत झाले असते तर ह्या दिव्य विमानानें तुला धारण केलें नसतें २५. मुख्य वीर वध पावले असतां, जिच्यावरील सुकाणूवाला वध पावला आहे अशी नौका ज्याप्रमाणें उदकामध्यें इकडे तिकडे भ्रमण करीत रहाते त्याप्रमाणें संग्रामामध्यें सेना उत्साहशून्य आणि उद्योगरहित होऊन इकडे तिकडे भटकत असते २६; परंतु, हे बिचाऱ्ये सीते, ही सेना उद्विग्न न होतां निर्भयपणानें, मी आनंदानें तुला ( जिवंत म्हणून ) निवेदन केलेल्या, ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांचें रक्षण करीत आहे २७. ह्यास्तव, तूं परिणामीं सुखावह अशा ह्या माझ्या अनुमानावरून रामलक्ष्मण वध पावले नाहींत असें समज आणि अगदीं बिनधोक रहा; मी तुला हें प्रेमानें सांगत आहें २८. हे मैथिलि, आजपर्यंत मीं कधीं अनृत भाषण केलें नाहीं व पुढें करणारही नाहीं. पातिव्रत्यामुळें आणि सुशीलपणामुळें तूं माझ्या मनामध्यें भरली आहेस ( ह्यास्तव, मी जें सांगेन तें तुला खरेंच सांगेन ) २९. तशा प्रकारची सैनिकांची मुद्रा अवलोकन करून मीं तुला ह्यांचें जिवंत असणें निवेदन केलें आहे तें खरें आहे. फार कशाला, इंद्रासहवर्तमान देवदैत्यांच्या हातूनही संग्रामामध्यें ह्यांचा पराजय होणें शक्य नाहीं ३०. हे मैथिलि, हा फारच मोठा चमत्कार काय आहे तो पहा. बाणांच्या योगानें हे जरी मूर्च्छित होऊन पडले आहेत तरी ह्यांची कांति नाहींशी झालेली नाहीं ३१. आयुष्य संपून गतप्राण झालेल्या पुरुषांच्या मुखांकडे पाहूं गेलें असतां तीं फारच विकारयुक्त दिसतात ३२. ह्यास्तव, हे जनककन्ये, रामलक्ष्मणांकरितां तूं शोक, दुःख व मोह ह्यांचें अवलंबन करूं नको. सांप्रत ते जिवंत नसणें शक्यच नाहीं " ३३. हें

तस्याः सीता सुरसुतोपमा । कृताञ्जलिरुवाचेमामेवमस्त्विति मैथिली ३४ विमानं पुष्पकं तत्तु संनिवर्त्य मनोजवम् । दीना त्रिजटया सीता लङ्कामेव प्रवेशिता ३५ ततस्त्रिजटया सार्धं पुष्पकादवरुह्य सा । अशोकवनिकामेव राक्षसीभिः प्रवेशिता ३६ प्रविश्य सीता बहुवृक्षखण्डां तां राक्षसेन्द्रस्य विहारभूमिम् । संप्रेक्ष्य संचिन्त्य च राजपुत्रौ परं विषादं समुपाजगाम ३७ [१८०३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टचत्वारिंशः सर्गः ॥ ४८ ॥

घोरेण शरबन्धेन बद्धौ दशरथात्मजौ । निःश्वसन्तौ यथा नागौ शयानौ रुधिरोक्षितौ १ सर्वे ते वानरश्रेष्ठाः ससुग्रीवमहाबलाः । परिवार्य महात्मानौ तस्थुः शोकपरिप्लुताः २ एतस्मिन्नन्तरे रामः प्रत्यबुध्यत वीर्यवान् । स्थिरत्वात्सत्त्वयोगाच्च शरैः संदानितोऽपि सन् ३ ततो दृष्ट्वा सरुधिरं निषण्णं गाढमर्पितम् । भ्रातरं दीनवदनं पर्यदेवयदातुरः ४ किं नु मे सीतया कार्यं लब्धया जीवितेन वा । शयानं योऽद्य पश्यामि

---

तिचें भाषण श्रवण केल्यावर देवकन्येप्रमाणें असलेली मिथिलराजकन्या सीता "तुझ्या ह्मणण्याप्रमाणें होवो" असें हात जोडून तिला ह्मणाली ३४. नंतर आंत बसणाऱ्यांच्या इच्छेप्रमाणें वेग धारण करणारें तें पुष्पकविमान परत फिरवून त्रिजटा त्या दीन सीतेला लंकेमध्येंच घेऊन गेली ३५. तदनंतर त्रिजटेसहवर्तमान सीता पुष्पकविमानांतून खालीं उतरली असतां राक्षसी तिला अशोकवनामध्यंच घेऊन गेल्या ३६; आणि अनेक वृक्षसमुदायांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसाधिपति रावणाच्या क्रीडास्थानामध्यें प्रविष्ट झाल्यावर तें स्थान दृष्टीं पडलें असतां राजकुमार रामलक्ष्मणांचें स्मरण होऊन तिला अतिशयच विषाद वाटला ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४८॥

रक्तानें भरलेले ते दशरथपुत्र रामलक्ष्मण बाणरूप नागपाशानें बद्ध झाल्यामुळें सर्पाप्रमाणें दीर्घश्वास टाकीत टाकीत भूमीवर पडले असतां १ सुग्रीवासहवर्तमान ते सर्वही महाबलाढ्य वानरश्रेष्ठ शोकग्रस्त झाले आणि त्या महात्म्यांच्या सभोंवतीं उभे राहिले २. इतक्यामध्यें वीर्यवान् राम बाणांनीं जरी अगदीं जखडून गेला होता तरी स्थैर्यामुळें आणि धैर्यामुळें सावध झाला ३; आणि आपला भ्राता लक्ष्मण बाणांनीं अतिशयच जखडून गेला असल्यामुळें भूमीवर पडला आहे; त्याची मुद्रा दीन झाली आहे व त्याचें शरीर रक्तानें भरलें आहे असें दृष्टीं पडतांक्षणीं शोकाकुल होऊन तो विलाप करूं लागला ४. ( तो ह्मणाला ) "युद्धामध्यें पराभव पावून पडलेला भ्राता

भ्रातरं युधि निर्जितम् ५ शक्या सीतासमा नारी मर्त्यलोके विचिन्वता । न लक्ष्मणसमो भ्राता सचिवः सांपरायिकः ६ परित्यक्ष्याम्यहं प्राणान्वानराणां तु पश्यताम् । यदि पञ्चत्वमापन्नः सुमित्रानन्दवर्धनः ७ किं नु वक्ष्यामि कौसल्यां मातरं किं नु कैकयीम् । कथमम्बां सुमित्रां च पुत्रदर्शनलालसाम् ८ विवत्सां वेपमानां च वेपन्तीं कुररीमिव । कथमाश्वासयिष्यामि यदि यास्यामि तं विना ९ कथं वक्ष्यामि शत्रुघ्नं भरतं च यशस्विनम् । मया सह वनं यातो विना तेनाहमागतः १० उपालम्भं न शक्ष्यामि सोढुमम्बासुमित्रया । इहैव देहं त्यक्ष्यामि न हि जीवितुमुत्सहे ११ धिङ्मां दुष्कृतकर्माणमनार्यं मत्कृते ह्यसौ । लक्ष्मणः पातितः शेते शरतल्पे गतासुवत् १२ त्वं नित्यं सुविषण्णं मामाश्वासयसि लक्ष्मण । गतासुर्नाद्य शक्तोसि मामार्तमभिभाषितुम् १३ येनाद्य बहवो युद्धे निहता राक्षसाः क्षितौ । तस्यामेवाद्य शूरस्त्वं शेषे विनिहतः

---

जर आज माझ्या दृष्टीं पडत आहे तर सीता प्राप्त झाल्यानें मला काय उपयोग होणार आहे आणि जीविताशीं तरी आतां मला काय करावयाचें आहे ! ५. अहो, शोधूंच लागलें असतां ह्या मर्त्यलोकामध्यें सीतेसारिखी स्त्री मिळणें शक्य आहे; परंतु, लक्ष्मणासारिखा भ्राता युद्धामध्यें निपुण आणि मंत्री मात्र मिळणें शक्य नाहीं ६. ह्यास्तव, सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा लक्ष्मण जर मृत्यु पावला आहे तर वानरांसमक्षच मी प्राणत्याग करीन ७. कारण, माता कौसल्या, कैकयी आणि पुत्राच्या भेटीकरितां उत्सुक झालेली माता सुमित्रा ह्यांना मी काय बरें सांगूं ? ८. अहो, त्या लक्ष्मणावांचून मी जर परत गेलों तर वत्सरहित कुररीप्रमाणें थरथर कांपूं लागलेल्या त्या माता सुमित्रेचें मी कसें बरें सांत्वन करूं ? ९ आणि "माझ्यासहवर्तमान लक्ष्मण वनामध्यें गेला परंतु, मी मात्र त्यावांचून येथें आलों" असें यशस्वी भरताला व शत्रुघ्नाला मी सांगूं तरी कसें ! १०. छेः ! छेः ! माता सुमित्रेनें दूषण दिलें असतां तें मला सहनच होणार नाहीं. ह्यास्तव, मी येथेंच देहत्याग करीन; आतां मला जगण्याची इच्छा नाहीं ११. ज्याअर्थी शत्रूनें पाडिलेला लक्ष्मण माझ्याकरितां गतप्राण झाल्याप्रमाणें शरशय्येवर पडला आहे त्याअर्थी दुष्कर्म करणाऱ्या मज दुष्टाला धिक्कार असो १२. हे लक्ष्मणा, मी अतिशय जरी खिन्न झालों तरी नेहमीं तूं मला धीर देत असतोस; परंतु, आज गतप्राण झाल्यामुळें मज दुःखिताशीं भाषण करण्यासही समर्थ नाहींस ! १३. युद्धामध्यें तूं आज ज्या पृथ्वीवर असंख्य राक्षस मारिलेस त्याच पृथ्वीवर बाणांच्या योगानें वध पावून तूं शूर आजच

शरैः १४ शयानः शरतल्पेस्मिन्सशोणितपरिप्लुतः । शरभूतस्ततो भासि भास्करोस्तमिव व्रजन् १५ बाणाभिहतमर्मत्वान्न शक्नोषीह भाषितुम् । रुजा चाब्रुवतो यस्य दृष्टिरागेण सूच्यते १६ यथैव मां वनं यान्तमनुयातो महाद्युतिः । अहमप्यनुयास्यामि तथैवैनं यमक्षयम् १७ इष्टबन्धुजनो नित्यं मां च नित्यमनुव्रतः । इमामद्य गतोवस्थां ममानार्यस्य दुर्नयैः १८ सुरुष्टेनापि वीरेण लक्ष्मणेन न संस्मरे । परुषं विप्रियं चापि श्रावितं तु कदाचन १९ विससर्जैकवेगेन पञ्च बाणशतानि यः । इष्वस्त्रेष्वधिकस्तस्मात्कार्तवीर्याच्च लक्ष्मणः २० अस्त्रैरस्त्राणि यो हन्याच्छक्रस्यापि महात्मनः । सोयमुर्व्यां हतः शेते महार्हशयनोचितः २१ तच्च मिथ्या प्रलप्तं मां प्रधक्ष्यति न संशयः । यन्मया न कृतो राजा राक्षसानां विभीषणः २२ अस्मिन्मुहूर्ते सुग्रीव प्रतियातुमितोर्हसि । सत्त्वहीनं मया राजन्रावणोभिभविष्यति २३ अङ्गदं तु पुरस्कृत्य ससैन्यं

---

शयन करीत आहेस १४. शरशय्येवर तूं शयन करीत असून रक्ताचे स्राव तुझ्या शरीरांतून चालले आहेत आणि तूं बाणांनीं अगदीं खेंचून गेला आहेस. ह्यामुळें अस्ताचलाला जाणाऱ्या सूर्याप्रमाणें तूं भासत आहेस १५. मर्मस्थानीं बाणांचा वेध झाल्यामुळें येथें माझ्याशीं भाषण करण्यास तूं समर्थ नाहींस; परंतु, तूं जरी भाषण करीत नाहींस तरी तुझ्या दृष्टीवरून व मुखचर्येवरून तुला पीडा होत असल्याचें दिसत आहे १६. असो. ज्याप्रमाणें मी वनांत निघालों असतां हा महातेजस्वी भ्राता माझ्या मागोमाग आला त्याचप्रमाणें मीही आतां ह्याच्या मागोमाग यमगृहीं जाईन १७. अरेरे ! बंधुजन ज्याला नेहमीं प्रिय असत आणि जो नेहमीं माझ्या मनाप्रमाणें वागत असे त्या लक्ष्मणाची आज मज दुष्टाच्या अपराधांमुळें अशी अवस्था झाली ! १८. अहो ! लक्ष्मण अतिशय क्रुद्ध जरी झालेला असला तरी त्या वीरानें कठोर अथवा अप्रिय भाषण कधींही मला ऐकविल्याचें स्मरत नाहीं १९. ( सहस्र बाहूंनीं युक्त असलेला ) जो कार्तवीर्य अर्जुन एकदम पांचशें बाण सोडीत असे त्या कार्तवीर्यापेक्षांही बाणप्रयोगांमध्यें लक्ष्मण अधिक होता २०. महात्म्या इंद्राचीं अस्त्रेंही जो अस्त्रांच्या योगानें हाणून पाडीत असे तो हा मोठ्या मोठ्या मूल्यवान् मंचकावरच शयन करण्याची संवय असलेला लक्ष्मण आज वध पावून भूमीवर शयन करीत आहे २१. ज्याअर्थीं बिभीषणाला मीं राक्षसांचें राज्य दिलें नाहीं त्याअर्थीं तें माझें मिथ्या ठरलेलें बरळणें मला आतां निःसंशय दग्ध करून टाकील २२. हे सुग्रीवा, आतांच्या आतांच तूं आपला परत जा कसा ! नाहींतर,

सपरिच्छदम् । सागरं तर सुग्रीव नीलेन च नलेन च २४ कृतं हि सुमहत्कर्म यदन्यैर्दुष्करं रणे । ऋक्षराजेन तुष्यामि गोलाङ्गुलाधिपेन च २५ अङ्गदेन कृतं कर्म मैन्देन द्विविदेन च । युद्धं केसरिणा सङ्ख्ये घोरं संपातिना कृतम् २६ गवयेन गवाक्षेण शरभेण गजेन च । अन्यैश्च हरिभिर्युद्धं दुर्धरं त्यक्तजीवितैः ॥ न चातिक्रमितुं शक्यं दैवं सुग्रीव मानुषैः २७ यत्तु शक्यं वयस्येन सुहृदा वा परं मम । कृतं सुग्रीव तत्सर्वं भवता धर्मभीरुणा २८ मित्रकार्यं कृतमिदं भवद्भिर्वानरर्षभाः । अनुज्ञाता मया सर्वे यथेष्टं गन्तुमर्हथ २९ शुश्रुवुस्तस्य ये सर्वे वानराः परिदेवितम् । वर्तयांचक्रिरेऽश्रूणि नेत्रैः कृष्णेतरेक्षणाः ३० ततः सर्वाण्यनीकानि स्थापयित्वा बिभीषणः । आजगाम गदापाणिस्त्वरितं यत्र राघवः ३१ तं दृष्ट्वा त्वरितं यान्तं नीलाञ्जनचयोपमम् । वानरा दुद्रुवुः सर्वे मन्यमानास्तु रावणिम् ३२ [१८३५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकोनपञ्चाशः सर्गः ॥ ४९ ॥

---

हे राजा, माझ्यासहवर्तमान धैर्यहीन झालेल्या तुझ्यावर रावण हल्ला करील २३. ह्यास्तव, हे सुग्रीवा, सैन्य आणि सामानसुमान ह्यांसहवर्तमान अंगदाला पुढें करून नील व नल ह्यांच्या बरोबर तूं समुद्र तरून जा २४. ऋक्षराजानें आणि गोलांगूलाधिपतीनें इतरांना दुष्कर असा फारच मोठा पराक्रम संग्रामामध्यें केला २५ अंगद, मैंद व द्विविद ह्यांनींही पराक्रम गाजविला; केसरि आणि संपाति ह्यांनीं संग्रामामध्यें घोर युद्ध केलें २६ आणि गवय, गवाक्ष, शरभ, गज व इतरही वानर ह्यांनींही प्राणांची पर्वा न करितां दुर्धर युद्ध केलें; परंतु, हे सुग्रीवा, मर्त्यजनांच्या हातून दैवाचें अतिक्रमण होणें शक्य नाहीं २७. हे सुग्रीवा, सखा अथवा सुहृद ह्या नात्यानें जें ह्मणून कांहीं करणें शक्य आहे तें धर्माची भीति बाळगणाऱ्या तू माझ्याकरितां पराकाष्ठा करून केलें आहेस २८. हे वानरश्रेष्ठहो, मित्राचें जें कर्तव्य तें तुह्मीं केलें आहे. मी तुह्मां सर्वांना आतां जाण्याची अनुज्ञा देतों. ह्यास्तव, तुह्मी इच्छेस येईल तिकडे जा" २९. ह्याप्रमाणें रामाचा विलाप ज्यांनीं ऐकिला त्या सर्वही पिंगटवर्ण नेत्रांनीं युक्त असलेल्या वानरांनीं नेत्रांतून अश्रु ढाळिले ३०. तों इतक्यांत सर्व सैन्यें नीट उभीं करून बिभीषण हातामध्यें गदा घेऊन जिकडे राम होता तिकडे सत्वर आला ३१; परंतु, कज्जलपर्वततुल्य असलेला तो बिभीषण सत्वर येत आहे असें अवलोकन करितांक्षणीं तो रावणपुत्र इंद्रजित् आहे असें समजून सर्वही वानर पळत सुटले ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीम-

अथोवाच महातेजा हरिराजो महाबलः। किमियं व्यथिता सेना मूढ-
वातेव नौर्जले १ सुग्रीवस्य वचः श्रुत्वा वालिपुत्रोऽङ्गदोऽब्रवीत्। न त्वं
पश्यसि रामं च लक्ष्मणं च महारथम् २ शरजालाचितौ वीरावुभौ
दशरथात्मजौ। शरतल्पे महात्मानौ शयानौ रुधिरोक्षितौ ३ अथाब्रवी-
द्वानरेन्द्रः सुग्रीवः पुत्रमङ्गदम्। नानिमित्तमिदं मन्ये भवितव्यं भयेन तु ४
विषण्णवदना ह्येते त्यक्तप्रहरणा दिशः। पलायन्तेऽत्र हरयस्त्रासादुत्फुल्ल-
लोचनाः ५ अन्योन्यस्य न लज्जन्ते न निरीक्षन्ति पृष्ठतः। विप्रकर्षन्ति
चान्योन्यं पतितं लङ्घयन्ति च ६ एतस्मिन्नन्तरे वीरो गदापाणिर्बिभी-
षणः। सुग्रीवं वर्धयामास राघवं च जयाशिषा ७ बिभीषणं च सुग्रीवो
दृष्ट्वा वानरभीषणम्। ऋक्षराजं महात्मानं समीपस्थमुवाच ह ८ बिभी-
षणोऽयं संप्राप्तो यं दृष्ट्वा वानरर्षभाः। द्रवन्त्यागतसंत्रासा रावणात्मजश-
ङ्कया ९ शीघ्रमेतान्सुसंत्रस्तान्बहुधा विप्रधावितान्। पर्यवस्थापयाख्याहि

---

द्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकुणपन्नासावा सर्ग समाप्त झाला॥४९॥

तदनंतर महाबलाढ्य व महातेजस्वी वानरराज सुग्रीव ह्मणाला "भ्रम
पाडणाऱ्या वावटळीमध्यें सांपडलेल्या उदकांतील नौकेप्रमाणें ही सेना घाबरी होऊन
गेली आहे हें काय ?" १. हें सुग्रीवाचें भाषण श्रवण करून वालिपुत्र
अंगद त्याला ह्मणाला "महारथि लक्ष्मण व राम हे उभयतां वीर व महात्मे
दशरथपुत्र बाणसमुदायांनीं व्याप्त होऊन व रक्तानें भरून जाऊन आपल्यासमोरच
शरशय्येवर पडले आहेतना ? (हेंच सेनेच्या भीतीचें कारण होय)" २, ३.
ह्यानंतर वानरराज सुग्रीव पुत्रतुल्य असलेल्या अंगदाला ह्मणाला "तूं सांगत आहेस
ह्यावांचून सैन्याच्या ह्या पलायनाचें दुसरें कांहीं निमित्त नाहीं असें मला वाटत नाहीं;
कांहीं तरी (दुसरें) भय उपस्थित झालें असलें पाहिजे. ४. कारण, आयुधें टाकून
देऊन, दीनवदन होऊन आणि भीतीनें नेत्र चंचल करून हे वानर येथें पळत सुटले
आहेत ५. एकमेकांची लाज हे धरीत नाहींत; मागें पहात देखील नाहींत; पळूं न
देणाऱ्यांना ओढून नेत आहेत आणि खालीं पडलेल्यांनाही ओलांडून जात आहेत" ६.
इतक्यांत वीर बिभीषण हातामध्यें गदा घेऊन तेथें आला आणि सुग्रीवाला व राघ-
वाला त्यानें जयाविषयीं आशीर्वाद दिला ७. तेव्हां वानरांना भयप्रद झालेल्या बिभी-
षणाला अवलोकन केल्यावर समीपच असलेल्या महात्म्या ऋक्षराजाला सुग्रीव
ह्मणाला ८ "ज्याला पाहिल्यामुळें रावणपुत्र इंद्रजित् आला असें समजून भयभीत
झालेले वानरश्रेष्ठ पळत आहेत तो हा बिभीषण येथें प्राप्त झाला आहे ९. ह्यास्तव,

बिभीषणमुपस्थितम् १० सुग्रीवेणैवमुक्तस्तु जाम्बवानृक्षपार्थिवः । वानरान्सान्त्वयामास संनिवर्त्य प्रधावतः ११ ते निवृत्ताः पुनः सर्वे वानरास्त्यक्तसाध्वसाः । ऋक्षराजवचः श्रुत्वा तं च दृष्ट्वा बिभीषणम् १२ बिभीषणस्तु रामस्य दृष्ट्वा गात्रं शरैश्चितम् । लक्ष्मणस्य तु धर्मात्मा बभूव व्यथितस्तदा १३ जलक्लिन्नेन हस्तेन तयोर्नेत्रे विमृज्य च । शोकसंपीडितमना रुरोद विललाप च १४ इमौ तौ सत्त्वसंपन्नौ विक्रान्तौ प्रियसंयुगौ । इमामवस्थां गमितौ राक्षसैः कूटयोधिभिः १५ भ्रातृपुत्रेण चैतेन दुष्पुत्रेण दुरात्मना । राक्षस्या जिह्मया बुद्ध्या वञ्चितावृजुविक्रमौ १६ शरैरिमावलं विद्धौ रुधिरेण समुक्षितौ । वसुधायामिमौ सुप्तौ दृश्येते शल्यकाविव १७ ययोर्वीर्यमुपाश्रित्य प्रतिष्ठा काङ्क्षिता मया । ताविमौ देहनाशाय प्रसुप्तौ पुरुषर्षभौ १८ जीवन्नद्य विपन्नोऽस्मि नष्टराज्यमनोरथः । प्राप्तप्रतिज्ञश्च रिपुः सकामो रावणः कृतः १९ एवं

---

अतिशय भयभीत होऊन अनेक मार्गांनीं पळत सुटलेल्या ह्या वानरांना बिभीषण आला आहे असें सांगून तूं सत्वर उभे कर " १०. ह्याप्रमाणें सुग्रीवानें सांगितलें असतां ऋक्षराज जांबवानानें धांवत सुटलेल्या वानरांना परत फिरवून त्यांना धीर दिला ११. तेव्हां ऋक्षराज जांबवानाचें ह्मणणें ऐकून घेऊन त्या बिभीषणालाही अवलोकन केल्यावर ते सर्वही वानर भीति सोडून पुनरपि परत फिरले १२. इकडे रामाचें व लक्ष्मणाचें शरीर बाणांनीं खेंचून गेलें आहे असें पाहून धर्मात्म्या बिभीषणाला कळवळा आला १३; आणि हात ओला करून त्यांच्या नेत्रांवरून फिरविल्यानंतर अंतःकरण शोकाकुल झाल्यामुळें तो बिभीषण रडत रडत विलाप करूं लागला १४, ( तो ह्मणाला ) " धैर्यवान्, पराक्रमी आणि युद्धप्रिय अशा त्या ह्या रामलक्ष्मणांची कपटयुद्ध करणाऱ्या राक्षसांनीं अशी अवस्था करून टाकिली आहे १५. ह्या दुरात्म्या व दुष्पुत्र भ्रातृनंदनानें राक्षसी कुटिल बुद्धीचें अवलंबन करून सरळ रीतीनें चालणाऱ्या ह्या रामलक्ष्मणांना फसविलें आहे १६. रक्तानें भरून जाऊन बाणांनीं अतिशयच विद्ध झाल्यामुळें भूमीवर मूर्च्छित होऊन पडलेले हे रामलक्ष्मण साळईप्रमाणें दिसत आहेत १७. ज्यांच्या पराक्रमावर विश्वास ठेवून मीं राज्यारोहणाची आशा धरिली होती ते हे पुरुषश्रेष्ठ देहत्याग करण्याकरितां येथें मूर्च्छित होऊन पडले आहेत १८. राज्यप्राप्तिरूप मनोरथाचा भंग झाल्यामुळें मी आज जिवंत असूनही मेल्यासारिखा झालों आहें आणि माझा शत्रु जो रावण त्याचा मात्र मनोरथ परिपूर्ण होऊन प्रतिज्ञाही शेवटास गेली

विलपमानं तं परिष्वज्य विभीषणम् । सुग्रीवः सत्त्वसंपन्नो हरिराजोऽब्रवीदि-
दम् २० राज्यं प्राप्स्यसि धर्मज्ञ लङ्कायां नेह संशयः । रावणः सह पुत्रेण
स्वकामं नेह लप्स्यते २१ गरुडाधिष्ठितावेतावुभौ राघवलक्ष्मणौ ।
त्यक्त्वा मोहं वधिष्यंते सगणं रावणं रणे २२ तमेवं सान्त्वयित्वा तु
समाश्वास्य तु राक्षसम् । सुषेणं श्वशुरं पार्श्वे सुग्रीवस्तमुवाच ह २३
सह शूरैर्हरिगणैर्लब्धसंज्ञावरिन्दमौ । गच्छ त्वं भ्रातरौ गृह्य किष्किन्धां
रामलक्ष्मणौ २४ अहं तु रावणं हत्वा सपुत्रं सहबान्धवम् । मैथिलीं-
मानयिष्यामि शक्रो नष्टामिव श्रियम् २५ श्रुत्वैतद्वानरेन्द्रस्य सुषेणो
वाक्यमब्रवीत् । देवासुरं महायुद्धमनुभूतं पुरातनम् २६ तदा स्म दानवा
देवाञ्शरसंस्पर्शकोविदान् । निजघ्नुः शस्त्रविदुषश्छादयन्तो मुहुर्मुहुः २७
तानार्तान्नष्टसंज्ञांश्च गतासूंश्च बृहस्पतिः । विद्याभिर्मन्त्रयुक्ताभिरोषधी-
भिश्चिकित्सति २८ तान्यौषधान्यानयितुं क्षीरोदं यान्तु सागरम् । जवेन
वानराः शीघ्रं संपातिपनसादयः २९ हरयस्तु विजानन्ति पार्वती ते
महौषधी । संजीवकरणीं दिव्यां विशल्यां देवनिर्मिताम् ३० चन्द्रश्च

---

आहे १९. ह्याप्रमाणे विलाप करीत असलेल्या त्या बिभीषणाला कवटाळून धरून धैर्यसंपन्न असलेला वानरराज सुग्रीव ह्मणाला २० " हे धर्मवेत्त्या, लंकेमध्यें तुला राज्य प्राप्त होईल ह्याविषयीं संशय नाहीं व पुत्रासहवर्तमान रावणाचा मनोरथ ह्या ठिकाणीं परिपूर्ण होणार नाहीं २१. कारण, हे उभयतां रामलक्ष्मण शुद्धीवर येतील आणि गरुडावर आरूढ होऊन राक्षसगणांसहवर्तमान संग्रामामध्यें रावणाचा वध करितील " २२. ह्याप्रमाणें त्या राक्षसाचें सांत्वन करून त्याला धीर देऊन समीपच असलेल्या सुषेणनामक श्वशुराला सुग्रीव ह्मणाला २३ " शत्रूंचें दमन करणारे हे भ्राते रामलक्ष्मण सावध व्हावे ह्याकरितां शूर वानरगणांसहवर्तमान आपण ह्यांना घेऊन किष्किंधानगरामध्यें जावें २४. नष्ट झालेली स्वर्गलक्ष्मी परत आणणाऱ्या इंद्राप्रमाणें पुत्र आणि बांधव ह्यांसहवर्तमान रावणाचा वध करून मी सीतेला परत आणीन " २५. हें वानरराज सुग्रीवाचें भाषण श्रवण केल्यावर सुषेण ह्मणाला " देवदैत्यांचें प्रचंड पुरातन युद्ध मीं पाहिलें आहे २६. त्या युद्धामध्यें बाणांनीं वेध कसा करावा हें जाणणाऱ्या देवांना शस्त्रवेत्ते दानव वारंवार आपलें स्वरूप गुप्त करून मारीत असत २७; परंतु, व्याकुल, मूर्च्छित व गतप्राण झालेल्या त्या देवांना मांत्रिक विद्या आणि औषधि ह्यांच्या योगानें बृहस्पति उठवीत असे २८. ह्यास्तव, तीं औषधें आणण्याकरितां संपाति, पनस इत्यादि वानरांनीं वेगानें व सत्वर क्षीरसमुद्रावर जावें २९.

नाम द्रोणश्च क्षीरोदे सागरोत्तमे । अमृतं यत्र मथितं तत्र ते परमौषधी ३१ तौ तत्र विहितौ देवैः पर्वतौ तौ महोदधौ । अयं वायुसुतो राजन्हनूमांस्तत्र गच्छतु ३२ एतस्मिन्नन्तरे वायुर्मेघाश्चापि सविद्युतः । पर्यस्य सागरे तोयं कम्पयन्निव पर्वतान् ३३ महता पक्षवातेन सर्वद्वीपमहाद्रुमाः । निपेतुर्भग्नविटपाः सलिले लवणाम्भसि ३४ अभवन्पन्नगास्त्रस्ता भोगिनस्तत्रवासिनः । शीघ्रं सर्वाणि यादांसि जग्मुश्च लवणार्णवम् ३५ ततो मुहूर्ताद्गरुडं वैनतेयं महाबलम् । वानरा ददृशुः सर्वे ज्वलन्तमिव पावकम् ३६ तमागतमभिप्रेक्ष्य नागास्ते विप्रदुद्रुवुः । यैस्तु तौ पुरुषौ बद्धौ शरभूतैर्महाबलैः ३७ ततः सुपर्णः काकुत्स्थौ स्पृष्ट्वा प्रत्यभिनन्द्य च । विममर्श च पाणिभ्यां मुखे चन्द्रसमप्रभे ३८ वैनतेयेन संस्पृष्टास्तयोः संरुरुहुर्व्रणाः । सुवर्णे च तनू स्निग्धे तयोराशु बभूवतुः ३९ तेजो वीर्यं बलं चौज उत्साहश्च महागुणाः । प्रदर्शनं च बुद्धिश्च

---

देवांनीं निर्माण केलेली ती पर्वतावरील विशल्यासंज्ञक संजीवनी व दिव्य महावनस्पति वानर जाणीत आहेत ३०. ज्या ठिकाणीं अमृतमंथन झालें तेथें श्रेष्ठ क्षीरसागरामध्यें चंद्र व द्रोण असे पर्वत असून त्यांवर ती महावनस्पति आहे ३१. ते दोन पर्वत महासागरामध्यें देवांनीं निर्माण केलेले आहेत. तस्मात्, हे राजा, ह्या वायुपुत्र हनुमानानें तेथें जावें ३२. असें ह्यांचें बोलणें चाललें आहे तोंच वायु सुटून विद्युल्लतसहवर्तमान मेघ दृग्गोचर होऊं लागले. वायु समुद्रांतील उदक क्षुब्ध करून पर्वतांनाही जसें कांहीं कंपित करूं लागला ३३. प्रचंड पक्षवातानें द्वीपांतील सर्व मोठे मोठे वृक्ष फांद्या मोडून क्षारसमुद्राच्या उदकांत पडूं लागले ३४; त्या मलयपर्वतावर वास्तव्य करणारे मोठे मोठे भुजंग त्रस्त होऊन गेले आणि सर्व जलचर प्राणीही सत्वर त्या क्षीरसमुद्राच्या अगदीं अंतर्भागामध्यें जाऊन बसले ३५. तदनंतर एका मुहूर्तानें प्रज्वलित अग्नीप्रमाणें असलेला महाबलाढ्य विनतापुत्र गरुड सर्व वानरांनीं अवलोकन केला ३६. तदनंतर तो आलेला पहातांक्षणीं ज्या बाणरूप झालेल्या महाबलाढ्य नागांनीं ते वीर रामलक्ष्मण बद्ध करून टाकिले होते ते नाग चोहोंकडे पळून गेले ३७. नंतर गरुडानें ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांच्या अंगावर हात फिरवून त्यांचें अभिनंदन केलें आणि त्यांच्या चंद्रतुल्य मुखांनाही त्यानें हातांनीं स्पर्श केला ३८. ह्याप्रमाणें गरुडाचा स्पर्श होतांक्षणीं त्यांच्या शरीरावरील क्षतें भरून आलीं आणि तीं शरीरें तत्क्षणींच तुळतुळीत व उत्कृष्ट कांतियुक्त दिसूं लागलीं ३९; आणि त्यांचें तेज, वीर्य, बल, कांति व उत्साह हे मोठे गुण द्विगुणित झाले व

स्मृतिश्च द्विगुणा तयोः ४० तावुत्थाप्य महातेजा गरुडो वासवोपमौ ।
उभौ च सस्वजे हृष्टो रामश्चैनमुवाच ह ४१ भवत्प्रसादाद्व्यसनं रावणि-
प्रभवं महत् । उपायेन व्यतिक्रान्तौ शीघ्रं च बलिनौ कृतौ ४२ यथा
तातं दशरथं यथाजं च पितामहम् । तथा भवन्तमासाद्य हृदयं मे प्रसी-
दति ४३ को भवान्रूपसंपन्नो दिव्यस्रगनुलेपनः । वसानो विरजे वस्त्रे
दिव्याभरणभूषितः ४४ तमुवाच महातेजा वैनतेयो महाबलः । पतत्रि-
राजः प्रीतात्मा हर्षपर्याकुलेक्षणम् ४५ अहं सखा ते काकुत्स्थ प्रियः
प्राणो बहिश्चरः । गरुत्मानिह संप्राप्तो युवयोः साह्यकारणात् ४६
असुरा वा महावीर्या वानरा वा महाबलाः । सुराश्चापि सगन्धर्वाः पुर-
स्कृत्य शतक्रतुम् ४७ नेमं मोक्षयितुं शक्ताः शरबन्धं सुदारुणम् । माया-
बलादिन्द्रजिता निर्मितं क्रूरकर्मणा ४८ एते नागाः काद्रवेयास्तीक्ष्णदंष्ट्रा
विषोल्बणाः । रक्षोमायाप्रभावेण शरभूतास्त्वदाश्रयाः ४९ सभाग्यश्चासि
धर्मज्ञ राम सत्यपराक्रम । लक्ष्मणेन सह भ्रात्रा समरे रिपुघातिना ५०

---

त्यांची दृष्टि, बुद्धि आणि स्मृति ह्यांचेंही सामर्थ्य दुप्पट झालें ४०. असो. त्या इंद्र-तुल्य रामलक्ष्मणांना उठविल्यानंतर महातेजस्वी गरुडानें त्या उभतांनाही कवटाळिलें. तेव्हां राम आनंदित होऊन त्याला ह्मणाला ४१ " इंद्रजितापासून उद्भवलेल्या ह्या घोर संकटांतून तुझ्या प्रसादामुळें आह्मी उपायानें पार पडलों आणि सत्वर बलाढ्य झालों ४२. ह्यास्तव, पिता दशरथ आणि पितामह अज ह्यांची गांठ पडल्यानें जसें अंतःकरण प्रसन्न व्हावें तसें माझें अंतःकरण तुझी गांठ पडल्यामुळें प्रसन्न झालें आहे ४३. तस्मात्, दिव्य अलंकारांनीं भूषित, दिव्य पुष्पं व चंदन धारण केलेला, निर्मल वस्त्रें परिधान केलेला आणि रूपसंपन्न असा तूं कोण ? " ४४. असें रामानें विचारिल्यानंतर तो महातेजस्वी व महाबलाढ्य विनतापुत्र पक्षिराज गरुड मनापासून प्रसन्न झाला; आनंदाश्रूंनीं त्याचे नेत्र भरून आले आणि तो रामाला ह्मणाला ४५. " हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, मी तुझा सखा आणि शरीराबाहेर संचार करणारा प्राण गरुड तुह्मांला साहाय्य करण्याकरितां येथें आलों आहें ४६. मायाबळाचें अवलंबन करून क्रूरकर्मी इंद्रजितानें निर्माण केलेला हा अतिभयंकर बाणरूप नागपाश सोडण्यास महावीर्यवान् असुर, महाबलाढ्य वानर आणि इंद्र व गंधर्व ह्यांसहवर्तमान देव ह्यांपैकीं कोणीही समर्थ नाहींत ४७, ४८. राक्षसांच्या मायेच्या प्रभावानें बाणरूप झालेले हे तीक्ष्ण दृष्ट्रा आणि प्रचंड विष ह्यांनीं युक्त असलेले हे कद्रूवंशज नागच तुमच्या आश्रयाला होते ४९. हे सत्यपराक्रमी धर्मवेत्त्या

इमं श्रुत्वा तु वृत्तान्तस्त्वरमाणोहमागतः । सहसैवावयोः स्नेहात्सखित्वमनुपालयन् ५१ मोक्षितौ च महाघोरादस्मात्सायकबन्धनात् । अप्रमादश्च कर्तव्यो युवाभ्यां नित्यमेव हि ५२ प्रकृत्या राक्षसाः सर्वे सङ्ग्रामे कूटयोधिनः। शूराणां शुद्धभावानां भवतामार्जवं बलम् ५३ तन्न विश्वसनीयं वो राक्षसानां रणाजिरे । एतेनैवोपमानेन नित्यं जिह्मा हि राक्षसाः ५४ एवमुक्त्वा तदा रामं सुपर्णः स महाबलः । परिष्वज्य च सुस्निग्धमाप्रष्टुमुपचक्रमे ५५ सखे राघव धर्मज्ञ रिपूणामपि वत्सल । अभ्यनुज्ञातुमिच्छामि गमिष्यामि यथासुखम् ५६ न च कौतूहलं कार्यं सखित्वं प्रति राघव । कृतकर्मा रणे वीर सखित्वं प्रतिवेत्स्यसि ५७ बालवृद्धावशेषां तु लङ्कां कृत्वा शरोर्मिभिः । रावणं तु रिपुं हत्वा सीतां त्वमुपलप्स्यसे ५८ इत्येवमुक्त्वा वचनं सुपर्णः शीघ्रविक्रमः । रामं च नीरुजं कृत्वा मध्ये तेषां वनौकसाम् ५९ प्रदक्षिणं ततः कृत्वा परिष्वज्य च वीर्यवान् । जगामाकाशमाविश्य सुपर्णः पवनो यथा ६० नीरुजौ राघवौ दृष्ट्वा ततो

---

रामा, संग्रामामध्ये शत्रूचा वध करणाऱ्या भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान तूं भाग्यवान् आहेस ५०. ( देवतांच्या मुखांतून ) हा ( नागबंधरूप ) वृत्तांत श्रवण करितांक्षणीं आपणां उभयतांमध्यें असलेलें सख्य कायम राखण्याकरितां मी प्रेमामुळें एकदम त्वरा करून येथें आलों आहें ५१; आणि ह्या महाघोर शरबंधापासून मीं तुह्मांला सोडविलें आहे. आतां तुह्मी सर्वदा सावध असत जा ५२. सर्वही राक्षस संग्रामामध्यें स्वभावतःच कपटयुद्ध करणार आहेत आणि शुद्धभावानें वागणाऱ्या तुह्मां शूरांचें निष्कपटपणा हेंच सामर्थ्य आहे ५३; परंतु, संग्रामामध्यें राक्षसांशीं युद्ध चाललें असतांना तुह्मी ह्या निष्कपटपणावर विश्वास ठेवून रहाणें योग्य नाहीं. ह्या इंद्रजितप्रमाणेंच राक्षस नेहमीं कपटानें वागणार आहेत" ५४. ह्याप्रमाणें सांगून व कडकडून भेटून तो महाबलाढ्य गरुड अत्यंत प्रेमपूर्वक रामाला जाण्याची अनुज्ञा विचारूं लागला ५५. ( तो ह्मणाला )" शत्रूवरही दया करणाऱ्या मित्रा धर्मवेत्त्या राघवा, मला जाण्याची अनुज्ञा दे; ह्मणजे मी खुशाल चालता होईन ५६. हे राघवा, आपलें मित्रत्व कसें ह्याविषयीं तूं मनामध्यें उत्कंठा धरून राहूं नको. हे वीरा, संग्रामामध्यें पराक्रम गाजविल्यानंतर तुला मित्रत्व समजून येईल ५७. बाणरूप तरंगांनीं तूं ह्या लंकानगरीमध्यें बाल व वृद्धच शिलक ठेवशील आणि शत्रु रावणाचा वध केल्यावर तूं सीता प्राप्त करून घेशील" ५८. ह्याप्रमाणें त्या वानरांमध्यें रामाची व्यथा नाहींशी करून असें भाषण केल्यानंतर त्या शीघ्रगति गरुडानें ५९. त्याला प्रदक्षिणा केली आणि

वानरयूथपाः । सिंहनादं तदा नेदुर्लाङ्गूलं दुधुवुश्च ते ६१ ततो भेरीः समाजघ्नुर्मृदङ्गांश्चाप्यवादयन् । दध्मुः शङ्खान्संप्रहृष्टाः क्ष्वेलन्त्यपि यथापुरम् ६२ अपरे स्फोट्य विक्रान्ता वानरा नगयोधिनः । द्रुमानुत्पाट्य विविधांस्तस्थुः शतसहस्रशः ६३ विसृजन्तो महानादांस्त्रासयन्तो निशाचरान् । लङ्काद्वाराण्युपाजग्मुर्युद्धकामाः प्लवङ्गमाः ६४ तेषां सुभीमस्तुमुलो निनादो बभूव शाखामृगयूथपानाम्। क्षये नि ाघस्य यथा घनानां नादः सुभीमो नदतां निशीथे ६५ [ १९०० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चाशः सर्गः ॥ ५० ॥

तेषां तु तुमुलं शब्दं वानराणां महौजसाम् । नर्दतां राक्षसैः सार्धं तदा शुश्राव रावणः १ स्निग्धगम्भीरनिर्घोषं श्रुत्वा तं निनदं भृशम् । सचिवानां ततस्तेषां मध्ये वचनमब्रवीत् २ यथासौ संप्रहृष्टानां वानराणामुपस्थितः । बहूनां सुमहान्नादो मेघानामिव गर्जताम् ३ सुव्यक्तं महती प्रीतिरेतेषां नात्र संशयः । तथा हि विपुलैर्नादैश्चुक्षुभे लवणार्णवः ४ तौ तु बद्धौ शरैस्तीक्ष्णैर्भ्रातरौ रामलक्ष्मणौ । अयं च सुमहान्नादः

---

आलिंगन दिल्यानंतर आकाशामध्यें उड्डाण करून तो वीर्यवान् गरुड वायूप्रमाणें निघून गेला ६०. असो. रामलक्ष्मण व्यथारहित झाल्यावर ते वानरसेनाधिपति सिंहनाद करूं लागले; पुच्छें हालवूं लागले ६१; नंतर कांहींजण दुंदुभि वाजवूं लागले; कांहीं मृदंग वाजवूं लागले; कांहीं शंख फुंकूं लागले आणि ह्याप्रमाणें ते सर्वही पूर्वीप्रमाणें क्रीडा करूं लागले ६२. तदनंतर वृक्षांनीं युद्ध करणारे दुसरे शेंकडों हजारों पराक्रमी वानर दंड थोपटून व नानाप्रकारचे वृक्ष उपटून सज्ज झाले ६३ आणि मोठ्या गर्जना करीत करीत व राक्षसांना भयभीत करीत करीत ते वानर युद्धाच्या इच्छेनें लंकेच्या द्वारांसमीप आले असतां ६४. ग्रीष्म ऋतु संपल्यानंतर मध्यरात्रीं गर्जना करणाऱ्या मेघांचा नाद ज्याप्रमाणें अति भयंकर होतो त्याप्रमाणें त्या वानराधिपतींचा अत्यंत भयंकर तुमुल ध्वनि होऊं लागला ६५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥ ५० ॥

गर्जना करूं लागलेल्या त्या महाबलाढ्य वानरांचा तुमुल ध्वनि राक्षसांसहवर्तमान रावणाच्या कानीं पडला १ आणि त्याचा तो आनंदयुक्त गंभीर ध्वनि वारंवार श्रवण केल्यानंतर त्या सचिवांमध्यें रावण म्हणाला २ "ज्याअर्थी आनंदित झालेल्या ह्या अनेक वानरांचा गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणें फारच मोठा नाद होऊं लागला आहे ३ त्याअर्थी ह्यांना कांहीं तरी मोठा आनंद झाल्याचें स्पष्ट होत आहे ह्यांत संशय नाहीं.

शङ्कां जनयतीव मे ५ एवं च वचनं चोक्त्वा मन्त्रिणो राक्षसेश्वरः । उवाच नैर्ऋतांस्तत्र समीपपरिवर्तिनः ६ ज्ञायतां तूर्णमेतेषां सर्वेषां च वनौकसाम् । शोककाले समुत्पन्नं हर्षकारणमुत्थितम् ७ तथोक्तास्ते सुसंभ्रान्ताः प्राकारमधिरुह्य च । ददृशुः पालितां सेनां सुग्रीवेण महात्मना ८ तौ च मुक्तौ सुघोरेण शरबन्धेन राघवौ । समुत्थितौ महाभागौ विषेदुः सर्वराक्षसाः ९ संत्रस्तहृदयाः सर्वे प्राकारादवरुह्य ते । विवर्णा राक्षसा घोरा राक्षसेन्द्रमुपस्थिताः १० तदप्रियं दीनमुखा रावणस्य च राक्षसाः । कृत्स्नं निवेदयामासुर्यथावद्वाक्यकोविदाः ११ यौ ताविन्द्रजिता युद्धे भ्रातरौ रामलक्ष्मणौ । निबद्धौ शरबन्धेन निष्प्रकम्पभुजौ कृतौ १२ विमुक्तौ शरबन्धेन दृश्येते तौ रणाजिरे । पाशानिव गजौ छित्त्वा गजेन्द्रसमविक्रमौ १३ तच्छ्रुत्वा वचनं तेषां राक्षसेन्द्रो महाबलः । चिन्ताशोकसमाक्रान्तो विवर्णवदनोऽभवत् १४

---

ह्या प्रचंड नादांच्या योगानें सागरही क्षुब्ध होऊन गेला आहे ४. अहो, ते भ्राते रामलक्ष्मण तीक्ष्ण बाणांनीं बद्ध झाले असतांही उपस्थित झालेला हा प्रचंड नाद माझ्या मनामध्यें शंका उत्पन्न करीत आहे " ५. ह्याप्रमाणें मंत्र्यांना सांगितल्यानंतर तो राक्षसाधिपति रावण तेथें जवळच असलेल्या त्या राक्षसांना ह्मणाला ६ " शोक करण्याचा समय प्राप्त झाला असतां ह्या सर्व वानरांना हर्ष होण्याचें काय कारण उपस्थित झालें आहे ह्याचा सत्वर शोध लावा " ७. ह्याप्रमाणें रावणाची आज्ञा झाली असतां त्या सर्वही राक्षसांची अतिशय लगबग उडून गेली; ते वानर चढून पाहूं लागले तों महात्मा सुग्रीव वानरसेनेचें रक्षण करीत आहे ८; व बाणरूप अत्यंत घोर नागपाशानें बद्ध झालेले महाभाग्यवान् रघुवंशज रामलक्ष्मण त्या पाशापासून मुक्त होऊन उभे राहिले आहेत. असें त्यांनीं अवलोकन केलें आणि तो प्रकार अवलोकन करितांक्षणीं सर्वही राक्षस खिन्न झाले ९ नंतर अंतःकरणामध्यें भीति उत्पन्न झालेले ते सर्वही घोर राक्षस निस्तेज होऊन कोटावरून खालीं उतरले आणि राक्षसाधिपति रावणाकडे परत आल्यावर १० संभाषण करण्यामध्यें निपुण असलेल्या त्या दीनवदन राक्षसांनीं तें सर्वही अप्रिय वृत्त रावणाला निवेदन केलें ११. ( ते ह्मणाले ) " इंद्रजितानें युद्धामध्यें ज्या भ्रात्या रामलक्ष्मणांना बाणपाशानें बद्ध करून त्यांचे भुजही अगदीं निश्चल करून टाकिले होते १२ ते उभयतां गजेंद्रतुल्य पराक्रमी रामलक्ष्मण पाश तोडून टाकिलेल्या गजांप्रमाणें संग्रामामध्यें बाणरूप नागपाशापासून मुक्त झालेले दिसत आहेत " १३. हें त्यांचें भाषण श्रवण केल्यावर

घोरैर्दत्तवरैर्बद्धौ शरैराशीविषोपमैः । अमोघैः सूर्यसंकाशैः प्रमथ्येन्द्र-
जिता युधि १५ तदस्त्रबन्धमासाद्य यदि मुक्तौ रिपू मम । संशयस्थमिदं
सर्वमनुपश्याम्यहं बलम् १६ निष्फलाः खलु संवृत्ताः शराः पावकते-
जसः । आदत्तं यैस्तु सङ्ग्रामे रिपूणां जीवितं मम १७ एवमुक्त्वा तु
संक्रुद्धो निःश्वसन्नुरगो यथा । अब्रवीद्रक्षसां मध्ये धूम्राक्षं नाम राक्ष-
सम् १८ बलेन महता युक्तो राक्षसैर्भीमविक्रमः । त्वं वधायाशु निर्याहि
रामस्य सह वानरैः १९ एवमुक्तस्तु धूम्राक्षो राक्षसेन्द्रेण धीमता ।
परिक्रम्य ततः शीघ्रं निर्जगाम नृपालयात् २० अभिनिष्क्रम्य तद्द्वारं
बलाध्यक्षमुवाच ह । त्वरयस्व बलं शीघ्रं किं चिरेण युयुत्सतः २१
धूम्राक्षवचनं श्रुत्वा बलाध्यक्षो बलानुगः । बलमुद्योजयामास रावण-
स्याज्ञया भृशम् २२ ते बद्धघण्टा बलिनो घोररूपा निशाचराः । विन-
र्दमानाः संहृष्टा धूम्राक्षं पर्यवारयन् २३ विविधायुधहस्ताश्च शूलमुद्गर-

महाबलाढ्य राक्षसाधिपति रावण चिंता व क्रोध ह्यांनीं व्याप्त झाला व त्याचें मुखही निस्तेज झालें १४. ( तो ह्मणाला ) " चिरकाल दुर्घट तपश्चर्या करून वर ह्मणून इंद्रजिताला प्राप्त झालेले जे सर्पांसारिखे तीक्ष्ण आणि सूर्यासारिखे उज्ज्वल घोर बाण त्यांच्या योगानें इंद्रजितानें युद्धामध्यें त्यांना जर्जर करून बांधिलें होतें १५; परंतु, तो अस्त्रबंध प्राप्त झाला असताही ज्याअर्थी माझे शत्रु त्यापासून सुटले त्याअर्थी आतां ह्या सर्वही सैन्याची मला धडगत दिसत नाहीं १६. अहो, ज्यांनीं आजपर्यंत संग्रामामध्यें माझ्या शत्रूंचें जीवित हरण केलें ते अग्नीसारिखे तेजस्वी बाणही खरोखर निष्फल झाले " १७. ह्याप्रमाणें बोलून अतिशय क्रुद्ध झालेला तो रावण भुजंगाप्रमाणें सुस्कारे टाकूं लागला आणि राक्षसांमध्यें धूम्राक्षनामक राक्षसाला ह्मणाला १८ " राक्षसांचें मोठें सैन्य बरोबर घेऊन भयंकर पराक्रम करणारा तूं वानरांसहवर्तमान रामाचा वध करण्याकरितां सत्वर येथून बाहेर पड " १९. ह्याप्रमाणें बुद्धिमान् राक्षसाधिपति रावणानें सांगितलें असतां धूम्राक्ष त्याला प्रदक्षिणा करून सत्वरच राजवाड्यांतून बाहेर निघाला २०; आणि राजवाड्याच्या द्वाराशीं आल्यावर सेनापतीला ह्मणाला " माझ्याबरोबर सैन्य सत्वर पाठीव. कारण, युद्ध करणाऱ्या पुरुषाला विलंब होणें व्यर्थ आहे " २१. हें धूम्राक्षाचें भाषण श्रवण केल्यावर सैन्याबरोबरच असलेल्या सेनापतीनें रावणाच्या आज्ञेप्रमाणें सत्वरच सैन्य सज्ज केलें असतां २२ घंटा बांधून तयार झालेले व घोर रूप धारण करणारे ते बलाढ्य राक्षस आनंदित होऊन गर्जना करीत करीत धूम्राक्षाच्या सभोंवतीं जुळले २३ आणि नानाप्रकारचीं आयुधें, शूल व मुद्गर हातामध्यें

पाणयः । गदाभिः पट्टिशैर्दण्डैरायसैर्मुसलैरपि २४ परिघैर्भिन्दिपालैश्च
भल्लैः पाशैः परश्वधैः । निर्ययू राक्षसा घोरा नर्दन्तो जलदा यथा २५
रथैः कवचिनस्त्वन्ये ध्वजैश्च समलंकृतैः । सुवर्णजालविहितैः खरैश्च
विविधाननैः २६ हयैः परमशीघ्रैश्च गजैश्चैव मदोत्कटैः । निर्ययुर्नैर्ऋत-
व्याघ्रा व्याघ्रा इव दुरासदाः २७ मृगसिंहमुखैर्युक्तं खरैः कनकभूषितैः ।
आरुरोह रथं दिव्यं धूम्राक्षः खरनिःस्वनः २८ स निर्यातो महावीर्यो
धूम्राक्षो राक्षसैर्वृतः । हसन्वै पश्चिमद्वाराद्धनूमान्यत्र तिष्ठति २९ रथप्र-
वरमास्थाय खरयुक्तं खरस्वनम् । प्रयान्तं तु महाघोरं राक्षसं भीमदर्श-
नम् ३० अन्तरिक्षगताः क्रूराः शकुनाः प्रत्यषेधयन् । रथशीर्षे महा-
भीमो गृध्रश्च निपपात ह ३१ ध्वजाग्रे ग्रथिताश्चैव निपेतुः कुणपाशनाः ।
रुधिरार्द्रो महाञ्श्वेतः कबन्धः पतितो भुवि ३२ विस्वरं चोत्सृजन्नादा-
न्धूम्राक्षस्य निपातितः । ववर्ष रुधिरं देवः संचचाल च मेदिनी ३३

घेऊन आणि गदा, पट्टे, लोहदंड, मुसळ २४, परिघ, भिंदिपाल, भल्ल, पाश व परशु हींहीं आयुधें बरोबर घेऊन ते घोर राक्षस मेघांप्रमाणें गर्जना करीत करीत बाहेर पडले २५. कांहीं राक्षस कवचें चढवून व रथांवर आरूढ होऊन निघाले; कांहीं अलंकार घातलेले ध्वज बरोबर घेऊन निघाले; कांहीं मोहरांच्या व पुतळ्यांच्या माळांनीं शृंगारिलेल्या आणि अनेक प्रकारच्या मुखांनीं युक्त असलेल्या गर्दभावर आरूढ होऊन निघाले २६. अत्यंत शीघ्र गमन करणाऱ्या अश्वांवर आरूढ होऊन कांहीं बाहेर पडले आणि व्याघ्राप्रमाणें अजिंक्य असलेले कांहीं राक्षसश्रेष्ठ मदमत्त गजांवर आरोहण करून बाहेर निघाले २७. गर्दभाप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे असा धूम्राक्ष सुवर्णालंकारांनीं भूषित केलेले आणि हरिणमुखांनीं व सिंहमुखांनीं युक्त असलेले गर्दभ ज्याला जोडिलेले आहेत अशा दिव्य रथावर आरूढ झाला २८. असा राक्षसांनीं परिवेष्टित झालेला तो बलवान् धूम्राक्ष हंसत हंसत पश्चिमद्वारांतून जिकडे हनुमान् उभा होता तिकडे बाहेर पडला २९. परंतु, गर्दभयुक्त श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन गर्दभासारिखी गर्जना करणारा व भयंकर मुद्रेनें युक्त असलेला तो महाघोर धूम्राक्ष बाहेर पडूं लागला असतां ३० अंतरिक्षामध्यें असलेल्या क्रूर पक्ष्यांनीं त्याचा निषेध केला. अतिभयंकर गृध्रपक्षी त्याच्या रथाचे अग्रभागीं येऊन उतरला ३१; पुष्पमालेप्रमाणें एकमेकांशीं संबद्ध झालेले मांसभक्षक गृध्र ध्वजाच्या अग्रभागीं येऊन बसले; रक्तानें भरलेला असा एक मोठा श्वेतवर्ण कबंध भूमीवर पडला ३२ आणि भयंकर स्वरानें गर्जना करीत करीत तो अगदीं धूम्राक्षाचे समीपच

प्रतिलोमं ववौ वायुर्निर्घातसमनिःस्वनः । तिमिरौघावृतास्तत्र दिशश्च न चकाशिरे ३४ स तूत्पातांस्ततो दृष्ट्वा राक्षसानां भयावहान् । प्रादुर्भूतान्सुघोरांश्च धूम्राक्षो व्यथितोऽभवत् ३५ मुमुहू राक्षसाः सर्वे धूम्राक्षस्य पुरःसराः ३६ ततः सुभीमो बहुभिर्निशाचरैर्वृतोऽभिनिष्क्रम्य रणोत्सुको बली । ददर्श तां राघवबाहुपालितां महौघकल्पां बहुवानरीं चमूम् ३७ [१९३७]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकपञ्चाशः सर्गः ॥ ५१ ॥

धूम्राक्षं प्रेक्ष्य निर्यान्तं राक्षसं भीमविक्रमम् । विनेदुर्वानराः सर्वे प्रहृष्टा युद्धकाङ्क्षिणः १ तेषां सुतुमुलं युद्धं संजज्ञे कपिरक्षसाम् । अन्योन्यं पादपैर्घोरैर्निघ्नतां शूलमुद्गरैः २ राक्षसैर्वानरा घोरा विनिकृत्ताः समन्ततः । वानरै राक्षसाश्चापि द्रुमैर्भूमिसमीकृताः ३ राक्षसास्त्वभिसंक्रुद्धा वानरान्निशितैः शरैः । विव्यधुर्घोरसंकाशैः कङ्कपत्रैरजिह्मगैः ४ ते गदाभिश्च भीमाभिः पट्टिशैः कूटमुद्गरैः । घोरैश्च परिघैश्चित्रैस्त्रिशूलैश्चापि

पडला. रक्ताची वृष्टि होऊं लागला; पृथ्वी कंपित होऊं लागली ३३; निर्घाततुल्य ध्वनीनें युक्त असा वायु प्रतिकूल वाहूं लागला आणि दिशा गाढ अंधकारानें व्याप्त झाल्यामुळें धुंद होऊन गेल्या ३४. राक्षसांना भयप्रद आणि अतिशय घोर असे उद्भवलेले उत्पात अवलोकन करून धूम्राक्ष खिन्न झाला ३५; आणि त्याच्यापुढं चालणाऱ्या सर्व राक्षसांनाही कांहीं सुचेनासें झालें ३६. तथापि, संग्रामाविषयीं उत्सुक असलेला तो अति बलाढ्य व भयंकर धूम्राक्ष असंख्य राक्षस बरोबर घेऊन बाहेर पडला आणि असंख्य वानरांनीं युक्त अशी ती सागरतुल्य सेना रामबाहूंनीं सुरक्षित असलेली त्यानें अवलोकन केली ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५१ ॥

भयंकर पराक्रम करणारा धूम्राक्ष राक्षस बाहेर पडत आहेसा पाहून सर्वही युद्धाभिलाषी वानर आनंदानें गर्जना करूं लागले १; आणि एकमेकांला भयंकर वृक्षांनीं व शूल व मुद्गर ह्या आयुधांनीं प्रहार करणाऱ्या त्या वानरराक्षसांमध्यें अत्यंत तुमुल युद्ध सुरू झालें २. राक्षसांनीं घोर वानरांचे सर्व बाजूंनीं लचके तोडिले आणि वानरांनींही वृक्षांच्या योगानें राक्षसांना जमीनदोस्त करून टाकिलें ३. अत्यंत क्रुद्ध झालेले राक्षस कंकपक्ष्यांच्या पिच्छांनीं युक्त, सरळ जाणाऱ्या घोररूप व तीक्ष्ण बाणांनीं वानरांना वेध करूं लागले ४; आणि भयंकर गदा, पट्ट, कूटमुद्गर, घोर परिघ आणि

१ वायुना निहतो वायुर्गगनाच्च पतत्यधः । प्रचण्डघोरनिर्घोषो निर्घात इति कथ्यते ॥

संश्रितैः ५ विदार्यमाणा रक्षोभिर्वानरास्ते महाबलाः । अमर्षजनितोद्धर्षाश्चक्रुः कर्माण्यभीतवत् ६ शरनिर्भिन्नगात्रास्ते शूलनिर्भिन्नदेहिनः । जगृहुस्ते द्रुमांस्तत्र शिलाश्च हरियूथपाः ७ ते भीमवेगा हरयो नर्दमानस्ततस्ततः । ममन्थू राक्षसान्वीरान्नामानि च बभाषिरे ८ तद्बभूवाद्भुतं घोरं युद्धं वानररक्षसाम् । शिलाभिर्विविधाभिश्च बहुशाखैश्च पादपैः ९ राक्षसा मथिताः केचिद्वानरैर्जितकाशिभिः । प्रवम् रुधिरं केचिन्मुखै रुधिरभोजनाः १० पार्श्वेषु दारिताः केचित्केचिद्राशीकृता द्रुमैः । शिलाभिश्चूर्णिताः केचित्केचिद्दन्तैर्विदारिताः ११ ध्वजैर्विमथितैर्भग्नैः खड्गैश्च विनिपातितैः । रथैर्विध्वंसिताः केचिद्व्यथिता रजनीचराः १२ गजेन्द्रैः पर्वताकारैः पर्वताग्रैर्वनौकमाम् । मथितैर्वाजिभिः कीर्णं सारोहैर्वसुधातलम् १३ वानरैर्भीमविक्रान्तैराप्लुत्याप्लुत्य वेगितैः । राक्षसाः करजैस्तीक्ष्णैर्मुखेषु विनिदारिताः १४

---

हातीं घेतलेले चित्रविचित्र शूल ह्यांच्याही योगानें ते राक्षस वानरांना प्रहार करूं लागले ५. परंतु, ह्याप्रमाणें राक्षस जरी वानरांना विदीर्ण करूं लागले तरी ते महाबलाढ्य वानर क्रोधानें उत्साह उत्पन्न झाल्यामुळें निर्भयपणें पराक्रम गाजवूं लागले ६. सारांश, बाणांनीं ज्यांचे अवयव फुटून गेलेले आहेत आणि शूलांच्या योगानें ज्यांचे देह विदीर्ण झालेले आहेत अशा त्या वानरसेनाधिपतींनीं पाषाण व वृक्ष हातामध्यें घेतले ७; ते भयंकर वेग धारण करणारे व गर्जना करणारे वानर ठिकठिकाणीं वीर राक्षसांचें मर्दन करून आपआपलीं नांवें सांगूं लागले ८; आणि अशारीतीनें नानाप्रकारच्या शिला व अनेक शाखांनीं युक्त असलेले वृक्ष ह्यांच्या योगानें वानरराक्षसांमध्यें अति अद्भुत युद्ध सुरू झालें ९. निर्भय झालेल्या वानरांनीं रक्तप्राशन करणाऱ्या कांहीं राक्षसांचें मर्दन केलें असतां ते मुखांतून रक्त ओकूं लागले १०. कांहीं राक्षसांच्या बरगडच्या विदीर्ण झाल्या; वृक्षांच्या प्रहारामुळें कांहींचे ढीग पडले; शिलांच्या योगानें कांहींचें चूर्ण होऊन गेलें; कित्येकांचें दांतांनींच विदारण होऊन गेलें ११; मोडून नासधूस झालेल्या ध्वजांनीं आणि फेंकिलेल्या तरवारींनीं कांहींचा विध्वंस झाला व रथ फेंकून दिल्यामुळेंही कांहीं राक्षसांचा निःपात झाला १२. मरून पडलेले पर्वतप्राय गजेंद्र, वानरांनीं फेंकिलेलीं पर्वतशिखरें आणि स्वारांसहवर्तमान मारून टाकिलेले अश्व ह्यांच्या योगानें भूतल भरून गेलें १३. भयंकर पराक्रम करणाऱ्या आणि वारंवार उड्डाण करून उत्तरोत्तर अधिक अधिकच वेग धारण करणाऱ्या वानरांनीं तीक्ष्ण नखांच्या योगानें राक्षसांचीं मुखें

विषण्णवदना भूयो विप्रकीर्णशिरोरुहाः । मूढाः शोणितगन्धेन निपेतुर्धरणीतले १५ अन्ये तु परमक्रुद्धा राक्षसा भीमविक्रमाः । तलैरेवाभिधावन्ति वज्रस्पर्शसमैर्हरीन् १६ वानरैः पातयन्तस्ते वेगिता वेगवत्तरैः । मुष्टिभिश्चरणैर्दन्तैः पादपैश्चावपोथिताः १७ सैन्यं तु विद्रुतं दृष्ट्वा धूम्राक्षो राक्षसर्षभः । रोषेण कदनं चक्रे वानराणां युयुत्सताम् १८ प्रासैः प्रमथिताः केचिद्वानराः शोणितस्रवाः । मुद्गरैराहताः केचित्पतिता धरणीतले १९ परिघैर्मथिताः केचिद्भिन्दिपालैश्च दारिताः । पट्टिशैर्मथिताः केचिद्विह्वलन्तो गतासवः २० केचिद्विनिहता भूमौ रुधिरार्द्रा वनौकसः । केचिद्विद्राविता नष्टाः संक्रुद्धै राक्षसैर्युधि २१ विभिन्नहृदयाः केचिदेकपार्श्वेन शायिताः । विदारितास्त्रिशूलैश्च केचिदान्त्रैर्विनिःसृताः २२ तत्सुभीमं महद्युद्धं हरिराक्षससंकुलम् । प्रबभौ शस्त्रबहुलं शिलापादपसंकुलम् २३ धनुर्ज्यातन्त्रिमधुरं हिक्कातालसमन्वितम् । मन्दस्तनितगीतं

---

विदीर्ण करून टाकिलीं १४; कांहीं राक्षस फारच दीनवदन होऊन गेले; कांहींच्या मस्तकांवरील केश अस्ताव्यस्त झाले आणि रक्ताच्या दुर्गंधीमुळेंही कांहीं मूर्च्छित होऊन भूमीवर पडले १५. भयंकर पराक्रम करणारे दुसरे कांहीं राक्षस अतिशय क्रुद्ध होऊन ज्यांचा आघात वज्रतुल्य आहे अशा आपल्या हस्ततलांचेच प्रहार करण्याकरितां वानरांकडे धांवू लागले १६; परंतु, ते वेगवान् राक्षस वानरांकडे धांवू लागले असतांही त्यांच्यापेक्षां अधिक वेगवान् असलेल्या वानरांनीं मुष्टिप्रहार, पांवप्रहार, वृक्षप्रहार व दंत यांच्या योगानें त्यांना मारून टाकिलें १७. असो. आपलें सैन्य पराजित झालेलें पाहून राक्षसश्रेष्ठ धूम्राक्षानें युद्ध करणाऱ्या वानरांची कत्तल उडविली १८. प्रासांचे प्रहार झाल्यामुळें कांहीं वानरांच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं लागला; मुद्गलांचा तडाका बसल्यामुळें कांहीं भूमीवर पडले १९; परिघांच्या योगानें कांहीं वध पावले; भिंदिपालांच्या योगानें कांहीं विदीर्ण होऊन गेले; पट्टयांच्या योगानें जर्जर झाल्यामुळें विवळत विवळत कांहींनीं प्राण सोडिला २०; रक्तानें भरून गेलेले कांहीं वानर भूमीवर मरून पडले; क्रुद्ध झालेल्या राक्षसांनीं युद्धामध्यें पळवून लाविल्यामुळें कांहींजण तेथून नाहींसे झाले २१; कांहींचीं हृदयें विदीर्ण होऊन गेलीं; कांहींजण एका कुशीवर मरून पडले; कांहींचे त्रिशूलाच्या योगानें तुकडे तुकडे होऊन गेले आणि कांहींचीं आंतडीं राक्षसांनीं बाहेर काढिलीं २२. वानर आणि राक्षस ह्यांची ज्यांत गर्दी उडून गेलेली आहे; असंख्य शस्त्रें ज्यामध्यें आहेत आणि शिला व वृक्ष ह्यांची ज्यांत खेचाखेच

तद्युद्धगान्धर्वमावभौ २४ धूम्राक्षस्तु धनुष्पाणिर्वानरान्रणमूर्धनि । हसन्विद्रावयामास दिशस्ताञ्छरवृष्टिभिः २५ धूम्राक्षेणार्दितं सैन्यं व्यथितं प्रेक्ष्य मारुतिः । अभ्यवर्तत संक्रुद्धः प्रगृह्य विपुलां शिलाम् २६ क्रोधाद्विगुणताम्राक्षः पितुस्तुल्यपराक्रमः । शिलां तां पातयामास धूम्राक्षस्य रथं प्रति २७ आपतन्तीं शिलां दृष्ट्वा गदामुद्यम्य संभ्रमात् । रथादाप्लुत्य वेगेन वसुधायां व्यतिष्ठत २८ सा प्रमथ्य रथं तस्य निपपात शिला भुवि । सचक्रकूबरमुखं सध्वजं सशरासनम् २९ स त्यक्त्वा तु रथं तस्य हनूमान्मारुतात्मजः । रक्षसां कदनं चक्रे सस्कन्धविटपैर्द्रुमैः ३० विभिन्नशिरसो भूत्वा राक्षसा रुधिरोक्षिताः । द्रुमैः प्रमथिताश्चान्ये निपेतुर्धरणीतले ३१ विद्राव्य राक्षसं सैन्यं हनूमान्मारुतात्मजः । गिरेः शिखरमादाय धूम्राक्षमभिदुद्रुवे ३२ तमापतन्तं धूम्राक्षो गदामुद्यम्य वीर्यवान् । विनर्दमानः सहसा हनूमन्तमभिद्रवत् ३३ तस्य क्रुद्धस्य

---

झालेली आहे असें तें अतिच मोठें भयंकर युद्ध तेथें झालें २३. प्रत्यंचारूप वीणावाद्यामुळें तें मधुर झालें होतें; अश्वांचें खेंखाळणें हाच तेथें ताल सुरू होता; मंदसंज्ञक गजांची गर्जना हेंच तेथें गीत चाललें होतें आणि अशारीतीनें तें युद्धरूप गायन चाललें होतें २४. असो. हातांत धनुष्य घेतलेल्या धूम्राक्षानें हंसत हंसतच बाणवृष्टींच्या योगानें त्या वानरांना संग्रामांतून चोहोंकडे पळवून लाविलें २५. तेव्हां धूम्राक्षानें जर्जर केलेलें आणि ह्मणूनच व्यथित झालेलें सैन्य अवलोकन करितांक्षणीं मारुति क्रुद्ध झाला; प्रचंड शिला हातांत घेऊन त्याच्याकडे निघाला २६ आणि क्रोधानें आपले डोळे पूर्वीपेक्षांही दुप्पट लाल केल्यावर पित्याप्रमाणें पराक्रम करणाऱ्या त्या हनुमानानें ती शिला धूम्राक्षाच्या रथावर टाकिली २७. परंतु, शिला येत आहे असें पहातांक्षणीं घाईघाईनें गदा हातांत घेऊन व वेगानें रथाखालीं उडी टाकून तो भूमीवर उभा राहिला २८. ती शिला चकें, दांडी, ध्वज, आणि धनुष्य ह्यांसहवर्तमान त्याचा रथ मोडून भूमीवर पडली २९. तदनंतर त्याचा रथ सोडून देऊन वायुपुत्र हनुमानानें स्कंध व शाखा ह्यांसहवर्तमान असलेल्या वृक्षांनीं राक्षसांचा वध करण्यास आरंभ केला ३०. तेव्हां कांहीं राक्षस मस्तकें भिन्न होऊन रक्तानें भरून गेले आणि वृक्षांचे प्रहार झाल्यामुळें कांहीं भूतलावर पडले ३१. ह्याप्रमाणें राक्षससैन्याचा पराभव केल्यानंतर वायुपुत्र हनुमान् हातामध्यें एक पर्वतशिखर घेऊन धूम्राक्षाकडे धांवला असतां ३२ तो हनुमान् धांवून येत आहे असें पाहिल्यावर गदा उगारून गर्जना करीत करीत तो वीर्यवान् धूम्राक्षही एकाएकीं

रोषेण गदां तां बहुकण्टकाम् । पातयामास धूम्राक्षो मस्तकेथ हनूमतः ३४ ताडितः स तया तत्र गदया भीमवेगया । स कपिर्मारुतबलस्तं प्रहारमचिन्तयन् ॥ धूम्राक्षस्य शिरो मध्ये गिरिशृङ्गमपातयत् ३५ स विस्फारितसर्वाङ्गो गिरिशृङ्गेण ताडितः । पपात सहसा भूमौ विकीर्ण इव पर्वतः ३६ धूम्राक्षं निहतं दृष्ट्वा हतशेषा निशाचराः । त्रस्ताः प्रविविशुर्लङ्कां वध्यमानाः प्लवङ्गमैः ३७ स तु पवनसुतो निहत्य शत्रून्क्षतजवहाः सरितश्च संविकीर्य । रिपुवधजनितश्रमो महात्मा मुदमगमत्कपिभिः सुपूज्यमानः ३८ [ १९७५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः ॥ ५२ ॥

धूम्राक्षं निहतं श्रुत्वा रावणो राक्षसेश्वरः । क्रोधेन महताविष्टो निःश्वसन्नुरगो यथा १ दीर्घमुष्णं विनिःश्वस्य क्रोधेन कलुषीकृतः । अब्रवीद्राक्षसं क्रूरं वज्रदंष्ट्रं महाबलम् २ गच्छ त्वं वीर निर्याहि राक्षसैः परिवारितः । जहि दाशरथिं रामं सुग्रीवं वानरैः सह ३ तथेत्युक्त्वा

---

हनुमानाच्या अंगावर धांवून गेला ३३; आणि अनेक कंटकांनीं युक्त असलेली ती गदा त्या क्रुद्ध झालेल्या हनुमानाच्या मस्तकावर रागारागानें धूम्राक्षानें फेंकिली ३४; परंतु, भयंकर वेग धारण करणाऱ्या त्या गदेचा प्रहार झाला असतांही वायूसारिखें ज्याचें सामर्थ्य आहे अशा त्या हनुमान् वानरानें त्या प्रहाराची पर्वा न करितां धूम्राक्षाच्या मस्तकावर एक पर्वताचें शिखर फेंकून दिलें ३५. तेव्हां पर्वतशिखराचा प्रहार होतांक्षणीं सर्वांगाचे तुकडे तुकडे होऊन तो धूम्राक्ष तुकडे तुकडे उडून गेलेल्या पर्वताप्रमाणें एकाएकीं अस्ताव्यस्त होऊन भूमीवर पडला ३६. धूम्राक्षाचा वध झाल्याचें आढळून येतांक्षणीं वानरांच्या हातून जिवंत राहिलेले राक्षस भयभीत झाले; वानरांचे प्रहार घेत घेतच ते लंकेमध्यें प्रविष्ट झाले ३७ आणि अशारीतीनें शत्रूंचा वध करून संग्रामामध्यें रक्ताच्या नद्या सुरू केल्यावर शत्रूंच्या वधामुळें श्रम पावलेल्या त्या महात्म्या हनुमानाची वानर प्रशंसा करूं लागले असतां तो आनंदित झाला ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं बावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५२ ॥

धूम्राक्षाचा वध झाल्याचें ऐकिल्यानंतर राक्षसाधिपति रावण अत्यंत क्रोधाविष्ट होऊन सर्पाप्रमाणें सुस्कारे टाकूं लागला १; आणि दीर्घ व उष्ण सुस्कारे टाकून क्रोधानें मनकलुषित झालेला तो रावण वज्रदंष्ट्रनामक महाबलाढ्य क्रूर राक्षसाला ह्मणाला २ " हे वीरा, राक्षसांनीं परिवेष्टित होऊन तूं जा आणि वानरांसहवर्तमान

द्रुततरं मायावी राक्षसेश्वरः । निर्जगाम बलैः सार्धं बहुभिः परिवारितः ४
नागैरश्वैः खरैरुष्ट्रैः संयुक्तः सुसमाहितः । पताकाध्वजचित्रैश्च बहुभिः
समलंकृतः ५ ततो विचित्रकेयूरमुकुटेन विभूषितः । तनुत्रं च समा-
वृत्य सधनुर्निर्ययौ द्रुतम् ६ पताकालंकृतं दीप्तं तप्तकाञ्चनभूषितम् ।
रथं प्रदक्षिणं कृत्वा समारोहच्चमूपतिः ७ ऋष्टिभिस्तोमरैश्चित्रैः श्लक्ष्णैश्च
मुसलैरपि । भिन्दिपालैश्च चापैश्च शक्तिभिः पट्टिशैरपि ८ खड्गैश्चक्रैर्ग-
दाभिश्च निशितैश्च परश्वधैः । पदातयश्च निर्यान्ति विविधाः शस्त्रपा-
णयः ९ विचित्रवाससः सर्वे दीप्ता राक्षसपुङ्गवाः । गजा मदोत्कटाः
शूराश्चलन्त इव पर्वताः १० ते युद्धकुशला रूढास्तोमराङ्कुशपाणिभिः ।
अन्ये लक्षणसंयुक्ताः शूरारूढा महाबलाः ११ तद्राक्षसबलं सर्वं विप्र-
स्थितमशोभत । प्रावृट्काले यथा मेघा नर्दमानाः सविद्युतः १२
निःसृता दक्षिणद्वाराद‌ङ्गदो यत्र यूथपः । तेषां निष्क्रममाणानामशुभं

---

सुग्रीवाचा व दशरथ पुत्र रामाचा वध कर " ३. ह्यावर " ठीक आहे " असें अति सत्वर सांगून तो मायावी राक्षसाधिपति वज्रदंष्ट्र असंख्य राक्षसांनीं परिवेष्टित झाला व तीं राक्षससैन्यें बरोबर घेऊन बाहेर पडला ४. गज, अश्व, गर्दभ व उंट ह्यांनीं युक्त असलेला तो राक्षस मनामध्यें फारच निर्भय होता व अनेक चित्रविचित्र ध्वजांनीं आणि पताकांनीं तो भूषित झाला होता ५. तदनंतर मनोहर बाहुभूषणें व मुकुट ह्यांनीं भूषित झालेला तो वज्रदंष्ट्र कवच घालून व हातामध्यें धनुष्य घेऊन सत्वर बाहेर निघाला ६; आणि पताकांनीं अलंकृत व उत्कृष्ट सुवर्णालंकारांनीं भूषित असलेल्या रथाला प्रदक्षिणा करून तो सेनाधिपति त्यावर आरूढ झाला ७. तेंव्हां त्याच्याबरोबर लहान लहान खड्ग, चित्रविचित्र तोमर, लकलकीत मुसळें, भिंदिपाल, चाप, शक्ति, पट्टे ८, खड्ग, चक्रें, गदा व तीक्ष्ण परशु घेऊन आणि इतरही शस्त्रें हातीं घेऊन नानाप्रकारचे पदाति बाहेर पडले ९. ते सर्वही राक्षसश्रेष्ठ मनोहर वस्त्रें परिधान केलेले व उज्ज्वल होते आणि चालणारे पर्वतच कीं काय अशाप्रकारचे मदमत्त शूर गजही त्यांच्याबरोबर होते १० त्या युद्धकुशल गजावर तोमर व अंकुश हातांत धारण केलेले योद्धे आरूढ झालेले होते व त्यांच्याच बरोबर असलेल्या इतरही सुलक्षणी व महाबलाढ्य गजांवर शूर राक्षस आरूढ झाले होते ११. तें सर्वही राक्षससैन्य चालूं लागलें असतां पर्जन्यकालीं विद्युल्लतेसहवर्तमान असलेल्या व गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणें शोभूं लागलें १२. जिकडे अंगद सेनाधिपति उभा होता त्या दक्षिणद्वारांतून ते बाहेर पडले असतां बाहेर पडतांना त्यांना अपशकुन होऊं

समजायत १३ आकाशाद्विघनात्तीव्रादुल्मुकान्यपतंस्तदा । वमन्तः पावकज्वालाः शिवा घोरा ववाशिरे १४ व्याहरन्त मृगा घोरा रक्षसां निधनं तदा । समापतन्तो योधास्तु प्रास्खलंस्तत्र दारुणम् १५ एतानौत्पातिकान्दृष्ट्वा वज्रदंष्ट्रो महाबलः । धैर्यमालम्ब्य तेजस्वी निर्जगाम रणोत्सुकः १६ तांस्तु विद्रवतो दृष्ट्वा वानरा जितकाशिनः । प्रणेदुः सुमहानादान्दिशः शब्देन पूरयन् १७ ततः प्रवृत्तं तुमुलं हरीणां राक्षसैः सह । घोराणां भीमरूपाणामन्योन्यवधकाङ्क्षिणाम् १८ निष्पतन्तो महोत्साहा भिन्नदेहशिरोधराः । रुधिरोक्षितसर्वाङ्गागान्यपतन्धरणीतले १९ केचिदन्योन्यमासाद्य शूराः परिघबाहवः । चिक्षिपुर्विविधाञ्शस्त्रान्समरेष्वनिवर्तिनः २० द्रुमाणां च शिलानां च शस्त्राणां चापि निःस्वनः । श्रूयते सुमहांस्तत्र घोरो हृदयभेदनः २१ रथनेमिस्वनस्तत्र धनुषश्चापि घोरवत् । शङ्खभेरीमृदङ्गानां बभूव तुमुलः स्वनः २२ केचिदस्त्राणि संत्यज्य बाहुयुद्धमकुर्वत । तलैश्च चरणैश्चापि मुष्टिभिश्च द्रुमैरपि २३ जानुभिश्च हताः

---

लागले.१३ मेघरहित भयंकर आकाशापासून उल्मुक पडूं लागले. तोंडातून अग्निज्वाला बाहेर टाकीत टाकीत घोर खोंकडें ओरडूं लागलीं १४; भयंकर पशुही राक्षसमृत्युसूचक ध्वनि करूं लागले आणि योद्धे एकत्र जुळूं लागले असतांही अडखळून पडूं लागले १५. हे अशुभसूचक उत्पात पाहिल्यावरही महाबलाढ्य तेजस्वी व रणाविषयीं उत्सुक असलेला वज्रदंष्ट्र धैर्याचें अवलंबन करून बाहेर पडला १६. तेव्हां विशेषतः संमुख धांवून येत असलेल्या त्या राक्षसांना अवलोकन केल्यानंतर निर्भय वानर ध्वनीनें दशदिशा दुमदुमून टाकीत टाकीत फारच मोठ्या गर्जना करूं लागले १७; आणि नंतर भयंकर रूप धारण करून एकमेकांच्या वधाची इच्छा करणाऱ्या त्या घोर वानरराक्षसांमध्यें तुमुल युद्ध सुरू झालें १८. मोठा उत्साह धरून शत्रूंवर तुटून पडणाऱ्या राक्षसांचे देह व कंठ विदीर्ण झाले आणि रक्तानें भरून जाऊन ते भूमीवर पडले १९. अडसरांप्रमाणें ज्यांचे बाहु आहेत असे कांहीं संग्रामामध्यें परत न फिरणारे शूर एकमेकांना गांठून नानाप्रकारचीं शस्त्रें एकमेकांवर फेंकूं लागले २०. वृक्ष, शिला व शस्त्र ह्यांचा हृदय विदीर्ण करून टाकणारा असा प्रचंड घोर ध्वनि ऐकूं येऊं लागला २१; रथांच्या धांवांचाही ध्वनि भयंकर होऊं लागला आणि धनुष्याचाही घोर शब्द सुरू होऊन शंख, दुंदुभि व मृदंग ह्यांचाही तुमुल ध्वनि सुरू होऊं लागला २२. कांहीं राक्षस अस्त्रें टाकून देऊन वानरांशीं मल्लयुद्ध करूं लागले; हस्ततल, पाय, मुष्टि, वृक्ष २३ आणि गुडघे ह्यांच्या प्रहारानें देह भग्न

केचिद्द्रुमदेहाश्च राक्षसाः । शिलाभिश्चूर्णिताः केचिद्वानरैर्युद्धदुर्मदैः २४
वज्रदंष्ट्रोऽथ तं दृष्ट्वा रणे वित्रासयन्हरीन् । चचार लोकसंहारे पाशहस्त इवा-
न्तकः २५ बलवन्तोऽस्त्रविदुषा नानाप्रहरणा रणे । जघ्नुर्वानरसैन्यानि राक्षसाः
क्रोधमूर्छिताः २६ जघ्न तान्राक्षसान्सर्वान्धृष्टो वायुसुतो रणे । क्रोधेन द्विगु-
णाविष्टः संवर्तक इवानलः २७ तान्राक्षसगणान्सर्वान्वृक्षमुद्यम्य वीर्यवान् ।
अङ्गदः क्रोधताम्राक्षः सिंहः क्षुद्रमृगानिव २८ चकार कदनं घोरं शक्र-
तुल्यपराक्रमः । अङ्गदाभिहतास्तत्र राक्षसा भीमविक्रमाः २९ विभिन्न-
शिरसः पेतुर्निकृत्ता इव पादपाः । रथैश्चित्रैर्ध्वजैरश्वैः शरीरैर्हरिरक्ष-
साम् ३० रुधिरौघेण संछन्ना भूमिर्भयकरी तदा । हारकेयूरवस्त्रैश्च
च्छत्रैश्च समलंकृता ३१ भूमिर्भाति रणे तत्र शारदीव यथा निशा । अङ्ग-
दस्य च वेगेन तद्राक्षसबलं महत् । प्राकम्पत तदा तत्र पवनेनाम्बुदो
यथा ३२ [ २००७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
युद्धकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥ ५३ ॥

---

झाल्यामुळें कांहीं राक्षस वध पावले; आणि युद्धामध्यें अजिंक्य असलेल्या वानरांनीं शिलांच्या योगानें कांहीं राक्षसांचें चूर्ण करून टाकिलें २४. तदनंतर राक्षसांचा तो नाश अवलोकन केल्यावर लोकांचा संहार करण्याकरितां हतांत पाश घेऊन संचार करणारा मृत्युच कीं काय अशारीतीनें वज्रदंष्ट्र संहार करण्याकरितां संचार करूं लागला असतां वानर भयभीत झाले २५. नंतर क्रोधानें व्याप्त होऊन नानाप्रकारचीं आयुधें हातामध्यें घेतलेल्या अस्त्रवेत्त्या बलाढ्य राक्षसांनीं वानरसैन्यांचा संग्रामामध्यें वध सुरू केला २६. परंतु, पूर्वीपेक्षां द्विगुणित क्रुद्ध झालेल्या आणि ह्मणूनच प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें दिसत असलेल्या वायुपुत्र शूर हनुमानानें संग्रामामध्यें त्या सर्वही राक्षसांचा वध केला २७. शिवाय, सिंह ज्याप्रमाणें क्षुद्र मृगांचा वध करितो त्याप्रमाणें क्रोधामुळें आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त झालेल्या वीर्यवान् अंगदानेंही पुढें आलेल्या त्या सर्व राक्षसांचा वध केला २८; आणि नंतरही त्या इंद्रतुल्य पराक्रमी अंगदानें राक्षसांची भयंकर कत्तल उडविली २९. भयंकर पराक्रमी राक्षसांना अंगदाचा प्रहार झाल्यामुळें शिरश्छेद होऊन तोडलेल्या वृक्षांप्रमाणें ते भूमीवर पडले ३०. तेव्हां रथ, आश्चर्यकारक ध्वज, अश्व, वानर व राक्षस ह्यांचीं शरीरें आणि रक्तप्रवाह ह्यांनीं आच्छादित झालेली भूमि भयंकर दिसूं लागली ३१; हार, बाहुभूषणें, वस्त्रें आणि छत्रें ह्यांच्या योगानें संग्रामामध्यें भूषित झालेली ती भूमि शरदृतूंतील रात्रीप्रमाणें दिसूं लागली आणि वायूच्या योगानें कंपित होणाऱ्या

स्वबलस्य च घातेन अङ्गदस्य बलेन च । राक्षसः क्रोधमाविष्टो
वज्रदंष्ट्रो महाबलः १ विस्फार्य च धनुर्घोरं शक्राशनिसमप्रभम् । वान-
राणामनीकानि प्राकिरच्छरवृष्टिभिः २ राक्षसाश्चापि मुख्यास्ते
रथैश्च समवस्थिताः । नानाप्रहरणाः शूराः प्रायुध्यन्त तदा
रणे ३ वानराणां च शूरास्तु ते सर्वे प्लवगर्षभाः । अयु-
ध्यन्त शिलाहस्ताः समवेताः समन्ततः ४ तत्रायुधसहस्राणि तस्मि-
न्नायोधने भृशम् । राक्षसाः कपिमुख्येषु पातयांचक्रिरे तदा ५
वानराश्चैव रक्षःसु गिरिवृक्षान्महाशिलाः । प्रवीराः पातयामासुर्मत्तवा-
रणसन्निभाः ६ शूराणां युध्यमानानां समरेष्वनिवर्तिनाम् । तद्राक्षसग-
णानां च सुयुद्धं समवर्तत ७ अभग्नशिरसः केचिच्छिन्नैः पादैश्च बाहुभिः ।
शस्त्रैरर्दितदेहास्तु रुधिरेण समुक्षिताः ८ हरयो राक्षसाश्चैव शेरते गां
समाश्रिताः । कङ्कगृध्रबलाढ्याश्च गोमायुकुलसंकुलाः ॥ कबन्धानि
समुत्पेतुर्भीरूणां भीषणानि वै ९ भुजपाणिशिरश्छिन्नाश्छिन्नकायाश्च

---

मेघाप्रमाणें अंगदाच्या वेगानें तें प्रचंड राक्षससैन्य कंपित होऊं लागलें ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५३ ॥

अंगदाच्या सैन्यानें स्वसैन्याचा घात झाल्यामुळें तो महाबलाढ्य वज्रदंष्ट्र राक्षस क्रुद्ध झाला १; आणि इंद्रवज्रासारिखी ज्याची प्रभा आहे असें आपलें घोर धनुष्य आकर्षण करून बाणवृष्टींच्या योगानें वानरांचीं सैन्यें त्यानें भरून काढिलीं २. रथारूढ होऊन व नानाप्रकारचीं आयुधें हातामध्यें घेऊन त्याच्या बरोबर ते मुख्य मुख्य शूर राक्षस संग्रामामध्यें युद्ध करूं लागले ३ आणि त्याचप्रमाणें वानरांतील ते सर्व शूर वानरश्रेष्ठ चोहोंकडून एकत्र जुळले आणि हातामध्यें शिला घेऊन युद्ध करूं लागले ४. त्या युद्धामध्यें राक्षसांनीं हजारों आयुधें वानरश्रेष्ठांवर फेंकिलीं ५ व मत्त गजांप्रमाणें असलेल्या त्या वीर वानरांनींही राक्षसांवर पर्वतांप्रमाणें वृक्ष व मोठे मोठे पाषाण फेंकिले ६; व संग्रामांतून परत न फिरणारे असे ते वानरराक्षसांचे शूर समुदाय एकमेकांशीं युद्ध करूं लागले असतां उभयतांमध्यें मोठाच संग्राम सुरू झाला ७. हातपाय तुटून जाऊन शस्त्रांनीं देहाला जखमा झाल्यामुळें रक्तानें भरून गेलेले ८ कांहीं शिरश्छेद न होतां वानर व राक्षस जमीनदोस्त झाले. कंक व गृध्र पक्ष्यांचे कळप त्यांच्या भोंवतालीं जुळूं लागले आणि कोल्ह्यांच्याही कळपांनीं ते गजबजून जाऊं लागले. भित्र्या लोकांना भयप्रद अशीं

भूतले । वानरा राक्षसाश्चापि निपेतुस्तत्र भूतले १० ततो वानरसैन्येन हन्यमानं निशाचरम् । प्राभज्यत बलं सर्वं वज्रदंष्ट्रस्य पश्यतः ११ राक्षसान्भयवित्रस्तान्हन्यमानान्प्लवङ्गमैः । दृष्ट्वा स रोषताम्राक्षो वज्रदंष्ट्रः प्रतापवान् १२ प्रविवेश धनुष्पाणिस्त्रासयन्हरिवाहिनीम् । शरैर्विदारयामास कङ्कपत्रैरजिह्मगैः १३ बिभेद वानरांस्तत्र सप्ताष्टौ नव पञ्च च । विव्याध परमक्रुद्धो वज्रदंष्ट्रः प्रतापवान् १४ त्रस्ताः सर्वे हरिगणाः शरैः संकृत्तदेहिनः । अङ्गदं संप्रधावन्ति प्रजापतिमिव प्रजाः १५ ततो हरिगणान्भग्नान्दृष्ट्वा वालिसुतस्तदा । क्रोधेन वज्रदंष्ट्रं तमुदीक्षन्तमुदैक्षत १६ वज्रदंष्ट्राङ्गदश्चोभौ योयुध्येते परस्परम् । चेरतुः परमक्रुद्धौ हरिमत्तगजाविव १७ ततः शतसहस्रेण हरिपुत्रं महाबलम् । जघान मर्मदेशेषु शरैरग्निशिखोपमैः १८ रुधिरोक्षितसर्वाङ्गो वालिसूनुर्महाबलः । चिक्षेप वज्रदंष्ट्राय वृक्षं भीमपराक्रमः १९ दृष्ट्वा पतन्तं तं वृक्षमसंभ्रान्तश्च

---

कबंधे नाचूं लागलीं ९; आणि हात, पाय, शीर व मस्तक तुटलेले वानर आणि राक्षस भूतलावर पडले १०. तदनंतर वानरसैन्यामुळें राक्षसी सैन्याचा वध होऊं लागला असतां तें सर्वही सैन्य वज्रदंष्ट्राची पर्वा न करितां वाट फुटेल तिकडे पळूं लागलें ११. तेव्हां वानरांचे प्रहार होऊं लागल्यामुळें राक्षस भयभीत होऊन पळत आहेत असें दृष्टीं पडल्यावर प्रतापी वज्रदंष्ट्राचे नेत्र क्रोधानें आरक्तवर्ण झाले १२. वानरसैन्याला भयभीत करीत करीत हातांत धनुष्य घेऊन त्यानें रणामध्यें प्रवेश केला आणि कंकपक्ष्याच्या पिच्छांनीं युक्त व सरळ जाणाऱ्या बाणांच्या योगानें तो वानरांना विदीर्ण करूं लागला १३. पांच पांच, सात सात, आठ आठ आणि नऊ नऊ वानरांना तो एका बाणानें वेध करूं लागला व अशारीतीनें तो प्रतापी वज्रदंष्ट्र अतिशय क्रुद्ध होऊन वानरांवर बाण टाकूं लागला १४. तेव्हां प्रजा ज्याप्रमाणें प्रजपालकाकडे धांवत जातात त्याप्रमाणें बाणांनीं शरीराला जखमा झालेले ते सर्वही वानरगण त्रस्त होऊन अंगदाकडे धांवूं लागले असतां १५. वानरगणांची दाणादाण झालेली पाहून वालिपुत्र अंगद आपल्याकडे पहात असलेल्या वज्रदंष्ट्राकडे क्रोधानें पाहूं लागला १६; आणि नंतर अतिशय क्रुद्ध झालेले गजव्याघ्रच कीं काय असे ते उभयतां अंगद व वज्रदंष्ट्र एकमेकांशीं युद्ध करूं लागले १७. प्रथमतः अग्निज्वालेप्रमाणें तीक्ष्ण अशा एक लक्ष बाणांनीं वालिपुत्र महाबलाढ्य अंगदाला वज्रदंष्ट्रानें वेध केला १८; तेव्हां महाबलाढ्य वालिपुत्र अंगदाचें सर्व शरीर रक्तानें भरून गेलें आणि भयंकर पराक्रम करणाऱ्या त्या अंगदानें एक वृक्षही त्या वज्रदंष्ट्रावर

राक्षसः । चिच्छेद बहुधा सोपि मथितः प्रापतद्भुवि २० तं दृष्ट्वा वज्रदंष्ट्रस्य विक्रमं प्लवगर्षभः । प्रगृह्य विपुलं शैलं चिक्षेप च ननाद च २१ तमापतन्तं दृष्ट्वा स रथादाप्लुत्य वीर्यवान् । गदापाणिरसंभ्रान्तः पृथिव्यां समतिष्ठत २२ अङ्गदेन शिला क्षिप्ता गत्वा तु रणमूर्धनि । सचक्रकूबरं साश्वं प्रममाथ रथं तदा २३ ततोन्यच्छिखरं गृह्य विपुलं द्रुमभूषितम् । वज्रदंष्ट्रस्य शिरसि पातयामास वानरः २४ अभवच्छोणितोद्गारी वज्रदंष्ट्रः सुमूर्च्छितः । मुहूर्तमभवन्मूढो गदामालिङ्ग्य निःश्वसन् २५ स लब्धसंज्ञो गदया वालिपुत्रमवस्थितम् । जघान परमक्रुद्धो वक्षोदेशे निशाचरः २६ गदां त्यक्त्वा ततस्तत्र मुष्टियुद्धमकुर्वत । अन्योन्यं जघ्नतुस्तत्र तावुभौ हरिराक्षसौ २७ रुधिरोद्गारिणौ तौ तु प्रहारैर्जनितश्रमौ । बभूवतुः सुविक्रान्तावङ्गारकबुधाविव २८ ततः परमतेजस्वी अङ्गदः प्लवगर्षभः । उत्पाट्य वृक्षं स्थितवानासीत्पुष्पफलैर्युतः २९ जग्राह चार्षभं चर्म खड्गं च विपुलं शुभम् । किङ्किणीजालसंछन्नं चर्मणा च परिष्कृतम् ३० चित्रांश्च

---

फेंकिला १९; परंतु, तो वृक्ष येत आहे असें पहातांक्षणीं त्या निर्भय राक्षसानें त्याचे तुकडे तुकडे करून टाकिले असतां तो वृक्षही छिन्नभिन्न होऊन भूमीवर पडला २०. तेव्हां वज्रदंष्ट्राचा तो पराक्रम अवलोकन करून वानरश्रेष्ठ अंगदानें एक मोठी शिला घेतली आणि त्याच्याकडे फेंकून तो गर्जना करूं लागला २१; परंतु, ती शिला येत आहे असें पाहतांक्षणीं त्या वीर्यवान् वज्रदंष्ट्रानें हातामध्यें गदा घेऊन रथाखालीं उडी घातली आणि निर्भयपणें तो भूमीवर उभा राहिला २२. अंगदानें संग्रामामध्यें फेंकिलेल्या त्या शिलेनें चक्रें, दांड्या आणि अश्व ह्यांसहवर्तमान वज्रदंष्ट्राच्या रथाचा चुराडा केला २३. तदनंतर वृक्षांनीं भूषित असें एक प्रचंड शिखर अंगदवानरानें हातामध्यें घेऊन वज्रदंष्ट्राच्या मस्तकावर फेंकिलें असतां २४ तो वज्रदंष्ट्र अत्यंत मूर्च्छित होऊन रक्त ओकूं लागला आणि गदा तशीच हातांत धरून सुस्कारे टाकीत टाकीत तो एक मुहूर्तपर्यंत बेशुद्धही झाला २५; परंतु, शुद्धीवर येतांक्षणीं पुढें असलेल्या वालिपुत्राच्या वक्षःस्थलावर त्या अत्यंत क्रुद्ध झालेल्या राक्षसानें गदेच्या योगानें प्रहार केला २६. तदनंतर गदा टाकून देऊन तो अंगदाशीं मुष्टियुद्ध करूं लागला असतां त्या उभयतां वानरराक्षसांनीं एकमेकांला प्रहार केले २७; आणि अशारीतीनें ते अत्यंत पराक्रमी वानरराक्षस प्रहारांनीं श्रांत होऊन रक्त ओकूं लागले आणि बुधमंगळच कीं काय असे दिसूं लागले २८. तदनंतर महातेजस्वी वानरश्रेष्ठ अंगद हातांत एक वृक्ष उपटून घेऊन उभा राहिला असतां त्याच्यावरील पुष्पांनीं व फलांनीं तो भरून गेला २९; आणि इकडे त्या राक्षसानेंही बैलाच्या कातड्याची केलेली ढाल

रुचिरान्मार्गांश्चेरतुः कपिराक्षसौ । जघ्नतुश्च तदान्योन्यं नर्दन्तौ जयकाङ्क्षिणौ ३१ व्रणैः समुत्थैः शोभेतां पुष्पिताविव किंशुकौ । युध्यमानौ परिश्रान्तौ जानुभ्यामवनीं गतौ ३२ निमेषान्तरमात्रेण अङ्गदः कपिकुञ्जरः । उदतिष्ठत दीप्ताक्षो दण्डाहत इवोरगः ३३ निर्मलेन सुधौतेन खड्गेनास्य महच्छिरः । जघान वज्रदंष्ट्रस्य वालिसूनुर्महाबलः ३४ रुधिरोक्षितगात्रस्य बभूव पतितं द्विधा । तच्च तस्य परीताक्षं शुभं खड्गहतं शिरः ३५ वज्रदंष्ट्रं हतं दृष्ट्वा राक्षसा भयमोहिताः । त्रस्ता ह्यभ्यद्रवँल्लङ्कां वध्यमानाः प्लवङ्गमैः ३६ विषण्णवदना दीना ह्रिया किंचिदवाङ्मुखाः ३७ निहत्य तं वज्रधरः प्रतापवान्स वालिसूनुः कपिसैन्यमध्ये । जगाम हर्षं महितो महाबलः सहस्रनेत्रस्त्रिदशैरिवावृतः ३८ [२०४५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुष्पञ्चाशः सर्गः ॥ ५४ ॥

---

व घुंघुरांच्या माळांनीं आच्छादित आणि चर्मकोशानें अलंकृत असा एक मोठा शुभ खड्ग हीं हातीं घेतलीं ३०. नंतर ते वानरराक्षस मनोहर व आश्चर्यकारक पवित्रे करूं लागले आणि ते उभयतां विजयेच्छु वानरराक्षस गर्जना करीत करीत एकमेकांला प्रहार करूं लागले ३१. शरीरावरील झालेल्या जखमा वाहूं लागल्यामुळें ते प्रफुल्लित पलाशवृक्षांप्रमाणें दिसूं लागले आणि युद्ध करितां करितां श्रांत झाल्यामुळें ते उभयतां भूमीमध्यें गुडघे टेंकून बसले ३२; तों एका निमिषांतच उज्ज्वल नेत्रांनीं युक्त असलेला वानरश्रेष्ठ अंगद दंडानें ताडित झालेल्या सर्पाप्रमाणें उठला ३३; आणि त्या महाबलाढ्य वालिपुत्र अंगदानें निर्मल व अतिशयच तीक्ष्ण अशा वज्रदंष्ट्राच्याच खड्गानें त्याचें प्रचंड मस्तक तोडून टाकिलें असतां ३४ ज्याचें शरीर रक्तानें भरून गेलें आहे अशा त्या वज्रदंष्ट्राच्या मस्तकावरील नेत्र गरगर फिरूं लागले आणि खड्गाचा प्रहार झालेलें तें शुभ मस्तक दोन तुकडे होऊन भूमीवर पडलें ३५. असो. ह्याप्रमाणें वज्रदंष्ट्राचा वध झालेला पाहून राक्षस भयानें गांगरून गेले; वानर वध करूं लागले असतां कांहींएक सुचेनासें होऊन ते लंकेकडे पळून गेले ३६ आणि खिन्नवदन व दीन होऊन लज्जेनें त्यांनीं आपल्या मानाही कांहींशा खालीं घातल्या ३७. असो. देवांनीं परिवेष्टित झालेला वज्रपाणि महाबलाढ्य इंद्र ज्याप्रमाणें मानमान्यता झाली असतां हर्ष पावतो त्याप्रमाणें त्या वज्रदंष्ट्राचा वध केल्यामुळें वानरसैन्यामध्यें प्रशंसेस पात्र झालेल्या त्या प्रतापी वालिपुत्र अंगदाला हर्ष झाला ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चौपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५४ ॥

वज्रदंष्ट्रं हतं श्रुत्वा वालिपुत्रेण रावणः । बलाध्यक्षमुवाचेदं कृताञ्जलिमुपस्थितम् १ शीघ्रं निर्यान्तु दुर्धर्षा राक्षसा भीमविक्रमाः । अकम्पनं पुरस्कृत्य सर्वशस्त्रास्त्रकोविदम् २ एष शास्ता च गोप्ता च नेता च युधि सत्तमः । भूतिकामश्च मे नित्यं नित्यं च समरप्रियः ३ एष जेष्यति काकुत्स्थौ सुग्रीवं च महाबलम् । वानरांश्चापरान्घोरान्हनिष्यति न संशयः ४ परिगृह्य स तामाज्ञां रावणस्य महाबलः । बलं संप्रेरयामास तदा लघुपराक्रमः ५ ततो नानाप्रहरणा भीमाक्षा भीमदर्शनाः । निष्पेतू राक्षसा मुख्या बलाध्यक्षप्रचोदिताः ६ रथमास्थाय विपुलं तप्तकाञ्चनभूषणम् । मेघाभो मेघवर्णश्च मेघस्वनमहास्वनः ७ राक्षसैः संवृतो घोरैस्तदा निर्यात्यकम्पनः । न हि कम्पयितुं शक्यः सुरैरपि महामृधे ८ अकम्पनस्ततस्तेषामादित्य इव तेजसा । तस्य निर्धावमानस्य संरब्धस्य युयुत्सया ९ अकस्माद्दैन्यमागच्छद्धयानां रथवाहिनाम् । विस्फुरन्नयनं चास्य सव्यं युद्धाभिनन्दिनः १० विवर्णो मुखवर्णश्च

---

वालिपुत्र अंगदाच्या हातून वज्रदंष्ट्राचा वध झाल्याचें श्रवण केल्यावर रावण हात जोडून उभा राहिलल्या सेनाधिपति प्रहस्ताला ह्मणाला १ "भयंकर पराक्रम करणाऱ्या अजिंक्य राक्षसांनीं आतां सर्व शस्त्रास्त्रांमध्यें निपुण असलेल्या अकंपनाला पुढें करून सत्वर बाहेर पडावें २. हा स्वसैन्याचें रक्षण करणारा व शत्रूंना शासन करणारा आहे; युद्धामध्यें हा अतिशय निपुण आहे; हा नेहमीं माझ्या अभ्युदयाची इच्छा करीत असतो व युद्ध ह्याला सर्वदां प्रिय असतें ३. हा ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांना व महाबलाढ्य सुग्रीवाला जिंकील आणि दुसऱ्याही घोर वानरांचा निःसंशय वध करील" ४. झटपट काम उरकणाऱ्या त्या महाबलाढ्य सेनाधिपतीनें रावणाची ती आज्ञा मान्य करून सैन्याला आज्ञा केली असतां ५ नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले आणि घोर नेत्र व भयंकर मुद्रा ह्यांनीं युक्त असलेले मुख्य मुख्य राक्षस सेनाधिपतीच्या सांगण्यावरून बाहेर पडले ६. नंतर उत्कृष्ट सुवर्णाचे अलंकार ज्यावर घातलेले आहेत अशा मोठ्या रथावर आरूढ होऊन तो, मेघवर्ण, मेघकांति आणि मेघतुल्य गर्जना ह्यांनीं युक्त असलेला ७ अकंपन घोर राक्षस बरोबर घेऊन निघाला. मोठ्या संग्रामामध्यें त्याला कंपित करणें देवांनाही शक्य नसल्यामुळें ८ अकंपन ह्मणून प्रसिद्ध असलेला तो राक्षस तेजाच्या योगानें त्या वानरांना सूर्याप्रमाणें पाहण्यासही कठीण झाला; परंतु, क्षुब्ध होऊन युद्धाच्या इच्छेनें तो धांवत असतांना ९ त्याचा रथ वाहून नेणाऱ्या अश्वांचें मन एकाएकीं खिन्न झालें. युद्धाची इच्छा करणाऱ्या ह्या अकंपनाचा डावा डोळा

गद्गदश्चाभवत्स्वनः । अभवत्सुदिने काले दुर्दिनं रूक्षमारुतम् ११
ऊचुः खगमृगाः सर्वे वाचः क्रूरा भयावहाः । स सिंहोपचितस्कन्धः
शार्दूलसमविक्रमः १२ तानुत्पातानचिन्त्यैव निर्जगाम रणाजिरम् ।
तथा निर्गच्छतस्तस्य रक्षसः सह राक्षसैः १३ बभूव सुमहान्नादः क्षोभ-
यन्निव सागरम् । तेन शब्देन वित्रस्ता वानराणां महाचमूः १४ द्रुमशैलप्र-
हाराणां योद्धुं समुपतिष्ठताम् । तेषां युद्धं महारौद्रं संजज्ञे कपिरक्षसाम् १५
रामरावणयोरर्थे समभित्यक्तदेहिनः । सर्वे ह्यतिबलाः शूराः सर्वे पर्वत-
सन्निभाः १६ हरयो राक्षसाश्चैव परस्परजिघांसया । तेषां विनर्दतां शब्दः
संयुगेतितरस्विनाम् १७ शुश्राव सुमहान्कोपादन्योन्यमभिगर्जताम् । रज-
श्चारुणवर्णाभं सुभीममभवद्भृशम् १८ उद्धूतं हरिरक्षोभिः संरुरोध दिशो
दश । अन्योन्यं रजसा तेन कौशेयोद्धतपाण्डुना १९ संवृतानि च भूतानि
ददृशुर्न रणाजिरे । न ध्वजो न पताका वा चर्म वा तुरगोपि वा २०
आयुधं स्यन्दनो वापि ददृशे तेन रेणुना । शब्दश्च सुमहांस्तेषां

---

स्फुरण पावूं लागला १०; मुखावरील कांति नाहींशी झाली; स्वरही नीट उमटेनासा झाला; आकाश स्वच्छ असतांना एकाएकीं मेघाच्छादित होऊन रूक्ष वायु वाहूं लागला ११. आणि सर्व क्रूर पशुपक्षीही भयंकर शब्द करूं लागले; परंतु, सिंहासारिखे पुष्ट स्कंध आणि व्याघ्रासारिखा पराक्रम ह्यांनीं युक्त असलेला तो अकंपन १२ त्या उत्पातांची पर्वा मुळींच न करितां रणभूमीकडे निघाला व त्याप्रमाणें राक्षसांसहवर्तमान तो अकंपन राक्षस निघाला असतां १३ समुद्र क्षुब्ध करून टाकण्यासारिखा फारच मोठा ध्वनि झाला आणि त्या ध्वनीनें वानरांची महासेना त्रस्त होऊन गेली १४. नंतर वृक्ष व पर्वत हींच ज्यांचीं आयुधें आहेत असे वानर युद्धाकरितां सज्ज झाले असतां त्या वानरराक्षसांमध्यें अतिभयंकर युद्ध सुरू झालें १५. ते सर्वही अतिबलाढ्य व शूर असून सर्वही पर्वततुल्य होते आणि रामरावणांकरितां देहाची आशा सोडून १६ ते सर्वही वानर आणि राक्षस एकमेकांचा वध करण्याच्या उद्देशानें युद्ध करीत होते. युद्धामध्यें रागारागानें एकमेकांवर ताण करून गर्जना करूं लागलेल्या त्या अतिबलाढ्य वानरराक्षसांचा फारच मोठा शब्द चोहोंकडे ऐकूं येऊं लागला. अति भयंकर आणि आरुणवर्ण अशी धूळ वानरराक्षसांमुळें जिकडे तिकडे अतिशय उडून दाही दिशा धुंद झाल्या. झगझगीत रेशमी वस्त्राप्रमाणें किंचित् पांडुरवर्ण असलेली ती धूळ एकमेकांमुळें एकमेकांच्या अंगावर उडाल्या कारणानें १७,१८,१९, सर्वही वानरराक्षस संग्रामामध्यें आच्छादित होऊन दिसेनासे झाले.

नर्दतामभिधावताम् २१ श्रूयते तुमुलो युद्धे न रूपाणि चकाशिरे । हरीनेव सुसंरुष्टा हरयो जघ्नुराहवे २२ राक्षसा राक्षसांश्चापि निजघ्नुस्तिमिरे तदा । ते परांश्च विनिघ्नन्तः स्वांश्च वानरराक्षसाः २३ रुधिरार्द्रां तदा चक्रुर्महीं पङ्कानुलेपनाम् । ततस्तु रुधिरौघेण सिक्तं ह्यपगतं रजः २४ शरीरशवसंकीर्णा बभूव च वसुन्धरा । द्रुमशक्तिगदाप्रासैः शिलापरिघतोमरैः २५ राक्षसा हरयस्तूर्णं जघ्नुरन्योन्यमोजसा । बाहुभिः परिघाकारैर्युध्यन्तः पर्वतोपमान् २६ हरयो भीमकर्माणो राक्षसाञ्जघ्नुराहवे । राक्षसास्त्वभिसंक्रुद्धाः प्रासतोमरपाणयः २७ कपीन्निजघ्निरे तत्र शस्त्रैः परमदारुणैः । अकम्पनः सुसंक्रुद्धो राक्षसानां चमूपतिः २८ संहर्षयति तान्सर्वान्राक्षसान्भीमविक्रमान् । हरयस्त्वपि रक्षांसि महाद्रुममहाश्मभिः २९ विदारयन्त्यभिक्रम्य शस्त्राण्याच्छिद्य वीर्यतः । एतस्मिन्नन्तरे

---

ध्वज, पताका, ढाल, अश्व २०, आयुधें आणि रथ ह्यांपैकीं त्या धुळीमुळें कांहींएक दिसेनासें झालें. गर्जना करीत करीत एकमेकांसमुख धांवत असलेल्या त्या वानरराक्षसांचा अति मोठा २१ तुमुल शब्द मात्र युद्धामध्यें ऐकूं येत असून त्यांचीं रूपें मुळींच दिसत नव्हतीं. ह्यामुळें त्या संग्रामामध्यें त्या अंधकारांत अत्यंत क्रुद्ध झालेले वानरच वानरांना व राक्षस राक्षसांना मारूं लागले; आणि ह्याप्रमाणें स्वकीयांना व परकीयांना मारीत सुटलेल्या त्या वानरराक्षसांनीं २२, २३ पृथ्वीला रक्ताचें स्नान घालून ( रक्तमांसमय ) चिखलाची उटी लाविली. तदनंतर रक्तप्रवाहानें भिजून गेल्यामुळें धूळ नाहींशी झाली असतां २४ शवरूप शरीरांनीं पृथ्वी व्याप्त दिसूं लागली. वृक्ष, शक्ति, गदा, प्रास, शिला, परिघ आणि तोमर २५ ह्या आयुधांनीं वेगावेगानें राक्षस व वानर एकमेकांवर सत्वर प्रहार करूं लागले. परिघतुल्य बाहूंनीं युद्ध करणाऱ्या महापराक्रमी वानरांनीं संग्रामामध्यें पर्वतप्राय राक्षसांचा वध केला आणि अतिशय क्रुद्ध झालेल्या राक्षसांनींही प्रास व तोमर हीं आयुधें हातांत घेऊन २६, २७ अति भयंकर शस्त्रांनीं वानरांचा वध केला. अत्यंत क्रुद्ध झालेला राक्षससेनाधिपति अकंपन २८ भयंकर पराक्रम करणाऱ्या त्या सर्व राक्षसांना हर्ष उत्पन्न करूं लागला. नंतर राक्षसांवर हल्ला करून व स्वपराक्रमानें त्यांचीं शस्त्रें हिसकावून घेऊन मोठमोठे वृक्ष व मोठमोठ्या शिला ह्यांच्या योगानें वानर राक्षसांना विदीर्ण करूं लागले व इतक्यांत कुमुद, नल आणि अति क्रुद्ध झालेला मैंद ह्याही वीर वानरांनीं अतिशयच गर्दी करून सोडिली. कारण, त्या महावीर वानरश्रेष्ठांनीं संग्रामामध्यें वृक्षांच्या योगानें राक्षसांची खेळत खेळतच अति मोठी कत्तल उडविली व इतरही

वीरा हरयः कुमुदो नलः ३० मैन्दश्च परमक्रुद्धश्चक्रुर्वेगमनुत्तमम् । ते तु वृक्षैर्महावीरा राक्षसानां चमूमुखे ३१ कदनं सुमहच्चक्रुर्लीलया हरिपुङ्गवाः। ममन्थू राक्षसान्सर्वे नानाप्रहरणैर्भृशम् ३२[ २०७७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥ ५५ ॥

तद्दृष्ट्वा सुमहत्कर्म कृतं वानरसत्तमैः । क्रोधमाहारयामास युधि तीव्रमकम्पनः १ क्रोधमूर्च्छितरूपस्तु धून्वन्परमकार्मुकम् । दृष्ट्वा तु कर्म शत्रूणां सारथिं वाक्यमब्रवीत् २ तत्रैव तावत्त्वरितो रथं प्रापय सारथे। एते च बलिनो घ्नन्ति सुबहून्राक्षसान्रणे ३ एते च बलवन्तो वा भीमकोपाश्च वानराः । द्रुमशैलप्रहरणास्तिष्ठन्ति प्रमुखे मम ४ एतान्निहन्तुमिच्छामि समरश्लाघिनो ह्यहम् । एतैः प्रमथितं सर्वं राक्षसां दृश्यते बलम् ५ ततः प्रचलिताश्वेन रथेन रथिनां वरः । हरीनभ्यपतद्दूराच्छरजालैरकम्पनः ६ न स्थातुं वानराः शेकुः किं पुनर्योद्धुमाहवे । अकम्पनशरैर्भग्नाः सर्व एवाभिदुद्रुवुः ७ तान्मृत्युवशमापन्नानकम्पनशरानुगान् । समीक्ष्य हनुमाञ्ज्ञातीनुपतस्थे महाबलः ८ तं महाप्लवगं दृष्ट्वा सर्वे ते

---

सर्व वानर नानाप्रकारच्या आयुधांनीं राक्षसांना अतिशय जर्जर करूं लागले २९,३०, ३१,३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडांपैकीं पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५५ ॥

वानरश्रेष्ठांनीं केलेला तो प्रचंड पराक्रम अवलोकन केल्यावर संग्रामामध्यें अकंपन अतिशयच क्रुद्ध झाला १. शत्रूचा तो पराक्रम पाहून क्रोधामुळें कांहींएक सुचेनासें झालें आणि तो आपलें उत्कृष्ट धनुष्य हालवीत हालवीत सारथ्याला ह्मणाला २ " हे सारथ्या, हे बलाढ्य वानर संग्रामामध्यें असंख्य राक्षसांचा वध करीत आहेत तिकडेच माझा रथ प्रथम सत्वर घेऊन जा ३. अथवा भयंकर कोप धारण केलेले हे बलाढ्य वानर वृक्ष व पर्वत हीं आयुधें घेऊन माझ्या संमुख उभे आहेत ४. तस्मात्, संग्रामाविषयीं गर्व करणाऱ्या ह्यांचाच वध करण्याची माझी इच्छा आहे. कारण, ह्यांनींच राक्षसांचें सर्व सैन्य मारून टाकिल्याचें दिसत आहे " ५. तदनंतर रथाचे अश्व चालूं लागले असतां तो रथिश्रेष्ठ अकंपन लांब असतांनाच बाणसमुदायांचा वर्षाव करीत करीत वानरांवर चालून आला ६. तेव्हां त्याच्या समोर उभें रहाण्यासही वानर समर्थ झाले नाहींत; मग संग्रामामध्यें युद्ध करण्याची तर गोष्ट पाहिजे कशाला ? सारांश, सर्वही वानर अकंपनाच्या बाणांनीं पराजित होऊन पळूं लागले ७. अकंपनाच्या बाणांनीं युक्त असलेले ते वानर मुमूर्षु झालेले अवलोकन करून

प्लवगर्षभाः । समेत्य समरे वीराः सहिताः पर्यवारयन् ९ व्यवस्थितं हनू-
मन्तं ते दृष्ट्वा प्लवगर्षभाः । बभूवुर्बलवन्तो हि बलवन्तमुपाश्रिताः १० अक-
म्पनस्तु शैलाभं हनूमन्तमवस्थितम् । महेन्द्र इव धाराभिः शरैरभिववर्ष ह ११
अचिन्तयित्वा बाणौघाञ्शरीरे पातितान्कपिः । अकम्पनवधार्थाय
मनो दध्रे महाबलः १२ स प्रहस्य महातेजा हनूमान्मारुतात्मजः । अभि-
दुद्राव तद्रक्षः कम्पयन्निव मेदिनीम् १३ तस्याथ नर्दमानस्य दीप्यमा-
नस्य तेजसा । बभूव रूपं दुर्धर्षं दीप्तस्येव विभावसोः १४ आत्मानं त्वप्र-
हरणं ज्ञात्वा क्रोधसमन्वितः । शैलमुत्पाटयामास वेगेन हरिपुङ्गवः १५
गृहीत्वा सुमहाशैलं पाणिनैकेन मारुतिः । स विनद्य महानादं भ्रामया-
मास वीर्यवान् १६ ततस्तमभिदुद्राव राक्षसेन्द्रमकम्पनम् । पुरा हि
नमुचिं संख्ये वज्रेणेव पुरन्दरः १७ अकम्पनस्तु तद्दृष्ट्वा गिरिशृङ्गं समु-
द्यतम् । दूरादेव महाबाणैरर्धचन्द्रैर्व्यदारयत् १८ तं पर्वताग्रमाकाशे रक्षो-
बाणविदारितम् । विकीर्णं पतितं दृष्ट्वा हनूमान्क्रोधमूर्च्छितः १९

---

महाबलाढ्य हनुमान् उभा राहिला ( व त्या वानरश्रेष्ठाला अवलोकन करून ते सर्वही मुख्य मुख्य वीर वानर समरांगणामध्यें त्याच्या समीप आले आणि एकत्र जुळून त्याच्या भोंवतीं उभे राहिले ९. सारांश, हनुमान् युद्धार्थ तयार आहे असें आढळून आल्यावर बलवानाचा आश्रय झाल्यामुळें त्या सर्वही वानरश्रेष्ठांना बल प्राप्त झालें १०. परंतु, पर्वततुल्य हनुमान् पुढें उभा राहिला असतां जलधारांची वृष्टि करणाऱ्या इंद्रा-प्रमाणें अकंपनानें त्याच्यावर बाणांची वृष्टि केली ११; तथापि, शरीरावर त्यानें टाकिलेल्या त्या बाणसमुदायांची पर्वा न करितां अकंपनाचा वध करण्याचें त्या महा-बलाढ्य हनुमानानें मनामध्यें आणिलें १२. सारांश, तो महातेजस्वी वायुपुत्र हनुमान् हास्य करून पृथ्वी कंपित करीत करीत त्या राक्षसाकडे धांवला १३. तेव्हां तेजानें झळकत असून गर्जना करीत असलेल्या त्या हनुमानाचें रूप प्रदीप्त अग्निप्रमाणें अव-लोकन करण्यासही दुस्तर झालें १४. परंतु, आपण आयुधरहित आहोंत असें समजून आल्यावर क्रुद्ध झालेल्या त्या वानरश्रेष्ठानें वेगावेगानें एक पर्वत उपटला १५; तो प्रचंड पर्वत एका हातांत घेऊन व मोठी गर्जना करून त्या वीर्यवान् मारुतीनें गरगर फिरविला १६ आणि नंतर पूर्वी वज्र हातांत घेऊन नमुचिराक्षसावर धांवलेल्या इंद्रा-प्रमाणें तो मारुति राक्षसाधिपति अकंपनावर धांवला १७. परंतु, तें पर्वतशिखर उगारिलेलें पहातांक्षणीं अकंपनानें दुरूनच मोठ्या अर्धचंद्रबाणांनीं त्याचें विदारण करून टाकिलें १८. याप्रमाणें तें पर्वतशिखर राक्षसाच्या बाणांनीं आकाशामध्येंच विदीर्ण होऊन गेल्यामुळें

सोऽश्वकर्णं समासाद्य रोषदर्पान्वितो हरिः । तूर्णमुत्पाटयामास महागिरिमिवोच्छ्रितम् २० तं गृहीत्वा महास्कन्धं सोऽश्वकर्णं महाद्युतिः । प्रगृह्य परया प्रीत्या भ्रामयामास भूतले २१ प्रधावन्नुरुवेगेन बभञ्ज तरसा द्रुमान् । हनूमान्परमक्रुद्धश्चारणैर्दारयन्महीम् २२ गजांश्च सगजारोहान्सरथान्रथिनस्तथा । जघान हनुमान्भीमान्राक्षसांश्च पदातिगान् २३ तमन्तकमिव क्रुद्धं सद्रुमं प्राणहारिणम् । हनूमन्तमभिप्रेक्ष्य राक्षसा विप्रदुद्रुवुः २४ तमापतन्तं संक्रुद्धं राक्षसानां भयावहम् । ददर्शाकम्पनो वीरश्चुक्षोभ च ननाद च २५ स चतुर्दशभिर्बाणैर्निशितैर्देहदारणैः । निर्बिभेद महावीर्यं हनूमन्तमकम्पनः २६ स तथा विप्रकीर्णस्तु नाराचैः शितशक्तिभिः । हनूमान्ददृशे वीरः प्ररूढ इव सानुमान् २७ विरराज महावीर्यो महाकायो महाबलः । पुष्पिताशोकसंकाशो विधूम इव पावकः २८ ततोऽन्यं वृक्षमुत्पाट्य कृत्वा वेगमनुत्तमम् । शिरस्यभिजघानाशु

---

भूमीवर पडलेलें पाहून हनुमान् क्रोधानें व्याप्त झाला १९. नंतर रोष आणि दर्प ह्यांनीं युक्त झालेला तो वानर अश्वकर्ण वृक्षासमीप आला; मोठ्या पर्वताप्रमाणें उन्नत असलेला तो वृक्ष त्यानें उपटला २० आणि प्रचंड स्कंधानें युक्त असलेला तो प्रचंड अश्वकर्ण वृक्ष हातामध्यें घेतल्यावर मोठ्या आनंदानें त्यानें त्याला भूतलावर फिरविलें २१; मोठ्या वेगानें धांवत जातां जातां जोरानें वृक्ष त्यानें मोडून टाकिले; अत्यंत क्रुद्ध झालेला तो हनुमान् पादप्रक्षेपांच्या योगानें पृथ्वी विदीर्ण करूं लागला २२ आणि माहुतांसहवर्तमान गज, रथासहवर्तमान रथी आणि पादचारी क्रूर राक्षस ह्यांचा हनुमानानें वध केला २३. क्रुद्ध होऊन वृक्षासहवर्तमान आलेला तो हनुमान् क्रुद्ध झालेला अंतक प्राण हरण करण्याकरितां येत आहे कीं काय असा अवलोकन करून राक्षस धांवाधांव करूं लागले २४. तेव्हां राक्षसांना भय उत्पन्न करणारा तो हनुमान् क्रुद्ध होऊन आपल्या अंगावर येत आहे असें अवलोकन करून अकंपन वीर क्षुब्ध झाला आणि गर्जना करूं लागला २५. नंतर देह विदीर्ण करणाऱ्या चवदा तीक्ष्ण बाणांनीं महावीर्यवान् हनुमानाला अकंपनानें वेध केला असतां २६ ज्यांचीं टोंकें घांसलेलीं आहेत अशा नाराच बाणांनीं भरून गेलेला तो वीर हनुमान् मोठमोठे वृक्ष ज्यांवर उगवलेले आहेत अशा पर्वताप्रमाणें दिसूं लागला २७. इतकेंच नव्हे परंतु, महावीर्यवान् व प्रचंड शरीर धारण करणारा तो महाबलाढ्य हनुमान् प्रफुल्लित अशोक वृक्षाप्रमाणें अथवा निर्धूम अग्निप्रमाणें भासूं लागला २८. तदनंतर दुसरा एक वृक्ष उपटून अतित्वरेनें राक्षसाधिपति अकंपनाच्या

राक्षसेन्द्रमकम्पनम् २९ स वृक्षेण हतस्तेन सक्रोधेन महात्मना ।
राक्षसो वानरेन्द्रेण पपात च ममार च ३० तं दृष्ट्वा निहतं भूमौ
राक्षसेन्द्रमकम्पनम् । व्यथिता राक्षसाः सर्वे क्षितिकम्प इव द्रुमाः ३१
त्यक्तप्रहरणाः सर्वे राक्षसास्ते पराजिताः । लङ्कामभिययुस्त्रासाद्वानरै-
स्तैरभिद्रुताः ३२ ते मुक्तकेशाः संभ्रान्ता भग्नमानाः पराजिताः । भया-
च्छ्रमजलैरङ्गैः प्रस्रवद्भिर्विदुद्रुवुः ३३ अन्योन्यं ते प्रमथ्नन्तो विविशुर्न-
गरं भयात् । पृष्ठतस्ते तु संमूढाः प्रेक्षमाणा मुहुर्मुहुः ३४ तेषु लङ्कां प्रवि-
ष्टेषु राक्षसेषु महाबलाः । समेत्य हरयः सर्वे हनूमन्तमपूजयन् ३५ सोपि
प्रवृद्धस्तान्सर्वान्हरीन्संप्रत्यपूजयत् । हनूमान्सत्त्वसंपन्नो यथार्हमनुकू-
लतः ३६ विनेदुश्च यथाप्राणं हरयो जितकाशिनः । चकृषुश्च पुनस्तत्र
सप्राणानेव राक्षसान् ३७ स वीरशोभामभजन्महाकपिः समेत्य रक्षांसि
निहत्य मारुतिः । महासुरं भीममित्रनाशनं विष्णुर्यथैवोरुबलं चमूमुखे ३८

---

मस्तकावर त्यानें फेंकिला असतां २९ क्रुद्ध झालेल्या त्या महात्म्या वानराधिपति हनुमानानें टाकिलेल्या त्या वृक्षाचा तडाका बसल्यामुळें तो राक्षस खालीं पडला व गतप्राण झाला ३०. नंतर तो राक्षसाधिपति अकंपन वध पावून भूमीवर पडल्याचें अवलोकन करितांक्षणीं भूकंपसमयीं वृक्ष ज्याप्रमाणें हदळून जातात त्याप्रमाणें सर्वही राक्षस अतिशय कंपित झाले ३१. पराजित झालेल्या त्या सर्वही राक्षसांनीं आपआपलीं आयुधें टाकून दिलीं आणि भीतीनें ते लंकेकडेच पळत सुटले असतां ते वानरही त्यांच्या मागोमाग लागले ३२. त्यांचे केश अस्ताव्यस्त झाले; त्यांना कांहींएक सुचे-नासें झालें; पराजित झाल्यामुळें त्यांचा गर्वही नाहींसा झाला आणि श्रमामुळें शरी-रांतून घामाचे पाट चालले असतांना ते भीतीनें पळत सुटले ३३; आणि द्वारासमीप आल्यावर एकमेकांशीं खेंचाखेंच करीत करीत व कांहींएक सुचनासें होऊन वारंवार भीतीनें मागें पहात पहात ते नगरामध्यें प्रविष्ट झाले ३४. असो. ह्याप्रमाणें ते राक्षस लंकेमध्यें प्रविष्ट झाले असतां सर्वही महाबलाढ्य वानर एकत्र जुळून हनुमानाची प्रशंसा करूं लागले ३५. तेव्हां वृद्धिंगत झालेल्या त्या धैर्यसंपन्न हनुमानानेंही योग्यता पाहून सर्व वानरांची, प्रेमपूर्वक अवलोकन, भाषण इत्यादिकांच्या योगानें, स्तुति केली असतां ३६ ते निर्भय वानर आपआपल्या सामर्थ्याप्रमाणें गर्जना करूं लागले आणि जिवंत असलेल्याच राक्षसांना ते ओढून नेऊं लागले ३७. असो. सैन्यामध्यें महाबलाढ्य दैत्याचा वध केल्यामुळें ज्याप्रमाणें विष्णूला वीरशोभा येत असते त्याप्रमाणें त्या भयंकर शत्रुनाशक महादैत्याचा वध केल्यानंतर त्या

अपूजयन्देवगणास्तदा कपिं स्वयं च रामोऽतिबलश्च लक्ष्मणः । तथैव सुग्रीवप्रमुखाः प्लवङ्गमा विभीषणश्चैव महाबलस्तदा ३९ [२११६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः॥५६॥

अकम्पनवधं श्रुत्वा क्रुद्धो वै राक्षसेश्वरः । किंचिद्दीनमुखश्चापि सचिवांस्तानुदैक्षत १ स तु ध्यात्वा मुहूर्तं तु मन्त्रिभिः संविचार्य च । ततस्तु रावणः पूर्वाह्णे राक्षसाधिपः ॥ पुरीं परिययौ लङ्कां सर्वान्गुल्मानवेक्षितुम् २ तां राक्षसगणैर्गुप्तां गुल्मैर्बहुभिरावृताम् । ददर्श नगरीं राजा पताकाध्वजमालिनीम् ३ रुद्धां तु नगरीं दृष्ट्वा रावणो राक्षसेश्वरः । उवाचात्महितं काले प्रहस्तं युद्धकोविदम् ४ पुरस्योपनिविष्टस्य सहसा पीडितस्य ह । नान्ययुद्धात्प्रपश्यामि मोक्षं युद्धविशारदाः ५ अहं वा कुम्भकर्णो वा त्वं वा सेनापतिर्मम । इन्द्रजिद्वा निकुम्भो वा वहेयुर्भारमीदृशम् ६ स त्वं बलमतः शीघ्रमादाय परिगृह्य च । विजयायाभिनिर्याहि यत्र सर्वे वनौकसः ७ निर्याणादेव तूर्णं च चलिता हरिवाहिनी । नर्दतां

---

महाकपीला वीरशोभा प्राप्त झाली ३८; आणि देवगण, स्वतः राम, अतिबलाढ्य लक्ष्मण, सुग्रीवप्रभृति वानर व महाबलाढ्य बिभीषण हे त्याची प्रशंसा करूं लागले ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं छप्पन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५६ ॥

अकंपनाचा वध झाल्याचें श्रवण केल्यावर राक्षसाधिपति रावण क्रुद्ध झाला आणि किंचित् म्लानवदन होऊन सचिवांकडे पाहूं लागला १. तदनंतर एक मुहूर्तपर्यंत मनामध्येंच चिंतन करून मन्त्र्यांसहवर्तमान विचार केल्यानंतर तो राक्षसाधिपति रावण पूर्वाह्णसमयींच सर्व सेनासमुदाय अवलोकन करण्याकरितां लंकेसभोंवतीं हिंडला असतां २ पताका व ध्वज ह्यांच्या समूहांनीं युक्त असलेली ती लंकानगरी राक्षसगणांनीं सुरक्षित आणि असंख्य सेनासमुदायांनीं व्याप्त असलेली त्या राजाच्या दृष्टीं पडली ३. तेव्हां नगरीला वेढा पडलेला पाहून राक्षसाधिपति रावण युद्धनिपुण प्रहस्ताला वेळेवर आपल्या हिताची गोष्ट बोलूं लागला ४. ( तो ह्मणाला ) " एकाएकीं नगराला शत्रुसैन्याचा वेढा पडून ज्याअर्थीं नगर कचाट्यांत सांपडलें आहे त्याअर्थीं, हे युद्धनिपुणहो, दुसऱ्यानें युद्ध केल्यापासून ह्या नगराची मुक्तता होईल असें मला दिसत नाहीं ५. कारण, मी, कुंभकर्ण, माझा सेनाधिपति तूं, इंद्रजित् आणि निकुंभ हेच अशाप्रकारचें दुर्घट कार्य पार पाडितील ६. ह्यास्तव, तूं सत्वर सैन्य जमा करून बरोबर घे आणि जिकडे सर्व वानर आहेत तिकडे विजयप्राप्तीकरितां चालता हो ७.

राक्षसेन्द्राणां श्रुत्वा नादं द्रविष्यति ८ चपला ह्यविनीताश्च चलचित्ताश्च
वानराः।न सहिष्यन्ति ते नादं सिंहनादमिव द्विपाः ९विद्रुते च बले तस्मिन्रामः
सौमित्रिणा सह। अवशस्तु निरालम्बः प्रहस्तवशमेष्यति १०आपत्संशयिता
श्रेयो नात्र निःसंशयीकृता। प्रतिलोमानुलोमं वा यत्तु नो मन्यसे हितम् ११
रावणेनैवमुक्तस्तु प्रहस्तो वाहिनीपतिः। राक्षसेन्द्रमुवाचेदमसुरेन्द्रमिवो-
शना १२ राजन्मन्त्रितपूर्वं नः कुशलैः सह मन्त्रिभिः। विवादश्चापि
नो वृत्तः समवेक्ष्य परस्परम् १३ प्रदानेन तु सीतायाः श्रेयो व्यवसितं
मया। अप्रदाने पुनर्युद्धं दृष्टमेव तथैव नः १४ सोहं दानैश्च मानैश्च
सततं पूजितस्त्वया। सान्त्वैश्च विविधैः काले किं न कुर्यां हितं तव १५
न हि मे जीवितं रक्ष्यं पुत्रदारधनानि च। त्वं पश्य मां जुहूषन्तं त्वदर्थे
जीवितं युधि १६ एवमुक्त्वा तु भर्तारं रावणं वाहिनीपतिः। उवाचेदं
बलाध्यक्षान्प्रहस्तः पुरतः स्थितान् १७ समानयत मे शीघ्रं राक्षसानां

---

तूं बाहेर पडतांक्षणीं वानरसेना कंपित होऊन जाईल आणि गर्जना करणाऱ्या राक्षसाधिपतींचा शब्द कानीं पडतांक्षणीं ती सेना पळूनही जाईल ८. कारण, गजांना ज्याप्रमाणें सिंहनाद सहन होत नाहीं त्याप्रमाणें चपल, उद्धट व चंचलचित्त असलेल्या वानरांना तो नाद सहन होणार नाहीं ९. असो. तें सैन्य पळून गेल्यावर लक्ष्मणासहवर्तमान राम निराधार व निरुपाय होऊन तो प्रहस्ताच्या स्वाधीन होईल १०. युद्धामध्यें मरण येणें हें संशयित आहे परंतु, विजयप्राप्ति ह्या ठिकाणीं संशयित दिसत नाहीं. ह्यास्तव, मला बरें वाटो अथवा न वाटो तुला जी गोष्ट ह्याप्रसंगीं हितावह दिसत असेल ती तूं सांग" ११. ह्याप्रमाणें रावणानें भाषण केलें असतां असुराधिपतीला सांगणाऱ्या शुक्राचार्याप्रमाणें सेनापति प्रहस्त राक्षसराज रावणाला ह्मणाला १२ "हे राजा, कुशल मंत्र्यांसहवर्तमान आह्मीं पूर्वींच विचार करून ठेविला आहे आणि एकमेकांचें मत ऐकून घेतल्यावर आह्मांमध्यें पूर्वीं ह्याविषयीं विवादही झालेला आहे १३. सीता दिली असतां कल्याण होईल असें मीं ठरविलें होतें आणि न दिली असतां, युद्धाचा प्रसंग येईल असेंही मी निश्चित केलें होतें. तस्मात्, त्याचप्रमाणें आमच्या अनुभवाला आलें आहे १४. सारांश, दान, मान आणि नानाप्रकारचे सौम्य शब्द ह्यांनीं तूं माझी नेहमीं मान्यता राखीत असतांना मी तुझें हित कां बरें करणार नाहीं ? १५. जीवित, पुत्र, दारा व धन ह्यांपैकीं मला कशाचीही पर्वा नाहीं. तुझ्याकरितां युद्धामध्यें जीविताचें हवन करण्यास मी तयार आहें असें तूं समज" १६. ह्याप्रमाणें अधिपति रावणाला सांगून पुढें उभ्या असलेल्या सेनाधिपतींना तो प्रहस्त ह्मणाला १७

महाबलम् १८ मद्बाणानां तु वेगेन हतानां तु रणाजिरे । अद्य तृप्यन्तु मांसादाः पक्षिणः काननौकसः १९ तस्य तद्वचनं श्रुत्वा बलाध्यक्षा महाबलाः । बलमुद्योजयामासुस्तस्मिन्राक्षसमन्दिरे २० सा बभूव मुहूर्तेन भीमैर्नानाविधायुधैः । लङ्का राक्षसवीरैस्तैर्गजैरिव समाकुला २१ हुताशनं तर्पयतां ब्राह्मणांश्च नमस्यताम् । आज्यगन्धप्रतिवहः सुरभिर्मारुतो ववौ २२ स्रजश्च विविधाकारा जगृहुस्त्वभिमन्त्रिताः । सङ्ग्रामसज्जाः संहृष्टा धारयन्राक्षसास्तदा २३ सधनुष्काः कवचिनो वेगादुत्सृज्य राक्षसाः । रावणं प्रेक्ष्य राजानं प्रहस्तं पर्यवारयन् २४ अथामन्त्र्य तु राजानं भेरीमाहत्य भैरवाम् । आरुरोह रथं युक्तः प्रहस्तः सज्जकल्पितम् २५ हयैर्महाजवैर्युक्तं सम्यक्सूतं सुसंयुतम् । महाजलदनिर्घोषं साक्षाच्चन्द्रार्कभास्वरम् २६ उरगध्वजदुर्धर्षं सुवरूथं स्वपस्करम् । सुवर्णजालसंयुक्तं प्रहसन्तमिव श्रिया २७ ततस्तं रथमास्थाय रावणार्पितशासनः। लङ्काया

---

"राक्षसांचें प्रचंड सैन्य सत्वर माझ्याकडे घेऊन या १८. कारण, माझ्या बाणांच्या वेगानें संग्राममध्यें वध पावलेल्या वानरांचें मांसभक्षण करून आज वनामध्यें रहाणारे मांसभक्षक पक्षी तृप्त होवोत " १९. तें त्याचें भाषण श्रवण करून महाबलाढ्य सेनाधिपतींनीं त्या राक्षसमंदिरामध्यें सैन्य तयार केलें असतां २० एका मुहूर्तामध्यें गजांनीं व्याप्त होऊन गेल्याप्रमाणें नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेल्या त्या भयंकर राक्षसवीरांनीं ती लंका व्याप्त होऊन गेली २१. ते राक्षस ब्राह्मणांना नमस्कार करून अग्नीमध्यें होम देऊं लागले असतां आज्यगंधानें युक्त असा सुगंधि वायु वाहूं लागला २२; अभिमंत्रित केलेल्या नानाप्रकारच्या पुष्पमाला संग्रामाकरितां सज्ज झालेल्या राक्षसांनीं हातामध्यें घेतल्या आणि आनंदित होऊन कंठामध्यें धारण केल्या २३. नंतर धनुष्यें व कवचें धारण केलेले ते राक्षस वेगावेगानें वाहनांवरून खालीं उतरले आणि रावणराजाकडे पाहिल्यानंतर ते प्रहस्ताच्या भोंवतीं उभे राहिले २४. तदनंतर राजाचा निरोप घेऊन व भयंकर दुंदुभि वाजवून सर्वायुधसंपन्न रथावर तो प्रहस्त आरूढ झाला २५. त्या रथाला महावेगवान् अश्व लाविलेले होते; त्याचा सारथि उत्कृष्ट होता; त्याची बांधणी चांगली बळकट होती; प्रचंड मेघाप्रमाणें त्याचा ध्वनि होता; प्रत्यक्ष चंद्रसूर्यांप्रमाणें तो उज्ज्वल होता २६; सर्पध्वजामुळें त्याच्यासमीप प्रतिपक्ष्यांनीं जाणेंही शक्य नव्हतें. त्याला चांगलें चिलखत चढविलेलें होतें; त्याचे अवयव चांगले होते; सुवर्णभूषणांनीं तो युक्त होता आणि कांतीमुळें तो जसा कांहीं हास्यच करीत असल्यासारिखा दिसत होता २७. असो. रावणाची आज्ञा झाल्यानंतर

निर्ययौ तूर्णं बलेन महता वृतः २८ ततो दुन्दुभिनिर्घोषः पर्जन्यनिनदोपमः ।
वादित्राणां च निनदः पूरयन्निव मेदिनीम् २९ शुश्रुवे शङ्खशब्दश्च
प्रयाते वाहिनीपतौ । निनदन्तः स्वरान्घोरान्राक्षसा जग्मुरग्रतः ३०
भीमरूपा महाकायाः प्रहस्तस्य पुरःसराः । नरान्तकः कुम्भहनुर्महानादः
समुन्नतः ॥ प्रहस्तसचिवा ह्येते निर्ययुः परिवार्य तम् ३१ व्यूढेनैव सुघो-
रेण पूर्वद्वारात्स निर्ययौ । गजयूथनिकाशेन बलेन महता वृतः ३२
सागरप्रतिमौघेन वृतस्तेन बलेन सः । प्रहस्तो निर्ययौ क्रुद्धः कालान्त-
कयमोपमः ३३ तस्य निर्याणघोषेण राक्षसानां च नर्दताम् । लङ्कायां
सर्वभूतानि विनेदुर्विकृतैः स्वरैः ३४ व्यभ्रमाकाशमाविश्य मांसशोणि-
तभोजनाः । मण्डलान्यपसव्यानि खगाश्चक्रू रथं प्रति ३५ वमन्ति पाव-
कज्वालाः शिवा घोरा ववाशिरे । अन्तरिक्षात्पपातोल्का वायुश्च परुषं
ववौ ३६ अन्योन्यमभिसंरब्धा ग्रहाश्च न चकाशिरे ३७ मेघाश्च खर-
निर्घोषा रथस्योपरि रक्षसः । ववर्षू रुधिरं चास्य सिषिचुश्च पुरःसरान् ३८
केतुमूर्धनि गृध्रस्तु विलीनो दक्षिणामुखः । नदन्नुभयतः पार्श्वे समग्रां

---

तो प्रहस्त त्या रथावर आरूढ झाला आणि मोठें सैन्य बरोबर घेऊन तो सत्वर लंकेंतून बाहेर पडला २८. तेव्हां मेघगर्जनेप्रमाणें दुंदुभीचा ध्वनि आणि पृथ्वी जशी कांहीं दुमदुमून टाकीत असलेला वाद्यांचा व शंखांचा शब्द तो सेनापति निघाला असतां ऐकूं येऊं लागला आणि भयंकर रूपें व प्रचंड शरीरें धारण केलेले प्रहस्ताचे पुढें चालणारे राक्षस भयंकर गर्जना करीत करीत त्याच्या अग्रभागीं चालूं लागले आणि नरांतक, कुंभहनु, महानाद व समुन्नत हे प्रहस्ताचे सचिवही त्याच्या सभोंवतीं राहून बाहेर पडले २९, ३०, ३१. व्यवस्थित, अत्यंत भयंकर आणि गजसमुदायतुल्य असें प्रचंड सैन्य बरोबर घेऊन तो प्रहस्त पूर्वद्वारांतून बाहेर पडला ३२. सारांश, त्या सागरतुल्य सैन्यानें परिवेष्टित झालेला तो प्रहस्त क्रुद्ध झाल्यामुळें काल, अंतक व यम ह्यांप्रमाणें दिसूं लागला आणि बाहेर पडला ३३. त्याच्या प्रयाणाच्या घोषाबरोबर राक्षसांची गर्जना सुरू झाली असतां लंकेंतील सर्व प्राणी विकृत स्वरांनीं आक्रोश करूं लागले ३४. रक्तमांस भक्षण करणारे पक्षी मेघरहित असलेल्या आकाशामध्यें उड्डाण करून त्या प्रहस्ताच्या रथावर उलट्या प्रदक्षिणा करूं लागले ३५. खोंकडें तोंडांतून अग्निज्वाला टाकूं लागून भयंकर शब्द करूं लागलीं; अंतरिक्षापासून उल्कापात होऊं लागले; वायु दुःसह वाहूं लागला ३६; एकमेकांवर क्रुद्ध झालेले ग्रहही झळकेनासे झाले ३७; त्या राक्षसाच्या रथावर गर्दभासारिखी गर्जना करणारे मेघ रक्ताची वृष्टि करूं लागले व

श्रियमाहरत् ३९ सारथेर्बहुशश्चात्र सङ्ग्राममनिवर्तिनः । प्रतोदो न्यपतद्धस्तात्सूतस्य हयसादिनः ४० निर्याणश्री च या च स्याद्भास्वरा च सुदुर्लभा । सा ननाश मुहूर्तेन समे च स्खलिता हयाः ४१ प्रहस्तं तं हि निर्यान्तं प्रख्यातगुणपौरुषम् । युधि नानाप्रहरणाः कपिसेनाभ्यवर्तत ४२ अथ घोषः सुतुमुलो हरीणां समजायत । वृक्षानारुजतां चैव गुर्वीर्वै गृह्णतां शिलाः ४३ नदतां राक्षसानां च वानराणां च गर्जताम् । उभे प्रमुदिते सैन्ये रक्षोगणवनौकसाम् ४४ वेगितानां समर्थानामन्योन्यवधकाङ्क्षिणाम् । परस्परं चाह्वयतां निनादः श्रूयते महान् ४५ ततः प्रहस्तः कपिराजवाहिनीमभिप्रतस्थे विजयाय दुर्मतिः । विवृद्धवेगश्च विवेशितां चमूं यथा मुमूर्षुः शलभो विभावसुम् ४६ [२१६२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तपञ्चाशः सर्गः॥५७॥

ततः प्रहस्तं निर्यान्तं दृष्ट्वा रणकृतोद्यमम् । उवाच सस्मितं रामो

---

याच्या अग्रेसरांवरही त्यांनीं रक्ताचा सडा करून टाकिला ३८; ध्वजावर एक गृध्र दक्षिणाभिमुख होऊन बसला आणि आक्रोश करीत करीत आपल्या दोन्ही बाजू खाजवूं लागला असतां त्याच्या सर्व संपत्तीचा नाश होणार असल्याचें त्यानें सुचविलें ३९. संग्रामांतून परत न फिरणाऱ्या आणि अश्वांना शिक्षण देणाऱ्या सूतवंशज सारथ्याच्या हातांतून वारंवार चाबूक खालीं पडूं लागला ४०. उज्वल आणि अत्यंत दुर्लभ अशी जी प्रयाणशोभा त्याला प्राप्त झाली होती तीही एका क्षणांत नाहींशी होऊन गेली आणि अश्वही सपाट प्रदेशावरच ठेंचाळूं लागले ४१ व ह्याप्रमाणें प्रख्यात गुण व पराक्रम ह्यांनीं युक्त असलेला तो प्रहस्त बाहेर जाऊं लागला असतां नानाप्रकारचीं आयुधें घेऊन वानरसेनाही संग्रामामध्यें परत फिरली ४२. तदनंतर वृक्ष उपटणाऱ्या व मोठच्या मोठ्या शिला हातांत घेणाऱ्या वानरांमध्यें फारच मोठी गर्जना होऊं लागली ४३. गर्जना करणाऱ्या राक्षसांचीं व वानरांचीं अशीं दोन्हीं सैन्यें आनंदित झालीं; वेगवान्, समर्थ, परस्परांच्या वधाची इच्छा करणारे आणि परस्परांना आह्वान करणारे जे राक्षसगण व वानर ह्यांमध्यें मोठी गर्जना सुरू झाली ४४,४५. तदनंतर तो दुर्बुद्धि प्रहस्त विजयप्राप्तीकरितां वानरराजाच्या सेनेकडे निघाला आणि मुमूर्षु पतंग ज्याप्रमाणें अग्नीमध्यें प्रवेश करितो त्याप्रमाणें अतिशयच वेगानें त्यानें त्या सेनेमध्यें प्रवेश केला ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५७ ॥

तदनंतर संग्रामाविषयीं उद्युक्त झालेला प्रहस्त बाहेर पडत आहे असें पाहून

बिभीषणमरिन्दमः १ क एष सुमहाकायो बलेन महता वृतः । आगच्छति महावेगः किंरूपबलपौरुषः २ आचक्ष्व मे महाबाहो वीर्यवन्तं निशाचरम् । राघवस्य वचः श्रुत्वा प्रत्युवाच बिभीषणः ३ एष सेनापतिस्तस्य प्रहस्तो नाम राक्षसः । लङ्कायां राक्षसेन्द्रस्य त्रिभागबलसंवृतः ॥ वीर्यवानस्त्रविच्छूरः सुप्रख्यातपराक्रमः ४ ततः प्रहस्तं निर्यान्तं भीमं भीमपराक्रमम् । गर्जन्तं सुमहाकायं राक्षसैरभिसंवृतम् ५ ददर्श महती सेना वानराणां बलीयसाम् । अभिसंजातघोषाणां प्रहस्तमभिगर्जताम् ६ खड्गशक्त्यृष्टिशूलाश्च बाणानि मुसलानि च । गदाश्च परिघाः प्रासा विविधाश्च परश्वधाः ७ धनूंषि च विचित्राणि राक्षसानां जयैषिणाम् । प्रगृहीतान्यराजन्त वानरानभिधावताम् ८ जगृहुः पादपांश्चापि पुष्पितांस्तु गिरींस्तथा । शिलाश्च विपुला दीर्घा योद्धुकामाः प्लवङ्गमाः ९ तेषामन्योन्यमासाद्य सङ्ग्रामः सुमहानभूत् । बहूनामश्मवृष्टिं च शरवर्षं च वर्षताम् १० बहवो राक्षसा युद्धे बहून्वानरपुङ्गवान्। वानरा राक्षसांश्चापि

---

शत्रुदमन राम हास्यपूर्वक बिभीषणाला ह्मणाला १ "प्रचंड सैन्यानें परिवेष्टित, महावेगवान् आणि अतिशयच धिप्पाड असा हा कोण येत आहे आणि ह्याचा अधिकार, बल व पराक्रम हीं कशीं आहेत ? २. हे महापराक्रमी बिभीषणा, ह्या वीर्यवान् राक्षसासंबंधानें तू मला वृत्तांत निवेदन कर". हें रामाचें भाषण श्रवण करून बिभीषण ह्मणाला ३ "हा त्या राक्षसाधिपति रावणाचा सेनापति प्रहस्तनामक राक्षस होय. लंकेमध्यें असलेल्या सैन्यापैकीं एक तृतीयांश सैन्य ह्याच्या बरोबर आहे आणि हा वीर्यवान्, अस्त्रवेत्ता व शूर असून ह्याचे पराक्रम फारच प्रख्यात आहेत ४. प्रहस्ताला अनुलक्षून गर्जना सुरू झाल्यामुळें ज्यांच्यामध्यें जिकडे तिकडे गडबड उडून राहिली आहे अशा बलाढ्य वानरांच्या प्रचंड सेनेनें भयंकर पराक्रम करणारा, राक्षसांनीं परिवेष्टित व अतिशयच धिप्पाड असा गर्जना करीत असलेला तो घोर प्रहस्त बाहेर पडतांना अवलोकन केला ५,६. नंतर खड्ग, शक्ति, ऋष्टि, शूल, बाण, मुसलें, गदा, परिघ, प्रास, नानाप्रकारचे परशु आणि चित्रविचित्र धनुष्यें हीं वानरांवर धांवून जाणाऱ्या जयेच्छु राक्षसांनीं घेतलेलीं आयुधें चमकूं लागलीं असतां ७,८ युद्ध करण्याच्या इच्छेनें वानरांनींही प्रफुल्लित वृक्ष, पर्वत आणि दीर्घ व प्रचंड शिला हातामध्यें घेतल्या ९; व ते पाषाणांचा आणि बाणांचा वर्षाव करणारे असंख्य वानरराक्षस एकमेकांशीं जाऊन भिडले असतां त्यांमध्यें फारच मोठा संग्राम झाला १०. त्या युद्धांत असंख्य राक्षसांनीं मोठ्या मोठ्या असंख्य वानरांचा आणि असंख्य वानरांनीं

निजघ्नुर्बहवो बहून् ११ शूलैः प्रमथिताः केचित्केचित्तु परमायुधैः । परिघैराहताः केचित्केचिच्छिन्नाः परश्वधैः १२ निरुच्छ्वासाः पुनः केचित्पतिता जगतीतले । विभिन्नहृदयाः केचिदिषुसंधानसाधिताः १३ केचिद्द्विधा कृताः खड्गैः स्फुरन्तः पतिता भुवि । वानरा राक्षसैः शूरैः पार्श्वतश्च विदारिताः १४ वानरैश्चापि संक्रुद्धै राक्षसौघाः समन्ततः । पादपैर्गिरिशृङ्गैश्च संपिष्टा वसुधातले १५ वज्रस्पर्शतलैर्हस्तैर्मुष्टिभिश्च हता भृशम् । वमञ्शोणितमास्येभ्यो विशीर्णवदनेक्षणाः १६ आर्तस्वनं च स्वनतां सिंहनादं च नर्दताम् । बभूव तुमुलः शब्दो हरीणां रक्षसामपि १७ वानरा राक्षसाः क्रुद्धा वीरमार्गमनुव्रताः । विवृत्तवदनाः क्रूराश्चक्रुः कर्माण्यभीतवत् १८ नरान्तकः कुम्भहनुर्महानादः समुन्नतः । एते प्रहस्तसचिवाः सर्वे जघ्नुर्वनौकसः १९ तेषां निपततां शीघ्रं निघ्नतां चापि वानरान् । द्विविदो गिरिशृङ्गेण जघानैकं नरान्तकम् २० दुर्मुखः पुनरुत्थाय कपिः स विपुलद्रुमम् । राक्षसं क्षिप्रहस्तं

---

अपरिमित राक्षसांचा वध केला ११. कांहीं वानरांचा शूलांच्या योगानें फडशा पडला; कांहींचीं चक्रामुळें गच्छन्ति झाली; कांहींचा परिघांमुळें चुराडा झाला; कांहींचे कुऱ्हाडींमुळें तुकडे तुकडे झाले १२; कांहीं गतप्राण होऊन भूमीवर पडले; शरसंधानांत सांपडल्यामुळें कांहींचीं हृदयें विदीर्ण होऊन गेलीं १३; तरवारींनीं दोन दोन तुकडे झालेले कांहीं वानर भूमीवर तडफडत पडले आणि शूर राक्षसांनीं कांहीं वानरांच्या बरगड्याच विदीर्ण करून टाकिल्या १४. अतिशय क्रुद्ध झालेल्या वानरांनींही वृक्ष व पर्वतशिखरें ह्यांच्या योगानें भूतलावर जिकडे तिकडे राक्षसगणांचा चुराडा उडवून दिला १५; आणि ज्यांचा प्रहार वज्रतुल्य आहे अशा हातांनीं व मुष्टींनीं ताडित झाल्यामुळें कांहीं राक्षस तोंडांतून रक्त ओकूं लागले व कांहींचीं मुखें आणि नेत्र हीं छिन्नभिन्न झालीं १६. आर्तस्वरानें विवळणाऱ्या आणि सिंहासारिखी गर्जना करणाऱ्या त्या वानरराक्षसांमध्यें तुमुल शब्द होऊन राहिला १७. ( क्रोधामुळें ) ज्यांच्या मुखावरील चर्या फिरून गेली आहे व ज्यांनीं ( संग्रामामध्यें पराङ्मुख न होणें ह्या ) वीरमार्गाचें अवलंबन केलें आहे त्या वानरांनीं व राक्षसांनीं निर्भयपणें पराक्रम केले. १८. नरांतक, कुंभहनु, महानाद व समुन्नत ह्या सर्व प्रहस्तसचिवांनीं वानरांचा वध केला १९; परंतु, ते त्वरेत्वरेनें अंगावर तुटून पडून वानरांचा वध करीत असतांनाही द्विविदानें त्यांपैकीं एका नरांतकाचा पर्वतशिखरानें वध केला २०. नंतर दुर्मुख वानरानें पुनरपि उठून हातामध्यें मोठा वृक्ष घेतला आणि ( शस्त्रादिकांचा

तु समुन्नतमपोथयत् २१ जाम्बवांस्तु सुसंक्रुद्धः प्रगृह्य महतीं शिलाम् । पातयामास तेजस्वी महानादस्य वक्षसि २२ अथ कुम्भहनुस्तत्र तारेणासाद्य वीर्यवान् । वृक्षेण महता सद्यः प्राणान्संत्याजयद्रणे २३ अमृष्यमाणस्तत्कर्म प्रहस्तो रथमाश्रितः । चकार कदनं घोरं धनुष्पाणिर्वनौकसाम् २४ आवर्त इव संजज्ञे सेनयोरुभयोस्तदा । क्षुभितस्याप्रमेयस्य सागरस्येव निःस्वनः २५ महता हि शरौघेण राक्षसो रणदुर्मदः । अर्दयामास संक्रुद्धो वानरान्परमाहवे २६ वानराणां शरीरैस्तु राक्षसानां च मेदिनी । बभूवातिचिता घोरैः पर्वतैरिव संवृता २७ सा मही रुधिरौघेण प्रच्छन्ना संप्रकाशते । संछन्ना माधवे मासि पलाशैरिव पुष्पितैः २८ हतवीरौघवप्रां तु भग्नायुधमहाद्रुमाम् । शोणितौघमहातोयां यमसागरगामिनीम् २९ यकृत्प्लीहमहापङ्कां विनिकीर्णान्त्रशैवलाम् । भिन्नकायशिरोमीनामङ्गावयवशाद्वलाम् ३० गृध्रहंसवराकीर्णां कङ्कसारससेविताम् । मेदःफेनसमाकीर्णामावर्तस्वननिःस्वनाम् ३१ तां कापुरुषदु-

---

प्रयोग करण्यामध्यें फारच ) हातचलाखी दाखविणाऱ्या समुन्नतसंज्ञक राक्षसाला त्यानें ठार केलें २१. अतिशय क्रूर झालेल्या तेजस्वी जांबवानानें मोठी शिला घेतली आणि महानादाच्या वक्षःस्थलावर फेंकिली २२; व नंतर मोठा वृक्ष हातीं घेतलेल्या तार वानराशीं गांठ पडल्यामुळें वीर्यवान् कुंभहनूनेंही संग्रामामध्यें तत्क्षणीं प्राणत्याग केला २३. तेव्हां रथारूढ झालेल्या प्रहस्ताला तें कृत्य सहन न झाल्यामुळें त्यानें हातामध्यें धनुष्य घेऊन वानरांची भयंकर कत्तल उडविली असतां २४, इकडे तिकडे दोन्ही सेना फिरूं लागल्यामुळें संग्रामामध्यें जसा कांहीं पाण्याचा भोंवराच होऊं लागला आणि क्षुब्ध झालेल्या अपार सागराप्रमाणें ध्वनि सुरू झाला २५. संग्रामामध्यें हार जाण्यास दुर्घट व क्रुद्ध झालेल्या त्या प्रहस्त राक्षसानें त्या महारणांत प्रचंड बाणवृष्टीनें वानरांना जर्जर केलें २६; वानरांच्या व राक्षसांच्या शरीरांचे पृथ्वीवर अतिशयच ढीग पडल्यामुळें ती घोर पर्वतांनीं व्याप्त झाल्यासारिखी दिसूं लागली २७; आणि रक्तप्रवाहानें ती भरून गेल्यामुळें वैशाखमासीं प्रफुल्लित पलाशवृक्षांनीं आच्छादित झाल्यासारिखी दिसूं लागली २८. वध पावलेले वीरगण हेच कोणी तट, मोडून गेलेलीं आयुधें हे मोठे मोठे वृक्ष, रक्तप्रवाह हें अगाध जल, यमरूप सागर हें गमनस्थान २९, यकृत् व प्लीहा हा दुस्तर चिखल, अस्ताव्यस्त पडलेलीं आंतडीं हें शेंवाळें, छिन्नभिन्न होऊन पडलेलीं धडें व मस्तकें हे मासे, शरीराचे अवयव हें हिरवें गवत ३०, गृध्र पक्षी हेच गर्दी करणारे हंस, कंकपक्षी हेच आश्रयाला रहाणारे सारस, मेद हाच

स्तारां युद्धभूमिमयीं नदीम् । नदीमिव घनापाये हंससारससेविताम् ३२
राक्षसाः कपिमुख्यास्ते तेरुस्तां दुस्तरां नदीम् । यथा पद्मरजोध्वस्तां
नलिनीं गजयूथपाः ३३ ततः सृजन्तं बाणौघान्प्रहस्तं स्यन्दने स्थितम् ।
ददर्श तरसा नीलो विधमन्तं प्लवङ्गमान् ३४ उद्धूत इव वायुः खे महद्-
भ्रबलं बलात् । समीक्ष्याभिद्रुतं युद्धे प्रहस्तो वाहिनीपतिः ३५ रथेना-
दित्यवर्णेन नीलमेवाभिदुद्रुवे । स धनुर्धन्विनां श्रेष्ठो विकृष्य परमाहवे ३६
नीलाय व्यसृजद्बाणान्प्रहस्तो वाहिनीपतिः । ते प्राप्य विशिखा नीलं विनि-
र्भिद्य समाहिताः ३७ महीं जग्मुर्महावेगा रोषिता इव पन्नगाः । नीलः
शरैरभिहतो निशितैर्ज्वलनोपमैः ३८ स तं परमदुर्धर्षमापतन्तं महाकपिः ।
प्रहस्तं ताडयामास वृक्षमुत्पाट्य वीर्यवान् । ३९ स तेनाभिहतः क्रुद्धो
नर्दन्राक्षसपुङ्गवः । ववर्ष शरवर्षाणि प्लवङ्गानां चमूपतौ ४० तस्य बाण-
गणानेव राक्षसस्य दुरात्मनः । अपारयन्वारयितुं प्रत्यगृह्णान्निमीलितः ४१
यथैव गोवृषो वर्षं शारदं शीघ्रमागतम् ४२ एवमेव प्रहस्तस्य शरवर्षा-

---

व्यापून टाकणारा फेंस आणि भोंवऱ्याप्रमाणें भरभर फिरणाऱ्या सेनांचा शब्द हाच प्रवाहध्वनि ह्यांनीं युक्त असलेली ३१ व भीरूंना दुस्तर अशी ती युद्धभूमिरूप अनुल्लंघनीय नदी, पर्जन्यकाल संपल्यानंतर हंसपक्षी व सारसपक्षी ह्यांनीं युक्त झालेली नदी तरून जाणाऱ्या सामान्य लोकांप्रमाणें अथवा कमलकेसरांनी भरलेलें सरोवर तरून जाणाऱ्या गजेंद्रांप्रमाणें, ते राक्षस व मुख्य मुख्य वानर तरून गेले ३२, ३३. तदनंतर रथावर आरूढ होऊन शरवृष्टि करीत असलेला प्रहस्त जोरानें वानरांना उडवून देत आहे असें अवलोकन केल्यावर नल ३४ त्याच्यावर चालून जाऊं लागला असतां तो संमुख येत आहे असें पाहून प्रचंड मेघावर जाणारा क्षुब्ध वायुच कीं काय असा तो सेनापति प्रहस्त सूर्यतुल्य तेजस्वी रथांत बसून स्वसामर्थ्यानें नीलाच्याच अंगावर धांवून गेला. नंतर, धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या सेनापति प्रहस्तानें महारणांत आपलें धनुष्य आकर्षण करून बाण सोडिले असतां सुव्यवस्थित रीतीनें सोडिलेले ते महावेगवान् बाण नीलाला भेदून क्रुद्ध सर्पांप्रमाणें भूमीमध्यें गेले व अशारीतीनें अग्नितुल्य तीक्ष्ण बाणांचा नीलाला प्रहार झाला ३५, ३६ ३७, ३८. तथापि, तो अतिदुःसह प्रहस्त चालून येत असतां त्या वीर्यवान् महाकपीनें वृक्ष उपटून त्याला ताडण केलें ३९. तेव्हां वृक्षानें ताडित झालेल्या त्या राक्षसश्रेष्ठाला क्रोध आला आणि गर्जना करीत करीत तो वानरसेनाधिपति नीलावर बाणवृष्टि करूं लागला ४०.

न्दुरासदान् । निमीलिताक्षः सहसा नीलः सेहे दुरासदान् ४३ रोषितः शरवर्षेण सालेन महता महान् । प्रजघान हयान्नीलः प्रहस्तस्य महाबलः ४४ ततो रोषपरीतात्मा धनुस्तस्य दुरात्मनः । बभञ्ज तरसा नीलो ननाद च पुनःपुनः ४५ विधनुः स कृतस्तेन प्रहस्तो वाहिनीपतिः । प्रगृह्य मुसलं घोरं स्यन्दनादवपुप्लुवे ४६ तावुभौ वाहिनीमुख्यौ जातवैरौ तरस्विनौ । स्थितौ क्षतजसिक्ताङ्गौ प्रभिन्नाविव कुञ्जरौ ४७ उल्लिखन्तौ सुतीक्ष्णाभिर्दंष्ट्राभिरितरेतरम् । सिंहशार्दूलसदृशौ सिंहशार्दूलचेष्टितौ ४८ विक्रान्तविजयौ वीरौ समरेष्वनिवर्तिनौ । काङ्क्षमाणौ यशः प्राप्तुं वृत्रवासवयोरिव ४९ आजघान तदा नीलं ललाटे मुसलेन सः । प्रहस्तः परमायत्तस्ततः सुस्राव शोणितम् ५० ततः शोणितदिग्धाङ्गः प्रगृह्य च महातरुम् । प्रहस्तस्योरसि क्रुद्धो विससर्ज महाकपिः ५१ तमचिन्त्यप्रहारं स प्रगृह्य

---

परंतु, त्या दुरात्म्या राक्षसाचें ते शरसमुदाय हाणून पाडण्यास असमर्थ असलेल्या त्या नीलानें जोराजोरानें होणारी शरदृतूंतील पर्जन्यवृष्टि ज्याप्रमाणें बैल डोळे मिटून सहन करितो त्याप्रमाणें ते शरसमुदाय डोळे मिटून सहन केले ४१, ४२; आणि अशाच रीतीनें प्रहस्तानें एकाएकीं केलेले बाणांचे दुसरेही दुःसह वर्षाव नीलानें डोळे मिटून सहन केले ४३. नंतर बाणवृष्टीमुळें क्रुद्ध झालेल्या त्या महाबलाढ्य व महावीर नीलानें मोठा सालवृक्ष हातांत घेऊन प्रहस्ताचे अश्व मारिले ४४; आणि क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या नीलानें त्या दुरात्म्याचें धनुष्य तोडून टाकून जोराजोरानें वारंवार गर्जना करण्यासही सुरवात केली ४५. तेव्हां नीलानें चापरहित केलेला तो सेनापति प्रहस्त भयंकर मुसळ घेऊन रथावरून खालीं उतरला ४६. तदनंतर एकमेकांविषयीं वैरभाव उत्पन्न झालेले ते उभयतां सेनापति सर्वांग रक्तानें भरून उभे राहिले असतां शरीरांतून मदस्राव चाललेल्या गजांप्रमाणें दिसूं लागले ४७. सिंहव्याघ्रांप्रमाणें पराक्रम करणारे आणि दिसण्यांतही त्यांच्यासारिखे क्रूर असलेले ते उभयतां अत्यंत तीक्ष्ण अशा दंष्ट्रांनीं एकमेकांचे लचके तोडूं लागले ४८. त्या दोघांनाही विजय प्राप्त झाल्यासारिखें वाटत होतें; दोघेही वीर संग्रामामध्यें पराङ्मुख होणारे नव्हते आणि वृत्रासुर व इंद्र ह्यांप्रमाणें असलेले ते उभयतांही यश संपादन करण्याची इच्छा धरून होते ४९. अतिशय उत्सुक झालेल्या प्रहस्तानें नीलाच्या ललाटावर मुसळानें प्रहार केला असतां त्या ललाटांतून रक्तस्राव होऊं लागला ५० आणि लगेच त्याचें सर्वांग रक्तानें भरून गेलें. तथापि, त्या महाकपीनें क्रुद्ध होऊन एक मोठा वृक्ष हातांत घेतला आणि प्रहस्ताच्या वक्षःस्थलावर फेंकिला ५१. परंतु,

मुसलं महत् । अभिदुद्राव बलिनं बलान्नीलं प्लवङ्गमम् ५२ तमुग्रवेगं संरब्धमापतन्तं महाकपिः । ततः संप्रेक्ष्य जग्राह महावेगो महाशिलाम् ५३ तस्य युद्धाभिकामस्य मृधे मुसलयोधिनः । प्रहस्तस्य शिलां नीलो मूर्ध्नि तूर्णमपातयत् ५४ नीलेन कपिमुख्येन विमुक्ता महती शिला। बिभेद बहुधा घोरा प्रहस्तस्य शिरस्तदा ५५ स गतासुर्गतश्रीको गतसत्त्वो गतेन्द्रियः । पपात सहसा भूमौ छिन्नमूल इव द्रुमः ५६ विभिन्नशिरसस्तस्य बहु सुस्राव शोणितम् । शरीरादपि सुस्राव गिरेः प्रस्रवणो यथा ५७ हते प्रहस्ते नीलेन तदकम्प्यं महाबलम् । राक्षसानामहृष्टानां लङ्कामभिजगाम ह ५८ न शेकुः समवस्थातुं निहते वाहिनीपतौ । सेतुबन्धं समासाद्य विशीर्णं सलिलं यथा ५९ हते तस्मिंश्चमूमुख्ये राक्षसास्ते निरुद्यमाः । रक्षःपतिगृहं गत्वा ध्यानमूकत्वमागताः ॥ प्राप्ताः शोकार्णवं तीव्रं विसंज्ञा इव ते भवन् ६० ततस्तु नीलो विजयी महाबलः

---

त्या वृक्षप्रहाराचीही पर्वा न करितां मोठें मुसल हातांत घेऊन तो प्रहस्त वेगावेगानें त्या बलाढ्य नीलवानराच्या अंगावर धांवला ५२. तेव्हां भयंकर वेग धारण करणारा तो प्रहस्त क्षुब्ध होऊन आपल्या अंगावर चालून येत आहे असें आढळून येतांक्षणीं त्या महावेगवान् महाकपीनें मोठी शिला हातांत घेतली ५३; युद्धाविषयीं उत्सुक असून संग्रामामध्यें मुसळानें युद्ध करणाऱ्या त्या प्रहस्ताच्या मस्तकावर त्या नीलानें झटपट फेंकिली ५४; आणि त्या वानरश्रेष्ठ नीलानें फेंकिलेल्या त्या घोर व प्रचंड शिलेनें प्रहस्ताच्या मस्तकाचे पुष्कळच तुकडे तुकडे करून टाकिले असतां ५५ प्राण, तेज, धैर्य आणि इंद्रियें ह्यांनीं हीन झालेला तो प्रहस्त मुळें तोडून टाकिलेल्या वृक्षाप्रमाणें एकाएकीं भूमीवर पडला ५६; आणि पर्वतापासून ज्याप्रमाणें झरा वाहूं लागतो त्याप्रमाणें त्याच्या त्या छिन्नभिन्न झालेल्या मस्तकांतून व शरीरांतूनही अतिशयच रक्तस्राव सुरू झाला ५७. असो. नीलानें प्रहस्ताचा वध केल्यावर हर्षरहित झालेल्या राक्षसांचें तें अजिंक्य प्रचंड सैन्य लंकेकडे चालतें झालें ५८. कारण, फुटक्या बंधाऱ्यापाशीं येऊन पोंचलेलें उदक ज्याप्रमाणें स्थिर रहाण्यास समर्थ होत नाहीं त्याप्रमाणें सेनापतीचा वध झाल्यावर ते राक्षस समरांगणामध्यें उभे रहाण्यास समर्थ झाले नाहींत ५९. सेनेमध्यें मुख्य असलेला तो प्रहस्त वध पावला असतां राक्षसांचा उत्साह नाहींसा झाला आणि राक्षसाधिपतीच्या घरीं गेल्यावर एकाद्या ध्यानस्थ पुरुषाप्रमाणें त्यांनीं मौन धारण केलें. सारांश, अगाध शोकसागरामध्यें सांपडल्यामुळें ते जवळ जवळ मूर्च्छितच झाले होते ६०. तदनंतर

प्रशस्यमानः सुकृतेन कर्मणा । समेत्य रामेण सलक्ष्मणेन प्रहृष्टरूपस्तु बभूव यूथपः ६१ [ २२२३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टपञ्चाशः सर्गः ॥ ५८ ॥

तस्मिन्हते राक्षससैन्यपाले प्लवङ्गमानामृषभेण युद्धे । भीमायुधं सागरवेगतुल्यं विदुद्रुवे राक्षसराजसैन्यम् १ गत्वा तु रक्षोधिपतेः शशंसुः सेनापतिं पावकसूनुशस्तम् । तच्चापि तेषां वचनं निशम्य रक्षोधिपः क्रोधवशं जगाम २ संख्ये प्रहस्तं निहतं निशम्य क्रोधार्दितः शोकपरीतचेताः । उवाच तान्राक्षसयूथमुख्यानिन्द्रो यथा निर्जरयूथमुख्यान् ३ नावज्ञा रिपवे कार्या यैरिन्द्रबलसादनः । सूदितः सैन्यपालो मे सानुयात्रः सकुञ्जरः ४ सोऽहं रिपुविनाशाय विजयायाविचारयन् । स्वयमेव गमिष्यामि रणशीर्षं तदद्भुतम् ५ अद्य तद्वानरानीकं रामं च सहलक्ष्मणम् । निर्दहिष्यामि बाणौघैर्वनं दीप्तैरिवाग्निभिः ६ स एवमुक्त्वा ज्वलनप्रकाशं रथं तुरङ्गोत्तमराजियुक्तम् । प्रकाशमानं वपुषा ज्वलन्तं

---

चांगला पराक्रम केल्याबद्दल महाबलाढ्य विजयी नीलाची प्रशंसा होऊं लागली असतां लक्ष्मणासहवर्तमान रामाला येऊन भेटल्यानंतर तो सेनाधिपति अतिशय आनंदित झाला ६१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अठ्ठावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५८ ॥

वानरश्रेष्ठ नीलानें युद्धामध्यें त्या राक्षससेनाधिपतीचा वध केला असतां वेगामध्यें समुद्राची बरोबरी करणारें आणि भयंकर आयुधें हातीं घेतलेलें तें राक्षसराजाचें सैन्य पळत सुटलें १. राक्षसाधिपति रावणाच्या घरीं गेल्यानंतर अग्निपुत्र नीलानें सेनापतीचा वध केल्याचें राक्षसांनीं त्याला कळविलें असतां त्यांचें तें भाषण ऐकून राक्षसाधिपति रावण क्रोधाच्या अधीन होऊन गेला २ आणि संग्राममध्यें प्रहस्ताचा वध झाल्याचें ऐकिल्यामुळें क्रोधानें व्याप्त होऊन शोकानें व्याकुल झालेला तो रावण मुख्य मुख्य देवगणांना सांगणाऱ्या इंद्राप्रमाणें सैन्यांतील मुख्य मुख्य राक्षसांना ह्मणाला ३ " इंद्रसैन्याचा नाश करणाऱ्या माझ्या सेनापतीचा अनुयायी आणि गज ह्यांसहवर्तमान ज्यांनीं वध केला त्या शत्रूंची उपेक्षा करणें योग्य नव्हे ४. ह्यास्तव, दुसरा तिसरा कांहींएक विचार न करितां शत्रुनाशार्थ मी स्वतःच त्या अद्भुत रणभूमीमध्यें जातों ५; आणि प्रदीप्त अग्नीच्या योगानें ज्याप्रमाणें वन दग्ध करून टाकितात त्याप्रमाणें त्या वानरसैन्याला आणि लक्ष्मणासहवर्तमान रामाला मी आज बाणसमुदायांनीं दग्ध करून टाकीन " ६. ह्याप्रमाणें बोलल्यानंतर उत्कृष्ट उत्कृष्ट अश्वमालिका

समारुरोहामरराजशत्रुः ७ स शङ्खभेरीपणवप्रणादैरास्फोटितक्ष्वेडितसिंहनादैः । पुण्यैः स्तवैश्चापि सुपूज्यमानस्तदा ययौ राक्षसराजमुख्यः ८ स शैलजीमूतनिकाशरूपैर्मांसाशनैः पावकदीप्तनेत्रैः । बभौ वृतो राक्षसराजमुख्यो भूतैर्वृतो रुद्र इवामरेशः ९ ततो नगर्याः सहसा महौजा निष्क्रम्य तद्वानरसैन्यमुग्रम् । महार्णवाभ्रस्तनितं ददर्श समुद्यतं पादपशैलहस्तम् १० तद्राक्षसानीकमतिप्रचण्डमालोक्य रामो भुजगेन्द्रबाहुः । विभीषणं शस्त्रभृतां वरिष्ठमुवाच सेनानुगतः पृथुश्रीः ११ नानापताकाध्वजछत्रजुष्टं प्रासासिशूलायुधशस्त्रजुष्टम् । कस्येदमक्षोभ्यमभीरुजुष्टं सैन्यं महेन्द्रोपमनागजुष्टम् १२ ततस्तु रामस्य निशम्य वाक्यं बिभीषणः शक्रसमानवीर्यः । शशंस रामस्य बलप्रवेकं महात्मनां राक्षसपुङ्गवानाम् १३ योऽसौ गजस्कन्धगतो महात्मा नवोदितार्कोपमताम्रवक्त्रः । संकम्पयन्नागशिरोऽभ्युपैति ह्यकम्पनं त्वेनमवेहि राजन् १४ योऽसौ

---

ज्याला जोडिल्या आहेत, अग्निप्रमाणें ज्याचें तेज आहे आणि आकृतीनें जो झळकत आहे अशा देदीप्यमान रथावर तो देवराजशत्रु रावण आरूढ झाला ७. तो मुख्य राक्षसराज रावण जाऊं लागला असतां मंगलावह स्तवांनीं चारण त्याची प्रशंसा करूं लागले; शंख, दुंदुभि व पणव ह्यांचे ध्वनि होऊं लागले; कांहीं वीर दंड थोपटूं लागले; कांहीं योद्धे शौर्यप्रकाशक शब्द करूं लागले आणि कांहीं सिंहनाद करूं लागले ८ व पर्वतप्राय आणि मेघतुल्य देह व अग्नीसारिखे उज्ज्वल नेत्र ह्यांनीं युक्त असलेल्या राक्षसांनीं तो मुख्य राक्षसराज परिवेष्टित झाला असतां भूतींनीं परिवेष्टित झालेल्या सुराधिपति रुद्राप्रमाणें दिसूं लागला ९. तदनंतर तो महाबलाढ्य रावण एकाएकीं लंकानगरींतून बाहेर पडला असतां महासागर व मेघ ह्यांप्रमाणें ज्याची गर्जना आहे आणि वृक्ष व पर्वत ज्यानें हातामध्यें घेतले आहेत असें तें घोर वानरसैन्य सज्ज असलेलें त्यानें अवलोकन केलें १०. तेव्हां नागराजतुल्य बाहूंनीं युक्त व सैन्यासहवर्तमान असलेला महावैभवशाली राम तें अतिप्रचंड राक्षससैन्य अवलोकन करून शस्त्रधारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या बिभीषणाला ह्मणाला ११ "नानाप्रकारच्या पताका, ध्वज, छत्रें, प्रास, खड्ग, शूल इत्यादि आयुधें व शस्त्रें, निर्भय वीर आणि महेंद्रपर्वततुल्य गज ह्यांनीं भरलेलें हें अजिंक्य सैन्य कोणाचें !" १२. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर इंद्रतुल्यपराक्रमी बिभीषण "महात्म्या राक्षसश्रेष्ठांचें हें श्रेष्ठ सैन्य आहे" असें रामाला सांगून पुनरपि ह्मणाला १३ "हे राजा, बालसूर्यतुल्यताम्रवर्ण मुखानें युक्त असा जो हा महात्मा गजाच्या स्कंधावर आरूढ होऊन त्या

रथस्थो मृगराजकेतुर्धुन्वन्धनुः शक्रधनुःप्रकाशम् । करीव भात्युग्रविवृत्तदंष्ट्रः स इन्द्रजिन्नाम वरप्रधानः १५ यश्चैष विन्ध्यास्तमहेन्द्रकल्पो धन्वी रथस्थोतिरथोतिवीरः । विस्फारयंश्चापमतुल्यमानं नाम्नातिकायोतिविवृद्धकायः १६ योसौ नवार्कोदितताम्रचक्षुरारुह्य घण्टानिनदप्रणादम् । गजं खरं गर्जति वै महात्मा महोदरो नाम स एष वीरः १७ योसौ हयं काञ्चनचित्रभाण्डमारुह्य संध्याभ्रगिरिप्रकाशः । प्रासं समुद्यम्य मरीचिनद्धं पिशाच एषाशनितुल्यवेगः १८ यश्चैष शूलं निशितं प्रगृह्य विद्युत्प्रभं किङ्करवज्रवेगम् । वृषेन्द्रमास्थाय शशिप्रकाशमायाति योसौ त्रिशिरा यशस्वी १९ असौ च जीमूतनिकाशरूपः कुम्भः पृथुव्यूढसुजातवक्षाः । समाहितः पन्नगराजकेतुर्विस्फारयन्याति धनुर्विधुन्वन् २० यश्चैष जाम्बूनदवज्रजुष्टं दीप्तं सधूमं परिघं प्रगृह्य ।

---

गजाचें मस्तक कंपित करीत करीत येत आहे तो अकंपन होय असें आपण समजा १४. सिंहचिन्हांकित ध्वजानें युक्त असलेला जो हा रथावर आरूढ झाला आहे; इंद्रधनुष्यासारिखें आपलें धनुष्य जो हालवीत आहे; ब्रह्मदेवाचा वर प्राप्त झाल्यामुळें जो राक्षसांमध्यें श्रेष्ठ झाला आहे आणि उग्र व बांकदार दंष्ट्रांनीं युक्त असल्यामुळें जो गजासारिखा भासत आहे तो इंद्रजित् होय १५. शरीरानें अतिशयच धिप्पाड असल्यामुळें विंध्याचल, अस्ताचल आणि महेंद्रपर्वत ह्यांप्रमाणें दिसणारा जो हा धनुर्धारी वीर रथावर आरूढ होऊन आपलें अनुपम प्रचंड धनुष्य आकर्षण करीत आहे तो अतिकायनामक राक्षस होय. हा महावीर राक्षस अतिरथि आहे १६. उदय पावलेल्या नूतन सूर्याप्रमाणें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण आहेत असा जो हा घंटानादांच्या योगानें ध्वनियुक्त असलेल्या क्रूर गजावर आरूढ होऊन गर्जना करीत आहे तो हा महोदरनामक महावीर होय १७. संध्याकाळच्या अभ्रानें युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें झळकणारा आणि विद्युल्लतेसहवर्तमान वज्र धारण करणारा जो हा तेजानें व्याप्त असलेला भाला उगारून व सुवर्णालंकारांनीं भूषित झालेल्या अश्वावर आरूढ होऊन येत आहे तो हा पिशाचनामक राक्षस होय १८. वज्राचा वेग ज्याचा दास बनून राहिलेला आहे व विद्युल्लतेप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा तीक्ष्ण शूल हातांत घेऊन आणि चंद्रतुल्य उज्ज्वल असलेल्या श्रेष्ठ वृषभावर आरूढ होऊन जो हा येत आहे तो यशस्वी त्रिशिरा राक्षस होय १९. विशाल, दृढ व मनोहर वक्षःस्थल आणि मेघतुल्य रूप ह्यांनीं युक्त असलेला व शेषचिन्हांकित ध्वजानें संपन्न असून मनामध्यें स्वस्थ असलेला जो हा आपलें धनुष्य आकर्षण करून

आयाति रक्षोबलकेतुभूतो योसौ निकुम्भोद्भुतवीरकर्मा २१ यश्चैष चापासिशरौघजुष्टं पताकिनं पावकदीप्तरूपम् । रथं समारुह्य विभात्युदग्रो नरान्तकोसौ नगशृङ्गयोधी २२ यश्चैष नानाविधघोररूपैर्व्याघ्रोष्ट्रनागेन्द्रमृगाश्ववक्त्रैः । भूतैर्वृतो भाति विवृत्तनेत्रैर्योसौ सुराणामपि दर्पहन्ता २३ यत्रैतदिन्दुप्रतिमं विभाति च्छत्रं सितं सूक्ष्मशलाकमग्र्यम् । अत्रैव रक्षोधिपतिर्महात्मा भूतैर्वृतो रुद्र इवावभाति २४ असौ किरीटी चलकुण्डलास्यो नगेन्द्रविन्ध्योपमभीमकायः । महेन्द्रवैवस्वतदर्पहन्ता रक्षोधिपः सूर्य इवावभाति २५ प्रत्युवाच ततो रामो बिभीषणमरिन्दमः । अहो दीप्तमहातेजा रावणो राक्षसेश्वरः २६ आदित्य इव दुष्प्रेक्ष्यो रश्मिभिर्भाति रावणः । न व्यक्तं लक्षये ह्यस्य रूपं तेजःसमावृतम् २७ देवदानववीराणां वपुर्नैवंविधं भवेत् । यादृशं राक्षसेन्द्रस्य वपुरेतद्विराजते २८

---

प्रत्यंचेचा टणत्कार करीत करीत येत आहे तो कुंभसंज्ञक राक्षस होय २०. सुवर्ण व रत्नें ह्यांनीं युक्त, उज्ज्वल आणि नील रत्नांच्या प्रभेमुळें धूमयुक्त दिसत असलेला परिघ हातामध्यें घेऊन जो हा येत आहे तो निकुंभ होय. हा अद्भुत पराक्रम करणारा असून राक्षससेनेचा मुख्य झेंडाच आहे २१. धनुष्य, खड्ग, बाणसमुदाय आणि पताका ह्यांनीं युक्त व अग्निप्रमाणें देदीप्यमान अशा रथावर आरूढ होऊन जो हा झळकत आहे तो पर्वतशिखरांनीं युद्ध करणारा प्रसिद्ध नरांतक होय २२. व्याघ्र, उष्ट्र, गजेंद्र, मृग आणि अश्व ह्यांच्यासारिखीं मुखें, नानाप्रकारचीं घोर रूपें व चढून गेलेले डोळे ह्यांनीं युक्त अशा भूतगणांनीं परिवेष्टित असलेला जो हा झळकत आहे तो देवांचाही गर्व नाहींसा करणारा रावण होय २३. सूक्ष्म शलाकांनीं युक्त, चंद्रतुल्य आणि श्वेतवर्ण असें श्रेष्ठ छत्र जेथें दिसत आहे तेथेंच भूतगणांनीं परिवेष्टित असलेल्या रुद्राप्रमाणें महात्मा राक्षसाधिपति रावण झळकत आहे २४. ज्याचीं कुंडलें हालत असून ओष्ठ स्फुरण पावत आहेत, पर्वतराज विंध्याचलाप्रमाणें ज्याचें शरीर भयंकर आहे आणि ज्यानें किरीट धारण केलेला आहे तो हा इंद्र, यम इत्यादि लोकपालांचाही गर्व हरण करणारा राक्षसाधिपति रावण सूर्याप्रमाणें भासत आहे " २५. असें बिभीषणानें सांगितल्यानंतर शत्रूंचें दमन करणारा राम त्या बिभीषणाला ह्मणाला " काय हो ह्या राक्षसाधिपति रावणाचें मोठें उज्ज्वल तेज हें ! २६. किरणांमुळें ज्याप्रमाणें सूर्याकडे पाहवत नाहीं त्याप्रमाणें ह्याच्याकडे पहावत नाहीं ! तेजानें व्याप्त झालें असल्यामुळें ह्याचें रूप मला स्पष्ट दिसत नाहीं २७. राक्षसराजानें हें शरीर जसें झळकत आहे तसें

सर्वे पर्वतसंकाशाः सर्वे पर्वतयोधिनः । सर्वे दीप्तायुधधरा योधास्तस्य महात्मनः २९ विभाति रक्षोराजोऽसौ प्रदीप्तैर्भीमदर्शनैः । भूतैः परिवृतैस्तीक्ष्णैर्देहवद्भिरिवान्तकः ३० दिष्ट्यायमद्य पापात्मा मम दृष्टिपथं गतः । अद्य क्रोधं विमोक्ष्यामि सीताहरणसंभवम् ३१ एवमुक्त्वा ततो रामो धनुरादाय वीर्यवान् । लक्ष्मणानुचरस्तस्थौ समुद्धृत्य शरोत्तमम् ३२ ततः स रक्षोधिपतिर्महात्मा रक्षांसि तान्याह महाबलानि । द्वारेषु चर्यागृहगोपुरेषु सुनिर्वृतास्तिष्ठत निर्विशङ्काः ३३ इहागतं मां सहितं भवद्भिर्वनौकसश्छिद्रमिदं विदित्वा । शून्यां पुरीं दुष्प्रसहां प्रमथ्य प्रधर्षयेयुः सहसा समेताः ३४ विसर्जयित्वा सचिवांस्ततस्तान्गतेषु रक्षःसु यथानियोगम् । व्यदारयद्वानरसागरौघं महाझषः पूर्णमिवार्णवौघम् ३५ तमापतन्तं सहसा समीक्ष्य दीप्तेषुचापं युधि राक्षसेन्द्रम् । महत्समुत्पाट्य महीधराग्रं दुद्राव रक्षोधिपतिं हरीशः ३६ तच्छैलशृङ्गं बहुवृक्षसानुं प्रगृह्य

---

शरीर श्रेष्ठ श्रेष्ठ देवदानवांचेंही नसेल ! २८. त्या महात्म्याचे योद्धेही सर्व पर्वततुल्य असून सर्व पर्वतांनीं युद्ध करणारे आहेत आणि सर्वही उज्ज्वल आयुधें धारण करणारे आहेत २९. भयंकर मुद्रेनें युक्त, देदीप्यमान व क्रूर अशा चोहोंकडून वेष्टून टाकणाऱ्या देहधारी भूतगणांच्या योगानें हा राक्षसराज प्रत्यक्ष यमाप्रमाणें भासत आहे ३०. हा दुरात्मा आज माझ्या दृष्टीं पडला हें फारच चांगलें झालें. सीताहरणामुळें उत्पन्न झालेला क्रोध मी आज ह्याच्यावर सोडीन " ३१. ह्याप्रमाणें बिभीषणाशीं बोलून वीर्यवान् रामानें हातामध्यें धनुष्य घेतलें आणि लक्ष्मण पाठीशीं असतांना एक उत्कृष्ट बाण भात्यांतून काढून तो उभा राहिला ३२. तदनंतर तो राक्षसाधिपति महात्मा रावण त्या महाबलाढ्य राक्षसांना ह्मणाला " लंकेचीं द्वारें, मोठे मोठे मार्ग आणि माझ्या निवासस्थानाबाहेरील प्रासाद ह्या ठिकाणीं तुह्मी खुशाल निःशंकपणें रहा ३३. नाहींतर मी तुह्मासहवर्तमान तेथें आलों आहें ही संधि पाहून हे वानर एकत्र होतील आणि हल्ला होण्यास अतिशय दुर्घट असलेल्या ह्या शून्य लंका नगरीवर एकदम हल्ला करून ते तिचा विध्वंस करून टाकितील ३४. ह्याप्रमाणें सचिवांना अनुज्ञा दिल्यानंतर व आज्ञेप्रमाणें ते राक्षस गेल्यानंतर ज्याप्रमाणें महामत्स्य परिपूर्ण असलेला समुद्रजलसमूह विदीर्ण करून टाकितो त्याप्रमाणें वानरसेनारूप सागराचा जलसमूह तो विदीर्ण करीत चालला ३५. तेव्हां उज्ज्वल बाण व धनुष्य हातीं घेऊन तो राक्षसाधिपति रावण युद्धामध्यें आपणावर चाल करून येत आहे असें एकाएकीं दृष्टीं पडलें असतां वानराधिपति सुग्रीव एक मोठें

चिक्षेप निशाचराय । तमापतन्तं सहसा समीक्ष्य चिच्छेद बाणैस्तपनीय-
पुङ्खैः ३७ तस्मिन्प्रवृद्धोत्तमसानुवृक्षे शृङ्गे विदीर्णे पतिते पृथिव्याम् । महाहि-
कल्पं शरमन्तकाभं समाददे राक्षसलोकनाथः ३८ स तं गृहीत्वानिल-
तुल्यवेगं सविस्फुलिङ्गज्वलनप्रकाशम् । बाणं महेन्द्राशनितुल्यवेगं चिक्षेप
सुग्रीववधाय रुष्टः ३९ स सायको रावणबाहुमुक्तः शक्राशनिस्पर्शवपुः-
प्रकाशम् । सुग्रीवमासाद्य बिभेद वेगाद्गुहेरिता क्रौञ्चमिवोग्रशक्तिः ४०
स सायकार्तो विपरीतचेताः कूजन्पृथिव्यां निपपात वीरः । तं वीक्ष्य
भूमौ पतितं विसंज्ञं नेदुः प्रहृष्टा युधि यातुधानाः ४१ ततो गवाक्षो
गवयः सुषेणस्त्वथर्षभो ज्योतिमुखो नलश्च । शैलान्समुत्पाट्य विवृद्ध-
कायाः प्रदुद्रुवुस्तं प्रति राक्षसेन्द्रम् ४२ तेषां प्रहारान्स चकार मोघा-
न्रक्षोधिपो बाणशतैः शिताग्रैः । तान्वानरेन्द्रानपि बाणजालैर्बिभेद

---

पर्वतशिखर उपटून घेऊन त्या राक्षसाधिपतीवर धांवला ३६; आणि अनेक वृक्षांनीं व लहान लहान अनेक शिखरांनीं युक्त असलेलें तें प्रचंड शिखर नीट हातीं घेतल्यानंतर त्यानें त्या राक्षसावर फेंकिलें. परंतु, तें शिखर एकाएकीं आपणाकडे येत आहे असें दृष्टीं पडतांक्षणीं सुवर्णपिच्छांनीं युक्त असलेल्या बाणांच्या योगानें त्या निशाचरानें त्याचे तुकडे तुकडे केले ३७. मोठमोठ्या व उत्कृष्ट वृक्षांनीं व शिखरांनीं युक्त असलेलें तें मोठें शिखर विदीर्ण होऊन पृथ्वीवर पडलें असतां त्या राक्षसराजानें साक्षात् मृत्युच कीं काय असा एक मोठ्या सर्पासारिखा बाण धनुष्याला लाविला ३८; आणि वायूप्रमाणें वेग व इंद्राच्या वज्राप्रमाणें प्रहार ह्यांनीं युक्त आणि चोहोंकडे ठिणग्या उडत असलेल्या अग्नीप्रमाणें देदीप्यमान असा तो बाण धनुष्याला लाविल्यानंतर क्रुद्ध झालेल्या राक्षसानें सुग्रीवाच्या वधाकरितां तो त्याच्यावर टाकिला ३९. तदनंतर ज्याचा प्रहार, रूप व कांति हीं इंद्राच्या वज्राप्रमाणें आहेत असा तो रावणाच्या हातांतून सुटलेला बाण सुग्रीवासमीप येतांक्षणीं कार्तिकेयानें सोडिलेल्या उग्र शक्तीनें ज्याप्रमाणें क्रौंच पर्वत भेदून टाकिला त्याप्रमाणें त्या बाणानें सुग्रीवाला वेगानें भेदून टाकिलें ४०; व ह्याप्रमाणें तो वीर सुग्रीव बाणानें जर्जर झाला असतां भान नाहींसें होऊन किंकाळ्या फोडीत पृथ्वीवर पडला आणि तो मूर्च्छित होऊन भूमीवर पडला असें पहातांक्षणीं रणभूमीमध्यें असलेले राक्षस आनंदित होऊन गर्जना करूं लागले ४१. तदनंतर गवाक्ष, गवय, सुषेण, ऋषभ, ज्योतिमुख आणि नल हे धिप्पाड वानर पर्वत उपटून त्या राक्षसराजावर धांवले ४२; परंतु, त्या राक्षसाधिपतीनें तीक्ष्ण अग्रांनीं युक्त असलेल्या शेंकडों बाणांच्या योगानें त्यांचे प्रहार व्यर्थ करून त्या

जाम्बूनदचित्रपुङ्खैः । ते वानरेन्द्रास्त्रिदशारिबाणैर्भिन्ना निपेतुर्भुवि भीम-
कायाः ४३ ततस्तु तद्वानरसैन्यमुग्रं प्रच्छादयामास स बाणजालैः ४४ ते
वध्यमानाः पतिताश्च वीरा नानद्यमाना भयशल्यविद्धाः । शाखामृगा
रावणसायकार्ता जग्मुः शरण्यं शरणं स्म रामम् ४५ ततो महात्मा स
धनुर्धनुष्मानादाय रामः सहसा जगाम । तं लक्ष्मणः प्राञ्जलिरभ्युपेत्य उवाच
रामं परमार्थयुक्तम् ४६ काममार्य सुपर्याप्तो वधायास्य दुरात्मनः ।
विधमिष्याम्यहं चैतमनुजानीहि मां विभो ४७ तमब्रवीन्महातेजा रामः
सत्यपराक्रमः । गच्छ यत्नपरश्चापि भव लक्ष्मण संयुगे ४८ रावणो हि
महावीर्यो रणेऽद्भुतपराक्रमः । त्रैलोक्येनापि संक्रुद्धो दुष्प्रसह्यो न
संशयः ४९ तस्य च्छिद्राणि मार्गस्व स्वच्छिद्राणि च लक्षय । चक्षुषा
धनुषात्मानं गोपायस्व समाहितः ५० राघवस्य वचः श्रुत्वा संपरिष्वज्य
पूज्य च । अभिवाद्य च रामाय ययौ सौमित्रिराहवे ५१ स रावणं
वारणहस्तबाहुं ददर्श भीमोद्यतदीप्तचापम् । प्रच्छादयन्तं शरवृष्टिजालै-

---

वानराधिपतींनाही सुवर्णखचित मनोहर पिच्छांनीं युक्त असलेल्या बाणसमूहांच्या योगानें त्यानें भेदून टाकिलें ४३. ह्याप्रमाणें देवशत्रु रावणाच्या बाणानी छिन्नभिन्न झालेले ते मोठे धिप्पाड वानराधिपति भूमीवर पडले असता बाणसमुदायांच्या योगानें तें उग्र वानरसैन्य त्या रावणानें आच्छादित करून टाकिलें ४४; आणि ह्याप्रमाणें ते वीर पडून वानरांचा वध होऊ लागला असता रावणाच्या बाणांनीं जर्जर झालेले ते वानर भयरूप बाणांनींही विद्ध होऊन शरण जाण्यास योग्य असलेल्या रामाकडे शरण गेले ४५. तेव्हा तो महात्मा धनुर्धर राम धनुष्य घेऊन एकदम चालूं लागला असतां लक्ष्मण हात जोडून त्याच्या समीप आला आणि उत्कृष्ट अर्थांनीं युक्त असें भाषण त्याच्याशीं करूं लागला ४६. ( तो ह्मणाला ) " हे आर्य, मी ह्या दुरात्म्याच्या वधाला हवा तसा पुरून उरण्यासारिखा आहें. हे प्रभो, आपण मला अनुज्ञा द्या ह्मणजे मी ह्याला उडवून देतो" ४७. ह्यावर सत्यपराक्रमी व महातेजस्वी राम त्याला ह्मणाले "हे लक्ष्मणा, संग्रामामध्यें जा आणि (त्याचा नाश करण्याविषयीं) हरप्रयत्न कर ४८. संग्रामामध्यें अद्भुत पराक्रम करणारा रावण महावीर्यवान् आहे आणि तो क्रुद्ध झाला असतां त्रैलोक्यालाही सहन होण्यास दुर्घट आहे ह्यांत संशय नाहीं ४९. ह्यास्तव, त्याचीं छिद्रं शोधीत राहून आपल्या छिद्रांकडेही लक्ष्य देत जा आणि सावध राहून दृष्टि व धनुष्य ह्यांच्या योगानें तूं आपलें रक्षण कर " ५०. रामचंद्रांचें हें भाषण श्रवण केल्यावर त्याची प्रशंसा करून लक्ष्मण रामाला कडकडून भेटला आणि त्यांला

स्तान्वानरान्भिन्नविकीर्णदेहान् ५२ तमालोक्य महातेजा हनूमान्मारुतात्मजः । निवार्य शरजालानि विदुद्राव स रावणम् ५३ रथं तस्य समासाद्य बाहुमुद्यम्य दक्षिणम् । त्रासयन्रावणं धीमान्हनूमान्वाक्यमब्रवीत् ५४ देवदानवगन्धर्वैर्यक्षैश्च सह राक्षसैः । अवध्यत्वं त्वया प्राप्तं वानरेभ्यस्तु ते भयम् ५५ एष मे दक्षिणो बाहुः पञ्चशाखः समुद्यतः । विधमिष्यति ते देहे भूतात्मानं चिरोषितम् ५६ श्रुत्वा हनूमतो वाक्यं रावणो भीमविक्रमः । संरक्तनयनः क्रोधादिदं वचनमब्रवीत् ५७ क्षिप्रं प्रहर निःशङ्कं स्थिरां कीर्तिमवाप्नुहि । ततस्त्वां ज्ञातविक्रान्तं नाशयिष्यामि वानर ५८ रावणस्य वचः श्रुत्वा वायुसूनुर्वचोऽब्रवीत् । प्रहतं हि मया पूर्वमक्षं तव सुतं स्मर ५९ एवमुक्तो महातेजा रावणो राक्षसेश्वरः । आजघानानिलसुतं तलेनोरसि वीर्यवान् ६० स तलाभिहतस्तेन चचाल च मुहुर्मुहुः ६१ स्थितो मुहूर्तं तेजस्वी स्थैर्यं

---

अभिवंदन करून तो संग्रामामध्यें निघाला ५१. तेव्हां गजशुंडप्रमाणें ज्याचे बाहु आहेत; भयंकर व उज्ज्वल धनुष्य ज्यानें हातांत घेतलें आहे आणि ज्यांचे देह छिन्नभिन्न व अस्ताव्यस्त झाले आहेत अशा त्या वानरांना बाणांच्या वर्षावांनीं जो आच्छादित करून टाकीत आहे असा रावण त्यानें अवलोकन केला ५२. असो. त्या लक्ष्मणाला पाहून महातेजस्वी वायुपुत्र हनुमान् बाणसमुदायांचें निवारण करून रावणावर धांवला ५३; आणि त्याच्या रथासमीप गेल्यावर आपला उजवा हात उगारून रावणाला दर्डावीत दर्डावीत तो बुद्धिमान् हनुमान् ह्मणाला ५४ " देव, दानव, गंधर्व, यक्ष आणि राक्षस ह्यांना तूं अवध्य आहेस असा वर तूं प्राप्त करून घेतला आहेस; परंतु, वानरांपासून तुला मृत्यूचें भय आहे ५५. पांच अंगुलींनीं युक्त असलेला हा माझा उजवा हात तझ्या देहामध्यें पुष्कळ वेळ राहिलेल्या भूतात्म्याला हांकून लावील " ५६. हें हनुमानाचें भाषण ऐकून भयंकर पराक्रम करणाऱ्या रावणाचे नेत्र आरक्तवर्ण झाले आणि रागारागानें तो त्याला ह्मणाला ५७ " तूं निःशंकपणें सत्वर प्रहार करून अक्षय्य कीर्ति संपादन कर. तूं प्रहार केल्यानंतर तुझा पराक्रम कळून आला ह्मणजे, हे वानरा, मी तुझा नाश करीन " ५८. रावणाचें हें भाषण श्रवण करून वायुपुत्र हनुमान् त्याला ह्मणाला " मीं पूर्वी वध केलेल्या आपल्या अक्षनामक पुत्राची तूं आठवण कर " ५९. ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां त्या महातेजस्वी व वीर्यवान् राक्षसाधिपति रावणानें वायुपुत्र हनुमानाच्या वक्षःस्थलावर हस्ततलानें प्रहार केला ६०. तेव्हां त्या रावणानें तलप्रहार केल्यामुळें हनुमान् एकसारिखा

कृत्वा महामतिः । आजघान च संक्रुद्धस्तलेनैवामरद्विषम् ६२ ततः स
तेनाभिहतो वानरेण महात्मना । दशग्रीवः समाधूतो यथा भूमिचले-
चलः ६३ सङ्ग्रामे तं तथा दृष्ट्वा रावणं तलताडितम् । ऋषयो वानराः
सिद्धा नेदुर्देवाः सुरासुरैः ६४ अथाश्वस्य महातेजा रावणो वाक्यमब्र-
वीत् । साधु वानर वीर्येण श्लाघनीयोसि मे रिपुः ॥ रावणेनैवमुक्तस्तु
मारुतिर्वाक्यमब्रवीत् ६५ धिगस्तु मम वीर्यस्य यत्त्वं जीवसि रावण ।
सकृत्तु प्रहरेदानीं दुर्बुद्धे किं विकत्थसे ६६ ततस्त्वां मामको मुष्टिर्नयि-
ष्यति यमक्षयम् । ततो मारुतिवाक्येन कोपस्तस्य प्रजज्वले ६७ संरक्त-
नयनो यत्नान्मुष्टिमावृत्य दक्षिणम् । पातयामास वेगेन वानरोरसि वीर्य-
वान् ६८ हनूमान्वक्षसि व्यूढे संचचाल पुनःपुनः । विह्वलं तं तदा दृष्ट्वा
हनूमन्तं महाबलम् ६९ रथेनातिरथः शीघ्रं नीलं प्रतिसमभ्यगात् ।
राक्षसानामधिपतिर्दशग्रीवः प्रतापवान् ७० पन्नगप्रतिमैर्भीमैः परमर्मा-
भिभेदनैः । शरैरर्दीपयामास नीलं हरिचमूपतिम् ७१ स शरौघसमायस्तो

---

तडफड करूं लागला ६१. तथापि, धैर्य धरून तो तेजस्वी व महाबुद्धिमान् हनुमान् क्षणभर उभा राहिला आणि क्रुद्ध होऊन त्या देवद्वेष्ट्या रावणाला त्यानेंही हस्ततला-च्याच योगानें प्रहार केला ६२. ह्याप्रमाणें त्या महात्म्या वानरानें प्रहार केला असतां भूकंपसमयीं कोलमडून पडणाऱ्या पर्वताप्रमाणेंच कीं काय तो रावण कोलमडून पडला ६३. तेव्हां तलप्रहारानें जर्जर झाल्यामुळें रावणाची संग्राममध्यें तशी अवस्था झालेली पाहून ऋषि, वानर, सिद्ध आणि सुरासुरांसहवर्तमान देव गर्जना करूं लागले ६४. तदनंतर महातेजस्वी रावण सावध होऊन ह्मणाला " हे वानरा, शाबास; तूं जरी माझा शत्रु आहेस तरी वीर्यामुळें तूं माझ्या प्रशंसेस पात्र आहेस " ह्याप्रमाणें रावण बोलला असतां मारुति त्याला ह्मणाला ६५ "हे रावणा, ज्याअर्थी तूं जिवंत आहेस त्याअर्थी माझ्या वीर्याला धिक्कार असो. हे दुर्बुद्धे, बढाया कशाला मारीत आहेस. आतां आणखीं एकदां प्रहार कर ६६. ह्मणजे माझा मुष्टिप्रहार तुला यमसदनीं पोंचवून देईल. " ह्या मारुतीच्या भाषणानें त्याचा कोप वृद्धिंगत झाला ६७; डोळे लाल झाले आणि त्या वीर्यवान् राक्षसानें मोठ्या यत्नानें आपली उजवी मूठ वळून त्या वानराच्या वक्षःस्थलावर वेगानें प्रहार केला ६८. विशाल वक्षःस्थलावर प्रहार झाल्यामुळें हनुमान् वारंवार कोलमडूं लागला असतां तो महाबलाढ्य हनुमान् विह्वल झाल्याचें पाहून ६९ राक्षसाधिपति, प्रतापी व अतिरथि रावण रथावर आरूढ होऊन सत्वर नीलाकडे गेला ७०; आणि शत्रूंचें मर्म भेदणाऱ्या भुजंगतुल्य भयंकर बाणांनीं

नीलो हरिचमूपतिः । करेणैकेन शैलाग्रं रक्षोधिपतयेसृजत् ७२ हनूमानपि तेजस्वी समाश्वस्तो महामनाः । विप्रेक्षमाणो युद्धेप्सुः सरोषमिदमब्रवीत् ७३ नीलेन सह संयुक्तं रावणं राक्षसेश्वरम् । अन्येन युध्यमानस्य न युक्तमभिधावनम् ७४ रावणोथ महातेजास्तं शृङ्गं सप्तभिः शरैः । आजघान सुतीक्ष्णाग्रैस्तद्विशीर्णं पपात ह ७५ तद्विशीर्णं गिरेः शृङ्गं दृष्ट्वा हरिचमूपतिः । कालाग्निरिव जज्वाल कोपेन परवीरहा ७६ सोश्वकर्णद्रुमाञ्शालांश्चूतांश्चापि सुपुष्पितान् । अन्यांश्च विविधान्वृक्षान्नीलश्चिक्षेप संयुगे ७७ स तान्वृक्षान्समासाद्य प्रतिचिच्छेद रावणः । अभ्यवर्षच्च घोरेण शरवर्षेण पावकिम् ७८ अभिवृष्टः शरौघेण मेघेनेव महाबलः । ह्रस्वं कृत्वा ततो रूपं ध्वजाग्रे निपपात ह ७९ पावकात्मजमालोक्य ध्वजाग्रे समवस्थितम् । जज्वाल रावणः क्रोधात्ततो नीलो ननाद च ८० ध्वजाग्रे धनुषश्चाग्रे किरीटाग्रे च तं हरिम् । लक्ष्मणोथ

---

ग्यानें त्या वानरसेनाधिपति नीलाला जसें कांहीं प्रदीप्त केलें ७१. ह्याप्रमाणें बाणसमुदायांनीं जर्जर झालेल्या त्या वानरसेनाधिपति नीलानें एक पर्वतशिखर एका हातांत घेऊन राक्षसाधिपतीवर सोडिलें ७२; आणि महाविचारी व तेजस्वी हनुमानही सावध झाल्यावर युद्धाच्या इच्छेनें इकडे तिकडे पहात पहात नीलाशीं भिडलेल्या राक्षसाधिपति रावणाला रागारागानें ह्मणाला " दुसऱ्याशीं युद्ध करीत असलेल्या वीरावर धांवून जाणें योग्य नाहीं " ७३,७४. इतकें झालें असतां महातेजस्वी रावणानें अत्यंत तीक्ष्ण अग्रांनीं युक्त अशा सात बाणांनीं त्या शिखराला वेध केला असतां तें शिखर तुकडे तुकडे होऊन भूमीवर पडलें ७५; परंतु, तें पर्वतशिखर तुकडे तुकडे होऊन पडलें असें दृष्टीं पडतांक्षणीं तो वानरसेनाधिपति व शत्रुपक्षीय वीरनाशक नील प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें कोपानें जसा कांहीं प्रज्वलित होऊन गेला ७६ आणि अश्वकर्ण वृक्ष, शालवृक्ष, चांगले प्रफुल्लित झालेले आम्रवृक्ष व इतरही नानाप्रकारचे वृक्ष संग्रामामध्यें नीलानें रावणावर फेंकिले ७७. परंतु, ते वृक्ष समीप येऊं लागले असतां रावणानें तोडून टाकिले आणि अग्निपुत्र नीलावर त्या रावणानें प्रचंड बाणवृष्टि केली ७८. अशा रीतीनें मेघासारिखी बाणवृष्टि शरीरावर झाली असतां त्या महाबलाढ्य नीलानें ह्रस्वरूप धारण केलें आणि रावणाच्या ध्वजाचे अग्रभागीं उडी टाकिली ७९. परंतु, ह्याप्रमाणें तो अग्निपुत्र नील ध्वजाचे अग्रावर बसलेला दृष्टीं पडतांक्षणीं क्रोधामुळें रावणाच्या अंगाचा भडका होऊन गेला; तथापि, नील गर्जनाच करूं लागला ८० आणि रावणाचा ध्वज, धनुष्य व किरीट ह्यांच्या अग्रांवर उड्या

हनूमांश्च रामश्चापि सुविस्मिताः ८१ रावणोपि महातेजाः कपिलाघव-
विस्मितः । अस्त्रमाहारयामास दीप्तमाग्नेयमद्भुतम् ८२ ततस्ते चुक्रुशु-
र्हृष्टा लब्धलक्षाः प्लवङ्गमाः । नीललाघवसंभ्रान्तं दृष्ट्वा रावणमाहवे ८३
वानराणां च नादेन संरब्धो रावणस्तदा । संभ्रमाविष्टहृदयो न किंचि-
त्प्रत्यपद्यत ८४ आग्नेयेनापि संयुक्तं गृहीत्वा रावणः शरम् । ध्वजशीर्ष-
स्थितं नीलमुदैक्षत निशाचरः ८५ ततोब्रवीन्महातेजा रावणो राक्षसे-
श्वरः । कपे लाघवयुक्तोसि मायया परया सह ८६ जीवितं खलु रक्षस्व
यदि शक्तोसि वानर । तानि तान्यात्मरूपाणि सृजसि त्वमनेकशः ८७
तथापि त्वां मया मुक्तः सायकोस्त्रप्रयोजितः । जीवितं परिरक्षन्तं जीवि-
ताद्भ्रंशयिष्यति ८८ एवमुक्त्वा महाबाहू रावणो राक्षसेश्वरः । संधाय
बाणमस्त्रेण चमूपतिमताडयत् ८९ सोस्त्रमुक्तेन बाणेन नीलो वक्षसि
ताडितः । निर्दह्यमानः सहसा स पपात महीतले ९० पितृमाहात्म्यसंयो-
गादात्मनश्चापि तेजसा । जानुभ्यामपतद्भूमौ न तु प्राणैर्वियुज्यत ९१

---

मारून बसत असलेल्या त्या नीलवानराला अवलोकन करून लक्ष्मण, हनुमान् व राम ह्यांनाही फार आश्चर्य वाटलें ८१; इतकेंच नव्हे परंतु, त्या वानराच्या चलाखीमुळें महातेजस्वी रावणही विस्मित झाला आणि देदीप्यमान व अद्भुत अशा आग्नेय अस्त्राचा त्यानें प्रयोग केला ८२. तदनंतर तिकडे वानरांचें लक्ष गेलें असतां नीलाच्या चलाखी-मुळें संग्रामामध्यें गोंधळून गेलेल्या त्या रावणाला अवलोकन करून वानर आनंदित झाले व गर्जना करू लागले ८३; वानरांच्या गर्जनेनें रावणही क्षुब्ध झाला. परंतु, अंतःकरण गोंधळून गेलें असल्यामुळें तो कांहींएक हालचाल करीनासा झाला ८४. असो. आग्नेय अस्त्रानें अभिमंत्रण केलेला बाण धनुष्याला लाविल्यानंतर ध्वजाचे अग्रभागीं बसलेल्या नीला-कडे त्या रावणराक्षसानें पाहिलें ८५ आणि नंतर तो महातेजस्वी राक्षसाधिपति रावण त्याला म्हणाला "हे वानरा, तुझ्या ठिकाणीं चलाखी असून कपटही मोठें आहे ८६. आतां, हे वानरा, समर्थ असशील तर खरोखर आपल्या जीविताचें रक्षण कर. वारं-वार तूं जरी नानाप्रकारचीं रूपें धारण करीत आहेस ८७ तथापि, जीविताचें रक्षण करणाऱ्या तुला मीं सोडिलेला अस्त्राभिमंत्रित बाण जीवितापासून च्युत करील "८८. ह्याप्रमाणें त्याला सांगितल्यावर महापराक्रमी राक्षसाधिपति रावणानें आग्नेय अस्त्रांनीं बाणाचें अभिमंत्रण करून सेनापति नीलाला वेध केला ८९. तेव्हां अस्त्रानें अभिमं-त्रण करून सोडिलेल्या त्या बाणाचा वक्षःस्थलावर प्रहार झाला असतां तो नील अगदीं जळूं लागला आणि एकदम भूतलावर पडला ९०; परंतु, पित्याच्या पुण्यामुळ

विसंज्ञं वानरं दृष्ट्वा दशग्रीवो रणोत्सुकः । रथेनाम्बुदनादेन सौमित्रिमभिदुद्रुवे ९२ आसाद्य रणमध्ये तु वारयित्वा स्थितो ज्वलन् । धनुर्विस्फारयामास राक्षसेन्द्रः प्रतापवान् ९३ तमाह सौमित्रिरदीनसत्त्वो विस्फारयन्तं धनुरप्रमेयम् । अन्वेहि मामद्य निशाचरेन्द्र न वानरांस्त्वं प्रतियोद्धुमर्हसि ९४ स तस्य वाक्यं प्रतिपूर्णघोषं ज्याशब्दमुग्रं च निशम्य राजा । आसाद्य सौमित्रिमुपस्थितं तं रोषान्वितं वाचमुवाच रक्षः ९५ दिष्ट्यासि मे राघव दृष्टिमार्गं प्राप्तोऽन्तगामी विपरीतबुद्धिः । अस्मिन्क्षणे यास्यसि मृत्युलोकं संसाद्यमानो मम बाणजालैः ९६ तमाह सौमित्रिरविस्मयानो गर्जन्तमुद्वृत्तशिताग्रदंष्ट्रम् । राजन्न गर्जन्ति महाप्रभावा विकत्थसे पापकृतां वरिष्ठ ९७ जानामि वीर्यं तव राक्षसेन्द्र बलं प्रतापं च पराक्रमं च । अवस्थितोऽहं शरचापपाणिरागच्छ किं मोघविकत्थ-

---

आणि स्वतःच्याही तेजामुळें तो गुडघे खालीं होऊन भूमीवर पडला. तथापि, मृत झाला नाहीं ९१. ह्याप्रमाणें नील मूर्च्छित झालेला पाहून संग्रामाविषयीं उत्सुक असलेला रावण मेघासारिखी गर्जना करणाऱ्या रथाच्या योगानें लक्ष्मणावर धांवला ९२; आणि संग्रामामध्यें त्याच्यासमीप आल्यावर सर्व वानरसैन्याचें निवारण करून तो क्रोधानें जळत असलेला प्रतापी राक्षसाधिपति उभा राहिला आणि धनुष्याचा टणत्कार करूं लागला ९३. तेव्हां उदार अंतःकरणानें युक्त असलेला सुमित्रापुत्र लक्ष्मण अनुपम धनुष्याचा टणत्कार करीत असलेल्या त्या रावणाला ह्मणाला "हे राक्षसाधिपते, आज तूं मला पहा. वानरांशीं युद्ध करण्याला आज तूं पात्र नाहींस" ९४. गंभीर ध्वनीनें युक्त असलेलें त्याचें तें भाषण व प्रत्यंचेचा भयंकर टणत्कार ऐकून आणि युद्धार्थ सज्ज झालेल्या त्या क्रुद्ध लक्ष्मणापाशीं येऊन तो राक्षस त्याला ह्मणाला ९५ "हे राघवा, माझ्या दृष्टीच्या टप्यांत तूं आला आहेस हें फारच चांगलें झालें. ज्याअर्थीं तुझ्या बुद्धीला विपर्यास झालेला आहे त्याअर्थीं तुझा अंतकाल जवळ आला आहे व ह्या क्षणामध्येंच माझ्या बाणसमुदायांनीं जर्जर होऊन तूं यमलोकीं जाणार आहेस" ९६. ह्यानंतर लक्ष्मण विस्मयचकित न होतां अतिशय उत्कट व तीक्ष्ण अग्रें ज्यांचीं आहेत अशा दंष्ट्रांनीं युक्त व गर्जना करीत असलेल्या त्या राक्षसाला ह्मणाला "हे अत्यंत पापी राजा, तूं आत्मप्रशंसा करीत आहेस; परंतु, महासामर्थ्यवान् लोक ( प्रथमतः अशी ) गर्जना करीत नाहींत ९७. हे राक्षसाधिपते, तुझें वीर्य, बल, प्रताप व पराक्रम हीं मी जाणीत आहें आणि हातामध्यें धनुर्बाण घेऊन येथें उभा राहिलों आहें. तस्मात् तूं युद्धाला ये; व्यर्थ आत्मप्रशंसा करण्यांत

नेन ९८ स एवमुक्तः कुपितः ससर्ज रक्षोधिपः सप्त शरान्सुपुङ्खान् । ताँल्लक्ष्मणः काञ्चनचित्रपुङ्खैश्चिच्छेद बाणैर्निशिताग्रधारैः ९९ तान्प्रेक्षमाणः सहसा निकृत्तान्निकृत्तभोगानिव पन्नगेन्द्रान् । लङ्केश्वरः क्रोधवशं जगाम ससर्ज चान्यान्निशितान्पृषत्कान् १०० स बाणवर्षं तु ववर्ष तीव्रं रामानुजः कार्मुकसंप्रयुक्तम् । क्षुरार्धचन्द्रोत्तमकर्णभल्लैः शरांश्च चिच्छेद न चुक्षुभे च १ स बाणजालान्यपि तानि तानि मोघानि पश्यंस्त्रिदशारिराजः । विसिस्मिये लक्ष्मणलाघवेन पुनश्च बाणान्निशितान्मुमोच २ स लक्ष्मणश्चापि शिताञ्शिताग्रान्महेन्द्रतुल्योऽशनिभीमवेगान् । संधाय चापे ज्वलनप्रकाशान्ससर्ज रक्षोधिपतेर्वधाय ३ स तान्प्रचिच्छेद हि राक्षसेन्द्रः शिताञ्शराँल्लक्ष्मणमाजघान । शरेण कालाग्निसमप्रभेण स्वयंभुदत्तेन ललाटदेशे ४ स लक्ष्मणो रावणसायकार्तश्चचाल चापं शिथिलं प्रगृह्य । पुनश्च संज्ञां प्रतिलभ्य कृच्छ्राच्चिच्छेद चापं त्रिदशेन्द्रशत्रोः ५ निकृत्तचापं त्रिभिराजघान बाणैस्तदा

---

काय अर्थ आहे ?" ९८. ह्याप्रमाणें लक्ष्मण त्याला बोलला असतां क्रुद्ध झालेल्या त्या राक्षसाधिपतीनें उत्कृष्ट पिच्छांनीं युक्त असलेले सात बाण त्यावर सोडिले; परंतु, सुवर्णमय मनोहर पिच्छें आणि तीक्ष्ण अग्रधारा ह्यांनीं युक्त असलेल्या आपल्या बाणांनीं लक्ष्मणानें ते तोडून टाकिले ९९. तेव्हां शरीराचे तुकडे तुकडे करून टाकिलेल्या नागराजाप्रमाणें एकदम तोडून टाकिलेले ते बाण अवलोकन करून लंकाधिपति रावण अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें दुसरे तीक्ष्ण बाण त्याच्यावर सोडिले १००. तदनंतर रामानुज लक्ष्मणानें आपल्या धनुष्याच्या योगानें तीव्र बाणवृष्टि केली आणि त्या राक्षसाचे बाण स्वस्थानापासून चलित न होतां आपल्या क्षुरप्र, अर्धचंद्र, उत्तमकर्ण व भल्ल बाणांनीं त्यानें तोडून टाकिले १. तेव्हां वारंवार सोडिलेले आपले बाणसमुदाय व्यर्थ होत आहेत असें राक्षसराज रावणाच्या दृष्टीं पडूं लागलें असतां लक्ष्मणाच्या चलाखीचा त्याला विस्मय वाटला आणि पुनरपि तीक्ष्ण बाण त्यानें त्याच्यावर सोडिले २; परंतु, महेंद्रतुल्य लक्ष्मणानेंही विद्युल्लतेसारिखा भयंकर वेग, अग्नीसारिखें तेज व तीक्ष्ण अग्रें ह्यांनीं युक्त असलेले तीक्ष्ण बाण धनुष्याला लावून राक्षसाधिपति रावणाच्या वधाकरितां सोडिले ३. तथापि, ते तीक्ष्ण बाण तोडून टाकून त्या राक्षसाधिपतीनें प्रलयाग्नितुल्य तेजानें युक्त असलेल्या ब्रह्मदत्त बाणानें लक्ष्मणाला ललाटाचे ठिकाणीं वेध केला ४. तेव्हां रावणाच्या बाणांनीं जर्जर झालेला तो लक्ष्मण स्थानापासून चळला; परंतु, पुनरपि सावध होऊन व शिथिल झालेले

दाशरथिः शिताग्रैः । स सायकार्तो विचचाल राजा कृच्छ्राच्च संज्ञां पुनराससाद ६ सुकृत्तचापः शरताडितश्च मेदार्द्रगात्रो रुधिरावसिक्तः । जग्राह शक्तिं स्वयमुग्रशक्तिः स्वयंभुदत्तां युधि देवशत्रुः ७ स तां सधूमानलसंनिकाशां वित्रासनीं संयति वानराणाम् । चिक्षेप शक्तिं तरसा ज्वलन्तीं सौमित्रये राक्षसराष्ट्रनाथः ८ तामापतन्तीं भरतानुजोऽस्त्रैर्जघान बाणैश्च हुताग्निकल्पैः । तथापि सा तस्य विवेश शक्तिर्भुजान्तरं दाशरथेर्विशालम् ९ स शक्तिमाञ्शक्तिसमाहतः सन्पपात भूमौ स रघुप्रवीरः । तं विह्वलन्तं सहसाभ्युपेत्य जग्राह राजा तरसा भुजाभ्याम् १० हिमवान्मन्दरो मेरुस्त्रैलोक्यं वा सहामरैः । शक्यं भुजाभ्यामुद्धर्तुं न शक्यो भरतानुजः ११ शक्त्या ब्राह्म्या तु सौमित्रिस्ताडितोऽपि स्तनान्तरे । विष्णोरमीमांस्यभागमात्मानं प्रत्यनुस्मरत् १२ ततो दानवदर्पघ्नं सौमित्रिं

---

आपलें धनुष्य मोठ्या कष्टानें घेऊन त्यानें देवराजशत्रु जो रावण त्याचें धनुष्य तोडिलें ५ इतकेंच नव्हे परंतु, ज्याच्या धनुष्याचे तुकडे तुकडे झालेले आहेत; अशा त्या रावणाला तीक्ष्ण अग्रांनीं युक्त अशा तीन बाणांनीं दशरथपुत्र लक्ष्मणानें वेध केला व ह्याप्रमाणें लक्ष्मणाच्या बाणांनीं जर्जर झालेला तो राजा मूर्च्छित होऊन मोठ्या कष्टानें पुनरपि सावध झाला ६. धनुष्याचे अगदीं तुकडे होऊन बाणांनीं ताडित झालेल्या त्या देवशत्रु रावणाचें शरीर मेदानें आर्द्र झालें; रक्तानें तो भरून गेला आणि भयंकर सामर्थ्यानें युक्त असलेल्या त्या रावणानें ब्रह्मदेवानें दिलेली शक्ति त्या रणभूमीमध्यें आपल्या हातीं घेतली ७; आणि नंतर त्या राक्षसराष्ट्राधिपति रावणानें धूमयुक्त अग्नीसारिखी दिसत असलेली व संग्रामामध्यें वानरांना त्रस्त करणारी ती प्रज्वलित शक्ति वेगावेगानें लक्ष्मणावर सोडिली ८; परंतु, ती शक्ति येत असतांना होमद्रव्यांनीं प्रज्वलित केलेल्या अग्नीसारिख्या उज्ज्वल बाणांनीं आणि अस्त्रांनीं भरतानुज लक्ष्मणानें तिला वेध केला; तथापि, ती शक्ति त्या दशरथपुत्र लक्ष्मणाच्या विशाल वक्षःस्थलामध्यें प्रविष्ट झाली ९. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला शक्ति लागली असतां तो रघुवीर लक्ष्मण शक्तिमान् असतांही पृथ्वीवर पडला व तो विव्हळत पडला असतांना राक्षसराज रावणानें एकाएकीं त्याच्या जवळ येऊन वेगावेगानें आपल्या बाहूंनीं त्याला आंवळून धरिलें १०; परंतु, हिमालय, मंदर, मेरु, अथवा देवांसहवर्तमान त्रैलोक्यसुद्धां ज्याच्या भुजांनीं उचललें जाणें शक्य होतें त्याच्याच भुजांनीं भरतानुज लक्ष्मण उचलला जाणें शक्य झालें नाहीं ११. ब्राह्मी शक्तीनें लक्ष्मण जरी वक्षःस्थलाच ठिकाणीं ताडित झाला होता तरी आपण विष्णूचा अतर्क्य अंश आहोंत असें त्याला स्मरण झालें १२. तदनंतर दानवांचा गर्व

देवकण्टकः । तं पीडयित्वा बाहुभ्यां न प्रभुर्लङ्घनेभवत् १३ ततः क्रुद्धो वायुसुतो रावणं समभिद्रवत्। आजघानोरसि क्रुद्धो वज्रकल्पेन मुष्टिना १४ तेन मुष्टिप्रहारेण रावणो राक्षसेश्वरः। जानुभ्यामगमद्भूमौ चचाल च पपात च १५ आस्यैश्च नेत्रैः श्रवणैः पपात रुधिरं बहु । विघूर्णमानो निश्चेष्टो रथोपस्थ उपाविशत् १६ विसंज्ञो मूर्च्छितश्चासीन्न च स्थानं समालभत्। विसंज्ञं रावणं दृष्ट्वा समरे भीमविक्रमम् १७ ऋषयो वानराश्चैव नेदुर्देवाश्च सासुराः १८ हनूमानथ तेजस्वी लक्ष्मणं रावणार्दितम् । आनयद्राघवाभ्याशं बाहुभ्यां परिगृह्य तम् १९ वायुसूनोः सुहृत्त्वेन भक्त्या परमया च सः । शत्रूणामप्यकम्प्योऽपि लघुत्वमगमत्कपेः १२० तं समुत्सृज्य सा शक्तिः सौमित्रिं युधि निर्जितम् । रावणस्य रथे तस्मिन्स्थानं पुनरुपागमत् २१ रावणोऽपि महातेजाः प्राप्य संज्ञां महाहवे । आददे निशितान्बाणाञ्जग्राह च महद्धनुः २२ आश्वस्तश्च विशल्यश्च लक्ष्मणः शत्रुसूदनः । विष्णोर्भागममीमांस्यमात्मानं प्रत्यनुस्मरन् २३ निपातित-

---

नाहींसा करणाऱ्या त्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाला हातांनीं आंवळून धरूनही देवकंटक रावण त्याला घेऊन जाण्यास समर्थ झाला नाहीं १३. तदनंतर वायुपुत्र हनुमान् क्रुद्ध होऊन रावणावर धांवून गेला आणि आपल्या वज्रतुल्य मुष्टीनें रावणाच्या वक्षःस्थलीं त्या क्रुद्ध झालेल्या हनुमानानें प्रहार केला १४. तेव्हां त्या मुष्टिप्रहाराच्या योगानें राक्षसाधिपति रावण तोंडघशीं पडला आणि ह्याप्रमाणें भूमीवर पडल्यानंतर तो मूर्छितही झाला १५. मुखें, नेत्र व कान ह्यांतून पुष्कळच रक्त वाहूं लागलें; विवळत विवळत तो निश्चेष्ट होऊन रथावर बसला १६; त्याला कांहींएक सुचनासें झालें; मूर्च्छाही आली आणि बसवेनासेंही झालें. ह्याप्रमाणें भयंकर पराक्रमी रावण संग्रामामध्यें बेशुद्ध झालेला पाहून १७. असुरांसहवर्तमान देव, वानर आणि ऋषि आनंदानें गर्जना करूं लागले १८. नंतर रावणानें जर्जर केलेल्या त्या लक्ष्मणाला हातांनीं कवटाळून धरून तेजस्वी हनुमानानें रामासमीप आणिलें १९. तेव्हां लक्ष्मण शत्रूंच्या हातून यत्किंचितही चलित होणें शक्य नव्हतें तरी वायुपुत्र हनुमानाच्या परम भक्तीमुळें आणि सख्यामुळें तो त्या वानराला हलका झाला १२०. असो. इतकें झाल्यानंतर युद्धामध्यें पराजित झालेल्या लक्ष्मणाला सोडून ती शक्ति रावणाच्या त्या रथावर पुनरपि स्वस्थानीं परत आली २१. तदनंतर महातेजस्वी रावणही त्या महासंग्रामामध्यें शुद्धीवर आला आणि प्रचंड धनुष्यासहवर्तमान तीक्ष्ण बाण त्यानें हातीं घेतले २२. इतक्यांत शत्रुनाशक लक्ष्मण शल्यरहित झाल्यामुळें सावध झाला आणि

महावीरां वानराणां महाचमूम् । राघवस्तु रणे दृष्ट्वा रावणं समभिद्रवत् २४ अथैनमनुसंक्रम्य हनूमान्वाक्यमब्रवीत् । मम पृष्ठं समारुह्य राक्षसं शास्तुमर्हसि २५ विष्णुर्यथा गरुत्मन्तमारुह्यामरवैरिणम् । तच्छ्रुत्वा राघवो वाक्यं वायुपुत्रेण भाषितम् २६ अथारुरोह सहसा हनूमन्तं महाकपिम् । रथस्थं रावणं सङ्ख्ये ददर्श मनुजाधिपः २७ तमालोक्य महातेजाः प्रदुद्राव स रावणम् । वैरोचनमिव क्रुद्धो विष्णुरभ्युद्यतायुधः २८ ज्याशब्दमकरोत्तीव्रं वज्रनिष्पेषनिष्ठुरम् । गिरा गम्भीरया रामो राक्षसेन्द्रमुवाच ह २९ तिष्ठ तिष्ठ मम त्वं हि कृत्वा विप्रियमीदृशम् । क्व नु राक्षसशार्दूल गत्वा मोक्षमवाप्स्यसि ३० यदीन्द्रवैवस्वतभास्करान्वा स्वयंभुवैश्वानरशंकरान्वा । गमिष्यसि त्वं दशधा दिशो वा तथापि मे नाद्य गतो विमोक्ष्यसे ३१ यश्चैष शक्त्या निहतस्त्वयाद्य गच्छन्विषादं सहसाभ्युपेत्य । स एष रक्षोगणराज मृत्युः सपुत्रपौत्रस्य तवाद्य युद्धे ३२ एतेन चात्यद्भुतदर्शनानि

---

विष्णूचा आपण अतर्क्य अंश आहों असें तो स्मरण करूं लागला २३. तदनंतर वानरांच्या प्रचंड सेनेंतील मोठे मोठे वीर पडले आहेत असें आढळून आल्यावर रघुवंशज राम संग्राममध्यें रावणावर धांवून गेला असतां २४ मागोमाग जाऊन हनुमान् त्याला ह्मणाला "गरुडावर आरोहण करणाऱ्या विष्णूप्रमाणें माझ्या पृष्ठभागावर आरूढ होऊन आपण देववैरी राक्षसाला शासन करा." हें वायुपुत्रानें केलेलें भाषण श्रवण केल्यानंतर रघुवंशज राम २५, २६ महाकपि हनुमानावर सत्वर आरूढ झाली असतां संग्रामामध्यें रावण रथारूढ झाल्याचें त्या राजानें अवलोकन केलें २७; व त्याला अवलोकन केल्याबरोबर चक्रायुध उगारून विरोचनपुत्र बलीवर चाल करून जाणाऱ्या क्रुद्ध विष्णूप्रमाणें तो महातेजस्वी राम रावणावर चालून गेला २८; वज्रावर वज्राचा आघात झाल्याप्रमाणें भयंकर असा प्रत्यंचेचा प्रचंड टणत्कार त्यानें ऐकिला आणि गंभीर वाणीनें तो राम राक्षसाधिपति रावणाला ह्मणाला २९, "थांब, थांब! अशा प्रकारचा माझा अपराध केल्यानंतर, हे राक्षसश्रेष्ठा, तूं आतां कोठेंही गेलास तरी माझ्या हातून सुटणार नाहींस ३०. इंद्र, यम, सूर्य, ब्रह्मदेव, अग्नि, शंकर ह्यांच्याकडे अथवा दशदिशांच्याही पलीकडे जरी तूं गेलास तरी आज माझ्या हातून सुटणार नाहींस ३१. हा लक्ष्मण मूर्च्छित होत असतांना एकाएकीं समीप येऊन तूं आज त्याला शक्तीनें प्रहार केला आहेस; परंतु, हे राक्षसकुलाधिपते, आज संग्रामामध्यें तो हा मी राम पुत्रपौत्रांसहवर्तमान तुझा मृत्यु होईल ३२. अत्यंत

शरैर्जनस्थानकृतालयानि । चतुर्दशान्यात्तवरायुधानि रक्षःसहस्राणि निषूदितानि ३३ राघवस्य वचः श्रुत्वा राक्षसेन्द्रो महाबलः । वायुपुत्रं महावेगं वहन्तं राघवं रणे ३४ रोषेण महताविष्टः पूर्ववैरमनुस्मरन् । आजघान शरैर्दीप्तैः कालानलशिखोपमैः ३५ राक्षसेनाहते तस्य ताडितस्यापि सायकैः । स्वभावतेजोयुक्तस्य भूयस्तेजोभ्यवर्धत ३६ ततो रामो महातेजा रावणेन कृतव्रणम् । दृष्ट्वा प्लवगशार्दूलं क्रोधस्य वशमेयिवान् ३७ तस्याभिसंक्रम्य रथं सचक्रं साश्वध्वजच्छत्रमहापताकम् । ससारथिं साशनिशूलखड्गं रामः प्रचिच्छेद शितैः शराग्रैः ३८ अथेन्द्रशत्रुं तरसा जघान बाणेन वज्राशनिसन्निभेन । भुजान्तरे व्यूढसुजातरूपे वज्रेण मेरुं भगवानिवेन्द्रः ३९ यो वज्रपाताशनिसंनिपातान्न चुक्षुभे नापि चचाल राजा । स रामबाणाभिहतो भृशार्तश्चचाल चापं च मुमोच वीरः १४० तं विह्वलन्तं प्रसमीक्ष्य रामः

---

अद्भुत रूपें धारण करून व मोठीं मोठीं आयुधें हातांत घेऊन जनस्थानामध्यें वास्तव्य करीत असलेल्या चवदा हजार राक्षसांचा ह्या रामानें बाणांच्या योगानें वध केला आहे " ३३. हें रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर महाबलाढ्य राक्षसाधिपति रावण अतिशय क्रुद्ध झाला आणि महावेगवान् हनुमान् संग्रामामध्यें रामाला नेत असतांना पूर्वीचें वैर आठवून प्रलयाग्नीच्या ज्वालेप्रमाणें देदीप्यमान असलेल्या बाणांनीं त्याला त्यानें वेध केला ३४, ३५. परंतु, राक्षसानें बाणांनीं प्रहार केल्यामुळें तो ताडित झाला असतांहि स्वभावतःच तेजस्वी असलेल्या त्या हनुमानाचें तेज अधिकच वृद्धिंगत झालें ३६. ह्याप्रकार रावणानें वानरश्रेष्ठ हनुमानाला जखमी केल्याचें अवलोकन करून महातेजस्वी राम क्रुद्ध झाला ३७; आणि सज्ज होऊन तीक्ष्ण बाणाग्रांनीं त्या राक्षसाचा रथ— सारथि, वज्र, शूल, खड्ग, चक्र, अश्व, ध्वज, छत्र आणि मोठ्या मोठ्या पताका—ह्यांसहवर्तमान त्यानें तोडून टाकिला ३८. इतकेंच नव्हे परंतु, भगवान् इंद्रानें ज्याप्रमाणें वज्राच्या योगानें मेरुपर्वताला प्रहार केला त्याप्रमाणें वज्र व विद्युल्लता ह्यांप्रमाणें प्रकाशमान असलेल्या बाणांच्या योगानें त्या इंद्रशत्रु रावणाला विशाल व शृंगारिलेल्या वक्षःस्थलाचे ठिकाणीं त्यानें प्रहार केला असतां ३९ वज्र व विद्युल्लता ह्यांचे प्रहार झाले असतांही जो गांगरून जात नसे व मूर्च्छितही होत नसे तो वीर रावणराजा रामबाणांचा प्रहार झाल्यामुळें अतिशय आर्त होऊन मूर्च्छित झाला व हातांतील धनुष्यही त्यानें टाकून दिलें १४०. तदनंतर तो विवळत आहे असें पाहून महात्म्या रामानें अर्धचंद्राकृति देदीप्यमान बाण

समाददे दीप्तमथार्धचन्द्रम् । तेनार्कवर्णं महसा किरीटं चिच्छेद रक्षोधिपतेर्महात्मा ४१ तं निर्विषाशीविषसंनिकाशं शान्तार्चिषं सूर्यमिवाप्रकाशम् । गतश्रियं छिन्नकिरीटकूटमुवाच रामो युधि राक्षसेन्द्रम् ४२ कृतं त्वया कर्म महत्सुभीमं हतप्रवीरश्च कृतस्त्वयाहम् । तस्मात्परिश्रान्त इति व्यवस्य न त्वां शरैर्मृत्युवशं नयामि ४३ प्रयाहि जानामि रणार्दितस्त्वं प्रविश्य रात्रिंचरराज लङ्काम् । आश्वस्य निर्याहि रथी सधन्वी तदा बलं प्रेक्ष्यसि मे रथस्थः ४४ स एवमुक्तो हतदर्पहर्षो निकृत्तचापः स हताश्वसूतः । शरार्दितो भग्नमहाकिरीटो विवेश लङ्कां सहसा स्म राजा ४५ तस्मिन्प्रविष्टे रजनीचरेन्द्रे महाबले दानवदेवशत्रौ । हरीन्विशल्यान्सह लक्ष्मणेन चकार रामः परमाहवाग्रे ४६ तस्मिन्प्रभग्ने त्रिदशेन्द्रशत्रौ सुरासुरा भूतगणा दिशश्च । ससागराः सर्षिमहोरगाश्च तथैव भूम्यम्बुचराः प्रहृष्टाः ४७ [ २३७० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकोनषष्टितमः सर्गः ॥ ५९ ॥

---

हातामध्यें घेतला आणि त्या बाणाच्या योगानें त्या राक्षसाधिपतीचा सूर्यतुल्य तेजस्वी किरीट त्यानें एकाएकीं तोडून टाकिला ४१. तदनंतर ज्याच्या किरीटसमुदायाचे तुकडे तुकडे होऊन गेलेले होते; निस्तेज झाल्यामुळें प्रकाशरहित सूर्याप्रमाणें, ज्वालारहित झालेल्या अग्नीप्रमाणें अथवा विषरहित झालेल्या भुजंगाप्रमाणें जो दिसत होता त्या राक्षसाधिपतीला राम संग्रामामध्यें ह्मणाला ४२ " तूं फारच मोठें भयंकर कर्म केलें असून माझ्या वीरांचा वध केला आहेस. तस्मात्, तूं श्रांत झाला असशील असें समजून मी तुला इतक्यांतच मृत्यूच्या स्वाधीन करीत नाहीं ४३. हे निशाचराधिपते, तूं युद्ध करून थकला आहेस हें मी जाणीत आहें. ह्यास्तव, तूं आतां येथून निघून जा; लंकेमध्यें प्रविष्ट होऊन विश्रांति घे आणि विश्रांति घेतल्यानंतर रथावर आरूढ होऊन तूं रथी धनुष्यासहवर्तमान इकडे ये; ह्मणजे माझें बल तुझ्या दृष्टीं पडेल " ४४. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां ज्याचा गर्व व हर्ष हे नाहींसे झालेले आहेत; ज्याच्या धनुष्याचे तुकडे तुकडे उडून गेलेले आहेत; ज्याचे अश्व व सारथि हे वध पावले आहेत; ज्याच्या मोठ्या किरीटाच्या ठिकऱ्या उडालेल्या आहेत आणि जो बाणांनीं जर्जर झालेला आहे असा तो राजा त्वरेत्वरेनें लंकेमध्यें निघून गेला ४५. ह्याप्रमाणें तो देवदानवांचा शत्रु महाबलाढ्य राक्षसाधिपति लंकेमध्यें निघून गेला असतां त्या प्रचंड संग्रामामध्यें रामानें लक्ष्मणासहवर्तमान वानरांना शल्यरहित केलें ४६; आणि ह्याप्रमाणें त्या देवराजशत्रूचा पराजय झाला असतां देव, दैत्य,

स प्रविश्य पुरीं लङ्कां रामबाणभयार्दितः । भग्नदर्पस्तदा राजा बभूव व्यथितेन्द्रियः १ मातङ्ग इव सिंहेन गरुडेनेव पन्नगः । अभिभूतोभवद्राजा राघवेण महात्मना २ ब्रह्मदण्डप्रतीकानां विद्युच्चलितवर्चसाम् । स्मरन्राघवबाणानां विव्यथे राक्षसेश्वरः ३ स काञ्चनमयं दिव्यमाश्रित्य परमासनम् । विप्रेक्षमाणो रक्षांसि रावणो वाक्यमब्रवीत् ४ सर्वं तत्खलु मे मोघं यत्तप्तं परमं तपः । यत्समानो महेन्द्रेण मानुषेण विनिर्जितः ५ इदं तद्ब्रह्मणो घोरं वाक्यं मामभ्युपस्थितम् । मानुषेभ्यो विजानीहि भयं त्वमिति तत्तथा ६ देवदानवगन्धर्वैर्यक्षराक्षसपन्नगैः । अवध्यत्वं मया प्रोक्तं मानुषेभ्यो न याचितम् ७ तमिमं मानुषं मन्ये रामं दशरथात्मजम् । इक्ष्वाकुकुलजातेन अनरण्येन यत्पुरा ८ उत्पत्स्यति हि मद्वंशे पुरुषो राक्षसाधम । यस्त्वां सपुत्रं सामात्यं सबलं साश्वसारथिम् ९ निहनिष्यति सङ्ग्रामे त्वां कुलाधम दुर्मते । शप्तोऽहं वेदवत्या च यथा

---

भूतगण, दिशा, सागर, महोरग आणि जलचर व स्थलचर प्राणी ह्या सर्वांना आनंद झाला १४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग समाप्त झाला ॥ ५९ ॥

रामबाणांच्या भीतीनें ग्रस्त झाल्यामुळें आणि इंद्रियें व्यथित झाल्यामुळें तो राजा, लंकानगरीमध्यें प्रविष्ट झाल्यावर गर्वरहित झाला १. कारण, सिंहानें ज्याप्रमाणें गजाला अथवा गरुडानें ज्याप्रमाणें भुजंगाला जेरीस आणावें त्याचप्रमाणें महात्म्या राघवानें त्या राजाला जेरीस आणिलें होतें २. विद्युल्लतेप्रमाणें ज्यांचें तेज देदीप्यमान आहे असे राघवाचे ब्रह्मदंडतुल्य बाण मनामध्यें येऊं लागले असतां तो राक्षसाधिपति घाबरून जाऊं लागला ३ आणि सुवर्णमय दिव्य सिंहासनावर आरूढ होऊन राक्षसांकडे पहात पहात तो रावण ह्मणाला ४ " ज्याअर्थी महेंद्रासमान असलेल्या माझा मानवानें पराजय केला त्याअर्थी ती मीं केलेली पराकाष्ठेची तपश्चर्या खरोखर व्यर्थ झाली ५. " मानवांपासून भय आहे हें तूं जाणून ठेव " असें जें मला उद्देशून ब्रह्मदेवानें उच्चारिलेलें भयंकर वाक्य तें आज सफल होण्याचा माझ्यावर प्रसंग येऊन ठेपला आहे ६. देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस व पन्नग ह्यांच्या हातून माझा वध होऊं नये असा वर मीं मागितला; परंतु, मानवांपासून वध न होण्याविषयीं मीं वर मागितला नाहीं ७. ह्यास्तव, ब्रह्मदेवानें सांगितल्याप्रमाणें तो हा दशरथपुत्र मानव राम माझ्या भयाचें कारण आहे असें मला वाटतें. " हे राक्षसाधमा, हे कुलाधमा, हे दुर्मते, माझ्या वंशामध्यें एक पुरुष उत्पन्न होईल आणि तो संग्रामामध्यें

सा धर्षिता पुरा १० सेयं सीता महाभागा जाता जनकनन्दिनी । उमा नन्दीश्वरश्चापि रम्भा वरुणकन्यका ११ यथोक्तास्तन्मया प्राप्तं न मिथ्या ऋषिभाषितम् । एतदेव समागम्य यत्नं कर्तुमिहार्हथ १२ राक्षसाश्चापि तिष्ठन्तु चर्यागोपुरमूर्धसु । स चाप्रतिमगाम्भीर्यो देवदानवदर्पहा १३ ब्रह्मशापाभिभूतस्तु कुम्भकर्णो विबोध्यताम् । समरे जितमात्मानं प्रहस्तं च निषूदितम् १४ ज्ञात्वा रक्षो भीमबलमादिदेश महाबलः । द्वारेषु यत्नः क्रियतां प्राकारश्चाधिरुह्यताम् १५ निद्रावशसमाविष्टः कुम्भकर्णो विबोध्यताम् । सुखं स्वपिति निश्चिन्तः कामोपहतचेतनः १६ नव सप्त दशाष्टौ च मासान्स्वपिति राक्षसः । मन्त्रं कृत्वा प्रसुप्तोऽयमितस्तु नवमेऽहनि १७ स हि सङ्ख्ये महाबाहुः ककुदं सर्वरक्षसाम् । वानरान्राजपुत्रौ च क्षिप्रमेव हनिष्यति १८ एष केतुः परं सङ्ख्ये मुख्यो वै सर्वरक्षसाम् । कुम्भकर्णः सदा शेते मूढो ग्राम्यसुख

---

पुत्र, अमात्य, सैन्य, अश्व व सारथि ह्यांसहवर्तमान तुझा वध करील " असा पूर्वी इक्ष्वाकुकुलांत उत्पन्न झालेल्या अनरण्यानें मला शापही दिला आहे. त्याचप्रमाणें वेदवतीवर पूर्वी बलात्कार केल्यामुळें तिनें मला शाप दिला आहे ८, ९, १०; व तीही वेदवतीच महाभाग्यवती सीता जनककन्या झाली आहे. त्याचप्रमाणें उमा, नंदिकेश्वर, रंभा आणि वरुणकन्यका ११ ह्यांनीं जें सांगितलं तेंच मला प्राप्त झालें आहे. कारण, तपस्वीजनांचें भाषण असत्य होणार नाहीं. ह्यास्तव, ह्याचा विचार करून तुह्मी ह्या प्रसंगीं भयनिवृत्तीकरितां यत्न करा १२. मार्ग व गोपुरें ह्यांचे ठिकाणीं राक्षस असूं द्या; अनुपम गांभीर्यानें युक्त देवदानवांचा दर्प नाहींसा करणाऱ्या १३ व ब्रह्मशापानें ग्रस्त झालेल्या कुंभकर्णाला उठवा आणि संग्रामामध्यें माझा पराजय झाल्याचें व प्रहस्ताचा वध झाल्याचें त्याला कळवा " १४ ह्याप्रमाणें कुंभकर्ण आपणाला साहाय्य करण्यास योग्य आहे असें समजून महाबलाढ्य रावणानें पुनरपि कुंभकर्णाला जागें करण्याविषयीं त्या भीमबल राक्षसाला सांगितलें. ( तो ह्मणाला )" द्वारांचे ठिकाणीं रक्षणाविषयीं यत्न करा; कोटावर फौज पाठवा १५; आणि निद्रावश झालेल्या कुंभकर्णाला उठवा विषयवासनेनें मति गुंग झाल्यामुळें हा निश्चिंत होऊन खुशाल झोंप घेत पडत असतो १६. हा राक्षस सात सात, आठ आठ, नऊ नऊ, दहा दहा महिनेपर्यंतही झोंप घेत असतो आणि युद्धाविषयीं बेत ठरल्यानंतर हा निद्रिस्थ झाल्याला जवळ जवळ नऊ महिने होत आले आहेत १७. सर्व राक्षसांमध्यें श्रेष्ठ असलेला तो महापराक्रमी कुंभकर्ण संग्रामामध्यें [illegible] राजपुत्रांचा सत्वर वध करील १८. सर्व राक्षसांमध्यें

रतः १९ रामेणाभिनिरस्तस्य सङ्ग्रामेऽस्मिन्सुदारुणे । भविष्यति न मे शोकः कुम्भकर्णे विबोधिते २० किं करिष्याम्यहं तेन शक्रतुल्यबलेन हि । ईदृशे व्यसने घोरे यो न साह्याय कल्पते २१ ते तु तद्वचनं श्रुत्वा राक्षसेन्द्रस्य राक्षसाः । जग्मुः परमसंभ्रान्ताः कुम्भकर्णनिवेशनम् २२ ते रावणसमादिष्टा मांसशोणितभोजनाः । गन्धं माल्यं महद्भक्ष्यमादाय सहसा ययुः २३ तां प्रविश्य महाद्वारां सर्वतो योजनायताम् । कुम्भकर्णगुहां रम्यां पुष्पगन्धप्रवाहिनीम् २४ कुम्भकर्णस्य निःश्वासादवधूता महाबलाः । प्रतिष्ठमानाः कृच्छ्रेण यत्नात्प्रविविशुर्गुहाम् २५ तां प्रविश्य गुहां रम्यां रत्नकाञ्चनकुट्टिमाम् । ददृशुर्नैर्ऋतव्याघ्राः शयानं भीमविक्रमम् २६ ते तु तं विकृतं सुप्तं विकीर्णमिव पर्वतम् । कुम्भकर्णं महानिद्रं समेताः प्रत्यबोधयन् २७ ऊर्ध्वलोमाञ्चिततनुं श्वसन्तमिव पन्नगम् । भ्रामयन्तं विनिःश्वासैः शयानं भीमविक्रमम् २८ भीमनासापुटं तं तु

---

मुख्य आणि संग्रामांतील मुख्य ध्वज असा हा विषयलंपट मूढ कुंभकर्ण सर्वदा निद्रिस्थ असतो १९. ह्या अति भयंकर संग्रामामध्यें रामाच्या हातून पराजय पावल्यामुळें जें मला दुःख होत आहे तें हा जागा झाल्यावर नाहींसें होईल २०. अशा प्रकारचें घोर संकट प्राप्त झालें असूनही ज्याचें साहाय्य होत नाहीं त्या इंद्रतुल्य पराक्रमी कुंभकर्णाचा मला काय उपयोग आहे ? " २१. राक्षसाधिपति रावणाचें तें भाषण श्रवण करून ते राक्षस अतिशय लगबगीनें कुंभकर्णाचे घराकडे निघाले २२; आणि रक्तमांस भक्षण करणारे ते राक्षस रावणानें सांगितल्यामुळें गंध, पुष्पें आणि विपुल भक्ष्य बरोबर घेऊन ते एकदम चालते झाले २३. सर्व बाजूंनीं एक एक योजन विस्तीर्ण, महाद्वारांनीं युक्त आणि पुष्पगंधांचा सुवास जिच्यामध्यें सुटला आहे अशा त्या कुंभकर्णाच्या रम्य गुहेमध्यें प्रविष्ट होतांक्षणीं २४ ते महाबलाढ्य राक्षस कुंभकर्णाच्या श्वासानें उडून जाऊं लागले; परंतु, मोठ्या यत्नानें परत वळून ते त्या गुहेमध्यें प्रविष्ट झाले २५. रत्नजडित व सुवर्णजडित फरशीनें युक्त असलेल्या त्या रम्य गुहेमध्यें गेल्यानंतर त्या राक्षसश्रेष्ठांनीं भयंकर पराक्रमी कुंभकर्ण निद्रिस्थ असल्याचें अवलोकन केलें २६; व अस्ताव्यस्त होऊन पडलेला पर्वतच कीं काय अशा त्या घोर निद्रा घेत अव्यवस्थित रीतीनें पडलेल्या कुंभकर्णाला त्या सर्वांनीं मिळून जागें केलें २७. त्याच्या शरीरावरील लोम ऊर्ध्व होते; भुजंगाप्रमाणें तो सुस्कारे टाकीत होता; तो भयंकर पराक्रमी होता; निद्रिस्थ असतांना श्वासोच्छ्वासांच्या योगानें गुहेसमीप येणाऱ्या लोकांना तो मागें पुढें फिरवीत होता २८; त्याच्या नाकपुड्याही

पातालविपुलाननम् । शयने न्यस्तसर्वाङ्गं मेदोरुधिरगन्धिनम् २९ काञ्चनाङ्गदनद्धाङ्गं किरीटेनार्कवर्चसम् । ददृशुर्नैर्ऋतव्याघ्रं कुम्भकर्णमरिन्दमम् ३० ततश्चक्रुर्महात्मानः कुम्भकर्णस्य चाग्रतः । भूतानां मेरुसंकाशं राशिं परमतर्पणम् ३१ मृगाणां महिषाणां च वराहाणां च संचयान् । चक्रुर्नैर्ऋतशार्दूला राशिमन्नस्य चाद्भुतम् ३२ ततः शोणितकुम्भांश्च मांसानि विविधानि च । पुरस्तात्कुम्भकर्णस्य चक्रुस्त्रिदशशत्रवः ३३ लिलिपुश्च परार्ध्येन चन्दनेन परन्तपम् । दिव्यैराश्वासयामासुर्माल्यैर्गन्धैश्च गन्धिभिः ३४ धूपगन्धांश्च ससृजुस्तुष्टुवुश्च परन्तपम् । जलदा इव चानेदुर्यातुधानास्ततस्ततः ३५ शङ्खांश्च पूरयामासुः शशाङ्कसदृशप्रभान् । तुमुलं युगपच्चापि विनेदुश्चाप्यमर्षिताः ३६ नेदुरास्फोटयामासुश्चिक्षिपुस्ते निशाचराः । कुम्भकर्णविबोधार्थं चक्रुस्ते विपुलं स्वनम् ३७ सशङ्खभेरीपणवप्रणादमास्फोटितक्ष्वेलितसिंहनादम् । दिशो द्रवन्तस्त्रिदिवं किरन्तः श्रुत्वा विहङ्गाः सहसा निपेतुः ३८ यदा

---

फार भयंकर होत्या; मुख तर पातालाप्रमाणें मोठें होतें; त्याचें सर्व शरीर शय्येवर पसरलेलें होतें; मेद व रक्त ह्यांचा गंध त्याच्या शरीराला येत होता; २९ सुवर्णबाहुभूषणांनीं त्याचे बाहु जखडून गेलेले होते आणि किरीटाच्या योगानें तो शत्रुदमन राक्षसश्रेष्ठ कुंभकर्ण सूर्यासारिखा तेजस्वी दिसत होता ३०. अशाप्रकारें त्या कुंभकर्णाला अवलोकन केल्यानंतर त्या महात्म्या राक्षसांनीं त्याच्या समोर अत्यंत तृप्तिकारक अशी मेरुपर्वतासारिखी प्राण्यांची रास घातली ३१. मृग, महिष आणि वराह ह्यांचेही ढीग त्या राक्षसश्रेष्ठांनीं तेथें घातले आणि अन्नाचीही एक अद्भुत रास त्यांनीं तेथें घातली ३२. तदनंतर रक्तानें भरलेले घट व नानाप्रकारचीं मांसें त्या देवशत्रु राक्षसांनीं कुंभकर्णापुढें ठेविलीं ३३. उत्कृष्ट चंदन त्या शत्रुतापन कुंभकर्णाच्या शरीराला त्यांनीं लाविलें; उत्कृष्ट सुगंधी द्रव्यें आणि उत्कृष्ट सुगंधी पुष्पें त्यांनीं त्याच्याकडून हुंगविलीं ३४; धूपांचे सुवास त्यांनीं चोहोंकडे सुरू केले; त्या शत्रुतापन कुंभकर्णाची ते स्तुति करूं लागले; ठिकठिकाणीं ते राक्षस मेघांप्रमाणें गर्जना करूं लागले ३५; चंद्रतुल्य तेजस्वी शंख वाजवूं लागले; क्रुद्ध झालेले ते एकदम प्रचंड गर्जना करूं लागले ३६; आरोळ्या मारूं लागले ; दंड ठोकूं लागले; त्याला हालवूं लागले आणि त्याला जागें करण्याकरितां ते मोठा ध्वनिही करूं लागले ३७. शंख व दुंदुभि ह्यांसहवर्तमान पणववाद्याचा ध्वनि आणि दंड व पणवाद्य ह्यांसहवर्तमान सिंहनाद श्रवण करून पक्षी

भृशार्तैर्निनदैर्महात्मा न कुम्भकर्णो बुबुधे प्रसुप्तः । ततो भुशुण्डीर्मुसलानि सर्वे रक्षोगणास्ते जगृहुर्गदांश्च ३९ तं शैलशृङ्गैर्मुसलैर्गदाभिर्वक्षःस्थले मुद्गरमुष्टिभिश्च । सुखप्रसुप्तं भुवि कुम्भकर्णं रक्षांस्युदग्राणि तदा निजघ्नुः ४० तस्य निःश्वासवातेन कुम्भकर्णस्य रक्षसः । राक्षसाः कुम्भकर्णस्य स्थातुं शेकुर्न चाग्रतः ४१ ततः परिहिता गाढं राक्षसा भीमविक्रमाः । मृदङ्गपणवान्भेरीः शङ्खकुम्भगणांस्तथा ॥ दश राक्षससाहस्रं युगपत्पर्यवारयत् ४२ नीलाञ्जनचयाकारं ते तु तं प्रत्यबोधयन् । अभिघ्नन्तो नदन्तश्च न च संबुबुधे तदा ४३ यदा चैनं न शेकुस्ते प्रतिबोधयितुं तदा । ततो गुरुतरं यत्नं दारुणं समुपाक्रमन् ४४ अश्वानुष्ट्रान्खरान्नागाञ्जघ्नुर्दण्डकशाङ्कुशैः । भेरीशङ्खमृदङ्गांश्च सर्वप्राणैरवादयन् ४५ निजघ्नुश्चास्य गात्राणि महाकाष्ठकटङ्करैः । मुद्गरैर्मुसलैश्चापि सर्वप्राणसमुद्यतैः ४६ तेन नादेन महता लङ्का सर्वा प्रपूरिता । सपर्वतवना सर्वा सोपि नैव प्रबुध्यते ४७ ततो भेरीसहस्रं तु युगपत्समहन्यत । मृष्टकाञ्च-

---

वोहोंकडे पळूं लागले, आकाशामध्यें उड्डाण करूं लागले आणि एकाएकीं खालीं पडूंही लागले ३८; परंतु; ह्या प्रचंड ध्वनींच्या योगानेंही जेव्हां तो निद्रिस्थ असलेला कुंभकर्ण जागा होईना तेव्हां त्या सर्व राक्षसगणांनीं भुशुंडि, मुसळ व गदा हीं आयुधें हातामध्यें घेतलीं ३९ आणि पर्वतशिखरें, मुसळें, गदा, मुद्गर व मुष्टि ह्यांचे प्रहार सुखानें निद्रिस्थ झालेल्या कुंभकर्णाच्या वक्षःस्थलावर ते महाबलाढ्य राक्षस करूं लागले ४०. कुंभकर्ण राक्षसाच्या निश्वासवायूमुळें राक्षस त्याच्या समोर उभे रहाण्यास समर्थ झाले नाहींत ४१. असो. तदनंतर भयंकर पराक्रम करणाऱ्या त्या राक्षसांनीं वस्त्रें व कांचे घट्ट केले; मृदंग, पणव, दुंदुभि व कुंभवाद्यें ते वाजवूं लागले आणि दहा हजार राक्षस एकदम त्याच्या भोंवतीं गराडा देऊन उभे राहिले ४२. कज्जलाच्या राशीप्रमाणें असलेल्या त्या कुंभकर्णाला उठविण्याचा ते प्रयत्न करूं लागले; आणि गर्जना करीत करीत त्याला ते प्रहारही करूं लागले; तथापि तो जागा झाला नाहीं ४३. ह्या उपायांनीं जेव्हां ते राक्षस त्याला उठविण्यास समर्थ होईनात तेव्हां त्यांनीं त्याच्याहीपेक्षां मोठा भयंकर यत्न आरंभिला ४४. अश्व, उष्ट्र, गर्दभ आणि गज ह्यांना त्यांनीं दंड, चाबुक व अंकुश ह्यांच्या योगानें ताडण केलें; दुंदुभि, शंख व मृदंग हीं वाद्यें सर्व सामर्थ्य खर्च करून ते वाजवूं लागले ४५. मोठ्या मोठ्या काष्ठसमुदायांनीं ते त्याच्या अवयवांवर प्रहार करूं लागले आणि सर्व शक्ति एकत्र करून उचललेले मुद्गर व मुसळें त्यांनीं त्याला मारिलीं ४६. त्या मोठ्या ध्वनीनें सर्व लंकानगरी पर्वत व वनें ह्यांसहवर्तमान

मकोणानामसक्तानां समन्ततः ४८ एवमप्यतिनिद्रस्तु यदा नैव प्रबुध्यते। शापस्य वशमापन्नस्ततः क्रुद्धा निशाचराः ४९ ततः कोपसमाविष्टाः सर्वे भीमपराक्रमाः । तद्रक्षो बोधयिष्यन्तश्चक्रुरन्ये पराक्रमम् ५० अन्ये भेरीः समाजघ्नुरन्ये चक्रुर्महास्वनम् । केशानन्ये प्रलुलुपुः कर्णानन्ये दशन्ति च ५१ उदकुम्भशतानन्ये समसिञ्चन्त कर्णयोः । न कुम्भकर्णः पस्पन्दे महानिद्रावशं गतः ५२ अन्ये च बलिनस्तस्य कूटमुद्गरपाणयः । मूर्ध्नि वक्षसि गात्रेषु पातयन्कूटमुद्गरान् ५३ रज्जुबन्धनबद्धाभिः शतघ्नीभिश्च सर्वशः । वध्यमानो महाकायो न प्राबुध्यत राक्षसः ५४ वानराणां सहस्रं च शरीरेस्य प्रधावितम् । कुम्भकर्णस्तदा बुद्धा स्पर्शं परमबुध्यत ५५ स पात्यमानैर्गिरिशृङ्गवृक्षैरचिन्तयंस्तान्विपुलान्प्रहारान् । निद्राक्षयात्क्षुद्भयपीडितश्च विजृम्भमाणः सहसोत्पपात ५६ स नागभोगाचलशृङ्गकल्पौ विक्षिप्य बाहू जितवज्रसारौ । विवृत्य

---

दुमदुमून गेली; परंतु, तो जागा झालाच नाहीं ४७. तदनंतर उज्ज्वल सुवर्णदंडांनीं युक्त असलेल्या आणि सभोंवतीं ठेविलेल्या हजार नौबदी एकदम झडूं लागल्या ४८; परंतु, शापाच्या अधीन झालेला तो अति झोंपाळू कुंभकर्ण ह्या प्रकारानेंही जेव्हां जागा होईना तेव्हां राक्षस क्रुद्ध झाले ४९; तदनंतर क्रोधानें व्याप्त झालेले ते सर्वही भयंकर पराक्रम करणारे राक्षस त्या राक्षसाला उठविण्याकरितां फुनरपि यत्न करूं लागले. कांहींजण त्याच्या शरीरावरून जाऊं लागले ५०; कांहीं नौबदी वाजवूं लागले; कांहीं मोठ्या गर्जना करूं लागले; कांहीं केंस उपटूं लागले; कांहींजण त्याच्या कानांना चावूं लागले ५१ आणि कांहींजण शेंकडों घागरी त्याच्या कानामध्यें ओतूं लागले. तथापि, महानिद्रेच्या अधीन झालेला तो कुंभकर्ण यत्किंचित् हालला देखील नाहीं ५२. अद्भुत मुद्गर हातामध्यें घेतलेले इतर बलाढ्य राक्षस त्याच्या मस्तकावर, वक्षःस्थलावर आणि इतर अवयवांवर ते अद्भुत मुद्गर फेंकूं लागले ५३. रज्जुरूप बंधनांनीं जखडलेल्या शतघ्नींनेंही प्रहार जरी सर्व बाजूंनीं त्या धिप्पाड राक्षसावर होऊं लागले तरी तो राक्षस जागा झाला नाहीं ५४. शेवटीं एक हजार गज जेव्हां त्याच्या शरीरावरून धांवत नेले तेव्हां त्या कुंभकर्णाला आपल्या शरीराला कांहीं स्पर्श झाल्यासारिखा भास होऊन तो जागा झाला ५५ पर्वतशिखरें व वृक्ष ह्यांच्या योगानें ते राक्षस जरी त्याच्या शरीरावर असंख्य प्रहार करीत होते तरी त्यांची पर्वा न करितां निद्रा नाहींशी झाल्याबरोबर क्षुधेनें व्याकुळ झाल्यामुळें तो जांभया देत देतच एकदम जागा झाला ५६. तदनंतर नागाच्या शरीराप्रमाणें गर्गरीत,

वक्त्रं वडवामुखाभं निशाचरोसौ विकृतं जजृम्भे ५७ तस्य आजृम्भमाणस्य वक्त्रं पातालसंनिभम् । ददृशे मेरुशृङ्गाग्रे दिवाकर इवोदितः ५८ स जृम्भमाणोतिबलः प्रबुद्धस्तु निशाचरः । निःश्वासश्चास्य संजज्ञे पर्वतादिव मारुतः ५९ रूपमुत्तिष्ठतस्तस्य कुम्भकर्णस्य तद्बभौ । युगान्ते सर्वभूतानि कालस्येव दिधक्षतः ६० तस्याग्निदीप्तसदृशे विद्युत्सदृशवर्चसी । ददृशाते महानेत्रे दीप्ताविव महाग्रहौ ६१ ततस्त्वदर्शयन्सर्वान्भक्ष्यांश्च विविधान्बहून् । वराहान्महिषांश्चैव बभक्ष स महाबलः ६२ आदद्बुभुक्षितो मांसं शोणितं तृषितोपिबत् । मेदःकुम्भांश्च मद्यांश्च पपौ शक्ररिपुस्तदा ६३ ततस्तृप्त इति ज्ञात्वा समुत्पेतुर्निशाचराः । शिरोभिश्च प्रणम्यैनं सर्वतः पर्यवारयन् ६४ निद्राविशदनेत्रस्तु कलुषीकृतलोचनः । चारयन्सर्वतो दृष्टिं तानुवाच निशाचरान् ६५ स सर्वान्सान्त्वयामास नैर्ऋतान्नैर्ऋतर्षभः । बोधनाद्विस्मितश्चापि राक्षसानिदमब्रवीत् ६६

---

पर्वताच्या शिखराप्रमाणें स्थूल आणि काठिण्यामध्यें वज्रालाही मागें सारणारे आपले हात वर करून ( ह्मणजे आळस देऊन ) आणि वडवामुखासारिखें आपलें अक्राळविक्राळ मुख उघडून तो राक्षस जांभया देऊं लागला ५७. तो जांभया देऊं लागला असतां त्याचें मुख आंतल्या बाजूनें पातालासारिखें दिसूं लागलें आणि तो स्वतः मेरुपर्वताच्या शिखरावर उदय पावल्याप्रमाणें भासूं लागला ५८. ह्याप्रमाणें तो अतिबलाढ्य राक्षस जागा झाल्यावर जांभया देऊं लागला असतां पर्वतावरून सुरू होणाऱ्या वायूप्रमाणें त्याच्या नाकपुड्यांतून निश्वास सुरू झाला ५९ आणि तो कुंभकर्ण उठूं लागला असतां प्रलयकालीं सर्व प्राण्यांना दग्ध करण्यास उद्यक्त झालेल्या कालाप्रमाणें त्याचें रूप दिसूं लागलें ६०. अग्नीप्रमाणें देदीप्यमान आणि विद्युल्लताप्रमाणें उज्ज्वल असलेले त्याचे मोठे मोठे नेत्र मोठे उज्ज्वल ग्रहच कीं काय असे दिसूं लागले ६१. नंतर नानाप्रकारचे सर्व भक्ष्य पदार्थ आणि असंख्य वराह व महिष राक्षसांनीं त्याला दर्शविले व त्या महाबलाढ्य कुंभकर्णानेंही ते भक्षण केले ६२. त्या बुभुक्षित व तृषाक्रांत इंद्रशत्रु कुंभकर्णानें मांसभक्षण केलें, रक्तप्राशन केलें आणि मेद व मद्य ह्यांच्याही घागरी त्यानें गट्ट केल्या ६३. तदनंतर तो तृप्त झाला असें आढळून आल्यावर राक्षस उठले आणि मस्तकांनीं त्याला प्रणाम करून सर्व बाजूंनीं त्याच्या भोंवतीं उभे राहिले ६४. निद्रेच्या योगानें त्याचे नेत्र किंचित् उघडले आहेत व कलुषित झालेले आहेत असा तो कुंभकर्ण चाहोंकडे दृष्टि फेंकीत फेंकीत त्या राक्षसांशीं भाषण करूं लागला ६५.

किमर्थमहमादृत्य भवद्भिः प्रतिबोधितः । कच्चित्सुकुशलं राज्ञो भयं वा नेह किंचन ६७ अथ वा ध्रुवमन्येभ्यो भयं परमुपस्थितम् । यदर्थमेव त्वरितैर्भवद्भिः प्रतिबोधितः ६८ अद्य राक्षसराजस्य भयमुत्पाटयाम्यहम् । दारयिष्ये महेन्द्रं वा शीतयिष्ये तथानलम् ६९ न ह्यल्पकारणे सुप्तं बोधयिष्यति मादृशम् । तदाख्यातार्थतत्त्वेन मत्प्रबोधनकारणम् ७० एवं ब्रुवाणं संरब्धं कुम्भकर्णमरिंदमम् । यूपाक्षः सचिवो राज्ञः कृताञ्जलिरभाषत ७१ न नो देवकृतं किंचिद्भयमस्ति कदाचन । मानुषान्नो भयं राजंस्तुमुलं संप्रबाधते ७२ न दैत्यदानवेभ्यो वा भयमस्ति न नः क्वचित् । यादृशं मानुषं राजन्भयमस्मानुपस्थितम् ७३ वानरैः पर्वताकारैर्लङ्केयं परिवारिता । सीताहरणसंतप्ताद्रामान्नस्तुमुलं भयम् ७४ एकेन वानरेणेयं पूर्वं दग्धा महापुरी । कुमारो निहतश्चाक्षः सानुयात्रः सकुञ्जरः ७५ स्वयं रक्षोधिपश्चापि पौलस्त्यो देवकण्टकः । व्रजेति संयुगे मुक्तो रामेणादित्यवर्चसा ७६ यन्न देवैः कृतो राजा नापि दैत्यैर्न दानवैः ।

---

प्रथमतः त्या राक्षसश्रेष्ठानें त्या राक्षसांचें सांत्वन केलें आणि झोंपेंतून जागें केल्यामुळें विस्मयचकित होऊन तो राक्षसांना ह्मणाला ६६ "तुह्मीं बुद्ध्या मला कशाकरितां उठविलें ? राजाचें कुशल असून येथें कांहीं भय उपस्थित झालें नाहीं नां ? ६७. छे! छे! दुसऱ्यापासून निःसंशय कांहीं तरी मोठें भय उपस्थित झालें आहे आणि ह्मणूनच तुह्मीं त्वरत्वरें मला उठविलें आहे ६८. आज राक्षसराजाचें भय मी नाहींसें करीन आणि त्याकरितां महेंद्राला फाडून टाकीन अथवा अग्नीलाही थंड करून टाकीन ६९. यःकश्चित् कार्याकरितां माझ्यासारिख्याला तो राक्षसराज कधींही उठविणार नाहीं. तस्मात्, मला जागें करण्याचें कारण काय तें तुह्मी यथार्थ सांगा" ७०. ह्याप्रमाणें तो शत्रुदमन कुंभकर्ण क्षुब्ध होऊन विचारूं लागला असतां राजाचा यूपाक्षनामक सचिव हात जोडून त्याला ह्मणाला ७१ "हे राजा, देवांपासून आह्मांला कधींही भय प्राप्त होण्याचा संभव नाहीं; परंतु, मनुष्यापासून उत्पन्न झालेलें प्रचंड भय आह्मांला पीडा देत आहे ७२. हे राजा, मनुष्यापासून जसें भय सांप्रत आह्मांला उपस्थित झालें आहे तसें भय दैत्यांपासून अथवा दानवांपासून कधींही प्राप्त होण्याचा संभव नाहीं ७३. पर्वतप्राय वानरांनीं ह्या लंकेला गराडा दिला आहे आणि सीताहरणामुळें संतप्त झालेल्या रामापासून आह्मांला अशारीतीनें मोठें भय प्राप्त झालें आहे ७४. पूर्वीं एका वानरानें येथें येऊन ही महानगरी दग्ध केली आणि अनुयायी व गज ह्यांसहवर्तमान राजकुमार अक्षाचा वध केला ७५ व सूर्यतुल्य तेजस्वी रामानें तर पुलस्त्यपुत्र, देवकंटक व राक्षसाधिपति

कृतः स इह रामेण विमुक्तः प्राणसंशयात् ७७ स यूपाक्षवचः श्रुत्वा भ्रातुर्युधि पराभवम्। कुम्भकर्णो विवृत्ताक्षो यूपाक्षमिदमब्रवीत् ७८ सर्वमद्यैव यूपाक्ष हरिसैन्यं सलक्ष्मणम्। राघवं च रणे जित्वा ततो द्रक्ष्यामि रावणम् ७९ राक्षसांस्तर्पयिष्यामि हरीणां मांसशोणितैः। रामलक्ष्मणयोश्चापि स्वयं पास्यामि शोणितम् ८० तत्तस्य वाक्यं ब्रुवतो निशम्य सगर्वितं रोषविवृद्धदोषम्। महोदरो नैर्ऋतयोधमुख्यः कृताञ्जलिर्वाक्यमिदं बभाषे ८१ रावणस्य वचः श्रुत्वा गुणदोषौ विमृश्य च। पश्चादपि महाबाहो शत्रून्युधि विजेष्यसि ८२ महोदरवचः श्रुत्वा राक्षसैः परिवारितः। कुम्भकर्णो महातेजाः संप्रतस्थे महाबलः ८३ सुप्तमुत्थाप्य भीमाक्षं भीमरूपपराक्रमम्। राक्षसास्त्वरिता जग्मुर्दशग्रीवनिवेशनम् ८४ तेऽभिगम्य दशग्रीवमासीनं परमासने। ऊचुर्बद्धाञ्जलिपुटाः सर्व एव निशाचराः ८५ कुम्भकर्णः प्रबुद्धोऽसौ भ्राता ते राक्षसेश्वर।

---

रावणाला युद्धामध्यें कचाट्यांत धरिलें आणि जा ह्मणून सोडूनही दिलें ७६. देव, दैत्य आणि दानव ह्यांनीं जी अवस्था राजाला कधीं प्राप्त करून दिली नाहीं ती अवस्था ह्या युद्धामध्यें रामानें त्याला प्राप्त करून दिली आणि प्राणावरचा प्रसंग गुदरला असतांही त्यांतून रामानें त्याला मुक्त केलें" ७७. युद्धामध्यें भ्रात्याचा पराभव झाला अशाप्रकारचें यूपाक्षाचें भाषण श्रवण केल्यावर कुंभकर्ण डोळे वटारून यूपाक्षाला ह्मणाला ७८ "हे यूपाक्षा, लक्ष्मणासहवर्तमान सर्व वानरसैन्य आणि राम ह्यांचा संग्रामामध्यें मी आजच्या आजच पराभव करून नंतर रावणाची भेट घेईन ७९; वानरांच्या रक्तमांसांनीं राक्षसांना तृप्त करीन आणि रामलक्ष्मणांचेंही रक्त मी स्वतः प्राशन करीन." गर्वयुक्त आणि क्रोधामुळें अतिशय ८० दोषग्रस्त असें त्याचें भाषण श्रवण करून राक्षसवीरांतील मुख्य योद्धा महोदर हात जोडून त्याला ह्मणाला ८१ "रावणाचें ह्मणणें ऐकून घेऊन आणि गुणदोषांचा विचार करून नंतर, हे महापराक्रमी राजा, युद्धामध्यें आपण शत्रूंना जिंकावें" ८२. महोदराचें भाषण श्रवण केल्यावर राक्षसांनीं परिवेष्टित असलेला महातेजस्वी व महाबलाढ्य कुंभकर्ण तेथून निघाला ८३. भयंकर रूप, पराक्रम व दृष्टि ह्यांनीं युक्त असलेला जो निद्रिस्थ कुंभकर्ण त्याला उठविल्यानंतर राक्षस सत्वर रावणाच्या घरीं गेले ८४ आणि उत्कृष्ट आसनावर बसलेल्या रावणाचे समीप गेल्यानंतर ते सर्वही राक्षस हात जोडून त्याला ह्मणाले ८५ "हे राक्षसाधिपते, आपला भ्राता कुंभकर्ण जागा झाला आहे; तेव्हां पुढें काय करावयाचें ? त्यानें परस्पर संग्रामामध्येंच जावें किंवा

कथं तत्रैव निर्यातु द्रक्ष्यसे तमिहागतम् ८६ रावणस्त्वब्रवीद्धृष्टो राक्षसांस्तानुपस्थितान् । द्रष्टुमेनमिहेच्छामि यथान्यायं च पूज्यताम् ८७ तथेत्युक्त्वा तु ते सर्वे पुनरागम्य राक्षसाः । कुम्भकर्णमिदं वाक्यमूचू रावणचोदिताः ८८ द्रष्टुं त्वां काङ्क्षते राजा सर्वराक्षसपुङ्गवः । गमने क्रियतां बुद्धिर्भ्रातरं संप्रहर्षय ८९ कुम्भकर्णस्तु दुर्धर्षो भ्रातुराज्ञाय शासनम् । तथेत्युक्त्वा महावीर्यः शयनादुत्पपात ह ९० प्रक्षाल्य वदनं हृष्टः स्नातः परमहर्षितः । पिपासुस्त्वरयामास पानं बलसमीरणम् ९१ ततस्ते त्वरितास्तत्र राक्षसा रावणाज्ञया । मद्यं भक्ष्यांश्च विविधान्क्षिप्रमेवोपहारयन् ९२ पीत्वा घटसहस्रे द्वे गमनायोपचक्रमे । ईषत्समुत्कटो मत्तस्तेजोबलसमन्वितः ९३ कुम्भकर्णो बभौ रुष्टः कालान्तकयमोपमः । भ्रातुः स भवनं गच्छन्रक्षोबलसमन्वितः ९४ कुम्भकर्णः पदन्यासैरकम्पयत मेदिनीम् ९५ स राजमार्गं वपुषा प्रकाशयन्सहस्ररश्मिर्धरणीमिवांशुभिः ।

---

तो येथें येऊन भेटावा अशी आपणांला इच्छा आहे ? " ८६ ह्यावर रावण आनंदित होऊन त्या आलेल्या राक्षसांना ह्मणाला " त्याची येथें गांठ घेण्याची माझी इच्छा आहे तुह्मी त्याचा योग्य रीतीनें संमान करा " ८७. ह्यावर " ठीक आहे " असें ह्मणून रावणानें आज्ञा केलेले ते सर्वही राक्षस कुंभकर्णाकडे आले आणि त्याला ह्मणाले ८८ " सर्व राक्षसांमध्यें श्रेष्ठ जो राजा तो आपल्या भेटीची इच्छा करीत आहे., ह्यास्तव, आपण तिकडे जाण्याचें मनामध्यें आणून भ्रात्याला आनंद द्या"८९. ही भ्रात्याची आज्ञा ऐकून तो अजिंक्य व महावीर्यवान् कुंभकर्ण " ठीक आहे" असें ह्मणाला आणि शय्येवरून उठला ९०. नंतर आनंदित होऊन मुखमार्जन केल्यावर मोठ्या हर्षानें त्यानें स्नान केलें आणि तृषाक्रांत झाल्यामुळें बलवृद्धिकारक पेय आणविण्याची त्यानें त्वरा केली ९१. तदनंतर ते राक्षस तेथून सत्वर निघाले आणि रावणाच्या आज्ञेनें त्यांनीं नानाप्रकारच्या भक्ष्यांसहवर्तमान सत्वर मद्य आणिलें ९२. तेव्हां दोन हजार घागरी मद्य पिऊन तेज व बल ह्यांनीं युक्त, किंचित् बेफाम व मत्त झालेला तो कुंभकर्ण तेथून जाण्यास तयार झाला व रुष्ट झाल्यामुळें काळ, अंतक आणि यम ह्यांप्रमाणें तो कुंभकर्ण दिसूं लागला; भ्रात्याच्या घरीं जातां जातां राक्षससैन्यासहवर्तमान असलेल्या त्या कुंभकर्णानें पादप्रक्षेपांच्या योगानें पृथ्वी कंपित केली ९३, ९४, ९५ आणि किरणांच्या योगानें ज्याप्रमाणें सूर्य पृथ्वी प्रकाशित करीत असतो त्याप्रमाणें आपल्या शरीरकांतीनें राजमार्ग प्रकाशित करीत असलेला तो कुंभकर्ण हात जोडिलेल्या राक्षसांनीं

जगाम तत्राञ्जलिमालया वृतः शतक्रतुर्गेहमिव स्वयंभुवः १६ तं राजमार्गस्थममित्रघातिनं वनौकसस्ते महसा बहिः स्थिताः । दृष्ट्वाप्रमेयं गिरिशृङ्गकल्पं वितत्रसुस्ते सह यूथपालैः १७ केचिच्छरण्यं शरणं स्म रामं व्रजन्ति केचिद्व्यथिताः पतन्ति । केचिद्दिशश्च व्यथिताः पतन्ति केचिद्भयार्ता भुवि शेरते स्म १८ तमद्रिशृङ्गप्रतिमं किरीटिनं स्पृशन्तमादित्यमिवात्मतेजसा । वनौकसः प्रेक्ष्य विवृद्धमद्भुतं भयार्दिता दुद्रुविरे यतस्ततः १९ [ २४६९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षष्टितमः सर्गः ॥ ६० ॥

ततो रामो महातेजा धनुरादाय वीर्यवान् । किरीटिनं महाकायं कुम्भकर्णं ददर्श ह १ तं दृष्ट्वा राक्षसश्रेष्ठं पर्वताकारदर्शनम् । क्रममाणमिवाकाशं पुरा नारायणं यथा २ सतोयाम्बुदसंकाशं काञ्चनाङ्गदभूषणम् । दृष्ट्वा पुनः प्रदुद्राव वानराणां महाचमूः ३ विद्रुतां वाहिनीं दृष्ट्वा वर्धमानं च राक्षसम् । सविस्मितमिदं रामो बिभीषणमुवाच ह ४

---

परिवेष्टित झाला आणि इंद्र ज्याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या घरीं जातो त्याप्रमाणें तो आपल्या भ्रात्याच्या घरीं निघाला १६. ह्याप्रमाणें तो शत्रुघातक कुंभकर्ण राजमार्गांतून चालला असतां बाहेर असलेल्या त्या वानरांच्या तो पर्वतशिखरतुल्य अनुपम कुंभकर्ण एकाएकीं दृष्टीं पडल्याबरोबर सेनापतींसहवर्तमान ते वानर घाबरून गेले १७. कांहीं-जण शरणागताचें रक्षण करणाऱ्या रामाला शरण गेले; कांहींजण गांगरून गेल्यामुळें तेथेंच पडले; कांहींजण भयभीत होऊन वाट फुटेल तिकडे जाऊं लागले आणि कांहींजण भीतिग्रस्त झाल्यामुळें भूमीवरच पडले १८. सारांश, पर्वतशिखरतुल्य शरीर, किरीट आणि सूर्याप्रमाणें स्वतःचें तेज ह्यांनीं युक्त असलेल्या त्या प्रचंड कुंभकर्णाला अवलोकन करण्याबरोबर वानर भयभीत होऊन इकडे तिकडे पळूं लागले १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं साठावा सर्ग समाप्त झाला ॥ ६० ॥

तदनंतर महातेजस्वी वीर्यवान् रामानें धनुष्य घेऊन किरीट धारण केलेल्या धिप्पाड कुंभकर्णाला अवलोकन केलें १. ज्याचा आकार व मुद्रा हीं पर्वताप्रमाणें आहेत; सजल मेघाप्रमाणें ज्याची कांति आहे; सुवर्णबाहुभूषणांनीं जो अलंकृत झालेला आहे आणि पूर्वीं आकाश व्याप्त करण्यास सिद्ध झालेल्या नारायणाप्रमाणें जो दिसत आहे तो राक्षसश्रेष्ठ कुंभकर्ण पुनरपि दृष्टीं पडताक्षणीं वानरांची महासेना पळत सुटली २,३. तेव्हां सेना पळूं लागलेली पाहून आणि अर्थातच राक्षसाची

कोऽसौ पर्वतसंकाशः किरीटी हरिलोचनः । लङ्कायां दृश्यते वीरः सविद्युदिव तोयदः ५ पृथिव्यां केतुभूतोऽसौ महानेकोऽत्र दृश्यते । यं दृष्ट्वा वानराः सर्वे विद्रवन्ति यतस्ततः ६ आचक्ष्व सुमहान्कोऽसौ रक्षो वा यदि वासुरः। न मयैवंविधं भूतं दृष्टपूर्वं कदाचन ७ संपृष्टो राजपुत्रेण रामेणाक्लिष्टकर्मणा । बिभीषणो महाप्राज्ञः काकुत्स्थमिदमब्रवीत् ८ येन वैवस्वतो युद्धे वासवश्च पराजितः । सैष विश्रवसः पुत्रः कुम्भकर्णः प्रतापवान् ॥ अस्य प्रमाणसदृशो राक्षसोऽन्यो न विद्यते ९ एतेन देवा युधि दानवाश्च यक्षा भुजङ्गाः पिशिताशनाश्च । गन्धर्वविद्याधरपन्नगाश्च सहस्रशो राघव संप्रभग्नाः १० शूलपाणिं विरूपाक्षं कुम्भकर्णं महाबलम् । हन्तुं न शेकुस्त्रिदशाः कालोऽयमिति मोहिताः ११ प्रकृत्या ह्येष तेजस्वी कुम्भकर्णो महाबलः । अन्येषां राक्षसेन्द्राणां वरदानकृतं बलम् १२ बालेन जातमात्रेण क्षुधार्तेन महात्मना । भक्षितानि सहस्राणि प्रजानां सुबहून्यपि १३ तेषु संभक्ष्यमाणेषु प्रजा भयनिपीडिताः । यान्ति स्म शरणं शक्रं

---

सरशी होत आहे असें अवलोकन करून राम विस्मयपूर्वक बिभीषणाला ह्मणाले ४ " पर्वतासारिखें शरीर, वानरासारिखे नेत्र, विद्युल्लतेसहवर्तमान असलेल्या मेघासारिखी कांति व किरीट ह्यांनीं युक्त असा हा कोण वीर लंकेमध्यें दृष्टीं पडत आहे? ५ पृथ्वीवरील ध्वजच कीं काय असा हा प्रचंड योद्धा एकटाच येथें दिसत आहे व त्याला पाहून सर्व वानर इकडे तिकडे पळत आहेत ६. ह्यास्तव, हा अतिप्रचंड पुरुष राक्षस आहे किंवा असुर आहे हें मला सांग. अशाप्रकारचा प्राणी मीं आजपर्यंत कधीं पाहिला नाहीं " ७. उदार कर्म करणाऱ्या राजपुत्र रामानें ह्याप्रमाणें प्रश्न केला असतां महाबुद्धिमान् बिभीषण त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला ह्मणाला ८ " ज्यानें यम व इंद्र ह्यांना युद्धामध्यें पराजित केलें तो हा विश्रवसाचा पुत्र प्रतापी कुंभकर्ण होय. मोठेपणामध्यें ह्याची बरोबरी करणारा दुसरा राक्षस नाहीं ९. हे राघवा, हजारों देव, दानव, यक्ष, भुजंग, राक्षस, गंधर्व, विद्याधर आणि पन्नग ह्यांचा ह्यानें युद्धामध्यें पराजय केलला आहे १०. उग्र नेत्र आणि शूलयुक्त हात ह्यांनीं युक्त असलेल्या महाबलाढ्य कुंभकर्णाचा वध करण्यास देव समर्थ झाले नाहींत. इतकेंच नव्हे परंतु, हा काल आहे असा त्यांना मोहच पडून राहिला ११. हा महाबलाढ्य कुंभकर्ण स्वभावतःच इतर राक्षसाधिपतींमध्यें तेजस्वी आहे आणि वरप्रदानामुळें ह्याला बल प्राप्त झालेलें आहे १२. बालपणीं जन्मास येतांक्षणीं क्षुधित झालेल्या ह्या महात्म्यानें शेंकडों हजार प्रजाजन भक्षण केले १३ आणि ह्याप्रमाणें हजारों लोकांना तो भक्षण करूं लागला असतां प्रजा

तमप्यर्थं न्यवेदयन् १४ स कुम्भकर्णं कुपितो महेन्द्रो जघान वज्रेण शितेन वज्री । स चक्रवज्राभिहतो महात्मा चचाल कोपाच्च भृशं ननाद १५ तस्य नानद्यमानस्य कुम्भकर्णस्य रक्षसः । श्रुत्वा निनादं वित्रस्ताः प्रजा भूयो वितत्रसुः १६ ततः क्रुद्धो महेन्द्रस्य कुम्भकर्णो महाबलः । निष्कृष्यैरावताद्दन्तं जघानोरसि वासवम् १७ कुम्भकर्णप्रहारार्तो विजज्वाल स वासवः । ततो विषेदुः सहसा देवा ब्रह्मर्षिदानवाः १८ प्रजाभिः सह शक्रश्च ययौ स्थानं स्वयंभुवः । कुम्भकर्णस्य दौरात्म्यं शशंसुस्ते प्रजापतेः १९ प्रजानां भक्षणं चापि शशंसुस्ते दिवौकसाम् । आश्रमध्वंसनं चापि परस्त्रीहरणं तथा २० एवं प्रजा यदि त्वेष भक्षयिष्यति नित्यशः । अचिरेणैव कालेन शून्यो लोको भविष्यति २१ वासवस्य वचः श्रुत्वा सर्वलोकपितामहः । रक्षांस्यावाहयामास कुम्भकर्णं ददर्श ह २२ कुम्भकर्णं समीक्ष्यैव वितत्रास प्रजापतिः । कुम्भकर्णमथाश्वस्तः स्वयंभूरिदमब्रवीत् २३ ध्रुवं लोकविनाशाय पौलस्त्येनासि निर्मितः । तस्मात्त्वमद्यप्रभृति मृतकल्पः शयिष्यसे २४ ब्रह्मशापाभिभूतोथ निपपाताग्रतः

---

भयभीत होऊन इंद्राला शरण गेल्या व ती गोष्ट त्यांनीं त्याला निवेदन केली १४. तेव्हां वज्रपाणि महेंद्रानें क्रुद्ध होऊन आपल्या तीक्ष्ण वज्रानें कुंभकर्णाला प्रहार केला व इंद्राच्या वज्राचा प्रहार झाल्याबरोबर तो महात्मा रागानें हातपाय आपटूं लागला व अतिशय गर्जना करूं लागला १५. ह्याप्रमाणें तो कुंभकर्ण राक्षस गर्जना करूं लागला असतां पूर्वीं त्रस्त होऊन गेलेल्या प्रजा अधिक अधिकच त्रस्त होऊं लागल्या १६. तदनंतर क्रुद्ध झालेल्या त्या महाबलाढ्य कुंभकर्णानें ऐरावताचा एक दांत उपटून इंद्राच्या वक्षःस्थलावर एक प्रहार केला असतां १७ कुंभकर्णाच्या प्रहारानें जर्जर झालेला तो इंद्र रक्तप्रवाहामुळें जसा कांहीं ज्वालांनीं व्याप्त झाल्यासारिखा दिसूं लागला. तेव्हां देव, ब्रह्मर्षि आणि दानव एकाएकीं खिन्न झाले १८; आणि प्रजाजनांसहवर्तमान इंद्र ब्रह्मलोकीं गेला व कुंभकर्णाचा तो दुष्टपणा त्यांनीं ब्रह्मदेवाला कथन केला १९. देवांच्या प्रजा भक्षण करून टाकिल्याचें, आश्रमांचा विध्वंस केल्याचें व परस्त्रिया हरण केल्याचें त्यांनीं त्याला कळविलें आणि पुनरपि ते ह्मणाले २० "ह्याप्रमाणें जर हा नित्य प्रजा भक्षण करीत राहील तर थोडक्याच कालांत सर्व जगत् शून्य होऊन जाईल" २१. इंद्राचें भाषण श्रवण केल्यावर सर्वलोकाधिपति ब्रह्मदेवानें राक्षसांचें आवाहन करून कुंभकर्णाला अवलोकन केलें २२. प्रथमतः तर कुंभकर्ण दृष्टीं पडतांक्षणींच ब्रह्मदेवाची गाळण उडाली; परंतु, धैर्य धरून ब्रह्मदेव कुंभकर्णाला ह्मणाला २३

प्रभोः । ततः परमसंभ्रान्तो रावणो वाक्यमब्रवीत् २५ प्रवृद्धः काञ्चनो वृक्षः फलकाले निकृन्त्यते । न नप्तारं स्वकं न्याय्यं शप्तुमेवं प्रजापते २६ न मिथ्यावचनश्च त्वं स्वप्स्यत्येव न संशयः । कालस्तु क्रियतामस्य शयने जागरणे तथा २७ रावणस्य वचः श्रुत्वा स्वयंभूरिदमब्रवीत् । शयिता ह्येष षण्मासमेकाहं जागरिष्यति २८ एकेनाह्ना त्वसौ वीरश्चरन्भूमिं बुभुक्षितः । व्यात्तास्यो भक्षयँल्लोकान्संवृद्ध इव पावकः २९ सोऽसौ व्यसनमापन्नः कुम्भकर्णमबोधयत् । त्वत्पराक्रमभीतश्च राजा संप्रति रावणः ३० स एष निर्गतो वीरः शिबिराद्भीमविक्रमः । वानरान्भृशसंक्रुद्धो भक्षयन्परिधावति ३१ कुम्भकर्णं प्रतीक्ष्यैव हरयोऽद्य प्रदुद्रुवुः । कथमेनं रणे क्रुद्धं वारयिष्यन्ति वानराः ३२ उच्यन्तां वानराः सर्वे यन्त्रमेतत्समुच्छ्रितम् । इति विज्ञाय हरयो भविष्यन्तीह निर्भयाः ३३

---

" विश्रवसानें तुला निःसंशय लोकांच्या नाशार्थ निर्माण केलें आहे. तस्मात्, तूं आजपासून मृततुल्य निद्रिस्थ होऊन रहाशील " २४. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाचा शाप झाला असतां त्या कुंभकर्णानें प्रभु ब्रह्मदेवासमोर साष्टांग नमस्कार घातला आणि नतर अतिशयच घाबरून गेलेला रावण ब्रह्मदेवांना ह्मणाला २५ " स्वतः वाढविलेला सुवर्णफलाचा वृक्ष सुवर्णरूप फल त्यापासून प्राप्त होण्याचा समय असतां ज्याप्रमाणें एकाद्यानें तोडून टाकावा त्याप्रमाणें, हे प्रजाधिपते, स्वतःच्या नातवाला असा शाप देणें न्याय्य नव्हे २६. आपलें वचन मिथ्या होणार नाहीं. ह्यास्तव, निःसंशय तो निद्रिस्थ राहीलच; परंतु ह्याच्या झोपेची व जागरणाची आपण कांहींतरी वेळ ठरवावी " २७. रावणाचें भाषण श्रवण करून ब्रह्मदेव ह्मणाले "(कमींत कमी) हा सहा तरी महिने एकसारिखा निजून राहिल्यावर एक दिवस जागा राहील २८. एका दिवसामध्यें हा वीर बुभुक्षित होऊन व आ पसरून भूमीवर संचार करितां करितां वृद्धिंगत झालेल्या अग्नीप्रमाणें लोकांना भक्षण करीत सुटेल " २९. असो. ( हे राघवा ) हा रावणराजा सांप्रत तुझ्या पराक्रमाला भिऊन गेला आहे आणि अशा संकटांत सांपडल्यामुळें त्यानें कुंभकर्णाला उठविलें आहे ३०. हा भयंकर पराक्रमी वीर कुंभकर्ण आपल्या घरांतून बाहेर पडला आहे आणि हा अतिशय क्रुद्ध होऊन वानरांना भक्षण करण्याकरितां इकडे तिकडे धांवत आहे ३१. अरे, कुंभकर्णाला पहातांक्षणींच जर आज वानर पळत सुटले आहेत तर संग्राममध्यें ह्या क्रुद्ध कुंभकर्णाचें निवारण ते कसें करतील ? ३२. ह्यास्तव, हें यन्त्र उभारिलें असें सर्व वानरांना कळवा; ह्मणजे तें खरें वाटून वानर येथें निर्भय होतील " ३३.

विभीषणवचः श्रुत्वा हेतुमत्सुमुखोद्गतम् । उवाच राघवो वाक्यं नीलं सेनापतिं तदा ३४ गच्छ सैन्यानि सर्वाणि व्यूह्य तिष्ठस्व पावके । द्वाराण्यादाय लङ्कायाश्चर्याश्चाप्यथ संक्रमान् ३५ शैलशृङ्गाणि वृक्षांश्च शिलाश्चाप्युपसंहरन् । भवन्तः सायुधाः सर्वे वानराः शैलपाणयः ३६ राघवेण समादिष्टो नीलो हरिचमूपतिः । शशास वानरानीकं यथावत्कपिकुञ्जरः ३७ ततो गवाक्षः शरभो हनूमानङ्गदस्तथा । शैलशृङ्गाणि शैलाभा गृहीत्वा द्वारमभ्ययुः ३८ रामवाक्यमुपश्रुत्य हरयो जितकाशिनः । पादपैरर्दयन्वीरा वानराः परवाहिनीम् ३९ ततो हरीणां तदनीकमुग्रं रराज शैलोद्यतवृक्षहस्तम् । गिरेः समीपानुगतं यथैव महन्महाम्भोधरजालमुग्रम् ४० [२५०९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे एकषष्टितमः सर्गः ॥ ६१ ॥

स तु राक्षसशार्दूलो निद्रामदसमाकुलः । राजमार्गं श्रिया जुष्टं ययौ विपुलविक्रमः १ राक्षसानां सहस्रैश्च वृतः परमदुर्जयः । गृहेभ्यः पुष्पवर्षेण कीर्यमाणस्तदा ययौ २ स हेमजालविततं भानुभास्वरदर्शनम् ।

---

वानरांना धैर्य यावें ह्या उद्देशानें बिभीषणानें केलेलें भाषण श्रवण करून सेनापति नीलाला राम ह्मणाले ३४ "हे अग्निपुत्रा, जा आणि सर्व सैन्यें सज्ज करून उभा रहा. लंकेचीं द्वारें व लहानमोठे मार्ग रोखून धरा ३५ आणि तुह्मी सर्वही वानर हातामध्यें पर्वत व इतर आयुधें घेऊन पर्वतशिखरें, वृक्ष व शिळा जमा करूं लागा" ३६. ह्याप्रमाणें रामाची आज्ञा झाली असतां वानरसेनाधिपति वानरश्रेष्ठ नीलानें त्या आज्ञेप्रमाणें वानरसैन्याला हुकूम केला ३७. तदनंतर गवाक्ष, शरभ, हनुमान् आणि अंगद हे पर्वतप्राय वानर पर्वतशिखरें घेऊन लंकेच्या द्वारासमीप गेले ३८; रामाचें भाषण श्रवण करून वानर निर्भय झाले; ते वीर वृक्षांच्या योगानें शत्रूच्या सेनेला पीडा देऊं लागले ३९ आणि ह्याप्रमाणें पर्वत व वृक्ष हातामध्यें घेऊन लंकेसमीप चाललेलें तें उग्र वानरसैन्य पर्वतासमीप आलेल्या व विशालप्रदेश व्यापून टाकणाऱ्या भयंकर व प्रचंड मेघसमुदायाप्रमाणें दिसूं लागलें ४०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६१ ॥

निद्रा व मद ह्यांनीं घेरून गेलेला तो महापराक्रमी राक्षसश्रेष्ठ कुंभकर्ण सुशोभित राजमार्गानें जाऊं लागला असतां १ हजारों राक्षस त्याच्या बरोबर होते आणि हार जाण्यास अतिशयच अशक्य असलेल्या त्या कुंभकर्णावर मार्गांवरील घरांतून

ददर्श विपुलं रम्यं राक्षसेन्द्रनिवेशनम् ३ स तत्तदा सूर्य इवाभ्रजालं प्रविश्य रक्षोधिपतेर्निवेशनम् । ददर्श दूरेग्रजमासनस्थं स्वयंभुवं शक्र इवासनस्थम् ४ भ्रातुः स भवनं गत्वा रक्षोगणसमन्वितः । कुम्भकर्णः पद्भ्यामैरकम्पयत मेदिनीम् ५ सोभिगम्य गृहं भ्रातुः कक्ष्यामभिविगाह्य च । ददर्शोद्विग्नमासीनं विमाने पुष्पके गुरुम् ६ अथ दृष्ट्वा दशग्रीवः कुम्भकर्णमुपस्थितम् । तूर्णमुत्थाय संहृष्टः संनिकर्षमुपानयत् ७ अथासीनस्य पर्यङ्के कुम्भकर्णो महाबलः । भ्रातुर्ववन्दे चरणौ किं कृत्यमिति चाब्रवीत् ८ पुनः समुदितोत्पत्य रावणः परिषस्वजे ९ स भ्रात्रा संपरिष्वक्तो यथावच्चाभिनन्दितः । कुम्भकर्णः शुभं दिव्यं प्रतिपेदे वरासनम् १० स तदासनमाश्रित्य कुम्भकर्णो महाबलः । संरक्तनयनः क्रोधाद्रावणं वाक्यमब्रवीत् ११ किमर्थमहमादृत्य त्वया राजन्प्रबोधितः । शंस कस्माद्भयं तत्र को वा प्रेतो भविष्यति १२ भ्रातरं रावणः

---

पुष्पांचा वर्षाव चालला होता २. सुवर्णाचें जाळें ज्यावर पसरलें आहे आणि सूर्याप्रमाणें ज्याची कांति उज्ज्वल आहे असें तें राक्षसाधिपति रावणाचें विपुल व रम्य गृह त्यानें अवलोकन केलें ३. नंतर मेघपटलामध्यें प्रविष्ट होणारा सूर्यच कीं काय असा तो कुंभकर्ण राक्षसाधिपति रावणाच्या गृहांत प्रविष्ट झाला असतां सिंहासनावर बसलेल्या ब्रह्मदेवाला ज्याप्रमाणें इंद्र अवलोकन करितो त्याप्रमाणें त्यानें सिंहासनावर बसलेल्या आपल्या भ्रात्याला पाहिलें ४. सारांश, राक्षसगण बरोबर घेऊन भ्रात्याच्या गृहाकडे जाऊं लागल्यावर कुंभकर्ण पादविक्षेपांच्या योगानें पृथ्वी कांपित करूं लागला आणि ५ भ्रात्याच्या गृहासमीप गेल्यावर चौकांत गेल्यानंतर पुष्पकविमानामध्यें उद्विग्न होऊन बसलेल्या त्यानें आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला अवलोकन केलें ६. नंतर कुंभकर्ण आलेला पाहून रावण सत्वर उठला आणि आनंदानें त्याला त्यानें जवळ आणिलें ७. तदनंतर महाबलाढ्य कुंभकर्णानें सिंहासनावर बसलेल्या भ्रात्याच्या चरणांना वंदन करून " काय कार्य आहे " असें त्याला विचारिलें ८. तेव्हां पुनरपि रावणाला आनंद झाला व त्यानें कुंभकर्णाला आलिंगन दिलें ९; ह्याप्रमाणें भ्रात्यानें कवटाळून धरून एकदम आलिंगन दिल्यावर कुंभकर्ण दिव्य व शुभ अशा श्रेष्ठ आसनावर बसला १०; आणि महाबलाढ्य कुंभकर्ण त्या आसनावर बसल्यानंतर डोळे लाल करून रागारागानें रावणाला ह्मणाला ११ " हे राजा, तूं मला युद्धाच्या कशाकरितां उठविलें आहेस ? तुला येथें कोणापासून भय आहे अथवा कोणाला माझ्या हातून वध पावून परलोकीं जावयाचें आहे ? हें एकदां कळूं दे " १२.

क्रुद्धं कुम्भकर्णमवस्थितम् । रोषेण परिवृत्ताभ्यां नेत्राभ्यां वाक्यमब्रवीत् १३ अयं ते सुमहान्कालः शयानस्य महाबल । सुषुप्तस्त्वं न जानीषे मम रामकृतं भयम् १४ एष दाशरथिः श्रीमान्सुग्रीवसहितो बली । समुद्रं लङ्घयित्वा तु कुलं नः परिकृतन्ति १५ हन्त पश्य स्वलङ्कायां वनान्युपवनानि च । सेतुना सुखमागत्य वानरैकार्णवं कृतम् १६ ये राक्षसा मुख्यतमा हतास्ते वानरैर्युधि । वानराणां क्षयं युद्धे न पश्यामि कथंचन ॥ न चापि वानरा युद्धे जितपूर्वाः कदाचन १७ तदेतद्भयमुत्पन्नं त्रायस्वेह महाबल । नाशय त्वमिमानद्य तदर्थं बोधितो भवान् १८ सर्वक्षपितकोशं च स त्वमभ्युपपद्य माम् । त्रायस्वेमां पुरीं लङ्कां बालवृद्धावशेषिताम् १९ भ्रातुरर्थे महाबाहो कुरु कर्म सुदुष्करम् । मयैवं नोक्तपूर्वो हि भ्राता कश्चित्परन्तप २० त्वय्यस्ति मम च स्नेहः परा संभावना च मे । देवासुरेषु युद्धेषु बहुशो राक्षसर्षभ २१ त्वया देवाः प्रतिव्यूह्य निर्जिताश्चामरा युधि २२ तदेतत्सर्वमातिष्ठ वीर्यं भीमपराक्रम ।

---

ह्यानंतर क्रुद्ध होऊन बसलेल्या भ्रात्या कुंभकर्णाला रावण क्रोधानें आंख चढवून ह्मणाला १३ "हे महाबलाढ्य, तूं निद्रिस्थ झाल्यापासून हा फारच मोठा काळ लोटला आहे. तूं गाढ निद्रेंत असल्यामुळें रामापासून मला भय प्राप्त आलेलें तुला विदित नाहीं १४. हा बलाढ्य व वैभवशाली राम सुग्रीवासहवर्तमान समुद्राचें उल्लंघन करून आपलें कुल छेदून टाकीत आहे १५. अरे, पहा बरें ! सेतूनें खुशाल येथें येऊन आपल्या लंकेंतील वनें व उपवनें हीं सर्व कांहीं त्यानें वानरमय करून टाकिलीं आहेत १६; अत्यंत मुख्य मुख्य जे राक्षस त्यांचा वानरांनीं युद्धामध्यें वध केला आहे आणि कांहीं केलें तरी संग्रामामध्यें वानरांचा क्षय होत असल्याचें मला मुळींच दिसत नाहीं. इतकेंच नव्हे परंतु, युद्धामध्यें वानरांचा आजपर्यंत पराजय देखील झालेला नाहीं १७. तस्मात्, हे महाबलाढ्य, ह्या ठिकाणीं जें हें भय आज उत्पन्न झालें आहे त्या भयापासून तूं आमचें रक्षण कर आणि ह्या अनर्थांचा तूं आज नाश करून टाक. कारण, त्याकरितां तुला उठविलें आहे १८. आज माझीं सर्व ऐश्वर्यें लयाला गेलीं आहेत असें समजून बाल व वृद्ध एवढेच जिच्यामध्यें अवशिष्ट राहिले आहेत त्या ह्या लंकानगरीचें तूं रक्षण कर १९. हे महापराक्रमी कुंभकर्णा, भ्रात्याकरितां तूं अत्यंत दुष्कर कर्म कर. हे शत्रुतापना, आजपर्यंत मीं कोणत्याही भ्रात्याशीं असें भाषण केलें नाहीं २०. तुझे ठिकाणीं माझें प्रेम असून कार्यसिद्धीसंबंधानें तुझ्याविषयीं मला मोठी आशा आहे. कारण, हे राक्षसश्रेष्ठा, देवदैत्यांच्या युद्धामध्यें अनेक वेळां तूं देवांशीं प्रतिपक्षी ह्या नात्यानें

न हि ते सर्वभूतेषु दृश्यते सदृशो बली २३ कुरुष्व मे प्रियहितमेतदुत्तमं यथाप्रियं प्रियरण बान्धवप्रिय । स्वतेजसा व्यथय सपत्नवाहिनीं शरद्घनं पवन इवोद्यतो महान् २४ [२५३३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ॥ ६२ ॥

तस्य राक्षसराजस्य निशम्य परिदेवितम् । कुम्भकर्णो बभाषेदं वचनं प्रजहास च १ दृष्टो दोषो हि योऽस्माभिः पुरा मन्त्रविनिर्णये । हितेष्वनभियुक्तेन सोयमासादितस्त्वया २ शीघ्रं खल्वभ्युपेतं त्वां फलं पापस्य कर्मणः । निरयेष्वेव पतनं यथा दुष्कृतकर्मणः ३ प्रथमं वै महाराज कृत्यमेतदचिन्तितम् । केवलं वीर्यदर्पेण नानुबन्धो विचारितः ४ यः पश्चात्पूर्वकार्याणि कुर्यादैश्वर्यमास्थितः । पूर्वं चोत्तरकार्याणि न स वेद नयानयौ ५ देशकालविहीनानि कर्माणि विपरीतवत् । क्रियमाणानि दुष्यन्ति हवींष्यप्रयतेष्विव ६ त्रयाणां पञ्च वा योगं कर्मणां यः प्रपद्यते ।

---

लढला आहेस व संग्रामामध्यें त्यांचा पराजय केलेला आहेस २१,२२. तस्मात्, हे भयंकर पराक्रमी कुंभकर्णा, त्या ह्या सर्व वीर्याचें तूं आतां अवलंबन कर; सर्व प्राण्यांमध्यें तुझ्यासारिखा बलाढ्य प्राणी कोणी दिसत नाहीं २३. हे संग्रामप्रिय, हे बांधवप्रिय, मनापासून तूं ह्या माझ्या प्रिय, हितावह व उत्कृष्ट भाषणाप्रमाणें वाग आणि प्रकट झालेला प्रचंड वायु ज्याप्रमाणें शरदृतूंतील मेघ उडवून देतो त्याप्रमाणें आपल्या तेजाच्या योगानें शत्रुसेनेला तूं उडवून दे २४." ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं बासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६२ ॥

त्या राक्षसराज रावणाचा तो विलाप ऐकून कुंभकर्ण हसला आणि ह्मणाला १ "पूर्वी सल्लामसलत चालली असतांना हिताचें ह्मणून भाषण करणाऱ्यावर माझी श्रद्धा नसल्यामुळें जो दोष मला दृष्टीं पडला होता तो तुला प्राप्त झाला आहे २. दुष्कर्मी पुरुषाला ज्याप्रमाणें नरकपातच प्राप्त होत असतो त्याप्रमाणें पापकर्माचें फल तुला सत्वरच प्राप्त झालें आहे ३. हे महाराजा, प्रथमतः तूं ह्या कृत्याचा विचार केवल सामर्थ्याच्या गर्वामुळें केला नाहींस आणि त्याचा परिणाम काय होईल इकडेही लक्ष्य दिलें नाहींस ४. जो ऐश्वर्यवान् पुरुष पूर्वी करावयाचीं कार्यें मागून करूं लागतो आणि पुढलीं कार्यें आधीं करूं लागतो, तो न्याय अन्याय जाणीत नाहीं ५. योग्य काल व देश न पहातां अयोग्य वेळीं व अयोग्य ठिकाणीं घडणारीं कर्में अशुद्ध हवींप्रमाणें दुःखाला कारणीभूत होतात ६. ( क्षय, वृद्धि व स्थैर्य हीं ज्यांचीं लक्षणें आहेत अशा ) तीन प्रकारच्या कर्मांचा सामादिकांशीं जो मेळ घालितो आणि

सचिवैः समयं कृत्वा स सम्यग्वर्तते पथि ७ यथागमं च यो राजा समयं च चिकीर्षति । बुध्यते सचिवैर्बुद्ध्या सुहृदश्चानुपश्यति ८ धर्ममर्थं हि कामं वा सर्वान्वा रक्षसांपते । भजते पुरुषः काले त्रीणि द्वन्द्वानि वा पुनः ९ त्रिषु चैतेषु यच्छ्रेष्ठं श्रुत्वा तन्नावबुध्यते । राजा वा राजमात्रो वा व्यर्थं तस्य बहुश्रुतम् १० उपप्रदानं सान्त्वं च भेदं काले च विक्रमम् । योगं च रक्षसां श्रेष्ठ तावुभौ च नयानयौ ११ काले धर्मार्थकामान्यः संमन्त्र्य सचिवैः सह । निषेवतात्मवाँल्लोके न स व्यसनमाप्नुयात् १२ हितानुबन्धमालोक्य कुर्यात्कार्यमिहात्मनः । राजा सहार्थतत्त्वज्ञैः सचिवैर्बुद्धिजीविभिः १३ अनभिज्ञाय शास्त्रार्थान्पुरुषाः पशुबुद्धयः । प्रागल्भ्याद्वक्तुमिच्छन्ति मन्त्रिष्वभ्यन्तरीकृताः १४ अशास्त्रविदुषां तेषां

---

सचिवांसहवर्तमान तीं कर्मे करण्याविषयीं पांचे गोष्टींचा विचार करून जो कर्मे करूं लागतो त्याच्या हातून मार्गाचें उल्लंघन होत नाहीं ७. नीतिशास्त्राला अनुसरून जो राजा सचिवांसहवर्तमान विचार करण्याची इच्छा करितो आणि स्वतःच्या बुद्धीनें आणि सचिवांसहवर्तमान सुहृद् कोण व नाहीं कोण ह्याचा जो विचार करितो त्याला कार्याकार्यविवेकबुद्धि प्राप्त होते ८. हे राक्षसाधिपते, कोणताही जरी काल असला तरी पुरुष धर्माचें, अर्थाचें अथवा कामाचें, किंवा धर्माचें, अर्थाचें आणि कामाचें अथवा धर्म व अर्थ, अर्थ आणि काम किंवा धर्म व काम ह्या तीन जोड्यांपैकीं एकाचें सेवन करीत असतो ९; परंतु, ह्या तिन्हींमध्यें श्रेष्ठ काय हें श्रवण करूनही ज्याला समजत नाहीं, तो राजा असो अथवा युवराज असो त्याचा बहुश्रुतपणा व्यर्थ होय १०. साम, दान, भेद, योग्य वेळीं पराक्रम ( कार्यारंभाचा उपाय, द्रव्यबल, व पुरुषबल, देशकालांचा विभाग, विपत्तीचा प्रतिकार आणि कार्यसिद्धि असें पांच प्रकारचें ) कार्यनिष्पत्ति साधन आणि, हे राक्षसश्रेष्ठा, उभयतां न्याय व अन्याय ११ ह्या सर्वांचा सचिवांसहवर्तमान विचार करून जो जितेंद्रिय राजा धर्म, अर्थ व काम ह्यांचें अवलंबन करितो त्याला संकट प्राप्त होत नाहीं १२. विचाराकरितां पुढें आलेल्या गोष्टींचें तात्पर्य जाणणारे आणि कोणतीही गोष्ट विचारपूर्वक करणारे जे मंत्री ह्यांच्या सहवर्तमान विवक्षित कार्याचा परिणाम हितावह होईल किंवा नाहीं ह्याचा विचार करून जो कार्य करीत असतो तो राजा होय १३. मंत्र्यांशीं जे मोकळ्या मनानें वागत नाहींत आणि नीतिशास्त्राला संमत गोष्टी कोणत्या हें न

---

१ कार्यारंभाचा उपाय, पुरुषबल व द्रव्यबल, देश व काल ह्यांचा विभाग, मध्यें येणाऱ्या संकटांचा प्रतिकार आणि कार्यसिद्धि.

कार्यं नाभिहितं वचः । अर्थशास्त्रानभिज्ञानां विपुलां श्रियमिच्छताम् १५
अहितं च हिताकारं धाष्टर्याज्जल्पन्ति ये नराः । अवश्यं मन्त्रबा-
ह्यास्ते कर्तव्याः कृत्यदूषकाः १६ विनाशयन्तो भर्तारं सहिताः शत्रुभि-
र्बुधैः । विपरीतानि कृत्यानि कारयन्तीह मन्त्रिणः १७ तान्भर्ता मित्र-
संकाशानमित्रान्मन्त्रनिर्णये । व्यवहारेण जानीयात्सचिवानुपसंहितान् १८
चपलस्येह कृत्यानि सहसानुप्रधावतः । छिद्रमन्ये प्रपद्यन्ते क्रौञ्चस्य
खमिव द्विजाः १९ यो हि शत्रुमवज्ञाय आत्मानं नाभिरक्षति । अवाप्नोति
हि सोनर्थान्स्थानाच्च व्यवरोप्यते २० यदुक्तमिह ते पूर्वं प्रियया मेनु-
जेन च । तदेव नो हितं वाक्यं यथेच्छसि तथा कुरु २१ तत्तु श्रुत्वा
दशग्रीवः कुम्भकर्णस्य भाषितम् । भ्रुकुटिं चैव संचक्रे क्रुद्धश्चैनमभा-
षत २२ मान्यो गुरुरिवाचार्यः किं मां त्वमनुशाससि । किमेवं वाक्-
श्रमं कृत्वा यद्युक्तं तद्विधीयताम् २३ विभ्रमाच्चित्तमोहाद्वा बलवीर्याश्रयेण

---

जाणतां केवल वाचाशक्तीच्या जोरावर जे बोलण्याची इच्छा करीत असतात ते पशुबुद्धि पुरुष होत १४. ह्यास्तव, नीतिशास्त्रशून्य आणि अर्थशास्त्रसंबंधींही अनभिज्ञ असून विपुल संपत्तीची इच्छा करणाऱ्या त्या पुरुषांनीं जें सांगितलें असेल तिकडे लक्ष्य देऊं नये १५. धाडसामुळें जे पुरुष हितावह दिसणारें अहित भाषण करीत असतात ते कार्यविघातक पुरुष सल्लामसलतीपासून अवश्य दूर करावेत १६. विचारी शत्रूंशीं मिळून गेलेले कांहीं मंत्री स्वामीचा नाश करण्याच्या उद्देशानें त्याच्याकडून विपरीत कृत्यें करवीत असतात १७. तस्मात्, सल्लामसलत ठरविण्याचा प्रसंग आला असतां मित्रांप्रमाणें दिसणारे परंतु, शत्रूला वश झाल्यामुळें वस्तुतः शत्रु असलेले ते मंत्री राजानें त्यांच्या मताप्रमाणें केलेल्या व्यवहाराचा परिणाम पाहून ओळखून ठेवावे १८. क्रौंच पर्वताच्या गुहेचें ज्याप्रमाणें पक्षी अवलंबन करीत असतात त्याप्रमाणें उतावीळ आणि ह्मणूनच एकाएकीं कार्यांना हात घालणाऱ्या राजाचें छिद्र कोठें आहे तें शत्रु सत्वरच हुडकून काढीत असतात १९. शत्रूची अवज्ञा करून जो आपलें रक्षण करीत नाहीं त्याला अनर्थ प्राप्त होतात आणि शत्रु त्याला पदच्युतही करितात २०. तुझी प्रिया जी मंदोदरी हिनें व माझ्या कनिष्ठ भ्रात्या बिभीषणानें ह्यासबंधानें जें भाषण पूर्वी तुझ्याशीं केलें आहे तेंच भाषण आपणाला हितावह होतें; आतां तुझी इच्छा असेल त्याप्रमाणें तूं वाग" २१. कुंभकर्णाचें तें भाषण श्रवण करून रावणानें भिंवया वर चढविल्या आणि तो क्रुद्ध होऊन त्याला ह्मणाला २२ "पित्याप्रमाणें अथवा आचार्याप्रमाणें

वा । नाभिपन्नमिदानीं यद्व्यर्था तस्य पुनः कथा २४ अस्मिन्काले तु यद्युक्तं तदिदानीं विचिन्त्यताम् । ममापनयजं दुःखं विक्रमेण समीकुरु २५ यदि खल्वस्ति मे स्नेहो विक्रमं वाधिगच्छसि । यदि कार्यं ममैतत्ते हृदि कार्यतमं मतम् २६ स सुहृद्यो विपन्नार्थं दीनमभ्युपपद्यते । स बन्धुर्योपनीतेषु साहाय्यायोपकल्पते २७ तमथैवं ब्रुवाणं स वचनं धीरदारुणम् । रुष्टोयमिति विज्ञाय शनैः श्लक्ष्णमुवाच ह २८ अतीव हि समालक्ष्य भ्रातरं क्षुभितेन्द्रियम् । कुम्भकर्णः शनैर्वाक्यं बभाषे परिसान्त्वयन् २९ शृणु राजन्नवहितो मम वाक्यमरिन्दम । अलं राक्षसराजेन्द्र संतापमुपपद्यते ॥ रोषं च संपरित्यज्य स्वस्थो भवितुमर्हसि ३० नैतन्मनसि कर्तव्यं मयि जीवति पार्थिव । तमहं नाशयिष्यामि यत्कृते परितप्यते ३१ अवश्यं च हितं वाच्यं सर्वावस्थां गतं मया । बन्धुभा-

---

तुझ्या मानास मी पात्र असताना तू मला हा उपदेश कशाचा करीत आहेस ? ह्याप्रमाणें वाणीला शीण देऊन फल काय प्राप्त होणार आहे ? ह्यावेळीं जें योग्य असेल तेंच आतां केलें पाहिजे २३. विपरीत समजूत झाल्यामुळें, अज्ञानामुळें अथवा बल व वीर्य ह्यांचा गर्व झाल्यामुळें तुमचें ह्मणणें मीं ऐकिलें नाहीं हें जरी खरें असलें तरी त्याची ( ह्याप्रसंगीं ) चर्चा करणें व्यर्थ आहे २४. ह्यावेळीं काय करणें योग्य आहे त्याचा विचार कर आणि माझ्या अपराधामुळें जें दुःख प्राप्त झालें आहे तें तूं आपल्या पराक्रमानें नाहींसें कर २५. स्वतःच्या पराक्रमाची जर तुला खात्री असेल, माझे ठिकाणीं जर तुझें प्रेम असेल आणि माझ्या मनामध्यें जी गोष्ट कर्तव्य आहे तीच जर तुला अत्यंत इष्ट वाटत असेल तर तूं युद्ध कर २६. कार्यविघात झालेल्या दीनावर जो अनुग्रह करितो तो सुहृद् होय आणि नीतिमार्गापासून च्युत झालेल्यांचें साहाय्य करण्यास जो तयार होतो तो बंधु होय " २७. ह्याप्रमाणें तो रावण धैर्ययुक्त व भयंकर भाषण करूं लागला असतांना ह्याची खिन्नता नाहींशी झाली आहे असें समजून कुंभकर्ण हळूं हळूं मधुर वाणीनें त्याच्याशीं बोलूं लागला २८. सारांश, आपल्या भ्रात्याचें मन अतिशय क्षुब्ध होऊन गेलें आहे असें अवलोकन करून सांत्वन करण्याच्या उद्देशानें कुंभकर्ण हळूं हळूं त्याला ह्मणाला २९ " हे राजा, हे शत्रुदमना, लक्ष्यपूर्वक तूं माझें भाषण ऐकून घे. हे राक्षसराजाधिराज, आपला संताप [illegible] झाला; आतां क्रोध सोडून देऊन तूं स्वस्थ रहा ३०. हे राजा, मी जिवंत [illegible] हें दैन्य तूं मनामध्यें सुद्धां आणूं नको; ज्याच्याकरितां तुला संताप [illegible] त्याचा मी नाश करीन ३१. तुला कोणतीही अवस्था प्राप्त झाली तरी [illegible]

वादभिहितं भ्रातृस्नेहाच्च पार्थिव ३२ सदृशं यच्च कालेस्मिन्कर्तुं स्नेहेन बन्धुना । शत्रूणां कदनं पश्य क्रियमाणं मया रणे ३३ अद्य पश्य महाबाहो मया समरमूर्धनि । हतं रामं सह भ्रात्रा द्रवन्तीं हरिवाहिनीम् ३४ अद्य रामस्य तद्दृष्ट्वा मया नीतं रणाच्छिरः । सुखी भव महाबाहो सीता भवतु दुःखिता ३५ अद्य रामस्य पश्यन्तु निधनं सुमहत्प्रियम् । लङ्कायां राक्षसाः सर्वे ये ते निहतबान्धवाः ३६ अद्य शोकपरीतानां स्वबन्धुवधशोचिनाम् । शत्रोर्युधि विनाशेन करोम्यश्रुप्रमार्जनम् ३७ अद्य पर्वतसंकाशं ससूर्यमिव तोयदम् । विकीर्णं पश्य समरे सुग्रीवं प्लवगेश्वरम् ३८ कथं च राक्षसैरेभिर्मया च परिसान्त्वितः । जिघांसुभिर्दाशरथिं व्यथसे त्वं सदानघ ३९ मां निहत्य किल त्वां हि निहनिष्यति राघवः । नाहमात्मनि संतापं गच्छेयं राक्षसाधिप ४० कामं त्विदानीमपि मां व्यादिश त्वं परन्तप । न परः प्रेक्षणीयस्ते युद्धायातुलविक्रम ४१ अहमुत्सादयिष्यामि शत्रूंस्तव महाबलान् । यदि शक्रो यदि यमो यदि पावकमारुतौ ४२

---

असेल तेंच भाषण तुझ्याशीं करणें मला योग्य आहे आणि म्हणूनच, हे राजा, भ्रातृप्रेमामुळे व बंधभावामुळें मीं हें भाषण तुझ्याशीं केलें आहे ३२. आतां प्रेम करणाऱ्या बंधूनें ह्या प्रसंगीं जें करणें योग्य आहे तें संग्रामामध्यें माझ्या हातून होणारें शत्रूंचें कदन तूं अवलोकन कर ३३. हे महापराक्रमी राजा, संग्रामामध्यें भ्रात्यासहवर्तमान राम माझ्या हातून वध पावला असतां पळत सुटलेली वानरसेना तूं आज अवलोकन कर ३४. हे महापराक्रमी राजा, रामाचें तें मस्तक मीं रणांतून दूर नेलेलें पाहून तूं आज सुखी हो व सीता दुःखित होऊं दे ३५. ज्यांच्या बांधवांचा वध झालेला आहे असे ते लंकेमध्यें असलेले सर्वही राक्षस अत्यंत प्रिय असें रामाचें मरण आज अवलोकन करोत ३६. आपआपल्या बांधवांच्या वधाबद्दल शोक करीत असलेल्या दुःखग्रस्त राक्षसांचे अश्रु युद्धामध्यें शत्रूचा नाश केल्यानें मी पुसून टाकीन ३७. सूर्यासहवर्तमान मेघच कीं काय असा तो पर्वतप्राय वानराधिपति सुग्रीव छिन्नभिन्न होऊन संग्रामामध्यें पडलेला आज तूं अवलोकन कर ३८. हे निष्पापा, दशरथपुत्र रामाचा वध करूं पहाणाऱ्या ह्या राक्षसांनीं व मीं तुझें सांत्वन केलें असतांही तूं एकसारिखें दुःख कशाकरितां करीत आहेस ? ३९. माझा वध केल्यानंतर राम तुझा वध करील; परंतु, हे राक्षसाधिपते, रामाबद्दल मनामध्यें मला मुळींच काळजी वाटत नाहीं ४०. हे शत्रुतापना, तूं आतांही खुशाल मला आज्ञा कर. हे अतुल पराक्रमी राजा, युद्धाकरितां तुला दुसऱ्याकडे पहाण्याचें कारण

तानहं योधयिष्यामि कुबेरवरुणावपि । गिरिमात्रशरीरस्य शितशूलधरस्य मे ४३ नर्दतस्तीक्ष्णदंष्ट्रस्य बिभीयाद्वै पुरन्दरः । अथ वा त्यक्तशस्त्रस्य मृद्नतस्तरसा रिपून् ४४ न मे प्रतिमुखः कश्चित्स्थातुं शक्तो जिजीविषुः । नैव शक्त्या न गदया नासिना निशितैः शरैः ४५ हस्ताभ्यामेव संरभ्य हनिष्यामि सवज्रिणम् । यदि मे मुष्टिवेगं स राघवोद्य सहिष्यति ४६ ततः पास्यन्ति बाणौघा रुधिरं राघवस्य मे । चिन्तया तप्यसे राजन्किमर्थं मयि तिष्ठति ४७ सोहं शत्रुविनाशाय तव निर्यातुमुद्यतः । मुञ्च रामाद्भयं घोरं निहनिष्यामि संयुगे ४८ राघवं लक्ष्मणं चैव सुग्रीवं च महाबलम् । हनूमन्तं च रक्षोघ्नं येन लङ्का प्रदीपिता ४९ हरींश्च भक्षयिष्यामि संयुगे समुपस्थिते । असाधारणमिच्छामि तव दातुं महद्यशः ५० यदि चेन्द्राद्भयं राजन्यदि चापि स्वयंभुवः । अपि देवाः शयिष्यन्ते मयि क्रुद्धे महीतले ५१ यमं च शमयिष्यामि भक्षयिष्यामि पावकम् । आदित्यं पातयिष्यामि

---

नाहीं ४१. तुझ्या महाबलाढ्य शत्रूंचाही उच्छेद करीन इंद्र व यम, अग्नि आणि वायु ४२ व कुबेर आणि वरुण हे जरी तुझे शत्रु असले तरी मी त्यांच्याशीं युद्ध करीन. पर्वतप्राय शरीर, तीक्ष्ण शूल आणि तीक्ष्ण दंष्ट्रा धारण करणाऱ्या माझी गर्जना सुरू झाली असतां इंद्रही भिऊन जाईल. अथवा शस्त्रत्याग करून केवल स्वसामर्थ्यानेंच मी शत्रूंचा वध करूं लागलों असतां ४३,४४ जीवाची आशा धरणारा कोणीही पुरुष माझ्यासमोर उभा राहण्यास समर्थ नाहीं शक्ति, गदा, खड्ग आणि तीक्ष्ण बाण ह्यांपैकीं कांहींएक न घेतां ४५ हातांच्याच योगानें रामाला जर्जर करून इंद्रासहवर्तमानही त्यांचा वध करीन. आज माझ्या मुष्टीचा वेग जर रामानें सहन केला तर ४६ माझे बाणसमुदाय त्याचें रक्त प्राशन करितील. हे राजा, मी असतांना तूं कशाकरितां काळजीनें संताप करून घेत आहेस ? ४७. तुझ्या शत्रूंचा नाश करण्याकरितां संग्रामामध्यें जाण्यास मी उद्युक्त झालों आहें. ह्यास्तव, रामापासून प्राप्त झालेलें घोर भय तूं सोडून दे; युद्धामध्यें मी त्याचा वध करीन ४८. राम, लक्ष्मण, महाबलाढ्य सुग्रीव, लंका पेटवून दिलेला राक्षसघातक हनुमान् ४९ आणि इतरही वानर युद्ध सुरू झाल्यावर भक्षण करून मोठें अलौकिक यश तुला संपादन करून देण्याची मला इच्छा आहे ५०. हे राजा, इंद्रापासून अथवा ब्रह्मदेवापासूनही तुला जरी भय असलें तरी कांहीं चिंता नाहीं; मी क्रुद्ध झालों असतां देवही भूतलावर मरून पडतील ५१. यमाचा वध करून अग्नीला भक्षण करून

सनक्षत्रं महीतले ५२ शतक्रतुं वधिष्यामि पास्यामि वरुणालयम् । पर्वतांश्चूर्णयिष्यामि दारयिष्यामि मेदिनीम् ५३ दीर्घकालं प्रसुप्तस्य कुम्भकर्णस्य विक्रमम् । अद्य पश्यन्तु भूतानि भक्ष्यमाणानि सर्वशः ५४ न त्विदं त्रिदिवं सर्वमाहारो मम पूर्यते ५५ वधेन ते दाशरथेः सुखावहं सुखं समाहर्तुमहं व्रजामि । निहत्य रामं सहलक्ष्मणेन खादामि सर्वान्हरियूथमुख्यान् ५६ रमस्व राजन्पिब चाद्य वारुणीं कुरुष्व कृत्यानि विनीय दुःखम् । मयाद्य रामे गमिते यमक्षयं चिराय सीता वशगा भविष्यति ५७ [ २५१० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥ ६३ ॥

तदुक्तमतिकायस्य बलिनो बाहुशालिनः । कुम्भकर्णस्य वचनं श्रुत्वोवाच महोदरः १ कुम्भकर्णकुले जातो धृष्टः प्राकृतदर्शनः । अवलिप्तो न शक्नोषि कृत्यं सर्वत्र वेदितुम् २ न हि राजा न जानीते कुम्भकर्ण नयानयौ । त्वं तु कैशोरकाद्धृष्टः केवलं वक्तुमिच्छसि ३ स्थानं वृद्धिं

---

टाकीन आणि नक्षत्रांसहवर्तमान सूर्यही भूतलावर पाडीन ५२; मी इंद्राचा वध करीन; समुद्र गट्ट करीन; पर्वतांचें पीठ करीन आणि पृथ्वीही विदीर्ण करून टाकीन ५३. दीर्घकालपर्यंत निद्रिस्थ असलेल्या कुंभकर्णाचा पराक्रम सर्व बाजूंनीं त्याचे भक्ष्यस्थानीं पडत असलेले प्राणी आज अवलोकन करतील ५४. फार कशाला हें सर्व त्रैलोक्यही माझ्या आहाराला पुरेसें होणार नाहीं ५५. दशरथपुत्र रामाच्या वधानें उत्तरोत्तर अधिक सुख देणारें सौख्य तुला प्राप्त करून देण्याकरितां मी येथून जातों आणि लक्ष्मणासहवर्तमान रामाचा वध करून सैन्यांतील सर्व मुख्य मुख्य वानर मी भक्षण करून टाकितों ५६. हे राजा, मद्यपान करून तूं आज क्रीडा कर आणि दुःखाचा त्याग करून ज्या कांहीं गोष्टी तुला कर्तव्य असतील त्या कर. रामाला मीं आज यमसदनीं पोंचविलें ह्मणजे सीता चिरकाल तुझ्या स्वाधीन राहील"५७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६३ ॥

ज्याचें शरीर प्रमाणापेक्षां फारच मोठें आहे अशा त्या पराक्रमी व बलाढ्य कुंभकर्णाचें भाषण श्रवण केल्यावर महोदर त्याला ह्मणाला १ " हे कुंभकर्णा, तूं जरी महाकुलामध्यें उत्पन्न झाला आहेस तरी तूं उद्धट व गर्वयुक्त झाल्यामुळें तुझी विचारशक्तिही साधारणच आहे आणि ह्मणूनच कोठें काय करावयाचें हें सर्व जाणण्यास तूं समर्थ नाहींस २. हे कुंभकर्णा, न्याय व अन्याय रामाला ठाऊक नाहींत असें

च हानिं च देशकालविधानवित् । आत्मनश्च परेषां च बुध्यते राक्षसर्षभः ४ यत्त्वशक्यं बलवता कर्तुं प्राकृतबुद्धिना । अनुपासितवृद्धेन कः कुर्यात्तादृशं नरः ५ यांस्तु धर्मार्थकामांस्त्वं ब्रवीषि पृथगाश्रयान् । अवबोद्धुं स्वभावेन न हि लक्षणमस्ति तान् ६ कर्म चैव हि सर्वेषां कारणानां प्रयोजनम् । श्रेयः पापीयसां चात्र फलं भवति कर्मणाम् ७ निःश्रेयसफलावेव धर्मार्थावितरावपि । अधर्मानर्थयोः प्राप्तं फलं च प्रात्यवायिकम् ८ ऐहलौकिकपारक्यं कर्म पुंभिर्निषेव्यते । कर्माण्यपि तु कल्प्यानि लभते काममास्थितः ९ तत्र क्लृप्तमिदं राज्ञा हृदि कार्यं मतं च नः । शत्रौ हि साहसं यत्तत्किमिवात्रापनीयते १० एकस्यैवाभियाने तु हेतुर्यः प्रहितस्त्वया । तत्राप्यनुपपन्नं ते वक्ष्यामि यदसाधु च ११ येन

---

नाहीं. परंतु, पोरपणामुळें धृष्ट असलेला तूं मात्र केवळ भाषण करण्याची इच्छा करीत आहेस ३. कोणत्या ठिकाणीं व कोणत्या वेळीं काय करावयाचें हें जाणणाऱ्या राक्षसश्रेष्ठ रावणाला आपलें आणि शत्रूचें स्थैर्य, वृद्धि व हानि कशानें होणार आहे हें समजत आहे ४. वृद्धसमागम न केलेल्या आणि ह्मणूनच असंस्कृत बुद्धीनें युक्त असलेल्या केवळ बलाढ्य पुरुषाला जें करितां येणें शक्य नाहीं तशाप्रकारचें कर्म कोणता बरें पुरुष करील ? ५ धर्म, अर्थ, काम ह्यांचें एकाला अनुष्ठान करितां येत नाहीं असें तूं ह्मणत आहेस; परंतु, खरोखर धर्मादिविषयक ज्ञान होण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं नाहीं ६. धर्मार्थकामरूप सर्वही सुखसाधनांचें उत्पादक कर्मच आहे आणि पुण्यकर्माचें व पापकर्माचें अनुक्रमें उत्कृष्ट व निकृष्ट फल पुरुषाला प्राप्त होत असल्याचें सिद्ध आहे ७. जप, ध्यान वगैरे धर्म आणि यज्ञ, दान वगैरे द्रव्यसाध्य कर्मे हीं उभयतां मोक्षफल देणारीं असून स्वर्ग व अभ्युदय हीं फलेंही त्यांच्यामुळें प्राप्त होत असतात आणि जप, ध्यान इत्यादि धर्म व याग, दान इत्यादि कर्मे न केल्यानें प्रत्यवायजन्य फल पुरुषाला प्राप्त होतें ८. धर्म व अर्थ ह्यांचें अवलंबन केलें असतां इहलोकीं व परलोकींही चांगलें फल प्राप्त होतें आणि धर्मानुरूप कामाचें अवलंबन करून कर्मानुष्ठान केलें असतांही शुभ फलें प्राप्त होतात ९. तस्मात्, धर्म, अर्थ व काम ह्या तीन पुरुषार्थांपैकीं कामरूप पुरुषार्थसाधन करणें योग्य आहे; तसें आह्मीं मनामध्यें आणिलेंही आहे आणि मंत्र्याला व आह्मांला तें संमतही आहे. असो. आतां साहस करणें योग्य नाहीं असें जें तूं सुचविलेंस तें बरोबर नाहीं. कारण, शत्रूला अनुलक्षून साहसकर्म केलें असतां त्यांत नीतिदृष्ट्या अन्याय तो कोणता ? १०. आतां शत्रूवर एकटाच जाण्याविषयीं जो बलरूप हेतु तूं सांगितलास त्या तुझ्या

पूर्वं जनस्थाने बहवोऽतिबलास्तदा । राक्षसा राघवं ध्वस्ताः कथमेको जयिष्यसि १२ ये पूर्वं निर्जितास्तेन जनस्थाने महौजसः । राक्षसांस्तान्पुरे सर्वान्भीतानद्य न पश्यसि १३ तं सिंहमिव संक्रुद्धं रामं दशरथात्मजम् । सर्पं सुप्तमहो बुद्ध्वा प्रबोधयितुमिच्छसि १४ ज्वलन्तं तेजसा नित्यं क्रोधेन च दुरासदम् । कस्तं मृत्युमिवासह्यमासादयितुमर्हति १५ संशयस्थमिदं सर्वं शत्रोः प्रतिसमासने । एकस्य गमनं तात न हि मे रोचते भृशम् १६ हीनार्थस्तु समृद्धार्थं को रिपुं प्राकृतं यथा । निश्चितं जीवितत्यागे वशमानेतुमिच्छति १७ यस्य नास्ति मनुष्येषु सदृशो राक्षसोत्तम । कथमाशंससे योद्धुं तुल्येनेन्द्रविवस्वतोः १८ एवमुक्त्वा तु संरब्धं कुम्भकर्णं महोदरः । उवाच रक्षसां मध्ये रावणं लोकरावणम् १९ लब्ध्वा पुरस्ताद्वैदेहीं किमर्थं त्वं विलम्बसे । यदीच्छसि तदा सीता वशगा ते भविष्यति २० दृष्टः कश्चिदुपायो मे सीतोपस्थानकारकः।

---

सांगण्यांतही जें असंभवनीय व अयोग्य आहे तें मी तुला सांगतों ११. ज्यानें पूर्वी जनस्थानामध्यें असंख्य अतिबलाढ्य राक्षसांचा नाश केला त्या रामाला तूं एकटा कसा बरें जिंकशील ? १२. जनस्थानामध्यें जे महाबलाढ्य राक्षस पूर्वी त्यानें जिंकिले आहेत ते सर्वही भयभीत झालेले ह्या लंकानगरीमध्यें आज तूं अवलोकन करीत नाहींस काय ? १३ क्रुद्ध झालेला सिंह अथवा निद्रिस्थ असलेला सर्प असा जो दशरथपुत्र राम त्याला समजून उमजून तूं क्षुब्ध करण्याचें मनांत आणीत आहेस ह्याला काय ह्मणावें ? १४. तेजानें नेहमीं जळत असलेला आणि क्रोधामुळें समीप गमन करण्यासही अशक्य असलेला आणि मृत्यूप्रमाणें असह्य असलेला जो राम त्याच्याशीं प्रसंग करण्यास कोण बरें योग्य आहे ? १५. प्रतिपक्षी ह्या नात्यानें शत्रूशीं युद्ध करण्यास हें सर्व सैन्यही समर्थ होईल किंवा नाहीं ह्याचा संशयच आहे आणि ह्मणूनच, बा कुंभकर्णा, तूं एकट्यानें तिकडे जाणें मला मुळींच उचित दिसत नाहीं १६. जिवावर उदार व साहाय्यसंपन्न असलेल्या शत्रूला यःकश्चित् शत्रु समजून कोण बरें साहाय्यरहित पुरुष त्याला पादाक्रांत करण्याची इच्छा करील ? १७. हे राक्षसश्रेष्ठा, मनुष्यांमध्यें ज्याच्या तोडीचा कोणीही नाहीं आणि इंद्र व सूर्य ह्यांची जो बरोबरी करणारा आहे त्याच्याशीं युद्ध करण्याचें तूं कां बरें मनांत आणीत आहेस ? " १८. क्षुब्ध झालेल्या कुंभकर्णाला ह्याप्रमाणें सांगून लोकांना आक्रोश करण्यास लावणाऱ्या रावणाला तो महोदर राक्षसांमध्यें ह्मणाला १९ " पूर्वींच सीता प्राप्त झाली असूनही तूं आतां कां बरें ( तिचा

रुचितश्चेत्स्वया बुद्ध्या राक्षसेन्द्र ततः शृणु २१ अहं द्विजिह्वः संह्रादी कुम्भकर्णो वितर्दनः । पञ्च रामवधायैते निर्यान्तीत्यवघोषय २२ ततो गत्वा वयं युद्धं दास्यामस्तस्य यत्नतः । जेष्यामो यदि ते शत्रून्नोपायैः कार्यमस्ति नः २३ अथ जीवति नः शत्रुर्वयं च कृतसंयुगाः । ततः समभिपत्स्यामो मनसा यत्समीक्षितम् २४ वयं युद्धादिहैष्यामो रुधिरेण समुक्षिताः । विदार्य स्वतनुं बाणै रामनामाङ्कितैः शरैः २५ भक्षितो राघवोऽस्माभिर्लक्ष्मणश्चेति वादिनः । ततः पादौ ग्रहीष्यामस्त्वं नः कामं प्रपूरय २६ ततोऽवघोषय पुरे गजस्कन्धेन पार्थिव । हतो रामः सह भ्रात्रा ससैन्य इति सर्वतः २७ प्रीतो नाम ततो भूत्वा भृत्यानां त्वमरिन्दम । भोगांश्च परिवारांश्च कामान्वसु च दापय २८ ततो माल्यानि वासांसि वीराणामनुलेपनम् । देयं च बहु योधेभ्यः स्वयं च मुदितः पिब २९ ततोऽस्मिन्बहुलीभूते कौलीने सर्वतो गते । भक्षितः ससुहृद्रामो राक्षसैरिति विश्रुते ३०

---

उपभोग घेण्यास ) विलंब करीत आहेस ? तुझी इच्छा असल तर सीता तुझ्या स्वाधीन होईल २०. सीतला अनुकूल करून घेण्याचा एक उपाय मला सुचला आहे तो ऐकून घे आणि स्वतःच्या बुद्धीनें विचार करून उचित दिसेल तर, हे राक्षसाधिपते, तूं त्याचें अवलंबन कर २१. मी ( महोदर ), द्विजिह्व, संऱ्हादी, कुंभकर्ण आणि वितर्दन हे पांच रामाच्या वधाकरितां बाहेर पडत आहेत असें तूं प्रसिद्ध कर २२. नंतर आह्मी येथून जाऊं आणि त्या रामाशीं यत्नानें युद्ध करूं. ( सुदैवानें ) तुझ्या शत्रूंना जर आह्मीं जिंकिलें तर सीतेला वश करून घेण्याविषयीं इतर उपाय योजण्याचें आह्मांला कारणच उरणार नाहीं २३; परंतु, आमचा शत्रु जर जिवंत राहिला व आह्मीही जर युद्धांतून जिवंत पार पडलों तर जें आमच्या मनांत आहे तें आह्मांला प्राप्त होईल २४. रामनामानें चिन्हित असलेल्या बाणांनीं स्वतःचा देह विदीर्ण करून घेतल्यामुळें रक्तानें माखलेले असे आह्मी संग्रामांतून येथें येऊं २५. राम व लक्ष्मण ह्यांना आह्मीं जिंकिलें असें खोटेंच बोलत बोलत आल्यानंतर तुझे आह्मी पाय धरूं आणि तूंही आह्मी शत्रूंना जिंकून आलों आहों असें समजून आमच्या इच्छेप्रमाणें आमचा संमान कर २६. तदनंतर, हे राजा, भ्राता व सैन्य ह्यांसहवर्तमान रामाचा सर्वस्वीं वध झाला असें तूं गजावर आरूढ होऊन सर्व नगरामध्यें प्रसिद्ध कर २७. तदनंतर, हे शत्रुदमना, तूं प्रसन्न हो आणि सेवकांना भोग्य वस्तु, दासी, दास वगैरे परिवार व द्रव्य देऊन त्यांचे मनोरथ परिपूर्ण कर २८. तदनंतर वीरांना पुष्पमाला, वस्त्रं व उटी देऊन योध्यांना तूं विपुल देणगी दे आणि आनंदित होऊन स्वतः मद्यपान कर २९.

प्रविश्याश्वास्य चापि त्वं सीतां रहसि सान्त्वयन् । धनधान्यैश्च कामैश्च रत्नैश्चैनां प्रलोभय ३१ अनयोपधया राजन्भूयः शोकानुबन्धया । अकामा त्वद्वशं सीता नष्टनाथा गमिष्यति ३२ रमणीयं हि भर्तारं विनष्टमधिगम्य सा । नैराश्यात्स्त्रीलघुत्वाच्च त्वद्वशं प्रतिपत्स्यते ३३ सा पुरा सुखसंवृद्धा सुखार्हा दुःखकर्शिता । त्वय्यधीनं सुखं ज्ञात्वा सर्वथैव गमिष्यति ३४ एतत्सुनीतं मम दर्शनेन रामं हि दृष्ट्वैव भवेदनर्थः । इहैव ते सेत्स्यति मोत्सुको भूर्महानयुद्धेन सुखस्य लाभः ३५ अनष्टसैन्यो ह्यनवाप्तसंशयो रिपुं त्वयुद्धेन जयं जयाधिप । यशश्च पुण्यं च महान्महीपतिः श्रियं च कीर्तिं च चिरं समश्नुते ३६ [ २६२६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः ॥ ६४ ॥

स तथोक्तस्तु निर्भर्त्स्य कुम्भकर्णो महोदरम् । अब्रवीद्राक्षसश्रेष्ठं भ्रातरं

---

तदनंतर ही वार्ता पसरत पसरत चोहोंकडे गेली असतां ह्मणजे राक्षसांनीं सुहृदांसहवर्तमान रामाला भक्षण करून टाकिलें असें जिकडे तिकडे प्रसिद्ध झालें असतां ३० तूं एकांतामध्यें प्रवेश करून सांत्वन करीत करीत सीतेला आश्वासन दे आणि धन, धान्य, भोग्य वस्तु व रत्नें ह्यांच्या योगानें तिला क्षुब्ध करून टाक ३१. हे राजा, सध्यांपेक्षांही परिणामीं अधिक दुःख देणाऱ्या अशा कपटानेंच, सांप्रत तुझ्याविषयीं निष्काम असलेली ही सीता, आपला नाथ नाहींसा झाला असें समजून तुला वश होईल ३२. सारांश, आपला मनोहर भर्ता नाहींसा झाला असें समजल्यावर निराशेमुळें आणि स्त्रीजातीच ठिकाणीं असलेल्या चांचल्यामुळें ती तुला वश होईल ३३. सुखालाच पात्र असलेली आणि पूर्वी सुखामध्येंच वाढलेली ती सीता सांप्रत दुःखानें जर्जर झाली आहे. ह्मास्तव, सुख तुझ्या अधीन आहे असें समजून सर्व प्रकारें ती तुला वश होईल ३४. माझ्या बुद्धीनें हाच उपाय मीं निश्चित केलेला आहे; युद्ध हा सुखप्राप्तीचा उपाय नव्हे. कारण, राम दृष्टीं पडतांक्षणींच राक्षसांचा वध होईल. तस्मात्, रामदर्शनाविषयीं उत्सुक होऊं नको. युद्ध केल्याशिवाय यथल्यायेथेंच सुखाचा मोठा लाभ तुला होईल ३५. हे प्रजाधिपते, सैन्याचा नाश न होतां व संकटांत न पडतां युद्ध केल्याशिवाय जो शत्रूला जिंकितो त्या महात्म्या भूपतीला यश, पुण्य, ऐश्वर्य व कीर्ति ह्यांचा चिरकाल लाभ होतो ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चौसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६४ ॥

ह्याप्रमाणें कुंभकर्णाला उद्देशून महोदरानें भाषण केलें असतां त्याची निर्भर्त्सना

रावणं ततः १ मोहं तव भयं घोरं वधात्तस्य दुरात्मनः । रामस्याद्य प्रमार्जामि निर्वैरो हि सुखी भव २ गर्जन्ति न वृथा शूरा निर्जला इव तोयदाः । पश्य संपद्यमानं तु गर्जितं युधि कर्मणा ३ न मर्षयन्ति चात्मानं संभावयितुमात्मना । अदर्शयित्वा शूरास्तु कर्म कुर्वन्ति दुष्करम् ४ विक्लवानां ह्यबुद्धीनां राज्ञां पण्डितमानिनाम् । रोचते त्वद्वचो नित्यं कथ्यमानं महोदर ५ युद्धे कापुरुषैर्नित्यं भवद्भिः प्रियवादिभिः । राजानमनुगच्छद्भिः सर्वं कृत्यं विनाशितम् ६ राजशेषा कृता लङ्का क्षीणः कोशो बलं हतम् । राजानमिममासाद्य सुहृच्चिह्नममित्रकम् ७ एष निर्याम्यहं युद्धमुद्यतः शत्रुनिर्जये । दुर्नयं भवतामद्य समीकर्तुं महाहवे ८ एवमुक्तवतो वाक्यं कुम्भकर्णस्य धीमतः । प्रत्युवाच ततो वाक्यं प्रहसन्राक्षसाधिपः ९ महोदरोयं रामात्तु परित्रस्तो न संशयः । न हि रोचयते तात युद्धं युद्धविशारद १० कश्चिन्मे त्वत्समो नास्ति सौहृदेन बलेन च । गच्छ शत्रुवधाय त्वं कुम्भकर्ण जयाय च ११ शयानः

---

करून राक्षसश्रेष्ठ भ्रात्या रावणाला कुंभकर्ण ह्मणाला १ " त्या दुरात्म्या रामाचा वध करून मी तुझें घोर भय आज नाहींसें करितों; तूं शत्रुरहित होऊन सुखी हो २. निर्जल मेघांप्रमाणें शूर पुरुष व्यर्थ गर्जना करीत नसतात. ही माझी गर्जना युद्धामध्यें कृतीनें घडून आल्याचें तूं अवलोकन कर ३. शूर पुरुषांना स्वतःच आत्मप्रशंसा करण्याची इच्छा नसते. बोलून दाखविल्यावांचूनच शूर पुरुष दुष्कर कर्म करीत असतात ४. हे महोदरा, तुझें हें भाषण मूढ, अज्ञानी आणि पंडितंमन्य राजांना सर्वदां रुचणारें आहे ५. तोंडापुरतें प्रिय भाषण करून युद्धामध्यें राजाच्या मागोमाग जाणाऱ्या तुह्मी भित्र्या लोकांनीं सर्व कार्याचा विघात केला आहे ६. लंकानगरी तुह्मीं राजशेष करून सोडिली आहे; खजिना संपला आहे व सैन्याचाही वध झाला आहे. सारांश, ह्या राजाला गांठून तुह्मीं मित्रत्वानें केवळ आच्छादिलेलें असें शत्रूचें कृत्य केलें आहे ७. हा मी युद्धाकरितां उद्युक्त झालों असून शत्रूंना जिंकण्याकरितां बाहेर पडत आहें. सारांश, अयोग्य सल्ला देऊन आजपर्यंत तुह्मीं जी नासाडी करून टाकिली आहे ती भरून काढण्याकरितां मी आज महासंग्रामामध्यें जात आहें "८. ह्याप्रमाणें बुद्धिमान् कुंभकर्णानें भाषण केलें असतां राक्षसाधिपति रावण हंसत हंसत त्याला ह्मणाला ९ " हा महोदर रामाला भ्याला आहे ह्यांत संशय नाहीं. कारण, बा युद्धनिपुण कुंभकर्णा, ह्याला युद्ध रुचत नाहीं १०. हे कुंभकर्णा, प्रेमानें व बलानें तुझी बरोबरी करणारा माझ्यापाशीं दुसरा कोणीही नाहीं. ह्यास्तव,

शत्रुनाशार्थं भवान्संबोधितो मया। अयं हि कालः सुमहान्राक्षसानामरिन्दम १२ संगच्छ शूलमादाय पाशहस्त इवान्तकः । वानरान्राजपुत्रौ च भक्षयादित्यतेजसौ १३ समालोक्य तु ते रूपं विद्रविष्यन्ति वानराः । रामलक्ष्मणयोश्चापि हृदये प्रस्फुटिष्यतः १४ एवमुक्त्वा महातेजाः कुम्भकर्णं महाबलम् । पुनर्जातमिवात्मानं मेने राक्षसपुङ्गवः १५ कुम्भकर्णबलाभिज्ञो जानंस्तस्य पराक्रमम् । बभूव मुदितो राजा शशाङ्क इव निर्मलः १६ इत्येवमुक्तः संहृष्टो निर्जगाम महाबलः । राज्ञस्तु वचनं श्रुत्वा योद्धुमुद्युक्तवांस्तदा १७ आददे निशितं शूलं वेगाच्छत्रुनिबर्हणः । सर्वं कालायसं दीप्तं तप्तकाञ्चनभूषणम् १८ इन्द्राशनिसमप्रख्यं वज्रप्रतिमगौरवम् । देवदानवगन्धर्वयक्षपन्नगसूदनम् १९ रक्तमाल्यमहादामं स्वतश्चोद्गतपावकम् । आदाय विपुलं शूलं शत्रुशोणितरञ्जितम् २० कुम्भकर्णो महातेजा रावणं वाक्यमब्रवीत् । गमिष्याम्यहमेकाकी तिष्ठत्विह

---

शत्रूचा वध करून जय मिळविण्याकरितां तूं येथून जा ११. तूं निद्रिस्थ असतांना शत्रुनाशार्थ मीं तुला उठविलें आहे. कारण, हे शत्रुदमना, राक्षसांवर हा फारच मोठा प्रसंग गुदरला आहे १२. ह्यास्तव हातामध्यें पाश घेतलेला मृत्युच कीं काय असा तूं शूल घेऊन बाहेर पड आणि वानरांना व सूर्यतुल्य तेजस्वी राजपुत्रांना भक्षण करून टाक १३. तुझें रूप अवलोकन करून वानर पळून जातील आणि रामलक्ष्मणांचींही हृदयें विदीर्ण होऊन जातील " १४. ह्याप्रमाणें महाबलाढ्य कुंभकर्णाला सांगितल्यानंतर तो महातेजस्वी राक्षसश्रेष्ठ रावण आपला पुनर्जन्म झाला असें समजूं लागला १५; आणि कुंभकर्णाचें सामर्थ्य व त्याचा पराक्रम जाणीत असल्यामुळें तो राजा निर्मल चंद्राप्रमाणें आल्हादयुक्त दिसूं लागला १६. असो. ह्याप्रमाणें रावणानें सांगितलें असतां महाबलाढ्य कुंभकर्ण आनंदित होऊन बाहेर पडला आणि राजाच्या आज्ञेप्रमाणें युद्ध करण्यास उद्युक्त झाला १७. नंतर त्या शत्रुनाशक कुंभकर्णानें वेगावेगानें एक तीक्ष्ण शूल हातामध्यें घेतला. तो देदीप्यमान शूल सर्वस्वीं लोहमय असून उज्ज्वल सुवर्णभूषणांनीं युक्त होता १८; इंद्राच्या अशनिसंज्ञक आयुधाप्रमाणें त्याची कांति होती; त्याचे ठिकाणीं वज्रासारिखें सामर्थ्य होतें; देव, दानव, गंधर्व, यक्ष व पन्नग ह्यांचा तो नाश करणारा होता १९. रक्तवर्ण पुष्पमाला हेच मोठे मोठे बंध त्याला लाविलेले होते आणि आपोआप अग्नीच्या ज्वाला त्याच्यांतून निघत होत्या. असो. शत्रूंच्या रक्तानें रंगलेला तो प्रचंड शूल घेतल्यानंतर २० महातेजस्वी कुंभकर्ण रावणाला म्हणाला " हें मोठें सैन्य येथेंच राहूं दे; मी एकटाच

बलं महत् २१ अथ ताञ्क्षुधितः क्रुद्धो भक्षयिष्यामि वानरान् । कुम्भकर्णवचः श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् २२ सैन्यैः परिवृतो गच्छ शूलमुद्गरपाणिभिः । वानरा हि महात्मानः शूराः सुव्यवसायिनः २३ एकाकिनं प्रमत्तं वा नयेयुर्दशनैः क्षयम् । तस्मात्परमदुर्धर्षः सैन्यैः परिवृतो व्रज ॥ रक्षसामहितं सर्वं शत्रुपक्षं निषूदय २४ अथासनात्समुत्पत्य स्रजं मणिकृतान्तराम् । आबबन्ध महातेजाः कुम्भकर्णस्य रावणः २५ अङ्गदान्यङ्गुलीवेष्टान्वराण्याभरणानि च । हारं च शशिसंकाशमाबबन्ध महात्मनः २६ दिव्यानि च सुगन्धीनि माल्यदामानि रावणः । गात्रेषु सज्जयामास श्रोत्रयोश्चास्य कुण्डले २७ काञ्चनाङ्गदकेयूरनिष्काभरणभूषितः । कुम्भकर्णो बृहत्कर्णः सुहुतोऽग्निरिवाबभौ २८ श्रोणीसूत्रेण महता मेचकेन विराजितः । अमृतोत्पादने नद्धो भुजङ्गेनेव मन्दरः २९ सकाञ्चनं भारसहं निवातं विद्युत्प्रभं दीप्तमिवात्मभासा । आबध्यमानः कवचं

---

संग्राममध्यें जातों २१ आणि क्रुद्ध व क्षुधित झालों असल्यामुळें आज त्या वानरांना भक्षण करून टाकितों" कुंभकर्णाचें हें भाषण ऐकून घेतल्यावर रावण म्हणाला २२ "शूल व मुद्गर हातामध्यें घेतलेलीं सैन्यें बरोबर घेऊन तूं जा. कारण, वानर धिप्पाड, शूर व चांगले उद्योगी आहेत २३. ह्यास्तव, तूं एकटा आहेस अथवा सावध नाहींस असें पाहून दांतांच्या योगानें ते तुझा नाश करितील. तस्मात्, सैन्यांनीं परिवेष्टित असल्यामुळें वानरांचा हल्ला होण्यास अत्यंत अशक्य असा तूं होऊन जा आणि राक्षसांना अहितकारक असलेल्या सर्व शत्रुपक्षाचा नाश कर" २४. इतकें सांगितल्यानंतर महातेजस्वी रावण सिंहासनावरून खालीं उतरला आणि रत्नें ओंवलेली सुवर्णमाला त्यानें कुंभकर्णाच्या गळ्यामध्यें घातली २५; बाहुभूषणें, अंगट्या, इतरही श्रेष्ठ श्रेष्ठ अलंकार आणि चंद्रासारिखा उज्ज्वल हार हींही महात्म्या कुंभकर्णाच्या शरीरावर त्यानें घातलीं २६. दिव्य व सुगंधी पुष्पांचे हार व गजर रावणानें त्याच्या कंठादि अवयवांचे ठिकाणीं घालून कानांमध्यें कुंडलें घातलीं २७ आणि अशारीतीनें सुवर्णबाहुभूषण, केयूर व निष्क ह्या अलंकारांनीं भूषित झालेला व मोठ्या मोठ्या कर्णांनीं युक्त असलेला तो कुंभकर्ण उत्कृष्टरीतीनें हवनयुक्त केलेल्या अग्निप्रमाणें भासूं लागला २८. मोठ्या उज्ज्वल व कृष्णवर्ण कटिसूत्रानें युक्त असलेला तो कुंभकर्ण, अमृतोत्पादनसमयीं भुजगानें परिवेष्टित केलेल्या मंदरपर्वताप्रमाणें शोभूं लागला २९; आणि आघात सहन करणारें, शस्त्रांनींही अभेद्य, विद्युल्लतेसारिखें तेजस्वी व स्वतःच्या कांतीनें देदीप्यमान असें सुवर्णमय कवच तो घालूं लागला असतां संध्याकाळच्या अभ्रानें आच्छादिलेला

रराज संध्याभ्रसंवीत इवाद्रिराजः ३० सर्वाभरणसर्वाङ्गः शूलपाणिः स राक्षसः । त्रिविक्रमकृतोत्साहो नारायण इवाबभौ ३१ भ्रातरं संपरिष्वज्य कृत्वा चापि प्रदक्षिणम् । प्रणम्य शिरसा तस्मै प्रतस्थे स महाबलः ३२ तमाशीर्भिः प्रशस्ताभिः प्रेषयामास रावणः । शङ्खदुन्दुभिनिर्घोषैः सैन्यैश्चापि वरायुधैः ३३ तं गजैश्च तुरङ्गैश्च स्यन्दनैश्चाम्बुदस्वनैः । अनुजग्मुर्महात्मानो रथिनो रथिनां वरम् ३४ सर्पैरुष्ट्रैः खरैश्चैव सिंहद्विपमृगद्विजैः । अनुजग्मुश्च तं घोरं कुम्भकर्णं महाबलम् ३५ स पुष्पवर्षैरवकीर्यमाणो धृतातपत्रः शितशूलपाणिः । महोत्कटः शोणितगन्धमत्तो विनिर्ययौ दानवदेवशत्रुः ३६ पदातयश्च बहवो महानादा महाबलाः । अन्वयू राक्षसा भीमा भीमाक्षाः शस्त्रपाणयः ३७ रक्ताक्षाः सुबहुव्यामा नीलाञ्जनचयोपमाः । शूलानुद्यम्य खड्गांश्च निशितांश्च परश्वधान् ३८ भिन्दिपालांश्च परिघान्गदाश्च मुसलानि च । तालस्कन्धांश्च विपुलान्क्षेपणीयान्दुरासदान् ३९ अथान्यद्वपुरादाय दारुणं घोरदर्शनम् ।

---

हिमालय पर्वतच कीं काय असा दिसूं लागला ३०. सर्व प्रकारचीं भूषणें ज्याच्या सर्व अंगावर घातलेलीं आहेत आणि हातामध्यें ज्यानें शूल घेतलला आहे असा तो राक्षस तीन पावलें टाकण्यास उद्युक्त झालेल्या नारायणाप्रमाणें दिसूं लागला ३१ आणि भ्रात्याला कडकडून भेटून, प्रदक्षिणा करून व मस्तकानें प्रणाम करून तो महाबलाढ्य कुंभकर्ण चालूं लागला ३२. रावणानें प्रशस्त आशीर्वाद, शंख व दुंदुभि ह्यांचे घोष आणि उत्कृष्ट आयुधें धारण केलेलीं सैन्यें बरोबर देऊन त्याला पाठविलें असतां ३३ गज, अश्व आणि मेघासारिखी गर्जना करणारे रथ बरोबर घेऊन महात्मे रथीही त्या श्रेष्ठ रथ्याच्या मागोमाग चालते झाले ३४; व कांहीं रथी सर्प, उंट, गर्दभ, सिंह, गज, मृग व पक्षी हीं वाहनें बरोबर घेऊन त्या महाबलाढ्य व घोर कुंभकर्णाच्या मागोमाग गेले ३५. रक्ताच्या गंधामुळें मत्त, अतिशयच उच्छृंखल असा तो देवदानवांचा शत्रु हातामध्यें शूल घेऊन बाहेर पडूं लागला असतां त्याच्यावर पुष्पांचे वर्षाव होऊं लागले आणि सेवक त्याच्यावर छत्री धरूं लागले ३६. अत्यंत दृढ, महाबलाढ्य, उग्र नेत्रांनीं युक्त व हातामध्यें शस्त्रें घेतलेले असे पुष्कळच भयंकर पादचारी राक्षस त्याच्या बरोबर गेले ३७. शूल, खड्ग, व धार लावलेले परशु, भिंदिपाल, परिघ, गदा, मुसलें आणि फेंकण्याकरितां म्हणून तालवृक्षाचीं मोठीं मोठीं शत्रूला सहन न होणारीं खोडें हातांत घेऊन त्याच्या मागोमाग निघालेल्या त्या राक्षसांचे नेत्र आरक्तवर्ण होते; कज्जलाचे पर्वतच कीं काय असे त्यांचे देह होते

निष्पपात महातेजाः कुम्भकर्णो महाबलः ४० धनुःशतपरीणाहः स षट्शतसमुच्छ्रितः। रौद्रः शकटचक्राक्षो महापर्वतसंनिभः ४१ संनिपत्य च रक्षांसि दग्धशैलोपमो महान्। कुम्भकर्णो महावक्त्रः प्रहसन्निदमब्रवीत् ४२ अद्य वानरमुख्यानां तानि यूथानि भागशः। निर्दहिष्यामि संक्रुद्धः पतङ्गानिव पावकः ४३ नापराध्यन्ति मे कामं वानरा वनचारिणः। जातिरस्मद्विधानां मा पुरोद्यानविभूषणम् ४४ पुररोधस्य मूलं तु राघवः सहलक्ष्मणः। हते तस्मिन्हतं सर्वं तं वधिष्यामि संयुगे ४५ एवं तस्य ब्रुवाणस्य कुम्भकर्णस्य रक्षसः। नादं चक्रुर्महाघोरं कम्पयन्त इवार्णवम् ४६ तस्य निष्पततस्तूर्णं कुम्भकर्णस्य धीमतः। बभूवुर्घोररूपाणि निमित्तानि समन्ततः ४७ उल्काशनियुता मेघा बभूवुर्गर्दभारुणाः। ससागरवना चैव वसुधा समकम्पत ४८ घोररूपाः शिवा नेदुः सज्वालकवलैर्मुखैः। मण्डलान्यपसव्यानि बबन्धुश्च विहङ्गमाः ४९ निष्पपात

---

व त देह पुष्कळच वांवा लांब होते ३८, ३९. तदनंतर भयंकर मुद्रेनें युक्त असें दुसरेंच एक घोर शरीर धारण करून महातेजस्वी व महाबलाढ्य कुंभकर्ण झपाट्यानें निघाला ४०. शंभर धनुष्यें ज्याच्या देहाची रुंदी असून उंची सहाशें धनुष्यें आहे, गाड्याच्या चाकांप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत आणि महापर्वतासारिखी ज्याची आकृति आहे असा तो उग्र ४१ व दग्ध झालेल्या पर्वताप्रमाणें दिसत असलेला आणि प्रचंड मुखानें युक्त असलेला तो महान् कुंभकर्ण राक्षसांना एकत्र व्यवस्थित रीतीनें उभे करून हंसत हंसत म्हणाला ४२ "अग्नि ज्याप्रमाणें पतंगांना दग्ध करून टाकितो त्याप्रमाणें क्रुद्ध झालेला मी आज मुख्य मुख्य वानरांचीं तीं सैन्यें अनुक्रमानेंच दग्ध करून टाकीन ४३. परंतु, छेः! वनचर वानरांनीं खरोखर माझा कांहींएक अपराध केलेला नाहीं. ती जाति आह्मांसारख्यांच्या नगरांचें व बागांचें भूषण आहे ४४. नगराला जो हा वेढा पडला आहे त्याचें मूळ लक्ष्मणासहवर्तमान रामच होय. तस्मात्, त्याचा वध झाला असतां सर्वांचा वध झाल्यासारिखेंच होणार असल्यामुळें संग्रामामध्यें मी त्याचाच वध करीन" ४५. ह्याप्रमाणें तो कुंभकर्ण राक्षस बोलू लागला असतां समुद्र कंपित करीतच कीं काय इतर राक्षसांनीं महाभयंकर गर्जना केली ४६. असो. तो बुद्धिमान् कुंभकर्ण सत्वर बाहेर पडूं लागला असतां सर्व बाजूंनीं त्याला भयंकर अपशकुन होऊं लागले ४७. ज्वाला व विद्युल्लता ह्यांनीं युक्त असलेले गर्दभासारिखे धूम्रवर्ण मेघ प्रकट झाले आणि समुद्र व अरण्य ह्यांसहवर्तमान पृथ्वी कंपित झाली ४८. अंगारासहवर्तमान ग्रासांनीं युक्त अशा मुखांनीं

च गृध्रोऽस्य शूले वै पथि गच्छतः ।। प्रास्फुरन्नयनं चास्य सव्यो बाहुरकम्पत ५० निष्पपात तदा चोल्का ज्वलन्ती भीमनिःस्वना । आदित्यो निष्प्रभश्चासीन्न वाति च सुखोऽनिलः ५१ अचिन्तयन्महोत्पातानुदितान्रोमहर्षणान् । निर्ययौ कुम्भकर्णस्तु कृतान्तबलचोदितः ५२ स लङ्घयित्वा प्राकारं पद्भ्यां पर्वतसंनिभः स ददर्श घनप्रख्यं वानरानीकमद्भुतम् ५३ ते दृष्ट्वा राक्षसश्रेष्ठं वानराः पर्वतोपमम् । वायुनुन्ना इव घना ययुः सर्वा दिशस्तदा ५४ तद्वानरानीकमतिप्रचण्डं दिशो द्रवद्भिन्नमिवाभ्रजालम् । स कुम्भकर्णः समवेक्ष्य हर्षान्ननाद भूयो घनवद्घनाभः ५५ ते तस्य घोरं निनदं निशम्य यथा निनादं दिवि वारिदस्य । पेतुर्धरण्यां बहवः प्लवङ्गा निकृत्तमूला इव शालवृक्षाः ५६ विपुलपरिघवान्स कुम्भकर्णो रिपुनिधनाय विनिःसृतो महात्मा । कपिगणभयमाददत्सुभीमं प्रभुरिव किंकरदण्डवान्युगान्ते ५७ [२६८३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥ ६५ ॥

---

उग्ररूप शिवा ओरडूं लागल्या आणि इतर पक्षीही अप्रदक्षिणिक घिरट्या घालूं लागले ४९; मार्गामध्यें जातां जातां गृध्रपक्षी त्याच्या शूलावर येऊन बसला; त्याचा डावा डोळा स्फुरण पावूं लागला; डाव्या हाताला कांपरें भरलें ५०; भयंकर स्वरानें युक्त अशी एक उज्वल ज्वाला आकाशांतून खालीं आली; सूर्य निस्तेज झाला आणि वायूचें सुखकारक वाहणें बंद झालें ५१. परंतु, शरीरावर रोमांच उठविणाऱ्या ह्या मोठ्या उत्पातांची पर्वा न करितां मृत्युबलानें प्रेरित झालेला कुंभकर्ण बाहेर पडला ५२. लंकेभोंवतीं असलेला प्राकार पायांनीं उल्लंघून गेल्यावर मेघतुल्य अद्भुत वानरसैन्य त्या पर्वतप्राय कुंभकर्णाच्या दृष्टीं पडलें ५३; त्या राक्षसश्रेष्ठ कुंभकर्णाला अवलोकन केल्यानंतर वायूनें उडवून दिलेल्या मेघाप्रमाणें ते वानर वाट फुटेल तिकडे पळूं लागले ५४; वायूनें विदीर्ण झालेल्या मेघपटलाप्रमाणें तें अतिप्रचंड वानरसैन्य रानोमाळ पळत सुटलें आहे असें पाहून तो मेघतुल्य कुंभकर्ण मेघासारिखी अधिक अधिकच गर्जना करूं लागला ५५; आकाशांतील मेघाच्या गर्जनेप्रमाणें त्याची भयंकर गर्जना ऐकून मुळें तोडिलेल्या शालवृक्षाप्रमाणें ते पुष्कळच वानर भूमीवर पडले ५६ आणि युगांतसमयीं संहार करणारे सेवक व कालदंड बरोबर घेतलेला प्रभु कालाग्नि रुद्रच कीं काय असा तो प्रचंड परिघ धारण केलेला महात्मा कुंभकर्ण वानरसैन्याला अतिशय भय उत्पन्न करीत करीत शत्रुवधाच्या उद्देशानें बाहेर पडला ५७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६५ ॥

स लङ्घयित्वा प्राकारं गिरिकूटोपमो महान् । निर्ययौ नगरात्तूर्णं कुम्भकर्णो महाबलः १ ननाद च महानादं समुद्रमभिनादयन् । विजयन्निव निर्घातान्विधमन्निव पर्वतान् २ तमवध्यं मघवता यमेन वरुणेन वा । प्रेक्ष्य भीमाक्षमायान्तं वानरा विप्रदुद्रुवुः ३ तांस्तु विप्रद्रुतान्दृष्ट्वा राजपुत्रोऽङ्गदोऽब्रवीत् । नलं नीलं गवाक्षं च कुमुदं च महाबलम् ४ आत्मनस्तानि विस्मृत्य वीर्याण्यभिजनानि च । क्व गच्छत भयत्रस्ताः प्राकृता हरयो यथा ५ साधु सौम्या निवर्तध्वं किं प्राणान्परिरक्षथ । नालं युद्धाय वै रक्षो महतीयं विभीषिका ६ महतीमुत्थितामेनां राक्षसानां विभीषिकाम् । विक्रमाद्विधमिष्यामो निवर्तध्वं प्लवङ्गमाः ७ कृच्छ्रेण तु समाश्वस्य संगम्य च ततस्ततः । वृक्षान्गृहीत्वा हरयः संप्रतस्थू रणाजिरं ८ ते निवर्त्य तु संरब्धाः कुम्भकर्णं वनौकसः । निर्जघ्नुः परमक्रुद्धाः समदा इव कुञ्जराः ९ प्रांशुभिर्गिरिशृङ्गैश्च शिलाभिश्च महाबलः । पादपैः पुष्पिताग्रैश्च हन्यमानो न कम्पते १० तस्य गात्रेषु पतता

---

तो पर्वतशिखरप्राय महाबलाढ्य प्रचंड कुंभकर्ण प्राकाराचें उल्लंघन करून सत्वर नगराच्या बाहेर पडला असतां १ विद्युल्लतेच्या कडकडाटांनाही मार्गे सारीत सारीत, पर्वतांना जसा कांहीं उडवून देत देत आणि समुद्र नादित करीत करीत मोठी गर्जना करूं लागला २. इंद्र, यम व वरुण ह्यांनाही अवध्य व भयंकर नेत्रांनीं युक्त असलेला तो कुंभकर्ण येत आहे असें अवलोकन करितांक्षणीं वानर पळत सुटले ३. तेव्हां त्या पळत सुटलेल्या वानरांना अवलोकन करून राजपुत्र अंगद नल, नील, गवाक्ष व महाबलाढ्य कुमुद ह्यांना ह्मणाला ४ "ते आपले पराक्रम व तीं आपलीं कुलें विसरून जाऊन साधारण वानरांप्रमाणें तुह्मी भयभीत होऊन कोणीकडे जात आहां ? ५. हे सौम्य वानरहो, तुह्मी बऱ्या विचारानें परत फिरा. प्राणांचें रक्षण कशाकरितां करीत आहां ? हा राक्षस आपल्यांशां युद्ध करण्यास समर्थ नाहीं. ह्याचें हें मोठें नुसतें बुजगावणें आहे ६ राक्षसाचें उत्पन्न झालेलें हें मोठें बुजगावणें पराक्रमाच्या योगानें आपण उडवून देऊं. तस्मात्, हे वानरहो, तुह्मी परत फिरा" ७. अशारीतीनें मोठ्या कष्टानें धैर्य मिळाल्यावर वानर चोहोंकडून एकत्र जमले आणि हातामध्यें वृक्ष घेऊन रणांगणामध्यें निघाले ८. नंतर रणांगणामध्यें परत निघालेल्या आणि मदमत्त गजांप्रमाणें अत्यंत क्रुद्ध असलेल्या त्या क्षुब्ध वानरांनीं कुंभकर्णाला प्रहार केले ९. परंतु, उंच उंच पर्वतशिखरें, शिला आणि प्रफुल्लित अग्रांनीं युक्त असलेले वृक्ष ह्यांचे प्रहारही होऊं लागले असतां तो महाबलाढ्य कुंभकर्ण भ्याला नाहीं १०. त्याच्या शरीरावर

भिद्यन्ते बहवः शिलाः । पादपाः पुष्पिताग्राश्च भग्नाः पेतुर्महीतले ११
सोऽपि सैन्यानि संक्रुद्धो वानराणां महौजसाम् । ममन्थ परमायत्तो वना-
न्यग्निरिवोत्थितः १२ लोहितार्द्रास्तु बहवः शेरते वानरर्षभाः । निरस्ताः
पतिता भूमौ ताम्रपुष्पा इव द्रुमाः १३ लङ्घयन्तः प्रधावन्तो वानरा नाव-
लोकयन् । केचित्समुद्रे पतिताः केचिद्गगनमास्थिताः १४ वध्यमानास्तु
ते वीरा राक्षसेन च लीलया । सागरं येन ते तीर्णाः पथा तेनैव दुद्रुवुः १५
ते स्थलानि तदा निम्नं विवर्णवदना भयात् । ऋक्षा वृक्षान्समारूढाः
केचित्पर्वतमास्थिताः १६ निपेतुः केचिदपरे केचिन्नैवावतस्थिरे । केचि-
द्भूमौ निपतिताः केचित्सुप्ता मृता इव १७ तान्समीक्ष्याङ्गदो भग्नान्वान-
रानिदमब्रवीत् । अवतिष्ठत युध्यामो निवर्तध्वं प्लवङ्गमाः १८ भग्नानां
वो न पश्यामि परिक्रम्य महीमिमाम् । स्थानं सर्वे निवर्तध्वं किं प्राणा-
न्परिरक्षथ १९ निरायुधानां क्रमतामसङ्गतिपौरुषाः । दारा ह्युपहसिष्यन्ति

---

पडलेल्या असंख्य शिला फुटून जाऊं लागल्या आणि प्रफुल्लित अग्रांनीं युक्त असलेले वृक्षही मोडून भूतलावर पडूं लागले ११. तदनंतर उत्पन्न झालेला अतिप्रचंड अग्नि ज्याप्रमाणें वनांचा नाश करितो त्याप्रमाणें तो अत्यंत क्रुद्ध झालेला कुंभकर्ण महाबलाढ्य वानरांच्या सैन्यांचा नाश करूं लागला असतां १२ त्यानें फेंकून दिलेले आणि रक्तानें भरलेले पुष्कळच वानर आरक्तवर्ण पुष्पांनीं युक्त असलेल्या वृक्षांप्रमाणें भासूं लागून भूतलावर पडूं लागले. १३. उड्या टाकीत व धांवत जाणाऱ्या वानरांना आपण कोठें जात आहांत ह्याचेंही भान नाहींसें झालें. ह्यामुळें कांहीं समुद्रांत पडले व कांहींनीं आकाशामध्येंच उड्डाण केलें १४. ह्याप्रमाणें तो राक्षस अनायासानें त्या वीरांचा वध करूं लागला असतां ज्या मार्गानें ते वानर सागर तरून आले होते त्याच मार्गानें पुनरपि पळून जाऊं लागले १५. भीतीनें ज्यांचें मुख निस्तेज झालेलें आहे असे ते वानर कांहीं सखल प्रदेशाकडे पळूं लागले; कांहीं ऋक्ष वृक्षांवर जाऊन राहिले; कांहींनीं पर्वताचा आश्रय केला १६; कांहीं भूतलावरच पडले; कांहीं तेथें मुळींच उभे राहीनासे झाले; कांहीं भूतलावर निश्चेष्ट पडले आणि कांहीं मेल्याप्रमाणें निद्रिस्थ होऊन पडले १७. त्या रानोमाळ झालेल्या वानरांना अवलोकन करून अंगद ह्मणाला " हे वानरहो, उभे रहा; आपण युद्ध करूं, तुह्मी परत फिरा १८. तुह्मी फुटाफूट होऊन जाऊं लागलां असतां ही सर्व पृथ्वी जरी हिंडला तरी तुह्मांला कोठें आश्रयस्थान मिळेल असें मला दिसत नाहीं. वास्तव, सर्वही परत फिरा; प्राणरक्षणार्थ पळत कशाला सुटलां आहांत ? १९.

स वै घातः सुजीवताम् २० कुलेषु जाताः सर्वेस्मिन्विस्तीर्णेषु महत्सु च । क गच्छत भयत्रस्ताः प्राकृता हरयो यथा २१ अनार्याः खलु यद्भीतास्त्यक्त्वा वीर्यं प्रधावत २२ विकत्थनानि वो यानि भवद्भिर्जनसंसदि । तानि वः क नु यातानि सोदग्राणि हतानि च २३ भीरोः प्रवादाः श्रूयन्ते यस्तु जीवति धिक्कृतः । मार्गः सत्पुरुषैर्जुष्टः सेव्यतां त्यज्यतां भयम् २४ शयामहे वा निहताः पृथिव्यामल्पजीविताः । प्राप्नुयामो ब्रह्मलोकं दुष्प्रापं च कुयोधिभिः २५ अवाप्नुयामः कीर्तिं वा निहत्वा शत्रुमाहवे । निहता वीरलोकस्य भोक्ष्यामो वसु वानराः २६ न कुम्भकर्णः काकुत्स्थं दृष्ट्वा जीवन्गमिष्यति । दीप्यमानमिवासाद्य पतङ्गो ज्वलनं यथा २७ पलायनेन चोद्दिष्टाः प्राणान्रक्षामहे वयम् । एकेन बहवो भग्ना यशोनाशं गमिष्यति २८ एवं ब्रुवाणं तं शूरमङ्गदं कनकाङ्गदम् ।

---

हे वानरहो, तुमची गति व पराक्रम हीं दोन्हीं कोठेंही कुंठित होणारीं नसतांना आयुधांचा त्याग करून जर तुह्मी जाऊं लागलां तर तुमच्या बायकाही तुह्मांला हंसतील आणि स्त्रियांनीं उपहास करणें हा तर अब्रूनें राहाणाऱ्यांचा घातच आहे २०. अरे, तुह्मी सर्वही मोठ्या प्रख्यात कुलांमध्यें उत्पन्न झालां असून ह्या प्रसंगीं यःकश्चित् वानरांप्रमाणें भयभीत होऊन कोणीकडे पळत सुटलां आहांत ? २१. पराक्रम न करितां तुह्मी भयभीत होऊन पळत सुटलां आहांत ह्यावरून तुह्मी खरोखर स्वामिद्रोही आहां २२. जनसमाजामध्यें तुह्मीं ज्या फुशारक्या मारल्या त्या कोणीकडे गेल्या ? आत्मप्रशंसेबरोबर त्या सर्वच निष्फल झाल्या कीं काय ? २३ सत्पुरुषांनीं धिक्कार केला असतां जो पुरुष जिवंत राहातो त्या भीरु पुरुषाच्या वीरांनीं निंदा केलेल्या एकण्यांत येत असतात. ह्यास्तव, भय सोडून देऊन सत्पुरुषांनीं स्वीकारलेल्या मार्गाचें अवलंबन करा २४. क्षणभंगुर जीवितांनीं युक्त असलेले आपण जर वध पावून पृथ्वीवर पडलों तर निंद्य योद्ध्यांना प्राप्त होण्यास अशक्य जो ब्रह्मलोक तो आपणांला प्राप्त होईल २५. सारांश, संग्रामामध्यें शत्रूंचा आपल्या हातून वध झाला असतां आपणांला कीर्ति प्राप्त होईल; अथवा, हे वानरहो, आपला वध झाला असतां वीरांना प्राप्त होणाऱ्या ब्रह्मलोकांतील आनंदरूप धनाचा आपण उपभोग घेऊ २६. अरे, प्रदीप्त अग्नीसमीप आलेला पतंग ज्याप्रमाणें जिवंत जात नाहीं त्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम दृष्टीं पडल्यावर कुंभकर्ण जिवंत जाणार नाहीं २७. मोठ्या वीरांमध्यें ज्याअर्थी आपली गणना झाली आहे त्याअर्थी पलायन करून जर आपण प्राणरक्षण केलें तर एकानें पुष्कळांचा पराभव केला असें ठरून आपली (आजपर्यंत मिळविलेली) कीर्ति नाहींशी

द्रवमाणास्ततो वाक्यमूचुः शूरविगर्हितम् २९ कृतं नः कदनं घोरं कुम्भकर्णेन रक्षसा । न स्थानकालो गच्छामो दयितं जीवितं हि नः ३० एतावदुक्त्वा वचनं सर्वे ते भेजिरे दिशः । भीमं भीमाक्षमायान्तं दृष्ट्वा वानरयूथपाः ३१ द्रवमाणास्तु ते वीरा अङ्गदेन वलीमुखाः । सान्त्वनैश्चानुमानैश्च ततः सर्वे निवर्तिताः ३२ प्रहर्षमुपनीताश्च वालिपुत्रेण धीमता । आज्ञाप्रतीक्षास्तस्थुश्च सर्वे वानरयूथपाः ३३ [२७१६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥ ६६ ॥

ते निवृत्ता महाकायाः श्रुत्वाङ्गदवचस्तदा । नैष्ठिकीं बुद्धिमास्थाय सर्वे सङ्ग्रामकाङ्क्षिणः १ समुदीरितवीर्यास्ते समारोपितविक्रमाः । पर्यवस्थापिता वाक्यैरङ्गदेन बलीयसा २ प्रयाताश्च गता हर्षं मरणे कृतनिश्चयाः । चक्रुः सुतुमुलं युद्धं वानरास्त्यक्तजीविताः ३ अथ वृक्षान्महाकायाः सानूनि सुमहान्ति च । वानरास्तूर्णमुद्यम्य कुम्भकर्णमभि-

होईल " २८. ह्याप्रमाणें सुवर्णबाहुभूषणांनीं युक्त असलेला शूर अंगद बोलूं लागला असतां शूरांनीं निंद्य असें भाषण त्या पळत सुटलेल्या वानरांनीं त्याच्याशीं केलें २९. ( ते ह्मणाले ) " कुंभकर्ण राक्षसानें आमचा भयंकर नाश केला आहे. येथें राहण्याचा हा समय नव्हे; आह्मी चालते होतों; कारण, आह्मांला जीवित प्रिय आहे " ३०. इतकेंच भाषण त्याच्याशीं केल्यावर ते सर्वही वानरसेनाधिपति भयंकर नेत्रांनीं युक्त असलेला तो उग्र कुंभकर्ण येत आहे असें पहातांक्षणीं ते वाट फुटेल तिकडे पळूं लागले ३१. असो. ह्याप्रमाणें ते वीर वानर कपाळाला आंठ्या घालून पळत सुटले असतां प्रोत्साहक भाषणांनीं आणि रामपराक्रमसूचक अनुमानांनीं त्या सर्वांनाही त्यानें परत फिरविलें ३२. इतकेंच नव्हे, परंतु, बुद्धिवान् वालिपुत्र अंगदानें त्या सर्वांना आनंदित केलें व ते सर्वही वानरसेनाधिपति आज्ञेची प्रतीक्षा करीत राहिले ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६६ ॥

अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर पक्का निश्चय करून ते सर्वही प्रचंड शरीर धारण केलेले वानर संग्रामाच्या इच्छेनें परत फिरले १. पूर्वीच्या पराक्रमाचा बलाढ्य अंगदानें निर्देश केल्यामुळें त्यांनीं पराक्रम करण्याचें मनामध्यें आणिलें आणि ( अनेक प्रकारच्या भाषणांनीं ) अंगदानें त्यांना युद्धार्थ सज्ज केलें २. जे पळून गेले होते त्यांनींही आनंदित होऊन युद्धांत मरण्याचा निश्चय केला आणि जीवाची आशा न धरितां त्या वानरांनीं अतिशयच तुमुल युद्ध केलें ३. प्रथमतः मोठीं मोठीं

द्रवन् ४ कुम्भकर्णः सुसंक्रुद्धो गदामुद्यम्य वीर्यवान् । धर्षयन्स महाकायः समन्ताद्व्याक्षिपद्रिपून् ५ शतानि सप्त चाष्टौ च सहस्राणि च वानराः । प्रकीर्णाः शेरते भूमौ कुम्भकर्णेन ताडिताः ६ षोडशाष्टौ च दश च विंशत्रिंशत्तथैव च । परिक्षिप्य च बाहुभ्यां खादन्स परिधावति ॥ भक्षयन्भृशसंक्रुद्धो गरुडः पन्नगानिव ७ कृच्छ्रेण च समाश्वस्ताः संगम्य च ततस्ततः । वृक्षाद्रिहस्ता हरयस्तस्थुः सङ्ग्राममूर्धनि ८ ततः पर्वतमुत्पाट्य द्विविदः प्लवगर्षभः । दुद्राव गिरिशृङ्गाभं विलम्ब इव तोयदः ९ तं समुत्पाट्य चिक्षेप कुम्भकर्णाय वानरः । तमप्राप्य महाकायं तस्य सैन्येऽपतत्ततः १० ममर्दाश्वान्गजांश्चापि रथांश्चापि गजोत्तमान् । तानि चान्यानि रक्षांसि एवं चान्यद्गिरेः शिरः ११ तच्छैलवेगाभिहतं हताश्वं हतसारथिम् । रक्षसां रुधिरक्लिन्नं बभूवायोधनं महत् १२ रथिनो वानरेन्द्राणां शरैः कालान्तकोपमैः । शिरांसि नदतां जह्रुः सहसा भीमनिःस्वनाः १३ वानराश्च

---

शरीरें धारण केलेले ते वानर वृक्ष व अतिप्रचंड पर्वतशिखरें हातामध्यें उगारून सत्वर कुंभकर्णाकडे धांवले ४. तेव्हां तो धिप्पाड व वीर्यवान् कुंभकर्ण अतिशय क्रुद्ध होऊन चाल करून येऊं लागला व त्यानें शत्रूंना चोहोंकडे उडवून दिलें असतां ५ आठ हजार सातशें वानर कुंभकर्णाच्या प्रहारानें ताडित होऊन अस्ताव्यस्त भूमीवर पडले ६. सोळा सोळा, आठ आठ, दहा दहा, वीस वीस व तीस तीस असे वानर एकदम हातांनीं तोंडांत टाकून भक्षण करीत करीत तो धांवूं लागला आणि सर्पांना भक्षण करणाऱ्या गरुडाप्रमाणें तो अतिशय क्रुद्ध होऊन भक्षण करूं लागला ७. तदनंतर मोठ्या कष्टानें धैर्य धरून व चोहोंकडून एकत्र जुळून वृक्ष व पर्वत हातीं घेतलेले ते वानर समरांगणामध्यें उभे राहिले ८. तदनंतर वानरश्रेष्ठ द्विविदानें एक पर्वत उपटला आणि जलाच्या योगानें लोंबकळ लागलेला मेघच कीं असा तो द्विविद पर्वतशिखरतुल्य कुंभकर्णावर धांवला ९ तो पर्वत उपटून त्या वानरानें कुंभकर्णाकडे फेंकिला; परंतु धिप्पाड कुंभकर्णापर्यंत न पोंचतांच तो पर्वत कुंभकर्णाच्या सैन्यामध्यें पडला १० आणि त्या पर्वतानें अश्व, गज, रथ व इतर उत्कृष्ट गज ह्यांचा चुराडा केला. तदनंतर त्या व इतर राक्षसांना उद्देशून त्याचप्रमाणें दुसरें पर्वतशिखर द्विविदानें फेंकिलें असतां ११ त्या पर्वतशिखराच्या वेगानें ताडित झालेलें राक्षसांचें सैन्य रक्तानें भरून गेलें; त्यांतील कित्येक अश्व व कित्येक सारथि वध पावून पडले आणि नंतर मोठें युद्ध सुरू झालें १२. गर्जना करणाऱ्या वानरश्रेष्ठांचीं मस्तकें, रथारूढ झालेल्या व भयंकर गर्जना करणाऱ्या

महात्मानः समुत्पाट्य महाद्रुमान् । रथानश्वान्गजानुष्ट्रान्राक्षसानभ्यसू-
दयन् १४ हनूमाञ्शैलशृङ्गाणि शिलाश्च विविधान्द्रुमान् । ववर्ष कुम्भ-
कर्णस्य शिरस्यम्बरमास्थितः १५ तानि पर्वतशृङ्गाणि शूलेन स बिभेद
ह । बभञ्ज वृक्षवर्षं च कुम्भकर्णो महाबलः १६ ततो हरीणां तदनीक-
मुग्रं दुद्राव शूलं निशितं प्रगृह्य । तस्थौ स तस्यापततः पुरस्तान्म-
हीधराग्रं हनुमान्प्रगृह्य १७ स कुम्भकर्णं कुपितो जघान वेगेन शैलो-
त्तमभीमकायम् । संचुक्षुभे तेन तदाभिभूतो मेदार्द्रगात्रो रुधिराव-
सिक्तः १८ स शूलमाविध्य तडित्प्रकाशं गिरिर्यथा प्रज्वलिताग्निशृङ्गम् ।
बाह्वन्तरे मारुतिमाजघान गुहोऽचलं क्रौञ्चमिवोग्रशक्त्या १९ स शूल-
निर्भिन्नमहाभुजान्तरः प्रविह्वलः शोणितमुद्वमन्रुषा । ननाद भीमं हनुमा-
न्महाहवे युगान्तमेघस्तनितस्वनोपमम् २० ततो विनेदुः महसा प्रहृष्टा
रक्षोगणास्तं व्यथितं समीक्ष्य । प्लवङ्गमास्तु व्यथिता भयार्ताः प्रदुद्रुवुः

---

राक्षसांनीं काल व मृत्यु ह्यांप्रमाणें भासणाऱ्या बाणांच्या योगानें, एकदम हरण केलीं असतां १३ महात्म्या वानरांनींही मोठे मोठे वृक्ष उपटून त्यांच्या योगानें रथ, अश्व, गज, उंट व राक्षस ह्यांचा वध केला १४. आकाशाचा आश्रय करून असलेल्या हनुमानानें कुंभकर्णाच्या मस्तकीं पर्वतशिखरें, शिला व नानाप्रकारचे वृक्ष ह्यांचा वर्षाव चालविला असतां १५ महाबलाढ्य कुंभकर्णानें शूलाच्या योगानें तीं पर्वत-शिखरें भग्न करून वृक्षवृष्टीचाही भंग केला १६. तदनंतर तीक्ष्ण शूल हातामध्यें घेऊन वानरांच्या उग्र सैन्यावर तो कुंभकर्ण धांवला असतां अंगावर धांवून येणाऱ्या त्या कुंभकर्णासमोरच एक पर्वतशिखर हातामध्यें घेऊन हनुमान् उभा राहिला १७; आणि क्रुद्ध होऊन त्या हनुमानानें महापर्वतासारिखें भयंकर शरीर धारण केलेल्या त्या कुंभकर्णाला वेगानें प्रहार केला असतां त्या प्रहारानें जर्जर झालेल्या कुंभकर्णाचें शरीर मेदानें आर्द्र झालें; रक्तानें बरबटून गेलें व तोही स्वतः क्षुब्ध झाला १८. तदनंतर पर्वतानें ज्याप्रमाणें आपलें प्रज्वलित अग्नीनें युक्त असलेलें शिखर हातीं घ्यावें त्याप्रमाणें विद्युल्लतेसारिख्या प्रकाशानें युक्त असलेला शूल उगारून कुंभकर्णानें, उग्र शक्तीच्या योगानें क्रौंचपर्वतावर प्रहार करणाऱ्या कार्तिकेयाप्रमाणें, हनुमानाच्या वक्षःस्थलीं प्रहार केला असतां १९, शूलाच्या योगानें प्रचंड वक्षःस्थल विदीर्ण झाल्यामुळें तो हनुमान् अतिशय विव्हल झाला, रक्त ओकूं लागला आणि प्रलयकालीन मेघाच्या गर्जनेप्रमाणें त्या महासंग्रामामध्यें रागारागानें तो भयंकर गर्जना करूं लागला २०. ह्याप्रमाणें हनुमान् व्यथित झाल्याचें अवलोकन करून

संयति कुम्भकर्णात् २१ ततस्तु नीलो बलवान्पर्यवस्थापयन्बलम्। प्रविचिक्षेप शैलाग्रं कुम्भकर्णाय धीमते २२ तदापतन्तं संप्रेक्ष्य मुष्टिनाभिजघान ह। मुष्टिप्रहाराभिहतं तच्छैलाग्रं व्यशीर्यत २३ सविस्फुलिङ्गं सज्वालं निपपात महीतले २४ ऋषभः शरभो नीलो गवाक्षो गन्धमादनः। पञ्च वानरशार्दूलाः कुम्भकर्णमुपाद्रवन् २५ शैलैर्वृक्षैस्तलैः पादैर्मुष्टिभिश्च महाबलाः। कुम्भकर्णं महाकायं निजघ्नुः सर्वतो युधि २६ स्पर्शानिव प्रहारांस्तान्वेदयानो न विव्यथे। ऋषभं तु महावेगं बाहुभ्यां परिषस्वजे २७ कुम्भकर्णभुजाभ्यां तु पीडितो वानरर्षभः। निपपातर्षभो भीमः प्रमुखागतशोणितः २८ मुष्टिना शरभं हत्वा जानुना नीलमाहवे। आजघान गवाक्षं तु तलेनेन्द्ररिपुस्तदा २९ दत्तप्रहारैर्व्यथिता मुमुहुः शोणितोक्षिताः। निपेतुस्ते तु मेदिन्यां निकृत्ता इव किंशुकाः ३० तेषु वानरमुख्येषु पातितेषु महात्मसु। वानराणां सहस्राणि कुम्भकर्णं प्रदुद्रुवुः ३१ तं शैलमिव शैलाभाः सर्वे तु प्लवगर्षभाः। समारुह्य समुत्पत्य

---

आनंदित झालेले राक्षसगण एकाएकीं गर्जना करूं लागले आणि युद्धामध्यें कुंभकर्णाच्या भीतीनें ग्रस्त झालेले वानर व्यथित होऊन पळूं लागले २१. तदनंतर आपल्या सैन्याला धीर देत देत बलाढ्य नीलानें बुद्धिमान् कुंभकर्णावर एक पर्वतशिखर फेंकिलें असतां २२ तें येत आहे असें पाहून कुंभकर्णानें त्याला मुष्टीचा प्रहार केला; मुष्टिप्रहारानें ताडित झालेलें तें पर्वतशिखर विदीर्ण झालें २३; आणि ठिणग्या व ज्वाला ह्यांसहवर्तमान तें भूतलावर पडलें २४. नंतर ऋषभ, शरभ, नील, गवाक्ष आणि गंधमादन हे पांच वानरश्रेष्ठ कुंभकर्णावर धांवून गेले २५; आणि पर्वत, वृक्ष, चपराका, लाथा व मुष्टि ह्यांच्या योगानें ते महाबलाढ्य वानर संग्रामामध्यें सर्व बाजूंनीं त्या धिप्पाड कुंभकर्णावर प्रहार करूं लागले २६. परंतु, पुष्पादिकांच्या स्पर्शाप्रमाणें ते प्रहार भासूं लागल्यामुळें कुंभकर्ण मुळींच व्यथित न होतां महावेगवान् ऋषभ वानराला त्यानें हातानें आंवळून धरिलें २७. तेव्हां कुंभकर्णाच्या हातांनीं पीडित झालेला तो वानरश्रेष्ठ भयंकर ऋषभ भूमीवर पडून रक्ताच्या गुळण्या टाकूं लागला २८ तदनंतर त्या इंद्रशत्रु कुंभकर्णानें संग्रामामध्यें मुष्टीनें शरभाला व गुडघ्यानें नीलाला प्रहार करून गवाक्षाला हस्ततलानें प्रहार केला २९; व ह्याप्रमाणें कुंभकर्णानें त्यांना प्रहार केला असतां व्यथित झालेले ते वानर रक्तानें भरून गेले आणि तोडून टाकिलेल्या पळसाप्रमाणें ते भूमीवर पडले ३०. असो. अशारीतीनें त्या महात्म्या मुख्य मुख्य वानरांना कुंभकर्णानें पाडिलें असतां हजारों

ददंशुः प्लवगर्षभाः ३२ तं नखैर्दशनैश्चापि मुष्टिभिर्बाहुभिस्तथा । कुम्भकर्णं महाबाहुं निजघ्नुः प्लवगर्षभाः ३३ स वानरसहस्रैस्तु विचितः पर्वतोपमः । रराज राक्षसव्याघ्रो गिरिरात्मरुहैरिव ३४ बाहुभ्यां वानरान्सर्वान्प्रगृह्य स महाबलः । भक्षयामास संक्रुद्धो गरुडः पन्नगानिव ३५ प्रक्षिप्ताः कुम्भकर्णेन वक्त्रे पातालसंनिभे । नासापुटाभ्यां संजग्मुः कर्णाभ्यां चैव वानराः ३६ भक्षयन्भृशसंक्रुद्धो हरीन्पर्वतसंनिभः । बभञ्ज वानरान्सर्वान्संक्रुद्धो राक्षसोत्तमः ३७ मांसशोणितसंक्लेदां कुर्वन्भूमिं स राक्षसः । चचार हरिसैन्येषु कालाग्निरिव मूर्च्छितः ३८ वज्रहस्तो यथा शक्रः पाशहस्त इवान्तकः । शूलहस्तो बभौ युद्धे कुम्भकर्णो महाबलः ३९ यथा शुष्काण्यरण्यानि ग्रीष्मे दहति पावकः । तथा वानरसैन्यानि कुम्भकर्णो ददाह सः ४० ततस्ते वध्यमानास्तु हतयूथाः प्लवङ्गमाः । वानरा भयसंविग्ना विनेदुर्विकृतैः स्वरैः ४१ अनेकशो वध्यमानाः कुम्भकर्णेन वानराः । राघवं शरणं जग्मुर्व्यथिता भिन्नचेतसः ४२

---

वानर कुंभकर्णावर धांवले ३१. ते सर्वही पर्वतप्राय वानरश्रेष्ठ पर्वताप्रमाणें कुंभकर्णाच्या शरीरावर आरोहण करून व उड्या टाकून त्याला चावूं लागले ३२; आणि नखें, दांत, मुष्टि व बाहु ह्यांच्या योगानें ते वानरश्रेष्ठ त्या महापराक्रमी कुंभकर्णाला प्रहार करूं लागले ३३. तेव्हां हजारों वानरांनीं खेचून गेलेला तो पर्वतप्राय राक्षसश्रेष्ठ कुंभकर्ण वृक्षांनीं व्याप्त झालेल्या पर्वताप्रमाणें शोभूं लागला ३४; भुजंगांना भक्षण करणाऱ्या गरुडाप्रमाणें तो क्रुद्ध व महाबलाढ्य कुंभकर्ण सर्व वानर हातांनीं घेऊन भक्षण करूं लागला ३५ आणि पातालासारिख्या मुखामध्यें टाकलेले ते वानर नाकपुड्यांतून व कानांतून बाहेर येऊं लागले ३६. अतिशय क्रुद्ध झालेला तो पर्वतप्राय राक्षसश्रेष्ठ कुंभकर्ण वानरांना भक्षण करूं लागला असतां सर्व वानर पळूं लागले ३७; आणि रक्तमांसांच्या योगानें भूमि आर्द्र करीत असलेला व देहभानावर नसलेला तो राक्षस प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें तो वानरसैन्यामध्यें संचार करूं लागला ३८. वज्रपाणि इंद्राप्रमाणें अथवा हातामध्यें पाश घेतलेल्या मृत्यूप्रमाणें हातामध्यें शूल घेतलेला तो महाबलाढ्य कुंभकर्ण रणभूमींत दिसूं लागला ३९; आणि ग्रीष्मऋतूंत शुष्क अरण्य दग्ध करून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें तो कुंभकर्ण वानरसैन्यांना दग्ध करूं लागला ४०. तदनंतर ज्यांच्या वरिष्ठांचा वध झाला आहे असे ते वानर स्वतःचा वध होऊं लागला असतां भयानें उद्विग्न होऊन विकृत स्वरांनीं आक्रोश करूं लागले ४१; आणि कुंभकर्ण एकदम अनेक वानरांचा वध करूं लागला असतां अंतःकरणामध्ये घाबरे होऊन दुःखित झालेले ते

प्रभग्नान्वानरान्दृष्ट्वा वज्रहस्तात्मजात्मजः । अभ्यधावत वेगेन कुम्भकर्णं महाहवे ४३ शैलशृङ्गं महद्गृह्य विनदन्स मुहुर्मुहुः । त्रासयन्राक्षसान्सर्वान्कुम्भकर्णपदानुगान् ४४ चिक्षेप शैलशिखरं कुम्भकर्णस्य मूर्धनि । स तेनाभिहतो मूर्ध्नि शैलेनेन्द्ररिपुस्तदा ४५ कुम्भकर्णः प्रजज्वाल क्रोधेन महता तदा । सोऽभ्यधावत वेगेन वालिपुत्रममर्षणम् ४६ कुम्भकर्णो महानादस्त्रासयन्सर्ववानरान् । शूलं ससर्ज वै रोषादङ्गदं तु महाबलः ४७ तदापतन्तं बलवान्युद्धमार्गविशारदः । लाघवान्मोक्षयामास बलवान्वानरर्षभः ४८ उत्पत्य चैनं तरसा तलेनोरस्यताडयत् । स तेनाभिहतः कोपात्प्रमुमोहाचलोपमः ४९ स लब्धसंज्ञोऽतिबलो मुष्टिं संगृह्य राक्षसः । अपहासेन चिक्षेप विसंज्ञः स पपात ह ५० तस्मिन्प्लवगशार्दूले विसंज्ञे पतिते भुवि । तच्छूलं समुपादाय सुग्रीवमभिदुद्रुवे ५१ तमापतन्तं संप्रेक्ष्य कुम्भकर्णं महाबलम् । उत्पपात तदा वीरः सुग्रीवो वानराधिपः ५२ स पर्वताग्र-

---

रामाला शरण गेले ४२. परंतु, दाणादाण उडून गेलेले ते वानर अवलोकन करून वालिपुत्र अंगद त्या महासंग्रामामध्यें वेगावेगानें त्या कुंभकर्णाच्या अंगावर धांवून गेला ४३. मोठें पर्वतशिखर हातामध्यें घेऊन आणि वारंवार गर्जनेनें कुंभकर्णानुयायी सर्व राक्षसांना भयभीत करीत करीत ४४ तें पर्वतशिखर त्यानें कुंभकर्णाच्या मस्तकीं फेंकिलें असतां त्या पर्वतानें मस्तकाचे ठिकाणीं ताडित झालेला तो इंद्रशत्रु ४५ कुंभकर्ण मोठ्या क्रोधानें अगदीं जळूं लागला आणि वेगावेगानें क्रोधी वालिपुत्र अंगदाच्या अंगावर तो धांवून गेला ४६. महाबलाढ्य व प्रचंड गर्जना करणाऱ्या त्या कुंभकर्णानें रागारागानें शूल फेंकिला असतां सर्व वानर भयभीत झाले ४७; परंतु, तो येत असलेला शूल युद्धकलानिपुण बलाढ्य वानरश्रेष्ठ अंगदानें मोठ्या शिताफीनें चुकविला ४८; इतकेंच नव्हे; परंतु, वेगानें उड्डाण करून हस्ततलानें त्यानें कुंभकर्णाच्या वक्षःस्थलावर प्रहार केला व रागारागानें त्या प्रहाराचा तडाका बसतांक्षणीं तो पर्वतप्राय कुंभकर्ण मूर्च्छित झाला ४९. तथापि, शुद्धीवर आल्यानंतर त्या अतिबलाढ्य राक्षसानें एक मूठ वळून उपहास करीत करीत त्याला प्रहार केला असतां तो वानर मूर्च्छित होऊन भूमीवर पडला ५०. ह्या प्रमाणें तो वानरश्रेष्ठ अंगद मूर्च्छित होऊन भूमीवर पडला असतां तो कुंभकर्ण राक्षस तो शूल घेऊन सुग्रीवावर धांवला ५१. परंतु, तो महाबलाढ्य कुंभकर्ण चाल करून येत आहे असें पाहिल्याबरोबर वानराधिपति वीर सुग्रीवानें उड्डाण केलें ५२; आणि तो महाबलाढ्य

मुत्क्षिप्य समाविध्य महाबलः । अभिदुद्राव वेगेन कुम्भकर्णं महाबलम् ५३ तमापतन्तं संप्रेक्ष्य कुम्भकर्णः प्लवङ्गमम् । तस्थौ विवृत्तसर्वाङ्गो वानरेन्द्रस्य संमुखः ५४ कपिशोणितदिग्धाङ्गं भक्षयन्तं महाकपीन् । कुम्भकर्णं स्थितं दृष्ट्वा सुग्रीवो वाक्यमब्रवीत् ५५ पातिताश्च मया वीराः कृतं कर्म सुदुष्करम् । भक्षितानि च सैन्यानि प्राप्तं ते परमं यशः ५६ त्यज तद्वानरानीकं प्राकृतैः किं करिष्यसि । सहस्वैकं निपातं मे पर्वतस्यास्य राक्षस ५७ तद्वाक्यं हरिराजस्य सत्त्वधैर्यसमन्वितम् । श्रुत्वा राक्षसशार्दूलः कुम्भकर्णोऽब्रवीद्वचः ५८ प्रजापतेस्तु पौत्रस्त्वं तथैवर्क्षरजःसुतः । धृतिपौरुषसंपन्नस्तस्माद्गर्जसि वानर ५९ स कुम्भकर्णस्य वचो निशम्य व्याविध्य शैलं सहसा मुमोच । तेनाजघानोरसि कुम्भकर्णं शैलेन वज्राशनिसंनिभेन ६० तच्छैलशृङ्गं सहसा विभिन्नं भुजान्तरे तस्य तदा विशाले । ततो विषेदुः सहसा प्लवङ्गा रक्षोगणाश्चापि मुदा विनेदुः ६१ स शैलशृङ्गाभिहतश्चुकोप ननाद रोषाच्च विवृत्य वक्त्रम् । व्याविध्य

---

सुग्रीव एक पर्वतशिखर उपटून व फिरवून वेगावेगानें महाबलाढ्य कुंभकर्णावर धांवला ५३. परंतु, चाल करून येत असलेल्या त्या वानराला अवलोकन करून अंगावरील सर्व कांति फिरून गेलेला तो कुंभकर्ण वानराधिपति सुग्रीवाच्या समोर उभा राहिला ५४. तेव्हां, वानराच्या रक्तानें ज्याचें शरीर बरबटून गेलें आहे असा तो कुंभकर्ण मोठ्या मोठ्या वानरांना भक्षण करीत उभा राहिलेला आहे असें अवलोकन करून सुग्रीव त्याला ह्मणाला ५५ " मीं वीरांचा वध करून मोठें दुष्कर कर्म केलें आहे आणि तूंही सैन्य भक्षण करून मोठी कीर्ति संपादन केली आहेस ५६. परंतु, साधारण वानरांशीं तुला काय कर्तव्य आहे ? तें वानरसैन्य तूं सोडून दे; आणि, हे राक्षसा, ह्या माझ्या पर्वताचा एक प्रहार तूं सहन कर " ५७. वानरराज सुग्रीवाचें तें धैर्यदर्शक व सामर्थ्यदर्शक भाषण श्रवण करून राक्षसश्रेष्ठ कुंभकर्ण ह्मणाला ५८ " हे वानरा, ब्रह्मदेवाचा नातू व ऋक्षरजाचा पुत्र असल्याकारणानें धैर्य व पराक्रम ह्यांनीं संपन्न आहेस ह्मणून गर्जना करीत आहेस " ५९. कुंभकर्णाचें तें भाषण श्रवण केल्यानंतर तो पर्वत हातानें अजमावून पाहून सुग्रीवानें एकाएकीं सोडिला आणि त्या वज्र व अशनि ह्या अस्त्रांप्रमाणें असलेल्या पर्वताच्या योगानें कुंभकर्णाच्या वक्षःस्थलावर त्यानें प्रहार केला ६०; परंतु, त्याच्या विशाल वक्षःस्थलावर त्या पर्वतशिखराचे एकदम तुकडे होऊन गेले असतां वानर एकाएकीं खिन्न झाले आणि राक्षसगण हे आनंदानें गर्जना करूं लागले ६१. तदनंतर पर्वतशिखराचा

शूलं च तडित्प्रकाशं चिक्षेप हर्यृक्षपतेर्वधाय ६२ तत्कुम्भकर्णस्य भुजप्रणुन्नं शूलं शितं काञ्चनदामयष्टिम्। क्षिप्रं समुत्पत्य निगृह्य दोर्भ्यां बभञ्ज वेगेन सुतोनिलस्य ६३ कृतं भारसहस्रस्य शूलं कालायसं महत्। बभञ्ज जानुमारोप्य तदा हृष्टः प्लवङ्गमः ६४ शूलं भग्नं हनुमता दृष्ट्वा वानरवाहिनी । हृष्टा ननाद बहुशः सर्वतश्चापि दुद्रुवे ६५ बभूवाथ परित्रस्तो राक्षसो विमुखोभवत् । सिंहनादं च ते चक्रुः प्रहृष्टा वनगोचराः ॥ मारुतिं पूजयाञ्चक्रुर्दृष्ट्वा शूलं तथागतम् ६६ स तत्तथा भग्नमवेक्ष्य शूलं चुकोप रक्षोधिपतिर्महात्मा । उत्पाट्य लङ्कामलयात्स शृङ्गं जघान सुग्रीवमुपेत्य तेन ६७ स शैलशृङ्गाभिहतो विसंज्ञः पपात भूमौ युधि वानरेन्द्रः । तं वीक्ष्य भूमौ पतितं विसंज्ञं नेदुः प्रहृष्टा युधि यातुधानाः ६८ समभ्युपेत्याद्भुतघोरवीर्यं स कुम्भकर्णो युधि वानरेन्द्रम् । जहार सुग्रीवमभिप्रगृह्य यथानिलो मेघमिव प्रचण्डः ६९ स तं महामेघनिकाशरूपमुत्पाट्य

---

प्रहार झाल्यामुळें तो कुंभकर्ण क्रुद्ध झाला; रागानें जबडा पसरून गर्जना करूं लागला आणि विद्युल्लतेसारिख्या तेजानें युक्त असलेला तो शूल तोलून धरून ऋक्षवानरश्रेष्ठ सुग्रीवाच्या वधाकरितां त्यानें फेंकिला ६२; परंतु, हातांनीं फेंकिलेला आणि सुवर्णबंधनानें व दंडानें युक्त असलेला तो कुंभकर्णाचा तीक्ष्ण शूल वायुपुत्र हनुमानानें सत्वर उड्डाण करून हातामध्यें धरिला व वेगानें मोडून टाकिला ६३. हजारों भार सहन करणारा आणि लोखंडाचा तयार केलेला तो प्रचंड शूल गुडघ्यावर धरून आनंदित झालेल्या हनुमान् वानरानें मोडून टाकिला असतां ६४ हनुमानानें मोडिलेला तो शूल अवलोकन करून वानरसेना आनंदित झाली; नानाप्रकारांनीं गर्जना करूं लागली आणि ( आनंदाच्या भरामध्यें ) चोहोंकडे उड्या मारूं लागली ६५. तेव्हां कुंभकर्ण राक्षस अतिशय त्रस्त होऊन परत फिरला असतां ते वानर आनंदित होऊन सिंहनाद करूं लागले आणि शूलाची तशी अवस्था झालेली पाहून त्यांनीं मारुतीची प्रशंसा केली ६६. असो. त्याप्रमाणें तो शूल भग्न झाल्याचें पाहून महात्मा राक्षसाधिपति कुंभकर्ण क्रुद्ध झाला आणि लंकेसमीप असलेल्या मलयपर्वतावरील एक शिखर उपटून व समीप येऊन त्या शिखरानें सुग्रीवाला त्यानें प्रहार केला ६७. तेव्हां पर्वतशिखरानें ताडित झालेला तो वानराधिपति सुग्रीव मूर्च्छित होऊन भूमीवर पडला व तो भूमीवर मूर्च्छित पडलेला पहातांक्षणीं युद्धामध्यें असलेले ते राक्षस आनंदित होऊन गर्जना करूं लागले ६८. अद्भुत आणि घोर वीर्यानें युक्त असलेल्या त्या वानराधिपति सुग्रीवासमीप येऊन ज्याप्रमाणें प्रचंड वायु

गच्छन्युधि कुम्भकर्णः। रराज मेरुप्रतिमानरूपो मेरुर्यथा व्युच्छ्रितघोरशृङ्गः ७० ततस्तमादाय जगाम वीरः संस्तूयमानो युधि राक्षसेन्द्रः। शृण्वन्निनादं त्रिदिवालयानां प्लवङ्गराजगृहविस्मितानाम् ७१ ततस्तमादाय तदा स मेने हरीन्द्रमिन्द्रोपममिन्द्रवीर्यः। अस्मिन्हृते सर्वमिदं हृतं स्यात्सराघवं सैन्यमितीन्द्रशत्रुः ७२ विद्रुतां वाहिनीं दृष्ट्वा वानराणामितस्ततः। कुम्भकर्णेन सुग्रीवं गृहीतं चापि वानरम् ७३ हनूमांश्चिन्तयामास मतिमान्मारुतात्मजः। एवं गृहीते सुग्रीवे किं कर्तव्यं मया भवेत् ७४ यद्धि न्याय्यं मया कर्तुं तत्करिष्याम्यसंशयम्। भूत्वा पर्वतसंकाशो नाशयिष्यामि राक्षसम् ७५ मया हते संयति कुम्भकर्णे महाबले मुष्टिविशीर्णदेहे। विमोचिते वानरपार्थिवे च भवन्तु हृष्टाः प्लवगाः समग्राः ७६ अथ वा स्वयमप्येष मोक्षं प्राप्स्यति वानरः। गृहीतोयं यदि भवेत्त्रिदशैः सासुरोरगैः ७७ मन्ये न तावदात्मानं बुध्यते वानराधिपः।

---

मेघाला घेऊन जातो त्याप्रमाणें तो कुंभकर्ण सुग्रीवाला हातांत धरून घेऊन चालला ६९; आणि ह्याप्रमाणें महामेघतुल्य सुग्रीवाला उचलून तो मेरुपर्वततुल्य कुंभकर्ण युद्धभूमीमध्यें जाऊं लागला असतां उन्नत व भयंकर शिखरांनीं युक्त असलेल्या मेरुपर्वताप्रमाणें दिसूं लागला ७०. असो. युद्धभूमीमध्यें त्या सुग्रीवाला घेऊन राक्षसाधिपति वीर कुंभकर्ण लंकानगरीकडे चालता झाला असतां वानरराज कचाट्यांत सांपडल्यामुळें विस्मित झालेल्या देवांचा आक्रोश त्याला ऐकूं येऊं लागला व राक्षस त्याची स्तुति करूं लागले ७१. इंद्रासारिखा पराक्रमी असलेला तो इंद्रशत्रु कुंभकर्ण त्या इंद्रतुल्य वानराधिपतीला घेतल्यानंतर " ह्याचा वध झाला असतां राघवासहवर्तमान ह्या सर्व सैन्याचा वध होईल " असें मानूं लागला ७२. वानरांची सेना इकडे तिकडे पळत सुटली असून सुग्रीववानराला कुंभकर्णानें पकडलें आहे असें अवलोकन केल्यावर ७३ बुद्धिमान् वायुपुत्र हनुमान् आपल्याशीं ह्मणाला " ह्याप्रमाणें सुग्रीव पकडला गेला असतां माझ्या हातून काय बरें होण्यासारिखें आहे? ७४. जें कांहीं माझ्या हातून होण्यासारिखें असेल तें मी निःसंशय करीन. सारांश, पर्वतप्राय होऊन मी ह्या राक्षसाचा नाश करीन ७५. कारण, मुष्टिप्रहारानें देहाचे तुकडे तुकडे करून महाबलाढ्य कुंभकर्णाचा मीं संग्रामामध्यें वध केला असतां आणि वानरराज सुग्रीवाची सुटका केली असतां सर्व वानर आनंदित होतील. ७६ अथवा असुर व उरग ह्यांसहवर्तमान देवांनीं जरी ह्याला धरिलें तरी सुद्धां स्वतःच्याच सामर्थ्यानें हा वानर मुक्त होईल ७७. परंतु, युद्धामध्यें कुंभकर्णानें

शैलप्रहाराभिहतः कुम्भकर्णेन संयुगे ७८ अयं मुहूर्तात्सुग्रीवो लब्धसंज्ञो महाहवे । आत्मनो वानराणां च यत्पथ्यं तत्करिष्यति ७९ मया तु मोक्षितस्यास्य सुग्रीवस्य महात्मनः । अप्रीतिश्च भवेत्कष्टा कीर्तिनाशश्च शाश्वतः ८० तस्मान्मुहूर्तं काङ्क्षिष्ये विक्रमं मोक्षितस्य तु । भिन्नं च वानरानीकं तावदाश्वासयाम्यहम् ८१ इत्येवं चिन्तयित्वाथ हनूमान्मारुतात्मजः । भूयः संस्तम्भयामास वानराणां महाचमूम् ८२ स कुम्भकर्णोथ विवेश लङ्कां स्फुरन्तमादाय महाहरिं तम् । विमानचर्यागृहगोपुरस्थैः पुष्पाग्र्यवर्षैरभिपूज्यमानः ८३ लाजगन्धोदवर्षैस्तु सेव्यमानः शनैः शनैः । राजवीथ्यास्तु शीतत्वात्संज्ञां प्राप महाबलः ८४ ततः स संज्ञामुपलभ्य कृच्छ्राद्बलीयसस्तस्य भुजान्तरस्थः । अवेक्षमाणः पुरराजमार्गं विचिन्तयामास मुहुर्महात्मा ८५ एवं गृहीतेन कथं नु नाम शक्यं मया संप्रतिकर्तुमद्य । तथा करिष्यामि यथा हरीणां भविष्यतीष्टं च हितं च कार्यम् ८६ ततः कराग्रैः सहसा समेत्य राजा हरीणाममरेन्द्रशत्रोः ।

---

झाला पर्वताचा प्रहार केल्यामळें हा मूर्च्छित झाला आहे व ह्मणूनच आपण कुंभकर्णाच्या तावडींत सांपडलों आहों हें ह्याला ठाऊक नाहीं असें मला वाटतें ७८. एका क्षणानें हा सुग्रीव शुद्धीवर येईल आणि महासंग्रामामध्यें स्वतःला आणि वानरांना जें हितावह असेल तें तो करील ७९ ह्या महात्म्या सुग्रीवाची मीं सुटका केली असतां त्याला अतिशय वाईट वाटेल आणि त्याची कीर्तिही कायमचीच नाहींशी होईल ८०. तस्मात्, क्षणभर वाट पाहून आपोआप मुक्त झालेल्या सुग्रीवाचा पराक्रम अवलोकन करावा असें वाटतें. तोंपर्यंत दाणादाण उडून गेलेल्या ह्या वानरसैन्याला मी धीर देतों " ८१. ह्याप्रमाणें मनामध्यें आणून त्या वायुपुत्र हनुमानानें पुनरपि ती वानरांची महासेना थोपवून धरिली ८२. असो. तदनंतर तडफड करीत असलेल्या त्या महावानराला घेऊन कुंभकर्ण लंकेमध्यें प्रविष्ट झाला असतां विमानें, क्रीडागृहें व गोपुरें ह्यांचे ठिकाणीं असलेले राक्षस उत्कृष्ट पुष्पांचे वर्षाव त्याच्यावर करून त्याची प्रशंसा करूं लागले ८३. ह्याप्रमाणें हळू हळूं राजमार्गामध्यें लाह्या व गंधोदक ह्यांचे वर्षाव महाबलाढ्य सुग्रीवावर होऊं लागले असतां गारव्यामुळें तोहा शुद्धीवर आला ८४ आणि त्या बलाढ्य कुंभकर्णाच्या हाताचे मिठींत सांपडलेला तो महात्मा सुग्रीव मोठ्या कष्टानें शुद्धीवर येऊन लंकेतील राजमार्ग अवलोकन करीत असतां वारंवार मनामध्यें आणूं लागला ८५ " अशारीतीनें ह्याचे तावडींत सांपडल्यावर आज मला प्रतिकार तरी कसा करितां येईल! वानरांचा मनोरथ परिपूर्ण

खरैश्च कर्णौ दशनैश्च नासां ददंश पादैर्विददार पार्श्वौ ८७ स कुम्भकर्णो हृतकर्णनासो विदारितस्तेन रदैर्नखैश्च । रोषाभिभूतः क्षतजार्द्रगात्रः सुग्रीवमाविध्य पिपेष भूमौ ८८ स भूतले भीमबलाभिपिष्टः सुरारिभिस्तैरभिहन्यमानः । जगाम खं कन्दुकवज्जवेन पुनश्च रामेण समाजगाम ८९ कर्णनासाविहीनस्तु कुम्भकर्णो महाबलः । रराज शोणितोत्सिक्तो गिरिः प्रस्रवणैरिव ९० शोणितार्द्रो महाकायो राक्षसो भीमदर्शनः । अमर्षाच्छोणितोद्गारी शुशुभे रावणानुजः ९१ नीलाञ्जनचयप्रख्यः ससंध्य इव तोयदः । युद्धायाभिमुखो भीमो मनश्चक्रे निशाचरः ९२ गते च तस्मिन्सुरराजशत्रुः क्रोधात्प्रदुद्राव रणाय भूयः । अनायुधोऽस्मीति विचिन्त्य रौद्रो घोरं तदा मुद्गरमाससाद ९३ ततः स पुर्याः सहसा महात्मा निष्क्रम्य तद्वानरसैन्यमुग्रम् ।

---

होऊन आपलें कार्यही हितावह होईल असा प्रतिकार मी आतां करितों" ८६. असा विचार केल्यानंतर वानरराज सुग्रीवानें देवराजाचा शत्रु जो कुंभकर्ण त्याचे कान आपल्या तीक्ष्ण नखांनीं फाडून टाकिले; दांतांनीं त्याच्या नासिकेला दंश केला आणि पायांनीं त्याच्या कुशीही फाडून टाकिल्या ८७; ह्याप्रमाणें त्या सुग्रीवानें त्या कुंभकर्णाला दांतांनीं व नखांनीं विदीर्ण करून त्याचे कान व नाक तोडून टाकिल्यामुळें रक्तानें ज्याचें शरीर भरून गेलें आहे असा तो कुंभकर्ण क्रोधानें व्याप्त झाला आणि सुग्रीवाला हातानें तोलून धरून त्यानें भूमीवर आपटलें ८८. तव्हां भयंकर पराक्रमी कुंभकर्णानें भूतलावर आपटलेल्या त्या सुग्रीवाला ते देवशत्रु राक्षसही प्रहार करूं लागले असतां चेंडूप्रमाणें तो वेगानें आकाशामध्यें गेला आणि पुनरपि रामाकडे परत आला ८९. असो. इकडे कर्णहीन व नासिकाहीन झालेल्या त्या महाबलाढ्य कुंभकर्णाच्या अंगावर रक्ताचा सडा झाला असतां जलप्रवाहानें शोभणाऱ्या पर्वताप्रमाणें तो शोभूं लागला ९०. भयंकर मुद्रेनें युक्त असलेला तो धिप्पाड रावणानुज राक्षस रक्तानें भरून जाऊन रक्ताच्या गुळण्या टाकूं लागला; क्रोधामुळें तो कज्जलपर्वततुल्य राक्षस संध्यासमयानें युक्त असलेल्या मेघाप्रमाणें शोभूं लागला आणि त्या भयंकर राक्षसानें संमुख होऊन युद्ध करण्याचें मनामध्यें आणिलें ९१, ९२. तो सुग्रीव निघून गेल्यावर देवराजशत्रु कुंभकर्ण रागारागानें पुनरपि रणभूमीकडे धांवला आणि "आपण आयुधरहित आहों" असें समजून त्या भयंकर कुंभकर्णानें एक घोर मुद्गर हातामध्यें घेतला ९३. तदनंतर लंकानगरींतून एकाएकीं बाहेर पडल्यावर प्रलयकालचा वृद्धिंगत झालेला अग्नि

भक्ष रक्षो युधि कुम्भकर्णः प्रजा युगान्ताग्निरिव प्रवृद्धः ९४
बुभुक्षितः शोणितमांसगृध्नुः प्रविश्य तद्वानरसैन्यमुग्रम् । चखाद रक्षांसि
हरीन्पिशाचानृक्षांश्च मोहाद्युधि कुम्भकर्णः ९५ यथैव मृत्युर्हरते युगान्ते
स भक्षयामास हरींश्च मुख्यान् ९६ एकं द्वौ त्रीन्बहून्क्रुद्धो वानरान्सह
राक्षसैः । समादायैकहस्तेन प्रचिक्षेप त्वरन्मुखे ९७ संप्रस्रवंस्तदा मेदः
शोणितं च महाबलः । वध्यमानो नगेन्द्राग्रैर्भक्षयामास वानरान् ९८
ते भक्ष्यमाणा हरयो रामं जग्मुस्तदा गतिम् । कुम्भकर्णो भृशं क्रुद्धः
कपीन्खादन्प्रधावति ९९ शतानि सप्त चाष्टौ च विंशत्रिंशत्तथैव च ।
संपरिष्वज्य बाहुभ्यां खादन्विपरिधावति १०० मेदोवसाशोणितदिग्ध-
गात्रः कर्णावसक्तग्रथितान्त्रमालः । ववर्ष शूलानि सुतीक्ष्णदंष्ट्रः कालो
युगान्तस्थ इव प्रवृद्धः १ तस्मिन्काले सुमित्रायाः पुत्रः परबलार्दनः ।
चकार लक्ष्मणः क्रुद्धो युद्धं परपुरंजयः २ स कुम्भकर्णस्य शराञ्शरीरे

ज्याप्रमाणे प्रजा भक्षण करिता त्याप्रमाणें तो कुंभकर्ण रणभूमीमध्यें तें उग्र वानरसैन्य भक्षण करूं लागला ९४; रक्त व मांस ह्यांचा अभिलाष धरणारा तो बुभुक्षित कुंभकर्ण त्या उग्र वानरसैन्यामध्यें प्रविष्ट झाला; मोहामुळें राक्षस, वानर, पिशाच व ऋक्ष ह्या सर्वांनाच तो गट्ट करूं लागला ९५ आणि ज्याप्रमाणें प्रलयकालीं मृत्यु प्रजा हरण करितो त्याप्रमाणे मुख्य मुख्य वानरांना तो भक्षण करूं लागला ९६. असा तो क्रुद्ध कुंभकर्ण राक्षसांसहवर्तमान एका हातानें एक एक, दोन दोन, तीन तीन व ह्याहीपेक्षां अधिक वानर त्वरेत्वरेनें आपल्या मुखांत टाकूं लागला असतां ९७ रक्त व मेद ह्यांचा त्याच्या मुखांतून स्राव होऊं लागला आणि मोठ्या मोठ्या वृक्षाग्रांचे तडाके त्याला बसत असतांनाही तो वानरांना भक्षण करीतच सुटला ९८. तेव्हां कुंभकर्णाच्या भक्षस्थानीं पडूं लागलेले ते वानर रामाला शरण गेले आणि ह्मणाले " अतिशय क्रुद्ध झालेला कुंभकर्ण वानरांना खात खात धांवत आहे ९९. सात सात, आठ आठ, वीस वीस, तीस तीस व शेंकडों वानर हातांनीं आंवळून धरून तो भक्षण करीत करीत इकडे तिकडे धांवत आहे १००. मेद, वसा व रक्त ह्यांच्या योगानें त्याचें शरीर बरबटून गेलें आहे; त्याच्या ( तुटलेल्या ) कानांवर परस्पर संलग्न झालेल्या आंतड्यांच्या माळा लोंबत आहेत आणि अतिशय तीक्ष्ण दंष्ट्रांनीं युक्त असलेला तो कुंभकर्ण युगांतसमयीं प्रचंड रूप धारण केलेल्या कालाप्रमाणें शूलांची वृष्टि करीत आहे " १. हें ऐकून घेतल्यावर शत्रुसैन्याचा विध्वंस करणारा आणि शत्रुसमुदायाला जिंकणारा सुमित्रापुत्र लक्ष्मण क्रुद्ध होऊन युद्ध करूं लागला २. कुंभकर्णाच्या शरी-

सप्त वीर्यवान्। निचखानाद्ददे चान्यान्विससर्ज च लक्ष्मणः ३ पीड्यमानस्तदस्त्रं तु विशेषं तस्य राक्षसः। ततश्चुकोप बलवान्सुमित्रानन्दवर्धनः ४ अथास्य कवचं शुभ्रं जाम्बूनदमयं शुभम्। प्रच्छादयामास शरैः संध्याभ्रमिव मारुतः ५ नीलाञ्जनचयप्रख्यः शरैः काञ्चनभूषणैः। आपीड्यमानः शुशुभे मेघैः सूर्य इवांशुमान् ६ ततः स राक्षसो भीमः सुमित्रानन्दवर्धनम्। सावज्ञमेव प्रोवाच वाक्यं मेघौघनिःस्वनः ७ अन्तकस्यापि कष्टेन युधि जेतारमाहवे। युध्यता मामभीतेन ख्यापिता वीरता त्वया ८ प्रगृहीतायुधस्येह मृत्योरिव महामृधे। तिष्ठन्नप्यग्रतः पूज्यः किमु युद्धप्रदायकः ९ ऐरावतं समारूढो वृतः सर्वामरैः प्रभुः। नैव शक्रोऽपि समरे स्थितपूर्वः कदाचन १० अद्य त्वयाहं सौमित्रे बालेनापि पराक्रमैः। तोषितो गन्तुमिच्छामि त्वामनुज्ञाप्य राघवम् ११ यत्तु वीर्यबलोत्साहैस्तोषितोऽहं रणे त्वया। राममेवैकमिच्छामि हन्तुं यस्मिन्हते हतम् १२

---

रावर वीर्यवान् लक्ष्मणानें प्रथमतः सात बाण टाकिले आणि दुसरेही बाण घेऊन त्यानें त्याच्यावर सोडिले ३. ह्याप्रमाणें लक्ष्मणाच्या बाणांनीं कुंभकर्णाला पीडा होऊं लागली असतां त्या राक्षसानें लक्ष्मणाचें तें बाणास्त्र अगदीं निःशेष नाहींसें केलें व तें पाहून सुमित्रापुत्र बलाढ्य लक्ष्मण क्रुद्ध झाला ४. नंतर संध्याकाळच्या मेघाला घरून टाकणाऱ्या वायूप्रमाणें त्यानें निर्मल, शुभ व सुवर्णमय कवच लक्ष्मणानें बाणांनीं व्याप्त करून टाकिलें असतां ५ सुवर्णभूषणांनीं युक्त असलेल्या बाणांच्या योगानें पीडित होऊं लागलेला तो कज्जलपर्वततुल्य कुंभकर्ण मेघांच्या योगानें शोभणाऱ्या किरणयुक्त सूर्याप्रमाणें शोभू लागला ६. तदनंतर मेघपटलाप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे असा तो भयंकर राक्षस कुंभकर्ण सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या लक्ष्मणाला अवज्ञापूर्वक ह्मणाला ७ " रणभूमीमध्यें संग्राम सुरू झाला असतां मृत्यूलाही अनायासानें जिंकणाऱ्या माझ्याशीं निर्भयपणानें युद्ध करून तूं आपलें वीरत्व आज प्रकट केलें आहेस ८. अरे, मृत्यूप्रमाणें हातामध्यें आयुध घेऊन संग्रामामध्यें आलेल्या माझ्यासमोर नुसता उभा राहणाराही प्रशंसेस पात्र आहे; मग माझ्याशीं युद्ध करण्याची तर गोष्ट कशाला पाहिजे ? ९ ऐरावतावर आरूढ होऊन सर्व देवांनीं परिवेष्टित असलेला इंद्रही समरांगणामध्यें पूर्वीं कधीं माझ्यासमोर उभा राहिला नाहीं १०; परंतु, हे सुमित्रापुत्रा, तूं बाल असूनही पराक्रमांच्या योगानें आज मला संतुष्ट केलें आहेस. ह्यास्तव, तुला अनुज्ञा देऊन रामाकडे जाण्याची माझी इच्छा आहे ११. ज्याअर्थीं वीर्य, बल व उत्साह ह्यांच्या योगानें तूं मला संग्रामामध्यें संतुष्ट केलें आहेस त्याअर्थीं ( तुला सोडून देऊन ) एका रामाचाच वध

रामे मयात्र निहते येऽन्ये स्थास्यन्ति संयुगे । तानहं योधयिष्यामि स्वब-
लेन प्रमाथिना १३ इत्युक्तवाक्यं तद्रक्षः प्रोवाच स्तुतिसंहितम् । मृधे
घोरतरं वाक्यं सौमित्रिः प्रहसन्निव १४ यस्त्वं शक्रादिभिर्देवैरसह्यः प्राप्य
पौरुषम् । तत्सत्यं नान्यथा वीर दृष्टस्तेद्य पराक्रमः १५ एष दाशरथी
रामस्तिष्ठत्यद्रिरिवाचलः । इति श्रुत्वा ह्यनादृत्य लक्ष्मणं स निशाचरः १६
अतिक्रम्य च सौमित्रिं कुम्भकर्णो महाबलः । राममेवाभिदुद्राव कम्प-
यन्निव मेदिनीम् १७ अथ दाशरथी रामो रौद्रमस्त्रं प्रयोजयन् । कुम्भ-
कर्णस्य हृदये ससर्ज निशिताञ्शरान् १८ तस्य रामेण विद्धस्य सहसा-
भिप्रधावतः । अङ्गारमिश्राः क्रुद्धस्य मुखान्निश्चेरुरर्चिषः १९ रामास्त्र-
विद्धो घोरं वै नर्दन्राक्षसपुङ्गवः । अभ्यधावत तं क्रुद्धो हरीन्विद्रावय-
न्रणे १२० तस्योरसि निमग्नास्ते शरा बर्हिणवाससः । हस्ताच्चास्य परि-
भ्रष्टा गदा चोर्व्यां पपात ह २१ आयुधानि च सर्वाणि विप्रकीर्यन्त
भूतले । स निरायुधमात्मानं यदा मेने महाबलः २२ मुष्टिभ्यां च कराभ्यां

करण्याची माझी इच्छा आहे व त्याचा वध झाला असतां ह्या सर्व वानरसैन्याचा वध झाल्यासारिखेंच होणार आहे १२. रामाचा ह्या ठिकाणीं मीं वध केल्यावरही जे कोणी समरांगणामध्यें उभे रहातील त्यांच्याशींही मी आपल्या प्रचंड बलानें युद्ध करीन " १३. ह्याप्रमाणें आत्मप्रशंसा करणारा तो कुंभकर्ण राक्षस संग्रामामध्यें बोलल्यानंतर सुमित्रापुत्र हंसत हंसत फारच क्रूर शब्दांनीं त्याला म्हणाला १४: " बलाढ्य असल्यामुळें इंद्रादि देवांनाही तूं असह्य आहेस हें खरें आहे; तें खोटें नाहीं. कारण, हे वीरा, आज तुझा पराक्रम दृष्टीं पडला आहे १५; परंतु, हा दाशरथी राम पर्वताप्रमाणें निश्चल उभा आहे ". हें लक्ष्मणाचें भाषण श्रवण केल्यावरही त्याची पर्वा न करितां तो महाबलाढ्य कुंभकर्ण राक्षस त्याला सोडून देऊन पृथ्वी कंपित करीत करीत रामावर धांवला १६, १७. तेव्हां रौद्रास्त्राचा प्रयोग करणाऱ्या दाशरथी रामानें कुंभकर्णाच्या वक्षःस्थलीं तीक्ष्ण बाण सोडिले १८. नंतर ह्याप्रमाणें रामानें विद्ध केलेला तो कुंभकर्ण क्रुद्ध होऊन एकाएकीं धांवूं लागला असतां त्याच्या मुखांतून ज्वाला बाहेर पडूं लागल्या १९. रामाच्या अस्त्रानें विद्ध झालेला तो राक्षसश्रेष्ठ कुंभकर्ण क्रुद्ध होऊन घोर गर्जना करूं लागला आणि समरामामध्यें वानरांना पळवीत पळवीत धांवूं लागला १२०. परंतु, मयूरपिच्छांनीं युक्त असलेले ते रामाचे बाण त्याच्या वक्षःस्थलावर बसले असतां त्याच्या हातांतील गदा भ्रष्ट होऊन भूमीवर पडली २१ आणि इतरही सर्व आयुधें भूतलावर अस्ताव्यस्त

श्चकार कदनं महत् । स बाणैरतिविद्धाङ्गः क्षतजेन समुक्षितः २३ रुधिरं परिसुस्राव गिरिः प्रस्रवणं यथा । स तीव्रेण च कोपेन रुधिरेण च मूर्च्छितः २४ वानरान्राक्षसानृक्षान्खादन्स परिधावति । अथ शृङ्गं समाविध्य भीमं भीमपराक्रमः २५ चिक्षेप राममुद्दिश्य बलवानन्तकोपमः । अप्राप्तमन्तरा रामः सप्तभिस्तमजिह्मगैः २६ ततस्तु रामो धर्मात्मा तस्य शृङ्गं महत्तदा । शरैः काञ्चनचित्राङ्गैश्चिच्छेद भरताग्रजः २७ तन्मेरुशिखराकारैर्द्योतमानमिव श्रिया । द्वे शते वानराणां च पतमानमपातयत् २८ तस्मिन्काले स धर्मात्मा लक्ष्मणो राममब्रवीत् । कुम्भकर्णवधे युक्तो योगान्परिमृशन्बहून् २९ नैवायं वानरान्राजन्न विजानाति राक्षसान् । मत्तः शोणितगन्धेन स्वान्परांश्चैव खादति ३० साध्वेनमधिरोहन्तु सर्वतो वानरर्षभाः । यूथपाश्च यथा मुख्यास्तिष्ठन्त्वस्मिन्समन्ततः ३१ अथायं दुर्मतिः काले गुरुभारप्रपीडितः । प्रचरन्राक्षसो

पडली. तदनतर आपण आयुधरहित झालों आहों असे जेव्हा त्या महाबलाढ्य कुंभकर्णाला वाटलें २२ तव्हा मुठींनी व हातांनीं त्यानें वानरसैन्याचा फारच विध्वंस केला. बाणांनी त्याच्या शरीराला अतिशय वध झाल्यामुळें त्याच्या शरीरावर रक्ताचा सडा झाला २३; आणि पर्वतापासून ज्याप्रमाण जलप्रवाह वाहूं लागतो त्याप्रमाणें त्याच्यापासून रक्ताचा प्रवाह सुरू झाला. तदनतर रक्तानें व कोपानें भान नाहीसें होऊन २४ तो कुंभकर्ण वानर, राक्षस व अस्वलें ह्या सर्वांनाच भक्षण करीत करीत धावूं लागला. नंतर त्या भयंकर पराक्रमी व मृत्यप्रमाणें बलाढ्य असलेल्या कुंभकर्णानें एक प्रचंड पर्वतशिखर अजमावून पाहिलें आणि रामाला उद्देशून त्याच्याकडे फेंकिलें. तथापि, आपल्या समीप येण्यापूर्वीं सात बाणांच्या योगानें मध्यतरींच रामानें तें तोडून टाकिलें २५ २६. साराश, धर्मात्म्या भरताग्रज रामानें तें प्रचंड शिखर सुवर्णाच्या योगानें मनोहर रीतीनें शृंगारिलेल्या बाणानीं तोडून टाकिलें असतां २७ मेरुपर्वतावरील शिखरासारिख्या वृक्षानी युक्त व कांतीनें झळकत असलेल्या त्या शिखरानें पडतां पडतां दोनशें वानर जमीनदोस्त केले २८ त्यावेळीं कुंभकर्णाच्या वधाविषयीं उद्युक्त होऊन अनेक उपायांचा विचार करीत असलेला तो धर्मात्मा लक्ष्मण रामाला म्हणाला २९ " हे राजा, हा कुंभकर्ण वानर कोणते व राक्षस कोणते हें आतां ओळखीत नाहीं. रक्ताच्या गंधानें मत्त झालेला हा राक्षस स्वकीयांना व परकीयांनाही खात सुटला आहे ३०. यास्तव, वानरश्रेष्ठांनीं सर्व बाजूनीं ह्यावर आरोहण करावें आणि मुख्य मुख्य सेनाधिपतींनीं ह्याच्या शरीरावर सभोंवतीं उभें

भूमौ वानरान्हन्यात्सुबहून्मानं ३२ तस्य तद्वचनं श्रुत्वा राजपुत्रस्य धीमतः ।
ते समारुरुहुर्हृष्टाः कुम्भकर्णं महाबलाः ३३ कुम्भकर्णस्तु संक्रुद्धः समारूढः प्लवङ्गमैः । व्यधूनयत्तान्वेगेन दुष्टहस्तीव हस्तिपान् । ३४ तान्दृष्ट्वा निर्धुतान्रामो रुष्टोऽयमिति राक्षसम् । समुत्पपात वेगेन धनुरुत्तममाददे ३५ क्रोधसंरक्तनयनो धीरो निर्दहन्निव चक्षुषा । राघवो राक्षसं वेगादभिदुद्राव वीर्यवान् । यूथपान्हर्षयन्सर्वान्कुम्भकर्णबलार्दितान् ३६ स चापमादाय भुजङ्गकल्पं दृढज्यमुग्रं तपनीयचित्रम् । हरीन्समाश्वास्य समुत्पपात रामो निबद्धोत्तमतूणबाणः ३७ स वानरगणैस्तैस्तु वृतः परमदुर्जयैः । लक्ष्मणानुचरो वीरः संप्रतस्थे महाबलः ३८ स ददर्श महात्मानं किरीटिनमरिन्दमम् । शोणिताबृतरक्ताक्षं कुम्भकर्णं महाबलम् ३९ सर्वान्समभिधावन्तं यथारुष्टं दिग्गजम् । मार्गमाणं हरीन्क्रुद्धं राक्षसैः परिवारितम् ४० विन्ध्यमन्दरसंकाशं काञ्चनाङ्गदभूषणम् । स्रवन्तं रुधिरं वक्त्रा-

---

रहावें ३१; म्हणजे आज ह्यावेळीं मोठ्या भारानें पीडित झालेला हा दुर्मति राक्षस भूमीमध्यें संचार करितां करितां ह्यापेक्षां जास्त वानरांचा वध करणार नाहीं " ३२. विचारी राजपुत्र लक्ष्मणाचें तें भाषण श्रवण केल्यावर ते महाबलाढ्य वानर आनंदित होऊन कुंभकर्णावर आरूढ झाले ३३ व वानर आरूढ झाल्यामुळें कुंभकर्ण अतिशय क्रुद्ध झाला आणि दुष्ट हत्ती ज्याप्रमाणें माहुतांना उडवून देतो त्याप्रमाणें वेगानें अंग हालवून त्यानें त्या वानरांना उडवून दिलें ३४. तऱ्हां उडवून दिलेल्या त्या वानरांना अवलोकन केल्यावर हा राक्षस क्रुद्ध झाला आहे असें समजून रामानें वेगानें उड्डाण केलें; श्रेष्ठ धनुष्य हातामध्यें घतलें ३५ आणि क्रोधानें आरक्तदृष्टि झालेला तो धैर्यवान् राम दृष्टीनें त्या राक्षसाला दग्ध करीतच कीं काय त्वरा करून वेगावेगानें त्याच्यावर धांवला आणि कुंभकर्णाच्या सामर्थ्यानें पीडित झालेल्या आपल्या सर्वेही सेनाधिपतींना तो आनंदित करूं लागला ३६. सारांश, सुवर्णानें शृंगारिलेलें व दृढ प्रत्यंचेनें युक्त असलेलें भुजंगतुल्य उग्र चाप हातामध्यें घेऊन व वानरांना धीर देऊन उत्कृष्ट भाते व बाण लटकाविलेल्या त्या रामानें उड्डाण केलें ३७ आणि अत्यंत अजिंक्य अशा त्या वानरगणांनीं परिवेष्टित झालेला तो महाबलाढ्य वीर राम शत्रूवर चालला असतां लक्ष्मणही त्याच्या मागोमाग निघाला ३८. पुढें गेल्यानंतर किरीट धारण केलेला महात्मा शत्रुदमन कुंभकर्ण त्याच्या दृष्टीं पडला. त्या महाबलाढ्य कुंभकर्णाचे आरक्तवर्ण नेत्र रक्तानें व्याप्त झाले होते ३९; क्रुद्ध झालेल्या दिग्गजाप्रमाणें तो सर्वांवरच धांवून जात होता; राक्षसांनीं परिवेष्टित झालेला होता; क्रुद्ध होऊन तो वानरांना

रूपं मेघमिवोत्थितम् ४१ जिह्वया परिलिह्यन्तं सृक्किणी शोणितोक्षिते । मृद्नन्तं वानरानीकं कालान्तकयमोपमम् ४२ तं दृष्ट्वा राक्षसश्रेष्ठं प्रदीप्तानलवर्चसम् । विस्फारयामास तदा कार्मुकं पुरुषर्षभः ४३ स तस्य चापनिर्घोषात्कुपितो राक्षसर्षभः । अमृष्यमाणस्तं घोषमभिदुद्राव राघवम् ४४ ततस्तु धारोद्धतमेघकल्पं भुजङ्गराजोत्तमभोगबाहुः । तमापतन्तं धरणीधराभमुवाच रामो युधि कुम्भकर्णम् ४५ आगच्छ रक्षोधिप मा विषादमवस्थितोहं प्रगृहीतचापः । अवेहि मां राक्षसवंशनाशनं यस्त्वं मुहूर्ताद्भविता विचेताः ४६ रामोयमिति विज्ञाय जहास विकृतस्वनम् । अभ्यधावत संक्रुद्धो हरीन्विद्रावयन्रणे ४७ दारयन्निव सर्वेषां हृदयानि वनौकसाम् । प्रहस्य विकृतं भीमं समेघस्तनितोपमम् ४८ कुम्भकर्णो महातेजा राघवं वाक्यमब्रवीत् । नाहं विराधो विज्ञेयो न कबन्धः खरो न च ४९ न वाली न च मारीचः कुम्भकर्णः समागतः १५० पश्य मे मुद्गरं भीमं सर्वं

---

शोधीत होता १४०; विंध्य व मंदर ह्या पर्वतांप्रमाणें त्याचा आकार होता; सुवर्णाचीं बाहुभूषणें त्यानें घातलीं होतीं; आकाशामध्यें उद्भवलेला मेघ ज्याप्रमाणें पर्जन्यवृष्टि करितो त्याप्रमाणें आपल्या मुखांतून तो रक्तस्राव करीत होता ४१; रक्तांनीं भरलेले ओष्ठप्रांत तो जिभेनें चाटीत होता आणि काल, अंतक व यम ह्यांप्रमाणें असलेला तो कुंभकर्ण वानरसैन्याचा नाश करीत होता ४२. असो. प्रदीप्त अग्निप्रमाणें ज्याचें तेज आहे अशा त्या राक्षसश्रेष्ठ कुंभकर्णाला अवलोकन करून पुरुषश्रेष्ठ रामानें धनुष्याचा टणत्कार केला असतां ४३ त्याच्या चापध्वनीमुळें तो राक्षसश्रेष्ठ क्रुद्ध झाला आणि तो ध्वनि सहन न झाल्यामुळें तो रामावर धांवला ४४. तदनंतर जलधारांनीं भरलेल्या मेघाप्रमाणें कृष्णवर्ण असून आकृतीनें पर्वताप्रमाणें असलेला तो कुंभकर्ण अंगावर चालून येऊं लागला असतां नागराजाच्या उत्कृष्ट शरीराप्रमाणें ज्याचे बाहु आहेत असा तो राम त्याला ह्मणाला ४५ " हे राक्षसाधिपते, खिन्न होऊं नको; धनुष्य घेऊन मी उभा राहिलों आहें. राक्षसवंशाचा नाश करणारा मी आहें असें तूं मला समज. आतां एका मुहूर्तामध्येंच तूं मृत्यु पावशील " ४६. तेव्हां हा राम आहे असें समजून त्या क्रुद्ध झालेल्या कुंभकर्णानें विकृतस्वरानें गर्जना केली आणि वानरांना पळवीत पळवीत तो रणभूमीमध्यें धांवूं लागला ४७. तेव्हां सर्वही वानरांचीं हृदयें विदीर्ण होऊं लागलीं. तदनंतर मेघगर्जनेप्रमाणें भयंकर व विकृत हास्य करून ४८ तो महातेजस्वी कुंभकर्ण रामाला ह्मणाला " मी विराध, कबंध, खर ४९, वाली अथवा मारीच नसून कुंभकर्ण आलों आहें हें तूं लक्षांत

कालायसं महत्। अनेन निर्जिता देवा दानवाश्च पुरा मया ५१ विकर्णनास इति मां नावज्ञातुं त्वमर्हसि। स्वल्पापि हि न मे पीडा कर्णनासाविनाशनात् ५२ दर्शयेक्ष्वाकुशार्दूल वीर्यं गात्रेषु मेनघ। ततस्त्वां भक्षयिष्यामि दृष्टपौरुषविक्रमम् ५३ स कुम्भकर्णस्य वचो निशम्य रामः सपुङ्खान्विससर्ज बाणान्। तैराहतो वज्रसमप्रवेगैर्न चुक्षुभे न व्यथते सुरारिः ५४ यैः सायकैः सालवरा निकृत्ता वाली हतो वानरपुङ्गवश्च। ते कुम्भकर्णस्य तदा शरीरं वज्रोपमानं व्यथयांप्रचक्रुः ५५ स वारिधारा इव सायकांस्तान्पिबञ्शरीरेण महेन्द्रशत्रुः। जघान रामस्य शरप्रवेगं व्याविध्य तं मुद्गरमुग्रवेगम् ५६ ततस्तु रक्षः क्षतजावलिप्तं वित्रासनं देवमहाचमूनाम्। व्याविध्य तं मुद्गरमुग्रवेगं विद्रावयामास चमूं हरीणाम् ५७ वायव्यमादाय ततोपरास्त्रं रामः प्रचिक्षेप निशाचराय। समुद्गरं तेन जहार बाहुं स कृत्तबाहुस्तुमुलं ननाद ५८ स तस्य बाहुर्गिरिशृङ्गकल्पः समुद्गरो राघवबाणकृत्तः। पपात तस्मिन्हरिराजसैन्ये जघान

---

ठेव १५०. हा माझा मोठा भयंकर लोखंडी मुद्गर तूं पहा; ह्याच्या योगानें मीं पूर्वी देवांचा व दानवांचा पराजय केला आहे ५१. मी कर्णनासिकारहित आहें ह्मणून माझी अवज्ञा करणें तुला योग्य नाहीं. कारण, कर्णांचा व नासिकेचा नाश झाल्यामुळें मला यत्किंचितूही पीडा झालेली नाहीं ५२. हे इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठा, बिचाऱ्या रामा, तूं आपलें वीर्य माझ्या शरीराचे ठिकाणीं दाखीव ह्मणजे तुझें वीर्य व पराक्रम अवलोकन केल्यानंतर मी तुला भक्षण करीन" ५३. कुंभकर्णाचें हें भाषण श्रवण करून रामानें पिच्छयुक्त बाण त्याच्यावर सोडिले; परंतु, त्या वज्रासारिख्या वेगवान् बाणांचा प्रहार झाला असतांही त्या देवशत्रु कुंभकर्णाला पीडाही झाली नाहीं व तो क्षुब्धही झाला नाहीं ५४. ज्या बाणांनीं प्रचंड सालवृक्ष तुटून पडले व वानरश्रेष्ठ वालीचा वध झाला ते बाण कुंभकर्णाच्या वज्रतुल्य शरीराला व्यथाही करण्यास समर्थ झाले नाहींत ५५ जलधारा सहन करणाऱ्या पर्वताप्रमाणें शरीराच्या योगानें बाण सहन करणाऱ्या त्या महेंद्रशत्रु कुंभकर्णानें आपला महावेगवान् मुद्गर गरगर फिरवून रामाच्या बाणांचा वेग हाणून पाडिला ५६. नंतर रक्तानें भरलेला व देवांच्या मोठमोठ्या सेनांनाही भीति उत्पन्न करणारा तो महावेगवान् मुद्गर फिरवून त्या राक्षसानें वानरांची सेना पळवून लाविली ५७. तेव्हां दुसरें वायव्यास्त्र रामानें त्या राक्षसावर सोडिलें मुद्गरासहवर्तमान त्याचा हात तोडून टाकिला असतां हात तुटल्यामुळें तो व त्याच्या योगानें कुंभकर्ण तुमल गर्जना करूं लागला ५८. ह्याप्रमाणें रामाच्या बाणानें

तां वानरवाहिनीं च ५९ ते वानरा भग्नहतावशेषाः पर्यन्तमाश्रित्य तदा विषण्णाः । प्रपीडिताङ्गा ददृशुः सुघोरं नरेन्द्ररक्षोधिपसंनिपातम् ६० स कुम्भकर्णोऽस्त्रनिकृत्तबाहुर्महानिकृत्ताग्र इवाचलेन्द्रः । उत्पाटयामास करेण वृक्षं ततोऽभिदुद्राव रणे नरेन्द्रम् ६१ तं तस्य बाहुं सहतालवृक्षं समुद्यतं पन्नगभोगकल्पम् । ऐन्द्रास्त्रयुक्तेन जघान रामो बाणेन जाम्बूनदचित्रितेन ६२ स कुम्भकर्णस्य भुजो निकृत्तः पपात भूमौ गिरिसंनिकाशः । विचेष्टमानो निजघान वृक्षाञ्शैलाञ्शिलावानरराक्षसांश्च ६३ तं छिन्नबाहुं समवेक्ष्य रामः समापतन्तं सहसा नदन्तम् । द्वावर्धचन्द्रौ निशितौ प्रगृह्य चिच्छेद पादौ युधि राक्षसस्य ६४ तौ तस्य पादौ प्रदिशो दिशश्च गिरेर्गुहाश्चैव महार्णवं च । लङ्कां च सेनां कपिराक्षसानां विनादयन्तौ विनिपेततुश्च ६५ निकृत्तबाहुर्विनिकृत्तपादो विदार्य वक्त्रं बडवामुखाभम् । दुद्राव रामं सहसाभिगर्जन्राहुर्यथा चन्द्रमिवान्तरिक्षे ६६

मुद्गरासहवर्तमान कुंभकर्णाचा तो पर्वतशिखरतुल्य हात तुटला असतां वानरराज सुग्रीवाच्या सैन्यामध्यें तो हात पडला व त्यानें ती (खालीं सांपडलेली) वानरसेना मारून टाकिली ५९. असें झालें असतां छिन्नभिन्न झालेले व वध पावलेले ह्यांशिवाय जे वानर तेथें अवशिष्ट होते ते ज्या ठिकाणीं तो हात पडला होता त्याच्या समीप येऊन खेद करीत उभे राहिले आणि ज्यांचीं शरीरें जर्जर झालेलीं आहेत असे ते वानर मानवराज राम आणि राक्षसाधिपति कुंभकर्ण ह्यांमध्यें होत असलेलें अत्यंत घोर युद्ध पाहूं लागले ६०. महाखड्गाच्या योगानें शिखर तुटून गेलेला पर्वतराजच कीं काय असा तो अस्त्राच्या योगानें हात तुटून गेलेला कुंभकर्ण एका हातानें वृक्ष उपटून घेऊन संग्रामामध्यें मानवराज रामावर धांवला असतां ६१ भुजंगाच्या शरीराप्रमाणें गरगरीत असलेला तो त्याचा तालवृक्षासहवर्तमान उगारिलेला हात ऐंद्रास्त्रानें अभिमंत्रण केलेल्या व सुवर्णानें शृंगारिलेल्या बाणाच्या योगानें रामानें तोडून टाकिला ६२. कुंभकर्णाचा तो पर्वतप्राय हात तुटला असतां भूमीवर पडला आणि भूमीवर पडल्यानंतरही तो हात तडफड करूं लागल्यामुळें वृक्ष, पर्वत, पाषाण, वानर आणि राक्षस ह्यांचा चुराडा होऊं लागला ६३. तदनंतर हात तुटलेला तो कुंभकर्ण एकाएकीं गर्जना करीत आपल्यावर चाल करून येत आहे असें पाहून रामानें दोन तीक्ष्ण अर्धचंद्र बाण घेतले आणि युद्धामध्यें त्या राक्षसाचे पाय तोडून टाकिले ६४. तेव्हां ते त्याचे पाय दिशा, उपदिशा पर्वताच्या गुहा, महासागर, लंकानगरी आणि वानरांची व राक्षसांची सेना नादित करीत करीत भूमीवर पडले ६५; परंतु, ह्याप्रमाणें हातपाय तुटून गेले असतांही वडवानलाप्रमाणें

अपूरयत्तस्य मुखं शिताग्रै रामः शरैर्हेमपिनद्धपुङ्खैः। संपूर्णवक्त्रो न शशाक वक्तुं चुकूज कृच्छ्रेण मुमूर्च्छ चापि ६७ अथाददे सूर्यमरीचिकल्पं ब्रह्मदण्डान्तककालकल्पम् । अरिष्टमैन्द्रं निशितं सुपुङ्खं रामः शरं मारुततुल्यवेगम् ६८ तं वज्रजाम्बूनदचारुपुङ्खं प्रदीप्तसूर्यज्वलनप्रकाशम् । महेन्द्रवज्राशनितुल्यवेगं रामः प्रचिक्षेप निशाचराय ६९ स सायको राघवबाहुचोदितो दिशः स्वभासा दश संप्रकाशयन् । विधूमवैश्वानरभीमदर्शनो जगाम शक्राशनिभीमविक्रमम् १७० स तन्महापर्वतकूटसंनिभं सुवृत्तदंष्ट्रं चलचारुकुण्डलम् । चकर्त रक्षाधिपतेः शिरस्तदा यथैव वृत्रस्य पुरा पुरन्दरः ७१ कुम्भकर्णशिरो भाति कुण्डलालंकृतं महत् । आदित्येऽभ्युदिते रात्रौ मध्यस्थ इव चन्द्रमाः ७२ तद्रामबाणाभिहतं पपात रक्षःशिरः पर्वतसंनिकाशम् । बभञ्ज चर्यागृहगोपुराणि प्राकारमुच्चं

---

आपलें प्रचंड मुख पसरून अंतरिक्षामध्यें चंद्रावर धांवणारा राहुच कीं काय असा तो कुंभकर्ण गर्जना करीत करीत एकाएकीं रामावर धांवला ६६. परंतु, सुवर्णजडित पिच्छयुक्त तीक्ष्ण बाणांच्या योगानें रामानें त्याचें मुख भरून टाकिलें असतां मुख भरून गेलेला तो कुंभकर्ण भाषण करण्यास समर्थ न होतां मोठ्या कष्टानें किंकाळ्या फोडून मूर्च्छित झाला ६७. तों इतक्यांत सूर्यकिरणासारिखा तेजस्वी, ब्रह्मदंड, अंतक व काल ह्यांप्रमाणें भयंकर, शत्रूंना अशुभप्रद आणि वायूसारिख्या वेगानें युक्त असा एक ऐंद्र तीक्ष्ण बाण रामानें हातामध्यें घेतला ६८; आणि हिरे व सुवर्ण ह्यांमुळें ज्याचा पिच्छयुक्त भाग शृंगारिलेला आहे; देदीप्यमान सूर्याप्रमाणें व प्रदीप्त अग्नीप्रमाणें ज्याचें तेज आहे आणि महेंद्राच्या वज्राप्रमाणें व अशनिसंज्ञक अस्त्राप्रमाणें ज्याचा वेग आहे असा तो बाण रामानें त्या राक्षसावर फेंकिला. रामाच्या हातांतून सुटलेला व दिशण्यांतही धूमरहित अग्नीप्रमाणें भयंकर असलेला तो बाण स्वतःच्या तेजानें दशदिशा प्रदीप्त करीत करीत इंद्राच्या अशनिअस्त्राप्रमाणें ज्याचा पराक्रम भयंकर आहे अशा त्या कुंभकर्णाकडे गेला ७०; इतकेंच नव्हे परंतु, इंद्रानें ज्याप्रमाणें पूर्वी वृत्राचें मस्तक तोडून टाकिलें त्याचप्रमाणें, अत्यंत वर्तुलाकार दंष्ट्रा व लटलट हालत असलेलीं मनोहर कुंडलें ह्यांनीं युक्त असलेल्या त्या राक्षसाधिपतीचें महापर्वतशिखरतुल्य मस्तक रामानें तोडिलें ७१. तेव्हां, रात्र संपून सूर्योदय झाला असतां आकाशामध्यें असलेला चंद्रमा ज्याप्रमाणें तेजोरहित दिसूं लागतो त्याप्रमाणें कुंडलांनीं अलंकृत केलेलें त्या कुंभकर्णाचें प्रचंड मस्तक निस्तेज दिसूं लागलें ७२. रामबाणाचा प्रहार ज्यावर झाला आहे असें त्या राक्षसाचें पर्वततुल्य मस्तक भूमीवर

तमपातयच्च ७३ तच्चातिकायं हि महत्प्रकाशं रक्षस्तदा तोयनिधौ पपात । ग्राहान्परान्मीनवरान्भुजङ्गमान्ममर्द भूमिं च तथा विवेश ७४ तस्मिन्हते ब्राह्मणदेवशत्रौ महाबले संयति कुम्भकर्णे । चचाल भूर्भूमिधराश्च सर्वे हर्षाच्च देवास्तुमुलं प्रणेदुः ७५ ततस्तु देवर्षिमहर्षिपन्नगाः सुराश्च भूतानि सुपर्णगुह्यकाः । सयक्षगन्धर्वगणा नभोगताः प्रहर्षिता रामपराक्रमेण ७६ ततस्तु ते तस्य वधेन भूरिणा मनस्विनो नैर्ऋतराजबान्धवाः । विनेदुरुच्चैर्व्यथिता रघूत्तमं हरिं समीक्ष्यैव यथा मतङ्गजाः ७७ स देवलोकस्य तमो निहत्य सूर्यो यथा राहुमुखाद्विमुक्तः । तथा व्यभासीद्धरिसैन्यमध्ये निहत्य रामो युधि कुम्भकर्णम् ७८ प्रहर्षमीयुर्बहवश्च वानराः प्रबुद्धपद्मप्रतिमैरिवाननैः । अपूजयन्राघवमिष्टभागिनं हते रिपौ भीमबले नृपात्मजम् ७९ स कुम्भकर्णं सुरसैन्यमर्दनं महत्सु युद्धेषु कदाचनाजितम् । ननन्द हत्वा भरताग्रजो रणे महासुरं वृत्रमिवामराधिपः ।८०[२८९६] इत्यार्षे श्रीमद्रा-

---

पडलें असतां क्रीडागृहें व गोपुरें त्यानें मोडिलीं आणि उंच प्राकारही त्यानें खालीं पाडिला ७३; आणि ह्याप्रमाणें मस्तक तुटून गेल्यानंतर तो धिप्पाड व महातेजस्वी राक्षस समुद्रामध्यें पडला; पडतां पडतां मोठ मोठे नक्र, श्रेष्ठ श्रेष्ठ मत्स्य व भुजंग ह्यांचा त्यानें चुराडा केला आणि तें भूमीमध्येंही प्रविष्ट झालें ७४. असो. ह्याप्रमाणें देवब्राह्मणांचा शत्रु जो महाबलाढ्य कुंभकर्ण त्याचा संग्रामामध्यें वध झाला असतां सर्व पर्वतांसहवर्तमान भूमि कंपित झाली आणि हर्षामुळें देवही अतिशय गर्जना करूं लागले ७५. तदनंतर देवर्षि, महर्षि, भुजंग, देव, भूतें, सुपर्ण, गुह्यक, यक्ष व गंधर्वगण हे सर्वही नभश्चर रामाच्या पराक्रमानें आनंदित झाले ७६. तदनंतर होण्यास अशक्य असलेलाही त्या कुंभकर्णाचा वध झाल्यामुळें सिंहाला अवलोकन केल्याबरोबर ज्याप्रमाणें गज आक्रोश करूं लागतात त्याप्रमाणें राक्षसराजाचे विचारी बांधव रघुवंशजश्रेष्ठ रामाला अवलोकन करितांक्षणीं भयभीत होऊन उच्च स्वरानें गर्जना करूं लागले ७७. तदनंतर राहुमुखापासून मुक्त झालेला सूर्य आकाशांतील अंधकार नाहींसा करून ज्याप्रमाणें झळकूं लागतो त्याप्रमाणें संग्रामामध्यें कुंभकर्णाचा वध करून तो राम वानरसैन्यामध्यें झळकूं लागला ७८. भयंकर बलाढ्य शत्रूचा वध झाला असतां पुष्कळ वानरांना आनंद झाला; प्रफुल्लित कमलाप्रमाणें त्यांचीं मुखें दिसूं लागलीं आणि कृतार्थ झालेल्या त्या राजकुमार रामाची त्यांनीं प्रशंसा केली ७९ व वृत्राचा वध केल्यावर ज्याप्रमाणें देवाधिपति इंद्र आनंदित झाला त्याप्रमाणें देवसैन्याचें मर्दन करणाऱ्या आणि मोठ्या मोठ्या युद्धामध्यें

मायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः ॥ ६७ ॥

कुम्भकर्णं हतं दृष्ट्वा राघवेण महात्मना । राक्षसा राक्षसेन्द्राय रावणाय न्यवेदयन् १ स जन्स कालसंकाशः संयुक्तः कालकर्मणा । विद्राव्य वानरीं सेनां भक्षयित्वा च वानरान् २ प्रतपित्वा मुहूर्तं तु प्रशान्तो रामतेजसा । कायेनार्धप्रविष्टेन समुद्रं भीमदर्शनम् ३ निकृत्तनासाकर्णेन विक्षरद्रुधिरेण च । रुद्ध्वा द्वारं शरीरेण लङ्कायाः पर्वतोपमः ४ कुम्भकर्णस्तव भ्राता काकुत्स्थशरपीडितः । अगण्डभूतो विवृतो दावदग्ध इव द्रुमः ५ श्रुत्वा विनिहतं सङ्ख्ये कुम्भकर्णं महाबलम् । रावणः शोकसंतप्तो मुमोह च पपात च ६ पितृव्यं निहतं श्रुत्वा देवान्तकनरान्तकौ । त्रिशिराश्चातिकायश्च रुरुदुः शोकपीडिताः ७ भ्रातरं निहतं श्रुत्वा रामेणाक्लिष्टकर्मणा । महोदरमहापार्श्वौ शोकाक्रान्तौ बभूवतुः ८ ततः कृच्छ्रात्समासाद्य संज्ञां

---

कधींही पराजय न पावलेल्या महादैत्य कुंभकर्णाचा वध करून तो भरताग्रज राम आनंदित झाला १८०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६७ ॥

महात्म्या रामानें कुंभकर्णाचा वध केल्याचें अवलोकन केल्यावर राक्षसांनीं राक्षसाधिपति रावणाला तें वृत्त निवेदन केलें १. ( ते ह्मणाले ) "हे राजा, तो काळतुल्य कुंभकर्णही मृत्यु पावला. वानरसेना पळवून लावून, वानरांना भक्षण करून २ आणि मुहूर्तभर पराक्रम गाजवून तो कुंभकर्ण शेवटीं रामाच्या तेजानें मृत्यु पावला. दिसण्यांत भयंकर असलेल्या समुद्रामध्यें त्याचें अर्धे शरीर गेलें आहे ३ आणि त्या पर्वतप्राय कुंभकर्णानें नाककान तुटलेल्या व रक्तस्राव चाललेल्या आपल्या शरीराच्या योगानें आपलें लंकेचें द्वार अडवून टाकिलें आहे ४. सारांश, दावाग्नीनें दग्ध झालेल्या वृक्षाप्रमाणें तुझा भ्राता कुंभकर्ण ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या बाणानें पीडित झाल्यामुळें वस्त्ररहित व अगंडरूप होऊन पडला आहे " ५. युद्धामध्यें महाबलाढ्य कुंभकर्णाचा वध झाल्याचें ऐकून रावण शोकसंतप्त झाला व मूर्च्छित होऊन पडला ६; आपल्या चुलत्याचा वध झाल्याचें ऐकून ( रावणपुत्र ) देवांतक, नरांतक, त्रिशिरा आणि अतिकाय शोकाकुल होऊन रडूं लागले ७; सदाचरणसंपन्न रामाच्या हातून भ्रात्याचा वध झाल्याचें ऐकून महोदर व महापार्श्व शोकाकुल झाले ८ आणि कुंभकर्णाच्या वधामुळें खिन्न झालेला राक्षसश्रेष्ठ रावण

---

१ अशिरःप्राणिपादस्तु कबन्धोऽगण्ड उच्यते । मस्तकरहित व हस्तपादरहित धडाला अगंड असें ह्मणतात.

राक्षसपुङ्गवः । कुम्भकर्णवधाद्दीनो विललापाकुलेन्द्रियः ९ हा वीर रिपु-
दर्पघ्न कुम्भकर्ण महाबल । त्वं मां विहाय वै दैवाद्यातोऽसि यमसादनम् १०
मम शल्यमनुद्धृत्य बान्धवानां महाबल । शत्रुसैन्यं प्रताप्यैकः क्व मां
संत्यज्य गच्छसि ११ इदानीं खल्वहं नास्मि यस्य मे पतितो भुजः । दक्षि-
णोयं समाश्रित्य न बिभेमि सुरासुरात् १२ कथमेवंविधो वीरो देवदान-
वदर्पहा । कालाग्निप्रतिमो ह्यद्य राघवेण रणे हतः १३ यस्य ते वज्रनि-
ष्पेषो न कुर्याद्व्यसनं सदा । स कथं रामबाणार्तः प्रसुप्तोसि महीतले १४
एते देवगणाः सार्धमृषिभिर्गगने स्थिताः । निहतं त्वां रणे दृष्ट्वा निन-
दन्ति प्रहर्षिताः १५ ध्रुवमद्यैव संहृष्टा लब्धलक्षाः प्लवङ्गमाः । आरोक्ष्य-
न्तीह दुर्गाणि लङ्काद्वाराणि सर्वशः १६ राज्येन नास्ति मे कार्यं किं
करिष्यामि सीतया । कुम्भकर्णविहीनस्य जीविते नास्ति मे मतिः १७
यद्यहं भ्रातृहन्तारं न हन्मि युधि राघवम् । ननु मे मरणं श्रेयो न चेदं
व्यर्थजीवितुम् १८ अद्यैव तं गमिष्यामि देशं यत्रानुजो मम । न हि भ्रातॄ-

---

मोठ्या कष्टानें शुद्धीवर आल्यानंतर मनामध्यें क्षुब्ध होऊन विलाप करूं लागला ९. (तो ह्मणाला) " हे वीरा, हे शत्रुदर्पनाशका, हे महाबलाढ्य कुंभकर्णा, दैवामुळें तूं मला टाकून यमसदनीं चालता झाला आहेस १०. हे महाबलाढ्या, माझा व माझ्या बांधवांचा कांटा काढिल्याशिवायच शत्रुसैन्याला संतप्त करून तूं एकटाच मला टाकून कोठें बरें जात आहेस ? ११. ज्याच्या आश्रयामुळें मी देवदैत्यांची भीति बाळगीत नव्हतों तो हा माझा उजवा हात गळून पडल्यामुळें मी सांप्रत मृतप्रायच झालों आहें १२. अरे! देव-दानवांचा दर्प नाहींसा करणारा व प्रलयाग्नीप्रमाणें असलेला जो हा अशाप्रकारचा वीर त्याचा संग्रामामध्यें रामानें कसा बरें वध केला? १३. अरे! वज्रप्रहार झाला असतांही ज्या तुला कधीं पीडा होत नसे तो तूं रामबाणानें व्याकुल होऊन कसा बरें भूमीवर निश्चेष्ट होऊन पडला आहेस ! १४. ऋषींसहवर्तमान आकाशामध्यें असलेले हे देवगण संग्रामामध्यें तुझा वध झाल्याचें पाहून आनंदानें गर्जना करीत आहेत १५. खरोखर आजच हे आनंदित झालेले वानर संधि साधून किल्यावर व सर्वही लंकाद्वारांवर आरोहण करि-तील १६. मला राज्याची गरज नाहीं आणि सीतेशीं तरी मला काय कर्तव्य आहे! कुंभकर्णाचा वियोग झाल्यामुळें मला आतां जगणेंही बरें वाटत नाहीं १७. भ्रातृघा-तकी रामाचा जर माझ्या हातून वध न होईल तर मला मरणही श्रेयस्कर आहे; परंतु, अशारीतीनें व्यर्थ जगणें मला श्रेयस्कर दिसत नाहीं १८. जिकडे माझा धाकटा भाऊ गेला आहे तिकडे मी आजच चालता होईन. भ्रात्याला सोडून क्षणभरही

न्समुत्सृज्य क्षणं जीवितुमुत्सहे १९ देवा हि मां हसिष्यन्ति दृष्ट्वा पूर्वापकारिणम् । कथमिन्द्रं जयिष्यामि कुम्भकर्ण हते त्वयि २० तदिदं मामनुप्राप्तं बिभीषणवचः शुभम् । यदज्ञानान्मया तस्य न गृहीतं महात्मनः २१ बिभीषणवचस्तावत्कुम्भकर्णप्रहस्तयोः । विनाशोऽयं समुत्पन्नो मां व्रीडयति दारुणः २२ तस्यायं कर्मणः प्राप्तो विपाको मम शोकदः । यन्मया धार्मिकः श्रीमान्स निरस्तो बिभीषणः २३ इति बहुविधमाकुलान्तरात्मा कृपणमतीव विलप्य कुम्भकर्णम् । न्यपतदपि दशाननो भृशार्तस्तमनुजमिन्द्ररिपुं हतं विदित्वा २४ [ २१२० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः ॥ ६८ ॥

एवं विलपमानस्य रावणस्य दुरात्मनः । श्रुत्वा शोकाभिभूतस्य त्रिशिरा वाक्यमब्रवीत् १ एवमेव महावीर्यो हतो नस्तात मध्यमः । न तु सत्पुरुषा राजन्विलपन्ति यथा भवान् २ नूनं त्रिभुवनस्यापि पर्याप्तस्त्वमसि प्रभो । स कस्मात्प्राकृत इव शोचस्यात्मानमीदृशम् ३ ब्रह्मदत्तास्ति ते शक्तिः कवचं सायको धनुः । सहस्रखरसंयुक्तो रथो

---

जिवंत राहण्याची माझी इच्छा नाहीं. देवांचा मीं पूर्वीं अपराध केला असल्यामुळें माझ्याकडे पाहून तेही मला हसूं लागतील. हे कुंभकर्णा, तूं वध पावल्यावर मी आतां कसें बरें इंद्राला जिंकूं ? २०. अज्ञानामुळें महात्म्या बिभीषणाचें जें शुभ भाषण मीं ऐकिलें नाहीं त्याचें हें फल मला प्राप्त झालें आहे २१. कुंभकर्ण व प्रहस्त ह्यांचा हा भयंकर घात झाल्यापासून बिभीषणाचें भाषण मला अगदीं लाजवीत आहे २२. श्रीमान् व धार्मिक असलेल्या त्या भ्रात्या बिभीषणाचा जो मीं धिक्कार केला त्या कर्माचें हें शोकप्रद फल मला प्राप्त झालें आहे " २३. आपला तो इंद्रशत्रु कनिष्ठ भ्राता वध पावल्याचें समजल्यावर रावण अतिशय दुःखाकुल झाला; अंतःकरण व्याकुल होऊन कुंभकर्णाकरितां नानाप्रकारांनीं अतिकरुणस्वरानें त्यानें ह्याप्रमाणें विलाप केला आणि तो भूमीवरही पडला २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अडुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६८ ॥

ह्याप्रमाणें शोकाकुल झालेला दुरात्मा रावण विलाप करीत असल्याचें ऐकून त्रिशिरा ह्मणाला १ " बाबारे, आपला महावीर्यवान् मधला भाऊ ह्याप्रमाणेंच वध पावला हें खरें आहे. परंतु, हे राजा, तुझ्याप्रमाणें शूर पुरुष कधींही विलाप करीत नाहींत. २ हे प्रभो, खरोखर त्रैलोक्यालाही तूं पुरेसा आहेस. तस्मात्, यःकश्चित् पुरुषाप्रमाणें तूं अशारीतीनें स्वतः शोक कशाकरितां करीत बसला आहेस ? ३

मेघसमस्वनः ४ त्वयासकृद्धि शस्त्रेण विशस्ता देवदानवाः । स सर्वायुधसंपन्नो राघवं शास्तुमर्हसि ५ कामं तिष्ठ महाराज निर्गमिष्याम्यहं रणे । उद्धरिष्यामि ते शत्रून्गरुडः पन्नगानिव ६ शम्बरो देवराजेन नरको विष्णुना यथा । तथाद्य शयिता रामो मया युधि निपातितः ७ श्रुत्वा त्रिशिरसो वाक्यं रावणो राक्षसाधिपः । पुनर्जातमिवात्मानं मन्यते कालचोदितः ८ श्रुत्वा त्रिशिरसो वाक्यं देवान्तकनरान्तकौ । अतिकायश्च तेजस्वी बभूवुर्युद्धहर्षिताः ९ ततोऽहमहमित्येव गर्जन्तो नैर्ऋतर्षभाः । रावणस्य सुता वीराः शक्रतुल्यपराक्रमाः १० अन्तरिक्षगताः सर्वे सर्वे मायाविशारदाः । सर्वे त्रिदशदर्पघ्नाः सर्वे समरदुर्मदाः ११ सर्वे सुबलसंपन्नाः सर्वे विस्तीर्णकीर्तयः । सर्वे समरमासाद्य न श्रूयन्ते स्म निर्जिताः १२ देवैरपि सगन्धर्वैः सकिंनरमहोरगैः । सर्वेऽस्त्रविदुषो वीराः सर्वे युद्धविशारदाः । सर्वे प्रवरविज्ञानाः सर्वे लब्धवरास्तथा १३ स तैस्तथा भास्करतुल्यदर्शनैः सुतैर्वृतः शत्रुब-

---

ब्रह्मदत्त शक्ति, कवच, बाण, धनुष्य आणि मेघतुल्य घोषानें युक्त असा सहस्र गर्दभ जोडिलेला रथ हीं तुझ्यापाशीं आहेत ४; आणि शस्त्राच्या योगानें तूं अनेकवेळां देवदानवही फाडून टाकिले आहेस. तस्मात्, सर्व आयुधांनीं संपन्न होऊन रामाला शासन करणेंच तुला योग्य आहे ५. हे महाराजा, तूं खुशाल स्वस्थ रहा; मी संग्रामामध्यें जातों आणि भुजंगांना समूळ उपटून टाकणाऱ्या गरुडाप्रमाणें तुझे शत्रु उपटून टाकितों ६. देवराज इंद्रानें मारिलेल्या शंबरासुराप्रमाणें अथवा विष्णूनें वध केलेल्या नरकासुराप्रमाणें युद्धामध्यें माझ्या हातून वध पावलेला राम आज (रणभूमीमध्यें) शयन करील " ७ त्रिशिराराक्षसाचें हें भाषण श्रवण केल्यावर कालाची प्रेरणा झालेला राक्षसाधिपति रावण आपला पुनर्जन्म झाला असें समजूं लागला ८; आणि त्रिशिराचें भाषण श्रवण केल्यानंतर देवांतक, नरांतक व तेजस्वी अतिकाय हेही युद्धाकरितां उत्सुक झाले ९. तदनंतर इंद्रतुल्य पराक्रमी रावणपुत्र वीर राक्षसश्रेष्ठ मी मी म्हणून गर्जना करूं लागले १०. सर्वही अंतरिक्षामध्यें संचार करणारे असून सर्वही मायेमध्यें निपुण होते; सर्वही देवांचा दर्प नाहींसा करणारे होते; संग्रामामध्यें त्यांपैकीं कोणीही हार जाणें दुर्घट होतें ११; सर्वही महाबलाढ्य होते; सर्वही महाकीर्तिमान् होते; संग्राम प्राप्त झाला असतां देव, गंधर्व, किंनर व महोरग ह्यांच्या हातून पराजय पावल्याची वार्ता कोणाच्याही संबंधानें ऐकण्यांत आलेली नव्हती १२; सर्वही वीर अस्त्रवेत्ते असून सर्वही युद्धामध्यें निपुण होते; सर्वही महाज्ञानी होते आणि सर्वांनाही

लश्रियार्दनैः । रराज राजा मघवान्यथामरैर्वृतो महादानवदर्पनाशनैः १४ स पुत्रान्संपरिष्वज्य भूषयित्वा च भूषणैः । आशीर्भिश्च प्रशस्ताभिः प्रेषयामास वै रणे १५ युद्धोन्मत्तं च मत्तं च भ्रातरौ चापि रावणः । रक्षणार्थं कुमाराणां प्रेषयामास संयुगे १६ तेऽभिवाद्य महात्मानं रावणं लोकरावणम् । कृत्वा प्रदक्षिणं चैव महाकायाः प्रतस्थिरे १७ सर्वौषधीभिर्गन्धैश्च समालभ्य महाबलाः । निर्जग्मुर्नैर्ऋतश्रेष्ठाः षडेते युद्धकाङ्क्षिणः १८ त्रिशिराश्चातिकायश्च देवान्तकनरान्तकौ । महोदरमहापार्श्वौ निर्जग्मुः कालचोदिताः १९ ततः सुदर्शनं नागं नीलजीमूतसंनिभम् । ऐरावतकुले जातमारुरोह महोदरः २० सर्वायुधसमायुक्तस्तूणीभिश्चाप्यलंकृतः । रराज गजमास्थाय सवितेवास्तमूर्धनि २१ हयोत्तमसमायुक्तं सर्वायुधसमाकुलम् । आरुरोह रथश्रेष्ठं त्रिशिरा रावणात्मजः २२ त्रिशिरा रथमास्थाय विरराज धनुर्धरः । सविद्युदुल्कः सज्वालः सेन्द्रचाप इवाम्बुदः २३ त्रिभिः किरीटैस्त्रिशिराः शुशुभे स

---

वर मिळाले होते १३. सूर्यतुल्य तेजस्वी मुद्रेनें युक्त, आणि शत्रूंच्या बलाचा व संपत्तीचा उच्छेद करणारे असे ते पुत्र सभोंवतीं जुळले असतां मोठमोठ्या दानवांचा दर्प नाहींसा करणाऱ्या देवांनीं परिवेष्टित झालेल्या इंद्राप्रमाणें तो राजा झळकूं लागला १४. नंतर पुत्रांना आलिंगन देऊन,अलंकारांनीं त्यांना भूषित करून आणि आशीर्वाद देऊन त्यानें संग्रामामध्यें पाठविलें १५; आणि युद्धोन्मत्त व मत्त हे दोन भ्रातेही कुमारांच्या रक्षणाकरितां रावणानें रणामध्यें पाठविले १६. तेव्हां, लोकांना रडविणाऱ्या त्या महात्म्या रावणाला अभिवंदन करून व त्याला प्रदक्षिणा करून ते धिप्पाड राक्षस चालूं लागले १७. (जखमा भरून काढणाऱ्या) सर्व ओषधि व सुगंधि द्रव्यें बरोबर घेऊन हे सहा युद्धाभिलाषी महाबलाढ्य राक्षसश्रेष्ठ बाहेर पडले १८. सारांश, त्रिशिरा, अतिकाय, देवांतक, नरांतक, महोदर आणि महापार्श्व असे कालाची प्रेरणा झालेले सहा राक्षस बाहेर पडले १९. तदनंतर नील मेघाप्रमाणें असलेल्या व ऐरावतकुलामध्यें उत्पन्न झालेल्या सुदर्शनसंज्ञक गजावर महोदर आरूढ झाला २०; आणि सर्व आयुधांनीं संपन्न होऊन भात्यांनींही भूषित झालेला तो महोदर गजारूढ झाल्यानंतर अस्ताचलावर गेलेल्या सूर्याप्रमाणें दिसूं लागला २१. उत्कृष्ट अश्व ज्याला जोडिले आहेत आणि सर्व प्रकारच्या आयुधांनीं जो भरलेला आहे अशा श्रेष्ठ रथावर रावणपुत्र त्रिशिरा आरूढ झाला २२; आणि इंद्रधनुष्य, विद्युल्लता, उल्का व ज्वाला ह्यांनीं युक्त असलेल्या मेघाप्रमाणें तो धनुर्धर त्रिशिरा रथारूढ झाल्यावर झळकूं लागला २३.

रथोत्तमे । हिमवानिव शैलेन्द्रस्त्रिभिः काञ्चनपर्वतैः २४ अतिकायोऽतितेजस्वी राक्षसेन्द्रसुतस्तदा । आरुरोह रथश्रेष्ठं श्रेष्ठः सर्वधनुष्मताम् २५ सुचक्राक्षं सुसंयुक्तं सानुकर्षं सकूबरम् । तूणीबाणासनैर्दीप्तं प्रासासिपरिघाकुलम् २६ स काञ्चनविचित्रेण किरीटेन विराजता । भूषणैश्च बभौ मेरुः प्रभाभिरिव भासयन् २७ स रराज रथे तस्मिन्राजसूनुर्महाबलः । वृतो नैर्ऋतशार्दूलैर्वज्रपाणिरिवामरैः २८ हयमुच्चैःश्रवःप्रख्यं श्वेतं कनकभूषणम् । मनोजवं महाकायमारुरोह नरान्तकः २९ गृहीत्वा प्रासमुल्काभं विरराज नरान्तकः । शक्तिमादाय तेजस्वी गुहः शिखिगतो यथा ३० देवान्तकः समादाय परिघं हेमभूषणम् । परिगृह्य गिरिं दोर्भ्यां वपुर्विष्णोर्विडम्बयन् ३१ महापार्श्वो महातेजा गदामादाय वीर्यवान् । विरराज गदापाणिः कुबेर इव संयुगे ३२ ते प्रतस्थुर्महात्मानोऽमरावत्याः सुरा इव । तान्गजैश्च तुरङ्गैश्च रथैश्चाम्बुदनिःस्वनैः ३३ अनूत्पेतुर्महात्मानो

---

सारांश, तीन सुवर्ण पर्वतांनीं शोभणाऱ्या पर्वतराज हिमालयाप्रमाणें तीन किरिटांच्या योगानें तो त्रिशिरा श्रेष्ठ रथावर शोभूं लागला २४. सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ व अतिशय तेजस्वी असा राक्षसराजपुत्र अतिकाय श्रेष्ठ रथावर आरूढ झाला २५. त्याचीं चक्रें व कणा हीं उत्तम होतीं; उत्कृष्ट रीतीनें त्याला अश्व जोडिले होते; अनुकर्ष व कूबर हेंही सामान त्या रथावर होतें; भाते व धनुष्यें ह्यांच्या योगानें तो रथ झळकत होता आणि भाले, खड्ग व परिघ ह्या आयुधांनीं तो भरलेला होता २६. असो. सुवर्णानें शृंगारिलेला देदीप्यमान खड्ग आणि भूषणें ह्यांच्या योगानें तो अतिकाय प्रभेच्या योगानें दिशा प्रकाशित करणाऱ्या मेरुपर्वताप्रमाणें शोभूं लागला २७; आणि देवांनीं परिवेष्टित झालेल्या वज्रपाणि इंद्राप्रमाणें राक्षसश्रेष्ठांनीं परिवेष्टित झालेला तो महाबलाढ्य राजपुत्र त्या रथावर चमकूं लागला २८. उच्चैःश्रव्याप्रमाणें श्वेतवर्ण, सुवर्णालंकारांनीं भूषित आणि मनासारिख्या वेगवान् व धिप्पाड अश्वावर नरांतक आरूढ झाला २९ व मयूरावर आरूढ झालेला कार्तिकेय ज्याप्रमाणें शोभूं लागतो त्याप्रमाणें अग्निज्वालेसारिखा देदीप्यमान असलेला भाला हातामध्यें घेऊन नरांतक शोभूं लागला ३०. सुवर्णालंकारांनीं भूषित झालेला परिघ घेऊन आणि दोन्ही हातामध्यें एक पर्वत घेऊन देवांतक कांतीनें विष्णूचीच बरोबरी करीत आहे कीं काय असा दिसूं लागला ३१ आणि महातेजस्वी व वीर्यवान् महापार्श्व हातामध्यें गदा घेऊन गदापाणि कुबेराप्रमाणें संग्रामामध्यें शोभूं लागला ३२. अमरावती नगरींतून बाहेर पडणाऱ्या देवांप्रमाणें गज, अश्व आणि मेघतुल्य गर्जना करणारे रथ ह्यांसहवर्तमान ते भ्राते (लंकानगरींतून) बाहेर पडले असतां ३३ श्रेष्ठ श्रेष्ठ आयुधें धारण केलेले महात्मे

राक्षसाः प्रवरायुधाः ३४ ते विरेजुर्महात्मानः कुमाराः सूर्यवर्चसः । किरीटिनः श्रिया जुष्टा ग्रहा दीप्ता इवाम्बरे ३५ प्रगृहीता बभौ तेषां वस्त्राणामावलिः शिवा । शरदभ्रप्रतीकाशा हंसावलिरिवाम्बरे ३६ मरणं वापि निश्चित्य शत्रूणां वा पराजयम् । इति कृत्वा मतिं वीराः संजग्मुः संयुगार्थिनः ३७ जगर्जुश्च प्रणेदुश्च चिक्षिपुश्चापि सायकान् । जगृहुश्च महात्मानो निर्याता युद्धदुर्मदाः ३८ क्ष्वेडितास्फोटितानां वै संचचालेव मेदिनी । रक्षसां सिंहनादैश्च संस्फोटितमिवाम्बरम् ३९ नभिनिष्क्रम्य मुदिता राक्षसेन्द्रा महाबलाः । ददृशुर्वानरानीकं समुद्यतशिलानगम् ४० हरयोपि महात्मानो ददृशू राक्षसं बलम् । हस्त्यश्वरथसंबाधं किङ्किणीशतनादितम् ४१ नीलजीमूतसंकाशं समुद्यतमहायुधम् । दीप्तानलरविप्रख्यैर्नैर्ऋतैः सर्वतो वृतम् ४२ तद्दृष्ट्वा बलमायातं लब्धलक्षाः प्लवङ्गमाः । समुद्यतमहाशैलाः संप्रणेदुर्मुहुर्मुहुः ॥ अमृष्यमाणा रक्षांसि प्रतिनर्दन्त वानराः ४३ ततः समुत्क्रुष्टरवं निशम्य रक्षोगणा वानरयूथपानाम् ।

---

राक्षसही त्यांच्या मागोमाग निघाले ३४ ते सूर्यतुल्य तेजस्वी किरीट धारण केलेले व कांतीनें युक्त असलेले महात्मे कुमार आकाशामध्यें शोभणाऱ्या देदीप्यमान ग्रहांप्रमाणें शोभूं लागले ३५. त्यांनीं धारण केलेला वस्त्रांचा शुभ समुदाय शरदृतूंतील अभ्रांप्रमाणें श्वेतवर्ण असल्यामुळें हंसपंक्तीप्रमाणें आकाशामध्यें शोभूं लागला ३६. मरून तरी जाऊं किंवा शत्रूंचा पराजय तरी करूं असा मनाचा पक्का निश्चय करून ते युद्धाभिलाषी वीर बाहेर निघाले ३७; आणि युद्धाचा अतिशयच मद चढलेले ते महात्मे वीर बाहेर पडल्यानंतर गर्जना करूं लागले; आक्रोश करूं लागले; शत्रूंची निंदा करूं लागले आणि हातामध्यें बाणही घेऊं लागले ३८. युद्धगर्जना व दंड ठोकण्याचा ध्वनि ह्यांच्या योगानें पृथ्वी जशी कांहीं हालूं लागली आणि राक्षसांच्या सिंहनादांनीं आकाश जसें कांहीं विदीर्ण होऊन गेलें ३९. तदनंतर ते महाबलाढ्य राक्षसश्रेष्ठ आनंदानें बाहेर पडले असतां हातामध्यें पाषाण व वृक्ष घेऊन सज्ज झालेलें वानरसैन्य त्यांनीं अवलोकन केलें ४०. इकडे महात्म्या वानरांनींही राक्षसांचें सैन्य अवलोकन केलें. तें राक्षससैन्य गज, अश्व व रथ ह्यांनीं गजबजून गेलेलें होतें. शेंकडों लहान घंटांनीं तें नादित झालेलें होतें ४१; नील मेघाप्रमाणें तें दिसत होतें; मोठीं मोठीं आयुधें त्यांतील वीरांनीं हातामध्यें घेतलीं होतीं आणि उज्ज्वल अग्नि व सूर्य ह्यांप्रमाणें तेजस्वी असलेल्या राक्षसांनीं तें चोहोंबाजूंनीं व्याप्त झालेलें होतें ४२; तें राक्षससैन्य आलेलें पाहतांक्षणीं टपून बसलेले वानर मोटे मोठे पर्वत हातामध्यें घेऊन वारंवार गर्जना करूं लागले आणि राक्षसांचा

अमृष्यमाणाः परहर्षमुग्रं महाबला भीमतरं प्रणेदुः ४४ ते राक्षसबलं घोरं प्रविश्य हरियूथपाः । विचेरुरुद्यतैः शैलैर्नगाः शिखरिणो यथा ४५ केचिदाकाशमाविश्य केचिदुर्व्यां प्लवङ्गमाः । रक्षःसैन्येषु संक्रुद्धाः केचिद्द्रुमशिलायुधाः ४६ द्रुमांश्च विपुलस्कन्धान्गृह्य वानरपुङ्गवाः । तद्युद्धमभवद्घोरं रक्षोवानरसंकुलम् ४७ ते पादपशिलाशैलैश्चक्रुर्वृष्टिमनूपमाम् । बाणौघैर्वार्यमाणाश्च हरयो भीमविक्रमाः ४८ सिंहनादान्विनेदुश्च रणे राक्षसवानराः । शिलाभिश्चूर्णयामासुर्यातुधानान्प्लवङ्गमाः ४९ निर्जघ्नुः संयुगे क्रुद्धाः कवचाभरणावृतान् । केचिद्रथगतान्वीरान्गजवाजिगतानपि ५० निर्जघ्नुः सहसा वीरान्यातुधानान्प्लवङ्गमाः ५१ शैलशृङ्गान्विताङ्गास्ते मुष्टिभिर्वान्तलोचनाः। चेलुः पेतुश्च नेदुश्च तत्र राक्षसपुङ्गवाः ५२ राक्षसाश्च शरैस्तीक्ष्णैर्बिभिदुः कपिकुञ्जरान् । शूलमुद्गरखड्गैश्च जघ्नुः

---

पराक्रम सहन होईनासा झाल्यामुळें ते वानर अतिशयच गर्जू लागले ४३. तदनंतर वानरसेनाधिपतींची प्रचंड गर्जना एकून शत्रूचा हर्ष सहन न करणाऱ्या महाबलाढ्य राक्षसगणांनीं उग्र स्वरानें व वानरांपक्षांही अधिक भयकर रीतीनें गर्जना केली ४४. तदनंतर ते वानरसेनाधिपति घोर राक्षससैन्यामध्यें प्रविष्ट होऊन व पर्वत उगारून संचार करूं लागले असतां शिखरयुक्त वृक्षांप्रमाणें दिसूं लागले ४५. कांहीं वानर आकाशामध्यें प्रवेश करून आणि कांहीं भूमीवरच राहून राक्षससैन्यांमध्यें संचार करूं लागले व अतिशय क्रुद्ध झालेले कांहीं वानर वृक्ष व पाषाण हीं आयुधें घेऊन राक्षससैन्यांमध्यें संचार करूं लागले ४६; आणि त्याचप्रमाणें मोठ्या मोठ्या स्कंधांनीं युक्त असलेले वृक्ष घेऊन वानरश्रेष्ठ संचार करूं लागले असतां तें युद्ध भयंकर झालें व राक्षस आणि वानर ह्यांची त्या ठिकाणीं एकच गर्दी उडून गेली ४७. बाणसमुदायांनीं राक्षस वानरांचें निवारण करूं लागले असतां भयंकर पराक्रम करणारे ते वानर वृक्ष, पाषाण व पर्वत ह्यांची अनुपम वृष्टि राक्षसांवर करूं लागले ४८. राक्षस व वानर हे उभयतांही रणामध्यें गर्जना करूं लागले; वानरांनीं पाषाणांच्या योगानें राक्षसांचें चूर्ण करून टाकिलें ४९; क्रुद्ध झालेल्या कांहीं वानरांनीं रथारूढ, अश्वारूढ व गजारूढ होऊन कवचें व भूषणें ह्यांनीं व्याप्त झालेल्या राक्षसवीरांचा संग्रामामध्यें वध केला ५०; आणि कांहीं वानरांनीं एकदमच राक्षसवीरांना यमसदनीं पोंचविलें ५१. पर्वतशिखरांच्या योगानें राक्षसश्रेष्ठांचीं शरीरें व्याप्त होऊन मुष्टिप्रहारांच्या योगानें त्यांचे नेत्रही बाहेर निघाले असतां ते डळमळूं लागले, पडूं लागले व आक्रोश करूं लागले ५२. तदनंतर तीक्ष्ण बाणांच्या योगानें राक्षसांनींही वानरश्रेष्ठांना

प्रासैश्च शक्तिभिः ५३ अन्योन्यं पातयामासुः परस्परजयैषिणः । रिपुशोणितदिग्धाङ्गास्तत्र वानरराक्षसाः ५४ ततः शैलैश्च खड्गैश्च विसृष्टैर्हरिराक्षसैः । मुहूर्तेनावृता भूमिरभवच्छोणितोक्षिता ५५ विकीर्णैः पर्वताकारै रक्षोभिरभिमर्दितैः । आसीद्वसुमती पूर्णा तदा युद्धमदान्वितैः ५६ आक्षिप्ताः क्षिप्यमाणाश्च भग्नशैलैश्च वानरैः । पुनरङ्गैस्तदा चक्रुर्वानरा युद्धमद्भुतम् ५७ वानरान्वानरैरेव जघ्नुस्ते नैर्ऋतर्षभाः । राक्षसान्राक्षसैरेव जघ्नुस्ते वानरा अपि ५८ आक्षिप्य च शिलाः शैलाञ्जघ्नुस्ते राक्षसास्तदा । तेषां चाच्छिद्य शस्त्राणि जघ्नू रक्षांसि वानराः ५९ निर्जघ्नुः शैलशृङ्गैश्च बिभिदुश्च परस्परम् । सिंहनादान्विनेदुश्च रणे राक्षसवानराः ६० छिन्नवर्मतनुत्राणा राक्षसा वानरैर्हताः । रुधिरं प्रस्रुतास्तत्र रससारमिव द्रुमाः ६१ रथेन च रथं चापि वारणेनापि वारणम् । हयेन च हयं केचिन्निर्जघ्नुर्वानरा रणे ६२ क्षुरप्रैरर्धचन्द्रैश्च भल्लैश्च निशितैः शरैः । राक्षसा वानरेन्द्राणां बिभिदुः

---

वेध करून शूल मुद्गर, खड्ग, प्रास व शक्ति ह्या आयुधांच्या योगानेंही त्यांनीं त्यांना प्रहार केले ५३. शत्रूंच्या रक्तानें ज्यांचीं शरीरें भरून गेलीं आहेत असे वानर व राक्षस एकमेकांचा पराजय करण्याच्या इच्छेनें त्या संग्रामामध्यें एकमेकांना पाडूं लागले असतां ५४ वानरांनीं व राक्षसांनीं सोडिलेले पर्वत व खड्ग ह्यांच्या योगानें एका मुहूर्तामध्यें त्या भूमीवर रक्ताचा सडा होऊन गेला ५५ आणि युद्धाचा मद चढलेले पर्वतप्राय राक्षस वानरांनीं मारून टाकिले असतां ते अस्ताव्यस्त पडले व त्यांच्या योगानें ती भूमि भरून गेली ५६. राक्षसांनीं ज्यांचे पर्वत भग्न करून टाकिले आहेत अशा वानरांनीं राक्षसांना जोरानें आंवळून धरिलें, जोराजोरानें ते त्यांना आंवळून धरूं लागले आणि पुनरपि ते वानर त्यांच्याशीं हस्तपादादि अवयवांच्या योगानें युद्ध करूं लागले ५७. ते राक्षसश्रेष्ठ वानरांच्याच योगानें वानरांना प्रहार करूं लागले व ते वानरही राक्षसांच्याच योगानें राक्षसांना प्रहार करूं लागले ५८. जोराजोरानें पाषाण व पर्वत घेऊन ते राक्षस वानरांना प्रहार करूं लागले व त्यांचीं शस्त्रें हिसकावून घेऊन वानरही राक्षसांना प्रहार करूं लागले ५९. त्या संग्रामामध्यें राक्षस व वानर पर्वतशिखरांनीं एकमेकांवर प्रहार करून परस्परांना विदीर्ण करूं लागले आणि उभयतांहीं सिंहनाद करूं लागले ६०. वानरांनीं मारून टाकिलेल्या राक्षसांचीं कवचें व इतरही शरीरत्राणें छिन्नभिन्न झालीं असतां वृक्षांतून ज्याप्रमाणें चीक गळूं लागतो त्याप्रमाणें त्यांच्या शरीरांतून रक्त गळूं लागलें ६१. कांहीं वानर संग्रामामध्यें रथाच्या योगानें रथाला, गजाच्या योगानें गजाला आणि अश्वाच्या योगानें अश्वाला प्रहार करूं

पादपाञ्शिलाः ६३ विकीर्णाः पर्वतास्तैश्च द्रुमैश्छिन्नैश्च संयुगे । हतैश्च कपिरक्षोभिर्दुर्गमा वसुधाभवत् ६४ ते वानरा गर्वितहृष्टचेष्टाः सङ्ग्राममासाद्य भयं विमुच्य । युद्धं स्म सर्वे सह राक्षसैस्ते नानायुधाश्चक्रुरदीनसत्त्वाः ६५ तस्मिन्प्रवृत्ते तुमुले विमर्दे प्रहृष्यमाणेषु वलीमुखेषु । निपात्यमानेषु च राक्षसेषु महर्षयो देवगणाश्च नेदुः ६६ ततो हयं मारुततुल्यवेगमारुह्य शक्तिं निशितां प्रगृह्य । नरान्तको वानरसैन्यमुग्रं महार्णवं मीन इवाविवेश ६७ स वानरान्सप्त शतानि वीरः प्रासेन दीप्तेन विनिर्बिभेद । एकः क्षणेनेन्द्ररिपुर्महात्मा जघान सैन्यं हरिपुङ्गवानाम् ६८ ददृशुश्च महात्मानं हयपृष्ठप्रतिष्ठितम् । चरन्तं हरिसैन्येषु विद्याधरमहर्षयः ६९ स तस्य ददृशे मार्गो मांसशोणितकर्दमः । पतितैः पर्वताकारैर्वानरैरभिसंवृतः ७० यावद्विक्रमितुं बुद्धिं चक्रुः प्लवगपुङ्गवाः । तावदेतानतिक्रम्य निर्बिभेद नरान्तकः ७१ ददाह हरिसैन्यानि वनानीव विभावसुः । यावदुत्पाटयामासु-

---

लागले ६२; क्षुरप्र, अर्धचंद्र व भल्ल ह्या तीक्ष्ण बाणांच्या योगानें राक्षसांनीं वानराधिपतींचे वृक्ष व पाषाण फोडून टाकिले ६३; आणि फेंकिलेले पर्वत, तुटलेले वृक्ष व संग्रामामध्यें वध पावलेले वानर व राक्षस ह्यांच्या योगानें ती पृथ्वी व्याप्त झाली असतां तिच्यावरून संचार होणेंही कठीण झालें ६४. गर्वयुक्त व आनंदयुक्त चेष्टा करूं लागलेले व मनाचे उदार असलेले ते वानर संग्रामामध्यें आले असतां नानाप्रकारचीं आयुधें घेऊन निर्भयपणें राक्षसांसहवर्तमान सर्वही युद्ध करूं लागले ६५. ह्याप्रमाणें तें तुमुल युद्ध सुरू होऊन वानरांचा उत्कर्ष व राक्षसांचा निःपात होऊं लागला असतां महर्षि आणि देवगण गर्जना करूं लागले ६६. तदनंतर मत्स्य ज्याप्रमाणें महासागरामध्यें प्रवेश करितो त्याप्रमाणें वायुतुल्य वेगवान् अश्वावर आरूढ होऊन व तीक्ष्ण शक्ति हातामध्यें घेऊन नरांतक राक्षस वानरांच्या उग्र सैन्यामध्यें प्रविष्ट झाला असतां ६७ त्या वीरानें उज्ज्वल प्रासाच्या योगानें सातशें वानर विदीर्ण करून टाकिले आणि अशारीतीनें एका क्षणामध्यें त्या महात्म्या इंद्रशत्रूनें एकट्यानेंच वानरश्रेष्ठांच्या (बऱ्याच) सैन्याचा वध केला ६८. अश्वारूढ होऊन वानरसैन्यामध्यें संचार करीत असलेल्या त्या महात्म्या नरांतकाला विद्याधर व महर्षि ह्यांनीं अवलोकन केलें ६९ आणि भूमीवर पडलेल्या पर्वताकार वानरांनीं व्याप्त झालेला तो त्याचा मार्ग मांसरक्तरूप कर्दमानें युक्त झाला आहे असेंही त्यांच्या दृष्टीं पडूं लागलें ७०. वानर पराक्रम करण्याचें मनामध्यें आणीत आहेत तोंच त्यांवर हल्ला करून नरांतकानें त्यांना विदीर्ण करून टाकिलें ७१; अग्नि ज्याप्रमाणें वनें दग्ध करून टाकितो त्याप्रमाणें

वृक्षाञ्शैलान्वनौकसः ७२ तायत्प्रासहताः पेतुर्वज्रकृत्ता इवाचलाः । ज्वलन्तं प्रासमुद्यम्य सङ्ग्रामान्ते नरान्तकः ७३ दिक्षु सर्वासु बलवान्विचचार नरान्तकः । प्रमृद्नन्सर्वतो युद्धे प्रावृट्काले यथानिलः ७४ न शेकुर्धावितुं वीरा न स्थातुं स्पन्दितुं कुतः । उत्पतन्तं स्थितं यान्तं सर्वान्विव्याध वीर्यवान् ७५ एकेनान्तककल्पेन प्रासेनादित्यतेजसा । भग्नानि हरिसैन्यानि निपेतुर्धरणीतले ७६ वज्रनिष्पेषसदृशं प्रासस्याभिनिपातनम् । न शेकुर्वानराः सोढुं ते विनेदुर्महास्वनम् ७७ पततां हरिवीराणां रूपाणि प्रचकाशिरे । वज्रभिन्नाग्रकूटानां शैलानां पततामिव ७८ ये तु पूर्वं महात्मानः कुम्भकर्णेन पातिताः । ते स्वस्था वानरश्रेष्ठाः सुग्रीवमुपतस्थिरे ७९ प्रेक्षमाणः स सुग्रीवो ददर्श हरिवाहिनीम् । नरान्तकभयत्रस्तां विद्रवन्तीं यतस्ततः ८० विद्रुतां वाहिनीं दृष्ट्वा स ददर्श नरान्तकम् । गृहीतप्रासमायान्तं हयपृष्ठप्रतिष्ठितम् ८१ दृष्ट्वोवाच महातेजाः

---

वानरसैन्यें त्यानें वृथा करून टाकिलीं; वानर वृक्ष व पर्वत उपटण्याच्या बेतांत आहेत तोंच ७२ त्याच्या भाल्याचे तडाके बसून वज्रानें विदीर्ण झालेल्या पर्वताप्रमाणें ते विदीर्ण होऊन पडले; संग्रामामध्यें त्या नरांतकानें देदीप्यमान भाला हातामध्यें घेतला ७३ आणि पर्जन्यकालीं ज्याप्रमाणें वायु सर्व बाजूंनीं संचार करूं लागतो त्याप्रमाणें संग्रामामध्यें सर्व बाजूंनीं वानरांचें मर्दन करीत करीत तो बलाढ्य राक्षस सर्व दिशेस संचार करूं लागला ७४. तो वीर्यवान् राक्षस कोणी वानर उड्डाण करीत असो, उभा राहिलेला असो अथवा चालूं लागलेला असो सर्वांनाच वेध करूं लागल्यामुळें वीर वानरांच्या तोंडांतून शब्दही येईनासा झाला. मग त्याच्या समोर उभें राहून हातपाय हालविण्याची गोष्ट पाहिजे कशाला ? ७५. सूर्यतुल्य तेजस्वी असलेल्या त्या अंतकतुल्य एकट्या भाल्याच्याच योगानें वानरसैन्यें वध पावून भूतलावर पडूं लागलीं ७६; वज्राच्या तडाक्याप्रमाणें त्या भाल्याचा तडाका वानरांना सहन होईनासा झाल्यामुळें ते उच्च स्वरानें आक्रोश करूं लागले ७७; आणि वज्राच्या योगानें अग्रें व शिखरें छिन्नभिन्न होऊन पडणाऱ्या पर्वताप्रमाणें त्या संग्रामामध्यें पडत असलेल्या वानरांचीं शरीरें दिसूं लागलीं ७८. पूर्वी कुंभकर्णानें ज्या महात्म्या वानरश्रेष्ठांचा पराजय केलेला होता ते स्वस्थपणें सुग्रीवासमीप येऊन उभे राहिले असतां ७९ नरांतकाच्या भीतीनें त्रस्त होऊन वानरसेना वाट फुटेल तिकडे पळत आहे असें तो सुग्रीव पाहूं लागला असतां त्याच्या दृष्टीं पडलें ८०. पळत असलेली वानरसेना अवलोकन केल्यानंतर अश्वारूढ होऊन व हातांमध्यें भाला

सुग्रीवो वानराधिपः । कुमारमङ्गदं वीरं शक्रतुल्यपराक्रमम् ८२ गच्छैनं राक्षसं वीरं योऽसौ तुरगमास्थितः । भक्षयन्तं परबलं क्षिप्रं प्राणैर्वियोजय ८३ स भर्तृवचनं श्रुत्वा निष्पपाताङ्गदस्तदा । अनीकान्मेघसंकाशादंशुमानिव वीर्यवान् ८४ शैलसंघातसंकाशो हरीणामुत्तमोऽङ्गदः । रराजाङ्गदसंनद्धः सधातुरिव पर्वतः ८५ निरायुधो महातेजाः केवलं नखदंष्ट्रवान् । नरान्तकमभिक्रम्य वालिपुत्रोऽब्रवीद्वचः ८६ तिष्ठ किं प्राकृतैरेभिर्हरिभिस्त्वं करिष्यसि । अस्मिन्वज्रसमस्पर्शे प्रासं क्षिप ममोरसि ८७ अङ्गदस्य वचः श्रुत्वा प्रचुक्रोध नरान्तकः । संदश्य दशनैरोष्ठं निःश्वस्य च भुजङ्गवत् ॥ अभिगम्याङ्गदं क्रुद्धो वालिपुत्रं नरान्तकः ८८ स प्रासमाविध्य तदाङ्गदाय समुज्ज्वलन्तं सहसोत्ससर्ज । स वालिपुत्रोरसि वज्रकल्पे बभूव भग्नो न्यपतच्च भूमौ ८९ तं प्रासमालोक्य तदा विभग्नं सुपर्णकृत्तोरगवीर्यकल्पम् । तलं समुद्यम्य स वालिपुत्रस्तुरङ्गमस्याभिजघान मूर्ध्नि ९० निमग्नपादः स्फुटिताक्षितारो निष्क्रान्तजिह्वोऽचलसंनिकाशः ।

---

घेऊन येत असलेला नरांतक हा त्याच्या दृष्टीं पडला ८१; आणि दृष्टीं पडतांक्षणीं तो महातेजस्वी वानराधिपति सुग्रीव इंद्रतुल्य पराक्रमी जो वीर कुमार अंगद त्याला ह्मणाला ८२ "हा जो अश्वारूढ झाला आहे आणि प्रतिपक्षाचें सैन्य भक्षण करीत आहे त्या ह्या राक्षसवीराकडे तूं जा आणि त्याचा सत्वर वध कर" ८३. राजाची ही आज्ञा ऐकतांक्षणीं तो वीर्यवान् अंगद सूर्याप्रमाणें मेघतुल्य सैन्यांतून बाहेर पडला ८४; आणि बाहुभूषणांनीं युक्त असलेला व पर्वतसमुदायाप्रमाणें दिसत असलेला तो वानरश्रेष्ठ अंगद धातुयुक्त पर्वताप्रमाणें शोभूं लागला ८५. आयुधरहित परंतु, नखें व दंष्ट्रा ह्यांनीं युक्त असलेला तो महातेजस्वी वालिपुत्र अंगद नरांतकावर चालून जाऊन त्याला ह्मणाला ८६ "थांब, ह्या यःकश्चित् वानरांशीं तुला काय कर्तव्य आहे ? ज्याचा प्रहार वज्राप्रमाणें आहे असा तुझा भाला ह्या माझ्या वक्षःस्थलावर तूं टाक" ८७. हें अंगदाचें भाषण श्रवण केल्यावर नरांतक क्रुद्ध झाला आणि दांतओंठ खाऊन, भुजंगाप्रमाणें सुस्कारे टाकून व रागारागानें वालिपुत्र अंगदासमीप गेला ८८. तदनंतर आपला उज्ज्वल भाला फिरवून त्यानें एकाएकीं अंगदावर सोडिला असतां वालिपुत्र अंगदाच्या वज्रतुल्य वक्षःस्थलावर मोडून जाऊन तो भाला भूमीवर पडला ८९. गरुडानें तुकडे तुकडे करून टाकिलेल्या भुजंगाप्रमाणें ज्याची अवस्था झाली आहे असा तो मोडलेला भाला अवलोकन करितांक्षणीं वालिपुत्र अंगदानें हात उगारून त्याच्या अश्वाचे मस्तकावर एक चपराक दिली

स तस्य वाजी निपपात भूमौ तलप्रहारेण विकीर्णमूर्धा ९१ नरान्तकः क्रोधवशं जगाम हतं तुरङ्गं पतितं समीक्ष्य । स मुष्टिमुद्यम्य महाप्रभावो जघान शीर्षे युधि वालिपुत्रम् ९२ अथाङ्गदो मुष्टिविशीर्णमूर्धा सुस्राव तीव्रं रुधिरं भृशोष्णम् । मुहुर्विजज्वाल मुमोह चापि संज्ञां समासाद्य विसिस्मिये च ९३ अथाङ्गदो मृत्युसमानवेगं संवर्त्य मुष्टिं गिरिशृङ्गकल्पम् । निपातयामास तदा महात्मा नरान्तकस्योरसि वालिपुत्रः ९४ स मुष्टिनिर्भिन्ननिमग्नवक्षा ज्वाला वमञ्शोणितदिग्धगात्रः । नरान्तको भूमितले पपात यथाचलो वज्रनिपातभग्नः ९५ तदान्तरिक्षे त्रिदशोत्तमानां वनौकसां चैव महाप्रणादः । बभूव तस्मिन्निहतेऽग्र्यवीर्ये नरान्तके वालिसुतेन सङ्ख्ये ९६ अथाङ्गदो राममनःप्रहर्षणं सुदुष्करं तं कृतवान्हि विक्रमम् । विसिस्मिये सोऽप्यथ भीमकर्मा पुनश्च युद्धे स बभूव हर्षितः ९७ नरान्तकं हतं दृष्ट्वा चुक्रुशुर्नैर्ऋतर्षभाः । देवान्तकस्त्रिमूर्धा च पौलस्त्यश्च महोदरः ९८ आरूढो मेघसंकाशं वारणेन्द्रं महोदरः ।

---

असतां ९० त्या अश्वाचे पाय भूमीमध्यें रुपून गेले; डोळ्यांतील बुबुळें फुटून गेलीं; जीभ बाहेर आली आणि हस्ततलाच्या प्रहारानें मस्तक विदीर्ण होऊन गेल्यामुळें तो पर्वतप्राय अश्व भूमीवर ( उलथूनही ) पडला ९१. ह्याप्रमाणें अश्व वध पावून पडलेला अवलोकन करितांक्षणीं महासामर्थ्यवान् नरांतक अतिशय क्रुद्ध झाला आणि संग्रामामध्यें मूठ वळून वालिपुत्र अंगदाच्या मस्तकीं त्यानें प्रहार केला ९२. तदनंतर मुष्टिप्रहारानें मस्तक फटून गेल्यामुळें अंगदाच्या शरीरांतून अत्यंत उष्ण व तीव्र रक्ताचा प्रवाह सुरू झाला; त्याच्या अंगाचा अतिशय संताप झाला; कांहीं वेळ त्याला मूर्च्छाही आली आणि शुद्धीवर आल्यानंतर त्याला विस्मयही वाटला ९३. तदनंतर मृत्यूसारिखा जिचा वेग आहे अशी आपली पर्वतशिखरतुल्य मुष्टि वळून महात्म्या वालिपुत्र अंगदानें नरांतकाच्या वक्षःस्थलावर प्रहार केला असतां ९४. मुष्टीच्या प्रहारामुळें त्या नरांतकाचें वक्षःस्थल फटून आंत गेलें; रक्तानें त्याचें शरीर भरून गेलें; त्याच्या तोंडांतून ज्वाला येऊं लागल्या आणि वज्रप्रहारानें भग्न झालेल्या पर्वताप्रमाणें तो भूमीवर पडला ९६. ह्याप्रमाणें संग्रामामध्यें वालिपुत्र अंगदानें त्या महावीर्यवान् नरांतकाचा वध केला असतां अंतरिक्षामध्यें मोठे मोठे देव व वानर ह्यांची मोठीच गर्जना सुरू झाली ९५. असो. रामाच्या मनाला आनंद देणारा असा तो अति दुष्कर पराक्रम करून अंगदही आश्चर्यचकित झाला आणि भयंकर कर्म करणारा तो अंगद पुनरपि युद्धाविषयीं उत्सुक झाला ९७. नरांतकाचा वध झाल्याचें पाहून देवांतक, त्रिमूर्धा

वालिपुत्रं महावीर्यमभिदुद्राव वेगवान् ९९ भ्रातृव्यसनसंतप्तस्तदा देवान्तको बली । आदाय परिघं घोरमङ्गदं समभिद्रवत् १०० रथमादित्यसंकाशं युक्तं परमवाजिभिः । आस्थाय त्रिशिरा वीरो वालिपुत्रमथाभ्यगात् १ स त्रिभिर्देवदर्पघ्नै राक्षसेन्द्रैरभिद्रुतः । वृक्षमुत्पाटयामास महाविटपमङ्गदः २ देवान्तकाय तं वीरश्चिक्षेप सहसाङ्गदः । महावृक्षं महाशाखं शक्रो दीप्तमिवाशनिम् ३ त्रिशिरास्तं प्रचिच्छेद शरैराशीविषोपमैः । स वृक्षं कृत्तमालोक्य उत्पपात तदाङ्गदः ४ स ववर्ष ततो वृक्षाञ्शिलाश्च कपिकुञ्जरः । तान्प्रचिच्छेद संक्रुद्धस्त्रिशिरा निशितैः शरैः ५ परिघाग्रेण तान्वृक्षान्बभञ्ज स महोदरः । त्रिशिराश्चाङ्गदं वीरमभिदुद्राव सायकैः ६ गजेन समभिद्रुत्य वालिपुत्रं महोदरः । जघानोरसि संक्रुद्धस्तोमरैर्वज्रसंनिभैः ७ देवान्तकश्च संक्रुद्धः परिघेण तदाङ्गदम् । उपगम्याभिहत्याशु व्यपचक्राम वेगवान् ८ स त्रिभिर्नैर्ऋतश्रेष्ठैर्युगपत्समभिद्रुतः । न विव्यथे

---

व पौलस्त्य महोदर हे राक्षसश्रेष्ठ आक्रोश करूं लागले ९८. नंतर वेगवान् महोदर मेघतुल्य गजेंद्रावर आरूढ होऊन महावीर्यवान् वालिपुत्रावर धांवला असतां ९९ भ्रातृशोकानें संतप्त झालेला बलाढ्य देवांतकही घोर परिघ हातांत घेऊन अंगदावर धांवला १००; आणि त्याचप्रमाणें उत्कृष्ट अश्व जोडिलेल्या सूर्यतुल्य तेजस्वी रथावर आरूढ होऊन वीर त्रिशिराही वालिपुत्र अंगदासमीप गेला १. ह्याप्रमाणें शत्रूचा गर्व नाहींसे करणारे तीन राक्षसाधिपति अंगदावर चालून गेले असतां मोठ्या मोठ्या शाखांनीं युक्त असा एक वृक्ष उपटून अंगदानें हातामध्यें घतला आणि त्या वीर अंगदानें इंद्र ज्याप्रमाणें आपलें देदीप्यमान अशनि अस्त्र टाकितो त्याप्रमाणें मोठ्या मोठ्या शाखांनीं युक्त असलेला तो महावृक्ष देवांतकावर फेंकिला ३; परंतु, भुजंगतुल्य बाणांच्या योगानें त्रिशिराराक्षसानें त्याचे तुकडे तुकडे करून टाकिले. तेव्हां वृक्षाचे तुकडे तुकडे झालेले पाहून अंगदानें उड्डाण केलें ४; आणि त्या कपिश्रेष्ठ अंगदानें वृक्षांचा व पाषाणांचा वर्षाव केला; परंतु, त्या वृक्षपाषाणांना अतिशय क्रुद्ध झालेल्या त्रिशिराराक्षसानें तीक्ष्ण बाणांच्या योगानें तोडून टाकिलें ५; परिघाच्या अग्रानें महोदरानेंही ते वृक्ष मोडून टाकिले आणि बाणांचा वर्षाव करीत करीत त्रिशिराराक्षस वीर अंगदावर धांवून गेला ६. तदनंतर अतिशय क्रुद्ध झालेला महोदरही गजासहवर्तमान वालिपुत्र अंगदावर धांवून गेला आणि वज्रतुल्य तोमरांनीं त्यानें त्याच्या वक्षःस्थलावर प्रहार केला ७. फारच क्रुद्ध झालेला वेगवान् देवांतकही अंगदासमीप गेला आणि परिघानें त्याला एक प्रहार करून तेथून

तेजा वालिपुत्रः प्रतापवान् ९ स वेगवान्महावेगं कृत्वा परमदुर्जयः।
समभिद्रुत्य जघानास्य महागजम् १० पेततुर्नयने तस्य विन-
स कुञ्जरः। विषाणं चास्य निष्कृष्य वालिपुत्रो महाबलः ११
कमभिद्रुत्य ताडयामास संयुगे। स विह्वलस्तु तेजस्वी वातोद्धूत
द्रुमः १२ लाक्षारससवर्णं च सुस्राव रुधिरं महत्। अथाश्वस्य
तेजाः कृच्छ्राद्देवान्तको बली १३ आविध्य परिघं वेगादाजघान
ङ्गदम्। परिघाभिहतश्चापि वानरेन्द्रात्मजस्तदा १४ जानुभ्यां पतितो
पुनरेवोत्पपात ह। तमुत्पतन्तं त्रिशिरास्त्रिभिराशीविषोपमैः १५घोरैर्ह-
तः पुत्रं ललाटेऽभिजघान ह। ततोऽङ्गदं परिक्षिप्तं त्रिभिर्नैर्ऋतपुङ्गवैः १६
मानथ विज्ञाय नीलश्चापि प्रतस्थतुः। ततश्चिक्षेप शैलाग्रं नीलस्त्रिशिरसे
१७ तद्रावणसुतो धीमान्बिभेद निशितैः शरैः १८ तद्बाणशतनिर्भिन्नं
विगिलातलम्। सविस्फुलिङ्गं सज्वालं निपपात गिरेः गिरः १९ स

---

र दूर गेला ८; परंतु, ह्याप्रमाणें तीन राक्षसश्रेष्ठांनीं एकदम हल्ला केला असताही
तेजस्वी व प्रतापी वालिपुत्र मनामध्यें कचरला नाहीं ९. इतकेंच नव्हे परंतु,
त दुर्जय असलेल्या त्या वेगवान् अंगदानें मोठा वेग धारण करून व महोदरा-
प धावत जाऊन हस्ततलानें त्याच्या महागजाला प्रहार केला असतां १० डोळे
र पडून तो गज मृत्यु पावला. तदनंतर त्याचा दांत उपटून घेऊन महाबलाढ्य
त्र ११ संग्रामामध्यें देवांतकावर धावला आणि त्या दांताच्या योगानें त्यानें
ा ताडन केलें असता तो तेजस्वी देवांतक विह्वल होऊन वायूनें उलथून पड
ा वृक्षाप्रमाणें भूमीवर पडला. १२ व लाक्षारसासारिखें लाल रक्त त्याच्या
ातून अतिशयच वाहूं लागलें. तदनंतर तो महातेजस्वी व बलाढ्य देवांतक मोठ्या
नें शुद्धीवर आला असतां १३ वेगानें परिघ फिरवून त्यानें अंगदाला प्रहार केला त
ा तडाका बसताक्षणीं वानराधिपति वालीचा पुत्र जो अंगद १४ तो भूमीवर गुडघे
पडून पुनरपि उठला; परंतु, तो उठत आहे तोंच त्रिशिराराक्षसानें सरळ जाणाऱ्या
भयंकर बाणांनीं वानरराजपुत्र अंगदाच्या ललाटावर प्रहार केला. तदनंतर तीन
श्रेष्ठांनीं अंगदाला घेरून टाकिलें आहे १५, १६ असें समजून हनुमान् व
हे उभयतां तिकडे निघाले व नीलानें त्रिशिराराक्षसावर एक पर्वतशिखर फे
लें १७. परंतु, त्या बुद्धिमान् रावणपुत्रानें तीक्ष्ण बाणांनीं तें शिखर फाडून
कें १८ व अशारीतीनें शेंकडों बाणांनीं विदीर्ण झालेलें तें पर्वत-
ा व ज्वाळा ह्यांसहवर्तमान भूमीवर पडलें असतां त्या ठिकाणीं सांपडलेल्या

विजृम्भितमालोक्य हर्षाद्देवान्तको बली। परिघेणाभिदुद्राव मारुतात्मज-
माहवे १२० तमापतन्तमुत्पत्य हनूमान्कपिकुञ्जरः। आजघान तदा मूर्ध्नि
वज्रकल्पेन मुष्टिना २१ शिरसि प्राहरद्वीरस्तदा वायुसुतो बली। नादे-
नाकम्पयच्चैव राक्षसान्स महाकपिः २२ स मुष्टिनिष्पिष्टविभिन्नमूर्धा
निर्वान्तदन्ताक्षिविलम्बिजिह्वः। देवान्तको राक्षसराजसूनुर्गतासुरुर्व्यां
सहसा पपात २३ तस्मिन्हते राक्षसयोधमुख्ये महाबले संयति देवशत्रौ।
क्रुद्धस्त्रिशीर्षा निशितास्त्रमुग्रं ववर्ष नीलोरसि बाणवर्षम् २४ महोदरस्तु
संक्रुद्धः कुञ्जरं पर्वतोपमम्। भूयः समधिरुह्याशु मन्दरं रश्मिवानिव २५
ततो बाणमयं वर्षं नीलस्योपर्यपातयत्। गिरौ वर्षं तडिच्चक्रं स गर्ज-
न्निव तोयदः २६ ततः शरौघैरभिवृष्यमाणो विभिन्नगात्रः कपि-
सैन्यपालः। नीलो बभूवाथ विसृष्टगात्रो विष्टम्भितस्तेन महाबलेन २७
ततस्तु नीलः प्रतिलब्धसंज्ञः शैलं समुत्पाट्य सवृक्षखण्डम्। ततः समुत्पत्य

---

विदीर्ण होऊन गल्या १९; ह्याप्रमाणें आपला उत्कर्ष झालेला अवलोकन करून बलाढ्य देवांतक आनंदानें परिघ हातामध्यें घेऊन संग्रामामध्यें वायुपुत्र हनुमानाकडे धांवला असतां १२० चाल करून येणाऱ्या त्या राक्षसाचे मस्तकावर वानरश्रेष्ठ हनु-मानानें उड्डाण करून आपल्या वज्रतुल्य मुष्टीचा प्रहार केला २१. बलाढ्य व वीर असा जो महाकपि वायुपुत्र हनुमान् त्यानें त्याचे मस्तकीं मुष्टीचा प्रहार केला, इतकेंच नव्हे परंतु, गर्जनेनें राक्षसांना कंपितही केलें २२; आणि इतक्यांत तो राक्षसराजपुत्र देवांतकही मुष्टिप्रहारानें मस्तकाचा चुराडा झाल्यामुळें दांत व डोळे बाहेर पडून व जीभ लोंबूं लागून गतप्राण झाला आणि एकाएकीं भूमीवर पडला २३. ह्याप्रमाणें राक्षसयोद्ध्यांपैकीं मुख्य असलेला तो महाबलाढ्य देवशत्रु देवांतक संग्रामामध्यें वध पावला असतां त्रिशीर्षा क्रुद्ध झाला आणि तीक्ष्ण अस्त्रांसहवर्तमान बाणांचा भयंकर वर्षाव त्यानें नीलाच्या वक्षःस्थलावर केला २४. महोदर तर क्रुद्ध होऊन मंदरपर्व-तावर आरूढ होणाऱ्या सूर्याप्रमाणेंच कीं काय पर्वतप्राय गजावर पुनरपि सत्वर आरूढ झाला २५; आणि मेघ ज्याप्रमाणें गर्जना करीत करीत विद्युत्समुदायानें युक्त अशी वृष्टि पर्वतावर करितो त्याप्रमाणें नीलाचे वक्षःस्थलावर बाणमय वृष्टि करूं लागला २६. तेव्हां बाणसमुदायांचा चोहोंकडून वर्षाव होऊं लागल्यामुळें वानरसेनाधिपति नीलाचीं गात्रें फुटून शिथिल झालीं आणि त्या महाबलाढ्य महोदरानें त्याचा पराक्रमही कुंठित करून टाकिला २७. तदनंतर कांहीं वेळानें नील शुद्धीवर आला असतां वृक्षसमुदा-यासहवर्तमान एक पर्वत त्यानें उपटून हातामध्यें घेतला आणि फारच उग्र वेग धारण

महोग्रवेगो महोदरं तेन जघान मूर्ध्नि २८ ततः स शैलाभिनिपातभग्नो महोदरस्तेन महाद्विपेन । व्यामोहितो भूमितले गतासुः पपात वज्राभिहतो यथाद्रिः २९ पितृव्यं निहतं दृष्ट्वा त्रिशिराश्चापमाददे । हनुमन्तं च संक्रुद्धो विव्याध निशितैः शरैः १३० स वायुसूनुः कुपितश्चिक्षेप शिखरं गिरेः । त्रिशिरास्तच्छरैस्तीक्ष्णैर्बिभेद बहुधा बली ३१ तद्व्यर्थं शिखरं दृष्ट्वा द्रुमवर्षं तदा कपिः । विससर्ज रणे तस्मिन्रावणस्य सुतं प्रति ३२ तमापतन्तमाकाशे द्रुमवर्षं प्रतापवान् । त्रिशिरा निशितैर्बाणैश्चिच्छेद च ननाद च ३३ हनूमांस्तु समुत्पत्य हयं त्रिशिरसस्तदा । विददार नखैः क्रुद्धो नागेन्द्रं मृगराडिव ३४ अथ शक्तिं समासाद्य कालरात्रिमिवान्तकः । चिक्षेपानिलपुत्राय त्रिशिरा रावणात्मजः ३५ दिवः क्षिप्तामिवोल्कां तां शक्तिं क्षिप्तामसंगताम् । गृहीत्वा हरिशार्दूलो बभञ्ज च ननाद च ३६ तां दृष्ट्वा घोरसंकाशां शक्तिं भग्नां हनूमता । प्रहृष्टा वानरगणा विनेदुर्जलदा यथा ३७ ततः खड्गं समुद्यम्य त्रिशिरा

---

करणाऱ्या त्या नीलानें उड्डाण करून त्या पर्वताच्या योगानें महोदराला वक्षःस्थलाचे ठिकाणीं प्रहार केला २८. तेव्हां पर्वत पडल्यामुळें त्या महागजासहवर्तमान महोदर मुर्च्छित होऊन छिन्नभिन्न झाला आणि वज्रानें ताडित झालेल्या पर्वताप्रमाणें गतप्राण होऊन भूमीवर पडला २९. नंतर आपला पितृव्य वध पावल्याचें अवलोकन करून क्रुद्ध झालेल्या त्रिशिराराक्षसानेंही हातामध्यें धनुष्य घेतलें आणि तीक्ष्ण बाणांच्या योगानें त्यानें हनुमानाला वेध केला १३०. तेव्हां, वायुपुत्र हनुमानानें क्रुद्ध होऊन एक पर्वतशिखर त्याच्यावर फेंकिलें असतां बलाढ्य त्रिशिराराक्षसानें तीक्ष्ण बाणांच्या योगानें त्याचे अनेक तुकडे करून टाकिले ३१. ह्याप्रमाणें तें शिखर व्यर्थ गेलेलें पाहून हनुमानानें त्या संग्रामामध्यें रावणाच्या पुत्रावर वृक्षांचा वर्षाव केला ३२; परंतु, तो वृक्षांचा वर्षाव आकाशामध्यें आहे तोंच तीक्ष्ण बाणांच्या योगानें त्याचे तुकडे तुकडे करून तो प्रतापी त्रिशिरा गर्जना करूं लागला ३३. तेव्हां क्रुद्ध झालेला मृगराज सिंह ज्याप्रमाणें गजेंद्राला नखांनीं विदीर्ण करून टाकितो त्याप्रमाणें हनुमानानें उड्डाण करून त्रिशिराराक्षसाचा अश्व नखांनीं विदीर्ण करून टाकिला ३४. नंतर कालरात्रीचा स्वीकार करणाऱ्या अंतकाप्रमाणें हातामध्यें शक्ति घेऊन रावणपुत्र त्रिशिराराक्षसानें ती वायुपुत्र हनुमानावर फेंकिली ३५. परंतु, आकाशांतून निघालेल्या ज्वालेप्रमाणें ती त्रिशिरानें फेंकिलेली अप्रतिहत शक्ति वानरश्रेष्ठ हनुमानानें धरून मोडून टाकिली आणि गर्जनाही केली ३६. ती घोर शक्ति हनुमानानें मोडल्याचें पहातांक्षणीं वानरगणही

राक्षसोत्तमः । निचखान तदा खड्गं वानरेन्द्रस्य वक्षसि ३८ खड्गप्रहाराभिहतो हनूमान्मारुतात्मजः । आजघान त्रिमूर्धानं तलेनोरसि वीर्यवान् ३९ स तलाभिहतस्तेन स्रस्तहस्तायुधो भुवि । निपपात महातेजास्त्रिशिरास्त्यक्तचेतनः १४० स तस्य पततः खड्गं तमाच्छिद्य महाकपिः । ननाद गिरिसंकाशस्त्रासयन्सर्वराक्षसान् ४१ अमृष्यमाणस्तं घोषमुत्पपात निशाचरः । उत्पत्य च हनूमन्तं ताडयामास मुष्टिना ४२ तेन मुष्टिप्रहारेण संचुकोप महाकपिः । कुपितश्च निजग्राह किरीटे राक्षसर्षभम् ४३ स तस्य शीर्षाण्यसिना शितेन किरीटजुष्टानि सकुण्डलानि । क्रुद्धः प्रचिच्छेद सुतोनिलस्य त्वष्टुः सुतस्येव शिरांसि शक्रः ४४ तान्यायताक्षाण्यगसंनिभानि प्रदीप्तवैश्वानरलोचनानि । पेतुः शिरांसीन्द्ररिपोः पृथिव्यां ज्योतींषि मुक्तानि यथेन्द्रमार्गात् ४५ तस्मिन्हते देवरिपौ त्रिशीर्षे हनूमता शक्रपराक्रमेण । नेदुः प्लवङ्गाः प्रचचाल भूमी रक्षांस्यथो दुद्रुविरे समन्तात् ४६ हतं त्रिशिरसं दृष्ट्वा युद्धोन्मत्तं तथैव च । हतौ प्रेक्ष्य

आनंदित होऊन मेघांप्रमाणें गर्जना करूं लागले ३७. तदनंतर राक्षसश्रेष्ठ त्रिशिरानें हातामध्यें खड्ग घेतला आणि वानराधिपति हनुमानाच्या वक्षःस्थलावर तो टोंचिला ३८. त्या खड्गप्रहारानें ताडित झालेल्या वीर्यवान् वायुपुत्र हनुमानानेंही हस्ततलानें त्रिशिराचे वक्षःस्थलावर प्रहार केला असतां ३९ त्या तलप्रहारानें तो महातेजस्वी ताडित झाला असतां त्याच्या हातांतील खड्ग गळून पडला आणि त्रिशिराही मूर्च्छित होऊन भूमीवर पडला १४०. त्याच्या हातांतून तो खड्ग गळून पडूं लागला असतां पर्वतप्राय महाकपि हनुमानानें तो घेतला आणि सर्व राक्षसांना भय उत्पन्न करीत करीत त्यानें गर्जना केली ४१. परंतु, ती गर्जना सहन न झाल्यामुळें त्रिशिराराक्षसानें उड्डाण केलें आणि उड्डाण करून हनुमानाला त्यानें एक मुष्टिप्रहारही केला ४२. त्या मुष्टिप्रहारामुळें महाकपि हनुमान् क्रुद्ध झाला आणि क्रुद्ध झाल्यावर किरीटप्रदेशाचे ठिकाणीं त्यानें त्या राक्षसश्रेष्ठाला धरिलें ४३. इतकेंच नव्हे परंतु, त्वष्ट्याच्या पुत्राचीं मस्तकें ज्याप्रमाणें इंद्रानें तोडिलीं त्याप्रमाणें क्रुद्ध झालेल्या वायुपुत्र हनुमानानें तीक्ष्ण खड्गाच्या योगानें किरीटकुंडलांनीं युक्त असलेलीं त्याचीं मस्तकें तोडून टाकिलीं ४४. तेव्हां आकाशांतून पडलेले तारेच कीं काय अशीं इंद्रशत्रु त्रिशिराचीं दीर्घ अवयव आणि उज्ज्वल अग्नीसारिखे नेत्र ह्यांनीं युक्त असलेलीं तीं पर्वततुल्य मस्तकें पृथ्वीवर पडलीं ४५; आणि ह्याप्रमाणें इंद्रतुल्य पराक्रमी हनुमानानें त्या देवशत्रु त्रिशिरसाचा वध केला असतां वानर गर्जना करूं लागले; भूमि

दुराधर्षौ देवान्तकनरान्तकौ ४७ चुकोप परमामर्षी मत्तो राक्षसपुङ्गवः।
जग्राहार्चिष्मतीं चापि गदां सर्वायसीं तदा ४८ हेमपट्टपरिक्षिप्तां मांस-
शोणितफेनिलाम्। विराजमानां विपुलां शत्रुशोणिततर्पिताम् ४९
तेजसा संप्रदीप्ताग्रां रक्तमाल्यविभूषिताम्। ऐरावतमहापद्मसार्वभौमभ-
यावहाम् १५० गदामादाय संक्रुद्धो मत्तो राक्षसपुङ्गवः। हरीन्समभिदु-
द्राव युगान्ताग्निरिव ज्वलन् ५१ अथर्षभः समुत्पत्य वानरो रावणा-
नुजम्। मत्तानीकमुपागम्य तस्थौ तस्याग्रतो बली ५२ तं पुरस्तात्स्थितं
दृष्ट्वा वानरं पर्वतोपमम्। आजघानोरसि क्रुद्धो गदया वज्रकल्पया ५३
स तयाभिहतस्तेन गदया वानरर्षभः। भिन्नवक्षाः समाधूतः सुस्राव रुधिरं
बहु ५४ स संप्राप्य चिरात्संज्ञामृषभो वानरेश्वरः। क्रुद्धो विस्फुरमा-
णोष्ठो महापार्श्वमुदैक्षत ५५ स वेगवान्वेगवदभ्युपेत्य तं राक्षसं वानर-
वीरमुख्यः। संवर्त्य मुष्टिं सहसा जघान बाह्वन्तरे शैलनिकाशरूपः ५६

---

हदरळू लागली आणि राक्षस वाट फुटेल तिकडे पळून जाऊं लागले ४६. त्रिशिरस्, युद्धो-न्मत्त, महोदर आणि पराजित होण्यास दुर्घट असलेले देवांतक व नरांतक ह्यांचा वध झाल्याचें अवलोकन करून ४७ अतिशय रागीट असलेला राक्षसश्रेष्ठ मत्त क्रुद्ध झाला आणि सर्वस्वीं लोहमय अशी एक उज्ज्वल गदा त्यानें हातामध्यें घेतली ४८. त्या गदेला सुवर्णाचे पट्ट सभोंवतीं गुंडाळलेले होते; व रक्तमांसांच्या योगानें ती फसफसून गेली होती; शत्रूंच्या रक्तानें तृप्त झालेली ती प्रचंड गदा चमकत होती ४९; तेजाच्या योगानें तिचा अग्रभाग प्रज्वलित दिसत होता; आरक्तवर्ण पुष्पांनीं तिला शृंगारिलें होतें आणि ऐरावत, महापद्म व सार्वभौम ह्या दिग्गजांनाही ती भयप्रद होती १५०. अशा प्रकारची ती गदा हातामध्यें घेऊन प्रलयकालच्या प्रज्वलित अग्नीप्रमाणें तो राक्षसश्रेष्ठ मत्त क्रुद्ध होऊन वानरांवर धांवला ५१. तदनंतर बलाढ्य ऋषभ वानर उड्डाण करून व रावणपुत्र मत्ताचे समीप जाऊन त्याच्यापुढें उभा राहिला असतां ५२ अग्रभागीं स्थित असलेल्या त्या पर्वतप्राय वानराच्या वक्षःस्थलावर वज्रतुल्य गदेच्या योगानें त्या क्रुद्ध मत्तानें प्रहार केला ५३. तव्हां, त्या मत्तानें त्या गदेच्या योगानें प्रहार केला असतां त्या वानरश्रेष्ठानें वक्षःस्थल विदीर्ण झालें आणि जर्जर झालेल्या त्या वानर-श्रेष्ठाच्या शरीरांतून रक्तही अतिशय वाहूं लागलें ५४. नंतर बऱ्याच वेळानें शुद्धीवर आल्यानंतर तो वानराधिपति ऋषभ क्रुद्ध झाला, त्याचे ओष्ठ स्फुरण पावूं लागले आणि तो त्या मत्तसंज्ञक महापार्श्व राक्षसाकडे पाहूं लागला ५५. नंतर वानरवीरां-पैकीं मुख्य असलेला तो वेगवान् पर्वतप्राय शरीर धारण करणारा ऋषभ वेगावेगानें

स छिन्नमूलः सहसैव वृक्षः क्षितौ पपात क्षतजोक्षिताङ्गः । तां चास्य घोरां यमदण्डकल्पां गदां प्रगृह्याशु तदा ननाद ५७ मुहूर्तमासीत्स गतासुकल्पः प्रत्यागतात्मा सहसा सुरारिः । उत्पत्य संध्याभ्रसमानवर्णस्तं वारिराजात्मजमाजघान ५८ स मूर्च्छितो भूमितले पपात मुहूर्तमुत्पत्य पुनः ससंज्ञः । तामेव तस्याद्रिवराद्रिकल्पां गदां समाविध्य जघान सङ्ख्ये ५९ सा तस्य रौद्रा समुपेत्य देहं रौद्रस्य देवाध्वरविप्रशत्रोः । बिभेद वक्षः क्षतजं च भूरि सुस्राव धात्वम्भ इवाद्रिराजः १६० अभिदुद्राव वेगेन गदां तस्य महात्मनः । तां गृहीत्वा गदां भीमामाविध्य च पुनःपुनः ॥ मत्तानीकं महात्मा स जघान रणमूर्धनि ६१ स स्वया गदया भग्नो विशीर्णदशनेक्षणः । निपपात तदा मत्तो वज्राहत इवाचलः ६२ विशीर्णनयनो भूमौ गतसत्त्वो गतायुषः । पतिते राक्षसे तस्मिन्विद्रुतं

---

त्या राक्षसासमीप गेला आणि एकाएकीं मूठ वळवून त्या राक्षसाच्या वक्षःस्थलावर त्यानें प्रहार केला ५६. तेव्हां, मुळें तुटून गेलेला वृक्ष ज्याप्रमाणें भूमीवर पडतो त्याप्रमाणें तो राक्षस शरीरावर रक्ताचा सडा होऊन एकाएकीं भूमीवर पडला व इतक्यांत त्याची ती यमदंडतुल्य प्रचंड गदाही सत्वर हातामध्यें धरून ऋषभ वानरानें गर्जना केली ५७. भूमीवर पडल्यानंतर एक मुहूर्तपर्यंत तो मत्तराक्षस मृतप्रायच होता. परंतु, पुनरपि एकाएकीं शुद्धीवर आला आणि संध्याकाळच्या अभ्राप्रमाणें ज्याचा वर्ण आहे अशा त्या देवशत्रु मत्तराक्षसानें उड्डाण करून त्या वरुणपुत्र ऋषभ वानराला प्रहार केला ५८. तेव्हां तो ऋषभ वानर मूर्च्छित होऊन मुहूर्तभर भूमीवर पडला आणि पुनरपि शुद्धीवर आल्यानंतर महापर्वताप्रमाणें असलेली त्याचीच गदा रणभूमीमध्यें गरगर फिरवून तिच्या योगानें त्यानें त्याला प्रहार केला ५९. तेव्हां त्याची ती दारुण गदा देव, यज्ञ व ब्राह्मण ह्यांचा शत्रु जो भयंकर मत्तराक्षस त्याच्या देहासमीप आली; त्याचें वक्षःस्थल तिनें फोडून टाकिलें व असें झालें असतां महापर्वतापासून स्रवणाऱ्या धातुमिश्रित जलाप्रमाणें त्याच्या शरीरांतून रक्तही अतिशय स्रवूं लागलें १६०. गदेचा प्रहार केल्यानंतर पुनरपि वेगावेगानें तो ऋषभ वानर त्या महात्म्या मत्त राक्षसाच्या गदेकडे धांवला; ती भयंकर गदा घेऊन वारंवार त्यानें फिरविली आणि संग्रामामध्यें त्या महात्म्या वानरानें त्या मत्त राक्षसाला प्रहार केला ६१. ह्याप्रमाणें स्वतःच्याच गदेनें विदीर्ण झालेल्या त्या मत्तराक्षसाचे दांतांचा व नेत्रांचा चुराडा झाला आणि अशारीतीनें ज्याच्या नेत्रांचा चुराडा झाला आहे व आयुर्दाय संपून जो गतप्राण झाला आहे असा तो मत्त वज्रानें ताडित झालेल्या

राक्षसं बलम् ६३ तस्मिन्हते भ्रातरि रावणस्य तन्नैर्ऋतानां . बलमर्णवा-
भम् । त्यक्तायुधं केवलजीवितार्थं दुद्राव भिन्नार्णवसंनिकाशम् १६४
[ ३०८४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे
एकोनसप्ततितमः सप्ततितमश्च सर्गौ ॥ ६९ ॥ ७० ॥

स्वबलं व्यथितं दृष्ट्वा तुमुलं लोमहर्षणम् । भ्रातॄंश्च निहतान्दृष्ट्वा शक्र-
तुल्यपराक्रमान् १ पितृव्यौ चापि संदृश्य समरे संनिपातितौ । युद्धो-
न्मत्तं च मत्तं च भ्रातरौ राक्षसोत्तमौ २ चुकोप च महातेजा ब्रह्मद-
त्तवरो युधि । अतिकायोऽद्रिसंकाशो देवदानवदर्पहा ३ स भास्करसह-
स्रस्य संघातमिव भास्वरम् । रथमारुह्य शक्रारिरभिदुद्राव वानरान् ४
स विस्फार्य तदा चापं किरीटी मृष्टकुण्डलः । नाम संश्रावयामास
ननाद च महास्वनम् ५ तेन सिंहप्रणादेन नामविश्रावणेन च । ज्याश-
ब्देन च भीमेन त्रासयामास वानरान् ६ ते दृष्ट्वा देहमाहात्म्यं कुम्भकर्णो-
ऽयमुत्थितः । भयार्ता वानराः सर्वे संश्रयन्ते परस्परम् ७ ते तस्य रूपमालोक्य

---

पर्वताप्रमाणें भूमीवर पडला व तो राक्षस पडल्यानंतर राक्षससैन्यही पळत सुटलें ६२. ६३.
सारांश, रावणाच्या त्या ( मत्तसंज्ञक ) भ्रात्याचा वध झाला असतां राक्षसांच्या त्या
समुद्रप्राय सैन्यानें आयुधें टाकून दिलीं आणि केवळ जीविताच्या आशेनें अमर्याद
झालेल्या समुद्राप्रमाणें तें वाट फुटेल तिकडे पळत सुटलें १६४. ह्याप्रमाणें महामुनि-
वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकुणहत्तरावा व
सत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ६९ ॥ ७० ॥

अंगावर रोमांच उठविणारें आपलें प्रचंड सैन्य जर्जर झालें असून इंद्रतुल्य परा-
क्रमी आपले भ्रातेही वध पावले आहेत १; आणि एकमेकांचे भ्राते असलेले राक्षस-
श्रेष्ठ युद्धोन्मत्त व मत्त असे जे आपले पितृव्य त्यांचाही समरांगणामध्यें निःपात झाला आहे
असें अवलोकन करून २ महातेजस्वी अतिकाय संग्रामामध्यें क्रुद्ध झाला. त्या अतिकायाला
ब्रह्मदेवानें वर दिला होता. शरीरानें अतिशयच मोठा असलेला तो पर्वततुल्य अतिकाय देव-
दानवांचाही गर्व परिहार करणारा होता ३. असो. सहस्र सूर्यांच्या समुदायाप्रमाणें उज्ज्वल
असलेल्या रथावर आरूढ होऊन तो इंद्रशत्रु वानरांवर धांवला ४; किरीट व उज्ज्वल
कुंडलें धारण केलेल्या त्या अतिकायानें धनुष्याचा टणत्कार केला आणि आपलें नांव
प्रसिद्ध करून उच्च स्वरानें गर्जनाही केली ५. तो सिंहनाद, तें स्वनामख्यापन व प्रत्यंचेचा
तो भयंकर टणत्कार ह्यांच्या योगानें त्यानें वानरांना भयभीत केलें ६ व त्याचा मोठा
देह अवलोकन करितांक्षणीं " हा कुंभकर्ण आज पुनरपि उठला आहे " असा

यथा विष्णोस्त्रिविक्रमे । भयाद्वानरयोधास्ते विद्रवन्ति ततस्ततः ८
अतिकायं समासाद्य वानरा मूढचेतसः । शरण्यं शरणं जग्मुर्लक्ष्मणाग्र-
जमाहवे ९ ततोतिकायं काकुत्स्थो रथस्थं पर्वतोपमम् । ददर्श धन्विनं
दूराद्गर्जन्तं कालमेघवत् १० स तं दृष्ट्वा महाकायं राघवस्तु सुविस्मितः ।
वानरान्सान्त्वयित्वा च विभीषणमुवाच ह ११ कोसौ पर्वतसंकाशो
धनुष्मान्हरिलोचनः । युक्ते हयसहस्रेण विशाले स्यन्दने स्थितः १२ य
एष निशितैः शूलैः सुतीक्ष्णैः प्रासतोमरैः । अर्चिष्मद्भिर्वृतो भाति भूतैरिव
महेश्वरः १३ कालजिह्वाप्रकाशाभिर्य एषोभिविराजते । आवृतो रथश-
क्तीभिर्विद्युद्भिरिव तोयदः १४ धनूंषि चास्य सज्जानि हेमपृष्ठानि सर्वशः ।
शोभयन्ति रथश्रेष्ठं शक्रचापमिवाम्बरम् १५ य एष रक्षःशार्दूलो रणभूमिं
विराजयन् । अभ्येति रथिनां श्रेष्ठो रथेनादित्यवर्चसा १६ ध्वजशृङ्गप्र-
तिष्ठेन राहुणाभिविराजते । सूर्यरश्मिप्रभैर्बाणैर्दिशो दश विराजयन् १७

---

सगर्जनेनें सर्वही वानर भयभीत होऊन परस्परांना कवटाळूं लागले ७. तीन पावलें टाकण्याचे वेळीं झालेल्या विष्णूच्या रूपाप्रमाणें त्याचें रूप अवलोकन करून ते वानर-योद्धे भीतीनें वाट फुटेल तिकडे पळत सुटले ८ आणि त्या अतिकायाची गांठ पडतांक्षणीं मनामध्यें गोंधळून गेलेले ते वानर शरण जाण्याला योग्य असलेल्या रामाला युद्धभूमीमध्यें शरण गेले ९. तों इतक्यांत प्रलयकालच्या मेघाप्रमाणें गर्जना करीत असलेला व रथारूढ झालेला तो धनुर्धारी अतिकाय ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्याही दृष्टीं पडला असतां १० त्या अतिकायाला अवलोकन करून रामही अतिशय विस्मित झाला आणि वानरांना धीर देऊन बिभीषणाला ह्मणाला ११. "सिंहासारिखी दृष्टि व पर्वतासारिखें शरीर ह्यांनीं युक्त असलेला व सहस्र अश्व जोडिलेल्या विशाल रथावर आरूढ झालेला हा धनुर्धर कोण बरें असावा ? १२. धार लाविलेले शूल आणि अत्यंत तीक्ष्ण व देदीप्यमान असलेले प्रास व तोमर ह्या आयुधांनीं परिवेष्टित असल्यामुळें भूतगणांनीं परिवेष्टित झालेल्या महेश्वराप्रमाणें हा भासत आहे १३. कालाच्या जिह्वाच कीं काय अशा रथशक्तींनीं परिवेष्टित झालेला असल्यामुळें विद्युल्लतांनीं परिवेष्टित असलेल्या मेघाप्रमाणें हा भासत आहे १४. ह्याचीं सज्ज केलेलीं धनुष्यें सर्व बाजूंनीं सुवर्णानें मढविलेलीं असल्यामुळें आकाशाला शोभा देणाऱ्या इंद्रधनुष्याप्रमाणें श्रेष्ठ रथाला शोभा देत आहेत १५. रथांमध्यें श्रेष्ठ असलेला हा राक्षसोत्तम सूर्यासारिख्या तेजस्वी रथाच्या योगानें रणभूमि प्रकाशित करीत आहे १६. ध्वजाचे अग्रभागीं असलेल्या राहूच्या

त्रिनतं मेघनिर्ह्रादं हेमपृष्ठमलंकृतम् । शतक्रतुधनुःप्रख्यं धनुश्चास्य विरा-
जते १८ सध्वजः सपताकश्च सानुकर्षो महारथः । चतुःसादिसमायुक्तो
मेघस्तनितनिःस्वनः १९ विंशतिर्दश चाष्टौ च तूणास्य रथमास्थिताः ।
कार्मुकाणि च भीमानि ज्याश्च काञ्चनपिङ्गलाः २० द्वौ च खड्गौ च
पार्श्वस्थौ प्रदीपौ पार्श्वशोभितौ । चतुर्हस्तत्सरुचितौ व्यक्तहस्तदशा-
यतौ २१ रक्तकण्ठगुणो धीरो महापर्वतसंनिभः । कालः कालमहावक्त्रो
मेघस्थ इव भास्करः २२ काञ्चनाङ्गदनद्धाभ्यां भुजाभ्यामेष शोभते ।
शृङ्गाभ्यामिव तुङ्गाभ्यां हिमवान्पर्वतोत्तमः २३ कुण्डलाभ्यामुभाभ्यां च
भाति वक्त्रं सुभीषणम् । पुनर्वस्वन्तरगतः परिपूर्णो निशाकरः २४
आचक्ष्व मे महाबाहो त्वमेनं राक्षसोत्तमम् । यं दृष्ट्वा वानराः सर्वे भयार्ता
विद्रुता दिशः २५ स पृष्टो राजपुत्रेण रामेणामिततेजसा । आचचक्षे
महातेजा राघवाय बिभीषणः २६ दशग्रीवो महातेजा राजा वैश्रवणानुजः ।

---

योगानें हा झळकत आहे आणि सूर्यकिरणांसारिख्या उज्ज्वल बाणांनीं हा दशदिशा प्रकाशित करीत आहे १७. ह्याचें धनुष्य तीन ठिकाणीं नमलेलें असून मेघासारिखी गर्जना करीत आहे; त्याचा पृष्ठ भाग सुवर्णानें मढविलेला आहे; तें भूषित केलेलें आहे आणि इंद्राच्या धनुष्यासारिखें तें झळकत आहे १८. ध्वज, पताका, अनुकर्ष (आंखरी) व चार सारथी ह्यांनीं युक्त असलेला त्याचा मोठा रथ मेघगर्जनेप्रमाणें घोष करीत आहे १९. ह्याच्या रथावर अडतीस भाते असून भयंकर धनुष्यें आहेत. आणि सुवर्णवर्ण व पिंगटवर्ण प्रत्यंचाही त्या रथावर ठेविल्या आहेत २०. त्याच्या दोन्हीं बाजूंना असलेले दोन खड्ग आजूबाजूंना झळकत असलेल्या प्रदीपांप्रमाणें शोभत आहेत; चार चार हात लांब असलेल्या मुठीमध्यें ते बसविलेले आहेत आणि पूर्ण दहा दहा हात त्यांची लांबी आहे २१. मृत्यूप्रमाणें प्रचंड मुख, महापर्वततुल्य शरीर आणि रक्तवर्ण कंठमाला ह्यांनीं युक्त असलेला हा कृष्णवर्ण व धैर्यवान् योद्धा मेघपटलांतील सूर्याप्रमाणें भासत आहे २२; सुवर्णभूषणांनीं शृंगारिलेल्या भुजांच्या योगानें हा वीर उच्च शिखरांनीं शोभणाऱ्या उत्कृष्ट हिमालयपर्वताप्रमाणें शोभत आहे २३ आणि पुनर्वसु ताऱ्यांचे मध्यभागीं असलेल्या पूर्ण चंद्राप्रमाणें ह्याचें अतिभयंकर मुख दोन्हीं कुंडलांनीं शोभत आहे २४. तस्मात्, हे महाबाहो, हा राक्षसश्रेष्ठ कोण हें तूं मला सांग; कारण, ह्याला अवलोकन करून भयभीत झालेले सर्वही वानर वाट फुटेल तिकडे पळत सुटले आहेत" २५. ह्याप्रमाणें महातेजस्वी राजकुमार रामानें विचारिलें असतां तो महातेजस्वी बिभीषण रावणाला म्हणाला २६ "कुबेराचा कनिष्ठ भ्राता

भीमकर्मा महात्मा हि रावणो राक्षसेश्वरः २७ तस्यासीद्वीर्यवा-न्पुत्रो रावणप्रतिमो बले । वृद्धसेवी श्रुतबलः सर्वास्त्रविदुषां वरः २८ अश्वपृष्ठे नागपृष्ठे खड्गे धनुषि कर्षणे । भेदे सान्त्वे च दाने च नये मन्त्रे च संमतः २९ यस्य बाहुं समाश्रित्य लङ्का भवति निर्भया । तनयं धान्यमालिन्या अतिकायमिमं विदुः ३० एतेनाराधितो ब्रह्मा तपसा भावितात्मना । अस्त्राणि चाप्यवाप्तानि रिपवश्च पराजिताः ३१ सुरासुरैरवध्यत्वं दत्तमस्मै स्वयंभुवा । एतच्च कवचं दिव्यं रथश्च रविभास्वरः ३२ एतेन शतशो देवा दानवाश्च पराजिताः । रक्षितानि च रक्षांसि यक्षाश्चापि निषूदिताः ३३ वज्रं विष्टम्भितं येन बाणैरिन्द्रस्य धीमता । पाशः सलिलराजस्य युद्धे प्रतिहतस्तथा ३४ एषोऽतिकायो बलवान्राक्षसानामथर्षभः । स रावणसुतो धीमान्देवदानवदर्पहा ३५ तदस्मिन्क्रियतां यत्नः क्षिप्रं पुरुषपुङ्गव । पुरा वानरसैन्यानि क्षयं नयति सायकैः ३६ ततोऽतिकायो बलवान्प्रविश्य हरिवाहिनीम् । विस्फारयामास धनुर्ननाद च

---

दशानन रावणराजा राक्षसाधिपति आहे आणि तो महात्मा भयंकर कर्मे करणारा आहे २७. सामर्थ्यानें त्याची बरोबरी करणारा असा एक त्याचा वीर्यवान् पुत्र आहे. तो वृद्धांचा समागम करणारा, सर्व अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आणि बलाविषयीं प्रख्यात आहे २८. अश्वारोहण, गजारोहण, तरवार, धनुष्य, चाप वगैरे आणि त्याचप्रमाणें साम, दान, भेद, राजनीति, आणि मसलत ह्यांविषयीं तो निपुण आहे २९. ह्याच्या बाहूचें अवलंबन करून लंका निर्भय आहे आणि धान्यमालिनीच्या ह्या पुत्राला अतिकाय असें म्हणत असतात ३०. तपाच्या योगानें ज्याचें अंतःकरण शुद्ध झालेलें आहे अशा ह्या रावणपुत्रानें ब्रह्मदेवाचें आराधन करून अस्त्रें प्राप्त करून घेतलीं आहेत आणि शत्रूंचा पराजय केलेला आहे ३१. देवदैत्यांना तूं अवध्य होशील असा वर ब्रह्मदेवानें ह्याला दिला असून हें दिव्य कवच आणि सूर्यासारिखा तेजस्वी रथ हींही ह्याला त्यानेंच दिलीं आहेत ३२. देव आणि दानव ह्यांचा ह्यानें शेंकडों वेळां पराजय केला असून यक्षांचाही ह्यानें वध केला आहे आणि राक्षसांचें रक्षण केलें आहे ३३. ह्या बुद्धिमान् रावणपुत्रानें युद्धामध्यें बाणांच्या योगानें इंद्राचें वज्र आणि वरुणाचा पाश ह्यांना कुंठित केलें आहे ३४; हा अतिकाय बलाढ्य असून राक्षसांमध्यें श्रेष्ठ आहे आणि त्याचप्रमाणें हा बुद्धिमान् रावणपुत्र देवदानवांच्याही गर्वाचा परिहार करणारा आहे ३५. तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठ, बाणांच्या योगानें वानरसैन्याचा ह्यानें क्षय केला नाहीं, तोंच ह्याविषयीं आपण सत्वर प्रयत्न करा" ३६ इतकें झाल्यानंतर तो बलाढ्य

पुनः पुनः ३७ तं भीमवपुषं दृष्ट्वा रथस्थं रथिनां वरम् । अभिपेतुर्महात्मानः प्रधाना ये वनौकसः ३८ कुमुदो द्विविदो मैन्दो नीलः शरभ एव च । पादपैर्गिरिशृङ्गैश्च युगपत्समभिद्रवन् ३९ तेषां वृक्षांश्च शैलांश्च शरैः कनकभूषणैः । अतिकायो महातेजाश्चिच्छेदास्त्रविदां वरः ४० तांश्चैव सर्वान्स हरीञ्शरैः सर्वायसैर्बली । विव्याधाभिमुखान्सङ्ख्ये भीमकायो विशारदः ४१ तेऽर्दिता बाणवर्षेण भिन्नगात्राः पराजिताः । न शेकुरतिकायस्य प्रतिकर्तुं महाहवे ४२ तत्सैन्यं हरिवीराणां त्रासयामास राक्षसः । मृगयूथमिव क्रुद्धो हरिर्यौवनदर्पितः ४३ स राक्षसेन्द्रो हरियूथमध्ये नायुध्यमानं निजघान कंचित् । उत्पत्य रामं सधनुःकलापी सगर्वितं वाक्यमिदं बभाषे ४४ रथे स्थितोऽहं शरचापपाणिर्न प्राकृतं कंचन योधयामि । यस्यास्ति शक्तिर्व्यवसाययुक्तो ददातु मे शीघ्रमिहाद्य युद्धम् ४५ तत्तस्य वाक्यं ब्रुवतो निशम्य चुकोप सौमित्रिरमित्रहन्ता ।

---

अतिकाय वानरसेनेमध्यें प्रविष्ट होऊन वारंवार धनुष्याचा टणत्कार व गर्जना करूं लागला ३७. तेव्हां रथ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो अतिकाय रथारूढ झालेला अवलोकन करून मुख्य मुख्य असलेले महात्मे वानर त्याच्या अंगावर धांवून गेले ३८. कुमुद, द्विविद, मैंद, नील व शरभ हे वानर वृक्ष व पर्वतशिखरें घेऊन एकदम त्याच्यावर धांवून गेले ३९; परंतु, त्या महातेजस्वी, व अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ अतिकायानें सुवर्णभूषित बाणांच्या योगानें त्यांचे वृक्ष व पर्वत तोडून टाकिले ४०. इतकेंच नव्हे परंतु, त्या बलाढ्य व युद्धनिपुण अतिकायानें संग्राममध्यें संमुख आलेल्या त्या सर्व वानरांना लोहमय बाणांनीं वेधही केला ४१. तेव्हां बाणवृष्टीनें जर्जर होऊन व शरीरें फुटून जाऊन पराजित झालेले ते वानर त्या महासंग्राममध्यें अतिकायाचा प्रतिकार करण्यास समर्थ झाले नाहींत ४२. असो. तारुण्यानें मुसमुसत असलेला क्रुद्ध सिंह ज्याप्रमाणें हरिणांचा कळप त्रस्त करून सोडितो त्याप्रमाणें वानरवीरांचें तें सैन्य त्या राक्षसानें त्रस्त करून सोडिलें ४३. वानरसैन्यामध्यें युद्ध न करणाऱ्या कोणाचाही त्या राक्षसाधिपतीनें वध केला नाहीं आणि धनुष्य व भाते ह्यांनीं युक्त असलेला तो अतिकाय उड्डाण करून गर्वयुक्त शब्दांनीं रामाला म्हणाला ४४ " हातामध्यें धनुर्बाण घेऊन रथारूढ झालेला मी कोणत्याही यःकश्चित् पुरुषाशीं युद्ध करणार नाहीं. ह्यास्तव, ज्याचे ठिकाणीं सामर्थ्य असेल आणि युद्धाचा हुरूप असेल त्यानें ह्या ठिकाणीं आज माझ्याशीं सत्वर युद्ध सुरू करावें " ४५. ह्याप्रमाणें बोलत असलेल्या त्या अतिकायाचें भाषण श्रवण करून शत्रूचा वध

अनुष्यमाणश्च समुत्पपात जग्राह चापं च ततः स्मयित्वा ४६ क्रुद्धः सौमित्रिरुत्पत्य तूणादाक्षिप्य सायकम् । पुरस्तादतिकायस्य विचकर्ष महद्धनुः ४७ पूरयन्स महीं सर्वामाकाशं सागरं दिशः । ज्याशब्दो लक्ष्मणस्योग्रस्त्रासयन्रजनीचरान् ४८ सौमित्रेश्चापनिर्घोषं श्रुत्वा प्रतिभयं तदा । विसिस्मिये महातेजा राक्षसेन्द्रात्मजो बली ४९ तदातिकायः कुपितो दृष्ट्वा लक्ष्मणमुत्थितम् । आदाय निशितं बाणमिदं वचनमब्रवीत् ५० बालस्त्वमसि सौमित्रे विक्रमेष्वविचक्षणः । गच्छ किं कालसंकाशं मां योधयितुमिच्छसि ५१ न हि मद्बाहुसृष्टानां बाणानां हिमवानपि । सोढुमुत्सहते वेगमन्तरिक्षमथो मही ५२ सुखप्रसुप्तं कालाग्निं निबोधयितुमिच्छसि । न्यस्य चापं निवर्तस्व प्राणाञ्जहि मद्गतः ५३ अथवा त्वं प्रतिस्तब्धो न निवर्तितुमिच्छसि । तिष्ठ प्राणान्परित्यज्य गमिष्यसि यमक्षयम् ५४ पश्य मे निशितान्बाणानरिपुदर्पनिषूदनान् । ईश्वरायुधसंकाशांस्तप्तकाञ्चनभूषणान् ५५ एष ते

---

करणाऱ्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाला क्रोध आला आणि तें भाषण सहन न झाल्यामुळें उड्डाण करून हास्यपूर्वक धनुष्य हातांत घेतलें ४६. क्रुद्ध झालेल्या लक्ष्मणानें उड्डाण करून व भात्यांतून बाण घेऊन अतिकायासमोर आपलें मोठें धनुष्य खेंचलें असतां ४७ सर्व पृथ्वी, आकाश, समुद्र व दिशा हीं दुमदुमून टाकणारा जो लक्ष्मणाच्या प्रत्यंचेचा प्रचंड टणत्कार तो राक्षसांनाही त्रस्त करूं लागला ४८. तेव्हां लक्ष्मणाच्या धनुष्याचा भयंकर टणत्कार ऐकून महातेजस्वी व बलाढ्य राक्षसराजपुत्र विस्मित झाला ४९ आणि लक्ष्मण उठलेला पाहून क्रुद्ध झालेला तो अतिकाय एक तीक्ष्ण बाण घेऊन त्याला म्हणाला ५० " हे लक्ष्मणा, तूं बाल आहेस व पराक्रमाविषयीं तुला कांहीं माहिती नाहीं. म्हणून, तूं येथून परत जा; कालतुल्य असलेल्या माझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा कशाकरितां करीत आहेस ? ५१. माझ्या बाहूपासून सुटलेल्या बाणांचा वेग सहन करण्यास हिमालयपर्वत, अंतरिक्ष आणि पृथ्वी हींही समर्थ नाहींत ५२. म्हणून, गाढ निद्रिस्त असलेल्या कालाग्नीला जागें करण्याची तू कशाकरितां इच्छा करीत आहेस ? सारांश, धनुष्य खालीं ठेवून तूं आपला परत फीर; माझ्या तावडींत सांपडून प्राणांचा त्याग करूं नकोस ५३. अथवा तुला गर्व झाल्यामुळें जर परत जाण्याचें तूं मनामध्यें आणीत नसशील तर उभा रहा म्हणजे प्राणत्याग करून यमलोकीं चालता होशील ५४. शत्रूंच्या दर्पाचा नाश करणारे हे माझे तीक्ष्ण बाण तूं अवलोकन कर. हे शंकराच्या

सर्पसंकाशो बाणः पास्यति शोणितम्। मृगराज इव क्रुद्धो नागराजस्य शोणितम् ५६ इत्येवमुक्त्वा संक्रुद्धः शरं धनुषि संदधे ५७ श्रुत्वातिकायस्य वचः सरोषं सगर्वितं संयति राजपुत्रः। स संचुकोपातिबलो मनस्वी उवाच वाक्यं च ततो बृहच्छ्रीः ५८ न वाक्यमात्रेण भवान्प्रधानो न कत्थनात्सत्पुरुषा भवन्ति। मयि स्थिते धन्विनि बाणपाणौ निदर्शयस्वात्मबलं दुरात्मन् ५९ कर्मणा सूचयात्मानं न विकत्थितुमर्हसि। पौरुषेण तु यो युक्तः स तु शूर इति स्मृतः ६० सर्वायुधसमायुक्तो धन्वी त्वं रथमास्थितः। शरैर्वा यदि वाप्यस्त्रैर्दर्शयस्व पराक्रमम् ६१ ततः शिरस्ते निशितैः पातयिष्याम्यहं शरैः। मारुतः कालसंपक्वं वृन्तात्तालफलं यथा ६२ अद्य ते मामका बाणास्तप्तकाञ्चनभूषणाः। पास्यन्ति रुधिरं गात्राद्बाणशल्यान्तरोत्थितम् ६३ बालोऽयमिति विज्ञाय न चावज्ञातुमर्हसि। बालो वा यदि वा वृद्धो मृत्युं जानीहि संयुगे। बालेन विष्णुना लोकास्त्रयः क्रान्तास्त्रिविक्रमैः ६४ लक्ष्मणस्य

---

त्रिशूलासारिखे असून उज्ज्वल सुवर्णभूषणांनीं शृंगारिलेले आहेत ५५. क्रुद्ध झालेला मृगराज ज्याप्रमाणें गजेंद्राचें रक्त प्राशन करितो त्याप्रमाणें हा सर्पासारिखा बाण तुझें रक्त प्राशन करील" ५६. असें बोलून क्रुद्ध झालेल्या अतिकायानें धनुष्याला बाण लाविला ५७. गर्व व रोष ह्यांनीं युक्त असलेलें तें अतिकायाचें भाषण श्रवण करून तो महावैभवशाली, अतिबलाढ्य व विचारी राजपुत्र लक्ष्मण संग्रामामध्यें क्रुद्ध झाला आणि ह्मणाला ५८ "केवल बडबड करण्यानें तूं श्रेष्ठ होत नाहींस आणि फुशारक्या मारण्यानें कोणी सत्पुरुषही होत नाहींत. धनुर्बाण हातामध्यें घेऊन मी उभा असतांना, हे दुरात्म्या, आपलें सामर्थ्य तूं मला प्रकट कर ५९. तूं कसा आहेस हें पराक्रमानें दाखीव; नुसत्या फुशारक्या मारणें तुला योग्य नाहीं. जो प्रत्यक्ष पराक्रम करणारा असेल त्यालाच शूर असें ह्मणतात ६०. तूं रथारूढ झाला असून सर्व आयुधांनीं संपन्न आहेस आणि धनुष्यही हातामध्यें घेतलें आहेस. ह्यास्तव, बाणांच्या योगानें अथवा अस्त्रांच्या योगानें मला आपला काय तो पराक्रम दर्शीव ६१. ह्मणजे वायु ज्याप्रमाणें देंठापासून तालवृक्षाचें परिपक्व फल पाडून टाकितो त्याप्रमाणें तीक्ष्ण बाणांच्या योगानें तुझें मस्तक मी खालीं पाडीन ६२. उत्कृष्ट सुवर्णानें भूषित झालेले माझे बाण इतर बाणाग्रांनीं पडलेल्या क्षतापासून स्रवणारें तुझ्या शरीरांतील रक्त आज प्राशन करितील ६३. हा बाल आहे असें समजून अवज्ञा करणें तुला योग्य नाहीं. मी बाल असों अथवा वृद्ध असों, संग्रामामध्यें आज तुला माझ्यापासून मृत्यु

वचः श्रुत्वा हेतुमत्परमार्थवत्। आतिकायः प्रचुक्रोध बाणं चोत्तममाददे ६५ ततो विद्याधरा भूता देवदैत्या महर्षयः । गुह्यकाश्च महात्मानस्तद्युद्धं ददृशुस्तदा ६६ ततोतिकायः कुपितश्चापमारोप्य सायकम् । लक्ष्मणाय प्रचिक्षेप संक्षिपन्निव चाम्बरम् ६७ तमापतन्तं निशितं शरमाशीविषो-पमम् । अर्धचन्द्रेण चिच्छेद लक्ष्मणः परवीरहा ६८ तं निकृत्तं शरं दृष्ट्वा कृत्तभोगमिवोरगम्। अतिकायो भृशं क्रुद्धः पञ्च बाणान्समाददे ६९ तान्शरान्संप्रचिक्षेप लक्ष्मणाय निशाचरः । तानप्राप्तान्शितैर्बाणैश्चिच्छेद भरतानुजः ७० स तान्छित्त्वा शितैर्बाणैर्लक्ष्मणः परवीरहा । आददे निशितं बाणं ज्वलन्तमिव तेजसा ७१ तमादाय धनुःश्रेष्ठे योजयामास लक्ष्मणः । विचकर्ष च वेगेन विससर्ज च सायकम् ७२ पूर्णायतविसृ-ष्टेन शरेण नतपर्वणा । ललाटे राक्षसश्रेष्ठमाजघान स वीर्यवान् ७३ स ललाटे शरो मग्नस्तस्य भीमस्य रक्षसः । ददृशे शोणितेनाक्तः पन्नगेन्द्र इवाचले ७४ राक्षसः प्रचकम्पेथ लक्ष्मणेषुप्रपीडितः । रुद्रबाणहतं घोरं

---

येणार हें तूं समजून ठेव आणि बालरूपी विष्णूनेंच तीन पावलांच्या योगानें तीन लोक व्यापून टाकिले हेंही तुझ्या लक्ष्यांत असूं दे " ६४. लक्ष्मणाचें हें सहेतुक व अतिशय यथार्थ भाषण श्रवण केल्यावर अतिकाय क्रुद्ध झाला व एक उत्कृष्ट बाण त्यानें हातामध्यें घेतला ६५ व नंतर विद्याधर, भूत, देव, दैत्य, महर्षि आणि महात्मे गुह्यक त्या उभयतांचें युद्ध पाहूं लागले ६६. तदनंतर अतिकाय क्रुद्ध झाला आणि धनुष्याला बाण लावून त्याच्या वेगानें अंतरालीं असलेलें आकाश ग्रस्त करीतच कीं काय तो बाण त्यानें लक्ष्मणावर सोडिला ६७; परंतु, तो सर्पतुल्य तीक्ष्ण बाण आपल्याकडे येऊं लागला असतां शत्रुपक्षीयवीरनाशक लक्ष्मणानें अर्धचंद्रबाणानें तो तोडून टाकिला ६८. तेव्हां खांडोळीं झालेल्या सर्पाप्रमाणें फुटलेला तो बाण अवलोकन करून अतिकाय अतिशय क्रुद्ध झाला आणि पांच बाण धनुष्याला लावून ६९ त्या राक्षसानें ते लक्ष्मणावर सोडिले; परंतु, भरताहून लहान असलेला जो लक्ष्मण त्यानें तेही बाण आपल्या समीप येण्यापूर्वीच तीक्ष्ण बाणांनीं तोडून टाकिले ७०. तीक्ष्ण बाणांच्या योगानें ते बाण तोडून टाकिल्यावर शत्रुवीरनाशक लक्ष्मणानें तेजानें जसा कांहीं जळत असलेला एक तीक्ष्ण बाण हातामध्यें घेतला ७१; तो घेऊन लक्ष्मणानें आपल्या श्रेष्ठ धनुष्याला लाविला; वेगानें धनुष्य आकर्षण केलें आणि तो बाण सोडिला ७२. पूर्णपणें खेंचून सोडिलेल्या आणि नमलेल्या पर्वांनीं युक्त असलेल्या त्या बाणाच्या योगानें त्या राक्षस-श्रेष्ठाला ललाटस्थानीं त्या वीर्यवान् लक्ष्मणानें वेध केला असतां ७३ ललाटांत

यथा त्रिपुरगोपुरम् ७५ चिन्तयामास चाश्वस्य विमृश्य च महाबलः । साधु बाणनिपातेन श्लाघनीयोसि मे रिपुः ७६ विधायैवं विदार्यास्यं विनम्य च महाभुजौ । स रथोपस्थमास्थाय रथेन प्रचचार ह ७७ एकं त्रीन्पञ्च सप्तेति सायकान्राक्षसर्षभः । आददे संदधे चापि विचकर्षोत्ससर्ज च ७८ ते बाणाः कालसंकाशा राक्षसेन्द्रधनुश्च्युताः । हेमपुङ्खा रविप्रख्याश्चक्रुर्दीप्तमिवाम्बरम् ७९ ततस्तान्राक्षसोत्सृष्टाञ्शरौघान्राघवानुजः । असंभ्रान्तः प्रचिच्छेद निशितैर्बहुभिः शरैः ८० ताञ्शरान्युधि संप्रेक्ष्य निकृत्तान्रावणात्मजः । चुकोप त्रिदशेन्द्रारिर्जग्राह निशितं शरम् ८१ स संधाय महातेजास्तं बाणं सहसोत्सृजत् । तेन सौमित्रिमायान्तमाजघान स्तनान्तरे ८२ अतिकायेन सौमित्रिस्ताडितो युधि वक्षसि । सुस्राव रुधिरं तीव्रं मदं मत्त इव द्विपः ८३ स चकार तदात्मानं विशल्यं सहसा विभुः । जग्राह च शरं तीक्ष्णमस्त्रेणापि

---

ठिकाणीं रुतलेला तो बाण त्या भयंकर राक्षसाच्या रक्तानें युक्त झाला असतां पर्वतावरील नागराजाप्रमाणें दिसूं लागला ७४. तदनंतर रुद्राच्या बाणानें ताडित झालेल्या त्रिपुरासुरपुराच्या घोर गोपुराप्रमाणें लक्ष्मणाच्या बाणानें ताडित झालेला तो राक्षस कांपूं लागला ७५ आणि शुद्धीवर आल्यानंतर विचार करून तो महाबलाढ्य राक्षस मनामध्यें ह्मणाला "शाबास, ह्या बाणप्रयोगानें तूं माझा शत्रु प्रशंसेस पात्र झाला आहेस" ७६. असें मनामध्यें आणिल्यानंतर मुखानेंही त्या शब्दांचा उच्चार करून व आपले मोठे मोठे भुज व्यवस्थित ठेवून तो रथारूढ झाला आणि रथाच्या योगानें संचार करूं लागला ७७. नंतर एकेकच नव्हे परंतु, तीन तीन, पांच पांच व सात सातही बाण तो एकदम घेऊन, धनुष्याला लावून व धनुष्य ओढून सोडूं लागला असतां ७८ राक्षसाधिपतीच्या धनुष्यापासून सुटलेले ते कालतुल्य सुवर्णभूषित पिच्छांनीं युक्त आणि सूर्यतुल्य बाण आकाश प्रकाशित करूं लागले ७९. परंतु, राक्षसानें सोडिलेले ते बाणसमुदाय रामाहून लहान असलेल्या निर्भय लक्ष्मणानें आपल्या अनेक तीक्ष्ण बाणांनीं तोडून टाकिले ८०. ह्याप्रमाणें संग्रामामध्यें तुटलेले ते बाण अवलोकन करून देवशत्रु रावणपुत्र क्रुद्ध झाला व त्यानें तीक्ष्ण बाण हातामध्यें घेतला ८१; महातेजस्वी राक्षसानें तो बाण धनुष्याला लावून एकदम सोडिला आणि चाल करून येत असलेल्या लक्ष्मणाला त्याच्या योगानें स्थानें वक्षःस्थलाचे ठिकाणीं वेध केला ८२. अतिकायानें ह्याप्रमाणें संग्रामामध्यें वक्षःस्थलाचे ठिकाणीं लक्ष्मणाला वेध केला असतां मत्त गजाच्या गंडस्थलांतून स्रवणाऱ्या मदाप्रमाणें

समस्वरे ८४ आग्नेयेन तदास्त्रेण योजयामास सायकम् । स जज्वाल तदा बाणो धनुष्यस्य महात्मनः ८५ अतिकायोऽतितेजस्वी रौद्रमस्त्रं समादधे । तेन बाणं भुजङ्गाभं हेमपुङ्खमयोजयत् ८६ तदस्त्रं ज्वलितं घोरं लक्ष्मणः शरमाहितम् । अतिकायाय चिक्षेप कालदण्डमिवान्तकः ८७ आग्नेयास्त्राभिसंयुक्तं दृष्ट्वा बाणं निशाचरः । उत्ससर्ज तदा बाणं रौद्रं सूर्यास्त्रयोजितम् ८८ तावुभावम्बरे बाणावन्योन्यमभिजघ्नतुः । तेजसा संप्रदीप्ताग्रौ क्रुद्धाविव भुजङ्गमौ ८९ तावन्योन्यं विनिर्दह्य पेततुः पृथिवीतले ९० निरर्चिषौ भस्मकृतौ न भ्राजेते शरोत्तमौ । तावुभौ दीप्यमानौ स्म न भ्राजेते महीतले ९१ ततोऽतिकायः संक्रुद्धस्त्वाष्ट्रमैषीकमुत्सृजत् । ततश्चिच्छेद सौमित्रिरस्त्रमैन्द्रेण वीर्यवान् ९२ ऐषीकं निहतं दृष्ट्वा कुमारो रावणात्मजः । याम्येनास्त्रेण संक्रुद्धो योजयामास सायकम् ९३ ततस्तदस्त्रं चिक्षेप लक्ष्मणाय निशाचरः । वायव्येन तदस्त्रेण निजघान स लक्ष्मणः ९४ अथैनं शरधाराभिर्धाराभिरिव तोयदः ।

---

लक्ष्मणाच्या शरीरांतून तीव्र रक्त स्रवूं लागलें ८३. शरीरांत रुतलेला बाण एकदम काढि-ल्यानंतर समर्थ लक्ष्मणानें एक तीक्ष्ण बाण घेऊन त्याला अस्त्रानें अभिमंत्रित केलें ८४ आणि ह्याप्रमाणें आग्नेयास्त्रानें तो बाण त्यानें अभिमंत्रित केला असतां धनुष्यासहवर्तमान उज्ज्वल दिसूं लागला ८५. तेव्हां अतितेजस्वी अतिकायानेंही रौद्र ह्मणजे उग्र अस्त्राचा स्वीकार केला आणि त्याची सुवर्ण पिच्छांनीं युक्त असलेल्या भुजंगतुल्य बाणाशीं योजना केली ८६. असो. इकडे लक्ष्मणानें अस्त्राभिमंत्रित करून धनुष्याला लाविलेला तो घोर व प्रज्व-लित बाण कालदंड फेंकणाऱ्या मृत्यूप्रमाणें अतिकायावर सोडिला ८७. आग्नेय अस्त्रानें अभिमंत्रित केलेला बाण अवलोकन केल्यावर राक्षसानें सूर्यास्त्रानें अभिमंत्रित केलेला आपलाही घोर बाण सोडिला असतां ८८. तेजाच्या योगानें ज्यांचीं अग्रें प्रज्वलित झालीं आहेत असे ते दोन्ही बाण क्रुद्ध झालेल्या भुजंगांप्रमाणें एकमेकांला प्रहार करूं लागले ८९. परस्परांना दग्ध करून ते बाण भूतलावर पडले असतां ९० ज्वाला-रहित झाले आणि भस्म बनून गेल्यामुळें झळकेनासे झाले. ह्याप्रमाणें ते उभयतांही देदीप्यमान बाण भूतलावर पडून झळकेनासे झाले असतां ९१ अतिकाय अतिशय क्रुद्ध झाला व त्वष्टा हा ज्याची देवता आहे असें ऐषिकसंज्ञक अस्त्र त्यानें सोडिलें. परंतु, वीर्यवान् लक्ष्मणानें ऐंद्रास्त्रानें त्याचें तेंही अस्त्र तोडून टाकिलें ९२. ऐषीकास्त्र लक्ष्मणानें हाणून पाडल्याचें पाहून रावणपुत्र तरुण अतिकाय क्रुद्ध झाला आणि याम्य अस्त्रानें त्यानें आपला बाण अभिमंत्रित केला ९३. तदनंतर राक्षसानें तें अस्त्र लक्ष्मणावर

अभ्यवर्षत संक्रुद्धो लक्ष्मणो रावणात्मजम् ९५ तेतिकायं समासाद्य कवचे वज्रभूषिते । भग्नाग्रशल्याः सहसा पेतुर्बाणा महीतले ९६ तान्मोघानभिसंप्रेक्ष्य लक्ष्मणः परवीरहा । अभ्यवर्षत बाणानां सहस्रेण महायशाः ९७ स वृष्यमाणो बाणौघैरतिकायो महाबलः । अवध्यकवचः सङ्ख्ये राक्षसो नैव विव्यथे ९८ न शशाक रुजं कर्तुं युधि तस्य नरोत्तमः । अथैनमभ्युपागम्य वायुर्वाक्यमुवाच ह ९९ ब्रह्मदत्तवरो ह्येष अवध्यकवचावृतः । ब्राह्मेणास्त्रेण भिन्द्ध्येनमेष वध्यो हि नान्यथा॥ अवध्य एष ह्यन्येषामस्त्राणां कवची बली १०० ततस्तु वायोर्वचनं निशम्य सौमित्रिरिन्द्रप्रतिमानवीर्यः। समादधे बाणमथोग्रवेगं तद्ब्राह्ममस्त्रं सहसा नियुज्य १ तस्मिन्वरास्त्रे तु नियुज्यमाने सौमित्रिणा बाणवरे शिताग्रे। दिशश्च चन्द्रार्कमहाग्रहाश्च नभश्च तत्रास ररास चोर्वी २ तं ब्रह्मणोऽस्त्रेण नियुज्य चापे शरं सपुङ्खं यमदूतकल्पम् । सौमित्रिरिन्द्रारिसुतस्य तस्य ससर्ज बाणं युधि

---

टाकिलें असतां त्या लक्ष्मणानें तेंही अस्त्र वायव्यास्त्राच्या योगानें हाणून पाडिलें ९४. नंतर जलधारांनीं वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें बाणधारांच्या योगानें रावणपुत्र अतिकायावर क्रुद्ध झालेल्या लक्ष्मणानें वृष्टि केली असतां ९५ अतिकायसमीप आल्यानंतर रत्नभूषित कवचावर ते लक्ष्मणाचे बाण हपटल्यामुळें पातीं मोडून जाऊन ते एकाएकीं भूतलावर पडले ९६ ह्याप्रमाणें ते निष्फल झालेले बाण अवलोकन करून शत्रुवीरनाशक महायशस्वी लक्ष्मणानें अतिकायावर सहस्र बाणांचा वर्षाव केला ९७. परंतु, बाणसमुदायांचा जरी वर्षाव होऊं लागला तरी तो महाबलाढ्य व अभेद्य कवचानें युक्त असलेला अतिकाय राक्षस संग्राममध्यें मुळींच व्यथित झाला नाहीं ९८. कारण, पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण संग्रामामध्यें त्या राक्षसाला पीडा करण्यास जेव्हां समर्थ होईना तेव्हां वायु समीप येऊन त्याला ह्मणाला ९९ " अभेद्य कवचानें आच्छादित झालेल्या ह्या अतिकायाला ब्रह्मदेवानें वर दिला आहे. ह्यास्तव, तूं ब्रह्मास्त्रानें ह्याचा वध कर; दुसऱ्या अस्त्रानें ह्याचा वध होणें शक्य नाहीं. कारण, कवच धारण केलेला हा बलाढ्य अतिकाय इतर अस्त्रांना अवध्य आहे " १००. वायूचें भाषण श्रवण केल्यानंतर वीर्यानें इंद्राची बरोबरी करणाऱ्या लक्ष्मणानें लगेच तें ब्रह्मास्त्र जपून महावेगवान् बाणाशीं त्याची योजना केली १. तीक्ष्ण अग्रानें युक्त असलेल्या श्रेष्ठ बाणाचे ठिकाणीं लक्ष्मण त्या श्रेष्ठ अस्त्राची योजना करूं लागला असतां दिशा, चंद्रसूर्यप्रभृति महाग्रह व आकाश हीं त्रस्त होऊन गेलीं आणि पृथ्वींतूनही ध्वनि निघूं लागला २. ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रित केलेला आणि ह्मणूनच यमदूताप्रमाणें झालेला तो पिच्छयुक्त वज्रतुल्य बाण

वज्रकल्पम् ३ तं लक्ष्मणोत्सृष्टविवृद्धवेगं समापतन्तं श्वसनोग्रवेगम्। सुपर्णवज्रोत्तमचित्रपुङ्खं तदातिकायः समरे ददर्श ४ तं प्रेक्षमाणः सहसातिकायो जघान बाणैर्निशितैरनेकैः । स सायकस्तस्य सुपर्णवेगस्तथातिवेगेन जगाम पार्श्वम् ५ तमागतं प्रेक्ष्य तदातिकायो बाणं प्रदीप्तान्तककालकल्पम् । जघान शक्त्यृष्टिगदाकुठारैः शूलैः शरैश्चाप्यविपन्नचेष्टः ६ तान्यायुधान्यद्भुतविग्रहाणि मोघानि कृत्वा स शरोऽग्निदीप्तः । प्रगृह्य तस्यैव किरीटजुष्टं तदातिकायस्य शिरो जहार ७ तच्छिरः सशिरस्त्राणं लक्ष्मणेषुप्रमर्दितम् । पपात सहसा भूमौ शृङ्गं हिमवतो यथा ८ तं भूमौ पतितं दृष्ट्वा विक्षिप्ताम्बरभूषणम् । बभूवुर्व्यथिताः सर्वे हतशेषा निशाचराः ९ ते विषण्णमुखा दीनाः प्रहारजनितश्रमाः । विनेदुरुच्चैर्बहवः सहसा विस्वरैः स्वरैः १० ततस्तत्परिता याता निरपेक्षा निशाचराः । पुरीमभिमुखा भीता द्रवन्तो नायके हते ११ प्रहर्षयुक्ता बहवस्तु वानराः

---

धनुष्याला लावून संग्राममध्यें लक्ष्मणानें त्या इंद्रशस्त्र रावणपुत्रावर टाकिला असतां ३ लक्ष्मणानें सोडिल्यामुळें ज्याचा वेग अधिकच वृद्धिंगत झाला आहे असा तो वायूसारिखा भयंकर वेगानें आणि उत्कृष्ट रत्नें वर बसविलेल्या चित्रविचित्र पिच्छांनीं व इतरही पिच्छांनीं युक्त असलेला तो बाण संग्राममध्यें आपणाकडे येत असलेला अतिकायानें अवलोकन केला ४. पहातां पहातांच अनेक तीक्ष्ण बाणांनीं अतिकायानें त्या बाणाला एकदम प्रहार केला. तथापि, गरुडासारिख्या वेगानें युक्त असलेला तो बाण अतिवेगानें त्याच्यासमीप गेलाच ५. ज्याची हालचाल यत्किंचितूही कमी झालेली नाहीं अशा अतिकायानें अंतक व काल ह्यांप्रमाणें भयंकर असलेला तो बाण समीप आलेला अवलोकन करून शक्ति, ऋष्टि, गदा, कुठार, शूल व बाण ह्यांच्या योगानें त्याला प्रहार केला ६. तथापि, अद्भुतरूपांनीं युक्त असलेलीं तीं आयुधें व्यर्थ करून अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेल्या त्या बाणानें त्या अतिकायाच्याच किरीटयुक्त मस्तकासमीप येऊन तें तोडून टाकिलें असतां ७ लक्ष्मणाच्या बाणानें विद्ध झालेलें तें मस्तक शिरस्त्राणासहवर्तमान हिमालय पर्वताचें शिखरच कीं काय असें एकाएकीं भूमीवर पडलें ८. ज्यावरील भूषणें आकाशामध्यें इकडे तिकडे उडून गेलीं आहेत असा तो अतिकाय भूमीवर पडलेला पाहून वध न पावतां शिलक राहिलेले सर्वही राक्षस दुःखित झाले ९. खिन्नवदन होऊन दीन झालेले ते असंख्य राक्षस प्रहारांनीं जर्जर झाल्यामुळें अकाळ विकाळ स्वरांनीं एकाएकीं मोठ्या मोठ्यानें ओरडूं लागले १०. नंतर निराश होऊन ते राक्षस त्या अतिकायाच्या भोंवतीं

प्रफुल्लपद्मप्रतिमाननास्तदा । अपूजयँल्लक्ष्मणमिष्टभागिनं हते रिपौ भीमबले दुरासदे ११२ [३१९६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकसप्ततितमः सर्गः ॥ ७१ ॥

अतिकायं हतं श्रुत्वा लक्ष्मणेन महात्मना । उद्वेगमगमद्राजा वचनं चेदमब्रवीत् १ धूम्राक्षः परमामर्षी सर्वशस्त्रभृतां वरः । अकम्पनः प्रहस्तश्च कुम्भकर्णस्तथैव च २ एते महाबला वीरा राक्षसा युद्धकाङ्क्षिणः । जेतारः परसैन्यानां परैर्नित्यापराजिताः ३ ससैन्यास्ते हता वीरा रामेणाक्लिष्टकर्मणा । राक्षसाः सुमहाकाया नानाशस्त्रविशारदाः ४ अन्ये च बहवः शूरा महात्मानो निपातिताः । प्रख्यातबलवीर्येण पुत्रेणेन्द्रजिता मम ॥ तौ भ्रातरौ तदा बद्धौ घोरैर्दत्तवरैः शरैः ५ यन्न शक्यं सुरैः सर्वैरसुरैर्वा महाबलैः । मोक्तुं तद्बन्धनं घोरं यक्षगन्धर्वपन्नगैः ६ तन्न जाने प्रभावैर्वा मायया मोहनेन वा । शरबन्धाद्विमुक्तौ तौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ७ ये योधा निर्गताः शूरा राक्षसा मम शासनात् । ते सर्वे

---

जमले आणि नायक वध पावल्यामुळें भयभीत झालेले ते राक्षस लंकेकडे तोंड करून पळून जाऊं लागले १११; आणि ह्याप्रमाणें भयंकर सामर्थ्यानें युक्त व सामना करण्यासही दुर्घट अशा त्या शत्रूचा वध झाल्यामुळें अनेक वानर आनंदित झाले; त्यांचीं मुखें प्रफुल्लित कमलाप्रमाणें झालीं व इष्ट कार्य सिद्धीस नेलेल्या लक्ष्मणाची ते प्रशंसा करूं लागले ११२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७१ ॥

महात्म्या लक्ष्मणानें अतिकायाचा वध केल्याचें श्रवण करून राजा उद्विग्न झाला आणि ह्मणाला १ " सर्व शस्त्रधारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ व अत्यंत रागीट धूम्राक्ष, अकंपन, प्रहस्त आणि कुंभकर्ण २ हे युद्धाभिलाषी महाबलाढ्य राक्षसवीर शत्रुसैन्यांचा पराजय करणारे असून शत्रूंच्या हातून कधींही पराजय पावणारे नव्हेत ३; परंतु, सदाचारसंपन्न वीर रामानें शरीरानें फारच मोठे आणि अनेक प्रकारच्या शस्त्रांमध्यें निपुण असलेले ते वीर राक्षस सैन्यासहवर्तमान मारून टाकिले व इतरही मोठे मोठे शूर राक्षस त्यानें असंख्य मारिले ४. बल व वीर्य ह्यांविषयीं प्रख्यात असलेला जो माझा पुत्र इंद्रजित् त्यानें वर ह्मणून प्राप्त झालेल्या घोर बाणांनीं त्या भ्रात्यांना बद्ध केलें होतें ५ आणि देव, महाबलाढ्य असुर, यक्ष, गंधर्व व पन्नग ह्यांनाही तें घोर बंधन सोडितां येणें शक्य नव्हतें ६; परंतु, ते रामलक्ष्मण बाणबंधापासून मुक्त झाले. हे प्रभावानें, मायेनें, अथवा मोहानें मुक्त झाले कीं काय तें मला

निहता युद्धे वानरैः सुमहाबलैः ८ तं न पश्याम्यहं युद्धे योद्धारं रामं सलक्ष्मणम् । नाशयेत्सबलं वीरं ससुग्रीवं बिभीषणम् ९ अहो सुबलवान्रामो महदस्त्रबलं च वै । यस्य विक्रममासाद्य राक्षसा निधनं गताः १० अप्रमत्तैश्च सर्वत्र गुल्मै रक्ष्यतां पुरी त्वियम् । अशोकवनिका चैव यत्र सीताभिरक्ष्यते ११ निष्क्रामो वा प्रवेशो वा ज्ञातव्यः सर्वदैव नः । यत्र यत्र भवेद्गुल्मस्तत्र तत्र पुनः पुनः १२ सर्वतश्चापि तिष्ठध्वं स्वैः स्वैः परिवृता बलैः । द्रष्टव्यं च पदं तेषां वानराणां निशाचराः १३ प्रदोषे वार्धरात्रे वा प्रत्यूषे वापि सर्वशः । नावज्ञा तत्र कर्तव्या वानरेषु कदाचन १४ द्विषतां बलमुद्युक्तमापतत्किं स्थितं यथा १५ ततस्ते राक्षसाः सर्वे श्रुत्वा लङ्काधिपस्य तत् । वचनं सर्वमातिष्ठन्यथावत्तु महाबलाः १६ तान्सर्वान्हि समादिश्य रावणो राक्षसाधिपः । मन्युशल्यं वहन्दीनः प्रविवेश स्वमालयम् १७ ततः स संदीपितकोपवह्निर्निशाचराणामधिपो महाबलः । तदेव पुत्रव्यसनं विचिन्तयन्मुहुर्मुहुश्चैव तदा विनिःश्वसन् १८

---

कांहींच कळत नाहीं ७. जे शूर व योद्धे राक्षस माझ्या आज्ञेनें बाहेर पडले त्या सर्वांचा अत्यंत बलाढ्य वानरांनीं वध केला ८. लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण व सैन्य ह्यांसहवर्तमान संग्रामामध्यें रामाचा वध करणारा वीर आज मला कोणी दिसत नाहीं ९. ज्याच्या पराक्रमामुळें राक्षस मरण पावले तो राम केवढा तरी मोठा बलाढ्य असला पाहिजे ! आणि त्याचें अस्त्रबल तरी केवढें असलें पाहिजे ! १०. बेसावध न राहतां सर्व सैन्यांनीं सर्व बाजूंनीं ह्या नगरीचें आणि सीता ज्यामध्यें बंदोबस्तानें ठेविली आहे त्या अशोकवनाचें रक्षण केलें पाहिजे ११. ज्या ज्या ठिकाणीं आपलें सैन्य ठेविलें आहे तेथून जातो कोण व तेथें येतो कोण ह्याचा वारंवार एकसारखा आपणांला शोध लाविला पाहिजे १२. हे निशाचरहो, सर्व बाजूंनीं सैन्यासहवर्तमान तुह्मी सज्ज असा आणि वानरांची चाहूल पाहत असा १३. संध्याकाळ असो, मध्यरात्र असो अथवा पहाट असो, वानरांसंबंधानें तुह्मी कधींही कोणत्याच बाजूनें बेसावध राहूं नका १४. शत्रूचें सैन्य कांहीं खटपटींत आहे, हल्ला करण्याच्या बेतांत आहे किंवा स्वस्थ उभें आहे इकडे लक्ष्य असूं द्या" १५ तदनंतर लंकाधिपति रावणाचें तें भाषण श्रवण करून त्या सर्वही महाबलाढ्य राक्षसांनीं त्याची सर्व आज्ञा मान्य केली १६ व त्या सर्वांना आज्ञा करून राक्षसाधिपति दीन रावण क्रोधरूप शल्य अंतःकरणामध्यें तसेंच सलत असतांना निवासस्थानांत प्रविष्ट झाला १७. तदनंतर ज्याचा क्रोधाग्नि प्रदीप्त झाला आहे असा तो

[३२१४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्विसप्ततितमः सर्गः ॥ ७२ ॥

ततो हतान्राक्षसपुङ्गवांस्तान्देवान्तकादित्रिशिरोतिकायान् । रक्षोगणास्तत्र हतावशिष्टास्ते रावणाय त्वरिताः शशंसुः १ ततो हतांस्तान्सहसा निशम्य राजा महाबाष्पपरिप्लुताक्षः । पुत्रक्षयं भ्रातृवधं च घोरं विचिन्त्य राजा विपुलं प्रदध्यौ २ ततस्तु राजानमुदीक्ष्य दीनं शोकार्णवे संपरिपुप्लुवानम् । रथर्षभो राक्षसराजसूनुस्तमिन्द्रजिद्वाक्यमिदं बभाषे ३ न तात मोहं परिगन्तुमर्हसे यत्रेन्द्रजिज्जीवति नैर्ऋतेश । नेन्द्रारिबाणाभिहतो हि कश्चित्प्राणान्समर्थः समरेभिपातुम् ४ पश्याद्य रामं सह लक्ष्मणेन मद्बाणनिर्भिन्नविकीर्णदेहम् । गतायुषं भूमितले शयानं शितैः शरैराचितसर्वगात्रम् ५ इमां प्रतिज्ञां शृणु शक्रशत्रोः सुनिश्चितां पौरुषदैवयुक्ताम् । अद्यैव रामं सह लक्ष्मणेन संतर्पयिष्यामि शरैरमोघैः ६ अद्येन्द्रवैवस्वतविष्णुरुद्रसाध्याश्च वैश्वानरचन्द्रसूर्याः । द्रक्ष्यन्तु मे

---

निशाचराधिपति महाबलाढ्य रावण तें पुत्राचेंच दुःख मनामध्यें आणून सुस्कारे टाकूं लागला १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं बहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७२ ॥

तदनंतर तेथें वध न पावतां शिलक राहिलेले राक्षसगण सत्वर रावणाकडे गेले आणि त्रिशिर, अतिकाय व देवतांक वगैरे असे ते राक्षसश्रेष्ठ वध पावल्याचें त्यांनीं त्याला निवेदन केलें १. तेव्हां एकाएकीं ते वध पावल्याची वार्ता ऐकून राजाचे नेत्र अश्रूंच्या लोटानें भरून गेले आणि पुत्रांचा नाश व भ्रात्याचा भयंकर वध झाल्याचें मनांत आणून तो अतिशय चिंताक्रांत झाला २. तदनंतर शोकसागरामध्यें मग्न झालेल्या त्या दीन राजाला अवलोकन करून रथ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला राक्षसराजपुत्र इंद्रजित् ह्मणाला ३ " हे तात, हे राक्षसाधिपते, ज्याअर्थी इंद्रजित् जिवंत आहे त्याअर्थी आपण असे मोहांत पडूं नका. कारण, इंद्रजिताच्या बाणानें संग्रामामध्यें विद्ध झालेला कोणीही प्राणांचें रक्षण करण्यास समर्थ नाहीं ४. माझ्या बाणानें ज्याचा देह छिन्नभिन्न होऊन अस्ताव्यस्त पडला आहे व ज्याचीं सर्व गात्रें तीक्ष्ण बाणांनीं व्याप्त झालेलीं आहेत असा गतायु राम लक्ष्मणासहवर्तमान भूतलावर पडलेला तूं आज अवलोकन करिशील ५. इंद्रजिताची ही अतिनिश्चित व पुरुषप्रयत्नानें आणि दैवसामर्थ्यानें युक्त असलेली प्रतिज्ञा आपण ऐकून ठेवा. अमोघ बाणांच्या योगानें मी आजच लक्ष्मणासहवर्तमान रामाला चांगल्या रीतीनें तृप्त करीन ६.

विक्रममप्रमेयं विष्णोरिवोग्रं बलियज्ञवाटे ७ स एवमुक्त्वा त्रिदशेन्द्रशत्रुरा-
पृच्छ्य राजानमदीनसत्त्वः । समारुरोहानिलतुल्यवेगं रथं खरश्रेष्ठसमा-
धियुक्तम् ८ समास्थाय महातेजा रथं हरिरथोपमम् । जगाम सहसा
तत्र यत्र युद्धमरिन्दमः ९ तं प्रस्थितं महात्मानमनुजग्मुर्महाबलाः ।
संहर्षमाणा बहवो धनुःप्रवरपाणयः १० गजस्कन्धगताः केचित्के-
चित्परमवाजिभिः । व्याघ्रवृश्चिकमार्जारखरोष्ट्रैश्च भुजङ्गमैः ११ वराहैः
श्वापदैः सिंहैर्जम्बुकैः पर्वतोपमैः । काकहंसमयूरैश्च राक्षसा भीमवि-
क्रमाः ॥ प्रासमुद्गरनिस्त्रिंशपरश्वधगदाधराः १२ स शङ्खनिनदैः पूर्णैर्भे-
रीणां चापि निःस्वनैः । जगाम त्रिदशेन्द्रारिराजिं वेगेन वीर्यवान् १३
स शङ्खशशिवर्णेन च्छत्रेण रिपुसूदनः । रराज प्रतिपूर्णेन नभश्चन्द्रमसा
यथा १४ वीज्यमानस्ततो वीरो हैमैर्हेमविभूषणः । चारुचामरमुख्यैश्च
मुख्यः सर्वधनुष्मताम् १५ ततस्त्विन्द्रजिता लङ्का सूर्यप्रतिमतेजसा ।

---

बलीच्या यज्ञमंडपामध्यें झालेल्या विष्णूच्या उग्र अतुल पराक्रमाप्रमाणें इंद्र, यम, विष्णु, रुद्र, साध्य, अग्नि, चंद्र व सूर्य हे आज माझा अतुल पराक्रम अवलोकन करितील " ७. ह्याप्रमाणें बोलून उदार अंतःकरणानें युक्त असलेल्या इंद्रजितानें राजाचा निरोप घेतला आणि वायूसारिखा ज्याचा वेग आहे, मोठे मोठे गर्दभ ज्याला जोडिले आहेत व युद्धसामग्री ज्यावर ठेविलेली आहे अशा रथावर तो आरूढ झाला ८. इंद्ररथाचीच ज्याला उपमा योग्य आहे अशा रथावर आरूढ होऊन तो महातेजस्वी शत्रुदमन इंद्रजित् एकाएकीं जिकडे युद्ध चाललें होतें तिकडे गेला ९. तेव्हां हातामध्यें श्रेष्ठ धनुष्य घेऊन महाबलाढ्य असंख्य राक्षस आनंदानें त्या चालूं लागलेल्या महात्म्याच्या मागोमाग गेले १०. कांहीं गजांच्या स्कंधावर आरूढ झाले; कांहीं मोठ्या मोठ्या अश्वांवर आरूढ होऊन गेले आणि व्याघ्र, वृश्चिक, मार्जार, गर्दभ, उष्ट्र, भुजंग ११, वराह, श्वापदें, सिंह, पर्वततुल्य जंबूक, काक, हंस आणि मयूर ह्यांवरही आरूढ होऊन व प्रास, मुद्गर, खड्ग, परशु व गदा हीं आयुधें धारण करून कांहीं महापराक्रमी राक्षस त्याच्या मागोमाग गेले १२. शंखनादांनीं व्याप्त झालेले दुंदुभींचे ध्वनि चालले असतांना तो वीर्यवान् देवराजशत्रु वेगानें समरांगणामध्यें गेला १३. तो शत्रुनाशक इंद्रजित् परिपूर्ण चंद्रानें शोभणाऱ्या आकाशाप्रमाणें शंखतुल्य व चंद्रतुल्य श्वेतवर्णानें युक्त असलेल्या छत्रानें शोभूं लागला १४. सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ आणि सुवर्णालंकारांनीं विभूषित अशा त्या वीर इंद्रजितावर सुवर्णमय व मनोहर श्रेष्ठ श्रेष्ठ चामरें ढळत होतीं १५. तदनंतर उज्ज्वल सूर्याच्या योगानें

रराजाप्रतिवीर्येण द्यौरिवार्केण भास्वता १६ स संप्राप्य महातेजा युद्धभूमिमरिन्दमः । स्थापयामास रक्षांसि रथं प्रति समन्ततः १७ ततस्तु हुतभोक्तारं हुतभुक्सदृशप्रभः । जुहुवे राक्षसश्रेष्ठो विधिवन्मन्त्रसत्तमैः १८ स हविर्लाजसत्कारैर्माल्यगन्धपुरस्कृतैः । जुहुवे पावकं तत्र राक्षसेन्द्रः प्रतापवान् १९ शस्त्राणि शरपत्राणि समिधोऽथ बिभीतकाः । लोहितानि च वासांसि स्रुवं कार्ष्णायसं तथा २० स तत्राग्निं समास्तीर्य शरपत्रैः सतोमरैः । छागस्य कृष्णवर्णस्य गलं जग्राह जीवतः २१ सकृदेव समिद्धस्य विधूमस्य महार्चिषः । बभूवुस्तानि लिङ्गानि विजयं यान्यदर्शयन् २२ प्रदक्षिणावर्तशिखस्तप्तकाञ्चनसंनिभः । हविस्तत्प्रतिजग्राह पावकः स्वयमुत्थितः २३ सोऽस्त्रमाहारयामास ब्राह्ममस्त्रविशारदः । धनुश्चात्मरथं चैव सर्वं तत्राभ्यमन्त्रयत् २४ तस्मिन्नाहूयमानेऽस्त्रे हूयमाने च पावके । सार्कग्रहेन्दुनक्षत्रं वितत्रास नभस्थलम् २५ स पावकं पावकदीप्ततेजा हुत्वा महेन्द्रप्रतिमप्रभावः । सचापबाणासिरथाश्वशूलः खेऽन्तर्दधेऽत्मान-

ज्याप्रमाणें आकाशमंडल झळकूं लागतें त्याप्रमाणें अनुपम वीर्य व सूर्यतुल्य तेज ह्यांनीं युक्त असलेल्या इंद्रजिताच्या योगानें ती लंका झळकूं लागली १६. शत्रूंचें दमन करणारा तो महातेजस्वी इंद्रजित् युद्धभूमीवर गेला असतां आपल्या रथाभोंवतीं त्यानें राक्षस उभे केले १७ आणि नंतर अग्नीसारिखें ज्याचें तेज आहे असा तो राक्षसश्रेष्ठ इंद्रजित् श्रेष्ठ मंत्रांच्या योगानें अग्नीमध्यें यथाविधि हवन करूं लागला १८. गंध, पुष्प व लाह्या ह्यांच्या योगानें अग्नीचें पूजन करून त्या प्रतापी राक्षसाधिपतीनें त्यामध्यें हवन केलें १९. शस्त्रांचे परिधि, बेहड्यांच्या समिधा, आरक्तवर्ण वस्त्रें आणि लोखंडाची पळी हें त्या होमाला साहित्य होतें २०. तोमर व बाणांचीं पानें ह्यांच्या योगानें अग्नीला परिस्तरणें घालून कृष्णवर्ण जिवंत बोकडाचा त्यानें (होमाकरितां) गळा धरिला २१. नंतर एकदमच तो बोकड आंत टाकून प्रदीप्त व मोठ्या मोठ्या ज्वालांनीं युक्त झालेल्या अग्नीचे ठिकाणीं पूर्वीं विजयसूचक ह्मणून अनुभवास आलेलीं चिन्हें होऊं लागलीं २२. प्रदक्षिणिक ज्वालांनीं अग्नि युक्त झाला; उज्ज्वल सुवर्णासारिखा त्याचा वर्ण दिसूं लागला आणि आपोआपच प्रदीप्त झालेल्या त्या अग्नीनें हवीचा स्वीकार केला २३. तदनंतर त्या अस्त्रनिपुण इंद्रजितानें ब्रह्मास्त्राचा पुनरपि उपदेश घेतला आणि धनुष्य, आपला रथ इत्यादि सर्व कांहीं त्यानें ब्राह्मास्त्रानेंच अभिमंत्रून टाकिलें २४. त्या अस्त्राचें आवाहन व अग्नीमध्यें हवन सुरू झालें असतां सूर्य, ग्रह चंद्र व नक्षत्रें ह्यांसहवर्तमान नभोमंडल त्रस्त झालें २५.

मचिन्त्यवीर्यः २६ ततो हयरथाकीर्णं पताकाध्वजशोभितम् । निर्ययौ राक्षसबलं नर्दमानं युयुत्सया २७ ते शरैर्बहुभिश्चित्रैस्तीक्ष्णवेगैरलंकृतैः। तोमरैरङ्कुशैश्चापि वानराञ्जघ्नुराहवे २८ रावणिस्तु सुसंक्रुद्धस्तान्निरीक्ष्य निशाचरान् । हृष्टा भवन्तो युध्यन्तु वानराणां जिघांसया २९ ततस्ते राक्षसाः सर्वे गर्जन्तो जयकाङ्क्षिणः । अभ्यवर्षंस्ततो घोरान्वानराञ्शर-वृष्टिभिः ३० स तु नालीकनाराचैर्गदाभिर्मुसलैरपि । रक्षोभिः संवृतः सङ्ख्ये वानरान्विचकर्ष ह ३१ ते वध्यमानाः समरे वानराः पादपायुधाः। अभ्यवर्षन्त सहसा रावणिं शैलपादपैः ३२ इन्द्रजित्तु तदा क्रुद्धो महा-तेजा महाबलः । वानराणां शरीराणि व्यधमद्रावणात्मजः ३३ शरेणै-केन च हरीन्नव पञ्च च सप्त च । बिभेद समरे क्रुद्धो राक्षसान्संप्रहर्ष-यन् ३४ स शरैः सूर्यसंकाशैः शातकुम्भविभूषणैः । वानरान्समरे वीरः

---

अग्नीसारिखें देदीप्यमान तेज, महेंद्रासारिखा पराक्रम आणि अचिंत्यवीर्य ह्यांनीं युक्त असून धनुष्य, बाण, खड्ग, रथ, अश्व व शूल ह्यानीं संपन्न असलेला तो इंद्रजित् अग्नीमध्यें हवन करून आकाशामध्यें स्वतः गुप्त झाला २६. तदनंतर अश्व व रथ ह्यांनीं व्याप्त आणि पताका व ध्वज ह्यांनीं सुशोभित झालेलें राक्षससैन्य युद्धाच्या इच्छेनें गर्जना करीत करीत बाहेर पडलें २७; आणि तीक्ष्ण वेगानें युक्त व भूषित अशा असंख्य आश्चर्यकारक बाणांनीं, तोमरांनीं व अंकुशांनीं संग्रामामध्यें ते राक्षस त्या वानरांचा वध करूं लागले २८. नंतर अतिशय क्रुद्ध झालेला रावणपुत्र इंद्रजित् त्या निशाचरांना अवलोकन करून "वानरांचा वध करण्याच्या इच्छेनें तुह्मी आनंदानें युद्ध करा" २९ असें ह्मणाला असतां ते सर्वही जयाभिलाषी राक्षस गर्जना करीत करीत बाण समुदायाच्या योगानें घोर वानरांवर वृष्टि करूं लागले ३०. नालीक व नाराच हे बाण, गदा व मुसलें हीं आयुधें ह्यांच्या योगानें राक्षसांनीं व्याप्त झालेला तो इंद्रजित् संग्रामामध्यें वानरांचा वध करूं लागला ३१; आणि ह्याप्रमाणें संग्रामामध्यें वानरांचा वध होऊं लागला असतां वृक्षरूप आयुधांनीं युक्त असलेले ते वानर पर्वत व वृक्ष ह्यांच्या योगानें रावणपुत्र इंद्रजिताला अनुलक्षून एक-दम वर्षाव करूं लागले ३२. तदनंतर महातेजस्वी व महाबलाढ्य रावणपुत्र इंद्रजित् क्रुद्ध झाला आणि वानरांचीं शरीरें उडवून देऊं लागला ३३. क्रुद्ध झालेला तो इंद्रजित् एकेका बाणानें पांच पांच, सात सात अथवा नऊ नऊ वानर संमरांगणामध्यें तोडूं लागला असतां राक्षसांना हर्ष झाला ३४ व हार जाण्यास अतिशय दुर्घट अस-लेला तो वीर इंद्रजित् सुवर्णविभूषित व सूर्यतुल्य तेजस्वी बाणांनीं समरांगणामध्यें

प्रममाथ सुदुर्जयः ३५ ते भिन्नगात्राः समरे वानराः शरपीडिताः। पेतुर्मथितसंकल्पाः सुरैरिव महासुराः ३६ ते तपन्तमिवादित्यं घोरैर्बाणगभस्तिभिः । अभ्यधावन्त संक्रुद्धाः संयुगे वानरर्षभाः ३७ ततस्तु वानराः सर्वे भिन्नदेहा विचेतसः । व्यथिता विद्रवन्ति स्म रुधिरेण समुक्षिताः ३८ रामस्यार्थे पराक्रम्य वानरास्त्यक्तजीविताः । नर्दन्तस्ते निवृत्तास्तु समरे सशिलायुधाः ३९ ते द्रुमैः पर्वताग्रैश्च शिलाभिश्च प्लवङ्गमाः । अभ्यवर्षन्त समरे रावणिं समवस्थिताः ४० तं द्रुमाणां शिलानां च वर्षं प्राणहरं महत् । व्यपोहत महातेजा रावणिः समितिंजयः ४१ ततः पावकसंकाशैः शरैराशीविषोपमैः । वानराणामनीकानि बिभेद समरे प्रभुः ४२ अष्टादशशरैस्तीक्ष्णैः स विद्ध्वा गन्धमादनम् । विव्याध नवभिश्चैव नलं दूरादवस्थितम् ४३ सप्तभिस्तु महावीर्यो मैन्दं मर्मविदारणैः । पञ्चभिर्विशिखैश्चैव गजं विव्याध संयुगे ४४ जाम्बवन्तं तु दशभिर्नीलं त्रिंशद्भिरेव च । सुग्रीवमृषभं चैव सोऽङ्गदं द्विविदं तथा ४५ घोरैर्दत्तवरैस्ती-

---

वानरांना तसाच मारीत सुटला ३५. तेव्हां देवांनीं पराजित केलेल्या महादैत्यांप्रमाणें संग्रामामध्यें ते वानर बाणांनीं पीडित होऊन त्यांचीं शरीरें छिन्नभिन्न झालीं असतां युद्धसंबंधीं उमेद जागच्या जागीं नाहींशी होऊन ते भूतलावर पडले ३६. तदनंतर बाणरूप घोर किरणांनीं सूर्याप्रमाणें प्रकाशत असलेल्या त्या इंद्रजितावर संग्रामामध्यें ते क्रुद्ध झालेले वानरश्रेष्ठ धांवून गेले ३७. तदनंतर देह छिन्नभिन्न झाल्यामुळें मूर्च्छित झालेले, रक्तानें भरलेले व दुःखित झालेले ते सर्वही वानर धांवाधांव करूं लागले ३८. रामाकरितां पराक्रमाचें अवलंबन करून जीविताविषयीं निराश झालेले ते वानर पाषाणरूप आयुधें हातांत घेऊन समरांगणामध्यें गर्जना करीत करीत परत आले ३९ आणि नेटानें उभे राहून ते वानर वृक्ष, पर्वतशिखरें व पाषाण ह्यांच्या योगानें संग्रामामध्यें रावणपुत्रावर वर्षाव करूं लागले ४०. परंतु, संग्रामविजयी महातेजस्वी रावणपुत्रानें वृक्षांचा व पाषाणांचा तो प्राणहरण करणारा प्रचंड वर्षावही उडवून दिला ४१; आणि नंतर सूर्यतुल्य तेजस्वी व भुजंगतुल्य भयंकर बाणांनीं समरांगणामध्यें त्या समर्थ इंद्रजितानें वानरसैन्यांचा पराजय केला ४२. अठरा तीक्ष्ण बाणांनीं गंधमादनाला वेध करून दूर असलेल्या नलालाही त्यानें वेध केला ४३; मर्मभेदक सात बाणांनीं महावीर्यवान् इंद्रजितानें मैंदाला वेध केला; पांच बाणांनीं संग्रामामध्यें त्यानें गजाला वेध केला ४४; जांबवानाला दहा बाणांनीं प्रहार केला; तीस बाणांनीं नीलाला त्यानें वेध केला आणि सुग्रीव, ऋषभ, अंगद व द्विविद

क्ष्णैर्निष्प्राणानकरोत्तदा । अन्यानपि तदा मुख्यान्वानरान्बहुभिः शरैः ४६
अर्दयामास संक्रुद्धः कालाग्निरिव मूर्च्छितः । स शरैः सूर्यसंकाशैः
सुमुक्तैः शीघ्रगामिभिः ४७ वानराणामनीकानि निर्ममन्थ महारणे ।
आकुलां वानरीं सेनां शरजालेन पीडिताम् ४८ हृष्टः स परया प्रीत्या
ददर्श क्षतजोक्षिताम् । पुनरेव महातेजा राक्षसेन्द्रात्मजो बली ४९
संसृज्य बाणवर्षं च शस्त्रवर्षं च दारुणम् । ममर्द वानरानीकं परितश्चि-
न्द्रजिद्बली ५० स्वसैन्यमुत्सृज्य समेत्य तूर्णं महाहवे वानरवाहिनीषु ।
अदृश्यमानः शरजालमुग्रं ववर्ष नीलाम्बुधरो यथाम्बु ५१ ते शक्रजि-
द्बाणविशीर्णदेहा मायाहता विस्वरमुन्नदन्तः । रणे निपेतुर्हरयोऽद्रिकल्पा
यथेन्द्रवज्राभिहता नगेन्द्राः ५२ ते केवलं संददृशुः शिताग्रान्बाणान्रणे
वानरवाहिनीषु । मायाविगूढं च सुरेन्द्रशत्रुं न चात्र तं राक्षसमभ्यप-
श्यन् ५३ ततः स रक्षोऽधिपतिर्महात्मा सर्वा दिशो बाणगतैः
शिताग्रैः । प्रच्छादयामास रविप्रकाशैर्विदारयामास च वानरेन्द्रान् ५४

---

ह्यांनाही ४५ वर म्हणून प्राप्त झालेल्या तीक्ष्ण व घोर बाणांच्या योगानें त्यानें जर्जर करून टाकिलें ४६. प्रलयाग्नीप्रमाणें तुफान झालेल्या व अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या इंद्रजितानें अनेक बाणांनीं इतरही मुख्य मुख्य वानरांना वेध केला; नंतर उत्तम रीतीनें सुटलेल्या व त्वरित जाणाऱ्या सूर्यतुल्य बाणांनीं ४७ महारणामध्यें वानरांचीं सैन्यें त्यानें जर्जर केलीं; बाणसमुदायानें पीडित झाल्यामुळें व्याकुल झालेली व रक्तानें भरलेली वानरसेना हर्षयुक्त होऊन मोठ्या आनंदानें त्यानें अवलोकन केली आणि त्या राक्षसराजपुत्र, बलाढ्य व महातेजस्वी इंद्रजितानें चोहोंबाजूंस बाणांचा व शस्त्रांचा वर्षाव करून वानरसैन्याचें मर्दन केलें ४८,४९,५०. तदनंतर स्वतःचें सैन्य सोडून तो इंद्रजित् त्या महासंग्रामामध्यें सत्वर वानरसैन्यांत जाऊन भिडला आणि कृष्णवर्ण मेघ ज्याप्रमाणें उदकाची वृष्टि करितो त्याप्रमाणें कोणाच्या दृष्टीं न पडतां प्रचंड बाणसमुदायाचा त्यानें वानरसैन्यावर वर्षाव केला ५१. तेव्हां इंद्राच्या वज्रानें ताडित झालेल्या पर्वतराजांप्रमाणें मायेनें ताडित झालेले व इंद्रजिताच्या बाणानें देह छिन्नभिन्न झालेले ते पर्वततुल्य वानर विकृत स्वरानें आक्रोश करीत करीत संग्रामामध्यें पडले ५२. वानरसैन्यांवर संग्रामामध्यें येत असलेले तीक्ष्णाग्र बाण मात्र त्यांना दिसत होते; परंतु, मायेनें गुप्त राहिलेला तो इंद्रजित् राक्षस त्यांना दिसत नव्हता ५३. तदनंतर बाणांच्या सूर्यप्रकाशतुल्य तीक्ष्ण अग्रांनीं त्या महात्म्या राक्षसाधिपतीनें सर्व दिशा आच्छादित करून टाकिल्या आणि मोठमोठ्या

स शूलनिस्त्रिंशपरश्वधानि व्याविद्धदीप्तानलसप्रभाणि । सविस्फुलिङ्गो-
ज्ज्वलपावकानि ववर्ष तीव्रं प्लवगेन्द्रसैन्ये ५५ ततो ज्वलनसंकाशैर्बाणै-
र्वानरयूथपाः । ताडिताः शक्रजिद्बाणैः प्रफुल्ला इव किंशुकाः ५६
उद्वीक्षमाणा गगनं केचिन्नेत्रेषु ताडिताः । शनैर्विविशुरन्योन्यं पेतुश्च
जगतीतले ५७ हनूमन्तं च सुग्रीवमङ्गदं गन्धमादनम् । जाम्बवन्तं सुषेणं
च वेगदर्शिनमेव च ५८ मैन्दं च द्विविदं नीलं गवाक्षं गवयं तथा ।
केसरिं हरिलोमानं विद्युद्दंष्ट्रं च वानरम् ५९ सूर्याननं ज्योतिमुखं तथा
दधिमुखं हरिम् । पावकाक्षं नलं चैव कुमुदं चैव वानरम् ६० प्रासैः
शूलैः शितैर्बाणैरिन्द्रजिन्मन्त्रसंहितैः । विव्याध हरिशार्दूलान्सर्वांस्तान्रा-
क्षसोत्तमः ६१ स वै गदाभिर्हरियूथमुख्यान्निर्भिद्य बाणैस्तपनीयवर्णैः ।
ववर्ष रामं शरवृष्टिजालैः सलक्ष्मणं भास्कररश्मिकल्पैः ६२ स बाणव-
र्षैरभिवृष्यमाणो धारानिपातानिव तानचिन्त्य । समीक्षमाणः परमाद्भु-
तश्री रामस्तदा लक्ष्मणमित्युवाच ६३ असौ पुनर्लक्ष्मण राक्षसेन्द्रो

---

वानरांनाही त्यानें विदीर्ण करून टाकिलें ५४. तदनंतर चाळविल्यामुळें प्रज्व-
लित झालेल्या अग्नीप्रमाणें ज्यांची प्रभा आहे आणि ठिणग्यांसहवर्तमान उज्ज्वल
अग्नि ज्यांतून निघत आहे अशीं जीं शूल, खड्ग व परश हीं आयुधें
त्यांचा वानरराजाच्या सैन्यावर त्या इंद्रजितानें प्रचंड वर्षाव केला असतां ५५
इंद्रजिताच्या अग्नितुल्य बाणांनीं ताडित झालेले ते वानरसेनाधिपति प्रफुल्लित
पलाश वृक्षांप्रमाणें दिसूं लागले ५६. कांहीं वानर हळूं हळूं वर तोंड करून
आकाशाकडे पाहूं लागले असतां नेत्रांचे ठिकाणीं ताडित झाल्यामुळें एकमेकांना
मिठ्या मारून उभे राहूं लागले व कांहीं भूतलावरही पडले ५७. हनुमान्, सुग्रीव,
अंगद, गंधमादन, जांबवान्, सुषेण, वेगदर्शी, ५८, मैंद, द्विविद, नील, गवाक्ष, गवय,
केसरी, हरिलोमा, विद्युद्दंष्ट्र ५९, सूर्यानन, ज्योतिमुख, दधिमुख, पावकाक्ष, नल
आणि कुमुद ६० ह्या सर्व वानरश्रेष्ठांना त्या राक्षसाधिपति इंद्रजितानें अभिमंत्रित
केलेले प्रास, शूल आणि तीक्ष्ण बाण ह्यांच्या योगानें वेध केला ६१. सुवर्णवर्ण बाण
आणि गदा ह्यांच्या योगानें वानरसैन्यांतील मुख्य मुख्य वानरांना भेद करून सूर्यकि-
रणतुल्य बाणवृष्टींच्या समुदायांनीं त्यानें लक्ष्मणासहवर्तमान रामावर वर्षाव केला ६२.
परतु, अशारीतीनें बाणांचे वर्षाव जरी शरीरावर होऊं लागले तरी मेघांतून पडणाऱ्या
जलधारांप्रमाणें त्यांची पर्वा न करितां फारच अद्भुत कांतीनें युक्त असलेला राम
इकडे तिकडे पाहूं लागून लक्ष्मणाला म्हणाला ६३ "हे लक्ष्मणा, पुनरपि हा राक्ष-

महास्त्रमाश्रित्य सुरेन्द्रशत्रुः। निपातयित्वा हरिसैन्यमस्मान्शितैः शरैरर्दयति प्रसक्तम् ६४ स्वयंभुवा दत्तवरो महात्मा समाहितोन्तर्हितभीमकायः। कथं नु शक्यो युधि नष्टदेहो निहन्तुमद्येन्द्रजिदुद्यतास्त्रः ६५ मन्ये स्वयंभूर्भगवानचिन्त्यस्तस्यैतदस्त्रं प्रभवश्च योऽस्य। बाणावपातं त्वमिहाद्य धीमन्मया सहाव्यग्रमनाः सहस्व ६६ प्रच्छादयत्येष हि राक्षसेन्द्रः सर्वाधिकः सायकवृष्टिजालैः। एतच्च सर्वं पतिताग्र्यशूरं न भ्राजते वानरराजसैन्यम् ६७ आवां तु दृष्ट्वा पतितौ विसंज्ञौ निवृत्तयुद्धौ हतहर्षरोषौ। ध्रुवं प्रवेक्ष्यत्यमरारिवासमसौ समासाद्य रणाग्र्यलक्ष्मीम् ६८ ततस्तु ताविन्द्रजितोऽस्त्रजालैर्बभूवतुस्तत्र तदा विशस्तौ। स चापि तौ तत्र विषादयित्वा ननाद हर्षाद्युधि राक्षसेन्द्रः ६९ ततस्तदा वानरसैन्यमेवं रामं च सङ्ख्ये सह लक्ष्मणेन। निषूदयित्वा सहसा विवेश पुरीं दशग्रीवभुजाभिगुप्ताम् ॥ संस्तूयमानः स तु यातुधानैः पित्रे च सर्वं हृषितोऽभ्यु-

साधिपति व देवराजशत्रु ह्या मोठ्या ब्रह्मास्त्राच्या योगानें वानरसैन्याचा निःपात करून तीक्ष्ण बाणांनीं आह्मांलाही पीडा देत आहे ६४. ब्रह्मदेवानें ह्या महात्म्याला वर दिला आणि आपलें प्रचंड शरीर गुप्त करून हा सावधपणानें युद्ध करीत आहे. ह्यास्तव, अस्त्रप्रयोग करण्यास उद्युक्त झालेल्या आणि शरीरानें अदृश्य झालेल्या ह्या इंद्रजिताचा संग्रामामध्यें आज कसा बरें वध करितां येईल ? ६५. ह्या जगताचा उत्पादक जो भगवान् अचिंत्य ब्रह्मदेव त्याचें हें अस्त्र आहे असें मला वाटतें. ह्यास्तव, हे बुद्धिमान् लक्ष्मणा, सावधपणानें माझ्यासहवर्तमान तूं आज ह्या ठिकाणीं बाणांचा वर्षाव सहन कर ६६. सर्वांपेक्षां अधिक असलेल्या ह्या राक्षसाधिपतीला बाणवृष्टींच्या योगानें सर्व कांहीं आच्छादित करूं दे. मोठे मोठे शूर पडल्यामुळें वानरराज सुग्रीवाचें हें सैन्य तर झळकेनासें झालेंच आहे ६७. सारांश, हर्ष व क्रोध हे दोन्ही ज्यांचे नाहींसे झाले आहेत व युद्धापासून जे निवृत्त झालेले आहेत असे आपण मूर्च्छित होऊन पडल्याचें पाहून संग्रामसंबंधीं श्रेष्ठ कीर्ति संपादन केल्यानंतर हा इंद्रजित् देवशत्रु रावणाच्या निवासस्थानामध्यें निःसंशय प्रवेश करील " ६८. तदनंतर इंद्रजिताच्या अस्त्रसमुदायांनीं ते रामलक्ष्मण पीडित झाले असतां त्यानेंही त्यांना अगदींच निश्चेष्ट पाडिलें आणि आनंदानें संग्रामामध्यें त्या राक्षसाधिपतीनें गर्जना केली ६९. तदनंतर संग्रामामध्यें ह्याप्रमाणें वानरसैन्य मारून टाकून व लक्ष्मणासहवर्तमान रामालाही मृतप्राय करून टाकून तो इंद्रजित् सत्वर रावणाच्या बाहूंनीं सुरक्षित असलेल्या लंकानगरीमध्यें प्रविष्ट झाला असतां राक्षस त्याची प्रशंसा करूं लागले व त्यानें आनंदित

वाच ७० [ ३२८४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्रिसप्ततितमः सर्गः ॥ ७३ ॥

तयोस्तदासादितयो रणाग्रे मुमोह सैन्यं हरियूथपानाम् । सुग्रीवनीलाङ्गदजाम्बवन्तो न चापि किंचित्प्रतिपेदिरे ते १ ततो विषण्णं समवेक्ष्य सर्वं विभीषणो बुद्धिमतां वरिष्ठः । उवाच शाखामृगराजवीरानाश्वासयन्नप्रतिमैर्वचोभिः २ मा भैष्ट नास्त्यत्र विषादकालो यदार्यपुत्रौ ह्यवशौ विषण्णौ । स्वयंभुवो वाक्यमथोद्वहन्तौ यत्सादिताविन्द्रजितास्त्रजालैः ३ तस्मै तु दत्तं परमास्त्रमेतत्स्वयंभुवा ब्राह्ममोघवीर्यम् । तन्मानयन्तौ युधि राजपुत्रौ निपातितौ कोऽत्र विषादकालः ४ ब्राह्ममस्त्रं ततो धीमान्मानयित्वा तु मारुतिः । बिभीषणवचः श्रुत्वा हनूमानिदमब्रवीत् ५ अस्मिन्नस्त्रहते सैन्ये वानराणां तरस्विनाम् । यो यो धारयते प्राणांस्तं तमाश्वासयावहे ६ तावुभौ युगपद्वीरौ हनूमद्राक्षसोत्तमौ । उल्काहस्तौ तदा रात्रौ रणशीर्षे विचेरतुः ७ भिन्नलाङ्गूलहस्तोरुपादाङ्गुलिशिरोधरैः ।

---

होऊन सर्व कांहीं आपल्या पित्याला निवेदन केलें ७०. ह्याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडांपैकीं त्र्याहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७३ ॥

ह्याप्रमाणें ते उभयतां रामलक्ष्मण रणाचे अग्रभागीं निश्चेष्ट पडले असतां वानरसेनाधिपतींचें सैन्य मूर्च्छित झालें आणि सुग्रीव, नील, अंगद व जांबवान् ह्यांही वानरांना कसलीही शुद्ध राहिली नाहीं १. तदनंतर सर्व निश्चेष्ट झालेले अवलोकन करून बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ असलेला बिभीषण अप्रतिम शब्दांनीं वानरराज सुग्रीवाकडील वीरांना धीर देत देत ह्मणाला २ " भिऊं नका; खेद करीत बसण्याची ही वेळ नव्हे. आर्यपुत्र रामलक्ष्मण इंद्रजिताच्या अस्त्रसमुदायांनीं ताडित होऊन व निरुपाय होऊन अगदीं निश्चेष्ट पडले आहेत हें खरें आहे; परंतु, ब्रह्मदेवाच्या आज्ञेला ते मान देत आहेत ३. ब्रह्मदेवानें अमोघ वीर्यानें युक्त असलेलें हें उत्कृष्ट ब्रह्मास्त्र त्या इंद्रजिताला दिलें आहे व त्याला मान देण्याकरितां हे राजकुमार युद्धामध्यें अगदीं निश्चित पडले आहेत. तेव्हां ह्याविषयीं खेद करण्याचा प्रसंग तो काय आहे ? " ४. तदनंतर बिभीषणाचें भाषण श्रवण करून विचारी मारुतीनेंही त्या ब्रह्मास्त्राला मान दिला आणि तो ह्मणाला ५ " वेगवान् वानरांच्या ह्या सैन्याचा तर अस्त्रानें निःपात झालेलाच आहे. तथापि, जो जो जीव धरून राहिला असेल त्याला त्याला आपण अश्वासन देऊं " ६. तदनंतर राक्षसश्रेष्ठ बिभीषण व हनुमान् ह्या उभयतांही वीरांनीं हातामध्यें दिवट्या

स्रवद्भिः क्षतजं गात्रैः प्रस्रवद्भिः समन्ततः ८ पतितैः पर्वताकारैर्वानरैर-
भिसंवृताम् । शस्त्रैश्च पतितैर्दीप्तैर्ददृशाते वसुंधराम् ९ सुग्रीवमङ्गदं नीलं
शरभं गन्धमादनम् । जाम्बवन्तं सुषेणं च वेगदर्शिनमेव च १०
मैन्दं नलं ज्योतिमुखं द्विविदं चापि वानरम् । बिभीषणो हनूमांश्च दद्द-
शाते हतान्रणे ११ सप्तषष्टिर्हताः कोट्यो वानराणां तरस्विनाम् । अह्नः
पञ्चमशेषेण वल्लभेन स्वयंभुवः १२ सागरौघनिभं भीमं दृष्ट्वा बाणार्दितं
बलम् । मार्गते जाम्बवन्तं च हनूमान्सबिभीषणः १३ स्वभावजरया
युक्तं वृद्धं शरशतैश्चितम् । प्रजापतिसुतं वीरं शाम्यन्तमिव पावकम् १४
दृष्ट्वा समभिसंक्रम्य पौलस्त्यो वाक्यमब्रवीत् । कच्चिदार्य शरैस्तीक्ष्णैर्न
प्राणा ध्वंसितास्तव १५ बिभीषणवचः श्रुत्वा जाम्बवानृक्षपुङ्गवः । कृच्छ्रा-
दभ्युद्गिरन्वाक्यमिदं वचनमब्रवीत् १६ नैर्ऋतेन्द्र महावीर्य स्वरेण त्वाभि-
लक्षये । विद्धगात्रः शितैर्बाणैर्न त्वां पश्यामि चक्षुषा १७ अञ्जना सुप्रजा
येन मातरिश्वा च सुव्रत । हनूमान्वानरश्रेष्ठः प्राणान्धारयते क्वचित् १८

---

घेतल्या आणि रणभूमीमध्यें रात्रीं ते संचार करूं लागले ७. तव्हां पुच्छ, हात, मांड्या, पाय, बोटें व माना हीं ज्यांचीं छिन्नभिन्न झालीं आहेत आणि ज्यांच्या शरीरांतून सर्व बाजूंनीं रक्तस्राव चालला आहे ८ अशा पर्वतप्राय वानरांनीं व पडलेल्या उज्ज्वल शस्त्रांनीं सर्व पृथ्वी व्याप्त झालेली त्यांच्या दृष्टीं पडली ९ आणि नंतर बिभीषण व हनुमान् ह्यांनीं सुग्रीव, अंगद, नील, शरभ, गंधमादन, जांबवान्, सुषेण, वेगदर्शी, मैंद, नल, ज्योतिमुख आणि द्विविद हे वानर संग्रामामध्यें मृतप्राय होऊन पडलेले अवलोकन केले १०, ११. ब्रह्मदेवाला प्रिय असलेलें जें ब्रह्मास्त्र त्याच्या योगानें दिवसाचा पंचमभाग जो सायं-काल त्यामध्यें सदुसष्ट कोट वेगवान् वानरांचा वध झाला १२. ह्याप्रमाणें समुद्रासा-रिखें प्रचंड सैन्य बाणांनीं पीडित झालेलें अवलोकन करून बिभीषणासहवर्तमान हनु-मान् जांबवानाला शोधूं लागला असतां १३ स्वभावतःच आलेल्या जरेनें युक्त अस-लेला व शेंकडों बाणांनीं व्याप्त झालेला तो वृद्ध व वीर ब्रह्मपुत्र विझत आलेल्या अग्निप्रमाणें त्यांना दिसला १४. जांबवानाला अवलोकन केल्यानंतर बिभीषण त्याच्या शेजारीं गेला आणि ह्मणाला "हे आर्य, तीक्ष्ण बाणांनीं तुझे प्राण तर नाश पावले नाहींत नां ?" १५. हें बिभीषणाचें भाषण श्रवण करून ऋक्षश्रेष्ठ जांबवान् मोठ्या कष्टानें मुखांतून शब्द काढीत काढीत त्याला ह्मणाला १६ "हे महावीर्यवान् राक्ष-सराज, स्वरावरून मी तुला ओळखीत आहें. तीक्ष्ण बाणांनीं माझें शरीर विद्ध झाल्यामुळें दृष्टीनें मी तुला अवलोकन करीत नाहीं १७. हे सदाचरणसंपन्न बिभीषणा,

श्रुत्वा जाम्बवतो वाक्यमुवाचेदं विभीषणः । आर्यपुत्रावतिक्रम्य कस्मा-
त्पृच्छसि मारुतिम् १९ नैव राजनि सुग्रीवे नाङ्गदे नापि राघवे । आर्य
संदर्शितः स्नेहो यथा वायुसुते परः २० विभीषणवचः श्रुत्वा जाम्बवान्वा-
क्यमब्रवीत् । शृणु नैर्ऋतशार्दूल यस्मात्पृच्छामि मारुतिम् २१ अस्मि-
ञ्जीवति वीरे तु हतमप्यहतं बलम् । हनुमत्युज्झितप्राणे जीवन्तोपि मृता
वयम् २२ धरते मारुतिस्तात मारुतप्रतिमो यदि । वैश्वानरसमो वीर्ये
जीविताशा ततो भवेत् २३ ततो वृद्धमुपागम्य विनयेनाभ्यवादयत् ।
गृह्य जाम्बवतः पादौ हनूमान्मारुतात्मजः २४ श्रुत्वा हनूमतो वाक्यं तदा
विव्यथितेन्द्रियः । पुनर्जातमिवात्मानं मन्यते प्लवगोत्तमः २५ ततोब्रवी-
न्महातेजा हनूमन्तं स जाम्बवान् । आगच्छ हरिशार्दूल वानरांस्त्रातु-
मर्हसि २६ नान्यो विक्रमपर्याप्तस्त्वमेषां परमः सखा । त्वत्पराक्रमका-
लोयं नान्यं पश्यामि कंचन २७ ऋक्षवानरवीराणामनीकानि प्रहर्षय ।

---

ज्याच्या योगानें अंजना व वायु हे दोन्ही सुपुत्रयुक्त आहेत तो वानरश्रेष्ठ हनुमान् कोठें जिवत आहे काय ?" १८. जांबवानाचें हें भाषण श्रवण करून बिभीषण ह्मणाला " आर्यपुत्र रामलक्ष्मणांना सोडून तूं मारुतीची कशाकरितां चौकशी करीत आहेस? १९. हे सज्जना, मारुतीवर जसें तूं उत्कृष्ट प्रेम दर्शविलें आहेस तसें राजा सुग्रीव, अंगद आणि राम ह्यापैकीं कोणावरही तूं दर्शवीत नाहींस हें काय ?" २०. बिभीषणाचें हें भाषण श्रवण करून जांबवान् ह्मणाला " हे राक्षसश्रेष्ठा, मारुतीचीच कशाकरितां चौकशी करीत आहें तें ऐक २१. हा वीर जिवंत असल्यास सर्व सैन्याचा जरी वध झाला असला तरी तो न झाल्यासारिखाच आहे; परंतु, हनुमानानें जर प्राणत्याग केला असेल तर आह्मी जिवंत असूनही मृततुल्यच आहोंत २२. बा बिभीषणा, वीर्यानें अग्नीची बरोबरी करणारा वायुतुल्य वायुपुत्र हनुमान् जर जिवंत असेल तरच आमच्या जीविताची कांहींतरी आशा आहे " २३. तदनंतर वृद्ध जांबवानासमीप जाऊन हनुमानानें विनयपूर्वक त्याला अभिवंदन केलें आणि त्याचे पाय धरून त्याला आपण आल्याचें कळविलें २४. हनुमानाचें भाषण श्रवण केल्यानंतर वानरश्रेष्ठ जांबवानाचीं इंद्रियें जरी व्याकुल झालीं होतीं तरी आपला पुनर्जन्म झाला असें त्याला वाटलें २५ आणि नंतर तो महातेजस्वी जांबवान् हनुमानाला ह्मणाला " हे वानरश्रेष्ठा, इकडे ये आणि वानरांचें रक्षण कर २६. तुझ्यासारिखा पूर्ण पराक्रम कोणाचाही नाहीं. तूं ह्यांचा परम सखा आहेस व तुझ्याच पराक्रमाचा हा प्रसंग आहे. दुसरा कोणी पराक्रम करणारा ह्यावेळीं मला दिसत नाहीं २७. ह्यास्तव ऋक्षवीर व

विशल्यौ कुरु चाप्येतौ सादितौ रामलक्ष्मणौ २८ गत्वा परममध्वानमुपर्युपरि सागरम् । हिमवन्तं नगश्रेष्ठं हनूमन्गन्तुमर्हसि २९ ततः काञ्चनमत्युग्रमृषभं पर्वतोत्तमम् । कैलासशिखरं चात्र द्रक्ष्यस्यरिनिषूदन ३० तयोः शिखरयोर्मध्ये प्रदीप्तमतुलप्रभम् । सर्वौषधियुतं वीर द्रक्ष्यस्योषधिपर्वतम् ३१ तस्य वानरशार्दूल चतस्रो मूर्ध्नि संभवाः । द्रक्ष्यस्योषधयो दीप्ता दीपयन्तीर्दिशो दश ३२ मृतसंजीवनीं चैव विशल्यकरणीमपि । सुवर्णकरणीं चैव संधानीं च महौषधीम् ३३ ताः सर्वा हनुमन्गृह्य क्षिप्रमागन्तुमर्हसि । आश्वासय हरीन्प्राणैर्योज्य गन्धवहात्मज ३४ श्रुत्वा जाम्बवतो वाक्यं हनूमान्मारुतात्मजः । आपूर्यत बलोद्धर्षैर्वायुवेगैरिवार्णवः ३५ स पर्वततटाग्रस्थः पीडयन्पर्वतोत्तमम् । हनूमान्दृश्यते वीरो द्वितीय इव पर्वतः ३६ हरिपादविनिर्भग्नो निषसाद स पर्वतः । न शशाक तदात्मानं वोढुं भृशनिपीडितः ३७ तस्य पेतुर्नगा भूमौ हरिवेगाच्च जज्वलुः । शृङ्गाणि च व्यकीर्यन्त पीडितस्य हनूमता ३८

---

वानरवीर ह्यांच्या सैन्यांना आनंद दे आणि निश्चेष्ट पडलेल्या ह्या रामलक्ष्मणांच्याही शरीरांतील बाण काढून टाक २८. हे हनुमाना, सागरावरून उड्डाण करून बराच दीर्घ मार्ग आक्रमिल्यानंतर तूं पर्वतश्रेष्ठ हिमालयावर जा २९. ह्मणजे, हे शत्रुनाशका, तेथून अतिशय प्रचंड असा एक ऋषभसंज्ञक श्रेष्ठ सुवर्णमय पर्वत व कैलासशिखर हीं तूं अवलोकन करिशील ३०. त्या दोन पर्वतांच्या शिखरांमध्यें उज्ज्वल, अतुल प्रभेनें युक्त आणि सर्व औषधींनीं संपन्न असा एक औषधिपर्वत, हे वीरा, तुझ्या दृष्टीं पडेल ३१. हे वानरश्रेष्ठा, त्या पर्वताच्या माथ्यावर उत्पन्न झालेल्या चार देदीप्यमान औषधि दशदिशा प्रकाशित करीत असलेल्या तूं अवलोकन करिशील ३२. मृतसंजीवनी, विशल्यकर्णी, सुवर्णकर्णी व संधानी ह्या त्या चार महौषधि होत ३३. हे हनुमाना, त्या सर्व औषधि घेऊन तूं सत्वर परत ये आणि, हे वायुपुत्रा, वानरांचे प्राण परत आणून तूं त्यांना धीर दे" ३४. जांबवानाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर वायुपुत्र हनुमान् वायुवेगानें जोराजोरानें उसळणाऱ्या लाटांनीं ज्याप्रमाणें समुद्र वृद्धिंगत होतो त्याप्रमाणें वृद्धिंगत झाला ३५; आणि त्रिकूटाचलाच्या शिखरावर असलेला तो हनुमान् वीर त्या श्रेष्ठ पर्वताला दाबू लागला असतां दुसरा पर्वतच कीं काय असा दिसूं लागला ३६. तेव्हां मारुतीच्या पायांनीं विदीर्ण होऊन गेलेला तो पर्वत खचला आणि अतिशयच दाब बसल्यामुळें तो पर्वत जसाच्या तसा तेथें ठरणेंही अशक्य झालें ३७. हनुमानाचा दाब

तस्मिन्संपीड्यमाने तु भग्नद्रुमशिलातले । न शेकुर्वानराः स्थातुं घूर्णमाने नगोत्तमे ३९ सा घूर्णितमहाद्वारा प्रभग्नगृहगोपुरा । लङ्का त्रासाकुला रात्रौ प्रनृत्येवाभवत्तदा ४० पृथिवीधरसंकाशो निपीड्य पृथिवीधरम् । पृथिवीं क्षोभयामास सार्णवां मारुतात्मजः ४१ पद्भ्यां तु शैलमापीड्य वडवामुखवन्मुखम् । विवृत्योग्रं ननादोच्चैस्त्रासयन्रजनीचरान् ४२ तस्य नानद्यमानस्य श्रुत्वा निनदमुत्तमम् । लङ्कास्था राक्षसव्याघ्रा न शेकुः स्पन्दितुं क्वचित् ४३ नमस्कृत्वा समुद्राय मारुतिर्भीमविक्रमः । राघवार्थे परं कर्म समीहत परन्तपः ४४ स पुच्छमुद्यम्य भुजङ्गकल्पं विनम्य पृष्ठं श्रवणे निकुच्य । विवृत्य वक्त्रं वडवामुखाभमापुप्लुवे व्योम्नि स चण्डवेगः ४५ स वृक्षखण्डांस्तरसा जहार शैलाञ्शिलाः प्राकृतवानरांश्च । बाहूरुवेगोद्धतसंप्रणुन्नास्ते क्षीणवेगाः सलिले निपेतुः ४६ स तौ

---

बसल्याबरोबर त्या पर्वतावरील वृक्ष उलथून पडले; त्या हनुमानाच्या वेगानें प्रज्वलितही होऊं लागले व त्या पर्वताचीं शिखरेंही कोसळून पडूं लागलीं ३८. हनुमानाचा अधिक अधिकच दाब बसूं लागला असतां त्या पर्वतावरील वृक्ष व शिला ह्यांचा भंग झाला आणि तो श्रेष्ठ पर्वत डुलूं लागल्यामुळें वानरांनाही तेथें उभें रहातां येईनासें झालें ३९. रात्रीचे समयीं लंकानगरीच्या मोठमोठ्या वेशीही हालूं लागल्या; घरें व गोपुरें कोसळून पडूं लागलीं आणि सर्वही लंकानगरी भयभीत होऊन जशी कांहीं नृत्यच करूं लागली ४०. पर्वतप्राय झालेल्या वायुपुत्र हनुमानानें तो पर्वत दबवून टाकून समुद्रासहवर्तमान पृथ्वीही क्षुब्ध करून टाकिली ४१. पायांनीं पर्वताला ह्याप्रमाणें चेपून टाकिल्यानंतर वडवानलाच्या मुखाप्रमाणें आपलें जाज्वल्यमान प्रचंड मुख त्यानें उघडिलें आणि राक्षसांना त्रस्त करीत करीत उच्च स्वरानें गर्जनाही केली ४२. तो गर्जना करूं लागला असतां ती प्रचंड गर्जना कानावर येतांक्षणीं लंकेंतील मोठे मोठे राक्षसही इकडे तिकडे हालण्यास सुद्धां समर्थ झाले नाहींत ४३. भयंकर पराक्रम करणाऱ्या आणि शत्रूंना ताप देणाऱ्या त्या मारुतीनें समुद्राला नमस्कार करून रामाकरितां मोठेंच कर्म करण्याचें मनामध्यें आणिलें ४४; आणि नंतर आपलें भुजंगतुल्य पुच्छ उभारून, पृष्ठभाग नमवून, कान अकुंचित करून व वडवानलाच्या मुखाप्रमाणें असलेलें आपलें मुख उघडून त्या प्रचंड वेगवान् मारुतीनें आकाशामध्यें उड्डाण केलें ४५. उड्डाण केल्याबरोबर त्याच्या वेगानें वृक्षांचीं वनें, पर्वत, शिला आणि लहानसहान वानरही त्याच्या मागोमाग गेले आणि हात व मांड्या ह्यांच्या वेगामुळें वर उचलले जाऊन त्याच्या हातांचा वगैरे धक्का बसल्यामुळें वेग नाहींसा होऊन ते समुद्रामध्यें पडले ४६.

प्रसार्योरगभोगकल्पौ भुजौ भुजङ्गारिनिकाशवीर्यः। जगाम शैलं नग-
राजमग्र्यं दिशः प्रकर्षन्निव वायुसूनुः ४७ स सागरं घूर्णितवीचिमालं
तदम्भसा भ्रामितसर्वसत्त्वम्। समीक्ष्यमाणः सहसा जगाम चक्रं यथा
विष्णुकराग्रमुक्तम् ४८ स पर्वतान्पक्षिगणान्सरांसि नदीस्तटाकानि पुरो-
त्तमानि। स्फीताञ्जनांस्तानपि संप्रवीक्ष्य जगाम वेगात्पितृतुल्यवेगः ४९
आदित्यपथमाश्रित्य जगाम स गतश्रमः। हनूमांस्त्वरितो वीरः पितुस्तु-
ल्यपराक्रमः ५० जवेन महता युक्तो मारुतिर्वातरंहसा। जगाम हरि-
शार्दूलो दिशः शब्देन नादयन् ५१ स्मरञ्जाम्बवतो वाक्यं मारुतिर्भीमवि-
क्रमः। ददर्श सहसा चापि हिमवन्तं महाकपिः ५२ नानाप्रस्रवणोपेतं
बहुकन्दरनिर्झरम्। श्वेताभ्रचयसंकाशैः शिखरैश्चारुदर्शनैः ५३ शोभितं
विविधैर्वृक्षैरगमत्पर्वतोत्तमम् ५४ स तं समासाद्य महानगेन्द्रमतिप्रवृद्धो-
त्तमहेमशृङ्गम्। ददर्श पुण्यानि महाश्रमाणि सुरर्षिसङ्घोत्तमसेवितानि ५५
स ब्रह्मकोशं रजतालयं च शक्रालयं रुद्रशरप्रमोक्षम्। हयाननं ब्रह्मशिरश्च

---

नागाच्या शरीराप्रमाणें असलेले आपले बाहु विस्तृत करून नागशत्रु गरुडाप्रमाणें वीर्यवान् असलेला तो वायुपुत्र हनुमान् दिशा ओढीत नेत नेतच कीं काय पर्वतराज जो श्रेष्ठ हिमालय त्यावर गेला ४७. विष्णूच्या हातांतून सुटलेलें चक्र ज्याप्रमाणें एकदम निघून जातें त्याप्रमाणें तो हनुमान् ज्यामध्यें लाटा उसळू लागल्या आहेत व त्या उसळलेल्या उदकामुळें ज्यांतील सर्व प्राणी मूर्च्छित झाले आहेत असा समुद्र अवलोकन करीत करीत तो एकदम निघून गेला ४८. पर्वत, पक्षिगण, सरोवरें, नद्या, तटाक, श्रेष्ठ नगरें आणि सुपीक देश अवलोकन करून वेगामध्यें पित्याची बरोबरी करणारा तो हनुमान् वेगानें निघून गेला ४९. पराक्रमामध्येंही पित्याची बरोबरी करणारा व कधींही न श्रमणारा तो वीर हनुमान् आकाशाचें अवलंबन करून सत्वर चालता झाला ५०. मोठ्या वेगानें व वायूच्या गतीनें युक्त असलेला तो वायुपुत्र वानरश्रेष्ठ हनुमान् शब्दानें दिशा नादित करीत करीत चालला ५१; आणि जांबवानाचें भाषण मनामध्यें ठेऊन तो प्रचंड पराक्रमी महाकपि मारुति पुढें चालला असतां एकाएकीं हिमालयपर्वत त्याच्या दृष्टीं पडला ५२. सारांश, अनेक जलस्राव, असंख्य गुहा व झरे ह्यांनीं युक्त असून श्वेतवर्ण अभ्रसमुदायाप्रमाणें मनोहर दिसणारीं शिखरें व नानाप्रकारचे वृक्ष ह्यांनीं सुशोभित झालेल्या श्रेष्ठ पर्वतावर तो गेला. अति प्रचंड, उत्कृष्ट व सुवर्णमय शिखरांनीं युक्त असलेल्या त्या मोठ्या पर्वत-राजासमीप गेल्यानंतर देव व ऋषि ह्यांचे उत्कृष्ट गण ज्यांचा आश्रय करून राहिलेले

दीप्तं ददर्श वैवस्वतकिङ्करांश्च ५६ वह्न्यालयं वैश्रवणालयं च सूर्यप्रभं सूर्यनिबन्धनं च । ब्रह्मालयं शंकरकार्मुकं च ददर्श नाभिं च वसुंधरायाः ५७ कैलासमुग्रं हिमवच्छिलां च तं वै वृषं काञ्चनशैलमग्र्यम् । प्रदीप्तसर्वौषधिसंप्रदीप्तं ददर्श सर्वौषधिपर्वतेन्द्रम् ५८ स तं समीक्ष्यानलराशिदीप्तं विसिस्मिये वासवदूतसूनुः । आप्लुत्य तं चौषधिपर्वतेन्द्रं तत्रौषधीनां विचयं चकार ५९ स योजनसहस्राणि समतीत्य महाकपिः । दिव्यौषधिधरं शैलं व्यचरन्मारुतात्मजः ६० महौषध्यस्ततः सर्वास्तस्मिन्पर्वतसत्तमे । विज्ञायार्थिनमायान्तं ततो जग्मुरदर्शनम् ६१ स ता महात्मा हनुमानपश्यंश्चुकोप रोषाच्च भृशं ननाद । अमृष्यमाणोऽग्निसमानचक्षुर्महीधरेन्द्रं तमुवाच वाक्यम् ६२ किमेतदेवं सुविनिश्चितं ते यद्राघवे नासि कृतानुकम्पः । पश्याद्य मद्बाहुबलाभिभूतो विकीर्णमात्मानमथो नगेन्द्र ६३ स तस्य शृङ्गं सनगं सनागं सकाञ्चनं धातुसहस्रजुष्टम् । विकीर्णकूटं ज्वलिताग्रसानुं

आहेत असे मोठे मोठे पवित्र आश्रम त्यानें अवलोकन केले ५५. नंतर भगवान् हिरण्यगर्भाचें स्थान, रजतनाभीचें स्थान, इंद्राचें स्थान, त्रिपुरासुरवधप्रसंगीं ज्या ठिकाणीं उभें राहून रुद्रानें बाण सोडिला तें स्थान, भगवान् हयग्रीवाचें स्थान, ब्रह्मास्त्रदेवतेचें उज्ज्वल स्थान, यमाचे सेवक ५६, अग्नीचें स्थान, कुबेराचें स्थान, सूर्यतुल्य तेजस्वी सूर्याचें स्थान, चतुर्मुख ब्रह्मदेवाचें स्थान, शंकराच्या पिनाकपाणीसंज्ञक अस्त्राचें स्थान, भूनाभिसंज्ञक प्राजापत्यस्थान ५७, उग्र कैलासस्थान, हिमालयपर्वतावरील भगवान् रुद्राचें तपश्चर्यास्थान, जांबवानानें सांगितलेला तो वृष श्रेष्ठ सुवर्णपर्वत आणि सर्वप्रकारच्या उज्ज्वल औषधींनीं देदीप्यमान असलेला सर्वौषधिमय पर्वतराज हीं त्यानें अवलोकन केलीं ५८. अग्निप्रमाणें देदीप्यमान असलेला तो ओषधिमय पर्वतराज अवलोकन करून त्यावर उड्डाण केल्यानंतर देवराज सेवक वायुपुत्र हनुमान् तेथील औषधि शोधूं लागला ५९. हजारों योजनें उल्लंघन गेल्यानंतर महाकपि वायुपुत्र हनुमान् दिव्य औषधि धारण करणाऱ्या त्या पर्वतावर संचार करूं लागला ६०. तेव्हां याचक आला आहे असें समजून आल्यावर त्या श्रेष्ठ पर्वतावरील सर्वही महौषधि गुप्त झाल्या ६१. त्या औषधि दृष्टीं पडेनाशा झाल्या असतां त्या महात्म्या हनुमानानें रागारागानें अतिशय गर्जना केली आणि तें सहन न झाल्यामुळें नेत्र लाल करून त्या पर्वतराजाला तो ह्मणाला ६२ "हे पर्वतराज, रामाविषयीं तुझे ठिकाणीं दया नाहीं हें तूं काय मनामध्यें आणिलें आहेस ? चिंता नाहीं. माझ्या बाहुबलानें जर्जर होऊन स्वतःचे तुकडे तुकडे झालेले आज तूं पहा" ६३. असें त्याला सांगून वेगावेगानें त्यानें त्या पर्वताचें शिखर, वृक्ष, गज व

प्रगृह्य वेगात्सहसोन्ममाथ ६४ स तं समुत्पाट्य खमुत्पपात वित्रास्य लोकान्ससुरान्सुरेन्द्रान् । संस्तूयमानः खचरैरनेकैर्जगाम वेगाद्गरुडोग्रवेगः ६५ स भास्कराध्वानमनुप्रपन्नस्तं भास्कराभं शिखरं प्रगृह्य । बभौ तदा भास्करसंनिकाशो रवेः समीपे प्रतिभास्कराभः ६६ स तेन शैलेन भृशं रराज शैलोपमो गन्धवहात्मजस्तु । सहस्रधारेण सपावकेन चक्रेण खे विष्णुरिवार्पितेन ६७ तं वानराः प्रेक्ष्य तदा विनेदुः स तानपि प्रेक्ष्य मुदा ननाद । तेषां समुत्कृष्टरवं निशम्य लङ्कालया भीमतरं विनेदुः ६८ ततो महात्मा निपपात तस्मिञ्शैलोत्तमे वानरसैन्यमध्ये । हर्युत्तमेभ्यः शिरसाभिवाद्य बिभीषणं तत्र च सस्वजे सः ६९ तावप्युभौ मानुषराजपुत्रौ तं गन्धमाघ्राय महौषधीनाम् । बभूवतुस्तत्र तदा विशल्यावुत्तस्थुरन्ये च हरिप्रवीराः ७० सर्वे विशल्या विरुजा क्षणेन हरिप्रवीराश्च हताश्च ये स्युः । गन्धेन तासां प्रवरौषधीनां सुप्ता निशान्तेष्विव संप्रबुद्धाः ७१

---

सुवर्ण ह्यांसहवर्तमान हातांत धरून एकदम उपटलें. तें शिखर हजारों धातूंनीं युक्त होतें. त्यावरील दुसरीं लहान लहान शिखरें देदीप्यमान होतीं व कांहीं लहान लहान शिखरें अस्ताव्यस्त झालेलीं होतीं ६४. तें शिखर उपटिल्यानंतर देवांसहवर्तमान देवाधिपतींना व तिन्ही लोकांना त्रस्त करून त्यानें आकाशामध्यें उड्डाण केलें व गरुडासारिख्या उग्र वेगानें युक्त असलेला तो हनुमान् आकाशामध्यें संचार करणारे गंधर्वप्रभृति अनेक लोक स्तुति करीत असतांना तो चालता झाला ६५. सूर्यासारिखें तें देदीप्यमान शिखर हातामध्यें घेऊन सूर्याच्या मार्गाचें अवलंबन केलेला तो सूर्यतुल्य तेजस्वी हनुमान् सूर्याचे समीप प्रतिसूर्याप्रमाणेंच दिसूं लागला ६६. हजारों धारा व अग्नि ह्यांनीं युक्त असलेलें चक्र हातामध्यें घतल्यावर ज्याप्रमाणें विष्णु शोभूं लागतो त्याप्रमाणें तो पर्वततुल्य वायुपुत्र हनुमान् त्या पर्वताच्या योगानें अतिशय शोभूं लागला. त्याला अवलोकन करून वानर घोष करूं लागले; त्या वानरांना अवलोकन करून तोही आनंदानें गर्जना करूं लागला आणि त्यांचा तो प्रचंड ध्वनि श्रवण करून लंकानिवासी राक्षस त्यांच्याहीपेक्षां भयंकर स्वरानें ओरडूं लागले ६८. तदनंतर तो महात्मा हनुमान् वानरसैन्याचे मध्यभागीं त्या श्रेष्ठ पर्वतावर उतरला आणि उतरतांक्षणीं श्रेष्ठ श्रेष्ठ वानरांना मस्तकानें प्रणाम करून बिभीषणाला त्यानें कडकडून भेट दिली ६९. इतका प्रकार झाला असतां ते नरेंद्रपुत्र उभयतां रामलक्ष्मणही महौषधींचा वास आल्याबरोबर शल्यरहित झाले आणि मरून पडलेले इतरही वानरश्रेष्ठ उठले ७०. संग्रामामध्यें जे वानरश्रेष्ठ वध पावले होते ते त्या श्रेष्ठ औषधींचा गंध येतांक्षणीं सत्र

यदा प्रभृति लङ्कायां युध्यन्ते हरिराक्षसाः । तदाप्रभृति मानार्थमाज्ञया रावणस्य च ७२ ये हन्यन्ते रणे तत्र राक्षसाः कपिकुञ्जरैः । हता हतास्तु क्षिप्यन्ते सर्व एव तु सागरे ७३ ततो हरिर्गन्धवहात्मजस्तु तमोषधीशैलमुदग्रवेगः । निनाय वेगाद्धिमवन्तमेव पुनश्च रामेण समाजगाम ७४ [३३५८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुःसप्ततितमः सर्गः ॥ ७४ ॥

ततोऽब्रवीन्महातेजाः सुग्रीवो वानरेश्वरः । अर्थ्यं विज्ञापयंश्चापि हनूमन्तमिदं वचः १ यतो हतः कुम्भकर्णः कुमाराश्च निषूदिताः । नेदानीमुपनिर्हारं रावणो दातुमर्हति २ ये ये महाबलाः सन्ति लघवश्च प्लवङ्गमाः । लङ्कामभिपतन्त्वाशु गृह्योल्काः प्लवगर्षभाः ३ ततोऽस्तं गत आदित्ये रौद्रे तस्मिन्निशामुखे । लङ्कामभिमुखाः सोल्का जग्मुस्ते प्लवगर्षभाः ४ उल्काहस्तैर्हरिगणैः सर्वतः समभिद्रुताः । आरक्षस्था विरूपाक्षाः सहसा विप्रदुद्रुवुः ५ गोपुराट्टप्रतोलीषु चर्यासु विविधासु

---

संपल्यानंतर ज्याप्रमाणें निद्रिस्थ लोक जागे होतात त्याप्रमाणें जागे होऊन उठले आणि एका क्षणामध्यें सर्वही शल्यरहित व वेदनारहित झाले ७१. लंकेमध्यें वानरांचें व राक्षसांचें युद्ध सुरू झाल्यापासून वानरश्रेष्ठांनीं ज्या राक्षसांचा संग्रामामध्यें वध केला होता ते सर्वही राक्षस रावणाच्या आज्ञेनें आणि मरून पडलेल्या राक्षसांची संख्या शत्रूंना कळूं नये ह्मणून समुद्रामध्यें टाकून देण्याचा क्रम चालला होता ( ह्यामुळें त्या औषधींच्या गंधानें राक्षस उठले नाहींत ) ७२, ७३. तदनंतर त्या महावेगवान् वायुपुत्र हनुमानानें तें ओषधिमय हिमालयपर्वताचें शिखर जेथल्या तेथें नेऊन ठेविलें व पुनरपि तो रामाकडे परत आला ७४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चौऱ्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला॥७४॥

तदनंतर महातेजस्वी वानराधिपति सुग्रीव आपल्या भाषणामध्यें अर्थगांभिर्य दर्शवीत दर्शवीत हनुमानाला ह्मणाला १ " ज्याअर्थी रामलक्ष्मणांनीं कुंभकर्णाचा व रावणपुत्रांचा वध केला आहे त्याअर्थी लंकेंतून बाहेर पडून रावण आतां आपल्याशीं युद्ध करणार नाहीं २. ह्यास्तव, हे वानरश्रेष्ठहो, महाबलाढ्य आणि चलाख असे जे जे ह्मणून कांहीं वानर असतील त्यांनीं हातामध्यें दिवट्या घेऊन सत्वर लंकेवर धांवावें ३ सूर्यास्तानंतर अशी आज्ञा झाली असतां त्या भयंकर प्रदोषसमयीं ते राक्षसश्रेष्ठ हातामध्यें दिवट्या घेऊन लंकेकडे चालले ४. हातामध्यें दिवट्या घेऊन वानरगण चोहोंकडून मागें लागले असतां द्वाररक्षक राक्षस एकाएकीं पळत सुटले ५

च । प्रासादेषु च संहृष्टाः ससृजुस्ते हुताशनम् ६ तेषां गृहसहस्राणि ददाह हुतभुक्तदा । प्रासादाः पर्वताकाराः पतन्ति धरणीतले ७ अगुरु-र्दह्यते तत्र परं चैव सुचन्दनम् । मौक्तिका मणयः स्निग्धा वज्रं चापि प्रवालकम् ८ क्षौमं च दह्यते तत्र कौशेयं चापि शोभनम् । आविकं विविधं चौर्णं काञ्चनं भाण्डमायुधम् ९ नानाविकृतसंस्थानं वाजिभाण्ड-परिच्छदम् । गजग्रैवेयकक्ष्याश्च रथभाण्डांश्च संस्कृतान् १० तनुत्राणि च योधानां हस्त्यश्वनां च चर्म च । खड्गा धनूंषि ज्याबाणास्तोमराङ्कु-शशक्तयः ११ रोमजं वालजं चर्म व्याघ्रजं चाण्डजं बहु । मुक्तामणि-विचित्रांश्च प्रासादांश्च समन्ततः १२ विविधानस्त्रसंघातानग्निर्दहति तत्र वै । नानाविधान्गृहांश्चित्रान्ददाह हुतभुक्तदा १३ आवासान्राक्षसानां च सर्वेषां गृहगृध्नुनाम् । हेमचित्रतनुत्राणां स्रग्भाण्डाम्बरधारिणाम् १४ सीधुपानचलाक्षाणां मदविह्वलगामिनाम् । कान्तालम्बितवस्त्राणां शत्रुसं-जातमन्युनाम् १५ गदाशूलासिहस्तानां खादतां पिबतामपि । शयनेषु

---

व वेशी, गच्या, मोठे मोठे रस्ते, नानाप्रकारचे बोळ व वाडे ह्यांमध्यें त्या वानरांनीं आनंदानें आग लावून दिली असतां ६ त्या राक्षसांचीं हजारों घरें त्या वेळीं अग्नीनें दग्ध केलीं. पर्वतासारिखे वाडे भूतलावर पडूं लागले ७. अगुरु, उत्कृष्ट प्रकारचें चंदन, मोत्यें, पाणीदार माणकें, हिरे, पोंवळीं ८ तागाचीं व रेशमी मनोहर वस्त्रें, नानाप्रकारचीं ऊर्णावस्त्रें मेंढ्याच्या लोकरीचीं केलेलीं वस्त्रें, सुवर्णाचीं भांडीं, आयुधें ९, नानाप्रकारच्या इमारती, अश्वांचे अलंकार व सामान, गजांच्या गळ्यांतील माळा व झुली, रथावरील उत्तम उत्तम प्रकारचे अलंकार १०, योद्धे, गज व अश्व ह्यांचीं चिलखतें, ढाला, तरवारी, धनुष्यें, प्रत्यंचा, बाण, तोमर, अंकुश, शक्ति ११, कंबलादि रोमवस्त्रें, पुच्छाच्या केसांच्या केलेल्या चवऱ्या वगैरे व्याघ्रचर्में, विपुल कस्तुरी, मोत्यें व रत्नें ह्यांनीं अलंकृत केलेले वाडे १२, नानाप्रकारचे अस्त्र-समुदाय, नानाप्रकारचीं चित्रविचित्र गृहें १३ आणि सर्व गृहस्थाश्रमी राक्षसांचीं निवासस्थानें अग्नीनें दग्ध केलीं. कांहीं राक्षस सुवर्णाचीं चित्रविचित्र कवचें धारण करून बसले असतांना, कांहीं माला, भूषणें व उत्कृष्ट वस्त्रें धारण करून सज्ज झाले असतांना १४, कांहीं मद्यपानानें नेत्र धुंद होऊन पडले असतांना, कांहीं विषयमदानें विह्वल झालेल्या स्त्रियांना आलिंगन देऊन स्त्रियांशीं समागम करीत असतांना, कांहींचीं वस्त्रें स्त्रियांनीं ओढून धरिलीं असतांना, कांहीं शत्रूवर क्रुद्ध होऊन बसले असतांना १५, गदा, शूल व खड्ग हातांत घेऊन कांहीं युद्धाच्या तयारींत असतांना,

महार्हेषु प्रसुप्तानां प्रियैः सह १६ त्रस्तानां गच्छतां तूर्णं पुत्रानादाय सर्वतः। तेषां शतसहस्राणि तदा लङ्कानिवासिनाम् १७ अदहत्पावकस्तत्र जज्वाल च पुनःपुनः। सारवन्ति महार्हाणि गम्भीरगुणवन्ति च १८ हेमचन्द्रार्धचन्द्राणि चन्द्रशालोत्तमानि च। तत्र चित्रगवाक्षाणि साधिष्ठानानि सर्वशः १९ मणिविद्रुमचित्राणि स्पृशन्तीव दिवाकरम्। क्रौञ्चबर्हिणवर्णानां भूषणानां च निःस्वनैः॥ नादितान्यचलाभानि वेश्मान्यग्निर्ददाह सः २० ज्वलनेन परीतानि तोरणानि चकाशिरे। विद्युद्भिरिव नद्धानि मेघजालानि घर्मगे २१ ज्वलनेन परीतानि गृहाणि प्रचकाशिरे। दावाग्निदीप्तानि यथा शिखराणि महागिरेः २२ विमानेषु प्रसुप्ताश्च दह्यमाना वराङ्गनाः। त्यक्ताभरणसंयोगा हाहेत्युच्चैर्विचुक्रुशुः २३ तत्र चाग्निपरीतानि निपेतुर्भवनान्यपि। वज्रिवज्रहतानीव शिखराणि महागिरेः २४ तानि निर्दह्यमानानि दूरतः प्रचकाशिरे। हिमवच्छिखराणीव दह्यमानानि सर्वशः २५ हर्म्याग्रैर्दह्यमानैश्च ज्वालाप्रज्वलितैरपि। रात्रौ सा दृश्यते

---

कांहीं भक्षण करीत असतांना, कांहीं पान करीत असतांना, कांहीं मोठमोठ्या शय्यांवर प्रिय पात्रांसहवर्तमान शयन करीत असतांना १६ आणि कांहीं लंकानिवासी राक्षस भयभीत झाल्यामुळें मुलाला घेऊन वाट फुटेल तिकडे पळत सुटले असतांना त्यांपैकीं लक्षावधि राक्षस १७ दग्ध करून अग्नि पुनरपि प्रज्वलित होऊं लागला. बळकट, मोठीं मोठीं मौल्यवान्, उत्तम उत्तम सोर्या ज्यांमध्यें आहेत अशीं १८, सुवर्णमय, चंद्राकृति, अर्धचंद्राकृति, उत्कृष्ट गच्यांनीं युक्त, मनोहर खिडक्यांची सर्वत्र मंचकादिकांनीं युक्त असलेलीं १९, रत्नें व पोवळीं ह्यांच्या योगानें मनोहर सूर्याला जशीं कांहीं स्पर्शच करीत आहेत कीं काय अशीं उंच, क्रौंच व मयूर पक्ष्यांच्या व भूषणांच्या ध्वनींनीं नादित आणि पर्वतप्राय गृहें तेथें अग्नीनें दग्ध केलीं २० उष्णकाल गेल्यानंतर विद्युल्लतांनीं युक्त झालेल्या मेघसमुदायाप्रमाणें सर्वबाजूंनीं पेटलेले दरवाजे प्रकाशित होऊं लागले २१. वणव्यानें प्रज्वलित झालेल्या महापर्वताच्या शिखराप्रमाणें चोहोंकडून आग लागलेलीं घरें प्रकाशित होऊं लागलीं २२. सात सात मजली वाड्यांमध्यें निद्रिस्थ असलेल्या श्रेष्ठ स्त्रिया अंगावरील भूषणें टाकून देऊन हाय हाय ह्मणत ह्मणत मोठ्यानें आक्रोश करूं लागल्या २३. इंद्राच्या वज्राचा तडाका बसून पडणारीं महापर्वताचीं शिखरेंच कीं काय अशीं सभोंवतीं आग लागलेलीं घरें पडूं लागलीं २४. तीं घरें दग्ध होऊं लागलीं असतां हिमालयपर्वताचीं सर्व बाजूंनीं पेटलेलीं शिखरेंच कीं काय अशीं दिसूं लागलीं २५. ज्वालांनीं प्रज्वलित होऊन मोठे मोठे वाडे रात्रीं

लङ्का पुष्पितैरिव किंशुकैः २६ हस्त्यध्यक्षैर्गजैर्मुक्तैर्मुक्तैश्च तुरगैरपि । बभूव लङ्का लोकान्ते भ्रान्तग्राह इवार्णवः २७ अश्वं मुक्तं गजो दृष्ट्वा कचिद्भीतोपसर्पति । भीतो भीतं गजं दृष्ट्वा कचिदश्वो निवर्तते २८ लङ्कायां दह्यमानायां शुशुभे च महोदधिः । छायासंसक्तसलिलो लोहितोद इवार्णवे २९ सा बभूव मुहूर्तेन हरिभिर्दीपिता पुरी । लोकस्यास्य क्षये घोरे प्रदीप्तेव वसुंधरा ३० नारीजनस्य धूमेन व्याप्तस्योच्चैर्विनेदुषः । स्वनो ज्वलनतप्तस्य शुश्रुवे शतयोजनं ३१ प्रदग्धकायानपरान्राक्षसान्निर्गतान्बहिः । सहसा ह्युत्पतन्ति स्म हरयोऽथ युयुत्सवः ३२ उद्घुष्टं वानराणां च राक्षसानां च निःस्वनम् । दिशो दश समुद्रं च पृथिवीं च व्यनादयत् ३३ विशल्यौ च महात्मानौ तावुभौ रामलक्ष्मणौ । असंभ्रान्तौ जगृहतुस्ते उभे धनुषी वरे ३४ ततो विस्फारयामास रामश्च धनुरुत्तमम् । बभूव तुमुलः शब्दो राक्षसानां भयावहः ३५ अशोभत तदा रामो धनुर्विस्फारयन्महत् । भगवानिव संक्रुद्धो भवो वेदमयं धनुः ३६ उद्घुष्टं वानराणां च राक्षसानां

---

जळूं लागलें असतां प्रफुल्लित पलाशवृक्षांनीं भरल्यासारिखी ती लंका दिसूं लागली २६. माहुतांनीं सोडिलेले हत्ति व मोतद्दारांनीं सोडिलेले घोडे ह्यांच्या योगानें ती लंका प्रलयकालीं क्षुब्ध जलचर प्राण्यांनीं युक्त झालेल्या समुद्राप्रमाणें दिसूं लागली २७. अश्व सुटलेला पाहून कोठें गज भयभीत होऊन पलायन करूं लागला आणि भयभीत झालेला गज अवलोकन करून त्रस्त झालेला अश्वही कोठं कोठें परतूं लागला २८. ह्याप्रमाणें वानरांनीं प्रदीप्त केलेली ती लंकानगरी घोर प्रलयकालीं जळूं लागलेल्या पृथ्वीप्रमाणें दिसूं लागली २९. लंका दग्ध होऊं लागली असतां तिचें प्रतिबिंब समुद्रांत पडल्यामुळें तो महासागर आरक्तवर्ण जलानें युक्त असल्यासारिखा दिसूं लागला ३०. अग्नीनें तप्त होऊन धूमानें व्याप्त झालेल्या स्त्रीजनांचा ध्वनि शंभर शंभर योजनेंपर्यंत दूर ऐकूं येऊं लागला ३१. शरीर दग्ध झालेले दुसरे कांहीं राक्षस बाहेर पडले असतां युद्धाची इच्छा करणारे वानर एकदम उड्या मारूं लागले ३२ आणि वानरांच्या व राक्षसांच्या प्रचंड आक्रोशानें दहा दिशा, समुद्र व पृथ्वी हीं नादित झालीं ३३. शल्यरहित झालेल्या त्या महात्म्या उभयतां रामलक्ष्मणांनीं निःशंकपणें आपलीं दोन्हीं श्रेष्ठ धनुष्यें हातामध्यें घेतलीं ३४. तदनंतर रामानें आपल्या उत्कृष्ट धनुष्याचा टणत्कार केला असतां त्या तुमुल शब्दामुळें राक्षसांना भय उत्पन्न झालें ३५. आपल्या प्रचंड धनुष्याचा टणत्कार करीत असतांना तो राम क्रुद्ध होऊन वेदमय धनुष्याचा टणत्कार करणाऱ्या भगवान् शंकराप्रमाणें दिसूं लागला ३६.

च निःस्वनम् । ज्याशब्दस्तावुभौ शब्दावति रामस्य शुश्रुवे ३७
वानरोद्धुष्टघोषश्च राक्षसानां च निःस्वनः । ज्याशब्दश्चापि रामस्य त्रयं
व्याप दिशो दश ३८ तस्य कार्मुकनिर्मुक्तैः शरैस्तत्पुरगोपुरम् । कैला-
सशृङ्गप्रतिमं विकीर्णमभवद्भुवि ३९ ततो रामशरान्दृष्ट्वा विमानेषु गृहेषु
च । संनाहो राक्षसेन्द्राणां तुमुलः समपद्यत ४० तेषां संनह्यमानानां
सिंहनादं च कुर्वताम् । शर्वरी राक्षसेन्द्राणां रौद्रीव समपद्यत ४१
आदिष्टा वानरेन्द्रास्ते सुग्रीवेण महात्मना । आसन्नं द्वारमासाद्य युध्यध्वं
च प्लवङ्गमाः ४२ यश्च वो वितथं कुर्यात्तत्र तत्राप्युपस्थितः । स हन्तव्यो-
ऽभिसंप्लुत्य राजशासनदूषकः ४३ तेषु वानरमुख्येषु दीप्तोल्कोज्ज्वलपाणिषु ।
स्थितेषु द्वारमाश्रित्य रावणं क्रोध आविशत् ४४ तस्य जृम्भितविक्षेपा-
द्व्यामिश्रा वै दिशो दश । रूपवानिव रुद्रस्य मन्युर्गात्रेष्वदृश्यत ४५
स कुम्भं च निकुम्भं च कुम्भकर्णात्मजावुभौ । प्रेषयामास संक्रुद्धो
राक्षसैर्बहुभिः सह ४६ यूपाक्षः शोणिताक्षश्च प्रजङ्घः कम्पनस्तथा ।

---

वानरांचा घोष आणि राक्षसांचा ध्वनि ह्या दोहोंनाही मागें सारून रामाच्या प्रत्यं-
चेचा टणत्कार ऐकूं येऊं लागला ३७ आणि उच्च स्वरानें होत असलेला घोष, राक्ष-
सांची गर्जना व रामाच्या प्रत्यंचेचा शब्द ह्या तिहींनीं दाही दिशा व्यापून टाकिल्या ३८.
रामाच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं त्या लंकानगरीचें कैलासशिखरासारिखें
द्वार मोडून भूमीवर पडलें ३९. तदनंतर रामाचे बाण अवलोकन करून विमानांमध्यें
व घरांमध्यें राक्षसाधिपतींची जारीनें तयारी सुरू झाली ४०. ते राक्षसाधिपति तया-
रीला लागून सिंहनाद करूं लागले असतां ती रात्र त्यांना कालरात्रीप्रमाणें भासूं
लागली ४१. नंतर महात्मा सुग्रीव वानराधिपतींना ह्मणाला " हे वानरहो, ज्याला
जें द्वार संनिध असेल त्यानें तें रोखून युद्ध करावें ४२. ठिकठिकाणच्या सैन्यामध्यें
असलेला जो जो ह्मणून कोणी पलायन करूं लागेल त्या त्या राजाज्ञा अमान्य कर-
णाऱ्याचा तुह्मी हल्ला करून वध करावा " ४३. पेटलेल्या दिवट्यांनीं ज्यांचे हात
उज्ज्वल झालेले आहेत असे ते मुख्य वानर द्वाराशीं येऊन उभे राहिले असतां राव-
णाला कोप आला ४४ आणि तो जांभई देऊं लागला असतां आंतून निघालेल्या
ध्वनियुक्त वायूनें दशदिशा व्याप्त होऊन रुद्राच्या क्रोधाप्रमाणें मूर्तिमान् क्रोध त्याच्या
गात्रांचे ठिकाणीं दृष्टीं पडूं लागला ४५. तदनंतर अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या राव-
णानें कुंभ व निकुंभ हे उभयतां कुंभकर्णाचे पुत्र अनेक राक्षसांसहवर्तमान पाठवून
दिले ४६ व त्याप्रमाणें यूपाक्ष, शोणिताक्ष, प्रजंघ व कंपन हे कुंभकर्णाच्या पुत्रांसह-

निर्ययुः कौम्भकर्णाभ्यां सह रावणशासनात् ४७ शशास चैव तान्सर्वा-
न्राक्षसान्स महाबलान् । राक्षसा गच्छताद्यैव सिंहनादं च नादयन् ४८
ततस्तु चोदितास्तेन राक्षसा ज्वलितायुधाः । लङ्काया निर्ययुर्वीराः प्रण-
दन्तः पुनःपुनः ४९ रक्षसां भूषणस्थाभिर्भाभिः स्वाभिश्च सर्वशः ।
चक्रुस्ते सप्रभं व्योम हरयश्चाग्निभिः सह ५० तत्र ताराधिपस्याभा ताराणां
भा तथैव च । तयोराभरणाभा च ज्वलिता द्यामभासयत् ५१ चन्द्राभा
भूषणाभा च ग्रहाणां ज्वलिता च भा । हरिराक्षससैन्यानि भ्राजयामास
सर्वतः ५२ तत्र चार्धप्रदीप्तानां गृहाणां सागरः पुनः । भाभिः संसक्त-
सलिलश्चलोर्मिः शुशुभे ध्रुवम् ५३ पताकाध्वजसंयुक्तमुत्तमासिपरश्व-
धम् । भीमाश्वरथमातङ्गं नानापत्तिसमाकुलम् ५४ दीप्तशूलगदाखड्गप्रा-
सतोमरकार्मुकम् । तद्राक्षसबलं भीमं घोरविक्रमपौरुषम् ५५ ददृशे ज्वलि-
तप्रासं किङ्किणीशतनादितम् । हेमजालाचितभुजं व्यावेष्टितपरश्वधम् ५६
व्याघूर्णितमहाशस्त्रं बाणसंसक्तकार्मुकम् । गन्धमाल्यमधूत्सेकसंमोदित-

---

वर्तमान रावणाच्या आज्ञेनें निघून गेले ४७. नंतर त्या सर्व महाबलाढ्य राक्षसांना "हे राक्षसहो, आतांच तुह्मी युद्धाला जा" असें सिंहनाद करीत करीत त्यानें सांगितलें ४८; व ह्याप्रमाणें त्याची आज्ञा झाली असतां उज्ज्वल आयुधें हातामध्यें घेऊन ते वीर राक्षस वारंवार गर्जना करीत करीत लंकेच्या बाहेर पडले ४९. राक्षसांच्या भूषणांमध्यें पडलेल्या आपल्या प्रभा व हातांत घेतलेल्या दिवट्या ह्यांच्या योगानें वानरांनीं सर्व बाजूंनीं आकाश प्रभायुक्त करून सोडिलें ५०. चंद्राची प्रभा, तारांचें तेज व कुंभकर्णाच्या त्या पुत्रांच्या भूषणांची प्रभा ह्या सर्वही उज्ज्वल असल्यामुळें त्यांनीं आकाश प्रकाशित करून सोडिलें ५१. चंद्र, भूषणें आणि ग्रह ह्यांच्या उज्ज्वल प्रभेमुळें वानर व राक्षस ह्यांचीं सैन्यें सर्व बाजूंनीं झळकूं लागलीं ५२. त्या लंकानगरीमध्यें अर्धवट जळत असलेल्या गृहांच्या प्रभा उदकांत पडल्यामुळें आणि लाटा उसळूं लागल्यामुळें समुद्र एकसारिखा शोभूं लागला ५३. पताका, ध्वज, उत्कृष्ट खड्ग, परशु आणि भयंकर अश्व, रथ व गज ह्यांनीं युक्त असलेलें, नानाप्रकारच्या पायदळ सैन्यांनीं गजबजलेलें ५४, देदीप्यमान शूल, गदा, खड्ग, प्रास, तोमर व धनुष्यें ह्यांनीं संपन्न असलेलें आणि प्रचंड पराक्रम व बल ह्यांनीं युक्त असलेलें तें घोर राक्षससैन्य ५५ दृष्टीं पडूं लागलें. त्या सैन्यांतील लोकांनीं उज्ज्वल भाले हातामध्यें घेतले होते; शेंकडों लहान लहान घंटांचा नाद त्या सैन्यामध्यें चालला होता; त्यांतील योद्ध्यांचे हात सुवर्णभूषणांच्या समुदायांनीं भरून गेलेले होते; त्यांतील वीर परशु फिरवीत होते ५६. मोठीं मोठीं

महानिलम् ५७ घोरं शूरजनाकीर्णं महाम्बुधरनिःस्वनम् । तद्दृष्ट्वा बलमायातं राक्षसानां दुरासदम् ५८ संचचाल प्लवङ्गानां बलमुच्चैर्ननाद च ५९ जवेनाप्लुत्य च पुनस्तद्बलं रक्षसां महत् । अभ्ययात्प्रत्यरिबलं पतङ्गा इव पावकम् ६० तेषां भुजपरामर्शव्यामृष्टपरिघाशनि । राक्षसानां बलं श्रेष्ठं भूयः परमशोभत ६१ तत्रोन्मत्ता इवोत्पेतुर्हरयोऽथ युयुत्सवः । तरुशैलैरभिघ्नन्तो मुष्टिभिश्च निशाचरान् ६२ तथैवापततां तेषां हरीणां निशितैः शरैः । शिरांसि सहसा जह्रू राक्षसा भीमविक्रमाः ६३ दशनैर्हृतकर्णाश्च मुष्टिभिर्भिन्नमस्तकाः । शिलाप्रहारभग्नाङ्गा विचेरुस्तत्र राक्षसाः ६४ तथैवाप्यपरे तेषां कपीनामसिभिः शितैः । प्रवरानभितो जघ्नुर्घोररूपा निशाचराः ६५ घ्नन्तमन्यं जघानान्यः पातयन्तमपातयत् । गर्हमाणं जगर्हान्यो दशन्तमपरोदशत् ६६ देहीत्यन्यो ददात्यन्यो ददामीत्यपरः

---

शस्त्रें त पेलीत होते; बाणाशीं धनुष्याचा संयोग करीत होते आणि गंध, माल्य व मद्य हीं तेथें अतिशयच असल्यामुळें त्या सैन्यानें प्रचंड वायुही सुगंधयुक्त करून सोडिला होता ५७. घोर, शूर लोकांनीं गजबजलेलें, मोठ्या मेघाप्रमाणें गर्जना करीत असलेलें आणि पराजित होण्यास दुर्घट असलेलें तें राक्षसांचें सैन्य आलेलें पाहून ५८ वानरांच्या सैन्यामध्यें खळबळ उडाली आणि त्यानें उच्च स्वरानें गर्जना सुरू केली ५९. तदनंतर राक्षसांचें तें प्रचंड सैन्य पुनरपि वेगावगानें उड्या टाकून अग्नीवर तुटून पडणाऱ्या पतंगांप्रमाणें प्रतिपक्षाच्या सैन्यावर तुटून पडलें असतां ६० त्या राक्षसांच्या बाहुबंधनांचें परिघ व अशनि ह्या शस्त्रांशीं घर्षण होऊं लागलें आणि त्यामुळें त्या राक्षसांचें श्रेष्ठ बल फारच उत्तम रीतीनें शोभूं लागलें ६१. युद्धाभिलाषी वानर वृक्ष, पर्वत आणि मुष्टि ह्यांच्या योगानें राक्षसांना प्रहार करीत करीत उन्मत्त झाल्याप्रमाणें त्या सैन्यावर तुटून पडले ६२: परंतु, त्याप्रमाणें ते वानर चाल करून येऊं लागले असतां भयंकर पराक्रम करणाऱ्या राक्षसांनीं त्यांचीं मस्तकें तीक्ष्ण बाणांच्या योगानें एकदम तोडून टाकिलीं ६३. वानरांच्या दांतांनीं ज्यांचे कान नाहींसे झालेले आहेत; मुष्टींच्या योगानें ज्यांचीं मस्तकें फुटून गेलेलीं आहेत आणि शिलाप्रहारांमुळें ज्यांचीं शरीरें भग्न झालेलीं आहेत असे राक्षस त्या ठिकाणीं संचार करूं लागले ६४. त्याचप्रमाणें भयंकर राक्षस तीक्ष्ण खड्गांच्या योगानें त्या वानरांपैकीं मुख्यमुख्यांचा सर्व बाजूंनीं वध करूं लागले ६५. जो दुसऱ्याचा वध करण्याच्या बेतांत आहे त्याचाच त्यानें वध केला; दुसऱ्याला पाडण्याच्या बेतांत असलेलाच त्याच्या हातून पतन पावूं लागला; एक दुसऱ्याची निंदा करूं लागला असतां दुसराही त्याची

पुनः । किं क्लेशयसि तिष्ठेति तत्रान्योन्यं बभाषिरे ६७ विप्रलम्भितशस्त्रं च विमुक्तकवचायुधम् । समुद्यतमहाप्रासं मुष्टिशूलासिकुन्तलम् ६८ प्रावर्तत महारौद्रं युद्धं वानरक्षसाम् । वानरान्दश सप्तति राक्षसा जघ्नुराहवे ६९ विप्रलम्भितवस्त्रं च विमुक्तकवचध्वजम् । बलं राक्षसमालम्ब्य वानराः पर्यवारयन् ७० [३४२८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चसप्ततितमः सर्गः ॥ ७५ ॥

प्रवृत्ते संकुले तस्मिन्घोरे घोरजनक्षये । अङ्गदः कम्पनं वीरमाससाद रणोत्सुकः १ आहूय सोऽङ्गदं कोपात्ताडयामास वेगितः । गदया कम्पनः पूर्वं स चचाल भृशाहतः २ स संज्ञां प्राप्य तेजस्वी चिक्षेप शिखरं गिरेः । अर्दितश्च प्रहारेण कम्पनः पतितो भुवि ३ ततस्तु कम्पनं दृष्ट्वा शोणिताक्षो हतं रणे । रथेनाभ्यपतत्क्षिप्रं तत्राङ्गदमभीतवत् ४ सोऽङ्गदं

---

निंदा करूं लागला; एक चावूं लागला असतां दुसराही त्याचे लचके तोडूं लागला ६६; एक प्रहार कर ह्मणूं लागला असतां दुसरा त्याला प्रहार करूं लागला; मी प्रहार करितों असें पुनरपि पहिला त्याला ह्मणूं लागला आणि उगीच कशाला क्लेश भोगीत आहेस स्वस्थ उभा रहा असेंही ते वानर व राक्षस एकमेकांला बोलूं लागले ६७. त्या वानरराक्षसांचें अतिभयंकर युद्ध सुरू झालें असतां शस्त्रप्रहारांची चुकवाचुकवी होऊं लागली; कवचें व आयुधें गळून पडूं लागलीं; मोठे मोठे भाले त्यांतील योद्धे उगारूं लागले आणि मुष्टि, शूल, खड्ग व सामान्य भाले तेथें चमकूं लागले. सात सात, दहा दहा वानरांचा त्या संग्रामामध्यें राक्षस एकदम वध करूं लागले ६८,६९ आणि ज्यांतील योध्यांचीं वस्त्रें अस्ताव्यस्त होऊन कवचें व ध्वज गळून पडले आहेत असें तें राक्षससैन्य पकडून वानर त्याला गराडा देऊं लागले ७०. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पंचाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७५ ॥

भयंकर जनक्षय ज्यामध्यें होत आहे असें तें तुमुल युद्ध सुरू झालें असतां रणाविषयीं उत्सुक असलेला अंगद कंपनवीरावर चालून गेला १. तेव्हां अंगदाला क्रोधानें आह्वान करून प्रथमतः त्या कंपनानें गदेच्या योगानें वेगावेगानें त्याला ताडण केलें असतां अतिशयच ताडित झाल्यामुळें तो अंगद मूर्च्छित झाला २. नंतर सावध झाल्यावर तेजस्वी अंगदानें पर्वताचें शिखर कंपनावर फेंकिलें व त्या प्रहारानें जर्जर झालेला कंपन वध पावून भूमीवर पडला ३. तदनंतर संग्रामामध्यें कंपन वध पावल्याचें अवलोकन करून शोणिताक्ष निर्भयपणें अंगदावर रथाच्या योगानें सत्वर चालून

निशितैर्बाणैस्तदा विव्याध वेगितः । शरीरदारणैस्तीक्ष्णैः कालाग्निसमविग्रहैः ५ क्षुरक्षुरप्रनाराचैर्वत्सदन्तैः शिलीमुखैः । कर्णिशल्यविपाठैश्च बहुभिर्निशितैः शरैः ६ अङ्गदः प्रतिविद्धाङ्गो वालिपुत्रः प्रतापवान् । धनुरुग्रं रथं बाणान्ममर्द तरसा बली ७ शोणिताक्षस्ततः क्षिप्रमसिचर्म समाददे । उत्पपात तदा क्रुद्धो वेगवानविचारयन् ८ तं क्षिप्रतरमाप्लुत्य परामृश्याङ्गदो बली । करेण तस्य तं खड्गं समाच्छिद्य ननाद च ९ तस्यांसफलके खड्गं निजघान ततोऽङ्गदः । यज्ञोपवीतवच्चैनं चिच्छेद कपिकुञ्जरः १० तं प्रगृह्य महाखड्गं विनद्य च पुनःपुनः । वालिपुत्रोऽभिदुद्राव रणशीर्षे परानरीन् ११ प्रजङ्घसहितो वीरो यूपाक्षस्तु ततो बली । रथेनाभिययौ क्रुद्धो वालिपुत्रं महाबलम् १२ आयसीं तु गदां गृह्य स वीरः कनकाङ्गदः । शोणिताक्षः समाश्वस्य तमेवानुपपात ह १३ प्रजङ्घस्तु महावीरो यूपाक्षसहितो बली । गदयाभिययौ क्रुद्धो वालिपुत्रं महाबलम् १४ तयोर्मध्ये कपिश्रेष्ठः शोणिताक्षप्रजङ्घयोः ।

---

गेला ४ व वेगावेगानें त्यानें तीक्ष्ण बाणांच्या योगानें अंगदाला वेध केला. शरीर विदीर्ण करणारे व दिसण्यांत कालाग्नितुल्य असलेले असे जे क्षुराग्र, क्षुरप्र, नाराच, वत्सदंत, शिलीमुख, कर्णि, शल्य, विपाठ इत्यादि असंख्य जलाल बाण ५,६ त्यांच्या योगानें प्रतापी वालिपुत्र अंगदाचें शरीर विद्ध झालें असतां त्या बलाढ्य अंगदानें वेगावेगानें त्या शोणिताक्षाचें उग्र धनुष्य, रथ व बाण ह्यांचा चुराडा केला ७. तदनंतर शोणिताक्षानें सत्वर ढालतरवार हातामध्यें घतली आणि क्रुद्ध होऊन वेगावेगानें कांहींएक मनामध्यें न आणितां तो उडाला ८; परंतु, त्याच्याही त्वरेपेक्षां अधिक त्वरा करून बलाढ्य अंगदानें त्याला धरिलें आणि हातानें त्याचा तो खड्ग हिसकून घेऊन गर्जना केली ९. तदनंतर त्याच खड्गाचा त्याच्या खांद्यावर प्रहार करून यज्ञोपवीताप्रमाणें त्या शोणिताक्षाचे त्या वानरश्रेष्ठानें तुकडे तुकडे केले ( परंतु इतकें झालें असतांही तो शोणिताक्ष वध पावला नाहीं व परतही फिरला नाहीं ) १०. नंतर तो मोठा खड्ग घेऊन आणि वारवार गर्जना करून वालिपुत्र अंगद संग्रामामध्यें इतर शत्रूंवर धांवून गेला असतां ११ बलाढ्य व वीर यूपाक्ष क्रुद्ध होऊन प्रजंघासहवर्तमान महाबलाढ्य वालिपुत्रावर रथाच्या योगानें चाल करून गेला असतां १२ सुवर्णबाहुभूषणें धारण केलेला तो वीर शोणिताक्षही इतक्यांत सावध झाला आणि लोहमय गदा घेऊन त्याच्याच मागोमाग गेला १३. नंतर यूपाक्षासहवर्तमान महावीर बलाढ्य प्रजंघ क्रुद्ध होऊन व हातांत गदा घेऊन महाबलाढ्य वालिपुत्र अंगदावर

विशाखयोर्मध्यगतः पूर्णचन्द्र इवाबभौ १५ अङ्गदं परिरक्षन्तौ मैन्दो द्विविद
एव च । तस्य तस्थतुरभ्याशे परस्परदिदृक्षया १६ अभिपेतुर्महाकायाः प्रति-
यत्ता महाबलाः । राक्षसा वानरान्रोषादसिबाणगदाधराः १७ त्रयाणां वान-
रेन्द्राणां त्रिभी राक्षसपुङ्गवैः । संसक्तानां महद्युद्धमभवद्रोमहर्षणम् १८
ते तु वृक्षान्समादाय संप्रचिक्षिपुराहवे । खड्गेन प्रतिचिक्षेप तान्प्रजङ्घो
महाबलः १९ रथान्सर्वान्द्रुमाञ्छैलान्प्रतिचिक्षिपुराहवे । शरौघैः प्रति-
चिच्छेद तान्यूपाक्षो महाबलः २० सृष्टान्द्विविदमैन्दाभ्यां द्रुमानुत्पाट्य
वीर्यवान् । बभञ्ज गदया मध्ये शोणिताक्षः प्रतापवान् २१ उद्यम्य विपुलं
खड्गं परमर्मविदारणम् । प्रजङ्घो वालिपुत्राय अभिदुद्राव वेगितः २२
तमभ्याशगतं दृष्ट्वा वानरेन्द्रो महाबलः । आजघानाश्वकर्णेन द्रुमणाति-
बलस्तदा २३ बाहुं चास्य सनिस्त्रिंशमाजघान स मुष्टिना । वालिपुत्रस्य
घातेन स पपात क्षितावसिः २४ तं दृष्ट्वा पतितं भूमौ खड्गं मुसलसंनि-
भम् । मुष्टिं संवर्तयामास वज्रकल्पं महाबलः २५ स ललाटे महावीर्यमङ्गदं

---

धांवून गेला असतां १४ शोणिताक्ष आणि प्रजंघ ह्या दोन राक्षसांमध्यें सांपडलेला तो वानरश्रेष्ठ अंगद विशाखानक्षत्राच्या दोन ताऱ्यांमध्यें सांपडलेल्या पूर्ण चंद्राप्रमाणें दिसूं लागला १५. मैंद व द्विविद हे आपल्या जोडीचा योद्धा पहाण्याचा उद्देश मनांत धरून अंगदाचें रक्षण करण्याकरितां त्याच्या समीप उभे राहिले १६. तेव्हां खड्ग, बाण व गदा धारण करून सावधपणानें असलेले महाबलाढ्य व धिप्पाड राक्षस क्रोधानें वानरांवर तुटून पडले १७ आणि तीन राक्षसश्रेष्ठांशीं भिडून गेलेल्या तीन वानराधिपतींचें अंगावर कांटा आणणारें मोठें युद्ध सुरू झालें १८. त्या वानरांनीं वृक्ष घेऊन संग्रामामध्यें फेंकिले असतां महाबलाढ्य प्रजंघानें खड्गाच्या तडाक्यानें ते उलट त्यांच्या अंगावरच फेंकिले १९. सर्व रथ, वृक्ष आणि पर्वत वानरांनीं संग्रामामध्यें प्रतिपक्षावर फेंकिले; परंतु, बाणसमुदायांच्या योगानें महाब-लाढ्य यूपाक्षानें ते तोडून टाकिले २०. द्विविद व मैंद ह्यांनीं उपटून फेंकिलेले वृक्ष वीर्यवान् व प्रतापी शोणिताक्षानें गदेच्या योगानें मध्यें तोडिले २१. शत्रूचें मर्म विदा-रण करणारा प्रचंड खड्ग उगारून वेगावेगानें प्रजंघराक्षस वालिपुत्रावर धांवला २२. परंतु, तो समीप आलेला पाहून महाबलाढ्यच नव्हे परंतु,अतिबलाढ्य वानराधिपति वालिपुत्र अंगदानें सालवृक्षाच्या योगानें त्याला प्रहार केला २३ आणि मुष्टीच्या योगानें खड्गासहवर्तमान त्याच्या हातावरच त्यानें प्रहार केला असतां वालिपुत्राच्या प्रहारानें तो खड्ग भूमीवर पडला २४. मुसलासारिखा तो खड्ग पृथ्वीवर पडलेला

वानरर्षभम् । आजघान महातेजाः स मुहूर्तं चचाल ह २६ स संज्ञां प्राप्य तेजस्वी वालिपुत्रः प्रतापवान् । प्रजङ्घस्य शिरः कायात्पातयामास मुष्टिना २७ स यूपाक्षोऽश्रुपूर्णाक्षः पितृव्ये निहते रणे । अवरुह्य रथात्क्षिप्रं क्षीणेषुः खड्गमाददे २८ तमापतन्तं संप्रेक्ष्य यूपाक्षं द्विविदस्त्वरन् । आजघानोरसि क्रुद्धो जग्राह च बलाद्बली २९ गृहीतं भ्रातरं दृष्ट्वा शोणिताक्षो महाबलम् । आजघान महातेजा वक्षसि द्विविदं ततः ३० स तेनाभिहतस्तेन चचाल च महाबलः । उद्यतां च पुनस्तस्य जहार द्विविदो गदाम् ॥ एतस्मिन्नन्तरे मैन्दो द्विविदाभ्याशमागमत् ३१ तौ शोणिताक्षयूपाक्षौ प्लवङ्गाभ्यां तरस्विनौ । चक्रतुः समरं तीव्रमाकर्षोत्पाटनं भृशम् ३२ द्विविदः शोणिताक्षं तु विददार नखैर्मुखे । निष्पिपेष स वीर्येण क्षितावाविध्य वीर्यवान् ३३ यूपाक्षमभिसंक्रुद्धो मैन्दो वानरपुङ्गवः । पीडयामास बाहुभ्यां पपात स हतः क्षितौ ३४ हतप्रवीरा

---

पाहून महाबलाढ्य प्रजंघानें आपली वज्रतुल्य मूठ वळली २५ आणि त्या महातेजस्वी प्रजंघानें महावीर्यवान् वानरश्रेष्ठ अंगदाला ललाटाचे ठिकाणीं प्रहार केला व त्याच्या योगानें एक क्षणभर तो अंगद बेसावध झाला २६. नंतर तो तेजस्वी व प्रतापी वालिपुत्र सावध झाल्यावर मुष्टीच्या योगानें प्रजंघाचें शीरच त्यानें धडापासून खालीं पाडिलें २७. ह्याप्रमाणें संग्रामामध्यें चुलत्याचा वध झाला असतां यूपाक्षाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले व बाण संपल्यामुळें रथावरून सत्वर खालीं उतरून त्यानें हातामध्यें खड्ग धारण केला २८; परंतु, तो यूपाक्ष चाल करून येत आहे असें अवलोकन करून क्रुद्ध झालेल्या बलाढ्य द्विविदानें त्वरा करून जोरानें त्याच्या वक्षःस्थलावर प्रहार केला २९. तेव्हां आपला महाबलाढ्य भ्राता कचाटयांत सांपडला असें पाहून महातेजस्वी शोणिताक्षानें वक्षःस्थलाचे ठिकाणीं द्विविदाला वध केला ३०. ह्याप्रमाणें शोणिताक्षाचा प्रहार झाला असतां महाबलाढ्य द्विविदाला ग्लानि आली; परंतु, लगेच सावध झाल्यावर शोणिताक्षानें उगारिलेली गदा पुनरपि त्यानें हिसकावून घतली व इतक्यामध्यें मैंदही द्विविदासमीप आला ३१. तेव्हां शोणिताक्ष व यूपाक्ष हे उभयतां राक्षस त्या दोन्ही वेगवान् वानरांशीं संग्रामामध्यें अतिशय तीव्र युद्ध करूं लागले व त्या युद्धामध्यें ते एकमेकांला ओढून उचलून टाकूं लागले ३२. द्विविदानें नखांच्या योगानें शोणिताक्षाचें मुख विदीर्ण केलें इतकेंच नव्हे परंतु, त्या वीर्यवान् द्विविदानें भूमीवर आपटून त्या शोणिताक्षाचा चुराडाही करून टाकिला ३३. तेव्हां अतिशय क्रुद्ध झालेल्या वानरश्रेष्ठ मैंदानेंही यूपाक्षाला हातांनीं आवळला असतां तो वध पावून भूमीवर पडला ३४.

व्यथिता राक्षसेन्द्रचमूस्तथा । जगामाभिमुखी सा तु कुम्भकर्णात्मजो
यतः ३५ आपतन्तीं च वेगेन कुम्भस्तां सान्त्वयच्चमूम् । अथोत्कृष्टं महा-
वीर्यैर्लब्धलक्षैः प्लवङ्गमैः ३६ निपातितमहावीरां दृष्ट्वा रक्षश्चमूं तदा ।
कुम्भः प्रचक्रे तेजस्वी रणे कर्म सुदुष्करम् ३७ स धनुर्धन्विनां श्रेष्ठः
प्रगृह्य सुसमाहितः । मुमोचाशीविषप्रख्याञ्छरान्देहविदारणान् ३८ तस्य
तच्छुशुभे भूयः सशरं धनुरुत्तमम् । विद्युदैरावतार्चिष्मद्द्वितीयेन्द्रधनु-
र्यथा ३९ आकर्णकृष्टमुक्तेन जघान द्विविदं तदा । तेन हाटकपुङ्खेन
पत्रिणा पत्रवाससा ४० सहसाभिहतस्तेन विप्रमुक्तपदः स्फुरन् । निप-
पात त्रिकूटाभो विह्वलन्प्लवगोत्तमः ४१ मैन्दस्तु भ्रातरं तत्र भग्नं दृष्ट्वा
महाहवे । अभिदुद्राव वेगेन प्रगृह्य विपुलां शिलाम् ४२ तां शिलां तु
प्रचिक्षेप राक्षसाय महाबलः । बिभेद तां शिलां कुम्भः प्रसन्नैः पञ्चभिः
शरैः ४३ संधाय चान्यं सुमुखं शरमाशीविषोपमम् । आजघान

---

ह्याप्रमाणें वीरांचा वध झाल्यामुळें घाबरून गेलेली ती राक्षसाधिपति राव-
णाची सेना कुंभकर्णाच्या पुत्राकडे तोंड करून जाऊं लागली ३५. तेव्हां
वेगानें आपल्याकडे येत असलेल्या त्या सेनेला तो उत्कृष्ट कुंभराक्षस
धीर देऊं लागला. नंतर ज्यांचा नेम फुकट गेला नाहीं अशा महा-
वीर्यवान् वानरांनीं ३६. जिच्यांतील मोठ्या मोठ्या वीरांचा वध केला आहे
अशी ती सेना अवलोकन करून तेजस्वी कुंभराक्षसानें रणामध्यें अतिशय दुर्घट कर्म
केलें ३७ धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या व मन अतिशय स्वस्थ ठेविलेल्या त्या कुंभानें
हातामध्यें धनुष्य घेऊन देह विदारण करणार सर्पतुल्य बाण सोडिले ३८. विद्युल्लतारूप
बाणानें युक्त असलेलें व ऐरावत गजामुळें झळकत असलेलें दुसरें इंद्रधनुष्यच कीं काय
असें त्या कुंभाचें तें बाणासहवर्तमान उत्कृष्ट धनुष्य अतिशय शोभूं लागलें ३९. काना-
पर्यंत ओढून सोडिलेल्या व सुवर्णमय पिच्छभागानें व पिच्छरूप वस्त्रानें युक्त असलेल्या
त्या बाणानें द्विविदाला कुंभानें वेध केला असतां ४० त्यानें वध करितांक्षणीं कंपित
होऊन त्या त्रिकूटाचलतुल्य वानरश्रेष्ठ द्विविदाचा पाय सरला आणि तो विवळत भूमी-
वर पडला ४१. ह्याप्रमाणें महासंग्रामामध्यें आपल्या भ्रात्याचा पराजय झालेला अव-
लोकन केल्यावर एक प्रचंड शिला हातीं घेऊन मैंद वेगावेगानें कुंभावर धांवला ४२;
व महाबलाढ्य मैंदानें ती शिला त्या राक्षसाकडे फेंकिली; परंतु, लकलकत अस-
लेल्या पांच बाणांच्या योगानें ती शिला कुंभानें फोडून टाकिली ४३; इतकेंच नव्हे
परंतु, उत्कृष्ट अग्रानें युक्त असा दुसरा एक सर्पतुल्य बाण धनुष्याला लावून

महातेजा वक्षसि द्विविदाग्रजम् ४४ स तु तेन प्रहारेण मैन्दो वानरयूथपः । मर्मण्यभिहतस्तेन पपात भुवि मूर्च्छितः ४५ अङ्गदो मातुलौ दृष्ट्वा मथितौ तु महाबलौ । अभिदुद्राव वेगेन कुम्भमुद्यतकार्मुकम् । ४६ तमापतन्तं विव्याध कुम्भः पञ्चभिरायसैः । त्रिभिश्चान्यैस्त्रिभिर्बाणैर्मातङ्गमिव तोमरैः ४७ सोऽङ्गदं बहुभिर्बाणैः कुम्भो विव्याध वीर्यवान् ४८ अकुण्ठधारैर्निशितैस्तीक्ष्णैः कनकभूषणैः । अङ्गदः प्रतिविद्धाङ्गो वालिपुत्रो न कम्पते ४९ शिलापादपवर्षाणि तस्य मूर्ध्नि ववर्ष ह । स प्रचिच्छेद तान्सर्वान्बिभेद च पुनः शिलाः ५० कुम्भकर्णात्मजः श्रीमान्वालिपुत्रसमीरितान् । आपतन्तं च संप्रेक्ष्य कुम्भो वानरयूथपम् ५१ भ्रुवौ विव्याध बाणाभ्यामुल्काभ्यामिव कुञ्जरम् । तस्य सुस्राव रुधिरं पिहिते चास्य लोचने ५२ अङ्गदः पाणिना नेत्रे पिधाय रुधिरोक्षिते । सालमासन्नमेकेन परिजग्राह पाणिना ५३ संपीड्योरसि सस्कन्धं करेणाभिनिवेश्य च । किंचिदभ्यवनम्यैनमुन्ममाथ महारणे ५४ तमिन्द्रकेतुप्रतिमं वृक्षं

---

महातेजस्वी कुंभानें द्विविदाचा ज्येष्ठ भ्राता जो मैंद त्याच्या वक्षःस्थलावर प्रहार केला ४४. तेव्हां तो वानरसेनाधिपति मैंद त्या प्रहारानें मर्मस्थानीं ताडित झाल्यामुळें मूर्च्छा येऊन भूमीवर पडला ४५ व ह्याप्रमाणें आपले महाबलाढ्य मातुल पराजित झालेले पहातांक्षणीं अंगद धनुष्य उगारिलेल्या कुंभावर वेगानें धांवला ४६. परंतु, तोमरांनीं ज्याप्रमाणें गजाला प्रहार करितात त्याप्रमाणें अंगावर चालून येणाऱ्या त्या अंगदाला कुंभानें लोहमय पांच व इतर तीन अशा आठ बाणांनीं वेध केला ४७ आणि वीर्यवान् कुंभानें आणखीं ही असंख्य बाण अंगदावर सोडिले ४८. ज्यांची धार कोठेंही कुंठित व्हावयाची नाहीं व ज्यांना सुवर्णाचे अलंकार घातलेले आहेत असे धार लावलेले तीक्ष्ण बाण शरीरांत रुतले असतांही तो वायुपुत्र अंगद कंपित झाला नाहीं ४९. नंतर पाषाण व वृक्ष ह्यांचे वर्षाव अंगदानें त्या कुंभाच्या मस्तकावर केले असतां कुंभकर्णपुत्र श्रीमान् कुंभानें वालिपुत्रानें सोडिलेले ते सर्वही वृक्ष व पाषाण तोडून टाकिले. नंतर तो वानरसेनाधिपति अंगद चाल करून येत आहे असें पाहून टेंभ्यांनीं ज्याप्रमाणें गजाला वेध करितात त्याचप्रमाणें त्या कुंभानें दोन बाणांच्या योगानें अंगदाच्या दोन भिंवयांना वेध केला असतां त्या अंगदाचे डोळे मिटले व तेथून रक्तस्राव सुरू झाला ५०, ५१, ५२. नंतर रक्तानें माखलेल्या आपल्या डोळ्यांवर एक हात देऊन जवळच असलेला एक सालवृक्ष अंगदानें दुसऱ्या हातानें घेतला ५३. नंतर खोडासहवर्तमान त्या वृक्षाला वक्षःस्थलाशीं आंवळून

मन्दरसंनिभम् । समुत्सृजत वेगेन मिषतां सर्वरक्षसाम् ५५ स चिच्छेद शितैर्बाणैः सप्तभिः कायभेदनैः । अङ्गदो विव्यथेऽभीक्ष्णं स पपात मुमोह च ५६ अङ्गदं पतितं दृष्ट्वा सीदन्तमिव सागरम् । दुरासदं हरिश्रेष्ठा राघवाय न्यवेदयन् ५७ रामस्तु व्यथितं श्रुत्वा वालिपुत्रं महाहवे । व्यादिदेश हरिश्रेष्ठाञ्जाम्बवत्प्रमुखांस्ततः ५८ ते तु वानरशार्दूलाः श्रुत्वा रामस्य शासनम् । अभिपेतुः सुसंक्रुद्धाः कुम्भमुद्यतकार्मुकम् ५९ ततो द्रुमशिलाहस्ताः कोपसंरक्तलोचनाः । रिरक्षिषन्तोऽभ्यपतन्नङ्गदं वानरर्षभाः ६० जाम्बवांश्च सुषेणश्च वेगदर्शी च वानरः । कुम्भकर्णात्मजं वीरं क्रुद्धाः समभिदुद्रुवुः ६१ समीक्ष्यापततस्तांस्तु वानरेन्द्रान्महाबलान् । आववार शरौघेण नगेनेव जलाशयम् ६२ तस्य बाणपथं प्राप्य न शेकुरपि वीक्षितुम् । वानरेन्द्रा महात्मानो वेलामिव महोदधिः ६३ तांस्तु दृष्ट्वा हरिगणाञ्शरवृष्टिभिरर्दितान् । अङ्गदं पृष्ठतः कृत्वा भ्रातृजं

---

धरून, हातानें वळखा घालून व किंचित् वांकवून महासंग्रामामध्यें त्यानें तो उपटून काढिला ५४ आणि सर्व राक्षस पहात असतांना वेगावगानें तो इंद्रध्वजतुल्य व मंदरपर्वतासारिखा वृक्ष त्यानें फेंकिला ५५. परंतु, शरीर विदारण करणाऱ्या सात तीक्ष्ण बाणांच्या योगानें त्यानें तो वृक्ष छेदून टाकिला असतां एकसारिखें युद्ध चालल्यामुळें अंगद अतिशय जर्जर झाला आणि भूतलावर पडला ५६. जेरीस येणारा समुद्रच कीं काय असा तो अजिंक्य अंगद पडलेला अवलोकन करून वानरश्रेष्ठांनीं तें वृत्त रामाला निवेदन केलें ५७ आणि महासंग्रामामध्यें वालिपुत्र अंगद व्यथित झाल्याचें ऐकून जांबवान्प्रभृति वानरश्रेष्ठांना रामानें कुंभाकडे जाण्याची आज्ञा केली ५८. तव्हां रामाची आज्ञा श्रवण केल्यावर अतिशय क्रुद्ध झालेले ते वानरश्रेष्ठ हातामध्यें धनुष्य उगारिलेल्या त्या कुंभावर तुटून पडले ५९. सारांश, रामाची आज्ञा होतांक्षणीं वृक्ष व पाषाण हातामध्यें घेऊन क्रोधानें ज्यांचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत असे ते वानरश्रेष्ठ अंगदाचें रक्षण करण्याकरितां कुंभावर चालून गेले ६०. जांबवान्, सुषण व वेगदर्शी वानर हे क्रुद्ध होऊन कुंभकर्णपुत्र वीर कुंभाकडे धांवून गेले असतां ६१ पर्वतानें ज्याप्रमाणें एकाद्यानें जलप्रवाह कुंठित करावा त्याप्रमाणें आपल्या अंगावर चालून येणाऱ्या त्या महाबलाढ्य वानराधिपतींना बाणसमुदायांच्या योगानें त्या कुंभानें आवरून धरिलें ६२. तेव्हां मर्यादसान्निध आल्यानंतर पलीकडे पहाण्यासही ज्याप्रमाणें महासागर समर्थ होत नाहीं त्याप्रमाणें त्याच्या बाणांच्या टप्प्यांत आल्यानंतर त्याच्याकडे पहाण्यासही ते महात्मे वानराधिपति

प्लवगेश्वरः ६४ अभिदुद्राव सुग्रीवः कुम्भकर्णात्मजं रणे । शैलसानुचरं
नागं वेगवानिव केसरी ६५ उत्पाट्य च महावृक्षानश्वकर्णादिकान्बहून् ।
अन्यांश्च विविधान्वृक्षांश्चिक्षेप स महाकपिः ६६ तां छादयन्तीमाकाशं
वृक्षवृष्टिं दुरासदाम् । कुम्भकर्णात्मजः श्रीमांश्चिच्छेद स्वशरैः
शितैः ६७ अर्दितास्ते द्रुमा रेजुर्यथा घोराः शतघ्नयः । द्रुम-
वर्षं तु तद्भिन्नं दृष्ट्वा कुम्भेन वीर्यवान् ६८ वानराधिपतिः श्रीमान्महा-
सत्त्वो न विव्यथे । स विध्यमानः सहसा सहमानस्तु ताञ्छरान् ६९
कुम्भस्य धनुराक्षिप्य बभञ्जेन्द्रधनुःप्रभम् । अवप्लुत्य धनुः शीघ्रं कृत्वा
कर्म सुदुष्करम् ७० अब्रवीत्कुपितः कुम्भं भग्नशृङ्गमिव द्विपम् । निकु-
म्भाग्रज वीर्यं ते बाणवेगं तदद्भुतम् ७१ संनतिश्च प्रभावश्च तव वा राव-
णस्य वा । प्रह्लादबलिवृत्रघ्नकुबेरवरुणोपम ७२ एकस्त्वमनुजातोसि
पितरं बलवत्तरम् । त्वामेवैकं महाबाहुं शूलहस्तमरिन्दमम् ७३ त्रिदशा

---

समर्थ झाले नाहींत ६३. ते वानरगण बाणवृष्टींच्या योगानें पीडित झाल्याचें अवलोकन केल्यावर वानराधिपति सुग्रीव भ्रातृपुत्र अंगदाला पाठीशीं घालून वेगवान् सिंह ज्याप्रमाणें पर्वतशिखरावर संचार करणाऱ्या गजावर धांवून जातो त्याप्र- माणें संग्रामामध्यें त्या कुंभकर्णाच्या पुत्रावर धांवून गेला ६४,६५. नंतर अश्वकर्ण- प्रभृति असंख्य मोठे मोठे वृक्ष व इतरही नानाप्रकारचे वृक्ष उपटून त्या महाकपीनें कुंभकर्णाच्या पुत्रावर फेंकिले असतां ६६ हटविण्यास कठिण असलेली व आकाश व्याप्त करीत असलेली ती वृक्षवृष्टि वैभवशाली कुंभकर्णपुत्रानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं तोडून टाकिली असतां ६७ छिन्नभिन्न झालेले ते वृक्ष भयंकर तोफांप्रमाणें दिसूं लागले. कुंभानें भिन्न भिन्न करून टाकिलेला तो वृक्षसमुदाय अवलोकनांत आल्यानं- तरही वीर्यवान् ६८ श्रीमान् व महाधैर्यवान् वानराधिपति सुग्रीव भयभीत झाला नाहीं. इतकेंच नव्हे परंतु, कुंभ एकाएकीं त्याला वेध करूं लागला असतांही बाण सहन करीत करीत ६९ सुग्रीवानें कुंभाचें तें इंद्रचापतुल्य धनुष्य तोडून टाकिलें आणि अशारीतीनें सत्वर धनुष्य तोडून व अति दुष्कर कर्म करून ७० क्रुद्ध झालेला सुग्रीव दंतभग्न झालेल्या गजाप्रमाणें दिसूं लागलेल्या कुंभाला ह्मणाला "हे निकुंभाच्या ज्येष्ठ भ्रात्या, तुझा बाणवेग व वीर्य हीं अद्भुत आहेत ७१. स्वजनाविषयीं दया आणि प्रताप हीं तुझ्याच ठिकाणीं आहेत किंवा रावणाचे ठिकाणीं आहेत. प्रल्हाद, बली, इंद्र, कुबेर व वरुण ह्यांचीच उपमा तुला योग्य असून ७२ अतिबलाढ्य पित्याला अनुरूप असा तूंच एक पुत्र उत्पन्न झाला आहेस. हातामध्यें शूल घेऊन

नातिवर्तन्ते जितेन्द्रियमिवाधयः । विक्रमस्व महाबुद्धे कर्माणि मम पश्य च ७४ वरदानात्पितृव्यस्ते सहते देवदानवान् । कुम्भकर्णस्तु वीर्येण महते च सुरासुरान् ७५ धनुषीन्द्रजितस्तुल्यः प्रतापे रावणस्य च । त्वमद्य रक्षसां लोके श्रेष्ठोसि बलवीर्यतः ७६ महाविमर्दं समरे मया सह तवाद्भुतम् । अद्य भूतानि पश्यन्तु शक्रशम्बरयोरिव ७७ कृतमप्रतिमं कर्म दर्शितं चास्त्रकौशलम् । पातिता हरिवीराश्च त्वयैते भीमविक्रमाः ७८ उपालम्भभयाच्चैव नासि वीर मया हतः । कृतकर्मपरिश्रान्तो विश्रान्तः पश्य मे बलम् ७९ तेन सुग्रीववाक्येन सावमानेन मानितः । अग्नेराज्यहुतस्येव तेजस्तस्याभ्यवर्धत ८० ततः कुम्भस्तु सुग्रीवं बाहुभ्यां जगृहे तदा । गजाविवावीतमदौ निःश्वसन्तौ मुहुर्मुहुः ८१ अन्योन्यगात्रग्रथितौ घर्षन्ताविेतरेतरम् । सधूमां मुखतो ज्वालां विसृजन्तौ परिश्रमात् ८२ तयोः पादाभिघाताच्च निमग्ना चाभवन्मही । व्याघूर्णिततरङ्गश्च चुक्षुभे

---

शत्रूचें दमन करणाऱ्या एकट्या तुज महापराक्रमी वीराचाच ७३ मानसिक दुःखें ज्याप्रमाणें जितेंद्रिय पुरुषाचा पराभव करण्यास समर्थ होत नाहींत त्याप्रमाणें पराभव करण्यास देव समर्थ नाहींत. हे महाबुद्धिमान् कुंभा, तूं पराक्रम कर आणि माझींच कर्में अवलोकन कर ७४. वरप्रदानामुळें तुझा चुलता रावण देवदानवांना भारी असून कुंभकर्णही पराक्रमानें देवदैत्यांना भारी होता ७५. परंतु, धनुर्युद्धामध्यें इंद्रजिताची व प्रतापामध्यें रावणाची बरोबरी करणारा आज तूंच बल व वीर्य ह्या दोहोंमुळें राक्षसांच्या समुदायांमध्यें श्रेष्ठ आहेस ७६. ह्यास्तव, इंद्र व शंबर ह्यांमध्यें झालेल्या महायुद्धाप्रमाणें माझ्यासहवर्तमान समरांगणामध्यें होणारें तुझें अद्भुत महायुद्ध आज प्राणी अवलोकन करोत ७७. अरे, आज तूं अप्रतिम कर्म केलें असून अस्त्रकौशलही दर्शविलें आहेस आणि भयंकर पराक्रम करणारे हे वानरवीरही तूं पाडिले आहेस ७८; परंतु, अनेकांसहवर्तमान युद्ध करून श्रांत झालेल्या कुंभाचा सुग्रीवानें वध केला अशी माझी निंदा होऊं लागेल ह्मणूनच, हे वीरा, मीं आज तुझा वध केला नाहीं. ह्यास्तव, पराक्रम केल्यामुळें थकलेला तूं विश्रांति घे आणि नंतर माझें बल अवलोकन कर" ७९. सुग्रीवाच्या त्या तिरस्कारयुक्त भाषणानें त्याचा अवमान झाला असतां तूप ओतलेल्या अग्नीप्रमाणें त्याचें तेज अधिकच वृद्धिंगत झालें ८०. तदनंतर कुंभानें हातांनीं सुग्रीवाला आंवळून धरिलें असतां मत्त झालेल्या गजांप्रमाणें ते उभयतां वारंवार सुस्कारे टाकूं लागले ८१; एकमेकांच्या शरीराशीं भिडून जाऊन एकामेकांला घर्षण करूं लागले आणि परिश्रमामुळें मुखांतून धूमयुक्त ज्वाला बाहेर सोडूं लागले ८२. त्यांच्या

वरुणालयः ८३ ततः कुम्भं समुत्क्षिप्य सुग्रीवो लवणाम्भसि । पातयामास वेगेन दर्शयन्नुदधेः स्थलम् ८४ ततः कुम्भनिपातेन जलराशिः समुत्थितः । विन्ध्यमन्दरसंकाशो विससर्प समन्ततः ८५ ततः कुम्भः समुत्पत्य सुग्रीवमभिपात्य च । आजघानोरसि क्रुद्धो वज्रकल्पेन मुष्टिना ८६ तस्य चर्म च पुस्फाट संजज्ञे चापि शोणितम् । तस्य मुष्टिमहावेगः प्रतिजघ्नेऽस्थिमण्डले ८७ तस्य वेगेन तत्रासीत्तेजः प्रज्वलितं महत् । वज्रनिष्पेषसंजाता ज्वाला मेरोर्यथा गिरेः ८८ स तत्राभिहतस्तेन सुग्रीवो वानरर्षभः । मुष्टिं संवर्तयामास वज्रकल्पं महाबलः ८९ अर्चिःसहस्रविकचरविमण्डलवर्चसम् । स मुष्टिं पातयामास कुम्भस्योरसि वीर्यवान् ९० स तु तेन प्रहारेण विह्वलो भृशपीडितः । निपपात तदा कुम्भो गतार्चिरिव पावकः ९१ मुष्टिनाभिहतस्तेन निपपाताशु राक्षसः । लोहिताङ्ग इवाकाशाद्दीप्तरश्मिर्यदृच्छया ९२ कुम्भस्य पततो रूपं भग्नस्योरसि मुष्टिना । बभौ रुद्राभिपन्नस्य यथा रूपं गवां पतेः ९३

---

पादप्रहारामुळें पृथ्वी निमग्न होऊन गेली व लाटा उसळूं लागून समुद्रही क्षुब्ध झाला ८३. तदनंतर आपलें बल दर्शविण्याकरितां सुग्रीवानें कुंभाला उचलिलें आणि वेगावेगानें समुद्राचें तीर ओलांडून समुद्राच्या उदकामध्यें त्याला फेंकून दिलें ८४. तेव्हां कुंभ पडल्यामुळें तो सागर विंध्य व मंदर ह्या पर्वतांप्रमाणें उंच होऊन सभोंवतीं पसरला ८५ व इतक्यांत कुंभानें उड्डाण करून सुग्रीवाला पाडिलें आणि क्रुद्ध होऊन आपल्या वज्रतुल्य मुष्टीनें त्याच्या वक्षःस्थलावर त्यानें प्रहारही केला ८६. तेव्हां त्याची त्वचा फुटून जाऊन तेथं रक्तही निघालें. कारण, ती मोठ्या वेगानें बसलेली मूठ त्या सुग्रीवाच्या अस्थिमंडलापर्यंत जाऊन भिडली होती ८७. वज्राचा तडाका बसला असतां मेरुपर्वतापासून निघणाऱ्या ज्वालांप्रमाणें त्या मुष्टीच्या योगानें त्या प्रहाराचे ठिकाणीं प्रज्वलित झालें ८८. ह्याप्रमाणें त्या कुंभानें वानरश्रेष्ठ सुग्रीवाला मुष्टीचा प्रहार केला असतां महाबलाढ्य सुग्रीवानेंही आपली वज्रतुल्य मूठ वळली ८९ आणि हजारों किरणांनीं झळकणाऱ्या सूर्यमंडलाप्रमाणें जिचें तेज आहे अशा त्या मूठीचा वीर्यवान् सुग्रीवानें कुंभाच्या वक्षःस्थलावर प्रहार केला असतां ९० त्या प्रहाराच्या योगानें अतिशय पीडित होऊन विह्वल झालेला तो कुंभ ज्वालारहित झालेल्या अग्नीप्रमाणें निस्तेज होऊन खालीं पडला ९१. त्या मुष्टीचा तडाका बसल्यामुळें तो राक्षस उज्ज्वल किरणांनीं युक्त असलेला मंगळ ज्याप्रमाणें आकाशांतून आपोआप खालीं पडावा त्याप्रमाणें सत्वर भूमीवर पडला ९२ आणि मुष्टीच्या योगानें वक्षःस्थलाचे ठिकाणीं

तस्मिन्हते भीमपराक्रमेण प्लवङ्गमानामृषभेण युद्धे । मही सशैला सवना चचाल भयं च रक्षांस्यधिकं विवेश १४ [३५२२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षट्सप्ततितमः सर्गः ॥ ७६ ॥

निकुम्भो भ्रातरं दृष्ट्वा सुग्रीवेण निपातितम् । प्रदहन्निव कोपेन वानरेन्द्रमुदैक्षत १ ततः स्रग्दामसंनद्धं दत्तपञ्चाङ्गुलं शुभम् । आददे परिघं धीरो महेन्द्रशिखरोपमम् २ हेमपट्टपरिक्षिप्तं वज्रविद्रुमभूषितम् । यमदण्डोपमं भीमं रक्षसां भयनाशनम् ३ तमाविध्य महातेजाः शक्रध्वजसमौजसम् । विननाद विवृत्तास्यो निकुम्भो भीमविक्रमः ४ उरोगतेन निष्केण भुजस्थैरङ्गदैरपि । कुण्डलाभ्यां च चित्राभ्यां मालया च स चित्रया ५ निकुम्भो भूषणैर्भाति तेन स्म परिघेण च । यथेन्द्रधनुषा मेघः सविद्युत्स्तनयित्नुमान् ६ परिघाग्रेण पुस्फोट वातग्रन्थिर्महात्मनः । प्रजज्वाल सघोषश्च विधूम इव पावकः ७ नगर्या विटपावत्या गन्धर्वभवनोत्तमैः ।

---

भग्न होऊन पतन पावूं लागलेल्या त्या कुंभाचें रूप रुद्रानें जर्जर केलेल्या सूर्याचेंच रूप कीं काय असें दिसूं लागलें १३; आणि ह्याप्रमाणें भयंकर पराक्रम करणाऱ्या त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवानें संग्रामामध्यें त्या कुंभाचा वध केला असतां पर्वत व वनें ह्यांसहवर्तमान पृथ्वी कंपित होऊन राक्षस अधिकच भयभीत झाले १४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं शहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७६ ॥

आपल्या भ्रात्याचा सुग्रीवानें वध केला असें अवलोकन करून कोपानें जसा कांहीं जळूं लागलेला तो निकुंभ वानराधिपति सुग्रीवाकडे पाहूं लागला १ आणि नंतर त्या धैर्यवान् निकुंभानें महेंद्रपर्वताच्या शिखराचीच ज्याला उपमा योग्य आहे असा एक शुभ परिघ हातामध्यें घेतला. त्या परिघाला पुष्पमाला घातलेल्या होत्या; पांच पांच बोटें रुंदीचे लोखंडी पट्ट त्याला आंवळून टाकिले होते २; सुवर्णाच्या पट्ट्यांनींही तो जखडून टाकिला होता; हिरे व पोंवळीं ह्यांनीं तो भूषित केला होता आणि यमदंडाप्रमाणें असलेला तो भयंकर परिघ राक्षसांचें भय नाहींसें करणारा होता ३. इंद्रध्वजाप्रमाणें दिसत असलेला तो परिघ गरगर फिरवून महातेजस्वी व भयंकर पराक्रमी निकुंभ आ पसरून गर्जना करूं लागला ४. वक्षःस्थलावर लोळत असलेलें पदक, बाहूंचे ठिकाणीं असलेलीं बाहुभूषणें, मनोहर कुंडलें, अद्भुत माला ५, इतर भूषणें व तो परिघ ह्यांच्या योगानें तो निकुंभ विद्युल्लतेनें युक्त असून गर्जना करणारा मेघ ज्याप्रमाणें इंद्रधनुष्यानें शोभूं लागतो त्याप्रमाणें शोभूं लागला ६. त्या महात्म्या

सताराणगनक्षत्रं सचन्द्रसमहाग्रहम् ८ निकुम्भपरिघाघूर्णं भ्रमतीव नभ-
स्थलम् ८ दुरासदश्च संजज्ञे परिघाभरणप्रभः। क्रोधेन्धनो निकुम्भाग्नि-
र्युगान्ताग्निरिवोत्थितः ९ राक्षसा वानराश्चापि न शेकुः स्पन्दितुं भयात्।
हनुमांस्तु विवृत्योरस्तस्थौ प्रमुखतो बली १० परिघोपमबाहुस्तु परिघं
भास्करप्रभम्। बली बलवतस्तस्य पातयामास वक्षसि ११ स्थिरे तस्यो-
रसि व्यूढे परिघः शतधा कृतः। विकीर्यमाणः सहसा उल्काशतमिवा-
म्बरे १२ स तु तेन प्रहारेण न चचाल महाकपिः। परिघेण समाधूतो
यथा भूमिचलेऽचलः १३ स तथाभिहतस्तेन हनूमान्प्लवगोत्तमः। मुष्टिं
संवर्तयामास बलेनातिमहाबलः १४ तमुद्यम्य महातेजा निकुम्भोरसि
वीर्यवान्। अभिचिक्षेप वेगेन वेगवान्वायुविक्रमः १५ तत्र पुस्फोट

निकुंभाच्या परिघाचे अग्रानें आवहप्रभृति जे सप्त महावायु त्यांच्या संधीचा भेद झाला आणि ध्वनियुक्त असलेला तो परिघ धूमरहित अग्निप्रमाणें प्रज्वलित होऊं लागला ७. उत्कृष्ट उत्कृष्ट गंधर्वगृहांच्या योगानें व गंधर्वनगरीनें युक्त झालेलें आकाश ज्याप्रमाणें भ्रमण करीत असल्यासारिखें दिसू लागतें त्याप्रमाणें तारागण, नक्षत्रें, चंद्र, व इतरही मोठे मोठे ग्रह ह्यांसहवर्तमान निकुंभाच्या परिघानें नादित झालेलें आकाश जसें कांहीं भ्रमणच करूं लागलें ८. नंतर क्रोध हेंच ज्याचें इंधन आहे व परिघभूषणें हीच ज्याची प्रभा आहे असा निकुंभरूप अग्नि प्रलयसमयीं उत्पन्न झालेल्या अग्नीप्रमाणें सहन होण्यास अतिच भयंकर असा उत्पन्न झाला असतां ९ भीतीमुळें राक्षस व वानर यत्किंचितूही हालचाल करण्यास समर्थ झाले नाहींत; फक्त बलाढ्य हनुमान् मात्र वक्षःस्थल उघडें ठेवून त्याच्या संमुख उभा राहिला होता १०. तेव्हां परिघासारिखे ज्याचे बाहु आहेत अशी त्या बलाढ्य निकुंभानें सूर्यतुल्य तेजस्वी असलेल्या आपल्या परिघाचा प्रहार त्या बलाढ्य हनुमानाचे वक्षःस्थलावर केला असतां ११ त्याच्या विशाल व दृढ वक्षःस्थलावर हपटलेल्या त्या परिघाचे शेंकडों तुकडे झाले आणि एकाएकीं तुकडे तुकडे होऊन तो खालीं पडूं लागला असतां आकाशामध्यें एकदम जशा कांहीं शेंकडों उल्काच दिसूं लागल्या १२. भूकंप झाला असतांही ज्याप्रमाणें पर्वत डळमळत नाहीं त्याप्रमाणें परिघाचा तडाका बसला असतांही त्या प्रहाराच्या योगानें तो महाकपि हनुमान् डळमळला नाहीं १३. ह्याप्रमाणें त्या निकुंभानें प्रहार केल्यावर अतिशयच बलाढ्य असलेल्या त्या वानरश्रेष्ठ हनुमानानें जोरानें आपली मूठ वळली १४ आणि वायूप्रमाणें पराक्रम करणाऱ्या त्या वेगवान्, वीर्यवान् व महातेजस्वी हनुमानानें ती मूठ उगारून वेगानें निकुंभाच्या वक्षःस्थलावर

वर्मास्य प्रसुस्राव च शोणितम् । मुष्टिना तेन संजज्ञे मेघे विद्युदिवोत्थिता १६ स तु तेन प्रहारेण निकुम्भो विचचाल ह । स्वस्थश्चापि निजग्राह हनूमन्तं महाबलम् १७ चुक्रुशुश्च तदा सङ्ख्ये भीमं लङ्कानिवासिनः । निकुम्भेनोद्यतं दृष्ट्वा हनूमन्तं महाबलम् १८ स तथा ह्रियमाणोपि हनूमांस्तेन रक्षसा । आजघानानिलसुतो वज्रकल्पेन मुष्टिना १९ आत्मानं मोक्षयित्वाथ क्षितावभ्यवपद्यत । हनूमानुन्ममाथाशु निकुम्भं मारुतात्मजः २० निक्षिप्य परमायत्तो निकुम्भं निष्पिपेष च । उत्पत्य चास्य वेगेन पपातोरसि वेगवान् २१ परिगृह्य च बाहुभ्यां परिवृत्य शिरोधराम् । उत्पाटयामास शिरो भैरवं नदतो महत् २२ अथ निनदति सादिते निकुम्भे पवनसुतेन रणे बभूव युद्धम् । दशरथसुतराक्षसेन्द्रसूनोर्भृशतरमागतरोषयोः सुभीमम् २३ व्यपेते तु जीवे निकुम्भस्य हृष्टा विनेदुः प्लवङ्गा दिशः सस्वनुश्च । चचालेव चोर्वी पपातेव सा

टाकिली १५. तऱ्हां त्या मुष्टीच्या प्रहारामुळें त्या निकुंभाचें कवच छिन्नभिन्न होऊन त्याच्या शरीरांतून रक्तस्राव सुरू झाला आणि मेघामध्यें ज्याप्रमाणें विद्युल्लता उत्पन्न होते त्याप्रमाणें त्या मुष्टीच्या योगानें त्याच्या शरीराचे ठिकाणीं अग्नि उत्पन्न झाला १६. त्या प्रहाराच्या योगानें निकुंभ मूर्च्छित झाला; परंतु, शुद्धीवर आल्यानतर त्यानें महाबलाढ्य हनुमानाला धरिलें १७. महाबलाढ्य हनुमानाला निकुंभानें उचललें आहे असें पाहून लंकानिवासी राक्षस संग्रामामध्यें भयंकर गर्जना करूं लागले १८; परंतु, तो राक्षस ओढून नेत असतांनाही वायुपुत्र हनुमानानें आपल्या वज्रतुल्य मुष्टीनें त्याला प्रहार केला १९; अशा रीतीनें आपली सुटका करून घेऊन त्यानें भूमीवर उड्डाण केलें आणि त्या वायुपुत्र हनुमानानें सत्वरच निकुंभाचा वध केला २०. अतिशय सावध असलेल्या त्या वेगवान् हनुमानानें भूमीवर आपटून निकुंभाला छिन्नभिन्न केलें; भूमीवर पडलेल्या त्या निकुंभाचे वक्षःस्थलावर वेगावेगानें उड्डाणही केलें २१ आणि हातांनीं त्याला आंवळून धरून व मान मुरगळून मोठी भयंकर गर्जना करीत करीत त्याचें मस्तक त्यानें उपटून काढिलें २२. गर्जना करणाऱ्या निकुंभाचा वायुपुत्र हनुमानानें संग्रामांत वध केला असतां दशरथपुत्र राम व राक्षसाधिपति खराचा पुत्र मकराक्ष ह्या अत्यंत क्रुद्ध झालेल्या उभयतांमध्यें अतिभयंकर युद्ध सुरू झालें २३. असो. निकुंभाचा जीव गेल्यावर वानर आनंदित होऊन गर्जना करूं लागले; दिशा नादित होऊं लागल्या; पृथ्वी जशी कांहीं डळमळूं लागली; नक्षत्रमंडल जसें कांहीं गळूनच पडण्याच्या बेतांत आलें व राक्षसांनाही भय उत्पन्न

घोर्बलं राक्षसाभ्यां भयं प्रविवेश २४ [३५४६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तसप्ततितमः सर्गः ॥ ७७ ॥

निकुम्भं निहतं दृष्ट्वा कुम्भं च विनिपातितम् । रावणः परमामर्षी प्रजज्वालानलो यथा १ नैर्ऋतः क्रोधशोकाभ्यां द्वाभ्यां तु परिमूर्च्छितः । खरपुत्रं विशालाक्षं मकराक्षमचोदयत् । २ गच्छ पुत्र मयाज्ञप्तो बलेनाभिसमन्वितः । राघवं लक्ष्मणं चैव जहि तौ सवनौकसौ ३ रावणस्य वचः श्रुत्वा शूरमानी खरात्मजः । बाढमित्यब्रवीद्धृष्टो मकराक्षो निशाचरम् ४ सोभिवाद्य दशग्रीवं कृत्वा चापि प्रदक्षिणम् । निर्जगाम गृहाच्छुभ्राद्रावणस्याज्ञया बली ५ समीपस्थं बलाध्यक्षं खरपुत्रोब्रवीद्वचः । रथमानीयतां तूर्णं सैन्यं त्वानीयतां त्वरात् ६ तस्य तद्वचनं श्रुत्वा बलाध्यक्षो निशाचरः । स्यन्दनं च बलं चैव समीपं प्रत्यपादयत् ७ प्रदक्षिणं रथं कृत्वा समाहूय निशाचरः । सूतं संचोदयामास शीघ्रं वै रथमावह ८ अथ तान्राक्षसान्सर्वान्मकराक्षो ब्रवीदिदम् । यूयं सर्वे प्रयुध्यध्वं पुरस्तान्मम राक्षसाः ९ अहं राक्षसराजेन रावणेन महात्मना । आज्ञप्तः समरे

---

झालें २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सत्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७७ ॥

निकुंभाचा वध होऊन कुंभाचाही निःपात झाल्याचें अवलोकन करून अतिशय क्रुद्ध झालेला रावण जसा कांहीं अग्निप्रमाणें प्रज्वलित होऊं लागला १ आणि क्रोध व शोक ह्या दोहोंनीं सर्वस्वीं ग्रस्त केलेला तो रावणराक्षस विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या खरपुत्र मकराक्षाला ह्मणाला २ " हे पुत्रा, माझ्या आज्ञेनें सैन्य बरोबर घेऊन तूं जा आणि वानरांसहवर्तमान त्या रामलक्ष्मणांचा तूं वध कर " ३. रावणाचें भाषण श्रवण करून स्वतःला शूर समजणारा खरपुत्र मकराक्ष हर्षयुक्त होऊन " ठीक आहे " असें त्या राक्षसाला ह्मणाला ४; आणि तो बलाढ्य मकराक्ष अभिवंदनपूर्वक रावणाला प्रदक्षिणा करून त्याच्या आज्ञेनें आपल्या शुभ्र गृहांतून बाहेर पडला ५; आणि समीप असलेल्या सेनाधिपतीला तो खरपुत्र मकराक्ष ह्मणाला " रथ सत्वर आणा आणि सैन्यही त्वरेनें घेऊन या " ६. तें त्याचें भाषण श्रवण करून त्या सेनाधिपति राक्षसानें रथ व सैन्य हीं दोन्हीं त्याच्याजवळ आणिलीं ७. तेव्हां रथाला प्रदक्षिणा घालून व सारथ्याला हांक मारून " माझा रथ युद्धभूमीमध्यें लवकर ने " अशी त्यानें त्याला आज्ञा केली ८. नंतर मकराक्ष त्या सर्व राक्षसांना ह्मणाला " हे राक्षसहो, तुह्मी सर्व माझ्या समोर युद्ध करा ९. महात्म्या राक्षसराज रावणानें त्या

हन्तुं तावुभौ रामलक्ष्मणौ १० अद्य रामं वधिष्यामि लक्ष्मणं च निशाचराः । शाखामृगं च सुग्रीवं वानरांश्च शरोत्तमैः ११ अद्य शूलनिपातैश्च वानराणां महाचमूम् । प्रदहिष्यामि संप्राप्तां शुष्केन्धनमिवानलः १२ मकराक्षस्य तच्छ्रुत्वा वचनं ते निशाचराः । सर्वे नानायुधोपेता बलवन्तः समाहिताः १३ ते कामरूपिणः क्रूरा दंष्ट्रिणः पिङ्गलेक्षणाः । मातङ्गा इव नर्दन्तो ध्वस्तकेशा भयावहाः १४ परिवार्य महाकाया महाकायं खरात्मजम् । अभिजग्मुस्ततो हृष्टाश्चालयन्तो नभस्तलम् १५ शङ्खभेरीसहस्राणामाहतानां समन्ततः । क्ष्वेलितास्फोटितानां च तत्र शब्दो महानभूत् १६ प्रभ्रष्टोऽथ करात्तस्य प्रतोदः सारथेस्तदा । पपात सहसा दैवाद्ध्वजस्तस्य तु रक्षसः १७ तस्य ते रथसंयुक्ता हया विक्रमवर्जिताः । चरणैराकुलैर्गत्वा दीनाः सास्रमुखा ययुः १८ प्रवाति पवनस्तस्मिन्सपांसुः खरदारुणः । निर्याणे तस्य रौद्रस्य मकराक्षस्य दुर्मतेः १९ तानि दृष्ट्वा निमित्तानि राक्षसा

---

उभयतां रामलक्ष्मणांचा संग्रामामध्यें वध करण्याविषयीं मला आज्ञा दिली आहे १०. ह्यास्तव, हे निशाचरहो, राम, लक्ष्मण, सुग्रीववानर आणि इतरही वानर ह्यांचा मी आज उत्तम बाणांच्या योगानें वध करीन ११; आणि अग्नि ज्याप्रमाणें शुष्क इंधन दग्ध करून टाकितो त्याप्रमाणें तावडींत सांपडलेली वानरांची प्रचंड सेना मी आज शूलप्रहारांनीं दग्ध करून टाकीन " १२. मकराक्षाचें तें भाषण श्रवण केल्यावर मनामध्यें स्वस्थ असलेल्या त्या सर्वही बलाढ्य राक्षसांनीं नानाप्रकारचीं आयुधें हातामध्यें घेतलीं १३. दंष्ट्रा, पिंगटवर्ण नेत्र आणि अस्ताव्यस्त केश ह्यांनीं युक्त असून यथेष्ट रूप धारण करणारे ते भयंकर राक्षस गजांप्रमाणें गर्जना करूं लागले १४. शरीरानें फारच मोठे असलेले ते राक्षस फारच धिप्पाड असलेल्या खरपुत्र मकराक्षासभोंवतीं जमून त्याला मध्यें ठेवून आनंदानें चालले असतां ते आकाशमंडलच हालवीत आहेत कीं काय असा भास होऊं लागला १५. सर्व बाजूंनीं फुंकलेले हजारों शंख, सर्व बाजूंनीं वाजूं लागलेल्या हजारों नौबदी आणि त्याचप्रमाणें उड्या मारणें व दंड ठोकणें ह्यांचा ध्वनि तर्थे फारच मोठा होऊं लागला १६. त्या मकराक्षाच्या सारथ्याचे हातांतून चाबूक खालीं गळाला. दुर्दैवानें त्या राक्षसाचा ध्वजही एकाएकीं कोसळून खालीं पडला १७. तेव्हां रथाला जोडिलेले त्याचे अश्व चालेनासे झाले आणि त्यांचे पाय अगदीं मट्यास आल्यामुळें ते दीन होऊन व नेत्रांमध्यें अश्रु आणून तसेच पुढें जाऊं लागले १८. तो दुर्बुद्धि व भयंकर मकराक्ष बाहेर पडला असतां फारच भयंकर व रजःकणांनीं भरलेला वायु वाहूं लागला १९. परंतु, ते अपशकुन अवलोकन

वीर्यबलान्विताः। अचिन्त्य निर्गताः सर्वे यत्र तौ रामलक्ष्मणौ २० घनगजमहिषाङ्गतुल्यवर्णाः समरमुखेष्वसकृद्गदासिभिन्नाः। अहमहमिति युद्धकौशलास्ते रजनिचराः परिबभ्रमुर्मुहुस्ते २१ [ ३५६७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टसप्ततितमः सर्गः ॥ ७८ ॥

निर्गतं मकराक्षं ते दृष्ट्वा वानरपुङ्गवाः। आप्लुत्य सहसा सर्वे योद्धुकामा व्यवस्थिताः १ ततः प्रवृत्तं सुमहत्तद्युद्धं लोमहर्षणम्। निशाचरैः प्लवङ्गानां देवानां दानवैरिव २ वृक्षशूलनिपातैश्च गदापरिघपातनैः। अन्योन्यं मर्दयन्ति स्म तदा कपिनिशाचराः ३ शक्तिखड्गगदाकुन्तैस्तोमरैश्च निशाचराः। पट्टिशैर्भिन्दिपालैश्च बाणपातैः समन्ततः ४ पाशमुद्गरदण्डैश्च निर्घातैश्चापरैस्तथा। कदनं कपिसिंहानां चक्रुस्ते रजनीचराः ५ बाणौघैरर्दिताश्चापि खरपुत्रेण वानराः। संभ्रान्तमनसः सर्वे दुद्रुवुर्भयपीडिताः ६ तान्दृष्ट्वा राक्षसाः सर्वे द्रवमाणान्वनौकसः। नेदुस्ते सिंहवद्धृष्टा राक्षसा जितकाशिनः ७ विद्रवत्सु तदा तेषु वानरेषु समन्ततः।

---

केल्यावरही अतिशय वीर्यवान् असलेले ते सर्वही राक्षस त्यांचा पर्वा न करितां जिकडे ते रामलक्ष्मण होते तिकडे निघाले २०. मेघ, गज व महिष ह्यांप्रमाणें ज्यांच्या शरीराची कांति आहे आणि समरांगणामध्यें अनेकवेळां गदा व खड्ग ह्यांच्या योगानें ज्यांना जखमा झालेल्या आहेत असे ते युद्धाविषयीं निपुण असलेले राक्षस मी मी ह्मणत ह्मणत समरांगणामध्यें वारंवार संचार करूं लागले २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अठ्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७८ ॥

मकराक्ष बाहेर पडल्याचें पाहून ते सर्वही वानरश्रेष्ठ एकदम उड्डाण करून त्याच्याशीं युद्ध करण्यास उद्युक्त झाले १. तदनंतर देवांचें ज्याप्रमाणें दानवांशीं युद्ध झालें त्याप्रमाणें अंगावर कांटा आणणारें असें फारच मोठें वानरांचें निशाचरांशीं युद्ध सुरू झालें २. वृक्ष, शूल, गदा व परिघ ह्यांच्या प्रहारांनीं ते उभयतां वानर व राक्षस एकमेकांचें मर्दन करूं लागले ३. शक्ति, खड्ग, गदा, भाले, तोमर, पट्टे, गोफणी, सभोंवतालीं चाललेले बाणांचे भडिमार ४. पाश, मुद्गर, दंड आणि तोफा ह्यांच्या योगानें ते राक्षस वानरश्रेष्ठांची कचल उडवूं लागले ५. ह्याप्रमाणें खरपुत्रानें वानरांना बाणसमुदायांनीं जर्जर केलें असतां भयभीत झालेले ते सर्वही वानर मनामध्यें गोंधळून जाऊन परत पळत सुटले ६ आणि ते वानर पळत आहेत असें अवलोकन केल्यावर विजयामुळें ज्यांच्या मुखावर टवटवी आली आहे असे ते सर्वही राक्षस सिंहांप्रमाणें बेफाम होऊन गर्जना करूं लागले ७; परंतु, ते वानर चोहोंकडून पळूं

रामस्तान्वारयामास शरवर्षेण राक्षसान् ८ वारितान्राक्षसान्दृष्ट्वा मकराक्षो निशाचरः । कोपानलसमाविष्टो वचनं चेदमब्रवीत् ९ तिष्ठ राम मया सार्धं द्वन्द्वयुद्धं भविष्यति । त्याजयिष्यामि ते प्राणान्धनुर्मुक्तैः शितैः शरैः १० यत्तदा दण्डकारण्ये पितरं हतवान्मम । तदग्रतः स्वकर्मस्थं स्मृत्वा रोषोभिवर्धते ११ दह्यन्ते भृशमङ्गानि दुरात्मन्मम राघव । यन्मयासि न दृष्टस्त्वं तस्मिन्काले महावने १२ दिष्ट्यासि दर्शनं राम मम त्वं प्राप्तवानिह । काङ्क्षितोसि क्षुधार्तस्य सिंहस्येवेतरो मृगः १३ अद्य मद्बाणवेगेन प्रेतराड्विषयं गतः । ये त्वया निहताः शूराः सह तैश्च वसिष्यसि १४ बहुनात्र किमुक्तेन शृणु राम वचो मम । पश्यन्तु सकला लोकास्त्वां मां चैव रणाजिरे । १५ अस्त्रैर्वा गदया वापि बाहुभ्यां वा रणाजिरे । अभ्यस्तं येन वा राम वर्ततां तेन वा मृधम् १६ मकराक्षवचः श्रुत्वा रामो दशरथात्मजः । अब्रवीत्प्रहसन्वाक्यमुत्तरोत्तरवादिनम् १७ कत्थसे किं वृथा रक्षो बहून्यसदृशानि ते । न रणे शक्यते जेतुं

---

लागले असतां रामानें त्या राक्षसांनें बाणवृष्टीच्या योगानें निवारण केलें ८. तेव्हां राक्षसांचें निवारण केल्याचें पाहून मकराक्षराक्षस क्रोधाग्नीनें व्याप्त झाला आणि ह्मणाला ९ " हे रामा, थांब; माझ्यासहवर्तमान तुझें द्वंद्वयुद्ध होऊं दे; ह्मणजे धनुष्यापासून सोडिलेल्या आपल्या तीक्ष्ण बाणांच्या योगानें मी तुला प्राणत्याग करावयास लावीन १०. आपलें कर्तव्य करणाऱ्या माझ्या पित्याचा दंडकारण्यामध्यें तूं वध केल्यापासून त्याचें स्मरण झालें असतां आजपर्यंत माझा क्रोध एकसारिखा वृद्धिंगतच होत आहे ११. हे रामा, त्यावेळीं त्या महावनामध्यें तूं माझ्या दृष्टीं पडला नाहींस ह्यामुळें, हे दुरात्म्या, आजपर्यंत माझ्या अंगाचा अतिशय भडका होऊन राहिला आहे १२. क्षुधेनें व्याकुळ झालेल्या सिंहासमीप ज्याप्रमाणें सामान्य पशु प्राप्त होतो त्याप्रमाणें, हे रामा, आज तूं माझ्या दृष्टीं पडला आहेस ही मोठी सुदैवाचीच गोष्ट आहे १३. माझ्या बाणवेगानें तूं आज यमराजाच्या देशामध्यें जाशील आणि तूं ज्या शूरांचा वध केला आहेस त्यांच्यासहवर्तमान वास्तव्य करिशील १४. हे रामा, ह्या ठिकाणीं पुष्कळ बोलून कर्तव्य तें काय आहे ? सर्व लोक संग्रामामध्यें तुला व मला अवलोकन करोत १५. हे रामा, अस्त्रें, गदा, बाहु ह्यांच्या योगानें अथवा संग्रामामध्यें ज्याचा तुला अभ्यास असेल त्याच्या योगानें युद्ध सुरू होऊं दे " १६. हें मकराक्षानें भाषण श्रवण करून दशरथपुत्र राम जास्त जास्तच बोलत सुटणाऱ्या त्या मकराक्षाला हंसत हंसत ह्मणाला १७. " हे राक्षसा, स्वतःला न शोभणाऱ्या पुष्कळशा फुशारक्या मारून तूं व्यर्थ कल्पना

विना युद्धेन संग्रामे पराजयः कदाचन। विकत्थनं हि ... १८ चतुर्दश सहस्राणि रक्षसां त्वत्पिता च मे।
त्रिशिरा दूषणश्चापि दण्डके निहता मया १९ स्वाशितास्तेऽपि मांसेन
गृध्रगोमायुकाकाश्च भविष्यन्त्यद्य वै पाप तीक्ष्णतुण्डनखाङ्कुशाः २०
राघवेणैवमुक्तस्तु मकराक्षो महाबलः। बाणौघानमुचत्तस्मै राघवाय रणा-
जिरे २१ ताञ्छराञ्छरवर्षेण रामश्चिच्छेद नैकधा। निपेतुर्भुवि विच्छिन्ना
रुक्मपुङ्खाः सुवाससः २२ तद्युद्धमभवत्तत्र समेत्यान्योन्यमोजसा। खर-
राक्षसपुत्रस्य सूनोर्दशरथस्य च २३ जीमूतयोरिवाकाशे शब्दो ज्यातल-
योरिव। धनुर्मुक्तः स्वनोऽन्योन्यं श्रूयते च रणाजिरे २४ देवदानवगन्धर्वाः
किन्नराश्च महोरगाः। अन्तरिक्षगताः सर्वे द्रष्टुकामास्तदद्भुतम् २५
विद्धमन्योन्यगात्रेषु द्विगुणं वर्धते बलम्। कृतप्रतिकृतान्यांन्यं कुरुतां तौ
रणाजिरे २६ राममुक्तांस्तु बाणौघान्राक्षसस्त्वच्छिनद्रणे। रक्षोमुक्तांस्तु
रामो वै नैकधा प्राच्छिनच्छरैः २७ बाणौघवितताः सर्वा दिशश्च

---

कशाकरितां करीत आहेस ? युद्धावांचून केवळ बाणीच्या जोरावर संग्रामामध्यें शत्रूचा पराजय होणें शक्य नाहीं १८. चवदा हजार राक्षस, तुझा पिता, त्रिशिरा व दूषण ह्यांचा मीं दंडकारण्यामध्यें वध केला आहे १९. हे पाप्या, तीक्ष्ण चंचु व नखरूप अंकुश ह्यांनीं युक्त असलेले गृध्र, कोल्हे व काकपक्षी आज तुझ्या मांसानें चांगले तृप्त होतील " २०. राघवानें ह्याप्रमाणें महाबलाढ्य मकराक्षाला सांगितलें असतां त्यानें संग्रामामध्यें त्या रामावर बाणसमुदाय सोडिले २१; परंतु, रामानें ते बाण बाणवृष्टीच्या योगानें अनेक ठिकाणीं तोडून टाकिले असतां मोडून गेलेले व सुवर्णमय पिच्छप्रदेश आणि उत्कृष्ट पिच्छें ह्यांनीं युक्त असलेले ते बाण भूमीवर पडले २२. खरराक्षसाचा पुत्र मकराक्ष आणि दशरथाचा पुत्र राम हे उभयतां एकमेकांशीं येऊन भिडल्यानंतर त्यांमध्यें जोराजोरानें युद्ध सुरू झालें असतां २३ आकाशामध्यें होणाऱ्या मेघांच्या ध्वनीप्रमाणें प्रत्यंचा व हस्ततल ह्यांच्या संघर्षणामुळें एकमेकांच्या धनुष्यापासून निघालेला शब्द एकमेकांना संग्रामामध्यें ऐकूं येऊं लागला २४. देव, दानव, गंधर्व, किन्नर आणि महोरग हे सर्वही अंतरिक्षामध्यें संचार करणारे प्राणी तें अद्भुत युद्ध पहाण्याविषयीं तत्पर झाले २५. एकमेक एकमेकांच्या शरीराला वेध करूं लागले असतांही उभयतांचेंही बल द्विगुणित होऊं लागलें आणि संग्रामामध्यें ते उभयतां एकमेकांच्या तोंडीस तोंड देऊं लागले २६. रामानें रणभूमीमध्यें सोडिलेले बाणसमुदाय राक्षसानें तोडून टाकिले व राक्षसानेंही सोडिलेल्या बाणसमुदायांचे रामानें आपल्या बाणांच्या योगानें अनेक तुकडे तुकडे केले २७.

प्रदिशस्तथा । संछन्ना वसुधा चैव समन्तात्प्रकाशते २८ ततः क्रुद्धो महाबाहुर्धनुश्चिच्छेद संयुगे । अष्टाभिरथ नाराचैः सूतं विव्याध राघवः २९ भित्त्वा रथं शरै रामो हत्वा अश्वानपातयत् । विरथो वसुधास्थः स मकराक्षो निशाचरः ३० तत्तिष्ठद्वसुधां रक्षः शूलं जग्राह पाणिना । त्रासनं सर्वभूतानां युगान्ताग्निसमप्रभम् ३१ दुरवापं महच्छूलं रुद्रदत्तं भयंकरम् । जाज्वल्यमानमाकाशे संहारास्त्रमिवापरम् ३२ यं दृष्ट्वा देवताः सर्वा भयार्ता विद्रुता दिशः । विभ्राम्य च महच्छूलं प्रज्वलन्तं निशाचरः ३३ स क्रोधात्प्राहिणोत्तस्मै राघवाय महात्मने । तमापतन्तं ज्वलितं खरपुत्रकराच्च्युतम् ३४ बाणैश्चतुर्भिराकाशे शूलं चिच्छेद राघवः । स भिन्नो नैकधा शूलो दिव्यहाटकमण्डितः ॥ व्यशीर्यत महोल्केव रामबाणार्दितो भुवि ३५ तच्छूलं निहतं दृष्ट्वा रामेणाक्लिष्टकर्मणा । साधु साध्विति भूतानि व्याहरन्ति नभोगताः ३६ तं दृष्ट्वा निहतं शूलं मकराक्षो निशाचरः ।

---

सर्व दिशा आणि उपदिशा बाणसमुदायांनीं व्याप्त झाल्या आणि पृथ्वीही आच्छादित झाल्यामुळें सर्व बाजूंनीं प्रकाशित होईनाशी झाली २८. तदनंतर महापराक्रमी राम क्रुद्ध झाला आणि संग्रामामध्यें त्याचें धनुष्य तोडून टाकून आठ नाराच बाणांनीं रामानें त्याच्या सारथ्यालाही वेध केला २९. बाणांच्या योगानें रामानें त्याचा रथ मोडून टाकून अश्वांचाही निःपात केला असतां विरथ झालेला तो मकराक्ष राक्षस भूतलावर उभा राहिला ३० आणि भूमीवर उभ्या राहिलेल्या त्या राक्षसानें प्रभेनें प्रलयाग्नीची बरोबरी करणारा व प्राणिमात्राला भय उत्पन्न करणारा एक शूल हातामध्यें घतला ३१. इतरांना प्राप्त होण्यास अशक्य, रुद्रानें दिलेला व आकाशामध्यें जाज्वल्यमान असलेला तो रुद्रदत्त प्रचंड शूल दुसरें संहारास्त्रच कीं काय असा दिसूं लागला ३२; व तो शूल अवलोकन करितांक्षणीं सर्व देवता भयभीत होऊन वाट फुटेल तिकडे पळत सुटल्या. तदनंतर तो उज्ज्वल व प्रचंड शूल गरगर फिरवून ३३ त्या राक्षसानें रागारागानें त्या महात्म्या रामावर फेंकिला असतां खरपुत्र मकराक्षाच्या हातांतून सुटलेला तो उज्ज्वल शूल आपणाकडे येत आहे तोंच ३४ चार बाणांच्या योगानें मध्यतरींच रामानें त्याचे तुकडे केले आणि अशारीतीनें रामबाणांचा तडाका बसून अनेक ठिकाणीं छिन्नभिन्न झालेला व दिव्य सुवर्णालंकारांनीं भूषित झालेला तो शूल मोठ्या उल्केप्रमाणें भूतलावर पडला ३५. सदाचरणसंपन्न रामानें त्या शूलाचा विध्वंस केल्याचें पाहून अंतरिक्षांतील प्राणी "उत्तम, उत्तम" असें ह्मणूं लागले ३६. असो. त्या शूलाचा विध्वंस झाला असें दिसून आल्यावर मकराक्षराक्षस मूठ उगारून

मुष्टिमुद्यम्य काकुत्स्थं तिष्ठ तिष्ठेति चाब्रवीत् ३७ स तं दृष्ट्वापतन्तं तु प्रहस्य रघुनन्दनः । पावकास्त्रं ततो रामः संदधे तु शरासने ३८ तेनास्त्रेण हतं रक्षः काकुत्स्थेन तदा रणे । सच्छिन्नहृदयं तत्र पपात च ममार च ३९ दृष्ट्वा ते राक्षसाः सर्वे मकराक्षस्य पातनम् । लङ्कामेव प्रधावन्त रामबाणभयार्दिताः ४० दशरथनृपसूनुबाणवेगै रजनिचरं निहतं खरात्मजं तम् । प्रददृशुरथ देवताः प्रहृष्टा गिरिमिव वज्रहतं यथा विकीर्णम् ४१ [ ३६०८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे नवसप्ततितमः सर्गः ॥ ७९ ॥

मकराक्षं हतं श्रुत्वा रावणः समितिंजयः । रोषेण महताविष्टो दन्तान्कटकटाय्य च १ कुपितश्च तदा तत्र किं कार्यमिति चिन्तयन् । आदिदेशाथ संक्रुद्धो रणायेन्द्रजितं सुतम् २ जहि वीर महावीर्यौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ । अदृश्यो दृश्यमानो वा सर्वथा त्वं बलाधिकः ३ त्वमप्रतिमकर्माणमिन्द्रं जयसि संयुगे । किं पुनर्मानुषौ दृष्ट्वा न वधिष्यसि

---

" थांब थांब " असें रामाला म्हणाला ३७; परंतु, तो मकराक्ष आपल्यावर चाल करून येत आहे असें आढळून येतांक्षणीं रघुनंदन रामानें अग्न्यस्त्रानें अभिमंत्रित केलेला बाण धनुष्याला लाविला ३८ आणि संग्रामामध्यें त्या अस्त्राच्या योगानें त्या राक्षसाचा ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें वध केला असतां हृदय विदीर्ण होऊन तो राक्षस तेथें पडला व मरणही पावला ३९. ह्याप्रमाणें मकराक्षाचा वध झाल्याचें अवलोकन केल्यावर रामबाणांच्या भीतीनें व्याकुल झालेले ते सर्वही राक्षस लंकेकडेच पळत सुटले ४० आणि वज्राचा तडाका बसून अस्ताव्यस्त पडलेल्या पर्वताप्रमाणें रामबाणांच्या वेगामुळें मरून पडलेला तो खरपुत्र मकराक्ष देवतांनीं अवलोकन केला व त्या संतुष्ट झाल्या ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकुणऐंशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ७९ ॥

मकराक्ष वध पावल्याचें श्रवण केल्यानंतर संग्रामविजयी रावण अतिशय क्रुद्ध होऊन दांतओंठ खाऊं लागला १ आणि आतां काय करावें हा विचार करीत करीत क्रुद्ध झाला असतांनाच आपल्या इंद्रजित् पुत्रालाच त्यानें संग्रामामध्यें जाण्याची आज्ञा केली २. ( तो म्हणाला ) " हे वीरा, उघडपणें अथवा गुप्त राहून तूं त्या महावीर्यवान् भ्रात्या रामलक्ष्मणांचा वध कर. सर्व प्रकारें तूं त्यांच्यांहून बलानें अधिक आहेस ३. अतुल पराक्रम करणाऱ्या इंद्राचा जर संग्रामामध्यें पराजय करीत आहेस तर रणामध्यें दोन मानव दृष्टीं पडल्याबरोबर तूं त्यांचा वध करणार नाहींस असें होईल तरी

संयुग ४ तथोक्तो राक्षसेन्द्रेण प्रतिगृह्य पितुर्वचः । यज्ञभूमौ स विधि-वत्पावकं जुहवेन्द्रजित् ५ जुह्वतश्चापि तत्राग्निं रक्तोष्णीषधराः स्त्रियः । आजग्मुस्तत्र संभ्रान्ता राक्षस्यो यत्र रावणिः ६ शस्त्राणि शरपत्राणि समिधोऽथ बिभीतकाः । लोहितानि च वासांसि स्रुवं कार्ष्णायसं तथा ७ सर्वतोऽग्निं समास्तीर्य शरपत्रैः सतोमरैः । छागस्य सर्वकृष्णस्य गलं जग्राह जीवतः ८ शरहोमसमिद्धस्य विधूमस्य महार्चिषः । बभूवुस्तानि लिङ्गानि विजयं दर्शयन्ति च ९ प्रदक्षिणावर्तशिखस्तप्तहाटकसंनिभः । हविस्तत्प्रतिजग्राह पावकः स्वयमुत्थितः १० हुत्वाग्निं तर्पयित्वाथ देव-दानवराक्षसान् । आरुरोह रथश्रेष्ठमन्तर्धानगतं शुभम् ११ स वाजिभि-श्चतुर्भिस्तु बाणैस्तु निशितैर्युतः । आरोपितमहाचापः शुशुभे स्यन्दनो-त्तमः १२ जाज्वल्यमानो वपुषा तपनीयपरिच्छदः । मृगैश्चन्द्रार्धचन्द्रैश्च स रथः समलंकृतः १३ जाम्बूनदमहाकम्बुर्दीप्तपावकसंनिभः । बभूवेन्द्रजितः

---

कसं ! ” ४. ह्याप्रमाणें राक्षसाधिपतीनें आज्ञा केली असतां पित्याच्या आज्ञेला मान देऊन इंद्रजितानें यज्ञभूमीमध्यें यथाविधि होम केला ५ आणि ह्याप्रमाणें तो अग्नी-मध्यें हवन करूं लागला असतां आरक्तवर्ण शिरस्त्राण धारण केलेल्या स्त्रिया तेथें आल्या आणि जेथें तो रावणपुत्र होता तेथें धांदल उडून गेलेल्या इतर राक्षसीही आल्या ६. शस्त्रांचे परिधी, बिभीतक वृक्षांच्या समिधा, आरक्तवर्ण वस्त्रें व लोहमय दर्वी हें सामान जुळवून ७ आणि सर्व बाजूंनीं तोमरासहवर्तमान शरपत्रांचीं अग्नीला परिस्तरणें घालून सर्वस्वीं कृष्णवर्ण असलेल्या जिवंत बोकडाचा त्यानें गळा धरिला ८ आणि शरहोमानें प्रज्वलित होऊन धूमरहित झालेल्या अग्नीच्या मोठ्या मोठ्या ज्वाला होऊं लागल्या असतां तीं पूर्वींचीं विजयसूचक चिन्हें होऊं लागलीं ९. तप्त सुवर्णासारिखी ज्याची कांति आहे आणि ज्याच्या ज्वाला प्रदक्षिणिक जात आहेत अशा अग्नीनें आपोआप प्रज्वलित होऊन त्याच्या हविर्द्र-व्याचा स्वीकार केला ( हें त्यांतील एक जयसूचक चिन्ह होतें ) १०. असो. अग्नी-मध्यें होम देऊन आणि देव, दानव व राक्षस ह्यांचें संतर्पण करून इंद्रजित् अदृश्य रहाण्याचें सामर्थ्य ज्यामध्यें आहे अशा शुभ व श्रेष्ठ रथावर आरूढ झाला ११. चार अश्व व तीक्ष्ण बाण ह्यांनीं युक्त व मोठमोठीं धनुष्यें ज्यावर ठेविलीं आहेत असा तो श्रेष्ठ रथ झळकूं लागला १२. आकृतीनें जाज्वल्यमान असलेल्या त्या रथा-वर सुवर्णाचें सामान होतें आणि मृग, चंद्र व अर्धचंद्र ह्यांच्या योगानें तो रथ शृंगा-रिलेला होता १३. इंद्रजिताचा ध्वज वैडूर्यरत्नांनीं शृंगारिलेला होता, प्रदीप्त

केतुर्वैदूर्यसमलंकृतः १४ तेन चादित्यकल्पेन ब्रह्मास्त्रेण च पालितः । स बभूव दुराधर्षो रावणिः सुमहाबलः १५ सोऽभिनिर्याय नगरादिन्द्रजित्समितिंजयः । हुत्वाग्निं राक्षसैर्मन्त्रैरन्तर्धानगतोऽब्रवीत् १६ अद्य हत्वा रणे यौ तौ मिथ्या प्रव्रजितौ वने । जयं पित्रे प्रदास्यामि रावणाय रणाधिकम् १७ अद्य निर्वानरामुर्वीं हत्वा रामं च लक्ष्मणम् । करिष्ये परमां प्रीतिमित्युक्त्वान्तरधीयत १८ आपपाताथ संक्रुद्धो दशग्रीवेण चोदितः । तीक्ष्णकार्मुकनाराचैस्तीक्ष्णस्त्विन्द्ररिपू रणे १९ स ददर्श महावीर्यौ नागौ त्रिशिरसाविव । सृजन्ताविषुजालानि वीरौ वानरमध्यगौ २० इमौ ताविति संचिन्त्य सज्ज्यं कृत्वा च कार्मुकम् । संततानिषुधाराभिः पर्जन्य इव वृष्टिमान् २१ स तु वैहायसरथो युधि तौ रामलक्ष्मणौ । अचक्षुर्विषये तिष्ठन्विव्याध निशितैः शरैः २२ तौ तस्य शरवेगेन परीतौ रामलक्ष्मणौ । धनुषी सशरे कृत्वा दिव्यमस्त्रं प्रचक्रतुः २३ प्रच्छादयन्तौ गगनं शरजालैर्महाबलौ । तमस्त्रैः सूर्यसंकाशैर्नैव

अग्निप्रमाणें त्याची कांति होती आणि सुवर्णाचीं मोठीं मोठीं कडीं त्यांत घातलेलीं होतीं १४. त्या सूर्यतुल्य ध्वजानें व ब्रह्मास्त्रानें सुरक्षित असल्यामुळें तो अतिबलाढ्य रावणपुत्र अजिंक्य झाला होता १५. असो. संग्रामविजयी इंद्रजित् निर्ऋति ज्यांची देवता आहे अशा मंत्रांनीं अग्नीमध्यें हवन करून नगरांतून बाहेर निघाला आणि अदृश्य रहाण्याची विद्या ज्याला आहे असा तो इंद्रजित् ह्मणाला १६. "आज मी विनाकारण वनामध्यें निघून गेलेल्या त्या रामलक्ष्मणाचा संग्रामांत वध करून पित्या रावणाला पूर्ण जय देईन १७; आणि रामलक्ष्मणांचा वध करून व पृथ्वी वानरशून्य करून पित्याला उत्कृष्ट प्रकारचा आनंद देईन" असें ह्मणून तो अंतर्धान पावला १८. नंतर रावणानें आज्ञा केली असतां अतिशय क्रुद्ध झालेला तो प्रचंड इंद्रजित् धनुष्यापासून सुटलेले तीक्ष्ण नाराच बाण टाकीत टाकीत संग्रामामध्यें आला १९; आणि तीन फड्याचे नागच कीं काय असे ते वानरांमध्यें असलेले महावीर्यवान् वीर रामलक्ष्मण बाणसमुदाय सोडीत असलेले त्यानें अवलोकन केले २०. नंतर हेच ते राक्षसांचा वध करणारे असें मनामध्यें आणून व धनुष्य सज्ज करून जलवृष्टि करणाऱ्या पर्जन्यप्रमाणें एकसारिख्या बाणधारांनीं त्यानें सर्व दिशा भरून काढिल्या २१. आकाशगामी ज्याचा रथ आहे अशा त्या इंद्रजितानें रामलक्ष्मणांच्या दृष्टोत्पत्तीस न येतां तीक्ष्ण बाणांनीं त्यांना संग्रामामध्यें वेध केला २२. तेव्हां त्याच्या बाणवेगानें ग्रस्त झालेल्या त्या रामलक्ष्मणांनींही धनुष्य सज्ज करून दिव्य अस्त्राचा

पस्पर्शतुः शरैः २४ स हि धूमान्धकारं च चक्रे प्रच्छादयन्नभः । दिशश्चान्तर्दधे श्रीमान्नीहारतमसा वृतः २५ नैव ज्यातलनिर्घोषो न च नेमिखुरस्वनः । शुश्रुवे चरतस्तस्य न च रूपं प्रकाशते २६ घनान्धकारे तिमिरे शिलावर्षमिवाद्भुतम् । स ववर्ष महाबाहुर्नाराचशरवृष्टिभिः २७ स रामं सूर्यसंकाशैः शरैर्दत्तवरैर्भृशम् । विव्याध समरे क्रुद्धः सर्वगात्रेषु रावणिः २८ तौ हन्यमानौ नाराचैर्धाराभिरिव पर्वतौ । हेमपुङ्खान्नरव्याघ्रौ तिग्मान्मुमुचतुः शरान् २९ अन्तरिक्षे समासाद्य रावणिं कङ्कपत्रिणः । निकृत्य पतगा भूमौ पेतुस्ते शोणिताप्लुताः ३० अतिमात्रं शरौघेण दीप्यमानौ नरोत्तमौ । तानिषून्पततो भल्लैरनेकैर्विचकर्ततुः ३१ यतो हि ददृशाते तौ शरान्निपतिताञ्छितान् । ततस्तु तौ दाशरथी ससृजातेऽस्त्रमुत्तमम् ३२ रावणिस्तु दिशः सर्वा रथेनातिरथोऽपतत् । विव्याध तौ

---

प्रयोग केला २३. महाबलाढ्य रामलक्ष्मण बाणांच्या योगानें आकाशही आच्छादित करूं लागले; परंतु, अस्त्रमंत्रानें अभिमंत्रित केलेल्या त्यांच्या सूर्यतुल्य बाणांचा त्याला स्पर्शही झाला नाहीं २४. धुक्याच्या अंधकारानें गुरफटून गेलेल्या व बाणांच्या योगानें आकाश आच्छादित करीत असलेल्या त्या इंद्रजितानें मायेच्या योगानें धूमासहवर्तमान अंधकार उत्पन्न केला आणि दिशांविषयींही भ्रम उत्पन्न केला २५. तो इंद्रजित् संग्रामामध्यें संचार करूं लागला असतां त्याच्या रथाच्या धांवा व घोड्यांच्या टापा ह्यांचाही ध्वनि ऐकू येईनासा झाला; त्याच्या प्रत्यंचेचाही टणत्कार कानावर येईनासा झाला व त्याचें मुखही दृष्टोत्पत्तीस आलें नाहीं २६. पराकाष्ठेच्या अंधकारामध्यें त्या महापराक्रमी इंद्रजितानें अद्भुत पाषाणवृष्टिच कीं काय अशी नाराचबाणसमुदायांच्या योगानें वृष्टि केली २७ आणि संग्रामामध्यें क्रुद्ध झालेल्या त्या रावणपुत्रानें वर म्हणून प्राप्त झालेल्या सूर्यतुल्य तेजस्वी बाणांनीं सर्व अवयवांचे ठिकाणीं रामाला अतिशय वेध केला २८; परंतु, जलधारांचा ज्याप्रमाणें पर्वतावर भडिमार होतो त्याप्रमाणें इंद्रजिताच्या नाराचबाणांचा एकसारिखा भडिमार होत असतांनाही ते पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण सुवर्णपिच्छांनीं युक्त असे तीक्ष्ण बाण सोडूं लागले २९ आणि अंतरिक्षामध्यें रावणपुत्र इंद्रजिताला गांठून व त्याचे लचके तोडून ते बाण रक्तानें भरून भूमीवर पडले ३०. नंतर इंद्रजिताच्या बाणसमुदायानें ते पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण अतिशय प्रदीप्त होऊं लागले असतां त्यांचे ते आपल्यावर येणारे बाण त्यांनीं असंख्य भल्ल बाणांच्या योगानें तोडून टाकिले ३१. जेथून जेथून तीक्ष्ण बाण येत असलेले त्यांच्या दृष्टीं पडले तेथें तेथें त्या दशरथपुत्रांनीं उत्कृष्ट अस्त्राचा प्रयोग केला ३२; परंतु, चलाखीनें अस्त्रप्रयोग करणाऱ्या त्या

दाशरथी लक्ष्मणौ निशितैः शरैः ३३ तेनातिविद्धौ तौ वीरौ रुक्मपुङ्खैः सुसंहतैः । बभूवतुर्दाशरथी पुष्पिताविव किंशुकौ ३४ नास्य वेगगतिं कश्चिन्न च रूपं धनुः शरान् । न चास्य विदितं किंचित्सूर्यस्येवाभ्रसंप्लवे ३५ तेन विद्धाश्च हरयो निहताश्च गतासवः । बभूवुः शतशस्तत्र पतिता धरणीतले ३६ लक्ष्मणस्तु ततः क्रुद्धो भ्रातरं वाक्यमब्रवीत् । ब्राह्ममस्त्रं प्रयोक्ष्यामि वधार्थं सर्वरक्षसाम् ३७ तमुवाच ततो रामो लक्ष्मणं शुभलक्षणम् । नैकस्य हेतो रक्षांसि पृथिव्यां हन्तुमर्हसि ३८ अयुध्यमानं प्रच्छन्नं प्राञ्जलिं शरणागतम् । पलायमानं मत्तं वा न हन्तुं त्वमिहार्हसि ३९ तस्यैव तु वधे यत्नं करिष्यामि महाभुज । आदेक्ष्यावो महावेगानस्त्रानाशीविषोपमान् ४० तमेनं मायिनं क्षुद्रमन्तर्हितरथं बलात् । राक्षसं निहनिष्यन्ति दृष्ट्वा वानरयूथपाः ४१ यद्येष भूमिं विशते दिवं वा

---

दशरथपुत्र रामलक्ष्मणांना तीक्ष्ण बाणांनीं वेध करून तो अतिरथि रावणपुत्र रथाच्या योगानें सर्व दिशेस संचार करूं लागला ३३. त्या इंद्रजितानें सुवर्णमय पिच्छांनीं युक्त व अतिशय दृढ असलेल्या बाणांनीं त्या वीरांना फारच वेध केला असतां ते दशरथपुत्र प्रफुल्लित पलाश वृक्षांप्रमाणें शोभूं लागले ३४. त्या इंद्रजिताच्या वेगयुक्त गतीचाही कोणाला पत्ता लागला नाहीं; त्याचें रूप, धनुष्य आणि बाण हींही कोणाच्या अवलोकनांत आलीं नाहींत आणि मेघपटलांत ज्याप्रमाणें सूर्याची गति वगैरे कांहींएक समजत नाहीं त्याप्रमाणें त्याची हालचाल वगैरे कांहींएक कोणाच्या दृष्टोत्पत्तीस आलें नाहीं ३५. त्यानें बाणांचा वेध करून मारून टाकिलेले आणि ह्मणूनच गतप्राण झालेले शेंकडो वानर त्या रणामध्यें भूतलावर पडले ३६. तेव्हां लक्ष्मण अतिशय क्रुद्ध होऊन भ्रात्या रामाला ह्मणाला " सर्व राक्षसांच्या वधाकरितां मी आतां ब्रह्मास्त्राचा प्रयोग करितों " ३७. तेव्हां शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या त्या लक्ष्मणाला राम ह्मणाला " एकाकरितां पृथ्वींतील सर्व राक्षसांचा वध करणें तुला उचित नाहीं ३८. आणि युद्ध न करणाऱ्याला, दडून राहिलेल्याला, हात जोडून शरण आलेल्याला अथवा भांबावून पळत सुटलेल्याला ह्या ठिकाणीं मारणें तुला उचित नाहीं ३९. हे महापराक्रमी लक्ष्मणा, त्या इंद्रजिताच्याच वधाविषयीं मी आतां यत्न करितों. आतां आपण सर्पतुल्य भयंकर व महावेगवान् अस्त्रांचा प्रयोग करूं ४०. मायावी असल्यामुळें दृष्टोत्पत्तीस न येतां युद्ध करीत असलेला तो हा क्षुद्र राक्षस दृष्टीं पडल्यावर वानरसेनाधिपति स्वपराक्रमानें त्याचा वध करतील ४१; परंतु, हा इंद्रजित् अशारीतीनें अदृश्य राहून भूमि, स्वर्ग,

रसातलं वापि नभस्तलं वा । एवं विगूढोपि ममास्त्रदग्धः पतिष्यते भूमितले गतासुः ४२ इत्येवमुक्त्वा वचनं महार्थं रघुप्रवीरः प्लवगर्षभैर्वृतः । वधाय रौद्रस्य नृशंसकर्मणस्तदा महात्मा त्वरितं निरीक्षते ४३ [३६५१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेशीतितमः सर्गः ॥८०॥

विज्ञाय तु मनस्तस्य राघवस्य महात्मनः । स निवृत्याहवात्तस्मात्प्रविवेश पुरं ततः १ सोनुस्मृत्य वधं तेषां राक्षसानां तरस्विनाम् । क्रोधताम्रेक्षणः शूरो निर्जगामाथ रावणिः २ स पश्चिमेन द्वारेण निर्ययौ राक्षसैर्वृतः । इन्द्रजित्सुमहावीर्यः पौलस्त्यो देवकण्टकः ३ इन्द्रजित्तु ततो दृष्ट्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ । रणायाभ्युद्यतौ वीरौ मायां प्रादुष्करोत्तदा ४ इन्द्रजित्तु रथे स्थाप्य सीतां मायामयीं तदा । बलेन महतावृत्य तस्या वधमरोचयत् ५ मोहनार्थं तु सर्वेषां बुद्धिं कृत्वा सुदुर्मतिः । हन्तुं सीतां व्यवसितो वानराभिमुखो ययौ ६ तं दृष्ट्वा त्वभिनिर्यान्तं सर्वे ते काननौकसः । उत्पेतुरभिसंक्रुद्धाः शिलाहस्ता युयुत्सवः ७ हनूमान्पुरतस्तेषां

---

रसातल आणि आकाश ह्यांपैकीं कोठेंही जरी प्रविष्ट झाला तरी माझ्या अस्त्रानें दग्ध झाल्यामुळें गतप्राण होऊन भूमीवर पडेल"४२. ह्याप्रमाणें गंभीर अर्थानें युक्त असें भाषण लक्ष्मणाशीं केल्यावर वानरश्रेष्ठांनीं परिवेष्टित असलेला तो रघुवीर महात्मा राम त्या दुराचरणी व भयंकर इंद्रजिताचा वध करण्याकरितां सत्वर संधि पाहूं लागला ४३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं ऐशींवा सर्ग समाप्त झाला ॥ ८० ॥

त्या महात्म्या राघवाचा उद्देश जाणून तो इंद्रजित् त्या संग्रामांतून निवृत्त होऊन नगरामध्यें प्रविष्ट झाला १; परंतु, त्या बलाढ्य राक्षसांच्या वधाचें स्मरण झाल्यामुळें क्रोधानें त्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले व तो शूर रावणपुत्र पुनरपि बाहेर पडला २. पुलस्त्यकुलोत्पन्न व देवकंटक असलेला तो महावीर्यवान् इंद्रजित् राक्षसांनीं परिवेष्टित होऊन पश्चिम द्वारानें बाहेर पडला ३ आणि ते भ्राते वीर रामलक्ष्मण संग्रामाकरितां अतिशय उत्सुक झालेले आहेत असें आढळून आल्यावर त्यानें आपली माया प्रकट केली ४. एक मायेची सीता बनवून इंद्रजितानें तिला रथावर स्थापन केली आणि मोठ्या सैन्यानें परिवेष्टित होऊन तिचा वध करण्याचेंही त्यानें मनामध्यें आणिलें ५. सर्वांना मोह पाडण्याचा निश्चय करून तो अतिदुर्बुद्धि इंद्रजित् सीतेचा वध करण्याविषयीं निश्चित होऊन वानरांवर चालून येऊं लागला असतां ६ बाहेर पडणाऱ्या त्या इंद्रजिताला अवलोकन करितांक्षणीं ते सर्वही वानर अतिशय क्रुद्ध

जगाम कपिकुञ्जरः । प्रगृह्य सुमहच्छृङ्गं पर्वतस्य दुरासदम् ८ स ददर्श हतानन्दां सीतामिन्द्रजिता रथे । एकवेणीधरां दीनामुपवासकृशाननाम् ९ परिक्लिष्टैकवसनाममृजां राघवप्रियाम् । रजोमलाभ्यामालिप्तैः सर्वगात्रैर्वरस्त्रियम् १० तां निरीक्ष्य मुहूर्तं तु मैथिलीमध्यवस्य च । बभूवाचिरदृष्टा हि तेन सा जनकात्मजा ११ अब्रवीत्तां तु शोकार्तां निरानन्दां तपस्विनीम् । दृष्ट्वा रथस्थितां दीनां राक्षसेन्द्रसुताश्रिताम् १२ किं समर्थितमस्येति चिन्तयन्स महाकपिः । सह तैर्वानरश्रेष्ठैरभ्यधावत रावणिम् १३ तद्वानरबलं दृष्ट्वा रावणिः क्रोधमूर्च्छितः । कृत्वा विकोशं निस्त्रिंशं मूर्ध्नि सीतामकर्षयत् १४ तां स्त्रियं पश्यतां तेषां ताडयामास राक्षसः । क्रोशन्तीं राम रामेति मायया योजितां रथे १५ गृहीतमूर्धजां दृष्ट्वा हनूमान्दैन्यमागतः । दुःखजं वारि नेत्राभ्यामुत्सृजन्मारुतात्मजः १६ तां दृष्ट्वा चारुस-

---

झाले आणि युद्धाची इच्छा धरून व हातामध्यें पाषाण घेऊन ते संग्रामामध्यें आले ७; आणि राक्षसांना सहन न होणारें असें पर्वताचें फारच मोठें शिखर हातामध्यें घेऊन वानरश्रेष्ठ हनुमान्‌ही त्यांच्या पुढें निघाला ८. व इंद्रजिताच्या रथावर त्यानें ती सीता अवलोकनही केली. तेव्हां तिचा आनंद नाहींसा झाला होता; तिनें आपल्या केसांचा अंबाडा बांधिलेला होता; ती दीन झाली होती; उपवासामुळें तिचें मुखकमलही कोमेजून गेलें होतें ९; एक मलिन वस्त्र तिनें परिधान केलें होतें; तिनें वेणीफणी केलेली नव्हती आणि रजःकण व मळ ह्यांनीं त्या—रामाला प्रिय असलेल्या—उत्कृष्ट स्त्रीचीं सर्व गात्रें भरून गेलीं होतीं १०. असो. एक क्षणभर त्या सीतेकडे पाहिल्यानंतर ती सीताच आहे असा हनुमानाचा निश्चय झाल्यामुळें तो खिन्न झाला. कारण, ती जनककन्या सीता त्याच्या नुकतीच दृष्टीं पडली होती ( व तिच्यामध्यें आणि ह्यानें अवलोकन केलेल्या सीतेमध्यें कांहींएक भेद नव्हता ) ११. आनंदरहित, शोकाकुल व दीन होऊन रथावर स्थित असलेल्या आणि राक्षसाधिपतीच्या पुत्राचा आश्रय केलेल्या त्या बिचाऱ्या सीतेला अवलोकन करून तो तिच्याशीं भाषणही करूं लागला १२. नंतर ह्यानें मनामध्यें आणलें आहे तरी काय असा विचार करीत करीत तो महाकपि हनुमान् त्या वानरश्रेष्ठांसहवर्तमान रावणपुत्र इंद्रजितावर चाल करून गेला १३. तेव्हां तें वानरसैन्य अवलोकन करून क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या रावणपुत्र इंद्रजितानें म्यानांतून तरवार काढिली आणि तिच्या योगानें सीतेच्या मस्तकाला स्पर्श करून त्यानें तिला ओढिलें १४. इतकेंच नव्हे परंतु, मायेनें बनवून रथामध्यें घातलेली ती स्त्री " राम राम " असा आक्रोश करीत असतांना सर्वांच्या समक्ष त्या राक्षसानें तिला ताडणही केलें १५. तेव्हां इंद्रजितानें सीतेचे केश धरिले आहेत असें

दीनां रामस्य महिषीं प्रियाम् । अब्रवीत्परुषं वाक्यं क्रोधाद्रक्षोधिपात्म-
जम् १७ दुरात्मन्नात्मनाशाय केशपक्षे परामृशः १८ ब्रह्मर्षीणां कुले
जातो राक्षसीं योनिमाश्रितः । धिक्त्वां पापसमाचारं यस्य ते मतिरी-
दृशी १९ नृशंसानार्य दुर्वृत्त क्षुद्र पापपराक्रम । अनार्यस्येदृशं कर्म घृणा
ते नास्ति निर्घृण २० च्युता गृहाच्च राज्याच्च रामहस्ताच्च मैथिली । किं
तवैषापराद्धा हि यदेनां हंसि निर्दय २१ सीतां हत्वा तु न चिरं जीवि-
ष्यसि कथंचन । वधार्ह कर्मणा तेन मम हस्तगतो ह्यसि २२ ये च स्त्रीघा-
तिनां लोका लोकवध्यैश्च कुत्सिताः । इह जीवितमुत्सृज्य प्रेत्य तान्प्रति
लप्स्यसे २३ इति ब्रुवाणो हनुमान्सायुधैर्हरिभिर्वृतः । अभ्यधावत्सुसं-
क्रुद्धो राक्षसेन्द्रसुतं प्रति २४ आपतन्तं महावीर्यं तदनीकं वनौकसाम् ।
रक्षसां भीमकोपानामनीकेन न्यवारयत् २५ स तां बाणसहस्रेण विक्षोभ्य

---

अवलोकन करून वायुपुत्र हनुमान् खिन्न झाला; नेत्रांतून दुःखाश्रुही ढाळूं लागला १६
आणि रामाची प्रिय भार्या जी सर्वांगसुंदरी सीता तिला अवलोकन करून राक्षसाधि-
पति रावणाच्या पुत्राला रागारागानें कठोर शब्दांनीं तो म्हणाला १७ " हे दुष्टा,
हिच्या केशांना तूं स्पर्श केला आहेस; परंतु, हा स्पर्श तुझ्या नाशाला कारण
होईल १८. अरे, राक्षसयोनि स्वीकारिलेला तू ब्रह्मर्षींच्या कुलामध्यें उत्पन्न झाला
असूनही ज्याअर्थी तुझी बुद्धि अशी आहे त्याअर्थी तुज दुराचाऱ्याला धिक्कार असो १९.
हे दुष्टा, हे अनार्या, दुर्वृत्ता, हे क्षुद्रा, हे कपटयुद्ध करणाऱ्या इंद्रजिता, अशाप्रकारचें
हें कर्म दुर्जनाचें आहे. हे निर्दया, तुझ्या ठिकाणीं दया नाहीं २०. हे निर्दय, इंद्र-
जिता, घराला व राज्याला मुकून रामाच्याही हातून सुटलेल्या ह्या मिथिलराजकन्या
सीतेनें तुझा काय बरें अपराध केला आहे ? आणि कोणता अपराध हिच्या हातून घड-
ल्यामुळें तूं हिचा वध करण्यास उद्युक्त झाला आहेस ? २१ सीतेचा वध केल्यावर तू फार-
वेळ जिवंत रहाणार नाहींस. कारण, त्या कर्माच्या योगानें तूं वधालाच पात्र होणार आहेस
आणि माझ्या हातामध्येंही सांपडला आहेस २२. ह्यास्तव, जनांच्या हातून वध पावण्यासच
पात्र असलेले जे चोर वगैरेही ज्यांना निंद्य मानितात अशीं स्त्रीघातकीपुरुषांना प्राप्त होणारीं
स्थानें ह्या संग्रामामध्यें प्राणत्याग करून तू गेल्यानंतर तुला प्राप्त होतील " २३.
असें बोलत बोलत तो सायुध वानरांनीं परिवेष्टित असलेला हनुमान् अतिशय क्रुद्ध
होऊन राक्षसाधिपति रावणाच्या पुत्रावर धांवून गेला २४; परंतु; प्रचंड वीर्यानें युक्त
असलेलें तें वानरांचें सैन्य अंगावर चालून येऊं लागलें असतां ज्यांचा कोप भयंकर
आहे अशा राक्षसांच्या सैन्याच्या योगानें इंद्रजितानें त्याचें निवारणही केलें २५.

हरिवाहिनीम् । हनूमन्तं हरिश्रेष्ठमिन्द्रजित्प्रत्युवाच ह २६ सुग्रीवस्त्वं च रामश्च यन्निमित्तमिहागताः । तां वधिष्यामि वैदेहीमद्यैव तव पश्यतः २७ इमां हत्वा ततो रामं लक्ष्मणं त्वां च वानर । सुग्रीवं च वधिष्यामि तं चानार्यं विभीषणम् २८ न हन्तव्याः स्त्रियश्चेति यद्ब्रवीषि प्लवङ्गम । पीडाकरममित्राणां यच्च कर्तव्यमेव तत् २९ तमेवमुक्त्वा रुदतीं सीतां मायामयीं च ताम् । शितधारेण खड्गेन निजघानेन्द्रजित्स्वयम् ३० यज्ञोपवीतमार्गेण छिन्ना तेन तपस्विनी । सा पृथिव्यां पृथुश्रोणी पपात प्रियदर्शना ३१ तामिन्द्रजित्स्त्रियं हत्वा हनूमन्तमुवाच ह । मया रामस्य पश्येमां प्रियां शस्त्रनिषूदिताम् ॥ एषा विशस्ता वैदेही निष्फलो वः परिश्रमः ३२ ततः खड्गेन महता हत्वा तामिन्द्रजित्स्वयम् । हृष्टः स रथमास्थाय ननाद च महास्वनम् ३३ वानराः शुश्रुवुः शब्दमदूरे प्रत्यवस्थिताः । व्यादितास्यस्य नदतस्तद्दुर्गं संश्रितस्य तु ३४ तथा तु सीतां विनिहत्य दुर्मतिः प्रहृष्टचेताः स बभूव रावणिः । तं हृष्टरूपं समुदीक्ष्य वानरा विषण्णरूपाः

---

हजारों बाणांनीं ती वानरसेना जर्जर करून वानरश्रेष्ठ हनुमानाला तो इंद्रजित् ह्मणाला २६ " जिच्याकरितां सुग्रीव, तूं आणि राम असे येथें आलां आहां त्या सीतेचा तुझ्यासमक्ष आजच मी वध करितों २७. हे वानरा, हिचा वध केल्यानंतर राम, लक्ष्मण, तूं, सुग्रीव आणि तो दुर्जन बिभीषण ह्यांचाही मी वध करीन २८. हे वानरा, स्त्रियांचा घात करूं नये असें तूं ह्मणत आहेस खरें; परंतु, शत्रूंना ज्याच्या योगानें पीडा होईल असें कर्म जरी निंद्य असलें तरी सुद्धां तें अवश्य केलेंच पाहिजे " २९. ह्याप्रमाणें त्या हनुमानाला सांगितल्यानंतर त्या इंद्रजितानें स्वतः तीक्ष्ण धारेच्या खड्गानें रोदन करीत असलेल्या त्या मायामयी सीतेचा वध केला ३०. यज्ञोपवीताचें अवलंबन केलेल्या ( ह्मणजे ब्रह्म कुलामध्यें उत्पन्न झालेल्या ) त्या इंद्रजितानें त्या बिचाऱ्या सीतेला तोडून टाकिलें असतां मनोहर मुद्रेनें युक्त असलेली ती सुंदरी पृथ्वीवर पडली ३१. त्या स्त्रीचा वध केल्यानंतर इंद्रजित् हनुमानाला ह्मणाला " पहा, रामाच्या प्रिय भार्येचा मी शस्त्रानें वध केला आहे. सारांश, ह्या सीतेचे तुकडे तुकडे केले आहेत व ह्यामुळें तुझे परिश्रम व्यर्थ झाले आहेत " ३२. तदनंतर मोठ्या खड्गानें इंद्रजितानें स्वतः तिचा वध केला आणि रथावर आरूढ होऊन हर्षयुक्त झालेला तो इंद्रजित् उच्चस्वरानें गर्जनाही करूं लागला ३३. रथरूप किल्याचा आश्रय करून व आ पसरून गर्जना करीत असलेल्या त्या इंद्रजिताचा शब्द समीप असलेल्या वानरांनीं ऐकिला ३४. ह्याप्रमाणें सीतेचा वध

समभिप्रदुद्रुवुः ३५ [३३८३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकाशीतितमः सर्गः ॥ ८१ ॥

श्रुत्वा तं भीमनिर्ह्रादं शक्राशनिसमस्वनम् । वीक्षमाणा दिशः सर्वा दुद्रुवुर्वानरा भृशम् १ तानुवाच ततः सर्वान्हनूमान्मारुतात्मजः । विषण्णवदनान्दीनांस्त्रस्तान्विद्रवतः पृथक् २ कस्माद्विषण्णवदना विद्रवध्वं प्लवङ्गमाः । त्यक्तयुद्धसमुत्साहाः शूरत्वं क नु वो गतम् ३ पृष्ठतो न व्रजध्वं मामग्रतो यान्तमाहवे ४ एवमुक्ताः सुसंक्रुद्धा वायुपुत्रेण धीमता । शैलशृङ्गान्द्रुमांश्चैव जगृहुर्हृष्टमानसाः ५ अभिपेतुश्च गर्जन्तो राक्षसान्वानरर्षभाः । परिवार्य हनूमन्तमन्वयुश्च महाहवे ६ स तैर्वानरमुख्यैस्तु हनूमान्सर्वतो वृतः । हुताशन इवार्चिष्मानदहच्छत्रुवाहिनीम् ७ स राक्षसानां कदनं चकार सुमहाकपिः । वृतो वानरसैन्येन कालान्तकयमोपमः ८ स तु शोकेन चाविष्टः कोपेन महता कपिः । हनूमान्रावणिरथे महतीं

---

करून तो दुर्मति रावणपुत्र अंतःकरणामध्यें आनंदित झाला आणि तो आनंदयुक्त झालेला अवलोकन केल्यावर सर्वही वानर खिन्न होऊन धांवाधांव करूं लागले ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एक्यायशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८१ ॥

इंद्राच्या वज्राप्रमाणें जिचा स्वर आहे अशी ती भयंकर गर्जना श्रवण करून वानर चोहोंकडे पहात पहात अतिशयच पळत सुटले १. तेव्हां खिन्नवदन, दीन व त्रस्त होऊन कोणी कोणाची पर्वा न करितां पळत सुटलेल्या त्या सर्व वानरांना वायुपुत्र हनुमान् ह्मणाला २ "हे वानरहो, खिन्नवदन होऊन व युद्धाचा उत्साह सोडून तुह्मी कशाकरितां पळत आहांत ? अरे, तुमचें तें शौर्य कोणीकडे गेलें ? ३. संग्रामामध्यें मी पुढें असतांना तुह्मी माझ्या मागोमाग कां बरें येत नाहीं ?" ४. ह्याप्रमाणें विचारी वायुपुत्र हनुमान् त्यांना ह्मणाला असतां अतिशयच क्रुद्ध झालेले ते वानर मनामध्यें आनंदित झाले आणि पर्वतशिखरें व वृक्ष हातामध्यें घेऊं लागले ५. वानरश्रेष्ठ गर्जना करीत करीत राक्षसांवर चाल करून गेले व त्या महासंग्रामामध्यें हनुमानाला वेढून टाकून ते त्याच्या मागोमाग चालले ६. ह्याप्रमाणें मुख्य मुख्य वानरांनीं सर्व बाजूंनीं परिवेष्टित झालेल्या त्या हनुमानानें ज्वालायुक्त अग्नीप्रमाणें शत्रुसेना दग्ध करून टाकिली ७. काल, अंतक व यम ह्यांच्याच उपमेस पात्र असलेल्या व वानरसैन्यानें परिवेष्टित झालेल्या त्या अतिप्रचंड वानरानें राक्षसांचा नाश केला ८. शोकानें व अतिशय क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या हनुमान् वानरानें रावणपुत्र इंद्रजिताच्या रथावर

पातयच्छिलाम् ९ तामापतन्तीं दृष्ट्वैव रथं सारथिना तदा । विधेयाश्वसमायुक्तं विदूरमपवाहितः १० तमिन्द्रजितमप्राप्य रथस्थं सहसारथिम् । विवेश धरणीं भित्त्वा सा शिला व्यर्थमुद्यता ११ पतितायां शिलायां तु व्यथिता रक्षसां चमूः । निपतन्त्या च शिलया राक्षसा मथिता भृशम् १२ तमभ्यधावञ्छतशो नदन्तः काननौकसः । ते द्रुमांश्च महाकाया गिरिशृङ्गाणि चोद्यताः ॥ क्षिपन्तीन्द्रजितं सङ्ख्ये वानरा भीमविक्रमाः १३ वृक्षशैलमहावर्षं विसृजन्तः प्लवङ्गमाः । शत्रूणां कदनं चक्रुर्नेदुश्च विविधैः स्वनैः १४ वानरैस्तैर्महाभीमैर्घोररूपा निशाचराः । वीर्यादभिहता वृक्षैर्व्यचेष्टन्त रणक्षितौ १५ स सैन्यमभिवीक्ष्याथ वानरार्दितमिन्द्रजित् । प्रगृहीतायुधः क्रुद्धः परानभिमुखो ययौ १६ स शरौघानवसृजन्स्वसैन्येनाभिसंवृतः । जघान कपिशार्दूलान्सुबहून्दृढविक्रमः १७ शूलैरशनिभिः खड्गैः पट्टिशैः शूलमुद्गरैः । ते चाप्यनुचरांस्तस्य वानरा जघ्नुराहवे १८ सुस्कन्धविटपैः शैलैः शिलाभिश्च महाबलः । हनूमान्कदनं चक्रे रक्षसां भीमकर्मणाम् १९ स निवार्य परानीकमब्रवीत्तान्वनौकसः । हनूमान्संनिवर्तध्वं

---

मोठी शिला फेंकली ९; परंतु, ती शिला येत आहे असें अवलोकन करतांक्षणींच इशाऱ्याप्रमाणें वागणारे अश्व जोडिलेला तो रथ सारथ्यानें दूर नेला १०. ह्यामुळें व्यर्थ उचललेली गेलेली ती शिला सारथ्यासहवर्तमान रथावर असलेल्या इंद्रजितासमीप न येतां भूमि भेदून आंत प्रविष्ट झाली ११. शिला पडल्यानंतर राक्षसांची सेना भयभीत झाली व पडतां पडतां त्या शिलेनेंही राक्षसांचा अतिशय चुराडा केला १२. असो. नंतर शेंकडों वानर गर्जना करीत करीत त्या इंद्रजितावर धांवून गेले आणि युद्धाविषयीं उद्युक्त झालेले ते धिप्पाड व भयंकर पराक्रमी वानर संग्रामामध्यें पर्वतशिखरें इंद्रजितावर फेंकू लागले १३. वृक्षांचा व पर्वतांचा मोठा वर्षाव करीत असलेल्या त्या वानरांनीं शत्रूचा विध्वंस करून नानाप्रकारच्या स्वरांनीं गर्जना केली १४. तेव्हां त्या महाभयंकर वानरांनीं स्वसामर्थ्यानें वृक्षांच्या योगानें त्या घोर राक्षसांना ताडण केलें असतां ते राक्षस रणभूमीवर तडफडूं लागले १५. ह्याप्रमाणें वानरांनीं त्रस्त करून सोडिलेलें आपलें सैन्य अवलोकन केल्यावर इंद्रजित् क्रुद्ध झाला आणि हातामध्यें आयुधें घेऊन शत्रूंचे संमुख चालला १६. स्वतःच्या सैन्यानें परिवेष्टित असलेल्या त्या महापराक्रमी इंद्रजितानें बाणसमुदायाचा वर्षाव करीत करीत असंख्य वानरश्रेष्ठांचा वध केला १७. त्या वानरांनीं संग्रामामध्यें शूल, खड्ग, पट्ट, मुद्गर व अशनि ह्या आयुधांच्या योगानें त्याच्या अनुयायांचाही वध केला १८. महाबलाढ्य हनूमानानें भयंकर कर्म करणाऱ्या राक्षसांचा शिला, पर्वत व

न नः साध्यमिदं बलम् २० त्यक्त्वा प्राणान्विचेष्टन्तो रामप्रियचिकीर्षवः। यन्निमित्तं हि युध्यामो हता सा जनकात्मजा २१ इममर्थं हि विज्ञाप्य रामं सुग्रीवमेव च। तौ यत्प्रतिविधास्येते तत्करिष्यामहे वयम् २२ इत्युक्त्वा वानरश्रेष्ठो वारयन्सर्ववानरान्। शनैःशनैरसंत्रस्तः सबलः संन्यवर्तत २३ ततः प्रेक्ष्य हनूमन्तं व्रजन्तं यत्र राघवः। स होतुकामो दुष्टात्मा गतश्चैत्यं निकुम्भिलाम् २४ निकुम्भिलामधिष्ठाय पावकं जुहवेन्द्रजित् २५ यज्ञभूम्यां ततो गत्वा पावकस्तेन रक्षसा। हूयमानः प्रजज्वाल होमशोणितभुक्तदा २६ सार्चिः पिनद्धो ददृशे होमशोणिततर्पितः। संध्यागत इवादित्यः सुतीव्रोऽग्निः समुत्थितः २७ अथेन्द्रजिद्राक्षसभूतये तु जुहाव हव्यं विधिना विधानवित्। दृष्ट्वा व्यतिष्ठन्त च राक्षसास्ते महासमूहेषु नयानयज्ञाः २८ [ ३७१४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्व्यशीतितमः सर्गः ॥ ८२ ॥

राघवश्चापि विपुलं तं राक्षसवनौकसाम्। श्रुत्वा संग्रामनिर्घोषं

---

उत्कृष्ट स्कंद आणि खांद्या ह्यांनीं युक्त असलेले वृक्ष ह्यांच्या योगानें नाश केला १९. नंतर शत्रुसैन्याचें निवारण करून त्या वानरांना हनुमान् ह्मणाला " तुह्मी परत फिरा, आपल्या हातून ह्या सैन्याचा पराजय होणें शक्य नाहीं २०. कारण, जिवाचीही पर्वा न करितां रामाचें प्रिय करण्याचा उद्देश धरून जिच्याकरितां आपण युद्ध करीत आहों त्या जनककन्येचा वध झाला २१. हा वृत्तांत रामाला व सुग्रीवाला कळविल्यानंतर ते जें सांगतील तें आपण करूं " २२. सर्व वानरांना युद्धापासून परावृत्त करण्याकरितां वानरश्रेष्ठ हनुमानानें असें सांगितलें आणि हळू हळू सैन्यासहवर्तमान तो परत फिरला २३. तदनंतर रामाकडे हनुमान् जात असल्याचें पाहून तो दुरात्मा इंद्रजित् होम करण्याकरितां निकुंभिलासंज्ञक देवालयामध्यें गेला २४; आणि निकुंभिलेमध्यें जाऊन त्या इंद्रजितानें अग्नीमध्यें होम केला २५. असो. यज्ञभूमीमध्यें जाऊन तो राक्षस अग्नीमध्यें होम करूं लागला असतां होमाकरितां आंत फेंकिलेलें रक्त सेवन करणारा अग्नि प्रज्वलित झाला २६ आणि होमसंबंधीं रक्तानें तृप्त झाल्यामुळें अतिशय तीव्र झालेला अग्नि ज्वालांनीं समृद्ध झाला असतां संध्याकाळच्या सूर्याप्रमाणें दिसूं लागला २७. नंतर राक्षसांच्या अभ्युदयाकरितां विधानवेत्त्या इंद्रजितानें हविर्द्रव्याचें यथाविधि हवन केल्याचें पाहून महायुद्धामध्यें कर्तव्याकर्तव्य जाणणारे राक्षस युद्धाकरितां सज्ज झाले २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं ब्यायशींवा सर्ग समाप्त झाला ॥ ८२ ॥

जाम्बवन्तमुवाच ह १ सौम्य नूनं हनुमता कृतं कर्म सुदुष्करम्। श्रूयते च
यथा भीमः सुमहानायुधस्वनः २ तद्गच्छ कुरु साहाय्यं स्वबलेनाभिसं-
वृतः। क्षिप्रमृक्षपते तस्य कपिश्रेष्ठस्य युध्यतः ३ ऋक्षराजस्तथेत्युक्त्वा
स्वेनानीकेन संवृतः। आगच्छत्पश्चिमं द्वारं हनूमान्यत्र वानरः ४ अथा-
यान्तं हनूमन्तं ददर्शर्क्षपतिस्तदा। वानरैः कृतसङ्ग्रामैः श्वसद्भिरभिसंवृ-
तम् ५ दृष्ट्वा पथि हनूमांश्च तदृक्षबलमुद्यतम्। नीलमेघनिभं भीमं संनि-
वार्य न्यवर्तत ६ स तेन सह सैन्येन संनिकर्षं महायशाः। शीघ्रमागम्य
रामाय दुःखितो वाक्यमब्रवीत् ७ समरे युध्यमानानामस्माकं प्रेक्षतां च
सः। जघान रुदतीं सीतामिन्द्रजिद्रावणात्मजः ८ उद्भ्रान्तचित्तस्तां दृष्ट्वा
विषण्णोहमरिन्दम। तदहं भवतो वृत्तं विज्ञापयितुमागतः ९ तस्य तद्वचनं
श्रुत्वा राघवः शोकमूर्च्छितः। निपपात तदा भूमौ छिन्नमूल इव द्रुमः १०
तं भूमौ देवसंकाशं पतितं दृश्य राघवम्। अभिपेतुः समुत्पत्य सर्वतः
कपिसत्तमाः ११ आसिञ्चन्सलिलैश्चैनं पद्मोत्पलसुगन्धिभिः। प्रदहन्तम-

राक्षस व वानर ह्यांचा तो प्रचंड युद्धघोष श्रवण करून राम जांबवानाला ह्मणाला १ "हे सौम्या, ज्याअर्थी आयुधांचा फारच मोठा ध्वनि कानावर येत आहे त्याअर्थी हनुमानानें खरोखर मोठें दुर्घट कर्म केलें आहे २. तस्मात्, हे ऋक्षाधिपते, तूं आपलें सैन्य बरोबर घे आणि युद्ध करणाऱ्या त्या वानरश्रेष्ठ हनुमानाला साहाय्य कर" ३. ह्यावर "ठीक आहे" असें ह्मणून ऋक्षराज जांबवानानें आपलें सैन्य बरोबर घेतलें आणि जेथें हनुमान् वानर उभा होता त्या पश्चिमद्वाराकडे तो चालता झाला ४. नंतर संग्राम केलेल्या आणि ह्मणूनच धापा टाकीत असलेल्या वानरांनीं परिवेष्टित असलेला हनुमान् येत आहे असें ऋक्षराज जांबवानानें अवलोकन केलें ५. तेव्हां नीलमेघासारिखी ज्याची कांति आहे असें तें युद्धाकरितां सज्ज झालेलें भयंकर ऋक्ष-सैन्य मार्गामध्यें दृष्टीं पडलें असतां युद्धापासून त्याला परावृत्त करून हनुमानूही परत फिरला ६; आणि तो महाकीर्तिमान् हनुमान् त्या सैन्यासहवर्तमान रामासमीप आला व दुःखित होऊन ह्मणाला ७ "संग्रामामध्यें युद्ध करणाऱ्या आमच्या समक्ष रावणपुत्र इंद्रजितानें रुदन करीत असलेल्या सीतेचा वध केला ८. हे शत्रुदमना, त्या सीतेला अवलोकन करून माझें चित्त गोंधळून गेलें असून मी फारच खिन्न झालों आहें आणि तें वृत्त आपणांला कळविण्याकरितां मी येथें आलों आहें" ९. तें हनुमानाचें भाषण श्रवण करितांक्षणीं राम शोकाकुल झाला व मुळें तुटलेल्या वृक्षाप्रमाणें भूमीवर पडला १०. तो देवतुल्य राम भूमीवर पडलेला अवलोकन करून वानरश्रेष्ठ सर्व बाजूनीं

संहार्यं सहसाग्निमिवोत्थितम् १२ तं लक्ष्मणोथ बाहुभ्यां परिष्वज्य सुदुःखितः। उवाच राममस्वस्थं वाक्यं हेत्वर्थसंयुतम् १३ शुभे वर्त्मनि तिष्ठन्तं त्वामार्य विजितेन्द्रियम्। अनर्थेभ्यो न शक्नोति त्रातुं धर्मो निरर्थकः १४ भूतानां स्थावराणां च जङ्गमानां च दर्शनम्। यथास्ति न तथा धर्मस्तेन नास्तीति मे मतिः १५ यथैव स्थावरं व्यक्तं जङ्गमं च तथाविधम्। नायमर्थस्तथा युक्तस्त्वद्विधो न विपद्यते १६ यद्यधर्मो भवेद्भूतो रावणो नरकं व्रजेत्। भवांश्च धर्मसंयुक्तो नैव व्यसनमाप्नुयात् १७ तस्य च व्यसनाभावाद्व्यसनं चागते त्वयि। धर्मो भवत्यधर्मश्च परस्परविरोधिनौ १८ धर्मेणोपलभेद्धर्ममधर्मं चाप्यधर्मतः। यद्यधर्मेण युज्येयुर्येष्वधर्मः प्रतिष्ठितः १९ न धर्मेण वियुज्येरन्नाधर्मरुचयो जनाः। धर्मेणाचरतां तेषां तथा

---

त्याच्या समीप आले ११ आणि एकाएकीं प्रज्वलित झालेल्या व अनिवार्य वेगानें युक्त असून दग्ध करीत असलेल्या अग्नीवर ज्याप्रमाणें उदक सिंचन करितात त्याप्रमाणें नानाप्रकारच्या कमलांनीं सुगंधित झालेलें उदक त्यांनीं त्याच्यावर सिंचन केलें १२. नंतर अत्यंत दुःखित झालेल्या लक्ष्मणानेंही त्याला हातांनीं कवटाळून धरिलें आणि हेतु व अर्थ ह्यांनीं युक्त असलेलें भाषण तो अस्वस्थ झालेल्या रामाशीं करूं लागला १३. ( तो ह्मणाला ) " हे सज्जना, तूं जितेंद्रिय असून सन्मार्गानें वागत असतांना ज्या-अर्थीं धर्म अनर्थांपासून तुझें रक्षण करण्यास समर्थ होत नाहीं त्याअर्थीं तो निरर्थक आहे १४. चराचर प्राण्यांना ज्याप्रमाणें प्रत्यक्ष सुख अनुभवाला येत असतें त्याप्रमाणें धर्म सुखाचें साधन आहे असें अनुभवाला येत नाहीं. तस्मात्, धर्म हा नाहींच असें मला वाटतें १५ सारांश, ज्याप्रमाणें धर्माचें अवलंबन केल्याशिवायही वृक्षादि स्थावर व पशुपक्ष्यादि जंगम प्राणी सुखी असल्याचें स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येत असतें त्याप्रमाणें हा धर्म सुखाचें साधन असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. कारण, धर्म जर सुखाचें साधन असेल तर तुझ्यासारिख्या धार्मिक पुरुषाला विपत्ति प्राप्त होऊ नये १६. अधर्म जर दुःखसाधन असल्याचें सिद्ध असतें तर रावण नरकांत पडला असतां व तुज धर्मनिष्ठाला संकट प्राप्त झालें नसतें १७. तस्मात्, ज्याअर्थीं त्या रावणाला संकट नसून तूं विपत्तीमध्यें सांपडला आहेस त्याअर्थीं धर्म हें दुःखाचें साधन असून अधर्म हें सुखाचें साधन आहे असें ठरतें. १८. धर्माच्या योगानें सुख प्राप्त व्हावयाचें आणि अधर्माच्या योगानें दुःख प्राप्त व्हावयाचें असा जर नियम असता तर ज्यांचे ठिकाणीं अधर्म खिळून गेलेला आहे त्यांना दुःख प्राप्त झालें असतें १९; आणि ज्यांची अधर्माकडे रुचि नाहीं त्यांना सुखाचा वियोग झाला नसता.

धर्मफलं भवेत् २० यस्मादर्था विवर्धन्ते येष्वधर्मः प्रतिष्ठितः । क्लिश्यन्ते धर्मशीलाश्च तस्मादेतौ निरर्थकौ २१ वध्यन्ते पापकर्माणो यद्यधर्मेण राघव । वधकर्महतो धर्मः स हतः कं वधिष्यति २२ अथवा विहितेनायं हन्यते हन्ति चापरम् । विधिः स लिप्यते तेन न स पापेन कर्मणा २३ अदृष्टप्रतिकारेण अव्यक्तेनासता सता । कथं शक्यं परं प्राप्तुं धर्मेणारिविकर्षण २४ यदि सत्स्यात्सतां मुख्य नासत्स्यात्तव किंचन । त्वया यदीदृशं प्राप्तं तस्मात्तन्नोपपद्यते २५ अथवा दुर्बलः क्लीबो बलं धर्मोनुवर्तते । दुर्बलो हृतमर्यादो न सेव्य इति मे मतिः २६ बलस्य यदि चेद्धर्मो गुणभूतः पराक्रमैः । धर्ममुत्सृज्य वर्तस्व यथा धर्मे तथा बले २७ अथ चेत्सत्यवचनं धर्मः किल परन्तप । अनृतं त्वय्यकरुणे किं न बद्धस्त्वया

---

धर्मानें वागणाऱ्या त्यांना धर्मफल जें सुख तेंच प्राप्त झालें असतें २०. ज्याअर्थी अधर्मनिष्ठ पुरुषांची संपत्ति वृद्धिंगत होत आहे आणि धर्मशील पुरुषांना क्लेश होत आहे त्याअर्थी धर्म सुखाचें साधन व अधर्म दुःखाचें साधन हें व्यर्थ आहे. २१. हे रामा, अधर्माच्या योगानें पापकर्मी पुरुषांचा जर वध होत असेल तर वधकर्मामुळेंच खर्ची पडलेला जो धर्म तो नष्ट झाला असतां कोणाचा वध करण्यास समर्थ होईल? २२. दुसऱ्यानें केलेल्या विहित कर्माच्या योगानें जर ह्या पुरुषाचा वध होत असेल अथवा विहित असलेल्या अभिचार कर्माच्या योगानें हा जर दुसऱ्याचा वध करीत असेल तर पापकर्मानें तो विधि लिप्त होईल; विहित कर्म करणाऱ्या पुरुषाला पातक लागणार नाहीं २३. हे शत्रुनाशका, शत्रूचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य ज्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत नाहीं असा जो अदृश्य व विद्यमान असतांनाही नसल्यासारिखा धर्म त्याचा वध्य जो शत्रु त्याच्या स्वरूपाशीं गांठ पडण्याचा संभव तरी कसा ? २४. हे सज्जनश्रेष्ठ, सत्कर्मजन्य अदृष्ट फल जर खरें असतें तर तुला कांहींएक दुःख प्राप्त झालें नसतें; परंतु, ज्याअर्थी अशा प्रकारचें दुःख तुला प्राप्त झालें आहे त्याअर्थी धर्माचें फल संभवत नाहीं ५. अथवा दुर्बल आणि क्लीब असलेल्या ह्या धर्माला जर पुरुषप्रयत्नाची अपेक्षा असेल तर दुर्बल आणि अमर्याद असलेल्या ह्या धर्माचें आचरण करूं नये असें मला वाटतें २६. पुरुषप्रयत्न मुख्य असून जर धर्म गौण असेल तर प्रयत्नपूर्वक धर्माचा त्याग करून तूं सांप्रत ज्याप्रमाणें धर्माचें अवलंबन करीत आहेस त्याप्रमाणें पुरुषप्रयत्नाचेंच अवलंबन कर २७. हे शत्रुतापना, सत्यवचन हा जर खरोखर धर्म असेल तर तुला अभिषेक करावयाचा असें राजानें सांगितलें असतांनाही तो न झाल्यामुळें राजाला जो असत्य दोष प्राप्त

विना २८ यदि धर्मो भवेद्भूत अधर्मो वा परन्तप । न स्म हत्वा मुनिं वज्री कुर्यादिज्यां शतक्रतुः २९ अधर्मसंश्रितो धर्मो विनाशयति राघव। सर्वमेतद्यथाकामं काकुत्स्थ कुरुते नरः ३० मम चेदं मतं तात धर्मो-ऽयमिति राघव। धर्ममूलं त्वया छिन्नं राज्यमुत्सृजता तदा ३१ अर्थे-भ्योथ प्रवृद्धेभ्यः संवृत्तेभ्यस्ततस्ततः। क्रियाः सर्वाः प्रवर्तन्ते पर्वतेभ्य इवापगाः ३२ अर्थेन हि विमुक्तस्य पुरुषस्याल्पचेतसः। विच्छिद्यन्ते क्रियाः सर्वा ग्रीष्मे कुसरितो यथा ३३ सोयमर्थं परित्यज्य सुखकामः सुखैधितः। पापमाचरते कर्तुं तदा दोषः प्रवर्तते ३४ यस्यार्थास्तस्य

---

झाला त्या दोषाच्या योगानें तो मृत झाला. तस्मात्, तुला अभिषेक करावयाचा ह्मणून जें राजानें भाषण केलें होतें तें परिपालन करणें एतद्रूप जें सत्य त्या सत्याच्या योगानें तूं बद्ध कसा बरें होत नाहींस ? ( सारांश, रामाला अभिषेक करावयाचा हें जें भाषण राजाच्या मुखांतून प्रथम निघून गेलें तें तूं सत्य करून दाखविलें नाहींस. तें राजाचें वचन जर तूं शेवटास नेलें असतेंस तर तुझा वियोग होण्याचा प्रसग आला नसता आणि अर्थातूच राजाला मृत्युही प्राप्त झाला नसता ) २८. हे शत्रुतापना, धर्म अथवा धर्माहून अन्य असलेला पुरुषप्रयत्न जर मुख्य असता तर विश्वरूपसंज्ञक ब्राह्मणाचा वध करून वज्रपाणि इंद्राला अश्वमेधरूप धर्म करण्याचें कारण पडलें नसतें. ( तात्पर्य, धर्मच जर मुख्य असता तर इंद्रानें नुसता यागच केला असता आणि पुरुषप्रयत्न जर मुख्य असता तर इंद्रानें फक्त त्याचेंच अवलंबन केलें असतें; परंतु, इंद्रानें विश्वरूपाचा वध करून ज्याअर्थी यागरूप धर्माचें अवलंबन केलें आहे त्याअर्थी धर्मही श्रेष्ठ मानितां येत नाहीं आणि पुरुषप्रयत्नही श्रेष्ठ ह्मणतां येत नाहीं ) २९. हे रामा, पुरुषप्रयत्नानें युक्त असलेला धर्म शत्रूचा नाश करीत असतो आणि ह्मणूनच, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, धर्म व पुरुषप्रयत्न ह्या दोहों-चेंही आपआपल्या कार्याच्या अनुरोधानें लोक अवलंबन करीत असतात ३०. बा रामा, देशकालाकडे दृष्टि देऊन दोहोंचेंही पुरुषानें अवलंबन करावें असें माझें मत आहे आणि हाच धर्म आहे; परंतु, अर्थमूलक राज्याचा तूं त्याग केल्यामुळें धर्माचें मूलच तोडून टाकिलें आहेस ३१. कारण, पर्वतापासून ज्याप्रमाणें नद्या प्रवृत्त होतात त्याप्रमाणें अनेक देशांहून आणिलेल्या व वृद्धिंगत झालेल्या अर्थाच्या योगानें सर्व कर्में सुरू होत असतात ३२; आणि ग्रीष्मऋतूमध्यें बारीकसारीक नद्या ज्याप्रमाणें आटून जातात त्याप्रमाणें द्रव्यहीन असलेल्या मंदमति पुरुषाचीं सर्व कर्में विच्छिन्न होतात ३३. प्राप्त झालेल्या अर्थाचा त्याग करून जो

मित्राणि यस्यार्थास्तस्य बान्धवाः । यस्यार्थाः स पुमाँल्लोके यस्यार्थाः स च पण्डितः ३५ यस्यार्थाः स च विक्रान्तो यस्यार्थाः स च बुद्धिमान् । यस्यार्थाः स महाबाहुर्यस्यार्थाः स गुणाधिकः ३६ अर्थस्यैते परित्यागे दोषाः प्रव्याहृता मया । राज्यमुत्सृजता धीर येन बुद्धिस्त्वया कृता ३७ यस्यार्था धर्मकामार्थास्तस्य सर्वं प्रदक्षिणम् । अधनेनार्थकामेन नार्थः शक्यं विचिन्वता ३८ हर्षः कामश्च दर्पश्च धर्मः क्रोधः शमो दमः । अर्थादेतानि सर्वाणि प्रवर्तन्ते नराधिप ३९ येषां नश्यत्ययं लोकश्चरतां धर्मचारिणाम् । तेऽर्थास्त्वयि न दृश्यन्ते दुर्दिनेषु यथा ग्रहाः ४० त्वयि प्रव्रजिते वीर गुरोश्च वचने स्थिते । रक्षसापहृता भार्या प्राणैः प्रियतरा तव ४१ तदद्य विपुलं वीर दुःखमिन्द्रजिता कृतम् । कर्मणा व्यपनेष्यामि

---

पुरुष सुखाची इच्छा करूं लागतो तो अर्थापासून भ्रष्ट होतो आणि त्याचा सुखविषयक अभिलाष वृद्धिंगत होऊन तो अन्यायानें द्रव्य संपादन करण्यास आरंभ करितो व त्यामुळें त्याला ताडन, बंधन इत्यादि संकटें प्राप्त होतात ३४. अरे, ज्याच्यापाशीं द्रव्य असतें त्यालाच मित्र असतात; ज्याच्यापाशीं वित्त असतें त्यालाच बांधव असतात; अरे, ज्याच्यापाशीं संपत्ति असेल तोच जगतांतील खरा पुरुष होय आणि ज्याच्यापाशीं ऐश्वर्य असेल तोच पंडित होय ३५. त्याचप्रमाणें ज्याच्यापाशीं लक्ष्मी असेल त्यालाच लोक पराक्रमी असें ह्मणतात; ज्याच्यापाशीं धन असेल त्याचीच बुद्धिमानांमध्यें गणना होत असते; ज्याच्यापाशीं अर्थ असेल तोच आजानुबाहु ठरला जातो आणि ज्याच्यापाशीं दोन पैसे असतील तोच इतरांपेक्षां गुणांनीं अधिक ह्मणून समजला जातो ३६. अर्थाचा त्याग केला असतां कोणते अनर्थ गुदरतात तें मीं तुला स्पष्ट सांगितलें आहे; आणि ह्मणूनच, हे ज्ञानसंपन्न रामा, कोणता लाभ मनामध्यें आणून तूं राज्याचा त्याग करण्याचा विचार केलास तो माझ्या लक्ष्यांत येत नाहीं ३७. ज्याच्यापाशीं द्रव्य असेल त्याचेच धर्म, अर्थ व काम हे पुरुषार्थ सिद्धीस जातात; सर्वकांहीं त्याला अनुकूल असतें व द्रव्येच्छु दरिद्री पुरुष द्रव्यसंपादनाच्या उद्योगाला लागला असतांनाही पुरुषप्रयत्नाशिवाय त्याला द्रव्यप्राप्ति होणें शक्य नसतें ३८. हे प्रजाधिपते, हर्ष, काम, दर्प, धर्म, क्रोध, शम व दम ह्या सर्वांची प्रवृत्ति द्रव्यामुळेंच होत असते ३९. आकाश मेघमंडलानें आच्छादित झालें असतां ज्याप्रमाणें ग्रह दिसेनासे होतात त्याप्रमाणें ज्याचा अभाव झाला असतां धर्मनिष्ठ तपस्वी लोकही ऐहिक पुरुषार्थापासून भ्रष्ट होतात तें द्रव्य तुझ्या ठिकाणीं नाहीं ४०. हे वीरा, पित्याच्या वचनाप्रमाणें वागण्याचा निश्चय करून तूं अरण्यामध्यें चालता झालास ह्यामुळें प्राणाहूनही प्रिय अशी

तस्मादुत्तिष्ठ राघव ४२ उत्तिष्ठ नरशार्दूल दीर्घबाहो धृतव्रत । किमात्मानं महात्मानमात्मानं नावबुध्यसे ४३ अयमनघ तवोदितः प्रियार्थं जनकसुतानिधनं निरीक्ष्य रुष्टः । सरथगजहयां सराक्षसेन्द्रां भृशमिषुभिर्विनिपातयामि लङ्काम् ४४ [३७५८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्र्यशीतितमः सर्गः ॥ ८३ ॥

राममाश्वासयमाने तु लक्ष्मणे भ्रातृवत्सले । निक्षिप्य गुल्मान्स्वस्थाने तत्रागच्छद्विभीषणः १ नानाप्रहरणैर्वीरैश्चतुर्भिरभिसंवृतः । नीलाञ्जनचयाकारैर्मातङ्गैरिव यूथपैः २ सोऽभिगम्य महात्मानं राघवं शोकलालसम् । वानरांश्चापि ददृशे बाष्पपर्याकुलेक्षणान् ३ राघवं च महात्मानमिक्ष्वाकुकुलनन्दनम् । ददर्श मोहमापन्नं लक्ष्मणस्याङ्कमाश्रितम् ४ व्रीडितं शोकसंतप्तं दृष्ट्वा रामं विभीषणः । अन्तर्दुःखेन दीनात्मा किमेतदिति सोऽब्रवीत् ५ विभीषणमुखं दृष्ट्वा सुग्रीवं तांश्च वानरान् । लक्ष्मणोवाच

---

तुझी भार्या राक्षसानें हरण करून नेली ४१. असो. हे वीरा, इंद्रजितानें आज आपणांला अतिशयच दुःख दिलें आहे. हें दुःख मी पुरुषप्रयत्नानेंच नाहींसें करीन. ह्यास्तव, हे राघवा, ( मला प्रोत्साहन देण्याकरितां ) तूं ऊठ ४२. हे पुरुषश्रेष्ठा, हे महापराक्रमी व्रतस्थ रामा, ऊठ तूं स्वतः परमात्मा आहेस हें विसरला आहेस काय ? ४३. हे निष्पाप रामा, जनककन्या सीतेला मृत्यु प्राप्त झाला हें अवलोकन करून रुष्ट झालेला व तुझें प्रिय करण्याकरितां तत्पर असलेला मी हा लक्ष्मण रथ, गज, अश्व आणि राक्षसाधिपति ह्यांसहित लंकेचा अगदीं निःपात करून टाकितों" ४४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं त्र्यायशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८३ ॥

ह्याप्रमाणें भ्रातृवत्सल लक्ष्मण रामाला धीर देऊं लागला असतां सेना जेथें असावयाची तेथें ठेवून बिभीषण तेथें आला १. नानाप्रकारचीं आयुधें घेतलेले चार वीर त्याच्या बरोबर होते व कज्जलाच्या पर्वताप्रमाणें त्यांचे देह असल्यामुळें मोठ्या मोठ्या गजांप्रमाणें ते दिसत होते. २. शोकाकुल झालेल्या महात्म्या रामासमीप गेल्यानंतर अश्रूंनीं ज्यांचे नेत्र भरून आलले आहेत असे वानरही त्या बिभीषणाच्या दृष्टीं पडले ३; व इक्ष्वाकुकुलाला आनंद देणारा महात्मा राम लक्ष्मणाच्या अंकावर मस्तक ठेवून मूर्च्छित झाला आहे असेंही त्यानें अवलोकन केलें ४. लज्जित व शोकाकुल झालेल्या रामाला अवलोकन करून अंतःस्थ दुःखानें खिन्न झालेल्या त्या बिभीषणानें हें काय असें विचारिलें असतां ५ बिभीषणाच्या दीन मुखाकडे, सुग्रीवाकडे आणि त्या

मन्दार्थमिदं बाष्पपरिप्लुतः ६ हता इन्द्रजिता सीता इति श्रुत्वैव राघवः । हनूमद्वचनात्सौम्य ततो मोहमुपाश्रितः ७ कथयन्तं तु सौमित्रिं संनिवार्य बिभीषणः । पुष्कलार्थमिदं वाक्यं विसंज्ञं राममब्रवीत् ८ मनुजेन्द्रार्तरूपेण यदुक्तस्त्वं हनूमता । तदयुक्तमहं मन्ये सागरस्येव शोषणम् ९ अभिप्रायं तु जानामि रावणस्य दुरात्मनः । सीतां प्रति महाबाहो न च घातं करिष्यति १० याच्यमानः सुबहुशो मया हितचिकीर्षुणा । वैदेहीमुत्सृजस्वेति न च तत्कृतवान्वचः ११ नैव साम्ना न दानेन न भेदेन कुतो युधा । सा द्रष्टुमपि शक्येत नैव चान्येन केनचित् १२ वानरान्मोहयित्वा तु प्रतियातः स राक्षसः । मायामयीं महाबाहो तां विद्धि जनकात्मजाम् १३ चैत्यं निकुम्भिलामद्य प्राप्य होमं करिष्यति । हुतवानुपयातो हि देवैरपि सवासवैः १४ दुराधर्षो भवत्येष सङ्ग्रामे रावणात्मजः । तेन मोहयता नूनमेषा माया प्रयोजिता ॥ विघ्नमन्विच्छता तत्र वानराणां पराक्रमे १५ ससैन्यास्तत्र गच्छामो यावत्तन्न समाप्यते १६

---

वानरांकडे पाहून अश्रूंनीं भरून गेलेला लक्ष्मण अल्प अर्थानें युक्त असें भाषण करूं लागला ६. ( तो ह्मणाला ) " हे सौम्या बिभीषणा, इंद्रजितानें सीतेचा वध केला हें हनुमानाच्या सांगण्यावरून ऐकतांक्षणीं राम मूर्च्छा येऊन पडला आहे " ७. ह्याप्रमाणें लक्ष्मण सांगूं लागला असतां त्याला स्वस्थ बसवून बिभीषण ज्यांत बराचसा अर्थ आहे असें भाषण मूर्च्छित झालेल्या रामाशीं करूं लागला ८. ( तो ह्मणाला ) " हे प्रजाधिपते, शोकाकुल झालेल्या हनुमानानें जें तुला सांगितलें तें समुद्राच्या शोषणाप्रमाणें अशक्य आहे असें मला वाटतें ९. हे महापराक्रमी रामा, दुरात्म्या रावणाचा उद्देश मी जाणून आहें; सीतेचा तो घात करणार नाहीं १०. त्याचें हित व्हावें ह्या बुद्धीनें मीं " सीतेला सोडून दे " असें वारंवार मागणें मागितलें असतांही त्यानें तें माझें ह्मणणें मान्य केलें नाहीं ११. साम, दान आणि भेद ह्यांपैकीं कोणत्याही उपायानें सीता कोणालाही नुसती दृष्टीं पडणेंसुद्धां शक्य नाहीं, मग युद्धामुळें ती दुसऱ्याच्या कोठून दृष्टीं पडणार ? १२. हे महापराक्रमी रामा, वानरांना मोह पाडून तो राक्षस चालता झालेला आहे. ती जनककन्या खरी नसून मायामयी आहे असें तूं समज १३. निकुंभिलासंज्ञक देवालयामध्यें जाऊन आज हा होम करील. त्यानें होम केल्यानंतर इंद्रासहवर्तमान देव जरी त्याच्याशीं युद्धाला आले तरी हा रावणपुत्र संग्रामामध्यें त्यांना हार जाणार नाहीं. वानरांच्या पराक्रमाला अडथळा यावा एतदर्थ त्यांना मोह पाडण्याच्या उद्देशानें ह्यानें खरोखर ही माया

त्यजैनं नरशार्दूल मिथ्या संतापमागतम् । सीदते हि बलं सर्वं दृष्ट्वा त्वां शोककर्शितम् १७ इह त्वं स्वस्थहृदयस्तिष्ठ सत्त्वसमुच्छ्रितः । लक्ष्मणं प्रेषयास्माभिः सह सैन्यानुकर्षिभिः १८ एष तं नरशार्दूलो रावणिं निशितैः शरैः । त्याजयिष्यति तत्कर्म ततो वध्यो भविष्यति १९ तस्यैते निशितास्तीक्ष्णाः पत्रिपत्राङ्गवाजिनः । पतत्रिण इवासौम्याः शराः पास्यन्ति शोणितम् २० तत्संदिश महाबाहो लक्ष्मणं शुभलक्षणम् । राक्षसस्य विनाशाय वज्रं वज्रधरो यथा २१ मनुजवर न कालविप्रकर्षो रिपुनिधनं प्रति यत्क्षमोद्य कर्तुम् । त्वमतिसृज रिपोर्वधाय वज्रं दिविजरिपुमथने यथा महेन्द्रः २२ समाप्तकर्मा हि स राक्षसर्षभो भवत्यदृश्यः समरे सुरासुरैः । युयुत्सता तेन समाप्तकर्मणा भवेत्सुराणामपि संशयो महान् २३ [ ३७८१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुरशीतितमः सर्गः ॥ ८४ ॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा राघवः शोककर्शितः । नोपधारयते व्यक्तं यदुक्तं

---

योजिली आहे. ह्यास्तव, त्याचें तें होमकर्म समाप्त होण्यापूर्वींच आपण सैन्यासहवर्तमान तेथें जाऊं १४,१५,१६. हे पुरुषश्रेष्ठा, विनाकारण प्राप्त झालेला हा खेद तूं सोडून दे. तूं शोकाकुल झाला आहेस असें दृष्टीं पडतांक्षणीं सर्वही सैन्याचा धीर खचून जाईल १७. ह्यास्तव, तूं धीर धरून स्वस्थ मनानें येथें उभा रहा आणि सर्व सेना घेऊन जाणाऱ्या आह्मांबरोबर तूं लक्ष्मणाला पाठीव १८. हा पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण तीक्ष्ण बाणांच्या योगानें रावणपुत्र इंद्रजिताला त्या कर्माचा त्याग करावयास लावील आणि नंतर तो इंद्रजित् वध्य होईल १९. पक्षिपिच्छरूप अंगांनीं युक्त असल्यामुळें वेगवान् असलेले त्या लक्ष्मणानें धार लाविलेले तीक्ष्ण बाण क्रूर पक्ष्याप्रमाणें रक्त प्राशन करितील २०. तस्मात्, हे महापराक्रमी रामा, वज्रपाणि इंद्र ज्याप्रमाणें वज्र पाठवितो त्याप्रमाणें राक्षसांच्या नाशाकरितां तूं शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या लक्ष्मणाला पाठीव २१. हे पुरुषश्रेष्ठा, शत्रूचा वध करण्यास ज्याअर्थीं आज विलंब लावणें योग्य नव्हे त्याअर्थीं देवशत्रूंच्या वधाकरितां ज्याप्रमाणें इंद्र वज्र पाठवितो त्याप्रमाणें शत्रूच्या वधाकरितां तूं लक्ष्मणाला पाठीव २२. त्या राक्षसश्रेष्ठ इंद्रजिताचें तें कर्म समाप्त झालें असतां तो संग्रामामध्यें देवदैत्यांना अदृश्य होईल आणि युद्धाची इच्छा करणाऱ्या त्या इंद्रजिताचें तें कर्म समाप्त झालें असतां देवांनाही मोठें भय उत्पन्न होईल " २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं चौऱ्यायशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८४ ॥

तेन रक्षसा १ ततो धैर्यमवष्टभ्य रामः परपुरंजयः । बिभीषणमुपासीन-
मुवाच कपिसंनिधौ २ नैर्ऋताधिपते वाक्यं यदुक्तं ते बिभीषण । भूयस्त-
च्छ्रोतुमिच्छामि ब्रूहि यत्ते विवक्षितम् ३ राघवस्य वचः श्रुत्वा वाक्यं
वाक्यविशारदः । यत्तत्पुनरिदं वाक्यं बभाषेथ बिभीषणः ४ यथाज्ञप्तं
महाबाहो त्वया गुल्मनिवेशनम् । तत्तथानुष्ठितं वीर त्वद्वाक्यसमनन्तरम् ५
तान्यनीकानि सर्वाणि विभक्तानि समन्ततः । विन्यस्ता यूथपाश्चैव यथा-
न्यायं विभागशः ६ भूयस्तु मम विज्ञाप्यं तच्छृणुष्व महाप्रभो । त्वय्य-
कारणसंतप्ते संतप्तहृदया वयम् ७ त्यज राजन्निमं शोकं मिथ्या संताप-
मागतम् । यदियं त्यजतां चिन्ता शत्रुहर्षविवर्धिनी ८ उद्यमः क्रियतां
वीर हर्षः समुपसेव्यताम् । प्राप्तव्या यदि ते सीता हन्तव्याश्च निशाचराः ९
रघुनन्दन वक्ष्यामि श्रूयतां मे हितं वचः । साध्वयं यातु सौमित्रिर्बलेन
महता वृतः १० निकुम्भिलायां संप्राप्तं हन्तुं रावणिमाहवे । धनुर्मण्डल-

---

त्या बिभीषणाचें तें भाषण श्रवण केलें असूनही राम शोकाकुल झाला असल्या-मुळें त्या बिभीषण राक्षसानें काय सांगितलें हें नीटसें रामाला समजलें नाहीं १. तेव्हां शत्रुपक्षीय वीरसमुदायाचा पराजय करणारा राम धैर्य धरून वानरांसंनिध बसलेल्या बिभीषणाला ह्मणाला २ " हे राक्षसाधिपते बिभीषणा, तूं जें मला सांगितलेंस तें पुनरपि श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. ह्यास्तव, तुझ्या मनांतून जें सांगावयाचें असेल तें मला सांग " ३. रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर संभाषण करण्यामध्यें निपुण असलेला बिभीषण पुनरपि रामाला ह्मणाला ४ " हे महापराक्रमी वीर रामा, सैन्य उभें करण्याची आपली आज्ञा झाल्याप्रमाणें आह्मीं लगेच तसें केलें आहे ५. तीं सर्व सैन्यें सभोंवतीं वेगळीं वेगळीं ठेविलीं आहेत आणि यथायोग्य रीतीनें सेनाधिपतींचीही ठिकठिकाणीं योजना केली आहे ६; परंतु, हे महापराक्रमी रामा, आणखीं एक माझी विनंति आहे ती तूं श्रवण कर. तूं विनाकारण संतप्त झाल्यामुळें आमचेंही अंतःकरण संतप्त झालें आहे ७. ह्यास्तव, हे राजा, विनाकारण प्राप्त झालेल्या ह्या संतापाचा व शोकाचा त्याग कर आणि शत्रूंचा हर्ष वृद्धिंगत करणारी ही काळजीही तूं सोडून दे ८. हे वीरा, उद्योग करून आतां हर्षाचें अवलंबन केलें पाहिजे आणि राक्षसांचा वध होऊन सीता प्राप्त व्हावी अशी जर तुझी इच्छा असेल ९ तर, हे रघुनंदना रामा, मी जें हितकारक भाषण तुझ्याशीं करीत आहें तें तूं श्रवण कर. निकुंभिलादेवालयामध्यें प्राप्त झालेल्या रावणपुत्र इंद्रजिताचा संग्रामामध्यें धनुर्मंडलापासून सोडिलेल्या सर्पतुल्य बाणांनीं वध करण्याकरितां मोठें सैन्य बरोबर घेऊन सुमित्रापुत्र लक्ष्मणाला

निर्मुक्तैराशीविषविषोपमैः ११ तेन वीरेण तपसा वरदानात्स्वयंभुवः ।
अस्त्रं ब्रह्मशिरःप्राप्तं कामगाश्च तुरङ्गमाः १२ स एष किल सैन्येन प्राप्तः
किल निकुम्भिलाम् । यद्युत्तिष्ठेत्कृतं कर्म हतान्सर्वांश्च विद्धि नः १३
निकुम्भिलामसंप्राप्तमकृताग्निं च यो रिपुः । त्वामाततायिनं हन्यादिन्द्र-
शत्रो स ते वधः १४ वरो दत्तो महाबाहो सर्वलोकेश्वरेण वै । इत्येवं
विहितो राजन्वधस्तस्यैष धीमतः १५ वधायेन्द्रजितो राम संदिशस्व
महाबलम् । हते तस्मिन्हतं विद्धि रावणं ससुहृद्गणम् १६ बिभीषणवचः
श्रुत्वा रामो वाक्यमथाब्रवीत् । जानामि तस्य रौद्रस्य मायां सत्यपरा-
क्रम १७ स हि ब्रह्मास्त्रवित्प्राज्ञो महामायो महाबलः । करोत्यसंज्ञान्स-
ङ्ग्रामे देवान्सवरुणानपि १८ तस्यान्तरिक्षे चरतः सरथस्य महायशः ।
न गतिर्ज्ञायते वीर सूर्यस्येवाभ्रसंप्लवे १९ राघवस्तु रिपोर्ज्ञात्वा मायावीर्यं
दुरात्मनः । लक्ष्मणं कीर्तिसंपन्नमिदं वचनमब्रवीत् २० यद्वानरेन्द्रस्य
बलं तेन सर्वेण संवृतः । हनूमत्प्रमुखैश्चैव यूथपैः सह लक्ष्मण २१

---

जाऊं दे १०, ११. तपश्चर्येच्या योगानें त्या वीरानें ब्रह्मदेवाला संतुष्ट केलें आहे व त्याच्यापासून वर ह्मणून ब्रह्मास्त्र आणि यथेष्ट गमन करणारे अश्व त्यानें प्राप्त करून घेतले आहेत १२. खरोखर तो हा इंद्रजित् सैन्यासहवर्तमान निकुंभिलासंज्ञक देवालयामध्यें गेला आहे. होमकर्म समाप्त करून जर हा तेथून उठला तर आह्मां सर्वांचा वध झालाच असें तूं समज १३. " हे इंद्रजिता, निकुंभिलेमध्यें जाऊन तूं हवन करण्यापूर्वी जो शत्रु तुज शस्त्रधारण करणाऱ्याशीं युद्ध करील त्याच्या हातून तुझा वध होईल " १४ असा, हे महापराक्रमी रामा, सर्वलोकाधिपति ब्रह्मदेवानें त्याला वर दिला आहे आणि, हे राजा, त्या बुद्धिमान् इंद्रजिताचा अशारीरितानेंच वध होण्याचें ब्रह्मदेवानें ठरविलें आहे १५. तस्मात्, हे रामा, इंद्रजिताच्या वधाकरितां तूं मोठें सैन्य पाठीव. कारण, त्याचा वध झाला असतां सुहृद्गणासहवर्तमान रावणाचा वध झालाच आहे असें तूं समज " १६. हें बिभीषणाचें भाषण श्रवण केल्यावर राम ह्मणाला " हे सत्यपराक्रमी बिभीषणा, त्या क्रूर राक्षसाची माया मी जाणीत आहें १७. महामायावी, महाबलाढ्य, महाबुद्धिमान् व ब्रह्मास्त्रवेत्ता असा तो इंद्रजित् संग्रामामध्यें वरुणासहवर्तमान देवांनाही मूर्च्छित करून टाकील १८. हे महाकीर्तिमान् वीरा, मेघसमूहामध्यें ज्याप्रमाणें सूर्याची गति दृष्टोत्पत्तीस येत नाहीं त्याप्रमाणें रथासहवर्तमान अंतरिक्षामध्यें संचार करणाऱ्या त्या इंद्रजिताची गति दृष्टोत्पत्तीस येत नाहीं " १९. दुरात्म्या शत्रूच्या मायेचें सामर्थ्य जाणून

जाम्बवेनर्क्षपतिना सह सैन्येन संवृतः । जहि तं राक्षससुतं मायाबलसमन्वितम् २२ अयं त्वां सचिवैः सार्धं महात्मा रजनीचरः । अभिज्ञातस्य मायानां पृष्ठतोनुगमिष्यति २३ राघवस्य वचः श्रुत्वा लक्ष्मणः सबिभीषणः । जग्राह कार्मुकश्रेष्ठमन्यद्भीमपराक्रमः २४ संनद्धः कवची खड्गी सशरी वामचापभृत् । रामपादावुपस्पृश्य हृष्टः सौमित्रिरब्रवीत् २५ अद्य मत्कार्मुकोन्मुक्ताः शरा निर्भिद्य रावणिम् । लङ्कामभिपतिष्यन्ति हंसाः पुष्करिणीमिव २६ अद्यैव तस्य रौद्रस्य शरीरं मामकाः शराः । विधमिष्यन्ति भित्त्वा तं महाचापगुणच्युताः२७एवमुक्त्वा तु वचनं द्युतिमान्भ्रातुरग्रतः । स रावणिवधाकाङ्क्षी लक्ष्मणस्त्वरितं ययौ २८ सोभिवाद्य गुरोः पादौ कृत्वा चापि प्रदक्षिणम् । निकुम्भिलामभिययौ चैत्यं रावणिपालितम् २९ बिभीषणेन सहितो राजपुत्रः प्रतापवान् । कृतस्वस्त्ययनो भ्रात्रा लक्ष्मणस्त्वरितो ययौ ३० वानराणां सहस्रैस्तु हनूमान्बहुभिर्वृतः । बिभीषणश्च सामात्यो लक्ष्मणं त्वरितं ययौ ३१ महता

---

राम कीर्तियुक्त लक्ष्मणाला ह्मणाला २० " हे लक्ष्मणा, वानरराज सुग्रीवाचें जें सैन्य आहे तें सर्व आणि हनुमान् वगैरे सर्व सेनाधिपति बरोबर घेऊन २१ आणि त्याचप्रमाणें सैन्यासहवर्तमान ऋक्षराज जांबवानालाही बरोबर घेऊन मायाबलानें युक्त असलेल्या त्या राक्षसपुत्राचा तूं वध कर २२. माया जाणणारा हा महात्मा निशाचर बिभीषण सचिवांसहवर्तमान तुझ्या मागोमाग येईल " २३. रामाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर भयंकर पराक्रम करणाऱ्या लक्ष्मणानें बिभीषणासहवर्तमान दुसरें एक श्रेष्ठ धनुष्य हातामध्यें घेतलें २४ आणि कवच, खड्ग, बाण व सुंदर धनुष्य घेऊन युद्धार्थ सज्ज झाल्यानंतर रामाच्या पायांना स्पर्श करून तो लक्ष्मण आनंदानें ह्मणाला २५ "ज्याप्रमाणें हंसपक्षी पुष्करिणीवर जातात त्याप्रमाणें माझ्या धनुष्यापासून सुटलेले बाण रावणपुत्र इंद्रजिताचा वध करून आज लंकेवर जातील २६. प्रचंड धनुष्याच्या प्रत्यंचेपासून सुटलेले माझे बाण त्याला वेध करून आजच त्या क्रूर इंद्रजिताचें शरीर उडवून देतील २७. ह्याप्रमाणें भ्रात्यासमोर भाषण करून तो तेजस्वी लक्ष्मण रावणपुत्राचा वध करण्याच्या उद्देशानें सत्वर निघाला २८. बाहेर पडतांना प्रथमतः ज्येष्ठ भ्राता जो राम त्याच्या पायांना अभिवंदन करून व त्याला प्रदक्षिणा करून रावणपुत्र इंद्रजितानें परिपालन केलेल्या निकुंभिलासंज्ञक देवालयाकडे तो गेला २९. तात्पर्य, भ्रात्या रामानें आशीर्वाद दिल्यानंतर बिभीषणासहवर्तमान तो प्रतापी राजपुत्र लक्ष्मण सत्वर तिकडे चालता झाला ३०; व अनेक सहस्र वानर बरोबर घेऊन हनुमान् आणि अमात्यासहवर्तमान

हरिसैन्येन सवेगमभिसंवृतः । ऋक्षराजबलं चैव ददर्श पथि विष्ठितम् ३२
स गत्वा दूरमध्वानं सौमित्रिर्मित्रनन्दनः । राक्षसेन्द्रबलं दूरादपश्यद्व्यूह-
माश्रितम् ३३ स संप्राप्य धनुष्पाणिर्मायायोगमरिन्दमः । तस्थौ ब्रह्मवि-
धानेन विजेतुं रघुनन्दनः ३४ विभीषणेन सहितो राजपुत्रः प्रतापवान् ।
अङ्गदेन च वीरेण तथानिलसुतेन च ३५ विविधममलशस्त्रभास्वरं तद्ध्वज-
गहनं गहनं महारथैश्च । प्रतिभयतममप्रमेयवेगं तिमिरमिव द्विषतां बलं
विवेश ३६ [ ३८१६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
युद्धकाण्डे पञ्चाशीतितमः सर्गः ॥ ८५ ॥

अथ तस्यामवस्थायां लक्ष्मणं रावणानुजः । परेषामहितं वाक्यम-
र्थसाधकमब्रवीत् १ यदेतद्राक्षसानीकं मेघश्यामं विलोक्यते । एतदायो-
ध्यतां शीघ्रं कपिभिश्च शिलायुधैः २ तस्यानीकस्य महतो भेदने यत
लक्ष्मण। राक्षसेन्द्रसुतोऽप्यत्र भिन्ने दृश्यो भविष्यति ३ सत्वमिन्द्राशनिप्रख्यैः

---

बिभीषण हेही सत्वरच लक्ष्मणाच्या मागोमाग गेले ३१. प्रचंड वानरसैन्यानें परिवेष्टित असलेला तो लक्ष्मण वेगानें जाऊं लागला असतां मार्गामध्यें द्वाररक्षणार्थ हनुमानानें ठेविलेलें ऋक्षराज जांबवानाचें सैन्य त्यानें अवलोकन केलें ३२ आणि बऱ्याच दूर मार्गाचें आक्रमण झाल्यानंतर मित्रांना आनंद देणाऱ्या सुमित्रापुत्र लक्ष्मणानें व्यूहाचें अवलंबन करून राहिलेलें राक्षसाधिपतीचें सैन्यही दुरून पाहिलें ३३. मायेच्याच योगानें शत्रु जिंकण्याचा उपाय ज्याला साध्य होणारा आहे अशा त्या इंद्रजितासमीप गेल्यानंतर शत्रूंचें दमन करणारा तो धनुर्धर रघुनंदन लक्ष्मण ब्रह्मदेवाच्या वरप्रदानाला अनुसरून त्याचा वध करण्याकरितां सज्ज होऊन राहिला ३४. त्यावेळीं बिभीषण, वीर अंगद आणि वायुपुत्र हनुमान् हे त्या प्रतापी राजपुत्र लक्ष्मणाच्या बरोबर होते आणि ह्यांनीं युक्त असलेला तो लक्ष्मण ३५ अंधकाराचा भेद करून प्रविष्ट होणाऱ्या सूर्याप्रमाणें शत्रूंच्या नानाप्रकारच्या सैन्यामध्यें प्रविष्ट झाला. तें शत्रुसैन्य निर्मल शस्त्रांच्या योगानें झळकत होतें, ध्वजांनीं गजबजलेलें होतें, महारथ्यांनीं भरलेलें होतें, अत्यंत भयंकर होतें व अतुल वेगानें युक्त होतें ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पंच्यायशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८५ ॥

तदनंतर त्या अवस्थेमध्यें शत्रूंना अहितकारक परंतु, स्वतःचा उद्देश सिद्धीस नेणारें असें भाषण रावणाचा कनिष्ठ भ्राता बिभीषण लक्ष्मणाशीं करूं लागला १. ( तो ह्मणाला ) "हें जें मेघांप्रमाणें श्यामवर्ण राक्षससैन्य दृष्टीं पडत आहे ह्याच्याशीं पाषाणरूप आयुधें धारण केलेल्या वानरांसहवर्तमान तूं सत्वर युद्ध कर २. हे लक्ष्मणा,

शरैरवकिरन्परान् । अभिद्रवाशु यावद्वै नैतत्कर्म समाप्यते ४ जहि वीर दुरात्मानं मायापरमधार्मिकम् । रावणिं क्रूरकर्माणं सर्वलोकभयावहम् ५ बिभीषणवचः श्रुत्वा लक्ष्मणः शुभलक्षणः । ववर्ष शरवर्षेण राक्षसेन्द्रसुतं प्रति ६ ऋक्षाः शाखामृगाश्चैव द्रुमप्रवरयोधिनः । अभ्यधावन्त सहितास्तदनीकमवस्थितम् ७ राक्षसाश्च शितैर्बाणैरसिभिः शक्तितोमरैः । अभ्यवर्तन्त समरे कपिसैन्यजिघांसवः ८ स संप्रहारस्तुमुलः संजज्ञे कपिरक्षसाम् । शब्देन महता लङ्कां नादयन्वै समन्ततः ९ शस्त्रैश्च विविधाकारैः शितैर्बाणैश्च पादपैः । उद्यतैर्गिरिशृङ्गैश्च घोरैराकाशमावृतम् १० राक्षसा वानरेन्द्रेषु विकृताननबाहवः । निवेशयन्तः शस्त्राणि चक्रुस्ते सुमहद्भयम् ११ तथैव सकलैर्वृक्षैर्गिरिशृङ्गैश्च वानराः । अभिजघ्नुर्निजघ्नुश्च समरे सर्वराक्षसान् १२ ऋक्षवानरमुख्यैश्च महाकायैर्महाबलैः । रक्षसां युध्यमानानां महद्भयमजायत १३ स्वमनीकं विषण्णं

---

त्या प्रचंड राक्षससैन्याचा पराजय करण्याविषयीं तूं प्रयत्न कर; ह्या राक्षससैन्याचा पराजय झाला असतां राक्षसराजपुत्र इंद्रजितूही येथें दिसूं लागेल ३. तस्मात्, इंद्रजिताचें हें कर्म समाप्त झालें नाहीं तोंच इंद्रवज्रतुल्य बाणांचा शत्रूवर वर्षाव करीत करीत तूं सत्वर चाल करून जा ४; आणि, हे वीरा, मायावी, अधार्मिक, दुरात्मा, क्रूर कर्म करणारा व सर्व लोकांना भय उत्पन्न करणारा जो रावणपुत्र इंद्रजित् त्याचा तूं वध कर " ५. हें बिभीषणाचें भाषण श्रवण केल्यावर शुभ लक्षणांनीं संपन्न असलेल्या लक्ष्मणानें राक्षसाधिपति रावणाच्या पुत्रावर बाणांचा वर्षाव चालविला असतां ६, ऋक्ष आणि मोठमोठे वृक्ष हातामध्यें घेऊन युद्ध करणार वानरही एकत्र जमून त्या सज्ज असलेल्या राक्षससैन्यावर धांवून गेले ७. नंतर तीक्ष्ण बाण, खड्ग, शक्ति व तोमर ह्यांचे प्रहार करीत करीत राक्षसही वानरसैन्याचा वध करण्याच्या उद्देशानें रणभूमीमध्यें परत फिरले ८. तेव्हां प्रचंड शब्दानें सर्व बाजूंनीं लंका नादित करणारें मोठें तुमुल युद्ध त्या वानरराक्षसांमध्यें झालें ९. नानाप्रकारचीं शस्त्र, तीक्ष्ण बाण, उगारलेले वृक्ष, आणि भयंकर पर्वतशिखरें ह्यांच्या योगानें आकाश व्याप्त होऊन गेलें १०. अक्राळविक्राळ मुखांनीं व बाहूनीं युक्त असलेले राक्षस वानराधिपतींवर शस्त्रांचे प्रहार करूं लागले व त्यांनीं त्या वानराधिपतींमध्यें फारच मोठें भय उत्पन्न केलें ११. त्याचप्रमाणें मुळासकट उपटलेले वृक्ष व पर्वतशिखरें बरोबर घेऊन वानर राक्षसांसमीप गेले आणि तावडींत सांपडलेल्या सर्व राक्षसांचा त्यांच्या योगानें समरांगणामध्यें त्यांनीं वध केला १२. ऋक्ष व वानर ह्यांपैकीं मोठे धिप्पाड व महाबलाढ्य मुख्य मुख्य वीरांशीं

हनूमन्तं जिघांसति ३३ तमप्रतिमसंस्थानैः शरैः शत्रुनिवारणैः । जीवितान्तकरैर्घोरैः सौमित्रे रावणिं जहि ३४ इत्येवमुक्तस्तु तदा महात्मा बिभीषणेनारिविभीषणेन । ददर्श तं पर्वतसंनिकाशं रथस्थितं भीमबलं दुरासदम् ३५ [ ३८५१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षडशीतितमः सर्गः ॥ ८६ ॥

एवमुक्त्वा तु सौमित्रिं जातहर्षो बिभीषणः । धनुष्पाणिं तमादाय त्वरमाणो जगाम सः १ अविदूरं ततो गत्वा प्रविश्य तु महद्वनम् । अदर्शयत तत्कर्म लक्ष्मणाय बिभीषणः २ नीलजीमूतसंकाशं न्यग्रोधं भीमदर्शनम् । तेजस्वी रावणभ्राता लक्ष्मणाय न्यवेदयत् ३ इहोपहारं भूतानां बलवान्रावणात्मजः । उपहृत्य ततः पश्चात्सङ्ग्राममभिवर्तते ४ अदृश्यः सर्वभूतानां ततो भवति राक्षसः । निहन्ति समरे शत्रून्बध्नाति च शरोत्तमैः ५ तमप्रविष्टं न्यग्रोधं बलिनं रावणात्मजम् । विध्वंसय शरैर्दीप्तैः सरथं साश्वसारथिम् ६ तथेत्युक्त्वा महातेजाः सौमित्रिर्मित्रनन्दनः । बभूवावस्थितस्तत्र चित्रं विस्फारयन्धनुः ७ स रथेनाग्निवर्णेन बलवा-

---

पराभव करणारा जो रावणाचा पुत्र तो रथारूढ होऊन हनुमानाचा वध करण्याच्या बेतात आहे ३३. ह्यास्तव, अनुपम आकृतीनें युक्त, शत्रुनिवारक व प्राणनाशक भयंकर बाणांनीं, हे लक्ष्मणा, तू रावणपुत्राचा वध कर "३४ शत्रूला भय उत्पन्न करणाऱ्या बिभीषणानें ह्याप्रमाणें महात्म्या लक्ष्मणाला सांगितलें असतां भयंकर सैन्यानें युक्त असलेला तो अजिंक्य व पर्वततुल्य इंद्रजित् रथारूढ झाला आहे असें त्यानें अवलोकन केलें ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं श्याहायशींवा सर्ग समाप्त झाला ॥ ८६ ॥

ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगितल्यानंतर आनंदयुक्त झालेला बिभीषण हातामध्यें धनुष्य धारण केलेल्या लक्ष्मणाला घेऊन त्वरेनें गेला १ आणि जवळच गेल्यावर महावनामध्यें प्रवेश करून बिभीषणानें रावणपुत्राचें तें हवनकर्म लक्ष्मणाला दर्शविलें २; आणि रावणभ्रात्या बिभीषणानें दिसण्यांतही भयंकर असा तो होमस्थानभूत असलेला नीलमेघतुल्य वटही लक्ष्मणाला दर्शविला ३. ( तो म्हणाला ) " ह्या ठिकाणीं भूतांना बलि देऊन बलाढ्य रावणपुत्र संग्रामामध्यें जात असतो ४. नंतर तो राक्षस सर्व भूतांना अदृश्य होतो आणि संग्रामामध्यें उत्कृष्ट बाणांनीं बंधनपूर्वक शत्रूंचा वध करूं लागतो ५. ह्यास्तव, तो बलाढ्य रावणपुत्र वटवृक्षासमीप गेला नाहीं तोंच उज्ज्वल बाणांनीं रथ, अश्व व सारथि ह्यांसहवर्तमान तूं त्याचा वध कर " ६. ह्यावर मित्रांना

न्रावणात्मजः । इन्द्रजित्कवची खड्गी सध्वजः प्रत्यदृश्यत ८ तमुवाच महातेजाः पौलस्त्यमपराजितम् ।समाह्वये त्वां समरे सम्यग्युद्धं प्रयच्छ मे ९ एवमुक्तो महातेजा मनस्वी रावणात्मजः । अब्रवीत्परुषं वाक्यं तत्र दृष्ट्वा बिभीषणम् १० इह त्वं जातसंवृद्धः साक्षाद्भ्राता पितुर्मम । कथं द्रुह्यसि पुत्रस्य पितृव्यो मम राक्षस ११ न जातित्वं न सौहार्दं न जातिस्तव दुर्मते । प्रमाणं न च सौदर्यं न धर्मो धर्मदूषण १२ शोच्यस्त्वमसि दुर्बुद्धे निन्दनीयश्च साधुभिः । यस्त्वं स्वजनमुत्सृज्य परभृत्यत्वमागतः १३ नैतच्छिथिलया बुद्ध्या त्वं वेत्सि महदन्तरम् । क्व च स्वजनसंवासः क्व च नीचपराश्रयः १४ गुणवान्वा परजनः स्वजनो निर्गुणोपि वा । निर्गुणः स्वजनः श्रेयान्यः परः पर एव सः १५ यः स्वपक्षं परित्यज्य परपक्षं निषेवते । स स्वपक्षे क्षयं याते पश्चात्तैरेव हन्यते १६ निरनुक्रोशता चेयं यादृशी ते निशाचर । स्वजनेन त्वया शक्यं पौरुषं रावणानुज १७

---

आनंद देणारा महातेजस्वी सुमित्रापुत्र लक्ष्मण 'ठीक आहे' असें ह्मणाला आणि आपल्या चमत्कारिक धनुष्याचा टणत्कार करीत करीत तेथें उभा राहिला ७. अग्निवर्ण रथावर आरूढ झालेला तो बलाढ्य रावणपुत्र इंद्रजित् कवच, खड्ग, व ध्वज ह्यांसहवर्तमान तेथें दिसूं लागला ८. तेव्हां महातेजस्वी लक्ष्मण त्या अजिंक्य पुलस्त्यवंशजाला ह्मणाला "संग्राममध्यें मी तुला आह्वान करीत आहें. तूं माझ्याशीं चांगलें युद्ध कर" ९. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें त्याला सांगितलें असतां तो महातेजस्वी व विचारी रावणपुत्र बिभीषणाला तेथें पाहून कठोर शब्दांनीं त्याला ह्मणाला १० हे राक्षसा, ह्या आमच्या राक्षसकुलामध्यें जन्मास येऊन वाढलेला तूं माझ्या पित्याचा प्रत्यक्ष भ्राता आणि माझा पितृव्य असतांना पुत्रतुल्य असलेल्या माझा कसा बरें द्रोह करीत आहेस? ११. हे धर्मदूषका, जात्यभिमान, प्रेम, जाति, सोदरत्व आणि धर्म ह्यांपैकीं कांहींएक, हे दुर्बुद्धे, तुला आड येत नाहीं १२. स्वजनाचा त्याग करून तूं दुसऱ्याचा दास बनल्यामुळें शोचनीय झाला आहेस आणि, हे दुर्बुद्धे, साधूंच्या निंदेसही पात्र झाला आहेस १३. स्वजनासहवर्तमान वास्तव्य करणें कोणीकडे आणि शत्रूच्या आश्रयाला राहून नीच बनणें कोणीकडे? ह्यांतील महदंतर तुझ्या कोत्या बुद्धीमुळें तुला समजत नाहीं १४. स्वजन निर्गुण असून दुसरे जरी गुणी असले तरी निर्गुणी स्वजन बरे; परंतु, जे परके ते परकेच होत १५. जो स्वपक्षाचा त्याग करून परपक्षाचा आश्रय करितो तो स्वपक्षाचा क्षय झाल्यानंतर त्या परपक्षीय लोकांकडूनच वध पावतो १६. हे राक्षसा, जशाप्रकारचा हा तुझा निर्दयपणा दृष्टोत्पत्तीस आला आहे तशाप्रकारचा निर्दयपणा आणि, हे रावणानुज,

इत्युक्तो भ्रातृपुत्रेण प्रत्युवाच बिभीषणः । अजानन्निव मच्छीलं किं राक्षस विकत्थसे १८ राक्षसेन्द्रसुतासाधो पारुष्यं त्यज गौरवात् १९ कुले यद्यप्यहं जातो रक्षसां क्रूरकर्मणाम् । गुणो यः प्रथमो नृणां तन्मे शीलमराक्षसम् २० न रमे दारुणेनाहं न चाधर्मेण वै रमे । भ्रात्रा विषमशीलोपि कथं भ्राता निरस्यते २१ धर्मात्प्रच्युतशीलं हि पुरुषं पापनिश्चयम् । त्यक्त्वा सुखमवाप्नोति हस्तादाशीविषं यथा २२ परस्वहरणे युक्तं परदाराभिमर्शकम् । त्याज्यमाहुर्दुरात्मानं वेश्म प्रज्वलितं यथा २३ परस्वानां च हरणं परदाराभिमर्शनम् । सुहृदामतिशङ्का च त्रयो दोषाः क्षयावहाः २४ महर्षीणां वधो घोरः सर्वदेवैश्च विग्रहः । अभिमानश्च रोषश्च वैरत्वं प्रतिकूलता २५ एते दोषा मम भ्रातुर्जीवितैश्वर्यनाशनाः । गुणान्प्रच्छादयामासुः पर्वतानिव तोयदाः २६ दोषैरेतैः परित्यक्तो मया भ्राता

---

अशाप्रकारचें कर्म स्वजनाच्या हातून होणें असेल तर तें एक तुझ्याच हातून " १७. ह्याप्रमाणें भ्रातृपुत्र इंद्रजित् ह्मणाला असतां बिभीषण उलट त्याला ह्मणाला " माझें शील न समजल्यासारिखें करून, हे राक्षसा, तूं कशाकरितां आत्मप्रशंसा करीत आहेस ? १८. हे दुष्टा राक्षसराजपुत्रा, माझें मोठेपणाचें नातें लक्ष्यांत आणून तरी तूं हें कठोर भाषण सोडून दे १९. क्रूरकर्मी राक्षसांच्या कुलामध्यें जरी मी जन्मास आलों आहें तरी मनुष्यांचे ठिकाणीं आढळणारा जो उत्कृष्ट सत्त्वगुण तो माझे ठिकाणीं असल्यामुळें माझें शील राक्षसांना दुर्लभ आहे २०. अधर्मानें अथवा क्रूर कर्मानें मी कधीं आनंद मानीत नाहीं; परंतु, हे इंद्रजिता, एखाद्या भ्रात्याचा स्वभाव जरी वेगळा असला तरी सहोदर भ्रात्यानें त्याला कसें हाकून लाविलें ? ( हें योग्य आहे काय ?) २१. हातांत धरिलेला सर्प सोडून दिल्यानंतर ज्याप्रमाणें पुरुषाला सुख होतें त्याप्रमाणें धर्मग्रस्त व पापबुद्धि पुरुषाचा त्याग केल्यानंतरच त्याला सुख होत असतें २२. शिवाय, जळतें घर ज्याप्रमाणें त्याज्य मानिलें आहे त्याप्रमाणें परद्रव्याचा अपहार करण्याविषयीं तत्पर आणि परस्त्रीवर हात टाकणाऱ्या दुरात्म्याचा त्याग करावा असें विचारी लोक ह्मणत असतात २३. परद्रव्याचा अपहार करणें, परस्त्रीवर हात टाकणें आणि सुहृदांसंबंधानें अतिच अविश्वास धरणें हे तीन दोष क्षयाला कारण होणारे आहेत २४. महर्षींचा घोर वध, सर्व देवांशीं कलह, अभिमान, रोष, वैरत्व व प्रतिकूलता २५ हे माझ्या भ्रात्याचे ठिकाणीं असलेले दोष जीविताचा व ऐश्वर्याचा नाश करणारे आहेत व मेघ ज्याप्रमाणें पर्वतांना आच्छादित करीत असतात त्याप्रमाणें ह्या दोषांनीं त्याचे गुण आच्छादिले आहेत २६. ह्या दोषांमुळें माझा भ्राता जो

पिता तव । नेयमस्ति पुरी लङ्का न च त्वं न च ते पिता २७ अतिमानश्च बालश्च दुर्विनीतश्च राक्षस । बद्धस्त्वं कालपाशेन ब्रूहि मां यद्यदिच्छसि २८ अद्येह व्यसनं प्राप्तं यन्मां परुषमुक्तवान् । प्रवेष्टुं न त्वया शक्यं न्यग्रोधं राक्षसाधम २९ धर्षयित्वा च काकुत्स्थं न शक्यं जीवितुं त्वया । युध्यस्व नरदेवेन लक्ष्मणेन रणे सह ।। हतस्त्वं देवताकार्यं करिष्यसि यमक्षयम् ३० निदर्शयित्वात्मबलं समुद्यतं कुरुष्व सर्वायुधसायकव्ययम् । न लक्ष्मणस्यैत्य हि बाणगोचरं त्वमद्य जीवन्सबलो गमिष्यसि ३१ [३८८२]

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्ताशीतितमः सर्गः ॥ ८७ ॥

बिभीषणवचः श्रुत्वा रावणिः क्रोधमूर्च्छितः । अब्रवीत्परुषं वाक्यं क्रोधेनाभ्युत्पपात च १ उद्यतायुधनिस्त्रिंशो रथे सुसमलंकृते । कालाश्वयुक्ते महति स्थितः कालान्तकोपमः २ महाप्रमाणमुद्यम्य विपुलं वेगवद्दृढम् । धनुर्भीमबलो भीमं शरांश्चामित्रनाशनान् ३ तं ददर्श महेष्वासो

तुझा पिता त्याचा मीं त्याग केला आहे. ही लंकानगरी, तूं व तुझा पिता ह्या सर्वांचा नाश होणार असें तूं समज २७. अतिमानी, वाईट रीतीचें शिक्षण मिळालेला व मूर्ख असा तूं कालपाशानें बद्ध झाला आहेस. ह्यास्तव, हे राक्षसा, जें जें तुझ्या इच्छेस येईल तें तें तूं मला बोल २८. मला तूं कठोर भाषण केलेंस त्यामुळें हें संकट आज तुला प्राप्त झालें आहे. हे राक्षसाधमा, आतां वटवृक्षासमीप तुझें जाणें शक्य-नाहीं २९. ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचा अपराध करून जिवंत रहाणें तुला शक्य नाहीं. पुरुषश्रेष्ठ लक्ष्मणासहवर्तमान तूं युद्ध कर. आज वध पावून तूं यमसदनीं गेलास म्हणजे देवांचें संतोषरूप कार्य करशील ३०. उचंबळत असलेलें आपलें बल दर्शवून सर्व आयुधांचा व बाणांचा तूं खुशाल व्यय कर. लक्ष्मणाच्या बाणाचे दृष्टींत आल्यानंतर तूं आज सैन्यासहवर्तमान जिवंत रहाणार नाहींस "३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सत्यायशींवा सर्ग समाप्त झाला ॥ ८७ ॥

बिभीषणाचें भाषण श्रवण करून क्रोधानें व्याप्त झालेल्या रावणपुत्रानेंही त्याच्याशीं कठोर भाषण केलें आणि रागारागानें तो तेथून उडाला १. कृष्णवर्ण अश्व जोडिलेल्या व उत्कृष्ट रीतीनें शृंगारिलेल्या मोठ्या रथावर आरूढ झालेला तो इंद्रजित् आयुधें व खड्ग सज्ज करून राहिला असतां काल व अंतक ह्यांप्रमाणें दिसूं लागला २. वेगयुक्त, दृढ, दीर्घ व रुंद असें भयंकर धनुष्य आणि शत्रुनाशक बाण घेऊन ३ अलंकृत,

रथस्थः समलंकृतः । अलंकृतममित्रघ्नो रावणस्यात्मजो बली ४ हनुम-
त्पृष्ठमारूढमुदयस्थरविप्रभम् । उवाचैनं सुसंरब्धः सौमित्रिं सविभीष-
णम् ५ तांश्च वानरशार्दूलान्पश्यध्वं मे पराक्रमम् ६ अद्य मत्कार्मुको-
त्सृष्टं शरवर्षं दुरासदम् । मुक्तवर्षमिवाकाशे धारयिष्यथ संयुगे ७ अद्य
वो मामका बाणा महाकार्मुकनिःसृताः । विधमिष्यन्ति गात्राणि तूल-
राशिमिवानलः ८ तीक्ष्णसायकनिर्भिन्नाञ्शूलशक्त्यृष्टिसायकैः । अद्य वो
गमयिष्यामि सर्वानेव यमक्षयम् ९ सृजतः शरवर्षाणि क्षिप्रहस्तस्य
संयुगे । जीमूतस्येव नदतः कः स्थास्यति ममाग्रतः १० रात्रियुद्धे तदा
पूर्वं वज्राशनिसमैः शरैः । शायितौ तौ मया भूमौ विसंज्ञौ सपुरःसरौ ११
स्मृतिर्न तेऽस्ति वा मन्ये व्यक्तं यातो यमक्षयम् । आशीविषसमं क्रुद्धं यन्मां
योद्धुमुपस्थितः १२ तच्छ्रुत्वा राक्षसेन्द्रस्य गर्जितं राघवस्तदा । अभीतवदनः
क्रुद्धो रावणिं वाक्यमब्रवीत् १३ उक्तश्च दुर्गमः पारः कार्याणां राक्षस त्वया ।

---

रथारूढ, महाधनुर्धारी, शत्रुनाशक व बलाढ्य रावणपुत्रानें त्या अलंकृत झालेल्या लक्ष्मणाला अवलोकन केलें ४; आणि उदयाचलावर आलेल्या सूर्याप्रमाणें ज्याची कांति आहे व हनुमानाचे पृष्ठभागावर जो आरूढ झाला आहे असा जो बिभीषणास-हवर्तमान सुमित्रापुत्र लक्ष्मण त्याला व त्या वानरश्रेष्ठांना अनुलक्षून अतिक्षुब्ध झालेला इंद्रजित् ह्मणाला " माझा पराक्रम तुह्मी अवलोकन करा ५, ६; आणि आकाशामध्यें होणाऱ्या अनियंत्रित पर्जन्य वृष्टीप्रमाणें माझ्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांची दुःसहवृष्टि संग्रामामध्यें आज तुह्मी सहन करा ७. अग्नि ज्याप्रमाणें कापसाच्या राशीला उडवून देतो त्याप्रमाणें प्रचंड धनुष्यापासून सुटलेले माझे बाण आज तुमच्या शरीरांना उडवून देतील ८. शूल, शक्ति, ऋष्टि, बाण आणि इतरही तीक्ष्ण शर ह्यांच्या योगानें तुह्मां सर्वांना विदीर्ण करून मी आज यमसदनीं पाठवून देईन ९. हस्तलाघवानें युक्त असलेला मी संग्रामामध्यें बाणांचे वर्षाव करूं लागलों असतां व मेघाप्रमाणें गर्जना करूं लागलों असतां माझ्या समोर कोण बरें उभा रहाणार आहे १०. पूर्वी रात्रीयुद्धामध्यें वज्र व अशनि ह्यांप्रमाणें असलेल्या बाणांच्या योगानें अग्रणीसहवर्तमान मी तुह्मां उभयतां रामलक्ष्मणांना अगदीं मूर्च्छित पाडिलें होतें ११. ह्याचें तुला स्मरणच राहिलें नाहीं असें मला वाटतें. असो. ज्याअर्थी सर्पाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या माझ्यासहवर्तमान युद्ध करण्यास तूं तयार झाला आहेस त्याअर्थी तूं निःसंशय यमसदनींच गेला आहेस असें मी समजतों "१२. राक्षसाधिपति इंद्रजिताची ती गर्जना श्रवण करून निर्भय मुद्रेनें युक्त असलेला तो क्रुद्ध रघुनंदन त्या रावणपुत्राला ह्मणाला १३ " हे राक्षसा,

कार्याणां कर्मणा पारं यो गच्छति स बुद्धिमान् १४ स त्वमर्थस्य हीनार्थो दुरवापस्य केनचित् । वाचा व्याहृत्य जानीषे कृतार्थोस्मीति दुर्मते १५ अन्तर्धानगतेनाजौ यत्त्वया चरितस्तदा । तस्करचरितो मार्गो नैष वीरनिषेवितः १६ यथा बाणपथं प्राप्य स्थितोस्मि तव राक्षस । दर्शयस्वाद्य तत्तेजो वाचा त्वं किं विकत्थसे १७ एवमुक्तो धनुर्भीमं परामृश्य महाबलः । ससर्ज निशितान्बाणानिन्द्रजित्समितिंजयः १८ तेन सृष्टा महावेगाः शराः सर्पविषोपमाः । संप्राप्य लक्ष्मणं पेतुः श्वसन्त इव पन्नगाः १९ शरैरतिमहावेगैर्वेगवान्रावणात्मजः । सौमित्रिमिन्द्रजिद्युद्धे विव्याध शुभलक्षणम् २० स शरैरतिविद्धाङ्गो रुधिरेण समुक्षितः । शुशुभे लक्ष्मणः श्रीमान्विधूम इव पावकः २१ इन्द्रजित्त्वात्मनः कर्म प्रसमीक्ष्याभिगम्य च । विनद्य सुमहानादमिदं वचनमब्रवीत् २२ पत्रिणः शितधारास्ते शरा मत्कार्मुकच्युताः । आदास्यन्तेद्य सौमित्रे जीवितं

---

शत्रुवधादि कार्यें उरकलीं असें ज्याअर्थीं तूं सांगितलें आहेस त्याअर्थीं तीं तुझ्या हातून होणें दुर्घट आहे. अरे, ( वल्गना न करितां ) कृतीनें जो कार्य शेवटास नेतो तो बुद्धिमान् होय १४. कार्य शेवटास नेण्यास तूं असमर्थ असतांनाही कोणाच्याही हातून सिद्धीस न जाणारें कार्य झालें ह्मणून बोलून दाखवून, हे दुर्बुद्धे, " मी कृतार्थ आहें " असें समजत आहेस ( परंतु, हें व्यर्थ आहे ) १५. संग्राममध्यें अदृश्य राहून जें तूं आचरण केलेंस तो वीरांनीं सेवन केलेला मार्ग नसून चोरांनीं आचरिलेला मार्ग होय १६. हे राक्षसा, ज्याअर्थीं मी तुझ्या बाणाच्या टप्प्यांत उभा आहें त्याअर्थीं आपलें तें तेज आज दाखीव. वाणीनें कशाकरितां आत्मप्रशंसा करीत आहेस ? " १७. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें इंद्रजिताला सांगितलें असतां त्या संग्रामविजयी महाबलाढ्य इंद्रजितानें भयंकर धनुष्य हातामध्यें घेऊन तीक्ष्ण बाण सोडिले १८; व त्यानें सोडिलेले ते सर्पविषतुल्य व महावेगवान् बाण फुस्कारे टाकीत असलेल्या सर्पांप्रमाणें लक्ष्मणासमीप येऊन पडले १९. ह्याप्रमाणें फारच मोठ्या वेगानें युक्त असलेल्या बाणांनीं वेगवान् रावणपुत्र इंद्रजितानें शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाला संग्राममध्यें वेध केला असतां २० बाणांनीं शरीर अतिशयच विद्ध झाल्यामुळें रक्तानें भरून गेलेला तो वैभवशाली लक्ष्मण धूमरहित अग्निप्रमाणें दिसूं लागला २१. असो. आपलें कर्म अवलोकन करून इंद्रजित् लक्ष्मणासमीप गेला आणि फारच उच्च स्वरानें गर्जना करून त्याला ह्मणाला २२

जीवितान्तकाः २३ अद्य गोमायुसङ्घाश्च श्येनसङ्घाश्च लक्ष्मण । गृध्राश्च निपतन्तु त्वां गतासुं निहतं मया २४ क्षत्रबन्धुं सदानार्यं रामः परमदुर्मतिः । भक्तं भ्रातरमद्यैव त्वां द्रक्ष्यति हतं मया २५ विस्रस्तकवचं भूमौ व्यपविद्धशरासनम् । हृतोत्तमाङ्गं सौमित्रे त्वामद्य निहतं मया २६ इति ब्रुवाणं संक्रुद्धः परुषं रावणात्मजम् । हेतुमद्वाक्यमर्थज्ञो लक्ष्मणः प्रत्युवाच ह २७ वाग्बलं त्यज दुर्बुद्धे क्रूरकर्मन्हि राक्षस । अथ कस्माद्वदस्येतत्संपादय सुकर्मणा २८ अकृत्वा कत्थसे कर्म किमर्थमिह राक्षस । कुरु तत्कर्म येनाहं श्रद्दध्यां तव कत्थनम् २९ अनुक्त्वा परुषं वाक्यं किंचिदप्यनवक्षिपन् । अविकत्थन्वधिष्यामि त्वां पश्य पुरुषादन ३० इत्युक्त्वा पञ्च नाराचानाकर्णापूरिताञ्शरान् । विजघान महावेगाल्लक्ष्मणो राक्षसोरसि ३१ सुपत्रवाजिता बाणा ज्वलिता इव पन्नगाः । नैर्ऋतोरस्यभासन्त सवितू रश्मयो यथा ३२ स शरैराहतस्तेन सरोषो

---

"हे लक्ष्मणा, पिसें व तीक्ष्ण धारा ह्यांनीं युक्त असून माझ्या धनुष्यापासून सुटलेले प्राणनाशक बाण आज तुझें जीवित हरण करितील २३. हे लक्ष्मणा, कोल्हीं व ससाणे ह्यांचे कळप व गृध्र आज माझ्या हातून वध पावल्यामुळें गतप्राण झालेल्या तुझ्यावर धाड घालतील २४. अत्यंत दुर्बुद्धि राम क्षत्रियाधम, सर्वदां अनार्य परंतु, अनुरक्त भ्राता असा जो तूं त्या तुला माझ्या हातून वध पावल्याचें आज अवलोकन करील २५. सारांश, हे लक्ष्मणा, ज्याचें कवच छिन्नभिन्न झालें आहे, ज्याच्या धनुष्याचे तुकडे तुकडे झाले आहेत आणि ज्याचें मस्तक तुटून गेलें आहे असा तूं माझ्या हातून वध पावल्याचें आज रामाला अवलोकन करावें लागेल" २६. ह्याप्रमाणें रावणपुत्र इंद्रजित् कठोर शब्दांनीं भाषण करूं लागला असतां अर्थवेत्ता लक्ष्मण अतिशय क्रुद्ध होऊन हेतुयुक्त भाषण त्याच्याशीं करूं लागला २७. (तो ह्मणाला) "हे क्रूरकर्म करणाऱ्या दुर्बुद्धि राक्षसा, आपल्या तोंडाचा पराक्रम सोडून दे. अरे, अशी कशाकरितां बडबड करीत आहेस ? हें जें बोलून दाखवीत आहेस तें चांगल्या कृतीनें दाखवीव २८. हे राक्षसा, पराक्रम केल्याशिवाय कशाकरितां येथें नुसत्या वल्गना करीत आहेस ? तूं तें कर्म करून दाखीव ह्मणजे ही तुझी वल्गना मी खरी मानीन २९ हे मनुष्यभक्षका, कठोर भाषण न करितां कोणाचीहि निंदा न करितां व यत्किंचितूही फुशारकी न मारितां पहा मी आज तुझा वध करितों" ३०. असें बोलून लक्ष्मणानें कानापर्यंत धनुष्य ओढिलें आणि महावेगवान् पांच नाराच बाण राक्षसाच्या वक्षस्थलावर त्यानें टाकिले ३१.

रावणात्मजः । सुप्रयुक्तैस्त्रिभिर्बाणैः प्रतिविव्याध लक्ष्मणम् ३३ स बभूव महाभीमो नरराक्षससिंहयोः । विमर्दस्तुमुलो युद्धे परस्परजयैषिणोः ३४ विक्रान्तौ बलसंपन्नावुभौ विक्रमशालिनौ । उभौ परमदुर्जेयावतुल्यबलतेजसौ ३५ युयुधाते तदा वीरौ ग्रहाविव नभोगतौ । बलवृत्राविव हि तौ युधि वै दुष्प्रधर्षणौ ३६ युयुधाते महात्मानौ तदा केसरिणाविव । बहूनवसृजन्तौ हि मार्गणौघानवस्थितौ ॥ नरराक्षसमुख्यौ तौ प्रहृष्टावभ्ययुध्यताम् ३७ ततः शरान्दाशरथिः संधायामित्रकर्षणः । ससर्ज राक्षसेन्द्राय क्रुद्धः सर्प इव श्वसन् ३८ तस्य ज्यातलनिर्घोषं स श्रुत्वा राक्षसाधिपः । विवर्णवदनो भूत्वा लक्ष्मणं समुदैक्षत ३९ विषण्णवदनं दृष्ट्वा राक्षसं रावणात्मजम् । सौमित्रिं युद्धसंयुक्तं प्रत्युवाच बिभीषणः ४० निमित्तान्युपपश्यामि यान्यस्मिन्रावणात्मजे । त्वर तेन महाबाहो भग्न एष न संशयः ४१ ततः संधाय सौमित्रिः शरानाशीविषोपमान् । मुमोच विशि-

---

उत्कृष्ट पिसांमुळें ज्यांना वेग उत्पन्न झालेला आहे व देदीप्यमान भुजंगांसारिखे भासत आहेत असे बाण ते सूर्याच्या किरणांप्रमाणें त्या राक्षसाच्या वक्षःस्थलावर झळकूं लागले ३२. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें बाणांनीं रावणपुत्र इंद्रजिताला ताडन केलें असतां तो क्रुद्ध झाला व चांगल्या रीतीनें सोडिलेल्या तीन बाणांनीं त्यानें लक्ष्मणाला उलट वेध केला ३३. एकमेकांचा पराजय करण्याची इच्छा करणार जे उभयतां पुरुषश्रेष्ठ व राक्षसश्रेष्ठ ह्यांमध्यें होणाऱ्या संग्रामांत अतिभयंकर व तुमुल प्रसंग झाला ३४. ते उभयतां पराक्रमी असून उभयतांही बलाढ्य होते; उभयतांही पराक्रमाविषयीं अभिमान बाळगीत होते आणि फारच अजिंक्य असून उभयतांचेंही बल व तेज अनुपम होतें ३५. संग्रामामध्यें हार जाण्यास अशक्य असलेले ते वीर आकाशांतील ग्रहांप्रमाणें युद्ध करूं लागले असतां बल व वृत्र ह्यांप्रमाणें शोभूं लागले ३६. ते महात्मे सिंहांप्रमाणें परस्परांशीं युद्ध करूं लागले. संग्रामामध्यें उभे राहून ते उभयतांही पुरुषश्रेष्ठ व राक्षसश्रेष्ठ असंख्य बाणसमुदाय एकमेकांवर सोडूं लागले आणि आनंदित होऊन युद्ध करूं लागले ३७. तदनंतर शत्रुनाशक दशरथपुत्र लक्ष्मण क्रुद्ध सर्पाप्रमाणें सुस्कारे टाकूं लागला व धनुष्याला बाण लावून राक्षसाधिपति इंद्रजितावर त्यानें सोडिले ३८. त्याच्या प्रत्यंचेचा टणत्कार श्रवण करितांक्षणीं त्या राक्षसाधिपति इंद्रजिताची मुद्रा निस्तेज झाली व तो लक्ष्मणाकडे पाहूं लागला ३९. ह्याप्रमाणें रावणपुत्र राक्षस खिन्नवदन झाल्याचें पाहून युद्धाविषयीं उद्युक्त झालेल्या लक्ष्मणाला बिभीषण ह्मणाला ४० " हे महापराक्रमी लक्ष्मणा, ह्या रावणपुत्राच्या मुखावर जीं चिन्हें मला दृष्टीं पडत आहेत त्यांवरून

स्वांस्तस्मिन्सर्पानिव विषोल्बणान् ४२ शक्राशनिसमस्पर्शैर्लक्ष्मणेनाहतः शरैः । मुहूर्तमभवन्मूढः सर्वसंक्षुभितेन्द्रियः ४३ ददर्शावस्थितं वीरमाजौ दशरथात्मजम् । सोऽभिचक्राम सौमित्रिं रोषात्संरक्तलोचनः ४४ अब्रवीच्चैनमासाद्य पुनः स परुषं वचः । किं न स्मरसि तद्युद्धे प्रथमे मत्पराक्रमम् ४५ निबद्धस्त्वं सह भ्रात्रा यदा युधि विचेष्टसे ४६ युवां खलु महायुद्धे वज्राशनिसमैः शरैः । शायितौ प्रथमं भूमौ विसंज्ञौ सपुरःसरौ ४७ स्मृतिर्वा नास्ति ते मन्ये व्यक्तं वा यमसादनम् । गन्तुमिच्छसि यन्मां त्वमाधर्षयितुमिच्छसि ४८ यदि ते प्रथमे युद्धे न दृष्टो मत्पराक्रमः । अद्य त्वां दर्शयिष्यामि तिष्ठेदानीं व्यवस्थितः ४९ इत्युक्त्वा सप्तभिर्बाणैरभिविव्याध लक्ष्मणम् । दशभिस्तु हनूमन्तं तीक्ष्णधारैः शरोत्तमैः ५० ततः शरशतेनैव सुप्रयुक्तेन वीर्यवान् । क्रोधाद्द्विगुणसंरब्धो निर्बिभेद

---

त्याचा निःसंशय पराजय झाला आहे; ह्यास्तव, तूं त्वरा कर" ४१. तदनंतर सर्पतुल्य बाण लक्ष्मणानें धनुष्याला लाविले आणि विषामुळें भयंकर असलेले सर्पच कीं काय असे ते बाण त्यानें इंद्रजितावर सोडिले ४२. इंद्राच्या अशनिसंज्ञक आयुधाप्रमाणें ज्यांचा प्रहार आहे अशा बाणांनीं लक्ष्मणानें इंद्रजिताला वेध केला असतां त्याचीं सर्व इंद्रियें क्षुब्ध होऊन तो मुहूर्तभर मूर्च्छित झाला. ४३ नंतर दशरथपुत्र वीर लक्ष्मण संग्रामामध्यें उभा आहे असें अवलोकन करून क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत असा तो इंद्रजित् लक्ष्मणावर चाल करून गेला ४४ आणि त्याच्या समीप गेल्यावर पुनरपि कठोर शब्दांनीं त्याला ह्मणाला " प्रथम झालेल्या युद्धामध्यें दृष्टोत्पत्तीस आलेल्या माझ्या पराक्रमाचें तुला स्मरण नाहीं काय ? ४५. अरे, त्यावेळीं संग्रामामध्यें भ्रात्यासहवर्तमान बद्ध होऊन तूं तडफडत पडला होतास ४६. वज्र व अशनि ह्या आयुधांप्रमाणें तीक्ष्ण असलेल्या बाणांनीं पूर्वी झालेल्या महायुद्धामध्यें मीं तुह्मांला तुमच्या पुढाऱ्यांसहवर्तमान भूमीवर निश्चेष्ट पाडिलें होतें ४७. ह्या गोष्टीचें तुला स्मरणच नाहीं असें मला वाटतें. अथवा ज्याअर्थी माझ्यावर हल्ला करण्याची तूं इच्छा करीत आहेस त्याअर्थी यमसदनाप्रत जाण्याचेंच तूं निःसंशय मनामध्यें आणिलें आहेस असें मी समजतों ४८. अरे, पहिल्या युद्धामध्यें माझा पराक्रम जर तुझ्या दृष्टीं पडला नसेल तर आतां सावध रहा; आज मी तुला आपला पराक्रम दर्शवीन " ४९. असें बोलून सात बाणांनीं त्यानें लक्ष्मणाला वेध केला; तीक्ष्ण धारांनीं युक्त असलेल्या दहा उत्कृष्ट बाणांनीं हनुमानाला वेध केला ५० आणि क्रोधामुळें पहिल्यापेक्षांही द्विगुणित क्षुब्ध झालेल्या त्या वीर्यवान् इंद्रजितानें चांगल्या रीतीनें सोडिलेल्या शंभर बाणांनीं बिभीषणाला वेध

विभीषणम् ५१ तद्दृष्ट्वेन्द्रजिता कर्म कृतं रामानुजस्तदा । अचिन्तयित्वा प्रहसन्नैतत्किंचिदिति ब्रुवन् ५२ मुमोच च शरान्घोरान्संगृह्य नरपुङ्गवः । अभीतवदनः क्रुद्धो रावणिं लक्ष्मणो युधि ५३ नैवं रणगताः शूराः प्रहरन्ति निशाचर । लघवश्चाल्पवीर्याश्च शरा हीमे सुखास्तव ५४ नैवं शूरास्तु युध्यन्ते समरे युद्धकाङ्क्षिणः । इत्येवं तं ब्रुवन्धन्वी शरैरभिववर्ष ह ५५ तस्य बाणैः सुविध्वस्तं कवचं काञ्चनं महत् । व्यशीर्यत रथोपस्थे ताराजालमिवाम्बरात् ५६ विधूतवर्मा नाराचैर्बभूव स कृतव्रणः । इन्द्रजित्समरे वीरः प्रत्यूषे भानुमानिव ५७ ततः शरसहस्रेण संक्रुद्धो रावणात्मजः । बिभेद समरे वीरो लक्ष्मणं भीमविक्रमः ५८ व्यशीर्यत महद्दिव्यं कवचं लक्ष्मणस्य तु । कृतप्रतिकृतान्योन्यं बभूवतुरभिद्रुतौ ५९ अभीक्ष्णं निःश्वसन्तौ वै युध्यतां तुमुलं युधि । शरसंकृत्तसर्वाङ्गौ सर्वतो रुधिरोक्षितौ ६० सुदीर्घकालं तौ वीरावन्योन्यं निशितैः शरैः । ततक्षतुर्महात्मानौ रणकर्मविशारदौ ॥ बभूवतुश्चात्मजये यत्तौ भीमपराक्रमौ ६१

---

केला ५१. हें इंद्रजितानें केलेलें कर्म पाहून त्याची पर्वाही न करितां रामाचा कनिष्ठ भ्राता लक्ष्मण 'हें कांहींच नाहीं' असें ह्मणत ह्मणत हसूं लागला ५२ आणि निर्भय मुद्रेनें युक्त असलेला तो क्रुद्ध पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण संग्रामामध्यें भयंकर बाण घेऊन रावणपुत्र इंद्रजितावर सोडूं लागला ५३. ( आणि ह्मणाला ) " हे निशाचरा, संग्रामामध्यें उभे राहिलेले शूर ह्याप्रमाणें प्रहार करीत नाहींत. हे तुझे हलके व दुर्बल बाण मला सुखावहच होत आहेत ५४. युद्धाभिलाषी शूर संग्रामामध्यें ह्याप्रमाणें युद्ध करीत नसतात ". असें बोलत बोलत धनुर्धारी लक्ष्मणानें त्या इंद्रजितावर बाणांचा वर्षाव केला असतां ५५ त्याच्या बाणांनीं इंद्रजिताच्या मोठ्या सुवर्णकवचाचा विध्वंस झाला आणि आकाशांतून गळून पडणारा नक्षत्रसमुदायच कीं काय असें तें कवच रथावर गळून पडलें ५६. ह्याप्रमाणें नाराच बाणांनीं कवचाचा विध्वंस होऊन शरीरावर जखमा झालेला तो वीर इंद्रजित् उदयसमयीं दिसणाऱ्या सूर्याप्रमाणें शोभूं लागला ५७. नंतर अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या भयंकर पराक्रमी वीर रावणपुत्रानें संग्रामामध्यें सहस्र बाणांनीं लक्ष्मणाला वेध केला असतां ५८ लक्ष्मणाचें मोठें दिव्य कवच फुटून गेलें व ते उभयतां एकमेकांवर तोड करण्याविषयीं उद्युक्त झाले ५९. अनावर झालेले ते उभयतां एकसारिखे सुस्कारे टाकीत टाकीत संग्रामामध्यें युद्ध करूं लागले असतां बाणांनीं त्यांचे अवयव विदीर्ण होऊन सर्व बाजूंनीं ते रक्तानें भरून गेले ६०. पुष्कळच वेळपर्यंत ते महात्मे वीर तीक्ष्ण बाणांनीं एकमेकांला विदीर्ण करीत होते आणि रणकर्मामध्यें निपुण असलेले

तौ शरौघैस्तथाकीर्णौ निकृत्तकवचध्वजौ । सृजन्तौ रुधिरं चोष्णं जलं प्रस्रवणाविव ६२ शरवर्षं ततो घोरं मुञ्चतोर्भीमनिःस्वनम् । सासारयोरिवाकाशे नीलयोः कालमेघयोः ६३ तयोरथ महान्कालो व्यतीयाद्युध्यमानयोः । न च तौ युद्धवैमुख्यं क्लमं चाप्युपजग्मतुः ६४ अस्त्राण्यस्त्रविदां श्रेष्ठौ दर्शयन्तौ पुनः पुनः । शरानुच्चावचाकारानन्तरिक्षे बबन्धतुः ६५ व्यपेतदोषमस्यन्तौ लघु चित्रं च सुष्ठु च । उभौ तु तुमुलं घोरं चक्रतुर्नरराक्षसौ ६६ तयोः पृथक्पृथग्भीमः शुश्रुवे तुमुलः स्वनः । स कम्पं जनयामास निर्घात इव दारुणः ६७ तयोः स भ्राजते शब्दस्तथा समरयत्तयोः । सुघोरयोर्निःस्वनतोर्गगने मेघयोरिव ६८ सुवर्णपुङ्खैर्नाराचैर्बलवन्तौ कृतव्रणौ । प्रसुस्रुवाते रुधिरं कीर्तिमन्तौ जये धृतौ ६९ ते गात्रयोर्निपतिता रुक्मपुङ्खाः शरा युधि । असृग्दिग्धा विनिष्पेतुर्विविशुर्धरणीतलम् ७० अन्ये सुनिशितैः शस्त्रैराकाशे संजघट्टिरे । बभञ्जुश्चिच्छि-

---

ते उभयतांही भयंकर पराक्रमी वीर स्वतःला जय प्राप्त करून घेण्याविषयीं यत्न करीत होते ६१. ह्याप्रमाणें बाणसमुदायांनीं व्याप्त झालेल्या त्या उभयतांचींही कवचें व ध्वज तुटून जाऊन त्यांच्या शरीरांतून उष्ण रक्ताचे प्रवाह चालले असतां जलप्रवाह सोडणाऱ्या झऱ्यांप्रमाणें ते दिसूं लागले ६२. तदनंतर भयंकर शब्दानें युक्त अशी घोर बाणवृष्टि करूं लागलेले ते उभयतां वीर आकाशांतील जलधारांनीं युक्त असलेल्या प्रलयकालच्या नीलमेघांप्रमाणें दिसूं लागले ६३. त्या उभतांचें युद्ध सुरू होऊन पुष्कळच वेळ झाला तरी ते युद्धापासून पराङ्मुखही झाले नाहींत व श्रांतही झाले नाहींत ६४. अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेले ते उभयतां योद्धे वारंवार अस्त्रें सोडूं लागले व लहानमोठ्या आकाराचे बाण त्या अंतरिक्षामध्यें भरूं लागले ६५. आश्चर्यकारक, निर्दोष व उत्कृष्ट रीतीनें झटपट बाण सोडणारे ते उभयतां मानवराक्षस तुमुल व घोर युद्ध करूं लागले ६६. त्यांच्यापैकीं प्रत्येकाचा तुमुल व भयंकर ध्वनि वेगळा वेगळा ऐकूं येऊं लागला व भयंकर निर्घातशब्दाप्रमाणें तो श्रवण करणाऱ्यांना कंप उत्पन्न करूं लागला ६७. समरांगणामध्यें सज्ज झालेल्या त्या उभयतांचा शब्द आकाशामध्यें गर्जना करणाऱ्या अतिभयंकर मेघांच्या शब्दाप्रमाणें भासूं लागला ६८. जयाविषयीं ज्यांना उत्साह आहे अशा त्या कीर्तिमान व बलाढ्य वीरांना सुवर्णमय पिच्छयुक्त भागांनीं संपन्न असलेल्या नाराच बाणांनीं क्षतें पडलीं असतां त्यांच्या शरीरांतून रक्ताचा स्राव सुरू झाला ६९; व संग्रामामध्यें त्यांच्या शरीरावर पडलेले ते सुवर्णपुंखयुक्त बाण रक्तानें भरून जाऊन खालीं पडले असतां भूतलामध्यें प्रविष्ट झाले ७०. अतिशय तीक्ष्ण शस्त्रांसहवर्तमान

दृश्चैव तयोर्बाणाः सहस्रशः ७१ स बभूव रणे घोरस्तयोर्बाणमयश्चयः।
अग्निभ्यामिव दीप्ताभ्यः सत्रे कुशमयश्चयः ७२ तयोः क्षतव्रणौ देहौ शुशु-
भाते महात्मनोः। सुपुष्पाविव निष्पत्रौ वने किंशुकशाल्मली ७३ चक्रतु-
स्तुमुलं घोरं संनिपातं मुहुर्मुहुः। इन्द्रजिल्लक्ष्मणश्चैव परस्परजयैषिणौ ७४
लक्ष्मणो रावणिं युद्धे रावणिश्चापि लक्ष्मणम्। अन्योन्यं तावभिघ्नन्तौ
न श्रमं प्रतिपद्यताम् ७५ बाणजालैः शरीरस्थैरवगाढैस्तरस्विनौ। शुशु-
भाते महावीर्यौ प्ररूढाविव पर्वतौ ७६ ततो रुधिरसिक्तानि संवृतानि शरैर्भृ-
शम्। बभ्राजुः सर्वगात्राणि ज्वलन्त इव पावकाः ७७ तयोरथ महान्कालो
व्यतीयाद्युध्यमानयोः। न च तौ युद्धवैमुख्यं श्रमं चाप्यभिजग्मतुः ७८अथ
समरपरिश्रमं निहन्तुं समरमुखेष्वजितस्य लक्ष्मणस्य। प्रियहितमुपपादय-
न्महात्मा समरमुपेत्य बिभीषणोवतस्थे७९ [३९६१] इत्यार्षे श्रीमद्रामा-
यणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेष्टाशीतितमः सर्गः॥ ८८ ॥

---

आकाशामध्यें त्यांच्या कांहीं बाणांचें घर्षण होऊं लागलें व त्यांचे हजारों बाण एक-मेकांना मोडूं लागले तुकडे तुकडे करूं लागले ७१. सत्रामध्यें प्रज्वलित अग्नीसह-वर्तमान दर्भांचा ढीग ज्याप्रमाणें शोभूं लागतो त्याप्रमाणें संग्रामामध्यें त्या उभयतांचा तो बाणमय ढीग शोभूं लागला ७२. व्रणयुक्त झालेले त्या महात्म्यांचे देह वनामध्यें पुष्पयुक्त व पत्ररहित झालेल्या पलाश व शाल्मली ह्यां वृक्षांप्रमाणें दिसूं लागले ७३. परस्परांच्या पराजयाची इच्छा करणारे ते उभयतां इंद्रजित् व लक्ष्मण वारंवार तुमुल व भयंकर युद्ध करूं लागले ७४. लक्ष्मण रावणपुत्रावर आणि रावणपुत्र लक्ष्मणावर अशारीतीनें संग्रामामध्यें ते एकमेकांवर प्रहार करूं लागले असतां श्रांत झाले नाहींत ७५. शरीरामध्यें रुतून राहिलेल्या बाणसमु-दायांच्या योगानें ते उभयतां महावीर्यवान् व वेगवान् वीर वृक्षयुक्त पर्वतांप्रमाणें दिसूं लागले ७६. तदनंतर बाणांच्या योगानें व्याप्त व रक्तानें भरून गेलेलीं त्या उभयतांचीं सर्व गात्रें प्रज्वलित अग्निप्रमाणें दिसूं लागलीं ७७. इंद्रजित् व लक्ष्मण ह्यांचें युद्ध सुरू होऊन जरी बराच काल लोटला तरी त्यांपैकीं कोणीही युद्धापासून पराङ्मुख झाला नाहीं व कोणी श्रमला नाहीं ७८. संग्रामामध्यें पराजित न होणाऱ्या लक्ष्म-णाला युद्धामध्यें झालेल्या श्रमाचा परिहार करण्याकरितां आणि त्याचें प्रिय व हित करण्याकरितां महात्मा बिभीषण समरांगणामध्यें येऊन उभा राहिला ७९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अठ्ठ्या-यशीवा सर्ग समाप्त झाला॥ ८८ ॥

युध्यमानौ ततो दृष्ट्वा प्रसक्तौ नरराक्षसौ । प्रभिन्नाविव मातङ्गौ परस्परजयैषिणौ १ तयोर्युद्धं द्रष्टुकामो वरचापधरो बली । शूरः स रावणभ्राता तस्थौ सङ्ग्राममूर्धनि २ ततो विस्फारयामास महद्धनुरवस्थितः । उत्ससर्ज च तीक्ष्णाग्रान्राक्षसेषु महाशरान् ३ ते शराः शिखिसंस्पर्शा निपतन्तः समाहिताः । राक्षसान्दारयामासुर्वज्रा इव महागिरीन् ४ बिभीषणस्यानुचरास्तेपि शूलासिपट्टिशैः । चिच्छिदुः समरे वीरान्राक्षसान्राक्षसोत्तमाः ५ राक्षसैस्तैः परिवृतः स तदा तु बिभीषणः । बभौ मध्ये प्रधृष्टानां कलभानामिव द्विपः ६ ततः संचोदमानो वै हरीन्रक्षोवधप्रियान् । उवाच वचनं काले कालज्ञो रक्षसांवरः ७ एकोयं राक्षसेन्द्रस्य परायणमवस्थितः । एतच्छेषं बलं तस्य किं तिष्ठत हरीश्वराः ८ तस्मिंश्च निहते पापे राक्षसे रणमूर्धनि । रावणं वर्जयित्वा तु शेषमस्य बलं हतम् ९ प्रहस्तो निहतो वीरो निकुम्भश्च महाबलः । कुम्भकर्णश्च कुम्भश्च धूम्राक्षश्च निशाचरः १० जम्बुमाली महामाली तीक्ष्णवेगोश-

---

मत्त गजांप्रमाणें एकमेकांना जिंकण्याची इच्छा धरून व हातघाईवर येऊन युद्ध करीत असलेल्या त्या नरराक्षसांना अवलोकन करून १ त्यांचें युद्ध पहाण्याच्या उद्देशानें तो श्रेष्ठ धनुष्य धारण करणारा बलाढ्य व शूर रावणभ्राता संग्राममध्यें उभा राहिला २. तदनंतर सज्ज होऊन राहिलेल्या त्या बिभीषणानें आपल्या मोठ्या धनुष्याचा टणत्कार करून तीक्ष्ण अग्रांनीं युक्त असलेले मोठे मोठे बाण राक्षसांवर सोडिले ३. तेव्हां अग्निप्रमाणें दग्ध करीत सुटणारे व उत्कृष्ट रीतीनें सोडिलेले ते बाण येऊन पडूं लागले असतां वज्रांच्या योगानें विदीर्ण होऊन जाणारे मोठे मोठे पर्वतच कीं काय असे ते राक्षस त्यांच्या योगानें विदीर्ण होऊं लागले ४. बिभीषणाचे अनुयायी जे राक्षसश्रेष्ठ होते तेही शूल, खड्ग व पट्टे ह्यांच्या योगानें संग्राममध्यें वीर राक्षसांना तोडूं लागले असतां ५ त्या राक्षसांनीं परिवेष्टित झालेला तो बिभीषण उच्छृंखल गजबालकांमध्यें सांपडलेल्या गजाप्रमाणें दिसूं लागला ६. नंतर राक्षसांचा वध ज्यांना प्रिय आहे अशा वानरांना प्रोत्साहन देण्याकरितां तो कालवेत्ता राक्षसश्रेष्ठ वेळ पाहून वानरांना ह्मणाला ७" हे वानरराजहो, राक्षसाधिपति रावणाचा हा काय तो एकच मुख्य योद्धा आहे व येवढेंच त्याचें सैन्य आतां शिलक राहिलें आहे. तस्मात्, तुह्मी असे स्वस्थ कशाकरितां उभे राहिलां आहांत ? ८. ह्या पापी राक्षसाचा संग्राममध्यें वध झाला असतां रावणाशिवाय अवशिष्ट राहिलेल्या त्याच्या सर्व सैन्याचा वध झाल्यासारिखाच आहे ९. वीर प्रहस्ताचा वध झाला असून त्याचप्रमाणें

निप्रभः । सुमघ्नो यज्ञकोपश्च वज्रदंष्ट्रश्च राक्षसः ११ संह्रादी विकटो-
रिघ्नस्तपनो मन्द एव च । प्रघास प्रघसश्चैव प्रजङ्घो जङ्घ एव च १२
अग्निकेतुश्च दुर्धर्षो रश्मिकेतुश्च वीर्यवान् । विद्युज्जिह्वो द्विजिह्वश्च सूर्य-
शत्रुश्च राक्षसः १३ अकम्पनः सुपार्श्वश्च चक्रमाली च राक्षसः ।
कम्पनः सत्त्ववन्तश्च देवान्तकनरान्तकौ १४ एतान्निहत्यातिबलान्बहू-
न्राक्षससत्तमान् । बाहुभ्यां सागरं तीर्त्वा लङ्घ्यतां गोष्पदं लघु १५
एतावदेव शेषं वो जेतव्यमिति वानराः । हताः सर्वे समागम्य राक्षसा
बलदर्पिताः १६ अयुक्तं निधनं कर्तुं पुत्रस्य जनितुर्मम । घृणामपास्य
रामार्थे निहन्यां भ्रातुरात्मजम् १७ हन्तुकामस्य मे बाष्पं चक्षुश्चैव निरु-
णद्धि । तमेवैष महाबाहुर्लक्ष्मणः शमयिष्यति १८ वानरा घ्नत संभूय
भृत्यानस्य समीपगान् १९ इति तेनातियशसा राक्षसेनाभिचोदिताः । वान-
रेन्द्रा जहृषिरे लाङ्गूलानि च विव्यधुः २० ततस्तु कपिशार्दूलाः क्ष्वेड-
न्तश्च पुनः पुनः । मुमुचुर्विविधान्नादान्मेघान्दृष्ट्वेव बर्हिणः २१ जाम्बवानपि

---

महाबलाढ्य निकुंभ, कुंभकर्ण, कुंभ, निशाचर धूम्राक्ष १०, जंबुमाली, महामाली, तीक्ष्णवेग, अशनिप्रभ, सुमघ्न, यज्ञकोप, वज्रदंष्ट्र राक्षस ११, संन्हादी, विकट, अरिघ्न, तपन, मंद, प्रघास, प्रघस, प्रजंघ, जंघ १२, अजिंक्य अग्निकेतु, वीर्यवान् रश्मिकेतु, विद्युज्जिह्व, द्विजिह्व, सूर्यशत्रु राक्षस १३, अकंपन, सुपार्श्व, चक्रमाली राक्षस, कंपन, सत्त्ववान् आणि देवांतक व नरांतक ह्यांचाही वध झाला आहे १४. ज्याअर्थीं ह्या असंख्य अतिबलाढ्य राक्षसश्रेष्ठांचा तुह्मीं वध केला आहे त्याअर्थीं बाहूंनीं समुद्र तरून स्थित असलेले तुह्मी अवशिष्ट राहिलेलें क्षुद्र गोष्पद तरून जा १५. सारांश, हे वानरहो, समुद्राशीं ज्याप्रमाणें गाईच्या उमटलेल्या पावलांत सांचलेल्या पाण्याचें प्रमाण आहे त्याचप्रमाणें मारिल्या गेलेल्या राक्षसांशीं जिंकावयाचें राहिलेल्या अवशिष्ट राक्षससैन्याचें प्रमाण आहे व बलाच्या संबंधानें गर्व वाहणाऱ्या इतर सर्वही राक्षसांचा युद्धामध्यें वध झाला आहे १६. पित्याचे ठिकाणीं असलेल्या माझ्या हातून पुत्रतुल्य इंद्रजिताचा वध होणें जरी योग्य नाहीं तरी रामाकरितां दया बाजूला ठेवून मी त्याचा वध करीन १७. ह्याचा वध करण्याचें माझ्या मनामध्यें आहे. परंतु, अश्रूंच्या योगानें माझ्या दृष्टीचा निरोध होत आहे. तस्मात्, हा महापराक्रमी लक्ष्मणच त्या इंद्रजिताचा वध करील १८. हे वानरहो, तुह्मी एकत्र जुळून समीप असलेल्या ह्याच्या सेवकांचा वध करा " ह्याप्रमाणें त्या अतियशस्वी राक्षसानें सांगितलें असतां वानराधिपति आनंदित होऊन पुच्छें हालवूं

तैः सर्वैः मयूथैरभिसंवृतः । तेश्चाभिस्ताडयामासुर्नखैर्दन्तैश्च राक्ष-
सान् २२ निघ्नन्तमृक्षाधिपतिं राक्षसास्ते महाबलाः । परिभर्त्स्य भयं
त्यक्त्वा तमनेकविधायुधाः २३ शरैः परशुभिस्तीक्ष्णैः पट्टिशैर्यष्टितोमरैः।
जाम्बवन्तं मृधे जघ्नुर्निघ्नन्तं राक्षसीं चमूम् २४ स संप्रहारस्तुमुलः संजज्ञे
कपिरक्षसाम् । देवासुराणां क्रुद्धानां यथा भीमो महास्वनः २५ हनूमानपि
संक्रुद्धः सानुमुत्पाट्य पर्वतात् । स लक्ष्मणं स्वयं पृष्ठादवरोप्य महामनाः २६
रक्षसां कदनं चक्रे दुरासादः सहस्रशः २६ स दत्त्वा तुमुलं युद्धं पितृ-
व्यस्येन्द्रजिद्बली । लक्ष्मणं परवीरघ्नः पुनरेवाभ्यधावत २७ तौ प्रयुद्धौ
तदा वीरौ मृधे लक्ष्मणराक्षसौ । शरौघानभिवर्षन्तौ जघ्नतुस्तौ परस्प-
रम् २८ अभीक्ष्णमन्तर्दधतुः शरजालैर्महाबलौ । चन्द्रादित्याविवोष्णान्ते
यथा मेघैस्तरस्विनौ २९ न ह्यादानं न संधानं धनुषो वा परिग्रहः । न
विप्रमोक्षो बाणानां न विकर्षो न विग्रहः ३० न मुष्टिप्रतिसंधानं न

---

लागले २०. तदनंतर वारंवार रणशब्द करीत असलेले ते वानरश्रेष्ठ मेघ दृष्टीं पडले असतां गर्जना करणाऱ्या मयूरपक्ष्यांप्रमाणें नानाप्रकारच्या गर्जना करूं लागले २१. आपल्या सैन्यांतील त्या सर्व ऋक्षांनीं जांबवानूही परिवेष्टित झाल्यावर ते वानर पाषाण, नखें व दांत ह्यांच्या योगानें राक्षसांना पीडा देऊं लागले २२. ऋक्षराज जांबवान् राक्षसांचा वध करूं लागला असतां अनेक प्रकारचीं आयुधें धारण केलेले ते महाबलाढ्य राक्षसही राक्षससेनेचा वध करणाऱ्या जांबवानाची निर्भर्त्सना करून निर्भयपणें संग्रामामध्यें बाण, तीक्ष्ण परशु, पट्टे, सोडगे व तोमर ह्यांच्या योगानें जांबवानाला प्रहार करूं लागले २३, २४. तेव्हां क्रुद्ध झालेल्या देवदैत्यांच्या युद्धाप्रमाणें मोठी भयंकर गर्जना सुरू होऊन त्या वानरराक्षसांमध्यें तुमुल युद्ध सुरू झालें २५. नंतर उदार मनानें युक्त असलेला हनुमानूही क्रुद्ध झाला आणि लक्ष्मणाला आपण होऊनच पाठीवरून खालीं उतरून पर्वतानें एक शिखर त्यानें उपटून घेतलें आणि त्या अजिंक्य हनुमानानें हजारों राक्षसांचा विध्वंस केला २६. ह्याप्रमाणें तो बलाढ्य व शत्रुपक्षीय वीरनाशक इंद्रजित् चुलत्याशीं तुमुल युद्ध करून पुनरपि लक्ष्मणावर धांवून गेला २७. संग्रामामध्यें युद्धाकरितां उद्युक्त झालेले ते उभयतां वीर लक्ष्मण व राक्षस बाणसमुदायांचा वर्षाव करीत करीत एकमेकांना प्रहार करूं लागले २८. उष्णकाल समाप्त झाल्यानंतर मेघांच्या योगानें ज्याप्रमाणें चंद्रसूर्य वारंवार अंतर्धान पावत असतात त्याप्रमाणें ते उभयतां वेगवान् व महाबलाढ्य वीर बाणसमुदायांच्या योगानें वारंवार अंतर्धान पावूं लागले २९. त्या युद्ध करणाऱ्या वीरांचे हात फारच

लक्ष्यप्रतिपादनम् । अदृशत तयोस्तत्र युध्यतोः पाणिलाघवात् ३१ चापवेगप्रयुक्तैश्च बाणजालैः समन्ततः । अन्तरिक्षेभिसंपन्ने न रूपाणि चकाशिरे ३२ लक्ष्मणो रावणिं प्राप्य रावणिश्चापि लक्ष्मणम् । अव्यवस्था भवत्युग्रा ताभ्यामन्योन्यविग्रहे ३३ ताभ्यामुभाभ्यां तरसा प्रसृष्टैर्विशिखैः शितैः । निरन्तरमिवाकाशं बभूव तमसा वृतम् ३४ तैः पतद्भिश्च बहुभिस्तयोः शरशतैः शितैः । दिशश्च प्रदिशश्चैव बभूवुः शरसंकुलाः ३५ तमसा पिहितं सर्वमासीत्प्रतिभयं महत् ३६ अस्तं गते सहस्रांशौ संवृते तमसा च वै । रुधिरौघा महानद्यः प्रावर्तन्त सहस्रशः ३७ क्रव्यादा दारुणा वाग्भिश्चिक्षिपुर्भीमनिःस्वनान् । न तदानीं ववौ वायुर्न च जज्वाल पावकः ३८ स्वस्त्यस्तु लोकेभ्य इति जजल्पुस्ते महर्षयः । संपेतुश्चात्र संतप्ता गन्धर्वाः सह चारणैः ३९ अथ राक्षससिंहस्य कृष्णान्कनकभूषणान् । शरैश्चतुर्भिः सौमित्रिर्विव्याध चतुरो हयान् ४० ततोपरेण भल्लेन पीतेन निशितेन च । संपूर्णायतमुक्तेन सुपत्रेण सुवर्चसा ४१ महेन्द्राश-

---

चलाख असल्यामुळें बाण घेणें, धनुष्याला लाविणें, धनुष्य धरणें, बाण सोडणें, धनुष्य आकर्षण करणें, एकामागें एक बाण सोडणें, मुठीनें बळकट धरणें आणि लक्ष्याचा भेद करणें हीं केव्हां केलीं जातात हें कांहींएक समजेनासें झालें ३०, ३१. धनुष्याच्या वेगानें सुटलेल्या बाणसमुदायांनीं अंतरिक्ष सर्व बाजूंनीं व्याप्त झाल्यामुळें रूपयुक्त वस्तु दृष्टीस पडेनाशा झाल्या ३२. रावणपुत्राला गांठून लक्ष्मण व लक्ष्मणाला गांठून रावणपुत्र अशारीतीनें ते एकमेकांशीं युद्ध करूं लागले असतां भयंकर घोटाळा उडून गेला ३३ आणि त्या उभयतांनीं जोरानें सोडिलेल्या तीक्ष्ण बाणांच्या योगानें भरून गेलेलें आकाश अंधकारानें व्याप्त होऊन गेलें ३४. त्या उभयतांचे शेंकडों असंख्य बाण रणभूमीमध्यें पडूं लागले असतां दिशा व उपदिशा ह्या सर्व त्या बाणांनींच व्याप्त होऊन गेल्या ३५; आणि सर्व कांहीं अंधकारानें व्याप्त होऊन फारच भयंकर दिसूं लागलें ३६. अंधकारानें सूर्य व्याप्त होऊन अस्तंगत झाला असतां रुधिरप्रवाहानें युक्त अशा हजारों महानद्या सुरू झाल्या ३७. मांसभक्षक गृध्रादि भयंकर प्राणी वागिंद्रियांच्या योगानें भयंकर ध्वनि करूं लागले; वायूचें वाहणें बंद झालें; अग्निही प्रज्वलित होईनासा झाला ३८; "लोकांचें कल्याण असो" असें महर्षि ह्मणूं लागले आणि चारणांसहवर्तमान गंधर्वही संतप्त होऊन खालीं पडले ३९. तदनंतर राक्षसश्रेष्ठ इंद्रजिताच्या सुवर्णालंकारांनीं भूषित केलेल्या कृष्णवर्ण चार अश्वांना सुमित्रापुत्र लक्ष्मणानें चार बाणांनीं वेध केला ४०. तदनंतर उत्कृष्ट पिच्छें व उत्तम तेज ह्यांनीं युक्त असून

निकल्पेन सूतस्य विचरिष्यतः । स तेन बाणाशनिना तलशब्दानुनादिना ४२ लाघवाद्राघवः श्रीमाञ्शिरः कायादपाहरत् । स यन्तरि महातेजा हते मन्दोदरीसुतः ४३ स्वयं सारथ्यमकरोत्पुनश्च धनुरस्पृशत् । तदद्भुतमभूत्तत्र सारथ्यं पश्यतां युधि ४४ हयेषु व्यग्रहस्तं तं विव्याध निशितैः शरैः । धनुष्यथ पुनर्व्यग्रं हयेषु मुमुचे शरान् ४५ छिद्रेषु तेषु बाणौघैर्विचरन्तमभीतवत् । अर्दयामास समरे सौमित्रिः शीघ्रकृत्तमः ४६ निहतं सारथिं दृष्ट्वा समरे रावणात्मजः । प्रजहौ समरोद्धर्षं विषण्णः स बभूव ह ४७ विषण्णवदनं दृष्ट्वा राक्षसं हरियूथपाः । ततः परमसंहृष्टा लक्ष्मणं चाभ्यपूजयन् ४८ ततः प्रमाथी रभसः शरभो गन्धमादनः । अमृष्यमाणाश्चत्वारश्चक्रुर्वेगं हरीश्वराः ४९ ते चास्य हयमुख्येषु तूर्णमुत्पत्य वानराः । चतुर्षु सुमहावीर्या निपेतुर्भीमविक्रमाः ५० तेषामधिष्ठितानां तैर्वानरैः पर्वतोपमैः । मुखेभ्यो रुधिरं व्यक्तं हयानां समवर्तत ॥ ते हया मथिता

---

पूर्णपणें धनुष्य ओढून सोडिलेला जो दुसरा पाजळलेला तीक्ष्ण व इंद्राच्या अशनिसंज्ञक आयुधाची बरोबरी करणारा आणि तलशब्दाच्या प्रतिध्वनीनें युक्त असलेला जो दुसरा अशनितुल्य भल्लबाण त्याच्या योगानें रथ चालविणाऱ्या सारथ्याचें मस्तक ४१, ४२ रघुनंदन श्रीमान् लक्ष्मणानें धडापासून लगेंच वेगळें केलें. ह्याप्रमाणें सारथ्याचा वध झाला असतां तो मंदोदरीपुत्र महातेजस्वी इंद्रजित् ४३ हातामध्यें धनुष्य घेऊन स्वतः सारथ्यही करूं लागला असतां संग्रामामध्यें त्याचें तें सारथ्यकर्म प्रेक्षकांना आश्चर्यकारक वाटलें ४४; परंतु, अश्वांकडे इंद्रजिताचा हात गुंतल्याबरोबर तीक्ष्ण बाणांनीं लक्ष्मण त्याला वेध करूं लागला आणि तो इंद्रजित् धनुष्याकडे गुंतला असतां त्याच्या अश्वांवर बाण टाकूं लागला ४५. तथापि, बाणसमुदायांच्या योगानें ते अश्व छिन्नभिन्न झाल्यावर इंद्रजित् संग्रामामध्यें निर्भयपणें संचार करूं लागला असतां अत्यंत त्वरा करणाऱ्या सुमित्रापुत्र लक्ष्मणानें त्याला जर्जर केलें ४६. ह्याप्रमाणें संग्रामामध्यें सारथ्याचा वध झाल्याचें अवलोकन केल्यावर रावणपुत्र इंद्रजितानें युद्धाचा उत्साह सोडून दिला व तो खिन्न होऊन बसला ४७. तेव्हां इंद्रजित् राक्षस खिन्नवदन झाल्याचें अवलोकन करून वानरसेनाधिपति अतिशय आनंदित झाले व लक्ष्मणाची प्रशंसा करूं लागले ४८. तदनंतर प्रमाथी, रभस, शरभ व गंधमादन ह्या चार यशस्वी वानराधिपतींनीं त्वरा केली ४९ आणि अत्यंत महावीर्यवान् व भयंकर पराक्रम करणारे ते वानर सत्वर उड्डाण करून त्याच्या चार श्रेष्ठ अश्वांवर तुटून पडले ५०. ह्याप्रमाणें ते पर्वततुल्य वानर त्या अश्वांवर बसले असतां त्यांच्या

भग्ना व्यसवो धरणीं गताः ५१ ते निहत्य हयांस्तस्य प्रमथ्य च महारथम् । पुनरुत्पत्य वेगेन तस्थुर्लक्ष्मणपार्श्वतः ५२ स हताश्वादवप्लुत्य रथान्मथितसारथिः । शरवर्षेण सौमित्रिमभ्यधावत रावणिः ५३ ततो महेन्द्रप्रतिमः स लक्ष्मणः पदातिनं तं निहतैर्हयोत्तमैः । सृजन्तमाजौ निशितान्छरोत्तमान्भृशं तदा बाणगतैर्व्यदारयत् ५४ [४०१५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे एकोननवतितमः सर्गः॥८९॥

स हताश्वो महातेजा भूमौ तिष्ठन्निशाचरः । इन्द्रजित्परमक्रुद्धः संप्रजज्वाल तेजसा १ तौ धन्विनौ जिघांसन्तावन्योन्यमिषुभिर्भृशम् । विजयेनाभिनिष्क्रान्तौ वने गजवृषाविव २ निबर्हयन्तश्चान्योन्यं ते राक्षसवनौकसः । भर्तारं न जहुर्युद्धे संपतन्तस्ततस्ततः ३ ततस्तान्राक्षसान्सर्वान्हर्षयन्रावणात्मजः । स्तुवानो हर्षमाणश्च इदं वचनमब्रवीत् ४ तमसा बहुलेनेमाः संसक्ताः सर्वतो दिशः । नेह विज्ञायते स्वो वा परो वा

---

मुखांतून स्पष्टपणें रक्त वाहूं लागलें ५१ आणि जर्जर झालेले ते अश्व छिन्नभिन्न होऊन व मरण पावून भूमीवर पडले. ह्याप्रमाणें त्याच्या अश्वांचा वध करून त्याच्या महारथाचा विध्वंस केल्यावर पुनरपि वेगानें उड्डाण करून ते वानर लक्ष्मणाचे समीप उभे राहिले ५२. ह्यानंतर ज्याला जोडिलेल्या अश्वांचा वध झाला आहे अशा रथावरून ज्याच्या सारथ्याचा नाश झाला आहे असा तो रावणपुत्र बाणांचा वर्षाव करीत करीत सुमित्रापुत्र लक्ष्मणावर धांवला ५३. तदनंतर त्या उत्कृष्ट अश्वांचा वध झाल्यामुळें इंद्रजित् पदाति होऊन तीक्ष्ण व उत्कृष्ट बाण संग्रामामध्यें सोडूं लागला असतां त्या महेंद्रतुल्य लक्ष्मणानें बाणांच्या अग्रांनीं त्याला विदीर्ण करून टाकिलें ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडांपैकीं एकुणनव्वदावा सर्ग समाप्त झाला ॥ ८९ ॥

अश्वांचा वध झाला असतां त्या महातेजस्वी निशाचर इंद्रजिताला भूमीवरच उभें राहणें भाग पडलें व अत्यंत क्रुद्ध होऊन तो तेजानें अगदीं प्रज्वलित होऊं लागला १. अरण्यामध्यें ज्याप्रमाणें दोन गजेंद्र एकमेकांशीं युद्ध करूं लागतात त्याप्रमाणें बाणांच्या योगानें परस्परांच्या वधाचा उद्देश मनामध्यें धरून विजयप्राप्तीकरितां ते उभयतां धनुर्धारी युद्ध करूं लागले २. एकमेकांला मारीत असलेले ते राक्षस व वानर चोहोंकडून एकत्र जुळत होते व संग्रामामध्यें ते आपल्या अधिपतीला सोडीत नव्हते ३. तदनंतर त्या सर्वही राक्षसांना आनंदित करण्याच्या उद्देशानें तो रावणपुत्र इंद्रजित् त्यांची प्रशंसा करूं लागला आणि स्वतः हर्षयुक्त झाल्याचें दर्शवीत त्यांना ह्मणाला ४.

राक्षसोत्तमाः५ धृष्टं भवन्तो युध्यन्तु हरीणां मोहनाय वै । अहं तु रथमास्थाय आगमिष्यामि संयुगे ६ तथा भवन्तः कुर्वन्तु यथेमे हि वनौकसः। न युध्येयुर्महात्मानः प्रविष्टे नगरं मयि ७ इत्युक्त्वा रावणसुतो वञ्चयित्वा वनौकसः । प्रविवेश पुरीं लङ्कां रथहेतोरमित्रहा ८ स रथं भूषयित्वाथ रुचिरं हेमभूषितम् । प्रासासिशरसंयुक्तं युक्तं परमवाजिभिः ९ अधिष्ठितं हयज्ञेन सूतेनाप्तोपदेशिना । आरुरोह महातेजा रावणिः समितिंजयः १० स राक्षसगणैर्मुख्यैर्वृतो मन्दोदरीसुतः । निर्ययौ नगराद्वीरः कृतान्तबलचोदितः ११ सोभिनिष्क्रम्य नगरादिन्द्रजित्परमौजसा । अभ्ययाज्जवनैरश्वैर्लक्ष्मणं सविभीषणम् १२ ततो रथस्थमालोक्य सौमित्री रावणात्मजम् । वानराश्च महावीर्या राक्षसश्च विभीषणः १३ विस्मयं परमं जग्मुर्लाघवात्तस्य धीमतः १४ रावणिश्चापि संक्रुद्धो रणे वानरयूथपान् । पातयामास बाणौघैः शतशोथ सहस्रशः १५ स मण्डलीकृतधनू रावणिः

---

" हे राक्षसश्रेष्ठहो, ह्या सर्व दिशा गाढ अंधकारानें अगदीं व्याप्त झाल्या आहेत व त्यामुळें स्वकीय कोण अथवा परकीय कोण हें येथें समजेनासें झालें आहे ५. वानरांना मोह पाडण्याकरितां तुह्मी निर्भयपणानें युद्ध करा ह्मणजे मी इतक्यांत रथारूढ होऊन संग्रामामध्यें परत येईन ६. मी नगरामध्यें प्रविष्ट होण्यास उद्युक्त झालों असतां माझ्या प्रवेशाला विघ्न आणण्याच्या उद्देशानें ह्या वानरांना माझ्याशीं युद्ध करण्याचा अवसर सांपडणार नाहीं अशी तुह्मा व्यवस्था करा " ७. असें त्या राक्षसांना सांगून व वानरांना फसवून रथाकरितां तो शत्रुनाशक इंद्रजित् लंकानगरीमध्यें प्रविष्ट झाला ८. तदनंतर प्रास, खड्ग व बाण ह्यांनीं युक्त, सुवर्णालंकारांनीं भूषित उत्कृष्ट अश्व जोडिलेला आणि हिताचा उपदेश करणाऱ्या अश्ववेत्त्या सारथ्यानें संपन्न असलेला मनोहर रथ भूषित करून तो संग्रामविजयी महातेजस्वी रावणपुत्र त्यावर आरूढ झाला ९, १० आणि मृत्यूच्या बलानें प्रेरित झालेला तो वीर मंदोदरीपुत्र मुख्य राक्षसगणांना बरोबर घेऊन नगरांतून बाहेर पडला ११. ह्याप्रमाणें तो इंद्रजित् मोठ्या वेगानें नगरांतून बाहेर पडला असतां वेगवान् अश्वांच्या योगानें बिभीषणासहवर्तमान लक्ष्मणासमीप येऊन पोंचला असतां १२ रावणपुत्र इंद्रजित् रथारूढ झालेला अवलोकन केल्यावर त्या बुद्धिमान् रावणपुत्राच्या चलाखीनें लक्ष्मण, महावीर्यवान् वानर आणि बिभीषण राक्षस ह्यांना अतिशय थक्क करून सोडिलें १३, १४. नंतर संग्रामामध्यें क्रुद्ध झालेल्या रावणपुत्र इंद्रजितानें बाणसमुदायांच्या योगानें शेंकडों हजारों वानरसेनाधिपतींचा निःपात केला १५.

समितिंजयः। हरीनभ्यहनत्क्रुद्धः परं लाघवमास्थितः १६ ते वध्यमाना
हरयो नाराचैर्भीमविक्रमैः।सौमित्रिं शरणं प्राप्ताः प्रजापतिमिव प्रजाः १७
ततः समरकोपेन ज्वलितो रघुनन्दनः। चिच्छेद कार्मुकं तस्य दर्शयन्पा-
णिलाघवम् १८ सोऽन्यत्कार्मुकमादाय सज्जं चक्रे त्वरन्निव। तदप्यस्य
त्रिभिर्बाणैर्लक्ष्मणो निरकृन्तत १९ अथैनं छिन्नधन्वानमाशीविषविषो-
पमैः। विव्याधोरसि सौमित्री रावणिं पञ्चभिः शरैः २० ते तस्य कायं
निर्भिद्य महाकार्मुकनिःसृताः। निपेतुर्धरणीं बाणा रक्ता इव महोरगाः २१
स च्छिन्नधन्वा रुधिरं वमन्वक्त्रेण रावणिः। जग्राह कार्मुकश्रेष्ठं दृढज्यं
बलवत्तरम् २२ स लक्ष्मणं समुद्दिश्य परं लाघवमास्थितः। ववर्ष शर-
वर्षाणि वर्षाणीव पुरन्दरः २३ मुक्तमिन्द्राजिता तत्तु शरवर्षमरिन्दमः।
आवारयदसंभ्रान्तो लक्ष्मणः सुदुरासदम् २४ संदर्शयामास तदा रावणिं
रघुनन्दनः। असंभ्रान्तो महातेजास्तदद्भुतमिवाभवत् २५ ततस्तान्सा-

---

अतिशय चलाखी करून त्या संग्रामविजयी व क्रुद्ध रावणपुत्र इंद्रजितानें जोरानें आपलें धनुष्य मंडलाकार करून वानरांवर हल्ला केला १६ आणि ह्याप्रमाणें भयंकर वेध करणाऱ्या नाराच बाणांनें त्या वानरांना प्रहार होऊं लागले असतां ब्रह्मदेवाकडे शरण जाणाऱ्या प्रजांप्रमाणें ते वानर सुमित्रापुत्र लक्ष्मणाला शरण गेले १७ तदनंतर संग्रामसंबंधीं क्रोधानें प्रज्वलित झालेल्या त्या रघुनंदन लक्ष्मणानें हस्तलाघव दर्शवीत दर्शवीत त्याचें धनुष्य तोडिलें असतां १८ दुसरें धनुष्य घेऊन त्यानें तें सत्वर सज्ज केलें; परंतु, लक्ष्मणानें तेंही त्याचें धनुष्य तीन बाणांच्या योगानें तोडून टाकिलें १९. इतकेंच नव्हे परंतु, ज्याचें धनुष्य छिन्नभिन्न झालें आहे अशा त्या रावणपुत्र इंद्रजिताच्या वक्षःस्थलावर सर्पविषतुल्य पांच बाणांनीं सुमित्रापुत्र लक्ष्मणानें वेध केला २०. तेव्हां प्रचंड धनुष्यापासून निघालेले ते बाण त्याचें शरीर भेदून आरक्तवर्ण सर्पांप्रमाणें भूमीवर येऊन पडले २१. तदनंतर धनुष्य छिन्नभिन्न झालेला तो रावणपुत्र इंद्रजित् रक्त ओकूं लागला व पूर्वीपेक्षांही बळकट आणि दृढ प्रत्यंचेनें युक्त असें आणखीं एक श्रेष्ठ धनुष्य त्यानें हातामध्यें घेतलें २२ आणि अतिशय त्वरा करून पर्जन्यवृष्टि करणाऱ्या इंद्राप्रमाणें लक्ष्मणाला उद्देशून त्यानें बाणांचे वर्षाव केले २३; परंतु, इंद्रजितानें केलेल्या त्या अतिदुःसह बाणवृष्टीचेंही शत्रूचें दमन करणाऱ्या निर्भय लक्ष्मणानें निवारण केलें २४ आणि ह्याप्रमाणें त्या महातेजस्वी व निर्भय रघुनंदन लक्ष्मणानें आपला पराक्रम रावणपुत्र इंद्रजिताला दर्शविला असतां प्रेक्षकांना तें एक आश्चर्यच वाटूं लागलें २५. तदनंतर अत्यंत क्रुद्ध झालेल्या

क्षमान्सर्वांस्त्रिभिरेकैकमाहवे । अविध्यत्परमक्रुद्धः शीघ्रास्त्रं संप्रदर्शयन् ॥ राक्षसेन्द्रस्तु तं चापि बाणौघैः समताडयत् २६ सातिविद्धो बलवता शत्रुणा शत्रुघातिना । असक्तं प्रेषयामास लक्ष्मणाय बहूञ्शरान् २७ तानप्राप्ताञ्शितैर्बाणैश्चिच्छेद परवीरहा । सारथेरस्य च रणे रथिनो रथसत्तमः २८ शिरो जहार धर्मात्मा भल्लेनानतपर्वणा २९ असूतास्ते हयास्तत्र रथमूहुरविक्लवाः । मण्डलान्यभिधावन्ति तदद्भुतमिवाभवत् ३० अमर्षवशमापन्नः सौमित्रिर्दृढविक्रमः । प्रत्यविध्यद्धयांस्तस्य शरैर्वित्रासयन्रणे ३१ अमर्षमाणस्तत्कर्म रावणस्य सुतो रणे । विव्याध दशभिर्बाणैः सौमित्रिं रोमहर्षणम् ३२ ते तस्य वज्रप्रतिमाः शराः सर्पविषोपमाः । विलयं जग्मुरागत्य कवचं काञ्चनप्रभम् ३३ अभेद्यकवचं मत्वा लक्ष्मणं रावणात्मजः । ललाटे लक्ष्मणं बाणैः सुपुङ्खैस्त्रिभिरिन्द्रजित् ३४ अविध्यत्परमक्रुद्धः शीघ्रमस्त्रं प्रदर्शयन् । तैः

---

लक्ष्मणानें शरसंधानसंबंधीं आपली शीघ्रता दर्शवीत दर्शवीत प्रत्येकाला तीन बाणांनीं ह्याप्रमाणें संग्रामामध्यें त्या सर्व राक्षसांना वेध केला असतां राक्षसाधिपति इंद्रजितानें त्यालाही बाणसमुदायांच्या योगानें ताडण केलें २६. ह्याप्रमाणें बलाढ्य शत्रु जो शत्रुघातक लक्ष्मण त्यानें बाणांनीं अतिशय विद्ध केलेल्या त्या इंद्रजितानें विलंब न लावितां एकसारिखे पुष्कळ बाण त्या लक्ष्मणावर सोडले २७; परंतु, ते येऊन पोंचण्यापूर्वीच शत्रुपक्षीय वीरनाशक लक्ष्मणानें तीक्ष्ण बाणांनीं त्यांचे तुकडे तुकडे करून टाकिले आणि रथ्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या धर्मात्म्या लक्ष्मणानें संग्रामामध्यें रथारूढ झालेल्या त्या इंद्रजिताच्या सारथ्याचें सूक्ष्म अग्रानें युक्त अशा भल्ल बाणानें मस्तक उडविलें २८,२९ तेव्हां सारथिरहित झालेलेही ते अश्व क्षुब्ध न होतां रथ ओढूं लागले असतां आणि मंडलावर चालूं लागले असतां प्रेक्षकांना तें आश्चर्य वाटलें ३०. नंतर महापराक्रमी सुमित्रापुत्र लक्ष्मण क्रुद्ध झाला व संग्रामामध्यें लोकांना भय उत्पन्न करीत करीत बाणांच्या योगानें त्याच्या अश्वांनाही त्यानें वेध केला ३१; परंतु, लक्ष्मणाचें तें कर्म रावणपुत्र इंद्रजिताला संग्रामामध्यें सहन झालें नाहीं आणि ह्मणून अंगावर कांटा आणणाऱ्या सुमित्रापुत्र लक्ष्मणालाही त्यानें दहा बाणांनीं वेध केला ३२. तथापि, सर्पविषाचीच ज्यांना उपमा योग्य आहे अशा त्या इंद्रजिताच्या वज्रतुल्य बाणांचाही सुवर्णाप्रमाणें उज्ज्वल असलेल्या लक्ष्मणाच्या कवचाशीं यण्याबरोबर लय झाला ३३. तदनंतर लक्ष्मणानें अभेद्य कवच धारण केलें आहे असें समजून अतिशय क्रुद्ध झालेल्या रावणपुत्र इंद्रजितानें शरसंधानसंबंधीं त्वरा दर्शवीत दर्शवीत उत्कृष्ट पिच्छांनीं युक्त अशा

पृषत्कैर्ललाटस्थैः शुशुभे रघुनन्दनः ३५ रणाग्रे समरश्लाघी त्रिशृङ्ग इव पर्वतः । स तथाप्यर्दितो बाणै राक्षसेन तदा मृधे ३६ तमाशु प्रतिविव्याध लक्ष्मणः पञ्चभिः शरैः । विकृष्येन्द्रजितो युद्धे वदनं शुभकुण्डलं ३७ लक्ष्मणेन्द्रजितौ वीरौ महाबलशरासनौ । अन्योन्यं जघ्नतुर्वीरौ विशिखैर्भीमविक्रमौ ३८ ततः शोणितदिग्धाङ्गौ लक्ष्मणेन्द्रजितावुभौ । रणे तौ रेजतुर्वीरौ पुष्पिताविव किंशुकौ ३९ तौ परस्परमभ्येत्य सर्वगात्रेषु धन्विनौ । घोरैर्विव्यधतुर्बाणैः कृतभावावुभौ जये ४० ततः समरकोपेन संवृतो रावणात्मजः । बिभीषणं त्रिभिर्बाणैर्विव्याध वदने शुभे ४१ अयोमुखैस्त्रिभिर्विद्ध्वा राक्षसेन्द्रं बिभीषणम् । एकैकेनाभिविव्याध तान्सर्वान्हरियूथपान् ४२ तस्मै दृढतरं क्रुद्धो जघान गदया हयान् । बिभीषणो महातेजा रावणेः स दुरात्मनः ४३ स हताश्वादवप्लुत्य रथान्मथितसारथिः । अथ शक्तिं महातेजाः पितृव्याय मुमोच ह ४४ तामापतन्तीं

---

तीन बाणांनीं लक्ष्मणाला ललाटाचे ठिकाणीं वेध केला असतां तो संग्रामप्रिय रघुनंदन लक्ष्मण ललाटांत रुतलेल्या त्या तीन बाणांच्या योगानें संग्रामामध्यें तीन शिखरांनीं युक्त असलेला पर्वतच कीं काय असा दिसूं लागला; परंतु, इंद्रजित् राक्षसानें बाणांच्या योगानें जरी संग्रामामध्यें लक्ष्मणाला ताडित केलें होतें तरी ३४,३५,३६ धनुष्य आकर्षण करून लक्ष्मणानें त्या इंद्रजिताला शुभ कुंडलांनीं युक्त अशा मुखाचे ठिकाणीं युद्धामध्यें पांच बाणांनीं वेध केला ३७. तदनंतर ज्यांचीं धनुष्येंही फार बळकट असून ज्यांचे पराक्रमही भयंकर आहेत असे ते वीर लक्ष्मण व इंद्रजित् बाणांच्या योगानें एकमेकांला प्रहार करूं लागले असतां ३८ त्या उभयतांचींही शरीरें रक्तानें भरून गेलीं आणि ते उभयतांही वीर लक्ष्मण व इंद्रजित् त्यामुळें प्रफुल्लित पलाशवृक्षांप्रमाणें संग्रामभूमीमध्यें दिसूं लागले ३९. जयाची आशा धरून राहिलेल्या त्या उभयतांही धनुर्धारी वीरांनीं एकमेकांसमीप येऊन एकमेकांच्या प्रत्येक अवयवाचे ठिकाणीं घोर बाणांनीं वेध केला ४०. तदनंतर संग्रामसंबंधीं कोपानें युक्त झालेल्या रावणपुत्र इंद्रजितानें बिभीषणाला तीन बाणांनीं त्याच्या शुभ मुखावर वेध केला ४१ आणि अग्राशीं लोखंड लाविलेल्या तीन बाणांनीं ह्याप्रमाणें राक्षसाधिपति बिभीषणाला वेध केल्यानंतर त्या सर्व वानरश्रेष्ठांनाही त्यानें पृथक् पृथक् वेध केला ४२. तेव्हां तो तेजस्वी बिभीषण त्या इंद्रजितावर अतिशय क्रुद्ध झाला व गदेच्या योगानें त्यानें त्या दुरात्म्या रावणपुत्राचे अश्व मारून टाकिले ४३. तदनंतर ज्याच्या सारथ्याचा वध झाला आहे अशा त्या महातेजस्वी इंद्रजितानें ज्याला जोडिलेल्या अश्वांचा वध झाला

संप्रेक्ष्य सुमित्रानन्दवर्धनः । चिच्छेद निशितैर्बाणैर्दशधापातयद्भुवि ४५
तस्मै दृढधनुः क्रुद्धो हताश्वाय विभीषणः । वज्रस्पर्शसमान्पञ्च ससर्जो-
रसि मार्गणान् ४६ ते तस्य कायं भित्त्वा तु रुक्मपुङ्खा निमित्तगाः ।
बभूवुर्लोहिता दिग्धा रक्ता इव महोरगाः ४७ स पितृव्यस्य संक्रुद्ध इन्द्र-
जिच्छरमाददे । उत्तमो रक्षसां मध्ये यमदत्तं महाबलम् ४८ तं समीक्ष्य महा-
तेजा महेषुं तेन संधितम् । लक्ष्मणोऽप्याददे बाणमन्यद्भीमपराक्रमः ४९ कुबे-
रेण स्वयं स्वप्ने यद्दत्तममितात्मना । दुर्जयं दुर्विषह्यं च सेन्द्रैरपि सुरासुरैः ५०
तयोस्तु धनुषी श्रेष्ठे बाहुभिः परिघोपमैः । विकृष्यमाणे बलवत्क्रौञ्चाविव
चुकूजतुः ५१ ताभ्यां तु धनुषि श्रेष्ठे संहितौ सायकोत्तमौ । विकृष्य-
माणौ वीराभ्यां भृशं जज्वलतुः श्रिया ५२ तौ भासयन्तावाकाशं
धनुर्भ्यां विशिखौ च्युतौ । मुखेन मुखमाहत्य संनिपेततुरोजसा ५३ संनि-
पातस्तयोश्चासीच्छरयोर्घोररूपयोः । सधूमविस्फुलिङ्गश्च तज्जोऽग्निर्दारुणो-

---

आहे अशा त्या रथावरून खालीं उडी टाकून आपल्या पितृव्यावर शक्ति सोडिली ४४; परंतु, सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या लक्ष्मणानें ती येत आहे असें अवलोकन करितांक्षणींच तीक्ष्ण बाणांनीं तिला तोडून टाकिलें व तिचे दहा तुकडे करून तिला भूमीवर पाडिलें ४५. तदनंतर दृढ धनुष्य धारण केलेला बिभीषण ज्याच्या अश्वांचा वध झाला आहे अशा त्या इंद्रजितावर क्रुद्ध झाला आणि वज्राप्रमाणें ज्यांचा प्रहार आहे असे पांच बाण त्यानें त्याच्या वक्षःस्थलावर सोडिले ४६; व सुवर्णयुक्त पिच्छ भागांनीं युक्त असलेले ते लक्ष्यभेद करणारे बाण त्याचें शरीर भेदून गेले असतां आरक्तवर्ण महाभुजंगांप्रमाणें दिसूं लागले ४७. तदनंतर पितृव्यावर क्रुद्ध झालेल्या त्या राक्षसश्रेष्ठ इंद्रजितानें यमानें दिलेला अतिप्रबल बाण हातामध्यें घेतला असतां ४८ त्यानें तो प्रचंड बाण धनुष्याला लाविलेला पहातांक्षणीं महातेजस्वी व भयंकर पराक्रमी लक्ष्मणानेंही दुसरा एक बाण हातामध्यें घेतला ४९. तो बाण अनंत कीर्तिमान् कुबेरानें स्वतः स्वप्नामध्यें त्याला दिला होता व इंद्रासहवर्तमान देवदैत्यांनाही तो दुःसह व दुर्जय होता ५०. असो. अडसरांसारख्या बाहूंनीं त्यांचीं तीं श्रेष्ठ धनुष्यें ताणलीं जाऊं लागलीं असतां बलाढ्य क्रौंच पक्ष्यांप्रमाणेंच कीं काय गर्जना करूं लागलीं ५१. नंतर त्या उभयतांनीं आपआपल्या श्रेष्ठ धनुष्याला ते उत्कृष्ट बाण लावून ओढिले असतां कांतीच्या योगानें वीरांचीं मुखें त्या बाणांनीं अतिशय प्रकाशित केलीं ५२. तदनंतर धनुष्यापासून सुटलेले ते बाण आकाश प्रकाशित करूं लागले आणि एकमेकांच्या मुखावर जोरानें प्रहार करून खालीं पडले ५३. त्या

भवत् ५४ तौ महाग्रहसंकाशावन्योन्यं संनिपत्य च । सङ्ग्रामे शतधा-
तौ मेदिन्यां चैव पततुः ५५ शरौ प्रतिहतौ दृष्ट्वा तावुभौ रणमूर्धनि ।
व्रीडितौ जातरोषौ च लक्ष्मणेन्द्रजितौ तदा ५६ स संरब्धस्तु सौमित्रि-
रस्त्रं वारुणमाददे । रौद्रं महेन्द्रजिद्युद्धेऽप्यसृजद्युद्धविष्ठितः ॥ तेन तद्विहतं
शस्त्रं वारुणं परमाद्भुतम् ५७ ततः क्रुद्धो महातेजा इन्द्रजित्समितिंजयः ।
आग्नेयं संदधे दीप्तं स लोकं संक्षिपन्निव ५८ सौर्येणास्त्रेण तं वीरो
लक्ष्मणः पर्यवारयत् । अस्त्रं निवारितं दृष्ट्वा रावणिः क्रोधमूर्च्छितः ५९
आददे निशितं बाणमासुरं शत्रुदारणम् । तस्माच्चापाद्विनिष्पेतुर्भास्वराः
कूटमुद्गराः ६० शूलानि भुशुण्ड्यश्च गदाः खड्गाः परश्वधाः । तद्दृष्ट्वा
लक्ष्मणः सङ्ख्ये घोरमस्त्रं सुदारुणम् ६१ अवार्यं सर्वभूतानां सर्वशस्त्रवि-
दारणम् । माहेश्वरेण द्युतिमांस्तदस्त्रं प्रत्यवारयत् ६२ तयोः समभवद्यु-
द्धमद्भुतं रोमहर्षणम् । गगनस्थानि भूतानि लक्ष्मणं पर्यवारयन् ६३
भैरवाभिरुते भीमे युद्धे वानररक्षसाम् । भूतैर्बहुभिराकाशं विस्मितैरावृतं

---

भयंकर बाणांची टक्कर झाली असतां धूम व ठिणग्या ह्यांनीं युक्त असा भयंकर अग्नि त्यांपासून निघाला ५४. सारांश, संग्रामामध्यें शंकडों वेळा आलेले ते महाग्रहतुल्य बाण एकमेकांला पाडून पृथ्वीवर पडले ५५ तेव्हां बाण हाणून पडल्याचें पाहून ते उभयतां लक्ष्मण व इंद्रजित् संग्रामामध्यें लज्जित व क्रुद्ध झाले ५६. तदनंतर सुमित्रापुत्र लक्ष्मणानें क्रुद्ध होऊन वारुणास्त्राचा प्रयोग केला असतां युद्धाविषयीं आसक्त असलेल्या इंद्रजितानेंही युद्धामध्यें रौद्रास्त्राचा प्रयोग केला व त्या रौद्रास्त्राच्या योगानें तें अत्यंत अद्भुत वारुणास्त्र हाणून पडलें ५७. तदनंतर संग्रामविजयी महातेजस्वी इंद्रजित् क्रुद्ध झाला; उज्ज्वल आग्नेयास्त्राचा त्यानें प्रयोग केला व त्यावेळीं तो जगताचा संहार करण्यासच उद्युक्त झाला आहे कीं काय असा भासूं लागला ५८. तथापि, वीर लक्ष्मणानें सौर्यास्त्रानें त्याचें निवारण केलें ह्याप्रमाणें अस्त्राचें निवारण झाल्याचें पाहून रावणपुत्र इंद्रजित् क्रोधानें व्याप्त झाला ५९ आणि शत्रूंचें विदारण करणारा असा एक तीक्ष्ण राक्षसी बाण त्यानें हातामध्यें घेतला; व त्याच्या धनुष्यापासूनही मायाजन्य उज्ज्वल मुद्गर, शूल, भुशुंडी, गदा, खड्ग व परशु हीं शस्त्र बाहेर पडलीं. संग्रामामध्यें अत्यंत भयंकर व घोर असलेलें तें अस्त्र कोणत्याही प्राण्याच्या हातून परत फिरणारें नसून सर्व शस्त्रांना विदीर्ण करून टाकणारें आहे असें आढळून आल्यावर तेजस्वी लक्ष्मणानें माहेश्वरास्त्रानें त्या अस्त्राचें निवारण केलें ६०,६१,६२. त्या उभयतांमध्यें शरीरादर रोमांच उठविणारें असें अद्भुत युद्ध होऊं लागलें असतां आकाशांतील

बभौ ६४ ऋषयः पितरो देवा गन्धर्वगरुडोरगाः । शतक्रतुं पुरस्कृत्य ररक्षुर्लक्ष्मणं रणे ६५ अथान्यं मार्गणश्रेष्ठं संदधे राघवानुजः । हुताशनसमस्पर्शं रावणात्मजदारणम् ६६ सुपत्रमनुवृत्ताङ्गं सुपर्वाणं सुसंस्थितम्। सुवर्णविकृतं वीरः शरीरान्तकरं शरम् ६७ दुरावारं दुर्विषमं राक्षसानां भयावहम् । आशीविषविषप्रख्यं देवसङ्घैः समर्चितम् ६८ येन शक्रो महातेजा दानवानजयत्प्रभुः । पुरा देवासुरे युद्धे वीर्यवान्हरिवाहनः ६९ अथैन्द्रमस्त्रं सौमित्रिः संयुगेष्वपराजितम् । शरश्रेष्ठं धनुःश्रेष्ठे विकर्षन्निदमब्रवीत् ७० लक्ष्मीवाँल्लक्ष्मणो वाक्यमर्थसाधकमात्मनः । धर्मात्मा सत्यसन्धश्च रामो दाशरथिर्यदि ७१ पौरुषे चाप्रतिद्वन्द्वस्तदैनं जहि रावणिम् । इत्युक्त्वा बाणमाकर्णं विकृष्य तमजिह्मगम् ७२ लक्ष्मणः समरे वीरः ससर्जेन्द्रजितं प्रति । ऐन्द्रास्त्रेण समायुज्य लक्ष्मणः परवीरहा ७३ तच्छिरः सशिरस्त्राणं श्रीमज्ज्वलितकुण्डलम् । प्रमथ्येन्द्रजितः काया-

---

भूतांनीं लक्ष्मणाचें निवारण केलें ६३. भयंकर गर्जनेनें युक्त असें त्या वानरराक्षसांमध्यें दारुण युद्ध सुरू झालें असतां विस्मित झालेल्या असंख्य भूतांनीं आकाश व्याप्त होऊन गेलें ६४. ऋषि, पितर, देव, गंधर्व, गरुड व उरग ह्यांनीं इंद्राला पुढें करून रणामध्यें लक्ष्मणाचें रक्षण केलें ६५. तदनंतर रामानुज वीर लक्ष्मणानें रावणपुत्र इंद्रजिताला विदीर्ण करून टाकणारा असा एक श्रेष्ठ बाण धनुष्याला लाविला. त्या बाणाचा स्पर्श अग्नीप्रमाणें होता; उत्कृष्ट पिसें, वर्तुल आकृति, उत्तम पेर्वे व दृढता ह्यांनीं तो युक्त होता; सुवर्णाचें त्याच्यावर काम केलेलें होतें; तो शरीराचा नाश करणारा होता ६६,६७; राक्षसांना भयंकर असलेल्या त्या दुःसह बाणाचें निवारण होणें अशक्य होतें आणि सर्पविषाप्रमाणें तो भयंकर होता आणि देवगणांना तो पूज्य होता ६८. कारण, हरिसंज्ञक अश्व ज्याच्या रथाला जोडिलेले असतात असा जो महातेजस्वी वीर्यवान् प्रभु इंद्र त्यानें पूर्वी देवदैत्यांच्या युद्धामध्यें त्या बाणाच्या योगानें दानवांना जिंकिलें होतें ६९. नंतर संग्रामामध्यें पराजय न पावणारा असा जो तो श्रेष्ठ बाण त्याला ऐंद्रास्त्रानें अभिमंत्रण करून सुमित्रापुत्र लक्ष्मण श्रेष्ठ धनुष्याला लावूं लागला आणि तो बाण धनुष्याला लावीत असतांना वैभवशाली लक्ष्मणानें त्या बाणाला उद्देशून आपला हेतु सिद्धीस नेणारें भाषण केलें. "दाशरथि राम जर धर्मात्मा, सत्यवचनी व पराक्रमामध्यें अनुपम असेल तर ह्या रावणपुत्राचा तूं वध कर" असें बोलून त्या शत्रुपक्षीय वीरनाशक वीर लक्ष्मणानें तो सरळ जाणारा बाण कानापर्यंत खेंचला आणि ऐंद्रास्त्रानें अभिमंत्रण करून समरांगणामध्यें इंद्रजितावर

स्पातयामास भूतले ७४ तद्राक्षसतनूजस्य भिन्नस्कन्धं शिरो महत् ।
तपनीयनिभं भूमौ ददृशे रुधिरोक्षितम् ७५ हतः स निपपाताथ धरण्यां
रावणात्मजः । कवची सशिरस्त्राणो विप्रविद्धशरासनः ७६ चुक्रुशुस्ते
ततः सर्वे वानराः सविभीषणाः । हृष्यन्ते निहते तस्मिन्देवा वृत्रवधे
यथा ७७ अथान्तरिक्षे भूतानामृषीणां च महात्मनाम् । जज्ञेथ जयसं-
नादो गन्धर्वाप्सरसामपि ७८ पतितं समभिज्ञाय राक्षसी सा महाचमूः ।
वध्यमाना दिशो भेजे हरिभिर्जितकाशिभिः ७९ वानरैर्वध्यमानास्ते
शस्त्राण्युत्सृज्य राक्षसाः । लङ्कामभिमुखाः सस्रुर्भ्रष्टसंज्ञाः प्रधाविताः ८०
दुद्रुवुर्बहुधा भीता राक्षसाः शतशो दिशः । त्यक्त्वा प्रहरणान्सर्वे पट्टि-
शासिपरश्वधान् ८१ केचिल्लङ्कां परित्रस्ताः प्रविष्टा वानरार्दिताः । समुद्रे
पतिताः केचित्केचित्पर्वतमाश्रिताः ८२ हतमिन्द्रजितं दृष्ट्वा शयानं च रण-
क्षितौ । राक्षसानां सहस्रेषु न कश्चित्प्रत्यदृश्यत ८३ यथास्तं गत आदित्ये
नावतिष्ठन्ति रश्मयः । तथा तस्मिन्निपतिते राक्षसास्ते गता दिशः ८४

सोडिला ७०, ७१, ७२, ७३. तेव्हां शिरस्त्राण, उज्ज्वल कुंडलें व उत्कृष्ट कांति ह्यांनीं युक्त असलेलें तें इंद्रजिताचें मस्तक तोडून त्या बाणानें शरीरापासून भूतलावर पाडिलें असतां ७४ राक्षसपुत्राचें तें स्कंधापासून भिन्न झालेलें व रक्तानें भरून गेलेलें प्रचंड मस्तक भूमीवर सुवर्णासारिखें दिसूं लागलें ७५. ह्याप्रमाणें त्या रावणपुत्राचा वध झाला असतां कवच व शिरस्त्राण ह्यांसहवर्तमान तो भूमीवर पडला आणि त्याचें धनुष्यही मोडून जाऊन अस्ताव्यस्त पडलें ७६. सारांश, ह्याप्रमाणें इंद्रजिताचा वध झाला असतां बिभीषणासहवर्तमान सर्व वानरांनीं जयघोष केला व वृत्रासुरवधसमयीं देवाप्रमाणें ते आनंदित झाले ७७. नंतर अंतरिक्षांतील भूतें, महात्मे ऋषि, गंधर्व व अप्सरा ह्यांमध्यें जयघोष सुरू झाला आणि विजयामुळें उल्हासयुक्त झालेले वानर जिचा वध करीत आहेत अशी ती राक्षसी सेना इंद्रजित् पडल्याचें समजतांक्षणीं वाट फुटेल तिकडे पळत सुटली ७८, ७९. वानर वध करूं लागले असतां कांहींएक सुचेनासें झालेले ते राक्षस धांवाधांव करूं लागले आणि शस्त्रें टाकून देऊन व लंकेकडे तोंड करून पळत सुटले ८०. अनेक प्रकारांनीं भयभीत झालेले ते सर्वही राक्षस पट्टे, खड्ग आणि परशु हीं आयुधें टाकून देऊन शेंकडों मार्गांनीं पळून गेले ८१. वानरांनीं जर्जर केल्यामुळें अतिशय त्रस्त झालेले कांहीं राक्षस लंकेमध्यें प्रविष्ट झाले; कांहीं समुद्रामध्यें पडले व कांहीं पर्वताचा आश्रय करून राहिले ८२. इंद्रजित् वध पावून रणभूमीमध्यें पडल्याचें पहातांक्षणीं हजारों राक्षसांपैकीं तेथें एकही दिसेनासा

शान्तरश्मिरिवादित्यो निर्वाण इव पावकः । बभूव स महाबाहुर्व्यपास्तम-
तर्जीवितः८५प्रशान्तपीडाबहुलो विनष्टारिः प्रहर्षवान्।बभूव लोकः पतिते
राक्षसेन्द्रसुते तदा ८६ हर्षं च शक्रो भगवान्सह सर्वैर्महर्षिभिः । जगाम
निहते तस्मिन्राक्षसे पापकर्मणि ८७ आकाशे चापि देवानां शुश्रुवे दुन्दुभि-
स्वनः । नृत्यद्भिरप्सरोभिश्च गन्धर्वैश्च महात्मभिः ८८ ववर्षुः पुष्पवर्षाणि
तदद्भुतमिवाभवत् । प्रशशाम हते तस्मिन्राक्षसे क्रूरकर्मणि ८९ शुद्धा
आपो नभश्चैव जहृषुर्देवदानवाः । आजग्मुः पतिते तस्मिन्सर्वलोकभया-
वहे ९० ऊचुश्च सहितास्तुष्टा देवगन्धर्वदानवाः । विज्वराः शान्तकलुषा
ब्राह्मणा विचरन्त्विति ९१ ततोऽभ्यनन्दन्संहृष्टाः समरे हरियूथपाः । तमप्र-
तिबलं दृष्ट्वा हतं नैर्ऋतपुङ्गवम् ९२ बिभीषणो हनूमांश्च जाम्बवांश्चर्क्षयू-
थपः । विजयेनाभिनन्दन्तस्तुष्टुवुश्चापि लक्ष्मणम् ९३ क्ष्वेडन्तश्च प्लवन्तश्च
गर्जन्तश्च प्लवङ्गमाः । लब्धलक्षा रघुसुतं परिवार्योपतस्थिरे ९४ लाङ्गू-

---

झाला ८३. सूर्य अस्ताचलाला गेल्यावर ज्याप्रमाणें किरणेंही नाहींशीं होतात त्याप्रमाणें तो इंद्रजित् पडतांक्षणीं सर्वही राक्षस वाट फुटेल तिकडे चालते झाले ८४. त्या महापराक्रमी इंद्रजिताची हालचाल नाहींशी होऊन तो गतप्राण झाला असतां किरणरहित असलेला सूर्यच कीं काय अथवा शांत झालेला अग्निच कीं काय असा दिसू लागला ८५. ह्याप्रमाणें राक्षसराज रावणाचा पुत्र पडला असतां जगताची बरीच पीडा नाहींशी झाली; जगतांतील शत्रु नाहींसा झाला आणि ह्मणून त्यांतील लोकांना हर्ष झाला ८६. त्या दुष्कर्मी राक्षसाचा वध झाल्यामुळें सर्व महर्षी-सहवर्तमान भगवान् इंद्राला आनंद झाला ८७. आकाशामध्यें देवदुंदुभींचा ध्वनि ऐकूं येऊं लागला आणि महात्मे गंधर्व व अप्सरा ह्यांनीं नृत्य सुरू झालें ८८. त्या क्रूर-कर्मी राक्षसाचा वध झाला असतां दिशा निर्मल झाल्या आणि पुष्पवृष्टि होऊं लागल्यामुळें लोकांनाही तें एक आश्चर्यच वाटूं लागलें ८९. सर्व लोकांना भयंकर असलेला तो इंद्रजित् पडल्यावर उदकें निर्मल झालीं; आकाश स्वच्छ झालें आणि देवदानवांना हर्ष होऊन तेही तेथें आले ९०. तदनंतर देव, गंधर्व व दानव हे संतुष्ट होऊन एकत्र जुळले आणि "आतां निश्चिंत व निर्भय झालेले ब्राह्मण स्वस्थपणें राहोत" असें ह्मणाले ९१. ज्याच्याशीं बलामध्यें बरोबरी करणारा कोणी नाहीं अशा त्या राक्षसश्रेष्ठाचा संग्रामामध्यें वध झाल्याचें अवलोकन करून हर्षयुक्त झालेल्या श्रेष्ठ श्रेष्ठ वानरांनीं लक्ष्मणाचें अभिनंदन केलें ९२; आणि बिभीषण, हनुमान् व ऋक्ष-सेनाधिपति जांबवान् जय झाल्याबद्दल लक्ष्मणाची अभिनंदनपूर्वक स्तुति करूं लागले ९३.

लानि प्रविध्यन्तः स्फोटयन्तश्च वानराः । लक्ष्मणो जयतीत्येवं वाक्यं विश्रावयंस्तदा १५ अन्योन्यं च समाश्लिष्य हरयो हृष्टमानसाः । चक्रुरुच्चावचगुणा राघवाश्रयसत्कथाः १६ तदसुकरमथाभिवीक्ष्य हृष्टाः प्रियसुहृदो युधि लक्ष्मणस्य कर्म । परममुपलभन्मनःप्रहर्षं विनिहतमिन्द्ररिपुं निशम्य देवाः १७ [४११२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे नवतितमः सर्गः ॥ ९० ॥

रुधिरक्लिन्नगात्रस्तु लक्ष्मणः शुभलक्षणः । बभूव हृष्टस्तं हत्वा शक्रजेतारमाहवे १ ततः स जाम्बवन्तं च हनूमन्तं च वीर्यवान् । संनिपत्य महातेजास्तांश्च सर्वान्वनौकसः २ आजगाम ततः शीघ्रं यत्र सुग्रीवराघवौ । विभीषणमवष्टभ्य हनूमन्तं स लक्ष्मणः ३ ततो राममभिक्रम्य सौमित्रिरभिवाद्य च । तस्थौ भ्रातृसमीपस्थः शक्रस्येन्द्रानुजो यथा ४ निष्टनन्निव चागत्य राघवाय महात्मने । आचचक्षे तदा वीरो घोरमिन्द्रजितो वधम् ५ रावणेस्तु शिरश्छिन्नं लक्ष्मणेन महात्मना । न्यवेदयत

---

हर्षाचा समय प्राप्त झाल्यामुळें जयघोष, उड्डाण व गर्जना करीत असलेले वानर लक्ष्मणाला परिवेष्टित करून उभे राहिले १४. शेपट्या हपटून वानर दंड ठोकूं लागले आणि "लक्ष्मणाचा जयजयकार असो" येवढेच भाषण ज्याला त्याला ऐकूं येऊं लागलें १५. मनामध्यें आनंदित झालेले वानर एकमेकांला कवटाळून धरून लक्ष्मणासंबंधीं जिकडे तिकडे त्याच्या अल्पस्वल्पगुणांनीं युक्त अशा गोष्टी सांगूं लागले १६. इंद्रजिताचा वध झाल्याचें ऐकिल्यानंतर देवांना हर्ष झाला आणि मित्र ज्याला प्रिय आहेत अशा लक्ष्मणानें संग्रामामध्यें केलेलें तें दुर्घट कर्म अवलोकन करून त्यांच्या मनाला अतिशयच आनंद झाला १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं नव्वदावा सर्ग समाप्त झाला ॥ ९० ॥

रक्तानें ज्याचें शरीर भरून गेलें आहे असा शुभ लक्षणसंपन्न लक्ष्मण त्या शत्रुविजयी इंद्रजिताचा संग्रामामध्यें वध करून हर्ष पावला १ आणि नंतर तो महातेजस्वी व वीर्यवान् लक्ष्मण, जांबवान्, हनुमान् व ते सर्वही वानर ह्यांना घेऊन २ सुग्रीव आणि राम जिकडे होते तिकडे हनुमान् व बिभीषण ह्यांच्या खांद्यावर हात ठेवून सत्वर गेला ३. तदनंतर रामाला प्रदक्षिणा करून व त्याला अभिवंदन करून तो सुमित्रापुत्र लक्ष्मण इंद्रासमीप उभ्या राहणाऱ्या वामनाप्रमाणें भ्रात्याचे समीप उभा राहिला ४. इतक्यांत आपल्या सुद्रेवरूनच झालेलें वृत्त कळवीत असलेला तो वीर बिभीषण महात्म्या रामाच्या समीप आला आणि इंद्रजिताच्या वधाची भयंकर वार्ता

रामाय तदा हृष्टो बिभीषणः ६ श्रुत्वैव तु महावीर्यो लक्ष्मणेनेन्द्रजिद्वधम्।
प्रहर्षमतुलं लेभे वाक्यं चेदमुवाच ह ७ साधु लक्ष्मण तुष्टोऽस्मि कर्म
चासुकरं कृतम् । रावणेर्हि विनाशेन जितमित्युपधारय ८ स तं शिर-
स्युपाघ्राय लक्ष्मणं कीर्तिवर्धनम् । लज्जमानं बलात्स्नेहादङ्कमारोप्य वीर्य-
वान् ९ उपवेश्य तमुत्सङ्गे परिष्वज्यावपीडितम् । भ्रातरं लक्ष्मणं स्निग्धं
पुनः पुनरुदैक्षत १० शल्यसंपीडितं शस्तं निःश्वसन्तं तु लक्ष्मणम् ।
रामस्तु दुःखसंतप्तं तं तु निःश्वासपीडितम् ११ मूर्ध्नि चैनमुपाघ्राय भूयः
संस्पृश्य च त्वरन् । उवाच लक्ष्मणं वाक्यमाश्वास्य पुरुषर्षभः १२ कृतं
परमकल्याणं कर्म दुष्करकर्मणा । अद्य मन्ये हते पुत्रे रावणं निहतं
युधि १३ अद्याहं विजयी शत्रौ हते तस्मिन्दुरात्मनि । रावणस्य नृशंसस्य
दिष्ट्या वीर त्वया रणे १४ छिन्नो हि दक्षिणो बाहुः स हि तस्य व्यपाश्रयः।
बिभीषणहनूमद्भ्यां कृतं कर्म महद्रणे १५ अहोरात्रैस्त्रिभिर्वीरः कथंचिद्वि-

---

त्यानें रामाला कथन केली ५. सारांश, आनंदित झालेल्या बिभीषणानें रावणपुत्र इंद्र-
जिताचा शिरश्छेद महात्म्या लक्ष्मणानें केल्याचें रामाला निवेदन केलें ६. लक्ष्मणानें
इंद्रजिताचा वध केल्याचें श्रवण करितांक्षणीं महावीर्यवान् रामाला अनुपम हर्ष झाला
आणि तो ह्मणाला ७ "हे लक्ष्मणा, शाबास. मी संतुष्ट झालों आहें. कारण, तूं दुर्घट कर्म केलें
आहेस व रावणपुत्राचा वध झाल्यामुळें मी ह्या युद्धामध्यें आपल्याला जय प्राप्त झालाच असें
समजत आहें." ८ तदनंतर त्या वीर्यवान् रामानें कीर्ति वृद्धिंगत करणाऱ्या लक्ष्मणाचें मस्तकीं
अवघ्राण केलें आणि त्या विनयसंपन्न लक्ष्मणाला प्रेमामुळें बळेंबळेंच मांडीवर घेतलें ९.
त्या लक्ष्मणाला अंकावर बसविल्यानंतर राम त्याला कडकडून भेटला आणि सप्रेम-
दृष्टीनें वारंवार त्या आपल्या भ्रात्याकडे पाहूं लागला १०. त्यावेळीं बाणांचीं वगैरे
टोंकें रुतल्यामुळें लक्ष्मणाचें शरीर ठिकठिकाणीं फाटून गेलें होतें व त्याला दमही
लागला होता; परंतु, दुःखसंतप्त व ऊर्ध्व झाल्यामुळें व्याकुल झालेल्या त्या लक्ष्मणाचें
मस्तकीं अवघ्राण करून आणि वारंवार त्वरेत्वरेनें त्याच्या अंगावर हात फिरवून
पुरुषश्रेष्ठ राम त्याला धीर देऊन ह्मणाला ११, १२ "दुष्कर कर्म करणाऱ्या तुझ्या
हातून आज उत्कृष्ट प्रकारची कल्याणकारक गोष्ट झाली आहे. रावणाच्या पुत्राचा
वध झाल्यामुळें संग्रामामध्यें आज रावणाचा वधच झाला असें मी समजत आहें १३.
त्या दुरात्म्या शत्रूचा वध झाल्यामुळें आज मी विजयी झालों आहे. हे वीरा, संग्रामा-
मध्यें त्या दुष्ट रावणाचा तूं आज उजवा हातच तोडून टाकिला आहेस ही मोठी
आनंदाची गोष्ट आहे. कारण, त्या इंद्रजिताचाच त्याला आधार होता. बिभीषण

निपातितः । निरमित्रः कृतोस्म्यद्य निर्यास्यति हि रावणः १६ बलव्यूहेन महता निर्यास्यति हि रावणः। बलव्यूहेन महता श्रुत्वा पुत्रं निपातितम् १७ तं पुत्रवधसंतप्तं निर्यान्तं राक्षसाधिपम् । बलेनावृत्य महता निहनिष्यामि दुर्जयम् १८ त्वया लक्ष्मण नाथेन सीता च पृथिवी च मे। न दुष्प्रापा हते तस्मिञ्शक्रजेतरि चाहवे १९ स तं भ्रातरमाश्वास्य परिष्वज्य च राघवः। रामः सुषेणं मुदितः समाभाष्येदमब्रवीत् २० विशल्योयं महाप्राज्ञः सौमित्रिर्मित्रवत्सलः । यथा भवति सुस्वस्थस्तथा त्वं समुदाचर २१ विशल्यः क्रियतां क्षिप्रं सौमित्रिर्मित्रवत्सलः। ऋक्षवानरसैन्यानां शूराणां द्रुमयोधिनाम् २२ ये चाप्यन्येत्र युध्यन्ति सशल्या व्रणिनस्तथा । तेपि सर्वे प्रयत्नेन क्रियतां सुखिनस्तथा २३ एवमुक्तः स रामेण महात्मा हरियूथपः। लक्ष्मणाय ददौ नस्तः सुषेणः परमौषधम् २४ स तस्य गन्धमाघ्राय विशल्यः समपद्यत । तदा निर्वेदनश्चैव संरूढप्राण एव च २५ विभीषणमुखानां च सुहृदां राघवाज्ञया । सर्ववानरमुख्यानां चिकित्सा-

---

व हनुमान् ह्यांनींही संग्रामामध्यें मोठा पराक्रम केला आहे १४, १५. तीन अहोरात्र मिळून कसा तरी त्या वीर इंद्रजिताचा वध झाल्यामुळें मी आज शत्रुरहित झालों आहें व आतां रावण बाहेर पडण्याचा संभव आहे १६. प्रचंड सैन्यसमुदायासहवर्तमान पुत्राचा वध झाल्याचें ऐकून रावण मोठा सेनासमूह बरोबर घेऊन बाहेर पडेल १७ आणि पुत्रवधानें संतप्त झालेला तो अजिंक्य राक्षसाधिपति मोठें सैन्य बरोबर घेऊन बाहेर पडूं लागला असतां मी त्याचा वध करीन १८. हे लक्ष्मणा, संग्रामामध्यें त्या इंद्रजिताचा ज्याअर्थी तूं वध केला आहेस त्याअर्थी तूं नाथ असतांना मला आतां सीता व पृथ्वी ह्यांपैकीं कोणीच दुर्लभ नाहीं" १९. ह्याप्रमाणें भ्रात्याला आश्वासन देऊन व आलिंगन देऊन आनंदित झालेला राम सुषेणाला हांक मारून ह्मणाला २० "हा मित्रवत्सल व महाबुद्धिमान् लक्ष्मण ज्या रीतीनें शल्यरहित होऊन चांगला स्वस्थ होईल अशारीतीनें तूं औषधि उपचार कर २१. मित्रवत्सल सुमित्रापुत्र लक्ष्मणाला तूं सत्वर शल्यरहित कर आणि त्याचप्रमाणें वृक्ष घेऊन युद्ध करणारीं जीं ऋक्ष व वानर ह्यांचीं शूर सैन्यें २२ ह्यांपैकीं जे कोणी इतर शल्ययुक्त व व्रणयुक्त होऊन युद्ध करीत असतील त्याही सर्वांना तूं यत्नपूर्वक सुखी कर" २३. ह्याप्रमाणें रामानें त्या महात्म्या वानरसेनाधिपति सुषेणाला सांगितलें असतां त्यानें लक्ष्मणाला एक उत्कृष्ट औषध हुंगावयास दिलें २४. तेव्हां जीव गुदमरून गेलेला तो लक्ष्मण औषध हुंगतांक्षणीं शल्यरहित झाला आणि त्याची वेदनाही एकाएकीं नाहींशी झाली २५.

मकरोन्मुदा २६ ततः प्रकृतिमापन्नो हृतशल्यो गतक्लमः। सौमित्रिर्मुमुदे तत्र क्षणेन विगतज्वरः २७ तदैव रामः प्लवगाधिपस्तथा बिभीषणश्चर्क्षपतिश्च वीर्यवान्। अवेक्ष्य सौमित्रिमरोगमुत्थितं मुदा ससैन्याः सुचिरं जहर्षिरे २८ अपूजयत्कर्म स लक्ष्मणस्य सुदुष्करं दाशरथिर्महात्मा । बभूव हृष्टो युधि वानरेन्द्रो निशम्य तं शक्रजितं निपातितम् २९ [४१४१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्ड एकनवतितमः सर्गः ॥९१॥

ततः पौलस्त्यसचिवाः श्रुत्वा चेन्द्रजितो वधम् । आचचक्षुरवज्ञाय दशग्रीवाय सत्वराः १ युद्धे हतो महाराज लक्ष्मणेन तवात्मजः । बिभीषणसहायेन मिषतां नो महाद्युतिः २ शूरः शूरेण संगम्य संयुगेष्वपराजितः । लक्ष्मणेन हतः शूरः पुत्रस्ते विबुधेन्द्रजित् ॥ गतः स परमाँल्लोकाञ्शरैः संतर्प्य लक्ष्मणम् ३ स तं प्रतिभयं श्रुत्वा वधं पुत्रस्य दारुणम् । घोरमिन्द्रजितः सङ्ख्ये कश्मलं प्राविशन्महत् ४ उपलभ्य चिरात्संज्ञां

---

नंतर रामाच्या आज्ञेप्रमाणें बिभीषणप्रभृति सुहृदांना आणि सर्व मुख्य मुख्य वानरांनाही त्यानें औषध दिलें २६; आणि ह्याप्रमाणें शरीरांतील शल्यें निघून गेलीं असतां श्रम परिहार होऊन लक्ष्मण पूर्वीप्रमाणें एका क्षणामध्यें ज्वररहित व स्वस्थ झाला आणि त्याला आनंदही वाटला २७. सुमित्रापुत्र लक्ष्मण आरोग्यसंपन्न होऊन उठल्याचें अवलोकन करितांक्षणीं राम, वानराधिपति सुग्रीव, बिभीषण आणि वीर्यवान् ऋक्षाधिपति जांबवान् हे सर्वही सैन्यासहवर्तमान आनंदानें पुष्कळ वेळपर्यंत हंसत राहिले २८. त्या महात्म्या दशरथपुत्र रामानें लक्ष्मणाच्या त्या अतिदुर्घट कर्माची प्रशंसा केली व त्या इंद्रजिताचा संग्रामामध्यें वध झाल्याचें श्रवण करून वानराधिपति सुग्रीवालाही हर्ष झाला २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एक्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९१ ॥

तदनंतर इंद्रजिताचा वध झाल्याचें श्रवण करून रावणाच्या मंत्र्यांनीं त्वरेनें ती गोष्ट प्रत्यक्ष अवलोकन केली आणि नंतर ते सत्वर जाऊन रावणाला म्हणाले १ "हे महाराज, बिभीषणाचें साहाय्य असतांना लक्ष्मणानें आम्हांसमक्ष तुझ्या महातेजस्वी पुत्राचा युद्धामध्यें वध केला २. संग्रामामध्यें कधींही पराजय न पावलेल्या तुझ्या शूर पुत्राची शूर लक्ष्मणाशीं गांठ पडली व देवराजालाही जिंकणाऱ्या तुझ्या शूर पुत्राचा लक्ष्मणानें वध केला; सारांश, बाणांच्या योगानें लक्ष्मणाला तृप्त करून तो तुझा पुत्र आंमत उत्तम लोकाप्रत गेला आहे " ३. ह्याप्रमाणें पुत्र इंद्रजिताचा अतिभयंकर, घोर व दारुण वध संग्रामामध्यें झाल्याचें श्रवण करितांक्षणीं रावणाला अतिशय

राजा राक्षसपुङ्गवः । पुत्रशोकाकुलो दीनो विललापाकुलेन्द्रियः ५ हा राक्षसचमूमुख्य मम वत्स महाबल । जित्वेन्द्रं कथमद्य त्वं लक्ष्मणस्य वशंगतः ६ ननु त्वमिषुभिः क्रुद्धो भिन्द्याः कालान्तकावपि । मन्दरस्यापि शृङ्गाणि किं पुनर्लक्ष्मणं युधि ७ अद्य वैवस्वतो राजा भूयो बहुमतो मम। येनाद्य त्वं महाबाहो संयुक्तः कालधर्मणा ८ एष पन्थाः सुयोधानां सर्वामरगणेष्वपि । यः कृते हन्यते भर्तुः स पुमान्स्वर्गमृच्छति ९ अद्य देवगणाः सर्वे लोकपाला महर्षयः । हतमिन्द्रजितं दृष्ट्वा सुखं स्वप्स्यन्ति निर्भयाः १० अद्य लोकास्त्रयः कृत्स्ना पृथिवी च सकानना । एकेनेन्द्रजिता हीना शून्येव प्रतिभाति मे ११ अद्य नैर्ऋतकन्यानां श्रोष्याम्यन्तःपुरे रवम् । करेणुसङ्घस्य यथा निनादं गिरिगह्वरे १२ यौवराज्यं च लङ्कां च रक्षांसि च परन्तप । मातरं मां च भार्यांश्च क्व गतोसि विहाय नः १३ मम नाम त्वया वीर गतस्य यमसादनम् । प्रेतकार्याणि कार्याणि विपरीते हि वर्तसे १४ स त्वं जीवति सुग्रीवे लक्ष्मणेन च राघवे । मम शल्य-

---

मूर्च्छा आली ४; आणि तो पुत्रशोकाकुल व इंद्रियें व्याकुल झालेला राक्षसश्रेष्ठ रावणराजा बऱ्याच वेळानें शुद्धीवर येऊन विलाप करू लागला ५ "हे राक्षससेनेमध्यें मुख्य असलेल्या महाबलाढ्य पुत्रा, इंद्राचाही पराजय तूं पूर्वी केलेला असून आज तुला लक्ष्मणानें कसें बरें पादाक्रांत केलें आहे ? ६. अरे, तूं क्रुद्ध झालास तर बाणांच्या योगानें काल व मृत्यु ह्यांचाही नाश करिशील आणि मंदरपर्वताचीं शिखरेंही फोडून टाकिशील; मग संग्रामामध्यें लक्ष्मणाचा वध करण्याची गोष्ट पाहिजे कशाला ? ७. हे महापराक्रमी पुत्रा, ज्याअर्थी यमानें आज तुलाही मरण आणिलें आहे त्याअर्थी तो वैवस्वतराजा आज माझ्या बहुमानास अधिकच पात्र झाला आहे ८. यजमानाकरितां जो पुरुष वध पावतो तो स्वर्गाला जातो. उत्कृष्ट योद्ध्यांना स्वर्ग प्राप्त होण्याचा मार्ग हाच आहे. हा सर्व देवगणामध्येंही प्रसिद्ध आहे ९. आज सर्वही देवगण, लोकपाल आणि महर्षि इंद्रजित् वध पावल्याचें पाहून निर्भय होतील व सुखानें निद्रा घेतील १०. एक इंद्रजित् गेल्यामुळें आज संपूर्ण तिन्ही लोक आणि वनासहवर्तमान ही पृथ्वीही मला शून्य वाटत आहे ११. पर्वताच्या गुहेमध्यें चाललेल्या हत्तिणींच्या समुदायाचा आक्रोशच कीं काय अशाप्रकारचा राक्षसकन्यांचा आक्रोश अंतःपुरामध्यें ऐकण्याचा आज मला प्रसंग येईल ! १२. हे शत्रुतापना इंद्रजिता, यौवराज्य, लंका, राक्षस, माता, मी व भार्या ह्या आम्हां सर्वांचा त्याग करून तूं कोठें रे गेला आहेस! १३. हे वीरा, यमलोकीं गेलेल्या माझीं और्ध्वदेहिक कार्यें तूं करावयाचीं परंतु, असें असु-

मनुद्धृत्य क्क गतोसि विहाय नः १५ एवमादिविलापार्तं रावणं राक्षसाधिपम् । आविवेश महान्कोपः पुत्रव्यसनसंभवः १६ प्रकृत्या कोपनं ह्येनं पुत्रस्य पुनराधयः । दीप्तं संदीपयामासुर्घर्मेऽर्कमिव रश्मयः १७ कोपाद्विजृम्भमाणस्य वक्त्राद्व्यक्तमिव ज्वलन् । उत्पपात सधूमाग्निर्वृत्रस्य वदनादिव १८ स पुत्रवधसंतप्तः शूरः क्रोधवशं गतः । समीक्ष्य रावणो बुद्ध्या वैदेह्या रोचयद्वधम् १९ तस्य प्रकृत्या रक्ते च रक्ते क्रोधाग्निनापि च । रावणस्य महाघोरे दीप्ते नेत्रे बभूवतुः २० घोरं प्रकृत्या रूपं तत्तस्य क्रोधाग्निमूर्च्छितम् । बभूव रूपं क्रुद्धस्य रुद्रस्येव व्यवस्थितम् २१ तस्य क्रुद्धस्य नेत्राभ्यां प्रापतन्नश्रुबिन्दवः । दीपाभ्यामिव दीप्ताभ्यां सार्चिषः स्नेहबिन्दवः २२ दन्तान्विदशतस्तस्य श्रूयते दशनस्वनः । यन्त्रस्याकृष्यमाणस्य मथ्नतो दानवैरिव २३ तमन्तकमिव क्रुद्धं चराचरचिखादिषुम् । वीक्षमाणं दिशः सर्वा राक्षसा नोपचक्रमुः २४ ततः परमसं-

---

नही तूं अशा विपरीत मार्गाचें कां बरें अवलंबन केलें आहेस ? १४. तस्मात्, सुग्रीव आणि लक्ष्मणासहवर्तमान राम हे जिवंत असतांना माझ्या अंतःकरणांतील शल्य काढल्यावांचून तूं कोठें बरें मला टाकून गेला आहेस ?" १५. ह्याप्रमाणें विलापानें व्याकुळ झालेल्या त्या राक्षसाधिपति रावणाला पुत्रमरणामुळें फारच कोप आला १६. सारांश, उष्ण कालामध्यें ज्याप्रमाणें देदीप्यमान सूर्याचीं किरणें उद्दीपन करीत असतात त्याप्रमाणें स्वभावतःच रागीट असलेल्या ह्या रावणाला पुत्रसंबंधीं मानसिक दुःखांनीं प्रदीप्त करून टाकिलें १७ आणि रागारागानें तो जांभया देऊं लागला असतां वृत्रासुराच्या मुखापासून निघालेल्या सधूम अग्नीप्रमाणें त्याच्या मुखांतून धूमयुक्त प्रज्वलित अग्नि स्पष्टपणें बाहेर पडला १८. नंतर पुत्रवधानें संतप्त झालेल्या त्या शूर रावणाला क्रोधामुळें कांहींएक सुचेनासें झालें आणि विधिपूर्वक विचार करून त्या रावणानें सीतेचा वध करण्याचें मनामध्यें आणिलें १९. त्या रावणाचे स्वभावतःच आरक्तवर्ण असलेले नेत्र क्रोधानें अधिकच लाल झाले असतां अतिभयंकर व देदीप्यमान दिसूं लागले २०. त्याचप्रमाणें स्वभावतःच उग्र असून क्रोधाग्नीनें व्याप्त झालेलें त्या रावणाचें रूप क्रुद्ध रुद्राच्या रूपाप्रमाणें दिसूं लागलें २१. ज्याप्रमाणें प्रदीप्त दीपापासून ज्वालांसहवर्तमान तैलबिंदु खालीं पडतात त्याप्रमाणें त्या क्रुद्ध रावणाच्या नेत्रांपासून अश्रुबिंदु पडूं लागले २२. तो दांत खाऊं लागला असतां त्याच्या दांतांचा ध्वनि समुद्रमंथनसमयीं दानव आकर्षण करीत असलेल्या मंदरपर्वतरूप मथनयंत्राच्या ध्वनीप्रमाणें ऐकूं येऊं लागला २३. चराचर जगत् भक्षण करण्यास उद्युक्त झालेला अंतकच कीं काय असा तो क्रुद्ध रावण सर्व दिशेस

क्रुद्धो रावणो राक्षसाधिपः । अब्रवीद्राक्षसां मध्ये संस्तम्भयिषुराहवे २५ मया वर्षसहस्राणि चरित्वा परमं तपः । तेषु तेष्ववकाशेषु स्वयम्भूः परितोषितः २६ तस्यैव तपसो व्युष्ट्या प्रसादाच्च स्वयम्भुवः । नासुरेभ्यो न देवेभ्यो भयं मम कदाचन २७ कवचं ब्रह्मदत्तं मे यदादित्यसमप्रभम् । देवासुरविमर्देषु न च्छिन्नं वज्रमुष्टिभिः २८ तेन मामद्य संयुक्तं रथस्थमिह संयुगे । प्रतीयात्कोऽद्य मामाजौ साक्षादपि पुरन्दरः २९ यत्तदाभिप्रसन्नेन सशरं कार्मुकं महत् । देवासुरविमर्देषु मम दत्तं स्वयम्भुवा ३० अद्य तूर्यशतैर्भीमं धनुरुत्थाप्यतां मम । रामलक्ष्मणयोरेव वधाय परमाहवे ३१ स पुत्रवधसंतप्तः क्रूरः क्रोधवशं गतः । समीक्ष्य रावणो बुद्ध्या सीतां हन्तुं व्यवस्यत ३२ प्रत्यवेक्ष्य तु ताम्राक्षः सुघोरो घोरदर्शनः । दीनो दीनस्वरान्सर्वांस्तानुवाच निशाचरान् ३३ मायया मम वत्सेन वञ्चनार्थं वनौकसाम् । किंचिदेव हतं तत्र सीतेयमिति दर्शितम् ३४ तदिदं तथ्यमेवाहं करिष्ये प्रियमात्मनः । वैदेहीं नाशयिष्यामि क्षत्रबन्धुमनुव्रताम् ३५ इत्येवमुक्त्वा सचिवान्खड्गमाशु परामृशत् । उत्प्लुत्य गुणसंपन्नं विमलाम्बर-

---

पाहूं लागला असतां कोणीही राक्षस त्याच्याजवळ जाईना २४. तदनंतर अतिशय क्रुद्ध झालेला तो राक्षसाधिपति रावण संग्रामामध्यें राक्षसांना निश्चल ठेवण्याच्या उद्देशानें राक्षसांमध्यें ह्मणाला २५ "हजारों वर्षें पराकाष्ठेचें तप करून वेळोवेळीं मीं ब्रह्मदेवाला संतुष्ट करून घेतलें आहे २६ आणि तीच तपश्चर्या फलाला येऊन ब्रह्मदेवाचा प्रसाद प्राप्त झाल्यामुळें असुर आणि देव ह्यांपासून मला कधींही भय प्राप्त होणार नाहीं असा वर मला मिळाला आहे २७. प्रभेनें सूर्याची बरोबरी करणारें जें कवच मला ब्रह्मदेवानें दिलें आहे, तें देवदैत्यांच्या युद्धांमध्यें वज्रमुष्टींनींही फुटलें नाहीं २८. तस्मात्, तें कवच घालून संग्रामामध्यें रथारूढ झालेल्या माझ्यावर प्रत्यक्ष इंद्र जरी झाला तरी कोण बरें आज चाल करून येणार आहे ? २९. देवदैत्यांच्या युद्धांचे समयीं ब्रह्मदेवानें प्रसन्न होऊन बाणांसहवर्तमान जें प्रचंड धनुष्य त्यावेळीं मला दिलें आहे ३०. तेंच माझें भयंकर धनुष्य प्रचंड संग्रामामध्यें रामलक्ष्मणांच्याच वधाकरितां शेंकडों मंगल वाद्यांच्या ध्वनींसहवर्तमान उचलून धरा" ३१. ह्याप्रमाणें पुत्रवधानें संतप्त झाल्यामुळें क्रोधाधीन झालेला तो क्रूर रावण विचार करून बुद्धिपूर्वक सीतेचा वध करण्याविषयीं उद्युक्त झाला ३२. नंतर आरक्तवर्ण नेत्र व घोर मुद्रा ह्यांनीं युक्त असलेला तो अतिभयंकर दीन राक्षस चोहोंकडे दृष्टि फेंकून दीन स्वरानें आक्रोश करीत असलेल्या त्या सर्व राक्षसांना ह्मणाला ३३ "माझ्या पुत्रानें मायेचें अवलंबन करून वानरांना फसविण्याकरितां कांहींतरी मारून ही सीता ह्मणून जें दर्शविलें आहे ३४ तें मी स्वतःला प्रिय असलेलें वृत्त

वर्चसम् ३६ निष्पपात स वेगेन सभार्यः सचिवैर्वृतः । रावणः पुत्रशोकेन भृशमाकुलचेतनः ३७ संक्रुद्धः खड्गमादाय सहसा यत्र मैथिली । व्रजन्तं राक्षसं प्रेक्ष्य सिंहनादं विचुक्रुशुः ३८ ऊचुश्चान्योन्यमालिङ्ग्य संक्रुद्धं प्रेक्ष्य राक्षसम् । अद्यैनं तावुभौ दृष्ट्वा भ्रातरौ प्रव्यथिष्यतः ३९ लोकपाला हि चत्वारः क्रुद्धेनानेन निर्जिताः । बहवः शत्रवश्चान्ये संयुगेष्वभिपातिताः ४० त्रिषु लोकेषु रत्नानि भुङ्क्ते आहृत्य रावणः । विक्रमे च बले चैव नास्त्यस्य सदृशो भुवि ४१ तेषां संजल्पमानानामशोकवनिकां गताम् । अभिदुद्राव वैदेहीं रावणः क्रोधमूर्च्छितः ४२ वार्यमाणः सुसंक्रुद्धः सुहृद्भिर्हितबुद्धिभिः । अभ्यधावत संक्रुद्धः खे ग्रहो रोहिणीमिव ४३ मैथिली रक्षमाणा तु राक्षसीभिरनिन्दिता । ददर्श राक्षसं क्रुद्धं निस्त्रिंशवरधारिणम् ४४ तं निशम्य सनिस्त्रिंशं व्यथिता जनकात्मजा ।

---

आज खरेंच करून दाखविणार. सारांश, त्या क्षत्रियाधमाला अनुसरून असलेल्या विदेहराजकन्या सीतेचा मी नाश करणार" ३५ ह्याप्रमाणें सचिवांना सांगून रावणानें उड्डाण केलें आणि निर्मल आकाशाप्रमाणें ज्याची कांति आहे असा एक बंधयुक्त खड्ग त्यानें सत्वर हातामध्यें घेतला ३६. तदनंतर पुत्रशोकानें ज्याचें अंतःकरण अतिशय गोंधळून गेलें आहे असा तो सचिवांनीं परिवेष्टित असलेला रावण भार्येसहवर्तमान क्रुद्ध होऊन वेगानें तेथून उडाला व बरोबर खड्ग घेऊन जिकडे सीता होती तिकडे एकाएकीं चालता झाला. रावणराक्षस निघालेला पाहून त्याचे मंत्री सिंहासारिखी गर्जना करूं लागले ३७, ३८ आणि राक्षस अतिशय क्रुद्ध झाला आहे असें अवलोकन केल्यावर एकमेकांला कवटाळून ते ह्मणाले " आज ह्याला अवलोकन करितांक्षणीं ते उभयतां भ्राते रामलक्ष्मण घाबरून जातील ३९. कारण, ह्यानें एकदम क्रुद्ध होऊन चार लोकपालांचा पराजय केलेला आहे आणि इतरही अनेक शत्रूंचा संग्रामामध्यें ह्यानें निःपात केला आहे ४०. त्रैलोक्यांतील उत्कृष्ट उत्कृष्ट वस्तु हरण करून रावण त्यांचा उपभोग घेत असतो. कारण, पराक्रमामध्यें व बलामध्यें ह्या भूतलावर त्याची बरोबरी करणारा कोणी नाहीं " ४१. ह्याप्रमाणें त्यांचें भाषण चाललें असतां क्रोधानें व्याप्त झालेला रावण अशोकवनामध्यें असलेल्या सीतेकडे धांवत गेला ४२. अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या रावणाचे सुविचारी सुहृद जरी निवारण करूं लागले तरी आकाशामध्यें रोहिणीवर चालून जाणाऱ्या क्रुद्ध ग्रहाप्रमाणें तो सीतेकडे धांवून गेला ४३. तों राक्षसी जिचें रक्षण करीत आहेत अशा त्या निर्दोष सीतेनेंही उत्कृष्ट खड्ग धारण करणारा तो क्रुद्ध राक्षस अवलोकन केला ४४. सुहृदांनीं अनेक वेळां निवारण केलें असूनही

निवार्यमाणं बहुशः सुहृद्भिरनिवर्तिनम् ४५ सीता दुःखसमाविष्टा विलपन्तीदमब्रवीत् ४६ यथायं मामभिक्रुद्धः समभिद्रवति स्वयम् । वधिष्यति सनाथां मामनाथामिव दुर्मतिः ४७ बहुशश्चोदयामास भर्तारं मामनुव्रताम् । भार्या मम भवस्वेति प्रत्याख्यातो ध्रुवं मया ४८ सोयं मामनुपस्थाने व्यक्तं नैराश्यमागतः । क्रोधमोहसमाविष्टो व्यक्तं मां हन्तुमुद्यतः ४९ अथवा तौ नरव्याघ्रौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ । मन्निमित्तमनार्येण समरेद्य निपातितौ ५० भैरवो हि महान्नादो राक्षसानां श्रुतो मया। बहूनामिह हृष्टानां तथा विक्रोशतां प्रियम् ५१ अहो धिङ्मन्निमित्तोयं विनाशो राजपुत्रयोः । अथवा पुत्रशोकेन अहत्वा रामलक्ष्मणौ ५२ विधमिष्यति मां रौद्रो राक्षसः पापनिश्चयः । हनूमतस्तु तद्वाक्यं न कृतं क्षुद्रया मया ५३ यद्यहं तस्य पृष्ठेन तदायासमनिर्जिता । नाद्यैवमनुशोचेयं भर्तुरङ्कगता सती५४ मन्ये तु हृदयं तस्याः कौसल्यायाः फलिष्यति । एकपुत्रा तदा पुत्रं विनष्टं श्रोष्यते युधि ५५ सा हि जन्म च बाल्यं च यौवनं

---

परत न फिरलेला तो राक्षस खड्गासहवर्तमान आला आहे हें पाहून जनककन्या सीता घाबरून गेली ४५; आणि दुःखाकुल झालेली ती सीता विलाप करीत करीत ह्मणाली "ज्याअर्थी हा क्रुद्ध होऊन स्वतःच माझ्याकडे ४६ धांवून येत आहे त्याअर्थी सनाथ असूनही अनाथाप्रमाणें झालेल्या माझा हा दुर्बुद्धि वध करील ४७. भर्त्याचे ठिकाणीं अनुरक्त असलेल्या मला "माझी भार्या हो" ह्मणून अनेक वेळां ह्यानें सांगितलें असतां मीं निश्चयपूर्वक त्याला नाकारिलें आहे ४८. ह्यामुळें मी अंगीकार करीत नाहीं ह्याविषयीं ह्याची पूर्णपणें निराशा झाली असल्या कारणानें क्रोध व मोह ह्यांनीं व्याप्त झालेला तो हा रावण उघडपणें माझा वध करण्यास उद्युक्त झाला आहे ४९. अथवा माझ्या करितां ह्या दुष्टानें समरांगणामध्यें त्या पुरुषश्रेष्ठ भ्रात्या रामलक्ष्मणांचा आज वध केला असावा ५०. कारण, ह्या ठिकाणीं आनंदित झालेल्या आणि ज्ञातींना प्रिय होईल अशारीतीनें गर्जना करीत असलेल्या पुष्कळ राक्षसांचा प्रचंड व भयंकर ध्वनि मीं आज ऐकिला आहे५१. तस्मात्, ज्याअर्थी माझ्याकरितां अशारीतीनें ह्या राजपुत्रांचा नाश झाला आहे त्याअर्थी मला धिक्कार असो. अथवा पुत्रशोकामुळें हा पापबुद्धि क्रूर राक्षस रामलक्ष्मणांचा वध न करितांच येथें आला आहे आणि मला उडवून देण्याच्या बेतांत आहे. हनुमानाचें तें ह्मणणेंही मीं क्षुद्रनें ऐकिलें नाहीं ५२,५३. मी पराभव न पावतां जर त्याच्या पाठीवर बसून गेलें असतें तर भर्त्याच्या अंकावर आरूढ झालेल्या मला आज अशाप्रकारें विलाप करण्याची पाळी आली नसती ५४. पुत्राचा युद्धामध्यें

च महात्मनः। धर्मकार्याणि रूपं च रुदती संस्मरिष्यति ५६ निराशा निहते पुत्रे दत्त्वा श्राद्धमचेतना। अग्निमावेक्ष्यते नूनमपो वापि प्रवेक्ष्यति ५७ धिगस्तु कुब्जामसतीं मन्थरां पापनिश्चयाम्। यन्निमित्तमिमं शोकं कौसल्या प्रतिपत्स्यते ५८ इत्येवं मैथिलीं दृष्ट्वा विलपन्तीं तपस्विनीम्। रोहिणीमिव चन्द्रेण विनाग्रहवशंगताम् ५९ एतस्मिन्नन्तरे तस्य अमात्यः शीलवाञ्छुचिः। सुपार्श्वो नाम मेधावी रावणं रक्षसां वरम्॥ निवार्यमाणः सचिवैरिदं वचनमब्रवीत् ६० कथं नाम दशग्रीव साक्षाद्वैश्रवणानुज। हन्तुमिच्छसि वैदेहीं क्रोधाद्धर्ममपास्य च ६१ वेदविद्याव्रतस्नातः स्वकर्मनिरतस्तथा। स्त्रियः कस्माद्वधं वीर मन्यसे राक्षसेश्वर ६२ मैथिलीं रूपसंपन्नां प्रत्यवेक्षस्व पार्थिव। तस्मिन्नेव सहास्माभिराहवे क्रोधमुत्सृज ६३ अभ्युत्थानं त्वमद्यैव कृष्णपक्षचतुर्दशी। कृत्वा निर्याह्यमावास्यां विजयाय बलैर्वृतः ६४ शूरो

---

नाश झाल्याचें जेव्हां एकपुत्रा कौसल्या श्रवण करील तेव्हां तिचें हृदय विदीर्णच होऊन जाईल असें मला वाटतें ५५. त्या महात्म्या रामाचें रूप, जन्म, बाल्य, यौवन आणि धर्मकार्यें ह्यांचें रडतां रडतां तिला स्मरण होईल ५६ आणि पुत्राचा वध झाल्यामुळें कांहींएक सुचेनासें होऊन निराश झालेली ती कौसल्या त्याचें और्ध्वदेहिक श्राद्ध होतांक्षणीं खरोखर अग्निमध्यें अथवा उदकामध्यें प्रवेश करील ५७. धिक्कार असो त्या पापबुद्धि दुष्ट मंथरेला! कारण, तिच्यामुळें कौसल्येला हा पुत्रशोक प्राप्त होणार आहे ५८. चंद्राचा वियोग होऊन ग्रहाच्या तावडींत सांपडलेली रोहिणीच कीं काय अशारीतीनें रामाचा वियोग होऊन रावणाच्या तावडींत सांपडलेली बिचारी सीता ह्याप्रमाणें विलाप करीत आहे असें दृष्टीं पडल्यावर ५९ इतक्यामध्यें रावणाचा सुशील व आचरणानें शुद्ध असलेला सुपार्श्वनामक बुद्धिमान् अमात्य इतर सचिव निवारण करीत असतांनाही राक्षसश्रेष्ठ रावणाला ह्मणाला ६० "हे रावणा, हे कुबेराच्या प्रत्यक्ष भ्रात्या, धर्म झुगारून देऊन तूं सीतेचा वध करण्याची कशी बरें इच्छा करीत आहेस? ६१. हे वीरा राक्षसराजा, वेदविद्येला आवश्यक असलेलें ब्रह्मचर्यव्रत धारण करून विद्या समाप्त झाल्यानंतर गुरुगृहांपासून निवृत्त झालेला व स्वकर्माविषयीं तत्पर असलेला तूं स्त्रीचा वध करण्याचें कशाकरितां मनामध्यें आणीत आहेस? ६२. हे राजा, रामाच्या वधापर्यंत तूं रूपसंपन्न सीतेची वाट पहा आणि आमच्यासहवर्तमान संग्रामामध्यें त्या रामावरच आपला क्रोध सोड ६३. आज कृष्णपक्षांतील चतुर्दशी आहे; ह्यास्तव आजच तूं युद्धाच्या तयारीला लाग आणि सेना बरोबर घेऊन तूं उद्यां अमावास्येच्या मुहू-

धीमान्रथी खड्गी रथप्रवरमास्थितः । हत्वा दाशरथिं भीमं भवान्प्राप्स्यति मैथिलीम् ६५ स तद्दुरात्मा सुहृदा निवेदितं वचः सुधर्म्यं प्रतिगृह्य रावणः। गृहं जगामाथ ततश्च वीर्यवान्पुनः सभां च प्रययौ सुहृद्वृतः ६६ [४२०७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्विनवतितमः सर्गः ॥ ९२ ॥

स प्रविश्य सभां राजा दीनः परमदुःखितः । निषसादासने मुख्ये सिंहः क्रुद्ध इव श्वसन् १ अब्रवीच्च स तान्सर्वान्बलमुख्यान्महाबलः । रावणः प्राञ्जलिर्वाक्यं पुत्रव्यसनकर्शितः २ सर्वे भवन्तः सर्वेण हस्त्यश्वेन समावृताः । निर्यातरथसङ्घैश्च हस्त्यश्वैश्चोपशोभिताः ३ एकं रामं परिक्षिप्य समरे हन्तुमर्हथ । प्रहृष्टाः शरवर्षाणि प्रावृट्काल इवाम्बुदाः ४ अथवाहं शरैस्तीक्ष्णैर्भिन्नगात्रं महाहवे । भवद्भिः श्वो निहन्तास्मि रामं लोकस्य पश्यतः ५ इत्येतद्वाक्यमादाय राक्षसेन्द्रस्य राक्षसाः । निर्ययुस्ते रथैः शीघ्रैर्नानानीकैश्च संयुताः ६ परिघान्पट्टिशांश्चैव शरखड्गपरश्वधान् । शरी-

---

र्तावर विजयार्थ बाहेर पड ६४. म्हणजे खड्ग धारण करून श्रेष्ठ रथावर आरूढ झालेला तूं बुद्धिमान् व शूर रथी दशरथपुत्र भयंकर रामाचा वध करून सीतेला प्राप्त करून घेशील " ६५. ह्याप्रमाणें सुहृदानें केलेल्या व धर्माला अतिशयच अनुसरून असलेल्या त्या भाषणाला मान देऊन तो दुरात्मा रावण घरीं गेला आणि पुनरपि तो वीर्यवान् रावण सुहृदांनीं परिवेष्टित होऊन सभेमध्यें आला ६६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडांपैकीं ब्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९२ ॥

दीन व पराकाष्ठेचा दुःखित झालेला तो राजा सभेमध्यें प्रवेश केल्यानंतर क्रुद्ध सिंहाप्रमाणें फुस्कारे टाकीत टाकीत मुख्य आसनावर येऊन बसला १ आणि पुत्रमरणानें व्याकुल झालेला तो महाबलाढ्य रावण हात जोडून त्या सर्वही मुख्य मुख्य बलाढ्य राक्षसांना म्हणाला २ " गज व अश्व ह्यांनीं सुशोभित झालेले तुह्मी जो म्हणून कांहीं अश्व अथवा गज आपल्या सैन्यामध्यें शिलक असेल तो बरोबर घेऊन रथसमुदायांसहवर्तमान तुह्मी सर्वजण बाहेर पडा ३; आणि पर्जन्यसमयीं ज्याप्रमाणें मेघ उदकवृष्टि करितात त्याप्रमाणें तुह्मी एका संग्रामामध्यें रामाला वेढून आनंदानें त्याच्यावर बाणवृष्टि करा व त्याचा वध करा ४. अथवा तीक्ष्ण बाणांनीं प्रचंड संग्रामामध्यें ज्याचें शरीर छिन्नभिन्न झालें आहे अशा त्या रामाचा लोकांसमक्ष तुमच्या साहाय्यानें मी उद्यां वध करीन " ५. ह्याप्रमाणें झालेली ती राक्षसाधिपतीची आज्ञा मान्य

रान्तकरान्सर्वे चिक्षिपुर्वानरान्प्रति ७ वानराश्च द्रुमाञ्शैलान्राक्षसान्प्रति चिक्षिपुः ८ स सङ्ग्रामो महाभीमः सूर्यस्योदयनं प्रति । रक्षसां वानराणां च तुमुलः समपद्यत ९ ते गदाभिश्च चित्राभिः प्रासैः खड्गैः परश्वधैः । अन्योन्यं समरे जघ्नुस्तदा वानरराक्षसाः १० एवं प्रवृत्ते सङ्ग्रामे ह्यद्भुतं सुमहद्रजः । रक्षसां वानराणां च शान्तं शोणितविस्रवैः ११ मातङ्गरथकूलाश्च शरमत्स्या ध्वजद्रुमाः । शरीरसंघाटवहाः प्रसस्रुः शोणितापगाः १२ ततस्ते वानराः सर्वे शोणितौघपरिप्लुताः । ध्वजवर्मरथानश्वान्नानाप्रहरणानि च ॥ आप्लुत्याप्लुत्य समरे वानरेन्द्रा बभञ्जिरे १३ केशान्कर्णललाटं च नासिकाश्च प्लवङ्गमाः । रक्षसां दशनैस्तीक्ष्णैर्नखैश्चापि व्यकर्तयन् १४ एकैकं राक्षसं सङ्ख्ये शतं वानरपुङ्गवाः । अभ्यधावन्त पतितं वृक्षं शकुनयो यथा १५ तदा गदाभिर्गुर्वीभिः प्रासैः खड्गैः परश्वधैः । निर्जघ्नुर्वानरान्घोरान्राक्षसाः पर्वतोपमाः १६ राक्षसैर्वध्यमानानां वानराणां महाचमूः । शरण्यं शरणं याता रामं दशरथात्मजम् १७

---

करून नानाप्रकारचीं सैन्यं व शीघ्रगामी रथ ह्यांनीं युक्त झालेले ते राक्षस बाहेर पडले ६ आणि शरीराचा नाश करणारे परिघ, पट्ट, बाण, खड्ग व परशु अशीं आयुधें ते सर्व राक्षस वानरांवर फेंकूं लागले ७ आणि वानरही राक्षसांवर वृक्ष व पर्वत उलट फेंकूं लागले ८. ह्याप्रमाणें राक्षस व वानर ह्यांमध्यें सूर्योदयसमयीं महाभयंकर व तुमुल संग्राम सुरू झाला ९. चित्रविचित्र गदा, भाले, खड्ग आणि परशु ह्यांच्या योगानें ते वानर व राक्षस संग्रामामध्यें एकमेकांचा वध करूं लागले १०. ह्याप्रमाणें संग्राम सुरू झाला असतां फारच प्रचंड व अद्भुत धूळ राक्षस व वानर ह्यांच्या रक्तस्रावामुळें जागच्या जागीं शांत होऊन गेली ११. गज व रथ हींच ज्यांचीं तीरें आहेत; बाण हेच ज्यांच्यांतील मत्स्य आहेत; ध्वज हेच ज्यांच्यांतील वृक्ष आहेत आणि शरीररूप काष्ठसमुदाय ज्यांच्यांतून वहात जात आहेत अशा रक्तप्रवाहरूप नद्या सुरू झाल्या १२. तदनंतर ते सर्वही वानर रक्तप्रवाहानें भरून गेले आणि संग्रामामध्यें ते वानराधिपति उड्डाण करून ध्वज, कवचें, रथ, अश्व आणि अनेक प्रकारचीं आयुधें मोडून टाकूं लागले १३. वानर तीक्ष्ण दांत व नखें ह्यांच्या योगानें राक्षसांचे केश, कान, ललाटें व नासिका तोडूं लागले १४ आणि वृक्ष पडला असतां ज्याप्रमाणें शेंकडों पक्षी त्याच्याकडे धांवून जातात त्याप्रमाणें संग्रामामध्यें एकेका राक्षसावर शेंकडों वानरश्रेष्ठ धांवून जाऊं लागले १५. तेव्हां पर्वतप्राय राक्षसही मोठ्या मोठ्या गदा, भाले, खड्ग व परशु ह्यांच्या योगानें घोर वानरांचा वध करूं लागले १६ आणि ह्याप्रमाणें वानरांच्या प्रचंड सेनेचा राक्षस वध करूं लागले

ततो रामो महातेजा धनुरादाय वीर्यवान् । प्रविश्य राक्षसं सैन्यं शरवर्षं ववर्ष च १८ प्रविष्टं तु तदा रामं मेघाः सूर्यमिवाम्बरे । नाधिजग्मुर्महाघोरा निर्दहन्तं शराग्निना १९ कृतान्येव सुघोराणि रामेण रजनीचराः । रणे रामस्य ददृशुः कर्माण्यसुकराणि ते २० चालयन्तं महासैन्यं विधमन्तं महारथान् । ददृशुस्तेन वै रामं वातं वनगतं यथा २१ छिन्नं भिन्नं शरैर्दग्धं प्रभग्नं शस्त्रपीडितम् । बलं रामेण ददृशुर्न रामं शीघ्रकारिणम् २२ प्रहरन्तं शरीरेषु न ते पश्यन्ति राघवम् । इन्द्रियार्थेषु तिष्ठन्तं भूतात्मानमिव प्रजाः २३ एष हन्ति गजानीकमेष हन्ति महारथान् । एष हन्ति शरैस्तीक्ष्णैः पदातीन्वाजिभिः सह २४ इति ते राक्षसाः सर्वे रामस्य सदृशान्रणे । अन्योन्यं कुपिता जघ्नुः सादृश्याद्राघवस्य तु २५ न ते ददृशिरे रामं दहन्तमपि वाहिनीम् । मोहिताः परमास्त्रेण गान्धर्वेण

---

असतां शरण जाण्यास योग्य असलेल्या दशरथपुत्र रामाला ती सेना शरण गेली १७. तदनंतर महातेजस्वी व वीर्यवान् राम धनुष्य घेऊन राक्षससैन्यामध्यें प्रविष्ट झाला आणि बाणांचा वर्षाव करूं लागला १८. परंतु, मेघ ज्याप्रमाणें आकाशामध्यें सूर्यासमीप जाण्यास समर्थ होत नाहींत त्याप्रमाणें सैन्यामध्यें प्रविष्ट होऊन बाणरूप अग्नीनें राक्षससैन्य दग्ध करीत सुटलेल्या रामासमीप जाण्यास ते महाघोर राक्षस समर्थ झाले नाहींत १९. रामाच्या हातून होणारीं दुर्घट व अतिभयंकर कर्में राक्षसांनीं रामानें केलेलींच अवलोकन केलीं ( रामाच्या हातून होत असतांना तीं त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलीं नाहींत ) २०. अरण्यांतील वायुप्रमाणें मोठ्या मोठ्या रथांना उडवून देऊन प्रचंड सैन्याला कांपवीत असलेल्या रामाला त्यांनीं अवलोकन केलें २१. रामाच्या योगानें छिन्नभिन्न होऊन त्याच्या बाणांनीं दग्ध व पराजित झालेलें आणि त्याच्या शस्त्रांनीं जर्जर झालेलें सैन्य मात्र राक्षसांच्या दृष्टीं पडलें; चलाखीनें युद्ध करीत असलेला राम त्यांच्या दृष्टीं पडला नाहीं २२. इंद्रियांचे ठिकाणीं असलेला भूतात्मा ज्याप्रमाणें लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येत नाहीं त्याप्रमाणें शरीरांचे ठिकाणीं प्रहार करीत असलेला राम त्या राक्षसांचे दृष्टोत्पत्तीस येत नव्हता २३. " हा गजसेनेचा वध करीत आहे; हा महारथ्यांचा फडशा पाडीत आहे आणि तीक्ष्ण बाणांनीं अश्वांसहवर्तमान पदातींचा हा नाश करीत आहे " २४ असा आक्रोश करीत असलेल्या त्या सर्वही राक्षसांना संग्रामामध्यें जो तो रामासारिखाच दिसूं लागला आणि अशारीतीनें जो तो रामासारिखाच दिसूं लागल्यामुळें ते राक्षस क्रुद्ध होऊन एकमेकांचाच वध करूं लागले २५. सारांश, महात्म्या रामानें उत्कृष्ट गांधर्वास्त्रानें मोहित करून टाकिलेल्या

महात्मना २६ ते तु रामसहस्राणि रणे पश्यन्ति राक्षसाः। पुनः पश्यन्ति काकुत्स्थमेकमेव महाहवे २७ भ्रमन्तीं काञ्चनीं कोटिं कार्मुकस्य महात्मनः। अलातचक्रप्रतिमां ददृशुस्ते न राघवम् २८ शरीरनाभिसत्त्वार्चिः शरारं नेमिकार्मुकम् । ज्याघोषतलनिर्घोषं तेजोबुद्धिगुणप्रभम् २९ दिव्यास्त्रगुणपर्यन्तं निघ्नन्तं युधि राक्षसान् । ददृशू रामचक्रं तत्कालचक्रमिव प्रजाः ३० अनीकं दशसाहस्रं रथानां वातरंहसाम् । अष्टादश सहस्राणि कुञ्जराणां तरस्विनाम् ३१ चतुर्दश सहस्राणि सारोहाणां च वाजिनाम् । पूर्णे शतसहस्रे द्वे राक्षसानां पदातिनाम् ३२ दिवसस्याष्टभागेन शरैरग्निशिखोपमैः। हतान्येकेन रामेण रक्षसां कामरूपिणाम् ३३ ते हताश्वा हतरथाः शान्ता विमथितध्वजाः । अभिपेतुः पुरीं लङ्कां हतशेषा निशाचराः ३४ हतैर्गजपदात्यश्वैस्तद्बभूव रणाजिरम् । आक्रीडभूमिः क्रुद्धस्य रुद्रस्येव महात्मनः ३५ ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । साधु साध्विति

---

त्या राक्षसांनीं सैन्य दग्ध करीत सुटलेला खरा खरा राम अवलोकन केला नाहीं २६. त्या राक्षसांना संग्रामामध्यें हजारों राम क्षणामध्यें दिसूं लागले आणि क्षणामध्यें पुनरपि त्या प्रचंड संग्रामामध्यें एकटाच राम त्यांच्या दृष्टीं पडूं लागला २७. कांहीं वेळानें त्या महात्म्या रामाच्या धनुष्याची सुवर्णमय कोटि वेगामुळें अलातचक्राप्रमाणें भ्रमण करीत असलेली त्यांच्या दृष्टीं पडूं लागली व राम दृष्टीं पडेनासा झाला २८. मध्यदेह हाच ज्याचा तुंबा आहे; बल हीच ज्याची ज्वाला आहे; बाण हेच ज्याचे अरे आहेत; धनुष्य हेंच ज्याचें पुठ्यांचें कडें आहे; प्रत्यंचेचा टणत्कार आणि तल ह्यांपासून उत्पन्न होणारे घोष हाच ज्याचा ध्वनि आहे; प्रताप व ज्ञान हे गुणच ज्याची प्रभा आहे २९ आणि दिव्यास्त्रवैभव हीच ज्याची धांव आहे असें कालचक्राप्रमाणें रामरूप चक्र युद्धामध्यें राक्षसांचा वध करीत असलेलें लोकांनीं अवलोकन केलें ३०. सात कोट एकोणतीस लक्ष वायूप्रमाणें वेगवान् रथ, तेरा कोट बारा लक्ष वीस हजार बलाढ्य गज ३१, दहा कोट वीस लक्ष साठ हजार स्वारांसहवर्तमान अश्व आणि एक अब्ज पंचेचाळीस कोट अठ्यायशी लक्ष पायदळ ३२. इतकें यथेष्ट रूप धारण करणाऱ्या राक्षसांचें सैन्य दिवसाच्या एका अष्टमांशांत (ह्मणजे चतुर्दशीच दिवशीं संध्याकाळच्या चार घटिकांमध्यें ) एका रामानें अग्निज्वालातुल्य बाणांनीं मारिलें ३३. वध न पावतां अवशिष्ट राहिलेले जे राक्षस होते ते लंकानगरीकडे धांवले. तेव्हां त्यांचे अश्व, रथ व ध्वज ह्यांचा विध्वंस होऊन ते अगदीं जर्जर झालेले होते ३४. वध पावलेले गज, पदाति व अश्व ह्यांच्या योगानें तें रणांगण क्रुद्ध झालेल्या महात्म्या

रामस्य तत्कर्म समपूजयन् ३६ अब्रवीच्च तदा रामः सुग्रीवं प्रत्यनन्तरम्। विभीषणं च धर्मात्मा हनूमन्तं च वानरम् ३७ जाम्बवन्तं हरिश्रेष्ठं मैन्दं द्विविदमेव च । एतदस्त्रबलं भीमं मम वा त्र्यम्बकस्य वा ३८ निहत्य तां राक्षसराजवाहिनीं रामस्तदा शक्रसमो महात्मा । अस्त्रेषु शस्त्रेषु जितक्लमश्च संस्तूयते देवगणैः प्रहृष्टैः ३९ [ ४२४६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्रिनवतितमः सर्गः ॥ ९३ ॥

तानि नागसहस्राणि सारोहाणि च वाजिनाम् । रथानां त्वग्निवर्णानां सध्वजानां सहस्रशः १ राक्षसानां सहस्राणि गदापरिघयोधिनाम् । काञ्चनध्वजचित्राणां शूराणां कामरूपिणाम् २ निहतानि शरैर्दीप्तैस्तप्तकाञ्चनभूषणैः । रावणेन प्रयुक्तानि रामेणाक्लिष्टकर्मणा ३ दृष्ट्वा श्रुत्वा च संभ्रान्ता हतशेषा निशाचराः । राक्षस्यश्च समागम्य दीनाश्चिन्तापरिप्लुताः ४ विधवा हतपुत्राश्च क्रोशन्त्यो हतबान्धवाः।राक्षस्यः सह संगम्य दुःखार्ताः पर्यदेवयन् ५ कथं शूर्पणखा वृद्धा कराला निर्णतोदरी । आससाद वने

---

रुद्राची क्रीडाभूमिच कीं काय असें दिसूं लागलें ३५. तदनंतर गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध आणि महर्षि "शाबास शाबास" ह्मणून रामाच्या त्या कर्माची प्रशंसा करूं लागले असतां ३६ जवळच असलेला सुग्रीव, बिभीषण, हनुमान् वानर, वानरश्रेष्ठ जांबवान्, मैंद व द्विविद ह्यांना तो धर्मात्मा राम ह्मणाला "हें भयंकर अस्त्रसामर्थ्य एक माझें आहे अथवा एक त्र्यंबकाचें आहे" ३७, ३८. अस्त्रयुद्धामध्यें व शस्त्रयुद्धामध्येंही न श्रमणाऱ्या इंद्रतुल्य महात्म्या रामानें राक्षसाधिपति रावणाच्या त्या सेनेचा वध केल्यावर देवगण आनंदित होऊन त्याची स्तुति करूं लागले ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं त्र्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९३॥

रावणानें पाठविलेले ते हजारों गज, स्वारांसहवर्तमान हजारों अश्व, अग्नीसारिखे देदीप्यमान असे ध्वजयुक्त हजारों रथ व सुवर्णध्वजानें मनोहर, शूर, यथेष्ट रूप धारण करणारे आणि गदा व परिघ ह्या आयुधांनीं युद्ध करणारे हजारों राक्षस ह्यांचा उज्ज्वल सुवर्णानें भूषित अशा देदीप्यमान बाणांच्या योगानें सज्जन रामानें वध केल्याचें १, २, ३ पाहून व ऐकून वध न पावतां अवशिष्ट राहिलेले राक्षस गोंधळून गेले व राक्षसी आणि राक्षस एकत्र जुळले असतां सर्वही दीन होऊन चिंताक्रांत झाले ४. गतभर्तृका झालेल्या, पुत्रांचा नाश झालेल्या आणि नातेवाईकांचाही वध झालेल्या दुःखाकुल राक्षसस्त्रिया एकत्र जुळून शोक करूं लागल्या ५. "कृशोदरी, वृद्ध आणि विसप्यांतही अप-

रामं कन्दर्पसमरूपिणम् ६ सुकुमारं महासत्त्वं सर्वभूतहिते रतम् । तं दृष्ट्वा लोकवध्या सा हीनरूपा प्रकामिता ७ कथं सर्वगुणैर्हीना गुणवन्तं महौजसम् । सुमुखं दुर्मुखी रामं कामयामास राक्षसी ८ जनस्यास्याल्पभाग्यत्वाद्वलिनी श्वेतमूर्धजा । अकार्यमपहास्यं च सर्वलोकविगर्हितम् ९ राक्षसानां विनाशाय दूषणस्य खरस्य च । चकाराप्रतिरूपा सा राघवस्य प्रधर्षणम् १० तन्निमित्तमिदं वैरं रावणेन कृतं महत् । वधाय सीता सा नीता दशग्रीवेण रक्षसा ११ न च सीतां दशग्रीवः प्राप्नोति जनकात्मजाम् । बद्धं बलवता वैरमक्षयं राघवेण च १२ वैदेहीं प्रार्थयानं तं विराधं प्रेक्ष्य राक्षसम् । हतमेकेन रामेण पर्याप्तं तन्निदर्शनम् १३ चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् । निहतानि जनस्थाने शरैरग्निशिखोपमैः १४ खरश्च निहतः सङ्ख्ये दूषणस्त्रिशिरास्तथा । शरैरादित्यसंकाशैः पर्याप्तं तन्निदर्शनम् १५ हतो योजनबाहुश्च कबन्धो रुधिराशनः । क्रोधान्नादं नदन्सोऽथ

---

कर अशी शूर्पणखा रूपानें मदनासारिख्या असलेल्या रामाकडे कशाकरितां बरें गेली? ६. सुकुमार, महाशय आणि सर्व भूतांच्या हिताविषयीं तत्पर अशा त्या रामाला अवलोकन करितांक्षणीं त्या कुरूप शूर्पणखेलाहीं त्याच्यासंबंधानें कामवासना उत्पन्न झाली ७; परंतु, सर्वगुणहीन अशी ती दुर्मुखलेली शूर्पणखा राक्षसी तिच्या मनामध्यें गुणवान्, महाबलाढ्य व मनोहर मुखानें युक्त असलेल्या रामाविषयीं कशी बरें कामवासना उत्पन्न झाली ? ८. रामाच्या गळीं पडणें हें जें सर्व लोकांमध्यें निंद्य व उपहासास्पद अकार्य शरीराला सुरकुत्या पडून केंस पिकलेल्या त्या अनुपम शूर्पणखेनें ह्या लोकांच्या दुर्दैवामुळें केलें तें खर, दूषण व इतरही राक्षस ह्यांच्या नाशाला कारण झालें ९, १०. रावणानें जें हें रामाशीं मोठें वैर बांधिलें ह्याचें कारण तरी शूर्पणखाच असून त्या राक्षसानें वनांतून सीतेला नेलें त्यामुळें राक्षसांचा वध झाला ११. जनककन्या सीता रावणाला प्राप्त होणार नाहीं; बलाढ्य रामाशीं अशारीतीनें अक्षय वैर मात्र रावणानें बांधिलें आहे १२. सीतेची इच्छा करणारा विराध राक्षस एकट्या रामाच्या हातून वध पावला हें अवलोकन केलेल्या रावणाला रामाच्या पराक्रमाविषयीं तेवढें उदाहरण पुरें आहे १३. अग्निज्वालातुल्य बाणांच्या योगानें जनस्थानामध्यें भयंकर पराक्रम करणाऱ्या चवदा हजार राक्षसांचा रामानें वध केला १४. संग्रामामध्यें खर, दूषण व त्रिशिरा ह्यांचा सूर्यतुल्य व देदीप्यमान बाणांनीं रामानें वध केला हें उदाहरण रामा ( च्या लोकोत्तरा ) विषयीं रावणाला पुरेंसें होतें १५. योजनपर्यंत ज्याचे हात लांब होते असा रक्तसेवक कबंधराक्षस क्रोधानें मोठी गर्जना करीत असतांनाही रामानें त्याचा वध केला हें

पर्याप्तं तन्निदर्शनम् १६ जघान बलिनं रामः सहस्रनयनात्मजम्। वालिनं मेघ-संकाशं पर्याप्तं तन्निदर्शनम् १७ ऋष्यमूके वसंश्चैव दीनो भग्नमनोरथः।सुग्रीवः प्रापितो राज्यं पर्याप्तं तन्निदर्शनम् १८ धर्मार्थसहितं वाक्यं सर्वेषां रक्षसां हितम्। युक्तं बिभीषणेनोक्तं मोहात्तस्य न रोचते १९ बिभीषणवचः कुर्याद्यदि स्म धनदानुजः । श्मशानभूता दुःखार्ता नेयं लङ्का भविष्यति २० कुम्भकर्णं हतं श्रुत्वा राघवेण महाबलम् । अतिकायं च दुर्मर्षं लक्ष्मणेन हतं तदा २१ प्रियं चेन्द्रजितं पुत्रं रावणो नावबुध्यते २२ मम पुत्रो मम भ्राता मम भर्ता रणे हतः । इत्येष श्रूयते शब्दो राक्षसीनां कुले कुले २३ रथाश्वनागाश्च हतास्तत्र तत्र सहस्रशः । रणे रामेण शूरेण हताश्चापि पदातयः २४ रुद्रो वा यदि वा विष्णुर्महेन्द्रो वा शतक्रतुः । हन्ति नो रामरूपेण यदि वा स्वयमन्तकः २५ हतप्रवीरा रामेण निराशा जीविते वयम् । अपश्यन्तो भयस्यान्तमनाथा विलपामहे २६ रामहस्ताद्दशग्रीवः शूरो दत्तमहावरः । इदं भयं महाघोरं समुत्पन्नं न बुध्यते २७ तं न देवा

---

उदाहरण रावणाला पुरें होतें १६. इंद्रपुत्र मेघतुल्य बलाढ्य वालीचा रामानें वध केला हेंही उदाहरण पुरें झालें असतें १७. मनोरथाचा भंग झाल्यामुळें दीन होऊन ऋष्यमूकपर्वतावर वास्तव्य करीत असलेल्या सुग्रीवाला त्यानें राज्यावर बसविलें हें उदाहरण पुरें होतें १८. धर्म व अर्थ ह्यांनीं युक्त असून सर्व राक्षसांना हितावह असें योग्य भाषण बिभीषणानें केलें असतांनाही मोहामुळें तें त्याला रुचलें नाहीं १९. कुबेराचा कनिष्ठ भ्राता जो रावण त्यानें जर बिभीषणाचें ह्मणणें ऐकिलें असतें तर ही लंका श्मशानरूप व दुःखाकुल झाली नसती २०. रामानें महाबलाढ्य कुंभकर्णाचा आणि लक्ष्मणानें क्रोधी अतिकायाचा व प्रियपुत्र इंद्रजिताचा वध केल्याचें ऐकूनही रावण शुद्धीवर येत नाहीं २१,२२. " अहो, माझा पुत्र रणामध्यें वध पावला; अहो, माझ्या भ्रात्याचा समरांगणांत नाश झाला; अहो, माझा भर्ता संग्रामामध्यें वध पावला " इत्यादि प्रकारचा राक्षसींचा आक्रोश घरोघर ऐकूं येऊं लागला २३. हजारों रथ, अश्व व गज आणि पदाति ह्यांचा शूर रामानें ठिकठिकाणीं रणामध्यें वध केला आहे २४. अरे, रामरूपानें रुद्र, विष्णु, शतक्रतु महेंद्र अथवा स्वतः मृत्यूच आमचा वध करीत आहे २५. रामानें आमच्यांतील वीरांचा वध केल्यामुळें आह्मांला आतां जीवाची आशा उरली नाहीं व हें भय संपण्याचा संभव दिसत नसल्यामुळें आह्मां अनाथांचा विलाप चालला आहे २६. ब्रह्मदेवानें मोठा वर दिला असल्यामुळें ह्या शूर रावणाला रामाच्या हातून उत्पन्न झालेलें हें महाघोर भय समजत

न गन्धर्वा न पिशाचा न राक्षसाः । उपसृष्टं परित्रातुं शक्ता रामेण संयुगे २८ उत्पाताश्चापि दृश्यन्ते रावणस्य रणे रणे । कथयन्ति हि रामेण रावणस्य निबर्हणम् २९ पितामहेन प्रीतेन देवदानवराक्षसैः । रावणस्याभयं दत्तं मनुष्येभ्यो न याचितम् ३० तदिदं मानुषं मन्ये प्राप्तं निःसंशयं भयम् । जीवितान्तकरं घोरं रक्षसां रावणस्य च ३१ पीड्यमानास्तु बलिना वरदानेन रक्षसा । दीप्तैस्तपोभिर्विबुधाः पितामहमपूजयन् ३२ देवतानां हितार्थाय महात्मा वै पितामह । उवाच देवतास्तुष्ट इदं सर्वा महद्वचः ३३ अद्यप्रभृति लोकांस्त्रीन्सर्वे दानवराक्षसाः । भयेन प्रावृता नित्यं विचरिष्यन्ति शाश्वतम् ३४ दैवतैस्तु समागम्य सर्वैश्चेन्द्रपुरोगमैः। वृषध्वजस्त्रिपुरहा महादेवः प्रतोषितः ३५ प्रसन्नस्तु महादेवो देवानेतद्वचोऽब्रवीत् । उत्पत्स्यति हितार्थं वो नारी रक्षःक्षयावहा ३६ एषा देवैः प्रयुक्ता तु क्षुद्यथा दानवान्पुरा । भक्षयिष्यति नः सर्वान्राक्षसघ्नी सरावणान् ३७ रावणस्यापनीतेन दुर्विनीतस्य दुर्मतेः । अयं निष्टानको घोरः शोकेन समभिप्लुतः ३८ तं न पश्यामहे लोके यो नः शरणदो भवेत् ।

---

नाहीं २७. संग्रामामध्यें रामानें ज्याचा वध करण्याचें मनामध्यें आणिलें आहे त्या रावणाचें देव, गंधर्व, पिशाच आणि राक्षस हे सर्व मिळूनही रक्षण करण्यास समर्थ नाहींत २८. रावणाच्या प्रत्येक रणामध्यें उत्पात दृष्टीं पडत आहेत व रामाच्या हातून रावणाचा नाश ते उत्पात सुचवीत आहेत २९. ब्रह्मदेवानें प्रसन्न होऊन रावणाला देव, दानव आणि राक्षस ह्यांपासून अभय दिलें आहे; परंतु, मनुष्यापासून अभय असावें असा वर रावणानें मागितला नाहीं (व ब्रह्मदेवानें दिला नाहीं) ३०. ह्यास्तव, राक्षस व रावण ह्यांच्या जीविताचा अंत करणारें हें घोर मानुष भयच निःसंशय प्राप्त झालें आहे असें मला वाटतें ३१. वरप्रदानामुळें बलाढ्य झालेला रावणराक्षस देवांना पीडा देऊं लागला असतां उज्ज्वल तपश्चर्या करून त्यांनीं ब्रह्मदेवाला संतुष्ट केलें ३२. तेव्हां महात्मा पितामह संतुष्ट झाला आणि देवतांच्या हिताकरितां सर्व देवतांना उद्देशून त्यानें असें महत्त्वाचें भाषण केलें ३३. " आजपासून सर्व दानव आणि राक्षस नेहमीं भययुक्त होऊनच त्रैलोक्यामध्यें संचार करितील " ३४. सर्व इंद्रप्रभृति देवांनीं एकत्र जुळून वृषध्वज त्रिपुरनाशक महादेवाला संतुष्ट केलें असतां ३५ तो महादेव प्रसन्न होऊन देवांना असें ह्मणाला " तुमच्या हिताकरितां राक्षसांचा नाश करणारी एक स्त्री उत्पन्न होईल ३६. तस्मात्, देवांनीं सोडिलेल्या क्षुधेनें ज्याप्रमाणें पूर्वी दानव भक्षण करून टाकिले त्याप्रमाणें रावणासहवर्तमान आह्मां सर्वांनाही राक्षसघातकी सीता भक्षण करणार आहे ३७. दुष्ट व दुर्बुद्धि

राघवेणोपसृष्टानां कालेनेव युगक्षये ३९ नास्ति नः शरणं किंचिद्भये महति तिष्ठताम् । दावाग्निवेष्टितानां हि करेणूनां यथा वने ४० प्राप्तकालं कृतं तेन पौलस्त्येन महात्मना । यत एव भयं दृष्टं तमेव शरणं गतः ४१ इतीव सर्वा रजनीचरस्त्रियः परस्परं संपरिरभ्य बाहुभिः । विषेदुरार्तातिभयाभिपीडिता विनेदुरुच्चैश्च तदा सुदारुणम् ४२ [ ४२८८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुर्नवतितमः सर्गः ॥ ९४ ॥

आर्तानां राक्षसीनां तु लङ्कायां वै कुले कुले । रावणः करुणं शब्दं शुश्राव परिदेवितम् १ स तु दीर्घं विनिःश्वस्य मुहूर्तं ध्यानमास्थितः । बभूव परमक्रुद्धो रावणो भीमदर्शनः २ संदश्य दशनैरोष्ठं क्रोधसंरक्तलोचनः । राक्षसैरपि दुर्दर्शः कालाग्निरिव मूर्तिमान् ३ उवाच च समीपस्थान्राक्षसान्राक्षसेश्वरः । क्रोधाव्यक्तकथस्तत्र निर्दहन्निव चक्षुषा ४ महोदरं महापार्श्वं विरूपाक्षं च राक्षसम् । शीघ्रं वदत सैन्यानि निर्या-

---

रावणाच्या अपराधामुळें शोकासहवर्तमान ही घोर हानि प्राप्त झाली आहे ३८. युगांतसमयीं कालाच्या तावडींत सांपडणाऱ्या प्रजांप्रमाणें रामाच्या तावडींत सांपडलेल्या आमचें रक्षण करणारा जगतामध्यें आह्मांला कोणी दिसत नाहीं ३९. वनांतील वणव्यामध्यें सांपडलेल्या हत्तिणींना ज्याप्रमाणें कोणाचाही आश्रय नसतो त्याप्रमाणें मोठ्या भयामध्यें सांपडलेल्या आह्मांला कसलाही आश्रय नाहीं ४०. खरोखर महात्म्या पुलस्त्यपुत्र बिभीषणानें ह्या वेळीं समयाला योग्य असेंच वर्तन केलें आहे. कारण, ज्याच्यापासून भय त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें त्यालाच तो शरण गेला आहे" ४१ ह्याप्रमाणें सर्वही राक्षसस्त्रिया आर्त व अतिशय भयानें व्याकुल झाल्यामुळें हातांनीं एकमेकींला कवटाळून धरून खेद करूं लागल्या आणि मोठ्या मोठ्यानें अतिभयंकर आक्रोश करूं लागल्या ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडांपैकीं चौऱ्याणवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९४ ॥

लंकेमध्यें घरोघर दुःखाकुल राक्षसस्त्रियांचा विलापयुक्त करुणस्वर रावणाच्या कानीं पडला असतां १ दिसण्यांतही भयंकर असलेला तो रावण अतिशय क्रुद्ध झाला आणि दीर्घ सुस्कारा टाकून मुहूर्तपर्यंत विचार करीत बसला २. नंतर आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त असलेला तो रावण दांतओंठ खाऊं लागला असतां मूर्तिमान् प्रलयाग्निच कीं काय असा दिसूं लागल्यामुळें त्याच्याकडे नुसतें अवलोकन करणें राक्षसांनाही दुर्घट झालें ३. तदनंतर क्रोधामुळें ज्याचा शब्द स्पष्ट उमटेनासा झाला आहे व दृष्टीच्या योगानें लोकांना वध करण्यासच उद्युक्त झाल्यासारिखा जो दिसत आहे असा तो राक्षसाधिपति रावण

तेति ममाज्ञया ५ तस्य तद्वचनं श्रुत्वा राक्षसास्ते भयार्दिताः । चोदया-
मासुरव्यग्रान्राक्षसांस्तान्नृपाज्ञया ६ ते तु सर्वे तथेत्युक्त्वा राक्षसा भीम-
दर्शनाः । कृतस्वस्त्ययनाः सर्वे ते रणाभिमुखा ययुः ७ प्रतिपूज्य यथा-
न्यायं रावणं ते महारथाः । तस्थुः प्राञ्जलयः सर्वे भर्तुर्विजयकाङ्क्षिणः ८
ततोवाच प्रहस्यैतान्रावणः क्रोधमूर्च्छितः । महोदरमहापार्श्वौ विरूपाक्षं
च राक्षसम् ९ अद्य बाणैर्धनुर्मुक्तैर्युगान्तादित्यसंनिभैः । राघवं लक्ष्मणं
चैव नेष्यामि यमसादनम् १० खरस्य कुम्भकर्णस्य प्रहस्तेन्द्रजितोस्तथा।
करिष्यामि प्रतीकारमद्य शत्रुवधादहम् ११ नैवान्तरिक्षं न दिशो न च द्यौर्नापि
सागराः । प्रकाशत्वं गमिष्यन्ति मद्बाणजलदावृताः १२ अद्य वानरमुख्यानां
तानि यूथानि भागशः । धनुषा शरजालेन वधिष्यामि पतत्रिणा १३ अद्य
वानरसैन्यानि रथेन पवनौजसा। धनुःसमुद्रादुद्भूतैर्मथिष्यामि शरोर्मिभिः १४
व्याकोशपद्मवक्त्राणि पद्मकेसरवर्चसाम् । अद्य यूथतटाकानि गजवत्प्रम-
थाम्यहम् १५ सशरैरद्य वदनैः सङ्ख्ये वानरयूथपाः । मण्डयिष्यन्ति वसुधां

---

समीप असलेल्या महोदर, महापार्श्व आणि विरूपाक्ष राक्षस ह्यांना ह्मणाला " — बाहेर निघा —असें माझ्या आज्ञेनें तुह्मी सैन्यांना सत्वर सांगा " ४,५ ही त्याची आज्ञा श्रवण करितांक्षणीं भयव्याकुल झालेल्या त्या राक्षसांनीं तत्पर असलेल्या त्या इतर राक्षसांना राजाच्या आज्ञेनें बाहेर पडण्यास सांगितलें ६. तेव्हां भयंकर मुद्रेनें युक्त असलेले ते सर्वही राक्षस " ठीक आहे " असें ह्मणाले आणि ते सर्वही पुण्याहवाचन करून व रणाकडे तोंड करून निघाले ७. तदनंतर भर्त्याच्या विजयाची इच्छा करणारे ते सर्वही महारथी राक्षस रीतीप्रमाणें रावणाला वंदन करून व हात जोडून उभे राहिले असतां ८ क्रोधानें व्याप्त झालेला रावण महोदर, महापार्श्व आणि विरूपाक्ष राक्षस ह्यांना हास्यपूर्वक ह्मणाला ९ " प्रलयकालच्या सूर्याप्रमाणें असलेले जे धनुष्यापासून सुटलेले बाण त्यांच्या योगानें रामाला व लक्ष्मणाला मी आज यमलोकीं पोंचवीन १०. आज शत्रूना वध करून खर, कुंभकर्ण, प्रहस्त व इंद्रजित् ह्यांच्या ऋणांतून मी मुक्त होईन ११. माझ्या बाणसमुदायरूप मेघांनीं व्याप्त झालेल्या दिशा, सागर, अंतरिक्ष व स्वर्ग ह्यांपैकीं कांहींएक दृश्य रहाणार नाहीं १२. वानरश्रेष्ठांचीं तीं सैन्यें धनुष्याच्या योगानें सोडिलेल्या व उत्कृष्ट पिच्छांनीं युक्त असलेल्या बाणसमुदायाच्या योगानें मी वेगळीं वेगळीं मारून टाकीन १३. वायूप्रमाणें वेगवान् रथावर आरूढ होऊन मी आज चापरूप समुद्रापासून उत्पन्न झालेल्या बाणरूप लाटांनीं वानरसैन्यांचा नाश करीन १४. कमलकेसराप्रमाणें ज्यांची कांति आहे अशा वानरांचीं मुखरूप विकसित

सनालैरिव पङ्कजैः १६ अद्य यूथप्रचण्डानां हरीणां द्रुमयोधिनाम् । मुक्तेनैकेषुणा युद्धे भेत्स्यामि च शतं शतम् १७ हतो भ्राता च येषां वै येषां च तनयो हतः । वधेनाद्य रिपोस्तेषां करोम्यश्रुप्रमार्जनम् १८ अद्य मद्बाणनिर्भिन्नैः प्रस्तीर्णैर्गतचेतनैः । करोमि वानरैर्युद्धे यत्नावेक्ष्य तलां महीम् १९ अद्य काकाश्च गृध्राश्च ये च मांसाशिनोपरे । सर्वांस्तांस्तर्पयिष्यामि शत्रुमांसैः शराहतैः २० कल्प्यतां मे रथः शीघ्रं क्षिप्रमानीयतां धनुः । अनुप्रयान्तु मां युद्धे येत्र शिष्टा निशाचराः २१ तस्य तद्वचनं श्रुत्वा महापार्श्वोब्रवीद्वचः । बलाध्यक्षान्स्थितांस्तत्र बलं संत्वर्यतामिति २२ बलाध्यक्षास्तु संयुक्ता राक्षसांस्तान्गृहे गृहे । चोदयन्तः परिययुर्लङ्कां लघुपराक्रमाः २३ ततो मुहूर्तान्निष्पेतू राक्षसा भीमदर्शनाः । नदन्तो भीमवदना नानाप्रहरणैर्भुजैः २४ असिभिः पट्टिशैः शूलैर्गदाभिर्मुसलैर्हलैः । शक्तिभिस्तीक्ष्णधाराभिर्महद्भिः कूटमुद्गरैः २५ यष्टिभिर्विविधैश्चक्रैर्निशितैश्च

---

कमलें आणि सैन्यरूप तटाक ह्यांचा मी आज गजाप्रमाणें नाश करीन १५. नालयुक्त कमलाप्रमाणें झालेल्या आपल्या बाणयुक्त मुखांनीं वानरसैन्याधिपति संग्रामामध्यें आज पृथ्वी भूषित करितील १६. सैन्यामध्यें प्रचंड असलेले व वृक्षांच्या योगानें युद्ध करणारे शंभर शंभर वानर धनुष्यापासून सोडिलेल्या एकेकाच बाणानें मी आज युद्धामध्यें मारून टाकीन १७. ज्यांच्या भ्रात्याचा व ज्यांच्या पुत्राचा वध झाला आहे त्यांचे अश्रु शत्रूच्या वधानें मी आज पुसून टाकीन १८. माझ्या बाणानें विदीर्ण व गतप्राण होऊन पसरलेल्या वानरांच्या योगानें रणांतील भूमि मोठ्या यत्नानेंच तळ अवलोकन करावा लागेल अशी मी आज करून टाकीन १९. काक, गृध्र व इतरही जे कांहीं मांसभक्षक प्राणी असतील त्या सर्वांना बाणानें काढिलेल्या शत्रुमांसांनीं मी आज तृप्त करून टाकीन २०. माझा रथ सत्वर तयार करा, धनुष्य लवकर घेऊन या आणि ह्या ठिकाणीं जे निशाचर अवशिष्ट राहिले असतील ते सर्व संग्रामामध्यें माझ्याबरोबर येऊं द्या " २१. हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर महापार्श्व तेथें असलेल्या सर्व सेनाधिपतींना उद्देशून "सैन्याला त्वरा करा" असें ह्मणाला २२. नंतर सेनाधिपति एकत्र जुळून लवकर चालूं लागले आणि घरोघर त्या राक्षसांना तसें सांगत सांगत सर्व लंकेमध्यें फिरले २३. तेव्हां एका मुहूर्तामध्येंच भयंकर मुद्रा व भयंकर मुख ह्यांनीं युक्त असलेले राक्षस नानाप्रकारचीं आयुधें हातांमध्यें घेऊन गर्जना करीत करीत बाहेर पडले २४. खड्ग, पट्ट, शूल, गदा, मुसळें, नांगर, तीक्ष्ण धारांनीं युक्त असलेल्या शक्ति, मायेनें बनविलेले मोठे मोठे मुद्गर २५. सोटे, नानाप्रकारचीं चक्रें, तीक्ष्ण परशु,

परश्वधैः। भिन्दिपालैः शतघ्नीभिरन्यैश्चापि वरायुधैः२६अथाबलाध्यक्षाश्चत्वारो रावणाज्ञया । रथानां नियुतं साग्रं नागानां नियुतत्रयम् २७ अश्वानां षष्टिकोट्यस्तु खरोष्ट्राणां तथैव च । पदातयस्त्वसंख्याता जग्मुस्ते राजशासनात् २८ बलाध्यक्षाश्च संस्थाप्य राज्ञः सेनां पुरःस्थिताम् । एतस्मिन्नन्तरे सूतः स्थापयामास तं रथम् २९ दिव्यास्त्रवरसंपन्नं नानालंकारभूषितम् । नानायुधसमाकीर्णं किङ्किणीजालसंयुतम् ३० नानारत्नपरिक्षिप्तं रत्नस्तम्भैर्विराजितम् । जाम्बूनदमयैश्चैव सहस्रकलशैर्वृतम् ३१ तं दृष्ट्वा राक्षसाः सर्वे विस्मयं परमं गताः । तं दृष्ट्वा सहसोत्थाय रावणो राक्षसेश्वरः ३२ कोटिसूर्यप्रतीकाशं ज्वलन्तमिव पावकम् । द्रुतं सूतसमायुक्तं युक्ताष्टतुरगं रथम् । आरुरोह तदा भीमं दीप्यमानं स्वतेजसा ३३ ततः प्रयातः सहसा राक्षसैर्बहुभिर्वृतः । रावणः सत्त्वगाम्भीर्याद्दारयन्निव मेदिनीम् ३४ ततश्चासीन्महानादस्तूर्याणां च ततस्ततः । मृदङ्गैः पटहैः शङ्खैः कलहैः सह रक्षसाम् ३५ आगतो रक्षसां राजा छत्रचामरसंयुतः।

---

भिंदिपाल, तोफा आणि इतरही श्रेष्ठ आयुधें बरोबर घेऊन ते राक्षस बाहेर निघाले २६. तदनंतर रावणाच्या आज्ञेनें चार सेनाधिपतींनीं एक लक्ष रथ आणि तीन लक्ष गज आणिले २७ आणि साठ कोटी अश्व, त्याचप्रमाणें साठ साठ कोटी गर्दभ व उष्ट्र आणि असंख्य पदाति राजाज्ञेनें बाहेर पडले २८. सेनाधिपति राजाच्या पुढें ती सेना उभी करून राहिले; व इतक्यामध्यें सारथ्यानेंही तो रथ तेथें उभा केला २९. श्रेष्ठ श्रेष्ठ दिव्यास्त्रांनीं तो रथ संपन्न होता; नानाप्रकारच्या अलंकारांनीं तो भूषित केलेला होता; नानाप्रकारच्या आयुधांनीं तो व्याप्त झालेला होता; लहान लहान घंटांच्या समुदायांनीं तो संयुक्त होता ३०; त्याच्या सभोंवतीं नानाप्रकारचीं रत्नें जडलेलीं होतीं; रत्नस्तंभांनीं तो झळकत होता आणि सुवर्णमय हजारों कलशांनीं तो वेढून गेलेला होता ३१. तो रथ अवलोकन करितांक्षणीं सर्वही राक्षसांना अतिशय विस्मय झाला व त्याला अवलोकन करितांक्षणीं राक्षसाधिपति रावण लगबगीनें उठला ३२ व कोटि सूर्याप्रमाणें देदीप्यमान, अग्नीप्रमाणें उज्ज्वल, शीघ्रगामी, सारथ्यानें युक्त, आठ अश्व जोडिलेला, उग्र आणि स्वतःच्याचें तेजानें झळकत असलेल्या त्या रथावर तो आरूढ झाला ३३. असंख्य राक्षसांनीं परिवेष्टित असलेला तो रावण अतिशय बलाढ्य असल्यामुळें पृथ्वी विदारण करीतच कीं काय एकदम चालता झाला. ३४. तेव्हां राक्षसांच्या कलहांसहवर्तमान मृदंग, शंख, पटह आणि तूर्यवाद्यें ह्यांचा मोठा ध्वनि सुरू झाला ३५. छत्रचामरांनीं युक्त, दुर्वृत्त, ब्रह्मघातकी, देवांचा कंटक, सीतेचा अपहार करणारा आणि

सीतापहारी दुर्वृत्तो भ्रमन्नो देवकण्टकः ३६ योद्धुं रघुवरेणेति शुश्रुवे
कलहध्वनिः ३७ तेन नादेन महता पृथिवी समकम्पत । तं शब्दं सहसा
श्रुत्वा वानरा दुद्रुवुर्भयात् ३८ रावणस्तु महाबाहुः सचिवैः परिवारितः।
आजगाम महातेजा जयाय विजयं प्रति ३९ रावणेनाभ्यनुज्ञातौ महापा-
र्श्वमहोदरौ । विरूपाक्षश्च दुर्धर्षो रथानारुरुहुस्तदा ४० ते तु हृष्टाभिनर्दन्तो
भिन्दन्त इव मेदिनीम् । नादं घोरं विमुञ्चन्तो निर्ययुर्जयकाङ्क्षिणः ४१ ततो
युद्धाय तेजस्वी रक्षोगणबलैर्वृतः।निर्ययावुद्यतधनुः कालान्तकयमोपमः४२
ततः प्रजविताश्वेन रथेन स महारथः । द्वारेण निर्ययौ तेन यत्र तौ राम-
लक्ष्मणौ ४३ ततो नष्टप्रभः सूर्यो दिशश्च तिमिरावृताः । द्विजाश्च नेदु-
र्घोराश्च संचचाल च मेदिनी ४४ ववर्ष रुधिरं देवश्चस्खलुश्च तुरङ्गमाः।
ध्वजाग्रे न्यपतद्गृध्रो विनेदुश्चाशिवाः शिवाः४५ नयनं चास्फुरद्वामं वामो
बाहुरकम्पत । विवर्णवदनश्चासीत्किंचिदभ्रश्यत स्वनः४६ ततो निष्पततो
युद्धं दशग्रीवस्य रक्षसः । रणे निधनशंसीनि रूपाण्येतानि जज्ञिरे ४७

---

राक्षसांचा राजा असा जो रावण तो रघुवंशजश्रेष्ठ रामाशीं युद्ध करण्याकरितां आला असा कलहयुक्त ध्वनि ऐकूं येऊ लागला ३६, ३७. त्या प्रचंड नादानें भूकंप होऊं लागला व तो ध्वनि एकाएकीं कानावर येतांक्षणीं वानरही भीतीनें पळूं लागले ३८. तों इतक्यांत सचिवांनीं परिवेष्टित असलेला महापराक्रमी व महातेजस्वी रावण जयप्राप्ती-करितां विजयशील रामासमीप आला ३९. नंतर रावणाची आज्ञा झाल्यामुळें महा-पार्श्व, महोदर आणि अजिंक्य विरूपाक्ष हे रथारूढ झाले ४०; आणि आनंदानें गर्जना करीत करीत व घोर नादानें दिशा भरून टाकीत टाकीत आणि पृथ्वी कंपित करीत करीत जयाच्या इच्छेनें ते बाहेर पडले ४१. तदनंतर राक्षससमूहांच्या सैन्यांनीं परिवेष्टित असलेला आणि काल, अंतक व यम ह्यांच्याच उपमेस पात्र असलेला तो तेजस्वी रावण धनुष्य उगारून युद्धाकरितां निघाला ४२ आणि वेगवान् अश्व जोडिलेल्या रथाच्या योगानें तो महारथी रावण जिकडे ते रामलक्ष्मण उभे होते त्या द्वारानें बाहेर पडला ४३. तदनंतर सूर्याची प्रभा नष्ट झाली; दिशा अंधकारानें व्याप्त झाल्या; घोर पक्ष्यांचा शब्द सुरू झाला; पृथ्वी हलूं लागली ४४; रक्ताचा पर्जन्य पडूं लागला; घोडे ठेचाळूं लागले; ध्वजाचे अग्रभागीं गृध्रपक्षी येऊन बसूं लागले; अमंगल भालु शब्द करूं लागल्या ४५; रावणाचा डावा डोळाही लवूं लागला; डाव्या हातालाही कापरें भरलें; मुख निस्तेज झालें आणि त्याचा आवाजही कांहींसा कमी झाला ४६. इतकेंच नव्हे परंतु, तो राव-णराक्षस युद्ध करण्याकरितां निघाला असतां रणभूमीमध्येंही मृत्युसूचक चिन्हें झालीं ४७

अन्तरिक्षात्पपातोल्का निर्घातसमनिःस्वना । विनेदुरशिवा गृध्रा वायसैरभिमिश्रिताः ४८ एतानचिन्तयन्घोरानुत्पातान्समवस्थितान् । निर्ययौ रावणो मोहाद्वधार्थं कालचोदितः ४९ तेषां तु रथघोषेण राक्षसानां महात्मनाम् । वानराणामपि चमूर्युद्धायैवाभ्यवर्तत ॥ अन्योन्यमाह्वयानानां क्रुद्धानां जयमिच्छताम् ५० ततः क्रुद्धो दशग्रीवः शरैः काञ्चनभूषणैः। वानराणामनीकेषु चकार कदनं महत् ५१ निकृत्तशिरसः केचिद्रावणेन वलीमुखाः । केचिद्विच्छिन्नहृदयाः केचिच्छ्रोत्रविवर्जिताः ५२ निरुच्छ्वासा हताः केचित्केचित्पार्श्वेषु दारिताः। केचिद्विभिन्नशिरसः केचिच्चक्षुर्विनाकृताः ५३ दशाननः क्रोधविवृत्तनेत्रो यतो यतोऽभ्येति रथेन सङ्ख्ये। ततस्ततस्तस्य शरप्रवेगं सोढुं न शेकुर्हरियूथपास्ते ५४ [४३४०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चनवतितमः सर्गः॥९५॥

तथा तैः कृत्तगात्रैस्तु दशग्रीवेण मार्गणैः । बभूव वसुधा तत्र प्रकीर्णा हरिभिस्तदा १ रावणस्याप्रसह्यं तं शरसंपातमेकतः । न शेकुः सहितुं दीप्तं

---

निर्घाताप्रमाणें जिचा ध्वनि आहे अशी उल्का अंतरिक्षांतून पडली आणि अमंगलसूचक गृध्रपक्षी काकपक्ष्यांसहवर्तमान शब्द करूं लागले ४८. तथापि, कालाची प्रेरणा झालेला तो रावण उत्पन्न झालेल्या ह्या घोर उत्पातांची पर्वा न करितां स्वतःच्या वधाकरितां मोहामुळें बाहेर पडला ४९. तेव्हां त्या महात्म्या राक्षसांच्या रथांचा घोष कानीं पडतांक्षणीं वानरांचीही सेना युद्धाकरितांच रणभूमीकडे परत फिरली व त्या सेनेंतील ते जयाभिलाषी क्रुद्ध वानर रणभूमीकडे एकमेकांना हाका मारूं लागले ५०. तदनंतर क्रुद्ध झालेल्या रावणानें सुवर्णभूषित बाणांनीं वानरांच्याही सैन्यांमध्यें मोठीच कत्तल उडवून दिली ५१. रावणानें कांहीं वानरांचीं मस्तकें तोडून टाकिलीं; कांहींचीं हृदयें विदीर्ण केलीं; कांहींचे कान नाहींसे केले ५२; कांहींना गुदमरून मारिलें; कांहींच्या बरगड्या फाडून टाकिल्या; कांहींचीं मस्तकें फोडून टाकिलीं व कांहींना नेत्रहीन करून टाकिलें ५३. असो. क्रोधामुळें ज्याचे आंख चढून गेले आहेत असा तो रावण संग्रामामध्यें रथाच्या योगानें जिकडे जिकडे जाऊं लागला तिकडे तिकडे त्याच्या बाणांचा वेग सहन करण्यास ते वानराधिपति समर्थ झाले नाहींत ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं पंचाणवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९५ ॥

ह्याप्रमाणें रावणानें बाणांच्या योगानें ज्यांचीं गात्रें छिन्नभिन्न करून टाकिलीं आहेत अशा त्या वानरांनीं त्या रणांतील पृथ्वी व्याप्त होऊन गेली १. आणि प्रदीप्त

---

१ वायुना निहतो वायुर्गगनाच्च पतत्यधः । प्रचण्डघोरनिर्घोषो निर्घात इति कथ्यते ॥

पतङ्गा ज्वलनं यथा २ तेर्दिता निशितैर्बाणैः क्रोशन्तो विप्रदुद्रुवुः । पाव-
कार्चिःसमाविष्टा दह्यमाना यथा गजाः ३ प्लवङ्गानामनीकानि महाभ्रा-
णीव मारुतः । संययौ समरे तस्मिन्विधमन्रावणः शरैः ४ कदनं तरसा
कृत्वा राक्षसेन्द्रो वनौकसाम् । आससाद ततो युद्धे त्वरितं राघवं रणे ५
सुग्रीवस्तान्कपीन्दृष्ट्वा भग्नान्विद्रावितान्रणे । गुल्मे सुषेणं निक्षिप्य चक्रे
युद्धे द्रुतं मनः ६ आत्मनः सदृशं वीरं स तं निक्षिप्य वानरम् । सुग्रीवो-
भिमुखं शत्रुं प्रतस्थे पादपायुधः ७ पार्श्वतः पृष्ठतश्चास्य सर्वे वानरयू-
थपाः । अनुजग्मुर्महाशैलान्विविधांश्च वनस्पतीन् ८ ननर्द युधि सुग्रीवः
स्वरेण महता महान् । पोथयन्विविधांश्चान्यान्ममन्थोत्तमराक्षसान् ९ ममर्द
च महाकायो राक्षसान्वानरेश्वरः । युगान्तसमये वायुः प्रवृद्धानगमा-
निव १० राक्षसानामनीकेषु शैलवर्षं ववर्ष ह । अश्मवर्षं यथा मेघः पक्षि-
सङ्घेषु कानने ११ कपिराजविमुक्तैस्तैः शैलवर्षैस्तु राक्षसाः । विकीर्ण-

---

अग्नि ज्याप्रमाणें पतंगांना सहन होत नाहीं त्याप्रमाणें रावणाच्या बाणांचा तो अत्यंत असह्य भडिमार त्या वानरांना सहन झाला नाहीं २. तेव्हां अग्नीच्या ज्वालांनीं व्याप्त होऊन दग्ध होऊं लागलेले गज ज्याप्रमाणें आक्रोश करीत करीत पळत सुटतात त्याप्रमाणें रावणाच्या तीक्ष्ण बाणांनीं पीडित झालेले ते वानर आक्रोश करीत करीत पळत सुटले ३. वायु ज्याप्रमाणें मोठीं मोठीं अभ्रें उडवीत जातो त्याप्रमाणें त्या संग्रामामध्यें बाणांच्या योगानें वानरांचीं सैन्यें उडवीत उडवीत तो रावण चालता झाला ४. ह्याप्रमाणें संग्रामामध्यें वानरांचा वेगानें वध करून तो राक्षसाधिपति रावण रणभूमीमध्यें सत्वरच रामापाशीं येऊन ठेपला ५. नंतर संग्रामामध्यें पराजय करून पळवून लाविलेले ते वानर अवलोकन करितांक्षणीं सैन्याच्या तळावर सुषेणाला नेमून सुग्रीवानें युद्ध करण्याचें सत्वर मनामध्यें आणिलें ६. सारांश, आपल्या सारिख्या त्या वीर वानरांची सैन्याच्या तळाकडे योजना करून वृक्षरूप आयुधानें युक्त असलेला तो सुग्रीव शत्रूचे संमुख चालला ७. तेव्हां त्याच्या बाजूंना व मागून सर्वही वानरसेनाधिपति मोठे मोठे पर्वत व नानाप्रकारचे वृक्ष बरोबर घेऊन निघाले ८. तो प्रचंड सुग्रीव संग्रामामध्यें उच्च स्वरानें गर्जना करूं लागला आणि श्रेष्ठ श्रेष्ठ राक्षसांचा वध करून इतरही अनेक प्रकारचे राक्षस हपटून टाकूं लागला ९. इतकेंच नव्हे परंतु, युगांतसमयीं ज्याप्रमाणें वायु मोठमोठे वृक्ष उलथून पाडितो त्याप्रमाणें तो धिप्पाड वानराधिपति सुग्रीव राक्षसांचें मर्दन करूं लागला १० आणि अरण्यामध्यें पक्षिसमुदायावर पाषाणवृष्टि करणारा पर्जन्यच कीं काय अशा रीतीनें राक्षसांच्या सैन्यावर तो पर्वतांची वृष्टि करूं लागला ११. तेव्हां वानरराज सुग्री-

शिरसः पेतुर्विकीर्णा इव पर्वताः १२ अथ संक्षीयमाणेषु राक्षसेषु समन्ततः । सुग्रीवेण प्रभग्नेषु नदत्सु च पतत्सु च १३ विरूपाक्षः स्वकं नाम धन्वी विश्राव्य राक्षसः । रथादाप्लुत्य दुर्धर्षो गजस्कन्धमुपारुहत् १४ स तं द्विपमथारुह्य विरूपाक्षो महाबलः । ननर्द भीमनिर्ह्रादं वानरानभ्यधावत १५ सुग्रीवे स शरान्घोरान्विससर्ज चमूमुखे । स्थापयामास चोद्विग्नान्राक्षसान्संप्रहर्षयन् १६ सोऽतिविद्धः शितैर्बाणैः कपीन्द्रस्तेन रक्षसा । चुक्रोश च महाक्रोधो वधं चास्य मनो दधे १७ ततः पादपमुद्धृत्य शूरः संप्रधनो हरिः । अभिपत्य जघानास्य प्रमुखे तं महागजम् १८ स तु प्रहाराभिहतः सुग्रीवेण महागजः । अपासर्पद्धनुर्मात्रं निषसाद ननाद च १९ गजात्तु मथितात्तूर्णमपक्रम्य स वीर्यवान् । राक्षसोऽभिमुखः शत्रुं प्रत्युद्गम्य ततः कपिम् २० आर्षभं चर्म खड्गं च प्रगृह्य लघुविक्रमः । भर्त्सयन्निव सुग्रीवमाससाद व्यवस्थितम् २१ स हि तस्यापि संगृह्य प्रगृह्य विपुलां शिलाम् । विरूपाक्षस्य चिक्षेप सुग्रीवो जलदोपमाम् २२ स तां शिलामापतन्तीं

---

नानें केलेल्या पर्वतवृष्टीमुळें कान व मस्तकें तुटून गेलेले ते राक्षस पर्वतांप्रमाणें इकडे तिकडे उधळून पडले १२. ह्याप्रमाणें सुग्रीवामुळें पराजित झालेल्या राक्षसांचा चोहों बाजूंस क्षय होऊं लागला असतां आणि ते आक्रोश करीत करीत पतन पावूं लागले असतां १३ धनुर्धारी व अजिंक्य विरूपाक्ष राक्षस मी विरूपाक्ष आलों आहें असें सांगून व रथावरून उडी टाकून गजाच्या स्कंधावर आरूढ झाला १४ आणि ह्याप्रमाणें तो महाबलाढ्य विरूपाक्ष त्या गजावर आरूढ झाल्यानंतर भयंकर गर्जना करीत करीत वानरांवर धांवला १५. सेनेच्या अग्रभागीं सुग्रीवावर त्यानें घोर बाण सोडिले आणि भयभीत झालेल्या राक्षसांना हर्ष उत्पन्न करीत करीत त्यानें रणामध्यें उभे केलें १६. त्या राक्षसानें बाणांच्या योगानें त्या अतिक्रोधी वानरराज सुग्रीवाला अतिशय वेध केला असतां तो गर्जना करूं लागला व त्याचा वध करण्याचें त्यानें मनामध्यें आणिलें १७. तदनंतर तो युद्धनिपुण शूर वानर वृक्ष उपटून त्याच्या संमुख धांवून गेला आणि त्या महागजाला त्यानें ताडण केलें १८ तेव्हां सुग्रीवानें प्रहार केल्यामुळें तो महागज एक धनुष्यपर्यंत मागें सरला व खालीं बसून ओरडूं लागला १९. ह्याप्रमाणें गजाचा नाश झाल्यावर तो वीर्यवान् राक्षस त्याच्यावरून सत्वर खालीं उतरला आणि त्या वानररूप शत्रूचे संमुख होऊन पुढें चालला २०. बैलाच्या कातड्यानें मढविलेली ढाल व तरवार घेऊन तो शीघ्रगामी राक्षस रणामध्यें स्थिर असलेल्या सुग्रीवाची निर्भर्त्सना करीत करीत त्याच्या समीप आला असतां २१

दृष्ट्वा राक्षसपुङ्गवः। अथ कपिपतिं प्रवीरः सुविक्रान्तः खड्गेन प्राहरत्तदा २३ तेन खड्गप्रहारेण रक्षसा बलिना हतः। मुहूर्तमभवद्भूमौ विसंज्ञ इव वानरः २४ सहसा स तदोत्पत्य राक्षसस्य महाहवे। मुष्टिं संवर्त्य वेगेन पातयामास वक्षसि २५ मुष्टिप्रहाराभिहतो विरूपाक्षो निशाचरः। तेन खड्गेन संक्रुद्धः सुग्रीवस्य चमूमुखे २६ कवचं पातयामास पद्भ्यामभिहतोऽपतत्। स समुत्थाय पतितः कपिस्तस्य व्यसर्जयत् २७ तलप्रहारमशनेः समानं भीमनिःस्वनम्। तलप्रहारं तद्रक्षः सुग्रीवेण समुद्यतम् २८ नैपुण्यान्मोचयित्वैनं मुष्टिनोरसि ताडयत्। ततस्तु संक्रुद्धतरः सुग्रीवो वानरेश्वरः २९ मोक्षितं चात्मनो दृष्ट्वा प्रहारं तेन रक्षसा। स ददर्शान्तरं तस्य विरूपाक्षस्य वानरः ३० ततोऽन्यं पातयत्क्रोधाच्छङ्खदेशे महातलम्। महेन्द्राशनिकल्पेन तलेनाभिहतः क्षितौ ३१ पपात रुधिरक्लिन्नः शोणितं हि समुद्गिरन्। स्रोतोभ्यस्तु विरूपाक्षो जलं प्रस्रवणादिव ३२ विवृत्तनयनं क्रोधात्सफेनं रुधिराप्लुतम्। ददृशुस्ते विरू-

---

सुग्रीवानेंही मेघासारिखी एक प्रचंड शिला हातामध्यें घेऊन त्या विरूपाक्षाकडे फेंकिली २२; परंतु, येत असलेली शिला अवलोकन करितांक्षणीं तिच्या टप्प्यांतून दूर होऊन त्या महापराक्रमी राक्षसश्रेष्ठ विरूपाक्षानें सुग्रीवाला खड्गानें प्रहार केला २३. तेव्हां बलाढ्य राक्षसाच्या खड्गप्रहारानें ताडित झालेला तो वानर जवळ जवळ बेशुद्ध होऊन क्षणभर भूमीवर पडला २४; परंतु, लगेंच त्या महारणामध्यें एकाएकीं उठून व मूठ वळून राक्षसाच्या वक्षःस्थलावर त्यानें वेगानें मारिली २५. ह्याप्रमाणें तो विरूपाक्षराक्षस मुष्टिप्रहारानें ताडित झाला असतां क्रुद्ध झाला आणि वानरसेनेच्या अग्रभागीं असलेल्या सुग्रीवाचें कवच त्या खड्गानें पाडून त्यालाही पायांनीं प्रहार केला असतां तो खालीं पडला. परंतु, खालीं पडलेलाही तो वानर उठला आणि भयंकर स्वरानें युक्त व वज्रासारिखा तीक्ष्ण असा एक तलप्रहार करण्याचें त्या वानरानें मनामध्यें आणिलें; तथापि, सुग्रीवानें उगारिलेला तो तलप्रहार कुशलतेनें चुकवून त्या राक्षसानें सुग्रीवाच्या वक्षःस्थलावर मुष्टीनें ताडणही केलें. तदनंतर अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या वानराधिपति सुग्रीवानें २६, २७, २८, २९ आपला प्रहार त्या राक्षसानें चुकविला असें अवलोकन करून त्या विरूपाक्षाला प्रहार करण्याची संधि पाहिली ३०; आणि ललाटास्थिप्रदेशाचे ठिकाणीं दुसरी एक मोठी चपराक रागारागानें त्यानें त्या राक्षसाला मारिली असतां महेंद्राच्या अशनिसंज्ञक अस्त्राची प्रहारामध्यें बरोबरी करणाऱ्या त्या हस्ततलानें ताडित झालेला तो विरूपाक्ष रक्तानें भरून जाऊन भूमीवर पडला असतां झऱ्यांतून वहाणाऱ्या उदकाप्रमाणें त्याच्या शरीरांतील सर्व स्रोतसांपासून रक्ताचे प्रवाह सुरू झाले ३१, ३२. नंतर

पाक्षं विरूपाक्षतरं कृतम् ३३ स्फुरन्तं परिवर्तन्तं पार्श्वेन रुधिरोक्षितम्। करुणं च विनर्दन्तं ददृशुः कपयो रिपुम् ३४ तथा तु तौ संयति संप्रयुक्तौ तरस्विनौ वानरराक्षसानाम् । बलार्णवौ सस्वनतुश्च भीमौ महार्णवौ द्वाविव भिन्नसेतू ३५ विनाशिनं प्रेक्ष्य विरूपनेत्रं महाबलं तं हरिपार्थिवेन । बलं समेतं कपिराक्षसानामुद्वृत्तगङ्गाप्रतिमं बभूव ३६ [४१७८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षण्णवतितमः सर्गः ॥ ९६ ॥

हन्यमाने बले तूर्णमन्योन्यं ते महामृधे । सरसीव महाघर्मे सूपक्षीणे बभूवतुः १ स्वबलस्य तु घातेन विरूपाक्षवधेन च । बभूव द्विगुणं क्रुद्धो रावणो राक्षसाधिपः २ प्रक्षीणं स्वबलं दृष्ट्वा वध्यमानं वलीमुखैः । बभूवास्य व्यथा युद्धे दृष्ट्वा दैवविपर्ययम् ३ उवाच च समीपस्थं महोदरमनन्तरम् । अस्मिन्काले महाबाहो जयाशा त्वयि मे स्थिता ४

---

वानर त्या शत्रूकडे पाहूं लागले असतां त्याचे डोळे क्रोधानें फिरून गेलेले आहेत, फेनयुक्त रक्तानें तो भरून गेलेला आहे, नामानेंही विरूपाक्ष असून डोळे तर पूर्वीपेक्षांही अधिकच विरूप झालेले आहेत, जिकडे तिकडे शरीरावर रक्ताचा सडा होऊन तो कुशीवर लोळत आहे, तडफडत आहे आणि करुण स्वरानें आक्रोश करीत आहे असें त्यांच्या दृष्टीं पडलें ३३, ३४. असो. वानर व राक्षस ह्यांचे ते संग्रामामध्यें परस्परांशीं युद्ध करण्यास सज्ज झालेले भयंकर सेनासमुद्र मर्यादा उल्लंघन करून चाललेल्या महासागराप्रमाणें गर्जना करूं लागले ३५. आणि वानरराज सुग्रीवानें त्या महाबलाढ्य विरूपाक्षाचा वध केल्याचें अवलोकन करून वानरांचें व राक्षसांचें तें सैन्य अनुक्रमें आनंदानें व शोकानें अमर्याद वाढलेल्या गंगेप्रमाणें दिसूं लागलें ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं शहाण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९६ ॥

त्या संग्रामामध्यें एकमेकांकडून वध पावूं लागलेलीं तीं दोन्हीं सैन्यें मोठ्या उन्हाळ्यांत क्षीण होऊन जाणाऱ्या सरोवरांप्रमाणें अतिशय क्षीण झालीं १. स्वसैन्याचा व विरूपाक्षाचा वध झाल्यामुळें राक्षसाधिपति रावण दुप्पट क्रुद्ध झाला २; आणि वानर वध करूं लागल्यामुळें क्षय पावत चाललेलें आपलें सैन्य अवलोकन करून आणि अर्थातूच दैव प्रतिकूल झालेलें पाहून संग्रामामध्यें त्याच्या मनाला वाईट वाटलें ३ व अगदीं जवळच असलेल्या महोदराला तो म्हणाला "हे महापराक्रमी महोदरा, ह्या वेळीं माझी जयाविषयीं आशा कायती तुझ्यावर अवलंबून राहिलेली आहे ४.

जहि शत्रुचमूं वीर दर्शयाद्य पराक्रमम् । भर्तृपिण्डस्य कालोयं निर्वेष्टुं साधु युध्यताम् ५ एवमुक्तस्तथेत्युक्त्वा राक्षसेन्द्रो महोदरः । प्रविवेशारिसेनां स पतङ्ग इव पावकम् ६ ततः स कदनं चक्रे वानराणां महाबलः । भर्तृवाक्येन तेजस्वी स्वेन वीर्येण चोदितः ७ वानराश्च महासत्त्वाः प्रगृह्य विपुलाः शिलाः । प्रविश्यारिबलं भीमं जघ्नुस्ते सर्वराक्षसान् ८ महोदरः सुसंक्रुद्धः शरैः काञ्चनभूषणैः । चिच्छेद पाणिपादोरु वानराणां महाहवे ९ ततस्ते वानराः सर्वे राक्षसानां महामृधे । दिशो दश द्रुताः केचित्केचित्सुग्रीवमाश्रिताः १० प्रभग्नं समरे दृष्ट्वा वानराणां महाबलम् । अभिदुद्राव सुग्रीवो महोदरमनन्तरम् ११ प्रगृह्य विपुलां घोरां महीधरसमां शिलाम् । चिक्षेप च महातेजास्तद्वधाय हरीश्वरः १२ तामापतन्तीं सहसा शिलां दृष्ट्वा महोदरः। असंभ्रान्तस्ततो बाणैर्निर्बिभेद ततः शिलाम् १३ रक्षसा तेन बाणौघैर्निकृत्ता सा सहस्रधा । निपपात तदा भूमौ गृध्रचक्रमिवाकुलम् १४ तां तु भिन्नां शिलां दृष्ट्वा सुग्रीवः क्रोधमूर्च्छितः ।

---

हे वीरा, आज शत्रुसेनेचा वध करून आपला पराक्रम दाखीव; आजपर्यंत मालकाचें जें अन्न तूं भक्षण केलें आहेस त्याचा उपयोग करून दाखविण्याकरिता तूं आतां चांगलें युद्ध कर" ५. ह्याप्रमाणें रावणानें सांगितलें असतां अग्नीमध्यें प्रवेश करणाऱ्या पतंगाप्रमाणें तो राक्षसाधिपति महोदर शत्रुसेनेमध्यें प्रविष्ट झाला. ६ तदनंतर स्वतःच्या वीर्यामुळें व भर्त्याच्या आज्ञेमुळें प्रोत्साहन मिळालेला तो महाबलाढ्य व तेजस्वी महोदर वानरांची कत्तल करूं लागला असतां ७ मोठ्या मोठ्या शिला घेऊन ते महाबलाढ्य वानर भयंकर शत्रुसैन्यामध्यें प्रविष्ट झाले आणि सर्व राक्षसांचा त्यांनीं वध केला ८. हें पाहून अतिशय क्रुद्ध झालेल्या महोदरानें महारणामध्यें सुवर्णभूषित बाणांनीं वानरांचे हात, पाय व मांड्या तोडून टाकिल्या ९. तेव्हां राक्षसांनीं सुरू केलेल्या त्या महासंग्रामामध्यें ते सर्वही वानर दशदिशेस पळत सुटले व कांहीं सुग्रीवाचाही आश्रय करून राहिले १०. ह्याप्रमाणें वानरांचें प्रचंड सैन्य संग्रामामध्यें पराजित झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं सुग्रीव समीपच असलेल्या महोदरावर धांवून गेला ११; आणि पर्वतासारिखी एक प्रचंड व घोर शिला हातांत घेऊन त्या महातेजस्वी वानराधिपतीनें फेंकिली असतां १२ एकाएकीं येत असलेली ती शिला अवलोकन करून महोदरानें गोंधळून न जातां बाणांच्या योगानें तिला तोडून टाकिलें १३ आणि ह्याप्रमाणें बाणसमुदायांच्या योगानें त्या राक्षसानें तोडून टाकिलेली ती शिळा हजारों तुकडे होऊन घाबरून गेलेल्या गृध्रपक्ष्यांच्या कळपाप्रमाणें एकदम भूमीवर पडली १४. ह्याप्रमाणें शिळेचे

सालमुत्पाट्य चिक्षेप तं स चिच्छेद नैकधा १५ शरैश्च विददारैनं शूरः
परबलार्दनः । स ददर्श ततः क्रुद्धः परिघं पतितं भुवि १६ आविध्य तु स
तं दीप्तं परिघं तस्य दर्शयन् । परिघेणोग्रवेगेन जघानास्य हयोत्तमान् १७
तस्माद्धतहयाद्वीरः सोऽवप्लुत्य महारथात् । गदां जग्राह संक्रुद्धो राक्षसोऽथ
महोदरः १८ गदापरिघहस्तौ तौ युधि वीरौ समीयतुः । नर्दन्तौ गोवृ-
षप्रख्यौ घनाविव सविद्युतौ १९ ततः क्रुद्धो गदां तस्य चिक्षेप रजनीचरः ।
ज्वलन्तीं भास्कराभासां सुग्रीवाय महोदरः २० गदां तां सुमहाघोरामा-
पतन्तीं महाबलः । सुग्रीवो रोषताम्राक्षः समुद्यम्य महाहवे २१ आजघान
गदां तस्य परिघेण हरीश्वरः । पपात तरसा भिन्नः परिघस्तस्य भूतले २२
ततो जग्राह तेजस्वी सुग्रीवो वसुधातलात् । आयसं मुसलं घोरं सर्वतो
हेमभूषितम् २३ स तमुद्यम्य चिक्षेप सोऽप्यस्य प्राक्षिपद्गदाम् । भिन्नाव-
न्योन्यमासाद्य पेततुस्तौ महीतले २४ ततो भिन्नप्रहरणौ मुष्टिभ्यां तौ

---

तुकडे झालेले पाहून सुग्रीव क्रोधानें व्याप्त झाला व एक सालवृक्ष उपटून त्यानें महोदरा-कडे फेंकला; परंतु, त्या वृक्षाचेही त्या महोदरानें अनेक तुकडे करून टाकिले १५; आणि शत्रुसैन्याला पीडा देणाऱ्या त्या शूरानें बाणांच्या योगानें त्यालाही विदीर्ण करून टाकिलें असतां क्रुद्ध झालेल्या त्या सुग्रीवानें त्याचा परिघ भूमीवर पडला आहे असें पाहिलें १६. नंतर त्याचा तो उज्जल परिघ गरगर फिरवून त्याला आपलें हस्तलाघव दर्शवीत दर्शवीत त्या महावेगवान् परिघाच्या योगानें त्यानें त्या महोदराच्या उत्कृष्ट अश्वां-चाही वध केला १७. नंतर ज्याला जोडिलेल्या अश्वांचा वध झाला आहे अशा त्या मोठ्या रथावरून त्या वीर महोदर राक्षसानें उडी टाकिली आणि क्रुद्ध होऊन त्यानें गदा हातामध्यें घेतली १८. तेव्हां विद्युल्लतेनें युक्त असलेले मेघच कीं काय असे ते गदा व परिघ हातामध्यें धारण केलेले वीर मोठ्या बैलांप्रमाणें गर्जना करीत करीत समरांगणामध्यें एकमेकांशीं येऊन भिडले असतां १९ क्रुद्ध महोदर राक्षसानें ती सूर्या-सारिखी तेजस्वी व उज्ज्वल गदा सुग्रीवावर फेंकिली २०; परंतु, अतिशयच भयंकर अस-लेली ती गदा येत असलेली पाहून क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशा त्या महाबलाढ्य सुग्रीवानें महासंग्रामामध्यें परिघ उगारिला २१ आणि त्या परिघानें त्याच्या गदेला त्या वानरराजानें प्रहार केला; परंतु, परिघाच्या तडाक्यामुळें गदा भूमीवर पडून गदेच्या वेगानें तो परिघही भूतलावर मोडून पडला २२. तदनंतर सर्व बाजूंनीं सुवर्णानें भूषित असें एक भयंकर लोखंडी मुसळ तेजस्वी सुग्रीवानें भूतलावरून उचलून घेतलें २३. नंतर तें मुसळ उगारून त्यानें त्या महोदर राक्षसावर फेंकिलें

समीयतुः। तेजोबलसमाविष्टौ दीप्ताविव हुताशनौ २५ जघ्नतुस्तौ तदान्योन्यं नदन्तौ च पुनःपुनः। तलैश्चान्योन्यमासाद्य पततुश्च महीतले २६ उत्पेततुस्तदा तूर्णं जघ्नतुश्च परस्परम्। भुजैश्चिक्षिपतुर्वीरावन्योन्यमपराजितौ २७ जग्मतुस्तौ श्रमं वीरौ बाहुयुद्धे परन्तपौ। जहार च तदा खड्गमदूरपरिवर्तिनम् २८ ततो रोषपरीताङ्गौ नदन्तावभ्यधावताम्। उद्यतासी रणे हृष्टौ युद्धे शस्त्रविशारदौ २९ दक्षिणं मण्डलं चोभौ सुतूर्णं संपरीयतुः। अन्योन्यमभिसंक्रुद्धौ जये प्रणिहितावुभौ ३० स तु शूरो महावेगो वीर्यश्लाघी महोदरः। महावर्मणि तं खड्गं पातयामास दुर्मतिः ३१ लग्नमुत्कर्षतः खड्गं खड्गेन कपिकुञ्जरः। जहार सशिरस्त्राणं कुण्डलोपगतं शिरः ३२ निकृत्तशिरसस्तस्य पतितस्य महीतले। तद्बलं राक्षसेन्द्रस्य दृष्ट्वा तत्र न दृश्यते ३३ हत्वा तं वानरैः सार्धं ननाद

---

असतां त्या राक्षसानेंही त्याच्यावर गदा फेंकिली व एकमेकांचा एकमेकांना प्रहार होऊन तीं दोन्हीं आयुधें भूतलावर पडलीं २४. नंतर तेज व बल ह्यांनीं युक्त असलेले व प्रदीप्त अग्नीसारिखे दिसूं लागलेले ते सुग्रीवमहोदर आयुधें मोडून गेल्यामुळें एकमेकांशीं मुष्टियुद्ध करूं लागले २५. एकसारिखी गर्जना करीत करीत एकमेकांला त्यांनीं मुष्टीचे प्रहार केले आणि एकमेकांला हस्ततलांचेही प्रहार करून ते उभयतांही भूतलावर पडले २६. नंतर सत्वर उठून ते एकमेकांना ताडण करूं लागले आणि उभयतांही अजिंक्य असलेले ते वीर सुग्रीवमहोदर एकमेकांला हातांनींच प्रहार करूं लागले २७. ह्याप्रमाणें बाहुयुद्ध सुरू झालें असतां शत्रूला ताप देणारे ते उभयतां वीर त्या बाहुयुद्धामध्यें थकून गेले असतां जवळच असलेलें खड्ग दोघांनींही हातामध्यें घेतलें २८. नंतर क्रोधानें व्याप्त झालेले ते उभयतां वीर रणामध्यें गर्जना करू लागले आणि शस्त्रांमध्यें निपुण असलेले ते उभयतां वीर आनंदित होऊन व खड्ग उगारून रणामध्यें एकमेकांवर चाल करून गेले २९. एकमेकांवर अतिशय क्रुद्ध झालेले आणि उभयतांनाही जय मिळविण्याविषयीं निश्चित झालेले ते वीर फारच त्वरेनें डावीं उजवीं मंडलें करूं लागले ३०. नंतर पराक्रमाविषयीं अभिमान बाळगणाऱ्या त्या महावेगवान्, शूर व दुर्मति महोदरानें सुग्रीवाच्या मोठ्या वर्मावर त्या खड्गानें प्रहार केला ३१ आणि सुग्रीवाचे ठिकाणीं रुतून बसलेला खड्ग तो उपसूं लागला तों इतक्यांत शिरस्त्राण आणि कुंडलें ह्यांनीं युक्त असलेलें त्या महोदराचें मस्तक वानरश्रेष्ठ सुग्रीवानें आपल्या खड्गाच्या योगानें उडविलें ३२. ह्याप्रमाणें शिरश्छेद होऊन तो राक्षसाधिपति महोदर भूतलावर पडला असतां त्याला तसा पहातांक्षणीं त्याचें सैन्य (तेथून पळून गेल्यामुळें) तेथें दिसेनासें झालें ३३. त्या

मुदितो हरिः। चुक्रोध च दशग्रीवो जहृषे राघवस्तदा ३४ विषण्णवदनाः सर्वे राक्षसा दीनचेतसः। विद्रवन्ति ततः सर्वे भयवित्रस्तचेतसः ३५ महोदरं तं विनिपात्य भूमौ महागिरेः कीर्णमिवैकदेशम्। सूर्यात्मजस्तत्र रराज लक्ष्म्या सूर्यः स्वतेजोभिरिवाप्रधृष्य ३६ अथ विजयमवाप्य वानरेन्द्रः समरमुखे सुरसिद्धयक्षसङ्घैः। अवनितलगतैश्च भूतसङ्घैर्हर्षसमाकुलितैर्निरीक्ष्यमाणः ३७ [४४१५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तनवतितमः सर्गः ॥ ९७ ॥

महोदरे तु निहते महापार्श्वो महाबलः। सुग्रीवेण समीक्ष्याथ क्रोधात्संरक्तलोचनः १ अङ्गदस्य चमूं भीमां क्षोभयामास मार्गणैः २ स वानराणां मुख्यानामुत्तमाङ्गानि राक्षसः। पातयामास कायेभ्यः फलं वृन्तादिवानिलः ३ केषांचिदिषुभिर्बाहूंश्चिच्छेदाथ स राक्षसः। वानराणां सुसंरब्धः पार्श्वं केषांचिदाक्षिपत् ४ तेऽर्दिता बाणवर्षेण महापार्श्वेन वानराः। विषादविमुखाः सर्वे बभूवुर्गतचेतसः ५ निशम्य बलमुद्विग्नमङ्गदो

महोदराचा वध केल्यावर वानरांसहवर्तमान सुग्रीव आनंदानें गर्जना करूं लागला, रावण क्रुद्ध झाला आणि रामाला हर्ष झाला ३४. तदनंतर मनामध्यें खिन्न होऊन दीन मुद्रेनें युक्त झालेले ते सर्वही राक्षस भीतीमुळें अंतःकरणामध्यें अगदीं गोंधळून जाऊन धांवाधांव करूं लागले ३५. महापर्वताचा तुटून पडलेला एक भागच कीं काय अशा त्या महोदराला भूतलावर पाडिल्यानंतर सूर्यपुत्र सुग्रीव स्वतःच्या तेजानें कोणालाही जवळ येऊं न देणाऱ्या सूर्याप्रमाणें स्वतःच्या तेजानें झळकूं लागला ३६. असो. अशा रीतीनें संग्रामामध्यें वानराधिपति सुग्रीवाला विजय प्राप्त झाला असतां हर्षानें व्याप्त झालेले देवगण, सिद्धगण, यक्षगण आणि भूतलावरीलही प्राण्यांचे समुदाय त्याच्याकडे पाहूं लागले ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं सत्त्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९७ ॥

सुग्रीवानें महोदराचा वध केल्यावर महाबलाढ्य महापार्श्वाचे नेत्र क्रोधानें आरक्तवर्ण झाले आणि सुग्रीवाकडे पाहून १ अंगदाची भयंकर सेना बाणांच्या योगानें त्यानें क्षुब्ध करून टाकिली २. नंतर वायु ज्याप्रमाणें देंठापासून फळें पाडितो त्याप्रमाणें त्या राक्षसानें मुख्य मुख्य वानरांचीं मस्तकें देहांपासून खालीं पाडिलीं ३. अतिशय क्षुब्ध झालेल्या त्या राक्षसानें बाणांच्या योगानें कांहीं वानरांचे हात तोडिले आणि कांहींच्या बरगड्या फोडिल्या ४. ह्याप्रमाणें महापार्श्वानें त्या वानरांस बाणवृष्टीच्या योगानें जर्जर करून टाकिलें असतां ते सर्वही खेदामुळें युद्धापासून पराङ्मुख झाले आणि

राक्षसार्दितम् । वेगं चक्रे महावेगः समुद्र इव पर्वसु ६ आयसं परिघं गृह्य
सूर्यरश्मिसमप्रभम् । समरे वानरश्रेष्ठो महापार्श्वे न्यपातयत् ७ स तु तेन
प्रहारेण महापार्श्वो विचेतनः । ससूतः स्यन्दनात्तस्माद्विसंज्ञश्चापतद्भुवि ८
तस्यर्क्षराजस्तेजस्वी नीलाञ्जनचयोपमः । निष्पत्य सुमहावीर्यः स्वयूथा-
न्मेघसंनिभात् ९ प्रगृह्य गिरिशृङ्गाभां क्रुद्धः स विपुलां शिलाम् । अश्वा-
ञ्जघान तरसा बभञ्ज स्यन्दनं च तम् १० मुहूर्ताल्लब्धसंज्ञस्तु महापार्श्वो
महाबलः । अङ्गदं बहुभिर्बाणैर्भूयस्तं प्रत्यविध्यत ११ जाम्बवन्तं त्रिभि-
र्बाणैराजघान स्तनान्तरे । ऋक्षराजं गवाक्षं च जघान बहुभिः शरैः १२
गवाक्षं जाम्बवन्तं च स दृष्ट्वा शरपीडितौ । जग्राह परिघं घोरमङ्गदः क्रोध-
मूर्च्छितः १३ तस्याङ्गदः सरोषाक्षो राक्षसस्य तमायसम् । दूरस्थितस्य
परिघं रविरश्मिसमप्रभम् १४ द्वाभ्यां भुजाभ्यां संगृह्य भ्रामयित्वा च वेग-
वत् । महापार्श्वाय चिक्षेप वधार्थं वालिनः सुतः १५ स तु क्षिप्तो बल-

---

कोणालाच कांहीं सुचेनासें झालें ५. राक्षसांनीं जर्जर केल्यामुळें उद्विग्न झालेलें आपलें सैन्य अवलोकन करून पर्वदिवशीं क्षुब्ध होणाऱ्या समुद्राप्रमाणें तो महावेगवान् अंगद क्षुब्ध झाला ६ आणि सूर्यकिरणासारिखी ज्याची प्रभा आहे असा एक लोखंडी परिघ हातामध्यें घेऊन त्या वानरश्रेष्ठानें संग्रामामध्यें महापार्श्वावर टाकिला असतां ७त्या प्रहाराच्या योगानें महापार्श्व मूर्च्छित झाला आणि मूर्च्छित होऊन सारथ्यासहवर्तमान असलेल्या त्या रथावरून भूतलावर पडला ८. तदनंतर कज्जलाच्या राशीचीच ज्याला उपमा योग्य आहे असा अतिबलाढ्य व तेजस्वी ऋक्षराज जांबवान् आपल्या मेघतुल्य समुदायांतून बाहेर निघाला ९आणि पर्वतशिखरासारिखी एक प्रचंड शिला हातामध्यें घेऊन क्रुद्ध झालेल्या त्या जांबवानानें वेगावेगानें त्या महापार्श्वाचे अश्व मारून तो रथही फोडून टाकिला १०. नंतर एक मुहूर्त गेल्यावर महाबलाढ्य महापार्श्व शुद्धीवर आला; पुनरपि अनेक बाणांनीं त्यानें अंगदाला वेध केला ११, तीन बाणांनीं वक्षःस्थलाचे ठिकाणीं त्यानें जांबवानाला वेध केला आणि पुनरपि ऋक्षराज जांबवानाला व गवाक्षालाही त्यानें अनेक बाणांनीं वेध केला १२. ह्याप्रमाणें गवाक्ष व जांबवान् बाणांनीं जर्जर झाल्याचें अवलोकन करून क्रोधानें व्याप्त झालेल्या अंगदानें भयंकर परिघ हातामध्यें घेतला १३. दूर असलेल्या त्या राक्षसाच्या वधाकरितां तो सूर्यकिरणतुल्य तेजस्वी लोखंडी परिघ दोन्ही हातामध्यें घेऊन आणि वेगानें गरगर फिरवून क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशा त्या वालिपुत्र अंगदानें महापार्श्वावर फेंकिला १४,१५. तेव्हां बलाढ्य वालिपुत्रानें फेकि-

हता परिघवेगेन रक्षसः । धनुश्च सशरं हस्ताच्छिरस्त्राणं च्यपातयत् १६
तं समासाद्य वेगेन वालिपुत्रः प्रतापवान् । तलेनाभ्यहनत्क्रुद्धः कर्णमूले
सकुण्डले १७ स तु क्रुद्धो महावेगो महापार्श्वो महाद्युतिः । करेणैकेन
जग्राह सुमहान्तं परश्वधम् १८ तं तैलधौतं विमलं शैलसारमयं दृढम् ।
राक्षसः परमक्रुद्धो वालिपुत्रे न्यपातयत् १९ तेन वामांसफलके भृशं प्रत्य-
वपातितम् । अङ्गदो मोक्षयामास सरोषः सपरश्वधम् २० स वीरो वज्रसं-
काशमङ्गदो मुष्टिमात्मनः । संवर्तयत्सुसंक्रुद्धः पितुस्तुल्यपराक्रमः २१
राक्षसस्य स्तनाभ्याशे मर्मज्ञो हृदयं प्रति । इन्द्राशनिसमस्पर्शं स मुष्टिं
विन्यपातयत् २२ तेन तस्य निपातेन राक्षसस्य महामृधे । पफाल हृदयं
चास्य स पपात हतो भुवि २३ तस्मिन्विनिहते भूमौ तत्सैन्यं संप्रचुक्षुभे।
अभवच्च महान्क्रोधः समरे रावणस्य तु २४ वानराणां प्रहृष्टानां सिंहनादः
सुपुष्कलः । स्फोटयन्निव शब्देन लङ्कां साट्टालगोपुराम् ॥ सहेन्द्रेणेव
देवानां नादः समभवन्महान् २५ अथेन्द्रशत्रुस्त्रिदशालयानां वनौकसां चैव

---

लेल्या त्या परिघानें त्या राक्षसाचें शिरस्त्राण आणि हातांतून बाणासहवर्तमान धनुष्य खालीं पाडिलें १६. तदनंतर क्रुद्ध झालेला प्रतापी वालिपुत्र अंगद वेगावेगानें त्याच्याजवळ गेला आणि त्याच्या कुंडलयुक्त कर्णप्रदेशाचे ठिकाणीं त्यानें एक तलप्रहार केला १७. तेव्हां तो महातेजस्वी व महावेगवान् महापार्श्व क्रुद्ध झाला आणि एका हातामध्यें फारच मोठी कुऱ्हाड त्यानें घेतली १८. नंतर ती तेलामध्यें पाणी दिलेली, निर्मल, बळकट व लोह-मय कुऱ्हाड अतिशय क्रुद्ध झालेल्या राक्षसानें वालिपुत्र अंगदावर मारिली १९; परंतु, डाव्या खांद्यावर अगदीं नेमून धरिलेली ती कुऱ्हाड क्रुद्ध झालेल्या त्या अंगदानें चुकविली आणि २० नंतर पराक्रमामध्यें पित्याची बरोबरी करणाऱ्या त्या अतिक्रुद्ध वीर अंगदानें वज्रासारिखी आपली मुष्टि वळिली २१ आणि नंतर मर्म जाणणाऱ्या त्या अंगदानें इंद्राच्या अशनिसंज्ञक अस्त्राप्रमाणें जिचा तडाका आहे अशी ती मुष्टि राक्षसाच्या हृदयावर मारिली २२. तेव्हां त्या मुष्टिप्रहारानें महासंग्रामामध्यें त्या राक्षसाचें हृदय विदीर्ण झालें व तो वध पावून भूमीवर पडला २३. याप्रमाणें तो वध पावून भूमीवर पडला असतां त्याचें सैन्य क्षुब्ध झालें; संग्रामामध्यें रावणाला अतिशय क्रोध आला २४; हर्षयुक्त झालेले वानर फारच उच्च स्वरानें सिंहासारिखी गर्जना करूं लागले आणि बुरुज व वेशी ह्यांसहवर्तमान सर्व लंकेला विदीर्णच करीत आहे कीं काय अशी त्या वानरांमध्यें इंद्रासहवर्तमान देवांच्या गर्जनेप्रमाणें मोठी गर्जना होऊं लागली. २५

महाप्रणादम्। श्रुत्वा शरोऽयं युधि राक्षसेन्द्रः पुनश्च युद्धाभिमुखोऽवतस्थे २६
[४४४१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टनव-
तितमः सर्गः ॥ ९८ ॥

महोदरमहापार्श्वौ हतौ दृष्ट्वा स रावणः। तस्मिंश्च निहते वीरे विरू-
पाक्षे महाबले १ आविवेश महान्क्रोधो रावणं तु महामृधे। सूतं संचो-
दयामास वाक्यं चेदमुवाच ह२निहतानाममात्यानां रुद्धस्य नगरस्य च।
दुःखमेवापनेष्यामि हत्वा तौ रामलक्ष्मणौ ३ रामवृक्षं रणे हन्मि सीतापुष्प-
फलप्रदम्। प्रशाखा यस्य सुग्रीवो जाम्बवान्कुमुदो नलः ४ द्विविदश्चैव मै-
न्दश्च अङ्गदो गन्धमादनः। हनूमांश्च सुषेणश्च सर्वे च हरियूथपाः५ स दिशो
दश घोषेण रथस्यातिरथो महान्। नादयन्प्रययौ तूर्णं राघवं चाभ्यधावत ६
पूरिता तेन शब्देन सनदीगिरिकानना। संचचाल मही सर्वा त्रस्तसिंह-
मृगद्विजा ७ तामसं सुमहाघोरं चकारास्त्रं सुदारुणम्। निर्ददाह कपी-
न्सर्वांस्ते प्रपेतुः समन्ततः ८ उत्पपात रजो भूमौ तैर्भग्नैः संप्रधावितैः।

---

तदनंतर देव आणि वानर ह्यांची मोठी गर्जना श्रवण करून इंद्रशत्रु राक्षसाधिपति रावण रागारागानें पुनरपि संग्रामामध्यें युद्धाकरितां सज्ज झाला २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं अठ्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९८ ॥

त्या महाबलाढ्य वीर विरूपाक्षाचा वध होऊन महोदर व महापार्श्व ह्यांचाही वध झाल्याचें अवलोकन केल्यावर त्या रावणाला १ संग्रामामध्यें अतिशय क्रोध आला आणि सारथ्याला हाक मारून तो ह्मणाला २ "त्या रामलक्ष्मणांचा वध करून मी, वानरांनीं अमात्यांचा वध करून नगराला वेढा दिल्यामळें जें मला दुःख दिलें आहे, तें नाहींसें करीन ३. सीतारूप पुष्प व फल देणारा रामवृक्ष मी संग्रामामध्यें तोडून टाकीन. सुग्रीव, जांबवान्, कुमुद, नल, द्विविद, मैंद, अंगद, गंधमादन, हनुमान्, सुषेण आणि इतरही सर्व वानरसेनाधिपति त्या वृक्षाच्या शाखा आहेत". ४, ५. इतकें बोलून तो अतिरथी प्रचंड रावण रथाच्या घोषानें दशदिशा नादित करीत करीत सत्वर निघून रामासमीप आला ६. तेव्हां त्या शब्दाच्या योगानें नद्या, पर्वत व अरण्यें ह्यांसहवर्तमान सर्व पृथ्वी कंपित होऊन तिच्यावरील सिंह, मृग व पक्षी भयभीत झाले ७. तदनंतर फारच घोर आणि अतिशय दारुण असें तामसास्त्र रावणानें सोडिलें असतां त्या अस्त्रानें सर्व वानर दग्ध होऊन जाऊन चोहोंकडे पडले ८ आणि पराजय पावून पळत सुटलेल्या त्या

न हि तत्सहितुं शेकुर्वानरास्ते निर्मितं स्वयम् ९ तान्यनीकान्यनेकानि राव-
णस्य शरोत्तमैः । दृष्ट्वा भग्नानि शतशो राघवः पर्यवस्थितः १० ततो राक्ष-
सशार्दूलो विद्राव्य हरिवाहिनीम् । स ददर्श ततो रामं तिष्ठन्तमपराजितम् ११
लक्ष्मणेन सह भ्रात्रा विष्णुना वासवं यथा । आलिखन्तमिवाकाशमवष्टभ्य
महद्धनुः १२ पद्मपत्रविशालाक्षं दीर्घबाहुमरिन्दमम् । ततो रामो महातेजाः
सौमित्रिसहितो बली १३ वानरांश्च रणे भग्नानापतन्तं च रावणम् । समीक्ष्य
राघवो हृष्टो मध्ये जग्राह कार्मुकम् १४ विस्फारयितुमारेभे ततः स धनु-
रुत्तमम् । महावेगं महानादं निर्भिन्दन्निव मेदिनीम् १५ रावणस्य च
बाणौघै रामविस्फारितेन च । शब्देन राक्षसास्तेन पेतुश्च शतशस्तदा १६
तयोः शरपथं प्राप्य रावणो राजपुत्रयोः । स बभौ च यथा राहुः समीपे
शशिसूर्ययोः १७ तमिच्छन्प्रथमं योद्धुं लक्ष्मणो निशितैः शरैः । मुमोच
धनुरायम्य शरानग्निशिखोपमान् १८ तान्मुक्तमात्रानाकाशे लक्ष्मणेन

---

वानरांमुळें भूमीवर धुरळाही उडाला. सारांश, ब्रह्मदेवानें स्वतः निर्माण केलेलें तें अस्त्र सहन करण्यास वानर समर्थ झाले नाहींत ९. त्याप्रमाणें रावणाच्या उत्कृष्ट बाणांनीं त्या अनेक सैन्यांचा शेंकडों वेळां पराजय झालेला पाहून राम नेटानें उभा राहिला १० आणि वानरसेनेला पळवून लाविल्यावर त्या राक्षसश्रेष्ठ रावणानेंही अजिंक्य राम उभा असल्याचें अवलोकन केलें ११. विष्णुसहवर्तमान स्थित असलेल्या इंद्राप्रमाणें भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान तो राम उभा होता; मोठें धनुष्य घेऊन आकाशाला स्पर्शच करीत आहे कीं काय असा तो दिसत होता १२; शत्रूचें दमन करणाऱ्या त्या रामाचे नेत्र कमलपत्रांप्रमाणें विशाल होते आणि त्याचे हातही लांबलांब होते. तदनंतर रणामध्यें पराजित झालेले वानर आणि संमुख येत असलेला रावण ह्यांना अवलोकन करून महा-तेजस्वी व बलाढ्य राम लक्ष्मणासहवर्तमान आनंदित झाला व त्यानें धनुष्य हातामध्यें घेतलें १३,१४. तदनंतर महावेगवान् आणि प्रचंड गर्जना करणाऱ्या अशा आपल्या उत्कृष्ट धनुष्याचा टणत्कार करण्यास त्यानें आरंभ केला असतां तो पृथ्वीच विदीर्ण करीत आहे कीं काय असें भासूं लागलें १५. रावणाचे बाणसमुदाय आणि रामधनुष्याचा टणत्कार ह्यांपासून निघालेला जो ध्वनि त्याच्या योगानें शेंकडों राक्षस पडूं लागले १६. त्या राजपुत्रांच्या बाणांचे टप्प्यांत सांपडलेला तो राक्षस चंद्रसूर्यासमीप असलेल्या राहू-प्रमाणें शोभूं लागला असतां १७. तीक्ष्ण बाणांनीं प्रथमतः त्याच्याशीं युद्ध करण्याचा उद्देश धरून लक्ष्मणानें धनुष्य आकर्षण केलें आणि अग्नीच्या ज्वालेसारिखे तीक्ष्ण बाण

धनुष्मता । बाणान्बाणैर्महातेजा रावणः प्रत्यवारयत् १९ एकमेकेन बाणेन त्रिभिस्त्रीन्दशभिर्दश । लक्ष्मणस्य प्रचिच्छेद दर्शयन्पाणिलाघवम् २० अभ्यतिक्रम्य सौमित्रिं रावणः समितिंजयः । आससाद रणे रामं स्थितं शैलमिवापरम् २१ स राघवं समासाद्य क्रोधसंरक्तलोचनः । व्यसृजच्छरवर्षाणि रावणो राक्षसेश्वरः २२ शरधारास्ततो रामो रावणस्य धनुश्च्युताः । दृष्ट्वैवापतिताः शीघ्रं भल्लाञ्जग्राह सत्वरम् २३ तान्छरौघांस्ततो भल्लैस्तीक्ष्णैश्चिच्छेद राघवः । दीप्यमानान्महाघोराञ्छरानाशीविषोपमान् २४ राघवो रावणं तूर्णं रावणो राघवं तथा । अन्योन्यं विविधैस्तीक्ष्णैः शरवर्षैर्ववर्षतुः २५ चेरतुश्च चिरं चित्रं मण्डलं सव्यदक्षिणम् । बाणवेगात्समुत्क्षिप्तावन्योन्यमपराजितौ २६ तयोर्भूतानि वित्रेसुर्युगपत्संप्रयुध्यतोः । रौद्रयोः सायकमुचोर्यमान्तकनिकाशयोः २७ सततं विविधैर्बाणैर्बभूव गगनं तदा । घनैरिवातपापाये विद्युन्मालासमाकुलैः २८

---

त्याच्यावर सोडिले १८. धनुर्धारी लक्ष्मणानें आकाशामध्यें धनुष्याच्या योगानें ते बाण सोडिले नाहींत तोंच महातेजस्वी रावणानें बाणांच्या योगानें त्यांचें निवारण केलें १९. लक्ष्मणानें सोडिलेल्या एका बाणाचे एका बाणानें, तीन बाणांचे तीन बाणांनीं आणि दहा बाणांचे दहा बाणांनीं हस्तलाघव दर्शवीत दर्शवीत रावणानें तुकडे तुकडे केले २०; आणि संग्रामविजयी रावण लक्ष्मणाला सोडून देऊन दुसरा पर्वतच कीं काय अशा रीतीनें संग्रामामध्यें निश्चल स्थित असलेल्या रामासमीप तो जाऊन भिडला २१. क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झालेले आहेत अशा त्या राक्षसाधिपति रावणानें रामासमीप आल्यानंतर त्याच्यावर बाणांचा वर्षाव केला २२. तदनंतर रावणाच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणधारा संग्राममध्यें पडल्यानें अवलोकन करितांक्षणीं रामानें सत्वर भल्लबाण घेतले २३. तदनंतर देदीप्यमान व सर्पासारिखे महाभयंकर असलेले जे रावणाचे बाणसमुदाय ते तीक्ष्ण भल्लबाणांनीं रामानें तोडून टाकिले २४. नंतर राम रावणावर आणि रावण रामावर अशारीतीनें एकमेकांवर नानाप्रकारच्या तीक्ष्ण बाणांची ते वृष्टि करूं लागले २५; आश्चर्यकारक रीतीनें डावीं उजवीं मंडलें बराच वेळपर्यंत ते घेत राहिले आणि अजिंक्य असलेले ते उभयतां रामलक्ष्मण बाणवेगानें एकमेकांला ढकलूं लागले २६. यम व अंतक ह्यांप्रमाणें दिसूं लागलेले ते उग्र रामरावण युद्ध करीत करीत बाण सोडूं लागले असतां सर्वही भूतें एकदम त्रस्त होऊन गेलीं २७. ग्रीष्मकाल संपल्यानंतर विद्युल्लतांनीं व्याप्त झालेल्या मेघांनीं ज्याप्रमाणें आकाश शोभूं लागतें त्याप्रमाणें एकसारिख्या नानाप्रकारच्या बाणांनीं ते शोभूं

गवाक्षितमिवाकाशं बभूव शरवृष्टिभिः ।' महावेगैः सुतीक्ष्णाग्रैर्गृध्रपत्रैः सुवाजितैः २९ शरान्धकारमाकाशं चक्रतुः प्रथमं तदा । गतेऽस्तं तपने चापि महामेघाविवोत्थितौ ३० तयोरभून्महायुद्धमन्योन्यवधकाङ्क्षिणोः । अनासाद्यमचिन्त्यं च वृत्रवासवयोरिव ३१ उभौ हि परमेष्वासावुभौ युद्धविशारदौ । उभावस्त्रविदां मुख्यावुभौ युद्धे विचेरतुः ३२ उभौ हि येन व्रजतस्तेन तेन शरोर्मयः । ऊर्मयो वायुना विद्धा जग्मुः सागरयोरिव ३३ ततः संसक्तहस्तस्तु रावणो लोकरावणः । नाराचमालां रामस्य ललाटे प्रत्यमुञ्चत ३४ रौद्रचापप्रयुक्तां तां नीलोत्पलदलप्रभाम् । शिरसाधारयद्रामो न व्यथामभ्यपद्यत ३५ अथ मन्त्रानपि जपन्रौद्रमस्त्रमुदीरयन् । शरान्भूयः समादाय रामः क्रोधसमन्वितः ३६ मुमोच च महातेजाश्चापमायम्य वीर्यवान् । ताञ्शरान्राक्षसेन्द्राय चिक्षेपाच्छिन्नसायकः ३७ ते महामेघसंकाशे कवचे पातिताः शराः । अवध्ये राक्षसेन्द्रस्य

---

लागले २८. बाणवृष्टींच्या योगानें आकाश जिकडे तिकडे खिडक्यांनींच व्याप्त झालें आहे कीं काय असें भासूं लागलें. प्रचंड वेग, अतितीक्ष्ण अग्रें आणि गृध्रपक्ष्यांचीं पिसें ह्यांनीं युक्त असलेल्या बाणांनीं २९ सूर्य अस्तास जाण्यापूर्वीं त्यांनीं आकाश अंधकारयुक्त केलें होतें आणि सूर्यअस्ताचलाला गेल्यानंतरही एकाएकीं उठलेले दोन महामेघच कीं काय अशा त्या रामरावणांनीं आकाश अंधकारयुक्त केलें ३०. एकमेकांच्या वधाच्या इच्छेनें रामरावणांमध्यें इंद्रवृत्रांच्या युद्धाप्रमाणें जें मोठें युद्ध झालें तें पहावयासही सांपडणार नाहीं व त्याची कल्पनाही करितां येणार नाहीं ३१. ते उभयतांही महाधनुर्धारी होते; उभयतांही युद्धामध्यें निपुण होते; उभयतांही अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ होते आणि उभयतांही रणभूमीमध्यें संचार करीत होते ३२; वायूचा आघात झाला असतां ज्याप्रमाणें समुद्रामध्यें लाटा उसळूं लागतात त्याप्रमाणें ज्या ज्या मार्गानें ते उभयतां जाऊं लागले त्या त्या मार्गानें बाणांच्या लाटा उसळूं लागल्या ३३. तदनंतर बाण सोडण्यामध्यंच ज्याचे हात गुंतलेले आहेत अशा त्या लोकभयंकर रावणानें रामाच्या ललाटावर एक नाराच बाणांची माळा सोडिली ३४ व नील कमलाच्या पाकळ्यांप्रमाणें जिची प्रभा आहे अशी ती भयंकर धनुष्यापासून सोडिलेली माळा कांहींएक व्यथा न पावतां रामानें मस्तकीं धारणही केली ३५. नंतर रौद्रास्त्राचा प्रयोग करण्याच्या उद्देशानें, क्रुद्ध झालेल्या रामानें पुनरपि बाण घेतले ३६ आणि ज्याच्या धनुष्याला मुळींच खळ नाहीं अशा त्या महातेजस्वी वीर्यवान् रामानें ते बाण राक्षसाधिपति रावणावर सोडिले ३७. परंतु, राक्षसाधिपति

न व्यथां जनयंस्तदा ३८ पुनरेवाथ तं रामो रथस्थं राक्षसाधिपम् । ललाटे परमास्त्रेण सर्वास्त्रकुशलोऽभिनत् ३९ ते भित्त्वा बाणरूपाणि पञ्चशीर्षा इवोरगाः । श्वसन्तो विविशुर्भूमिं रावणप्रतिकूलिताः ४० निहत्य राघवस्यास्त्रं रावणः क्रोधमूर्च्छितः । आसुरं सुमहाघोरमन्यदस्त्रं चकार सः ४१ सिंहव्याघ्रमुखांश्चापि कङ्ककोकमुखानपि । गृध्रश्येनमुखांश्चापि शृगालवदनांस्तथा ४२ ईहामृगमुखांश्चापि व्यादितास्यान्भयावहान् । पञ्चास्याँल्लेलिहानांश्च ससर्ज निशितान्शरान् ४३ शरान्खरमुखांश्चान्यान्वराहमुखसंश्रितान् । श्वानकुक्कुटवक्त्रांश्च मकराशीविषाननान् ४४ एतांश्चान्यांश्च मायाभिः ससर्ज निशिताञ्छरान् । रामं प्रति महातेजाः क्रुद्धः सर्प इव श्वसन् ४५ आसुरेण समाविष्टः सोऽस्त्रेण रघुपुङ्गव । ससर्जास्त्रं महोत्साहं पावकं पावकोपमः ४६ अग्निदीप्तमुखान्बाणांस्तत्र सूर्यमुखानपि । ग्रहनक्षत्रवर्णांश्च महोल्कामुखसंस्थितान् ४७ विद्युज्जिह्वोपमां-

---

रावणाच्या महामेघतुल्य अभेद्य कवचावर सोडिलेल्या त्या बाणांनीं रावणाला कांहींच व्यथा उत्पन्न केली नाहीं ३८. तेव्हां पुनरपि त्या रथारूढ झालेल्या राक्षसाधिपति रावणाच्या ललाटावर सर्व अस्त्रांमध्यें निपुण असलेल्या रामानें मोठ्या अस्त्रानें अभिमंत्रित करून सोडिलेल्या बाणांनीं वेध केला ३९; व तीं बाणरूप अस्त्रें रावणाच्या निवारणाला न जुमानतां रावणाचें ललाट फोडून पंचमुखी भुजंगांप्रमाणें सों सों करीत करीत भूमीमध्यें प्रविष्ट झालीं ४०. नंतर क्रोधानें व्याप्त झालेल्या रावणानें रामाचें अस्त्र हाणून पाडून अतिच भयंकर अशा दुसऱ्या आसुरास्त्राचा प्रयोग केला ४१. सारांश, क्रुद्ध सर्पाप्रमाणें फुस्कारे टाकीत असलेल्या त्या महातेजस्वी रावणानें रामावर आसुरास्त्राच्या योगानें नानाप्रकारचे तीक्ष्ण बाण सोडिले त्या बाणांमध्यें कांहींचीं तोंडें सिंहांसारिखीं होतीं; कांहींचीं व्याघ्रांप्रमाणें होतीं; कांहींचीं कंकपक्ष्यांप्रमाणें होतीं; कांहींचीं काकपक्ष्यांच्या मुखाप्रमाणें होतीं; कांहींचीं गृध्रपक्ष्यांच्या मुखाप्रमाणें होतीं; कांहींचीं श्येनपक्ष्यांच्या मुखाप्रमाणें होतीं; कांहींचीं मुखें कोल्ह्याप्रमाणें होतीं; कांहींचीं लांडग्यांप्रमाणें होतीं; कांहीं तीक्ष्ण बाण आ पसरून जिभळ्या चाटणारे भयंकर सिंहच बनले होते; कांहींचीं मुखें गर्दभांसारिखीं होतीं; कांहींचीं मुखें डुकरांसारिखीं होतीं; कांहींचीं श्वानांसारिखीं होतीं; कांहींचीं कोंबड्यांप्रमाणें होतीं; कांहींचीं सुसरीप्रमाणें होतीं आणि कांहींचीं सर्पांप्रमाणें होतीं ४२,४३,४४,४५. याप्रमाणें आसुरास्त्रानें अग्नितुल्य रघुवंशजश्रेष्ठ राम व्याप्त झाला असतां त्यानें महाप्रबळ आग्नेयास्त्र सोडिलें ४६. तेव्हां कांहीं अग्नीसारिख्या देदीप्यमान मुखानें युक्त,

श्चापि ससर्ज विविधाञ्छरान्। ते रावणशरा घोरा राघवास्त्रसमाहताः ४८ विलयं जग्मुराकाशे जघ्नुश्चैव सहस्रशः। तदस्त्रं निहतं दृष्ट्वा रामेणाक्लिष्टकर्मणा ४९ हृष्टा नेदुस्ततः सर्वे कपयः कामरूपिणः। सुग्रीवाभिमुखा वीराः संपरिक्षिप्य राघवम् ५० ततस्तदस्त्रं विनिहत्य राघवः प्रसह्य तद्रावणबाहुनिःसृतम्। मुदान्वितो दाशरथिर्महात्मा विनेदुरुच्चैर्मुदिताः कपीश्वराः ५१ [ ४४९२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकोनशततमः सर्गः ॥ ९९ ॥

तस्मिन्प्रतिहतेऽस्त्रे तु रावणो राक्षसाधिपः। क्रोधं च द्विगुणं चक्रे क्रोधाच्चास्त्रमनन्तरम् १ मयेन विहितं रौद्रमन्यदस्त्रं महाद्युतिः। उत्स्रष्टुं रावणो भीमं राघवाय प्रचक्रमे २ ततः शूलानि निश्चेरुर्गदाश्च मुसलानि च। कार्मुकाद्दीप्यमानानि वज्रसाराणि सर्वशः ३ मुद्गराः कूटपाशाश्च दीप्ताश्चाशनयस्तथा। निष्पेतुर्विविधास्तीक्ष्णा वाता इव युगक्षये ४ तदस्त्रं राघवः श्रीमानुत्तमास्त्रविदां वरः। जघान परमास्त्रेण गान्धर्वेण

काहीं सूर्यासारिख्या उज्ज्वल मुखानें युक्त, काहीं ग्रह व नक्षत्रें ह्यांसारिख्या कांतीनें युक्त, काहीं मोठ्या मोठ्या ज्वालांनीं संपन्न ४७ आणि काहीं विद्युल्लतेसारिख्या चंचल जिह्वाप्रमाणें असलेले असे नानाप्रकारचे तीक्ष्ण बाण त्या अस्त्रापासून रामानें सोडले. रावणानें सोडिलेले ते घोर बाण रामाच्या अस्त्राचा तडाका बसतांक्षणीं ४८ आकाशांतच लीन झाले; तथापि, हजारों वानर त्यानें मारिले. उदार कर्म करणाऱ्या रामानें तें अस्त्र हाणून पाडिल्यानें पहातांक्षणीं ४९ यथेष्ट रूप धारण करणारे सुग्रीवप्रभृति सर्वही वीर वानर आनंदित झाले आणि रामासभोंवतीं जुळून गर्जना करूं लागले ५०. सारांश, रावणाच्या हातून सुटलेलें तें अस्त्र एकदम हाणून पाडिल्यावर महात्मा दाशरथी राम आनंदित झाला आणि मोठे मोठे वानरही आनंदित होऊन उच्च स्वरानें गर्जना करूं लागले ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं नव्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९९ ॥

ह्याप्रमाणें त्या अस्त्राचा विघात झाला असतां राक्षसाधिपति रावणाला दुप्पट क्रोध चढला आणि क्रोधामुळें दुसऱ्याही अस्त्राचा त्यानें प्रयोग केला १. सारांश, मयानें निर्माण केलेलें दुसरें भयंकर रौद्रास्त्र महातेजस्वी रावण रामावर सोडूं लागला असतां २ सर्व बाजूंनीं देदीप्यमान व वज्रासारिखीं दृढ, मुसळें, गदा, शूल, मुद्गर, मायापाश आणि अशनिसंज्ञक देदीप्यमान अस्त्रें प्रलयकालीं सुटणाऱ्या नानाप्रकारच्या तीक्ष्ण वायूप्रमाणें रावणाच्या धनुष्यापासून बाहेर पडूं लागलीं ३, ४; परंतु, उत्कृष्ट

महाद्युतिः ५ तस्मिन्प्रतिहतेऽस्त्रे तु राघवेण महात्मना । रावणः क्रोधताम्राक्षः सौरमस्त्रमुदीरयत् ६ ततश्चक्राणि निष्पेतुर्भास्वराणि महान्ति च । कार्मुकाद्भीमवेगस्य दशग्रीवस्य धीमतः ७ तैरासीद्गगनं दीप्तं संपतद्भिः समन्ततः । पतद्भिश्च दिशो दीप्तैश्चन्द्रसूर्यग्रहैरिव ८ तानि चिच्छेद बाणौघैश्चक्राणि तु स राघवः । आयुधानि च चित्राणि रावणस्य चमूमुखे ९ तदस्त्रं तु हतं दृष्ट्वा रावणो राक्षसाधिपः । विव्याध दशभिर्बाणै रामं सर्वेषु मर्मसु १० स विद्धो दशभिर्बाणैर्महाकार्मुकनिःसृतैः । रावणेन महातेजा न प्राकम्पत राघवः ११ ततो विव्याध गात्रेषु सर्वेषु समितिंजयः । राघवस्तु सुसंक्रुद्धो रावणं बहुभिः शरैः १२ एतस्मिन्नन्तरे क्रुद्धो राघवस्यानुजो बली। लक्ष्मणः सायकान्सप्त जग्राह परवीरहा १३ तैः सायकैर्महावेगै रावणस्य महाद्युतिः । ध्वजं मनुष्यशीर्षं तु तस्य चिच्छेद नैकधा १४ सारथेश्चापि बाणेन शिरो ज्वलितकुण्डलम् । जहार लक्ष्मणः श्रीमान्नैर्ऋतस्य महाबलः १५ तस्य बाणैश्च चिच्छेद धनुर्गजकरोपमम् । लक्ष्मणो राक्षस-

---

अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या महातेजस्वी व वैभवशाली रामानें गांधर्वसंज्ञक उत्कृष्ट अस्त्रानें त्या अस्त्राचा प्रतीकार केला ५; तथापि, महात्म्या रामानें तें अस्त्र हाणून पाडिलें असतां क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशा रावणानें सौरसंज्ञक अस्त्र सोडिलें ६. तेव्हां भयंकर वेग धारण करणाऱ्या विचारी रावणाच्या धनुष्यापासून मोठीं मोठीं उज्ज्वल चक्रें निघालीं ७ आणि देदीप्यमान चंद्रसूर्य ग्रहच पडत आहेत कीं काय अशारीतीनें भासत असलेल्या त्या पडणाऱ्या चक्रांनीं दिशा व आकाश हीं सर्व बाजूंनीं देदीप्यमान झालीं ८. परंतु, रावणाचीं तीं चक्रें आणि त्याचप्रमाणें इतरही आश्चर्यकारक आयुधें बाणसमुदायाच्या योगानें रणभूमीमध्यें त्या रामानें तोडून टाकिलीं ९. तें अस्त्र हाणून पडलेलें पाहून राक्षसाधिपति रावणानें दहा बाणांनीं रामाला सर्व मर्मांचे ठिकाणीं वेध केला १०; परंतु, प्रचंड धनुष्यापासून सुटलेल्या दहा बाणांनीं रावणानें वेध केला असतांही तो महातेजस्वी राम कंपित झाला नाहीं ११. नंतर संग्रामविजयी राम अतिशय क्रुद्ध झाला व पुष्कळच बाणांनीं त्यानें रावणाला सर्व अवयवांचे ठिकाणीं वेध केला १२. इतक्यांत परवीरनाशक रामानुज बलाढ्य लक्ष्मण क्रुद्ध झाला; त्यानें सात बाण हातामध्यें घेतले १३ आणि त्या महावेगवान् बाणांच्या योगानें मनुष्यमस्तकानें युक्त असलेल्या त्या रावणाच्या ध्वजाचे त्या महातेजस्वी लक्ष्मणानें अनेक तुकडे केले १४. इतकेंच नव्हे परंतु, महाबलाढ्य व वैभवशाली लक्ष्मणानें त्या राक्षसाच्या सारथ्याचें उज्ज्वल कुंडलांनीं युक्त असलेलें मस्तकही बाणानें

न्द्रस्य पञ्चभिर्निशितैस्तदा १६ नीलमेघनिभांश्चास्य सदश्वान्पर्वतोपमान्। जघानाप्लुत्य गदया रावणस्य बिभीषणः १७ हताश्वात्तु तदा वेगादवप्लुत्य महारथात्। कोपमाहारयत्तीव्रं भ्रातरं प्रति रावणः १८ ततः शक्तिं महाशक्तिः प्रदीप्तामशनीमिव। बिभीषणाय चिक्षेप राक्षसेन्द्रः प्रतापवान् १९ अप्राप्तामेव तां बाणैस्त्रिभिश्चिच्छेद लक्ष्मणः। अथोदतिष्ठत्संनादो वानराणां महारणे २० संपपात त्रिधा छिन्ना शक्तिः काञ्चनमालिनी। सविस्फुलिङ्गा ज्वलिता महोल्केव दिवश्च्युता २१ ततः संभाविततरां कालेनापि दुरासदाम्। जग्राह विपुलां शक्तिं दीप्यमानां स्वतेजसा २२ सा वेगिता बलवता रावणेन दुरात्मना। जज्वाल सुमहातेजा दीप्ताशनिसमप्रभा २३ एतस्मिन्नन्तरे वीरो लक्ष्मणस्तं बिभीषणम्। प्राणसंशयमापन्नं तूर्णमभ्यवपद्यत २४ तं विमोक्षयितुं वीरश्चापमायम्य लक्ष्मणः। रावणं शक्तिहस्तं वै शरवर्षैरवाकिरत् २५ कीर्यमाणः शरौघेण विसृष्टेन

---

उडविलें १५; गजशुंडेप्रमाणें असलेलं त्या राक्षसाधिपति रावणाचें धनुष्य पांच तीक्ष्ण बाणांनीं लक्ष्मणानें तोडून टाकिलें १६ आणि इतक्यांत बिभीषणानें उडी मारून गदेच्या योगानें रावणाचे नील, मेघतुल्य व पर्वतप्राय उत्कृष्ट अश्व मारिले १७. नंतर ज्याला जोडिलेल्या अश्वांचा वध झाला आहे अशा मोठ्या रथावरून रावणानें वेगावेगानें उडी टाकिली व भ्रात्या बिभीषणावर तो अतिशय क्रुद्ध झाला १८. तदनंतर महाशक्तिमान् व प्रतापी राक्षसाधिपति रावणानें विद्युल्लतेप्रमाणें देदीप्यमान शक्ति बिभीषणावर फेंकिली १९; परंतु, ती येऊन पोंचण्यापूर्वींच तीन बाणांनीं लक्ष्मणानें तिचे तुकडे तुकडे करून टाकिले. तेव्हां त्या महासंग्रामांत वानरांमध्यें मोठीच गर्जना सुरू झाली २० आणि इतक्यांत ठिणग्यांनीं युक्त असलेली व आकाशांतून सुटलेली मोठी प्रज्वलित उल्काच कीं काय अशी ती सुवर्णभूषणांनीं युक्त असलेली व तीन ठिकाणीं तुटलेली शक्ति खालीं पडली २१. तदनंतर अमोघ ह्मणून सर्वत्र अतिशय विख्यात असलेली, कालालाही दुःसह व स्वतःच्या तेजानें देदीप्यमान असलेली एक प्रचंड शक्ति रावणानें घेतली २२; आणि त्या दुरात्म्या बलाढ्य रावणानें तिला वेगानें फिरविली असतां अत्यंत तेजस्वी असलेली ती शक्ति प्रदीप्त विद्युल्लतेप्रमाणें चमकूं लागली २३. इतक्यामध्यें प्राणसंकटांत सांपडलेल्या त्या बिभीषणाकडे वीर लक्ष्मण त्याला सोडविण्याकरितां सत्वर धांवून गेला आणि धनुष्य खेंचून त्या वीर लक्ष्मणानें हातामध्यें शक्ति असलेल्या रावणाला बाणवृष्टींनीं व्याप्त करून टाकिलें २४; २५. महात्म्या लक्ष्मणानें सोडिलेल्या बाणसमुदायानें रावण व्याप्त होऊन

महात्मना । स प्रहर्तुं मनश्चक्रे विमुखीकृतविक्रमः २६ मोक्षितं भ्रातरं दृष्ट्वा लक्ष्मणेन स रावणः । लक्ष्मणाभिमुखस्तिष्ठन्निदं वचनमब्रवीत् २७ मोक्षितस्ते बलश्लाघिन्यस्मादेवं विभीषणः । विमुच्य राक्षसं शक्तिस्त्वयीयं विनिपात्यते २८ एषा ते हृदयं भित्त्वा शक्तिर्लोहितलक्षणा । मद्बाहुपरिघोत्सृष्टा प्राणानादाय यास्यति २९ इत्येवमुक्त्वा तां शक्तिमष्टघण्टां महास्वनाम् । मयेन मायाविहिताममोघां शत्रुघातिनीम् ३० लक्ष्मणाय समुद्दिश्य ज्वलन्तीमिव तेजसा । रावणः परमक्रुद्धश्चिक्षेप च ननाद च ३१ सा क्षिप्ता भीमवेगेन वज्राशनिसमस्वना । शक्तिरभ्यपतद्वेगाल्लक्ष्मणं रणमूर्धनि ३२ तामनुव्याहरच्छक्तिमापतन्तीं स राघवः । स्वस्त्यस्तु लक्ष्मणायेति मोघा भव हतोद्यमा ३३ रावणेन रणे शक्तिः क्रुद्धेनाशीविषोपमा । मुक्ता शूरस्य भीतस्य लक्ष्मणस्य ममज्ज सा ३४ न्यपतत्सा महावेगा लक्ष्मणस्य महोरसि । जिह्वेवोरगराजस्य दीप्यमाना महाद्युतिः ३५ ततो रावणवेगेन सुदूरमवगाढया । शक्त्या विभिन्नहृदयः पपात भुवि

---

त्याचा पराक्रम निष्फल होऊं लागला असतां लक्ष्मणाला प्रहार करण्याचें त्यानें मनामध्यें आणिलें २६. लक्ष्मणानें भ्रात्याला सोडविलेलें पाहून तो रावण लक्ष्मणाभिमुख उभा राहून ह्मणाला २७ "हे बलाढ्य लक्ष्मणा, ज्याअर्थी ह्याप्रमाणें तूं बिभीषणाला सोडविलें आहेस त्याअर्थी राक्षसाला सोडून देऊन तुझ्यावरच मी ही शक्ति टाकितों २८. माझ्या परिघतुल्य बाहूपासून सुटलेली ही शक्ति तुझें हृदय भेदून रक्तानें भरेल व तुझे प्राण घेऊन जाईल" २९. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला बोलून अतिशय क्रुद्ध झालेल्या रावणानें ती शक्ति लक्ष्मणाला उद्देशून टाकिली व गर्जना केली. ती अमोघ व शत्रुनाशक शक्ति आठ घंटांनीं युक्त होती; तिचा ध्वनि मोठा होता; मयानें मायेच्या योगानें ती निर्माण केलेली होती आणि तेजानें ती जशी कांहीं जळतच होती ३०, ३१. भयंकर वेग धारण करणाऱ्या रावणानें सोडिलेली आणि वज्र व विद्युल्लता ह्यांच्या सारिखा ध्वनीनें युक्त असलेली ती शक्ति संग्रामामध्यें वेगावेगानें लक्ष्मणावर येऊन पडली ३२. ती शक्ति लक्ष्मणावर येत असतांना "लक्ष्मणाचें कल्याण असो, तूं व्यर्थ हो आणि तुझें सामर्थ्यही व्यर्थ होवो" असें तो राम ह्मणाला ३३. इतक्यामध्यें संग्रामामध्यें क्रुद्ध झालेल्या रावणानें सोडिलेली ती भुजंगासारिखी शक्ति शूर परंतु भयभीत झालेल्या लक्ष्मणाचे ठिकाणीं मग्न होऊन गेली ३४. नागराजाची देदीप्यमान व महातेजस्वी जिह्वाच कीं काय अशी ती महावेगानें युक्त असलेली शक्ति लक्ष्मणाच्या विशाल वक्षःस्थलावर आदळली ३५. तदनंतर रावणाच्या

लक्ष्मणः ३६ तदवस्थं समीपस्थो लक्ष्मणं प्रेक्ष्य राघवः । भ्रातृस्नेहान्महातेजा विषण्णहृदयोऽभवत् ३७ स मुहूर्तमिव ध्यात्वा बाष्पपर्याकुलेक्षणः । बभूव संरब्धतरो युगान्त इव पावकः ३८ न विषादस्य कालोऽयमिति संचिन्त्य राघवः । चक्रे सुतुमुलं युद्धं रावणस्य वधे धृतः । सर्वयत्नेन महता लक्ष्मणं परिवीक्ष्य च ३९ स ददर्श ततो रामः शक्त्या भिन्नं महाहवे । लक्ष्मणं रुधिरादिग्धं सपन्नगमिवाचलम् ४० तामपि प्रहितां शक्तिं रावणेन बलीयसा । यत्नतस्ते हरिश्रेष्ठा न शेकुरवमर्दितुम् ४१ अर्दिताश्चैव बाणौघैस्ते प्रवेकेण रक्षसाम् । सौमित्रेः सा विनिर्भिद्य प्रविष्टा धरणीतलम् ४२ तां कराभ्यां परामृश्य रामः शक्तिं भयावहाम् । बभञ्ज समरे क्रुद्धो बलवान्विचकर्ष च ४३ तस्य निष्कर्षतः शक्तिं रावणेन बलीयसा । शरा सर्वेषु गात्रेषु पातिता मर्मभेदिनः ४४ अचिन्तयित्वा तान्बाणान्समाश्लिष्य च लक्ष्मणम् । अब्रवीच्च हनूमन्तं सुग्रीवं च महाकपिम् ४५ लक्ष्मणं परिवार्यैवं तिष्ठध्वं वानरोत्तमाः । पराक्रमस्य कालोऽयं संप्राप्तो

---

वेगामुळें अतिशयच रुतलेल्या त्या शक्तीनें हृदय विदीर्ण होऊन लक्ष्मण भूमीवर पडला असतां ३६ लक्ष्मणाची ती अवस्था पाहून समीपच असलेला महातेजस्वी राम भ्रातृवत्सलतेमुळें मनामध्यें खिन्न झाला ३७; त्याचे नेत्र अश्रूंनीं व्याप्त झाले आणि क्षणभर विचार केल्यानंतर प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें तो अतिशयच खिन्न झाला ३८. " खेद करीत बसण्याची ही वेळ नव्हे " असा विचार करून आणि लक्ष्मणाकडे पाहून रावणाच्या वधाविषयीं निश्चित झालेल्या त्या रावणानें अतिशयच तुमुल युद्ध केलें ३९. नंतर महासंग्रामामध्यें शक्तीनें हृदय विदीर्ण होऊन पडलेल्या आणि ह्मणूनच रक्तानें भरलेल्या लक्ष्मणाकडे राम पाहूं लागला असतां सर्पयुक्त पर्वताप्रमाणें त्याला तो दिसला ४०. बलाढ्य रावणानें टाकिलेली ती शक्ति लक्ष्मणाच्या शरीरांतून उपटून काढण्याला मोठे मोठे वानरश्रेष्ठ नेटानें यत्न करूनही समर्थ झाले नाहींत ४१. कारण, राक्षसश्रेष्ठ रावणानें बाणसमुदायांनीं त्या वानरांना जर्जर करून टाकिलें होतें. असो. लक्ष्मणाचें हृदय फाडून ती शक्ति भूतलामध्यें रुतली ४२; तथापि, ती भयंकर शक्ति हातामध्यें धरून क्रुद्ध झालेल्या बलाढ्य रामानें उपटून काढिली आणि समरांगणामध्यें मोडून टाकिली ४३. राम शक्ति ओढून काढूं लागला असतां बलाढ्य रावणानें त्याच्या सर्व अवयवांचे ठिकाणीं मर्मभेदक बाण टाकिले ४४; तथापि, त्या बाणांचीही पर्वा न करितां लक्ष्मणाला कवटाळून धरून हनुमानाला व कपिश्रेष्ठ सुग्रीवाला राम ह्मणाला ४५ 'हे वानरश्रेष्ठहो, ह्याप्रमाणें तुह्मी लक्ष्मणाभोंवतीं जुळून उभे रहा. पुष्कळ दिवसांपासून

मे चिरेप्सितः ४६ पापात्मायं दशग्रीवो वध्यतां पापनिश्चयः । काङ्क्षितं चातकस्येव घर्मान्ते मेघदर्शनम् ४७ अस्मिन्मुहूर्ते न चिरात्सत्यं प्रतिशृणोमि वः । अरावणमरामं वा जगद्द्रक्ष्यथ वानराः ४८ राज्यनाशं वने वासं दण्डके परिधावनम् । वैदेह्याश्च परामर्शो रक्षोभिश्च समागमम् ४९ प्राप्तं दुःखं महद्घोरं क्लेशश्च निरयोपमः । अद्य सर्वमहं त्यक्ष्ये निहत्वा रावणं रणे ५० यदर्थं वानरं सैन्यं समानीतमिदं मया । सुग्रीवश्च कृतो राज्ये निहत्वा वालिनं रणे ५१ यदर्थं सागरः क्रान्तः सेतुर्बद्धश्च सागरे ५२ सोऽयमद्य रणे पापश्चक्षुर्विषयमागतः । चक्षुर्विषयमागम्य नायं जीवितुमर्हति ५३ दृष्टिं दृष्टिविषस्येव सर्पस्य मम रावणः । यथा वा वैनतेयस्य दृष्टिं प्राप्तो भुजङ्गमः ५४ सुखं पश्यथ दुर्धर्षा युद्धं वानरपुङ्गवाः । आसीनाः पर्वताग्रेषु ममेदं रावणस्य च ५५ अद्य पश्यन्तु रामस्य रामत्वं मम संयुगे । त्रयो लोकाः सगन्धर्वाः सिद्धगन्धर्वचारणाः ५६ अद्य कर्म करिष्यामि यल्लोकाः सचराचराः । सदेवाः कथयिष्यन्ति यावद्भूमिर्धरिष्यति ५७एव-

---

माझ्या मनामध्यें असलेला पराक्रमाचा काल हा आतांच प्राप्त झाला आहे ४६. ग्रीष्मकाल संपल्यानंतर मेघदर्शन होईल ह्मणून ज्याप्रमाणें चातकपक्ष्याच्या मनांत घोळत असतें त्याप्रमाणें ह्या पापबुद्धि रावणाचा वध केला पाहिजे असें माझ्या मनामध्यें एकसारिखें घोळत होतें ४७; परंतु, विलंब न लावितां ह्या मुहूर्तामध्यें, हे वानरहो, हें जगत् रावणरहित अथवा रामरहित तुह्मी अवलोकन कराल हें मी तुह्माला प्रतिज्ञेनें खरें सांगतों ४८. राज्याचा नाश, वनामध्यें वास्तव्य, दंडकारण्यामध्यें हिंडणें, सीताहरण, राक्षसांशीं समागम ४९ इत्यादिकांमुळें मोठें घोर दुःख प्राप्त होऊन नरकतुल्य क्लेश झालेले आहेत; परंतु, त्या सर्वांचा संग्रामामध्यें रावणाचा वध करून मी आज त्याग करीन ५०. ज्याकरितां हें वानरसैन्य मीं येथें आणिलें; ज्याच्याकरितां संग्रामामध्यें वालीचा वध करून सुग्रीवाला राज्यावर स्थापिलें ५१; ज्याच्याकरितां समुद्रावें उल्लंघन केलें आणि ज्याच्याकरितां समुद्रामध्यें सेतु बांधिला ५२, तो हा पापी संग्रामामध्यें आज माझ्या दृष्टीसमोर आला आहे. दृष्टीसमोर आल्यानंतर हा जिवंत परत जाण्यास योग्य नाहीं ५३. सारांश, गरुडाच्या दृष्टीं पडलेला भुजंग ज्याप्रमाणें जिवंत परत जाण्यास समर्थ होत नाहीं त्याप्रमाणें सर्पासारिख्या विषयुक्त दृष्टीनें संपन्न असलेल्या माझ्या दृष्टीं पडल्यानंतर रावण जिवंत जाणें शक्य नाहीं ५४. हे अजिंक्य वानरश्रेष्ठहो, पर्वतशिखरावर बसून तुह्मी हें माझें व रावणाचें युद्ध स्वस्थपणानें पहा ५५. गंधर्व, सिद्ध व चारण ह्यांसहवर्तमान त्रैलोक्याला मज रामाचें रामत्व

मुक्त्वा शितैर्बाणैस्तप्तकाञ्चनभूषणैः । आजघान रणे रामो दशग्रीवं समाहितः ५८ तथा प्रविद्धैर्नाराचैर्मुसलैश्चापि रावणः । अभ्यवर्षत्तदा रामं धाराभिरिव तोयदः ५९ रामरावणमुक्तानामन्योन्यमभिनिघ्नताम् । वराणां च शराणां च बभूव तुमुलः स्वनः ६० विच्छिन्नाश्च विकीर्णाश्च रामरावणयोः शराः । अन्तरिक्षात्प्रदीप्ताग्रा निपेतुर्धरणीतले ६१ तयोर्ज्यातलनिर्घोषो रामरावणयोर्महान् । त्रासनः सर्वभूतानां बभूवाद्भुतदर्शनः ६२ विकीर्यमाणः शरजालवृष्टिर्महात्मना दीप्तधनुष्मतार्दितः । भयात्प्रदुद्राव समेत्य रावणो यथानिलेनाभिहतो बलाहकः ६३ [ ४५५५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे शततमः सर्गः ॥ १०० ॥

शक्त्या निपातितं दृष्ट्वा रावणेन बलीयसा । लक्ष्मणं समरे शूरं शोणितौघपरिप्लुतम् १ स दत्त्वा तुमुलं युद्धं रावणस्य दुरात्मनः । विसृजन्नेव बाणौघान्सुषेणमिदमब्रवीत् २ एष रावणवीर्येण लक्ष्मणः पतितो भुवि ।

---

संग्रामामध्यें आज दृष्टीं पडेल ५६. चराचर प्राणी व देव ह्यांसहवर्तमान सर्व लोक पृथ्वी आहे तोंपर्यंत ज्याची प्रशंसा करीत राहतील असें कर्म मी आज करीन " ५७. ह्याप्रमाणें बोलल्यानंतर गोंधळून न गेलेल्या रामानें उज्ज्वल सुवर्णभूषणांनीं युक्त असलेल्या तीक्ष्ण बाणांच्या योगानें संग्रामामध्यें रामाला वेध केला ५८. त्याचप्रमाणें मेघ ज्याप्रमाणें धारांच्या योगानें वृष्टि करितो त्याप्रमाणें घांसलेले नाराच बाण व मुसळें ह्यांच्या योगानें रावणानें रामावर वृष्टि केली ५९. एकमेकांला वेध करणाऱ्या रामरावणांनीं सोडिलेल्या श्रेष्ठ बाणांचा तुमुल ध्वनि होऊं लागला ६०; छिन्नभिन्न होऊन अस्ताव्यस्त झालेले व उज्ज्वल अग्रांनीं युक्त असलेले रामरावणांचे बाण अंतरिक्षांतून भूतलावर पडूं लागले ६१. त्या रामरावणांच्या प्रत्यंचेचा व हस्ततलाचा प्रचंड घोष होऊं लागला आणि त्या अद्भुत घोषामुळें सर्व प्राणी त्रस्त होऊं लागले ६२. बाणसमुदायांची ज्याच्यावर वृष्टि होत आहे आणि ह्मणूनच जो बाणांनीं व्याप्त झालेला आहे अशा रावणाला उज्ज्वल धनुष्य धारण केलेल्या महात्म्या रामानें जेरीस आणि- त्यामुळें वायूचा तडाका बसला असतां ज्याप्रमाणें मेघ पलायन करितो त्याप्रमाणें रामाशीं प्रसंग पडला असतां तो रावण भीतीनें पळून गेला ६३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं शंभरावा सर्ग समाप्त झाला ॥ १०० ॥

बलाढ्य रावणानें शक्ति टाकून संग्रामामध्यें पाडिलेल्या व रक्तप्रवाहानें भरून गेलेल्या शूर लक्ष्मणाला अवलोकन केल्यानंतर १ आणि त्या दुरात्म्या रावणाशीं तुमुल युद्ध

सर्पवच्चेष्टते वीरो मम शोकमुदीरयन् ३ शोणितार्द्रमिमं वीरं प्राणैः प्रियतरं मम । पश्यतो मम का शक्तिर्योद्धुं पर्याकुलात्मनः ४ अयं स समरश्लाघी भ्राता मे शुभलक्षणः । यदि पञ्चत्वमापन्नः प्राणैर्मे किं सुखेन वा ५ लज्जतीव हि मे वीर्यं भ्रश्यतीव कराद्धनुः । सायका व्यवसीदन्ति दृष्टिर्बाष्पवशं गता ६ अवसीदन्ति गात्राणि स्वप्नयाने नृणामिव । चिन्ता मे वर्तते तीव्रा मुमूर्षापि च जायते ७ भ्रातरं निहतं दृष्ट्वा रावणेन दुरात्मना। विष्टनन्तं तु दुःखार्तं मर्मण्यभिहतं भृशम् ८ परं विषादमापन्नो विललापाकुलेन्द्रियः । भ्रातरं निहतं दृष्ट्वा लक्ष्मणं रणपांसुषु ९ विजयोऽपि हि मे शूर न प्रियायोपकल्पते । अचक्षुर्विषयश्चन्द्रः कां प्रीतिं जनयिष्यति १० किं मे युद्धेन किं प्राणैर्युद्धकार्यं न विद्यते । यत्रायं निहतः शेते रणमूर्धनि लक्ष्मणः ११ यथैव मां वनं यान्तमनुयाति महाद्युतिः । अहमप्य-

---

केल्यानंतर बाणसमुदाय टाकीत टाकीतच राम सुषेणाला ह्मणाला २ " रावणाच्या पराक्रमानें भूमीवर पडलेला हा वीर लक्ष्मण सर्पाप्रमाणें तडफडत आहे त्यामुळें मला दुःख होत आहे ३. प्राणापेक्षांही मला प्रिय असलेला हा वीर रक्तानें भरलेला माझ्या दृष्टीं पडत असल्यामुळें मनामध्यें गोंधळून गेलेल्या मला युद्ध करण्याचें सामर्थ्य कोठून असणार ? ४. तो हा माझा संग्रामविजयी व शुभ लक्षणांनीं संपन्न असलेला भ्राता जर मृत्यु पावला आहे तर प्राणांशीं मला काय कर्तव्य आहे ? अथवा सुख तरी मला पाहिजे कशाला ? ५ माझें वीर्य जसें कांहीं लज्जित झालें असून माझ्या हातांतून धनुष्य जसें कांहीं पडण्याच्या बेतांत आलें आहे. बाण भात्यांतच रुपून बसू लागले आहेत आणि अश्रूमुळें दृष्टीलाही अंधारी आलेली आहे ६. स्वप्नामध्यें गमन केलें असतांही ज्याप्रमाणें कधीं कधीं लोकांचें अंग मोडून येतें त्याप्रमाणें माझें अंग मोडून आलें आहे, मला फारच काळजी लागली आहे व मूर्च्छाही येत आहे " ७. दुरात्म्या रावणानें मर्मस्थानीं फारच वेगानें प्रहार केल्यामुळें दुःखाकुल होऊन कण्हत कण्हत मरत पडलेल्या भ्रात्याला अवलोकन करून ८ अंतःकरणामध्यें व्याकुल झालेला राम अतिशय खिन्न होऊन विलाप करू लागला. " रणांतील धुळीमध्यें मारून टाकिलेल्या भ्रात्या लक्ष्मणाला अवलोकन केल्यावर ९, हे शूरा, जरी विजय प्राप्त झाला तरी मला बरें वाटणार नाहीं. कारण, डोळ्याआड झालेला हा लक्ष्मणरूप चंद्र मला कसा बरें आनंद उत्पन्न करील ? १०. ज्याअर्थी संग्रामामध्यें हा लक्ष्मण वध पावून पडला आहे त्याअर्थी युद्धाची अथवा प्राणांची आतां मला जरूर काय आहे ? युद्धाचें मला आतां प्रयोजनच उरलें नाहीं ११. ज्याप्रमाणें हा महातेजस्वी

नुयास्यामि तथैवैनं यमक्षयम् १२ इष्टबन्धुजनो नित्यं मां स नित्यमनुव्रतः। इमामवस्थां गमितो राक्षसैः कूटयोधिभिः १३ देशेदेशे कलत्राणि देशेदेशे च बान्धवाः। तं तु देशं न पश्यामि यत्र भ्राता सहोदरः १४ किं नु राज्येन दुर्धर्ष लक्ष्मणेन विना मम। कथं वक्ष्याम्यहं त्वम्बां सुमित्रां पुत्रवत्सलाम् १५ उपालम्भं न शक्ष्यामि सोढुं दत्तं सुमित्रया। किं नु वक्ष्यामि कौसल्यां मातरं किं नु कैकयीम् १६ भरतं किं नु वक्ष्यामि शत्रुघ्नं च महाबलम्। सह तेन वनं यातो विना तेनागतः कथम् १७ इहैव मरणं श्रेयो न तु बन्धुविगर्हणम्। किं मया दुष्कृतं कर्म कृतमन्यत्र जन्मनि १८ येन मे धार्मिको भ्राता निहतश्चाग्रतः स्थितः। हा भ्रातर्मनुजश्रेष्ठ शूराणां प्रवर प्रभो १९ एकाकी किं नु मां त्यक्त्वा परलोकाय गच्छसि। विलपन्तं च मां भ्रातः किमर्थं नावभाषसे॥ उत्तिष्ठ पश्य किं शेषे दीनं मां पश्य चक्षुषा २० शोकार्तस्य प्रमत्तस्य पर्वतेषु वनेषु च। विषण्णस्य महाबाहो समाश्वासयिता मम २१ राममेवं ब्रुवाणं तु शोकव्याकुलितेन्द्रियम्। आश्वासय-

---

लक्ष्मण आजपर्यंत वनामध्यें माझ्या मागोमाग आला आहे त्याचप्रमाणें मीही त्याच्या मागोमाग यमसदनीं चालता होईन १२. इष्टबंधु असलेला तो लक्ष्मण नेहमीं माझ्या इच्छेप्रमाणें वागत असे; परंतु, ह्या वेळीं कपटाचें अवलंबन करून युद्ध करणाऱ्या राक्षसांनीं त्याची अशी अवस्था करून टाकिली आहे १३. ठिकठिकाणीं भार्या आहेत व ठिकठिकाणीं बांधवही आहेत; परंतु, लक्ष्मणासारिखा भ्राता कोठें दृष्टीं पडेल असें मला वाटत नाहीं १४. हे अजिंक्य, तुज लक्ष्मणावांचून मला राज्याशीं काय कर्तव्य आहे ? पुत्रवत्सला सुमित्रामातेशीं मी आतां बोलूं तरी काय ? १५. सुमित्रेनें केलेलें उपरोधिक भाषण सहन करण्यास मी समर्थ होणार नाहीं. माता कौसल्येला आणि त्याचप्रमाणें कैकेयीला मीं काय सांगावें ? १६. महाबलाढ्य शत्रुघ्नाला व भरताला तरी मी आतां काय सांगूं ? त्याच्यासहवर्तमान वनामध्यें गेलों व त्याच्यावांचून परत आलों हे शब्द माझ्या मुखांतून निघतील तरी कसे ? १७. बांधवांच्या निंदेला पात्र होण्यापेक्षां येथेंच मरण येणें श्रेयस्कर आहे. तरी माझा धर्मनिष्ठ भ्राता माझ्यासमोर वध पावून पडावा असें मीं काय बरें जन्मांतरीं दुष्कर्म केलें आहे ? हे पुरुषश्रेष्ठा, हे भ्रात्या, हे शूरांमध्यें श्रेष्ठ, हे प्रभो, १८,१९ मला सोडून तूं एकटाच कां बरें परलोकीं जात आहेस ? हे भ्रात्या, विलाप करीत असलेल्या माझ्याशीं तूं कां बरें भाषण करीत नाहींस ? ऊठ आणि माझ्याकडे पहा. असा कां निजला आहेस ? मज दीनाकडे एकवार दृष्टि दे २०. हे महापराक्रमी लक्ष्मणा, पर्वत व वनें ह्यांचे ठिकाणीं शोकाकुल,

श्रुत्वाचेदं सुषेणः परमं वचः २२ त्यजेमां नरशार्दूल बुद्धिं वैक्लव्यकारिणीम् । शोकसंजननीं चिन्तां तुल्यां बाणैश्चमूमुखे २३ नैव पञ्चत्वमापन्नो लक्ष्मणो लक्ष्मिवर्धनः । न ह्यस्य विकृतं वक्त्रं न च श्यामत्वमागतम् २४ सुप्रभं च प्रसन्नं च मुखमस्य निरीक्ष्यताम् । पद्मपत्रतलौ हस्तौ सुप्रसन्ने च लोचने २५ नेदृशं दृश्यते रूपं गतासूनां विशाम्पते । विषादं मा कृथा वीर सप्राणोऽयमरिन्दम २६ आख्याति तु प्रसुप्तस्य स्रस्तगात्रस्य भूतले । सोच्छ्वासं हृदयं वीर कम्पमानं मुहुर्मुहुः २७ एवमुक्त्वा महाप्राज्ञः सुषेणो राघवं वचः । समीपस्थमुवाचेदं हनूमन्तं महाकपिम् २८ सौम्य शीघ्रमितो गत्वा पर्वतं हि महोदयम् । पूर्वं तु कथितो योऽसौ वीर जाम्बवता तव २९ दक्षिणे शिखरे जातां महौषधिमिहानय । विशल्यकरणीं नाम्ना सावर्ण्यकरणीं तथा ३० संजीवकरणीं वीर संधानीं च महौषधीम् । संजीवनार्थं वीरस्य लक्ष्मणस्य त्वमानय ३१ इत्येवमुक्तो हनुमान्गत्वा चौषधिपर्वतम् । चिन्तामभ्यगमच्छ्रीमानजानंस्ता महौषधीः ३२

---

बेफाम व खिन्न झालेल्या मला धीर देणारा तूं आहेस" २१. शोकानें ज्याचें अंतःकरण व्याप्त झालेलें आहे असा राम ह्याप्रमाणें बोलूं लागला असतां त्याला धीर देण्याकरितां उत्कृष्ट शब्दांनीं सुषेण ह्मणाला २२ "हे पुरुषश्रेष्ठा, संग्रामामध्यें मोह उत्पन्न करणारी ही बुद्धि आणि बाणाप्रमाणें सोडण्यासच योग्य असलेली ही दुःखकारक चिंता तूं सोडून दे २३. लक्ष्मी वृद्धिंगत करणारा लक्ष्मण मरण पावला नाहीं. कारण, ह्याच्या मुखावर विकार दिसत नाहीं व ह्याचें मुख काळेंही पडलें नाहीं २४. सतेज आणि टवटवीत असें ह्याचें मुख, कमलाच्या पानाप्रमाणें ह्याचे हात व सुप्रसन्न नेत्र तूं अवलोकन कर २५. हे प्रजाधिपते, मतप्राण झालेल्याचें रूप असें दिसत नाहीं. हे वीरा, तूं खेद करूं नको. हे शत्रुदमना, हा जिवंत आहे २६. गात्रें शिथिल होऊन भूतलावर निद्रिस्थ झालेल्या ह्या लक्ष्मणाचें हृदय एकसारिखें धडधड उडत आहे ह्यावरून, हे वीरा, हा जिवंत असल्याचें सिद्ध होत आहे" २७. महाबुद्धिमान् सुषेण रामाला असें सांगून समीप असलेल्या महाकपि हनुमानाला ह्मणाला २८ "हे विनयसंपन्न वीरा, जांबवानानें पूर्वी जो हा पर्वत तुला सांगितला आहे त्या महोदयपर्वतावर तूं येथून सत्वर जा २९ आणि त्याच्या दक्षिणशिखरावर उगवलेली महौषधि तूं येथें घेऊन ये. विशल्यकरणी, सावर्ण्यकरणी ३०, संजीवकरणी आणि, हे वीरा, संधानी महौषधि वीर लक्ष्मणाच्या संजीवनाकरितां तूं घेऊन ये" ३१. ह्याप्रमाणें सुषेणानें सांगितलें असतां हनुमान् औषधिपर्वतावर गेला परंतु, त्या महौषधि कोणत्या हें ठाऊक नस-

तस्य बुद्धिः समुत्पन्ना मारुतेरमितौजसः । इदमेव गमिष्यामि गृहीत्वा शिखरं गिरेः ३३ अस्मिंस्तु शिखरे जातामोषधीं तां सुखावहाम् । प्रतर्केणावगच्छामि सुषेणो ह्येवमब्रवीत् ३४ अगृह्य यदि गच्छामि विशल्यकरणीमहम् । कालात्ययेन दोषः स्याद्वैक्लव्यं च महद्भवेत् ३५ इति संचिन्त्य हनुमान्गत्वा क्षिप्रं महाबलः । आसाद्य पर्वतश्रेष्ठं त्रिः प्रकम्प्य गिरेस्तटम् ३६ फुल्लनानातरुगणं समुत्पाट्य महाबलः । गृहीत्वा हरिशार्दूलो हस्ताभ्यां समतोलयत् ३७ स नीलमिव जीमूतं तोयपूर्णं नभस्तलात् । उत्पपात गृहीत्वा तु हनूमाञ्शिखरं गिरेः ३८ समागम्य महावेगः संन्यस्य शिखरं गिरेः । विश्रम्य किंचिद्धनुमान्सुषेणमिदमब्रवीत् ३९ ओषधीर्नावगच्छामि ता अहं हरिपुङ्गव । तदिदं शिखरं कृत्स्नं गिरेस्तस्याहृतं मया ४० एवं कथयमानं तु प्रशस्य पवनात्मजम् । सुषेणो वानरश्रेष्ठो जग्राहोत्पाट्य चौषधीः ४१ विस्मितास्तु बभूवुस्ते सर्वे वानरपुङ्गवाः । दृष्ट्वा तु हनुमत्कर्म सुरैरपि सुदुष्करम् ४२ ततः संक्षोदयित्वा

---

त्यामुळें तो श्रीमान् हनुमान् तेथें जाऊन चिंताक्रांत झाला ३२. परंतु, अपरिमित सामर्थ्यवान् वायुपुत्र हनुमानाला बुद्धि सुचली. "हें पर्वताचें शिखरच घेऊन मी जातों म्हणजे झालें ३३. कारण ती सुखावह ओषधि ह्याच शिखरावर उमवलेली आहे असा माझा तर्क आहे व सुषेणानेंही ह्याप्रमाणेंच शिखराची खूण सांगितली आहे ३४. विशल्यकरणी ओषधि घेतल्याशिवाय जर मी जाईन तर तेथें मोठाच हाहाकार उडून जाईल आणि असाच विचार करीत बसलों तर विलंब झाल्यामुळें लक्ष्मण प्राणाला मुकल्याचा दोष पदरीं घ्यावा लागेल " ३५. ह्याप्रमाणें विचार करून महाबलाढ्य हनुमान् सत्वर चालता झाला. त्या श्रेष्ठ पर्वतासमीप गेल्यावर त्यानें त्या पर्वताचें शिखर तीन वेळ हालविलें ३६. नंतर ज्याच्यावर नानाप्रकारचे वृक्षसमुदाय प्रफुल्लित झालेले आहेत असें तें शिखर वानरश्रेष्ठ महाबलाढ्य हनुमानानें उपटून घेऊन हातानें तोलून धरिलें ३७ आणि आकाशांतून जलपूर्ण नील मेघच घेऊन जात आहे कीं काय अशा रीतीनें तें पर्वताचें शिखर घेऊन हनुमानानें उड्डाण केलें ३८. नंतर तो महावेगवान् हनुमान् परत येतांक्षणीं पर्वताचें शिखर खालीं ठेवून किंचित् विश्रांति घेतल्यासारिखें केल्यावर सुषेणाला म्हणाला ३९ " हे वानरश्रेष्ठा, त्या ओषधि कोणत्या हें मला ठाऊक नाहीं म्हणून तें हें त्या पर्वताचें संपूर्ण शिखरच मीं येथें आणिलें आहे" ४०. ह्याप्रमाणें वायुपुत्र हनुमान् सांगूं लागला असतां त्याची प्रशंसा करून वानरश्रेष्ठ सुषेणानें त्या शिखरावरील ओषधि उपटून घेतल्या ४१. तेव्हां देवांनाही अत्यंत दुर्घट असें

तामोषधीं वानरोत्तमः । लक्ष्मणस्य ददौ नस्तः सुषेणः सुमहाद्युतिः ४३ सशल्यः स समाघ्राय लक्ष्मणः परवीरहा । विशल्यो विरुजः शीघ्रमुदतिष्ठन्महीतलात् ४४ तमुत्थितं तु हरयो भूतलात्प्रेक्ष्य लक्ष्मणम् । साधु साध्विति सुप्रीता लक्ष्मणं प्रत्यपूजयन् ४५ एह्येहीत्यब्रवीद्रामो लक्ष्मणं परवीरहा । सस्वजे गाढमालिङ्ग्य बाष्पपर्याकुलेक्षणः ४६ अब्रवीच्च परिष्वज्य सौमित्रिं राघवस्तदा । दिष्ट्या त्वां वीर पश्यामि मरणात्पुनरागतम् ४७ न हि मे जीवितेनार्थः सीतया च जयेन वा । को हि मे जीवितेनार्थस्त्वयि पञ्चत्वमागते ४८ इत्येवं ब्रुवतस्तस्य राघवस्य महात्मनः । खिन्नः शिथिलया वाचा लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् ४९ तां प्रतिज्ञां प्रतिज्ञाय पुरा सत्यपराक्रम । लघुः कश्चिदिवासत्त्वो नैवं त्वं वक्तुमर्हसि ५० न हि प्रतिज्ञां कुर्वन्ति वितथां सत्यवादिनः । लक्षणं हि महत्त्वस्य प्रतिज्ञापरिपालनम् ५१ नैराश्यमुपगन्तुं च नालं ते मत्कृतेऽनघ । वधेन रावणस्याद्य प्रतिज्ञामनुपालय ५२ न जीवन्यास्यते शत्रुस्तव बाणवशं गतः । नर्दतस्तीक्ष्णदंष्ट्रस्य सिंहस्येव महागजः ५३ अहं तु वधमिच्छामि शीघ्र-

---

तें हनुमानाचें कर्म पाहून ते सर्वही वानरश्रेष्ठ विस्मयचकित झाले ४२. तदनंतर ती ओषधि ठेवून अति तेजस्वी वानरश्रेष्ठ सुषेणानें लक्ष्मणाच्या नाकांत घातली ४३. तेव्हां ज्याच्या शरीरामध्यें शल्यें रुतून बसलेलीं आहेत असा तो परवीरनाशक लक्ष्मण ती ओषधि हुंगतांक्षणीं शल्यरहित व व्यथारहित होऊन भूतलावरून उठला ४४. ह्याप्रमाणें लक्ष्मण भूतलावरून उठल्याचें पहातांक्षणीं वानरांनीं सुप्रसन्न होऊन " शाबास, शाबास " अशी लक्ष्मणाची प्रशंसा केली ४५. अश्रूंनीं नेत्र भरून आलेला परवीरनाशक राम " ये ये " असें लक्ष्मणाला ह्मणाला; त्याला कडकडून भेटला ४६ आणि कवटाळून धरिल्यानंतर तो पुनरपि त्याला ह्मणाला "हे वीरा, परलोकीं जाऊन परत आलेला सुदैवानें तूं माझ्या दृष्टीं पडत आहेस ४७. जीवित, सीता आणि जय ह्यांच्याशीं मला कांहीं एक कर्तव्य नव्हतें. कारण, तूं मरण पावल्यावर जीविताचा मला काय उपयोग आहे ? " ४८. ह्याप्रमाणें तो महात्मा राम बोलूं लागला असतां त्याच्या निराशेच्या भाषणानें खिन्न होऊन लक्ष्मण त्याला ह्मणाला ४९ " हे सत्यपराक्रमी रामा, ती प्रतिज्ञा करून एखाद्या यःकश्चित् दुर्बल पुरुषाप्रमाणें असें भाषण करणें तुला योग्य नाहीं ५०. सत्यवादी आपली प्रतिज्ञा व्यर्थ करीत नसतात. प्रतिज्ञा शेवटास नेणें हेंच मोठेपणाचें लक्षण होय ५१. हे निष्पापा, माझ्याकरितां निराश होणें तुला योग्य नाहीं. आज रावणाचा वध करून तूं आपली प्रतिज्ञा शेवटास ने ५२. तीक्ष्ण दंष्ट्रांनीं युक्त

मस्य दुरात्मनः । यावदस्तं न यात्येष कृतकर्मा दिवाकरः ५४ यदि वधमिच्छसि रावणस्य संख्ये यदि च कृतां हि तवेच्छसि प्रतिज्ञाम् । यदि तव राजसुताभिलाष आर्य कुरु च वचो मम शीघ्रमद्य वीर ५५ [ ४६१० ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकाधिकशततमः सर्गः ॥ १०१ ॥

लक्ष्मणेन तु तद्वाक्यमुक्तं श्रुत्वा स राघवः । संदधे परवीरघ्नो धनुरादाय वीर्यवान् १ रावणाय शरान्घोरान्विससर्ज चमूमुखे । अथान्यं रथमास्थाय रावणो राक्षसाधिपः २ अभ्यधावत काकुत्स्थं स्वर्भानुरिव भास्करम् । दशग्रीवो रथस्थस्तु रामं वज्रोपमैः शरैः ॥ आजघान महाशैलं धाराभिरिव तोयदः ३ दीप्तपावकसंकाशैः शरैः काञ्चनभूषणैः ४ अभ्यवर्षद्रणे रामो दशग्रीवं समाहितः । भूमौ स्थितस्य रामस्य रथस्थस्य च रक्षसः ५ न समं युद्धमित्याहुर्देवगन्धर्वकिंनराः । ततो देववरः श्रीमाञ्श्रुत्वा तेषां वचोमृतम् ६ आहूय मातलिं शक्रो वचनं चेदमब्रवीत् ।

---

व गर्जना करीत असलेल्या सिंहाच्या तावडींत सांपडलेल्या महागजाप्रमाणें तुझ्या बाणांचे तावडींत सांपडलेला शत्रु जिवंत परत जाणार नाहीं ५३. लोकांवर अनुग्रह करून हा सूर्य अस्तास जाण्यापूर्वींच ह्या दुरात्म्याचा सत्वर वध व्हावा अशी माझी इच्छा आहे ५४. सारांश, संग्रामामध्यें रावणाचा वध करण्याची जर तुझी इच्छा असेल; आपली प्रतिज्ञा शेवटास नेण्याचें जर तुझ्या मनांत असेल आणि त्याचप्रमाणें राजकन्या सीतेची जर तुला गरज असेल तर, हे सज्जना वीरा, आज मी सांगतों तें तूं सत्वर कर " ५५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें एक सर्ग समाप्त झाला ॥ १०१ ॥

लक्ष्मणानें केलेलें तें भाषण श्रवण केल्यावर परवीरनाशक वीर्यवान् रामानें धनुष्य घेऊन शरसंधान केलें १ व रावणावर संग्रामामध्यें त्यानें घोर बाण सोडिले. नंतर राक्षसाधिपति रावण दुसऱ्या रथावर आरूढ झाला २ आणि सूर्याकडे धांवणाऱ्या राहूप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न रामावर धांवून गेला. नंतर मेघ ज्याप्रमाणें धारांच्या योगानें महापर्वतावर हल्ला करितो त्याप्रमाणें रथारूढ झालेल्या रावणानें वज्रतुल्य बाणांनीं रामावर हल्ला केला असतां प्रदीप्त अग्नीप्रमाणें दिसत असलेल्या सुवर्णभूषित बाणांनीं ३.४ रामानेंही स्वस्थपणें रावणावर वर्षाव केला. भूमीवर असलेल्या रामाचें आणि रथारूढ झालेल्या राक्षसाचें ५ युद्ध सारखें नव्हे असें देव, गंधर्व व किंनर म्हणाले असतां त्यांचें अमृततुल्य भाषण श्रवण करून सुरश्रेष्ठ वैभवशाली ६ इंद्र मातलीला हाक

रथेन मम भूमिष्ठं शीघ्रं याहि रघूत्तमम् ७ आहूय भूतलं यातः कुरु देवहितं महत् । इत्युक्तो देवराजेन मातलिर्देवसारथिः ८ प्रणम्य शिरसा देवं ततो वचनमब्रवीत् । शीघ्रं यास्यामि देवेन्द्र सारथ्यं च करोम्यहम् ९ ततो हयैश्च संयोज्य हरितैः स्यन्दनोत्तमम् । ततः काञ्चनचित्राङ्गः किङ्किणीशतभूषितः १० तरुणादित्यसंकाशो वैदूर्यमयकूबरः । सदश्वैः काञ्चनापीडैर्युक्तः श्वेतप्रकीर्णकैः ११ हरिभिः सूर्यसंकाशैर्हेमजालविभूषितैः । रुक्मवेणुध्वजः श्रीमान्देवराजरथो वरः १२ देवराजेन संदिष्टो रथमारुह्य मातलिः । अभ्यवर्तत काकुत्स्थमवतीर्य त्रिविष्टपात् १३ अब्रवीच्च तदा रामं सप्रतोदो रथे स्थितः । प्राञ्जलिर्मातलिर्वाक्यं सहस्राक्षस्य सारथिः १४ सहस्राक्षेण काकुत्स्थ रथोऽयं विजयाय ते । दत्तस्तव महासत्त्व श्रीमञ्शत्रुनिबर्हण १५ इदमैन्द्रं महच्चापं कवचं चाग्निसंनिभम् । शराश्चादित्यसंकाशाः शक्तिश्च विमला शिवा १६ आरुह्येमं रथं वीर राक्षसं जहि रावणम् । मया सारथिना देव महेन्द्र इव दानवान् १७

---

मारून ह्मणाला "माझा रथ घेऊन भूमीवर असलेल्या रघुवंशजश्रेष्ठ रामाकडे तूं सत्वर जा ७ आणि भूतलावर गेल्यानंतर तूं त्याला हाक मारून देवांचें मोठें हित कर." ह्याप्रमाणें देवराज इंद्रानें सांगितलें असतां देवसारथि मातलि ८ त्या देवाला मस्तकानें प्रणाम करून ह्मणाला "हे देवराज, मी सत्वर जातों आणि हरित अश्व उत्कृष्ट रथाला जोडून मी त्याचें सारथ्य करितों." तदनंतर सुवर्णानें ज्याचे अवयव चित्रविचित्र केलेले आहेत, लहान लहान शेंकडों घंटांनीं जो भूषित केलेला आहे ९. १०, बालसूर्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे, ज्याची दांडी वैदूर्य रत्नांनीं मढविलेली आहे, श्वेतवर्ण चामरादि अलंकार, सुवर्णभूषणें आणि सूर्यतुल्य प्रभा ह्यांनीं युक्त व सुवर्णजालांनीं विभूषित असे उत्कृष्ट अश्व ज्याला जोडिलेले आहेत आणि ज्याच्या ध्वजाची काठी सुवर्णानें मढविलेली आहे असा जो देवराज इंद्राचा व त्यानेंच न्यावयास सांगितलेला विजयावह श्रेष्ठ रथ, त्यावर मातली आरूढ झाला आणि स्वर्गापासून खालीं उतरून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचे समीप आला ११, १२, १३. हातामध्यें कोरडा घेऊन रथारूढ झालेला इंद्राचा सारथि मातली हात जोडून रामाला ह्मणाला १४ "हे वैभवशाली, हे शत्रुनाशका, हे महाशय, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना, इंद्रानें हा रथ जय प्राप्त होण्याकरितां तुला दिला आहे १५. त्याचप्रमाणें हें प्रचंड धनुष्य, अग्नीसारिखें देदीप्यमान कवच, सूर्यासारिखे तेजस्वी बाण आणि कल्याणकारक निर्मल शक्ति हींही तुला इंद्रानें दिलीं आहेत १६. तस्मात्, हे देवतुल्य वीरा, मी सारथि असतांना

इत्युक्तः संपरिक्रम्य रथं तमभिवाद्य च । आरुरोह तदा रामो लोकाल्लँक्ष्म्या विराजयन् १८ तद्बभौ चाद्भुतं युद्धं द्वैरथं रोमहर्षणम् । रामस्य च महाबाहो रावणस्य च राक्षसः १९ स गान्धर्वेण गान्धर्वं दैवं दैवेन राघवः । अस्त्रं राक्षसराजस्य जघान परमास्त्रवित् २० अस्त्रं तु परमं घोरं राक्षसं राक्षसाधिपः । ससर्ज परमक्रुद्धः पुनरेव निशाचरः २१ ते रावणधनुर्मुक्ताः शराः काञ्चनभूषणाः । अभ्यवर्तन्त काकुत्स्थं सर्पा भूत्वा महाविषाः २२ ते दीप्तवदना दीप्तं वमन्तो ज्वलनं मुखैः । राममेवाभ्यवर्तन्त व्यादितास्या भयानकाः २३ तैर्वासुकिसमस्पर्शैर्दीप्तभोगैर्महाविषैः । दिशश्च संतताः सर्वा विदिशश्च समावृताः २४ तान्दृष्ट्वा पन्नगान्रामः समापतत आहवे । अस्त्रं गारुत्मतं घोरं प्रादुश्चक्रे भयावहम् २५ ते राघवधनुर्मुक्ता रुक्मपुङ्खाः शिखिप्रभाः । सुपर्णाः काञ्चना भूत्वा विचेरुः सर्पशत्रवः २६ ते तान्सर्वाञ्शराञ्जघ्नुः सर्परूपान्महाजवान् । सुपर्णरूपा रामस्य

---

ज्याप्रमाणें इंद्र दानवांचा वध करितो त्याप्रमाणें तूं ह्या रथावर आरूढ होऊन मी सारथि असतांना रावण राक्षसाचा वध कर" १७. ह्याप्रमाणें मातलीनें सांगितलें असतां त्या रथाला प्रदक्षिणा करून व अभिवंदन करून कांतीच्या योगानें त्रैलोक्य प्रकाशित करीत करीत राम त्याच्यावर आरूढ झाला १८. तेव्हां राक्षस रावण व महापराक्रमी राम ह्यांमध्यें अंगावर कांटा आणणारें असें एकएकट्याचें अद्भुत युद्ध सुरू झालें १९. त्या परम अस्त्रवेत्त्या रामानें राक्षसराजाच्या गांधर्वास्त्राचा गांधर्वास्त्रानें व दैवास्त्राचा दैवास्त्रानें नाश केला २०. तेव्हां पुनरपि तो राक्षसाधिपति निशाचर अतिशय क्रुद्ध झाला आणि अतिशयच घोर असें राक्षसास्त्र त्यानें सोडिलें २१. तेव्हां रावणाच्या धनुष्यापासून सुटलेले व सुवर्णभूषणांनीं युक्त असलेले ते बाण मोठे मोठे विषारी सर्प बनून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडे निघाले २२. देदीप्यमान मुखानें युक्त, आ पसरल्यामुळें भयंकर आणि मुखांतून प्रदीप्त अग्नि टाकीत असलेले ते सर्परूप बाण रामाकडेच जाण्याकरितां निघाले २३. वासुकीप्रमाणें ज्यांचा तडाका आहे, ज्यांचीं शरीरें उज्ज्वल आहेत आणि ज्यांचें विष अति भयंकर आहे अशा त्या सर्परूप बाणांच्या योगानें सर्व दिशा भरून जाऊन विदिशाही व्याप्त झाल्या २४. असो. संग्रामामध्यें आपल्यावर चाल करून येणारे ते भुजंग अवलोकन करून भयंकर व घोर अशा गरुडास्त्राचा रामानें प्रयोग केला २५. तेव्हां रामाच्या धनुष्यापासून सुटलेले आणि सौवर्णपिच्छभागांनीं युक्त असलेले अग्नितुल्य तेजस्वी बाण सर्पांचे शत्रु असे सुवर्णवर्ण गरुड बनून संचार करूं लागले २६ आणि रामाच्या त्या यथेष्ट रूप धारण करणाऱ्या बाणांनीं सर्परूप

विशिखाः कामरूपिणः २७ अस्त्रे प्रतिहते क्रुद्धो रावणो राक्षसाधिपः।
अभ्यवर्षत्तदा रामं घोराभिः शरवृष्टिभिः २८ ततः शरसहस्रेण राममक्लिष्ट-
कारिणम्। अर्दयित्वा शरौघेण मातलिं प्रत्यविध्यत २९ चिच्छेद केतुमुद्दिश्य
शरेणैकेन रावणः। पातयित्वा रथोपस्थे रथात्केतुं च काञ्चनम् ३० ऐन्द्रा-
नपि जघानाश्वाञ्शरजालेन रावणः। विषेदुर्देवगन्धर्वचारणा दानवैः
सह ३१ राममार्तं तदा दृष्ट्वा सिद्धाश्च परमर्षयः। व्यथिता वानरेन्द्राश्च
बभूवुः सविभीषणाः ३२ रामचन्द्रमसं दृष्ट्वा ग्रस्तं रावणराहुणा। प्राजा-
पत्यं च नक्षत्रं रोहिणीं शशिनः प्रियाम् ३३ समाक्रम्य बुधस्तस्थौ प्रजा-
नामहितावहः। सधूमपरिवृत्तोर्मिः प्रज्वलन्निव सागरः ३४ उत्पपात तदा
क्रुद्धः स्पृशन्निव दिवाकरम् ३५ शस्त्रवर्णः सुपरुषो मन्दरश्मिर्दिवाकरः।
अदृश्यत कबन्धाङ्कः संसक्तो धूमकेतुना ३६ कोसलानां च नक्षत्रं व्यक्त-
मिन्द्राग्निदैवतम्। आहत्याङ्गारकस्तस्थौ विशाखमपि चाम्बरे ३७ दशास्यो
विंशतिभुजः प्रगृहीतशरासनः। अदृश्यत दशग्रीवो मैनाक इव पर्वतः ३८

---

व महावेगवान् अशा त्या सर्वही बाणांचा नाश केला २७. ह्याप्रमाणें अस्त्र हाणून पडलें असतां राक्षसाधिपति रावण क्रुद्ध झाला आणि घोर बाणवृष्टींनीं रामावर वर्षाव करूं लागला २८. तदनंतर उदार पराक्रम करणाऱ्या रामाला हजार बाणांनीं पीडित करून मातलीलाही बाणसमुदायानें रावणानें वेध केला २९. नंतर नेम धरून एका बाणानें रामाचा ध्वज रावणानें तोडिला आणि रथापासून तो सुवर्णध्वज रथावर पाडिल्यानंतर ३० बाणसमुदायाच्या योगानें इंद्राच्या अश्वांनाही त्यानें वेध केला. हें अवलोकन करून दानवांसहवर्तमान देव, गंधर्व व चारण खिन्न झाले ३१; रामाला रावणानें घेरून त्रस्त केलें आहे असें पाहून सिद्ध, महर्षि आणि बिभीषणासहवर्तमान वानराधिपति व्यथित झाले ३२; रामरूप चंद्राला रावणरूप राहूनें ग्रस्त केलें आहे असें पाहून प्रजापति ही ज्याची देवता आहे आणि चंद्राला जें प्रिय आहे असें रोहिणीनक्षत्र ३३ आक्रमण करून बुध प्रजाजनांना दुःखकारक होऊन बसला; समुद्रामध्यें धूमयुक्त लाटा उसळूं लागल्यामुळें तो जसा कांहीं प्रज्वलितच होत आहे कीं काय असा दिसूं लागला ३४. आणि अतिशय क्षुब्ध झाल्यामुळें सूर्याला स्पर्शच करीत आहे कीं काय असा तो उचंबळूं लागला ३५. सूर्याचीं किरणें मंद होऊन तो रुक्ष दिसूं लागला; त्याचें आंतील मंडल कृष्णवर्ण दिसूं लागलें आणि धूमकेतूनें तो युक्त झाल्यामुळें अंकावर कबंध घेऊन बसला आहे कीं काय असा भासूं लागला ३६; इंद्र व अग्नि ह्या ज्याच्या देवता आहेत असें कोसलदेशाचें विशाखा नक्षत्र

निरस्यमानो रामस्तु दशग्रीवेण रक्षसा । नाशक्नोदभिसंधातुं सायका-
न्रणमूर्धनि ३९ स कृत्वा भ्रुकुटिं क्रुद्धः किंचित्संरक्तलोचनः । जगाम
सुमहाक्रोधं निर्दहन्निव राक्षसान् ४० तस्य क्रुद्धस्य वदनं दृष्ट्वा रामस्य
धीमतः । सर्वभूतानि वित्रेसुः प्राकम्पत च मेदिनी ४१ सिंहशार्दूलवा-
ञ्छैलः संचचाल चलद्रुमः । बभूव चापि क्षुभितः समुद्रः सरितां पतिः ४२
खराश्च खरनिर्घोषा गगने परुषा घनाः । औत्पातिकाश्च नर्दन्तः समन्ता-
त्परिचक्रमुः ४३ रामं दृष्ट्वा सुसंक्रुद्धमुत्पातांश्चैव दारुणान् । वित्रेसुः सर्व-
भूतानि रावणस्याभवद्भयम् ४४ विमानस्थास्तदा देवा गन्धर्वाश्च महो-
रगाः । ऋषिदानवदैत्याश्च गरुत्मन्तश्च खेचराः ४५ ददृशुस्ते तदा युद्धं
लोकसंवर्तसंस्थितम् । नानाप्रहरणैर्भीमैः शूरयोः संप्रयुध्यतोः ४६ ऊचुः
सुरासुराः सर्वे तदा विग्रहमागताः । प्रेक्षमाणा महायुद्धं वाक्यं भक्त्या
प्रहृष्टवत् ४७ दशग्रीवं जयेत्याहुरसुराः समवस्थिताः । देवा राममथा-

---

आकाशामध्यें मगळ रोखून बसला ३७ आणि दहा मुखें व वीस हात ह्यांनीं युक्त असलेला व हातामध्यें धनुष्य धारण केलेला रावण मैनाकपर्वताप्रमाणें दिसूं लागला ३८ ह्याप्रमाणें रावणराक्षस रामाचा प्रतीकार करूं लागला असतां संग्रामामध्यें शरसंधान करण्यासही जेव्हां राम समर्थ होईना तेव्हां ३९ क्रुद्ध झाल्यामुळें ज्याचे नेत्र किंचित् आरक्तवर्ण झालेले आहेत अशा त्या रामानें भिंवया चढविल्या आणि राक्षसांना दग्धच करीत आहे कीं काय अशा रीतीनें तो अतिशय क्रुद्ध झाला ४०. ह्याप्रमाणें क्रुद्ध झालेल्या विचारी रामाचें मुख अवलोकन करितांक्षणीं सर्व प्राणी त्रस्त झाले; पृथ्वी कंपित होऊं लागली ४१; सिंह व व्याघ्र ह्यांनीं युक्त असलेला पर्वत कंपित होऊं लागला; त्याच्या वरील वृक्षही लटलट हालूं लागले; नद्यांचा अधिपति समुद्रही क्षुब्ध झाला ४२; गर्दभ फारच कर्कश स्वरानें ओरडूं लागले; आकाशामध्यें उत्पातसूचक उग्र मेघही गर्जना करीत करीत सर्वत्र संचार करूं लागले ४३; अतिशय क्रुद्ध झालेला राम आणि दारुण उत्पात ह्यांना अवलोकन करून सर्व प्राणी त्रस्त झाले आणि रावणालाही भीति उत्पन्न झाली ४४. नानाप्रकारच्या भयंकर आयुधांनीं युद्ध करीत असलेल्या त्या शूरांचें प्रलयतुल्य युद्ध विमानारूढ झालेल्या देवांनीं, गंधर्वांनीं, महोरगांनीं, ऋषि, दानव व दैत्य ह्यांनीं आणि आकाशामध्यें संचार करणाऱ्या गरुड पक्ष्यांनीं, अवलोकन केलें ४५, ४६; आणि तें प्रचंड युद्ध पहातां पहातां पक्षाभिमान धरून कलह करूं लागलेले ते सर्वही देवदैत्य भक्तीनें व आनंदानें भाषणही करूं लागले ४७. एका बाजूला झालेले दैत्य "तुझा जयजयकार असो" असें रावणाला ह्मणूं लागले आणि "तुझा

चुस्ते त्वं जयेति पुनःपुनः ४८ एतस्मिन्नन्तरे क्रोधाद्राघवस्य च रावणः
प्रहर्तुकामो दुष्टात्मा स्पृशन्प्रहरणं महत् ४९ वज्रसारं महानादं सर्वशत्रु-
निबर्हणम्। शैलशृङ्गनिभैः कूटैश्चितदृष्टिभयावहम् ५० सधूममिव तीक्ष्णाग्रं
युगान्ताग्निचयोपमम्। अतिरौद्रमनासाद्यं कालेनापि दुरासदम् ५१ त्रासनं
सर्वभूतानां दारणं भेदनं तथा। प्रदीप्त इव रोषेण शूलं जग्राह रावणः ५२
तच्छूलं परमक्रुद्धो जग्राह युधि वीर्यवान्। अनीकैः समरे शूरै राक्षसैः
परिवारितः ५३ समुद्यम्य महाकायो ननाद युधि भैरवम्। संरक्तनयनो
रोषात्स्वसैन्यमभिहर्षयन् ५४ पृथिवीं चान्तरिक्षं च दिशश्च प्रदिशस्तथा।
प्राकम्पयत्तदा शब्दो राक्षसेन्द्रस्य दारुणः ५५ अतिकायस्य नादेन तेन
तस्य दुरात्मनः। सर्वभूतानि वित्रेसुः सागरश्च प्रचुक्षुभे ५६ स गृहीत्वा
महावीर्यः शूलं तद्रावणो महत्। विनद्य सुमहानादं रामं परुषमब्रवीत् ५७

---

जयजयकार असो" असें देव रामाला ह्मणूं लागले ४८. इतक्यामध्यें रामावर प्रहार करण्याकरितां दुरात्म्या रावणानें मोठें आयुध हातामध्यें घेण्याचें मनामध्यें आणिलें ४९ आणि क्रोधानें अगदीं प्रदीप्त झालेल्या त्या रावणानें एक शूल हातामध्यें घेतला. वज्रा-प्रमाणें त्या शूलाचें सामर्थ्य होतें; त्याची गर्जना फारच मोठी होती; कोणत्याही शत्रूंना नाश करण्याचें त्याच्या अंगीं सामर्थ्य होतें; पर्वतशिखरासारिख्या तीन पात्यांनीं पहाणाऱ्यांच्या चित्ताला व दृष्टीला तो भय उत्पन्न करणारा होता; त्याच्यां-तून थोडा थोडा धूरही निघत होता; तीक्ष्ण अग्रांनीं तो युक्त होता; प्रलयकालच्या अग्नींच्या राशीप्रमाणें तो दिसत होता; त्याचें स्वरूप फारच भयंकर होतें; त्याच्या समीप जाणें कोणालाही शक्य नव्हतें; प्रत्यक्ष कालालाही तें सहन होणें अशक्य होतें आणि कोणाचाही भेद करण्याचें अथवा कोणालाही विदीर्ण करून टाकण्याचें सामर्थ्य त्याचे ठिकाणीं असल्यामुळें प्राणिमात्राला तो भीति उत्पन्न करणारा होता ५०, ५१, ५२. ज्यांची संख्या अनेक सैन्याच्या संख्येइतकी होईल अशा शूर राक्षसांनीं परिवेष्टित असलेल्या त्या अत्यंत क्रुद्ध व समर्थ रावणानें तो शूल हातामध्यें घेतला ५३; आणि क्रोधामुळें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशा त्या धिप्पाड रावणानें स्वतःच्या सैन्याला हर्ष उत्पन्न करीत करीत संग्रामामध्यें भयंकर गर्जना केली असतां ५४ राक्ष-साधिपतीच्या त्या भयंकर शब्दानें पृथ्वी, अंतरिक्ष, दिशा व उपदिशा ह्या सर्वांना कंपित करून सोडिलें ५५. शरीरानें अति प्रचंड असलेल्या त्या दुरात्म्याच्या त्या गर्जनेनें सर्व प्राणी त्रस्त होऊन गेले आणि सागरही क्षुब्ध होऊन गेला ५६. असो. तो प्रचंड शूल हातामध्यें घेऊन आणि फारच उच्च स्वरानें गर्जना करून तो महावीर्यवान् रावण

शूलोऽयं वज्रसारस्ते राम रोषान्मयोद्यतः । तव भ्रातृसहायस्य सम्यक्प्राणान्हरिष्यति ५८ रक्षसामद्य शूराणां निहतानां चमूमुखे । त्वां निहत्य रणश्लाघी करोमि तरसा समम् ५९ तिष्ठेदानीं निहन्मि त्वामेष शूलेन राघव । एवमुक्त्वा स चिक्षेप तच्छूलं राक्षसाधिपः ६० तद्रावणकरान्मुक्तं विद्युन्मालासमावृतम् । अष्टघण्टं महानादं वियद्गतमशोभत ६१ तच्छूलं राघवो दृष्ट्वा ज्वलन्तं घोरदर्शनम् । ससर्ज विशिखान्रामश्चापमायम्य वीर्यवान् ६२ आपतन्तं शरौघेण वारयामास राघवः । उत्पतन्तं युगान्ताग्निं जलौघैरिव वासवः ६३ निर्ददाह स तान्बाणान्रामकार्मुकनिःसृतान् । रावणस्य महाञ्शूलः पतङ्गानिव पावकः ६४ तान्दृष्ट्वा भस्मसाद्भूताञ्शूलसंस्पर्शचूर्णितान् । सायकानन्तरिक्षस्थान्राघवः क्रोधमूर्छितः ६५ स तां मातलिनानीतां शक्तिं वासवसंमताम् । जग्राह परमक्रुद्धो राघवो रघुनन्दनः ६६ सा तोलिता बलवता शक्तिर्घण्टाकृतस्वना । नभः प्रज्वाल-

---

कठोरपणानें रामाला ह्मणाला ५७ " हे रामा, क्रोधानें मीं उगारिलेला हा शूल वज्रासारिखा बळकट आहे. हा भ्रात्यासहवर्तमान तुझे प्राण उत्तमरीतीनें हरण करील५८. आज संग्रामामध्यें जे शूर राक्षस वध पावले आहेत त्यांची अवस्था—सामर्थ्यानें तुझा वध करून—मीं संग्रामविजयी रावण तुला प्राप्त करून देईन ५९. हे राघवा, आतां उभा रहा; हा मी शूलानें तुझा वध करितो ". ह्याप्रमाणें रामाला बोलून त्या राक्षसाधिपतीनें तो शूल त्याच्यावर फेंकिला असतां ६० रावणाच्या हातांतून सुटलेला, विद्युल्लतांच्या समुदायांनीं व्याप्त झालेला, आठ घंटांनीं युक्त असलेला आणि प्रचंड गर्जना करीत असलेला तो शूल अंतरिक्षामध्यें गेला असतां शोभूं लागला ६१. दिसण्यांतही भयंकर असलेला तो उज्ज्वल शूल अवलोकन करितांक्षणीं समर्थ रामानें धनुष्य ओढून बाण सोडिले ६२ आणि जलप्रवाहांच्या योगानें ज्याप्रमाणें इंद्र उत्तंबळत असलेल्या प्रलयकालच्या अग्नीचें निवारण करितो त्याप्रमाणें आपल्यावर येणाऱ्या त्या शूलाचें बाणसमुदायाच्या योगानें रामानें निवारण केलें ६३; परंतु, अग्नि ज्याप्रमाणें पतंगांना दग्ध करून टाकितो त्याप्रमाणें रामाच्या धनुष्यापासून सुटलेले ते बाण रावणाच्या त्या प्रचंड शूलानें दग्ध करून टाकिले ६४. ह्याप्रमाणें शूलाचा स्पर्श होतांक्षणीं चुराडा होऊन आकाशामध्येंच भस्मीभूत झालेले ते बाण अवलोकन करून राम क्रोधानें अगदीं व्याप्त झाला ६५ आणि अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या रघुनंदन रामानें मातलीनें आणिलेली व इंद्राला प्रिय असलेली ती शक्ति हातामध्यें घेतली ६६. घंटांच्या योगानें नादित झालेली ती शक्ति बलाढ्य रामानें तोलून धरिली असतां

यामास युगान्तोल्केव सप्रभा ६७ सा क्षिप्ता राक्षसेन्द्रस्य तस्मिञ्शूले पपात ह । भिन्नः शक्त्या महाञ्शूलो निपपात गतद्युतिः ६८ निर्बिभेद ततो बाणैर्हयानस्य महाजवान् । रामः क्षिप्तैर्महावेगैर्बाणवज्रिरजिह्मगैः ६९ निर्बिभेदोरसि तदा रावणं निशितैः शरैः । राघवः परमायत्तो ललाटे पत्रिभिस्त्रिभिः ७० स शरैर्भिन्नसर्वाङ्गो गात्रप्रस्रुतशोणितः । राक्षसेन्द्रसमूहस्थः फुल्लाशोक इवाबभौ ७१ स रामबाणैरतिविद्धगात्रो निशाचरेन्द्रः क्षतजार्द्रगात्रः । जगाम खेदं च समाजमध्ये क्रोधं च चक्रे सुभृशं तदानीम् ७२ [ ४६८२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्व्यधिकशततमः सर्गः ॥ १०२ ॥

स तु तेन तदा क्रोधात्काकुत्स्थेनार्दितो भृशम् । रावणः समरश्लाघी महाक्रोधमुपागमत् १ स दीप्तनयनोऽमर्षाच्चापमुद्यम्य वीर्यवान् । अभ्यर्दयत्सुसंक्रुद्धो राघवं परमाहवे २ बाणधारासहस्रैस्तु स तोयद इवाम्बरात् ।

---

प्रलयकालच्या तेजस्वी उल्केप्रमाणें तिनें आकाश प्रज्वलित केलें ६७. ती शक्ति रामानें फेंकिली असतां राक्षसाधिपतीच्या त्या शूलावर जाऊन आदळली व त्या शक्तीच्या योगानें मोडून गेलेला तो प्रचंड शूल निस्तेज होऊन खालीं पडला ६८. नंतर रामानें त्या रावणाच्या महावेगवान् अश्वांनाही बाणांच्या योगानें वेध केला. ते सोडिलेले बाण सरळ जाणारे होते; महावेगवान् होते आणि वेगामुळें ते घोषही करीत होते ६९. नंतर अतिशयच सावध असलेल्या त्या रामानें तीक्ष्ण बाणांनीं रावणाला वक्षस्थलावर वेध केला आणि तीन बाणांनीं त्याच्या ललाटावरही त्यानें वेध केला ७०. ह्यामुळें बाणांच्या योगानें रावणाचें सर्व शरीर छिन्नभिन्न होऊन गेलें; त्याच्या शरीरांतून रक्तस्राव होऊं लागला आणि राक्षसाधिपतींच्या समूहामध्यें असलेला तो रावण प्रफुल्लित अशोकवृक्षाप्रमाणें दिसूं लागला ७१. असो. रामाच्या बाणांनीं शरीर अतिशयच विद्ध होऊन गेल्यामुळें त्या राक्षसाधिपतीचीं सर्व गात्रें रक्तानें भिजून गेलीं; राक्षससमाजामध्यें तो फार खिन्नही झाला आणि त्यावेळीं त्याला अतिशयच क्रोध आला ७२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ १०२ ॥

संग्रामासंबंधानें ज्याची मान्यता आहे अशा त्या रावणाला रामानें रागारागानें अतिशय जर्जर केलें असतां त्याला फार क्रोध आला १. आणि प्रदीप्त नेत्रांनीं युक्त झालेल्या त्या अतिक्रुद्ध समर्थ रावणानें रागारागानें धनुष्य उगारून महासंग्राममध्यें रामाला अमर्षानें त्रासून सोडिलें २. आकाशांतून पडणाऱ्या जलधारांनीं ज्याप्रमाणें मेघ

राघवं रावणो बाणैस्तटाकमिव पूरयन् ३ पूरितः शरजालेन धनुर्मुक्तेन संयुगे। महागिरिरिवाकम्प्यः काकुत्स्थो न प्रकम्पते ४ स शरैः शरजालानि वारयन्समरे स्थितः। गभस्तीनिव सूर्यस्य प्रतिजग्राह वीर्यवान् ५ ततः शरसहस्राणि क्षिप्रहस्तो निशाचरः। निजघानोरसि क्रुद्धो राघवस्य महात्मनः ६ स शोणितसमादिग्धः समरे लक्ष्मणाग्रजः। दृष्टः फुल्ल इवारण्ये सुमहान्किंशुकद्रुमः ७ शराभिघातसंरब्धः सोऽभिजग्राह सायकान्। काकुत्स्थः सुमहातेजा युगान्तादित्यवर्चसः ८ ततोऽन्योन्यं सुसंरब्धौ तावुभौ रामरावणौ। शरान्धकारे समरे नोपलक्षयतां तदा ९ ततः क्रोधसमाविष्टो रामो दशरथात्मजः। उवाच रावणं वीरः प्रहस्य परुषं वचः १० मम भार्या जनस्थानादज्ञानाद्राक्षसाधम। हृता ते विवशा यस्मात्तस्मात्त्वं नासि वीर्यवान् ११ मया विरहितां दीनां वर्तमानां महावने। वैदेहीं प्रसभं हृत्वा शूरोहमिति मन्यसे १२ स्त्रीषु शूर विनाथासु परदाराभिमर्शनम्। कृत्वा कापुरुषं कर्म शूरोऽहमिति मन्यसे १३ भिन्नमर्याद निर्लज्ज चारि-

---

तडाग भरून टाकितो त्याप्रमाणें हजारों बाणधारांच्या योगानें रावण रामाला व्याप्त करूं लागला ३. परंतु, धनुष्यापासून सुटलेल्या बाणसमुदायानें संग्रामामध्यें जरी राम भरून गेला तरी ज्याला कंपित करणें अशक्य आहे अशा महापर्वताप्रमाणें तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम हालला देखील नाहीं ४. इतकेंच नव्हे परंतु, सूर्याचीं किरणें घेत घेत ज्याप्रमाणें एकदा पुरुष उन्हामध्यें उभा असतो त्याप्रमाणें संग्रामामध्यें तो समर्थ राम बाणांच्या योगानें त्याच्या बाणसमुदायाचें निवारण करीत करीत (व कांहीं बाणसमुदाय सेवन करीत करीत) उभा राहिला ५. तदनंतर हस्तलाघवानें युक्त असलेल्या त्या क्रुद्ध राक्षसानें महात्म्या रामाच्या वक्षःस्थलावर हजारों बाण टाकिले असतां ६ समरांगणामध्यें रक्तानें भरून गेलेला तो राम अरण्यामध्यें प्रफुल्लित झालेल्या प्रचंड पलाशवृक्षाप्रमाणें दिसूं लागला ७. नंतर बाणप्रहारानें क्षुब्ध झालेल्या त्या अतितेजस्वी रामानें प्रलयकालच्या सूर्यासारिख देदीप्यमान बाण हातामध्यें घतले ८. तदनंतर अतिशय क्षुब्ध झालेले ते उभयतां रामरावण बाणांच्या योगानें अंधकारमय होऊन गेलेल्या समरांगणामध्यें एकमेकाला दिसेनासे झाले ९. तदनंतर क्रुद्ध झालेला दशरथपुत्र वीर राम हास्यपूर्वक कठोर शब्दांनीं रावणाला म्हणाला १० "हे राक्षसाधमा, मला समजूं न देतां ज्याअर्थीं निरुपाय होऊन गेलेली माझी भार्या तूं हरण करून नेलीस त्याअर्थीं तूं वीर्यवान् नाहींस ११. अरे! माझ्या विरहित महावनामध्यें असलेली दीन सीता दांडगाईनें हरण करून तूं स्वतःला शूर समजत आहेस! १२. अरे, अनाथस्त्रियांचे ठिकाणीं शौर्य गाजविणाऱ्या

न्नेष्वनवस्थित । दर्पान्मृत्युमुपादाय शूरोऽहमिति मन्यसे १४ शूरेण धनद-
भ्रात्रा बलैः समुदितेन च । श्लाघनीयं महत्कर्म यशस्यं च कृतं त्वया १५
उत्सेकेनाभिपन्नस्य गर्हितस्याहितस्य च । कर्मणः प्राप्नुहीदानीं तस्याद्य
सुमहत्फलम् १६ शूरोऽहमिति चात्मानमवगच्छसि दुर्मते । नैव लज्जास्ति
ते सीतां चौरवद्व्यपकर्षतः १७ यदि मत्संनिधौ सीता धर्षिता स्यात्त्वया
बलात् । भ्रातरं तु खरं पश्येस्तदा मत्सायकैर्हतः १८ दिष्ट्यासि मम मन्दा-
त्मंश्चक्षुर्विषयमागतः । अद्य त्वां सायकैस्तीक्ष्णैर्नयामि यमसादनम् १९
अद्य ते मच्छरैश्छिन्नं शिरो ज्वलितकुण्डलम् । क्रव्यादा व्यपकर्षन्तु विकीर्णं
रणपांसुषु २० निपत्योरसि गृध्रास्त क्षितौ क्षिप्तस्य रावण । पिबन्तु रुधिरं
तर्षाद्बाणशल्यान्तरोत्थितम् २१ अद्य मद्बाणभिन्नस्य गतासोः पतितस्य
ते । कर्षन्त्वन्त्राणि पतगा गरुत्मन्त इवोरगान् २२ इत्येवं स वदन्वीरो रामः

---

रावणा, परस्त्रीला स्पर्श करणें हें नीच पुरुषाचें कर्म करून तूं " मी शूर आहें " असें स्वतःला मानीत आहेस ! १३. हे मर्यादा सोडून वागणाऱ्या निर्लज्जा, हे अनन्वित कृत्यें करणाऱ्या राक्षसा, गर्वानें मृत्यूचें अवलंबन करूनही तूं " मी शूर आहें " असें स्वतःला मानीत आहेस ! १४. खरोखर सैन्यांनीं युक्त असलेला तूं कुबेराचा भाऊ मोठाच शूर आहेस ! आणि लोकांनीं प्रशंसा करण्यासारिखें हें मोठें कीर्ति वाढ-विणारेंच कर्म तूं केलें आहेस ! १५. गर्वानें जें तूं निंद्य व अनिष्ट कर्म केलें आहेस त्याचें फारच मोठें फल आज आतां संपादन कर १६. हे दुर्बुद्धि रावणा, " मी शूर आहें " असें तूं स्वतःला समजत आहेस; परंतु, चोराप्रमाणें सीता हरण करणाऱ्या तुला लाजच नाहीं १७. मी संनिध असतांना दांडगाईनें जर तूं तिच्याशीं मर्यादा सोडून वागला असतास तर त्याच वेळीं माझ्या बाणांच्या योगानें वध पावून भ्रात्या खराच्या भेटीला तुला जावें लागलें असतें १८. परंतु, हे मूढा, आज सुदैवानें तूं माझ्या दृष्टीं पडला आहेस. मी आतां तीक्ष्ण बाणांच्या योगानें तुला यमसदनीं पोंचवितों १९. उज्ज्वल कुंडलांनीं युक्त असलेलें तुझें मस्तक माझ्या बाणांनीं तुटून जाऊन रणभूमींतील धुळीनें भरून गेलेलें आज श्वापदें ओढून नेतील २०. हे रावणा, भूमीवर पाडिलेल्या तुझ्या वक्षःस्थलावर बसून बाणांच्या शल्यांनीं शरीराला पड-लेल्या छिद्रांतून निघालेलें रक्त सोसासोसानें आज गृध्रपक्षी पितील २१. माझ्या बाणांनीं विदीर्ण झाल्यामुळें गतप्राण होऊन पडलेल्या तुझीं आंतडीं भुजंगांना ओढून नेणाऱ्या गरुडांप्रमाणें आज पक्षी ओढूं लागतील " २२. ह्याप्रमाणें बालेत

शत्रुनिबर्हणः । राक्षसेन्द्रं समीपस्थं शरवर्षैरवाकिरत् २३ बभूव द्विगुणं
वीर्यं बलं हर्षश्च संयुगे । रामस्यास्त्रबलं चैव शत्रोर्निधनकाङ्क्षिणः २४
प्रादुर्बभूवुरस्त्राणि सर्वाणि विदितात्मनः । प्रहर्षाच्च महातेजाः शीघ्रहस्त-
तरोऽभवत् २५ शुभान्येतानि चिह्नानि विज्ञायात्मगतानि सः । भूय एवा-
र्दयद्रामो रावणं राक्षसान्तकृत् २६ हरीणां चाश्मनिकरैः शरवर्षैश्च राघ-
वात् । हन्यमानो दशग्रीवो विघूर्णहृदयोऽभवत् २७ यदा च शस्त्रं नारेभे
न चकर्ष शरासनम् । नास्य प्रत्यकरोद्वीर्यं विक्लवेनान्तरात्मना २८ क्षिप्ता-
श्चाशु शरास्तेन शस्त्राणि विविधानि च । मरणार्थाय वर्तन्ते मृत्युकालो-
ऽभ्यवर्तत २९ सूतस्तु रथनेताऽस्य तदवस्थं निरीक्ष्य तम् । शनैर्युद्धादसं-
भ्रान्तो रथं तस्यापवाहयत् ३० रथं च तस्याथ जवेन सारथिर्निवार्य
भीमं जलदस्वनं तदा । जगाम भीत्या समरान्महीपतिं निरस्तवीर्यं पतितं
समीक्ष्य ३१ [ ४७१३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये
युद्धकाण्डे त्र्यधिकशततमः सर्गः ॥ १०३ ॥

---

बोलत त्या शत्रुनाशक वीर रामानें समीपच असलेल्या राक्षसाधिपति रावणाला बाण-वृष्टींनीं भरून काढिलें २३. शत्रूच्या मरणाची इच्छा करणाऱ्या रामाचें त्या संग्रामा-मध्यें अस्त्रबल, शारीर बल, हर्ष आणि वीर्यही द्विगुणित झालें २४. आत्मस्वरूप जाण-णाऱ्या त्या रामापुढें सर्व अस्त्रें प्रकट झालीं आणि उल्हास उत्पन्न झाल्यामुळें त्या महाते-जस्वी रामाचा हातही फारच सत्वर चालूं लागला २५. आपले ठिकाणीं होत असलेलीं हीं चिन्हें सर्व शुभ आहेत असें समजून राक्षसांचा अंत करणाऱ्या त्या रामानें रावणाला अधिकच जेरीस आणिलें २६. वानरांनीं फेंकिलेले पाषाणसमुदाय आणि रामापासून निघालेले बाणांचे वर्षाव ह्यांचा एकसारिखा हल्ला होत असल्यामुळें रावण मनामध्यें अगदीं गोंधळून गेला २७. मन गोंधळून गेल्यामुळें रावण जेव्हां शस्त्र उचलीनासा झाला, धनुष्यही ओढीनासा झाला आणि कसल्याच प्रकारचें शौर्यकर्म करीनासा झाला तेव्हां रामानेंही त्याच्यावर प्रहार करण्याचें बंद केलें २८; परंतु, रावणाला मूर्च्छा येण्यापूर्वींच त्या रामानें सत्वर सोडिलेले बाण आणि नानाप्रकारचीं शस्त्रें हीं त्याच्या मृत्यूला कारण होण्याचें चिन्ह दिसूं लागलें व अशा रीतीनें त्याचा मृत्युसमय अगदीं जवळ येऊन ठेपला २९; तेव्हां त्या रावणाची तशी अवस्था झालेली पाहून रथ चालविणाऱ्या त्याच्या सारथ्यानें गोंधळून न जातां समरांगणापासून युक्तीनें त्याचा रथ दूर काढून नेला ३०. सारांश, भूपति रावण हतवीर्य होऊन पडला आहे असें अवलोकन करितांक्षणीं सारथ्यानें मेघासारखी गर्जना करणारा त्याचा भयंकर

स तु मोहात्सुसंक्रुद्धः कृतान्तबलचोदितः । क्रोधसंरक्तनयनो रावणः सूतमब्रवीत् १ हीनवीर्यमिवाशक्तं पौरुषेण विवर्जितम् । भीरुं लघुमिवासत्त्वं विहीनमिव तेजसा २ विमुक्तमिव मायाभिरस्त्रैरिव बहिष्कृतम् । मामवज्ञाय दुर्बुद्धे स्वया बुद्ध्या विचेष्टसे ३ किमर्थं मामवज्ञाय मच्छन्दमनवेक्ष्य च । त्वया शत्रुसमक्षं मे रथोऽयमपवाहितः ४ त्वयाद्य हि ममानार्य चिरकालमुपार्जितम् । यशो वीर्यं च तेजश्च प्रत्ययश्च विनाशितः ५ शत्रोः प्रख्यातवीर्यस्य रञ्जनीयस्य विक्रमैः । पश्यतो युद्धलुब्धोऽहं कृतः कापुरुषस्त्वया ६ यस्त्वं कथमिदं मोहान्न चेद्वहसि दुर्मते । सत्योऽयं प्रतितर्को मे परेण त्वमुपस्कृतः ७ न हि तद्विद्यते कर्म सुहृदो हितकाङ्क्षिणः । रिपूणां सदृशं त्वेतद्यस्त्वयैतदनुष्ठितम् ८ निवर्तय रथं शीघ्रं यावन्नापैति मे रिपुः । यदि वाऽध्युषितोऽसि त्वं स्मर्यन्ते यदि मे गुणाः ९ एवं परुषमुक्तस्तु

---

रथ वेगानें परत फिरविला आणि भीतीनें समरांगणातून तो निघून गेला ३१. ह्याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ १०३ ॥

तदनंतर तो रावण शुद्धीवर आला असतां अतिशय क्रुद्ध झाला; क्रोधानें त्याचे नेत्र आरक्तवर्ण होऊन गेले आणि कालाच्या बलाची प्रेरणा झाल्यामुळें तो सारथ्याला ह्मणाला १ " हे दुर्बुद्धे, वीर्यहीन, अशक्त, पराक्रमरहित, भित्रा, यःकश्चित्, धैर्यहीन, निस्तेज, मायाहीन आणि अस्त्रहीन मी आहें असें समजून माझी पर्वा न करितां स्वतःच्याच इच्छेनें तूं वागत आहेस २, ३. अरे, माझी पर्वा न करितां आणि माझें मतही लक्ष्यांत न घेतां शत्रूचे समक्ष तूं हा माझा रथ कशाकरितां समरांगणांतून दूर आणिलास ? ४. हे दुष्टा, पुष्कळ दिवसांपासून संपादन केलेलें माझें यश, वीर्य, तेज आणि लोकांची माझ्यासंबंधानें असलेली खात्री ह्या सर्वांचा आज तूं नाश करून टाकिलास ५. वीर्याविषयीं प्रख्यात व पराक्रमांनीं शोभणारा शत्रु पहात असतांना मज युद्धप्रिय शूराला तूं भ्याड ठरविलेंस ६. ज्याअर्थी मोहानें सुद्धां तूं शत्रूचे समुख माझा रथ नेत नाहींस त्याअर्थीं शत्रूनें लांच देऊन तुला बिघडवून टाकिलें आहे हेंच माझा तर्क सत्य होय ७. हितेच्छु मित्राचें हें कर्म नव्हे; शत्रूना योग्य असेंच हें कर्म तूं केलें आहेस ८. असो. पुष्कळ दिवसपर्यंत तूं माझ्याजवळ राहिला आहेस. ह्यास्तव, माझा कांहीं उपकार तुझ्यावर झाल्याचें जर तुला स्मरत असेल तर माझा शत्रु अजून रणांतून गेला नाहीं तोंच तूं माझा रथ सत्वर तिकडे वळीव " ९. ह्याप्रमाणें हितेच्छु सारथ्याशीं अविचारी

हितबुद्धिरबुद्धिना। अब्रवीद्रावणं सूतो हितं सानुनयं वचः १० न
भीतोऽस्मि न मूढोऽस्मि नोपजप्तोऽस्मि शत्रुभिः। न प्रमत्तो न निःस्नेहो
विस्मृता न च सत्क्रिया ११ मया तु हितकामेन यशश्च परिरक्षता। स्नेह-
प्रस्कन्नमनसा हितमित्यप्रियं कृतम् १२ नास्मिन्नर्थे महाराज त्वं मां प्रिय-
हिते रतम्। कश्चिल्लघुरिवानार्यो दोषतो गन्तुमर्हसि १३ श्रूयतां प्रति-
दास्यामि यन्निमित्तं मया रथः। नदीवेग इवाम्भोभिः संयुगे विनिवर्तितः १४
श्रमं तवावगच्छामि महता रणकर्मणा। न हि ते वीरसौमुख्यं प्रकर्षं नोप-
धारये १५ रथोद्वहनखिन्नाश्च भग्ना मे रथवाजिनः। दीना घर्मपरि-
श्रान्ता गावो वर्षहता इव १६ निमित्तानि च भूयिष्ठं यानि प्रादुर्भवन्ति
नः। तेषु तेष्वभिपन्नेषु लक्षयाम्यप्रदक्षिणम् १७ देशकालौ च विज्ञेयौ
लक्षणानीङ्गितानि च। दैन्यं हर्षश्च खेदश्च रथिनश्च महाबल १८ स्थल-
निम्नानि भूमेश्च समानि विषमाणि च। युद्धकालश्च विज्ञेयः परस्यान्तर-
दर्शनम् १९ उपयानापयाने च स्थानं प्रत्यपसर्पणम्। सर्वमेतद्रथस्थेन

---

रावणानें कठोर भाषण केलें असतां त्या सारथ्यानें हिताव्ह व मार्दवयुक्त असें भाषण त्याच्याशीं केलें १०. (तो म्हणाला) "मी भ्यायलों नाहीं; मला मोह झाला नाहीं; शत्रूंशीं माझी कानगोष्ट झालेली नाहीं; मी निष्काळजीपणानें वागलों नाहीं; आपल्याविषयीं माझी कळकळ कमी झाली नाहीं आणि आपल्या उपकारांचेंही मला विस्मरण झालें नाहीं ११. आपलें हित व्हावें आणि आपलें यश सुरक्षित रहावें एत-दर्थ मन स्निग्ध व प्रसन्न ठेवून जी गोष्ट मीं हिताची म्हणून केली ती आपणांला अप्रिय झाली १२. हे महाराज, आपलें प्रिय व हित करण्याविषयीं तत्पर असलेल्या मला एखाद्या क्षुद्र दुर्जनाप्रमाणें दूषण लावणें आपणांला योग्य नाहीं १३. समुद्राच्या योगानें ज्याप्रमाणें नदीचा वेग परत फिरविला जातो त्याप्रमाणें संग्राममध्यें मी आपला रथ कशाकरितां परत फिरविला तें उत्तर आपण श्रवण करा; मी सांगतों १४. मोठें युद्ध केल्यामुळें आपणांला श्रम झाले असून शत्रूपेक्षां अधिक पराक्रम करण्याचें सामर्थ्य आपल्या ठिकाणीं उरलें नाहीं असें मला वाटलें १५. पावसानें सडकलेल्या गाई ज्याप्रमाणें दीन होऊन जातात त्याप्रमाणें रथ ओढून श्रांत व जर्जर झालेले माझे रथाचे अश्व घामानें अगदीं टेकीस येऊन दीन झाले १६. जे जे म्हणून कांहीं शकुन आपणांला होत आहेत त्यांपैकीं वेळोवेळीं आपणांला प्रतिकूल असेंच चिन्ह माझ्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें १७. हे महाबलाढ्य, देश, काल, लक्षणें, हालचाली, रथ्याचें दैन्य, हर्ष, खेद १८, भूमी-संबंधीं सपाटी व सखलपणा म्हणजे सम आणि विषमप्रदेश, युद्धाचा समय, शत्रूचें

श्रेयं रथकुटुम्बिना २० तव विश्रामहेतोस्तु तथैषां रथवाजिनाम्। रौद्रं वर्जयता खेदं क्षमं कृतमिदं मया २१ स्वेच्छया न मया वीर रथोयमपवाहितः। भर्तुः स्नेहपरीतेन मयेदं यत्कृतं प्रभो २२ आज्ञापय यथा तत्त्वं वक्ष्यस्यरिनिषूदन। तत्करिष्याम्यहं वीर गतानृण्येन चेतसा २३ संतुष्टस्तेन वाक्येन रावणस्तस्य सारथेः। प्रशस्यैनं बहुविधं युद्धलुब्धोऽब्रवीदिदम् २४ रथं शीघ्रमिमं सूत राघवाभिमुखं नय। नाहत्वा समरे शत्रून्निवर्तिष्यति रावणः २५ एवमुक्त्वा रथस्तस्य रावणो राक्षसेश्वरः। ददौ तस्य शुभं ह्येकं हस्ताभरणमुत्तमम्॥ श्रुत्वा रावणवाक्यानि सारथिः संन्यवर्तत २६ ततो द्रुतं रावणवाक्यचोदितः प्रचोदयामास हयान्स सारथिः। स राक्षसेन्द्रस्य ततो महारथः क्षणेन रामस्य रणाग्रतोऽभवत् २७ [ ४७४० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुरधिकशततमः सर्गः॥ १०४॥

ततो युद्धपरिश्रान्तं समरे चिन्तया स्थितम्। रावणं चाग्रतो दृष्ट्वा

---

छिद्र शोधणें १९, रथ शत्रूचे समीप नेणें, शत्रूपासून दूर नेणें, धैर्यानें उभा करणें व संमुख न सोडितां मार्ग सरणें हें सर्व रथ संभाळणाऱ्या सारथ्यानें रथावर असतांना जाणिलें पाहिजे २०. आपल्याला व त्याचप्रमाणें ह्या रथाच्या अश्वांना भयंकर थकवा न येतां विश्रांति मिळावी एतदर्थ मीं सारथ्याला योग्य असेंच हें कर्म केलें आहे २१. हे वीरा, माझी लहर लागली ह्मणून मीं हा रथ दूर आणिला नाहीं. हे प्रभो, हें जें मीं केलें आहे तें तुज भर्त्याचे ठिकाणीं माझें अतिशय प्रेम असल्यामुळेंच केलें आहे २२. हे शत्रुनाशका, आतां आपण आज्ञा करा. जे आपण सांगाल तें मी मनामध्यें कसलाही विचार न आणितां करीन" २३. त्या सारथ्याच्या ह्या भाषणानें रावण संतुष्ट झाला आणि नानाप्रकारांनीं त्याची प्रशंसा करून तो युद्धलुब्ध रावण त्याला ह्मणाला २४ "हे सारथ्या, हा रथ सत्वर रामासमीप ने; संग्रामामध्यें शत्रूंचा वध केल्यावांचून रावण परत फिरणार नाहीं" २५. ह्याप्रमाणें रथावर असलेल्या त्या सारथ्याला सांगून राक्षसाधिपति रावणानें त्याला एक शुभ व उत्कृष्ट हस्तभूषण दिलें आणि रावणाचें भाषण ऐकून सारथिही परत फिरला २६. तदनंतर रावणाची आज्ञा झालेल्या त्या सारथ्यानें अश्वांना इशारा केला व राक्षसाधिपतीचा तो महारथ एका क्षणांत रामासमोर रणाचे अग्रभागीं येऊन ठेपला २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें चवथा सर्ग समाप्त झाला॥ १०४॥

युद्धाय समुपस्थितम् १ दैवतैश्च समागम्य द्रष्टुमभ्यागतो रणम् । उपग-
म्याब्रवीद्राममगस्त्यो भगवांस्तदा २ राम राम महाबाहो शृणु गुह्यं सना-
तनम् । येन सर्वानरीन्वत्स समरे विजयिष्यसे ३ आदित्यहृदयं पुण्यं
सर्वशत्रुविनाशनम् । जयावहं जपं नित्यमक्षयं परमं शिवम् ४ सर्वमङ्ग-
लमाङ्गल्यं सर्वपापप्रणाशनम् । चिन्ताशोकप्रशमनमायुर्वर्धनमुत्तमम् ५
रश्मिमन्तं समुद्यन्तं देवासुरनमस्कृतम् । पूजयस्व विवस्वन्तं भास्करं भुव-
नेश्वरम् ६ सर्वदेवात्मको ह्येष तेजस्वी रश्मिभावनः । एष देवासुरगणा-
ल्लँोकान्पाति गभस्तिभिः ७ एष ब्रह्मा च विष्णुश्च शिवः स्कन्दः प्रजा-
पतिः । महेन्द्रो धनदः कालो यमः सोमो ह्यपाम्पतिः ८ पितरो वसवः
साध्या अश्विनौ मरुतो मनुः । वायुर्वह्निः प्रजाः प्राण ऋतुकर्ता प्रभा-
करः ९ आदित्यः सविता सूर्यः खगः पूषा गभस्तिमान् । सुवर्णसदृशो
भानुर्हिरण्यरेता दिवाकरः १० हरिदश्वः सहस्रार्चिः सप्तसप्तिर्मरीचिमान् ।
तिमिरोन्मथनः शंभुस्त्वष्टा मार्तण्डकोंऽशुमान् ११ हिरण्यगर्भः शिशिर-
स्तपनोहस्करो रविः । अग्निगर्भो दितेः पुत्रः शङ्खः शिशिरनाशनः १२

---

तदनंतर समरांगणीं राम युद्धानें श्रांत होऊन चिंताक्रांत व युद्धाला सज्ज झालेला आहे असें अवलोकन करून १ देवांसहवर्तमान रण पहाण्याकरितां आलेले भगवान् अगस्त्यमुनि जवळ येऊन रामाला ह्मणाले २ " हे रामा, हे महापराक्रमी रामा, सनातन गुह्य तूं श्रवण कर. हे वत्सा, ह्याच्या योगानें संग्रामामध्यें तूं सर्व शत्रूंचा पराजय करशील ३. हें आदित्यहृदयस्तोत्र पुण्यजनक, सर्वशत्रुनाशक, जयावह, नित्य, उत्कृष्ट, कल्याणकारक ४, सर्व मंगलांपेक्षांही मंगलप्रद, सर्वपापनाशक, चिंता व शोक ह्यांचा नाश करणारें, आयुष्याची वृद्धि करणारें आणि अनुपम असें आहे ५. देवदैत्यांना पूज्य, रश्मिवान् आणि त्रैलोक्याधिपति असा जो उदयास येणारा विवस्वान् भास्कर त्याचें तूं पूजन कर ६. हा तेजस्वी सूर्य सर्व देवमय असून आपल्या रश्मींच्या योगानें योग्यांना ब्रह्मलोक प्राप्त करून देणारा आहे; आणि देवगण, दैत्यगण व मनुष्यादि लोक ह्यांचें हा किरणांच्या योगानें पालन करीत असतो ७. ब्रह्मा, विष्णु, शिव, स्कंद, प्रजापति, महेंद्र, धनद, काल, यम, सोम व जलाधिपति हाच असून ८ पितर, वसु, साध्य, अश्विनीकुमार, मरुद्गण, मनु, वायु, अग्नि, प्रजा, प्राण, ऋतुकर्ता व प्रभाकर हाच आहे ९. आदित्य, सविता, सूर्य, खग, पूषा, गभस्तिमान्, सुवर्णतुल्य, भानु, हिरण्यरेता, दिवाकर १०, हरिदश्व, सहस्रार्चि, सप्तसप्ति, मरीचिमान्, तिमिरोन्मथन, शंभु, त्वष्टा, मार्तंडक, अंशुमान् ११, हिरण्यगर्भ, शिशिर, तपन,

व्योमनाथस्तमोभेदी ऋग्यजुःसामपारगः । घनवृष्टिरपां मित्रो विन्ध्यवीथीप्लवङ्गमः १३ आतपी मण्डली मृत्युः पिङ्गलः सर्वतापनः । कविर्विश्वो महातेजा रक्तः सर्वभवोद्भवः १४ नक्षत्रग्रहताराणामधिपो विश्वभावनः । तेजसामपि तेजस्वी द्वादशात्मन्नमोस्तु ते १५ नमः पूर्वाय गिरये पश्चिमायाद्रये नमः । ज्योतिर्गणानां पतये दिनाधिपतये नमः १६ जयाय जयभद्राय हर्यश्वाय नमो नमः । नमो नमः सहस्रांशो आदित्याय नमो नमः १७ नम उग्राय वीराय सारङ्गाय नमो नमः । नमः पद्मप्रबोधाय प्रचण्डाय नमोस्तु ते १८ ब्रह्मेशानाच्युतेशाय सूरायादित्यवर्चसे । भास्वते सर्वभक्षाय रौद्राय वपुषे नमः १९ तमोघ्नाय हिमघ्नाय शत्रुघ्नायामितात्मने । कृतघ्नघ्नाय देवाय ज्योतिषां पतये नमः २० तप्तचामीकराभाय हरये विश्वकर्मणे । नमस्तमोभिनिघ्नाय रुचये लोकसाक्षिणे २१ नाशयत्येष वै भूतं तमेव सृजति प्रभुः । पायत्येष तपत्येष वर्षत्येष गभस्तिभिः २२ एष सुप्तेषु जागर्ति भूतेषु परिनिष्ठितः । एष चैवाग्निहोत्रं च फलं चैवाग्निहोत्रि-

---

अहस्कर, रवि, अग्निगर्भ, दितिपुत्र, शख, शिशिरनाशन १२, व्योमनाथ, तमोभेदी, ऋग्यजुःसामपारग, घनवृष्टि, जलमित्र, विंध्यथीवीप्लवंगम १३, आतपी, मंडली, मृत्यु, पिंगल, सर्वतापन, कवि, विश्व, महातेजस्वी, रक्त, सर्वभवोद्भव १४. नक्षत्रग्रहताराधिपति, विश्वभावन आणि तेजांमध्येही तेजस्वी अशा तुला, हे द्वादशात्म्या, नमस्कार असो १५. तुज पूर्वपर्वतरूप धारण केलेल्याला नमस्कार असो. पश्चिम पर्वताला नमस्कार असो; ज्योतिर्गणाधिपतीला नमस्कार असो; दिनाधिपतीला नमस्कार असो १६; जयाला नमस्कार असो; जयभद्राला नमस्कार असो; हर्यश्वाला नमस्कार असो; हे सहस्रांशा, नमोनमः; तुज आदित्याला नमस्कार असो १७; उग्राला नमस्कार असो; वीराला नमस्कार असो; सारंगाला नमस्कार असो; पद्मप्रबोधाला नमस्कार असो; प्रचंडाला नमस्कार असो १८; ब्रह्मा, रुद्र व विष्णु ह्यांच्या अधिपतीला नमस्कार असो; तुज सूराला नमस्कार असो; आदित्यवर्चस्, भास्वान्, सर्वभक्ष आणि रौद्रदेही अशा तुला नमस्कार असो १९. तमोघ्न, हिमघ्न, शत्रुघ्न, कृतघ्नघातक, देव आणि ज्योतिर्गणांचा अधिपति अशा तुला नमस्कार असो २०. सुवर्णतुल्य, हरी, विश्वकर्मा, तमोनाशक, रुचि आणि लोकसाक्षी अशा तुला नमस्कार असो २१. प्रपंचाचा नाश हाच करीत असून त्याची उत्पत्तिही हाच प्रभु करीत असतो; सर्वांचें शोषण हाच करीत असतो; सर्वांचा नाश हाच करीत असतो आणि किरणांच्या योगानें सर्वांची उत्पत्तिही हाच करीत असतो २२. भूतांचे ठिकाणीं अंतर्यामिरूपानें स्थित असलेला हा, इंद्रियें निद्रिस्थ असतांना, जागत असतो;

णाम् २३ देवाश्च क्रतवश्चैव क्रतूनां फलमेव च। यानि कृत्यानि लोकेषु सर्वेषु परमप्रभुः २४ एनमापत्सु कृच्छ्रेषु कान्तारेषु भयेषु च। कीर्तयन्पुरुषः कश्चिन्नावसीदति राघव २५ पूजयस्वैनमेकाग्रो देवदेवं जगत्पतिम् । एतत्त्रिगुणितं जप्त्वा युद्धेषु विजयिष्यति २६ अस्मिन्क्षणे महाबाहो रावणं त्वं जहिष्यसि । एवमुक्त्वा ततोगस्त्यो जगाम स यथागतम् । २७ एतच्छ्रुत्वा महातेजा नष्टशोकोभवत्तदा । धारयामास सुप्रीतो राघवः प्रयतात्मवान् २८ आदित्यं प्रेक्ष्य जप्त्वेदं परं हर्षमवाप्तवान् । त्रिराचम्य शुचिर्भूत्वा धनुरादाय वीर्यवान् २९ रावणं प्रेक्ष्य हृष्टात्मा जयार्थं समुपागमत् । सर्वयत्नेन महता वृतस्तस्य वधेभवत् ३० अथ रविरवदन्निरीक्ष्य रामं मुदितमनाः परमं प्रहृष्यमाणः । निशिचरपतिसंक्षयं विदित्वा सुरगणमध्यगतो वचस्त्वरेति ३१ [ ४७७१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चोत्तरशततमः सर्गः ॥ १०५ ॥

सारथिः स रथं हृष्टः परसैन्यप्रधर्षणम् । गन्धर्वनगराकारं समुच्छ्रि-

---

अग्निहोत्र हाच आहे आणि अग्निहोत्र्यांना प्राप्त होणारें फल देणाराही हाच आहे २३. देव, क्रतु, क्रतुफल आणि सर्व जगतांतील कर्मे हा परम प्रभुच होय २४. विपत्ति, संकटें, वनें आणि भयप्रद प्रसंग प्राप्त झाल्यास, हे राघवा, ह्याचें स्तवन करणारा कोणीही पुरुष नाश पावत नाहीं २५. एकाग्र होऊन ह्या जगदीश देवाधिदेवाचें तूं पूजन कर. हें स्तोत्र तीन वेळ जपिलें असतां युद्धामध्यें पुरुषाला विजय प्राप्त होतो २६. हे महापराक्रमी रामा, ह्या क्षणींच तूं रावणाचा वध करशील ". असें सांगून अगस्त्यमुनि आल्या वाटेनें परत गेले २७. हें श्रवण करून महातेजस्वी राम चिंतारहित झाला आणि त्या जितेंद्रिय रामानें सुप्रसन्न होऊन हृदयामध्यें तें स्तोत्र धारण केलें २८. आदित्याकडे दृष्टि देऊन ह्या स्तोत्राचा जप केल्यानंतर वीर्यवान् रामाला पराकाष्ठेचा हर्ष झाला. नंतर तीन वेळ आचमन करून शुचिर्भूत झाल्यानंतर त्यानें धनुष्य घेतलें २९; रावणाला अवलोकन केल्यानंतर मनामध्यें संतुष्ट होऊन जयप्राप्तीकरितां त्यानें ईश्वराचें ध्यान केलें व सर्व प्रकारच्या यत्नांची पराकाष्ठा करून त्याच्या वधाविषयीं तो उद्युक्त झाला ३०. तदनंतर देवगणांच्या मध्यभागीं असलेला सूर्य रामाला अवलोकन करून मनामध्यें प्रसन्न झाला; पराकाष्ठेचा त्याला आनंद होऊं लागला आणि राक्षसाधिपतीचा नाश होणार असें जाणून ' त्वरा कर ' एवढें भाषण रामाला उद्देशून त्यानें केलें ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें पांचवा सर्ग समाप्त झाला॥ १०५॥

तपताकिनम् १ युक्तं परमसंपन्नैर्वाजिभिर्हेममालिभिः । युद्धोपकरणैः पूर्णं पताकाध्वजमालिनम् २ ग्रसन्तमिव चाकाशं नादयन्तं वसुन्धराम् ३ प्रणाशं परसैन्यानां स्वसैन्यस्य प्रहर्षणम् । रावणस्य रथं क्षिप्रं चोदयामास सारथिः ४ तमापतन्तं सहसा स्वनवन्तं महाध्वजम् । रथं राक्षसराजस्य नरराजो ददर्श ह ५ कृष्णवाजिसमायुक्तं युक्तं रौद्रेण वर्चसा । दीप्यमानमिवाकाशे विमानं सूर्यवर्चसम् ६ तडित्पताकागहनं दर्शितेन्द्रायुधप्रभम् । शरधारा विमुञ्चन्तं धाराधरमिवाम्बुदम् ७ स दृष्ट्वा मेघसंकाशमापतन्तं रथं रिपोः । गिरेर्वज्राभिमृष्टस्य दीर्यतः सदृशस्वनम् ८ विस्फारयन्वै वेगेन बालचन्द्रानतं धनुः । उवाच मातलिं रामः सहस्राक्षस्य सारथिम् ९ मातले पश्य संरब्धमापतन्तं रथं रिपोः । यथापसव्यं पतता वेगेन महता पुनः १० समरे हन्तुमात्मानं तथाऽनेन कृता मतिः । तदप्रमादमातिष्ठ प्रत्युद्गच्छ रथं रिपोः ११ विध्वंसयितुमिच्छामि वायुर्मेघमिवोत्थितम् । अविक्लवमसंभ्रान्तमव्यग्रहृदयेक्षणम् १२ रश्मिसंचारनि-

---

शत्रूच्या सैन्यावर हल्ला करणारा, गंधर्वनगरासारिखी आकृति आणि उभारिलेल्या पताका ह्यांनीं युक्त, उत्कृष्ट गुणांनीं संपन्न व सुवर्णालंकारांनीं भूषित असे अश्व जोडिलेला, युद्धसाधनांनीं भरलेला, पताका व ध्वज ह्यांनीं व्याप्त झालेला, आकाश जसें कांहीं गट्ट करून टाकिलेला, पृथ्वी नादित करणारा, शत्रुसैन्यांचा नाश करणारा आणि स्वतःच्या सैन्याला हर्ष उत्पन्न करणारा असा जो रावणाचा रथ तो सारथ्यानें सत्वर हांकिला १,२,३,४; आणि मोठ्यामोठ्या ध्वजांनीं युक्त असून घोष करीत येत असलेला तो राक्षसराज रावणाचा रथ मानवराज रामानें अवलोकन केला ५. कृष्णाश्व जोडिलेला, उग्र तेजानें युक्त, सूर्यतुल्य तेजस्वी विमानाप्रमाणें आकाशामध्यें झळकणारा ६, विद्युल्लतेसारिख्या पताकांनीं व्याप्त, इंद्रधनुष्यासारिखी प्रभा दर्शविणारा आणि जलधारा धारण करणाऱ्या मेघाप्रमाणें बाणधारा सोडणारा ७ असा तो शत्रूचा मेघतुल्य रथ अवलोकन केल्यावर वज्रानें ताडित झाल्यामुळें विदीर्ण होणाऱ्या पर्वताप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे ८ आणि बालचंद्राप्रमाणें जें नमलेलें आहे अशा आपल्या धनुष्याचा टणत्कार करीत करीत राम इंद्रसारथि मातलीला ह्मणाला ९ "हे मातले, अगदीं तुफान होऊन येत असलेल्या शत्रूचा रथ तूं अवलोकन कर. ज्याअर्थीं मोठ्या वेगानें संग्रामामध्यें हा आपल्याला उजवी घालून येत आहे त्याअर्थीं माझा वध करण्याचें ह्यानें मनामध्यें आणिलें आहे. तस्मात्, चित्त दुसरीकडे व्यग्र होऊं न देतां शत्रूच्या रथासमोर आपला रथ ने. १०, ११. वायु ज्याप्रमाणें उद्भवलेला मेघ उडवून देतो त्याप्रमाणें हा

यतं प्रचोदय रथं द्रुतम्। कामं न त्वं समाधेयः पुरन्दररथोचितः १३ युयुत्सुरहमेकाग्रः स्मारये त्वां न शिक्षये। परितुष्टः स रामस्य तेन वाक्येन मातलिः १४ प्रचोदयामास रथं सुरसारथिरुत्तमः। अपसव्यं ततः कुर्वन्रावणस्य महारथम् १५ चक्रसंभूतरजसा रावणं व्यवधूनयत्। ततः क्रुद्धो दशग्रीवस्ताम्रविस्फारितेक्षणः १६ रथप्रतिमुखं रामं सायकैरवधूनयत्। धर्षणामर्षितो रामो धैर्यं रोषेण लम्भयन् १७ जग्राह सुमहावेगमैन्द्रं युधि शरासनम्। शरांश्च सुमहावेगान्सूर्यरश्मिसमप्रभान् १८ तदुपोढं महद्युद्धमन्योन्यवधकाङ्क्षिणोः। परस्पराभिमुखयोर्दृप्तयोरिव सिंहयोः १९ ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः। समीयुर्द्वैरथं द्रष्टुं रावणक्षयकाङ्क्षिणः २० समुत्पेतुरथोत्पाता दारुणा रोमहर्षणाः। रावणस्य विनाशाय राघवस्योदयाय च २१ ववर्ष रुधिरं देवो रावणस्य रथोपरि। वाता मण्ड-

---

रथ उडवून देण्याची माझी इच्छा आहे. तस्मात्, खिन्न न होतां, गोंधळून न जातां, चित्त व दृष्टि दुसरीकडे व्यग्र होऊं न देतां १२ आणि रश्मिसंबंधी अव्यवस्था होऊं न देतां तूं माझा रथ सत्वर पुढें ने. इंद्राच्या रथाची तुला नेहेमींच संवय असल्यामुळें खरोखर मीं ह्मणजे तुला कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहींच; १३. तथापि, रावणाशीं युद्ध करण्यास मी एकटा सज्ज झालों असल्यामुळें सारथ्यकर्माची मी तुला आठवण करीत आहें. सारथ्यकर्मासंबंधानें तुला कांहीं शिकविण्याचा माझा उद्देश नाहीं" रामाच्या ह्या भाषणानें तो मातलि संतुष्ट झाला १४ आणि त्या उत्कृष्ट देवसारथ्यानें तो रथ हांकिला. तदनंतर रावणाच्या महारथाला उजवी घालून जातां जातां १५ चाकांच्या योगानें उडालेल्या धुळीनें त्या देवसारथ्यानें रावणाला कंपित करून सोडिलें तदनंतर क्रुद्ध झालेल्या रावणानें आपले आरक्तवर्ण डोळे वटारिले १६ आणि रथाच्यासंमुखच असलेल्या रामाला बाणांच्या योगानें तो कंपित करूं लागला. ह्याप्रमाणें बाणांचा गहजब झाल्यामुळें राम क्रुद्ध झाला; परंतु, क्रुद्ध झाला असतांनाही धैर्य धरून अतिशय वेगानें युक्त असें इंद्राचें धनुष्य आणि फारच वेगवान् व सूर्यकिरणासारिखे तेजस्वी असे बाण त्यानें त्या संग्रामामध्यें हातांत घेतले १७, १८. तदनंतर मत्त झालेले सिंह ज्याप्रमाणें एकमेकांसमोर उभे राहून युद्ध करूं लागतात त्याप्रमाणें एकमेकांच्या वधाची इच्छा करणाऱ्या त्या उभयतांमध्यें प्रचंड युद्ध सुरू झालें १९. तदनंतर रावणाचा नाश होण्याची इच्छा धरणारे गंधर्वासहवर्तमान देव, सिद्ध आणि महर्षि तें एकेकट्याचें युद्ध पाहण्याकरितां तेथें आले असतां २० रावणाचा नाश आणि राघवाचा जय सुचविणारे व अंगावर रोमांच उठविणारे असे भयंकर उत्पात होऊं

लिनकवीक्ष्य परुषं प्रचक्रमुः २२ महद्गृध्रकुलं चास्य भ्रममाणं नभःस्थले । येन येन रथो याति तेन तेन प्रधावति २३ संध्यया चावृता लङ्का जपापुष्पनिकाशया । दृश्यते संप्रदीप्तेव दिवसेऽपि वसुन्धरा २४ सनिर्घाता महोल्काश्च संप्रपेतुर्महास्वनाः । विषादयंस्ते रक्षांसि रावणस्य तदा हिताः २५ रावणश्च यतस्तत्र प्रचचाल वसुन्धरा । रक्षसां च प्रहरतां गृहीता इव बाहवः २६ ताम्राः पीताः सिताः श्वेताः पतिताः सूर्यरश्मयः । दृश्यन्ते रावणस्याङ्गे पर्वतस्येव धातवः २७ गृध्रैरनुगताश्चास्य वमन्तो ज्वलनं मुखैः । प्रणेदुर्मुखमीक्षन्त्यः संरब्धमशिवं शिवाः २८ प्रतिकूलं ववौ वायू रणे पांसून्समुत्किरन् । तस्य राक्षसराजस्य कुर्वन्दृष्टिविलोपनम् २९ निपेतुरिन्द्राशनयः सैन्ये चास्य समन्ततः । दुर्विषह्यस्वरा घोरं विना जलधरोदयम् ३० दिशश्च प्रदिशः सर्वा बभूवुस्तिमिरावृताः । पांसुवर्षेण महता दुर्दर्शं च नभोऽभवत् ३१ कुर्वत्यः कलहं घोरं सारिकास्तद्रथं प्रति ॥

---

लागले २१. रावणाच्या रथावर रक्ताचा पर्जन्य पडूं लागला; तीव्र वेगानें युक्त व अप्रदक्षिणिक अशा वायधुळी रावणासमीप सुटूं लागल्या २२; जिकडे जिकडे ह्याचा रथ जाऊं लागला तिकडे तिकडे आकाशामध्यें हिंडत असलेला गृध्रपक्ष्यांचा मोठाच कळप धांवूं लागला २३; जास्वंदीच्या फुलासारिखा जिचा रंग आहे अशा संध्येनें म्हणजे संधिकालीन प्रभेनें लंकानगरी व्याप्त झाली; दिवस असतांनाही पृथ्वी प्रदीप्त झाल्यासारिखी दिसूं लागली २४; निर्घातशब्द व प्रचंड गर्जना ह्यांनीं युक्त असलेल्या मोठ्या मोठ्या उल्का आकाशांतून पडूं लागल्यामुळें रावणाचें हित इच्छिणारे राक्षस खिन्न झाले २५; जिकडे रावण होता तिकडे भूकंप होऊं लागला; युद्ध करणाऱ्या राक्षसाचे हात जसे कांहीं धरून ठेविल्यासारिखे स्तब्ध झाले २६;* पर्वतावरील धातूप्रमाणें ताम्र, पीत, सित व श्वेतवर्ण सूर्यकिरणें रावणाच्या समोर पडलेलीं दृष्टीं पडूं लागलीं २७; गृध्रपक्षी ज्यांच्या मागोमाग आहेत अशा भालू मुखांतून ज्वाला सोडीत सोडीत व रावणाच्या मुखाकडे पहात पहात वेगावेगानें अमंगल शब्द करूं लागल्या २८; संग्रामामध्यें धूळ उडवीत उडवीत वायु प्रतिकूल वाहूं लागला; आणि त्या राक्षसराजाच्या दृष्टीलाही तो अंधेरी आणूं लागला २९; प्रचंड मेघ आकाशामध्यें आल्याशिवायच ज्यांचा ध्वनि अति दुःसह आहे अशा विजा रावणाच्या सैन्यामध्यें ठिकठिकाणीं पडूं लागल्या ३०; धूळ अतिशयच उडाल्यामुळें सर्व दिशा व

---

* सूर्यकिरणें अनेक वर्णांनीं युक्त असतात हें रामायणासारख्या अतिप्राचीन ग्रंथांतूनही आढळतें. ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारिखी आहे.

निपेतुः शतशस्तत्र दारुणा दारुणारुताः ३२ जघनेभ्यः स्फुलिङ्गाश्च नेत्रेभ्योऽश्रूणि सन्ततम् । मुमुचुस्तस्य तुरगास्तुल्यमग्निं च वारि च ३३ एवंप्रकारा बहवः समुत्पाता भयावहाः । रावणस्य विनाशाय दारुणाः संप्रजज्ञिरे ३४ रामस्यापि निमित्तानि सौम्यानि च शिवानि च । बभूवुर्जयशंसीनि प्रादुर्भूतानि सर्वशः ३५ निमित्तानीह सौम्यानि राघवस्य जयाय वै । दृष्ट्वा परमसंहृष्टो हतं मेने च रावणम् ३६ ततो निरीक्ष्यात्मगतानि राघवो रणे निमित्तानि निमित्तकोविदः । जगाम हर्षं च परां च निर्वृतिं चकार युद्धे ह्यधिकं च विक्रमम् ३७ [४८०८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षडुत्तरशततमः सर्गः ॥ १०६ ॥

ततः प्रवृत्तं सुक्रूरं रामरावणयोस्तदा । सुमहद्द्वैरथं युद्धं सर्वलोकभयावहम् १ ततो राक्षससैन्यं च हरीणां च महद्बलम् । प्रगृहीतप्रहरणं निश्चेष्टं समवर्तत २ संप्रयुद्धौ तु तौ दृष्ट्वा बलवन्नरराक्षसौ । व्याक्षिप्तहृदयाः

---

उपदिशा अंधकारानें व्याप्त झाल्या आणि आकाशही दृष्टीं पडण्याची मोठी पंचाईत पडली ३१; भयंकर शब्द करणाऱ्या शेंकडों घोर सारिका भयंकर कलह करीत करीत रावणाच्या रथावर येऊन बसूं लागल्या ३२; त्याच्या अश्वांच्या नेत्रांतून एकसारिखे अश्रु आणि कुल्ल्यांतून एकसारिख्या ठिणग्या पडूं लागल्या व अशारीतीनें त्याचे ते अश्व अग्नीचा व उदकाचा बरोबरच वर्षाव करूं लागले ३३ आणि अशाच प्रकारचे भयंकर दारुण उत्पात रावणाच्या नाशाकरितां उत्पन्न होऊं लागले ३४. त्याचप्रमाणें रामाच्याही सर्व बाजूंनीं सौम्य, कल्याणकारक व जयसूचक शकुन होऊं लागले ३५ आणि अशारीतीनें रामाच्या जयाकरितां होत असलेलीं सौम्य चिन्हें अवलोकन करितांक्षणीं राम अतिशय संतुष्ट झाला व आपल्या हातून रावणाचा वध झालाच असें तो समजूं लागला ३६. सारांश, संग्रामामध्यें आपल्याला होत असलेले शकुन अवलोकन केल्यावर शकुन जाणणाऱ्या त्या रामाला हर्ष व पराकाष्ठेचें सुख झालें आणि युद्धामध्यें तो अधिकच पराक्रम करूं लागला ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें सहावा सर्ग समाप्त झाला ॥ १०६ ॥

तदनंतर रामरावणांमध्यें सर्व लोकांना भय उत्पन्न करणारें व अत्यंत क्रूर असें फारच मोठें एकेकट्यांचें युद्ध सुरू झालें असतां १ राक्षससैन्य व वानरांचेंही प्रचंड सैन्य अशीं दोन्हीं सैन्यें हातांत आयुधें घेतलीं असतांनाही रामरावणाचें युद्ध पहात स्वस्थ उभीं राहिलीं २. ते उभयतां बलाढ्य रामरावण उत्कृष्ट रीतीनें युद्धाला प्रवृत्त

सर्वे परं विस्मयमागताः ३ नानाप्रहरणैर्व्यग्रैर्भुजैर्विस्मितबुद्धयः। तस्थुः प्रेक्ष्य च सर्वं ते नाभिजग्मुः परस्परम् ४ रक्षसां रावणं चापि वानराणां च राघवम्। पश्यतां विस्मिताक्षाणां सैन्यं चित्रमिवाबभौ ५ तौ तु तत्र निमित्तानि दृष्ट्वा राघवरावणौ। कृतबुद्धी स्थितामर्षौ युयुधाते ह्यभीतवत् ६ जेतव्यमिति काकुत्स्थो मर्तव्यमिति रावणः। धृतौ स्ववीर्यसर्वस्वं युद्धेऽदर्शयतां तदा ७ ततः क्रोधाद्दशग्रीवः शरान्संधाय वीर्यवान्। मुमोच ध्वजमुद्दिश्य राघवस्य रथे स्थितम् ८ ते शरास्तमनासाद्य पुरन्दररथध्वजम्। रथशक्तिं परामृश्य निपेतुर्धरणीतले ९ ततो रामोऽपि संक्रुद्धश्चापमाकृष्य वीर्यवान्। कृतप्रतिकृतं कर्तुं मनसा संप्रचक्रमे १० रावणध्वजमुद्दिश्य मुमोच निशितं शरम्। महासर्पमिवासह्यं ज्वलन्तं स्वेन तेजसा ११ रामश्चिक्षेप तेजस्वी केतुमुद्दिश्य सायकम्। जगाम स महीं भित्त्वा दशग्रीवध्वजं शरः। स निकृत्तोऽपतद्भूमौ रावणस्यन्दनध्वजः १२ ध्वजस्योन्मथनं

---

झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं सर्वही अंतःकरणामध्यें गोंधळून जाऊन अतिशय विस्मयचकित झाले ३. अनेक प्रकारच्या आयुधांनीं हात तसेच अडकून राहिले असतांना मनामध्यें विस्मित झालेले ते वानर व राक्षस तो सर्व प्रकार अवलोकन करून प्रहार करण्याकरितां एकमेकांसमीप जाईनासे झाले ४. ज्यांची दृष्टि विस्मयचकित झालेली आहे असे राक्षस रावणाला पाहूं लागले असतां आणि वानर रामाला पाहूं लागले असतां त्या उभयतांचींही सैन्यें चित्राप्रमाणें स्वस्थ उभीं राहिलीं ५; परंतु, वर निर्दिष्ट केलेले शकुन अवलोकन केल्यानंतर ते दीर्घद्वेषी रामरावण मनाचा पक्का निश्चय करून निर्भयपणें युद्ध करूं लागले ६. उभयतां रामरावणांनीं अनुक्रमें जिंकण्याचा व मरणाचा निश्चय करून आपलें सर्व कांहीं सामर्थ्य त्यावेळीं युद्धामध्यें प्रकट केलें ७. तदनंतर वीर्यवान् रावणानें रागारागानें धनुष्याला बाण लाविले आणि रामाच्या रथावर असलेल्या ध्वजाला अनुलक्षून सोडिले ८; परंतु, इंद्राच्या रथावरील ध्वजापर्यंत येण्याचे पूर्वींच त्या रथाच्या तेजाची गांठ पडतांक्षणीं ते बाण भूतलावर पडले ९. तदनंतर वीर्यवान् रामही अतिशय क्रुद्ध झाला आणि धनुष्य आकर्षण करून तोडीस तोड देण्याचें त्यानें मनामध्यें आणिलें १०. इतकेंच नव्हे परंतु, प्रचंड सर्पाप्रमाणें दुःसह व स्वतःच्या तेजानें जसा कांहीं जळत असलेला एक तीक्ष्ण बाण रावणाचा ध्वज रोखून त्यानें सोडिला ११. सारांश, तेजस्वी रामानें ध्वजाला अनुलक्षून बाण सोडिला असतां रावणाचा ध्वज तोडून आणि पृथ्वी विदीर्ण करून तो बाण चालता झाला व रावणाच्या रथावरील तो तुटलेला ध्वज तत्क्षणींच भूमीवर पडला १२. ध्वज उलथून

दृष्ट्वा रावणः स महाबलः । संप्रदीप्तोऽभवत्क्रोधादमर्षात्प्रज्वलन्निव १३
स रोषवशमापन्नः शरवर्षं ववर्ष ह । रामस्य तुरगान्दीप्तैः शरैर्विव्याध
रावणः १४ ते दिव्या हरयस्तत्र नास्खलन्नापि बभ्रमुः । बभूवुः स्वस्थ-
हृदयाः पद्मनालैरिवाहताः १५ तेषामसंभ्रमं दृष्ट्वा वाजिनां रावणस्तदा ।
भूय एव सुसंक्रुद्धः शरवर्षं मुमोच ह १६ गदाश्च परिघांश्चैव चक्राणि
मुसलानि च । गिरिशृङ्गाणि वृक्षांश्च तथा शूलपरश्वधान् १७ माया-
विहितमेतत्तु शस्त्रवर्षमपातयत् । सहस्रशस्तदा बाणानश्रान्तहृदयोद्यमः १८
तुमुलं त्रासजननं भीमं भीमप्रतिस्वनम् । तद्वर्षमभवद्युद्धे नैकशस्त्रमयं महत् १९
विमुच्य राघवरथं समन्ताद्वानरे बले । सायकैरन्तरिक्षं च चकार सुनिरन्त-
रम् २० मुमोच च दशग्रीवो निःसङ्गेनान्तरात्मना । व्यायच्छमानं तं दृष्ट्वा
तत्परं रावणं रणे २१ प्रहसन्निव काकुत्स्थः संदधे निशिताञ्छरान् । स
मुमोच ततो बाणाञ्छतशोथ सहस्रशः २२ तान्दृष्ट्वा रावणश्चक्रे स्वशरैः
खं निरन्तरम् । ताभ्यां नियुक्तेन तदा शरवर्षेण भास्वता २३ शरबद्धमिवा-

---

पडल्याचें अवलोकन करून तो महाबलाढ्य रावण क्रोधानें प्रदीप्त झाला आणि तो अपमान सहन न झाल्यामुळें जसा कांहीं जळूं लागला १३. नंतर क्रोधाधीन झालेल्या त्या रावणानें बाणांचा वर्षाव सुरू केला आणि देदीप्यमान बाणांनीं त्यानें रामाच्या अश्वांनाही वेध केला १४. तथापि, ते दिव्य अश्व मुळींच ढळले नाहींत व गोंधळूनही गेले नाहींत; परंतु, कमलांच्या देठांचा प्रहार झाल्याप्रमाणें ते मनामध्यें स्वस्थच राहिले १५. ते अश्व मुळींच गडबडले नाहींत असें आढळून आल्यावर रावण अधिकच क्रुद्ध होऊन बाणवृष्टि करूं लागला १६. नंतर गदा, परिघ, चक्रें, मुसळें, पर्वतशिखरें, वृक्ष, शूल आणि परशु १७ असा मायानिर्मित शस्त्रवर्षाव त्यानें सुरू केला आणि अंतःकरणामध्यें यत्किंचि-त्‌ही गोंधळून न जातां व प्रयत्नांत कसर होऊं न देतां हजारों बाणही त्यानें रामावर टाकिले १८. तुमुल, त्रासजनक, भयंकर, भयंकर नादानें युक्त आणि नानाप्रकारच्या शस्त्रांनीं व्याप्त अशी ती प्रचंड वृष्टि युद्धामध्यें होऊं लागली १९. रामाच्या रथाशिवाय वानरसैन्यामध्येंही सोडिलेल्या बाणांच्या योगानें त्यानें अंतरिक्ष अगदीं व्याप्त करून टाकिलें २० आणि मनामध्यें जिवाची आशा न धरितां तो रावण एकसारिखा बाण सोडीतच राहिला. तदनंतर संग्राममध्यें तो रावण आपल्या जीवाची अगदीं ओढाताण करीत आहे असें आढळून आल्यावर २१ रामानें हंसत हंसत तीक्ष्ण बाण धनुष्याला लाविले आणि नंतर शेंकडों हजारों बाण रावणावर सोडिले २२. ते अवलोकन करून रावणानें आपल्या बाणांच्या योगानें आकाश व्याप्त करून टाकिलें. असो. त्या

भाति द्वितीयं भास्वदम्बरम्। नानिमित्तोऽभवद्बाणो नातिर्भेत्ता न निष्फलः २४
अन्योन्यमभिसंहत्य निपेतुर्धरणीतले। तथा विसृजतोर्बाणान्रामरावण-
योर्मृधे २५ प्रायुध्येतामविच्छिन्नमस्यन्तौ सव्यदक्षिणम्। चक्रतुश्च शरै-
र्घोरैर्निरुच्छ्वासमिवाम्बरम् २६ रावणस्य हयान्रामो हयान्रामस्य रावणः।
जघ्नतुस्तौ तदाऽन्योन्यं कृतानुकृतकारिणौ २७ एवं तु तौ सुसंक्रुद्धौ चक्र-
तुर्युद्धमुत्तमम्। मुहूर्तमभवद्युद्धं तुमुलं रोमहर्षणम् २८ तौ तथा युध्य-
मानौ तु समरे रामरावणौ। ददृशुः सर्वभूतानि विस्मितेनान्तरात्मना २९
अर्दयन्तौ तु समरे तयोस्तौ स्यन्दनोत्तमौ। परस्परमभिक्रुद्धौ परस्प-
रमभिद्रुतौ ३० परस्परवधे युक्तौ घोररूपौ बभूवतुः। मण्डलानि च वीथीश्च
गतप्रत्यागतानि च ३१ दर्शयन्तौ बहुविधां सूतौ सारथ्यजां गतिम्। अर्द-
यन्रावणं रामो राघवं चापि रावणः ३२ गतिवेगं समापन्नौ प्रतिवेगनि-
वर्तने। क्षिपतोः शरजालानि तयोस्तौ स्यन्दनोत्तमौ ३३ चेरतुः संयुगमहीं

---

उभयतांनीं केलेल्या उज्ज्वल बाणवृष्टीमुळें २३ बाणनिर्मित असें एक दुसरें आकाशच तेथें भासूं लागलें. लक्ष्य सोडून जाणारा, वेध न करणारा अथवा निष्फल असा एकही बाण त्या उभयतांच्या हातून सुटला नाहीं २४. संग्रामामध्यें ते उभयतां रामरावण बाण सोडूं लागले असतां एकमेकांला वेध करून ते त्यांचे बाण भूमीवर पडले २५. दोन्ही बाजूंनीं एकसारिखे बाण सोडीत सोडीत ते युद्ध करूं लागले आणि घोर बाणांच्या योगानें त्यांनीं आकाश अगदीं गच्च भरून काढिलें २६. रामानें रावणाच्या अश्वांना व रावणानें रामाच्या अश्वांना वेध केला आणि अशारीतीनें तोडीस तोड करणारे ते उभयतां एकमेकांवर बाण टाकूं लागले २७. ह्याप्रमाणें अतिशय क्रुद्ध होऊन ते उभयतां उत्कृष्ट युद्ध करूं लागले असतां शरीरावर रोमांच उठविणारें असें एक मुहूर्तपर्यंत त्या उभयतांमध्यें तुमुल युद्ध झालें २८. ह्याप्रमाणें संग्रामामध्यें ते रामरावण युद्ध करूं लागले असतां एकमेकाला संग्रामामध्यें जर्जर करून सोडणाऱ्या त्या रामरावणांकडे व त्यांच्या उत्कृष्ट रथांकडे सर्व प्राणी मनामध्यें विस्मित होऊन पाहूं लागले. एकमेकावर क्रुद्ध झालेले ते रामरावण एकमेकांवर धांवून जाऊं लागले २९,३० आणि एकमेकांचा वध करण्याविषयीं उद्युक्त झालेल्या त्या उभयतांचीं रूपेंही भयंकर दिसूं लागलीं. मंडलें, मार्ग, जाणें, परत येणें ३१ इत्यादि नानाप्रकारचें सारथ्यकर्मांतील कौशल उभयतां सारथि दाखवूं लागले. रावणाला वेध करीत असलेला राम आणि रामाला वेध करीत असलेला रावण ३२ हे उभयतांही प्रतिपक्ष्याचा वेग नाहींसा करण्याकरितां स्वतः फारच वेगानें एकमेकांसमोर जाऊं लागले. बाणसमुदाय सोडीत असलेल्या त्या उभयतांचे उत्कृष्ट

[illegible] । दर्शयित्वा तदा तौ तु गतिं बहुविधां रणे ३४ परस्परस्याभिमुखौ पुनरेव च तस्थतुः । धुरं धुरेण रथयोर्वक्त्रं वक्त्रेण वाजिनाम् ३५ पताकाश्च पताकाभिः समीयुः स्थितयोस्तदा । रावणस्य ततो रामो धनुर्मुक्तैः शितैः शरैः ३६ चतुर्भिश्चतुरो दीप्तान्हयान्प्रत्यपसर्पयत् । स क्रोधवशमापन्नो हयानामपसर्पणे ३७ मुमोच निशितान्बाणान्राघवाय दशाननः । सोऽतिविद्धो बलवता दशग्रीवेण राघवः ३८ जगाम न विकारं च न चापि व्यथितोऽभवत् । चिक्षेप च पुनर्बाणान्वज्रसारसमस्वनान् ३९ सारथिं वज्रहस्तस्य समुद्दिश्य दशाननः । मातलेस्तु महावेगाः शरीरे पतिताः शराः ४० न सूक्ष्ममपि संमोहं व्यथां वा प्रददुर्युधि । तया धर्षणया क्रुद्धो मातलेर्न तथाऽऽत्मनः ४१ चकार शरजालेन राघवो विमुखं रिपुम् । विंशतिं त्रिंशतिं षष्टिं शतशोऽथ सहस्रशः ४२ मुमोच राघवो वीरः सायकान्स्यन्दने रिपोः । रावणोऽपि ततः क्रुद्धो रथस्थो राक्षसेश्वरः ४३ गदामुसलवर्षेण रामं प्रत्यर्दयद्रणे । तत्प्रयुक्तं पुनर्युद्धं तुमुलं रोमहर्षणम् ४४

---

रथ ३३ पर्जन्यवृष्टि करीत असलेल्या मेघांप्रमाणें संग्रामभूमीमध्यें संचार करूं लागले. नानाप्रकारची गति संग्रामामध्यें दर्शवून ३४ ते उभयतांही रामरावण पुनरपि एकमेकांसमुख उभे राहिले. तेव्हां एकमेकांसमोर ते रथ उभे राहिले असतां धुरीशीं धुरी, अश्वांच्या मुखांशीं अश्वांचें मुख ३५ व पताकांशीं पताका भिडून गेल्या. तदनंतर धनुष्यापासून सोडिलेल्या चार तीक्ष्ण बाणांच्या योगानें रावणाचे चार देदीप्यमान अश्व रामानें मागें सारिले. तेव्हां अश्व मागें सारिल्यामुळें क्रोधाधीन झालेल्या त्या ३६,३७ रावणानें रामावर तीक्ष्ण बाण सोडिले. तथापि, बलाढ्य रावणानें अतिशय वेध केला असतांही रामाची चर्या ३८ मुळींच पालटली नाहीं व त्याला व्यथाही झाली नाहीं. तेव्हां पुनरपि वज्रासारिखा ज्यांचा ध्वनि प्रचंड आहे असे बाण इंद्राच्या सारथ्याला उद्देशून रावणानें सोडिले असतां ते महावेगवान् बाण मातलीच्या शरीरावर पडले ३९,४०; परंतु, संग्रामामध्यें त्या बाणांनीं मातलीला यत्किंचितही मूर्च्छा अथवा व्यथा उत्पन्न केली नाहीं. मातलीवर तो गहजब झाल्यामुळें राम जसा क्रुद्ध झाला तसा स्वतःवर झाल्यानेंही तो क्रुद्ध झाला नव्हता ४१ आणि म्हणून बाणसमुदायाच्या योगानें त्या रामानें शत्रूला पराङ्मुखच करून टाकिलें. असो. वीसवीस, तीसतीस, साठसाठ, शंभरशंभर, व हजारहजार ४२ बाण शत्रूच्या रथावर वीर राम सोडूं लागला असतां रथारूढ झालेला राक्षसाधिपति रावणही क्रुद्ध झाला ४३ आणि गदा व मुसळें ह्यांचा वर्षाव करून संग्रामामध्यें त्यानें रामाला पीडा दिली व अशारीतीनें त्या उभयतांमध्यें

गदानां मुसलानां च परिघाणां च निःस्वनैः । शराणां पुङ्खवातैश्च क्षुभिताः
सप्त सागराः ४५ क्षुब्धानां सागराणां च पातालतलवासिनः । व्यथिता
दानवाः सर्वे पन्नगाश्च सहस्रशः ४६ चकम्पे मेदिनी कृत्स्ना सशैलवन-
कानना । भास्करो निष्प्रभश्चासीन्न ववौ चापि मारुतः ४७ ततो देवाः
सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । चिन्तामापेदिरे सर्वे सकिंनरमहोरगाः ४८
स्वस्ति गोब्राह्मणेभ्यस्तु लोकास्तिष्ठन्तु शाश्वताः । जयतां राघवः संख्ये
रावणं राक्षसेश्वरम् ४९ एवं जपन्तोऽपश्यंस्ते देवाः सर्षिगणास्तदा । राम-
रावणयोर्युद्धं सुघोरं रोमहर्षणम् ५० गन्धर्वाप्सरसां सङ्घा दृष्ट्वा युद्धम-
नूपमम् । सागरं चाम्बरप्रख्यमम्बरं सागरोपमम् ५१ रामरावणयोर्युद्धं
रामरावणयोरिव । एवं ब्रुवन्तो ददृशुस्तद्युद्धं रामरावणम् ५२ ततः क्रोधा-
न्महाबाहू रघूणां कीर्तिवर्धनः । संधाय धनुषा रामः शरमाशीविषोप-
मम् ५३ रावणस्य शिरोऽच्छिन्दच्छ्रीमज्ज्वलितकुण्डलम् । तच्छिरः पतितं
भूमौ दृष्टं लोकैस्त्रिभिस्तदा ५४ तस्यैव सदृशं चान्यद्रावणस्योत्थितं शिरः ।

---

पुनरपि शरीरावर रोमांच उठविणारें तुमुल युद्ध सुरू झालें ४४. गदा, मुसलें व परिघ ह्यांचे ध्वनि आणि बाणांच्या पिच्छांचे वायु ह्यांच्या योगानें सप्त सागर क्षुब्ध झाले ४५. सागर क्षुब्ध झाले असतां पातालामध्यें वास्तव्य करणार सर्व दानव आणि हजारों भुजंग व्यथित झाले ४६; पर्वत, वनें व अरण्यें ह्यांसहवर्तमान सर्व पृथ्वी हालूं लागली; सूर्य निस्तेज झाला आणि वायूचाही संचार बंद झाला ४७. तदनंतर गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध, महर्षि आणि-किन्नर व महोरग ह्यांसहवर्तमान-इतरही सर्व चिंताक्रांत झाले ४८. "गोब्राह्मणांचें कल्याण असो; लोक अक्षय्य कायम राहोत आणि संग्रामामध्यें राम राक्षसाधिपति रावणाचा पराभव करो" ४९ असा मनामध्यें जप करीत करीत ऋषिगणांसहवर्तमान देव शरीरावर रोमांच उठविणारें तें रामरावणांचें अतिशय घोर युद्ध पाहूं लागले ५०. हें अनुपम युद्ध अवलोकन करून गंधर्व व अप्सरा ह्यांचे समुदाय " सागरालाही नीलवर्णादि सादृश्य असल्यामुळें कदाचित् आकाशाची उपमा देतां येईल व आकाशालाही समुद्राची उपमा देतां येईल; परंतु, रामरावणांचें युद्ध रामरावणांच्या युद्धासारिखेंच आहे " असें आपआपसांत बोलूं लागले व असें बोलत बोलतच तें रामरावणांचें युद्ध ते पाहूं लागले ५१, ५२. तदनंतर रघुवंशजांची कीर्ति वृद्धिंगत करणाऱ्या महापराक्रमी रामानें रागारागानें एक भुजंगासारिखा तीक्ष्ण बाण धनुष्याला लावून ५३ उज्ज्वल कुंडलांनीं युक्त व देदीप्यमान असें रावणाचें मस्तक तोडिलें व तें मस्तक भूमीवर पडलेलें त्रैलोक्यानें अवलोकनही केलें ५४; परंतु, त्याचसारिखें दुसरें

तत्क्षिप्रं क्षिप्रहस्तेन रामेण क्षिप्रकारिणा ५५ द्वितीयं रावणशिरश्छिन्नं संयति सायकैः । छिन्नमात्रं च तच्छीर्षं पुनरेव प्रदृश्यते ५६ तदप्यशनिसंकाशैश्छिन्नं रामस्य सायकैः । एवमेव शतं छिन्नं शिरसां तुल्यवर्चसाम् ५७ न चैव रावणस्यान्तो दृश्यते जीवितक्षये । ततः सर्वास्त्रविद्वीरः कौसल्यानन्दवर्धनः ५८ मार्गणैर्बहुभिर्युक्तश्चिन्तयामास राघवः । मारीचो निहतो यैस्तु खरो यैस्तु सदूषणः ५९ क्रौञ्चावटे विराधस्तु कबन्धो दण्डकावने । यैः साला गिरयो भग्ना वाली च क्षुभितोऽम्बुधिः ६० त इमे सायकाः सर्वे युद्धे प्रात्ययिका मम । किं तु तत्कारणं येन रावणे मन्दतेजसः ६१ इति चिन्तापरश्चासीदप्रमत्तश्च संयुगे । ववर्ष शरवर्षाणि राघवो रावणोरसि ६२ रावणोऽपि ततः क्रुद्धो रथस्थो राक्षसेश्वरः । गदामुसलवर्षेण रामं प्रत्यर्दयद्रणे ६३ तत्प्रवृत्तं महद्युद्धं तुमुलं रोमहर्षणम् । अन्तरिक्षे च भूमौ च पुनश्च गिरिमूर्धनि ६४ देवदानवयक्षाणां पिशा-

---

मस्तक रावणाच्या त्या मस्तकाचे ठिकाणीं उत्पन्न झालें व तें दुसरेंही रावणाचें मस्तक हस्तलाघवानें युक्त असलेल्या व सत्वर कार्यें उरकून टाकणाऱ्या रामानें संग्रामामध्यें बाणांच्या योगानें सत्वर छेदून टाकिलें. तथापि, तुटून पडतांक्षणीं तेंही मस्तक पुनरपि तेथें दिसूं लागलें ५५,५६ आणि तेंही रामाच्या वज्रतुल्य बाणांच्या योगानें तुटून पडलें. ह्याप्रमाणें तेजानें एकसारिखीं असलेलीं शंभर मस्तकें रामानें तोडिलीं असतांही ५७ जीविताचा नाश होऊन रावणाचा अंत झाल्याचें दिसेना. तेव्हां कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणारा सर्वास्त्रवेत्ता वीर राम ५८ असंख्य बाणांनीं संपन्न असूनही चिंताक्रांत झाला. ( तो ह्मणाला ) " मारीच आणि दूषणासहवर्तमान खर ह्यांचा ज्यांच्या योगानें वध झाला ५९, क्रौंचवनसंबंधी खंदकामध्यें ज्यांच्या योगानें विराधाचा वध झाला, ज्यांच्या योगानें दंडकारण्यामध्यें कबंधाचा नाश झाला, ज्यांनीं सालवृक्षांचा भेद केला, ज्यांनीं पर्वतही विदीर्ण करून टाकिले, ज्यांच्या योगानें वालीचा अंत झाला आणि समुद्रही ज्यांनीं क्षुब्ध करून टाकिला ६० तेच हे सर्व बाण ह्या प्रसंगीं युद्धामध्यें निष्फल ह्मणून माझ्या प्रत्ययाला येत आहेत. परंतु, रावणाचे ठिकाणीं हे सर्वही बाण निस्तेज होण्याचें कारण काय बरें असावें ? " ६१. ह्याप्रमाणें राम चिंताक्रांत झाला आणि दुसऱ्या कोणत्याही विषयाकडे चित्त व्यग्र होऊं न देतां रावणाच्या वक्षःस्थलावर त्यानें बाणांची वृष्टि केली ६२. तेव्हां रथारूढ राक्षसाधिपति रावणही क्रुद्ध होऊन गदा व मुसलें ह्यांच्या वृष्टीनें संग्रामामध्यें रामाला उलट पीडा देऊं लागला असतां ६३ पुनरपि भूमि, अंतरिक्ष व पर्वताचा माथा ह्यांचे

चोरगरक्षसाम् । पश्यतां तन्महद्युद्धं सर्वरात्रमवर्तत ६५ नैव रात्रिं न दिवसं न मुहूर्तं न च क्षणम् । रामरावणयोर्युद्धं विराममुपगच्छति ६६ दशरथसुतराक्षसेन्द्रयोस्तयोर्जयमनवेक्ष्य रणे स राघवस्य । सुरवररथसारथिर्महात्मा रणरतराममुवाच वाक्यमाशु ६७ [४८७५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्ताेत्तरशततमः सर्गः ॥१०७॥

अथ संस्मारयामास मातली राघवं तदा । अजानन्निव किं वीर त्वमेनमनुवर्तसे १ विसृजास्मै वधाय त्वमस्त्रं पैतामहं प्रभो । विनाशकालः कथितो यः सुरैः सोऽद्य वर्तते २ ततः संस्मारितो रामस्तेन वाक्येन मातलेः । जग्राह स शरं दीप्तं निःश्वसन्तमिवोरगम् ३ यं तस्मै प्रथमं प्रादादगस्त्यो भगवानृषिः । ब्रह्मदत्तं महद्बाणममोघं युधि वीर्यवान् ४ ब्रह्मणा निर्मितं पूर्वमिन्द्रार्थममितौजसा । दत्तं सुरपतेः पूर्वं त्रिलोकजयकाङ्क्षिणः ५ यस्य वाजेषु पवनः फले पावकभास्करौ । शरीरमाकाशमयं गौरवे मेरु-

---

ठिकाणीं त्या उभयतांचें शरीरावर रोमांच उठविणारें मोठें तुमुल युद्ध सुरू झालें ६४. देव, दानव, यक्ष, पिशाच, उरग व राक्षस ह्यांच्या कित्येक रात्री तें प्रचंड युद्ध पाहतां पाहतां निघून गेल्या ६५. रात्रीं अथवा दिवसां तर गोष्टच बोलावयास नको परंतु, एक मुहूर्तभर किंवा क्षणभर सुद्धां रामरावणांचें युद्ध बंद राहीना ६६. दशरथपुत्र आणि राक्षसाधिपति रावण ह्या युद्ध करीत असलेल्या उभयतांपैकीं संग्रामामध्यें रामाचा जय होण्याचें चिन्ह दृष्टीं न पडल्यामुळें देवराजाच्या रथावरील सारथि महात्मा मातलि रणाविषयीं तत्पर असलेल्या रामाशीं हलकेंच बोलूं लागला ६७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें सातवा सर्ग समाप्त झाला ॥ १०७ ॥

तदनंतर रामाला स्मरण देण्याच्या उद्देशानें मातलि म्हणाला " हे वीरा, अरे, असें न समजल्यासारिखें करून तूं ह्यांच्याशीं रगड कसली लावीत बसला आहेस ? १. हे प्रभो, ह्याच्या वधाकरितां तूं पैतामहास्त्राचा प्रयोग कर. देवांनीं जो ह्याच्या मृत्यूचा काल सांगून ठेविला आहे तो आज प्राप्त झाला आहे " २. ह्याप्रमाणें मातलीच्या त्या भाषणानें रामाला स्मरण झालें असतां फुसकारीत असलेला भुजंगच कीं काय असा एक देदीप्यमान बाण त्यानें हातामध्यें घेतला ३. तो बाण प्रथमतः भगवान् अगस्त्यऋषींनीं त्या रामाला दिला होता व पूर्वी तोच बाण ब्रह्मदेवानें इंद्राला दिला होता. असा तो मोठा अमोघ बाण वीर्यवान् रामानें युद्धामध्यें धनुष्याला लाविला ४. सारांश, अतुल तेजस्वी ब्रह्मदेवानें इंद्राकरितां तो बाण पूर्वी निर्माण केला होता व त्रैलोक्य जिंकण्याची

मन्दरौ ६ जाज्वल्यमानं वपुषा सुपुङ्खं हेमभूषितम् । तेजसा सर्वभूतानां कृतं भास्करवर्चसम् ७ सधूममिव कालाग्निं दीप्तमाशीविषोपमम् । नरनागाश्ववृन्दानां भेदनं क्षिप्रकारिणम् ८ द्वाराणां परिघाणां च गिरीणां चापि भेदनम् । नानारुधिरदिग्धाङ्गं मेदोदिग्धं सुदारुणम् ९ वज्रसारं महानादं नानासमितिदारुणम् । सर्ववित्रासनं भीमं श्वसन्तमिव पन्नगम् १० कङ्कगृध्रबकानां च गोमायुगणरक्षसाम् । नित्यभक्षप्रदं युद्धे यमरूपं भयावहम् ११ नन्दनं वानरेन्द्राणां रक्षसामवसादनम् । वाजितं विविधैर्वाजैश्चारुचित्रैर्गरुत्मतः १२ तमुत्तमेषुं लोकानामिक्ष्वाकुभयनाशनम् । द्विषतां कीर्तिहरणं प्रहर्षकरमात्मनः १३ अभिमन्त्र्य ततो रामस्तं महेषुं महाबलः । वेदप्रोक्तेन विधिना संदधे कार्मुके बली १४ तस्मिन्संधीयमाने तु राघवेण शरोत्तमे । सर्वभूतानि संत्रेसुश्चचाल च वसु-

---

इच्छा करणाऱ्या इंद्राला त्यानें तो पूर्वी दिला होता ५. त्या बाणाच्या वेगसाधनरूप पिच्छांचे ठिकाणीं वायूचें वास्तव्य असून फळाचे ठिकाणीं अग्नि व सूर्य ह्यांचें वास्तव्य होतें. त्याचप्रमाणें मध्यभागाचे ठिकाणीं ब्रह्मदेवाचें वास्तव्य असून त्याच्या गरुत्वाचे ठिकाणीं मेरुमंदरांचें वास्तव्य होतें ६. त्याचा आकार देदीप्यमान होता; उत्कृष्ट पिच्छप्रदेशानें तो युक्त होता; सुवर्णानें तो भूषित होता; सर्वभूतांतील सार एकत्र करून तो बनविलेला होता; सूर्यासारिखें त्याचें तेज होतें ७; प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें तो धूमयुक्त होता; भुजंगाप्रमाणें तो तीक्ष्ण होता; पुरुष, गज आणि अश्व ह्यांच्या समुदायांना तो विदीर्ण करणारा होता; तो आपलें कार्य सत्वर उरकणारा होता ८; द्वारें, परिघ व पर्वत ह्यांचेंही तो विदारण करणारा होता; नानाप्रकारच्या रक्तांनीं तो भरलेला होता; मेदानें तो युक्त होता; अत्यंत भयंकर होता ९; वज्रासारिखें त्याचें सामर्थ्य होतें; त्याचा ध्वनि मोठा होता; अनेक प्रकारचीं युद्धें तो जिंकणारा होता; तो सर्वांना त्रस्त करून सोडणारा होता; दिसण्यांतही भयंकर असून भुजंगाप्रमाणें तो जसा कांहीं सुस्कारेच टाकीत होता १०; कंक, गृध्र, बक, कोल्ह्यांचे कळप आणि राक्षस ह्यांना नेहमीं युद्धामध्यें तो भक्ष्य देणारा होता; त्याचें रूप यमासारिखें असल्यामुळें तो भयंकर होता ११; वानराधिपतींना तो आनंद देणारा असून राक्षसांचें धैर्य तो खचविणारा होता आणि गरुडाच्या अनेक मनोहर व चित्रविचित्र पक्षांनीं तो युक्त होता १२. त्रैलोक्यामध्यें श्रेष्ठ, रामपक्षीय लोकांचें भय नाहींसें करणारा, शत्रूंची कीर्ति हरण करणारा आणि स्वतःला आनंद देणारा १३ असा तो मोठा बाण महाबलाढ्य रामानें वेदोक्त विधीनें अभिमंत्रण करून धनुष्याला लाविला १४. राम तो उत्कृष्ट बाण धनुष्याला लावूं लागला असतां सर्व भूतें त्रस्त

न्धरा १५ स रावणाय संक्रुद्धो भृशमायम्य कार्मुकम् । चिक्षेप परमायत्तः शरं मर्मविदारणम् १६ स वज्र इव दुर्धर्षो वज्रिबाहुविसर्जितः । कृतान्त इव चावार्यो न्यपतद्रावणोरसि १७ स विसृष्टो महावेगः शरीरान्तकरः परः । बिभेद हृदयं तस्य रावणस्य दुरात्मनः १८ रुधिराक्तः स वेगेन शरीरान्तकरः शरः । रावणस्य हरन्प्राणान्विवेश धरणीतलम् १९ स शरो रावणं हत्वा रुधिरार्द्रकृतच्छविः । कृतकर्मा निभृतवत्स तूणीं पुनराविशत् २० तस्य हस्ताद्धतस्याशु कार्मुकं चापि सायकम् । निपपात सह प्राणैर्भ्रंश्यमानस्य जीवितात् २१ गतासुर्भीमवेगस्तु नैर्ऋतेन्द्रो महाद्युतिः । पपात स्यन्दनाद्भूमौ वृत्रो वज्रहतो यथा २२ तं दृष्ट्वा पतितं भूमौ हतशेषा निशाचराः । हतनाथा भयत्रस्ताः सर्वतः संप्रदुद्रुवुः २३ सर्वतश्चाभिपेतुस्तान्वानरा द्रुमयोधिनः । दशग्रीववधं दृष्ट्वा वानरा जितकाशिनः २४ अर्दिता वानरैर्भ्रष्टा लङ्कामभ्यपतन्भयात् । हताश्रयत्वात्करुणैर्बाष्पप्रस्रवणैर्मुखैः २५ ततो विनेदुः संहृष्टा वानरा जितकाशिनः ।

---

होऊन पृथ्वी कंपित झाली १५. क्रुद्ध झालेल्या व अतिशय तत्पर असलेल्या रामानें धनुष्य फारच ओढून तो मर्मभेदक बाण रावणावर सोडिला असतां १६ इंद्राच्या हातांतून सुटलेल्या वज्राप्रमाणें दुःसह व मृत्यूप्रमाणें अनिवार्य असलेला तो बाण रावणाच्या वक्षःस्थलावर पडला १७. रामानें सोडिलेल्या त्या महावेगवान् व शरीरनाशक उत्कृष्ट बाणानें त्या दुरात्म्या रावणाचें हृदय फोडून टाकिलें १८. रक्तानें भरलेला व शरीराचा नाश करणारा तो बाण रावणाचे प्राण हरण करीत करीत भूतलामध्यें प्रविष्ट झाला १९ आणि रक्तानें ज्याचें रूप आर्द्र झालें आहे असा तो बाण रावणाचा वध करून कृतकृत्य झाल्यानंतर पुनरपि नम्रपणें रामाच्या भात्यामध्यें प्रविष्ट झाला २०. बाणाचा प्रहार होतांक्षणीं जीविताला मुकणाऱ्या त्या रावणाच्या हातांतून प्राणांसहवर्तमान धनुष्य व बाण हीं खालीं पडलीं २१ आणि वज्राचा प्रहार झालेल्या वृत्रासुराप्रमाणें गतप्राण झालेला तो महावेगवान् व महातेजस्वी राक्षसाधिपति रावण रथांतून भूमीवर पडला २२. तो रावण भूमीवर पडलेला अवलोकन करितांक्षणीं वध पावलेल्या राक्षसाशिवाय जे दुसरे राक्षस अवशिष्ट राहिले होते ते आपल्या प्रभूचा वध झाल्यामुळें भयभीत होऊन चोहोंकडे पळत सुटले २३. तेव्हां रावणाचा वध झाल्याचें अवलोकन करून विजयप्राप्तीमुळें स्फुरण चढलेले व वृक्षांच्या योगानें युद्ध करणारे वानरही सर्व बाजूंनीं त्या राक्षसांवर तुटून पडूं लागले २४; आणि वानरांनीं जेरीस आणिल्यामुळें युद्धपराङ्मुख झालेले ते राक्षस आश्रयभूत असलेल्या

वदन्तो राघवजयं रावणस्य च तद्वधम् २६ अथान्तरिक्षे व्यनदत्सौम्यस्त्रिदशदुन्दुभिः । दिव्यगन्धवहस्तत्र मारुतः सुसुखो ववौ २७ निपपातान्तरिक्षाच्च पुष्पवृष्टिस्तदा भुवि । किरन्ती राघवरथं दुरावापा मनोहरा २८ राघवस्तवसंयुक्ता गगने च विशुश्रुवे । साधुसाध्विति वागग्र्या दैवतानां महात्मनाम् २९ आविवेश महान्हर्षो देवानां चारणैः सह । रावणे निहते रौद्रे सर्वलोकभयङ्करे ३० ततः सकामं सुग्रीवमङ्गदं च बिभीषणम् । चकार राघवः प्रीतो हत्वा राघवपुङ्गवम् ३१ ततः प्रजग्मुः प्रशमं मरुद्गणा दिशः प्रसेदुर्विमलं नभोऽभवत् । मही चकम्पे न च मारुतो ववौ स्थिरप्रभश्चाप्यभवद्दिवाकरः ३२ ततस्तु सुग्रीवबिभीषणाङ्गदाः सुहृद्विशिष्टाः सहलक्ष्मणास्तदा । समेत्य हृष्टा विजयेन राघवं रणेऽभिरामं विधिनाभ्यपूजयन् ३३ स तु निहतरिपुः स्थिरप्रतिज्ञः स्वजनबलाभिवृतो रणे बभूव । रघुकुलनृपनन्दनो महौजास्त्रिदशगणैरभिसंवृतो महेन्द्रः ३४ [ ४७०९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टोत्तरशततमः सर्गः ॥ १०८ ॥

---

रावणाचा वध झाल्यामुळें अश्रूंनीं परिपूर्ण व दीन अशा मुखांनीं युक्त होऊन भीतीनें लंकेकडे पळत सुटले २५. विजयामुळें झळकूं लागलेले वानर "रावणाचा वध व रामाचा जय झाला" असें ह्मणत ह्मणत आनंदानें गर्जना करूं लागले असतां २६ अंतरिक्षामध्यें देवांच्या सौम्य नौबदी झडूं लागल्या; दिव्य गंधांनीं युक्त असलेला वायु अतिशय सुखावह वाहूं लागला २७; दुर्लभ, मनोहर व रामाचा रथ भरून काढणारी अशी पुष्पवृष्टि अंतरिक्षांतून भूतलावर होऊं लागली २८; रामाचें स्तवन जिच्यामध्यें आहे अशी महात्म्या देवतांची "साधु, साधु" अशी श्रेष्ठ वाणी अंतरिक्षामध्यें कानीं पडूं लागली २९; सर्व लोकांना भय उत्पन्न करणाऱ्या क्रूर रावणाचा वध झाल्यामुळें चारणांसहवर्तमान देवांना मोठा हर्ष झाला ३० आणि राक्षसश्रेष्ठ रावणाचा वध केल्यामुळें रामानें सुग्रीव, अंगद व बिभीषण ह्यांचे मनोरथ परिपूर्ण केले ३१. तदनंतर देवगण स्वस्थ झाले; दिशा स्वच्छ झाल्या; आकाश निर्मल झालें; भूमि कंपित होईनाशी झाली; भयंकर वायु वाहीनासा झाला आणि सूर्याची प्रभा स्थिर झाली ३२. तदनंतर सुग्रीव, बिभीषण व अंगद—लक्ष्मण व मित्र ह्यांसहवर्तमान—आनंदित होऊन एकत्र जमले आणि संग्रामामध्यें विजय प्राप्त झाल्यामुळें मनोहर रामाचें त्यांनीं यथाविधि पूजन केलें ३३ असो. शत्रूचा वध केल्यामुळें सत्यप्रतिज्ञ ठरलेला राम संग्रामामध्यें स्वजन व सैन्य ह्यांनीं परिवेष्टित झाला आणि रघुवंशांतील राजांना आनंद देणारा महातेजस्वी महेंद्रही देवगणांनीं परिवेष्टित झाला ३४. ह्याप्रमाणें महामुनिवा-

भ्रातरं निहतं दृष्ट्वा शयानं निर्जितं रणे। शोकवेगपरीतात्मा विललाप विभीषणः १ वीर विक्रान्त विख्यात प्रवीण नयकोविद । महार्हशयनोपेत किं शेषे निहतो भुवि २ निक्षिप्य दीर्घौ निश्चेष्टौ भुजावङ्गदभूषितौ। मुकुटेनापवृत्तेन भास्कराकारवर्चसा ३ तदिदं वीर संप्राप्तं यन्मया पूर्वमीरितम् । काममोहपरीतस्य यत्तन्न रुचितं तव ४ यन्न दर्पात्प्रहस्तो वा नेन्द्रजिन्नापरे जनाः । न कुम्भकर्णोऽतिरथो नातिकायो नरान्तकः ५ न स्वयं बहु मन्येथास्तस्योदर्कोऽयमागतः । गतः सेतुः सुनीतानां गतो धर्मस्य विग्रहः ६ गतः सत्त्वस्य संक्षेपः सुहस्तानां गतिर्गता । आदित्यः पतितो भूमौ मग्नस्तमसि चन्द्रमाः ७ चित्रभानुः प्रशान्तार्चिर्व्यवसायो निरुद्यमः । अस्मिन्निपतिते वीरे भूमौ शस्त्रभृतां वरे ८ किं शेषमिहलोकस्य गतसत्त्वस्य संप्रति । रणे राक्षसशार्दूले प्रसुप्त इव पांसुषु ९ धृतिप्रवालः प्रसभाग्र्यपुष्पस्तपोबलः शौर्यनिबद्धमूलः । रणे महान्राक्षसराज-

---

ल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें आठवा सर्ग समाप्त झाला ॥ १०८ ॥

आपला भ्राता संग्रामामध्यें वध पावून पडला आहे असें अवलोकन करून बिभीषणाचें मन शोकवेगानें व्याप्त झालें व तो विलाप करूं लागला १. ( तो ह्मणाला ) "हे प्रख्यात व पराक्रमी वीरा, हे समर्था, हे शास्त्रज्ञा, मोठ्या मोठ्या मूल्यवान् मंचकावर शयन करणाऱ्या, तूं वध पावून भूमीवर कां बरें शयन करीत आहेस ? २. तुझा सूर्यासारिखा तेजस्वी मुकुट अस्ताव्यस्त पडला आहे व बाहुभूषणांनीं भूषित झालेले तुझे दीर्घ बाहु निश्चेष्ट पडले आहेत ३. हे वीरा, मद व मोह ह्यांनीं व्याप्त झालेल्या तुला न रुचलेलें असें जें मीं पूर्वी भविष्य केलें होतें तेंच हें प्राप्त झालें आहे ४. गर्वामुळें प्रहस्तानें, इंद्रजितानें, इतर लोकांनीं, अतिरथि कुंभकर्णानें, अतिकायानें, नरांतकानें ५ अथवा तूं स्वतःही माझ्या भाषणाची पर्वा न केल्यामुळें त्याचें हें फल सांप्रत प्राप्त झालें आहे. शस्त्र धारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असा हा वीर भूमीवर पडल्यामुळें धर्मनिष्ठांची मर्यादा नाहींशी झाली आहे; धर्माचें स्वरूप नष्ट झालें आहे; बलाचें निधान लयाला गेलें आहे; वीराचा आश्रय समाप्त झाला आहे; सूर्य भूमीवर गळून पडला आहे; चंद्रमा अंधकारामध्यें मग्न झाला आहे; अग्नि ज्वालारहित झाला आहे आणि प्रवृत्तिरूप धर्मालाही प्रतिबंध झाला आहे ६,७,८. राक्षसश्रेष्ठ रणांतील धुळीमध्यें ज्याअर्थी निद्रिस्थ झाला आहे त्याअर्थी निःसत्त्व झालेल्या ह्या लंकानगरींतील लोकांमध्यें सांप्रत अर्थ तो काय उरला आहे ? ९. धैर्य हेच ज्याचे कोमल पल्लव,

वृक्षः संमर्दितो राघवमारुतेन १० तेजोविषाणः कुलवंशवंशः कोपप्रसादापरगात्रहस्तः । इक्ष्वाकुसिंहावगृहीतदेहः सुप्तः क्षितौ रावणगन्धहस्ती ११ पराक्रमोत्साहविजृम्भितार्चिर्निःश्वासधूमः स्वबलप्रतापः । प्रतापवान्संयति राक्षसाग्निर्निर्वापितो रामपयोधरेण १२ सिंहर्क्षलाङ्गूलककुद्विषाणः पराभिजिद्गन्धनगन्धवाहः । रक्षोवृषश्चापलकर्णचक्षुः क्षितीश्वरव्याघ्रहतोऽवसन्नः १३ वदन्तं हेतुमद्वाक्यं परिदृष्टार्थनिश्चयम् । रामः शोकसमाविष्टमित्युवाच बिभीषणम् १४ नायं विनष्टो निश्चेष्टः समरे चण्डविक्रमः । अत्युन्नतमहोत्साहः पतितोऽयमशङ्कितः १५ नैवं विनष्टाः शोच्यन्ते क्षत्रधर्मव्यवस्थिताः । वृद्धिमाशंसमाना ये निपतन्ति रणाजिरे १६ येन सेन्द्रास्त्रयो लोकास्त्रासिता युधि धीमता । अस्मिन्कालसमायुक्ते न कालः परिशोचितुम् १७ नैकान्तविजयो युद्धे भूतपूर्वः कदाचन । परैर्वा हन्यते वीरः परान्वा हन्ति संयुगे १८ इयं हि पूर्वैः संदिष्टा

---

हट्ट हेंच ज्याचें उत्कृष्ट पुष्प, तप हेंच ज्याचें बल आणि शौर्य हेंच ज्याचें खोल गेलेलें मूळ असा राक्षसराजरूप प्रचंड वृक्ष रणामध्यें रामरूप वायूनें उलथून पाडिला १०. तेज हेंच ज्याचे दांत, पूर्वजसमदाय हाच ज्याचा पृष्ठवंश, कोप हेच ज्याचे पादादि अवयव आणि प्रसन्नता हीच ज्याची शुंडा असा रावणरूप मत्त गज रामरूप सिंहानें पकडल्यामुळें भूमीवर निश्चेष्ट पडला आहे ११. पराक्रम व उत्साह ह्याच ज्याच्या मोठ्या मोठ्या ज्वाला, निःश्वास हाच ज्याचा धूम आणि स्वतःचें सामर्थ्य हीच ज्याची दाहशक्ति असा जो राक्षसरूप दाहक अग्नि तो रामरूप मेघानें विझवून टाकिला १२. राक्षस हेंच ज्याचें पुच्छ, वशिंड व शिंगें आणि धर्मादिविषयक प्रमाद हेच ज्याचे कान व डोळे असा जो पराक्रमामध्यें वायूची बरोबरी करणारा राक्षसरूप वृषभ त्याला रामराजरूप व्याघ्राचा तडाका बसल्यामुळें तो गतप्राण होऊन पडला आहे " १३. ह्याप्रमाणें निश्चित अर्थानें भरलेलें आणि सहेतुक असें भाषण करीत असलेल्या शोकाकुल बिभीषणाला राम ह्मणाला १४ " हा महापराक्रमी व अतिशय उत्साही रावण संग्रामामध्यें दुर्बल होऊन नाश पावला नाहीं; हा मृत्यूची पर्वा न करितां दैवानें वध पावून पडला आहे १५. अभ्युदयाची इच्छा धरणारे जे पुरुष रणांगणामध्यें पडतात ते क्षात्रधर्माविषयीं तत्पर राहून पडले असल्यामुळें त्यांचें आप्तजन अशारीतीनें त्यांच्याकरितां शोक करीत बसत नाहींत १६. ज्या बुद्धिमान् पुरुषानें इंद्रासहवर्तमान तिन्ही लोक युद्धामध्यें त्रस्त करून सोडिले तो हा पुरुष मृत झाला असतां शोक करणें योग्य नाहीं १७. निश्चयपूर्वक युद्धामध्यें जयच प्राप्त व्हावयाचा

गतिः क्षत्रियसंमता। क्षत्रियो निहतः संख्ये न शोच्य इति निश्चयः १९ तदेवं निश्चयं दृष्ट्वा तत्त्वमास्थाय विज्वरः। यदिहानन्तरं कार्यं कल्प्यं तदनुचिन्तय २० तमुक्तवाक्यं विक्रान्तं राजपुत्रं विभीषणः। उवाच शोकसंतप्तो भ्रातुर्हितमनन्तरम् २१ योऽयं विमर्देष्वविभग्नपूर्वः सुरैः समस्तैरपि वासवेन। भवन्तमासाद्य रणे विभग्नो वेलामिवासाद्य यथा समुद्रः २२ अनेन दत्तानि वनीपकेषु भुक्ताश्च भोगा निभृताश्च भृत्याः। धनानि मित्रेषु समर्पितानि वैराण्यमित्रेषु निपातितानि २३ एषोऽहिताग्निश्च महातपाश्च वेदान्तगः कर्मसु चाग्र्यशूरः। एतस्य यत्प्रेतगतस्य कार्यं तत्कर्तुमिच्छामि तव प्रसादात् २४ स तस्य वाक्यैः करुणैर्महात्मा संबोधितः साधु विभीषणेन। आज्ञापयामास नरेन्द्रसूनुः स्वर्गीयमाधानमदीनसत्त्वः २५ मरणान्तानि वैराणि निवृत्तं नः प्रयोजनम्। क्रियतामस्य

---

अशी गोष्ट पूर्वीही कधीं झालेली नाहीं. संग्रामामध्यें शत्रु तरी वीराचा वध करितात, किंवा वीर तरी शत्रूंचा वध करितो १८. क्षत्रियांना संमत अशी गति हीच असून प्राचीन लोकांनींही हीच गति क्षत्रियाला योग्य ह्मणून ठरविली आहे. सारांश, संग्रामामध्यें वध पावलेल्या क्षत्रियाबद्दल शोक करणें योग्य नाहीं हें निश्चित आहे १९. तस्मात्, ही निश्चित गोष्ट मनामध्यें आणून व अंतःकरणाचा निश्चय करून तूं स्वस्थ हो आणि पुढें काय कार्य करणें योग्य आहे त्याचा विचार कर" २०. ह्याप्रमाणें पराक्रमी राजपुत्र रामानें भाषण केलें असतां शोकाकुल झालेला बिभीषण भ्रात्याच्या हिताची गोष्ट बोलला २१. "संपूर्ण देवांसहवर्तमान इंद्राच्या हातूनही संग्रामामध्यें ज्याचा पूर्वी कधींही पराभव झालेला नाहीं असा जो हा राक्षस मर्यादेसमीप येऊन मागें हटणाऱ्या समुद्राप्रमाणें संग्रामामध्यें तुझी गांठ पडतांक्षणीं पराभव पावला २२ ह्यानें याचकांना दानें दिलीं आहेत, भोग भोगिले आहेत, दासांचें पोषण केलें आहे, मित्रांना द्रव्यें अर्पण केलीं आहेत आणि शत्रूंशीं ह्यानें वैरेंही बांधिलीं आहेत २३. हा अग्निहोत्री आहे; हा महातपस्वी आहे; ह्यानें उपनिषदांचें अध्ययन केलें आहे आणि अग्निहोत्रादि कर्मांचें अनुष्ठान करणाऱ्यांमध्यें हा मुख्य आहे. ह्यास्तव, परलोकीं गेलेल्या ह्याचें जें और्ध्वदेहिककर्म तें आपल्या प्रसादानें करण्याची माझी इच्छा आहे" २४. ह्याप्रमाणें बिभीषणानें हृदयद्रावक शब्दांनीं त्या महात्म्या रामाची उत्कृष्ट रीतीनें प्रार्थना केली असतां त्या उदारबुद्धि राजपुत्र रामानें त्या रावणाचें और्ध्वदेहिक कर्म करण्याविषयीं त्याला आज्ञा दिली २५ आणि तो ह्मणाला "वैरें मरणापर्यंतच कायम राहात असतात आणि सांप्रत आपला कार्यभागही उरकला आहे. ह्यास्तव, ह्याचा

संस्कारो ममाप्येष यथा तव २६ [४७३१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये युद्धकाण्डे नवाधिकशततमः सर्गः ॥ १०९ ॥

रावणं निहतं दृष्ट्वा राघवेण महात्मना । अन्तःपुराद्विनिष्पेतू राक्षस्यः शोककर्शिताः १ वार्यमाणाः सुबहुशो वेष्टन्त्यो रणपांसुषु । विमुक्तकेश्यः शोकार्ता गावो वत्सहता यथा २ उत्तरेण विनिष्क्रम्य द्वारेण सह राक्षसैः । प्रविश्यायोधनं घोरं विचिन्वन्त्यो हतं पतिम् ३ आर्यपुत्रेति वादिन्यो हा नाथेति च सर्वशः । परिपेतुः कबन्धाङ्कां महीं शोणितकर्दमाम् ४ ता बाष्पपरिपूर्णाक्ष्यो भर्तृशोकपराजिताः । करिण्य इव नर्दन्त्यः करेण्वो हतयूथपाः ५ ददृशुस्ता महाकायं महावीर्यं महाद्युतिम् । रावणं निहतं भूमौ नीलाञ्जनचयोपमम् ६ ताः पतिं सहसा दृष्ट्वा शयानं रणपांसुषु । निपेतुस्तस्य गात्रेषु च्छिन्ना वनलता इव ७ बहुमानात्परिष्वज्य काचिदेनं रुरोद ह । चरणौ काचिदालम्ब्य काचित्कण्ठेऽवलम्ब्य च ८ उत्क्षिप्य च भुजौ काचिद्भूमौ सुपरिवर्तते । हतस्य वदनं दृष्ट्वा काचि-

---

आतां तूं संस्कार कर. सांप्रत हा जसा तुझा आहे तसा माझाही आहे २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें नववा सर्ग समाप्त झाला ॥ १०९ ॥

महात्म्या रामानें रावणाचा वध केल्याचें पाहून शोकाकुल झालेल्या राक्षसी अंतःपुरांतून बाहेर पडल्या १. अंतःपुरावरील सेवक त्यांचें वारंवार निवारण करूं लागले; परंतु, वासरूं मेलेल्या गाईप्रमाणें शोकाकुल झाल्यामुळें त्या केंस मोकळे टाकून रणांतील धुळीमध्यें गडबड लोळूं लागल्या २. राक्षसांसह वर्तमान लंकेच्या उत्तरद्वारानें बाहेर पडून व घोर संग्रामामध्यें प्रवेश करून त्या आपला वध पावलेला पति शोधूं लागल्या ३ आणि "हे आर्यपुत्र, हे नाथ," असें ह्मणत ह्मणत त्या सर्वही राक्षसी कबंधांनीं चिन्हित व रक्तकर्दमांनीं युक्त झालेल्या भूमीवर पडल्या ४. भर्त्याच्या शोकानें व्याकुळ झाल्यामुळें त्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून गेले; त्या हत्तिणींप्रमाणें आक्रोश करूं लागल्या आणि ज्यांच्या कळपांतील मुख्य गजाचा वध झाला आहे अशा हत्तिणींप्रमाणें त्या दिसूं लागल्या ५. धिप्पाड शरीर, मोठें वीर्य आणि प्रचंड तेज ह्यांनीं युक्त असून कज्जलाच्या राशीप्रमाणें असलेला तो रावण भूमीवर वध पावून पडल्याचें त्यांनीं अवलोकन केलें ६ आणि रणभूमींतील धुळीमध्यें शयन करीत पडलेला आपला पति पाहातांक्षणीं तोडिलेल्या वनलतांचें कीं काय अशा त्या स्त्रिया एकाएकीं त्याच्या अंगावर पडल्या ७. एक बहुमानानें त्याला कवटाळून धरून रडूं लागली; एक त्याचे पाय धरून लोळूं लागली;

मोहमुपागमत् ९ काचिदङ्के शिरः कृत्वा करोद् मुखमीक्षती । स्नापयन्ती मुखं बाष्पैस्तुषारैरिव पङ्कजम् १० एवमार्ताः पतिं दृष्ट्वा रावणं निहतं भुवि । चुक्रुशुर्बहुधा शोकाद्भूयस्ताः पर्यदेवयन् ११ येन वित्रासितः शक्रो येन वित्रासितो यमः । येन वैश्रवणो राजा पुष्पकेण वियोजितः १२ गन्धर्वाणामृषीणां च सुराणां च महात्मनाम् । भयं येन रणे दत्तं सोऽयं शेते रणे हतः १३ असुरेभ्यः सुरेभ्यो वा पन्नगेभ्योऽपि वा तथा । भयं यो न विजानाति तस्येदं मानुषाद्भयम् १४ अवध्यो देवतानां यस्तथा दानवरक्षसाम् । हतः सोऽयं रणे शेते मानुषेण पदातिना १५ यो न शक्यः सुरैर्हन्तुं न यक्षैर्नासुरैस्तथा । सोऽयं कश्चिदिवासत्त्वो मृत्युं मर्त्येन लम्भितः १६ एवं वदन्त्यो रुरुदुस्तस्य ता दुःखिताः स्त्रियः । भूय एव च दुःखार्ता विलेपुश्च पुनःपुनः १७ अशृण्वता तु सुहृदां सततं हितवादिनाम् । मरणायाहृता सीता राक्षसाश्च निपातिताः । एताः सममिदानीं ते वयमात्मा च

---

एकीनें गळ्याला मिठी मारून अंग टाकून दिलें ८; एक हात हालवून भूमीवर गडबडां लोळूं लागली; वध पावलेल्या रावणाचें मुख अवलोकन करितांक्षणीं एकीला मूर्च्छाच आली ९; त्याचें मस्तक आपल्या मांडीवर ठेवून मुखाकडे पहात पहात एकीनें टाहो फोडिला आणि जलतुषारांनीं कमलावरच सिंचन करीत आहे कीं काय अशा रीतीनें आपल्या अश्रूंनीं त्याच्या मुखावर ती सिंचन करूं लागली १०. ह्याप्रमाणें आपला पति रावण वध पावून भूमीवर पडल्याचें अवलोकन करितांक्षणीं शोकामुळें त्यांनीं नाना प्रकार केले व त्या अधिकाधिकच शोक करूं लागल्या ११. "अरे, ज्यानें इंद्राला अतिशय त्रस्त केलें, ज्यानें यमाला त्राहि त्राहि करून सोडिलें, ज्यानें वैश्रवणराजाचा पुष्पकविमानाशीं वियोग केला १२ आणि गंधर्व, ऋषि व महात्मे देव ह्यांना संग्रामामध्यें ज्यानें भय उत्पन्न केलें तो हा रावण आज रणामध्यें वध पावून पडला आहे १३. असुरांपासून, देवांपासून अथवा पन्नगांपासून ज्याला भय कसलें तें ठाऊक नव्हतें, त्याला हें मनुष्यापासून भय उपस्थित झालें आहे १४. देव, दानव व राक्षस ह्यांना जो अवध्य तो हा रावण आज संग्रामामध्यें पादचारी मनुष्याच्या हातून वध पावून पडला आहे १५. देव, यक्ष व असुर ह्यांच्या हातून ज्याचा वध होणें शक्य नाहीं त्याला एका मर्त्य मनाऱ्यें यःकश्चित् दुर्बल प्राण्याप्रमाणें मृत्यु आणिला आहे" १६. असें बोलत बोलत त्या दुःखित स्त्रिया रडूं लागल्या आणि दुःखाकुल झालेल्या त्या स्त्रिया एकसारिख्या वारंवार विलाप करूं लागल्या १७. (त्या म्हणाल्या.) "नेहमीं हितावह गोष्ट सांगणाऱ्या मित्रांचें न ऐकितां स्वतःच्या मरणाकरितां आपण सीतेला घेऊन

पातितः १८ मुक्तोऽपि हितं वाक्यमिष्टो भ्राता विभीषणः । इदं पश्चिमो मोहात्त्वयाऽऽत्मवधकाङ्क्षिणा १९ यदि निर्यातिता ते स्यात्सीता रामाय मैथिली । न नः स्याद्व्यसनं घोरमिदं मूलहरं महत् २० वृत्तकामो भवेद्भ्राता रामो मित्रकुलं भवेत् । वयं चाविधवाः सर्वाः सकामा न च शत्रवः २१ त्वया पुनर्नृशंसेन सीता संरुन्धता बलात् । राक्षसा वयमात्मा च त्रयं तुल्यं निपातितम् २२ न कामकारः कामं वा तव राक्षसपुङ्गव । दैवं चेष्टयते सर्वं हतं दैवेन हन्यते २३ वानराणां विनाशोऽयं राक्षसानां च ते रणे । तव चैव महाबाहो दैवयोगादुपागतः २४ नैवार्थेन च कामेन विक्रमेण न चाज्ञया । शक्या दैवगतिर्लोके निवर्तयितुमुद्यता २५ विलेपुरेवं दीनास्ता राक्षसाधिपयोषितः । कुरर्य इव दुःखार्ता बाष्पपर्याकुलेक्षणाः २६ [ ४९६१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे दशाधिकशततमः सर्गः ॥ ११० ॥

---

आला; राक्षसांचाही आपण निःपात केला आणि ह्या आह्मांसहवर्तमान आपण स्वतःचाही नाश करून घेतला १८. हिताचा उपदेश आपला इष्ट भ्राता बिभीषण करीत असतांनाही स्वतःच्या वधाचे डोहाळे आठवल्यामुळें त्याला आपण झिडकारून टाकिलें; परंतु, त्याचें फल लवकरच दृष्टीं पडलें १९. मिथिलराजकन्या सीता आपण रामाला नेऊन दिली असती तर समूळ नाश करणारें हें प्रचंड घोर संकट आह्मांवर ओढवलें नसतें २०. (सीतेला आपण रामाकडे पोंचविली असती तर) त्याच्या (बिभीषणा)चा मनोरथ परिपूर्ण झाला असता; राम मित्रपक्षाकडील झाला असता; आह्मांपैकीं कोणालाही वैधव्य आलें नसतें आणि शत्रूंचेही मनोरथ परिपूर्ण न होते २१; परंतु, बंडेली करून सीतेला प्रतिबंधांत ठेवणाऱ्या तूं दुष्टानें राक्षस, आह्मी व स्वतः ह्या तिघांचा सारखाच निःपात करून टाकिला आहेस ! २२. अथवा, हे राक्षसश्रेष्ठा, तुझ्या इच्छेचा हा परिणाम नव्हे. कारण, सर्व कांहीं घडामोडी दैवच करीत असतें आणि दैवानें ज्याचा वध केला त्याचाच वध होत असतो २३. हे महापराक्रमी रावणा, तुझ्या संग्रामामध्यें हा वानरांचा, राक्षसांचा व तुझा नाश दैवयोगानेंच झालेला आहे २४. द्रव्य, इच्छा, पराक्रम व आज्ञा ह्यांपैकीं कोणत्याही साधनानें, प्राप्त झालेली दैवगति जगतामध्यें कोणाच्याही हातून निवृत्त होणें शक्य नाहीं " २५. ह्याप्रमाणें त्या राक्षसाधिपतीच्या स्त्रिया शोक करूं लागल्या आणि दुःखाकुल झालेल्या कुररीप्रमाणें त्यांचे नेत्र दुःखाश्रूंनीं अतिशय व्याकुल झाले २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणांतील आदिकाव्यांतील युद्धकांडांतील एकशें दहावा सर्ग समाप्त झाला ॥ ११० ॥

तासां विलप्यमानानां तदा राक्षसयोषिताम्। ज्येष्ठपत्नी प्रिया दीना भर्तारं समुदैक्षत १ दशग्रीवं हतं दृष्ट्वा रामेणाचिन्त्यकर्मणा। पतिं मन्दोदरी तत्र कृपणा पर्यदेवयत् २ ननु नाम महाबाहो तव वैश्रवणानुज। क्रुद्धस्य प्रमुखे स्थातुं त्रस्यत्यपि पुरन्दरः ३ ऋषयश्च महान्तोपि गन्धर्वाश्च यशस्विनः। ननु नाम तवोद्वेगाच्चारणाश्च दिशो गताः ४ स त्वं मानुषमात्रेण रामेण युधि निर्जितः। न व्यपत्रपसे राजन्किमिदं राक्षसेश्वर ५ कथं त्रैलोक्यमाक्रम्य श्रिया वीर्येण चान्वितम्। अविषह्यं जघान त्वां मानुषो वनगोचरः ६ मानुषाणामविषये चरतः कामरूपिणः। विनाशस्तव रामेण संयुगे नोपपद्यते ७ न चैतत्कर्म रामस्य श्रद्दधामि चमूमुखे। सर्वतः समुपेतस्य तव सेनाभिमर्षणम् ८ अथवा रामरूपेण कृतान्तः स्वयमागतः। मायां तव विनाशाय विधायाप्रतितर्किताम् ९ अथवा वासवेन त्वं धर्षितोऽसि महाबल। वासवस्य तु का शक्तिस्त्वां द्रष्टुमपि संयुगे १० महाबलं महावीर्यं देवशत्रुं महौजसम्। व्यक्तमेष महायोगी परमात्मा सनातनः ११ अनादिमध्यनिधनो महतः

---

ह्याप्रमाणें त्या राक्षसस्त्रिया विलाप करूं लागल्या असतां रावणाची दीन झालेली प्रिय ज्येष्ठ पत्नी भर्त्याकडे पाहूं लागली १. अचिंत्यपराक्रमी रामाच्या हातून आपला पति जो रावण त्याचा वध झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं बिचारी मंदोदरी शोक करूं लागली २. ( ती म्हणाली ) "हे महापराक्रमी वैश्रवणानुजा, अरे, तूं क्रुद्ध असतांना तुझ्या संमुख उभा रहाण्यास इंद्रही भीत असे ३ आणि मोठे मोठे ऋषि, यशस्वी गंधर्व व चारणही तुझ्या भीतीमुळें वाट फुटेल तिकडे निघून जात असत ४; परंतु, केवळ मनुष्य असलेल्या रामानें संग्रामामध्यें तुला पराजित केलें असूनही, हे राजा, हे राक्षसाधिपते, तुला लज्जा वाटत नाहीं हें काय! ५ अरे, संपत्तीनें व सामर्थ्यानें भरलेलें त्रैलोक्य पादाक्रांत करून असह्य झालेल्या तुझा वध यःकश्चित् वनचर मनुष्यानें कसा बरें केला! ६. मनुष्यांचा जेथें संचार नाहीं अशा ठिकाणीं यथेष्ट रूप धारण करून रहाणाऱ्या तुझा संग्रामामध्यें रामाच्या हातून वध होणें संभवनीय नाहीं ७. सर्वप्रकारांनीं समृद्ध असलेल्या तुझ्यावर संग्रामामध्यें हल्ला करणें हें रामाचें कर्म असेल असें मला वाटत नाहीं ८; अथवा ( कोणीं सांगावें! ) तुझ्या नाशाकरितां अतर्क्य माया योजून प्रत्यक्ष यमच रामरूपानें आला असेल! ९; अथवा, हे महाबलाढ्य रावणा, इंद्रानेंच तुझा पराभव केला आहे! परंतु, छे! संग्रामामध्यें तुझ्याकडे पहाण्याला तरी इंद्राचें काय सामर्थ्य आहे! १०. कारण, तूं महाबलाढ्य, महावीर्यवान् व महातेजस्वी

परस्यो महांश्च । तमसः परमो धाता शङ्खचक्रगदाधरः १२ श्रीवत्सवक्षा नित्यश्रीरजय्यः शाश्वतो ध्रुवः । मानुषं रूपमास्थाय विष्णुः सत्यपराक्रमः १३ सर्वैः परिवृतो देवैर्वानरत्वमुपागतैः । सर्वलोकेश्वरः श्रीमाँल्लोकानां हितकाम्यया १४ सराक्षसपरीवारं देवशत्रुं भयावहम् । इन्द्रियाणि पुरा जित्वा जितं त्रिभुवनं त्वया १५ स्मरद्भिरिव तद्वैरमिन्द्रियैरेव निर्जितः । यदैव हि जनस्थाने राक्षसैर्बहुभिर्वृतः १६ खरस्तु निहतो भ्राता तदा रामो न मानुषः । यदैव नगरीं लङ्कां दुष्प्रवेशां सुरैरपि १७ प्रविष्टो हनुमान्वीर्यात्तदैव व्यथिता वयम् । क्रियतामविरोधश्च राघवेणेति यन्मया १८ उच्यमानं न गृह्णासि तस्येयं व्युष्टिरागता । अकस्माच्चाभिकामोऽसि सीतां राक्षसपुङ्गव १९ ऐश्वर्यस्य विनाशाय देहस्य स्वजनस्य च । अरुन्धत्या विशिष्टां तां रोहिण्याश्चापि दुर्मते २० सीतां धर्षयता मान्यां त्वया ह्यसदृशं कृतम् । वसुधाया हि वसुधां श्रियाः श्रीं भर्तृवत्सलाम् २१ सीतां सर्वानवद्याङ्गीमरण्ये विजने शुभाम् । आनयित्वा तु तां दीनां छद्मनात्मस्वदूषणम् २२ अप्राप्य तं

---

देवशत्रु आहेस. खरोखर हा महायोगी, परमात्मा, सनातन ११, आदिमध्यांतशून्य, मोठ्यापेक्षांही मोठा, उत्कृष्ट, प्रकृतीचा प्रवर्तक, स्रष्टा, शंखचक्रगदाधारी १२, वक्षःस्थलीं श्रीवत्सलांछन धारण करणारा, नेहमीं लक्ष्मीनें युक्त असलेला, अजिंक्य, शाश्वत, ध्रुव, सत्यपराक्रमी, सर्वलोकाधिपति आणि श्रीमान् असा विष्णुच लोकांचें हित करण्याच्या इच्छेनें वानरयोनीमध्यें जन्मास आलेल्या सर्व देवांनीं परिवेष्टित झाला आहे १३,१४ आणि त्यानेंच राक्षसी परिवारासहवर्तमान तुज भयंकर देवशत्रूना वध केला आहे. पूर्वी तूं इंद्रियें जिंकून त्रिभुवन जिंकिलेंस १५; परंतु, तें वैर आठवूनच कीं काय सांप्रत इंद्रियांनीं तुझा पराभव केला आहे. ज्या वेळीं असंख्य राक्षसांनीं परिवेष्टित असलेल्या भ्रात्या खराचा जनस्थानामध्यें वध झाला त्याच वेळीं राम मनुष्य नव्हे हें ठरलें. ज्या वेळीं देवांचाही प्रवेश होण्यास अशक्य असलेल्या लंकानगरीमध्यें १६, १७ स्वसामर्थ्यानें हनुमान् प्रविष्ट झाला त्याच वेळीं आम्हांला धडकी भरली. 'रामाशीं विरोधानें वागूं नका' असें मी १८ सांगत असूनही जें आपण ऐकिलें नाहीं त्याचें हें फल प्राप्त झालें आहे. हे राक्षसश्रेष्ठा, ऐश्वर्य, देह आणि स्वजन ह्यांच्या नाशाकरितां एकाएकीं तुला सीतेची कि रे इच्छा झाली ! हे अविचारी रावणा, अरुंधतीपेक्षां व रोहिणीपेक्षांही श्रेष्ठ असलेल्या त्या पूज्य सीतेवर हात टाकणाऱ्या तुझ्या हातून अयोग्य गोष्ट घडली. क्षमेसंबंधानें पृथ्वीलाही अनुकरणीय, सर्वतोभाग्यसमृद्धिसंबंधानें लक्ष्मीलाही मागें सारणारी, पतिवत्सल १९,२०,२१,

नैव कामं मैथिलीसंगमे कृतम्। पतिव्रतायास्तपसा नूनं दग्धोऽसि मे प्रभो २३ तदैव यन्न दग्धस्त्वं धर्षयंस्तनुमध्यमाम्। देवा बिभ्यति ते सर्वे सेन्द्राः साग्निपुरोगमाः २४ अवश्यमेव लभते फलं पापस्य कर्मणः। भर्तः पर्यागते काले कर्ता नास्त्यत्र संशयः २५ शुभकृच्छुभमाप्नोति पापकृत्पापमश्नुते। बिभीषणः सुखं प्राप्तस्त्वं प्राप्तः पापमीदृशम् २६ सन्त्यन्याः प्रमदास्तुभ्यं रूपेणाभ्यधिकास्ततः। अनङ्गवशमापन्नस्त्वं तु मोहान्न बुध्यसे २७ न कुलेन न रूपेण न दाक्षिण्येन मैथिली। मयाधिका वा तुल्या वा तत्तु मोहान्न बुध्यसे २८ सर्वदा सर्वभूतानां नास्ति मृत्युरलक्षणः। तव तावदयं मृत्युर्मैथिलीकृतलक्षणः २९ सीतानिमित्तजो मृत्युस्त्वया दूरादुपाहृतः। मैथिली सह रामेण विशोका विहरिष्यति ३० अल्पपुण्या त्वहं घोरे पतिता शोकसागरे। कैलासे मन्दरे मेरौ तथा चैत्ररथे वने ३१

---

शुद्ध, सर्व निर्दोष अवयवांनीं युक्त व दीन अशी जी सीता निर्जन अरण्यामध्यें होती तिला कपटानें आणून तूं आपल्या कुलाला कलंक लाविलास २२. हे प्रभो, मिथिलराजकन्येच्या समागमासंबंधानें जी इच्छा तूं धारण केली होतीस तीही परिपूर्ण न होतां त्या पतिव्रतेच्या तपश्चर्येच्याच योगानें तूं खरोखर दग्ध झाला आहेस २३. ज्या वेळीं तूं त्या सुंदरीवर हात टाकण्यास उद्युक्त झालास त्याच वेळीं तुझें भस्म होऊन जावयाचें. परंतु, इंद्रासहवर्तमान अग्निप्रभृति सर्व देव ज्या मोठेपणामुळें तुला भीत होते त्या मोठेपणाचें तें फल होय २४. हे भर्त्या, पापकर्म करणाऱ्या पुरुषाला त्या पापकर्माचें फल वेळ आली ह्मणजे अवश्य प्राप्त होतच असतें ह्याविषयीं संशय नाहीं २५. पुण्यकर्म करणाऱ्याला शुभ फल प्राप्त होत असतें व पापकर्म करणाऱ्याला फलही वाईटच मिळत असतें. ह्यामुळें बिभीषणाला सुख प्राप्त झालें आणि तुला अशाप्रकारचें फल भोगावें लागलें २६. रूपानें सीतेपेक्षांही अधिक अशा इतर यौवनसंपन्न स्त्रिया तुला होत्या; परंतु, कामवश होऊन गेलेल्या तुला मोहामुळें त्या वेळीं कांहींच भान उरलें नाहीं २७. कुलानें, रूपानें अथवा सरळ स्वभावानें सीता माझ्यापेक्षां जास्त नाहीं. इतकेंच नव्हे; तर माझ्याबरोबरीचीही नाहीं; परंतु मोहामुळें तुला ह्या गोष्टीचा उमज पडला नाहीं २८. असो. कोणत्याही प्राण्याला केव्हां जरी मृत्यु यावयाचा झाला तरी त्याला कांहीं तरी कारण असावें लागतें आणि त्याच नियमाला अनुसरून सीता निमित्त होऊन तुला हा मृत्यु प्राप्त झाला आहे २९. सीतेकरितां तूं फार दूर असलेला मृत्यु जवळ ओढून घेतलास आणि ती सीता तर आतां शोकमुक्त होऊन रामासहवर्तमान क्रीडा करीलच करील ३०. माझ्या पदरीं पुण्य अल्प असल्यामुळें मी ह्या घोर शोकसागरामध्यें पडलें आहें. मनोहर पुष्पमाल

देवोद्यानेषु सर्वेषु विहृत्य सहिता त्वया। विमानेनानुरूपेण या याम्यतु-
लया श्रिया ३२ पश्यन्ती विविधान्देशांस्तांस्तांश्चित्रस्रगम्बरा। भ्रंशिता
कामभोगेभ्यः साऽस्मि वीर वधात्तव ३३ सैवान्येवास्मि संवृत्ता धिग्राज्ञां
चञ्चलां श्रियम्। हा राजन्सुकुमारं ते सुभ्रु सुत्वक्समुन्नसम् ३४
कान्तिश्रीद्युतिभिस्तुल्यमिन्दुपद्मदिवाकरैः। किरीटकूटोज्ज्वलितं ताम्रास्यं
दीप्तकुण्डलम् ३५ मदव्याकुललोलाक्षं भूत्वा यत्पानभूमिषु। विवि-
धस्रग्धरं चारु वल्गुस्मितकथं शुभम् ३६ तदेवाद्य तवैवं हि वक्त्रं न
भ्राजते प्रभो। रामसायकनिर्भिन्नं रक्तं रुधिरविस्रवैः ३७ विशीर्णमे-
दोमस्तिष्कं रूक्षं स्यन्दनरेणुभिः। हा पश्चिमा मे संप्राप्ता दशा वैधव्य-
दायिनी ३८ या मयासीन्न संबुद्धा कदाचिदपि मन्दया। पिता दानव-
राजो मे भर्ता मे राक्षसेश्वरः ३९ पुत्रो मे शक्रनिर्जेता इत्यहं गर्विता
भृशम्। दृप्तारिमथनाः क्रूराः प्रख्यातबलपौरुषाः ४० अकुतश्चिद्भया

---

व वस्त्रें धारण करून अतुल संपत्तीनें युक्त असलेली मी आपणांसहवर्तमान योग्य विमा-
नामध्यें बसून आणि कैलास, मंदर, मेरु, चैत्ररथवन व देवांचीं सर्व क्रीडास्थानें ह्यांमध्यें
विहार करून ठिकठिकाणीं असलेले नानाप्रकारचे प्रदेश पहात पहात जात असे; परंतु,
सांप्रत आपला वध झाल्यामुळें, हे वीरा, मी त्या विषयोपभोगांना मुकलें आहें ३१,
३२, ३३. मी तीच कायम असतांना जशी कांहीं दुसरी झालें आहें. तस्मात्, राजांच्या
ह्या चंचल लक्ष्मीला धिक्कार असो. हे राजा, तुझें मुख सुकुमार असून उत्कृष्ट भिंव-
यांनीं युक्त होतें; त्यावर चांगली टवटवी होती; नासिका उत्कृष्ट दिसत होती ३४;
कांति, उज्ज्वलता आणि तेज ह्यांच्या योगानें तें अनुक्रमें चंद्राची, कमलाची आणि
सूर्याची बरोबरी करीत होतें; किरीटसमुदायानें तें उज्ज्वल दिसत असे; त्यावरील ओंठ
ताम्रवर्ण असत; देदीप्यमान कुंडलांनीं तें युक्त असे ३५; पानभूमींचे ठिकाणीं त्यावरील नेत्र
मदानें व्याकुळ व चंचल झालेले असत. नानाप्रकारच्या माळांनीं तें सुंदर मुख युक्त
असे आणि त्या शुभ्र मुखांतून बाहेर पडणारे शब्द व हास्य हीं फार मनोहर असत ३६.
परंतु, तेंच आपलें मुख आज असेंच कायम असतांना, हे प्रभो, रामबाणांनीं फुटून
जाऊन रक्तस्रावांनीं रंगून गेल्यामुळें तसें झळकत नाहीं! ३७. ह्या रूक्ष झालेल्या
मुखांतील मेद व मज्जा हींही अस्ताव्यस्त झालीं आहेत! हाय! हाय! वैधव्यदायक निकृष्ट
दशा मला प्राप्त झाली! ३८. मज भाग्यहीन स्त्रीला ही दशा कधीं (स्वप्नांतही)
ठाऊक नव्हती! माझा पिता दानवांचा राजा आहे; माझा भर्ता राक्षसांचा अधि-
पति आहे ३९; आणि माझा पुत्र इंद्राला जिंकणारा आहे ह्यामुळें मला अतिशय

नाथा मर्मेऽरीन्मतिर्भुवा । तेषामेवंप्रभावाणां युष्माकं राक्षसर्षभाः ॥ कथं भयमसंबुद्धं मानुषादिदमागतम् । स्निग्धेन्द्रनीलनीलं तु प्रांशु शैलोपमं महत् ४२ केयूराङ्गदवैडूर्यमुक्ताहारस्रगुज्ज्वलम् । कान्तं विहारेष्वधिकं दीप्तं संग्रामभूमिषु ४३ भात्याभरणभाभिर्यद्विद्युद्भिरिव तोयदः । तदेवाद्य शरीरं ते तीक्ष्णैर्नैकशरैश्चितम् ४४ पुनर्दुर्लभसंस्पर्शं परिष्वक्तुं न शक्यते । श्वाविधः शलकैर्यद्वत् बाणैर्निरन्तरम् ४५ स्वर्पितैर्मर्मसु भृशं संछिन्नस्नायुबन्धनम् । क्षितौ निपतितं राजञ्श्यामं वै रुधिरच्छवि ४६ वज्रप्रहाराभिहतो विकीर्ण इव पर्वतः । हा स्वप्नः सत्यमेवेदं त्वं रामेण कथं हतः ४७ त्वं मृत्योरपि मृत्युः स्याः कथं मृत्युवशं गतः । त्रैलोक्यवसुभोक्तारं त्रैलोक्योद्वेगदं महत् ४८ जेतारं लोकपालानां क्षेप्तारं शंकरस्य च । दृप्तानां निग्रहीतारमाविष्कृतपराक्रमम् ४९ लोकक्षोभ-

---

गर्व झालेला असे. मत्त शत्रूंचा नाश करणारे, बलाविषयीं व पौरुषाविषयीं प्रख्यात आणि सर्वप्रकारें निर्भय व क्रूर कर्म करणारे माझे नाथ आहेत अशी माझ्या मनाला खात्री वाटत असे; परंतु, हे राक्षसश्रेष्ठहो, तुम्ही अशाप्रकारच्या प्रभावानें युक्त असतांनाही ४०, ४१ कधीं स्वप्नांतही माहीत नसलेलें हें भय तुम्हांला मनुष्यापासून कसें प्राप्त झालें ! तुळतुळीत इंद्रनीलमण्याप्रमाणें नीलवर्ण, उन्नत, पर्वतासारिखें मोठें ४२, केयूर व अंगद ह्या भूषणांतील वैडूर्यमणि आणि मोत्यांचे हार व गजरे ह्यांच्या योगानें उज्ज्वल, क्रीडास्थानामध्यें अत्यंत मनोहर आणि संग्रामभूमीमध्यें जसें कांहीं प्रदीप्त झालेलें ४३ असें जें आपलें शरीर विद्युल्लतांच्या योगानें झळकणाऱ्या मेघाप्रमाणें भूषणांच्या कांतींनीं झळकत रहावयाचें तेंच आज अनेक तीक्ष्ण बाणांनीं व्याप्त झालें आहे ४४. साळपिसांनीं भरलेल्या साळईप्रमाणें आंत रुतून बसलेल्या बाणांनीं आपलें शरीर सांप्रत अगदीं भरून गेलें असल्यामुळें त्याला आलिंगनही देतां येत नाहीं; परंतु, पूर्वी ह्याचा स्पर्श होणेंही दुर्लभ होतें ४५. हे राजा, मर्मस्थानीं सोडिलेल्या बाणांनीं ह्या शरीरांतील स्नायुबंधनें अगदीं तुटून गेलीं आहेत आणि वस्तुतः श्यामवर्ण असूनही रक्तामुळें रक्तवर्ण बनलेलें हें शरीर भूमीवर पडलें आहे ४६. वज्रप्रहार सभोंवतीं झाल्यामुळें अस्ताव्यस्त झालेल्या पर्वताप्रमाणें तुमचें शरीर अस्ताव्यस्त झालें आहे ! अरेरे ! हें स्वप्न तर नव्हे ना ! छे छे ! हा खरा प्रकारच आहे. रामानें तुमचा वध केला तरी कसा ! ४७. तूं मृत्यूचाही मृत्यु होणारा असतांना मृत्यूच्या तावडींत कसा सांपडलास ! त्रैलोक्यांतील संपत्तीचा उपभोग घेणारा, त्रैलोक्याला अतिशय उद्वेग उत्पन्न करणारा ४८, लोकपालांचा पराजय करणारा,

रामपत्नी त्वया आनीय च लक्ष्मणम् । कातर्यं च न ते युद्धे कदाचित्सं-
स्मराम्यहम् ६९ तत्तु भाग्यविपर्यासान्नूनं ते पक्वलक्षणम् । अतीतानाग-
तार्थज्ञो वर्तमानविचक्षणः ७० मैथिलीमाहृतां दृष्ट्वा ध्यात्वा निःश्वस्य
चायतम् । सत्यवाक्स महाबाहो देवरो मे यदब्रवीत् ७१ अयं राक्षस-
मुख्यानां विनाशः पर्युपस्थितः । कामक्रोधसमुत्थेन व्यसनेन प्रसङ्गिना ७२
निर्वृत्तस्त्वत्कृते नार्थः सोऽयं मूलहरो महान् । त्वया कृतमिदं सर्वमनाथं
राक्षसं कुलम् ७३ न हि त्वं शोचितव्यो मे प्रख्यातबलपौरुषः । स्त्रीस्व-
भावात्तु मे बुद्धिः कारुण्ये परिवर्तते ७४ सुकृतं दुष्कृतं च त्वं गृहीत्वा
स्वां गतिं गतः । आत्मानमनुशोचामि त्वद्विनाशेन दुःखिताम् ७५ सुहृदां
हितकामानां न श्रुतं वचनं त्वया । भ्रातॄणां चैव कार्त्स्न्येन हितमुक्तं दशा-
नन ७६ हेत्वर्थयुक्तं विधिवच्छ्रेयस्करमदारुणम् । विभीषणेनाभिहितं न
कृतं हेतुमत्त्वया ७७ मारीचकुम्भकर्णाभ्यां वाक्यं मम पितुस्तथा । न
कृतं वीर्यमत्तेन तस्येदं फलमीदृशम् ७८ नीलजीमूतसंकाश पीताम्बर

---

आश्रमांतून दूर नेऊन ६६,६७,६८ आणि लक्ष्मणालाही दूर करून तूं रामपत्नी आणिलीस हें खरोखर भित्रेपणाचें काम केलेंस. युद्धामध्यें तुझा भित्रेपणा मला कधींही आठवत नाहीं ६९; परंतु दैव फिरल्यामुळें तुझा भित्रेपणा अगदीं खरोखर परिपक्व दशेला जाऊन पोंचला. हे महापराक्रमी रावणा, भूत, भविष्य व वर्तमान जाणणारा तो माझा सत्यवचनी दीर सीता आणिलेली पहातांक्षणीं विचार करून व दीर्घ सुस्कारा टाकून "रावणाच्या कामक्रोधजन्य उत्कट व्यसनामुळें हा राक्षसश्रेष्ठांच्या विनाशाचा काल प्राप्त झाला आहे" असें जें ह्मणाला होता तेंच प्राप्त झालें आहे ७०,७१,७२. सारांश, समूल नाश करणारा असा तो हा मोठा अनर्थ तुझ्यामुळें येऊन गुदरला आहे आणि हें सर्व राक्षसकुल तूंच अनाथ करून टाकिलें आहेस ७३. बल व पौरुष ह्यांविषयीं प्रख्यात असलेल्या तुझ्यासंबंधानें मला शोक करण्याचें प्रयोजन नाहीं; परंतु, स्त्रीस्वभावामुळें माझ्या मनामध्यें दया उत्पन्न होत असते ७४. पापपुण्य बरोबर घेऊन तूं आपल्या गतीला गेला आहेस. तुझ्या नाशामुळें स्वतःला दुःख झालें आहे ह्मणून मला वाईट वाटतें ७५. हितेच्छु सुहृदांनीं व भ्रात्यांनीं जें पूर्णपणें हिताचें भाषण तुझ्याशीं केलें तें तूं ऐकिलें नाहींस ७६. उद्देश व कारण ह्यांनीं युक्त, श्रेयस्कर आणि सौम्य असें जें बिभीषणानें योग्य रीतीनें भाषण केलें तें तूं ऐकिलें नाहींस ७७. वीर्यानें तूं मत्त झाल्यामुळें मारीच, कुंभकर्ण आणि त्याचप्रमाणें माझा पिता ह्यांचें जें भाषण तूं ऐकिलें नाहींस त्याचें हें

[illegible] विनिक्षिप्य किं शेषे [illegible] इव [illegible]
किं मां न प्रतिभाषसे । महावीर्यस्य दक्षस्य संयुगेष्वपलायिनः ८० यातु-
धानस्य दौहित्रीं किं मां न प्रतिभाषसे । उत्तिष्ठोत्तिष्ठ किं शेषे नवे परि-
भवे कृते ८१ अद्य वै निर्भया लङ्कां प्रविष्टाः सूर्यरश्मयः । येन सूदयसे
शत्रून्समरे सूर्यवर्चसा ८२ वज्रं वज्रधरस्येव सोऽयं ते सततार्चितः । रणे
बहुप्रहरणो हेमजालपरिष्कृतः ८३ परिघो व्यवकीर्णस्ते बाणैश्छिन्नः सह-
स्रधा । प्रियामिवोपगुह्य किं शेषे रणमेदिनीम् ८४ अप्रियामिव कस्मान्
मां नेच्छस्यभिभाषितुम् । धिगस्तु हृदयं यस्या ममेदं न सहस्रधा ८५
त्वयि पञ्चत्वमापन्ने फलते शोकपीडितम् । इत्येवं विलपन्ती सा बाष्प-
पर्याकुलेक्षणा ८६ स्नेहोपस्कन्नहृदया तदा मोहमुपागमत् । कश्मलाभि-
हता सन्ना बभौ सा रावणोरसि ८७ संध्यानुरक्ते जलदे दीप्ता विद्युदि-

---

अशाप्रकारचें फल प्राप्त झालें आहे ७८. हे नीलमेघतुल्य, हे पीतवस्त्रपरिधान कर-
णाऱ्या, हे उत्कृष्ट बाहुभूषणें धारण करणाऱ्या, आपले अवयव भूतलावर अस्ताव्यस्त
टाकून व स्वतः रक्तानें व्याप्त होऊन तूं कां बरें पडला आहेस ? ७९. निद्रिस्त
पुरुषाप्रमाणें तूं कां बरें शोकाकुल झालेल्या माझ्याशीं भाषण करीत नाहींस ?
महावीर्यवान्, दक्ष आणि संग्रामामध्यें पलायन न करणारा ८० अशा राक्षसाची
मी कन्या असतांना तूं कां बरें माझ्याशीं भाषण करीत नाहींस ? ऊठ, ऊठ; नवी-
नच पराभव झाला असतांना तूं असा पडून कां राहिला आहेस ! ८१. आज सूर्य-
किरणें निर्भय होऊन लंकेमध्यें प्रविष्ट झालीं आहेत. आजपर्यंत संग्रामामध्यें आपल्या
सूर्यतुल्य तेजाच्या योगानें तूं शत्रूंचा संहार करीत होतास ८२. वज्रपाणि इंद्राच्या
वज्राप्रमाणें नेहमीं पूजा करून ठेविलेला, सुवर्णभूषणांनीं अलंकृत आणि संग्रामामध्यें
असंख्य प्रहार करणारा तो हा ८३ तुझा परिघ बाणांनीं हजारों तुकडे तुकडे उडून
गेल्यामुळें विस्कळित होऊन पडलेला आहे. प्रियेप्रमाणें रणभूमीला आलिंगन देऊन
तूं कशाकरितां शयन करीत आहेस ? ८४ आणि अप्रिय असलेल्या स्त्रीप्रमाणें माझ्याशीं
नुसतें भाषण सुद्धां करण्याची तूं कां बरें इच्छा करीत नाहींस ? तूं मृत झाला असू-
नही शोकाकुल झालेल्या ज्या ह्या माझ्या हृदयाचे हजारों तुकडे उडून जात नाहींत
त्या हृदयाला धिक्कार असो ". ह्याप्रमाणें ती मंदोदरी विलाप करितां करितां मूर्च्छित
झाली. त्या वेळीं तिचे नेत्र अश्रूंनीं अगदीं व्याकुल झाले होते आणि प्रेमाच्या योगानें
तिचें हृदय अगदीं कळवळून गेलें होतें. मूर्च्छेनें घेरल्यामुळें रावणाच्या वक्षःस्थलावर

वेपमाना । तथागतां समुत्थाप्य सपत्न्यस्तां भृशातुराः ८८ पर्यवस्थाप-
यामासु रुदत्यो रुदतीं भृशम् । किं ते न विदिता देवि लोकानां स्थितिर-
ध्रुवा ८९ दशाविभागपर्याये राज्ञां वै चञ्चलाः श्रियः । इत्येवमुच्यमाना सा
सशब्दं प्ररुरोद ह ९० स्नापयन्ती तदास्रेण स्तनौ वक्त्रं सुनिर्मलम् । एतस्मिन्न-
न्तरे रामो विभीषणमुवाच ह ९१ संस्कारः क्रियतां भ्रातुः स्त्रीगणः परिसा-
न्त्व्यताम् । तमुवाच ततो धीमान्विभीषण इदं वचः ९२ विमृश्य प्रश्रितं
बुद्ध्या धर्मार्थसहितं हितम् । त्यक्तधर्मव्रतं क्रूरं नृशंसमनृतं तथा ९३
नाहमर्हामि संस्कर्तुं परदाराभिमर्शनम् । भ्रातृरूपो हि मे शत्रुरेष सर्वा-
हित रतः ९४ रावणो नार्हते पूजां पूज्योऽपि गुरुगौरवात् । नृशंस इति
मां राम वक्ष्यन्ति मनुजा भुवि ९५ श्रुत्वा तस्य गुणान्सर्वे वक्ष्यन्ति सुकृतं
पुनः । तच्छ्रुत्वा परमप्रीतो रामो धर्मभृतां वरः ९६ विभीषणमुवाचेदं

---

पडलेली ती मंदोदरी ८५, ८६, ८७ संधिप्रकाशानें आरक्तवर्ण झालेल्या मेघावर पडलेली देदीप्यमान व उज्ज्वल विद्युल्लताच कीं काय अशी दिसूं लागली. तशा अवस्थेस पोंचलेल्या त्या मंदोदरीला अत्यंत व्याकुल झालेल्या तिच्या सवतींनीं उठविलें ८८ आणि अतिशयच रोदन करीत असलेल्या त्या सवतींनीं रडत रडत तिचें समाधानही केलें. " हे देवि, लोकांची स्थिति शाश्वत नाहीं हें तुला विदित नाहीं काय ? ८९. भिन्न भिन्न दशांचे फेरे ज्यांत होत असतात अशा ह्या संसारामध्यें राजांचीं वैभवें चंचल आहेत. " ह्याप्रमाणें त्या तिचें समाधान करूं लागल्या असतां ती मोठ्या मोठ्यानेंच रडूं लागली ९० आणि अश्रूंच्या योगानें आपल्या अत्यंत निर्मल मुखाला व स्तनांना स्नान घालूं लागली. इतक्यामध्यें राम बिभीषणाला म्हणाला ९१ " भ्रात्याचा और्ध्वदेहिक संस्कार कर आणि स्त्रीसमुदायाचें सांत्वन कर. ह्यावर विचारी बिभीषण बुद्धिपूर्वक विचार करून धर्मार्थसहित, हितावह व विनययुक्त असें भाषण त्या रामाशीं करूं लागला. ( तो म्हणाला ) " धर्माचा व व्रताचा ज्यानें त्याग केला असा जो क्रूर, दुष्ट, खोटा ९२, ९३ आणि परस्त्रीवर हात टाकणारा त्याचा और्ध्वदेहिक संस्कार करणें मला योग्य नाहीं. सर्वांच्या अकल्याणाविषयीं तत्पर असलेला हा रावण माझा भ्रातृरूप शत्रु होय ९४. "ज्येष्ठ भ्राता" ही महत्त्वाची गोष्ट लक्ष्यांत घेतली असतां रावण जरी पूज्य आहे तरी माझ्या हातून पूजा होण्यास तो पात्र नाहीं. हे रामा, ( संस्कार न केला तर ) भूतलावरील मानव मला प्रथमतः दुष्ट म्हणतील ९५; परंतु, त्याचे दोष श्रवण केल्यानंतर सर्वही पुनरपि ' चांगलें केलें ' असेच उद्गार माझ्यासंबधानें काढूं लागतील. तें भाषण श्रवण करून धर्मनिष्ठांमध्यें

वाक्यज्ञं वाक्यकोविदः । तथापि मे प्रियं कार्यं त्वत्प्रभावान्मया जितम् ९७ अवश्यं तु क्षमं वाच्यो मया त्वं राक्षसेश्वर । अधर्मानृतसंयुक्तः कामं त्वेष निशाचरः ९८ तेजस्वी बलवाञ्छूरः सङ्ग्रामेषु च नित्यशः । शतक्रतुमुखैर्देवैः श्रूयते न पराजितः ९९ महात्मा बलसंपन्नो रावणो लोकरावणः । मरणान्तानि वैराणि निर्वृत्तं नः प्रयोजनम् १०० क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव । त्वत्सकाशान्महाबाहो संस्कारं विधिपूर्वकम् १ क्षिप्रमर्हति धर्मेण त्वं यशोभाग्भविष्यसि । राघवस्य वचः श्रुत्वा त्वरमाणो विभीषणः २ संस्कारयितुमारेभे भ्रातरं रावणं हतम् । स प्रविश्य पुरीं लङ्कां राक्षसेन्द्रो विभीषणः ३ रावणस्याग्निहोत्रं तु निर्यापयति सत्वरम् । शकटान्दारुरूपाणि अग्नीन्वै याजकांस्तथा ४ तथा चन्दनकाष्ठानि काष्ठानि विविधानि च । अगरूणि सुगन्धीनि गन्धांश्च सुरभींस्तथा ५ मणिमुक्ताप्रवालानि निर्यापयति राक्षसः । आजगाम मुहूर्तेन राक्षसैः परिवारितः ६ ततो माल्यवता सार्धं क्रियामेव चकार सः । सौवर्णी

---

श्रेष्ठ असलेला राम अतिशय संतुष्ट झाला ९६ आणि तो वक्ता राम भाषणाचें मर्म जाणणाऱ्या बिभीषणाला ह्मणाला "तुझेंही प्रिय करणें माझें कर्तव्यच आहे. कारण, तुझ्या प्रभावानेंच मला जय प्राप्त झाला आहे ९७. हे राक्षसाधिपते, योग्य तेंच मीं तुला अवश्य सांगितलें पाहिजे. अधर्मी व असत्य असा जरी हा राक्षस खरोखर होता तरी ९८ तो तेजस्वी, बलाढ्य व शूर असून इंद्रप्रभृति देवांच्या हातूनही संग्रामामध्यें त्याचा कधींच पराजय झालेला नाहीं असें ऐकण्यांत आहे ९९. सारांश, लोकांना भय उत्पन्न करणारा रावण महात्मा व बलाढ्य होता. शिवाय, मरणाबरोबर वैरांचा शेवट होत असून आपला कार्यभागही उरकला आहे १००. ह्यास्तव, ह्याचा और्ध्वदेहिक संस्कार केला पाहिजे. ह्याचें हित होणें आतां तुझ्याप्रमाणें मलाही इष्ट आहे. तस्मात्, हे महापराक्रमी बिभीषणा, तुझ्या हातून ह्याचा विधिपूर्वक व धर्माला अनुसरून संस्कार सत्वर होणें योग्य आहे व असें केल्यानें तुझी ही कीर्ति होणार आहे." रामाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर बिभीषणानें त्वरा केली १,२ आणि आपल्या वध पावलेल्या रावणभ्रात्याचा संस्कार करण्यास प्रारंभ केला. लंकानगरीमध्यें प्रवेश करून, त्या राक्षसाधिपति बिभीषणानें ३ रावणाचें अग्निहोत्र सत्वर बाहेर काढिलें. सारांश, शकट, काष्ठपात्रें, अग्नि, होम देणारे ४, चंदनकाष्ठें, इतरही नानाप्रकारचीं काष्ठें, सुगंधि अगुरु, सुवासिक गंधद्रव्यें ५, हिरे, मोत्यें आणि पोंवळीं हीं त्या राक्षसानें बाहेर काढिलीं आणि एका मुहूर्तामध्यें राक्षसांबरोबर तो परत आला ६. नंतर माल्यवानासहवर्तमान तो

शिबिकां दिव्यामारोप्य क्षौमवाससम् ७ रावणं राक्षसाधीशमश्रुपूर्णमुखा
द्विजाः । तूर्यघोषैश्च विविधैस्तुवद्भिश्चाभिनन्दितम् ८ पताकाभिश्च चित्राभिः
सुमनोभिश्च चित्रिताम् । उत्क्षिप्य शिबिकां तां तु विभीषणपुरोगमाः ९
दक्षिणाभिमुखाः सर्वे गृह्य काष्ठानि भेजिरे । अग्नयो दीप्यमानास्ते तदा-
ध्वर्युसमीरिताः १० शरणाभिगताः सर्वे पुरस्तात्तस्य ते ययुः । अन्तःपुराणि
सर्वाणि रुदमानानि सत्वरम् ११ पृष्ठतोऽनुययुस्तानि प्लवमानानि सर्वतः १२
रावणं प्रयते देशे स्थाप्य ते भृशदुःखिताः । चितां चन्दनकाष्ठैश्च पद्मको-
शीरचन्दनैः १३ ब्राह्म्या सवर्तयामासू राङ्कवास्तरणावृताम् । प्रचक्रू राक्ष-
सेन्द्रस्य पितृमेधमनुत्तमम् १४ वेदिं च दक्षिणप्राच्यां यथास्थानं च पाव-
कम् । पृषदाज्येन संपूर्णं स्रुवं स्कन्धे प्रचिक्षिपुः १५ पादयोः शकटं प्रापु-
रूर्वोश्चोलूखलं तदा । दारुपात्राणि सर्वाणि अरणिं चोत्तरारणिम् १६
दत्त्वा तु मुसलं चान्यं यथास्थानं विचक्रमुः । शास्त्रदृष्टेन विधिना महर्षि-
विहितेन च १७ तत्र मेध्यं पशुं हत्वा राक्षसेन्द्रस्य राक्षसाः । परिस्तर-

---

त्याची क्रिया करूं लागला. सोन्याच्या दिव्य पालखीमध्यें रेशमी वस्त्रें परिधान केलेल्या राक्षसाधिपति रावणाला बसवून नानाप्रकारचे वाद्यघोष आणि स्तुतिपाठक ह्यांच्याकडून त्याचें अभिनंदन होत असतांना ज्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून गेले आहेत असे द्विज स्मशा-नाकडे निघाले ७, ८. तदनंतर मनोहर पताका व पुष्पें ह्यांनीं शृंगारिलेली ती पालखी वाहकांकडून उठवून बिभीषणप्रभृति ९ सर्वही राक्षस दक्षिणेकडे तोंड करून व हातामध्यें काष्ठें घेऊन स्मशानाच्या मार्गाला लागले. अध्वर्यूनें चाळविलेले ते अग्नि प्रज्वलित होऊं लागले १० आणि कुंडामध्यें असतांना ते सर्वही त्याच्या पुढें गेले व सर्वही अंतःपुराचें लोटच्या लोट रडत रडत त्याच्या मागोमाग सर्व बाजूंनीं सत्वर निघाले ११, १२. तदनंतर शुद्ध प्रदेशावर रावणाला ठेवून अत्यंत दुःखित झालेल्या त्या बिभीषणप्रभृति राक्षसांनीं चंदन, पद्मक व वाळा ह्यांची चिता रचून रंकुसंज्ञक मृगाच्या अजिनानें त्यावर आस्तरण घातलें. आणि वेदोक्त मार्गानें ती तयार केल्या-नंतर त्या राक्षसाधिपतीला अनुलक्षून त्यांनीं पितृमेधविहित उत्कृष्ट कर्म केलें १३, १४. चितेच्या आग्नेय दिशेस वेदि करून व तेथें त्या त्या ठिकाणीं अग्नि ठेवून पृषदाज्यानें ( अर्थात् दधियुक्त आज्यानें ) भरलेल्या एका स्रुव्याची त्यांनीं त्याच्या खांद्यावर आहुती दिली १५. पायांवर शकट, मांड्यांवर उखळ आणि त्याचप्रमाणें सर्व काष्ठपात्रें, अरणी, मंथा १६, मुसळ व दुसरें मुसळ हीं योग्य ठिकाणीं शास्त्रोक्त व ऋषिप्रणीत विधी-प्रमाणें ठेवून त्यांनीं त्याचा संस्कार केला १७. नंतर यज्ञिय पशु मारून राक्षसांनीं त्या राजा

णिकां राज्ञो घृताक्तां समवेशयन् १८ गन्धैर्माल्यैरलंकृत्य रावणं दीन-
मानसाः । विभीषणसहायास्ते वस्त्रैश्च विविधैरपि १९ लाजैरवकिरन्ति
स्म बाष्पपूर्णमुखास्तथा । स ददौ पावकं तस्य विधियुक्तं बिभीषणः २०
स्नात्वा चैवार्द्रवस्त्रेण तिलान्दर्भविमिश्रितान् । उदकेन च संमिश्रान्प्रदाय
विधिपूर्वकम् २१ ताः स्त्रियोऽनुनयामास सान्त्वयित्वा पुनःपुनः ।
गम्यतामिति ताः सर्वा विविशुर्नगरं ततः २२ प्रविष्टासु पुरीं स्त्रीषु
राक्षसेन्द्रो बिभीषणः । रामपार्श्वमुपागम्य समतिष्ठद्विनीतवत् २३ रामोऽपि
सह सैन्येन ससुग्रीवः सलक्ष्मणः । हर्षं लेभे रिपुं हत्वा वृत्रं वज्रधरो
यथा २४ ततो विमुक्त्वा सशरं शरासनं महेन्द्रदत्तं कवचं स तन्महत् ।
विमुच्य रोषं रिपुनिग्रहात्ततो रामः स सौम्यत्वमुपागतोऽरिहा १२५
[ ५०८६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे
एकादशाधिकशततमः सर्गः ॥ १११ ॥

ते रावणवधं दृष्ट्वा देवगन्धर्वदानवाः । जग्मुः स्वैः स्वैर्विमानैस्ते कथ-
यन्तः शुभाः कथाः १ रावणस्य वधं घोरं राघवस्य पराक्रमम् । सुयुद्धं

---

राक्षसाधिपतीच्या मुखामध्यें त्याची वपा घातली १८. अंतःकरणामध्यें खिन्न झालेल्या व अश्रूंनीं मुख व्याप्त झालेल्या त्या बिभीषणाच्या मित्रांनीं गंध, पुष्पें आणि नानाप्रकारचीं वस्त्रें ह्यांनीं रावणाला भूषित करून त्याच्यावर लाह्या उधळल्या. नंतर बिभीषणानें त्याला यथाविधि अग्नि दिला १९,१२०. स्नान केल्यानंतर आर्द्र वस्त्र असतांनाच दर्भमिश्रित तिल उदकासहवर्तमान विधिपूर्वक देऊन २१ बिभीषणानें वारंवार सांत्वन करून त्या स्त्रियांचें सांत्वन केलें. तदनंतर ' जा ' असें सांगितलें असतां त्या सर्वही स्त्रिया नगरामध्यें प्रविष्ट झाल्या २२. लंकानगरीमध्यें स्त्रिया प्रविष्ट झाल्यानंतर राक्षसाधिपति बिभीषण रामाचे समीप येऊन नम्रपणें उभा राहिला २३; आणि वृत्राचा वध केल्यावर ज्याप्रमाणें वज्रपाणि इंद्राला हर्ष झाला त्याप्रमाणें सुग्रीव, लक्ष्मण व सैन्य ह्यांसहवर्तमान रामालाही शत्रूचा वध केल्यामुळें हर्ष झाला २४. असो. तदनंतर शत्रूचा नाश झाल्यामुळें बाणासहवर्तमान धनुष्य आणि तें इंद्रदत्त प्रचंड कवच रामानें टाकून दिलें आणि क्रोधही सोडून देऊन त्या शत्रुघातक रामानें सौम्य रूप धारण केलें १२५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ १११ ॥

रावणाचा वध झाल्याचें अवलोकन करून देव, गंधर्व व दानव शुभ कथा कथन करीत करीत आपआपल्या विमानांत बसून चालते झाले १. सारांश, रावणाचा घोर

वानराणां च सुग्रीवस्य च मन्त्रितम् २ अनुरागं च वीर्यं च मारुतेर्लक्ष्मणस्य च । पतिव्रतात्वं सीताया हनूमति पराक्रमम् ३ कथयन्तो महाभागा जग्मुर्हृष्टा यथागतम् ४ राघवस्तु रथं दिव्यमिन्द्रदत्तं शिखिप्रभम् । अनुज्ञाप्य महाबाहुर्मातलिं प्रत्यपूजयत् ५ राघवेणाभ्यनुज्ञातो मातलिः शक्रसारथिः । दिव्यं तं रथमास्थाय दिवमेवोत्पपात ह ६ तस्मिंस्तु दिवमारूढे सरथे रथिनां वरः । राघवः परमप्रीतः सुग्रीवं परिषस्वजे ७ परिष्वज्य च सुग्रीवं लक्ष्मणेनाभिवादितः । पूज्यमानो हरिगणैराजगाम बलालयम् ८ अथोवाच स काकुत्स्थः समीपपरिवर्तिनम् । सौमित्रिं मित्रसंपन्नं लक्ष्मणं शुभलक्षणम् ९ विभीषणमिमं सौम्य लङ्कायामभिषेचय । अनुरक्तं च भक्तं च तथा पूर्वोपकारिणम् १० एष मे परमः कामो यदिमं रावणानुजम् । लङ्कायां सौम्य पश्येयमभिषिक्तं विभीषणम् ११ एवमुक्तस्तु सौमित्री राघवेण महात्मना । तथेत्युक्त्वा सुसंहृष्टः सौवर्णं घटमाददे १२ तं घटं वानरेन्द्राणां हस्ते दत्त्वा मनोजवान् । व्यादिदेश महा-

---

वध, रामाचा पराक्रम, वानरांचें उत्कृष्ट युद्ध, सुग्रीवाची मसलत २, मारुती व लक्ष्मण ह्यांचें प्रेम व वीर्य, सीतेचें पातिव्रत्य आणि हनुमानाचा पराक्रम ३ कथन करीत करीत ते महाभाग्यवान् देवादिक आले तसे आनंदानें चालते झाले ४. इंद्रानें दिलेला अग्नितुल्य दिव्य रथ नेण्याची अनुज्ञा देऊन महापराक्रमी रामानें मातलीचा सत्कार केला ५; आणि रामाची अनुज्ञा झाली असतां इंद्रसारथि मातलिही त्या दिव्य रथावर आरूढ होऊन स्वर्गामध्येंच निघून गेला ६. तो रथिश्रेष्ठ मातलि रथासहवर्तमान स्वर्गारूढ झाल्यानंतर रामानें अतिशय संतुष्ट होऊन सुग्रीवाला आलिंगन दिलें ७. ह्याप्रमाणें सुग्रीवाला रामानें आलिंगन दिल्यानंतर लक्ष्मणानें त्या रामाला अभिवंदन केलें आणि वानरसमुदाय प्रशंसा करीत असतांना तो राम आपल्या सैन्याच्या तळापाशीं आला ८. तदनंतर तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम मित्रसंपन्न व शुभ लक्षणांनीं युक्त अशा समीप असलेल्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाला ह्मणाला ९ " हे सौम्या, ह्या बिभीषणाला लंकेमध्यें अभिषेक कर. हा आपणावर प्रेम करणारा असून आपला भक्त आहे व प्रथमतः ह्यानें आपणावर उपकार केला आहे १०. ह्या रावणानुज बिभीषणाला लंकेमध्यें अभिषिक्त झाल्याचें पहावें ही माझी, हे सज्जना लक्ष्मणा, उत्कट इच्छा आहे " ११. ह्याप्रमाणें महात्म्या रामानें लक्ष्मणाला सांगितलें असतां अतिशय आनंदित झालेल्या लक्ष्मणानें 'ठीक आहे' असें ह्मणून सुवर्णघट घेतला १२ आणि वानराधिपतींच्या हातीं तो घट देऊन मनाप्रमाणें वागणाऱ्या असलेल्या त्या वानराधिपतींना त्या महासामर्थ्यवान्

सत्त्वः समुद्रसलिलं तदा १३ अतिशीघ्रं ततो गत्वा वानरास्ते मनोजवाः।
आगतास्तु जलं गृह्य समुद्राद्वानरोत्तमाः १४ ततस्त्वेकं घटं गृह्य संस्थाप्य
परमासने । घटेन तेन सौमित्रिरभ्यषिञ्चद्विभीषणम् १५ लङ्कायां रक्षसां
मध्ये राजानं रामशासनात् । विधिना मन्त्रदृष्टेन सुहृद्गणसमावृतः १६
अभ्यषिञ्चंस्तदा सर्वे राक्षसा वानरास्तथा । प्रहर्षमतुलं गत्वा तुष्टुवू
राममेव हि १७ तस्यामात्या जहृषिरे भक्ता ये चास्य राक्षसाः ।
दृष्ट्वाभिषिक्तं लङ्कायां राक्षसेन्द्रं विभीषणम् १८ राघवः परमां प्रीतिं जगाम
सहलक्ष्मणः । सान्त्वयित्वा प्रकृतयस्ततो राममुपागमत् १९ दध्यक्षता-
न्मोदकांश्च लाजाः सुमनसस्तथा । आजह्रुरथ संहृष्टाः पौरास्तस्मै निशा-
चराः २० स तान्गृहीत्वा दुर्धर्षो राघवाय न्यवेदयत् । माङ्गल्यं मङ्गलं सर्वं
लक्ष्मणाय च वीर्यवान् २१ कृतकार्यं समृद्धार्थं दृष्ट्वा रामो विभीषणम् ।
प्रतिजग्राह तत्सर्वं तस्यैव प्रतिकाम्यया २२ ततः शैलोपमं वीरं प्राञ्जलिं
प्रणतं स्थितम् । उवाचेदं वचो रामो हनूमन्तं प्लवङ्गमम् २३ अनुज्ञाप्य

---

लक्ष्मणानें समुद्राचें उदक आणण्याविषयीं आज्ञा केली १३. तेव्हां मनाप्रमाणें वेग धारण करणारे ते वानर तेथून अतिशयच त्वरेनें गेले आणि समुद्रापासून उदक घेऊन ते वानरश्रेष्ठ परत आले १४. तदनंतर त्यांपैकीं एक घट घेऊन आणि बिभीषणाला सिंहासनावर बसवून सुहृद्गणांनीं परिवेष्टित असलेल्या सुमित्रापुत्र लक्ष्मणानें रामाच्या आज्ञेप्रमाणें राक्षसांमध्यें त्यांचा राजा ह्मणून समंत्रक विधीनें त्याला लंकेंत अभिषेक केला १५,१६. तेव्हां सर्व राक्षसांनीं व वानरांनींही त्याला अभिषेक केला आणि अतिशय हर्षयुक्त होऊन ते रामाची स्तुति करूं लागले १७. लंकेमध्यें बिभीषणाला राक्षसांचा राजा ह्मणून अभिषेक झाल्याचें अवलोकन करून त्याच्या अमात्यांना व त्याचे भक्त असलेल्या राक्षसांना आनंद झाला १८. लक्ष्मणास-हवर्तमान रामाला पराकाष्ठेचा आनंद झाला व प्रजाजनांचें सांत्वन करून तो रामा-समीप आला १९. तदनंतर दहीं, अक्षता, मोदक, लाह्या व पुष्पें घेऊन आनं-दित झालेले लंकानगरनिवासी राक्षस त्या बिभीषणाकडे आले असतां २० त्या दधिप्रभृति पदार्थांचा स्वीकार करून त्या अजिंक्य व वीर्यवान् बिभीषणानें ते सर्व मंगलदायक व मंगलरूप शुभ पदार्थ रामाला व लक्ष्मणाला निवेदन केले २१. तद-नंतर मनोरथ परिपूर्ण होऊन कृतकृत्य झालेल्या बिभीषणाला अवलोकन केल्यावर त्याच्याच इच्छेनें रामानें तें सर्व स्वीकारिलें २२. तदनंतर नम्रपणें हात जोडून स्थित असलेल्या पर्वततुल्य वीर हनुमान् वानराला राम ह्मणाला २३ "हे सौम्या, महाराज

महाराजमिमं सौम्य विभीषणम् । प्रविश्य नगरीं लङ्कां कौशलं ब्रूहि मैथिलीम् २४ वैदेह्या मां च कुशलं सुग्रीवं च सलक्ष्मणम् । आचक्ष्व वदतां श्रेष्ठ रावणं च हतं रणे २५ प्रियमेतदिहाख्याहि वैदेह्यास्त्वं हरीश्वर । प्रतिगृह्य तु संदेशमुपावर्तितुमर्हसि २६ [ ५११२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्वादशाधिकशततमः सर्गः ॥११२॥

इति प्रतिसमादिष्टो हनूमान्मारुतात्मजः । प्रविवेश पुरीं लङ्कां पूज्यमानो निशाचरैः १ प्रविश्य च पुरीं लङ्कामनुज्ञाप्य विभीषणम् । ततस्तेनाभ्यनुज्ञातो हनूमान्वृक्षवाटिकाम् २ संप्रविश्य यथान्यायं सीतया विदितो हरिः । ददर्श मृजया हीनां सातङ्कां रोहिणीमिव ३ वृक्षमूले निरानन्दां राक्षसीभिः परीवृताम् । निभृतः प्रणतः प्रह्वः सोऽभिगम्याभिवाद्य च ४ दृष्ट्वा समागतं देवी हनूमन्तं महाजवम् । तूष्णीमास्त तदा दृष्ट्वा स्मृत्वा हृष्टाभवत्तदा ५ सौम्यं तस्या मुखं दृष्ट्वा हनूमान्प्लवगोत्तमः । रामस्य वचनं सर्वमाख्यातुमुपचक्रमे ६ वैदेहि कुशली रामः सुग्रीवः सहलक्ष्मणः ।

---

बिभीषणाची आज्ञा घेऊन तूं लंकानगरीमध्यें जा आणि सीतेला कुशल वर्तमान कळीव २४. सारांश, हे वक्त्यांमध्यें श्रेष्ठ हनुमाना, मी व सुग्रीवासहवर्तमान लक्ष्मण कुशल असून रणामध्यें रावणाचा वध झाल्याचें तूं सीतेला कळीव २५. हे वानराधिपते, हें प्रिय वृत्त तूं सीतेला कळीव आणि तिचा निरोप घेऊन इकडे परत ये " २६.
ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें बारावा सर्ग समाप्त झाला ॥ ११२ ॥

ह्याप्रमाणें वायुपुत्र हनुमानास आज्ञा झाली असतां निशाचर त्याची प्रशंसा करीत असतांना तो लंकानगरीमध्यें प्रविष्ट झाला १. बिभीषणाच्या अनुज्ञेनें लंकानगरीमध्यें प्रवेश केल्यानंतर त्यानें अनुज्ञा दिली असतां हनुमान् अशोकवनामध्यें २ प्रविष्ट झाला आणि रीतीप्रमाणें सीतेला तो विदित झाल्यावर संस्काररहित सीता त्यानें अवलोकन केली. ग्रहपीडायुक्त रोहिणीप्रमाणें ती दिसत होती ३ आणि राक्षसस्त्रियांनीं परिवेष्टिलेली ती आनंदरहित सीता एका वृक्षाच्या मुळाशीं बसली होती. सेवेविषयीं तत्पर आणि विनयसंपन्न असलेला तो हनुमान् समीप जाऊन व अभिवंदन करून नम्रपणानें उभा राहिला ४. तदनंतर महाबलाढ्य हनुमान् आल्याचें अवलोकन करून सीता देवी स्वस्थ झाली आणि त्याला अवलोकन केल्यानतर सीतेला (त्याच्या भाषणाचें वगैरे) स्मरण होऊन आनंद झाला ५. तिची सौम्य मुद्रा अवलोकन करून वानरश्रेष्ठ हनुमानानें रामाचें सर्व भाषण सीतेला कळविण्यास आरंभ केला ६. ( तो ह्मणाला )

कुशलं त्वाह सिद्धार्थो हतशत्रुरमित्रजित् ७ विभीषणसहायेन रामेण हरिभिः सह । निहतो रावणो देवि लक्ष्मणेन च वीर्यवान् ८ प्रियमाख्यामि ते देवि भूयश्च त्वां सभाजये । तव प्रभावाद्धर्मज्ञे महान्रामेण संयुगे ९ लब्धोऽयं विजय सीते स्वस्था भव गतज्वरा । रावणश्च हतः शत्रुर्लङ्का चैव वशीकृता १० मया ह्यलब्धनिद्रेण धृतेन तव निर्जये । प्रतिज्ञैषा विनिस्तीर्णा बद्धा सेतुं महोदधौ ११ संभ्रमश्च न कर्तव्यो वर्तन्त्या रावणालये । विभीषणविधेयं हि लङ्कैश्वर्यमिदं कृतम् १२ तदाश्वसिहि विस्रब्धं स्वगृहे परिवर्तसे । अयं चाभ्येति संहृष्टस्त्वद्दर्शनसमुत्सुकः १३ एवमुक्ता तु सा देवी सीता शशिनिभानना । प्रहर्षेणावरुद्धा सा व्याहर्तुं न शशाक ह १४ ततोऽब्रवीद्धरिवरः सीतामप्रतिजल्पतीम् । किं त्वं चिन्तयसे देवि किं च मां नाभिभाषसे १५ एवमुक्ता हनुमता सीता धर्मपथे स्थिता । अब्रवीत्परमप्रीता बाष्पगद्गदया गिरा १६ प्रियमेतदुपश्रुत्य भर्तुर्विजयसंश्रितम् । प्रहर्षवशमापन्ना निर्वा-

---

" हे वैदेहि, राम व लक्ष्मणासहवर्तमान सुग्रीव हे कुशल आहेत; शत्रूंना जिंकणारा तो राम शत्रूचा वध करून कृतकृत्य झाला आहे आणि तुला त्यानें कुशल कळविलें आहे ७. हे देवि, बिभीषण, हा ज्याचा साहाय्यकर्ता आहे अशा रामानें व लक्ष्मणानें वानरांच्या मदतीनें वीर्यवान् रावणाचा वध केला ८. हे देवि, मी तुला पुनरपि आनंद देऊन तुला प्रिय असलेलें वृत्त कथन करितों. हे धर्मज्ञ सीते, तुझ्या प्रभावामुळें संग्रामामध्यें रामाला हा मोठा विजय प्राप्त झाला आहे. ह्यास्तव, तूं आतां चिंता सोडून देऊन स्वस्थ हो. शत्रु रावणाचा वध करून रामानें लंका पादाक्रांत केली आहे ९,१०. तुझ्या शत्रूच्या पराजयाविषयीं निश्चय केल्यामुळें निद्रारहित असलेल्या माझ्या हातून महासागराला सेतु होऊन ही प्रतिज्ञा शेवटास गेली आहे ११. रावणाच्या घरीं असलेल्या तुला आतां भय बाळगण्याचें कारण नाहीं. कारण, हें लंकेचें ऐश्वर्य बिभीषणाच्या स्वाधीन केलेलें आहे १२. तस्मात्, तूं आतां विश्वासानें स्वस्थ हो; तूं आतां स्वतःच्या घरींच आहेस आणि तुझ्या दर्शनाकरितां उत्सुक झालेला हा आनंदित बिभीषणही इकडेच येत आहे " १३. ह्याप्रमाणें हनुमानानें त्या सीतादेवीला सांगितलें असतां चंद्रासारिख्या आल्हादकारक मुद्रेनें युक्त असलेली ती सीता हर्षानें व्याप्त झाल्यामुळें भाषण करण्यास समर्थ झाली नाहीं १४. तेव्हां कांहींएक उत्तर न देणाऱ्या त्या सीतेला तो वानरश्रेष्ठ हनुमान् म्हणाला " हे देवि, तूं काय विचार करीत आहेस? आणि माझ्याशीं कां भाषण करीत नाहींस ?" १५. ह्याप्रमाणें हनुमानानें विचारिलें असतां धर्ममार्गाला अनुसरून असलेली ती सीता अत्यंत संतुष्ट

कयास्मि क्षणान्तरम् १७ न हि पश्यामि सदृशं चिन्तयन्ती प्लवङ्गम । आख्यानकस्य भवतो दातुं प्रत्यभिनन्दनम् १८ न च पश्यामि सदृशं पृथिव्यां तव किंचन । सदृशं यत्प्रियाख्याने तव दत्त्वा भवेत्सुखम् १९ हिरण्यं वा सुवर्णं वा रत्नानि विविधानि च । राज्यं वा त्रिषु लोकेषु एतन्नार्हति भाषितम् २० एवमुक्तस्तु वैदेह्या प्रत्युवाच प्लवङ्गमः । प्रगृहीताञ्जलिर्हर्षात्सीतायाः प्रमुखे स्थितः २१ भर्तुः प्रियहिते युक्ते भर्तुर्विजयकाङ्क्षिणि । स्निग्धमेवंविधं वाक्यं त्वमेवार्हस्यनिन्दिते २२ तस्य तद्वचनं श्रुत्वा मैथिली जनकात्मजा । ततः शुभतरं वाक्यमुवाच पवनात्मजम् २३ अतिलक्षणसंपन्नं माधुर्यगुणभूषणम् । बुद्ध्या ह्यष्टाङ्गया युक्तं त्वमेवार्हसि भाषितुम् २४ श्लाघनीयोऽनिलस्य त्वं सुतः परमधार्मिकः । बलं शौर्यं श्रुतं सत्त्वं विक्रमो दाक्ष्यमुत्तमम् २५ तेजः क्षमा धृतिः स्थैर्यं विनीतत्वं न संशयः । एते चान्ये च बहवो गुणास्त्वय्येव शोभनाः २६ अथोवाच पुनः सीतामसंभ्रान्तो विनीतवत् । प्रगृहीताञ्जलिर्हर्षात्सीतायाः

---

झाली आणि आनंदाश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें गद्गदवाणीनें त्याला ह्मणाली १६ " भर्त्याच्या विजयासंबंधानें हें प्रिय वृत्त श्रवण केल्यामुळें मी हर्षानें उचंबळूं लागलें आणि ह्मणूनच क्षणभर मला कांहीं बोलतां आलें नाहीं १७. हे वानरा, तूं ज्या योग्यतेची प्रियवार्ता कथन करीत आहेस त्या योग्यतेचें तुला बक्षीस देण्याला मला कांहींच दिसत नाहीं १८. सारांश, प्रिय वृत्त कथन केल्याबद्दल त्या प्रिय वृत्ताला योग्य असें कांहीं बक्षीस तुला देऊन मन स्वस्थ करीन ह्मटलें तर पृथ्वीमध्यें कांहीं एक योग्य वस्तु नाहीं १९. हें जें प्रिय वृत्त तूं कथन केलें आहेस त्याच्याबद्दल बक्षीस ह्मणून रौप्य, सुवर्ण, नानाप्रकारचीं रत्नें अथवा त्रैलोक्याचें राज्यही योग्य होणार नाहीं " २०. ह्याप्रमाणें सीतेनें सांगितलें असतां सीतेच्या संमुख हात जोडून उभा राहिलेला तो वानर आनंदानें तिला ह्मणाला २१ " हे अनिंदित सीते, भर्त्याचें प्रिय व हित करण्याविषयीं तूं तत्पर असून भर्त्याचा विजय इच्छिणारी आहेस आणि अशाप्रकारचें सप्रेम भाषण करण्यास तूंच योग्य आहेस " २२. तें त्याचें भाषण श्रवण केल्यावर जनककन्या सीतेनें त्याच्याहीपेक्षां उत्कृष्ट भाषण त्या वायुपुत्र हनुमानाशीं केलें २३. ( ती ह्मणाली ) " अतिशय लक्षणांनीं संपन्न, माधुर्यगुणरूप भूषणानें युक्त आणि अष्टांगबुद्धीनें संयुक्त असें भाषण करण्यास तूंच योग्य आहेस २४. वायूचा तूं परम धार्मिक व प्रशंसनीय पुत्र आहेस आणि बल, शौर्य, विद्या, सत्त्व, पराक्रम, उत्कृष्ट दक्षता २५, तेज, क्षमा, धैर्य, स्थैर्य, विनयपणा हे व इतरही

प्रमुखे स्थितः २७ इमास्तु खलु राक्षस्यो यदि त्वमनुमन्यसे । हन्तुमिच्छामि ताः सर्वा याभिस्त्वं तर्जिता पुरा २८ क्लिश्यन्तीं पतिदेवां त्वामशोकवनिकां गताम् । घोररूपसमाचाराः क्रूराः क्रूरतरेक्षणाः २९ इह श्रुता मया देवि राक्षस्यो विकृताननाः । असकृत्परुषैर्वाक्यैर्वदन्त्यो रावणाज्ञया ३० विकृताविकृताकाराः क्रूराक्रूरकचेक्षणाः । इच्छामि विविधैर्घातैर्हन्तुमेताः सुदारुणाः ३१ राक्षस्यो दारुणकथा वरमेतत्प्रयच्छ मे । मुष्टिभिः पार्ष्णिघातैश्च विशालैश्चैव बाहुभिः ३२ जङ्घाजानुप्रहारैश्च दन्तानां चैव पीडनैः । भक्षणैः कर्णनासानां केशानां लुञ्चनैस्तथा ३३ निपात्य हन्तुमिच्छामि तव विप्रियकारिणीः । एवं प्रहारैर्बहुभिः संप्रहार्य यशस्विनि ३४ घातये तीव्ररूपाभिर्याभिस्त्वं तर्जिता पुरा । इत्युक्ता सा हनुमता कृपणा दीनवत्सला ३५ हनूमन्तमुवाचेदं चिन्तयित्वा विमृश्य च । राजसंश्रयवश्यानां कुर्वतीनां पराज्ञया ३६ विधेयानां च दासीनां कः

---

असंख्य उत्कृष्ट गुण तुझ्याच ठिकाणीं आहेत " २६. ह्यानंतर सीतेचे संमुख हात जोडून नम्रपणें उभा राहिलेला तो निर्भय हनुमान् आनंदानें पुनरपि तिला ह्मणाला २७ " खरोखर ह्याच त्या राक्षसी; जर तूं अनुज्ञा देत असशील तर ज्यांनीं पूर्वीं तुला धमकाविलें आहे त्या सर्वांचा वध करण्याची माझी इच्छा आहे २८. हे देवि, पति हेंच जिचें दैवत आहे अशी तूं अशोकवनामध्यें क्लेश भोगीत पडली असतांना घोर मुद्रा व आचरण, अत्यंत क्रूर नेत्र व विकृत मुख ह्यांनीं युक्त असलेल्या क्रूर राक्षसी रावणाच्या आज्ञेनें वारवार कठोर भाषणें ह्या ठिकाणीं तुझ्याशीं करीत होत्या असें मीं ऐकिलें आहे २९,३०. ह्यास्तव, विकृत व अविकृत मुद्रा आणि त्याचप्रमाणें क्रूर व सौम्य केश आणि नेत्र ह्यांनीं युक्त असून भयंकर भाषणें करणाऱ्या ह्या अतिभयंकर राक्षसस्त्रियांचा नानाप्रकारांनीं वध करण्याची माझी इच्छा आहे. ह्यास्तव, तसें करण्याची मला अनुज्ञा दे. सारांश, तुला दुःख देणाऱ्या राक्षसींचा—कांहींना मुष्टिप्रहार करून, कांहींना लत्ताप्रहार करून, कांहींना विशाल बाहूंचे तडाके देऊन, कांहींना पोटऱ्यांनीं व गुडघ्यांनीं प्रहार करून, कांहींना दांतांनीं पीडा देऊन, कांहींच्या कानांचे व नाकांचे लचके तोडून आणि कांहींचे केश उपटून—हपटून वध करण्याची माझी इच्छा आहे. हे यशस्विनि, ज्या घोर राक्षसींनीं पूर्वीं तुला धमकाविलें आहे त्यांना अशाप्रकारच्या अनेक प्रहारांनीं जेरीस आणून त्यांचा मीं वध करीन ". ह्याप्रमाणें त्या बिचाऱ्या दीनवत्सल सीतेला हनुमानानें सांगितलें असतां ३१,३२,३३,३४,३५ चिंतन करून व विचार करून ती हनुमानाला ह्मणाली " राजाच्या आश्रयाला

कुप्येद्वानरोत्तम । भाग्यवैषम्यदोषेण पुरस्ताद्दुष्कृतेन च ३७ मयैतत्प्राप्यते सर्वं स्वकृतं ह्युपभुज्यते । मैवं वद महाबाहो दैवी ह्येषा परा गतिः ३८ प्राप्तव्यं तु दशायोगान्मयैतदिति निश्चितम् । दासीनां रावणस्याहं मर्षयामीह दुर्बला ३९ आज्ञप्ता राक्षसेनेह राक्षस्यस्तर्जयन्ति माम् । हते तस्मिन्न कुर्वन्ति तर्जनं मारुतात्मज ४० अयं व्याघ्रसमीपे तु पुराणो धर्मसंहितः । ऋक्षेण गीतः श्लोकोऽस्ति तं निबोध प्लवङ्गम ४१ न परः पापमादत्ते परेषां पापकर्मणाम् । समयो रक्षितव्यस्तु संतश्चारित्रभूषणाः ४२ पापानां वा शुभानां वा वधार्हाणामथापि वा । कार्यं कारुण्यमार्येण न कश्चिन्नापराध्यति ४३ लोकहिंसाविहाराणां क्रूराणां पापकर्मणाम् । कुर्वतामपि पापानि नैव कार्यमशोभनम् ४४ एवमुक्तस्तु हनुमान्सीतया वाक्यकोविदः । प्रत्युवाच ततः सीतां रामपत्नीमनिन्दिताम् ४५ युक्ता रामस्य भवती धर्मपत्नी गुणान्विता । प्रतिसंदिश मां देवि गमिष्ये यत्र

असल्यामुळें त्याच्या अधीन असून दुसऱ्याच्या आज्ञेमुळें बरी वाईट गोष्ट करणाऱ्या ३६ आणि हुकमाचे चाकर असलेल्या ज्या दासी त्यांच्यावर, हे वानरश्रेष्ठा, कोण बरें क्रोध करील ? दुर्दैवामुळें आणि पूर्वसंचित पातकामुळें ३७ मला हें सर्व प्राप्त होत आहे. कारण, स्वतः जें कर्म केलें असेल त्याचें फल स्वतःच भोगावें लागतें. तस्मात्, हे महापराक्रमी हनुमाना, असें भाषण करूं नको. हा दैवाचा चमत्कारिक खेळ आहे ३८. दैवदशेमुळें मला हें प्राप्त होणारच असा माझा निश्चय झाला होता आणि ह्मणूनच मी दुर्बल स्त्रीप्रमाणें रावणाच्या दासींचे हे प्रकार सहन करीत होतें ३९. राक्षसानें आज्ञा केल्यामुळें राक्षसी मला येथें धमकावीत असत; परंतु, हे वायुपुत्रा, त्याचा वध झाल्यावर त्या आतां मला धमकावीत नाहींत ४०. हे वानरा, धर्माला अनुसरून असलेला, व अस्वलानें व्याघ्रासमीप ह्मटलेला हा एक श्लोक प्रसिद्ध आहे तो ऐक ४१. दुसऱ्यांना अपकार करणाऱ्या पापकर्मी लोकांना प्राज्ञ पुरुष उलट अपकार करीत नाहीं. कारण, सदाचरण हेंच सज्जनाचें भूषण असल्यामुळें सदाचाराचें त्यानें रक्षण केलेंच पाहिजे ४२. पुरुष पुण्य कर्म करणारे असोत, पापकर्म करणारे असोत अथवा वधाला योग्य असोत सज्जनानें त्यांच्यावर दया करावी. कारण, अपराध करीत नाहीं असा कोणीही नाहीं ४३. लोकांची हिंसा करणें हाच ज्यांचा स्वभाव आहे असे क्रूर व दुष्कर्मी लोक पापकर्में करीत असतांनाही त्यांच्याशीं पापकर्म करूं नये " ४४. ह्याप्रमाणें सीतेनें भाषणांतील मर्म जाणणाऱ्या हनुमानाला सांगितलें असतां अनिंदित रामपत्नी सीतेला तो ह्मणाला ४५ " रामाची तूं गुणसंपन्न धर्मपत्नी योग्य आहेस. हे देवि, आतां रामाला

राघवः ४६ एवमुक्ता हनुमता वैदेही जनकात्मजा । साब्रवीद्द्रष्टुमिच्छामि भर्तारं भक्तवत्सलम् ४७ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा हनूमान्मारुतात्मजः । हर्षयन्मैथिलीं वाक्यमुवाचेदं महामतिः ४८ पूर्णचन्द्रमुखं रामं द्रक्ष्यस्यद्य सलक्ष्मणम् । स्थितमित्रं हतामित्रं शचीवेन्द्रं सुरेश्वरम् ४९ तामेवमुक्त्वा भ्राजन्तीं सीतां साक्षादिव श्रियम् । आजगाम महातेजा हनूमान्यत्र राघवः ५० सपदि हरिवरस्ततो हनूमान्प्रतिवचनं जनकेश्वरात्मजायाः । कथितमकथयद्यथाक्रमेण त्रिदशवरप्रतिमाय राघवाय ५१ [ ५१६३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्रयोदशाधिकशततमः सर्गः ॥ ११३ ॥

तमुवाच महाप्राज्ञः सोऽभिवाद्य प्लवङ्गमः । रामं कमलपत्राक्षं वरं सर्वधनुष्मताम् १ यन्निमित्तोऽयमारम्भः कर्मणां यः फलोदयः । तां देवीं शोकसंतप्तां द्रष्टुमर्हसि मैथिलीम् २ सा हि शोकसमाविष्टा बाष्पपर्याकुलेक्षणा । मैथिली विजयं श्रुत्वा द्रष्टुं त्वामभिकाङ्क्षति ३ पूर्वकात्प्रत्यया-

---

कांहीं निरोप सांगावयाचा असल्यास तूं माझ्यापाशीं सांग; ह्मणजे मी जिकडे राम आहे तिकडे जातों " ४६. ह्याप्रमाणें जनककन्या सीतेला हनुमान् ह्मणाला असतां " भक्तवत्सल भर्त्याच्या दर्शनाची मला इच्छा आहे " असें ती ह्मणाली ४७. तें तिचें भाषण श्रवण केल्यावर महाविचारी वायुपुत्र हनुमान् सीतेला हर्ष उत्पन्न करीत करीत ह्मणाला ४८ " देवराज इंद्राला अवलोकन करणाऱ्या शचीप्रमाणें तू शत्रूंचा वध करून मित्रांचें रक्षण केलेल्या आणि पूर्णचंद्रतुल्य मुद्रेनें युक्त असलेल्या रामाला लक्ष्मणासहवर्तमान अवलोकन करिशील " ४९. ह्याप्रमाणें साक्षात् लक्ष्मीप्रमाणें झळकत असलेल्या सीतेला सांगितल्यानंतर महातेजस्वी हनुमान् जेथें राम होता तेथें आला ५०. तदनंतर वानरश्रेष्ठ हनुमानानें सुरश्रेष्ठतुल्य रामाला जनकराजकन्येनें सांगितलेला निरोप सत्वर क्रमानें सांगितला ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११३ ॥

तो महाबुद्धिमान् वानर सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असा जो कमलनयन राम त्याला अभिवंदन करून ह्मणाला १ " जिच्याकरितां हा उद्योग आरंभिला आणि जिच्याकरितां हीं सेतुबंधादि कर्मे सफल झालीं त्या शोकाकुल झालेल्या देवी सीतेला आपण अवलोकन करा. २ जी शोकाकुल झालेली आहे व अश्रूंनीं जिचे नेत्र व्याकुल झालेले आहेत अशी सीता तुझा विजय झाल्याचें ऐकून तुझ्या दर्शनाची इच्छा करीत आहे ३.

चाहमुक्तो विश्वस्तया तया । द्रष्टुमिच्छामि भर्तारमिति पर्याकुलेक्षणा ४
एवमुक्तो हनुमता रामो धर्मभृतां वरः । अगच्छत्सहसा ध्यानमीषद्बाष्प-
परिप्लुतः ५ स दीर्घमभिनिःश्वस्य जगतीमवलोकयन् । उवाच मेघसं-
काशं विभीषणमुपस्थितम् ६ दिव्याङ्गरागां वैदेहीं दिव्याभरणभूषिताम् ।
इह सीतां शिरःस्नातामुपस्थापय मा चिरम् ७ एवमुक्तस्तु रामेण त्वर-
माणो विभीषणः । प्रविश्यान्तःपुरं सीतां स्त्रीभिः स्वाभिरचोदयत् ८ ततः
सीतां महाभागां दृष्ट्वोवाच विभीषणः । मूर्ध्नि बद्धाञ्जलिः श्रीमान्विनीतो
राक्षसेश्वरः ९ दिव्याङ्गरागा वैदेहि दिव्याभरणभूषिता । यानमारोह भद्रं ते
भर्ता त्वां द्रष्टुमिच्छति १० एवमुक्ता तु वैदेही प्रत्युवाच विभीषणम् । अस्नात्वा
द्रष्टुमिच्छामि भर्तारं राक्षसेश्वर ११ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा प्रत्युवाच विभी-
षणः । यथाह रामो भर्ता ते तत्तथा कर्तुमर्हसि १२ तस्य तद्वचनं श्रुत्वा
मैथिली पतिदेवता । भर्तृभक्त्या वृता साध्वी तथेति प्रत्यभाषत १३ ततः
सीतां शिरःस्नातां संयुक्तां प्रतिकर्मणा । महार्हाभरणोपेतां महार्हाम्बर-

---

पूर्वीचा प्रत्यय आल्यामुळें नेत्रांमध्यें अश्रु आणून ती विश्वासानें मला " भर्त्याच्या दर्शनाची मला इच्छा आहे " असें ह्मणाली " ४. ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां रामाचें मुख कांहींसें अश्रूंनीं भरून गेलें आणि धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेला तो राम तत्क्षणीं ध्यानस्थ झाला ५ व दीर्घ सुस्कारा टाकून पृथ्वीकडे पहात पहात तो राम समीपच असलेल्या मेघतुल्य बिभीषणाला ह्मणाला ६ " दिव्य उटी लावून व दिव्य अलंकारांनीं भूषित होऊन शिरःस्नात झालेल्या सीतेला तूं येथें घेऊन ये. विलंब लावूं नको " ७. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां बिभीषण त्वरेत्वरेनें अंतःपुरामध्यें प्रवेश करून स्वपक्षीय स्त्रियांच्या द्वारानें त्यानें तें सीतेला सुचविलें ८. तदनंतर महाभाग्यवती सीतेला अवलोकन करितांक्षणीं मस्तकीं हात जोडिलेला तो विनयसंपन्न राक्षसाधिपति श्रीमान् बिभीषण तिला ह्मणाला ९ " हे वैदेहि, दिव्य उटी लावून व दिव्य अलंकार घालून तूं वाहनावर आरूढ हो. भर्ता तुला अवलोकन करण्याची इच्छा करीत आहे; तुझें कल्याण असो " १०. ह्याप्रमाणें बिभीषणानें तिला सांगितलें असतां ती त्याला ह्मणाली " हे राक्षसाधिपते, स्नान केल्याशिवायच भर्त्याला अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे " ११. हें तिचें भाषण श्रवण केल्यानंतर बिभीषण उलट तिला ह्मणाला " ज्याप्रमाणें तुझ्या भर्त्या रामानें तुला सांगितलें आहे त्याप्रमाणें तूं कर " १२. हें त्याचें भाषण श्रवण केल्यानंतर पतीलाच दैवत मानणारी साध्वी सीता भर्त्याचे ठिकाणीं प्रेम असल्यामुळें "ठीक आहे " असें ह्मणाली १३. तदनंतर शरीरसंस्कार

धारिणीम् १४ आरोप्य शिबिकां सीतां राक्षसैर्वहनोचितैः । राक्षसैर्बहु-भिर्गुप्तामाजहार विभीषणः १५ सोऽभिगम्य महात्मानं ज्ञात्वापि ध्यान-मास्थितम् । प्रणतश्च प्रहृष्टश्च प्राप्तां सीतां न्यवेदयत् १६ तामागता-मुपश्रुत्य रक्षोगृहचिरोषिताम् । रोषं हर्षं च दैन्यं च राघवः प्राप शत्रुहा १७ ततो यानगतां सीतां सविमर्शं विचारयन् । विभीषणमिदं वाक्यमहृष्टो राघवोऽब्रवीत् १८ राक्षसाधिपते सौम्य नित्यं मद्विजये रत । वैदेही संनिकर्षं मे क्षिप्रं समभिगच्छतु १९ तस्य तद्वचनं श्रुत्वा राघवस्य विभी-षणः । तूर्णमुत्सारणं तत्र कारयामास धर्मवित् २० कञ्चुकोष्णीषिण-स्तत्र वेत्रझर्झरपाणयः । उत्सारयन्तस्तान्योधान्समन्तात्परिचक्रमुः २१ ऋक्षाणां वानराणां च राक्षसानां च सर्वशः । वृन्दान्युत्सार्यमाणानि दूर-मुत्तस्थुरन्ततः २२ तेषामुत्सार्यमाणानां निःस्वनः सुमहानभूत् । वायुनो-द्धूयमानस्य सागरस्येव निःस्वनः २३ उत्सार्यमाणान्दृष्ट्वाथ जगत्यां जात-संभ्रमान् । दाक्षिण्यात्तदमर्षाच्च वारयामास राघवः २४ संरम्भाच्चाब्रवी-

---

करून शिरःस्नात झालेल्या व मोठीं मोठीं वस्त्रें धारण करून मोठे मोठे अलंकार घात-लेल्या त्या सीतेला १४ पालखीमध्यें बसवून व असंख्य राक्षस बंदोबस्ताला देऊन वहनक-र्माला योग्य अशा राक्षसांकडून बिभीषण तिला घेऊन आला १५. समीप आल्यानंतर महात्मा राम ध्यानस्थ झाला आहे असें जरी त्याला समजलें होतें तरी आनंदानें व नम्रपणानें त्यानें सीता आल्याचें निवेदन केलें १६. तेव्हां राक्षसाच्या गृहामध्यें चिरकाल राहिलेली ती सीता आल्याचें श्रवण करितांक्षणीं शत्रुघातक रामाला रोष, हर्ष व दैन्य हीं सर्वच प्राप्त झालीं १७. तदनंतर शिबिकेमध्यें आरूढ झालेल्या सीतेसंबंधानें विचारपूर्वक चिंतन करीत करीत हर्षरहित झालेला राम बिभीषणाला ह्मणाला १८ " हे राक्षसाधिपते, हे सौम्या, नेहेमीं माझ्याविषयीं तत्पर असलेल्या, हे बिभीषणा, सीतेला सत्वर माझ्या-समीप येऊं दे " १९. रामाचें तें भाषण श्रवण केल्यावर धर्मवेत्त्या बिभीषणानें त्या ठिकाणचे लोक सत्वर पलीकडे केले २०. अंगांत अंगरखे व मस्तकीं पागोटीं ज्यांनीं घातलेलीं आहेत आणि काठ्यांमुळें ज्यांचे हात झरझर वाजत आहेत असे ते सेवक त्या योद्ध्यांना दूर करीत करीत सभोंवतीं फिरले २१. ऋक्ष, वानर व राक्षस ह्यांच्या समुदायांना ते हटवूं लागले असतां ते समुदाय उठून दूर गेले २२ आणि वायूनें क्षुब्ध होणाऱ्या सागराच्या ध्वनीप्रमाणें तेथून दूर सारल्या जाणाऱ्या त्या ऋक्षादिकांमध्यें फारच मोठा शब्द होऊं लागला २३. ऋक्षादिकांना त्या ठिकाणीं दूर करूं लागल्यामुळे

द्रामश्चक्षुषा प्रदहन्निव । बिभीषणं महाप्राज्ञं सोपालम्भमिदं वचः २५
किमर्थं मामनादृत्य क्लिश्यतेऽयं त्वया जनः । निवर्तयैनमुद्वेगं जनोऽयं स्वजनो मम २६ न गृहाणि न वस्त्राणि न प्राकारास्तिरस्क्रिया । नेदृशा राजसत्कारा वृत्तमावरणं स्त्रियः २७ व्यसनेषु न कृच्छ्रेषु न युद्धेषु स्वयंवरे । न क्रतौ नो विवाहे वा दर्शनं दूष्यते स्त्रियः २८ सैषा विपद्गता चैव कृच्छ्रेण च समन्विता । दर्शने नास्ति दोषोऽस्या मत्समीपे विशेषतः २९
विसृज्य शिबिकां तस्मात्पद्भ्यामेवापसर्पतु । समीपे मम वैदेहीं पश्यन्त्वेते वनौकसः ३० एवमुक्तस्तु रामेण सविमर्शो बिभीषणः । रामस्योपानयत्सीतां संनिकर्षं विनीतवत् ३१ ततो लक्ष्मणसुग्रीवो हनूमांश्च प्लवङ्गमः । निशम्य वाक्यं रामस्य बभूवुर्व्यथिता भृशम् ३२ लज्जया त्ववलीयन्ती स्वेषु गात्रेषु मैथिली । बिभीषणेनानुगता भर्तारं साभ्यवर्तत ३३ विस्मयाच्च प्रहर्षाच्च स्नेहाच्च पतिदेवता । उदैक्षत मुखं भर्तुः सौम्यं सौम्यतरानना ३४

---

त्यांच्यांत घोटाळा उडून गेला आहे असें अवलोकन केल्यावर त्यांची दया आल्यामुळें आणि ( माझ्या आज्ञेशिवाय हा ह्यांना दूर सारीत आहे असें वाटून बिभीषणासंबधानें ) क्रोध आल्यामुळें रामानें त्यांना दूर सारणें बंद करविलें २४ आणि क्रोध आल्यामुळें दृष्टीनें दग्ध करीत करीतच कीं काय तो राम त्या महाबुद्धिमान् बिभीषणाला रागें भरून ह्मणाला २५ " माझी पर्वा न करितां तूं ह्या लोकांना कशाकरितां त्रास देत आहेस? ही दाणादाण बंद कर; हे लोक माझे आहेत २६. गृहें, वस्त्रें व कोट हीं स्त्रीचीं आवरणें नसून (लोकांना मागें हटविणें, धक्काबुक्की करून त्यांना मागें सारणें ) अशा प्रकारचे राजसत्कारही स्त्रीचें वास्तविक आवरण नव्हे. सदाचरण हेंच स्त्रीचें स्वाभाविक आवरण होय २७. संकट, विपत्ति, युद्ध, स्वयंवर, यज्ञ आणि विवाह ह्या प्रसंगीं स्त्रिया इतरांच्या दृष्टीं पडणें दोषावह होत नाहीं २८. तस्मात्, ज्याअर्थीं ती ही सीता विपत्तीमध्यें व संकटामध्यें सांपडलेली आहे त्याअर्थीं इतरांच्याही दृष्टीं पडणें दोषावह नाहीं आणि विशेषतः मी समीप असतांना तर दोषावह नाहींच नाहीं २९. ह्यास्तव, पालखींतून उतरून पायांनींच तिला इकडे येऊं दे आणि माझ्यासमीप ह्या वानरांच्या तो खुशाल दृष्टीं पडूं दे " ३०. ह्याप्रमाणें विचारी बिभीषणाला रामानें सांगितलें असतां नम्रपणें तो सीतेला रामासमीप घेऊन आला ३१. तदनंतर लक्ष्मण, सुग्रीव आणि हनुमान् वानर रामाचें भाषण श्रवण करून अतिशय दुःखित झाले ३२ व इतक्यांत लज्जेनें अंग चोरीत चोरीत ती सीता बिभीषण मागें असतां भर्त्याकडे आली ३३ आणि पति हेंच जिचें मुख्य दैवत आहे व भर्त्याच्या मुखापेक्षांही जिचें

अथ समपनुदन्मनःक्लमं सा सुचिरमदृष्टमुदीक्ष्य वै प्रियस्य। वदनमुदितपूर्णचन्द्रकान्तं विमलशशाङ्कनिभानना तदासीत् ३५ [५११८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुर्दशाधिकशततमः सर्गः॥ ११४॥

तां तु पार्श्वे स्थितां प्रह्वां रामः संप्रेक्ष्य मैथिलीम्। हृदयान्तर्गतं भावं व्याहर्तुमुपचक्रमे १ एषाऽसि निर्जिता भद्रे शत्रुं जित्वा रणाजिरे। पौरुषाद्यदनुष्ठेयं मयैतदुपपादितम् २ गतोऽस्म्यन्तममर्षस्य धर्षणा संप्रमार्जिता। अवमानश्च शत्रुश्च युगपन्निहतौ मया ३ अद्य मे पौरुषं दृष्टमद्य मे सफलः श्रमः। अद्य तीर्णप्रतिज्ञोऽहं प्रभवाम्यद्य चात्मनः ४ या त्वं विरहिता नीता चलचित्तेन रक्षसा। दैवसंपादितो दोषो मानुषेण मया जितः ५ संप्राप्तमवमानं यस्तेजसा न प्रमार्जति। कस्तस्य पौरुषेणार्थो महताप्यल्पचेतसा ६ लङ्घनं च समुद्रस्य लङ्कायाश्चापि मर्दनम्। सफलं तस्य च

---

मुख अधिक आल्हादकारक आहे अशा त्या सीतेनें विस्मयानें, आनंदानें व प्रेमानें आपल्या पतीच्या मुखाकडे पाहिलें ३४. सारांश, पुष्कळ दिवसपर्यंत दृष्टीं न पडलेलें आणि उदय पावलेल्या पूर्ण चंद्राप्रमाणें आल्हादकारक असलेलें प्रिय भर्त्याचें मुख अवलोकन करून निर्मल चंद्राप्रमाणें जिचें मुख आहे अशी ती सीता मानसिक दुःखाचा त्याग करीत करीत उभी राहिली ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें चवदावा सर्ग समाप्त झाला॥ ११४॥

बाजूला नम्रपणें उभी असलेली ती सीता अवलोकन करून राम आपलें हृद्गत तोंडानें बोलून दाखवूं लागला १. (तो ह्मणाला) " हे कल्याणि, संग्रामामध्यें शत्रूचा पराजय करून ह्या तुला मी जिंकून आणिलें आहे. सारांश, पुरुषप्रयत्नानें जें कांहीं करितां येण्यासारिखें आहे तें हें मीं केलें आहे २. आज क्रोधाची समाप्ति झाली असून शत्रूनें केलेल्या स्त्रीहरणरूप अपमानाचीही मीं फेड केली आहे आणि अवमान व शत्रु ह्या दोहोंचेंही पारिपत्य मीं एकदमच केलें आहे ३. आज माझा पराक्रम लोकांच्या दृष्टीं पडला; आज माझ्या श्रमाचें सार्थक झालें; आज मीं आपली प्रतिज्ञा शेवटास नेली आणि आज मी स्वतंत्र झालों ४. चंचल चित्तानें युक्त असलेल्या राक्षसानें तुला एकटी असतांना नेलें हा अनर्थ दैवामुळें घडला व तो मीं मनुष्यसाध्य पराक्रमानें नाहींसा केला ५. अवमान झाला असतां जो तेजाच्या योगानें त्याचें परिमार्जन करीत नाहीं त्या मंदमति पुरुषाचा पराक्रम मोठा जरी असला तरी त्याचा उपयोग काय? ६. समुद्राचें उल्लंघन व लंकेचें मर्दन हें त्या हनुमानाचें

श्लाघ्यमद्य कर्म हनूमतः ७ युद्धे विक्रमतश्चैव हितं मन्त्रयतस्तथा । सुग्रीवस्य ससैन्यस्य सफलोऽद्य परिश्रमः ८ विभीषणस्य च तथा सफलोऽद्य परिश्रमः । विगुणं भ्रातरं त्यक्त्वा यो मां स्वयमुपस्थितः ९ इत्येवं वदतः श्रुत्वा सीता रामस्य तद्वचः । मृगीवोत्फुल्लनयना बभूवाश्रुपरिप्लुता १० पश्यतस्तां तु रामस्य समीपे हृदयप्रियाम् । जनवादभयाद्राज्ञो बभूव हृदयं द्विधा ११ सीतामुत्पलपत्राक्षीं नीलकुञ्चितमूर्धजाम् । अवदद्वै वरारोहां मध्ये वानररक्षसाम् १२ यत्कर्तव्यं मनुष्येण धर्षणां प्रतिमार्जता । तत्कृतं रावणं हत्वा मयेदं मानकाङ्क्षिणा १३ निर्जिता जीवलोकस्य तपसा भावितात्मना । अगस्त्येन दुराधर्षा मुनिना दक्षिणेव दिक् १४ विदितश्चास्तु भद्रं ते योऽयं रणपरिश्रमः । सुतीर्णः सुहृदां वीर्यान्न त्वदर्थं मया कृतः १५ रक्षता तु मया वृत्तमपवादं च सर्वतः । प्रख्यातस्यात्मवंशस्य न्यङ्गं च परिमार्जता १६ प्राप्तचारित्रसंदेहा मम प्रतिमुखे स्थिता । दीपो नेत्रातुरस्येव प्रतिकूलासि मे दृढा १७ तद्गच्छ

---

प्रशंसनीय कर्म आज सफल झालें ७. युद्धामध्यें पराक्रम करून हिताची गोष्ट सांगणाऱ्या सैन्यासहवर्तमान सुग्रीवाच्या श्रमाचेंही चीज आज झालें ८ आणि त्याचप्रमाणें गुणहीन भ्रात्याला टाकून जो स्वतः माझ्याकडे आला त्या बिभीषणाच्याही परिश्रमाचें सार्थक आज झालें " ९. ह्याप्रमाणें बोलत असलेल्या रामाचें भाषण श्रवण केल्यावर हरिणीप्रमाणें प्रफुल्लित नेत्रांनीं युक्त असलेली सीता अश्रूंनीं भरून गेली १० आणि मनाला प्रिय असलेल्या त्या सीतेकडे पहात असलेल्या रामाचें हृदय लोकापवादाच्या भीतीनें द्विधा झालें ११. नंतर कमलपत्राप्रमाणें जिचे नेत्र आहेत आणि जिचे कुरळ केश नीलवर्ण आहेत अशा त्या सीतेला वानर व राक्षस ह्यामध्यें तो ह्मणाला १२ " अपमानाचें परिमार्जन करणाऱ्या मनुष्याच्या हातून जें होण्यासारिखें आहे तें मीं लौकिकाची चाड बाळगणाऱ्या रामानें रावणाचा वध करून केलें आहे १३. सारांश, संपूर्ण प्राण्यांपैकीं कोणालाही जिच्यावर हल्ला करितां येणार नाहीं अशा तुला तपश्चर्येनें अंतःकरण शुद्ध झालेल्या अगस्त्यमुनींनीं प्राप्त करून घेतलेल्या दक्षिणदिशेप्रमाणें मीं प्राप्त करून घेतलें आहे १४. तुझें कल्याण असो. संग्रामसंबंधी जो हा खटाटोप मीं केला आणि सुहृदांच्या सामर्थ्यामुळें ज्याच्यांतून मी चांगल्या रीतीनें पार पडलों तो मीं तुझ्याकरितां केलेला नाहीं १५. आपलें वर्तन कायम राखण्याकरितां, अपवाद सर्वस्वीं टाळण्याकरितां आणि आपल्या प्रख्यात वंशाला आलेला कमीपणा नाहींसा करण्याकरितां मीं हें केलें १६; परंतु, नेत्ररोगी पुरुषाला ज्याप्रमाणें

त्वानुजानेऽद्य यथेष्टं जनकात्मजे। एता दशदिशो भद्रे कार्यमस्ति न मे त्वया १८ कः पुमांस्तु कुले जातः स्त्रियं परगृहोषिताम् । तेजस्वी पुनरादद्यात्सुहृल्लोभेन चेतसा १९ रावणाङ्कपरिक्लिष्टां दृष्टां दुष्टेन चक्षुषा । कथं त्वां पुनरादद्यां कुलं व्यपदिशन्महत् २० यदर्थं निर्जिता मे त्वं सोऽयमासादितो मया । नास्ति मे त्वय्यभिष्वङ्गो यथेष्टं गम्यतामिति २१ तदद्य व्याहृतं भद्रे मयैतत्कृतबुद्धिना । लक्ष्मणे वाथ भरते कुरु बुद्धिं यथासुखम् २२ शत्रुघ्ने वाथ सुग्रीवे राक्षसे वा विभीषणे । निवेशय मनः सीते यथा वा सुखमात्मनः २३ न हि त्वां रावणो दृष्ट्वा दिव्यरूपां मनोरमाम् । मर्षयत्यचिरं सीते स्वगृहे पर्यवस्थिताम् २४ ततः प्रियार्हश्रवणा तदप्रियं प्रियादुपश्रुत्य चिरस्य मानिनी । मुमोच बाष्पं रुदती तदा भृशं गजेन्द्रहस्ताभिहतेव वल्लरी २५ [५२२३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-

---

दीप अतिशय प्रतिकूल होत असतो त्याप्रमाणें माझ्या संमुख स्थित असलेली तूं, तुझ्या वर्तनासंबंधानें संदेह उपस्थित झाल्यामुळें, माझ्या दृष्टीला अतिशय प्रतिकूल झाली आहेस १७. तस्मात्, हे जनककन्ये, मी तुला अनुज्ञा देतों. तूं आज वाटेल तिकडे चालती हो. हे भद्रे, ह्या दहा दिशा तुला मोकळ्या आहेत; तुझ्याशीं मला आतां कांहीं एक कर्तव्य नाहीं १८ पुष्कळ दिवसांपासून ही आपणावर प्रेम करणारी आहे असा लोभ मनामध्यें धरून कोण बरें कुलीन व तेजस्वी पुरुष परगृहीं राहिलेल्या स्त्रीचा पुनरपि स्वीकार करणार आहे ? १९. रावणाच्या अंकाचा स्पर्श झालेल्या आणि त्यानें दोषदृष्टीनें अवलोकन केलेल्या तुझा कुलीन म्हणविणारा मी कसा बरें स्वीकार करूं ? २०. ज्याच्याकरितां मीं तुला जिंकिलें तो हा माझा उद्देश सिद्धीस गेला आहे. आतां तुझ्या ठिकाणीं माझ्या मनाची आसक्ति नाहीं; तूं वाटेल तिकडे चालती हो २१. हे भद्रे, मनाचा निश्चय करून ही गोष्ट मीं तुला सांगितली आहे. आतां तुझी इच्छा असल्यास लक्ष्मणापाशीं अथवा भरतापाशीं तूं खुशाल रहा २२. अथवा, हे सीते, शत्रुघ्नाजवळ, सुग्रीवाजवळ, बिभीषण राक्षसाजवळ किंवा तुला नीट वाटेल तेथें राहण्याचें तूं मनामध्यें आण २३. हे सीते, दिव्य कांतीनें युक्त व मनोहर असून स्वगृहीं राहिलेल्या तुला अवलोकन केल्यानंतर रावण एक क्षणभरही तुझी उपेक्षा करणार नाहीं " २४. प्रिय भाषण श्रवण करण्यासच योग्य असलेली ती मानी सीता अगदीं लहानपणापासून प्रिय असलेल्या रामाच्या मुखांतून तें अप्रिय भाषण श्रवण करितांक्षणीं रोदन करूं लागली आणि गजेंद्राच्या शुंडेचा तडाका बसलेली वेली ज्याप्रमाणें पुष्पें गाळूं लागते त्याप्रमाणें एकसारिखे टपटप अश्रु ढाळूं लागली २५. ह्याप्रमाणें महामुनि-

कीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चदशाधिकशततमः सर्गः ॥ ११५ ॥

एवमुक्ता तु वैदेही परुषं रोमहर्षणम् । राघवेण सरोषेण श्रुत्वा प्रव्यथिताभवत् १ सा तदश्रुतपूर्वं हि जने महति मैथिली । श्रुत्वा भर्तुर्वचो घोरं लज्जयावनताभवत् २ प्रविशन्तीव गात्राणि स्वानि सा जनकात्मजा। वाक्शरैस्तैः सशल्येव भृशमश्रूण्यवर्तयत् ३ ततो बाष्पपरिक्लिन्नं प्रमार्जन्ती स्वमाननम् । शनैर्गद्गदया वाचा भर्तारमिदमब्रवीत् ४ किं मामसदृशं वाक्यमीदृशं श्रोत्रदारुणम् । रूक्षं श्रावयसे वीर प्राकृतः प्राकृतामिव ५ न तथास्मि महाबाहो यथा मामवगच्छसि । प्रत्ययं गच्छ मे स्वेन चारित्रेणैव ते शपे ६ पृथक्स्त्रीणां प्रचारेण जातिं त्वं परिशङ्कसे । परित्यजैनां शङ्कां तु यदि तेऽहं परीक्षिता ७ यदहं गात्रसंस्पर्शं गतास्मि विवशा प्रभो । कामकारो न मे तत्र दैवं तत्रापराध्यति ८ मदधीनं तु यत्तन्मे हृदयं त्वयि वर्तते । पराधीनेषु गात्रेषु किं करिष्याम्यनीश्वरी ९ सह संवृद्धभावेन

---

वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११५ ॥

ह्याप्रमाणें रामानें रागारागानें शरीरावर रोमांच उठविणारें असें कठोर भाषण सीतेशीं केलें असतां तें श्रवण करितांक्षणीं ती अतिशय घाबरून गेली १; आणि मोठ्या समाजामध्यें पूर्वीं कधींही न ऐकिलेलें असें भर्त्याचें घोर भाषण श्रवण केल्यावर लज्जेनें तिनें मान खालीं घातली २. लज्जेमुळें सर्व बाजूंनीं अंग चोरीत असलेली ती जनककन्या त्या वाग्बाणांनीं जखमी झाल्यासारिखी होऊन अतिशय अश्रु ढाळूं लागली ३ आणि नंतर अश्रूंनीं भरून गेलेलें आपलें मुख पुशीत पुशीत गद्गदवाणीनें हळूं हळूं आपल्या भर्त्याला ह्मणाली ४ " हे वीरा, एखादा यःकश्चित् पुरुष ज्याप्रमाणें एखाद्या क्षुद्र स्त्रीला अनुलक्षून भाषण करितो त्याप्रमाणें अशाप्रकारचें हें कर्णकटु व अयोग्य भाषण मला अनुलक्षून आपण कां बरें करीत आहां ? ५. हे महापराक्रमी रामा, आपण जशी मला समजत आहांत तशी मी नाहीं. ह्याचा आपणांला प्रत्यय येईल; हें मी आपल्या पातिव्रत्यरूप सदाचरणाच्या शपथेवर आपणांला सांगत आहें ६. सामान्य स्त्रीचें आचरण पाहून संपूर्ण स्त्रीजातीविषयीं आपण शंका घेत आहां; परंतु, आपणांला जर माझी परीक्षा झाली असेल तर माझ्याविषयीं आपण ही शंका सोडून द्या ७. हे प्रभो, पराधीन झाल्यामुळें जो मला परपुरुषाचा स्पर्श झाला तो माझ्या इच्छेनें झालेला नाहीं. दुर्दैवामुळें ती गोष्ट घडून आली ८. माझ्या अधीन असलेलें जें माझें हृदय तें तर माझें आपल्यापाशींच आहे; परंतु, शरीर माझ्या स्वाधीन नसतांना मी पराधीन स्त्री काय बरें करणार ! ९.

संसर्गेण च मानद । यदि तेऽहं न विज्ञाता हता तेनास्मि शाश्वतम् १०
प्रेषितस्ते महावीरो हनुमानवलोककः । लङ्कास्थाहं त्वया राजन्किं तदा
न विसर्जिता ११ प्रत्यक्षं वानरस्यास्य तद्वाक्यसमनन्तरम् । त्वया संत्य-
क्तया वीर त्यक्तं स्याज्जीवितं मया १२ न वृथा ते श्रमोऽयं स्यात्संशये
न्यस्य जीवितम् । सुहृज्जनपरिक्लेशो न चायं विफलस्तव १३ त्वया तु
नृपशार्दूल रोषमेवानुवर्तता । लघुनेव मनुष्येण स्त्रीत्वमेव पुरस्कृतम् १४
अपदेशो मे जनकान्नोत्पत्तिर्वसुधातलात् । मम वृत्तं च वृत्तज्ञ बहु ते न
पुरस्कृतम् १५ न प्रमाणीकृतः पाणिर्बाल्ये मम निपीडितः । मम भक्तिश्च
शीलं च सर्वं ते पृष्ठतः कृतम् १६ इति ब्रुवन्ती रुदती बाष्पगद्गदभाषिणी ।
उवाच लक्ष्मणं सीता दीनं ध्यानपरायणम् १७ चितां मे कुरु सौमित्रे
व्यसनस्यास्य भेषजम् । मिथ्यापवादोपहता नाहं जीवितुमुत्सहे १८

---

हे मान्य रामा, परस्परांचें परस्परांवर प्रेम वृद्धिंगत झालें असून आणि पुष्कळ दिवसपर्यंत उभयतांचें एकत्र वास्तव्य झालें असूनही जर माझी परीक्षा आपणांला झाली नसेल तर मात्र मी कायमचीच बुडालें १०. हे राजा, ज्या वेळीं महावीर हनुमान् माझ्या शोधाकरितां आपण पाठविला त्यावेळीं मी लंकेमध्यें होतें व तेव्हांच आपण " तुझा त्याग केला आहे " असें मला कां कळविलें नाहीं ? ११. हे वीर, ह्या वानरानें आपल्या ह्मणण्याप्रमाणें तसा निरोप सांगितला असता ह्मणजे आपण माझा त्याग केल्याचें कळतांक्षणींच मीं जीविताचा त्याग केला असता १२. असें झालें असतें ह्मणजे जीव धोक्यामध्यें घालून आपणांला हे युद्धसंबंधीं व्यर्थ श्रम करावे लागले नसते आणि आपल्या सुहृज्जनांनाही हे विनाकारण क्लेश झाले नसते १३. हे नृपश्रेष्ठ, क्रोधाचे अधीन होऊन आपण एखाद्या क्षुद्र मनुष्याप्रमाणें सामान्य स्त्रीजातीला अनुसरूनच माझ्यासंबंधानें विचार केला आहे १४. जानकी हें नांव मात्र मला जनकामुळें प्राप्त झालेलें आहे; परंतु, माझी उत्पत्ति जनकापासून झालेली नसून भूतलापासून झालेली आहे. तथापि, हे चरित्र जाणणाऱ्या रामा, तूं ह्या माझ्या अद्वितीय चरित्राचा विचार केला नाहींस १५. बाल्यावस्थेमध्यें आपण ज्या उद्देशानें माझें पाणिग्रहण केलें त्याचीही आपण पर्वा केली नाहीं आणि त्याचप्रमाणें माझी भक्ति व शील ह्याही सर्वांकडे आपण कानाडोळा केला आहे " १६. अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अशा रीतीनें रडत रडत रामाशीं भाषण करणारी सीता चिंताक्रांत झालेल्या दीन लक्ष्मणाला ह्मणाली १७ " हे लक्ष्मणा, माझ्याकरितां चिता तयार कर. चिता हें ह्या संकटाचें औषध आहे. कारण, मिथ्यापवादानें ग्रस्त झालेल्या मला जिवंत रहाण्याची इच्छा नाहीं १८. गुणांनीं

अप्रीतेन गुणैर्भर्त्रा त्यक्ताया जनसंसदि । या क्षमा मे गतिर्गन्तुं प्रवेक्ष्ये हव्यवाहनम् १९ एवमुक्तस्तु वैदेह्या लक्ष्मणः परवीरहा । अमर्षवशमापन्नो राघवं समुदैक्षत २० स विज्ञाय मनश्छन्दं रामस्याकारसूचितम् । चितां चकार सौमित्रिर्मते रामस्य वीर्यवान् २१ न हि रामं तदा कश्चित्कालान्तकयमोपमम् । अनुनेतुमथो वक्तुं द्रष्टुं वाऽप्यशकत्सुहृत् २२ अधोमुखं स्थितं रामं ततः कृत्वा प्रदक्षिणम् । उपावर्तत वैदेही दीप्यमानं हुताशनम् २३ प्रणम्य दैवतेभ्यश्च ब्राह्मणेभ्यश्च मैथिली । बद्धाञ्जलिपुटा चेदमुवाचाग्निसमीपतः २४ यथा मे हृदयं नित्यं नापसर्पति राघवात् । तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः २५ यथा मां शुद्धचारित्रां दुष्टां जानाति राघवः । तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः २६ एवमुक्त्वा तु वैदेही परिक्रम्य हुताशनम् । विवेश ज्वलनं दीप्तं निःशङ्केनान्तरात्मना २७ जनश्च सुमहांस्तत्र बालवृद्धसमाकुलः । ददर्श मैथिलीं दीप्तां प्रविशन्तीं हुताशनम् २८ सा तप्तनवहेमाभा तप्तकाञ्चनभूषणा । पपात ज्वलनं दीप्तं सर्वलोकस्य संनिधौ २९ ददृशुस्तां विशालाक्षीं पतन्तीं

---

संतुष्ट न झालेल्या भर्त्यानें लोकसमाजामध्यें त्याग केलेल्या मला आतां मरणाचेंच अवलंबन करणें योग्य असल्यामुळें मी अग्निमध्यें प्रवेश करितें " १९. ह्याप्रमाणें सीतेनें सांगितलें असतां शत्रुवीरनाशक लक्ष्मणानें क्रुद्ध होऊन रामाकडे पाहिलें २० आणि रामाच्या मुद्रेवरून दिसत असलेला त्याच्या मनाचा कल ओळखून तो वीर्यवान् लक्ष्मण रामाच्या उद्देशाविषयीं विचार करूं लागला २१. कारण, त्या प्रसंगीं काल, अंतक आणि यम ह्यांप्रमाणें झालेल्या रामाचें मन वळविण्यास, त्याच्याशीं भाषण करण्यास अथवा त्याच्याकडे पाहण्यास कोणी सुहृदही समर्थ झाला नाहीं २२. असो. तदनंतर अधोमुख स्थित असलेल्या रामाला प्रदक्षिणा करून सीता प्रदीप्त होत असलेल्या अग्निकडे वळली २३ आणि देवब्राह्मणांना प्रणाम करून व हात जोडून अग्नीचे समीप ह्मणाली २४ " माझें चित्त जर रामापासून दूर जात नसेल तर जगत्साक्षी अग्नि माझें सर्व प्रकारें रक्षण करील २५. माझें वर्तन शुद्ध असून राम मला दुष्ट समजत आहे हें जर खरें असेल तर लोकसाक्षी अग्नि माझें सर्व प्रकारें रक्षण करील " २६. ह्याप्रमाणें भाषण करून व अग्नीला प्रदक्षिणा करून मनांत कांहींएक भीति न आणितां सीतेनें प्रदीप्त अग्नीमध्यें प्रवेश केला २७. बाल व वृद्ध ह्यांनीं गजबजून गेलेला फारच मोठा लोकसमाज तेथें जमला होता व त्या समाजानें प्रदीप्त अग्निमध्यें सीतेला प्रवेश करितांना पाहिलें २८. तप्त सुवर्णाप्रमाणें जिची कांति आहे

हव्यवाहनम्। सीतां सर्वाणि रूपाणि रुक्मवेदिनिभां तदा ३० ददृशुस्तां महाभागां प्रविशन्तीं हुताशनम्। ऋषयो देवगन्धर्वा यज्ञे पूर्णाहुतीमिव ३१ प्रचुक्रुशुः स्त्रियः सर्वास्तां दृष्ट्वा हव्यवाहने। पतन्तीं संस्कृतां मन्त्रैर्वसोर्धारामिवाध्वरे ३२ ददृशुस्तां त्रयो लोका देवगन्धर्वदानवाः। शप्तां पतन्तीं निरये त्रिदिवाद्देवतामिव ३३ तस्यामग्निं विशन्त्यां तु हाहेति विपुलः स्वनः। रक्षसां वानराणां च संबभूवाद्भुतोपमः ३४ [५२५७]

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षोडशाधिकशततमः सर्गः॥ ११६॥

ततो हि दुर्मना रामः श्रुत्वैवं वदतां गिरः। दध्यौ मुहूर्तं धर्मात्मा बाष्पव्याकुललोचनः १ ततो वैश्रवणो राजा यमश्च पितृभिः सह। सहस्राक्षश्च देवेशो वरुणश्च जलेश्वरः २ षडर्धनयनः श्रीमान्महादेवो वृषध्वजः। कर्ता सर्वस्य लोकस्य ब्रह्मा ब्रह्मविदां वरः ३ एते सर्वे समागम्य विमानैः सूर्यसंनिभैः। आगम्य नगरीं लङ्कामभिजग्मुश्च राघवम् ४

---

आणि उत्कृष्ट सुवर्णभूषणें जिनें धारण केलेलीं आहेत अशा त्या सीतेनें सर्व लोकांसमक्ष प्रदीप्त अग्निमध्यें उडी घातली असतां २९ सुवर्णवेदीप्रमाणें दिसत असलेली आणि विशाल नयनांनीं युक्त असलेली सीता अग्निमध्यें प्रवेश करीत असतांना सर्व प्राण्यांनीं अवलोकन केली ३० व यज्ञांतील पूर्णाहुतिच कीं काय अशारीतीनें अग्नीमध्यें प्रवेश करीत असलेली ती महाभाग्यवती सीता ऋषि, देव आणि गंधर्व ह्यांनीं अवलोकन केली ३१. यज्ञांतील मंत्रसंस्कृत वसोर्धारेप्रमाणें अग्नीमध्यें ती पडत असल्याचें अवलोकन करितांक्षणीं सर्व स्त्रिया आक्रोश करूं लागल्या ३२; शाप झाल्यामुळें स्वर्गापासून भ्रष्ट होऊन अधोलोकीं पतन पावत असलेली देवताच कीं काय अशी ती सीता देव, गंधर्व, दानव व त्रैलोक्य ह्यांनीं अवलोकन केली ३३; आणि ती अग्नीमध्यें प्रवेश करूं लागली असतां "हाय हाय" असा फारच मोठा व आश्चर्यकारक ध्वनि राक्षस व वानर ह्यांमध्यें उसळला ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें सोळावा सर्ग समाप्त झाला॥ ११६॥

तदनंतर ह्याप्रमाणें हाय हाय करीत असलेल्या लोकांचीं भाषणें श्रवण करून मनामध्यें खिन्न झालेल्या धर्मात्म्या रामाचे नेत्र अश्रूंनीं व्याकुल झाले आणि तो एक मुहूर्तभर विचार करूं लागला १. नंतर राजा कुबेर, पितरांसहवर्तमान यम, देवराज सहस्रनयन इंद्र, जलाधिपति वरुण २, तीन नेत्रांनीं युक्त असलेला श्रीमान् वृषध्वज महादेव आणि सर्व जगताचा उत्पादक व ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ ब्रह्मदेव ३ हे सर्वही

ततः सहस्ताभरणान्प्रगृह्य विपुलान्भुजान् । अब्रुवंस्त्रिदशश्रेष्ठा राघवं प्राञ्जलिं स्थितम् ५ कर्ता सर्वस्य लोकस्य श्रेष्ठो ज्ञानविदां विभुः । उपेक्षसे कथं सीतां पतन्तीं हव्यवाहने ६ कथं देवगणश्रेष्ठमात्मानं नावबुध्यसे ७ ऋतधामा वसुः पूर्वं वसूनां च प्रजापतिः । त्रयाणामपि लोकानामादिकर्ता स्वयंप्रभुः ८ रुद्राणामष्टमो रुद्रः साध्यानामपि पञ्चमः । अश्विनौ चापि कर्णौ ते सूर्याचन्द्रमसौ दृशौ ९ अन्ते चादौ च मध्ये च दृश्यसे च परन्तप । उपेक्षसे च वैदेहीं मानुषः प्राकृतो यथा १० इत्युक्तो लोकपालैस्तैः स्वामी लोकस्य राघवः । अब्रवीत्त्रिदशश्रेष्ठान्रामो धर्मभृतां वरः ११ आत्मानं मानुषं मन्ये रामं दशरथात्मजम् । सोऽहं यश्च यतश्चाहं भगवांस्तद्ब्रवीतु मे १२ इति ब्रुवाणं काकुत्स्थं ब्रह्मा ब्रह्मविदां वरः । अब्रवीच्छृणु मे वाक्यं सत्यं सत्यपराक्रम १३ भवान्नारायणो देवः श्रीमांश्चक्रायुधः प्रभुः । एकशृङ्गो वराहस्त्वं भूतभव्यसपत्नजित् १४ अक्षरं ब्रह्म सत्यं च मध्ये चान्ते च राघव । लोकानां त्वं परो धर्मो विष्वक्सेन-

---

सूर्यतुल्य तेजस्वी विमानांमध्यें आरूढ होऊन व एकत्र जळून लंकेमध्यें आल्यानंतर रामाजवळ आले ४. अनंतर हस्तभूषणांनीं युक्त असे आपले विशाल बाहु उभारून ते सुरश्रेष्ठ हात जोडून स्थित असलेल्या रामाला ह्मणाले ५ " सर्व जगताचा उत्पादक, ज्ञानवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आणि प्रभु असा तूं असतांना अग्निमध्यें उडी घालीत असलेल्या सीतेची कशी उपेक्षा करीत आहेस ? ६ तूं स्वत: देवगणांमध्यें श्रेष्ठ असल्याचें कसें बरें जाणीत नाहींस ? ७. पूर्वकल्पामध्यें वसूंपैकीं ऋतधामनामक वसु, त्रैलोक्याचा उत्पादक, स्वतंत्र ८, रुद्रांतील आठवा आणि साध्यांतील पांचवा असा तूं असून अश्विनीकुमार तुझे कर्ण असतांना, सूर्यचंद्र तुझे नेत्र असतांना ९ आणि, हे शत्रुतापना, जगताच्या लयकालीं, उत्पत्तिकालीं व स्थितिकालीं तूं दृष्टीं पडत असतांना प्राकृत मनुष्याप्रमाणें सीतेची कशी बरें उपेक्षा करीत आहेस ? १०. " ह्याप्रमाणें त्या लोकपालांनीं सांगितलें असतां धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेला जगदीश राम त्या सुरश्रेष्ठांना ह्मणाला ११ " मी स्वत: दशरथपुत्र मनुष्य असल्याचें समजत आहें. तथापि मी वस्तुत: कोण आहें आणि माझी प्रकृति कोणती आहे हें आपण मला कथन करावें " १२. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम बोलत असतांना ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेला ब्रह्मदेव त्याला ह्मणाला " हे सत्यपराक्रमी रामा, माझें यथार्थ भाषण तूं श्रवण कर १३. श्रीमान् व चक्रायुध धारण करणारा असा जो प्रभु नारायण देव तो तूं आहेस, एकशृंग वराह तूंच असून भूतभविष्यत्कालरूप शत्रूलाही जिंकणारा तूं

श्चतुर्भुजः १५ शार्ङ्गधन्वा हृषीकेशः पुरुषः पुरुषोत्तमः। अजितः खड्गधृग्विष्णुः कृष्णश्चैव बृहद्बलः १६ सेनानीर्ग्रामणीः सर्वं त्वं बुद्धिस्त्वं क्षमा दमः। प्रभवश्चाप्ययश्च त्वमुपेन्द्रो मधुसूदनः १७ इन्द्रकर्मा महेन्द्रस्त्वं पद्मनाभो रणान्तकृत्। शरण्यं शरणं च त्वामाहुर्दिव्या महर्षयः १८ सहस्रशृङ्गो वेदात्मा शतशीर्षो महर्षभः। त्वं त्रयाणां हि लोकानामादिकर्ता स्वयंप्रभुः १९ सिद्धानामपि साध्यानामाश्रयश्चासि पूर्वजः। त्वं यज्ञस्त्वं वषट्कारस्त्वमोंकारः परात्परः २० प्रभवं निधनं चापि नो विदुः को भवानिति। दृश्यसे सर्वभूतेषु गोषु च ब्राह्मणेषु च २१ दिक्षु सर्वासु गगने पर्वतेषु नदीषु च। सहस्रचरणः श्रीमाञ्शतशीर्षः सहस्रदृक् २२ त्वं धारयसि भूतानि पृथिवीं सर्वपर्वतान्। अन्ते पृथिव्याः सलिले दृश्यसे त्वं महोरगः २३ त्रीँल्लोकान्धारयन्राम देवगन्धर्वदानवान्। अहं ते हृदयं

---

आहेस १४. जगताच्या प्रलयकालीं, स्थितिकालीं व उत्पत्तिकालीं असणारें जें सत्यस्वरूप अविनाशी ब्रह्म तें तूंच असून लोकांचा श्रेष्ठ धर्म तूंच आहेस.तुझें विजयाचक गण सर्वत्र आहेत; चार भुजांनीं तूं युक्त आहेस १५; शार्ङ्गधनुष्य तूं धारण केललें आहेस;इंद्रियांचा नियंता तूं आहेस; हृदयकमलामध्यें शयन करणारा पुरुषोत्तम तूं आहेस; तुझा कधींही पराजय होत नाहीं; खड्गधारी, सर्वव्यापक, कृष्णवर्ण आणि प्रचंडसामर्थ्यवान् असा तूं आहेस १६; राजसेनाधिपति, मंत्री, सर्व जगत्, निश्चयात्मिका बुद्धि, क्षमा, इंद्रियनिग्रह आणि जगताच्या उत्पत्तीचें व लयाचेंही कारण तूंच आहेस; उपेंद्र, मधुसूदन १७, इंद्राचा उत्पादक, महेंद्र व पद्मनाभ तूंच असून रणामध्यें शत्रूचा नाश करणारा तूंच आहेस आणि दिव्य महर्षिही 'तूंच शरण जाण्यास योग्य व रक्षक आहेस' असें ह्मणत असतात १८. अनेकशाखारूप सहस्र शृंगांनीं आणि अनेकविधिरूप शेंकडों मस्तकांनीं युक्त असलेला अत्यंत श्रेष्ठ वेदात्मा तूंच असून त्रैलोक्याचा मूळ उत्पादक व स्वेच्छेनें वागणारा असा तूंच आहेस १९. सिद्ध व साध्य ह्यांचा आश्रय तूंच असून ब्रह्मांडाचे पूर्वीं असणारा तूंच आहेस. यज्ञ, वषट्कार व प्रणव असा तूंच परात्पर असून २० तुझी उत्पत्ति व लय असल्याचें कोणीही जाणीत नाहींत आणि तूं अमुकच आहेस असेंही कोणी जाणीत नाहींत. कारण, गाई, ब्राह्मण इत्यादि सर्व भूतांचे ठिकाणीं तूं दृष्टोत्पत्तीस येत असून २१ सर्व दिशा, आकाश, पर्वत व नद्या ह्यांचे ठिकाणीं तूं दृष्टोत्पत्तीस येत आहेस. हजारों पाय, शेंकडों मस्तकें व हजारों नेत्र ह्यांनीं युक्त असून श्रीमान् तूंच आहेस २२; भूतें, पृथ्वी आणि सर्व पर्वत तूंच धारण करीत आहेस. प्रलयकालीं पृथ्वीवर असलेल्या उदकाचे ठिकाणीं महाभुजंगावर शयन करणारा तूंच आहेस २३ आणि, हे

राम जिह्वा देवी सरस्वती २४ देवा रोमाणि गात्रेषु ब्रह्मणा निर्मिताः प्रभो । निमेषस्ते स्मृता रात्रिरुन्मेषो दिवसस्तथा २५ संस्कारास्त्वभवन्वेदा नैतदस्ति त्वया विना । जगत्सर्वं शरीरं ते स्थैर्यं ते वसुधातलम् २६ अग्निः कोपः प्रसादस्ते सोमः श्रीवत्सलक्षण । त्वया लोकास्त्रयः क्रान्ताः पुरा स्वैर्विक्रमैस्त्रिभिः २७ महेन्द्रश्च कृतो राजा बलिं बद्ध्वा सुदारुणम् । सीता लक्ष्मीर्भवान्विष्णुर्देवः कृष्णः प्रजापतिः २८ वधार्थं रावणस्येह प्रविष्टो मानुषीं तनुम् । तदिदं नस्त्वया कार्यं कृतं धर्मभृतां वर २९ निहतो रावणो राम प्रहृष्टो दिवमाक्रम । अमोघं देव वीर्यं ते न ते मोघाः पराक्रमाः ३० अमोघं दर्शनं राम अमोघस्तव संस्तवः । अमोघास्ते भविष्यन्ति भक्तिमन्तो नरा भुवि ३१ ये त्वां देवं ध्रुवं भक्ताः पुराणं पुरुषोत्तमम् । प्राप्नुवन्ति तथा कामानिह लोके परत्र

---

रामा, देव, गंधर्व व दानव ह्या तिन्ही लोकांना धारण करणारा तूंच आहेस. हे रामा, मी तुझें हृदय आहें; देवी सरस्वती तुझी जिह्वा आहे २४; हे प्रभो, तुझ्या अवयवांचे ठिकाणीं मीं ब्रह्मदेवानें देव निर्माण केले असून ओषधि, वनस्पति इत्यादिरूपानें रोमही मीं निर्माण केले आहेत. तुझ्या डोळ्यांची पापणी मिटणें ही रात्र असून ती उघडणें हा दिवस होय २५. प्रवृत्तिनिवृत्तिबोधक वेद तुझ्यापासूनच उत्पन्न झाले असून तुझ्याशिवाय कांहींएक विद्यमान नाहीं. सर्व जगत् हें तुझें शरीर असून वसुधातल हें तुझें संपूर्ण प्रजा नित्य धारण करण्याचें सामर्थ्य आहे २६. अग्नि हाच तुझा क्रोध असून चंद्र हा तुझा प्रसाद आहे आणि, हे श्रीवत्सलांछना, पूर्वी तीन पायांनीं तूंच त्रैलोक्य व्यापिलें आहेस २७ व अतिभयंकर बलीला बांधून महेंद्र तूंच राजा केला आहेस. सीता हीच लक्ष्मी असून कृष्णवर्ण व प्रजाधिपति देवाधिदेव विष्णु तूं आहेस २८ आणि रावणाच्या वधाकरितां ह्या भूतलावर तूं मनुष्य देह धारण केला आहेस. सारांश, हे धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ रामा, हें आमचें रावणवधरूप कार्य तूं केलें आहेस २९. हे रामा, रावणाचा तुझ्या हातून वध झाल्यामुळें आतां तूं आनंदानें स्वर्गारोहण कर. हे देवा, तुझें वीर्य फुकट जाणारें नाहीं आणि तुझे पराक्रमही व्यर्थ होणारे नाहींत ३०. हे रामा, तुझें दर्शन निरर्थक होणारें नाहीं आणि तुझी स्तुतिही लाभशून्य होणारी नाहीं. जे लोक भूतलावर तुझी भक्ति करितील त्यांनाही ब्रह्मलोकप्राप्तिरूप अमोघ फल प्राप्त होईल ३१. सारांश, पुरातन व अविनाशी अशा तुज पुरुषश्रेष्ठ देवाची जे भक्ति करीत असतात त्यांचे

च ३२ इममार्षस्तवं दिव्यमितिहासं पुरातनम् । ये नराः कीर्तयिष्यन्ति नास्ति तेषां पराभवः ३३ [५२९०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तदशाधिकशततमः सर्गः ॥ ११७ ॥

एतच्छ्रुत्वा शुभं वाक्यं पितामहसमीरितम् । अङ्केनादाय वैदेहीमुत्पपात विभावसुः १ विधूयाथ चितां तां तु वैदेहीं हव्यवाहनः । उत्तस्थौ मूर्तिमानाशु गृहीत्वा जनकात्मजाम् २ तरुणादित्यसंकाशां तप्तकाञ्चनभूषणाम् । रक्ताम्बरधरां बालां नीलकुञ्चितमूर्धजाम् ३ अक्लिष्टमाल्याभरणां तथारूपामनिन्दिताम् । ददौ रामाय वैदेहीमङ्के कृत्वा विभावसुः ४ अब्रवीत्तु तदा रामं साक्षी लोकस्य पावकः । एषा ते राम वैदेही पापमस्यां न विद्यते ५ नैव वाचा न मनसा नैव बुद्ध्या न चक्षुषा । सुवृत्ता वृत्तशौटीर्य न त्वामत्यचरच्छुभा ६ रावणेनापनीतैषा वीर्योत्सिक्तेन रक्षसा । त्वया विरहिता दीना विवशा निर्जने सती ७ रुद्धा चान्तःपुरे गुप्ता त्वच्चित्ता त्वत्परायणा । रक्षिता राक्षसीभिश्च घोराभिर्घोरबुद्धिभिः ८ प्रलोभ्यमाना

---

ऐहिक व पारलौकिक मनोरथ परिपूर्ण होतात ३२. हें तुझें दिव्य, पुरातन आणि इतिहासरूप असें वेदोक्त स्तोत्र जे मानव पठण करितील त्यांचा पराजय होणार नाहीं" ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११७ ॥

ब्रह्मदेवानें केलेलें हें शुभ भाषण श्रवण कल्यावर अग्नि सीतेला मांडीवर घेऊन बाहेर पडला १. सारांश, ती चिता उडवून देऊन आणि जनककन्या सीतेला घेऊन मूर्तिमान् अग्नि तेथून सत्वर बाहेर निघाला २ व बालसूर्याप्रमाणें जिचें तेज आहे, उत्कृष्ट सुवर्णाचीं भूषणें जिनें धारण केलीं आहेत, अनेक वर्णांनीं युक्त असलेलीं वस्त्रें जिनें परिधान केलीं आहेत, नीलवर्ण व कुरळे असे जिचे केश आहेत, ३ टवटवीत पुष्पांचीं भूषणें जिनें धारण केलीं आहेत आणि जी निर्दोष आहे अशा त्या सुंदरी सीतेला मांडीवर घेऊन अग्नीनें रामाला अर्पण केलें ४. लोकांसमक्ष अग्नि त्यावेळीं रामाला ह्मणाला "हे रामा, ही तुझी सीता. हिचे ठिकाणीं दोषाचा संपर्क नाहीं ५. वाणीनें, मनानें, बुद्धीनें व दृष्टीनें हिनें तुज सद्वृत्ताचें उल्लंघन केलें नसून हिचें वर्तन उत्कृष्ट आहे ६. तूं समीप नसल्यामुळें निर्जन वनामध्यें ही साध्वी दीन व पराधीन असतांना वीर्यमदानें चढून गेलेल्या रावणराक्षसानें हिला नेलें ७ आणि अंतःपुरामध्यें बंदोबस्तानें अडकवून ठेविलें. भयंकर इच्छा धारण करणाऱ्या घोर राक्षसी तिच्या बंदोबस्ताला असतांनाही तुझ्याविषयींच ही तत्पर असून हिचें चित्तही तुझ्याकडेच होतें ८. राक्षसी अनेक प्रकारांनीं

विविधं तर्ज्यमाना च मैथिली । नाचिन्तयत तद्रक्षस्त्वद्गतेनान्तरात्मना ९
विशुद्धभावां निष्पापां प्रतिगृह्णीष्व मैथिलीम् । न किंचिदभिधातव्या
अहमाज्ञापयामि ते १० ततः प्रीतमना रामः श्रुत्वैवं वदतां वरः । दध्यौ
मुहूर्तं धर्मात्मा हर्षव्याकुललोचनः ११ एवमुक्तो महातेजा धृतिमानुरु-
विक्रमः । उवाच त्रिदशश्रेष्ठं रामो धर्मभृतां वरः १२ अवश्यं चापि
लोकेषु सीता पावनमर्हति । दीर्घकालोषिता हीयं रावणान्तःपुरे शुभा १३
बालिशो बत कामात्मा रामो दशरथात्मजः । इति वक्ष्यति मां लोको
जानकीमविशोध्य हि १४ अनन्यहृदयां सीतां मच्चित्तपरिरक्षिणीम् ।
अहमप्यवगच्छामि मैथिलीं जनकात्मजाम् १५ इमामपि विशालाक्षीं
रक्षितां स्वेन तेजसा । रावणो नातिवर्तेत वेलामिव महोदधिः १६ न च
शक्तः सुदुष्टात्मा मनसापि हि मैथिलीम् । प्रधर्षयितुमप्राप्यां दीप्तामग्नि-
शिखामिव १७ नेयमर्हति वैक्लव्यं रावणान्तःपुरे सती । अनन्या हि मया

---

सीतेला लोभ दाखवीत असतांना आणि धमकावीत असतांना हिचें मन तुझ्या ठिकाणीं असल्यामुळें त्या राक्षसाचें स्मरणही तिला झालें नाहीं ९. ह्यास्तव, शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या ह्या निष्पाप सीतेचा तूं स्वीकार कर. हिला उद्देशून तूं कांहींएक भाषण करूं नकोस अशी माझी तुला आज्ञा आहे " १०. ह्याप्रमाणें अग्नीचें भाषण श्रवण केल्यानंतर वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या धर्मात्म्या रामाचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून गेले आणि मनामध्यें संतुष्ट होऊन तो क्षणभर विचार करीतच राहिला ११. ह्याप्रमाणें महा-पराक्रमी, महातेजस्वी व धैर्यवान् रामाला अग्नीनें सांगितलें असतां धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेला तो राम त्या सुरश्रेष्ठ अग्नीला ह्मणाला १२ " लोकांसमक्ष सीतेची शुद्धि होणें अवश्य होतें. कारण, ही शुभ सीता रावणाच्या अंतःपुरामध्यें पुष्कळ दिवसपर्यंत राहिलेली आहे १३. तस्मात्, हिची शुद्धि न करितां जर मीं हिचा स्वीकार केला असता तर दशरथपुत्र राम विषयलंपट व बालिश आहे असें लोक मला ह्मणाले असते १४. माझ्याशिवाय सीतेचें चित्त दुसरीकडे नाहीं आणि माझ्याकडेच आपलें चित्त वेधून ही मिथिलराजकन्या जानकी दोषापासून आपलें रक्षण करणारी आहे हें मीही जाणीत आहें १५ व महासागर ज्याप्रमाणें मर्यादा सोडून जात नाहीं त्याप्रमाणें स्वतःच्या तेजानें रक्षित असलेल्या ह्या विशालनयना सीतेशीं रावणही मर्यादा सोडून वागणार नाहीं ( हें मला ठाऊक होतें ) १६. रावण जरी अत्यंत दुष्ट होता तरी अग्नीच्या प्रदीप्त ज्वालेप्रमाणें ग्रहण करण्यास अशक्य असलेल्या ह्या मैथिलीला कामबुद्धीनें स्पर्श करण्याचें मनांतही आणण्यास तो समर्थ नव्हता १७ आणि रावणाच्या अंतःपुरामध्यें

सीता भास्करस्य प्रभा यथा १८ विशुद्धा त्रिषु लोकेषु मैथिली जनकात्मजा । न विहातुं मया शक्या कीर्तिरात्मवता यथा १९ अवश्यं च मया कार्यं सर्वेषां वो वचो हितम् । स्निग्धानां लोकनाथानामेवं च वदतां हितम् २० इत्येवमुक्त्वा विजयी महाबलः प्रशस्यमानः स्वकृतेन कर्मणा । समेत्य रामः प्रियया महायशाः सुखं सुखार्होऽनुबभूव राघवः २१ [ ५३११ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टादशाधिकशततमः सर्गः ॥ ११८ ॥

एतच्छ्रुत्वा शुभं वाक्यं राघवेणानुभाषितम् । ततः शुभतरं वाक्यं व्याजहार महेश्वरः १ पुष्कराक्ष महाबाहो महावक्षः परन्तप । दिष्ट्या कृतमिदं कर्म त्वया धर्मभृतां वर २ दिष्ट्या सर्वस्य लोकस्य प्रवृद्धं दारुणं तमः । अपवृत्तं त्वया सङ्ख्ये रामरावणजं भयम् ३ आश्वास्य भरतं दीनं कौसल्यां च यशस्विनीम् । कैकेयीं च सुमित्रां च दृष्ट्वा लक्ष्मणमातरम् ४ प्राप्य

---

ह्या साध्वीला भय प्राप्त होणेंही शक्य नव्हतें. कारण, सूर्याच्या प्रभेप्रमाणें ही सीता माझ्यापासून भिन्न नाहीं १८. सारांश, विचारी पुरुषाच्या हातून ज्याप्रमाणें कीर्तीचा त्याग होणें शक्य नाहीं त्याप्रमाणें त्रैलोक्यामध्यें शुद्ध ठरलेल्या मिथिलराजकन्या जानकीचा माझ्या हातून त्याग होणें शक्य नाहीं १९. तुह्मां सर्वांच्या हितकारक उपदेशाप्रमाणें मला अवश्य वागलें पाहिजे. कारण, तुह्मी जगताचे अधिपति असून माझ्यावर प्रेम करणारे आहांत आणि हिताची गोष्ट मला सांगत आहांत " २०. असो. स्वतःच्या कर्मामुळें ज्याची प्रशंसा होत आहे अशा त्या महाबलाढ्य, विजयी, महाकीर्तिमान् आणि सुखाचा उपभोग घेण्यासच योग्य असलेल्या रामानें ह्याप्रमाणें देवांना सांगून प्रिय सीतेचा स्वीकार केला आणि सुखाचा उपभोग घेतला २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११८ ॥

रामानें केलेलें हें शुभ भाषण श्रवण केल्यानंतर त्याच्याहीपेक्षां अधिक शुभ भाषण महेश्वर त्याच्याशीं करूं लागला १. ( तो ह्मणाला ) " हे कमलनयना, हे महापराक्रमी, हे शत्रुतापना, हे धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ, हे विशाल वक्षःस्थलानें युक्त असलेल्या रामा, तुझ्या हातून हें कृत्य घडलें ही गोष्ट फार चांगली झाली २. सर्व जगताच्या भयंकर दुःखाचा तूं उच्छेद केलास ही मोठी आनंदाची गोष्ट आहे आणि संग्रामामध्यें रामरावणांपासून जगताला उत्पन्न झालेलें भय तूं नाहींसें केलें आहेस ३. ह्यास्तव, दीन भरताचें सांत्वन करून आणि यशस्विनी कौसल्या, कैकेयी व लक्ष्मणमाता

राज्यमयोध्यां च नन्दयित्वा सुहृज्जनम् । इक्ष्वाकूणां कुले वंशं स्थापयित्वा महाबल ५ इष्ट्वा तुरगमेधेन प्राप्य चानुत्तमं यशः । ब्राह्मणेभ्यो धनं दत्त्वा त्रिदिवं गन्तुमर्हसि ६ एष राजा दशरथो विमानस्थः पिता तव । काकुत्स्थ मानुषे लोके गुरुस्तव महायशाः ७ इन्द्रलोकं गतः श्रीमांस्त्वया पुत्रेण तारितः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा त्वमेनमभिवादय ८ महादेववचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः । विमानशिखरस्थस्य प्रणाममकरोत्पितुः ९ दीप्यमानं स्वया लक्ष्म्या विरजोम्बरधारिणम् । लक्ष्मणेन सह भ्रात्रा ददर्श पितरं प्रभुः १० हर्षेण महताविष्टो विमानस्थो महीपतिः । प्राणैः प्रियतरं दृष्ट्वा पुत्रं दशरथस्तदा ११ आरोप्याङ्के महाबाहुर्वरासनगतः प्रभुः । बाहुभ्यां संपरिष्वज्य ततो वाक्यं समाददे १२ न मे स्वर्गो बहुमतः संमानश्च सुरर्षभैः । त्वया राम विहीनस्य सत्यं प्रतिशृणोमि ते १३ कैकेय्या यानि चोक्तानि वाक्यानि वदतां वर । तव प्रव्राजनार्थानि स्थितानि हृदये मम १४ त्वां तु दृष्ट्वा कुशलिनं परिष्वज्य सलक्ष्मणम् ।

---

सुमित्रा ह्यांचें दर्शन घऊन ४, अयोध्येचें राज्य प्राप्त करून घेऊन, सुहृज्जनांना आनंद देऊन, हे महाबलाढ्य रामा, इक्ष्वाकूंच्या कुलामध्यें संतति उत्पन्न करून ५, अश्वमेधयाग करून, अनुपम कीर्ति संपादन करून आणि ब्राह्मणांना धन देऊन तूं स्वर्गाप्रत परत ये ६. हा विमानारूढ झालेला तुझा पिता दशरथराजा होय. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, हा महायशस्वी राजा मनुष्यलोकामध्यें तुझा जनक होता ७. तूं पुत्रानें ह्याचा उद्धार केल्यामुळें हा वैभवशाली राजा सांप्रत इंद्रलोकीं गेला आहे. तस्मात्, भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान तूं ह्याला अभिवंदन कर" ८. महादेवाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर लक्ष्मणासहवर्तमान रघुवंशज रामानें विमानशिखरावर आरूढ झालेल्या आपल्या पित्याला प्रणाम केला ९ आणि स्वतःच्या कांतीनें झळकत असलेल्या व निर्मल वस्त्रें धारण केलेल्या आपल्या पित्याचें प्रभु रामानें भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान दर्शन घेतलें १०. तेव्हां विमानारूढ झालेल्या भूपति दशरथाला प्राणापेक्षांही अधिक प्रिय असा आपला पुत्र दृष्टीं पडतांक्षणीं अतिशय आनंद झाला ११ आणि त्याला अंकावर घेऊन व बाहूंनीं आलिंगन देऊन विमानारूढ असलेला तो महापराक्रमी प्रभु दशरथ त्याला ह्मणाला १२ "हे रामा, तूं नसतांना सुरश्रेष्ठांसहवर्तमान स्वर्गामध्यें वास्तव्य करणें मला चांगलेंसें अभिमत नाहीं हें मी तुला प्रतिज्ञेनें सत्य सांगतों १३. हे वक्त्यांमध्यें श्रेष्ठ रामा, तुझ्या वनवासाकरितां कैकेयीनें जीं भाषणें केलीं तीं माझ्या हृदयामध्यें खिळून राहिलेलीं आहेत १४. तूं

अद्य दुःखाद्विमुक्तोऽस्मि नीहारादिव भास्करः १५ तारितोऽहं त्वया पुत्र सुपुत्रेण महात्मना । अष्टावक्रेण धर्मात्मा कहोलो ब्राह्मणो यथा १६ इदानीं च विजानामि यथा सौम्य सुरेश्वरैः । वधार्थं रावणस्येव पिहितं पुरुषोत्तमम् १७ सिद्धार्था खलु कौसल्या या त्वां राम गृहं गतम् । वनान्निवृत्तं संहृष्टा द्रक्ष्यते शत्रुसूदनम् १८ सिद्धार्थाः खलु ते राम नरा ये त्वां पुरीं गतम् । राज्ये चैवाभिषिक्तं च द्रक्ष्यन्ते वसुधाधिपम् १९ अनुरक्तेन बलिना शुचिना धर्मचारिणा । इच्छेयं त्वामहं द्रष्टुं भरतेन समागतम् २० चतुर्दश समाः सौम्य वने निर्यातितास्त्वया । वसता सीतया सार्धं मत्प्रीत्या लक्ष्मणेन च २१ निवृत्तवनवासोऽसि प्रतिज्ञा पूरिता त्वया । रावणं च रणे हत्वा देवताः परितोषिताः २२ कृतं कर्म यशः श्लाघ्यं प्राप्तं ते शत्रुसूदन । भ्रातृभिः सह राज्यस्थो दीर्घमायुरवाप्नुहि २३ इति ब्रुवाणं राजानं रामः प्राञ्जलिरब्रवीत् । कुरु प्रसादं धर्मज्ञ कैकेय्या भरतस्य च २४ सपुत्रां त्वां त्यजामीति यदुक्ता कैकयी त्वया । स शापः

---

कुशल असल्याचें अवलोकन करून आणि लक्ष्मणासहवर्तमान तुला आलिंगन देऊन आज मी धुक्यांतून मुक्त होणाऱ्या सूर्याप्रमाणें दुःखापासून मुक्त झालों आहें १५. सारांश, धर्मात्म्या कहोल ब्राह्मणाचा ज्याप्रमाणें त्याच्या अष्टावक्रसंज्ञक पुत्रानें उद्धार केला त्याप्रमाणें, हे पुत्रा, तूं महात्म्या सत्पुत्रानें माझा उद्धार केला आहेस १६. हे सौम्य रामा, रावणाच्या वधाकरितां देवांनीं माझा पुत्र ह्मणून ठेविलेला तूं पुरुषोत्तमच आहेस हें मी सांप्रत जाणीत आहें १७. कौसल्येचे मनोरथ खरोखर परिपूर्ण झाले: कारण, हे रामा, वनापासून निवृत्त होऊन घरीं आलेल्या तुज शत्रुनाशकाला ती आनंदानें अवलोकन करील १८. हे रामा, जे लोक अयोध्यानगरीमध्यें प्राप्त होऊन राज्याभिषेक झालेल्या तुज भूपतीला अवलोकन करितील ते खरोखर धन्य होत १९. अनुरक्त, शुचि, धर्मनिष्ठ आणि बलाढ्य अशा भरताशीं तुझा समागम झाल्याचें पहाण्याची माझी इच्छा आहे २०. हे सौम्य रामा, माझे ठिकाणीं तुझें प्रेम असल्यामुळें सीता व लक्ष्मण ह्यांसहवर्तमान वनामध्यें वास्तव्य करून तूं चवदा वर्षें काढिलींस २१. आतां तुझा वनवास संपूर्ण झाला आहे. तूं आपली प्रतिज्ञा शेंवटास नेली आहेस आणि संग्रामामध्यें रावणाचा वध करून तूं देवताही संतुष्ट केल्या आहेस २२. हे शत्रुनाशका रामा, प्रशंसनीय कर्म केल्यामुळें तूं कीर्ति संपादन केली आहेस. तस्मात्, राज्यारूढ झालेल्या तुला भ्रात्यांसहवर्तमान दीर्घ आयुष्य प्राप्त होईल" २३. ह्याप्रमाणें भाषण करणाऱ्या दशरथराजाला हात जोडून राम ह्मणाला "हे

केकर्यी घोरः सपुत्रां न स्पृशेत्प्रभो २५ तथेति स महाराजो राममुक्त्वा कृताञ्जलिम् । लक्ष्मणं च परिष्वज्य पुनर्वाक्यमुवाच ह २६ धर्मं प्राप्स्यसि धर्मज्ञ यशश्च विपुलं भुवि । रामे प्रसन्ने स्वर्गं च महिमानं तथोत्तमम् २७ रामं शुश्रूष भद्रं ते सुमित्रानन्दवर्धन । रामः सर्वस्य लोकस्य हितेष्वभिरतः सदा २८ एते सेन्द्रास्त्रयो लोकाः सिद्धाश्च परमर्षयः । अभिवाद्य महात्मानमर्चन्ति पुरुषोत्तमम् २९ एतत्तदुक्तमव्यक्तमक्षरं ब्रह्मसंमितम् । देवानां हृदयं सौम्य गुह्यं रामः परन्तपः ३० अवाप्तधर्माचरणं यशश्च विपुलं त्वया । एवं शुश्रूषता व्यग्रं वैदेह्या सह सीतया ३१ इत्युक्त्वा लक्ष्मणं राजा स्नुषां बद्धाञ्जलिं स्थिताम् । पुत्रीत्याभाष्य मधुरं शनैरेनामुवाच ह ३२ कर्तव्यो न तु वैदेहि मन्युस्त्यागमिमं प्रति । रामेणेदं विशुद्ध्यर्थं कृतं वै त्वद्धितैषिणा ३३ सुदुष्करमिदं पुत्रि तव चारित्रलक्षणम् । कृतं यत्तेऽन्यनारीणां यशो ह्यभिभविष्यति ३४ न त्वं कामं

---

धर्मज्ञ, आपण कैकेयी व भरत ह्यांच्यावर कृपा करा २४. हे प्रभो, "पुत्रासहवर्तमान मी तुझा त्याग करितों " असें जें आपण कैकेयीला ह्मणाला आहां त्या घोर शापाचा पुत्रासहवर्तमान कैकेयीला स्पर्श होऊं नये " २५. ह्यावर " ठीक आहे " असें हात जोडिलेल्या रामाला सांगून आणि लक्ष्मणाला आलिंगन देऊन तो महाराज दशरथ पुनरपि ह्मणाला २६ " हे धर्मज्ञ, तुला धर्म प्राप्त होईल; भूतलावर तुझी मोठी कीर्ति होईल आणि राम प्रसन्न झाला असतां तुला स्वर्गप्राप्ति होऊन तुझी उत्कृष्ट कीर्ति होईल २७. हे सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या लक्ष्मणा, तुझें कल्याण असो. तूं रामाची शुश्रूषा कर. कारण, सर्व जगताच्या कल्याणाविषयीं राम सर्वदां तत्पर असतो २८. इंद्रासहवर्तमान हे तिन्ही लोक, सिद्ध व महर्षि ह्या महात्म्या पुरुषोत्तमाचें अभिवंदनपूर्वक पूजन करीत असतात २९. हे सौम्या, शत्रुतापन राम हेंच अव्यक्त, अविनाशी, श्रुतिप्रतिपादित, देवांनाही आधारभूत व गुह्य असें ब्रह्म होय ३०. तस्मात्, विदेहराजकन्या सीतेसहवर्तमान एकनिष्ठपणानें तूं ह्याची सेवा करीत असल्यामुळें सर्व धर्म आचरिल्याचें फल तुला प्राप्त झालें असून तूं मोठें यशही संपादन केलें आहेस " ३१. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगितल्यानंतर हात जोडून स्थित असलेल्या स्नुषेला " हे मुलि " अशी हाक मारून मधुर वाणीनें हळू हळू तो राजा तिला ह्मणाला ३२ " हे वैदेहि, रामानें जो ह्या पूर्वी तुझा त्याग केला होता त्यासंबंधानें तूं त्याच्यावर क्रोध करूं नको. तुझें हित इच्छिणाऱ्या रामानें तुझ्या शुद्धीकरितां हें केलें आहे ३३. हे मुलि, तूं केलेलें हें आचरण फारच दुर्घट आहे. ह्या तुझ्या आचरणामुळें इतर

समाधेया भर्तृशुश्रूषणं प्रति। अवश्यं तु मया वाच्यमेष ते दैवतं परम् ३५
इति प्रतिसमादिश्य पुत्रौ सीतां च राघवः। इन्द्रलोकं विमानेन ययौ दश-
रथो नृपः ३६ विमानमास्थाय महानुभावः श्रिया च संहृष्टतनुर्नृपोत्तमः।
आमन्त्र्य पुत्रौ सह सीतया च जगाम देवप्रवरस्य लोकम् ३७ [५३४८]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्ड एकोन-
विंशाधिकशततमः सर्गः॥ ११९॥

प्रतिप्रयाते काकुत्स्थे महेन्द्रः पाकशासनः। अब्रवीत्परमप्रीतो राघवं
प्राञ्जलिं स्थितम् १ अमोघं दर्शनं राम तवास्माकं नरर्षभ। प्रीतियुक्ताः
स्म तेन त्वं ब्रूहि यन्मनसेप्सितम् २ एवमुक्तो महेन्द्रेण प्रसन्नेन महात्मना।
सुप्रसन्नमना हृष्टो वचनं प्राह राघवः ३ यदि प्रीतिः समुत्पन्ना मयि ते
विबुधेश्वर। वक्ष्यामि कुरु मे सत्यं वचनं वदतां वर ४ मम हेतोः परा-
क्रान्ता ये गता यमसादनम्। ते सर्वे जीवितं प्राप्य समुत्तिष्ठन्तु वानराः ५
मत्कृते विप्रयुक्ता ये पुत्रैर्दारैश्च वानराः। तान्प्रीतमनसः सर्वान्द्रष्टुमिच्छामि

---

पतिव्रता स्त्रियांची कीर्ति मागें पडेल ३४. पतिशुश्रूषसंबंधानें खरोखर तुला सांग-ण्याचें कारण नाहीं. तथापि, हा रामच तुझें मुख्य दैवत होय हें मला अवश्य सांगि-तलें पाहिजे" ३५. ह्याप्रमाणें पुत्रांना व सीतेला सांगून तो रघुवंशज दशरथराजा विमानाच्या योगानें इंद्रलोकीं गेला ३६. सारांश, आनंदानें ज्याच्या शरीरावर रोमांच उठले आहेत असा तो महापराक्रमी नृपश्रेष्ठ दशरथ सीतेसहवर्तमान पुत्रांचा निरोप घेतल्यानंतर विमानारूढ होऊन देवराज इंद्राच्या स्थानाप्रत गेला ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें एकोणिसावा सर्ग समाप्त झाला॥ ११९॥

ककुत्स्थकुलोत्पन्न दशरथ परत गेल्यानंतर पाकशासन महेंद्र अतिशय संतुष्ट झाला आणि हात जोडून स्थित असलेल्या रामाला ह्मणाला १ "हे पुरुषश्रेष्ठा रामा तुला झालेलें आमचें दर्शन व्यर्थ होणार नाहीं. आह्मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहोंत. वास्तव, तूं मनामध्यें जें आणिलें असशील तें सांग" २. ह्याप्रमाणें संतुष्ट झालेल्या महात्म्या महेंद्रानें सांगितलें असतां मनामध्यें सुप्रसन्न झालेला राम आनंदानें त्याला ह्मणाला ३ "हे देवराज, हे वक्त्यांमध्यें श्रेष्ठ, माझ्यावर जर आपण संतुष्ट झालां असाल तर मी जें आपणांला सांगणार आहें तें आपण खरें करा ४. माझ्याकरितां पराक्रम करून जे वानर यमलोकीं गेले आहेत ते सर्व जिवंत होऊन उठावे ५. हे मान्य देवराजा, माझ्याकरितां ज्या वानरांना पुत्रांना व स्त्रियांचा वियोग झाला आहे

मानद ६ विक्रान्ताश्चापि शूराश्च न मृत्युं गणयन्ति च । कृतयत्ना विपन्नाश्च जीवयैतान्पुरन्दर ७ मत्प्रियेष्वभिरक्ताश्च न मृत्युं गणयन्ति ये । त्वत्प्रसादात्समेयुस्ते वरमेतमहं वृणे ८ नीरुजो निर्व्रणांश्चैव संपन्नबलपौरुषान् । गोलाङ्गूलांस्तथर्क्षांश्च द्रष्टुमिच्छामि मानद ९ अकाले चापि पुष्पाणि मूलानि च फलानि च । नद्यश्च विमलास्तत्र तिष्ठेयुर्यत्र वानराः १० श्रुत्वा तु वचनं तस्य राघवस्य महात्मनः । महेन्द्रः प्रत्युवाचेदं वचनं प्रीतिसंयुतम् ११ महानयं वरस्तात यस्त्वयोक्तो रघूत्तम । द्विर्मया नोक्तपूर्वं च तस्मादेतद्भविष्यति १२ समुत्तिष्ठन्तु ते सर्वे हता ये युधि राक्षसैः । ऋक्षाश्च सह गोपुच्छैर्निकृत्ताननबाहवः १३ नीरुजो निर्व्रणाश्चैव संपन्नबलपौरुषाः । समुत्थास्यन्ति हरयः सुप्ता निद्राक्षये यथा १४ सुहृद्भिर्बान्धवैश्चैव ज्ञातिभिः स्वजनेन च । सर्व एव समेष्यन्ति संयुक्ताः परया मुदा १५ अकाले पुष्पशबलाः फलवन्तश्च पादपाः । भविष्यन्ति महेष्वास नद्यश्च सलिलायुताः १६ सव्रणैः प्रथमं गात्रैरिदानीं निर्व्रणैः समैः । ततः समु-

---

ते सर्व मनामध्यें प्रसन्न झालेले अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे ६. हे पुरंदरा, पराक्रमी, शूर व मृत्यूची पर्वा न करणारे असे हे वानर युद्धार्थ श्रम करून मृत्यु पावले आहेत ह्यांना तूं जिवंत कर ७. मला प्रिय असलेलीं कृत्यें करण्याविषयीं तत्पर आणि मृत्यूची पर्वा न करणारे असे जे वानर त्यांचा तुझ्या प्रसादामुळें स्वजनाशीं समागम व्हावा हा वर मी मागत आहें ८. हे मान्य रामा, गोलांगूल व ऋक्ष ह्यांना पीडारहित, व्रणरहित आणि बल व पराक्रम ह्यांनीं संपन्न असल्याचें अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे ९. ज्या ठिकाणीं वानर असतील त्या ठिकाणीं अकालीं सुद्धां पुष्पें, मुळें, फळें व निर्मल नद्या असाव्या " १० महात्म्या राघवाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर प्रेमयुक्त शब्दांनीं महेंद्र त्याला ह्मणाला ११ "बा रघूत्तमा, तूं मागितलेला हा वर मोठा आहे; परंतु, ज्याअर्थीं एकदां सांगितलेलें मीं आजपर्यंत कधीं फिरविलें नाहीं त्याअर्थीं हें तुझें मागणें सिद्धीस जाईल १२. राक्षसांनीं युद्धामध्यें ज्यांचा वध केला आहे आणि ज्यांच्या मुखांचे व हातांचे तुकडे तुकडे होऊन गेले आहेत असे सर्वही ऋक्ष गोलांगुलांसहवर्तमान जिवंत होतील १३. सारांश, निद्रा झाल्यानंतर निद्रिस्थ पुरुष ज्याप्रमाणें उठतात त्याप्रमाणें बल व पराक्रम ह्यांनीं संपन्न होऊन आणि पीडारहित व व्रणरहित होऊन वानर उठतील १४. सुहृद, बांधव, ज्ञाति व स्वजन ह्यांना सर्वही वानर एकत्र होऊन मोठ्या आनंदानें भेटतील १५. हे महाधनुर्धारी रामा, वृक्ष अकालीं सुद्धां पुष्पांनीं चित्रविचित्र होऊन फलयुक्त

स्थिताः सर्वे सुप्त्वेव हरिसत्तमाः १७ बभूवुर्वानराः सर्वे किं त्वेतदिति विस्मिताः । काकुत्स्थं परिपूर्णार्थं दृष्ट्वा सर्वे सुरोत्तमाः १८ अब्रुवन्परमप्रीताः स्तुत्वा रामं सलक्ष्मणम् । गच्छायोध्यामितो राजन्विसर्जय च वानरान् १९ मैथिलीं सान्त्वयस्वैनामनुरक्तां यशस्विनीम् । भ्रातरं भरतं पश्य त्वच्छोकाद्व्रतचारिणम् २० शत्रुघ्नं च महात्मानं मातॄः सर्वाः परन्तप । अभिषेचय चात्मानं पौरान्गत्वा प्रहर्षय २१ एवमुक्त्वा सहस्राक्षो रामं सौमित्रिणा सह । विमानैः सूर्यसंकाशैर्ययौ हृष्टः सुरैः सह २२ अभिवाद्य च काकुत्स्थः सर्वांस्तांस्त्रिदशोत्तमान् । लक्ष्मणेन सह भ्रात्रा वासमाज्ञापयत्तदा २३ ततस्तु सा लक्ष्मणरामपालिता महाचमूर्हृष्टजना यशस्विनी । श्रिया ज्वलन्ती विरराज सर्वतो निशा प्रणीतेव हि शीतरश्मिना २४ [ ५३७२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे विंशाधिकशततमः सर्गः ॥ १२० ॥

---

होतील आणि नद्याही उदकांनीं परिपूर्ण होतील " १६. ह्याप्रमाणें इंद्रानें सांगितल्यानंतर प्रथमतः ज्यांच्या शरीरांना जखमा झालेल्या होत्या त्या वानरांचीं शरीरें व्रणरहित व साफ होऊन झोपेंतून उठल्याप्रमाणें ते सर्वही वानरश्रेष्ठ उठले १७. आणि ते सर्वही वानर हा काय चमत्कार आहे असें मनामध्यें ह्मणत ह्मणत विस्मित झाले. असो. ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचे मनोरथ परिपूर्ण झाल्याचें अवलोकन केल्यानंतर सर्व सुरश्रेष्ठ १८ अत्यंत संतुष्ट होऊन आणि लक्ष्मणासहवर्तमान त्याची प्रशंसा करून त्याला ह्मणाले " हे राजा, तूं येथून अयोध्येला जा आणि वानरांनाही आतां जाण्याची अनुज्ञा दे १९. तुझ्याविषयीं अनुरक्त असलेल्या ह्या यशस्विनी मैथिलीचें सांत्वन कर; तुझ्या शोकामुळें व्रतस्थ राहिलेल्या भ्रात्या भरताची, महात्म्या शत्रुघ्नाची आणि सर्व मातांची भेट घे व, हे शत्रुतापना रामा, अयोध्येला जाऊन नागरिक जनांना आनंद दे व स्वतःला अभिषेक करून घे" २०,२१. ह्याप्रमाणें लक्ष्मणासहवर्तमान रामाला सांगून देवांसहवर्तमान आनंदित झालेला सहस्रनयन इंद्र सूर्यतुल्यतेजस्वी विमानांमध्यें आरूढ होऊन देवांसहवर्तमान चालता झाला २२. तदनंतर त्या सर्व सुरश्रेष्ठांना अभिवंदन करून भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें विश्रांति घेण्याविषयीं सैन्याला आज्ञा केली २३. नंतर रामलक्ष्मणांनीं जिचें पावन केलें आहे आणि जिच्यातील वीर आनंदित झालेले आहेत अशी ती कांतीनें झळकत असलेली यशस्विनी प्रचंड सेना चंद्रानें युक्त झालेल्या रात्रीप्रमाणें सर्व बाजूंनीं झळकूं लागली २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें विसावा सर्ग समाप्त झाला ॥ १२० ॥

तां रात्रिमुषितं रामं सुखोदितमरिन्दमम् । अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यं जयं पृष्ट्वा विभीषणः १ स्नानानि चाङ्गरागाणि वस्त्राण्याभरणानि च । चन्दनानि च माल्यानि दिव्यानि विविधानि च २ अलंकारविदश्चैता नार्यः पद्मनिभेक्षणाः । उपस्थितास्त्वां विधिवत्स्नापयिष्यन्ति राघव ३ एवमुक्तस्तु काकुत्स्थः प्रत्युवाच विभीषणम् । हरीन्सुग्रीवमुख्यांस्त्वं स्नानेनोपनिमन्त्रय ४ स तु ताम्यति धर्मात्मा मम हेतोः सुखोचितः । सुकुमारो महाबाहुर्भरतः सत्यसंश्रयः ५ तं विना कैकयीपुत्रं भरतं धर्मचारिणम् । न मे स्नानं बहुमतं वस्त्राण्याभरणानि च ६ एतत्पश्य यथा क्षिप्रं प्रतिगच्छाम तां पुरीम् । अयोध्यां गच्छतो ह्येष पन्थाः परमदुर्गमः ७ एवमुक्तस्तु काकुत्स्थं प्रत्युवाच विभीषणः । अह्ना त्वां प्रापयिष्यामि तां पुरीं पार्थिवात्मज ८ पुष्पकं नाम भद्रं ते विमानं सूर्यसंनिभम् । मम भ्रातुः कुबेरस्य रावणेन बलीयसा ९ हृतं निर्जित्य सङ्ग्रामे कामगं दिव्यमुत्तमम् । त्वदर्थं पालितं चेदं तिष्ठत्यतुलविक्रम १० तदिदं मेघसंकाशं विमानमिह तिष्ठति । येन यास्यसि यानेन त्वमयोध्यां गतज्वरः ११ अहं

---

त्या रात्रीं विश्रांति घेऊन आनंदानें उठलेल्या शत्रुदमन रामाचा जयजयकार करून व हात जोडून बिभीषण त्याला ह्मणाला १ " सुगंधतैलप्रभृति स्नानसाधनें, उटया, वस्त्रें, भूषणें, चंदन, नानाप्रकारचीं दिव्य पुष्पें २ आणि अलंकार कसे घालावे हें जाणणाऱ्या ह्या कमलाक्षी स्त्रिया तयार आहेत; तस्मात्, हे रामा, त्या तुला यथाविधि स्नान घालतील " ३. ह्याप्रमाणें बिभीषणानें सांगितलें असतां तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्याला ह्मणाला " ह्या स्नानाकरितां तूं सुग्रीवप्रभृति वानरांना निमंत्रण कर ४. सुखाचाच उपभोग घेत आलेला तो धर्मात्मा सुग्रीव आणि महापराक्रमी व सत्यनिष्ठ सुकुमार भरत हे माझ्याकरितां क्लेश भोगीत आहेत ५. तस्मात्, त्या धर्मनिष्ठ कैकयीपुत्र भरताशिवाय स्नान, वस्त्रें व भूषणें ह्यांचा स्वीकार करणें मला योग्य दिसत नाहीं ६. आतां आपण सत्वर त्या नगरीला परत जाऊं अशी तूं तजवीज पहा. अयोध्येस जाणाऱ्याला हा मार्ग फारच कठीण आहे " ७. ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर बिभीषण त्याला ह्मणाला " हे नृपनंदना, दिवस असतांनाच मी तुला त्या नगरीप्रत पोंचवीन ८. तुझें कल्याण असो. माझा भ्राता जो कुबेर त्याचें सूर्यासारिखें तेजस्वी पुष्पकनामक विमान बलाढ्य रावणानें ९ संग्रामामध्यें जिंकून आणिलेलें आहे. तें उत्कृष्ट दिव्य विमान आपल्या इच्छेप्रमाणें जाणारें आहे आणि, हे अतुलपराक्रमी रामा, तुझ्याकरितां हें विमान रक्षण करून ठेविलें आहे १०. सारांश, हें मेघतुल्य प्रचंड विमान येथें आहे व ह्याच्यामध्यें च

ते यद्यनुग्राह्यो यदि स्मरसि मे गुणान् । वस तावदिह प्राज्ञ यद्यस्ति मयि सौहृदम् १२ लक्ष्मणेन सह भ्रात्रा वैदेह्या भार्यया सह । अर्चितः सर्वकामैस्त्वं ततो राम गमिष्यसि १३ प्रीतियुक्तस्य विहितां ससैन्यः ससुहृद्गणः । सत्क्रियां राम मे तावद्गृहाण त्वं मयोद्यताम् १४ प्रणयाद्बहुमानाच्च सौहार्देन च राघव । प्रसादयामि प्रेष्योऽहं न खल्वाज्ञापयामि ते १५ एवमुक्तस्ततो रामः प्रत्युवाच विभीषणम् । रक्षसां वानराणां च सर्वेषामेव शृण्वताम् १६ पूजितोऽस्मि त्वया वीर साचिव्येन परेण च । सर्वात्मना च चेष्टाभिः सौहार्देन परेण च १७ न खल्वेतन्न कुर्यां ते वचनं राक्षसेश्वर । तं तु मे भ्रातरं द्रष्टुं भरतं त्वरते मनः १८ मां निवर्तयितुं योऽसौ चित्रकूटमुपागतः । शिरसा याचतो यस्य वचनं न कृतं मया १९ कौसल्यां च सुमित्रां च कैकेयीं च यशस्विनीम् । गुहं च सुहृदं चैव पौरजानपदैः सह २० अनुजानीहि मां सौम्य पूजितोऽस्मि विभीषण । मन्युर्न

---

आरूढ होऊन आपण कांहींएक काळजी न करितां अयोध्येला जाल ११. हे प्राज्ञ, मजवर जर आपणांला अनुग्रह कर्तव्य असेल, माझ्या गुणांचें जर आपणांला स्मरण असेल आणि माझे ठिकाणीं जर आपलें प्रेम असेल तर आपण आधीं येथें वास्तव्य करा १२. हे रामा, भ्राता लक्ष्मण व भार्या वैदेही ह्यांसहवर्तमान आपलें सर्व इष्ट वस्तु देऊन पूजन झाल्यानंतर आपण जा १३. सारांश, हे रामा, सैन्य व सुहृद्गण ह्यांसहवर्तमान आपण, मीं तयार केलल्या शास्त्रविहित पाहुणचाराचा स्वीकार करा. आपल्या ठिकाणीं माझी भक्ति आहे १४. हे राघवा, प्रेमानें, विनयानें आणि बहुमानानें मी दास अशी आपली प्रार्थना करीत आहें. खरोखर मी आपणांला आज्ञा करीत नाहीं" १५. ह्याप्रमाणें बिभीषणानें सांगितल्यानंतर राक्षस व वानर असे सर्वही श्रवण करीत असतांना राम त्याला ह्मणाला १६ "हे वीरा, उत्कृष्ट मसलत, अनुपम प्रेम आणि कृति ह्यांच्या योगानें तूं मनापासून माझें पूजन केलें आहेस १७. हे राक्षसाधिपते, तुझें हें ह्मणणें मी ऐकणार नाहीं अशी गोष्ट खरोखरच नाहीं; परंतु, त्या भ्रात्या भरताची भेट घेण्याविषयीं माझें मन उत्सुक झालें आहे १८. कारण, मला परत फिरविण्याकरितां तो चित्रकूटपर्वतावर आला होता आणि पायांवर मस्तक ठेवून माझी प्रार्थना करीत असतांनाही मी त्याचें ऐकिलें नाहीं १९. असो. कौसल्या, सुमित्रा, यशस्विनी कैकेयी, मित्र गुह व देशांतील लोकांसहवर्तमान नागरिक जन ह्या सर्वांचीच भेट घेण्याविषयीं माझें मन उत्सुक झालें आहे २०. ह्यास्तव, हे सौम्या बिभीषणा, तूं माझें पूजन केलेंच असल्यामुळें आतां मला जाण्याची अनुज्ञा दे. खरोखर

खलु कर्तव्यः सखे त्वां चानुमानये २१ उपस्थापय मे शीघ्रं विमानं राक्षसेश्वर। कृतकार्यस्य मे वासः कथं स्यादिह संमतः २२ एवमुक्तस्तु रामेण राक्षसेन्द्रो विभीषणः। विमानं सूर्यसंकाशमाजुहाव त्वरान्वितः २३ ततः काञ्चनचित्राङ्गं वैदूर्यमणिवेदिकम्। कूटागारैः परिक्षिप्तं सर्वतो रजतप्रभम् २४ पाण्डुराभिः पताकाभिर्ध्वजैश्च समलंकृतम्। काञ्चनं काञ्चनैर्हर्म्यैर्हेमपद्मविभूषितैः २५ प्रकीर्णं किङ्किणीजालैर्मुक्तामणिगवाक्षकम्। घण्टाजालैः परिक्षिप्तं सर्वतो मधुरस्वनम् २६ तं मेरुशिखराकारं निर्मितं विश्वकर्मणा। बृहद्भिर्भूषितं हर्म्यैर्मुक्तारजतशोभितैः २७ तलैः स्फटिकचित्राङ्गैर्वैदूर्यैश्च वरासनैः। महार्हास्तरणोपेतैरुपपन्नं महाधनैः २८ उपस्थितमनाधृष्यं तद्विमानं मनोजवम्। निवेदयित्वा रामाय तस्थौ तत्र विभीषणः २९ तत्पुष्पकं कामगमं विमानमुपस्थितं भूधरसंनिकाशम्। दृष्ट्वा तदा विस्मयमाजगाम रामः ससौमित्रिरुदारसत्त्वः ३०

---

माझ्यावर तूं क्रोध करूं नको. हे मित्रा, माझ्या म्हणण्याला अनुमोदन देण्याविषयीं मी तुझी प्रार्थना करीत आहें २१. हे राक्षसाधिपते, माझ्याकरितां विमान सत्वर येथें आण. येथील कार्य उरकल्यानंतर येथें वास्तव्य करणें मला कसें बरें संमत होईल ?" २२. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां राक्षसाधिपति बिभीषणानें त्वरा करून सूर्यतुल्य तेजस्वी विमान आणविलें २३. तदनंतर सुवर्णानें ज्याचा प्रदेश चित्रविचित्र केलेला आहे; ज्यांतील बसावयाच्या जागेला वैदूर्य रत्नें जडलेलीं आहेत; ज्याच्या सर्व बाजूंना शालागृहें आहेत; सर्व बाजूंनीं ज्याची कांति रुप्यासारिखी झळकत आहे २४; श्वेतवर्ण पताका व ध्वज ह्यांनीं जें शृंगारिलें आहे; सुवर्णकमलांनीं शृंगारिलेल्या सुवर्णगृहामुळें जें सुवर्णमय दिसत आहे २५; घुंगुरांच्या माळांनीं जें गजबजलेलें आहे; मोतीं व रत्नें ह्यांनीं ज्याच्या खिडक्या मढविलेल्या आहेत; घंटाजालांनीं सभोंवतीं व्याप्त असल्यामुळें ज्याच्या सर्व बाजूंनीं मधुर ध्वनि चालला आहे २६; मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें ज्याचा आकार आहे; विश्वकर्म्यानें जें निर्माण केलें आहे; मोत्यें व रजत ह्यांनीं सुशोभित असलेल्या मोठ्या मोठ्या वाड्यांनीं जें शृंगारिलेलें आहे २७; स्फटिक मण्यांनीं चित्रविचित्र झालेल्या फरसबंद्या ज्यामध्यें आहेत आणि वैदूर्यरत्नमय व मोठ्या मोठ्या आस्तरणांनीं युक्त अशीं मोठीं मूल्यवान् श्रेष्ठ आसनें ज्यामध्यें आहेत २८ असें तें आंत बसणाऱ्याच्या मनाप्रमाणें वेग धारण करणारें अजिंक्य विमान प्राप्त झाल्याचें रामाला निवेदन करून बिभीषण तेथें उभा राहिला २९ आणि ( त्यानें निवेदन केल्याप्रमाणें ) इच्छेप्रमाणें गमन करणारें तें पर्वततुल्य पुष्पक

[ ५४०२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे एकविंशाधिकशततमः सर्गः ॥ १२१ ॥

उपस्थितं तु तं कृत्वा पुष्पकं पुष्पभूषितम् । अविदूरे स्थितो राममित्युवाच विभीषणः १ स तु बद्धाञ्जलिपुटो विनीतो राक्षसेश्वरः । अब्रवीत्त्वरयोपेतः किं करोमीति राघवम् २ तमब्रवीन्महातेजा लक्ष्मणस्योपशृण्वतः । विमृश्य राघवो वाक्यमिदं स्नेहपुरस्कृतम् ३ कृतप्रयत्नकर्माणः सर्व एव वनौकसः । रत्नैरर्थैश्च विविधैः संपूज्यन्तां विभीषण ४ सहामीभिस्त्वया लङ्का निर्जिता राक्षसेश्वर । हृष्टैः प्राणभयं त्यक्त्वा सङ्ग्रामेष्वनिवर्तिभिः ५ त इमे कृतकर्माणः सर्व एव वनौकसः । धनरत्नप्रदानैश्च कर्मैषां सफलं कुरु ६ एवं संमानिताश्चैते नन्द्यमाना यथा त्वया । भविष्यन्ति कृतज्ञेन निर्वृता हरियूथपाः ७ त्यागिनं संग्रहीतारं सानुक्रोशं जितेन्द्रियम् । सर्वे त्वामभिगच्छन्ति ततः संबोधयामि ते ८ हीनं रतिगुणैः सर्वैरभिहन्तारमाहवे । सेना त्यजति संविग्ना नृपतिं तं नरेश्वर ९

---

विमान प्राप्त झाल्याचें अवलोकन करून लक्ष्मणासहवर्तमान महाशय राम विस्मित झाला ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें एकविसावा सर्ग समाप्त झाला ॥ १२१ ॥

रामाच्या जवळच उभा असलेला राक्षसाधिपति विनयसंपन्न बिभीषण पुष्पांनीं विभूषित असलेलें पुष्पकविमान संनिध आणून व हात जोडून " काय आज्ञा आहे ? " असें सत्वर रामाला ह्मणाला असतां १, २ लक्ष्मणासमोर महातेजस्वी राम विचार करून त्याच्याशीं अशारीतीनें सप्रेम भाषण करूं लागला ३. ( तो ह्मणाला ) " हे बिभीषणा, सर्वही वानरांनीं प्रयत्नानें युद्धकर्म केलें आहे. ह्यास्तव, रत्नें व नानाप्रकारच्या वस्तु देऊन ह्यांचें पूजन कर ४. हे राक्षसाधिपते, संग्रामापासून परावृत्त न होणाऱ्या व आनंदित असलेल्या ह्या वानरांसहवर्तमान प्राणाची भीति सोडून देऊन तूं लंका जिंकिली आहेस. ५ त्या ह्या सर्वही वनचरांनीं युद्धकर्म केलेलें आहे. ह्यास्तव, द्रव्य व रत्नें देऊन तूं ह्यांचा पराक्रम सफल कर ६. ह्याप्रमाणें त्यांचा संमान केला असतां आणि यथायोग्य रीतीनें तुज कृतज्ञाकडून त्यांचें अभिनंदन होऊं लागलें असतां हे वानरसेनाधिपति सुखी होतील ७. दाता, संग्रहकर्ता, दयालु व जितेंद्रिय अशा तुझ्याकडे सर्व येत असतात ह्मणून मी तुला सांगत आहें ८. सैन्याला आनंददायक असा कोणताही गुण ज्याच्यापाशीं नाहीं आणि संग्रामामध्यें जो नुसता वधच करीत सुटतो त्या राजाचा, हे प्रजाधिपते बिभीषणा, सेना उद्विग्न होऊन त्याग

एवमुक्तस्तु रामेण वानरांस्तान्विभीषणः । रत्नार्थसंविभागेन सर्वानेवा-
भ्यपूजयत् १० ततस्तान्पूजितान्दृष्ट्वा रत्नार्थैर्हरियूथपान् । आरुरोह तदा
रामस्तद्विमानमनुत्तमम् ११ अङ्कनादाय वैदेहीं लज्जमानां मनस्विनीम् ।
लक्ष्मणेन सह भ्रात्रा विक्रान्तेन धनुष्मता १२ अब्रवीत्स विमानस्थः
पूजयन्सर्ववानरान् । सुग्रीवं च महावीर्यं काकुत्स्थः सविभीषणम् १३
मित्रकार्यं कृतमिदं भवद्भिर्वानरर्षभाः । अनुज्ञाता मया सर्वे यथेष्टं प्रति-
गच्छत १४ यत्तु कार्यं वयस्येन स्निग्धेन च हितेन च । कृतं सुग्रीव
तत्सर्वं भवताऽधर्मभीरुणा १५ किष्किन्धां प्रति याह्याशु स्वसैन्येनाभि-
संवृतः । स्वराज्ये वस लङ्कायां मया दत्ते विभीषण ॥ न त्वां धर्षयितुं
शक्ताः सेन्द्रा अपि दिवौकसः १६ अयोध्यां प्रति यास्यामि राजधानीं
पितुर्मम । अभ्यनुज्ञातुमिच्छामि सर्वानामन्त्रयामि वः १७ एवमुक्तास्तु
रामेण हरीन्द्रा हरयस्तथा । ऊचुः प्राञ्जलयः सर्वे राक्षसश्च विभी-
षणः १८ अयोध्यां गन्तुमिच्छामः सर्वान्नयतु नो भवान् । मुदुक्ता

---

करितें " ९. ह्याप्रमाणें रामानें बिभीषणाला सांगितलें असतां त्यानें रत्नें व द्रव्यें देऊन त्या सर्वही वानरांचें पूजन केलें १०. तदनंतर रत्नें व द्रव्यें ह्यांच्या योगानें त्या वानरसेनाधिपतींचा संमान झालेला पाहून राम धनुर्धारी व पराक्रमी अशा आपल्या भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान त्या अनुपम विमानावर, लाजत असलेल्या विचारी सीतेला मांडीवर घेऊन, आरूढ झाला ११,१२; आणि विमानारूढ झालेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम बिभीषणासहवर्तमान महावीर्यवान् सुग्रीव आणि सर्व वानर ह्यांची प्रशंसा करण्याकरितां ह्मणाला १३ " हे वानरश्रेष्ठहो, मित्रानें जें कर्तव्य तें हें तुह्मीं केलें. आतां तुह्मां सर्वांना मी अनुज्ञा देत आहें; तुह्मी आपल्या इच्छेप्रमाणें परत जा १४ हे सुग्रीवा, हितेच्छु व प्रेमयुक्त मित्रानें जें कृत्य करावयाचें तें सर्व, तुज पापभीरूच्या हातून झालें आहे १५. स्वतःच्या सैन्यानें परिवेष्टित होऊन तूं आतां सत्वर किष्किंधानगरीला जा आणि, हे बिभीषणा, तूंही आपल्या राज्यामध्यें लंकेंत वास्तव्य कर. इंद्रासहवर्तमानही देव तुझा पराभव करण्यास समर्थ नाहींत १६. माझ्या पित्याची राजधानी जी अयोध्या तिकडे मी आतां परत जातों. तुह्मीं मला अनुज्ञा द्यावी अशी माझी इच्छा आहे आणि मी तुह्मां सर्वांचा निरोप घेत आहें " १७. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां बिभीषणासहवर्तमान ते सर्वही वानराधिपति आणि वानर हात जोडून ह्मणाले १८ "अयोध्येस येण्याची आमचीही इच्छा आहे. आह्मां सर्वांना आपण घेऊन चला. आह्मी आनंदानें तिकडील वनामध्यें व उपवनामध्यें

विचरिष्यामो वनान्युपवनानि च १९ दृष्ट्वा त्वामभिषेकार्द्रं कौसल्या-
मभिवाद्य च । अचिरादागमिष्यामः स्वगृहान्नृपसत्तम २० एवमुक्तस्तु
धर्मात्मा वानरैः सविभीषणैः । अब्रवीद्वानरान्रामः ससुग्रीवविभीष-
णान् २१ प्रियात्प्रियतरं लब्धं यदहं ससुहृज्जनः । सर्वैर्भवद्भिः सहितः प्रीतिं
लप्स्ये पुरीं गतः २२ क्षिप्रमारोह सुग्रीव विमानं सह वानरैः । त्वम-
प्यारोह सामात्यो राक्षसेन्द्र विभीषण २३ ततः स पुष्पकं दिव्यं सुग्रीवः
सह वानरैः । आरुरोह मुदा युक्तः सामात्यश्च विभीषणः २४ तेष्वा-
रूढेषु सर्वेषु कौबेरं परमासनम् । राघवेणाभ्यनुज्ञातमुत्पपात विहायसम् २५
खगतेन विमानेन हंसयुक्तेन भास्वता । प्रहृष्टश्च प्रतीतश्च बभौ रामः कुबे-
रवत् २६ ते सर्वे वानरर्क्षाश्च राक्षसाश्च महाबलाः । यथा सुखमसंबाधं
दिव्ये तस्मिन्नुपाविशन् २७ [ ५४२९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-
कीय आदिकाव्ये युद्धकाण्डे द्वाविंशाधिकशततमः सर्गः ॥ १२२ ॥

अनुज्ञातं तु रामेण तद्विमानमनुत्तमम् । हंसयुक्तं महानादमुत्पपात

---

संचार करूं १९. हे नृपश्रेष्ठ, राज्याभिषेकानें आर्द्र झालेल्या तुला अवलोकन करून व कौसल्येला अभिवंदन करून आह्मी लवकरच स्वगृहीं परत येऊं " २०. ह्याप्रमाणें बिभीषणासहवर्तमान वानरांनीं प्रार्थना केली असतां धर्मात्मा राम सुग्रीव व बिभीषण ह्यांसहवर्तमान वानरांना ह्मणाला २१ "तुह्मां सर्वांसहवर्तमान आणि सुहृद्गणासहवर्तमान अयोध्यानगरीला गेल्यावर (राज्याभिषेकसंबंधीं) आनंद मला प्राप्त होणार आहे ही गोष्ट तर मला अतिशयच प्रिय प्राप्त झाली २२. हे सुग्रीवा, वानरांसहवर्तमान तूं सत्वर विमानामध्यें आरोहण कर आणि, हे राक्षसाधिपते बिभीषणा, तूंही अमात्यांसहवर्तमान ह्या विमानांत आरूढ हो " २३. तदनंतर वानरांसहवर्तमान सुग्रीव आणि अमात्यांसहवर्तमान बिभीषण हे आनंदानें त्या दिव्य पुष्पकविमानावर आरूढ झाले २४; आणि त्या सर्वांनीं आरोहण केल्यानंतर रामानें अनुज्ञा दिली असतां तें कुबेराचें उत्कृष्ट यान आकाशामध्यें उडालें २५. चित्ररूप हंसांनीं युक्त असलेलें तें देदीप्यमान विमान आकाशामध्यें गेलें असतां कुबेराप्रमाणें रामाचें चित्त आनंदित झालें व आनंदानें त्याच्या शरीरावर रोमांचही उठले २६ आणि ते सर्वही वानर, ऋक्ष व महाबलाढ्य राक्षस प्रशस्तरीतीनें त्या दिव्य विमानामध्यें सुखानें बसले २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥१२२॥

रामानें अनुज्ञा दिली असतां प्रचंड गर्जना करणारें तें हंसयुक्त अनुपम विमान

विहायसम् १ पातयित्वा ततश्चक्षुः सर्वतो रघुनन्दनः। अब्रवीन्मैथिलीं सीतां रामः शशिनिभाननाम् २ कैलासशिखराकारे त्रिकूटशिखरे स्थिताम्। लङ्कामीक्षस्व वैदेहि निर्मितां विश्वकर्मणा ३ एतदायोधनं पश्य मांसशोणितकर्दमम्। हरीणां राक्षसानां च सीते विशसनं महत् ४ एष दत्तवरः शेते प्रमाथी राक्षसेश्वरः। तव हेतोर्विशालाक्षि निहतो रावणो मया ५ कुम्भकर्णोऽत्र निहतः प्रहस्तश्च निशाचरः। धूम्राक्षश्चात्र निहतो वानरेण हनूमता ६ विद्युन्माली हतश्चात्र सुषेणेन महात्मना। लक्ष्मणेनेन्द्रजिच्चात्र रावणिर्निहतो रणे ७ अङ्गदेनात्र निहतो विकटो नाम राक्षसः। विरूपाक्षश्च दुष्प्रेक्षो महापार्श्वमहोदरौ ८ अकम्पनश्च निहतो बलिनोऽन्ये च राक्षसाः। त्रिशिराश्चातिकायश्च देवान्तकनरान्तकौ ९ युद्धोन्मत्तश्च मत्तश्च राक्षसप्रवरावुभौ। निकुम्भश्चैव कुम्भश्च कुम्भकर्णात्मजौ बली १० वज्रदंष्ट्रश्च दंष्ट्रश्च बहवो राक्षसा हताः। मकराक्षश्च दुर्धर्षो मया युधि निपातितः ११ अकम्पनश्च निहतः शोणिताक्षश्च वीर्यवान्। यूपाक्षश्च प्रजङ्घश्च निहतौ तु महाहवे १२ विद्युज्जिह्वोऽत्र निहतो राक्षसो भीम-

---

आकाशामध्यें उडालें १. नंतर रघुनंदन राम चोहोंकडे दृष्टि देऊन चंद्रतुल्य मुखानें युक्त असलेल्या मिथिलराजकन्या सीतेला ह्मणाला २ "हे वैदेहि, कैलासशिखराप्रमाणें ज्याचा आकार आहे अशा त्रिकूटाचलाच्या शिखरावर असलेली व विश्वकर्म्यानें निर्माण केलेली ही लंका तूं अवलोकन कर ३. हे सीते, वानर व राक्षस ह्यांची मोठी कत्तल" ज्यामध्यें झाली आहे आणि मांस व रक्त ह्यांचा जेथें चिखल झालेला आहे असें हें रण तूं अवलोकन कर ४. हे विशालनयने, वर प्राप्त झालेला हा महाबलाढ्य राक्षसाधिपति रावण तुझ्याकरितां माझ्या हातून वध पावून पडला आहे ५. कुंभकर्ण व प्रहस्त निशाचर ह्यांचा ह्या ठिकाणीं वध झाला आहे आणि हनुमान् वानरानें धूम्राक्षाचाही येथें वध केला आहे ६. महात्म्या सुषेणानें विद्युन्मालीला येथें ठार केलें आहे आणि रावणपुत्र इंद्रजितालाही लक्ष्मणानें रणामध्यें ह्या ठिकाणीं परलोकीं पाठविलें आहे ७. अंगदानें विकटनामक राक्षसाचा येथें वध केला आहे व ज्याच्याकडे पाहणेंही कठीण आहे असा विरूपाक्ष, महापार्श्व, महोदर ८, अकंपन आणि इतरही बलाढ्य राक्षस ह्यांचा येथें वध झाला आहे. त्रिशिरा, अतिकाय, देवांतक, नरांतक ९, उभयतां राक्षसश्रेष्ठ युद्धोन्मत्त व मत्त, कुंभकर्णाचे पुत्र बलाढ्य निकुंभ व कुंभ १०, वज्रदंष्ट्र व दंष्ट्र असे असंख्य राक्षस येथें वध पावले आहेत. अजिंक्य मकराक्षाचा संग्रामामध्यें मीं वध केला आहे ११ आणि अकंपन,

दर्शनः । यज्ञशत्रुश्च निहतः सुप्तघ्नश्च महाबलः १३ सूर्यशत्रुश्च निहतो ब्रह्मशत्रुस्तथापरः । अत्र मन्दोदरी नाम भार्या तं पर्यदेवयत् १४ सपत्नीनां सहस्रेण साग्रेण परिवारिता । एतत्तु दृश्यते तीर्थं समुद्रस्य वरानने १५ यत्र सागरमुत्तीर्य तां रात्रिमुषिता वयम् । एष सेतुर्मया बद्धः सागरे लवणार्णवे १६ तव हेतोर्विशालाक्षि नलसेतुः सुदुष्करः । पश्य सागरमक्षोभ्यं वैदेहि वरुणालयम् १७ अपारमिव गर्जन्तं शङ्खशुक्तिसमाकुलम् । हिरण्यनाभं शैलेन्द्रं काञ्चनं पश्य मैथिलि १८ विश्रमार्थं हनुमतो भित्त्वा सागरमुत्थितम् । एतत्कुक्षौ समुद्रस्य स्कन्धावारनिवेशनम् १९ अत्र पूर्वं महादेवः प्रसादमकरोद्विभुः । एतत्तु दृश्यते तीर्थं सागरस्य महात्मनः २० सेतुबन्ध इति ख्यातं त्रैलोक्येन च पूजितम् । एतत्पवित्रं परमं महापातकनाशनम् २१ अत्र राक्षसराजोऽयमाजगाम विभीषणः । एषा सा दृश्यते सीते किष्किन्धा चित्रकानना २२ सुग्रीवस्य पुरी रम्या यत्र वाली मया हतः । अथ दृष्ट्वा पुरीं सीता किष्किन्धां वालिपालि-

---

वीर्यवान् शोणिताक्ष, यूपाक्ष आणि प्रजंघ ह्यांचाही त्या महासंग्रामामध्यें वध झाला आहे १२. दिसण्यांतही भयंकर असलेला विद्युज्जिह्व राक्षस, यज्ञशत्रु व महाबलाढ्य सुप्तघ्न ह्यांचाही ह्या ठिकाणीं वध झाला आहे १३ आणि सूर्यशत्रु व ब्रह्मशत्रु हे येथें वध पावले आहेत. सहस्र पत्नींहीं जास्त सवतींनीं परिवेष्टित असलेल्या मंदोदरीनामक भार्येनें येथें त्याच्याकरितां शोक केला. हे वरानने, हें तें समुद्रतीर्थ दृष्टीं पडूं लागलें आहे १४, १५. ह्या ठिकाणीं सागराचें उल्लंघन करून ती रात्र आम्हीं काढिली. क्षारोदकानें भरलेल्या सागरामध्यें हा मीं बांधिलेला सेतु होय १६. हे विशालनयने, हा अति दुर्घट नलसेतु तुझ्याकरितां तयार केलेला आहे. हे वैदेहि, वरुणाचें निवासस्थान असलेला हा अगाध सागर तूं अवलोकन कर १७. हा अपार समुद्र गर्जना करीत आहे आणि शंख व शुक्ति ह्यांच्या योगानें हा गजबजून गेलेला आहे. हे मैथिलि, हा सुवर्णाचा श्रेष्ठ पर्वत हिरण्यनाभ तूं अवलोकन कर १८. हनुमानाला विश्रांति घेतां यावी एतदर्थ समुद्र भेदून हा वर आला आहे. समुद्राच्या तीरीं असलेलें हें सेनानिवासस्थान होय १९. ह्या ठिकाणीं पूर्वीं प्रभु महादेव माझ्यावर प्रसन्न झाला आहे. महात्म्या सागराचें हे तीर्थ दृष्टीं पडत आहे २०. सेतुबंध ह्मणून हें तीर्थ प्रसिद्ध आहे; त्रैलोक्याला हें वंद्य आहे; हें अत्यंत पवित्र आहे आणि महापातकांचाही नाश करणारें आहे २१. ह्या ठिकाणीं हा राक्षसराज बिभीषण माझ्याकडे आला. हे सीते, मनोहर वनांनीं युक्त असलेली ती ही किष्किंधा दृष्टीं पडत आहे २२. ही सुग्रीवाची रम्य

ताम् २३ अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं रामं प्रणयसाध्वसा । सुग्रीवप्रियभार्याभिस्ताराप्रमुखतो नृप २४ अन्येषां वानरेन्द्राणां स्त्रीभिः परिवृता ह्यहम् । गन्तुमिच्छे सहायोध्यां राजधानीं त्वया सह २५ एवमुक्तोऽथ वैदेह्या राघवः प्रत्युवाच ताम् । एवमस्त्विति किष्किन्धां प्राप्य संस्थाप्य राघवः २६ विमानं प्रेक्ष्य सुग्रीवं वाक्यमेतदुवाच ह । ब्रूहि वानरशार्दूल सर्वान्वानरपुङ्गवान् २७ स्त्रीभिः परिवृताः सर्वे ह्ययोध्यां यान्तु सीतया । तथा त्वमेभिः सर्वाभिः स्त्रीभिः सह महाबल २८ अभित्वरय सुग्रीव गच्छामः प्लवगाधिप । एवमुक्तस्तु सुग्रीवो रामेणामिततेजसा २९ वानराधिपतिः श्रीमांस्तैश्च सर्वैः समावृतः । प्रविश्यान्तःपुरं शीघ्रं तारामुद्वीक्ष्य सोऽब्रवीत् ३० प्रिये त्वं सह नारीणां वानराणां महात्मनाम् । राघवेणाभ्यनुज्ञाता मैथिलीप्रियकाम्यया ३१ त्वर त्वमभिगच्छामो गृह्य वानरयोषितः । अयोध्यां दर्शयिष्यामः सर्वा दशरथस्त्रियः ३२ सुग्रीवस्य वचः श्रुत्वा तारा सर्वाङ्गशोभना । आहूय चाब्रवीत्सर्वा वानराणां तु योषितः ३३ सुग्रीवेणाभ्यनु-

---

नगरी असून ह्या ठिकाणीं वालीचा मीं वध केला. नंतर वालिरक्षित किष्किंधानगरी अवलोकन केल्यावर भीतियुक्त प्रेमानें युक्त असलेली सीता विनययुक्त शब्दांनीं रामाला ह्मणाली "हे नृप, ताराप्रभृति सुग्रीवाला प्रिय असलेल्या भार्या आणि इतर वानराधिपतींच्या स्त्रिया ह्यांसहवर्तमान आपणांबरोबर अयोध्यानामक राजधानीमध्यें एकदमच जाण्याची माझी इच्छा आहे" २३,२४, २५. ह्याप्रमाणें सीतेनें सांगितलें असतां राम तिला "ठीक आहे" असें ह्मणाला आणि किष्किंधेसमीप आल्यानंतर तेथें विमान थांबवून व सुग्रीवाकडे पाहून तो ह्मणाला "हे वानरश्रेष्ठ, 'स्त्रिया बरोबर घेऊन सर्वांनीं सीतेसहवर्तमान अयोध्येला यावें' असें सर्व वानरश्रेष्ठांना तूं सांग. आणि त्याप्रमाणें, हे महाबलाढ्य सुग्रीवा, ह्या सर्व स्त्रियांसहवर्तमान तूं त्वरा कर. हे वानराधिपते, आपणांला आतां गेलें पाहिजे" ह्याप्रमाणें अतुलतेजस्वी रामानें सुग्रीवाला सांगितलें असतां २६, २७, २८, २९ त्या सर्व वानरांनीं परिवेष्टित असलेला तो वानराधिपति श्रीमान् सुग्रीव सत्वर अंतःपुरामध्यें प्रविष्ट होऊन व तारेकडे पाहून ह्मणाला ३० "हे प्रिये, महात्म्या वानरांच्या स्त्रियांसहवर्तमान अयोध्येला येण्याची, सीतेचें प्रिय करण्याकरितां, रामानें अनुज्ञा दिली आहे ३१. ह्यास्तव, वानरस्त्रियांना घेऊन येण्याची तूं त्वरा कर. आपण बरोबर अयोध्येला जाऊं आणि दशरथाच्या स्त्रिया सर्वांना दाखवूं" ३२. सुग्रीवाचें भाषण श्रवण केल्यानंतर सर्वांगसुंदरी तारा सर्व वानरस्त्रियांना हाक मारून ह्मणाली ३३ "सर्व

ज्ञाता गन्तुं सर्वैश्च वानरैः । मम चापि प्रियं कार्यमयोध्यादर्शनेन च ३४ प्रवेशं चैव रामस्य पौरजानपदैः सह । विभूतिं चैव सर्वासां स्त्रीणां दशरथस्य च ३५ तारया चाभ्यनुज्ञाताः सर्वा वानरयोषितः । नेपथ्यविधिपूर्वं तु कृत्वा चापि प्रदक्षिणम् ३६ अध्यारोहन्विमानं तत्सीतादर्शनकाङ्क्षया । ताभिः सहोत्थितं शीघ्रं विमानं प्रेक्ष्य राघवः ३७ ऋष्यमूकसमीपे तु वैदेहीं पुनरब्रवीत् । दृश्यतेऽसौ महान्सीते सविद्युदिव तोयदः ३८ ऋष्यमूको गिरिवरः काञ्चनैर्धातुभिर्वृतः । अत्राहं वानरेन्द्रेण सुग्रीवेण समागतः ३९ समयश्च कृतः सीते वधार्थं वालिनो मया । एषा सा दृश्यते पम्पा नलिनी चित्रकानना ४० त्वया विहीनो यत्राहं विललाप सुदुःखितः । अस्यास्तीरे मया दृष्टा शबरी धर्मचारिणी ४१ अत्र योजनबाहुश्च कबन्धो निहतो मया । दृश्यतेऽसौ जनस्थाने श्रीमान्सीते वनस्पतिः ४२ जटायुश्च महातेजास्तव हेतोर्विलासिनि । रावणेन हतो यत्र पक्षिणां प्रवरो बली ४३ एतत्तदाश्रमपदमस्माकं वरवर्णिनि । पर्णशाला तथा चित्रा दृश्यते शुभदर्शने ४४ यत्र त्वं राक्षसेन्द्रेण रावणेन

---

वानरांसहवर्तमान अयोध्येला जाण्याची सुग्रीवानें तुम्हांला आज्ञा केली आहे आणि अयोध्या तुमच्या दृष्टीं पडल्यानें माझ्याही मनासारिखें होणारें आहे ३४. नगरांतील व देशांतील लोकांसहवर्तमान रामाचा प्रवेश आणि दशरथाच्या सर्व स्त्रियांचें ऐश्वर्य आपणांला पहावयास सांपडेल" ३५. ह्याप्रमाणें तारेनें अनुज्ञा दिली असतां सर्वही वानरस्त्रिया अलंकार वगैरे घालून आणि विमानाला प्रदक्षिणा करून सीतेचें दर्शन होईल ह्या हेतूनें त्यावर आरूढ झाल्या. तदनंतर त्या स्त्रियांसहवर्तमान सत्वर उडालेलें विमान अवलोकन करून राम ३६, ३७ ऋष्यमूकपर्वतासमीप पुनरपि सीतेला ह्मणाला "हे सीते, विद्युल्लतेसहवर्तमान मेघच कीं काय असा हा सुवर्णमिश्र धातूंनीं भरलेला ऋष्यमूकसंज्ञक मोठा श्रेष्ठ पर्वत दिसूं लागला आहे. ह्या ठिकाणीं वानरराज सुग्रीव मला भेटला ३८, ३९. हे सीते, ह्या ठिकाणीं वालीच्या वधाविषयीं मीं प्रतिज्ञा केली. मनोहर वनांनीं युक्त असलेलें हें तें पंपानामक सरोवर दृष्टीं पडूं लागलें ४०. तुझा वियोग झाल्यामुळें अत्यंत दुःखित होऊन मी येथें विलाप करीत बसलों होतों. ह्याच सरोवराच्या तीरीं ती धर्मचारिणी शबरी माझ्या दृष्टीं पडली ४१ ह्या ठिकाणीं योजनपरिमित दीर्घ बाहूंनीं युक्त असलेल्या कबंधाचा मीं वध केला. हे सीते, जनस्थानामध्यें तो हा भव्य वटवृक्ष दिसूं लागला आहे ४२. हे विलासिनि, तुझ्याकरितां पक्षिश्रेष्ठ, महातेजस्वी व बलाढ्य जटायु ह्या ठिकाणीं रावणाच्या हातून वध पावला ४३. हे वरवर्णिनि, हा तो आमचा आश्रम व त्याचप्रमाणें

हृता बलात्। एषा गोदावरी रम्या प्रसन्नसलिला शुभा ४५ अगस्त्यस्याश्रमश्चैव दृश्यते कदलीवृतः। दृश्यते चैव वैदेहि शरभङ्गाश्रमो महान्४६ उपयातः सहस्राक्षो यत्र शक्रः पुरन्दरः। एते ते तापसा दृवि दृश्यन्ते तनुमध्यमे ४७ अत्रिः कुलपतिर्यत्र सूर्यवैश्वानरोपमः। अस्मिन्देशे महाकायो विराधो निहतो मया ४८ अत्र सीते त्वया दृष्टा तापसी धर्मचारिणी। असौ सुतनु शैलेन्द्रश्चित्रकूटः प्रकाशते ४९ अत्र मां कैकयीपुत्रः प्रसादयितुमागतः। एषा सा यमुना रम्या दृश्यते चित्रकानना ५० भरद्वाजाश्रमः श्रीमान्दृश्यते चैष मैथिलि। इयं च दृश्यते गङ्गा पुण्या त्रिपथगा नदी ५१ शृङ्गवेरपुरं चैतद्गुहो यत्र सखा मम। एषा सा दृश्यते सीते राजधानी पितुर्मम ५२ अयोध्यां कुरु वैदेहि प्रणामं पुनरागता ५३ ततस्ते वानराः सर्वे राक्षसाः सविभीषणाः। उत्पत्योत्पत्य संहृष्टास्तां पुरीं ददृशुस्तदा ५४ ततस्तु तां पाण्डुरहर्म्यमालिनीं विशालकक्ष्यां गजवाजिभिर्वृताम्। पुरीमपश्यन्प्लवगाः सराक्षसाः पुरीं महेन्द्रस्य यथामराव-

---

हे शुभदर्शने, मनोहर पर्णकुटिका दिसूं लागली आहे ४४. येथून राक्षसाधिपति रावण बलात्कारानें तुला घेऊन गेला. निर्मल उदकानें युक्त, शुभ व रम्य अशी ही गोदावरी ४५ व कदलींनीं भरलेला हा अगस्त्यमुनींचा आश्रमही दिसूं लागला; आणि, हे वैदेहि, शरभंगमुनींचा प्रचंड आश्रमही दिसत आहे ४६. येथें सहस्रनयन पुरंदर इंद्र आला होता. हे दृवि, कृशोदरि, ते हे तपस्वी दिसत आहेत ४७. सूर्य व अग्नि ह्यांची ज्यांना उपमा आहे असे कुलपति अत्रिमुनि ह्याच ठिकाणीं वास्तव्य करीत असतात. ह्या देशामध्यें प्रचंड शरीर धारण करणाऱ्या विराधाचा मीं वध केला ४८ हे सीते, येथें धर्मचारिणी तापसी( अत्रिपत्नी )शीं तुझी भेट झाली. हे सुंदरि, हा पर्वतराज चित्रकूट प्रकाशत आहे ४९. कैकेयीपुत्र भरत ह्या ठिकाणीं माझें मन वळविण्याकरितां आला होता. मनोहर वनांनीं युक्त असलेली ही ती रमणीय यमुना दृष्टीं पडत आहे ५० हे मैथिलि, भरद्वाजमुनींचा हा भव्य आश्रम दिसत आहे आणि तीन मार्गांनीं गमन करणारी ही पुण्यनदी गंगाही दिसत आहे ५१. हें तें शृंगवेरपुर. येथेंच तो माझा सखा गुह आहे. हे सीते, ती ही माझ्या पित्याची राजधानी दृष्टीं पडूं लागली ५२. हे वैदेहि, तूं परत आली आहेस; ह्यास्तव, अयोध्येला प्रणाम कर" ५३. इतकें रामानें सांगितल्यानंतर ते सर्वही वानर आणि बिभीषणासहवर्तमान सर्वही राक्षस आनंदित झाले आणि सर्वही पुन्हां पुन्हां उडून उडून ती नगरी पाहूं लागले ५४. नंतर श्वेतवर्ण गृहसमुदाय आणि रुंद रुंद रस्ते ह्यांनीं युक्त असलेली, गज आणि अश्व ह्यांनीं गजबजून

तीम् ५५ [५४८४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे त्रयोविंशाधिकशततमः सर्गः ॥ १२३ ॥

पूर्णे चतुर्दशे वर्षे पञ्चम्यां लक्ष्मणाग्रजः । भरद्वाजाश्रमं प्राप्य ववन्दे नियतो मुनिम् १ सोऽपृच्छदभिवाद्यैनं भरद्वाजं तपोधनम् । शृणोषि कच्चिद्भगवन्सुभिक्षानामयं पुरे । कच्चित्स युक्तो भरतो जीवन्त्यपि च मातरः २ एवमुक्तस्तु रामेण भरद्वाजो महामुनिः । प्रत्युवाच रघुश्रेष्ठं स्मितपूर्वं प्रहृष्टवत् ३ आज्ञावशत्वे भरतो जटिलस्त्वां प्रतीक्षते । पादुके ते पुरस्कृत्य सर्वं च कुशलं गृहे ४ त्वां पुरा चीरवसनं प्रविशन्तं महावनम् । स्त्रीतृतीयं च्युतं राज्याद्धर्मकामं च केवलम् ५ पदातिं त्यक्तसर्वस्वं पितुर्निर्देशकारिणम् । सर्वभोगैः परित्यक्तं स्वर्गच्युतमिवामरम् ६ दृष्ट्वा तु करुणा पूर्वं ममासीत्समितिंजय । कैकेयीवचने युक्तं वन्यमूलफलाशिनम् ७ सांप्रतं तु समृद्धार्थं समित्रगणबान्धवम् । समीक्ष्य विजितारिं च

गेलेली आणि इंद्राच्या अमरावतीनगरीप्रमाणें असलेली ती अयोध्यानगरी त्यांनीं अवलोकन केली ५५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें तेविसावा सर्ग समाप्त झाला ॥ १२३ ॥

पंचमीचे दिवशीं चवदावें वर्ष पूर्ण झालें असतां लक्ष्मणाचे पूर्वीं झालेल्या जितेंद्रिय रामानें भरद्वाज मुनींच्या आश्रमाला आल्यावर त्या मुनींना वंदन केलें १ आणि तपोधन भरद्वाज मुनींना अभिवंदन केल्यानंतर त्यानें त्यांना प्रश्न केला "हे भगवन्, नगरामध्यें सुभिक्ष व आरोग्य असल्याचें आपल्या कानावर येत असतें ना ? तो भरत प्रजापालनाविषयीं दक्ष आहे नां ? आणि माता जिवंत आहेत नां ? "२. ह्याप्रमाणें रामानें भरद्वाजमहर्षींना विचारिलें असतां किंचित् हास्य करून आनंदानें ते त्या रघुवंशजश्रेष्ठ रामाला ह्मणाले ३ "तुझ्या पादुका पुढें करून तुझ्या आज्ञेप्रमाणें वागणारा जटाधारी भरत तुझी मार्गप्रतीक्षा करीत बसला आहे आणि घराकडे सर्व कांहीं ठीक चाललें आहे. ४. पूर्वीं तुला अवलोकन करून मला खेद उत्पन्न झाला होता; कारण त्या वेळीं वल्कलें धारण करून तूं महावनामध्यें जात होतास; सीता स्त्री धरूनही तुह्मी तिघेच होतां; केवळ धर्मबुद्धि मनामध्यें आणून तूं राज्यापासून भ्रष्ट झाला होतास; सर्व स्वाचा त्याग करून व पादचारी बनून बापाच्या आज्ञेप्रमाणें तूं वागण्यास तयार झाला होतास; सर्व भोगांना परित्याग केल्यामुळें स्वर्गभ्रष्ट देवच कीं काय असा तूं दिसत होता आणि कैकेयीच्या वचनाला अनुसरून तूं वनांतील फलमूलांवरच उपजीविका करीत होतास; परंतु, हे संग्रामविजयी रामा ५,६,७, सांप्रत शत्रु जिंकून मित्रगण व बांध

ममाभूत्प्रीतिरुत्तमा ८ सर्वं च सुखदुःखं ते विदितं मम राघव । यत्त्वया विपुलं प्राप्तं जनस्थाननिवासिना ९ ब्राह्मणार्थे नियुक्तस्य रक्षतः सर्वतापसान् । रावणेन हृता भार्या बभूवेयमनिन्दिता १० मारीचदर्शनं चैव सीतोन्मथनमेव च । कबन्धदर्शनं चैव पम्पाभिगमनं तथा ११ सुग्रीवेण च ते सख्यं यत्र वाली हतस्त्वया । मार्गणं चैव वैदेह्याः कर्म वातात्मजस्य च १२ विदितायां च वैदेह्यां नलसेतुर्यथा कृतः । यथा चादीपिता लङ्का प्रहृष्टैर्हरियूथपैः १३ सपुत्रबान्धवामात्यः सबलः सहवाहनः । यथा च निहतः संख्ये रावणो बलदर्पितः १४ यथा च निहते तस्मिन्रावणे देवकण्टके । समागमश्च त्रिदशैर्यथा दत्तश्च ते वरः १५ सर्वं ममैतद्विदितं तपसा धर्मवत्सल । संपतन्ति च मे शिष्याः प्रवृत्त्याख्याः पुरीमितः १६ अहमप्यत्र ते दद्मि वरं शस्त्रभृतां वर । अर्घ्यं प्रतिगृहाणेदमयोध्यां श्वो गमिष्यसि १७ तस्य तच्छिरसा वाक्यं प्रतिगृह्य नृपात्मजः । बाढमित्येव संहृष्टः श्रीमान्वरमयाचत १८ अकालफलिनो वृक्षाः

---

ह्यांसहवर्तमान कृतकृत्य झालेल्या तुला अवलोकन करून मला उत्कृष्ट आनंद प्राप्त झाला आहे ८. हे राघवा, तुला प्राप्त झालेलें सर्व कांहीं सुखदुःख मला विदित आहे. सारांश, जनस्थानामध्यें वास्तव्य करीत असतांना तुला जें अपरिमित दुःख प्राप्त झालें तें मला विदित आहे ९. ब्राह्मणांच्या रक्षणाविषयीं तत्पर होऊन तूं सर्व तापसांचें रक्षण करीत असतांना ही तुझी निर्दोष भार्या रावणानें हरण करून नेली होती १०. मारीचदर्शन, सीतेचे क्लेश, कबंधाची गांठ, पंपासरोवरीं गमन ११, सुग्रीवाशीं तुझें सख्य व तेथें तुझ्या हातून वालीचा वध, सीतेचा शोध आणि वायुपुत्र हनुमानाचें कर्म हें सर्व मला विदित आहे १२. सीतेची बातमी लागल्यावर नलसेतु कसा तयार केला ? आनंदित झालेल्या वानरसेनाधिपतींनीं लंकेची होळी कशी केली ? १३; सामर्थ्यामुळें गर्विष्ठ झालेल्या रावणाचा, पुत्र, बांधव, अमात्य, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान संग्रामामध्यें वध कसा झाला ? १४; त्या देवकंटक रावणाचा वध झाल्यावर देवांशीं तुझा समागम कसा झाला ? आणि त्यांच्यापासून तुला वर कसा प्राप्त झाला ? १५ हें सर्व, हे धर्मवत्सला रामा, तपश्चर्येमुळें मला समजून चुकलें आहे. शिवाय, लोकवार्ता सांगणारे माझे शिष्यही येथून अयोध्यानगरीला जात असतात १६. हे शस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ रामा, मीही ह्या ठिकाणीं तुला एक वर देतों; परंतु, प्रथमतः ह्या माझ्या सन्मानाचा तूं स्वीकार कर आणि अयोध्येला उद्यां जा " १७. हें त्या मुनींचें भाषण शिरसा मान्य करून आणि 'ठीक आहे' असें म्हणून आनंदित झालेल्या

सर्वे चापि मधुस्रवाः । फलान्यमृतगन्धीनि बहूनि विविधानि च १९
भवन्तु मार्गे भगवन्नयोध्यां प्रति गच्छतः । तथेति च प्रतिज्ञाते वचना-
त्समनन्तरम् २० अभवन्पादपास्तत्र स्वर्गपादपसंनिभाः । निष्फलाः फलि-
नश्चासन्विपुष्पाः पुष्पशालिनः २१ शुष्काः समग्रपत्रास्ते नगाश्चैव मधु-
स्रवाः । सर्वतो योजनास्तिस्रो गच्छतामभवंस्तदा २२ ततः प्रहृष्टाः प्लव-
गर्षभास्ते बहूनि दिव्यानि फलानि चैव । कामादुपाश्नन्ति सहस्रशस्ते
मुदान्विताः स्वर्गजितो मुदेव २३ [५५०७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे चतुर्विंशाधिकशततमः सर्गः ॥१२४॥

अयोध्यां तु समालोक्य चिन्तयामास राघवः । प्रियकामः प्रियं राम-
स्ततस्त्वरितविक्रमः १ चिन्तयित्वा ततो दृष्टिं वानरेषु न्यपातयत् ।
उवाच धीमांस्तेजस्वी हनूमन्तं प्लवङ्गमम् २ अयोध्यां त्वरितो गत्वा
शीघ्रं प्लवगसत्तम । जानीहि कच्चित्कुशली जनो नृपतिमन्दिरे ३ शृङ्गवेरपुरं
प्राप्य गुहं गहनगोचरम् । निषादाधिपतिं ब्रूहि कुशलं वचनान्मम ४

---

श्रीमान् राजकुमार रामानें वर मागितला १८. (तो ह्मणाला) "हे भगवन्, अयो-ध्येला जातांना माझ्या मार्गामध्यें सर्वही वृक्ष समय नसतांनाही फलयुक्त होवोत. सर्वांपासून मधाचा स्राव सुरू होवो आणि अमृतासारिख्या स्वादानें युक्त असलेलीं नानाप्रकारचीं असंख्य फलें तेथें होवोत". ह्यावर "ठीक आहे" असें त्या मुनींनीं सांगतांक्षणीं १९, २० स्वर्गांतील वृक्षासारिखे वृक्ष तेथें झाले. जे फलरहित होते ते फलयुक्त झाले; पुष्पशून्य होते ते पुष्पांनीं भरून गेले २१; शुष्क होते ते संपूर्ण पानांनीं युक्त झाले; मधाचा स्राव त्यांतून होऊं लागला आणि असा प्रकार ते मार्गानें जाऊं लागले असतां तीन योजनेंपर्यंत सर्व बाजूंनीं झाला २२. तदनंतर स्वर्ग प्राप्त झालेल्या पुरुषाप्रमाणें आनंदित व हर्षयुक्त झालेले ते हजारों वानरश्रेष्ठ आनंदानें असंख्य दिव्य फलें यथेष्ट भक्षण करूं लागले २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ १२३ ॥

सुग्रीवादिकांना प्रिय असलेली गोष्ट करण्याची ज्याला इच्छा आहे आणि गम-नाची ज्यानें त्वरा केलेली आहे असा तो राम अयोध्येकडे पाहून आपण काय केलें असतां तेथील लोकांना बरें वाटेल ह्याचा विचार करूं लागला १ आणि विचार केल्यानंतर वानरांकडे दृष्टि फेंकून तो बुद्धिमान् व तेजस्वी राम हनुमान् वानराला ह्मणाला २ "हे वानरश्रेष्ठा, विलंब न करितां अयोध्येमध्यें सत्वर जा आणि राजवा-

श्रुत्वा तु मां कुशलिनमरोगं विगतज्वरम् । भविष्यति गुहः प्रीतः स ममात्मसमः सखा ५ अयोध्यायाश्च ते मार्गं प्रवृत्तिं भरतस्य च । निवेदयिष्यति प्रीतो निषादाधिपतिर्गुहः ६ भरतस्तु त्वया वाच्यः कुशलं वचनान्मम । सिद्धार्थं शंस मां तस्मै सभार्यं सहलक्ष्मणम् ७ हरणं चापि वैदेह्या रावणेन बलीयसा । सुग्रीवेण च संवादं वालिनश्च वधं रणे ८ मैथिल्यन्वेषणं चैव यथा चाधिगता त्वया । लङ्घयित्वा महातोयमापगापतिमव्ययम् ९ उपयानं समुद्रस्य सागरस्य च दर्शनम् । यथा च कारितः सेतू रावणश्च यथा हतः १० वरदानं महेन्द्रेण ब्रह्मणा वरुणेन च । महादेवप्रसादाच्च पित्रा मम समागमम् ११ उपयातं च मां सौम्य भरताय निवेदय । सह राक्षसराजेन हरीणामीश्वरेण च १२ जित्वा शत्रुगणान्रामः प्राप्य चानुत्तमं यशः । उपयाति समृद्धार्थः सह मित्रैर्महाबलैः १३ एतच्छ्रुत्वा यमाकारं भजते भरतस्ततः । स च ते वेदितव्यः स्यात्सर्वं यच्चापि मां प्रति १४ ज्ञेयाः सर्वे च वृत्तान्ता भरतस्येङ्गितानि च । तत्त्वेन

---

ड्यामध्यें लोक कुशल आहेतनां हें समजून घे ३. शृंगवेरपुराला जाऊन अरण्यामध्यें संचार करणाऱ्या निषादाधिपति गुहाला माझ्या सांगण्यावरून तूं कुशल वृत्तांत कळीव ४. मी कुशल, आरोग्यसंपन्न व निश्चिंत आहे असें ऐकून तो माझा आत्मतुल्य सखा गुह सुतुष्ट होईल ५ आणि तो निषादाधिपति गुह संतुष्ट झाला असतां तुला अयोध्येचा मार्ग व भरताची हकीकत निवेदन करील ६. माझ्या आज्ञेनें भरताला तूं कुशल सांग आणि भार्या व लक्ष्मण ह्यांसहवर्तमान मी कृतकृत्य झाल्याचें त्याला कळीव ७. बलाढ्य रावणानें केलेलें सीताहरण, सुग्रीवाशीं झालेला संवाद, संग्रामामध्यें वालीचा वध ८ आणि सीतेचा शोध लावणें हें तूं भरताला निवेदन कर. अगाध उदकानें युक्त असलेल्या अक्षय्य सागराचें उल्लंघन करून सीतेचा शोध तूं कसा लाविलास ९; आमच्याबरोबर तूं पुनरपि समुद्राचें संनिध कसा आलास; समुद्रानें प्रत्यक्ष दर्शन कसें दिलें; सेतु कसा करविला; रावणाचा वध कसा केला १०; इंद्र, ब्रह्मा व वरुण ह्यांनीं काय वरदान दिलें आणि महादेवाच्या प्रसादानें पित्याशीं माझा समागम कसा झाला हें कळवून ११, हे सौम्या, मी जवळ आल्याचेंही तूं भरताला निवेदन कर. राक्षसराज बिभीषण आणि वानराधिपति सुग्रीव ह्यांसहवर्तमान १२ राम शत्रुगणांना जिंकून, अनुपम कीर्ति संपादन करून व कृतकृत्य होऊन महाबलाढ्य मित्रांबरोबर समीप येत आहे असें तूं भरताला कथन कर १३; आणि, हें ऐकिल्यानंतर भरताची मुद्रा कशी काय होते व माझ्यासंबंधानें तो काय काय, तजवीजी करितो तें सर्व तूं समजून ठेव १४.

मुखवर्णेन दृष्ट्या व्याभाषितेन च १५ सर्वकामसमृद्धं हि हस्त्यश्वरथसंकुलम् । पितृपैतामहं राज्यं कस्य नावर्तयेन्मनः १६ संगत्या भरतः श्रीमान्राज्येनार्थी स्वयं भवेत् । प्रशास्तु वसुधां सर्वामखिलां रघुनन्दनः १७ तस्य बुद्धिं च विज्ञाय व्यवसायं च वानर । यावन्न दूरं याताः स्मः क्षिप्रमागन्तुमर्हसि १८ इति प्रतिसमादिष्टो हनूमान्मारुतात्मजः । मानुषं धारयन्रूपमयोध्यां त्वरितो ययौ १९ अथोत्पपात वेगेन हनूमान्मारुतात्मजः । गरुत्मानिव वेगेन जिघृक्षन्भुजगोत्तमम् २० लङ्घयित्वा पितृपथं विहगेन्द्रालयं शुभम् । गङ्गायमुनयोर्भीमं समतीत्य समागमम् २१ शृङ्गवेरपुरं प्राप्य गुहमासाद्य वीर्यवान् । स वाचा शुभया हृष्टो हनूमानिदमब्रवीत् २२ सखा तु तव काकुत्स्थो रामः सत्यपराक्रमः । ससीतः सहसौमित्रिः स त्वां कुशलमब्रवीत् २३ पञ्चमीमद्य रजनीमुषित्वा वचनान्मुनेः । भरद्वाजाभ्यनुज्ञातं द्रक्ष्यस्यत्रैव राघवम् २४ एवमुक्त्वा महा-

---

सारांश, भरताच्या मुखावरील कांति, त्याची दृष्टि आणि भाषणाचा रोंख ह्यांवरून सर्व वृत्तांत व भरताच्या हालचाली तूं समजून घे १५. कारण, सर्व भोग्य वस्तूंनीं परिपूर्ण आणि गज, अश्व व रथ ह्यांनीं गजबजलेलें व वाडवडिलांपासून चालत आलेलें राज्य कोणाचें बरें मन लुब्ध करणार नाहीं १६. *संगतीमुळें श्रीमान् भरताला कदाचित् स्वतःही राज्य करण्याची इच्छा झाली असेल तर सर्व पृथ्वीचें परिपालन त्या रघुनंदनालाच करूं दे १७. तात्पर्य, हे वानरा, त्याच्या मनाचा कल कसा आहे आणि तो काय उद्योग करीत आहे हें जाणून आम्ही अयोध्यसमीप गेलों नाहीं तोंच तूं सत्वर परत ये" १८. ह्याप्रमाणें वायुपुत्र हनुमानाला रामानें सांगितलें असतां सत्वर मनुष्यरूप धारण करून तो अयोध्येमध्यें गेला १९. रामाची आज्ञा झाल्यानंतर महाभुजंग ग्रहण करण्याकरितां ज्याप्रमाणें गरुड वेगानें उड्डाण करितो त्याप्रमाणें वायुपुत्र हनुमानानें वेगानें उड्डाण केलें २०. नंतर श्रेष्ठ पक्ष्यांच्या संचाराचें स्थान जें शुभ अंतरिक्ष त्यांतून उड्डाण करून, गंगायमुनांचा भयंकर संगमही ओलांडून २१ आणि शृंगवेरपुराप्रत जाऊन गुहाची गांठ घेतल्यानंतर तो वीर्यवान् हनुमान् आनंदित झाला आणि शुभ वाणीनें त्याला म्हणाला २२ "सत्यपराक्रमी ककुत्स्थकुलोत्पन्न राम जो तुझा सखा त्याच्या बरोबर सीता व लक्ष्मण हे आहेत व त्यानें तुला कुशल कळविलें आहे २३. आजची पंचमीची रात्र भरद्वाजमुनींच्या आज्ञेप्रमाणें त्या आश्रमांत

---

* पुष्कळ दिवस राज्यकारभार केल्यामुळें अथवा कैकेयीच्या संगतीमुळें ह्या दोहोंपैकीं कोणताही एक अर्थ येथें संभवनीय आहे.

तेजाः संप्रहृष्टतनूरुहः । उत्पपात महावेगाद्वेगवानविचारयन् २५ सोऽप-
श्यद्रामतीर्थं च नदीं वालुकिनीं तथा । वरूथीं गोमतीं चैव भीमं शाल-
वनं तथा २६ प्रजाश्च बहुसाहस्रीः स्फीताञ्जनपदानपि । स गत्वा दूर-
मध्वानं त्वरितः कपिकुञ्जरः २७ आससाद द्रुमान्फुल्लान्नन्दिग्रामसमी-
पगान् । सुराधिपस्योपवने यथा चैत्ररथे द्रुमान् २८ स्त्रीभिः सपुत्रैः
पौत्रैश्च रममाणैः स्वलंकृतैः । क्रोशमात्रे त्वयोध्यायाश्चीरकृष्णाजिना-
म्बरम् २९ ददर्श भरतं दीनं कृशमाश्रमवासिनम् । जटिलं मलदिग्धाङ्गं
भ्रातृव्यसनकर्शितम् ३० फलमूलाशिनं दान्तं तापसं धर्मचारिणम् ।
समुन्नतजटाभारं वल्कलाजिनवाससम् ३१ नियतं भावितात्मानं ब्रह्मर्षि-
समतेजसम् । पादुके ते पुरस्कृत्य प्रशासन्तं वसुंधराम् ३२ चातुर्वर्ण्यस्य
लोकस्य त्रातारं सर्वतो भयात् । उपस्थितममात्यैश्च शुचिभिश्च पुरो-
हितैः ३३ बलमुख्यैश्च युक्तैश्च काषायाम्बरधारिभिः ३४ न हि ते राजपुत्रं

---

काढून त्यांनीं जाण्याची अनुज्ञा दिल्यानंतर उद्यां येथेंच तूं रामाला अवलोकन कर-
शील " २४. ह्याप्रमाणें त्याला सांगितल्यानंतर त्या महातेजस्वी हनुमानाच्या शरी-
रावर रोमांच उठले आणि मार्गसंबंधी श्रमाची पर्वा न करितां त्या वेगवान् हनुमानानें
मोठ्या वेगानें तेथून उड्डाण केलें २५. जातां जातां परशुरामतीर्थ, वालुकिनी नदी, वरूथी,
गोमती, भयंकर शालवन २६, हजारों लोक आणि समृद्ध देश त्यानें अवलोकन
केले. बराच मार्ग आक्रमण केल्यानंतर तो शीघ्रगामी वानरश्रेष्ठ २७ इंद्राच्या चैत्र-
रथवनांतील वृक्षांप्रमाणें नंदिग्रामाचे संनिध असलेल्या प्रफुल्लित वृक्षांचे समीप येऊन
पोंहोंचला २८ तों उत्कृष्ट अलंकार धारण करून क्रीडा करीत असलेले पुत्र व पौत्र
ह्यांसहवर्तमान स्त्रिया त्या वृक्षांचीं पुष्पें तोडीत आहेत असें त्याच्या दृष्टीं पडलें आणि
अयोध्येपासून सुमारें एका कोसावर वल्कलें व कृष्णाजिनें परिधान करून २९ राहि-
लेला आश्रमवासी, दीन व कृश भरतही त्यानें अवलोकन केला. त्यानें जटा धारण
केल्या होत्या; त्याचें शरीर मळानें भरलें होतें; भ्रात्यावर संकट आल्यामुळें तो थकला
होता ३०; फलमूलांवर तो उपजीविका करीत होता; जितेंद्रिय राहून तो धर्मनिष्ठ
भरत तपस्व्यांप्रमाणें वागत होता; मस्तकावर पुष्कळच उंच असलेल्या जटांचा भार
त्यानें धारण केला होता; वल्कलें व अजिनें ह्यांच वस्त्रांचा त्यानें स्वीकार केला होता ३१;
शुचि राहून परमात्म्याचें ध्यान करीत असल्यामुळें ब्रह्मर्षीसारखें त्याचें तेज होतें; त्या
पादुका पुढें करून तो पृथ्वीचें परिपालन करीत होता ३२; वर्णचतुष्टयरूप प्रजाज-
नांचें तो सर्व भयापासून रक्षण करीत होता; सदाचरणसंपन्न अमात्य व पुरोहित

तं चीरकृष्णाजिनाम्बरम् । परिमोक्तुं व्यवस्यन्ति पौरा वै धर्मवत्सलाः ३५
तं धर्ममिव धर्मज्ञं देहबन्धमिवापरम् । उवाच प्राञ्जलिर्वाक्यं हनूमान्मा-
रुतात्मजः ३६ वसन्तं दण्डकारण्ये यं त्वं चीरजटाधरम् । अनुशोचसि
काकुत्स्थं स त्वां कौशलमब्रवीत् ३७ प्रियमाख्यामि ते देव शोकं त्यज
सुदारुणम् । अस्मिन्मुहूर्ते भ्रात्रा त्वं रामेण सह संगतः ३८ निहत्य रावणं
रामः प्रतिलभ्य च मैथिलीम् । उपयाति समृद्धार्थः सह मित्रैर्महाबलैः ३९
लक्ष्मणश्च महातेजा वैदेही च यशस्विनी । सीता समग्रा रामेण महे-
न्द्रेण शची यथा ४० एवमुक्तो हनुमता भरतः कैकयीसुतः । पपात सहसा
हृष्टो हर्षान्मोहमुपागमत् ४१ ततो मुहूर्तादुत्थाय प्रत्याश्वस्य च राघवः ।
हनूमन्तमुवाचेदं भरतः प्रियवादिनम् ४२ अशोकजैः प्रीतिमयैः कपि-
मालिङ्ग्य संभ्रमात् । सिषेच भरतः श्रीमान्विपुलैरश्रुबिन्दुभिः ४३
देवो वा मानुषो वा त्वमनुक्रोशादिहागतः । प्रियाख्यानस्य ते सौम्य

---

त्याच्यासमीप होते ३३; आणि काषायवस्त्र परिधान केलेले व जितेंद्रिय राहिलेले सेनाधिपतिही त्याच्याजवळ होते ३४. कारण, वल्कलें व कृष्णाजिनें हींच ज्याचीं वस्त्रें आहेत अशा त्या राजपुत्राचा त्याग करण्याचें ते धर्मनिष्ठ नागरिक मनामध्येंही आणीत नसत ३५. असो. मनुष्यदेहाचा संबंध घडलेला प्रत्यक्ष धर्मच कीं काय अशा त्या धर्मवेत्त्या भरताला हात जोडून वायुपुत्र हनुमान् ह्मणाला "वल्कलें व जटा धारण करून ३६ दंडकारण्यामध्यें वास्तव्य करणाऱ्या ज्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाविषयीं तूं शोक करीत आहेस त्यानें तुला खुशाल असल्याचें सांगितलें आहे ३७. हे राजा, ह्या अतिभयंकर शोकाचा तूं त्याग कर. आतां अगदीं लवकरच भ्रात्या रामाशीं तुझा समागम होईल ३८. रावणाचा वध करून आणि सीतेचा पुनरपि लाभ करून घेऊन मनोरथ परिपूर्ण झालेला राम महाबलाढ्य भ्रात्यासहवर्तमान इकडेच येत आहे ३९. त्याचप्रमाणें महातेजस्वी लक्ष्मण व यशस्विनी वैदेही इकडेच येत असून इंद्रासहवर्तमान असलेल्या शचीप्रमाणें सीता रामासहवर्तमान इकडे येत आहे" ४०. ह्याप्रमाणें हनुमानानें सांगितलें असतां कैकेयीपुत्र भरत एकाएकीं आनंदित झाला ४१ आणि हर्षानें त्याची मुरकुंडी वळून जाऊन त्याला कांहींएक सुचेनासें झालें. तदनंतर कांहीं वेळानें उठून स्वस्थ झाल्यावर तो रघुवंशज भरत प्रिय भाषण करणाऱ्या हनुमानाशीं भाषण करूं लागला ४२. सौरांश, घाईघाईनें हनुमानाला आलिंगन देऊन शोकाचा ज्यांत संबंध नाहीं अशा आनंदमय असंख्य अश्रुबिंदूंनीं त्या वैभवशाली भरतानें त्याला स्नान घातलें ४३ ( आणि तो त्याल

ददामि ब्रुवतः प्रियम् ४४ गवां शतसहस्रं च ग्रामाणां च शतं परम् । सकुण्डलाः शुभाचारा भार्याः कन्यास्तु षोडश ४५ हेमवर्णाः सुनासोरूः शशिसौम्याननाः स्त्रियः । सर्वाभरणसंपन्नाः संपन्नाः कुलजातिभिः ४६ निशम्य रामागमनं नृपात्मजः कपिप्रवीरस्य तदाद्भुतोपमम् । प्रहर्षितो रामदिदृक्षयाभवत्पुनश्च हर्षादिदमब्रवीद्वचः ४७ [५५५४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे पञ्चविंशाधिकशततमः सर्गः ॥१२५॥

बहूनि नाम वर्षाणि गतस्य सुमहद्वनम् । शृणोम्यहं प्रीतिकरं मम नाथस्य कीर्तनम् १ कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति माम् । एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि २ राघवस्य हरीणां च कथमासीत्समागमः । कस्मिन्देशे किमाश्रित्य तत्त्वमाख्याहि पृच्छतः ३ स पृष्टो राजपुत्रेण बृस्यां समुपवेशितः । आचचक्षे ततः सर्वं रामस्य चरितं वने ४ यथा प्रव्राजितो रामो मातुर्दत्तौ वरौ तव । यथा च पुत्रशोकेन राजा

---

ह्मणाला ) " कृपेमुळें येथें आलेला तूं देव आहेस किंवा मनुष्य आहेस ( हें मला कांहीं कळत नाहीं ); तथापि, हे सौम्य, प्रिय वृत्तांत कथन करणाऱ्या तुला मी काय बरें प्रिय वस्तु अर्पण करूं ? ४४. एक लक्ष गाई, शंभर उत्कृष्ट गांव आणि कुंडलें व सर्व भूषणें ह्यांनीं युक्त असलेल्या, कुलीन, जातिवंत व शुभ आचरण, उत्कृष्ट नासिका व मांड्या, चंद्राप्रमाणें सौम्य मुख व सुवर्णतुल्य कंठ ह्यांनीं संपन्न असलेल्या सोळा कन्या भार्या ह्मणून मी तुला अर्पण करितों" ४५,४६ असो. वानरश्रेष्ठाच्या मुखांतून रामाचें अद्भुततुल्य आगमन श्रवण करितांक्षणीं भरताला रामदर्शनाची इच्छा उत्पन्न होऊन आनंद झाला आणि हर्षानें तो असें बोलूं लागला ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥ १२५ ॥

" प्रचंड वनामध्यें माझ्या नाथाला जाऊन बहुत वर्षें झालीं आहेत; परंतु, त्याची आनंदकारक वार्ता आज माझ्या कानावर येत आहे १. " मनुष्य हयात राहिल्यास शंभर वर्षांनीं तरी त्याला आनंदाचे दिवस प्राप्त होतात " ही लोकांमध्यें असलेली ह्मण खरोखर मला आज सत्य भासत आहे २. असो. रघुवंशज राम आणि वानर ह्यांचा समागम कसा झाला, कोणत्या देशामध्यें झाला आणि काय कारणामुळें झाला हें तूं मज विचारणाऱ्याला खरें खरें सांग " ३. ह्याप्रमाणें हनुमानाला आसनावर बसवून राजपुत्र भरतानें प्रश्न केला असतां रामाचें वनांतील सर्व चरित्र त्यानें त्याला कथन केलें ४. ( तो ह्मणाला ) "रामाला वनवासांत कसें पाठविलें, तुझ्या मातेला दोन वर

दशरथो मृतः ५ यथा दूतैस्त्वमानीतस्तूर्णं राजगृहात्प्रभो । त्वयायोध्यां प्रविष्टेन यथा राज्यं न चेप्सितम् ६ चित्रकूटगिरिं गत्वा राज्येनामित्रकर्शनः । निमन्त्रितस्त्वया भ्राता धर्ममाचरता सताम् ७ स्थितेन राज्ञो वचने यथा राज्यं विसर्जितम् । आर्यस्य पादुके गृह्य यथासि पुनरागतः ८ सर्वमेतन्महाबाहो यथावद्विदितं तव । त्वयि प्रतिप्रयाते तु यद्वृत्तं तन्निबोध मे ९ अपयाते त्वयि तदा समुद्भ्रान्तमृगद्विजम् । परिद्यूनमिवात्यर्थं तद्वनं समपद्यत १० तद्धस्तिमृदितं घोरं सिंहव्याघ्रमृगाकुलम् । प्रविवेशाथ विजनं स महद्दण्डकावनम् ११ तेषां पुरस्ताद्बलवान्गच्छतां गहने वने । विनदन्सुमहानादं विराधः प्रत्यदृश्यत १२ तमुत्क्षिप्य महानादमूर्ध्वबाहुमधोमुखम् । निखाते प्रक्षिपन्ति स्म नदन्तमिव कुञ्जरम् १३ तत्कृत्वा दुष्करं कर्म भ्रातरौ रामलक्ष्मणौ । सायाह्ने शरभङ्गस्य रम्यमाश्रममीयतुः १४ शरभङ्गे दिवं प्राप्ते रामः सत्यपराक्रमः । अभिवाद्य मुनीन्सर्वाञ्जनस्थानमुपागमत् १५ चतुर्दश सहस्राणि जनस्थाननिवासिनाम् । हतानि वसता

---

दशरथानें कसें दिलें, दशरथराजा पुत्रशोकानें कसा मृत्यु पावला ५, हे प्रभो, दूतांनीं तुला राजगृहांतून सत्वर कसें आणिलें, अयोध्येमध्यें प्रवेश केल्यानंतर राज्याची इच्छा तुला कशी झाली नाहीं ६, चित्रकूटपर्वतावर जाऊन सद्धर्मानें वागणाऱ्या तूं राज्य स्वीकारण्याविषयीं शत्रुनाशक भ्रात्या रामाची प्रार्थना कशी केलीस ७, राजाच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या रामानें राज्याचा त्याग कसा केला आणि आर्य रामाच्या पादुका घेऊन तूं परत कसा आलास ८ हें सर्व तुझें (व रामाचें) वृत्त, हे महापराक्रमी भरता, मला इत्थंभूत विदित आहे. आतां तूं परत आल्यावर जो वृत्तांत घडला तो तूं श्रवण कर ९ तूं दूर गेल्यानंतर रामाला अतिशय दाट असें एक वन लागलें. त्या वनांतील मृग व पक्षी खवळून गेले होते १०; हत्तींनीं तें घोर वन तुडविलें होतें आणि सिंह, व्याघ्र व मृग ह्यांनीं तें गजबजून गेलें होतें. ह्या मोठ्या दंडकावनामध्यें रामानें प्रवेश केला ११. नंतर गहन वनामध्यें जातां जातां फारच मोठी गर्जना करीत असलेला विराध समोरच त्यांच्या दृष्टीं पडला १२. तथापि, गर्जना करीत असलेला गज ज्याप्रमाणें कांहीं खड्यामध्यें फेंकून द्यावा त्याप्रमाणें भयंकर गर्जना करणाऱ्या त्या विराधाला त्यांनीं उडवून दिलें व तो अधोमुख असून त्याचे हात वर असतांना त्यांनीं त्याला खड्यामध्यें फेंकून दिलें १३. तें दुष्कर कर्म केल्यानंतर भ्राते रामलक्ष्मण सायंकालीं शरभंगमुनींच्या रम्य आश्रमामध्यें गेले १४ आणि शरभंगमुनि स्वर्गास गेल्यानंतर सत्यपराक्रमी राम सर्व मुनींना अभिवंदन करून जनस्थानामध्यें गेला १५. त्या ठिकाणीं वास्तव्य करीत

तत्र राघवेण महात्मना १६ एकेन सह संगम्य रामेण रणमूर्धनि । अह्नश्चतुर्थभागेन निःशेषा राक्षसाः कृताः १७ महाबला महावीर्यास्तपसो विघ्नकारिणः । निहता राघवेणाजौ दण्डकारण्यवासिनः १८ राक्षसाश्च विनिष्पिष्टाः खरश्च निहतो रणे । दूषणं चाग्रतो हत्वा त्रिशिरास्तदनन्तरम् ॥ पश्चाच्छूर्पणखा नाम रामपार्श्वमुपागता १९ ततो रामेण संदिष्टो लक्ष्मणः सहसोत्थितः । प्रगृह्य खड्गं चिच्छेद कर्णनासे महाबलः २० ततस्तेनार्दिता बाला रावणं समुपागता । रावणानुचरो घोरो मारीचो नाम राक्षसः २१ लोभयामास वैदेहीं भूत्वा रत्नमयो मृगः । सा राममब्रवीद्दृष्ट्वा वैदेही गृह्यतामिति २२ अयं मनोहरः कान्त आश्रमो नो भविष्यति । ततो रामो धनुष्पाणिर्मृगं तमनुधावति २३ स तं जघान धावन्तं शरेणानतपर्वणा । अथ सौम्य दशग्रीवो मृगयां याति राघवे २४ लक्ष्मणे चापि निष्क्रान्ते प्रविवेशाश्रमं तदा । जग्राह तरसा सीतां ग्रहः

असतांना महात्म्या रामानें जनस्थानामध्यें रहाणाऱ्या चवदा हजार राक्षसांचा वध केला १६ सारांश, संग्रामामध्यें राक्षसांशीं युद्ध सुरू करून एकट्या रामानें (सीतेला गुहेमध्यें पाठविणें, राक्षसांशीं युद्धाची तयारी करणें इत्यादि इतर सर्व खटपटी करूनही सुमारें) दिवसाच्या चतुर्थांशामध्यें राक्षस निःशेष करून टाकिले १७. तपाला विघ्न करणारे महावीर्यवान् व महाबलाढ्य असे जे दंडकारण्यामध्यें वास्तव्य करणारे राक्षस त्यांचा रामानें संग्रामांत वध केला १८. राक्षसांचा चुराडा करून संग्रामामध्यें खराचा त्यानें वध केला आणि दूषणाला प्रथम मारून त्रिशिरालाही नंतर त्यानें मृत्युलोकीं पाठविलें असतां शूर्पणखानामक राक्षसी त्या रामासमीप आली १९. तऱ्हां रामाची आज्ञा झाल्यामुळें महाबलाढ्य लक्ष्मण एकाएकीं उठला आणि हातामध्यें खड्ग घेऊन त्यानें तिचे कान व नाक कापून काढिले २० व ह्याप्रमाणें त्यानें तिला जर्जर केलें असतां ती बाला शूर्पणखा रावणासमीप आली. तदनंतर रावणाचा अनुयायी जो मारीचनामक घोर राक्षस त्यानें रत्नमय मृग होऊन सीतेला मोह पाडिला असतां त्याला अवलोकन करितांक्षणीं ती वैदेही रामाला ह्मणाली " ह्या मृगाला आपण धरा. २१,२२ कारण, ह्याच्या योगानें हा आपला आश्रम मनोहर व रमणीय होईल ". तदनंतर हातामध्यें धनुष्य घेऊन राम त्याच्या पाठोपाठ धांवू लागला २३ आणि ज्याचीं पर्वें बांकदार आहेत अशा बाणाच्या योगानें त्या धांवणाऱ्या मृगाचा त्यानें वध केला. नंतर, हे सौम्या, राम मृगयेला गेला असतां आणि लक्ष्मणही बाहेर पडला असतां रावण आश्रमामध्यें प्रविष्ट झाला आणि आकाशामध्यें ज्याप्रमाणें राहूनें रोहिणीला ग्रस्त करावें त्याप्रमाणें

खे रोहिणीमिव २५ त्रातुकामं ततो युद्धे हत्वा गृध्रं जटायुषम् । प्रगृह्य सहसा सीतां जगामाशु स राक्षसः २६ ततस्त्वद्भुतसंकाशाः स्थिताः पर्वतमूर्धनि । सीतां गृहीत्वा गच्छन्तं वानराः पर्वतोपमाः २७ ददृशुर्विस्मिताकारा रावणं राक्षसाधिपम् । ततः शीघ्रतरं गत्वा तद्विमानं मनोजवम् २८ आरुह्य सह वैदेह्या पुष्पकं स महाबलः । प्रविवेश तदा लङ्कां रावणो राक्षसेश्वरः २९ तां सुवर्णपरिष्कारे शुभे महति वेश्मनि । प्रवेश्य मैथिलीं वाक्यैः सान्त्वयामास रावणः ३० तृणवद्भाषितं तस्य तं च नैर्ऋतपुङ्गवम् । अचिन्तयन्ती वैदेही ह्यशोकवनिकां गता ३१ न्यवर्तत तदा रामो मृगं हत्वा तदा वने । निवर्तमानः काकुत्स्थो दृष्ट्वा गृध्रं स विव्यथे ३२ गृध्रं हतं तदा दृष्ट्वा रामः प्रियतरं पितुः । मार्गमाणस्तु वैदेहीं राघवः सहलक्ष्मणः ३३ गोदावरीमनुचरन्वनोद्देशांश्च पुष्पितान् । आसेदतुर्महारण्ये कबन्धं नाम राक्षसम् ३४ ततः कबन्धवचनाद्रामः सत्यपराक्रमः । ऋष्यमूकगिरिं गत्वा सुग्रीवेण समागतः ३५ ततः समागमः पूर्वं प्रीत्या

---

वेगावेगानें त्यानें सीतेला ग्रस्त केलें २४,२५. तदनंतर तिच्या रक्षणाची इच्छा करणाऱ्या जटायुसंज्ञक गृध्रपक्ष्याचा युद्धामध्यें पराजय करून व बलात्कारानें सीतेला घेऊन तो राक्षस सत्वर चालता झाला २६. तदनंतर पर्वताच्या माथ्यावर बसलेल्या पर्वततुल्य अद्भुत वानरांनीं सीतेला घेऊन चाललेल्या राक्षसाधिपति रावणाला अवलोकन केलें आणि अवलोकन करितांक्षणीं त्यांच्या मुद्रा आश्चर्यचकित झाल्या. तदनंतर फारच सत्वर गमन करून तो महाबलाढ्य राक्षसाधिपति रावण वैदेहीसहवर्तमान त्या, मनाप्रमाणें वेगवान् असलेल्या, पुष्पकनामक विमानामध्यें आरूढ होऊन लंकेमध्यें प्रविष्ट झाला २७,२८, २९. नंतर सुवर्णमय प्राकारानें युक्त व शुभ अशा मोठ्या घरामध्यें मैथिलीला ठेवून ( अनेक प्रकारच्या ) भाषणांनीं रावण तिचें सांत्वन करूं लागला ३०. परंतु, त्याचें भाषण तृणाप्रमाणें तुच्छ मानून त्या राक्षसश्रेष्ठाचीही पर्वा न करितां वैदेही अशोकवनामध्यें गेली ३१. असो. वनामध्यें मृगाचा वध करून राम परत फिरला व परत येतांना गृध्रपक्ष्याला अवलोकन करितांक्षणीं त्याला कळवळा आला ३२. पित्याला अत्यंत प्रिय असलेल्या गृध्राचा वध झाल्याचें अवलोकन केल्यानंतर लक्ष्मणासहवर्तमान राम सीतेचा शोध करूं लागला ३३. नंतर गोदावरीचे तीरीं प्रफुल्लित वनप्रदेशांतून संचार करितां करितां एका प्रचंड अरण्यामध्यें कबंधनामक राक्षसाची व त्याची गांठ पडली ३४. तदनंतर कबंधाच्या सांगण्यावरून सत्यपराक्रमी रामचंद्र ऋष्यमूकपर्वतावर गेला असतां सुग्रीवाशीं त्याचा समागम

हार्दो व्यजायत । भ्राता निरस्तः क्रुद्धेन सुग्रीवो वालिना पुरा ३६ इतरेतरसंवादात्प्रगाढः प्रणयस्तयोः । रामः स्वबाहुवीर्येण स्वराज्यं प्रत्यपादयत् ३७ वालिनं समरे हत्वा महाकायं महाबलम् । सुग्रीवः स्थापितो राज्ये सहितः सर्ववानरैः ३८ रामाय प्रतिजानीते राजपुत्र्यास्तु मार्गणम् । आदिष्टा वानरेन्द्रेण सुग्रीवेण महात्मना ३९ दश कोट्यः प्लवङ्गानां सर्वाः प्रस्थापिता दिशः । तेषां नो विप्रनष्टानां विन्ध्ये पर्वतसत्तमे ४० भृशं शोकाभितप्तानां महान्कालोऽत्यवर्तत । भ्राता तु गृध्रराजस्य संपातिर्नाम वीर्यवान् ४१ समाख्याति स्म वसतीं सीतां रावणमन्दिरे । सोऽहं दुःखपरीतानां दुःखं तज्ज्ञातिनां नुदन् ४२ आत्मवीर्यं समास्थाय योजनानां शतं प्लुतः । तत्राहमेकामद्राक्षमशोकवनिकां गताम् ४३ कौशेयवस्त्रां मलिनां निरानन्दां दृढव्रताम् । तया समेत्य विधिवत्पृष्ट्वा सर्वमनिन्दिताम् ४४ अभिज्ञानं मया दत्तं रामनामाङ्गुलीयकम् । अभिज्ञानं मणिं लब्ध्वा चरिता-

---

झाला ३५. नंतर प्रथमतः प्रेमामुळें त्या उभयतांचीं मनेंही जळून गेलीं. कारण, पूर्वी वालीनेंही क्रुद्ध होऊन आपल्या भ्रात्या सुग्रीवाला हाकून लाविलें होतें ३६ आणि अशा रीतीनें दोघांच्या स्थितीचें कांहीं अंशीं साम्य झालें असल्यामुळें त्या उभयतांमध्यें दृढ प्रेम जडलें व रामानें आपल्या बाहुवीर्यानें संग्रामामध्यें महाबलाढ्य व धिप्पाड वालीचा वध करून सुग्रीवाला त्याचें राज्य दिलें. ह्याप्रमाणें सुग्रीवाची राज्यावर स्थापना झाली असतां त्यानें सर्व वानरांसहवर्तमान ३७, ३८ राजकन्या सीतेचा शोध लावण्याविषयीं रामाशीं प्रतिज्ञा केली. नंतर महात्म्या वानराधिपति सुग्रीवानें आज्ञा केली असतां दहा कोटि वानर चोहोंकडे पाठविले गेले. ते आह्मी वानर विंध्यनामक श्रेष्ठ पर्वताचे ठिकाणीं मार्ग चुकल्यामुळें ३९, ४० अतिशय शोकाकुल होऊन बसलों असतांना मोठाच काल लोटला; परंतु, इतक्यांत गृध्रराज जटायूच्या संपातिनामक वीर्यवान् भ्रात्यानें ४१ रावणाच्या मंदिरामध्यें सीता वास्तव्य करीत असल्याचें आह्मांला कळविलें. नंतर दुःखाकुल होऊन बसलेल्या त्या ज्ञातिबांधवांचें दुःख हरण करण्याकरितां ४२ मी केवल स्वपराक्रमावर. शंभर योजनें उड्डाण केलें असतां अशोकवनामध्यें एकटी असलेली सीता माझ्या दृष्टीं पडली ४३. ती पैठणी नेसली होती; आनंदरहित होती आणि त्या पतिव्रतेचें शरीरही मलिन झालें होतें. असो. तिची गांठ घेऊन व त्या निर्दोष साध्वीला सर्व कांहीं रीतीप्रमाणें विचारून ४४ रामनामानें युक्त अशी एक खुणेची अंगठी मीं तिला दिली. नंतर खुणेकरितां तिच्यापासून चूडामणि प्राप्त झाल्यावर मी कृतकृत्य होऊन परत

र्थोऽहमागतः ४५ मया च पुनरागम्य रामस्याक्लिष्टकर्मणः । अभिज्ञानं मया दत्तमर्चिष्मान्स महामणिः ४६ श्रुत्वा तां मैथिलीं रामस्त्वाशशंसे च जीवितम् । जीवितान्तमनुप्राप्तः पीत्वामृतमिवातुरः ४७ उद्योजयिष्यन्नुद्योगं दध्रे लङ्कावधे मनः । जिघांसुरिव लोकान्ते सर्वाँल्लोकान्विभावसुः ४८ ततः समुद्रमासाद्य नलं सेतुमकारयत् । अतरत्कपिवीराणां वाहिनी तेन सेतुना ४९ प्रहस्तमवधीन्नीलः कुम्भकर्णं तु राघवः । लक्ष्मणो रावणसुतं स्वयं रामस्तु रावणम् ५० स शक्रेण समागम्य यमेन वरुणेन च । महेश्वरस्वयंभूभ्यां तथा दशरथेन च ५१ तैश्च दत्तवरः श्रीमानृषिभिश्च समागतैः । सुरर्षिभिश्च काकुत्स्थो वराँल्लेभे परन्तपः ५२ स तु दत्तवरः प्रीत्या वानरैश्च समागतः । पुष्पकेण विमानेन किष्किन्धामभ्युपागमत् ५३ तां गङ्गां पुनरासाद्य वसन्तं मुनिसंनिधौ । अविघ्नं पुष्ययोगेन श्वो रामं द्रष्टुमर्हसि ५४ ततः स वाक्यैर्मधुरैर्हनूमतो निशम्य हृष्टो भरतः कृताञ्जलिः । उवाच वाणीं मनसः प्रहर्षिणीं चिरस्य पूर्णः खलु मे

---

आलों ४५ व परत आल्यानंतर उदार कर्म करणाऱ्या रामाला तो खुणेचा तेजस्वी महामणि मीं दिला ४६. तव्हां जीविताचा अंत झालेल्या रोग्यानें अमृत प्राशन केलें असतां ज्याप्रमाणें तो जिवंत होतो त्याप्रमाणें त्या सीतेची वार्ता श्रवण करितांक्षणीं रामाच्या जिवांत जीव आला ४७. नंतर प्रलयकालीं सर्व लोकांचा वध करण्यास उद्युक्त झालेला अग्निच कीं काय अशा त्या रामानें सैन्याला प्रोत्साहन देऊन लंकेचा नाश करण्याचें मनामध्यें आणिलें ४८. तदनंतर समुद्रासमीप येऊन त्यानें नलाकडून सेतु करविला असतां त्या सेतूच्या योगानें वानरवीरांची सेना तरून गेली ४९. तदनंतर नीलानें प्रहस्ताचा वध केला; रामानें कुंभकर्णाला परलोकीं पाठविलें; लक्ष्मणानें रावणपुत्र इंद्रजिताचा वध केला आणि स्वतः रामानें रावणाचा वध केला ५०. तदनंतर इंद्र, यम, वरुण, महेश्वर, ब्रह्मदेव आणि दशरथ ह्यांचा समागम झाल्यावर त्यांनीं आणि तेथें आलेल्या ऋषींनीं त्या वैभवशाली रामाला वर दिला आणि शत्रूंना ताप देणाऱ्या त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला देवर्षींपासूनही वर प्राप्त झाला ५१,५२. ह्याप्रमाणें वर प्राप्त झाले असतां प्रेमानें त्यानें वानरांची गांठ घेतली व पुष्पकविमानामध्यें आरूढ होऊन तो किष्किंधानगरीमध्यें आला ५३. सांप्रत पुनरपि त्याच गंगेसमीप येऊन मुनिसंनिध वास्तव्य करणाऱ्या त्या रामाचें उद्यां पुष्यनक्षत्रावर तुला निर्विघ्नपणें दर्शन होईल" ५४. तदनंतर हनुमानाच्या मधुर भाषणांनीं आनंदित झालेल्या त्या भरतानें तीं भाषणें श्रवण केल्यावर हात जोडिले आणि "पुष्कळ दिवसांनीं

मनोरथः ५५ [ ५६०९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे षड्विंशाधिकशततमः सर्गः ॥ १२६ ॥

श्रुत्वा तु परमानन्दं भरतः सत्यविक्रमः । हृष्टमाज्ञापयामास शत्रुघ्नं परवीरहा १ दैवतानि च सर्वाणि चैत्यानि नगरस्य च । सुगन्धमाल्यैर्वादित्रैरर्चन्तु शुचयो नराः २ सूताः स्तुतिपुराणज्ञाः सर्वे वैतालिकास्तथा। सर्वे वादित्रकुशला गणिकाश्चैव सर्वशः ३ राजदारास्तथामात्याः सैन्याः सेनाङ्गनागणाः । ब्राह्मणाश्च सराजन्याः श्रेणीमुख्यास्तथा गणाः ४ अभिनिर्यान्तु रामस्य द्रष्टुं शशिनिभं मुखम् । भरतस्य वचः श्रुत्वा शत्रुघ्नः परवीरहा ५ विष्टीरनेकसाहस्रीश्चोदयामास भागशः । समीकुरुत निम्नानि विषमाणि समानि च ६ स्थानानि च निरस्यन्तां नन्दिग्रामादितः परम्। सिञ्चन्तु पृथिवीं कृत्स्नां हिमशीतेन वारिणा ७ ततोऽभ्यवकिरन्त्वन्ये लाजैः पुष्पैश्च सर्वतः । समुच्छ्रितपताकास्तु रथ्याः पुरवरोत्तमे ८ शोभयन्तु च वेश्मानि सूर्यस्योदयनं प्रति । स्रग्दाममुक्तपुष्पैश्च सुवर्णैः पञ्चवर्णकैः ९

---

खरोखर माझा हा मनोरथ परिपूर्ण झाला.'' अशी मनाला आनंद देणारी वाणी त्यानें उच्चारिली ५५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें सव्विसावा सर्ग समाप्त झाला ॥ १२६ ॥

हनुमानाचें परमानंदकारक भाषण श्रवण करून आनंदित झालेल्या शत्रुघ्नाला तो सत्यपराक्रमी व परवीरनाशक भरत ह्मणाला १ " लोकांनीं शुचि होऊन नगरांतील सर्व देव आणि देवालयें ह्यांचें सुवासिक पुष्पें व वाद्यें ह्यांच्या योगानें पूजन करावें २. आणि स्तुति व पुराण जाणणारे सूत, सर्व भाट, वाद्यवादनामध्यें कुशल असलेले सर्व लोक, सर्व गणिका ३, राजभार्या, अमात्य, सैन्य, सेनासमुदाय, स्त्रीगण, क्षत्रियासहवर्तमान ब्राह्मण आणि समाजांतील मुख्य मुख्य गण ४ ह्यांनीं रामाचें चंद्रतुल्य मुख अवलोकन करण्यास बाहेर पडावें. " हें भरताचें भाषण श्रवण करितांक्षणीं परवीरनाशक शत्रुघ्नानें ५ हजारों मजुरांच्या वेगळ्या वेगळ्या टोळ्या करून त्यांना सांगितलें "सखल व उंच असलेलीं स्थलें सारखीं करा ६. कोठें उंच व कोठें सखल असा प्रकार राहूं देऊं नका. कांहीं लोकांनीं ह्या नंदिग्रामापासून तों अयोध्येपर्यंत बर्फासारिख्या शीतल उदकानें सर्व भूमीवर सडा टाकावा ७; इतर कांहीं लोकांनीं ह्या श्रेष्ठ नगरांतील ध्वज उभारिलेले मार्ग सर्व बाजूंनीं लाह्या व पुष्पें ह्यांच्या योगानें भरून काढावे ८; सूर्योदयसमयीं सर्व लोकांनीं आपआपलीं गृहें सुशोभित करावीं आणि शेंकडों लोकांनीं पंचरंगी भूषणें, विरळ व दाट गुंफिलेल्या पुष्पमाला आणि सुवर्णाचीं मोकळीं पुष्पें

राजमार्गमसंबाधं किरन्तु शतशो नराः । ततस्तच्छासनं श्रुत्वा शत्रुघ्नस्य मुदान्विताः १० धृष्टिर्जयन्तो विजयः सिद्धार्थश्चार्थसाधकः । अशोको मन्त्रपालश्च सुमन्त्रश्चापि निर्ययुः ११ मत्तैर्नागसहस्रैश्च सध्वजैः सुविभूषितैः । अपरे हेमकक्षाभिः सगजाभिः करेणुभिः १२ निर्ययुस्तुरगाक्रान्ता रथैश्च सुमहारथाः । शक्त्यृष्टिपाशहस्तानां सध्वजानां पताकिनाम् १३ तुरगाणां सहस्रैश्च मुख्यैर्मुख्यतरान्वितैः । पदातीनां सहस्रैश्च वीराः परिवृता ययुः १४ ततो यानान्युपारूढाः सर्वा दशरथस्त्रियः । कौसल्यां प्रमुखे कृत्वा सुमित्रां चापि निर्ययुः १५ द्विजातिमुख्यैर्धर्मात्मा श्रेणीमुख्यैः सनैगमैः । माल्यमोदकहस्तैश्च मन्त्रिभिर्भरतो वृतः १६ शङ्खभेरीनिनादैश्च बन्दिभिश्चाभिनन्दितः । आर्यपादौ गृहीत्वा तु शिरसा धर्मकोविदः १७ पाण्डुरं छत्रमादाय शुक्लमाल्योपशोभितम् । शुक्ले च वालव्यजने राजार्हे हेमभूषिते १८ उपवासकृशो दीनश्चीरकृष्णाजिनाम्बरः । भ्रातुरागमनं श्रुत्वा तत्पूर्वं हर्षमागतः १९ प्रत्युद्ययौ तदा रामं महात्मा

भव्य राजमार्गावर उधळावीं". ही शत्रुघ्नाची आज्ञा श्रवण करून धृष्टि, जयंत, विजय, सिद्धार्थ, अर्थसाधक, अशोक, मंत्रपाल व सुमंत्र हे अष्टप्रधान आनंदित होऊन बाहेर पडले ९, १०, ११. ध्वज व भूषणें ह्यांनीं युक्त असलेले हजारों मत्त गज आणि सोन्याच्या झुली ज्यांवर घातलेल्या आहेत व ज्यांमध्यें गज आहेत अशा हत्तिणी ह्यांसहवर्तमान कांहीं बाहेर पडले १२. अश्वांनीं गजबजून गेलेले कांहीं उत्कृष्ट महारथि रथांसहवर्तमान बाहेर पडले. शक्ति, ऋष्टि व पाश ज्यांनीं हातामध्यें घेतलले आहेत असे हजारों सैनिक, ध्वज व पताका धारण केलेले हजारों लोक १३, फारच उत्कृष्ट स्वार ज्यांवर आरूढ झालेले आहेत असे हजारों मुख्य अश्व आणि हजारों पायदळ बरोबर घेऊन वीर निघाले १४. तदनंतर दशरथाच्या सर्व स्त्रिया वाहनावर आरूढ झाल्या आणि कौसल्येला व सुमित्रेला पुढें घालून बाहेर पडल्या १५. द्विजश्रेष्ठ, मुख्य मुख्य व्यापारी, वाणी आणि पुष्पें व मोदक ज्यांनीं हातामध्यें घेतलले आहेत असे मंत्री भरतासभोंवतीं जमले १६. शंख व भेरी ह्यांचे ध्वनि भरताच्या अभिनंदनाकरितां होऊं लागले; भाट त्याची स्तुति करूं लागले आणि त्या धर्मवेत्त्या भरतानेंही रामपादुका मस्तकीं धारण केल्या १७. त्याचप्रमाणें श्वेत पुष्पांनीं सुशोभित केलेलें श्वेतवर्ण छत्र आणि राजांना योग्य अशा सुवर्णभूषित व श्वेतवर्ण चवऱ्या बरोबर घेऊन १८ महात्मा भरत सचिवांसहवर्तमान, भ्रात्या रामाचें आगमन श्रवण करितांक्षणीं त्याला सामोरा गेला. त्यावेळीं तो दीन भरत उपवासानें कृश

सचिवैः सह। अश्वानां खुरशब्दैश्च रथनेमिस्वनेन च २० शङ्खदुन्दुभिनादेन संचचालेव मेदिनी। गजानां बृंहितैश्चापि शङ्खदुन्दुभिनिःस्वनैः २१ कृत्स्नं तु नगरं तत्तु नन्दिग्राममुपागमत्। समीक्ष्य भरतो वाक्यमुवाच पवनात्मजम् २२ कच्चिन्न खलु कापेयी सेव्यते चलचित्तता। न हि पश्यामि काकुत्स्थं राममार्यं परन्तपम् २३ कच्चिन्न चानुदृश्यन्ते कपयः कामरूपिणः। अथैवमुक्ते वचने हनूमानिदमब्रवीत् २४ अर्थं विज्ञापयन्नेव भरतं सत्यविक्रमम्। सदाफलान्कुसुमितान्वृक्षान्प्राप्य मधुस्रवान् २५ भरद्वाजप्रसादेन मत्तभ्रमरनादितान्। तस्य चैव वरो दत्तो वासवेन परन्तप २६ ससैन्यस्य तदातिथ्यं कृतं सर्वगुणान्वितम्। निःस्वनः श्रूयते भीमः प्रहृष्टानां वनौकसाम् २७ मन्ये वानरसेना सा नदीं तरति गोमतीम्। रजोवर्षं समुद्भूतं पश्य सालवनं प्रति २८ मन्ये सालवनं रम्यं लोलयन्ति प्लवङ्गमाः। तदेतद्दृश्यते दूराद्विमानं चन्द्रसंनि-

---

झाला होता; वल्कलें व कृष्णाजिनें हींच त्याचीं वस्त्रें होतीं आणि रामाच्या आगमनाची वार्ता कानावर येतांक्षणीं त्याला हर्ष झाला होता. घोड्यांच्या टापा, रथांच्या धांवा आणि शंख व दुंदुभि ह्यांच्या नादानें पृथ्वी जशी कांहीं हलूं लागली. त्याचप्रमाणें गजांच्या गर्जना आणि शंख व दुंदुभि ह्यांचे ध्वनि ह्यांच्याही योगानें भूमि हलून गेली १९,२०,२१. असो. तें सर्वही नगर नंदिग्रामाकडे लोटलें आणि नंतर वायुपुत्र हनुमानाला अवलोकन करून भरत ह्मणाला २२ "तूं ही माकडचेष्टा तर आरंभिली नाहींस नां? कारण, शत्रुतापन व सज्जन असा ककुत्स्थकुलोत्पन्न राम माझ्या दृष्टीं पडत नाहीं २३ आणि यथेष्टरूप धारण करणारे वानरही दृष्टीं पडत नाहींत". ह्याप्रमाणें भरतानें भाषण केलें असतां सत्यपराक्रमी भरताला यथार्थ गोष्ट कळविण्याच्या उद्देशानें हनुमान् ह्मणाला "हे शत्रुतापना, इंद्रानें भरद्वाजमुनींना वर दिला आहे व त्या वरामुळें त्या मुनींनीं सैन्यासहवर्तमान रामाचें सर्व प्रकारें आतिथ्य केलें आहे. त्या भरद्वाजमुनींच्या प्रसादानें रामाच्या मार्गाच्या आसपास असलेले वृक्ष सर्वदां फलपुष्पांनीं युक्त झालेले आहेत. त्यांतून मधाचा स्राव चालला आहे आणि मत्त भ्रमरांनीं ते नादित झालेले आहेत अशाप्रकारचे वृक्ष प्राप्त झाल्यामुळें आनंदित झालेल्या वानरांचा प्रचंड ध्वनि ज्याअर्थी कानावर येत आहे त्याअर्थी २४, २५, २६, २७ ती वानरसेना गोमती नदी तरून येत आहे असें मला वाटतें. शिवाय, सालवनासमीप उद्भवलेली रजःकणांची वृष्टि तूं अवलोकन कर २८. वानर रम्य सालवनाचा फन्ना उडवीत आहेत असें मला

भम् २९ विमानं पुष्पकं दिव्यं मनसा ब्रह्मनिर्मितम् । रावणं बान्धवैः सार्धं हत्वा लब्धं महात्मना ३० तरुणादित्यसंकाशं विमानं रामवाहनम् । धनदस्य प्रसादेन दिव्यमेतन्मनोजवम् ३१ एतस्मिन्भ्रातरौ वीरौ वैदेह्या सह राघवौ । सुग्रीवश्च महातेजा राक्षसश्च विभीषणः ३२ ततो हर्षसमुद्भूतो निःस्वनो दिवमस्पृशत् । स्त्रीबालयुववृद्धानां रामोऽयमिति कीर्तिते ३३ रथकुञ्जरवाजिभ्यस्तेऽवतीर्य महीं गताः । ददृशुस्तं विमानस्थं नराः सोममिवाम्बरे ३४ प्राञ्जलिर्भरतो भूत्वा प्रहृष्टो राघवोन्मुखः । यथार्थेनार्घ्यपाद्याद्यैस्ततो राममपूजयत् ३५ मनसा ब्रह्मणा सृष्टे विमाने भरताग्रजः । रराज पृथुदीर्घाक्षो वज्रपाणिरिवामरः ३६ ततो विमानाग्रगतं भरतो भ्रातरं तदा । ववन्दे प्रणतो रामं मेरुस्थमिव भास्करम् ३७ ततो रामाभ्यनुज्ञातं तद्विमानमनुत्तमम् । हंसयुक्तं महावेगं निपपात महीतलम् ३८ आरोपितो विमानं तद्भरतः सत्यविक्रमः । राममासाद्य मुदितः पुनरेवा-

---

वाटतें. तें हें चंद्रासारिखें आल्हादकारक विमान दूर दृष्टीं पडत आहे २९. हें दिव्य पुष्पकविमान विश्वकर्म्यानें आपल्या मनाप्रमाणें निर्माण केलें आहे. बालसूर्याप्रमाणें ह्याची प्रभा आहे; हें रामाचें वहान झालें आहे; ब्रह्मदेवाच्या प्रसादानें हें मनाप्रमाणें वेगवान् व दिव्य विमान पूर्वीं कुबेराला प्राप्त झालेलें आहे; बांधवांसहवर्तमान रावणाचा वध करून महात्म्या रामानें हें सांप्रत प्राप्त करून घेतलें आहे ३०, ३१ आणि वैदेहीसहवर्तमान रघुवंशज वीर भ्राते रामलक्ष्मण, महातेजस्वी सुग्रीव व बिभीषण राक्षस असे ह्या विमानामध्यें बसले आहेत " ३२. तदनंतर ' हा राम ' असें सांगितल्यावर स्त्रिया, बाल, तरुण व वृद्ध ह्यांमध्यें हर्षामुळें उत्पन्न झालेला ध्वनि स्वर्गाला जाऊन पोंचला ३३. नंतर रथ, गज व अश्व ह्यांवरून ते सामोरे आलेले लोक खालीं भूमीवर उतरले आणि लोक ज्याप्रमाणें अंतरिक्षामध्यें असलेला चंद्र अवलोकन करीत असतात त्याप्रमाणें विमानारूढ झालेल्या रामाला त्यांनीं अवलोकन केलें ३४. रामासंमुख असलेल्या भरतानें रामाला अवलोकन करितांक्षणीं आनंदित होऊन हात जोडिले आणि खरें खरें स्वागत करून अर्घ्य, पाद्य इत्यादिकांच्या योगानें त्यानें रामाचें पूजन केलें ३५. विश्वकर्म्यानें मनानें निर्माण केलेल्या विमानामध्यें विशाल व दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेला भरताग्रज राम वज्रपाणि इंद्राप्रमाणें झळकत होता ३६. तदनंतर मेरुपर्वतावर असलेल्या सूर्याप्रमाणें विमानाचे अग्रभागीं बसलेल्या भ्रात्या रामाला भरतानें नम्र होऊन वंदन केलें ३७. नंतर रामाची अनुज्ञा झाल्यामुळें तें हंसयुक्त, महावेगवान् व अनुपम विमान भूतलावर पडलें असतां ३८ सत्यपराक्रमी भरत त्या

भ्यवादयत् ३९ तं समुत्थाय काकुत्स्थश्चिरस्याक्षिपथं गतम् । अङ्के भरतमारोप्य मुदितः परिषस्वजे ४० ततो लक्ष्मणमासाद्य वैदेहीं च परन्तपः। अथाभ्यवादयत्प्रीतो भरतो नाम चाब्रवीत् ४१ सुग्रीवं कैकयीपुत्रो जाम्बवन्तमथाङ्गदम् । मैन्दं च द्विविदं नीलमृषभं चैव सस्वजे ४२सुषेणं च नलं चैव गवाक्षं गन्धमादनम् । शरभं पनसं चैव परितः परिषस्वजे४३ ते कृत्वा मानुषं रूपं वानराः कामरूपिणः । कुशलं पर्यपृच्छंस्ते प्रहृष्टा भरतं तदा ४४ अथाब्रवीद्राजपुत्रः सुग्रीवं वानरर्षभम् । परिष्वज्य महातेजा भरतो धर्मिणां वरः ४५ त्वमस्माकं चतुर्णां वै भ्राता सुग्रीव पञ्चमः। सौहृदाज्जायते मित्रमपकारोऽरिलक्षणम् ४६ विभीषणं च भरतः सान्त्ववाक्यमथाब्रवीत् । दिष्ट्या त्वया सहायेन कृतं कर्म सुदुष्करम् ४७ शत्रुघ्नश्च तदा राममभिवाद्य सलक्ष्मणम् । सीतायाश्चरणौ वीरो विनयादभ्यवादयत् ४८ रामो मातरमासाद्य विवर्णां शोककर्शिताम् । जग्राह प्रणतः पादौ मनो मातुः प्रहर्षयन् ४९ अभिवाद्य सुमित्रां च कैकेयीं च यशस्विनीम् । स मातॄश्च ततः सर्वाः पुरोहितमुपागमत् ५० स्वागतं ते

---

विमानावर आरूढ झाला आणि रामासमीप आल्यावर आनंदित होऊन पुनरपि त्यानें त्याला अभिवंदन केलें ३९. तेव्हां फार दिवसांनीं नजरेस पडलेल्या त्या भरताला उठवून रामानें मांडीवर घेतलें आणि आनंदित होऊन त्याला आलिंगन दिलें ४०. नंतर लक्ष्मणासमीप व सीतेसमीप जाऊन प्रसन्न झालेल्या शत्रुतापन भरतानें स्वनामनिर्देशपूर्वक अभिवंदन केलें ४१. तदनंतर सुग्रीव, जांबवान्, अंगद, मैंद, द्विविद, नील व ऋषभ ह्यांना कैकेयीपुत्र भरतानें आलिंगन दिलें ४२ व त्याचप्रमाणें सुषेण, नल, गवाक्ष, गंधमादन, शरभ व पनस ह्यांनाही तो कडकडून भेटला ४३. तेव्हां यथेष्ट रूप धारण करणारे ते वानर आनंदित झाले आणि मनुष्यरूप धारण करून त्यांनीं भरताला कुशल प्रश्न केला ४४. तदनंतर धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ व महातेजस्वी राजकुमार भरत वानरश्रेष्ठ सुग्रीवाला कवटाळून ह्मणाला ४५ " हे सुग्रीवा, तूं आमच्या चौघांचा पांचवा भ्राता आहेस. प्रेमामुळें मित्र उत्पन्न होत असतो आणि अपकार हें शत्रु उत्पन्न करण्याचें साधन होय " ४६. नतर भरत सांत्वनपूर्वक बिभीषणाला ह्मणाला " तूं आमच्या सुदैवानें सहाय होऊन फारच दुर्घट कर्म केलें आहेस " ४७. तदनंतर लक्ष्मणासहवर्तमान रामाला अभिवंदन करून सीतेच्याही चरणांना वीर शत्रुघ्नानें विनयानें अभिवंदन केलें ४८. नंतर शोकानें कृश व निस्तेज झालेल्या मातेसमीप जाऊन तिच्या चित्ताला हर्ष उत्पन्न करीत करीत रामानें प्रणामपूर्वक तिचे पाय धरिले ४९

महाबाहो कौसल्यानन्दवर्धन । इति प्राञ्जलयः सर्वे नागरा राममब्रुवन् ५१ तान्यञ्जलिसहस्राणि प्रगृहीतानि नागरैः । व्याकोशानीव पद्मानि ददर्श भरताग्रजः ५२ पादुके ते तु रामस्य गृहीत्वा भरतः स्वयम् । चरणाभ्यां नरेन्द्रस्य योजयामास धर्मवित् ५३ अब्रवीच्च तदा रामं भरतः स कृताञ्जलिः । एतत्ते सकलं राज्यं न्यासं निर्यातितं मया ५४ अद्य जन्म कृतार्थं मे संवृत्तश्च मनोरथः । यत्त्वां पश्यामि राजानमयोध्यां पुनरागतम् ५५ अवेक्षतां भवान्कोशं कोष्ठागारं गृहं बलम् । भवतस्तेजसा सर्वं कृतं दशगुणं मया ५६ तथा ब्रुवाणं भरतं दृष्ट्वा तं भ्रातृवत्सलम् । मुमुचुर्वानरा बाष्पं राक्षसश्च विभीषणः ५७ ततः प्रहर्षाद्भरतमङ्कमारोप्य राघवः । ययौ तेन विमानेन ससैन्यो भरताश्रमम् ५८ भरताश्रममासाद्य ससैन्यो राघवस्तदा । अवतीर्य विमानाग्रादवतस्थे महीतले ५९ अब्रवीत्तु तदा रामस्तद्विमानमनुत्तमम् । वह वैश्रवणं देवमनुजानामि गम्यताम् ६० ततो रामाभ्यनुज्ञातं तद्विमानमनुत्तमम् । उत्तरां दिशमुद्दिश्य

---

आणि नंतर सुमित्रा, यशस्विनी कैकेयी व इतरही सर्व माता ह्यांना अभिवंदन करून तो पुरोहिताकडे गेला ५०. " हे कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या महापराक्रमी रामा, तुझें स्वागत असो " असें सर्वही नागरिक जन हात जोडून रामाला ह्मणाले ५१. तेव्हां नागरिक जनांनीं जोडिलेलीं तीं हजारों हस्तसंपुटें विकसित कमलांप्रमाणें रामानें अवलोकन केलीं ५२. नंतर रामाच्या त्या पादुका स्वतः घेऊन धर्मवेत्त्या भरतानें त्या रामराजाच्या पायामध्यें घातल्या ५३ आणि तो भरत हात जोडून रामाला ह्मणाला " ठेव ह्मणून माझ्याजवळ असलेलें हें तुझें संपूर्ण राज्य मीं तुझ्या स्वाधीन केलें आहे ५४; व आज माझ्या जन्माचें सार्थक झालें असून माझा मनोरथ परिपूर्ण झाला आहे. कारण, अयोध्येमध्यें परत आलेल्या तुज राजाला मी अवलोकन करीत आहें ५५. आतां खजिना, कोठी, गृह व सैन्य आपण बघून घ्या. आपल्या प्रभावानें हें सर्व माझ्या हातून दसपट झालेलें आहे " ५६. ह्याप्रमाणें तो भ्रातृवत्सल भरत भाषण करीत असल्याचें अवलोकन करून वानर आणि बिभीषण राक्षस ह्यांनीं आनंदाश्रु ढाळिले ५७. तदनंतर आनंदानें भरताला मांडीवर घेऊन राम सैन्यासहवर्तमान त्या विमानाच्या योगानें भरताच्या आश्रमाकडे गेला ५८ आणि भरताच्या आश्रमासमीप गेल्यानंतर सैन्यासहवर्तमान विमानावरून खालीं उतरून तो भूतलावर उभा राहिला ५९. नंतर त्या अनुपम विमानाला अनुलक्षून राम ह्मणाला " वैश्रवणराजाला तूं नेत जा. जा; मी तुला अनुज्ञा देतों " ६०. ह्याप्रमाणें रामाची अनुज्ञा

जगाम धनदालयम् ६१ विमानं पुष्पकं दिव्यं संगृहीतं तु रक्षसा । अगमद्धनदं वेगाद्रामवाक्यप्रचोदितम् ६२ पुरोहितस्यात्मसखस्य राघवो बृहस्पतेः शक्र इवामराधिपः । निपीड्य पादौ पृथगासने शुभे सदैव तेनोपविवेश वीर्यवान् ६३ [ ५६७२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डे सप्तविंशाधिकशततमः सर्गः ॥ १२७ ॥

शिरस्यञ्जलिमाधाय कैकेयीनन्दिवर्धनः । बभाषे भरतो ज्येष्ठं रामं सत्यपराक्रमम् १ पूजिता मामिका माता दत्तं राज्यमिदं मम । तद्ददामि पुनस्तुभ्यं यथा त्वमददा मम २ धुरमेकाकिना न्यस्तां वृषभेण बलीयसा । किशोरवद्गुरुं भारं न वोढुमहमुत्सहे ३ वारिवेगेन महता भिन्नः सेतुरिव क्षरन् । दुर्बन्धनमिदं मन्ये राज्यच्छिद्रमसंवृतम् ४ गतिं खर इवाश्वस्य हंसस्येव च वायसः । नान्वेतुमुत्सहे वीर तव मार्गमरिन्दम ५ यथा चारोपितो वृक्षो जातश्चान्तर्निवेशने । महानपि दुरारोहो महास्कन्धः

---

झाली असतां तें अनुपम विमान आपला रोख उत्तरदिशेकडे फिरवून कुबेराच्या स्थानाकडे निघून गेलें ६१. सारांश, राक्षसानें घेतलेलें तें दिव्य पुष्पकविमान रामाची अनुज्ञा झाली असतां कुबेराकडे चालतें झालें ६२. बृहस्पतीचे पाय धरणाऱ्या देवराज इंद्राप्रमाणें आपला सखा व पुरोहित ( ह्मणजे वसिष्टपुत्र सुयज्ञ ) ह्याचे पाय धरून रघुवंशज वीर्यवान् राम शुभ अशा वेगळ्या असनावर बसला ६३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ १२७ ॥

कैकयीचा आनंद वृद्धिंगत करणारा भरत मस्तकीं हात जोडून सत्यपराक्रमी व ज्येष्ठ अशा रामाला ह्मणाला १ "माझ्या मातेला मान देऊन तूं हें राज्य मला अर्पण केलें आहेस; परंतु, ज्याप्रमाणें तूं हें मला अर्पण केलें आहेस त्याप्रमाणें मी हें पुनरपि तुला अर्पण करीत आहें २. एकट्या बलाढ्य बैलानें झुगारून दिलेलें जूं ज्याप्रमाणें शिंगरू ओढून नेण्यास समर्थ होत नाहीं त्याप्रमाणें राज्यरूप प्रचंड ओझें वाहून नेण्याचें मला सामर्थ्य नाहीं ३. प्रचंड जलवेगानें फुटून जाऊन गळूं लागलेला सेतु ज्याप्रमाणें बंद होणें अशक्य आहे त्याप्रमाणें ज्याला आच्छादित करणें शक्य नाहीं असें हें राज्यछिद्र बंद करणें अशक्य आहे असें मला वाटतें ४. हे शत्रुदमना वीरा, अश्वाच्या गतीचें अवलंबन करण्यास ज्याप्रमाणें गर्दभ असमर्थ आहे अथवा हंसाची गति स्वीकारण्यास ज्याप्रमाणें काकपक्षी असमर्थ आहे त्याप्रमाणें तुझ्या मार्गाचें अवलंबन करण्यास मी असमर्थ आहें ५. घरांतील बागेंत लाविलेला वृक्ष मोठा होतो, त्याच्यावर कोणाला चढतां येईनासें होतें, मोठें खोड

प्रशाखवान् ६ शीर्येत पुष्पितो भूत्वा न फलानि प्रदर्शयन् । तस्य नानुभवेदर्थं यस्य हेतोः स रोपितः ७ एषोपमा महाबाहो त्वमर्थं वेत्तुमर्हसि । यद्यस्मान्मनुजेन्द्र त्वं भर्ता भृत्यान्न शाधि हि ८ जगदद्याभिषिक्तं त्वामनुपश्यतु राघव । प्रतपन्तमिवादित्यं मध्याह्ने दीप्ततेजसम् ९ तूर्यसङ्घातनिर्घोषैः काञ्चीनूपुरनिःस्वनैः । मधुरैर्गीतशब्दैश्च प्रतिबुध्यस्व शेष्व च १० यावदावर्तते चक्रं यावती च वसुन्धरा । तावत्त्वमिह लोकस्य स्वामित्वमनुवर्तय ११ भरतस्य वचः श्रुत्वा रामः परपुरञ्जयः । तथेति प्रतिजग्राह निषसादासने शुभे १२ ततः शत्रुघ्नवचनान्निपुणाः श्मश्रुवर्धनाः । सुखहस्ताः सुशीघ्राश्च राघवं पर्यवारयन् १३ पूर्वं तु भरते स्नाते लक्ष्मणे च महाबले । सुग्रीवे वानरेन्द्रे च राक्षसेन्द्रे विभीषणे १४ विशोधितजटः स्नातश्चित्रमाल्यानुलेपनः । महार्हवसनोपेतस्तस्थौ तत्र श्रिया ज्वलन् १५

---

व शाखा ह्यांनीं तो युक्त होतो ६ आणि पुष्पयुक्त होऊन फलें न येतां तो मोडून पडतो असें झालें असतां ज्याप्रमाणें फलाच्या उद्देशानें ज्यानें तो लाविला असतो त्याला त्याचा उपभोग होत नाहीं ७ त्याचप्रमाणें, हे महापराक्रमी रामा, तुझी अवस्था आहे. सारांश, हे राजा, तूं अधिपति असून आह्मां सेवकांचें जर परिपालन न करशील तर ही त्या वृक्षाची उपमा तुला योग्य आहे आणि त्या उपमेचा अर्थ जाणण्यास तूं समर्थ आहेस ( तात्पर्य, प्रजाजनांचें परिपालन करण्याकरितां मोठ्या यत्नानें तुला दशरथराजानें उत्पन्न केलें आहे व चांगल्या रीतीनें वाढविलें आहे. ह्यास्तव, प्रजापालन करणें हेंच तुझें कर्तव्य आहे; परंतु, हें तूं जर न करिशील तर तशा वृक्षाच्याच उपमेला तूं योग्य होशील ) ८. हे राघवा, मध्याह्नसमयीं देदीप्यमान तेजानें युक्त असलेल्या सूर्याप्रमाणें राज्याभिषेक झाल्यामुळें प्रकाशत असलेल्या तुला आज जगत् अवलोकन करो ९. तूर्यवाद्यांच्या समुदायाचे ध्वनि, कमरपट्टे व तोरड्या ह्यांचे ध्वनि आणि गायनसंबंधीं मधुर शब्द ह्यांच्या योगानें तूं आतां जागा होत जा आणि शयन करीत जा १०. ज्या प्रदेशावर हें ज्योतिश्चक्र भ्रमण करीत आहे आणि जितकी ही पृथ्वी आहे तितकें जगताचें आधिपत्य तूं स्वीकार " ११. भरताचें भाषण श्रवण केल्यानंतर शत्रुसमुदाय जिंकणारा राम 'ठीक आहे' असें ह्मणून शुभ आसनावर बसला १२. तदनंतर ज्यांचा हात सुखकारक आहे व आपल्या कृत्यामध्यें जे फारच शीघ्र आहेत असे निपुण निपुण नापित शत्रुघ्नाच्या आज्ञेनें रामासभोंवतीं जुळले १३. प्रथमतः भरत, महाबलाढ्य लक्ष्मण, वानराधिपति सुग्रीव आणि राक्षसराज बिभीषण ह्यांचें स्नान झाल्यावर १४ जटा झालेले केस साफ करून रामानें स्नान केलें; मनोहर पुष्पें व उटी हीं त्यानें

प्रतिकर्म च रामस्य कारयामास वीर्यवान् । लक्ष्मणस्य च लक्ष्मीवानिक्ष्वाकुकुलवर्धनः १६ प्रतिकर्म च सीतायाः सर्वा दशरथस्त्रियः । आत्मनैव तदा चक्रुर्मनस्विन्यो मनोहरम् १७ ततो वानरपत्नीनां सर्वासामेव शोभनम् । चकार यत्नात्कौसल्या प्रहृष्टा पुत्रवत्सला १८ ततः शत्रुघ्नवचनात्सुमन्त्रो नाम सारथिः । योजयित्वाभिचक्राम रथं सर्वाङ्गशोभनम् १९ अग्न्यर्कामलसंकाशं दिव्यं दृष्ट्वा रथं स्थितम् । आरुरोह महाबाहू रामः परपुरंजयः २० सुग्रीवो हनुमांश्चैव महेन्द्रसदृशद्युती । स्नातौ दिव्यनिभैर्वस्त्रैर्जग्मतुः शुभकुण्डलौ २१ सर्वाभरणजुष्टाश्च ययुस्ताः शुभकुण्डलाः । सुग्रीवपत्न्यः सीता च द्रष्टुं नगरमुत्सुकाः २२ अयोध्यायां च सचिवा राज्ञो दशरथस्य च । पुरोहितं पुरस्कृत्य मन्त्रयामासुरर्थवत् २३ अशोको विजयश्चैव सिद्धार्थश्च समाहिताः । मन्त्रयन्रामवृद्ध्यर्थं वृत्त्यर्थं नगरस्य च २४ सर्वमेवाभिषेकार्थं जयार्हस्य महात्मनः । कर्तुमर्हथ रामस्य यद्यन्मङ्गलपूर्वकम् २५ इति ते मन्त्रिणः सर्वे संदिश्य च पुरोहितः । नगरान्निर्य-

---

धारण केलीं आणि मोठीं मूल्यवान् वस्त्र परिधान करून तो कांतीनें झळकत राहिला १५. इक्ष्वाकुकुलाची कीर्ति वृद्धिंगत करणाऱ्या वीर्यवान् व वैभवशाली शत्रुघ्नानें रामाला व लक्ष्मणाला अलंकार घालविले १६ आणि दशरथाच्या सर्व विचारी स्त्रियांनीं सीतेला स्वतःच मनोहर अलंकार घातले १७. नंतर सर्वही वानरस्त्रियांना आनंदित झालेल्या पुत्रवत्सल कौसल्येनें स्वतः श्रम घेऊन अलंकार घातले १८. तदनंतर सुमंत्रनामक सारथि शत्रुघ्नाच्या आज्ञेनें सर्वांगसुंदर रथ जोडून रामासमीप गेला १९ आणि अग्नि व सूर्य ह्यांप्रमाणें निर्मल असलेला तो दिव्य रथ आल्याचें अवलोकन करून शत्रुसमुदाय जिंकणारा महापराक्रमी राम त्यावर आरूढ झाला २०. इंद्रासारिखें ज्यांचें तेज आहे, स्नान करून शुभ कुंडलें ज्यांनीं धारण केलीं आहेत आणि दिव्य कांतीनें युक्त असलेलीं वस्त्रें ज्यांनीं परिधान केलीं आहेत असे सुग्रीव व हनुमान् रामाच्या मागोमाग गेले २१. त्याचप्रमाणें सर्व अलंकार घालून शुभ कुंडलें धारण केलेल्या त्या सुग्रीवस्त्रिया आणि सीता ह्या नगर पहाण्याविषयीं उत्सुक होऊन निघाल्या २२. इतक्यांत अयोध्येमध्यें दशरथराजाचे सचिव पुरोहिताला पुढाकार देऊन ( रामाभिषेकसंबंधीं ) यथार्थ विचार करूं लागले २३. अशोक, विजय आणि सिद्धार्थ ह्यांनीं चित्त स्वस्थ ठेवून रामाचा उत्कर्ष व्हावा व नगराचें परिपालन व्हावें ह्याविषयीं विचार केला २४. "जयाला योग्य असलेल्या महात्म्या रामाच्या अभिषेकाकरितां जें जें म्हणून कांहीं कर्तव्य असेल तें तें सर्व तुम्ही मंगलपूर्वक करा ". २५ असें सेवकांना सांगून ते सर्व मंत्री व पुरोहित

युस्तूर्णं रामदर्शनबुद्धयः २६ हरियुक्तं सहस्राक्षो रथमिन्द्र इवानघः ।
प्रययौ रथमास्थाय रामो नगरमुत्तमम् २७ जग्राह भरतो रश्मीञ्शत्रुघ्न-
श्छत्रमाददे । लक्ष्मणो व्यजनं तस्य मूर्ध्नि संवीजयंस्तदा २८ श्वेतं च
वालव्यजनं जगृहे परितः स्थितः । अपरं चन्द्रसंकाशं राक्षसेन्द्रो विभी-
षणः २९ ऋषिसङ्घैस्तदाकाशे देवैश्च समरुद्गणैः । स्तूयमानस्य रामस्य
शुश्रुवे मधुरध्वनिः ३० ततः शत्रुंजयं नाम कुञ्जरं पर्वतोपमम् । आरु-
रोह महातेजाः सुग्रीवः प्लवगर्षभः ३१ नवनागसहस्राणि ययुरास्थाय
वानराः । मानुषं विग्रहं कृत्वा सर्वाभरणभूषिताः ३२ शङ्खशब्दप्रणादैश्च
दुन्दुभीनां च निःस्वनैः । प्रययौ पुरुषव्याघ्रस्तां पुरीं हर्म्यमालिनीम् ३३
ददृशुस्ते समायान्तं राघवं सपुरःसरम् । विराजमानं वपुषा रथेनातिरथं
तदा ३४ ते वर्धयित्वा काकुत्स्थं रामेण प्रतिनन्दिताः । अनुजग्मुर्महा-
त्मानं भ्रातृभिः परिवारितम् ३५ अमात्यैर्ब्राह्मणैश्चैव तथा प्रकृतिभिर्वृतः ।
श्रिया विरुरुचे रामो नक्षत्रैरिव चन्द्रमाः ३६ स पुरोगामिभिस्तूर्यैस्ता-

---

रामदर्शनाच्या उद्देशानें नगरांतून सत्वर बाहेर पडले २६. हरिसंज्ञक अश्व जोडिलेल्या रथावर आरूढ होऊन जाणाऱ्या निष्पाप इंद्राप्रमाणें राम रथारूढ होऊन त्या उत्कृष्ट नगरामध्यें गेला २७. त्यावेळीं भरतानें अश्वांच्या रश्मि धरिल्या होत्या; शत्रुघ्नानें छत्र धारण केलें होतें; लक्ष्मण त्याच्या मस्तकावर विंझोणा वारीत होता २८ आणि राक्षसाधिपति बिभीषण दुसरी एक श्वेतवर्ण व चंद्रतुल्य चवरी घेऊन त्याच्या समीप उभा होता २९. त्यावेळी ऋषिसमुदाय आणि मरुद्गणांसहवर्तमान देव रामाची स्तुति करूं लागले असतां आकाशामध्यें मधुर ध्वनि ऐकूं येऊं लागला ३०. तदनंतर महातेजस्वी वानरश्रेष्ठ सुग्रीव शत्रुंजयनामक पर्वततुल्य गजावर आरूढ झाला ३१ आणि नंतर मनुष्यरूप धारण करून सर्व अलंकार धारण केलेले वानर नऊ हजार गजांवर आरूढ होऊन गेले ३२. शंखांचे नाद, लोकांचे हर्षध्वनि आणि दुंदुभींचे स्वर चालले असतांना पुरुषश्रेष्ठ राम त्या गृहपंक्तींनीं युक्त असलेल्या नगरीमध्यें गेला असतां ३३ त्या नागरिक जनांनींही कांतीनें झळकत असलेला अतिरथि राम रथारूढ होऊन पुढाऱ्यांसहवर्तमान येत असल्याचें अवलोकन केलें ३४. त्यांनीं रामाला आशीर्वाद दिल्यानंतर त्यानेंही त्यांचें अभिनंदन केलें आणि नंतर ते नागरिक जन भ्रात्यांनीं परिवेष्टित असलेल्या त्या महात्म्या रामाच्या मागोमाग निघाले ३५. त्यावेळीं नक्षत्रांच्या योगानें ज्याप्रमाणें चंद्रमा झळकत असतो त्याप्रमाणें अमात्य, ब्राह्मण व प्रजाजन ह्यांनीं परिवेष्टित असलेला तो राम कांतीनें झळकूं लागला ३६. राम चालला असतांना त्याच्या सभोंवतीं व

लस्वस्तिकपाणिभिः । प्रत्याहरद्भिर्मुदितैर्मङ्गलानि वृतो ययौ ३७ अक्षतं जातरूपं च गावः कन्याः सहद्विजाः । नरा मोदकहस्ताश्च रामस्य पुरतो ययुः ३८ सख्यं च रामः सुग्रीवे प्रभावं चानिलात्मजे । वानराणां च तत्कर्म ह्याचचक्षेऽथ मन्त्रिणाम् ३९ श्रुत्वा च विस्मयं जग्मुरयोध्यापुरवासिनः । वानराणां च तत्कर्म राक्षसानां च तद्बलम् ४० द्युतिमानेतदाख्याय रामो वानरसंयुतः । हृष्टपुष्टजनाकीर्णामयोध्यां प्रविवेश सः ४१ ततो ह्यभ्युच्छ्रयन्पौराः पताकाश्च गृहे गृहे । ऐक्ष्वाकाध्युषितं रम्यमाससाद पितुर्गृहम् ४२ अथाब्रवीद्राजपुत्रो भरतं धर्मिणां वरम् । अर्थोपहितया वाचा मधुरं रघुनन्दनः ४३ पितुर्भवनमासाद्य प्रवेश्य च महात्मनः । कौसल्यां च सुमित्रां च कैकेयीमभिवाद्य ४४ तच्च मद्भवनं श्रेष्ठं साशोकवनिकं महत् । मुक्तावैडूर्यसंकीर्णं सुग्रीवाय निवेदय ४५ तस्य तद्वचनं श्रुत्वा भरतः सत्यविक्रमः । हस्ते गृहीत्वा सुग्रीवं प्रविवेश तमालयम् ४६ तत-

---

पुढें मंगलसूचक गीतें वाजवीत वाजवीत वाजंत्रीं चाललें होते व त्यांच्या हातामध्यें टाळा व स्वस्तिक हीं वाद्यें होतीं ३७ अक्षता, सुवर्ण, गाई, द्विजांसहवर्तमान कन्या आणि हातामध्यें मोदक घेतलेले पुरुष रामाच्या पुढें चालले होते ३८. नंतर सुग्रीवाशीं झालेलें आपलें सख्य, वायुपुत्र हनुमानाचे ठिकाणीं असलेलें सामर्थ्य आणि वानरांचें तें कर्म रामानें मंत्र्यांना कथन केलें असतां ३९ वानरांचा तो पराक्रम व राक्षसांचें तें बल ऐकून अयोध्यानगरीमध्यें वास्तव्य करणारे लोक आश्चर्यचकित झाले ४०. वानरांनीं युक्त असलेला तो तेजस्वी राम हें सांगितल्यानंतर संतुष्ट[1] व पुष्ट प्रजाजनांनीं व्याप्त असलेल्या अयोध्येमध्यें प्रविष्ट झाला ४१. तदनंतर नागरिक लोकांनीं घरोघर गुड्या उभारिल्या असतां इक्ष्वाकुवंशज ज्यामध्यें वास्तव्य करीत आलेले आहेत अशा आपल्या पित्याच्या रमणीय गृहासमीप राम आला ४२. नंतर तो रघुनंदन राजपुत्र राम धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेल्या भरताला यथार्थ वाणीनें व मधुर स्वरानें ह्मणाला ४३ " महात्म्या पित्याच्या गृहासमीप आल्यानंतर वानरांना तूं आंत ने आणि कौसल्या, सुमित्रा व कैकयी ह्यांना त्यांच्याकडून अभिवंदन करीव ४४. मोत्यें व वैडूर्यमणि ह्यांनीं गजबजून गेलेलें तें माझें प्रचंड श्रेष्ठ गृह अशोकवनासहवर्तमान तूं सुग्रीवाला निवेदन कर " ४५. तें त्याचें भाषण श्रवण केल्यानंतर सत्यपराक्रमी भरत सुग्रीवाला हातीं धरून त्या गृहामध्यें प्रविष्ट झाला ४६. तदनंतर

---

१ पुरातन ग्रंथांतून हृष्टपुष्टजनाकीर्ण असें विशेषण ठिकठिकाणीं नगरांना दिलेलें आढळतें. हें एकच विशेषण देशादिकांना अन्वर्थक लागू पडणें हें त्या त्या देशांत, प्रांतांत वगैरे उत्कृष्ट प्रतीची सुधारणा असल्याचें दर्शक आहे.

तैलप्रदीपांश्च पर्यङ्कास्तरणानि च । गृहीत्वा विविशुः क्षिप्रं शत्रुघ्नेन प्रचोदिताः ४७ उवाच च महातेजाः सुग्रीवं राघवानुजः । अभिषेकाय रामस्य दूतानाज्ञापय प्रभो ४८ सौवर्णान्वानरेन्द्राणां चतुर्णां चतुरो घटान् । ददौ क्षिप्रं स सुग्रीवः सर्वरत्नविभूषितान् ४९ तथा प्रत्यूषसमये चतुर्णां सागराम्भसाम् । पूर्णैर्घटैः प्रतीक्षध्वं तथा कुरुत वानराः ५० एवमुक्ता महात्मानो वानरा वारणोपमाः । उत्पेतुर्गगनं शीघ्रं गरुडा इव शीघ्रगाः ५१ जाम्बवांश्च हनूमांश्च वेगदर्शी च वानरः । ऋषभश्चैव कलशाञ्जलपूर्णानथानयन् ५२ नदीशतानां पञ्चानां जलं कुम्भैरुपाहरन् । पूर्वात्समुद्रात्कलशं जलपूर्णमथानयत् ५३ सुषेणः सत्त्वसंपन्नः सर्वरत्नविभूषितम् । ऋषभो दक्षिणात्तूर्णं समुद्राज्जलमानयत् ५४ रक्तचन्दनकर्पूरैः संवृतं काञ्चनं घटम् । गवयः पश्चिमात्तोयमाजहार महार्णवात् ५५ रत्नकुम्भेन महता शीतं मारुतविक्रमः । उत्तराच्च जलं शीघ्रं गरुडानिलविक्रमः ५६ आजहार स धर्मात्मानिलः सर्वगुणान्वितः । ततस्तैर्वानरश्रेष्ठैरानीतं प्रेक्ष्य तज्जलम् ५७

---

शत्रुघ्नानें आज्ञा केली असतां तेलाचे दीप व पलंगपोस घेऊन रक्षक सत्वर त्या गृहाच्या अन्तर्भागामध्यें प्रविष्ट झाले ४७. नंतर रामानुज महातेजस्वी भरत "हे प्रभो, रामाच्या अभिषेकाकरितां दूतांना आज्ञा करा" असें सुग्रीवाला ह्मणाला ४८. तेव्हां मुख्य मुख्य चार वानरांना सर्व रत्नांनीं विभूषित असे चार सुवर्णमय घट सुग्रीवानें सत्वर दिले ४९ ( आणि ते देतांना तो ह्मणाला ) "हे वानरहो, पहांटेस चार समुद्राच्या उदकानीं भरलेल्या घटांसहवर्तमान तुह्मांला आमची वाट पहात बसावें लागेल अशी व्यवस्था ठेवा" ५०. ह्याप्रमाणें त्या गजतुल्य महात्म्या वानरांना सुग्रीवानें सांगितलें असतां शीघ्रगामी गरुडांप्रमाणें त्यांनीं सत्वर आकाशामध्यें उड्डाण केलें ५१. नंतर जांबवान्, हनुमान्, वेगदर्शी व ऋषभ हे वानर उदकानें भरलेले कलश घेऊन आले ५२. त्याचप्रमाणें इतर वानर पांचशें नद्यांचें उदक कलशांमध्यें घेऊन आले. सारांश, धैर्यवान् सुषेण सर्व रत्नांनीं विभूषित आणि जलानें परिपूर्ण असा कलश पूर्वसमुद्रापासून घेऊन आला. ऋषभ वानर दक्षिणसमुद्रापासून सत्वर जल घेऊन आला ५३, ५४. त्यानें सुवर्णमय घट आणिला होता आणि रक्तचंदन व कापूर ह्यांनीं तो घट व्याप्त झालेला होता. नंतर वायूप्रमाणें ज्याची गति आहे असा गवय मोठ्या रत्नजडित कुंभामध्यें पश्चिममहासागरापासून शीतळ उदक घेऊन आला. सर्वगुणसंपन्न, गतीमध्यें गरुड व वायु ह्यांची बरोबरी करणारा आणि धर्मात्मा असा जो वायुपुत्र हनुमान् तो उत्तरसमुद्रापासून सत्वर उदक घेऊन आला. ह्याप्रमाणें श्रेष्ठ वानरांनीं आणिलेलें तें उदक अवलोकन

अभिषेकाय रामस्य शत्रुघ्नः सचिवैः सह । पुरोहिताय श्रेष्ठाय सुहृद्भ्यश्च न्यवेदयत् ५८ ततः स प्रयतो वृद्धो वसिष्ठो ब्राह्मणैः सह । रामं रत्नमये पीठे ससीतं संन्यवेशयत् ५९ वसिष्ठो विजयश्चैव जाबालिरथ काश्यपः। कात्यायनो गौतमश्च वामदेवस्तथैव च ६० अभ्यषिञ्चन्नरव्याघ्रं प्रसन्नेन सुगन्धिना । सलिलेन सहस्राक्षं वसवो वासवं यथा ६१ ऋत्विग्भिर्ब्राह्मणैः पूर्वं कन्याभिर्मन्त्रिभिस्तथा । योधैश्चैवाभ्यषिञ्चंस्ते संप्रहृष्टैः सनैगमैः ६२ सर्वौषधिरसैश्चापि दैवतैर्नभसि स्थितैः । चतुर्भिर्लोकपालैश्च सर्वैर्देवैश्च सङ्गतैः ६३ ब्रह्मणा निर्मितं पूर्वं किरीटं रत्नशोभितम् । अभिषिक्तः पुरा येन मनुस्तं दीप्ततेजसम् ६४ तस्यान्ववाये राजानः क्रमाद्येनाभिषेचिताः । सभायां हेमक्लृप्तायां शोभितायां महाधनैः ६५ रत्नैर्नानाविधैश्चैव चित्रितायां सुशोभनैः । नानारत्नमये पीठे कल्पयित्वा यथाविधि ६६ किरीटेन ततः पश्चाद्वसिष्ठेन महात्मना । ऋत्विग्भिर्भूषणैश्चैव समयोक्ष्यत राघवः ६७ छत्रं तस्य च जग्राह शत्रुघ्नः पाण्डुरं शुभम् ।

---

केल्यानंतर ५५,५६,५७ सचिवांसहवर्तमान शत्रुघ्नानें रामाला अभिषेक करण्याविषयीं श्रेष्ठ पुरोहिताला व सुहृदांना सांगितलें ५८. तदनंतर ब्राह्मणांसहवर्तमान त्या प्रयत्नशील वृद्ध वसिष्ठमुनींनीं रत्नमय सिंहासनावर सीतेसहवर्तमान रामाला बसविलें ५९. नंतर अष्टवसूंनीं ज्याप्रमाणें सहस्रनयन इंद्राला अभिषेक केला त्याप्रमाणें वसिष्ठ, विजय, जाबालि, कश्यप, कात्यायन, गौतम आणि वामदेव ह्यांनीं निर्मल व सुगंधि उदकानें पुरुषश्रेष्ठ रामाला अभिषेक केला ६०,६१. प्रथमतः ऋत्विज, ब्राह्मण, कन्या व मंत्री ह्यांच्याकडून अभिषेक करवून उदम्यांसहवर्तमान आनंदित झालेल्या योद्ध्यांकडूनही त्यांनीं त्याला अभिषेक करविला ६२. त्याचप्रमाणें आकाशामध्यें स्थित असलेल्या देवतांकडून, चार लोकपालांकडून आणि एकत्र जुळलेल्या सर्व देवांकडून सर्वप्रकारच्या ओषधिरसांनींही वसिष्ठप्रभृतींनीं रामाला अभिषेक करविला ६३. जो किरीट मस्तकीं असतांना पूर्वी मनूला अभिषेक झाला होता तो-देदीप्यमान तेजानें युक्त असलेला, ब्रह्मदेवानें पूर्वी निर्माण केलेला व रत्नांनीं शृंगारिलेला-किरीट वसिष्ठांनीं हातामध्यें घेतला. त्या मनूच्या वंशामध्यें क्रमाक्रमानें जे राजे होऊन गेले त्यांनाही तोच किरीट असतांना अभिषेक झाला होता. सुवर्णमय, मोठ्या मोठ्या मूल्यवान् वस्तूंनीं सुशोभित आणि नानाप्रकारच्या उत्कृष्ट रत्नांनीं भूषित अशा सभास्थानामध्यें अनेक रत्नमय सिंहासनावर वसिष्ठांनीं देदीप्यमान तेजानें युक्त असलेल्या रामाला यथाविधि बसविलें ६४, ६५, ६६. नंतर महात्म्या वसिष्ठमुनींनीं राघवाचे मस्तकीं किरीट चढविला व ऋत्विजांनीं त्याला

श्वेतं च वालव्यजनं सुग्रीवो वानरेश्वरः६८अपरं चन्द्रसंकाशं राक्षसेन्द्रो विभीषणः । मालां ज्वलन्तीं वपुषा काञ्चनीं शतपुष्करम् ६९ राघवाय ददौ वायुर्वासवेन प्रचोदितः । सर्वरत्नसमायुक्तं मणिभिश्च विभूषितम् ७० मुक्ताहारं नरेन्द्राय ददौ शक्रप्रचोदितः । प्रजगुर्देवगन्धर्वा ननृतुश्चाप्सरोगणाः ७१ अभिषेके तदर्हस्य तदा रामस्य धीमतः । भूमिः सस्यवती चैव फलवन्तश्च पादपाः ७२ गन्धवन्ति च पुष्पाणि बभूवू राघवोत्सवे । सहस्रशतमश्वानां धेनूनां च गवां तथा ७३ ददौ शतवृषान्पूर्वं द्विजेभ्यो मनुजर्षभः । त्रिंशत्कोटीर्हिरण्यस्य ब्राह्मणेभ्यो ददौ पुनः ७४ नानाभरणवस्त्राणि महार्हाणि च राघवः । अर्करश्मिप्रतीकाशां काञ्चनीं मणिविग्रहाम् ७५ सुग्रीवाय स्रजं दिव्यां प्रायच्छन्मनुजाधिपः । वैदूर्यमयचित्रे च चन्द्ररश्मिविभूषिते ७६ वालिपुत्राय धृतिमानङ्गदायाङ्गदे ददौ । मणिप्रवरजुष्टं तं मुक्ताहारमनुत्तमम् ७७ सीतायै प्रददौ रामश्चन्द्ररश्मिसमप्रभम् । अरजे वाससी दिव्ये शुभान्याभरणानि च ७८ अवेक्षमाणा

---

अलंकार घातले ६७. शत्रुघ्नानें त्या रामावर शुभ्रवर्ण व शुभ छत्र धरिलें; वानराधिपति सुग्रीव श्वेतवर्ण चौरी वारूं लागला ६८ आणि राक्षसराज बिभीषण चंद्रासारिखें दुसरें चामर वारीत राहिला. शंभर कमलांनीं युक्त व कांतीनें झळकत असलेली सुवर्णमय माला ६९ इंद्राची आज्ञा झाल्यामुळें वायूनें रामाला अर्पण केली आणि इंद्राची आज्ञा झाल्यामुळें—सर्व रत्नांनीं युक्त व हिऱ्यांनीं सुशोभित असा—एक मोत्यांचा हारही त्यानें त्या रामराजाला दिला ७०. देवगायन, नृत्य इत्यादिकांना योग्य असलेल्या विचारी रामाला अभिषेक होऊं लागला असतां देवगंधर्व गायन करूं लागले; अप्सरांचे समुदाय नृत्य करूं लागले; भूमि धान्ययुक्त झाली; वृक्ष फलांनीं भरून गेले ७१,७२ आणि त्या रामाभिषेकोत्सवसमयीं पुष्पेंही सुगंधी झालीं. लक्षावधि अश्व, गाई, दुभत्या धेनु ७३ आणि शेंकडों वृषभ पुरुषश्रेष्ठ रामानें प्रथमतः द्विजांना दिले; तीस कोटी मोहोरा रामानें ब्राह्मणांना अर्पण केल्या ७४ आणि नानाप्रकारचीं मोठीं मोठीं मूल्यवान् भूषणें व वस्त्रेंही त्यानें त्यांना दिलीं. प्रजाधिपति रामानें सुग्रीवाला एक दिव्य माला दिली; तिची कांति सूर्यकिरणांप्रमाणें होती आणि ती रत्नमय माला सुवर्णानें गुंफिलेली होती. वैदूर्यमय, मनोहर आणि चंद्रकिरणांप्रमाणें आल्हादकारक ७५,७६ अशीं बाहुभूषण वालिपुत्र अंगदाला धैर्यवान् रामानें दिलीं. उत्कृष्ट रत्नें ज्यांत गुंफिलीं आहेत आणि चंद्रकिरणांप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा तो मोत्यांचा अनुपम हार रामानें सीतेला दिला आणि निर्मल व दिव्य अशीं दोन वस्त्रं आणि शुभ

वैदेही प्रददौ वायुसूनवे । अवमुच्यात्मनः कण्ठाद्धारं जनकनन्दिनी ७९ अवैक्षत हरीन्सर्वान्भर्तारं च मुहुर्मुहुः । तामिङ्गितज्ञः संप्रेक्ष्य बभाषे जनकात्मजाम् ८० प्रदेहि सुभगे हारं यस्य तुष्टासि भामिनि । अथ सा वायुपुत्राय तं हारमसितेक्षणा ८१ तेजो धृतिर्यशो दाक्ष्यं सामर्थ्यं विनयो नयः । पौरुषं विक्रमो बुद्धिर्यस्मिन्नेतानि नित्यदा ८२ हनूमांस्तेन हारेण शुशुभे वानरर्षभः । चन्द्रांशुचयगौरेण श्वेताभ्रेण यथाचलः ८३ सर्वे वानरवृद्धाश्च ये चान्ये वानरोत्तमाः । वासोभिर्भूषणैश्चैव यथार्हं प्रतिपूजिताः ८४ विभीषणोऽथ सुग्रीवो हनूमाञ्जाम्बवांस्तथा । सर्वे वानरमुख्याश्च रामेणाक्लिष्टकर्मणा ८५ यथार्हं पूजिताः सर्वे कामै रत्नैश्च पुष्कलैः । प्रहृष्टमनसः सर्वे जग्मुरेव यथागतम् ८६ ततो द्विविदमैन्दाभ्यां नीलाय च परन्तपः । सर्वान्कामगुणान्वीक्ष्य प्रददौ वसुधाधिपः ८७ दृष्ट्वा सर्वे महात्मानस्ततस्ते वानरर्षभाः । विसृष्टाः पार्थिवेन्द्रेण किष्किन्धां समुपागमन् ८८ सुग्रीवो वानरश्रेष्ठो दृष्ट्वा रामाभिषेचनम् । पूजितश्चैव रामेण

---

भूषणेंही त्यानें तिला अर्पण केलीं ७७,७८. वायुपुत्र हनुमानानें केलेले उपकार मनामध्यें आणून जनककन्या सीतेनें आपल्या कंठांतून हार काढिला आणि त्याला दिला ७९. परंतु, तो देण्याचेपूर्वीं सर्व वानरांकडे आणि भर्त्याकडे तीं वारंवार पाहूं लागली असतां इंगितज्ञ राम जानकीकडे पाहून तिला ह्मणाला ८० " हे सुभगे, हे सुंदरि, ज्याच्यावर तूं संतुष्ट झाली आहेस त्याला तूं हार अर्पण कर ". ह्यानंतर कृष्णनेत्रांनीं युक्त असलेल्या त्या सीतेनें तो हार वायुपुत्र हनुमानाला अर्पण केला ८१. तेज, धैर्य, यश, दक्षता, सामर्थ्य, विनय, न्याय, पौरुष, पराक्रम आणि बुद्धि हे गुण सर्वदा त्या वायुपुत्र हनुमानाचे ठिकाणीं वास्तव्य करीत होते ८२. असो. श्वेत मेघाच्या योगानें ज्याप्रमाणें पर्वत शोभूं लागतो त्याप्रमाणें त्या चंद्रकिरणसमूहतुल्य गौरवर्ण हारानें तो वानरश्रेष्ठ हनुमान् शोभूं लागला ८३. नंतर सर्व वृद्ध वृद्ध वानर आणि इतरही श्रेष्ठ श्रेष्ठ वानर ह्यांचे योग्यतेनुरूप वस्त्र व भूषणें देऊन पूजन करण्यांत आलें ८४. बिभीषण, सुग्रीव, हनुमान्, जांबवान् व इतरही सर्व वानरश्रेष्ठ ह्या सर्वांचें उदार पराक्रम करणाऱ्या रामानें असंख्य रत्नें व इष्ट वस्तु देऊन योग्यतेनुरूप पूजन केलें व नंतर ते सर्वही मनामध्यें संतुष्ट होऊन आल्या मार्गानें परत गेले ८५,८६. तदनंतर शत्रूंना ताप देणाऱ्या प्रजाधिपति रामानें द्विविद, मैंद व नील ह्यांचें कार्य लक्ष्यांत आणून सर्वप्रकारच्या उत्कृष्ट भोग्य वस्तु त्यांना अर्पण केल्या ८७ नंतर त्या सर्वही महात्म्या वानरश्रेष्ठांकडे पाहून राजाधिराज रामानें त्यांना अनुज्ञा दिली असतां ते किष्किंधानगरीला गेले ८८ रामाला

किष्किन्धां प्राविशत्पुरीम् ८९ विभीषणोऽपि धर्मात्मा सह तैर्नैर्ऋतर्षभैः। लब्ध्वा कुलधनं राजा लङ्कां प्रायान्महायशाः९० स राज्यमखिलं शासन्निहतारिर्महायशाः । राघवः परमोदारः शशास परया मुदा ॥ उवाच लक्ष्मणं रामो धर्मज्ञं धर्मवत्सलः ९१ आतिष्ठ धर्मज्ञ मया सहेमां गां पूर्वराजाध्युषितां बलेन । तुल्यं यथा त्वं पितृभिः पुरस्तात्तैयौंवराज्ये धुरमुद्वहस्व ९२ सर्वात्मना पर्यनुनीयमानो यदा न सौमित्रिरुपैति योगम् । नियुज्यमानो भुवि यौवराज्ये ततोऽभ्यषिञ्चद्भरतं महात्मा ९३ पौण्डरीकाश्वमेधाभ्यां वाजिमेधेन चासकृत् । अन्यैश्च विविधैर्यज्ञैरयजत्पार्थिवात्मजः ९४ राज्यं दशसहस्राणि प्राप्य वर्षाणि राघवः । दशाश्वमेधानाजह्रे सदश्वान्भूरिदक्षिणान् ९५ आजानुलम्बिबाहुः स महावक्षाः प्रतापवान् । लक्ष्मणानुचरो रामः शशास पृथिवीमिमाम् ९६ राघवश्चापि धर्मात्मा प्राप्य राज्यमनुत्तमम् । ईजे बहुविधैर्यज्ञैः ससुतभ्रातृबान्धवः ९७

---

अभिषेक झाल्याचें दृष्टीं पडल्यावर आणि रामानें पूजन केल्यावर वानरश्रेष्ठ सुग्रीव किष्किंधानगरीमध्यें प्रविष्ट झाला ८९; धर्मात्मा व महायशस्वी बिभीषणही लंकाराज्यरूप कुलधन प्राप्त झाल्यानंतर त्या राक्षसश्रेष्ठांसहवर्तमान लंकेमध्यें गेला ९०; नंतर शत्रूंचा ज्यानें वध केला आहे असा तो महाकीर्तिमान् व अत्यंत उदार रघुवंशज राम दुष्टांचा निग्रह करीत करीत मोठ्या आनंदानें पृथ्वीचें परिपालन करूं लागला आणि तो धर्मवत्सल राम धर्मवेत्त्या लक्ष्मणाला ह्मणाला ९१ "हे धर्मवेत्त्या, माझ्यासहवर्तमान तूं ह्या पृथ्वीचें परिपालन कर. पूर्वीं होऊन गेलेल्या राजांनीं स्वसामर्थ्यानें हिचें परिपालन केलेलें आहे. ह्यास्तव, पूर्वीं पूर्वजांनीं ज्याप्रमाणें यौवराज्यावर असतांना राज्याचें जोकाड धारण केलें होतें त्याप्रमाणें तूं धारण कर" ९२. सर्व प्रकारें राम मन वळवूं लागला असतांही आणि यौवराज्य स्वीकारण्याविषयीं भरत सुद्धां सांगत असतांनाही सुमित्रापुत्र लक्ष्मणानें यौवराज्याचा स्वीकार करण्याचें जेव्हां नाकारिलें तेव्हां महात्म्या रामानें भरताला पृथ्वीवरील यौवराज्याचा अभिषेक केला ९३. राजकुमार रामानें पौंडरीक, अश्वमेध आणि विशेषतः वाजिमेध वारंवार करून इतरही नानाप्रकारचे यज्ञ केले ९४. रघुवंशज रामानें दहा हजार वर्षें राज्य करून उत्कृष्ट अश्व आणि विपुल दक्षिणा ह्यांनीं युक्त असे दहा अश्वमेध केले ९५. ज्याचे हात गुडघ्यापर्यंत लोंबत होते, ज्याचें वक्षःस्थल विशाल होतें आणि लक्ष्मण ज्याचा अनुयायी होता अशा त्या प्रतापी रामानें ह्या पृथ्वीचें परिपालन केलें ९६. सारांश, धर्मात्म्या रामाला अनुपम राज्य प्राप्त झाल्यानंतर पुत्र, भ्राते व बांधव

न पर्यदेवन्विधवा न च व्यालकृतं भयम् । न व्याधिजं भयं चासीद्रामे राज्यं प्रशासति ९८ निर्दस्युरभवल्लोको नानर्थं कश्चिदस्पृशत् । न च स्म वृद्धा बालानां प्रेतकार्याणि कुर्वते ९९ सर्वं मुदितमेवासीत्सर्वो धर्मपरोऽभवत् । राममेवानुपश्यन्तो नाभ्यहिंसन्परस्परम् १०० आसन्वर्षसहस्राणि तथा पुत्रसहस्रिणः । निरामया विशोकाश्च रामे राज्यं प्रशासति १ नित्यमूला नित्यफलास्तरवस्तत्र पुष्पिताः । कामवर्षी च पर्जन्यः सुखस्पर्शश्च मारुतः २ स्वकर्मसु प्रवर्तन्ते तुष्टाः स्वैरेव कर्मभिः । आसन्प्रजा धर्मपरा रामे शासति नानृताः ३ सर्वे लक्षणसंपन्नाः सर्वे धर्मपरायणाः । दशवर्षसहस्राणि रामो राज्यमकारयत् ४ धर्म्यं यशस्यमायुष्यं राज्ञां च विजयावहम् । आदिकाव्यमिदं चार्षं पुरा वाल्मीकिना कृतम् ५ यः शृणोति सदा लोके नरः पापात्प्रमुच्यते । पुत्रकामश्च पुत्रान्वै धनकामो धनानि च ६ लभते मनुजो लोके श्रुत्वा रामाभिषेचनम् । महीं विजयते राजा रिपूंश्चाप्यधितिष्ठति ७ राघवेण यथा माता

---

ह्यांसहवर्तमान त्यानें नानाप्रकारचे यज्ञ केले ९७. राम राज्य करीत असतांना स्त्रियांना अकालीं वैधव्य येऊन शोक करण्याचा प्रसंग आला नाहीं आणि सर्पजन्य व व्याधिजन्य भयही त्यावेळीं प्रजेला प्राप्त झालें नाहीं ९८. लोकांमध्यें कोणी चोर नव्हता; कोणावरही अनर्थ गुदरला नाहीं आणि वृद्धांना बालकांचीं प्रेतकर्में करावीं लागलीं नाहींत ९९. सर्व कांहीं आनंदयुक्तच होतें; सर्व लोक धर्मनिष्ठ होते आणि रामा(च्या वर्तना)कडे लक्ष्य देऊन लोक परस्परांच्या हिंसेपासून पराङ्मुख होते १००. राम राज्य करीत असतांना प्रजाजन रोग व शोक ह्यांनीं रहित आणि हजारों पुत्रांनीं युक्त असून हजारों वर्षें वांचत असत १. सर्वदां फळें व मुळें ह्यांनीं युक्त असलेले प्रफुल्लित वृक्ष त्यावेळीं असत; पर्जन्य हवा तसा पडत असे आणि वायु सुखावह वहात असे २. राम राज्य करीत असतांना प्रजाजन स्वकर्मावरच संतुष्ट होऊन स्वकर्मेंच करीत असत आणि धर्मनिष्ठ राहून असत्याचें अवलंबन करीत नसत ३.; इतकेंच नव्हे परंतु, सर्वही प्रजाजन सद्गुणी असून सर्वही धर्मनिष्ठ असत. सारांश, अशारीतीनें रामानें दहा हजार वर्षेंपर्यंत राज्य केलें ४. असो. वाल्मीकिमुनींनीं पूर्वीं केलेलें, वेदतुल्य, यशस्कर, आयुर्वर्धक, राजांना विजयप्रद आणि धर्म्य असें हें आदिकाव्य ५ जगतामध्यें जो पुरुष श्रवण करितो तो पापापासून मुक्त होतो. रामाभिषेकापर्यंत रामायण श्रवण केलें असतां पुत्रेच्छु पुरुषाला इहलोकीं पुत्रप्राप्ति होत असून द्रव्येच्छु पुरुषाला द्रव्यप्राप्ति होते आणि राजानें तें श्रवण केलें असतां तो पृथ्वी जिंकून शत्रूंना पादाक्रांत करितो ६, ७.

सुमित्रा लक्ष्मणेन च । भरतेन च कैकेयी जीवपुत्रास्तथा स्त्रियः ८ श्रुत्वा रामायणमिदं दीर्घमायुश्च विन्दति । रामस्य विजयं चेमं सर्वमक्लिष्टकर्मणः ९ शृणोति य इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् । श्रद्दधानो जितक्रोधो दुर्गाण्यतितरत्यसौ १० समागम्य प्रवासान्ते रमन्ते सह बान्धवैः। शृण्वन्ति य इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् ११ ते प्रार्थितान्वरान्सर्वान्प्राप्नुवन्तीह राघवात् । श्रवणेन सुराः सर्वे प्रीयन्ते संप्रशृण्वताम् १२ विनायकाश्च शाम्यन्ति गृहे तिष्ठति यस्य वै । विजयेत महीं राजा प्रवासी स्वस्तिमान्भवेत् १३ स्त्रियो रजस्वलाः श्रुत्वा पुत्रान्सूयुरनुत्तमान् । पूजयंश्च पठंश्चैनमितिहासं पुरातनम् १४ सर्वपापैः प्रमुच्येत दीर्घमायुरवाप्नुयात् । प्रणम्य शिरसा नित्यं श्रोतव्यं क्षत्रियैर्द्विजात् १५ ऐश्वर्यं पुत्रलाभश्च भविष्यति न संशयः । रामायणमिदं कृत्स्नं शृण्वतः पठतः सदा १६ प्रीयते सततं रामः स हि विष्णुः सनातनः । आदिदेवो महाबाहुर्हरिर्नारायणः प्रभुः १७ एवमेतत्पुरावृत्तमाख्यानं भद्रमस्तु वः । प्रव्या-

---

रामाच्या योगानें ज्याप्रमाणें माता कौसल्या, लक्ष्मणाच्या योगानें ज्याप्रार्णे सुमित्रा अथवा भरताच्या योगानें ज्याप्रमाणें कैकेई पुत्रवती झाली, त्याप्रमाणें रामायण श्रवण केल्यानें स्त्रिया पुत्रवती होतात. हें रामायण आणि उदारकर्म करणाऱ्या रामाचा विजय श्रवण केल्यानें दीर्घायुष्य प्राप्त होतें ९. पूर्वी वाल्मीकिमहर्षींनीं केलेलें हें काव्य जो क्रोध जिंकिलेला पुरुष श्रद्धापूर्वक श्रवण करितो तो संकटांतून तरून जातो १० वाल्मीकिमहर्षींनीं पूर्वी केलेलें हें काव्य जे श्रवण करितात त्यांचे सर्व उद्दिष्ट मनोरथ परिपूर्ण होतात आणि प्रवास संपल्यानंतर बांधवांशीं समागम होऊन त्यांच्यासहवर्तमान ते रममाण होतात. जे लोक हें रामायण श्रवण करितात त्यांच्यावर सर्व देव त्या श्रवणाच्या योगानें प्रसन्न होतात ११,१२ आणि ज्याच्या घरीं हें रामायण असतें त्याच्या; घरांतील विघ्नकारक देवगण शांत होतात. हें काव्य श्रवण केल्यानें राजा पृथ्वी जिंकितो; प्रवासी पुरुष मार्गामध्यें सुखरूप रहातो आणि रजोयुक्त स्त्रियांना अनुपम पुत्र प्राप्त होतात. हा पुरातन इतिहास संमानपूर्वक जो पठण करितो तो सर्व पातकांपासून मुक्त होतो व त्याला दीर्घ आयुष्य प्राप्त होतें. क्षत्रियांनीं मस्तकानें प्रणाम करून हें रामायण द्विजांपासून नेहेमीं श्रवण करावें १३,१४,१५. ह्मणजे त्यांना निःसंशय ऐश्वर्य व पुत्र ह्यांचा लाभ होतो. हें संपूर्ण रामायण जो सर्वदा श्रवण व पठण करितो १६ त्याच्यावर तो सनातन विष्णुस्वरूप राम नेहेमीं प्रसन्न राहतो. तो महापराक्रमी रामच आदिदेव असून जगताचा अधिपति हरि व नारायणही तोच आहे १७. ह्याप्रमाणें पूर्वी घडलेलें हें

हरत विस्रब्धं बलं विष्णोः प्रवर्धताम् १८ देवाश्च सर्वे तुष्यन्ति ग्रहणाच्छ्रवणात्तथा । रामायणस्य श्रवणे तृप्यन्ति पितरः सदा १९ भक्त्या रामस्य ये चेमां संहितामृषिणा कृताम् । ये लिखन्तीह च नरास्तेषां वासस्त्रिविष्टपे १२० कुटुम्बवृद्धिं धनधान्यवृद्धिं स्त्रियश्च मुख्याः सुखमुत्तमं च । श्रुत्वा शुभं काव्यमिदं महार्थं प्राप्नोति सर्वां भुवि चार्थसिद्धिम् १२१ आयुष्यमारोग्यकरं यशस्यं सौभ्रातृकं बुद्धिकरं शुभं च । श्रोतव्यमेतन्नियमेन सद्भिराख्यानमोजस्करमृद्धिकामैः १२२ [५७९५*] [२०२९२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये युद्धकाण्डेऽष्टाविंशत्यधिकशततमः सर्गः ॥ १२८ ॥

इति श्रीगोमतीतीरनैमिषारण्याश्वमेधसप्ततन्तुवाटगतमुनीन्द्रद्विजेन्द्रादिवसुधाधिपेन्द्रपरिवृतस्य मुनिवृन्दारकवृन्दवन्द्यमानकोरकाकारचरणयुगलस्य सद्भ्रातृमन्मित्रमन्मन्त्रिसहितस्य साकेतपुरवराधीश्वरस्य दीनानां दैन्यहरण उदीर्णवीर्योत्सिक्तरावणवधार्थं देवैः प्रार्थितस्य रघुकुलतिलक-

---

आख्यान आहे. तुमचें कल्याण असो. तुह्मी विश्वासपूर्वक हें पठण करीत जा आणि त्याच्या योगानें विष्णूचें बल वृद्धिंगत होऊं द्या १८. रामायणाचा पाठ घेतल्यानें आणि त्याचप्रमाणें रामायण श्रवण केल्यानें सर्व देव संतुष्ट होतात आणि रामायणाचें श्रवण होऊं लागलें असतां पितरही सर्वदा संतुष्ट असतात १९. वाल्मीकिमहर्षींनीं केलेली ही रामसंहिता जे पुरुष लिहून काढितात आणि श्रवण करितात त्यांचें स्वर्गामध्यें वास्तव्य होतें १२०. गंभीर अर्थानें युक्त असें हें शुभ काव्य श्रवण केलें असतां कुटुंबवृद्धि, धनधान्यवृद्धि, उत्कृष्ट स्त्रिया, अनुपम सुख आणि इहलोकसंबंधीं कोणताही मनोरथ ह्यांची प्राप्ति होते २१. तस्मात्, आपला अभ्युदय व्हावा अशी इच्छा करणाऱ्या सज्जनांनीं हें काव्य नियमानें श्रवण करावें. कारण, हें आयुर्वर्धक, आरोग्यदायक, यशस्कारक, बुद्धिवर्धक, तेजस्कारक व शुभ असून भ्रातृप्रेम वृद्धिंगत करणारें आहे १२२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील युद्धकांडापैकीं एकशें अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ १२८ ॥ ह्या ठिकाणीं युद्धकांडही संपूर्ण झालें.

---

* ८५ व्या सर्गाचे शेवटीं श्लोकाची बेरीज ३८१६ आहे ती चुकीची असून ३८१७ ही बेरीज तेथें पाहिजे. त्याठिकाणीं चूक झाल्यामुळें पुढेंही शेवट पर्यंत तीच कायम राहून एका संख्येनें पुढच्या सर्व बेरजा कमी आहेत. तेव्हां १२८ व्या सर्गाचे शेवटली खरी बेरीज. ५७९५ होत आहे व युद्धकांडासुद्धा एकंदर सहा कांडांच्या श्लोकांची संख्या २०२९२ होत आहे.

संभूतस्य श्रीसीताविशेषकस्य लक्ष्मीपतेः साम्यांशस्य लक्ष्मीवतो राजाधिराजस्य लोकाभिरामस्य निकटोक्तयोः श्रीरामात्मजयोरादिकविशिष्ययोः कुशलवयोराख्याने श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये चतुर्विंशतिसहस्रिकायां संहितायां श्रीमद्युद्धकाण्डे पञ्चविंशेऽह्नि वर्तमानकथाप्रसङ्गः समाप्तः ॥ ॥ इति श्रीरामायणे युद्धकाण्डं समाप्तम् ॥



॥ श्रीः ॥

# मराठी भाषांतरासह रामायण.



## उत्तरकांड.

काशीनाथ वामन लेले वाईकर

त्यांनीं

वाई येथें मोदवृत्त छापखान्यांत छापून मोदवृत्तवर्तमानपत्रद्वारा

प्रसिद्ध केलें.







शके १८२२.

[illegible]

॥ श्रीः ॥

# श्रीमहामुनिवाल्मीकिप्रणीतं श्रीरामायणम् ॥

## ७ उत्तरकाण्डम् ।

श्रीः॥ प्राप्तराज्यस्य रामस्य राक्षसानां वधे कृते । आजग्मुर्मुनयः सर्वे राघवं प्रति नन्दितुम् १ कौशिकोऽथ यवक्रीतो गार्ग्यो गालव एव च । कण्वो मेधातिथेः पुत्रः पूर्वस्यां दिशि ये श्रिताः २ स्वस्त्यात्रेयश्च भगवान्नमुचिः प्रमुचिस्तथा । अगस्त्योऽत्रिश्च भगवान्सुमुखो विमुखस्तथा ३ आजग्मुस्ते सहागस्त्या ये श्रिता दक्षिणां दिशम् । नृषङ्गुः कवषी धौम्यः कौषेयश्च महानृषिः ४ तेऽप्याजग्मुः सशिष्या वै ये श्रिताः पश्चिमां दिशम् । वसिष्ठः कश्यपोऽथात्रिर्विश्वामित्रः सगौतमः ५ जमदग्निर्भरद्वाजस्तेऽपि सप्तर्षयस्तथा । उदीच्यां दिशि सप्तैते नित्यमेव निवासिनः ६

---

श्रीः॥ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम्। भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ त्यक्त्वा सुदुस्त्यज सुरेप्सित राज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम् । मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरम् । आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम् ॥ राक्षसांचा वध केल्यानंतर रामाला राज्य प्राप्त झालें असतां सर्व मुनि अभिवंदन करण्याकरितां रामाकडे आले १. कौशिक, यवक्रीत, गार्ग्य, गालव आणि मेधातिथीचा पुत्र कण्व हे पूर्वदिशेचा आश्रय करून राहणारे ऋषि तेथें आले २. स्वस्त्यात्रेय, भगवान् नमुचि, प्रमुचि, अगस्त्य, अत्रि, भगवान् सुमुख आणि विमुख ३ हे जे दक्षिणदिशेचा आश्रय करून राहणारे मुनि तेही अगस्त्यासहवर्तमान तेथें आले. नृषंगु, कवषी, धौम्य आणि महर्षि कौषेय ४ हे जे पश्चिमदिशेचा आश्रय करून राहणारे मुनि तेही शिष्यांसहवर्तमान तेथें आले. वसिष्ठ, कश्यप, अत्रि, गौतमासहवर्तमान विश्वामित्र ५, जमदग्नि आणि भरद्वाज हे

संप्राप्यैते महात्मानो राघवस्य निवेशनम् । विष्ठिताः प्रतिहारार्थं हुताशनसमप्रभाः ७ वेदवेदाङ्गविदुषो नानाशास्त्रविशारदाः । द्वाःस्थं प्रोवाच धर्मात्मा अगस्त्यो मुनिसत्तमः ८ निवेद्यतां दाशरथेर्ऋषयो वयमागताः । प्रतीहारस्ततस्तूर्णमगस्त्यवचनाद्द्रुतम् ९ समीपं राघवस्याशु प्रविवेश महात्मनः । नयेङ्गितज्ञः सद्वृत्तो दक्षो धैर्यसमन्वितः १० स रामं दृश्य सहसा पूर्णचन्द्रसमद्युतिम् । अगस्त्यं कथयामास संप्राप्तमृषिसत्तमम् ११ श्रुत्वा प्राप्तान्मुनींस्तांस्तु बालसूर्यसमप्रभान् । प्रत्युवाच ततो द्वाःस्थं प्रवेशय यथासुखम् १२ दृष्ट्वा प्राप्तान्मुनींस्तांस्तु प्रत्युत्थाय कृताञ्जलिः । पाद्यार्घ्यादिभिरानर्च गां निवेद्य च सादरम् १३ रामोऽभिवाद्य प्रयत आसनान्यादिदेश ह १४ तेषु काञ्चनचित्रेषु महत्सु च वरेषु च । कुशान्तर्धानदत्तेषु मृगचर्मयुतेषु च १५ यथार्हमुपविष्टास्ते आसनेष्वृषिपुङ्गवाः । रामेण कुशलं पृष्टाः सशिष्याः सपुरोगमाः १६ महर्षयो वेदविदो रामं वचनमब्रुवन् । कुशलं नो महाबाहो सर्वत्र रघुनन्दन १७ त्वां तु दिष्ट्या

---

जे उत्तरदिशेस नित्य वास्तव्य करणारे सप्तर्षि तेही तेथें आले होते ६. हे अग्नितुल्य तेजस्वी महात्मे राघवाच्या घराशीं आल्यानंतर द्वारपालांकडून आपल्या आगमनाची वर्दी रामाच्या कानावर घालण्याकरितां द्वाराशीं उभे राहिले ७. ते सर्वही वेदवेदांगवेत्ते असून सर्वही अनेक शास्त्रांमध्ये निष्णात होते. असो. तेथें उभे राहिल्यानंतर मुनिश्रेष्ठ धर्मात्मे अगस्त्य द्वारपालांना ह्मणाले ८"दाशरथि रामाला वर्दी द्या. आह्मी ऋषि आलों आहों". असें अगस्त्यमुनींनीं सांगितल्यानंतर द्वारपाल तेथून सत्वर निघाला ९ आणि महात्म्या राघवासमीप तत्क्षणीं प्रविष्ट झाला. तो द्वारपाल नीतिशास्त्रवेत्ता व इंगितज्ञ असून सदाचरणसंपन्न, दक्ष व धैर्यवान् होता १०. पूर्ण चंद्रासारिख्या तेजस्वी रामाला जातांक्षणीं अवलोकन केल्यानंतर ते ऋषिश्रेष्ठ अगस्त्य प्राप्त झाल्याचें त्यानें त्याला निवेदन केलें ११. तेव्हां बालसूर्यासारिखे तेजस्वी मुनि प्राप्त झाल्याचें श्रवण केल्यानंतर "खुशाल येऊं द्या" असें राम त्या द्वारपालाला ह्मणाला १२; ते मुनि प्राप्त झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं तो हात जोडून उभा राहिला; पाद्य, अर्घ्य इत्यादिकांनीं त्यानें त्यांचें पूजन केलें; आदरपूर्वक त्यांना गाय अर्पण केली आणि त्या शुद्ध रामानें अभिनंदन करून त्यांना बसण्याकरितां आसनें दिलीं १३,१४. सुवर्णानें शृंगारिलेलीं व दर्भ पसरलेलीं आणि मृगचर्मानें युक्त असलेलीं अशीं जीं तीं मोठीं व श्रेष्ठ आसनें त्यांवर ते ऋषिश्रेष्ठ आपापले योग्यतेप्रमाणें बसले आणि रामानें कुशल प्रश्न केल्यानंतर शिष्य व पुढारी ह्यांसहवर्तमान १५, १६ ते वेदवेत्ते महर्षि त्याला ह्मणाले

कुशलिनं पश्यामो हतशात्रवम् । दिष्ट्या त्वया हतो राजन्रावणो लोक-
रावणः १८ न हि भारः स ते राम रावणः पुत्रपौत्रवान् । सधनुस्त्वं हि
लोकांस्त्रीन्विजयेथा न संशयः १९ दिष्ट्या त्वया हतो राम रावणः पुत्र-
पौत्रवान् । दिष्ट्या विजयिनं त्वाद्य पश्यामः सह सीतया २० लक्ष्मणेन
च धर्मात्मन्भ्रात्रा त्वद्धितकारिणा । मातृभिर्भ्रातृसहितं पश्यामोऽद्य वयं
नृप २१ दिष्ट्या प्रहस्तो विकटो विरूपाक्षो महोदरः । अकम्पनश्च
दुर्धर्षो निहतास्ते निशाचराः २२ यस्य प्रमाणाद्विपुलं प्रमाणं नेह विद्यते।
दिष्ट्या ते समरे राम कुम्भकर्णो निपातितः २३ त्रिशिराश्चातिकायश्च
देवान्तकनरान्तकौ । दिष्ट्या ते निहता राम महावीर्या निशाचराः २४
दिष्ट्या त्वं राक्षसेन्द्रेण द्वन्द्वयुद्धमुपागतः । देवतानामवध्येन विजयं प्राप्त-
वानसि २५ संख्ये तस्य न किंचित्तु रावणस्य पराभवः । द्वन्द्वयुद्धमनु-
प्राप्तो दिष्ट्या ते रावणिर्हतः २६ दिष्ट्या तस्य महाबाहो कालस्येवाभि-

---

" हे महापराक्रमी रघुनंदना, आमचे सर्व प्रकारें कुशल आहे १७. शत्रूंचा वध करून तूं कुशल असल्याचें आह्मी अवलोकन करीत आहोंत ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. हे राजा, लोकांना रडविणाऱ्या रावणाचा तूं वध केलास हें फारच चांगलें झालें १८. हे रामा, पुत्रपौत्रांसहवर्तमान रावण तुला भारी नव्हता. कारण, तूं धनुष्य हातांत घेतल्यावर त्रैलोक्यही पादाक्रांत करिशील यांत शंका नाहीं १९. हे रामा, पुत्रपौत्रां-सहवर्तमान रावणाचा तुझ्या हातून वध झाला ही मोठी आनंदाची गोष्ट असून सीने-सहवर्तमान आज तूं विजयी आमच्या दृष्टीं पडत आहेस हीही मोठी सुदैवाचीच गोष्ट आहे २०. हे धर्मात्म्या राजा, तुझें हित करणारा भ्राता लक्ष्मण, माता आणि इतर भ्राते ह्यांसहवर्तमान आज आह्मी तुला अवलोकन करीत आहोंत २१. प्रहस्त, विकट, विरूपाक्ष, महोदर आणि अजिंक्य अकंपन ह्या राक्षसांचा वध झाला हें फारच उत्तम झालें २२. ज्याच्या शरीराहून प्रमाणानें अधिक मोठें असलेलें शरीर ह्या जगा-तामध्यें नाहीं त्या कुंभकर्णाचा तूं समरांगणामध्यें निःपात केलास हें मोठें भाग्यच समजाव-याचें २३. त्रिशिरा, अतिकाय, देवांतक आणि नरांतक ह्या महावीर्यवान् राक्षसांचाही तूं वध केलास हीही भाग्याचीच गोष्ट होय २४. देवांना अवध्य अशा राक्षसाधिप-तीशीं द्वंद्वयुद्ध करून तुला जय प्राप्त झाला ही आनंदाची गोष्ट आहे २५. संग्रामा-मध्यें त्या रावणाचा तूं पराभव केलास ह्यांत कांहींच अर्थ नसून द्वंद्वयुद्धामध्यें राव-णपुत्र इंद्रजिताचा तूं वध केलास ही मोठी आनंदाची गोष्ट आहे २६. हे महापराक्रमी वीरा, कालाप्रमाणें अंगावर तुटून पडणाऱ्या त्या देवशत्रु इंद्रजिताच्या तडाक्यांतून

भावतः । मुक्तः सुररिपोर्वीर प्राप्तश्च विजयस्त्वया २७ अभिनन्दाम ते सर्वे संश्रुत्येन्द्रजितो वधम् । अवध्यः सर्वभूतानां महामायाधरो युधि २८ विस्मयस्त्वेष चास्माकं तं श्रुत्वेन्द्रजितं हतम् । दत्त्वा पुण्यामिमां वीर सौम्यामभयदक्षिणाम् ॥ दिष्ट्या वर्धसि काकुत्स्थ जयेनामित्रकर्शन २९ श्रुत्वा तु वचनं तेषां मुनीनां भावितात्मनाम् । विस्मयं परमं गत्वा रामः प्राञ्जलिरब्रवीत् ३० भगवन्तः कुम्भकर्णं रावणं च निशाचरम् । अतिक्रम्य महावीर्यौ किं प्रशंसथ रावणिम् ३१ महोदरं प्रहस्तं च विरूपाक्षं च राक्षसम् । मत्तोन्मत्तौ च दुर्धर्षौ देवान्तकनरान्तकौ ३२ अतिक्रम्य महावीरान्किं प्रशंसथ रावणिम् ३३ अतिकायं त्रिशिरसं धूम्राक्षं च निशाचरम् । अतिक्रम्य महावीर्यान्किं प्रशंसथ रावणिम् ३४ कीदृशो वै प्रभावोऽस्य किं बलं कः पराक्रमः । केन वा कारणेनैष रावणादतिरिच्यते ३५ शक्यं यदि मया श्रोतुं न खल्वाज्ञापयामि वः । यदि गुह्यं न

---

सुटून तुला विजय प्राप्त झाला ही सुदैवाची गोष्ट होय २७. इंद्रजिताचा वध तुझ्या हातून झाल्याचें ऐकिल्यामुळें हे आह्मी सर्व मुनि तुझें अभिनंदन करीत आहों. संग्रामामध्यें अगाध माया धारण करणाऱ्या त्या इंद्रजिताचा वध कोणाच्याही हातून होणें शक्य नव्हतें २८. त्या इंद्रजिताचा वध झाल्याचें ऐकून आह्मांला हा विस्मय झाला आहे. हे वीरा, पवित्र व सौम्य अशी ही अभयदक्षिणा आह्मां मुनींना तूं दिली आहेस आणि,"हे शत्रुनाशका ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तुझा अभ्युदय होत आहे ही फारच आनंदाची गोष्ट आहे" २९. शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या त्या मुनींचें भाषण श्रवण केल्यानंतर राम अतिशय विस्मयचकित झाला आणि हात जोडून त्यांना ह्मणाला ३० " हे भगवन्त, कुंभकर्ण आणि रावण ह्या महावीर्यवान् राक्षसांना सोडून आपण रावणपुत्र इंद्रजिताचीच कां बरें प्रशंसा करीत आहां ? ३१. महोदर, प्रहस्त, विरूपाक्ष आणि मत्त, उन्मत्त व अजिंक्य असे देवांतक व नरांतक ह्या महावीर्यवान् राक्षसांना सोडून रावणपुत्राचीच स्तुति तुह्मी कशाकरितां आरंभिली आहे ? ३२, ३३. अतिकाय, त्रिशिरा आणि धूम्राक्ष ह्या महावीर्यवान् राक्षसांना टाकून तुह्मी रावणपुत्राचीच स्तुति चालविली आहे ह्याचा अर्थ काय ? ३४. ह्या इंद्रजिताचा प्रभाव कशा प्रकारचा होता; ह्याचें शरीरसामर्थ्य तरी काय होतें; ह्याचा पराक्रम तरी काय होता आणि रावणापेक्षांही हा अधिक असण्याचें कारण तरी काय आहे ? ३५. हें मी श्रवण करण्यास जर मी योग्य असेन आणि जर हें गुह्य नसेल तर श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. आपण कथन करा.

चेदुक्तुं श्रोतुमिच्छामि कथ्यताम् ३६ शक्रोऽपि विजितस्तेन कथं लब्धवरश्च सः । कथं च बलवान्पुत्रो न पिता तस्य रावणः ३७ कथं पितुश्चाप्यधिको महाहवे शक्रस्य जेता हि कथं स राक्षसः। वराश्च लब्धाः कथयस्व मेऽद्य पाप्रच्छतश्चास्य मुनीन्द्र सर्वम् ३८ इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये उत्तरकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा राघवस्य महात्मनः। कुम्भयोनिर्महातेजा वाक्यमेतदुवाच ह १ शृणु राम तथा वृत्तं तस्य तेजोबलं महत्। जघान शत्रून्येनासौ न च वध्यः स शत्रुभिः २ तावत्ते रावणस्येदं कुलं जन्म च राघव। वरप्रदानं च तथा तस्मै दत्तं ब्रवीमि ते ३ पुरा कृतयुगे राम प्रजापतिसुतः प्रभुः। पुलस्त्यो नाम ब्रह्मर्षिः साक्षादिव पितामहः ४ नानुकीर्त्या गुणास्तस्य धर्मतः शीलतस्तथा। प्रजापतेः पुत्र इति वक्तुं शक्यं हि नामतः ५ प्रजापतिसुतत्वेन देवानां वल्लभो हि सः। इष्टः सर्वस्य लोकस्य गुणैः शुभ्रैर्महामतिः ६ स तु धर्मप्रसङ्गेन मेरोः पार्श्वे महागिरेः।

---

हें सांगण्याविषयीं मीं आपणांला आज्ञा करीत नाहीं ३६. इंद्रालाही त्यानें कसें जिंकिलें ? त्याला वरप्राप्ति कशी झाली ? आणि तो पुत्रच बलाढ्य असून त्याच्या मानानें तो पिता रावण बलाढ्य कां नव्हता ? ३७. त्याचप्रमाणें महासंग्रामामध्यें पित्यापेक्षांही तो अधिक कसा ! तो राक्षस इंद्राला कसा जिंकीत असे ? आणि त्याला वर कसे प्राप्त झाले ? हें मी आज आपणांला विचारीत आहे. ह्यास्तव, हे मुनींद्र, तें सर्व आपण मला सांगा ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पहिला सर्ग समाप्त झाला ॥ १ ॥

हें महात्म्या रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर महातेजस्वी अगस्त्यमुनि त्याला ह्मणाले १ " ज्यामुळें तो शत्रूंचा वध करीत असे आणि शत्रूंना अवध्य असे असें मोठें तेज व बल त्याला कसें प्राप्त झालें हें, हे रामा, तूं श्रवण कर २. हे राघवा, प्रथमतः रावणाचें हें कुल, जन्म आणि त्याला झालेलें वरप्रदान मी तुला कथन करितों ३. हे रामा, पूर्वी कृतयुगामध्यें पुलस्त्यनामक ब्रह्मर्षि ह्मणून एक प्रजापतीचा पुत्र होऊन गेला. तो प्रभु प्रत्यक्ष ब्रह्मदेवच कीं काय असा होता ४. धर्म आणि शील ह्यांमुळें त्याचे ठिकाणीं उत्पन्न झालेले गुण किती होते हें सांगतां येणें शक्य नाहीं. तो प्रजापतीचा पुत्र होता एवढाच नामनिर्देश त्याच्यासंबंधानें करितां येणें शक्य आहे ५. प्रजापतीचा पुत्र असल्यामुळें देवांनाही तो प्रिय होता आणि उत्कृष्ट गुणांमुळें तो महामति पुलस्त्य सर्व लोकांना इष्ट होता ६. तपश्चर्या करण्याकरितां

तृणबिन्द्वाश्रमं गत्वाप्यवसन्मुनिपुङ्गवः ७ तपस्तेपे स धर्मात्मा स्वाध्याय-
नियतेन्द्रियः । गत्वाश्रमपदं तस्य विघ्नं कुर्वन्ति कन्यकाः ८ ऋषिपन्नग-
कन्याश्च राजर्षितनयाश्च याः । क्रीडन्त्योऽप्सरसश्चैव तं देशमुपपेदिरे ९
सर्वर्तुषूपभोग्यत्वाद्रम्यत्वात्काननस्य च । नित्यशस्तास्तु तं देशं गत्वा
क्रीडन्ति कन्यकाः १० देशस्य रमणीयत्वात्पुलस्त्यो यत्र स द्विजः । गायन्त्यो
वादयन्त्यश्च लासयन्त्यस्तथैव च ११ मुनेस्तपस्विनस्तस्य विघ्नं चक्रु-
रनिन्दिताः । अथ रुष्टो महातेजा व्याजहार महामुनिः १२ या मे दर्श-
नमागच्छेत्सा गर्भं धारयिष्यति । तास्तु सर्वाः प्रतिश्रुत्य तस्य वाक्यं महा-
त्मनः १३ ब्रह्मशापभयाद्भीतास्तं देशं नोपचक्रमुः । तृणबिन्दोस्तु राजर्षे-
स्तनया न शृणोति तत् १४ गत्वाश्रमपदं तत्र विचचार सुनिर्भया । न
चापश्यच्च सा तत्र कांचिदभ्यागतां सखीम् १५ तस्मिन्काले महातेजाः
प्राजापत्यो महानृषिः । स्वाध्यायमकरोत्तत्र तपसा भावितः स्वयम् १६
सा तु वेदश्रुतिं श्रुत्वा दृष्ट्वा वै तपसो निधिम् । अभवत्पाण्डुदेहा सा सुव्य-
ञ्जितशरीरजा १७ बभूव च समुद्विग्ना दृष्ट्वा तद्दोषमात्मनः । इदं मे किन्त्विति

---

तो मुनिश्रेष्ठ मेरुसंज्ञक महापर्वतासमीप तृणबिंदूच्या आश्रमामध्यें जाऊन राहिला ७ आणि एकसारिखें वेदाध्ययन करून जितेंद्रिय राहिलेला तो धर्मात्मा मुनि तपश्चर्या करूं लागला असतां त्याच्या आश्रमामध्यें जाऊन मुली त्याला विघ्न करूं लागल्या ८. ऋषिकन्या, नागकन्या, राजर्षिकन्या आणि अप्सरा क्रीडा करीत करीत त्या आश्रम-प्रदेशाशीं आल्या ९. सर्व ऋतूंमध्यें उपभोग घेण्यास योग्य अशा वस्तु त्या ठिकाणीं असल्यामुळें आणि वन रम्य असल्यामुळें त्या कन्या नित्य त्या प्रदेशावर जाऊन क्रीडा करीत असत १० आणि जेथें तो पुलस्त्य ब्राह्मण होता तें स्थल रमणीय असल्यामुळें त्या तेथें गायन व नृत्य करीत असत ११. ह्याप्रमाणें त्या निर्दोष कन्या त्या तपस्वी मुनीला विघ्न करूं लागल्या असतां तो महातेजस्वी महर्षि क्रुद्ध होऊन ह्मणाला १२ "जी कन्या माझ्या दृष्टीं पडेल तिला गर्भधारणा होईल". हें त्या महात्म्याचें वाक्य त्या सर्वांनीं ऐकिलें १३ आणि ब्रह्मशापाच्या भीतीनें त्या कन्या त्या प्रदेशा-समीप जाईनाशा झाल्या. परंतु, तृणबिंदुराजर्षीच्या कन्येनें तें न ऐकिल्यामुळें १४. त्या आश्रमामध्यें जाऊन ती निःशंक संचार करूं लागली. परंतु, आपली कोणीही मैत्रीण तेथें आल्याचें तिच्या दृष्टीं पडलें नाहीं १५. त्यावेळीं तपश्चर्येनें स्वतः शुद्ध झालेला तो प्रजापतिपुत्र महातेजस्वी महर्षि वेदाध्ययन करीत होता १६. वेदघोष श्रवण करि-तांक्षणीं आणि तो तपोनिधि दृष्टीं पडतांक्षणीं त्या कन्येचें शरीर पांढरकें झालें आणि

ज्ञात्वा पितुर्गत्वाश्रमे स्थिता १८ तां तु दृष्ट्वा तथाभूतां तृणबिन्दुरथाब्रवीत् । किं त्वमेतत्त्वसदृशं धारयस्यात्मनो वपुः १९ सा तु कृत्वाञ्जलिं दीना कन्योवाच तपोधनम् । न जाने कारणं तात येन मे रूपमीदृशम् २० किं तु पूर्वं गतास्म्येका महर्षेर्भावितात्मनः । पुलस्त्यस्याश्रमं दिव्यमन्वेष्टुं स्वसखीजनम् २१ न च पश्याम्यहं तत्र कांचिदभ्यागतां सखीम् । रूपस्य तु विपर्यासं दृष्ट्वा त्रासादिहागता २२ तृणबिन्दुस्तु राजर्षिस्तपसा द्योतितप्रभः । ध्यानं विवेश तच्चापि अपश्यदृषिकर्मजम् २३ स तु विज्ञाय तं शापं महर्षेर्भावितात्मनः । गृहीत्वा तनयां गत्वा पुलस्त्यमिदमब्रवीत् २४ भगवंस्तनयां मे त्वं गुणैः स्वैरेव भूषिताम् । भिक्षां प्रतिगृहाणेमां महर्षे स्वयमुद्यताम् २५ तपश्चरणयुक्तस्य श्राम्यमाणेन्द्रियस्य ते । शुश्रूषणपरा नित्यं भविष्यति न संशयः २६ तं ब्रुवाणं तु तद्वाक्यं राजर्षिं धार्मिकं तदा । जिघृक्षुरब्रवीत्कन्यां बाढमित्येव स द्विजः २७ दत्त्वा तु तनयां

---

गर्भाचा तिंच ठिकाणीं चांगलाच प्रादुर्भाव झाला १७. आपल्या ठिकाणीं उद्भवलेला तो अनर्थ अवलोकन करून ती उद्विग्न झाली आणि हें काय मला प्राप्त झालें असा विचार करीत करीत ती पित्याच्या आश्रमामध्यें जाऊन उभी राहिली १८. तेव्हां तशा अवस्थेमध्यें असलेल्या त्या कन्येला अवलोकन करून तृणबिंदु ह्मणाला " तुला अयोग्य असें हें शरीर तुझें कशामुळें झालें आहे ?" १९. ह्यावर ती दीन कन्या हात जोडून त्या तपोधनाला ह्मणाली "हे तात, अशाप्रकारचें रूप माझें कां झालें ह्याचें कारण मी जाणीत नाहीं २०. पूर्वी पवित्र पुलस्त्यमहर्षींच्या दिव्य आश्रमामध्यें आपल्या सख्यांना पहाण्याकरितां मी गेलें होतें २१; परंतु, कोणीही सखी तेथें आल्याचें माझ्या दृष्टीं पडलें नाहीं आणि माझ्या स्वरूपामध्यें मात्र बदल झाला. हें पहातांक्षणीं भीतीनें मी येथें आलें आहे " २२. तपश्चर्येनें ज्याची कांति उज्ज्वल झालेली आहे असा तृणबिंदु राजर्षि यावर ध्यानस्थ बसला आणि पुलस्त्यऋषीच्या कृतीमुळें तो प्रकार झाला आहे असें त्यानें अवलोकन केलें २३. शुद्ध महर्षींचा तो शाप जाणिल्यानंतर तृणबिंदु कन्येला घेऊन पुलस्त्यमुनींकडे गेला आणि ह्मणाला २४ " हे भगवन्, स्वतःच्याच गुणांनीं भूषित असलेली ही माझी कन्या आपण स्वीकारा. हे महर्षे, आपोआप चालून आलेली ही भिक्षा होय २५. तपश्चर्या करीत असल्यामुळें आपल्या हातापायांना थकवा येत असतो. ह्यास्तव, हीं कन्या आपल्या शुश्रूषेमध्यें तत्पर राहील ह्यामध्यें संशय नाहीं " २६. ह्याप्रमाणें तो धर्मनिष्ठ राजर्षि भाषण करूं लागला असतां कन्या स्वीकारण्याचा उद्देश मनांत धरून तो द्विज "ठीक आहे" एवढेंच ह्मणाला २७.

राजा स्वमाश्रमपदं गतः । सापि तत्रावसत्कन्या तोषयन्ती पतिं गुणैः २८ तस्यास्तु शीलवृत्ताभ्यां तुतोष मुनिपुङ्गवः । प्रीतः स तु महातेजा वाक्यमेतदुवाच ह २९ परितुष्टोऽस्मि सुश्रोणि गुणानां संपदा भृशम् । तस्माद्देवि ददाम्यद्य पुत्रमात्मसमं तव३० उभयोर्वंशकर्तारं पौलस्त्य इति विश्रुतम् । यस्मात्तु विश्रुतो वेदस्त्वयेहाध्ययतो मम ३१ तस्मात्स विश्रवा नाम भविष्यति न संशयः । एवमुक्ता तु सा देवी प्रहृष्टेनान्तरात्मना ३२ अचिरेणैव कालेनासूत विश्रवसं सुतम् । त्रिषु लोकेषु विख्यातं यशोधर्मसमन्वितम् ३३ श्रुतिमान्समदर्शी च व्रताचाररतस्तथा । पितेव तपसा युक्तो अभवद्विश्रवा मुनिः ३४ [ ७२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

अथ पुत्रः पुलस्त्यस्य विश्रवा मुनिपुङ्गवः । अचिरेणैव कालेन पितेव तपसि स्थितः १ सत्यवाञ्शीलवान्दान्तः स्वाध्यायनिरतः शुचिः । सर्वभोगेष्वसंसक्तो नित्यं धर्मपरायणः २ ज्ञात्वा तस्य तु तद्वृत्तं भरद्वाजो महामुनिः । ददौ विश्रवसे भार्यां स्वसुतां देववर्णिनीम् ३ प्रतिगृह्य तु

---

ह्याप्रमाणें कन्या अर्पण करून तृणबिंदुराजा स्वतःच्या आश्रमामध्यें परत आला असतां ती कन्याही आपल्या गुणांनीं पतीला संतुष्ट करीत करीत तेथें राहिली २८. तिचें शील व वर्तनह्यांच्या योगानें तो मुनिश्रेष्ठ संतुष्ट झाला आणि प्रसन्न झालेला तो महातेजस्वी मुनि तिला ह्मणाला २९ "हे सुंदरि, तुझ्या गुणसंपत्तीनें मीं अतिशय संतुष्ट झालों आहें. तस्मात्, हे देवि, उभयतांचा वंश चालविणारा आणि पौलस्त्य ह्मणून प्रसिद्ध होणारा असा एक आपल्यासारिखाच पुत्र मी तुला अर्पण करितों. ज्याअर्थी मी अध्ययन करीत असतांना तूं वेद श्रवण केला आहेस त्याअर्थी तो विश्रवा ह्मणून प्रसिद्ध होईल ह्यांत संशय नाहीं. ह्याप्रमाणें प्रसन्न मनानें त्या देवीला पुलस्त्यमुनींनीं सांगितलें असतां ३०,३१,३२. थोडकाच काळ लोटल्यावर विश्रवा ह्या नांवाचा पुत्र तिला प्राप्त झाला. तो यशस्वी व धर्मनिष्ठ असून त्रैलोक्यामध्यें विख्यात झाला ३३. तो श्रुतिमान्, समदृष्टि, व्रत व आचार ह्यांविषयीं तत्पर आणि पित्याप्रमाणेंच तपस्वी असा विश्रवामुनि झाला ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ २ ॥

पुलस्त्यपुत्र मुनिश्रेष्ठ विश्रवा थोडक्याच कालानें पित्याप्रमाणें तपश्चर्या करूं लागला १. तो सत्यनिष्ठ, सुशील, जितेंद्रिय, वेदाध्ययनाविषयीं तत्पर, शुचि, कसल्याही भोगाविषयीं आसक्ति न धरणारा आणि नेहेमीं धर्मपरायण असा होता २. तें

धर्मेण भरद्वाजसुतां तदा । प्रजान्वीक्षिकया बुद्ध्या श्रेयो ह्यस्य विचिन्तयन् ४ मुदा परमया युक्तो विश्रवा मुनिपुङ्गवः । स तस्यां वीर्यसंपन्नमपत्यं परमाद्भुतम् ५ जनयामास धर्मज्ञः सर्वैर्ब्रह्मगुणैर्वृतम् । तस्मिञ्जाते तु संहृष्टः स बभूव पितामहः ६ दृष्ट्वा श्रेयस्करीं बुद्धिं धनाध्यक्षो भविष्यति । नाम चास्याकरोत्प्रीतः सार्धं देवर्षिभिस्तदा ७ यस्माद्विश्रवसोऽपत्यं सादृश्याद्विश्रवा इव । तस्माद्वैश्रवणो नाम भविष्यत्येष विश्रुतः ८ स तु वैश्रवणस्तत्र तपोवनगतस्तदा । अवर्धताहुतिहुतो महातेजा यथानलः ९ तस्याश्रमपदस्थस्य बुद्धिर्जज्ञे महात्मनः । चरिष्ये परमं धर्मं धर्मो हि परमा गतिः १० स तु वर्षसहस्राणि तपस्तप्त्वा महावने । यन्त्रितो नियमैरुग्रैश्चकार सुमहत्तपः ११ पूर्णे वर्षसहस्रान्ते तं तं विधिमकल्पयत् । जलाशी मारुताहारो निराहारस्तथैव च ॥ एवं वर्षसहस्राणि जग्मुस्ता-

---

त्याचें आचरण जाणून भरद्वाजमहर्षींनीं आपली देववर्णिनी कन्या भार्या ह्मणून त्या विश्रव्याला दिली ३. तेव्हां धर्मानें भरद्वाजकन्येचा त्यानें स्वीकार केला आणि प्रजेचें शुभ अथवा अशुभ कसें होईल हें मनामध्यें आणून पुढें होणाऱ्या पुत्राच्या कल्याणाविषयीं तो चिंतन करूं लागला ४. त्या मुनिश्रेष्ठ विश्रव्याला तिच्या समागमानें अतिशय आनंद झाला आणि त्या धर्मवेत्त्या मुनीनें सर्व ब्रह्मगुणांनीं युक्त व वीर्यसंपन्न असें अत्यंत अद्भुत अपत्य तिच्या ठिकाणीं उत्पन्न केलें. तें अपत्य उत्पन्न झाल्यावर तो पितामह पुलस्त्य संतुष्ट झाला ५,६ ( जन्मकालावरून ) त्या अपत्याची मति कल्याणकारक होईल असें समजून आल्यावर "हा धनाध्यक्ष होईल" असें तो ह्मणाला आणि देवर्षींसहवर्तमान प्रसन्न होऊन त्यानें त्याचें नामकरण केलें ७. "ज्याअर्थीं विश्रवामुनीचें अपत्य असलेला हा पुत्र रूपसादृश्यानें त्याच्यासारिखाच आहे त्याअर्थीं वैश्रवण ह्या नांवानें तो प्रख्यात होईल" (असें तो ह्मणाला)८. तपोवनामध्यें असलेला तो वैश्रवण आहुति टाकिलेल्या महातेजस्वी अग्नीप्रमाणें वृद्धिंगत झाला ९. आश्रमामध्यें असतांना "ज्याअर्थीं धर्मच परम गति होय त्याअर्थीं मी उत्कृष्ट धर्माचें आचरण करीन" असा विचार त्या महात्म्याच्या मनामध्यें आला १०; महावनामध्यें हजारों वर्षें तपश्चर्या केल्यानंतर जितेंद्रिय राहून व कडक नियम पाळून त्यानें आणखींही फारच मोठें तप केलें ११ आणि सहस्रवर्षें पूर्ण झाल्यानंतर ( जलाशन, वायुभक्षण इत्यादि ) भिन्न भिन्न प्रकारांचें त्यानें अवलंबन केलें-कांहीं कालपर्यंत तो जलप्राशन करून राहिला; कांहीं कालपर्यंत वायुभक्षण करून राहिला; कांहीं कालपर्यंत तो आहाररहितच राहिला आणि अशारीतीनें त्याची तपश्चर्या चालली असतांना हजारों वर्षें एका वर्षा-

न्येकवर्षवत् १२ अथ प्रीतो महातेजाः सेन्द्रैः सुरगणैः सह । गत्वा तस्या-
श्रमपदं ब्रह्मेदं वाक्यमब्रवीत् १३ परितुष्टोऽस्मि ते वत्स कर्मणानेन
सुव्रत । वरं वृणीष्व भद्रं ते वरार्हस्त्वं महामते १४ अथाब्रवीद्वैश्रवणः
पितामहमुपस्थितम् । भगवँल्लोकपालत्वमिच्छेयं लोकरक्षणम् १५ अथा-
ब्रवीद्वैश्रवणं परितुष्टेन चेतसा । ब्रह्मा सुरगणैः सार्धं बाढमित्येव हृष्टवत् १६
अहं वै लोकपालानां चतुर्थं स्रष्टुमुद्यतः । यमेन्द्रवरुणानां च पदं यत्तव
चेप्सितम् १७ तद्गच्छ बत धर्मज्ञ निधीशत्वमवाप्नुहि । शक्राम्बुपयमानां
च चतुर्थस्त्वं भविष्यसि १८ एतच्च पुष्पकं नाम विमानं सूर्यसंनिभम् ।
प्रतिगृह्णीष्व यानार्थं त्रिदशैः समतां व्रज १९ स्वस्ति तेऽस्तु गमिष्यामः
सर्व एव यथागतम् । कृतकृत्या वयं तात दत्त्वा तव वरद्वयम् २० इत्युक्त्वा
स गतो ब्रह्मा स्वस्थानं त्रिदशैः सह २१ गतेषु ब्रह्मपूर्वेषु देवेष्वथ नभ-
स्तलम् । धनेशः पितरं प्राह प्राञ्जलिः प्रयतात्मवान् २२ भगवँल्लब्धवा-
नस्मि वरमिष्टं पितामहात् । निवासनं न मे देवो विदधे स प्रजापतिः २३

---

प्रमाणें निघून गेलीं १२. तदनंतर महातेजस्वी ब्रह्मदेव प्रसन्न झाला आणि इंद्रासह-वर्तमान असलेल्या देवगणांबरोबर त्याच्या आश्रमामध्यें जाऊन ह्मणाला १३ "हे वत्सा, हे सदाचरणसंपन्न, ह्या तुझ्या कर्मानें मी संतुष्ट झालों आहें. हे महामते, वर-प्राप्ति होण्यास तूं योग्य आहेस; ह्यास्तव, वर मागून घे. तुझें कल्याण असो" १४. ह्यानंतर समीप असलेल्या ब्रह्मदेवाला वैश्रवण ह्मणाला "हे भगवन्, लोकरक्षण ज्याच्या योगानें होतें असें लोकपालत्व प्राप्त होण्याची माझी इच्छा आहे" १५. असें त्यानें मागितलें असतां देवगणांसहवर्तमान मनामध्यें संतुष्ट होऊन ब्रह्मदेव "ठीक आहे" असें आनंदानें सांगून पुनरपि त्याला ह्मणाला १६ "चवथा लोकपाल उत्पन्न करण्यास मी उद्युक्त झालों आहें. ह्यास्तव, यम, इंद्र व वरुण ह्यांना जें लोकपाल पद प्राप्त झालें आहे तें तुलाही प्राप्त होईल व दुसरेंही जें कांहीं तुझ्या मनामध्यें असेल तें सिद्धीस जाईल १७. तस्मात्, हे धर्मवेत्त्या, जा; तुला निधीशत्व प्राप्त होईल; आणि इंद्र, वरुण व यम ह्यांमध्यें तूंही चवथा लोकपाल होशील १८. हे सूर्यासारिखें पुष्पकनामक विमान गमन करण्याकरितां तूं घे आणि देवांच्या बरोबरीचा हो १९. तुझें कल्याण असो; आह्मी सर्वही आतां आल्या मार्गानें परत जातों. बा वैश्रवणा, तुला दोन वर देऊन आह्मी कृतकृत्य झालों आहों" २०. असें सांगून ब्रह्मदेव देवांसहवर्तमान स्वस्थानीं गेला २१. ब्रह्मप्रभृति देव आकाशामध्यें गेल्यानंतर जितेंद्रिय धनाधिपति हात जोडून पित्याला ह्मणाला २२ "हे भगवन्, ब्रह्मदेवापासून

तं पश्य भगवन्कंचिन्निवासं साधु मे प्रभो । न च पीडा भवेद्यत्र प्राणिनो यस्य कस्यचित् २४ एवमुक्तस्तु पुत्रेण विश्रवा मुनिपुंगवः । वचनं प्राह धर्मज्ञ श्रूयतामिति सत्तम २५ दक्षिणस्योदधेस्तीरे त्रिकूटो नाम पर्वतः। तस्याग्रे तु विशाला सा महेन्द्रस्य पुरी यथा २६ लङ्का नाम पुरी रम्या निर्मिता विश्वकर्मणा । राक्षसानां निवासार्थं यथेन्द्रस्यामरावती २७ तत्र त्वं वस भद्रं ते लङ्कायां नात्र संशयः । हेमप्राकारपरिखा यन्त्रशस्त्रसमावृता २८ रमणीया पुरी सा हि रुक्मवैदूर्यतोरणा । राक्षसैः सा परित्यक्ता पुरा विष्णुभयार्दितैः २९ शून्या रक्षोगणैः सर्वै रसातलतलं गतैः । शून्या संप्रति लङ्का सा प्रभुस्तस्या न विद्यते ३० स त्वं तत्र निवासाय गच्छ पुत्र यथासुखम् । निर्दोषस्तत्र ते वासो न बाधस्तत्र कस्यचित् ३१ एतच्छ्रुत्वा स धर्मात्मा धर्मिष्ठं वचनं पितुः । निवासयामास तदा लङ्कां पर्वतमूर्धनि ३२ नैर्ऋतानां सहस्रैस्तु हृष्टैः प्रमुदितैः सदा। अचिरेणैव कालेन संपूर्णा तस्य शासनात् ३३ स तु तत्रावसत्प्रीतो

इष्ट वर मला प्राप्त झाला आहे. परंतु, त्या देव प्रजापतीनें मला वसतिस्थान दिलेलं नाहीं २३. तस्मात्, हे भगवन्, हे प्रभो, कोणत्याही प्राण्यापासून पीडा न होईल असें एखादें चांगलें वसतिस्थान आपण मला पहा " २४. ह्याप्रमाणें पुत्रानें सांगितलें असतां मुनिश्रेष्ठ विश्रवा ह्मणाला " हे धर्मवेत्त्या सज्जनश्रेष्ठा, ऐक २५. दक्षिण समुद्राच्या तीरीं त्रिकूटनामक पर्वत आहे. त्याच्या अग्रभागीं महेंद्राच्या त्या नगरीप्रमाणें विशाल २६, रमणीय आणि इंद्राच्या वास्तव्याकरितां निर्माण केलेल्या अमरावतीनगरीप्रमाणें राक्षसांच्या वास्तव्याकरितां विश्वकर्म्यानें निर्माण केलेली लंकानामक नगरी आहे २७. त्या लंकेमध्यें तूं वास्तव्य कर. ह्मणजे तुझें कल्याण होईल; ह्यांत संशय नाहीं. सुवर्णाचे प्राकार व खंदक ह्यांनीं ती नगरी युक्त असून यंत्रांनीं व शस्त्रांनीं ती गजबजलेली आहे २८. सुवर्ण व वैदूर्यमणि ह्यांचीं तोरणें तिच्यामध्यें असून ती रम्य नगरी विष्णूच्या भीतीनें व्याकुल झालेल्या राक्षसांनीं पूर्वीं टाकून दिलेली आहे २९. सर्वही राक्षसगण रसातलामध्यें निघून गेले असल्यामुळें तेथें कोणीही नाहीं. सारांश, ती लंकानगरी सांप्रत शून्य झालेली आहे; तिला कोणी प्रभु नाहीं ३०. ह्यास्तव, हे पुत्रा, तूं वास्तव्य करण्याकरितां खुशाल तिकडे जा. तुझें निर्विघ्न वास्तव्य तेथें होईल. तेथें कोणाचीही पीडा नाहीं" ३१. पित्याचें हें धर्माला अनुसरून असलेलें भाषण श्रवण केल्यानंतर पर्वताचे अग्रभागीं असलेल्या लंकेमध्यें तो धर्मात्मा हर्षयुक्त व आनंदित अशा हजारों

धर्मात्मा नैर्ऋतर्षभः । समुद्रपरिखायां स लङ्कायां विश्रवात्मजः ३४काले काले तु धर्मात्मा पुष्पकेण धनेश्वरः । अभ्यागच्छद्विनीतात्मा पितरं मातरं च हि ३५ स देवगन्धर्वगणैरभिष्टुतस्तथाप्सरोनृत्यविभूषितालयः। गभस्तिभिः सूर्य इवावभासयन्पितुः समीपं प्रययौ स वित्तपः३६ [१०८]

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे तृतीयः सर्गः॥३॥

श्रुत्वागस्त्येरितं वाक्यं रामो विस्मयमागतः । कथमासीत्तु लङ्कायां संभवो रक्षसां पुरा १ ततः शिरः कम्पयित्वा त्रेताग्निसमविग्रहम् । तमगस्त्यं मुहुर्दृष्ट्वा स्मयमानोऽभ्यभाषत २ भगवन्पूर्वमप्येषा लङ्कासीत्पिशिताशिनाम् । श्रुत्वेदं भगवद्वाक्यं जातो मे विस्मयः परः ३ पुलस्त्यवंशादुद्भूता राक्षसा इति नः श्रुतम् । इदानीमन्यतश्चापि संभवः कीर्तितस्त्वया ४ रावणात्कुम्भकर्णाच्च प्रहस्ताद्विकटादपि । रावणस्य च पुत्रेभ्यः किं नु ते बलवत्तराः ५ क एषां पूर्वको ब्रह्मन्किंनामा च बलोत्कटः ।

---

नैर्ऋतांसहवर्तमान सर्वदां वास्तव्य करूं लागला आणि त्याच्या परिपालनामुळें अल्प कालामध्येंच ती नगरी (धनधान्यादिकांनीं) परिपूर्ण झाली ३२,३३. विश्रवामुनींचा पुत्र तो धर्मात्मा नैर्ऋतश्रेष्ठ वैश्रवण समुद्राचा जिला खंदक आहे अशा त्या लंकेमध्यें आनंदानें राहिला ३४; आणि वेळोवेळीं तो विनयसंपन्न व धर्मात्मा धनाधिपति पुष्पकविमानामध्यें बसून मातापितरांकडे येत असे ३५. सारांश, देवगण व गंधर्वगण ज्याची स्तुति करीत आहेत आणि अप्सरांच्या नृत्यानें ज्याचें वसतिस्थान भूषित झालेलें आहे असा तो धनाधिपति सूर्याप्रमाणें किरणांनीं दिशा प्रकाशित करीत करीत पित्यासमीप जाऊं लागला ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

अगस्त्यमुनींनीं केलेलें भाषण श्रवण केल्यानंतर पूर्वी लंकेमध्यें राक्षसांचा उद्भव कसा झाला ह्याविषयीं रामाला विस्मय वाटला १ आणि तदनंतर मस्तक हालवून त्रेताग्नितुल्य कांतीनें युक्त असें ज्याचें शरीर आहे त्या अगस्त्यमुनींकडे वारंवार पाहून विस्मित करीत करीत तो म्हणाला २ " हे भगवन्, पूर्वीं सुद्धां ही लंका राक्षसांची होती " हें भगवानांचें भाषण श्रवण करून मला अतिशय विस्मय झाला आहे ३. पुलस्त्यवंशापासून राक्षस उत्पन्न झाले असें आमच्या ऐकण्यांत होतें. परंतु, सांप्रत दुसरीकडूनही राक्षसांची उत्पत्ति झाली असल्याचें आपण कथन केलें आहे ४. (ज्याअर्थीं विष्णूनें त्यांना पळवून लावण्याचा प्रयत्न केला त्याअर्थीं) रावण, कुंभकर्ण, प्रहस्त, विकट आणि रावणपुत्र ह्यांच्यांहूनही ते राक्षस बलाढ्य होते की काय? ५. हे

अपराधं च कं प्राप्य विष्णुना द्राविताः कथम् ६ एतद्विस्तरतः सर्वं कथयस्व ममानघ । कुतूहलमिदं मह्यं नुद भानुर्यथा तमः ७ राघवस्य वचः श्रुत्वा संस्कारालंकृतं शुभम् । अथ विस्मयमानस्तमगस्त्यः प्राह राघवम् ८ प्रजापतिः पुरा सृष्ट्वा अपः सलिलसंभवः । तासां गोपायने सत्त्वानसृजत्पद्मसंभवः ९ ते सत्त्वाः सत्त्वकर्तारं विनीतवदुपस्थिताः । किं कुर्म इति भाषन्तः क्षुत्पिपासाभयार्दिताः १० प्रजापतिस्तु तान्सर्वान्प्रत्याह प्रहसन्निव । आभाष्य वाचा यत्नेन रक्षध्वमिति मानवाः ११ रक्षाम इति तत्रान्यैर्यक्षाम इति चापरैः । भुक्षिताभुक्षितैरुक्तस्ततस्तानाह भूतकृत् १२ रक्षाम इति यैरुक्तं राक्षसास्ते भवन्तु वः । यक्षाम इति यैरुक्तं यक्षा एव भवन्तु वः १३ तत्र हेतिः प्रहेतिश्च भ्रातरौ राक्षसाधिपौ । मधुकैटभसंकाशौ बभूवतुररिन्दमौ १४ प्रहेतिर्धार्मिकस्तत्र तपोवनगतस्तदा । हेतिर्दारक्रियार्थे तु परं यत्नमथाकरोत् १५ स कालभगिनीं कन्यां भयां

---

ब्रह्मन्, ह्या राक्षसांचा बलाढ्य पूर्वज कोण होता; त्याचें नांव काय होतें; राक्षसांच्या हातून कोणता अपराध झाल्यामुळें त्यांना विष्णूनें पळवून लाविलें आणि कसें पळवून लाविलें ? ६ हें सर्व, हे निष्पाप मुने, आपण मला सविस्तर कथन करा; आणि ज्याप्रमाणें सूर्य अंधकार नाहींसा करितो त्याप्रमाणें आपण माझी ही उत्सुकता नाहींशी करा " ७. संस्कारानें भूषित व शुभ असें हें रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर विस्मय करीत करीत अगस्त्यमुनि रामाला ह्मणाले ८ " उदकापासून उत्पन्न झालेल्या प्रजापतीनें प्रथमतः उदक उत्पन्न केलें आणि त्याउदकाच्या रक्षणाकरितां त्य. ब्रह्मदेवानें प्राणी उत्पन्न केले ९. ते प्राणी सृष्टिकर्त्यासमीप नम्रपणें येऊन उभे राहिले आणि क्षुधा, तृषा व भय ह्यांनीं व्याकुल होऊन " आह्मीं काय करावें " असें त्याला ह्मणाले १०. तेव्हां प्रजापति वाणीनें त्यांना हाक मारून हंसत हंसत त्या सर्वांनाच ह्मणाला " हे मानवहो, प्रयत्नपूर्वक तुह्मीही उदक रक्षण करा. " ह्यानंतर " रक्षामः ( आह्मी रक्षण करूं ) " असें कांहींनीं त्याला उत्तर दिलें आणि "यक्ष्यामः ( आह्मी यजन करूं ) " असेंही कांहींनीं उत्तर दिलें. हे उत्तर देणारे प्राणी क्षुधेनें व तृषेनें व्याकुल झालेले होते.तदनंतर सृष्टिकर्ता ब्रह्मदेव त्यांना ह्मणाला ११, १२ 'रक्षामः' असें तुह्मांपैकीं ज्यांनीं उत्तर दिलें आहे ते राक्षस होवोत आणि ' यक्षामः ' असें तुह्मांपैकीं ज्यांनीं उत्तर दिलें आहे ते यक्ष होवोत " १३. त्या राक्षसांमध्यें हेति व प्रहेति हे दोन भ्राते राक्षसांचे अधिपति झाले. ते शत्रूचें दमन करणारे असून पराक्रमानें मधु व कैटभ ह्या असुरांप्रमाणें होते १४. त्यांपैकीं धर्मनिष्ठ प्रहेति तपोवनामध्यें

नाम महाभयाम् । उदावहदमेयात्मा स्वयमेव महामतिः १६ स तस्यां जनयामास हेती राक्षसपुंगवः । पुत्रं पुत्रवतां श्रेष्ठो विद्युत्केशमिति श्रुतम् १७ विद्युत्केशो हेतिपुत्रः स दीप्तार्कसमप्रभः । व्यवर्धत महातेजास्तोयमध्य इवाम्बुजम् १८ स यदा यौवनं भद्रमनुप्राप्तो निशाचरः । ततो दारक्रियां तस्य कर्तुं व्यवसितः पिता १९ संध्यादुहितरं सोऽथ संध्यातुल्यां प्रभावतः । वरयामास पुत्रार्थं हेती राक्षसपुंगवः २० अवश्यमेव दातव्या परस्मै सेति संध्यया । चिन्तयित्वा सुता दत्ता विद्युत्केशाय राघव २१ संध्यायास्तनयां लब्ध्वा विद्युत्केशो निशाचरः । रमते स तया सार्धं पौलोम्या मघवानिव २२ केनचित्त्वथ कालेन राम सालकटङ्कटा । विद्युत्केशाद्गर्भमाप घनराजिरिवार्णवात् २३ ततः सा राक्षसी गर्भं घनगर्भसमप्रभम् । प्रसूता मन्दरं गत्वा गङ्गा गर्भमिवाग्निजम् २४ समुत्सृज्य तु सा गर्भं विद्युत्केशरतार्थिनी । रेमे तु सार्धं पतिना विसृज्य सुतमात्म-

---

गेला आणि हेति विवाहाकरितां पराकाष्ठेचा यत्न करूं लागला १५. पुढें त्या अतर्क्य व महामति हेतीनें कालाची भगिनी व महाभयंकर अशा एका भयानामक कन्येचें आपण होऊनच पाणिग्रहण केलें १६. पुढें पुत्रवानांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या राक्षसश्रेष्ठ हेतीनें तिचे ठिकाणीं विद्युत्केश ह्मणून प्रसिद्ध असलेला पुत्र उत्पन्न केला १७. नंतर प्रभेनें देदीप्यमान सूर्यासारिखा असलेला तो महातेजस्वी हेतिपुत्र विद्युत्केश उदकांत वृद्धिंगत होणाऱ्या कमलाप्रमाणें वृद्धिंगत झाला १८. तो राक्षस जेव्हां चांगल्या यौवनावस्थेमध्यें आला तेव्हां त्याचा पिता त्याचा विवाह करण्याच्या यत्नाला लागला १९. त्या राक्षसश्रेष्ठ हेतीनें आपल्या पुत्राकरितां संध्येची मुलगी पसंत केली. ती प्रभावानें संध्येप्रमाणेंच ( असून सालकटंकटा ह्या नांवानें प्रसिद्ध ) होती २०. दुसऱ्याला कन्या अवश्य अर्पण केलीच पाहिजे असा संध्येनें विचार करून, हे रामा, आपली कन्या विद्युत्केशाला दिली २१ आणि नंतर पौलोमीसहवर्तमान रममाण होणाऱ्या इंद्राप्रमाणें तो विद्युत्केशराक्षस संध्येची कन्या प्राप्त झाल्यावर तिच्यासहवर्तमान रममाण होऊं लागला. पुढें कांहीं काळ लोटल्यानंतर, हे रामा, समुद्रापासून ज्याप्रमाणें मेघपंक्तीला गर्भधारणा होते त्याप्रमाणें विद्युत्केशापासून त्या सालकटंकटेला गर्भधारणा झाली २२, २३. नंतर अग्नीनें टाकून दिलेल्या माहेश्वरगर्भाला ज्याप्रमाणें गंगा प्रसवली त्याप्रमाणें मंदरपर्वतावर जाऊन जलगर्भरूप मेघाप्रमाणें ज्याची कांति आहे अशा गर्भाला ती राक्षसी प्रसवली २४. परंतु, विद्युत्केशासहवर्तमान रतिक्रीडा करण्याविषयीं उद्युक्त झालेल्या त्या राक्षसीनें तो गर्भ सोडून दिला; आणि अशा रीतीनें स्वतःचा पुत्र टाकून देऊन ती पतीसह-

जम् २५ उत्सृष्टस्तु तदा गर्भो घनशब्दसमस्वनः । तयोत्सृष्टः स तु शिशुः शरदर्कसमद्युतिः । निधायास्ये स्वयं मुष्टिं रुरोद शनकैस्तदा २६ ततो वृषभमास्थाय पार्वत्या सहितः शिवः । वायुमार्गेण गच्छन्वै शुश्राव रुदितस्वनम् २७ अपश्यदुमया सार्धं रुदन्तं राक्षसात्मजम् । कारुण्यभावात्पार्वत्या भवस्त्रिपुरसूदनः २८ तं राक्षसात्मजं चक्रे मातुरेव वयःसमम् । अमरं चैव तं कृत्वा महादेवोऽक्षरोऽव्ययः २९ पुरमाकाशगं प्रादात्पार्वत्याः प्रियकाम्यया । उमयापि वरो दत्तो राक्षसीनां नृपात्मज ३० सद्योपलब्धिर्गर्भस्य प्रसूतिः सद्य एव च । सद्य एव वयःप्राप्तिं मातुरेव वयः समम् ३१ ततः सुकेशो वरदानगर्वितः श्रियं प्रभोः प्राप्य हरस्य पार्श्वतः । चचार सर्वत्र महान्महामतिः खगं पुरं प्राप्य पुरन्दरो यथा ३२ [ १४० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

सुकेशं धार्मिकं दृष्ट्वा वरलब्धं च राक्षसम् । ग्रामणीर्नाम गन्धर्वो विश्वावसुसमप्रभः १ तस्य देववती नाम द्वितीया श्रीरिवात्मजा । त्रिषु

---

वर्तमान रममाण होऊं लागली २५. तिनें सोडिलेला तो गर्भ मेघाप्रमाणें गर्जना करीत होता आणि शरदृतूंतील सूर्याप्रमाणें त्या बालकाचें तेज होतें. तो बालक तोंडामध्यें स्वतः मूठ घालून हळू हळू रडूं लागला असतां २६ पार्वतीसहवर्तमान शिव वृषभावर आरूढ होऊन अंतरिक्षांतून जात असतांना त्यांना त्याच्या रडण्याचा ध्वनि ऐकूं आला २७. रडत असलेल्या त्या राक्षसपुत्राला उमेसहवर्तमान शंकरांनीं अवलोकन केलें असतां करुणा आल्यामुळें पार्वतीनें त्या त्रिपुरनाशक शंकराची ( त्याच्यासंबंधानें ) प्रार्थना केली. तेव्हां स्वमहात्म्यापासून च्युत न होणाऱ्या अविनाशी महादेवानें त्या राक्षसपुत्राला अमर करून मातेप्रमाणें त्याचें वय ( प्रौढ ) केलें २८,२९ आणि पार्वतीचें प्रिय करण्याकरितां आकाशगामी नगरही त्याला दिलें. हे राजपुत्रा, समागम होतांक्षणीं गर्भप्राप्ति होणें, गर्भप्राप्ति होतांक्षणीं प्रसूति होणें आणि गर्भ उत्पन्न होतांक्षणीं त्याला मातेप्रमाणें प्रौढ वयाची प्राप्ति होणें असा वर पार्वतीनेंही राक्षसींना दिला ३०,३१. तदनंतर वरप्रदानामुळें गर्वयुक्त झालेला तो प्रचंड व महामति सुकेश प्रभु शंकरापासून वैभव आणि आकाशगामी नगर प्राप्त झाल्यामुळें इंद्राप्रमाणें सर्वत्र संचार करूं लागला ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चवथा सर्ग समाप्त झाला ॥ ४ ॥

प्रभेनें विश्वावसूप्रमाणें असलेला एक ग्रामणीनामक गंधर्व असून त्याची देववती नांवाची कन्या होती. ती त्रैलोक्यामध्यें विख्यात होती आणि सौंदर्य व यौवन ह्यांनीं

लोकेषु विख्याता रूपयौवनशालिनी २ तां सुकेशाय धर्मात्मा ददौ रक्षः श्रियं यथा ३ वरदानकृतैश्वर्यं सा तं प्राप्य पतिं प्रियम् । आसीद्देववती तुष्टा धनं प्राप्येव निर्धनः ४ स तया सह संयुक्तो रराज रजनीचरः । अञ्जनादभिनिष्क्रान्तः करेण्वेव महागजः । ततः काले सुकेशस्तु जनयामास राघव ५ त्रीन्पुत्राञ्जनयामास त्रेताग्निसमविग्रहान् ६ माल्यवन्तं सुमालिं च मालिं च बलिनां वरम् । त्रींस्त्रिनेत्रसमान्पुत्रान्राक्षसान्राक्षसाधिपः ७ त्रयो लोका इवाव्यग्राः स्थितास्त्रय इवाग्नयः । त्रयो मन्त्रा इवात्युग्रास्त्रयो घोरा इवामयाः ८ त्रयः सुकेशस्य सुतास्त्रेताग्निसमतेजसः । विवृद्धिमगमंस्तत्र व्याधयोपेक्षिता इव ९ वरप्राप्तिं पितुस्ते तु ज्ञात्वैश्वर्यं तपोबलात् । तपस्तप्तुं गता मेरुं भ्रातरः कृतनिश्चयाः १० प्रगृह्य नियमान्घोरान्राक्षसा नृपसत्तम । विचेरुस्ते तपो घोरं सर्वभूतभयावहम् ११ सत्यार्जवशमोपेतैस्तपोभिर्भुवि दुर्लभैः । संतापयन्तस्त्रींल्लो-

संपन्न असल्यामुळें दुसरी लक्ष्मीच कीं काय अशी दिसत होती. सुकेशराक्षसाला वर प्राप्त झाला आहे आणि तो धार्मिक आहे असें अवलोकन करून राक्षसांची लक्ष्मीच कीं काय अशी ती आपली कन्या त्या धर्मात्म्या गंधर्वानें सुकेशाला दिली १,२,३. वरप्रदानामुळें ज्याला ऐश्वर्य प्राप्त झालें आहे असा प्रियपति प्राप्त झाल्याकारणानें ती देववती धनप्राप्ति झाल्यानें संतुष्ट होणाऱ्या दरिद्र पुरुषाप्रमाणें संतुष्ट झाली. अंजननामक दिग्गजापासून उत्पन्न झालेला महागज ज्याप्रमाणें हत्तिणीशीं समागम करून झळकूं लागतो त्याप्रमाणें त्या देववतीशीं संयुक्त झालेला तो राक्षस झळकूं लागला ४,५. तदनंतर, हे रघुवंशजा रामा, योग्य कालीं त्रेताग्नीप्रमाणें उज्ज्वल शरीरानें युक्त असलेले तीन पुत्र त्या देववतीचे ठिकाणीं सुकेशानें उत्पन्न केले ६. माल्यवान्, सुमाली आणि बलवानांमध्यें श्रेष्ठ असलेला माली हे ते राक्षसाधिपति सुकेशानें उत्पन्न केलेले त्र्यंबकतुल्य व राक्षसरूप तीन पुत्र होत ७. ते तीन पुत्र लक्ष्य लावून राहिलेले तीन लोकच कीं काय, होमशालेमध्यें असलेले तीन अग्निच कीं काय, अत्यंत उग्र तीन मंत्रच कीं काय अथवा तीन घोर रोगच कीं काय असे होते ८. असो. उपेक्षा केली असतां ज्याप्रमाणें व्याधि वृद्धिंगत होतात त्याप्रमाणें तेजानें अग्निहोत्रसंबंधीं तीन अग्नींप्रमाणें असलेले सुकेशाचे तीन पुत्र तेथें वृद्धिंगत झाले ९. आपल्या पित्याला तपःसामर्थ्यानें वरप्राप्ति होऊन ऐश्वर्य प्राप्त झाल्याचें ऐकून ते भ्राते मनामध्यें निश्चय करून तपश्चर्या करण्याकरितां मेरुपर्वतावर गेले १० आणि, हे नृपश्रेष्ठा, घोर नेम स्वीकारून ते राक्षस सर्व भूतांना भयंकर असें घोर तप करूं लागले ११.

कान्सदेवासुरमानुषान् १२ ततो विभुश्चतुर्वक्त्रो विमानवरमाश्रितः । सुके-
शपुत्रानामन्त्र्य वरदोऽस्मीत्यभाषत १३ ब्रह्माणं वरदं ज्ञात्वा सेन्द्रैर्देवग-
णैर्वृतम् । ऊचुः प्राञ्जलयः सर्वे वेपमाना इव द्रुमाः १४ तपसाराधितो
देव यदि नो दिशसे वरम् । अजेयाः शत्रुहन्तारस्तथैव चिरजीविनः ।
प्रभविष्णवो भवामेति परस्परमनुव्रताः १५ एवं भविष्यथेत्युक्त्वा सुके-
शतनयान्विभुः । स ययौ ब्रह्मलोकाय ब्रह्मा ब्राह्मणवत्सलः १६ वरं
लब्ध्वा तु ते सर्वे राम रात्रिंचरास्तदा । सुरासुरान्प्रबाधन्ते वरदानसुनि-
र्भयाः १७ तैर्बाध्यमानास्त्रिदशाः सर्षिसङ्घाः सचारणाः । त्रातारं नाधि-
गच्छन्ति निरयस्था यथा नराः १८ अथ ते विश्वकर्माणं शिल्पिनां
वरमव्ययम् । उचुः समेत्य संहृष्टा राक्षसा रघुसत्तम १९ ओजस्तेजो-
बलवतां महतामात्मतेजसा । गृहकर्ता भवानेव देवानां हृदयेप्सितम् २०
अस्माकमपि तावत्त्वं गृहं कुरु महामते । हिमवन्तमुपाश्रित्य मेरुमन्दर-

---

सत्य, सरळपणा व शांति ह्यांनीं युक्त आणि ह्मणूनच भूतलावर दुर्लभ अशीं जीं तपें त्यांच्या योगानें देव असुर व मानुष ह्यांसहवर्तमान तिन्ही लोकांना ते संताप देऊं लागले १२. तेव्हां चतुर्मुख प्रभु ब्रह्मदेव श्रेष्ठ विमानामध्यें आरूढ झाला आणि सुकेशाच्या पुत्रांना हाक मारून "मी तुह्मांला वर देण्यास उद्युक्त झालों आहें" असें त्यांना ह्मणाला १३. इंद्रासहवर्तमान देवगणांनीं परिवेष्टित असलेला ब्रह्मदेव वर देण्यास उद्युक्त झाला आहे असें समजल्यावर लटलट हलणाऱ्या वृक्षांप्रमाणें ते सर्वही राक्षस हात जोडून त्याला ह्मणाले १४ "हे देवा, तपश्चर्येमुळें प्रसन्न होऊन तूं जर आह्मांला वर देत असशील तर आह्मीं अजिंक्य, शत्रुघातक, चिरजीवी, प्रभु आणि परस्परांवर प्रीति करणारे असें व्हावें" १५. 'ह्याप्रमाणें तुह्मी व्हाल' असें सुकेशपुत्रांना सांगून तो ब्राह्मणवत्सल प्रभु ब्रह्मदेव ब्रह्मलोकाला गेला १६ आणि हे रामा, वर प्राप्त झाल्यानंतर त्या वरप्रदानामुळें अत्यंत निर्भय झालेले ते निशाचर देवांना व असुरांना पीडा देऊं लागले १७. ह्याप्रमाणें ऋषिसमुदाय आणि चारण ह्यांसहवर्तमान देवांना ते पीडा देऊं लागले असतां नरकांत पडलेल्या प्राण्यांप्रमाणें त्यांना कोणी त्राता आढळेना १८. नंतर, हे रघुवंशजश्रेष्ठा, कारागिरांमध्यें श्रेष्ठ अशा अक्षय विश्वकर्म्याकडे जाऊन ते राक्षस आनंदानें ह्मणाले १९ "ओज, तेज आणि बल ह्यांनीं युक्त आणि ह्मणूनच मोठे असे जे देव ह्यांना मनाप्रमाणें आपल्या तेजाच्या योगानें गृह निर्माण करून देणारा तूंच आहेस २०. ह्यास्तव, हे महामते, आह्मांलाही तूं गृह करून दे. सारांश, हिमालयाचा, मेरु पर्वताचा अथवा

मेव वा २१ महेश्वरगृहप्रख्यं गृहं नः क्रियतां महत् । विश्वकर्मा ततस्तेषां राक्षसानां महाभुजः २२ निवासं कथयामास शक्रस्येवामरावतीम् । दक्षिणस्योदधेस्तीरे त्रिकूटो नाम पर्वतः २३ सुवेल इति चाप्यन्यो द्वितीयो राक्षसेश्वराः । शिखरे तस्य शैलस्य मध्यमेऽम्बुदसंनिभे २४ शकुनैरपि दुष्प्रापे टङ्कच्छिन्नचतुर्दिशि । त्रिंशद्योजनविस्तीर्णा शतयोजनमायता २५ स्वर्णप्राकारसंवीता हेमतोरणसंवृता । मया लङ्केति नगरी शक्राज्ञप्तेन निर्मिता २६ तस्यां वसत दुर्धर्षा यूयं राक्षसपुंगवाः । अमरावतीं समासाद्य सेन्द्रा इव दिवौकसः २७ लङ्कादुर्गं समासाद्य राक्षसैर्बहुभिर्वृताः । भविष्यथ दुराधर्षाः शत्रूणां शत्रुसूदनाः २८ विश्वकर्मवचः श्रुत्वा ततस्ते राक्षसोत्तमाः । सहस्रानुचरा भूत्वा गत्वा तामवसन्पुरीम् २९ दृढप्राकारपरिखां हैमैर्गृहशतैर्वृताम् । लङ्कामवाप्य ते हृष्टा न्यवसन्रजनीचराः ३० एतस्मिन्नेव काले तु यथाकामं च राघव । नर्मदा नाम गन्धर्वी बभूव रघुनन्दन ३१ तस्याः कन्यात्रयं ह्यासीद्धीश्रीकीर्तिसमद्युति । ज्येष्ठक्रमेण

---

मंदरपर्वताचा आश्रय करून २१ महेश्वराच्या गृहाप्रमाणें तूं आह्मांला मोठें गृह तयार करून दे." तदनंतर इंद्राच्या अमरावतीनगरीप्रमाणें त्या राक्षसांना एक निवासस्थान महापराक्रमी विश्वकर्म्यानें सांगितलें. ( तो त्यांना ह्मणाला ) " दक्षिणसमुद्राचे तीरीं त्रिकूटनामक पर्वत आहे २२, २३ आणि, हे राक्षसाधिपतींनो, सुवेल ह्मणून त्याच्यासारिखाच दुसरा एक पर्वत आहे. त्या पर्वताचें मध्यम शिखर मेघतुल्य असून २४. चोहोंकडून टांक्यांनीं फोडून काढिलें असल्यामुळें पक्ष्यांचेंही तेथें गमन होणें अशक्य आहे. त्या शिखरावर इंद्राच्या आज्ञेनें लंका ह्मणून मीं एक नगरी निर्माण केलेली आहे. ती तीस योजनें रुंद असून शंभर योजनें लांब आहे; सुवर्णाच्या तटांनीं ती परिवेष्टित आहे; आणि सुवर्णाच्या कमानींनीं ती गजबजून गेली आहे २५, २६. तस्मात्, हे अजिंक्य राक्षसश्रेष्ठहो, अमरावतीमध्यें ज्याप्रमाणें इंद्रासहवर्तमान देव वास्तव्य करितात, त्याप्रमाणें तुह्मी त्या नगरीमध्यें वास्तव्य करा २७. सारांश, हे शत्रुनाशक राक्षसहो, लंकारूप किल्ल्याचा आश्रय करून असंख्य राक्षसांनीं युक्त असलेले तुह्मी शत्रूंना अजिंक्य व्हा " २८. विश्वकर्म्याचें हें भाषण श्रवण केल्यानंतर ते राक्षसश्रेष्ठ हजारों अनुयायी बरोबर घेऊन त्या नगरीमध्यें गेले आणि तेथें वास्तव्य करूं लागले २९. जिचे तट व खंदक बळकट आहेत आणि सुवर्णाच्या शेंकडों गृहांनीं जी गजबजून गेलेली आहे, अशी लंकानगरी प्राप्त झाल्यानंतर ते निशाचर आनंदित होऊन तेथें वास्तव्य करूं लागले ३०. ह्याचवेळीं,

सा तेषां राक्षसानामराक्षसी ३२ कन्यास्ताः प्रददौ हृष्टा पूर्णचन्द्रनिभाननाः । त्रयाणां राक्षसेन्द्राणां तिस्रो गन्धर्वकन्यकाः ३३ दत्ता मात्रा महाभागा नक्षत्रे भगदैवते । कृतदारास्तु ते राम सुकेशतनयास्तदा ३४ चिक्रीडुः सह भार्याभिरप्सरोभिरिवामराः । ततो माल्यवतो भार्या सुन्दरी नाम सुन्दरी ३५ स तस्यां जनयामास यदपत्यं निबोध तत् । वज्रमुष्टिर्विरूपाक्षो दुर्मुखश्चैव राक्षसः ३६ सुप्तघ्नो यज्ञकोपश्च मत्तोन्मत्तौ तथैव च । अनला चाभवत्कन्या सुन्दर्यां राम सुन्दरी ३७ सुमालिनोऽपि भार्यासीत्पूर्णचन्द्रनिभानना । नाम्ना केतुमती राम प्राणेभ्योऽपि गरीयसी ३८ सुमाली जनयामास यदपत्यं निशाचरः । केतुमत्यां महाराज तन्निबोधानुपूर्वशः ३९ प्रहस्तोऽकम्पनश्चैव विकटः कालिकामुखः । धूम्राक्षश्चैव दण्डश्च सुपार्श्वश्च महाबलः ४० संह्रादिः प्रघसश्चैव भासकर्णश्च राक्षसः। राका पुष्पोत्कटा चैव कैकसी च शुचिस्मिताः ४१ कुम्भीनसी च इत्येते सुमालेः प्रसवाः स्मृताः ४२ मालेस्तु वसुदा नाम गन्धर्वी रूपशालिनी। भार्या-

---

हे राघवा, हे रघुनंदना, नर्मदानामक गन्धर्वी यथेष्ट वर्तन करणारी होऊन गेली ३१. तिला तीन कन्या होत्या; त्या धी, श्री व कीर्ति ह्यांच्याप्रमाणें तेजस्वी होत्या आणि ज्येष्ठक्रमानें त्या तिन्ही कन्या राक्षसजातीहून भिन्न असलेल्या त्या नर्मदानामक गंधर्वीनें त्या राक्षसांना आनंदानें दिल्या. त्या कन्यांचीं मुखें पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक होतीं आणि त्या तीन महाभाग्यशाली गंधर्वकन्या उत्तराफल्गुनी नक्षत्रावर मातेनें त्या तीन राक्षसाधिपतींना दिल्या होत्या. असो. हे रामा, विवाह झाल्यानंतर ते सुकेशपुत्र ३२, ३३, ३४ अप्सरांसहवर्तमान क्रीडा करणाऱ्या देवांप्रमाणें भार्यांसहवर्तमान क्रीडा करूं लागले. तदनंतर माल्यवानाची जी सुंदरीनामक सौंदर्यसंपन्न भार्या ३५ तिचे ठिकाणीं माल्यवानानें जी संतति उत्पन्न केली ती तूं श्रवण कर. वज्रमुष्टि, विरूपाक्ष, दुर्मुखराक्षस ३६, सुप्तघ्न, यज्ञकोप, मत्त आणि उन्मत्त व अनलानामक मनोहर कन्या इतकीं अपत्यें सुंदरीचे ठिकाणीं झालीं ३७. हे रामा, सुमालीचीही पूर्णचंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त अशी एक केतुमतीनामक भार्या होती व ती त्याला प्राणापेक्षांही प्रिय होती ३८. हे महाराज, ह्या केतुमतीचे ठिकाणीं सुमाली राक्षसानें काय संतति उत्पन्न केली ती तूं अनुक्रमानें श्रवण कर ३९. प्रहस्त, अकंपन, विकट, कालिकामुख, धूम्राक्ष, दंड, महाबलाढ्य सुपार्श्व ४०, संह्रादी, प्रघस, भासकर्णराक्षस आणि राका, पुष्पोत्कटा, कैकसी व कुंभीनसी ह्या सुहास्यवदना कन्या हीं सुमालीची संतति होय ४१,४२. वसुधानामक गंधर्वी मालीची भार्या होय. ती रूप-

सीत्पद्मपत्राक्षी स्वक्षी यक्षीवरोपमा ४३ सुमालेरनुजस्तस्यां जनयामास यत्प्रभो । अपत्यं कथ्यमानं तु मया त्वं शृणु राघव ४४ अनलश्चानिलश्चैव हरः संपातिरेव च । एते विभीषणामात्या मालेयास्ते निशाचराः ४५ ततस्तु ते राक्षसपुंगवास्त्रयो निशाचरैः पुत्रशतैश्च संवृताः । सुरान्सहेन्द्रानृषिनागयक्षान्बबाधिरे तान्बहुवीर्यदर्पिताः ४६ जगद्भ्रमन्तोऽनिलवद्दुरासदा रणेषु मृत्युप्रतिमानतेजसः । वरप्रदानादपि गर्विता भृशं क्रतुक्रियाणां प्रशमंकराः सदा ४७ [ १८७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे पञ्चमः सर्गः ॥ ५ ॥

तैर्वध्यमाना देवाश्च ऋषयश्च तपोधनाः । भयार्ताः शरणं जग्मुर्देवदेवं महेश्वरम् १ जगत्सृष्ट्यन्तकर्तारमजमव्यक्तरूपिणम् । आधारं सर्वलोकानामाराध्यं परमं गुरुम् २ ते समेत्य तु कामारिं त्रिपुरारिं त्रिलोचनम् । ऊचुः प्राञ्जलयो देवा भयगद्गदभाषिणः ३ सुकेशपुत्रैर्भगवन्पितामहवरोद्धतैः । प्रजाध्यक्ष प्रजाः सर्वा बाध्यन्ते रिपुबाधनैः ४ शरणा-

---

वती असून तिचे नेत्र उत्कृष्ट व कमलपत्राप्रमाणें विशाल होते आणि यक्षिणींमध्यें श्रेष्ठ असलेल्या स्त्रीलाही तिची उपमा देत असत ४३. हे प्रभो राघवा, सुमालीच्या पाठचा भाऊ जो माली त्यानें तिचे ठिकाणीं काय संतति उत्पन्न केली ती मी तुला सांगतों. तूं श्रवण कर ४४. अनल, अनिल, हर व संपाति हे जे राक्षस बिभीषणाचे अमात्य ते त्या मालीचे पुत्र होत ४५. असो. तदनंतर शेंकडों राक्षसपुत्रांनीं युक्त असलेले ते तीन राक्षसश्रेष्ठ मोठ्या प्रचंड सामर्थ्याचा गर्व झाल्यामुळें इंद्रासहवर्तमान देव, ऋषि, नाग व यक्ष ह्यांना पीडा देऊं लागले ४६. जगतावर भ्रमण करणारे ते राक्षस वायूप्रमाणें अजिंक्य असून रणामध्यें त्यांचें तेज मृत्यूप्रमाणें दुःसह असे. वरप्रदानामुळें ते अतिशय गर्विष्ठ झाले होते; आणि यज्ञयागादिकर्मांचा ते विध्वंस करीत असत ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

देव आणि तपोधन ऋषि ह्यांचा ते राक्षस वध करूं लागले असतां ते भयभीत होऊन देवाधिदेव महेश्वराला शरण गेले १. जगताची उत्पत्ति व लय करणारा तो महेश्वर असून सर्व लोकांचा आधार, आराध्यदैवत व मुख्य गुरु तोच आहे आणि त्याचें रूप अव्यक्त असून तो जन्मादिविकाररहित आहे २. मदनांतक व त्रिपुरनाशक अशा त्र्यंबकासमीप येऊन भयामुळें अडखळत अडखळत भाषण करूं लागलेले ते देव हात जोडून त्याला ह्मणाले ३ " हे भगवन्, हे प्रजाधिपते, ब्रह्मदेवाच्या वरामुळें

न्यशरण्यानि आश्रमाणि कृतानि नः।स्वर्गाच्च देवान्प्रच्याव्य स्वर्गे क्रीडन्ति देववत् ५ अहंविष्णुरहं रुद्रो ब्रह्माहं देवराडहम् । अहं यमश्च वरुणश्चन्द्रोऽहं रविरप्यहम् ६ इति माली सुमाली च माल्यवांश्चैव राक्षसाः। बाधन्ते समरोद्धर्षा ये च तेषां पुरःसराः ७ तन्नो देव भयार्तानामभयं दातुमर्हसि। अशिवं वपुरास्थाय जहि वै देवकण्टकान् ८ इत्युक्तस्तु सुरैः सर्वैः कपर्दी नीललोहितः। सुकेशं प्रति सापेक्षः प्राह देवगणान्प्रभुः ९ अहं तान्न हनिष्यामि ममावध्या हि ते सुराः। किं तु मन्त्रं प्रदास्यामि यो वै तान्निहनिष्यति १० एतमेवसमुद्योगं पुरस्कृत्य महर्षयः। गच्छध्वं शरणं विष्णुं हनिष्यति स तान्प्रभुः ११ ततस्तु जयशब्देन प्रतिनन्द्य महेश्वरम् । विष्णोः समीपमाजग्मुर्निशाचरभयार्दिताः १२ शङ्खचक्रधरं देवं प्रणम्य बहुमान्य च। ऊचुः सम्भ्रान्तवद्वाक्यं सुकेशतनयान्प्रति १३ सुकेशतनयैर्देव त्रिभिस्त्रेताग्निसंनिभैः। आक्रम्य वरदानेन स्थानान्यपहृतानि

---

गर्विष्ठ झालेले शत्रुनाशक सुकेशपुत्र सर्व प्रजेला पीडा देत आहेत ४. आश्रयास योग्य असलेले आमचे आश्रम त्यांनीं आश्रयाला अयोग्य करून टाकिले आहेत आणि स्वर्गापासून देवांना घालवून देऊन ते स्वर्गामध्यें देवांप्रमाणें क्रीडा करीत आहेत ५. विष्णु मीच, रुद्र मीच, ब्रह्मदेव मीच, देवराज इंद्र मीच, यम मीच, वरुण मीच, चंद्र मीच आणि रविही मीच ६ असें माली, सुमाली व माल्यवान् राक्षस ह्मणत असून ज्याला त्याला पीडा देत आहेत. संग्रामाचें वारें त्यांच्या अंगांत फुरफुरलें आहे आणि त्यांच्या अनुयायांचाही प्रकार ताच आहे ७. तस्मात्, हे देव, भयानें व्याकुल झालेल्या आह्मांला आपण अभय द्या आणि उग्र रूप धारण करून देवकंटक राक्षसांचा आपण वध करा " ८. ह्याप्रमाणें कपर्दनामक जटाजूटानें युक्त असलेल्या शंकराला सर्व देवांनीं सांगितलें असतां सुकेशावर कृपादृष्टि ठेवणारा तो प्रभु देवगणांना ह्मणाला ९ " हे देवहो, मी त्यांचा वध करणार नाहीं. मला ते अवध्य आहेत. परंतु, मी एक तुह्मांला उपाय सांगतों त्याच्या योगानें त्यांचा वध होईल १०. हे महर्षिहो, हाच उद्देश मनांत धरून तुह्मी विष्णूला शरण जा; ह्मणजे तो त्यांचा वध करील " ११. तदनंतर जयशब्दानें महेश्वराचें अभिनंदन करून राक्षसांच्या भयानें व्याकुल झालेले ते देव आणि ऋषि विष्णूच्या समीप गेले १२ आणि शंखचक्र धारण करणाऱ्या त्या देवाला प्रणाम करून व बहुमान देऊन गांगरून गेल्याप्रमाणें ते सुकेशपुत्रांसंबंधानें त्याच्याशीं भाषण करूं लागले १३ ( ते ह्मणाले " हे देवा, अग्निहोत्रादिश्रौतकर्मसंबंधीं ) तीन अग्नींप्रमाणें तेजस्वी असलेल्या सुकेशपुत्रांनीं वरप्रदानामुळें आमचीं स्थानें पादाक्रांत

नः १४ लङ्का नाम पुरी दुर्गा त्रिकूटशिखरे स्थिता । तत्र स्थिताः प्रबा-
धन्ते सर्वान्नः क्षणदाचराः १५ स त्वमस्मद्धितार्थाय जहि तान्मधुसूदन।
शरणं त्वां वयं प्राप्ता गतिर्भव सुरेश्वर १६ चक्रकृत्तास्यकमलान्निवेदय
यमाय वै । भयेष्वभयदोऽस्माकं नान्योऽस्ति भवता विना १७ राक्षसान्समरे
हृष्टान्सानुबन्धान्मदोद्धतान्। नुद त्वं नो भयं देव नीहारमिव भास्करः १८
इत्येवं दैवतैरुक्तो देवदेवो जनार्दनः । अभयं भयदोऽरीणां दत्त्वा देवानु-
वाच ह १९ सुकेशं राक्षसं जाने ईशानवरदर्पितम् । तांश्चास्य तनया-
ञ्जाने येषां ज्येष्ठः स माल्यवान् २० तानहं समतिक्रान्तमर्यादान्राक्षसा-
धमान्। निहनिष्यामि संक्रुद्धः सुरा भवत विज्वराः २१ इत्युक्तास्ते सुराः सर्वे
विष्णुना प्रभविष्णुना। यथावासं ययुर्हृष्टाः प्रशंसन्तो जनार्दनम् २२ विबु-
धानां समुद्योगं माल्यवांस्तु निशाचरः । श्रुत्वा तौ भ्रातरौ वीराविदं
वचनमब्रवीत् २३ अमरा ऋषयश्चैव संगम्य किल शंकरम् । अस्मद्वधं
परीप्सन्त इदं वचनमब्रुवन् २४ सुकेशतनया देव वरदानबलोद्धताः ।

---

करून हरण केलीं आहेत १४. त्रिकूटाचलाच्या शिखरावर एक लंकानामक नगरी आहे; तिच्यामध्यें कोणाची गति शक्य नाहीं. तेथें ते राक्षस वास्तव्य करीत असून आह्मां सर्वांना पीडा देत असतात १५. ह्यास्तव, हे मधुसूदना, आमच्या हिताकरितां तूं त्यांचा वध कर. हे सुरेश्वरा, आह्मी तुला शरण आलों आहों. तूं आह्मांला आश्रय दे १६. चक्राच्या योगानें यांचीं शिरःकमलें तोडून तूं ह्यांना यमाला अर्पण कर. भयंकर प्रसंग उपस्थित झाले असतां आह्मांला अभय देणारा आपणावांचून दुसरा कोणी नाहीं १७. ह्यास्तव, हे देवा, सूर्य ज्याप्रमाणें धुकें नाहींसें करितो त्याप्रमाणें समरांगणाविषयीं फुरफुरत असलेल्या ह्या मदमत्त राक्षसांचा अनुयायांसहवर्तमान वध करून तूं आमचें भय नाहींसें कर" १८. ह्याप्रमाणें देवांनीं प्रार्थना केली असतां शत्रूंना भय उत्पन्न करणारा तो देवाधिदेव जनार्दन देवांना अभय देऊन ह्मणाला १९ "रुद्रवरामुळें गर्विष्ठ झालेला सुकेशराक्षस मला ठाऊक असून ज्यांच्यामध्यें तो माल्यवान् ज्येष्ठ आहे असे त्याचे पुत्रही मी जाणीत आहें २०. मर्यादेचें अतिक्रमण करून वागणाऱ्या त्या राक्षसाधमांचा, मी क्रुद्ध झालों असतां, वध करीन. हे देवहो, तुह्मी काळजी करूं नका" २१. ह्याप्रमाणें प्रभु विष्णूनें सांगितलें असतां सर्वही देव आनंदित झाले आणि त्या जनार्दनाची प्रशंसा करीत करीत आपापल्या निवासस्थानीं परत गेले २२. देवांचा हा उद्योग ऐकिल्यावर त्या वीर भ्रात्यांना माल्यवान् राक्षस ह्मणाला २३ "देव आणि ऋषि एकत्र जमून शंकराकडे गेले आणि आमच्या वधाच्या उद्देशानें ते त्यांना ह्मणाले २४

बाधन्तेऽस्मान्समुद्वृत्ता घोररूपाः पदेपदे २५ राक्षसैरभिभूताः स्मो न शक्ताः स्म प्रजापते । स्वेषु सद्मसु संस्थातुं भयात्तेषां दुरात्मनाम् २६ तदस्माकं हितार्थाय जहि तांश्च त्रिलोचन । राक्षसान्हुंकृतेनैव दह प्रदहतां वर २७ इत्येवं त्रिदशैरुक्तो निशम्यान्धकसूदनः । शिरः करं च धुन्वान इदं वचनमब्रवीत् २८ अवध्या मम ते देवाः सुकेशतनया रणे । मन्त्रं तु वः प्रदास्यामि यस्तान्वै निहनिष्यति २९ योऽसौ चक्रगदापाणिः पीतवासा जनार्दनः । हरिर्नारायणः श्रीमाञ्शरणं तं प्रपद्यथ ३० हरादवाप्य ते मन्त्रं कामारिमभिवाद्य च । नारायणालयं प्राप्य तस्मै सर्वं न्यवेदयन् ३१ ततो नारायणेनोक्ता देवा इन्द्रपुरोगमाः । सुरारींस्तान्हनिष्यामि सुरा भवत निर्भयाः ३२ देवानां भयभीतानां हरिणा राक्षसर्षभौ । प्रतिज्ञातो वधोऽस्माकं चिन्त्यतां यदिह क्षमम् ३३ हिरण्यकशिपोर्मृत्युरन्येषां च सुरद्विषाम् । नमुचिः कालनेमिश्च संह्रादो वीरसत्तम ३४ राधेयो बहुमायी च लोकपालोऽथ धार्मिकः । यमलार्जुनौ च हार्दिक्यः

" हे देवा, वरप्रदानाच्या सामर्थ्यामुळें चढून गेलेले भयंकर सुकेशपुत्र अतिशय गर्विष्ठ झाले असून पदोपदीं आह्मांला पीडा देत आहेत २५. हे प्रजाधिपते, राक्षसांनीं आह्मांला पादाक्रांत केलें आहे व त्या दुरात्म्यांच्या भीतीमुळें स्वस्थानीं वास्तव्य करण्यास आह्मी समर्थ नाहीं २६. तस्मात्, हे त्रिलोचन आमच्या हिताकरितां तूं त्यांचा वध कर. हे दहन करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ, केवल हुंकाराच्याच योगानें तूं त्यांना दग्ध करून टाक " २७ ह्याप्रमाणें देवांनीं प्रार्थना केली असतां त्यांचें ह्मणणें ऐकून घेऊन अंधकासुरनाशक शंकर मस्तक व हात हालवीत हालवीत त्यांना ह्मणाला २८ " हे देवहो, ते सुकेशपुत्र संग्रामामध्यें मला अवध्य आहेत; परंतु, मी तुह्मांला एक उपाय सांगतों त्याच्या योगानें त्यांचा वध होईल २९. हातामध्यें चक्र व गदा धारण करून पीत वस्त्र परिधान करणारा व जनांचें दुःख हरण करणारा जो श्रीमान् हरि नारायण त्याला तुह्मी शरण जा " ३०. ह्याप्रमाणें शंकराचा उपदेश घेऊन व त्या मदनांतकाला अभिवंदन करून ते वैकुंठलोकीं गेले आणि त्यांनीं त्या नारायणाला तें सर्व निवेदन केलें ३१. तदनंतर " हे देवहो, तुह्मी निर्भय असा; मी त्या देवशत्रूंचा वध करीन " असें त्या नारायणानें इंद्रप्रभृति देवांना सांगितलें ३२. सारांश, हे राक्षसश्रेष्ठहो, भयभीत झालेल्या देवांपाशीं आमच्या वधासंबंधानें हरीनें प्रतिज्ञा केली आहे ३३. ह्यास्तव, ह्या प्रसंगीं जें करणें उचित असेल त्याचा तुह्मी विचार करा. कारण, हिरण्यकशिपूचा आणि इतरही राक्षसांचा त्यानें वध केलेला आहे.

शुम्भश्चैव निशुम्भकः ३५ असुरा दानवाश्चैव सत्त्ववन्तो महाबलाः । सर्वे समरमासाद्य न श्रूयन्तेपराजिताः ३६ सर्वैः क्रतुशतैरिष्टं सर्वे मायाविदस्तथा । सर्वे सर्वास्त्रकुशलाः सर्वे शत्रुभयंकराः ३७ नारायणेन निहताः शतशोऽथ सहस्रशः । एतज्ज्ञात्वा तु सर्वेषां क्षमं कर्तुमिहार्हथ ॥ दुःखं नारायणं जेतुं यो नो हन्तुमिहेच्छति ३८ ततः सुमाली माली च श्रुत्वा माल्यवतो वचः । ऊचतुर्भ्रातरं ज्येष्ठमश्विनाविव वासवम् ३९ स्वधीतं दत्तमिष्टं च ऐश्वर्यं परिपालितम् । आयुर्निरामयं प्राप्तं सुधर्मः स्थापितः पथि ४० देवसागरमक्षोभ्यं शस्त्रैः समवगाह्य च । जिता द्विषो ह्यप्रतिमास्तन्नो मृत्युकृतं भयम् ४१ नारायणश्च रुद्रश्च शक्रश्चापि यमस्तथा । अस्माकं प्रमुखे स्थातुं सर्वे बिभ्यति सर्वदा ४२ विष्णोर्द्वेषस्य नास्त्येव कारणं राक्षसेश्वर । देवानामेव दोषेण विष्णोः प्रचलितं मनः ४३ तस्मादद्यैव सहिताः

---

नमुचि, कालनेमि, श्रेष्ठ वीर संऱ्हाद ३४, बहुमायावी राधेय, धर्मनिष्ठ लोकपाल, यमल व अर्जुन, हार्दिक्य, शुंभ आणि निशुंभ ३५ असे जे सर्व धैर्यवान् व महाबलाढ्य असुर आणि राक्षस त्यांचा संग्रामामध्यें पराजय झाल्याचें ऐकण्यांत नाहीं ३६. सर्वांनींही शेंकडों क्रतु केले असून सर्वही माया जाणणारे आहेत; सर्वही सर्व अस्त्रांमध्यें निपुण आहेत आणि सर्वही शत्रूंना भय उत्पन्न करणारे आहेत ३७. तथापि, नारायणानें शेंकडों हजारों राक्षसांचा वध केला आहे हें लक्ष्यांत आणून सांप्रत जें आपण सर्वांनीं करणें योग्य असेल तें तुह्मी करा नारायणाचा पराजय होणें दुर्घट आहे व तो तर ह्याठिकाणीं आमचा वध करण्याची इच्छा करीत आहे " ३८. ह्याप्रमाणें माल्यवानाचें भाषण श्रवण केल्यानंतर इंद्राशीं भाषण करणाऱ्या अश्विनीकुमारांप्रमाणें माली व सुमाली आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला ह्मणाले ३९ " आपण उत्कृष्ट रीतीनें यजन, दान व अध्ययन केलें असून ऐश्वर्याचें परिपालन केलें आहे; रोगरहित ऐश्वर्याचा उपभोग घेतलेला आहे; चांगल्या धर्माची सन्मार्गामध्यें स्थापना केलेली आहे ४०; आंत शिरण्यासही अशक्य असलेल्या देवरूप सागरामध्यें शिरून शस्त्रांसहवर्तमान आपण पोंहलों आहों आणि अतुलपराक्रमी शत्रूही पादाक्रांत केले आहेत. तस्मात्, आतां आह्मांला मृत्यूचें भय उरलें नाहीं. ( कांहीं करावयाचें राहिलें नसल्यामुळें मरणाला आपण आतां केव्हांही तयारच आहोंत ४१. नारायण, रुद्र, इंद्र व यम हे सर्वही नेहेमीं आमच्या समोर उभें राहण्यास भीत असतात ४२. हे राक्षसाधिपते, विष्णूच्या मनामध्यें आपल्यासंबंधानें द्वेष उत्पन्न होण्याचें वास्तविक कांहीं कारण नाहीं. देवांच्याच कानभरणीमुळें विष्णूचें मन क्षुब्ध झालें आहे ४३. तस्मात्, ज्यांच्यामुळें विष्णूच्या

सर्वेऽन्योन्यसमावृताः । देवानेव जिघांसामो येभ्यो दोषः समुत्थितः ४४ एवं संमन्त्र्य बलिनः सर्वसैन्यमुपासिताः । उद्योगंघोषयित्वा तु सर्वे नैर्ऋतपुङ्गवाः ४५ युद्धाय निर्ययुः क्रुद्धाः जम्भवृत्रादयो यथा । इति ते राम संमन्त्र्य सर्वोद्योगेन राक्षसाः ४६ युद्धाय निर्ययुः सर्वे महाकाया महाबलाः । स्यन्दनैर्वारणैश्चैव हयैश्च करिसंनिभैः ४७ खरैर्गोभिरथोष्ट्रैश्च शिशुमारैर्भुजङ्गमैः । मकरैः कच्छपैर्मीनैर्विहङ्गैर्गरुडोपमैः ४८ सिंहैर्व्याघ्रैर्वराहैश्च सृमरैश्चमरैरपि । त्यक्त्वा लङ्कां गताः सर्वे राक्षसा बलगर्विताः ४९ प्रयाता देवलोकाय योद्धुं दैवतशात्रवः । लङ्काविपर्ययं दृष्ट्वा यानि लङ्कालयान्यथ ५० भूतानि भयदर्शीनि विमनस्कानि सर्वशः । रथोत्तमैरुह्यमानाः शतशोऽथ सहस्रशः ५१ प्रयाता राक्षसास्तूर्णं देवलोकं प्रयत्नतः । रक्षसामेव मार्गेण दैवतान्यपचक्रमुः ५२ भौमाश्चैवान्तरिक्षाश्च कालाज्ञप्ता भयावहाः । उत्पाता राक्षसेन्द्राणामभावाय समुत्थिताः ५३ अस्थीनि मेघा ववृषुरुष्णं शोणितमेव च । वेलां समुद्राश्चोत्क्रान्ताश्चेलुश्चाप्यथ भूधराः ५४ अट्टहासान्विमुञ्चन्तो घननादसमस्वनाः । वाश्यन्त्यश्च

---

मनामध्यें आपणासंबधानें काळ वगैरे आलें आहे त्या देवांचाच आज आणि सर्व एकत्र जुळून एकमेकांच्या मदतीनें वध करूं " ४४. ह्याप्रमाणें बेत करून त्या बलाढ्य राक्षसांनीं सर्व सैन्य जुळविलें; त्या सर्वही राक्षसश्रेष्ठांनीं युद्धाविषयीं जिकडे तिकडे वर्दी दिली ४५ आणि जंभ, वृत्र इत्यादिकांप्रमाणें ते क्रुद्ध होऊन युद्धाकरितां बाहेर निघाले. हे रामा, ह्याप्रमाणें बेत करून ते सर्वही धिप्पाड व महाबलाढ्य राक्षस मोठा उत्साह मनामध्यें धरून युद्धाकरितां बाहेर पडले. रथ, गज, गजतुल्य अश्व ४६,४७, गर्दभ, वृषभ, उंट, शिशुमार, भुजंग, मकर, कूर्म, मत्स्य, गरुडतुल्य पक्षी ४८, सिंह, व्याघ्र, सूकर, सृमर आणि चमर ह्या वाहनांच्या योगानें ते सर्वही सामर्थ्याविषयीं गर्व वाहणारे देवशत्रु राक्षस युद्ध करण्याकरितां देवलोकाकडे चालते झाले. असो. लंकेचा नाश जवळ आला आहे असें समजून लंकेमध्यें वास्तव्य करणाऱ्या ज्या देवता होत्या ४९,५० त्या मनामध्यें सर्व प्रकारें खिन्न झाल्या आणि उत्कृष्ट रथांवर आरूढ होऊन शेंकडों हजारों ५१ राक्षस उत्साहानें देवलोकाकडे सत्वर निघून गेले असतां त्यांच्याच मार्गानें लंकेंतील देवताही लंका सोडून चालत्या झाल्या ५२. त्यावेळीं कालाची प्रेरणा झाल्यामुळें पृथ्वीसंबंधीं व अंतरिक्षसंबंधीं भयंकर उत्पातही राक्षसाधिपतींच्या नाशाकरितां उत्पन्न झाले ५३. मेघ अस्थि व उष्ण रक्त ह्यांची वृष्टि करूं लागले; समुद्रांनीं मर्यादेचें

शिवास्तत्र दारुणं घोरदर्शनाः ५५ संपतन्त्यथ भूतानि दृश्यन्ते च यथाक्रमम् । गृध्रचक्रं महच्चात्र प्रज्वालोद्गारिभिर्मुखैः ५६ रक्षोगणस्योपरिष्टात्परिभ्रमति कालवत् । कपोता रक्तपादाश्च सारिका विद्रुता ययुः ५७ काका वाश्यन्ति तत्रैव बिडालाय द्विपादिकाः । उत्पातांस्ताननादृत्य राक्षसा बलदर्पिताः ५८ यान्त्येव न निवर्तन्ते मृत्युपाशावपाशिताः । माल्यवांश्च सुमाली च माली च सुमहाबलः ५९ पुरःसरा राक्षसानां ज्वलिता इव पावकाः । माल्यवन्तं तु ते सर्वे माल्यवन्तमिवाचलम् ६० निशाचरा आश्रयन्ति धातारमिव देवताः । तद्बलं राक्षसेन्द्राणां महाभ्रघननादितम् ६१ जयेप्सया देवलोकं ययौ मालिवशे स्थितम् । राक्षसानां समुद्योगं तं तु नारायणः प्रभुः ६२ देवदूतादुपश्रुत्य चक्रे युद्धे तदा मनः । मसज्जायुधतूर्णीरो वैनतेयोपरि स्थितः ६३ आसाद्य कवचं दिव्यं सहस्रार्कसमद्युति । आबध्य शरसंपूर्णे इषुधी विमले तदा ६४ श्रोणिसूत्रं च खड्गं च विमलं कमलेक्षणः । शङ्खचक्रगदाशार्ङ्गखड्गांश्चैव वरायुधान् ६५ संपूर्ण

---

उल्लंघन केलें; पर्वत हलूं लागले ५४; उग्र मुद्रेनें युक्त असलेल्या आणि भयंकर आक्रोश करीत असलेल्या भालु मेघगर्जनेप्रमाणें नाद करून अट्टहास करूं लागल्या ५५; प्राणी तेथें पडतांना दृष्टीं पडूं लागले; नंतर क्रमाक्रमानें गृध्रपक्ष्यांचा कळपही मुखांतून ज्वाला बाहेर काढीत काढीत ५६ कालाप्रमाणें राक्षससमूहावर घिरट्या घालूं लागला; आरक्तवर्ण पादांनीं युक्त असलेले कपोत व सारिका हे पक्षी इकडून तिकडे त्वरेनें उडून जाऊं लागले ५७ आणि काकपक्षीही मांजराप्रमाणें शब्द करूं लागले. तथापि, मृत्युपाशानें बद्ध झालेले ते राक्षस बलाविषयीं गर्व झाला असल्यामुळें त्या उत्पातांची पर्वा न करितां तसे पुढेंच जात राहिले; मागें फिरले नाहींत. माल्यवान्, सुमालि आणि अत्यंत महाबलाढ्य माली ५८,५९ हे त्या राक्षसांचे प्रज्वलित अग्नींप्रमाणें पुढारी होते. ब्रह्मदेवाचा आश्रय करणाऱ्या देवतांप्रमाणें ते सर्व राक्षस माल्यवान्पर्वतच कीं काय अशा त्या माल्यवानाचा आश्रय करून राहिले आणि मालीच्या आज्ञेंत असलेले व प्रचंड मेघसमूहाप्रमाणें गर्जना करीत असलेलें तें राक्षसाधिपतींचें सैन्य जयाच्या इच्छेनें देवलोकाकडे चाललें. इकडे देवदूतापासून राक्षसांचा तो उद्योग श्रवण करून प्रभु नारायणानेंही युद्ध करण्याचें मनामध्यें आणिलें आणि धनुष्य व भाते सज्ज करून तो गरुडावर आरूढ झाला ६०,६१,६२,६३. सारांश, सहस्र सूर्यांप्रमाणें तेजस्वी असें दिव्य कवच धारण करून, बाणांनीं भरलेले निर्मल भाते बांधून ६४, कमरेला कांचा भिडवून, लकलकीत तरवार लटकावून आणि शंख,

गिरिसंकाशं वैनतेयमथास्थितः। राक्षसानामभावाय ययौ तूर्णतरं प्रभुः ६६ सुपर्णपृष्ठे स बभौ श्यामः पीताम्बरो हरिः। काञ्चनस्य गिरेः शृङ्गे सतडित्तोयदो यथा ६७ स सिद्धदेवर्षिमहोरगैश्च गन्धर्वयक्षैरुपगीयमानः। समाससादासुरसैन्यशत्रुश्चक्रासिशार्ङ्गायुधशङ्खपाणिः ६८ सुपर्णपक्षानिलनुन्नपक्षं भ्रमत्पताकं प्रविकीर्णशस्त्रम्। चचाल तद्राक्षसराजसैन्यं चलोपलं नीलमिवाचलाग्रम् ६९ ततः शितैः शोणितमांसरूषितैर्युगान्तवैश्वानरतुल्यविग्रहैः। निशाचराः संपरिवार्य माधवं वरायुधैर्निर्बिभिदुः सहस्रशः ७० [ २५७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

नारायणगिरिं ते तु गर्जन्तो राक्षसाम्बुदाः। अर्दयन्तोऽस्त्रवर्षेण वर्षेणेवाद्रिमम्बुदाः १ श्यामावदातस्तैर्विष्णुर्नीलैर्नक्तंचरोत्तमैः। वृतोऽञ्जनगिरीवायं वर्षमाणैः पयोधरैः २ शलभा इव केदारं मशका इव पाव-

---

चक्र, गदा, शार्ङ्ग धनुष्य व इतरही श्रेष्ठ आयुधें बरोबर घेऊन ६५ सर्वगुणसंपन्न अशा पर्वततुल्य गरुडावर तो आरूढ झाला आणि राक्षसांच्या नाशाकरितां तो प्रभु अतिशयच त्वरेनें निघाला ६६. गरुडाच्या पाठीवर आरूढ झालेला तो श्यामवर्ण व पीतांबरधारी श्रीहरि सुवर्णपर्वताच्या शिखरावर आरूढ झालेल्या आणि विद्युल्लतेनें युक्त असलेल्या मेघाप्रमाणें दिसूं लागला ६७. सिद्ध, देव, ऋषि, महोरग, गंधर्व आणि यक्ष ज्याचें स्तवन करीत आहेत आणि चक्र, खड्ग, शार्ङ्गधनुष्य व शंख हीं ज्यानें हातांमध्यें घेतलीं आहेत असा तो असुरसैन्यांचा शत्रु श्रीहरि प्राप्त झाला असतां ६८. गरुडाच्या पक्षवातानें ज्यांतील योद्ध्यांचे हातपाय थरथर कांपूं लागले आहेत; आणि ज्यांमध्यें पताका फडकत असून शस्त्रांची मर्दी उडून गेली आहे असें तें राक्षसाधिपतीचें सैन्य खवळून गेलें आणि अचल शिखरें व चल पाषाण ह्यांनीं युक्त असलेल्या नीलपर्वताप्रमाणें दिसूं लागलें ६९. तदनंतर राक्षसांनीं श्रीहरीला वेढून टाकिलें आणि रक्त व मांस ज्यांना चोपडलेलें आहे व प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें ज्यांचें स्वरूप आहे अशा उत्कृष्ट प्रकारच्या व तीक्ष्ण शस्त्रांच्या योगानें हजारों प्रकारांनीं ते त्याला टोंचूं लागले ७०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

पर्जन्यवृष्टीनें ज्याप्रमाणें मेघ पर्वताला जर्जर करून सोडितात त्याप्रमाणें ते गर्जना करणारे राक्षसरूप मेघ नारायणरूप पर्वताला जर्जर करूं लागले १. तेव्हां वृष्टि करणाऱ्या मेघांनीं व्याप्त होऊन जाणाऱ्या अंजनपर्वताप्रमाणें श्यामवर्ण असून निर्मल

कम् । यथामृतघटं दंशा मकरा इव चार्णवम् ३ तथा रक्षोधनुर्मुक्ता
वज्रानिलमनोजवाः । हरिं विशन्ति स्म शरा लोका इव विपर्यये ४
स्यन्दनैः स्यन्दनगता गजैश्च गजमूर्धगाः । अश्वारोहास्तथाश्वैश्च पादा-
ताश्चाम्बरे स्थिताः ५ राक्षसेन्द्रा गिरिनिभाः शरैः शक्त्यृष्टितोमरैः । निरु-
च्छ्वासं हरिं चक्रुः प्राणायामा इव द्विजम् ६ निशाचरैस्ताड्यमानो मीनै-
रिव महोदधिः । शार्ङ्गमायम्य दुर्धर्षो राक्षसेभ्योऽसृजच्छरान् ७ शरैः
पूर्णायतोत्सृष्टैर्वज्रकल्पैर्मनोजवैः । चिच्छेद विष्णुर्निशितैः शतशोऽथ सह-
स्रशः ८ विद्राव्य शरवर्षेण वर्षं वायुरिवोत्थितम् । पाञ्चजन्यं महाशङ्खं
प्रदध्मौ पुरुषोत्तमः ९ सोऽम्बुजो हरिणाध्मातः सर्वप्राणेन शङ्खराट् । ररास
भीमनिर्ह्रादस्त्रैलोक्यं व्यथयन्निव १० शङ्खराजरवः सोऽथ त्रासयामास
राक्षसान् । मृगराज इवारण्ये समदानिव कुञ्जरान् ११ न शेकुरश्वाः

---

असलेला विष्णु त्या नीलवर्ण श्रेष्ठ राक्षसांनीं व्याप्त होऊन गेला २. शेतामध्यें प्रवेश करणाऱ्या टोळांप्रमाणें, अग्नीमध्यें प्रवेश करणाऱ्या मशकांप्रमाणें, मधुघटावर धाड घालणाऱ्या वनमक्षिकांप्रमाणें, समुद्रामध्यें प्रवेश करणाऱ्या मकरांप्रमाणें ३ अथवा प्रलयकालीं परमात्म्याचे ठिकाणी प्रविष्ट होणाऱ्या लोकांप्रमाणें राक्षसांच्या धनुष्यांपासून सुटलेले आणि वज्र, वायु व मन ह्यांप्रमाणें वेगयुक्त असलेले बाण श्रीहरीचे ठिकाणीं प्रविष्ट होऊं लागले ४. नंतर द्विजाला ज्याप्रमाणें प्राणायाम उच्छ्वासरहित करून टाकितात त्याप्रमाणें रथारूढ झालेल्या राक्षसांनीं रथांच्या योगानें, गजारूढ झालेल्यांनीं गजांच्या योगानें, अश्वारूढ झालेल्यांनीं अश्वांच्या योगानें आणि पादचारी व आकाशामध्यें स्थित असलेल्या पर्वततुल्य राक्षसाधिपतींनीं बाण, शक्ति, ऋष्टि व तोमर ह्यांच्या योगानें हरीला उच्छ्वासरहित करून सोडिलें ५, ६. महासागराला ताडण करणाऱ्या मत्स्यांप्रमाणें ते निशाचर विष्णूला ताडण करूं लागले असतां त्या अजिंक्य विष्णूनें शार्ङ्गधनुष्य ओढून धरून राक्षसांवर बाण टाकिले ७ आणि अशारीतीनें धनुष्य पूर्ण आकर्षण करून सोडिलेल्या, वज्रतुल्य, मनासारिख्या वेगानें युक्त व तीक्ष्ण बाणांच्या योगानें शेंकडों हजारों राक्षस विष्णूनें तोडून टाकिले ८. नंतर एकाएकीं आलेल्या पर्जन्याला वायु धुडकावून लावितो त्याप्रमाणें बाणवृष्टीच्या योगानें राक्षसांना धुडकावून लावून त्या पुरुषोत्तमानें आपला पांचजन्यनामक प्रचंड शंख वाजविला ९ आणि ह्याप्रमाणें तो श्रेष्ठ शंख सर्व सामर्थ्यानें श्रीहरीनें फुंकिला असतां त्रैलोक्य त्रस्त करून सोडणारा भयंकर ध्वनि होऊं लागला १०. अरण्यामध्यें ज्याप्रमाणें मदमत्त गजांना सिंह त्रस्त करून सोडितो त्याप्रमाणें त्या श्रेष्ठ शंखाच्या ध्वनीनें राक्षसांना त्रस्त करून सोडिलें ११. शंखाच्या शब्दानें सामर्थ्य

संस्थातुं विमदाः कुञ्जराभवन् । स्यन्दनेभ्यश्च्युता वीराः शङ्खरावितदुर्बलाः १२ शार्ङ्गचापविनिर्मुक्ता वज्रतुल्याननाः शराः । विदार्य तानि रक्षांसि सुपुङ्खा विविशुः क्षितिम् १३ भिद्यमानाः शरैः संख्ये नारायणकरच्युतैः । निपेतू राक्षसा भूमौ शैला वज्रहता इव १४ व्रणानि परगात्रेभ्यो विष्णुचक्रकृतानि हि । असृक्क्षरन्ति धाराभिः स्वर्णधारा इवाचलाः १५ शङ्खराजरवश्चापि शार्ङ्गचापरवस्तथा । राक्षसानां रवांश्चापि ग्रसते वैष्णवो रवः १६ तेषां शिरांधरान्धूताञ्छरध्वजधनूंषि च । रथान्पताकास्तूणीरांश्चिच्छेद स हरिः शरैः १७ सूर्यादिव करा घोरा वार्योघा इव सागरात्पर्वतादिव नागेन्द्रा धारौघा इव चाम्बुदात् १८ तथा शार्ङ्गविनिर्मुक्ताः शरा नारायणेरितात् । निर्धावन्तीषवस्तूर्णं शतशोऽथ सहस्रशः १९ शरभेण यथा सिंहाः सिंहेन द्विरदा यथा । द्विरदेन यथा व्याघ्रा व्याघ्रेण द्वीपिनो यथा २० द्वीपिनेव यथा श्वानः शुना मार्जारका यथा । मार्जारेण यथा सर्पाः सर्पेण च यथाखवः २१ तथा ते

---

नाहींसें झाल्यामुळें वीर रथावरून पडले; गज मदशून्य झाले आणि अश्वही उभे राहण्यास असमर्थ झाले १२. वज्रतुल्य मुखें आणि पिच्छयुक्त प्रदेश ह्यांनीं युक्त असलेले बाण शार्ङ्गधनुष्यापासून सुटले असतां त्या राक्षसांना विदीर्ण करून पृथ्वीमध्यें प्रवेश करूं लागले १३. नारायणाच्या हातांतून सुटलेल्या बाणानें संग्राममध्यें छिन्नभिन्न होऊं लागलेले राक्षस वज्राचा तडाका बसलेल्या पर्वतांप्रमाणें भूमीवर पडूं लागले १४ आणि पर्जन्यधारांच्या योगानें ज्याप्रमाणें पर्वतांतून सुवर्णधातूच्या धारा सुरू होतात त्याप्रमाणें विष्णूच्या चक्रामुळें झालेले व्रण शत्रूच्या शरीरांतून रक्ताचे पाट वाहवूं लागले १५. विष्णूनें उत्पन्न केलेला त्या श्रेष्ठ शंखाचा व शार्ङ्गधनुष्याचा ध्वनि राक्षसांच्या ध्वनींना ग्रस्त करूं लागला. त्या हरीनें बाणांच्या योगानें त्या राक्षसांचे कंपित झालेले कंठ, बाण, ध्वज, धनुष्यें, रथ, पताका व भाते तोडून टाकिले १६, १७. सूर्यापासून निघालेलीं घोर किरणेंच कीं काय, समुद्रापासून निघालेले जलप्रवाहच कीं काय, पर्वतापासून निघालेले महागजच कीं काय, अथवा मेघापासून निघालेले जलधारांचे ओघच कीं काय १८ असे नारायणाच्या हस्तव्यापारामुळें शार्ङ्गधनुष्यापासून सुटलेले शेंकडो हजारों बाण सत्वर धांवूं लागले १९. शरभ ज्याप्रमाणें सिंहाना पळवून लावितो, सिंह ज्याप्रमाणें गजांना धुडकावून लावितो, गज ज्याप्रमाणें व्याघ्रांची हवेलंडी करून टाकितो, व्याघ्र ज्याप्रमाणें चित्त्यांची तारंबळ उडवून देतो २०, चित्ता ज्याप्रमाणें श्वानांना त्राहि त्राहि करून सोडितो, श्वान ज्याप्रमाणें मांजरांना पुरेपुरेसें करून टाकितें,

राक्षसाः सर्वे विष्णुना प्रभविष्णुना । द्रवन्ति द्राविताश्चान्ये शायिताश्च महीतले २२ राक्षसानां सहस्राणि निहत्य मधुसूदनः । वारिजं पूरयामास तोयदं सुरराडिव २३ नारायणशरस्तत्रं शङ्खनादसुविह्वलम् । ययौ लङ्कामभिमुखं प्रभग्नं राक्षसं बलम् २४ प्रभग्ने राक्षसबले नारायणशराहते । सुमाली शरवर्षेण निववार रणे हरिम् २५ स तु तं छादयामास नीहार इव भास्करम् । राक्षसाः सत्त्वसंपन्नाः पुनर्धैर्यं समादधुः २६ अथ सोऽभ्यपतद्रोषाद्राक्षसो बलदर्पितः । महानादं प्रकुर्वाणो राक्षसाञ्जीवयन्निव २७ उत्क्षिप्य लम्बाभरणं धुन्वन्करमिव द्विपः । ररास राक्षसो हर्षात्सतडित्तोयदो यथा २८ सुमालेर्नर्दतस्तस्य शिरो ज्वलितकुण्डलम् । चिच्छेद यन्तुरश्वाश्च भ्रान्तास्तस्य तु रक्षसः २९ तैरश्वैर्भ्राम्यते भ्रान्तैः सुमाली राक्षसेश्वरः । इन्द्रियाश्वैः परिभ्रान्तैर्धृतिहीनो यथा नरः ३०

---

मांजर ज्याप्रमाणें सर्पांना चळाकापळो करून सोडितें आणि सर्प ज्याप्रमाणें उंदरांना नकोनकोसें करून टाकितो २१ त्याप्रमाणें या सर्वही राक्षसांना समर्थ विष्णूनें दमाय धरणी ठाव करून सोडिलें आणि पिटवून लाविलेल्या इतर राक्षसांना ( कायमचें ) भूतलावर निजवूनही टाकिलें २२. ह्याप्रमाणें हजारों राक्षसांचा वध करून मधुसूदनानें मेघाला प्रेरणा करणाऱ्या इंद्राप्रमाणें शंखाला प्रेरणा केली २३. तेव्हां नारायणाच्या बाणांनीं आधींच त्रस्त होऊन त्या शंखनादाच्या योगानें अतिशय विह्वल झालेलें तें राक्षससैन्य पराभव पावलें आणि लंकेकडे तोंड करून पळत सुटलें २४. नारायणाच्या बाणांचा तडाका बसल्यामुळें राक्षससैन्याची दाणादाण उडून गेली असतां सुमाली संग्रामामध्यें बाणवृष्टीच्या योगानें हरीचें निवारण करूं लागला २५ आणि सूर्याला आच्छादित करून टाकणाऱ्या धुक्याप्रमाणें त्यानें त्याला आच्छादित केलें. तें पाहून बलाढ्य राक्षसांना पुनरपि धैर्य आलें २६. तदनंतर राक्षसांचें पुनरुज्जीवन करण्याकरितांच कीं काय सामर्थ्यामुळें गर्वयुक्त झालेला तो सुमाली राक्षस प्रचंड गर्जना करीत करीत रागारागानें विष्णूवर तुटून पडला २७ आणि इकडे तिकडे हालविणाऱ्या गजाप्रमाणें आपल्या कंठांतील माळेला इकडे तिकडे झोले देऊन तो राक्षस विद्युल्लतेसहवर्तमान असलेल्या मेघाप्रमाणें हर्षानें गर्जना करूं लागला २८. ह्याप्रमाणें सुमाली गर्जना करूं लागला असतां उज्ज्वल कुंडलांनीं युक्त असलेलें त्याच्या सारथ्याचें मस्तक विष्णूनें छेदून टाकिलें व त्या बरोबर त्या राक्षसाचे अश्व गोंधळून गेले २९. तेव्हां इंद्रियरूप अश्व मोकळे सुटले असतां ज्ञानहीन पुरुष ज्याप्रमाणें भांबावून जातो त्याप्रमाणें त्या मोकळ्या सुटलेल्या अश्वांमुळें राक्षसा-

ततो विष्णुं महाबाहुं प्रपतन्तं रणाजिरे । हृते सुमालेरश्वैश्च रथे विष्णुरथं प्रति ॥ माली चाभ्यद्रवद्युक्तः प्रगृह्य स शरासनम् ३१ मालेर्धनुच्युता बाणाः कार्तस्वरविभूषिताः । विविशुर्हरिमासाद्य क्रौञ्चं पत्ररथा इव ३२ अर्द्यमानः शरैः सोऽथ मालिमुक्तैः सहस्रशः । चुक्षुभे न रणे विष्णुर्जितेन्द्रिय इवाधिभिः ३३ अथ मौर्वीस्वनं कृत्वा भगवान्भूतभावनः । मालिनं प्रति बाणौघान्ससर्जासिगदाधरः ३४ ते मालिदेहमासाद्य वज्रविद्युत्प्रभाः शराः । पिबन्ति रुधिरं तस्य नागा इव सुधारसम् ३५ मालिनं विमुखं कृत्वा शङ्खचक्रगदाधरः । मालिमौलिं ध्वजं चापं वाजिनश्चाप्यपातयत् ३६ विरथस्तु गदां गृह्य माली नक्तंचरोत्तमः । आपुप्लुवे गदापाणिर्गिर्यग्रादिव केसरी ३७ गदया गरुडेशानमीशानमिव चान्तकः । ललाटदेशेऽभ्यहनद्वज्रेणेन्द्रो यथाचलम् ३८ गदयाभिहतस्तेन

---

धिपति सुमाली भांबावून गेला ३०. असो. सुमालीच्या अश्वांनीं त्याचा रथ विष्णूच्या रथाकडे ओढून नेला असतां संग्रामामध्यें शत्रूवर तुटून पडणाऱ्या महापराक्रमी विष्णूकडे धनुष्य हातांत घेऊन माली सावधानपूर्वक धांवत गेला ३१. नंतर क्रौंचपर्वतावर प्रवेश करणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें मालीच्या धनुष्यापासून सुटलेले सुवर्णभूषित बाण हरीचेसमीप येऊन त्याच्या शरीरामध्यें प्रवेश करूं लागले ३२. परंतु, जितेंद्रिय पुरुष ज्याप्रमाणें मानसिक व्यथांना डगत नाहीं त्याप्रमाणें मालीनें सोडलेल्या हजारों बाणांची पीडा होऊं लागली असतांही तो विष्णु संग्रामामध्यें डगला नाहीं ३३. तदनंतर खड्ग व गदा धारण करणाऱ्या भूतपालक भगवानानें प्रत्यंचेचा टणत्कार करून मालीवर बाणांचे समूह सोडिले ३४ आणि वज्र व विद्युल्लता ह्यांप्रमाणें तेजस्वी असलेले ते बाण मालीच्या देहासमीप आल्यानंतर अमृतरस प्राशन करणाऱ्या नागाप्रमाणें त्याचें रक्त प्राशन करूं लागले ३५ ह्याप्रमाणें मालीला पराङ्मुख केल्यानंतर शंख, चक्र व गदा धारण करणाऱ्या विष्णूनें मालीचा मुकुट, ध्वज, धनुष्य व अश्व ह्यांना खालीं पाडिलें ३६. तेव्हां पर्वतशिखरापासून उड्डाण करणाऱ्या सिंहाप्रमाणें तो विरथ झालेला गदापाणि श्रेष्ठ राक्षस माली हातामध्यें गदा घेऊन उडाला ३७. नंतर रुद्रावर प्रहार करणाऱ्या अंतकाप्रमाणें अथवा पर्वतावर वज्रानें प्रहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें गरुडाधिपति विष्णूला गदेच्या योगानें ललाटावर त्या मालीनें प्रहार केला ३८

---

१ श्वेतारण्यामध्यें मार्कंडेयाच्या रक्षणाकरितां आणि त्याचप्रमाणें दुसऱ्याही एका राजाच्या रक्षणाकरितां रुद्र व अंतक ह्यांमध्यें युद्ध सुरू झालें असतां त्या युद्धांत अंतकानें रुद्रावर आयुधाचा प्रहार केला अशी पुराणप्रसिद्ध कथा आहे.

मालिना गरुडो भृशम् । रणात्पराङ्मुखं देवं कृतवान्वेदनातुरः ३९ पराङ्मुखे कृते देवे मालिना गरुडेन वै । उदतिष्ठन्महाञ्शब्दो रक्षसामभिनर्दताम् ४० रक्षसां रुवतां रावं श्रुत्वा हरिहयानुजः । तिर्यगास्थाय संक्रुद्धः पक्षीशे भगवान्हरिः ४१ पराङ्मुखोऽप्युत्ससर्ज मालेश्चक्रं जिघांसया ४२ तत्सूर्यमण्डलाभासं स्वभासा भासयन्नभः । कालचक्रनिभं चक्रं मालेः शीर्षमपातयत् ४३ तच्छिरो राक्षसेन्द्रस्य चक्रोत्कृत्तं विभीषणम् ॥ पपात रुधिरोद्गारि पुरा राहुशिरो यथा ४४ ततः सुरैः संप्रहृष्टैः सर्वप्राणसमीरितः । सिंहनादरवो मुक्तः साधु देवेतिवादिभिः ४५ मालिनं निहतं दृष्ट्वा सुमाली माल्यवानपि । सबलौ शोकसंतप्तौ लङ्कामेव प्रधावितौ ४६ गरुडस्तु समाश्वस्तः संनिवृत्य यथा पुरा । राक्षसान्द्रावयामास पक्षवातेन कोपितः ४७ चक्रकृत्तास्यकमला गदासंचूर्णितोरसः । लाङ्गलग्लपितग्रीवा मुसलैर्भिन्नमस्तकाः ४८ केचिच्चैवा-

---

त्या मालीनें गदेच्या योगानें गरुडाला अतिशय ताडण केलें असतां वेदनांनीं व्याकुल झालेल्या त्या गरुडानें विष्णूला रणापासून पराङ्मुख केलें ३९. मालीनें ताडण केलेल्या गरुडानें ह्याप्रमाण विष्णूला पराङ्मुख केलं असतां गर्जना करणाऱ्या राक्षसांमध्यें एकाएकीं मोठाच आनंदध्वनि उमळला ४०. पक्षिश्रेष्ठ गरुड पराङ्मुख झाला असतां गर्जना करणाऱ्या राक्षसांचा ध्वनि ऐकून भगवान् श्रीहरी उपेंद्रानें आपलें तोंड मागें वळविलें ४१ आणि गरुडामुळें तो पराङ्मुख झाला असतांही मालीचा वध करण्याकरितां त्यानें त्याच्यावर चक्र सोडिलें ४२. कालचक्राप्रमाणें अप्रतिहत असून सूर्यमंडलाप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या चक्रानें स्वतःच्या तेजानें आकाश प्रकाशित करीत करीत मालीचें मस्तक तोडून पाडिलें ४३ आणि अशा रीतीनें चक्रानें तोडून टाकिलेलें तें राक्षसाधिपतीचें भयंकर मस्तक पुरातन कालीं तुटलेल्या राहूच्या मस्तकाप्रमाणें रक्ताच्या गुळण्या टाकीत टाकीत खालीं पडलें ४४. तदनंतर, ' हे देवा, शाबास ' असें म्हणणाऱ्या देवांनीं आनंदित होऊन व सर्व सामर्थ्य एकत्र करून सिंहनाद केला ४५. मालीचा वध झाल्याचें पाहून सुमाली आणि माल्यवान् सैन्यासहवर्तमान शोकसंतप्त होऊन लंकेकडेच धांवत गेले ४६. इतक्यांत गरुडालाही धीर येऊन पूर्वीप्रमाणें तो परत फिरला आणि क्रुद्ध होऊन त्यानें पक्षांच्या वाऱ्यानें राक्षसांना पळवून लाविलें ४७. ज्यांचीं मुखकमलें सुदर्शन चक्रानें तुटून गेलेलीं आहेत, ज्यांच्या वक्षःस्थलांचें गदेच्या योगानें चूर्ण झालेलें आहे, नांगरांनीं ज्यांच्या माना मोडून गेल्या आहेत आणि मुसळांच्या योगानें ज्यांचीं मस्तकें फुटून गेलीं आहेत ४८ असे कांहीं राक्षस खड्गांच्या

सिना छिन्नास्तथान्ये शरताडिताः । निपेतुरम्बराच्चूर्णं राक्षसाः सागराम्भसि ४९ नारायणोऽपीषुवराशनीभिर्विदारयामास धनुर्विमुक्तैः । नक्तञ्चरान्धूतविमुक्तकेशान्यथाशनीभिः सतडिन्महाभ्रः ५० भिन्नातपत्रं पतमानशस्त्रं शरैरपध्वस्तविनीतवेषम् । विनिःसृतान्त्रं भयलोलनेत्रं बलं तदुन्मत्ततरं बभूव ५१ सिंहार्दितानामिव कुञ्जराणां निशाचराणां सह कुञ्जराणाम् । रवाश्च वेगाश्च समं बभूवुः पुराणसिंहेन विमर्दितानाम् ५२ ते वार्यमाणा हरिबाणजालैः स्वबाणजालानि समुत्सृजन्तः । धावन्ति नक्तञ्चरकालमेघा वायुप्रणुन्ना इव कालमेघाः ५३ चक्रप्रहारैर्विनिकृत्तशीर्षाः संचूर्णिताङ्गाश्च गदाप्रहारैः । असिप्रहारैर्द्विविधाविभिन्नाः पतन्ति शैला इव राक्षसेन्द्राः ५४ विलम्बमानैर्मणिहारकुण्डलैर्निशाचरैर्नीलबलाहकोपमैः । निपात्यमानैर्ददृशे निरन्तरं निपात्यमानैरिव नीलपर्वतैः ५५ [ ३१२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

---

योगानें छिन्नभिन्न होऊन आणि कांहीं बाणांच्या योगानें ताडित होऊन पटापट समुद्राच्या उदकामध्यें पडले ४९. ज्यांचे केश वायूनें तडाका बसून मोकळे सुटलेले आहेत अशा राक्षसांना धनुष्यापासून सुटलेल्या उत्कृष्ट बाणरूप वज्रांच्या योगानें नारायण विदीर्ण करूं लागला असतां विद्युल्लतासहवर्तमान असलेला प्रचंड मेघच विद्युल्लतांच्या योगानें स्थलें विदीर्ण करून टाकीत आहे कीं काय असा दिसूं लागला ५०. तेव्हां राक्षसांचें तें सैन्य अतिशय उन्मत्त झालें. कारण, छत्रें फाटून गेलीं; शस्त्रांची त्यांच्यावर वृष्टि होऊं लागली; त्यांचा सौम्य वेष बाणांच्या योगानें नाहींसा झाला; त्यांचीं आंतडीं बाहेर निघालीं आणि भीतीमुळें त्यांचे नेत्रही चंचल झाले ५१. सिंहानें ग्रस्त केलेल्या गजांप्रमाणें पुराणपुरुषरूप सिंहानें जर्जर करून सोडिलेल्या गजांसहवर्तमान राक्षसांचे आक्रोश व धांवाधांवी हीं सारखींच सुरू झालीं ५२. स्वतःचे बाणसमूह सोडीत असलेल्या राक्षसरूप कालमेघांचें हरीच्या बाणसमुदायांनीं निवारण होऊं लागलें असतां वायूनें उडवून लाविलेल्या कालमेघांप्रमाणें ते धांवाधांव करूं लागले ५३. चक्राच्या प्रहारांनीं ज्यांचीं मस्तकें तुटून गेलेलीं आहेत; गदेच्या तडाक्यांनीं ज्यांच्या अवयवांचें चूर्ण झालें आहे आणि खड्गाच्या प्रहारांनीं ज्यांचे दोन दोन तुकडे झाले आहेत असे ते राक्षसाधिपति पर्वतांप्रमाणें पडूं लागले ५४. लोंबत असलेले रत्नांचे हार व कुंडलें आणि नीलमेघांप्रमाणें दिसत असलेले राक्षस ह्यांना श्रीहरी पाहूं लागला असतां भूमीवर कोसळणारे नील पर्वतच कीं काय असे ते राक्षस दिसूं लागले आणि सर्वही रणभूमि यत्किंचितही अवकाश न रहावा त्यांच्या योगानें व्याप्त होऊं

हन्यमाने बले तस्मिन्पद्मनाभेन पृष्ठतः । माल्यवान्संनिवृत्तोऽथ वेलामेत्य इवार्णवः १ संरक्तनयनः क्रोधाच्चलन्मौलिर्निशाचरः । पद्मनाभमिदं प्राह वचनं पुरुषोत्तमम् २ नारायण न जानीषे क्षात्रधर्मं पुरातनम् । अयुद्धमनसो भीतानस्मान्हंसि यथेतरः ३ पराङ्मुखवधं पापं यः करोति सुरेश्वर । स हन्ता न गतः स्वर्गं लभते पुण्यकर्मणाम् ४ युद्धश्रद्धाथवा तेऽस्ति शङ्खचक्रगदाधर । अहं स्थितोऽस्मि पश्यामि बलं दर्शय यत्तव ५ माल्यवन्तं स्थितं दृष्ट्वा माल्यवन्तमिवाचलम् । उवाच राक्षसेन्द्रं तं देवराजानुजो बली ६ युष्मत्तो भयभीतानां देवानां वै मयाऽभयम् । राक्षसोत्सादनं दत्तं तदेतदनुपाल्यते ७ प्राणैरपि प्रियं कार्यं देवानां हि सदा मया । सोहं वो निहनिष्यामि रसातलगतानपि ८ देवदेवं ब्रुवाणं तं रक्ताम्बुरुहलोचनम् । शक्त्या बिभेद संक्रुद्धो राक्षसेन्द्रो भुजान्तरे ९ माल्यवद्भुजनिर्मुक्ता शक्तिर्घण्टाकृतस्वना । हरेरुरसि बभ्राज मेघस्थेव शत-

---

लागलें ५५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

पाठलाग करून पद्मनाभ विष्णु त्या सैन्याचा वध करूं लागला असतां मर्यादेला जाऊन पोंचलेल्या समुद्राप्रमाणें माल्यवान् परत फिरला १. क्रोधानें त्याचे नेत्र आरक्तवर्ण होऊन मुकुट लटलट हलूं लागला व तो माल्यवान् पद्मनाभ पुरुषोत्तमाला ह्मणाला २ " नारायणा, ज्याअर्थी आह्मी भयभीत झालों असून युद्धाकडे आमचें लक्ष्य नसतांना प्राकृत जनांप्रमाणें तूं आमचा वध करीत आहेस त्याअर्थी पुरातन क्षात्र धर्म तूं जाणीत नाहींस ३. हे सुरेश्वरा, पराङ्मुखवधरूप पाप जो करितो तो वध करणारा इहलोक सोडून गेला असतां पुण्यकर्मी पुरुषांना प्राप्त होणारा स्वर्ग त्याला प्राप्त होत नाहीं ४. हे शंखचक्रगदाधरा, युद्धाचीच जर तुला खुमखुम असेल तर आपलें जें सामर्थ्य असेल तें तूं दाखीव. मी येथें उभा आहें; आतां तुझें सामर्थ्य अवलोकन करितों" ५. माल्यवान् पर्वताप्रमाणें माल्यवान् राक्षस उभा राहिलेला अवलोकन करून त्या राक्षसाधिपतीला तो बलाढ्य उपेंद्र ह्मणाला ६ "तुह्मांमुळें भयभीत झालेल्या देवांना मीं अभयवचन दिलेलें आहे आणि राक्षसांचा उच्छेद करून तें हें वचन मी परिपालन करीत आहें ७. प्राणांचीही पर्वा न करितां देवांचें सर्वदां मला प्रिय केलें पाहिजे. ह्यास्तव, तुह्मी रसातळाला जरी जाऊन पोंचला तरी तुमचा मी वध करीन" ८. आरक्तवर्ण कमलांसारिख्या नेत्रांनीं युक्त असलेला तो देवाधिदेव ह्याप्रमाणें भाषण करूं लागला असतांना राक्षसाधिपति माल्यवानानें क्रुद्ध होऊन त्याच्या वक्षःस्थलाचे ठिकाणीं शक्तीच्या योगानें प्रहार केला ९. तेव्हां

हृदि १० ततस्तामेव चोत्कृष्य शक्तिं शक्तिधरप्रियः । माल्यवन्तं समुद्दिश्य चिक्षेपाम्बुरुहेक्षणः ११ स्कन्दोत्सृष्टेव सा शक्तिर्गोविन्दकरनिःसृता । काङ्क्षन्ती राक्षसं प्रायान्महोल्केवाञ्जनाचलम् १२ सा तस्योरसि विस्तीर्णे हारभारावभासिते । आपतद्राक्षसेन्द्रस्य गिरिकूट इवाशनिः १३ तया भिन्नतनुत्राणः प्राविशद्विपुलं तमः । माल्यवान्पुनराश्वस्तस्तस्थौ गिरिरिवाचलः १४ ततः कालायसं शूलं कण्टकैर्बहुभिश्चितम् । प्रगृह्याभ्यहनद्देवं स्तनयोरन्तरे दृढम् १५ तथैव रणरक्तस्तु मुष्टिना वासवानुजम् । ताडयित्वा धनुर्मात्रमपक्रान्तो निशाचरः १६ ततोऽम्बरे महाञ्छब्दः साधु साध्विति चोत्थितः । आहत्य राक्षसो विष्णुं गरुडं चाप्यताडयत् १७ वैनतेयस्ततः क्रुद्धः पक्षवातेन राक्षसम् । व्यपोहद्बलवान्वायुः शुष्कपर्णचयं यथा १८ द्विजेन्द्रपक्षवातेन द्रावितं दृश्य पूर्वजम् । सुमाली स्वबलैः सार्धं लङ्कामभिमुखो ययौ १९ पक्षवातबलोद्धूतो माल्य-

---

माल्यवानाच्या हातांपासून सुटलेली आणि घंटांमुळें वाजत असलेली ती शक्ति मेघांतील विद्युल्लतेप्रमाणें हरीच्या वक्षःस्थलाचे ठिकाणीं चमकूं लागली १०. तदनंतर शक्ति धारण करणारा कार्तिकेय ज्याला प्रिय आहे अशा कमलनयन श्रीहरीनें तीच शक्ति उपसून काढून माल्यवानाकडे फेंकिली असतां ११ स्कंदानें सोडिलेल्या शक्तीप्रमाणें गोविंदाच्या हातांतून सुटलेली ती शक्ति अंजनपर्वताच्या उद्देशानें जाणारी मोठी उल्काच कीं काय अशारीतीनें राक्षसांविषयीं उत्सुक होऊन त्याच्याकडे गेली १२; आणि पर्वतशिखरावर पडणाऱ्या वज्राप्रमाणें ती शक्ति जड हारानें झळकत असलेल्या त्या राक्षसाधिपतीच्या विशाल वक्षःस्थलावर जाऊन पडली १३. त्या शक्तीच्या योगानें माल्यवानाचें कवच फुटून जाऊन त्याच्या डोळ्यापुढें फारच अंधेरी आली; परंतु, पुनरपि सावध होऊन तो पर्वताप्रमाणें निश्चल उभा राहिला १४. तदनंतर अनेक कंटकांनीं व्याप्त असलेला एक लोखंडी शूल हातामध्यें घेऊन वक्षःस्थलाचे ठिकाणीं देवाधिदेव विष्णूला माल्यवानानें जोरानें प्रहार केला १५. इतकेंच नव्हे परंतु, त्याप्रमाणें त्या उपेंद्राला मुष्टीनें ताडण करून तो रणप्रिय निशाचर एक धनुष्य मागें गेला. तदनंतर 'शाबास शाबास' १६ असा प्रचंड ध्वनि आकाशांतून एकाएकीं निघाला असतां त्या राक्षसानें विष्णूला प्रहार करून गरुडालाही ताडण केलें १७. तदनंतर गरुड क्रुद्ध झाला आणि वायु ज्याप्रमाणें शुष्क पानांचा ढीग उडवून लावितो त्याप्रमाणें पक्षांच्या वायूनें त्यानें राक्षसांना उडवून दिलें १८ पक्षिराज गरुडाच्या पक्षवातानें पळवून लाविलेल्या आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला अवलोकन करून सुमाली सैन्यांसहवर्तमान लंकेकडे तोंड करून चालता झाला १९;

वानपि राक्षसः । स्वबलेन समागम्य ययौ लङ्कां ह्रिया वृतः २० एवं त राक्षसा राम हरिणा कमलेक्षण । बहुशः संयुगे भग्ना हतप्रवरनायकाः २१ अशक्नुवन्तस्ते विष्णुं प्रतियोद्धुं बलार्दिताः । त्यक्त्वा लङ्कां गता वस्तुं पातालं सहपत्नयः २२ सुमालिनं समासाद्य राक्षसं रघुसत्तम । स्थिताः प्रख्यातवीर्यास्ते वंशे सालकटङ्कटे २३ ये त्वया निहतास्ते तु पौलस्त्या नाम राक्षसाः २४ सुमाली माल्यवान्माली ये च तेषां पुरःसराः । सर्व एते महाभागा रावणाद्बलवत्तराः २५ न चान्यो राक्षसान्हन्ता सुरारीन्देवकण्टकान् । ऋते नारायणं देवं शङ्खचक्रगदाधरम् २६ भवान्नारायणो देवश्चतुर्बाहुः सनातनः । राक्षसान्हन्तुमुत्पन्नो ह्यजय्यः प्रभुरव्ययः २७ नष्टधर्मव्यवस्थानां कालेकाले प्रजाकरः । उत्पद्यते दस्युवधे शरणागतवत्सलः २८ एषा मया तव नराधिप राक्षसानामुत्पत्तिरद्य कथिता सकला यथावत् । भूयो निबोध रघुसत्तम रावणस्य जन्मप्रभावमतुलं ससुतस्य सर्वम् २९ चिरात्सुमाली व्यचरद्र-

---

व पक्षवाताच्या सामर्थ्यानें उडून गेलेला माल्यवान् राक्षसही लज्जित होऊन स्वसैन्यासहवर्तमान लंकेकडे निघून गेला २०. हे कमलनयना रामा, ह्याप्रमाणें मुख्य मुख्य नायकांचा वध करून हरीनें अनेक वेळां राक्षसांचा संग्रामामध्यें पराजय केलेला आहे २१. असो. अशा रीतीनें विष्णूशीं युद्ध करण्यास ते राक्षस असमर्थ झाले असतां लंका सोडून देऊन ते पातालामध्यें वास्तव्य करण्याकरितां सपत्नीक निघून गेले २२. हे रघुवंशजश्रेष्ठा, सालकटंकटेच्या वंशामध्यें असलेले ते प्रसिद्ध पराक्रमी राक्षस सुमाली राक्षसाचा आश्रय करून राहिले होते २३. तूं ज्यांचा वध केलास ते पौलस्त्यनामक राक्षस होत २४. सुमाली, माल्यवान्, माली आणि त्यांचे पुढारी हे सर्वही महापराक्रमी राक्षस रावणापेक्षांही बलाढ्य होते २५. शंखचक्रगदाधर नारायण देवाशिवाय देवकंटक व देवशत्रु राक्षसांचा वध करणारा दुसरा कोणी नाहीं २६. ( हे रामा, ) चतुर्भुज नारायण जो सनातन देव तोच तूं असून राक्षसांचा वध करण्याकरितां अवतीर्ण झाला आहेस; तूं प्रभु आहेस; अविनाशी आहेस आणि तुझा पराजय होणें अशक्य आहे २७. धर्ममर्यादा नाहींशा झाल्या असतां वेळोवेळीं तूं त्यांची स्थापना करीत असतोस आणि शरणागतांचें रक्षण करणारा तू पापी लोकांचा वध करण्याकरितां अवतीर्ण होत असतोस २८. हे प्रजाधिपते, ही मीं राक्षसांची उत्पत्ति आज तुला सर्व इत्थंभूत कथन केली आहे. आतां, हे रघुवंशजश्रेष्ठा, पुत्रांसहवर्तमान रावणाचा सर्व अनुपम जन्मवृत्तांत तूं माझ्यापासून श्रवण कर २९. असो. विष्णूच्या भीतीनें

सातलं स राक्षसो विष्णुभयार्दितस्तदा । पुत्रैश्च पौत्रैश्च समन्वितो बली ततस्तु लङ्कामवसद्धनेश्वरः ३० [ ४२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

कस्यचित्त्वथ कालस्य सुमाली नाम राक्षसः । रसातलान्मर्त्यलोकं सर्वं वै विचचार ह १ नीलजीमूतसंकाशस्तप्तकाञ्चनकुण्डलः । कन्यां दुहितरं गृह्य विना पद्ममिव श्रियम् २ राक्षसेन्द्रः स तु तदा विचरन्वै महीतले । तदाऽपश्यत्स गच्छन्तं पुष्पकेण धनेश्वरम् ३ गच्छन्तं पितरं द्रष्टुं पुलस्त्यतनयं विभुम् । तं दृष्ट्वाऽमरसंकाशं गच्छन्तं पावकोपमम् ४ रसातलं प्रविष्टः सन्मर्त्यलोकात्सविस्मयः । इत्येवं चिन्तयामास राक्षसानां महामतिः ५ किं कृत्वा श्रेय इत्येवं वर्धेमहि कथं वयम् । नीलजीमूतसंकाशस्तप्तकाञ्चनकुण्डलः ६ राक्षसेन्द्रः स तु तदाऽचिन्तयत्सुमहामतिः । अथाब्रवीत्सुतां रक्षः कैकसीं नाम नामतः ७ पुत्रि प्रदानकालोऽयं यौवनं व्यतिवर्तते । प्रत्याख्यानाच्च भीतैस्त्वं न वरैः परिगृह्यसे ८

---

व्याकुल झालेला तो बलाढ्य राक्षस सुमाली पुत्र व पौत्र ह्यांसहवर्तमान पुढें पुष्कळ दिवसपर्यंत रसातलामध्येंच संचार करीत राहिला आणि नंतर धनाधिपति कुबेर लंकेमध्यें वास्तव्य करूं लागला ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

कांहीं कालानें सुमालीनामक राक्षस रसातलांतून बाहेर येऊन सर्व मर्त्यलोकामध्यें संचार करूं लागला १. नीलमेघाप्रमाणें त्याची कांति होती; उज्ज्वल सुवर्णकुंडलें त्यानें धारण केलीं होतीं आणि कमलाचा त्याग करून राहिलेली लक्ष्मीच कीं काय अशी आपली अविवाहित कन्या त्यानें बरोबर आणिली होती २. असो. तो राक्षसाधिपति भूतलावर संचार करूं लागला असतां पुलस्त्यपुत्र जो आपला पिता विभु विश्रवा त्याच्या दर्शनाकरितां पुष्पकविमानामध्यें बसून धनाध्यक्ष कुबेर जात असतांना त्यानें अवलोकन केले. अग्नीचीच उपमा ज्याला योग्य आहे असा तो देवतुल्य कुबेर जात असतांना अवलोकन करून ३, ४ सुमाली राक्षस विस्मयचकित झाला आणि मर्त्यलोकापासून रसातलामध्यें निघून गेला. नंतर " काय केल्यानें आपलें कल्याण होईल आणि अशा रीतीनें आमचा अभ्युदय तरी कसा होईल " असा तो राक्षसांमध्यें महाविचारी असलेला सुमाली राक्षस विचार करूं लगला. उज्ज्वल सुवर्णकुंडलांनीं युक्त असलेल्या त्या अत्यंत महाविचारी नीलमेघतुल्य राक्षसाधिपति सुमालीनें विचार केला आणि नामानें कैकसी ह्मणून प्रसिद्ध असलेल्या आपल्या कन्येला तो राक्षस ह्मणाला ५, ६, ७ "हे पुत्रि, तुझें दान करण्याचा

त्वत्कृते च वयं सर्वे यन्त्रिता धर्मबुद्धयः । त्वं हि सर्वगुणोपेता श्रीः
साक्षादिव पुत्रिके ९ कन्यापितृत्वं दुःखं हि सर्वेषां मानकाङ्क्षिणाम् ।
न ज्ञायते च कः कन्यां वरयेदिति कन्यके १० मातुः कुलं पितृकुलं
यत्र चैव च दीयते । कुलत्रयं सदा कन्या संशये स्थाप्य तिष्ठति ११
सा त्वं मुनिवरं श्रेष्ठं प्रजापतिकुलोद्भवम् । भज विश्रवसं पुत्रि पौलस्त्यं
वरय स्वयम् १२ ईदृशास्ते भविष्यन्ति पुत्राः पुत्रि न संशयः । तेजसा
भास्करसमो यादृशोऽयं धनेश्वरः १३ सा तु तद्वचनं श्रुत्वा कन्यका पितृ-
गौरवात् । तत्र गत्वा च सा तस्थौ विश्रवा यत्र तप्यते १४ एतस्मिन्न-
न्तरे राम पुलस्त्यतनयो द्विजः । अग्निहोत्रमुपातिष्ठच्चतुर्थ इव पावकः १५
अविचिन्त्य तु तां वेलां दारुणां पितृगौरवात् । उपसृत्याग्रतस्तस्य चर-
णाधोमुखी स्थिता ॥ विलिखन्ती मुहुर्भूमिमङ्गुष्ठाग्रेण भामिनी १६ स तु
तां वीक्ष्य सुश्रोणीं पूर्णचन्द्रनिभाननाम् । अब्रवीत्परमोदारो दीप्यमानां
स्वतेजसा १७ भद्रे कस्यासि दुहिता कुतो वा त्वमिहागता । किं कार्यं

---

हा समय आहे; कारण, तुझें यौवन जात आहे. परंतु, नकाराला भिऊन गेलेले वर तुला मागणी घालीत नाहींत ८. हे कन्यके, सर्वगुणसंपन्न अशी तूं साक्षात् लक्ष्मीप्रमाणेंच आहेस आणि आम्ही सर्व धर्मनिष्ठ लोक तुझ्याकरितां पंचाइतींत पडलों आहों ९. अब्रूची चाड बाळगणाऱ्या सर्वांनाच कन्यापितृत्व दुःखदायक आहे. कारण, हे मुलि, आपल्या कन्येला कोण वरील हें समजत नाहीं १०. मातृकुल, पितृकुल आणि ज्या कुलांत कन्या दिली जातें तें कुल अशीं तीन कुलें नेहमींच काळजींत ठेवून कन्या रहात असते ११. ह्यास्तव, हे कन्ये, मुनींमध्यें उत्तम, ब्रह्मदेवाच्या कुळामध्यें उत्पन्न झालेला आणि पुलस्त्यपुत्र असा जो श्रेष्ठ विश्रवा त्याला तूं आपण होऊनच वर १२. हे मुलि, तेजानें रवितुल्य असलेला हा धनाधिपति ज्या प्रकारचा आहे त्या प्रकारचे तुला पुत्र होतील ह्यांत संशय नाहीं" १३. कन्येनें तें भाषण श्रवण केलें आणि पित्याच्या भाषणाला मान देऊन जिकडे विश्रवामुनि तप करीत होता तिकडे जाऊन ती उभी राहिली १४. हे रामा, इतक्यांत चवथा अग्निच कीं काय असा तो द्विज पुल-स्त्यपुत्र ( सायंकाळीं ) अग्नींना होम देत होता १५. परंतु, पित्याचे ठिकाणीं फारच पूज्यबुद्धि असल्यामुळें ती क्रूर वेळा आहे ह्याचा विचार न करितां ती कन्या त्याच्यासमोर गेली; पाय अवलोकन करीत करीत खालीं मान घालून उभी राहिली आणि ती सुंदरि वारंवार अंगुष्ठाग्रानें भूमीवर रेघोट्या ओढूं लागली १६. पूर्णचंद्रा-प्रमाणें जिचें मुख आहे व स्वतःच्या तेजानें जी झळकत आहे अशा त्या सुंदरीला

कस्य वा हेतोस्तत्त्वतो ब्रूहि शोभने १८ एवमुक्ता तु सा कन्या कृताञ्जलिरथाब्रवीत् । आत्मप्रभावेण मुने ज्ञातुमर्हसि मे मतम् १९ किं तु मां विद्धि ब्रह्मर्षे शासनात्पितुरागताम् । कैकसी नाम नाम्नाहं शेषं त्वं ज्ञातुमर्हसि २० स तु गत्वा मुनिर्ध्यानं वाक्यमेतदुवाच ह । विज्ञातं ते मया भद्रे कारणं यन्मनोगतम् २१ सुताभिलाषो मत्तस्ते मत्तमातङ्गगामिनि । दारुणायां तु वेलायां यस्मात्त्वं मामुपस्थिता २२ शृणु तस्मात्सुतान्भद्रे यादृशाञ्जनयिष्यसि । दारुणान्दारुणाकारान्दारुणाभिजनप्रियान् २३ प्रसविष्यसि सुश्रोणि राक्षसान्क्रूरकर्मणः। सा तु तद्वचनं श्रुत्वा प्रणिपत्याब्रवीद्वचः २४ भगवन्नीदृशान्पुत्रांस्त्वत्तोऽहं ब्रह्मवादिनः। नेच्छामि सुदुराचारान्प्रसादं कर्तुमर्हसि २५ कन्यया त्वेवमुक्तस्तु विश्रवा मुनिपुङ्गवः। उवाच कैकसीं भूयः पूर्णेन्दुरिव रोहिणीम् २६ पश्चिमो यस्तव सुतो भविष्यति शुभानने । मम वंशानुरूपः स धर्मात्मा च न संशयः २७ एवमुक्ता तु सा कन्या राम कालेन केनचित् । जनयामास बीभत्सं रक्षो-

---

अवलोकन करून तो अत्यंत उदार मुनि तिला ह्मणाला १७ " हे भद्रे, हे कल्याणि, तूं कोणाची कन्या आहेस ? येथें कोठून आली आहेस? तुझें कार्य आह्मीं काय करावें? अथवा कोणत्या उद्देशानें तूं येथें आली आहेस ? हें तूं खरं खरं सांग १८. ह्याप्रमाणें त्यानें विचारिलें असतां ती कन्या हात जोडून त्याला ह्मणाली "हे मुने, आपल्या प्रभावानेंच आपण माझा उद्देश जाणाल १९. तथापि, हे ब्रह्मर्षे, पित्याच्या आज्ञेनें मी येथें आलें आहे एवढें आपण समजा. माझें नांव कैकसी. बाकीचें आपणांला समजेलच " २०. ह्यावर तो मुनि ध्यानस्थ होऊन ह्मणाला " हे भद्रे, तुझ्या मनांतील काय उद्देश आहे तो मीं जाणिला २१. हे मत्तगजगामिनि, माझ्यापासून पुत्रप्राप्ति व्हावी अशी तुझी इच्छा आहे. परंतु, ज्याअर्थीं क्रूर वेळा असतांना तू माझ्याकडे आली आहेस २२ त्याअर्थीं, हे कल्याणि, तुला कसे पुत्र होतील हें तूं श्रवण कर. स्वभावानें व रूपानेंही भयंकर, क्रूर बांधव आवडणारे २३ आणि क्रूर कर्म करणारे राक्षस, हे सुंदरि, तुला होतील ". तें भाषण श्रवण केल्यानंतर प्रणिपातपूर्वक ती ह्मणाली २४ "भगवन्, आपणा ब्रह्मवेत्त्यापासून अशाप्रकारचे अत्यंत दुराचारी पुत्र प्राप्त होण्याची माझी इच्छा नाहीं. ह्यास्तव, आपण मजवर कृपा करा " २५. कन्येनें ह्याप्रमाणें सांगितलें असतां रोहिणीशीं भाषण करणारा पूर्णचंद्रमाच कीं काय असा तो मुनिश्रेष्ठ विश्रवा पुनरपि कैकसीला ह्मणाला २६ " हे सुमुखि, तुझा जो शेवटला पुत्र होईल तो माझ्या वंशाला अनुरूप व धर्मात्मा होईल

रूपं सुदारुणम् २८ दशग्रीवं महादंष्ट्रं नीलाञ्जनचयोपमम् । ताम्रोष्ठं विंशतिभुजं महास्यं दीप्तमूर्धजम् २९ तस्मिञ्जाते ततस्तस्मिन्सज्वालकवलाः शिवाः । क्रव्यादाश्चापसव्यानि मण्डलानि प्रचक्रमुः ३० ववर्ष रुधिरं देवो मेघाश्च खरनिःस्वनाः । प्रबभौ न च सूर्यो वै महोल्काश्चापतन्भुवि ३१ चकम्पे जगती चैव ववुर्वाताः सुदारुणाः। अक्षोभ्यः क्षुभितश्चैव समुद्रः सरितां पतिः ३२ अथ नामाकरोत्तस्य पितामहसमः पिता। दशग्रीवः प्रसूतोऽयं दशग्रीवो भविष्यति ३३ तस्य त्वनन्तरं जातः कुम्भकर्णो महाबलः । प्रमाणाद्यस्य विपुलं प्रमाणं नेह विद्यते ३४ ततः शूर्पणखा नाम संजज्ञे विकृतानना । विभीषणश्च धर्मात्मा कैकस्याः पश्चिमः सुतः ३५ तस्मिञ्जाते महासत्त्वे पुष्पवर्षं पपात ह । नभःस्थाने दुन्दुभयो देवानां प्राणदंस्तथा ३६ वाक्यं चैवान्तरिक्षे च साधु साध्विति तत्तदा ३७ तौ तु तत्र महारण्ये ववृधाते महौजसौ । कुम्भकर्णदशग्रीवौ लोकोद्वेगकरौ तदा ३८ कुम्भकर्णः प्रमत्तस्तु महर्षीन्धर्मवत्सलान् । त्रैलोक्यं

ह्याविषयीं संशय नाहीं " २७. हे रामा, ह्याप्रमाणें मुनीनें त्या कन्येला सांगितलें असतां कांहीं कालानें अतिभयंकर व बीभत्स असा एक राक्षसरूप पुत्र तिला झाला २८. दहा कंठ, मोठ्या मोठ्या दाढा, ताम्रवर्ण ओष्ठ, वीस हात, मोठे मोठे जबडे आणि उज्ज्वल केश ह्यांनीं तो युक्त होता आणि कज्जलपर्वताचीच उपमा त्याला योग्य होती २९. तो जन्मास आला असतां त्यावेळीं ज्वालारूप घांस ज्यांच्या मुखांमध्यें आहेत अशा भालु व श्वापदें हीं अप्रदक्षिणिक घिरट्या घालूं लागलीं ३०; पर्जन्य रक्तवृष्टि करूं लागला; मेघ कर्कश स्वरानें गर्जना करूं लागले; सूर्य प्रकाशनाशा झाला मोठ्या मोठ्या उल्का भूमीवर पडूं लागल्या ३१; भूकंप होऊं लागला; अतिभयंकर वारे वाहूं लागले आणि मर्यादेचें अतिक्रमण न करणारा नद्यांचा अधिपति समुद्रही अमर्याद झाला ३२. असो. " ज्याअर्थी जन्मास आलेला पुत्र दहा ग्रीवांनीं ( ह्मणजे कंठांनीं ) युक्त आहे त्याअर्थी नांवानेंही हा दशग्रीवच होईल " असें ह्मणून ब्रह्मतुल्य पित्यानें त्याचें नामकरण केलें ३३. त्याच्यानंतर महाबलाढ्य कुंभकर्ण झाला. ज्याच्या शरीरापेक्षां प्रमाणानें मोठें शरीर ह्या जगांत नाहीं ३४. तदनंतर विकृत मुखानें युक्त अशी शूर्पणखानामक कन्या झाली आणि धर्मात्मा बिभीषण झाला. हा कैकसीचा शेवटला पुत्र होय ३५. तो महाशय जन्मास येतांक्षणीं पुष्पवृष्टि झाली; अंतरिक्षामध्यें देवांच्या नौबदी झडूं लागल्या ३६ आणि ' उत्तम ! उत्तम ! ' अशी आकाशवाणी झाली ३७. लोकांना उद्वेग उत्पन्न करणारे ते महाबलाढ्य रावणकुंभकर्ण

नित्यासंतुष्टो भक्षयन्विचचार ह ३९ विभीषणस्तु धर्मात्मा नित्यं धर्मव्यवस्थितः। स्वाध्यायनियताहार उवास विजितेन्द्रियः ४० अथ वैश्रवणो देवस्तत्र कालेन केनचित्। आगतः पितरं द्रष्टुं पुष्पकेण धनेश्वरः ४१ तं दृष्ट्वा कैकसी तत्र ज्वलन्तमिव तेजसा। आगम्य राक्षसी तत्र दशग्रीवमुवाच ह ४२ पुत्र वैश्रवणं पश्य भ्रातरं तेजसा वृतम्। भ्रातृभावे समे चापि पश्यात्मानं त्वमीदृशम् ४३ दशग्रीव तथा यत्नं कुरुष्वामितविक्रम। यथा त्वमपि मे पुत्र भवेर्वैश्रवणोपमः ४४ मातुस्तद्वचनं श्रुत्वा दशग्रीवः प्रतापवान्। अमर्षमतुलं लेभे प्रतिज्ञां चाकरोत्तदा ४५ सत्यं ते प्रतिजानामि भ्रातृतुल्योऽधिकोऽपि वा। भविष्याम्योजसा चैव सन्तापं त्यज हृद्गतम्॥ ततः क्रोधेन तेनैव दशग्रीवः सहानुजः। चिकीर्षुर्दुष्करं कर्म तपसे धृतमानसः ४६ प्राप्स्यामि तपसा काममिति कृत्वाध्यवस्य च। आगच्छदात्मसिद्ध्यर्थं गोकर्णस्याश्रमं शुभम् ४७ स राक्षसस्तत्र सहानुजस्तदा तपश्चचारातुलमुग्रविक्रमः। अतोषयच्चापि पितामहं विभुं ददौ स तुष्टश्च वराञ्जयावहान् ४८ [ ३१० ] इत्यार्षे श्रीमद्रा-

---

त्या महारण्यामध्यें वाढले ३८. कांहींही भक्षण केलें तरी कधींही तृप्त न होणारा अतिमत्त कुंभकर्ण धर्मनिष्ठ महर्षींना भक्षण करीत करीत त्रैलोक्यामध्यें संचार करूं लागला ३९. परंतु, नेहेमीं धर्ममर्यादेनें वागणारा धर्मात्मा बिभीषण वेदाध्ययन व शुद्ध आहार ह्यांचें अवलंबन करून व इंद्रियदमन करून राहूं लागला ४०. पुढें कांहीं काल लोटल्यानंतर धनाधिपति वैश्रवण देव पित्याचें दर्शन घेण्याकरितां पुष्पकविमानामध्यें आरूढ होऊन तेथें आला ४१. तेजानें जळतच आहे कीं काय अशा त्या कुबेराला अवलोकन करून कैकसी राक्षसी दशग्रीवासमीप गेली आणि ह्मणाली ४२ "हे पुत्रा, वैश्रवणनामक तेजस्वी भ्रात्याकडे तूं पहा आणि भ्राता हें नातें सारखेंच असतांना अशाप्रकारचें स्वतःचें स्वरूपही तूं अवलोकन कर ४३. अतुलपराक्रमी दशग्रीवा, तूंही माझा पुत्र वैश्रवणाप्रमाणें होशील अशा रीतीनें यत्न कर" ४४. मातेचें तें भाषण श्रवण केल्यावर प्रतापी रावणाला अनुपम हर्ष झाला आणि त्यानें प्रतिज्ञा केली ४५. (तो ह्मणाला) "मी बलानें भ्रात्याच्या बरोबरीचा अथवा अधिकही होईन हें मी तुला प्रतिज्ञेवर सत्य सांगतों. तूं आपल्या मनांतील संताप सोडून दे" ४६. तदनंतर तोच क्रोध आला असतांना आपल्या कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान रावणानें दुर्घट कर्म करण्याकरितां तपश्चर्येचा निश्चय केला ४७ आणि "तपश्चर्येनें मी आपला मनोरथ शेवटास नेईन" असा निश्चय करून आपला मनोरथ

मायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

अथाब्रवीन्मुनिं रामः कथं ते भ्रातरो वने । कीदृशं तु तदा ब्रह्मंस्तपस्तेपुर्महाबलाः १ अगस्त्यस्त्वब्रवीत्तत्र रामं सुप्रीतमानसम् । तांस्तान्धर्मविधींस्तत्र भ्रातरस्ते समाविशन् २ कुम्भकर्णस्ततो यत्तो नित्यं धर्मपथे स्थितः । तताप ग्रीष्मकाले तु पञ्चाग्नीन्परितः स्थितः ३ मेघाम्बुसिक्तो वर्षासु वीरासनमसेवत । नित्यं च शिशिरे काले जलमध्यप्रतिश्रयः ४ एवं वर्षसहस्राणि दश तस्यापचक्रमुः । धर्मे प्रयतमानस्य सत्पथे निष्ठितस्य च ५ विभीषणस्तु धर्मात्मा नित्यं धर्मपरः शुचिः । पञ्चवर्षसहस्राणि पादेनैकेन तस्थिवान् ६ समाप्ते नियमे तस्य ननृतुश्चाप्सरोगणाः । पपात पुष्पवर्षं च तुष्टुवुश्चापि देवताः ७ पञ्च वर्षसहस्राणि सूर्यं चैवान्ववर्तत । तस्थौ चोर्ध्वशिरोबाहुः स्वाध्याये धृतमानसः ८ एवं विभीषणस्यापि स्वर्गस्थस्येव नन्दने । दश वर्षसहस्राणि गतानि नियतात्मनः ८ दशवर्षसहस्रं तु निराहारो दशाननः । पूर्णे वर्षसहस्रे तु शिर-

---

सिद्धीस नेण्याकरितां तो शुभ अशा गोकर्णाश्रमामध्यें गेला ४८. पाठच्या भावांसहवर्तमान त्या महापराक्रमी राक्षसानें तेथें त्यावेळीं अतुल तपश्चर्या करून प्रभु ब्रह्मदेवाला संतुष्ट केलें आणि संतुष्ट झालेल्या त्या ब्रह्मदेवानेंही त्यांना जयावह वर दिले ४९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

तदनंतर राम त्या मुनींना ह्मणाला "हे ब्रह्मन्, वनामध्यें त्या महाबलाढ्य भ्रात्यांनीं कसें व कशाप्रकारचें तप केलें" ? १. ह्यावर प्रसन्न मनानें युक्त असलेल्या रामाला अगस्त्यमुनि ह्मणाले " अनेक प्रकारचे धर्मविधि त्या भ्रात्यांनीं त्या ठिकाणीं केले २. उदाहरणार्थ, नेहमीं जितेंद्रिय व धर्माप्रमाणें वागून कुंभकर्णानें ग्रीष्मकालीं पांच अग्नींमध्यें बसून तपश्चर्या केली ३; मेघोदकाचें शरीरावर सिंचन होत असतांना पर्जन्यकालीं वीरासन घालून तो तपश्चर्या करूं लागला आणि थंडीच्या दिवसांतही नेहेमीं जलमध्याचा आश्रय करून त्यानें तपश्चर्या केली ४. ह्याप्रमाणें तपोरूप धर्मामध्यें गढून गेलेल्या आणि सन्मार्गाचें अवलंबन केलेल्या त्या कुंभकर्णाचीं दहा हजार वर्षें गलीं ५ आणि नेहेमीं धर्मनिष्ठ व शुद्ध राहणारा धर्मात्मा बिभीषण पांच हजार वर्षें होईपर्यंत एकाच पायावर तपश्चर्या करीत उभा राहिला ६. त्याचें तप समाप्त झाल्यानंतर अप्सरांचे समुदाय नृत्य करूं लागले; पुष्पवृष्टि होऊं लागली आणि देवताही स्तुति करूं लागल्या ७.नंतर मस्तक व बाहु वर करून आणि वेदाध्ययनाविषयीं तत्पर

श्चाग्नौ जुहाव सः १० एवं वर्षसहस्राणि नव तस्यातिचक्रमुः । शिरांसि
नव चाप्यस्य प्रविष्टानि हुताशनम् ११ अथ वर्षसहस्रे तु दशमे दशमं
शिरः । छेत्तुकामे दशग्रीवे प्राप्तस्तत्र पितामहः १२ पितामहस्तु सुप्रीतः
सार्धं देवैरुपस्थितः । तव तावद्दशग्रीव प्रीतोऽस्मीत्यभ्यभाषत १३ शीघ्रं
वरय धर्मज्ञ वरो यस्तेऽभिकाङ्क्षितः । कं ते कामं करोम्यद्य न वृथा ते
परिश्रमः १४ अथाब्रवीद्दशग्रीवः प्रहृष्टेनान्तरात्मना । प्रणम्य शिरसा देवं
हर्षगद्गदया गिरा १५ भगवन्प्राणिनां नित्यं नान्यत्र मरणाद्भयम् । नास्ति
मृत्युसमः शत्रुरमरत्वमहं वृणे १६ एवमुक्तस्तदा ब्रह्मा दशग्रीवमुवाच
ह । नास्ति सर्वामरत्वं ते वरमन्यं वृणीष्व मे १७ एवमुक्ते तदा राम
ब्रह्मणा लोककर्तृणा । दशग्रीव उवाचेदं कृताञ्जलिरथाग्रतः १८
सुपर्णनागयक्षाणां दैत्यदानवरक्षसाम् । अवध्योऽहं प्रजाध्यक्ष देवतानां
च शाश्वत १९ न हि चिन्ता ममान्येषु प्राणिष्वमरपूजित । तृणभूता हि

राहून पांच हजार वर्षेपर्यंत त्यानें सूर्याची तपश्चर्या केली ८. सारांश, नंदनवनामध्यें काल घालविणाऱ्या देवांप्रमाणें जितेंद्रिय बिभीषणाचींही दहा हजार वर्षें ( तपश्चर्येमध्यें ) गेलीं ९. रावणानें तर दहा हजार वर्षेपर्यंत कांहींएक आहार न स्वीकारितां तपश्चर्या केली. हजार वर्षें झालीं असतां अग्नीमध्यें तो एका मस्तकाचें हवन करीत असे १०. ह्याप्रमाणें त्याचीं नऊ हजार वर्षें गेलीं आणि नऊ मस्तकेंही अग्नीमध्यें प्रविष्ट झालीं ११. तदनंतर दहा हजारावें वर्ष संपूर्ण झाल्यावर रावण दहावें मस्तक तोडण्यास उद्युक्त झाला असतां ब्रह्मदेव तेथें प्रकट झाले १२. सारांश, ब्रह्मदेव प्रसन्न होऊन देवांसहवर्तमान तेथें आले आणि त्याला ह्मणाले " हे रावणा, मी तर तुझ्यावर प्रसन्न झालों आहें १३. तेव्हां हे धर्मवेत्त्या, तुझ्या मनामध्यें असेल तो वर तूं सत्वर मागून घे. मी तुझा आज कोणता मनोरथ परिपूर्ण करूं. हे तुझे परिश्रम व्यर्थ होणार नाहींत " १४. तदनंतर रावण मनामध्यें संतुष्ट होऊन व मस्तकानें प्रणाम करून हर्षानें कंठ सद्गदित झाला असतां त्या देवाला ह्मणाला १५ " हे भगवन्, प्राण्यांना मरणापेक्षां केव्हांही दुसरें भय नाहीं आणि मृत्यूसारिखा कोणी शत्रुही नाहीं; ह्मास्तव, मी अमरत्व मागतों " १६. ह्याप्रमाणें रावणानें वर मागितला असतां ब्रह्मदेव त्याला ह्मणाले " पूर्ण अमरत्व तुला प्राप्त होणार नाहीं; तूं दुसरा वर मागून घे " १७. हे रामा, ह्याप्रमाणें जगत्स्रष्ट्या ब्रह्मदेवानें सांगितलें असतां रावण त्याच्या समोर हात जोडून ह्मणाला १८ "हे प्रजाधिपते, हे सनातन, सुपर्ण, नाग, यक्ष, दैत्य, दानव, राक्षस आणि देवता ह्यांच्या हातून माझा वध होऊं नये १९; हे देवमान्य,

ते मन्ये प्राणिनो मानुषादयः २० एवमुक्तस्तु धर्मात्मा दशग्रीवेण रक्षसा । उवाच वचनं देवः सह देवैः पितामहः २१ भविष्यत्येवमेतत्ते वचो राक्षसपुङ्गव । एवमुक्त्वा तु तं राम दशग्रीवं पितामहः २२ शृणु चापि वरो भूयः प्रीतस्येह शुभो मम । हुतानि यानि शीर्षाणि पूर्वमग्नौ त्वयानघ २३ पुनस्तानि भविष्यन्ति तथैव तव राक्षस । वितरामीह ते सौम्य वरं चान्यं दुरासदम् २४ छन्दतस्तव रूपं च मनसा यद्यथेप्सितम् । एवं पितामहोक्तं च दशग्रीवस्य रक्षसः २५ अग्नौ हुतानि शीर्षाणि पुनस्तान्युत्थितानि वै । एवमुक्त्वा तु तं राम दशग्रीवं पितामहः २६ विभीषणमथोवाच वाक्यं लोकपितामहः । विभीषण त्वया वत्स धर्मसंहितबुद्धिना २७ परितुष्टोऽस्मि धर्मात्मन्वरं वरय सुव्रत । विभीषणस्तु धर्मात्मा वचनं प्राह साञ्जलिः २८ वृतः सर्वगुणैर्नित्यं चन्द्रमा रश्मिभिर्यथा । भगवन्कृतकृत्योऽहं यन्मे लोकगुरुः स्वयम् २९ प्रीतेन यदि दातव्यो वरो मे शृणु सुव्रत । परमापद्गतस्यापि धर्मे मम मतिर्भवेत् ३० अशिक्षितं च ब्रह्मास्त्रं

---

इतर प्राण्यासंबंधानें मला काळजीच नाहीं. कारण, मी ते मनुष्यादिक प्राणी कसपटाप्रमाणें समजत आहे" २०. ह्याप्रमाणें रावणराक्षसानें मागितलें असतां ब्रह्मदेव देवांसहवर्तमान त्याला ह्मणाले २१ " हे राक्षसश्रेष्ठा, ह्या तुझ्या ह्मणण्याप्रमाणें होईल ". हे रामा, ह्याप्रमाणें त्या रावणाला सांगितल्यानंतर ब्रह्मदेव पुनरपि त्याला ह्मणाले २२ " प्रसन्न झालेल्या माझा एक दुसराही चांगला वर तूं ऐकून घे. हे निष्पापा, पूर्वीं ज्या मस्तकांचें तूं अग्नीमध्यें हवन केलें आहेस २३ तीं मस्तकें, हे राक्षसा, पूर्वीप्रमाणेंच तुला प्राप्त होतील. शिवाय, हे विनयसंपन्न, जें जें रूप तूं मनामध्यें आणिशील तें तें रूप तूं स्वेच्छेनें धारण करिशील असा आणखीही एक दुर्लभ वर मी तुला देत आहें. ह्याप्रमाणें रावणराक्षसाला ब्रह्मदेवानें सांगितलें २४, २५ असतां अग्नीमध्यें टाकिलेलीं तीं मस्तकें पुनरपि त्याला फुटलीं. हे रामा, ह्याप्रमाणें त्या रावणाला सांगून २६ लोकपितामह ब्रह्मदेव बिभीषणाला ह्मणाला " वत्सा, बिभीषणा, धर्माविषयीं मन तत्पर ठेविलेल्या तुझ्यावर २७ मी संतुष्ट झालों आहें. हे सदाचरणसंपन्न धर्मनिष्ठा, तूं वर माग ". ह्यावर धर्मात्मा बिभीषण हात जोडून ह्मणाला २८ " चंद्र ज्याप्रमाणें किरणांनीं नेहेमीं युक्त असतो त्याप्रमाणें सर्व कांहीं पुरुषार्थांनीं मी नेहेमीं संपन्न आहें. सारांश, हे भगवन्, आपण प्रत्यक्ष जगदीश मजवर प्रसन्न झालां आहां एवढ्यानेंच मी कृतार्थ झालों आहें २९. आतां आपण प्रसन्न होऊन जर मला वर देतच असाल तर, हे सुव्रत, माझें ऐका. " पराकाष्ठेच्या विपत्तींत जरी

भगवन्प्रतिभातु मे । या या मे जायते बुद्धिर्येषु येष्वाश्रमेषु च ३१ सा सा भवतु धर्मिष्ठा तं तं धर्मं च पालये । एष मे परमोदार वरः परमको मतः ३२ नहि धर्माभिरक्तानां लोके किंचन दुर्लभम् । पुनः प्रजापतिः प्रीतो विभीषणमुवाच ह ३३ धर्मिष्ठ त्वं यथा वत्स तथा चैतद्भविष्यति । यस्माद्राक्षसयोनौ ते जातस्यामित्रनाशन ३४ नाधर्मे जायते बुद्धिरमरत्वं ददामि ते । इत्युक्त्वा कुम्भकर्णाय वरं दातुमवस्थितम् ३५ प्रजापतिं सुराः सर्वे वाक्यं प्राञ्जलयोऽब्रुवन् । न तावत्कुम्भकर्णाय प्रदातव्यो वरस्त्वया ३६ जानीषे हि यथा लोकांस्त्रासयत्येष दुर्मतिः । नन्दनेऽप्सरसः सप्त महेन्द्रानुचरा दश ३७ अनेन भक्षिता ब्रह्मन्नृषयो मानुषास्तथा । अलब्धवरपूर्वेण यत्कृतं राक्षसेन तु ३८ यद्येष वरलब्धः स्याद्भक्षयेद्भुवनत्रयम् । वरव्याजेन मोहोऽस्मै दीयताममितप्रभ ३९ लोकानां स्वस्ति चैवं स्याद्भवेदस्य च संमतिः । एवमुक्तः सुरैर्ब्रह्माऽचिन्तयत्पद्मसंभवः ४० चिन्तिता चोपतस्थेऽस्य पार्श्वं देवी सरस्वती । प्राञ्जलिः सा तु पार्श्वस्था

---

मी सांपडलों तरी धर्माकडेच माझी मति असावी ३०; हे भगवन्, उपदेशावांचूनच ब्रह्मास्त्राची मला स्फूर्ति व्हावी आणि जी जी बुद्धि ज्या ज्या आश्रमामध्यें मला होईल ३१ ती ती धर्माला अनुसरून असावी व त्या त्या धर्माचें मीं परिपालन करावें. हे परम उदार, हा वर मला अतिशय प्रिय आहे ३२; कारण, धर्मनिष्ठांना जगतामध्यें कांहीं एक दुर्लभ नाहीं". ह्यावर प्रसन्न झालेला ब्रह्मदेव पुनरपि बिभीषणाला ह्मणाला ३३ "हे धर्मिष्ठा, हे वत्सा, तूं जशी इच्छा करीत आहेस तसें हें होईल आणि, हे शत्रुनाशका, राक्षसयोनीमध्यें जन्म झाला असूनही ज्याअर्थी तुझी ३४ मति अधर्माकडे जात नाहीं त्याअर्थीं मी तुला अमरत्व देतों". ह्याप्रमाणें बोलून ब्रह्मदेव कुंभकर्णाला वर देण्यास उद्युक्त झाला असतां ३५ सर्वही देव हात जोडून ब्रह्मदेवाला ह्मणाले "आपण कुंभकर्णाला तरी असा वर देऊं नका ३६. हा दुर्बुद्धि लोकांना कसा त्रास देत आहे हें आपण जाणीतच आहां. नंदनवनामध्यें सात अप्सरा, महेंद्राचे दहा सेवक ३७ आणि त्याचप्रमाणें, हे ब्रह्मन्, मानव व ऋषि ह्यांनें भक्षण केले आहेत. वर प्राप्त झाला नसूनही ह्या राक्षसानें जर हें कर्म केलें आहे ३८ तर ह्याला वर प्राप्त झाल्यास हा त्रैलोक्यही भक्षण करील. ह्यास्तव, हे अतुलतेजस्वि, वराच्या मिषानें आपण ह्याला मोह उत्पन्न करा ३९; ह्मणजे लोकांचेंही कल्याण होईल आणि ह्याच्याही प्रार्थनेला मान दिल्यासारिखा होईल". ह्याप्रमाणें देवांनीं सांगितलें असतां नाभिकमलापासून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव सरस्वतीचें

प्राह वाक्यं सरस्वती ४१ इयमस्म्यागता देव किं कार्यं करवाण्यहम् । प्रजापतिस्तु तां प्राप्तां प्राह वाक्यं सरस्वतीम् ४२ वाणि त्वं राक्षसेन्द्रस्य भव वाग्देवतेप्सिता । तथेत्युक्त्वा प्रविष्टा सा प्रजापतिरथाब्रवीत् ४३ कुम्भकर्ण महाबाहो वरं वरय यो मतः । कुम्भकर्णस्तु तद्वाक्यं श्रुत्वा वचनमब्रवीत् ४४ स्वप्तुं वर्षाण्यनेकानि देवदेव ममेप्सितम् । एवमस्त्विति तं चोक्त्वा प्रायाद्ब्रह्मा सुरैः समम् ४५ देवी सरस्वती चैव राक्षसं तं जहौ पुनः । ब्रह्मणा सह देवेषु गतेषु च नभःस्थलम् ४६ विमुक्तोऽसौ सरस्वत्या स्वां संज्ञां च ततो गतः । कुम्भकर्णस्तु दुष्टात्मा चिन्तयामास दुःखितः ४७ ईदृशं किमिदं वाक्यं ममाद्य वदनाच्च्युतम् । अहं व्यामोहितो देवैरिति मन्ये तदागतैः ४८ एवं लब्धवराः सर्वे भ्रातरो दीप्ततेजसः । श्लेष्मातकवनं गत्वा तत्र ते न्यवसन्सुखम् ४९ [४३९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये उत्तरकाण्डे दशमः सर्गः ॥१०॥

---

ध्यान करूं लागला ४० ध्यान केल्यानंतर देवी सरस्वती त्याच्या बाजूला येऊन उभी राहिली आणि बाजूला उभी राहिलेली ती सरस्वती हात जोडून त्याला ह्मणाली ४१ " हे देवा, ही मी आल्यें आहे; आपलें कोणतें कार्य मीं करावें ? " ह्यावर ब्रह्मदेव त्या प्राप्त झालेल्या सरस्वतीला ह्मणाला ४२ " हे वाणि, देवांच्या इच्छेप्रमाणें तूं राक्षसाधिपति कुंभकर्णाचे ठिकाणीं वर्तन कर". ह्यावर 'ठीक आहे' असें ह्मणून ती निघून गेली असतां ब्रह्मदेव ह्मणाला ४३ " हे महापराक्रमी कुंभकर्णा, इच्छेस येईल तो वर तूं माग " परंतु, हें भाषण श्रवण केल्यानंतर कुंभकर्ण ह्मणाला ४४. "हे देवाधिदेव अनेक वर्षें लोटेपर्यंत निद्रा घेत पडणें हें मला इष्ट आहे. " ह्यानंतर 'तथास्तु' असें त्याला सांगून देवगणांसहवर्तमान ब्रह्मदेव निघून गेला ४५. आणि सरस्वती देवीही त्या राक्षसाला सोडून पुनरपि चालती झाली. ब्रह्मदेवासहवर्तमान देव आकाशामध्यें निघून गेले असतां ४६. सरस्वतीनेंही कुंभकर्णाला सोडून दिल्यावर तो शुद्धीवर आला आणि " माझ्या मुखांतून अशाप्रकारचें हें कायबें भाषण आज निघून गेलें ? त्यावेळीं आलेल्या देवांनीं मला मोह पाडिला असें वाटतें " ह्याप्रमाणें तो दुरात्मा कुंभकर्ण दुःखित होऊन चिंतन करूं लागला ४७,४८. असो. देदीप्यमान तेजानें युक्त असलेल्या त्या सर्व भ्रात्यांना ह्याप्रमाणें वर प्राप्त झाले असतांना भोकरीच्या वनामध्यें जाऊन ते तेथें सुखानें वास्तव्य करूं लागले ४९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

सुमाली वरलब्धांस्तु ज्ञात्वा चैतान्निशाचरान् । उदतिष्ठद्भयं त्यक्त्वा सानुगः स रसातलात् १ मारीचश्च प्रहस्तश्च विरूपाक्षो महोदरः । उदतिष्ठन्सुसंरब्धाः सचिवास्तस्य रक्षसः २ सुमाली सचिवैः सार्धं वृतो राक्षसपुङ्गवैः । अभिगम्य दशग्रीवं परिष्वज्येदमब्रवीत् ३ दिष्ट्या ते वत्स संप्राप्तश्चिन्तितोऽयं मनोरथः । यस्त्वं त्रिभुवनश्रेष्ठाल्लब्धवान्वरमुत्तमम् ४ यत्कृते च वयं लङ्कां त्यक्त्वा याता रसातलम् । तद्गतं नो महाबाहो महद्विष्णुकृतं भयम् ५ असकृत्तद्भयाद्भग्नाः परित्यज्य स्वमालयम् । विद्रुताः सहिताः सर्वे प्रविष्टाः स्म रसातलम् ६ अस्मदीया च लङ्केयं नगरी राक्षसोषिता । निवेशिता तव भ्रात्रा धनाध्यक्षेण धीमता ७ यदि नामात्र शक्यं स्यात्साम्ना दानेन वानघ । तरसा वा महाबाहो प्रत्यानेतुं कृतं भवेत् ८ त्वं च लङ्केश्वरस्तात भविष्यसि न संशयः । त्वया राक्षसवंशोऽयं निमग्नोऽपि समुद्धृतः ९ सर्वेषां नः प्रभुश्चैव भविष्यसि महाबल । अथाब्रवीद्दशग्रीवो मातामहमुपस्थितम् १० वित्तेशो गुरुरस्माकं नार्हसे वक्तुमी-

---

ह्या निशाचरांना वर प्राप्त झाल्याचें ऐकिल्याबरोबर सुमाली राक्षस निर्भय होऊन अनुयायांसहवर्तमान रसातलांतून बाहेर आला १; आणि मारीच, प्रहस्त, विरूपाक्ष व महोदर हे त्या राक्षसाचे मंत्रीही अत्यंत क्षुब्ध होऊन बाहेर निघाले २. राक्षसांमध्यें श्रेष्ठ अशा मंत्र्यांनीं परिवेष्टित असलेला तो सुमाली रावणाकडे गेला आणि त्याला कवटाळून ह्मणाला ३ " हे वत्सा, त्रैलोक्यामध्यें श्रेष्ठ अशा ब्रह्मदेवापासून उत्कृष्ट वर तुला प्राप्त झाला, ही पुष्कळ दिवस आमच्या मनांत असलेली गोष्ट तुला प्राप्त झाली आहे ४. ज्याकरितां लंकेचा त्याग करून आह्मी रसातलामध्यें गेलों होतों तें विष्णूमुळें उत्पन्न झालेलें मोठें भय, हे रावणा, आह्मांला आतां राहिलें नाहीं ५. त्याच्या भीतीनें दाणादाण होऊन गेल्यामुळें स्वस्थानाचा त्याग करून आह्मी एकदमच सर्व पळून गेलों होतों आणि रसातलामध्यें प्रविष्ट झालों होतों ६. ही नगरी आमची आहे, राक्षसांनीं हिच्यामध्यें वास्तव्य केलें आहे आणि तुझा जो धनाधिपति विचारी भ्राता तो सांप्रत येथें राहत आहे. हें निष्पापा, सामोपचारानें, कांहीं लांच देऊन अथवा बलाचें अवलंबन करून जर ही नगरी परत मिळविणें शक्य असेल तर आपलें कार्यच झाल्यासारिखें आहे ८. बा रावणा, ( असें केल्यानें ) तूं लंकाधिपति होशील; रसातलाला जाऊन पोंचलेल्याही ह्या राक्षसवंशाचा तुझ्या हातून उद्धार होईल ९ आणि, हे महाबलाढ्य, तूं आह्मां सर्वांचा प्रभु होशील. " ह्यानंतर रावण त्या आलेल्या मातामहाला ह्मणाला १० " धनाध्यक्ष

दृशम् । साम्ना हि राक्षसेन्द्रेण प्रत्याख्यातो गरीयसा ११ किंचिन्नाह तदा रक्षो ज्ञात्वा तस्य चिकीर्षितम् । कस्यचित्त्वथ कालस्य वसन्तं रावणं ततः १२ प्रहस्तः प्रश्रितं वाक्यमिदमाह स रावणम् । दशग्रीव महाबाहो नार्हसे वक्तुमीदृशम् १३ सौभ्रात्रं नास्ति शूराणां शृणु चेदं वचो मम । अदितिश्च दितिश्चैव भगिन्यौ सहिते हि ते १४ भार्ये परमरूपिण्यौ कश्यपस्य प्रजापतेः । अदितिर्जनयामास देवांस्त्रिभुवनेश्वरान् १५ दितिस्त्वजनयद्दैत्यान्कश्यपस्यात्मसंभवान् । दैत्यानां किल धर्मज्ञ पुरेयं वसनार्णवा १६ सपर्वता मही वीर तेऽभवन्प्रभविष्णवः । निहत्य तांस्तु समरे विष्णुना प्रभविष्णुना १७ देवानां वशमानीतं त्रैलोक्यमिदमव्ययम् । नैतदेको भवानेव करिष्यति विपर्ययम् १८ सुरासुरैराचरितं तत्कुरुष्व वचो मम । एवमुक्तो दशग्रीवः प्रहृष्टेनान्तरात्मना १९ चिन्तयित्वा मुहूर्तं वै बाढमित्येव सोऽब्रवीत् । स तु तेनैव हर्षेण तस्मिन्नहनि वीर्यवान् २० वनं गतो दशग्रीवः सह तैः क्षणदाचरैः । त्रिकूटस्थः स तु तदा दशग्रीवो

---

कुबेर आमचा ज्येष्ठ भ्राता आहे; तेव्हां असें भाषण करणें तुला योग्य नाहीं." ह्याप्रमाणें त्या बलाढ्य राक्षसाधिपतीनें सौम्य शब्दांनीं त्याची विनंति नाकारिली असतां ११ त्याच्या मनांतील उद्देश जाणून तो सुमालीराक्षस कांहींएक बोलला नाहीं. ह्या गोष्टीला कांहीं काल लोटल्यानंतर स्वस्थानीं वास्तव्य करीत असलेल्या विनयसंपन्न रावणाला प्रहस्त ह्मणाला " हे महापराक्रमी रावणा, असें भाषण करणें तुला योग्य नाहीं १२,१३. अरे, शूरांमध्यें भ्रातृप्रेम नसतें. तूं हें माझें भाषण नीट श्रवण कर. अदिति व दिति ह्या दोन भगिनी परस्परांवर प्रेम करणाऱ्या होत्या आणि त्या १४ अतिसुंदर भगिनी कश्यपप्रजापतीच्या भार्या झाल्या. अदितीचे ठिकाणीं त्रैलोक्याधिपति देव उत्पन्न झाले १५ आणि दितीचे ठिकाणीं कश्यपापासून दैत्यांची उत्पत्ति झाली. हे धर्मवेत्त्या वीरा, ही समुद्रवलयांकित पृथ्वी पर्वतांसहवर्तमान पूर्वीं दैत्यांची होती असें ह्मणतात. कारण, त्यांचाच पूर्वीं येथें अंमल होता. परंतु, समर्थ विष्णूनें संग्रामामध्यें त्यांचा वध करून १६, १७ हें अक्षय्य त्रैलोक्य देवांच्या स्वाधीन केलें आहे. तेव्हां ( भ्रात्याचा द्रोह करणें ) हा विपरीत प्रकार तूंच एक करणारा आहेस असें नाहीं १८. देवदैत्य हेंच करीत आले आहेत. ह्यास्तव, तूं माझें ह्मणणें ऐकून घे." ह्याप्रमाणें त्यानें सांगितलें असतां रावणानें मन प्रसन्न ठेवून १९ ह्या गोष्टीचा मुहूर्तभर विचार केला आणि 'ठीक आहे' इतकेंच तो त्याला ह्मणाला. तोच हर्ष तसा कायम असतांना त्याच दिवशीं तो वीर्यवान् २० रावण त्या राक्षसांसहवर्तमान

निशाचरः २१ प्रेषयामास दौत्येन प्रहस्तं वाक्यकोविदः। प्रहस्त शीघ्रं गच्छ त्वं ब्रूहि नैर्ऋतपुङ्गवम् २२ वचसा मम वित्तेशं सामपूर्वमिदं वचः। इयं लङ्का पुरी राजन्राक्षसानां महात्मनाम् २३ त्वया निवेशिता सौम्य नैतद्युक्तं तवानघ। तद्भवान्यदि नो ह्यद्य दद्यादतुलविक्रम २४ कृता भवेन्मम प्रीतिर्धर्मश्चैवानुपालितः। स तु गत्वा पुरीं लङ्कां धनदेन सुरक्षिताम् २५ अब्रवीत्परमोदारं वित्तपालमिदं वचः। प्रेषितोऽहं तव भ्रात्रा दशग्रीवेण सुव्रत २६ त्वत्समीपं महाबाहो सर्वशस्त्रभृतां वर। वचनं मम वित्तेश यद्ब्रवीति दशाननः २७ इयं किल पुरी रम्या सुमालिप्रमुखैः पुरा। भुक्तपूर्वा विशालाक्ष राक्षसैर्भीमविक्रमैः २८ तेन विज्ञाप्यते सोऽयं सांप्रतं विश्रवात्मज। तदेषा दीयतां तात याचतस्तस्य सामतः २९ प्रहस्तादपि संश्रुत्य देवो वैश्रवणो वचः। प्रत्युवाच प्रहस्तं तं वाक्यं वाक्यविदां वरः ३० दत्ता ममेयं पित्रा तु लङ्का शून्या निशाचरैः। निवेशिता च मे रक्षो दानमानादिभिर्गुणैः ३१ ब्रूहि गच्छ दशग्रीवं पुरी राज्यं च यन्मम।

---

वनामध्यें गेला आणि त्रिकूटाचलावर राहणाऱ्या त्या संभाषणज्ञ रावण राक्षसानें त्याच वेळीं दूत ह्मणून प्रहस्ताला पाठविलें. २१. (तो ह्मणाला) "हे प्रहस्ता, तूं सत्वर जा आणि राक्षसश्रेष्ठ व वित्ताधिपतीला सौम्य शब्दांनीं माझा असा निरोप सांग कीं--हे राजा, ही लंका नगरी महात्म्या राक्षसांची असून २२,२३ तूं येथें वास्तव्य करीत आहेस; परंतु, हे सुशील, हे निष्पाप, असें करणें तुला योग्य नाहीं. ह्यास्तव, हे अतुलपराक्रमी, तूं जर हें स्थान आज आह्मांला परत देशील २४ तर आमच्याही मनासारिखें वागल्याप्रमाणें होईल आणि धर्माचेंही परिपालन केल्याप्रमाणें होईल--" ह्यानंतर तो प्रहस्त कुबेरानें संरक्षण केलेल्या लंकानगरीमध्यें गेला २५ आणि अत्यंत उदार अशा त्या धनाधिपतीला ह्मणाला "हे सदाचरणसंपन्न, तुझ्या रावणनामक भ्रात्यानें मला तुझ्याकडे पाठविलें आहे. हे सर्व शस्त्रधारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ व महापराक्रमी धनाधिपते, रावण काय बोलत आहे हें समजण्याकरितां तूं माझें भाषण ऐक २६,२७. हे विशालनयना, ह्या रम्य नगरीचा पूर्वीं सुमालिप्रभृति भयंकर राक्षसांनीं उपभोग घेतला आहे २८; ह्मणून सांप्रत तो सामोपचारांनीं ज्यांअर्थीं ती नगरी परत मागत आहे त्याअर्थीं बा विश्रवात्मजा, ती तूं परत द्यावीस एवढीच आमची तुझ्यापाशीं विज्ञप्ति आहे" २९. प्रहस्ताच्या मुखांतून हें भाषण श्रवण केल्यानंतर वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेला वैश्रवण देव उलट त्या प्रहस्ताला ह्मणाला ३० "निशाचरांनीं रहित झालेली ही लंका माझ्या पित्यानें माझे ठिकाणीं दान, मान इत्यादि गुण पाहून मला

तदाप्येतन्महाबाहो भुङ्क्ष्व राज्यमकण्टकम् ३२ अतिभक्तं त्वया सार्धं राज्यं यच्चापि मे वसु । एवमुक्त्वा धनाध्यक्षो जगाम पितुरन्तिकम् ३३ अभिवाद्य गुरुं प्राह रावणस्य यदीप्सितम् । एष तात दशग्रीवो दूतं प्रेषितवान्मम ३४ दीयतां नगरी लङ्का पूर्वं रक्षोगणोषिता । मयात्र यदनुष्ठेयं तन्ममाचक्ष्व सुव्रत ३५ ब्रह्मर्षिस्त्वेवमुक्तोऽसौ विश्रवा मुनिपुङ्गवः । प्राञ्जलिं धनदं प्राह शृणु पुत्र वचो मम ३६ दशग्रीवो महाबाहुरुक्तवान्मम संनिधौ । मया निर्भर्त्सितश्चासीद्बहुशोक्तः सुदुर्मतिः ३७ स क्रोधेन मया चोक्तो ध्वंससे च पुनः पुनः । श्रेयोऽभियुक्तं धर्म्यं च शृणु पुत्र वचो मम ३८ वरप्रदानसंमूढो मान्यामान्यं सुदुर्मतिः । न वेत्ति मम शापाच्च प्रकृतिं दारुणां गतः ३९ तस्माद्गच्छ महाबाहो कैलासं धरणीधरम् । निवेशय निवासार्थं त्यक्त्वा लङ्कां सहानुगः ४० तत्र मन्दाकिनी

---

दिली आहे आणि ह्मणूनच, हे राक्षसा, मी येथें वास्तव्य करीत आहें ३१. तथापि, —नगरी व राज्य ह्मणून जें कांहीं माझ्यापाशीं आहे तें, हे महापराक्रमी रावणा, तुझेंही आहेच. तस्मात् , तूं निष्कंटक राज्याचा उपभोग घे ३२. सारांश, राज्य आणि द्रव्य ह्मणून जें कांहीं माझ्यापाशीं आहे त्यामध्यें तुझाही पूर्ण विभाग आहेच— असें तूं रावणाकडे जाऊन सांग ". ह्याप्रमाणें प्रहस्ताला सांगून धनाधिपति कुबेर पित्यासमीप गेला ३३ आणि त्याला अभिवंदन करून रावणाच्या मनांतील उद्देश त्यानें त्याला कळविला. " हे तात, ह्या रावणानें माझ्याकडे दूत पाठविला आहे ३४ आणि ' पूर्वी राक्षसगणांनीं जिच्यामध्यें वास्तव्य केलें आहे ती लंका परत दे ' ह्मणून त्यानें मला निरोप पाठविला आहे. ह्यास्तव, ह्या प्रसंगीं मीं काय करावें तें, हे सुव्रत, आपण मला सांगा " ३५. ह्याप्रमाणें कुबेरानें मुनिश्रेष्ठ ब्रह्मर्षि विश्रव्याला सांगितलें असतां तो करद्वय जोडून स्थित असलेल्या कुबेराला ह्मणाला " हे पुत्रा, माझें भाषण श्रवण कर ३६. माझ्या जवळ महापराक्रमी रावणानें ही गोष्ट काढिली होती आणि त्या अतिदुर्बुद्धि रावणाला मीं निर्भर्त्सनापूर्वक अनेक वेळां समजूनही सांगितलें ३७; इतकेंच नव्हे परंतु, असें केल्यानें तुझा नाश होईल ह्मणूनही वारंवार मी त्याला रागानें बोललों. आतां कल्याणकारक, योग्य व धर्माला धरून असलेलें माझें भाषण, हे पुत्रा, तूं श्रवण कर ३८. वरप्रदानामुळें ज्याला भान नाहींसें झालें आहे अशा त्या अतिदुर्मति रावणाला मान्य कोणतें व अमान्य कोणतें कांहींच समजत नाहीं आणि माझ्या शापामुळें त्याचा स्वभाव क्रूर झालेला आहे ३९. तस्मात्, हे महापराक्रमी कुबेरा, लंका सोडून दे व वास्तव्य करण्या-

रम्या नदीनामुत्तमा नदी । काञ्चनैः सूर्यसंकाशैः पङ्कजैः संवृतोदका ॥
कुमुदैरुत्पलैश्चैव अन्यैश्चैव सुगन्धिभिः ४१ तत्र देवाः सगन्धर्वाः साप्स-
रोरगकिन्नराः । विहारशीलाः सततं रमन्ते सर्वदाश्रिताः ४२ न हि क्षमं
तवानेन वैरं धनद रक्षसा । जानीषे हि यथानेन लब्धः परमको वरः ४३
एवमुक्तो गृहीत्वा तु तद्वचः पितृगौरवात् । सदारपुत्रः सामात्यः सवा-
हनधनो गतः ४४ प्रहस्तोऽथ दशग्रीवं गत्वा वचनमब्रवीत् । प्रहृष्टात्मा
महात्मानं सहामात्यं सहानुजम् ४५ शून्या सा नगरी लङ्का त्यक्त्वैनां
धनदो गतः । प्रविश्य तां सहास्माभिः स्वधर्मं तत्र पालय ४६ एवमुक्तो
दशग्रीवः प्रहस्तेन महाबलः । विवेश नगरीं लङ्कां भ्रातृभिः सबलानुगैः ४७
धनदेन परित्यक्तां सुविभक्तमहापथाम् । आरुरोह स देवारिः स्वर्गं देवा-
धिपो यथा ४८ स चाभिषिक्तः क्षणदाचरैस्तदा निवेशयामास पुरीं दशा-

---

करितां तूं आपल्या अनुयायांसहवर्तमान कैलासपर्वतावर जा आणि तेथें रहा ४०. त्या ठिकाणीं नद्यांमध्यें उत्कृष्ट व रम्य अशी मंदाकिनीनामक एक नदी आहे आणि सूर्यतुल्यतेजस्वी असलेल्या सुवर्णवर्ण कमलांनीं आणि त्याचप्रमाणें कुमुदें, उत्पलें व इतरही सुंदर कमलें ह्यांनीं तिचें उदक आच्छादित झालेलें आहे ४१. अप्सरा, उरग, किन्नर व गंधर्व ह्यांसहवर्तमान विहार करण्याची संवय लागून गेलेले देव सर्वदां त्या नदीच्या आश्रयाला राहून तेथें क्रीडा करीत असतात ४२. असो. हे धनदा, ह्या राक्षसाशीं वैर धरून राहणें तुला शक्य नाहीं. कारण, ह्याला उत्कृष्ट वर कसा प्राप्त झाला आहे हें तूं जाणीतच आहेस " ४३. ह्याप्रमाणें पित्यानें सांगितलें असतां त्याच्याविषयीं पूज्यबुद्धि कुबेराच्या ठिकाणीं असल्यामुळें तें सांगणें मान्य करून भार्या, पुत्र, अमात्य व वाहनें ह्यांसहवर्तमान तो कैलासपर्वता-वर निघून गेला ४४. नंतर प्रहस्त अमात्य व कनिष्ठ भ्राते ह्यांसहवर्तमान असलेल्या महात्म्या रावणाकडे तो गेला आणि आनंदानें त्याला ह्मणाला ४५ "त्या लंका नगरीमध्यें आतां कोणीही नाहीं. कुबेर ती सोडून चालता झाला आहे. ह्यास्तव, आह्मांसहवर्तमान त्या नगरीमध्यें प्रवेश करून तूं तेथें स्वधर्माचें रक्षण कर " ४६. ह्याप्रमाणें प्रहस्तानें सांगितलें असतां महाबलाढ्य रावण सैन्य व अनुयायी ह्यांसहवर्तमान असलेल्या भ्रात्यांना बरोबर घेऊन लंकानगरीमध्यें प्रविष्ट झाला ४७. सारांश, देवराज इंद्र ज्याप्रमाणें स्वर्गामध्यें जातो त्याप्रमाणें तो देवशत्रु रावण कुबेरानें सोडिलेल्या आणि मोठ्या मोठ्या विशाल मार्गांनीं युक्त असलेल्या त्या नगरीमध्यें गेला ४८. राक्षसांनीं रावणाला अभिषेक केला असतां तो रावण त्या नगरीमध्यें वास्तव्य करूं लागला

नन: । निष्कामपूर्णा च बभूव सा पुरी निशाचरैर्नीलबलाहकोपमैः ४९ धनेश्वरस्त्वथ पितृवाक्यगौरवान्न्यवेशयच्छशिविमले गिरौ पुरीम् । स्वलंकृतैर्भवनवरैर्विभूषितां पुरन्दरः स्वरिव यथाऽमरावतीम् ५० [४८९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकादशः सर्गः ॥ ११ ॥

राक्षसेन्द्रोऽभिषिक्तस्तु भ्रातृभिः सहितस्तदा । ततः प्रदानं राक्षस्या भगिन्याः समचिन्तयत् १ ददौ तां कालकेन्द्राय दानवेन्द्राय राक्षसीम् । स्वसां शूर्पणखां नाम विद्युज्जिह्वाय राक्षसः २ अथ दत्त्वा स्वयं रक्षो मृगयामटते स्म तत् । तत्रापश्यत्ततो राम मयं नाम दितेः सुतम् ३ कन्यासहायं तं दृष्ट्वा दशग्रीवो निशाचरः । अपृच्छत्को भवानेको निर्मनुष्यमृगे वने ४ अनया मृगशावाक्ष्या किमर्थं सह तिष्ठसि । मयस्तदाऽब्रवीद्राम पृच्छन्तं तं निशाचरम् ५ श्रूयतां सर्व माख्यास्ये यथावृत्तमिदं तव । हेमा नामाप्सरास्तत्र श्रुतपूर्वा यदि त्वया ६ दैवतैर्मम सा दत्ता पौलोमीव शतक्रतोः । तस्यां सक्तमना ह्यासं दश वर्षशतान्यहम् ७ सा च दैवतका-

---

आणि नीलमेघतुल्य राक्षसांच्या योगानें ती नगरी आतिशय भरून गेली ४९. असो स्वर्गांतील अमरावतीनगरीमध्यें ज्याप्रमाणें इंद्र वास्तव्य करितो त्याप्रमाणें पित्याच्या भाषणाला मान देऊन चंद्रासारिख्या निर्मल पर्वतावर असलेल्या आणि शृंगारिलेल्या उत्कृष्ट गृहांनीं भूषित झालेल्या नगरीमध्यें तो धनाध्यक्ष कुबेर वास्तव्य करूं लागला ५०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

राक्षसाधिपति रावणाला अभिषेक झाला असतां भ्रात्यांसहवर्तमान त्यानें आपल्या राक्षसी भगिनीच्या दानाचा विचार केला १ आणि दानवाधिपति व कालकश्रेष्ठ विद्युज्जिह्वनामक राक्षसाला त्या राक्षसानें ती आपली शूर्पणखानामक राक्षसी भगिनी अर्पण केली २. ह्याप्रमाणें स्वत: त्या भागिनीचें दान केल्यानंतर तो राक्षस मृगयेकरितां संचार करूं लागला असतां दितीचा मयनामक पुत्र तेथें त्याच्या दृष्टीं पडला ३ आणि कन्येसहवर्तमान असलेल्या त्या मयाला अवलोकन केल्यानंतर " मनुष्य व पशु ज्याठिकाणीं नाहींत अशा वनामध्यें तूं एकटा कोण आहेस? आणि पाडसाप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशा ह्या कन्येसहवर्तमान तूं कशाकरितां येथें राहत आहेस ? " असें त्यानें विचारिलें. तेव्हां हे रामा, ह्याप्रमाणें विचारणाऱ्या त्या राक्षसाला मय ह्मणाला ४,५ "ऐक. हें सर्व वृत्त मी तुला इत्थंभूत कथन करितों. हेमा ह्मणून जी एक अप्सरा आहे ती पूर्वीं कधीं तुझ्या कानावरही आली असेल ६. इंद्राला अर्पण केलेल्या पौलोमी-

र्येण त्रयोदश समा गताः । वर्षं चतुर्दशं चैव ततो हेममयं पुरम् ८ वज्र-
वैदूर्यचित्रं च मायया निर्मितं मया।तत्राहमवसं दीनस्तया हीनः सुदुःखितः९
तस्मात्पुराद्दुहितरं गृहीत्वा वनमागतः । इयं ममात्मजा राजंस्तस्याः
कुक्षौ विवर्धिता १० भर्तारमनया सार्धमस्याः प्राप्तोऽस्मि मार्गितुम् ।
कन्यापितृत्वं दुःखं हि सर्वेषां मानकाङ्क्षिणाम् ११ कन्या हि द्वे कुले
नित्यं संशये स्थाप्य तिष्ठति । पुत्रद्वयं ममाप्यस्यां भार्यायां संबभूव ह १२
मायावी प्रथमस्तात दुन्दुभिस्तदनन्तरः । एवं ते सर्वमाख्यातं याथातथ्येन
पृच्छतः १३ त्वामिदानीं कथं तात जानीयां को भवानिति । एवमुक्तं तु
तद्रक्षो विनीतमिदमब्रवीत् १४ अहं पौलस्त्यतनयो दशग्रीवश्च नामतः ।
मुनेर्विश्रवसो यस्तु तृतीयो ब्रह्मणोऽभवत् १५ एवमुक्तस्तदा राम राक्षसे-
न्द्रेण दानवः । महर्षेस्तनयं ज्ञात्वा मयो दानवपुङ्गवः १६ दातुं दुहितरं
तस्मै रोचयामास तत्र वै । करेण तु करं तस्या ग्राहयित्वा मयस्तदा १७
प्रहसन्प्राह दैत्येन्द्रो राक्षसेन्द्रमिदं वचः । इयं ममात्मजा राजन्हेमयाप्स-

---

प्रमाणें देवांनीं ती अप्सरा मला दिली. हजारों वर्षेंपर्यंत तिचे ठिकाणीं माझें मन आसक्त होऊन राहिलें होतें ७. कांहीं देवकार्याकरितां ती देवलोकीं गेली असतां तेरा वर्षें लोटलीं; चवदावेंही वर्ष सुरू झाल्यावर हिरे व वैदूर्यमणि ह्यांनीं शृंगारिलेलें एक सुवर्णमय नगर मीं तेथें मायेनें निर्माण केलें आणि तिचा विरह झाल्यामुळें दीन व अत्यंत दुःखित असा मी त्या ठिकाणीं वास्तव्य करूं लागलों ८, ९. पुढें त्या नगरांतून आपली कन्या घेऊन मी येथें वनामध्यें आलों. हे राजा, ही माझी कन्या त्या अप्सरेच्या उदरामध्यें वाढलेली आहे १०. सारांश, हिला भर्ता शोधून काढण्याकरितां मी हिला बरोबर घेऊन येथें आलों आहे. कारण, अब्रूची चाड बाळगणाऱ्या सर्व लोकांना कन्येचें पितृत्व फार दुःखदायक होतें ११. तात्पर्य, कन्या दोन्ही कुलांना नेहेमीं संशयांत ठेवीत असते. असो. ह्या भार्येचे ठिकाणीं मला दोन पुत्रही झाले आहेत १२. बाबारे, पहिला मायावी आणि त्यानंतरचा दुंदुभि. ह्याप्रमाणें प्रश्न करणाऱ्या तुला मीं सर्व वर्तमान इत्थंभूत कथन केलें आहे १३. परंतु, बाबारे, तं कोण हें आतां तरी मला समजूं दे". ह्याप्रमाणें मय बोलला असतां तो रावणराक्षस त्या विनयसंपन्न मयाला ह्मणाला १४ "मी पौलस्त्यपुत्र असून माझें नांव दशग्रीव आहे. सारांश, ब्रह्मदेवाचा तिसरा पुत्र जो विश्रवामुनि त्याचा मी पुत्र होय" १५. हे रामा, ह्याप्रमाणें राक्षसाधिपतीनें त्यावेळीं मयासुराला सांगितलें असतां 'तो महर्षिपुत्र आहे' असें समजून त्या दानवश्रेष्ठ मयानें १६ त्याला आपली कन्या देण्याचें मनामध्यें

रसा धृता १८ कन्या मन्दोदरी नाम पत्न्यर्थं प्रतिगृह्यताम् । बाढमित्येव तं राम दशग्रीवोऽभ्यभाषत १९ प्रज्वाल्य तत्र चैवाग्निमकरोत्पाणिसंग्रहम् । स हि तस्य मयो राम शापाभिज्ञस्तपोधनात् २० विदित्वा तेन सा दत्ता तस्य पैतामहं कुलम् । अमोघां तस्य शक्तिं च प्रददौ परमाद्भुताम् २१ परेण तपसा लब्धां जघ्निवाँल्लक्ष्मणं यया । एवं स कृत्वा दारान्वै लङ्काया ईश्वरः प्रभुः २२ गत्वा तु नगरीं भार्ये भ्रातृभ्यां समुपाहरत् । वैरोचनस्य दौहित्रीं वज्रज्वालेति नामतः २३ तां भार्यां कुम्भकर्णस्य रावणः समकल्पयत् । गन्धर्वराजस्य सुतां शैलूषस्य महात्मनः २४ सरमां नाम धर्मज्ञां लेभे भार्यां विभीषणः । तीरे तु सरसो वै तु संजज्ञे मानसस्य हि २५ सरस्तदा मानसं तु ववृधे जलदागमे । मात्रा तु तस्याः कन्यायाः स्नेहेनाक्रन्दितं वचः २६ सरो मा वर्धतेत्युक्तं ततः सा सरमाऽभवत् । एवं ते कृतदारा वै रेमिरे तत्र राक्षसाः २७ स्वां

---

आणिलें आणि त्याच्या हातानें तिचें पाणिग्रहण करवून १७ दैत्याधिपति मय हंसत हंसत त्या राक्षसाधिपतीला ह्मणाला " हे राजा, हेमाप्सरेनें उदरामध्यें धारण केलेली ही माझी कन्या होय १८. ह्या मंदोदरीनामक कन्येचा तूं भार्या ह्मणून स्वीकार कर." हे रामा, ह्यानंतर ' ठीक आहे ' एवढेंच रावणानें त्याला सांगितलें १९ आणि तेथें अग्नि सिद्ध करून त्यानें तिचें पाणिग्रहण केलें. हे रामा, ( तुझा स्वभाव भयंकर होईल, ह्मणून ) रावणाला जो मुनीपासून शाप झाला होता तो त्या मयाला ठाऊक होता २०. परंतु, त्याच्या पितामहाच्या कुलाकडे लक्ष्य देऊन त्यानें ती कन्या त्याला अर्पण केली आणि फारच आश्चर्यकारक अशी एक अमोघ शक्तिही त्यानें त्याला दिली २१. ती शक्ति मयासुराला मोठ्या तपश्चर्येमुळें प्राप्त झाली होती आणि तीच शक्ति रावणानें लक्ष्मणावर टाकिली होती. ह्याप्रमाणें लंकाधिपति समर्थ रावणानें दारपरिग्रह केला २२ आणि नगरीमध्यें गेल्यानंतर उभयतां भ्रात्यांनाही त्यानें भार्या करून दिल्या. वज्रज्वाला ह्मणून विरोचनपुत्राची नात होती ती रावणानें कुंभकर्णाला भार्या केली आणि महात्मा गंधर्वराज जो शैलूष त्याची सरमानामक धर्मज्ञ कन्या भार्या ह्मणून बिभीषणाला प्राप्त झाली. असो. मानससरोवराचे तीरीं ती कन्या जन्मास आली होती २३, २४, २५. आणि पुढें पर्जन्यकाल प्राप्त झाला असतां तें मानससरोवर वाढतां वाढतां त्या कन्येपर्यंत येऊन ठेपलें. तेव्हां कन्येचें रडणें ऐकून तिची माता कन्येचे ठिकाणीं प्रेम असल्यामुळें २६ ( सरो मा वर्धत ह्मणजे हे सरोवरा, वाढूं नकोस ) असें ह्मणाली आणि ह्मणून ती कन्या सरमा ह्या नांवानें प्रसिद्ध झाली. असो. ह्याप्रमाणें त्या राक्षसांचे

स्वां भार्यामुपादाय गन्धर्वा इव नन्दने । ततो मन्दोदरी पुत्रं मेघनादमजीजनत् २८ स एष इन्द्रजिन्नाम युष्माभिरभिधीयते । जातमात्रेण हि पुरा तेन रावणसूनुना २९ रुदता सुमहान्मुक्तो नादो जलधरोपमः । जडीकृता च सा लङ्का तस्य नादेन राघवः ३० पिता तस्याकरोन्नाम मेघनाद इति स्वयम् । सोऽवर्धत तदा राम रावणान्तःपुरे शुभे ३१ रक्ष्यमाणो वरस्त्रीभिश्छन्नः काष्ठैरिवानलः । मातापित्रोर्महाहर्षं जनयन्रावणात्मजः ३२ [ ५२१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

अथ लोकेश्वरोत्सृष्टा तत्र कालेन केनचित् । निद्रा समभवत्तीव्रा कुम्भकर्णस्य रूपिणी १ ततो भ्रातरमासीनं कुम्भकर्णोऽब्रवीद्वचः । निद्रा मां बाधते राजन्कारयस्व ममालयम् २ विनियुक्तास्ततो राज्ञा शिल्पिनो विश्वकर्मवत् । विस्तीर्णं योजनं स्निग्धं ततो द्विगुणमायतम् ३ दर्शनीयं निराबाधं कुम्भकर्णस्य चक्रिरे । स्फाटिकैः काञ्चनैश्चित्रैः स्तम्भैः सर्वत्र शोभितम् ४ वैदूर्यकृतसोपानं किङ्किणीजालकं तथा । दान्ततोरणविन्यस्तं

---

विवाह झाले आणि नंदनवनामध्यें आपापली भार्या घेऊन रममाण होणाऱ्या गंधर्वांप्रमाणें ते तेथें रममाण होऊं लागले. तदनंतर मंदोदरीला मेघनादनामक पुत्र झाला २७,२८ आणि त्याच ह्या पुत्राला तुह्मी इंद्रजित् ह्मणत असता. पूर्वीं उपजतांक्षणीं त्या रावणपुत्रानें २९ रडतां रडतां मेघासारखी फारच मोठी गर्जना केली आणि, हे राघवा, त्या गर्जनेनें ती लंका अगदीं स्तब्ध होऊन गेली ३०. ह्यास्तव, स्वतः पित्यानेंच 'मेघनाद 'असें त्याचें नांव ठेविलें. हे रामा, काष्ठांनीं आच्छादिलेल्या अग्नीप्रमाणें त्यावेळीं ज्याचें तेज गुप्त होतें असा तो रावणपुत्र श्रेष्ठ स्त्रिया रक्षण करित असतांना मातापितरांना हर्ष उत्पन्न करीत करीत रावणाच्या शुभ अंतःपुरामध्यें वृद्धिंगत झाला ३१,३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं बारावा सर्ग समाप्त झाला ॥ १२ ॥

नंतर कांहीं काल लोटल्यावर जगदीश ब्रह्मदेवानें पाठविलेली तीव्र निद्रा कुंभकर्णाकडे प्रत्यक्ष प्राप्त झाली असतां १ तेथें बसलेल्या भ्रात्याला कुंभकर्ण ह्मणाला "हे राजा, मला निद्रेची बाधा होत आहे. ह्यास्तव, माझ्याकरितां आपण एक घर तयार करवा" २. ह्यानंतर रावणराजानें विश्वकर्म्यासारिख्या शिल्पांची तिकडे योजना केली असतां चार कोस रुंद, आठ कोस लांब, सफाईदार, दर्शनीय आणि उपद्रवरहित असें घर कुंभकर्णाकरितां त्यांनीं तयार केलें. स्फटिकाच्या व सुवर्णाच्या मनोहर

वज्रस्फटिकवेदिकम् ५ मनोहरं सर्वसुखं कारयामास राक्षसः । सर्वत्र सुखदं नित्यं मेरोः पुण्यां गुहामिव ६ तत्र निद्रां समाविष्टः कुम्भकर्णो महाबलः । बहून्यब्दसहस्राणि शयानो न च बुध्यते ७ निद्राभिभूते तु तदा कुम्भकर्णे दशाननः । देवर्षियक्षगन्धर्वान्संजघ्ने हि निरङ्कुशः ८ उद्यानानि विचित्राणि नन्दनादीनि यानि च । तानि गत्वा सुसंक्रुद्धो भिनत्ति स्म दशाननः ९ नदीं गज इव क्रीडन्वृक्षान्वायुरिव क्षिपन् । नगान्वज्र इवोत्सृष्टो विध्वंसयति राक्षसः १० यथावृत्तं तु विज्ञाय दशग्रीवं धनेश्वरः । कुलानुरूपं धर्मज्ञो वृत्तं संस्मृत्य चात्मनः ११ सौभ्रात्रदर्शनार्थं तु दूतं वैश्रवणस्तदा । लङ्कां संप्रेषयामास दशग्रीवस्य वै हितम् १२ स गत्वा नगरीं लङ्कामाससाद विभीषणम् । मानितस्तेन धर्मेण पृष्टश्चागमनं प्रति १३ पृष्ट्वा च कुशलं राज्ञो ज्ञातीनां च विभीषणः । सभायां

---

स्तंभांनीं तें सर्व बाजूंनीं सुशोभित झालेलें होतें ३,४. त्यांतील जिने वैडूर्यरत्नांचे केलेले होते, सभोंवतीं घुंगुरांच्या माळा लाविलेल्या होत्या; हस्तिदंती मेहेरपी ठिकठिकाणीं बसविलेल्या होत्या; रत्नजडित व स्फटिकमय फरशा जागोजाग केलेल्या होत्या ५; तें मनोहर गृह रावणराक्षसानें सर्वप्रकारें सुखावह करविलें होतें व मेरुपर्वताच्या पवित्र गुहेप्रमाणें तें गृह कोणत्याही ठिकाणीं व केव्हांही सुखदायकच होतें ६. त्या गृहामध्यें महाबलाढ्य कुंभकर्ण निद्रावश झाला असतां निद्रा घेत असे आणि तेथें एकदां निद्रा घेत पडला असतां अनेक हजार वर्षेपर्यंत तो जागाही होत नसे ७. असो ह्याप्रमाणें कुंभकर्ण निद्रेनें ग्रस्त झाला असतां ज्याला कोठेंही अडथळा होत नाहीं असा तो रावण देव, ऋषि, यक्ष आणि गंधर्व ह्यांना ताडण करीत असे ८. नंदनप्रभृति जीं मनोहर उद्यानें आहेत तीं अत्यंत क्रुद्ध झालेला रावण तेथें जाऊन फोडून टाकूं लागला ९ व क्रीडा करणाऱ्या गजाप्रमाणें नदीचा, ज्याला त्याला होलपडून टाकणाऱ्या वायूप्रमाणें वृक्षांचा आणि इंद्रानें सोडिलेल्या वज्राप्रमाणें पर्वतांचा तो राक्षस विध्वंस करूं लागला १०. असो. रावणाचें इत्थंभूत वर्तमान धनाधिपति कुबेराला समजून आल्यावरही आपल्या कुलाला अनुरूप असें आपलें योग्य वर्तन कोणतें ह्याचा त्या धर्मवेत्त्या कुबेरानें विचार केला ११ आणि खरें खरें भ्रातृप्रेम दर्शविण्याकरितां रावणाला हिताची गोष्ट कळवावी ह्या उद्देशानें त्या कुबेरानें लंकेमध्यें एक दूत पाठविला १२. लंकानगरीमध्यें गेल्यानंतर तो दूत बिभीषणाकडे गेला असतां त्यानें त्याचें यथाविधि आदरातिथ्य करून आगमनाचें कारण विचारिलें १३ आणि वैश्रवणराजासंबंधानें व आपल्या नातेवाईकांसंबंधानें कुशलप्रश्न केल्यानंतर सभेमध्यें

दर्शयामास तमासीनं दशाननम् १४ स दृष्ट्वा तत्र राजानं दीप्यमानं स्वतेजसा। जयेति वाचा संपूज्य तूष्णीं समभिवर्तते १५ स तत्रोत्तमपर्यङ्के वरास्तरणशोभिते। उपविष्टं दशग्रीवं दूतो वाक्यमथाब्रवीत् १६ राजन्वदामि ते सर्वं भ्राता तव यदब्रवीत्। उभयोः सदृशं वीर वृत्तस्य च कुलस्य च १७ साधु पर्याप्तमेतावत्कृत्यश्चारित्रसंग्रहः। साधु धर्मे व्यवस्थानं क्रियतां यदि शक्यते १८ दृष्टं मे नन्दनं भग्नमृषयो निहताः श्रुताः। देवतानां समुद्योगस्त्वत्तो राजन्मया श्रुतः १९ निराकृतश्च बहुशस्त्वयाहं राक्षसाधिप। सापराधोऽपि बालो हि रक्षितव्यः स्वबान्धवैः २० अहं तु हिमवत्पृष्ठं गतो धर्ममुपासितुम्। रौद्रं व्रतं समास्थाय नियतो नियतेन्द्रियः २१ तत्र देवो मया दृष्ट उमया सहितः प्रभुः। सव्यं चक्षुर्मया दैवात्तत्र देव्यां निपातितम् २२ का न्वेषेति महाराज न खल्वन्येन हेतुना। रूपं चानुपमं कृत्वा रुद्राणी तत्र तिष्ठति २३ देव्या दिव्यप्रभावेण दग्धं सव्यं ममेक्षणम्। रेणुध्वस्तमिव ज्योतिः पिङ्गलत्वमुपागतम् २४

---

बसलेला रावण बिभीषणानें त्या दूताला दर्शविला १४. आपल्या तेजानें झळकत असलेल्या राजाला तेथें अवलोकन करून आणि " तुझा जयजयकार असो " या शब्दांना मान देऊन तो " ( क्षणभर ) स्वस्थ उभा राहिला १५; आणि नंतर उत्कृष्ट आस्तरणांनीं सुशोभित असलेल्या उत्तम पलंगावर बसलेल्या रावणाला तो दूत ह्मणाला १६ " हे राजा, तुझ्या भ्रात्यानें जें सांगितलें आहे तें सर्व मी तुला सांगतों. हे वीरा, उभयतां मातापितरांचें कुल आणि त्यांचें वर्तन यांना अनुरूप असें तूं आपलें चांगलें वर्तन ठेव १७ इतकें पातक पुरें झालें; आतां ह्यापुढें आपण सदाचरणाचें अवलंबन करावें. सारांश, शक्य असेल तर उत्कृष्ट रीतीनें आपण धर्माचें अवलंबन करून रहा १८. नंदनवन भग्न झाल्याचें मीं अवलोकन केलें; ऋषींचाही वध झाल्याचें मीं ऐकिलें आणि, हे राजा, तुझ्याकरितां देवांचाही उद्योग सुरू झाला असल्याचें माझ्या कानावर आलें १९. हे राक्षसाधिपते, बहुतवेळां तूं मला फेटाळून लाविलें आहेस; परंतु, बालकाचा अपराध जरी झाला असला तरी त्याचें रक्षण करणें हेंच त्याच्या बांधवांचें कर्तव्य होय २०. कडकडीत व्रताचें अवलंबन करून आणि शुद्ध व जितेंद्रिय राहून मी धर्माचरण करण्याकरितां हिमालयावर गेलों होतों २१. तेथें पार्वतीसहवर्तमान प्रभु महादेव माझ्या दृष्टीं पडले. त्या ठिकाणीं अनुपम रूप धारण करून पार्वती उभी होती आणि, हे महाराज, दुसरा कांहीं उद्देश मनामध्यें न धरितां " ही असावी तरी कोण " हें समजण्याकरितां त्या देवीकडे मी दुर्दैवानें डाव्या डोळ्यानें पाहिलें २२, २३. परंतु, देवीच्या दिव्य प्रभा-

ततोऽहमन्यद्विस्तीर्णं गत्वा तस्य गिरेस्तटम् । तूष्णीं वर्षशतान्यष्टौ समधारं महाव्रतम् २५ समाप्ते नियमे तस्मिंस्तत्र देवो महेश्वरः । ततः प्रीतेन मनसा प्राह वाक्यमिदं प्रभुः २६ प्रीतोऽस्मि तव धर्मज्ञ तपसाऽनेन सुव्रत । मया चैतद्व्रतं चीर्णं त्वया चैव धनाधिप २७ तृतीयः पुरुषो नास्ति यश्चरेद्व्रतमीदृशम् । व्रतं सुदुष्करं ह्येतन्मयैवोत्पादितं पुरा २८ तत्सखित्वं मया सौम्य रोचयस्व धनेश्वर । तपसा निर्जितश्चैव सखा भव ममानघ २९ देव्या दग्धं प्रभावेण यच्च सव्यं तवेक्षणम् । पैङ्गल्यं यदवाप्तं हि देव्या रूपनिरीक्षणात् ३० एकाक्षिपिङ्गलीत्येव नाम स्थास्यति शाश्वतम् । एवं तेन सखित्वं च प्राप्यानुज्ञां च शंकरात् ३१ आगतेन मया चैवं श्रुतस्ते पापनिश्चयः । तदधर्मिष्ठसंयोगान्निवर्त कुलदूषणात् ३२ चिन्त्यते हि वधोपायः सर्षिसङ्घैः सुरैस्तव । एवमुक्तो दशग्रीवः कोपसंरक्तलोचनः ३३ हस्तान्दन्तांश्च संपिष्य वाक्यमेतदुवाच ह । विज्ञातं ते मया दूत वाक्यं यत्त्वं प्रभाषसे ३४ नैव त्वमसि नैवासौ भ्रात्रा येनासि

---

यामुळें माझा डावा डोळा जळून खाक झाला आणि तेजोमय असलेला उजवा डोळा केर गेल्यासारिखें होऊन पिंगट बनला २४. तदनंतर, त्या पर्वताच्या दुसऱ्या एका विस्तीर्ण तटावर जाऊन आठशें वर्षेपर्यंत स्वस्थपणानें मीं तपश्चर्या केली २५. तें तप संपूर्ण झाल्यानंतर देवाधिदेव प्रभु महेश्वर प्रसन्न मनानें तेथें मला म्हणाला २६ " हे सुव्रता, मी ह्या तपानें तुझ्यावर संतुष्ट झालों आहे. हे धनाधिपते, हें व्रत एक मीं केलें आहे आणि एक तूं आचरिलें आहेस २७. अशा प्रकारचा व्रत करणारा तिसरा पुरुष नाहीं. हें अत्यंत दुर्घट व्रत पूर्वी मींच उत्पन्न केलें आहे २८. तस्मात् हे धनाधिपते, माझ्याशीं सख्य असणें हें तूं माग. हे निष्पाप, आपल्या तपश्चर्येनें तूं मला जिंकून टाकिलें आहेस. ह्यास्तव, तूं माझा सखा हो २९. देवीच्या प्रभावामुळें जो तुझा डावा डोळा जळून गेला आहे आणि देवीचें रूप अवलोकन केल्यामुळें तुझ्या दुसऱ्या नेत्राला जी पिंगलता प्राप्त झाली आहे ३० त्यामुळें " एकाक्षपिंगली " हेंच तुझें नांव अक्षय कायम राहील. ह्याप्रमाणें त्या शंकराशीं सख्य प्राप्त करून घेऊन त्याची अनुज्ञा झाल्यानंतर ३१ मी परत आलों असतां तुझा दुष्ट हेतु मीं ऐकिला. तस्मात्, कुलाला ज्याच्या योगानें बट्टा लागणार आहे अशा अत्यंत पापकर्मापासून तूं निवृत्त हो ३२. ऋषिगणांसहवर्तमान देव तुझ्या वधाच्या उपायाविषयीं विचार करीत आहेत. " ह्याप्रमाणें दूतानें सांगितलें असतां रावणाचे डोळे क्रोधानें लाल झाले ३३ आणि दांतओठ खाऊन व हातावर हात चोळून तो म्हणाला " हे दूता, तूं करीत आहेस हें भाषण मला

चोदितः । हितं नैष ममैतद्धि ब्रवीति धनरक्षकः ३५ महेश्वरसखित्वं तु मूढः श्रावयते किल । नैवेदं क्षमणीयं मे यदेतद्भाषितं त्वया ३६ यदेतावन्मया कालं दूत तस्य तु मर्षितम् । न हन्तव्यो गुरुर्ज्येष्ठो ममायमिति मन्यते ३७ तस्य त्विदानीं श्रुत्वा मे वाक्यमेषा कृता मतिः । त्रींल्लोकानपि जेष्यामि बाहुवीर्यमुपाश्रितः ३८ एतन्मुहूर्तमेवाहं तस्यैकस्य तु वै कृते । चतुरो लोकपालांस्तान्नयिष्यामि यमक्षयम् ३९ एवमुक्त्वा तु लङ्केशो दूतं खड्गेन जघ्निवान् । ददौ भक्षयितुं ह्येनं राक्षसानां दुरात्मनाम् ४० ततः कृतस्वस्त्ययनो रथमारुह्य रावणः । त्रैलोक्यविजयाकाङ्क्षी ययौ यत्र धनेश्वरः ४१ [ ५६२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

ततः स सचिवैः सार्धं षड्भिर्नित्यबलोद्धतः । महोदरप्रहस्ताभ्यां मारीचशुकसारणैः १ धूम्राक्षेण च वीरेण नित्यं समरगर्धिना । वृतः संप्रययौ श्रीमान्क्रोधाल्लोकान्दहन्निव २ पुराणि स नदीः शैलान्वनान्युपवनानि च । अतिक्रम्य मुहूर्तेन कैलासं गिरिमागमत् ३ संनिविष्टं गिरौ तस्मिन्राक्ष-

---

समजलें ३४. तूं आणि ज्यांनीं तुला हा निरोप सांगून पाठविलें आहे तो भ्राता असे तुह्मी दोघेही कायम राहणार नाहीं. हा धनरक्षक मला हिताची गोष्ट सांगत नाहीं ३५. खरोखर हा मूढ महेश्वराचा सखा आहे असें मीं ऐकितों. तूं जें हें भाषण केलेंस तें मला क्षम्य नाहीं ३६. हे दूता, ह्यावेळपर्यंत मी त्याचें भाषण सहन करीत आलों ह्मणून पितृतुल्य ज्येष्ठ भ्राता मला वध्य नाहीं असें तो समजत आहे ३७. परंतु, त्याचें हें भाषण श्रवण करून आतां माझा असा निश्चय झाला आहे. बाहुवीर्याचें अवलंबन करून मी त्रैलोक्यालाही जिंकीन आणि त्या एकट्याकरितां आतांच्या आतांच मी चारी लोकपालांना यमसदनीं पाठवीन" ३८, ३९. ह्याप्रमाणें बोलून लंकाधिपति रावणानें खड्गाच्या योगानें दूताचा वध केला आणि दुरात्म्या राक्षसांना तो दूत त्यानें खावयास दिला ४०. तदनंतर स्वस्त्ययन करून रावण रथारूढ झाला आणि त्रैलोक्य जिंकण्याच्या उद्देशानें तो लंकाधिपति जिकडे धनाधिपति कुबेर होता तिकडे गेला ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

तदनंतर बलामुळें नेहेमींच उद्धट झालेला तो श्रीमान् राक्षस क्रोधानें त्रैलोक्य दग्ध करण्याकरितांच कीं काय महोदर, प्रहस्त, मारीच, शुक, सारण व नेहेमीं संग्रामाची इच्छा करणारा वीर धूम्राक्ष ह्या सहा मंत्र्यांसहवर्तमान बाहेर निघाला १, २;

सेन्द्रं निशम्य तु । युद्धेप्सुं तं कृतोत्साहं दुरात्मानं समन्त्रिणम् ४ यक्षा न शेकुः संस्थातुं प्रमुखे तस्य रक्षसः । राज्ञो भ्रातेति विज्ञाय गता यत्र धनेश्वरः ५ ते गत्वा सर्वमाचख्युर्भ्रातुस्तस्य चिकीर्षितम् । अनुज्ञाता ययुर्हृष्टा युद्धाय धनदेन ते ६ ततो बलानां संक्षोभो व्यवर्धत इवोदधेः । तस्य नैर्ऋतराजस्य शैलं संचालयन्निव ७ ततो युद्धं समभवद्यक्षराक्षससंकुलम् । व्यथिताश्चाभवंस्तत्र सचिवा राक्षसस्य ते ८ स दृष्ट्वा तादृशं सैन्यं दशग्रीवो निशाचरः । हर्षनादान्बहून्कृत्वा स क्रोधादभ्यभाषत ९ ये तु ते राक्षसेन्द्रस्य सचिवा घोरविक्रमाः । तेषां सहस्रमेकैको यक्षाणां समयोधयत् १० ततो गदाभिर्मुसलैरसिभिः शक्तितोमरैः । हन्यमानो दशग्रीवस्तत्सैन्यं समगाहत ११ स निरुच्छ्वासवत्तत्र वध्यमानो दशाननः । वर्षद्भिरिव जीमूतैर्धाराभिरवरुध्यत १२ न चकार व्यथां चैव यक्षशस्त्रैः समाहतः । महीधर इवाम्भोदैर्धाराशत-

---

आणि नगरें, नद्या, पर्वत, वनें व उपवनें ओलांडून एका मुहूर्तामध्यें तो कैलासपर्वतावर गेला ३. तो राक्षसाधिपति दुरात्मा रावण युद्धाचा उद्देश मनामध्यें धरून उत्साहपूर्वक मंत्र्यांसहवर्तमान पर्वतावर बसला आहे असें ऐकिल्यावर त्या राक्षसासमोर उभें राहण्यासही ते यक्ष समर्थ झाले नाहींत. राजाचा हा भ्राता आहे असें समजून आल्यावर ते कुबेराकडे गेले ४,५; तेथें गेल्यानंतर त्या भ्रात्याचा सर्व उद्देश त्यांनीं त्याला कळविला आणि कुबेरानें युद्ध करण्याला अनुज्ञा दिली असतां ते आनंदित होऊन परत आले ६. तदनंतर समुद्राच्या क्षोभाप्रमाणें त्या राक्षसाधिपतींच्या सैन्यांचा क्षोभ वृद्धिंगत झाला आणि त्याच्या योगानें तो कैलास पर्वत हलतच आहे कीं काय असा भास होऊं लागला ७. तदनंतर यक्ष व राक्षस ह्यांचीं गर्दी ज्यांत उडालेली आहे असें युद्ध तेथें सुरू झालें आणि राक्षसांचे ते मंत्री त्या युद्धामध्यें जर्जर झाले ८. परंतु, तशा प्रकारचें तें सैन्य अवलोकन केल्यावर तो रावण राक्षस आनंदाच्या अनेक गर्जना करून क्रोधानें बोलूं लागला ९. तेव्हां राक्षसाधिपतीचे जे भयंकर पराक्रम करणारे मंत्री तेथें आले होते त्यांपैकीं प्रत्येक हजार हजार यक्षांशीं युद्ध करूं लागला १०. तदनंतर गदा, मुसळें, तरवारी, शक्ति व तोमर ह्यांचा रावणावर हल्ला होऊं लागला असतां तो त्या सैन्यामध्यें शिरला ११; तथापि, एकसारिखा तेथें हल्ला होऊं लागल्यामुळें तो अगदीं गुदमरून गेला आणि वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें पडत असलेल्या शस्त्रसमूहांमुळें त्याचा अगदीं कोंडमारा झाला १२. परंतु, मेघांनीं शेंकडों धारांच्या योगानें सिंचन केलेल्या पर्वताप्रमाणें यक्षांच्या शस्त्रांचा

समुक्षितः १३ स महात्मा समुद्यम्य कालदण्डोपमां गदाम् । प्रविवेश ततः सैन्यं नयन्यक्षान्यमक्षयम् १४ स कक्षमिव विस्तीर्णं शुष्केन्धनमिवाकुलम् । वातेनाग्निरिवादीप्तो यक्षसैन्यं ददाह तत् १५ तैस्तु तत्र महामात्यैर्महोदरशुकादिभिः । अल्पावशेषास्ते यक्षाः कृता वातैरिवाम्बुदाः १६ केचित्समाहता भग्नाः पतिताः समरे क्षितौ । ओष्ठांश्च दशनैस्तीक्ष्णैरदशन्कुपिता रणे १७ श्रान्ताश्चान्योन्यमालिङ्ग्य भ्रष्टशस्त्रा रणाजिरे । सीदन्ति च तदा यक्षाः कूला इव जलेन ह १८ हतानां गच्छतां स्वर्गं युध्यतामथ धावताम् । प्रेक्षतामृषिसङ्घानां बभूव न तदान्तरम् १९ भग्नांस्तु तान्समालक्ष्य यक्षेन्द्रांस्तु महाबलान् । धनाध्यक्षो महाबाहुः प्रेषयामास यक्षकान् २० एतस्मिन्नन्तरे राम विस्तीर्णबलवाहनः । प्रेषितो न्यपतद्यक्षो नाम्ना संयोधकण्टकः २१ तेन चक्रेण मारीचो विष्णुनेव रणे हतः । पतितो भूतले शैलात्क्षीणपुण्य इव ग्रहः २२ ससंज्ञस्तु मुहूर्तेन स विश्रम्य

---

जरी त्याच्यावर हल्ला झाला होता तरी तो डगला नाहीं १३. इतकेंच नव्हे परंतु, आपली कालदंडतुल्य गदा उगारून तो महात्मा यक्षांना यमसदनीं पोंचविण्याकरितां त्या सैन्यामध्यें प्रविष्ट झाला १४ आणि वायूनें प्रदीप्त झालेला अग्नि ज्याप्रमाणें शुष्क काष्ठांनीं युक्त असलेलें विपुल तृण दग्ध करून टाकितो त्याप्रमाणें गजबजून गेलेलें तें यक्षसैन्य तो दग्ध करूं लागला १५ व वायु ज्याप्रमाणें मेघ अल्प करून टाकितात त्याप्रमाणें त्या महोदर, शुक वगैरे मुख्य अमात्यांनीं त्या यक्षांपैकीं अगदींच थोडे शिलक ठेविले १६. कांहीं यक्ष तडाका बसतांक्षणीं पराजित होऊन समरांगणामध्यें भूमीवर पडले; कांहीं रणामध्यें क्रुद्ध होऊन आपल्या तीक्ष्ण दातांनीं ओंठ चावूं लागले १७; संग्रामामध्यें हातांतील शस्त्रें गळून जाऊन कांहीं श्रांत झालेले यक्ष एकमेकांना कवटाळून पडूं लागले आणि ह्याप्रमाणें ते सर्वही यक्ष नदीच्या योगानें नाश पावणाऱ्या तीराप्रमाणें नाश पावूं लागले १८. वध पावून स्वर्गाला जाणाऱ्यांची, युद्ध करणाऱ्यांची, धांवाधांव करणाऱ्यांची आणि अवलोकन करणाऱ्या ऋषिगणांची तेथें अतिशय खेंचाखेंच झाली १९. नंतर त्या महाबलाढ्य यक्षाधिपतींचा पराभव झाला असें पाहून महापराक्रमी धनाध्यक्ष कुबेरानें दुसरे यक्ष पाठविले २०. इतक्यामध्यें, हे रामा, कुबेरानें पाठविलेला संयोधकंटक ह्या नांवाचा यक्ष विपुल सैन्य व वाहनें बरोबर घेऊन भूतलावर उतरला २१ आणि त्या विष्णुतुल्य संयोधकंटक यक्षानें संग्रामामध्यें मारीचराक्षसाला चक्राचा प्रहार केला असतां पुण्यक्षीण झालेला ग्रहच कीं काय असा तो मारीच कैलासपर्वतापासून भूतलावर पडला २२. परंतु, एका मुहूर्तानें शुद्धीवर येऊन विश्रांति घेतल्या-

निशाचरः । तं प्रक्षं योधयामास स च भग्नः प्रदुद्रुवे २३ ततः काञ्चनचित्राङ्गं वैदूर्यरजतोक्षितम् । मर्यादां प्रतिहाराणां तोरणान्तरमाविशत् २४ तं तु राजन्दशग्रीवं प्रविशन्तं निशाचरम् । सूर्यभानुरिति ख्यातो द्वारपालो न्यवारयत् २५ स वार्यमाणो यक्षेण प्रविवेश निशाचरः । यदा तु वारितो राम न व्यतिष्ठत्स राक्षसः २६ ततस्तोरणमुत्पाट्य तेन यक्षेण ताडितः । रुधिरं प्रस्रवन्भाति शैलो धातुस्रवैरिव २७ स शैलशिखराभेण तोरणेन समाहतः । जगाम न क्षतिं वीरो वरदानात्स्वयंभुवः २८ तेनैव तोरणेनाथ यक्षस्तेनाभिताडितः । नादृश्यत तदा यक्षो भस्मीकृततनुस्तदा २९ ततः प्रदुद्रुवुः सर्वे दृष्ट्वा रक्षःपराक्रमम् । ततो नदीर्गुहाश्चैव विविशुर्भयपीडिताः ॥ त्यक्तप्रहरणाः श्रान्ता विवर्णवदनास्तदा ३० [ ५९२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्य उत्तरकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

ततस्तांल्लँक्ष्य वित्रस्तान्यक्षेन्द्रांश्च सहस्रशः । धनाध्यक्षो महायक्षं

---

नंतर पुनरपि तो त्या यक्षाशीं युद्ध करूं लागला असतां तो यक्ष पराजित होऊन पळून गेला २३. तदनंतर जेथपर्यंत लोकांना जाण्याची मर्यादा आहे असें जें द्वारपाल उभे राहण्याचें द्वारांतील सुवर्णभूषित व वैदूर्यरत्नयुक्त रजतानें व्याप्त झालेलें स्थान तेथें रावण प्रविष्ट झाला २४. परंतु, हे राजा, तो रावणराक्षस प्रवेश करूं लागला असतां सूर्यभानु म्हणून प्रसिद्ध असलेल्या द्वारपालानें त्याला प्रतिबंध केला २५; तथापि, यक्षाच्या प्रतिबंधाला न जुमानतां तो राक्षस आंत शिरूं लागला, परंतु, हे रामा, प्रतिबंध झाला असतांही जेव्हां तो राक्षस उभा राहीना २६ तेव्हां द्वारासमीप असलेला दंड घेऊन त्या यक्षानें त्याला ताडण केलें व त्यामुळें शरीरांतून रुधिरस्राव होऊं लागला असतां तो राक्षस धातुस्रावानें शोभणाऱ्या पर्वताप्रमाणें शोभूं लागला २७. परंतु, पर्वतशिखरतुल्य दंडाचा प्रहार झाला असतांही ब्रह्मदेवाच्या वरप्रदानामुळें त्या वीराला क्षत पडलें नाहीं २८; इतकेंच नव्हे परंतु, तोच दंड घेऊन त्या यक्षाला त्यानें ताडण केलें असतां तो यक्ष शरीराचें चूर्ण होऊन गेल्यामुळें दिसेनासा झाला २९. तदनंतर राक्षसाचा पराक्रम पाहून सर्व यक्ष पळून गेले आणि भयानें व्याकुल होऊन श्रांत झाल्यामुळें ज्यांच्या मुखावरील तेज नाहींसें झालें आहे असे ते यक्ष आयुधांचा त्याग करून नद्या व गुहा ह्यांमध्यें प्रवेश करूं लागले ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चवदावा सर्ग समाप्त झाला ॥ १४ ॥

तदनंतर त्रस्त होऊन गेलेल्या त्या हजारों यक्षाधिपतींना अवलोकन करून

माणिचारमथाब्रवीत् १ रावणं जहि यक्षेन्द्र दुर्वृत्तं पापचेतसम् । शरणं
भव वीराणां यक्षाणां युद्धशालिनाम् २ एवमुक्तो महाबाहुर्माणिभद्रः
सुदुर्जयः । वृतो यक्षसहस्रैस्तु चतुर्भिः समयोधयत् ३ ते गदामुसलप्रासैः
शक्तितोमरमुद्गरैः । अभिघ्नन्तस्तदा यक्षा राक्षसान्समुपाद्रवन् ४ कुर्वन्त-
स्तुमुलं युद्धं चरन्तः श्येनवल्लघु । बाढं प्रयच्छ नेच्छामि दीयतामिति
भाषिणः ५ ततो देवाः सगन्धर्वा ऋषयो ब्रह्मवादिनः । दृष्ट्वा तत्तुमुलं
युद्धं परं विस्मयमागमन् ६ यक्षाणां तु प्रहस्तेन सहस्रं निहतं रणे । महो-
दरेण चानिन्द्यं सहस्रमपरं हतम् ७ क्रुद्धेन च तदा राजन्मारीचेन युयु-
त्सुना । निमेषान्तरमात्रेण द्वे सहस्रे निपातिते ८ क्व च यक्षार्जवं युद्धं क्व
च मायाबलाश्रयम् । रक्षसां पुरुषव्याघ्र तेन तेऽभ्यधिका युधि ९ धूम्रा-
क्षेण समागम्य माणिभद्रो महारणे । मुसलेनोरसि क्रोधात्ताडितो न च
कम्पितः १० ततो गदां समाविध्य माणिभद्रेण राक्षसः । धूम्राक्षस्ता-
डितो मूर्ध्नि विह्वलः स पपात ह ११ धूम्राक्षं ताडितं दृष्ट्वा पतितं शोणि-

---

धनाध्यक्ष कुबेर माणिचारनामक महायक्षाला ह्मणाला १ " हे यक्षाधिपते, दुरात्मा व दुराचरणी रावणाचा तूं वध कर आणि युद्ध करणाऱ्या वीर यक्षांचें तूं रक्षण कर २." ह्याप्रमाणें कुबेरानें सांगितलें असतां तो महापराक्रमी व अत्यंत दुर्जय माणिभद्र चार हजार यक्ष बरोबर घेऊन युद्ध करूं लागला ३. गदा, मुसळें, भाले, शक्ति, तोमर व मुद्गर ह्यांच्या योगानें प्रहार करीत करीत ते यक्ष राक्षसांवर धांवून गेले ४ आणि श्येनपक्ष्याप्रमाणें सत्वर संचार करीत करीत तुमुल युद्ध करणारे ते यक्ष " जोरानें प्रहार कर; असला निर्जीव प्रहार मला नको; चांगला तडाखा दे ", असें भाषण करूं लागले ५. तदनंतर गंधर्वांसहवर्तमान देव आणि ब्रह्मवेत्ते ऋषि तें तुमुल युद्ध अवलोकन करून पराकाष्ठेचे विस्मयचकित झाले ६. प्रहस्तानें संग्रामामध्यें हजार यक्षांचा वध केला आणि महोदरानेंही ज्यांना कोठेंही नांव ठेवण्यास जागा नाहीं असे दुसरे एक हजार यक्ष मारिले ७; व हे राजा, क्रुद्ध झालेल्या युद्धाभिलाषी मारीच राक्षसानें तर एका निमिषामध्यें दोन हजार यक्षांचा निःपात केला ८. हे पुरुषश्रेष्ठा, यक्षांचें सरळ युद्ध कोणीकडे आणि मायाबलाच्या आश्रयानें होणारें राक्षसांचें युद्ध कोणीकडे ? सारांश, मायेमुळें ते राक्षस (कोणापेक्षांही) युद्धामध्यें अधिक आहेत ९. धूम्राक्षानें महारणामध्यें माणिभद्राला पाहून त्याच्या वक्षःस्थलाचे ठिकाणीं रागा-रागानें मुसळाचा प्रहार केला; तथापि, तो यक्ष हलला नाहीं १०. इतकेंच नव्हे परंतु गदा गरगर फिरवून माणिभद्रानें धूम्राक्षाला मस्तकाचे ठिकाणीं प्रहार केला असतां

तोक्षितम् । अभ्यधावत सङ्ग्रामे माणिभद्रं दशाननः १२ संक्रुद्धमभिधावन्तं माणिभद्रो दशाननम् । शक्तिभिस्ताडयामास तिसृभिर्यक्षपुंगवः १३ ताडितो माणिभद्रस्य मुकुटे प्राहरद्रणे । तस्य तेन प्रहारेण मुकुटं पार्श्वमागतम् १४ ततःप्रभृति यक्षोऽसौ पार्श्वमौलिरभूत्किल १५ तस्मिंस्तु विमुखीभूते माणिभद्रे महात्मनि । संनादः सुमहान्राजंस्तस्मिन्शैले व्यवर्धत १६ ततो दूरात्प्रददृशे धनाध्यक्षो गदाधरः । शुक्रप्रौष्ठपदाभ्यां च पद्मशङ्खसमावृतः १७ स दृष्ट्वा भ्रातरं संख्ये शापाद्विभ्रष्टगौरवम् । उवाच वचनं धीमान्युक्तं पैतामहे कुले १८ यन्मया वार्यमाणस्त्वं नावगच्छसि दुर्मते । पश्चादस्य फलं प्राप्य ज्ञास्यसे निरयं गतः १९ यो हि मोहाद्विषं पीत्वा नावगच्छति दुर्मतिः । स तस्य परिणामान्ते जानीते कर्मणः फलम् २० दैवतानि न नन्दन्ति धर्मयुक्तेन केनचित् । येन त्वमीदृशं भावं नीतस्तच्च न बुध्यसे २१ मातरं पितरं विप्रमाचार्यं चावमन्य वै । स

---

तो विह्वल होऊन पडला ११. धूम्राक्ष प्रहार झाल्यामुळें रक्तानें भरून गेला आहे व खालीं पडला आहे असें अवलोकन करितांक्षणीं संग्रामामध्यें रावण माणिभद्रावर धांवला १२; परंतु, क्रुद्ध होऊन धांवत येणाऱ्या त्या रावणाला त्या श्रेष्ठ यक्षानें तीन शक्तींनीं ताडण केलें १३. तथापि, स्वतःला शक्तींचे प्रहार झाले असतांही रावणानें संग्रामामध्यें माणिभद्राच्या मुकुटावर प्रहार केला; त्या प्रहारामुळें त्याचा तो मुकुट एका बाजूला कलला १४ व तेव्हांपासून तो यक्ष खरोखर एका कलावरच मुकुट घालूं लागला १५. असो. त्या महात्म्या माणिभद्राचा पराजय झाला असतां, हे राजा, त्या पर्वतावर फारच मोठा नाद होऊं लागला १६. तदनंतर पद्म व शंख ह्यांनीं परिवेष्टित झालेला धनाध्यक्ष कुबेर हातामध्यें गदा घेऊन शुक्र व प्रौष्ठपद ह्यांसहवर्तमान लांब दृष्टीं पडूं लागला १७. शापामुळें ज्याचा मोठेपणा नाहींसा झालेला आहे अशा आपल्या भ्रात्याला संग्रामामध्यें अवलोकन करून तो विचारी कुबेर ब्रह्मकुलाला शोभण्यासारखें भाषण त्याच्याशीं करूं लागला १८. (तो ह्मणाला) "हे दुर्मते, मी नको नको ह्मणत असतांनाही तूं माझ्याकडे लक्ष्य दिलें नाहींस; परंतु, ह्याचें फल प्राप्त होऊन तूं नरकाला गेलास ह्मणजे तुला काय तें कळून येईल १९. मोह झाला असल्यामुळें एकाद्यानें विष प्राशन केलें असतां त्यावेळीं जरी त्याला समजलें नाहीं तरी त्याचा परिपाककाल प्राप्त होऊन मरणाचा प्रसंग येऊन ठेपला असतां हें आपल्या विषप्राशनरूप कर्माचें फल होय असें त्याला समजतें २०. कोणत्याही प्रकारचा धर्म तुझ्या ठिकाणीं नसल्यामुळें देवतांची तुझ्यावर कृपादृष्टि नाहीं आणि ह्या

पश्यति फलं तस्य प्रेतराजवशं गतः २१ अध्रुवे हि शरीरे यो न करोति तपोऽर्जनम्। स पश्चात्तप्यते मूढो मृतो गत्वाऽऽत्मनो गतिम् २२ कस्यचिन्न हि दुर्बुद्धेश्छन्दतो जायते मतिः २३ यादृशं कुरुते कर्म तादृशं फलमश्नुते । ऋद्धिं रूपं बलं पुत्रान्वित्तं शूरत्वमेव च २४ प्राप्नुवन्ति नरा लोके निर्जितं पुण्यकर्मभिः २५ एवं निरयगामी त्वं यस्य ते मतिरीदृशी । न त्वां समभिभाषिष्येऽसद्वृत्तेष्वेष निर्णयः २६ एवमुक्तास्ततस्तेन तस्यामात्याः समाहताः । मारीचप्रमुखाः सर्वे विमुखा विप्रदुद्रुवुः २७ ततस्तेन दशग्रीवो यक्षेन्द्रेण महात्मना । गदयाऽभिहतो मूर्ध्नि न च स्थानात्प्रकम्पितः २८ ततस्तौ राम निघ्नन्तौ तदान्योन्यं महामृधे। न विह्वलौ न च श्रान्तौ तावुभौ यक्षराक्षसौ २९ आग्नेयमस्त्रं तस्मै स मुमोच धनदस्तदा। राक्षसेन्द्रो वारुणेन तदस्त्रं प्रत्यवारयत् ३० ततो मायां प्रविष्टोऽसौ राक्षसीं राक्षसेश्वरः । रूपाणां शतसाहस्रं विनाशाय चकार च ३१ व्याघ्रो वराहो जीमूतः पर्वतः सागरो द्रुमः । यक्षो दैत्यस्वरूपी च सोऽदृश्यत दशा-

---

कारणानें तुझी अशी अवस्था झाली असूनही तुझ्या समजण्यांत येत नाहीं २१. माता, पिता, विप्र व आचार्य ह्यांचा अवमान केला असतां त्याचें फल यमाच्या तावडींत सांपडल्यावर प्राप्त होतच असतें २२. कोणत्याही दुर्बुद्धि पुरुषाला स्वतःच्या इच्छेनें शुभ मति प्राप्त होते २३. जशा प्रकारचें कर्म तो करीत असतो तशा प्रकारचें फल त्याला प्राप्त होत असतें २४. पुण्यकर्मांमुळें संपादित केलेलें रूप, बल, समृद्धि, पुत्र, वित्त आणि शौर्य जगतामध्यें लोकांना प्राप्त होत असतें २५. असो. ज्याअर्थी ह्या प्रकारची तुझी मति आहे त्याअर्थी तूं नरकाला जाणार आहेस. मी तुझ्याशीं भाषण करणार नाहीं; कारण, दुराचरणी लोकांशीं असेंच वागावें हा शास्त्राचा निश्चय आहे " २६. ह्याप्रमाणें सांगून त्या कुबेरानें त्याच्या मारीचप्रभृति अमात्यांना ताडण केलें असतां ते सर्वही पराङ्मुख होऊन पळून गेले २७. तदनंतर त्या महात्म्या यक्षाधिपति कुबेरानें रावणाच्या मस्तकीं गदेचा प्रहार केला; परंतु, तो रावण स्थानापासून चळला देखील नाहीं २८. तदनंतर, हे रामा, महासंग्रामामध्यें ते उभयतां यक्षराक्षस परस्पर प्रहार करूं लागले असतां विह्वल झाले नाहींत व श्रांतही झाले नाहींत २९. त्या धनाधिपति कुबेरानें रावणावर आग्नेय अस्त्र सोडिलें; परंतु, वारुण अस्त्रानें त्या अस्त्राचें त्या राक्षसाधिपतीनें निवारण केलें ३०. तदनंतर ह्या राक्षसाधिपति रावणानें राक्षसमायेचें अवलंबन करून कुबेराच्या नाशाकरितां लक्षावधि रूपें धारण केलीं ३१. व्याघ्र, वराह, मेघ, पर्वत, सागर, वृक्ष, यक्ष व दैत्य ह्यांच्या रूपानें तो राक्षस दिसूं

नवः ३२ बहूनि च करोति स्म दृश्यन्ते न त्वसौ ततः । प्रतिगृह्य ततो राम महदस्त्रं दशाननः । जघान मूर्ध्नि धनदं व्याविद्ध्य महतीं गदाम् ३३ एवं स तेनाभिहतो विह्वलः शोणितोक्षितः । कृत्तमूल इवाशोको निपपात धनाधिपः ३४ ततः पद्मादिभिस्तत्र निधिभिः स तदा वृतः । धनदोच्छ्वासितस्तैस्तु वनमानीय नन्दनम् ३५ निर्जित्य राक्षसेन्द्रस्तं धनदं हृष्टमानसः । पुष्पकं तस्य जग्राह विमानं जयलक्षणम् ३६ काञ्चनस्तम्भसंवीतं वैदूर्यमणितोरणम् । मुक्ताजालप्रतिच्छन्नं सर्वकालफलद्रुमम् ३७ मनोजवं कामगमं कामरूपं विहंगमम् । मणिकाञ्चनसोपानं तप्तकाञ्चनवेदिकम् ३८ देवोपवाह्यमक्षय्यं सदा दृष्टिमनःसुखम् । बह्वाश्चर्यं भक्तिचित्रं ब्रह्मणा परिनिर्मितम् ३९ निर्मितं सर्वकामैस्तु मनोहरमनुत्तमम् । न तु शीतं न चोष्णं च सर्वर्तुसुखदं शुभम् ४० स तं राजा समारुह्य कामगं वीर्यनिर्जितम् । जितं त्रिभुवनं मेने दर्पोत्सेकात्सुदुर्मतिः ४१ जित्वा वैश्र-

---

लागला ३२. सारांश, तो जीं असंख्य रूपें धारण करीत असे तीं मात्र दिसूं लागलीं; परंतु, स्वतः तो राक्षस दृष्टीं पडेना. नंतर, हे रामा, रावणानें एका मोठ्या अस्त्राचा जप केला आणि एक प्रचंड गदा गरगर फिरवून कुबेराच्या मस्तकावर त्यानें प्रहार केला ३३. ह्याप्रमाणें त्यानें प्रहार केला असतां तो धनाधिपति कुबेर रक्तानें भरून जाऊन विह्वल झाल्यामुळें तोडून टाकिलेल्या अशोक वृक्षाप्रमाणें खालीं पडला ३४. तदनंतर पद्मप्रभृति निधि त्याच्या भोंवतीं जमले आणि नंदन वनामध्यें धनदाला आणून त्यांनीं सावध केलें ३५. ह्याप्रमाणें त्या कुबेराला जिंकल्यानंतर मनामध्यें आनंदित झालेल्या त्या राक्षसाधिपतीनें त्याचें जयप्रद पुष्पक विमान घेतलें ३६. तें विमान सुवर्णस्तंभांनीं परिवेष्टित होतें; त्याच्या द्वारांना वैदूर्यरत्नें व हिरे लाविलेले होते; मोत्यांच्या सरांनीं तें आच्छादिलेलें होतें; सर्वदां सफल असणारे वृक्ष त्या ठिकाणीं होते ३७; मनाप्रमाणें वेग आणि इच्छेप्रमाणें गति व रूप धारण करणाऱ्या त्या आकाशगामि विमानाला रत्नजडित सुवर्णाचे जिने होते; त्यांतील बसावयाच्या जागा उत्कृष्ट सुवर्णाच्या केलेल्या होत्या ३८; कधींही नाश न पावणारें आणि सर्वदा मनाला व दृष्टीला सुखावह होणारें तें विमान देवांनाच बसण्यास योग्य होतें; अनेक आश्चर्यकारक गोष्टी त्यामध्यें होत्या; अनेक प्रकारच्या चितारी कामामुळें तें सुंदर झालें होतें; ब्रह्मदेवानें सर्व प्रकारच्या भोग्य वस्तूंसहवर्तमान तें मनोहर व अनुपम विमान निर्माण केलें होतें; त्यांत शैत्य नव्हतें; उष्णाही नव्हतें आणि सर्व ऋतूंमध्यें तें शुभ विमान सुखावह होतें ३९,४०. पराक्रमानें जिंकिलेल्या व बसणाऱ्याच्या इच्छेप्रमाणें गमन करणाऱ्या त्या विमानामध्यें आरूढ

वर्णं देवं कैलासात्समवातरत् ४२ स तेजसा विपुलमवाप्य तं जयं प्रतापवान्विमलकिरीटहारवान् । रराज वै परमविमानमास्थितो निशाचरः सदसि गतो यथाऽनलः ४३ [ ६३५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥ १५ ॥

स जित्वा धनदं राम भ्रातरं राक्षसाधिपः । महासेनप्रसूतिं तद्ययौ शरवणं महत् १ अथापश्यद्दशग्रीवो रौक्मं शरवणं महत् । गभस्तिजालसंवीतं द्वितीयमिव भास्करम् २ स पर्वतं समारुह्य कंचिद्रम्यवनान्तरम् । प्रेक्षते पुष्पकं तत्र रामविष्टम्भितं तदा ३ विष्टब्धं किमिदं कस्मान्नागमत्कामगं कृतम् । अचिन्तयद्राक्षसेन्द्रः सचिवैस्तैः समावृतः ४ किंनिमित्तमिच्छया मे नेदं गच्छति पुष्पकम् । पर्वतस्योपरिष्ठस्य कर्मेदं कस्यचिद्भवेत् ५ ततोऽब्रवीत्तदा राम मारीचो बुद्धिकोविदः । नेदं निष्कारणं राजन्पुष्पकं यन्न गच्छति ६ अथवा पुष्पकमिदं धनदान्नान्यवाह-

---

झाल्यावर तो अत्यंत दुर्मति रावण गर्व उचंबळूं लागल्यामुळें आपण त्रैलोक्य जिंकिलें असें मानूं लागला ४१ आणि ह्याप्रमाणें वैश्रवण देवाला जिंकिल्यानंतर तो कैलासपर्वतावरून खालीं उतरला ४२. असो. निर्मल किरीट व हार हे ज्यानें धारण केले आहेत असा तो राक्षस तेजाच्या योगानें मोठा जय मिळवून उत्कृष्ट विमानामध्यें आरूढ झाला असतां यज्ञमंडपामध्यें असलेल्या अग्नीप्रमाणें शोभूं लागला ४३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

हे रामा, ह्याप्रमाणें भ्रात्या कुबेराला जिंकिल्यानंतर तो राक्षसाधिपति रावण कार्तिकेयाचा जन्म ज्याठिकाणीं झाला त्या मोठ्या शरवणामध्यें गेला १. सारांश, कुबेराला जिंकिल्यानंतर किरणसमुदायांनीं परिवेष्टित असलेला दुसरा सूर्यच कीं काय असें एक शरांचें सुवर्णवर्ण प्रचंड वन त्याच्या दृष्टीं पडलें २. तदनंतर रम्य वनांनीं युक्त असलेल्या एका पर्वतावर तो आरूढ झाला असतां, हे रामा, त्या ठिकाणीं पुष्पकविमान कुंठित झाल्याचें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें ३. तेव्हां 'यथेष्ट संचार करणारें तें विमान कां कुंठित झालें? आपल्या इच्छेप्रमाणें हें पुष्पक विमान कांवरें गमन करीत नाहीं? कदाचित् पर्वतावर राहणाऱ्या एकाद्याचें हें कर्म असेल' असें त्या सचिवांनीं परिवेष्टित असलेला तो राक्ष-साधिपति रावण चिंतन करूं लागला ४,५. तदनंतर, हे रामा, तर्क करण्यामध्यें निपुण असलेला मारीच त्याला ह्मणाला "हे राजा, ज्याअर्थीं पुष्पकविमान गमन करीत नाहीं त्याअर्थीं ही गोष्ट कांहीं निष्कारण झालेली नव्हे ६. अथवा हें पुष्पकविमान

नम् । अतो निःस्पन्दमभवद्धनाध्यक्षविनाकृतम् ७ इति वाक्यान्तरे तस्य करालः कृष्णपिङ्गलः । वामनो विकटो मुण्डी नन्दी ह्रस्वभुजो बली ८ ततः पार्श्वमुपागम्य भवस्यानुचरोऽब्रवीत् । नन्दीश्वरो वचश्चेदं राक्षसेन्द्रमशङ्कितः ९ निवर्तस्व दशग्रीव शैले क्रीडति शंकरः । सुपर्णनागयक्षाणां देवगन्धर्वरक्षसाम् १० सर्वेषामेव भूतानामगम्यः पर्वतः कृतः । इति नन्दिवचः श्रुत्वा क्रोधात्कम्पितकुण्डलः ११ रोषात्तु ताम्रनयनः पुष्पकादवरुह्य सः । कोऽयं शंकर इत्युक्त्वा शैलमूलमुपागतः १२ सोऽपश्यन्नन्दिनं तत्र देवस्यादूरतः स्थितम् । दीप्तं शूलमवष्टभ्य द्वितीयमिव शंकरम् १३ तं दृष्ट्वा वानरमुखमवज्ञाय स राक्षसः । प्रहासं मुमुचे तत्र सतोय इव तोयदः १४ तं क्रुद्धो भगवान्नन्दी शंकरस्यापरा तनुः । अब्रवीत्तत्र तद्रक्षो दशाननमुपस्थितम् १५ यस्माद्वानररूपं मामवज्ञाय दशानन । अशनीपातसंकाशमपहासं प्रमुक्तवान् १६ तस्मान्मद्वीर्यसंयुक्ता मद्रूपसमतेजसः । उत्पत्स्यन्ति वधार्थं हि कुलस्य तव वानराः १७ नखदंष्ट्रायुधाः क्रूर मनःसंपातरंहसः । युद्धोन्मत्ता

---

जर कुबेराशिवाय इतराचें वहान नसेल तर कुबेराचा संबंध सुटल्यामुळें हे निश्चल झालें असेल " ७. असें त्यांचें भाषण चाललें आहे तोंच कृष्णवर्ण व पिंगटवर्ण ह्यांनीं युक्त, ठेंगणा, बलाढ्य, ऱ्हस्व भुजांनीं युक्त, मुंडन केलेला, भयंकर आणि प्रचंड नंदी ८ जवळ आला आणि तो शंकराचा सेवक नंदीश्वर निःशंक राहून राक्षसाधिपतीला म्हणाला ९ " हे रावणा, परत फीर. पर्वतावर शंकराची क्रीडा चालली आहे आणि सुपर्ण, नाग, यक्ष, देव, गंधर्व, राक्षस इत्यादि सर्व भूतांना ह्या पर्वतावर जाण्याचा प्रतिबंध केला आहे ". हें नंदीश्वराचें भाषण श्रवण केल्याबरोबर क्रोधामुळें रावणाच्या कानांतील कुंडलें लटलट हलूं लागलीं १०, ११; रोषामुळें नेत्रही लाल झाले; पुष्पकविमानांतून तो खालीं उतरला आणि ' कोण हा शंकर ' असें म्हणून पर्वताच्या पायथ्याशीं आला १२; तों देवाच्या समीपच स्थित असलेला नंदी प्रदीप्त शूल हातामध्यें घेऊन दुसरा शंकरच आहे की काय असा त्याच्या दृष्टीं पडला १३. परंतु, त्या वानरमुख नंदीची अवज्ञा करून त्या राक्षसानें सजल मेघाप्रमाणें गर्जनायुक्त हास्य केलें १४. तेव्हां शंकराची प्रत्यक्ष दुसरी मूर्तिच असलेला भगवान् नंदी क्रुद्ध झाला आणि समीप आलेल्या त्या रावण राक्षसाला म्हणाला १५. " हे रावणा, ज्याअर्थीं वानररूप धारण केलेल्या माझी अवज्ञा करून तूं विद्युत्पाततुल्य अमर्याद हास्य केलें आहेस १६ त्याअर्थीं माझ्या वीर्यानें युक्त व माझ्या सारखेच तेजस्वी आणि रूपवान्

बलोद्रिक्ताः शैला इव विसर्पिणः १८ ते तव प्रबलं दर्पमुत्सेधं च
पृथग्विधम्। व्यपनेष्यन्ति संभूय सहामात्यसुतस्य च १९ किं त्विदानीं
मया शक्यं हन्तुं त्वां हे निशाचर। न हन्तव्यो हतस्त्वं हि पूर्वमेव स्वक-
र्मभिः २० इत्युदीरितवाक्ये तु देवे तस्मिन्महात्मनि। देवदुन्दुभयो नेदुः
पुष्पवृष्टिश्च खाच्च्युता २१ अचिन्तयित्वा स तदा नन्दिवाक्यं महाबलः।
पर्वतं तु समासाद्य वाक्यमाह दशाननः २२ पुष्पकस्य गतिश्छिन्ना यत्कृते
मम गच्छतः। तमिमं शैलमुन्मूलं करोमि तव गोपते २३ केन प्रभा-
वेण भवो नित्यं क्रीडति राजवत्। विज्ञातव्यं न जानीते भयस्थानमुप-
स्थितम् २४ एवमुक्त्वा ततो राम भुजान्विक्षिप्य पर्वते। तोलयामास
तं शीघ्रं स शैलः समकम्पत २५ चालनात्पर्वतस्यैव गणा देवस्य कम्पिताः।
चचाल पार्वती चापि तदाश्लिष्टा महेश्वरम् २६ ततो राम महादेवो
देवानां प्रवरो हरः। पादाङ्गुष्ठेन तं शैलं पीडयामास लीलया २७ पीडि-
तास्तु ततस्तस्य शैलस्तम्भोपमा भुजाः। विस्मिताश्चाभवंस्तत्र सचिवा-

---

वानर तुझ्या कुलाच्या वधाकरितां उत्पन्न होतील १७. हे क्रूरा, नखें व दाढा हीं ज्यांचीं आयुधें आहेत, मनाप्रमाणें ज्यांचा वेग आहे, बलानें जे उचंबळत आहेत, युद्धामध्यें ज्यांना भान रहात नाहीं आणि गमन करणारे पर्वतच कीं काय असे जे प्रचंड आहेत १८ ते वानर तुझा, तुझ्या अमात्यांचा व तुझ्या पुत्रांचा हरतऱ्हेचा फाजिल गर्व आणि बल एकत्र जुळून नष्ट करितील १९. हे राक्षसा, सांप्रत माझ्या हातून तुझा वध होणें जरी शक्य आहे तरी तुला मारणें योग्य नाहीं; कारण, आपल्या कर्मांच्या योगानें तूं पूर्वींच वध पावला आहेस" २०. ह्याप्रमाणें त्या महात्म्या नंदीश्वर देवानें भाषण केलें असतां देवांच्या दुंदुभि वाजूं लागल्या आणि आकाशांतून पुष्पवृष्टिही झाली २१. परंतु, नंदीच्या त्या भाषणाची पर्वा न करितां तो महाबलाढ्य रावण पर्वतासमीप येऊन ह्मणाला २२ "ज्यामुळें मी जात असतांना पुष्पकविमानाची गति कुंठित झालेली आहे तो हा पर्वत, हे धेनुपते, मी उपटून टाकितों २३. शंकर कोणत्या सामर्थ्याच्या आधारावर नेहेमीं राजाप्रमाणें क्रीडा करीत असतो बरें ? आपल्याला भयप्रद गोष्ट प्राप्त झाली आहे हें समजणें उचित असूनही त्याला समजत नाहीं २४. हे रामा, ह्याप्रमाणें बोलून त्यानें पर्वताच्या खालीं आपले हात सारिले आणि सत्वर तो पर्वत तोलून धरिला असतां तो हलूं लागला २५. पर्वताच्या हालण्याबरोबर देवांचे गण कंपित झाले; पार्वतीही कांपूं लागली आणि महेश्वराला चिकटून बसली २६. तदनंतर हे रामा, सुरश्रेष्ठ महादेव हरानें पायाच्या अंगठ्यानें सहज तो पर्वत दाबिला असतां

स्तस्य रक्षसः२८रक्षसा तेन रोषाच्च भुजानां पीडनात्तथा । मुक्तो विरावः सहसा त्रैलोक्यं येन कम्पितम् २९ मेनिरे वज्रनिष्पेषं तस्यामात्या युगक्षये । तदा वर्त्मसु चलिता देवा इन्द्रपुरोगमाः ३० समुद्राश्चापि संक्षुब्धाश्चलिताश्चापि पर्वताः । यक्षा विद्याधराः सिद्धाः किमेतदिति चाब्रुवन् ३१ तोषयस्व महादेवं नीलकण्ठमुमापतिम् । तमृते शरणं नान्यं पश्यामोऽत्र दशानन ३२ स्तुतिभिः प्रणतो भूत्वा तमेवं शरणं व्रज । कृपालुः शंकरस्तुष्टः प्रसादं ते विधास्यति ३३ एवमुक्तस्तदामात्यैस्तुष्टाव वृषभध्वजम् । सामभिर्विविधैः स्तोत्रैः प्रणम्य स दशाननः ॥ संवत्सरसहस्रं तु रुदतो रक्षसो गतम् ३४ ततः प्रीतो महादेवः शैलाग्रे विष्ठितः प्रभुः । मुक्त्वा चास्य भुजान्राम प्राह वाक्यं दशाननम् ३५ प्रीतोऽस्मि तव वीरस्य शौटीर्याच्च दशानन । शैलाक्रान्तेन यो मुक्तस्त्वयारावः सुदारुणः ३६ यस्माल्लोकत्रयं चैतद्रावितं भयमागतम् । तस्मात्त्वं रावणो नाम नाम्ना राजन्भविष्यसि ३७ देवता मानुषा यक्षा ये चान्ये जगतीतले । एवं त्वामभिधास्यन्ति रावणं लोकरावणम् ३८ गच्छ पौलस्त्य

---

पर्वताचे स्तंभच कीं काय असे त्याचे हात दडपून गेले व त्या राक्षसाचे सचिव विस्मित झाले २७,२८. ह्याप्रमाणें हात चिरडल्यामुळें त्या राक्षसानें एकाएकीं क्रोधानें गर्जना केली असतां त्रैलोक्य कंपित झालें २९; हा प्रलयकाल असून वज्रपात झाला आहे असें त्याच्या अमात्यांना वाटलें; आपआपल्या स्थानीं असलेले इंद्रप्रभृति देव स्थानापासून चलित झाले ३०; समुद्रही अतिशय क्षुब्ध झाले; पर्वतही चळूं लागले आणि यक्ष, विद्याधर व सिद्ध 'काय हें!' असें ह्मणूं लागले ३१. नंतर "हे रावणा, उमापति नीलकंठ महादेवाला संतुष्ट कर; त्याच्यावांचून ह्या प्रसंगीं आह्मांला दुसरा कोणी रक्षक दिसत नाहीं ३२. ह्यास्तव, स्तुतींनीं नम्र होऊन तूं त्याला शरण जा; ह्मणजे दयालु शंकर तुष्ट होऊन तुझ्यावर कृपा करील" ३३. ह्याप्रमाणें त्या अमात्यांनीं त्या रावणाला सांगितलें असतां प्रणामपूर्वक नानाप्रकारचीं स्तोत्रें व सामें ह्यांच्या योगानें त्यानें वृषभध्वजाला संतुष्ट केलें; तथापि, रडतां रडतां त्या राक्षसाचीं एक हजार वर्षें लोटलीं ३४. तदनंतर पर्वताच्या अग्रभागीं बसलेला प्रभु महादेव प्रसन्न झाला आणि हे रामा, रावणाचे हात मोकळे करून त्याला ह्मणाला ३५ "हे रावणा, तुज वीराच्या पराक्रमामुळें मी प्रसन्न झालों आहें. पर्वताखालीं दडपून गेल्यामुळें जो अतिभयंकर शब्द तूं केलास ३६ आणि ज्याअर्थी, हें त्रैलोक्य तूं रावित केल्यामुळें भयभीत झालें त्या अर्थी, हे राजा, नांवानेंही तूं रावण ह्मणूनच प्रसिद्ध होशील ३७. देव, मानव, यक्ष आणि भूतलावर वास्तव्य करणारे जे कोणी

विस्रब्धं यथा येन त्वमिच्छसि । मया चैवाभ्यनुज्ञातो राक्षसाधिप गम्यताम् ३९ एवमुक्तस्तु लङ्केशः शंभुना स्वयमब्रवीत् । प्रीतो यदि महादेव वरं मे देहि याचतः ४० अवध्यत्वं मया प्राप्तं देवगन्धर्वदानवैः । राक्षसैर्गुह्यकैर्नागैर्ये चान्ये बलवत्तराः ४१ मानुषान्न गणे देव स्वल्पास्ते मम संमताः । दीर्घमायुश्च मे प्राप्तं ब्रह्मणस्त्रिपुरान्तक ४२ वाञ्छितं चायुषः शेषं शस्त्रं त्वं च प्रयच्छ मे । एवमुक्तस्ततस्तेन रावणेन स शंकरः ४३ ददौ खड्गं महादीप्तं चन्द्रहासमिति श्रुतम् । आयुषश्चावशेषं च ददौ भूतपतिस्तदा ४४ दत्त्वोवाच ततः शंभुर्नावज्ञेयमिदं त्वया । अवज्ञातं यदि हि ते मामेवैष्यत्यसंशयः ४५ एवं महेश्वरेणैव कृतनामा स रावणः । अभिवाद्य महादेवमारुरोहाथ पुष्पकम् ४६ ततो महीतलं राम पर्यक्रामत रावणः । क्षत्रियान्सुमहावीर्यान्बाधमानस्ततस्ततः ४७ केचित्तेजस्विनः शूराः क्षत्रिया युद्धदुर्मदाः । तच्छासनमकुर्वन्तो विनेशुः

---

असतील ते ह्याप्रमाणें लोकांना आक्रोश करूं लावणाऱ्या तुला ' रावण ' ह्मणतील. हे पौलस्त्या, ज्या मार्गानें तुला जाण्याची इच्छा असेल त्या मार्गानें आतां तूं जा. हे राक्षसाधिपते, जा; मीं तुला अनुज्ञा दिली आहे " ३९. ह्याप्रमाणें शंकरानें रावणाला स्वतः सांगितलें असतां तो लंकाधिपति ह्मणाला " हे महादेवा, तूं जर प्रसन्न झाला असशील तर मज याचकाला एक वर दे ४०. देव, गंधर्व, दानव, राक्षस, गुह्यक, नाग, व इतरही बलाढ्य प्राणी ह्यांपासून मला अवध्यत्व प्राप्त झालें आहे ४१. हे देवा, मनुष्यांची मी गणनाच करीत नाहीं. मी त्यांना क्षुद्र समजतों. शिवाय, हे त्रिपुरनाशका दीर्घायुष्यही मला ब्रह्मदेवापासून प्राप्त झालें आहे ४२. परंतु, अवशिष्ट राहिलेल्या आयुष्याचा पूर्ण उपभोग घेतां यावा ( ह्मणजे शापादिकांमुळें तें कमी होऊं नये ) अशी माझी इच्छा आहे; ह्यास्तव, अवशिष्ट आयुष्य आणि शस्त्र मला द्या " ह्याप्रमाणें त्या रावणानें प्रार्थना केली असतां चंद्रहास ह्मणून प्रसिद्ध असलेला एक अति देदीप्यमान खड्ग व अवशिष्ट आयुष्य हीं दोन्हीं त्या भूताधिपति शंकरानें त्याला दिलीं ४३,४४ व दिल्यानंतर तो शंभु त्याला ह्मणाला " तूं ह्या शस्त्राची अवज्ञा करूं नकोस; तुझ्या हातून जर ह्याची अवज्ञा झाली तर हें शस्त्र माझ्याकडेच येईल ह्यांत संशय नाहीं " ४५. ह्याप्रमाणें महेश्वरानेंच नामकरण केलेला तो रावण महादेवाला अभिवंदन करून पुष्पकविमानामध्यें आरूढ झाला ४६. तदनंतर हे रामा, अतिवीर्यवान् क्षत्रियांना ठिकठिकाणीं पीडा करीत करीत तो रावण भूतलावर संचार करूं लागला ४७. युद्धामध्यें जेरीस येणारे असे जे तेजस्वी व शूर क्षत्रिय त्याच्या आज्ञेप्रमाणें वागले

सपरिच्छदाः ४८ अपरे दुर्जयं रक्षो जानन्तः प्राज्ञसंमताः । जिताः स्म इत्यभाषन्त राक्षसं बलदर्पितम् ४९ [ ८८४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

अथ राजन्महाबाहुर्विचरन्पृथिवीतले । हिमवद्वनमासाद्य परिचक्राम रावणः १ तत्रापश्यत्स वै कन्यां कृष्णाजिनजटाधराम् । आर्षेण विधिना युक्तां दीप्यन्तीं देवतामिव २ स दृष्ट्वा रूपसंपन्नां कन्यां तां सुमहाव्रताम् । काममोहपरीतात्मा पप्रच्छ प्रहसन्निव ३ किमिदं वर्तसे भद्रे विरुद्धं यौवनस्य ते । न हि युक्ता तवैतस्य रूपस्यैवं प्रतिक्रिया ४ रूपं तेऽनुपमं भीरु कामोन्मादकरं नृणाम् । न युक्तं तपसि स्थातुं निर्गतो ह्येष निर्णयः ५ कस्यासि किमिदं भद्रे कश्च भर्ता वरानने । येन संभुज्यसे भीरु स नरः पुण्यभाग्भुवि ॥ पृच्छतः शंस मे सर्वं कस्य हेतोः परिश्रमः ६ एवमुक्ता तु सा कन्या रावणेन यशस्विनी । अब्रवीद्विधिवत्कृत्वा तस्यातिथ्यं तपोधना ७ कुशध्वजो नाम पिता ब्रह्मर्षिरमितप्रभः

---

नाहींत त्यांचा सपरिवार नाश झाला ४८ आणि प्राज्ञजनांना मान्य असे जे कांहीं दुसरे क्षत्रिय होते ते तो राक्षस अजिंक्य आहे असें जाणीत असल्यामुळें बलासंबंधानें त्या रावणाला 'आह्मी जित आहोंत' असें ह्मणाले ४९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सोळावा सर्ग समाप्त झाला॥१६॥

नंतर, हे राजा, पृथ्वीवर संचार करणारा तो महापराक्रमी रावण हिमालयाच्या वनामध्यें जाऊन हिंडूं लागला असतां कृष्णाजिन व जटा धारण करून तपश्चर्या करीत असलेली व देवतेप्रमाणें झळकत असलेली एक कन्या त्यानें तेथें अवलोकन केली" १,२ आणि फारच मोठी तपश्चर्या करीत बसलेली ती रूपवती कन्या अवलोकन करून विषयमोहानें अंतःकरण व्याप्त झाल्यामुळें तो रावण हंसत हंसत तिला ह्मणाला ३ "हे भद्रे, हें काय करीत आहेस; हें तुझ्या यौवनाला विरुद्ध आहे; तुझ्या ह्या रूपाला अशाप्रकारचें हें विरुद्ध आचरण योग्य नव्हे ४. हे भीरु, तुझें अनुपम रूप पुरुषांची विषयवासना क्षुब्ध करणारें आहे; ह्यास्तव, तपश्चर्या करणें तुला योग्य नाहीं; हा सिद्धांतच ठरलेला आहे ५. हे भद्रे, हें तप कसलें ? तूं कोणाची आहेस आणि हे सुमुखि, तुझा भर्ता कोण आहे ? हे भीरु, जो तुझा उपभोग घेत असेल तो पुरुष पृथ्वीवर पुण्यवान् होय. सारांश, हे तुझे परिश्रम कशाकरितां चालले आहेत हें सर्व तूं मज विचारणाऱ्याला सांग " ६. ह्याप्रमाणें रावणानें विचारिलें असतां ती यशस्विनी व तपस्विनी कन्या त्याचें यथाविधि आदरातिथ्य करून त्याला ह्मणाली ७

बृहस्पतिसुतः श्रीमान्बुद्ध्या तुल्यो बृहस्पतेः ८ तस्याहं कुर्वतो नित्यं वेदाभ्यासं महात्मनः। संभूता वाङ्मयी कन्या नाम्ना वेदवती स्मृता ९ ततो देवाः सगन्धर्वा यक्षराक्षसपन्नगाः। ते चापि गत्वा पितरं वरणं रोचयन्ति मे १० न च मां स पिता तेभ्यो दत्तवान्राक्षसेश्वर। कारणं तद्वदिष्यामि निशामय महाभुज ११ पितुस्तु मम जामाता विष्णुः किल सुरेश्वरः। अभिप्रेतस्त्रिलोकेशस्तस्मान्नान्यस्य मे पिता १२ दातुमिच्छति तस्मै तु तच्छ्रुत्वा बलदर्पितः। शंभुर्नाम ततो राजा दैत्यानां कुपितोऽभवत् १३ तेन रात्रौ शयानो मे पिता पापेन हिंसितः १४ ततो मे जननी दीना तच्छरीरं पितुर्मम। परिष्वज्य महाभागा प्रविष्टा हव्यवाहनम् १५ ततो मनोरथं सत्यं पितुर्नारायणं प्रति। करोमीति तमेवाहं हृदयेन समुद्वहे १६ इति प्रतिज्ञामारुह्य चरामि विपुलं तपः। एतत्ते सर्वमाख्यातं मया राक्षसपुंगव १७ नारायणो मम पतिर्न त्वन्यः पुरुषोत्तमात्। आश्रये नियमं घोरं नारायणपरीप्सया १८ विज्ञातस्त्वं हि मे राजन्गच्छ पौल-

---

" अतुलतेजानें युक्त असलेला कुशध्वजनामक ब्रह्मर्षि माझा पिता होय. तो श्रीमान् महर्षि बृहस्पतीचा पुत्र असून बुद्धीनेंही बृहस्पतीची बरोबरी करणारा आहे ८. तो महात्मा नेहेमीं वेदाभ्यास करीत असतांना त्याच्यापासून मज वाङ्मयी कन्येची उत्पत्ति झाली. नामानें मी वेदवती ह्मणून प्रसिद्ध आहें ९ तदनंतर गंधर्वांसहवर्तमान देव, यक्ष, राक्षस आणि पन्नग हेही माझ्या पित्याकडे जाऊन मला 'मागणी घालूं लागले १०. परंतु, हे राक्षसाधिपते, त्यांना माझ्या पित्यानें मला अर्पण केलें नाहीं. हे महापराक्रमी राक्षसाधिपते, ह्याचें कारण काय तें मी तुला सांगतें; तूं श्रवण कर ११. सुरेश्वर त्रैलोक्याधिपति विष्णु जामाता ह्मणून माझ्या पित्याला अभिमत होता आणि ह्मणून त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणालाही मला देण्याविषयीं माझ्या पित्याची १२ इच्छा नाहीं. त्या विष्णूलाच अर्पण करण्याची त्याची इच्छा आहे. हें श्रवण केल्यानंतर सामर्थ्यामुळें गर्विष्ठ झालेला शंभुनामक दैत्यांचा राजा क्रुद्ध झाला १३ आणि रात्रीं माझा पिता निद्रिस्थ असतांना त्या दुष्टानें त्याची हिंसा केली १४ व नंतर माझी महाभाग्यवती दीन माता माझ्या पित्याच्या त्या शरीराला आलिंगन देऊन अग्नीमध्यें प्रविष्ट झाली १५. तेव्हांपासून विष्णुसंबंधानें पित्याचा मनोरथ परिपूर्ण करण्याची माझी इच्छा आहे आणि अंतःकरणापासून मी त्यालाच वरीत आहें १६. सारांश, ही प्रतिज्ञा शेवटास नेण्याकरितां मी विपुल तप करीत आहे. हे राक्षसश्रेष्ठा, हें सर्व मी तुला कथन केलें आहे १७. नारायण हा माझा पति होय; त्या पुरुषोत्तमाशिवाय दुसरा कोणी माझा पति

स्त्यनन्दन । जानामि तपसा सर्वं त्रैलोक्ये यद्धि वर्तते १९ सोऽब्रवीद्ब्राषणो भूयस्तां कन्यां सुमहाव्रताम् । अवरुह्य विमानाग्रात्कन्दर्पशरपीडितः २० अवलिप्तासि सुश्रोणि यस्यास्ते मतिरीदृशी । वृद्धानां मृगशावाक्षि भ्राजते पुण्यसंचयः २१ त्वं सर्वगुणसंपन्ना नार्हसे वक्तुमीदृशम् । त्रैलोक्यसुन्दरी भीरु यौवनं तेऽतिवर्तते २२ अहं लङ्कापतिर्भद्रे दशग्रीव इति श्रुतः । तस्य मे भव भार्या त्वं भुङ्क्ष्व भोगान्यथासुखम् २३ कश्च तावदसौ यं त्वं विष्णुरित्यभिभाषसे । वीर्येण तपसा चैव भोगेन च बलेन च २४ स मया नो समो भद्रे यं त्वं कामयसेऽङ्गने ॥ इत्युक्तवति तस्मिंस्तु वेदवत्यथ साऽब्रवीत् । मा मैवमिति सा कन्या तमुवाच निशाचरम् २५ त्रैलोक्याधिपतिं विष्णुं सर्वलोकनमस्कृतम् । त्वदृते राक्षसेन्द्रान्यः कोऽवमन्येत बुद्धिमान् २६ एवमुक्तस्तया तत्र वेदवत्या निशाचरः । मूर्धजेषु तदा कन्यां कराग्रेण परामृशत् २७ ततो वेदवती क्रुद्धा केशान्हस्तेन साऽच्छिनत् । असिर्भूत्वा करस्तस्याः केशांश्छिन्नांस्तदाकरोत् २८ मा

---

नाहीं; नारायणाच्या प्राप्तीकरितां मीं घोर तपश्चर्येचें अवलंबन केलें आहे १८. हे राजा, पौलस्त्यनंदना मीं तुला ओळखिलें. तूं जा. त्रैलोक्यामध्यें जें कांहीं चालत आहे तें सर्व तपश्चर्येनें मी जाणीत आहें" १९. ह्यानंतर मदनबाणाच्या योगानें पीडित झालेला तो रावण विमानांतून खालीं उतरला आणि त्या महातपस्विनी कन्येला पुनरपि ह्मणाला २०. "हे सुंदरि, तुला गर्व झाला आहे आणि ह्मणूनच तुझी अशा प्रकारची बुद्धि झाली आहे. हे मृगशावाक्षि, पुण्यसंचय करणें वृद्धांनाच शोभत असतें २१. सर्वगुणसंपन्न असलेल्या तुला अशा प्रकारचें भाषण करणें योग्य नाहीं. हे विनयसंपन्न, तूं त्रैलोक्यामध्यें सुंदर आहेस व तुझें यौवन फुकट जात आहे २२. हे भद्रे, दशग्रीव ह्मणून प्रसिद्ध असलेला मी लंकाधिपति आहें, त्या माझी तूं भार्या हो आणि भोग्य वस्तूंचा तूं यथेष्ट उपभोग घे २३. विष्णु ह्मणून ज्याला तूं ह्मणत आहेस तो हा कोण? हे स्त्रिये, हे कल्याणि, ज्याची तूं इच्छा करीत आहेस तो वीर्य, मद, बल व भोग ह्यांमध्यें माझी बरोबरी करणारा नाहीं" २४. ह्याप्रमाणें त्यानें भाषण केलें असतां त्या वेदवतीनें त्याला उत्तर दिलें. "छे छे ! असें बोलूं नकोस". असें सांगून ती कन्या त्या राक्षसाला ह्मणाली २५ "हे राक्षसाधिपते, तुझ्यावांचून कोण बरें विचारी पुरुष सर्व लोकांना पूज्य अशा त्रैलोक्याधिपति विष्णूचा अवमान करील ?" २६. ह्याप्रमाणें त्या वेदवतीनें त्या राक्षसाला सांगितलें असतां त्यानें आपल्या हातानें त्या कन्येचे केश धरिले २७. तदनंतर वेदवती क्रुद्ध झाली आणि आपल्या हातानें तिनें केश तोडून टाकिले. सारांश, तिचा हातच खड्ग बनून

ज्वलन्तीव रोषेण दहन्तीव निशाचरम् । उवाचाग्निं समाधाय मरणाय कृतत्वरा २९ धर्षितायास्त्वयानार्य न मे जीवितमिष्यते । रक्षस्तस्मात्प्रवेक्ष्यामि पश्यतस्ते हुताशनम् ३० यस्मात्तु धर्षिता चाहं त्वया पापात्मना वने । तस्मात्तव वधार्थं हि समुत्पत्स्याम्यहं पुनः ३१ न हि शक्यः स्त्रिया हन्तुं पुरुषः पापनिश्चयः । शापे त्वयि मयोत्सृष्टे तपसश्च व्ययो भवेत् ३२ यदि त्वस्ति मया किंचित्कृतं दत्तं हुतं तथा । तस्मात्त्वयोनिजा साध्वी भवेयं धर्मिणः सुता ३३ एवमुक्त्वा प्रविष्टा सा ज्वलितं जातवेदसम् । पपात च दिवो दिव्या पुष्पवृष्टिः समन्ततः ३४ सैषा जनकराजस्य प्रसूता तनया प्रभो । तव भार्या महाबाहो विष्णुस्त्वं हि सनातनः ३५ पूर्वं क्रोधहतः शत्रुर्ययासौ निहतस्तया । उपाश्रयित्वा शैलाभस्तव वीर्यममानुषम् ३६ एवमेषा महाभागा मर्त्येषूत्पत्स्यते पुनः । क्षेत्रे हलमुखोत्कृष्टे वेद्यामग्निशिखोपमा ३७ एषा वेदवती नाम पूर्वमासीत्कृते युगे । त्रेतायुगमनुप्राप्य

---

त्यानें तिचे केश तोडून टाकिले २८. क्रोधानें जशी कांहीं जळतच असलेली, राक्षसाला जशी कांहीं जाळीतच असलेली व सत्वर मरणाला तयार झालेली ती वेदवती अग्नि प्रज्वलित करून त्याला ह्मणाली २९ " हे दुष्टा, तूं माझ्या अंगावर हात टाकिल्यामुळें मला आतां जगण्याची इच्छा नाहीं. तस्मात्, हे राक्षसा मी तुझ्यासमक्ष अग्नीमध्यें प्रवेश करितें ३०. ज्याअर्थीं वनामध्यें तूं दुरात्म्यानें माझ्या अंगावर हात टाकिला आहेस त्याअर्थीं तुझ्या वधाकरितां मी पुनरपि उत्पन्न होईन ३१. पापबुद्धि पुरुषाचा वध मज स्त्रीच्या हातून होणें शक्य नाहीं. कारण, मी तुला शाप दिला असतां माझ्या तपाचा व्यय होईल. ३२ मी जर कांहीं तप केलें असेल, जर कांहीं दान दिलें असेल आणि जर कांहीं हवन केलें असेल तर त्या पुण्याच्या योगानें एका धर्मनिष्ठ पुरुषाची मी अयोनिसंभव साध्वी कन्या होईन" ३३. ह्याप्रमाणें त्याला सांगून ती वेदवती कन्या प्रज्वलित अग्नीमध्यें प्रविष्ट झाली असतां आकाशांतून सर्व बाजूंस दिव्य पुष्पवृष्टि झाली ३४. हे प्रभो रामा, ती ही जनकराजाची कन्या ह्मणून उत्पन्न झाली आहे; ती तुझी भार्या आहे आणि हे महापराक्रमी रामा, तूं सनातन विष्णु आहेस ३५. ह्या पर्वतप्राय शत्रूचा क्रोधानें पूर्वी तिनें वध केलाच होता आणि सांप्रतही तुझ्या अमानुष वीर्याचा आश्रय करून तिनें त्याचा पूर्ण वध केला आहे ३६. तेजानें वेदींतील अग्नीच्या ज्वालेप्रमाणें असलेली ही महाभाग्यवती सीता नांगराच्या फाळानें उकरलेल्या क्षेत्रामध्यें पुनरपि मर्त्यजनांत उत्पन्न होईल ३७. पूर्वी कृतयुगीं ही वेदवती ह्मणून प्रसिद्ध होती आणि त्रेतायु-

वधार्थं तस्य रक्षसः ३८ उत्पन्ना मैथिलकुले जनकस्य महात्मनः ३९
[ ७२३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे सप्तदशः सर्गः ॥ १७ ॥

प्रविष्टायां हुताशं तु वेदवत्यां स रावणः । पुष्पकं तु समारुह्य परिचक्राम मेदिनीम् १ ततो मरुत्तं नृपतिं यजन्तं सह दैवतैः । उशीरबीजमासाद्य ददर्श स तु रावणः २ संवर्तो नाम ब्रह्मर्षिः साक्षाद्भ्राता बृहस्पतेः । याजयामास धर्मज्ञः सर्वैर्देवगणैर्वृतः ३ दृष्ट्वा देवास्तु तद्रक्षो वरदानेन दुर्जयम् । तिर्यग्योनिं समाविष्टास्तस्य धर्षणभीरवः ४ इन्द्रो मयूरः संवृत्तो धर्मराजस्तु वायसः । कृकलासो धनाध्यक्षो हंसश्च वरुणोऽभवत् ५ अन्येष्वपि गतेष्वेवं देवेष्वरिनिषूदन । रावणः प्राविशद्यज्ञं सारमेय इवाशुचिः ६ तं च राजानमासाद्य रावणो राक्षसाधिपः । प्राह युद्धं प्रयच्छेति निर्जितोऽस्मीति वा वद ७ ततो मरुत्तो नृपतिः को भवानित्युवाच तम् । अवहासं ततो मुक्त्वा रावणो वाक्यमब्रवीत् ८ अकुतूहलभावेन प्रीतोऽस्मि तव पार्थिवः । धनदस्यानुजं यो मां नावगच्छसि रावणम् ९ त्रिषु लोकेषु

---

गामध्यें त्या राक्षसाच्या वधाकरितां मैथिलकुलामध्यें महात्म्या जनकाची कन्या ह्या नात्यानें उत्पन्न झाली आहे ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

वेदवती अग्नीमध्यें प्रविष्ट झाल्यानंतर रावण पुष्पकविमानामध्यें आरूढ होऊन पृथ्वीपर्यटन करूं लागला १. त्यावेळीं उशीरबीजनामक देशामध्यें मरुत्त राजा देवांसहवर्तमान याग करीत असतांना त्या रावणानें त्याला अवलोकन केलें २. बृहस्पतीचा प्रत्यक्ष भ्राता जो संवर्तनामक ब्रह्मर्षि तो त्याचा पुरोहित होता. तो संवर्त धर्मवेत्ता असून सर्व देवगणांनीं परिवेष्टित होता. ३. वरप्रदानानें अजिंक्य झालेल्या त्या राक्षसाला अवलोकन करितांक्षणीं त्याचा हल्ला होईल ह्मणून भीत असलेल्या देवांनीं तिर्यग्योनीमध्यें प्रवेश केला ४. इंद्र मयूरपक्षी झाला; धर्मराज यम काकपक्षी बनला; धनाध्यक्ष कुबेरानें सरड्याचें रूप धारण केलें आणि वरुणानें हंसाचें रूप स्वीकारिलें ५. हे शत्रुनाशका, ह्याप्रमाणें इतर देवांनींही पशुपक्ष्यांचीं रूपें धारण केलीं असतां अशुचि श्वानाप्रमाणें रावण त्या यज्ञमंडपामध्यें प्रविष्ट झाला ६ आणि त्या मरुत्तराजासमीप गेल्यानंतर 'युद्धाला ये अथवा पराजित झालों असें ह्मण.' असें त्या राक्षसाधिपति रावणानें त्याला सांगितलें असतां ७ 'आपण कोण' ह्मणून मरुत्तराजानें त्याला विचारिलें. तेव्हां हास्य करून रावण त्याला ह्मणाला ८ "हे राजा,

कोऽन्योऽस्ति यो न जानाति मे बलम् । भ्रातरं येन निर्जित्य विमानमिदमाहृतम् १० ततो मरुत्तः स नृपस्तं रावणमथाब्रवीत् । धन्यः खलु भवान्येन ज्येष्ठो भ्राता रणे जितः ११ न त्वया सदृशः श्लाघ्यस्त्रिषु लोकेषु विद्यते । कं त्वं प्राक्केवलं धर्मं चरित्वा लब्धवान्वरम् १२ श्रुतपूर्वं हि न मया भाससे यादृशं स्वयम् । तिष्ठेदानीं न मे जीवन्प्रतियास्यसि दुर्मते १३ अद्य त्वां निशितैर्बाणैः प्रेषयामि यमक्षयम् । ततः शरासनं गृह्य सायकांश्च नराधिपः १४ रणाय निर्ययौ क्रुद्धः संवर्तो मार्गमावृणोत् । सोऽब्रवीत्स्नेहसंयुक्तं मरुत्तं तं महानृषिः १५ श्रोतव्यं यदि मद्वाक्यं संप्रहारो न ते क्षमः । माहेश्वरमिदं सत्रमसमाप्तं कुलं दहेत् १६ दीक्षितस्य कुतो युद्धं क्रोधित्वं दीक्षिते कुतः । संशयश्च जये नित्यं राक्षसश्च सुदुर्जयः १७ स निवृत्तो गुरोर्वाक्यान्मरुत्तः पृथिवीपतिः । विसृज्य सशरं चापं स्वस्थो मखमुखोऽभवत् १८ ततस्तं निर्जितं मत्वा घोषयामास वै शुकः । रावणो

---

मला अवलोकन केल्यानंतरही तूं विस्मयचकित झाला नाहींस ह्याबद्दल मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. कारण, मी कुबेराच्या पाठचा भ्राता रावण असतांना तुझ्या गांवींही नाहीं ९. अरे, ज्यानें भ्रात्याचा पराजय करून हें विमान हरण करून आणिलें त्या माझें सामर्थ्य न जाणणारा त्रैलोक्यामध्यें तुझ्यावांचून दुसरा कोण बरें आहे ?" १०. तदनंतर तो मरुत्तराजा त्या रावणाला ह्मणाला "ज्यानें आपला ज्येष्ठ भ्राता रणामध्यें जिंकिला त्या तुझी खरोखर धन्य असो ११. तुझ्यासारिखा त्रैलोक्यामध्यें स्तुतीला पात्र होणारा दुसरा कोणीही नाहीं. पूर्वी केवल तपश्चर्या करून तूं कोणता वर प्राप्त करून घेतला आहेस ? १२. ज्या प्रकारचा तूं मला दिसत आहेस त्याप्रकारचा पूर्वी तूं मला कधींही दिसला नाहींस. आतां उभा रहा, हे दुर्बुद्धे, माझ्या हातून तूं आतां जिवंत परत जाणार नाहींस १३. आज तीक्ष्ण बाणांच्या योगानें मी तुला यमसदनीं पाठवितों". तदनंतर तो मरुत्त राजा क्रुद्ध होऊन व हातामध्यें धनुर्बाण घेऊन संग्रामाकरितां निघाला असतां संवर्तानें त्याचा मार्ग अडवून धरिला आणि तो महर्षि प्रेमानें त्या मरुत्तराजाला ह्मणाला १४, १५ "माझा उपदेश ऐकावयाचा असेल तर प्रहार करणें तुला योग्य नाहीं. हें माहेश्वर सत्र समाप्त न झाल्यास कुल दग्ध करील १६. अरे, दीक्षा घेतलेल्या पुरुषाला युद्धाचा अधिकार कोठून असणार! आणि दीक्षा घेतल्यानंतर रागीटपणा तरी कोठून योग्य ठरणार ? शिवाय, युद्धामध्यें जयाविषयीं संशय हा नेहेमीं ठरलेलाच असून राक्षस अत्यंत दुर्जय आहे" १७. ह्याप्रमाणें गुरूनें सांगितलें असतां तो मरुत्त राजा परत फिरला; बाणासहवर्तमान धनुष्य

जयतीत्युच्चैर्हर्षान्नादं विमुक्तवान् १९ तान्भक्षयित्वा तत्रस्थान्महर्षीन्यज्ञमागतान् । वितृप्तो रुधिरैस्तेषां पुनः संप्रययौ महीम् २० रावणे तु गते देवाः सेन्द्राश्चैव दिवौकसः । ततः स्वां योनिमासाद्य तानि सत्त्वानि चाब्रुवन् २१ हर्षात्तदाब्रवीदिन्द्रो मयूरं नीलबर्हिणम् । प्रीतोऽस्मि तव धर्मज्ञ भुजङ्गाद्धि न ते भयम् २२ इदं नेत्रसहस्रं तु यत्तद्बर्हे भविष्यति । वर्षमाणे मयि मुदं प्राप्स्यसे प्रीतिलक्षणम् २३ एवमिन्द्रो वरं प्रादान्मयूरस्य सुरेश्वरः २४ नीलाः किल पुरा बर्हा मयूराणां नराधिप । सुराधिपाद्वरं प्राप्य गताः सर्वेऽपि बर्हिणः २५ धर्मराजोऽब्रवीद्राम प्राग्वंशे वायसं प्रति । पक्षिंस्तवास्मि सुप्रीतः प्रीतस्य वचनं शृणु २६ यथान्ये विविधै रोगैः पीड्यन्ते प्राणिनो मया । ते न ते प्रभविष्यन्ति मयि प्रीते न संशयः २७ मृत्युतस्ते भयं नास्ति वरान्मम विहङ्गम । यावत्त्वां न वधिष्यन्ति नरास्तावद्भविष्यसि २८ ये च मद्विषयस्था वै मानवाः क्षुधया-

---

टाकून देऊन स्वस्थ झाला आणि यज्ञाकडे लक्ष्य लावून बसला १८. तदनंतर त्या राजाचा पराजय झाला असें समजून ' रावणाचा जय झाला ' अशी हर्षपूर्वक उच्चस्वरानें शुकानें गर्जना केली १९; आणि तदनंतर यज्ञाकरितां आलेल्या तेथील महर्षींना भक्षण करून त्यांच्या रक्तामुळें अतिशय तृप्त झालेला तो रावण पुनरपि पृथ्वीवर संचार करूं लागला २० व रावण गेल्यानंतर स्वर्गवासी देव आपापलें रूप धारण करून इंद्रासहवर्तमान त्या त्या प्राण्याशीं बोलूं लागले २१. नीलवर्ण पिसाऱ्यानें युक्त असलेल्या मयूरपक्ष्याला इंद्र आनंदानें ह्मणाला ' हे धर्मवेत्त्या, मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें २२. हे जे माझे हजार नेत्र आहेत ते तुझ्या पिसाऱ्यावर रहातील आणि मी वृष्टि करूं लागलों असतां प्रेमसूचक आनंद तुला प्राप्त होत जाईल ' २३. ह्याप्रमाणें देवराज इंद्रानें मयूरपक्ष्याला वर दिला २४. हे प्रजाधिपते, पूर्वी खरोखर मयूरपक्ष्यांचीं पिसें केवल नीलवर्ण होतीं. परंतु, देवराज इंद्रापासून वर प्राप्त झाल्यानंतर सर्वही मयूरपक्ष्यांना नेत्रयुक्त पिसें प्राप्त झालीं २५. हे रामा, प्राग्वंशावर बसलेल्या काकपक्ष्याला धर्मराज ह्मणाला " हे पक्ष्या, मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. ह्यास्तव, प्रसन्न झालेल्या माझें भाषण तूं श्रवण कर २६. इतर प्राण्यांना ज्याप्रमाणें मी नाना प्रकारच्या रोगांनीं पीडा देत असतो त्याप्रमाणें माझ्या हातून तुला, मी तुझ्यावर प्रसन्न झालों असल्यामुळें, रोगाची पीडा होणार नाहीं हें निःसंशय आहे २७. हे पक्ष्या, माझ्या वरामुळें स्वाभाविक मृत्यूचें तुला भय नाहीं. जोंपर्यंत मनुष्यादि इतर प्राणी वध करणार नाहींत तोंपर्यंत तूं कायम रहाशील २८. माझ्या प्रदेशांत राहणारे जे कांहीं क्षुधेनें पीडित

र्दिताः । त्वयि भुक्ते सुतृप्तास्ते भविष्यन्ति सबान्धवाः २९ वरुणस्त्वब्रवी-
द्धंसं गङ्गातोयविचारिणम् । श्रूयतां प्रीतिसंयुक्तं ततः पत्ररथेश्वरम् ३०
वर्णो मनोरमः सौम्यश्चन्द्रमण्डलसंनिभः । भविष्यति तवोदग्रः शुद्धफेन-
समप्रभः ३१ मच्छरीरं समासाद्य कान्तो नित्यं भविष्यसि । प्राप्स्यसे
चातुलां प्रीतिमेन्तन्मे प्रीतिलक्षणम् ३२ हंसानां हि पुरा राम न वर्णः
सर्वपाण्डुरः । पक्षा नीलाग्रसंवीताः क्रोडाः शष्पाग्रनिर्मलाः ३३ अथा-
ब्रवीद्वैश्रवणः कृकलासं गिरौ स्थितम् । हैरण्यं संप्रयच्छामि वर्णं प्रीत-
स्तवाप्यहम् ३४ सद्रव्यं च शिरो नित्यं भविष्यति तवाक्षयम् । एष काञ्चनको
वर्णो मत्प्रीत्या ते भविष्यति ३५ एवं दत्त्वा वरांस्तेभ्यस्तस्मिन्यज्ञोत्सवे
सुराः । निवृत्ते सह राज्ञा ते पुनः स्वभवनं गताः ३६ [ ७५९ ] इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डेऽष्टादशः सर्गः ॥ १८ ॥

अथ जित्वा मरुत्तं स प्रययौ राक्षसाधिपः । नगराणि नरेन्द्राणां
युद्धकाङ्क्षी दशाननः १ समासाद्य तु राजेन्द्रान्महेन्द्रवरुणोपमान् । अब्र-
वीद्राक्षसेन्द्रस्तु युद्धं मे दीयतामिति २ निर्जिताः स्मेति वा ब्रूत एष मे

---

झाले असतील ते तुझें भोजन झालें असतां बांधवांसहवर्तमान अत्यंत तृप्त होतील "२९. तदनंतर गंगोदकामध्यें संचार करणाऱ्या पक्षिराज हंसाला वरुण ह्मणाला " माझें सप्रेम भाषण तूं श्रवण कर ३०. शुद्ध फेसाप्रमाणें ज्याची कांति आहे आणि चंद्र-मंडलाप्रमाणें ज्याचें तेज आहे असा मनोहर, सौम्य व उत्कृष्ट वर्ण तुला प्राप्त होईल ३१. मद्देहरूप जलाच्या आश्रयानें तूं नेहमीं मनोहर रहाशील आणि माझ्या प्रेमाचें लक्षण ह्मणून अतुल आनंद तुला प्राप्त होईल " ३२. हे रामा, पूर्वीं हंसांचा वर्ण सर्व पांढरा नव्हता; त्यांच्या पक्षांचीं अग्रें नीलवर्ण असत आणि वक्षःस्थलें कोमल तृणा-प्रमाणें श्यामवर्ण असत ३३. तदनंतर वैश्रवण पर्वतावर स्थित असलेल्या सरडाला ह्मणाला " मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें; ह्मास्तव, तुलाही मी सुवर्णतुल्य वर्ण देतों ३४. तुझें मस्तक नेहमीं सुवर्णवर्ण राहील. सारांश, माझ्या प्रेमामुळें हा सुवर्ण-वर्ण तुला प्राप्त होईल " ३५. ह्याप्रमाणें देवांनीं त्या प्राण्यांना वर दिले आणि तो यज्ञोत्सव समाप्त झाल्यानंतर राजांसहवर्तमान ते पुनरपि आपआपल्या घरीं चालते झाले ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ १८ ॥

ह्याप्रमाणें मरुत्त राजाला जिंकिल्यानंतर तो राक्षसाधिपति दशानन युद्धाच्या इच्छेनें राजांचीं नगरें हिंडूं लागला १; आणि इंद्रवरुणतुल्य महाराजांकडे जाऊन तो राक्ष-

हि सुनिश्चयः । अन्यथा कुर्वतामेवं मोक्षो नैवोपपद्यते ३ ततस्त्वभीरवः प्राज्ञाः पार्थिवा धर्मनिश्चयाः । मन्त्रयित्वा ततोऽन्योन्यं राजानः सुमहाबलाः ४ निर्जिताः स्मेत्यमाषन्त ज्ञात्वा वरबलं रिपोः । दुष्कन्तः सुरथो गाधिर्गयो राजा पुरूरवाः ५ एते सर्वेऽब्रुवंस्तात निर्जिताः स्मेति पार्थिवाः। अथायोध्यां समासाद्य रावणो राक्षसाधिपः ६ सुगुप्तामनरण्येन शक्रेणेवामरावतीम् । स तं पुरुषशार्दूलं पुरन्दरसमं बले ७ प्राह राजानमासाद्य युद्धं देहीति रावणः । निर्जितोऽस्मीति वा ब्रूहि त्वमेवं मम शासनम् ८ अयोध्याधिपतिस्तस्य श्रुत्वा पापात्मनो वचः । अनरण्यस्तु संक्रुद्धो राक्षसेन्द्रमथाब्रवीत् ९ दीयते द्वन्द्वयुद्धं ते राक्षसाधिपते मया। सन्तिष्ठ क्षिप्रमायत्तो भव चैवं भवाम्यहम् १० अथ पूर्वं श्रुतार्थेन निर्जितं सुमहद्बलम् । निष्क्रामत्तन्नरेन्द्रस्य बलं रक्षोवधोद्यतम् ११ नागानां दशसाहस्रं वाजिनां नियुतं तथा । रथानां बहुसाहस्रं पत्तीनां च नरोत्तम १२ महीं संछाद्य निष्क्रान्तं सपदातिरथं रणे । ततः प्रवृत्तं सुमहद्युद्धं युद्धविशारद १३

---

साधिपति त्यांना ह्मणाला " माझ्याशीं युद्ध करा; अथवा पराजित झालों असें तरी ह्मणा. दोहोंपैकीं एक कांहीं तरी झालेंच पाहिजे २ हा माझा पूर्ण निश्चय झालेला आहे. ह्याला अनुसरून जे वागणार नाहींत त्यांची माझ्या हातून सुटका होणार नाहीं " ३. तदनंतर शूर, अत्यंत महाबलाढ्य, प्राज्ञ आणि धर्मनिष्ठ असेही राजे एकमेकांचा विचार घेऊन ४ व शत्रूचें बल श्रेष्ठ आहे असें समजून ' आह्मी पराजित झालों, असें ह्मणाले. दुष्कंत, सुरथ, गाधि, गय व राजा पुरूरवा ५ हे सर्वही, बा रामा, ' आह्मी पराजित झालों ' असें ह्मणाले. तदनंतर राक्षसाधिपति रावण इंद्रानें रक्षिलेल्या अमरावती नगरीप्रमाणें अनरण्यराजानें उत्कृष्ट रीतीनें रक्षिलेल्या अयोध्यानगरीमध्यें आला आणि बलामध्यें इंद्राची बरोबरी करणाऱ्या त्या पुरुषश्रेष्ठ अनरण्यराजासमीप जाऊन तो रावण ह्मणाला " तूं माझ्याशीं युद्ध कर अथवा पराजित झालों असें तरी ह्मण. कारण, ह्याप्रमाणें माझा निश्चय झालेला आहे " ६, ७, ८. त्या दुरात्म्याचें तें भाषण श्रवण करितांक्षणीं अयोध्यापति अनरण्यराजा क्रुद्ध झाला आणि त्या राक्षसाधिपतीला ह्मणाला ९ ' हे राक्षसाधिपते, मी तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करितों; धीर धर. तूं सत्वर तयार हो आणि मीही ह्याप्रमाणें तयार होतों १०. असो. रावणाचा वृत्तांत समजतांक्षणीं पूर्वींच पराजित झाल्यासारिखें झालेलें जें त्या राजाचें अतिप्रचंड सैन्य तें तदनंतर राक्षसाच्या वधाविषयीं उद्युक्त होऊन बाहेर पडलें ११. दहा हजार गज, एक लक्ष अश्व आणि हे पुरुषोत्तमा, अनेक हजार रथ व पदाति बाहेर पडले १२

अनरण्यस्य नृपते राक्षसेन्द्रस्य चाद्भुतम् । तद्रावणबलं प्राप्य बलं तस्य महीपतेः १४ प्राणश्यत तदा सर्वं हव्यं हुतमिवानले । युद्ध्वा च सुचिरं कालं कृत्वा विक्रममुत्तमम् १५ प्रज्वलन्तं समासाद्य क्षिप्रमेवावशेषितम्। प्राविशत्संकुलं तत्र शलभा इव पावकम् १६ सोऽपश्यत्तन्नरेन्द्रस्तु नश्यमानं महाबलम् । महार्णवं समासाद्य वनापगशतं यथा १७ ततः शक्रधनुःप्रख्यं धनुर्विस्फारयन्स्वयम् । आससाद नरेन्द्रस्तं रावणं क्रोधमूर्च्छितः १८ अनरण्येन तेऽमात्या मारीचशुकसारणाः । प्रहस्तसहिता भग्ना व्यद्रवन्त मृगा इव १९ ततो बाणशतान्यष्टौ पातयामास मूर्धनि । तस्य राक्षसराजस्य इक्ष्वाकुकुलनन्दनः २० तस्य बाणाः पतन्तस्ते चक्रिरे न क्षतं क्वचित् । वारिधारा इवाभ्रेभ्यः पतन्त्यो गिरिमूर्धनि २१ ततो राक्षसराजेन क्रुद्धेन नृपतिस्तदा । तलेनाभिहतो मूर्ध्नि स रथान्निपपात ह २२ स राजा पतितो भूमौ विह्वलः प्रविवेपितः । वज्रदग्ध इवारण्ये

---

आणि पदाति व रथ ह्यांनीं युक्त असलेलें तें सैन्य पृथ्वी आच्छादित करून रणामध्यें निघालें असतां, हे युद्धनिपुण राजा, अनरण्य राजा व राक्षसाधिपति रावण ह्यांचें फारच मोठें अद्भुत युद्ध सुरू झालें. परंतु, रावणाच्या सामर्थ्याशीं गांठ पडतांक्षणीं त्या राजाचें तें सर्वही सैन्य अग्निमध्यें टाकिलेल्या हविर्द्रव्याप्रमाणें नष्ट झालें. नंतर अवशिष्ट राहिलेल्या कांहीं सैन्यानें पुष्कळ वेळपर्यंत त्याच्याशीं युद्ध केलें व उत्कृष्ट पराक्रमही करून दाखविला. परंतु, प्रज्वलित अग्नीसमीप येतांक्षणीं ज्याप्रमाणें पतंग नाश पावतात त्याप्रमाणें त्या रावणासमीप येतांक्षणीं तें सैन्य सत्वर नाश पावलें १३,१४, १५, १६ आणि जलानें भरलेल्या शेंकडों नद्या ज्याप्रमाणें महासागराला जाऊन पोंचतांक्षणीं नाहींशा होतात त्याप्रमाणें रावणाची गांठ पडतांक्षणीं नाश पावत असलेलें तें प्रचंड सैन्य राजानें अवलोकन केलें १७. तदनंतर इंद्रचापतुल्य असलेल्या आपल्या धनुष्याचा स्वतः टणत्कार करीत करीत क्रोधानें व्याप्त झालेला तो राजा रावणापाशीं आला १८ आणि अनरण्यानें मारीच, शुक, सारण व प्रहस्त ह्या अमात्यांचा पराजय केला असतां ते मृगाप्रमाणें धांवूं लागले १९. तदनंतर इक्ष्वाकुकुलाला आनंद देणाऱ्या त्या अनरण्यानें त्या राक्षसराजाच्या मस्तकावर आठशें बाण टाकिले २०; परंतु, मेघांपासून पर्वताच्या माथ्यावर पडणाऱ्या जलधारांप्रमाणें पडणाऱ्या त्या बाणांनीं त्या रावणाला कोठेंही जखम केली नाहीं २१. नंतर राक्षसराज रावणानें क्रुद्ध होऊन त्या राजाच्या मस्तकावर हस्ततलाचा प्रहार केला असतां तो रथांतून खालीं पडला २२; आणि वज्रप्रहारानें दग्ध होऊन गेलेला सालवृक्ष ज्याप्रमाणें अरण्यामध्यें पडतो त्याप्रमाणें

मालो निपतितो यथा २३ तं प्रहस्याब्रवीद्रक्ष इक्ष्वाकुं पृथिवीपतिम् । किमिदानीं फलं प्राप्तं त्वया मां प्रति युद्धयता २४ त्रैलोक्ये नास्ति यो द्वन्द्वं मम दद्यान्नराधिप । शङ्के प्रसक्तो भोगेषु न शृणोषि बलं मम २५ तस्यैवं ब्रुवतो राजा मन्दासुर्वाक्यमब्रवीत् । किं शक्यमिह कर्तुं वै कालो हि दुरतिक्रमः २६ नह्यहं निर्जितो रक्षस्त्वया चात्मप्रशंसिना । कालेनैव विपन्नोऽहं हेतुभूतस्तु मे भवान् २७ किं त्विदानीं मया शक्यं कर्तुं प्राणपरिक्षये । नह्यहं विमुखो रक्षो युध्यमानस्त्वया हतः २८ इक्ष्वाकुपरिभावित्वाद्वचो वक्ष्यामि राक्षस । यदि दत्तं यदि हुतं यदि मे सुकृतं तपः ॥ यदि गुप्ताः प्रजाः सम्यक्तदा सत्यं वचोऽस्तु मे २९ उत्पत्स्यते कुले ह्यस्मिन्निक्ष्वाकूणां महात्मनाम् । रामो दाशरथिर्नाम यस्ते प्राणान्हरिष्यति ३० ततो जलधरोदग्रस्ताडितो देवदुन्दुभिः । तस्मिन्नुदाहृते शापे पुष्पवृष्टिश्च खाच्च्युता ३१ ततः स राजा राजेन्द्र गतः स्थानं त्रिविष्टपम् ।

---

भूमीवर पडलेला तो राजा विह्वल होऊन कांपूं लागला २३. तेव्हां तो राक्षस हास्य करून त्या इक्ष्वाकुराजाला ह्मणाला " माझ्याशीं युद्ध करून सांप्रत तुला काय बरें फल प्राप्त झालें आहे ? २४. हे राजा, माझ्याशीं द्वंद्वयुद्ध करणारा त्रैलोक्यांतही कोणी नाहीं; परंतु, विषयोपभोगामध्यें तूं आसक्त असल्यामुळें माझें सामर्थ्यही तुझ्या कानावर आलें नाहीं अशी मला शंका येत आहे " २५. ह्याप्रमाणें तो राक्षस बोलूं लागला असतां मुमूर्षु होऊन पडलेला तो राजा त्याला ह्मणाला " ह्या प्रसंगीं आतां माझ्या हातून काय होणें शक्य आहे ? ( कांहींएक होणें शक्य नाहीं. कारण, ) कालाचें उल्लंघन करितां येणें शक्य नाहीं २६. हे राक्षसा, आत्मप्रशंसा करणाऱ्या तुझ्या हातून माझा पराजय झालेला नाहीं; कालानेंच मला पछाडिलें आहे आणि निमित्त मात्र तूं झाला आहेस २७. तथापि, प्राणांचाच नाश झाल्यानंतर आतां माझ्या हातून होणार तरी काय आहे ? हे राक्षसा, मी कांहीं पराङ्मुख झालों नाहीं. युद्ध करीत असतांनाच तूं माझा वध केला आहेस २८. हे राक्षसा, तूं जें माझ्याशीं भाषण केलेंस त्याच्या योगानें इक्ष्वाकुकुलाचा अवमान झाला असल्यामुळें मी तुला एवढें सांगून ठेवितों कीं, " मीं जर कांहीं दान दिलें असेल, कांहीं हवन केलें असेल, जर कांहीं चांगलें तप आचरिलें असेल आणि प्रजाजनांचें चांगल्या रीतीनें परिपालन केलें असेल तर माझें भाषण सत्य होईल २९. महात्म्या इक्ष्वाकूंच्या ह्या कुलामध्यें राम ह्मणून दशरथाचा पुत्र उत्पन्न होईल आणि तो तुझे प्राण हरण करील " ३०. असें त्यानें सांगितल्यानंतर मेघाप्रमाणें गंभीर असलेली देवांची नौबद झडूं लागली आणि तो शाप त्याच्या मुखांतून निघण्याबरो-

स्वर्गते च नृपे तस्मिन्राक्षसः सोऽपसर्पत ३२ [ ७९१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकिय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोनविंशः सर्गः॥१९॥

ततो वित्रासयन्मर्त्यान्पृथिव्यां राक्षसाधिपः । आससाद घने तस्मिन्नारदं मुनिपुङ्गवम् १ तस्याभिवादनं कृत्वा दशग्रीवो निशाचरः । अब्रवीत्कुशलं पृष्ट्वा हेतुमागमनस्य च २ नारदस्तु महातेजा देवर्षिरमितप्रभः । अब्रवीन्मेघपृष्ठस्थो रावणं पुष्पके स्थितम् ३ राक्षसाधिपते सौम्य तिष्ठ विश्रवसः सुत । प्रीतोऽस्म्यभिजनोपेत विक्रमैरूर्जितैस्तव ४ विष्णुना दैत्यघातैश्च गन्धर्वोरगधर्षणैः । त्वया समं विमर्दैश्च भृशं हि परितोषितः५ किंचिद्वक्ष्यामि तावत्तु श्रोतव्यं श्रोष्यसे यदि । तन्मे निगदतस्तात समाधिं श्रवणे कुरु ६ किमयं वध्यते तात त्वयाऽवध्येन दैवतैः । हत एव ह्ययं लोको यदा मृत्युवशं गतः ७ देवदानवदैत्यानां यक्षगन्धर्वरक्षसाम् । अवध्येन त्वया लोकः क्लेष्टुं योग्यो न मानुषः ८ नित्यं श्रेयसि संमूढं मह-

---

वर आकाशापासून पुष्पांचीही वृष्टि झाली ३१. तदनंतर, हे राजेंद्रा, त्या राजाला स्वर्गस्थान प्राप्त झालें आणि तो राजा स्वर्गलोकीं गेल्यानंतर तो राक्षसही तेथून निघून गेला ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकोणिसावा सर्ग समाप्त झाला ॥ १९ ॥

तदनंतर तो राक्षसाधिपति पृथ्वींतील मर्त्य जनांना पीडा देत देत घनपृष्ठावर असलेल्या मुनिश्रेष्ठ नारदाजवळ आला १; त्यानें त्याला अभिवंदन केलें आणि कुशलप्रश्न केल्यानंतर त्यानें त्याला आपल्या आगमनाचेंही कारण कळविलें २. तेव्हां अमित प्रभेनें युक्त असलेला महातेजस्वी देवर्षि नारद स्वतः मेघपृष्ठावर असतांना पुष्पकविमानामध्यें स्थित असलेल्या रावणाला ह्मणाला ३ " हे विनयसंपन्न राक्षसाधिपते, हे विश्रवस्पुत्रा, हे कुलीन, उभा रहा; तुझ्या ह्या उज्वल पराक्रमामुळें मी तुजवर प्रसन्न झालों आहें ४; विष्णूनें दैत्यांचा वध केल्यामुळें मी संतुष्ट झालों आहें आणि गंधर्व व उरग ह्यांच्यावर तूं हल्ले केले असून तुझ्यासहवर्तमान त्यांची युद्धें झालीं असल्यामुळें तुझ्यावरही मी अतिशय संतुष्ट झालों आहे ५. परंतु, ऐकून घेशील तर मला कांहीं थोडें सांगावयाचें आहे. बा रावणा, तें मी सांगत असतांना तूं लक्ष्यपूर्वक ऐक ६. बा रावणा, देवांनाही जर तूं अवध्य आहेस तर ह्या मानवांचा वध करीत आहेस हें काय ? हा मृत्यलोक ज्याअर्थी मृत्यूच्या अधीन झाला आहे त्याअर्थी त्याचा वध झालेलाच आहे ७. देव, दानव, दैत्य, यक्ष, गंधर्व व राक्षस ह्यांना तूं अवध्य असतांना मानुष लोकांना क्लेश देणें तुला योग्य नाहीं ८. कल्या-

द्भिर्व्यसनैर्वृतम् । हन्यात्कस्तादृशं लोकं जराव्याधिशतैर्युतम् ९ तैस्तैर-निष्टोपगमैरजस्रं यत्र कुत्र कः । मतिमान्मानुषे लोके युद्धेन प्रणयी-भवेत् १० क्षीयमाणं दैवहतं क्षुत्पिपासाजरादिभिः । विषादशोकसंमूढं लोकं त्वं क्षपयस्व मा ११ पश्य तावन्महाबाहो राक्षसेश्वर मानुषम् । मूढमेवं विचित्रार्थं यस्य न ज्ञायते गतिः १२ क्वचिद्वादित्रनृत्यादि सेव्यते मुदितैर्जनैः । रुद्यते चापरैरार्तैर्धाराश्रुनयनाननैः १३ मातापितृसुतस्नेह-भार्याबन्धुमनोरमैः । मोहितोऽयं जनो ध्वस्तः क्लेशं स्वं नावबुध्यते १४ तत्किमेवं परिक्लिश्य लोकं मोहनिराकृतम् । जित एव त्वया सौम्य मर्त्य-लोको न संशयः १५ अवश्यमेभिः सर्वैश्च गन्तव्यं यमसादनम् । तन्नि-गृह्णीष्व पौलस्त्य यमं परपुरंजय १६ तस्मिञ्जिते जितं सर्वं भवत्येव न संशयः १७ एवमुक्तस्तु लङ्केशो दीप्यमानं स्वतेजसा । अब्रवीन्नारदं तत्र

---

ह्यासंबंधानें सर्वदा अत्यंत मूढ, नेहमींच मोठ्या मोठ्या संकटांमध्यें सांपडलेल्या व शेंकडों व्याधींनीं युक्त असलेल्या अशा प्रकारच्या लोकांचा वध कोण बरें करणार आहे ? ९. अनेक प्रकारच्या संकटांनीं ठिकठिकाणीं पीडित होऊन गेलेल्या मनुष्यांशीं कोण बरें विचारी पुरुष युद्ध करण्याचें मनामध्यें आणील ? १०. दैवानें पछाडिलेल्या, क्षुधा, तृषा, व जरा इत्यादिकांनीं क्षीण होत असलेल्या आणि खेद व शोक ह्यांच्या योगानें कांहीं-एक सुचेनासें झालेल्या लोकांचा तूं नाश करूं नकोस ११. हे महापराक्रमी राक्षसा-धिपते, ज्यांची गति कांहींएक समजत नाहीं आणि नानाप्रकारच्या क्षुद्र सुखांविषयीं जे आसक्त आहेत अशा मर्त्य जनांवर तूं आपली कृपादृष्टि ठेव १२. ह्या मनुष्यलोकामध्यें कोठेंकोठें लोक आनंदानें नृत्य, वाद्य इत्यादिकांचें अवलंबन करीत असतात आणि कोठें कोठें इतर दुःखित लोक नेत्र व मुखें हीं अश्रुधारांनीं भरून गेलीं असतांना रुदन करीत असतात १३. सारांश, माता, पिता, पुत्र, स्नेही, भार्या व बंधु ह्यांसंबंधानें असणारे जे मनोरथ त्यांच्या योगानें हे मर्त्यजन मोहित होऊन गेले असल्यामुळें नाश पावले असून परलोकीं भोगावें लागणारें दुःख त्यांना स्वतः समजत नाहीं १४. सारांश, मोहानें आधींच नाश करून टाकिलेल्या मर्त्य जनांना ह्याप्रमाणें क्लेश देऊन तुला काय बरें उप-योग आहे? हे सौम्या, तूं मर्त्यलोक जिंकिलाच आहेस ह्यांत संशयच नाहीं १५. कारण, ह्या सर्वांना, यमलोकीं अवश्य गेलेंच पाहिजे. तस्मात् , हे शत्रुसमूह जिंकणाऱ्या पौलस्त्या, तूं यमाचा पराजय कर १६. कारण, त्याचा पराजय झाला असतां सर्व कांहीं जिंकिल्यासारिखें होईल ह्यांत संशय नाहीं " १७. ह्याप्रमाणें नारदांनीं सांगि-तलें असतां स्वतःच्या तेजानें झळकत असलेल्या त्या नारदांना तो लंकाधिपति अभि-

संप्रहस्याभिवाद्य च १८ महर्षे देवगन्धर्वविहार समरप्रिय। अहं समु-
द्यतो गन्तुं विजयार्थं रसातलम् १९ ततो लोकत्रयं जित्वा स्थाप्य नागा-
न्सुरान्वशे। समुद्रममृतार्थं च मथिष्यामि रसालयम् २० अथाब्रवीद्द-
शग्रीवं नारदो भगवानृषिः। क खल्विदानीं मार्गेण त्वयेहान्येन गम्यते २१
अयं खलु सुदुर्गम्यः प्रेतराजपुरं प्रति। मार्गो गच्छति दुर्धर्ष यमस्यामित्रक-
र्शन २२ स तु शारदमेघाभं हासं मुक्त्वा दशाननः। उवाच कृतमित्येव वचनं
चेदमब्रवीत् २३ तस्मादेवं महाब्रह्मन् वैवस्वतवधोद्यतः। गच्छामि दक्षि-
णामाशां यत्र सूर्यात्मजो नृपः २४ मया हि भगवन्क्रोधात्प्रतिज्ञातं रणा-
र्थिना। अवजेष्यामि चतुरो लोकपालानिति प्रभो २५ तदिह प्रस्थितोऽहं
वै पितृराजपुरं प्रति। प्राणिसंक्लेशकर्तारं योजयिष्यामि मृत्युना २६ एव-
मुक्त्वा दशग्रीवो मुनिं तमभिवाद्य च। प्रययौ दक्षिणामाशां प्रविष्टः सह
मन्त्रिभिः २७ नारदस्तु महातेजा मुहूर्तं ध्यानमास्थितः। चिन्तयामास
विप्रेन्द्रो विधूम इव पावकः २८ येन लोकास्त्रयः सेन्द्राः क्लिश्यन्ते सच-

---

वंदनपूर्वक हास्य करून ह्मणाला १८ "हे महर्षे, हे देवगंधर्वांमध्यें संचार करणाऱ्या, हे युद्धप्रिय, मी जय मिळविण्याकरितां रसातलाला जाण्यास उद्युक्त झालों आहें १९. त्रैलोक्य जिंकून नागांना व देवांना स्वाधीन करून घेतल्यानंतर अमृताचें निधान असलेल्या समुद्राचें मी अमृताकरितां मंथन करीन" २०. ह्यानंतर भगवान् नारदमुनि रावणाला ह्मणाले "खरोखर सांप्रत तूं दुसऱ्या मार्गानें कोणीकडे जात आहेस? २१. हे अजिंक्य, हे शत्रुनाशका, प्रेतराज जो यम त्याच्या नगराला हा मार्ग जात आहे आणि ह्या मार्गानें गमन होणें फारच दुर्घट आहे" २२. ह्यानंतर शरदृतूंतील मेघाप्रमाणें ज्याची कांति आहे अशा नारदमुनींना हास्यपूर्वक तो रावण ह्मणाला "आपलें ह्मणणें मीं मान्य के २३ हे महाब्रह्मर्षे, आपल्या ह्मणण्याप्रमाणें मी यमाच्या वधाकरितां उद्युक्त झालों आहें आणि सूर्यपुत्र यम जिकडे आहे त्या दक्षिणदिशेस मी निघालों आहें २४. हे भगवन्, हे प्रभो, मला संग्रामाची इच्छा आहे व चारी लोकपालांना जिंकीन अशी मीं रागारागानें प्रतिज्ञाही केली आहे २५. तस्मात्, पितृराजाच्या नगराकडे मी निघालों आहें. प्राण्यांना अतिशय क्लेश देणाऱ्या त्या पितृराजाला मी आतां मृत्यु आणीन" २६. ह्याप्रमाणें नारदमुनींना सांगून व त्यांना अभिवंदन करून तो रावण मंत्र्यांसहवर्तमान दक्षिणदिशेकडे निघाला असतां २७. महातेजस्वी नारदमुनि मुहूर्तपर्यंत ध्यानस्थ ले ाणि धूम्र अग्नीप्रमाणें असलेले ते विप्रश्रेष्ठ नारदमुनि मनामध्यें ह्मणाले २८ "आयुष्य क्षीण झालें असतां इंद्रासह-

राचराः । क्षीणे चायुषि धर्मेण स कालो जेष्यते कथम् २९ स्वदत्तकृतसाक्षी यो द्वितीय इव पावकः । लब्धसंज्ञा विचेष्टन्ते लोका यस्य महात्मनः ३० यस्य नित्यं त्रयो लोका विद्रवन्ति भयार्दिताः । तं कथं राक्षसेन्द्रोऽसौ स्वयमेव गमिष्यति ३१ यो विधाता च धाता च सुकृतं दुष्कृतं तथा । त्रैलोक्यं विजितं येन तं कथं विजयिष्यते ॥ अपरं किं तु कृत्वैवं विधानं संविधास्यति ३२ कौतूहलं समुत्पन्नो यास्यामि यमसादनम् । विमर्दं द्रष्टुमनयोर्यमराक्षसयोः स्वयम् ३३ [ ८२४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे विंशः सर्गः ॥ २० ॥

एवं संचिन्त्य विप्रेन्द्रो जगाम लघुविक्रमः । आख्यातुं तद्यथावृत्तं यमस्य सदनं प्रति १ अपश्यत्स यमं तत्र देवमग्निपुरस्कृतम् । विधानमनुतिष्ठन्तं प्राणिनो यस्य यादृशम् २ स तु दृष्ट्वा यमः प्राप्तं महर्षिं तत्र नारदम् । अब्रवीत्सुखमासीनमर्घ्यमावेद्य धर्मतः ३ कच्चित्क्षेमं नु देवर्षे कच्चिद्धर्मो न नश्यति । किमागमनकृत्यं ते देवगन्धर्वसेवित ४ अब्रवीत्तु

---

वर्तमान व चराचर प्राण्यांसहवर्तमान जो धर्ममार्गानें त्रैलोक्याला क्लेश देत असतो त्या कालाचा पराजय हा रावण कसा करणार ? २९ स्वतः आचरिलेल्या तपाचा व दिलेल्या दानाचा जो साक्षी आहे, दुसरा अग्निच कीं काय असा जो झळकत आहे, ज्या महात्म्याच्या अनुग्रहामुळें लोक शुद्धीवर राहून हातपाय हलवीत असतात ३० आणि ज्याला भयभीत होऊन तिन्ही लोक नेहमीं धांवाधांव करीत असतात त्या यमाकडे हा राक्षसाधिपति स्वतःच कसा जाणार? ३१. सामान्यतः व विशेषतः जो जगताचा उत्पादक आहे, पुण्यपापांचें जो फल देणारा आहे आणि ज्यानें त्रैलोक्य जिंकिलें आहे त्याला हा कसा बरें जिंकील ? दुसरा काय उपाय योजून हा आपला उद्देश सिद्धीस नेणार आहे हें कळत नाहीं ३२. ह्याविषयीं मला मोठी उत्सुकता प्राप्त झाली आहे. तस्मात्, ह्या यमराक्षसांचें युद्ध अवलोकन करण्याकरितां मी स्वतःच तिकडे जातों" ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं विसावा सर्ग समाप्त झाला॥२०॥

ह्याप्रमाणें विचार केल्यानंतर शीघ्र गमन करणारे ते विप्रश्रेष्ठ नारदमुनि इकडे घडलेलें तें इत्थंभूत वर्तमान कळविण्याकरितां यमलोकीं गेले १ तों अग्नीच्या साक्षीनें यम ज्या प्राण्याचें जसें कर्म असेल त्या प्राण्याला तसें फल देत असल्याचें त्यांच्या दृष्टीं पडलें २. त्या ठिकाणीं महर्षि नारद प्राप्त झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं यमानें त्यांचें यथाविधि पूजन केलें आणि ते स्वस्थ बसल्यानंतर तो त्यांना ह्मणाला ३ "हे देवर्षे, स्वस्तिक्षेम आहेना ? धर्माचा नाश होत नाहींना ? हे देवगंधर्वमान्य, आपलें

तदा वाक्यं नारदो भगवानृषिः । श्रूयतामभिधास्यामि विधानं च विधी-
यताम् ५ एष नाम्ना दशग्रीवः पितृराज निशाचरः । उपयाति वशं नेतुं
विक्रमैस्त्वां सुदुर्जयम् ६ एतेन कारणेनाहं त्वरितो ह्यागतः प्रभो । दण्ड-
प्रहरणस्याद्य तव किं नु भविष्यति ७ एतस्मिन्नन्तरे दूरादंशुमन्तमिवो-
दितम् । ददृशुर्दीप्तमायान्तं विमानं तस्य रक्षसः ८ तं देशं प्रभया तस्य
पुष्पकस्य महाबलः । कृत्वा वितिमिरं सर्वं समीपमभ्यवर्तत ९ सोऽप-
श्यत्स महाबाहुर्दशग्रीवस्ततस्ततः । प्राणिनः सुकृतं चैव भुञ्जानांश्चैव
दुष्कृतम् १० अपश्यत्सैनिकांश्चास्य यमस्यानुचरैः सह । यमस्य पुरुषै-
रुग्रैर्घोररूपैर्भयानकैः ११ ददर्श वध्यमानांश्च क्लिश्यमानांश्च देहिनः ।
क्रोशतश्च महानादं तीव्रनिष्टनतत्परान् १२ कृमिभिर्भक्ष्यमाणांश्च सारमे-
यैश्च दारुणैः । श्रोत्रायासकरा वाचो वदतश्च भयावहाः १३ संतार्यमा-
णान्वैतरणीं बहुशः शोणितोदकाम् । वालुकासु च तप्तासु तप्यमानान्मु-
हुर्मुहुः १४ असिपत्रवनं चैव भिद्यमानानधार्मिकान् । रौरवे क्षारनद्यां

आगमन कशाकरितां झालें आहे ?'' ४. ह्यानंतर भगवान् नारदऋषि ह्मणाले ''मी सांगतों तें आपण श्रवण करा आणि मग काय उपाय योजावयाचा असेल तो योजा ५. हे पितृराज, आपला पराजय होणें अतिशय कठीण आहे; तथापि, पराक्रमांच्या योगानें आपणांला पादाक्रांत करण्याकरितां हा दशग्रीवनामक राक्षस आपणांकडे येत आहे ६. हे प्रभो, ह्या कारणाकरितां मी सत्वर येथें आलों आहें. दंडरूप आयुध धारण करणाऱ्या आपली आज अवस्था तरी काय होणार ?'' ७. इतकें बोलणें चाललें आहे तोंच उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें उज्ज्वल असलेलें त्या राक्षसाचें विमान लांबून येत असतांना त्यांच्या दृष्टीं पडलें ८; व त्या पुष्पक विमानाच्या प्रभेनें तो सर्व प्रदेश अंधकाररहित करीत करीत तो महाबलाढ्य राक्षस समीप आला ९. तेव्हां चांगल्या व वाईट कर्मांचें फल भोगीत असलेले प्राणी त्या महापराक्रमी रावणाच्या दृष्टीं पडले १०. घोररूप, भयानक व उग्र असे जे यमाची सेवा करणारे पुरुष त्यांच्यासहवर्तमान ते यमाचेच सैनिक त्यानें अवलोकन केले ११. नंतर यमदूत ज्यांना क्लेश देत आहेत व ज्यांचा वध करीत आहेत असे किंकाळ्या फोडीत असलेले व उच्च स्वरानें ओरडत असलेले प्राणीही त्यानें अवलोकन केले १२. तदनंतर कृमी भक्षण करीत असल्यामुळे आणि भयंकर श्वान डसत असल्यामुळें श्रवणेंद्रियालाही दुःखकारक असे भयावह शब्द कांहीं प्राणी उच्चारीत आहेत १३; रक्तरूप उदकानें भरलेल्या वैतरणीनदीमध्यें शेंकडों प्राणी डुंबत आहेत; तापलेल्या वाळूमध्यें कांहींजण एकसारखे पोळत आहेत १४; कांहीं

च क्षुरधारासु चैव हि १५ पानीयं याचमानांश्च तृषितान्क्षुधितानपि । शवभूतान्कृशान्दीनान्विवर्णान्मुक्तमूर्धजान् १६ मलपङ्कधरान्दीनान्रूक्षांश्च परिधावतः । ददर्श रावणो मार्गे शतशोऽथ सहस्रशः १७ कांश्चिच्च गृहमुख्येषु गीतवादित्रनिःस्वनैः । प्रमोदमानानद्राक्षीद्रावणः सुकृतैः स्वकैः १८ गोरसं गोप्रदातारो अन्नं चैवान्नदायिनः । गृहांश्च गृहदातारः स्वकर्मफलमश्नतः १९ सुवर्णमणिमुक्ताभिः प्रमदाभिरलंकृतान् । धार्मिकानपरांस्तत्र दीप्यमानान्स्वतेजसा २० ददर्श स महाबाहू रावणो राक्षसाधिपः २१ ततस्तान्भिद्यमानांश्च कर्मभिर्दुष्कृतैः स्वकैः । रावणो मोचयामास विक्रमेण बलाद्बली २२ प्राणिनो मोक्षितस्तेन दशग्रीवेण रक्षसा। सुखमापुर्मुहूर्तं ते ह्यतर्कितमचिन्तितम् २३ प्रेतेषु मुच्यमानेषु राक्षसेन महीयसा । प्रेतगोपाः सुसंक्रुद्धा राक्षसेन्द्रमभिद्रवन् २४ ततो हलहलाशब्दः सर्वदिग्भ्यः समुत्थितः । धर्मराजस्य योधानां शूराणां संप्रधावताम् २५

---

पापी लोकांना असिपत्रवनामध्यें यमदूत पीडा देत आहेत; रौरवनरक, क्षारनदी व वस्तऱ्यांच्या धारा ह्यांचीही कांहींना पीडा होत आहे १५; कोणी तृषाक्रांत होऊन उदकाची याचना करीत आहेत; कोणी क्षुधित आहेत; कृश, दीन कांतिरहित व ज्यांचे केश मोकळे सुटले आहेत असे कांहीं लोक प्रेतरूप बनलेले आहेत १६ आणि मळानें व चिखलानें मरलेले असे कांहीं दीन व निस्तेज झालेले शेंकडों हजारों प्राणी इकडे तिकडे धांवत आहेत' असें मार्गामध्यें रावणानें अवलोकन केलें १७. आपल्या पुण्यकर्मामुळें उत्तम उत्तम गृहांमध्यें गीत व वाद्यें ह्यांच्या ध्वनींच्या योगानें कांहींजण आनंद करीत आहेत असेंही रावणानें अवलोकन केलें १८. गोप्रदान करणारे गोरस सेवन करीत आहेत; अन्न देणारे अन्न भक्षण करीत आहेत आणि गृहें देणारे घरामध्यें वास्तव्य करीत आहेत असें स्वकर्मफल भोगीत असलेले प्राणी रावणानें तेथें अवलोकन केले १९. सुवर्ण, रत्नें व मोत्यें ह्यांनीं संपन्न असलेल्या तरुण स्त्रियांनीं युक्त आणि स्वतःच्या तेजानें झळकत असलेले दुसरे कांहीं धार्मिक लोकही २० त्या महापराक्रमी राक्षसाधिपति रावणानें तेथें अवलोकन केलें २१. असा प्रकार अवलोकन केल्यानंतर स्वतःच्या दुष्कर्मामुळें दुःख भोगीत असलेल्या त्या प्राण्यांना बलाढ्य रावणानें दांडगाई करून स्वपराक्रमानें सोडविलें २२. ह्याप्रमाणें त्या दशग्रीवराक्षसानें प्राणी सोडिले असतां कधीं मनामध्येंही न आणिलेले अतर्क्य सुख एक मुहूर्तभर त्यांना प्राप्त झालें २३. परंतु, तो बलाढ्य राक्षस यमलोकीं गेलेल्या प्राण्यांना सोडून देऊं लागला असतां त्यांच्या बंदोबस्ताला असलेले यमसेवक अतिशय क्रुद्ध होऊन राक्षसाधिपतीवर धांवून

ते प्रासैः परिघैः शूलैर्मुसलैः शक्तितोमरैः। पुष्पकं समधर्षन्त शूराः शतसहस्रशः २६ तस्यासनानि प्रासादान्वेदिकास्तोरणानि च। पुष्पकस्य बभञ्जुस्ते शीघ्रं मधुकरा इव २७ देवनिष्ठानभूतं तद्विमानं पुष्पकं मृधे। भज्यमानं तथैवासीदक्षयं ब्रह्मतेजसा २८ असंख्या सुमहत्यासीत्तस्य सेना महात्मनः। शूराणामग्रयातॄणां सहस्राणि शतानि च २९ ततो वृक्षैश्च शैलैश्च प्रासादानां शतैस्तथा। ततस्ते सचिवास्तस्य यथाकामं यथाबलम्॥ अयुध्यन्त महावीराः स च राजा दशाननः ३० ते तु शोणितदिग्धाङ्गाः सर्वशस्त्रसमाहताः। अमात्या राक्षसेन्द्रस्य चक्रुरायोधनं महत् ३१ अन्योन्यं ते महाभागा जघ्नुः प्रहरणैर्भृशम्। यमस्य च महाबाहो रावणस्य च मन्त्रिणः ३२ अमात्यांस्तांस्तु संत्यज्य यमयोधा महाबलाः। तमेव चाभ्यधावन्त शूलवर्षैर्दशाननम् ३३ ततः शोणितदिग्धाङ्गः प्रहारैर्जर्जरीकृतः। फुल्लाशोक इवाभाति पुष्पके राक्षसाधिपः ३४ स तु शूलगदाप्रासाञ्छक्तितोमरसायकान्। मुमोच च

गेले २४. तदनंतर धर्मराजाचे शूर योद्धे धांवाधांव करूं लागले असतां सर्व दिशेस हलकल्होळ उडून गेला आणि त्या लक्षावधि शूर सेवकांनीं माले, परिघ, शूल, मुसळें, शक्ति व तोमर ह्यांच्या योगानें त्या पुष्पकविमानावर हल्ला केला २५, २६. मधमाशांप्रमाणें त्यांनीं सत्वर त्या पुष्पक विमानावर गर्दी केली आणि त्यांतील सिंहासनें, वाडे, चौक व दरवाजे ह्यांचाही त्यांनीं विध्वंस केला २७. देवांचें निवासस्थान असलेलें तें पुष्पकविमान जरी यमसेवक संग्रामामध्यें मोडूं लागले तरी ब्रह्मतेजाच्या योगानें तें विमान पूर्वीप्रमाणें अभंगच राहिलें २८. त्या महात्म्या यमाची सेना फारच प्रचंड व असंख्य होती आणि सेनेच्या अग्रभागीं रहाणारे शेंकडों हजारों शूर त्या सेनेमध्यें होते २९. तदनंतर वृक्ष, पर्वत आणि शेंकडों वाडे ह्यांच्या योगानें त्या राक्षसाचे ते महावीर्यवान् सचिव आणि तो रावणराजा हे इच्छेप्रमाणें व सामर्थ्याप्रमाणें युद्ध करूं लागले ३०. हे महापराक्रमी रामा, सर्व प्रकारच्या शस्त्रांचे प्रहार झाल्यामुळें ज्यांचीं शरीरें रक्तानें भरलेलीं आहेत अशा त्या राक्षसाधिपतीच्या अमात्यांनीं मोठें युद्ध केलें ३१ आणि अशारीतीनें, हे महापराक्रमी रामा, रावणाचे अमात्य व यमसेवक आयुधांच्या योगानें एकमेकांना प्रहार करूं लागले ३२. यमाकडील महाबलाढ्य योद्धे त्या अमात्यांना सोडून देऊन शूलांची वृष्टि करीत करीत रावणाकडेच धांवून गेले ३३. तेव्हां प्रहारांनीं जर्जर होऊन रक्ताच्या योगानें सर्वांग भरून गेलेला तो राक्षसाधिपति रावण प्रफुल्लित अशोक वृक्षाप्रमाणें भासूं लागला ३४ आणि तो बलाढ्य रावण शूल,

शिलावृक्षान्मुमोचास्त्रबलाद्बली ३५ तरूणां च शिलानां च शस्त्राणां चातिदारुणम् । यमसैन्येषु तद्वर्षं पपात धरणीतले ३६ तांस्तु सर्वान्विनिर्भिद्य तदस्त्रमपहत्य च । जघ्नुस्ते राक्षसं घोरमेकं शतसहस्रशः ३७ परिवार्य च तं सर्वे शैलं मेघोत्करा इव । भिन्दिपालैश्च शूलैश्च निरुच्छ्वासमपोथयन् ३८ विमुक्तकवचः क्रुद्धः सिक्तः शोणितविस्रवैः । ततः स पुष्पकं त्यक्त्वा पृथिव्यामवतिष्ठत ३९ ततः स कार्मुकी बाणी समरे चाभिवर्धत । लब्धसंज्ञो मुहूर्तेन क्रुद्धस्तस्थौ यथाऽन्तकः ४० ततः पाशुपतं दिव्यमस्त्रं संधाय कार्मुके । तिष्ठ तिष्ठेति तानुक्त्वा तच्चापं व्यपकर्षत ४१ आकर्णात्स विकृष्याथ चापमिन्द्रारिराहवे । मुमोच तं शरं क्रुद्धस्त्रिपुरे शंकरो यथा ४२ तस्य रूपं शरस्यासीत्सधूमज्वालमण्डलम् । वनं दहिष्यतो घर्मे दावाग्नेरिव मूर्च्छतः ४३ ज्वालामाली स तु शरः क्रव्यादानुगतो रणे । मुक्तो गुल्मान्द्रुमांश्चापि भस्म कृत्वा प्रधावति ४४ ते तस्य तेजसा दग्धाः सैन्या वैवस्वतस्य तु । बले तस्मिन्निपतिता

---

गदा, भाले, शक्ति, तोमर, बाण, पाषाण व वृक्ष ह्यांची अस्त्रसामर्थ्यानें वृष्टि करूं लागला असतां ३५ भूतलावर असलेल्या यमधर्माच्या सैन्यावर तीं वृक्षांची, पाषाणांची व शस्त्रांची अतिभयंकर वृष्टि होऊं लागली ३६. परंतु, त्या सर्व शूलादिकांचा भेद करून व तें अस्त्र हाणून पाडून ते लक्षावधि यमसैनिक त्या एका घोर राक्षसावर प्रहार करूं लागले ३७. मेघसमुदाय ज्याप्रमाणें पर्वताला वेढून टाकितात त्याप्रमाणें त्याला वेढून टाकून ते सर्वही यमसैनिक भिंदिपाल व शूल ह्यांच्या योगानें त्याला प्रहार करूं लागले असतां त्याला श्वासोच्छ्वास करण्यासही सवड सांपडेना ३८. तेव्हां रक्तस्रावांनीं भरून गेलेला आणि कवचरहित झालेला तो क्रुद्ध रावण पुष्पकविमान सोडून देऊन पृथ्वीवर उभा राहिला ३९. सारांश, एका मुहूर्तानें शुद्धीवर आल्यानंतर धनुर्बाण घेऊन मृत्युप्रमाणें क्रुद्ध झालेला तो रावण संग्रामामध्यें उभा राहिला ४०. तदनंतर पाशुपतनामक दिव्य अस्त्र धनुष्याला लावून आणि ' दम धरा, दम धरा ' असें त्या यमसैनिकांना सांगून त्यानें आपलें धनुष्य खेंचिलें ४१ आणि क्रुद्ध झालेल्या शंकरानें ज्याप्रमाणें त्रिपुरासुरावर बाण सोडिला त्याप्रमाणें कानापर्यंत धनुष्य खेंचून त्या इंद्रशत्रूनें संग्रामामध्यें तो बाण त्या यमसैनिकांवर सोडिला ४२. तेव्हां ग्रीष्मऋतूंमध्यें वन दग्ध करून टाकणाऱ्या व एकसारख्या व्यापीत जाणाऱ्या वणव्याप्रमाणें सधूम ज्वालामंडलांनीं युक्त असें त्या बाणाचें रूप दिसूं लागलें ४३ आणि राक्षसाजवळ असलेला तो ज्वालासमुदाययुक्त बाण संग्रामामध्यें सुटल्याबरोबर झुडपें व वृक्षही दग्ध

माहेन्द्रा इव केतवः ४५ ततस्तु सचिवैः सार्धं राक्षसो भीमविक्रमः। ननाद सुमहानादं कम्पयन्निव मेदिनीम् ४६ [८७०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकविंश सर्गः ॥ २१ ॥

स तस्य तु महानादं श्रुत्वा वैवस्वतः प्रभुः। शत्रुं विजयिनं मेने स्वबलस्य च संक्षयम् १ स हि योधान्हतान्मत्वा क्रोधसंरक्तलोचनः। अब्रवीत्त्वरितः सूतं रथो मे उपनीयताम् २ तस्य सूतस्तदा दिव्यमुपस्थाप्य महारथम्। स्थितः स च महातेजा अध्यारोहत तं रथम् ३ प्रासमुद्गरहस्तश्च मृत्युस्तस्याग्रतः स्थितः। येन संक्षिप्यते सर्वं त्रैलोक्यमिदमव्ययम् ४ कालदण्डस्तु पार्श्वस्थो मूर्तिमानस्य चाभवत्। यमप्रहरणं दिव्यं तेजसा ज्वलदग्निवत् ५ ततो लोकत्रयं क्षुब्धमकम्पन्त दिवौकसः। कालं दृष्ट्वा तथा क्रुद्धं सर्वलोकभयावहम् ६ ततस्त्वचोदयत्सूतस्तानश्वान्रुचिरप्रभान्। प्रययौ भीमसंनादो यत्र रक्षःपतिः स्थितः ७ मुहूर्तेन यमं ते तु हया हरिहयोपमाः। प्रापयन्मनसस्तुल्या यत्र तत्प्रस्तुतं रणम् ८ दृष्ट्वा तथैव

---

करून पुढें जाऊं लागला ४४. तेव्हां यमाचे ते सैनिक त्या बाणाच्या तेजानें दग्ध झाले व इंद्रध्वजांप्रमाणें त्या सैन्यांत पडले ४५; आणि तदनंतर सचिवांसहवर्तमान त्या भयंकर पराक्रम करणाऱ्या राक्षसानें अति उच्चस्वरानें गर्जना केली असतां पृथ्वी जशी कांहीं कांपितच होऊं लागली ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २१ ॥

त्याची ती प्रचंड गर्जना श्रवण केल्यानंतर शत्रूचा विजय झाला असून स्वतःच्या सेनेचा क्षय झाला आहे असें प्रभु यमधर्मानें जाणिलें १; आणि योद्धे वध पावल्याचें समजून आल्यानंतर क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत असा तो यमधर्म 'माझा रथ इकडे घेऊन ये' असें सत्वर सारथ्याला ह्मणाला २. तेव्हां त्याचा सारथिही तो दिव्य महारथ घेऊन उभा राहिला व तो महातेजस्वी यम त्या रथावर आरूढ झाला ३. ह्या सर्व अक्षय्य त्रैलोक्याचा जो संहार करितो तो मृत्यु भाला व मुद्गर हातामध्यें घेऊन त्याचे अग्रभागीं येऊन उभा राहिला असतां ४ तेजानें प्रज्वलित अग्नीप्रमाणें असलेलें यमाचें दिव्य आयुध ह्मणजे कालदंड मूर्तिमान् त्याच्या बाजूला असलेला दिसूं लागला ५. तेव्हां सर्व लोकांना भय उत्पन्न करणारा काल क्रुद्ध झाल्याचें अवलोकन करून त्रैलोक्य क्षुब्ध झालें व देवही थरथर कांपूं लागले ६. तदनंतर मनोहर कांतीनें युक्त असलेल्या त्या अश्वांना सारथ्यानें इशारा केला असतां राक्षसाधिपति रावण जेथें उभा होता तेथें तो प्रचंड गर्जना करणारा रथ गेला ७. सारांश, वेगा-

विकृतं रथं मृत्युसमन्वितम् । सचिवा राक्षसेन्द्रस्य सहसा विप्रदुद्रुवुः ९
लघुसत्त्वतया ते हि नष्टसंज्ञा भयार्दिताः । नेह युद्धं समर्थाः स्म इत्युक्त्वा
प्रययुर्दिशः १० स तु तं तादृशं दृष्ट्वा रथं लोकभयावहम् । नाक्षुभ्यत
दशग्रीवो न चापि भयमाविशत् ११ स तु रावणमासाद्य व्यसृजच्छ-
क्तितोमरान् । यमो मर्माणि संक्रुद्धो रावणस्य न्यकृन्तत १२ रावणस्तु
ततः स्वस्थः शरवर्षं मुमोच ह । तस्मिन्वैवस्वतरथे तोयवर्षमिवाम्बुदः १३
ततो महाशक्तिशतैः पात्यमानैर्महोरसि । नाशक्नोत्प्रतिकर्तुं स राक्षसः
स्वल्पपीडितः १४ एवं नानाप्रहरणैर्यमेनामित्रकर्शिना । सप्तरात्रं कृतः
संख्ये विसंज्ञो विमुखो रिपुः १५ तदासीत्तुमुलं युद्धं यमराक्षसयोर्द्वयोः ।
जयमाकाङ्क्षतोर्वीर समरेष्वनिवर्तिनोः १६ ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च
परमर्षयः । प्रजापतिं पुरस्कृत्य समेतास्तद्रणाजिरे १७ संवर्त इव लोकानां
युध्यतोरभवत्तदा । राक्षसानां च मुख्यस्य प्रेतानामीश्वरस्य च १८

---

मध्यें मनाची बरोबरी करणारे आणि इंद्राच्या अश्वांप्रमाणें असलेले ते अश्व एका क्षणामध्यें जिकडे संग्राम सुरू होता तिकडे यमाला घेऊन गेले ८. तेव्हां मृत्यूनें युक्त असलेला तो रथ त्याचप्रमाणें भयंकर आहे असें पाहून राक्षसाधिपतीचे मंत्री एकाएकीं पळत सुटले ९. सारांश, धैर्य कमी असल्यामुळें भयभीत होऊन कांहीं-एक सुचेनासें झालेले अमात्य येथें युद्ध करण्यास आह्मी समर्थ नाहीं असें ह्मणून वाट फुटेल तिकडे पळत सुटले १०; परंतु, लोकांना भयावह असलेला तो तशाप्रकारचा रथ अवलोकन करूनही रावण क्षुब्ध झाला नाहीं व त्याला भयही वाटलें नाहीं ११. अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या यमानें रावणासमीप येऊन त्याच्यावर शक्ति व तोमर हीं आयुधें टाकिलीं आणि रावणाचीं मर्में त्यानें छेदून काढिलीं १२. तथापि रावण स्वस्थ राहिला आणि जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें त्या यमाच्या रथावर त्यानें बाणांची वृष्टि केली १३. तदनंतर मोठ्या मोठ्या शेंकडों शक्ति प्रचंड वक्षःस्थलावर यम टाकूं लागला असतां तो राक्षस कांहींसा व्यथित झाल्यामुळें प्रति-कार करण्यास समर्थ झाला नाहीं १४. ह्याप्रमाणें शत्रूला जेरीस आणणाऱ्या यमानें नानाप्रकारच्या आयुधांसहवर्तमान सात दिवसपर्यंत युद्ध करून संग्रामामध्यें शत्रूला निश्चेष्ट व पराङ्मुख केलें १५ आणि अशा रीतीनें, हे वीरा रामा, जयाची इच्छा धरणाऱ्या व संग्रामामध्यें परत न फिरणाऱ्या त्या उभयतां यमराक्षसांचें तुमुल युद्ध झालें असतां १६ देव, गंधर्व, सिद्ध आणि महर्षि ब्रह्मदेवाला पुढें करून त्या संग्रा-मामध्यें प्राप्त झाले १७. राक्षसाधिपति रावण आणि प्रेताधिपति यम हे युद्ध करूं

राक्षसेन्द्रोऽपि विस्फार्य चापमिन्द्राशनिप्रभम् । निरन्तरमिवाकाशं कुर्वन्बाणांस्ततोऽसृजत् १९ मृत्युं चतुर्भिर्विशिखैः सूतं सप्तभिरार्दयत् । यमं शतसहस्रेण शीघ्रं मर्मस्वताडयत् २० ततः क्रुद्धस्य वदनाद्यमस्य समजायत । ज्वालामाली सनिःश्वासः सधूमः कोपपावकः २१ तदाश्चर्यमथो दृष्ट्वा देवदानवसंनिधौ । प्रहर्षितौ सुसंरब्धौ मृत्युकालौ बभूवतुः२२ ततो मृत्युः क्रुद्धतरो वैवस्वतमभाषत । मुञ्च मां समरे यावद्धन्मीमं पापराक्षसम् २३ नैषा रक्षो भवेदद्य मर्यादा हि निसर्गतः । हिरण्यकशिपुः श्रीमान्नमुचिः शम्बरस्तथा २४ निसन्दिर्धूमकेतुश्च बलिर्वैरोचनोऽपि च । शम्भुर्दैत्यो महाराजो वृत्रो बाणस्तथैव च २५ राजर्षयः शास्त्रविदो गन्धर्वाः समहोरगाः । ऋषयः पन्नगा दैत्या यक्षाश्च ह्यप्सरोगणाः २६ युगान्तपरिवर्ते च पृथिवी समहार्णवा । क्षयं नीता महाराज सपर्वतसरिद्द्रुमा२७ एते चान्ये च बहवो बलवन्तो दुरासदाः । विनिपन्ना मया दृष्टाः किमुतायं निशाचरः २८ मुञ्च मां साधु धर्मज्ञ यावदेनं निहन्म्यहम् । न हि कश्चिन्मया दृष्टो बलवानपि जीवति २९

---

लागले असतां प्रलयकालच प्राप्त झाल्याप्रमाणें त्रैलोक्याची अवस्था होऊन गेली१८. राक्षसाधिपतीनें आपल्या इंद्रवज्रतुल्य धनुष्याचा टणत्कार करून आकाश अच्छिद्र करीत करीत बाण सोडिले १९ आणि चार बाणांनीं प्रथमतः मृत्यूला आणि सात बाणांनीं सूताला ताडण करून नंतर एक लक्ष बाणांनीं त्यानें यमालाही मर्मांचे ठिकाणीं वेध केला २०. तदनंतर यम क्रुद्ध झाला असतां निःश्वास, धूम व ज्वालासमुदाय ह्यांनीं युक्त असलेला क्रोधाग्नि त्याच्या मुखांतून निघूं लागला २१. देवदानवांचे संनिध तो आश्चर्यकारक प्रकार दृष्टीं पडला असतां मृत्यु व काल अतिशय क्षुब्ध व आनंदित झाले२२.नंतर अतिशयच क्रुद्ध झालेला मृत्यु यमाला ह्मणाला"तूं मला संग्रामामध्यें जाण्याची आज्ञा दे. ह्मणजे मी ह्या पापी राक्षसाचा वध करितों २३. हा राक्षस आज कायम रहाणार नाहीं. कारण, नाश होणें हा सृष्टीचा ठरीव नियमच आहे. वैभवशाली हिरण्यकशिपु, नमुचि, शंबर २४, निसंदि, धूमकेतु, विरोचनपुत्र बली, शंभुनामकदैत्य, महाराज वृत्र, बाण २५, शास्त्रवेत्ते राजर्षि, महोरगांसहवर्तमान गंधर्व, ऋषि, पन्नग, दैत्य, यक्ष आणि अप्सरांचे समुदाय ह्यांचा नाश झालेला आहे २६ आणि युगांतसमयीं, हे महाराजा, पर्वत, नद्या, वृक्ष व महासागर ह्यांसहवर्तमान पृथ्वीचाही क्षय झालेला आहे २७. सारांश, हे आणि इतरही बलाढ्य व अजिंक्य असे असंख्य पुरुष नष्ट झाल्याचें मी अवलोकन केलें आहे; मग ह्या राक्षसाची कथा काय आहे?२८.

बलं मम न खल्वेतन्मर्यादैषा निसर्गतः । स दृष्टो न मया काल मुहूर्तमपि जीवति ३० तस्यैवं वचनं श्रुत्वा धर्मराजः प्रतापवान् । अब्रवीत्तत्र तं मृत्युं त्वं तिष्ठैनं निहन्म्यहम् ३१ ततः संरक्तनयनः क्रुद्धो वैवस्वतः प्रभुः। कालदण्डममोघं तु तोलयामास पाणिना ३२ यस्य पार्श्वेषु निहिताः कालपाशाः प्रतिष्ठिताः। पावकाशनिसंकाशो मुद्गरो मूर्तिमान्स्थितः ३३ दर्शनादेव यः प्राणान्प्राणिनामपकर्षति । किं पुनः स्पृशमानस्य पात्यमानस्य वा पुनः ३४ स ज्वालापरिवारस्तु निर्दहन्निव राक्षसम् । तेन स्पृष्टो बलवता महाप्रहरणोऽस्फुरत् ३५ ततो विदुद्रुवुः सर्वे तस्मात्त्रस्ता रणाजिरे । सुराश्च क्षुभिताः सर्वे दृष्ट्वा दण्डोद्यतं यमम् ३६ तस्मिन्प्रहर्तुकामे तु यमे दण्डेन रावणम् । यमं पितामहः साक्षाद्दर्शयित्वेदमब्रवीत् ३७ वैवस्वत महाबाहो न खल्वमितविक्रम । न हन्तव्यस्त्वयैतेन दण्डेनैष निशाचरः ३८ वरः खलु मयैतस्मै दत्तस्त्रिदशपुङ्गव । स त्वया नानृतः कार्यो यन्मया

---

हे धर्मवेत्त्या, तूं मला खुशाल आज्ञा दे ह्मणजे मी ह्याचा वध करितों. कोणीही जरी बलाढ्य असला तरी सर्वदां जिवंत राहणारा असा माझ्या कधींच दृष्टीं पडला नाहीं २९. खरोखर हें कांहीं माझें सामर्थ्य नव्हें. सृष्टीचा हा ठरीव नियमच आहे. हे काला, तो माझ्या दृष्टीं पडला असतां एक क्षणभरही जिवंत राहणार नाहीं " ३०. तें त्याचें भाषण श्रवण केल्यानंतर प्रतापी धर्मराज ' तूं स्वस्थ रहा; मी ह्याचा वध करितों' असें त्या मृत्यूला ह्मणाला ३१. तदनंतर क्रुद्ध झाल्यामुळें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झालेले आहेत अशा त्या वैवस्वत प्रभूनें अमोघ कालदंड हातानें अजमावून पाहिला ३२. त्या दंडाच्या बाजूला लाविलेले कालपाश अचल होते आणि अग्नि व वज्र ह्यांप्रमाणें ज्याची कांति आहे असा मूर्तिमान् मुद्गरही त्याच्या बाजूला होता ३३ आणि स्पर्श अथवा प्रहार झाल्यानंतरची तर गोष्ट पाहिजे कशाला? परंतु, दृष्टीं पडतांक्षणींच तो कालदंड प्राण्यांचे प्राण हरण करणारा होता ३४. ज्वालांनीं परिवेष्टित असल्यामुळें राक्षसाला दग्ध करून टाकण्यास उद्युक्तच झाला आहे कीं काय असा तो महायुधरूप कालदंड त्या बलाढ्य यमानें हातांत घेतला असतां स्फुरण पावूं लागला ३५. तदनंतर संग्रामामध्यें असलेले सर्वही प्राणी त्रस्त होऊन धांवाधांव करूं लागले आणि हातामध्यें दंड घेऊन स्थित असलेल्या त्याला अवलोकन करितांक्षणीं सर्व देवही क्षुब्ध झाले ३६. परंतु, तो यम दंडानें रावणाला प्रहार करण्यास उद्युक्त झाला असतां ब्रह्मदेव प्रत्यक्ष दर्शन देऊन यमाला ह्मणाला ३७ " हे महापराक्रमी वैवस्वता, हे अतुलविक्रम, ह्या दंडानें तूं ह्या राक्षसाचा वध करूं नकोस ३८. कारण, हे सुरश्रेष्ठा,

व्याहृतं वचः ३९ यो हि मामनृतं कुर्याद्देवो वा मानुषोऽपि वा । त्रैलोक्यमनृतं तेन कृतं स्यान्नात्र संशयः ४० क्रुद्धेन विप्रमुक्तोऽयं निर्विशेषं प्रियाप्रिये । प्रजाः संहरते रौद्रो लोकत्रयभयावहः ४१ अमोघो ह्येष सर्वेषां प्राणिनाममितप्रभः । कालदण्डो मया सृष्टः सर्वमृत्युपुरस्कृतः ४२ तन्न खल्वेष ते सौम्य पात्यो रावणमूर्धनि । न ह्यस्मिन्पतिते कश्चिन्मुहूर्तमपि जीवति ४३ यदि ह्यस्मिन्निपतिते न म्रियेतैष राक्षसः । म्रियते वा दशग्रीवस्तदाऽप्युभयतोऽनृतम् ४४ तन्निवर्तय लङ्केशाद्दण्डमेतं समुद्यतम् । सत्यं च मां कुरुष्वाद्य लोकांस्त्वं यद्यवेक्षसे ४५ एवमुक्तस्तु धर्मात्मा प्रत्युवाच यमस्तदा । एष व्यावर्तितो दण्डः प्रभविष्णुर्हि नो भवान् ४६ किं त्विदानीं मया शक्यं कर्तुं रणगतेन हि । न मया यद्ययं शक्यो हन्तुं वरपुरस्कृतः ४७ एष तस्मात्प्रणश्यामि दर्शनादस्य रक्षसः । इत्युक्त्वा सरथः साश्वस्तत्रैवान्तरधीयत ४८ दशग्रीवस्तु तं जित्वा नाम विश्राव्य

---

मीं जो खरोखर ह्या रावणाला वर दिला आहे ह्मणजे मीं जें भाषण ह्याला अनुलक्षून केलें आहे त्याला तूं असत्यता आणूं नकोस ३९. देव असो अथवा मनुष्य असो, जो मला असत्य करील त्याला त्रैलोक्य असत्य केल्याचें पातक लागेल ह्यांत संशय नाहीं ४०. प्रिय अथवा अप्रिय हा भेद ह्या दंडाचे ठिकाणीं मुळींच नाहीं. क्रुद्ध झालेल्या पुरुषानें हा सोडिला असतां त्रैलोक्याला भीति उत्पन्न करणारा हा भयंकर दंड प्रजेचा संहार करीत सुटतो ४१. अतुल प्रभेनें युक्त असलेल्या ह्या दंडाचें तेज कोणत्याही प्राण्याचे ठिकाणीं कुंठित होणारें नाहीं. मी उत्पन्न केलेला हा कालदंड सर्वप्रकारच्या मृत्यूंचा पुढारी आहे ४२. ह्यास्तव, हे निरुपद्रवी यमधर्मा, खरोखर रावणाच्या मस्तकीं तूं ह्याचा प्रहार करूं नकोस. ह्याचा प्रहार झाला असतां कोणीही क्षणभर सुद्धां जिवंत रहात नाहीं ४३. ह्या कालदंडाचा प्रहार झाल्यावर हा राक्षस मृत झाला अथवा मृत न झाला तरी दोन्ही प्रकारांनीं मी असत्य ठरणार ४४. तस्मात्, उगारिलेला हा दंड लंकाधिपतीपासून तूं माघारा घे आणि त्रैलोक्याची तुला गरज असल्यास तूं मला सत्य कर " ४५. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें त्याला सांगितलें असतां धर्मात्मा यम ह्मणाला "हा मीं दंड परत फिरविला. आपण आमचे अधिपति आहां ४६. परंतु, ह्या राक्षसाला वर मिळाल्यामुळें माझ्या हातून जर ह्याचा वध होणें शक्य नाहीं तर संग्रामामध्यें राहून आतां माझ्या हातून होणार तरी काय ? ४७. तस्मात्, हा मी ह्या राक्षसाच्या दृष्टीआड निघून जातों ". असें बोलून रथ व अश्व ह्यांसहवर्तमान तो तेथेंच गुप्त झाला ४८. तेव्हां ह्याप्रमाणें त्याला जिंकून आपलें नांव तेथें मशहूर केल्या-

चात्मनः । आरुह्य पुष्पकं भूयो निष्क्रान्तो यमसादनात् ४९ स तु वैवस्वतो देवैः सह ब्रह्मपुरोगमैः । जगाम त्रिदिवं हृष्टो नारदश्च महामुनिः ५०
[ १२० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे द्वाविंशः सर्गः ॥ २२ ॥

ततो जित्वा दशग्रीवो यमं त्रिदशपुङ्गवम् । रावणस्तु रणश्लाघी स्वसहायान्ददर्श ह १ ततो रुधिरसिक्ताङ्गं प्रहारैर्जर्जरीकृतम् । रावणं राक्षसा दृष्ट्वा विस्मयं समुपागमन् २ जयेन वर्धयित्वा च मारीचप्रमुखास्ततः । पुष्पकं भेजिरे सर्वे सान्त्विता रावणेन तु ३ ततो रसातलं रक्षः प्रविष्टः पयसां निधिम् । दैत्योरगगणाध्युष्टं वरुणेन सुरक्षितम् ४ स तु भोगवतीं गत्वा पुरीं वासुकिपालिताम् । कृत्वा नागान्वशे हृष्टो ययौ मणिमयीं पुरीम् ५ निवातकवचास्तत्र दैत्या लब्धवरावसन् । राक्षसस्तान्समागम्य युद्धाय समुपाह्वयत् ६ ते तु सर्वे सुविक्रान्ता दैतेया बलशालिनः । नानाप्रहरणास्तत्र प्रहृष्टा युद्धदुर्मदाः ७ शूलैस्त्रिशूलैः कुलिशैः पट्टिशा-

---

नंतर पुष्पकविमानामध्यें तो पुनरपि आरूढ झाला आणि यमलोकांतून निघून गेला ४९ व इकडे ब्रह्मप्रभृति देवांसहवर्तमान तो वैवस्वत यम आणि महामुनि नारद हेही ( ब्रह्मदेवाचें सत्यत्व कायम राहिलें ह्मणून ) आनंदित होऊन स्वर्गाला गेले ५०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २२ ॥

ह्याप्रमाणें सुरश्रेष्ठ यमाला जिंकिल्यानंतर त्या संग्रामप्रिय दशग्रीव रावणानें आपले सांथीदार अवलोकन केले १. तेव्हां रक्तानें ज्याचें शरीर भरलेलें आहे व प्रहारांमुळे जो जर्जर झालेला आहे अशा रावणाला अवलोकन करून ते विस्मित झाले २ आणि त्या सर्वांचेंही रावणानें सांत्वन केलें असतां त्याचा जयजयकार करून ते सर्वही मारीचप्रभृति अमात्य त्या पुष्पकविमानामध्यें आरूढ झाले ३. तदनंतर वरुणानें ज्याचें चांगलें रक्षण केलें आहे आणि दैत्यगण व उरगगण ह्यांनीं ज्या ठिकाणीं वास्तव्य केलें आहे अशा सागरामध्यें जातां जातां प्रवेश करून तो राक्षस रसातलामध्यें गेला ४ आणि वासुकीनें परिपालन केलेल्या भोगवतीनगरीमध्यें जाऊन नागांना पादाक्रांत केल्यानंतर तो आनंदित होऊन मणिमयनगरीमध्यें गेला ५. त्या ठिकाणीं ब्रह्मदेवापासून वर प्राप्त झालेले निवातकवच दैत्य रहात होते. त्यांच्याकडे जाऊन राक्षसानें त्यांना युद्धार्थ आह्वान केलें असतां ६ ते सर्वही महापराक्रमी, बलाढ्य व युद्धामध्यें हार न जाणारे दैत्य आनंदित झाले आणि नानाप्रकारचीं आयुधें घेऊन युद्धाकरितां

सिपरश्वधैः । अन्योन्यं बिभिदुः क्रुद्धा राक्षसा दानवास्तथा ८ तेषां तु युध्यमानानां साग्रः संवत्सरो गतः । न चान्यतरतस्तत्र विजयो वा क्षयोऽपि वा ९ ततः पितामहस्तत्र त्रैलोक्यगतिरव्ययः । आजगाम द्रुतं देवो विमानवरमास्थितः १० निवातकवचानां तु निवार्य रणकर्म तत् । वृद्धः पितामहो वाक्यमुवाच विदितार्थवत् ११ न ह्ययं रावणो युद्धे शक्यो जेतुं सुरासुरैः । न भवन्तः क्षयं नेतुमपि सामरदानवैः १२ राक्षसस्य सखित्वं च भवद्भिः सह रोचते । अविभक्ताश्च सर्वार्थाः सुहृदां नात्र संशयः १३ ततोऽग्निसाक्षिकं सख्यं कृतवांस्तत्र रावणः । निवातकवचैः सार्धं प्रीतिमानभवत्तदा १४ अर्चितस्तैर्यथान्यायं संवत्सरमथोषितः । स्वपुरान्निर्विशेषं च प्रियं प्राप्तो दशाननः १५ तत्रोपधार्य मायानां शतमेकं समाप्तवान् । सलिलेन्द्रपुरान्वेषी भ्रमति स्म रसातलम् १६ ततोऽश्मनगरं नाम कालकेयैरधिष्ठितम् । गत्वा तु कालकेयांश्च हत्वा तत्र बलोत्कटान् १७ शूर्पणख्याश्च भर्तारमसिना प्राच्छिनत्तदा । श्यालं च बलवन्तं च विद्यु-

---

सज्ज झाले ७. शूल, त्रिशूल, वज्र, पट्टे, खड्ग आणि परशु ह्यांच्या योगानें ते क्रुद्ध झालेले राक्षस व दानव एकमेकांवर प्रहार करूं लागले ८ आणि ते युद्ध करीत असतांना एक संपूर्ण संवत्सरही लोटला. परंतु, कोणत्याच पक्षाचा जय किंवा पराजयही होईना ९. तदनंतर त्रैलोक्याला आधारभूत असलेला अक्षय ब्रह्मदेव श्रेष्ठ विमानामध्यें आरूढ होऊन तेथें आला १० आणि निवातकवचांचें तें युद्धकर्म अवलोकन करून तो वृद्ध पितामह प्रसिद्ध अर्थानें युक्त असें भाषण करूं लागला ११. ( तो ह्मणाला ) " देवदैत्यांच्या हातूनही ह्या रावणाचा युद्धामध्यें पराजय होणें शक्य नाहीं आणि देवदानवांच्या हातूनही तुमचा नाश होणें कठीण आहे १२. ह्यास्तव, ह्या रावणराक्षसाशीं तुमचें सख्य व्हावें असें मला वाटतें. जे सुहृद् झालेले असतात त्यांच्या सर्व कांहीं वस्तु अविभक्तच असतात ह्यांत संशय नाहीं " १३. तदनंतर रावणानें त्या ठिकाणीं अग्नीचे समक्ष निवातकवचांशीं सख्य केलें व त्यामुळें त्याला आनंदही झाला १४. नंतर त्यांनीं यथायोग्य पूजन केलें असतां एक संवत्सरपर्यंत त्यानें तेथें वास्तव्य केलें आणि त्या ठिकाणीं त्या रावणाला लंकानगरीप्रमाणें सुख प्राप्त झालें १५. त्या ठिकाणीं सख्यानें राहिल्यामुळें शंभर माया त्याला प्राप्त झाल्या आणि वरुणाचें नगर हुडकून काढण्याकरितां तो रसातलामध्येंच हिंडत राहिला १६. तदनंतर कालकेयांनीं ज्यामध्यें वास्तव्य केलें आहे अशा अश्मनगरामध्यें तो गेला. तेथें गेल्यानंतर अतिशय बलाढ्य असलेल्या त्या कालकेयांचा त्यानें वध केला १७ आणि बलाढ्य व सामर्थ्यामुळें मत्त असून

जिह्वं बलोत्कटम् १८ जिह्वया संलिहन्तं च राक्षसं समरे तदा । तं विजित्य मुहूर्तेन जघ्ने दैत्यांश्चतुःशतम् १९ ततः पाण्डुरमेघाभं कैलासमिव भास्वरम् । वरुणस्यालयं दिव्यमपश्यद्राक्षसाधिपः २० क्षरन्तीं च पयस्तत्र सुरभिं गामवस्थिताम् । यस्याः पयोभिनिष्यन्दात्क्षीरोदो नाम सागरः २१ ददर्श रावणस्तत्र गोवृषेन्द्रवरारणिम् २२ यस्माच्चन्द्रः प्रभवति शीतरश्मिर्निशाकरः । यं समाश्रित्य जीवन्ति फेनपाः परमर्षयः २३ अमृतं यत्र चोत्पन्नं स्वधा च स्वधभोजिनाम् । यां ब्रुवन्ति नरा लोके सुरभिं नाम नामतः २४ प्रदक्षिणं तु तां कृत्वा रावणः परमाद्भुताम् । प्रविवेश महाघोरं गुप्तं बहुविधैर्बलैः २५ ततो धाराशताकीर्णं शारदाभ्रनिभं तदा । नित्यप्रहृष्टं ददृशे वरुणस्य गृहोत्तमम् २६ ततो हत्वा बलाध्यक्षान्समरे तैश्च ताडितः । अब्रवीच्च ततो योधान्राजा शीघ्रं निवेद्यताम् २७ युद्धार्थी रावणः प्राप्तस्तस्य युद्धं प्रदीयताम् । वद वा न भयं

---

जिह्वनें रावणपक्षीय राक्षसांचा आस्वाद घेत असलेला जो विद्युज्जिह्वनामक राक्षस त्याच्या शूर्पणखानामक भगिनीचा भर्ता त्यालाही त्यानें संग्रामामध्यें खड्गाच्या योगानें तोडून टाकिलें आणि त्याला जिंकिल्यानंतर एका मुहूर्तामध्यें दुसरे चारशें दैत्य त्यानें मारिले १८, १९. तदनंतर श्वेतवर्ण मेघासारिख्या कांतीनें युक्त आणि कैलासपर्वताप्रमाणें उज्ज्वल असें वरुणालयाधिपतीचें दिव्य स्थान त्या राक्षसानें अवलोकन केलें २०. जिच्या दुग्धस्रावामुळें क्षीरोदनामक समुद्र झालेला आहे व वृषभाधिपतीची जी मुख्य माता आहे अशी तेथें असलेली सुरभि स्तनांतून दुग्धस्राव चालला असतांना त्यानें अवलोकन केली २१, २२. त्या क्षीरसागरापासून शीत किरणांनीं युक्त असलेला चंद्र बाहेर पडत असतो; त्याच सागराचा आश्रय करून फेनपान करणारे महर्षि उपजीविका करीत असतात २३; आणि देवांचें अमृत व पितरांचें सुधासंज्ञक अन्नही तेथेंच उत्पन्न होत असतें. असो. जगतामध्यें लोक जिला सुरभि असें ह्मणत असतात त्या अत्यंत अद्भुत धेनूला प्रदक्षिणा केल्यानंतर नानाप्रकारच्या सैन्यांनीं सुरक्षित असलेल्या अतिभयंकर वरुणालयामध्यें राक्षसानें प्रवेश केला २४, २५. नंतर शरदृतूंतील अभ्राप्रमाणें ज्याची कांति आहे, ज्यांतील लोक सर्वदां आनंदित आहेत आणि शेंकडों जलधारांनीं जें व्याप्त आहे असें वरुणाचें उत्कृष्ट गृह त्या रावणाच्या दृष्टीं पडतांक्षणीं २६ वरुणाच्या सेनाधिपतींना त्यानें ताडण केलें व त्यांनींही त्याला ताडण केलें. नंतर त्या योद्ध्यांना तो ह्मणाला "युद्धाकरितां रावण प्राप्त झाला आहे. त्याच्याशीं आपण युद्ध करावें, नाहीं तर त्याच्यापुढें हात जोडून 'मी पराजित झालों' असें तरी कबूल करावें; ह्मणजे आपणांला भय नाहीं,

तेऽस्मि निर्जितोऽस्मीति साञ्जलिः २८ एतस्मिन्नन्तरे क्रुद्धा वरुणस्य महात्मनः । पुत्राः पौत्राश्च निष्क्रामन्गौश्च पुष्कर एव च २९ ते तु तत्र गुणोपेता बलैः परिवृताः स्वकैः । युक्त्वा रथान्कामगमानुद्यद्भास्करवर्चसः ३० ततो युद्धं समभवद्दारुणं रोमहर्षणम् । सलिलेन्द्रस्य पुत्राणां रावणस्य च धीमतः ३१ अमात्यैश्च महावीर्यैर्दशग्रीवस्य रक्षसः । वारुणं तद्बलं सर्वं क्षणेन विनिपातितम् ३२ समीक्ष्य स्वबलं संख्ये वरुणस्य सुतास्तदा । अर्दिताः शरजालेन निवृत्ता रणकर्मणः ३३ महीतलगतास्ते तु रावणं दृश्य पुष्पके । आकाशमाशु विविशुः स्यन्दनैः शीघ्रगामिभिः ३४ महदासीत्ततस्तेषां तुल्यं स्थानमवाप्य तत् । आकाशयुद्धं तुमुलं देवदानवयोरिव ३५ ततस्ते रावणं युद्धे शरैः पावकसंनिभैः । विमुखीकृत्य संहृष्टा विनेदुर्विविधान्रवान् ३६ ततो महोदरः क्रुद्धो राजानं वीक्ष्य धर्षितम् । त्यक्त्वा मृत्युभयं क्रुद्धो युद्धकाङ्क्षी व्यलोकयत् ३७ तेन ते वारुणा युद्धे कामगाः पवनोपमाः । महोदरेण गदया हतास्ते प्रययुः

---

असें तुह्मी राजाला सत्वर कळवा " २७,२८. इतक्यामध्यें महात्म्या वरुणाचे पुत्र व पौत्र बाहेर पडले आणि त्यांचे अधिपति गौ व पुष्कर हेही बाहेर पडले २९. स्वतःच्या सैन्यांनीं परिवेष्टित असलेले ते वरुणाचे गुणसंपन्न पुत्र व पौत्र, उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें ज्यांची कांति आहे असे आपले यथेष्ट गमन करणारे रथ जोडून, बाहेर पडले असतां ३० बुद्धिमान् रावण आणि जलाधिपति वरुणाचे पुत्र ह्यांमध्यें शरीरावर रोमांच उठविणारें भयंकर युद्ध झालें ३१. रावणराक्षसाच्या महावीर्यवान् अमात्यांनीं एका क्षणामध्यें वरुणाच्या त्या सर्व सेनेचा निःपात केला ३२ आणि बाणसमूहानें पीडित झालेले ते वरुणपुत्र संग्रामामध्यें आपलें सैन्य किती राहिलें आहे ह्याचा विचार करून युद्धापासून परावृत्त झाले ३३. भूतलावर असणाऱ्या त्या वरुणपुत्रांनें पुष्पकविमानामध्यें असलेल्या रावणाला अवलोकन करून शीघ्र गमन करणाऱ्या रथांच्या योगानें आकाशामध्यें प्रवेश केला ३४. तेव्हां प्रतिपक्ष्यांप्रमाणें तें आकाशरूप स्थान प्राप्त झाल्यानंतर देवदानवांतील युद्धाप्रमाणें त्यांचें रावणाशीं मोठें तुमुल आकाशयुद्ध झालें ३५. तदनंतर अग्नितुल्य बाणांनीं संग्रामामध्यें रावणाला पराङ्मुख करून ते आनंदित झाले आणि नानाप्रकारच्या गर्जना करूं लागले ३६. परंतु, राजावर हल्ला झाल्याचें अवलोकन करून महोदर क्रुद्ध झाला आणि मृत्यूचें भय सोडून देऊन युद्धाच्या इच्छेनें तो इकडे तिकडे पाहूं लागला ३७. इतकेंच नव्हे परंतु, त्या महोदरानें यथेष्ट गमन करणाऱ्या व वायुतुल्य वेगवान् असलेल्या त्या वरुणपुत्रांना गदेचा प्रहार करून

क्षितिम् ३८ तेषां वरुणसूनूनां हत्वा योधान्हयांश्च तान् । मुमोचाशु महानादं विरथान्प्रेक्ष्य तान्स्थितान् ३९ ते तु तेषां रथान्साश्वाः सह सारथिभिर्वरैः । महोदरेण निहताः पतिताः पृथिवीतले ४० ते तु त्यक्त्वा रथान्पुत्रा वरुणस्य महात्मनः । आकाशे विष्ठिताः शूराः स्वप्रभावान्न विव्यथुः ४१ धनूंषि कृत्वा सज्जानि विनिर्भिद्य महोदरम् । रावणं समरे क्रुद्धाः सहिताः समवारयन् ४२ सायकैश्चापविभ्रष्टैर्वज्रकल्पैः सुदारुणैः । दारयन्ति स्म संक्रुद्धा मेघा इव महागिरिम् ४३ ततः क्रुद्धो दशग्रीवः कालाग्निरिव मूर्च्छितः । शरवर्षं महाघोरं तेषां मर्मस्वपातयत् ४४ मुसलानि विचित्राणि ततो भल्लशतानि च । पट्टिशांश्चैव शक्तीश्च शतघ्नीर्महतीरपि । पातयामास दुर्धर्षस्तेषामुपरि विष्ठितः ४५ ततस्तेनैव सहसा सीदन्ति स्म पदातिनः । महापङ्कमिवासाद्य कुञ्जराः षष्टिहायनाः ४६ सीदमानान्सुतान्दृष्ट्वा विह्वलान्स महाबलः । ननाद रावणो हर्षान्महानम्बुधरो यथा ४७ ततो रक्षो महानादान्मुक्त्वा हन्ति स्म वारुणान् । नाना-

---

भूमीवर पाडिलें ३८ आणि नंतर त्या वरुणपुत्रांचे योद्धे व ते अश्व ह्यांचा वध करून आणि ते विरथ होऊन संग्रामामध्यें उभे असल्याचें पाहून त्यानें सत्वर मोठी गर्जनाही केली ३९. श्रेष्ठ सारथ्यांसहवर्तमान व अश्वांसहवर्तमान असलेल्या त्या त्यांच्या रथांना महोदरानें प्रहार केले असतां ते भूतलावर पडले ४०. तेव्हां रथांचा त्याग करून महात्म्या वरुणाचे ते शूर पुत्र निर्भयपणें आकाशाचाच आश्रय करून राहिले ४१. तदनंतर धनुष्य सज्ज करून महोदरालाही वेध केल्यानंतर क्रुद्ध झालेल्या त्या वरुणपुत्रांनीं एकत्र होऊन संग्रामामध्यें रावणाला वेढिलें ४२ आणि महापर्वताला विदीर्ण करण्यास उद्युक्त झालेले मेघच कीं काय असे ते अतिक्रुद्ध वरुणपुत्र धनुष्यापासून सुटलेल्या, वज्रतुल्य व अतिभयंकर बाणांच्या योगानें रावणाला विदीर्ण करूं लागले असतां ४३ रावण क्रुद्ध झाला, प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें तो खवळून गेला आणि त्यांच्या मर्मांचे ठिकाणीं त्यानें मोठी भयंकर बाणवृष्टि सुरू केली ४४. अद्भुत मुसळें, शेंकडों भल्ल बाण, पट्टे, शक्ति आणि प्रचंड तोफा ह्यांचा भडिमार करून तो अजिंक्य रावण आकाशामध्यें त्यांच्याहीपेक्षां उर्ध्वभागीं राहिला असतां ४५ अगाध चिखलांत रुतलेल्या साठवर्षांच्या ( तरुण ) गजांप्रमाणें त्या भडिमारामुळें वरुणाचे पदाति पुत्र एकाएकीं खचूं लागले ४६. तेव्हां वरुणपुत्र विह्वल होऊन खचत आहेत असें अवलोकन करितांक्षणीं तो महाबलाढ्य रावण हर्षामुळें प्रचंड मेघाप्रमाणें गर्जना करूं लागला ४७ आणि मोठ्या मोठ्या गर्जना केल्यानंतर जल-

प्रहरणोपेतैर्धारापातैरिवाम्बुदः ४८ ततस्ते विमुखाः सर्वे पतिता धरणीतले। रणात्स्वपुरुषैः शीघ्रं गृहाण्येव प्रवेशिताः ४९ तानब्रवीत्ततो रक्षो वरुणाय निवेद्यताम् । रावणं त्वब्रवीन्मन्त्री प्रहासो नाम वारुणः ५० गतः खलु महाराजो ब्रह्मलोकं जलेश्वरः । गान्धर्वं वरुणः श्रोतुं यं त्वमाह्वयसे युधि ५१ तत्किं तव यथा वीर परिश्रम्य गते नृपे । ये तु संनिहिता वीराः कुमारास्ते पराजिताः ५२ राक्षसेन्द्रस्तु तच्छ्रुत्वा नाम विश्राव्य चात्मनः । हर्षान्नादं विमुञ्चन्वै निष्क्रान्तो वरुणालयात् ५३ आगतस्तु पथा येन तेनैव विनिवृत्य सः । लङ्कामभिमुखो रक्षो नभस्तलगतो ययौ५४ [ १७४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥ २३ ॥

* ततोऽश्मगरं भूयो विचेरुर्युद्धदुर्मदाः । यत्रापश्यद्दशग्रीवो गृहं परमभास्वरम् १ वैदूर्यतोरणाकीर्णं मुक्ताजालविभूषितम् । सुवर्णस्तम्भगहनं

धारांनीं ताडण करणाऱ्या मेघाप्रमाणें नानाप्रकारच्या आयुधांनीं युक्त असलेल्या बाणांनीं तो वरुणपुत्रांना ताडण करूं लागला ४८. तदनंतर ते सर्वही वरुणपुत्र विमुख होऊन भूतलावर पडले असतां त्यांच्या सेवकांनीं संग्रामापासून त्यांना सत्वर घरीं पोंचतें केलें ४९. तेव्हां 'वरुणाला माझा निरोप सांगा' म्हणून पुनरपि तो रावणराक्षस त्या वरुण सेवकांना सांगूं लागला असतां वरुणाचा प्रहासनामक मंत्री रावणाला म्हणाला ५० "ज्याला आपण संग्रामामध्यें आह्वान करीत आहां तो महाराज जलाधिपति वरुण गंधर्वांचें गायन श्रवण करण्याकरितां ब्रह्मलोकीं गेला आहे ५१. तस्मात्, हे वीरा, राजा निघून गेल्यानंतर परिश्रम करून तुला काय उपयोग होणार आहे ? त्याचे वीरपुत्र जे संनिध होते ते तर पराजित झाले आहेत" ५२. राक्षसाधिपतीनें तें श्रवण केल्यानंतर तेथें आपलें नांव गाजविलें; आनंदानें गर्जना करीत करीत तो वरुणलोकांतून बाहेर पडला ५३; आणि ज्या मार्गानें आला होता त्याच मार्गानें परत फिरल्यानंतर आकाशामध्यें असलेला तो रावण लंकाभिमुख होऊन चालता झाला ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं तेविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २३ ॥

*तदनंतर युद्धामध्यें जेरीस न येणारे ते राक्षस अश्मनगरामध्यें संचार करूं लागले असतां अत्यंत उज्ज्वल असें एक गृह तेथें रावणाच्या दृष्टीं पडलें १. वैडूर्यरत्नांच्या

* येथून पांच सर्ग कांहीं पुस्तकांमध्यें सांपडत नाहींत व ह्यांवर तिलकटीकाही नाहीं. हे सर्ग प्रक्षिप्त असावेत असेंही कांहींचें म्हणणें आहे; परंतु, ह्यांतील कथाभाग प्रसिद्ध आहे.

वेदिकाग्रिभिः समन्ततः २ वज्रस्फटिकसोपानं किङ्किणीजालसंवृतम् । बह्वासनयुतं रम्यं महेन्द्रभवनोपमम् ३ दृष्ट्वा गृहवरं रम्यं दशग्रीवः प्रतापवान् । कस्येदं भवनं रम्यं मेरुमन्दरसंनिभम् ४ गच्छ प्रहस्त शीघ्रं त्वं जानीष्व भवनोत्तमम् । एवमुक्तः प्रहस्तस्तु प्रविवेश गृहोत्तमम् ५ निःशून्यं प्रेक्षतं वरं पुनः कक्ष्यान्तरे ययौ । सप्तकक्ष्यान्तरं गत्वा ततो ज्वालामपश्यत ६ ततो दृष्टः पुमांस्तत्र हृष्टो हासं मुमोच सः । श्रुत्वा स तु महाहासमूर्ध्वरोमाभवत्तदा ७ ज्वालामध्ये स्थितस्तत्र हेममाली विमोहितः । आदित्य इव दुष्प्रेक्ष्यः साक्षादिव यमः स्थितः ८ तथा दृष्ट्वा तु वृत्तान्तं त्वरमाणो विनिर्गतः । विनिर्गम्याब्रवीत्सर्वं रावणाय निशाचरः९ अथ राम दशग्रीवः पुष्पकादवरुह्य सः । प्रवेष्टुमिच्छन्वेश्माथ भिन्नाञ्जनचयोपमः १० चन्द्रमौलिर्वपुष्मांश्च पुरुषोऽस्याग्रतः स्थितः । द्वारमा-

---

तोरणांनीं तें गजबजलेलें होतें; मोत्यांच्या सरांनीं तें भूषित केलें होतें; सुवर्णस्तंभांची तेथें गर्दी उडाली होती; त्याच्या सभोंवतीं चौरंग ठेविलेले होते २; हिऱ्यांचे व स्फटिकांचे जिने त्यामध्यें केलेले होते; लहान लहान घंटांच्या सरांनीं तें व्याप्त झालेलें होतें आणि तें रम्य गृह असंख्य सिंहासनांनीं युक्त असून महेंद्राच्या गृहाप्रमाणें होतें ३. तें श्रेष्ठ व रमणीय गृह अवलोकन करून प्रतापी रावण प्रहस्ताला ह्मणाला " मेरु व मंदर ह्यांप्रमाणें असलेलें हें रम्य गृह कोणाचें आहे ? हे प्रहस्ता, तूं सत्वर जा आणि हें उत्कृष्ट गृह कोणाचें आहे ह्याचा तपास कर ". ह्याप्रमाणें रावणानें सांगितलें असतां प्रहस्त त्या उत्कृष्ट गृहामध्यें प्रविष्ट झाला ४,५. तां त्या गृहाच्या पहिल्या उत्कृष्ट चौकांत त्याला कोणीच दिसलें नाहीं. तेव्हां तो पुनरपि दुसऱ्या चौकांत गेला व ह्याप्रमाणें जातां जातां सातव्या चौकांत गेल्यानंतर तेथें एक ज्वाला त्याच्या दृष्टीं पडली ६. तदनंतर तेथें एक पुरुष त्याच्या दृष्टीं पडला व तो पुरुष आनंदित होऊन हास्य करूं लागला असतां तें प्रचंड हास्य श्रवण करून त्या प्रहस्ताच्या शरीरावर कांटा आला ७. कारण, मोहक स्वरूपानें युक्त आणि सुवर्णभूषणें धारण केलेला असा जो पुरुष त्या ज्वालेमध्यें उभा होता तो साक्षात् यमाप्रमाणें दिसत होता आणि सूर्याप्रमाणें त्याच्याकडे पहाणेंही शक्य नव्हतें ८. ह्याप्रमाणें प्रकार दृष्टीं पडला असतां प्रहस्त सत्वर बाहेर पडला आणि बाहेर पडल्यानंतर त्या प्रहस्तराक्षसानें तो सर्व वृत्तांत रावणाला निवेदन केला ९. तदनंतर, हे रामा, तो रावण पुष्पकविमानांतून खालीं उतरला आणि त्या गृहांत प्रवेश करण्याचें त्यानें मनामध्यें आणिलें. परंतु, कज्जलाच्या पर्वताप्रमाणें ज्याची कांति आहे १०, ज्याच्या

वृत्य सहसा ज्वालाजिह्वो भयानकः ११ रक्ताक्षश्चारुदशनो बिम्बोष्ठश्चारुदर्शनः । महाभीषणनासश्च कम्बुग्रीवो महाहनुः १२ रूढश्मश्रुर्निगूढास्थिर्दंष्ट्रालो लोमहर्षणः । गृहीत्वा लोहमुसलं द्वारं विष्टभ्य तिष्ठति १३ अथ संदर्शनात्तस्य ऊर्ध्वरोमा बभूव सः । हृदयं कम्पते चास्य वेपथुश्चाप्यजायत १४ निमित्तान्यमनोज्ञानि दृष्ट्वा राम व्यचिन्तयत् । अथ चिन्तयतस्तस्य स एव पुरुषोऽब्रवीत् १५ किं त्वं चिन्तयसे रक्षो ब्रूहि विस्रब्धमानसः । युद्धातिथ्यमहं वीर करिष्ये रजनीचर १६ एवमुक्त्वा स तद्रक्षः पुनर्वचनमब्रवीत् । योत्स्यसे बलिना सार्धमथवा मन्यसे कथम् १७ रावणोऽभिहतो भूय ऊर्ध्वरोमा व्यजायत । अथ धैर्यं समालम्ब्य रावणो वाक्यमब्रवीत् १८ गृहेषु तिष्ठते को हि तद्ब्रूहि वदतां वर । तेनैव सार्धं योत्स्यामि यथा वा मन्यते भवान् १९ स एनं पुनरप्याह दानवेन्द्रोऽत्र तिष्ठति । एष वै परमोदारः शूरः सत्य-

---

मुकुटाचे ठिकाणीं चंद्र आहे व ज्याचें शरीर धिप्पाड आहे असा एक पुरुष द्वार व्याप्त करून एकाएकीं त्याच्यापुढें उभा राहिला. त्याची जिह्वा ज्वालायुक्त होती; त्याचें स्वरूप भयंकर होतें ११; त्याचें नेत्र आरक्तवर्ण होते, दांत सुंदर होते, ओंठ पिकलेल्या तोंडल्यासारिखे लाल होते, नेत्र मनोहर होते, नासिका अतिभयंकर होती, त्याचा कंठ शंखासारिख्या तीन रेषांनीं युक्त होता, हनुवटी प्रचंड होती १२, दाढी वाढलेली होती, हाडें बुजालेलीं होतीं, दाढा मोठ्या मोठ्या होत्या, शरीरावर रोमांच उठलेले होते आणि हातामध्यें मुसळ घेऊन तो द्वारामध्यें उभा राहिलेला होता १३. त्याचें दर्शन होतांक्षणीं त्या रावणाच्या शरीरावर कांटा आला, उरामध्यें धडकी भरली, शरीरालाही कंप सुटला १४ आणि, हे रामा, हीं अशुभ चिन्हें अवलोकन करून तो मनामध्यें विचार करूं लागला. परंतु, तो विचार करूं लागला असतां तो पुरुष त्याला ह्मणाला १५ " हे राक्षसा, तूं काय विचार करीत आहेस हें मला निर्भय मनानें सांग. हे वीरा निशाचरा, युद्धाच्या योगानें मी तुझें आतिथ्य करण्यास तयार आहे " १६. असें त्या राक्षसाला सांगितल्यानंतर पुनरपि तोच पुरुष त्याला ह्मणाला " बलीशीं युद्ध करण्याची तुझी इच्छा आहे ? अथवा दुसरा कांहीं तुझा उद्देश आहे ? " १७ ह्याप्रमाणें पुनरपि तो पुरुष रावणाला बोलला असतां रावणाच्या शरीरावर रोमांच उठले; परंतु, धैर्य धरून रावण त्याला ह्मणाला १८ " हे श्रेष्ठ वक्त्या, घरामध्यें कोण आहे हें मला सांग; त्याच्याचबरोबर युद्ध करण्याची माझी इच्छा आहे. मग तुझा काय मानस असेल तो खरा " १९. ह्यावर पुनरपि तो पुरुष त्याला ह्मणाला "दान-

पराक्रमः २० वीरो बहुगुणोपेतः पाशहस्त इवान्तकः। बालार्क इव तेजस्वी समरेष्वनिवर्तकः २१ अमर्षी दुर्जयो जेता बलवान्गुणसागरः। प्रियंवदः संविभागी गुरुविप्रप्रियः सदा २२ कालाकाङ्क्षी महासत्त्वः सत्यवाक्सौम्यदर्शनः। दक्षः सर्वगुणोपेतः शूरः स्वाध्यायतत्परः २३ एष गच्छति वात्येष ज्वलते तपते तथा। देवैश्च भूतसङ्घैश्च पन्नगैश्च पतत्रिभिः २४ भयं यो नाभिजानाति तेन त्वं योद्धुमिच्छसि। बलिना यदि ते योद्धुं रोचते राक्षसेश्वर २५ प्रविश त्वं महासत्व सङ्ग्रामं कुरु मा चिरम्। एवमुक्तो दशग्रीवः प्रविवेश यतो बलिः २६ स विलोक्याथ लङ्केशं जहास दहनोपमः। आदित्य इव दुष्प्रेक्ष्यः स्थितो दानवसत्तमः २७ अथ संदर्शनादेव बलिर्वै विश्वरूपवान्। स गृहीत्वा च तद्रक्ष उत्सङ्गे स्थाप्य चाब्रवीत् २८ दशग्रीव महाबाहो कं ते कामं करोम्यहम्। किमागमन-

---

वराज ह्या ठिकाणीं वास्तव्य करीत आहे. हा दानवराज फारच उदार व शूर असून सत्यपराक्रमी आहे २०. हा वीर बहुगुणांनीं संपन्न आहे; हातामध्यें पाश घेतलेल्या यमाप्रमाणें हा भयंकर आहे; बालसूर्याप्रमाणें हा तेजस्वी आहे; संग्रामांतून हा कधींही परत फिरणारा नाहीं २१; हा कोणाचा अपराध क्षमा करणारा नाहीं; ह्याचा पराजय होणें दुर्घट असून हा स्वतः इतरांचा पराजय करणारा आहे; हा बलाढ्य व प्रियभाषणी असून गुणांचा सागरही आहे; जें आपल्याला मिळेल तें आश्रितांना हा विभागून देणारा आहे; गुरु व विप्र ह्याला सर्वदां प्रिय आहेत २२; हा मोक्षसमयाची वाट पहात बसलेला आहे; हा महाधैर्यवान्, सत्यवचनी, सौम्य मुद्रेनें युक्त, दक्ष, सर्वगुणसंपन्न व शूर असून वेदाध्ययनाविषयीं तत्पर आहे २३; जलरूपानें हा भ्रमन करीत असतो, वायुरूपानें वहातही असतो, अग्निरूपानें प्रज्वलित असतो आणि सूर्यरूपानें हा प्रकाशतही असतो. देव, भूतगण, पन्नग व पक्षी २४ ह्यांपासून ज्याला भय माहीत नाहीं त्याच्याशीं तूं युद्ध करण्याची इच्छा करीत आहेस! बलीशी युद्ध करण्याचें जर तुझ्या मनामध्यें असेल तर, हे महाधैर्यवान् राक्षसाधिपते, तूं आंत प्रवेश कर आणि विलंब न करितां संग्राम कर ". ह्याप्रमाणें रावणाला त्यानें सांगितलें असतां जेथें बली होता तेथें रावण प्रविष्ट झाला २५,२६. सूर्याप्रमाणें ज्याच्याकडे पहाणें अशक्य आहे आणि अग्नीप्रमाणें ज्याचें तेज आहे असा तो तेथें असलेला दानवश्रेष्ठ बली लंकाधिपति रावणाला अवलोकन करितांक्षणीं हंसूं लागला २७ आणि तो रावणराक्षस दृष्टीं पडतांक्षणीं तो विश्वरूप धारण करणारा बली त्या रावणराक्षसाला उचलून घेऊन व आपल्या मांडीवर बसवून ह्मणाला २८ " हे महापराक्रमी रावणा, तुझी काय इच्छा

कृत्यं ते ब्रूहि त्वं राक्षसेश्वर २९ एवमुक्तस्तु बलिना रावणो वाक्यमब्रवीत्। श्रुतं मया महाभाग बद्धस्त्वं विष्णुना पुरा ३० सोऽहं मोक्षयितुं शक्तो बन्धनात्त्वां न संशयः। एवमुक्ते ततो हासं बलिर्मुक्त्वैनमब्रवीत् ३१ श्रूयतामभिधास्यामि यत्त्वं पृच्छसि रावण। य एष पुरुषः श्यामो द्वारे तिष्ठति नित्यदा ३२ एतेन दानवेन्द्राश्च तथान्ये बलवत्तराः। वशं नीता बलवता पूर्वे पूर्वतराश्च ये ३३ बद्धः सोऽहमनेनैवं कृतान्तो दुरतिक्रमः। क एनं पुरुषो लोके वञ्चयिष्यति मानवः ३४ सर्वभूतापहर्ता धै य एष द्वारि तिष्ठति। कर्ता कारयिता चैव धाता च भुवनेश्वरः ३५ न त्वं वेद न चैवाहं भूतभव्यभवत्प्रभुः। कलिश्चैवैष कालश्च सर्वभूतापहारकः ३६ लोकत्रयस्य सर्वस्य हर्ता स्रष्टा तथैव च। संहरत्येष भूतानि स्थावराणि चराणि च ३७ पुनश्च सृजते सर्वमनाद्यन्तं महेश्वरः। इष्टं चैव हि दत्तं च हुतं चैव निशाचर ३८ सर्वमेव हि लोकेशो धाता गोप्ता न संशयः। नैवंविधं महद्भूतं विद्यते भुवनत्रये ३९ अहं त्वं चैव पौलस्त्य

---

मी शेवटास नेऊं? हे राक्षसाधिपते, तुझ्या आगमनाचें कारण काय हें तूं मला सांग" २९. ह्याप्रमाणें बलीनें भाषण केलें असतां रावण त्याला ह्मणाला "हे महाभाग्यवान्, विष्णूनें पूर्वीच तुला बांधून टाकिलें ही गोष्ट माझ्या कानावर आली आहे ३०; व मी तुला बंधनापासून सोडविण्यास समर्थ आहें ह्यांत संशय नाहीं". ह्याप्रमाणें रावणानें भाषण केलें असतां बली हास्य करून त्याला ह्मणाला ३१ "हे रावणा, श्रवण कर; तूं जें विचारीत आहेस तें मी तुला सांगतों. जो हा श्यामवर्ण पुरुष नेहमीं द्वारामध्यें उभा असतो ३२ त्या ह्या बलाढ्य पुरुषानें दानवाधिपति आणि इतरही अतिबलाढ्य प्राचीन व अति प्राचीन पुरुष पादाक्रांत केले आहेत ३३; आणि ह्यानेंच मला बद्ध केलें आहे. ह्याप्रमाणें असलेला जो हा कृतांत त्याचें अतिक्रमण होणें शक्य नाहीं. जगतामध्यें कोण बरें मानवकोटींतील पुरुष ह्याला फसविणार आहे? ३४. सर्व भूतांचा संहार करणारा जो हा द्वारामध्यें स्थित आहे, तो कर्ता, करविता व विधाता असून जगदीश्वर आहे ३५. भूत, वर्तमान आणि भविष्य यांचा प्रभु असलेल्या ह्याला मी जाणीत नाहीं आणि तूंही जाणत नाहींस. हा कलि असून सर्व भूतांचा संहार करणारा कालही हाच आहे ३६. सर्व त्रैलोक्याचा संहार करणारा व उत्पादक हाच असून स्थावर व जंगम प्राण्यांचा हाच संहार करीत असतो ३७; आणि पुनरपि हा महेश्वर हें अनादि व अनंत जगत् उत्पन्नही करीत असतो. हे निशाचरा, यजन केलेलें, दान दिलेलें आणि हवन केलेलें ३८ हें सर्व कांहीं हा लोकाधिपतिच असून हाच जगताचा

ये चान्ये पूर्ववत्तराः । नेता ह्येषां महद्भूतं पशुं रशनया यथा ४० वृत्रो दनुः शुकः शम्भुर्निशुम्भः शुम्भ एव च । कालनेमिश्च प्राह्लादिः कूटो वैरोचनो मृदुः ४१ यमलार्जुनौ च कंसश्च कैटभो मधुना सह । एते तपन्ति द्योतन्ति वान्ति वर्षन्ति चैव हि ४२ सर्वैः क्रतुशतैरिष्टं सर्वैस्तप्तं महत्तपः । सर्वे त सुमहात्मानः सर्वे वै योगधर्मिणः ४३ सर्वैरैश्वर्यमासाद्य भुक्त भोगैर्महत्तरैः । दत्तमिष्टमधीतं च प्रजाच परिपालिताः ४४ स्वपक्षेष्वनुगोप्तारः प्रहन्तारः परेष्वपि । सामरेष्वपि लोकेषु नैतेषां विद्यते समम् ४५ शूरास्त्वभिजनोपेताः सर्वशास्त्रार्थपारगाः । सर्वविद्याप्रवक्तारः सङ्ग्रामेष्वनिवर्तकाः ४६ सर्वैस्त्रिदशराज्यानि कारितानि महात्मभिः । युद्धे सुरगणाः सर्वे निर्जिताश्च सहस्रशः ४७ देवानामप्रियं सक्ताः स्वपक्षपरिपालकाः । प्रमत्ताश्चोपसक्ताश्च बालार्कसमतेजसः ४८ यस्तु देवान्प्रधर्षेत तदेषां विष्णुरीश्वरः । उपायपूर्वकं नाशं स वेत्ता भगवान्हरिः ४९ प्रादु-

---

उत्पादक व रक्षक आहे, यांत संशय नाहीं. अशा प्रकारचें महद्भूत त्रैलोक्यामध्येंही नाहीं ३९. हे पौलस्त्या, मी, तूं व इतरही जे कोणी मोठे बलाढ्य आहेत त्यांना, रज्जूच्या योगानें पशू नेणाऱ्या पशुपालाप्रमाणें, नेणारा हाच आहे ४०. वृत्र, दनु, शुक, शंभु, निशुंभ, शुंभ, कालनेमि, प्राल्हादि, कूट, वैरोचन, मृदु ४१, यमल व अर्जुन, कंस, कैटभ आणि मधु ह्यांनाही ताप देण्याचें, प्रकाशयुक्त होण्याचें, वायु उत्पन्न करण्याचें व पर्जन्य पाडण्याचें सामर्थ्य आहे ४२. कारण, ह्या सर्वांनींही शेंकडों क्रतु केले असून सर्वांनींही मोठें तप आचरिलें आहे; सर्वही उत्कृष्ट महात्मे असून सर्वही योगसामर्थ्यानें युक्त आहेत ४३; सर्वांनींही ऐश्वर्य प्राप्त करून घेऊन फारच मोठे भोग भोगिले आहेत; सर्वांनींही दान दिलें आहे, यज्ञयाग केले आहेत, अध्ययन केलें आहे, आणि प्रजांचें परिपालनही केलें आहे ४४. स्वपक्षीयांचे हे रक्षक असून शत्रूंचे हे घातक आहेत व देवांसहवर्तमान त्रैलोक्यांतील प्राण्यांमध्यें ह्यांची बरोबरी करणारा कोणीही नाहीं ४५. शूर, कुलीन, सर्व शास्त्रांतील अर्थामध्यें पारंगत, सर्व विद्यांचे ज्ञाते व संग्रामांतून निवृत्त न होणारे असे हे आहेत ४६. सर्वही महात्म्यांनीं स्वर्गाचीं राज्यें चालविलीं आहेत आणि सर्व देवगणांचा युद्धांमध्यें हजारों वेळ पराजय केलेला आहे ४७. देवांना अप्रिय असलेलें कृत्य करण्याविषयीं हे तत्पर असून स्वपक्षाला असलेल्या लोकांचें हे रक्षण करणारे होते आणि बालसूर्याप्रमाणें हे तेजस्वी असून मत्त व विषयलंपट झाले होते ४८. परंतु, देवांवर हल्ला करण्याचें जो मनामध्यें आणितो, त्याचा नाश उपाय योजून कसा करावा हें ह्या भगवान् श्रीहरीला

भावं विकुरुते येनैतन्निधनं नयेत्। पुनरेवात्मनात्मानमधिष्ठाय स तिष्ठति ५० एवमेतेन देवेन दानवेन्द्रा महात्मना। ते हि सर्वे क्षयं नीता बलिनः कामरूपिणः ५१ समरे च दुराधर्षाः श्रूयन्ते येऽपराजिताः। तेऽपि नीता महद्भूताः कृतान्तबलचोदिताः ५२ एवमुक्त्वाथ प्रोवाच राक्षसं दानवेश्वरः। यदेतद्दृश्यते वीर चक्रं दीप्तानलोपमम् ५३ एतद्गृहीत्वाऽऽगच्छ त्वं मम पार्श्वं महाबल। ततोऽहं तव व्याख्यास्ये मुक्तिकारणमव्ययम् ५४ तत्कुरुष्व महाबाहो मा विलम्बस्व रावण। एतच्छ्रुत्वा गतो रक्षः प्रहसंश्च महाबलः ५५ यत्र स्थितं महादिव्यं कुण्डलं रघुनन्दन। लीलयोत्पाटनं चक्रे रावणो बलदर्पितः ५६ न च चालयितुं शक्तो रावणोऽभूत्कथंचन। लज्जया स पुनर्भूयो यत्नं चक्रे महाबलः ५७ उत्क्षिप्तमात्रे दिव्ये च पपात भुवि राक्षसः। छिन्नमूलो यथा शालो रुधिरौघपरिप्लुतः ५८ एतस्मिन्नन्तरे जज्ञे शब्दः पुष्पकसंभवः। राक्षसेन्द्रस्य सचिवैर्मुक्तो हाहाकृतो महान् ५९ ततो रक्षो मुहूर्तेन चेतनां लभ्य चोत्थितम्। लज्जयावनती-

---

विदित आहे व हा सर्वव्यापी श्रीहरि देवांचा अधिपति आहे ४९. जगताचा प्रादुर्भाव होण्यास हाच कारण असून ह्याच्याच योगानें ह्या जगताचा लय होत असतो आणि पुनरपि स्वतःच स्वतःचा आश्रय करून हा रहात असतो ५०. ह्या महात्म्या देवानें ते सर्वही बलाढ्य आणि यथेष्टरूप धारण करणारे दानवराज लयाला नेले आहेत ५१. संग्रामामध्यें अजिंक्य ह्मणून ज्यांची ख्याति होती व ज्यांच्यावर कोणाचाही हल्ला होणें शक्य नव्हतें, ते मोठेमोठे पुरुषही कालसामर्थ्यानें प्रेरित झाल्यामुळें ह्यानें लयाला नेले आहेत " ५२. ह्याप्रमाणें त्याला सांगून पुनरपि तो दानवाधिपति बलि त्या राक्षसाला ह्मणाला " हे वीरा, हें जें प्रदीप्त अग्नीसारखें चक्र दिसत आहे ५३ तें घेऊन, हे महाबलाढ्य दानवाधिपते, तूं माझ्याकडे ये; ह्मणजे मुक्तीच्या अक्षय्य कारणाचा मी तुला उपदेश करीन ५४; तस्मात्, हे महापराक्रमी रावणा, तूं ह्याप्रमाणें कर; विलंब लावू नको ". हें श्रवण केल्यानंतर तो महाबलाढ्य रावण राक्षस हंसत हंसत जिकडे तें महादिव्य कुंडल पडलें होतें तिकडे गेला आणि, हे रघुनंदना रामा, सामर्थ्यामुळें गर्विष्ठ झालेला तो रावण तें कुंडल सहज उपटूं लागला ५५, ५६. परंतु, कांहीं केलें तरी तो तें कुंडल हालविण्यास समर्थ झाला नाहीं; तेव्हां लज्जित होऊन पुनरपि त्या महाबलाढ्य रावणानें तें उचलण्याचा यत्न केला ५७. परंतु, तें दिव्य कुंडल त्यानें उचलिलें नाहीं तोंच तो राक्षस रक्तप्रवाहानें भरून जाऊन मुळें तुटलेल्या शालवृक्षाप्रमाणें भूमीवर पडला ५८. इतक्यांत पुष्पकविमानामध्यें राक्षसाधिपति रावणाच्या अमात्यांनीं हाहा-

भूतं बलिर्वाक्यमुवाच ह ६० आगच्छ राक्षसश्रेष्ठ वाक्यं शृणु मयोदितम् । यत्त्वया चोद्यतं वीर कुण्डलं मणिभूषितम् ६१ एतद्धि पूर्वजस्यासीत्कर्णाभरणमीक्ष्यताम् । एतत्पतितवच्चैवमत्र भूमौ महाबल ६२ अन्यत्पर्वतसानौ हि पतितं कुण्डलादनु । मुकुटं वेदिसामीप्ये पतितं युध्यतो भुवि ६३ हिरण्यकशिपोः पूर्वं मम पूर्वपितामहात् । न तस्य कालो मृत्युर्वा न व्याधिर्न विहिंसकाः ६४ न दिवा मरणं तस्य न रात्रौ संध्ययोर्न हि । न शुष्केण न चार्द्रेण न च शस्त्रेण केनचित् ६५ विद्यते राक्षसश्रेष्ठ तस्य नास्त्रेण केनचित् । प्रह्लादेन समं चक्रे वादं परमदारुणम् ६६ तस्य वादे समुत्पन्ने धीरो लोकभयङ्करः । सर्ववर्यस्य वीरस्य प्रह्लादस्य महात्मनः ६७ उत्पन्नो राक्षसश्रेष्ठ नृसिंहाकृतिरूपधृक् । दृष्टं च तेन रौद्रेण क्षुब्धं सर्वमशेषतः ६८ तत उद्धृत्य बाहुभ्यां नखैर्निन्ये यमक्षयम् । एष तिष्ठति द्वारस्थो

कार करून मोठा आक्रोश केला ५९. तदनंतर एका मुहूर्तानें शुद्धीवर येऊन रावण उठून बसला असतां व लज्जेनें अधोमुख झाला असतां बलि त्याला ह्मणाला ६०, "हे राक्षसश्रेष्ठा, इकडे ये; आणि मी तुला जें सांगत आहे तें ऐक. हे वीरा, जें रत्नभूषित कुंडल उचलण्याचा तूं प्रयत्न केलास ६१, तें माझ्या पूर्वजाचें कर्णभूषण होतें हें तूं लक्ष्यांत ठेव. हे महाबलाढ्य रावणा, माझा पितामह जो हिरण्यकशिपु त्याचें युद्ध चाललें असतांना हें एक कुंडल येथें भूमीवर पडलें, दुसरें कुंडल पर्वताच्या शिखरावर पडलेलें आहे आणि मुकुट यज्ञवेदीचे संनिध भूतलावर पडलेला आहे ६२, ६३. त्या हिरण्यकशिपूला काल, मृत्यु, व्याधि व हिंस्रक प्राणी ह्यांपैकीं कोणाचेंही भय नव्हतें ६४. दिवसा, रात्रीं, दोहोंपैकीं कोणत्याही संधिकालीं, शुष्क पदार्थानें, आर्द्र पदार्थानें, कोणत्याही शस्त्रानें व कोणत्याही अस्त्रानें, हे राक्षसश्रेष्ठा, त्याला मरण येणारें नव्हतें. प्रल्हादासहवर्तमान ह्यानें अति भयंकर वाद केला ६५, ६६ आणि तो वाद उपस्थित झाला असतां, हे राक्षसश्रेष्ठा, सर्वांमध्यें श्रेष्ठ असा जो महात्मा प्रल्हाद वीर त्याच्याकरितां नृसिंहरूप धारण करून जगताला भय उत्पन्न करणारा हा ईश्वर उत्पन्न झाला आणि त्या क्रूर राक्षसाच्याही तें सर्वस्वीं क्षुब्ध झालेलें पूर्ण रूप दृष्टीस पडलें ६७, ६८. तदनंतर हातांनीं हिरण्यकशिपूला उचलून घेऊन ह्या ईश्वरानें नखांच्या योगानेंच त्यास यमसदनीं

१सन्ध्ययोः असें पद मुळामध्यें आहे, परंतु, त्याचा अर्थ रात्र व दिवस ह्यांमधला व दिवस आणि रात्र ह्यांमधला संधिकाल असा करितां येत नाहीं. कारण, हिरण्यकशिपूचा वध दिवस व रात्र ह्यांच्या मध्यभागीं असलेल्या संध्यासमयीं झाला असल्याचें प्रसिद्ध आहे; ह्मणून सन्ध्ययोः ह्या पदाचा अर्थ मध्यान्हसंधि व मध्यरात्रसंधि ह्यांपैकीं कोणत्याही संधिसमयीं अथवा सूर्योदयाचे संनिध असलेला संधिकाल आणि मध्यान्ह संधिकाल ह्यांपैकीं कोणत्याही संधिसमयीं असा करावा.

वासुदेवो निरञ्जनः ६९ तस्य देवाधिदेवस्य गदतो मे शृणुष्व ह। वाक्यं परमभावेन यदि ते वर्तते हृदि ७० इन्द्राणां च सहस्राणि सुराणामयुतानि च। ऋषीणां चैव मुख्यानां शतान्यब्दसहस्रशः ७१ वशं नीतानि सर्वाणि य एष द्वारि तिष्ठति। तस्य तद्वचनं श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् ७२ मया प्रेतेश्वरो दृष्टः कृतान्तः सह मृत्युना। पाशहस्तो महाज्वाल ऊर्ध्वरोमा भयानकः ७३ दंष्ट्रालो विद्युज्जिह्वश्च सर्पवृश्चिकरोमवान्। रक्ताक्षो भीमवेगश्च सर्वसत्त्वभयंकरः ७४ आदित्य इव दुष्प्रेक्ष्यः समरेष्वनिवर्तकः। पापानां शासिता चैव स मया युधि निर्जितः ७५ न च मे तत्र भीः काचिद्यथा वा दानवेश्वर। एनं तु नाभिजानामि तद्भवान्वक्तुमर्हति ७६ रावणस्य वचः श्रुत्वा बलिर्वैरोचनोऽब्रवीत्। एष त्रैलोक्यधाता च हरिर्नारायणः प्रभुः ७७ अनन्तः कपिलो जिष्णुर्नरसिंहो महाद्युतिः। क्रतु-

---

पोंचविलें. हा जो निरंजन वासुदेव द्वारपाल ह्मणून उभा आहे, त्या देवाधिदेवासंबंधानें मी तुला खऱ्या खऱ्या भावानें जें सांगत आहे तें तूं तुझी इच्छा असल्यास श्रवण कर ६९, ७०. जो हा द्वारामध्यें उभा आहे त्यानें हजारों इंद्र, लक्षावधि देव आणि शेंकडों महर्षि ह्या सर्वांना हजारों वर्षेंपर्यंत ताब्यांत ठेविलें आहे." हें त्याचें भाषण श्रवण केल्यानंतर रावण ह्मणाला ७१, ७२ "मृत्यूसहवर्तमान मी प्रेताधिपति कृतांत अवलोकन केला. तो अतिशय उज्वल असून दिसण्यांत भयंकर होता. त्याच्या शरीरावरील केश ताठ होते. त्यानें हातामध्यें पाश घेतला होता ७३; त्याच्या दाढा मोठ्या मोठ्या होत्या; विद्युल्लतेसारिखी त्याची जिव्हा होती; सर्प व वृश्चिक हींच त्याचीं रोमें होतीं; त्याचा वेग भयंकर असून नेत्र आरक्तवर्ण होते; सर्व प्राण्यांना तो भय उत्पन्न करणारा होता ७४; सूर्याप्रमाणें त्याच्याकडे कोणाला पहातां येणेंही शक्य नव्हतें; संग्रामापासून तो परावृत्त होणारा नव्हता; आणि दुष्टांना तो शासनही करणारा होता. परंतु, त्यालाही मीं युद्धामध्यें जिंकिलें ७५. हे दानवराज, त्या कृतांतासंबंधानें मला यत्किंचितूही भय नव्हतें; व भय कसलें असतें, हें अद्यापि मला ठाऊकही नाहीं. परंतु, हा मला माहीत नाहीं. ह्यास्तव, कोण हें आपण कथन करा" ७६. रावणाचें भाषण श्रवण केल्यानंतर विरोचनपुत्र बलि ह्मणाला "हा त्रैलोक्य उत्पन्न करणारा प्रभु श्रीहरि होय. नारायण ७७, अनंत, कपिल, जिष्णु, महातेजस्वी नरसिंह, क्रतुधामा,

---

१ अयुत ह्मणजे दहाहजार; परंतु, हजारों, लक्षावधि अथवा लाखों असेंच ह्मणण्याचा प्रचार असून दहा हजारों असें ह्मणण्याचा प्रचार नसल्यामुळें अयुतानि ह्या पदाचें भाषांतर ह्या व इतर ठिकाणीही लाखों अथवा लक्षावधि ह्या शब्दानें केलेलें आहे.

धामा सुधामा च पाशहस्तो भयानकः ७८ द्वादशादित्यसदृशः पुराणपुरुषोत्तमः । नीलजीमूतसंकाशः सुरनाथः सुरोत्तमः ७९ ज्वालामाली महाबाहो योगी भक्तजनप्रियः । एष धारयते लोकानेष वै सृजते प्रभुः ८० एष संहरते चैव कालो भूत्वा महाबलः । एष यज्ञश्च याज्यश्च चक्रायुधधरो हरिः ८१ सर्वदेवमयश्चैव सर्वभूतमयस्तथा । सर्वलोकमयश्चैव सर्वज्ञानमयस्तथा ८२ सर्वरूपी महारूपी बलदेवो महाभुजः । वीरहा धीरचक्षुष्मांस्त्रैलोक्यगुरुरव्ययः ८३ एनं मुनिगणाः सर्वे चिन्तयन्तीह मोक्षिणः । य एनं वेत्ति पुरुषं न स पापैर्विलिप्यते ८४ स्मृत्वा स्तुत्वा तथेष्ट्वा च सर्वमस्मादवाप्यते ८५ एतच्छ्रुत्वा तु वचनं रावणो निर्ययौ तदा । क्रोधसंरक्तनयन उद्यतास्त्रो महाबलः ८६ तथाभूतं च तं दृष्ट्वा हरिर्मुसलधृक्प्रभुः । नैनं हन्म्यधुना पापं चिन्तयित्वेति रूपधृक् ८७ अन्त-

---

सुधामा व हातामध्यें पाश घेतलेला भयंकर यम हाच होय ७८, द्वादशादित्यांप्रमाणें ह्याचें तेज आहे; हा नरामध्यें श्रेष्ठ असून अनादि आहे; नीलमेघाप्रमाणें ह्याची कांति आहे; हा सुरश्रेष्ठ देवांचा अधिपति आहे ७९; हे महापराक्रमी रावणा, ज्वालासमुदायांनीं हा युक्त आहे; हा योगी असून भक्तजनांना प्रिय आहे; हाच प्रभु त्रैलोक्याचें परिपालन करणारा असून त्रैलोक्यही हाच उत्पन्न करीत असतो ८० आणि हाच महाबलाढ्य काल होऊन त्रैलोक्याचा संहार करीत असतो; चक्ररूप आयुध धारण करणारा हा हरीच यज्ञ असून ज्या देवतांच्या उद्देशानें यज्ञ करीत असतात त्या देवताही हाच आहे ८१. सर्व देव ह्याचेच ठिकाणीं असून सर्व भूतें ह्याचेच ठिकाणीं आहेत; सर्व लोक ह्याच्यामध्येंच असून सर्व ज्ञानांचें स्थानही हाच आहे ८२; सर्वांचीं रूपें यानेंच धारण केलेलीं आहेत; मोठींमोठीं रूपें धारण करणाराही हाच आहे; हा बलाधिपति आहे; ह्याचे बाहु मोठे आहेत; वीरांचा घात करणारा हाच आहे; ज्ञानी जन हे ह्याचेच नेत्र आहेत; हा अविनाशी असून त्रैलोक्याचा गुरु आहे ८३; सर्वही मुमुक्षु मुनिगण ह्याचेंच चिंतन करीत असतात; ह्या पुरुषाला जो जाणितो त्याला पापांचा संपर्क होत नाहीं ८४; आणि सर्व कांहीं सुख ह्याचेंच स्मरण केल्यानें, ह्याचेंच स्तवन केल्यानें आणि ह्याचेंच यजन केल्यानें प्राप्त होत असतें ८५". हें भाषण श्रवण करितांक्षणीं महाबलाढ्य रावण क्रोधानें डोळे लाल करून व अस्त्र उगारून तेथून निघाला असतां ८६ तशाप्रकारें क्रुद्ध झालेल्या त्या रावणाला अवलोकन करून मुसलायुध धारण करणारा व द्वारपालाच्या रूपानें असलेला

र्धानं गतो राम ब्रह्मणः प्रियकाम्यया । न च तं पुरुषं तत्र पश्यते रज-
नीचरः ८८ हर्षान्नादं विमुञ्चन्वै निष्क्रामन्वरुणालयात् । येनैव संप्रविष्टः
स पथा तेनैव निर्ययौ ८९ [१०६३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय
आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ १ ॥

अथ संचिन्त्य लङ्केशः सूर्यलोकं जगाम ह । मेरुशृङ्गे वरे रम्ये उषित्वा
तत्र शर्वरीम् १ पुष्पकं तत्समारुह्य रवेस्तुरगसन्निभम् । नानापातगतिर्दिव्यं
विहारवियतिस्थितम् २ यत्रापश्यद्रविं देवं सर्वतेजोमयं शुभम् । वरकाञ्चन-
केयूररत्नाम्बरविभूषितम् ३ कुण्डलाभ्यां शुभाभ्यां तु भ्राजन्मुखविका-
सितम् । केयूरनिष्काभरणं रक्तमालावलम्बिनम् ४ रक्तचन्दनदिग्धाङ्गं सहस्र-
किरणोज्ज्वलम् । तमादिदेवमादित्यमुच्चैःश्रवसवाहनम् ॥ अनाद्यन्तममध्यं
च लोकसाक्षिं जगत्पतिम् ५ तं दृष्ट्वा प्रवरं देवं रावणो रक्षसां वरः । स
प्रहस्तमुवाचाथ रवितेजोबलार्दितः । गच्छामात्य वदस्वैनं निदेशान्मम

---

श्रीहरि ब्रह्मदेवाचें प्रिय करण्याकरितां " ह्या दुष्टाचा वध करितां उपयोगीं नाहीं, " असा विचार करून अंतर्धान पावला ८७, ८८. तेव्हां हर्षानें गर्जना करीत करीत तो रावण वरुणलोकांतून बाहेर जाऊं लागला व ज्या मार्गानें त्यानें प्रवेश केला होता, त्याच मार्गानें तो परत निघून गेला ८९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पहिला सर्ग समाप्त झाला ॥ १ ॥

तदनंतर लंकाधिपति रावण विचार करून सूर्यलोकीं गेला. सारांश, श्रेष्ठ व रम्य अशा मेरुपर्वताच्या शिखरावर त्या रात्रीं वास्तव्य करून रवीच्या अश्वाप्रमाणें ज्याची कांति आहे अशा आपल्या पुष्पकविमानामध्यें तो आरूढ झाला. तें दिव्य विमान विहारस्थानभूत आकाशामध्यें स्थित होतें व त्यावर आरूढ झालेला रावण नानाप्रकारच्या भराऱ्या मारूनही त्रैलोक्यामध्यें संचार करणारा होता १, २. त्या विमानांतून तेजोमय व शुद्ध असा रविदेव त्यानें अवलोकन केला. उत्कृष्ट सुवर्णाचीं बाहुभूषणें आणि रत्नयुक्त वस्त्रें ह्यांनीं तो रवि भूषित झालेला होता ३; शुभ कुंडलांच्या योगानें त्याचें मुख झळकत असून तो उदयाचलावर आलेला होता; बाहुभूषणें व पदकें हे अलंकार त्यानें धारण केले होते; आरक्तवर्ण माला त्याच्या कंठामध्यें लोंबत होती ४; रक्तचंदन, त्याच्या शरीराला लाविलेलें होतें; हजारों किरणांच्या योगानें तो उज्ज्वल दिसत होता; तो आदित्य आदिदेव असून उच्चैःश्रवःसंज्ञक अश्व त्याचें वाहन होतें; आणि तो जगदीश जगत्साक्षी असून आदि, अंत व मध्य ह्यांनीं रहित होता ५. त्या श्रेष्ठ सूर्य देवाला अवलोकन करितांक्षणीं त्याच्या तेजाच्या

शासनम् । युद्धार्थं रावणः प्राप्तो युद्धं तस्य प्रदीयताम् ७ निर्जितोऽस्मीति वा ब्रूहि पक्षमेकतरं कुरु । तस्य तद्वचनाद्रक्षः सूर्यस्यान्तिकमागमत् ८ पिङ्गलं दण्डिनं चैव पश्य ते द्वारपालकौ । ताभ्यामाख्याय तत्सर्वं रावणस्य विनिश्चयम् ९ तूष्णीमास्ते प्रहस्तस्तु तत्र तेजोंशुदीपितः । दण्डी गतो रवेः पार्श्वं प्रणम्याख्यातवान्रवेः १० श्रुत्वा तु सूर्यस्तद्वृत्तं दण्डिनो रावणस्य ह । उवाच वचनं धीमान्बुद्धिपूर्वं क्षपापहः ११ गच्छ दण्डिञ्जयस्वैनं निर्जितोऽस्मीति वा वद । यत्तेऽभिकाङ्क्षितं कार्षीः कंचित्कालं क्षपाचरम् १२ स गत्वा वचनात्तस्य राक्षसस्य महात्मनः । कथयामास तत्सर्वं सूर्योक्तवचनं तदा १३ स श्रुत्वा वचनं तस्य दण्डिनो राक्षसेश्वरः । घोषयित्वा जगामाथ स्वजयं राक्षसाधिपः १४ [१०७७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ २ ॥

अथ संचिन्त्य लङ्केशः सोमलोकं जगाम ह । मेरुशृङ्गवरे रम्ये

---

प्रभावानें दिपून गेलेला तो राक्षसश्रेष्ठ प्रहस्ताला ह्मणाला ६ " हे अमात्या, तूं ह्याच्याकडे जा आणि माझ्या आज्ञेनें तूं ह्याला—रावण युद्धार्थ प्राप्त झाला आहे, त्याच्याशीं युद्ध कर किंवा पराजित झालों असें ह्मण; दोहोंपैकीं कोणत्या तरी एका पक्षाचें अवलंबन कर—असें सांग ". त्याच्या आज्ञेप्रमाणें तो प्रहस्त राक्षस सूर्याचे संनिध गेला ७,८; आणि पिंगल व दंडी हे दोन द्वारपाल त्याच्या दृष्टीं पडले असतां रावणाचा तो सर्व निश्चय त्यांना कळविल्यानंतर ९ तेजाच्या किरणांनीं दिपून गेलेला तो प्रहस्त तेथेंच स्वस्थ उभा राहिला. नंतर दंडी रवीसमीप गेला आणि प्रणाम करून त्यानें तें वृत्त रवीला कळविलें १०. परंतु, दंडीच्या मुखांतून रावणाचें तें वृत्त श्रवण केल्यानंतर रात्रीचा नाश करणारा तो बुद्धिमान् सूर्य विचारपूर्वक त्याला ह्मणाला " हे दंडि, तूं जा आणि त्याचा पराजय कर अथवा मी पराजित झालों असें त्याला सांग. दोहोंपैकीं जें तुला योग्य दिसेल तें तूं त्याला सांग अथवा कांहीं वेळपर्यंत त्या निशाचराचा मनोरथ तू परिपूर्ण कर ( ह्मणजे मी पराजित झालों असेंच त्याला सांगून तूं कांहीं दिवस काढ) ११,१२. त्या सूर्याच्या आज्ञेप्रमाणें तो दंडी त्या महात्म्या राक्षसाकडे गेला आणि सूर्यानें केलेलें सर्व भाषण त्यानें त्याला कळविलें १३. त्या दंडीचें भाषण श्रवण केल्यानंतर राक्षसाधिपति रावणानें स्वतःच्या जयाविषयीं तेथें घोष केला आणि नंतर तो राक्षसेश्वर तेथून निघून गेला १४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं दुसरा सर्ग समाप्त झाला ॥१२॥

नंतर थोडा विचार करून लंकाधिपति रावण सोमलोकीं गेला. त्या वीर्यवान् राव-

रजनीमुष्य वीर्यवान् १ अथ स्यन्दनमारूढो दिव्यस्रगनुलेपनः । अप्सरोगणमुख्येन सेव्यमानस्तु गच्छति २ रतिश्रान्तोऽप्सरोङ्केषु चुम्बितः स विबुध्यते । दृष्टस्तु पुरुषस्तेन दृष्ट्वा कौतूहलान्वितः ३ अथापश्यदृषिं तत्र दृष्ट्वा चैवमुवाच तम् । स्वागतं तव देवर्षे कालेनैवागतो ह्यसि ४ कोऽयं स्यन्दनमारूढो ह्यप्सरोगणसेवितः । निर्लज्ज इव संयाति भयस्थानं न विन्दति ५ रावणेनैवमुक्तस्तु पर्वतो वाक्यमब्रवीत् । शृणु वत्स यथा तत्त्वं वक्ष्ये चाहं महामते ६ अनेन निर्जिता लोका ब्रह्मा चैवाभितोषितः । एष गच्छति मोक्षाय सुसुखं स्थानमुत्तमम् ७ तपसा निर्जिता यद्वद्भवता राक्षसाधिप । प्रयाति पुण्यकृत्तद्वत्सोमं पीत्वा न संशयः ८ त्वं तु राक्षसशार्दूल शूरः सत्यपराक्रमः । नैवेदृशेषु क्रुद्ध्यन्ति बलिनो धर्मचारिषु ९ अथापश्यद्रथवरं महाकायं महौजसम् । जाज्वल्यमानं वपुषा गीतवादित्रनिः-

---

णानें प्रथमतः रम्य व श्रेष्ठ अशा मेरु पर्वताच्या शिखरावर त्या रात्रीं वास्तव्य केलें १. तदनंतर दिव्य माला ज्यानें धारण केल्या आहेत, दिव्य उटी ज्याच्या शरीराला लाविलेली आहे, व अप्सरांच्या गणांतील मुख्य मुख्य अप्सरा ज्याची सेवा करीत आहेत, असा एक पुरुष रथारूढ होऊन जात असतां रावणानें अवलोकन केला २. सुरतक्रीडेमुळें तो पुरुष श्रांत झाला असतां अप्सरांच्या अंकावर शयन करीत असे आणि अप्सरा त्याचें चुंबन घेऊन त्याला उठवीत असत. असा पुरुष रावणानें अवलोकन केला व अवलोकन करतांक्षणीं तो कोण हें जाणण्याची त्याला जिज्ञासा उत्पन्न झाली ३. इतक्यामध्यें एक ऋषि त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां तो दृष्टीं पडल्यावर रावण त्याला ह्मणाला " हे देवर्षे, तुझें स्वागत असो. तूं बरा वेळेवरच आला आहेस ४. अरे, अप्सरांचे समुदाय ज्याची सेवा करीत आहेत असा हा कोण बरें रथारूढ होऊन निर्लज्ज पुरुषाप्रमाणें जात आहे ! ( अशा रीतीनें जाणाऱ्याला ) हें स्थान भयप्रद आहे असें आढळून आलें नाहीं ! " ५. रावणानें असें विचारिलें असतां पर्वतऋषि त्याला ह्मणाले " हे वत्सा, श्रवण कर. हे महामते, मी तुला खरें खरें वृत्त कथन करितों ६. ह्या राजानें लोक जिंकिले असून ब्रह्मदेवालाही संतुष्ट केलें आहे आणि हा मोक्षप्राप्तीकरितां ह्मणजे अत्यंत सुखावह असें उत्कृष्ट स्थान प्राप्त करून घेण्याकरितां जात आहे ७. हे राक्षसाधिपते, तुझ्याप्रमाणें ह्यानेंही तपाच्या योगानें लोक जिंकिले आहेत आणि हा पुण्य कर्म करणारा राजा सोमपान करून खरोखर उत्कृष्ट स्थानाला जात आहे ८. हे राक्षसश्रेष्ठा, तूंही शूर असून सत्यपराक्रमी आहेस. तेव्हां अशा धर्मानें वागणाऱ्यांवर बलाढ्य

स्वनैः १० कृत्र गच्छति देवर्षे भ्राजमानो महाद्युतिः। किन्नरैश्च प्रगायद्भिर्नृत्यद्भिश्च मनोरमम् ११ श्रुत्वा चैनमुवाचाथ पर्वतो मुनिसत्तमः। एष शूरो रणे योद्धा सङ्ग्रामेष्वनिवर्तकः १२ युध्यमानस्तथैवैष प्रहारैर्जर्जरीकृतः। कृती शूरो रणे जेता स्वाम्यर्थे त्यक्तजीवितः १३ सङ्ग्रामे निहतोऽमित्रैर्हत्वा च समरे बहून्। इन्द्रस्यातिथिरेवैष अथ वा यत्र गच्छति १४ नृत्यगीतपरैर्लोकैः सेव्यते नरसत्तमः। पप्रच्छ रावणो भूयः कोऽयं यात्यर्कसंनिभः १५ रावणस्य वचः श्रुत्वा पर्वतो वाक्यमब्रवीत्। य एष दृश्यते राजन्विमाने सर्वकाञ्चने १६ अप्सरोगणसंयुक्ते पूर्णचन्द्रनिभाननः। सुवर्णदो महाराज विचित्राभरणाम्बरः १७ एष गच्छति शीघ्रेण यानेन तु महाद्युतिः। पर्वतस्य वचः श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् १८ एते वै यान्ति राजानो ब्रूहि त्वमृषिसत्तम। को ह्यत्र याचितो दद्याद्युद्धातिथ्यं ममाद्य वै १९ तं ममाख्याहि धर्मज्ञ पिता मे त्वं हि धर्मतः। एवमुक्तः प्रत्युवाच

---

लोक क्रुद्ध होत नाहींत " ९. तदनंतर महातेजस्वी, कांतीनें झळकत असलेला आणि प्रचंड आकारानें युक्त असलेला एक उत्कृष्ट रथ अवलोकन करून रावण प्रश्न करूं लागला " हे देवर्षे, गीतें व वाद्यें ह्यांचा घोष चालला असतांना आणि किन्नर मनोहर गायन व नृत्य करीत असतांना हा कोण महातेजस्वी पुरुष झळकत चालला आहे व हा कोठें चालला आहे ! " १०,११. हें ऐकून मुनिश्रेष्ठ पर्वत ह्मणाले " हा शूर असून रणामध्यें युद्ध करणारा आहे; संग्राममध्यें हा परावृत्त होणारा नाहीं १२. युद्ध करीत असतांना शत्रूंच्या प्रहारांनीं जरी हा जर्जर झाला तरी स्वामीकरितां जिवावर उदार होऊन हा शूर रणामध्यें शत्रूला जिंकून कृतकृत्य होत असतो १३. संग्राममध्यें ह्यानेंही असंख्य शत्रूंचा वध केला आहे व परिणामीं ह्याचाही शत्रूंच्या हातून वध झाला आहे. हा सांप्रत इंद्राचाच नव्हे परंतु, जिकडे जाईल त्याचा हा अतिथि होत असतो १४ आणि नृत्यगायनाविषयीं तत्पर राहून लोक ह्या पुरुषश्रेष्ठाची सेवा करीत असतात ". नंतर पुनरपि रावण ह्मणाला " हा कोण सूर्यतुल्य तेजस्वी पुरुष येत आहे ! " १५. रावणाचा प्रश्न ऐकून घेऊन पर्वत ह्मणाला " हे राजा, अप्सरोगणांनीं युक्त अशा सुवर्णमय विमानामध्यें जो हा दृष्टीं पडत आहे व ज्याचें मुख पूर्ण चंद्राप्रमाणें असून विचित्र भूषणें व वस्त्रें ज्यानें धारण केलेलीं आहेत तो हा, हे महाराज, सुवर्णद ह्मणून प्रसिद्ध आहे १६, १७. हा महातेजस्वी राजा, शीघ्र गमन करणाऱ्या विमानांतून जात आहे. " हें पर्वताचें भाषण श्रवण करून रावण ह्मणाला १८ " हे ऋषिश्रेष्ठ, हे राजे जात आहेत; परंतु, प्रार्थना केली असतां आज माझें युद्धरूप

रावणं पर्वतस्तदा २० स्वर्गार्थिनो महाराज नैते युद्धार्थिनो नृपाः। वक्ष्यामि ते महाभाग यस्ते युद्धं प्रदास्यति २१ स तु राजा महातेजाः सप्तद्वीपेश्वरो महान् । मांधातेत्यभिविख्यातः स ते युद्धं प्रदास्यति २२ पर्वतस्य वचः श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् । कुतोऽसौ तिष्ठते राजा तत्समाचक्ष्व सुव्रत २३ सोऽहं यास्यामि तत्रैव यत्रासौ नरपुङ्गवः ।' रावणस्य वचः श्रुत्वा मुनिर्वचनमब्रवीत् २४ युवनाश्वसुतो राजा मांधाता राजसत्तमः । सप्तद्वीपसमुद्रान्तां जित्वेहाभ्यागमिष्यति २५ अथापश्यन्महाबाहुस्त्रैलोक्ये वरदर्पितः । अयोध्यायाः पतिं वीरं मांधातारं नृपोत्तमम् २६ सप्तद्वीपाधिपं यान्तं चन्दनेन विराजता । काञ्चनेन विचित्रेण माहेन्द्राभेण भास्वता २७ जाज्वल्यमानं रूपेण दिव्यगन्धानुलेपनम् । तमुवाच दशग्रीवो युद्धं मे दीयतामिति २८ एवमुक्तो दशग्रीवं प्रहस्येदमुवाच ह । यदि ते जीवितं नेष्टं ततो युद्ध्यस्व राक्षस २९ मांधातुर्वचनं श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् । वरुणस्य कुबेरस्य यमस्यापि न विव्यथे ३० किं पुनर्मानुषात्त्वत्तो

---

आतिथ्य करण्यास ह्यांपैकीं कोण तयार आहे ? १९ तो आपण मला कथन करा. हे धर्मवेत्त्या, धर्मानें तूं माझा पिता आहेस ". असें रावणानें भाषण केलें असतां पर्वतमुनि रावणाला ह्मणाले २० " हे महाराजा, हे राजे युद्धेच्छु नसून स्वर्गेच्छु आहेत. तथापि, हे महाभाग्यवान्, तुझ्याशीं कोण युद्ध करील तो मी सांगतों " २१. तो महातेजस्वी सप्तद्वीपांचा अधिपति महान् राजा मांधाता या नावानें विख्यात आहे तो तुझ्याशीं युद्ध करील २२. पर्वताचें भाषण श्रवण केल्यानंतर रावण ह्मणाला " हे सुव्रता, तो राजा कोठें आहे तें आपण मला सांगा २३ ह्मणजे जिकडे तो पुरुषश्रेष्ठ असेल तिकडे हा मी निघालोंच ". रावणाचें भाषण श्रवण केल्यावर ते मुनि ह्मणाले २४ " युवनाश्वपुत्र नृपश्रेष्ठ मांधाताराजा सप्तद्वीप व समुद्र ह्यांसहवर्तमान पृथ्वी जिंकून इकडेच येईल " २५. इतक्यांत वरामुळेंच त्रैलोक्यांत गर्विष्ट झालेला त्या महापराक्रमी रावण त्यानें अयोध्याधिपति, वीर व नृपश्रेष्ठ मांधात्याला अवलोकन केलें २६. त्या सप्तद्वीपाधिपति राजाचें शरीर चंदनानें उज्वल दिसत होतें; विचित्र सुवर्णभूषणांच्या योगानें तें झळकत होतें; इंद्राच्या शरीराप्रमाणें त्याचा आकार होता आणि दिव्य सुगंधी द्रव्यांची उटी लाविलेला तो राजा त्या देहानें चमकत होता. " माझ्याशीं युद्ध कर " असें भाषण रावणानें त्याच्याशीं केलें २७,२८ असतां तो हास्य करून रावणाला ह्मणाला " तुला जर जीवित नको असेल तर, हे राक्षसा, माझ्याशीं युद्ध कर " २९. मांधात्याचें भाषण श्रवण करून रावण ह्मणाला

रावणो भयमाविशेत् । एवमुक्त्वा राक्षसेन्द्रः क्रोधात्संप्रज्वलन्निव ३१
आज्ञापयामास तदा राक्षसान्युद्धदुर्मदान् । अथ क्रुद्धास्तु सचिवा राव-
णस्य दुरात्मनः ३२ ववर्षुः शरजालानि क्रुद्धा युद्धविशारदाः । अथ
राज्ञा बलवता कङ्कपत्रैः शिलाशितैः ३३ इषुभिस्ताडिताः सर्वे प्रहस्तशु-
कसारणाः । महोदरविरूपाक्षा अकम्पनपुरोगमाः ३४ अथ प्रहस्तस्तु
नृपमिषुवर्षैरवाकिरत् । अप्राप्तानेव तान्सर्वान्प्रचिच्छेद नृपोत्तमः ३५
भुशुण्डीभिश्च भल्लैश्च भिन्दिपालैश्च तोमरैः । नरराजेन दह्यन्ते तृणभारा
इवाग्निना ३६ ततो नृपवरः क्रुद्धः पञ्चभिः प्रबिभेद तम् । तोमरैश्च महावेगैः
पुनः क्रौञ्चमिवाग्निजः ३७ ततो मुहुर्भ्रामयित्वा मुद्गरं यमसंनिभम् । प्राह-
रत्सोऽतिवेगेन राक्षसस्य रथं प्रति ३८ स पपात महावेगो मुद्गरो वज्र-
संनिभः । स तूर्णं पातितस्तेन रावणः शक्रकेतुवत् ३९ तदा स नृपतिः
प्रीत्या हर्षोद्भूतबलो बभौ । सकलेन्दुकलाः स्पृष्ट्वा यथाम्बु लवणाम्भसः ४०
ततो रक्षोबलं सर्वं हाहाभूतमचेतनम् । परिवार्याथ तं तस्थौ राक्षसेन्द्रं

---

" वरुण, कुबेर आणि यम ह्यांचें ज्याला भय वाटलें नाहीं त्या ३० रावणाला तुज मानवाचें भय वाटेल काय ? " असें बोलून क्रोधानें जळत असलेल्या त्या राक्षसाधिपति रावणानें ३१ युद्धामध्यें जेरीस न येणाऱ्या राक्षसांना आज्ञा केली. तेव्हां दुरात्म्या रावणाचे ते सचिव क्रुद्ध झाले ३२ आणि युद्धामध्यें निपुण असलेल्या त्या क्रुद्ध सचिवांनीं बाणसमुदायांची वृष्टि केली. तदनंतर शिळेवर घासलेल्या कंकपत्र बाणांनीं त्या बलाढ्य राजानें प्रहस्त, शुक, सारण, महोदर, विरूपाक्ष व अकंपनप्रभृति इतरही राक्षस ह्या सर्वांना ताडण केलें ३३,३४. तदनंतर प्रहस्तानें बाणवृष्टीच्या योगानें त्या राजाला भरून काढण्याचें मनामध्यें आणिलें; परतु, ते त्याचे सर्वही बाण येऊन पोंचण्यापूर्वींच त्या नृपश्रेष्ठानें तोडून टाकिले ३५. अग्नीच्या योगानें ज्याप्रमाणें गवताच्या गंजी दग्ध होऊन जातात त्याप्रमाणें त्या राजाच्या हातून भुशुंडी, भल्ल, भिंदिपाल व तोमर ह्यांच्या योगानें ते राक्षस दग्ध होऊं लागले ३६. तदनंतर क्रुद्ध झालेल्या त्या नृपश्रेष्ठानें पुनरपि क्रौंचपर्वताला वेध करणाऱ्या स्कंधाप्रमाणें महावेगवान् अशा पांच तोमरांनीं त्या रावणाला वेध केला ३७ व नंतर यमदंडतुल्य मुद्गर अनेकवेळां फिरवून अतिवेगानें त्यानें राक्षसाच्या रथावर फेंकिला असतां ३८ तो महावेगवान् व वज्रतुल्य मुद्गर तेथें येऊन आदळला व त्यानें इंद्रध्वजाप्रमाणें रावणाला सत्वर खालीं पाडिलें ३९. तेव्हां आनंदामुळें व हर्षामुळें त्या राजाला अधिकच बल आलें आणि संपूर्ण चंद्रकलांचा स्पर्श झाला असतां वृद्धिंगत होणाऱ्या समुद्राप्रमाणें तो वृद्धिंगत झालेला भासूं लागला ४०.

समन्ततः ४१ ततश्चिरात्समाश्वस्य रावणो लोकरावणः। मांधातुः पीडयामास देहं लङ्केश्वरो भृशम् ४२ मूर्च्छितं तु नृपं दृष्ट्वा प्रहृष्टास्ते निशाचराः। चुक्रुशुः सिंहनादांश्च प्रक्ष्वेलन्तो महाबलाः ४३ लब्धसंज्ञो मुहूर्तेन अयोध्याधिपतिस्तदा। दृष्ट्वा तं मन्त्रिभिः शत्रुं पूज्यमानं निशाचरैः ४४ जातकोपो दुराधर्षश्चन्द्रार्कसदृशद्युतिः। महता शरवर्षेणापातयद्राक्षसं बलम् ४५ चापस्यैव निनादेन तस्य बाणरवेण च। संचचाल ततः सैन्यमुद्धूत इव सागरः ४६ तद्युद्धमभवद्घोरं नरराक्षससङ्कुलम् ४७ अथाविष्टौ महात्मानौ नरराक्षससत्तमौ। कार्मुकासिधरौ वीरौ वीरासनगतौ तदा ४८ मांधाता रावणं चैव रावणश्चैव तं नृपम्। क्रोधेन महताविष्टौ शरवर्षं मुमोचतुः ४९ तौ परस्परसंक्षोभात्प्रहारैः क्षतविक्षतौ। कार्मुकेऽस्त्रं समाधाय रौद्रमस्त्रममुञ्चत ५० आग्नेयेन तु मांधाता तदस्त्रं पर्यवारयत्। गान्धर्वेण दशग्रीवो वारुणेन च राजराट् ५१ गृहीत्वा स तु ब्रह्मास्त्रं सर्व-

---

तदनंतर सर्व राक्षससैन्यामध्यें हाहाकार उडून गेला व काहींएक सुचनासें झालेलें तें सैन्य त्या राक्षसाधिपतीच्या भोंवतीं गराडा देऊन उभें राहिलें ४१. तदनंतर लोकांना भय उत्पन्न करणारा लंकाधिपति रावण बऱ्याचवेळानें शुद्धीवर आला व मांधात्याच्या शरीराला पीडा देऊं लागला ४२. पुढें तो राजा मूर्च्छित झाल्याचें अवलोकन करून ते महाबलाढ्य निशाचर आनंदित झाले आणि दंड ठोकीत ठोकीत सिंहगर्जना करूं लागले ४३. नंतर एका मुहूर्तानें अयोध्याधिपति मांधाता सावध झाला; राक्षसमंत्री शत्रूची प्रशंसा करीत आहेत असें आढळून आल्यावर तो क्रुद्ध झाला आणि चंद्रसूर्यांप्रमाणें ज्याचें तेज आहे अशा त्या मांधात्यानें प्रचंड बाणवृष्टीच्या योगानें राक्षससैन्य हाणून पाडिलें ४४,४५ असतां क्षुब्ध झालेल्या सागराप्रमाणें त्याच्या धनुष्याच्या व बाणाच्या ध्वनीनें तें सैन्य क्षुब्ध झालें ४६ व नरराक्षसांची ज्यांत गर्दी उडालेली आहे असें घोर युद्ध नंतर सुरू झालें ४७. तदनंतर नरश्रेष्ठ व राक्षसश्रेष्ठ अशा उभयतां महात्म्या वीरांना आवेश चढला; उभयतांनींही वीरासनें ठोकिलीं आणि उभयतांनींही धनुष्यासहवर्तमान खड्ग धारण केलें ४८. मांधात्यानें रावणावर व रावणानें त्या राजावर अशा रीतीनें त अतिशय क्रुद्ध झालेले वीर एकमेकांवर बाणवृष्टि करूं लागले ४९. परस्परांविषयीं क्षोभ उत्पन्न झाल्यामुळें प्रहारांच्या योगानें ते उभयतांही जखमी झाले असतां रावणानें आपल्या, धनुष्याला बाण लावून त्याला रौद्रास्त्रानें अभिमंत्रण केलें व तें अस्त्र सोडिलें ५०. परंतु, मांधात्यानें आग्नेय अस्त्रानें त्या अस्त्राचें निवारण केलें. नंतर रावणानें गांधर्व अस्त्राचा प्रयोग केला

भूतभयावहम् । वेदयामास मांधाता दिव्यं पाशुपतं महत् ५२ तदस्त्रं घोररूपं तु त्रैलोक्यभयवर्धनम् । दृष्ट्वा त्रस्तानि भूतानि स्थावराणि चराणि च ५३ वरदानात्तु रुद्रस्य तपसाराधितं महत् । ततः संकम्पते सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ५४ देवाः संकम्पिताः सर्वे लयं नागाश्च संगताः । अथ तौ मुनिशार्दूलौ ध्यानयोगादपश्यताम् ५५ पुलस्त्यो गालवश्चैव वारयामास तं नृपम् । सोपालम्भैश्च विविधैर्वाक्यै राक्षससत्तमम् ५६ तौ तु कृत्वा तदा प्रीतिं नरराक्षसयोस्तदा। संप्रस्थितौ सुसंहृष्टौ पथा येनैव चागतौ ५७ [११३३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ ३ ॥

गताभ्यामथ विप्राभ्यां रावणो राक्षसाधिपः। दशयोजनसाहस्रं प्रथमं तु मरुत्पथम् १ यत्र तिष्ठन्ति नित्यं हि हंसाः सर्वगुणान्विताः। अथ ऊर्ध्वं तु गत्वा वै मरुत्पथमनुत्तमम् २ दशयोजनसाहस्रं तदेव परिगण्यते । तत्र संनिहिता मेघास्त्रिविधा नित्यशः स्थिताः ३ आग्नेयाः पक्षिणो ब्राह्मास्त्रिविधास्तत्र ते स्थिताः। अथ गत्वा तृतीयं तु वायोः पन्थानमुत्तमम् ४

---

असतां राजाधिराज मांधात्यानें वारुण अस्त्राचा प्रयोग केला ५१. नंतर सर्व प्राण्यांना भय उत्पन्न करणारें असें जें दिव्य व प्रचंड पाशुपत अस्त्र तें मनामध्यें आणून मांधात्यानें जपिलें असतां ५२ त्रैलोक्याचें भय वृद्धिंगत करणारें तें घोररूप अस्त्र अवलोकन करितांक्षणीं चराचर प्राणी त्रस्त झाले ५३. तपश्चर्या करून रुद्राचा वर प्राप्त झाल्यामुळें मांधात्याला प्राप्त झालेल्या त्या प्रचंड अस्त्राच्या योगानें चराचर प्राण्यांसहवर्तमान सर्व त्रैलोक्य कंपित होऊं लागलें ५४; देवही थरथर कांपूं लागले आणि नागही लयाला जाऊं लागले. नंतर पुलस्त्य व गालव ह्या उभयतां श्रेष्ठ मुनींनीं समाधियोगानें तो प्रकार जाणून त्या राजाचें निवारण केलें आणि निंदापूर्वक नानाप्रकारचीं भाषणें करून त्यांनीं त्या राक्षसश्रेष्ठालाही युद्धापासून परावृत्त केलें ५५, ५६. ह्याप्रमाणें त्या उभयतां नरराक्षसांमध्यें प्रेम उत्पन्न केल्यानंतर ते उभयतां मुनिश्रेष्ठ अतिशय आनंदित झाले आणि आल्या मार्गानें परत गेले ५७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

ते उभयतां विप्र गेल्यानंतर राक्षसाधिपति रावण दहा हजार योजनें असलेला जो प्रथम वायुमार्ग तेथें गेला १. तेथें सर्वगुणसंपन्न हंस नेहेमीं वास्तव्य करीत असतात. तदनंतर त्याच्याही ऊर्ध्वभागीं अनुपम वायुमार्गावर तो गेला २. तोही मार्ग दहा हजार योजनेंच आहे. त्या ठिकाणीं तीन प्रकारचे मेघ नेहेमीं संनिध असतात ३.

नित्यं यत्र स्थिताः सिद्धाश्चारणाश्च मनस्विनः। दशैव तु सहस्राणि योजनानां तथैव च ५ चतुर्थं वायुमार्गं तु शीघ्रं गत्वा परंतप। वसन्ति यत्र नित्यस्था भूताश्च सविनायकाः ६ अथ गत्वा स वै शीघ्रं पञ्चमं वायुगोचरम्। दशैव च सहस्राणि योजनानां तथैव च ७ गङ्गा यत्र सरिच्छ्रेष्ठा नागा वै कुमुदादयः। कुञ्जरास्तत्र तिष्ठन्ति ये तु मुञ्चन्ति सीकरम् ८ गङ्गातोयेषु क्रीडन्ति पुण्यं वर्षन्ति सर्वशः। ततो रविकरभ्रष्टं वायुना पेशलीकृतम् ९ जलं पुण्यं प्रपतति हिमं वर्षति राघव। ततो जगाम षष्ठं स वायुमार्गं महाद्युते १० योजनानां सहस्राणि दशैव तु स राक्षसः। यत्रास्ते गरुडो नित्यं ज्ञातिबान्धवसत्कृतः ११ दशैव तु सहस्राणि योजनानां तथोपरि। सप्तमे वायुमार्गे च यत्रैत ऋषयः स्मृताः १२ अत ऊर्ध्वं तु गत्वा वै सहस्राणि दशैव तु। अष्टमं वायुमार्गं तु यत्र गङ्गा प्रतिष्ठिता १३ आकाशगङ्गा विख्याता आदित्यपथसंस्थिता। वायुना धार्यमाणा सा महावेगा महास्वना १४ अत ऊर्ध्वं प्रवक्ष्यामि चन्द्रमा

---

आग्नेय, पक्षी आणि ब्राह्म हे ते संनिध असलेले तीन मेघ होत. नंतर वायूच्या तिसऱ्या उत्कृष्ट मार्गाचें त्यानें आक्रमण केलें असतां ४ विचारी सिद्ध व चारण तेथें नेहमीं स्थित असलेले त्याच्या दृष्टीं पडले व तोही मार्ग दहा हजार योजनेंच होता ५. हे शत्रुतापना, चवथ्या वायुमार्गामध्यें तो सत्वर गेला असतां विनायकांसहवर्तमान तेथें नेहमीं वास्तव्य करणारे भूतगण त्याच्या दृष्टीं पडले ६. नंतर सत्वर पांचव्या वायुमार्गामध्यें तो गेला असतां तो मार्ग दहा हजार योजनेंच असल्याचें त्याला आढळून आलें ७. श्रेष्ठ नदी गंगा, कुमुदप्रभृति नाग आणि जलकण सोडणारे गज तेथें असतात ८. ते गज गंगेच्या उदकांमध्यें क्रीडा करीत असतात; पवित्र उदकांची सर्व बाजूंनीं वृष्टि करीत असतात आणि नंतर सूर्यकिरणांचा संबंध होऊन खालीं आलेल्या त्या उदकाचा वायूशीं संबंध झाला असतां ९ पवित्र उदक पडूं लागतें आणि, हे राघवा, बर्फाचीही वृष्टि होऊं लागते. तदनंतर, हे महातेजस्वी राघवा, तो राक्षस वायूच्या सहाव्या मार्गावर गेला असतां तोही मार्ग दहा हजार योजनेंच होता. त्याठिकाणीं गरुड नेहमीं वास्तव्य करीत असतो व ज्ञातिबांधव त्याचा सत्कार करीत असतात १०, ११. तदनंतर त्याचप्रमाणें दहा हजार योजनें वर असलेल्या सातव्या वायुमार्गामध्यें तो गेला असतां ते प्रसिद्ध ऋषि त्याच्या दृष्टीं पडले १२. नंतर दहा हजार योजनेंच वर ओठव्या वायुमार्गामध्यें तो गेला असतां सूर्यकिरणांच्या मार्गामध्यें असलेली व आकाशगंगा ह्मणून प्रख्यात असलेली गंगा त्याठिकाणीं त्याच्या दृष्टीं पडली १३. त्या गंगेला वायूचा आधार आहे व

यत्र तिष्ठति । अशीतिं तु सहस्राणि योजनानां प्रमाणतः १५ चन्द्रमा-स्तिष्ठते यत्र नक्षत्रग्रहसंयुतः । शतं शतसहस्राणि रश्मयश्चन्द्रमण्डलात् १६ प्रकाशयन्ति लोकांस्तु सर्वसत्त्वसुखावहाः । ततो दृष्ट्वा दशग्रीवं चन्द्रमा निर्दहन्निव १७ स तु शीताग्निना शीघ्रं प्रादहद्रावणं तदा । नासहं-स्तस्य सचिवाः शीताग्निभयपीडिताः १८ रावणं जयशब्देन प्रहस्तोऽथै-नमब्रवीत् । राजञ्शीतेन वध्यामो निवर्ताम इतो वयम् १९ चन्द्ररश्मिप्र-तापेन रक्षसां भयमाविशत् । स्वभाव एष राजेन्द्र शीतांशोर्दहनात्मकः २० एतच्छ्रुत्वा प्रहस्तस्य रावणः क्रोधमूर्छितः । विस्फार्य धनुरुद्यम्य नाराचै-स्तमपीडयत् २१ अथ ब्रह्मा तदागच्छत्सोमलोकं त्वरान्वितः । दशग्रीव महाबाहो साक्षाद्विश्रवसः सुत २२ गच्छ शीघ्रमितः सौम्य मा चन्द्रं पीडयस्व वै । लोकस्य हितकामो वै द्विजराजो महाद्युतिः २३ मन्त्रं च संप्रदास्यामि प्राणात्ययगतिर्यदा । यस्त्वेतं संस्मरेन्मन्त्रं नासौ मृत्युमवा-प्नुयात् २४ एवमुक्तो दशग्रीवः प्राञ्जलिर्देवमब्रवीत् । यदि तुष्टोऽसि मे

---

तिचा वेग मोठा असून घोषही मोठा आहे १४. ह्यानंतर चंद्रमा जेथें आहे तें स्थान कथन करितों. ऐंशी हजार योजनें तें स्थान असून नक्षत्र व ग्रह ह्यांच्यांशीं ज्याचा संयोग होत असतो तो चंद्रमा त्या ठिकाणीं असतो. चंद्रमंडलापासून लक्षावधि किरणें लोकांना प्रकाशित करीत असतात व सर्व प्राण्यांच्या सुखाला तीं कारणीभूत होत असतात. नंतर रावण दृष्टीं पडतांक्षणीं चंद्र दग्ध करण्यासच उद्युक्त झाला आहे कीं काय असा तो त्याला मासूं लागला १५, १६, १७ आणि शीत अग्नीनें त्यानें राव-णाला सत्वर दग्धही करून टाकिलें. शीत अग्नीच्या भीतीनें पीडित झालेल्या त्या रावण-मंत्र्यांना तें शैत्य सहन झालें नाहीं १८. तेव्हां जयजयकार करून प्रहस्त रावणाला ह्मणाला "हे राजा, थंडीनें मरणाची पाळी येथें येणार असल्यामुळें आह्मी येथून परत फिरतों १९. चंद्रकिरणांच्या प्रतापानें राक्षसांना भय उत्पन्न झालें आहे आणि, हे राजेंद्रा, दग्ध करून टाकणें हा चंद्राचा स्वभावच आहे" २०. हें प्रहस्ताचें भाषण श्रवण केल्या-नंतर रावण क्रोधानें व्याप्त झाला; त्यानें आपलें धनुष्य उगारिलें आणि त्याचा टणत्कार करून नाराच बाणांनीं त्यानें चंद्राला वेध केला २१. तदनंतर ब्रह्मदेव सत्वर चंद्रलोकीं गेला आणि ह्मणाला "हे महापराक्रमी रावणा, हे प्रत्यक्ष विश्रवस्मुनींच्या पुत्रा २२, हे सौम्या, येथून सत्वर परत जा; चंद्राला पीडा देऊं नकोस. हा महा-तेजस्वी द्विजराज जगताच्या हिताची इच्छा करीत असतो २३. मी तुला एक मंत्र देईन. प्राण जाण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां जो पुरुष ह्या मंत्राचा जप करील त्याला मृत्यु

देव लोकनाथ महाव्रत २५ यदि मन्त्रश्च मे देयो दीयतां मम धार्मिक ।
यं जप्त्वाहं महाभाग सर्वदेवेषु निर्भयः २६ असुरेषु च सर्वेषु दानवेषु पतत्रिषु । त्वत्प्रसादात्तु देवेश स्यामजेयो न संशयः २७ एवमुक्तो दशग्रीवं ब्रह्मा वचनमब्रवीत् । प्राणात्ययेषु जप्तव्यो न नित्यं राक्षसाधिप २८ अक्षसूत्रं गृहीत्वा तु जपेन्मन्त्रमिमं शुभम् । जप्त्वा तु राक्षसपते त्वमजेयो भविष्यसि २९ अजप्त्वा राक्षसपते न ते सिद्धिर्भविष्यति । शृणु मन्त्रं प्रवक्ष्यामि येन राक्षसपुङ्गव ३० मन्त्रस्य कीर्तनादेव प्राप्स्यसे समरे जयम्। नमस्ते देवदेवेश सुरासुरनमस्कृत ३१ भूतभव्य महादेव हरिपिङ्गललोचन। बालस्त्वं वृद्धरूपी च वैयाघ्रवसनच्छद ३२ अर्चनीयोऽसि देव त्वं त्रैलोक्यप्रभुरीश्वरः । हरो हरितनेमी च युगान्तदहनोऽबलः ३३ गणेशो लोकशम्भुश्च लोकपालो महाभुजः । महाभागो महाशूली महादंष्ट्री महेश्वरः ३४ कालश्च बलरूपी च नीलग्रीवो महोदरः । देवान्तगस्तपोन्तश्च पशूनां पतिरव्ययः ३५ शूलपाणिर्वृषः केतुर्नेता गोप्ता हरो हरिः । जटी मुण्डी

---

प्राप्त होणार नाहीं" २४. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें सांगितलें असतां रावण हात जोडून त्या देवाला ह्मणाला "हे देव, हे लोकनाथ, हे महाव्रत, तूं जर माझ्यावर संतुष्ट झाला असलास २५ आणि मला मंत्र देण्याचें जर तुझ्या मनामध्यें असलें तर, हे धार्मिक, तो मंत्र तूं मला दे; ह्मणजे, हे महाभाग्यवान् ब्रह्मदेवा, सर्व देव, असुर, सर्व दानव व पक्षी ह्यांसंबंधानें मी निर्भय होईन २६ आणि हे सुराधिपते, तुझ्या प्रसादामुळें मी ह्यांना अजिंक्य होईन ह्यांत संशय नाहीं" २७. ह्याप्रमाणें रावणानें भाषण केलें असतां ब्रह्मदेव त्याला ह्मणाले "हे राक्षसाधिपते, प्राणात्ययप्रसंगींच ह्या मंत्राचा जप करावा; नेहमीं ह्या मंत्राचा जप करणें उपयोगीं नाहीं २८. अक्षमाला घेऊन ह्या शिरोमंत्राचा जप करावा. ह्या मंत्राचा जप केल्यानें, हे राक्षसाधिपते, तूं अजिंक्य होशील २९. हे राक्षसराज, जप केल्यावांचून तुला सिद्धि प्राप्त होणार नाहीं. हे राक्षसश्रेष्ठा, श्रवण कर; मी तुला मंत्र कथन करितों; ह्मणजे ३० ह्या मंत्राचा उच्चार करितांक्षणीं संग्रामामध्यें तुला जय प्राप्त होईल." हे देवदैत्यमान्य, हे देवदेवाधिपते, तुला नमस्कार असो ३१. हे भूतभव्यरूप महादेवा, हे हरिपिंगललोचना, तूं बाल आहेस आणि, हे व्याघ्राजिन परिधान करणाऱ्या, तूं वृद्धही आहेस ३२. हे देवा, तूं पूज्य आहेस व त्रैलोक्याधिपति ईश्वर आहेस. हर, हरितनेमि, युगांतदहन, अबल ३३, गणेश, लोकशंभु, लोकपाल, महाभुज, महाभाग, महाशूली, महादंष्ट्री, महेश्वर ३४, बलरूपी काल, नीलग्रीव, महोदर, देवांतक, तपोंतक, अक्षय पशुपति ३५, शूलपाणि, वृष, केतु, नेता, गोप्ता, हर, हरि, जटी,

शिखण्डी च लकुटी च महायशाः ३६ भूतेश्वरो गणाध्यक्षः सर्वात्मा सर्वभावनः । सर्वगः सर्वहारी च स्रष्टा च गुरुरव्ययः ३७ कमण्डलुधरो देवः पिनाकी धूर्जटिस्तथा । माननीयश्च ओङ्कारो वरिष्ठो ज्येष्ठसामगः ३८ मृत्युश्च मृत्युभूतश्च पारियात्रश्च सुव्रतः । ब्रह्मचारी गुहावासी वीणापणवतूणवान् ३९ अमरो दर्शनीयश्च बालसूर्यनिभस्तथा । श्मशानवासी भगवानुमापतिरनिन्दितः ४० भगस्याक्षिनिपाती च पूष्णो दशननाशनः । ज्वरहर्ता पाशहस्तः प्रलयः काल एव च ४१ उल्कामुखोऽग्निकेतुश्च मुनिर्दीप्तो विशांपतिः । उन्मादो वेपनकरश्चतुर्थो लोकसत्तमः ४२ वामनो वामदेवश्च प्राक्प्रदक्षिणवामनः । भिक्षुश्च भिक्षुरूपी च त्रिजटी कुटिलः स्वयम् ४३ शक्रहस्तप्रतिष्टम्भी वसूनां स्तम्भनस्तथा । ऋतुर्ऋतुकरः कालो मधुर्मधुकलोचनः ४४ वानस्पत्यो वाजसनो नित्यमाश्रमपूजितः । जगद्धाता च कर्ता च पुरुषः शाश्वतो ध्रुवः ४५ धर्माध्यक्षो विरूपाक्षस्त्रिधर्मा भूतभावनः । त्रिनेत्रो बहुरूपश्च सूर्यायुतसमप्रभः ४६ देवदेवोऽतिदेवश्च चन्द्राङ्कितजटस्तथा । नर्तको लासकश्चैव पूर्णेन्दुसदृशाननः ४७ ब्रह्मण्यश्च शरण्यश्च सर्वजीवमयस्तथा । सर्वतूर्यनिनादी च सर्वबन्धविमोक्षकः ४८ मोहनो बन्धनश्चैव सर्वदा निधनोत्तमः । पुष्पदन्तो विभागश्च मुख्यः सर्वहरस्तथा ४९ हरिश्मश्रुर्धनुर्धारी भीमो भीमपराक्रमः ।

---

मुंडी, शिखंडी, लकुटी, महायशस् ३६, भूतेश्वर, गणाध्यक्ष, सर्वात्मा, सर्वभावन, सर्वग, सर्वहारी, स्रष्टा, अक्षय गुरु ३७, कमंडलुधर, देव, पिनाकी, धूर्जटी, माननीय, ओंकार, वरिष्ठ, ज्येष्ठसामग ३८, मृत्यु, मृत्युभूत, पारियात्र, सुव्रत, ब्रह्मचारी, गुहावासी, वीणापणवतूणवान् ३९, अमर, दर्शनीय, बालसूर्यनिभ, श्मशानवासी, भगवान्, उमापति, अनिंदित ४०, भगनेत्रहारक, पूषदंतनाशक, ज्वरहर्ता, पाशहस्त, प्रलयकाल ४१, उल्कामुख, अग्निकेतु, मुनि, दीप्त, विशांपति, उन्माद, वेपनकर, चतुर्थ, लोकसत्तम ४२, वामन, वामदेव, प्राक्प्रदक्षिणवामन, भिक्षु, भिक्षुरूपी, त्रिजटी, कुटिल ४३, इंद्रहस्तस्तंभक, वसुस्तंभक, ऋतु, ऋतुकर काल, मधु, मधुकलोचन ४४, वाजसन, वानस्पत्य, आश्रमांना नित्य पूज्य, जगद्धाता, कर्ता, पुरुष शाश्वत, ध्रुव, ४५ धर्माध्यक्ष, विरूपाक्ष, त्रिधर्मा, भूतभावन, त्रिनेत्र, बहुरूप, सूर्यायुतसमप्रभ ४६, देवदेव, अतिदेव, चंद्रांकितजट, नर्तक, लासक, पूर्णेंदुसदृशानन ४७, ब्रह्मण्य, शरण्य, सर्वजीवमय, सर्वतूर्यनिनादी, सर्वबंधविमोक्षक ४८, मोहन, बंधन, सर्वद, निधनोत्तम, पुष्पदंत, विभाग, मुख्य, सर्वहर ४९, हरिश्मश्रु, धनुर्धारी, भीम आणि भीमपराक्रम.' हें जें पवित्र व उत्कृष्ट नामाष्टो-

मया प्रोक्तमिदं पुण्यं नामाष्टशतमुत्तमम् ५० सर्वपापहरं पुण्यं शरण्यं शरणार्थिनाम् । जप्तमेतद्दशग्रीव कुर्याच्छत्रुविनाशनम् ५१ [११८४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ ४ ॥

दत्त्वा तु रावणस्यैवं वरं स कमलोद्भवः । पुनरेवागमत्क्षिप्रं ब्रह्मलोकं पितामहः १ रावणोऽपि वरं लब्ध्वा पुनरेवागमत्तथा । केनचित्त्वथ कालेन रावणो लोकरावणः २ पश्चिमार्णवमागच्छत्सचिवैः सह राक्षसः । द्वीपस्थो दृश्यते तत्र पुरुषः पावकप्रभः ३ महाजाम्बूनदप्रख्य एक एव व्यवस्थितः । दृश्यते भीषणाकारो युगान्तानलसंनिभः ४ देवानामिव देवेशो ग्रहाणामिव भास्करः । शरभाणां यथा सिंहो हस्तिष्वैरावतो यथा ५ पर्वतानां यथा मेरुः पारिजातश्च शाखिनाम् । तथा तं पुरुषं दृष्ट्वा स्थितं मध्ये महाबलम् ६ अब्रवीच्च दशग्रीवो युद्धं मे दीयतामिति । अभवत्तस्य सा दृष्टिर्ग्रहमाला इवाकुला ७ दन्ताग्रसंदशतः शब्दो यन्त्रस्येवाभिभिद्यतः । जगर्जोच्चैः स बलवान्सहामात्यो दशाननः ८ स गर्जन्विविधैर्नादैर्लम्बहस्तं भयानकम् । दंष्ट्रालं

---

त्तरशत मीं कथन केलें ५० आहे तें सर्वपापनाशक, पुण्यकारक आणि शरणेच्छूंनीं आश्रय करण्यास योग्य आहे व, हे रावणा ह्याचा जप केला असतां हें शत्रुविनाशक आहे ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चवथा सर्ग समाप्त झाला ॥ ४ ॥

ह्याप्रमाणें रावणाला वर दिल्यानंतर नाभिकमलापासून उत्पन्न झालेला तो पितामह ब्रह्मदेव पुनरपि सत्वर ब्रह्मलोकीं गेला १ आणि वर प्राप्त झाल्यानंतर रावणही पुनरपि तेथून निघून गेला. पुढें कांहीं काल लोटल्यानंतर लोकांना आक्रोश करूं लावणारा रावण २ राक्षस सचिवांसहवर्तमान पश्चिमसमुद्राकडे गेला तों एक अग्नितुल्यतेजस्वी पुरुष तेथें एका बेटामध्यें त्याच्या दृष्टीं पडला ३. उत्कृष्ट सुवर्णाप्रमाणें त्याची कांति होती; तो एकटाच तेथें होता आणि प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें त्याचें रूप भयंकर होतें ४. देवांतील देवराज, ग्रहांतील सूर्य, शरभांतील सिंह, गजांतील ऐरावत ५, पर्वतांतील मेरु अथवा वृक्षांतील पारिजातच कीं काय असा तो मध्यभागीं स्थित असलेला महाबलाढ्य पुरुष अवलोकन करून त्याला रावण ह्मणाला 'माझ्याशीं युद्ध कर'. ह्यावेळीं रावणाची नेत्रपंक्ति व्याकुल झालेल्या ग्रहमालेप्रमाणें दिसूं लागली ७; तो दांत ओंठ खाऊं लागला असतां मोडणाऱ्या यंत्राप्रमाणें कडकड आवाज होऊं लागला आणि तो बलाढ्य रावण अमात्यांसहवर्तमान उच्च स्वरानें

विकटं चैव कम्बुग्रीवं महोरसम् ९ मण्डूककुक्षिं सिंहास्यं कैलासशिखरोपमम् । पद्मपादतलं भीमं रक्तताल्वकराम्बुजम् १० महानादं महाकायं मनोनिलसमं जवे । भीममाबद्धतूणीरं सघण्टाबद्धचामरम् ११ ज्वालामालापरिक्षिप्तं किङ्किणीजालनिःस्वनम् । मालया स्वर्णपद्मानां कण्ठदेशेऽवलम्बया १२ ऋग्वेदमिव शोभन्तं पद्ममालाविभूषितम् । सोऽञ्जनाचलसंकाशं काञ्चनाचलसंनिभम् १३ प्राहरद्राक्षसपतिः शूलशक्त्यृष्टिपट्टिशैः । द्वीपिना स सिंह इव ऋषभेणेव कुञ्जरः १४ सुमेरुरिव नागेन्द्रैर्नदीवेगैरिवार्णवः । अकम्पमानः पुरुषो राक्षसं वाक्यमब्रवीत् १५ युद्धश्रद्धां हि ते रक्षो नाशयिष्यामि दुर्मते । रावणस्य च यो वेगः सर्वलोकभयंकरः १६ तथा वेगसहस्राणि संश्रितानि तमेव हि । धर्मस्तस्य तपश्चैव जगतः सिद्धिहेतुकौ १७ ऊरू ह्याश्रित्य तस्थाते

---

गर्जना करूं लागला ८. नानाप्रकारच्या स्वरांनीं गर्जना करणाऱ्या त्या रावणानें त्या भयंकर पुरुषाला प्रहार केला. त्या पुरुषाचे हात लांब लांब होते; त्याच्या दाढा मोठ्या मोठ्या होत्या; त्याची मुद्रा उग्र होती; शंखाप्रमाणें त्याची मान होती; वक्षःस्थल विशाल होतें ९; त्याचें उदर बेडकाप्रमाणें होतें; मुख सिंहाप्रमाणें होतें, कैलासाशिखराच्याच उपमेस तो पात्र होता; त्याच्या पायाचे तळवे पद्मांनीं युक्त होते; तो दिसण्यांत भयंकर असून त्याची टाळु व हात हीं आरक्तवर्ण होतीं १०; त्याचें शरीर मोठें असून ध्वनिही मोठा होता; वेगामध्यें तो मन व वायु ह्यांची बरोबरी करणारा होता; त्या उग्र पुरुषानें भाता घेतला असून घंटा बांधिलेलें चामरही त्याच्यापाशीं होतें ११; ज्वालासमुदायानें तो व्याप्त झालेला होता; क्षुद्र घंटांच्या माळांचा ध्वनि त्याचे ठिकाणीं होत होता आणि कंठामध्यें लोंबत असलेल्या सुवर्णकमलांच्या मालेमुळें १२ तो पद्ममालाभूषित ऋग्वेदच कीं काय असा शोभत होता. असो. मेरुपर्वताप्रमाणें दिसत असून नीलपर्वताप्रमाणें भासत असलेल्या त्या पुरुषाला १३ राक्षसाधिपति रावणानें शूल, शक्ति, ऋष्टि व पट्टे ह्या आयुधांनीं प्रहार केले असतां व्याघ्राच्या योगानें कंपित न होणाऱ्या सिंहाप्रमाणें, बैलाच्या योगानें कंपित न होणाऱ्या गजाप्रमाणें १४ नागराजांच्या योगानें न डगमगणाऱ्या मेरुपर्वताप्रमाणें आणि नदीवेगामुळें क्षुब्ध न होणाऱ्या सागराप्रमाणें तो पुरुष कंपित न होतां राक्षसाला ह्मणाला १५ "हे दुर्बुद्धि राक्षसा, मी तुझी युद्धाची खुमखुम नाहींशी करून टाकितों". असो. सर्व लोकांना भय उत्पन्न करणारा रावणाचा वेग १६ आणि इतरही हजारों वेग हे त्या पुरुषाच्याच आश्रयाला होते. जगताच्या सिद्धीला कारणीभूत धर्म व तप १७ ह्यांनीं त्याच्या

मन्मथः शिश्नमाश्रितः । विश्वेदेवाः कटीभागे मरुतो बस्तिपार्श्वयोः १८
मध्येऽष्टौ वसवस्तस्य समुद्राः कुक्षितः स्थिताः । पार्श्वादिषु दिशः सर्वाः
सर्वसंधिषु मारुतः १९ पृष्ठं च भगवान्रुद्रो हृदयं च पितामहः । पितर-
श्चाश्रिताः पृष्ठं हृदयं च पितामहाः २० गोदानानि पवित्राणि भूमिदा-
नानि यानि च । सुवर्णवरदानानि कक्षलोमानुगानि च २१ हिमवान्हे-
मकूटश्च मन्दरो मेरुरेव च । नरं तु तं समाश्रित्य अस्थिभूता व्यव-
स्थिताः २२ पाणिर्वज्रोऽभवत्तस्य शरीरे द्यौरवस्थिता । कृकाटिकायां
संध्या च जलवाहाश्च ये घनाः २३ बाहू धाता विधाता च तथा विद्या-
धरादयः । शेषश्च वासुकिश्चैव विशालाक्ष इरावतः २४ कम्बलाश्वतरौ
चोभौ कर्कोटकधनञ्जयौ । स च घोरविषो नागस्तक्षकः सोपतक्षकः २५
करजानाश्रिताश्चैव विषवीर्यमुमुक्षवः । अग्निरास्यमभूत्तस्य स्कन्धौ रुद्रै-
रधिष्ठितौ २६ पक्षमासर्तवश्चैव दंष्ट्रयोरुभयोः स्थिताः । नासे कुहूरमा-
वास्या छिद्रेषु वायवः स्थिताः २७ ग्रीवा तस्याभवद्देवी वीणा चापि सर-

---

मांड्यांचा आश्रय केलेला होता; मदनानें त्याच्या जननेंद्रियाचा आश्रय केलेला होता; विश्वेदेव कमरेचे ठिकाणीं, मरुद्गण बस्ति व पार्श्वभाग ह्या ठिकाणीं १८, अष्ट वसु मध्यभागीं, समुद्र उदराचे ठिकाणीं सर्व दिशा पार्श्वादिभागांचें ठिकाणीं आणि वायु त्याच्या सर्व संधींचें ठिकाणीं राहिलेला होता १९. भगवान् रुद्र त्याचा पृष्ठभाग असून ब्रह्मदेव हृदय होता आणि पृष्ठभागाच्या आश्रयानें पितर राहिलेले असून पितामहांनीं हृदयाचा आश्रय केलेला होता २०. पवित्र गोदानें, भूमि-दानें व इतरही सुवर्णाचीं श्रेष्ठ दानें ह्यांनीं त्याच्या काखेंतील लोमांचा आश्रय केलेला होता २१. हिमवान्, हेमकूट, मंदर व मेरु ह्या पर्वतांनीं अस्थिरूपानें त्या पुरुषाचा आश्रय केलेला होता २२; वज्र हाच त्याचा हात होता; स्वर्गलोक त्याच्या शरीराचे ठिकाणीं होता; घाटीचे ठिकाणीं संध्या व जलवृष्टि करणारे मेघ ह्यांनीं आश्रय केलेला होता २३; धाता विधाता आणि विद्याधरप्रभृति त्याच्या हातांचा आश्रय करून राहिले होते; शेष, वासुकि, विशालाक्ष, इरावत २४, उभयतां कंबल व अश्वतर आणि कर्कोटक व धनंजय, घोर विषानें युक्त असलेला तो तक्षकनाग व उपतक्षक २५ हे जे विषरूप वीर्य सोडण्याची इच्छा करणारे भुजंग ते त्याच्या नखांचा आश्रय करून राहिलेले होते. अग्नि त्याचें मुख होतें; स्कंधांचें ठिकाणीं रुद्रानें आश्रय केला होता २६; पक्ष, मास व ऋतु हे दोन्ही दाढांचे ठिकाणीं राहिले होते; नासिकेच्या ठिकाणीं कुहू व अमावास्या ह्यांनीं वास्तव्य केलें होतें; छिद्रांचे ठिकाणीं वायु राहिले होते २७; देवी

स्वती । नासत्यौ श्रवणे चोभौ नेत्रे च शशिभास्करौ २८ वेदाङ्गानि च यज्ञाश्च ताराख्पाणि यानि च। सुवृत्तानि च वाक्यानि तेजांसि च तपांसि च २९ एतानि नररूपस्य तस्य देहाश्रितानि वै। तेन वज्रप्रहारेण लब्ध-मात्रेण लीलया ३० पाणिना पीडितं रक्षो निपपात महीतले । पतितं राक्षसं ज्ञात्वा विद्राव्य स निशाचरान् ३१ ऋग्वेदप्रतिमः सोऽथ पद्ममालावि-भूषितः । प्रविवेश च पातालं निजं पर्वतसंनिभः ३२ उत्थाय च दश-ग्रीव आहूय सचिवान्स्वयम् । क्व गतः सहसा ब्रूत प्रहस्तशुकसारणाः ३३ एवमुक्ता रावणेन राक्षसास्ते तदाऽब्रुवन् । प्रविष्टः स नरोऽत्रैव देवदानव-दर्पहा ३४ अथ संगृह्य वेगेन गरुत्मानिव पन्नगम् । स तु शीघ्रं बिल-द्वारं संप्रविश्य च दुर्मतिः ३५ प्रविवेश च तद्द्वारं रावणो निर्भयस्तदा । स प्रविश्य च पश्यद्वै नीलाञ्जनचयोपमान् ३६ केयूरधारिणः शूरान्रक्त-माल्यानुलेपनान् । वरहाटकरत्नाद्यैर्विविधैश्च विभूषितान् ३७ दृश्यन्ते तत्र नृत्यन्त्यस्तिस्रः कोट्यो महात्मनाम् । नृत्योत्सवा वीतभया विमलाः पाव-

---

हीच त्याची मान होती; सरस्वती हेंच वीणावाद्य होतें; अश्विनीकुमारांनीं त्याच्या दोन्हीं कर्णांचा आश्रय केलेला होता; सूर्यचंद्रांनीं नेत्रांचा आश्रय धरिला होता २८ आणि वेदांगें, यज्ञ, सर्व तारा, सद्वर्तनें, संभाषणें, उत्कृष्ट तेजें व तपश्चर्या २९ ह्यांनींही त्याच नररूप पुरुषाच्या देहाचा आश्रय केलेला होता. वज्रप्रहारतुल्य अशी एक त्याची चापट रावणरा-क्षसाला सहज मिळाली असतां ती बसतांक्षणीं रावण तिरमिरी येऊन भूतलावर पडला. रावणराक्षस पडल्याचें समजून आल्यावर इतर राक्षसही त्यानें पळवून लाविले ३०, ३१ आणि पद्ममालांनीं भूषित असलेला तो ऋग्वेदतुल्य व पर्वतप्राय पुरुष आपल्या पातालामध्यें प्रविष्ट झाला ३२. इकडे (कांहीं वेळानें) रावण उठला आणि सचिवांना हाक मारून ह्मणाला "हे प्रहस्तशुकसारणहो, हा एकाएकीं कोठें गेला हें मला सांगा" ३३. ह्याप्रमाणें रावणानें विचारिलें असतां 'देवदानवांचा गर्व नाहींसा करणारा तो नर येथेंच शिरला आहे' असें त्यांनीं त्याला सांगितलें ३४. नंतर गरुड ज्याप्रमाणें भुजं-गाला वेगानें धरितो त्याप्रमाणें त्या दुर्बुद्धि रावणानें सत्वर बिलद्वार पकडून तेथें प्रवेश केला ३५. रावणानें निर्भयपणें त्या द्वारामध्यें प्रवेश केला आणि प्रवेश केल्यावर तो पाहूं लागला तों नीलपर्वततुल्य ३६ शूर त्याच्या दृष्टीं पडले. त्यांनीं बाहुभूषणें धारण केलेलीं होतीं; आरक्तवर्ण पुष्पें व अनुलेपनें त्यांनीं स्वीकारिलीं होती आणि उत्कृष्ट सुवर्ण, रत्नें इत्यादिकांच्या योगानें तयार केलेल्या नानाप्रकारच्या भूषणांनीं ते भूषित झालेले होते ३७. तीन कोटि महात्मे तेथें नृत्य करीत असलेले त्याच्या दृष्टीं पडले. नृत्यामध्यें

कप्रभाः ३८ नृत्यन्त्यः पश्यते तांस्तु रावणो भीमविक्रमः । द्वारस्थो रावणस्तत्र तादृक्कोटिषु निर्भयः ३९ यथा दृष्टः स तु नरस्तुल्यांस्तानपि सर्वशः । एकवर्णानेकवेषानेकरूपान्महौजसः ४० चतुर्भुजान्महोत्साहांस्तत्रापश्यत्स राक्षसः । तांस्तु दृष्ट्वा दशग्रीव ऊर्ध्वरोमा बभूव ह ४१ स्वयंभुवा दत्तवरस्ततः शीघ्रं विनिर्ययौ । अथापश्यत्परं तत्र पुरुषं शयने स्थितम् ४२ पाण्डुरेण महार्हेण शयनासनवेश्मना । शेते स पुरुषस्तत्र पावकेनावगुण्ठितः ४३ दिव्यस्रगनुलेपा च दिव्याभरणभूषिता । दिव्याम्बरधरा साध्वी त्रैलोक्यस्यैकभूषणम् ४४ वालव्यजनहस्ता च देवी तत्र व्यवस्थिता । लक्ष्मी देवी सपद्मा वै भ्राजते लोकसुन्दरी ४५ प्रविष्टः स तु रक्षेन्द्रो दृष्ट्वा तां चारुहासिनीम् । जिघृक्षुः सहसा साध्वीं सिंहासनसमास्थिताम् ४६ विनापि सचिवैस्तत्र रावणो दुर्मतिस्तदा । हस्ते ग्रहीतुमन्विच्छन्मन्मथेन वशीकृतः ४७ सुप्तमाशीविषं यद्वद्रावणः कालनोदितः । अथ सुप्तो महाबाहुः

---

ते तल्लीन झालेले होते आणि ते निर्भय पुरुष निर्मल असल्यामुळें त्यांची कांति अग्नीप्रमाणें दिसत होती ३८. भयंकर पराक्रम करणाऱ्या रावणाला ते नृत्य करीत असतांना दृष्टीं पडले; परंतु, त्या कोट्यावधि पुरुषांची भीति न बाळगितां रावण तेथेंच द्वारामध्यें उभा राहिला ३९. पूर्वी ज्याप्रमाणें तो पुरुष दृष्टीं पडला होता त्याप्रमाणेंच तेथें ते सर्वही पुरुष त्या रावणराक्षसाच्या दृष्टीं पडले. महाबलाढ्य, महोत्साही व चतुर्भुज अशा त्या पुरुषांचे वेष, वर्ण व रूपें हीं सारखींच होतीं; व ते दृष्टीं पडतांक्षणीं रावणाच्या अंगावर कांटाही आला ४०,४१; परंतु, ब्रह्मदेवाच्या वरप्रदानामुळें तो तेथून सत्वर निघून गेला; तों शय्येवर स्थित असलेला दुसरा एक पुरुष तेथें त्याच्या दृष्टीं पडला ४२. त्याची शय्या, आसनें व गृह हीं सर्व मोठीं मूल्यवान् असून श्वेतवर्ण होतीं आणि तेजानें व्याप्त असलेला तो पुरुष तेथें शयन करीत पडला होता ४३. दिव्य माला व उटी हीं जिनें धारण केलीं आहेत, दिव्य भूषणांनीं जी भूषित झालेली आहे, दिव्य वस्त्रें जिनें परिधान केलीं आहेत, जी साध्वी त्रैलोक्याचें मुख्य भूषणच आहे ४४ आणि केसांचा विंझोणा जिनें हातांत घेतला आहे अशी एक देवी तेथें उभी होती. त्या लक्ष्मीदेवीच्या हातामध्यें कमल होतें व ती त्रैलोक्यसुंदरी तेथें झळकत होती ४५. मनोहर हास्य करणारी ती लक्ष्मी दृष्टीं पडतांक्षणीं आंत प्रविष्ट झालेल्या त्या राक्षसाधिपति रावणानें सिंहासनावर असलेल्या त्या साध्वीला बलात्कारानें धरण्याचें मनामध्यें आणिलें ४६. मदनानें ग्रस्त झाल्यामुळें त्या दुर्मति रावणाला मंत्र्यांच्या साहाय्यावांचून तिला धरण्याची इच्छा झाली ४७ आणि मृत्युसमय जवळ आलेल्या पुरुषानें

पावकेनावगुण्ठितः ४८ ग्रहीतुकामं तं ज्ञात्वा व्यपविद्धपटं तदा । जहासोच्चैर्भृशं देवस्तं दृष्ट्वा राक्षसाधिपम् ४९ तेजसा सहसा दीप्तो रावणो लोकरावणः। छिन्नमूलो यथा शाखी निपपात महीतले ५० पतितं राक्षसं ज्ञात्वा वचनं चेदमब्रवीत् । उत्तिष्ठ राक्षसश्रेष्ठ मृत्युस्ते नाद्य विद्यते ५१ प्रजापतिवरो रक्ष्यस्तेन जीवसि राक्षस । गच्छ रावण विस्रब्धो नाधुना मरणं तव ५२ लब्धसंज्ञो मुहूर्तेन रावणो भयमाविशत् । एवमुक्तस्तदोत्थाय रावणो देवकण्टकः ५३ लोमहर्षणमापन्नो ह्यब्रवीत्तं महाद्युतिम् । को भवान्वीर्यसंपन्नो युगान्तानलसंनिभः ५३ ब्रूहि त्वं को भवान्देव कुतो भूत्वा व्यवस्थितः। एवमुक्तस्ततो देवो रावणेन दुरात्मना ५५ प्रत्युवाच हसन्देवो मेघगम्भीरया गिरा । किं ते मया दशग्रीव वध्योऽसि न चिरान्मम ५६ एवमुक्तो दशग्रीवः प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् । प्रजापतेस्तु वचनान्नाहं मृत्युपथं गतः ५७ न स जातो जनिष्यो वा मम तुल्यः सुरेष्वपि।

---

ज्याप्रमाणें निद्रिस्थ सर्प धरण्यास उद्युक्त व्हावें त्याप्रमाणें तो रावण तिला धरण्यास उद्युक्त झाला. इतक्यांत तेजानें व्याप्त असलेला जो महापराक्रमी पुरुष तेथें निद्रिस्थ होता ४८ त्यानें वस्त्र दूर करून लक्ष्मीला धरण्यास तो रावण उद्युक्त झाला आहे असें जाणिलें आणि त्या राक्षसाधिपति रावणाकडे पाहून त्यानें उच्चस्वरानें अतिशय हास्य केलें ४९. तेव्हां लोकांना रडविणारा तो रावण तेजानें एकाएकीं प्रदीप्त झाला आणि मुळें तोडून टाकिलेल्या वृक्षाप्रमाणें भूतलावर पडला ५०. राक्षस पडला असें समजून तो पुरुष ह्मणाला " हे राक्षसश्रेष्ठा, ऊठ; आज तुला मृत्यु नाहीं ५१. ब्रह्मदेवानें दिलेला वर आह्मीं पाळणें अवश्य आहे आणि ह्मणूनच, हे राक्षसा, तूं जिवंत राहिला आहेस. असो. हे रावणा, तूं आतां निःशंकपणें जा; इतक्यांत तुला मरण येत नाहीं " ५२. असो. एका मुहूर्तानंतर रावण शुद्धीवर आला असतां भयभीत झाला व त्या पुरुषानें असें भाषण केल्यानंतर तो देवकंटक रावण तेथून उठला ५३; त्याच्या शरीरावर कांटा आला आणि तो त्या महातेजस्वी पुरुषाला ह्मणाला "प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें व वीर्यसंपन्न असा तूं कोण आहेस ? ५४ हे देवा, तूं कोण ? आणि कोठें उत्पन्न होऊन तूं येथें उभा राहिला आहेस हे मला सांग. " ह्याप्रमाणें दुरात्म्या रावणानें विचारिलें असतां मेघासारिख्या गंभीर वाणीनें तो देव हंसत हंसत त्याला ह्मणाला " हे रावणा, माझ्याशीं तुला काय कर्तव्य आहे ? माझ्या हातून लवकरच तुझा वध होईल ". ५५, ५६. ह्याप्रमाणें त्यानें सांगितलें असतां रावण हात जोडून त्याला ह्मणाला " ब्रह्मदेवाच्या वचनामुळें मला मृत्यु प्राप्त होणार नाहीं ५७. देवांमध्यें कां होईना माझी बरोबरी करणारा

प्रजापतिवरं यो हि लङ्घयेद्वीर्यमाश्रितः ५८ न तत्र परिहारोऽस्ति प्रयत्नश्चापि दुर्बलः । त्रैलोक्ये तं न पश्यामि यो मे कुर्याद्वरं वृथा ५९ अमरोऽहं सुरश्रेष्ठ तेन मां नाविशद्भयम् । अथापि च भवेन्मृत्युस्त्वद्धस्तान्नान्यतः प्रभो ६० यशस्यं श्लाघनीयं च त्वद्धस्तान्मरणं मम । अथास्य गात्रे संपश्यद्रावणो भीमविक्रमः ६१ तस्य देवस्य सकलं त्रैलोक्यं सचराचरम् । आदित्या मरुतः साध्या वसवोऽथाश्विनावपि ६२ रुद्रश्च पितरश्चैव यमो वैश्रवणस्तथा । समुद्रा गिरयो नद्यो वेदा विद्यास्त्रयोऽग्नयः ६३ ग्रहास्तारागणा व्योम सिद्धा गन्धर्वचारणाः । महर्षयो वेदविदो गरुडोऽथ भुजंगमाः ६४ ये चान्ये देवतासङ्घाः संस्थिता दैत्यराक्षसाः । गात्रेषु शयनस्थस्य दृश्यन्ते सूक्ष्ममूर्तयः ६५ आह रामोऽथ धर्मात्मा ह्यगस्त्यं मुनिसत्तमम् । द्वीपस्थः पुरुषः कोऽसौ तिस्रः कोट्यस्तु काश्च ताः ६६ शयानः पुरुषः कोऽसौ दैत्यदानवदर्पहा । रामस्य वचनं श्रुत्वा ह्यगस्त्यो वाक्यमब्रवीत् ६७ श्रूयतामभिधास्यामि देवदेव सनातन । भगवान्कपिलो नाम द्वीपस्थो नर उच्यते ६८ ये तु नृत्यन्ति वै तत्र

कोणी झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. वीर्याच्या जोरावर जर कोणी ब्रह्मदेवाच्या वराचें अतिक्रमण केलें तर त्याला कांहीं उपाय नाहीं. परंतु, तसें करण्यास पुरुषप्रयत्नाचा कांहीं उपयोग होणार नाहीं. परंतु; वस्तुतः मला प्राप्त झालेला वर व्यर्थ करून टाकणारा त्रैलोक्यांतही मला कोणी दिसत नाहीं ५९. हे सुरश्रेष्ठा, मी अमर असल्यामुळें मला भय प्राप्त झालें नाहीं. तथापि, हे प्रभो, जर मला मृत्यु यावयाचा असेल तर तो दुसऱ्याच्या हातून न येता तुझ्याच हातून यावा ६०. तुझ्या हातून मरण येणें मला कीर्तिकारक व प्रशंसनीय होणार आहे. नंतर भयंकर पराक्रम करणाऱ्या रावणानें त्या देवाच्या शरीराचे ठिकाणीं चराचरप्राण्यांसहवर्तमान संपूर्ण त्रैलोक्य अवलोकन केलें. आदित्य, मरुद्गण, साध्य, वसु, अश्विनीकुमार ६१, ६२ रुद्र, पितर, यम, वैश्रवण, समुद्र, पर्वत, नद्या, वेद, विद्या, तीन अग्नि ६३, ग्रह, तारागण, आकाश, सिद्ध, गंधर्व, चारण, महर्षि, वेदवेत्ते, गरुड, भुजंग ६४, इतरही देवतागण, दैत्य व राक्षस त्या शयन करीत पडलेल्या देवाच्या शरीरामध्यें सूक्ष्मरूपानें दिसत होते ६५. तदनंतर धर्मात्मा राम मुनिश्रेष्ठ अगस्त्याला ह्मणाला " बेटामध्यें असलेला हा पुरुष कोण? त्या तीन कोटी कोण? ६६ आणि दैत्य व दानव ह्यांचा दर्प नाहींसा करणारा तो निद्रिस्थपुरुष कोण?" हा रामाचा प्रश्न ऐकून अगस्त्य ह्मणाले ६७ " हे सनातन देवाधिदेवा, श्रवण

स्वरास्ते तस्य धीमतः । तुल्यतेजःप्रभावास्ते कपिलस्य नरस्य वै ६९
नासौ क्रुद्धेन दृष्टस्तु राक्षसः पापनिश्चयः । न बभूव तदा तेन भस्मसा-
द्राम रावणः ७० खिन्नगात्रो नगप्रख्यो रावणः पतितो भुवि । वाक्श-
रैस्तं बिभेदाशु रहस्यं पिशुनो यथा ७१ अथ दीर्घेण कालेन लब्धसंज्ञः
स राक्षसः । आजगाम महातेजा यत्र ते सचिवाः स्थिताः ७२[१२५६]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीयआदिकाव्ये उत्तरकाण्डे प्रक्षिप्तःसर्गः॥५॥

निवर्तमानः संहृष्टो रावणः स दुरात्मवान् । जह्रे पथि नरेन्द्रर्षिदेवदा-
नवकन्यकाः १ दर्शनीयां हि यां रक्षः कन्यां स्त्रीं वाथ पश्यति । हत्वा
बन्धुजनं तस्या विमाने तां रुरोध सः २ एवं पन्नगकन्याश्च राक्षसासुरमा-
नुषीः । यक्षदानवकन्याश्च विमाने सोऽध्यरोपयत् ३ ता हि सर्वाः समं
दुःखान्मुमुचुर्बाष्पजं जलम् । तुल्यमग्न्यर्चिषां तत्र शोकाग्निभयसंभवम् ४
ताभिः सर्वानवद्याभिर्नदीभिरिव सागरः । आपूरितं विमानं तद्भयशोकाशि-

---

फर; मी सांगतो. भगवान् कपिल हा बेटांतील पुरुष होय ६८; आणि त्या ठिकाणीं जे नृत्य करीत आहेत ते त्या बुद्धिमान् कपिलाचे स्वर होत. ते तेजानें व प्रभावानें कपिल पुरुषाप्रमाणेंच आहेत ६९. हे रामा, ह्या पापबुद्धि रावणराक्षसाकडे त्यानें क्रोधदृष्टीनें पाहिलें नाहीं ह्मणून ह्याचें भस्म झालें नाहीं ७०. तो पुरुष दृष्टीं पडतां-क्षणीं रावणाच्या शरीराला (वरदरून) घाम सुटला व तो पर्वततुल्य रावण भूतला-वर पडला. तेव्हां विश्वासघातकी मनुष्य ज्याप्रमाणें रहस्याचा स्फोट करितो त्याप्रमाणें त्यानें वाग्बाणांच्या योगानें त्याचा भेद केला ७१. नंतर बऱ्याच वेळानें तो राक्षस शुद्धीवर आला आणि जिकडे ते मंत्री होते तिकडे तो महातेजस्वी रावण निघून गेला ७२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ ५ ॥

तो दुरात्मा रावण आनंदित होऊन परत फिरू लागला आणि राजर्षि, देव व दानव ह्यांच्या कन्या मार्गामध्यें त्यानें हरण केल्या १. कन्या असो अथवा स्त्री असो जी ह्मणून सुंदर त्याच्या दृष्टीं पडेल तिच्या बांधवांचा वध करून तो राक्षस त्या विमा-नांत तिला अडकावून ठेवूं लागला २; आणि ह्याप्रमाणें नाग, राक्षस, असुर, मानव, यक्ष व दानव ह्यांच्या कन्या त्यानें विमानांत घातल्या ३. त्या सर्व कन्या तेथें एकदम दुःखानें अश्रु ढाळूं लागल्या. तें अश्रुरूप जल अग्नीच्या ज्वालांप्रमाणें उष्ण होतें व शोकाग्नि आणि भय ह्यांपासून तें उत्पन्न झालें होतें ४. असो. सागराला भरून काढणाऱ्या नद्यांप्रमाणें भय व शोक ह्यांपासून उत्पन्न झालेल्या अशुभ अश्रूंच्या योगानें त्या सर्व निर्दोष

वाश्रुभिः ५ नागगन्धर्वकन्याश्च महर्षितनयाश्च याः । दैत्यदानवकन्याश्च विमाने शतशोऽरुदन् ६ दीर्घकेश्यः सुचार्वङ्ग्यः पूर्णचन्द्रनिभाननाः । पीनस्तनतटा मध्ये वज्रवेदिसमप्रभाः ७ रथकूबरसंकाशैः श्रोणिदेशैर्मनोहराः । स्त्रियः सुराङ्गनाप्रख्या निष्टप्तकनकप्रभाः ८ शोकदुःखभयत्रस्ता विह्वलाश्च सुमध्यमाः । तासां निःश्वासवातेन सर्वतः संप्रदीपितम् ॥ अग्निहोत्रमिवाभाति संनिरुद्धाग्निपुष्पकम् ९ दशग्रीववशं प्राप्तास्तास्तु शोकाकुलाः स्त्रियः । दीनवक्त्रेक्षणाः श्यामा मृग्यः सिंहवशा इव १० काचिच्चिन्तयती तत्र किं नु मां भक्षयिष्यति । काचिद्दध्यौ सुदुःखार्ता अपि मां मारयेदयम् ११ इति मातॄः पितॄन्स्मृत्वा भर्तॄन्भ्रातॄंस्तथैव च । दुःखशोकसमाविष्टा विलेपुः सहिताः स्त्रियः १२ कथं नु खलु मे पुत्रो भविष्यति मया विना । कथं माता कथं भ्राता निमग्नाः शोकसागरे १३ हा कथं नु करिष्यामि भर्तुस्तस्मादहं विना । मृत्यो प्रसादयामि त्वां नय मां दुःखभागिनीम् १४ किं नु तद्दुष्कृतं कर्म पुरा देहान्तरे कृतम् । एवं स्म दुःखिताः

---

स्त्रियांनीं तें विमान भरून काढिलें ५. नाग, गंधर्व, महर्षि, दैत्य व दानव ह्यांच्या शंकडो कन्या विमानामध्यें रोदन करूं लागल्या ६. त्या कन्यांचे केश लांब लांब होते; पूर्णचंद्राप्रमाणें त्यांचीं मुखें होतीं; त्यांचे अवयव फारच मनोहर होते; त्यांचे स्तनप्रदेश पुष्ट होते; त्यांचा मध्यभाग रत्नजडित चौरंगाप्रमाणें झळकत होता ७; रथकूबरतुल्य कटिप्रदेशामुळें त्या स्त्रिया मनोहर दिसत होत्या; देवांगनाप्रमाणें त्यांची कांति होती; तप्तसुवर्णाप्रमाणें त्यांची प्रभा होती; त्या अतिशयच सुंदर होत्या आणि विव्हल होऊन शोक, दुःख व भय ह्यांनीं त्रस्त झाल्या होत्या ८. त्यांच्या निश्वासवायूनें सर्व बाजूंनीं प्रदीप्त झालेलें तें पुष्पक विमान अग्नियुक्त अग्निकुंडाप्रमाणें दिसूं लागलें ९. रावणाच्या अधीन झाल्यामुळें शोकाकुल झालेल्या त्या स्त्रियांचीं मुखें व नेत्र हीं दीन झालीं आणि ह्मणूनच सिंहाच्या तावडींत सांपडलेल्या हरिणींप्रमाणें त्या तरुण स्त्रिया दिसूं लागल्या १०. "हा मला, भक्षण करील कीं काय ?" असें एकजण त्यांमध्यें चिंतन करूं लागली; व अत्यंत दुःखाकुल झालेली एक स्त्री "हा मला मारील सुद्धा" असें मनामध्यें आणूं लागली ११. सारांश, ह्याप्रमाणें माता, पितर, पति व भ्रात ह्यांचें स्मरण करून दुःखानें व शोकानें व्याप्त झालेल्या त्या स्त्रिया एकदम विलाप करूं लागल्या १२. "माझ्यावांचून माझा पुत्र कसा बरें राहील ? शोकसागरामध्यें मग्न झालेल्या त्या माता, भ्राता इत्यादि बांधवांचें आतां कसें बरें होईल ? १३. त्या भर्त्यावांचून मी आतां कसें बरें करूं ? मज दुःख भोगणारीला तूं आतां घेऊन जा अशी माझी

सर्वाः पतिताः शोकसागरे १५ न खल्विदानीं पश्यामो दुःखस्यास्यान्त-
मात्मनः । अहो धिङ्मानुषं लोकं नास्ति खल्वधमः परः १६ यद्दुर्बला
बलवता भर्तारो रावणेन नः । सूर्येणोदयता काले नक्षत्राणीव नाशिताः १७
अहो सुबलवद्रक्षो वधोपायेषु रज्यते । अहो दुर्वृत्तमास्थाय नात्मानं वै
जुगुप्सते १८ सर्वथा सदृशस्तावद्विक्रमोऽस्य दुरात्मनः । इदं त्वसदृशं
कर्म परदाराभिमर्शनम् १९ यस्मादेष परक्यासु रमते राक्षसाधमः ।
तस्माद्वै स्त्रीकृतेनैव वधं प्राप्स्यति दुर्मतिः २० सतीभिर्वरनारीभिरेवं वाक्ये
ऽभ्युदीरिते । नेदुर्दुन्दुभयः खस्थाः पुष्पवृष्टिः पपात च २१ शप्तः स्त्रीभिः
स तु समं हतौजा इव निष्प्रभः । पतिव्रताभिः साध्वीभिर्बभूव विमना
इव २२ एवं विलपितं तासां शृण्वन्राक्षसपुङ्गवः । प्रविवेश पुरीं लङ्कां
पूज्यमानो निशाचरैः २३ एतस्मिन्नन्तरे घोरा राक्षसी कामरूपिणी ।
सहसा पतिता भूमौ भगिनी रावणस्य सा २४ तां स्वसारं समुत्थाप्य

---

तुला प्रार्थना आहे १४. पूर्वजन्मीं मीं काय बरें दुष्कर्म केलें होतें ?" ह्याप्रमाणें शोकसागरामध्यें मग्न झालेल्या त्या सर्वही दुःखद स्त्रिया मनामध्यें चिंतन करूं लागल्या आणि म्हणाल्या १५ "खरोखर आमच्या ह्या दुःखाचा आतां शेवट होईल असें दिसत नाहीं. अहो, धिक्कार असो ह्या मनुष्यलोकाला ! खरोखर ह्या रावणापेक्षां कोणी अधम नाहीं १६. कारण, प्रभातकालीं उदय पावणारा सूर्य ज्याप्रमाणें नक्षत्रांना दृष्टिआड करून टाकितो त्याप्रमाणें बलाढ्य रावणानें आमच्या दुर्बल भर्त्यांना दृष्टिआड करून टाकिलें आहे १७. अहो, हा अतिबलाढ्य राक्षस दुराचरणाचें अवलंबन करीत असूनही स्वतःचें करणें त्याला वाईट दिसत नाहीं आणि वधाचे उपाय योजण्यामध्यंच ह्याला आनंद वाटत असतो १८. ह्या दुरात्म्याचा पराक्रम सर्वस्वीं त्याली शोभण्यासारखा आहे; परंतु, परस्त्रीवर हात टाकणें हें त्याला शोभणार नाहीं १९. तस्मात्, ज्याअर्थीं हा राक्षसाधम परस्त्रियांशीं रममाण होत आहे त्याअर्थीं स्त्रीच कारण होऊन ह्या दुर्बुद्धि राक्षसाचा वध होईल" २०. श्रेष्ठ साध्वी स्त्रियांनीं असे शब्द उच्चारिले असतां स्वर्गांतील दंदुभि वाजूं लागल्या आणि पुष्पांची वृष्टि झाली २१. स्त्रियांनीं त्याला एकदम शाप दिला असतां त्याचें तेज व प्रभा हीं नाहींशीं झालीं आणि पतिव्रता साध्वी स्त्रियांबरोबर रहाणें त्याच्याही मनाला नीट वाटेनासें झालें २२. असो. वरीलप्रमाणें त्यांचे विलाप श्रवण करीत करीत तो राक्षसश्रेष्ठ रावण इतर निशाचर त्याची प्रशंसा करीत असतांना लंकानगरीमध्यें प्रविष्ट झाला २३. इतक्यांत 'यथेष्ट रूप धारण करणारी एक घोर राक्षसी

रावणः परिसान्त्वयन्। अब्रवीत्किमिदं भद्रे वक्तुकामासि मां द्रुतम् २५
सा बाष्पपरिरुद्धाक्षी रक्ताक्षी वाक्यमब्रवीत्। कृतास्मि विधवा राजं-
स्त्वया बलवता बलात् २६ एते राजंस्त्वया वीर्याद्दैत्या विनिहता रणे।
कालकेया इति ख्याताः सहस्राणि चतुर्दश २७ प्राणेभ्योऽपि गरीयान्मे
तत्र भर्ता महाबलः। सोऽपि त्वया हतस्तात रिपुणा भ्रातृगन्धिना २८
त्वयास्मि निहता राजन्स्वयमेव हि बन्धुना। राजन्वैधव्यशब्दं च भोक्ष्यामि
त्वत्कृतं ह्यहम् २९ ननु नाम त्वया रक्ष्यो जामाता समरेष्वपि। स त्वया
निहतो युद्धे स्वयमेव न लज्जसे ३० एवमुक्तो दशग्रीवो भगिन्या क्रोश-
मानया। अब्रवीत्सान्त्वयित्वा तां सामपूर्वमिदं वचः ३१ अलं वत्से रुदित्वा
ते न भेतव्यं च सर्वशः। दानमानप्रसादैस्त्वां तोषयिष्यामि यत्नतः ३२
युद्धप्रमत्तो व्याक्षिप्तो जयकाङ्क्षी क्षिपञ्शरान्। नाहमज्ञासिषं युध्यन्स्वा-
न्परान्वापि संयुगे ३३ जामातरं न जाने स्म प्रहरन्युद्धदुर्मदः। तेनासौ

---

रावणभगिनी एकाएकी भूमीवर पडली २४. तेव्हां त्या भगिनीला उठवून तिचें सांत्वन करीत करीत रावण ह्मणाला "हे भद्रे, हें काय ? तूं कांहीं तरी सत्वर मला सांगण्याच्या बेतांत आहेस" २५. ह्यानंतर अश्रूंनीं जिचे नेत्र भरून आले आहेत आणि जिचे नेत्र आरक्तवर्ण झालेले आहेत अशी ती राक्षसी त्याला ह्मणाली "हे राजा, तूं बलाढ्य असून बलात्कारानें मला विधवा केलें आहेस २६. कारण, हे राजा, कालकेय ह्मणून प्रसिद्ध असलेल्या ह्या चवदा हजार राक्षसांचा संग्रामामध्यें तूं स्वपराक्रमानें वध केला आहेस २७ आणि प्राणापेक्षांही प्रिय असा जो माझा महाबलाढ्य भर्ता त्यांमध्यें होता त्याचाही, बा रावणा, तूं भ्रातृरूप शत्रूनें वध केला आहेस २८. सारांश, हे राजा, प्रत्यक्ष तुज बंधूच्या हातूनच माझा घात झाला आहे. हे राजा, वैधव्य हीं अक्षरें तुझ्यामुळें मला धारण करावीं लागणार ! २९. अरे ! संग्रामामध्यें सुद्धां जावयाचें रक्षण करणें तुला योग्य होतें; परंतु, युद्धामध्यें तूं त्याचा वध केला असून तूं लाजतही नाहींस" ३०. ह्याप्रमाणें आक्रोश करीत असलेली ती भगिनी रावणाला बोलली असतां तिचें सांत्वन करून सौम्यशब्दपूर्वक तो तिला ह्मणाला ३१ मुली, तूं रडूं नकोस आणि मुळींच भिऊं नकोस. दान, मान व प्रसाद ह्यांच्या योगानें मी तुला प्रयत्नपूर्वक संतुष्ट ठवीन ३२. युद्धाचा मद चढून अंतःकरण क्षुब्ध झालें असल्यामुळें जयाची आशा धरून युद्ध करीत असतांना बाण टाकितां टाकितां संग्रामामध्यें स्वकीय कोण व परकीय कोण हें मला भान राहिलें नाहीं ३३ आणि युद्धाचा अतिशय मद चढल्यामुळें मीं जावयाला

निहतः सङ्ख्ये मया भर्ता तव स्वसः ३४ अस्मिन्काले तु यत्प्राप्तं तत्करिष्यामि ते हितम् । भ्रातुरैश्वर्ययुक्तस्य खरस्य वस पार्श्वतः ३५ चतुर्दशानां भ्राता ते सहस्राणां भविष्यति । प्रभुः प्रयाणे दाने च राक्षसानां महाबलः ३६ तत्र मातृष्वसेयस्ते भ्रातायं वै खरः प्रभुः । भविष्यति तवादेशं सदा कुर्वन्निशाचरः ३७ शीघ्रं गच्छत्वयं वीरो दण्डकान्परिरक्षितुम् । दूषणोऽस्य बलाध्यक्षो भविष्यति महाबलः ३८ तत्र ते वचनं शूरः करिष्यति तदा खरः । रक्षसां कामरूपाणां प्रभुरेष भविष्यति ३९ एवमुक्त्वा दशग्रीवः सैन्यमस्यादिदेश ह । चतुर्दश सहस्राणि रक्षसां वीर्यशालिनाम् ४० स तैः परिवृतः सर्वै राक्षसैर्घोरदर्शनैः । आगच्छत खरः शीघ्रं दण्डकानकुतोभयः ४१ स तत्र कारयामास राज्यं निहतकण्टकम् । सा च शूर्पणखा तत्र न्यवसद्दण्डके वने ४२ [१२९८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे चतुर्विंशः सर्गः ॥ २४ ॥

स तु दत्त्वा दशग्रीवो बलं घोरं खरस्य तत् । भगिनीं च समाश्वास्य हृष्टः स्वस्थतरोऽभवत् १ ततो निकुम्भिला नाम लङ्कोपवनमुत्तमम् । तद्राक्षसेन्द्रो बलवान्प्रविवेश सहानुगः २ ततो यूपशताकीर्णं सौम्यचै-

---

ओळखिलें नाहीं; ह्यामुळें, हे भगिनि, तुझा भर्ता माझ्या हातून वध पावला ३४. परंतु, ह्यावेळीं जें तुला हितावह असेल तें मी करीन. ऐश्वर्यानें युक्त असलेला जो भ्राता खर त्याच्यापाशींच तूं रहा ३५. तुझा महाबलाढ्य भ्राता पाठविण्याविषयीं आणि अन्न वस्त्र वगैरे देण्याविषयीं चवदा हजार राक्षसांचा प्रभु होईल ३६. हा प्रभु खर तुझा मावसभाऊ आहे व हा निशाचर सर्वदा तुझ्या आज्ञेमध्यें वागेल ३७. हा वीर दंडकारण्याचें रक्षण करण्याकरितां सत्वर जाईल आणि महाबलाढ्य दूषण ह्याचा सेनाधिपति होईल ३८. त्याठिकाणीं शूर खर तूं सांगशील तें ऐकेल आणि यथेष्ट रूप धारण करणाऱ्या राक्षसांचा हा प्रभु होईल" ३९. ह्याप्रमाणें बोलून रावणानें चवदा हजार बलाढ्य राक्षसांचें सैन्य त्याच्याकडे नेमून दिलें ४०. दिसण्यांतही भयंकर असलेल्या त्या सर्व घोर राक्षसांनीं परिवेष्टित झालेला तो खर निर्भय होऊन सत्वर दंडकारण्यामध्यें गेला ४१; त्यानें तेथें निष्कंटक राज्य केलें व शूर्पणखा तेथें त्या दंडकारण्यांत राहिली ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २४ ॥

खराला तें घोर सैन्य देऊन भगिनीचें सांत्वन केल्यानंतर आनंदित झालेला तो रावण अधिक संतुष्ट झाला १. तदनंतर निकुंभिला म्हणून जें एक लंकेसमीप उत्कृष्ट

त्योपशोभितम् । ददर्श विष्ठितं यज्ञं श्रिया संप्रज्वलन्निव ३ ततः कृष्णाजिनधरं कमण्डलुशिखाध्वजम् । ददर्श स्वसुतं तत्र मेघनादं भयावहम् ४ तं समासाद्य लङ्केशः परिष्वज्याथ बाहुभिः । अब्रवीत्किमिदं वत्स वर्तसे ब्रूहि तत्त्वतः ५ उशना त्वब्रवीत्तत्र यज्ञसंपत्समृद्धये । रावणं राक्षसश्रेष्ठं द्विजश्रेष्ठो महातपाः ६ अहमाख्यामि ते राजञ्छ्रूयतां सर्वमेव तम् । यज्ञास्ते सप्त पुत्रेण प्राप्तास्ते बहुविस्तराः ७ अग्निष्टोमोऽश्वमेधश्च यज्ञो बहुसुवर्णकः । राजसूयस्तथा यज्ञो गोमेधो वैष्णवस्तथा ८ माहेश्वरे प्रवृत्ते तु यज्ञे पुंभिः सुदुर्लभे । वरांस्ते लब्धवान्पुत्रः साक्षात्पशुपतेरिह ९ कामगं स्यन्दनं दिव्यमन्तरिक्षचरं ध्रुवम् । मायां च तामसीं नाम यया संपद्यते तमः १० एतया किल सङ्ग्रामे मायया राक्षसेश्वर । प्रयुक्तया गतिः शक्या नहि ज्ञातुं सुरासुरैः ११ अक्षयाविषुधी बाणैश्चापं चापि सुदुर्जयम् । अस्त्रं च बलवद्राजञ्छत्रुविध्वंसनं रणे १२ एतान्सर्वान्वराँल्लब्ध्वा पुत्रस्तेऽयं

---

उपवन होतें त्या उपवनामध्यें बलाढ्य रावण अनुयायांसहवर्तमान प्रविष्ट झाला २. तदनंतर शेंकडों यूपांनीं व्याप्त आणि सौम्य देवालयांनीं सुशोभित असा एक सुरू झालेला यज्ञ कांतीनें झळकत असलेल्या त्या रावणानें अवलोकन केला ३. नंतर कृष्णाजिन धारण करणारा, कमंडलु व दंड ह्यांनीं युक्त असलेला आणि मेघाप्रमाणें गर्जना करणारा आपला भयंकर पुत्र त्याच्या दृष्टीं पडला असतां ४ त्याच्याजवळ येऊन लंकाधिपति रावणानें हातांनीं त्याला आलिंगन दिलें आणि तो त्याला ह्मणाला " हे वत्सा, हें काय करीत आहेस हें तूं मला खरें खरें सांग " ५. ह्यावर यज्ञकर्म सफल होण्याकरितां द्विजश्रेष्ठ महातपस्वी उशना राक्षसश्रेष्ठ रावणाला ह्मणाला ६ " हे राजा, मी तुला सांगतों; तें सर्व तूं श्रवण कर. मोठ्या विस्तरानें युक्त असे सात यज्ञ तुझ्या पुत्रानें केले ७. अग्निष्टोम, अश्वमेध, बहुसुवर्णक यज्ञ, राजसूययज्ञ, गोमेध, वैष्णव याग व ( माहेश्वर. ) ८ पुरुषांच्या हातून होण्यास फारच कठीण असा माहेश्वर यज्ञ सुरू झाला असतां साक्षात् पशुपतीपासून तुझ्या पुत्रास वर प्राप्त झाले आहेत ९. इच्छेप्रमाणें गमन करणारा व अंतरिक्षांतून संचार करणारा अक्षय दिव्य रथ आणि जिच्या योगानें तम उत्पन्न होतें अशी तामसी माया हीं दान त्याला देऊन पशुपति त्याला ह्मणाला " हे राक्षसाधिपते, संग्रामामध्यें ह्या मायेचा प्रयोग केला असतां देवदैत्यांनाही आपली गति समजणें शक्य नाहीं १०, ११. बाणांनीं भरलेले अक्षय भाते, पराजित होण्यास अत्यंत दुर्घट असें धनुष्य आणि संग्रामामध्यें शत्रूंचा विध्वंस करणारें असें एक प्रचंड अस्त्र १२ हे सर्व वर प्राप्त झाल्यानंतर, हे दशानना, हा तुझा पुत्र आज यज्ञसमाप्ति

दशानन । अद्य यज्ञसमाप्तौ च त्वां दिदृक्षुरिस्थतो ह्यहम् १३ ततोऽब्रवी-द्दशग्रीवो न शोभनमिदं कृतम् । पूजिताः शत्रवो यस्माद्‌द्रव्यैरिन्द्रपुरो-गमाः १४ एहीदानीं कृतं यद्धि सुकृतं तन्न संशयः । आगच्छ सौम्य गच्छामः स्वमेव भवनं प्रति १५ ततो गत्वा दशग्रीवः सपुत्रः सविभी-षणः । स्त्रियोऽवतारयामास सर्वास्ता बाष्पगद्गदाः १६ लक्षिण्यो रत्नभू-ताश्च देवदानवरक्षसाम् । तस्य तासु मतिं ज्ञात्वा धर्मात्मा वाक्यमब्रवीत् १७ ईदृशैस्त्वं समाचारैर्यशोर्थकुलनाशनैः । धर्षणं प्राणिनां ज्ञात्वा स्वमतेन विचेष्टसे १८ ज्ञातींस्तान्धर्षयित्वेमास्त्वयानीता वराङ्गनाः । त्वामतिक्रम्य मधुना राजन्कुम्भीनसी हृता १९ रावणस्त्वब्रवीद्वाक्यं नावगच्छामि किं त्विदम् । कोऽयं यस्तु त्वयाख्यातो मधुरित्येव नामतः २० विभीषणस्तु संक्रुद्धो भ्रातरं वाक्यमब्रवीत् । श्रूयतामस्य पापस्य कर्मणः फलमाग-तम् २१ मातामहस्य योऽस्माकं ज्येष्ठो भ्राता सुमालिनः । माल्यवा-निति विख्यातो वृद्धः प्राज्ञो निशाचरः २२ पिता ज्येष्ठो जनन्या नो

---

झाली असतां तुझ्या दर्शनाची वाट पहात आहे आणि माझाही उद्देश तोच आहे " १३. तदनंतर रावण ह्मणाला " ही गोष्ट कांहीं चांगली केली नाहीं. कारण, द्रव्यांच्या योगानें इंद्रप्रभृति शत्रूंचें तुह्मीं पूजन केलें आहे १४. आतां इकडे ये; जी गोष्ट झाली ती चांगलीच झाली ह्यांत संशय नाहीं. हे सौम्य, १५ आपण आपल्या घरीं जाऊं; " तदनंतर पुत्र व बिभीषण ह्यांसहवर्तमान स्वगृहीं गेल्यावर अश्रूंनीं ज्यांचे कंठ दाटून आले आहेत अशा त्या सर्व स्त्रियांना त्यानें विमानांतून उतरविलें १६. त्या स्त्रिया सुलक्षणी असून देव, दानव आणि राक्षस ह्यांमध्यें उत्कृष्ट होत्या. त्यांचे ठिकाणीं त्याचें मन आहे असें जाणून तो धर्मात्मा बिभीषण त्याला ह्मणाला १७ " यश, अर्थ व कुल ह्यांचा नाश करणाऱ्या ह्या अशा प्रकारच्या आचरणानें प्राण्यांवर धाड घालण्याचें मनामध्यें आणून तूं स्वच्छंदानें वागत आहेस १८. त्या ज्ञातींचा पराभव करून तूं ह्या श्रेष्ठ स्त्रिया आणिल्या आहेस परंतु, हे राजा, तुझी पर्वा न करितां मधूनें कुंभीनसी हरण केली" १९. ह्यावर रावण ह्मणाला " मला हें ठाऊक नाहीं. हें काय प्रकरण आहे ? आणि मधु ह्या नांवाचा हा कोण तूं सांगि-तला आहेस ? " २०. नंतर बिभीषण अत्यंत क्रुद्ध झाला आणि भ्रात्याला ह्मणाला " ह्या ( परदारहरणरूप ) पापकर्माचें फल कसें प्राप्त झालें आहे तें तूं श्रवण कर २१. आमचा मातामह जो सुमाली त्याचा माल्यवान् ह्मणून एक ज्येष्ठ भ्राता प्रसिद्ध आहे व तो

ह्यस्माकं चार्यकोऽभवत् । तस्य कुम्भीनसी नाम दुहितुर्दुहिताऽभवत् २३
मातृष्वसुरथास्माकं सा च कन्याऽनलोद्भवा । भवत्यस्माकमेवैषा भ्रातॄणां
धर्मतः स्वसा २४ सा हृता मधुना राजन्राक्षसेन बलीयसा । यज्ञप्रवृत्ते
पुत्रे तु मयि चान्तर्जलोषिते २५ कुम्भकर्णो महाराज निद्रामनुभवत्यथ ।
निहत्य राक्षसश्रेष्ठानमात्यान्सहसंमतान् २६ धर्षयित्वा हृता राजन्गुप्ताऽ-
प्यन्तःपुरे तव । श्रुत्वापि तन्महाराज क्षान्तमेव हतो न सः २७ यस्मा-
दवश्यं दातव्या कन्या भर्त्रे हि भ्रातृभिः । तदेतत्कर्मणो ह्यस्य फलं पापस्य
दुर्मतेः २८ अस्मिन्नेवाभिसंप्राप्तं लोके विदितमस्तु ते । विभीषणवचः श्रुत्वा
राक्षसेन्द्रः स रावणः २९ दौरात्म्येनात्मनोद्धूतस्तप्ताम्भा इव सागरः ।
ततोऽब्रवीद्दशग्रीवः क्रुद्धः संरक्तलोचनः ३० कल्प्यतां मे रथः शीघ्रं
शूराः सज्जीभवन्तु नः । भ्राता मे कुम्भकर्णश्च ये च मुख्या निशाचराः ३१
वाहनान्यधिरोहन्तु नानाप्रहरणायुधाः । अद्य तं समरे हत्वा मधुं रावण-

---

वृद्ध राक्षस ज्ञानी आहे २२. आमच्या मातेचा तो ज्येष्ठ चुलता असल्यामुळें आमचाही तो मातामहच होय. त्याच्या मुलीला कुंभीनसी ह्मणून एक मुलगी झालेली आहे २३. अनलेपासून उत्पन्न झालेली ती कन्या आमच्या मावशीचीच मुलगी असल्यामुळें आह्मा भ्रात्यांची ती धर्मदृष्ट्या भगिनीच होय २४. हे राजा, तुझ्या पुत्रानें यज्ञानुष्ठान आरंभिलें असतां आणि मी तपश्चर्या करण्याकरितां जलामध्यें राहिलों असतां मधुनामक बलाढ्य राक्षसानें तिला हरण करून नेलें २५. हे महाराज, कुंभकर्ण निद्रा घेत पडला आहे. हे राजा, आपली भगिनी आपल्या अंतःपुरामध्यें सुरक्षित असतांनाही प्रसिद्ध व विद्यमान असलेल्या राक्षसश्रेष्ठ अमात्यांचा वध करून बलात्कारानें मधुदैत्यानें तिला हरण करून नेलें. हे महाराज, तें आह्मांला समजल्यावरही आह्मीं त्याबद्दल त्याला क्षमाच केली; त्याचा वध केला नाहीं २६, २७. कारण, भ्रात्यांनीं भर्त्याला कन्या अवश्य दिलीच पाहिजे. शिवाय, परदारहरणरूप जें हें पापकर्म घडलें आहे त्याचेंहें फल ह्याच लोकामध्यें प्राप्त झालें ही गोष्ट तुज अविचाऱ्यालाही विदित असू दे." बिभीषणाचें भाषण श्रवण केल्यानंतर तो राक्षसाधिपति रावण स्वतःच्या दुष्टपणामुळें तप्त जलानें युक्त झालेल्या सागराप्रमाणें संतप्त झाला आणि नंतर क्रुद्ध होऊन व डोळे लाल करून तो रावण ह्मणाला २८, २९, ३० "माझा रथ सत्वर तयार करा; शूरांना सज्ज होऊं द्या; माझा भ्राता कुंभकर्ण आणि इतरही मुख्य मुख्य राक्षस ३१ नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन वाहनारूढ होऊं द्या; रावणाविषयीं निर्भय असलेल्या त्या मधूचा संग्रामामध्यें मी आज वध करीन आणि सुहृदांना बरोबर घेऊन मी युद्धाकरितां देवलोकीं गमन

निर्भयम् ३२ सुरलोकं गमिष्यामि युद्धाकाङ्क्षी सुहृद्वृतः । अक्षौहिणीसहस्राणि चत्वार्यग्र्याणि रक्षसाम् ३३ नानाप्रहरणान्याशु निर्ययुर्युद्धकाङ्क्षिणाम् । इन्द्रजित्त्वग्रतः सैन्यात्सैनिकान्परिगृह्य च ३४ जगाम रावणो मध्ये कुम्भकर्णश्च पृष्ठतः । विभीषणश्च धर्मात्मा लङ्कायां धर्ममाचरन् ३५ शेषाः सर्वे महाभागा ययुर्मधुपुरं प्रति । खरैरुष्ट्रैर्हयैर्दीप्तैः शिशुमारैर्महोरगैः ३६ राक्षसाः प्रययुः सर्वे कृत्वाऽऽकाशं निरन्तरम् । दैत्याश्च शतशस्तत्र कृतवैराश्च दैवतैः ३७ रावणं प्रेक्ष्य गच्छन्तमन्वगच्छन्हि पृष्ठतः । स तु गत्वा मधुपुरं प्रविश्य च दशाननः ३८ न ददर्श मधुं तत्र भगिनीं तत्र दृष्टवान् । सा च प्रह्वाञ्जलिर्भूत्वा शिरसा चरणौ गता ३९ तस्य राक्षसराजस्य त्रस्ता कुम्भीनसी तदा । तां समुत्थापयामास न भेतव्यमिति ब्रुवन् ४० रावणो राक्षसश्रेष्ठः किं चापि करवाणि ते । साऽब्रवीद्यदि मे राजन्प्रसन्नस्त्वं महाभुज ४१ भर्तारं न ममेहाद्य हन्तुमर्हसि मानद । न हीदृशं भयं किंचित्कुलस्त्रीणामिहोच्यते ४२ भयानामपि सर्वेषां वैधव्यं व्यसनं महत् । सत्यवाग्भव राजेन्द्र मामवेक्षस्व याच-

---

करीन ३२. नानाप्रकारचीं आयुधें घेतलेलें असें युद्धेच्छु राक्षसांचें उत्कृष्ट चार हजार अक्षौहिणी सैन्य बाहेर पडलें. इंद्रजित् सैन्यांतील सेनाधिपति बरोबर घेऊन सैन्याच्या अग्रभागीं चालला ३३,३४; रावण मध्यभागीं राहिला आणि कुंभकर्ण मागें राहिला. धर्मात्मा बिभीषण मात्र लंकेमध्येंच धर्माचें आचरण करीत बसला ३५. परंतु, इतर सर्वही महाभाग्यशाली राक्षस मधुपुराप्रत चालते झाले. खर, उष्ट्र, अश्व, उज्ज्वल शिशुमार आणि महोरग ह्यांवर आरूढ होऊन ३६ आणि आकाश निरवकाश करून सर्वही राक्षस चालते झाले. देवांसहवर्तमान वैर बांधिलेल्या शेंकडों दैत्यांनीं ३७ रावण जात आहे असें अवलोकन करून त्याच्या मागोमाग गमन केलें. मधुपुरासमीप गेल्यानंतर रावणानें त्यांत प्रवेश केला तों ३८ तो मधुदैत्य त्याच्या दृष्टीं न पडतां भगिनी त्याच्या दृष्टीं पडली. नंतर त्या राक्षसराज रावणापुढें नम्र होऊन त्या भयभीत झालेल्या कुंभीनसीनें हात जोडिले व तिनें त्याच्या चरणांवर मस्तक ठेविलें. तेव्हां ' भिऊं नको; तुझी काय इच्छा मी शेवटास नेऊं ' असें ह्मणत ह्मणत राक्षसश्रेष्ठ रावणानें तिला उठविलें असतां ती ह्मणाली " हे महापराक्रमी राजा, तूं जर माझ्यावर प्रसन्न झाला असशील ३९,४०,४१, तर; हे मान्य, येथें आज माझ्या भर्त्याचा तूं वध करूं नकोस. कारण, कुलस्त्रियांना अशाप्रकारचें भय दुसरें कोणतेंही नाहीं ४२. सर्व भयांमध्यें वैधव्य हें भय फार मोठें आहे. ह्यास्तव, हे राजेंद्रा, तूं सत्यवचनी हो आणि याचना करीत

तीम् ४३ त्वयाऽप्युक्तं महाराज न भेतव्यमिति स्वयम् । रावणस्त्वब्रवीद्धृष्टः स्वसारं तत्र संस्थिताम् ४४ क चासौ तव भर्ता वै मम शीघ्रं निवेद्यताम् । सह तेन गमिष्यामि सुरलोकं जयाय हि ४५ तव कारुण्यसौहार्दान्निवृत्तोऽस्मि मधोर्वधात् । इत्युक्ता सा समुत्थाप्य प्रसुप्तं तं निशाचरम् ४६ अब्रवीत्संप्रहृष्टेव राक्षसी सा पतिं वचः । एष प्राप्तो दशग्रीवो मम भ्राता महाबलः ४७ सुरलोकजयाकाङ्क्षी साहाय्ये त्वां वृणोति च । तदस्य त्वं सहायार्थं सबन्धुर्गच्छ राक्षस ४८ स्निग्धस्य भजमानस्य युक्तमर्थाय कल्पितुम् । तस्यास्तद्वचनं श्रुत्वा तथेत्याह मधुर्वचः ४९ ददर्श राक्षसश्रेष्ठं यथान्यायमुपेत्य सः । पूजयामास धर्मेण रावणं राक्षसाधिपम् ५० प्राप्य पूजां दशग्रीवो मधुवेश्मनि वीर्यवान् । तत्र चैकां निशामुष्य गमनायोपचक्रमे ५१ ततः कैलासमासाद्य शैलं वैश्रवणालयम् । राक्षसेन्द्रो महेन्द्राभः सेनामुपनिवेशयत् ५२ [१३५०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे पञ्चविंशः सर्गः ॥ २५ ॥

---

असलेल्या माझ्याकडे पहा ४३. हे महाराजा, 'भिऊं नकोस' ह्मणून तूंही स्वतः सांगितलें आहेस." ह्यानंतर तेथें उभ्या असलेल्या बहिणीला रावण आनंदित होऊन ह्मणाला ४४ "हा तुझा भर्ता कोणीकडे आहे हें मला सत्वर निवेदन कर. ह्मणजे त्याच्यासहवर्तमान मी जयप्राप्त्यर्थ देवलोकीं गमन करीन ४५. तुझी करुणा आल्यामुळें आणि तुझे ठिकाणीं माझें प्रेम असल्यामुळें मधूच्या वधापासून मी निवृत्त झालों आहें." असें रावणानें सांगितलें असतां निद्रिस्थ असलेल्या त्या निशाचराला तिनें उठविलें ४६ आणि आनंदित होऊन ती राक्षसी आपल्या पतीला ह्मणाली "हा माझा महाबलाढ्य भ्राता दशानन येथें आला आहे ४७; देवलोक जिंकण्याचा ह्याचा उद्देश आहे आणि त्याकरितां हा तुझी मदत मागत आहे. तस्मात्, हे राक्षसा, बांधवांसहवर्तमान तूं ह्याला साहाय्य करण्याकरितां जा ४८. कारण, प्रेमानें आपल्याजवळ येणाऱ्याच्या उपयोगा पडणें योग्य आहे". तिचें तें भाषण श्रवण करून 'ठीक आहे' असें मधु ह्मणाला असतां ४९ राक्षसश्रेष्ठ रावणाची त्यानें जवळ जाऊन रीतीप्रमाणें भेट घेतली आणि धर्मबुद्धीनें त्या राक्षसाधिपति रावणाचें त्यानें पूजनही केलें ५०. मधूच्या गृहामध्यें वीर्यवान् रावणाचा संमान झाला असतां एक रात्र तेथें राहून तो रावण देवलोकाप्रत गेला ५१. तदनंतर कुबेराचें निवासस्थान जो कैलासपर्वत तेथें गेल्यावर महेंद्रतुल्य राक्षसाधिपति रावणानें आपल्या सैन्याचा मुक्काम केला ५२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २५ ॥

स तु तत्र दशग्रीवः सह सैन्येन वीर्यवान् । अस्तं प्राप्ते दिनकरे निवासं समरोचयत् १ उदिते विमले चन्द्रे तुल्यपर्वतवर्चसि । प्रसुप्तं सुमहत्सैन्यं नानाप्रहरणायुधम् २ रावणस्तु महावीर्यो निषण्णः शैलमूर्धनि । स ददर्श गुणांस्तत्र चन्द्रपादपशोभितान् ३ कर्णिकारवनैर्दीप्तैः कदम्बबकुलैस्तथा । पद्मिनीभिश्च फुल्लाभिर्मन्दाकिन्या जलैरपि ४ चम्पकाशोकपुन्नागमन्दारतरुभिस्तथा । चूतपाटललोध्रैश्च प्रियङ्ग्वर्जुनकेतकैः ५ तगरैर्नारिकेलैश्च प्रियालपनसैस्तथा । एतैरन्यैश्च तरुभिरुद्भासितवनान्तरे ६ किन्नरा मदनेनार्ता रक्ता मधुरकण्ठिनः । समं संप्रजगुर्यत्र मनस्तुष्टिविवर्धनम् ७ विद्याधरा मदक्षीबा मदरक्तान्तलोचनाः । योषिद्भिः सह संक्रान्ताश्चिक्रीडुर्जहृषुश्च वै ८ घण्टानामिव संनादः शुश्रुवे मधुरस्वनः । अप्सरोगणसङ्घानां गायतां धनदालये ९ पुष्पवर्षाणि मुञ्चन्तो नगाः पवनताडिताः । शैलं तं वासयन्तीव मधुमाधवगन्धिनः १० मधुपुष्परजःपृक्तं गन्धमादाय पुष्कलम् । प्रववौ वर्धयन्कामं रावणस्य सुखोऽनिलः ११

---

सूर्यास्त झाला असतां सैन्यासहवर्तमान त्या वीर्यवान् रावणानें तेथेंच वास्तव्य करण्याचें मनामध्यें आणिलें १. पर्वताप्रमाणें ज्याचें तेज आहे असा निर्मल चंद्र उदय पावला असतां नानाप्रकारच्या शस्त्रास्त्रांनीं युक्त असलेलें तें रावणाचें प्रचंड सैन्य झोंपीं गेलें २. परंतु, महावीर्यवान् रावण पर्वताच्या माथ्यावरच बसला व चंद्रकिरणांनीं ज्यांना विशेष शोभा आलेली आहे असे कांहीं दर्शनीय प्रकार तो तेथें अवलोकन करूं लागला ३. उज्ज्वल कर्णिकारवनें, कदंब, बकुल, प्रफुल्लित कमलांनीं युक्त असलेलीं सरोवरें, गंगाजल, चंपक, अशोक, पुन्नाग, मंदार, चूत, पाटल, लोध्र, प्रियंगु, अर्जुन, केतक ४,५, तगर, नारिकेल, प्रियाल व पनस ह्यांनीं आणि इतरही वृक्षांनीं सुशोभित झालेल्या वनामध्यें ६ मदनानें व्याकुल झालेले, मधुर कंठानें युक्त असलेले व एकमेकांवर प्रेम करणारे किन्नर ज्याच्या योगानें मनाला संतोष होईल असें बरोबर गायन करूं लागले ७. मदाच्या योगानें ज्यांचे नेत्रप्रांत आरक्तवर्ण झालेले आहेत आणि मदामुळें जे बेशुद्धही झाले आहेत असे विद्याधर स्त्रियांसहवर्तमान तेथें येऊन आनंद व क्रीडा करूं लागले ८. कुबेराच्या निवासस्थानामध्यें अप्सरांच्या गणांचे समुदाय गायन करूं लागले असतां घंटांच्या स्वराप्रमाणें मधुर स्वर ऐकूं येऊं लागला ९. चैत्रवैशाखांमध्यें सुवासित होणारे वृक्ष वायूनें ताडित झाले असतां पुष्पवृष्टि करीत करीत त्या पर्वताला सुगंधयुक्त करूं लागले १०. मकरंद आणि पराग ह्यांनीं युक्त असलेला पुष्कळ गंध घेऊन वायु सुखावह वाहूं लागला असतां

गेयात्पुष्पसमृद्ध्या च शैत्याद्वायोर्गिरेर्गुणात् । प्रवृत्तायां रजन्यां च चन्द्रस्योदयनेन च १२ रावणः स महावीर्यः कामस्य वशमागतः । विनिःश्वस्य विनिःश्वस्य शशिनं समवैक्षत १३ एतस्मिन्नन्तरे तत्र दिव्याभरणभूषिता । सर्वाप्सरोवरा रम्भा पूर्णचन्द्रनिभानना १४ दिव्यचन्दनलिप्ताङ्गी मन्दारकृतमूर्धजा । दिव्योत्सवकृतारम्भा दिव्यपुष्पविभूषिता १५ चक्षुर्मनोहरं पीनं मेखलादामभूषितम् । समुद्वहन्ती जघनं रतिप्राभृतमुत्तमम् १६ कृतैर्विशेषकैरार्द्रैः षडर्तुकुसुमोद्भवैः । बभावन्यतमेव श्रीः कान्तिश्रीद्युतिकीर्तिभिः १७ नीलं सतोयमेघाभं वस्त्रं समवगुण्ठिता । यस्या वक्त्रं शशिनिभं भ्रुवौ चापनिभे शुभे १८ ऊरू करिकराकारौ करौ पल्लवकोमलौ । सैन्यमध्येन गच्छन्ती रावणेनोपलक्षिता १९ तां समुत्थाय गच्छन्तीं कामबाणवशं गतः । करे गृहीत्वा लज्जन्तीं स्मयमानोऽभ्यभाषत २० क्व गच्छसि वरारोहे कां सिद्धिं भजसे स्वयम् ।

---

रावणाची कामवासना वृद्धिंगत होऊं लागली ११. गायन, पुष्पसमृद्धि, थंडावा, वायु, पर्वताची शोभा, रात्रीचा समय आणि चंद्राचा उदय १२ ह्यांच्या योगानें तो महावीर्यवान् रावण कामाधीन होऊन गेला आणि सुस्कारे टाकीत टाकीत चंद्राकडे पाहूं लागला १३. इतक्यांत दिव्य भूषणांनीं भूषित आणि पूर्णचंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त अशी रंभा त्याच्या दृष्टीं पडली. ती सर्व अप्सरांमध्यें श्रेष्ठ होती १४, दिव्य चंदनाची उटी तिच्या अंगाला लाविलेली होती; तिचे केश कल्पवृक्षांच्या पुष्पांनीं शृंगारिलेले होते; दिव्य रतिसुखाचा उपभोग घेण्याकरितां ती बाहेर पडली होती आणि दिव्य पुष्पांनीं ती भूषित झालेली होती १५. दृष्टि व मन ह्यांना मोह पाडणारा, कमरपट्ट्यानें विभूषित व रतिसुखाचें उत्कृष्ट साधन असा कटिप्रदेश तिनें धारण केलेला होता १६. सर्व ऋतूंतील पुष्पांचे व टवटवीत असे विशेष अलंकार तिनें धारण केले असून सौंदर्य, भूषणसंपत्ति, लावण्य व कीर्ति ह्यांच्या योगानें ती दुसरी लक्ष्मीच कीं काय अशी दिसत होती १७. सजल मेघाप्रमाणें नीलवर्ण वस्त्र तिनें पांघरिलें होतें; तिचें मुख चंद्रासारिखें होतें; भिंवया धनुष्यासारख्या असून उत्कृष्ट होत्या १८; मांड्या गजशुंडेप्रमाणें होत्या आणि हात नव्या पालवीप्रमाणें कोमल होते. अशाप्रकारची ती रंभा सैन्यांतून जाऊं लागली असतां रावणाच्या दृष्टीं पडली १९. तेव्हां मदनबाणांच्या तावडींत सांपडलेला तो रावण उठला; ती चालली असतांना त्यानें तिचा हातही धरिला आणि नंतर ती लाजूं लागली असतां हंसत हंसत तो तिला ह्मणाला २० " हे सुंदरि, कोठें जात आहेस; आपण होऊन

कस्याभ्युदयकालोऽयं यस्त्वां समुपभोक्ष्यते २१ त्वदाननरसस्याद्य पद्मोत्पलसुगन्धिनः । सुधामृतरसस्येव कोऽद्य तृप्तिं गमिष्यति २२ स्वर्णकुम्भनिभौ पीनौ शुभौ भीरु निरन्तरौ । कस्योरस्थलसंस्पर्शं दास्यतस्ते कुचाविमौ २३ सुवर्णचक्रप्रतिमं स्वर्णदामचितं पृथु । अध्यारोक्ष्यति कस्तेऽद्य जघनं स्वर्गरूपिणम् २४ मद्विशिष्टः पुमान्कोऽद्य शक्रो विष्णुरथाश्विनौ। मामतीत्य हि यच्च त्वं यासि भीरु न शोभनम् २५ विश्रम त्वं पृथुश्रोणि शिलातलमिदं शुभम् । त्रैलोक्ये यः प्रभुश्चैव मदन्यो नैव विद्यते २६ तदेवं प्राञ्जलिः प्रह्वो याचते त्वां दशाननः । भर्तुर्भर्ता विधाता च त्रैलोक्यस्य भजस्व माम् २७ एवमुक्ताब्रवीद्रम्भा वेपमाना कृताञ्जलिः। प्रसीद नार्हसे वक्तुमीदृशं त्वं हि मे गुरुः २८ अन्येभ्योऽपि त्वया रक्ष्या प्राप्नुयां धर्षणं यदि । तद्धर्मतः स्नुषा तेऽहं तत्त्वमेतद्ब्रवीमि ते २९ अथाब्रवीद्दशग्रीवश्चरणाधोमुखीं स्थिताम् । रोमहर्षमनुप्राप्तां दृष्टमात्रेण तां

---

रतिसुखाविषयीं तूं कोणाचा मनोरथ परिपूर्ण करीत आहेस व तुझा उपभोग ज्याला घडणार अशा कोणाचा बरें उदयकाल आज प्राप्त झाला आहे ? २१. कमलांप्रमाणें ज्याचा सुगंध आहे आणि केवल सुधासंज्ञक अमृतरसाचीच ज्याला उपमा योग्य आहे अशा तुझ्या अधरामृताचें पान करून आज कोण बरें तृप्त होणार आहे ? २२ पुष्ट, परस्परसंलग्न,मनोहर, व सुवर्णकुंभतुल्य असे हे तुझे स्तन, हे भीरु, आज कोणाच्या बरें वक्षःस्थलाला स्पर्श करणार आहेत ?२३.सुवर्णचक्राप्रमाणें ज्याचा आकार आहे व सुवर्णाच्या माळांनीं जो भरून गेलेला आहे अशा तुझ्या अत्यंत सुस्वरूप व विशाल कटिप्रदेशावर आज कोण बरें आरूढ होणार आहे ? २४. आज माझ्याहून श्रेष्ठ पुरुष कोण आहे ? इंद्र, विष्णु, आणि अश्विनीकुमार ह्यापैकीं कोणी माझ्यापेक्षां श्रेष्ठ आहे कीं काय ? हे भीरु, मला सोडून तूं जात आहेस हें नीट नव्हें २५. हे विशालकटि, तूं ह्या शुभ शिलातलावर विश्रांति घे. त्रैलोक्याचा जो प्रभु आहे तो माझ्याहून दुसरा कोणी नाहींच ( तो मीच आहें)२६. सारांश, ह्याप्रमाणें नम्र होऊन व हात जोडून त्रैलोक्याधिपतीचाही अधिपति व पालक असलेला हा रावण तुझी प्रार्थना करीत आहें. ह्यास्तव, तूं माझा स्वीकार कर" २७. ह्याप्रमाणें रावणानें सांगितलें असतां रंभा हात जोडून कांपत कांपत त्याला म्हणाली "कृपा करा; माझ्याशीं असें भाषण करणें आपणांला योग्य नाहीं; आपण माझे श्वशुर आहां २८. माझ्यावर जर हल्ला होण्याचा प्रसंग आला तर इतरांपासून आपण माझें रक्षण केलें पाहिजे. सारांश, धर्मानें मी आपली स्नुषा आहें हें मीं आपणांला सत्य सांगतें " २९. ह्यानंतर पायांकडे दृष्टि देऊन स्थित असलेल्या व रावण

तदा ३० सुतस्य यदि मे भार्या ततस्त्वं हि स्नुषा भवेः। बाढमित्येव सा रम्भा प्राह रावणमुत्तरम् ३१ धर्मतस्ते सुतस्याहं भार्या राक्षसपुंगव। पुत्रः प्रियतरः प्राणैर्भ्रातुर्वैश्रवणस्य ते ३२ विख्यातास्त्रिषु लोकेषु नलकूबर इत्ययम्। धर्मतो यो भवेद्विप्रः क्षत्रियो वीर्यतो भवेत् ३३ क्रोधाद्यश्च भवेदग्निः क्षान्त्या च वसुधासमः। तस्यास्मि कृतसंकेता लोकपालसुतस्य वै ३४ तमुद्दिश्य तु मे सर्वं विभूषणमिदं कृतम् ३५ यथा तस्य हि नान्यस्य भावो मां प्रतितिष्ठति। तेन सत्येन मां राजन्मोक्तुमर्हस्यरिन्दम ३६ स हि तिष्ठति धर्मात्मा मां प्रतीक्ष्य समुत्सुकः। तत्र विघ्नं तु तस्येह कर्तुं नार्हसि मुञ्च माम् ३७ सद्भिराचरितं मार्गं गच्छ राक्षसपुङ्गव। माननीयो मम त्वं हि पालनीया तथाऽस्मि ते ३८ एवमुक्तो दशग्रीवः प्रत्युवाच विनीतवत्। स्नुषाऽस्मि यदवोचस्त्वमेकपत्नीष्वयं क्रमः ३९ देवलोकस्थितिरियं सुराणां शाश्वती मता। पतिरप्सरसां नास्ति न चैकस्त्रीपरिग्रहः ४० एवमुक्त्वा स तां रक्षो निवेश्य

---

दृष्टीं पडतांक्षणीं शरीरावर कांटा आलेल्या त्या रंभेला तो रावण ह्मणाला ३० “ माझ्या पुत्राची जर तूं भार्या असशील तर माझी स्नुषा होशील ”. ह्यावर ‘ होय ’ इतकेंच सांगून नंतर ती रंभा रावणाला ह्मणाली ३१ “ हे राक्षसश्रेष्ठ, धर्मानें मी आपल्या पुत्राची भार्या आहें. आपला भ्राता जो कुबेर त्याचा प्राणापेक्षांही अधिक प्रिय असा एक पुत्र आहे ३२ आणि हा पुत्र नलकूबर ह्मणून त्रैलोक्यामध्यें विख्यात आहे. धर्मानें तो विप्र आहे; वीर्यानें तो क्षत्रिय आहे ३३; क्रोधानें तो अग्नि आहे आणि क्षमेनें तो पृथ्वीची बरोबरी करणारा आहे. त्या लोकपालपुत्राशीं मीं रतिक्रीडेविषयीं संकेत केलेला आहे ३४ आणि त्याच्याचकरितां मीं हा सर्व थाटमाट केला आहे ३५. ज्याअर्थीं त्याच्याप्रमाणें दुसऱ्या कोणावरही माझें प्रेम नाहीं हें सत्य आहे त्याअर्थीं, हे शत्रुदमना राजा, त्या सत्याकडे लक्ष्य देऊन तूं मला सोड ३६. तो धर्मात्मा अतिशय उत्सुक होऊन माझी वाट पहात राहिला असेल. तस्मात्, तूं अशा प्रसंगीं त्या (च्या कार्या) ला विघ्न आणणें आपणांला योग्य नाहीं. ह्यास्तव, आपण मला सोडा ३७. हे राक्षसश्रेष्ठ, सज्जनांनीं आचरिलेल्या मार्गाचेंच आपण अवलंबन करा. आपणांला मान देणें माझें कर्तव्य आहे आणि त्याचप्रमाणें माझें रक्षण करणें आपलें कर्तव्य आहे ” ३८. ह्याप्रमाणें तिनें रावणाला सांगितलें असतां तो विनयानें तिला ह्मणाला “ स्नुषा आहे ह्मणून जें तूं ह्मणालीस तें खरें. परंतु, हा प्रकार एकच पति असणाऱ्या स्त्रियांचा होय ३९. ही देवलोकमर्यादा देवांना अक्षय्य अभि-

च शिलातले । कामभोगाभिसंरक्तो मैथुनायोपचक्रमे ४१ सा विमुक्ता ततो रम्भा भ्रष्टमाल्यविभूषणा। गजेन्द्राक्रीडमथिता नदीवाकुलतां गता४२ लुलिताकुलकेशाग्रा करवेपितपल्लवा । पवनेनावधूतेव लता कुसुमशालिनी ४३ सा वेपमाना लज्जन्ती भीता करकृताञ्जलिः । नलकूबरमासाद्य पादयोर्निपपात ह ४४ तदवस्थां च तां दृष्ट्वा महात्मा नलकूबरः। अब्रवीत्किमिदं भद्रे पादयोः पतिताऽसि मे ४५ सा वै निःश्वसमाना तु वेपमाना कृताञ्जलिः । तस्मै सर्वं यथातत्त्वमाख्यातुमुपचक्रमे ४६ एष देव दशग्रीवः प्राप्तो गन्तुं त्रिविष्टपम् । तेन सैन्यसहायेन निशेयं परिणामिता ४७ आयान्ती तेन दृष्टाऽस्मि त्वत्सकाशमरिन्दम। गृहीता तेन पृष्टाऽस्मि कस्य त्वमिति रक्षसा ४८ मया तु सर्वं यत्सत्यं तस्मै सर्वं निवेदितम् । काममोहाभिभूतात्मा नाश्रौषीत्तद्वचो मम ४९ याच्यमानो मया देव स्नुषा तेऽहमिति प्रभो । तत्सर्वं पृष्ठतः कृत्वा बलात्तेनास्मि धर्षिता ५० एवं

---

मत आहे. सारांश, अप्सरांना पति नाहीं आणि देवही भार्या ह्मणून एकाच अप्सरेचा स्वीकार करितात असें नाहीं " ४०. असें सांगून रावणानें तिला त्या शिलेवर बसविलें आणि विषयोपभोगाकरितां उत्सुक झालेला तो रावण तिचा उपभोग घेऊं लागला ४१. उपभोग घेतल्यानंतर त्यानें जेव्हां त्या रंभेला सोडून दिलें तेव्हां तिचीं पुष्पभूषणें गळून गेलीं होतीं; गजेंद्रानें क्रीडा केल्याप्रमाणें ती घुसळून निघाली होती; नदीप्रमाणें ती व्याकुळ झाली होती ४२; तिच्या केसांचीं अग्रें एकमेकांत गुंतून जाऊन लोंबत होतीं; तिचे हात हलत होते आणि वायूनें हलवून सोडिलेल्या पुष्पयुक्त लतेप्रमाणें तिची स्थिति झाली होती ४३. भयभीत झाल्यामुळें कांपत कांपत व लाजत लाजत ती रंभा हात जोडून नलकूबराजवळ आली आणि त्याच्या पायां पडली ४४. तेव्हां तिची तशी अवस्था अवलोकन करून महात्मा नलकूबर तिला ह्मणाला " हे भद्रे, माझ्या पायां पडलीस हें काय ?" ४५. असें त्यानें विचारिलें असतां सुस्कारे टाकीत टाकीत व कांपत कांपत ती हात जोडून त्याला सर्व इत्थंभूत वृत्तांत कथन करूं लागली ४६. ( ती ह्मणाली ) " हे देव, हा रावण स्वर्गाला जाण्याकरितां येथें आला आहे. सैन्यासहवर्तमान त्या रावणानें ही रात्र येथें काढिली ४७. हे शत्रुदमना, मी तुझ्याकडे येत असतांना त्याच्या दृष्टीं पडलें असतां त्यानें माझा हात धरिला आणि 'तूं कोणाची ?' असें त्या राक्षसानें मला विचारिलें ४८. तेव्हां मींही जें कांहीं खरें होतें तें सर्वही त्याला निवेदन केलें. परंतु, काम व मोह ह्यांनीं त्याचें अंतःकरण व्याप्त झालें असल्यामुळें त्यानें माझ्या ह्मणण्याकडे लक्ष्य दिलें नाहीं ४९. हे प्रभो, मी आपली स्नुषा आहें अशी

त्वमपराधं मे क्षन्तुमर्हसि सुव्रत । न हि तुल्यं बलं सौम्य स्त्रियाश्च पुरुषस्य हि ५१ एतच्छ्रुत्वा तु संक्रुद्धस्तदा वैश्रवणात्मजः । धर्षणां तां परां श्रुत्वा ध्यानं संप्रविवेश ह ५२ तस्य तत्कर्म विज्ञाय तदा वैश्रवणात्मजः । मुहूर्तात्क्रोधताम्राक्षस्तोयं जग्राह पाणिना ५३ गृहीत्वा सलिलं सर्वमुपस्पृश्य यथाविधि । उत्ससर्ज तदा शापं राक्षसेन्द्राय दारुणम् ५४ अकामा तेन यस्मात्त्वं बलाद्भद्रे प्रधर्षिता । तस्मात्स युवतीमन्यां नाकामामुपयास्यति ५५ यदा ह्यकामां कामार्तो धर्षयिष्यति योषितम् । मूर्धा तु सप्तधा तस्य शकलीभविता तदा ५६ तस्मिन्नुदाहृते शापे ज्वलिताग्निसमप्रभे । देवदुन्दुभयो नेदुः पुष्पवृष्टिश्च खाच्च्युता ५७ पितामहमुखाश्चैव सर्वे देवाः प्रहर्षिताः । ज्ञात्वा लोकगतिं सर्वां तस्य मृत्युं च रक्षसः ५८ श्रुत्वा तु स दशग्रीवस्तं शापं रोमहर्षणम् । नारीषु मैथुनीभावं नाकामास्वभ्यरोचयत् ५९ तेन नीताः स्त्रियः प्रीतिमापुः सर्वाः पतिव्रताः । नलकूबरनिर्मुक्तं शापं श्रुत्वा मनःप्रियम् ६० [ १४१० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे षड्विंशः सर्गः ॥ २६ ॥

---

मी त्याची प्रार्थना करीत असतांनाही त्या सर्वांकडे लक्ष्य न देतां, हे देव, बलात्कारानें त्यानें माझा उपभोग घेतला ५०. हे सुव्रत, ह्याप्रमाणें माझ्या हातून घडलेल्या अपराधाची आपण क्षमा करावी. हे सौम्य, स्त्री व पुरुष ह्या उभयतांचें बल सारखें नसतें " ५१. हें श्रवण करून वैश्रवणपुत्र क्रुद्ध झाला आणि तो झालेला पराकाष्ठेचा बलात्कार ऐकून घेतल्यावर त्यानें समाधि लाविली ५२. त्याचें तें कर्म समजून येतांक्षणीं कुबेरपुत्राचे नेत्र क्रोधानें आरक्तवर्ण झाले आणि त्यानें हातामध्यें उदक घेतलें ५३. उदक घेतल्यानंतर त्यानें यथाविधि आचमन केलें व राक्षसाधिपतिरावणाला त्यानें शाप दिला ५४. ( तो ह्मणाला ) " हे भद्रे, तूं निरिच्छ असतांना ज्याअर्थी त्यानें तुझा बलात्कारानें उपभोग घेतला आहे त्याअर्थी तो पुनरपि इतर कोणत्याही निरिच्छ तरुणीशीं समागम करण्यास तयार होणार नाहीं ५५. सारांश, मदनानें पीडित होऊन हा जर निरिच्छ स्त्रीवर बलात्कार करूं लागला तर त्याच्या मस्तकाचे तत्क्षणींच सात तुकडे उडून जातील " ५६. अशारीतीनें प्रज्वलित अग्नीप्रमाणें तीक्ष्ण शाप त्यानें दिला असतां देवांच्या दुंदुभि वाजूं लागल्या व आकाशांतून पुष्पवृष्टि झाली ५७. लोकांची सर्व स्थिति आणि त्या राक्षसाचा मृत्यु जाणून ब्रह्मदेवप्रभृति सर्व देवांना हर्ष झाला ५८; शरीरावर रोमांच उठविणारा तो शाप श्रवण केल्यानंतर निष्काम स्त्रियांशीं समागम करण्याचें तो रावणही मनामध्यें आणीनासा झाला ५९ आणि नलकूब-

कैलासं लङ्घयित्वा तु ससैन्यबलवाहनः । आससाद महातेजा इन्द्रलोकं दशाननः १ तस्य राक्षससैन्यस्य समन्तादुपयास्यतः । देवलोके बभौ शब्दो भिद्यमानार्णवोपमः २ श्रुत्वा तु रावणं प्राप्तमिन्द्रश्चलित आसनात् । देवानथाब्रवीत्तत्र सर्वानेव समागतान् ३ आदित्यांश्च वसून्रुद्रान्साध्यांश्च समरुद्गणान् । सज्जा भवत युद्धार्थं रावणस्य दुरात्मनः ४ एवमुक्तास्तु शक्रेण देवाः शक्रसमा युधि । संनह्य सुमहासत्त्वा युद्धश्रद्धासमन्विताः ५ स तु दीनः परित्रस्तो महेन्द्रो रावणः प्रति । विष्णोः समीपमागत्य वाक्यमेतदुवाच ह ६ विष्णो: कथं करिष्यामि रावणं राक्षसं प्रति । अहोतिबलवद्रक्षो युद्धार्थमभिवर्तते ७ वरप्रदानाद्बलवान्न खल्वन्येन हेतुना । तत्तु सत्यं वचः कार्यं यदुक्तं पद्मयोनिना ८ तद्यथा नमुचिर्वृत्रो बलिर्नरकशम्बरौ । त्वद्बलं समवष्टभ्य मया दग्धास्तथा कुरु ९ न ह्यन्यो देवदेवेश त्वदृते मधुसूदन । गतिः परायणं चापि त्रैलोक्ये सचराचरे १० त्वं हि नारायणः श्रीमान्पद्मनाभः सनातनः । त्वयेमे स्थापिता

---

रानें रावणाला दिलेला आपल्या मनाजोगा शाप कानीं आल्यावर त्या रावणानें नेऊन ठेविलेल्या सर्व पतिव्रता स्त्रियांनाही आनंद झाला ६०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सव्विसावा सर्ग समाप्त झाला ॥२६॥

कैलासपर्वत आलांडिल्यानंतर महातेजस्वी रावण सैन्य व समर्थ वाहनें ह्यांसहवर्तमान इंद्रलोकीं गेला १. तो रावण जवळ येऊं लागला असतां भेद पावणाऱ्या समुद्राप्रमाणें देवलोकीं शब्द होऊं लागला २. रावण प्राप्त झाल्याचें ऐकतांक्षणीं इंद्र आसनावरून उठला आणि तेथें जुळलेल्या वसु, रुद्र, आदित्य, साध्य व मरुद्गण ह्या सर्व देवांना 'दुरात्म्या रावणाशीं युद्ध करण्यास तयार व्हा' असें ह्मणाला ३, ४. ह्याप्रमाणें इंद्रानें सांगितलें असतां युद्धामध्यें इंद्राची बरोबरी करणारे ते महाधैर्यवान् व युद्धाभिलाषी देव तयार होऊन राहिले ५. परंतु, रावणासंबंधानें भयभीत झालेला तो दीन इंद्र विष्णूचे संनिध जाऊन ह्मणाला ६ "हे विष्णो, रावण राक्षसासंबधानें मीं कसें करावें ? अहो, हा अतिबलाढ्य राक्षस युद्धाकरितां इकडे येत आहे ७ आणि दुसरें कोणतेंही कारण नसून वरदानामुळें हा बलाढ्य झाला आहे. परंतु, ब्रह्मदेवानें जें वचन दिलें आहे तें सत्य केलें पाहिजे ८. तस्मात्, नमुचि, वृत्र, बलि, नरक व शंबर हे ज्याप्रमाणें तुझ्या सामर्थ्याचें अवलंबन करून मीं दग्ध करून टाकिले त्याप्रमाणें रावणाच्याही कांहीं वधाचा उपाय तूं मला सांग ९. हे देवाधिदेव, हे देवा, हे मधुसूदना, स्थावरजंगमात्मक प्राण्यांनीं युक्त असलेल्या ह्या त्रैलोक्यामध्यें तुझ्याशिवाय

लोकाः शक्रश्चाहं सुरेश्वरः ११ त्वया सृष्टमिदं सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् । त्वामेव भगवन्सर्वे प्रविशन्ति युगक्षये १२ तदाचक्ष्व यथातत्त्वं देवदेव मम स्वयम् । असिचक्रसहायस्त्वं योत्स्यसे रावणं प्रति १३ एवमुक्तः स शक्रेण देवो नारायणः प्रभुः । अब्रवीन्न परित्रासः कर्तव्यः श्रूयतां च मे १४ न तावदेष दुष्टात्मा शक्यो जेतुं सुरासुरैः । हन्तुं चापि समासाद्य वरदानेन दुर्जयः १५ सर्वथा तु महत्कर्म करिष्यति बलोत्कटः । राक्षसः पुत्रसहितो दृष्टमेतन्निसर्गतः १६ यत्तु मां त्वमभाषिष्ठा युध्यस्वेति सुरेश्वर । नाहं तं प्रति योत्स्यामि रावणं राक्षसं युधि १७ नाहत्वा समरे शत्रुं विष्णुः प्रतिनिवर्तते । दुर्लभश्चैव कामोऽद्य वरगुप्ताद्धि रावणात् १८ प्रतिजाने च देवेन्द्र त्वत्समीपे शतक्रतो । भवितास्मि यथास्याहं रक्षसो मृत्युकारणम् १९ अहमेव निहन्तास्मि रावणं सपुरःसरम् । देवता नन्दयिष्यामि ज्ञात्वा कालमुपागतम् २० एतत्ते कथितं तत्त्वं देवराज शची-

---

आमचा रक्षक व आश्रय दुसरा कोणी नाहीं १०. पद्मनाभ, श्रीमान् व सनातन नारायण तूंच आहेस आणि हे लोक व मी देवराज इंद्र ह्यांना तूंच स्थापिलें आहेस ११. हे भगवन्, चराचर प्राण्यांनीं भरलेलें हें सर्व त्रैलोक्य तूंच उत्पन्न केलें आहेस आणि युगांतसमयीं सर्व प्राणी तुझ्या ठिकाणींच प्रवेश करीत असतात १२. तस्मात्, हे देवाधिदेव, रावणाला जिंकितां येईल असा कांहीं उपाय आपण मला कथन करा अथवा रावणाशीं आपण स्वतःच खड्ग व चक्र ह्यांचें साहाय्य घेऊन युद्ध करणार असल्यास तसें कळूं द्या " १३. ह्याप्रमाणें इंद्रानें प्रार्थना केली असतां प्रभु नारायण देव त्याला ह्मणाला " भिण्याचें कारण नाहीं; मी सांगतों हें एक १४. देवदैत्यांच्या हातूनही ह्या दुरात्म्याचा पराजय अथवा गांठून वध होण्याचा संभव नाहीं. हा वरप्रदानामुळें अजिंक्य झालेला आहे १५; बलामुळें पुत्रासहवर्तमान गर्वयुक्त झालेला हा राक्षस सर्वथा मोठें कर्म करील हें मला स्वाभाविकच कळून आलें आहे १६. हे सुरेश्वरा, स्वतः युद्ध कर ह्मणून तूं मला सांगितलेंस खरें; परंतु, मी त्या रावणराक्षसाशीं संग्रामामध्यें युद्ध करणार नाहीं १७. कारण, संग्रामामध्यें शत्रूचा वध केल्याशिवाय विष्णु परत फिरत नाहीं. परंतु, वरप्रदानानें सुरक्षित असलेल्या रावणाची गांठ पडल्यावर हा संकल्प सिद्धीस जाणें कठीण आहे १८. हे देवराज, हे शतक्रतो, मी ह्या राक्षसाच्या मृत्यूचें कारण कसें होइन हें मात्र तुझ्याजवळ प्रतिज्ञेनें सांगतों १९. वेळ आली ह्मणजे ती जाणून मीच अनुयायांसहवर्तमान रावणाचा वध करीन आणि देवदानवांना आनंद देईन २०. हे देवराज, हे शचीपते, हें तत्त्व मीं तुला कथन केलें आहे. आतां, हे महास-

पते । युध्यस्व विगतत्रासः सुरैः सार्धं महाबल २१ ततो रुद्राः सहा-
दित्या वसवो मरुतोऽश्विनौ । संनद्धा निर्ययुस्तूर्णं राक्षसानभितः पुरात् २२
एतस्मिन्नन्तरे नादः शुश्राव रजनीक्षये । तस्य रावणसैन्यस्य प्रयुद्धस्य
समन्ततः २३ ते प्रबुद्धा महावीर्या अन्योन्यमभिवीक्ष्य वै । सङ्ग्राममेवाभि-
मुखा अभ्यवर्तन्त हृष्टवत् २४ ततो दैवतसैन्यानां संक्षोभः समजायत । तद-
क्षयं महासैन्यं दृष्ट्वा समरमूर्धनि २५ ततो युद्धं समभवद्देवदानवरक्षसाम् ।
घोरं तुमुलनिर्ह्रादं नानाप्रहरणोद्यतम् २६ एतस्मिन्नन्तरे शूरा राक्षसा घोर-
दर्शनाः । युद्धार्थं समवर्तन्त सचिवा रावणस्य ते २७ मारीचश्च प्रहस्तश्च
महापार्श्वमहोदरौ । अकम्पनो निकुम्भश्च शुकः सारण एव च २८ संह्रादो
धूमकेतुश्च महादंष्ट्रो घटोदरः । जम्बुमाली महाह्रादो विरूपाक्षश्च राक्षसः २९
सुप्तघ्नो यज्ञकोपश्च दुर्मुखो दूषणः खरः । त्रिशिराः करवीराक्षः सूर्यशत्रुश्च
राक्षसः ॥ महाकायोऽतिकायश्च देवान्तकनरान्तकौ ३० एतैः सर्वैः परि-
वृतो महावीर्यैर्महाबलः । रावणस्यार्यकः सैन्यं सुमाली प्रविवेश ह ३१ स
दैवतगणान्सर्वान्नानाप्रहरणैः शितैः । व्यध्वंसयत्समं क्रुद्धो वायुर्जलधरा-

---

लाढ्य, तू निर्भय होऊन देवांसहवर्तमान त्याच्याशीं युद्ध कर " २१. तदनंतर वसु, रुद्र, आदित्य, मरुद्गण आणि अश्विनीकुमार युद्धाकरितां तयार झाले आणि नगरां-तून निघून ते सत्वर राक्षसांचे संमुख गेले २२. इतक्यांत युद्धामध्यें निपुण असलेल्या त्या रावणसैन्याच्या कानावर रात्र समाप्त होते वेळीं तो घोष चोहोंकडून येऊं लागला २३. तेव्हां ते महावीर्यवान् राक्षस जागे झाले आणि एकमेकांकडे पाहून आनंदानें ते रणभूमीकडेच तोंड करून निघाले २४. तें अक्षय्य व प्रचंड सैन्य रणभू-मीमध्यें दृष्टीं पडलें असतां देवांच्या सैन्यांत मोठी गडबड उडाली २५ व नंतर प्रचंड ध्वनि व नानाप्रकारचीं उगारलेलीं आयुधें ह्यांनीं युक्त असे देव, दानव आणि राक्षस ह्यांचें घोर युद्ध सुरू झालें २६. इतक्यांत दिसण्यांतही भयंकर असलेले रावणाचे मंत्री शूर राक्षस युद्धाकरितां आले २७. मारीच, प्रहस्त, महापार्श्व, महोदर, अकंपन, निकुंभ, शुक, सारण २८, संऱ्हाद, धूमकेतु, महादंष्ट्र, घटोदर, जंबुमाली, महाऱ्हाद, विरूपाक्ष राक्षस २९, सुप्तघ्न, यज्ञकोप, दुर्मुख, दूषण, खर, त्रिशिरा, करवीराक्ष, सूर्यशत्रु राक्षस, महाकाय, अतिकाय, देवांतक आणि नरांतक ( हे ते राक्षस होत ) ३०. ह्या सर्व महावीर्यवान् राक्षसांनीं परिवेष्टित असलेला रावणाचा अमात्य महाबलाढ्य सुमाली सैन्यामध्यें प्रविष्ट झाला ३१ आणि वायु ज्याप्रमाणें मेघांना उडवून देतो त्याप्रमाणें तो क्रुद्ध झालेला राक्षस नानाप्रकारच्या तीक्ष्ण आयुधांनीं त्या सर्व देवग-

निव ३२ तद्दैवतबलं राम हन्यमानं निशाचरैः । प्रणुन्नं सर्वतो दिग्भ्यः सिंहनुन्ना मृगा इव ३३ एतस्मिन्नन्तरे शूरो वसूनामष्टमो वसुः । सावित्र इति विख्यातः प्रविवेश रणाजिरम् ३४ सैन्यैः परिवृतो हृष्टैर्नानाप्रहरणोद्यतैः । त्रासयञ्शत्रुसैन्यानि प्रविवेश रणाजिरम् ३५ तथादित्यौ महावीर्यौ त्वष्टा पूषा च तौ समम् । निर्भयौ सह सैन्येन तदा प्राविशतां रणे ३६ ततो युद्धं समभवत्सुराणां सह राक्षसैः । क्रुद्धानां रक्षसां कीर्तिं समरेष्वनिवर्तिनाम् ३७ ततस्ते राक्षसाः सर्वे विबुधान्समरे स्थितान् । नानाप्रहरणैर्घोरैर्जघ्नुः शतसहस्रशः ३८ देवाश्च राक्षसान्घोरान्महाबलपराक्रमान् । समरे विमलैः शस्त्रैरुपनिन्युर्यमक्षयम् ३९ एतस्मिन्नन्तरे राम सुमाली नाम राक्षसः । नानाप्रहरणैः क्रुद्धस्तत्सैन्यं सोऽभ्यवर्तत ४० स दैवतबलं सर्वं नानाप्रहरणैः शितैः । व्यध्वंसयत संक्रुद्धो वायुर्जलधरं यथा ४१ ते महाबाणवर्षैश्च शूलप्रासैः सुदारुणैः । हन्यमानाः सुराः सर्वे न व्यतिष्ठन्त संहताः ४२ ततो विद्राव्यमाणेषु दैवतेषु सुमालिना । वसूनामष्टमः

---

णांना एकदम उडवून देऊं लागला ३२. हे रामा, राक्षस प्रहार करूं लागले असतां तें देवसैन्य सिंहानें पळवून लाविलेल्या मृगाप्रमाणें वाट फुटेल तिकडे पळत सुटलें ३३. इतक्यांत सावित्र म्हणून प्रसिद्ध असलेला वसूंपैकी आठवा शूर वसु समरांगणामध्यें प्रविष्ट झाला ३४. सारांश, नानाप्रकारचीं आयुधें ज्यांनीं उगारिलीं आहेत अशा आनंदित सैन्यांनीं परिवेष्टित झालेला तो वसु शत्रुसैन्यांना त्रस्त करीत करीत समरांगणामध्यें शिरला ३५; आणि नंतर त्वष्टा व पूषा हे उभयतां महावीर्यवान् व निर्भय अदितिपुत्र सैन्यासहवर्तमान रणामध्यें प्रविष्ट झाले ३६. तदनंतर संग्रामांतून परत न फिरणाऱ्या राक्षसांच्या कीर्तीविषयानें क्रुद्ध झालेल्या देवांचें राक्षसांशीं युद्ध सुरू झालें ३७. तव्हां समरांगणामध्यें स्थित असलेल्या देवांवर ते राक्षस नानाप्रकारच्या शेंकडों हजारों घोर आयुधांनीं प्रहार करूं लागले असतां ३८ देवही महाबलाढ्य व महापराक्रमी अशा घोर राक्षसांना निर्मल शस्त्रांच्या योगानें संग्रामामध्यें यमसदनीं नेऊं लागले ३९. इतक्यांत, हे रामा, सुमालीनामक राक्षस क्रुद्ध झाला व नानाप्रकारचीं आयुधें बरोबर जाऊन तो त्या देवसैन्यावर चाल करून आला ४० आणि वायु ज्याप्रमाणें मेघांना उडवून देतो त्याप्रमाणें नानाप्रकारच्या तीक्ष्ण आयुधांनीं तो अत्यंत क्रुद्ध झालेला सुमाली देवसैन्य उडवून देऊं लागला ४१. तेव्हां मोठ्या मोठ्या बाणांचे वर्षाव आणि अतिभयंकर शूल व भाले ह्यांचा भडिमार होऊं लागला असतां देवांपैकीं कोणीही एके ठिकाणीं जुळून उभे राहिनासे झाले ४२. ह्याप्रमाणें सुमाली देवांना पळवू

क्रुद्धः सावित्रो वै व्यवस्थितः ४३ संवृतः स्वैरथानीकैः प्रहरन्तं निशाचरम् । विक्रमेण महातेजा वारयामास संयुगे ४४ ततस्तयोर्महद्युद्धमभवल्लोमहर्षणम् । सुमालिनो वसोश्चैव समरेष्वनिवर्तिनोः ४५ ततस्तस्य महाबाणैर्वसुना सुमहात्मना । निहतः पन्नगरथः क्षणेन विनिपातितः ४६ हत्वा तु संयुगे तस्य रथं बाणशतैश्चितम् । गदां तस्य वधार्थाय वसुर्जग्राह पाणिना ४७ ततः प्रगृह्य दीप्ताग्रां कालदण्डोपमां गदाम् । तां मूर्ध्नि पातयामास सावित्रो वै सुमालिनः ४८ सा तस्योपरि चोल्काभा पतन्ती विबभौ गदा । इन्द्रप्रमुक्ता गर्जन्ती गिराविव महाशनिः ४९ तस्य नैवास्थि न शिरो न मांसं ददृशे तदा । गदया भस्मतां नीतं निहतस्य रणाजिरे ५० तं दृष्ट्वा निहतं संख्ये राक्षसास्ते समन्ततः । व्यद्रवन्सहिताः सर्वे क्रोशमानाः परस्परम् ५१ विद्राव्यमाणा वसुना राक्षसा नावतस्थिरे ५२ [ १४६२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे सप्तविंशः सर्गः ॥ २७ ॥

---

लागला असतां वसूंपैकीं आठवा वसु सावित्र क्रुद्ध होऊन उभा राहिला ४३ आणि स्वतःच्या सैन्यानें परिवेष्टित होऊन त्या महातेजस्वी सावित्र वसूनें संग्रामामध्यें प्रहार करणाऱ्या राक्षसांचें आपल्या पराक्रमानें निवारण केलें ४४. तदनंतर सुमाली व वसु ह्या उभतांही संग्रामामध्यें परत न फिरणाऱ्या देवराक्षसांचें शरीरावर रोमांच उठविणारें मोठें युद्ध सुरू झालें ४५. नंतर महात्म्या वसूनें मोठ्या मोठ्या बाणांनीं त्याच्या भुजगयुक्त रथाला वेध करून तो एका क्षणामध्यें पाडिला ४६ आणि शेंकडो बाणांनीं व्याप्त असलेला त्याचा तो रथ ह्याप्रमाणें संग्रामामध्यें खडून टाकिल्यानंतर त्याच्याही वध करितां वसूनें हातामध्यें गदा धारण केली ४७. तदनंतर सावित्र वसूनें सुमालीच्या मस्तकीं ती उज्ज्वल अग्रानें युक्त असलेली कालदंडतुल्य गदा घेऊन टाकिली ४८. तव्हां त्याच्या मस्तकावर पडतां पडतां ती उल्कातुल्य गदा इंद्रानें पर्वतावर सोडिलेलें ध्वनियुक्त महावज्रच कीं काय अशी भासूं लागली ४९ संग्रामामध्यें गदेनें वध पावलेल्या त्या सुमालीचें हाड, मस्तक आणि मांस ह्यांपैकीं कांहींएक दृष्टी पडनासें झालें. कारण, त्याचें सर्वही शरीर गदेनें भस्म करून टाकिलें होतें ५०. संग्रामामध्यें त्याचा वध झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं एकमेकांच्या नांवानें आक्रोश करीत करीत ते सर्वही राक्षस एकदम चोहोंकडे पळून गेले ५१ आणि वसु त्यांना पिटवूं लागला असतां ते मुळींच उभे राहीनासे झाले ५२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडांतील सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २७ ॥

सुमालिनं हतं दृष्ट्वा वसुना भस्मसात्कृतम् । स्वसैन्यं विद्रुतं चापि लक्षयित्वार्दितं सुरैः १ ततः स बलवान्क्रुद्धो रावणस्य सुतस्तदा । निवर्त्य राक्षसान्सर्वान्मेघनादो व्यवस्थितः २ स रथेन महार्हेण कामगेन महारथः । अभिदुद्राव सेनां तां वनान्यग्निरिव ज्वलन् ३ ततः प्रविशतस्तस्य विविधायुधधारिणः । विदुद्रुवुर्दिशः सर्वा दर्शनादेव देवताः ४ न बभूव तदा कश्चिद्युयुत्सोरस्य संमुखे । सर्वानाविद्ध्य वित्रस्तांस्ततः शक्रोऽब्रवीत्सुरान् ५ न भेतव्यं न गन्तव्यं निवर्तध्वं रणे सुराः । एष गच्छति पुत्रो मे युद्धार्थमपराजितः ६ ततः शक्रसुतो देवो जयन्त इति विश्रुतः । रथेनाद्भुतकल्पेन सङ्ग्रामे सोऽभ्यवर्तत ७ ततस्ते त्रिदशाः सर्वे परिवार्य शचीसुतम् । रावणस्य सुतं युद्धे समासाद्य प्रजघ्निरे ८ तेषां युद्धं समभवत्सदृशं देवरक्षसाम् । महेन्द्रस्य च पुत्रस्य राक्षसेन्द्रसुतस्य च ९ ततो मातलिपुत्रस्य गोमुखस्य स रावणिः । सारथेः पातयामास शरान्कनकभूषणान् १० शचीसुतश्चापि तथा जयन्तस्तस्य सारथिम् । तं चापि रावणिः क्रुद्धः सम-

---

वसूनें सुमालीचा वध करून त्याचें अगदीं भस्म केलें आहे आणि देवांनीं त्रस्त करून सोडिल्यामुळें आपलें सैन्य पळून गेलें आहे असें अवलोकन करून १ रावणाचा तो बलाढ्य पुत्र मेघनाद क्रुद्ध झाला आणि सर्व राक्षसांना परत फिरवून उभा राहिला २. नंतर अग्नि ज्याप्रमाणें जाळीत जाळीत वनामध्यें प्रवेश करितो त्याप्रमाणें स्वेच्छेनें गमन करणाऱ्या मोठ्या मूल्यवान् रथावर आरूढ होऊन तो महारथि मेघनाद त्या सेनेवर चालून गेला ३. ह्याप्रमाणें नानाप्रकारचीं आयुधें धारण करून समरांगणामध्यें तो प्रवेश करूं लागला असतां सर्व देवता त्याचें दर्शन होतांक्षणींच वाट फुटेल तिकडे पळत सुटल्या ४ व त्या युद्धाभिलाषी मेघनादाचे संमुख कोणीही उभा राहिला नाहीं. तेव्हां त्रस्त झालेल्या सर्वही देवांना हाक मारून इंद्र ह्मणाला ५ "हे देवहो, भिऊं नका; जाऊं नका; संग्रामामध्यें परत फिरा; हा माझा अजिंक्य पुत्र युद्धाकरितां बाहेर पडत आहे" ६. तदनंतर जयंत ह्मणून प्रसिद्ध असलेला तो इंद्रपुत्र अद्भुत रथावर आरूढ होऊन संग्रामामध्यें आला असतां ७ ते सर्वही देव त्या शचीपुत्राचे सभोंवतीं जमले आणि संग्रामामध्यें रावणाच्या पुत्राला गांठून त्याच्यावर प्रहार करूं लागले ८. त्या देवराक्षसांचें युद्ध त्यांना योग्य असेंच झालें आणि महेंद्रपुत्र व राक्षसाधिपति रावणाचा पुत्र ह्यांचेंही युद्ध होऊं लागलें ९. तदनंतर त्या रावणपुत्रानें जयंताचा सारथि जो मातलिपुत्र गोमुख त्यावर सुवर्णभूषित बाण टाकिले असतां १० शचीपुत्र जयंतानेंही त्याच्या सारथ्यावर बाण टाकिले. परंतु, रावणपुत्रानें क्रुद्ध

न्तात्प्रत्यविध्यत ११ स हि क्रोधसमाविष्टो बली विस्फारितेक्षणः । रावणिः शक्रतनयं शरवर्षैरवाकिरत् १२ ततो नानाप्रहरणाञ्छितधारान्सहस्रशः । पातयामास संक्रुद्धः सुरसैन्येषु रावणिः १३ शतघ्नीमुसलप्रासगदाखड्गपरश्वधान् । महान्ति गिरिशृङ्गाणि पातयामास रावणिः १४ ततः प्रव्यथिता लोकाः संजज्ञे च तमस्ततः । तस्य रावणपुत्रस्य शत्रुसैन्यानि निघ्नतः १५ ततस्तद्दैवतबलं समन्तात्तं शचीसुतम् । बहुप्रकारमस्वस्थमभवच्छरपीडितम् १६ नाभ्यजानन्त चान्योन्यं रक्षो वा देवताथ वा । तत्र तत्र विपर्यस्तं समन्तात्परिधावत १७ देवा देवान्निजघ्नुस्ते राक्षसान्राक्षसास्तथा । संमूढास्तमसाच्छन्ना व्यद्रवन्नपरे तथा १८ एतस्मिन्नन्तरे वीरः पुलोमा नाम वीर्यवान् । दैत्येन्द्रस्तेन संगृह्य शचीपुत्रोऽपवाहितः १९ संगृह्य तं तु दौहित्रं प्रविष्टः सागरं तदा । आर्यकः स हि तस्यासीत्पुलोमा येन सा शची २० ज्ञात्वा प्रणाशं तु तदा जयन्तस्याथ देवताः । अप्रहृष्टास्ततः सर्वा व्यथिताः संप्रदुद्रुवुः २१ रावणिस्त्वथ संक्रुद्धो बलैः परिवृतः स्वकैः । अभ्यधावत देवांस्तान्मुमोच च महास्वनम् २२ दृष्ट्वा

---

होऊन त्यालाही सर्व बाजूंनीं वध केला ११. क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या बलाढ्य रावणपुत्रानें डोळे वटारून बाणवृष्टींनीं इंद्रपुत्राला आच्छादित केलें १२; अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या रावणपुत्रानें देवसैन्यांवर तीक्ष्ण धारांनीं युक्त अशीं नानाप्रकारचीं हजारों आयुधें टाकिलीं १३ आणि त्या रावणपुत्रानें शतघ्नी, मुसळें, भाले, गदा, खड्ग, परशु आणि मोठीं मोठीं पर्वतशिखरें हींही त्या देवसैन्यांवर फेंकिलीं १४. ह्याप्रमाणें तो रावणपुत्र शत्रुसैन्यांचा वध करूं लागला असतां लोक क्षुब्ध होऊन गेले; अंधकार उत्पन्न झाला १५; तें नानाप्रकारचें देवसैन्य बाणांनीं पीडित झाल्यामुळें अस्वस्थ झालें आणि त्या इंद्रपुत्राला सोडून चोहोंकडे पळत सुटलें १६. राक्षस आणि देव एकमेकांना ओळखीनासे झाले आणि ठिकठिकाणीं गोंधळून गेलेलें तें सैन्य चोहोंकडे पळत सुटलें १७; देव आणि राक्षस तमानें व्याप्त झाल्यामुळें अतिशय मोहित झाले; देव देवांचा व राक्षस राक्षसांचाच वध करूं लागले व कांहीं पळतही सुटले १८. इतक्यांत पुलोमानामक बलाढ्य व वीर दैत्यराज तेथें आला व तो शचीपुत्र जयंताला घेऊन गेला १९. इतकेंच नव्हे परंतु, आपल्या त्या दौहित्राला घेऊन तो सागरामध्यें प्रविष्ट झाला. कारण, तो पुलोमा त्याचा मातामह होता व त्यानेंच ती शची उत्पन्न केली होती २०. परंतु, जयंत नाहींसा झाला असें समजल्यावर देवतांचाही हर्ष नाहींसा झाला आणि त्या सर्वही देवता दुःखित होऊन धांवाधांव करूं लागल्या २१. नंतर

प्रणाशं पुत्रस्य दैवतेषु च विद्रुतम् । मातलिं चाह देवेशो रथः समुपनीयताम् २३ स तु दिव्यो महाभीमः सज्ज एव महारथः । उपस्थितो मातलिना वाह्यमानो महाजवः २४ ततो मेघा रथे तस्मिंस्तडित्वन्तो महाबलाः । अग्रतो वायुचपला नेदुः परमनिःस्वनाः २५ नानावाद्यानि वाद्यन्त गन्धर्वाश्च समाहिताः । ननृतुश्चाप्सरःसङ्घा निर्याते त्रिदशेश्वरे २६ रुद्रैर्वसुभिरादित्यैरश्विभ्यां समरुद्गणैः । वृतो नानाप्रहरणैर्निर्ययौ त्रिदशाधिपः २७ निर्गच्छतस्तु शक्रस्य परुषः पवनो ववौ । भास्करो निष्प्रभश्चैव महोल्काश्च प्रपेदिरे २८ एतस्मिन्नन्तरे शूरो दशग्रीवः प्रतापवान् । आरुरोह रथं दिव्यं निर्मितं विश्वकर्मणा २९ पन्नगैः सुमहाकायैर्वेष्टितं लोमहर्षणैः । येषां निःश्वासवातेन प्रदीप्तमिव संयुगे ३० दैत्यैर्निशाचरैश्चैव स रथः परिवारितः । समराभिमुखो दिव्यो महेन्द्रं सोऽभ्यवर्तत ३१ पुत्रं तं वारयित्वा तु स्वयमेव व्यवस्थितः । सोऽपि युद्धाद्विनिष्क्रम्य रावणिः समुपाविशत् ३२ ततो युद्धं प्रवृत्तं तु सुराणां राक्षसैः सह । शस्त्राणि वर्षतां तेषां मेघानामिव

---

रावणपुत्र क्रुद्ध होऊन स्वकीय सैन्यासहवर्तमान त्या देवांवर धांवून गेला आणि मोठी गर्जना करूं लागला २२. आपला पुत्र दिसत नाहीं आणि देव पळत सुटले आहेत असें अवलोकन करून देवराज इंद्र "माझा रथ घेऊन ये" असें मातलीला ह्मणाला २३. तो अतिभयंकर व महावेगवान् महारथ सज्जच होता व मातलि त्याला घेऊन आला २४. तदनंतर ( इंद्र रथारूढ झाला असतां ) वायूनें प्रवृत्त केलेले आणि विद्युल्लतेनें व प्रचंड गर्जनेनें युक्त असलेले महाबलाढ्य मेघ त्या रथावर अग्रभागीं गर्जना करूं लागले २५; देवराज बाहेर पडला असतां गंधर्व एकत्र जुळून नानाप्रकारचीं वाद्यें वाजवूं लागले आणि अप्सरांचे समुदाय नृत्य करूं लागले २६. नानाप्रकारचीं आयुधें घेतलेले वसु, रुद्र, आदित्य, अश्विनीकुमार आणि मरुद्गण ह्यांच्यासहवर्तमान देवराज इंद्र बाहेर पडला २७. इंद्र बाहेर निघूं लागला असतां वारा रूक्ष वाहूं लागला; सूर्य निस्तेज झाला आणि मोठे मोठे उल्कापात होऊं लागले २८. इतक्यांत प्रतापी व शूर रावण विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या दिव्य रथावर आरूढ झाला २९; शरीरानें फारच धिप्पाड असलेल्या व प्राण्यांच्या शरीरावर रोमांच उठविणाऱ्या भुजंगांनीं तो रथ परिवेष्टित झालेला होता आणि त्या भुजंगांच्या निःश्वासवायूमुळें संग्रामामध्यें आगच लागली आहे कीं काय असा भास होत होता ३०. दैत्यांनीं व राक्षसांनीं परिवेष्टित झालेला तो दिव्य रथ समरांगणाकडे मोर्चा फिरवून इंद्रावर गेला ३१. तदनंतर आपल्या त्या पुत्राचें निवारण करून रावण स्वतःच युद्ध

**संयुगे ३३ कुम्भकर्णस्तु दुष्टात्मा नानाप्रहरणोद्यतः । नाज्ञायत तदा राजन्युद्धं केनाभ्यपद्यत ३४ दन्तैः पादैर्भुजैर्हस्तैः शक्तितोमरमुद्गरैः । येन तेनैव संक्रुद्धस्ताडयामास देवताः ३५ स तु रुद्रैर्महाघोरैः संगम्याथ निशाचरः । प्रयुद्धस्तैश्च सङ्ग्रामे क्षतः शस्त्रैर्निरन्तरम् ३६ ततस्तद्राक्षसं सैन्यं प्रयुद्धं समरुद्गणैः । रणे विद्रावितं सर्वं नानाप्रहरणैस्तदा ३७ केचिद्विनिहताः कृत्ताश्चेष्टन्ति स्म महीतले । वाहनेष्ववसक्ताश्च स्थिता एवापरे रणे ३८ रथान्नागान्खरानुष्ट्रान्पन्नगांस्तुरगांस्तथा । शिशुमारान्वराहांश्च पिशाचवदनानपि ३९ तान्समालिङ्ग्य बाहुभ्यां विष्टब्धाः केचिदुत्थिताः । देवैस्तु शस्त्रसंभिन्ना मम्रिरे च निशाचराः ४० चित्रकर्म इवाभाति सर्वेषां रणसंप्लवः । निहतानां प्रसुप्तानां राक्षसानां महीतले ४१ शोणितोदकनिष्पन्दा काकगृध्रसमाकुला । प्रवृत्ता संयुगमुखे शस्त्रग्राहवती नदी ४२ एतस्मिन्नन्तरे**

---

करण्यास प्रवृत्त झाला व तो रावणपुत्रही युद्ध बंद करून स्वस्थ बसला ३२. नंतर संग्रामामध्यें मेघांप्रमाणें शस्त्रांचा वर्षाव करणाऱ्या त्या देवांचें राक्षसांसहवर्तमान युद्ध झालें ३३. परंतु, हे राजा, नानाप्रकारच्या आयुधांनीं युक्त असलेल्या दुरात्म्या कुंभकर्णानें त्या वेळीं कोणाकोणाशीं युद्ध केलें ह्याचा ठिकाणच लागला नाहीं ३४. सारांश, दांत, पाय, दंड, हात, शक्ति, तोमर, मुद्गर ह्यांपैकीं जें कांहीं उपलब्ध झालें त्याचा उपयोग करून तो अतिशय क्रुद्ध झालेला कुंभकर्ण देवतांना ताडन करीतच सुटला ३५. नंतर महाभयंकर रुद्रांशीं त्या राक्षसाची गांठ पडली असतां त्यांच्यासहवर्तमान त्यानें पराकाष्ठेचें युद्ध केलें आणि त्या देवांच्या शस्त्रांच्या योगानें त्याच्या शरीरावर एकसारख्या जखमाही झाल्या ३६. तदनंतर मरुद्गणांसहवर्तमान देवांशीं राक्षससैन्याचें युद्ध सुरू झालें असतां नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेल्या देवांनीं तें सर्वही सैन्य रणामध्यें पळवून लाविलें ३७. कांहीं निशाचरांचा वध झाला; कांहीं छिन्नभिन्न झाल्यामुळें भूतलावर तडफड करूं लागले; कांहीं वाहनांवरच खिळून राहिले आणि कांहीं संग्रामामध्येंच स्वस्थ राहिले ३८. रथ, गज, गर्दभ, उष्ट्र, भुजंग, अश्व, शिशुमार, सूकर आणि पिशाचतुल्य मुखांनीं युक्त असलेले राक्षस ३९ ह्यांना हातांनीं कवटाळून धरून मूर्च्छित झालेले कांहीं निशाचर उठले आणि देवांनीं शस्त्रांच्या योगानें छिन्नभिन्न केलेले राक्षस तर मृत्युच पावले ४०. भूतलावर वध पावून पडलेल्या आणि निद्रिस्थ झालेल्या सर्व राक्षसांची संग्रामामध्यें झालेली ती गर्दी चित्राप्रमाणें आश्चर्यकारक भासूं लागली ४१. रक्तरूप उदक जिच्यांतून वहात आहे, काक व गृध्रपक्षी ह्यांनीं जी व्याप्त झालेली आहे आणि शस्त्ररूप मकरांनीं जी युक्त आहे अशी नदी रणामध्यें उद्भवली ४२. इतक्यांत देवांशीं

क्रुद्धो दशग्रीवः प्रतापवान् । निरीक्ष्य तु बलं सर्वं दैवतैर्विनिपातितम् ४३
स तं प्रतिविगाह्याशु प्रवृद्धं सैन्यसागरम् । त्रिदशान्समरे निघ्नञ्शक्रमेवाभ्य-
वर्तत ४४ ततः शक्रो महच्चापं विस्फार्य सुमहास्वनम् । यस्य विस्फारनि-
र्घोषैः स्तनन्ति स्म दिशो दश ४५ तद्विकृष्य महच्चापमिन्द्रो रावणमूर्धनि ।
पातयामास स शरान्पावकादित्यवर्चसः ४६ तथैव च महाबाहुर्दशग्रीवो
निशाचरः । शक्रं कार्मुकविभ्रष्टैः शरवर्षैरवाकिरत् ४७ प्रयुध्यतोरथ
तयोर्बाणवर्षैः समन्ततः । नाज्ञायत तदा किंचित्सर्वं हि तमसा वृतम् ४८
[१५१०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डेऽष्टा-
विंशः सर्गः ॥ २८ ॥

ततस्तमसि संजाते सर्वे ते देवराक्षसाः । आयुध्यन्त बलोन्मत्ताः सूद-
यन्तः परस्परम् १ इन्द्रश्च रावणश्चैव रावणिश्च महाबलः । तस्मिंस्तमो-
जालवृते मोहमीयुर्न ते त्रयः २ स तु दृष्ट्वा बलं सर्वं रावणो निहतं क्षणात् ।
क्रोधमभ्यगमत्तीव्रं महानादं च मुक्तवान् ३ क्रोधात्सूतं च दुर्धर्षः स्यन्दन-
स्थमुवाच ह । परसैन्यस्य मध्येन यावदन्तो नयस्व माम् ४ अद्यैव त्रिद-

---

निःपात करून टाकिलेलें तें सर्व सैन्य अवलोकन करून प्रतापी रावण क्रुद्ध झाला ४३; क्रुद्ध झालेल्या सेनासमुद्रामध्यें तो सत्वर प्रविष्ट झाला आणि संग्रामामध्यें देवांवर हल्ला करीत करीत त्यानें इंद्राकडेच मोर्चा फिरविला ४४. तदनंतर प्रचंड गर्जना करणारें आपलें मोठें धनुष्य इंद्रानें खेंचिलें आणि ज्याच्या टणत्कारानें दशदिशा दुमदुमून जातात ४५ असें तें प्रचंड धनुष्य खेंचिल्यानंतर अग्नि व सूर्य ह्यांप्रमाणें तेजस्वी बाण इंद्रानें रावणाच्या मस्तकावर टाकिले ४६. तेव्हां महापराक्रमी रावणराक्षसानेंही त्याचप्रमाणें धनुष्यापासून सुटलेल्या बाणवृष्टींनीं इंद्राला आच्छादित केलें ४७ आणि ह्याप्रमाणें बाणवृष्टींच्या योगानें ते युद्ध करूं लागले असतां सर्वही अंधकारानें व्याप्त होऊन गेल्यामुळें कोणत्याच बाजूनें कशाचाही उमज पडेनासा झाला ४८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २८ ॥

तदनंतर अंधकार उत्पन्न झाला असतां बलानें उन्मत्त झालेले ते सर्वही देवराक्षस आपआपसांत एकमेकांचा वध करीतच युद्ध करूं लागले १. इंद्र, रावण आणि महाबलाढ्य रावणपुत्र हे तिघे मात्र, तें समरांगण गाढ अंधकारानें व्याप्त झालें असूनही, मोहित झाले नाहींत २. सर्व सैन्याचा वध झाल्याचें दृष्टीं पडतांक्षणीं रावणाला भयंकर क्रोध आला व त्यानें मोठी गर्जनाही केली, ३. नंतर रथावर असलेल्या सार-

शान्सर्वान्विक्रमैः समरे स्वयम् । नानाशस्त्रमहासारैर्नयामि यमसादनम् ५ अहमिन्द्रं वधिष्यामि धनदं वरुणं यमम् । त्रिदशान्विनिहत्याशु स्वयं स्थास्याम्यथोपरि ६ विषादो नैव कर्तव्यः शीघ्रं वाहय मे रथम् । द्विः खलु त्वां ब्रवीम्यद्य यावदन्तं नयस्व माम् ७ अयं स नन्दनोद्देशो यत्र वर्तामहे वयम् । नय मामद्य तत्र त्वमुदयो यत्र पर्वतः ८ तस्य तद्वचनं श्रुत्वा तुरगान्स मनोजवान् । आदिदेशाथ शत्रूणां मध्ये नैव च सारथिः ९ तस्य तं निश्चयं ज्ञात्वा शक्रो देवेश्वरस्तदा । रथस्थः समरस्थस्तान्देवान्वाक्यमथाब्रवीत् १० सुराः शृणुत मद्वाक्यं यत्तावन्मम रोचते । जीवन्नेव दशग्रीवः साधु रक्षो निगृह्यताम् ११ एष ह्यतिबलः सैन्ये रथेन पवनौजसा । गमिष्यति प्रवृद्धोर्मिः समुद्र इव पर्वणि १२ न ह्येष हन्तुं शक्योऽद्य वरदानात्सुनिर्भयः । तद्ग्रहीष्यामहे रक्षो यत्ता भवत संयुगे १३ यथा बलौ निरुद्धे च त्रैलोक्यं भुज्यते मया । एवमेतस्य पापस्य निरोधो मम रोचते १४ ततोऽन्यं देशमा-

---

थ्याला तो रावण रागानें ह्मणाला " शत्रुसैन्याच्या मधून शेवटपर्यंत माझा रथ घेऊन जा ४. ह्मणजे नानाप्रकारचीं शस्त्रें हेंच ज्यांतील मोठें बल आहे असे पराक्रम करून मी आजच सर्व देवांना यमसदनीं पोंचवितों ५. इंद्र, कुबेर, वरुण व यम ह्यांचा मी वध करीन आणि देवांचा सत्वर वध केल्यानंतर मी स्वतःच सर्वांचा अधिपति होईन ६. ह्यास्तव, मनामध्यें शंका न आणिता तूं माझा रथ सत्वर तिकडे घेऊन चल. अरे, शेवटापर्यंत तूं माझा रथ घेऊन चल हें मीं तुला दोनदां सांगितलें; परंतु, (तूं अद्यापि नेत नाहींस हें काय ?) ७. सांप्रत आपण जेथें उभे आहों तो हा नंदनप्रदेश होय. आतां जेथें उदयाचल पर्वत आहे तेथें तूं मला घेऊन चल " ८. हें त्याचें भाषण श्रवण केल्यानंतर मनाप्रमाणें वेगवान् असलेल्या अश्वांना शत्रूंमधून जाण्याचा त्या सारथ्यानें इशारा केला ९; व त्याचा तो निश्चय समजून आल्यानंतर समरांगणामध्यें रथारूढ झालेला देवराज इंद्र त्या देवांना ह्मणाला १० " हे देवहो, प्रस्तुत जें मला रुचत आहे तें माझें भाषण तुह्मी श्रवण करा. रावणराक्षसाला तुह्मी चांगल्या रीतीनें जिवंत धरा ११. अहो, पर्वदिवशीं समुद्र ज्याप्रमाणें मोठमोठ्या लाटांनीं युक्त व क्षुब्ध होऊन जातो त्याप्रमाणें वायुसारिख्या वेगवान् रथाच्या योगानें हा अतिबलाढ्य राक्षस सैन्यांतून निघून जाईल १२. वरदानानें हा अत्यंत निर्भय झाला असल्यामुळें ह्याचा वध होणें शक्य नाहीं. तस्मात्, रणामध्यें तुह्मी तयार असा; आपण त्या राक्षसाचा निग्रह करूं १३. ज्याप्रमाणें बलिदैत्याचा निरोध झाल्यामुळें मी त्रैलोक्याचा उपभोग घेत आहें त्याचप्रमाणें (त्रैलोक्यरक्षणार्थ) ह्या पाप्याचा निग्रह करणें मला रुचत आहे " १४.

रथाय शक्रः संत्यज्य रावणम् । अयुध्यत महाराज राक्षसांस्त्रासयन्रणे १५
उत्तरेण दशग्रीवः प्रविवेशानिवर्तकः । दक्षिणेन तु पार्श्वेन प्रविवेश शतक्रतुः १६
ततः स योजनशतं प्रविष्टो राक्षसाधिपः । देवतानां बलं सर्वं शरवर्षैरवा-
किरत् १७ ततः शक्रो निरीक्ष्याथ प्रणष्टं तु स्वकं बलम् । न्यवर्तयदसंभ्रान्तः
समावृत्य दशाननम् १८ एतस्मिन्नन्तरे नादो मुक्तो दानवराक्षसैः । हा हताः
स्म इति ग्रस्तं दृष्ट्वा शक्रेण रावणम् १९ ततो रथं समास्थाय रावणिः क्रोध-
मूर्च्छितः । तत्सैन्यमतिसंक्रुद्धः प्रविवेश सुदारुणम् २० तां प्रविश्य महा-
मायां प्राप्तां पशुपतेः पुरा । प्रविवेश सुसंरब्धस्तत्सैन्यं समभिद्रवत् २१ स
सर्वा देवतास्त्यक्त्वा शक्रमेवाभ्यधावत । महेन्द्रश्च महातेजा नापश्यच्च सुतं
रिपोः २२ विमुक्तकवचस्तत्र वध्यमानोऽपि रावणिः । त्रिदशैः सुमहावी-
र्यैर्न चकार च किंचन २३ स मातलिं समायान्तं ताडयित्वा शरोत्तमैः ।
महेन्द्रं बाणवर्षेण भूय एवाभ्यवाकिरत् २४ ततस्त्यक्त्वा रथं शक्रो विस-
सर्ज च सारथिम् । ऐरावतं समारुह्य मृगयामास रावणिम् २५ स तत्र

---

तदनंतर रावणाला सोडून देऊन इंद्र दुसऱ्या प्रदेशावर गेला; आणि, हे महाराज रामा, संग्रामामध्यें राक्षसांना त्रस्त करीत करीत तो त्यांच्याशीं युद्ध करूं लागला १५. उत्तरबाजूनें रावण देवसैन्यामध्यें परावृत्त न होण्याच्या उद्देशानें प्रविष्ट झाला आणि दक्षिणबाजूनें इंद्र प्रविष्ट झाला १६. तदनंतर शंभर योजनें आंत शिरल्यावर राक्षसाधिपति रावणानें देवांचें सर्व सैन्य बाणवृष्टींनीं आच्छादित केलें १७. तदनंतर स्वकीय सैन्य दिसेनासें झालेलें पाहून इंद्र निःशंकपणें उलटला आणि रावणाला त्यानें परतविलें १८. इतक्यांत इंद्रानें रावण ग्रस्त केल्याचें अवलोकन करितांक्षणीं "अरेरे! आह्मी ठार झालों" असा दानवांनीं व राक्षसांनीं आक्रोश केला १९. तदनंतर क्रोधानें व्याप्त झालेला रावणपुत्र रथारूढ झाला आणि अतिशयच क्रुद्ध झालेला तो रावणपुत्र त्या महाभयंकर सैन्यामध्यें प्रविष्ट झाला २०. पशुपतीपासून पूर्वीं प्राप्त झालेल्या त्या महामायेचा त्यानें आश्रय केला आणि अत्यंत क्षुब्ध झालेल्या त्या रावणपुत्रानें तें सैन्य पळवून लाविलें २१. नंतर सर्व देव सोडून तो इंद्रावरच धांवला; परंतु, महातेजस्वी इंद्राचें त्या शत्रुपुत्राकडे लक्ष्य गेलें नाहीं २२. कवच धारण केलेल्या रावणपुत्रावर त्या ठिकाणीं अतिवीर्यवान् देव जरी भडिमार करीत होते तरी त्याला यत्किंचितूही भय वाटलें नाहीं २३. मातलि येत असतांना उत्कृष्ट बाणांच्या योगानें त्यानें त्याला ताडण केलें व महेंद्रालाही बाण वृष्टीच्या योगानें त्यानें पुनरपि आच्छादित केलें २४. तदनंतर रथ व सारथि सोडून देऊन इंद्र ऐरावतावर आरूढ

मायाबलवानदृश्योऽथान्तरिक्षगः । इन्द्रं मायापरिक्षिप्तं कृत्वा स प्राद्रवच्छरैः २६ स तं यदा परिश्रान्तमिन्द्रं जज्ञेऽथ रावणिः । तदैनं मायया बद्ध्वा स्वसैन्यमभितोऽनयत् २७ तं तु दृष्ट्वा बलात्तेन नीयमानं महारणात् । महेन्द्रममराः सर्वे किं नु स्यादित्यचिन्तयन् २८ दृश्यते न स मायावी शक्रजित्समितिंजयः । विद्यावानपि येनेन्द्रो माययाऽपहृतो बलात् २९ एतस्मिन्नन्तरे क्रुद्धाः सर्वे सुरगणास्तदा । रावणं विमुखीकृत्य शरवर्षैरवाकिरन् ३० रावणस्तु समासाद्य आदित्यांश्च वसूंस्तदा । न शशाक स सङ्ग्रामे योद्धुं शत्रुभिरर्दितः ३१ स तं दृष्ट्वा परिम्लानं प्रहारैर्जर्जरीकृतम् । रावणिः पितरं युद्धे दर्शनस्थोऽब्रवीदिदम् ३२ आगच्छ तात गच्छामो रणकर्म निवर्तताम् । जितं नो विदितं तेऽस्तु स्वस्थो भव गतज्वरः ३३ अयं हि सुरसैन्यस्य त्रैलोक्यस्य च यः प्रभुः । स गृहीतो देवबलाद्भग्नदर्पाः सुराः कृताः ३४ यथेष्टं भुङ्क्ष्व लोकांस्त्रीन्निगृह्यारातिमोजसा । वृथा किं ते श्रमेणेह युद्ध-

---

झाला आणि रावणपुत्राला पाहूं लागला २५. परंतु, मायाबलानें युक्त असलेला तो रावणपुत्र अंतरिक्षांत जाऊन अदृश्य झाला आणि इंद्राला मायेनें व्यापून टाकून बाणांनीं वेध करीत करीत तो त्याच्यावर चालला २६. युद्ध होतां होतां इंद्र श्रांत झाला आहे असें जेव्हां रावणपुत्राला आढळून आलें तेव्हां त्याला मायेनें विद्ध करून इंद्रजित् आपल्या सैन्याकडे घेऊन गेला २७. महारणांतून तो रावणपुत्र महेंद्राला बलात्कारानें घेऊन जात आहे असें आढळून आल्यावर सर्वही देव ' हें काय ? ' ह्मणून चिंता करूं लागले २८; आणि मायेचें अवलंबन करून ज्यानें बलात्कारानें असुरमाया जाणणाऱ्याही इंद्राला हरण करून नेलें तो संग्रामविजयी व मायावी इंद्रजित् त्यांच्या दृष्टीही पडला नाहीं २९. इतक्यांत सर्व देवगण क्रुद्ध झाले आणि रावणाला पराङ्मुख करून त्यांनीं त्याला बाणवृष्टींनीं आच्छादित केलें ३०. रावण वसु व आदित्य ह्यांच्याकडे गेला; परंतु, शत्रूंनीं जेरीस आणिल्यामुळें संग्रामामध्यें त्यांच्याशीं युद्ध करण्यास समर्थ झाला नाहीं ३१. नंतर प्रहारांनीं जर्जर व अतिशय म्लान झालेल्या त्या पित्याला अवलोकन करून तो रावणपुत्र अदृश्य असतांनाच त्याला ह्मणाला ३२ " हे तात, चला; आपण नगरामध्यें परत जाऊं; आतां युद्ध पुरे; आपला जय झाला आहे असें आपण समजा आणि काळजी सोडून देऊन स्वस्थ व्हा ३३. देवसैन्याचा व त्रैलोक्याचा प्रभु जो इंद्र तो हा देवसैन्यांतून मीं धरून आणिला आहे आणि देवांचा गर्व नाहींसा केला आहे ३४. बलानें शत्रूचा निग्रह करून तूं आतां त्रैलोक्याचा यथेष्ट उपभोग घे; आतां ह्या ठिकाणीं तूं व्यर्थ श्रम कशाकरितां घेत

मद्य तु निष्फलम् ३५ ततस्ते दैवतगणा निवृत्ता रणकर्मणः। तच्छ्रुत्वा रावणेर्वाक्यं शक्रहीनाः सुरा गताः ३६ अथ स रणविगतमुत्तमौजास्त्रिदशरिपुः प्रथितो निशाचरेन्द्रः। स्वसुतवचनमादृतः प्रियं तत्समनुनिशम्य जगाद चैव सूनुम् ३७ अतिबलसदृशैः पराक्रमैस्त्वं मम कुलवंशविवर्धनः प्रभो। यदयमतुलबलस्त्वयाऽद्य वै त्रिदशपतिस्त्रिदशाश्च निर्जिताः ३८ नय रथमधिरोप्य वासवं नगरमितो व्रज सेनया वृतस्त्वम्। अहमपि तव पृष्ठतो द्रुतं सह सचिवैरनुयामि हृष्टवत् ३९ अथ स बलवृतः सवाहनस्त्रिदशपतिं परिगृह्य रावणिः। स्वभवनमधिगम्य वीर्यवान्कृतसमरान्विससर्ज राक्षसान् ४० [ १५५० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोनत्रिंशः सर्गः ॥ २९ ॥

जिते महेन्द्रेऽतिबले रावणस्य सुतेन वै। प्रजापतिं पुरस्कृत्य ययुर्लङ्कां सुरास्तदा १ तत्र रावणमासाद्य पुत्रभ्रातृभिरावृतम्। अब्रवीद्गगने तिष्ठन्सामपूर्वं प्रजापतिः २ वत्स रावण तुष्टोऽस्मि पुत्रस्य तव संयुगे। अहोऽस्य विक्रमौदार्यं तव तुल्योऽधिकोऽपि वा ३ जितं हि भविता सर्वं त्रैलोक्यं स्वेन

---

आहेस ? आज युद्ध करणें निरुपयोगी आहे" ३५. तदनंतर ते देवगण युद्धापासून परावृत्त झाले आणि रावणपुत्राचें तें भाषण श्रवण करितांक्षणीं इंद्राशिवाय देव निघून गेले ३६. तदनंतर महाबलाढ्य व राक्षसाधिपति असा तो प्रसिद्ध देवशत्रु रावण आदरानें आपल्या पुत्राचें प्रिय भाषण श्रवण करून रणापासून परावृत्त झालेल्या त्या पुत्राला ह्मणाला ३७ "हे प्रभो, ज्याअर्थी बलाची बरोबरी नसतांनाही तूं अतिबलाढ्य पुरुषाप्रमाणें पराक्रम करून देवराजाचा व देवांचा पराभव केला आहेस त्याअर्थी माझ्या कुलांमध्यें वंशाचें नांव चालविणारा तूं झाला आहेस ३८. आतां इंद्राला रथावर घालून तूं सेनेसहवर्तमान येथून नगराकडे चल; मीही आनंदानें सचिवांसहवर्तमान तुझ्या बरोबर येतों" ३९. तदनंतर सैन्यानें परिवेष्टित व वाहनांनीं युक्त असलेला तो वीर्यवान् रावणपुत्र देवराज इंद्राला घेऊन आपल्या घरीं गेला आणि युद्ध केलेल्या राक्षसांना त्यानें आपआपल्या घरीं पाठविलें ४०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकुणतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ २९ ॥

अतिबलाढ्य महेंद्राला रावणपुत्रानें जिंकिल्यावर ब्रह्मदेवाला पुढें करून देव लंकेमध्यें गेले आणि तेथें पुत्र व भ्राते ह्यांनीं परिवेष्टित असलेल्या रावणासमीप गेल्यानंतर अंतरिक्षामध्येंच असतांना सौम्यशब्दपूर्वक ब्रह्मदेव त्याला ह्मणाला १, २ "वत्सा रावणा, संग्रामामध्यें मी तुझ्या पुत्रावर संतुष्ट झालों आहें. कायहो, ह्याचा हा उदार

तेजसा । कृता प्रतिज्ञा सफला प्रीतोऽस्मि ससुतस्य ते ४ अयं च पुत्रोऽतिबलस्तव रावण वीर्यवान् । जगतीन्द्रजिदित्येव परिख्यातो भविष्यति ५ बलवान्दुर्जयश्चैव भविष्यत्येव राक्षसः । यं समाश्रित्य ते राजन्स्थापितास्त्रिदशा वशे ६ तन्मुच्यतां महाबाहो महेन्द्रः पाकशासनः । किं चास्य मोक्षणार्थाय प्रयच्छन्तु दिवौकसः ७ अथाब्रवीन्महातेजा इन्द्रजित्समितिञ्जयः । अमरत्वमहं देव वृणे यद्येष मुच्यते ८ ततोऽब्रवीन्महातेजा मेघनादं प्रजापतिः । नास्ति सर्वामरत्वं हि कस्यचित्प्राणिनो भुवि ९ पक्षिणश्चतुष्पदो वा भूतानां वा महौजसाम् । श्रुत्वा पितामहेनोक्तमिन्द्रजित्प्रभुणाव्ययम् १० अथाब्रवीत्स तत्रस्थं मेघनादो महाबलः । श्रूयतां वा भवेत्सिद्धिः शतक्रतुविमोक्षणे ११ ममेष्टं नित्यशो हव्यैर्मन्त्रैः संपूज्य पावकम् । सङ्ग्राममवतर्तुं च शत्रुनिर्जयकाङ्क्षिणः १२ अश्वयुक्तो रथो मह्यमुत्तिष्ठेत्तु विभावसोः । तत्स्थस्यामरता स्यान्मे एष मे निश्चितो वरः १३ तस्मिन्यद्यसमाप्ते च जप्यहोमे विभावसौ । युध्येयं देवसङ्ग्रामे तदा मे स्याद्वि-

---

पराक्रम ! हा तुझी बरोबरी करणारा आहे अथवा तुझ्यापेक्षां अधिकही आहे ३. स्वबलानें सर्व त्रैलोक्य जिंकून आपली प्रतिज्ञा तूं सफल केली आहेस. ह्यास्तव, पुत्रासहवर्तमान मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें ४. हे रावणा, हा तुझा वीर्यवान् व अतिबलाढ्य पुत्र जगतामध्यें इंद्रजित् ह्याच नांवानें प्रसिद्ध होईल ५. हे राजा ज्याचा आश्रय केल्यामुळें तूं देव पादाक्रांत करून टाकिले आहेस तो हा बलाढ्य राक्षस अजिंक्यच होईल ६. आतां, हे महापराक्रमी रावणा, पाकशासन महेंद्राला तूं सोडून दे; ह्याच्या सुटकेकरितां देवांनीं तुला काय द्यावें ?" ७. ह्यावर महातेजस्वी व संग्रामविजयी इंद्रजित् " हे देवा, ह्याला जर सोडावयाचा असेल तर अमरत्व प्राप्त होण्याचा मी वर मागत आहें " ८ असें ह्मणाला असतां महातेजस्वी ब्रह्मदेव मेघनादाला ह्मणाला " भूतलावर कोणत्याही प्राण्याला ह्मणजे पक्षी, चतुष्पाद आणि इतरही महातेजस्वी भूतें ह्यांपैकीं कोणालाही सर्व प्रकारें अमरत्व प्राप्त होत नाहीं " ९. प्रभु ब्रह्मदेवानें केलेलें त्रिकालाबाधित भाषण श्रवण करून तो महाबलाढ्य मेघनाद अंतरिक्षामध्यें असलेल्या ब्रह्मदेवाला ह्मणाला १०" असें होत नसेल तर इंद्राची मुक्तता करावयाची असल्यास दुसरा कोणता वर मला हवा आहे तो आपण ऐका ११. शत्रुपराजयाची इच्छा धरणाऱ्या मला समंत्रक हवनीय द्रव्यांनीं अग्नीचें नित्य पूजन करून संग्रामामध्यें जाणें इष्ट आहे १२. ह्यास्तव, संग्रामांत जातेवेळीं अग्नीचा अश्वयुक्त रथ माझ्याकरितां तयार असावा आणि त्या रथावर मी असतांना अमर असावें हा वर मीं ठरविला आहे १३.

नाशनम् १४ सर्वो हि तपसा देव वृणोत्यमरतां पुमान्। विक्रमेण मया त्वेतदमरत्वं प्रवर्तितम् १५ एवमस्त्विति तं चाह वाक्यं देवः पितामहः। मुक्तश्चेन्द्रजिता शक्रो गताश्च त्रिदिवं सुराः १६ एतस्मिन्नन्तरे राम दीनो भ्रष्टामरद्युतिः। इन्द्रश्चिन्तापरीतात्मा ध्यानतत्परतां गतः १७ तं तु दृष्ट्वा तथाभूतं प्राह देवः पितामहः। शतक्रतो किमु पुरा करोति स्म सुदुष्कृतम् १८ अमरेन्द्र मया बुद्ध्या प्रजाः सृष्टास्तथा प्रभो। एकवर्णाः समाभाषा एकरूपाश्च सर्वशः १९ तासां नास्ति विशेषो हि दर्शने लक्षणेऽपि वा। ततोऽहमेकाग्रमनास्ताः प्रजाः समचिन्तयम् २० सोऽहं तासां विशेषार्थं स्त्रियमेकां विनिर्ममे। यद्यत्प्रजानां प्रत्यङ्गं विशिष्टं तत्तदुद्धृतम् २१ ततो मया रूपगुणैरहल्या स्त्री विनिर्मिता। हलं नामेह वैरूप्यं हल्यं तत्प्रभवं भवेत् २२ यस्या न विद्यते हल्यं तेनाहल्येति विश्रुता। अहल्येत्येव च मया तस्या नाम प्रकीर्तितम् २३ निर्मितायां च देवेन्द्र तस्यां नार्यां सुरर्षभ। भविष्यतीति कस्यैषा मम चिन्ता ततोऽभवत् २४ त्वं तु शक्र तदा नारीं जानीष मनसा प्रभो।

---

अग्निसंबंधीं जप व होम समाप्त न होतां जेव्हां मीं देवसंग्रामामध्यें युद्ध करीन तेव्हां माझा नाश व्हावा ( हें मला संमत आहे ) १४. हे देवा, कोणताही पुरुष झाला तरी तपश्चर्येच्या योगानें तो अमरत्वाचा वर मागून घेत असतो; परंतु, मीं हें अमरत्व पराक्रमानें संपादन केलें आहे " १५. ह्यावर 'तथास्तु' असें ब्रह्मदेवानें त्याला सांगितलें असतां इंद्रजितानें इंद्राला सोडून दिलें व देवही स्वर्गाला गेले १६. हे रामा इतक्यांत इंद्र दीन झाला; त्याचें देवतेज नाहींसें झालें आणि तो चिंताक्रांत होऊन एकसारखा विचारच करीत बसला १७. तशी अवस्था प्राप्त झालेल्या इंद्राला पाहून ब्रह्मदेव म्हणाला," "पूर्वी तूं अत्यंत पापकर्म कशाकरितां केलें आहेस ? १८. हे प्रभो देवराज, पूर्वी मीं वर्णानें, भाषेनें व रूपानें सर्वस्वीं समान अशा प्रजा उत्पन्न केल्या होत्या १९. त्यांच्या रूपांमध्यें अथवा वर्णांमध्यें कांहीं एक फरक नव्हता. तदनंतर एकाग्र मनानें मीं त्या प्रजांसंबंधानें विचार केला व त्यांच्यांत कांहीं भिन्नत्व असावें एतदर्थ एक स्त्री मीं निर्माण केली. प्रजाजनांचा जो जो अवयव उत्कृष्ट होता तो तो मीं काढिला २०, २१ आणि त्या अवयवांच्या योगानें रूप व गुण ह्यांनीं संपन्न अशी अहल्या स्त्री मीं निर्माण केली. हल म्हणजे विरूपता आणि हल्य म्हणजे विरूपतेमुळें आलेलें निंद्यत्व २२. जिला हल्य नाहीं ती अहल्या म्हणून प्रसिद्ध असते आणि म्हणूनच मींही तिचें नांव अहल्या असेंच ठेविलें २३. हे सुरश्रेष्ठ देवराज, ती स्त्री निर्माण केल्यावर 'ही कोणाची पत्नी होईल ?' अशी चिंता मला प्राप्त झाली २४. परंतु हे इंद्रा, हे प्रभो, हे पुरंदरा, हें स्थान श्रेष्ठ अस-

स्थानाधिकतया पत्नी ममैषेति पुरन्दर २५ सा मया न्यासभूता तु गौतमस्य महात्मनः । न्यस्ता बहूनि वर्षाणि तेन निर्यातिता च ह २६ ततस्तस्य परिज्ञाय महास्थैर्यं महामुनेः । ज्ञात्वा तपसि सिद्धिं च पत्न्यर्थं स्पर्शिता तदा २७ स तया सह धर्मात्मा रमते स्म महामुनिः । आसन्निराशा देवास्तु गौतमे दत्तया तया २८ त्वं क्रुद्धस्त्विह कामात्मा गत्वा तस्याश्रमं मुनेः । दृष्टवांश्च तदा तां स्त्रीं दीप्तामग्निशिखामिव २९ सा त्वया धर्षिता शक्र कामार्तेन समन्युना । दृष्टस्त्वं स तदा तेन आश्रमे परमर्षिणा ३० ततः क्रुद्धेन तेनासि शप्तः परमतेजसा । गतोऽसि येन देवेन्द्र दशाभागविपर्ययम् ३१ यस्मान्मे धर्षिता पत्नी त्वया वासव निर्भयात् । तस्मात्त्वं समरे शक्र शत्रुहस्तं गमिष्यसि ३२ अयं तु भावो दुर्बुद्धे यस्त्वयेह प्रवर्तितः । मानुषेष्वपि लोकेषु भविष्यति न संशयः ३३ तत्रार्धं तस्य यः कर्ता त्वय्यर्धं निपतिष्यति । न च ते स्थावरं स्थानं भविष्यति न संशयः ३४ यश्च यश्च सुरेन्द्रः स्याद्ध्रुवः स न भविष्यति । एष शापो मया मुक्त इत्यसौ त्वां तदाब्रवीत् ३५ तां तु

---

त्यामुळें ' ही माझी पत्नी ' ह्मणून तूं त्या स्त्रीला मनामध्यें समजत होतास २५. महात्म्या गौतमापाशीं ठेव ह्मणून मीं ती स्त्री पुष्कळ वर्षें ठेविली होती व त्यानें ती मला परतही दिली २६. तेव्हां त्या महामुनीचें मोठें जितेंद्रियत्व जाणून आणि तपश्चर्येसंबंधानें त्याची सिद्धि अवलोकन करून पत्नी ह्या नात्यानें मीं त्याला ती अर्पण केली २७. तेव्हां तो धर्मात्मा महर्षि तिच्यासहवर्तमान रममाण होऊं लागला आणि ह्याप्रमाणें ती गौतमाला दिल्यावर देव निराश झाले २८. परंतु, विषयवासनेनें तुझें अंतःकरण ग्रस्त केलें असल्यामुळें तूं क्रुद्ध होऊन त्या मुनीच्या आश्रमामध्यें गेलास आणि प्रदीप्त अग्निज्वालेप्रमाणें असलेली ती स्त्री अवलोकन केलीस २९. हे इंद्रा, तूं कामांध व क्रुद्ध होऊन तिच्यावर बलात्कार केलास आणि त्यावेळीं आश्रमामध्यें त्या महर्षीनेंही तुला अवलोकन केलें ३०. तदनंतर क्रुद्ध झालेल्या त्या महातेजस्वी मुनीनें तुला शाप दिला; व, हे देवराज, त्यामुळें तुला विपरीत दशा प्राप्त झाली ३१. हे इंद्रा, ज्या अर्थी तूं निःशंकपणें माझ्या पत्नीचा उपभोग घेतलास त्याअर्थी समरांगणामध्यें तूं शत्रूच्या हस्तगत होशील ३२. परंतु, हे दुर्बुद्धे, हें जें पापकर्म तूं ह्या जगतामध्यें प्रवृत्त केलें आहेस तें मनुष्यलोकामध्यंही निःसंशय सुरू होईल ३३. त्या मनुष्यलोकामध्यें तें जारकर्म जो करील त्याला त्या कर्माचें अर्धें पातक लागेल; ( त्या कर्माचा प्रवर्तक तूं असल्यामुळें ) अर्धें पातक तुला लागेल आणि तुला अक्षय्य स्थान निःसंशय प्राप्त होणार नाहीं ३४. जो जो देवराज होईल

भार्यां सुनिर्भर्त्स्य सोऽब्रवीत्सुमहातपाः। दुर्विनीते विनिध्वंस ममाश्रमसमीपतः ३६ रूपयौवनसंपन्ना यस्मात्त्वमनवस्थिता। तस्माद्रूपवती लोके न त्वमेकाभविष्यति ३७ रूपं च ते प्रजाः सर्वा गमिष्यति न संशयः। यत्तदेकं समाश्रित्य विभ्रमोऽयमुपस्थितः ३८ तदाप्रभृति भूयिष्ठं प्रजा रूपसमन्विता। सा तं प्रसादयामास महर्षिं गौतमं तदा ३९ अज्ञानाद्धर्षिता विप्र त्वद्रूपेण दिवौकसा। न कामकाराद्विप्रर्षे प्रसादं कर्तुमर्हसि ४० अहल्यया त्वेवमुक्तः प्रत्युवाच स गौतमः। उत्पत्स्यति महातेजा इक्ष्वाकूणां महारथः ४१ रामो नाम श्रुतो लोके वनं चाप्युपयास्यति। ब्राह्मणार्थे महाबाहुर्विष्णुर्मानुषविग्रहः ४२ तं द्रक्ष्यसि यदा भद्रे ततः पूता भविष्यसि। स हि पावयितुं शक्तस्त्वया यद्दुष्कृतं कृतम् ४३ तस्यातिथ्यं च कृत्वा वै मत्समीपं गमिष्यसि। वत्स्यसि त्वं मया सार्धं तदा हि वरवर्णिनि ४४ एवमुक्त्वा स विप्रर्षिराजगाम स्वमाश्रमम्। तपश्चचार सुमहत्सा पत्नी ब्रह्मवादिनः ४५ शापोत्सर्गाद्धि तस्येदं मुनेः सर्वमुपस्थितम्। तत्स्मर त्वं

---

तो तो स्थिर होणार नाहीं हा शाप मीं दिला आहे " असें तो महर्षि त्यावेळीं तुला ह्मणाला ३५ नंतर त्या भार्येची फारच निर्भर्त्सना करून तो अत्यंत महातपस्वी मुनि तिला ह्मणाला " हे दुराचारिणि, माझ्या आश्रमाजवळच तुझा विध्वंस होवो ३६. ज्याअर्थीं रूप व यौवन ह्यांनीं संपन्न असलेली तूं स्थिर राहिली नाहींस त्याअर्थीं जगतामध्यें तूं एकटीच रूपवती रहाणार नाहींस ३७. ज्याअर्थीं एके ठिकाणींच सौंदर्य असल्यामुळें हा अनर्थ उपस्थित झाला आहे त्याअर्थीं सर्वही प्रजा तुझें रूप वाटून घेतील ह्यांत संशय नाहीं " ३८. असो. तेव्हांपासून पुष्कळच प्रजा रूपसंपन्न होऊं लागल्या. शाप झाल्यानंतर गौतममहर्षींची कृपा होण्याकरितां ती त्यांना ह्मणाली ३९ " हे विप्र, देवानें आपलें रूप धारण केलेलें मला न समजल्यामुळें त्यानें माझा उपभोग घेतला आहे. माझ्या इच्छेनें त्याला माझा उपभोग घडलेला नाहीं; ह्यास्तव, हे ब्रह्मर्षे, आपण मजवर कृपा करावी " ४०. ह्याप्रमाणें अहल्येनें प्रार्थना केली असतां तो गौतम तिला ह्मणाला " इक्ष्वाकूंमध्यें महारथि व महातेजस्वी असा एक पुरुष उत्पन्न होईल ४१; राम ह्मणून तो जगतामध्यें प्रसिद्ध होईल आणि मनुष्यरूप धारण केलेला तो महापराक्रमी विष्णु ब्राह्मणाकरितां ह्या वनामध्येंही येईल ४२. हे कल्याणि, त्याचें दर्शन जेव्हां तुला होईल तेव्हां तूं पवित्र होशील. कारण, तूं जें दुष्कर्म केलें आहेस त्याबद्दल शुद्धि करण्याचें सामर्थ्य त्याला आहे ४३. त्याचें आदरातिथ्य केल्यानंतर तूं माझ्यासमीप येशील आणि, हे वरवर्णिनि,

महाबाहो दुष्कृतं यत्त्वया कृतम् ४६ तेन त्वं ग्रहणं शत्रोर्यातो नान्येन वासव । शीघ्रं वै यज यज्ञं त्वं वैष्णवं सुसमाहितः ४७ पावितस्तेन यज्ञेन यास्यसे त्रिदिवं ततः । पुत्रश्च तव देवेन्द्र न विनष्टो महारणे ४८ नीतः संनिहितश्चैव आर्यकेण महोदधौ । एतच्छ्रुत्वा महेन्द्रस्तु यज्ञमिष्ट्वा च वैष्णवम् ४९ पुनस्त्रिदिवमाक्रामदन्वशासच्च देवराट् । एतदिन्द्रजितो नाम बलं यत्कीर्तितं मया ५० निर्जितस्तेन देवेन्द्रः प्राणिनोऽन्ये तु किं पुनः । आश्चर्यमिति रामश्च लक्ष्मणश्चाब्रवीत्तदा ५१ अगस्त्यवचनं श्रुत्वा वानरा राक्षसास्तदा । विभीषणस्तु रामस्य पार्श्वस्थो वाक्यमब्रवीत् ५२ आश्चर्यं स्मारितोऽस्म्यद्य यत्तद्दृष्टं पुरातनम् । अगस्त्यं त्वब्रवीद्रामः सत्यमेतच्छ्रुतं च मे ५३ एवं राम समुद्भूतो रावणो लोककण्टकः । सपुत्रो येन सङ्ग्रामे जितः शक्रः सुरेश्वरः ५४ [ १६०४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्य उत्तरकाण्डे त्रिंशः सर्गः ॥ ३० ॥

---

तेव्हां तूं माझ्यासहवर्तमान वास्तव्य करिशील " ४४. इतकें सांगून तो ब्रह्मर्षि आपल्या आश्रमामध्यें गेला व ब्रह्मवेत्त्या महर्षींची ती पत्नी फारच मोठें तप करूं लागली ४५. सारांश, त्या मुनीच्या शापामुळें हें सर्व उपस्थित झालें आहे. ह्यास्तव, हे महापराक्रमी इंद्रा, तूं जें दुष्कर्म केलें आहेस त्याची आठवण कर ४६. हे इंद्रा, त्या दुष्कर्मामुळें तूं शत्रूच्या हस्तगत झाला आहेस; असें होण्याला दुसरें कांहींएक कारण नाहीं. ह्यास्तव, तूं एकाग्र अंतःकरण करून सत्वर वैष्णव याग कर ४७. त्या यज्ञानें पवित्र झाल्यावर तूं स्वर्गामध्यें येशील. हे देवराज, तुझा पुत्र महासंग्रामामध्यें नष्ट झाला नाहीं ४८. त्याच्या मातामहानें महासागरामध्यें त्याला आपल्या जवळ नेऊन ठविलें आहे." हें श्रवण केल्यानंतर महेंद्रानें वैष्णव याग केला ४९ आणि पुनरपि तो देवराज स्वर्गामध्यें येऊन राज्य करूं लागला. हें इंद्रजिताचें बल मीं तुला कथन केलें आहे ५०. ह्यानें देवराजालाही जिंकिलें आहे; मग इतर प्राण्यांची गोष्ट पाहिजे कशाला?" ह्यावर 'आश्चर्य!' असें रामलक्ष्मण ह्मणाले ५१. अगस्त्यमुनींचें भाषण श्रवण केल्यानंतर वानर आणि राक्षसही तसेंच ह्मणाले. परंतु, रामाच्या समीप असलेला बिभीषण ह्मणाला ५२ " पूर्वी जें आश्चर्य मीं अवलोकन केलें होतें त्याचें आज ह्या अगस्त्यमुनींनीं मला स्मरण दिलें आहे ". ह्यावर रामही " खरोखर बिभीषणापासून मीं हें श्रवण केलें होतें " असें अगस्त्याला ह्मणाले ५३. ह्याप्रमाणें, हे रामा, रावण लोककंटक झाला व त्यानें संग्रामामध्यें पुत्रासहवर्तमान देवराज इंद्राचा पराभव केला ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडा तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३० ॥

ततो रामो महातेजा विस्मयात्पुनरेव हि । उवाच प्रणतो वाक्यमगस्त्यमृषिसत्तमम् १ भगवन्राक्षसः क्रूरो यदाप्रभृति मेदिनीम् । पर्यटत्किं तदा लोकाः शून्या आसन्द्विजोत्तम २ राजा वा राजमात्रो वा किं तदा नात्र कश्चन । धर्षणं यत्र नः प्राप्तो रावणो राक्षसेश्वरः ३ उताहो हतवीर्यास्ते बभूवुः पृथिवीक्षितः । बहिष्कृता वरास्त्रैश्च बहवो निर्जिता नृपाः ४ राघवस्य वचःश्रुत्वा अगस्त्यो भगवानृषिः । उवाच रामं प्रहसन्पितामह इवेश्वरम् ५ इत्येवं बाधमानस्तु पार्थिवान्पार्थिवर्षभ । चचार रावणो राम पृथिवीं पृथिवीपते ६ ततो माहिष्मतीं नाम पुरीं स्वर्गपुरीप्रभाम् । संप्राप्तो यत्र सांनिध्यं सदासीद्वसुरेतसः ७ तुल्य आसीन्नृपस्तस्य प्रभावाद्वसुरेतसः । अर्जुनो नाम यत्राग्निः शरकुण्डेशयः सदा ८ तमेव दिवसं सोऽथ हैहयाधिपतिर्बली । अर्जुनो नर्मदां रन्तुं गतः स्त्रीभिः सहेश्वरः ९ तमेव दिवसं सोऽथ रावणस्तत्र आगतः । रावणो राक्षसेन्द्रस्तु तस्यामात्यानपृच्छत १० क्वार्जुनो नृपतिः शीघ्रं सम्यगाख्यातुमर्हथ । रावणोऽहमनुप्राप्तो युद्धेप्सुर्नृवरेण ह ११ ममागमनमप्यग्रे युष्माभिः संनिवेद्यताम् । इत्येवं

---

तदनंतर महातेजस्वी रामानें प्रणामपूर्वक ऋषिश्रेष्ठ अगस्त्यांना पुनरपि विस्मयानें प्रश्न केला १ " हे भगवन्, हे द्विजश्रेष्ठ, क्रूर राक्षस जेव्हां पृथ्वीवर हिंडत होता तेव्हां लोक शौर्यहीनच होते कीं काय ? २. राक्षसाधिपति रावणाचा जर पराजय झालाच नाहीं तर राजा अथवा राजतुल्य असा कोणीच पुरुष ह्या भूतलावर नव्हता कीं काय ? ३ असंख्य राजे त्यानें जिंकिले असें ज्याअर्थी आपण सांगत आहां त्याअर्थी ते भूपति त्यावेळीं हतवीर्य व दिव्यास्त्ररहित झाले होते कीं काय ? " ४. रामाचें हें भाषण श्रवण करून भगवान् अगस्त्यऋषि इंद्राशीं भाषण करणाऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणें हंसत हंसत रामाला ह्मणाले ५ " हे नृपश्रेष्ठा, हे भूपाला रामा, ह्याप्रमाणें राजांना पीडा करीत करीत रावण पृथ्वीवर संचार करूं लागला असतां अमरावतीनगरीप्रमाणें झळकत असलेल्या माहिष्मतीनामक नगरीमध्यें आला ६. त्या नगरीमध्यें अग्नि सर्वदां संनिध असे ७. त्या अग्नीच्या प्रभावामुळें तो अर्जुननामक राजा अग्नितुल्य झाला होता व त्या नगरीमध्यें अग्नि सर्वदा शर पसरलेल्या कुंडामध्यें वास्तव्य करीत असे ८. ज्या दिवशीं रावण त्या नगरींत गेला त्याच दिवशीं तो हैहयाधिपति बलाढ्य अर्जुनराजा, स्त्रियांसहवर्तमान नर्मदेमध्यें क्रीडा करण्याकरितां गेला होता ९. त्याच दिवशीं रावणही तेथें आला आणि तो राक्षसाधिपति रावण त्याच्या अमात्यांना ह्मणाला १० " अर्जुनराजा कोठें आहे ? हें तुह्मी मला सत्वर सांगा; मी रावण त्या पुरुषश्रेष्ठाशीं

रावणेनोक्तास्तेऽमात्याः सुविपश्चितः ११ २ अब्रुवन्राक्षसपतिमसांनिध्यं महीपतेः । श्रुत्वा विश्रवसः पुत्रः पौराणामर्जुनं गतम् १३ अपसृत्यागतो विन्ध्यं हिमवत्संनिभं गिरिम् । स तमभ्रमिवाविष्टमुद्भ्रान्तमिव मेदिनीम् १४ अपश्यद्रावणो विन्ध्यमालिखन्तमिवाम्बरम् । सहस्रशिखरोपेतं सिंहाध्युषितकंदरम् १५ प्रपातपतितैः शीतैः साट्टहासमिवाम्बुभिः । देवदानवगन्धर्वैः साप्सरोभिः सकिंनरैः १६ स्वस्त्रीभिः क्रीडमानैश्च स्वर्गभूतं महोच्छ्रयम् । नदीभिः स्यन्दमानाभिः स्फटिकप्रतिमं जलम् १७ फणाभिश्चलजिह्वाभिरनन्तमिव विष्ठितम् । उत्क्रामन्तं दरीवन्तं हिमवत्संनिभं गिरिम् १८ पश्यमानस्ततो विन्ध्यं रावणो नर्मदां ययौ । चलोपलजलां पुण्यां पश्चिमोदधिगामिनीम् १९ महिषैः सृमरैः सिंहैः शार्दूलर्क्षगजोत्तमैः । उष्णाभितप्तैस्तृषितैः संक्षोभितजलाशयाम् २० चक्रवाकैः सकारण्डैः सहंसजलकुक्कुटैः । सारसैश्च सदा मत्तैः कूजद्भिः सुसमावृताम् २१ फुल्लद्रुमकृतोत्तंसां चक्र-

---

युद्ध करण्याच्या इच्छेनें येथें आलों आहें ११. ह्यास्तव, माझें आगमन तुम्ही प्रथम त्याला निवेदन करा ". ह्याप्रमाणें रावणानें सांगितलें असतां त्या महाविचारी अमात्यांनीं १२ 'राजा संनिध नाहीं' असें राक्षसाधिपतीला सांगितलें. अर्जुन बाहेर गेल्याचें नागरिक लोकांपासून श्रवण केल्यानंतर विश्रवस्मुनींचा पुत्र रावण १३ तेथून निघून हिमाचलतुल्य विंध्याद्रीकडे गेला. तेव्हां आकाशाशीं संयुक्त झालेल्या महामेघाप्रमाणें अतिशय उंच असलेला तो विंध्य पर्वत पृथ्वी विदीर्ण करून वर निघाला आहे आणि आकाशाला स्पर्शच करीत आहे असें त्या रावणानें अवलोकन केलें. तो पर्वत हजारों शिखरांनीं युक्त होता; त्याच्या गुहांमध्यें सिंह वास्तव्य करीत होते १४, १५; कड्यांवरून पडणाऱ्या शीतल जलप्रवाहांमुळें तो अट्टहासच करीत आहे कीं काय असें दिसत होतें; आपआपल्या स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करणारे देव, दानव, गंधर्व, किंनर आणि अप्सरा ह्यांच्या योगानें तो अत्युच्च पर्वत स्वर्गरूपच झाल्यासारखा दिसत होता; स्फटिकतुल्य उदकाचा स्राव करणाऱ्या नद्यांमुळें १६, १७ तो पर्वत चंचल जिह्वा ज्यांचे ठिकाणीं आहेत अशा फणांनीं युक्त असलेला शेषच कीं काय असा दिसत होता; वरवर तो आकाश व्यापीत चालला होता आणि दऱ्यांनीं युक्त असलेला तो पर्वत हिमाचलाप्रमाणें दिसत होता १८. ह्याप्रमाणें असलेला विंध्याचल पहात पहात रावण नर्मदेसमीप गेला. तेव्हां पश्चिमसमुद्राला जाऊन मिळणारें त्या पवित्र नदीचें उदक पाषाणावर आदळून क्षुब्ध होत होतें १९. तेव्हां उष्णानें तप्त होऊन तृषाक्रांत झालेले ते महिष, सिंह, व्याघ्र, अस्वलें व महागज ह्यांनीं तिचे जलाशय क्षुब्ध करून टाकिलेले होते २०. चक्रवाक, कारंडव,

चाकयुगस्तनीम् । विस्तीर्णपुलिनश्रोणीं हंसावलिसुमेखलाम् २२ पुष्परेणवनुलिप्ताङ्गीं जलफेनामलांशुकाम् । जलावगाहसुस्पर्शां फुल्लोत्पलशुभेक्षणाम् २३ पुष्पकादवरुह्याशु नर्मदां सरितां वराम् । इष्टामिव वरां नारीमवगाह्य दशाननः २४ स तस्याः पुलिने रम्ये नानामुनिनिषेविते । उपोपविष्टः सचिवैः सार्धं राक्षसपुंगवः २५ प्रख्याय नर्मदां सोऽथ गङ्गेयमिति रावणः । नर्मदादर्शने हर्षमाप्तवान्स दशाननः २६ उवाच सचिवांस्तत्र सलीलं शुकसारणौ । एष रश्मिसहस्रेण जगत्कृत्वेव काञ्चनम् २७ तीक्ष्णतापकरः सूर्यो नभसो मध्यमास्थितः । मामासीनं विदित्वैव चन्द्रायति दिवाकरः २८ नर्मदाजलशीतश्च सुगन्धिः श्रमनाशनः । मद्भयादनिलो ह्येष वात्यसौ सुसमाहितः २९ इयं चापि सरिच्छ्रेष्ठा नर्मदा शर्मवर्धिनी । नक्रमीनविहंगोर्मिः सभयेवाङ्गना स्थिता ३० तद्भवन्तः क्षताः शस्त्रैर्नृपैरि-

---

हंस, जलकुक्कुट आणि सर्वदा मत्त असून शब्द करीत असलेले सारसपक्षी ह्यांनीं ती व्याप्त झालेली होती २१. प्रफुल्लित वृक्षरूप भूषणांनीं ती नर्मदा रूपयुक्त होती; चक्रवाकपक्ष्यांचीं जोडपीं हेच तिचे स्तन होते; विस्तीर्ण वाळवंट हाच तिचा कटिप्रदेश होता; हंसपंक्तिरूप मनोहर मेखलेनें ती युक्त होती २२; पुष्पपरागांची तिच्या शरीराला उटी लाविलेली होती; उदकफेनरूप निर्मल वस्त्र तिनें परिधान केलें होतें २३; जलावगाहनसमयीं होणारें जें सुख तोच तिचा सुखावह स्पर्श होता आणि प्रफुल्लित कमलें हेच तिचे उत्कृष्ट नेत्र होते. असो. रावण पुष्पकविमानांतून सत्वर खालीं उतरला आणि प्रिय असलेल्या उत्कृष्ट स्त्रीला ज्याप्रमाणें पुरुष आलिंगन देतो त्याप्रमाणें नद्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या नर्मदेमध्यें त्यानें स्नान केलें २४. नंतर अनेक मुनींनीं ज्याचा आश्रय केलेला आहे अशा तिच्या वालुकायुक्त रम्य तीरावर सचिवांसहवर्तमान तो राक्षस बसला २५ नंतर ही गंगा आहे अशी त्यानें नर्मदेची प्रशंसा केली आणि नर्मदा अवलोकन करून त्या रावणाला हर्ष झाला २६. नंतर हंसत हंसत तो मंत्र्यांना अनुलक्षून ह्मणाला " हे शुकसारणहो, सहस्र किरणांच्या योगानें जगत् जसें कांहीं सुवर्णमय करून २७ तीक्ष्ण ताप देणारा सूर्य आकाशाचे मध्यभागीं आलेला आहे आणि मी येथें बसलों आहें असें समजूनच हा सूर्य चंद्राप्रमाणें शीतल झाला आहे २८. नर्मदेच्या उदकामुळें शीतल झालेला हा सुगंधि व श्रमनाशक वायु माझ्या भीतीमुळें अतिशय दक्ष राहून वहात आहे २९. मकर मत्स्य, व पक्षी ह्यांनीं युक्त अशा जिच्या लाटा आहेत ती ही सुख वृद्धिंगत करणारी श्रेष्ठ नदी नर्मदाही भयभीत झालेल्या स्त्रीप्रमाणें झाली आहे. ३०. इंद्रतुल्य राजांनीं संग्रामामध्यें शस्त्रांच्या योगानें तुह्मांला

न्द्रसमं युधि । चन्दनस्य रसेनेव रुधिरेण समुक्षिताः ३१ ते यूयमवगाहध्वं नर्मदां शर्मदां शुभाम् । सार्वभौममुखा मत्ता गङ्गामिव महागजाः ३२ अस्यां स्नात्वा महानद्यां पाप्मनो विप्रमोक्ष्यथ । अहमप्यत्र पुलिने शारदिन्दुसमप्रभे ३३ पुष्पोपहारं शनकैः करिष्यामि कपर्दिनः । रावणेनैवमुक्तास्तु प्रहस्तशुकसारणाः ३४ समहोदरधूम्राक्षा नर्मदां विजगाहिरे । राक्षसेन्द्रगजैस्तैस्तु क्षोभिता नर्मदा नदी ३५ वामनाञ्जनपद्माद्यैर्गङ्गा इव महागजैः। ततस्ते राक्षसाः स्नात्वा नर्मदायां महाबलाः ३६ उत्तीर्य पुष्पाण्याजह्रुर्बल्यर्थं रावणस्य तु । नर्मदापुलिने हृद्ये शुभ्राभ्रसदृशप्रभे ३७ राक्षसैस्तु मुहूर्तेन कृतः पुष्पमयो गिरिः । पुष्पेषूपहृतेष्वेवं रावणो राक्षसेश्वरः ३८ अवतीर्णो नदीं स्नातुं गङ्गामिव महागजः । तत्र स्नात्वा च विधिवज्जप्त्वा जप्यमनुत्तमम् ३९ नर्मदासलिलात्तस्मादुत्ततार स रावणः । ततः क्लिन्नाम्बरं त्यक्त्वा शुक्लवस्त्रसमावृतः ४० रावणं प्राञ्जलिं यान्तमन्वयुः सर्वराक्षसाः। तद्गतीवशमापन्ना मूर्तिमन्त इवाचलाः ४१ यत्रयत्र च याति स्म रावणो

---

जखमा केल्या असल्यामुळें रक्ताचा सडा तुमच्या अंगावर झाला आहे व चंदनरसाची उटीच लाविली आहे कीं काय असे तुह्मी दिसत आहां ३१. ह्यास्तव, सार्वभौमप्रभृति मत्त महागज ज्याप्रमाणें गंगेमध्यें स्नान करितात त्याप्रमाणें मंगलकारक व पवित्र नर्मदेमध्यें तुह्मी स्नान करा ३२. ह्या महानदीमध्यें स्नान करून तुह्मी पापापासून मुक्त व्हा. मीही शरदृतूंतील चंद्राप्रमाणें स्वच्छ असलेल्या ह्या वाळवंटावर स्वस्थपणानें शंकराची पुष्पपूजा करीन" ३३. रावणानें ह्याप्रमाणें सांगितलें असतां प्रहस्त, शुक व सारण ३४ ह्यांनीं महोदर व धूम्राक्ष ह्यांसहवर्तमान नर्मदेमध्यें स्नान केलें. तेव्हां वामन, अंजन, पद्म इत्यादि महागजांनीं खवळून जाणाऱ्या गंगेप्रमाणें त्या राक्षसाधिपतिरूप गजांच्या योगानें ती नर्मदानदी खवळून गेली. तदनंतर नर्मदेमध्यें स्नान केल्यावर ते महाबलाढ्य राक्षस ३५,३६ वर आले आणि रावणाच्या पूजेकरितां त्यांनीं पुष्पें आणिलीं. सारांश, शुभ्र मेघाप्रमाणें जिची प्रभा आहे अशा नर्मदेच्या मनोहर वाळवंटावर ३७ एका क्षणामध्यें राक्षसांनीं पुष्पमय पर्वत केला. ह्याप्रमाणें राक्षसांनीं पुष्पें आणिल्यावर राक्षसाधिपति रावण ३८ गंगेमध्यें उतरणाऱ्या महागजाप्रमाणें स्नानाकरितां त्या नदीमध्यें उतरला. तेथें स्नान करून यथाविधि उत्कृष्ट जप केल्यानंतर ३९ नर्मदेच्या त्या उदकांतून तो रावण वर आला आणि नंतर भिजलेलें वस्त्र सोडून त्यानें शुक्ल वस्त्र परिधान केलें ४०. नंतर रावण हात जोडून जाऊं लागला असतां सर्व राक्षस त्याच्या मागोमाग जाऊं लागले आणि जिकडे त्याचें गमन होईल तिकडे जाण्यास ते तयार

राक्षसेश्वरः । जाम्बूनदमयं लिङ्गं तत्र तत्र स्म नीयते ४२ वालुकावेदिमध्ये तु तल्लिङ्गं स्थाप्य रावणः । अर्चयामास गन्धैश्च पुष्पैश्चामृतगन्धिभिः ४३ ततः सतामार्तिहरं परं वरं वरप्रदं चन्द्रमयूखभूषणम् । समर्चयित्वा स निशाचरो जगौ प्रसार्य हस्तान्प्रणनर्त चाग्रतः ४४ [ १६४८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकत्रिंशः सर्गः॥३१॥

नर्मदापुलिने यत्र राक्षसेन्द्रः स दारुणः । पुष्पोपहारं कुरुते तस्माद्देशाददूरतः १ अर्जुनो जयतां श्रेष्ठो माहिष्मत्याः पतिः प्रभुः । क्रीडते सह नारीभिर्नर्मदातोयमाश्रितः २ तासां मध्यगतो राजा रराज च तदाऽर्जुनः । करेणूनां सहस्रस्य मध्यस्थ इव कुञ्जरः ३ जिज्ञासुः स तु बाहूनां सहस्रस्योत्तमं बलम् । रुरोध नर्मदावेगं बाहुभिर्बहुभिर्वृतः ४ कार्तवीर्यभुजासक्तं तज्जलं प्राप्य निर्मलम् । कूलोपहारं कुर्वाणं प्रतिस्रोतः प्रधावति ५ समीननक्रमकरः सपुष्पकुशसंस्तरः । स नर्मदाम्भसो वेगः प्रावृट्काल इवाबभौ ६ स

---

झालेले ते राक्षस मूर्तिमंत पर्वतच कीं काय असे दिसूं लागले ४१. जिकडे जिकडे तो राक्षसाधिपति रावण जाऊं लागला तिकडे तिकडे सुवर्णमय लिंग ते राक्षस नेत होते ४२. शेवटीं वालुकेचें एक स्थंडिल करून त्याच्या मध्यभागीं रावणानें तें लिंग ठेविलें आणि अमृततुल्य गंधानें युक्त असलेल्या सुगंधि पुष्पांनीं त्यानें त्याचें पूजन केलें ४३. तदनंतर सज्जनांची पीडा दूर करणारा, चंद्रकिरणरूप भूषणांनीं युक्त असलेला, वर देणारा आणि श्रेष्ठ असा जो परमेश्वर त्याचें पूजन करून त्या राक्षसानें सामगायन केलें आणि हात पुढें करून त्याच्यापुढें त्यानें प्रणामही केला ४४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३१ ॥

ज्याठिकाणीं नर्मदेच्या वाळवंटावर तो भयंकर राक्षसश्रेष्ठ रावण शंकराची पुष्पपूजा करीत बसला होता, त्या ठिकाणापासून जवळच एक माहिष्मतीनगरीचा प्रभु विजयिश्रेष्ठ अर्जुन नर्मदेच्या उदकाचा आश्रय करून स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करीत होता १,२; आणि हजारों हत्तिणींमध्यें झळकणाऱ्या गजाप्रमाणें त्या स्त्रियांचे मध्यभागीं असलेला तो अर्जुन झळकत होता ३. अनेक हातांनीं युक्त असलेला तो अर्जुन आपल्या सहस्र हातांचें उत्कृष्ट सामर्थ्य पहाण्याच्या उद्देशानें नर्मदेचा प्रवाह अडवून धरून राहिला होता ४. कार्तवीर्याच्या हातांशीं संलग्न झालेलें तें निर्मल उदक अडविलें गेल्यामुळें तीरावर चढत चढत उलट दिशेला वाहूं लागलें ५. मत्स्य, नक्र, मकर, पुष्पें व कुशास्तरणें ह्यांसहवर्तमान तो नर्मदाजलाचा प्रवाह पर्जन्यकालांतील प्रवाहाप्रमाणें दिसूं लागला ६. नंतर कार्तवी-

वेगः कार्तवीर्येण संप्रेषित इवाम्भसः । पुष्पोपहारं सकलं रावणस्य जहार
ह ७ रावणोऽर्धसमाप्तं तमुत्सृज्य नियमं तदा । नर्मदां पश्यते कान्तां प्रति-
कूलां यथा प्रियाम् ८ पश्चिमेन तु तं दृष्ट्वा सागरोद्गारसंनिभम् । वर्धन्तम-
म्भसो वेगं पूर्वामाशां प्रविश्य तु ९ ततोऽनुद्भ्रान्तशकुनां स्वभावे परमे
स्थिताम् । निर्विकाराङ्गनाभासामपश्यद्रावणो नदीम् १० सव्येतरकरा-
ङ्गुल्या ह्यशब्दास्यो दशाननः । वेगप्रभावमन्वेष्टुं सोऽदिशच्छुकसारणौ ११
तौ तु रावणसंदिष्टौ भ्रातरौ शुकसारणौ । व्योमान्तरगतौ वीरौ प्रस्थितौ
पश्चिमामुखौ १२ अर्धयोजनमात्रं तु गत्वा तौ रजनीचरौ । पश्येतां पुरुषं
तोये क्रीडन्तं सहयोषितम् १३ बृहत्सालप्रतीकाशं तोयव्याकुलमूर्धजम् ।
मदरक्तान्तनयनं मदव्याकुलचेतसम् १४ नदीं बाहुसहस्रेण रुन्धन्तमरिम-
र्दनम् । गिरिं पादसहस्रेण रुन्धन्तमिव मेदिनीम् १५ बालानां वरनारीणां
सहस्रेण समावृतम् । समदानां करेणूनां सहस्रेणेव कुञ्जरम् १६ तमद्भुत-
तरं दृष्ट्वा राक्षसौ शुकसारणौ । संनिवृत्तावुपागम्य रावणान्तमथोचतुः १७

---

यानें पाठवून दिलेल्याच कीं काय अशा त्या प्रवाहामुळें रावणाची सर्व पुष्पपूजा वाहून गेली ७; तेव्हां अर्धवट समाप्त झालेला तो पूजेचा नियम त्यानें सोडून दिला व नंतर पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रविष्ट झालेला व समुद्राच्या वृद्धीप्रमाणें वृद्धिंगत होत असलेला तो उदकाचा वेग रावणाच्या दृष्टीं पडला असतां प्रतिकूल झालेल्या प्रियेप्रमाणें ती रमणीय नर्मदा त्याला दिसूं लागली ८, ९. नंतर ( पूर्व दिशेकडे तो पाहूं लागला असतां ) तीरावरील पक्षी क्षुब्ध झालेले नसून अगदीं असावी तशीच असलली ती नर्मदानदी विकाररहित स्त्रीप्रमाणें त्याला दिसूं लागली १०. तदनंतर मुखानें कांहींएक उच्चार न करितां उजव्या हाताच्या अंगुलीनें शुकसारणांना त्या रावणानें प्रवाह कोठपासून वृद्धिंगत झाला आहे हें पहाण्याकरितां आज्ञा केली ११. तेव्हां आकाशमार्गानें गमन करणारे ते वीर भ्राते शुकसारण रावणाची आज्ञा होतांक्षणीं पश्चिमेकडे तोंड करून निघाले १२ आणि दोन कोस गेल्यानंतर कोणीएक पुरुष स्त्रियांसहवर्तमान क्रीडा करीत आहे असें त्या राक्षसांच्या दृष्टीं पडलें १३. मोठ्या शालवृक्षाप्रमाणें तो पुरुष उंच होता; उदकानें त्याच्या मस्तकावरील केश व्याप्त झाले होते; मदामुळें त्याचे नेत्रप्रांत आरक्तवर्ण झाले होते; अंतःकरण क्षुब्ध झालें होतें १४ आणि हजारों टेंकाडांनीं पृथ्वी अडवून धरून असलेला पर्वतच कीं काय असा तो शत्रुनाशक पुरुष हजार हातांनीं नदी अडवून धरीत होता १५ आणि उत्कृष्ट व तरुण अशा सहस्र स्त्रियांनीं परिवेष्टित झाला असल्यामुळें सहस्र मदमत्त हत्तिणींनीं परिवेष्टित झालेल्या गजाप्रमाणें

बृहत्सालप्रतीकाशः कोऽप्यसौ राक्षसेश्वर । नर्मदां रोधवद्रुद्ध्वा क्रीडाप-
यति योषितः १८ तेन बाहुसहस्रेण संनिरुद्धजला नदी । सागरोद्गारसंका-
शानुद्गारान्सृजते मुहुः १९ इत्येवं भाषमाणौ तौ निशम्य शुकसारणौ । राव-
णोऽर्जुन इत्युक्त्वा स ययौ युद्धलालसः २० अर्जुनाभिमुखे तस्मिन्रावणे
राक्षसाधिपे । चण्डः प्रवाति पवनः सनादः सरजस्तथा २१ सकृदेव कृतो
रावः सरक्तपृषतो घनैः । महोदरमहापार्श्वधूम्राक्षशुकसारणैः २२ संवृतो
राक्षसेन्द्रस्तु तत्रागाद्यत्र चार्जुनः । अदीर्घेणैव कालेन स तदा राक्षसो
बली २३ तं नर्मदाह्रदं भीममाजगामाञ्जनप्रभः । स तत्र स्त्रीपरिवृतं वासि-
ताभिरिव द्विपम् २४ नरेन्द्रं पश्यते राजा राक्षसानां तदार्जुनम् । स रोषा-
द्रक्तनयनो राक्षसेन्द्रो बलोद्धतः २५ इत्येवमर्जुनामात्यानाह गम्भीरया
गिरा । अमात्याः क्षिप्रमाख्यात हैहयस्य नृपस्य वै २६ युद्धार्थं समनुप्राप्तो
रावणो नाम नामतः । रावणस्य वचः श्रुत्वा मन्त्रिणोऽथार्जुनस्य ते २७
उत्तस्थुः सायुधास्तं च रावणं वाक्यमब्रुवन् । युद्धस्य कालो विज्ञातः साधु

---

तो दिसत होता १६. तो अतिशय अद्भुत प्रकार अवलोकन केल्यावर ते शुकसारण परत फिरले आणि रावणासमीप येऊन ह्मणाले १७ " हे राक्षसाधिपते, मोठ्या शाल-वृक्षाप्रमाणें उंच असलेला कोणी अतर्क्य पुरुष सेतूप्रमाणें नर्मदा अडवून धरून स्त्रियांशीं क्रीडा करीत आहे १८ आणि त्यानें सहस्र हातांनीं उदक अडवून धरिल्यामुळें समुद्राच्या लाटांप्रमाणें नदीमध्यें वारंवार लाटा वाहूं लागल्या आहेत " १९. ह्याप्रमाणें भाषण करणाऱ्या त्या शुकसारणांना अवलोकन केल्यावर ' हा अर्जुन इतकें ह्मणून तो युद्धाभिलाषी रावण तिकडे निघाला २०. तो राक्षसाधिपति रावण अर्जुनाकडे निघाला असतां धूळ व शब्द ह्यांसहवर्तमान प्रचंड वायु वाहूं लागला २१ आणि मेघांनीं रक्तबिंदूंसहवर्तमान एकाएकीं गर्जना केली. नंतर महोदर, महापार्श्व, धूम्राक्ष, शुक व सारण २२ ह्यांनीं परिवेष्टित असलेला तो राक्षसाधिपति रावण अर्जुनाकडे गेला आणि कज्जलाप्रमाणें ज्याची कांति आहे असा तो बलाढ्य राक्षस लवकरच नर्मदेच्या त्या भयंकर डोहासमीप आला. तेव्हां संगमोत्सुक हत्तिणींनीं परिवेष्टित असलेल्या गजाप्रमाणें तो अर्जुन राजा तेथें स्त्रियांनीं परिवेष्टित झालेला आहे असें त्या राक्षसाधिपतीच्या दृष्टीं पडलें असतां बलानें उन्मत्त झालेल्या राक्षसाधिपतीचे नेत्र क्रोधानें आरक्तवर्ण झाले २३, २४, २५. व गंभीर वाणीनें तो अर्जुनाच्या अमात्यांना ह्मणाला " हे अमात्यहो, रावण ह्मणून प्रसिद्ध असलेला मी युद्धाकरितां आलों आहें असें हैहयराजाला तुह्मी सत्वर सांगा ". रावणाचें हें भाषण श्रवण केल्या-

भो साधु रावण २८ यः क्षीबं स्त्रीगतं चैव योद्धुमुत्सहसे नृपम् । स्त्रीसमक्ष-
गतं यत्त्वं योद्धुमुत्सहसे नृपम् २९ क्षमस्वाद्य दशग्रीव उष्यतां रजनी त्वया।
युध्य श्रद्धा तु यद्यस्ति श्वस्तात समरेऽर्जुनम् ३० यदि वाऽपि त्वरा तुभ्यं
युद्धतृष्णासमावृत । निपात्यास्मान्रणे युद्धमर्जुनेनोपयास्यसि ३१ ततस्तै
रावणामात्यैरमात्यास्ते नृपस्य तु । सूदिताश्चापि ते युद्धे भक्षिताश्च बुभु-
क्षितैः ३२ ततो हलहलाशब्दो नर्मदातीरगो बभौ । अर्जुनस्यानुयात्राणां
रावणस्य च मन्त्रिणाम् ३३ इषुभिस्तोमरैः प्रासैस्त्रिशूलैर्वज्रकर्षणैः । सरा-
वणानर्दयन्तः समन्तात्समभिद्रुताः ३४ हैहयाधिपयोधानां वेग आसीत्सु-
दारुणः । सनक्रमीनमकरसमुद्रस्येव निःस्वनः ३५ रावणस्य तु तेऽमात्याः
प्रहस्तशुकसारणाः । कार्तवीर्यबलं क्रुद्धा निहन्ति स्म स्वतेजसा ३६
अर्जुनाय तु तत्कर्म रावणस्य समन्त्रिणः । क्रीडमानाय कथितं पुरुषैर्भय-
विह्वलैः ३७ श्रुत्वा न भेतव्यमिति स्त्रीजनं स तदार्जुनः । उत्ततार जलात्त-

---

नंतर अर्जुनाचे ते मंत्री २६, २७ आयुधें घेऊन उठले आणि रावणाला ह्मणाले "शाबास, हे रावणा, शाबास ? अरे, मत्त होऊन स्त्रियांमध्यें असलेल्या राजासहवर्तमान जो तू युद्ध करण्याची इच्छा करीत आहेस त्या तुला युद्धाची वेळ समजली खरी ! स्त्रियांमध्यें असलेल्या राजाशीं युद्ध करण्याचें तूं मनामध्यें आणीत आहेस २८, २९; परंतु, हे रावणा, आज धीर धर आणि रात्र येथें काढ. बा रावणा, तुझी जर इच्छा असेल तर अर्जुनाशीं तूं उद्ईक समरांगणामध्यें युद्ध कर ३०. परंतु, हे युद्ध-तृष्णेनें घेरून गेलेल्या रावणा, तुला जर अगदीं धीर निघतच नसेल तर संग्रामामध्यें आमचा वध करून तूं अर्जुनाशीं युद्ध कर" ३१. तदनंतर राजाच्या त्या अमात्यांचा रावणाच्या त्या बुभुक्षित अमात्यांनीं युद्धामध्यें वध केला आणि त्यांना खाऊन टाकिलें ३२. असो. उभयतांचें भाषण झाल्यानंतर अर्जुनाचे अनुयायी व रावणाचे मंत्री ह्यांनीं नर्मदेच्या तीरावर हलकल्होळ सुरू केला ३३. बाण, तोमर, भाले, त्रिशूल आणि वज्राकर्षण ह्या आयुधांच्या योगानें रावणासहवर्तमान त्याच्या मंत्र्यांना पीडा करीत करीत अर्जुनाच्या मंत्र्यांनीं चोहोंकडून त्याच्यावर हल्ला केला ३४ आणि नक्र, मत्स्य व मकर ह्यांनीं युक्त असलेल्या समुद्राप्रमाणें अर्जुनाचे योद्धे गर्जना करूं लागले आणि त्यांचा वेगही फारच भयंकर दिसूं लागला ३५. तेव्हां रावणाचे ते अमात्य प्रहस्त, शुक व सारण क्रुद्ध झाले आणि स्वसामर्थ्यानें कार्तवीर्य अर्जुनाचें सैन्य ते मारूं लागले ३६. इतक्यांत भयभीत झालेल्या लोकांनीं मंत्र्यांसहवर्तमान रावणाचें तें कर्म क्रीडा करीत असलेल्या अर्जुनाला कथन केलें असतां ३७ तें श्रवण करितांक्षणीं

स्मादुत्क्रान्तोयादिवाञ्जनः ३८ क्रोधदूषितनेत्रस्तु स तदाऽर्जुनपावकः। प्रजज्वाल महाघोरो युगान्त इव पावकः ३९ स तूर्णतरमादाय वरहेमाङ्गदो गदाम्। अभिदुद्राव रक्षांसि तमांसीव दिवाकरः ४० बाहुविक्षेपकरणां समुद्यम्य महागदाम्। गारुडं वेगमास्थाय आपपातैव सोऽर्जुनः ४१ तस्य मार्गं समारुध्य विन्ध्योऽर्कस्येव पर्वतः। स्थितो विन्ध्य इवाकम्प्यः प्रहस्तो मुसलायुधः ४२ ततोऽस्य मुसलं घोरं लोहबद्धं मदोद्धतः। प्रहस्तः प्रेषयन्क्रुद्धो ररास च यथाऽन्तकः ४३ तस्याग्रे मुसलस्याग्निरशोकापीडसंनिभः। प्रहस्तकरमुक्तस्य बभूव प्रदहन्निव ४४ आधावमानं मुसलं कार्तवीर्यस्तदाऽर्जुनः। निपुणं वञ्चयामास गदया गतविक्लवः ४५ ततस्तमभिदुद्राव सगदो हैहयाधिपः। भ्रामयाणो गदां गुर्वीं पञ्चबाहुशतोच्छ्रयाम् ४६ ततो हतोऽतिवेगेन प्रहस्तो गदया तदा। निपपात स्थितः शैलो वज्रिवज्रहतो यथा ४७ प्रहस्तं पतितं दृष्ट्वा मारीचशुकसारणाः। समहोदरधूम्राक्षा अपसृष्टा रणाजिरात् ४८ अप-

---

'भिऊं नका' असें स्त्रियांना सांगून तो अर्जुन गंगोदकांतून बाहेर पडणाऱ्या अंजननामक दिग्गजाप्रमाणें त्या उदकांतून बाहेर आला ३८. क्रोधानें त्याचे नेत्र दूषित झाले होते आणि तो अर्जुनरूप महाभयंकर अग्नि प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें प्रज्वलित झाला होता ३९. नंतर अंधकारांना पळवून लावणाऱ्या सूर्याप्रमाणें उत्कृष्ट सुवर्णभूषणें हातामध्यें धारण केलेल्या त्या अर्जुनानें सत्वर गदा घेऊन राक्षसांना पळवून लाविलें ४०. हातांनीं फिरविली जाणारी प्रचंड गदा उगारून व गरुडाच्या वेगाचें अवलंबन करून तो अर्जुन चालून आला असतां ४१ सूर्याचा मार्ग अडविणाऱ्या विंध्याचलाप्रमाणें त्याचा मार्ग मुसलायुध धारण केलेल्या प्रहस्तानें अडवून धरिला आणि विंध्याद्रीप्रमाणें तो निश्चल उभा राहिला ४२. तदनंतर त्या अर्जुनाच्या वधाकरितां लोहबद्ध भयंकर मुसल फेंकीत असलेला तो मदमत्त व क्रुद्ध प्रहस्त राक्षस प्रत्यक्ष मृत्यूप्रमाणेंच भासूं लागला ४३ आणि प्रहस्ताच्या हातांतून सुटलेल्या त्या मुसलाच्या अग्रभागीं अशोकपुष्पांच्या गुच्छाप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा अग्नि प्रज्वलित होऊं लागला ४४. परंतु, अंगावर येत असलेलें तें मुसल निर्भय असलेल्या कार्तवीर्य अर्जुनानें गदेच्या योगानें अगदीं व्यर्थ करून टाकिलें ४५. तदनंतर गदा धारण केलेला तो हैहयाधिपति पांचशें हात लांब असलेली आपली प्रचंड गदा फिरवीत फिरवीत त्या प्रहस्तावर धांवला ४६ व अतिवेगानें प्रहस्ताला त्या गदेचा तडाका बसला असतां तो उभा असलेला प्रहस्त इंद्रवज्रानें ताडित झालेल्या पर्वताप्रमाणें खालीं पडला ४७ आणि प्रहस्त

क्रान्तेष्वमात्येषु प्रहस्ते च निपातिते । रावणोऽभ्यद्रवत्तूर्णमर्जुनं नृपसत्तमम् ४९ सहस्रबाहोस्तद्युद्धं विंशद्बाहोश्च दारुणम् । नृपराक्षसयोस्तत्र आरब्धं रोमहर्षणम् ५० सागराविव संक्षुब्धौ चलमूलाविवाचलौ । तेजोयुक्ताविवादित्यौ प्रदहन्ताविवानलौ ५१ बलोद्धतौ यथा नागौ वासितार्थे यथा वृषौ । मेघाविव विनर्दन्तौ सिंहाविव बलोत्कटौ ५२ रुद्रकालाविव क्रुद्धौ तौ तदा राक्षसार्जुनौ । परस्परं गदां गृह्य ताडयामासतुर्भृशम् ५३ वज्रप्रहारानचला यथा घोरान्विषेहिरे । गदाप्रहारांस्तौ तत्र सेहाते नरराक्षसौ ५४ यथाशनिरवेभ्यस्तु जायतेऽथ प्रतिश्रुतिः । तथा तयोर्गदापोथैर्दिशः सर्वाः प्रतिश्रुताः ५५ अर्जुनस्य गदा सा तु पात्यमानाहितोरसि । काञ्चनाभं नभश्चक्रे विद्युत्सौदामनी यथा ५६ तथैव रावणेनापि पात्यमाना मुहुर्मुहुः । अर्जुनोरसि निर्भाति गदोल्केव महागिरौ ५७ नार्जुनः खेदमायाति न राक्षसगणेश्वरः । सममासीत्तयोर्युद्धं यथा पूर्वं बलीन्द्रयोः ५८ शृङ्गैरिव वृषायुध्य-

---

पडल्याचें अवलोकन करून मारीच, शुक, सारण, महोदर व धूम्राक्ष समरांगणांतून परावृत्त झाले ४८. ह्याप्रमाणें प्रहस्त पडल्यावर अमात्य निघून गेले असतां रावण त्या नृपश्रेष्ठ अर्जुनावर सत्वर धांवला ४९ व सहस्र बाहूंनीं युक्त असलेला तो अर्जुन आणि वीस हातांनीं युक्त असलेला तो रावण ह्या नृपराक्षसांमध्यें शरीरावर रोमांच उठविणारें भयंकर युद्ध सुरू झालें ५०. क्षुब्ध झालेले समुद्र, मुळांमध्यें हलून गेलेले पर्वत, तेजानें युक्त असलेले सूर्य, दग्ध करून टाकीत असलेले अग्नि ५१, सामर्थ्यामुळें बेगुमान झालेले हत्ती, माज केलेल्या गाईसंबंधानें उन्मत्त झालेले बैल, गर्जना करणारे मेघ, बलाढ्य सिंह ५२ अथवा क्रुद्ध झालेले रुद्रकालच कीं काय असे ते राक्षसार्जुन गदा घेऊन परस्परांना अतिशय ताडण करूं लागले ५३. पर्वतांनीं ज्याप्रमाणें घोर वज्रप्रहार सहन केले त्याप्रमाणें त्या नरराक्षसांनीं ते गदेचे प्रहार सहन केले ५४ आणि वज्राच्या ध्वनीपासून ज्याप्रमाणें प्रतिध्वनि उत्पन्न होतो त्याप्रमाणें त्या गदांच्या तडाख्यामुळें सर्व दिशा प्रतिध्वनींनीं नादित झाल्या ५५. अर्जुनाच्या त्या गदेचा शत्रूच्या वक्षःस्थलावर प्रहार होऊं लागला असतां अतिशय झळकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें तिनें आकाशाची कांति सुवर्णतुल्य करून सोडिली ५६ आणि त्याचप्रमाणें रावणाही वारंवार अर्जुनाच्या वक्षःस्थलावर गदेचा प्रहार करूं लागला असतां महापर्वतावर पडणाऱ्या उल्केप्रमाणें ती गदा दिसूं लागली ५७. अर्जुन आणि राक्षसगणाधिपति रावण ह्यांपैकीं कोणीही श्रांत होईना. पूर्वी बलि व इंद्र ह्यांमध्यें झालेल्या युद्धाप्रमाणें त्या उभयतांचें युद्ध झालें ५८. शिंगांच्या योगानें ज्याप्रमाणें बैल अथवा दंताग्रांच्या

न्दन्ताग्रैरिव कुञ्जरौ । परस्परं विनिघ्नन्तौ नरराक्षससत्तमौ५९ ततोऽर्जुनेन
क्रुद्धेन सर्वप्राणेन सा गदा । स्तनयोरन्तरे मुक्ता रावणस्य महोरसि ६०
वरदानकृतत्राणे सा गदा रावणोरसि । दुर्बलेव यथावेगं द्विधाभूताऽपत-
त्क्षितौ ६१ स त्वर्जुनप्रयुक्तेन गदाघातेन रावणः । अपासर्पद्धनुर्मात्रं निष-
साद च निष्टनन् ६२ स विह्वलं तदालक्ष्य दशग्रीवं ततोऽर्जुनः । सहसो-
त्पत्य जग्राह गरुत्मानिव पन्नगम् ६३ स तु बाहुसहस्रेण बलाद्गृह्य दशान-
नम् । बबन्ध बलवान्राजा बलिं नारायणो यथा ६४ बध्यमाने दशग्रीवे
सिद्धचारणदेवताः । साध्वीति वादिनः पुष्पैः किरन्त्यर्जुनमूर्धनि ६५ व्याघ्रो
मृगमिवादाय मृगराडिव कुञ्जरम् । ररास हैहयो राजा हर्षादम्बुदवन्मुहुः ६६
प्रहस्तस्तु समाश्वस्तो दृष्ट्वा बद्धं दशाननम् । सहसा राक्षसः क्रुद्ध अभिदु-
द्राव हैहयम् ६७ नक्तंचराणां वेगस्तु तेषामापततं बभौ । उद्धूत आतपा-
पाये पयोदानामिवाम्बुधौ ६८ मुञ्च मुञ्चेति भाषन्तस्तिष्ठ तिष्ठेति चासकृत् ।

---

योगानें ज्याप्रमाणें गज परस्परांना प्रहार करितात त्याप्रमाणें ते अर्जुनरावण गदेच्या योगानें एकमेकांना प्रहार करूं लागले ५९. तदनंतर अर्जुनानें क्रुद्ध होऊन सर्व सामर्थ्यानें ती गदा रावणाच्या विशाल वक्षःस्थलावर स्तनांमध्यें टाकिली ६०; परंतु, वरदानामुळें सुरक्षित असलेल्या त्या रावणाच्या वक्षःस्थलावर ती गदा स्वतःच्या वेगाप्रमाणें प्रहार करण्यास असमर्थ झाली आणि दोन तुकडे होऊन भूतलावर पडली ६१. तथापि, अर्जुनानें गदेचा प्रहार केला असतां तो रावण एक धनुष्य मागें हटला आणि रडत रडत खालीं बसला ६२. इतक्यांत रावण विह्वल झाल्याचें अर्जुनाच्या दृष्टीं पडलें व गरुड ज्याप्रमाणें एकाएकीं उड्डाण करून भुजंगाला धरितो त्याप्रमाणें एकदम उड्डाण करून त्यानें रावणाला धरिलें ६३ आणि नारायणानें ज्याप्रमाणें बलीला बांधून टाकिलें त्याप्रमाणें सहस्र हातांनीं रावणाला बलात्कारानें धरून अर्जुनानें त्याला बांधून टाकिलें ६४ आणि ह्याप्रमाणें अर्जुन रावणाला बांधूं लागला असतां सिद्ध, चारण व देव ' शाबास ! शाबास ! ' असें ह्मणत ह्मणत त्या अर्जुनाच्या मस्तकीं पुष्पवृष्टि करूं लागले ६५. हरीण धरिलेल्या व्याघ्राप्रमाणें अथवा गज धरिलेल्या सिंहाप्रमाणें तो हैहय राजा शोभूं लागला आणि आनंदामुळें मेघाप्रमाणें गर्जना करूं लागला ६६. इतक्यांत प्रहस्त राक्षस शुद्धीवर आला आणि रावण बद्ध झाल्याचें अवलोकन करितांक्षणीं तो हैहयावर धांवला ६७. तेव्हां पर्जन्यकालीं समुद्रामध्यें उद्भवणाऱ्या मेघांच्या वेगाप्रमाणें त्या राक्षसांचा वेग दिसूं लागला ६८. नंतर ' सोड, सोड व थांब, थांब ' असे शब्द एकसारखे उच्चारीत उच्चारीत त्यांनीं

मुसलानि च शूलानि सोत्ससर्ज तदा रणे ६९ अप्राप्तान्येव तान्याशु असं-
भ्रान्तस्तदाऽर्जुनः । आयुधान्यमरारीणां जग्राहाग्निसूदनः ७० ततस्तान्येव
रक्षांसि दुर्धरैः प्रवरायुधैः । भित्त्वा विद्रावयामास वायुरम्बुधरानिव ७१
राक्षसांस्त्रासयामास कार्तवीर्यार्जुनस्तदा । रावणं गृह्य नगरं प्रविवेश सुहृ-
द्वृतः ७२ स कीर्यमाणः कुसुमाक्षतोत्करैर्द्विजैः सपौरैः पुरुहूतसंनिभः। ततोऽ-
र्जुनः स्वां प्रविवेश तां पुरीं बलिं निगृह्येव सहस्रलोचनः ७३ [ १७२१ ]इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥ ३२ ॥

रावणग्रहणं तत्तु वायुग्रहणसंनिभम् । ततः पुलस्त्यः शुश्राव कथितं
दिवि दैवतैः १ ततः पुत्रकृतस्नेहात्कम्प्यमानो महाधृतिः । माहिष्मतीपतिं
द्रष्टुमाजगाम महानृषिः २ स वायुमार्गमास्थाय वायुतुल्यगतिर्द्विजः । पुरीं
माहिष्मतीं प्राप्तो मनःसंपातविक्रमः ३ सोमऽरावतिसंकाशां हृष्टपुष्टजना-
वृताम् । प्रविवेश पुरीं ब्रह्मा इन्द्रस्येवामरावतीम् ४ पादचारमिवादित्यं
निष्पतन्तं सुदुर्दशम् । ततस्ते प्रत्यभिज्ञाय अर्जुनाय न्यवेदयन् ५ पुलस्त्य

---

संग्रामामध्यें मुसळें व शूल हीं आयुधें फेंकिलीं ६९. परंतु, देवशत्रूंच्या त्या आयु-
धांचा प्रहार होण्यापूर्वींच शत्रुनाशक व निर्भय अर्जुनानें तीं सत्वर धरिलीं ७० आणि
नंतर वायु ज्याप्रमाणें मेघांना पळवून लावितो त्याप्रमाणें त्या दुर्धर व श्रेष्ठ आयुधांच्या
योगानें त्या राक्षसांना प्रहार करून त्यानें पळवून लाविलें ७१. सारांश, कार्तवीर्य
अर्जुनानें राक्षसांना त्रस्त करून सोडिलें आणि सुहृदांनीं परिवेष्टित झालेला तो अर्जुन
रावणाला घेऊन आपल्या नगरामध्यें प्रविष्ट झाला ७२. असो. बलीचा निग्रह करून
स्वर्गामध्यें प्रवेश करणारा इंद्रच कीं काय अशा रीतीनें तो अर्जुन त्या माहिष्मती
नगरीमध्यें प्रवेश करूं लागला असतां त्या इंद्रतुल्य अर्जुनावर नागरिक जनांसहवर्त-
मान द्विज पुष्प व अक्षता टाकूं लागले ७३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीम-
द्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥३२॥

तदनंतर स्वर्गामध्यें देवांनीं, वायूप्रमाणें धरण्यासही अशक्य असलेल्या, रावणाला धरि-
ल्याचें कथन केलें असतां पुलस्त्यमुनींनीं तें श्रवण केलें १. नंतर पुत्रप्रेमामुळें दयार्द्र
झालेला तो महाधैर्यवान् महर्षि माहिष्मती नगरीच्या राजाला अवलोकन करण्याकरितां
तेथें आला २. वायु व मन ह्यांप्रमाणें ज्याची गति आहे असा तो महर्षि आकाशमार्गाचें
अवलंबन करून माहिष्मतीनगरीसमीप आला ३ आणि ब्रह्मदेव ज्याप्रमाणें इंद्राच्या
अमरावती नगरीमध्यें प्रवेश करितो त्याप्रमाणें संतुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त असलेल्या त्या
अमरावतीतुल्य नगरीमध्यें त्यानें प्रवेश केला ४. तेव्हां आकाशांतून उतरत असलेला

इति विज्ञाय वचनाद्धैहयाधिपः । शिरस्यञ्जलिमाधाय प्रत्युद्गच्छत्तपस्विनम् ६ पुरोहितोऽस्य गृह्यार्घ्यं मधुपर्कं तथैव च । पुरस्तात्प्रययौ राज्ञः शक्रस्येव बृहस्पतिः ७ ततस्तमृषिमायान्तमुद्यन्तमिव भास्करम् । अर्जुनो दृश्य संभ्रान्तो ववन्देन्द्र इवेश्वरम् ८ स तस्य मधुपर्कं गां पाद्यमर्घ्यं निवेद्य च । पुलस्त्यमाह राजेन्द्रो हर्षगद्गदया गिरा ९ अद्यैवममरावत्या तुल्या माहिष्मती कृता । अद्याहं तु द्विजेन्द्र त्वां यस्मात्पश्यामि दुर्दशम् १० अद्य मे कुशलं देव अद्य मे कुशलं व्रतम् । अद्य मे सफलं जन्म अद्य मे सफलं तपः ११ यत्ते देवगणैर्वन्द्यौ वन्देऽहं चरणौ तव । इदं राज्यमिमे पुत्रा इमे दारा इमे वयम् ॥ ब्रह्मन्किं कुर्मः किं कार्यमाज्ञापयतु नो भवान् १२ तं धर्मेऽग्निषु पुत्रेषु शिवं पृष्ट्वा च पार्थिवम् । पुलस्त्योवाच राजानं हैहयानां तथार्जुनम् १३ नरेन्द्राम्बुजपत्राक्ष पूर्णचन्द्रनिभानन । अतुलं ते बलं येन दशग्रीवस्त्वया जितः १४ भयाद्यस्योपतिष्ठेतां निष्पन्दौ सागरानिलौ । सोऽयं

---

व अवलोकन करण्यासही कठीण असलेला पादचारी सूर्यच कीं काय अशा त्या मुनीला ओळखून त्या द्वारपालांनीं अर्जुनाला वर्दी दिली असतां त्यांच्या सांगण्यावरून 'पुलस्त्य' असें समजतांक्षणीं तो हैहयाधिपति अर्जुन मस्तकीं हात जोडून त्या तपस्व्याला सामोरा गेला आणि इंद्रपुरोहित बृहस्पतीप्रमाणें राजाचा पुरोहित अर्घ्य व मधुपर्क घेऊन राजाच्या पुढें गेला ५,६,७. तदनंतर इंद्र ज्याप्रमाणें महादेवाला वंदन करितो त्याप्रमाणें अर्जुनानें उदयाचलावर येणाऱ्या सूर्याप्रमाणें येत असलेल्या त्या ऋषीला अवलोकन करितांक्षणीं लगबगीनें वंदन केलें ८. नंतर मधुपर्क, गाय, पाद्य व अर्घ्य निवेदन करून तो राजेंद्र हर्षामुळें गद्गदस्वरयुक्त वाणीनें पुलस्त्यमुनीला ह्मणाला ९ " अमरावतीनगरीप्रमाणें आज ही माहिष्मतीनगरी झाली आहे. कारण, हे द्विजेंद्रा, आपलें दर्शन होणें फार दुर्लभ असतांना आज मी आपणांला येथें अवलोकन करीत आहें १०. हे देव, आज माझें कल्याण झालें असून आज माझ्या धर्मांचें सार्थक झालें आहे आणि माझा जन्मही आज सफळ झाला असून माझ्या तपानेंही आज सार्थक झालें आहे ११. कारण, देवगणांना वंद्य असलेल्या आपल्या चरणांना मी आज वंदन करीत आहें. ह्यास्तव, हे ब्रह्मनिष्ठ मुने, हें राज्य, हे पुत्र, ह्या स्त्रिया व हा मी हें सर्व आपल्या ताब्यांत आहे; आपलें काय कार्य आहे त्याची आपण आज्ञा करावी " १२. तदनंतर धर्म, अग्नि व पुत्र ह्यांविषयीं त्या भूपतीला कुशल प्रश्न केल्यावर त्या हैहयाधिपति अर्जुनाला पुलस्त्य मुनि ह्मणाले १३ " हे नरेंद्रा, हे कमलपत्रनयना, हे पूर्णचंद्रतुल्य वदना, तुझें सामर्थ्य अनुपम आहे; कारण, रावणाला तूं जिंकिलें आहेस १४. अरे,

मृधे त्वया बद्धः पौत्रो मे रणदुर्जयः १५ पुत्रकस्य यशः पीतं नाम विश्राविंत त्वया । मद्वाक्याद्याच्यमानोऽद्य मुञ्च वत्स दशाननम् १६ पुलस्त्याज्ञां प्रगृह्याथ न किंचन वचोऽर्जुनः । मुमोचैव पार्थिवेन्द्रो राक्षसेन्द्रं प्रहृष्टवत् १७ स तं प्रमुच्य त्रिदशारिमर्जुनः प्रपूज्य दिव्याभरणस्रगम्बरैः । अहिंसकं सख्यमुपेत्य साग्निकं प्रणम्य तं ब्रह्मसुतं गृहं ययौ १८ पुलस्त्येनापि संत्यक्तो राक्षसेन्द्रः प्रतापवान् । परिष्वक्तः कृतातिथ्यो लज्जमानो विनिर्जितः १९ पितामहसुतश्चापि पुलस्त्यो मुनिपुंगवः । मोचयित्वा दशग्रीवं ब्रह्मलोकं जगाम ह २० एवं स रावणः प्राप्तः कार्तवीर्यात्प्रधर्षणम् । पुलस्त्यवचनाच्चापि पुनर्मुक्तो महाबलः २१ एवं बलिभ्यो बलिनः सन्ति राघवनन्दन । नावज्ञा हि परे कार्या य इच्छेच्छ्रेय आत्मनः २२ ततः स राजा पिशिताशनानां सहस्रबाहोरुपलभ्य मैत्रीम् । पुनर्नृपाणां कदनं चकार चचार सर्वां पृथिवीं च दर्पात् २३ [ १७४४ ] इत्यार्षे श्रीमद्रा-

---

ज्याच्या भीतीमुळें समुद्र व वायु निश्चल होऊन रहातात त्या ह्या रणामध्यें अजिंक्य असलेल्या माझ्या नातवाला तूं संग्रामामध्यें बांधून टाकिलें आहेस १५. माझ्या नातवाची कीर्ति तूं नाहींशी केली असून स्वतःचें नांव प्रसिद्ध केलें आहेस. ह्यास्तव, हे वत्सा, मी तुझी स्वमुखानें प्रार्थना करीत असल्यामुळें तूं रावणाला सोड " १६. पुलस्त्यमुनींची आज्ञा मान्य करून राजाधिराज अर्जुनानें काहींएक भाषण न करितां आनंदित होऊन राक्षसाधिपति रावणाला सोडून दिलें १७. ह्याप्रमाणें त्या देवशत्रु रावणाला सोडून दिल्यानंतर अर्जुनानें दिव्य भूषणें, पुष्पें व वस्त्रें ह्यांच्या योगानें त्याचें पूजन केलें आणि अग्नीचेसमक्ष परस्परांनीं परस्परांना पीडा न करण्याविषयीं त्याच्याशीं मैत्री करून व त्या ब्रह्मपुत्र पुलस्त्य मुनींना प्रणाम करून तो स्वगृहीं निघून गेला १८. असो. ह्याप्रमाणें रावणाची मुक्तता करून अर्जुनानें त्याचें आदरातिथ्य केलें असतां पराजित झाल्यामुळें लाजूं लागलेल्या त्या प्रतापी राक्षसाधिपतीला पुलस्त्यमुनींनीं आलिंगन दिलें १९ आणि ह्याप्रमाणें रावणाला सोडविल्यानंतर ते ब्रह्मपुत्र मुनिश्रेष्ठ पुलस्त्य ब्रह्मलोकीं निघून गेले २०. ह्याप्रमाणें कार्तवीर्य अर्जुनापासून रावणाला बंधन प्राप्त झालें व पुलस्त्यमुनींच्या सांगण्यावरून त्या महाबलाढ्य रावणाची पुनरपि सुटका झाली २१. सारांश, हे राघवनंदना रामा, ह्याप्रमाणें बलवानापेक्षांही अधिक बलाढ्य पडलेलेच आहेत. ह्यास्तव, स्वहितेच्छु पुरुषानें दुसऱ्याची कधीं अवज्ञा करूं नये २२. तदनंतर सहस्र बाहूंनीं युक्त असलेल्या अर्जुनाची मैत्री संपादन केल्यावर तो राक्षसराज रावण पुनरपि राजांचा वध करूं लागला व गर्वामुळें सर्व पृथ्वी तो हिंडूं

मायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ॥ ३३ ॥

अर्जुनेन विमुक्तस्तु रावणो राक्षसाधिपः । चचार पृथिवीं सर्वामनिर्विण्णस्तथा कृतः १ राक्षसं वा मनुष्यं वा शृणुते यं बलाधिकम् । रावणस्तं समासाद्य युद्धे ह्वयति दर्पितः २ ततः कदाचित्किष्किन्धां नगरीं वालिपालिताम् । गत्वाह्वयति युद्धाय वालिनं हेममालिनम् ३ ततस्तु वानरामात्यास्तारस्तारापिता प्रभुः । उवाच वानरो वाक्यं युद्धप्रेप्सुमुपागतम् ४ राक्षसेन्द्र गतो वाली यस्ते प्रतिबलो भवेत् । कोऽन्यः प्रमुखतः स्थातुं तव शक्तः प्लवङ्गमः ५ चतुर्भ्योऽपि समुद्रेभ्यः संध्यामन्वास्य रावण । इदं मुहूर्तमायाति वाली तिष्ठ मुहूर्तकम् ६ एतानस्थिचयान्पश्य य एते शङ्खपाण्डुराः । युद्धार्थिनामिमे राजन्वानराधिपतेजसा ७ यद्वाऽमृतरसः पीतस्त्वया रावण राक्षस । तदा वालिनमासाद्य तदन्तं तव जीवितम् ८ पश्येदानीं जगच्चित्रमिमं विश्रवसः सुतः । इदं मुहूर्तं तिष्ठस्व दुर्लभं ते भविष्यति ९ अथवा त्वरसे मर्तुं गच्छ दक्षिणसागरम् । वालिनं द्रक्ष्यसे

---

लागला ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं तेहेतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३३ ॥

अर्जुनानें सोडून दिल्यामुळें निश्चिंत झालेला तो राक्षसाधिपति रावण सर्व पृथ्वीवर संचार करूं लागला १ आणि बलानें अधिक असा जो राक्षस अथवा मनुष्य त्याच्या कानीं येईल त्याच्याकडे जाऊन त्या गर्विष्ठ रावणानें त्याला युद्धार्थ आह्वान करण्याचा क्रम चालविला २. तदनंतर एकदां वालीनें परिपालन केलेल्या किष्किंधानगरीमध्यें तो गेला आणि सुवर्णमाला धारण केलेल्या त्या वालीला युद्धाकरितां आह्वान करूं लागला ३. तदनंतर वानराचे अमात्य, तार, तारेचा पिता आणि युवराज सुग्रीव वानर हे त्या युद्धार्थ आलेल्या रावणाला ह्मणाले ४ "हे राक्षसाधिपते, तुझ्याबरोबर युद्ध करणारा वाली बाहेर गेला आहे; तेव्हां तुझ्यासंमुख उभा रहाण्याला दुसरा कोण बरें वानर समर्थ आहे ? ५. हे रावणा, क्षणभर थांब; चारी समुद्रांवर संध्या करून वाली इतक्यांत येथें येईल ६. शंखासारिखे शुभ्रवर्ण असलेले हे अस्थींचे ढीग तूं अवलोकन कर. हे राजा, हे ढीग युद्धाभिलाषी पुरुषांच्या अस्थींचे वानराधिपति वालीच्या सामर्थ्यानें झाले आहेत ७. हे रावण राक्षसा, तूं जरी अमृतपान केलें असलेंस तरी सुद्धां वालीची गांठ पडल्यावर तुझ्या जीविताचा अंतच झाला असें तूं समज ८. हे विश्रवसमुनीच्या पुत्रा, जगतांतील आश्चर्य अशा ह्या वालीला तूं अवलोकन कर आणि एक क्षणभर थांब; ह्मणजे तुझें जीवित दुर्लभ होईल ९; अथवा मरणाची जर

तत्र भूमिष्ठमिव पावकम् १० स तु तारं विनिर्भर्त्स्य रावणो लोकरावणः। पुष्पकं तत्समारुह्य प्रययौ दक्षिणार्णवम् ११ तत्र हेमगिरिप्रख्यं तरुणार्कनिभाननम्। रावणो वालिनं दृष्ट्वा संध्योपासनतत्परम् १२ पुष्पकादवरुह्याथ रावणोऽञ्जनसंनिभः। ग्रहीतुं वालिनं तूर्णं निःशब्दपदमव्रजत् १३ यदृच्छया तदा दृष्टो वालिनापि स रावणः। पापाभिप्रायकं दृष्ट्वा चकार न तु संभ्रमम् १४ शशमालक्ष्य सिंहो वा पन्नगं गरुडो यथा। न चिन्तयति तं वाली रावणं पापनिश्चयम् १५ जिघृक्षमाणमायान्तं रावणं पापचेतसम्। कक्षावलम्बिनं कृत्वा गमिष्ये त्रीन्महार्णवान् १६ द्रक्ष्यन्त्यरिं ममाङ्कस्थं स्रंसदूरुकराम्बरम्। लम्बमानं दशग्रीवं गरुडस्येव पन्नगम् १७ इत्येवं मतिमास्थाय वाली मौनमुपास्थितः। जपन्वै नैगमान्मन्त्रांस्तस्थौ पर्वतराडिव १८ तावन्योन्यं जिघृक्षन्तौ हरिराक्षसपार्थिवौ। प्रयत्नवन्तौ तत्कर्म ईहतुर्बलदर्पितौ १९ हस्तग्राहं तु तं मत्वा पादशब्देन राव-

---

तुला त्वरा असेल तर दक्षिणसमुद्राचे तीरीं जा म्हणजे भूमीवर स्थित असलेला अग्निच कीं काय असा वाली तुझ्या दृष्टीं पडेल" १०. तदनंतर लोकांना आक्रोश करू लावणाऱ्या त्या रावणानें ताराची निर्भर्त्सना केली आणि पुष्पकविमानामध्यें आरूढ होऊन तो दक्षिण समुद्राकडे निघून गेला ११. तेथें गेल्यावर सुवर्णपर्वताप्रमाणें ज्याची कांति आहे व बालसूर्याप्रमाणें ज्याचें मुख आहे असा तो वाली संध्येमध्यें गढून गेलेला रावणाच्या दृष्टीं पडतांक्षणीं १२ कज्जलाप्रमाणें ज्याची कांति आहे असा तो रावण पुष्पकविमानांतून खालीं उतरला आणि वालीला धरण्याकरितां पाऊल न वाजवितां तो सत्वर त्याच्याकडे गेला १३. इतक्यांत वालीचीही दृष्टि सहज त्या रावणाकडे गेली; परंतु, दुष्ट हेतूनें आलेल्या रावणाला अवलोकन करूनही वाली गोंधळला नाहीं १४. ससा दृष्टीं पडल्यावर सिंह अथवा भुजंग दृष्टीं पडल्यावर गरुड ज्याप्रमाणें गोंधळून जात नाहीं, त्याप्रमाणें तो पापबुद्धि रावण दृष्टीं पडल्यावर वाली गोंधळून गेला नाहीं अथवा त्यानें त्याची पर्वाही केली नाहीं १५. मला धरण्याकरितां दुष्टबुद्धि रावण येऊं लागला असतां त्याला काखेंत मारून मी तिन्ही महासागर ओलांडून जाईन १६ आणि गरुडाच्या चोंचींत लोंबत असलेल्या भुजंगाप्रमाणें माझ्या काखेंत शत्रु रावण लोंबत आहे आणि त्याचे हात, पाय व वस्त्रें हीं जळून जात आहेत असें लोकांच्या दृष्टीं पडेल" १७. ह्याप्रमाणें मनामध्यें विचार आणून वालीनें मौन धारण केलें होतें आणि वैदिक मंत्राचा जप करीत करीत तो वाली पर्वतराजाप्रमाणें निश्चल बसला होता १८. ह्याप्रमाणें बलामुळें गर्वयुक्त झालेले ते उभयतां वानरराज व राक्षसराज

णम् । पराङ्मुखोऽपि जग्राह वाली सर्पमिवाण्डजः २० ग्रहीतुकामं तं गृह्य राक्षसानामीश्वरं हरिः । खमुत्पपात वेगेन कृत्वा कक्षावलम्बिनम् २१ तं च पीडयमानं तु वितुदन्तं नखैर्मुहुः । जहार रावणं वाली पवनस्तोयदं यथा २२ अथ ते राक्षसामात्या ह्रियमाणे दशानने । मुमोक्षयिषवो वालिं रवमाणा अभिद्रुताः २३ अन्वीयमानस्तैर्वाली भ्राजतेऽम्बरमध्यगः । अन्वीयमानो मेघौघैरम्बरस्थ इवांशुमान् २४ तेऽशक्नुवन्तः संप्राप्तुं वालिनं राक्षसोत्तमाः । तस्य बाहूरुवेगेन परिश्रान्ता व्यवस्थिताः २५ वालिमार्गादपाक्रामन्पर्वतेन्द्रापि गच्छतः । किं पुनर्जीवनप्रेप्सुर्बिभ्रद्वै मांसशोणितम् २६ अपक्षिगणसंपातान्वानरेन्द्रो महाजवः । क्रमशः सागरान्सर्वान्संध्याकालमवन्दत २७ संपूज्यमानो यातस्तु खचरैः खचरोत्तमः । पश्चिमं सागरं वाली आजगाम सरावणः २८ तस्मिन्संध्यामुपासित्वा स्नात्वा जप्त्वा च वानरः । उत्तरं सागरं प्रायाद्वहमानो दशाननम् २९ बहुयो-

---

एकमेकांना धरण्याचें मनांत आणूं लागले आणि प्रयत्नपूर्वक तें कर्म करण्याची त्यांना मोठा उत्कंठा प्राप्त झाली १९. पायाच्या आवाजावरून तो रावण हाताच्या टप्यांत आला आहे असें समजून पक्षांमध्यें गरुड ज्याप्रमाणें सर्पाला धरितो त्याप्रमाणें वालीनें पराङ्मुख असतांनाही त्याला धरिलें २०. धरण्याचे इच्छेनें आलेल्या त्या राक्षसाधिपतीलाच धरून काखेंत मारिल्यानंतर तो वानर वेगानें आकाशामध्यें उडाला २१ आणि वायु ज्याप्रमाणें मेघाला घेऊन जातो त्याप्रमाणें पीडा करण्याच्या उद्देशानें नखांनीं वारंवार कुरतडीत असलेल्या त्या रावणाला वालीनें हरण करून नेलें २२. ह्याप्रमाणें रावणाला तो मिळून चालला असतां राक्षसाचे ते अमात्य त्याची सुटका करण्याकरितां आक्रोश करीत करीत वालीकडे धांवले २३; तेव्हां मेघसमुदाय मागें येत असतांना शोभणाऱ्या आकाशांतील सूर्याप्रमाणें ते अमात्य मागें येत असतांना तो आकाशस्थ वाली शोभूं लागला २४. परंतु, वालीचे समीप जाण्यास असमर्थ असलेले ते राक्षसश्रेष्ठ त्याच्या हातापायांच्या वेगानेंच थकून जाऊन बसले २५. कारण, पर्वतराजसुद्धां जर वालीच्या मार्गांतून पलीकडे जात असत तर रक्तमांसमय शरीर धारण करणाऱ्या जीविताभिलाषी प्राण्यांची गोष्ट पाहिजे कशाला ? २६. असा. तो महावेगवान् वानराधिपति, पक्ष्यांचे कळपही भीतिमुळें त्यावेळीं ज्याठिकाणीं येत नाहींत अशा, सर्व सागरांचे तीरीं क्रमानें गेला आणि त्यानें तेथें संध्यावंदन केलें २७. आकाशांतून संचार करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो वाली आकाशगामी लोक प्रशंसा करीत असतांना रावणासहवर्तमान पश्चिमसागरीं गेला २८ आणि त्या ठिकाणीं स्नान,

जनसाहस्रं वहमानो महाहरिः। वायुवच्च मनोवच्च जगाम सह शत्रुणा३० उत्तरं सागरे संध्यामुपासित्वा दशाननम्। वहमानोऽगमद्वाली पूर्वं वै स महोदधिम् ३१ तत्रापि संध्यामन्वास्य वासविः सहरीश्वरः। किष्किन्धामभितो गृह्य रावणं पुनरागमत् ३२ चतुर्ष्वपि समुद्रेषु संध्यामन्वास्य वानरः। रावणोद्वहनश्रान्तः किष्किन्धोपवनेऽपतत् ३३ रावणं तु मुमोचाथ स्वकक्षात्कपिसत्तमः। कुतस्त्वमिति चोवाच प्रहसन्रावणं मुहुः ३४ विस्मयं तु महद्गत्वा श्रमलोलनिरीक्षणः। राक्षसेन्द्रो हरीन्द्रं तमिदं वचनमब्रवीत् ३५ वानरेन्द्र महेन्द्राभ राक्षसेन्द्रोऽस्मि रावणः। युद्धेप्सुरिह संप्राप्तः स चाद्यासादितस्त्वया ३६ अहो बलमहो वीर्यमहो गाम्भीर्यमेव च। येनाहं पशुवद्गृह्य भ्रामितश्चतुरोऽर्णवान् ३७ एवमश्रान्तवद्वीर शीघ्रमेव च वानर। मां चैवोद्वहमानस्तु कोऽन्यो वीर भविष्यति ३८ त्रयाणामेव भूतानां गतिरेषा प्लवंगम। मनोनिलसुपर्णानां तव चात्र न संशयः ३९ सोऽहं दृष्टबलस्तुभ्यमिच्छामि हरिपुंगव। त्वया

---

संध्या व जप आटोपल्यानंतर रावणाला घेऊन तो वाली उत्तरसमुद्रावर गेला २९. अनेक हजार योजनें जरी तो त्याला घेऊन जात होता तरी तो महावानर वायु व मन ह्यांप्रमाणेंच शत्रुसहवर्तमान वेगानें जात असे ३०. ह्याप्रमाणें रावणाला बरोबर घेऊन जाणारा तो वाली उत्तरसमुद्राचे तीरीं संध्या करून पूर्वेकडील महासागराकडे गेला ३१. तेथेंही त्यानें संध्या केली आणि नंतर तो इंद्रपुत्र वानराधिपति रावणाला घेऊन पुनरपि किष्किंधानगरीसमीप आला ३२. ह्याप्रमाणें चारी समुद्रांचे तीरीं संध्या केल्यानंतर तो वानर रावणाला बरोबर घेतल्यामुळें श्रांत होऊन किष्किंधेच्या उपवनामध्यें उतरला ३३ आणि रावणाला आपल्या काखेंतून सोडिल्यानंतर " तूं कोण व कोठून आलास ?" असें तो वानरश्रेष्ठ हंसत हंसत रावणाला विचारूं लागला ३४. तेव्हां ग्लानि आल्यामुळें डोळे फिरवूं लागलेला तो राक्षसाधिपति रावण अतिशय विस्मयचकित होऊन त्या वानरश्रेष्ठ वालीला म्हणाला ३५ " हे महेंद्रतुल्य वानराधिपते, मीं राक्षसाधिपति रावण युद्धाच्या इच्छेनें येथें आलों असतां तूं आज मला धरिलें आहेस ३६. काय हें तुझें बल! काय हें तुझें वीर्य! काय हा तरी हा तुझा गंभीरपणा ? कारण, पशूप्रमाणें बरोबर घेऊन तूं मला चारी समुद्रावर फिरविलेंस ३७ हे वीरा, हे वानर वीरा, ह्याप्रमाणें श्रांत न होतां मला घेऊन जाणारा दुसरा कोण वीर आढळणार आहे ? ३८. हे वानरा, मन, वायु व गरुड या तिघांचीच आजपर्यंत अशी गति होती; परंतु, तुझीही गति तशीच आहे ह्याविषयीं संशय नाहीं ३९. हे वानरश्रेष्ठ, ज्याचें सामर्थ्य प्रसिद्ध

सह चिरं सख्यं सुस्निग्धं पावकाग्रतः ४० दाराः पुत्राः पुरं राष्ट्रं भोगाच्छादनभोजनम्। सर्वमेवाविभक्तं नौ भविष्यति हरीश्वर ४१ ततः प्रज्वालयित्वाग्निं तावुभौ हरिराक्षसौ। भ्रातृत्वमुपसंपन्नौ परिष्वज्य परस्परम् ४२ अन्योन्यं लम्बितकरौ ततस्तौ हरिराक्षसौ। किष्किन्धां विशतुर्हृष्टौ सिंहौ गिरिगुहामिव ४३ स तत्र मासमुषितः सुग्रीव इव रावणः। अमात्यैरागतैर्नीतस्त्रैलोक्योत्सादनार्थिभिः ४४ एवमेतत्पुरा वृत्तं वालिना रावणः प्रभो। धर्षितश्च कृतश्चापि भ्राता पावकसंनिधौ ४५ बलमप्रतिमं राम वालिनोऽभवदुत्तमम्। सोऽपि त्वया विनिर्दग्धः शलभो वह्निना यथा ४६

[ १७९० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥ ३४ ॥

अपृच्छत तदा रामो दक्षिणाशाश्रयं मुनिम्। प्राञ्जलिर्विनयोपेत इदमाह वचोऽर्थवत् १ अतुलं बलमेतद्वै वालिनो रावणस्य च। न त्वेताभ्यां हनुमता समं त्विति मतिर्मम २ शौर्यं दाक्ष्यं बलं धैर्यं प्राज्ञता नयसाधनम्।

---

आहे असा मी अग्निसमीप तुझ्यासहवर्तमान अत्यंत प्रेमयुक्त असें चिरकाल सख्य करण्याची इच्छा करीत आहें ४०. ह्यास्तव, हे वानराधिपते, स्त्रिया, पुत्र, नगर, राष्ट्र, भोग्य वस्तु, आच्छादन व भोजन हें सर्व आपलें समाईक असो" ४१. तदनंतर ते उभयतां वानरराक्षस अग्नि प्रज्वलित करून व परस्परांना आलिंगन देऊन भ्राते बनले ४२; एकमेकांच्या हातांत हात घालून ते वानरराक्षस आनंदित झाले व पर्वताच्या गुहेंत प्रविष्ट होणाऱ्या सिंहाप्रमाणें किष्किंधानगरीमध्यें ते प्रविष्ट झाले ४३. नंतर सुग्रीवाप्रमाणें तो रावण एक महिनाभर तेथें राहिला व पुढें त्रैलोक्य-उध्वस्त करण्याची इच्छा करणारे जे त्याचे अमात्य तेथें आले होते ते त्याला घेऊन गेले ४४. हे प्रभो, ह्याप्रमाणें पूर्वी वर्तमान घडलेलें आहे. सारांश, वालीनें रावणाला धरून अग्नीचेसंनिध त्याच्याशीं सख्य केलें ४५. हे रामा, वालीचें बल अप्रतिम व सर्वोत्कृष्ट होतें. परंतु, अग्नीच्या योगानें ज्याप्रमाणें पतंग दग्ध होऊन जातो त्याप्रमाणें तोही तुझ्या योगानें दग्ध होऊन गेला ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चवतिसावा सर्ग समाप्त झाला ॥३४॥

तदनंतर रामानें दक्षिणदिशेस रहाणाऱ्या अगस्त्यमुनींस प्रश्न केला. सारांश, तो विनयसंपन्न राम हात जोडून त्यांच्याशीं यथार्थ भाषण करूं लागला १. (तो ह्मणाला) "वाली आणि रावण ह्यांचें हें सामर्थ्य तर अनुपम आहेच. परंतु, ह्यांच्या सामर्थ्याची बरोबरी हनुमानाच्या सामर्थ्याशीं होणार नाहीं असें मला वाटतें २. शौर्य, दक्षता, बल, धैर्य,

विक्रमश्च प्रभावश्च हनूमति कृतालयाः ३ दृष्ट्वैव सागरं वीक्ष्य सीदन्तीं कपिवाहिनीम् । समाश्वास्य महाबाहुर्योजनानां शतं प्लुतः ४ धर्षयित्वा पुरीं लङ्कां रावणान्तःपुरं तदा । दृष्टा संभाषिता चापि सीता ह्याश्वासिता तथा ५ सेनाग्रगा मन्त्रिसुताः किंकरा रावणात्मजः । एते हनूमता तत्र एकेन विनिपातिताः ६ भूयो बन्धाद्विमुक्तेन भाषयित्वा दशाननम् । लङ्का भस्मीकृता येन पावकेनेव मेदिनी ७ न कालस्य न शक्रस्य न विष्णोर्वित्तपस्य च । कर्माणि तानि श्रूयन्ते यानि युद्धे हनूमतः ८ एतस्य बाहुवीर्येण लङ्का सीता च लक्ष्मणः । प्राप्ता मया जयश्चैव राज्यं मित्राणि बान्धवाः ९ हनूमान्यदि मे न स्याद्वानराधिपतेः सखा । प्रवृत्तिमपि को वेत्तुं जानक्याः शक्तिमान्भवेत् १० किमर्थं वाली चैतेन सुग्रीवप्रियकाम्यया । तदा वैरे समुत्पन्ने न दग्धो वीरुधो यथा ११ न हि वेदितवान्मन्ये हनूमानात्मनो बलम् । यद्दृष्टवाञ्जीवितेष्टं क्लिश्यन्तं वानराधिपम् १२ एतन्मे भगवन्सर्वं हनूमति महामुने । विस्तरेण यथातत्त्वं कथयामरपूजित १३ राघवस्य

---

बुद्धिमत्ता, राजनीति, राजकीय कृत्य शेवटास नेण्याची हातोटी, पराक्रम व प्रभाव ह्यांनीं हनुमानाचा आश्रयच केलेला आहे ३. समुद्र दृष्टीं पडतांक्षणीं खचत चाललेल्या वानरसेनेला धीर देऊन त्या महापराक्रमी हनुमानानें शंभर योजनें उड्डाण केलें ४. लंकानगरीवर व रावणाच्या अंतःपुरावर हल्ला करून त्यानें सीता अवलोकन केली; इतकेंच नव्हे परंतु, तिच्याशीं संभाषण करून त्यानें तिला आश्वासनही दिलें ५. सेनाग्रणी, मंत्रिपुत्र, सेवक आणि रावणपुत्र ह्या सर्वांचा एका हनुमानानें त्या ठिकाणीं निःपात केला ६. बंधापासून मुक्त झाल्यावर पुनरपि रावणाशीं भाषण करून भूमि दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें त्यानें लंका दग्ध करून टाकिली ७ काल, इंद्र, विष्णु व कुबेर ह्यांनींही युद्धामध्यें हनुमानाप्रमाणें पराक्रम केल्याचें कानीं येत नाहीं ८. लंका, सीता, लक्ष्मण, विजय, राज्य, मित्र व बांधव ह्या सर्वांची प्राप्ति ह्याच्याच बाहुवीर्यामुळें मला झाली आहे ९. वानराधिपति सुग्रीवाचा सखा हनुमान् जर मला साह्य करणारा नसता तर जानकीची वार्ता तरी काढण्यास कोण बरें समर्थ झाला असता ? १० वाली आणि सुग्रीव ह्यांमध्यें जेव्हां वैर उत्पन्न झालें तेव्हां दग्ध करून टाकणाऱ्या दावाग्नीप्रमाणें सुग्रीवाचें प्रिय करण्याकरितां ह्या हनुमानानें वाली कां ह्मणून दग्ध केला नाहीं हें मला कळत नाहीं ११; अथवा जीवितापेक्षांही प्रिय असलेला वानराधिपति सुग्रीव क्लेश भोगीत असल्याचें ज्याअर्थी हनुमान् पहातच राहिला त्याअर्थी आपलें सामर्थ्य किती आहे हें त्याला ठाऊकच नव्हतें असें मला वाटतें १२. हे महामुने, हे भगवन्, हनुमानासंबंधानें मला जें

वचः श्रुत्वा हेतुयुक्तमृषिस्ततः । हनूमतः समक्षं तमिदं वचनमब्रवीत् १४
सत्यमेतद्रघुश्रेष्ठ यद्ब्रवीषि हनूमति । न बले विद्यते तुल्यो न गतौ न मतौ
परः १५ अमोघशापैः शापस्तु दत्तोऽस्य मुनिभिः पुरा । न वेत्ता हि बलं
सर्वं बली सन्नरिमर्दन १६ बाल्येऽप्येतेन यत्कर्म कृतं राम महाबल । तन्न
वर्णयितुं शक्यमिति बाल्यतयास्य ते १७ यदि वास्ति त्वभिप्रायः संश्रोतुं
तव राघव । समाधाय मतिं राम निशामय वदाम्यहम् १८ सूर्यदत्तवरस्वर्णः
सुमेरुर्नाम पर्वतः । यत्र राज्यं प्रशास्त्यस्य केसरी नाम वै पिता १९ तस्य
भार्या बभूवेष्टा ह्यञ्जनेति परिश्रुता । जनयामास तस्यां वै वायुरात्मजमुत्त-
मम् २० शालिशूकनिभाभासं प्रासूतेमं तदाञ्जना । फलान्याहर्तुकामा वै
निष्क्रान्ता गहने वरा २१ एष मातुर्वियोगाच्च क्षुधया च भृशार्दितः । रुरोद
शिशुरत्यर्थं शिशुः शरवणे यथा २२ तदोद्यन्तं विवस्वन्तं जपापुष्पोत्करा-
पमम् । ददर्श फललोभाच्च ह्युत्पपात रविं प्रति २३ बालार्काभिमुखो बालो

---

काय विदित आहे तें सर्व हेंच. हे देवमान्य मुने, आतां आपण त्यासंबंधानें यथार्थ वृत्तांत मला सविस्तर कथन करावा" १३. राघवाचें सहेतुक भाषण श्रवण केल्यानंतर अगस्त्य ऋषि हनुमानासमक्ष त्याला ह्मणाले १४ "हे रघुवंशजश्रेष्ठा, हनुमानासंबंधानें जें हें तूं सांगत आहेस तें सत्य आहे. बलामध्यें, गतीमध्यें अथवा मतीमध्यें हनुमानाची बरोबरी करणारा दुसरा कोणीही नाहीं १५. हे शत्रुनाशका, हनुमान् बलाढ्य असूनही आपलें सर्व बल किती आहे हें त्याला समजणार नाहीं असा पूर्वी—ज्यांचा शाप व्यर्थ होत नाहीं अशा—मुनींनीं त्याला शाप दिलेला आहे १६. हे महाबलाढ्य रामा, बालपणामुळें बाल्यावस्थेमध्यें ह्यानें जें कर्म केलें आहे तें ह्याचें कर्म तुला निवेदन करितां येणेंही शक्य नाहीं १७. तथापि, हे राघवा, त्याचें कर्म श्रवण करण्याचा जर तुझा हेतु असेल तर, हे रामा, मन स्थिर करून तूं श्रवण कर; मी तुला कथन करितों १८. सूर्यानें वर दिल्यामुळें सुवर्णरूप झालेला जो सुमेरुपर्वत त्या ठिकाणीं ह्याचा केसरी ह्मणून प्रसिद्ध असलेला पिता राज्य करीत आहे १९. अंजना ह्मणून विख्यात असलेली त्याची भार्या होती व तिचे ठिकाणीं वायूनें हा उत्कृष्ट पुत्र उत्पन्न केला २०. साळीच्या नवरीप्रमाणें ज्याचा वर्ण आहे असा हा हनुमान् अंजनेला झाला. एके प्रसंगीं ही श्रेष्ठ अंजना फळें आणण्याकरितां वनामध्यें गेली होती २१. माता जवळ नसल्यामुळें आणि क्षुधेनें अतिशय पीडित झाल्यामुळें एकदां शरवणांत रोदन करणाऱ्या कार्तिकेयाप्रमाणें हा अतिशय रोदन करूं लागला २२. तेव्हां जासवंदीच्या फुलांच्या ढिगाप्रमाणें दिसत असलेला सूर्य उदयाचलावर येतांना त्याच्या दृष्टीं पडला असतां तें कांहीं तरी फल असावें

बालार्क इव मूर्तिमान् । ग्रहीतुकामो बालार्कं प्लवतेऽम्बरमध्यगः २४ एतस्मिन्प्लवमाने तु शिशुभावे हनूमति । देवदानवयक्षाणां विस्मयः सुमहानभूत् २५ नाप्येवं वेगवान्वायुर्गरुडो न मनस्तथा । यथायं वायुपुत्रस्तु क्रमतेऽम्बरमुत्तमम् २६ यदि तावच्छिशोरस्य ईदृशो गतिविक्रमः । यौवन बलमासाद्य कथं वेगो भविष्यति २७ तमनुप्लवते वायुः प्लवन्तं पुत्रमात्मनः । सूर्यदाहभयाद्रक्षंस्तुषारचयशीतलः २८ बहुयोजनसाहस्रं क्रामत्येव गतोऽम्बरम् । पितुर्बलाच्च बाल्याच्च भास्कराभ्याशमागतः २९ शिशुरेष त्वदोषज्ञ इति मत्वा दिवाकरः । कार्यं चास्मिन्समायत्तमित्येवं न ददाह सः ३० यमेव दिवसं ह्येष ग्रहीतुं भास्करं प्लुतः । तमेव दिवसं राहुर्जिघृक्षति दिवाकरम् ३१ अनेन च परामृष्टो राहुः सूर्यरथोपरि । अपक्रान्तस्ततस्त्रस्तो राहुश्चन्द्रार्कमर्दनः ३२ इन्द्रस्य भवनं गत्वा सरोषः सिंहिकासुतः ।

---

असें समजून त्यानें त्याच्याकडे उड्डाण केलें २३ सारांश, प्रत्यक्ष बालसूर्याप्रमाणें दिसत असलेला हा हनुमान् बालसूर्याचे संमुख झाला आणि बालसूर्याला धरण्याच्या उद्देशानें हा आकाशामध्येंच उड्डाण करीत राहिला २४. बाल्यावस्थेमध्येंच हा हनुमान् असा उड्डाण करूं लागला असतां देव, दानव व यक्ष ह्यांना अतिशय विस्मय झाला २५. अमर्याद आकाशामध्यें ज्याप्रमाणें हा वायुपुत्र हनुमान् वेगानें संचार करूं लागला त्याप्रमाणें वेगानें संचार करण्यास वायु, गरुड अथवा मनही समर्थ नाहीं २६. अगदीं बाल असतांना ह्याच्या गतीचा वेग जर असा आहे तर यौवनावस्थेमध्यें ह्याला पूर्ण बल प्राप्त झालें असतां ह्याचा वेग केवढा बरें होईल ? ( असें देवदानवादिक चिंतन करूं लागले ) २७. ह्याप्रमाणें तो हनुमान् उड्डाण करूं लागला असतां सूर्यापासून दग्ध होऊन जाण्याचें भय ह्याला प्राप्त होऊं नये तदर्थ तुषारांच्या समुदायामुळें शीतल झालेला वायु त्या आपल्या पुत्राच्या मागोमाग धांवूं लागला २८. जातां जातां हा हनुमान् अनेक सहस्र योजनें आकाशामध्यें गेला आणि पित्याचें पाठबळ असल्यामुळें व बाल्यावस्था असल्यामुळें हा सूर्यासमीप जाऊन पोंचला २९. परंतु, अनर्थ न जाणणारें हें तान्हें मूल आहे असें समजून आणि ह्याच्यावर देवकार्य अवलंबून आहे हा विचार मनांत आणून त्या सूर्यानें ह्याला दग्ध केलें नाहीं ३०. ज्या दिवशीं सूर्याला धरण्याकरितां ह्यानें उड्डाण केलें त्याचदिवशीं राहूनेंही सूर्याला ग्रस्त करण्याचें मनामध्यें आणिलें होतें ३१;. परंतु, चंद्रसूर्यांचें मर्दन करणाऱ्या त्या राहूला सूर्याच्या रथासमीप ह्या हनुमानाचा धक्का लागला असतां तो त्रस्त होऊन तेथून पलीकडे गेला ३२. नंतर इंद्रलोकीं जाऊन देवगणासहवर्तमान बसलेल्या देवराज इंद्राला

अब्रवीद्भ्रुकुटिं कृत्वा देवं देवगणैर्वृतम् ३३ बुभुक्षापनयं दत्त्वा चन्द्रार्कौ मम वासव । किमिदं तत्त्वया दत्तमन्यस्य बलवृत्रहन् ३४ अद्याहं पर्वकाले तु जिघृक्षुः सूर्यमागतः । अथान्यो राहुरासाद्य जग्राह सहसा रविम् ३५ स राहोर्वचनं श्रुत्वा वासवः संभ्रमान्वितः । उत्पपातासनं हित्वा उद्वहन्काञ्चनीं स्रजम् ३६ ततः कैलासकूटाभं चतुर्दन्तं मदस्रवम् । शृङ्गारधारिणं प्रांशुं स्वर्णघण्टाट्टहासिनम् ३७ इन्द्रः करीन्द्रमारुह्य राहुं कृत्वा पुरःसरम् । प्रायाद्यत्राभवत्सूर्यः सहानेन हनूमता ३८ अथातिरभसेनागाद्राहुरुत्सृज्य वासवम् । अनेन च स वै दृष्टः प्रधावञ्शैलकूटवत् ३९ ततः सूर्यं समुत्सृज्य राहुं फलमवेक्ष्य च । उत्पपात पुनर्व्योम ग्रहीतुं सिंहिकासुतम् ४० उत्सृज्यार्कमिमं राम प्रधावन्तं प्लवंगमम् । अवेक्ष्यैवं परावृत्तो मुखशेषः पराङ्मुखः ४१ इन्द्रमाशंसमानस्तु त्रातारं सिंहिकासुतः । इन्द्र इन्द्रेति संत्रासान्मुहुर्मुहुरभाषत ४२ राहोर्विक्रोशमानस्य प्रागेवालक्षितं स्वरम् । श्रुत्वेन्द्रोवाच मा भैषीरहमेनं निषू-

---

तो क्रोधयुक्त राहु भिंवया चढवून ह्मणाला ३३ "हे बलवृत्रघातका इंद्रा, सूर्यचंद्र हें क्षुधा दूर करण्याचें साधन तूं मला दिलें असून तेंच तूं दुसऱ्याला दिलेंस हें काय ? ३४. मी आज अमावास्येचे दिवशीं सूर्याला ग्रस्त करण्याचे उद्देशानें आलों असतां दुसराच राहु तेथें आला व त्यानेंच एकाएकीं सूर्याला ग्रस्त केलें" ३५. राहूचें हें भाषण श्रवण केल्यानंतर इंद्र गोंधळून गेला आणि सुवर्णमाला धारण करणाऱ्या त्या इंद्रानें सिंहासनावरून खालीं उडी टाकिली ३६. तदनंतर कैलासपर्वताच्या शिखराप्रमाणें ज्याचा आकार आहे, चार दंतांनीं जो युक्त आहे, ज्याच्या गंडस्थलांतून मदाचा स्राव चालला आहे, उन्नत असून ज्यानें भूषणें धारण केलीं आहेत आणि सुवर्णघंटांचा ध्वनि हाच ज्याचा अट्टहास आहे ३७ अशा गजेंद्रावर इंद्र आरूढ झाला आणि ह्या हनुमानासहवर्तमान सूर्य जिकडे होता तिकडे राहूला पुढें घालून तो इंद्र गेला ३८. समीप येताक्षणीं इंद्राला सोडून राहु अतिशय वेगानें पुढें गेला व पर्वताच्या शिखराप्रमाणें धांवत असलेला तो वायु ह्या हनुमानाच्या दृष्टीं पडला ३९. तदनंतर राहु हें फल दृष्टीं पडल्यावर हनुमानानें सूर्याला सोडून दिलें आणि त्या सिंहिकापुत्राला धरण्याकरितां त्यानें पुनरपि आकाशामध्यें उड्डाण केलें ४०. हे रामा, सूर्याला सोडून धांवत येत असलेल्या ह्या वानराला ह्याप्रमाणें अवलोकन करितांक्षणीं मुख हेंच ज्याचें शरीर अवशिष्ट राहिलें आहे असा तो राहु पराङ्मुख होऊन परत फिरला ४१ आणि इंद्र आपला रक्षक आहे असें समजून तो सिंहिकापुत्र भीतीमुळें 'इंद्रा, इंद्रा,' अशा वारंवार

दय ४३ ऐरावतं ततो दृष्ट्वा महत्तदिदमित्यपि । फलं तं हस्तिराजानमभिदुद्राव मारुतिः ४४ तथास्य धावतो रूपमैरावतजिघृक्षया । मुहूर्तमभवद्घोरमिन्द्राग्निपरिभास्वरम् ४५ एवमाधावमानं तु नातिक्रुद्धः शचीपतिः । हस्तान्तादतिमुक्तेन कुलिशेनाभ्यताडयत् ४६ ततो गिरौ पपातैष इन्द्रवज्राभिताडितः । पतमानस्य चैतस्य वामो हनुरभज्यत ४७ तस्मिंस्तु पतिते चापि वज्रताडनविह्वले । चुक्रोधेन्द्राय पवनः प्रजानामहिताय सः ४८ प्रचारं स तु संगृह्य प्रजास्वन्तर्गतः प्रभुः । गुहां प्रविष्टः स्वसुतं शिशुमादाय मारुतः ४९ विण्मूत्राशयमावृत्य प्रजानां परमार्तिकृत् । रुरोध सर्वभूतानि यथा वर्षाणि वासवः ५० वायुप्रकोपाद्भूतानि निरुच्छ्वासानि सर्वतः। संधिभिर्भिद्यमानैश्च काष्ठभूतानि जज्ञिरे ५१ निःस्वाध्यायवषट्कारं निष्क्रियं धर्मवर्जितम् । वायुप्रकोपात्त्रैलोक्यं निरयस्थमिवाभवत् ५२ ततः प्रजाः सगन्धर्वाः सदेवासुरमानुषाः । प्रजापतिं समाधावन्दुःखिताश्च सुख-

---

हाका मारू लागला ४२. राहु आक्रोश करू लागला असतां त्यानें हाका मारण्याचें पूर्वींच इंद्रानें त्याचा स्वर ओळखिला आणि तो कानावर येतांक्षणीं ' भिऊ नको; मी ह्याचा वध करितों ' असें तो त्याला ह्मणाला ४३. तदनंतर ऐरावत दृष्टीं पडला असतां हेंही मोठें फळ आहे असें समजून मारुती त्या गजेंद्राकडे धांवला ४४ व ऐरावताला धरण्याकरितां धांवत असलेल्या ह्या हनुमानाचें इंद्राग्नीपेक्षांही उज्ज्वल असलेलें रूप क्षणभर भयंकर दिसूं लागलें ४५. ह्याप्रमाणें तो हनुमान् धांवत येऊं लागला असतां इंद्र थोडासा क्रुद्ध झाला आणि हातांतून वेगानें सोडिलेल्या वज्रानें त्यानें त्याला ताडण केलें ४६. तदनंतर इंद्राच्या वज्रानें ताडित झालेला हा मारुती पर्वतावर पडला व पडतां पडतां ह्याची डावी हनु मोडली ४७. वज्राच्या प्रहारानें विह्वल होऊन तो पडला असतां वायु इंद्रावर क्रुद्ध झाला. परंतु, त्याच्या योगानें प्रजेचें अकल्याण झालें ४८. प्रजाजनांचे ठिकाणीं अंतर्गत असलेल्या त्या प्रभु वायूनें आपला संचार बंद केला आणि आपला बालपुत्र घेऊन तो गुहेमध्यें प्रविष्ट झाला ४९. मलाशय व मूत्राशय बंद करून तो प्रजेला अतिशयच पीडा देऊं लागला आणि पर्जन्याचा निरोध करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्यानें सर्व भूतांचा निरोध करून टाकिला ५०. वायूला अतिशय क्रोध आल्यामुळें सर्व भूतांचा श्वासोच्छ्वास बंद झाला आणि सांधे खिळखिळे झाल्यामुळें सर्वही प्राणी काष्ठतुल्य झाले ५१. वेदाध्ययन, श्रौतकर्म, धर्म व संसारसंबंधी कर्म ह्या सर्वांचाच वायूच्या क्रोधामुळें त्रैलोक्यामध्यें लोप झाला व ह्यामुळें त्रैलोक्य अतिशयच दुःखित झालें ५२. तदनंतर गंधर्व, देव, असुर व मानव ह्यांसहवर्तमान दुःखित

च्छया ५३ ऊचुः प्राञ्जलयो देवा महोदरनिभोदराः ५४ त्वया तु भगवन्सृष्टाः प्रजानाथ चतुर्विधाः । त्वया दत्तोऽयमस्माकमायुषः पवनः पतिः ५५ सोऽस्मान्प्राणेश्वरो भूत्वा कस्मादेषोऽद्य सत्तम । रुरोध दुःखं जनयन्नन्तःपुर इव स्त्रियः ५६ तस्मात्त्वां शरणं प्राप्ता वायुनोपहता वयम् । वायुसंरोधजं दुःखमिदं नो नुद दुःखहन् ५७ एतत्प्रजानां श्रुत्वा तु प्रजानाथः प्रजापतिः । कारणादिति चोक्त्वासौ प्रजाः पुनरभाषत ५८ यस्मिंश्च कारणे वायुश्चुक्रोध च रुरोध च । प्रजाः शृणुध्वं तत्सर्वं श्रोतव्यं चात्मनः क्षमम् ५९ पुत्रस्तस्यामरेशेन इन्द्रेणाद्य निपातितः । राहोर्वचनमास्थाय ततः स कुपितोऽनिलः ६० अशरीरः शरीरेषु वायुश्चरति पालयन् । शरीरं हि विना वायुं समतां याति दारुभिः ६१ वायुः प्राणः सुखं वायुर्वायुः सर्वमिदं जगत् । वायुना संपरित्यक्तं न सुखं विन्दते जगत् ६२ अद्यैव च परित्यक्तं वायुना जगदायुषा । अद्यैव ते निरुच्छ्वासाः काष्ठकुड्योपमाः स्थिताः ६३ तद्यामस्तत्र यत्रास्ते

---

झालेले प्रजाजन सुखाच्या इच्छेनें ब्रह्मदेवाकडे धांवले ५३ आणि उदररोग झाल्याप्रमाणें ज्यांचें उदर दिसूं लागलें आहे असे ते देव हात जोडून त्याला ह्मणाले ५४ "हे भगवन्, हे लोकनाथ, तूं चार प्रकारच्या प्रजा उत्पन्न केल्या आहेस व आयुष्याचा अधिपति ह्मणून हा वायु तूंच आह्मांला दिला आहेस ५५. परंतु, हे सज्जनश्रेष्ठ, हा आमचा प्राणनाथ झाला असून अंतःपुरांतील स्त्रियांप्रमाणें दुःख देण्याकरितां ह्यानें आह्मांला कां बरें अडवून धरिलें आहे? ५६. वायूनें पछाडिल्यामुळें आह्मी तुला शरण आलों आहों. ह्यास्तव, हे दुःखनाशका, वायूच्या निरोधामुळें आह्मांला झालेल्या ह्या दुःखाचा तू परिहार कर" ५७. लोकनाथ ब्रह्मदेवानें प्रजेचें हें भाषण श्रवण केलें आणि 'कांहींतरी कारणामुळें असा प्रकार झाला असावा' असें ह्मणून तो पुनरपि प्रजाजनांना ह्मणाला ५८ "हे प्रजाजनहो, ज्या कारणामुळें वायूनें क्रुद्ध होऊन सर्वांचा निरोध केला आहे तें सर्व कारण तुह्मी श्रवण करा. तें ऐकण्यासारिखें आहे व आपण ऐकणें योग्य आहे ५९. देवराज इंद्रानें राहूचें ऐकून आज त्याच्या पुत्राला पाडिलें आहे आणि ह्मणून तो वायु क्रुद्ध झाला आहे ६०. स्वतः शरीररहित असलेला हा वायु प्राण्यांचें परिपालन करण्याकरितां शरीरांमध्यें संचार करीत असतो आणि वायूवांचून शरीर काष्ठतुल्य होऊन जात असतें ६१. सारांश, प्राण व सुख वायूच असून हें सर्व जगत् वायूवरच अवलंबून आहे; वायूनें सोडिल्यावर जगताला सुख होत नाहीं ६२. जीवनरूप जो वायु त्यानें आजच जगताचा त्याग केला आहे व ते जगतांतील प्राणीही श्वासोच्छ्वास बंद झाल्यामुळें काष्ठांप्रमाणें व भिंतीप्रमाणें स्तब्ध होऊन गेले आहेत ६३. तस्मात्, आह्मांला दुःख देणारा वायु जिकडे

मारुतो रुक्प्रदो हि नः । मा विनाशं गमिष्याम अप्रसाद्यादितेः सुतम् ६४ ततः प्रजाभिः सहितः प्रजापतिः सदेवगन्धर्वभुजंगगुह्यकैः । जगाम यत्रास्यति तत्र मारुतः सुतं सुरेन्द्राभिहतं प्रगृह्य सः ६५ ततोऽर्कवैश्वानरकाञ्चनप्रभं सुतं तदोत्सङ्गगतं सदागतेः । चतुर्मुखो वीक्ष्य कृपामथाकरोत्सदेवगन्धर्वऋषियक्षराक्षसैः ६६ [१८५६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः ॥ ३५ ॥

ततः पितामहं दृष्ट्वा वायुः पुत्रवधार्दितः । शिशुकं तं समादाय उत्तस्थौ धातुरग्रतः १ चलकुण्डलमौलिस्रक्तपनीयविभूषणः । पादयोर्न्यपतद्वायुस्त्रिरुपस्थाय वेधसे २ तं तु वेदविदा तेन लम्बाभरणशोभिना । वायुमुत्थाप्य हस्तेन शिशुं तं परिमृष्टवान् ३ स्पृष्टमात्रस्ततः सोऽथ सलीलं पद्मजन्मना । जलसिक्तं यथा सस्यं पुनर्जीवितमाप्तवान् ४ प्राणवन्तमिमं दृष्ट्वा प्राणो गन्धवहो मुदा । चचार सर्वभूतेषु संनिरुद्धं यथापुरा ५ मरुद्रोधाद्विनिर्मुक्तास्ताः प्रजा मुदिताभवन् । शीतवातविनिर्मुक्ताः पद्मिन्य इव साम्बुजाः ६ ततस्त्रियुग्मस्त्रिककुत्त्रिधामा त्रिदशार्चितः । उवाच देवता ब्रह्मा मारुता-

---

आहे तिकडे आपण जाऊं. अदितिपुत्राला प्रसन्न न केल्यामुळें आपला नाश न होवो" ६४. तदनंतर देव, गंधर्व, भुजंग व गुह्यक ह्या प्रजांसहवर्तमान ब्रह्मदेव, देवराजानें ताडण केलेला आपला पुत्र घेऊन जेथें वायु बसला होता तेथें गेला ६५. तदनंतर सूर्य, अग्नि व सुवर्ण ह्यांप्रमाणें ज्याची कांति आहे असा तो वायूचा पुत्र त्याच्या मांडीवर असलेला ब्रह्मदेवानें अवलोकन केला आणि देव, गंधर्व, ऋषि, यक्ष व राक्षस ह्यांसहवर्तमान त्याला त्या वायुपुत्राची दया आली ६६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पस्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३५ ॥

तदनंतर पुत्राला प्रहार झाल्यामुळें दुःखित झालेला वायु ब्रह्मदेव दृष्टीं पडला असतां तें मूल घेऊन त्याच्यापुढें उभा राहिला १ आणि चंचल कुंडलें, मुकुट, माळा व सुवर्णभूषणें ह्यांनीं युक्त असलेल्या त्या वायूनें ब्रह्मदेवाच्या चरणांवर स्तुतिपूर्वक तीन वेळ साष्टांग प्रणाम केला २. तेव्हां दीर्घ व भूषणांनीं शोभणाऱ्या अशा आपल्या हातानें वायूला उठवून त्या वेदवेत्त्या ब्रह्मदेवानें त्या मुलाच्याही अंगावरून हात फिरविला ३. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें सहज स्पर्श केला असतां जलसिंचन केलेल्या जितरापाप्रमाणें पुनरपि तो पुत्र सजीव झाला ४ आणि आपला पुत्र जिवंत दृष्टीं पडल्यावर प्राणरूपवायु निरोधाचा त्याग करून पूर्वीप्रमाणें सर्व भूतांचे ठिकाणीं आनंदानें संचार करूं लागला ५. वायूच्या निरोधापासून मुक्त झालेल्या त्या प्रजा थंडीवाऱ्यांतून सुटलेल्या

यकाम्यया ७ भो महेन्द्राग्निवरुणा महेश्वरधनेश्वराः । जानतामपि वः सर्वं वक्ष्यामि श्रूयतां हितम् ८ अनेन शिशुना कार्यं कर्तव्यं वो भविष्यति । तद्ददध्वं वरान्सर्वे मारुतस्यास्य तुष्टये ९ ततः सहस्रनयनः प्रीतियुक्तः शुभाननः । कुशेशयमयीं मालामुत्क्षिप्येदं वचोऽब्रवीत् १० मत्करोत्सृष्टवज्रेण हनुरस्य यथा हतः । नाम्ना वै कपिशार्दूलो भविता हनुमानिति ११ अहमस्य प्रदास्यामि परमं वरमद्भुतम् । इतः प्रभृति वज्रस्य ममावध्यो भविष्यति १२ मार्तण्डस्त्वब्रवीत्तत्र भगवांस्तिमिरापहः । तेजसोऽस्य मदीयस्य ददामि शतिकां कलाम् १३ यदा च शास्त्राण्यध्येतुं शक्तिरस्य भविष्यति। तदास्य शास्त्रं दास्यामि येन वाग्मी भविष्यति १४ वरुणश्च वरं प्रादान्नास्य मृत्युर्भविष्यति। वर्षायुतशतेनापि मत्पाशादुदकादपि १५ यमो दण्डादवध्यत्वमरोगत्वं च दत्तवान् । वरं ददामि संतुष्ट अविषादं च संयुगे १६ गदेयं मामिका नैनं संयुगेषु वधिष्यति । इत्येवं धनदः प्राह तदा ह्येकाक्षि-

---

कमलयुक्त कमलिनीप्रमाणें आनंदित झाल्या ६ तदनंतर षड्गुणैश्वर्य, तीन मूर्ति व तीन स्थानें ह्यांनीं युक्त असलेला तो देवमान्य ब्रह्मदेव वायूचें प्रिय करण्याकरितां देवांना ह्मणाला ७ " हे इंद्राग्निवरुणहो, हे शिवकुबेरप्रभृति देवहो, तुह्मी सर्व कांहीं जाणीत आहांत. तथापि, मी तुह्मांला हिताची गोष्ट सांगतों; तुह्मी श्रवण करा ८. ह्या बालकाच्या हातून तुह्मांला आपलें कार्य करून घ्यावयाचें आहे. ह्यास्तव, हा वायु संतुष्ट होण्याकरितां तुह्मी सर्व वर द्या "९. तदनंतर आनंदित झालेला व शुभमुखानें युक्त असलेला सहस्रनयन इंद्र आपली सुवर्णकमलांची माला त्याला काढून देऊन ह्मणाला १० ' माझ्या हातांतून सुटलेल्या वज्रानें ज्याअर्थीं ह्याची हनु भग्न झाली आहे त्याअर्थीं हा कपिश्रेष्ठ हनुमान् ह्या नांवानें विख्यात होईल ११. मी ह्याला अत्यंत अद्भुत वर देतों. आजपासून माझ्या वज्रानें ह्याचा वध होणार नाहीं " १२. तदनंतर अंधकारनाशक भगवान् सूर्य त्याला ह्मणाला " मी ह्या आपल्या तेजाचा शंभरावा अंश ह्याला देतों १३. शिवाय, शास्त्राध्ययन करण्यास जेव्हां हा समर्थ होईल तेव्हां मी ह्याला शास्त्र देईन आणि त्याच्या योगानें हा मोठा वक्ता होईल " १४. नंतर " दहा दहा हजार वर्षें शंकडों वेळां निघून गेलीं तरी माझ्या पाशापासून अथवा उदकापासून ह्याला मृत्यु प्राप्त होणार नाहीं " असा वरुणानें त्याला वर दिला १५. यमानें त्याला आरोग्य व आपल्या दंडापासून अवध्यत्व दिलें; आणि ' मी संतुष्ट होऊन वर देत आहें ' असें पुनरपि सांगून संग्राममध्यें ह्याला थकवा येणार नाहीं ' असाही त्यानें वर दिला १६. " ह्या माझ्या गदेनें संग्राममध्यें ह्याचा वध होणार नाहीं " ह्मणून एका पिंगलवर्ण नेत्रानें युक्त

पिङ्गलः १७ मत्तो मदायुधानां च अवध्योऽयं भविष्यति । इत्येवं शंकरेणापि दत्तोऽस्य परमो वरः १८ विश्वकर्मा च दृष्ट्वेमं बालं प्रति महारथः । मत्कृतानि च शस्त्राणि यानि दिव्यानि तानि च ॥ तैरवध्यत्वमापन्नश्चिरजीवी भविष्यति १९ दीर्घायुश्च महात्मा च ब्रह्मा तं प्राब्रवीद्वचः । सर्वेषां ब्रह्मदण्डानामवध्यत्वं भविष्यति २० ततः सुराणां तु वरैर्दृष्ट्वा ह्येनमलंकृतम् । चतुर्मुखस्तुष्टमना वायुमाह जगद्गुरुः २१ अमित्राणां भयकरो मित्राणामभयङ्करः । अजेयो भविता पुत्रस्तव मारुत मारुतिः २२ कामरूपः कामचारी कामगः प्लवतां वरः । भवत्यव्याहतगतिः कीर्तिमांश्च भविष्यति २३ रावणोत्सादनार्थानि रामप्रीतिकराणि च । रोमहर्षकराण्येव कर्ता कर्माणि संयुगे २४ एवमुक्त्वा तमामन्त्र्य मारुतं त्वमरैः सह । यथागतं ययुः सर्वे पितामहपुरोगमाः २५ सोऽपि गन्धवहः पुत्रं प्रगृह्य गृहमानयत् । अञ्जनायास्तमाख्याय वरदत्तं विनिर्गतः २६ प्राप्य राम वरानेष वरदानबलान्वितः । जवेनात्मनि संस्थेन सोऽसौ पूर्ण इवार्णवः २७ तरसा पूर्यमाणोऽपि तदा वानरपुङ्गवः । आश्रमेषु महर्षीणामपराध्यति

---

असलेल्या कुबेरानेंही त्याला वर दिला १७. " माझ्यापासून अथवा माझ्या आयुधापासून ह्याचा वध होणार नाहीं" असा शंकरानेंही ह्याला उत्कृष्ट वर दिला १८. नंतर ह्या बालाला अवलोकन करून महारथि विश्वकर्मा ह्मणाला " मीं जीं कांहीं दिव्य शस्त्रें केलेलीं आहेत त्यांच्या योगानेंही ह्याचा वध न होतां हा चिरजीवी होईल " १९. ह्यानंतर दीर्घायु व महात्मा ब्रह्मदेव " कोणत्याही ब्रह्मदंडानें ह्याचा वध होणार नाहीं " असें त्याला उद्देशून ह्मणाला २०. तदनंतर देवांच्या वरांनीं संपन्न झालेल्या ह्या हनुमानाला अवलोकन करून जगद्गुरु ब्रह्मदेव मनामध्यें संतुष्ट झाला आणि वायूला ह्मणाला २१ " हे वायो, हा तुझा पुत्र मारुति अजिंक्य शत्रूंना भय उत्पन्न करणारा, मित्रांचें भय दूर करणारा २२, यथेष्ट रूप धारण करणारा, स्वेच्छेनें वागणारा, वाटेल तिकडे जाणारा व कीर्तिमान् होईल आणि ह्या तुझ्या वानरश्रेष्ठ पुत्राची गति कोठेंही कुंठित होणार नाहीं २३ आणि संग्रामामध्यें रावणाचा उच्छेद व रामाला आनंद ज्यांच्या योगानें होईल अशीं शरीरावर रोमांच उठविणारीं कर्मे हा करील " २४. ह्याप्रमाणें देवांसहवर्तमान ब्रह्मदेवानें त्या वायूला सांगितलें आणि त्याचा निरोप घेऊन ते सर्वही ब्रह्मदेवप्रभृति देव आल्या वाटेनें परत गेले २५ इकडे तो वायूही पुत्राला घेऊन घरीं आला आणि त्याला वर प्राप्त झाल्याचें अंजनेला निवेदन करून निघून गेला २६. हे रामा, वर प्राप्त झाल्यामुळें वरदानरूप बलानें युक्त असलेला हा हनुमान स्वतःचे ठिकाणीं

निर्भयः २८ स्रुग्भाण्डान्यग्निहोत्राणि वल्कलानां च सञ्चयान् । भग्नविच्छिन्नविध्वस्तान्संशान्तानां करोत्ययम् २९ एवंविधानि कर्माणि प्रावर्तत महाबलः । सर्वेषां ब्रह्मदण्डानामवध्यः शंभुना कृतः ३० जानन्त ऋषयः सर्वे सहन्ते तस्य शक्तितः । तथा केसरिणा त्वेष वायुना सोऽञ्जनीसुतः ३१ प्रतिषिद्धोऽपि मर्यादां लङ्घयत्येव वानरः । ततो महर्षयः क्रुद्धा भृग्वङ्गिरसवंशजाः ३२ शेपुरेनं रघुश्रेष्ठ नातिक्रुद्धातिमन्यवः । बाधसे यत्समाश्रित्य बलमस्मान्प्लवङ्गम ३३ तद्दीर्घकालं वेत्तासि नास्माकं शापमोहितः । यदा ते स्मार्यते कीर्तिस्तदा ते वर्धते बलम् ३४ ततस्तु हृततेजौजा महर्षिवचनौजसा । एषोऽश्रमाणि तान्येव मृदुभावं गतोऽचरत् ३५ अथर्क्षरजसो नाम वालिसुग्रीवयोः पिता । सर्ववानरराजाऽऽसीत्तेजसा इव भास्करः ३६ स तु राज्यं चिरं कृत्वा वानराणां महेश्वरः । ततस्त्वृक्षरजा नाम कालधर्मेण योजितः ३७ तस्मिन्नस्तमिते चाथ मन्त्रिभिर्मन्त्रकोविदैः ।

---

असलेल्या वेगानें हा अगाध समुद्राची बरोबरी करणारा आहे २७. त्यावेळीं ह्या वानरश्रेष्ठाचा वेग दिवसानुदिवस वृद्धिंगत होत होता आणि महर्षींच्या आश्रमामध्यें हा निःशंकपणें अवाडाव करीत होता २८. शमपरायण ऋषींचीं यज्ञपात्रें, अग्नि आणि वल्कलसमुदाय हा वायुपुत्र भग्न, विध्वस्त व विच्छिन्न करून टाकीत असे २९. अशा प्रकारचीं कर्मे तो महाबलाढ्य हनुमान् करूं लागला; परंतु, कोणत्याही ब्रह्मदंडाच्या योगानें ह्याचा वध होणें शक्य नाहीं असा शंकरानें जो ह्याला वर दिला होता ३० तो लक्ष्यांत आणून सर्व ऋषि त्या वरप्रभावामुळें त्याचा तो अतिक्रम सहन करीत असत. तदनंतर केसरीनें व वायूनें त्या अंजनीपुत्राला ३१ निषेध केला असूनही तो वानर मर्यादेचें उल्लंघन करीतच असे. तेव्हां भृगुवंशांतील व आंगिरसवंशांतील ऋषि क्रुद्ध झाले ३२; परंतु, त्याचा घात करण्याची विशेष इच्छा न धरितां आणि संतापही फार न आणितां, हे रघुवंशजश्रेष्ठा, त्यांनीं ह्याला शाप दिला. ( ते ह्मणाले ) "हे वानरा, ज्या बलाचा आश्रय करून तूं आह्मांला पीडा देत आहेस ३३ त्या बलाचीच, आमच्या शापानें मोहित झाल्यामुळें, तुला पुष्कळ वेळपर्यंत आठवण रहाणार नाहीं. जेव्हां तुझ्या योग्यतेविषयीं तुला कोणी आठवण करील तेव्हां तुझें बल वृद्धिंगत होईल" ३४. तदनंतर महर्षिवचनाच्या प्रभावामुळें स्वसामर्थ्यसंबंधीं ज्ञान नाहींसें झाल्याकारणानें हा हनुमान् सौम्य होऊन आश्रमामध्यें संचार करूं लागला ३५. असो. वाली व सुग्रीव ह्यांचा जो सूर्यतुल्य तेजस्वी ऋक्षरजसनामक पिता तो सर्व वानरांचा राजा होता ३६ व पुष्कळ दिवस राज्य करून तो वानरराज ऋक्षरजस मृत्यु पावला ३७. तो निवर्तल्यानंतर नीतिवेत्त्या मंत्र्यांनीं वालीला

पित्र्ये पदे कृतो वाली सुग्रीवो वालिनः पदे ३८ सुग्रीवेण समं त्वस्य अद्वैधं छिद्रवर्जितम् । आबाल्यं सख्यमभवदनिलस्याग्निना यथा ३९ एष शापवशादेव न वेद बलमात्मनः । वालिसुग्रीवयोर्वैरं यदा राम समुत्थितम् ४० न ह्येष राम सुग्रीवो भ्राम्यमाणोऽपि वालिना । देव जानाति न ह्येष बलमात्मनि मारुतिः ४१ ऋषिशापाहृतबलस्तदैव कपिसत्तमः । सिंहः कुञ्जररुद्धो वा आस्थितः सहितो रणे ४२ पराक्रमोत्साहमतिप्रतापसौशील्यमाधुर्यनयानयैश्च । गाम्भीर्यचातुर्यसुवीर्यधैर्यैर्हनूमतः कोऽप्यधिकोऽस्ति लोके ४३ असौ पुनर्व्याकरणं ग्रहीष्यन्सूर्योन्मुखः प्रष्टुमनाः कपीन्द्रः । उद्यद्गिरेरस्तगिरिं जगाम ग्रन्थं महद्धारयनप्रमेयः ४४ ससूत्रवृत्त्यर्थपदं महार्थं ससंग्रहं सिध्यति वै कपीन्द्रः । न ह्यस्य कश्चित्सदृशोऽस्ति शास्त्रे वैशारदे

---

पित्याचे स्थानीं स्थापून सुग्रीवाला वालीच्या स्थानीं स्थापिलें ( ह्मणजे वालीला राज्यावर बसवून सुग्रीवाला यौवराज्याचा अभिषेक केला ) ३८. वायूचें ज्याप्रमाणें अग्नीशीं सख्य असतें त्याप्रमाणें सुग्रीवाशीं ह्या हनुमानाचें बालपणापासून सख्य होतें. त्या सख्यामध्यें कसलाही परकीपणा नव्हता आणि कसल्याही प्रकारची उणीव नव्हती ३९. हे रामा, वाली आणि सुग्रीव ह्यांमध्यें जेव्हां वैर उपस्थित झालें तेव्हां शापाधीन झाल्यामुळेंच ह्याला स्वसामर्थ्याचें स्मरण राहिलें नाहीं ४०. तात्पर्य, हे देवा रामा, वाली सुग्रीवाला जरी गरगर फिरवूं लागला तरी ह्या वायुपुत्र हनुमानाला स्वसामर्थ्याची आठवण झाली नाहीं ४१. ऋषींच्या शापामुळें त्या वानरश्रेष्ठाचें स्वसामर्थ्यविषयक ज्ञान नष्ट झालें व ह्यामुळें रणामध्यें गजांनीं कोंडून टाकिलेला सिंहच कीं काय असा तो वायुपुत्र सुग्रीवासहवर्तमान स्वस्थ राहूं लागला ४२. पराक्रम, उत्साह, मति, प्रताप, सुशीलता, मधुर वाणी, न्याय कोणता व अन्याय कोणता ह्यांचें ज्ञान, गंभीरपणा, चातुर्य, वीर्य आणि धैर्य ह्या गुणांनीं जगतामध्यें हनुमानापेक्षां कोण बरें अधिक आहे ? ४३. व्याकरणाचें अध्ययन करण्याच्या उद्देशानें सूर्याला विचारण्याकरितां हा वानरश्रेष्ठ सूर्यसंमुख झाला आणि विशाल ग्रंथ स्वीकारण्याकरितां तो अनुपम हनुमान् उदयाचलापासून अस्ताचलापर्यंत हिंडत राहिला ४४. व्याकरण, सूत्रें, सूत्रवृत्ति, वार्तिक, भाष्य आणि संग्रह ह्या सर्वांचें

---

१ ह्या श्लोकावरील तिलकटीका येणेंप्रमाणें:—कोऽसौ ग्रन्थस्तत्राह । ससूत्रेति । सूत्रमष्टाध्यायीलक्षणम् । वृत्तिस्तात्कालिकसूत्रवृत्तिः । अर्थपदं सूत्रार्थबोधकपदवद्वार्तिकम् । महार्थं महाभाष्यं पतञ्जलिकृतम् । ससंग्रहं व्याडिकृतसंग्रहाख्यग्रन्थसहितम् । सिध्यति वै सिद्धो भवति । शास्त्रान्तरेष्वपीत्यर्थः । तदेवाह । न ह्यस्य सदृशः शास्त्रे कश्चित् । छन्दगतौ पूर्वोत्तरमीमांसामुखेन वेदार्थनिर्णये वैशारदे वैदुष्ये । विशिष्य नवमव्याकरणकर्ता हनूमानिति च प्रसिद्धिरिति कतकः ॥

छन्दगतौ तथैव ४५ सर्वासु विद्यासु तपोविधाने प्रस्पर्धतेऽयं हि गुरुं सुराणाम् । प्रवीविविक्षोरिव सागरस्य लोकान्दिधक्षोरिव पावकस्य ४६ लोकक्षयेष्वेव यथाऽन्तकस्य हनूमतः स्थास्यति कः पुरस्तात् ४७ एषव चान्ये च महाकपीन्द्राः सुग्रीवमैन्दद्विविदाः सनीलाः । सतारतारेयनलाः सरम्भास्त्वत्कारणाद्राम सुरैर्हि सृष्टाः ४८ गजो गवाक्षो गवयः सुदंष्ट्रो मैन्दः प्रभोज्योऽतिमुखो नलश्च । एते च ऋक्षाः सह वानरेन्द्रैस्त्वत्कारणाद्राम सुरैर्हि सृष्टाः ४९ तदेतत्कथितं सर्वं यन्मां त्वं परिपृच्छसि । हनूमतो बालभावे कर्मैतत्कथितं मया ५० श्रुत्वाऽगस्त्यस्य कथितं रामः सौमित्रिरेव च । विस्मयं परमं जग्मुर्वानरा राक्षसैः सह ५१ अगस्त्यस्त्वब्रवीद्रामं सर्वमेतच्छ्रुतं त्वया । दृष्टः संभाषितश्चासि राम गच्छामहे वयम् ५२ श्रुत्वैतद्राघवो वाक्यमगस्त्यस्योग्रतेजसः । प्राञ्जलिः प्रणतश्चापि महर्षिमिदमब्रवीत् ५३ अद्य मे देवतास्तुष्टाः पितरः प्रपितामहाः । युष्माकं दर्शनादेव

---

अध्ययन करून इतर शास्त्रांमध्येंही तो वानरश्रेष्ठ प्रवीण झाला आणि विद्वत्ता, शास्त्र व वेदार्थनिर्णय ह्यांमध्यें ह्या हनुमानाची बरोबरी करणारा जगतामध्यें कोणी झाला नाहीं ४५. सर्व विद्या आणि तपश्चर्या ह्यांमध्यें हा देवगुरु बृहस्पतीचीच स्पर्धा करणारा आहे ४६. प्रलयकालीं पृथ्वी बुडवून टाकण्यास उद्युक्त झालेला समुद्र अथवा लोकांना दग्ध करून टाकण्यास प्रवृत्त झालेला अग्नि ह्यांप्रमाणें किंवा मृत्यूप्रमाणें असलेल्या हनुमानापुढें टिकाव धरण्यास कोण बरें समर्थ आहे ? ४७. हे रामा, ह्या हनुमानाप्रमाणें इतरही मोठे मोठे वानरश्रेष्ठ ह्मणजे सुग्रीव, मैंद, द्विविद, नील, तार, अंगद, नल आणि रंभ हे तुझ्याकरितां देवांनीं उत्पन्न केले आहेत ४८ आणि त्याचप्रमाणें, हे रामा, गज, गवाक्ष, गवय, सुदंष्ट्र, मैंद, प्रभोज्य, अतिमुख व नर हे ऋक्षही इतर वानराधिपतींसहवर्तमान देवांनीं तुझ्याकरितां उत्पन्न केले आहेत ४९. तूं जें मला विचारिलेंस तें हें सर्व मीं तुला कथन केलें. तात्पर्य, हनुमानाच्या बाल्यावस्थेंतील हें कर्म मीं तुला सांगितलें " ५०. अगस्त्यमुनींनीं सांगितलेलें श्रवण केल्यावर राम, लक्ष्मण आणि राक्षसांसहवर्तमान वानर हे अत्यंत आश्चर्यचकित झाले ५१. तेव्हां अगस्त्य रामाला ह्मणाले " तूं हें सर्व श्रवण केलें आहेस आणि, हे रामा, (आमच्या इच्छेप्रमाणें) तुझी भेट होऊन तुझ्याशीं संभाषणही झालें आहे. ह्यास्तव, आतां आह्मी जातों " ५२. महातेजस्वी अगस्त्यमुनींचें हें भाषण श्रवण केल्यानंतर राम हात जोडून व नम्र होऊन त्या महर्षींना ह्मणाला ५३ " आपल्या दर्शनामुळें आज माझ्यावर देवता संतुष्ट झाल्या आहेत आणि बांधवांसहवर्तमान पितर व प्रपितामहही आपलेंच दर्शन झाल्यामुळें

नित्यं तुष्टाः सबान्धवाः ५४ विज्ञाप्यं तु ममैतद्धि यद्दाम्यागतस्पृहः ।
तद्भवद्भिर्मम कृते कर्तव्यमनुकम्पया ५५ पौरजानपदान्स्थाप्य स्वकार्येष्व-
हमागतः । क्रतूनहं करिष्यामि प्रभावाद्भवतां सताम् ५६ सदस्या मम
यज्ञेषु भवन्तो नित्यमेव तु । भविष्यथ महावीर्या ममानुग्रहकाङ्क्षिणः ५७
अहं युष्मान्समाश्रित्य तपोनिर्धूतकल्मषान् । अनुगृहीतः पितृभिर्भविष्यामि
सुनिर्वृतः ५८ तदागन्तव्यमनिशं भवद्भिरिह संगतैः । अगस्त्याद्यास्तु
तच्छ्रुत्वा ऋषयः संशितव्रताः ५९ एवमस्त्विति तं प्रोच्य प्रयातुमुपचक्रमुः
एवमुक्त्वा गताः सर्वे ऋषयस्ते यथागतम् ६० राघवश्च तमेवार्थं चिन्त-
यामास विस्मितः । ततोऽस्तं भास्करे याते विसृज्य नृपवानरान् ६१ संध्या-
मुपास्य विधिवत्तदा नरवरोत्तमः । प्रवृत्तायां रजन्यां तु सोऽन्तःपुरचरो-
ऽभवत् ६२ [१९१८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्त-
रकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥ ३६ ॥

अभिषिक्ते तु काकुत्स्थे धर्मेण विदितात्मनि । व्यतीता या निशा पूर्वा

---

माझ्यावर नित्य संतुष्ट रहातील ५४. कांहीं इच्छा उत्पन्न झाल्यामुळें माझी ही एक प्रार्थना आहे ती आपण माझ्याकरितां कृपा करून शेवटास न्यावी ५५. वनवासांतून तूर्त मी आलों आहें; ह्यास्तव, मी प्रथमतः स्वतः नगरांतील व देशांतील लोकांची स्वकार्याकडे योजना करून तुम्हां सज्जनांच्या प्रभावामुळें क्रतु करीन ५६. आपण महासमर्थ असून माझ्यावर अनुग्रह करण्याची इच्छा धरणारे आहांत. ह्यास्तव, आपण नेहमीं माझ्या यज्ञामध्यें सदस्य व्हावें ५७. तपश्चर्येच्या योगानें ज्यांचें पातक नाहींसें झालें आहे अशा तुमचा आश्रय मला प्राप्त झाला असतां पितरांचा माझ्यावर अनुग्रह होईल व मी अतिशय सुखी होईन ५८. तस्मात्, आपण सर्वजण यज्ञामध्यें नेहमीं येथें यावें." निर्मल तपश्चर्या करणार ते अगस्त्यप्रभृति ऋषि रामाचें तें भाषण श्रवण करून ५९ 'ठीक आहे' असें ह्मणाले आणि जाण्यास उद्युक्त झाले; व ह्याप्रमाणें रामाला सांगितल्यानंतर ते सर्वही ऋषि आल्या मार्गानें परत गेले ६० आणि राम मात्र विस्मयचकित होऊन त्याच गोष्टीचें चिंतन करीत बसला. तदनंतर सूर्यास्त झाला असतां राजे व वानर ह्यांना जाण्याची अनुज्ञा देऊन ६१ त्या नरवरश्रेष्ठ रामानें यथाविधि संध्यावंदन केलें आणि रात्र पडल्यावर तो अंतःपुरामध्यें निघून गेला ६२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३८ ॥

आत्मवेत्त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला यथाविधि अभिषेक झाल्यानंतर जी पहिली

पौराणां हर्षवर्धिनी १ तस्यां रजन्यां व्युष्टायां प्रातर्नृपतिबोधकाः । बन्दिनः समुपातिष्ठन्सौम्या नृपतिवेश्मनि २ ते रक्तकण्ठिनः सर्वे किंनरा इव शिक्षिताः । तुष्टुवुर्नृपतिं वीरं यथावत्संप्रहर्षिणः ३ वीर सौम्य प्रबुध्यस्व कौसल्याप्रीतिवर्धन । जगद्धि सर्वं स्वपिति त्वयि सुप्ते नराधिप ४ विक्रमस्ते यथा विष्णो रूपं चैवाश्विनोरिव । बुद्ध्या बृहस्पतेस्तुल्यः प्रजापतिसमो ह्यसि ५ क्षमा ते पृथिवीतुल्या तेजसा भास्करोपमः । वेगस्ते वायुना तुल्यो गाम्भीर्यमुदधेरिव ६ अप्रकम्प्यो यथा स्थाणुश्चन्द्रे सौम्यत्वमीदृशम् । नेदृशाः पार्थिवाः पूर्वं भवितारो नराधिप ७ यथा त्वमसि दुर्धर्षो धर्मनित्यः प्रजाहितः । न त्वां जहाति कीर्तिश्च लक्ष्मीश्च पुरुषर्षभ ८ श्रीश्च धर्मश्च काकुत्स्थ त्वयि नित्यं प्रतिष्ठितौ । एताश्चान्याश्च मधुरा बन्दिभिः परिकीर्तिताः ९ सूताश्च संस्तवैर्दिव्यैर्बोधयन्ति स्म राघवम् । स्तुतिभिः स्तूयमानाभिः प्रत्यबुध्यत राघवः १० स तद्विहाय शयनं पाण्डुराच्छादनास्तृतम् । उत्तस्थौ नागशयनाद्धरिर्नारायणो यथा ११ तमुत्थितं महात्मानं प्रह्वाः प्राञ्जलयो नराः । सलिलं भाजनैः शुभ्रैरुपतस्थुः सहस्रशः १२

---

रात्र उजाडली ती नगरांतील लोकांचा हर्ष वृद्धिंगत करणारी झाली १. ती रात्र उजाडल्यानंतर प्रातःकालीं राजाला उठविण्याकरितां सुशील भाट राजवाड्यामध्यें आले २ आणि कंठमाधुर्यानें युक्त असलेले व किन्नरांप्रमाणें शिकलेले ते सर्वही आनंदी भाट वीर्यवान् रामाची खरी खरी स्तुति करूं लागले ३. (ते ह्मणाले) "हे वीरा, हे सौम्या, हे कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या राजा, ऊठ; कारण, तू निद्रिस्थ असलास ह्मणजे सर्व जगत् झोंप घेत असतें ४. तूं स्वतः ब्रह्मदेवाप्रमाणें असून पराक्रमानें विष्णूची, रूपानें अश्विनीकुमारांची, बुद्धीनें बृहस्पतीची ५, क्षमेनें पृथ्वीची, तेजानें सूर्याची, वेगानें वायूची, गंभीरपणामध्यें समुद्राची ६, निश्चलतेमध्यें स्थाणूची व सौम्यपणामध्यें चंद्राची बरोबरी करणारा आहेस. हे राजा, तूं ज्याप्रमाणें अजिंक्य, नित्य, धर्मनिष्ठ व प्रजेचें हित करणारा आहेस त्याप्रमाणें पूर्वीं राजे झाले नाहींत व पुढेंही होणार नाहींत. हे पुरुषश्रेष्ठा, कीर्ति व लक्ष्मी ह्या तुला सोडून जात नाहींत ७,८ आणि, हे काकुत्स्था, श्री व धर्म हेंही नेहेमीं तुझ्याच आश्रयाला आहेत." हीं व अशाचप्रकारचीं दुसरीं मधुर भाषणें भाटांनीं केलीं ९ व पौराणिकही दिव्य स्तवनांनीं रामाला जागे करूं लागले. ह्याप्रमाणें स्तुति होऊं लागली असतां राम जागा झाला १० आणि श्वेतवर्ण आस्तरण घातलेली शय्या सोडून तो राम शेषरूप शय्येपासून उठणाऱ्या श्रीहरि नारायणाप्रमाणें उठला ११. तो महात्मा उठल्यानंतर हजारों

कृतोदकः शुचिर्भूत्वा काले हुतहुताशनः । देवागारं जगामाशु पुण्यमिक्ष्वाकुसेवितम् १३ तत्र देवान्पितॄन्विप्रानर्चयित्वा यथाविधि । बाह्यकक्षान्तरं रामो निर्जगाम जनैर्वृतः १४ उपतस्थुर्महात्मानो मन्त्रिणः सपुरोहिताः । वसिष्ठप्रमुखाः सर्वे दीप्यमाना इवाग्नयः १५ क्षत्रियाश्च महात्मानो नानाजनपदेश्वराः । रामस्योपाविशन्पार्श्वे शक्रस्येव यथाऽमराः १६ भरतो लक्ष्मणश्चात्र शत्रुघ्नश्च महायशाः । उपासाञ्चक्रिरे हृष्टा वेदास्त्रय इवाध्वरम् १७ याताः प्राञ्जलयो भूत्वा किंकरा मुदिताननाः । मुदिता नाम पार्श्वस्था बहवः समुपाविशन् १८ वानराश्च महावीर्या विंशतिः कामरूपिणः । सुग्रीवप्रमुखा राममुपासन्ते महौजसः १९ विभीषणश्च रक्षोभिश्चतुर्भिः परिवारितः । उपासते महात्मानं धनेशमिव गुह्यकः २० तथा निगमवृद्धाश्च कुलीना ये च मानवाः । शिरसा वन्द्य राजानमुपासन्त विचक्षणाः २१ तथा परिवृतो राजा श्रीमद्भिर्ऋषिभिर्वरैः । राजभिश्च महावीर्यैर्वानरैश्च सराक्षसैः २२ यथा देवेश्वरो नित्यमृषिभिः समुपास्यते ।

---

सेवकजन हात जोडून व नम्र होऊन त्याच्यापुढें उभे राहिले आणि निर्मल पात्रांमध्यें त्याच्याकडे उदक घेऊन आले १२. पुढें स्नान करून शुचि झाल्यानंतर वेळेवर त्यानें अग्नीमध्यें होम दिला आणि इक्ष्वाकुवंशांतील पुरुष ज्याचा आश्रय करीत आले होते अशा पवित्र देवगृहामध्यें तो सत्वर गेला १३. त्या ठिकाणीं देव, पितर व विप्र ह्यांचें त्यानें यथाविधि पूजन केलें आणि नंतर सेवकजनांसहवर्तमान तो राम बाहेरल्या चौकांत निघून आला १४. तेव्हां पुरोहितासहवर्तमान महात्मे मंत्री त्याच्याजवळ आले आणि अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेले वसिष्ठप्रभृति सर्व ऋषि १५ व अनेक देशांचे अधिपति महात्मे क्षत्रिय इंद्राच्या बाजूला बसणाऱ्या देवांप्रमाणें रामाच्या बाजूला बसले १६. तेव्हां तीन वेद ज्याप्रमाणें यज्ञाचा आश्रय करून रहातात त्याचप्रमाणें महाकीर्तिमान् शत्रुघ्न, भरत व लक्ष्मण हेही आनंदित होऊन त्याच्या समीप बसले १७. सानंद मुखानें युक्त असलेले सेवक हात जोडून त्याच्यासमीप आले व दुसरेही अतिशय आनंदित झालेले पुष्कळच आजूबाजूचे लोक तेथें बसले १८. सुग्रीवप्रभृति महातेजस्वी, महावीर्यवान् व यथेष्ट रूप धारण करणारे वीस वानर रामासमीप बसले. १९ गुह्यक ज्याप्रमाणें कुबेरासमीप बसतो त्याप्रमाणें चार राक्षसांसहवर्तमान बिभीषणही महात्म्या रामाचे समीप बसला २०. त्याचप्रमाणें वेदविद्येमध्यें प्रवीण, कुलीन आणि चतुर असे जे पुरुष होते तेही रामराजाला मस्तकानें वंदन करून त्याच्यासमीप बसले. २१ श्रीमान् व श्रेष्ठ ऋषि आणि राक्षसांसहवर्तमान महावीर्यवान्

अधिकस्तेन रूपेण सहस्राक्षाद्विराजते २३ तेषां समुपविष्टानां तास्ताः सुमधुराः कथाः । कथ्यन्ते धर्मसंयुक्ताः पुराणज्ञैर्महात्मभिः २४ [ १९८२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये उत्तरकाण्डे सप्तत्रिंशः सर्गः ॥ ३७ ॥

एतच्छ्रुत्वा तु निखिलं राघवोऽगस्त्यमब्रवीत् । य एषर्क्षरजा नाम वालिसुग्रीवयोः पिता १ जननी का च भवनं सा त्वया परिकीर्तिता । वालिसुग्रीवयोश्चापि नामनी केन हेतुना २ एतद्ब्रह्मन्समाचक्ष्व कौतूहलमिदं हि नः । स प्रोक्तो राघवेणैवमगस्त्यो वाक्यमब्रवीत् ३ शृणु राम कथामेतां यथापूर्वं समासतः । नारदः कथयामास ममाश्रममुपागतः ४ कदाचिदटमानोऽसावतिथिर्मामुपागतः । अर्चितस्तु यथान्यायं विधिदृष्टेन कर्मणा ५ सुखासीनः कथामेतां मया पृष्टः स कौतुकात् । कथयामास

---

वानर व राजे त्या रामराजासमीप बसले असतां २२ देवराज इंद्र ज्याप्रमाणें, ऋषि समीप बसले असतांना, दिसतो त्याप्रमाणेंच नव्हे परंतु, त्याच्यापेक्षांही राम त्या रूपानें जास्त झळकूं लागला २३; आणि ह्याप्रमाणें ते बसले असतांना महात्मे पुराणवेत्ते लोक नानाप्रकारच्या अत्यंत मधुर व धर्मयुक्त कथा कथन करूं लागले २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडांपैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

हें सर्व श्रवण करून राम अगस्त्यमुनींना पुन्हां ह्मणाला "वाली आणि सुग्रीव ह्यांचा जो ऋक्षरजस् ह्मणून पिता आपण कथन केला तो मीं ऐकिला १; परंतु, ह्यांची माता कोण व ह्यांचें मूळ ठिकाण कोणतें हें आपण कथन करावें आणि वाली व सुग्रीव ह्यांचीं हीं नांवें कोणत्या कारणानें पडलीं तेंही मला सांगावें. हे ब्रह्मनिष्ठ, हें ऐकण्याविषयीं आह्मांला फार उत्कंठा प्राप्त झाली आहे". रामानें असें भाषण केलें असतां अगस्त्यमुनि त्याला ह्मणाले २, ३ "हे रामा, पूर्वीं ही कथा नारदानें माझ्या आश्रमामध्यें येऊन ज्याप्रमाणें संक्षेपतः कथन केली आहे त्याप्रमाणें तूंही श्रवण कर ४. हा अत्यंत धर्मनिष्ठ नारद एकदां हिंडतां हिंडतां माझ्या आश्रमामध्यें आला असतां यथाविधि पूजन करून मीं त्याचें रीतीप्रमाणें स्वागत केलें ५. नंतर स्वस्थ बसल्यावर जिज्ञासा उत्पन्न झाल्या-

---

१ ह्या सर्गानंतर टीकाकारांनीं मान्य न केलेले असे कांहीं सर्ग आहेत व ते सर्ग प्रक्षिप्त ह्मणून निर्णयसागरामध्यें छापलेल्या प्रतीमध्यें दिले आहेत. ह्यांपैकीं पहिल्याच सर्गाच्या प्रारंभाकडे लक्ष्य दिलें असतां राम अगस्त्यमुनींशीं भाषण करूं लागला असा उपक्रम त्यांत केलेला आहे व तो पूर्वीच्या मजकुराशीं विसंगतही आहे. कारण, अगस्त्यप्रभृति मुनि तेथून परत गेले असें पूर्वी सांगितलें आहे. तथापि, प्रक्षिप्त ह्मणून दिलेले जितके सर्ग निर्णयसागरांत छापिलेल्या प्रतींत आहेत त्या सर्गांचेंही तात्पर्य आतांपर्यंत दिलें गेलें असल्यामुळें ह्या सर्गांचेंही तात्पर्य पुढें दिलें आहे.

धर्मात्मा महर्षे श्रूयतामिति ६ मेरुर्नगवरः श्रीमाञ्जाम्बूनदमयः शुभः । तस्य यन्मध्यमं शृङ्गं सर्वदैवतपूजितम् ७ तस्मिन्दिव्या सभा रम्या ब्रह्मणः शतयोजना । तस्यामास्ते सदा देवः पद्मयोनिश्चतुर्मुखः ८ योगमभ्यसतस्तस्य नेत्राभ्यां यदसुस्रुवत्तु।तद्गृहीतं भगवता पाणिना चर्चितं तु तत् ९ निक्षिप्तमात्रं तद्भूमौ ब्रह्मणा लोककर्तृणा । तस्मिन्नश्रुकणे राम वानरः संबभूव ह १० उत्पन्नमात्रस्तु तदा वानरश्च नरोत्तम । समाश्वास्य प्रियैर्वाक्यैरुक्तः किल महात्मना ११ पश्य शैलं सुविस्तीर्णं सुरैरध्युषितं सदा । तस्मिन्रम्ये गिरिवरे बहुमूलफलाशनः १२ ममान्तिकचरो नित्यं भव वानरपुङ्गव । कंचित्कालमिहास्व त्वं ततः श्रेयो भविष्यति १३ एवमुक्तः स चैतेन ब्रह्मणा वानरोत्तमः । प्रणम्य शिरसा पादौ देवदेवस्य राघव १४ उक्तवाँल्लोककर्तारमादिदेव जगत्पतिम् । यथाऽऽज्ञापयसे देव स्थितोऽहं तव शासने १५ एवमुक्त्वा हरिर्देवं ययौ हृष्टमनास्तदा । स तदा द्रुमखण्डेषु फलपुष्पघनेषु च १६ ब्रह्मप्रतिबलः शीघ्रं वने फलकृताशनः । चिन्वन्मधूनि मुख्यानि चिन्वन्पुष्पाण्य-

---

मुळें मी ह्या कथेविषयीं त्याला प्रश्न केला असतां तो धर्मात्मा ह्मणाला "हे महर्षे, श्रवण कर ६. मेरु ह्मणून एक सुवर्णमय, पवित्र, भव्य व श्रेष्ठ पर्वत आहे व त्याचें जें मध्यम शिखर आहे तें सर्व देवांना पूज्य आहे ७. त्या शिखरावर ब्रह्मदेवाची दिव्य व रमणीय सभा आहे. त्या सभेचें क्षेत्र शंभर योजनें असून नाभिकमलापासून उत्पन्न झालेले चतुर्मुख ब्रह्मदेव त्या सभेंत नेहेमीं असतात ८. एकदां तो ब्रह्मदेव ध्यानस्थ बसला असतांना त्याच्या नेत्रांतून उदक पडलें तें त्या भगवानानें हातामध्यें घेऊन चोळिलें ९. नंतर जगत्स्रष्ट्या ब्रह्मदेवाच्या हातून अश्रुकण भूमीवर पडतांक्षणीं, हे रामा, त्या अश्रुकणामध्यें एक वानर उत्पन्न झाला १०. हे पुरुषश्रेष्ठा, तो वानर उत्पन्न होतांक्षणीं महात्म्या ब्रह्मदेवानें प्रिय भाषणांनीं त्याला आश्वासन दिलें व तो त्याला ह्मणाला ११ " देव ज्याचा सर्वदां आश्रय करीत आहेत असा हा अतिविस्तीर्ण पर्वत तूं अवलोकन कर आणि ह्या रम्य व श्रेष्ठ पर्वतावर अनेकप्रकारचीं मुळें व फळें भक्षण करून १२, हे वानरश्रेष्ठा, तूं नेहेमीं माझ्यासमीप रहात जा. निदान कांहीं वेळपर्यंत तरी तूं येथे रहा; ह्मणजे तुझें कल्याण होईल " १३. ह्याप्रमाणें त्या ब्रह्मदेवानें सांगितलें असतां, हे राघवा, त्या वानरश्रेष्ठानें त्या देवाधिदेवाच्या पायांवर मस्तक ठेविलें १४ आणि जगत्स्रष्ट्या व आदिदेव जगदीश ब्रह्मदेवाला तो ह्मणाला "हे देवा, आपल्या ह्मणण्याप्रमाणें मी आपल्या आज्ञेंत तत्पर आहें" १५. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाला सांगून तो वानर फलांची व पुष्पांची ज्यामध्यें गर्दी आहे अशा वनांतून आनंदानें संचार करूं लागला १६. हे ब्रह्मनिष्ठ रामा, तो महाबलाढ्य

नेकशः १७ दिने दिने च मायाह्ने ब्रह्मणोऽन्तिकमागमत् । गृहीत्वा राम मुख्यानि पुष्पाणि च फलानि च १८ ब्रह्मणो देवदेवस्य पादमूले न्यवेदयत् । एवं तस्य गतः कालो बहु पर्यटतो गिरिम् १९ कस्यचित्त्वथ कालस्य समतीतस्य राघव । ऋक्षराड्वानरश्रेष्ठस्तृषया परिपीडितः २० उत्तरं मेरुशिखरं गतस्तत्र च दृष्टवान् । नानाविहगसंघुष्टं प्रसन्नसलिलं सरः २१ चलत्केसरमात्मानं कृत्वा तस्य तटे स्थितः । ददर्श तस्मिन्सरसि वक्त्रच्छायामथात्मनः २२ कोऽयमस्मिन्मम रिपुर्वसत्यन्तर्जले महान् । रूपं चान्तर्गतं तत्र वीक्ष्य तत्पश्यतो हरिः २३ क्रोधाविष्टमना ह्येष नियतं मावमन्यते । तदस्य दुष्टभावस्य पुष्कलं कुमतेर्गृहम् २४ एवं संचिन्त्य मनसा स वै वानरचापलात् । आप्लुत्य चापतत्तस्मिन्ह्रदे वानरसत्तमः २५ उत्प्लुत्य तस्मात्स ह्रदादुत्थितः प्लवगः पुनः । तस्मिन्नेव क्षणे राम स्त्रीत्वं प्राप स वानरः २६ मनोज्ञरूपा सा नारी लावण्यललिता शुभा । विस्तीर्णजघना सुभ्रूर्नीलकुन्तलमूर्धजा २७ मुग्धसस्मितवक्त्रा च पीनस्तनतटा शुभा । ह्रदतीरे च सा

---

वानर वनामध्यें फलें भक्षण करीत असे आणि उत्कृष्ट मधुर फलें व अनेक पुष्पें सत्वर तोडीत तोडीत १७. प्रतिदिवशीं सायंकालीं ब्रह्मदेवासमीप तो येत असे. सारांश, हे रामा, उत्कृष्ट पुष्पें व फलें घेऊन १८. देवाधिदेव ब्रह्मदेवाच्या चरणासमीप तो ठेवीत असे. ह्याप्रमाणें पर्वतावर हिंडतां हिंडतां त्याचा बराच काल लोटला १९. हे राघवा, पुढें कांहीं काल लोटल्यानंतर ऋक्षराज वानरश्रेष्ठ तृषेनें व्याकुल झाला.असतां मेरुपर्वताच्या उत्तरशिखरावर गेला २० तों नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं नादित व निर्मल जलानें युक्त असें एक सरावर त्याच्या दृष्टीं पडलें २१ आणि शरीरावर रोमांच उठवून तो त्याच्या तटावर बसला असतांना स्वतःच्या मुखाचें प्रतिबिंब त्यानें त्या सरोवरामध्यें पडलेलें पाहिलें २२. तेव्हां उदकामध्यें असलेलें तें रूप अवलोकन करून तो वानर मनामध्यें क्रुद्ध झाला आणि ह्मणाला " जलामध्यें कोण बरें हा माझा मोठा शत्रु वास्तव्य करीत आहे ? हा नेहेमीं माझा अवमान करीत असतो माझ्याविषयीं दुष्ट बुद्धि धारण करून माझ्याकडे पहात असलेल्या ह्या दुर्बुद्धि शत्रूचें हेंच विशाल गृह आहे " २३,२४. ह्याप्रमाणें मनामध्यें विचार करून वानरस्वभावाला अनुसरून त्या श्रेष्ठ वानरानें त्या सरोवरामध्यें उडी टाकिली २५ आणि उसळी मारून पुनरपि तो वानर त्या सरोवरापासून वर आला असतां, हे रामा, तो तत्क्षणीं स्त्री झाला २६ त्या स्त्रीचें रूप मनोहर होतें; ती शुभ स्त्री सौंदर्यसंपन्न होती; तिचा जघनप्रदेश विस्तीर्ण होता; भिंवया उत्कृष्ट होत्या; मस्तकावरील केश कृष्णवर्ण व कुरुळे होते २७; गालांतल्या गालांत

भाति ऋजुयष्टिर्लता यथा २८ त्रैलोक्यसुन्दरी कान्ता सर्वचित्तप्रमाथिनी।
लक्ष्मीव पद्मरहिता चन्द्रज्योत्स्नेव निर्मला २९ रूपेणाप्यभवत्सा तु श्रियं
देवीमुमा यथा । द्योतयन्ती दिशः सर्वास्तथाभूत्सा वराङ्गना ३० एत-
स्मिन्नन्तरे देवो निवृत्तः सुरनायकः । पादावुपास्य देवस्य ब्रह्मणस्तेन वै
पथा ३१ तस्यामेव च वेलायामादित्योऽपि परिभ्रमन् । तस्मिन्नेव पदे
सोऽभूद्यस्मिन्सा तनुमध्यमा ३२ युगपत्सा तदा दृष्टा देवाभ्यां सुरसुन्दरी।
कंदर्पवशगौ तौ तु दृष्ट्वा तां संबभूवतुः ३३ ततः क्षुभितसर्वाङ्गौ सुरेन्द्रौ पन्न-
गाविव । तद्रूपमद्भुतं दृष्ट्वा त्याजितौ धैर्यमात्मनः ३४ ततस्तस्यां सुरेन्द्रेण
स्कन्नं शिरसि पातितम् । अनामाद्यैव तां नारीं संनिवृत्तमथाभवत् ३५ ततः
सा वानरपतिं जज्ञे वानरमीश्वरम् । अमोघरेतसस्तस्य वासवस्य महा-
त्मनः ३६ वालेषु पतितं बीजं वाली नाम बभूव सः । भास्करेणापि तस्यां
वै कंदर्पवशवर्तिना ३७ बीजं निषिक्तं ग्रीवायां विधानमनुवर्तता । तेनापि
सा वरतनुर्नोक्ता किंचिद्वचः शुभम् ३८ निवृत्तवदनश्चाथ सूर्योपि सम-

---

ती हंसत होती; तिचे स्तन पुष्ट होते आणि सरळ असलेल्या लतेप्रमाणें ती त्या सरोवराच्या तीरीं भासत होती २८ ती कांता त्रैलोक्यामध्यें सुंदर होती; सर्वांच्या मनाला ती क्षोभ उत्पन्न करणारी होती; पापरहित लक्ष्मी अथवा निर्मल चंद्रिकाच कीं काय अशी ती दिसत होती २९; रूपानें ती स्त्री देवी लक्ष्मीप्रमाणें आणि पार्वती-प्रमाणें होती आणि ती श्रेष्ठ स्त्री आपल्या तेजानें सर्व दिशा प्रकाशित करीत होती ३०. इतक्यांत ब्रह्मदेवाची चरणसेवा करून देवराज इंद्र त्या मार्गानें परत जात होता ३१ व त्याचवेळीं सूर्यही हिंडतां हिंडतां ज्या ठिकाणीं ती सुंदर स्त्री होती त्या ठिकाणीं आला ३२. देवांगनांपेक्षांही सुंदर असलेली ती स्त्री एकदम त्या उभयतांच्या दृष्टीं पडली असतां तिला अवलोकन करितांक्षणीं ते कामा-धीन झाले ३३. तदनंतर भुजंगाप्रमाणें त्या देवाधिपतींचें सर्व शरीर क्षुब्ध झालें आणि तें अद्भुत रूप अवलोकन करून त्यांना धीरही निघनासा झाला ३४. तदनंतर देव-राज इंद्राचें च्युत झालेलें वीर्य तिच्या मस्तकीं पडलें आणि तें वीर्य त्या स्त्रीच्या गर्भाशयाचे ठिकाणीं स्पर्श नकरितांच निवृत्त झालें ३५. परंतु, त्या स्त्रीला वानरांचा अधिपति असा एक समर्थ वानर झाला. अमोघ वीर्यानें युक्त असलेल्या त्या महात्म्या इंद्राचें ३६ वीर्य वालांचे ठिकाणीं ह्मणजे केसांचे ठिकाणीं पडल्यामुळें तो पुत्र वाली ह्या नांवानें प्रसिद्ध झाला. मदनाधीन झालेल्या सूर्याचेंही तिच्या ३७ मानेचे ठिकाणीं जें वीर्य च्युत झालें होतें त्याचाही तसाच प्रकार झाला. त्या सूर्यानेंही त्या सुंदरीशीं

पद्यत । ग्रीवायां पतितं बीजं सुग्रीवः समजायत ३९ एवमुत्पाद्य तौ वीरौ वानरेन्द्रौ महाबलौ । दत्त्वा तु काञ्चनीं मालां वानरेन्द्रस्य वालिनः ४० अक्षय्यां गुणसंपूर्णां शक्रस्तु त्रिदिवं ययौ । सूर्योऽपि स्वसुतस्यैव निरूप्य पवनात्मजम् ४१ कृत्येषु व्यवसायेषु जगाम सवितांम्बरम् । तस्यां निशायां व्युष्टायामुदिते च दिवाकरे ४२ स तद्वानररूपं तु प्रतिपेदे पुनर्नृप । स एव वानरो भूत्वा पुत्रौ स्वस्य प्लवङ्गमौ ४३ पिङ्गेक्षणौ हरिवरौ बलिनौ कामरूपिणौ । मधून्यमृतकल्पानि पायितौ तेन तौ तदा ४४ गृह्य ऋक्षरजास्तौ तु ब्रह्मणोऽन्तिकमागमत् । दृष्टर्क्षरजसं पुत्रं ब्रह्मा लोकपितामहः ४५ बहुशः सान्त्वयामास पुत्राभ्यां सहितं हरिम् । सान्त्वयित्वा ततःपश्चाद्देवदूतमथादिशत् ४६ गच्छ मद्वचनाद्दूत किष्किन्धां नाम वै शुभाम् । सा ह्यस्य गुणसंपन्ना महती च पुरी शुभा ४७ तत्र वानरयूथानि सुबहूनि वसन्ति च । बहुरत्नसमाकीर्णा वानरैः कामरूपिभिः ४८ पुण्यापुण्यवती दुर्गा चातुर्वर्ण्यपुरस्कृता । विश्वकर्मकृता दिव्या मन्नियोगाच्च शोभना ४९ तत्रर्क्षर-

---

काहींएक शुभ भाषण केलें नाहीं ३८ व वीर्यपात होतांक्षणीं त्याच ठिकाणीं कामवासनाही राहिली नाहीं. परंतु, तिच्या ग्रीवेचे ठिकाणीं ह्मणजे मानेचे ठिकाणीं सूर्याचें वीर्य पडल्यामुळें तिला पुत्र झाला व तो सुग्रीव ह्या नांवानें प्रसिद्ध झाला ३९. ह्याप्रमाणें त्या महाबलाढ्य व वीर वानराधिपतींना उत्पन्न केल्यावर ते उभयतांही तेथून निघून गेले. वानराधिपति वालीला अक्षय्य व गुणसंपन्न अशी एक सुवर्णाची माला देऊन इंद्र स्वर्गाला गेला आणि सूर्यही आपल्या पुत्राच्या कार्याविषयीं व उद्योगाविषयीं वायुपुत्राची योजना करून आकाशामध्यें निघून गेला. ती रात्र उलटून सूर्योदय झाल्यावर ४०,४१,४२, हे राजा, त्या ऋक्षराजाला पुनरपि वानराचें रूप प्राप्त झालें आणि वानर झाल्यावर त्यानेंच आपल्या वानरपुत्रांचा स्वीकार केला ४३. यथेष्ट रूप धारण करणारे आणि पिंगट नेत्रांनीं युक्त असलेले जे ते बलाढ्य वानरश्रेष्ठ त्यांना त्यानें अमृततुल्य मधुर फलांचा रस पाजिला ४४. नंतर तो ऋक्षरजस वानर त्या पुत्रांना घेऊन ब्रह्मदेवाकडे गेला. तेव्हां पुत्र ऋक्षरजस आलेला पाहून लोकपितामह ब्रह्मदेवानें ४५. पुत्रांसहवर्तमान त्या वानराचें अनेक वेळां सांत्वन केलें आणि सांत्वन केल्यानंतर एका देवदूताला तो ह्मणाला ४६ "हे दूता, माझ्या आज्ञेवरून तूं किष्किंधानामक शुभ नगरीला जा. ती सर्वगुणसंपन्न, विशाल व शुभ नगरी ह्याला योग्य आहे ४७. त्या ठिकाणीं वानरांचे पुष्कळच समुदाय रहात आहेत आणि बहु रत्नांनीं व्याप्त झालेली ती नगरी यथेष्ट रूप धारण करणाऱ्या वानरांनीं गजबजून गेलेली आहे ४८. त्या पवित्र नगरीमध्यें

जसं दृष्ट्वा सपुत्रं वानरर्षभम् । यूथपालान्समाहूय यांश्चान्यान्प्राकृतान्ह-
रीन् ५० तेषां संभाव्य सर्वेषां मदीयं जनसंसदि । अभिषेचय राजानमा-
रोप्य महदासने ५१ दृष्टमात्राश्च ते सर्वे वानरेण च धीमता । अस्यर्क्ष-
रजसो नित्यं भविष्यन्ति वशानुगाः ५२ इत्येवमुक्ते वचने ब्रह्मणा तं हरी-
श्वरम् । पुरतःकृत्य दूतोऽसौ प्रययौ तां पुरीं शुभाम् ५३ स प्रविश्या-
निलगतिस्तां गुहां वानरोत्तमम् । स्थापयामास राजानं पितामहनियो-
गतः ५४ राज्याभिषेकविधिना स्नातोऽथाभ्यर्चितस्तथा । स बद्धमुकुटः
श्रीमानभिषिक्तः स्वलंकृतः ५५ आज्ञापयामास हरीन्सर्वान्मुदितमानसः।
सप्तद्वीपसमुद्रायां पृथिव्यां ये प्लवङ्गमाः ५६ वालिसुग्रीवयोरेष एष चर्क्ष-
रजः पिता । जननी चैष तु हरिरित्येतद्भद्रमस्तु ते ५७ यश्चैतच्छ्रावयेद्वि-
द्वान्यश्चैतच्छृणुयान्नरः । सिध्यन्ति तस्य कार्यार्था मनसो हर्षवर्धनाः ५८
एतच्च सर्वं कथितं मया विभो प्रविस्तरेणेह यथार्थतस्तत् । उत्पत्तिरेषा रज-

---

बाजार आहे; तिच्यामध्यें इतरांचा प्रवेश होणें दुर्घट आहे; चातुर्वर्ण्यव्यवस्था त्या नगरींत आहे आणि माझ्या आज्ञेवरून ती शुभ व दिव्य नगरी विश्वकर्म्यानें निर्माण केली आहे ४९. त्या ठिकाणीं जाऊन पुत्रांसहवर्तमान ह्या वानरश्रेष्ठ ऋक्षरजाला तूं दाखीव आणि वानरगणांचें परिपालन करणारे व इतरही साधारण वानर बोलावून आण ५०. नंतर त्या सर्वांचा संमान कर आणि मोठ्या आसनावर बसवून जनसमु-जामध्यें ह्या माझ्या ऋक्षरजाला तूं राज्याभिषेक कर ५१. ह्या बुद्धिमान् वानराच्या दृष्टीं पडतांक्षणीं ते सर्वही नेहमीं ह्या ऋक्षरजाचे आज्ञाधारक होऊन रहातील" ५२. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें आज्ञा केली असतां त्या वानराधिपतीला पुढें करून तो दूत त्या शुभ नगरीमध्यें गेला आणि वायूप्रमाणें ज्याची गति आहे असा तो दूत त्या गुहेमध्यें गेल्यानंतर ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें त्यानें त्या वानरश्रेष्ठाला तेथें राज्याभिषेक केला ५३,५४. राज्याभिषेकविधीनें त्याचें स्नान व पूजन झाल्यानंतर त्या वैभवशाली ऋक्षरजानें उत्कृष्ट अलंकार धारण करून मस्तकीं मुकुट चढविला व नंतर त्याला अभि-षेक झाला ५५; आणि तदनंतर सप्तद्वीपें व समुद्र ह्यांनीं युक्त असलेल्या पृथ्वीमध्यें जे ह्मणून कांहीं वानर होते ते सर्वही मनामध्यें आनंदित झाले व त्या सर्वांना हा आज्ञा करूं लागला ५६. सारांश, हा ऋक्षरज वानरच वाली आणि सुग्रीव ह्यांचा पिता व माता होय. तुझें कल्याण असो ५७. हें आख्यान जो विद्वान् पुरुष श्रवण करील व दुसऱ्यांना सांगेल त्याचे सर्व उद्देश सिद्धीस जातील व त्याच्या मनाला आनंद देतील ५८. हे प्रभो, हें सर्व मीं तुला यथार्थ व सविस्तर कथन केलें आहे. सारांश, ही राक्षसांची

नीचराणामुक्ता तथैवेह हरीश्वराणाम् ५९ [ २००१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ ६ ॥

एतां श्रुत्वा कथां दिव्यां पौराणीं राघवस्तदा । भ्रातृभिः सहितो वीरो विस्मयं परमं ययौ १ राघवोऽथ ऋषेर्वाक्यं श्रुत्वा वचनमब्रवीत् । कथेयं महती पुण्या त्वत्प्रसादाच्छ्रुता मया २ बृहत्कौतूहले चास्मिन्संवृत्तो मुनिपुङ्गव । उत्पत्तिर्यादृशी दिव्या वालिसुग्रीवयोर्द्विज ३ किं चित्रं मम ब्रह्मर्षे सुरेन्द्रतपनावुभौ । जातौ वानरशार्दूलौ बलेन बलिनां वरौ ४ एवमुक्ते तु रामेण कुम्भयोनिरभाषत।एवमेतन्महाबाहो वृत्तमासीत्पुराकिल५अथापरां कथां दिव्यां शृणु राजन्सनातनीम् । यदर्थं राम वैदेही रावणेन पुरा हृता ६ तत्तेऽहं कीर्तयिष्यामि समाधिं श्रवणे कुरु । पुरा कृतयुगे राम प्रजापतिसुतं प्रभुम् ७ सनत्कुमारमासीनं रावणो राक्षसाधिपः । वपुषा सूर्यसंकाशं ज्वलन्तमिव तेजसा ८ विनयावनतो भूत्वा ह्यभिवाद्य कृताञ्जलिः । उक्तवान्रावणो राम तमृषिं सत्यवादिनम् ९ को ह्यस्मिन्प्रवरो लोके देवानां

---

व वानराधिपतींची उत्पत्ति मीं तुला कथन केली आहे ५९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

ही पुरातन दिव्य कथा श्रवण केल्यावर भ्रात्यांसहवर्तमान वीर रामाला अतिशय विस्मय वाटला १ आणि अगस्त्यमुनींचें भाषण श्रवण केल्यावर राम पुनरपि त्यांना ह्मणाला " ही मोठी पवित्र कथा आपल्या कृपेमुळें मीं श्रवण केली २. हे मुनिश्रेष्ठ, ह्यासंबंधानें मला मोठी उत्कंठाही प्राप्त झाली होती. परंतु, हे द्विज, वाली आणि सुग्रीव ह्यांची जी दिव्य उत्पत्ति झाली आहे ती लक्ष्यांत घेतली असतां हे उभयतां वानरश्रेष्ठ स्वसामर्थ्यानें सर्व बलवानांमध्यें श्रेष्ठ आहेत ह्याचें मला आतां आश्चर्य वाटत नाहीं. कारण, हे ब्रह्मर्षे, वाली व सुग्रीव हे उभयतां अनुक्रमें इंद्र व सूर्यच आहेत " ३,४. ह्याप्रमाणें रामानें भाषण केल्यानंतर अगस्त्यमुनि त्याला ह्मणाले " असें हे वर्तमान पूर्वी घडलें आहे खरें "५. आतां, हे राजा, दुसरी एक सनातन दिव्य कथा तूं श्रवण कर. हे रामा, पूर्वी रावणानें सीता कां हरण करून नेली ६ तें मी तुला सांगतों; तूं लक्ष्य देऊन ऐक. हे रामा, पूर्वी कृतयुगामध्यें कांतीनें सूर्यतुल्य असून तेजानें जसा कांहीं जळत असलेला ब्रह्मपुत्र प्रभु सनत्कुमार बसला असतांना राक्षसाधिपति रावणानें ७,८ विनयानें नम्र होऊन व हात जोडून त्या सत्यवादी ऋषीला अभिवंदन केलें आणि, हे रामा, तो रावण त्याला ह्मणाला ९ "ज्याचा आश्रय करून देव संग्रामामध्यें शत्रूंचा पराजय करितात

बलवत्तरः । यं समाश्रित्य विबुधा जयन्ति समरे रिपून् १० कं यजन्ति द्विजा नित्यं कं ध्यायन्ति च योगिनः । एतन्मे शंस भगवन्विस्तरेण तपोधन ११ विदित्वा हृद्गतं तस्य ध्यानदृष्टिर्महायशाः । उवाच रावणं प्रेम्णा श्रूयतामिति पुत्रक १२ यो वै भर्ता जगत्कृत्स्नं यस्योत्पत्तिं न विद्महे । सुरासुरैर्नतो नित्यं हरिर्नारायणः प्रभुः १३ यस्य नाभ्युद्भवो ब्रह्मा विश्वस्य जगतः पतिः । येन सर्वमिदं सृष्टं विश्वं स्थावरजङ्गमम् १४ तं समाश्रित्य विबुधा विधिना हरिमध्वरे । पिबन्ति ह्यमृतं चैव मानिताश्च यजन्ति तम् १५ पुराणैश्चैव वेदैश्च पञ्चरात्रैस्तथैव च । ध्यायन्ति योगिनो नित्यं क्रतुभिश्च यजन्ति तम् १६ दैत्यदानवरक्षांसि ये चान्ये चामरद्विषः । सर्वाञ्जयति सङ्ग्रामे सदा सर्वैः स पूज्यते १७ श्रुत्वा महर्षेस्तद्वाक्यं रावणो राक्षसाधिपः । उवाच प्रणतो भूत्वा पुनरेव महामुनिम् १८ दैत्यदानवरक्षांसि ये हताः समरेऽरयः । कां गतिं प्रतिपद्यन्ते किं च ते हरिणा हताः १९ रावणस्य वचः श्रुत्वा प्रत्युवाच महामुनिः । दैवतैर्निहता नित्यं

---

असा ह्या देवलोकामध्यें बलाढ्य कोण आहे ? १०; त्याचप्रमाणें द्विज कोणाचें नित्य यजन करीत असतात आणि योगिजन कोणाचें ध्यान करीत असतात हें, हे भगवन्, हे तपोधन, आपण मला सविस्तर कथन करा " ११. समाधीच्या योगानें ज्यांना सर्व ज्ञान आहे असे ते महायशस्वी मुनि त्या रावणाच्या मनांतील आशय जाणून प्रेमानें त्याला ह्मणाले " हे पुत्रा १२; संपूर्ण जगत् जो धारण करितो, ज्याची उत्पत्ति आह्मांला माहीत नाहीं, सुर व असुर ज्याला नेहेमीं प्रणाम करितात, संपूर्ण जगताचा अधिपति ब्रह्मदेव ज्याच्या नाभिकमलापासून उत्पन्न झाला आहे व ज्यानें हें सर्व चराचर विश्व उत्पन्न केलें आहे असा जो प्रभु नारायण श्रीहरि १३, १४ त्याचा आश्रय करून देव संग्रामामध्यें शत्रूंना जिंकीत असतात; यज्ञामध्यें सोमपानही त्याच्याच अश्रयानें त्यांना प्राप्त होत असतें; त्याच्याच आश्रयामुळें त्यांना मान मिळत असतो आणि द्विजही त्याचेंच यजन करीत असतात १५. पुराणें, वेद व पंचरात्रें ह्यांना अनुसरून योगिजन नित्य त्याचें ध्यान करीत असतात व क्रतूंच्या योगानें त्याचें यजन करीत असतात १६. दैत्य, दानव, राक्षस आणि इतरही देवशत्रु ह्या सर्वांचा तो संग्रामामध्यें पराजय करीत असतो आणि सर्वही सर्वदां त्याचें पूजन करीत असतात " १७. सनत्कुमारमहर्षींचें तें भाषण श्रवण केल्यावर राक्षसाधिपति रावण पुनरपि नम्र होऊन त्या महर्षींना ह्मणाला १८ " दैत्य, दानव आणि राक्षस हे जे शत्रु संग्रामामध्यें हरि मारीत असतो त्यांना कोणती गति प्राप्त होत असते ?" १९. रावणाचें भाषण श्रवण केल्यावर सनत्कुमारमहर्षि त्याला ह्मणाले

प्राप्नुवन्ति दिवःस्थलम् २० पुनस्तस्मात्परिभ्रष्टा जायन्ते वसुधातले । पूर्वार्जितैः सुखैर्दुःखैर्जायन्ते च म्रियन्ति च २१ये ये हताश्चक्रधरेण राजंस्त्रैलोक्यनाथेन जनार्दनेन । ते ते गतास्तन्निलयं नरेन्द्राः क्रोऽधोपि देवस्य वरेण तुल्यः २२ श्रुत्वा ततस्तद्वचनं निशाचरः सनत्कुमारस्य मुखाद्विनिर्गतम् । तथा प्रहृष्टः स बभूव विस्मितः कथं नु यास्यामि हरिं महाहवे२३[२०२४]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः७

एवं चिन्तयतस्तस्य रावणस्य दुरात्मनः । पुनरेवापरं वाक्यं व्याजहार महामुनिः १ मनसस्तेऽभिमतं यत्तद्भविष्यति महाहवे । सुखी भव महाबाहो कंचित्कालमुदीक्षय २ एवं श्रुत्वा महाबाहुस्तमृषिं प्रत्युवाच सः । कीदृशं लक्षणं तस्य ब्रूहि सर्वमशेषतः ३ राक्षसेशवचः श्रुत्वा स मुनिः प्रत्यभाषत । श्रूयतां सर्वमाख्यास्ये तव राक्षसपुङ्गव४स हि सर्वगतो देवः सूक्ष्मोऽव्यक्तः सनातनः । तेन सर्वमिदं व्याप्तं त्रैलोक्यं सचराचरम् ५ स भूमौ दिवि पाताले पर्वतेषु वनेषु च । स्थावरेषु च सर्वेषु नदीषु नगरीषु च ६

"देवांच्या हातून वध पावलेल्या दैत्यादिकांना नेहमीं स्वर्गप्राप्ति होत असते २०. तथापि, पुनरपि ते तेथून भ्रष्ट होऊन भूतलावर उत्पन्न होतात आणि पूर्वार्जित सुखदुःखांमुळें ते जन्ममरणांच्या फेऱ्यांत सांपडतात २१. परंतु, हे राजा, त्रैलोक्याधिपति चक्रधर जनार्दनाच्या हातून ज्यांचा ज्यांचा वध झाला आहे ते ते राजे वैकुंठाला गेलेले आहेत. सारांश, त्या देवाचा क्रोधही वराच्याच बरोबरीचा आहे" २२. सनत्कुमारांच्या मुखांतून निघालेलें हें भाषण श्रवण केल्यानंतर तो राक्षस आनंदित झाला आणि "महारणामध्यें तो हरी आपणांला कसा भेटेल" असा विचार मनांत आणून तो आश्चर्य करीत राहिला २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

ह्याप्रमाणें तो दुरात्मा रावण चिंताक्रांत होऊन बसला असतांना त्या महर्षींनीं पुनरपि त्याच्याशीं दुसरें भाषण केलें १. (ते ह्मणाले) "हे महापराक्रमी रावणा, कांहीं वेळ वाट पहा; ह्मणजे तुझ्या जें मनांत आहे तें महारणामध्यें सिद्धीस जाईल. तूं स्वस्थ रहा" २. हें ऐकून घेऊन तो महापराक्रमी रावण त्या ऋषींना ह्मणाला "त्याचें लक्षण कशाप्रकारचें आहे हें सर्व आपण मला निःशेष कथन करा" ३. राक्षसाधिपतीचें भाषण श्रवण केल्यानंतर ते मुनि त्याला ह्मणाले "हे राक्षसश्रेष्ठा, तूं श्रवण कर ४. तो देव सर्वव्यापी, सूक्ष्म, अव्यक्त व सनातन आहे आणि त्यानेंच चराचर प्राण्यांसहवर्तमान हें सर्व त्रैलोक्य व्यापिलें आहे ५. भूमि, स्वर्ग, पाताल, पर्वत, वनें, सर्व स्थावर

ओङ्कारश्चैव सत्यश्च सावित्री पृथिवी च सः। धराधरधरो देवो ह्यनन्त इति विश्रुतः ७ अहश्च रात्रिश्च उभे च संध्ये दिवाकरश्चैव यमश्च सोमः। स एव कालो ह्यनिलोऽनलश्च स ब्रह्मरुद्रेन्द्र स एव चापः ८ विद्योतति ज्वलति भाति लोकान्सृजन्त्ययं संहरति प्रशास्ति। क्रीडां करोत्यव्ययलोकनाथो विष्णुः पुराणो भवनाशकैकः ९ अथवा बहुनानेन किमुक्तेन दशानन। तेन सर्वमिदं व्याप्तं त्रैलोक्यं सचराचरम् १० नीलोत्पलदलश्यामः किंजल्कारुणवाससा। प्रावृट्काले यथा व्योम्नि सतडित्तोयदो यथा ११ श्रीमान्मेघवपुः श्यामः शुभः पङ्कजलोचनः। श्रीवत्सेनोरसा युक्तः शशाङ्ककृतलक्षणः १२ तस्य नित्यं शरीरस्था मेघस्येव शतह्रदाः। सङ्ग्रामरूपिणी लक्ष्मीर्देहमावृत्य तिष्ठति १३ न शक्यः स सुरैर्द्रष्टुं नासुरैर्न च पन्नगैः। यस्य प्रसादं कुरुते स वै तं द्रष्टुमर्हति १४ नहि यज्ञफलैस्तात न तपोभिस्तु संचितैः। शक्यते भगवान्द्रष्टुं न दानेन न चेज्यया १५ तद्भक्तैस्त-

---

प्रदेश, नद्या व नगरें ह्यांचे ठिकाणीं तोच आहे ६. प्रणव, सत्य, सावित्री व पृथ्वी तोच असून पर्वत धारण करणाराही तोच आहे आणि अनंत ह्मणून तोच देव प्रसिद्ध आहे ७. दिवस, रात्र, दोन्ही संध्या, सूर्य, यम, सोम, काल, वायु, अग्नि, ब्रह्मा, रुद्र, इंद्र व वरुण तोच आहे. विद्युल्लतेच्या रूपानें तोच चमकत असतो; अग्नीच्या रूपानें तोच जळत असतो व सूर्यादिकांच्या रूपानें तोच प्रकाशत असतो. लोकांचा उत्पादक, संहारक व शास्ता हाच असून हाच अक्षय व जगदीश विष्णु क्रीडा करीत असतो आणि हाच एक पुरुष संसाराचा नाश करीत असतो ८,९. अथवा, हे रावणा, हें पुष्कळ सांगून फल काय आहे ? चराचर प्राण्यांसहवर्तमान हें सर्व त्रैलोक्य त्यानें व्यापिलें आहे ( हें तूं लक्ष्यांत ठेव ) १०. कमलकेसराप्रमाणें त्याचें वस्त्र आरक्तवर्ण असून त्याची कांति नीलकमलाच्या पाकळ्यांप्रमाणें श्यामवर्ण आहे आणि वर्षाऋतूंमध्यें आकाशांत असलेल्या विद्युद्युक्त मेघाप्रमाणें तो झळकत आहे ११. त्या शुभ, श्रीमान् व श्यामवर्ण विष्णूचें शरीर मेघाप्रमाणें आहे; त्याचे नेत्र कमलाप्रमाणें आहेत; त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सलांछन आहे आणि अर्धचंद्राकारचिन्हांनेंही तो युक्त आहे १२. मेघाचे ठिकाणीं वास्तव्य करीत असलेल्या विद्युल्लतांप्रमाणें वीरपुरुष त्याच्या शरीराचे ठिकाणीं नेहेमीं वास्तव्यच करीत आहेत; आणि संग्रामरूपिणी लक्ष्मी तर त्याचा देह व्यापूनच राहिली आहे १३. देव, दैत्य आणि भुजंग ह्यांनाही त्याचें दर्शन होणें शक्य नाहीं; ज्याच्यावर हा कृपा करितो त्याला ह्याचें दर्शन होणें शक्य असतें १४. बा रावणा, यज्ञफलें, संचित तपें; दान व यजन ह्या साधनांनीं भगवानाचें दर्शन होणें

हृतप्राणैस्ताश्चि नैस्तत्परायणैः । शक्यते भगवान्द्रष्टुं ज्ञाननिर्दग्धकिल्बिषैः १६ अथवा पृच्छ रक्षेन्द्र यदि तं द्रष्टुमिच्छसि । कथयिष्यामि ते सर्वं श्रूयतां यदि रोचते १७ कृते युगे व्यतीते वै मुखे त्रेतायुगस्य तु । हितार्थं देवमर्त्यानां भविता नृप विग्रहः १८ इक्ष्वाकूणां च यो राजा भाव्यो दशरथो भुवि । तस्य सूनुर्महातेजा रामो नाम भविष्यति १९ महातेजा महाबुद्धिर्महाबलपराक्रमः । महाबाहुर्महासत्त्वः क्षमया पृथिवीसमः २० आदित्य इव दुष्प्रेक्ष्यः समरे शत्रुभिस्तदा । भविता हि तदा रामो नरो नारायणः प्रभुः २१ पितुर्नियोगात्स विभुर्दण्डके विविधे वने । विचरिष्यति धर्मात्मा भ्रात्रा सह महामनाः २२ तस्य पत्नी महाभागा लक्ष्मी सीतेति विश्रुता । दुहिता जनकस्यैषा उत्थिता वसुधातलात् २३ रूपेणाप्रतिमा लोके सर्वलक्षणलक्षिता । छायेवानुगता रामं निशाकरमिव प्रभा २४ शीलाचारगुणोपेता साध्वी धैर्यसमन्विता । सहस्रांशो रश्मिरिव ह्येका मूर्तिरिव स्थिता २५ एवं ते सर्वमाख्यातं मया रावण विस्त-

---

शक्य नाहीं १५ त्याचे जे भक्त असतील, त्याच्यावरच ज्यांचे प्राण अवलंबून असतील, त्याच्याकडेच ज्यांचें चित्त वेधून गेलें असेल, तोच ज्यांचा आश्रय असेल आणि ज्ञानाच्या योगानें ज्यांचें पातक दग्ध झालें असेल त्यांनाच त्या भगवानाचें दर्शन होणें संभवनीय आहे १६. अथवा, हे राक्षसाधिपते, त्याचें दर्शन घेण्याची तुझी इच्छा असेल तर सांग. हवें असेल तर मी सर्व कांहीं तुला सांगतों १७. कृतयुग संपल्यावर त्रेतायुगाचे आधीं देव आणि मानव ह्यांच्या हिताकरितां, हे राजा, संग्राम होईल १८. इक्ष्वाकुवंशामध्यें दशरथ ह्मणून जो राजा भूतलावर होणार आहे त्याला राम ह्मणून एक महातेजस्वी पुत्र होईल १९. तो महातेजस्वी, महाबुद्धिमान्, महाबलाढ्य, महापराक्रमी, आजानुबाहु, महाधैर्यवान् आणि क्षमेनें पृथ्वीची बरोबरी करणारा होईल २०. मनुष्ययोनीमध्यें राम ह्मणून उत्पन्न झालेला प्रभु नारायण सूर्याप्रमाणें संग्रामामध्यें शत्रूंनीं अवलोकन करण्यासही भयंकर होईल २१. तो महाशैव व धर्मात्मा प्रभु राम पित्याच्या आज्ञेमुळें भ्रात्यासहवर्तमान दंडकारण्यांतील नानाप्रकारच्या वनांत संचार करील २२. महाभाग्यवती लक्ष्मी सीता ह्मणून त्याची प्रसिद्ध पत्नी होईल आणि भूतलांतून उत्पन्न होणारी ही सीता जनकाची कन्या होईल २३. ती सर्व लक्षणसंपन्न होईल, रूपानें जगतामध्यें अप्रतिम होईल आणि चंद्राबरोबर राहणाऱ्या प्रभेप्रमाणें ती नेहमीं छायेचें अनुकरण करून रामाबरोबर राहील २४. सुशील, आचारसंपन्न, गुणयुक्त, साध्वी, पतिव्रता आणि धैर्ययुक्त अशी ती सीता सूर्याचें एक मूर्तिमान् किर-

रात् । महतो देवदेवस्य शाश्वतस्याव्ययस्य च २६ एवं श्रुत्वा महाबाहू राक्षसेन्द्रः प्रतापवान् । त्वया सह विरोधेच्छुश्चिन्तयामास राघव २७ सनत्कुमारात्तद्वाक्यं चिन्तयानो मुहुर्मुहुः । रावणो मुमुदे श्रीमान्युद्धार्थी विचचार ह २८ श्रुत्वा च तां कथां रामो विस्मयोत्फुल्ललोचनः । शिरश्चालनं कृत्वा विस्मयं परमं गतः २९ श्रुत्वा तु वाक्यं स नरेश्वरस्तदा मुदा युतो विस्मयमानचक्षुः । पुनश्च तं ज्ञानवतां प्रधानमुवाच वाक्यं वद मे पुरातनम् ३० [२०५४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ ८ ॥

ततः पुनर्महातेजाः कुम्भयोनिर्महायशाः । उवाच रामं प्रणतं पितामह इवेश्वरम् १ श्रूयतामिति चोवाच रामं सत्यपराक्रमम् । कथाशेषं महातेजाः कथयामास स प्रभुः २ यथाख्यानं श्रुतं चैव यथा वृत्तं यथातथा । प्रीतात्मा कथयामास राघवाय महामतिः ३ एतदर्थं महाबाहो रावणेन दुरात्मना । सुता जनकराजस्य हृता राम महामते ४ एतां कथां महा-

णच कीं काय भरी होऊन राहील २५. हे रावणा, ह्याप्रमाणें मी तुला महात्म्या सनातन व अक्षय्य अशा देवाधिदेवासंबंधानें सर्व कथन केलें २६; व त्याप्रमाणें श्रवण केल्यानंतर हे राघवा, तो महापराक्रमी राक्षसाधिपति तुझ्याशीं विरोध करण्याच्या बुद्धीनें विचार करूं लागला" २७. सनत्कुमार मुनींचें तें भाषण वारंवार लक्ष्यांत आणून वैभवशाली रावण आनंदित झाला आणि युद्धाकरितां संचार करूं लागला २८. ती कथा श्रवण केल्यावर रामाचेही नेत्र विस्मयानें प्रफुल्लित झाले आणि मस्तक डोलवून तो फारच आश्चर्यचकित झाला २९. सारांश, तें भाषण श्रवण केल्यानंतर तो राजा आनंदित झाला; त्याची दृष्टि विस्मयचकित झाली आणि पुनरपि ज्ञानवानांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या अगस्तिमुनींना तो ह्मणाला "मला पुरातन इतिहास सांगा" ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

तदनंतर पुनरपि महातेजस्वी व महायशस्वी अगस्तिमुनि, ब्रह्मदेव ज्याप्रमाणें शंकराला सांगतो त्याप्रमाणें, नम्र झालेल्या रामाला ह्मणाले १. "श्रवण कर" असें ते सत्यपराक्रमी रामाला प्रथम ह्मणाले आणि ते महातेजस्वी प्रभु अगस्त्यमुनि त्याला अवशिष्ट इतिहास कथन करूं लागले २. मनामध्यें प्रसन्न झालेले ते महाविचारी अगस्त्यमुनि जसें घडलें होतें आणि जसें तें आख्यान प्रसिद्ध होतें तसें त्याला सांगूं लागले ३. ( ते ह्मणाले ) "हे महापराक्रमी व महाविचारी रामा, ह्याकरितां दुरात्म्या रावणानें जनकराजाची कन्या हरण करून नेली ४. हे अजिंक्य व महापराक्रमी

बाहो नारदः सुमहायशाः । कथयामास दुर्धर्ष मेरौ गिरिवरोत्तमे ५ देव-
गन्धर्वसिद्धानामृषीणां च महात्मनाम् । कथाशेषं पुनः सोऽथ कथया-
मास राघव ६ नारदः सुमहातेजाः प्रहसन्निव मानद । तां कथां शृणु
राजेन्द्र महापापप्रणाशनीम् ७ यां तु श्रुत्वा महाबाहो ऋषयो दैवतैः सह ।
ऊचुस्तं नारदं सर्वे हर्षपर्याकुलेक्षणम् ८ यश्चेमां श्रावयन्नित्यं शृणुयाद्वापि
भक्तितः । स पुत्रपौत्रवान्राम स्वर्गलोके महीयते ९ [ २०६३ ] इत्यार्षे
श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥९॥

ततः स राक्षसो राम पर्यटन्पृथिवीतले । विजयार्थी महाशूरैः राक्षसैः
परिवारितः १ दैत्यदानवरक्षःसु यं शृणोति बलाधिकम् । तमाह्वयति
युद्धार्थी रावणो बलदर्पितः २ एवं स पर्यटन्सर्वां पृथिवीं पृथिवीपते ।
ब्रह्मलोकान्निवर्तन्तं समासाद्याथ रावणः ३ व्रजन्तं मेघपृष्ठस्थमंशुमन्त-
मिवापरम् । तमभिसृत्य प्रीतात्मा ह्यभिवाद्य कृताञ्जलिः ४ उवाच हृष्ट-
मनसा नारदं रावणस्तदा । आब्रह्मभुवनं लोकास्त्वया दृष्टा ह्यनेकशः ५

---

रामा, अत्यंत महाकीर्तिमान् नारदमुनींनीं सर्वोत्कृष्ट मेरुपर्वतावर महात्मे देव, गंधर्व, सिद्ध व ऋषि ह्यांना ही कथा सांगितली आणि हे मान्य राघवा, अवशिष्ट राहिलेली ही कथा त्या महातेजस्वी नारदमुनींनीं हंसत हंसत त्यांना कथन केली. हे राजाधिराज, ही महापापनाशक कथा तूं श्रवण कर ५, ६, ७. हे महापराक्रमी रामा, ही कथा श्रवण केल्यानंतर ऋषि आणि देव हे सर्वही आनंदाश्रूंनीं नेत्र भरून आले असतां नारदाची प्रशंसा करूं लागले ८. हे रामा, ही कथा जो भक्तीनें दुसऱ्याला सांगल अथवा श्रवण करील तो पुत्रपौत्रवान् होईल व स्वर्गलोकामध्यें त्याची प्रशंसा होईल ९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

तदनंतर, हे रामा, विजयाकरितां तो राक्षस महाशूर राक्षसांसहवर्तमान पृथ्वीवर पर्यटन करूं लागला १. बलाविषयीं अभिमान झालेल्या त्या युद्धेच्छु रावणानें दैत्य, दानव व राक्षस ह्यांमध्यें जो महाबलाढ्य म्हणून कानावर येईल, त्याला युद्धार्थ आव्हान करण्याचा क्रम चालविला २. ह्याप्रमाणें, हे भूपते, तो रावण सर्व पृथ्वीवर संचार करूं लागला असतां ब्रह्मलोकापासून परत येत असलेले नारदमुनि त्याच्या दृष्टीस पडले ३. ते नारदमुनि चालले असतांना मेघपृष्ठावर आरूढ झालेला प्रतिसूर्यच कीं काय असे दिसत होते. त्यांच्याजवळ जाऊन, त्यांना अभिवंदन करून आणि हात जोडून ४ प्रसन्न मनानें तो रावण त्या नारदमुनींना म्हणाला "ब्रह्मलोकापुढांसर्व लोक आपण अनेक वेळां अवलो-

कस्मिल्लँोके महाभाग मानवा बलवत्तराः । योद्धुमिच्छामि तैः सार्धं यथाकामं यदृच्छया ६ चिन्तयित्वा मुहूर्तं तु नारदः प्रत्युवाच तम् । अस्ति राजन्महाद्वीपं क्षीरोदस्य समीपतः ७ तत्र ते चन्द्रसंकाशा मानवाः सुमहाबलाः । महाकाया महावीर्या मेघस्तनितनिःस्वनाः ८ महामात्रा धैर्यवन्तो महापरिघबाहवः । श्वेतद्वीपे मया दृष्टा मानवा राक्षमाधिप ९ बलवीर्यसमोपेतान्यादृशांस्त्वमिहेच्छसि । नारदस्य वचः श्रुत्वा रावणः प्रत्युवाच ह १० कथं नारद जायन्ते तस्मिन्द्वीपे महाबलाः । श्वेतद्वीपे कथं वासः प्राप्तस्तैस्तु महात्मभिः ११ एतन्मे सर्वमाख्याहि प्रभो नारद तत्त्वतः । त्वया दृष्टं जगत्सर्वं हस्तामलकवत्सदा १२ रावणस्य वचः श्रुत्वा नारदः प्रत्युवाच ह । अनन्यमनसो नित्यं नारायणपरायणाः १३ तदाराधनसक्ताश्च तच्चित्तास्तत्परायणाः । एकान्तभावानुगतास्ते नरा राक्षमाधिप १४ तच्चित्तास्तद्गतप्राणा नरा नारायणं सदा । श्वेतद्वीपे तु तैर्वास अर्जितः

---

कन केले आहेत ५. तस्मात्, हे महाभाग्यवान् मुने, महाबलाढ्य मानव कोणत्या लोकीं आहेत? त्यांच्या सहवर्तमान यथेष्ट युद्ध करण्याची मला सहज इच्छा झाली आहे" ६. यावर क्षणभर विचार करून नारदमुनि त्याला ह्मणाले "हे राजा, क्षीरसागरासमीप एक महाद्वीप आहे ७. त्याठिकाणीं ते महाबलाढ्य, अतिशय धिप्पाड, महावीर्यवान् आणि मेघगर्जनेप्रमाणें गर्जना करणारे व कांतीनें चंद्राप्रमाणें असणारे मानव आहेत८. हे राक्षसाधिपते, श्वेतद्वीपामध्यें जे मानव माझ्या दृष्टीस पडले ते शरीरानें अतिशय मोठे होत, धैर्यवान् होते, आणि मोठ्या मोठ्या अडसरांप्रमाणें त्यांचे बाहु होते ९. सारांश, जसे बलाढ्य व वीर्यवान् मानव सांप्रत तुला हवे आहेत, तशा प्रकारचे ते आहेत." नारदमुनींचें भाषण श्रवण केल्यानंतर रावण पुन्हां त्यांना ह्मणाला १० "हे नारदमुने, त्या द्वीपामध्य महाबलाढ्य मानव कसे उत्पन्न होतात? आणि त्या महात्म्यांचें श्वेतद्वीपामध्यें वास्तव्य कसें होत? ११ हें, हे प्रभो नारदमुने, आपण सर्व खरें खरें मल. कथन करा. सर्व जगत् करतलामलकवत् आपण सर्वदां अवलोकन करीत असतां" १२. रावणाचें भाषण श्रवण केल्यानंतर नारदमुनि त्याला ह्मणाले "अनन्यभावानें जे नेहमीं नारायणाचा आश्रय करून राहतात१३, त्याच्या आराधनेमध्यें जे तल्लीन झालेले असतात नेहमीं नारायणाविषयींच तत्पर राहून ज्यांचें मनही त्याच्याकडे वेधून राहिलेलें असतें आणि निश्चयानें ज्यांनीं नारायणाचेंच अवलंबन केलेलें असतें ते, हे राक्षसाधिपते, श्वेतद्वीपांतील मानव होत १४. ते मानव सर्वदां नारायणाचेंच चिंतन करीत असतात; त्यांनीं आपले प्राणही नारायणालाच अर्पण केलेले आहेत आणि ह्मणूनच त्या महात्म्यांनीं श्वेतद्वीपामध्यें

सुमहात्मभिः १५ ये हता लोकनाथेन शार्ङ्गमानस्य संयुगे । चक्रायुधेन देवेन तेषां वासस्त्रिविष्टपे १६ नहि यज्ञफलैस्तात न तपोभिर्न संयमैः । न च दानफलैर्मुख्यैः स लोकः प्राप्यते सुखम् १७ नारदस्य वचः श्रुत्वा दशग्रीवः सुविस्मितः । ध्यात्वा तु सुचिरं कालं तेन योत्स्यामि संयुगे १८ आपृच्छ्य नारदं प्रायाच्छ्वेतद्वीपाय रावणः । नारदोऽपि चिरं ध्यात्वा कौतूहलसमन्वितः १९ दिदृक्षुः परमाश्चर्यं तत्रैव त्वरितं ययौ । स हि केलिकरो विप्रो नित्यं च समरप्रियः २० रावणोऽपि ययौ तत्र राक्षसैः सह राघव । महता सिंहनादेन दारयन्स दिशो दश २१ गते तु नारदे तत्र रावणोऽपि महायशाः । प्राप्य श्वेतं महाद्वीपं दुर्लभं यत्सुरैरपि २२ तेजसा तस्य द्वीपस्य रावणस्य बलीयसः । तत्तस्य पुष्पकं यानं वातवेगसमाहतम् २३ अवस्थातुं न शक्नोति वाताहत इवाम्बुदः । सचिवा राक्षसेन्द्रस्य द्वीपमासाद्य दुर्दृशम् २४ अब्रुवन्रावणं भीता राक्षसा जातसाध्वसाः । राक्षसेन्द्र वयं मूढाः भ्रष्टसंज्ञा विचेतसः २५ अवस्थातुं न शक्ष्यामो युद्धं

---

वास्तव्य प्राप्त करून घेतलें आहे १५. शार्ङ्ग धनुष्य नमवून संग्रामामध्यें चक्रधर जगदीश देवानें ज्यांचा वध केला असेल त्यांचें वास्तव्य स्वर्गामध्यें होत असतें १६. बा रावणा, यज्ञफलें, तपश्चर्या, इंद्रियनिग्रह व उत्कृष्ट दानफलें ह्यांच्या योगानें तो सुखरूप लोक प्राप्त होत नाहीं " १७. नारदाचें भाषण श्रवण केल्यावर रावण अतिशय विस्मित झाला आणि फारच वेळ विचार केल्यानंतर " संग्रामामध्यें मी त्यांच्यासहवर्तमान युद्ध करीन " असा उद्देश मनांत धरून १८ व नारदमुनींचा निरोप घेऊन तो रावण श्वेतद्वीपाकडे निघाला. नंतर बराच वेळ विचार केल्यावर नारदमुनिही कांहींतरी मोठा आश्चर्यकारक प्रकार घडेल असें समजून तो पहाण्याकरितां मोठ्या उत्कंठेनें सत्वर तिकडे चालते झाले. कारण, त्या विप्राला संग्राम प्रिय असून कांहीं तरी खेळ करणें हा त्याचा स्वभावच आहे १९,२०. हे राघवा, भयंकर सिंहनादानें दशदिशा दणाणून टाकीत टाकीत रावणही राक्षसांसहवर्तमान तिकडे निघून गेला २१. नारदमुनि गेल्यानंतर महायशस्वी रावण देवांनाही दुर्लभ अशा मोठ्या श्वेतद्वीपासमीप आला २२. त्या द्वीपाच्या तेजानें आणि वायुवेगानें बलाढ्य रावणाचें तें पुष्पक विमान वायूचा तडाका बसलेल्या मेघाप्रमाणें एके ठिकाणीं राहणें अशक्य झालें. राक्षसाधिपति रावणाचे मंत्रि ज्याच्याकडे दृष्टि देणेंही अशक्य आहे अशा त्या द्वीपासमीप आल्यानंतर २३,२४ त्या राक्षसांना भीति उत्पन्न झाली आणि घाबरून जाऊन ते रावणाला म्हणाले हे राक्षसाधिपते, आह्मी मूढ झालों आहों, आमची शुद्ध नाहींशी झाली आहे व आमचें

कर्तुं कथञ्चन । एवमुक्त्वा दुद्रुवुस्ते सर्व एव निशाचराः २६ रावणोऽपि हि तद्यानं पुष्पकं हेमभूषितम् । विसर्जयामास तदा सह तैः क्षणदाचरैः २७ गतं तु पुष्पके राम रावणो राक्षसाधिपः । कृत्वा रूपं महाभीमं सर्वराक्षसवर्जितः २८ प्रविवेश तदा तस्मिञ्श्वेतद्वीपे स रावणः । प्रविशन्नेव तत्राशु नारीभिरुपलक्षितः २९ एकया सस्मितं कृत्वा हस्ते गृह्य दशाननम् । पृष्टश्चागमनं ब्रूहि किमर्थमिह चागतः ३० को वा त्वं कस्य वा पुत्रः केन वा प्रहितो वद । इत्युक्तो रावणो राजन्क्रुद्धो वचनमब्रवीत् ३१ अहं विश्रवसः पुत्रो रावणो नाम राक्षसः । युद्धार्थमिह संप्राप्तो न च पश्यामि कञ्चन ३२ एवं कथयतस्तस्य रावणस्य दुरात्मनः । प्राहसंस्त ततः सर्वे सुस्वनं युवतीजनाः ३३ तासामेका ततः क्रुद्धा बालवद्गृह्य लीलया । भ्रामितस्तु सखीमध्ये मध्ये गृह्य दशाननम् ३४ सखीमन्यां समाहूय पश्य त्वं कीटकं धृतम् । दशास्यं विंशतिभुजं कृष्णाञ्जनसमप्रभम् ३५ हस्ताद्धस्तं स च

---

सरही थाऱ्यावर नाहीं २५; युद्धाकरितां कोणत्याही रीतीनें टिकाव धरण्यास आह्मी समर्थ नाहीं." ह्याप्रमाणें त्याला सांगून ते सर्वही निशाचर पळून गेले २६. परंतु, सुवर्णभूषणांनीं भूषित असलेल्या त्या पुष्पक विमानाला त्या राक्षसांसहवर्तमान त्या रावणानें अनुज्ञा दिली असतां २७ तें पुष्पक विमान निघून गेलें. नंतर, हे रामा, राक्षसांपैकीं कोणीही ज्याच्याबरोबर नाहीं असा तो राक्षसाधिपति रावण अतिभयंकर रूप धारण करून २८ त्या श्वेतद्वीपामध्यें प्रविष्ट झाला. परंतु, प्रविष्ट होतां होतांच तेथील स्त्रियांनीं त्याला अवलोकन केलें २९. त्यांतील एकीनें गालांतल्यागालांत हसून रावणाचा हात धरिला आणि "तूं येथें कशाकरितां आलास, तें सांग" ह्मणून आगमनाचें कारण त्यास विचारिलें ३०; आणि तूं कोण ? कोणाचा पुत्र ? व तुला कोणी पाठविलें आहे तें सांग" असें तिनें विचारिलें असतां तो रावण क्रुद्ध होऊन तिला ह्मणाला ३१ "मी विश्रवसाचा पुत्र रावणनामक राक्षस आहे व मी युद्धाकरितां येथें आलों आहें; परंतु, मला कोणीही (युद्ध करणारा) दिसत नाहीं"३२. ह्याप्रमाणें तो दुरात्मा रावण तीस सांगूं लागला असतां त्या सर्वही तरुणी स्त्रिया उच्च स्वरानें हसूं लागल्या ३३. तदनंतर, त्यांपैकीं एक क्रुद्ध झाली आणि लहान मुलें ज्याप्रमाणें लीलेनें एकादा कीटक मध्यें धरितात त्याप्रमाणें रावणाला मध्यें धरून तिनें आपल्या सख्यांमध्यें गरगर फिरविलें ३४ आणि दुसऱ्या सखीला हाक मारून ती ह्मणाली "मी एक किडा धरिला आहे, हा तूं पहा. ह्याला दहा तोंडें आहेत, वीस हात आहेत आणि अगदीं काजळाप्रमाणें ह्याची कांति आहे !" ३५. एका हातांतून दुसऱ्या हातांत

क्षिप्तो भ्राम्यते भ्रमत्लालमः । भ्राम्यमाणेन बलिना राक्षसेन विपश्चिता ३६ पाणाविकाथ संदष्टा रोषेण वनिता शुभा । मुक्तस्तया शुभः कीटो धुन्वन्त्या हस्तवेदनात् ३७ गृहीत्वान्या तु रक्षेन्द्रमुत्पपात विहायसा । ततस्तामपि संक्रुद्धो विददार नखैर्भृशम् ३८ तया सह विनिर्धूतः सहसैव निशाचरः । पपात सोऽम्भसो मध्ये सागरस्य भयातुरः ३९ पर्वतस्येव शिखरं यथा वज्रविदारितम् । प्रापतत्सागरजले तथासौ विनिपातितः ४० एवं स रावणो राम श्वेतद्वीपनिवासिभिः । युवतीभिर्विगृह्याशु भ्रामितश्च ततस्ततः ४१ नारदोऽपि महातेजा रावणं प्रेक्ष्य धर्षितम् । विस्मयं सुचिरं कृत्वा प्रजहास ननर्त च ४२ एतदर्थं महाबाहो रावणेन दुरात्मना । विज्ञायापहृता सीता त्वत्तो मरणकाङ्क्षया ४३ भवान्नारायणो देवः शङ्खचक्रगदाधरः । शार्ङ्गपद्मायुधो वज्री सर्वदेवनमस्कृतः ४४ श्रीवत्साङ्को हृषीकेशः सर्वदेवाभिपूजितः । पद्मनाभो महायोगी भक्तानामभयप्रदः ४५ वधार्थं रावणस्य त्वं प्रविष्टो मानुषीं तनुम् । किं न वेत्सि त्वमात्मानं यथा नारा-

---

त्या स्त्रिया त्यास झेलू लागल्या असतां व गरगर फिरवू लागल्या असतां त्याला भोंड येऊ लागली ३६. तथापि त्या त्यास फिरवीत असतांना तो विचारी बलाढ्य राक्षस रागारागानें एका शुभ स्त्रीच्या हाताला चावला. तेव्हां हाताला वेदना झाल्याबरोबर हात झाडीत झाडीत तिनें तो चांगला कीटक टाकून दिला ३७. परंतु, त्या राक्षसाधिपतीस हातांत धरून दुसरी एक स्त्री आकाशमार्गानें जाऊं लागली असतां क्रुद्ध होऊन तिलाही त्यानें नखांनीं अतिशय बोचकारिलें ३८. तेव्हां तिनेंही एकदम हात झाडून त्याला टाकिलें असतां भयानें व्याकुळ झालेला तो निशाचर एकाएकीं समुद्राच्या उदकामध्यें पडला ३९. वज्रानें विदीर्ण झालेलें पर्वताचें शिखरच कीं काय असा तो रावण समुद्राच्या उदकामध्यें पडला ४०. हे रामा, ह्याप्रमाणें श्वेतद्वीपामध्यें वास्तव्य करणाऱ्या तरुणी स्त्रियांनीं त्या रावणाला धरून ठिकठिकाणीं फिरविलें ४१. तेव्हां महातेजस्वी नारदमुनिही पराजित झालेल्या रावणासमीप येऊन व फारच वेळ आश्चर्य करून हर्षपूर्वक नाचूं लागले ४२. असो. हे महापराक्रमी रामा, ह्याकरितां दुरात्म्या रावणानें तुझ्यापासून मरण यावें ह्या उद्देशानें जाणूनबुजून सीतेचा अपहार केला ४३. तूं शंख, चक्र, गदा, शार्ङ्ग धनुष्य, पद्म व वज्र धारण करणारा देव नारायण असून सर्व देवांना पूज्य आहेस ४४, श्रीवत्सलांछनानें तूं युक्त आहेस, इंद्रियांचा तूं अधिपति आहेस, सर्व देव तुझें पूजन करीत असतात, तूं पद्मनाभ व महायोगी असून भक्तांना अभय देणारा आहेस ४५ आणि रावणाच्या वधाकरितां तूं मनुष्य योनीमध्यें प्रविष्ट झाला आहेस. "स्वतः नारायण

यणो ह्यहम् ४६ मा मुह्यस्व महाभाग स्मर चात्मानमात्मना । गुह्याद्गुह्यतरस्त्वं हि ह्येवमाह पितामहः ४७ त्रिगुणश्च त्रिवेदी च त्रिधामा च त्रिराघव । त्रिकालकर्म त्रैविद्य त्रिदशारिप्रमर्दन ४८ भयाक्रान्तास्त्रयो लोकाः पुराणैर्विक्रमैस्त्रिभिः । त्वं महेन्द्रानुजः श्रीमान्बलिबन्धनकारणात् ४९ अदित्या गर्भसंभूतो विष्णुस्त्वं हि सनातनः । लोकाननुग्रहीतुं वै प्रविष्टो मानुषीं तनुम् ५० तदिदं साधितं कार्यं सुराणां सुरसत्तम । निहतो रावणः पापः सपुत्रगणबान्धवः ५१ प्रहृष्टाश्च सुराः सर्वे ऋषयश्च तपोधनाः । प्रशान्तं च जगत्सर्वं त्वत्प्रसादात्सुरेश्वर ५२ सीता लक्ष्मीर्महाभागा संभूता वसुधातलात् । त्वदर्थमिह चोत्पन्ना जनकस्य गृहे प्रभो ५३ लङ्कामानीय यत्नेन मातेव परिरक्षिता । एवमेतत्समाख्यातं तव राम महायशः ५४ ममापि नारदेनोक्तमृषिणा दीर्घजीविना । यथा सनत्कुमारेण व्याख्यातं तस्य रक्षसः ५५ तेनापि च तदेवाशु कृतं सर्वमशेषतः । यश्चैतच्छ्रावयेच्छ्राद्धे विद्वान्ब्राह्मणसंनिधौ ५६ अन्नं तदक्षयं दत्तं पितॄणामुपतिष्ठति । एतां श्रुत्वा कथां दिव्यां रामो राजीवलोचनः ५७ परं विस्मयमापन्नो

---

आहेस, हें तूं जाणीत नाहींस काय ? ४६. हे महाभाग्यवान् रामा, तूं मोहयुक्त होऊं नकोस. आपण कोण आहों, याचा स्वतः विचार कर. तूं गुह्यापेक्षांही गुह्य आहेस असें ब्रह्मदेवांनीं सांगितलें आहे ४७. त्रिगुण, त्रिवेदि, त्रिधाम, त्रिराघव, त्रिकालकर्म, त्रैविद्य व देवशत्रुनाशक तूंच असून ४८ पुरातन तीन पावलांच्या योगानें तूं त्रैलोक्य भयभीत करून टाकिलें आहेस. बलीचा निग्रह करण्याकरितां तूं श्रीमान् सनातन विष्णुच इंद्राच्या मागून अदितीच्या उदरीं आला आहेस आणि लोकांवर अनुग्रह करण्याकरितां तूं सांप्रत मनुष्यरूप धारण केलें आहेस ४९, ५०. हे सुरश्रेष्ठा, ज्याअर्थी पुत्रगण व बांधव ह्यांसहवर्तमान पापी रावणाचा वध झाला आहे त्याअर्थी देवांचें हें कार्य सिद्धीस गेलें आहे ५१, सर्व देव आणि तपोधन ऋषि संतुष्ट झाले असून, हे सुरेश्वरा, तुझ्या प्रसादामुळें सर्व जगताला स्वस्थता प्राप्त झाली आहे ५२. हे प्रभो, महाभाग्यवती लक्ष्मी तुझ्याकरितां भूतलापासून सीतेच्या रूपानें येथें जनकगृहीं उत्पन्न झाली आहे ५३ व तिला यत्नानें लंकेमध्यें नेऊन रावणानें मातृप्रमाणें तिचें रक्षण केलें आहे. हे महाकीर्तिमान् रामा, हें मीं तुला कथन केलें ५४. मलाही चिरंजीवी नारदऋषींनीं हें सांगितलें होतें. सनत्कुमार मुनींनीं त्या राक्षसाला जें सांगितलें ५५ तें त्यानेंही सर्व पूर्णपणें सत्वर शेवटास नेलें. श्राद्धसमयीं ब्राह्मणांच सन्निध जो विद्वान् हें आख्यान पठण करील ५६ त्यानें पितरांना दिलेलें अन्न त्यांना अक्षय्य पोंचत राहील. ही दिव्य कथा श्रवण केल्यावर

भ्रातृभिः सह राघवः । वानराः ससुग्रीवा राक्षसाः सविभीषणाः ५८ राजानश्च सहामात्या ये चान्येऽपि समागमाः । ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रा धर्मसमन्विताः ५९ सर्वे चोत्फुल्लनयनाः सर्वे हर्षसमन्विताः । राममेवानुपश्यन्ति भृशमत्यन्तहर्षिताः ६० ततोऽगस्त्यो महातेजा राघवं चेदमब्रवीत् । दृष्टाः सभाजिताश्चापि राम यास्यामहे वयम् ॥ एवमुक्त्वा गताः सर्वे पूजितास्ते यथागतम् ६१ [२१२४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ १० ॥

एवमास्ते महाबाहुरहन्यहनि राघवः । प्रशासत्सर्वकार्याणि पौरजानपदेषु च १ ततः कतिपयाहःसु वैदेहं मिथिलाधिपम् । राघवः प्राञ्जलिर्भूत्वा वाक्यमेतदुवाच ह २ भवान्हि गतिरव्यग्रा भवता पालिता वयम् । भवतस्तेजसोग्रेण रावणो निहतो मया ३ इक्ष्वाकूणां च सर्वेषां मैथिलानां च सर्वशः । अतुलाः प्रीतयो राजन्संबन्धकपुरोगमाः ४ तद्भवान्स्वपुरं यातु रत्नान्यादाय पार्थिव । भरतश्च सहायार्थं पृष्ठतश्चानुयास्यति ५ स तथेति ततः कृत्वा राघवं वाक्यमब्रवीत् । प्रीतोऽस्मि भवता राजन्दर्शनेन नयेन

---

कमलनयन रघुवंशज राम भ्रात्यांसहवर्तमान अतिशय विस्मयचकित झाला. तेव्हां सुग्रीवासहवर्तमान वानर, बिभीषणासहवर्तमान राक्षस ५७,५८, अमात्यांसहवर्तमान राजे व इतरही तेथें जुळलेले ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ५९ हे सर्व हर्षयुक्त होऊन सर्वांचे नेत्र प्रफुल्लित झाले आणि अतिशय आनंदित होऊन ते सर्वही रामाकडेच पहात राहिले ६०. तदनंतर महातेजस्वी अगस्त्यमुनि रघुवंशज रामाला ह्मणाले "हे रामा, आमची भेट झाली असून तूं आमची मानमान्यताही राखिली आहेस; आतां आह्मी जातों. ह्याप्रमाणें अगस्त्यमुनींनीं सांगितल्यानंतर रामानें सर्वांचें पूजन केलें व ते सर्वही आल्या मार्गानें परत गेले ६१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडांपैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

ह्याप्रमाणें नगरांतील व देशांतील सर्व लोकांचीं सर्वप्रकारचीं कार्यें तो महापराक्रमी रघुवंशज राम प्रत्यही करीत राहिला १. तदनंतर कांहीं दिवस लोटल्यावर मिथिलाधिपति वैदेहाला हात जोडून राम ह्मणाला २ "आपण आमचा अक्षय्य आश्रय आहां; आपण आमचें रक्षण केलें आहे आणि आपल्याच उग्र तेजामुळें रावणाचा पराजय झाला आहे ३. इक्ष्वाकु आणि मैथिल ह्यांमध्यें शरीरसंबंध झाल्यामुळें सर्वप्रकारें सर्वांचें अतुल प्रेम, हे राजा, एकमेकांवर जडलें आहे ४. तस्मात्, हे भूपत, आपण रत्नें घेऊन आपल्या नगराला जावें. आपलें साहाय्य करण्याकरितां भरत आपल्या

च ६ यान्येतानि तु रत्नानि मदर्थं संचितानि वै । दुहितॄस्तान्यहं राज-न्सर्वाण्येव ददामि वै ७ ततः प्रयाते जनके केकयं मातुलं प्रभुम् । राघवः प्राञ्जलिर्भूत्वा विनयाद्वाक्यमब्रवीत् ८ इदं राज्यमहं चैव भरतश्च सलक्ष्मणः । आयत्तास्त्वं हि नो राजन्गतिश्च पुरुषर्षभ ९ राजा हि वृद्धः संतापं त्वदर्थमुपयास्यति । तस्माद्गमनमद्यैव रोचते तव पार्थिव १० लक्ष्मणेनानुयात्रेण पृष्ठतोऽनुगमिष्यते । धनमादाय बहुलं रत्नानि विविधानि च ११ युधाजित्तु तथेत्याह गमनं प्रति राघव । रत्नानि च धनं चैव त्वय्येवाक्षय्यमस्त्विति १२ प्रदक्षिणं च राजानं कृत्वा केकयवर्धनः । रामेण च कृतः पूर्वमभिवाद्य प्रदक्षिणम् १३ लक्ष्मणेन सहायेन प्रयातः केकयेश्वरः । हतेऽसुरे यथा वृत्रे विष्णुना सह वासवः १४ तं विसृज्य ततो रामो वयस्यमकुतोभयम् । प्रतर्दनं काशिपतिं परिष्वज्येदमब्रवीत् १५ दर्शिता भवता प्रीतिर्दर्शितं सौहृदं परम् । उद्योगश्च त्वया राजन्भरतेन कृतः सह १६ तद्भवानद्य काशेय पुरीं वाराणसीं व्रज । रमणीयां त्वया गुप्तां सुप्राकारां सुतो-

---

मागोमाग येईल " ५ नंतर ठीक आहे असें सांगून तो रामाला ह्मणाला " हे राजा, मी तुझ्या दर्शनानें व नीतीनें संतुष्ट झालों आहें ६. हीं जीं रत्नें तूं माझ्याकरितां जुळवून ठेविलीं आहेस तीं मीच सर्व, हे राजा, आपल्या मुलींना देतों ७. तदनंतर जनक गेल्यावर राम, केकयदेशाधिपति जो आपला प्रभु मातुल युधाजित त्याला हात जोडून, विनयानें ह्मणाला ८ " हे पुरुषश्रेष्ठ, हे राजा, हें राज्य, मी, भरत व लक्ष्मण हे सर्व तुझ्या अधीन आहों व तूंच आह्मांला आश्रय आहे ९. वृद्ध राजा आपल्याकरितां काळजी करीत असेल; ह्यास्तव, हे भूपते, आपण आजच गमन करावें हें मला बरें दिसतें १०. विपुल धन आणि नानाप्रकारचीं रत्नें बरोबर घेऊन लक्ष्मण अनुयायी ह्मणून आपल्या मागोमाग येईल " ११. ह्यावर युधाजित गमनासंबंधानें ह्मणाला " हे रामा, ठीक आहे. रत्नें व धन हीं अक्षय्य तुझ्याच पाशीं असूंद " १२. इतकें झाल्यावर रामानें प्रथमतः अभिवंदन पूर्वक त्याला प्रदक्षिणा केली असतां केकय देशाची भरभराट करणाऱ्या त्या युधाजितानेंही राजाला प्रदक्षिणा केली १३ आणि वृत्रासुराचा वध झाल्यावर ज्याप्रमाणें इंद्र विष्णूसहवर्तमान निघून गेला त्याप्रमाणें लक्ष्मणाबरोबर तो केकयाधिपति निघून गेला १४. ह्याप्रमाणें त्याला निरोप दिल्यानंतर आपला निर्भय मित्र जो काशिराज प्रतर्दन त्याला कडकडून भेटून राम ह्मणाला १५ " आपण प्रेमाचें व मैत्रीचें अतिशय सार्थक करून दाखविलें आहे व हे राजा, भरतासहवर्तमान आपण फार खटपटही केली आहे १६. तस्मात्, हे काशिराज, आपण आज वाराणशी नगरीला जावें. आपण

रणाम् १७ एतावदुक्त्वा चोत्थाय काकुत्स्थः परमासनात् । पर्यष्वजत धर्मात्मा निरन्तरमुरोगतम् १८ विसर्जयामास तदा कौसल्याप्रीतिवर्धनः । राघवेण कृतानुज्ञः काशेयो ह्यकुतोभयः १९ वाराणसीं ययौ तूर्णं राघवेण विसर्जितः २० विसृज्य तं काशिपतिं त्रिशतं पृथिवीपतीन् । हसन्राघवो वाक्यमुवाच मधुराक्षरम् २१ भवतां प्रीतिरव्यग्रा तेजसा परिरक्षिता । धर्मश्च नियतो नित्यं सत्यं च भवतां सदा २२ युष्माकं चानुभावेन तेजसा च महात्मनाम् । हतो दुरात्मा दुर्बुद्धी रावणो राक्षसाधमः २३ हेतुमात्रमहं तत्र भवतां तेजसा हतः । रावणः सगणो युद्धे सपुत्रामात्यबान्धवः २४ भवन्तश्च समानीता भरतेन महात्मना । श्रुत्वा जनकराजस्य काननात्तनयां हृताम् २५ उद्युक्तानां च सर्वेषां पार्थिवानां महात्मनाम् । कालोऽप्यतीतः सुमहान्गमनं रोचयाम्यतः ॥ प्रत्यूचुस्तं च राजानो हर्षेण महता वृताः २६ दिष्ट्या त्वं विजयी राम राज्यं चापि प्रतिष्ठितम् । दिष्ट्या प्रत्याहृता सीता दिष्ट्या शत्रुः पराजितः २७ एष नः परमः काम एषा नः

---

रक्षिलेली वाराणशी नगरी उत्कृष्ट प्राकार व वेशी ह्यांनीं युक्त असून रमणीय आहे" १७. इतकें बोलून ककुत्स्थकुलोत्पन्न राम सिंहासनावरून उठला आणि तो धर्मात्मा त्याला कडकडून भेटला १८. नंतर कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या त्या रामानें त्याला जाण्याची अनुज्ञा दिली; व ह्याप्रमाणें रामानें अनुज्ञा दिली असतां आणि जा ह्मणून सांगितलें असतां तो निर्भय काशिराज सत्वर वाराणशी नगरीला गेला १९,२०. ह्याप्रमाणें त्या काशिराजाला व इतर तीनशें भूपतींना अनुज्ञा दिल्यानंतर हंसत हसत मधुर वाणीनें राम ह्मणाला २१ " तुमचें प्रेम माझे ठिकाणीं निश्चल कायम राहिलें आहे; तुमचें तेजही पूर्ववत् आहे आणि धर्म व सत्य हीं तुमचे ठिकाणीं नेहेमीं आहेत २२. तुमच्याच प्रभावानें आणि महात्म्यांच्या तेजानें दुरात्मा व दुर्बुद्धि राक्षसाधिपति रावणाचा वध झाला आहे २३ त्याच्या वधाचें निमित्त मात्र मी झालों आहें; परंतु, पुत्र, अमात्य, बांधव आणि राक्षसगण ह्यांसहवर्तमान रावणाचा युद्धामध्यें तुमच्याच तेजामुळें वध झाला आहे २४ जनकराजाची कन्या वनांतून रावणानें हरण करून नेली हें एकतांक्षणीं महात्म्या भरतानें तुह्मांला येथें जमविलें आहे २५ आणि तिचा शोध लावण्यास उद्युक्त झालेल्या तुह्मां सर्व महात्म्या राजांना बाहेर पडून फारच मोठा काळ लोटला आहे. ह्यास्तव, आतां आपलें जाणें मला बरें दिसतें. " ह्यावर फारच आनंदित झालेले ते राजे त्याला ह्मणाले २६ " हे रामा, सुदैवानें तुला विजय प्राप्त होऊन राज्याचेंही स्थीरस्थावर झालें आहे; सीता परत आणिली

प्रीतिरुत्तमा । यत्त्वां विजयिनं राम पश्यामो हतशात्रवम् २८ एतत्त्वय्युपपन्नं च यदस्मांस्त्वं प्रशंससे । प्रशंसार्हं न जानीमः प्रशंसां वक्तुमीदृशीम् २९ आपृच्छामो गमिष्यामो हृदिस्थो नः सदा भवान् । वर्तामहे महाबाहो प्रीत्यात्र महता वृताः ३० भवेच्च ते महाराज प्रीतिरस्मासु नित्यदा । बाढमित्येव राजानो हर्षेण परमान्विताः ३१ ऊचुः प्राञ्जलयः सर्वे राघवं गमनोत्सुकाः । पूजितास्ते च रामेण जग्मुर्देशान्स्वकान्स्वकान् ३२ [ २१५६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डेऽष्टात्रिंशः सर्गः ॥३८॥

ते प्रयाता महात्मानः पार्थिवास्ते प्रहृष्टवत् । गजवाजिसहस्रौघैः कम्पयन्तो वसुन्धराम् १ अक्षौहिण्यो हि तत्रासन्राघवार्थे समुद्यताः । भरतस्याज्ञयानेकाः प्रहृष्टबलवाहनाः २ ऊचुस्ते च महीपाला बलदर्पसमन्विताः । न रामरावणं युद्धे पश्यामः पुरतः स्थितम् ३ भरतेन वयं पश्चात्समानीता निरर्थकम् । हता हि राक्षसाः क्षिप्रं पार्थिवैः स्युर्न संशयः ४ रामस्य

---

आहे आणि शत्रूचाही पराजय झाला आहे २७. हे रामा, शत्रूंचा वध करून विजयी झालेल्या तुला आम्हीं अवलोकन करावें हीच आमची मुख्य इच्छा होती व हेंच आमच्या उत्कृष्ट आनंदाचें कारण होतें २८. तथापि, तूं आमची प्रशंसा करीत आहेस हेंही तुला योग्यच आहे. परंतु, हे प्रशंसापात्र रामा, अशी प्रशंसा आह्मांला करितां येत नाहीं २९. आतां आह्मी तुझा निरोप घेऊन जातों. तूं सर्वदां आमच्या हृदयामध्यें आहेस व, हे महापराक्रमी रामा, तुझ्यासंबंधानें मोठें प्रेम धरून आह्मी रहात आहों ३०. हे महाराजा, आमचे ठिकाणीं तुझें नेहमीं प्रेम असावें ". ह्यावर ' ठीक आहे ' एवढेंच त्यांना रामानें सांगितलें असतां त्यांना फारच हर्ष झाला ३१ आणि गमनाविषयीं उत्सुक झालेल्या त्या सर्व राजांनीं हात जोडून रामाला विचारिलें असतां त्यानें त्यांचें पूजन केलें व ते आपापल्या देशांप्रत निघून गेले ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला॥३८॥

ते महात्मे राजे हजारों अश्वांच्या व गजांच्या सेनांच्या योगानें पृथ्वी कंपित करीत करीत आनंदानें निघाले १. भरताच्या आज्ञेमुळें रामाकरितां तेथें अनेक अक्षौहिणी जुळल्या होत्या आणि त्यांतील योद्धे व वाहनें ह्यांना हर्ष झाला होता २. सामर्थ्याविषयीं गर्व झाल्यामुळें ते भूपति आपआपसांत ह्मणाले " रामशत्रु रावण युद्धामध्यें अग्रभागीं स्थित असलेला आमच्या दृष्टीं पडला नाहीं ( ह्याला आमचा इलाज नाहीं ) ३. भरतानें आह्मांला व्यर्थ मागून आणिलें. ह्यानें जर आह्मांला पूर्वीं आणिलें असतें तर आह्मां राजांच्या हातून राक्षसांचा तेव्हांच वध झाला असता ह्यांत संशय

बाहुवीर्येण रक्षिता लक्ष्मणस्य च । सुखं पारे समुद्रस्य युध्येम विगतज्वराः ५ एताश्चान्याश्च राजानः कथास्तत्र सहस्रशः । कथयन्तः स्वराज्यानि जग्मुर्हर्षसमन्विताः ६ स्वानि राज्यानि मुख्यानि ऋद्धानि मुदितानि च । समृद्धधनधान्यानि पूर्णानि वसुमन्ति च ७ यथापुराणि ते गत्वा रत्नानि विविधान्यथ । रामस्य प्रियकामार्थमुपहारं नृपा ददुः ८ अश्वान्यानानि रत्नानि हस्तिनश्च मदोत्कटान् । चन्दनानि च मुख्यानि दिव्यान्याभरणानि च ९ मणिमुक्ताप्रवालांस्तु दास्यो रूपसमन्विताः । अजाविकं च विविधं रथांस्तु विविधान्बहून् १० भरतो लक्ष्मणश्चैव शत्रुघ्नश्च महाबलः । आदाय तानि रत्नानि स्वां पुरीं पुनरागताः ११ आगम्य च पुरीं रम्यामयोध्यां पुरुषर्षभाः । तानि रत्नानि चित्राणि रामाय समुपानयन् १२ प्रतिगृह्य च तत्सर्वं रामः प्रीतिसमन्वितः । सुग्रीवाय ददौ राज्ञे महात्मा कृतकर्मणे १३ विभीषणाय च ददौ तथान्येभ्योऽपि राघवः । राक्षसेभ्यः कपिभ्यश्च यैर्वृतो जयमाप्तवान् १४ ते सर्वे रामदत्तानि रत्नानि कपिराक्षसाः । शिरोभिर्धारयामासुर्भुजेषु च महाबलाः १५ हनूमन्तं च नृपतिरिक्ष्वाकूणां महारथः ।

---

नाहीं ४. रामाच्या व लक्ष्मणाच्या बाहुवीर्यानें आमचें रक्षण झालें असतें व आह्मीं समुद्रापलीकडे जाऊन निर्भयपणें युद्ध केलें असतें " ५. ह्या व इतरही हजारों गोष्टी सांगत सांगत ते राजे आनंदानें आपआपल्या राज्याप्रत गेले ६. त्यांचीं स्वतःचीं मुख्य राज्यें संपन्न, आनंदित, सर्वप्रकारच्या वस्तूंनीं भरलेलीं आणि धन, धान्य व रत्नें ह्यांच्या समृद्धीनें युक्त अशीं होतीं ७. आपापल्या नगरांप्रत गेल्यानंतर रामाला संतुष्ट करण्याकरितां त्या राजांनीं नानाप्रकारच्या उत्कृष्ट वस्तु नजराणा ह्मणून रामाकडे पाठवून दिल्या ८. अश्व, वाहनें, रत्नें, मदमत्त गज, उत्कृष्ट चंदन, दिव्य भूषणें ९, हिरे, मोत्यें, पोंवळीं, सौंदर्यसंपन्न दासी, नानाप्रकारच्या शेळ्यामेंढ्या आणि अनेकप्रकारचे असंख्य रथ हा तो नजराणा होय १०. त्या उत्कृष्ट वस्तु घेऊन महाबलाढ्य भरत, लक्ष्मण व शत्रुघ्न आपल्या नगरीप्रत परत आले ११ आणि रमणीय अयोध्यानगरीला आल्यानंतर तीं अद्भुत रत्नें त्या पुरुषश्रेष्ठांनीं रामाला अर्पण केलीं १२. तीं सर्व स्वीकारून महात्म्या रामानें कामगिरी बजाविलल्या राजा सुग्रीवाला तीं आनंदानें दिलीं १३. रामानें कांहीं रत्नें बिभीषणाला अर्पण केलीं आणि जे बरोबर असतांना रामाला जय प्राप्त झाला अशा इतरही राक्षसांना व वानरांना त्यानें कांहीं रत्नें दिलीं १४. तेव्हां त्या सर्व महाबलाढ्य वानरराक्षसांनीं रामानें दिलेलीं रत्नें मस्तकांमध्यें व हातांमध्यें धारण केलीं १५. नंतर इक्ष्वाकूंचा राजा जो महारथी, वीर्यवान्

अङ्गदं च महाबाहुमङ्कमारोप्य वीर्यवान् १६ रामः कमलपत्राक्षः सुग्रीव-
मिदमब्रवीत् । अङ्गदस्ते सुपुत्रोऽयं मन्त्री चाप्यनिलात्मजः १७ सुग्रीवम-
न्त्रिते युक्तौ मम चापि हिते रतौ । अर्हतो विविधां पूजां त्वत्कृते वै हरी-
श्वर १८ इत्युक्त्वा व्यपमुच्याङ्गाद्भूषणानि महायशाः । स बबन्ध महा-
र्हाणि तदाङ्गदहनूमतोः १९ आभाष्य च महावीर्यान्राघवो यूथपर्षभान् ।
नीलं नलं केसरिणं कुमुदं गन्धमादनम् २० सुषेणं पनसं वीरं मैन्दं द्विवि-
दमेव च । जाम्बवन्तं गवाक्षं च विनतं धूम्रमेव च २१ बलीमुखं प्रजङ्घं च
संनादं च महाबलम् । दरीमुखं दधिमुखमिन्द्रजानुं च यूथपम् २२ मधुरं
श्लक्ष्णया वाचा नेत्राभ्यामापिबन्निव । सुहृदो मे भवन्तश्च शरीरं भ्रातर-
स्तथा २३ युष्माभिरुद्धृतश्चाहं व्यसनात्काननौकसः । धन्यो राजा च
सुग्रीवो भवद्भिः सुहृदां वरैः २४ एवमुक्त्वा ददौ तेभ्यो भूषणानि यथा-
र्हतः । वज्राणि च महार्हाणि सस्वजे च नरर्षभः२५ त पिबन्तः सुगन्धीनि
मधूनि मधुपिङ्गलाः । मांसानि च सुमृष्टानि मूलानि च फलानि च २६
एवं तेषां निवसतां मासः साग्रो ययौ तदा । मुहूर्तमिव ते सर्वे रामभक्त्या

---

व कमलनयन राम तो हनुमान आणि महापराक्रमी अंगद ह्यांना अंकावर घेऊन सुग्रीवाला ह्मणाला " हे सुग्रीवा, अंगद हा तुझा सत्पुत्र असून वायुपुत्र तुझा मंत्री आहे; हे मसलतीमध्यें निपुण असून माझ्या हिताविषयीं तत्पर आहेत आणि, हे वानराधिपते, तुझ्याकरितां मी ह्यांची नानाप्रकारांनीं पूजा करण्यास योग्य आहें " १६,१७,१८. असें बोलून महाकीर्तिमान् रामानें आपल्या शरीरावरील मोठे मोठे मूल्यवान् अलंकार काढिले; अंगद व हनुमान् ह्यांच्या अंगावर घातले १९ आणि नंतर महावीर्यवान् व मुख्य मुख्य सेनाधिपतींशीं भाषण करून त्यांनाही त्यानें भूषणें दिलीं. सारांश, नील, नल, केसरी, कुमुद, गंधमादन २०, सुषेण, वीर, पनस, मैंद, द्विविद, जांबवान्, गवाक्ष, विनत, धूम्र २१, बलीमुख, प्रजंघ, महाबलाढ्य संनाद, दरीमुख, दधिमुख, आणि सेनापति इंद्रजानु २२ ह्यांना नेत्रांनीं पिऊन टाकीतच कीं काय कोमल शब्दानीं व मधुर स्वरानें तो ह्मणाला " माझे सुहृद्, शरीर व भ्राते आपणच आहां आणि, हे वनचरहो, तुह्मींच संकटांपासून माझा उद्धार केला आहे; तुमच्यासारखे श्रेष्ठ सुहृद ज्याच्यापाशीं आहेत तो सुग्रीवराजा धन्य होय " २३,२४ असें ह्मणून त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यानें त्यांना मोठीं भूषणें व मूल्यवान् हिरे दिले आणि त्या पुरुषश्रेष्ठानें त्यांच्या भेटीही घेतल्या २५. सुगंधीं मद्यें, उत्कृष्ट तयार केलेलीं मांसें, मुळें व फळें सेवन करीत ते वानर तेथें राहिले होते २६ आणि ह्याप्रमाणें

च मेनिरे २७ रामोऽपि रेमे तैः सार्धं वानरैः कामरूपिभिः । राक्षसैश्च महावीर्यैर्ऋक्षैश्चैव महाबलैः २८ एवं तेषां ययौ मासो द्वितीयः शिशिरः सुखम् । वानराणां प्रहृष्टानां राक्षसानां च सर्वशः २९ इक्ष्वाकुनगरे रम्ये परां प्रीतिमुपासताम् । रामस्य प्रीतिकरणैः कालस्तेषां सुखं ययौ ३० [ २१८६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोनचत्वारिंशः सर्गः ॥ ३९ ॥

तथा स्म तेषां वसतामृक्षवानररक्षसाम् । राघवस्तु महातेजाः सुग्रीवमिदमब्रवीत् १ गम्यतां सौम्य किष्किन्धां दुराधर्षां सुरासुरैः । पालयस्व सहामात्यै राज्यं निहतकण्टकम् २ अङ्गदं च महाबाहो प्रीत्या परमया युतः । पश्य त्वं हनुमन्तं च नलं च सुमहाबलम् ३ सुषेणं श्वशुरं वीरं तारं च बलिनां वरम् । कुमुदं चैव दुर्धर्षं नीलं चैव महाबलम् ४ वीरं शतबलिं चैव मैन्दं द्विविदमेव च । गजं गवाक्षं गवयं शरभं च महाबलम् ५ ऋक्षराजं च दुर्धर्षं जाम्बवन्तं महाबलम् । पश्य प्रीतिसमायुक्तो गन्धमादनमेव च ६ ऋषभं च सुविक्रान्तं प्लवङ्गं च सुपाटलम् । केसरिं शरभं शुम्भं

---

तेथें वास्तव्य करीत असतांना जरी त्यांचा संपूर्ण महिना लोटून गेला तरी रामभक्तीमुळें त्या सर्वांनाही तो एका क्षणामारखा भासला २७. रामही यथेष्ट रूप धारण करणारे वानर महावीर्यवान् राक्षस आणि महाबलाढ्य ऋक्ष ह्यांसहवर्तमान क्रीडा करूं लागला २८ व ह्याप्रमाणें आनंदित झालेल्या त्या सर्व वानरांचा व राक्षसांचा थंडीचा दुसराही महिना सुखावह गेला २९. सारांश, मोठ्या आनंदानें रम्य इक्ष्वाकुनगरामध्यें वास्तव्य करीत असलेल्या त्या वानरराक्षसांचा काल रामाच्या संमानामुळें सुखावह गेला ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकुणचाळीसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३९ ॥

ते ऋक्ष, वानर व राक्षस हे ह्याप्रमाणें तेथें वास्तव्य करीत असतांना महातेजस्वी रघुवंशज राम सुग्रीवाला ह्मणाला १ " हे विनयसंपन्न, देव आणि दैत्य ह्यांना अजिंक्य असलेल्या किष्किंधानगरीप्रत जा आणि अमात्यांसहवर्तमान तूं निष्कंटक झालेल्या राज्याचें परिपालन कर २. हे महापराक्रमी सुग्रीवा, मोठ्या आनंदानें तूं अंगद, हनुमान् आणि अत्यंत महाबलाढ्य नल ह्यांना अवलोकन कर ३ त्याचप्रमाणें सुषेण, बलवानांमध्यें श्रेष्ठ व वीर असा श्वशुर तार, अजिंक्य कुमुद, महाबलाढ्य नील ४, वीर शतबलि, मैंद, द्विविद, गज, गवाक्ष, गवय, महाबलाढ्य शरभ ५, अजिंक्य व महाबलाढ्य जांबवान् आणि गंधमादन ह्यांनाही तूं आनंदानें अवलोकन कर ६. महापराक्रमी

शङ्खचूडं महाबलम् ७ ये ये मे सुमहात्मानो मदर्थे त्यक्तजीविताः । पश्य त्वं प्रीतिसंयुक्तो मा चैषां विप्रियं कृथाः ८ एवमुक्त्वा च सुग्रीवमाश्लिष्य च पुनःपुनः । विभीषणमुवाचाथ रामो मधुरया गिरा ९ लङ्कां प्रशाधि धर्मेण धर्मज्ञस्त्वं मतो मम । पुरस्य राक्षसानां च भ्रातुर्वैश्रवणस्य च १० मा च बुद्धिमधर्मे त्वं कुर्या राजन्कथश्चन । बुद्धिमन्तो हि राजानो ध्रुवमश्नन्ति मेदिनीम् ११ अहं च नित्यशो राजन्सुग्रीवसहितस्त्वया । स्मर्तव्यः परया प्रीत्या गच्छ त्वं विगतज्वरः १२ रामस्य भाषितं श्रुत्वा ऋक्षवानरराक्षसाः । साधु साध्विति काकुत्स्थं प्रशशंसुः पुनः पुनः १३ तव बुद्धिर्महाबाहो वीर्यमद्भुतमेव च । माधुर्यं परमं राम स्वयंभोरिव नित्यदा १४ तेषामेवंब्रुवाणानां वानराणां च रक्षसाम् । हनुमान्प्रणतो भूत्वा राघवं वाक्यमब्रवीत् १५ स्नेहो मे परमो राजंस्त्वयि तिष्ठतु नित्यदा । भक्तिश्च नियता वीर भावो नान्यत्र गच्छतु १६ यावद्रामकथा वीर चरिष्यति महीतले । तावच्छरीरे वत्स्यन्तु प्राणा मम न संशयः १७ यच्चैतच्चरितं दिव्यं कथा

---

ऋषभ, सुपाटल वानर, केसरी, शरभ, शुंभ, आणि महाबलाढ्य शंखचूड ह्यांवरही तूं कृपादृष्टि ठेव ७. इतकेंच नव्हे परंतु, माझ्याकरितां जे जे महात्मे जिवावर उदार झाले असतील त्यांना तूं प्रेमानें अवलोकन कर; आणि त्यांचें तूं अप्रिय करीत जाऊं नकोस " ८. ह्याप्रमाणें सुग्रीवाला सांगून व वारंवार आलिंगन देऊन मधुर वाणीनें राम बिभीषणाला ह्मणाला ९ " तूं धर्मानें लंकेचें परिपालन कर. कारण, तुला लंकानगरीमध्यें वास्तव्य करणारे राक्षस, मी आणि भ्राता वैश्रवण हे धर्मज्ञ समजत आहों १०. ह्यास्तव, हे राजा, तूं अधर्मसंबंधी विचार कधींही मनामध्यें आणूं नको. विचारी, राजे निश्चयपूर्वक पृथ्वीचा उपभोग घेत असतात ११. हे राजा, सुग्रीवासहवर्तमान तूं माझें मोठ्या प्रेमानें स्मरण ठेवीत जा आणि आतां कांहीं एक शंका न धरितां लंकेमध्यें परत जा " १२. रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर ऋक्ष, वानर व राक्षस 'शाबास ! शाबास !' असें ह्मणून त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाची पुनः पुनः प्रशंसा करूं लागले १३. (ते ह्मणाले) " हे महापराक्रमी रामा, शंकराप्रमाणें तुझे ठिकाणीं नेहमीं उत्कृष्ट माधुर्य व अद्भुतवीर्य ह्यांचें वास्तव्य असतें " १४. ह्याप्रमाणें ते वानर व राक्षस बोलत असतांना हनुमान् नम्र होऊन रामाला ह्मणाला १५ " हे राजा, तुझे ठिकाणीं सर्वदां माझें पराकाष्ठेचें प्रेम असो; भक्ति अचल राहो आणि माझ्या मनाचा कल तुझ्याशिवाय दुसरीकडे न जावो १६.

ते रघुनन्दन । तन्ममाप्सरसो राम श्रावयेयुर्नरर्षभ १८ तच्छ्रुत्वाहं ततो वीर तव चर्यामृतं प्रभो । उत्कण्ठां तां हरिष्यामि मेघलेखामिवानिलः १९ एवं ब्रुवाणं रामस्तु हनूमन्तं वरासनात् । उत्थाय सस्वजे स्नेहाद्वाक्यमेतदुवाच ह २० एवमेतत्कपिश्रेष्ठ भविता नात्र संशयः । चरिष्यति कथा यावदेषा लोके च मामिका २१ तावत्ते भविता कीर्तिः शरीरेऽप्यसवस्तथा । लोका हि यावत्स्थास्यन्ति तावत्स्थास्यन्ति मे कथाः २२ एकैकस्योपकारस्य प्राणान्दास्यामि ते कपे । शेषस्येहोपकाराणां भवाम ऋणिनो वयम् २३ मदङ्गे जीर्णतां यातु यत्त्वयोपकृतं कपे । नरः प्रत्युपकाराणामापत्स्वायाति पात्रताम् २४ ततोऽस्य हारं चन्द्राभं मुच्य कण्ठात्स राघवः । वैदूर्यतरलं कण्ठे बबन्ध च हनूमतः २५ तेनोरसि निबद्धेन हारेण महता कपिः । रराज हेमशैलेन्द्रश्चन्द्रेणाक्रान्तमस्तकः २६ श्रुत्वा तु राघवस्यैतदुत्थायोत्थाय वानराः । प्रणम्य शिरसा पादौ निर्जग्मुस्ते महा-

---

हे वीरा, जोंपर्यंत भूतलावर रामकथा सुरू राहील तोंपर्यंत माझ्या शरीरामध्यें प्राण राहोत; ह्याविषयीं संशय नसावा १७. हे रघुनंदना पुरुषश्रेष्ठा, हें तुझें कथारूप दिव्य चरित्र मला अप्सरा कथन करोत १८; ह्मणजे, हे वीर प्रभो, वायु ज्याप्रमाणें मेघपंक्ति हरण करून नेतो त्याप्रमाणें मी तें तुझें चरितामृत श्रवण करून तुझ्या दर्शनासंबंधाची आपली इच्छा पूर्ण करून घेईन " १९. ह्याप्रमाणें हनुमान् बोलूं लागला असतां राम सिंहासनावरून उठला आणि त्याला प्रेमानें भेटून ह्मणाला २० " हे वानरश्रेष्ठ, ह्या तुझ्या ह्मणण्याप्रमाणें होईल ह्यांत संशय नाहीं. ही माझी कथा जोंपर्यंत जगतामध्यें राहील २१ तोंपर्यंत कीर्तीसहवर्तमान तुझ्या शरीराचे ठिकाणीं प्राण रहातील आणि जोंपर्यंत त्रैलोक्य राहील तोंपर्यंत माझ्या कथा रहातील २२. हे वानरा, प्राणदान देण्यासारिखा तुझा प्रत्येक उपकार आहे. तेव्हां एकाशिवाय सर्व अवशिष्ट राहिलेल्या उपकारांचे फेडीबद्दल आह्मी तुझे ऋणी आहों २३. हे वानरा, पुरुष विपत्तींमध्यें प्रत्युपकारांना पात्र होत असतो. ह्यास्तव, तूं जे उपकार केले आहेस त्यांची फेड ( तुझ्यावर तसा प्रसंग येऊन ) माझ्या हातून न होवो " २४. ह्यानंतर वैडूर्यमण्यांनीं झळकत असलेला व प्रभेनें चंद्रासारखा असलेला हार रामानें आपल्या गळ्यांतून काढून हनुमानाच्या कंठामध्यें घातला २५ व वक्षःस्थलावर लटकत राहिलेल्या त्या मोठ्या हाराच्या योगानें तो वानर, चंद्रकिरणांनीं ज्याचा माथा व्याप्त झालेला आहे असा, ( मेरुसंज्ञक ) मुख्य सुवर्णपर्वताप्रमाणें दिसूं लागला २६. पुढें रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर ते महाबलाढ्य वानर उठून व मस्तकानें रामाच्या चरणांना प्रणाम

बलाः २७ सुग्रीवः स च रामेण निरन्तरमुरोगतः । विभीषणश्च धर्मात्मा सर्वे ते बाष्पविक्लवाः २८ सर्वे च ते बाष्पकलाः साश्रुनेत्रा विचेतसः । संमूढा इव दुःखेन त्यजन्तो राघवं तदा २९ कृतप्रसादास्तेनैवं राघवेण महात्मना । जग्मुः स्वं स्वं गृहे सर्वे देही देहमिव त्यजन् ३० ततस्तु ते राक्षसऋक्षवानराः प्रणम्य रामं रघुवंशवर्धनम् । वियोगजाश्रुप्रतिपूर्णलोचनाः प्रतिप्रयातास्तु यथा निवासिनः ३१ [२२१७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे चत्वारिंशः सर्गः ॥ ४० ॥

विसृज्य च महाबाहुर्ऋक्षवानरराक्षसान् । भ्रातृभिः सहितो रामः प्रमुमोद सुखं सुखी १ अथापराह्णसमये भ्रातृभिः सह राघवः । शुश्राव मधुरां वाणीमन्तरिक्षान्महाप्रभुः २ सौम्य राम निरीक्षस्व सौम्येन वदनेन माम् । कुबेरभवनात्प्राप्तं विद्धि मां पुष्पकं प्रभो ३ तव शासनमाज्ञाय गतोऽस्मि भवनं प्रति । उपस्थातुं नरश्रेष्ठ स च मां प्रत्यभाषत ४ निर्जितस्त्वं नरेन्द्रेण राघवेण महात्मना । निहत्य युधि दुर्धर्षं रावणं राक्षसे-

---

करून निघून गेले २७. त्या सर्वांचेही नेत्र अश्रूंनीं व्याकुल झाले आणि सुग्रीवाला व धर्मात्म्या बिभीषणाला रामानें कडकडून आलिंगन दिलें. नेत्रांमध्यें अश्रु येऊन त्या सर्वांचेही कंठ दाटून आले; त्यांना कांहीं सुचेनासें झालें आणि त्यावेळीं ते रामाला सोडून जाऊं लागले असतां दुःखानें जसे कांहीं मूर्च्छितच झाले २८,२९. ह्याप्रमाणें महात्म्या रामानें त्यांच्यावर कृपा केल्यानंतर देह सोडून जाणाऱ्या जीवांप्रमाणें ते सर्वही आपापल्या घरीं निघून गेले ३०. सारांश, तदनंतर वियोगामुळें ज्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून आलेले आहेत असे ते राक्षस, ऋक्ष व वानर रघुवंश वृद्धिंगत करणाऱ्या रामाला प्रणाम करून आपापल्या वसतिस्थानाप्रत परत गेले ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४० ॥

ह्याप्रमाणें ऋक्ष, वानर व राक्षस ह्यांना आज्ञा दिल्यानंतर भ्रात्यांसहवर्तमान तो महापराक्रमी व सुखी राम यथेष्ट आनंद करूं लागला १. नंतर अपराह्णसमयीं महाप्रभु रामानें अंतरिक्षांतून मधुर वाणी श्रवण केली २. " हे विनयशील रामा, सौम्य मुद्रेनें तूं मला अवलोकन कर; हे प्रभो, कुबेरगृहापासून मी पुष्पकविमान प्राप्त झाल्याचें तुला विदित असूं दे ३. हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्या आज्ञेप्रमाणें मी स्वस्थानीं कुबेराच्या सेवेकरितां गेल्यावर तो मला म्हणाला ४ " महात्म्या रामराजानें युद्धामध्यें अजिंक्य असलेल्या राक्षसाधिपति रावणाचा वध करऊन तुला जिंकिलें आहे; ह्यास्तव, तूं त्यालाच

श्वरम् ५ ममापि परमा प्रीतिर्हते तस्मिन्दुरात्मनि । रावणे सगणे चैव सपुत्रे सहबान्धवे ६ स त्वं रामेण लङ्कायां निर्जितः परमात्मना । वह सौम्य तमेव त्वमहमाज्ञापयामि ते ७ परमो ह्येष मे कामो यत्त्वं राघवनन्दनम् । वहेर्लोकस्य संयानं गच्छस्व विगतज्वरः ८ सोऽहं शासनमाज्ञाय धनदस्य महात्मनः । त्वत्सकाशमनुप्राप्तो निर्विशङ्कः प्रतीच्छ माम् ९ अधृष्यः सर्वभूतानां सर्वेषां धनदाज्ञया । चराम्यहं प्रभावेण तवाज्ञां परिपालयन् १० एवमुक्तस्तदा रामः पुष्पकेण महाबलः । उवाच पुष्पकं दृष्ट्वा विमानं पुनरागतम् ११ यद्येवं स्वागतं तेऽस्तु विमानवर पुष्पक । आनुकूल्याद्धनेशस्य वृत्तदोषो न नो भवेत् १२ लाजैश्चैव तथा पुष्पैर्धूपैश्चैव सुगन्धिभिः । पूजयित्वा महाबाहू राघवः पुष्पकं तदा १३ गम्यतामिति चोवाच आगच्छ त्वं स्मर यदा । सिद्धानां च गतौ सौम्य मा विषादेन योजय १४ प्रतिघातश्च ते मा भूद्यथेष्टं गच्छतो दिशः १५ एवमस्त्विति रामेण पूजयित्वा विसर्जितम् । अभिप्रेतां दिशं तस्मात्प्रायात्तत्पुष्पकं तदा १६ एवमन्तर्हिते तस्मिन्पुष्पके सुकृतात्मनि । भरतः प्राञ्जलिर्वाक्यमुवाच रघुनन्दनम् १७

---

वाहून नेत जा ५. गण, पुत्र व बांधव ह्यांसहवर्तमान त्या दुरात्म्या रावणाचा वध झाला असल्यामुळें मलाही पराकाष्ठेचा आनंद झाला आहे ६. तस्मात्, हे सौम्य विमाना, ज्याअर्थी परमात्म्या रामानें लंकेमध्यें तुला जिंकिलें आहे त्याअर्थी त्यालाच तूं वाहून नेत जा अशी माझी तुला आज्ञा आहे ७. तूं रघुनंदनाला जगतामध्यें घेऊन जावेंस ही माझी पराकाष्ठेची इच्छा होती; ह्यास्तव, तूं आतां कांहींएक शंका न धरितां रामाकडे जा ८. महात्म्या कुबेराच्या ह्या आज्ञेप्रमाणें मी तुझ्यासंनिध आलों आहें; ह्यास्तव, कसलीही शंका मनामध्यें न आणितां तूं माझा स्वीकार कर ९. कुबेराच्या आज्ञेप्रमाणें मी तुझी आज्ञा परिपालन करून राहीन आणि तुझ्या प्रभावामुळें मी सर्व प्राण्यांना अजिंक्य होईन " १०. ह्याप्रमाणें पुष्पकविमानानें महाबलाढ्य रामाला सांगितलें असतां परत आलेल्या पुष्पकविमानाला अवलोकन करून राम ह्मणाला ११ " हे श्रेष्ठ पुष्पकविमाना, असें असेल तर तुझें स्वागत असो. कुबेराची संमति असली ह्मणजे आमच्यावर वर्तनसंबंधीं दोष येणार नाहीं " १२. इतकें बोलून लाह्या, पुष्पें, व सुगंधी धूप ह्यांच्या योगानें महापराक्रमी रामानें पुष्पकविमानाचें पूजन केलें १३ आणि तो त्याला ह्मणाला " जा आणि मी जेव्हां स्मरण करीन तेव्हां ये; हे सौम्य विमाना, आकाशमार्गामध्यें तूं सुखानें रहा १४. तूं इच्छेस येईल त्या दिशेस जात असतांना तुला कोठें अडथळा न होवो १५. " ह्यानंतर रामानें पूजा करून निरोप दिला असतां 'ठीक आहे' असें ह्मणून तें पुष्पकविमान इष्ट दिशेस चालतें झालें १६. ह्याप्रमाणें

विबुधात्मनि दृश्यन्ते त्वयि वीर प्रशासति । अमानुषाणि सत्त्वानि व्याहृतानि मुहुर्मुहुः १८ अनामयश्च मर्त्यानां साग्रो मासो गतो ह्ययम् । जीर्णानामपि सत्त्वानां मृत्युर्नायाति राघव १९ अरोगप्रसवा नार्यो वपुष्मन्तो हि मानवाः । हर्षश्चाभ्यधिको राजञ्जनस्य पुरवासिनः २० काले वर्षति पर्जन्यः पातयन्नमृतं पयः । वाताश्चापि प्रवान्त्येते स्पर्शयुक्ताः सुखाः शिवाः २१ ईदृशो नश्चिरं राजा भवेदिति नरेश्वरः । कथयन्ति पुरे राजन्पौरजानपदास्तथा २२ एता वाचः सुमधुरा भरतेन समीरिताः । श्रुत्वा रामो मुदा युक्तो बभूव नृपसत्तमः २३ [२२४०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकचत्वारिंशः सर्गः ॥ ४१ ॥

स विसृज्य ततो रामः पुष्पकं हेमभूषितम् । प्रविवेश महाबाहुरशोकवनिकां तदा १ चन्दनागुरुचूतैश्च तुङ्गकालयकैरपि । देवदारुवनैश्चापि समन्तादुपशोभिताम् २ चम्पकागुरुपुंनागमधूकपनसासनैः । शोभितां पारिजातैश्च विधूमज्वलनप्रभैः ३ लोध्रनीपार्जुनैर्नागैः सप्तपर्णातिमुक्तकैः ।

---

तें पवित्र पुष्पकविमान गुप्त झालें असतां भरत हात जोडून रघुनंदन रामाला ह्मणाला १७ " हे वीरा, तूं राज्य करूं लागल्यापासून अमानुष प्राणीही[1] वारंवार वाणीयुक्त असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें १८. हा पूर्ण महिना लोटून गेला तरी मर्त्यजनांना आरोग्य असून, हे राघवा, जीर्ण झालेल्या प्राण्यांनाही मृत्यु येत नाहीं १९. हे राजा, स्त्रियांना निरोगी मुलें होत आहेत; मानव हृष्ट व पुष्ट शरीरानें युक्त आहेत आणि नगरवासी लोकांना अतिशय हर्ष झाला आहे २०. अमृततुल्य उदक पाडणारा पर्जन्य वेळेवर वृष्टि करीत आहे; हे वायुही सुखस्पर्शानें युक्त व कल्याणकारक वहात आहेत २१ आणि, त्याचप्रमाणें हे राजा, नगरांतील व देशांतील लोक 'अशाप्रकारचा राजा आह्मांला नेहमीं असो' असें नगरामध्यें बोलत आहेत २२. ह्याप्रमाणें भरतानें उच्चारिलेले अत्यंत मधुर शब्द श्रवण केल्यावर नृपश्रेष्ठ राम आनंदित झाला २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

सुवर्णभूषित पुष्पकविमानाला निरोप दिल्यानंतर तो महापराक्रमी राम अशोकवनामध्यें प्रविष्ट झाला १. तें वन चंदन, अगरु, आम्र, पुन्नाग व रक्तचंदन ह्या वृक्षांनीं आणि देवदारुवृक्षसमुदायांनीं चोहोंकडे सुशोभित झालें होतें २. चंपक, अगरु, पुन्नाग, मधूक, फणस, सर्ज व पारिजात ह्या, प्रभेनें निर्धूम अग्नीप्रमाणें असलेल्या, वृक्षांनींही त्याला

---

१ एखाद्या विशिष्ट राजाच्या पुण्यप्रभावामुळें अमानुष प्राण्यांना मनुष्यवाचा पुरातनकालींही प्राप्त होती असें ह्यावरून दिसतें.

मन्दारकदलीगुल्मलताजालसमावृताम् ४ प्रियङ्गुभिः कदम्बैश्च तथा च बकुलैरपि । जम्बूभिर्दाडिमैश्चैव कोविदारैश्च शोभिताम् ५ सर्वदा कुसुमै रम्यैः फलवद्भिर्मनोरमैः । दिव्यगन्धरसोपेतैस्तरुणाङ्कुरपल्लवैः ६ तथैव तरुभिर्दिव्यैः शिल्पिभिः परिकल्पितैः । चारुपल्लवपुष्पाढ्यैर्मत्तभ्रमरसंकुलैः ७ कोकिलैर्भृङ्गराजैश्च नानावर्णैश्च पक्षिभिः । शोभितां शतशश्चित्रां चूतवृक्षावतंसकैः ८ शातकुम्भनिभाः केचित्केचिदग्निशिखोपमाः । नीलाञ्जननिभाश्चान्ये भान्ति तत्र स्म पादपाः ९ सुरभीणि च पुष्पाणि माल्यानि विविधानि च । दीर्घिका विविधाकाराः पूर्णाः परमवारिणा १० माणिक्यकृतसोपानाः स्फाटिकान्तरकुट्टिमाः । फुल्लपद्मोत्पलवनाश्चक्रवाकोपशोभिताः ११ दात्यूहशुकसंघुष्टा हंससारसनादिताः । तरुभिः पुष्पशबलैस्तीरजैरुपशोभिताः १२ प्राकारैर्विविधाकारैः शोभिताश्च शिलातलैः । तत्रैव च वनोद्देशे वैदूर्यमणिसंनिभैः १३ शाद्वलैः परमोपेतां पुष्पितद्रुमकाननाम् ।

---

शोभा आलेली होती ३. लोध्र, कदंब, अर्जुन, नागकेसर, सप्तपर्ण, अतिमुक्तक, मंदार, कदली, झुडपें व लता ह्यांच्या समुदायांनींही तें व्याप्त झालेलें होतें ४. प्रियंगु, कदंब, बकुल, जंबू, दाडिम व कोविदार ह्या वृक्षांनींही त्याला शोभा आलेली होती ५. सर्व ऋतूंमध्यें रम्य पुष्पांनीं व फलांनीं युक्त असून दिव्य गंध, रस, नूतन अंकुर व पल्लव ह्यांनीं संपन्न असलेले मनोहर वृक्षही तेथें होते ६. त्याचप्रमाणें कुशल माळ्यांनीं लाविलेले दिव्य वृक्ष तेथें असून ते मनोहर पल्लवांनीं व पुष्पांनीं भरले होते आणि मत्त भ्रमरांनीं व्याप्त झाले होते ७. आम्रवृक्षावरील पुष्परज हेंच ज्यांचें भूषण अशा कोकिल, मोठे मोठे भ्रमर व इतरही अनेकप्रकारच्या—शेंकडों पक्ष्यांनीं त्या चित्रविचित्र वनाला शोभा आलेली होती ८. तेथें असलेले कांहीं वृक्ष सुवर्णासारिखे, कांहीं अग्निज्वालेसारिखे आणि कांहीं कज्जलासारिखे भासत होते ९. सुगंधि पुष्पांचे झुबके, नानाप्रकारचीं पुष्पें, आणि उत्कृष्ट जलांनीं परिपूर्ण असलेल्या नानाप्रकारच्या वापी तेथें असून १० वापींना माणकाच्या पायऱ्या केलेल्या होत्या; त्यांच्या आंतील फरशी स्फटिकाची केलेली होती; नानाप्रकारचे कमलसमुदाय त्यांत प्रफुल्लित झालेले होते; चक्रवाकपक्ष्यांनीं त्यांला शोभा आलेली होती ११; पाणकावळे, राघू, हंस व सारस ह्या पक्ष्यांनीं त्या नादित झालेल्या होत्या; नानाप्रकारच्या पुष्पांमुळें रंगीबेरंगी दिसत असलेल्या तीरावरील वृक्षांच्या योगानेंही त्यांना शोभा आलेली होती १२; नानाप्रकारच्या प्राकारांनीं व पाषाणांनींही त्या सुशोभित झालेल्या होत्या व त्या वापी त्याच वनांत होत्या. वैदूर्य रत्नाप्रमाणेंच ज्यांची कांति आहे अशा उत्कृष्ट तृणांनीं तें वन युक्त होतें व प्रफु-

तत्र संघर्षजातानां वृक्षाणां पुष्पशालिनाम् ॥ प्रस्तराः पुष्पशबला नभस्तारागणैरिव १४ नन्दनं हि यथेन्द्रस्य ब्राह्मं चैत्ररथं यथा । तथाभूतं हि रामस्य काननं संनिवेशनम् १५ बह्वासनगृहोपेतां लतासनसमावृताम् । अशोकवनिकां स्फीतां प्रविश्य रघुनन्दनः १६ आसने च शुभाकारे पुष्पप्रकरभूषिते । कुशास्तरणसंस्तीर्णे रामः संनिषसाद ह १७ सीतामादाय हस्तेन मधु मैरेयकं शुचि । पाययामास काकुत्स्थः शचीमिव पुरंदरः १८ मांसानि च सुमृष्टानि फलानि विविधानि च । रामस्याभ्यवहारार्थं किंकरास्तूर्णमाहरन् १९ उपानृत्यं च राजानं नृत्यगीतविशारदाः । अप्सरोरगसङ्घाश्च किंनरीपरिवारिताः २० दक्षिणा रूपवत्यश्च स्त्रियः पानवशं गताः । उपानृत्यन्त काकुत्स्थं नृत्यगीतविशारदाः २१ मनोभिरामा रामास्ता रामो रमयतां वरः । रमयामास धर्मात्मा नित्यं परमभूषिताः २२ स तया सीतया सार्धमासीनो विरराज ह । अरुन्धत्या इवासीनो वसिष्ठ इव तेजसा २३ एवं रामो मुदा युक्तः सा ां सुरसुतोपमाम् । रमयामास

---

ळित वृक्षांचे समुदायही त्या ठिकाणीं होते. तेथें दाटीदाटीनें उगवलेल्या प्रफुल्लित वृक्षांच्या नानाप्रकारच्या पुष्पांमुळें चित्रविचित्र झालेले पाषाण नक्षत्रगणांनीं व्याप्त झालेल्या आकाशाप्रमाणें दिसत होते १३,१४. इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें अथवा ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या कुबेराच्या चैत्ररथवनाप्रमाणें त्या रामाच्या वनाचा आकार होता १५. विपुल आसनें व गृहें ह्यांनीं युक्त असून लतासनांनीं व्याप्त झालेल्या त्या भव्य अशोकवनामध्यें रघुनंदन रामानें प्रवेश केला १६; नंतर पुष्पसमुदायांनीं भूषित, शुभाकृतीनें युक्त व दर्भासन घातलेल्या सिंहासनावर राम बसला १७ आणि शचीचा हात धरणाऱ्या इंद्राप्रमाणें सीतेचा हात धरून त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें मैरेयसंज्ञक शुद्ध मद्य तिला पाजिलें १८. उत्कृष्टरीतीनें तयार केलेलीं मांसें आणि नानाप्रकारचीं फळें रामाच्या आहाराकरितां सेवक सत्वर घेऊन आले १९. नृत्य व गायन ह्यांमध्यें निपुण असलेल्या अप्सरांचे समुदाय, उरगगण व किंनरस्त्रिया, ह्यांसहवर्तमान राजासमीप नृत्य करूं लागले २०. मद्यपानानें मत्त झालेल्या परंतु नृत्यगायनामध्यें निपुण असलेल्या कुशल व रूपवती स्त्रियाही त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामासमी नृ रूं लागल्या २१ आणि क्रीडा करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो धर्मा राम उत्कृष्ट री नें भूषित झालेल्या त्या मनोहर स्त्रियांना नेहेमीं आनंद दऊ लागला २२ असो. त्या सीतेसहवर्तमान बसलेला तो राम तेजानें अरुंधतीसहवर्तमान बसलेल्या वसिष्ठाप्रमाणें दिसू लागला २३. अशारीतीनें आनंदयुक्त झालेला राम देवकन्यातुल्य असलेल्या त्या विदेहराजकन्या

वैदेहीमहन्यहनि देववत् २४ तथा तयोर्विहरतोः सीताराघवयोश्चिरम् । अत्यक्रामच्छुभः कालः शैशिरो भोगदः सदा २५ प्राप्तयोर्विविधान्भोगानतीतः शिशिरागमः २६ पूर्वाह्णे धर्मकार्याणि कृत्वा धर्मेण धर्मवित् । शेषं दिवसभागार्धमन्तःपुरगतोऽभवत् २७ सीतापि देवकार्याणि कृत्वा पौर्वाह्णिकानि वै । श्वश्रूणामकरोत्पूजां सर्वासामविशेषतः २८ अभ्यगच्छत्ततो रामं विचित्राभरणाम्बरा । त्रिविष्टपे सहस्राक्षमुपविष्टं यथा शची २९ दृष्ट्वा तु राघवः पत्नीं कल्याणेन समन्विताम् । प्रहर्षमतुलं लेभे साधु साध्विति चाब्रवीत् ३० अब्रवीच्च वरारोहां सीतां सुरसुतोपमाम् । अपत्यलाभो वैदेहि त्वय्ययं समुपस्थितः ॥ किमिच्छसि वरारोहे कामः किं क्रियतां तव ३१ स्मितं कृत्वा तु वैदेही रामं वाक्यमथाब्रवीत् । तपोवनानि पुण्यानि द्रष्टुमिच्छामि राघव ३२ गङ्गातीरोपविष्टानामृषीणामुग्रतेजसाम् । फलमूलाशिनां देव पादमूलेषु वर्तितुम् ३३ एष मे परमः कामो यन्मूलफलभोजिनाम् । अप्येकरात्रिं काकुत्स्थ निवसेयं तपोवने ३४ तथेति च प्रतिज्ञातं रामेणाक्लिष्टकर्मणा । विस्रब्धा भव वैदेहि श्वो गमिष्यस्यसंशयम् ३५ एव-

---

सीतेला देवाप्रमाणें प्रत्यहीं रमवूं लागला २४. ह्याप्रमाणें ते सीताराम पुष्कळ वेळपर्यंत क्रीडा करीत असतांना सर्वदां भोग देणारा शुभ शीत काल निघून गेला २५. ते उभयतां नानाप्रकारचे भोग भोगीत असतांना हिंवाळा निघून गेला २६. धर्मवेत्ता राम पूर्वाह्णसमयीं धर्मकार्यें यथाविधि उरकल्यानंतर दिवसाच्या अवशिष्ट राहिलेल्या अर्ध्या भागामध्यें अंतःपुरांत जात असे २७ आणि सीताही सकाळचीं देव-कार्यें आटोपून सर्व सासवांची एक सारखी पूजा केल्यानंतर २८ स्वर्गामध्यें असलेल्या इंद्राकडे जाणाऱ्या शचीप्रमाणें विचित्र भूषणें व रत्नें धारण करून रामाकडे जात असे २९. आपली पत्नी सुशील आहे असें अवलोकन करून रामाला अतुल हर्ष झाला; 'शाबास ! शाबास !' असे उद्गारही त्यानें काढिले आणि देवकन्येप्रमाणें असलेल्या सुंदरी सीतेला तो ह्मणाला ३० "हे वैदेहि, तुला अपत्यलाभ होण्याचा समय आतां जवळ आला आहे. ह्यास्तव, हे सुंदरि, तुझी काय इच्छा आहे ?" ३१. ह्यावर सीता हास्य करून रामाला ह्मणाली "हे राघवा, पवित्र तपोवनें अवलोकन करण्याची ३२ आणि फळें व मुळें भक्षण करून गंगातीरीं वास्तव्य करीत असलेल्या महातेजस्वी ऋषींच्या चरणासमीप रहाण्याची मला इच्छा झाली आहे ३३. हे काकुत्स्था, फळें व मुळें भक्षण करणाऱ्या ऋषींच्या तपोवनामध्यें एक रात्र तरी वास्तव्य करावें ही माझी उत्कट इच्छा आहे" ३४. ह्यावर 'ठीक आहे' असें त्या पवित्र कर्म करणाऱ्या रामानें तिला

मुक्त्वा तु काकुत्स्थो मैथिलीं जनकात्मजाम् । मध्यकक्षान्तरं रामो निर्जगाम सुहृद्वृतः ३६ [२२७६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः ॥ ४२ ॥

तत्रोपविष्टं राजानमुपासन्ते विचक्षणाः । कथानां बहुरूपाणां हास्यकाराः समन्ततः १ विजयो मधुमत्तश्च काश्यपो मङ्गलः कुलः । सुराजिः कालियो भद्रो दन्तवक्त्रः सुमागधः २ एते कथा बहुविधाः परिहाससमन्विताः । कथयन्ति स्म संहृष्टा राघवस्य महात्मनः ३ ततः कथायां कस्यांचिद्राघवः समभाषत । काः कथा नगरे भद्र वर्तन्ते विषयेषु च ४ मामाश्रितानि कान्याहुः पौरजानपदा जनाः । किं च सीतां समाश्रित्य भरतं किं च लक्ष्मणम् ५ किं नु शत्रुघ्नमुद्दिश्य कैकेयीं किं नु मातरम् । वक्तव्यतां च राजानो वने राज्ये व्रजन्ति च ६ एवमुक्ते तु रामेण भद्रः प्राञ्जलिरब्रवीत् । स्थिताः शुभाः कथा राजन्वर्तन्ते पुरवासिनाम् ७ अयं तु विजयं सौम्य दशग्रीववधार्जितम् । भूयिष्ठं स्वपुरे पौरैः कथ्यन्ते पुरुषर्षभ ८ एवमुक्तस्तु भद्रेण राघवो वाक्यमब्रवीत् । कथयस्व यथातत्त्वं

---

सांगितलें आणि " हे वैदेहि, स्वस्थ रहा; तूं उद्यां निःसंशय जाशील ३५ " असें त्या जनककन्या मैथिलीला सांगून तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम सुहृदांसहवर्तमान मधल्या चौकांत गेला ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४२ ॥

समयसूचक असे खुषमस्कऱ्ये लोक नानाप्रकारच्या गोष्टी राजा बसला असतांना सांगून त्याची सर्वप्रकारें सेवा करीत असत १. विजय, मधुमत्त, काश्यप, मंगल, कुल, सुराजि, कालीय, भद्र, दंतवक्त्र आणि सुमागध २ हे खुषमस्कऱ्ये लोक आनंदानें महात्म्या रामाला नानाप्रकारच्या गोष्टी सांगत असत ३. एकदां कांहीं गोष्ट निघाली असतांना राम ह्मणाला " हे भद्रा, नगरामध्यें व देशामध्यें काय चाललें आहे ? ४; नगरांतील व देशांतील लोक माझ्यासंबंधानें काय गोष्टी बोलत आहेत ? आणि त्याचप्रमाणें सीता, भरत, लक्ष्मण ५, शत्रुघ्न व माता कैकयी ह्यांच्यासंबंधानेंही लोक काय बोलत असतात ? कारण, राजे वनामध्यें असोत अथवा राज्यावर असोत; लोक त्यांना कांहींना कांहीं तरी नांवें ठेवीतच असतात " ६. ह्याप्रमाणें रामानें भाषण केलें असतां भद्र हात जोडून रामाला ह्मणाला " हे राजा, नगरवासीलोकांच्या गोष्टी चांगल्या चाललेल्या असतात ७ आणि, हे सौम्या पुरुषश्रेष्ठा रामा, रावणाच्या वधामुळें प्राप्त झालेला विजय-तर नगरांतील लोक नगरामध्यें फारच वाखाणीत आहेत " ८. असें भद्रानें सांगि-

सर्वं निरवशेषतः ९ शुभाशुभानि वाक्यानि कान्याहुः पुरवासिनः । श्रुत्वेदानीं शुभं कुर्यां न कुर्यामशुभानि च १० कथयस्व च विस्रब्धो निर्भयं विगतज्वरः । कथयन्ति यथा पौराः पापा जनपदेषु च ११ राघवेणैवमुक्तस्तु भद्रः सुरुचिरं वचः । प्रत्युवाच महाबाहुं प्राञ्जलिः सुसमाहितः १२ शृणु राजन्यथा पौराः कथयन्ति शुभाशुभम् । चत्वरापणरथ्यासु वनेषूपवनेषु च १३ दुष्करं कृतवान्रामः समुद्रे सेतुबन्धनम् । अश्रुतं पूर्वकैः कैश्चिद्देवैरपि सदानवैः १४ रावणश्च दुराधर्षो हतः सबलवाहनः । वानराश्च वशं नीता ऋक्षाश्च सह राक्षसैः १५ हत्वा च रावणं सङ्ख्ये सीतामाहृत्य राघवः । अमर्षं पृष्ठतः कृत्वा स्ववेश्म पुनरानयत् १६ कीदृशं हृदये तस्य सीतासंभोगजं सुखम् । अङ्कमारोप्य तु पुरा रावणेन बलाद्धृताम् १७ लङ्कामपि पुरा नीतामशोकवनिकां गताम् । रक्षसां वशमापन्नां कथं रामो न कुत्स्यति १८ अस्माकमपि दारेषु सहनीयं भवि-

---

तलें असतां राम त्याला ह्मणाला " तर मग जें काय असेल तें सर्व तूं कांहींएक शिलक न ठेवितां इत्थंभूत कथन कर ९. बरीं वाईट भाषणें माझ्यासंबंधानें नगरवासी लोक काय करीत असतात ? हें ऐकून घेतल्यानंतर मी आतां लोकांना शुभ वाटत असलेलीं कृत्यें करीत जाईन आणि अशुभ वाटत असलेलीं करणार नाहीं १०. तस्मात्, तूं कांहीं एक भीति मनामध्यें न बाळगितां कुटाळ लोक देशामध्यें माझ्यासंबंधानें काय बोलत असतात तें मला निर्भयपणें व निःशंकपणें कथन कर " ११. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां त्या भद्रानें हात जोडिले आणि चित्त अतिशय स्वस्थ ठेवून फारच मधुर शब्दांनीं त्या महापराक्रमी रामाला ह्मणाला १२ " हे राजा, चवाठे, बाजार, रस्ते, वनें आणि उपवनें ह्यांमध्यें लोक तुझ्यासंबंधानें जें काय बरें वाईट बोलत असतात तें ऐक १३. " समुद्रामध्यें सेतुबंधन हें दुष्कर कृत्य रामानें केलें; हें कृत्य देवदानवांच्या हातूनही घडल्याचें कोणत्याही वृद्ध लोकांच्या सुद्धां ऐकण्यांतही नाहीं १४. अजिंक्य रावणाचा, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान, वध करून राक्षसांसहवर्तमान ऋक्ष व वानर रामानें स्वाधीन करून घेतले १५; संग्रामामध्यें रावणाचा वध करून सीता घेतल्यानंतर क्रोध मागें सारून त्यानें तिला पुनरपि घरीं आणिलें १६. परंतु, सीतेच्या संभोगापासून त्या रामाच्या मनाला काय बरें सुख वाटत असेल ? जिला पूर्वीं रावणानें बलात्कारानें अंकावर घेऊन हरण करून नेलें १७; इतकेंच नव्हे परंतु, पूर्वीं लंकेंत नेल्यानंतर अशोकवनामध्यें नेऊन ठेविलें असतां जी राक्षसांच्या अधीन झालेली होती तिला राम दूषण कसें देत नाहीं ? १८. आतां स्त्रियांसंबंधानें असला प्रकार आह्मांलाही

ष्यति । यथा हि कुरुते राजा प्रजास्तमनुवर्तते १९ एवं बहुविधा वाचो वदन्ति पुरवासिनः । नगरेषु च सर्वेषु राजजनपदेषु च २० तस्यैवं भाषितं श्रुत्वा राघवः परमार्तवत् । उवाच सुहृदः सर्वान्कथमेतद्वदन्तु माम् २१ सर्वे तु शिरसा भूमावभिवाद्य प्रणम्य च । प्रत्यूचू राघवं दीनमेवमेतन्न संशयः २२ श्रुत्वा तु वाक्यं काकुत्स्थः सर्वेषां समुदीरितम् । विसर्जयामास तदा वयस्याञ्छत्रुसूदनः २३ [ २२९९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे त्रिचत्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

विसृज्य तु सुहृद्वर्गं बुद्ध्या निश्चित्य राघवः । समीपे द्वाःस्थमासीनमिदं वचनमब्रवीत् १ शीघ्रमानय सौमित्रिं लक्ष्मणं शुभलक्षणम् । भरतं च महाभागं शत्रुघ्नमपराजितम् २ रामस्य वचनं श्रुत्वा द्वाःस्थो मूर्ध्नि कृताञ्जलिः । लक्ष्मणस्य गृहं गत्वा प्रविवेशानिवारितः ३ उवाच सुमहात्मानं वर्धयित्वा कृताञ्जलिः । द्रष्टुमिच्छति राजा त्वां गम्यतां तत्र मा चिरम् ४ बाढमित्येव सौमित्रिः कृत्वा राघवशासनम् । प्राद्रवद्रथमारुह्य राघ-

सहन होऊं लागेल. कारण, जसें राजा करूं लागतो तसें लोकही त्याला अनुसरून वागूं लागतात " १९. अशीं नानाप्रकारचीं भाषणें, हे राजा, नागरिकजन सर्व नगरांमध्यें व देशांमध्यें तुझ्यासंबंधानें करीत असतात " २०. ह्याप्रमाणें त्यानें केलेलें भाषण श्रवण करून राम अतिशय कष्टी झाला आणि "हें काय आहे हें आपण मला सांगा " असें तो आपल्या सर्व सुहृदांना ह्मणाला २१. तेव्हां त्या सर्वांनींही भूमीवर मस्तक ठेवून रामाला अभिवंदन व प्रणाम केला आणि ' भद्र सांगत आहे ह्याप्रमाणें हें निःसंशय खरें आहे ' असें त्या दीन राघवाला त्यांनीं उत्तर दिलें २२. तेव्हां सर्वांनीं उच्चारिलेलें तें भाषण श्रवण केल्यावर शत्रुनाशक रामानें त्या सर्व मित्रांना निरोप दिला २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४३ ॥

मित्रवर्गाला निरोप देऊनच मनाचा पक्का निश्चय करून राम समीप बसलेल्या द्वारपालाला ह्मणाला १ " शुभ लक्षणांनीं युक्त असलेला सुमित्रापुत्र लक्ष्मण, महाभाग्यवान् भरत, आणि अजिंक्य शत्रुघ्न ह्यांना तूं सत्वर इकडे घेऊन ये " २. रामाचें हें भाषण श्रवण करून द्वारपालानें मस्तकीं हात जोडिले आणि लक्ष्मणाच्या घरीं गेल्यावर तो अडथळा न होतां आंत प्रविष्ट झाला ३. नंतर हात जोडून महात्म्या लक्ष्मणाचा जयजयकार केल्यावर तो त्याला ह्मणाला " राजा आपल्या भेटीची इच्छा करीत आहे; ह्यास्तव, विलंब न करितां. तिकडे चलावें " ४. ह्यावर ' ठीक आहे ' असें ह्मणून

वस्य निवेशनम् ५ प्रयान्तं लक्ष्मणं दृष्ट्वा द्वाःस्थो भरतमन्तिकात् । उवाच भरतं तत्र वर्धयित्वा कृताञ्जलिः ६ विनयावनतो भूत्वा राजा त्वां द्रष्टुमिच्छति ७ भरतस्तु वचः श्रुत्वा द्वाःस्थाद्रामसमीरितम् । उत्पपातासनात्तूर्णं पद्भ्यामेव महाबलः ८ दृष्ट्वा प्रयान्तं भरतं त्वरमाणः कृताञ्जलिः । शत्रुघ्नभवनं गत्वा ततो वाक्यमुवाच ह ९ एह्यागच्छ रघुश्रेष्ठ राजा त्वां द्रष्टुमिच्छति । गतो हि लक्ष्मणः पूर्वं भरतश्च महायशाः १० श्रुत्वा तु वचनं तस्य शत्रुघ्नः परमासनात् । शिरसा वन्द्य धरणीं प्रययौ यत्र राघवः ११ द्वाःस्थस्त्वागम्य रामाय सर्वानेव कृताञ्जलिः । निवेदयामास तथा भ्रातॄन्स्वान्समुपस्थितान् १२ कुमारानागताञ्छ्रुत्वा चिन्ताव्याकुलितेन्द्रियः अवाङ्मुखो दीनमना द्वाःस्थं वचनमब्रवीत् १३ प्रवेशय कुमारांस्त्वं मत्समीपं त्वरान्वितः । एतेषु जीवितं मह्यमेते प्राणाः प्रिया मम १४ आज्ञप्तास्तु नरेन्द्रेण कुमाराः शुक्लवाससः । प्रह्वाः प्राञ्जलयो भूत्वा विविशुस्ते समाहिताः १५ ते तु दृष्ट्वा मुखं तस्य सग्रहं शशिनं यथा । संध्या-

---

लक्ष्मणानें रामाची आज्ञा मान्य केली आणि रथावर आरूढ होऊन तो रामाच्या घराकडे धांवला ५. लक्ष्मण जाऊं लागल्याचें अवलोकन करून द्वारपाल भरतासमीप गेला आणि हात जोडून भरताचा जयजयकार केल्यानंतर विनयानें नम्र होऊन त्याला ह्मणाला " राजा आपल्या भेटीची इच्छा करीत आहे " ६, ७. द्वारपालानें रामासंबंधीं केलेलें हें भाषण श्रवण करून महाबलाढ्य भरत आसनावरून सत्वर उठला आणि पायांनींच निघाला ८. तेव्हां भरत जाऊं लागल्याचें अवलोकन करून द्वारपालानें त्वरा केली आणि शत्रुघ्नाच्या घरीं गेल्यावर हात जोडून तो त्याला ह्मणाला ९ " हे रघुवंशजश्रेष्ठा, ये ये; राजा तुझ्या दर्शनाची इच्छा करीत आहे. महायशस्वी भरत व लक्ष्मण हे पूर्वींच गेले आहेत " १०. हे त्याचें भाषण श्रवण केल्यावर शत्रुघ्न सिंहासनावरून उठला आणि रामाला उद्देशून भूमीवर मस्तक ठेविल्यानंतर तो रामाकडे गेला ११. नंतर द्वारपाल रामाकडे आला आणि " आपले सर्वही भ्राते प्राप्त झाले आहेत " असें त्यानें हात जोडून रामाला निवेदन केलें १२. तेव्हां चिंतेनें ज्याचें मन व्याकुल झालेलें आहे व अंतःकरणामध्यें खिन्न होऊन ज्यानें मुख खालीं घातलें आहे असा तो राम राजकुमार आल्याचें श्रवण करून द्वारपालाला ह्मणाला १३ " राजकुमारांना माझ्यासमीप सत्वर घेऊन ये; ह्यांच्यावरच माझें जीवित अवलंबून आहे व हे माझे प्रिय प्राण आहेत " १४. ह्याप्रमाणें राजाची आज्ञा झाली असतां शुभ्रवर्ण वस्त्रें ज्यांनीं परिधान केलेलीं आहेत असे ते राजकुमार चित्त स्वस्थ ठेवून,

गतामिवादित्यं प्रभया परिवर्जितम् १६बाष्पपूर्णे च नयने दृष्ट्वा रामस्य धीमतः।
हतशोभं यथा पद्मं मुखं वीक्ष्य च तस्य ते १७ ततोऽभिवाद्य त्वरिताः पादौ
रामस्य मूर्धभिः । तस्थुः समाहिताः सर्वे रामस्त्वश्रूण्यवर्तयत् १८ तान्प-
रिष्वज्य बाहुभ्यामुत्थाप्य च महाबलः। आसनेष्वासतेत्युक्त्वा ततो वाक्यं
जगाद ह १९ भवन्तो मम सर्वस्वं भवन्तो जीवितं मम । भवद्भिश्च कृतं राज्यं
पालयामि नरेश्वराः २० भवन्तः कृतशास्त्रार्था बुद्ध्या च परिनिष्ठिताः ।
संभूय च मदर्थोऽयमन्वेष्टव्यो नरेश्वराः २१ तथा वदति काकुत्स्थे अव-
धानपरायणाः । उद्विग्नमनसः सर्वे किं नु राजाभिधास्यति २२ [२३२१]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे चतुश्चत्वा-
रिंशः सर्गः ॥ ४४ ॥

तेषां समुपविष्टानां सर्वेषां दीनचेतसाम् । उवाच वाक्यं काकुत्स्थो
मुखेन परिशुष्यता १ सर्वे शृणुत भद्रं वो मा कुरुध्वं मनोऽन्यथा । पौराणां
मम सीतायां यादृशी वर्तते कथा २ पौरापवादः सुमहांस्तथा जनपदस्य

---

हात जोडून व नम्र होऊन आंत प्रविष्ट झाले १५. नंतर ग्रहण लागलेल्या चंद्राप्रमाणें अथवा संध्याकालीं प्रभाहीन झालेल्या सूर्याप्रमाणें त्या बिचाऱ्या रामाचें मुख आणि अश्रूंनीं भरलेले नेत्र त्यांनीं अवलोकन केले व शोभाहीन झालेल्या कमलाप्रमाणें पुनरपि त्याचें मुख अवलोकन करून १६, १७ त्यांनीं सत्वर रामाच्या चरणांवर मस्तकानें अभिवंदन केलें व ते सर्वही स्वस्थ उभे राहिल्यावर राम अश्रु ढाळूं लागला १८. नंतर त्यांना हातांनीं कवटाळून धरून व उठवून ' आसनावर बसा', असें त्यानें त्यांना सांगितलें आणि नंतर तो त्यांना ह्मणाला १९ " तुह्मी माझें सर्वस्व व माझें जीवित आहां आणि, हे राजपुत्रहो, तुह्मींच संपादन केलेलें राज्य मी परिपालन करीत आहे २०. तुमची बुद्धि परिपक्व झाली असून शास्त्रतात्पर्यही तुह्मीं जाणिलें आहे व त्याप्रमाणें तुह्मी वागतही आहां. ह्यास्तव, हे राजपुत्रहो, तुह्मी सर्व मिळून मी काय ह्मणत आहे ह्याचा विचार करा " २१. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम बोलूं लागला असतां ' आता राजा काय सांगेल ' ह्याविषयीं सर्वही मनामध्यें उद्विग्न होऊन व त्याच्याकडे लक्ष्य देऊन उभे राहिले २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला॥४४॥

ते सर्वही मनामध्यें खिन्न होऊन बसले असतां दीन वदनानें युक्त झालेला ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्यांना ह्मणाला १ " तुमचें कल्याण असो; दुसरीकडे लक्ष्य न देतां तुह्मी सर्व श्रवण करा. सीतेविषयीं आह्मांसंबंधानें लोक काय बोलत आहेत हें तुह्मी ऐका २. नगरांतील

च । वर्तते मयि बीभत्सा सा मे मर्माणि कृन्तति ३ अहं किल कुले जात
इक्ष्वाकूणां महात्मनाम् । सीतापि सत्कुले जाता जनकानां महात्मनाम् ४
जानासि त्वं यथा सौम्य दण्डके विजने वने । रावणेन हृता सीता स च
विध्वंसितो मया ५ तत्र मे बुद्धिरुत्पन्ना जनकस्य सुतां प्रति । अत्रोषि-
तामिमां सीतामानयेयं कथं पुरीम् ॥ प्रत्ययार्थं ततः सीता विवेश ज्वलनं
तदा ६ प्रत्यक्षं तव सौमित्रे देवानां हव्यवाहनः । अपापां मैथिलीमाह
वायुश्चाकाशगोचरः ७ चन्द्रादित्यौ च शंसेते सुराणां संनिधौ पुरा ।
ऋषीणां चैव सर्वेषामपापां जनकात्मजाम् ८ एवं शुद्धसमाचारा देवग-
न्धर्वसंनिधौ । लङ्काद्वीपे महेन्द्रेण मम हस्ते निवेदिता ९ अन्तरात्मा च
मे वेत्ति सीतां शुद्धां यशस्विनीम् । ततो गृहीत्वा वैदेहीमयोध्यामह-
मागतः १० अयं तु मेमहान्वादः शोकश्च हृदि वर्तते । पौरापवादः सुम-
हांस्तथा जनपदस्य च ११ अकीर्तिर्यस्य गीयेत लोके भूतस्य कस्यचित् ।
पतत्येवाधमाँल्लोकान्यावच्छब्दः प्रकीर्त्यते १२अकीर्तिर्निन्द्यते देवैः कीर्ति-

---

व देशांतील लोकांचा फारच मोठा अपवाद आहे. ते माझी निंदा करीत आहेत व
ती निंदा माझ्या मर्मांचा भेद करीत आहे ३ खरोखर महात्म्या इक्ष्वाकूंच्या कुला-
मध्यें मी झालों आहें आणि सीता ही महात्म्या जनकाच्या सत्कुलामध्यें उत्पन्न झाली
आहे ४. हे विनयसंपन्न, निर्जन दंडकारण्यामध्यें रावणानें सीता कशी हरण करून
नेली व त्याचा वध मीं कसा केला हें तुम्ही जाणीतच आहां ५. " ह्या ठिकाणीं राहि-
लेली सीता अयोध्यानगरीप्रत मला कशी नेतां येईल " ही शंका त्या जनककन्येसं-
बंधानें मला तथेंच आली होती. तेव्हां खात्रीकरितां सीता अग्नीमध्यें प्रविष्ट झाली ६.
हे लक्ष्मणा, देवांचे संनिध हव्य नेणाऱ्या अग्नीनें व आकाशामध्यें संचार करणाऱ्या
वायूनें मैथिली निष्पाप असल्याचें तुझ्यासमक्षच सांगितलें आहे ७; आणि सर्व ऋषि
व देव ह्यांचे संनिध सूर्यचंद्रांनीही पूर्वी जनककन्या निष्पाप असल्याचें कथन केलें आहे ८.
ह्याप्रमाणें देव आणि गंधर्व ह्यांचे संनिध आचरणानें शुद्ध झालेली सीता लंकाद्वीपा-
मध्यें महेंद्रानें माझ्या हातीं दिली ९ आणि यशस्विनी सीता शुद्ध असल्याची माझ्या
मनामध्यें खात्री आहे. तेव्हां सीतेला घेऊन मी अयोध्येला आलों १०. परंतु, माझ्या-
संबंधानें ही मोठीच निंदा सांप्रत सुरू झाल्यामुळें माझ्या मनाला दुःख होत आहे. कारण,
नगरांतील व देशांतीलही लोकांचा फारच मोठा माझ्यासंबंधानें अपवाद आहे ११. जगता-
मध्यें ज्या कोणा प्राण्याची निंदा होऊं लागते तो प्राणी ती निंदा कायम असेपर्यंत नरका-
मध्यें पडून रहातो १२; देवही अपकीर्तीची निंदा करीत असतात; कीर्तीची लोकांमध्यें

लोकेषु पूज्यते । कीर्त्यर्थं तु समारम्भः सर्वेषां सुमहात्मनाम् १३ अप्यहं जीवितं जह्यां युष्मान्वा पुरुषर्षभाः । अपवादभयाद्भीतः किं पुनर्जनकात्मजाम् १४ तस्माद्भवन्तः पश्यन्तु पतितं शोकसागरे । न हि पश्याम्यहं भूतं किंचिद्दुःखमतोऽधिकम् १५ श्वस्त्वं प्रभाते सौमित्रे सुमन्त्राधिष्ठितं रथम् । आरुह्य सीतामारोप्य विषयान्ते समुत्सृज १६ गङ्गायास्तु परे पारे वाल्मीकेस्तु महात्मनः । आश्रमो दिव्यसंकाशस्तमसातीरमाश्रितः १७ तत्रैतां विजने देशे विसृज्य रघुनन्दन । शीघ्रमागच्छ सौमित्रे कुरुष्व वचनं मम १८ न चास्मि प्रतिवक्तव्यः सीतां प्रति कथञ्चन । तस्मात्त्वं गच्छ सौमित्रे नात्र कार्या विचारणा १९ अप्रीतिर्हि परा मह्यं त्वयैतत्प्रतिवारिते । शापिता हि मया यूयं पादाभ्यां जीवितेन च २० ये मां वाक्यान्तरे ब्रूयुरनुनेतुं कथञ्चन । अहिता नाम ते नित्यं मदभीष्टविघातनात् २१ मानयन्तु भवन्तो मां यदि मच्छासने स्थिताः । इतोऽद्य नीयतां सीता कुरुष्व वचनं मम २२ पूर्वमुक्तोऽहमनया गङ्गातीरेऽहमाश्रमान् । पश्येय-

---

प्रशंसा होत असते आणि सर्वही महात्मे कीर्ति संपादन करण्याकरितांच खटपट करीत असतात १३. हे पुरुषश्रेष्ठहो, लोकापवादरूप भयाला भिऊन मी जीविताचा अथवा तुमचाही त्याग करीन; मग जनककन्येची गोष्ट पाहिजे कशाला ? १४ तस्मात्, सांप्रत शोकसागरामध्यें पडलेल्या मला तुह्मी अवलोकन करा. ह्यापक्षां अधिक दुःखदायक अशी कोणतीही गोष्ट प्राप्त झाल्याचें दिसत नाहीं १५. तस्मात्, हे लक्ष्मणा, उद्यां सकाळीं सुमंत्र सारथि ज्याच्यावर आहे अशा रथावर आरूढ होऊन तूं सीतेला वर घे आणि ह्या देशाच्या हद्दीपलीकडे सोडून दे १६. गंगा ओलांडून गेल्यावर तमसानदीचे तीरीं महात्म्या वाल्मीकिमुनींचा दिव्य आश्रम आहे १७. तस्मात्, हे रघुनंदना लक्ष्मणा, तेथें निर्जन प्रदेशामध्यें हिला सोडून देऊन तूं सत्वर परत ये. हें माझें ह्मणणें एक १८. सीतेसंबंधानें ह्याचे उलट तूं मला कांहींएक सांगूं नकोस. तस्मात्, हे लक्ष्मणा, ह्याविषयीं कांहींएक विचार न करितां तूं चालता हो १९. तूं ह्याला आड येशील तर मला अतिशय दुःख होईल. ह्यास्तव, मी आपल्या पायांची व जीविताची तुह्मांला शपथ घातली आहे २०. माझ्या भाषणाविरुद्ध जे कोणी माझी समजूत करण्याकरितां कसल्याही प्रकारचें भाषण करितील त्यांच्या योगानें मला इष्ट असलेल्या गोष्टीचा विघात होत असल्यामुळें ते माझे सर्वदां शत्रु समजले जातील २१. तुह्मी जर माझ्या आज्ञेप्रमाणें वागत असाल तर मला मान द्या; सीतेला येथून घेऊन जा. हें माझें ह्मणणें एक २२. " गंगातीरीं असलेले आश्रम अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे " असें

मिति तस्याश्च कामः संवर्त्यतामयम् २३ एवमुक्त्वा तु काकुत्स्थो बाष्पेण पिहितेक्षणः । संविवेश स धर्मात्मा भ्रातृभिः परिवारितः २४ शोकसंविग्नहृदयो निशश्वास यथा द्विपः २५ [२३४६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे पञ्चचत्वारिंशः सर्गः ॥ ४५ ॥

ततो रजन्यां व्युष्टायां लक्ष्मणो दीनचेतनः । सुमन्त्रमब्रवीद्वाक्यं मुखेन परिशुष्यता १ सारथे तुरगाञ्शीघ्रान्योजयस्व रथोत्तमे । स्वास्तीर्णं राजवचनात्सीतायाश्चासनं शुभम् २ सीता हि राजवचनादाश्रमं पुण्यकर्मणाम् । मया नेया महर्षीणां शीघ्रमानीयतां रथः ३ सुमन्त्रस्तु तथेत्युक्त्वा युक्तं परमवाजिभिः । रथं सुरुचिरप्रख्यं स्वास्तीर्णं सुखशय्यया ४ आनीयोवाच सौमित्रिं मित्राणां मानवर्धनम् । रथोऽयं समनुप्राप्तो यत्कार्यं क्रियतांप्रभो५एवमुक्तः सुमन्त्रेण राजवेश्मनि लक्ष्मणः।प्रविश्य सीतामासाद्य व्याजहार नरर्षभः ६ त्वया किलैष नृपतिर्वरं वै याचितः प्रभुः । नृपेण च प्रतिज्ञातमाज्ञप्तश्चाश्रमं प्रति ७ गङ्गातीरे मया देवि ऋषीणामाश्रमा-

---

तिनें पूर्वीच मला सांगितलें आहे. ह्यास्तव, ही तिची इच्छा परिपूर्ण होऊं दे " २३. ह्याप्रमाणें त्यांना सांगितल्यानंतर ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले आणि भ्रात्यांनीं परिवेष्टित असलेला तो धर्मात्मा गृहामध्यें प्रविष्ट झाला २४ व शोकानें हृदय उद्विग्न झालें असल्यामुळें गजाप्रमाणें तो सुस्कारे टाकूं लागला २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडांपैकीं पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४५ ॥

तदनंतर रात्र उजाडल्यावर मनामध्यें खिन्न झालेला लक्ष्मण दीन मुखानें सुमंत्राला ह्मणाला १ " हे सारथे, उत्कृष्ट रथाला शीघ्र गमन करणारे अश्व जोड आणि राजाच्या आज्ञेप्रमाणें त्या रथामध्यें सीतेचें शुभ आसन चांगलें घाल २. कारण, राजाच्या आज्ञेनें पुण्यवान् महर्षींच्या आश्रमामध्यें सीता मला न्यावयाची आहे. ह्यास्तव, रथ सत्वर घेऊन ये " ३. ह्यावर ' ठीक आहे ' असें ह्मणून सुमंत्र उत्कृष्ट अश्व ज्याला जोडिले आहेत आणि सुखशय्या ज्यांत पसरली आहे असा अत्यंत मनोहर रथ ४ मित्रांचा मान वृद्धिंगत करणाऱ्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाकडे आणून तो त्याला ह्मणाला " हे प्रभो, हा रथ आला. आतां काय करावयाचें ? तें कळूं द्या " ५. ह्याप्रमाणें सुमंत्रानें सांगितलें असतां लक्ष्मण राजवाड्यामध्यें गेला आणि सीतेसंनिध जाऊन तो पुरुषश्रेष्ठ तिला ह्मणाला ६ " तूं खरोखर ह्या प्रभु राजापाशीं आश्रमाला जाण्यासंबंधानें एक वर मागितला होतास व त्यानेंही तो देण्याचें कबूल करून मला आज्ञा

ऋशुभान् । शीघ्रं गत्वा तु वैदेहि शासनात्पार्थिवस्य नः ८ अरण्ये मुनिभिर्जुष्टे अवनेया भविष्यसि । एवमुक्ता तु वैदेही लक्ष्मणेन महात्मना ९ प्रहर्षमतुलं लेभे गमनं चाप्यरोचयत् । वासांसि च महार्हाणि रत्नानि विविधानि च १० गृहीत्वा तानि वैदेही गमनायोपचक्रमे । इमानि मुनिपत्नीनां दास्याम्याभरणान्यहम् ११ वस्त्राणि च महार्हाणि धनानि विविधानि च । सौमित्रिस्तु तथेत्युक्त्वा रथमारोप्य मैथिलीम् १२ प्रययौ शीघ्रतुरगं रामस्याज्ञामनुस्मरन् । अब्रवीच्च तदा सीता लक्ष्मणं लक्ष्मिवर्धनम् १३ अशुभानि बहून्येव पश्यामि रघुनन्दन । नयनं मे स्फुरत्यद्य गात्रोत्कम्पश्च जायते १४ हृदयं चैव सौमित्रे अस्वस्थमिव लक्षये । औत्सुक्यं परमं चापि अधृतिश्च परा मम १५ शून्यामेव च पश्यामि पृथिवीं पृथुलोचन । अपि स्वस्ति भवेत्तस्य भ्रातुस्ते भ्रातृवत्सल १६ श्वश्रूणां चैव मे वीर सर्वासामविशेषतः । पुरे जनपदे चैव कुशलं प्राणिनामपि १७ इत्यञ्जलिकृता सीता देवता अभ्ययाचत । लक्ष्मणोऽर्थं ततः श्रुत्वा शिरसा वन्द्य मैथिलीम् १८ शिवमित्यब्रवीद्धृष्टो हृदयेन विशुष्यता ।

---

केली आहे ७. हे देवि वैदेहि, आमच्या राजाच्या आज्ञेनें गंगातीरीं ऋषींच्या शुभ आश्रमामध्यें सत्वर जाऊन ८ मुनींनीं आश्रित अशा अरण्यामध्यें मी तुला पोंचविणार आहें." ह्याप्रमाणें महात्म्या लक्ष्मणानें सीतेला सांगितलें असतां ९ तिला अनुपम हर्ष झाला आणि जाण्याचेंही तिनें मनामध्यें आणिलें. नंतर मोठीं मूल्यवान् वस्त्रें व नानाप्रकारचीं रत्नें तिनें बरोबर घेतलीं आणि " हीं भूषणें, मोठीं मूल्यवान् वस्त्रें व नानाप्रकारच्या वस्तु मी ऋषिपत्न्यांना देईन " असें ह्मणून ती जावयास निघाली. तेव्हां 'ठीक आहे' असें ह्मणून सुमित्रापुत्र लक्ष्मणानें सीतेला शीघ्रगामी अश्व जोडिलेल्या रथावर घेतलें आणि रामाच्या आज्ञेची आठवण ठेवून तो निघाला. तेव्हां लक्ष्मी वृद्धिंगत करणाऱ्या लक्ष्मणाला सीता ह्मणाली १०,११,१२,१३ " हे रघुनंदना, मला फारच अपशकुन होत आहेत. आज माझा उजवा डोळा लवत असून शरीराला कंप सुटला आहे व, हे सुमित्रानंदना, माझें हृदयही अस्वस्थ झालें आहे. मला फारच उत्कंठा लागली आहे व पराकाष्ठेची भीति वाटत आहे. हे विशालनयना लक्ष्मणा, सर्व पृथ्वी मला शून्य दिसत आहे. हे भ्रातृवत्सला, तुझा तो भ्राता कुशल आहेनां ? १४,१५,१६ त्याचप्रमाणें हे वीरा, सर्व सास्वांचें आणि नगरांतील व देशांतील प्राण्यांचें कुशल आहेनां ?" १७. ह्याप्रमाणें लक्ष्मणाशीं भाषण केल्यानंतर सीतेनें हात जोडून देवतांची प्रार्थना केली. तेव्हां तें भाषण ऐकून लक्ष्मणानें त्या मैथिलीला मस्तकानें वंदन केलें १८ आणि

ततो वासमुपागम्य गोमतीतीर आश्रमे १९ प्रभाते पुनरुत्थाय सौमित्रिः सूतमब्रवीत् । योजयस्व रथं शीघ्रमद्य भागीरथीजलम् २० शिरसा धारयिष्यामि त्रियम्बक इवौजसा । सोऽश्वान्विचारयित्वा तु रथे युक्तान्मनोजवान् २१ आरोहस्वेति वैदेहीं सूतः प्राञ्जलिरब्रवीत् । सा तु सूतस्य वचनादारुरोह रथोत्तमम् २२ सीता सौमित्रिणा सार्धं सुमन्त्रेण च धीमता । आससाद विशालाक्षी गङ्गां पापविनाशिनीम् २३ अथार्धदिवसं गत्वा भागीरथ्या जलाशयम् । निरीक्ष्य लक्ष्मणो दीनः प्ररुरोद महास्वनः २४ सीता तु परमायत्ता दृष्ट्वा लक्ष्मणमातुरम् । उवाच वाक्यं धर्मज्ञा किमिदं रुद्यते त्वया २५ जाह्नवीतीरमासाद्य चिराभिलषितं मम । हर्षकाले किमर्थं मां विषादयसि लक्ष्मण २६ नित्यं त्वं रामपार्श्वेषु वर्तसे पुरुषर्षभ । कच्चिद्विनाकृतस्तेन द्विरात्रं शोकमागतः २७ ममापि दयितो रामो जीवितादपि लक्ष्मण । न चाहमेवं शोचामि मैवं त्वं बालिशो भव २८ तारयस्व च मां गङ्गां दर्शयस्व च तापसान् । ततो मुनिभ्यो वासांसि

---

अंतःकरण जरी खिन्न झालें होतें तरी वरवर आनंदित असल्यासारखें दाखवून तो तिला ह्मणाला " सर्वांचें क्षेम आहे. " तदनंतर गोमतीनदीच्या तीरावर एका आश्रमामध्यें वास्तव्य करण्याकरितां तो उतरला १९ आणि प्रभातकालीं पुनरपि उठून तो सुमित्रापुत्र लक्ष्मण सारथ्याला ह्मणाला "सत्वर रथ जोड. स्वसामर्थ्यानें मस्तकीं गंगोदक धारण करणाऱ्या शंकराप्रमाणें आज मी भागीरथीजल मस्तकीं धारण करीन ". असें लक्ष्मणानें सांगितल्यावर त्या सारथ्यानें मनाप्रमाणें वेगवान् असलेले ते अश्व चालत आणवून रथाला जोडिले आणि ' बसा ' असें तो सारथि हात जोडून २०,२१ सीतेला ह्मणाला. तेव्हां सारथ्याच्या सांगण्याप्रमाणें ती त्या उत्कृष्ट रथावर आरूढ झाली २२ आणि लक्ष्मण व विचारी सुमंत्र ह्यांसहवर्तमान ती विशालनयना सीता पापनाशक गंगेसमीप आली २३. नंतर अर्धादिवसपर्यंत चालून गेल्यावर भागीरथीचें पात्र दृष्टीं पडलें असतां लक्ष्मण दीन होऊन उच्च स्वरानें रडूं लागला २४. तेव्हां अत्यंत पराधीन असलेली ती धर्मज्ञ सीता लक्ष्मण दुःखी पाहून त्याला ह्मणाली " तूं रडत आहेस हें काय? २५. पुष्कळ दिवसपर्यंत मनामध्यें घोळत असलेल्या जह्नवीतीरावर आल्यानंतर हर्ष प्राप्त होण्याचा समय असतांना, हे लक्ष्मणा, तूं मला कशाकरितां खेद उत्पन्न करीत आहेस? २६. हे पुरुषश्रेष्ठा, तूं नेहेमीं रामाचे संनिध असतोस; तेव्हां त्याच्यावांचून दोन रात्रीं गेल्यामुळें तुला दुःख होत आहे कीं काय ? २७. हे लक्ष्मणा, मलासुद्धां जीवितापेक्षां हा राम प्रिय आहे. परंतु, मी ह्याप्रमाणें शोक करीत नाहीं. ह्यास्तव, तूं असा बालिश

दास्याम्याभरणानि च २९ ततः कृत्वा महर्षीणां यथार्हमभिवादनम् । तत्र चैकां निशामुष्य यास्यामस्तां पुरीं पुनः ३० ममापि पद्मपत्राक्षं सिंहोरस्कं कृशोदरम् । त्वरते हि मनो द्रष्टुं रामं रमयतां वरम् ३१ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा प्रमृज्य नयने शुभे । नाविकानाह्वयामास लक्ष्मणः परवीरहा ॥ इयं च सज्जा नौश्चेति दाशाः प्राञ्जलयोऽब्रुवन् ३२ तितीर्षुर्लक्ष्मणो गङ्गां शुभां नावमुपारुहत् । गङ्गां संतारयामास लक्ष्मणस्तां समाहितः ३३ [ २३७९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः ॥ ४६ ॥

अथ नावं सुविस्तीर्णां नैषादीं राघवानुजः । आरुरोह समायुक्तां पूर्वमारोप्य मैथिलीम् १ सुमन्त्रं चैव सरथं स्थीयतामिति लक्ष्मणः । उवाच शोकसंतप्तः प्रयाहीति च नाविकम् २ ततस्तीरमुपागम्य भागीरथ्याः स लक्ष्मणः । उवाच मैथिलीं वाक्यं प्राञ्जलिर्बाष्पसंवृतः ३ हृद्गतं मे महच्छल्यं यस्मादार्येण धीमता । अस्मिन्निमित्ते वैदेहि लोकस्य वचनीकृतः ४ श्रेयो हि

---

होऊं नको २८. मला गंगा उतरून ने आणि मुनींचें दर्शन करीव; ह्मणजे मी मुनींना वस्त्रें व भूषणें देईन २९; तदनंतर महर्षींना मी त्यांच्या योग्यतेप्रमाणें अभिवंदन करीन आणि एकरात्र आपण तेथें वास्तव्य करून पुनरपि अयोध्यानगरीला परत जाऊं ३०. कमलपत्राप्रमाणें ज्याचे नेत्र विशाल आहेत, ज्याचें वक्षस्थल सिंहासारिखें आहे, ज्याचें उदर कृश आहे आणि आनंद देणाऱ्यांमध्येंही जो श्रेष्ठ आहे अशा रामाला अवलोकन करण्याविषयीं माझ्याही मनाला उत्कंठा प्राप्त झाली आहे " ३१. तिचें हें भाषण श्रवण करून व आपले शुभ नेत्र पुसून शत्रुवीरनाशक लक्ष्मणानें नावाड्यांना हाक मारिली. तेव्हां 'ही नाव तयार आहे' असें ते तांडल हात जोडून त्याला ह्मणाले असतां ३२ गंगा तरून जाण्याच्या उद्देशानें लक्ष्मण त्या शुभ नावेवर आरूढ झाला आणि सावध राहून त्यानें ती सीता गंगा उतरून नेली ३३ ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडांतील शेहेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४६ ॥

कोळ्यांनीं सज्ज करून आणिलेल्या त्या अतिविशाल नावेवर प्रथमतः सीतेला चढवून नंतर रामानुज लक्ष्मण स्वतः चढला १ व " रथासहवर्तमान येथें उभा रहा " असें सुमंत्राला सांगून 'चल' असें नावाड्यालाही शोकसंतप्त झालेल्या लक्ष्मणानें सांगितलें २. तदनंतर भागीरथीच्या परतीरीं गेल्यावर लक्ष्मणाचे नेत्र अश्रूंनीं भरून गेले व तो हात जोडून सीतेला ह्मणाला ३ " हे वैदेहि, ह्या कारणाकरितां विचारी व सभ्य

मरणं मेऽद्य मृत्युर्वा यत्परं भवेत्।न चास्मिन्नीदृशे कार्ये नियोज्यो लोकनि-
न्दिते५प्रसीद च न मे पापं कर्तुमर्हसि शोभने । इत्यञ्जलिकृतो भूमौ निप-
पात स लक्ष्मणः ६ रुदन्तं प्राञ्जलिं दृष्ट्वा काङ्क्षन्तं मृत्युमात्मनः । मैथिली
भृशमंविग्ना लक्ष्मणं वाक्यमब्रवीत्.७ किमिदं नावगच्छामि ब्रूहि तत्त्वेन
लक्ष्मण। पश्यामि त्वां न च स्वस्थमपि क्षेमं महीपतेः ८ शापितोऽसि नर-
न्द्रेण यत्त्वं संतापमागतः । तद्ब्रूयाः संनिधौ मह्यमहमाज्ञापयामि ते९वैदेह्या
चोद्यमानस्तु लक्ष्मणो दीनचेतनः । अवाङ्मुखो बाष्पगलो वाक्यमेतदुवाच
ह १० श्रुत्वा परिषदो मध्ये ह्यपवादं सुदारुणम् । पुरे जनपदे चैव त्वत्कृते
जनकात्मजे ॥ रामः संतप्तहृदयो मां निवेद्य गृहं गतः ११ न तानि वचनी-
यानि मया देवि तवाग्रतः । यानि राज्ञा हृदि न्यस्तान्यमर्षात्पृष्ठतः
कृतः १२ सा त्वं त्यक्ता नृपतिना निर्दोषा मम संनिधौ । पौरापवादभी-
तेन ग्राह्यं देवि न तेऽन्यथा १३अश्रमान्तेषु च मया त्यक्तव्या त्वं भवि-

रामानें माझी योजना करून मला लोकनिंदेस पात्र केल्यामुळें माझ्या हृदयामध्यें मोठें शल्य उत्पन्न झालें आहे ४. लोकापवादास पात्र अशा ह्या कार्याचे ठिकाणीं ज्याअर्थी माझी योजना होत आहे त्याअर्थी आज जर मला मरण येईल तर फार चांगलें होईल. कारण, ह्या कार्यापेक्षां मृत्यु येणें उत्तम ५. हे कल्याणि, तूं माझ्यावर कृपा कर; मला दोष देऊं नको. "असें बोलून हात जोडून उभा राहिलेला तो लक्ष्मण भूमीवर पडला६. तेव्हां लक्ष्मण हात जोडून रडत आहे व मरणाची वाट पहात आहे असें अवलोकन करून सीता अतिशय घाबरली आणि त्याला ह्मणाली ७ " हे लक्ष्मणा, हें काय तें मला समजत नाहीं. तूं खरें खरें सांग. तूं मला स्वस्थ दिसत नाहींस. राजा स्वस्ति-क्षेम आहे नां ?८. तुला राजाची शपथ आहे; तुला इतका संताप कां झाला आहे हें माझ्यापाशीं सांग; मी तुला आज्ञा करीत आहे ९. ह्याप्रमाणें सीता बोलूं लागली असतां ज्याचें अंतःकरण खिन्न झालें आहे व ज्याचा कंठ अश्रूंनीं दाटून आला आहे असा तो लक्ष्मण खालीं मान घालून ह्मणाला १० " हे जनककन्ये, तुझ्यासंबंधानें नगरांत व देशांत होत असलेली अतिभयंकर निंदा सभेमध्यें श्रवण करून रामाचें अंतःकरण क्षुब्ध झालें. तेव्हां काय करावयाचें तें मला सांगून तो घरांत निघून गेला ११. क्रोधानें राजाला ज्या लोकापवादांचा मनामध्यें चटका लागून राहिला आहे ते लोकापवाद, हे देवि, तुझ्या पुढें मीं उच्चारणेंही योग्य नाहीं. मी ह्मणशील तर लोकापवादाकडे मुळींच लक्ष्य देत नाहीं १२. परंतु, तूं माझ्या समक्ष निर्दोष ठरली असूनही लोकापवादाला भिऊन राजानें तुझा त्याग केला आहे. हे देवि, तूं ह्याशिवाय

ष्यामि । राज्ञः शासनमादाय तथैव किल दौर्हृदम् १४ तदेतज्जाह्नवीतीरे ब्रह्मर्षीणां तपोवनम् । पुण्यं च रमणीयं च मा विषादं कृथाः शुभे १५ राज्ञो दशरथस्यैव पितुर्मे मुनिपुंगवः । सखा परमको विप्रो वाल्मीकिः सुमहायशाः १६ पादच्छायामुपागम्य सुखमस्य महात्मनः । उपवासपरैकाग्रा वस त्वं जनकात्मजे १७ पतिव्रतात्वमास्थाय रामं कृत्वा सदा हृदि । श्रेयस्ते परमं देवि तथा कृत्वा भविष्यति १८ [२३९७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ॥ ४७ ॥

लक्ष्मणस्य वचः श्रुत्वा दारुणं जनकात्मजा । परं विषादमागम्य वैदेही निपपात ह १ सा मुहूर्तमिवासंज्ञा बाष्पपर्याकुलेक्षणा । लक्ष्मणं दीनया वाचा उवाच जनकात्मजा २ मामिकेयं तनुर्नूनं सृष्टा दुःखाय लक्ष्मण । धात्रा यस्यास्तथा मेऽद्य दुःखमूर्तिः प्रदृश्यते ३ किं नु पापं कृतं पूर्वं को वा दारैर्वियोजितः । याऽहं शुद्धसमाचारा त्यक्ता नृपतिना सती ४ पुराऽहमाश्रमे वासं रामपादानुवर्तिनी । अनुरुध्यापि सौमित्रे दुःखे च परिव-

---

दुसरा भलताच कांहीं रामाचा उद्देश आहे असें समजू नको १३. राजाच्या आज्ञेप्रमाणें मी तुला आश्रमामध्यें सोडून देणार व तुलाही तसे डोहाळे झाले आहेत १४. तस्मात्, तें हें गंगातीरीं असलेलें ब्रह्मर्षींचें पुण्य व रमणीय तपोवन. हे कल्याणि, तूं आतां खेद करूं नको १५. महाकीर्तिमान् व मुनिश्रेष्ठ वाल्मीकि विप्र, दशरथ राजा जो माझा पिता त्याचा परम मित्र होय १६. ह्यास्तव, हे जनककन्ये, ह्या महात्म्याच्या चरणाचा तू आश्रय कर आणि उपवासपरायण व एकनिष्ठ अशी तूं येथें सुखानें वास्तव्य कर १७. हे देवि, पातिव्रत्याचें अवलंबन करून तूं सर्वदा राम हृदयामध्यें ठेवीत जा; ह्मणजे असें केल्यानें तुझें कल्याण होईल १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४७॥

लक्ष्मणाचें भयंकर भाषण श्रवण करितांक्षणीं जनककन्या सीता अतिशय खिन्न होऊन पडली १. तिचे नेत्र अश्रूंनीं व्याकुल होऊन क्षणभर तिला देहभानही नाहींसें झालें व नंतर दीनवाणीनें ती जनककन्या लक्ष्मणाला ह्मणाली २ " हे लक्ष्मणा, ही माझी तनु खरोखर विधात्यानें दुःखाचाच उपभोग घेण्याकरितां निर्माण केली आहे आणि ह्मणूनच दुःखाची मूर्ति आजही माझ्या दृष्टीं पडूं लागली आहे ३. आचरणानें मी शुद्ध असूनही ज्याअर्थी राजानें माझा त्याग केला आहे त्याअर्थी पूर्वी माझ्या हातून काय बरें पातक घडलें आहे ? व कोणाचा बरें स्त्रीशीं वियोग होण्यास मी कारण झालें आहें ? ४. हे लक्ष्मणा, पूर्वी जरी मी दुःखामध्यें

र्तिनी ५ सा कथं ह्याश्रमे सौम्य वत्स्यामि विजनीकृता। आख्यास्यामि च कस्याहं दुःखं दुःखपरायणा ६ किं नु वक्ष्यामि मुनिषु कर्म चासत्कृतं प्रभो। कस्मिन्वा कारणे त्यक्ता राघवेण महात्मना ७ न खल्वद्यैव सौमित्रे जीवितं जाह्नवीजले। त्यजेयं राजवंशस्तु भर्तुर्मे परिहास्यते ८ यथाज्ञं कुरु सौमित्रे त्यज मां दुःखभागिनीम्। निदेशे स्थीयतां राज्ञः शृणु चेदं वचो मम ९ श्वश्रूणामविशेषेण प्राञ्जलिप्रग्रहेण च। शिरसा वन्द्य चरणौ कुशलं ब्रूहि पार्थिवम् १० शिरसाभिनता ब्रूयाः सर्वासामेव लक्ष्मण। वक्तव्यश्चापि नृपतिर्धर्मेषु सुसमाहितः ११ जानासि च यथा शुद्धा सीता तत्त्वेन राघव। भक्त्या च परया युक्ता हिता च तव नित्यशः १२ अहं त्यक्ता च ते वीर अयशोभीरुणा जने १३ यच्च ते वचनीयं स्यादपवादः समुत्थितः। मया च परिहर्तव्यं त्वं हि मे परमा गतिः १४ वक्तव्यश्चैव नृपतिर्धर्मेण सुसमाहितः। यथा भ्रातृषु वर्तेथास्तथा पौरेषु नित्यदा १५

---

लोळत होतें तरी तें सहन करून रामचरणांची सेवा घडत असतांना आश्रमामध्यें वास्तव्य करण्याची मला इच्छा झाली होती ५. परंतु, आतां हे सुशील लक्ष्मणा, मी एकटी कशी बरें आश्रमामध्यें राहूं ? आणि दुःखामध्येंच निमग्न झालेली मी आतां आपलें दुःख तरी कोणाला सांगूं ? ६. हे प्रभो, "कोणत्या कारणामुळें महात्म्या रघुवंशज रामानें तुझा त्याग केला असें मुनि विचारूं लागले असतां मी त्यांना काय बरें सांगूं ? ७. हे लक्ष्मणा, गंगेच्या उदकामध्यें खरोखर आजच मला प्राणत्याग करितां येत नाहीं. कारण, तसें केलें असतां माझ्या भर्त्याच्या राजसंतानाचा विच्छेद होईल ८. हे लक्ष्मणा, दुःखाचीच वांटेकरीण असलेल्या माझा त्याग करून तूं राजाच्या आज्ञेप्रमाणें वाग व राजाच्या आज्ञेमध्येंच रहात जा; परंतु, हा माझा निरोप ऐक ९. माझ्या वर्तीनें कांहीं एक भेद मनामध्यें न आणितां सर्व सासुबाईंना हात जोडून मस्तकानें त्यांच्या चरणांना अभिवंदन कर व राजालाही कुशल कळीव १०. हे लक्ष्मणा, सर्वांच्याच पुढें तूं मस्तक लववून माझा निरोप सांग आणि धर्मकृत्यांविषयीं अतिशयच दक्ष असलेल्या राजाला कळीव कीं ११ "हे राघवा, खरोखर सीता कशी शुद्ध आहे हें तूं जाणीतच आहेस; व तुझ्या विषयीं तिचे ठिकाणीं पराकाष्ठेचें प्रेम असून ती सर्वदां तुझ्या हिताविषयीं तत्पर असते (हेंही तुला विदितच आहे) १२. परंतु, हे वीरा, लोकांत होणाऱ्या अपकीर्तीला भिऊन तूं माझा त्याग केला आहेस १३. माझ्यासंबंधानें लोकांमध्यें तुझी निंदा होऊं लागली आहे; परंतु, जी कांहीं तुझी निंदा होत असेल तिचा परिहार मला केलाच पाहिजे. कारण, तूंच माझा मुख्य आश्रय आहेस" १४. (असो. हे लक्ष्मणा,)

परमो ह्येष धर्मस्ते तस्मात्कीर्तिरनुत्तमा । यत्तु पौरजने राजन्धर्मेण समवाप्नुयात् १६ अहं तु नानुशोचामि स्वशरीरं नरर्षभ । यथापवादः पौराणां तथैव रघुनन्दन १७ पतिर्हि देवता नार्याः पतिर्बन्धुः पतिर्गुरुः । प्राणैरपि प्रियं तस्माद्भर्तुः कार्यं विशेषतः १८इति मद्वचनाद्रामो वक्तव्यो मम संग्रहः । निरीक्ष्य माद्य गच्छ त्वमृतुकालातिवर्तिनीम् १९ एवं ब्रुवन्त्यां सीतायां लक्ष्मणो दीनचेतनः । शिरसा वन्द्य धरणीं व्याहर्तुं न शशाक ह २० प्रदक्षिणं च तां कृत्वा रुदन्नेव महास्वनः । ध्यात्वा मुहूर्तं तामाह किं मां वक्ष्यसि शोभने २१ दृष्टपूर्वं न ते रूपं पादौ दृष्टौ तवानघे । कथमत्र हि पश्यामि रामेण रहितां वने २२ इत्युक्त्वा तां नमस्कृत्य पुनर्नावमुपारुहत् । आरुरोह पुनर्नावं नाविकं चाभ्यचोदयत् २३ स गत्वा चोत्तरं तीरं शोकभारसमन्वितः । संमूढ इव दुःखेन रथमध्यारुहद्द्रुतम् २४ मुहुर्मुहुः परावृत्य दृष्ट्वा सीतामनाथवत् । चेष्टन्तीं परतीरस्थां

---

धर्मविषयीं अत्यंत दक्ष असलेल्या राजाला तू पुनरपि असें सांग. " आत्यांप्रमाणें तूं नेहेमीं नागरिक जनांशीं वागत जा १५. कारण, लोकांशीं धर्मानें वागून पुण्य संपादन करणें हाच तुझा श्रेष्ठ धर्म आहे व ह्यामळेंच तुझी अनुपम कीर्ति होणार आहे १६. हे पुरुषश्रेष्ठा, स्वतःच्या देहाबद्दल मला मुळींच काळजी वाटत नाहीं. हे रघुनंदना, तूं आपला लोकापवाद टळेल अशाच रीतीनें वाग १७. ज्याअर्थी पति हा स्त्रीचा बंधु, देवता आणि गुरु आहे त्याअर्थी प्राण खर्ची घालून विशेषतः भर्त्याचा मनोरथ स्त्रीनें शेवटास नेला पाहिजे" १८. ह्याप्रमाणें मीं केलेलें भाषण तूं रामाला सांग आणि माझी पाळी चुकलेली आहे हें एकदां तू माझ्याकडे समक्ष बघून जा"१९. ह्याप्रमाणें सीता बोलू लागली असतां लक्ष्मण मनामध्यें खिन्न झाला आणि भूमीवर मस्तकानें वंदन करून कांहींएक उच्चार न करवल्यामुळें कांहीं वेळ स्तब्ध झाला २०. नंतर तिला प्रदक्षिणा करून तो उच्चस्वरानें रुदन करूं लागला आणि क्षणभर विचार करून तिला ह्मणाला " हे कल्याणि, तूं मला काय सांगत आहेस ? २१ हे निष्पाप, आजपर्यंत फक्त तुझे चरण मात्र मीं अवलोकन केले आहेत; तुझें रूप मीं अवलोकन केलें नाहीं. तव्हां रामसंनिध नसतांना वनामध्यें अशाप्रसंगीं मी तुझ्याकडे कसें पाहूं ? " २२. असें बोलून व तिला नमस्कार करून तो पुनरपि नावेवर चढला आणि नौकारूढ झाल्यानंतर त्यानें नावाड्याला नौका सुरू करण्यास सांगितलें २३. शोकाच्या भाराखालीं दडपून गेलेला तो लक्ष्मण उत्तरतीरीं गेल्यावर दुःखानें जसा कांहीं मूर्छितच झाला आणि सत्वर रथावर आरूढ झाला २४. पलीकडील तीरावर अनाथाप्रमाणें हालचाल करीत असलेल्या

लक्ष्मणः प्रययावथ २५ दूरस्थं रथमालोक्य लक्ष्मणं च मुहुर्मुहुः । निरीक्षमाणां तूद्विग्नां सीतां शोकः समाविशत् २६ सा दुःखभारावनता यशस्विनी यशोधरा नाथमपश्यती सती । रुरोद सा बर्हिणनादिते वने महास्वनं दुःखपरायणा सती २७ [२४२४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डेऽष्टचत्वारिंशः सर्गः ॥ ४८ ॥

सीतां तु रुदतीं दृष्ट्वा ते तत्र मुनिदारकाः । प्राद्रवन्यत्र भगवानास्ते वाल्मीकिरुग्रधीः १ अभिवाद्य मुनेः पादौ मुनिपुत्रा महर्षये । सर्वे निवेदयामासुस्तस्यास्तु रुदितस्वनम् २ अदृष्टपूर्वा भगवन्कस्याप्येषा महात्मनः । पत्नी श्रीरिव संमोहाद्विरौति विकृतानना ३ भगवन्साधु पश्येस्त्वं देवतामिव खाच्युताम् । नद्यास्तु तीरे भगवन्वरस्त्री कापि दुःखिता ४ दृष्टास्माभिः प्ररुदिता दृढं शोकपरायणा । अनर्हा दुःखशोकाभ्यामेका दीना अनाथवत् ५ तां सीतां शोकभारार्तां वाल्मीकिर्मुनिपुंगवः । उवाच मधुरां वाणीं ह्लादयन्निव तेजसा ६ स्नुषा दशरथस्य त्वं रामस्य महिषी

---

सीतेकडे वारंवार वळून पाहून तो पुढे जाऊं लागला असतां २५ दूर गेलेल्या रथाकडे व लक्ष्मणाकडे ती वारंवार पाहूं लागली आणि उद्विग्न होऊन ती पाहूं लागली असतां शोकाकुल झाली २६. सारांश, दुःखभारानें वांकलेली ती यशस्विनी, यशस्कारक व साध्वी सीता राम दृष्टीं पडेनासा झाल्यामुळें दुःखामध्यें मग्न होऊन, मयूरपक्ष्यांनीं नादित झालेल्या त्या वनामध्यें उच्चस्वरानें रुदन करूं लागली २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४८ ॥

रडत असलेल्या सीतेला तेथें अवलोकन करितांक्षणीं ते मुनिकुमार महाविचारी भगवान् वाल्मीकिमुनींकडे धांवत गेले १; व मुनींच्या चरणांना अभिवंदन केल्यानंतर त्या सर्व मुनिपुत्रांनीं तिचा तो रुदनस्वर महर्षींना निवेदन केला २ (आणि ते ह्मणाले) " हे भगवन्, साक्षात् लक्ष्मीप्रमाणें रूपवती असलेली ही कोणातरी महात्म्याची पत्नी तोंड वाईट करून मोहानें रडत आहे व ती आजपर्यंत आमच्या पहाण्यांत आली नाहीं ३. हे भगवन्, स्वर्गांतून भ्रष्ट झालेल्या देवतेप्रमाणें दिसत असलेल्या तिला आपण नीट अवलोकन करावें. सारांश, हे भगवन्, दुःखित झालेली कोणी एक श्रेष्ठ स्त्री नदीचे तीरीं अतिशय शोकाकुल होऊन रडत असलेली आह्मीं पाहिली. दुःख व शोक करण्यास ती पात्र नसून एकटी असल्यामुळें दीन व अनाथाप्रमाणें भासत आहे " ४, ५. ह्यानंतर अतिशय शोकानें व्याकुळ झालेल्या त्या सीतेला आपल्या तेजानें आनंदित करीतच

प्रिया । जनकस्य सुता राज्ञः स्वागतं ते पतिव्रते ७ आयान्ती चासि विज्ञाता मया धर्मसमाधिना । कारणं चैव सर्वं मे हृदयेनोपलक्षितम् ८ तव चैव महाभागे विदितं मम तत्त्वतः । सर्वं च विदितं मह्यं त्रैलोक्ये यद्धि वर्तते ९ अपापां वेद्मि सीते ते तपोलब्धेन चक्षुषा । विस्रब्धा भव वैदेहि सांप्रतं मयि वर्तसे १० आश्रमस्याविदूरे मे तापस्यस्तपसि स्थिताः । तास्त्वां वत्से यथा वत्सं पालयिष्यन्ति नित्यशः ११ इदमर्घ्यं प्रतीच्छ त्वं विस्रब्धा विगतज्वरा । यथा स्वगृहमभ्येत्य विषादं चैव मा कृथाः १२ श्रुत्वा तु भाषितं सीता मुनेः परममद्भुतम् । शिरसा वन्द्य चरणौ तथेत्याह कृताञ्जलिः ॥ तं प्रयान्तं मुनिं सीता प्राञ्जलिः पृष्ठतोऽन्वगात् १३ तं दृष्ट्वा मुनिमायान्तं वैदेह्या मुनिपत्नयः । उपाजग्मुर्मुदा युक्ता वचनं चेदमब्रुवन् १४ स्वागतं ते मुनिश्रेष्ठ चिरस्यागमनं च ते । अभिवादयामस्त्वां सर्वा उच्यतां किं च कुर्महे १५ तासां तद्वचनं श्रुत्वा वाल्मीकिरिदमब्रवीत् । सीतेयं समनुप्राप्ता पत्नी रामस्य धीमतः १६ स्नुषा दशरथस्यैषा जनकस्य सुता सती । अपापा पतिना

---

की काय मुनिश्रेष्ठ वाल्मीकि मधुरवाणीनें तिला ह्मणाले ६ "हे पतिव्रते, तुझें स्वागत असो. तूं दशरथाची स्नुषा, रामाची प्रिय पट्टराणी आणि जनकराजाची कन्या आहेस ७. तूं इकडे येत असतांना योगसमाधीमुळें मीं तुला जाणिलें आणि सर्व कारणही मीं मनामध्यें अवलोकन केलें ८. हे महाभाग्यवति, तुझें आचरण मला खरेंखरें विदित आहे व त्रैलोक्यामध्यें जें कांहीं चाललें आहे, तेंही सर्व मला विदित आहे ९. हे सीते, तपःसामर्थ्यानें प्राप्त झालेल्या ज्ञानदृष्टीनें मी तुला निष्पाप समजत आहे; ह्यास्तव, हे वैदेहि, तूं आतां स्वस्थ हो; तूं सांप्रत माझ्यापाशीं आहेस १०. सारांश, आश्रमाच्या सन्निधच तापसी स्त्रिया तपश्चर्या करीत बसल्या आहेत; त्या, हे वत्से, वत्साप्रमाणें तुझा नेहेमीं सांभाळ करितील ११. तूं स्वगृहीं आल्याप्रमाणें स्वस्थ व निश्चिंत होऊन ह्या आदराचा स्वीकार कर आणि खेद करूं नको " १२. मुनीचें हें अत्यंत आश्चर्यकारक भाषण श्रवण केल्यावर मस्तकानें त्यांच्या चरणांना वंदन करून व हात जोडून " ठीक आहे " असें ती त्यांना ह्मणाली व ते मुनि जाऊं लागले असतां ती हात जोडून त्यांच्या मागोमाग गेली १३. नंतर वैदेहीसहवर्तमान ते मुनि येत असल्याचें अवलोकन केल्यावर ऋषिपत्न्या आनंदित होऊन त्यांच्याजवळ गेल्या आणि ह्मणाल्या १४ " हे मुनिश्रेष्ठ, आपलें स्वागत असो. फार वेळानें आपलें आगमन झालें आहे. आह्मी सर्व आपणांला अभिवंदन करीत आहों. आतां आह्मी काय करावें ? याची आज्ञा व्हावी " १५. त्यांचें हें भाषण श्रवण केल्यावर वाल्मीकि

त्यक्ता परिपाल्या मया सदा १७ इमां भवन्तः पश्यन्तु स्नेहेन परमेण हि । गौरवान्मम वाक्याच्च पूज्या वोऽस्तु विशेषतः १८ मुहुर्मुहुश्च वैदेहीं परिदाय महायशाः । स्वमाश्रमं शिष्यवृतः पुनरायान्महातपाः १९ [ २४४३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे एकोनपञ्चाशः सर्गः ॥ ४९ ॥

दृष्ट्वा तु मैथिलीं सीतामाश्रमे संप्रवेशिताम् । संतापमगमद्घोरं लक्ष्मणो दीनचेतनः १ अब्रवीच्च महातेजाः सुमन्त्रं मन्त्रसारथिम् । सीतासंतापजं दुःखं पश्य रामस्य सारथे २ ततो दुःखतरं किं नु राघवस्य भविष्यति । पत्नीं शुद्धसमाचारां विसृज्य जनकात्मजाम् ३ व्यक्तं दैवादहं मन्ये राघवस्य विनाभवम् । वैदेह्या सारथे नित्यं दैवं हि दुरतिक्रमम् ४ यो हि देवान्सगन्धर्वानसुरान्सह राक्षसैः । निहन्याद्राघवः क्रुद्धः स दैवं पर्युपासते ५ पुरा रामः पितुर्वाक्याद्दण्डके विजने वने । उषित्वा नव वर्षाणि पञ्च चैव

---

ह्मणाले " विचारी रामाची पत्नी ही सीता येथें आली आहे १६. ही साध्वी, दशरथाची स्नुषा असून जनकाची कन्या आहे व निष्पाप असतांना पतीनें हिचा त्याग केला आहे; ह्यास्तव, सर्वदां हिचें मला परिपालन कर्तव्य आहे १७. तुह्मी परम प्रमानें हिच्याशीं वागत जा आणि माझ्या आज्ञेमुळें आणि हिची योग्यताही मोठी असल्यामुळें विशेषेंकरून तुह्मी हिला पूज्य समजत जा " १८. असें सांगून त्या महायशस्वी वाल्मीकिमुनींनीं सीतेला पुनः पुनः त्या ऋषिपत्न्यांच्या स्वाधीन केलें आणि ते महातपस्वी मुनि शिष्यांसहवर्तमान आपल्या आश्रमाला परत आले १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण ह्मण आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकुणपन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥ ४९ ॥

सीता आश्रमामध्यें पोंचती केल्याचें अवलोकन करून मनामध्यें खिन्न झालेल्या लक्ष्मणाला भयंकर दुःख झालें १ आणि तो महातेजस्वी लक्ष्मण सल्लामसलतीमध्येंही उपयोगीं पडणाऱ्या सुमन्त्र सारथ्याला ह्मणाला " हे सारथे, सीतेच्या वियोगामुळें आतां रामाला होणाऱ्या दुःखाचा तूं विचार कर २. आचरणानें शुद्ध असलेली जी आपली पत्नी जानकी तिचा त्याग करून राहण्यापेक्षां कोणती बरें मोठें रामाला अधिक दुःखदायक होणार आहे! ३ हे सारथे, सीतेशीं रामाचा झालेला वियोग खरोखर दैवामुळेंच झाला असें मी समजतों. दैवाचें अतिक्रमण कोणीही करितां येत नाहीं ४. अरे जो राम क्रुद्ध झाला असतां गंधर्वांसहवर्तमान देवांचा व राक्षसांसहवर्तमान असुरांचाही वध करील तोही दैवावरच अवलंबून असतो ५. पूर्वी पित्याच्या आग-

महावने ६ ततो दुःखतरं भूयः सीताया विप्रवासनम् । पौराणां वचनं श्रुत्वा नृशंसं प्रतिभाति मे ७ को नु धर्माश्रयः सूत कर्मण्यस्मिन्यशोहरे । मैथिलीं समनुप्राप्तः पौरैर्हीनार्थवादिभिः ८ एता वाचो बहुविधाः श्रुत्वा लक्ष्मणभाषिताः । सुमन्त्रः श्रद्धया प्राज्ञो वाक्यमेतदुवाच ह ९ न संतापस्त्वया कार्यः सौमित्रे मैथिलीं प्रति । दृष्टमेतत्पुरा विप्रैः पितुस्ते लक्ष्मणाग्रतः १० भविष्यति दृढं रामो दुःखप्रायो विसौख्यभाक् । प्राप्स्यते च महाबाहुर्विप्रयोगं प्रियैर्द्रुतम् ११ त्वां चैव मैथिलीं चैव शत्रुघ्नभरतौ तथा । स त्यजिष्यति धर्मात्मा कालेन महता महान् १२ इदं त्वयि न वक्तव्यं सौमित्रे भरतेऽपि वा । राज्ञा वो व्याहृतं वाक्यं दुर्वासा यदुवाच ह १३ महाजनसमीपे च मम चैव नरर्षभ । ऋषिणा व्याहृतं वाक्यं वसिष्ठस्य च संनिधौ १४ ऋषेस्तु वचनं श्रुत्वा मामाह पुरुषर्षभः । सूत न क्वचिदेवं ते वक्तव्यं जनसंनिधौ १५ तस्याहं लोकपालस्य वाक्यं तत्सुसमाहितः । नैव जात्वनृतं कुर्यामिति मे सौम्य दर्शनम् १६ सर्वथैव

---

ण्यावरून रामानें दंडकारण्यसंज्ञक मोठ्या निर्जन वनामध्यें चवदा वर्षे वास्तव्य करून मोठें दुःख भोगिलें आहे ६. परंतु, लोकांच्या ह्मणण्याकडे लक्ष देऊन सीतेला हाकून लावणें ही जी अति दुःखदायक गोष्ट रामानें केली ती मला क्रूरपणाची दिसत आहे ७. हे सूता, व्यर्थ भाषण करणाऱ्या नागरिकांच्या नादावर विश्वास ठेऊन रामानें हें जें अपकीर्तिकारक कर्म केलें तें केल्यानें त्याला कोणतें बरें पुण्य प्राप्त झालें आहे ?" ८. लक्ष्मणानें केलेलीं हीं नानाप्रकारचीं भाषणें श्रवण केल्यावर विचारी सुमंत अंतःकरणाला विश्वास वाटून ह्मणाला ९ " हे लक्ष्मणा, सीतेसंबंधानें तूं शोक करूं नको. कारण, हे लक्ष्मणा, पूर्वी ब्राह्मणांनीं तुझ्या पित्याच्या समोर हें अवलोकन केलें आहे १०. राम सौख्यरहित व प्रायः दुःख भोगणाराच निःसंशय होईल व त्या महापराक्रमी रामाला व लवकर प्रियवियोग होईल ११. तो धर्मात्मा व महात्मा राम बराच काळ लोटल्यावर तुझा, सीतेचा व भरतशत्रुघ्नाचाही त्याग करील १२. हे लक्ष्मणा, दशरथ राजानें प्रश्न केला असतां दुर्वासमुनीनीं जें त्याला सांगितलें आहे, तें हें तूं शत्रुघ्नाला व भरताला कळवूं नको १३. हे पुरुषश्रेष्ठा, मोठ्या जनसमुदायामध्यें वसिष्ठमुनींचे सन्निध व माझ्याही समक्ष दुर्वासमुनींनीं रामसंबंधानें दशरथाला जें कांहीं सांगावयाचें तें सांगितलें १४. परंतु, दुर्वासमुनीचें भाषण श्रवण करून त्या पुरुषश्रेष्ठ दशरथ मला ह्मणाला " हे सारथ्या, तूं कधींही हें इतर लोकांपाशीं सांगूं नको १५. हें जें त्या प्रजापालक दशरथाचें सांगणें तें मी कधींही अनृत न करितां अंतःकरण स्वस्थ ठेवून खरें करावें असें, हे विनयसंपन्न लक्ष्मणा,

न वक्तव्यं मया सौम्य तवाग्रतः । यदि ते श्रवणे श्रद्धा श्रूयतां रघुनन्दन १७ यद्यप्यहं नरेन्द्रेण रहस्यं श्रावितं पुरा । तथाप्युदाहरिष्यामि दैवं हि दुरतिक्रमम् १८ येनेदमीदृशं प्राप्तं दुःखं शोकसमन्वितम् । न त्वया भरतस्याग्रे शत्रुघ्नस्यापि संनिधौ १९ तच्छ्रुत्वा भाषितं तस्य गम्भीरार्थपदं महत् । तथ्यं ब्रूहीति सौमित्रिः सूतं तं वाक्यमब्रवीत् २० [२४६३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे पञ्चाशः सर्गः ॥५० ॥

तथा संचोदितः सूतो लक्ष्मणेन महात्मना । तद्वाक्यमृषिणा प्रोक्तं व्याहर्तुमुपचक्रमे १ पुरा नाम्ना हि दुर्वासा अत्रेः पुत्रो महामुनिः । वसिष्ठस्याश्रमे पुण्ये वार्षिक्यं समुवास ह २ तमाश्रमं महातेजाः पिता ते सुमहायशाः । पुरोहितं महात्मानं दिदृक्षुरगमत्स्वयम् ३ स दृष्ट्वा सूर्यसंकाशं ज्वलन्तमिव तेजसा । उपविष्टं वसिष्ठस्य सव्यपार्श्वे महामुनिम् ४ तौ मुनी तापसश्रेष्ठौ विनीतावभ्यवादयत् ५ स ताभ्यां पूजितो राजा स्वागतेनासनेन च । पाद्येन फलमूलैश्च उवास मुनिभिः सह ६ तेषां तत्रोप-

---

मला वाटतें १६. हे सौम्य लक्ष्मणा, तुझ्या समक्ष मीं हें सर्वथैव सांगू नये; परंतु, तुझी जर ऐकण्याची इच्छा असेल तर, हे रघुनंदना, तूं श्रवण कर १७. जरी पूर्वी राजानें ही गुप्त गोष्ट ह्मणून मला सांगितली आहे, तरी ( तूर्त सांगण्याचा प्रसंग आला असल्यामुळें मी सांगतों. ) बाबारे, दैवाचें अतिक्रमण होणें अतिकठीण आहे १८ व त्या दैवाच्याच योगानें तुला हें शोकयुक्त दुःख झालें आहे. असो. ही गोष्ट भरताजवळ अथवा शत्रुघ्नाजवळ तूं बोलू नको " १९. गंभीर अर्थ व शब्द ह्यांनीं युक्त असलेलें तें त्याचें महत्त्वाचें भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मण, " ( काय असेल तें ) तथ्य सांग; " असें बोलून त्या सारथ्याला ह्मणाला २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥५०॥

ह्याप्रमाणें महात्म्या लक्ष्मणानें सारथ्याला प्रेरणा केली असतां दुर्वासमुनींनीं केलेलें तें भाषण तो सांगूं लागला १. ( तो ह्मणाला ) " पूर्वी दुर्वास या नांवाचा महामुनि अत्रिपुत्र वसिष्ठांच्या पवित्र आश्रमामध्यें पर्जन्यकालचे चार महिने राहिला होता २. एकदां तुझा महाकीर्तिमान् व महातेजस्वी पिता महात्म्या पुरोहिताची भेट घेण्याकरितां स्वतः त्या आश्रमामध्यें गेला ३. तेथें गेल्यानंतर तेजानें सूर्यासारिखा झळकत असलेला व वसिष्ठमुनींच्या डाव्या बाजूस बसलेला एक महर्षि त्यानें अवलोकन केला ४. आणि त्या निरुपद्रवी व तपस्व्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या मुनींना त्यानें अभिवंदन केलें ५. नंतर त्या उभयतांनीं राजाचें आगतस्वागत करून आसन, पाद्य, फलें व मुळें ह्यांच्या

ष्ठानां तास्ताः सुमधुराः कथाः । बभूवुः परमर्षीणां मध्यादित्यगतेऽहनि ७ ततः कथायां कस्यांचित्प्राञ्जलिः प्रग्रहो नृपः । उवाच तं महात्मानमत्रेः पुत्रं तपोधनम् ८ भगवन्किंप्रमाणेन मम वंशो भविष्यति । किमायुश्च हि मे रामः पुत्राश्चान्ये किमायुषः ९ रामस्य च सुता ये स्युस्तेषामायुः कियद्भवेत् । काम्यया भगवन्ब्रूहि वंशस्यास्य गतिं मम १० तच्छ्रुत्वा व्याहृतं वाक्यं राज्ञो दशरथस्य तु । दुर्वासाः सुमहातेजा व्याहर्तुमुपचक्रमे ११ शृणु राजन्पुरा वृत्तं तदा देवासुरे युधि । दैत्याः सुरैर्भर्त्स्यमाना भृगुपत्नीं समाश्रिताः ॥ तया दत्ताभयास्तत्र न्यवसन्नभयास्तदा १२ तया परिगृहीतांस्तान्दृष्ट्वा क्रुद्धः सुरेश्वरः । चक्रेण शितधारेण भृगुपत्न्याः शिरोऽहरत् १३ ततस्तां निहतां दृष्ट्वा पत्नीं भृगुकुलोद्वहः । शशाप सहसा क्रुद्धो विष्णुं रिपुकुलार्दनम् १४ यस्मादवध्यां मे पत्नीमवधीः क्रोधमूर्च्छितः । तस्मात्त्वं मानुषे लोके जनिष्यसि जनार्दन १५ तत्र पत्नीवियोगं त्वं प्राप्स्यसे बहुवार्षिकम् । शापाभिहतचेतास्तु स्वात्मना

---

योगानें त्याचें पूजन केलें असतां तो मुनींसहवर्तमान कांहीं वेळ तेथेंच राहिला ६. सूर्य आकाशाचे मध्यभागीं आला असतांना तेथेंच असलेल्या त्या महर्षींमध्यें अत्यंत मधुर अशा नाना प्रकारच्या गोष्टी निघाल्या ७ नंतर कांहींएक गोष्ट चालली असतांना दशरथ राजा हात जोडून व ते वर करून त्या महात्म्या अत्रिपुत्र व तपोधन दुर्वास मुनींना ह्मणाला ८ "हे भगवन्, माझा वंश किती पिढ्यांपर्यंत चालेल ? माझ्या रामाचें आयुष्य किती आहे ? माझ्या इतर पुत्रांचें आयुष्य किती आहे ? ९ आणि त्याचप्रमाणें रामाला जे पुत्र होतील ते किती दिवस वाचतील ? हे भगवन्, ह्याप्रमाणें ह्या माझ्या वंशाचा परिणाम माझी इच्छा तृप्त करण्याकरितां आपण सांगा "१०. हें दशरथ राजानें केलेलें भाषण श्रवण करून अतिशय तेजस्वी दुर्वासमुनि त्याला ह्मणाले ११ "हे राजा, पूर्वींचें वृत्त श्रवण कर. पूर्वीं देवदैत्यांचें युद्ध चाललें असतांना देव दैत्यांची निर्भर्त्सना करू लागले. तेव्हां दैत्यांनीं भृगुपत्नीचा आश्रय केला आणि तिनें अभय दिल्यावर तेथें ते निर्भयपणें राहिले १२. तिनें रक्षिलेल्या त्या दैत्यांना अवलोकन करून सुरेश्वर विष्णु क्रुद्ध झाला आणि तीक्ष्ण धारेच्या चक्रानें भृगुपत्नीचें मस्तक त्यानें उडविलें १३. तव्हां त्या पत्नीचा वध झाल्याचें अवलोकन करून तो भृगुवंशश्रेष्ठ क्रुद्ध झाला आणि शत्रुसमुदायाचा नाश करणाऱ्या विष्णुला त्यानें शाप दिला १४. (तो ह्मणाला )" हे जनार्दना, ज्याअर्थीं माझ्या अवध्य पत्नीचा क्रोधानें धुंद होऊन तूं वध केला आहेस त्याअर्थीं मनुष्य लोकामध्यें तूं जन्मास येशील १५; आणि तेथें अनेक संवत्सर लोटे-

भावितोऽभवत् १६ अर्चयामास तं देवं भृगुः शापेन पीडितः । तपसाराधितो देवो ह्यब्रवीद्भक्तवत्सलः १७ लोकानां संप्रियार्थं तु तं शापं गृह्यमुक्तवान् । इति शप्तो महातेजा भृगुणा पूर्वजन्मनि १८ इहागतो हि पुत्रत्वं तव पार्थिवसत्तम । राम इत्यभिविख्यातस्त्रिषु लोकेषु मानद १९ तत्फलं प्राप्स्यते चापि भृगुशापकृतं महत् । अयोध्यायाः पती रामो दीर्घकालं भविष्यति २० सुखिनश्च समृद्धाश्च भविष्यन्त्यस्य येऽनुगाः । दशवर्षसहस्राणि दशवर्षशतानि च २१ रामो राज्यमुपासित्वा ब्रह्मलोकं गमिष्यति । समृद्धैश्चाश्वमेधैश्च इष्ट्वा परमदुर्जयः २२ राजवंशांश्च बहुशो बहून्संस्थापयिष्यति । द्वौ पुत्रौ तु भविष्येते सीतायां राघवस्य तु २३ स सर्वमखिलं राज्ञो वंशस्याह गतागतम् । आख्याय सुमहातेजास्तूष्णीमासीन्महामुनिः २४ तूष्णींभूते तदा तस्मिन्राजा दशरथो मुनौ । अभिवाद्य महात्मानौ पुनरायात्पुरोत्तमम् २५ एतद्वचो मया तत्र मुनिना व्याहृतं पुरा । श्रुतं हृदि च निक्षिप्तं नान्यथा तद्भविष्यति २६ सीतायाश्च ततः पुत्रावभिषेक्ष्यति राघवः । अन्यत्र न त्वयोध्यायां मुनेस्तु वचनं यथा २७ एवं

---

पर्यंत तुला पत्नीचा वियोग होईल." ह्याप्रमाणें शाप दिल्यानंतर त्या मुनीच्या मनाला ती गोष्ट लागून राहिली १६ आणि आपल्या हातून शाप झाल्यामुळें खिन्न झालेल्या भृगूनें त्या देवाचें पूजन केलें. तेव्हां तपानें संतुष्ट झालेला तो भक्तवत्सल देव त्याला ह्मणाला १७ "लोककल्याणार्थ हा शाप मला स्वीकारिला पाहिजे." ह्याप्रमाणें महातेजस्वी विष्णूला पूर्वजन्मीं भृगूचा शाप झालेला आहे. १८; आणि, हे नृपश्रेष्ठा, तोच विष्णु या मनुष्यलोकीं तुझा पुत्र झाला आहे. हे संमाननीय दशरथा, राम ह्या नावानें तो तुझा पुत्र त्रैलोक्यांत विख्यात होईल १९ आणि भृगुशापामुळें हें प्रचंड फलही त्याला प्राप्त होईल. राम दीर्घकालपर्यंत अयोध्येचा अधिपति होईल २०; त्याच्या मतानें वागणारे जे असतील ते सुखी व समृद्ध होतील; अकरा हजार वर्षें २१ राज्य करून राम ब्रह्मलोकीं गमन करील; अत्यंत दुर्जय राम मोठे मोठे अश्वमेध याग करून २२ अनेक राजवंशांची वारंवार स्थापना करील आणि राघवापासून सीतेचे ठिकाणीं दोन पुत्र होतील २३. याप्रमाणें वंशासंबंधानें राजाला मागला व पुढला सर्व वृत्तांत पूर्णपणें कथन करून ते महातेजस्वी दुर्वासमुनि स्वस्थ बसले २४ व ह्याप्रमाणें ते मुनि स्वस्थ बसले असतां दशरथराजा त्या महात्म्यांना, वंदन करून पुनरपि आपल्या श्रेष्ठ नगराला परत आला" २५. हें भाषण दुर्वासमुनींनीं पूर्वीं त्याठिकाणीं केलेलें मीं ऐकिलें आहे व मनामध्यें ठेविलें आहे; तें असत्य होणार नाहीं. असो २६. नंतर

गते न संतापं कर्तुमर्हसि राघव । सीतार्थे राघवार्थे वा दृढो भव नरोत्तम २८ श्रुत्वा तु व्याहृतं वाक्यं सूतस्य परमाद्भुतम् । प्रहर्षमतुलं लेभे साधु साध्विति चाब्रवीत् २९ ततः संवदतोरेवं सूतलक्ष्मणयोः पथि । अस्तमर्के गते वासं केशिन्यां तावथोषतुः ३० [२८१८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकपञ्चाशः सर्गः ॥ ५१ ॥

तत्र तां रजनीमुष्य केशिन्यां रघुनन्दनः । प्रभाते पुनरुत्थाय लक्ष्मणः प्रययौ तदा १ ततोऽर्धदिवसे प्राप्ते प्रविवेश महारथः । अयोध्यां रत्नसंपूर्णां हृष्टपुष्टजनावृताम् २ सौमित्रिस्तु परं दैन्यं जगाम सुमहामतिः । रामपादौ समासाद्य वक्ष्यामि किमहं गतः ३ तस्यैवं चिन्तयानस्य भवनं शशिसंनिभम् । रामस्य परमोदारं पुरस्तात्समदृश्यत ४ राज्ञस्तु भवनद्वारि सोऽवतीर्य नरोत्तमः । अवाङ्मुखो दीनमनाः प्रविवेशानिवारितः ५ स दृष्ट्वा राघवं दीनमासीनं परमासने । नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां ददर्शाग्रजम-

---

राम सीतेच्या पुत्रांना अयोध्येशिवाय इतर ठिकाणीं अभिषेक करील. कारण, दुर्वासमुनींनीं तसेंच सांगितलें आहे २७. सारांश, असा जर प्रकार आहे तर हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, दुःख करीत न बसतां सीतेविषयीं व रामाविषयीं तूं अगदीं निर्धास्त रहा २८. सारथ्याचें हें अत्यंत आश्चर्यकारक भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मणाला अनुपम हर्ष झाला व शाबास शाबास असें तो ह्मणाला २९. ह्याप्रमाणें सारथी व लक्ष्मण मार्गामध्यें भाषण करीत असतांना सूर्य अस्तास गेल्यामुळें ते केशिनीनदीचेतीरीं मुक्कामाला राहिले ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५१ ॥

तेथें केशिनीनदीचेतीरीं ती रात्र गेल्यानंतर प्रभातकाल झाला असतां रघुनंदनलक्ष्मण पुनरपि उठून चालता झाला १. तदनंतर अर्धा दिवस लोटल्यावर तो महारथी लक्ष्मण तुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त असून रत्नांनीं भरलेल्या अयोध्या नगरीमध्यें प्रविष्ट झाला २. अयोध्येंत प्रविष्ट होताक्षणीं लक्ष्मण जरी फारच मोठा विचारी होता तरी सुद्धां— रामचरणाचे सन्निद्ध गेल्यावर मी काय सांगूं ? ह्याविषयीं तो अतिशयच काळजी करूं लागला. ह्याप्रमाणें तो काळजी करीत आहे तोंच रामाचें मोठें विशाल व चंद्रतुल्य गृह पुढें दृष्टीं पडूं लागलें ४. नंतर तो पुरुषश्रेष्ठ राजवाड्याच्या द्वाराशीं रथांतून खालीं उतरला आणि कोणाचाही अडथळा न होतां तो मनामध्यें खिन्न होऊन व मान खालीं घालून आंत शिरला ५. आंत शिरल्यानंतर रामाकडे पाहूं लागला तों आपला ज्येष्ठ बंधु राम सिंहासनावर दीन होऊन बसला आहे आणि

अतः ६ जग्राह चरणौ तस्य लक्ष्मणो दीनचेतनः। उवाच दीनया वाचा प्राञ्जलिः सुसमाहितः ७ आर्यस्याज्ञां पुरस्कृत्य विसृज्य जनकात्मजाम्। गङ्गातीरे यथोद्दिष्टे वाल्मीकेराश्रमे शुभे ८ तत्र तां च शुभाचारामाश्रमान्ते यशस्विनीम्। पुनरप्यागतो वीर पादमूलमुपासितुम् ९ मा शुचः पुरुषव्याघ्र कालस्य गतिरीदृशी। त्वद्विधा न हि शोचन्ति बुद्धिमन्तो मनस्विनः १० सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः। संयोगा विप्रयोगान्ता मरणान्तं च जीवितम् ११ तस्मात्पुत्रेषु दारेषु मित्रेषु च धनेषु च। नातिप्रसङ्गः कर्तव्यो विप्रयोगो हि तैर्ध्रुवम् १२ शक्तस्त्वमात्मनात्मानं विनेतुं मनसा मनः। लोकान्सर्वांश्च काकुत्स्थ किं पुनः शोकमात्मनः १३ नेदृशेषु विमुह्यन्ति त्वद्विधाः पुरुषर्षभाः। अपवादः स किल ते पुनरेष्यति राघव १४ यदर्थं मैथिली त्यक्ता अपवादभयान्नृप। सोऽपवादः पुरे राजन्भविष्यति न संशयः १५ स त्वं पुरुषशार्दूल धैर्येण सुसमाहितः। त्यजेमां

---

त्याचे नेत्र अश्रूंनीं भरले आहेत असें त्याच्या दृष्टीं पडलें ६. नंतर मनामध्यें खिन्न झालेल्या लक्ष्मणानें त्याचे पाय धरिले आणि मन अतिशय स्वस्थ ठेवून व हात जोडून दीन वाणीनें तो त्याला म्हणाला ७ "महाराजांच्या आज्ञेला अनुसरून मीं महाराजांनीं सुचविलेल्या वाल्मीकि मुनींच्या शुभ आश्रमामध्यें जनककन्येला सोडिलें ८. आणि त्या यशस्विनी साध्वीला आश्रमाजवळ सोडिल्यानंतर, हे वीरा, पुनरपि मी आपल्या चरणांच संन्निध राहण्याकरितां परत आलों ९. हे पुरुषश्रेष्ठा, तूं शोक करूं नको; कालाची गति अशी आहे. तुझ्यासारिखे बुद्धिमान् व विचारी पुरुष शोक करीत बसत नाहींत १०. सर्व संचय नश्वर आहेत; पतन हाच कोणत्याही प्रकारच्या उन्नतीचा परिणाम आहे; वियोग हाच घडून आलेल्या उत्कृष्ट योगाचा अंत आहे आणि मरण हाच जीविताचा शेवट ठरलेला आहे ११. तस्मात्, पुत्र, स्त्रिया, मित्र व संपत्ति ह्यांचे ठिकाणीं अतिशय आसक्ति कधीं करूं नये. कारण, त्यांचा वियोग निःसंशय व्हावयाचाच आहे १२ तूं स्वतःच आपलें अंतःकरण, इंद्रियें व सर्व लोक ह्यांचा निग्रह करण्यास समर्थ आहेस; मग हे ककुत्स्थकुलोत्पन्न रामा, शोकाची गोष्ट पाहिजे कशाला? १३. तुझ्यासारिखे पुरुषश्रेष्ठ अशा प्रसंगामध्यें गोंधळून जात नाहींत; परंतु, तूं जर शोक करूं लागलास तर खरोखर तुझी निंदा मात्र होईल १४. हे राजा, ज्याअर्थी लोकापवादाच्या भीतीनें तूं सीतेचा त्याग केला आहेस त्या अर्थी तो अपवाद, हे राजा, नगरामध्यें निःसंशय कायम राहील १५ तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठा, धैर्य धरून आपलें मन स्वस्थ कर; हा क्षुल्लक विचार सोडून दे

दुर्बलां बुद्धिं संतापं मा कुरुष्व ह १६ एवमुक्तः स काकुत्स्थो लक्ष्मणेन महात्मना । उवाच परया प्रीत्या सौमित्रिं मित्रवत्सलः १७ एवमेतन्नरश्रेष्ठ यथा वदसि लक्ष्मण । परितोषश्च मे वीर मम कार्यानुशासने १८ निवृत्तिश्चागता सौम्य संतापश्च निराकृतः । भवद्वाक्यैः सुरुचिरैरनुनीतोऽस्मि लक्ष्मण १९ [२५१२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः ॥ ५२ ॥

लक्ष्मणस्य तु तद्वाक्यं निशम्य परमाद्भुतम् । सुप्रीतश्चाभवद्रामो वाक्यमेतदुवाच ह १ दुर्लभस्त्वीदृशो बन्धुरस्मिन्काले विशेषतः । यादृशस्त्वं महाबुद्धिर्मम सौम्य मनोनुगः २ यच्च मे हृदये किंचिद्वर्तते शुभलक्षण । तन्निशामय च श्रुत्वा कुरुष्व वचनं मम ३ चत्वारो दिवसाः सौम्य कार्यं पौरजनस्य च । अकुर्वाणस्य सौमित्रे तन्मे मर्माणि कृन्तति ४ आहूयन्तां प्रकृतयः पुरोधा मन्त्रिणस्तथा । कार्यार्थिनश्च पुरुषाः स्त्रियो वा पुरुषर्षभ ५ पौरकार्याणि यो राजा न करोति दिने दिने । संवृते नरके घोरे पतितो नात्र संशयः ६ श्रूयते हि पुरा राजा नृगो नाम महायशाः । बभूव

---

आणि शोक करूं नको " १६ ह्याप्रमाणें त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला महात्म्या लक्ष्मणानें सांगितलें असतां तो मित्रवत्सल राम मोठ्या प्रेमानें लक्ष्मणाला ह्मणाला १७. " हे पुरुषश्रेष्ठा, लक्ष्मणा, हें तूं ह्मणतोस असेंच आहे व हे वीरा, ह्या तुझ्या भाषणामुळें प्रजापालनरूप स्वकार्य करण्यास मला उमेद आली आहे १८. सारांश, हे विनयसंपन्न लक्ष्मणा, तुझ्या अति मनोहर भाषणांनीं माझा क्षोभ नाहींसा झाला असून दुःखाची निवृत्ति झाली आहे व संतापाचेंही निराकरण झालें आहे १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकाण्डापैकीं बावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५२॥

लक्ष्मणाचें तें अत्यंत आश्चर्यकारक भाषण श्रवण करून राम फारच संतुष्ट झाला आणि ह्मणाला १ " हे विनयसंपन्न लक्ष्मणा, विशेषतः अशा प्रसंगीं तुझ्यासारिखा मन वळविणारा महाबुद्धिमान् बंधु दुर्लभ होय २. हे शुभलक्षणसंपन्न लक्ष्मणा, माझ्या मनामध्यें जें कांहीं आहे तें तूं ऐकून घ आणि ऐकून घेतल्यावर माझें ह्मणणें शेवटास ने ३. हे विनयसंपन्न लक्ष्मणा, नागरिक जनांचीं कार्यें मी करीत नसल्याला आज चार दिवस झाले. परंतु, त्याची माझ्या मनाला फारच रुखरुख लागून राहिली आहे ४ हे पुरुषश्रेष्ठा, अमात्य, पुरोहित व मंत्री ह्यांना निमंत्रण करा आणि कामकाज असलेल्या पुरुषांना व स्त्रियांना बोलवा ५. अरे, जो राजा प्रजेचें काम प्रत्यही पहात नाहीं तो वायुसंचाररहित घोर नरकामध्यें पडतो यांत संशय नाहीं ६. पूर्वी

पृथिवीपालो ब्रह्मण्यः सत्यवाक्शुचिः ७ सकदाचिद्गवां कोटीः सवत्साः स्वर्णभूषिताः । नृदेवो भूमिदेवेभ्यः पुष्करेषु ददौ नृपः ८ ततः सङ्गाद्गता धेनुः सवत्सा स्पर्शितानघ । ब्राह्मणस्याहिताग्नेस्तु दरिद्रस्योञ्छवर्तिनः ९ स नष्टां गां क्षुधार्तो वै अन्विषंस्तत्र तत्र ह । नापश्यत्सर्वराष्ट्रेषु संवत्सरगणान्बहून् १० ततः कनखलं गत्वा जीर्णवत्सां निरामयाम् । ददर्श तां स्विकां धेनुं ब्राह्मणस्य निवेशने ११ अथ तां नामधेयेन स्वकेनोवाच ब्राह्मणः । आगच्छ शबलेत्येवं सा तु शुश्राव गौः स्वरम् १२ तस्य तं स्वरमाज्ञाय क्षुधार्तस्य द्विजस्य वै । अन्वगात्पृष्ठतः सा गौर्गच्छन्तं पावकोपमम् १३ योऽपि पालयते विप्रः सोऽपि गामन्वगाद्द्रुतम् । गत्वा च तमृषिं चेष्ट मम गौरिति सस्वरम् १४ स्पर्शिता राजसिंहेन मम दत्ता नृगेण ह । तयोर्ब्राह्मणयोर्वादो महानासीद्विपश्चितोः १५ विवदन्तौ ततोऽन्योन्यं दातारमभिजग्मतुः । तौ राजभवनद्वारि न प्राप्तौ नृगशासनम् ॥

---

महायशस्वी नृगनामक राजा ब्राह्मणप्रिय, सत्यवचनी, शुद्ध व खरा खरा भूपाल होऊन गेल्याचें आमच्या ऐकण्यांत आहे ७. एकदां त्या नृगराज भूपतीनें सुवर्णभूषित व सवत्स अशा कोट्यावधि गायी पुष्कर तीर्थावर ब्राह्मणांना दिल्या ८. त्यावेळीं, हे निष्पापा लक्ष्मणा, शेतांत पडलेले धान्यकण वेंचून निर्वाह करणाऱ्या एका अग्निहोत्री दरिद्री ब्राह्मणाचीही गाय वासरासहवर्तमान राजाकडे चाललेल्या गाईंच्या कळपाबरोबर निघून गेली व राजाकडून तिचें दानही दुसऱ्या ब्राह्मणाला झालें ९. पुढें तो क्षुधित ब्राह्मण आपली नाहींशी झालेली गाय सर्व राष्ट्रांमध्यें ठिकठिकाणीं पाहूं लागला. तरी अनेक संवत्सरसमुदाय लोटेपर्यंतही त्याला तिचा पत्ता लागला नाहीं १०. तदनंतर तो कनखल तीर्थाला गेला असतां वत्सरहित परंतु निरोगी अशी आपली गाय एका ब्राह्मणाचे घरीं त्यानें अवलोकन केली ११. तेव्हां " हे शबले इकडे य " अशा आपल्या नांवानें त्या ब्राह्मणानें तिला हाक मारिली असतां त्या गाईनें तो स्वर ऐकिला १२ आणि क्षुधित झालेल्या त्या द्विजाचा तो स्वर ऐकून ती गाय त्या गमन करीत असलेल्या अग्नितुल्य ब्राह्मणाच्या मागोमाग गेली १३ जो ब्राह्मण तिला पाळीत होता तोही तिच्या मागोमाग सत्वर गेला; त्या ऋषीपाशीं जाऊन त्यानें त्वरेनें " ही गाय माझी " असें त्याला सांगितलें १४ आणि " नृपश्रेष्ठ नृगानें ह्या गाईला स्पर्श करून ही गाय मला दिली आहे." (असेंही त्यानें त्याला कळविलें) ह्यानंतर त्या विद्वान् ब्राह्मणांमध्यें मोठा वाद उपस्थित झाला १५ व ते उभयतां ब्राह्मण भांडत भांडत गोप्रदान करणाऱ्या राजाकडे गेले. परंतु, राजवाड्याच्या द्वारीं जरी ते

अहोरात्राण्यनेकानि वसन्तौ क्रोधमीयतुः १६ ऊचतुश्च महात्मानौ तावुभौ द्विजसत्तमौ । क्रुद्धौ परममंप्राप्तौ वाक्यं घोराभिसंहतम् १७ अर्थिनां कार्यसिद्ध्यर्थं यस्मात्त्वं नैषि दर्शनम् ।, अदृश्यः सर्वभूतानां कृकलासो भविष्यसि १८ बहुवर्षसहस्राणि बहुवर्षशतानि च । श्वभ्रे त्वं कृकलीभूतो दीर्घकाले निवत्स्यसि १९ उत्पत्स्यते हि लोकेऽस्मिन्यदूनां कीर्तिवर्धनः । वासुदेव इति ख्यातो विष्णुः पुरुषविग्रहः २० स ते मोक्षयिता शापाद्राजंस्तस्माद्भविष्यसि । कृता च तेन कालेन निष्कृतिस्ते भविष्यति २१ भारावतरणार्थं हि नरनारायणावुभौ । उत्पत्स्येते महावीर्यौ कलौ युग उपस्थिते २२ एवं तौ शापमुत्सृज्य ब्राह्मणौ विगतज्वरौ । तां गां हि दुर्बलां वृद्धां ददतुर्ब्राह्मणाय वै २३ एवं स राजा तं शापमुपभुङ्क्ते सुदारुणम् । कार्यार्थिनां विमर्दो हि राज्ञां दोषाय कल्पते २४ तच्छीघ्रं दर्शनं मह्यमभिवर्तन्तु कार्यिणः । सुकृतस्य हि कार्यस्य फलं नावैति पार्थिवः २५ तस्माद्गच्छ प्रतीक्षस्व सौमित्रे कार्यवाञ्जनः २६ [२५२८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥५३॥

---

अनेक दिवस बसून राहिले तरी राजाची आज्ञा न झाल्यामुळें त्यांना क्रोध आला १६. नंतर क्रुद्ध झालेले ते उभयतां महात्मे द्विजश्रेष्ठ अतिशय खवळून गेले आणि भयंकर शब्द उच्चारून ह्मणाले १७ " ज्याअर्थी बरजूंचीं कामें उरकावीं एतदर्थ तूं बाहेर पडत नाहींस त्याअर्थी तूं सर्व भूतांना अदृश्य असा सरड होशील १८. इतकेंच नव्हें परंतु, शेंकडों हजारों वर्षें दीर्घ कालपर्यंत तूं सरड होऊन बिळामध्यें राहशील १९. ह्या जगतामध्यें यादवांची कीर्ति वृद्धिंगत करणारा विष्णु पुरुषदेह धारण करून वासुदेव ह्या प्रसिद्ध नांवानें उत्पन्न होईल २०; आणि, हे राजा, तो तुझी ह्या शापापासून मुक्तता करील. सारांश, तूं सरड होशील व ह्या तुझ्या पापाची निष्कृति इतका काल लोटला ह्मणजे होईल २१. कलियुग प्राप्त झाल्यावर उभयतां महावीर्यवान् नरनारायण भूभार हरण करण्याकरितां अवतार धारण करतील " २२. ह्याप्रमाणें राजाला शाप देऊन ते उभयतां ब्राह्मण स्वस्थ झाले आणि ती गाय थकली आहे असें समजून त्यांनीं ती दुसऱ्या ब्राह्मणास देऊन टाकिली २३. ह्याप्रमाणें तो राजा तो अतिभयंकर शाप भोगित पडला आहे. सारांश, कार्यार्थी पुरुषांमध्यें होणारा कलह राजांच्या पातकाला कारण होतो २४. तस्मात्, ' अर्जदारांनीं सत्वर माझी भेट घ्यावी. चांगल्या केलेल्या कार्याचें फल राजाला प्राप्त होतच असतें २५. तस्मात्, हे लक्ष्मणा, ज्याअर्थी लोक कार्यार्थी आहेत त्याअर्थी द्वारामध्यें उभा राहून तूं कोण येत आहे तें पहा २६. ह्याप्रमाणें

रामस्य भाषितं श्रुत्वा लक्ष्मणः परमार्थवित् । उवाच प्राञ्जलिर्वाक्यं राघवं दीप्ततेजसम् १ अल्पापराधे काकुत्स्थ द्विजाभ्यां शाप ईदृशः । महान्नृगस्य राजर्षेर्यमदण्ड इवापरः २ श्रुत्वा तु पापसंयुक्तमात्मानं पुरुषर्षभ । किमुवाच नृगो राजा द्विजौ क्रोधसमन्वितौ ३ लक्ष्मणेनैवमुक्तस्तु राघवः पुनरब्रवीत् । शृणु सौम्य यथा पूर्वं स राजा शापविक्षतः ४ अथाध्वनि गतौ विप्रौ विज्ञाय स नृपस्तदा । आहूय मन्त्रिणः सर्वान्नैगमान्सपुरोधसः ५ तानुवाच नृगो राजा सर्वाश्च प्रकृतीस्तथा । दुःखेन सुसमाविष्टः श्रूयतां मे समाहिताः ६ नारदः पर्वतश्चैव मम दत्त्वा महद्भयम् । गतौ त्रिभुवनं भद्रौ वायुभूतावनिन्दितौ ७ कुमारोऽयं वसुर्नाम स चेहाद्याभिषिच्यताम् । श्वभ्रं च यत्सुखस्पर्शं क्रियतां शिल्पिभिर्मम ८ यत्राहं सक्षयिष्यामि शापं ब्राह्मणनिःसृतम् । वर्षघ्नमेकं श्वभ्रं तु हिमघ्नमपरं तथा ९ ग्रीष्मघ्नं तु सुखस्पर्शमेकं कुर्वन्तु शिल्पिनः । फलवन्तश्च ये वृक्षाः पुष्प-

---

महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५३ ॥

रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर त्यांतील मुख्य रहस्य जाणणारा लक्ष्मण हात जोडून त्या महातेजस्वी रामाला ह्मणाला १ "हे ककुत्स्थकुलोत्पन्न रामा, नृगराजर्षीचा अपराध अल्प असूनही दुसरा यमदंडच कीं काय असा हा अशाप्रकारचा मोठा शाप ब्राह्मणांनीं त्याला दिला २. परंतु, हे पुरुषश्रेष्ठा, आपण शापग्रस्त झालों असें श्रवण केल्यावर नृगराजा त्या क्रुद्ध द्विजांना काय ह्मणाला ?" ३. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें प्रश्न केला असतां पुनरपि राम त्याला ह्मणाला "हे विनयसंपन्न लक्ष्मणा, तो राजा पूर्वी शापग्रस्त झाल्यावर काय ह्मणाला तें ऐक ४. विप्र मार्गाला लागल्याचें जाणून त्या राजानें पुरोहितासहवर्तमान सर्व मंत्र्यांना व प्रजाजनांना बोलाविलें ५ आणि दुःखानें अत्यंत व्याप्त झालेला तो नृगराजा सर्व प्रजाजनांना ह्मणाला "मन स्वस्थ करून तुह्मी माझें भाषण ऐका ६. नारद आणि पर्वत हे दोघे वायूप्रमाणें शीघ्र गमन करणारे निर्दोष व कल्याणकारक ऋषि शापासंबंधानें मला भयंकर वार्ता सांगून ब्रह्मलोकीं गेले ७. तस्मात्, हा वसुनामक कुमार आहे; ह्याला आज ह्या राज्यावर अभिषेक करा व शिल्पलेकांकडून ज्याचा स्पर्श सुखावह होईल असें एक बीळ माझ्याकरितां तयार करा ८ म्हणजे त्या ठिकाणीं ब्राह्मणानें दिलेला शाप मी भोगीत राहीन कारागिरांनीं सुखावह स्पर्शानें युक्त असें एक बीळ, एक पर्जन्यप्रतिबंधक बिळ, एक शीतनिवारक बिळ, आणि एक उष्णप्रतिबंधक बिळ करावें. त्याचप्रमाणें फळें

वत्यश्च या लताः १० विरोप्यन्तां बहुविधाश्छायावन्तश्च गुल्मिनः । क्रियतां रमणीयं च श्वभ्राणां सर्वतोदिशम् ११ सुखमत्र वसिष्यामि यावत्कालस्य पर्ययः । पुष्पाणि च सुगन्धीनि क्रियतां तेषु नित्यशः १२ परिवार्य यथा मे स्युरध्यर्धं योजनं तथा । एवं कृत्वा विधानं स संनिवेश्य वसुं तदा १३ धर्मनित्यः प्रजाः पुत्र क्षत्रधर्मेण पालय । प्रत्यक्षं ते यथा शापो द्विजाभ्यां मयि पातितः १४ नरश्रेष्ठ सरोषाभ्यामपराधेऽपि तादृशे । मा कृथास्त्वनुसंतापं मत्कृते हि नरर्षभ १५ कृतान्तः कुशलः पुत्र येनास्मि व्यसनीकृतः । प्राप्तव्यान्येव प्राप्नोति गन्तव्यान्येव गच्छति १६ लब्धव्यान्येव लभते दुःखानि च सुखानि च । पूर्वे जात्यन्तरे वत्स मा विषादं कुरुष्व ह १७ एवमुक्त्वा नृगस्तत्र सुतं राजा महायशाः । श्वभ्रं जगाम सुकृतं वासाय पुरुषर्षभ १८ एवं प्रविश्यैव नृपस्तदानीं श्वभ्रं महद्रत्नविभूषितं तत् संपादयामास तदा महात्मा शापं द्विजाभ्यां हि रुषा विमुक्तम् १९ [२५५७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे चतुष्पञ्चाशः सर्गः ॥ ५४ ॥

---

येणारे वृक्ष, पुष्पं येणाऱ्या लता ९, १० आणि घन छायेनें युक्त असेही नानाप्रकारचे वृक्ष, बिळांच्या सर्व बाजूंस लावून तिकडे रमणीय करा ११. शापकाल संपेपर्यंत मला त्या ठिकाणीं वास्तव्य करावयाचें आहे. ह्यास्तव, आसपास सहा कोसपर्यंत सुगंधि पुष्पें नेहेमीं राहतील अशी तुम्ही त्या बिळांसंबंधानें तजवीज करा. " ह्याप्रमाणें व्यवस्था करून व वसूला राज्यावर स्थापून तो राजा ह्मणाला १२, १३ " हे पुत्रा, तू नेहेमीं धर्मानें आचरण करून क्षात्रधर्मानें प्रतिपालन कर. हे पुरुषश्रेष्ठा, तशा प्रकारचा अपराध असूनही ब्राह्मणांनीं क्रुद्ध होऊन मला शाप कसा दिला आहे; हें तुला विदितच आहे. हे पुरुषश्रेष्ठा, तं माझ्याकरितां व्यर्थ दुःख करूं नको १४, १५. हे पुत्रा, ज्यानें मला संकटांत आणिलें; तें प्राक्तन कर्म बलवत्तर आहे. त्याच्यामुळें ज्या ज्या गोष्टी प्राप्त व्हावयाच्या त्याच प्राप्त होत असतात. ज्या ज्या ठिकाणीं जावयाचें असेल त्या त्या ठिकाणीं जाणें भाग पडतें १६ आणि जीं जीं सुखें प्राप्त व्हावयाचीं असतील तीं तींच प्राप्त होत असतात. तस्मात्, हे वत्सा, माझ्या पूर्व जन्मार्जित कर्मासंबंधानें तूं खेद करूं नको " १७. हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, ह्याप्रमाणें पुत्राला सांगून तो महाकीर्तिमान् महाराजा वास्तव्य करण्याकरितां उत्कृष्ट रीतीनें तयार केलेल्या बिळामध्यें शिरला १८. सारांश, मोठ्या मोठ्या रत्नांनीं सजविलेल्या त्या बिळामध्यें त्यावेळीं प्रविष्ट होतांक्षणींच ब्राह्मणांनीं क्रोधानें

एष ते नृगशापस्य विस्तरोऽभिहितो मया । यद्यस्ति श्रवणे श्रद्धा शृणुष्वेहापरां कथाम् १ एवमुक्तस्तु रामेण सौमित्रिः पुनरब्रवीत् । तृप्तिराश्चर्यभूतानां कथानां नास्ति मे नृप २ लक्ष्मणेनैवमुक्तस्तु राम इक्ष्वाकुनन्दनः । कथां परमधर्मिष्ठां व्याहर्तुमुपचक्रमे ३ आसीद्राजा निमिर्नाम इक्ष्वाकूणां महात्मनाम् । पुत्रो द्वादशमो वीर्ये धर्मे च परिनिष्ठितः ४ स राजा वीर्यसंपन्नः पुरं देवपुरोपमम् । निवेशयामास तदा अभ्याशे गौतमस्य तु ५ पुरस्य सुकृतं नाम वैजयन्तमिति श्रुतम् । निवेशं यत्र राजर्षिर्निमिश्चक्रे महायशाः ६ तस्य बुद्धिः समुत्पन्ना निवेश्य सुमहापुरम् । यजेयं दीर्घसत्रेण पितुः प्रह्लादयन्मनः ७ ततः पितरमामन्त्र्य इक्ष्वाकुं हि मनोः सुतम् । वसिष्ठं वरयामास पूर्वं ब्रह्मर्षिसत्तमम् ८ अनन्तरं स राजर्षिर्निमिरिक्ष्वाकुनन्दनः । अत्रिमङ्गिरसं चैव भृगुं चैव तपोनिधिम् ९ तमुवाच वसिष्ठस्तु निमिं राजर्षिसत्तमम् । वृतोऽहं पूर्वमिन्द्रेण अन्तरं प्रतिपालय १० अनन्तरं महाविप्रो गौतमः प्रत्यपूरयत् । वसिष्ठोऽपि महातेजा इन्द्रयज्ञमथाक-

---

दिलेल्या त्या शापाचा उपभोग तो महात्मा राजा घेऊं लागला १९. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चोपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५४ ॥

हा नृगशाप मीं तुला सविस्तर कथन केला आहे. आणखी कांहीं श्रवण करण्याची इच्छा असेल तर राजांच्या अपराधा संबंधानें दुसरी ही कथा श्रवण कर " १. ह्याप्रमाणें रामानें लक्ष्मणाला सांगितलें असतां लक्ष्मण त्याला ह्मणाला " हे राजा, आश्चर्यरूप कथांची मला तृप्ति झाली नाहीं २. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें सांगितलें असतां इक्ष्वाकुवंशज राम मोठें धर्मयुक्त आख्यान त्याला कथन करूं लागला ३. ( तो ह्मणाला ) " महात्म्या इक्ष्वाकुवंशजांचा निमि राजा ह्मणून बारावा पुत्र होता. तो वीर्यवान् व धर्मनिष्ठ असे ४. त्या वीर्यवान् राजानें गौतममुनींच्या आश्रमासमीप अमरावती नगरीप्रमाणें एक नगर वसविलें ५. उत्कृष्ट रीतीनें तें बनविलेलें नगर वैजयंत नगर ह्मणून प्रसिद्ध होतें व तेथें तो महायशस्वी निमिराजर्षी वास्तव्य करीत असे ६. तें प्रचंड नगर वसविल्यानंतर "पित्याच्या मनाला आनंद देण्याकरितां मी दीर्घ सत्र करीन " अशी त्याला इच्छा झाली ७. तेव्हां आपला पिता जो मनुपुत्र इक्ष्वाकु त्याचा विचार घेऊन ब्रह्मर्षिश्रेष्ठ वसिष्ठांना त्यानें प्रथम ऋत्विग्वरण दिलें. ८; आणि त्यानंतर इक्ष्वाकुपुत्र निमि राजानें अत्रि, अंगिरस व तपोनिधि भृगु ह्यांनाही ऋत्विग्वरण दिलें ९. तेव्हां त्या राजर्षिश्रेष्ठ निमीला वसिष्ठमुनि ह्मणाले " इंद्रानें 'मला पूर्वी ऋत्विग्वरण दिलें आहे.

रोत् ११ निमिस्तु राजा विप्रांस्तान्समानीय नराधिपः । अयजद्धिमवत्पार्श्वे स्वपुरस्य समीपतः १२ पञ्चवर्षसहस्राणि राजा दीक्षामथाकरोत् ॥ इन्द्रयज्ञावसाने तु वसिष्ठो भगवानृषिः १३ सकाशमागतो राज्ञो हौत्रं कर्तुमनिन्दितः । तदन्तरमथापश्यद्गौतमेनाभिपूरितम् १४ कोपेन महताविष्टो वसिष्ठो ब्रह्मणः सुतः । स राज्ञो दर्शनाकाङ्क्षी मुहूर्तं समुपाविशत् ॥ तस्मिन्नहनि राजर्षिर्निद्रयापहृतो भृशम् १५ ततो मन्युर्वसिष्ठस्य प्रादुरासीन्महात्मनः । अदर्शनेन राजर्षेर्व्याहर्तुमुपचक्रमे १६ यस्मात्त्वमन्यं वृतवान्मामवज्ञाय पार्थिव । चेतनेन विनाभूतो देहस्ते पार्थिवैष्यति १७ ततः प्रबुद्धो राजा तु श्रुत्वा शापमुदाहृतम् । ब्रह्मयोनिमथोवाच स राजा क्रोधमूर्छितः १८ अजानतः शयानस्य क्रोधेन कलुषीकृतः । उक्तवान्मम शापाग्निं यमदण्डमिवापरम् १९ तस्मात्तवापि ब्रह्मर्षे चेतनेन विनाकृतः । देहः स सुचिरप्रख्यो भविष्यति न संशयः २० इति रोषवशादुभौ तदानीमन्योन्यं शपितौ नृपद्विजेन्द्रौ । सहसैव बभूवतुर्विदेहौ तत्तुल्याधिगत-

ह्यास्तव, त्याचा याग होईपर्यंत तूं वाट पहा " १०. ह्याप्रमाणें सांगून वसिष्ठमुनी गेल्यानंतर महाविप्र गौतममुनींनीं वसिष्ठमुनींचें काम केलें व महातेजस्वी वसिष्ठमुनींनीं इंद्राचा याग केला ११; इकडे निमि राजानें त्या विप्रांना आणवून आपल्या नगरासमीप हिमालय पर्वताच्या जवळच याग केला १२ व त्या यागाकरितां पांच हजार वर्षेंपर्यंत तो राजा दीक्षा घेऊन बसला. इकडे इंद्राचा याग समाप्त झाल्यावर भगवान् वसिष्ठऋषि १३ राजाचे समीप हौत्र करण्याकरितां आले; तों गौतमानें आपली जागा भरून काढिल्याचें त्या निर्दोष मुनींच्या दृष्टीस पडलें १४. तेव्हां ब्रह्मपुत्र वसिष्ठमुनि अति क्रुद्ध होऊन राजाची भेट घेण्याकरितां मुहूर्तपर्यंत तेथें बसले; परंतु, त्या दिवशीं तो राजर्षि निद्रेनें फारच व्याकुळ झाला होता १५. तदनंतर राजर्षि दृष्टीं न पडल्यामुळें महात्म्या वसिष्ठमुनींनीं आपला क्रोध व्यक्त केला आणि ते ह्मणाले १६. " हे राजा, ज्याअर्थीं माझी अवज्ञा करून तूं दुसरा ऋत्विज वरिला आहेस, त्याअर्थीं, हे राजा, तुझा देह अचेतन होऊन राहील " १७. तदनंतर राजा जागा झाला आणि शाप झाल्याचें श्रवण करितांक्षणीं क्रुद्ध होऊन तो ब्रह्मपुत्र वसिष्ठमुनींना ह्मणाला १८" आपण आल्याचें मला ठाऊक नसल्यामुळें मी निद्रिस्थ असतांना ज्याअर्थीं आपण क्रोधानें व्याप्त होऊन प्रति यमदंडाप्रमाणें मजवर शापाग्नि सोडिला आहे १९ त्याअर्थीं, हे ब्रह्मर्षे, आपलाही अतिमनोहर देह निःसंशय अचेतन होऊन राहील २०. ह्याप्रमाणें त्या उभयतां नृपश्रेष्ठ व द्विजश्रेष्ठ ह्यांनीं एकमेकांस त्यावेळीं शाप दिले आणि ब्रह्मदेवाप्रमाणें सामर्थ्यवान्

प्रभाववन्तौ २१ [ २५७८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्य उत्तरकाण्ड पञ्चपञ्चाशः सर्गः ॥ ५५ ॥

रामस्य भाषितं श्रुत्वा लक्ष्मणः परवीरहा । उवाच प्राञ्जलिर्भूत्वा राघवं
दीप्ततेजसम् १ निक्षिप्य देहौ काकुत्स्थ कथं तौ द्विजपार्थिवौ । पुनर्देह
संयोगं जग्मतुर्देवसंमतौ २ लक्ष्मणेनैवमुक्तस्तु राम इक्ष्वाकुनन्दनः । प्रत्यु-
वाच महातेजा लक्ष्मणं पुरुषर्षभः ३ तौ परस्परशापेन देहमुत्सृज्य धार्मिकौ ।
अभूतां नृपविप्रर्षी वायुभूतौ तपोधनौ ४ अशरीरः शरीरस्य कृतेऽन्यस्य
महामुनिः । वसिष्ठस्तु महातेजा जगाम पितुरन्तिकम् ५ सोऽभिवाद्य ततः
पादौ देवदेवस्य धर्मवित् । पितामहमथोवाच वायुभूत इदं वचः ६ भगव-
न्निमिशापेन विदेहत्वमुपागमम् । देवदेव महादेव वायुभूतोऽहमण्डज ७
सर्वेषां देहहीनानां महद्दुःखं भविष्यति । लुप्यन्ते सर्व कार्याणि हीनदेहस्य
वै प्रभो ८ देहस्यान्यस्य सद्भावे प्रसादं कर्तुमर्हसि ९ तमुवाच ततो ब्रह्मा
स्वयंभूरमित प्रभः । मित्रावरुणजं तेज आविश त्वं महायशः १० अयोनिजस्त्वं
भविता तत्रापि द्विजसत्तम । धर्मेण महता युक्तः पुनरेष्यसि मे वशम् ११

---

असलेले ते उभयतांही एकाएकीं स्थूलदेहरहित झाले २१. ह्याप्रमाणें महामुनि-
वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पंचावन्नावा सर्ग
समाप्त झाला ॥ ५५ ॥

रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर शत्रुवीरनाशक लक्ष्मण हात जोडून उज्वलते-
जानें युक्त असलेल्या रामाला ह्मणाला १ " हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, देहांचा
त्याग केल्यानंतर त्या देवमान्य द्विजनृपांना पुनरपि देहप्राप्ति कशी झाली ? " २.
ह्याप्रमाणें लक्ष्मणानें प्रश्न केला असतां महातेजस्वी व पुरुषश्रेष्ठ इक्ष्वाकुवंशज राम
लक्ष्मणाला ह्मणाला ३ " ते उभयतां धर्मनिष्ठ तपोधन राजर्षि व ब्रह्मर्षि परस्पर
शापानें देहत्याग करून वायुरूप बनले ४. तेव्हां दुसरें शरीर प्राप्त होण्याकरितां
ते देहरहित महातेजस्वी महर्षी पित्यासमीप गेले ५; देवाधिदेव ब्रह्मदेवाच्या चरणांना
त्या धर्मवेत्त्या वसिष्ठमुनींनीं अभिवंदन केलें आणि ते वायुरूप झालेले वसिष्ठमुनि ब्रह्म-
देवाला ह्मणाले ६ " हे भगवन्, हे देवाधिदेव, हे महादेव, हे अंडज, निमीच्या शापानें
मी देहरहित होऊन वायुरूप बनलों आहे ७. परंतु, हे प्रभो, देहरहित झाल्यामुळें सर्व
कार्यांचा लोप होत आहे. इतरही देहरहित सर्व प्राण्यांना मोठें दुःख होत असेल ८.
ह्यास्तव, दुसरा देह प्राप्त होण्याविषयीं आपण मजवर कृपा करावी " ९. ह्यावर अपरिमित
तेजानें युक्त असलेले स्वयंभू ब्रह्मदेव त्यांना ह्मणाले " हे महाकीर्तिमान् वसिष्ठा,

एवमुक्तस्तु देवेन अभिवाद्य प्रदक्षिणम् । कृत्वा पितामहं तूर्णं प्रययौ वरुणालयम् १२ तमेव कालं मित्रोऽपि वरुणत्वमकारयत् । क्षीरोदेन सहोपेतः पूज्यमानः सुरेश्वरैः १३ एतस्मिन्नेव काले तु उर्वशी परमाप्सरा । यदृच्छया तमुद्देशमागता सखिभिर्वृता १४ तां दृष्ट्वा रूपसंपन्नां क्रीडन्तीं वरुणालये । तदाविशत्परो हर्षो वरुणं चोर्वशीकृते १५ स तां पद्मपलाशाक्षीं पूर्णचन्द्रनिभाननाम् । वरुणो वरयामास मैथुनायाप्सरोवराम् १६ प्रत्युवाच ततः सा तु वरुणं प्राञ्जलिः स्थिता । मित्रेणाहं वृता साक्षात्पूर्वमेव सुरेश्वर १७ वरुणस्त्वब्रवीद्वाक्यं कन्दर्पशरपीडितः । इदं तेजः समुत्स्रक्ष्ये कुम्भेऽस्मिन्देवनिर्मिते १८ एवमुत्सृज्य सुश्रोणि त्वय्यहं वरवर्णिनि । कृतकामो भविष्यामि यदि नेच्छसि संगमम् १९ तस्य तल्लोकनाथस्य वरुणस्य सुभाषितम् । उर्वशी परमप्रीता श्रुत्वा वाक्यमुवाच ह २० काममेतद्भवत्वेवं हृदयं मे त्वयि स्थितम् । भावश्चाप्यधिकं तुभ्यं देहो मित्रस्य तु प्रभो २१ उर्वश्या एवमुक्तस्तु रेतस्तन्महदद्भुतम् । ज्वल-

---

मित्रावरुणाच्या तेजामध्यें तूं प्रवेश कर १०. हे द्विजश्रेष्ठ, तेथेंही तूं अयोनिसंभव होशील आणि मोठा धर्मनिष्ठ होऊन पुनरपि माझ्या अधीन होशील " ११. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें सांगितलें असतां वसिष्ठमुनींनीं त्यांना प्रदक्षिणा केली व ते सत्वर वरुणलोकीं निघून गेले १२. त्याचवेळीं मित्रही क्षीरसागररूप वरुणरूपानें युक्त असून श्रेष्ठ देवांना पूज्य होता व वरुणाचा अधिकार चालवीत होता १३. त्याचवेळीं उर्वशी नामक श्रेष्ठ अप्सरा सख्यांसहवर्तमान सहज त्या ठिकाणीं आली असतां १४ वरुणलोकीं क्रीडा करीत असलेली ती अप्सरा अवलोकन करून तिच्यासंबंधानें वरुणाला अतिशय आनंद झाला १५. नंतर कमलपत्राप्रमाणें जिचे नेत्र विशाल आहेत आणि पूर्णचंद्राप्रमाणें जिचें मुख आल्हादकारक आहे अशा त्या श्रेष्ठ अप्सरेला पाहून तिच्याबरोबर क्रीडा करण्याची त्यानें इच्छा दर्शविली १६. तेव्हां ती हात जोडून उभी राहिली आणि वरुणाला ह्मणाली " हे सुरेश्वर, मित्रानें पूर्वींच स्वतः माझी मागणी केली आहे " १७. त्यानंतर मदनबाणानें पीडित झालेला वरुण तिला ह्मणाला " ह्या देवनिर्मित कुंभामध्यें मी हें तेज टाकितों १८; आणि हे सुंदरि, हे वरवर्णिनि, माझ्याशीं समागम करण्याची जर तुला इच्छा नसेल तर ह्याप्रमाणं तुझ्याकरितां तेजाचा उत्सर्ग करून मी कृतकृत्य होईन १९. लोकाधिपति वरुणाचें तें उत्कृष्ट भाषण श्रवण केल्यावर उर्वशी अतिशय संतुष्ट झाली आणि ह्मणाली २० " हे प्रभो, ठीक आहे; आपण खुशाल असें करावं. माझें हृदय आपल्या ठिकाणीं आहे व आपलेंही प्रेम माझे ठिकाणीं

दग्निसमप्रख्यं तस्मिन्कुम्भे न्यवासृजत् २२ उर्वशी त्वगमत्तत्र मित्रो वै यत्र देवता । तां तु मित्रः सुसंक्रुद्ध उर्वशीमिदमब्रवीत् २३ मयाभिमन्त्रिता पूर्वं कस्मात्त्वमवसर्जिता। पतिमन्यं वृतवती किमर्थं दुष्टचारिणि २४ अनेन दुष्कृतेन त्वं मत्क्रोधकलुषीकृता । मनुष्यलोकमास्थाय कंचित्कालं निवत्स्यसि २५ बुधस्य पुत्रो राजर्षिः काशिराजः पुरूरवाः । तमभ्यागच्छ दुर्बुद्धे स ते भर्ता भविष्यति २६ ततः सा शापदोषेण पुरूरवसमभ्यगात् । प्रतिष्ठाने पुरूरवं बुधस्यात्मजमौरसम् २७ तस्य जज्ञे ततः श्रीमानायुः पुत्रो महाबलः । नहुषो यस्य पुत्रस्तु बभूवेन्द्रसमद्युतिः २८ वज्रमुत्सृज्य वृत्राय श्रान्तेऽथ त्रिदिवेश्वरे । शतं वर्षसहस्राणि येनेन्द्रत्वं प्रशासितम् २९ सा तेन शापेन जगाम भूमिं तदोर्वशी चारुदती सुनेत्रा । बहूनि वर्षाण्यवसच्च सुभ्रूः शापक्षयादिन्द्रसदो ययौ च ३० [२६०८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः ॥५६॥

तां श्रुत्वा दिव्यसंकाशां कथामद्भुतदर्शनाम् । लक्ष्मणः परमप्रीतो राघवं

---

अधिक आहे. ह्यास्तव, माझा देह मात्र ( सांप्रत ) मित्राच्या अधीन आहे " २१. ह्याप्रमाणें उर्वशीनें सांगितलें असतां प्रज्वलित अग्नीसारिखें असलेलें तें अद्भुत रेत वरुणानें त्या कुंभांत टाकिलें २२. मित्रदेव ज्या ठिकाणीं होता त्या ठिकाणीं उर्वशी गेली असतां मित्र अतिशय क्रुद्ध होऊन तिला ह्मणाला २३ "हे दुराचारिणि, मीं तुला पूर्वी आव्हान केलें असून तूं मला कसें सोडिलेंस ? आणि दुसऱ्या पतीचा तूं कशाकरितां स्वीकार केलास? २४. ह्या तुझ्या पातकामुळें तूं माझ्या क्रोधाच्या तावडींत सांपडली आहेस. ह्यास्तव, मनुष्यलोकीं जाऊन तूं कांहीं कालपर्यंत वास्तव्य करशील २५. हे दुष्टे, पुरूरवा काशिराज जो राजर्षि बुधपुत्र त्याच्याकडे तूं जा; तो तुझा भर्ता होईल " २६. असें मित्रानें सांगितल्यानंतर शापदोषामुळें ती त्या पुरूरव्याकडे गेली. तो पुरूरवा बुधाचा औरस पुत्र असून प्रतिष्ठान नगरांत राहत होता २७. त्याला वैभवशाली व बलाढ्य असा आयु ह्मणून पुत्र झाला; व तेजानें इंद्रतुल्य असलेला नहुष ह्मणून त्या आयूला पुत्र झाला २८. वृत्रावर वज्र सोडून देवराज इंद्र श्रांत झाला असतां एक लक्ष वर्षेपर्यंत त्या नहुषानेंच इंद्राचा अधिकार चालविला २९. असो. मनोहर दंत व उत्कृष्ट नेत्र ह्यांनीं युक्त असलेली ती उर्वशी त्या शापामुळें भूलोकीं गेली; तेथें बहुत वर्षेपर्यंत तिनें वास्तव्य केलें व शाप संपल्यानंतर ती इंद्रलोकीं परत गेली ३०. ह्याप्रमाणे महामुनिवाल्मीकिप्रणीत-श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं छपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५६॥

ती आश्चर्यकारक दिव्य कथा श्रवण करून लक्ष्मण अतिशय संतुष्ट झाला व रामाला

वाक्यमब्रवीत् १ निक्षिप्तदेहौ काकुत्स्थ कथं तौ द्विजपार्थिवौ । पुनर्देहेन संयोगं जग्मतुर्देवसंमतौ २ तस्य तद्भाषितं श्रुत्वा रामः सत्यपराक्रमः । तां कथां कथयामास वसिष्ठस्य महात्मनः ३ यः स कुम्भो रघुश्रेष्ठ तेजःपूर्णो महात्मनोः । तस्मिंस्तेजोमयौ विप्रौ संभूतावृषिसत्तमौ ४ पूर्वं समभवत्तत्र अगस्त्यो भगवानृषिः । नाहं सुतस्तवेत्युक्त्वा मित्रं तस्मादपाक्रमत् ५ तद्धि तेजस्तु मित्रस्य उर्वश्या पूर्वमाहितम् । तस्मिन्समभवत्कुम्भे तत्तेजो यत्र वारुणम् ६ कस्यचित्त्वथ कालस्य मित्रावरुणसंभवः । वसिष्ठस्तेजसा युक्तो जज्ञे इक्ष्वाकुदैवतम् ७ तमिक्ष्वाकुर्महातेजा जातमात्रमनिन्दितम् । वव्रे पुरोधसं सौम्य वंशस्यास्य हिताय नः ८ एवं त्वपूर्वदेहस्य वसिष्ठस्य महात्मनः । कथितो निर्गमः सौम्य निमेः शृणु यथाऽभवत् ९ दृष्ट्वा विदेहं राजानमृषयः सर्व एव ते । तं च ते याजयामासुर्यज्ञदीक्षां मनीषिणः १० तं च देहं नरेन्द्रस्य रक्षन्ति स्म द्विजोत्तमाः । गन्धैर्माल्यैश्च वस्त्रैश्च पौरभृत्यसमन्विताः ११ ततो यज्ञे समाप्ते तु भृगुस्तत्रेदमब्रवीत् । आनयिष्यामि ते चेत-

---

ह्मणाला १ " हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, हे देवतुल्य द्विजराजे पुनरपि देहधारी कसे झाले ?" २, हा त्याचा प्रश्न श्रवण करून महात्म्या वसिष्ठमुनींची ती कथा सत्यपराक्रमी रामानें कथन केली ३. ( तो ह्मणाला ) " हे रघुवंशज श्रेष्ठा, त्या महात्म्या मित्रावरुणांच्या तेजानें जो कुंभ भरला होता; व त्या कुंभाचे ठिकाणीं तेजोमय असे दोन श्रेष्ठ ब्रह्मर्षि उत्पन्न झाले ४. भगवान् अगस्ति ऋषि प्रथम त्या ठिकाणीं उत्पन्न झाले आणि " मी तुझा एकट्याचा पुत्र नव्हे " असें मित्राला सांगून ते तेथून निघून गेले ५. उर्वशीनें पूर्वी मित्राचें शुक्र त्या कुंभांत ठेविलें होतें व तेथेच वरुणतेज होतें ६. असो. ह्या गोष्टीला काहीं दिवस लोटल्यानंतर मित्र व वरुण ह्या उभयतांपासून ज्याचा जन्म आहे असा, इक्ष्वाकुराजाला देवाप्रमाणें असलेला, तेजस्वी वसिष्ठ उत्पन्न झाला ७; व हे सौम्य लक्ष्मणा, ह्या आमच्या वंशाच्या कल्याणाकरितां महातेजस्वी इक्ष्वाकूनें त्या निर्दोष वसिष्ठ मुनीला, उत्पत्ति होतांक्षणींच, पुरोहित वरिलें ८. ह्याप्रमाणें, हे सौम्य लक्ष्मणा, अपूर्वदेहधारी महात्म्या वसिष्ठ मुनींच्या उत्पत्तीचा प्रकार मीं तुला कथन केला. आतां निमीचा वृत्तांत कसा झाला हें तूं श्रवण कर ९. राजा देह सोडून गेल्यानें अवलोकन करितांक्षणीं ते सर्वही ऋषि त्या विचारी राजानें घेतलेली धर्मदीक्षा संभाळून तो याग करूं लागले १०; व नागरिक जन आणि सेवक ह्यांसहवर्तमान त्या द्विजश्रेष्ठांनीं गंध, पुष्पें व वस्त्रें ह्यांच्या योगानें त्या राजाच्या देहाचें रक्षण केलें ११. नंतर यज्ञ समाप्त झाल्यावर भृगुमुनि ह्मणाले " हे राजा, मी तुजवर

स्तुष्टोऽस्मि तत्र पार्थिवः १२ सुप्रीताश्च सुराः सर्वे निमेश्चेतस्तदाब्रुवन् ।
वरं वरय राजर्षे क्व ते चेतो निरूप्यताम् १३ एवमुक्तः सुरैः सर्वैर्निमेश्चे-
तस्तदाब्रवीत् । नेत्रेषु सर्वभूतानां वसेयं सुरसत्तमाः १४ बाढमित्येव विबुधा
निमेश्चेतस्तदाब्रुवन् । नेत्रेषु सर्वभूतानां वायुभूतश्चरिष्यसि १५ त्वत्कृते च
निमिष्यन्ति चक्षूंषि पृथिवीपते । वायुभूतेन चरता विश्रामार्थं मुहुर्मुहुः १६
एवमुक्त्वा तु विबुधाः सर्वे जग्मुर्यथागतम् । ऋषयोऽपि म.त्मानो निमे-
र्देहं समाहरन् १७ अरणिं तत्र निक्षिप्य मथनं चक्रुरोजसा । मन्त्रहोमै-
र्महात्मानः पुत्रहेतोर्निमेस्तदा १८ अरण्यां मथ्यमानायां प्रादुर्भूतो महा-
तपाः । मथनान्मिथिरित्याहुर्जननाज्जनकोऽभवत् १९ यस्माद्विदेहात्संभूतो
वैदेहस्तु ततः स्मृतः । एवं विदेहराजश्च जनकः पूर्वकोभवत् ॥ मिथि-
र्नाम महातेजास्तेनायं मैथिलोऽभवत् २० इति सर्वमशेषतो मया कथितं
संभवकारणं तु सौम्य । नृपपुंगव शापजं द्विजस्य द्विजशापाच्च यदद्भुतं

---

संतुष्ट झालों आहें. ह्यास्तव, मी तुझ्या देहामध्यें चेतना आणीन " १२. ह्यानंतर सर्व देवही सुप्रसन्न झाले व निमीच्या देहांत जीव आणण्यासंबंधानें ते ह्मणाले " हे राजर्षे, वर माग; आणि तुझा प्रत्यगात्मा कोठें राहील तें सांग" १३. असें सर्व देवांनीं विचारिलें असतां निमीचा जीवात्मा ह्मणाला, सर्व प्राण्यांच्या नेत्रांचे ठिकाणीं, हे सुर-श्रेष्ठ हो, मी वास्तव्य करीन " १४. ह्यावर निमीच्या जीवात्म्याला देव ह्मणाले "ठीक आहे; सर्व भूतांच्या नेत्रांमध्यें तू वायुरूप होऊन संचार करशील १५; आणि हे भूपते, वायुरूप होऊन तूं संचार करीत असतांना तुला वारंवार विश्रांति मिळावी एतदर्थ सर्व प्राण्यांचे नेत्र तुझ्या करितां उघडझांप करूं लागतील " १६. ह्याप्रमाणें त्याला सांगून सर्व देव आल्या मार्गानें परत गेले व महात्म्या ऋषींनींही निमीचा देह तेथें आणिला १७. नंतर निमीपासून पुत्र व्हावा एतदर्थ तो देहच अरणी ह्मणून तेथें ठेवून त्या महात्म्या मुनींनीं समंत्रकहोमपूर्वक स्वसामर्थ्यानें त्या अरणीचे ठिकाणीं मंथन केलें १८. अरणीचें मंथन होऊं लागलें असतां एक महातपस्वी पुरुष तेथें उत्पन्न झाला. तो मंथनापासून झाल्यामुळें मिथि असें त्याला ह्मणं लागले; त्याचें जनन झाल्यामुळें तो जनक ह्मणून प्रसिद्ध झाला १९ आणि विदेहापासून ह्मणजे देहरहित निमिराजापासून तो उत्पन्न झाला असल्यामुळें वैदेह ह्मणून प्रसिद्ध झाला. ह्याप्रमाणें विदेहराज व जनक असा महातेजस्वी मिथि ह्मणून ह्या वंशांतील पूर्वज होऊन गेला आणि ह्मणूनच हा वंश मैथिल झाला " २०. हे सौम्य नृपश्रेष्ठ लक्ष्मणा, वसिष्ठ द्विजाची शापामुळें उत्पत्ति कशी झाली हें कारणासहवर्तमान मीं तुला ह्याप्रमाणें कथन

नृपस्य २१ [ २६२९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे सप्तपञ्चाशः सर्गः ॥ ५७ ॥

एवं ब्रुवति रामे तु लक्ष्मणः परवीरहा । प्रत्युवाच महात्मानं ज्वलन्तमिव तेजसा १ महदद्भुतमाश्चर्यं विदेहस्य पुरातनम् । निर्वृत्तं राजशार्दूल वासिष्ठस्य मुनेश्च ह २ निमिस्तु क्षत्रियः शूरो विशेषेण च दीक्षितः । न क्षमं कृतवान्राजा वसिष्ठस्य महात्मनः ३ एवमुक्तस्तु तेनायं रामः क्षत्रियपुङ्गवः । उवाच लक्ष्मणं वाक्यं सर्वशास्त्रविशारदम् ४ रामो रमयतां श्रेष्ठो भ्रातरं दीप्ततेजसम् । न सर्वत्र क्षमा वीर पुरुषेषु प्रदृश्यते ५ सौमित्रे दुःसहो रोषो यथा क्षान्तो ययातिना । सत्त्वानुगं पुरस्कृत्य तन्निबोध समाहितः ६ नहुषस्य सुतो राजा ययातिः पौरवर्धनः । तस्य भार्याद्वयं सौम्य रूपेणाप्रतिमं भुवि ७ एका तु तस्य राजर्षेर्नाहुषस्य पुरस्कृता । शर्मिष्ठा नाम दैतेयी दुहिता वृषपर्वणः ८ अन्या तूशनसः पत्नी ययातेः पुरुषर्षभ । न तु सा दयिता राज्ञो देवयानी सुमध्यमा ९ तयोः पुत्रौ तु संभूतौ रूपवन्तौ

---

केलें आणि द्विजाच्या शापामुळें राजासंबंधानें जो अद्भुत प्रकार घडला तोही मीं तुला कथन केला २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तर कांडापैकीं सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५७ ॥

ह्याप्रमाणें राम भाषण करीत असतांना परवीरनाशक लक्ष्मण तेजानें झळकत असलेल्या महात्म्या रामाला ह्मणाला १ " हे नृपश्रेष्ठ, वसिष्ठमुनि आणि विदेह निमि ह्यांच्यासंबंधानें मोठा अद्भुत व आश्चर्यकारक प्रकार पूर्वी घडून आलेला आहे २; परंतु, निमि राजा शूर क्षत्रिय असतांना व विशेषतः त्यानें दीक्षा घेतली असतांना महात्म्या वसिष्ठ मुनींशीं त्यानें योग्य वर्तन केलें नाहीं " ३. ह्याप्रमाणें लक्ष्मण बोलला असतां आनंद देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला क्षत्रियश्रेष्ठ राम सर्व शास्त्रांमध्यें निपुण व उज्ज्वल तेजानें युक्त असा जो आपला भ्राता लक्ष्मण त्याला ह्मणाला " हे वीरा, क्षमा सर्व पुरुषांचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते असें नाहीं ४,५. हे लक्ष्मणा, रोष दुःसह आहे; हा रोष ययाति राजानें सत्त्वगुणयुक्त मार्गाचें अवलंबन करून कसा जिंकिला हें तूं लक्ष्यपूर्वक ऐक ६. प्रजेचें कल्याण करणारा ययातिराजा ह्मणून नहुषपुत्र होता व जगतामध्यें रूपानें अप्रतिम अशा दोन भार्या, हे सौम्य लक्ष्मणा, त्याला होत्या ७. वृषपर्व्याची कन्या व दितीची नात शर्मिष्ठा दोहोंपैकीं त्याची एक भार्या होती व ती त्या नहुषपुत्र ययाति राजर्षीला मान्य होती ८; आणि, हे पुरुषश्रेष्ठा उशनस् मुनींची कन्या सुंदरी देवयानी ही त्या ययातीची दुसरी भार्या होती; परंतु, ती त्याला प्रिय

समाहितौ। शर्मिष्ठाऽजनयत्पूरुं देवयानी यदुं तदा १० पूरुस्तु दयितो राज्ञो गुणैर्मातृकृतेन च। ततो दुःखसमाविष्टो यदुर्मातरमब्रवीत् ११ भार्गवस्य कुले जाता देवस्याक्लिष्टकर्मणः। सहसे हृद्गतं दुःखमवमानं च दुःसहम् १२ आवां च महितौ देवि प्रविशाव हुताशनम्। राजा तु रमतां सार्धं दैत्यपुत्र्या बहुक्षपाः १३ यदि वा सहनीयं ते मामनुज्ञातुमर्हसि। क्षम त्वं न क्षमिष्येऽहं मरिष्यामि न संशयः १४ पुत्रस्य भाषितं श्रुत्वा परमार्तस्य रोदतः। देवयानी तु संक्रुद्धा सस्मार पितरं तदा १५ इङ्गितं तदभिज्ञाय दुहितुर्भार्गवस्तदा। आगतस्त्वरितं तत्र देवयानी स्म यत्र सा १६ दृष्ट्वा चाप्रकृतिस्थां तामप्रहृष्टामचेतनाम्। पिता दुहितरं वाक्यं किमेतदिति चाब्रवीत् १७ पृच्छन्तमसकृत्तं वै भार्गवं दीप्तचेतसम्। देवयानी तु संक्रुद्धा पितरं वाक्यमब्रवीत् १८ अहमग्निं विषं तीक्ष्णमपो वा मुनिसत्तम। भक्षयिष्ये प्रवेक्ष्ये वा न तु शक्ष्यामि जीवितुम् १९ न मां त्वमवजानीषे दुःखितामवमानिताम्। वृक्षस्यावज्ञया ब्रह्मंश्छिद्यन्ते वृक्षजीविनः२० अवज्ञया च

---

नव्हती ९. त्या उभयतां भार्यांपासून सुरूप व विचारी असे दोन पुत्र झाले; शर्मिष्ठेपासून पूरु झाला आणि देवयानीपासून यदु झाला १०. आपल्या मातेमुळें आणि अंगच्या गुणांमुळें पूरु राजाला प्रिय झाला असतां यदु दुःखाकुल होऊन मातेला ह्मणाला ११ " सदाचरणसंपन्न जो भार्गव देव त्याच्या कुलामध्यें तूं उत्पन्न झालेली असून हृद्गत दुःख व अवमान सहन करीत आहेस १२. ह्यास्तव, हे देवि, आपण बरोबरच अग्नीमध्यें प्रवेश करूं; राजाला दैत्यकन्येसहवर्तमान पुष्कळ दिवसपर्यंत क्रीडा करूं दे १३; अथवा तुला जर हें दुःख सहन होत असेल तर तूं मला अनुज्ञा दे. तूं हें सहन कर; मला हें सहन होणार नाहीं; मी निःसंशय प्राणत्याग करीन " १४. ह्याप्रमाणें अत्यंत दुःखित होऊन रडत असलेल्या पुत्राचें भाषण श्रवण केल्यावर देवयानीला क्रोध येऊन पित्याचें स्मरण झालें १५. तेव्हां त्या कन्येचें मनोगत जाणून भार्गवमुनि जेथें ती देवयानी होती तेथें सत्वर आले १६; आणि आनंदरहित, अस्वस्थ व क्षुब्ध अशा त्या कन्येला अवलोकन करून " हें काय? " असें त्यांनीं विचारिलें १७. तेव्हां ह्याप्रमाणें मनामध्यें क्षुब्ध होऊन ते भार्गवमुनि वारंवार विचारूं लागले असतां क्रुद्ध देवयानी पित्याला ह्मणाली १८ " हे मुनिश्रेष्ठ, मी अग्नीमध्यें किंवा उदकामध्यें उडी घालणार; अथवा तीक्ष्ण विष तरी भक्षण करणार; आतां जीव धरून राहण्यास मी समर्थ नाहीं १९. माझी अवज्ञा झाली असून मी दुःखित झालें असतांनाही, हे ब्रह्मन्, आपल्या गांवींही ही गोष्ट नाहीं; परंतु, वृक्षाच्या अवज्ञेमुळें वृक्षावर उपजीविका करणाऱ्यांचा

राजर्षिः परिभूय च भार्गव।मप्यवज्ञां प्रयुङ्क्ते हि न च मां बहु मन्यते २१ तस्या-
स्तद्वचनं श्रुत्वा कोपेनाभिपरीवृतः । व्याहर्तुमुपचक्राम भार्गवो नहुषात्म-
जम् २२यस्मान्मामवजानीषे नाहुष त्वं दुरात्मवान् । वयसा जरया जीर्णः
शैथिल्यमुपयास्यसि २३ एवमुक्त्वा दुहितरं समाश्वास्य स भार्गवः ।
पुनर्जगाम ब्रह्मर्षिर्भवनं स्वं महायशाः २४ स एवमुक्त्वा द्विजपुंगवाग्र्यः
सुतां समाश्वास्य च देवयानीम् । पुनर्ययौ सूर्यसमानतेजा दत्त्वा च शापं
नहुषात्मजाय २५ [ २६५४ ]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्य उत्तरकाण्डेऽष्टपञ्चाशः सर्गः ॥ ५८ ॥

श्रुत्वा तूशनसं क्रुद्धं तदार्तो नहुषात्मजः । जरां परमिकां प्राप्य यदुं
वचनमब्रवीत् १ यदो त्वमसि धर्मज्ञ मदर्थं प्रतिगृह्यताम् । जरां परमिकां
पुत्र भोगै रंस्ये महायशः २ न तावत्कृतकृत्योऽस्मि विषयेषु नरर्षभ ।
अनुभूय तदा कामं ततः प्राप्स्याम्यहं जराम् ३ यदुस्तद्वचनं श्रुत्वा प्रत्यु-
वाच नरर्षभम् । पुत्रस्ते दयितः पूरुः प्रतिगृह्णातु वै जराम् ४ बहिष्कृतो

---

घात होत असतो (हें आपण लक्ष्यांत ठेवा) २०. हे भार्गव, आपण माझी पर्वा करीत
नसल्यामुळें राजर्षिही तिरस्कारपूर्वक माझी अवज्ञा करीत असतो; तो मला मुळींच
मानीत नाहीं " २१. हें तिचें भाषण श्रवण केल्यानंतर भार्गवमुनि क्रोधानें व्याप्त
होऊन नहुषपुत्र ययाति राजला ह्मणाले २२ " हे नहुषपुत्रा, ज्याअर्थी तूं माझी
अवज्ञा करीत आहेस त्याअर्थी उतारवयामुळें तुज दुरात्म्याला जरा येऊन तूं दुर्बल
होशील " २३. ह्याप्रमाणें राजाला शाप देऊन कन्येचें समाधान केल्यानंतर ते
महाकीर्तिमान् भार्गव ब्रह्मर्षि स्वस्थानीं परत गेले २४. सारांश, ह्याप्रमाणें नहुषपुत्र
ययातीला बोलून शाप दिल्यानंतर व देवयानी कन्येचें समाधान केल्यानंतर ते सूर्य-
तुल्यतेजस्वी मुनि परत गेले २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक
आदिकाव्यांतील उत्तर कांडापैकीं अठ्ठावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५८ ॥

उशनस्मुनि क्रुद्ध झाल्याचें ऐकून नहुषपुत्र ययाति राजा घाबरून गेला आणि
भयंकर जरा प्राप्त झाल्यावर यदूला ह्मणाला १ " हे धर्मज्ञ यदो, माझ्याकरितां तूं ह्या
भयंकर जरेचा स्वीकार कर; ह्मणजे, हे महाकीर्तिमान् पुत्रा, मी विषयोपभोगांत रममाण
होईन २. कारण, हे पुरुषश्रेष्ठा, विषयांसंबंधानें अद्यापि माझी तृप्ति झाली नाहीं.
ह्यास्तव, रतिक्रीडेचा अनुभव घेऊन मी आपली जरा परत घेईन" ३. हें भाषण श्रवण करून यदु
पुरुषश्रेष्ठ ययाति राजाला ह्मणाला "आपणांला प्रिय असलेला पुत्र जो पूरु त्यानें आपल्या
जरेचा स्वीकार करावा ४. कारण, हे राजा, आपण मला ऐश्वर्यापासून दूर केलें आहे;

ऽहमर्थेषु संनिकर्षाच्च पार्थिव । प्रतिगृह्णातु वै राजन्यैः सहाश्नासि भोजनम् ५ तस्य तद्वचनं श्रुत्वा राजा पूरुमथाब्रवीत् । इयं जरा महाबाहो मदर्थं प्रतिगृह्यताम् ६ नाहुषेणैवमुक्तस्तु पूरुः प्राञ्जलिरब्रवीत् । धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि शासनेऽस्मि तवं स्थितः ७ पूरोर्वचनमाज्ञाय नाहुषः परया मुदा । प्रहर्षमतुलं लेभे जरां संक्रामयच्च ताम् ८ ततः स राजा तरुणः प्राप्य यज्ञान्सहस्रशः । बहुवर्षसहस्राणि पालयामास मेदिनीम् ९ अथ दीर्घस्य कालस्य राजा पूरुमथाब्रवीत् । आनयस्व जरां पुत्र न्यासं निर्यातयस्व मे १० न्यासभूता मया पुत्र त्वयि संक्रामिता जरा । तस्मात्प्रतिग्रहीष्यामि तां जरां मा व्यथां कृथाः ११ प्रीतश्चास्मि महाबाहो शासनस्य प्रतिग्रहात् । त्वां चाहमभिषेक्ष्यामि प्रीतियुक्तो नराधिपम् १२ एवमुक्त्वा सुतं पूरुं ययातिर्नहुषात्मजः । देवयानीसुतं क्रुद्धो राजा वाक्यमुवाच ह १३ राक्षसस्त्वं मया जातः क्षत्ररूपो दुरासदः । प्रतिहंसि ममाज्ञां त्वं प्रजार्थे विफलो भव १४ पितरं गुरुभूतं मां यस्मात्त्वमवमन्यसे । राक्षसान्यातुधा-

---

इतकेंच नव्हे परंतु, आपण मला कधीं जवळही येऊं देत नाहीं; ह्यास्तव, हे भूपते, ज्यांच्या सहवर्तमान आपण भोजन करितां त्यांपैकींच कोणी तरी आपल्या जरेचा स्वीकार करावा" ५. हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर राजा पूरूला ह्मणाला "हे महापराक्रमी पुत्रा, माझ्याकरितां तूं ह्या जरेचा स्वीकार कर" ६. नहुषपुत्र ययातिराजा असें बोलल्यानंतर पूरु हात जोडून त्याला ह्मणाला "मी धन्य आहें; व माझ्यावर हा आपला अनुग्रहच झाला असून मी आपल्या आज्ञेप्रमाणें वागण्यास तयार आहें" ७. पूरूचें हें भाषण श्रवण केल्यानंतर नहुषपुत्र ययाति राजाला पराकाष्ठेचा आनंद होऊन अनुपम हर्ष झाला आणि त्यानें ती जरा पुत्राकडे बदलली ८. तदनंतर तो राजा तरुण झाला व हजारों यज्ञ करून त्यानें अनेक सहस्र वर्षेंपर्यंत पृथ्वीचें परिपालन केलें ९. ह्याप्रमाणें दीर्घकाल लोटल्यानंतर राजा पूरूला ह्मणाला "हे पुत्रा, जरा आण; माझी ठेव मला परत दे १०. हे पुत्रा, मी आपली जरा ठेव ह्मणून तुझ्या ठिकाणीं बदलून टाकिली होती. तस्मात्, मी आतां त्या जरेचा स्वीकार करितों; आतां तूं दुःखांत राहूं नको ११. हे महापराक्रमी पुत्रा, तूं माझी आज्ञा मान्य केल्यामुळें मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहे आणि प्रसन्न झाल्यामुळें मी आतां तुला राजा ह्मणून अभिषेक करणार आहें" १२ ह्याप्रमाणें पूरुनामक पुत्राला सांगितल्यानंतर नहुषपुत्र ययाति राजा क्रुद्ध झाला आणि देवयानीच्या पुत्राला ह्मणाला १३ "तूं माझ्यापासून क्षत्रियरूपानें महाभयंकर राक्षस उत्पन्न झाला आहेस; परंतु, ज्याअर्थी तूं माझ्या आज्ञेचा विघात करीत आहेस त्याअर्थी प्रजासंबंधानें तूं निष्फल होशील १४.

नांस्त्वं जनयिष्यसि दारुणान् १५ न तु सोमकुलोत्पन्ने वंशे स्थास्यति दुर्मते:। वंशोऽपि भवतस्तुल्यो दुर्विनीतो भविष्यति १६ तमेवमुक्त्वा राजर्षिः पूरुं राज्यविवर्धनम् । अभिषेकेण संपूज्य आश्रमं प्रविवेश ह १७ ततः कालेन महता दिष्टान्तमुपजग्मिवान् । त्रिदिवं स गतो राजा ययातिर्नहुषात्मजः १८ पूरुश्चकार तद्राज्यं धर्मेण महता वृतः । प्रतिष्ठाने पुरवरे काशिराज्ये महायशाः १९ यदुस्तु जनयामास यातुधानान्सहस्रशः । पुरे क्रौञ्चवने दुर्गे राजवंशबहिष्कृते २० एष तूशनसा मुक्तः शापोत्सर्गो ययातिना । धारितः क्षत्रधर्मेण यं निमिश्चक्षमे न च २१ एतत्ते सर्वमाख्यातं दर्शनं सर्वकारिणाम् । अनुवर्तामहे सौम्य दोषो न स्याद्यथा नृगे २२ इति कथयति रामे चन्द्रतुल्याननेन प्रविरलतरतारं व्योम जज्ञे तदानीम् । अरुणकिरणरक्ता दिग्बभौ चैव पूर्वा कुसुमरसविमुक्तं वस्त्रमागुण्ठितेव २३ [ २६७७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोनषष्टितमः सर्गः॥५९॥

---

गुरुस्थानीं असलेल्या मज पित्याचा ज्याअर्थी तूं अवमान करीत आहेस त्याअर्थी भयंकर राक्षस व यातुधान तूं उत्पन्न करशील १५. सोमकुलामध्यें उत्पन्न झालेल्या वंशांत तुज दुष्टाची संतति रहाणार नाहीं; तुझा वंशही तुझ्याप्रमाणेंच उद्धट होईल" १६. ह्याप्रमाणें त्याला सांगितल्यानंतर राज्यवृद्धिंगत करणाऱ्या पूरूला राज्याभिषेकानें मान देऊन तो राजर्षि आश्रमामध्यें प्रविष्ट झाला १७. पुढें बराच काळ लोटल्यावर ता नहुषपुत्र ययातिराजा मरण पावला आणि स्वर्गाला गेला १८; काशिदेशाच्या राजधानीचें शहर जें श्रेष्ठ नगर प्रतिष्ठान त्यामध्यें राहून महाधर्मनिष्ठ व महाकीर्तिमान् पूरूनें त्याचें राज्य चालविलें १९ आणि यदूला राजवंशानें बहिष्कृत केलेल्या क्रौंचवननामक दुर्गम वनामध्यें हजारों यातुधान झाले २०. असो. ह्याप्रमाणें भार्गवमुनींनीं दिलला मोठा शाप क्षत्रधर्माचें अवलंबन करून ययातीनें सहन केला व निमीनें तो सहन केला नाहीं २१. सारांश, हे सौम्य लक्ष्मणा, हें सर्व मीं तुला कथन केलें. आतां नृगराजाप्रमाणें आपणांला दोष लागूं नये एतदर्थ सर्व कार्यार्थी जनांची आपण भेट घेऊं २२. ह्याप्रमाणें चंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें राम कथन करीत असतांना आकाशांतील तारे फारच विरल दिसूं लागले आणि पूर्व दिशा अरुण किरणांनीं आरक्तवर्ण झाल्यामुळें पुष्परसानें रंगविलेलें वस्त्र परिधान केल्याप्रमाणें भासूं लागली २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग समाप्त झाला ॥ ५९ ॥

ततः प्रभाते विमले कृत्वा पौर्वाह्णिकीं क्रियाम् । धर्मासनगतो राजा रामो राजीवलोचनः १ राजधर्मानवेक्षन्वै ब्राह्मणैर्नैगमैः सह । पुरोधसा वसिष्ठेन ऋषिणा कश्यपेन च २ मन्त्रिभिर्व्यवहारज्ञैस्तथान्यैर्धर्मपाठकैः । नीतिज्ञैरथ सभ्यैश्च राजभिः सा सभा वृता ३ सभा यथा महेन्द्रस्य यमस्य वरुणस्य च । शुशुभे राजसिंहस्य रामस्याक्लिष्टकर्मणः ४ अथ रामोऽब्रवीत्तत्र लक्ष्मणं शुभलक्षणम् । निर्गच्छ त्वं महाबाहो सुमित्रानन्दवर्धन ५ कार्यार्थिनश्च सौमित्रे व्याहर्तुं त्वमुपाक्रम । रामस्य भाषितं श्रुत्वा लक्ष्मणः शुभलक्षणः ६ द्वारदेशमुपागम्य कार्यिणश्चाह्वयत्स्वयम् । न कश्चिदब्रवीत्तत्र मम कार्यमिहाद्य वै ७ नाधयो व्याधयश्चैव रामे राज्यं प्रशासति । पक्कसस्या वसुमती सर्वौषधिसमन्विता ८ न बालो म्रियते तत्र न युवा न च मध्यमः । धर्मेण शासितं सर्वं न च बाधा विधीयते ९ दृश्यते न च कार्यार्थी रामे राज्यं प्रशासति । लक्ष्मणः प्राञ्जलिर्भूत्वा रामायैवं न्यवेदयत् १० अथ रामः प्रसन्नात्मा सौमित्रिमिदमब्रवीत् । भूय एव तु गच्छ

*तदनंतर निर्मल प्रभात काल प्राप्त झाला असतां सकाळची स्नानसंध्या आटोपून कमलनयन राम राजधर्म अवलोकन करण्याकरितां वेदवेत्ते ब्राह्मण, पुरोहित वसिष्ठ व कश्यप ऋषि ह्यांसहवर्तमान सिंहासनावर आरूढ झाला १,२. त्या सभेमध्यें व्यवहारचतुर मंत्री, इतरही धर्मशास्त्रवेत्ते, नीतिनिपुण सभासद व राजे होते ३; आणि महेंद्र, यम व वरुण ह्यांच्या सभेप्रमाणें ती निर्मल आचरण करणाऱ्या नृपश्रेष्ठ रामाची सभा शोभत होती ४. तदनंतर शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या लक्ष्मणाला राम ह्मणाला " हे महापराक्रमी, हे सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या लक्ष्मणा, तूं बाहेर जा आणि कार्यार्थी लोकांशीं बोलण्याचा उपक्रम कर ". रामाचें भाषण श्रवण करून शुभ लक्षणांनीं युक्त असलेला लक्ष्मण ५,६ द्वारासमीप गेला आणि कार्यार्थी जनांना त्यानें स्वतः आव्हान केलें. परंतु, " आज माझें काम आहे " ह्मणून कोणीही तेथें लक्ष्मणाला कळविलें नाहीं ७. कारण, राम राज्य करीत असतांना मानसिक व शारीरिक दुःखांचा अभाव असून पृथ्वी सर्व ओषधींनीं संपन्न व पक्क धान्यांनीं युक्त होती ८. बाल, तरुण अथवा मध्यम वयांतील असा कोणीही मरत नव्हता. सर्व कांहीं कारभार धर्मानें चालला होता; आणि कसल्याच प्रकारचा उपद्रव नव्हता ९. ह्यामुळें रामाचे कारकीर्दींत कोणी अर्जदारच दृष्टोत्पत्तीस येत नसे. असो. लक्ष्मणानें हात जोडून रामाला ह्याप्रमाणें सांगितलें असतां १० राम अंतःकरणामध्यें

* येथून पुढें कांहीं सर्गांवर टीका नाहीं. ह्यावरून टीकाकारांच्या मतानें ते सर्ग प्रक्षिप्त असावे असें दिसतें.

त्वं कार्यिणः प्रविचारय ११ सम्यक्प्रणीतया नीत्या नाधर्मो विद्यते क्वचित् । तस्माद्राजभयात्सर्वे रक्षन्तीह परस्परम् १२ बाणा इव मया मुक्ता इह रक्षन्ति मे प्रजाः । तथापि त्वं महाबाहो प्रजा रक्षस्व तत्परः १३ एवमुक्तस्तु सौमित्रिर्निर्जगाम नृपालयात् । अपश्यद्द्वारदेशे वै श्वानं तावदवस्थितम् १४ तमेवं वीक्षमाणो वै विक्रोशन्तं मुहुर्मुहुः । दृष्ट्वाथ लक्ष्मणस्तं वै स पप्रच्छाथ वीर्यवान् १५ किं ते कार्यं महाभाग ब्रूहि विस्रब्धमानसः । लक्ष्मणस्य वचः श्रुत्वा सारमेयोऽभ्यभाषत १६ सर्वभूतशरण्याय रामायाक्लिष्टकर्मणे । भयेष्वभयदात्रे च तस्मै वक्तुं समुत्सहे १७ एतच्छ्रुत्वा च वचनं सारमेयस्य लक्ष्मणः । राघवाय तदाख्यातुं प्रविवेशालयं शुभम् १८ निवेद्य रामस्य पुनर्निर्जगाम नृपालयात् । वक्तव्यं यदि ते किंचित्तत्त्वं ब्रूहि नृपाय वै १९ लक्ष्मणस्य वचः श्रुत्वा सारमेयोऽभ्यभाषत । देवागारे नृपागारे द्विजवेश्मसु वै तथा २० वह्निः शतक्रतुश्चैव सूर्यो वायुश्च तिष्ठति । नात्र योग्यास्तु सौमित्रे योनीनामधमा वयम् २१ प्रवेष्टुं नात्र

---

प्रसन्न झाला आणि सुमित्रापुत्र लक्ष्मणाला ह्मणाला " तूं पुनरपि जा आणि अर्जदारांची चौकशी कर ११. उत्तम रीतीनें राजनीति चालविल्यामुळें कोठेंही अधर्म होत नाहीं; आणि, राजभीतीमुळें सर्व परस्परांचें रक्षण करीत आहेत १२. परंतु, मीं सोडिलेल्या बाणांप्रमाणें जरी माझे प्रजाजन एकमेकांचें रक्षण करीत आहेत तरी, हे महापराक्रमी लक्ष्मणा, तूं लक्ष्यपूर्वक प्रजेचें रक्षण कर " १३. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां लक्ष्मण राजवाड्यांतून बाहेर निघाला तों द्वारासमीप एक श्वान स्थित असल्याचें त्यानें अवलोकन केलें १४. सारांश, लक्ष्मण इकडे तिकडे पाहूं लागला असतां एकसारखा आक्रोश करीत असलेला तो श्वान त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां पराक्रमी लक्ष्मण त्याला ह्मणाला १५ " हे भल्या गृहस्था, तुझें काय कार्य आहे तें तूं स्वस्थ मनानें कथन कर ". हें लक्ष्मणाचें भाषण श्रवण केल्यावर श्वान ह्मणाला १६ " मला जें काय सांगावयाचें आहे तें रामालाच सांगण्याची माझी इच्छा आहे. कारण, तो आचरणानें निर्मल, सर्व प्राण्यांना आश्रयभूत व भयप्रद प्रसंगीं अभय देणारा आहे " १७. हें श्वानांचें भाषण श्रवण करून लक्ष्मण रामाला कळविण्याकरितां शुभ राजवाड्यामध्यें प्रविष्ट झाला १८; रामाला तें निवेदन करून पुनरपि तो राजवाड्याचे बाहेर आला आणि " जें कांहीं तुला सांगावयाचें असेल तें तूं राजाला सांग " असें त्या श्वानाला ह्मणाला १९. हें लक्ष्मणाचें भाषण श्रवण करून श्वान त्याला ह्मणाला " देवालय, नृपालय व द्विजालय ह्यांमध्यें २० अग्नि, इंद्र, सूर्य व वायु ह्यांचें वास्तव्य असतें. हे लक्ष्मणा, अधम योनींमध्यें

शक्ष्यामि धर्मो विग्रहवान्नृपः । सत्यवादी रणपटुः सर्वसत्त्वहिते रतः २२
षाड्गुण्यस्य पदं वेत्ति नीतिकर्ता स राघवः । सर्वज्ञः सर्वदर्शी च रामो रम-
यतां वरः २३ स सोमः स च मृत्युश्च स यमो धनदस्तथा । वह्निः शतक्र-
तुश्चैव सूर्यो वै वरुणस्तथा २४ तस्य त्वं ब्रूहि सौमित्रे प्रजापालः स राघवः।
अनाज्ञप्तस्तु सौमित्रे प्रवेष्टुं नेच्छयाम्यहम् २५ आनृशंस्यान्महाभाग प्रवि-
वेश महाद्युतिः । नृपालयं प्रविश्याथ लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् २६ श्रूयतां
मम विज्ञाप्यं कौसल्यानन्दवर्धन । यन्मयोक्तं महाबाहो तव शासनजं
विभो २७ श्वा वै ते तिष्ठते द्वारि कार्यार्थी समुपागतः । लक्ष्मणस्य वचः
श्रुत्वा रामो वचनमब्रवीत् ॥ संप्रवेशय वै क्षिप्रं कार्यार्थी योऽत्र तिष्ठति २८
[ २७०५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे
प्रक्षिप्तः सर्गः ॥ ११ ॥

श्रुत्वा रामस्य वचनं लक्ष्मणस्त्वरितस्तदा । श्वानमाहूय मतिमान्राघ-

---

जन्मास आलेले आह्मी त्या ठिकाणीं असणें योग्य नाहीं २१. ह्याकरितां, राजवाड्यांत मला प्रवेश करितां येत नाहीं. कारण, आमचा राजा मूर्तिमान् धर्मच असून सत्यवादी, युद्धामध्यें निष्णात, सर्व प्राण्यांच्या हिताविषयीं तत्पर २२ आणि षड्गुण ऐश्वर्याचें तत्त्व जाणणारा आहे व तो रघुवंशज राम नीतिकर्ता, सर्वज्ञ व सर्व अवलोकन करणारा असून आनंद देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहे २३. इतकेंच नव्हें परंतु, सोम, मृत्यु, यम, कुबेर, अग्नि, इंद्र, सूर्य व वरुणही तोच आहे २४. हे लक्ष्मणा, त्याला तूं विचार. कारण, तो राम प्रजेचें पालन करणारा आहे. तस्मात्, हे लक्ष्मणा, त्याची आज्ञा झाल्याशिवाय आंत प्रवेश करण्याची माझी इच्छा नाहीं " २५. ह्यानंतर महाभाग्यवान् व महातेजस्वी लक्ष्मण चांगुलपणामुळें राजवाड्यामध्यें पुनरपि प्रविष्ट झाला आणि प्रविष्ट झाल्यानंतर रामाला ह्मणाला २६ " हे कौसल्यानंदवर्धना, हे महापराक्रमी प्रभो, माझ्या विनंतीकडे लक्ष्य द्यावें; आपल्या आज्ञेप्रमाणें मीं बाहेर जाऊन जें कळवावयाचें तें कळविलें २७. कांहीं कामाकरितां आलेला एक श्वान दाराशीं उभा आहे. " हें लक्ष्मणाचें भाषण श्रवण करून राम त्याला ह्मणाला " तर मग लवकर त्याला आंत घेऊन ये. अरे, आपल्या दाराशीं अर्जदार उभा आहे ! " २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदि-काव्यांतील उत्तरकांडापैकीं अकरावा प्रक्षिप्त सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

रामाची आज्ञा श्रवण करितांक्षणीं विचारी लक्ष्मणानें त्वरा केली आणि श्वानाला

---

१ देवालय, ब्राह्मणगृह, राजवाडा इत्यादि ठिकाणीं श्वानादिकांचा प्रवेश न होऊं देण्याचा संप्रदाय अति प्राचीन आहे.

वाय न्यवेदयत् १ दृष्ट्वा समागतं श्वानं रामो वचनमब्रवीत् । विवक्षितार्थं मे ब्रूहि सारमेय न ते भयम् २ अथापश्यत तत्रस्थं रामं श्वा भिन्नमस्तकः। ततो दृष्ट्वा स राजानं सारमेयोऽब्रवीद्वचः ३ राजैव कर्ता भूतानां राजा चैव विनायकः । राजा सुप्तेषु जागर्ति राजा पालयति प्रजाः ४ नीत्या सुनीतया राजा धर्मं रक्षति रक्षिता । यदा न पालयेद्राजा क्षिप्रं नश्यन्ति वै प्रजाः ५ राजा कर्ता च गोप्ता च सर्वस्य जगतः पिता । राजा कालो युगं चैव राजा सर्वमिदं जगत् ६ धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मेण विधृताः प्रजाः । यस्माद्धारयते सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ७ धारणाद्विद्विषां चैव धर्मेणारञ्जयन्प्रजाः । तस्माद्धारणमित्युक्तं स धर्म इति निश्चयः ८ एष राजन्परो धर्मः फलवान्प्रेत्य राघव । न हि धर्माद्भवेत्किंचिद्दुष्प्रापमिति मे मतिः ९ दानं दया सतां पूजा व्यवहारेषु चार्जवम् । एष राम परो धर्मो रक्षणात्प्रेत्य चेह च १० त्वं प्रमाणं प्रमाणानामसि राघव सुव्रत । विदितश्चैव ते धर्मः

---

बोलावून आणून रामाला वर्दी दिली १. तेव्हां श्वान आल्याचें पाहून राम ह्मणाला " हे सारमेया, काय सांगावयाचें असेल तें सांग. तुला भय नाहीं " २. नंतर ज्याच्या मस्तकाला खोक पडली आहे अशा त्या श्वानानें तेथें असलेल्या रामाला अवलोकन केलें आणि अवलोकन केल्यावर तो श्वान राजाळा अनुलक्षून ह्मणाला ३ " राजाच भूतांचा उत्पादक असून राजाच मुख्य नायक आहे; आणि इतर निद्रिस्थ असतांना राजा जागृत असून राजाच प्रजेचें परिपालन करीत असतो ४. प्रजेचें रक्षण करणारा राजा उत्कृष्ट चालविलेल्या नीतीनें धर्माचें रक्षण करीत असतो व राजा जेव्हां धर्माचें रक्षण करीनासा होतो तेव्हां प्रजेचा सत्वर नाश होतो ५. राजाच कर्ता व पालक असून सर्व जगताचा पिताही राजाच आहे; आणि काल, युग व हें सर्व जगत् राजाच आहे ६. धारणामुळें धर्म ही संज्ञा लोक शासनाला देत असतात आणि धर्माच्याच योगानें प्रजेचें परिपालन होत असतें. ज्याअर्थी चराचर प्राण्यांसहवर्तमान सर्व त्रैलोक्य धर्माच्याच आधारावर असतें ७, ज्याअर्थी दुर्जनांचा निग्रह धर्माच्याच योगानें होत असतो आणि ज्याअर्थी धर्माच्याच योगानें प्रजाजनांना आनंद होत असतो त्याअर्थी धारण ही संज्ञा त्या धर्माला दिलेली आहे ८. हे रघुवंशज राजा, प्रजापरिपालन हा इहलोकीं व परलोकीं उपयोगीं पडणारा श्रेष्ठ धर्म होय; आणि कोणतीही गोष्ट ह्या धर्मानें प्राप्त होणार नाहीं असें मला वाटत नाहीं ९. दान, दया, सज्जनांचें पूजन आणि व्यवहारामध्यें सरळपणा हा श्रेष्ठ धर्म असून, हे रामा, प्रजापरिपालनामुळें हा धर्म इहलोकीं व परलोकीं फलप्रद होत असतो १०. हें

---

१ प्रजेचें रक्षण राजाच्या धर्मरक्षणावर अवलंबून आहे ही शास्त्रसिद्ध समजूत अतिप्राचीन कालापासून लोकांत रूढ आहे.

सद्भिराचरितस्तु वै ११ धर्माणां त्वं परं धाम गुणानां सागरोपमः । अज्ञानाच्च मया राजन्नुक्तस्त्वं राजसत्तम १२ प्रसादयामि शिरसा न त्वं क्रोद्धुमिहार्हसि । शुनः स वचनं श्रुत्वा राघवो वाक्यमब्रवीत् १३ किं ते कार्यं करोम्यद्य ब्रूहि विस्रब्धमा चिरम्"। रामस्य वचनं श्रुत्वा सारमेयोऽब्रवीदिदम् १४ धर्मेण राष्ट्रं विन्देत धर्मेणैवानुपालयेत् । धर्माच्छरण्यतां याति राजा सर्वभयापहः १५ इदं विज्ञाय यत्कृत्यं श्रूयतां मम राघव । भिक्षुः सर्वार्थसिद्धश्च ब्राह्मणावसथे वसन् १६ तेन दत्तः प्रहारो मे निष्कारणमनागसः । एतच्छ्रुत्वा तु रामेण द्वास्थः संप्रेषितस्तदा १७ आनीतश्च द्विजस्तेन सर्वसिद्धार्थकोविदः । अथ द्विजवरस्तत्र रामं दृष्ट्वा महाद्युतिः १८ किं ते कार्यं मया राम तद्ब्रूहि त्वं ममानघ । एवमुक्तस्तु विप्रेण रामो वचनमब्रवीत् १९ त्वया दत्तः प्रहारोऽयं सारमेयस्य वै द्विज । किं तवापकृतं विप्र दण्डेनाभिहतो यतः २० क्रोधः प्राणहरः शत्रुः क्रोधोऽमित्रमुखो रिपुः ।

---

सदाचरणसंपन्न रामा, सर्व प्रमाणांमध्यें मुख्य प्रमाण तूंच आहेस आणि सज्जनांनीं आचरिलेला धर्मही तुला विदितच आहे ११. कारण, तूं धर्माचें मुख्य स्थान असून गुणांचा सागर आहेस. हे नृपश्रेष्ठा राजा, मीं जें धर्मसंबधानें तुला सांगितलें तें अज्ञानामुळें सांगितलें १२. ह्यास्तव, मी तुला मस्तकानें प्रणाम करितों. ह्याबद्दल तूं माझ्यावर क्रोध करूं नको ". हें श्वानाचें भाषण श्रवण करून राम ह्मणाला १३ " आज मीं तुझें कोणतें कार्य करूं ? तें निर्भयपणें सत्वर सांग". ही रामाची आज्ञा श्रवण करून सारमेय ह्मणाला १४ "धर्मानें राजाला राष्ट्र प्राप्त होत असून धर्माच्याच योगानें तो प्रजेचें परिपालन करण्यास समर्थ होतो; व धर्माच्याच योगानें राजा सर्व भयांचें निवारण करणारा होत असल्यामुळें शरण जाण्यास तो योग्य होत असतो १५. इतकें लक्ष्यांत ठेवून, हे राघवा, माझें काय कार्य आहे तें तूं ऐक. सर्व वस्तूंची ज्याचे पाशीं समृद्धि आहे असा एक भिक्षुक ब्राह्मणाचें घरीं रहात आहे १६. त्या भिक्षूनें, माझा कांहीं एक अपराध नसतां, मला विनाकारण प्रहार केला ". हें श्रवण केल्यावर रामानें एक दूत पाठविला १७ आणि ज्याला कांहीं- एक कमी नाहीं असा समंजस द्विज त्याच्याकडून त्यानें आणविला. नंतर तेथें रामाला अवलोकन करून तो महातेजस्वी द्विजश्रेष्ठ ह्मणाला १८ "हे निष्पापा रामा, माझ्याशीं आपलें काय कार्य आहे ? हें आपण कथन करावें. "ह्याप्रमाणें विप्रानें सांगितलें असतां राम ह्मणाला १९ " हे द्विज, श्वानाला तूं हा प्रहार केला आहेस. परंतु, हे विप्र, दंडानें ज्याअर्थी तूं ह्याला प्रहार केला आहेस त्याअर्थी तुझा ह्यानें अपराध तरी कोणता केला ? २०. क्रोध हाच प्राणहारक शत्रु असून क्रोध हाच अमित्रमुख रिपु होय; त्याच-

क्रोधो ह्यसिर्महातीक्ष्णः सर्वं क्रोधोऽपकर्षति २१ तपते यजते चैव यच्च दानं प्रयच्छति । क्रोधेन सर्वं हरति तस्मात्क्रोधं विसर्जयेत् २२ इन्द्रियाणां प्रदुष्टानां हयानामिव धावताम् । कुर्वीत धृत्या सारथ्यं संहृत्येन्द्रियगोचरम् २३ मनसा कर्मणा वाचा चक्षुषा च समाचरेत् । श्रेयो लोकस्य चरतो न द्वेष्टि न च लिप्यते २४ न तत्कुर्यादसिस्तीक्ष्णः सर्पो वा व्याहतः पदा । अरिर्वा नित्यसंक्रुद्धो यथात्मा दुरनुष्ठितः २५ विनीतविनयस्यापि प्रकृतिर्न विधीयते । प्रकृतिं गूहमानस्य निश्चयेन कृतिर्ध्रुवा २६ एवमुक्तः स विप्रो वै रामेणाक्लिष्टकर्मणा । द्विजः सर्वार्थसिद्धस्तु अब्रवीद्रामसंनिधौ २७ मया दत्तप्रहारोऽयं क्रोधेनाविष्टचेतसा। भिक्षार्थमटमानेन काले विगतभैक्षके २८ रथ्यां स्थितस्त्वयं श्वा वै गच्छगच्छेति भाषितः । अथ स्वैरेण गच्छंस्तु रथ्यान्ते विषमः स्थितः २९ क्रोधेन क्षुधयाविष्टस्ततो दत्तोऽस्य राघव । प्रहारो राजराजेन्द्र शाधि मामपराधिनम् ३० त्वया शस्तस्य राजेन्द्र नास्ति

---

प्रमाणें क्रोधच अतितीक्ष्ण खड्ग असून सर्वांचा नाशकही क्रोधच होय २१. पुरुषाच्या हातून घडलेल्या तपाचा, यागाचा, दानाचा व इतरही सर्व ( पुण्य ) कर्मांचा क्रोधामुळें नाश होतो. तस्मात् , क्रोध टाकून द्यावा २२. उन्मत्त अश्वांप्रमाणें धांवत असलेल्या इंद्रियांचें, विषयांपासून परावर्तन करून धैर्यानें त्यांचा निग्रह करावा २३. आपल्याशीं व्यवहार करणाऱ्या लोकांचें मनानें, कर्मानें, वाचेनें व दृष्टीनेंही हित करीत असावें. ह्मणजे आपला कोणी द्वेष. करीत नाहीं व आपणांला पातकही लागत नाहीं २४. कुमार्गाला लागलेलें मन ज्याप्रमाणें घात करितें त्याप्रमाणें तीक्ष्ण खड्ग, शेपटीवर पाय दिलेला सर्प, अथवा नित्य क्रुद्ध असलेला शत्रुही घात करीत नाहीं २५. विनय जरी शिकविलेला असला तरी पुरुषाचा स्वभाव नवीन बनविता येत नाहीं. ह्यास्तव ( दुष्ट ) स्वभाव जरी एकद्यानें बाहेर दाखविला नाहीं तरी दुष्ट कृत्य त्याच्या हातून होणार हें ठरलेलेंच आहे"२६. ह्याप्रमाणें सदाचरणसंपन्न रामानें त्या विप्राला सांगितलें असतां ज्याला काहींच कमी नव्हतें असा तो विप्र रामाचे संनिध ह्मणाला २७ " भिक्षेची वेळ नसतांना मी एकदां भिक्षा मागत फिरत होतो. तेव्हां अंतःकरण क्रोधानें व्याप्त झाल्यामुळें मीं ह्याला हा प्रहार केला आहे २८. कारण, हा श्वान मार्गामध्यें उभा होता व मीं त्याला " हड हड " असें ह्मटलेंही. परंतु, स्वैच्छपणानें जात असलेला हा श्वान रस्त्यांत वाट अडवून राहिला असल्यामुळें २९ मीं ह्याला प्रहार केला. कारण, मला क्षुधा अतिशय लागली होती व त्यामुळें मला फारच राग आला होता. तस्मात्, हे राजाधिराज, आपण मज अपराध्याला शासन करावें ३०. हे राजाधिराज, आपण शासन केलें ह्मणजे मला नरकाचें भय नाहीं ". ह्यानंतर

मे नरकाद्भयम् । अथ रामेण संपृष्टाः सर्व एव सभासदः ३१ किं कार्य-मस्य वै ब्रूत दण्डो वै कोऽस्य पात्यताम् । सम्यक्प्रणिहिते दण्डे प्रजा भवति रक्षिता ३२ भृग्वाङ्गिरसकुत्साद्या वसिष्ठश्च सकाश्यपः । धर्मपाठकमुख्याश्च सचिवा नैगमास्तथा ३३ एते चान्ये च बहवः पण्डितास्तत्र संगताः। अवध्यो ब्राह्मणो दण्डैरिति शास्त्रविदो विदुः ३४ ब्रुवते राघवं सर्वे राजधर्मेषु निष्ठिताः । अथ ते मुनयः सर्वे राममेवाब्रुवंस्तदा ३५ राजा शास्ता हि सर्वस्य त्वं विशेषेण राघव । त्रैलोक्यस्य भवाञ्शास्ता देवो विष्णुः सनातनः ३६ एवमुक्ते तु तैः सर्वैः श्वा वै वचनमब्रवीत् । यदि तुष्टोऽसि मे राम यदि देयो वरो मम ३७ प्रतिज्ञातं त्वया वीर किं करोमीति विश्रुतम् । प्रयच्छ ब्राह्मणस्यास्य कौलपत्यं नराधिप ३८ कालञ्जरे महाराज कौलपत्यं प्रदीयताम् । एतच्छ्रुत्वा तु रामेण कौलपत्येऽभिषेचितः ३९ प्रययौ ब्राह्मणो हृष्टो गजस्कन्धेन सोऽर्चितः । अथ ते रामसचिवाः स्मयमाना वचोऽब्रुवन् ४० वरोऽयं दत्त एतस्य नायं शापो महाद्युते । एवमुक्तस्तु

---

राम सर्व सभासदांना ह्मणाला ३१ " ह्याचें काय करावें ? ह्मणजे ह्याला दंड काय करावा ? हें आपण सांगा. कारण, दंडाची व्यवस्था चांगली राहिली ह्मणजे प्रजेचें रक्षण होतें " ३२. वसिष्ठ, काश्यप, भृगु, आंगिरस, कुत्स वगैरे धर्मशास्त्र पढविणारे मुख्य मुख्य मुनि, नीतिशास्त्रवेत्ते सचिव ३३ आणि इतरही तेथें जुळलेले पंडित असे ते राजनीतीमध्यें निष्णात असलेले सर्व सभासद रामाला ह्मणाले "ब्राह्मणाचा दंडांनीं वध करूं नये असें शास्त्रवेत्त्यांचें ह्मणणें आहे. " ह्यावर ते सर्वही मुनि रामाला ह्मणाले ३४, ३५ " हे राघवा, राजा सर्वांचा शास्ता आहे; आणि विशेषतः तूं तर आहेच आहेस. सनातन देवाधिदेव विष्णु असा तूं त्रैलोक्याचा शास्ता आहेस " ३६. ह्याप्रमाणें त्या सर्वांनीं सांगितलें असतां श्वान ह्मणाला " हे रामा, आपण जर माझ्यावर संतुष्ट झाला असाल आणि ह्मणूनच आपणांला जर माझा मनोरथ शेवटास नेणें असेल तर आपण माझी विनंति ऐका ३७. हे वीर, " मी तुझें काय काम करूं ? " असें आपण मला विचारून कार्य करण्याविषयीं वचन दिलें आहे. ह्यास्तव, हे प्रजाधिपते, ह्या ब्राह्मणाला धर्मसंबंधीं समाजाचें आधिपत्य द्यावें ३८. हे महाराज, कालंजर पर्वतावर ह्याला आपण कुलपतीचा अधिकार द्यावा. " हें श्रवण केल्यानंतर रामानें त्या ब्राह्मणाला कुलाधिपतित्वाचा अभिषेक केला ३९ व नंतर रामाच्या हातून पूजा झाल्यावर तो ब्राह्मण गजस्कंधावर आरूढ होऊन आनंदानें चालता झाला. तदनंतर ते रामाचे मंत्री विस्मय करीत करीत ह्मणाले ४० " हे महातेजस्वी महाराज, हा ह्या ब्राह्मणाला श्वानानें शाप दिला नसून वरच दिला आहे ( हे काय ? ) "

सचिवै रामो वचनमब्रवीत् ४१ न यूयं गतितत्त्वज्ञाः श्वा वै जानाति कारणम् ४२ अथ पृष्टस्तु रामेण सारमेयोऽब्रवीदिदम् । अहं कुलपतिस्तत्र आसं शिष्टान्नभोजनः ४३ देवद्विजातिपूजायां दासीदासेषु राघव । संविभागी शुभरतिर्देवद्रव्यस्य रक्षिता ४४ विनीतः शीलसंपन्नः सर्वसत्त्वहिते रतः । सोऽहं प्राप्त इमां घोरामवस्थामधमां गतिम् ४५ एवं क्रोधान्वितो विप्रस्त्यक्तधर्माहिते रतः । क्रुद्धो नृशंसः परुष अविद्वांश्चाप्यधार्मिकः ४६ कुलानि पातयत्येव सप्त सप्त च राघव । तस्मात्सर्वास्ववस्थासु कौलपत्यं न कारयेत् ४७ यमिच्छेन्नरकं नेतुं सपुत्रपशुबान्धवम् । देवेष्वधिष्ठितं कुर्याद्गोषु तं ब्राह्मणेषु च ४८ ब्रह्मस्वं देवताद्रव्यं स्त्रीणां बालधनं च यत् । दत्तं हरति यो भूय इष्टैः सह विनश्यति ४९ ब्राह्मणद्रव्यमादत्ते देवानां चैव राघव । सद्यः पतति घोरे वै नरके वीचिसंज्ञके ५० मनसापि हि देवस्वं ब्रह्मस्वं च हरेत्तु यः । निरयान्निरयं चैव पतत्येव नराधमः ५१ तच्छ्रुत्वा वचनं रामो

---

ह्याप्रमाणें सचिवांचें भाषण झाल्यावर राम ह्मणाला ४१ " तुह्मांला परिणामसंबंधीं तत्त्वज्ञान नाहीं. ह्याचें कारण श्वानाला विदित आहे " ४२. नंतर रामानें विचारिलें असतां सारमेय ह्मणाला " मी अवशिष्ट अन्न भक्षण करून त्या कालंजर पर्वतावर कुलपति होतो ४३. हे राघवा, देव व द्विज ह्यांची पूजा आणि दास व दासी ह्यांच्यावर मी अधिपति होतों. ह्यांना अन्न वगैरे देणारा मीच असून देवस्थानाचें द्रव्य रक्षण करणाराही मी होतों आणि शुभ कर्माकडे माझ्या मनाचा कल असे ४४. मी विनयसंपन्न व सुशील असून सर्व प्राण्यांच्या हिताविषयीं तत्पर असे; तथापि, ही अधमयोनिरूप घोर अवस्था मला प्राप्त झाली आहे ४५. ह्याचप्रमाणें क्रुद्ध, धर्मत्याग केलेला व प्राण्यांच्या अहिताविषयीं तत्पर असलेला जो विप्र त्याला अशीच अवस्था प्राप्त होईल. कारण, क्रुद्ध, दुष्ट, निर्दय, अविद्वान् आणि अधार्मिक पुरुष ४६, हे राघवा, आपल्या पूर्वींच्या सात पिढ्या व पुढल्या सात पिढ्या नरकांत पाडितोच. सारांश, कोणतीही अवस्था प्राप्त झाली तरी कुलपतीचा अधिकार स्वीकारूं नये ४७. पुत्र, पशु व बांधव ह्यांसहवर्तमान ज्याला नरकांत पाडण्याची आपली इच्छा असेल त्याला देव, गायी आणि ब्राह्मण ह्यांच्यावर अधिकारी नेमावें ४८. तात्पर्य, ब्राह्मण, देव, स्त्रिया व बाल ह्यांना दिलेलें द्रव्य जो हरण करितो तो पुत्रपशुप्रभृति इष्ट जनांसहवर्तमान नाश पावतो ४९. हे राघवा, ब्राह्मणांचें व देवांचें द्रव्य घेणारा पुरुष वीचिसंज्ञक घोर नरकामध्यें पडतो ५०. इतकेंच नव्हे परंतु, देवांचें अथवा ब्राह्मणांचें धन हरण करण्याचें कोणी मनामध्यें जरी आणिलें तरी तो नराधम एकामागून दुसऱ्या नरकांतच पडून राहतो " ५१. हें श्रवण केल्यानंतर रामाचे नेत्र

विस्मयोत्फुल्ललोचनः।श्वाऽप्यगच्छन्महातेजा यत एवागतस्ततः५२मनस्वी पूर्वजात्या स जातिमात्रोऽपदूषितः । वाराणस्यां महाभागः प्रायं चोपविवेश ह ५३ [ २७५८ ]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ १२ ॥

अथ तस्मिन्वनोद्देशे रम्ये पादपशोभिते । नदीकीर्णे गिरिवरे कोकिलानेककूजिते १ सिंहव्याघ्रसमाकीर्णे नानाद्विजगणावृते । गृध्रोलूकौ प्रवसतो बहुवर्षगणानपि २ अथोलूकस्य भवनं गृध्रः पापविनिश्चयः । ममेदमिति कृत्वासौ कलहं तेन चाकरोत् ३ राजा सर्वस्य लोकस्य रामो राजीवलोचनः । तं प्रपद्यावहे शीघ्रं यस्यैतद्भवनं भवेत् ४ इति कृत्वा मतिं तां तु निश्चयार्थं सुनिश्चिताम् । गृध्रोलूकौ प्रपद्येतां कोपाविष्टौ ह्यमर्षितौ ५ रामं प्रपद्य तौ शीघ्रं कलिव्याकुलचेतसौ।तौ परस्परविद्वेषात्स्पृशतश्चरणौ तदा६ अथ दृष्ट्वा नरेन्द्रं तं गृध्रो वचनमब्रवीत् । सुराणामसुराणां च प्रधानस्त्वं मतो मम ७ बृहस्पतेश्च शुक्राच्च विशिष्टोऽसि महाद्युत । परावरज्ञो भूतानां कान्त्या चन्द्र इवापरः ८ दुर्निरीक्ष्यो यथा सूर्यो हिमवांश्चैव गौरवे । साग-

---

विस्मयानें प्रफुल्लित झाले; तो महातेजस्वी श्वानही आल्या मार्गानें परत गेला ५२; आणि पूर्व जन्मामुळें विचारी असलेल्या परंतु, केवळ निंद्ययोनीमुळें दोषास्पद झालेल्या त्या महाशय श्वानानें वाराणसीनगरीमध्यें प्रायोपवेशन केलें ( ह्मणजे अन्नपान वर्ज्य करून प्राण सोडिला ) ५३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं बारावा प्रक्षिप्त सर्ग समाप्त झाला ॥ १२ ॥

वृक्षांनीं सुशोभित व रम्य अशा त्या वनांतील श्रेष्ठ पर्वतावर गृध्र आणि उलूक हे अनेक तपें वास्तव्य करीत होते. तो श्रेष्ठ पर्वत नद्यांनीं गजबजून गेलेला, अनेक कोकिल पक्ष्यांनीं नादित, सिंह व्याघ्रानीं व्याप्त व नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं भरलेला होता १, २. नंतर दुर्बुद्धि गृध्रानें उलूकाचें घर हें माझें आहे असें समजून त्याच्याशीं कलह आरंभिला ३. तेव्हां " कमलनयन राम सर्व जगताचा राजा आहे. ह्यास्तव, हें घर कोणाचें ह्याचा निर्णय करण्याकरितां आपण सत्वर त्याच्याकडे जाऊं " ४ असा पक्का विचार मनामध्यें आणून निर्णयाकरितां ते उभयतां गृध्र व उलूक एकमेकांची क्षमा न करितां रामाकडे गेले ५. कलहामुळें ज्यांचीं मनें क्षुब्ध झालीं आहेत असें तें उभयतां गृध्र व उलूक रामाकडे सत्वर गेल्यानंतर एकमेकाविषयीं द्वेष मनामध्यें धरून ते त्याच्या चरणांना वंदन करूं लागले ६. नंतर त्या राजाकडे पाहून गृध्र ह्मणाला ' माझ्या मतानें देवदैत्यांमध्यें तूं मुख्य असून ७, हे महातेजस्वी राजा, बृहस्पति व शुक्र ह्यांपेक्षांही तूं श्रेष्ठ आहेस; प्राण्यांची पूर्वींची व पुढें

स्थैर्य गाम्भीर्ये लोकपालो यमो ह्यसि ९ क्षान्त्या धरण्यां तुल्योऽसि शीघ्रत्वे ह्यनिलोपमः । गुरुस्त्वं सर्वसंपन्नः कीर्तियुक्तश्च राघव १० अमर्षी दुर्जयो जेता सर्वास्त्रविधिपारगः । शृणुष्व मम वै राम विज्ञाप्यं नरपुंगव ११ ममालयं पूर्वकृतं बाहुवीर्येण राघव । उलूको हरते राजंस्तत्र त्वं त्रातुमर्हसि १२ एवमुक्ते तु गृध्रेण उलूको वाक्यमब्रवीत् । सोमाच्छक्रतोः सूर्याद्धनदाद्वा यमात्तथा १३ जायते वै नृपो राम किंचिद्भवति मानुषः । त्वं तु सर्वमयो देवो नारायण इवापरः १४ याचते सौम्यता राजन्सम्यक्प्रणिहिता विभो । समं चरसि चान्विष्य तेन सोमांशको भवान् १५ क्रोधे दण्डे प्रजानाथ दाने पापभयापहः । दाता हर्तासि गोप्तासि तेनेन्द्र इव नो भवान् १६ अधृष्यः सर्वभूतेषु तेजसा चानलोपमः । अभीक्ष्णं तपसे लोकांस्तेन भास्करसंनिभः १७ साक्षाद्वित्तेशतुल्योऽसि अथवा धनदाधिकः । वित्तेशस्येव पद्मा श्रीर्नित्यं ते राजसत्तम १८ धनदस्य तु कार्येण धनद-

---

येणारी स्थिति तूं जाणीत असून कांतीनें जसा दुसरा कांहीं चंद्रच आहेस ८; सूर्याप्रमाणें तुझ्याकडे पाहणें अशक्य आहे आणि गुरुत्वासंबंधानें हिमालय पर्वताची, गंभीरपणासंबंधानें सागराची, लोकपाल ह्या नात्यानें यमाची ९, क्षमेसंबंधानें पृथ्वीची आणि शीघ्रगतीसंबंधानें वायूची तूं बरोबरी करणारा आहेस. हे राघवा, तूं कीर्तिमान्, सर्वगुणसंपन्न व गुरु असून १० रागीट, अजिंक्य, जिंकणारा आणि सर्व अस्त्रें योजण्यामध्यें निपुण आहेस. ह्यास्तव, हे पुरुषश्रेष्ठा रामा, तूं माझी विनंति ऐक ११. हे राघवा, मीं स्वपराक्रमानें पूर्वी तयार केलेलें घर उलूक हरण करीत आहे. तस्मात्, हे राजा, त्यासंबंधानें तूं माझें रक्षण कर " १२. ह्याप्रमाणें गृध्रानें सांगितलें असतां उलूक ह्मणाला " चंद्र, इंद्र, सूर्य, कुबेर आणि यम १३ ह्यांचा अंश राजाचे ठिकाणीं असून, हे रामा, कांहीं मानुष अंशही त्याचे ठिकाणीं असतो. परंतु, तूं तर सर्वरूप असून दुसरा देवाधिदेव नारायणच आहेस १४. ह्यास्तव, हे प्रभो, हे राजा, आपण सौम्यपणाचें अवलंबन करावें एवढीच माझी विनंति आहे. आपण विचारपूर्वक आपली वर्तणूक सारखी ठेवीत असतां; ह्यावरून सोमाचा अंश आपले ठिकाणीं आहे १५. हे प्रजाधिपते, तूं पापरूप भीतीचें निवारण करणारा असून क्रोध, दंड व दान ह्यासंबंधानें तूं सर्वांशीं सारखा वागणारा आहेस आणि दाता, भयहर्ता व रक्षणकर्ता तूं असल्यामुळें आह्मांला इंद्रतुल्य दिसत आहेस १६. सर्व प्राण्यांमध्यें कोणीही तुझ्यापुढें येण्यास समर्थ नाहीं; तेजानें तूं अग्नीची बरोबरी करणारा आहेस आणि लोकांवर एकसारिखा प्रकाश पाडणारा आहेस; ह्यामुळें तूं सूर्याची बरोबरी करीत आहेस १७. हे नृपश्रेष्ठा, कुबेराप्रमाणें तुझे ठिकाणीं संपत्तीचें नित्य वास्तव्य असल्यामुळें तूं प्रत्यक्ष

स्तेन नो भवान् । समः सर्वेषु भूतेषु स्थावरेषु चरेषु च ॥ शत्रौ मित्रे च ते दृष्टिः समतां याति राघव १९ धर्मेण शासनं नित्यं व्यवहारे विधिक्रमात् । यस्य रुष्यसि वै राम तस्य मृत्युर्विधावति २० गीयसे तेन वै राम यम इत्यभिविक्रमः । यश्चैष मानुषो भावो भवतो नृपसत्तम २१ आनृशंस्यपरो राजा सत्त्वेषु क्षमयान्वितः । दुर्बलस्य त्वनाथस्य राजा भवति वै बलम् २२ अचक्षुषोत्तमं चक्षुरगतेः स गतिर्भवान् । अस्माकमपि नाथस्त्वं श्रूयतां मम धार्मिक २३ ममालयं प्रविष्टस्तु गृध्रो मां बाधते नृप । त्वं हि देवमनुष्येषु शास्ता वै नरपुंगव २४ एतच्छ्रुत्वा तु वै रामः सचिवानाह्वयत्स्वयम् । धृष्टिर्जयन्तो विजयः सिद्धार्थो राष्ट्रवर्धनः २५ अशोको धर्मपालश्च सुमन्त्रश्च महाबलः । एते रामस्य सचिवा राज्ञो दशरथस्य च २६ नीतियुक्ता महात्मानः सर्वशास्त्रविशारदाः । ह्रीमन्तश्च कुलीनाश्च नये मन्त्रे च कोविदाः २७ तानाहूय च धर्मात्मा पुष्पकादवतीर्य च । गृध्रोलूकविवादं तं पृच्छति स्म रघूत्तमः २८ कति वर्षाणि वै गृध्र तवेदं

---

कुबेराची बरोबरी करणारा आहेस अथवा त्याच्यापेक्षां तूं अधिकही आहेस १८. कुबेराचें कार्य तूं करीत असल्यामुळें तूं आह्मांला कुबेरच भासत आहेस. सर्व चराचर प्राण्यांचे ठिकाणीं तूं सारखा असून, हे राघवा, शत्रु व मित्र ह्या दोहोंचे ठिकाणीं तुझी सम दृष्टि आहे १९. हे रामा, तुझा कारभार नेहेमीं धर्मानें चाललेला आहे; व्यवहारामध्यें तुझें वर्तन नीतिक्रमाला अनुसरून आहे आणि, हे रामा, तूं ज्यावर रुष्ट होशील त्याला मृत्यु प्राप्त होण्याचा संभव आहे २०. ह्यामुळें, हे रामा, तुला यम असें ह्मणत असतात. कारण, तूं तसा पराक्रमीच आहेस. त्याचप्रमाणें, हे नृपश्रेष्ठा, तुझ्या ठिकाणीं जो मानुष अंश आहे तोही तुझी कीर्ति होण्यासारिखा आहे २१. प्राण्यांचे ठिकाणीं दयादृष्टि आणि निर्लोभ वर्तन ही राजानें स्वीकारिलीं पाहिजेत. कारण, दुर्बल व अनाथ ह्यांचें बल राजाच होय २२. तूं अंध जनांची उत्कृष्ट दृष्टि असून पंगु जनांची गतिही तूंच आहेस. इतकेंच नव्हे परंतु, आमचाही नाथ तूंच आहेस. ह्यास्तव, हे धर्मनिष्ठा, माझें ह्मणणें ऐक २३. हे राजा, माझ्या घरांत प्रविष्ट झालेला गृध्र मला पीडा देत आहे आणि, हे पुरुषश्रेष्ठा राजा, देव आणि मानव ह्या उभयतांचाही शास्ता तूंच आहेस" २४. हें श्रवण केल्यानंतर रामानें स्वतः सचिवांना बोलाविलें. ऋष्टि, जयंत, विजय, सिद्धार्थ, राष्ट्रवर्धन २५, अशोक, धर्मपाल आणि महाबलाढ्य सुमंत्र हे दशरथ राजाचे व रामाचे सचिव होत २६. हे नीतिमान् महात्मे सर्व शास्त्रांमध्यें निपुण असून विनयशील व कुलीन होते आणि नीति व मसलत ह्यांमध्येंही प्रवीण होते २७. त्या सचिवांना निमंत्रण करून धर्मात्मा राम पुष्पक-

निलयं कृतम् । एतन्मे कारणं ब्रूहि यदि जानासि तत्त्वतः २९ एतच्छ्रुत्वा तु वै गृध्रो भाषते राघवं स तम् । इयं वसुमती राम मनुष्यैः परितो यदा ३० उत्थितैरावृता सर्वा तदा प्रभृति मे गृहम् । उलूकश्चाब्रवीद्रामं पादपैरुपशोभिता ३१ यदेयं पृथिवी राजंस्तदाप्रभृति मे गृहम् । एतच्छ्रुत्वा तु वै रामः सभासदमुवाच ह ३२ न सा सभा यत्र न सन्ति वृद्धा वृद्धा न ते ये न वदन्ति धर्मम् । नासौ धर्मो यत्र न सत्यमस्ति न तत्सत्यं यच्छलेनानुविद्धम् ३३ ये तु सभ्याः सदा ज्ञात्वा तूष्णीं ध्यायन्त आसते । यथाप्राप्तं न ब्रुवते ते सर्वेऽनृतवादिनः ३४ जानन्न वाब्रवीत्प्रश्नान्कामात्क्रोधाद्भयात्तथा । सहस्रं वारुणान्पाशानात्मनि प्रतिमुञ्चति ३५ तेषां संवत्सरे पूर्णे पाश एकः प्रमुच्यते । तस्मात्सत्येन वक्तव्यं जानता सत्यमञ्जसा ३६ एतच्छ्रुत्वा तु सचिवा राममेवाब्रुवंस्तदा । उलूकः शोभते राजन्न तु गृध्रो महामते ३७ त्वं प्रमाणं महाराज राजा हि परमा गतिः । राजमूलाः प्रजाः सर्वा राजा धर्मः सनातनः ३८ शास्ता नृणां नृपो येषां ते न गच्छन्ति

---

विमानांतून खालीं उतरला आणि तो रघुवंशजश्रेष्ठ, गृध्र व उलूक ह्यांच्या त्या कलहाची, चौकशी करूं लागला २८. ( तो ह्मणाला ) "हे गृध्रा, तूं हें घर तयार करून किती वर्षें झालीं हें जर तुला खरें माहीत असेल तर मला सांग" २९. हें श्रवण केल्यानंतर तो गृध्र त्या रामाला ह्मणाला "हे राम, ह्या सर्व पृथ्वीवर जेव्हांपासून मनुष्याचा संचार सुरू झाला तेव्हांपासून हें घर माझें आहे". ह्यावर उलूक रामाला ह्मणाला "हे रामा, जेव्हांपासून ही पृथ्वी वृक्षांनीं युक्त आहे तेव्हांपासून हें माझें घर आहे". हें श्रवण करून राम सभासदांना ह्मणाला ३०, ३१, ३२ "ज्याठिकाणीं वृद्ध नाहींत ती सभा नव्हे; त्याचप्रमाणें जे धर्माला अनुसरून बोलत नाहींत ते वृद्ध नव्हेत; जेथें सत्य नाहीं तो धर्म नव्हे आणि जें कपटानें युक्त असेल तें सत्यही नव्हे ३३. जे सभ्य जाणून बुजून स्वस्थ विचार करीत पडलेले असतात आणि समयाला जें सांगावयास पाहिजे तें सांगत नाहींत ते सर्व असत्यवादी होत ३४. त्याचप्रमाणें, लोभामुळें, क्रोधामुळें अथवा भीतीमुळें जो पुरुष समजत असूनही प्रश्नाचें उत्तर देत नाहीं तो आपणांला सहस्र वरुण पाशांनीं बांधून टाकितो ३५; आणि त्यांतील एकेक पाश सुटण्यास एकेक वर्ष पूर्ण व्हावें लागतें. तस्मात्, सत्य ह्मणजे काय हें नीटरीतीनें जाणणाऱ्या पुरुषानें सत्य भाषणच करावें" ३६. हें श्रवण करून सचिव रामालाच ह्मणाले "हे महाविचारी राजा, उलूक आह्मांला खरा दिसतो; गृध्र खरा भासत नाहीं ३७. परंतु, हे महाराज, आपल्या नजरेस काय येईल तें खरें: कारण, राजा हें शेवटलें प्रमाण होय. सर्व प्रजांना

दुर्गतिम् । वैवस्वतेन मुक्तास्तु भवन्ति पुरुषोत्तमाः ३९ सचिवानां वचः श्रुत्वा रामो वचनमब्रवीत् । श्रूयतामभिधास्यामि पुराणे यदुदाहृतम् ४० द्यौः सचन्द्रार्कनक्षत्रा सपर्वतमहावना । सलिलार्णवसंपूर्णं त्रैलोक्यं सचराचरम् ४१ एक एव तदा ह्यासीद्युक्तो मेरुरिवापरः । पुरा भूः सहलक्ष्म्या च विष्णोर्जठरमाविशत् ४२ तां निगृह्य महातेजाः प्रविश्य सलिलार्णवम् । सुष्वाप देवो भूतात्मा बहून्वर्षगणानपि ४३ विष्णौ सुप्ते तदा ब्रह्मा विवेश जठरं ततः । रुद्धस्रोतं तु तं ज्ञात्वा महायोगी समाविशत् ४४ नाभ्यां विष्णोः समुत्पन्ने पद्मे हेमविभूषिते । स तु निर्गम्य वै ब्रह्मा योगी भूत्वा महाप्रभुः ४५ सिसृक्षुः पृथिवीं वायुं पर्वतान्समहीरुहान् । तदन्तरे प्रजाः सर्वाः समनुष्यसरीसृपाः ४६ जरायुजाण्डजाः सर्वाः स ससर्ज महातपाः । तत्र श्रोत्रमलोत्पन्नः कैटभो मधुना सह ४७ दानवौ तौ महावीर्यौ घोररूपौ दुरासदौ। दृष्ट्वा प्रजापतिं तत्र क्रोधाविष्टौ बभूवतुः ४८ वेगेन महता तत्र स्वयंभुवमधावताम् । दृष्ट्वा स्वयंभुवा मुक्तो रावो वै विकृतस्तदा ४९ तेन शब्देन

---

राजाचाच आश्रय असून राजा हाच सनातन धर्म होय ३८. ज्या पुरुषांचा शास्ता राजा आहे त्यांना दुर्गति प्राप्त नाहीं. कारण, ते उत्तम पुरुष यमाच्या तावडींतून सुटतात" ३९. हें सचिवांचें भाषण श्रवण करून राम ह्मणाला " पुराणामध्यें जें सांगितलें आहे तें मीं तुह्मांला सांगतों; तुह्मी श्रवण करा ४०. चंद्र, सूर्य, नक्षत्रें, पर्वत व महावनें इतकेंच नव्हें परंतु, चराचर प्राण्यांनीं भरलेलें हें त्रैलोक्य सागरानें व्याप्त झालेलें होतें ४१. सारांश, दुसरा मेरुपर्वतच कीं काय असा एक परमेश्वरच त्यावेळीं सागररूप जगतामध्यें होता. असो. पूर्वी लक्ष्मीसहवर्तमान पृथ्वी विष्णूचे उदरामध्यें प्रविष्ट झाली ४२; तिचा स्वीकार करून महातेजस्वी विष्णु महासागरामध्यें प्रविष्ट झाला आणि तो भूतात्मा देव अनेक वर्षसमुदाय लोटेपर्यंत निद्रिस्थ राहिला ४३. विष्णु निद्रिस्थ झाला असतां ब्रह्मदेवानें त्याच्या उदरामध्यें प्रवेश केला; परंतु, त्या विष्णूच्या देहांतील मार्ग प्रतिबद्ध झाला आहे असें समजून आल्यावर तो महायोगी ब्रह्मदेव तेथेंच बसला ४४. विष्णूच्या नाभीचे ठिकाणीं सुवर्णभूषित कमल उत्पन्न झालें असतां महासमर्थ योगी ब्रह्मदेव त्यांतून बाहेर निघाला ४५; पृथ्वी, वायु व वृक्षांसहवर्तमान पर्वत उत्पन्न करण्याचें त्यानें मनामध्यें आणिलें व नंतर मानव व सरपटणारे प्राणी ह्यांसहवर्तमान सर्व प्रजा उत्पन्न करून ४६ त्या महातपस्वी ब्रह्मदेवानें गर्भाशयापासून व अंडापासून निघणाऱ्या प्रजाही सर्व उत्पन्न केल्या. त्यावेळीं कानाच्या मळापासून मधुकैटभ दैत्य उत्पन्न झाले ४७ आणि ते महावीर्यवान्, अजिंक्य व रूपानें उग्र असलेले दानव ब्रह्मदेवाला अवलोकन करून क्रोधाविष्ट झाले ४८. इतकेंच नव्हे परंतु,

संप्राप्तौ दानवौ हरिणा सह । अथ चक्रप्रहारेण सूदितौ मधुकैटभौ ५०
मेदसा प्लाविता सर्वा पृथिवी च समन्ततः । भूयो विशोधिता तेन हरिणा
लोकधारिणा ५१ शुद्धां वै मेदिनीं तां तु वृक्षैः सर्वामपूरयत् । ओषध्यः
सर्वसस्यानि निष्पद्यन्त पृथग्विधाः ५२ मेदोगन्धा तु धरणी मेदिनीत्यभि-
संज्ञिता । तस्मान्न गृध्रस्य गृहमुलूकस्येति मे मतिः ५३ तस्माद्गृध्रस्तु दण्ड्यो
वै पापो हर्ता परालयम् । पीडां करोति पापात्मा दुर्विनीतो महानयम् ५४
अथाशरीरिणी वाणी अन्तरिक्षात्प्रबोधिनी । मा वधी राम गृध्रं त्वं पूर्वदग्धं
तपोबलात् ५५ कालगौतमदग्धोऽयं प्रजानाथो नरेश्वर । ब्रह्मदत्तेति नाम्नैष
शूरः सत्यव्रतः शुचिः ५६ गृहं त्वस्यागतो विप्रो भोजनं प्रत्यमार्गत । साग्रं
वर्षशतं चैव भोक्तव्यं नृपसत्तम ५७ ब्रह्मदत्तः स वै तस्य पाद्यमर्घ्यं स्वयं
नृपः । हार्दं चैवाकरोत्तस्य भोजनार्थं महाद्युतेः ५८ मांसमस्याभवत्तत्र
आहारं तु महात्मनः । अथ क्रुद्धेन मुनिना शापो दत्तोऽस्य दारुणः ५९
गृध्रस्त्वं भव वै राजन्मा मैनं ह्यथ सोऽब्रवीत् । प्रमादं कुरु धर्मज्ञ अज्ञा-

---

मोठ्या वेगानें ते ब्रह्मदेवाकडे धांवले. तेव्हां त्यांना अवलोकन करून ब्रह्मदेवानें भयंकर शब्द केला असतां ४९ त्या शब्दाबरोबर प्राप्त झालेल्या त्या मधुकैटभ दानवांचा चक्रप्रहाराच्या योगानें हरीनें वध केला ५०. तेव्हां सर्व पृथ्वी सर्व बाजूंनीं त्यांच्या मेदानें भरून गेली असतां त्या लोकरक्षक हरीनें पुनरपि तिचें शोधन केलें ५१. नंतर ती सर्व शुद्ध पृथ्वी त्यानें वृक्षांनीं भरून काढिली आणि नानाप्रकारच्या औषधि व सर्व प्रकारचीं धान्येंही उत्पन्न केलीं ५२; सर्व पृथ्वी मेदाच्या गंधानें युक्त झाल्यामुळें तिला मेदिनी हें नांव प्राप्त झालें. तस्मात्, गृह गृध्राचें नसून उलूकाचें आहे असें मला वाटतें ५३. ह्यास्तव, दुसऱ्याच्या गृहाचा अपहार करणाऱ्या ह्या पापी गृध्राला दंड केला पाहिजे. कारण, कुमार्गाला लागलेला हा महादुरात्मा गृध्र ह्या उलूकाला पीडा देत आहे "५४. इतक्यांत अंतरिक्षांतून आकाशवाणी झाली ती अशी:– " हे रामा, तपःसामर्थ्यानें पूर्वीं दग्ध झालेल्या ह्या गृध्राचा तूं वध करूं नकोस ५५. कारण, हे प्रजाधिपते, हा राजा कालरूप गौतममुनीनें दग्ध केला आहे. हा ब्रह्मदत्त ह्या नांवानें प्रसिद्ध असून शूर, सत्यनिष्ठ व शुचि होता ५६. ह्याच्या घरीं एक विप्र आला आणि भोजन मागूं लागला. कारण, हे नृपश्रेष्ठ, संपूर्ण शंभर वर्षेंपर्यंत ( न केलेलें ) भोजन त्याला करावयाचें होतें ५७. त्या ब्रह्मदत्त राजानें स्वतः त्याला पाद्य व अर्घ्य निवेदन करून त्या महातेजस्वी मुनीला भोजनार्थ प्रेमपूर्वक विनंति केली ५८. परंतु, त्या महात्म्याच्या भोजनार्थ तेथें मांस होतें. तेव्हां " हे राजा, तूं गृध्र होशील " असा त्या मुनीनें क्रुद्ध होऊन भयंकर शाप दिला. तथापि,

नान्मे महाव्रत ६० शापस्यान्तं महाभाग क्रियतां वै ममानघ । तदज्ञानकृतं मत्वा राजानं मुनिरब्रवीत् ६१ उत्पत्स्यति कुले राज्ञां रामो, नाम महा-यशाः । इक्ष्वाकूणां महाभागो राजा राजीवलोचनः ६२ तेन स्पृष्टो विपा-पस्त्वं भविता नरपुंगव । स्पृष्टो रामेण तच्छ्रुत्वा नरेन्द्रः पृथिवीपतिः ६३ गृध्रत्वं त्यक्तवान्राजा दिव्यगन्धानुलेपनः । पुरुषो दिव्यरूपोऽभूदुवाचेदं च राघवम् ६४ साधु राघव धर्मज्ञ त्वत्प्रसादादहं विभो । विमुक्तो नरकाद्घो-राच्छापस्यान्तः कृतस्त्वया ६५ [२८२३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-कीय आदिकाव्य उत्तरकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ १३ ॥

तयोः संवदतोरेवं रामलक्ष्मणयोस्तदा । वासन्तिकी निशा प्राप्ता न शीता न च घर्मदा १ ततः प्रभाते विमले कृतपूर्वाह्णिकक्रियः । अभिच-क्राम काकुत्स्थो दर्शनं पौरकार्यवित् २ ततः सुमन्त्रस्त्वागम्य राघवं वाक्य-मब्रवीत् । एते प्रतिहता राजन्द्वारि तिष्ठन्ति तापसाः ३ भार्गवं च्यवनं चैव पुरस्कृत्य महर्षयः । दर्शनं ते महाराज चोदयन्ति कृतत्वराः ४ प्रीयमाणा

---

" असें करूं नका, असें करूं नका " असें बोलून पुनरपि तो त्या मुनीला ह्मणाला "हे धर्मज्ञ, हे महातपस्वी, माझ्या अज्ञानामुळें झालेल्या अपराधाबद्दल आपण क्षमा करावी. हे निष्पाप, हे महाशय मुने, आपण माझा हा शाप नाहींसा करा. " ह्यानंतर अज्ञानानें ती गोष्ट झाली असें समजून मुनि राजाला ह्मणाला ५९, ६०, ६१ " इक्ष्वाकु राजांच्या वंशामध्यें महायशस्वी, महाभाग्यवान् आणि कमलनयन असा राम ह्मणून राजा उत्पन्न होईल ६२; आणि, हे पुरुषश्रेष्ठा, त्याचा स्पर्श झाल्यावर तूं शापापासून मुक्त होशील. " हें श्रवण केल्यानंतर त्या भूपति प्रजाधिपतीला रामानें स्पर्श केला असतां ६३ त्या राजानें गृध्र देहाचा त्याग करून दिव्य चंदनाच्या अनुलेपनानें युक्त अशा दिव्य मानव देहाचा स्वीकार केला आणि तो रामाला ह्मणाला ६४ " हे धर्मज्ञप्रभो राघवा, शाबास; तूं शाप नाहींसा केल्यामुळें मी घोर नरकापासून मुक्त झालों आहें " ६५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं तेरावा प्रक्षिप्त सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

ह्याप्रमाणें त्या रामलक्ष्मणांचा संवाद चालला असतां शीत नव्हें व उष्ण नव्हे अशी वसंतऋतूंतील रात्रि प्राप्त झाली १. तदनंतर निर्मल प्रभातकाल झाल्यानंतर पूर्वाण्हांत करावयाचीं कर्में आटोपून तो प्रजाकार्यवेत्ता ककुत्स्थकुलोत्पन्न राम भेट घेण्याच्या जागे-मध्यें गेला असतां २ सुमंत्र समीप येऊन त्या रामाला ह्मणाला " हे राजा, हे तपस्वी द्वाराशीं खोळंबून राहिले आहेत ३ व हे महाराज, च्यवन भार्गवांना पुढें करून हे

नरव्याघ्र यमुनातीरवासिनः ५ तस्य तद्वचनं श्रुत्वा रामः प्रोवाच धर्मवित्। प्रवेश्यन्तां महाभागा भार्गवप्रमुखा द्विजाः ६ राज्ञस्त्वाज्ञां पुरस्कृत्य द्वास्थो मूर्ध्ना कृताञ्जलिः। प्रवेशयामास तदा तापसान्सुदुरासदान् ७ शतं समधिकं तत्र दीप्यमानं स्वतेजसा। प्रविष्टं राजभवनं तापसानां महात्मनाम् ८ ते द्विजाः पूर्णकलशैः सर्वतीर्थाम्बुसत्कृतैः। गृहीत्वा फलमूलं च रामस्याभ्याहरन्बहु ९ प्रतिगृह्य तु तत्सर्वं रामः प्रीतिपुरस्कृतः। तीर्थोदकानि सर्वाणि फलानि विविधानि च १० उवाच च महाबाहुः सर्वानेव महामुनीन्। इमान्यासनमुख्यानि यथार्हमुपविश्यताम् ११ रामस्य भाषितं श्रुत्वा सर्व एव महर्षयः। बृसीषु रुचिराख्यासु निषेदुः काञ्चनीषु ते १२ उपविष्टानृषींस्तत्र दृष्ट्वा परपुरंजयः। प्रयतः प्राञ्जलिर्भूत्वा राघवो वाक्यमब्रवीत् १३ किमागमनकार्यं वः किं करोमि समाहितः। आज्ञाप्योऽहं महर्षीणां सर्वकामकरः सुखम् १४ इदं राज्यं च सकलं जीवितं च हृदि स्थितम्। सर्वमेतद्द्विजार्थं मे सत्यमेतद्ब्रवीमि वः १५ तस्य तद्वचनं श्रुत्वा साधुकारो महानभूत्। ऋषीणामुग्रतपसां यमुनातीरवासिनाम् १६ ऊचु-

महर्षि सत्वर आपली भेट घेण्याविषयीं उत्सुक झाले आहेत ४ आणि ते यमुनातीरनिवासी महर्षि, हे पुरुषश्रेष्ठा, आनंदांत आहेत " ५. हें त्याचें भाषण श्रवण करून धर्मवेत्ता राम ह्मणाला " ते च्यवनभार्गवप्रभृति महाभाग्यवान् द्विज आंत येऊं द्या " ६. ह्यावर मस्तकीं हात जोडून राजाच्या आज्ञेनें तो द्वारपाल त्या, दर्शन होण्यासही अशक्य असलेल्या, तापसांना आंत घेऊन आला ७. तेव्हां स्वतःच्या तेजानें झळकत असलेले ते महात्मे तपस्वी शंभरांहून अधिकच राजवाड्यामध्यें प्रविष्ट झाले ८. सर्व तीर्थांचीं उदकें ज्यांत आहेत असे भरलेले कलश बरोबर घेऊन आलेल्या त्या द्विजांनीं बरोबर आणिलेलीं फळें व मुळेंही रामाला विपुल अर्पण केलीं ९. तेव्हां तें सर्व प्रेमपुरःसर स्वीकारून ह्मणजे अर्थात् सर्व तीर्थोदकें व नानाप्रकारचीं फळें घेऊन १० महापराक्रमी राम त्या सर्वही महर्षींना ह्मणाला " हीं श्रेष्ठ आसनें आहेत; येथें आपआपल्या योग्यतेप्रमाणें बसावें ११ ". रामाचें हें भाषण श्रवण केल्यावर सर्वही महर्षि सुवर्णमय व मनोहर आसनांवर बसले १२. तेव्हां शत्रुसमूह जिंकणारा रघुवंशज राम नम्र होऊन व हात जोडून त्या तेथें बसलेल्या ऋषींना ह्मणाला १३ " कोणत्या कार्याकरितां आपलें आगमन झालें आहे ? मीं सावधान राहून आपलें काय करावें ? महर्षींचीं मला आज्ञा व्हावी; मी आनंदानें कोणतेंही कार्य करण्यास तयार आहें १४. हें सर्व राज्य आणि हृदयकमलामध्यें असलेलें जीवित हें सर्व माझें ब्राह्मणांकरितां आहे हें मी तुह्मांला सत्य सांगतों " १५. हें त्याचें भाषण

त्वय्येव महात्मानो हर्षेण महता वृताः । उपपन्नं नरश्रेष्ठ तवैव भुवि नान्यतः १७ बहवः पार्थिवा राजन्नतिक्रान्ता महाबलाः । कार्यस्य गौरवं मत्वा प्रतिज्ञां नाभ्यरोचयन् १८ त्वया पुनर्ब्राह्मणगौरवादियं कृता प्रतिज्ञा ह्यनवेक्ष्य कारणम् । ततश्च कर्ता ह्यसि नात्र संशयो महाभयात्त्रातुमृषींस्त्वमर्हसि १९ [ २८४२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे षष्टितमः सर्गः ॥ ६० ॥

ब्रुवद्भिरेवमृषिभिः काकुत्स्थो वाक्यमब्रवीत् । किं कार्यं ब्रूत मुनयो भयं तावदपैतु वः १ तथा ब्रुवति काकुत्स्थे भार्गवो वाक्यमब्रवीत् । भयानां शृणु यन्मूलं देशस्य च नरेश्वर २ पूर्वं कृतयुगे राजन्दैतेयः सुमहामतिः । लोलापुत्रोऽभवज्ज्येष्ठो मधुर्नाम महासुरः ३ ब्रह्मण्यश्च शरण्यश्च बुद्ध्या च परिनिष्ठितः । सुरैश्च परमोदारैः प्रीतिस्तस्यातुलाभवत् ४ स मधुर्वीर्यसंपन्नो धर्मे च सुसमाहितः । बहुमानाच्च रुद्रेण दत्तस्तस्याद्भुतो वरः ५ शूलं शूलाद्विनिष्कृष्य महावीर्यं महाप्रभम् । ददौ महात्मा सुप्रीतो वाक्यं चैतदुवाच

श्रवण करून यमुनातीरस्थ महातपस्वी ऋषींमध्यें " शाबास, शाबास. " असा मोठा शब्द झाला १६ आणि अतिशय हर्षयुक्त होऊन ते महात्मे ह्मणाले " हे पुरुषश्रेष्ठा, जगतामध्यें हें तुझ्याच ठिकाणीं आहे; दुसरीकडे हें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं १७. हे राजा, कार्याचें महत्त्व समजून आल्यावर वचन न देणारे असे महाबलाढ्य राजे पूर्वी पुष्कळ होऊन गेले १८; परंतु, तूं, ब्राह्मणांचे ठिकाणीं असलेल्या पूज्य बुद्धीमुळें, कारणाची चौकशी न करितांच ही प्रतिज्ञा केली आहेस. ह्यावरून हें कार्य तूं करशील ह्याविषयीं संशय नाहीं. सारांश, महाभयापासून तूं आह्मा ऋषींचें रक्षण कर " १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं साठावा सर्ग समाप्त झाला ॥ ६० ॥

ह्याप्रमाणें ते ऋषि बोलत असतांना ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्यांना ह्मणाला " हे मुनिजनहो, तुह्मी भीति धरूं नका व तुमचें काय कार्य आहे तें सांगा ". ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम बोलूं लागला असतां च्यवनभार्गव मुनि त्याला ह्मणाले " हे प्रजाधिपते, देशाच्या व आमच्या भयाचें कारण काय हें तूं श्रवण कर, २. हे राजा, पूर्वी कृतयुगामध्यें दितिकुलोत्पन्न व अत्यंत बुद्धिमान् असा एक मधु ह्मणून महादैत्य होऊन गेला. तो लोलेचा ज्येष्ठ पुत्र होय ३. तो ब्राह्मणभक्त, दयाळु आणि विचारी असल्यामुळें मोठ्यामोठ्या देवांशीं त्याची अनुपम मैत्री जमली ४ व तो वीर्यवान् मधुदैत्य महाविचारी व धर्मनिष्ठ असल्यामुळें रुद्रानें बहुमानार्थ त्याला अद्भुत वर दिला, ५. सारांश, आपल्या शूला-

ह ६ त्वयाऽयमतुलो धर्मो मत्प्रसादकरः शुभः । प्रीत्या परमया युक्तो ददाम्यायुधमुत्तमम् ७ यावत्सुरैश्च विप्रैश्च न विरुध्येर्महासुर । तावच्छूलं तवेदं स्यादन्यथा नाशमेष्यति ८ यश्च त्वामभियुञ्जीत युद्धाय विगतज्वरः । तं शूलो भस्मसात्कृत्वा पुनरेष्यति ते करम् ९ एवं रुद्राद्वरं लब्ध्वा भूय एव महासुरः । प्रणिपत्य महादेवं वाक्यमेतदुवाच ह १० भगवन्मम वंशस्य शूलमेतदनुत्तमम् । भवेत्तु सततं देवसुराणामीश्वरो ह्यसि ११ तं ब्रुवाणं मधुं देवः सर्वभूतपतिः शिवः । प्रत्युवाच महादेवो नैतदेवं भविष्यति १२ मा भूत्ते विफला वाणी मत्प्रसादकृता शुभा । भवतः पुत्रमेकं तु शूलमेतद्भविष्यति १३ यावत्करस्थः शूलोऽयं भविष्यति सुतस्य ते । अवध्यः सर्वभूतानां शूलहस्तो भविष्यति १४ एवं मधुर्वरं लब्ध्वा देवात्सुमहदद्भुतम् । भवनं सोऽसुरश्रेष्ठः कारयामास सुप्रभम् १५ तस्य पत्नी महाभागा प्रिया कुम्भीनसीति या । विश्वावसोरपत्यं साप्यनलायां महाप्रभा १६ तस्याः पुत्रो महावीर्यो लवणो नाम दारुणः । बाल्यात्प्रभृति दुष्टात्मा पापान्येव समाच-

---

पासून एक प्रचंडशक्तिमान् व महातेजस्वी शूल बाहेर काढून महात्म्या रुद्रानें त्याला अर्पण केला आणि अतिशय संतुष्ट झालेला तो रुद्र त्याला ह्मणाला ६ " ज्याअर्थी तूं, मीं प्रसन्न होण्यासारखें, हें उत्कृष्ट व अनुपम पुण्य केलें आहेस त्याअर्थी मी अतिशय आनंदित झालों असून हें उत्कृष्ट आयुध तुला देत आहें ७. परंतु, हे महासुरा, जोंपर्यंत तूं देवब्राह्मणांशीं विरोध धरिला नाहींस तोंपर्यंतच हा शूल तुझ्यापाशीं राहील आणि तूं त्यांच्यांशीं विरोध धरिल्यास तो नाहींसा होईल ८. त्याचप्रमाणें जो निःशंकपणें तुला युद्धार्थ आव्हान करील त्याला हा शूल दग्ध करून पुनरपि तुझ्याहातीं येईल " ९. ह्याप्रमाणें रुद्रापासून वर प्राप्त झाला असतां तो महादैत्य पुनरपि प्रणाम करून महादेवाला ह्मणाला १० " हे भगवन्, आपण सुराधिपति आहां; ह्यास्तव, हे देव, हा अनुपम शूल माझ्या वंशामध्यें नेहेमीं असावा " ११. ह्याप्रमाणें तो मधुदैत्य बोलत असतांना सर्वभूताधिपति व कल्याणस्वरूप सुरश्रेष्ठ शंकर देव त्याला ह्मणाला " असें होणार नाहीं १२. तथापि, मी प्रसन्न झाल्यामुळें तूं ही जी शुभ विनंति केली आहेस तीही व्यर्थ जाणार नाहीं. तुझ्या एका पुत्राजवळ हा शूल राहील १३ आणि जोंपर्यंत तुझ्या पुत्राच्या हातांत हा शूल राहील तोंपर्यंत तुझा शूलपाणि पुत्र सर्व प्राण्यांना अवध्य होईल " १४. ह्याप्रमाणें देवापासून अत्यंत अद्भुत वर प्राप्त झाला असतां त्या असुरश्रेष्ठ मधूनें अत्यंत उज्ज्वल असें एक गृह करविलें १५. कुंभीनसी ह्मणून त्याची एक महाभाग्यवती व त्याला प्रिय अशी पत्नी होती व ती महातेजस्वी कुंभीनसी अनलेचे ठिकाणीं झालेलें विश्वावसूचें अपत्य

रत् १७ तं पुत्रं दुर्विनीतं तु दृष्ट्वा क्रोधसमन्वितः । मधुः स शोकमापेदे न चैनं किंचिदब्रवीत् १८ स विहाय इमं लोकं प्रविष्टो वरुणालयम् । शूलं निवेश्य लवणं वरं तस्मै न्यवेदयत् १९ स प्रभावेण शूलस्य दौरात्म्येनात्मनस्तथा । संतापयति लोकांस्त्रीन्विशेषेण च तापसान् २० एवंप्रभावो लवणः शूलं चैव तथाविधम् । श्रुत्वा प्रमाणं काकुत्स्थ त्वं हि नः परमा गतिः २१ बहवः पार्थिवा राम भयार्तैर्ऋषिभिः पुरा । अभयं याचिता वीर त्रातारं न च विद्महे २२ ते वयं रावणं श्रुत्वा हतं सबलवाहनम् । त्रातारं विद्महे तात नान्यं भुवि नराधिपम् ॥ तत्परित्रातुमिच्छामो लवणाद्भयपीडितान् २३ इति राम निवेदितं तु ते भयजं कारणमुत्थितं च यत् । विनिवारयितुं भवाक्षमः कुरु तं काममहीनविक्रम २४ [ २८६६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकषष्टितमः सर्गः ॥ ६१ ॥

तथोक्ते तानृषीन्रामः प्रत्युवाच कृताञ्जलिः । किमाहारः किमाचारो

---

होती १६. तिला लवण ह्मणून एक महावीर्यवान् व भयंकर पुत्र होता व तो दुरात्मा लहानपणापासून पापकर्मेंच करीत असे १७. तो उद्धट पुत्र पाहून तो मधु क्रुद्ध व शोकाकुल झाला; परंतु, त्याला कांहींएक बोलला नाहीं १८. शेंवटीं तो हा लोक सोडून वरुणलोकीं प्रविष्ट झाला; परंतु, जातांना शूल लवणाचें स्वाधीन करून तो वरही त्यानें त्याला सांगितला १९. तेव्हांपासून तो लवण शूलाच्या प्रभावामुळें व स्वतःच्या दुष्टपणामुळें त्रैलोक्याला व विशेषेंकरून तापसांना अतिशय ताप देत आहे २०. ह्याप्रमाणें लवणासुराचा प्रभाव असून तशाप्रकारचा शूल त्याच्यापाशीं आहे. हें श्रवण करून तूं जें करशील तें आह्मांला प्रमाण आहे. कारण, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तूंच अम्हचा आश्रय आहेस २१. हे रामा, आजपर्यंत आह्मीं ऋषींनीं भयभीत होऊन पुष्कळ राजांपाशीं अभयप्राप्तीविषयीं याचना केली; परंतु, हे वीरा, आह्मांला कोणीही त्राता आढळला नाहीं २२. तथापि, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान रावणाचा वध झाल्याचें ऐकून, बा रामा, आह्मांला त्राता मिळाला आहे; परंतु, तो तूंच असून तुझ्याशिवाय दुसरा राजा आमचें रक्षण करणारा ह्या भूतलावर नाहीं. तस्मात्, लवणामुळें भयभीत झालेल्या आह्मा-मुनिजनांचें रक्षण व्हावें एवढीच आमची इच्छा आहे २३. सारांश, हे रामा, आमच्या भयाचें कारण कसें उपस्थित झालें हें आह्मीं तुला ह्याप्रमाणें निवेदन केलें आहे व तूं त्याचें निवारण करण्यास समर्थही आहेस. तस्मात्, हे महापराक्रमी रामा, हा आमचा मनोरथ तूं पूर्ण कर २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६१ ॥

लवणः क्व च वर्तते १ राघवस्य वचः श्रुत्वा ऋषयः सर्व एव ते । ततो निवेदयामासुर्लवणो ववृधे यथा २ आहारः सर्वसत्त्वानि विशेषेण च तापसाः । आचारो रौद्रता नित्यं वासो मधुवने तथा ३ हत्वा बहुसहस्राणि सिंहव्याघ्रमृगाण्डजान् । मानुषांश्चैव कुरुते नित्यमाहारमाह्निकम् ४ ततोऽन्तराणि सत्त्वानि खादते स महाबलः । संहारे समनुप्राप्ते व्यादितास्य इवान्तकः ५ तच्छ्रुत्वा राघवो वाक्यमुवाच स महामुनीन् । घातयिष्यामि तद्रक्षो व्यपगच्छतु वो भयम् ६ प्रतिज्ञाय तदा तेषां मुनीनामुग्रतेजसाम् । सभ्रातॄन्सहितान्सर्वानुवाच रघुनन्दनः ७ को हन्ता लवणं वीरः कस्यांशः स विधीयताम् । भरतस्य महाबाहोः शत्रुघ्नस्य च धीमतः ८ राघवेणैवमुक्तस्तु भरतो वाक्यमब्रवीत् । अहमेनं वधिष्यामि ममांशः स विधीयताम् ९ भरतस्य वचः श्रुत्वा धैर्यशौर्यसमन्वितम् । लक्ष्मणावरजस्तस्थौ हित्वा सौवर्णमासनम् १० शत्रुघ्नस्त्वब्रवीद्वाक्यं प्रणिपत्य नराधिपम् । कृतकर्मा महाबाहुर्मध्यमो रघुनन्दन ११ आर्येण हि पुरा शून्या त्वयोध्या परिपालिता ।

---

ह्याप्रमाणें त्यांनीं सांगितलें असतां राम हात जोडून त्या ऋषींना ह्मणाला " लवण आहे कोठें ? तो वर्तन कसें ठेवीत आहे ? आणि त्याचें भक्ष्य काय आहे " १. रामाचें हें भाषण श्रवण केल्यावर ते सर्वही ऋषि लवण कसा वाढला हें सांगूं लागले २. ( ते ह्मणाले ) " सर्व प्राणी आणि विशेषतः तपस्वी हें त्याचें भक्ष्य होय; नेहेमीं क्रूरता हें त्याचें आचरण आहे आणि मधुवनामध्यें त्याचें वास्तव्य आहे ३. हजारों सिंह, व्याघ्र, मृग, पक्षी व मानव मारून तो नेहेमीं आपला रोजचा आहार करीत असतो ४; इतकेंच नव्हें परंतु, संहारकाल प्राप्त झाला असतां आ पसरून बसलेला मृत्युच कीं काय असा तो महाबलाढ्य लवण इतरही प्राणी भक्षण करीत असतो " ५. हें श्रवण करून तो राम महर्षींना ह्मणाला " मी त्या राक्षसांचा वध करीन; तुह्मी भय सोडा " ६. ह्याप्रमाणें त्या महातेजस्वी ऋषींना वचन दिल्यावर तो रघुनंदन राम एकत्र जुळलेल्या सर्व भ्रात्यांना ह्मणाला ७ " कोण वीर लवणाचा वध करणारा आहे ? तो कोणाचा भाग नेमावा ? महापराक्रमी भरत आणि विचारी शत्रुघ्न ह्यांपैकीं तो कोणाच्या वांट्याला जाणार आहे ?" ८. ह्याप्रमाणें रामानें विचारिलें असतां भरत ह्मणाला " तो माझा भाग असूं द्या; मी त्याचा वध करीन " ९. धैर्य व शौर्य ह्यांनीं युक्त असलेलें हें भरताचें भाषण श्रवण करून लक्ष्मणाहून धाकटा शत्रुघ्न आपल्या सुवर्णमय सिंहासनावरून खालीं येऊन उभा राहिला १० आणि राजाला प्रणाम करून ह्मणाला " हे रघुनंदना, महापराक्रमी मध्यम भ्रात्यानें कामगिरी बजाविलेली आहे " ११. कारण, महाराजांच्या आगमनाविषयीं एकसारखी

संतापं हृदये कृत्वा आर्यस्यागमनं प्रति १२ दुःखानि च बहूनीह अनुभूतानि पार्थिव १३ शयानो दुःखशय्यासु नन्दिग्रामे महायशाः ।, फलमूलाशनो भूत्वा जटी चीरधरस्तथा १४ अनुभूयद्दशं दुःखमेष राघवनन्दनः । प्रेष्ये मयि स्थिते राजन्न भूयः क्लेशमाप्नुयात् १५ तथा ब्रुवति शत्रुघ्ने राघवः पुनरब्रवीत् । एवं भवतु काकुत्स्थ क्रियतां मम शासनम् १६ राज्ये त्वामभिषेक्ष्यामि मधोस्तु नगरं शुभे । निवेशय महाबाहो भरतं यद्यवेक्षसे १७ शूरस्त्वं कृतविद्यश्च समर्थश्च निवेशने । नगरं यमुनाजुष्टं तथा जनपदाञ्शुभान् १८ यो हि वंशं समुत्पाद्य पार्थिवस्य निवेशने । न विधत्ते नृपं तत्र नरकं स हि गच्छति १९ स त्वं हत्वा मधुसुतं लवणं पापनिश्चयम् । राज्यं प्रशाधि धर्मेण वाक्यं मे यद्यवेक्षसे २० उत्तरं च न वक्तव्यं शूर वाक्यान्तरे मम । बालेन पूर्वजस्याज्ञा कर्तव्या नात्र संशयः २१ अभिषेकं च काकुत्स्थ प्रतीच्छस्व ममोद्यतम् । वसिष्ठप्रमुखैर्विप्रैर्विधिमन्त्रपुरस्कृतम् २२ [ २८८८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ॥ ६२ ॥

---

मनामध्यें काळजी करीत करीत पूर्वी शून्य झालेल्या ह्या अयोध्या नगरीचें ह्या महात्म्यानें परिपालन केलें आहे १२ आणि, हे राजा, येथें त्यानें फारच दुःखें भोगिलीं आहेत १३. हा महाकीर्तिमान् भ्राता सुखरहित शय्येवर नंदिग्रामामध्यें शयन करीत असे आणि जटा व वल्कलें धारण करून हा फलमूलांवर निर्वाह करीत असे १४. "रागेश, हे राजा, अशाप्रकारचें दुःख भोगिलेल्या ह्या रघुवंशजाला, मी दास उभा असतांना, पुनरपि क्लेश प्राप्त होणें योग्य नाहीं " १५. ह्याप्रमाणें शत्रुघ्नाचें बोलणें चाललें असतांना पुनरपि रघुवंशज राम त्याला ह्मणाला " ठीक आहे; हे ककुत्स्थकुलोत्पन्ना, तूं माझी आज्ञा शेवटास ने १६. मधूच्या शुभ नगरामध्यें मी तुला राज्याभिषेक करीन, हे महापराक्रमी शत्रुघ्ना, भरताची जर तुला काळजी वाटत असेल तर तूं त्याला येथेंच ठेव १७. तूं शूर व विद्यासंपन्न असल्यामुळें स्थिरस्थावर करण्यास समर्थ आहेस. यमुनेचें तीरीं असलेलें नगर आणि त्याचप्रमाणें ते शुभ देश ह्यांचें तूं स्थिरस्थावर करशील " १८. राजकुलामध्यें जो जन्मास येऊन राष्ट्रांत राजाची योजना करीत नाहीं तो नरकाला जातो १९. तस्मात्, दुर्बुद्धि मधुपुत्र जो लवण ह्याचा तूं वध कर आणि माझी आज्ञा शेवटास नेणें असल्यास तेथें धर्मानें राज्यही तूं च कर २०. हे शूरा, माझ्या बोलण्यावर तूं उत्तर करूं नकोस. कनिष्ठानें ज्येष्ठ भ्रात्याची आज्ञा मान्य केलीच पाहिजे ह्यांत संशय नाहीं २१. सारांश, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना शत्रुघ्ना, मी मनामध्यें योजिलेला राज्याभिषेक वसिष्ठप्रभृति विप्रांकडून तूं

एवमुक्तस्तु रामेण परां व्रीडामुपागमत् । शत्रुघ्नो वीर्यसंपन्नो मन्दं मन्दमुवाच ह १ अधर्मं विद्म काकुत्स्थ अस्मिन्नर्थे नरेश्वर । कथं तिष्ठत्सु ज्येष्ठेषु कनीयानभिषिच्यते २ अवश्यं करणीयं च शासनं पुरुषर्षभ । तव चैव महाभाग शासनं दुरतिक्रमम् ३ त्वत्तो मया श्रुतं वीर श्रुतिभ्यश्च मया श्रुतम् । नोत्तरं हि मया वाच्यं मध्यमे प्रतिजानति ४ व्याहृतं दुर्वचो घोरं हन्तास्मि लवणं मृधे । तस्यैवं मे दुरुक्तस्य दुर्गतिः पुरुषर्षभ ५ उत्तरं न हि वक्तव्यं ज्येष्ठेनाभिहिते पुनः । अधर्मसहितं चैव परलोकविवर्जितम् ६ सोऽहं द्वितीयं काकुत्स्थ न वक्ष्यामीति चोत्तरम् । मा द्वितीयेन दण्डो वै निपतेन्मयि मानद ७ कामकारो ह्यहं राजंस्तवास्य पुरुषर्षभ । अधर्मं जहि काकुत्स्थ मत्कृते रघुनन्दन ८ एवमुक्ते तु शूरेण शत्रुघ्नेन महात्मना । उवाच रामः संहृष्टो भरतं लक्ष्मणं तथा ९ संभारानभिषेकस्य आनयध्वं समा-

---

यथाविधि व समंत्रक स्वीकार २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं बासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६२ ॥

ह्याप्रमाणें रामानें भाषण केलें असतां ( तो वीर्यवान् ) शत्रुघ्न अतिशय लज्जित झाला आणि हळूं हळूं ह्मणाला १ " हे ककुत्स्थकुलोत्पन्ना राजा, ह्या राज्याभिषेकाविषयीं आह्मी हा अधर्म समजतों. ज्येष्ठ भ्राते विद्यमान असतांना कनिष्ठाला अभिषेक होईल कसा ? २. हे पुरुषश्रेष्ठ, आपली आज्ञा तर मला अवश्य शेवटास नेली पाहिजे. कारण, हे महाशय, आपली आज्ञा अनुल्लंघनीय आहे ३. हे वीरा, ज्येष्ठ भ्रात्याच्या भाषणावर मीं उत्तर करणें योग्य नाहीं हें मीं आपल्यापासून व श्रुतींपासूनही श्रवण केलें आहे; परंतु, मधल्या भ्रात्यानें प्रतिज्ञा केली असतां ( तिकडे लक्ष्य न देतां ) ४. संग्रामामध्यें लवणाचा वध करणारा मी आहें असें भयंकर दुर्भाषणही मीं केलें. तस्मात्. हे पुरुषश्रेष्ठा, त्या माझ्या दुर्भाषणाचें फल ह्मणून मला दुर्गति प्राप्त होणार आहे ५. सारांश, ज्येष्ठ भ्रात्यानें भाषण केलें असतां त्यावर कनिष्ठ भ्रात्यानें उलट उत्तर देणें योग्य नाहीं. कारण, तसें करणें हें धर्मविरुद्ध असून परलोकविघातकही आहे ६. तात्पर्य, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना मान्य राजा, ज्येष्ठ भ्रात्याच्या भाषणानंतर मीं उलट उत्तर करूं नयें तें केलें; ह्यामुळें राज्याभिषेकरूप एक दंड मला झाला आहे. तस्मात्, आपलीं ही आज्ञा अमान्य करून दुसऱ्यानें मला दंड प्राप्त होण्यांत कांहीं अर्थ नाहीं ७. ह्यास्तव, हे पुरुषश्रेष्ठा राजा, मी आपला आज्ञाधारक आहें; परंतु, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रघुनंदना, ही आज्ञा मान्य केल्यामुळें लागणारें पातक आपण माझ्या करितां नाहींसें करा " ८. ह्याप्रमाणें महात्म्या शूर शत्रुघ्नानें भाषण केलें असतां राम आनंदित होऊन भरताला व लक्ष्मणाला ह्मणाला ९ " तुह्मी सावध राहून अभिषेकाचें

हिताः। अद्यैव पुरुषव्याघ्रमभिषेक्ष्यामि राघवम् १० पुरोधसं च काकुत्स्थ नैगमानृत्विजस्तथा। मन्त्रिणश्चैव तान्सर्वानानयध्वं ममाज्ञया ११ राज्ञः शासनमाज्ञाय तथाऽकुर्वन्महारथाः। अभिषेकसमारम्भं पुरस्कृत्य पुरोधसम्॥ प्रविष्टा राजभवनं राजानो ब्राह्मणास्तथा १२ ततोऽभिषेको ववृधे शत्रुघ्नस्य महात्मनः। संप्रहर्षकरः श्रीमान्राघवस्य पुरस्य च १३ अभिषिक्तस्तु काकुत्स्थो बभौ चादित्यसंनिभः। अभिषिक्तः पुरा स्कन्दः सेन्द्रैरिव दिवौकसैः १४ अभिषिक्ते तु शत्रुघ्ने रामेणाक्लिष्टकर्मणा। पौराः प्रमुदिताश्चासन्ब्राह्मणाश्च बहुश्रुताः १५ कौसल्या च सुमित्रा च मङ्गलं कैकयी तथा। चक्रुस्ता राजभवने याश्चान्या राजयोषितः १६ ऋषयश्च महात्मानो यमुनातीरवासिनः। हतं लवणमाशंसुः शत्रुघ्नस्याभिषेचनात् १७ ततोऽभिषिक्तं शत्रुघ्नमङ्कमारोप्य राघवः। उवाच मधुरां वाणीं तेजस्तस्याभिपूरयन् १८ अयं शरस्त्वमोघस्ते दिव्यः परपुरंजयः। अनेन लवणं सौम्य हन्तासि रघुनन्दन १९ सृष्टः शरोऽयं काकुत्स्थ यदा शेते महार्णवे। स्वयंभूरजितो दिव्यो यं नापश्यन्सुरासुराः २० अदृश्यः सर्वभूतानां तेनायं हि

---

साहित्य आणा. ह्या रघुवंशज व पुरुषश्रेष्ठ शत्रुघ्नाला मी आजच अभिषेक करितों १०. हे ककुत्स्थकुलोत्पन्न, पुरोहित, वेदवेत्ते ऋत्विज आणि ते सर्व मंत्री तुह्मी माझ्या आज्ञेनें घेऊन या" ११. ही राजाची आज्ञा जाणून त्या महारथ्यांनीं त्याप्रमाणें केलें आणि अभिषेकसामग्री बरोबर घेऊन व पुरोहित वसिष्ठांना पुढें करून राजे व त्याचप्रमाणें ब्राह्मण राजवाड्यामध्यें शिरले १२. नंतर महात्म्या शत्रुघ्नाच्या अभिषेकाला सुरवात झाली व तो महाभिषेक रघुवंशजरामाला व नगराला आनंद देणारा झाला १३. ककुत्स्थकुलोत्पन्न शत्रुघ्नाला अभिषेक झाला असतां पूर्वी इंद्रासहवर्तमान देवांनीं अभिषेक केलेल्या स्कंदाप्रमाणें तो उज्ज्वल दिसूं लागला १४. सदाचरणसंपन्न रामानें शत्रुघ्नाला अभिषेक केल्यावर नागरिक जन व बहुश्रुत ब्राह्मण आनंदित झाले १५; कौसल्या, सुमित्रा, कैकेयी आणि इतरही राजस्त्रिया ह्यांनीं राजवाड्यामध्यें मंगल केलें १६; व यमुनातीरनिवासी ऋषि शत्रुघ्नाला अभिषेक झाल्यामुळेंच लवण वध पावला असें निश्चयानें समजूं लागले १७. तदनंतर अभिषेक झालेल्या शत्रुघ्नाला मांडीवर घेऊन त्याचें तेज वृद्धिंगत करण्याकरितां राम मधुरवाणीनें त्याला ह्मणाला १८ "हे रघुनंदना सौम्य शत्रुघ्ना, शत्रुसमुदाय जिंकणारा व दिव्य असा हा अमोघ शर आहे; ह्याच्या योगानें तूं लवणाचा वध करशील १९. हे काकुत्स्था, जो स्वयंभु, अजिंक्य व दिव्य परमेश्वर महासागरामध्यें शयन करीत असतांना देवदैत्यांनाही अदृश्य असतो ह्मणजे अर्थात्‌च त्यावेळीं जो सर्व प्राण्यांना दृश्य नसतो त्यानें, हे वीरा, त्रैलोक्य उत्पन्न करण्याची इच्छा धरून व दुरात्मे

शरोत्तमः । सृष्टः क्रोधाभिभूतेन विनाशार्थं दुरात्मनोः २१ मधुकैटभयो-र्वीर विघाते सर्वरक्षसाम् । स्रष्टुकामेन लोकांस्त्रींस्तौ चानेन हतौ युधि २२ तौ हत्वा जनभोगार्थे कैटभं तु मधुं तथा । अनेन शरमुख्येन ततो लोकां-श्चकार सः २३ नायं मया शरः पूर्वं रावणस्य वधार्थिना । मुक्तः शत्रुघ्न भूतानां महान्ह्रासो भवेदिति २४ यच्च तस्य महच्छूलं त्र्यम्बकेण महा-त्मना । दत्तं शत्रुविनाशाय मधोरायुधमुत्तमम् २५ तत्संनिक्षिप्य भवने पूज्यमानं पुनः पुनः । दिशः सर्वाः समासाद्य प्राप्नोत्याहारमुत्तमम् २६ यदा तु युद्धमाकाङ्क्षन्यदि कश्चित्समाह्वयेत् । तदा शूलं गृहीत्वा तु भस्म रक्षः करोति हि २७ स त्वं पुरुषशार्दूल तमायुधविनाकृतम् । अप्रविष्टं पुरं पूर्वं द्वारि तिष्ठ धृतायुधः २८ अप्रविष्टं च भवनं युद्धाय पुरुषर्षभ । आह्व-येथा महाबाहो ततो हन्तासि राक्षसम् २९ अन्यथा क्रियमाणे तु अवध्यः स भविष्यति । यदि त्वेवं कृते वीर विनाशमुपयास्यति ३० एतत्ते सर्वमा-ख्यातं शूलस्य च विपर्ययः । श्रीमतः शितिकण्ठस्य कृत्यं हि दुरतिक्र-मम् ३१ [ २९१९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥ ६३ ॥

---

मधुकैटभ व इतरही सर्व राक्षस ह्यांच्या नाशाकरितां क्रुद्ध होऊन हा उत्कृष्ट बाण निर्माण केला आहे आणि संग्रामामध्यें ह्या बाणाच्या योगानें त्या उभयतां मधुकैटभांचा वध झाला आहे २०,२१,२२. प्रजाजनांच्या सुखाकरितां मधुकैटभांचा ह्या श्रेष्ठ बाणानें वध केल्यावर त्यानें त्रैलोक्य उत्पन्न केलें २३. परंतु, हे शत्रुघ्ना, पूर्वी रावणाचा वध कर-ण्याचा माझा उद्देश असूनही प्राण्यांचा मोठा ऱ्हास होऊं नये एतदर्थ मीं हा बाण त्याच्यावर सोडिला नाहीं २४. असो. महात्म्या त्र्यंबकानें मधुदैत्याला जें महाशूलरूप उत्कृष्ट आयुध शत्रुनाशार्थ दिलें आहे २५ तें घरीं ठेवून हा वारंवार त्याचें पूजन करीत असतो; मग चोहोंकडे जाऊन हा आपल्या मनाप्रमाणें भक्ष्य मिळवीत असतो २६ आणि जेव्हां कोणी युद्धाकरितां ह्याला आह्वान करितो तेव्हां शूल घेऊन हा राक्षस त्याचें भस्म करीत असतो २७. तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठ, त्याच्यापाशीं आयुध नसतांना ह्मणजे तो नगरामध्यें प्रविष्ट झाला नसतांना तूं आधींच आयुधासहवर्तमान द्वारामध्यें उभा रहा २८; आणि, हे पुरुषश्रेष्ठा, तो घरांत शिरण्यापूर्वींच तूं त्याला युद्धार्थ आह्वान कर. ह्मणजे, हे महापरा-क्रमी शत्रुघ्ना, तुझ्या हातून त्या राक्षसाचा वध होईल २९. परंतु, ह्या माझ्या सांगण्याचें विरुद्ध तूं वागूं लागल्यास तो अवध्य होईल; आणि हे वीरा, ह्याप्रमाणें केलें असतां त्याचा नाश होईल ३०. असो. श्रीमान् नीलकंठानें जें केलें आहे त्याचें अतिक्रमण

एवमुक्त्वा च काकुत्स्थं प्रशस्य च पुनःपुनः । पुनरेवापरं वाक्यमु-
वाच रघुनन्दनः १ इमान्यश्वसहस्राणि चत्वारि पुरुषर्षभ । रथानां द्वे सहस्रे
च गजानां शतमुत्तमम् २ अन्तरापणवीथ्यश्च नानापण्योपशोभिताः ।
अनुगच्छन्तु काकुत्स्थं तथैव नटनर्तकाः ३ हिरण्यस्य सुवर्णस्य नियुतं
पुरुषर्षभ । आदाय गच्छ शत्रुघ्न पर्याप्तधनवाहनः ४ बलं च सुभृतं वीर हृष्टपुष्ट-
मनुद्धतम् । संभाषासंप्रदानेन रञ्जयस्व नरोत्तम ५ न ह्यर्थास्तत्र तिष्ठन्ति
न दारा न च बान्धवाः । सुप्रीतो भृत्यवर्गस्तु यत्र तिष्ठति राघव ६ अतो
हृष्टजनाकीर्णां प्रस्थाप्य महतीं चमूम् । एक एव धनुष्पाणिर्गच्छ त्वं मधुनो
वनम् ७ यथा त्वां न प्रजानाति गच्छन्तं युद्धकाङ्क्षिणम् । लवणस्तु मधोः
पुत्रस्तथा गच्छेरशङ्कितम् ८ न तस्य मृत्युरन्योऽस्ति कश्चिद्धि पुरुषर्षभ ।
दर्शनं योऽभिगच्छेत स वध्यो लवणेन हि ९ स ग्रीष्मे अपयाते तु वर्षा-
रात्र उपागते । हन्यास्त्वं लवणं सौम्य स हि कालोऽस्य दुर्मतेः १० मह-

---

होणें शक्य नाहीं. ह्यास्तव, शूल कसा टाळावा हें सांगून इतरही हें सर्व मीं तुला कथन केलें आहे ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६३ ॥

ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न शत्रुघ्नाला सांगून व त्याची वारंवार प्रशंसा करून पुनरपि रघुनंदन राम त्याला ह्मणाला १ " हे पुरुषश्रेष्ठा, हे चारहजार अश्व, दोनहजार रथ व शंभर उत्तम गज तयार आहेत २ ; आणि नगराच्या पेठेंतील मार्गही नानाप्रकारच्या विक्रेय वस्तूंनीं सुशोभित केले आहेत; त्याचप्रमाणें नट व नर्तकही काकुत्स्थाच्या बरोबर जावयाचे आहेत ३. तस्मात्, हे पुरुषश्रेष्ठा शत्रुघ्ना, पुरेसें धन व वाहनें घेऊन आणि एक लक्ष उत्कृष्ट मोहराही बरोबर घेऊन तूं जा ४; आणि हे पुरुषोत्तमा, हे वीरा, हर्षयुक्त, तुष्ट, आणि विनयशील असें जें हें चांगल्यारीतीनें पोसलेलें सैन्य त्यालाही तूं संभाषणाच्या योगानें आनंद दे ५. कारण, हे राघवा, सुप्रसन्न झालेल्या सेवकवर्गाचा जेथें उपयोग होतो तेथें स्त्रियांचा, बांधवांचा अथवा द्रव्याचा उपयोग होत नाहीं. ६. तस्मात्, हर्षयुक्त जनांनीं भरलेली अशी मोठी सेना पुढें पाठवून तूं एकटाच हातांत धनुष्य घेऊन मधूच्या वनामध्यें जा ७; परंतु, तूं युद्धाच्या इच्छेनें जात आहेस ही गोष्ट त्या मधुपुत्र लवणाला न समजेल अशा रीतीनें आगमनाची शंका ही न आणूं देतां जा ८. हे पुरुषश्रेष्ठा, त्या ठिकाणीं दुसरा कोणी मृत्यु नाहीं; जो दृष्टीं पडेल त्याचा लवणाच्या हातून वध होत असतो ९. ह्यास्तव, ग्रीष्मऋतु संपून वर्षाऋतु लागल्यावर, हे विनय संपन्न शत्रुघ्ना, त्या लवणाचा तूं वध कर. कारण, ती ह्या अविचारी राक्षसाची वेळ ठरलेली आहे १०.

पीनंतु पुरस्कृत्य प्रयान्तु तव सैनिकाः । यथा ग्रीष्मावशेषेण तरेयुर्जाह्नवी-
जलम् ११ तत्र स्थापय बलं सर्वं नदीतीरे समाहितः । अग्रतो धनुषा सार्धं
गच्छ त्वं लघुविक्रम १२ एवमुक्तस्तु रामेण शत्रुघ्नस्तान्महाबलान् । सेना-
मुख्यान्समानीय ततो वाक्यमुवाच ह १३ एते वो गणिता वासा यत्र तत्र
निवत्स्यथ । स्थातव्यं चाविरोधेन यथा बाधा न कस्यचित् १४ तथा तांस्तु
समाज्ञाप्य प्रस्थाप्य च महद्बलम् । कौसल्यां च सुमित्रां च कैकेयीं चाभ्य-
वादयत् १५ रामं प्रदक्षिणीकृत्य शिरसाभिप्रणम्य च । लक्ष्मणं भरतं चैव
प्रणिपत्य कृताञ्जलिः १६ पुरोहितं वसिष्ठं च शत्रुघ्नः प्रयतात्मवान् । रामेण
चाभ्यनुज्ञातः शत्रुघ्नः शत्रुतापनः ॥ प्रदक्षिणमथो कृत्वा निर्जगाम महा-
बलः १७ निर्याप्य सेनामथ सोऽग्रतस्तदा गजेन्द्रवाजिप्रवरौघसंकुलाम् ।
उपास्यमानः स नरेन्द्रपार्श्वतः प्रतिप्रयातो रघुवंशवर्धनः १८ [ २९३७ ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे चतुःषष्टि-
तमः सर्गः ॥ ६४ ॥

प्रस्थाप्य च बलं सर्वं मासमात्रोषितः पथि । एक एवाशु शत्रुघ्नो जगाम

---

महर्षींना पुढें करून तुझ्या सैनिकांनीं आधींच गेलें पाहिजे. कारण, ग्रीष्मऋतु कांहीं हीं अवशिष्ट आहे तोंच ते गेले असतां गंगा उतरून त्यांना जातां येईल ११. त्या ठिकाणीं नदीचे तीरीं तूं सर्व सैन्य ठेव आणि हे, शीघ्रगति शत्रुघ्ना, धनुष्य बरोबर घेऊन सावधपणानें तूं पुढें जा." १२. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां त्या महाबलाढ्य सेनाधिपतींना" आणवून शत्रुघ्न ह्मणाला १३ "हे तुमचे मुक्काम ठरलेले आहेत; त्याप्रमाणें तुह्मी त्या त्या ठिकाणीं वास्तव्य करा आणि आपआपसांत विरोधबुद्धि न धरितां कोणालाही पीडा होणार नाहीं अशा रीतीनें तुह्मी रहा " १४. ह्याप्रमाणें त्या सेनाधिपतींना सांगून व मोठें सैन्य रवाना करून कौसल्या, सुमित्रा व कैकेयी ह्यांना त्यानें अभिवंदन केलें १५; रामाला प्रदक्षिणा व मस्तकानें प्रणाम केल्यावर त्या शत्रुघ्नानें हात जोडून भरत व लक्ष्मण ह्यांनाही प्रणिपात केला १६; जितेंद्रिय शत्रुघ्नानें पुरोहित वसिष्ठांनाही प्रणाम केला आणि रामाची अनुज्ञा घेतल्यावर तो महाबलाढ्य व शत्रुतापन शत्रुघ्न पुनरपि त्याला प्रदक्षिणा करून बाहेर पडला १७. असो. महागज आणि उत्कृष्ट अश्व ह्यांच्या समुदायानें व्याप्त झालेली सेना पुढें पाठविल्यानंतर रघुवंशाची कीर्ति वृद्धिंगत करणारा तो शत्रुघ्न सेवकजन सेवा करीत असतांना राजापासून चालता झाला १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चौसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६४ ॥

त्वरितं तदा १ द्विरात्रमन्तरे शूर उष्य राघवनन्दनः। वाल्मीकेराश्रमं पुण्य-
मगच्छद्वासमुत्तमम् २ सोऽभिवाद्य महात्मानं वाल्मीकिं मुनिसत्तमम्।
कृताञ्जलिरथो भूत्वा वाक्यमेतदुवाच ह ३ भगवन्वस्तुमिच्छामि गुरोः
कार्यादिहागतः। श्वः प्रभाते गमिष्यामि प्रतीचीं दारुणां दिशम् ४ शत्रु-
घ्नस्य वचः श्रुत्वा प्रहस्य मुनिपुंगवः। प्रत्युवाच महात्मानं स्वागतं ते महा-
यशः ५ स्वमाश्रममिदं सौम्य राघवाणां कुलस्य वै। आसनं पाद्यमर्घ्यं च
निर्विशङ्कः प्रतीच्छ मे ६ प्रतिगृह्य तदा पूजां फलमूलं च भोजनम्। भक्ष-
यामास काकुत्स्थस्तृप्तिं च परमां गतः ७ स भुक्त्वा फलमूलं च महर्षिं
तमुवाच ह। पूर्वा यज्ञविभूतीयं कस्याश्रमसमीपतः ८ तत्तस्य भाषितं श्रुत्वा
वाल्मीकिर्वाक्यमब्रवीत्। शत्रुघ्न शृणु यस्येदं बभूवायतनं पुरा ९ युष्माकं
पूर्वको राजा सौदासस्तस्य भूपतेः। पुत्रो वीर्यसहो नाम वीर्यवानति-
धार्मिकः १० स बाल एव सौदासो मृगयामुपचक्रमे। चञ्चूर्यमाणं ददृशे
स शूरो राक्षसद्वयम् ११ शार्दूलरूपिणौ घोरौ मृगान्बहुसहस्रशः। भक्ष-

सर्व सैन्य रवाना केल्यावर एक महिनाभर अयोध्येमध्यें राहून तो शत्रुघ्न एकटाच मोठ्या त्वरेनें मार्गाला लागला १; आणि दोन रात्रीं मार्गामध्यें वास्तव्य केल्यानंतर तो रघुनंदन शूर शत्रुघ्न वाल्मीकिमुनींच्या पवित्र व उत्कृष्ट आश्रमामध्यें वास्तव्य करण्याकरितां गेला २. गेल्यानंतर महात्म्या मुनिश्रेष्ठ वाल्मीकींना त्यानें अभिनंदन केलें आणि हात जोडून तो ह्मणाला ३ " हे भगवन्, ज्येष्ठ भ्रात्यानें कांहीं कार्य सांगितलें असल्यामुळें तें करण्याकरितां मी येथें आलों असून येथें राहण्याची माझी इच्छा आहे; उदयीक प्रातःकालीं भयंकर अशा पश्चिम दिशेस मी जाईन " ४. शत्रुघ्नाचें हें भाषण श्रवण करून मुनिश्रेष्ठ वाल्मीकि हंसले आणि त्या महात्म्याला ह्मणाले " हे महाकीर्तिमान् शत्रुघ्ना, तुझें स्वागत असो ५. हे विनयसंपन्ना, हा आश्रम ह्मणजे रघुकुलांतील पुरुषांचा स्वतःचाच होय. ह्यास्तव, तूं कसलीही शंका मनामध्यें न आणितां माझें आसन, पाद्य व अर्घ्य ह्यांचा स्वीकार कर " ६. ह्यानंतर त्या सत्काराचा व फलमूलांचा स्वीकार करून ककुत्स्थकुलोत्पन्न शत्रुघ्नानें पराकाष्ठेची तृप्ति होईपर्यंत भोजन केलें ७. ह्याप्रमाणें फलमूलें भक्षण केल्यानंतर तो त्या महर्षींना ह्मणाला " आश्रमासमीपच पूर्वं सांठलेली ही यज्ञसामग्री कोणाची आहे ? " ८. हें त्याचें भाषण श्रवण करून वाल्मीकि ह्मणाले " हे शत्रुघ्ना, हें स्थान पूर्वीं कोणाचें होतें हें तूं ऐक ९. सौदास राजा तुमच्या एक पूर्वज होऊन गेला; त्या भूपतीला वीर्यसह ह्मणून एक वीर्यवान् व अतिधार्मिक पुत्र होता १०. तो सौदास बाल असतांनाच मृगयेला गेला असतां एक सारखें संचार करीत असलेले

माणावसंतुष्टौ पर्याप्तिं नैव जग्मतुः १२ स तु तौ राक्षसौ दृष्ट्वा निर्मृगं च वनं कृतम् । क्रोधेन महताविष्टो जघानैकं महेषुणा १३ विनिपात्य तमेकं तु सौदासः पुरुषर्षभः । विज्वरो विगतामर्षो हतं रक्षो ह्युदैक्षत १४ निरीक्षमाणं तं दृष्ट्वा सहायं तस्य रक्षसः । संतापमकरोद्घोरं सौदासं चेदमब्रवीत् १५ यस्मादनपराधं तं सहायं मम जघ्निवान् । तस्मात्तवापि पापिष्ठ प्रदास्यामि प्रतिक्रियाम् १६ एवमुक्त्वा तु तद्रक्षस्तत्रैवान्तरधीयत । कालपर्याययोगेन राजा मित्रसहोऽभवत् १७ राजापि यजते यज्ञमस्याश्रमसमीपतः । अश्वमेधं महायज्ञं तं वसिष्ठोऽप्यपालयत् १८ तत्र यज्ञो महानासीद्बहुवर्षगणायुतः ।समृद्धः परया लक्ष्म्या देवयज्ञसमोऽभवत् १९ अथावसाने यज्ञस्य पूर्ववैरमनुस्मरन् । वसिष्ठरूपी राजानमिति होवाच राक्षसः २० अद्य यज्ञावसानान्ते सामिषं भोजनं मम । दीयतामिति शीघ्रं वै नात्र कार्या विचारणा २१ तच्छ्रुत्वा व्याहृतं वाक्यं रक्षसा ब्रह्मरूपिणा । सूदान्संस्कारकुशलानुवाच पृथिवीपतिः २२ हविष्यं सामिषं स्वादु यथा भवति भोजनम् । तथा कुरुत

---

दोन राक्षस त्या शूराच्या दृष्टीं पडले ११. ते घोर राक्षस व्याघ्ररूप धारण करून हजारों मृग भक्षण करीत होते; तथापि, त्या अधाशांची तृप्ति झाली नाहीं १२. तेव्हां मृगरहित झालेलें तें वन व ते राक्षस अवलोकन करून त्याला अतिशय क्रोध आला आणि त्यांतील एकाचा त्यानें मोठ्या बाणानें वध केला १३. ह्याप्रमाणें त्या एकाचा निःपात करून चिंतारहित व क्रोधरहित झालेला तो पुरुषश्रेष्ठ सौदास वध पावलेल्या राक्षसाकडे पाहूं लागला १४. तेव्हां तो त्याच्याकडे पहात आहे असें अवलोकन करून त्या राक्षसाच्या दुसऱ्या मित्राला भयंकर संताप आला व तो सौदासाला ह्मणाला १५ "ज्याअर्थीं अपराध नसतांना तूं माझ्या मित्राचा वध केला आहेस त्याअर्थीं, हे महापाप्या, मीही तुझा सूड घेईन " १६. ह्याप्रमाणें बोलून तो राक्षस तेथेंच गुप्त झाला आणि बराच काळ लोटल्यानंतर तो मित्रसह राजा झाला १७. ह्या आश्रमाचे संनिध राजा अश्वमेधनामक महायज्ञ करीत असे व वसिष्ठमुनि त्याचें रक्षण करीत असत १८. ह्या ठिकाणीं अनेक वर्षसमुदाय लोटेपर्यंत एक मोठा यज्ञ चालला होता व तो यज्ञ उत्कृष्ट ऐश्वर्यानें युक्त असून देवयज्ञाची बरोबरी करणारा होता १९. हा यज्ञ समाप्त झाल्यावर पूर्वीचें वैर ध्यानांत आणून त्या राक्षसानें वसिष्ठरूप धारण केलें आणि तो राजाला ह्मणाला २० " आज यज्ञ समाप्त झाला असल्यामुळें तूं मला मांसयुक्त भोजन सत्वर दे; ह्यासंबंधानें तुला शंका येण्याचें कारण नाहीं " २१. हें मुनिरूप धारण केलेल्या राक्षसानें उच्चारिलेलें भाषण श्रवण करून पाकक्रियेंत निष्णात असलेल्या आचाऱ्यांना भूपति ह्मणाला २२ मांसयुक्त व स्वादिष्ठ असें हविष्य अन्न सत्वर तयार करा;

शीघ्रं वै परितुष्येद्यथा गुरुः २३ शासनात्पार्थिवेन्द्रस्य सूदः संभ्रान्तमानसः तच्च रक्षः पुनस्तत्र सूदवेषमथाकरोत् २४ स मानुषमथो मांसं पार्थिवाय न्यवेदयत् । इदं स्वादु हविष्यं च सामिषं चान्नमाहृतम् २५ स भोजनं वसिष्ठाय पत्न्या सार्धमुपाहरत् । मदयन्त्या नरश्रेष्ठ सामिषं रक्षसा हृतम् २६ ज्ञात्वा तदामिषं विप्रो मानुषं भोजनागतम् । क्रोधेन महताविष्टो व्याहर्तुमुपचक्रमे २७ यस्मात्त्वं भोजनं राजन्ममैतद्दातुमिच्छसि । तस्माद्भोजनमेतत्ते भविष्यति न संशयः २८ ततः क्रुद्धस्तु सौदासस्तोयं जग्राह पाणिना। वसिष्ठं शप्तुमारेभे भार्या चैनमवारयत् २९ राजन्प्रभुर्यतोऽस्माकं वसिष्ठो भगवानृषिः । प्रतिशप्तुं न शक्तस्त्वं देवतुल्यं पुरोधसम् ३० ततः क्रोधमयं तोयं तेजोबलसमन्वितम् । व्यसर्जयत धर्मात्मा ततः पादौ सिषेच च ३१ तेनास्य राज्ञस्तौ पादौ तदा कल्माषतां गतौ । तदाप्रभृति राजासौ सौदासः सुमहायशाः ३२ कल्माषपादः संवृत्तः ख्यातश्चैव तथा नृपः ३३ स राजा सह पत्न्या वै प्रणिपत्य मुहुर्मुहुः । पुनर्वसिष्ठं प्रोवाच यदुक्तं ब्रह्मरूपिणा ३४

---

ह्मणजे गुरु संतुष्ट होतील " २३. ह्या राजाच्या आज्ञेमुळें आचारी मनामध्यें गोंधळून गेला; परंतु, पुनरपि त्या राक्षसानेंच त्या ठिकाणीं आचाऱ्याचा वेष धारण केला २४. नंतर " हें मांसयुक्त व स्वादिष्ठ हविष्य अन्न आणिलें आहे असें ह्मणून त्यानें मानुषमांस राजाच्या स्वाधीन केलें असतां २५, हे पुरुषश्रेष्ठा शत्रुघ्ना, वसिष्ठमुनींना, राक्षसानें आणिलेलें तें मांसयुक्त अन्न मदयंती पत्नीसहवर्तमान राजानें अर्पण केलें २६. तेव्हां भोजनार्थ आलेलें तें मांस मानुष आहे असें समजून वसिष्ठमुनि अतिशय क्रुद्ध झाले आणि ह्मणाले २७ हे राजा, ज्याअर्थी तूं हें भोजन मला देण्याचें मनांत आणिलें आहेस त्याअर्थी असलें भोजन निःसंशय तुलाच प्राप्त होईल " २८. हा शाप श्रवण केल्यानंतर सौदास राजानेंही क्रुद्ध होऊन वसिष्ठमुनींना शाप देण्याकरितां हातामध्यें पाणी घेतलें; परंतु, त्याची भार्या त्या गोष्टीचा निषेध करून त्याला ह्मणाली २९ " महाराज, ज्याअर्थी भगवान् वसिष्ठ ऋषि आपले प्रभु आहेत त्याअर्थी त्या देवतुल्य पुरोहितांना उलट शाप देणें आपणांला योग्य नाहीं " ३०. तदनंतर तेज व बल ह्यांनीं युक्त असलेलें तें क्रोधमय उदक त्या धर्मात्म्यानें सोडिलें; परंतु, तें आपल्या पायावरच घेतलें ३१; त्याच्या योगानें त्या राजाचे ते पाय चित्रविचित्र वर्णांनीं युक्त झाले. सारांश, तेव्हांपासून तो अतिकीर्तिमान् सौदास राजा ३२ कल्माषपाद झाला व त्या नांवानेंही तो प्रसिद्ध झाला ३३. असो. पत्नीसहवर्तमान त्या राजानें वसिष्ठाला वारंवार प्रणाम केला आणि ब्राह्मणरूप धारण केलेल्या मायावी राक्षसानें जें सांगितलें होतें तें वसिष्ठमुनींना त्यानें निवेदन केलें ३४. हें महा-

तच्छ्रुत्वा पार्थिवेन्द्रस्य रक्षसा विकृतं च तत् । पुनः प्रोवाच राजानं वसिष्ठः पुरुषर्षभम् ३५ मया रोषपरीतेन यदिदं व्याहृतं वचः । नैतच्छक्यं वृथा कर्तुं प्रदास्यामि च ते वरम् ३६ कालो द्वादशवर्षाणि शापस्यान्तो भविष्यति । मत्प्रसादाच्च राजेन्द्र अतीतं न स्मरिष्यसि ३७ एवं स राजा तं शापमुपभुज्यारिसूदनः । प्रतिलेभे पुना राज्यं प्रजाश्चैवान्वपालयत् ३८ तस्य कल्माषपादस्य यज्ञस्यायतनं शुभम् । आश्रमस्य समीपेऽस्मिन्यन्मां पृच्छसि राघव ३९ तस्य तां पार्थिवेन्द्रस्य कथां श्रुत्वा सुदारुणाम् । विवेश पर्णशालायां महर्षिमभिवाद्य च ४० [२९७७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥ ६५ ॥

यामेव रात्रिं शत्रुघ्नः पर्णशालां समाविशत् । तामेव रात्रिं सीतापि प्रसूता दारकद्वयम् १ ततोऽर्धरात्रसमये बालका मुनिदारकाः । वाल्मीकेः प्रियमाचख्युः सीतायाः प्रसवं शुभम् २ भगवन्रामपत्नी सा प्रसूता दारकद्वयम् । ततो रक्षां महातेजः कुरु भूतविनाशिनीम् ३ तेषां तद्वचनं श्रुत्वा महर्षिः समुपागमत् । बालचन्द्रप्रतीकाशौ देवपुत्रौ महौजसौ ४ जगाम तत्र हृष्टात्मा ददर्श च कुमारकौ । भूतघ्नीं चाकरोत्ताभ्यां रक्षां रक्षोविना-

---

राजाचें भाषण व राक्षसानें केलेला तो अनर्थ श्रवण करून वसिष्ठमुनि पुनरपि त्या श्रेष्ठ राजाला ह्मणाले ३५ "मीं क्रुद्ध होऊन जें हें भाषण केलें आहे तें व्यर्थ होणें शक्य नाहीं. तथापि, मी तुला वर देतों ३६. बारा वर्षें काळ लोटला असतां ह्या शापाची समाप्ति होईल आणि हे राजेंद्रा, माझ्या प्रसादामुळें तुला पूर्वीचें स्मरणार नाहीं" ३७. ह्याप्रमाणें तो शाप भोगिल्यावर त्या शत्रुनाशक राजाला पुनरपि राज्य प्राप्त झालें व त्यानें प्रजेचेंही परिपालन केलें ३८. तात्पर्य, हे रघुनंदना शत्रुघ्ना, तूं जें मला विचारीत आहेस तें हें ह्या आश्रमाचें समीप असलेलें शुभ स्थान त्या कल्माषपाद राजाच्या यज्ञाचें होय" ३९. ही त्या सार्वभौम राजाची अतिभयंकर कथा श्रवण केल्यानंतर महर्षींना अभिवंदन करून शत्रुघ्न पर्णशालेमध्यें शिरला ४०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६५ ॥

ज्या रात्रीं शत्रुघ्न पर्णशालेमध्यें गेला त्याच रात्रीं सीतेलाही दोन जुळे मुलगे झाले १. नंतर मध्यरात्रीचे समयास लहान लहान मुनिकुमार सीतेच्या शुभप्रसवाची प्रिय वार्ता वाल्मीकिमुनींना सांगूं लागले, २. (ते ह्मणाले) "हे भगवन्, त्या रामपत्नीला दोन मुलगे झाले आहेत. ह्यास्तव, हे महातेजस्वी मुने, आपण भूतांपासून त्यांचें रक्षण करावें" ३. हें त्यांचें भाषण श्रवण करून वाल्मीकिमहर्षि बालचंद्राप्रमाणें आल्हादकारक असलेल्या

शिनीम् ५ कुशमुष्टिमुपादाय लवं चैव तु स द्विजः । वाल्मीकिः प्रददौ ताभ्यां रक्षां भूतविनाशिनीम् ६ यस्तयोः पूर्वजो जातः स कुशैर्मन्त्रसत्कृतैः। निर्मार्जनीयस्तु तदा कुश इत्यस्य नाम तत् ७ यश्चावरो भवेत्ताभ्यां लवेन सुसमाहितः । निर्मार्जनीयो वृद्धाभिर्लवेति च स नामतः ८ एवं कुशलवौ नाम्ना तावुभौ यमजातकौ । मत्कृताभ्यां च नामभ्यां ख्यातियुक्तौ भविष्यतः ९ तां रक्षां जगृहुस्तां च मुनिहस्तात्समाहिताः । अकुर्वंश्च ततो रक्षां तयोर्विगतकल्मषाः १० तथा तां क्रियमाणां च वृद्धाभिर्गोत्र नाम च । संकीर्तनं च रामस्य सीतायाः प्रसवौ शुभौ ११ अर्धरात्रे तु शत्रुघ्नः शुश्राव सुमहत्प्रियम् । पर्णशालां ततो गत्वा मातर्दिष्ट्येति चाब्रवीत् १२ तदा तस्य प्रहृष्टस्य शत्रुघ्नस्य महात्मनः । व्यतीता वार्षिकी रात्रिः श्रावणी लघुविक्रमा १३ प्रभाते सुमहावीर्यः कृत्वा पौर्वाह्णिकीं क्रियाम् । मुनिं प्राञ्जलिरामन्त्र्य ययौ पश्चान्मुखः पुनः १४ स गत्वा यमुनातीरं सप्तरा-

---

त्या महातेजस्वी देवपुत्रांसमीप गेले ४; आनंदानें तेथें गेल्यावर ते कुमार त्यांनीं अवलोकन केले आणि भूतें व राक्षस ह्यांपासून निवारण होण्याकरितां त्यांनीं त्यांच्या रक्षणाची तजवीज केली ५. त्या वाल्मीकि ब्रह्मर्षीनीं ( कापिलेली ) एक कुशमुष्टि खालील लवासहवर्तमान ( ह्मणजे तुटलेल्या भागासहवर्तमान ) हातांत घेतली आणि भूतादिकांपासून त्यांचें रक्षण होण्याकरितां दिली ( व ती देतांना ते ह्मणाले ) ६ " ह्यांपैकीं जो प्रथम उत्पन्न झाला असेल त्याच्या अंगावरून वृद्ध स्त्रियांनीं हे " अभिमंत्रित केलेले " कुश फिरवावे व कुश हेंच त्याचें नांव असावें ७. त्याचप्रमाणें ह्यांमध्यें जो कनिष्ठ असेल तो अगदीं स्वस्थ असतांना वृद्ध स्त्रियांनीं लवमुष्टि त्याच्या अंगावरून फिरवावी व लव हेंच त्याचें नांव असावें ८. ह्याप्रमाणें जुळे झालेले ते उभयतां पुत्र कुशलव मीं ठेविलेल्याच नामांनीं प्रसिद्ध होतील " ९. ह्यानंतर मुनींच्या हातांतून तें रक्षणसाधन सावधपणानें वागणाऱ्या वृद्ध स्त्रियांनीं घेतलें आणि त्या निष्कलंकस्त्रिया त्याप्रमाणें त्यांचें रक्षण करूं लागल्या १०. अशा रीतीनें वृद्ध स्त्रियांकडून होऊं लागलेलें तें रक्षण, त्या कुमारांचें गोत्र व नामें, रामनामाचा उच्चार आणि सीतेचीं शुभ अपत्यें ११ अशी फारच मोठी प्रिय वार्ता, पर्णशाळेमध्यें गेल्यानंतर, शत्रुघ्नानें मध्य रात्रीचे सुमारास श्रवण केली आणि " हे माते, फारच आनंदाची गोष्ट झाली ! " असें तो आपल्याशींच ह्मणाला १२. ह्याप्रमाणें तो महात्मा शत्रुघ्न आनंदित झाला असतांनाच पर्जन्यकालांतील ती श्रावण महिन्याची लवकर संपणारी रात्र निघून गेली १३. तेव्हां प्रभात काल झाल्यावर महावीर्यवान् शत्रुघ्नानें पूर्वाण्हसंबंधीं विधि उरकला आणि हात जोडून मुनींची अनुज्ञा घेत-

ोषितः पथि । ऋषीणां पुण्यकीर्तीनामाश्रमे वासमभ्ययात् १५ स तत्र मुनिभिः सार्धं भार्गवप्रमुखैर्नृपः । कथाभिरभिरूपाभिर्वासं चक्रे महायशाः १६ स काञ्चनाद्यैर्मुनिभिः समेतै रघुप्रवीरो रजनीं तदानीम् । कथाप्रकारैर्बहुभिर्महात्मा विरामयामास नरेन्द्रसूनुः १७ [२९९४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे षट्षष्टितमः सर्गः॥६६॥

अथ रात्र्यां प्रवृत्तायां शत्रुघ्नो भृगुनन्दनम् । पप्रच्छ च्यवनं विप्रं लवणस्य यथाबलम् १ शूलस्य च बलं ब्रह्मन्के च पूर्वं विनाशिताः । अनेन शूलमुख्येन द्वन्द्वयुद्धमुपागताः २ तस्य तद्वचनं श्रुत्वा शत्रुघ्नस्य महात्मनः। प्रत्युवाच महातेजा श्च्यवनो रघुनन्दनम् ३ असङ्ख्येयानि कर्माणि यान्यस्य रघुनन्दन । इक्ष्वाकुवंशप्रभवे यद्वृत्तं तच्छृणुष्व मे ४ अयोध्यायां पुरा राजा युवनाश्वसुतो बली । मांधाता इति विख्यातस्त्रिषु लोकेषु वीर्यवान् ५ स कृत्वा पृथिवीं कृत्स्नां शासने पृथिवीपतिः । सुरलोकमितो जेतुमुद्योगमकरोन्नृपः ६ इन्द्रस्य च भयं तीव्रं सुराणां च महात्मनाम् । मांधातरि कृतोद्योगे देवलोकजिगीषया ७ अर्धासनेन शक्रस्य राज्यार्धेन

---

त्यानंतर तो पुनरपि पश्चिमाभिमुख होऊन निघाला १४. यमुनातीरीं गेल्यावर मार्गामध्यें प्रथमपासून एकंदर सात दिवस त्याचें राहणें झालें आणि महाकीर्तिमान् ऋषींच्या आश्रमामध्यें त्यानें वास्तव्य केलें १५. सारांश, त्या ठिकाणीं भार्गवप्रभृति मुनींसहवर्तमान मनोहर गोष्टी चालल्या असतांना त्या महायशस्वी शत्रुघ्नराजाचें वास्तव्य झालें १६. तात्पर्य, तेथें जुळलेल्या कांचनप्रभृति मुनींसहवर्तमान नानाप्रकारच्या गोष्टी सांगत सांगतच त्या रघुवीर व राजपुत्र शत्रुघ्नानें विश्रांति घेतली १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६६ ॥

नंतर रात्र पडल्यावर शत्रुघ्न भृगुनंदन च्यवन ऋषींना ह्मणाला " ब्रह्मन्, लवणाचें व त्याच्या शूलाचें सामर्थ्य किति आहे ? आणि पूर्वीं द्वंद्वयुद्धाला आलेल्या कोणाकोणाचा ह्या मुख्य शूलानें नाश झाला आहे " ? १,२. हा महात्म्या शत्रुघ्नाचा प्रश्न श्रवण करून महातेजस्वी च्यवनमुनि त्या रघुनंदन शत्रुघ्नाला ह्मणाले ३ " हे रघुनंदना, ह्याचीं कर्मे असंख्य आहेत. ह्यास्तव, इक्ष्वाकुवंशांत जन्मलेल्या एका राजाचें काय वृत्त झालें आहे तें तूं माझ्यापासून श्रवण कर " ४. अयोध्येमध्यें पूर्वीं युवनाश्व राजाचा पुत्र बलाढ्य राजा होऊन गेला. तो वीर्यवान् राजा मांधाता ह्मणून त्रैलोक्यांत विख्यात आहे ५. संपूर्ण पृथ्वी पादाक्रांत केल्यावर त्या पृथ्वीपति राजानें येथून देवलोक जिंकण्याचा उद्योग आरंभिला ६. तेव्हां मांधात्यानें देवलोक जिंकण्याच्या उद्देशानें उद्योग सुरू केल्यामुळें

च पार्थिवः । वन्द्यमानः सुरगणैः प्रतिज्ञामध्यरोहत ८ तस्य पापमभिप्रायं विदित्वा पाकशासनः । सान्त्वपूर्वमिदं वाक्यमुवाच युवनाश्वजम् ९ राजा त्वं मानुषे लोके न तावत्पुरुषर्षभ । अकृत्वा पृथिवीं वश्यां देवराज्यमिहेच्छसि १० यदि वीर समग्रा ते मेदिनी निखिला वशे । देवराज्यं कुरुष्वेह सभृत्यबलवाहनः ११ इन्द्रमेवं ब्रुवाणं तं मान्धाता वाक्यमब्रवीत् । क्व मे शक्र प्रतिहतं शासनं पृथिवीतले १२ तमुवाच सहस्राक्षो लवणो नाम राक्षसः । मधुपुत्रो मधुवने न तेऽज्ञां कुरुतेऽनघ १३ तच्छ्रुत्वा विप्रियं घोरं सहस्राक्षेण भाषितम् । व्रीडितोऽवाङ्मुखो राजा व्याहर्तुं न शशाक ह १४ आमन्त्र्य तु सहस्राक्षं प्रायात्किंचिदवाङ्मुखः । पुनरेवागमच्छ्रीमानिमं लोकं नरेश्वरः १५ स कृत्वा हृदयेऽमर्षं सभृत्यबलवाहनः । आजगाम मधोः पुत्रं वशे कर्तुमरिन्दमः १६ स काङ्क्षमाणो लवणं युद्धाय पुरुषर्षभः । दूतं संप्रेषयामास सकाशं लवणस्य सः १७ स गत्वा विप्रियाण्याह बहूनि मधुनः सुतम् । वदन्तमेवं तं दूतं भक्षयामास राक्षसः १८ चिरायमाणे दूते

---

इंद्राला व महात्म्या देवांना अतिशय भय पडलें ७. "इंद्राच्या अर्ध्या आसनावर बसून त्याच्या अर्ध्या राज्याचा अधिपति होईन व देवगणांना वंदन करावयास लावीन" अशी त्या राजानें प्रतिज्ञा केली ८. तेव्हां त्याचा दुष्ट अभिप्राय जाणून इंद्र सांत्वनपूर्वक त्या युवनाश्वपुत्राला ह्मणाला ९ "हे पुरुषश्रेष्ठा, तूं अद्यापि मनुष्यलोकींही राजा झाला नाहींस. तेव्हां पृथ्वी पादाक्रांत केल्याशिवाय तूं देवराज्याची इच्छा करीत आहेस हें काय ? १०. हे वीरा, संपूर्ण पृथ्वी जर तुझ्या स्वाधीन असेल तर सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान तूं येथें स्वर्गामध्यें देवांचें राज्य कर" ११. ह्याप्रमाणें इंद्र बोलूं लागला असतां मांधाता त्याला ह्मणाला "हे इंद्रा, भूतलावर माझा अधिकार कोठें चालत नाहीं ?" १२. ह्यावर इंद्र त्याला ह्मणाला "हे निष्पापा, मधुवनांत राहणारा मधुपुत्र लवणनामक राक्षस तुझी आज्ञा पाळीत नाहीं" १३. इंद्रानें केलेलें हें भयंकर अप्रिय भाषण कानीं पडल्यावर राजा लज्जित झाला व मान खालीं घालून काहींएक बोलेनासा झाला १४. पुढें इंद्राचा निरोप घेऊन व मान किंचित् खालीं घालून तो वैभवशाली राजा तेथून निघाला व पुनरपि ह्या भूतलावर आला १५. नंतर त्या राजाच्या मनामध्यें क्रोध उत्पन्न झाला व शत्रूंचें दमन करणारा तो राजा सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान मधुपुत्राला पादाक्रांत करण्याकरितां मधुवनामध्यें गेला १६. तेथें गेल्यावर लवणाशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें त्या पुरुषश्रेष्ठानें त्याच्याकडे दूत पाठविला असतां १७ तो दूत मधुपुत्राकडे जाऊन त्याला फारच अप्रिय शब्द बोलला. परंतु, ह्याप्रमाणें तो बोलत असतांनाच राक्षसानें त्या

तु राजा क्रोधसमन्वितः । अर्दयामास तद्रक्षः शरवृष्ट्या समन्ततः १९ ततः प्रहस्य तद्रक्षः शूलं जग्राह पाणिना । वधाय सानुबन्धस्य मुमोचायुधमुत्तमम् २० तच्छूलं दीप्यमानं तु सभृत्यबलवाहनम् । भस्मीकृत्वा नृपं भूमौ लवणस्यागमत्करम् २१ एवं स राजा सुमहान्हतः सबलवाहनः । शूलस्य तु बलं सौम्य अप्रमेयमनुत्तमम् २२ श्वः प्रभाते तु लवणं वधिष्यसि न संशयः । अगृहीतायुधं क्षिप्रं ध्रुवो हि विजयस्तव २३ लोकानां स्वस्ति चैवं स्यात्कृते कर्मणि च त्वया । एतत्ते सर्वमाख्यातं लवणस्य दुरात्मनः २४ शूलस्य च बलं घोरमप्रमेयं नरर्षभ । विनाशश्चैव मान्धातुर्यत्नेनाभूच्च पार्थिव २५ त्वं श्वः प्रभाते लवणं महात्मन्वधिष्यसे नात्र तु संशयो मे। शूलं विना निर्गतमामिषार्थं ध्रुवो जयस्ते भविता नरेन्द्र २६ [ ३०२० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः ॥ ६७ ॥

कथां कथयतस्तेषां जयं चाकाङ्क्षतां शुभम् । व्यतीता रजनी शीघ्रं

---

दूताला भक्षण केलें १८. पुढें दूताला परत येण्यास वेळ लागला असें पाहून राजाला क्रोध चढला व त्यानें त्या राक्षसावर सर्व बाजूंनीं बाणवृष्टीच्या योगानें गहजब केला १९. ह्यावर किंचित् हास्य करून त्या राक्षसानें हातामध्यें शूल घेतला व अनुयायांसहवर्तमान राजाचा वध करण्याकरितां तें उत्कृष्ट आयुध त्यानें सोडिलें २०. तेव्हां त्या उज्ज्वल शूलानें सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान भूतलावर राजाचें भस्म केलें आणि पुनरपि तो लवणाच्या हातीं आला २१. ह्याप्रमाणें, हे सौम्य शत्रुघ्ना, त्या प्रचंड राजाचा भृत्य, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान वध झाला. कारण, त्या शूलाचें सामर्थ्य अटकळीच्या बाहेर आहे व त्याला कोणाचीही उपमा नाहीं २२. उदयीक सकाळीं शूलरूप आयुध लवणानें घेतलें नाहीं तोंच तूं त्याचा सत्वर वध करशील व तुझा निःसंशय विजय होईल २३. इतकेंच नव्हें परंतु, तुझ्या हातून हें कर्म झालें ह्मणजे लोकांचेंही कल्याण होईल. असो. दुरात्म्या लवणाचें हें सर्व वृत्त मीं तुला कथन केलें आहे २४. हे पुरुषश्रेष्ठा, त्या शूलाचें भयंकर सामर्थ्य अटकळीच्या बाहेर आहे व तो शूल त्याचेपाशीं असल्यामुळें, हे राजा, मांधाता प्रयत्न करूनही वध पावला आहे २५. सारांश, हे महात्म्या, उदयीक सकाळीं मांसाकरितां लवण शूलाशिवाय बाहेर गेला असतां तूं त्याचा वध करशील ह्याविषयीं मला संशय नाहीं; तुझा जय खात्रीनें होईल २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६७ ॥

महात्म्या शत्रुघ्नाच्या शुभ विजयाची इच्छा करणाऱ्या त्यांच्याशीं गोष्टी चालल्या

शत्रुघ्नस्य महात्मनः १ ततः प्रभाते विमले तस्मिन्काले स राक्षसः । निर्गतस्तु पुराद्वीरो भक्ष्याहारप्रचोदितः २ एतस्मिन्नन्तरे वीर उत्तीर्य यमुनां नदीम् । तीर्त्वा मधुपुरद्वारि धनुष्पाणिरतिष्ठत ३ ततोऽर्धदिवसे प्राप्ते क्रूरकर्मा स राक्षसः । आगच्छद्बहुसाहस्रं प्राणिनां भारमुद्वहन् ४ ततो ददर्श शत्रुघ्नं स्थितं द्वारि धृतायुधम् । तमुवाच ततो रक्षः किमनेन करिष्यसि ५ ईदृशानां सहस्राणि सायुधानां नराधम । भक्षितानि मया रोषात्कालेनानुगतो ह्यसि ६ आहारश्चाप्यसंपूर्णो ममायं पुरुषाधम । स्वयं प्रविष्टोऽद्य मुखं कथमासाद्य दुर्मते ७ तस्यैवं भाषमाणस्य हसतश्च मुहुर्मुहुः । शत्रुघ्नो वीर्यसंपन्नो रोषादश्रूण्यवासृजत् ८ तस्य रोषाभिभूतस्य शत्रुघ्नस्य महात्मनः । तेजोमया मरीच्यस्तु सर्वगात्रैर्विनिष्पतन् ९ उवाच च सुसंक्रुद्धः शत्रुघ्नः स निशाचरम् । योद्धुमिच्छामि दुर्बुद्धे द्वन्द्वयुद्धं त्वया सह १० पुत्रो दशरथस्याहं भ्राता रामस्य धीमतः । शत्रुघ्नो नाम शत्रुघ्नो वधाकाङ्क्षी तवागतः ११ तस्य मे युद्धकामस्य द्वन्द्वयुद्धं प्रदीयताम् । शत्रुस्त्वं सर्वभूतानां न मे जीवन्गमिष्यसि १२ तस्मिंस्तथा ब्रुवाणे तु राक्षसः

---

असतांना शत्रुघ्नाची ती रात्र तेव्हांच निघून गेली १. तदनंतर फटफटीत उजाडल्यावर त्या वेळीं तो वीर राक्षस भक्ष्य आहार आणण्याकरितां नगरांतून बाहेर पडला २ तों इतक्यांत यमुना नदी उतरून धनुर्धर वीर शत्रुघ्न मधुपुराच्या द्वाराशीं उभा राहिला ३. तदनंतर मध्यान्हीं सूर्य आला असतां तो क्रूर कर्म करणारा राक्षस हजारों प्राण्यांचें ओझें घेऊन आला ४ तों द्वारामध्यें धनुष्य घेऊन स्थित असलेला शत्रुघ्न त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां राक्षस त्याला ह्मणाला " ह्या आयुधानें तूं काय करणार ? ५. हे नराधमा, आयुधासहवर्तमान असलेले असले हजारों वीर मीं क्रोधाच्या आवेशांत भक्षण केले आहेत व तूंही वेळेवरच आला आहेस ६. हे पुरुषाधमा, हा माझा आहार मला पुरेसा नाहीं. तेव्हां, हे दुर्मते, आपण होऊन तूं आज येथें येऊन कसारे माझ्या मुखामध्यें प्रविष्ट झाला आहेस ?७ ह्याप्रमाणें तो बोलत असतांना व वारंवार हास्य करीत असतांना वीर्यवान् शत्रुघ्न क्रोधानें अश्रु ढाळूं लागला ८; क्रोधानें व्याप्त झालेल्या त्या महात्म्या शत्रुघ्नाच्या सर्व शरीरांतून तेजोमय ज्वाला बाहेर निघूं लागल्या ९ व तो शत्रुघ्न अतिशय क्रुद्ध होऊन त्या राक्षसाला ह्मणाला " हे दुर्बुद्धे, तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध लरण्याची माझी इच्छा आहे १०. मी दशरथाचा पुत्र व विचारी रामाचा भ्राता नांवानें व कृतीनेंही शत्रुघ्न असून तुझा वध करण्याकरितां येथें आलों आहे ११. ह्यास्तव, युद्धाकरितां आलेल्या त्या माझ्याशीं तूं युद्ध कर; तूं सर्व भूतांचा शत्रु माझ्या हातून जिवंत

प्रहसन्निव । प्रत्युवाच नरश्रेष्ठं दिष्ट्या प्राप्तोऽसि दुर्मते १३ मम मातृष्व-सुर्भ्राता रावणो नाम राक्षसः । हतो रामेण दुर्बुद्धे स्त्रीहेतोः पुरुषाधम १४ तच्च सर्वं मया क्षान्तं रावणस्य कुलक्षयम् । अवज्ञां पुरतः कृत्वा मया यूयं विशेषतः १५ निहताश्च हि ते सर्वे परिभूतास्तृणं यथा । भूताश्चैव भविष्याश्च यूयं च पुरुषाधमाः १६ तस्य ते युद्धकामस्य युद्धं दास्यामि दुर्मते । तिष्ठ त्वं च मुहूर्तं तु यावदायुधमानये १७ ईप्सितं यादृशं तुभ्यं सज्जये यावदायुधम् १८ तमुवाचाशु शत्रुघ्नः क्व मे जीवन्गमिष्यसि । स्वयमेवागतः शत्रुर्न मोक्तव्यः कृतात्मना १९ यो हि विक्लवया बुद्ध्या प्रसरं शत्रवे दिशेत् ॥ स हतो मन्दबुद्धिः स्याद्यथा कापुरुषस्तथा २० तस्मात्सुदृष्टं कुरु जीवलोकं शरैः शितैस्त्वां विविधैर्नयामि । यमस्य गेहाभिमुखं हि पापं रिपुं त्रिलोकस्य च राघवस्य २१ [३०४१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः ॥ ६८ ॥

तच्छ्रुत्वा भाषितं तस्य शत्रुघ्नस्य महात्मनः । क्रोधमाहारयत्तीव्रं तिष्ठ

---

जाणार नाहींस " १२. ह्याप्रमाणें तो शत्रुघ्न बोलूं लागला असतां राक्षस हंसत हंसत त्या पुरुषश्रेष्ठाला ह्मणाला " हे दुर्मते, सुदैवानें तूं येथें प्राप्त झाला आहेस १३. हे दुर्बुद्धे, हे नराधमा, माझा मामा रावणनामक राक्षस स्त्रीकरितां रामानें मारिला आहे १४. परंतु, रावणाचा तो कुलक्षय मीं सर्व सहन केला आहे. विशेषतः तुह्मांला मी कसपटाप्रमाणें समजत असल्यामुळें आजपर्यंत तुमच्याकडे लक्ष्य दिलें नाहीं १५. हे नराधमहो, पूर्वी होऊन गेलेल्या, पुढें होणाऱ्या व सांप्रत वर्तमान असलेल्या तुह्मा सर्वांना मी तृणाप्रमाणें क्षुल्लक समजून वध पावलेलेच आहांत असें मानीत असतों १६. हे दुर्मते, त्यांपैकींच युद्धाची इच्छा करणारा जो तूं त्या तुझ्याशीं युद्ध करण्यास मी तयार आहें; परंतु, मी आयुध आणीपर्यंत तूं मुहूर्तभर दम धर १७. सारांश, तुझा वध करण्यास जें आयुध मला हवें आहे तें मी घेऊन सज्ज करीपर्यंत तूं वाट पहा " १८. ह्यावर शत्रुघ्न त्याला सत्वर ह्मणाला " तूं माझ्या हातून जिवंत जाणार कोठें ? आपोआप आलेल्या शत्रूला विचारी पुरुषानें सोडितां उपयोगीं नाहीं १९. जो अविचारानें शत्रूला अवसर देतो त्या मंदबुद्धि पुरुषाचा दुर्बल पुरुषाप्रमाणें वध होतो २०. तस्मात्, एकदा तूं हा जीवलोक पोटभर पाहून घे; नानाप्रकारच्या तीक्ष्ण बाणांनीं मी तुज त्रैलोक्याच्या व रामाच्या दुष्ट शत्रूला यमसदनाकडे पाठवितों " २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडांतील अडुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६८ ॥

महात्म्या शत्रुघ्नाचें तें भाषण ऐकिल्यावर लवणासुर अतिशय क्रुद्ध झाला आणि " थांब

तिष्ठेति चाब्रवीत् १ पाणौ पाणिं स निष्पिष्य दन्तान्कटकटाय्य च। लवणो रघुशार्दूलमाह्वयामास चासकृत् २ तं ब्रुवाणं तथा वाक्यं लवणं घोरदर्शनम्। शत्रुघ्नो देवशत्रुघ्न इदं वचनमब्रवीत् ३ शत्रुघ्नो न तदा जातो यदान्ये निर्जिता स्त्वया। तदद्य बाणाभिहतो व्रज त्वं यमसादनम् ४ ऋषयोऽप्यद्य पापात्मन्मया त्वां निहतं रणे। पश्यन्तु विप्रा विद्वांसस्त्रिदशा इव रावणम् ५ त्वयि मद्बाणनिर्दग्धे पतितेऽद्य निशाचरे। पुरे जनपदे चापि क्षेममेव भविष्यति ६ अद्य मद्बाहुनिष्क्रान्तः शरो वज्रनिभाननः। प्रवेक्ष्यते ते हृदयं पद्ममंशुरिवार्कजः ७ एवमुक्तो महावृक्षं लवणः क्रोधमूर्च्छितः। शत्रुघ्नोरसि चिक्षेप स च तं शतधाच्छिनत् ८ तद्दृष्ट्वा विफलं कर्म राक्षसः पुनरेव तु। पादपान्सुबहून्गृह्य शत्रुघ्नायासृजद्बली ९ शत्रुघ्नश्चापि तेजस्वी वृक्षानापततो बहून्। त्रिभिश्चतुर्भिरेकैकं चिच्छेद नतपर्वभिः १० ततो बाणमयं वर्षं व्यसृजद्राक्षसोपरि। शत्रुघ्नो वीर्यसंपन्नो विव्यथे न स राक्षसः ११ ततः प्रहस्य लवणो वृक्षमुद्यम्य वीर्यवान्। शिरस्यभ्यहनच्छूरं स्रस्ताङ्गः

थांब " असें ह्मणाला १. वारंवार हातावर हात चोळून व दांतकिरकिटी करून रघुवंशजश्रेष्ठ शत्रुघ्नाला त्यानें आह्वान केलें २. तेव्हां दिसण्यांतही उग्र असलेला तो लवण आह्वान करूं लागला असतां देवशत्रूंचा घात करणारा शत्रुघ्न त्याला ह्मणाला ३ " तूं जेव्हां इतरांचा पराजय केलास तेव्हां शत्रुघ्न जन्मास आला नव्हता. ह्यास्तव, माझ्या बाणानें वध पावून तूं आज यमसदनीं चालता हो ४. हे पाप्या, रणामध्यें वध पावून पडलेल्या रावणाला ज्याप्रमाणें देवांनीं अवलोकन केलें त्याप्रमाणें माझ्या हातून संग्रामामध्यें वध पावून पडलेल्या तुला ऋषि व विद्वान् ब्राह्मण आज अवलोकन करोत ५. तुज राक्षसाचा आज माझ्या बाणानें दाह होऊन वध झाला असतां नगरामध्यें व देशामध्यें स्वस्थताच होईल ६. ह्याकरितां, सूर्याचें किरण ज्याप्रमाणें सूर्यविकासि कमलामध्यें प्रवेश करितें त्याप्रमाणें ज्याचें मुख वज्रासारिखें आहे असा माझ्या हातून सुटलेला बाण आज तुझ्या हृदयामध्यें प्रवेश करील " ७. ह्याप्रमाणें शत्रुघ्न लवणाला बोलला असतां तो क्रोधानें व्याप्त झाला व एक मोठा वृक्ष त्यानें शत्रुघ्नाच्या उरावर फेंकिला; परंतु, त्यानें त्याचे शेकडों तुकडे केले ८. हा आपला प्रयत्न निष्फल झालेला पाहून त्या बलाढ्य राक्षसानें पुनरपि असंख्य वृक्ष घेतले व शत्रुघ्नाकडे फेंकिले ९. परंतु, तेजस्वी शत्रुघ्नानें, तीन तीन चार चार तीक्ष्णाग्र बाणांनीं एकेक ह्याप्रमाणें, आपल्याकडे येणारे ते असंख्य वृक्ष तोडून टाकिले १०. तदनंतर वीर्यसंपन्न शत्रुघ्नानें राक्षसावर बाणांची वृष्टि केली; परंतु, तो राक्षस कचरला नाहीं ११. नंतर वीर्यवान् लवणानें हास्यपूर्वक एक वृक्ष उचलून

स मुमोह वै १२ तस्मिन्निपतिते वीरे हाहाकारो महानभूत् । ऋषीणां देवसङ्घानां गन्धर्वाप्सरसां तथा १३ तमवज्ञाय तु हतं शत्रुघ्नं भुवि पातितम् । रक्षो लब्धान्तरमपि न विवेश स्वमालयम् १४ नापि शूलं प्रजग्राह तं दृष्ट्वा भुवि पातितम् । ततो हत इति ज्ञात्वा तान्भक्षान्समुदावहत् १५ मुहूर्ताल्लब्धसंज्ञस्तु पुनस्तस्थौ धृतायुधः । शत्रुघ्नो वै पुरद्वारि ऋषिभिः संप्रपूजितः १६ ततो दिव्यममोघं तं जग्राह शरमुत्तमम् । ज्वलन्तं तेजसा घोरं पूरयन्तं दिशो दश १७ वज्राननं वज्रवेगं मेरुमन्दरसंनिभम् । नतं पर्वसु सर्वेषु संयुगेष्वपराजितम् १८ असृक्चन्दनदिग्धाङ्गं चारुपत्रं पतत्रिणम् । दानवेन्द्राचलेन्द्राणामसुराणां च दारणम् १९ तं दीप्तमिव कालाग्निं युगान्ते समुपस्थितम् । दृष्ट्वा सर्वाणि भूतानि परित्रासमुपागमन् २० सदेवासुरगन्धर्वं मुनिभिः साप्सरोगणम् । जगद्धि सर्वमस्वस्थं पितामहमुपस्थितम् २१ ऊचुश्च देवदेवेशं वरदं प्रपितामहम् । देवानां भयसंमोहो लोकानां संक्षयं प्रति २२ तेषां तद्वचनं श्रुत्वा ब्रह्मा लोकपितामहः । भय-

---

शूर शत्रूघ्नाचे मस्तकीं प्रहार केला असतां शरीर गळून जाऊन शत्रुघ्नाला मूर्च्छा आली १२; व ह्याप्रमाणें तो वीर पडला असतां ऋषि, देवगण, गंधर्व व अप्सरा ह्यांमध्यें मोठाच हाहाकार उडून राहिला १३. परंतु, भूमीवर प्रहार करून पाडिलेल्या शत्रुघ्नाला तो राक्षस सामान्य समजला आणि त्याला जरी अवकाश सांपडला होता तरी तो घरीं गेला नाहीं १४ व त्यानें शूलही घेतला नाहीं. कारण, भूमीवर पाडिलेल्या त्या शत्रुघ्नाकडे पाहून तो राक्षस त्याचा वध झाला असें समजला आणि आहाराकरितां मारून आणिलेले ते हजारों प्राणी घेऊन तो जाऊं लागला १५. परंतु, इतक्यांत सुमारें एका मूहूर्तानें शत्रुघ्न शुद्धीवर आला व धनुष्य घेऊन नगराच्या द्वाराशीं पुनरपि उभा राहिला. तेव्हां ऋषींनीं त्याची वाहवा केली १६. तदनंतर कधींही व्यर्थ न जाणारा तो दिव्य व उत्कृष्ट बाण त्यानें हातामध्यें घेतला. तो घोर बाण तेजानें झळकत असून दश दिशा व्यापीत होता १७; वज्रासारिखें त्याचें मुख असून त्याचा वेगही वज्राप्रमाणेंच होता; मेरुमंदराप्रमाणें तो जड होता; सर्व पर्वांचे ठिकाणीं त्याला बाक होता; संग्रामामध्यें तो कधींही कुंठित होणारा नव्हता १८; रक्तरूप चंदन त्याच्या सर्वभागाला लागलेलें होतें; तो बाण मनोहर पिसांनीं युक्त होता व दानवराजरूप पर्वतराजांना तो विदारण करणारा होता १९. असो. युगांतसमयीं कालाग्नी-प्रमाणें प्रदीप्त होऊन राहिलेल्या त्या बाणाला अवलोकन करितांक्षणीं सर्व प्राणी त्रस्त झाले २० आणि देव, असुर, गंधर्व, मुनि व अप्सरांचे समुदाय ह्यांसहवर्तमान सर्व जगत् अस्वस्थ होऊन ब्रह्मदेवाकडे गेलें २१. नंतर देव त्या वरप्रद व देवाधिदेव पितामहाला

कारणमाचष्ट देवानामभयंकरः २३ उवाच मधुरां वाणीं शृणुध्वं सर्व-
देवताः । वधाय लवणस्याजौ शरः शत्रुघ्नधारितः २४ तेजसा तस्य संमूढाः
सर्वे स्मः सुरसत्तमाः । एषो पूर्वस्य देवस्य लोककर्तुः सनातनः २५ शरस्ते-
जोमयो वत्सा येन वै भयमागतम् । एष वै कैटभस्यार्थे मधुनश्च महा-
शरः २६ सृष्टो महात्मना तेन वधार्थे दैत्ययोस्तयोः । एक एव प्रजानाति
विष्णुस्तेजोमयं शरम् २७ एषा एव तनुः पूर्वा विष्णोस्तस्य महात्मनः ।
इतो गच्छत पश्यध्वं वध्यमानं महात्मना २८ रामानुजेन वीरेण लवणं
राक्षसोत्तमम् । तस्य ते देवदेवस्य निशम्य वचनं सुराः २९ आजग्मुर्यत्र
युध्येते शत्रुघ्नलवणावुभौ । तं शरं दिव्यसंकाशं शत्रुघ्नकरधारितम् ३०
ददृशुः सर्वभूतानि युगान्ताग्निमिवोत्थितम् । आकाशमावृतं दृष्ट्वा देवैर्हि
रघुनन्दनः ३१ सिंहनादं भृशं कृत्वा ददर्श लवणं पुनः । आहूतश्च पुन-
स्तेन शत्रुघ्नेन महात्मना ३२ लवणः क्रोधसंयुक्तो युद्धाय समुपस्थितः ।
आकर्णात्स विकृष्याथ तद्धनुर्धन्विनां वरः ३३ स मुमोच महाबाणं लव-

---

ह्मणाले " लोकांचा संहार होण्यासंबंधानें देवांना भय उपस्थित होऊन कांहींएक सुचेनासें झालें आहे " २२. हें त्यांचें ह्मणणें ऐकून घेतल्यावर देवांचें भय दूर करणाऱ्या लोक-पितामह ब्रह्मदेवानें भयाचें कारण निवेदन केलें २३. मधुर वाणीनें तो ह्मणाला " हे सर्व देवहो, तुह्मी श्रवण करा. संग्रामामध्यें लवणाचा वध करण्याकरितां शत्रुघ्नानें बाण घेतला आहे २४ व त्या बाणाच्या तेजानें हे सुरश्रेष्ठ हो, आपण सर्व भांबावून गेलों आहों. जग-त्स्रष्ट्या पुरातन देवाचा हा सनातन २५ व तेजोमय बाण आहे व ह्यामुळें, हे वत्सहो, तुह्मांला भय उपस्थित झालें आहे. मधु व कैटभ ह्या दैत्यांच्या वधाकरितां हा महाशर त्या महात्म्यानें उत्पन्न केला आहे; त्या तेजोमय बाणाचें सामर्थ्य एक तो विष्णुच जाणीत आहे २६, २७ व त्या महात्म्या विष्णूची ही प्राचीन तनु आहे. ह्यास्तव, महात्म्या रामा-नुज वीराच्या हातून राक्षसश्रेष्ठ लवणाचा वध होत असतांना तुह्मी अवलोकन करा. " त्या देवाधिदेवाचें हें भाषण श्रवण केल्यावर ते देव २८, २९ उभयतां शत्रुघ्नलवणांचें युद्ध जेथें चाललें होतें तेथें आले. असो. शत्रुघ्नाच्या हातांत असलेला तो दिव्य बाण प्रलयकालचा अग्निच उपस्थित झाला आहे कीं काय असा सर्व प्राण्यांचे दृष्टीं पडला. नंतर, देवांनीं आकाश व्याप्त झालेलें अवलोकन केल्यावर रघुनंदन शत्रुघ्नानें सिंहनाद करून पुनरपि लवणाकडे पाहिलें व नंतर पुनरपि त्या महात्म्या शत्रुघ्नानें त्याला आह्वान केलें असतां ३०, ३१, ३२ लवण क्रुद्ध होऊन युद्धाला तयार झाला. तदनंतर धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या शत्रुघ्नानें कानापर्यंत धनुष्य खेंचून तो प्रचंडबाण लवणाच्या विशाल वक्षःस्थलावर सोडिला

णस्य महोरसि । उरस्तस्य विदार्याशु प्रविवेश रसातलम् ३४ गत्वा रसा-
तलं दिव्यः शरो विबुधपूजितः । पुनरेवागमत्तूर्णमिक्ष्वाकुकुलनन्दनम् ३५
शत्रुघ्नशरनिर्भिन्नो लवणः स निशाचरः । पपात सहसा भूमौ वज्राहत इवा-
चलः ३६ तच्च शूलं महद्दिव्यं हते लवणराक्षसे । पश्यतां सर्वदेवानां रुद्रस्य
वशमन्वगात् ३७ एकेषुपातेन भयं निपात्य लोकत्रयस्यास्य रघुप्रवीरः ।
विनिर्बभावुद्यतचापबाणस्तमः प्रणुद्येव सहस्ररश्मिः ३८ ततो हि देवा ऋषि-
पन्नगाश्च प्रपूजिरे ह्यप्सरसश्च सर्वाः । दिष्ट्या जयो दाशरथेरवाप्तस्त्यक्त्वा
भयं सर्प इव प्रशान्तः ३९ [ ३०८० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय
आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोनसप्ततितमः सर्गः ॥ ६९ ॥

हते तु लवणे देवाः सेन्द्राः साग्निपुरोगमाः । ऊचुः सुमधुरां वाणीं
शत्रुघ्नं शत्रुतापनम् १ दिष्ट्या ते विजयो वत्स दिष्ट्या लवणराक्षसः । हतः
पुरुषशार्दूल वरं वरय सुव्रत २ वरदास्तु महाबाहो सर्व एव समागताः ।
विजयाकाङ्क्षिणस्तुभ्यममोघं दर्शनं हि नः ३ देवानां भाषितं श्रुत्वा शूरो

---

असतां त्याचें वक्षःस्थल तत्काल विदीर्ण करून तो बाण रसातलामध्यें प्रविष्ट झाला ३३,३४. रसातलामध्यें प्रविष्ट झाल्यानंतर त्या दिव्य बाणाची देवांनीं प्रशंसा केली आणि तो पुनरपि इक्ष्वाकुकुलवंशज शत्रुघ्नाकडे सत्वर आला ३५. असो. शत्रुघ्नाच्या शरानें तो लवण राक्षस विदीर्ण झाला आणि वज्राचा तडाखा बसलेल्या पर्वताप्रमाणें तो एकाएकीं भूमीवर पडला ३६; व लवण राक्षसाचा वध होताक्षणीं तो प्रचंड दिव्य शूल सर्व देवांचे समक्ष रुद्राकडे आला ३७. तात्पर्य, उत्कृष्ट धनुर्बाण धारण केलेला तो रघुवंशज वीर शत्रुघ्न एका बाणानें ह्या त्रैलोक्याचें भय नाहींसें केल्यावर अंधकाराचा नाश केल्यानंतर दिसणाऱ्या सूर्याप्रमाणें दिसू लागला ३८. तदनंतर देव, ऋषि पन्नगे व सर्व अप्सरोगण " दशरथपुत्राला जय प्राप्त झाला ही फार आनंदाची गोष्ट आहे " असें ह्मणून निर्भयपणें त्याची प्रशंसा करूं लागले व तो लवण राक्षस वध पावलेल्या सर्पाप्रमाणें शांत झाला ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसञ्ज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकुणहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ६९ ॥

लवणाचा वध झाल्यावर इंद्राग्नीप्रभृति देव शत्रुतापन शत्रुघ्नाला अत्यंत मधुर वाणीनें ह्मणाले १ " हे वत्सा, तुझा विजय झाला ही आनंदाची गोष्ट असून लवण राक्षसाचा वध झाला हीही सुदैवाचीच गोष्ट आहे. ह्यास्तव, हे सदाचरणसंपन्न पुरुषश्रेष्ठा, वर माग २. हे महापराक्रमी शत्रुघ्ना, तुझ्या विजयाची इच्छा धरून वर देणारे आह्मी सर्वही येथें आलों आहों व आमचें दर्शन व्यर्थ होणारें नाहीं ३. " देवांचें हें भाषण श्रवण केल्यावर

मूर्ध्नि कृताञ्जलिः । प्रत्युवाच महाबाहुः शत्रुघ्नः प्रयतात्मवान् ४ इयं मधुपुरी रम्या मधुरा देवनिर्मिता । निवेशं प्राप्नुयाच्छीघ्रमेष मेऽस्तु वरः परः ५ तं देवाः प्रीतमनसो बाढमित्येव राघवम् । भविष्यति पुरी रम्या शूरसेना न संशयः ६ ते तथोक्त्वा महात्मानो दिवमारुरुहुस्तदा । शत्रुघ्नोऽपि महातेजास्तां सेनां समुपानयत् ७ सा सेना शीघ्रमागच्छच्छ्रुत्वा शत्रुघ्ननाशनम् । निवेशनं च शत्रुघ्नः श्रावणेन समारभत् ८ स पुरा दिव्यसंकाशो वर्षे द्वादशमे शुभे । निविष्टः शूरसेनानां विषयश्चाकुतोभयः ९ क्षेत्राणि सस्ययुक्तानि काले वर्षति वासवः । अरोगवीरपुरुषा शत्रुघ्नभुजपालिता १० अर्धचन्द्रप्रतीकाशा यमुनातीरशोभिता । शोभिता गृहमुख्यैश्च चत्वरापणवीथिकैः । चातुर्वर्ण्यसमायुक्ता नानावाणिज्यशोभिता ११ यच्च तेन पुरा शुभ्रं लवणेन कृतं महत् । तच्छोभयति शत्रुघ्नो नानावर्णोपशोभिताम् १२ आरामैश्च विहारैश्च शोभमानं समन्ततः । शोभितां शोभनीयैश्च तथान्यैर्दैवमानुषैः १३ तां पुरीं दिव्यसंकाशां नानापण्योपशोभि-

---

महापराक्रमी, शूर व जितेंद्रिय शत्रुघ्नानें मस्तकीं हात जोडिले आणि तो त्यांना ह्मणाला ४ " मधुदैत्याची ही मधुरानामक नगरी देवांनीं निर्माण केली असून मनोहर आहे; ही सत्वर निवासस्थानरूप राजधानी होवो हा मुख्य वर मला मिळावा " ५. ह्यानंतर देव मनामध्यें प्रसन्न होऊन त्या रघुवंशज शत्रुघ्नाला ह्मणाले "ठीक आहे, ही नगरी रमणीय होईल व ह्या नगरींत शूर सेनेचें वास्तव्य होईल ह्यांत संशय नाहीं" ६. ह्याप्रमाणें सांगून त्या महात्म्यांनीं स्वर्गारोहण केलें व महातेजस्वी शत्रुघ्नानेंही ती सेना आणविली ७. तेव्हां शत्रुघ्नाच्या हातून लवणराक्षसाचा वध झाला, हें ऐकिल्यावर ती सेना तेथें सत्वर आली व श्रावण महिना लागल्यावर शत्रुघ्नानें तेथें ती सेना स्थापण्यास आरंभ केला ८; तेव्हां तो दिव्य शूरसेन प्रदेश पूर्वी बारा वर्षेपर्यंत भीतियुक्त होता व बाराव्या शुभ वर्षीं शत्रुघ्नानें ठिकठिकाणीं वसति केल्यामुळें तो निर्भय व मनोहर झाला ९. सर्व शेतांमध्यें पिकें येऊं लागलीं; इंद्र वेळेवर पर्जन्यवृष्टि करूं लागला; शत्रुघ्नाच्या बाहूंनीं रक्षण होऊं लागल्यापासून त्या नगरींतील पुरुष वीर व आरोग्यसंपन्न झाले १०; ती नगरी अर्धचंद्रासारिखी दिसूं लागली; यमुनेच्या तीरामुळें आणि मोठीं मोठीं घरें, चौक, बाजार व मार्ग ह्यांमुळें ती सुशोभित झाली; चारी वर्णांचे लोक तिच्यामध्यें राहूं लागले; आणि नानाप्रकारच्या व्यापारसंबंधी वस्तूंनींही तिला शोभा आली ११. त्या लवणानें जें मोठें गृह बांधिलें होतें तें सफेती देऊन शत्रुघ्नानें शुभ्र केलें. नानाप्रकारच्या रंगांनीं तें भूषित करून सुशोभित केलें १२ आणि आरामस्थानें व विहारस्थानें ह्यांच्या योगानेंही सर्व बाजूंनीं त्यानें त्याला शोभा आणिली. इतर

नाम् । नानादेशागतैश्चापि वणिग्भिरुपशोभिताम् १४ तां समृद्धां समृद्धार्थः शत्रुघ्नो भरतानुजः । निरीक्ष्य परमप्रीतः परं हर्षमुपागमत् १५ तस्य बुद्धिः समुत्पन्ना निवेश्य मधुरां पुरीम् । रामपादौ निरीक्षेऽहं वर्षे द्वादश आगते १६ ततः सताममरपुरोपमां पुरीं निवेश्य वै विविधजनाभिसंवृताम् । नराधिपो रघुपतिपाददर्शने दधे मतिं रघुकुलवंशवर्धनः ॥ १७ ॥ [३१५०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये उत्तरकाण्डे सप्ततितमः सर्गः ॥ ७० ॥

ततो द्वादशमे वर्षे शत्रुघ्नो रामपालिताम् । अयोध्यां चकमे गन्तुमल्पभृत्यबलानुगः १ ततो मन्त्रिपुरोगांश्च बलमुख्यान्निवर्त्य च । जगाम हयमुख्येन रथानां च शतेन सः २ स गत्वा गणितान्वासान्सप्ताष्टौ रघुनन्दनः । वाल्मीकाश्रममागत्य वासं चक्रे महायशाः ३ सोऽभिवाद्य ततः पादौ वाल्मीकेः पुरुषर्षभः । पाद्यमर्घ्यं तथातिथ्यं जग्राह मुनिहस्ततः ४ बहुरूपाः सुमधुराः कथास्तत्र सहस्रशः । कथयामास स मुनिः

---

देवनिर्मित व मनुष्यनिर्मित मनोहर वस्तूंनींही ती दिव्य नगरी शृंगारिली होती; नानाप्रकारच्या व्यापारसंबंधी पदार्थांनीं ती भूषित झाली होती आणि अनेक देशांतून आलेल्या व्यापाऱ्यांनींही तिला शोभा आणिलेली होती १३,१४. ती समृद्ध नगरी अवलोकन करून भरतानुज व धनसंपन्न शत्रुघ्न फारच प्रसन्न झाला व त्याला अतिशय हर्ष झाला १५. ह्याप्रमाणें ती मनोहर नगरी वसवून बारावें वर्ष लागलें असतां " आपण रामचरणांचें दर्शन घ्यावें " असा विचार त्याच्या मनामध्यें उत्पन्न झाला १६. सारांश, नानाप्रकारच्या लोकांनीं भरलेली व अमरावतीप्रमाणें असलेली ती नगरी वसविल्यानंतर रघुवंशाधिपति रामाच्या चरणांचें दर्शन घेण्याविषयीं रघुकुल वृद्धिंगत करणाऱ्या राजा शत्रुघ्नाचे मनांत विचार उत्पन्न झाला १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७० ॥

तदनंतर बारावें वर्षीं राम जिचें रक्षण करीत होता अशा अयोध्यानगरीमध्यें थोडकेसे सेवक व अल्प सैन्य बरोबर घेऊन जाण्याची शत्रुघ्नाला इच्छा झाली १. तदनंतर मुख्य मंत्री व सेनाधिपति ह्यांना परत पाठवून तो एका श्रेष्ठ अश्वावर आरूढ झाला आणि शंभर रथ बरोबर घेऊन निघाला २. पूर्वीं ठरल्याप्रमाणें मार्गामध्यें सात आठ मुक्काम झाल्यानंतर तो महायशस्वी शत्रुघ्न वाल्मीकिमुनींच्या आश्रमामध्यें येऊन उतरला ३. नंतर वाल्मीकिमुनींच्या चरणांना त्या पुरुषश्रेष्ठानें अभिवंदन केलें व मुनींनीं आपल्या हातांनीं अर्पण केलेलें पाद्य व अर्घ्य स्वीकारून त्यांनीं दिलेल्या सत्काराला ही त्यानें मान दिला ४; इतकें झाल्यावर अत्यंत

शत्रुघ्नाय महात्मने ५ उवाच च मुनिर्वाक्यं लवणस्य वधाश्रितम् । सुदु-
ष्करं कृतं कर्म लवणं निघ्नता त्वया ६ बहवः पार्थिवाः सौम्य हताः सब-
लवाहनाः । लवणेन महाबाहो युध्यमाना महाबलाः ७ स त्वया निहतः
पापो लीलया पुरुषर्षभ । जगतश्च भयं तत्र प्रशान्तं तव तेजसा ८ राव-
णस्य वधो घोरो यत्नेन महता कृतः । इदं च सुमहत्कर्म त्वया कृतमय-
त्नतः ९ प्रीतिश्चास्मिन्परा जाता देवानां लवणे हते । भूतानां चैव सर्वेषां
जगतश्च प्रियं कृतम् १० तच्च युद्धं मया दृष्टं यथानत्पुरुषर्षभ । सभायां
वासवस्याथ उपविष्टेन राघव ११ ममापि परमा प्रीतिर्हृदि शत्रुघ्न वर्तते ।
उपाघ्रास्यामि ते मूर्ध्नि स्नेहस्यैषा परा गतिः १२ इत्युक्त्वा मूर्ध्नि शत्रु-
घ्नमुपाघ्राय महामतिः । आतिथ्यमकरोत्तस्य ये च तस्य पदानुगाः १३
स भुक्त्वा नरश्रेष्ठो गीतमाधुर्यमुत्तमम् । शुश्राव रामचरितं तस्मिन्काले
यथा कृतम् १४ तन्त्रीलयसमायुक्तं त्रिस्थानकरणान्वितम् । संस्कृतं लक्ष-
णोपेतं समतालसमन्वितम् १५ शुश्राव रामचरितं तस्मिन्काले पुरा कृतम् ।

---

मनोहर अशा अनेक प्रकारच्या हजारों कथा महात्म्या शत्रुघ्नाला त्या मुनींनीं कथन केल्या ५ व नंतर लवणाच्या वधासंबंधानें ते मुनि त्याला ह्मणाले " लवणाचा वध करणाऱ्या तुझ्या हातून हें अति दुष्कर कर्म झालें आहे ६. हे सौम्या, हे महापराक्रमी शत्रुघ्ना, युद्ध चाललें असतांना सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान असंख्य महाबलाढ्य राजांचा लवणानें वध केला आहे ७. परंतु, हे पुरुषश्रेष्ठा, तूं त्या पाप्याचा सहज वध केल्यामुळें त्याच्यासबंधानें पूर्वी जगताला उत्पन्न झालेलें भयही तुझ्या तेजानें नाहींसं झालें आहे ८. रावणाचा घोर वध रामानें मोठ्या यत्नानें केला; परंतु, हें फारच मोठें कर्म तुझ्या हातून आयास न पडतां शेवटास गेलें ९. ह्या लवणाचा वध झाल्यामुळें देवांना पराकाष्ठेचा आनंद झाला आहे आणि जगतांतील सर्व प्राण्यांना ही गोष्ट प्रिय झाली आहे १०. हे पुरुषश्रेष्ठा राघवा, इंद्रसभेमध्यें बसून मीं तें युद्ध पूर्णपणें अवलोकन केलें आहे ११ आणि तेव्हांपासून, हे शत्रुघ्ना, माझ्याही मनामध्यें तुझ्यासंबंधानें पराकाष्ठेचें प्रेम उत्पन्न झालें आहे. ह्यास्तव, मी तुझें मस्तकीं अवघ्राण करितों; कारण, प्रेम दर्शविण्याचें हें उत्कृष्ट लक्षण होय" १२. असें बोलून त्या महामति महर्षींनीं शत्रुघ्नाचें, मस्तकाचे ठिकाणीं, अवघ्राण केलें आणि त्याच्या अनुयायांसहवर्तमान त्याचा त्यांनीं पाहुणचार केला १३. त्या पुरुषश्रेष्ठ शत्रुघ्नानें तेथें भोजन केलें आणि रामाचें झालेलें, जें उत्कृष्ट चरित्र त्याच्यासंबंधानें मधुर गायन त्यानें श्रवण केलें १४. वीणा व टाळ ह्यांची जोड त्या गायनामध्यें चांगली जुळली होती; उर, कंठ व शिर ह्या स्थानांचे ठिकाणीं त्या गीताचे मंद्र, मध्य व तार

ताम्यक्षराणि सत्यानि यथावृत्तानि पूर्वशः १६ श्रुत्वा पुरुषशार्दूलो विसंज्ञो बाष्पलोचनः । स मुहूर्तमिवासंज्ञो विनिःश्वस्य मुहुर्मुहुः १७ तस्मिन्गीते यथावृत्तं वर्तमानमिवाशृणोत् १८ पदानुगाश्च ये राज्ञस्तां श्रुत्वा गीतिसंपदम् । अवाङ्मुखाश्च दीनाश्च ह्याश्चर्यमिति चाब्रुवन् १९ परस्परं च ते तत्र सैनिकाः संबभाषिरे । किमिदं क्व च वर्तामः किमेतत्स्वप्नदर्शनम् २० अर्थो यो नः पुरा दृष्टस्तमाश्रमपदे पुनः । शृणुमः किमिदं स्वप्ने गीतबन्धनमुत्तमम् २१ विस्मयं ते परं गत्वा शत्रुघ्नमिदमब्रुवन् । साधु पृच्छ नरश्रेष्ठ वाल्मीकिं मुनिपुङ्गवम् २२ शत्रुघ्नस्त्वब्रवीत्सर्वान्कौतूहलसमन्वितान् । सैनिकान्नक्षमोऽस्माकं परिप्रष्टुमिहेदृशः २३ आश्चर्याणि बहूनीह भवन्त्यस्याश्रमे मुने । न तु कौतूहलाद्युक्तमन्वेष्टुं तं महामुनिम् २४ एवं तद्वाक्यमुक्त्वा तु सैनिकान्रघुनन्दनः । अभिवाद्य महर्षिं तं स्वं निवेशं ययौ तदा २५

[३१७५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे एकसप्ततितमः सर्गः ॥ ७१ ॥

---

ह्या स्वरानें उच्चारण होत होतें. तें गीत सर्व लक्षणसंपन्न असून संस्कृत भाषेंत तयार केलेलें होतें आणि त्याचा तालही चांगला जुळला होता १५. पूर्वी घडून आलेलें रामचरित्र त्यावेळीं त्यानें श्रवण केलें आणि पूर्वी घडल्याप्रमाणें तीं सत्य अक्षरें श्रवण केल्यावर १६ नेत्रांमध्यें अश्रु येऊन त्या पुरुषश्रेष्ठ शत्रुघ्नाचें भान नाहींसें झालें. ह्याप्रमाणें क्षणभर भान नाहींसें होऊन तो सावध झाला आणि वारंवार सुस्कारे टाकूं लागला १७. कारण, तें गायन चाललें असतांना त्यांत निर्दिष्ट केलेल्या गोष्टी आतां घडतच आहेत कीं काय असा भास तें श्रवण करीत असतांना त्याला झाला १८. त्या राजाचे जे अनुयायी होते ते तर उत्कृष्ट गायन श्रवण केल्यानंतर माना खालीं घालून दीनवदन झाले आणि "आश्चर्य आश्चर्य" असें ह्मणूं लागले १९. नंतर तेथें असलेले सैनिक आपआपसांत ह्मणाले "हें काय! आह्मीं आहों कोठें? आह्मी हें स्वप्न तर पहात नाहीं नां! २० अहो, जी गोष्ट पूर्वी आह्मीं अवलोकन केली ती ह्या आश्रमामध्यें पुनरपि आह्मीं ऐकत आहों. तस्मात्, ही उत्कृष्ट गायनरचना आह्मी स्वप्नांत तर अवलोकन करीत नाहींना!" २१. असें आपल्याशीं ह्मणून ते अतिशय आश्चर्यचकित झाले आणि शत्रुघ्नाला ह्मणाले "हे पुरुषश्रेष्ठा, तूं हें मुनिश्रेष्ठ वाल्मीकींना नीट विचार" २२. ह्यावर आश्चर्यचकित झालेल्या त्या सर्व सैनिकांना शत्रुघ्न ह्मणाला "अशा प्रकारचा प्रश्न करणें आपणांला योग्य नाहीं २३. येथें ह्या मुनींच्या आश्रमामध्यें अनेक आश्चर्यकारक प्रकार घडत असतात, परंतु, उत्कंठेनें त्या महर्षींना ह्या संबंधानें प्रश्न करणें योग्य नाहीं" २४. ह्याप्रमाणें सैनिकांना सांगित-

तं शयानं नरव्याघ्रं निद्रा नाभ्यागमत्तदा । चिन्तयानमनेकार्थं रामगीतमनुत्तमम् १ तस्य शब्दं सुमधुरं तन्त्रीलयसमन्वितम् । श्रुत्वा रात्रिर्जगामाशु शत्रुघ्नस्य महात्मनः २ तस्यां रजन्यां व्युष्टायां कृत्वा पौर्वाह्णिकक्रमम् । उवाच प्राञ्जलिर्वाक्यं शत्रुघ्नो मुनिपुङ्गवम् ३ भगवन्द्रष्टुमिच्छामि राघवं रघुनन्दनम् । त्वयानुज्ञातमिच्छामि सहैभिः संशितव्रतैः ४ इत्येवंवादिनं तं तु शत्रुघ्नं शत्रुसूदनम् । वाल्मीकिः संपरिष्वज्य विससर्ज स राघवम् ५ सोऽभिवाद्य मुनिश्रेष्ठं रथमारुह्य सुप्रभम् । अयोध्यामगमत्तूर्णं राघवोत्सुकदर्शनः ६ स प्रविष्टः पुरीं रम्यां श्रीमानिक्ष्वाकुनन्दनः । प्रविवेश महाबाहुर्यत्र रामो महाद्युतिः ७ स रामं मन्त्रिमध्यस्थं पूर्णचन्द्रनिभाननम् । पश्यन्नमरमध्यस्थं सहस्रनयनं यथा ८ सोऽभिवाद्य महात्मानं ज्वलन्तमिव तेजसा । उवाच प्राञ्जलिर्भूत्वा रामं सत्यपराक्रमम् ९ यदाज्ञप्तं महाराज सर्वं तत्कृतवानहम् । हतः स लवणः पापः पुरी चास्य निवे-

---

ल्यानंतर रघुनंदन शत्रुघ्नानें त्या महर्षींना अभिवंदन केलें आणि तो आपल्या शयनस्थानाकडे निघून गेला २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७१ ॥

अनेक अर्थांनीं रामसंबंधीं अनुपम गीताचा विचार करीत पडलेल्या त्या पुरुषश्रेष्ठ शत्रुघ्नाला त्या वेळीं निद्रा आली नाहीं १. वीणा व टाळ ह्यांची ज्यांत चांगली जोड आहे असें तें अति मधुर गायन श्रवण केल्यावर त्याच्या विचारांतच त्या महात्म्या शत्रुघ्नाची रात्र सत्वर निघून गेली २. ती रात्र उजाडल्यानंतर पूर्वाण्हसंबंधीं स्नानसंध्या आटोपून शत्रुघ्नानें हात जोडिले आणि तो मुनिश्रेष्ठ वाल्मीकींना ह्मणाला ३. " हे भगवन्, रघुनंदन रामाचें दर्शन घेण्याची माझी इच्छा आहे. ह्यास्तव, ह्या निर्मल तपश्चर्या करणाऱ्या मुनींसहवर्तमान आपली मला अनुज्ञा व्हावी " ४. अशी तो शत्रुनाशक शत्रुघ्न प्रार्थना करूं लागला असतां वाल्मीकिमुनि त्या रघुवंशजाला कडकडून भेटले व त्यांनीं त्याला जाण्याची अनुज्ञा दिली ५. नंतर रामदर्शनाविषयीं उत्सुक झालेला तो शत्रुघ्न त्या मुनिश्रेष्ठांना अभिवंदन करून उज्ज्वल रथावर आरूढ झाला आणि सत्वर अयोध्येला गेला ६. तो इक्ष्वाकुवंशज श्रीमान् व महापराक्रमी शत्रुघ्न त्या रम्य नगरीमध्यें प्रविष्ट झाल्यानंतर महातेजस्वी राम जेथें होता तेथें गेला ७; तों देवांमध्यें बसलेल्या इंद्राप्रमाणें पूर्णचंद्रतुल्य आल्हादकारक मुखानें युक्त असलेला राम मंत्र्यांचे मध्यभागीं बसला आहे असें त्याच्या दृष्टीं पडलें ८. तेव्हां तेजानें जसा कांहीं प्रज्वलित होत असलेल्या त्या महात्म्या व सत्यपराक्रमी रामाला त्यानें अभिवंदन केलें आणि हात जोडून तो त्याला ह्मणाला ९ " हे महाराज, आज्ञेप्रमाणें मीं सर्व कांहीं केलें

शिता १० द्वादशैतानि वर्षाणि त्वां विना रघुनन्दन । नोत्सहेयमहं वस्तुं त्वया विरहितो नृप ११ स मे प्रसादं काकुत्स्थ कुरुष्वामितविक्रम । मातृहीनो यथा वत्सो न चिरं प्रवसाम्यहम् १२ एवं ब्रुवाणं काकुत्स्थः परिष्वज्येदमब्रवीत् । मा विषादं कृथाः शूर नैतत्क्षत्रियचेष्टितम् १३ नावसीदन्ति राजानो विप्रवासेषु राघव । प्रजा हि परिपाल्या हि क्षत्रधर्मेण राघव १४ काले काले तु मां वीर अयोध्यामवलोकितुम् । आगच्छ त्वं नरश्रेष्ठ गतासि च पुरं तव १५ ममापि त्वं सुदयितः प्राणैरपि न संशयः । अवश्यं करणीयं च राज्यस्य परिपालनम् १६ तस्मात्त्वं वस काकुत्स्थ सप्तरात्रं मया सह । ऊर्ध्वं गन्तासि मधुरां सभृत्यबलवाहनः १७ रामस्यैतद्वचः श्रुत्वा धर्मयुक्तं मनोनुगम् । शत्रुघ्नो दीनया वाचा बाढमित्येव चाब्रवीत् १८ सप्तरात्रं च काकुत्स्थो राघवस्य यथाज्ञया । उष्य तत्र महेष्वासो गमनायोपचक्रमे १९ आमन्त्र्य तु महात्मानं रामं सत्यपराक्रमम् । भरतं लक्ष्मणं चैव महारथमुपारुहत् २० दूरं पद्भ्यामनुगतो लक्ष्मणेन महात्मना।

---

आहे. त्या पापी लवणाचा वध करून त्याच्या नगरीमध्यें मीं वसति केली आहे १०. हे रघुनंदना राजा, आपल्यावांचून हीं माझीं बारा वर्षे गेलीं; आतां आपल्यावांचून तेथें राहण्याची माझी इच्छा नाहीं ११. ह्यास्तव, हे अमितपराक्रमी काकुत्स्था, आपण माझ्यावर कृपा करावी; मातेचा वियोग झालेल्या वत्साप्रमाणें माझी स्थिति झाली आहे; ह्यास्तव, मीं आतां फार दिवसपर्यंत प्रवास करणार नाहीं" १२. ह्याप्रमाणें शत्रुघ्न बोलत असतांना काकुत्स्थ राम त्याला कवटाळून ह्मणाला "हे शूरा तूं खेद करूं नको; असें आचरण क्षत्रियाला योग्य नाहीं १३. हे राघवा, प्रवासासंबंधानें राजे दुःखी होत नाहींत; हे रघुवंशजा, प्रजेचें पालन क्षत्रधर्मानें केलें पाहिजे १४. हे वीरा, वेळोवेळीं तूं मला भेटण्याकरितां अयोध्येमध्यें येत जा आणि, हे पुरुषश्रेष्ठा, आपल्या राजधानीला परत जात जा १५. तूं मला प्राणाहूनही अतिशय प्रिय आहेस ह्यांत संशय नाहीं; परंतु, राज्याचें परिपालन अवश्य केलें पाहिजे १६. तस्मात्, हे काकुत्स्था, सात दिवस तूं माझ्या बरोबर रहा आणि सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान तूं मधुरानगरीला जा" १७. रामाचें हें धर्मयुक्त व मनाला आल्हाददेणारें भाषण श्रवण केल्यावर शत्रुघ्न दीन वाणीनें "होय" इतकेंच ह्मणाला १८. नंतर रामाच्या आज्ञेप्रमाणें सात दिवस तेथें राहून तो महाधनुर्धारी ककुत्स्थकुलोत्पन्न शत्रुघ्न जाण्यास निघाला १९. महात्म्या सत्यपराक्रमी रामाचा, भरताचा व लक्ष्मणाचा निरोप घेऊन तो विशाल रथावर आरूढ झाला २०. महात्मा लक्ष्मण पायांनीं त्याला दूरपर्यंत पोहोंचविण्यास गेला आणि भरतासह तो शत्रुघ्न सत्वर आपल्या राजधानीला

भरतेन च शत्रुघ्नो जगामाशु पुरीं तदा २१ [ ३१९६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्विसप्ततितमः सर्गः ॥ ७२ ॥

प्रस्थाप्य तु स शत्रुघ्नं भ्रातृभ्यां सह राघवः । प्रमुमोद सुखी राज्यं धर्मेण परिपालयन् ॥ १ ततः कतिपयाहःसु वृद्धो जानपदो द्विजः । मृतं बालमुपादाय राजद्वारमुपागमत् २ किं नु मे दुष्कृतं कर्म पुरा देहान्तरे कृतम् । रुदन्बहुविधा वाचः स्नेहदुःखसमन्वितः ॥ असकृत्पुत्रपुत्रेति वाक्यमेतदुवाच ह ३ किं नु मे दुष्कृतं कर्म पुरा देहान्तरे कृतम् । यदहं पुत्रमेकं तु पश्यामि निधनं गतम् ४ अप्राप्तयौवनं बालं पञ्चवर्षसहस्रकम्। अकाले कालमापन्नं मम दुःखाय पुत्रक ५ अल्पैरहोभिर्निधनं गमिष्यामि न संशयः अहं च जननी चैव तव शोकेन पुत्रक ६ न स्मराम्यनृतं ह्युक्तं न च हिंसां स्मराम्यहम् । सर्वेषां प्राणिनां पापं न स्मरामि कदाचन ७ केनाद्य दुष्कृतेनायं बाल एव ममात्मजः । अकृत्वा पितृकार्याणि गतो वैवस्वतक्षयम् ८ नेदृशं दृष्टपूर्वं मे श्रुतं वा घोरदर्शनम् । मृत्युरप्राप्तकालानां रामस्य विषये

---

गेला २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं बहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७२ ॥

ह्याप्रमाणें उभयतां भ्रात्यांसहवर्तमान शत्रुघ्नाला पाठविल्यानंतर धर्मानें राज्य करीत करीत राम सुखानें व आनंदानें राहिला १. तदनंतर कांहीं दिवस लोटल्यावर देशांतील एक वृद्ध द्विज आपला मेलेला मुलगा घेऊन राजाच्या द्वाराशीं आला २. " पूर्वजन्मीं मीं काय बरें दुष्कर्म केलें आहे ? " असें नानाप्रकारचे उद्गार काढीत काढीत प्रेम व दुःख ह्यांनीं व्याप्त झालेला तो द्विज रडूं लागला व " हे पुत्रा, हे पुत्रा " असा त्याला वारंवार हाका मारूं लागला ३. " माझा एकुलता एक मुलगा ज्याअर्थी मी मेलेला पहात आहें त्याअर्थी पूर्वजन्मीं माझ्या हातून काय बरें दुष्कर्म घडलें आहे ? ४. हे पुत्रा, मला दुःख होण्याकरितां तूं यौवनावस्था येण्यापूर्वी सुमारें चवदा वर्षांचा असतांनाच अकालीं मरण पावलास असें पाहण्याचें माझ्या नशीबीं आलें आहे ५. आतां हे पुत्रा, तुझ्या शोकामुळें मी व तुझी माता अशा आह्मां उभयतांना थोडक्याच दिवसांत मरण येईल ! ६. कधीं अनृत भाषण केल्याचें, कधीं हिंसा केल्याचें अथवा कोणत्याही प्राण्याला मीं कधीं दुःख दिल्याचें मला स्मरत नाहीं ७. तेव्हां कोणाच्या बरें पातकामुळें हा माझा पुत्र अगदीं बाल असतांनाच पितृकार्य केल्याशिवाय आज यमसदनीं गेला आहे ! ८. रामाच्या देशामध्यें लोकांना

---

१ ह्या पांचव्या श्लोकावरील टीकेंत असा मजकूर आहेः– " पञ्चवर्षसहस्रकम् । वर्षशब्दोऽत्र दिनपरः । सहस्रसंवत्सरं सत्रमुपासीतेतिवत् । तेन षोडशवर्षमित्यर्थं इत्येक । तेन किंचिन्न्यूनचतुर्दशवर्षमित्यर्थं इत्यन्ये " ॥

ह्ययम् ९ रामस्य दुष्कृतं किंचिन्महदस्ति न संशयः । यथा हि विषयस्थानां बालानां मृत्युरागतः १० नह्यन्यविषयस्थानां बालानां मृत्युतो भयम् । स राजञ्जीवयस्वैनं बालं मृत्युवशंगतम् ११ राजद्वारि मरिष्यामि पत्न्या सार्धमनाथवत् । ब्रह्महत्यां ततो राम समुपेत्य सुखी भव १२ भ्रातृभिः सहितो राजन्दीर्घमायुरवाप्स्यसि । उषिताः स्म सुखं राज्ये तवास्मिन्सुमहाबल १३ इदं तु पतितं तस्मात्तव राम वशे स्थितान् । कालस्य वशमापन्नाः स्वल्पं हि न हि नः सुखम् १४ संप्रत्यनाथो विषय इक्ष्वाकूणां महात्मनाम् । रामं नाथमिहासाद्य बालान्तकरणं ध्रुवम् १५ राजदोषैर्विपद्यन्ते प्रजा ह्यविधिपालिताः । असद्वृत्ते हि नृपतावकाले म्रियते जनः १६ यद्वा पुरेष्वयुक्तानि जना जनपदेषु च । कुर्वते न च रक्षास्ति तदा कालकृतं भयम् १७ सुव्यक्तं राजदोषो हि भविष्यति न संशयः । पुरे जनपदे चापि तथा बालवधो ह्ययम् १८ एवं बहुविधैर्वाक्यैरुपरुध्य मुहुर्मुहुः । राजानं दुःखसंतप्तः सुतं तमुपगूहति १९ [ ३२१५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे त्रिसप्ततितमः सर्गः ॥ ७३ ॥

---

अकालीं मृत्यु, अशा प्रकारची भयंकर गोष्ट आजपर्यंत माझ्या कधीं पाहण्यांतही नाहीं व ऐकण्यांतही नाहीं ९. ज्या अर्थीं रामाच्या देशांत राहणाऱ्या बालकांना मृत्यु येत आहे त्याअर्थीं रामाच्याच हातून कांहींतरी मोठें पातक घडलें आहे ह्यांत संशय नाहीं १०. कारण इतर राजांच्या देशांत राहणाऱ्या बालकांना मृत्यूचें भय नाहीं. तस्मात्, हे राजा मृत्यु पावलेल्या ह्या बालकाला तूं जीवंत कर ११. नाहींतर पत्नीसहवर्तमान मी अनाथाप्रमाणें राजद्वारीं मरेन. हे रामा, असें झालें असतां ब्रह्महत्या पतकरून तूं सुखानें रहा १२. हे राजा, भ्रात्यांसहवर्तमान तूं असें केल्यानें दीर्घकाल लोटेपर्यंत वाचशील. हे अतिबलाढ्य रामा, आह्मी तुझ्या ह्या राज्यामध्यें सुखानें राहिलों १३. परंतु, हे रामा, आह्मी तुझ्या अधीन असतांना हें संकट आह्मांवर ओढवलें आहे. तस्मात्, ज्याअर्थीं आह्मी कालाच्या तावडींत सांपडलों आहों त्याअर्थीं तुझ्या कारकीर्दींत आह्मांला यत्किंचितही सुख नाहीं १४. बालघातक राम नाथ मिळाल्यामुळें सांप्रत महात्म्या इक्ष्वाकूंचा देश निःसंशय अनाथ झाला आहे ! १५. अन्यायानें प्रजेचें परिपालन होऊं लागलें असतां राजदोषामुळें त्यांना मृत्यु येतो आणि राजा दुराचारी असला ह्मणजे प्रजेला अकालीं मरण येतें १६; अथवा नगरांत व देशांत लोक अयोग्य कृत्यें जेव्हां करूं लागतात व जेव्हां राजाकडून त्याचा बंदोबस्त होत नाहीं तेव्हां मृत्यूचें भय उपस्थित होतें १७. सारांश, ज्याअर्थीं ह्या धडधडीत नगरामध्यें व देशामध्यें बालघात झाला त्याअर्थीं राजदोष हेंच ह्याचें कारण उघड रीतीनें असलें पाहिजे ह्यांत संशय नाहीं" १८. ह्याप्रमाणें नानाप्रकारच्या भाषणांनीं राजाला वारंवार दोष लावून तो दुःखसंतप्त झालेला द्विज त्या पुत्राला

तथा तु करुणं तस्य द्विजस्य परिदेवनम् । शुश्राव राघवः सर्वं दुःख-
शोकसमन्वितम् १ स दुःखेन च संतप्तो मन्त्रिणस्तानुपाह्वयत् । वसिष्ठं वाम-
देवं च भ्रातॄंश्च सह नैगमान् २ ततो द्विजा वसिष्ठेन सार्धमष्टौ प्रवेशिताः ।
राजानं देवसंकाशं वर्धस्वेति ततोऽब्रुवन् ३ मार्कण्डेयोऽथ मौद्गल्यो वाम-
देवश्च काश्यपः । कात्यायनोऽथ जाबालिर्गौतमो नारदस्तथा ४ एते द्विज-
र्षभाः सर्वे आसनेषूपवेशिताः ५ महर्षीन्समनुप्राप्तानभिवाद्य कृताञ्जलिः ।
मन्त्रिणो नैगमाश्चैव यथार्हमनुकूलिताः ६ तेषां समुपविष्टानां सर्वेषां दीप्त-
तेजसाम् । राघवः सर्वमाचष्टे द्विजोऽयमुपरोधति ७ तस्य तद्वचनं श्रुत्वा
राज्ञो दीनस्य नारदः । प्रत्युवाच शुभं वाक्यमृषीणां संनिधौ स्वयम् ८ शृणु
राजन्यथाकाले प्राप्तो बालस्य संक्षयः । श्रुत्वा कर्तव्यतां राजन्कुरुष्व रघु-
नन्दन ९ पुरा कृतयुगे राजन्ब्राह्मणा वै तपस्विनः । अब्राह्मणस्तदा राजन्न
तपस्वी कथंचन १० तस्मिन्युगे प्रज्वलिते ब्रह्मभूते त्वनावृते । अमृत्यव-
स्तदा सर्वे जज्ञिरे दीर्घदर्शिनः ११ ततस्त्रेतायुगं नाम मानवानां वपुष्मताम् ।
क्षत्रिया यत्र जायन्ते पूर्वेण तपसान्विताः १२ वीर्येण तपसा चैव तेऽधिकाः

---

कंवटाळूं लागला १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिका-
व्यांतील उत्तरकांडापैकीं त्र्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७३ ॥

ह्याप्रमाणें त्या ब्राह्मणाचें दुःखशोकांनीं व्याप्त झालेलें तें सर्वही दीन भाषण रामानें
श्रवण केलें १. तेव्हां रामही दुःखानें संतप्त झाला आणि मंत्री वसिष्ठ, वामदेव, भ्राते आणि
नागरिक जन ह्यांना त्यानें बोलावून आणिलें २. तदनंतर वसिष्ठासहवर्तमान आठ ब्राह्मण
सभेमध्यें आले आणि त्या देवतुल्य राजाला " अभिवृद्धि असो " असें ह्मणाले ३. मार्क-
डेय, मौद्गल्य, वामदेव, काश्यप, कात्यायन, जाबालि, गौतम आणि नारद ४ हे सर्वही
द्विजश्रेष्ठ आसनांवरून त्यानें बसविले ५. मंत्री व पौरजन ह्यांचें, योग्यतेप्रमाणें, आदरातिथ्य
होऊन ते सर्व महातेजस्वी बसले असतां ६ " हा द्विज धरणें घेऊन बसला आहे " वगैरे
सर्व कांहीं रामानें त्यांना निवेदन केलें ७. तेव्हां त्या दीन राजाचें भाषण श्रवण करून
ऋषींचे समक्ष नारदमुनि त्याला स्वतः ह्मणाले ८ " हे राजा, बालाला अकालीं मृत्यु कसा
प्राप्त झाला हें तूं श्रवण कर आणि, हे रघुनंदना राजा, श्रवण केल्यानंतर तुला काय करा-
वयाचें असेल तें कर ९. हे राजा, पूर्वीं कृतयुगामध्यें ब्राह्मणच तपस्वी होते; त्यावेळीं
कसाही प्रसंग आला तरी ब्राह्मणेतर तपस्वी नसे १०. ब्राह्मणांचें ज्यामध्यें प्राधान्य आहे
व अज्ञानाचें आवरण ज्यांत नाहीं असें तें उज्ज्वल युग असतांना सर्वही भूतभविष्य जाण-
णारे होते व कोणालाही मृत्यूचें भय नव्हतें ११. तदनंतर त्रेतायुग प्राप्त झालें व त्या

पूर्वजन्मनि । मानवा ये महात्मानस्तत्र त्रेतायुगे युगे १३ ब्रह्म क्षत्रं च तत्सर्वं यत्पूर्वमपरं च यत् । युगयोरुभयोरासीत्समवीर्यसमन्वितम् १४ अपश्यन्तस्तु ते सर्वे विशेषमधिकं ततः । स्थापनं चक्रिरे तत्र चातुर्वर्ण्यस्य संमतम् १५ तस्मिन्युगे प्रज्वलिते धर्मभूते ह्यनावृते । अधर्मः पादमेकं तु पातयत्पृथिवी-तले ॥ अधर्मेण हि संयुक्तस्तेजो मन्दं भविष्यति १६ आमिषं यच्च पूर्वेषां राजसं च मलं भृशम् । अनृतं नाम तद्भूतं क्षिप्तेन पृथिवीतले १७ अनृतं पातयित्वा तु पादमेकमधर्मतः । ततः प्रादुष्कृतं पूर्वमायुषः परिनिष्ठितम् १८ पातिते त्वनृते तस्मिन्नधर्मेण महीतले । शुभान्येवाचरँल्लोकः सत्यधर्मपरा-यणः १९ त्रेतायुगे च वर्तन्ते ब्राह्मणः क्षत्रियाश्च ये । तपोऽतप्यन्त ते सर्वे शुश्रूषामपरे जनाः २० स्वधर्मः परमस्तेषां वैश्यशूद्रं तदागमत् । पूजां च सर्ववर्णानां शूद्राश्चक्रुर्विशेषतः २१ एतस्मिन्नन्तरे तेषामधर्मे चानृते च

---

युगामध्यें मानव कांहींसे देहाभिमानी झाले; पूर्वसंचित तपानें युक्त असे क्षत्रिय त्या युगा-मध्यें उत्पन्न झाले १२; परंतु, त्रेतायुगामध्यें जे महात्मे मानव होते ते पूर्वजन्मीं तपानें व वीर्यानें अधिक होते १३. कृत आणि त्रेता ह्या दोन्हीं युगांपैकीं कृतयुगांत ब्राह्मण क्षत्रियांपेक्षां श्रेष्ठ होते; परंतु, त्रेतायुगामध्यें पूर्वयुगांत कनिष्ठ असलेले क्षत्रिय व ब्राह्मण ह्या सर्वांचें वीर्य सारखेंच होतें १४; तेव्हां क्षत्रियांपेक्षां ब्राह्मणांचेठिकाणीं कांहीं विशेष प्रकार दृष्टोत्पत्तीस येईनासा झाल्यामुळें चारी वर्णांना संमत असें धर्मशास्त्र त्यानीं सुरू केलें ( कृतयुगीं धर्मशास्त्राचे आज्ञेवांचून सर्व लोक आपआपल्या धर्माप्रमाणें वागत असत ) १५. असो. ह्याप्रमाणें तें अज्ञानरहित व धर्मरूप उज्ज्वल युग सुरू झालें असतां अधर्मानें आपला एक पाय भूमीवर ठेविला. लोक अधर्मयुक्त झाले असतां त्यांचें तेज कमी होणार हें ठरलेलेंच आहे १६. पृथ्वीतलाचे ठिकाणीं अधर्माचा एक पात आल्या-मुळें पूर्वी कृतयुगांतील लोक जो शेतकी वगैरे जीवनोपाय मलाप्रमाणें अतिशय त्याज्य समजत असत त्या अनृतनामक उपायाचा स्वीकार होऊं लागला १७. ह्याप्रमाणें अध-र्मानें एक असत्य पाद भूतलावर टाकिला असतां पूर्वी कृतयुगामध्यें आयुष्य जें अपरिमित होतें तें त्रेतायुगामध्यें परिमित झालें १८. अशा रीतीनें भूतलावर तो असत्य पाद अध-र्मानें टाकिला असतां लोक ( त्यापासून होणारे अनर्थ टाळण्याकरितां ) सत्य धर्माविषयीं तत्पर राहून शुभ कर्मेंच करीत असत १९. सारांश, त्रेतायुगामध्यें असलेले सर्व ब्राह्मण आणि क्षत्रिय तपश्चर्या करीत होते; आणि इतर शुश्रूषा करीत होते २०. त्या चार वर्णांपैकीं शुश्रूषा हा वैश्य व शूद्र ह्या उभयतांचा मुख्य स्वधर्म होता आणि शूद्र विशेषेंकरून सर्वच वर्णांची शुश्रूषा करीत असत २१. परंतु, हें त्रेतायुग समाप्त होण्याचे वेळीं वैश्य आणि

ह्यतः पूर्वे पुनर्ह्रासमगमन्नृपसत्तम २२ ततः पादमधर्मस्य द्वितीयमव-
तारयत्‌ । ततो द्वापरसंख्या सा युगस्य समजायत २३ तस्मिन्द्वापरसंख्ये
तु वर्तमाने युगक्षये । अधर्मश्चानृतं चैव ववृधे पुरुषर्षभ २४ अस्मिन्द्वा-
परसंख्याने तपो वैश्यान्समाविशत्‌ ।. त्रिभ्यो युगेभ्यस्त्रीन्वर्णान्क्रमाद्वै तप
आविशत्‌ २५ त्रिभ्यो युगेभ्यस्त्रीन्वर्णान्धर्मश्च परिनिष्ठितः । न शूद्रो लभते
धर्मं युगतस्तु नरर्षभ २६ हीनवर्णो नृपश्रेष्ठ तप्यते सुमहत्तपः । भविष्य-
च्छूद्रयोन्यां हि तपश्चर्या कलौ युगे २७ अधर्मः परमो राजन्द्वापरे शूद्र-
जन्मनः । स वै विषयपर्यन्ते तव राजन्महातपाः २८ अद्य तप्यति दुर्बुद्धि-
स्तेन बालवधो ह्ययम्‌ २९ यो ह्यधर्ममकार्यं वा विषये पार्थिवस्य तु । करोति
चाश्रीमूलं तत्पुरे वा दुर्मतिर्नरः ३० क्षिप्रं च नरकं याति स च राजा न
संशयः । अधीतस्य च तप्तस्य कर्मणः सुकृतस्य च ३१ षष्ठं भजति भागं
तु प्रजा धर्मेण पालयन्‌ । षड्भागस्य च भोक्ताऽसौ रक्षते न प्रजाः कथम्‌ ३२

---

शूद्र ह्यांचे ठिकाणीं अनृतरूप अधर्मपाद पूर्ण रीतीनें प्राप्त झाला असतां पुनरपि, हे नृपश्रेष्ठा, ब्राह्मण व क्षत्रिय ह्यांचा ऱ्हास होऊं लागला २२. तदनंतर, अधर्माचा दुसरा पाद भूतलावर येऊन द्वापरयुग सुरू झालें २३. हे पुरुषश्रेष्ठ, ह्याप्रमाणें अधर्माच्या दोन पादांना आश्रयभूत असें तें द्वापरयुग सुरू झाले असतां अधर्म व अनृत हीं दोन्हीं वृद्धिंगत होऊं लागलीं २४ व ह्या द्वापरयुगामध्यें वैश्य तपश्चर्या करूं लागले. सारांश, कृत, त्रेता व द्वापर ह्या तीन युगांमध्यें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे अनुक्रमें तपश्चर्या करूं लागले २५. हे पुरुषश्रेष्ठा, तीन युगांमध्यें तीन वर्णांना तपोरूप धर्म प्राप्त होत असतां; परंतु, तीन्हींपैकीं कोणत्याही युगामध्यें शूद्राला ह्या तपोरूप धर्माचा अधिकार प्राप्त होत नाहीं २६. हे नृपश्रेष्ठा, हीनवर्ण जो शूद्र हा तपश्चर्या करूं लागेल; परंतु, ती केव्हां? कलियुगामध्यें पुढें उत्पन्न होणाऱ्या शूद्रयोनीत तपश्चर्या सुरू होईल २७. हे राजा, ( सांप्रत सुरू असलेल्या त्रेतायुगाची गोष्टच नको आहे; परंतु ) द्वापर युगांतही तपश्चर्या हा शूद्राचा परम अधर्म होय; परतु, हे राजा, तुझ्या राज्यामध्यें एक दुर्बुद्धि शूद्र आज महातपस्वी होऊन तप करीत आहे व त्यामुळें हा बालघात झाला आहे २८, २९. जो अविचारी पुरुष राजांच्या देशांत अथवा नगरांत पातक अथवा अकार्य करितो, त्याचें तें पातक नाशाला कारणीभूत होत असतें ३० आणि तो राजाही त्यामुळें सत्वर नरकाला जातो ह्यांत संशय नाहीं. धर्मानें परिपालन करणाऱ्या राजाला इतरांनीं केलेल्या वेदाध्ययनाचें, तपश्चर्येचें व चांगल्या रीतीनें आचरिलेल्या कर्माचें षष्ठांश फल प्राप्त होत असतें. हा राजा षष्ठांश फळाचा भागीदार असून त्यानें प्रजेचें रक्षण करूं नये हें काय? ३१, ३२. सारांश,

स त्वं पुरुषशार्दूल मार्गस्व विषये स्वकम् । दुष्कृतं यत्र पश्येथास्तत्र यत्नं समाचर ३३ एवं च धर्मवृद्धिश्च नृणां चायुर्विवर्धनम् । भविष्यति नरश्रेष्ठ बालस्यास्य च जीवितम् ३४ [१२४९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे चतुःसप्ततितमः सर्गः ॥ ७४ ॥

नारदस्य तु तद्वाक्यं श्रुत्वाऽमृतमयं यथा । प्रहर्षमतुलं लेभे लक्ष्मणं चेदमब्रवीत् १ गच्छ सौम्य द्विजश्रेष्ठं समाश्वासय सुव्रत । बालस्य च शरीरं तत्तैलद्रोण्यां निधापय २ गन्धैश्च परमोदारैस्तैलैश्च सुसुगन्धिभिः । यथा न क्षीयते बालस्तथा सौम्य विधीयताम् ३ यथा शरीरो बालस्य गुप्तः सन्क्लिष्टकर्मणः । विपत्तिः परिभेदो वा न भवेच्च तथा कुरु ४ एवं संदिश्य काकुत्स्थो लक्ष्मणं शुभलक्षणम् । मनसा पुष्पकं दध्यावागच्छेति महायशाः ५ इङ्गितं स तु विज्ञाय पुष्पको हेमभूषितः । आजगाम मुहूर्तेन समीपे राघवस्य वै ६ सोऽब्रवीत्प्रणतो भूत्वा अयमस्मि नराधिप । वश्यस्तव महाबाहो किंकरः समुपस्थितः ७ भाषितं रुचिरं श्रुत्वा पुष्पकस्य नराधिपः । अभिवाद्य महर्षीन्स विमानं सोऽध्यरोहत ८ धनुर्गृहीत्वा तूणी च खड्गं च रुचिरप्रभम् । निक्षिप्य नगरे

---

हे पुरुषश्रेष्ठा, आपल्या राज्यांत तूं चौकशी कर आणि ज्या ठिकाणीं दुष्कर्म तुझ्या दृष्टीं पडेल त्या ठिकाणीं तें निवारण करण्याचा तूं प्रयत्न कर ३३. ह्याप्रमाणें झालें असतां, हे पुरुषश्रेष्ठा, धर्माची व मनुष्यांच्या आयुष्याची वृद्धि होऊन ह्या बालकालाही जीवित प्राप्त होईल ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चौऱ्याहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७४ ॥

नारदमुनींचें तें जसेंकांहीं अमृतमय भाषण श्रवण केल्यानंतर रामाला अनुपम हर्ष झाला व तो लक्ष्मणाला ह्मणाला १ "हे सौम्या, हे महाव्रतस्थ लक्ष्मणा, जा; त्या द्विजश्रेष्ठाला धीर दे आणि बालकाचें तें शरीर तेलाच्या कुंडीमध्यें ठेव २. हे सौम्या, उत्कृष्ट व सुगंधीत द्रव्यें व परम सुगंधी तैलें ह्यांच्या योगानें त्या बालकाच्या शरीराचा नाश न होईल अशी तूं व्यवस्था कर. सारांश, क्लेश भोगिलेल्या ह्या बालाचे शरीराला विकार अथवा तुटातूट न होईल अशी तूं व्यवस्था कर" ३, ४. ह्याप्रमाणें शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या लक्ष्मणाला ककुत्स्थकुलोत्पन्न व महाकीर्तिमान् रामानें आज्ञा केली आणि "ये;" असें ह्मणून पुष्पक विमानाचें त्यानें स्मरण केलें ५, तेव्हां रामाचा तो उद्देश जाणून तें सुवर्णभूषित पुष्पकविमान एका क्षणामध्यें रामाच्या समीप आलें ६ आणि नम्र होऊन ह्मणालें "हे प्रजाधिपते, हे महापराक्रमी राजा; तुझ्या अधीन असलेला हा तुझा दास उभा आहे" ७. हें पुष्पकविमानांवरील अधिष्ठात्या देवतेचें मनोहर भाषण श्रवण केल्यावर तो प्रजाधिपति

चेतो सौमित्रिभरतावुभौ ९ प्रायात्प्रतीचीं हरितं विचिन्वंश्च ततस्ततः।
उत्तरामगमच्छ्रीमान्दिशं हिमवतावृताम् १० अपश्यमानस्तत्रापि स्वल्पम-
प्यथ दुष्कृतम्। पूर्वामपि दिशं सर्वामथोऽपश्यन्नराधिपः ११ प्रविशुद्धस-
माचारामादर्शतलनिर्मलाम्। पुष्पकस्थो महाबाहुस्तदापश्यन्नराधिपः १२
दक्षिणां दिशमाक्रामत्ततो राजर्षिनन्दनः। शैवलस्योत्तरे पार्श्वे ददर्श सुम-
हत्सरः १३ तस्मिन्सरसि तप्यन्तं तापसं सुमहत्तपः। ददर्श राघवः श्रीमा-
ल्लँम्बमानमधोमुखम् १४ राघवस्तमुपागम्य तप्यन्तं तप उत्तमम्। उवाच
च नृपो वाक्यं धन्यस्त्वमसि सुव्रत १५ कस्यां योन्यां तपोवृद्ध वर्तसे दृढ-
विक्रम। कौतूहलात्त्वां पृच्छामि रामो दाशरथिर्ह्यहम् १६ कोऽर्थो मनी-
षितस्तुभ्यं स्वर्गलाभो परोऽथवा। वराश्रयो यदर्थं त्वं तपस्यन्यैः सुदुश्च-
रम् १७ यमाश्रित्य तपस्तप्तं श्रोतुमिच्छामि तापस। ब्राह्मणो वासि भद्रं ते
क्षत्रियो वासि दुर्जयः॥ वैश्यस्तृतीयो वर्णो वा शूद्रो वा सत्यवाग्भव १८

---

राम महर्षींना अभिवंदन करून विमानारूढ झाला ८. आरूढ होतांना धनुष्य, भाते व मनोहर प्रभेनें युक्त असलेला खड्ग हीं त्यानें बरोबर घेतलीं आणि उभयतां लक्ष्मण-भरतांना नगरामध्यें ठेवून ९ शोध करीत करीत तो पश्चिम दिशेला गेला; नंतर हिमालय पर्वतानें व्याप्त केलेल्या उत्तर दिशेकडेही तो गेला १० आणि तेथेंही यत्किंचित् सुद्धां पातक जेव्हां त्याच्या दृष्टीं पडेना तेव्हां त्या प्रजाधिपतीनें सर्व पूर्वदिशाही शोधून काढिली ११. तेव्हां पुष्पकविमानामध्यें आरूढ झालेल्या त्या महापराक्रमी प्रजाधिपति रामाला आरशाप्रमाणें निर्मल व सदाचरणसंपन्न असे लोक त्या दिशेचेठिकाणीं असल्याचें आढळून आलें १२. तदनंतर, तो राजर्षिनंदन दक्षिणदिशेकडे निघाला असतां शैवलपर्वताचे उत्तरेस फारच मोठें सरोवर त्याच्या दृष्टी पडलें १३ आणि त्या सरोवराचे तीरीं अधोमुख होऊन लोंबकळंत असलेला एक तापस फारच मोठी तपश्चर्या करीत असतांना त्या श्रीमान् रामानें अवलोकन केला १४. नंतर उत्कृष्ट तपश्चर्या करीत असलेल्या त्या तपस्व्यासमीप जाऊन तो रघुवंशज राम राजा त्याला ह्मणाला " हे सुव्रता, तूं धन्य आहेस १५. हे तपोवृद्ध, हे महानिश्चयी तपोवृद्ध, तूं कोणत्या योनीमध्यें उत्पन्न झाला आहेस हें मी तुला उत्कंठेनें विचारीत आहें व मी दाशरथी राम आहें १६. इतरांच्या हातून होण्यास अत्यंत दुर्घट असें तप ज्याअर्थी तूं करीत आहेस त्याअर्थी स्वर्गप्राप्ति अथवा दुसरा कोणता वर तुझ्या मनामध्यें प्राप्त करून घ्यावयाचा आहे? १७. सारांश, हे तापसा, कोणता वर प्राप्त होण्याच्या उद्देशानें तूं तपश्चर्या करीत आहेस हें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. तुझें देव बरें करो; तं ब्राह्मण, अजिंक्य क्षत्रिय, तृतीयवर्णरूप वैश्य आणि शूद्र ह्यांपैकीं कोण आहेस

इत्येवमुक्तः स नराधिपेन अवाक्शिरा दाशरथाय तस्मै । उवाच जातिं नृप-
पुंगवाय यत्कारणं चैव तपःप्रयत्नः १९ [३२६८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे पञ्चसप्ततितमः सर्गः ॥ ७५ ॥
तस्य तद्वचनं श्रुत्वा रामस्याक्लिष्टकर्मणः । अवाक्शिरास्तथाभूतो
वाक्यमेतदुवाच ह १ शूद्रयोन्यां प्रजातोऽस्मि तप उग्रं समास्थितः । देवत्वं
प्रार्थये राम सशरीरो महायशः २ न मिथ्याहं वदे राम देवलोकजिगीषया ।
शूद्रं मां विद्धि काकुत्स्थ शम्बूको नाम नामतः ३ भाषतस्तस्य शूद्रस्य खड्गं
सुरुचिरप्रभम् । निष्कृष्य कोशाद्विमलं शिरश्चिच्छेद राघवः ४ तस्मिञ्शूद्रे
हते देवाः सेन्द्राः साग्निपुरोगमाः । साधु साध्विति काकुत्स्थं ते शशंसुर्मु-
हुर्मुहुः ५ पुष्पवृष्टिर्महत्यासीद्दिव्यानां सुसुगन्धिनाम् । पुष्पाणां वायुमुक्तानां
सर्वतः प्रपपात ह ६ सुप्रीताश्चाब्रुवन्रामं देवाः सत्यपराक्रमम् । सुरकार्य-
मिदं देव सुकृतं ते महामते ७ गृहाण च वरं सौम्य यं त्वमिच्छस्यरिंदम ।
स्वर्गभाङ्न हि शूद्रोऽयं त्वत्कृते रघुनन्दन ८ देवानां भाषितं श्रुत्वा रामः

---

तें खरें खरें सांग " १८. ह्याप्रमाणें त्या प्रजाधिपति रामानें विचारिलें अततां मान खालीं केलेल्या त्या तापसानें त्या नृपश्रेष्ठ दशरथपुत्र रामाला आपली जाति कथन केली आणि तपश्चर्येचा प्रयत्न कशाकरितां आहे हेंही सांगितलें १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत-श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पंचाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥७५॥

सदाचरणसंपन्न रामाचा तो प्रश्न ऐकून घेतल्यावर मस्तक तसें खालींच असतांना तो ह्मणाला १ " हे महाकीर्तिमान् रामा, मी शूद्र योनीमध्यें उत्पन्न झालों असून, उग्र तपश्चर्या करीत आहें आणि ह्या शरीरासहवर्तमान देवत्व प्राप्त होण्याची माझी इच्छा आहे २. हे रामा, मी मिथ्या भाषण करीत नाहीं. देवलोक संपादन करण्याच्या इच्छेनें मी तपश्चर्या करीत आहें. मी शूद्र आहें असें तूं समज; व, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, शंबूक ह्या नांवानें मी प्रसिद्ध आहें " ३. ह्याप्रमाणें तो शूद्र सांगूं लागला असतां अतिशय उज्ज्वल प्रभेनें युक्त असा आपला निर्मल खड्ग कोशांतून बाहेर काढून रामानें त्याचा शिरश्छेद केला ४ व त्या शूद्राचा वध होताक्षणी इंद्रासहवर्तमान अग्निप्रभृति देव "शाबास शाबास " ह्मणून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाची वारंवार प्रशंसा करूं लागले ५. मोठी पुष्पवृष्टि झाली; ह्मणजे वायूनें सुटलेल्या महासुगंधी पुष्पांची वृष्टि चोहोंकडे होऊं लागली ६ आणि देव सुप्रसन्न होऊन अमोघपराक्रमी रामाला ह्मणाले " हे महाविचारी राजा, तूं हें देवकार्य चांगल्या रीतीनें पार पाडिलें आहेस ७. कारण, हे रघुनंदना, (स्वर्गप्राप्तीला) अयोग्य असलेला हा शूद्र तुझ्यामुळें स्वर्गाला येण्याचें टळलें. ह्यास्तव, हे शत्रुदमना सौम्य रामा, इच्छेस येईल तो वर तूं

सत्यपराक्रमः। उवाच प्राञ्जलिर्वाक्यं सहस्राक्षं पुरन्दरम् ९ यदि देवाः प्रसन्ना मे द्विजपुत्रः स जीवतु। दिशन्तु वरमेतं मे ईप्सितं परमं मम १० ममापचाराद्बालोऽसौ ब्राह्मणस्यैकपुत्रकः। अप्राप्तकालः कालेन नीतो वैवस्वतक्षयम् ११ तं जीवयथ भद्रं वो नानृतं कर्तुमर्हथ। द्विजस्य संश्रुतोऽर्थो मे जीवयिष्यामि ते सुतम् १२ राघवस्य तु तद्वाक्यं श्रुत्वा विबुधसत्तमाः। प्रत्यूचू राघवं प्रीता देवाः प्रीतिसमन्वितम् १३ निर्वृतो भव काकुत्स्थ सोऽस्मिन्नह्नि बालकः। जीवितं प्राप्तवान्भूयः समेतश्चापि बन्धुभिः १४ यस्मिन्मुहूर्ते काकुत्स्थ शूद्रोऽयं विनिपातितः। तस्मिन्मुहूर्ते बालोऽसौ जीवेन समयुज्यत १५ स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते साधु याम नरर्षभ। अगस्त्यस्याश्रमपदं द्रष्टुमिच्छाम राघव १६ तस्य दीक्षा समाप्ता हि ब्रह्मर्षेः सुमहाद्युते। द्वादशं हि गतं वर्षं जलशय्यां समासतः १७ काकुत्स्थ तद्गमिष्यामो मुनिं समभिनन्दितुम्। त्वं चापि गच्छ भद्रं ते द्रष्टुं तमृषिसत्तमम् १८ स तथेति प्रतिज्ञाय देवानां रघुनन्दनः। आरुरोह विमानं तं पुष्पकं हेमभूषितम् १९ ततो देवाः प्रयातास्ते विमानैर्बहुविस्तरैः। रामोऽप्यनुजगामाशु कुम्भयोनेस्त-

---

मागून घे" ८. देवांचें भाषण श्रवण केल्यावर सत्यपराक्रमी रामानें हात जोडिले आणि सहस्रनयन इंद्राकडे पाहून तो ह्मणाला ९ "देव जर माझ्यावर प्रसन्न झाले असतील तर तो ब्राह्मणपुत्र जीवंत होवो हा अत्यंत इष्ट असलेला वर देवांनीं मला द्यावा १०. कारण, माझ्या अपराधामुळें ह्या एकुलत्या एक ब्राह्मणपुत्राला अकालीं मृत्यु आला आहे ११; ह्यास्तव, त्याला आपण जीवंत करा. "तुझा पुत्र मी जीवंत करीन अशी जी मी प्रतिज्ञा ब्राह्मणाशीं केली आहे ती आपण खरी करा" १२. रामाचें तें भाषण श्रवण केल्यानंतर सुरश्रेष्ठ देव प्रसन्न झाले आणि प्रेमपूर्वक रामाला ह्मणाले १३ "हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तूं स्वस्थ हो. तो बालक आज जीवंत झाला आहे आणि पुनरपि बांधवांशीं त्याचा समागम झाला आहे १४. हे ककुत्स्थकुलोत्पन्न रामा, ह्या शूद्राचा वध होतांक्षणींच तो बाल जीवंत झाला आहे १५. हे पुरुषश्रेष्ठा, तुझें देव बरें करो; तुझें कल्याण होईल. आतां आह्मी जातों. हे रामा, अगस्त्य मुनींचा आश्रम अवलोकन करण्याची आमची इच्छा आहे १६. कारण, हे महातेजस्वी रामा, जलशय्येचें अवलंबन करून राहिलेल्या त्या ब्रह्मर्षीचें हें बारावें वर्ष संपलें आणि त्याच्या तपाची दीक्षाही समाप्त झाली १७. ह्यास्तव, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तुझें देव बरें करो; आह्मी त्या मुनींचें अभिवंदन करण्याकरितां जातों व तूंही त्या श्रेष्ठ ऋषीच्या दर्शनाकरितां जा" १८. नंतर "ठीक आहे" असें देवांना वचन देऊन तो रघुनंदन राम त्या सुवर्णभूषित पुष्पकविमानामध्यें आरूढ झाला १९. तदनंतर ते देव मोठ्या मोठ्या विशाल

पोवनम् २० दृष्ट्वा तु देवान्संप्राप्तानगस्त्यस्तपसां निधिः। अर्चयामास धर्मात्मा सर्वांस्तानविशेषतः २१ प्रतिगृह्य ततः पूजां संपूज्य च महामुनिम् । जग्मुस्ते त्रिदशा हृष्टा नाकपृष्ठं सहानुगाः २२ गतेषु तेषु काकुत्स्थः पुष्पकादवरुह्य च । ततोऽभिवादयामास अगस्त्यमृषिसत्तमम् २३ सोऽभिवाद्य महात्मानं ज्वलन्तमिव तेजसा। आतिथ्यं परमं प्राप्य निषसाद नराधिपः २४ तमुवाच महातेजाः कुम्भयोनिर्महातपाः। स्वागतं ते नरश्रेष्ठ दिष्ट्या प्राप्तोऽसि राघव २५ त्वं मे बहुमतो राम गुणैर्बहुभिरुत्तमैः । अतिथिः पूजनीयश्च मम राजन्हृदि स्थितः २६ सुरा हि कथयन्ति त्वामागतं शूद्रघातिनम् । ब्राह्मणस्य तु धर्मेण त्वया जीवापितः सुतः २७ उष्यतां चेह रजनीं सकाशे मम राघव । त्वं हि नारायणः श्रीमांस्त्वयि सर्वं प्रतिष्ठितम् २८ त्वं प्रभुः सर्वदेवानां पुरुषस्त्वं सनातनः। प्रभाते पुष्पकेण त्वं गन्ता स्वपुरमेव हि २९ इदं चाभरणं सौम्य निर्मितं विश्वकर्मणा । दिव्यं दिव्येन वपुषा दीप्यमानं स्वतेजसा ३० प्रतिगृह्णीष्व काकुत्स्थ मत्प्रियं कुरु राघव । दत्तस्य हि पुन-

---

विमानांच्या योगानें निघून गेले व रामही त्या अगस्त्यमुनींच्या तपोवनामध्यें सत्वर गेला २०. देव प्राप्त झाल्याचें अवलोकन करून धर्मात्म्या अगस्त्य तपोनिधीनें त्या सर्वांचा सारखा सत्कार केला २१. तेव्हां त्या सत्काराला मान देऊन व महर्षीचीही प्रशंसा करून ते देव अनुयायांसहवर्तमान आनंदानें स्वर्गाला गेले २२. ते देव गेल्यानंतर ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें पुष्पकविमानांतून खालीं उतरून ऋषिश्रेष्ठ अगस्त्यांना अभिवंदन केलें २३. तेजानें प्रज्वलितच कीं काय अशा त्या महात्म्या अगस्त्यमुनींना वंदन केल्यानंतर त्यांनीं केलेल्या उत्कृष्ट आतिथ्याचा स्वीकार करून तो प्रजाधिपति राम बसला २४. तेव्हां महातेजस्वी व महातपस्वी अगस्त्यमुनि त्याला ह्मणाले "हे पुरुषश्रेष्ठा, तुझें स्वागत असो; हे राघवा, तूं आलास हे फारच चांगलें झालें २५. हे रामा, अनेक उत्कृष्ट गुणांमुळें तूं मला अतिशय प्रिय झाला आहेस आणि, हे राजा, मी तुला मनामध्यें पूज्य अतिथि समजत आहें २६. तूं शूद्राचा वध करून इकडे येत आहेस असें देवांनीं आतां मला सांगितलें आहे व ह्या धर्मामुळें ब्राह्मणाचा पुत्र तूं जीवंत केला आहेस असेंही त्यांनीं कळविलें आहे २७. ह्यास्तव, हे राघवा, एक रात्र येथें माझ्यापाशीं रहा. तूं श्रीमान् नारायण असून सर्व जगताला आधार तुझाच आहे व सर्व देवांचा प्रभु तूं असून सनातन पुरुष तूंच आहेस २८. उदयीक प्रभातकालीं तूं पुष्पकविमानामध्यें बसून आपल्या राजधानीलाच जाशील २९. हे सौम्य, विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या व स्वतःच्या तेजानें आणि दिव्य आकृतीनें झळकत असलेल्या ह्या दिव्य भूषणाचा ३० तूं स्वीकार कर आणि हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, माझा मनोरथ परिपूर्ण कर. आपणांला

दाने सुमहत्फलमुच्यते ३१ मरणे हि भवाञ्शक्तः फलानां महतामपि । त्वं हि शक्तस्तारयितुं सेन्द्रानपि दिवौकसः ३२ तस्मात्प्रदास्ये विधिवत्तत्प्रतीच्छ नराधिप । अथोवाच महात्मानमिक्ष्वाकूणां महारथः ३३ (रामो मतिमतां श्रेष्ठः क्षत्रधर्ममनुस्मरन् । प्रतिग्रहोऽयं भगवन्ब्राह्मणस्याविगर्हितः ३४ क्षत्रियेण कथं विप्र प्रतिग्राह्यं भवेत्ततः । प्रतिग्रहो हि विप्रेन्द्र क्षत्रियाणां सुगर्हितः ३५ ब्राह्मणेन विशेषेण दत्तं तद्वक्तुमर्हसि । एवमुक्तस्तु रामेण प्रत्युवाच महानृषिः ३६ आसन्कृतयुगे राम ब्रह्मभूते पुरा युगे । अपार्थिवाः प्रजा सर्वाः सुराणां तु शतक्रतुः ३७ ताः प्रजा देवदेवेशं राजार्थं समुपाद्रवन् । सुराणां स्थापितो राजा त्वया देव शतक्रतुः ३८ प्रयच्छास्मासु लोकेश पार्थिवं नरपुंगवम् । यस्मै पूजां प्रयुञ्जाना धूतपापाश्चरेमहि ३९ न वसामो विना राज्ञा एष नो निश्चयः परः । ततो ब्रह्मा सुरश्रेष्ठो लोकपालान्सवासवान् ४० समाहूयाब्रवीत्सर्वांस्तेजोभागान्प्रयच्छत । ततो ददुर्लोकपालाः सर्वे भागान्स्वतेजसः ४१ अक्षुपच्च ततो ब्रह्मा यतो जातः

मिळालेली वस्तु आपण दिल्यास फारच मोठें फल प्राप्त होतें असें सांगितलें आहे ३१. हें भूषण धारण करण्यास तूंच योग्य असून मोठीं मोठीं फलें देण्यास तूंच समर्थ आहेस आणि इंद्रादि देवांचेंही रक्षण तुझ्या हातून होणें शक्य आहे ३२. तस्मात्, हे प्रजाधिपते, तुला मी जें हें भूषण आदरानें देत आहें त्याचा तूं स्वीकार कर". ह्यानंतर इक्ष्वाकूंच्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या महारथी रामानें त्या महात्म्याशीं भाषण केलें ३३. विचारवानांमध्यें श्रेष्ठ असलेला राम क्षत्रधर्माकडे लक्ष्य देऊन त्यांना ह्मणाला " हे भगवन्, हा प्रतिग्रह ब्राह्मणाला दोषावह नाहीं ३४; परंतु, हे विप्र, क्षत्रियांनीं हा प्रतिग्रह कसा करावा ? हे श्रेष्ठ विप्र, क्षत्रियांना प्रतिग्रह अत्यंत निंद्य मानिला आहे ३५ आणि विशेषतः ब्राह्मणानें दिलेला प्रतिग्रह क्षत्रियानें घेणें तर निंद्यच आहे; ह्यास्तव, आपणच ह्याचा काय तो निर्णय सांगा." ह्याप्रमाणें रामानें भाषण केलें असतां अगस्त्यमहर्षि त्याला ह्मणाले ३६ " हे रामा, पूर्वी ब्रह्मभूत कृतयुग सुरू असतांना पृथ्वीवरील सर्व प्रजा राजरहित होत्या व देवांना मात्र इंद्र हा राजा होता ३७. तेव्हां त्या प्रजा देवाधिदेव ब्रह्मदेवाकडे राजाकरितां गेल्या आणि ह्मणाल्या " हे देवा, तूं इंद्र हा देवांचा राजा स्थापन केला आहेस ३८. ह्यास्तव, हे जगदीशा, आह्मांलाही तूं एक पुरुषश्रेष्ठ राजा दे; ह्मणजे त्याला मान देऊन आह्मी निष्पाप राहूं ३९. राजावांचून रहावयाचें नाहीं असा आमचा पूर्ण निश्चय झाला आहे." तदनंतर सुरश्रेष्ठ ब्रह्मा इंद्रासहवर्तमान लोकपालांना ४० आह्वान करून "तेजाचे अंश द्या" असें सर्वांना ह्मणाला असतां

१ कंसांतील चवदा श्लोकांवर टीका नाहीं.

क्षुपो नृपः । तं ब्रह्मा लोकपालानां ममांशैः समयोजयत् ४२ ततो ददौ नृपं तासां प्रजानामीश्वरं क्षुपम् । तत्रैन्द्रेण च भागेन महीमाज्ञापयन्नृपः ४३ वारुणेन तु भागेन वपुः पुष्यति पार्थिवः । कौबेरेण तु भागेन वित्तप्राभां ददौ तदा ४४ यस्तु याम्योऽभवद्भागस्तेन शास्ति स्म स प्रजाः । तत्रैन्द्रेण नरश्रेष्ठ भागेन रघुनन्दन ४५ प्रतिगृह्णीष्व भद्रं ते तारणार्थं मम प्रभो।तद्रामः प्रतिजग्राह मुनेस्तस्य महात्मनः ४६ दिव्यमाभरणं चित्रं प्रदीप्तमिव भास्करम् । प्रतिगृह्य ततो रामस्तदाभरणमुत्तमम् ४७) आगमं तस्य दीप्तस्य प्रष्टुमेवोपचक्रमे । अत्यद्भुतमिदं दिव्यं वपुषा युक्तमद्भुतम् ४८ कथं वा भवता प्राप्तं कुतो वा केन वा हृतम् । कौतूहलतया ब्रह्मन्पृच्छामि त्वां महायशः ४९ आश्चर्याणां बहूनां हि निधिः परमको भवान् । एवं ब्रुवति काकुत्स्थे मुनिर्वाक्यमथाब्रवीत् ॥ शृणु राम यथावृत्तं पुरा त्रेतायुगे युगे ५० [ ३३१८ ]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे षट्सप्ततितमः सर्गः ॥ ७६ ॥

---

सर्व लोकपालांनीं आपआपले अंश दिले ४१. तदनंतर ब्रह्मदेवाला शिंक आली; त्या शिंकेपासून क्षुप ह्मणून राजा उत्पन्न झाला व त्या राजाचे ठिकाणीं ब्रह्मदेवानें लोकपालांचे अंश ठेविले ४२. तदनंतर त्या प्रजांना ब्रह्मदेवानें क्षुप हा अधिपति दिला. त्या लोकपालांच्या अंशांपैकीं इंद्राच्या अंशानें तो क्षुपराजा पृथ्वीवर अधिकार चालवीत असे ४३; वरुणाच्या अंशानें तो राजा प्रजेचें पोषण करीत असे; कुबेराच्या अंशानें तो त्यांचे ठिकाणीं कुबेराचें तेज उत्पन्न करीत असे ४४ आणि यमाच्या अंशानें तो प्रजाजनांना शासन करीत असे. हे पुरुषश्रेष्ठ रघुनंदना, हे प्रभो, तुझें देव बरें करो; त्यांपैकीं इंद्राच्या अंशानें, तूं माझा उद्धार करण्याकरितां प्रतिग्रह घे." ह्यानंतर त्या महात्म्या अगस्त्य मुनींचें तें भूषण रामानें स्वीकारिलें ४५,४६; तें दिव्य भूषण मनोहर असून सूर्याप्रमाणें देदीप्यमान् होतें. असो. तें उत्कृष्ट भूषण स्वीकारिल्यानंतर राम ४७ तें उज्ज्वल भूषण कोठून प्राप्त झालें हें समजण्याकरितां त्या अगस्त्य मुनींना ह्मणाला "हे ब्रह्मन्, हे महाकीर्तिमान् मुने, अत्यंत अद्भुत आणि मनोहर कांतीनें युक्त असें हें दिव्य भूषण आपणांला कसें प्राप्त झालें ? कोठून प्राप्त झालें ? व कोणीं दिलें ? हें उत्कंठेमुळें मी आपणाला विचारीत आहें ४८,४९. आपण अनेक आश्चर्यांचें प्रचंड भांडारच आहां." ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम प्रश्न करूं लागला असतां अगस्त्यमुनि त्याला ह्मणाले "हे रामा, पूर्वीं त्रेतायुगामध्यें काय वर्तमान घडलें आहे हें तूं श्रवण कर ५०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं शाहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७६ ॥

पुरा त्रेतायुगे राम बभूव बहुविस्तरम् । समन्ताद्योजनशतं विमृगं पक्षिवर्जितम् १ तस्मिन्निर्मानुषेऽरण्ये कुर्वाणस्तप उत्तमम् । अहमाक्रमितुं सौम्य तदारण्यमुपागमम् २ तस्य रूपमरण्यस्य निर्देष्टुं न शशाक ह । फलमूलैः सुखास्वादैर्बहुरूपैश्च काननैः ३ तस्यारण्यस्य मध्ये तु सरो योजनमायतम् । हंसकारण्डवाकीर्णं चक्रवाकोपशोभितम् ४ पद्मोत्पलसमाकीर्णं समतिक्रान्तशैवलम् । तदाश्चर्यमिवात्यर्थं सुखास्वादमनुत्तमम् ५ अरजस्कं तदाक्षोभ्यं श्रीमत्पक्षिगणायुतम् । तस्मिन्सरःसमीपे तु महदद्भुतमाश्रमम् ६ पुराणं पुण्यमत्यर्थं तपस्विजनवर्जितम् । तत्राहमवसं रात्रिं नैदाघीं पुरुषर्षभ ७ प्रभाते काल्यमुत्थाय सरस्तदुपचक्रमे । अथापश्यं शवं तत्र सुपुष्टमरजः क्वचित् ८ तिष्ठन्तं परया लक्ष्म्या तस्मिंस्तोयाशये नृप । तमर्थं चिन्तयानोऽहं मुहूर्तं तत्र राघव ९ विष्ठितोऽस्मि सरस्तीरे किं न्विदं स्यादिति प्रभो । अथापश्यं मुहूर्तात्तु दिव्यमद्भुतदर्शनम् १० विमानं परमोदारं हंस-

---

हे रामा, पूर्वी त्रेतायुगामध्यें औरस चौरस शंभर शंभर योजनें असें एक अति विशाल अरण्य पशुपक्षिरहित होतें १. त्या निर्जन अरण्यांत उत्कृष्ट तपश्चर्या करून राहण्याकरितां, हे सौम्य, मी तिकडे गेलों २. त्या अरण्याच्या स्वरूपाचा निर्देश करण्यास मी समर्थ नाहीं; कारण, ज्यांचा स्वाद सुखावह आहे अशा फलमूलांनीं व अनेक प्रकारच्या वृक्षसमुदायांनीं तें अरण्य भरलेलें होतें ३. त्या अरण्याचे मध्यभागीं शंभर योजनें लांब असें एक सरोवर होतें; तें सरोवर हंस व कारंडव पक्ष्यांनीं व्याप्त झालेलें होतें; चक्रवाक पक्ष्यांनीं तें सुशोभित झालें होतें ४; नाना प्रकारच्या कमलांनीं तें गजबजून गेलें होतें; त्यांत शेवाळ मुळींच नव्हतें; तें अत्यंत आश्चर्यकारक असून अनुपम होतें; त्यांतील उदक स्वादिष्ठ असून तें सुखावह होतें ५; त्यांत मल मुळींच नव्हता आणि भव्य भव्य पक्षिसमुदायांनीं युक्त असलेलें तें सरोवर शांत होतें. त्या सरोवरासमीप एक मोठा अद्भुत आश्रम होता ६. तो पुरातन आश्रम अतिशय पवित्र होता, पण त्यांत कोणीही तपस्वी रहात नव्हता. त्या आश्रमामध्यें, हे पुरुषश्रेष्ठा रामा, एक ग्रीष्मऋतूंतील रात्र मीं काढिली ७; आणि प्रभातकालीं मोठ्या पहाटेस उठून त्या सरोवराकडे चाललों तों त्या ठिकाणीं एक शव माझ्या दृष्टीं पडलें. तें शव चांगलें पुष्ट होतें; त्याचे ठिकाणीं कोठें मल नव्हता ८ आणि, हे राजा, त्या जलाशयामध्यें तें अतिशयच खुलत होतें. हे राघवा, हे प्रभो, त्या गोष्टीचा विचार करीत करीत म्हणजे "हें काय असावें", असा मनांत विचार करीत करीत मी त्या सरोवराच्या तीरीं बसलों असतांना मुहूर्तानंतर एक दिव्य व अद्भुत विमान मीं नेत्रें अवलोकन केलें. तें विमान फार विशाल असून त्याला शिरांतील हंस लाविलेले होते व

युक्तं मनोजवम् ११ अथर्षी स्वर्गिणं तत्र विमाने रघुनन्दन । उपासतेऽ-
प्सरसां वीर सहस्रं दिव्यभूषणम् १२ गायन्ति काश्चिद्रम्याणि वादयन्ति
तथाऽपराश्च मृदङ्गवीणापणवान्नृत्यन्ति च तथाऽपराः १३ अपराश्चन्द्ररश्म्या-
भैर्हेमदण्डैर्महाधनैः । दोधूयुर्वदनं तस्य पुण्डरीकनिभेक्षणाः १४ ततः
सिंहासनं हित्वा मेरुकूटमिवांशुमान् । पश्यतो मे तदा राम विमानादवरुह्य
च १५ तं शवं भक्षयामास स स्वर्गी रघुनन्दन । ततो भुक्त्वा यथाकामं
मांसं बहु सुपीवरम् १६ अवतीर्य सरः स्वर्गी संस्प्रष्टुमुपचक्रमे । उपस्पृश्य
यथान्यायं स स्वर्गी रघुनन्दन १७ आरोढुमुपचक्राम विमानवरमुत्तमम् ।
तमहं देवसंकाशमारोहन्तमुदीक्ष्य वै १८ अथाहमब्रुवं वाक्यं तमेव पुरुष-
र्षभ । को भवान्देवसंकाश आहारश्च विगर्हितः १९ त्वयेदं भुज्यते सौम्य
किमर्थं वक्तुमर्हसि । कस्य स्यादीदृशो भाव आहारो देवसंमत २० आश्चर्यं
वर्तते सौम्य श्रोतुमिच्छामि तत्त्वतः । नाहमौपयिकं मन्ये तव भक्ष्यमिमं
शवम् २१ इत्येवमुक्तः स नरेन्द्र नाकी कौतूहलात्सूनृतया गिरा च । श्रुत्वा च

---

मनाप्रमाणें तें वेगवान् होतें ९,१०,११. हे रघुनंदना वीरा, त्या विमानामध्यें दिव्य भूषणें धारण केलेल्या हजारों अप्सरा एका स्वर्गवासी पुरुषाची सेवा करीत होत्या १२; कांहीं मनोहर गायन करीत होत्या; कांहीं मृदंग, वीणा व पणव हीं वाद्यें वाजवीत होत्या; कांहीं नृत्य करीत होत्या १३ आणि कमलाप्रमाणें ज्यांचे नेत्र आहेत अशा कांहीं अप्सरा त्याच्या मुखाशीं चंद्रकिरणाप्रमाणें स्वच्छ, महामूल्यवान् व सुवर्णदंडानें युक्त अशा चवऱ्या वारीत होत्या १४. तदनंतर, मेरुपर्वताचें शिखर सोडून येणाऱ्या सूर्याप्रमाणें सिंहासन सोडून देऊन, हे रामा, त्या विमानांतून तो खालीं उतरला आणि मी पहात असतांना १५, हे रघुनंदना रामा, त्या स्वर्गवासी पुरुषानें तें शव भक्षण केलें. तदनंतर अत्यंत पुष्ट असें विपुल मांस इच्छे-प्रमाणें भक्षण केल्यानंतर तो स्वर्गवासी पुरुष सरोवरामध्यें उतरून स्नान वगैरे करूं लागला आणि स्नान वगैरे यथाविधि आटोपल्यानंतर, हे रघुनंदना रामा, तो स्वर्गवासी पुरुष १६,१७, त्या अनुपम श्रेष्ठ विमानामध्यें आरूढ होऊं लागला. तेव्हां तो देवतुल्य पुरुष आरोहण करीत असल्याचें अवलोकन करून १८, हे पुरुषश्रेष्ठा, मीं त्याला विचारिलें "हे देवतुल्य, आपण कोण? व हा निंद्य आहार १९. आपण कां स्वीकारीत असतां? हें, हे सौम्य, आपण मला कथन करावें. हे देवतुल्य, अशाप्रकारचा आहार कोणाला बरें योग्य होणार आहे? २०. हे सौम्य, मला ह्याची उत्कंठा लागून राहिल्यामुळें ह्याचें खरें खरें कारण श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. आपलें शवभोजन मला योग्य दिसत नाहीं" २१. हे पुरुषश्रेष्ठा, ह्याप्र-माणें उत्कंठेनें व मधुर वाणीनें मीं त्या स्वर्गवासी पुरुषाला प्रश्न केला असतां माझें हें सर्व

वाक्यं मम सर्वमेतत्मवै तथा चाकथयन्ममेति २२ [३३४०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे सप्तसप्ततितमः सर्गः ॥७७॥

श्रुत्वा तु भाषितं वाक्यं मम राम शुभाक्षरम् । प्राञ्जलिः प्रत्युवाचेदं स स्वर्गी रघुनन्दन १ शृणु ब्रह्मन्पुरा वृत्तं ममैतत्सुखदुःखयोः । अनतिक्रमणीयं च यथा पृच्छसि मां द्विज २ पुरा वैदर्भको राजा पिता मम महायशाः । सुदेव इति विख्यातस्त्रिषु लोकेषु वीर्यवान् ३ तस्य पुत्रद्वयं ब्रह्मन्द्वाभ्यां स्त्रीभ्यामजायत । अहं श्वेत इति ख्यातो यवीयान्सुरथोऽभवत् ४ ततः पितरि स्वर्याते पौरा मामभ्यषेचयन् । तत्राहं कृतवान्राज्यं धर्म्यं च सुसमाहितः ५ एवं वर्षसहस्राणि समतीतानि सुव्रत । राज्यं कारयतो ब्रह्मन्प्रजा धर्मेण रक्षतः ६ सोऽहं निमित्ते कस्मिंश्चिद्विज्ञातायुर्द्विजोत्तम । कालधर्मं हृदि न्यस्य ततो वनमुपागमम् ७ सोऽहं वनमिदं दुर्गं मृगपक्षिविवर्जितम् । तपश्चर्तुं प्रविष्टोऽस्मि समीपे सरसः शुभे ८ भ्रातरं सुरथं राज्ये अभिषिच्य महीपतिम् । इदं सरः समासाद्य तपस्तप्तं मया चिरम् ९ सोऽहं वर्षसहस्राणि तपस्त्रीणि महावने । तप्त्वा सुदुष्करं प्राप्तो ब्रह्मलो-

---

भाषण ऐकून घेऊन त्यानें त्याचें सर्व इत्थंभूत कारण मला कथन केलें २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सत्याहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७३ ॥

हे रघुनंदना रामा, सौम्य शब्दांनीं मीं केलेलें भाषण श्रवण केल्यावर तो स्वर्गवासी पुरुष हात जोडून मला ह्मणाला १ "हे ब्रह्मन्, हे द्विज, ज्याअर्थी आपण मला विचारीत आहां त्याअर्थी ह्या माझ्या सुखदुःखांना काय दुस्तर कारण घडून आलें आहे हें आपण श्रवण करा २. पूर्वीं सुदेव ह्मणून त्रैलोक्यामध्यें विख्यात असलेला विदर्भ देशाचा राजा माझा पिता होऊन गेला; तो वीर्यवान् असून महाकीर्तिमान् होता ३. हे ब्रह्मनिष्ठ, त्याला दोन स्त्रियांपासून दोन पुत्र झाले. त्यांपैकीं मी ज्येष्ठ असून श्वेत ह्या नांवानें विख्यात होतों व सुरत ह्मणून मला एक कनिष्ठ भ्राता होता ४. तदनंतर पिता स्वर्गस्थ झाल्यावर पौरजनांनीं मला राज्याभिषेक केला व मींही त्या देशामध्यें फारच सावध राहून धर्मानें राज्य केलें ५. हे सुव्रत, हे ब्रह्मन्, ह्याप्रमाणें मी धर्मानें प्रजेचें रक्षण करून राज्य चालवीत असतांना हजारों वर्षें लोटलीं ६. हे द्विजश्रेष्ठ, पुढें कांहीं कारणामुळें मला आपलें आयुष्य समजून आलें असतां अमुक अमुक वेळेला आपणांला मृत्यु येणार ही गोष्ट मनामध्यें ठेवून मी वनांत गेलों ७. सारांश, ह्या सरोवराच्या पवित्र तीरीं ह्या पशुपक्षिरहित दुर्गम वनामध्यें मी तपश्चर्या करण्याकरितां प्रविष्ट झालों ८. सुरथ भ्रात्याला मीं भूपति ह्मणून राज्याभिषेक केला

तदद्भुततमं वाक्यं श्रुत्वाऽगस्त्यस्य राघवः । गौरवाद्विस्मयाच्चैव भूयः प्रष्टुं प्रचक्रमे १ भगवंस्तद्वनं घोरं तपस्तप्यति यत्र सः । श्वेतो वैदर्भको राजा कथं तदमृगद्विजम् २ तद्वनं स कथं राजा शून्यं मनुजवर्जितम् । तपश्चर्तुं प्रविष्टः स श्रोतुमिच्छामि तत्त्वतः ३ रामस्य वचनं श्रुत्वा कौतूहलसमन्वितम् । वाक्यं परमतेजस्वी वक्तुमेवोपचक्रमे ४ पुरा कृतयुगे राम मनुर्दण्डधरः प्रभुः । तस्य पुत्रो महानासीदिक्ष्वाकुः कुलनन्दनः ५ तं पुत्रं पूर्वकं राज्ये निक्षिप्य भुवि दुर्जयम् । पृथिव्यां राजवंशानां भव कर्तेत्युवाच तम् ६ तथैव च प्रतिज्ञातं पितुः पुत्रेण राघव । ततः परमसंतुष्टो मनुः पुत्रमुवाच ह ७ प्रीतोऽस्मि परमोदार कर्ता चासि न संशयः । दण्डेन च प्रजा रक्ष मा च दण्डमकारणे ८ अपराधिषु यो दण्डः पात्यते मानवेषु वै । स दण्डो विधिवन्मुक्तः स्वर्गं नयति पार्थिवम् ९ तस्माद्दण्डे महाबाहो यत्नवान्भव पुत्रक । धर्मो हि परमो लोके कुर्वतस्ते भविष्यति १० इति तं बहु संदिश्य मनुः पुत्रं समाधिना । जगाम त्रिदिवं हृष्टो ब्रह्मलोकं सनातनम् ११ प्रयाते त्रिदिवं तस्मि-

---

अगस्त्यमुनींचें तें अत्यंत मनोहर भाषण श्रवण केल्यानंतर राम विस्मयामुळें व त्यांचे उत्पन्न झालेल्या पूज्य बुद्धीमुळें पुनरपि त्यांना ह्मणाला १ "हे भगवन्, ज्या घोर वनामध्यें तो विदर्भदेशाधिपति श्वेतराजा तपश्चर्या करीत होता तें वन कोणत्या कारणानें पशु पक्षिरहित झालें होतें ? २ आणि तो राजा तरी तपश्चर्या करण्याकरितां त्या शून्य व निर्जन वनामध्येंच कां प्रविष्ट झाला ? ह्याचें खरें खरें कारण श्रवण करण्याची माझी इच्छा आहे ३." रामाचें हें उत्कंठेनें युक्त असलेलें भाषण श्रवण केल्यानंतर महातेजस्वी अगस्त्यमुनींनीं सांगण्याला आरंभच केला ४. ( ते ह्मणाले ) " हे रामा, पूर्वी कृतयुगामध्यें मनु ह्मणून शास्ता प्रभु होऊन गेला. त्याला इक्ष्वाकु ह्मणून कुलदीपक पुत्र होता ५. पृथ्वीमध्यें अजिंक्य असलेल्या त्या ज्येष्ठ पुत्राला त्यानें राज्यावर बसविलें आणि " पृथ्वींतील राजवंशाचा तूं उत्पादक हो " असें त्यानें त्याला सांगितलें ६. तेव्हां, हे राघवा " ठीक आहे " ह्मणून त्या पुत्रानें पित्याला वचन दिलें असतां मनु अतिशय संतुष्ट होऊन पुत्राला ह्मणाला ७ " हे अत्यंत उदार पुत्रा, मी संतुष्ट झालों आहें; तूं ह्याप्रमाणें करशील ह्यांत संशय नाहीं. तूं दंडाच्या योगानें प्रजेचें रक्षण कर; परंतु, विनाकारण कोणाला दंड करूं नको ८. अपराधी मनुष्यांना ( जो योग्य ) दंड होत असतो तो दंड न्यायानें होत असल्यामुळें राजाला स्वर्गास नेतो ९. तस्मात्, हे महापराक्रमी पुत्रा, दंडासंबंधानें तूं दक्ष रहात जा; तूं दक्ष राहून जगतामध्यें दंड करूं लागलास ह्मणजे तुला मोठें पुण्य लागेल " १०. ह्याप्रमाणें पुत्राला मनूनें पुष्कळ उपदेश केला आणि समाधि लावून तो आनंदानें स्वर्गामध्यें सनातन

न्निक्ष्वाकुरमितप्रभः । जनयिष्ये कथं पुत्रानिति चिन्तापरोऽभवत् १२ कर्म-
भिर्बहुरूपैश्च तैस्तैर्मनुसुतस्तदा । जनयामास धर्मात्मा शतं देवसुतोप-
मान् १३ तेषामवरजस्तात सर्वेषां रघुनन्दन । मूढश्चाकृतविद्यश्च न शुश्रू-
षति पूर्वजान् १४ नाम तस्य च दण्डेति पिता चक्रेऽल्पतेजसः । अवश्यं
दण्डपतनं शरीरेऽस्य भविष्यति १५ अपश्यमानस्तं देशं घोरं पुत्रस्य राघव ।
विन्ध्यशैवलयोर्मध्ये राज्यं प्रादादरिन्दम १६ स दण्डस्तत्र राजाभूद्रम्ये पर्व-
तरोधसि । पुरं चाप्रतिमं राम न्यवेशयदनुत्तमम् १७ पुरस्य चाकरोन्नाम
मधुमन्तमिति प्रभो । पुरोहितं तूशनसं वरयामास सुव्रतम् १८ एवं स
राजा तद्राज्यमकरोत्सपुरोहितः । प्रहृष्टमनुजाकीर्णं देवराजो यथा दिवि १९
ततः स राजा मनुजेन्द्रपुत्रः सार्धं च तेनोशनसा तदानीम् । चकार राज्यं
सुमहान्महात्मा शक्रो दिवीवोशनसा समेतः २० [३३८९] इत्यार्षे श्रीम-
द्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोनाशीतितमः सर्गः ७९॥

एतदाख्याय रामाय महर्षिः कुम्भसंभवः । अस्यामेवापरं वाक्यं कथा-

---

ब्रह्मलोकीं गेला ११. तो स्वर्गाला गेल्यानंतर महातेजस्वी इक्ष्वाकु " पुत्रोत्पत्ति कशी होईल ह्मणून विचार करूं लागला १२ आणि नानाप्रकारचीं कर्मे करून त्या धर्मात्म्या मनुपुत्रानें देवकुमारतुल्य असे शंभर पुत्र उत्पन्न केले १३. बा रघुनंदना, त्या सर्वांमध्यें जो कनिष्ठ पुत्र होता तो मूढ व विद्याहीन असून ज्येष्ठ भ्रात्यांचीही शुश्रूषा करीत नसे १४. तेव्हां " ह्याच्या शरीराला अवश्य दंड भोगावा लागेल " असें समजून पित्यानें त्या निस्तेज पुत्राचें "दंड" हें नांव ठेविलें १५. नंतर, हे रामा, त्या पुत्राला योग्य असा घोर प्रदेश समीप न आढळल्य मुळें विंध्य आणि शैवल ह्यांमध्यें असलेला प्रदेश, हे शत्रुदमना राजा, त्यानें त्याला राज्य करण्याकरितां अर्पण केला १६. तेव्हां पर्वततटाप्रमाणें असलेल्या त्या डोंगराळ व रम्य प्रदेशामध्यें तो राजा झाला आणि, हे रामा, त्यानें तेथें अप्रतिम नगर वसविलें १७. हे प्रभो, त्या नगराचें नांव मधुमंत असें ठेविलें आणि महातपस्वी उशनसमुनींना त्यानें पुरोहित वरिलें १८. असो. स्वर्गामध्यें राज्य करणाऱ्या देवराज इंद्राप्रमाणें त्या दंड राजानें पुरोहितासहवर्तमान त्या प्रदेशाचें राज्य केलें. त्या राज्यांत जिकडे तिकडे मनुष्यें आनंदित होतीं १९. सारांश, स्वर्गामध्यें देवगुरूंसहवर्तमान राज्य करणाऱ्या महात्म्या इंद्राप्रमाणें त्या महात्म्या राजपुत्र दंड राजानें उशनसमुनींसहवर्तमान राज्य केलें २०. ह्याप्र-माणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकूणऐंशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ७९ ॥

ह्याप्रमाणें रामाला सांगितल्यानंतर अगस्त्यमहर्षि ह्याच कथेच्या संबंधानें दुसरी ही हकी-

यामुपचक्रमे १ ततः स दण्डः काकुत्स्थ बहुवर्षगणायुतम् । अकरोत्तत्र दान्तात्मा राज्यं निहतकण्टकम् २ अथ काले तु कस्मिंश्चिद्राजा भार्गवमाश्रमम् । रमणीयमुपाक्रामच्चैत्रे मासि मनोरमे ३ तत्र भार्गवकन्यां स रूपेणाप्रतिमां भुवि । विचरन्तीं वनोद्देशे दण्डोऽपश्यदनुत्तमाम् ४ स दृष्ट्वा तां सुदुर्मेधा अनङ्गशरपीडितः । अभिगम्य सुसंविग्नः कन्यां वचनमब्रवीत् ५ कुतस्त्वमसि सुश्रोणि कस्य वाऽसि सुता शुभे । पीडितोऽहमनङ्गेन पृच्छामि त्वां शुभानने ६ तस्य त्वेवं ब्रुवाणस्य मोहोन्मत्तस्य कामिनः । भार्गवी प्रत्युवाचेदं वचः सानुनयं त्विदम् ७ भार्गवस्य सुतां विद्धि देवस्याक्लिष्टकर्मणः । अरजां नाम राजेन्द्र ज्येष्ठामाश्रमवासिनीम् ८ मा मां स्पृश बलाद्राजन्कन्या पितृवशा ह्यहम् । गुरुः पिता मे राजेन्द्र त्वं च शिष्यो महात्मनः ९ व्यसनं सुमहत्क्रुद्धः स ते दद्यान्महातपाः । यदि वाऽन्यन्मया कार्यं धर्मदृष्टेन सत्पथा १० वरयस्व नरश्रेष्ठ पितरं मे महाद्युतिम् । अन्यथा तु फलं तुभ्यं भवेद्घोराभिसंहितम् ११ क्रोधेन हि पिता मेऽसौ त्रैलोक्यमपि निर्दहेत् । दास्यते चानवद्याङ्ग

---

कत सांगूं लागले १. ( ते ह्मणाले ) " हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तदनंतर त्या दंडराजानें जितेंद्रिय राहून अनेक वर्षसमुदाय लोटेपर्यंत त्याठिकाणीं निष्कंटक राज्य केलें २. पुढें एकेवेळीं मनोहर चैत्र महिन्यामध्यें तो दंडराजा रमणीय भार्गवाश्रमांत गेला असतां ३ सर्व पृथ्वीमध्यें रूपानें अप्रतिम अशी उत्कृष्ट भार्गवकन्या त्या तपोवनामध्यें संचार करीत असतांना त्याच्या दृष्टीं पडली ४. तेव्हां मदनबाणांनीं व्याकुल झालेला तो अत्यंत अविचारी राजा अतिशय उद्विग्न झाला आणि त्या कन्येला ह्मणाला ५ " हे सुंदरि, तूं कोठून आली आहेस ? हे कल्याणि, तूं कोणाची कन्या आहेस ? हे सुमुखि, मदनानें पीडित झाल्यामुळें मी तुला प्रश्न करीत आहें " ६. ह्याप्रमाणें मोहानें उन्मत्त झालेला तो विषयी दंड राजा विचारूं लागला असतां ती भार्गवकन्या विनयपूर्वक त्याला ह्मणाली ७ " हे राजेंद्रा, सदाचरणसंपन्न प्रभु भार्गवाची मी आश्रमामध्यें वास्तव्य करणारी अरजानामक ज्येष्ठ कन्या आहे असें आपण समजा ८. हे नृप, आपण माझ्यावर बलात्कारानें हात टाकूं नका. हे राजेंद्र, माझा पिता आपला गुरु असून आपण त्या महात्म्याचे शिष्य आहां ९. तो महातपस्वी पिता क्रुद्ध होऊन आपणांला फारच मोठें दुःख देईल अथवा मी आपल्याशीं कांहीं दुसऱ्या रीतीनें वागावें असें आपणांस वाटत असल्यास धर्मविहित सन्मार्गाला अनुसरून १०, हे नरश्रेष्ठ, आपण माझ्या महातेजस्वी पित्याची माझ्या विषयीं प्रार्थना करा. असें न केल्यास आपणांला परिणामीं भयंकर असें फल प्राप्त होईल ११. हे निर्दोष भूपते, तो माझा पिता क्रुद्ध झाला असतां त्रैलोक्यही दग्ध करून टाकील;

तव मा याचितः पिता १२ एवं ब्रुवाणामरजां दण्डः कामवशं गतः । प्रत्युवाच मदोन्मत्तः शिरस्याधाय चाञ्जलिम् १३ प्रसादं कुरु सुश्रोणि न कालं क्षेप्तुमर्हसि । त्वत्कृते हि मम प्राणा विदीर्यन्ते वरानने १४ त्वां प्राप्य तु वधो वापि पापं वापि सुदारुणम् । भक्तं भजस्व मां भीरु भजमानं सुविह्वलम् १५ एवमुक्त्वा तु तां कन्यां दोर्भ्यां प्राप्य बलाद्बली । विस्फुरन्तीं यथाकामं मैथुनायोपचक्रमे १६ तमनर्थं महाघोरं दण्डः कृत्वा सुदारुणम् । नगरं प्रययावाशु मधुमन्तमनुत्तमम् १७ अरजाऽपि रुदन्ती सा आश्रमस्याविदूरतः । प्रतीक्षते सुसंत्रस्ता पितरं देवसंनिभम् १८ [ ३४०७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डेऽशीतितमः सर्गः ॥८०॥

स मुहूर्तादुपश्रुत्य देवर्षिरमितप्रभः । स्वमाश्रमं शिष्यवृतः क्षुधार्तः संन्यवर्तत १ सोऽपश्यदरजां दीनां रजसा समभिप्लुताम् । ज्योत्स्नामिव ग्रहग्रस्तां प्रत्यूषे न विराजतीम् २ तस्य रोषः समभवत्क्षुधार्तस्य विशेषतः । निर्दहन्निव लोकांस्त्रीञ्शिष्यांश्चेतदुवाच ह ३ पश्यध्वं विपरीतस्य दण्डस्या-

---

परंतु, त्याची आपण प्रार्थना केल्यास तो कदाचित् मला आपल्या स्वाधीन करीन " १२. ह्याप्रमाणें ती अरजा कन्या सांगत असतांना मदनाच्या अधीन झालेला तो मदोन्मत्त दंड राजा मस्तकीं हात जोडून तिला ह्मणला १३ " हे सुंदरि, माझ्यावर कृपा कर. आतां कालक्षेप करूं नको. हे समुखि, तुझ्याकरितां माझे प्राण विदीर्ण होत आहेत १४. तूं प्राप्त झाल्यानंतर माझा वध होवो अथवा मला अतिभयंकर पातक लागो ! हे भीरु, मदनानें अतिशय विह्वल होऊन व तुझ्या ठिकाणीं अनुरक्त होऊन तुझी शुश्रूषा करण्यास तयार असलेल्या मला तूं वश हो १५." ह्याप्रमाणें त्या कन्येला सांगितल्यानंतर त्या बलाढ्य दंडराजानें बलात्कारानें ती कन्या हातांनीं आवळून धरिली आणि ती तडफड करीत असतांनाही आपले इच्छेप्रमाणें तो तिच्याशीं समागम करूं लागला १६. हा महाघोर व अतिदारुण अनर्थ करून दंड राजा आपल्या मधुमंतनामक अनुपम नगरामध्यें सत्वर चालता झाला १७ व इकडे ती अरजा कन्याही अतिशय क्षुब्ध होऊन आश्रमाचेसमीपच आपल्या देवतुल्य पित्याची रडत रडत वाट पहात बसली १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत-श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं ऐंशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८०॥

हा वृत्तांत एका मुहूर्तानंतर त्या अतुलतेजस्वी देवर्षींना समजला आणि क्षुधित झालेले ते मुनि शिष्यांसहवर्तमान आपल्या आश्रमाला परत आले १. तेव्हां आपली कन्या अरजा दीन होऊन रजानें भरली आहे व प्रभातसमयीं चंद्रग्रहण लागलें असतां दिसणाऱ्या चांदण्याप्रमाणें ती चांगलीशीं झळकत नाहीं असें त्यांनीं अवलोकन केलें २. असें त्यांच्या

विदितात्मनः । विपत्तिं घोरसङ्काशां क्रुद्धादग्निशिखामिव ४ क्षयोऽस्य दुर्मतेः प्राप्तः सानुगस्य महात्मनः । यः प्रदीप्तां हुताशस्य शिखां वै स्प्रष्टुमर्हति ५ यस्मात्स कृतवान्पापमीदृशं घोरसंहितम् । तस्मात्प्राप्स्यति दुर्मेधाः फलं पापस्य कर्मणः ६ सप्तरात्रेण राजासौ सपुत्रबलवाहनः । पापकर्मसमाचारो वधं प्राप्स्यति दुर्मतिः ७ समन्ताद्योजनशतं विषयं चास्य दुर्मतेः । धक्ष्यते पांसुवर्षेण महता पाकशासनः ८ सर्वसत्त्वानि यानीह स्थावराणि चराणि च । महता पांसुवर्षेण विलयं सर्वतोऽगमन् ९ दण्डस्य विषयो यावत्तावत्सर्वं समुच्छ्रयम् । पांसुवर्षमिवालक्ष्यं सप्तरात्रं भविष्यति १० इत्युक्त्वा क्रोधताम्राक्षस्तमाश्रमनिवासिनम् । जनं जनपदान्तेषु स्थीयतामिति चाब्रवीत् ११ श्रुत्वा तूशनसो वाक्यं सोऽश्रमावसथो जनः । निष्क्रान्तो विषयात्तस्मात्स्थानं चक्रेऽथ बाह्यतः १२ स तथोक्त्वा मुनिजनमरजामिदमब्रवीत् । इहैव वस दुर्मेधे आश्रमे सुसमाहिता १३ इदं योजनपर्यन्तं सरः सुरुचिरप्रभम् । अरजे विज्वरा भुङ्क्ष्व कालश्चात्र

---

अवलोकनांत आल्यामुळें आणि विशेषतः त्यावेळीं ती क्षुधेनें व्याप्त झाली असल्यामुळें त्यांना क्रोध आला आणि त्रैलोक्यच दग्ध करण्यास उद्युक्त झाले आहेत कीं काय असे ते मुनि आपल्या शिष्यांना ह्मणाले ३ " आपली योग्यता न समजणाऱ्या विपरीत दंडराजावर मी क्रुद्ध झाल्यामुळें अग्निज्वालेप्रमाणें कसा भयंकर अनर्थ गुदरेल तो तुह्मी अवलोकन करा ४. ह्या महात्म्या अविचारी राजाचा अनुयायांसहवर्तमान नाश होण्याचा समय प्राप्त झाला आहे व अग्नीच्या प्रदीप्त ज्वालेचाच समागम होण्यास हा योग्य आहे ५. ज्याअर्थी त्यानें हें अशा प्रकारचें घोर पातक केलें आहे त्याअर्थी ह्या पापकर्माचें फल त्या दुर्बुद्धि राजाला प्राप्त होईल ६. सारांश, पापकर्म करणाऱ्या ह्या दुर्बुद्धि दंडराजाचा, पुत्र, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान सात दिवसांत वध होईल ७. ह्या दुर्बुद्धि राजाचा प्रदेश आसपास शंभर योजनें-पर्यंत इंद्र मोठ्या धूलिवृष्टीच्या योगानें नष्ट करून टाकील ८. ह्या प्रदेशामध्यें स्थावर व जंगम असे जे प्राणी असतील ते सर्व प्रचंड धूलिवृष्टीच्या योगानें सर्व प्रकारें लयास जातील ९; आणि दंडराजाचा जितका ह्मणून प्रदेश आहे तितक्या प्रदेशावर धूलिवृष्टीनें धुळीचा ढीग होऊन सात दिवसांत तेथें कांहीं दिसेनासें होईल" १०. असा शाप दिल्यानंतर क्रोधामुळें ज्यांचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशा त्या भार्गव मुनींनीं "दंड राजाच्या प्रदेशाच्या सीमेबाहेर तुह्मी रहा " ह्मणून त्या आश्रमनिवासी लोकांना सांगितलें ११. तेव्हां उशनस् मुनींचें भाषण श्रवण केल्यावर आश्रमामध्यें वास्तव्य करणारे ते लोक त्या देशांतून निघून बाहेर राहिले १२. ह्याप्रमाणें मुनिजनांना सांगितल्यानंतर ते भार्गवऋषि अरजेला ह्मणाले " हे अविचारी कन्ये, तूं साव-

प्रतीक्षतताम् १४ त्वत्समीपे च ये सत्त्वा वासमेष्यन्ति तां निशाम् । अवध्याः पांसुवर्षेण ते भविष्यन्ति नित्यदा १५ श्रुत्वा नियोगं ब्रह्मर्षेः सारजा भार्गवी तदा । तथेति पितरं प्राह भार्गवं भृशदुःखितः १६ इत्युक्त्वा भार्गवो वासमन्यत्र समकारयत् । तच्च राज्यं नरेन्द्रस्य सभृत्यबलवाहनम् १७ सप्ताहाद्भस्मसाद्भूतं यथोक्तं ब्रह्मवादिना । तस्यासौ दण्डविषयो विन्ध्यशैवलयोर्नृप १८ शप्तो ब्रह्मर्षिणा तेन वैधर्म्ये सहिते कृते । ततः प्रभृति काकुत्स्थ दण्डकारण्यमुच्यते १९ तपस्विनः स्थिता ह्यत्र जनस्थानमतोऽभवत् । एतत्ते सर्वमाख्यातं यन्मां पृच्छसि राघव २० संध्यामुपासितुं वीर समयो ह्यतिवर्तते २१ एते महर्षयः सर्वे पूर्णकुम्भाः समन्ततः । कृतोदका नरव्याघ्र आदित्यं पर्युपासते २२ स तैर्ब्राह्मणमभ्यस्तं सहितैर्ब्रह्मवित्तमैः । रविरस्तं गतो राम गच्छोदकमुपस्पृश २३ [३४३०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकाशीतितमः सर्गः ॥८१॥

---

धानपूर्वक येथेंच आश्रमामध्यें रहा १३. हे अरजे, तूं निर्भय होऊन औरस चौरस एक योजन असलेल्या ह्या सरोवराचा उपभोग घे; हें सरोवर दिसण्यांत फारच मनोहर आहे १४. तूं ह्याठिकाणीं कालप्रतीक्षा करीत रहा. त्या रात्रीं जे प्राणी तुझ्यासमीप वास्तव्य करितील त्यांचा त्या धूलिवृष्टीच्या योगानें कधीं वध होणार नाहीं " १५. ब्रह्मर्षींचीं ही आज्ञा श्रवण केल्यानंतर ती अरजा भार्गवी कन्या अतिशय दुःखित झाली आणि त्या भार्गव पित्याला " होय " असें ह्मणाली १६. असो. ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर भार्गवमुनींनींही दुसरीकडे वास्तव्य केलें व दंड राजाचें तें राज्य, सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान १७ ब्रह्मवेत्त्या मुनींच्या ह्मणण्याप्रमाणें सात दिवसांनीं खाक होऊन गेलें. हे राजा, धर्मयुक्त अशा कृतयुगामध्यें धर्मविरुद्ध आचरण त्या राजाच्या हातून घडल्यामुळें विंध्य व शैवल ह्यांचे मध्यभागीं असलेल्या त्याच्या प्रदेशाला त्या ब्रह्मर्षींनीं शाप दिला; व, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तेव्हांपासून त्या प्रदेशाला दंडकारण्य असें नांव पडलें १८,१९. ह्या अरण्यामध्यें तपस्वी राहत असल्यामुळें पुढें जनस्थान ह्मणून हें प्रसिद्धीस आलें. हे राघवा, तूं मला विचारिल्याप्रमाणें हें सर्व कांहीं मीं तुला कथन केलें आहे २०. हे वीरा, आतां संध्यावंदनकालाचें अतिक्रमण होत आहे २१; हे सर्व महर्षि स्नान केले आहेत आणि आपल्यासमीप जलपूर्ण कुंभ ठेवून, हे पुरुषश्रेष्ठा रामा, हे सूर्याची उपासना करीत आहेत २२. सर्व ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांनीं वेदमय उपस्थानही केलें आहे आणि, हे रामा, सूर्य अस्ताचलास गेला आहे; ह्यास्तव, तूंही जा आणि स्नान कर २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एक्यायंशीवा सर्ग समाप्त झाला ॥८१॥

ऋषेर्वचनमाज्ञाय रामः संध्यामुपासितुम् । अपाक्रामत्सरः पुण्यमप्सरोगणसेवितम् १ तत्रोदकमुपस्पृश्य संध्यामन्वास्य पश्चिमाम् । आश्रमं प्राविशद्रामः कुम्भयोनेर्महात्मनः २ तस्यागस्त्यो बहुगुणं कन्दमूलं तथौषधम् । शाल्यादीनि पवित्राणि भोजनार्थमकल्पयत् ३ स भुक्तवान्नरश्रेष्ठस्तदन्नममृतोपमम् । प्रीतश्च परितुष्टश्च तां रात्रिं समुपाविशत् ४ प्रभाते काल्यमुत्थाय कृत्वाह्निकमरिंदमः । ऋषिं समुपचक्राम गमनाय रघूत्तमः ५ अभिवाद्याब्रवीद्रामो महर्षिं कुम्भसंभवम् । आपृच्छे स्वाश्रमं गन्तुं मामनुज्ञातुमर्हसि ६ धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि दर्शनेन महात्मनः । द्रष्टुं चैवागमिष्यामि पावनार्थं महात्मनः ७ तथा वदति काकुत्स्थे वाक्यमद्भुतदर्शनम् । उवाच परमप्रीतो धर्मनेत्रस्तपोधनः ८ अत्यद्भुतमिदं वाक्यं तव राम शुभाक्षरम् । पावनः सर्वभूतानां त्वमेव रघुनन्दन ९ मुहूर्तमपि राम त्वां येऽनुपश्यन्ति केचन । पाविताः स्वर्गभूताश्च पूज्यास्ते त्रिदिवेश्वरैः १० ये च त्वां घोरचक्षुर्भिः पश्यन्ति प्राणिनो भुवि । हतास्ते यमदण्डेन सद्यो

---

ऋषींचें भाषण श्रवण केल्यानंतर राम संध्यावंदन करण्याकरितां अप्सरोगणांनीं आश्रय केलेल्या सरोवराकडे गेला १ आणि तेथें स्नान व सायंसंध्या आटोपल्यानंतर तो राम महात्म्या अगस्त्यमुनींच्या आश्रमामध्यें प्रविष्ट झाला २. त्या ठिकाणीं अगस्त्यमुनींनीं बहुगुणसंपन्न कंदमुळें, ओषधि आणि शालिप्रभृति पवित्र धान्यें हीं रामाच्या भोजनाकरितां तयार करविलीं ३. तेव्हां तें अमृततुल्य अन्न त्या पुरुषश्रेष्ठ रामानें भक्षण केलें असतां तो प्रसन्न व संतुष्ट होऊन त्या रात्रीं तेथें राहिला ४. तदनंतर प्रभातकालीं पहाटेस उठून शत्रुदमन रामानें स्नानसंध्या आटोपिली; नंतर तो रघूत्तम जाण्याविषयीं अनुज्ञा घेण्याकरितां अगस्त्य मुनींकडे गेला ५ आणि अभिवंदन करून त्या अगस्त्य महर्षींना ह्मणाला "आपल्या आश्रमाला जाण्याविषयीं मी विचारीत आहें; मला आपली अनुज्ञा व्हावी ६. महात्म्यांच्या दर्शनानें मी धन्य झालों असून माझ्यावर भगवानांचा अनुग्रह झाला आहे. आतां स्वतःला पावन करण्याकरितां महात्म्या भगवानांच्या दर्शनार्थ मी एकादेवेळेस येईन"७. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम अद्भुत भासण्यासारिखें (सविनय) भाषण करूं लागला असतां योगधर्म हीच ज्यांची दृष्टि आहे व तप हेंच ज्यांचें धन आहे असे ते अगस्त्य मुनि अतिशय संतुष्ट होऊन ह्मणाले ८."हे रामा, शुभ शब्दांनीं युक्त असें हें तुझें भाषण अतिशय आश्चर्यकारक आहे. कारण, हे रघुनंदना, प्राणिमात्रांना पावन करणारा तूंच आहेस ९. हे रामा, क्षणभर कां होईना, जे कोणी तुला अवलोकन करितात ते पावन झाल्यामुळें देवांनाही पूज्य होतात व स्वर्गलोक त्यांना प्राप्त होतो १०. त्याचप्रमाणें द्वेषदृष्टीनें जे भूतलावरील

निरयगामिनः ११ ईदृशस्त्वं रघुश्रेष्ठ पावनः सर्वदेहिनाम् । भुवि त्वां कथयन्तो हि सिद्धिमेष्यन्ति राघव १२ त्वं गच्छारिष्टमव्यग्रः पन्थानमकुतोभयम् । प्रशाधि राज्यं धर्मेण गतिर्हि जगतां भवान् १३ एवमुक्तस्तु मुनिना प्राञ्जलिः प्रग्रहो नृपः । अभ्यवादयत प्राज्ञस्तमृषिं सत्यशालिनम् १४ अभिवाद्य ऋषिश्रेष्ठं तांश्च सर्वांस्तपोधनान् । अध्यारोहत्तदव्यग्रः पुष्पकं हेमभूषितम् १५ तं प्रयान्तं मुनिगणा आशीर्वादैः समन्ततः । अपूजयन्महेन्द्राभं सहस्राक्षमिवामराः १६ खस्थः स ददृशे रामः पुष्पके हेमभूषिते । शशी मेघसमीपस्थो यथा जलधरागमे १७ ततोऽर्धदिवसे प्राप्ते पूज्यमानस्ततस्ततः । अयोध्यां प्राप्य काकुत्स्थो मध्यकक्षामवातरत् १८ ततो विसृज्य रुचिरं पुष्पकं कामगामिनम् । विसर्जयित्वा गच्छेति स्वस्ति तेऽस्त्विति च प्रभुः १९ कक्षान्तरस्थितं क्षिप्रं द्वास्थं रामोऽब्रवीद्वचः । लक्ष्मणं भरतं चैव गत्वा तौ लघुविक्रमौ ॥ ममागमनमाख्याय शब्दापयत मा चिरम् २० [३४५०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्व्यशीतितमः सर्गः ॥ ८२ ॥

---

प्राणी तुला अवलोकन करितात ते यमदंडाच्या योगानें वध पावून तत्काल नरकाला जातात ११. हे रघुवंशजश्रेष्ठा, तूं अशाप्रकारच्या सर्व प्राण्यांना पावन करणारा आहेस. हे राघवा, तुझें कीर्तन करणारेही पुरुष मोक्षाला जातील १२. सर्वदा सावध असलेला तूं निर्विघ्नपणें आतां निर्भय मार्गानें जा आणि धर्मानें राज्य कर. कारण, तूंच जगताचा आश्रय आहेस" १३. ह्याप्रमाणें अगस्त्यमुनींनीं सांगितलें असतां जितेंद्रिय व प्राज्ञ रामराजानें हात जोडिले व त्या सत्यनिष्ठ ऋषींना त्यानें अभिवंदन केलें १४. ऋषिश्रेष्ठ अगस्त्यांना अभिवंदन केल्यानंतर त्या सर्व तपोधनांनाही त्यानें अभिवंदन केलें व तो कर्तव्यदक्ष राम सुवर्णभूषित पुष्पकविमानामध्यें आरूढ झाला १५. तो जाऊं लागला असतां सहस्रनयन इंद्राचेसभोंवतीं जुळणाऱ्या देवांप्रमाणें मुनिगण त्याच्याभोंवतीं जुळले व त्या महेंद्रतुल्य पराक्रमी रामाची त्यांनीं आशीर्वादपूर्वक स्तुति केली १६. तेव्हां पर्जन्यसमयीं मेघांसमीप असलेला चंद्र ज्याप्रमाणें शोभूं लागतो त्याप्रमाणें तो आकाशांत असलेला राम सुवर्णभूषित पुष्पकविमानामध्यें दिसूं लागला १७. तदनंतर सूर्य मध्यान्हीं आला असतां ठिकठिकाणीं ज्याची प्रशंसा चालली आहे असा तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम मधल्याचौकांत उतरला १८. नंतर, इच्छेप्रमाणें संचार करणाऱ्या मनोहर पुष्पकविमानांतून तो बाहेर पडला आणि बाहेर पडल्यावर "तुझें कल्याण असो" असें त्या प्रभूनें त्या विमानाला सांगितलें १९. नंतर, दुसऱ्या चौकांत उभ्या असलेल्या द्वारपालाला राम सत्वर ह्मणाला " ह्या शीघ्रगामी

तच्छ्रुत्वा भाषितं तस्य रामस्याक्लिष्टकर्मणः। द्वाःस्थः कुमारावाहूय राघवाय न्यवेदयत् १ दृष्ट्वा तु राघवः प्राप्तावुभौ भरतलक्ष्मणौ । परिष्वज्य ततो रामो वाक्यमेतदुवाच ह २ कृतं मया यथा तथ्यं द्विजकार्यमनुत्तमम्। धर्मसेतुमथो भूयः कर्तुमिच्छामि राघवौ ३ अक्षयश्चाव्ययश्चैव धर्मसेतुर्मतो मम । धर्मप्रवचनं चैव सर्वपापप्रणाशनम् ४ युवाभ्यामात्मभूताभ्यां राजसूयमनुत्तमम् । सहितो यष्टुमिच्छामि तत्र धर्मस्तु शाश्वतः ५ इष्ट्वा तु राजसूयेन मित्रः शत्रुनिबर्हणः । सुहुतेन सुयज्ञेन वरुणत्वमुपागमत् ६ सोमश्च राजसूयेन इष्ट्वा धर्मेण धर्मवित् । प्राप्तश्च सर्वलोकेषु कीर्तिं स्थानं च शाश्वतम् ७ अस्मिन्नहनि यच्छ्रेयश्चिन्त्यतां तन्मया सह। हितं चायति युक्तं च प्रयतौ वक्तुमर्हथः ८ श्रुत्वा तु राघवस्यैतद्वाक्यं वाक्यविशारदः । भरतः प्राञ्जलिर्भूत्वा वाक्यमेतदुवाच ह ९ त्वयि धर्मः परः साधो त्वयि सर्वा वसुन्धरा । प्रतिष्ठिता महाबाहो यशश्चामितविक्रम १० महीपालाश्च सर्वे त्वां

---

लक्ष्मणाकडे व भरताकडे जा आणि मी आलों आहें असें सांगून तूं त्यांना बोलावून आण; विलंब करूं नको " २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं ब्यायंशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८२ ॥

पुण्य कर्म करणाऱ्या त्या रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर द्वारपालानें उभयतां राजकुमारांना बोलावून आणून रामाला सांगितलें १. नंतर उभयतां भरतलक्ष्मण प्राप्त झाल्याचें अवलोकन केल्यावर रघुवंशज राम राजा त्यांना अलिंगन देऊन ह्मणाला २ "मी प्रतिज्ञेप्रमाणें ब्राह्मणाचें उत्कृष्ट कार्य सत्य मार्गानें शेवटास नेलें. आतां, हे राघवहो, पुनरपि धर्मसेतुरूप राजसूय क्रतु करण्याची माझी इच्छा आहे ३. कारण, धर्मसेतूच्या फलाचा कधींही क्षय होत नाहीं व तें कधीं कमींही होत नाहीं. शिवाय, त्या धर्मसेतूचें कीर्तनही सर्व पापें नाहींसें करणारें आहे ४. सारांश, मत्स्वरूपच असलेल्या तुह्मा उभयतांसहवर्तमान अनुपम राजसूय क्रतु करण्याची माझी इच्छा आहे. कारण, तो क्रतु केल्यानें अक्षय्य पुण्य प्राप्त होतें ५. शत्रुनाशक मित्रानें योग्यहवनपूर्वक राजसूयसंज्ञक उत्कृष्ट यज्ञ केला व त्यामुळें त्याला वरुणत्व प्राप्त झालें ६; आणि यथाविधि राजसूय याग केल्यामुळें धर्मवेत्त्या सोमालाही अक्षय्य स्थान प्राप्त झालें व सर्व लोकांमध्यें त्याची कीर्ति झाली ७. "तस्मात्, आज कोणतें श्रेयस्कर आहे ह्याचा तुह्मी माझ्याबरोबर विचार करा; आणि त्याचप्रमाणें हितावह व योग्य असें जें असेल तें तुह्मी लक्ष्यपूर्वक विचार करून मला कळवा "८. रामाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर वक्ता भरत हात जोडून ह्मणाला ९ "हे सज्जन, हे महाबाहो, हे अनंतपराक्रमी राम, मुख्य धर्म आपणांवरच अवलंबून असून सर्व पृथ्वी आपल्याच

प्रजापतिमिवामराः। निरीक्षन्ते महात्मानं लोकनाथं यथा वयम् ११
पुत्राश्च पितृवद्राजन्पश्यन्ति त्वां महाबल। पृथिव्या गतिभूतोऽसि प्राणि-
नामपि राघव १२ स त्वमेवंविधं यज्ञमाहर्तासि कथं नृप। पृथिव्यां राज-
वंशानां विनाशो यत्र दृश्यते १३ पृथिव्यां ये च पुरुषा राजन्पौरुषमा-
गताः। सर्वेषां भविता तत्र संक्षयः सर्वकोपजः १४ स त्वं पुरुषशार्दूल गुणै-
रतुलविक्रम। पृथिवीं नार्हसे हन्तुं वशे हि तव वर्तते १५ भरतस्य तु तद्वाक्यं
श्रुत्वाऽमृतमयं यथा। प्रहर्षमतुलं लेभे रामः सत्यपराक्रमः १६ उवाच च
शुभं वाक्यं कैकेय्यानन्दवर्धनम्। प्रीतोऽस्मि परितुष्टोऽस्मि तवाद्य वच-
नेऽनघ १७ इदं वचनमक्लीबं त्वया धर्मसमागतम्। व्याहृतं पुरुष
पृथिव्याः परिपालनम् १८ एष्यदस्मदभिप्रायाद्राजसूयात्क्रतूत्तमात्। निव-
र्तयामि धर्मज्ञ तव सुव्याहृतेन च १९ लोकपीडाकरं कर्म न कर्तव्यं विचक्षणैः।
बालानां तु शुभं वाक्यं ग्राह्यं लक्ष्मणपूर्वज॥ तस्माच्छृणोमि ते वाक्यं
साधु युक्तं महाबल २० [ ३४७० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये
आदिकाव्ये उत्तरकाण्डे चतुरशीतितमः सर्गः॥ ८४॥

---

आश्रयानें राहिली आहे १०; देव ज्याप्रमाणें ब्रह्मदेवाला लोकनाथ समजत असतात त्याचप्रमाणें आह्मांसहवर्तमान सर्व भूपाल तुला महात्मा व लोकनाथ समजत असतात ११. हे महाबलाढ्य राजा, सर्व प्रजाजन स्वतःला पुत्राप्रमाणें समजून तुला पित्याप्रमाणें मानीत आहेत; आणि, हे राघवा, पृथ्वीवरील प्राण्यांचा आश्रयही तूंच आहेस १२. तस्मात्, हे नृप, अशाप्रकारचा यज्ञ आपण कां करणार ?. ह्या क्रतु झाला असतां पृथ्वींतील राजवंशांचा नाश होत असतो १३. कारण, हे राजा, ह्या क्रतूनें सर्वांचे ठिकाणीं क्रोध उत्पन्न होत असतो व त्यामुळें पृथ्वींतील सर्व वीर्यवान् पुरुषांचा क्षय होत असतो १४. तस्मात्, हे अतुलपराक्रमी पुरुषश्रेष्ठा, ज्याअर्थी सर्व जगत् आपल्या अधीन आहे त्याअर्थी आपल्या गुणांचा उपयोग आपण पृथ्वीच्या नाशाकडे करूं नये " १५. भरताचें हें अमृतमय भाषण श्रवण केल्यानंतर सत्यपराक्रमी रामाला अनुपम हर्ष झाला १६ आणि कैकेयीचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या भरताला सौम्य शब्दांनीं तो ह्मणाला " हे निष्पापा, तुझ्या भाषणामुळें मी आज प्रसन्न व अतिशय संतुष्ट झालों आहें १७. हे पुरुषश्रेष्ठा, पृथ्वीच्या परिपालनासंबंधानें तूं जें हें भाषण केलें आहेस तें यथार्थ असून धर्माला अनुसरून आहे १८. ह्यास्तव, हे धर्मवेत्त्या, तुझ्या ह्या उत्कृष्ट भाषणामुळें मनांत आणिलेल्या राजसूयसंज्ञक श्रेष्ठ क्रतूपासून मी निवृत्त होतों १९. लोकांना ज्याच्या योगानें पीडा होईल असें कर्म समंजस पुरुषांनीं करूं नयें. असो. हे लक्ष्मणपूर्वजा, बालांनींही भाषण

तथोक्तवति रामे तु भरते च महात्मनि । लक्ष्मणोऽथ शुभं वाक्यमुवाच रघुनन्दनम् १ अश्वमेधो महायज्ञः पावनः सर्वपाप्मनाम् । पावनस्तव दुर्धर्षो रोचतां रघुनन्दन २ श्रूयते हि पुरावृत्तं वासवे सुमहात्मनि । ब्रह्महत्यावृतः शक्रो हयमेधेन पावितः ३ पुरा किल महाबाहो देवासुरसमागमे । वृत्रो नाम महानासीद्दैतेयो लोकसंमतः ४ विस्तीर्णो योजनशतमुच्छ्रितस्त्रिगुणं ततः । अनुरागेण लोकांस्त्रीन्स्नेहात्पश्यति सर्वतः ५ धर्मज्ञश्च कृतज्ञश्च बुद्ध्या च परिनिष्ठितः । शशास पृथिवीं स्फीतां धर्मेण सुसमाहितः ६ तस्मिन्प्रशासति तदा सर्वकामदुघा मही । रसवन्ति प्रसूतानि मूलानि च फलानि च ७ अकृष्टपच्या पृथिवी सुसंपन्ना महात्मनः । स राज्यं तादृशं भुङ्क्ते स्फीतमद्भुतदर्शनम् ८ तस्य बुद्धिः समुत्पन्ना तपः कुर्यामनुत्तमम् । तपो हि परमं श्रेयः संमोहमितरत्सुखम् ९ स निक्षिप्य सुतं ज्येष्ठं पौरेषु मधुरेश्वरम् । तप उग्रं समातिष्ठत्तापयन्सर्वदेवताः १०

---

शुभ असल्यास ऐकून घेतलें पाहिजे. तस्मात्, हे महाबलाढ्य भरता, मी तुझ्या ह्मणण्याप्रमाणें करितों २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं त्र्यायंशीवा अध्याय समाप्त झाला ॥ ८३ ॥

ह्याप्रमाणें राम व महात्मा भरत ह्यांनीं भाषण केलें असतां लक्ष्मणानें रघुनंदन रामाशीं शुभ भाषण केलें १. (तो ह्मणाला) " हे रघुनंदना सर्व पापांची निवृत्ति करणारा अश्वमेधसंज्ञक महायज्ञ पावन करणारा आहे. ह्यास्तव, तो करणाचें आपण मनामध्यें आणा २. महात्म्या इंद्रासंबंधानें पूर्वीचा वृत्तांत ऐकण्यांत आहे. ब्रह्महत्येचें पातक लागलेला इंद्र अश्वमेधानें शुद्ध झाला आहे ३. हे महापराक्रमी रामा, पूर्वी देवदैत्यांमध्यें प्रेम असतांना वृत्र ह्मणून एक मोठा लोकमान्य दैत्य होता ४. तो शंभर योजनें विस्तीर्ण असून तीनशें योजनें उंच होता आणि नैसर्गिक प्रेमामुळें सर्व लोकांवर त्याची कृपादृष्टि होती ५. तो धर्मज्ञ, कृतज्ञ, बुद्धिमान् व अत्यंत दक्ष असून धनधान्यसंपन्न पृथ्वीचें धर्मानें रक्षण करीत असे ६. तो राज्य करीत असतांना पृथ्वीमध्यें हवा तो इष्ट पदार्थ प्राण्यांना प्राप्त होत असे. पुष्पें, मुळें व फळें सरस असत ७; आणि त्या महात्माचें कारकीर्दींत पृथ्वी उत्कृष्ट रीतीनें संपन्न असे. इतकेंच नव्हें परंतु, नांगरटी वगैरे केल्यावांचून तिचे ठिकाणीं पिकें येत असत आणि अशा प्रकारच्या आश्चर्यकारक व संपन्न राज्याचा तो वृत्रासुर उपभोग घेत असे ८. असें होतां होतां त्याला वाटलें " आपण उत्कृष्ट तप करावें. कारण, तप हेंच उत्कृष्ट कल्याणाचें साधन असून इतर विषयसुख मोह पाडणारें आहे " ९. असें मनांत येऊन प्रजाजनांचा अधिपति ह्मणून त्यानें आपल्या मधुरनामक ज्येष्ठ पुत्राची राज्यावर स्थापना

तपस्तप्यति वृत्रे तु वासवः परमार्तवत् । विष्णुं समुपसंक्रम्य वाक्यमेत-
दुवाच ह ११ तपस्यता महाबाहो लोकाः सर्वे विनिर्जिताः । बलवानेष
हि धर्मात्मा नैनं शक्ष्यामि शासितुम् १२ यद्यसौ तप आतिष्ठेद्भूय एव सुरे-
श्वर । यावल्लोका धरिष्यन्ति तावदस्य वशानुगाः १३ तं चैनं परमोदा-
रमुपेक्षसि महाबल । क्षणं हि न भवेद्वृत्रः क्रुद्धे त्वयि सुरेश्वर १४ यदा
हि प्रीतिसंयोगं त्वया विष्णो समागतः । तदा प्रभृति लोकानां नाथत्व-
मुपलब्धवान् १५ स त्वं प्रसादं लोकानां कुरुष्व सुसमाहितः । त्वत्कृतेन
हि सर्वं स्यात्प्रशान्तमरुजं जगत् १६ इमे हि सर्वे विष्णो त्वां निरीक्षन्ते
दिवौकसः । वृत्रघातेन महता तेषां साह्यं कुरुष्व ह १७ त्वया हि नित्यशः
साह्यं कृतमेषां महात्मनाम् । असह्यमिदमन्येषामगतीनां गतिर्भवान् १८
[ ३४८८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे
चतुरशीतितमः सर्गः ॥ ८४ ॥

लक्ष्मणस्य तु तद्वाक्यं श्रुत्वा शत्रुनिबर्हणः । वृत्रघातमशेषेण कथये-
त्याह सुव्रत १ राघवेणैवमुक्तस्तु सुमित्रानन्दवर्धनः । भूय एव कथां दिव्यां

---

केली आणि उग्रतपश्चर्येला आरंभ केला; परंतु, त्यामुळें सर्व देवतांना ताप होऊं लागला १०. वृत्रासुर तपश्चर्या करूं लागला असतां इंद्र अतिशय दुःखित होऊन विष्णूकडे गेला आणि ह्मणाला ११ " हे महाबाहो, तपश्चर्या करीत असलेल्या वृत्रानें सर्व लोक स्वाधीन करून घेतले आहेत व तो धर्मात्मा बलाढ्य असल्यामुळें त्याला शासन करण्यास मी समर्थ नाहीं १२. हे सुरेश्वर, हा जर अजूनही तपश्चर्या करीत राहील तर जोंपर्यंत त्रैलोक्य विद्यमान आहे तोंपर्यंत तें ह्याच्याच अधीन राहील १३. ह्यास्तव, हे महाबलाढ्य, ह्या अतिप्रचंड वृत्राची आपण उपेक्षा करूं नका. हे सुरेश्वर, आपण क्रुद्ध झाल्यास वृत्र क्षणभरही राहणार नाहीं १४. हे विष्णो, जेव्हांपासून तुमच्याशीं त्याचें प्रेम जडलें तेव्हांपासूनच त्रैलोक्याचें आधिपत्य त्याला प्राप्त झालें १५. ह्यास्तव, आपण चांगलें सावध राहून लोकांवर कृपा करा. आपण रक्षण केलें असतां सर्व जगत् शांत व आरोग्यसंपन्न होईल १६. हे विष्णो, हे सर्व देव रक्षणाकरितां आपल्यावर अवलंबून आहेत. ह्यास्तव, वृत्रघातरूप मोठें कृत्य करून आपण त्यांचें साहाय्य करा १७. ह्या महात्म्या देवांना आपण वारंवार साहाय्य केलें आहे. ह्यास्तव, असें करणें जरी इतर असुरांना सहन होणारें नाहीं तरी तें आपण करा. कारण, आह्मा निराश्रित देवांचा आश्रय आपणच आहां १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चौऱ्यायंशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८४ ॥

लक्ष्मणाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर ' हे सुव्रता, वृत्रवध मला सविस्तर कथन कर '

कथयामास सुव्रतः २ सहस्राक्षवचः श्रुत्वा सर्वेषां च दिवौकसाम् । विष्णुर्देवानुवाचेदं सर्वानिन्द्रपुरोगमान् ३ पूर्वं सौहृदबद्धोऽस्मि वृत्रस्येह महात्मनः । तेन युष्मत्प्रियार्थं हि नाहं हन्मि महासुरम् ४ अवश्यं करणीयं च भवतां सुखमुत्तमम् । तस्मादुपायमाख्यास्ये सहस्राक्षो वधिष्यति ५ त्रेधाभूतं करिष्यामि आत्मानं सुरसत्तमाः । तेन वृत्रं सहस्राक्षो वधिष्यति न संशयः ६ एकांशो वासवं यातु द्वितीयो वज्रमेव तु । तृतीयो भूतलं यातु तदा वृत्रं हनिष्यति ७ तथा ब्रुवति देवेशे देवा वाक्यमथाब्रुवन् । एवमेतन्न संदेहो यथा वदसि दैत्यहन् ८ भद्रं तेऽस्तु गमिष्यामो वृत्रासुरवधैषिणः । भजस्व परमोदार वासवं स्वेन तेजसा ९ ततः सर्वे महात्मानः सहस्राक्षपुरोगमाः । तदारण्यमुपाक्रामन्यत्र वृत्रो महासुरः १० तेऽपश्यंस्तेजसा भूतं तपन्तमसुरोत्तमम् । पिबन्तमिव लोकांस्त्रीन्निर्दहन्तमिवाम्बरम् ११ दृष्ट्वैव चासुरश्रेष्ठं देवास्त्रासमुपागमन् । कथमेनं वधिष्यामः कथं न स्यात्परा-

---

असें शत्रुनाशक राम त्याला ह्मणाला १. ह्याप्रमाणें रामानें भाषण केलें असतां सुमित्रेच आनंद वृद्धिंगत करणाऱ्या सदाचरण संपन्न लक्ष्मणानें पुनरपि ती दिव्य कथा कथन केली २. (तो ह्मणाला) "इंद्राचें व सर्व देवांचें भाषण श्रवण केल्यानंतर सर्व इंद्रप्रभृति देवांना विष्णु ह्मणाले ३ " पूर्वी महात्म्या वृत्राशीं मी प्रेमपाशानें बद्ध झालों आहें. ह्यास्तव, तुमचे प्रिय करण्याकरितां मी ह्या महादैत्याचा वध करणार नाहीं ४. तथापि, तुह्मांला उत्कृष्ट सुख ज्याच्या योगानें होईल असें कृत्य मला अवश्य केलें पाहिजे. तस्मात्, मी उपाय कथन करितों. इंद्र वृत्रासुराचा वध करील ५. हे श्रेष्ठ देवहो, मी आपले तीन विभाग करीन व त्यांच्या योगानें सहस्रनयन इंद्र वृत्रासुराचा निःसंशय वध करील ६. माझा एक अंश इंद्राकडे जाईल; दुसरा वज्राचें अवलंबन करील; तिसरा भूतलाचा आश्रय करील आणि, असें झालें असतां इंद्राच्या हातून वृत्रासुराचा वध होईल " ७. ह्याप्रमाणें देवाधिपति विष्णु सांगत असतांना देव ह्मणाले " हे दैत्यनाशक, आपण सांगत आहां हें निःसंशय घडून येईल ८. आपलें कल्याण असो; वृत्रासुराचा वध व्हावा ह्या उद्देशानें आतां आह्मी जातों. हे महाशय आपल्या तेजानें आपण इंद्राचा आश्रय करावा " ९. तदनंतर इंद्रप्रभृति महात्मे सर्व देव जेथें महादैत्य वृत्रासुर होता त्या अरण्यांत गेले १०. तों तेजानें व्याप्त असा एक असुर तपश्चर्या करीत असतांना त्यांच्या दृष्टीं पडला. तो त्रैलोक्यच ग्राशीत आहे कीं काय अथवा आकाशच दग्ध करून टाकीत आहे कीं काय असा भासत होता ११. त्या असुरश्रेष्ठाला अवलोकन करितांक्षणीं देव भयभीत झाले आणि " आपल्याहातून ह्याचा वध होईल काय ? आणि काय केलें असतां आपला पराजय होणार

जयः १२ तेषां चिन्तयतां तत्र सहस्राक्षः पुरन्दरः । वज्रं प्रगृह्य पाणिभ्यां प्राहिणोद्वृत्रमूर्धनि १३ कालाग्निनेव घोरेण दीप्तेनेव महार्चिषा । पतता वृत्रशिरसा जगत्त्रासमुपागमत् १४ असंभाव्यं वधं तस्य वृत्रस्य विबुधाधिपः । चिन्तयानो जगामाशु लोकस्यान्तं महायशाः १५ तमिन्द्रं ब्रह्महत्याशु गच्छन्तमनुगच्छति । अपतच्चास्य गात्रेषु तमिन्द्रं दुःखमाविशत् १६ हतारयः प्रणष्टेन्द्रा देवाः साग्निपुरोगमाः । विष्णुं त्रिभुवनेशानं मुहुर्मुहुरपूजयन् १७ त्वं गतिः परमेशान पूर्वजो जगतः पिता । रक्षार्थं सर्वभूतानां विष्णुत्वमुपजग्मिवान् १८ हतश्चायं त्वया वृत्रो ब्रह्महत्या च वासवम् । बाधते सुरशार्दूल मोक्षं तस्य विनिर्दिश १९ तेषां तद्वचनं श्रुत्वा देवानां विष्णुरब्रवीत् । मामेव यजतां शक्रः पावयिष्यामि वज्रिणम् २० पुण्येन हयमेधेन मामिष्ट्वा पाकशासनः । पुनरेष्यति देवानामिन्द्रत्वमकुतोभयः २१ एवं संदिश्य तां वाणीं देवानां चामृतोपमाम् । जगाम विष्णुर्देवेशः स्तूयमानस्त्रिविष्टपम् २२ [३५१०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे पञ्चाशीतितमः सर्गः ॥ ८५ ॥

---

नाहीं ?" ह्मणून चिंता करूं लागले १२. परंतु, ह्याप्रमाणें ते चिंताक्रांत झाले असतांना सहस्रनयन इंद्रानें दोन हातांनीं वज्र घेऊन वृत्राच्या मस्तकावर फेंकिलें १३. तेव्हां प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें घोर, प्रदीप्त व प्रचंड तेजानें युक्त असें तें वज्र वृत्राच्या मस्तकासहवर्तमान पतन पावूं लागलें असतांना सर्व जगत् त्रस्त झालें १४; आणि त्या वृत्राचा वध अनुचित झाला असें चिंतन करीत करीत तो महायशस्वी देवराज त्वरेनें सर्व त्रैलोक्य हिंडला १५; परंतु, जिकडे तो इंद्र जाऊं लागला तिकडे ब्रह्महत्याही त्याच्यामागें सत्वर जाऊं लागली आणि शेवटीं इंद्राच्या शरीरावर जाऊन ती आदळल्यामुळें त्याला दुःख झालें १६. तदनंतर ज्यांच्या शत्रूंचा वध झाला आहे परंतु ज्यांच्या इंद्राचा ठिकाण नाहीं असे ते अग्निप्रभृति देव त्रैलोक्याधिपति विष्णूचें वारंवार स्तवन करूं लागले १७. ( ते ह्मणाले ) "हे महाराज, जगताचा आश्रय व पिता तूंच असून सर्व प्राण्यांच्या रक्षणाकरितां तूंच विष्णुरूप धारण केलें आहेस १८. हे सुरश्रेष्ठ, ( वस्तुतः पाहूं गेलें असतां ) तूंच वृत्राचा वध केला आहेस; परंतु, ब्रह्महत्येची पीडा मात्र इंद्राला होत आहे. ह्यास्तव, त्याच्या सुटकेचा उपाय काय असेल तो तूं सांग " १९. देवांचें हें भाषण श्रवण करून विष्णु ह्मणाला "इंद्रानें माझाच याग करावा; ह्मणजे मी त्या वज्रपाणि इंद्राला पावन करीन २०. पवित्र अश्वमेधानें माझें यजन केल्यानंतर पाकशासन निर्भय होईल व देवांचें आधिपत्य पुनरपि त्याला प्राप्त होईल" २१. ह्याप्रमाणें देवांना हा अमततल्य उपदेश करून देवाधिपति विष्णु,

तदा वृत्रवधं सर्वमखिलेन स लक्ष्मणः । कथयित्वा नरश्रेष्ठः कथाशेषं प्रचक्रमे १ ततो हते महावीर्ये वृत्रे देवभयङ्करे । ब्रह्महत्यावृतः शक्रः संज्ञां लेभे न वृत्रहा २ सोऽन्तमाश्रित्य लोकानां नष्टसंज्ञो विचेतनः । कालं तत्रावसत्कंचिद्वेष्टमानं इवोरगः ३ अथ नष्टे सहस्राक्षे उद्विग्नमभवज्जगत् । भूमिश्च ध्वस्तसङ्काशा निःस्नेहा शुष्ककानना ४ निःस्रोतसस्तु ते सर्वे ह्रदाश्च सरितस्तथा । संक्षोभश्चैव सत्त्वानामनावृष्टिकृतोऽभवत् ५ क्षीयमाणे तु लोकेऽस्मिन्संभ्रान्तमनसः सुराः । यदुक्तं विष्णुना पूर्वं तं यज्ञं समुपानयन् ६ ततः सर्वे सुरगणाः सोपाध्यायाः सहर्षिभिः । तं देशं समुपाजग्मुर्यत्रेन्द्रो भयमोहितः ७ ते तु दृष्ट्वा सहस्राक्षमावृतं ब्रह्महत्यया । तं पुरस्कृत्य देवेशमश्वमेधं प्रचक्रिरे ८ ततोऽश्वमेधः सुमहान्महेन्द्रस्य महात्मनः । ववृते ब्रह्महत्यायाः पावनार्थं नरेश्वर ९ ततो यज्ञे समाप्ते तु ब्रह्महत्या महात्मनः । अभिगम्याब्रवीद्वाक्यं क्व मे स्थानं विधास्यथ १० ते तामू-

---

देव प्रशंसा करीत असतांना, वैकुंठाला निघून गेला २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पंच्यांयशीवा सर्ग समाप्त झाला ॥८५॥

ह्याप्रमाणें वृत्रवधसंबंधीं सर्व वृत्तांत पूर्णपणें निवेदन केल्यानंतर तो पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण त्या वधासंबंधानेंच अवशिष्ट राहिलेला कथाभाग सांगूं लागला १. (तो ह्मणाला) "देवांना भय उत्पन्न करणाऱ्या महावीर्यवान् वृत्राचा ह्याप्रमाणें वध झाला असतां ब्रह्महत्येनें ग्रस्त झालेल्या वृत्रनाशक इंद्राला कांहींएक सुचेनासें झालें २. तेव्हां लोकांचें ज्या ठिकाणीं वास्तव्य नाहीं अशा ठिकाणीं तो गेला आणि वेटोळें घालून बसणाऱ्या भुजंगाप्रमाणें आपला देह संकुचित करून तो कांहींकालपर्यंत तेथें राहिला ३. इंद्र नाहींसा झाला असतां जगत् उद्विग्न झालें; पृथ्वी उद्ध्वस्त झाल्यासारिखी दिसूं लागली; तिच्यांतील उदक नाहींसें झालें; अरण्येंही शुष्क झालीं ४; अनावृष्टीमुळें सर्व सरोवरें आणि नद्या ह्यांतील प्रवाह बंद पडले आणि सर्व प्राणी क्षुब्ध झाले ५. ह्याप्रमाणें ह्या जगताचा क्षय होऊं लागला असतां देव मनामध्यें गोंधळून गेले व विष्णूनें पूर्वीं सांगितलेल्या त्या यज्ञाचें त्यांना स्मरण झालें ६. तदनंतर उपाध्याय व ऋषि ह्यांसहवर्तमान सर्व देवगण जेथें इंद्र भयभीत होऊन बसला होता तेथें गेले ७; तों सहस्रनयन इंद्र ब्रह्महत्येनें ग्रस्त झाला आहे असें त्यांच्या दृष्टीं पडलें. तेव्हां त्या सुरेश्वर विष्णूला उद्देशून त्यांनीं अश्वमेध केला ८; सारांश, हे प्रजाधिपते रामा, महात्म्या महेंद्राच्या मागें लागलेली ब्रह्महत्या निवृत्त होण्याकरितां अश्वमेधसंज्ञक प्रचंड याग सुरू झाला ९. नंतर यज्ञ समाप्त झाला असतां ब्रह्महत्या महात्म्या देवांकडे गेली आणि "मला तुह्मी जागा कोठें देणार ?" ह्मणून त्यांना

ऊचुस्ततो देवास्तुष्टाः प्रीतिसमन्विताः। चतुर्धा विभजात्मानमात्मनैव दुरासदे ११ देवानां भाषितं श्रुत्वा ब्रह्महत्या महात्मनाम्। संदधौ स्थानमन्यत्र वरयामास दुर्वसा १२ एकेनांशेन वत्स्यामि पूर्णोदासु नदीषु वै। चतुरो वार्षिकान्मासान्दर्पघ्नी कामचारिणी १३ भूम्यामहं सर्वकालमेकेनांशेन सर्वदा। वसिष्यामि न संदेहः सत्येनैतद्ब्रवीमि वः १४ योऽयमंशस्तृतीयो मे स्त्रीषु यौवनशालिषु। त्रिरात्रं दर्पपूर्णासु वसिष्ये दर्पघातिनी १५ हन्तारो ब्राह्मणान्ये तु मृषापूर्वमदूषकान्। तांश्चतुर्थेन भागेन संश्रयिष्ये सुरर्षभाः १६ प्रत्यूचुस्तां ततो देवा यथा वदसि दुर्वसे। तथा भवतु तत्सर्वं साधयस्व यदीप्सितम् १७ ततः प्रीत्यान्विता देवाः सहस्राक्षं ववन्दिरे। विज्वरः पूतपाप्मा च वासवः समपद्यत १८ प्रशान्तं च जगत्सर्वं सहस्राक्षे प्रतिष्ठिते। यज्ञं चाद्भुतसंकाशं तदा शक्रोऽभ्यपूजयत् १९ ईदृशो ह्यश्वमेधस्य प्रसादो रघुनन्दन। यजस्व सुमहाभाग हयमेधेन पार्थिव २० इति लक्ष्मणवाक्यमुत्तमं नृपतिरतीव मनोहरं महात्मा। परितोषमवाप हृष्टचेताः स निश-

---

विचारूं लागली १०. तेव्हां देव संतुष्ट व प्रसन्न होऊन तिला ह्मणाले "हे दुस्तर ब्रह्महत्ये, तूं स्वतः आपले चार भाग कर ११". महात्म्या देवांचें हें भाषण श्रवण केल्यावर जिचें वास्तव्य दुःखकारक आहे अशा त्या ब्रह्महत्येनें विचार करून इंद्राशिवाय दुसऱ्या ठिकाणीं वसतिस्थान मागून घेतलें १२. ( ती ह्मणाली ) वर्षाऋतूंतील चार महिने ज्यांना उदकांची समृद्धि असते अशा नद्यांचे ठिकाणीं मी पाप्यांचा गर्व नाहींसा करणारीं व स्वेच्छेनें चालणारी ब्रह्महत्या तेच चार महिनेंपर्यंत वास्तव्य करीन १३. त्याचप्रमाणें एका अंशानें मी सर्व काल भूमीचे ठिकाणीं (ऊषररूपानें) वास्तव्य करीन ह्यांत संशय नाहीं. हें मी तुह्माला सत्य सांगत आहें १४. हा जो माझा तिसरा अंश आहे त्या अंशानें मी विषयवासनेनें भरलेल्या तरुणी स्त्रियांचे ठिकाणी तीन दिवसपर्यंत वास्तव्य करीन आणि तितका काल लोटेपर्यंत मी त्यांच्यासमागमसुखाचा विघात करीन १५; आणि त्याचप्रमाणें हें सुरश्रेष्ठहो, निरपराधी ब्राह्मणांवर मिथ्या आरोप करून जे त्यांच्या वधाला कारण होतील त्यांच्या ठिकाणीं मी चवथ्या अंशानें राहीन" १६. ह्यावर देव तिला ह्मणाले "हे दुःखजनक वास्तव्य करणाऱ्ये ब्रह्महत्ये, तुझ्या ह्मणण्याप्रमाणें होवो; तूं सर्व आपल्या इच्छेप्रमाणें शेवटास ने" १७. तदनंतर आनंदित झालेल्या देवांनीं इंद्राला वंदन केलें व इंद्रही निश्चिंत आणि पापरहित झाला १८. इंद्र स्थानापन्न झाला असतां सर्व जगतामध्यें शांतता झाली व त्या अद्भुत फल देणाऱ्या इंद्रानें यज्ञाची प्रशंसा केली १९. हे रघुनंदना, अश्वमेधाचें फल अशाप्रकारचें आहे; ह्यास्तव, हे महाभाग्यवान् राजा, तूं अश्वमेध कर "२०. ह्याप्रमाणें अत्यंत मनोहर असलेलें

महेन्द्रसमानविक्रमौजाः २१ [ ३५३१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये उत्तरकाण्डे षडशीतितमः सर्गः ॥ ८६ ॥

तच्छ्रुत्वा लक्ष्मणेनोक्तं वाक्यं वाक्यविशारदः । प्रत्युवाच महातेजाः प्रहसन्राघवो वचः १ एवमेव नरश्रेष्ठ यथा वदसि लक्ष्मण । वृत्रघातमशेषेण वाजिमेधफलं च यत् २ श्रूयते हि पुरा सौम्य कर्दमस्य प्रजापतेः । पुत्रो बाह्लीश्वरः श्रीमानिलो नाम सुधार्मिकः ३ स राजा पृथिवीं सर्वां वशे कृत्वा महायशाः । राज्यं चैव नरव्याघ्र पुत्रवत्पर्यपालयत् ४ सुरैश्च परमोदारैर्दैतेयश्च महाधनैः । नागराक्षसगन्धर्वैर्यक्षैश्च सुमहात्मभिः ५ पूज्यते नित्यशः सौम्य भयार्तै रघुनन्दन । अबिभ्यंश्च त्रयो लोकाः सरोषस्य महात्मनः ६ स राजा तादृशोऽप्यासीद्धर्मे वीर्ये च निष्ठितः । बुद्ध्या च परमोदारो बाह्लीकेशो महायशाः ७ स प्रचक्रे महाबाहुर्मृगयां रुचिरे वने । चैत्रे मनोरमे मासे सभृत्यबलवाहनः ८ प्रजघ्ने स नृपोऽरण्ये मृगाञ्छतसहस्रशः । हत्वैव तृप्तिर्नाभूच्च राज्ञस्तस्य महात्मनः ९ नानामृगाणामयुतं वध्यमानं महात्मना । यत्र जातो महासेनस्तं देशमुपचक्रमे १०

---

लक्ष्मणाचें उत्कृष्ट भाषण श्रवण करून त्या इंद्रतुल्यतेजस्वी व इंद्रतुल्यपराक्रमी महात्म्या रामाचें अंतःकरण आनंदित झाले व तो संतुष्ट झाला २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं शहांयशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८६ ॥

लक्ष्मणानें केलेलें तें भाषण श्रवण करून महातेजस्वी व वक्ता राम हंसत हंसत ह्मणाला १ " हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, वृत्रवध आणि अश्वमेधाचें फल हें जें तूं सविस्तर सांगितलें आहेस तें अगदीं बरोबर आहे २. हे सौम्य लक्ष्मणा, कर्दम प्रजापतीचा एक इल ह्मणून अत्यंत धार्मिक पुत्र आमच्या ऐकण्यांत आहे. तो श्रीमान् इल बाल्हिकिदेशाचा अधिपति होता ३. हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, तो महायशस्वी राजा सर्व पृथ्वी पादाक्रांत करून राष्ट्राचें पुत्रवत् परिपालन करीत असे ४. मोठे मोठे पूज्य सुर, महाधनाढ्य दैत्य, नाग, राक्षस, गंधर्व आणि त्याचप्रमाणें मोठे यक्षही ५ भयभीत होऊन, हे सौम्य रघुनंदना लक्ष्मणा, त्याची नित्य प्रशंसा करीत असत ६. तो राजा तशा प्रकारचा असून धर्मनिष्ठ व वीर्यवान् होता आणि तो महायशस्वी बाल्हीकदेशाधिपति मनानेंही मोठा उदार होता ७. एकदां मनोहर चैत्रमासीं सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान तो महापराक्रमी राजा रमणीय वनामध्यें मृगया करूं लागला ८. मृगया करितां करितां अरण्यामध्यें शेंकडों हजारों मृगांचा त्यानें वध केला; तथापि त्या महात्म्या राजाची तृप्ति झाली नाहीं ९. ह्याप्रमाणें अनेक प्रकारच्या दहा दहा हजार मृगांचा त्या महात्म्याच्या हातून वध होऊं लागला व तो

तस्मिन्प्रदेशे देवेशः शैलराजसुतां हरः । रमयामास दुर्धर्षः सर्वैरनुचरैः सह ११ कृत्वा स्त्रीरूपमात्मानमुमेशो गोपतिध्वजः । देव्याः प्रियचिकीर्षुः संस्तस्मिन्पर्वतनिर्झरे १२ यत्र यत्र वनोद्देशे सत्त्वाः पुरुषवादिनः । वृक्षाः पुरुषनामानस्ते सर्वे स्त्रीजनाभवन् १३ यच्च किञ्चन तत्सर्वं नारीसंज्ञं बभूव ह १४ एतस्मिन्नन्तरे राजा स इलः कर्दमात्मजः । निघ्नन्मृगसहस्राणि तं देशमुपचक्रमे १५ स दृष्ट्वा स्त्रीकृतं सर्वं सव्यालमृगपक्षिणम् । आत्मानं स्त्रीकृतं चैव सानुगं रघुनन्दन १६ तस्य दुःखं महचासीद्दृष्ट्वाऽऽत्मानं तथागतम् । उमापतेश्च तत्कर्म ज्ञात्वा त्रासमुपागमत् १७ ततो देवं महात्मानं शितिकण्ठं कपर्दिनम् । जगाम शरणं राजा सभृत्यबलवाहनः १८ ततः प्रहस्य वरदः सह देव्या महेश्वरः । प्रजापतिसुतं वाक्यमुवाच वरदः स्वयम् १९ उत्तिष्ठोत्तिष्ठ राजर्षे कार्दमेय महाबल । पुरुषत्वमृते सौम्य वरं वरय सुव्रत २० ततः स राजा शोकार्तः प्रत्याख्यातो महात्मना । स्त्रीभूतोऽसौ न जग्राह वरमन्यं सुरोत्तमात् २१ ततः शोकेन महता शैल-

---

राजा कार्तिकेयाची ज्या ठिकाणीं उत्पत्ति झाली त्या ठिकाणीं जाऊं लागला १०. त्या प्रदेशामध्यें ज्याच्याकडे पाहणेंही शक्य नाहीं असा सुरेश्वर शंकर सर्व अनुयायांसहवर्तमान पार्वतीला रमवीत होता ११. तो वृषध्वज उमापति देवी पार्वतीचें प्रिय करण्याकरितां स्त्रीरूप धारण करून त्या प्रदेशामध्यें वास्तव्य करीत असतो. पर्वतावरून येत असलेले उदकाचे प्रवाह त्या प्रदेशामध्यें आहेत १२. त्या वनांत ज्या ज्या ठिकाणीं पुरुष ह्मणविणारे प्राणी व वृक्ष होते ते सर्व स्त्रीजन झाले १३ आणि इतरही जें ह्मणून कांहीं होतें तें सर्व स्त्रीसंज्ञेस पात्र झालें १४. इतक्यांत तो कर्दमपुत्र इल राजा हजारों मृगांचा वध करीत करीत त्या ठिकाणीं आला १५. हे रघुनंदना, त्या ठिकाणीं आल्यानंतर हिंस्र पशु, मृग व पक्षी ह्यांसहवर्तमान सर्व वन स्त्रीरूप झालें असून आपणही अनुयायांसहवर्तमान स्त्री झालों आहों असें जेव्हां त्याच्या दृष्टीं पडलें १६ तेव्हां आपली ती अवस्था पाहून त्याला मोठें दुःख झालें आणि उमापति शंकराचा तो प्रभाव आहे असें समजून आल्यावर तर त्याला भयच वाटूं लागलें १७. तदनंतर सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान तो राजा कपर्दकसंज्ञक जटाजूट धारण करणाऱ्या महात्म्या शितिकंठ देवाला शरण गेला १८. तेव्हां देवी पार्वतीसहवर्तमान तो महेश्वर वर देण्यास उद्युक्त झाला आणि स्वतः त्या कर्दमप्रजापतीच्या पुत्राला हास्यपूर्वक ह्मणाला १९ "हे महाबलाढ्य राजर्षे कर्दम पुत्रा, उठ उठ; हे सौम्य, हे सदाचरणसंपन्न, पुरुषत्वाशिवाय तुला जो वर हवा असेल तो तूं मागून घे" २०. ह्याप्रमाणें शोकाकुल झालेल्या त्या राजाला महात्म्या शंकरानें पुरुषत्व देण्याचें नाकारिलें व स्त्रीरूप झालेल्या राजाला

राजसुतां नृपः । प्रणिपत्य उमां देवीं सर्वेणैवान्तरात्मना २२ ईशे वराणां वरदे लोकानामसि भामिनी । अमोघदर्शने देवि भज सौम्येन चक्षुषा २३ हृद्गतं तस्य राजर्षेर्विज्ञाय हरसंनिधौ । प्रत्युवाच शुभं वाक्यं देवी रुद्रस्य संमता २४ अर्धस्य देवो वरदो वरार्धस्य तव ह्यहम् । तस्मादर्धं गृहाण त्वं स्त्रीपुंसोर्यावदिच्छसि २५ तदद्भुततरं श्रुत्वा देव्या वरमनुत्तमम् । संप्रहृष्टमना भूत्वा राजा वाक्यमथाब्रवीत् २६ यदि देवि प्रसन्ना मे रूपेणाप्रतिमा भुवि । मासं स्त्रीत्वमुपासित्वा मासं स्यां पुरुषः पुनः २७ ईप्सितं तस्य विज्ञाय देवी सुरुचिरानना । प्रत्युवाच शुभं वाक्यमेवमेव भविष्यति २८ राजन्पुरुषभूतस्त्वं स्त्रीभावं न स्मरिष्यसि । स्त्रीभूतश्च परं मासं न स्मरिष्यसि पौरुषम् २९ एवं स राजा पुरुषो मासं भूत्वाऽथ कार्दमिः । त्रैलोक्यसुन्दरी नारी मासमेकमिलाऽभवत् ३० [३५६१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे सप्ताशीतितमः सर्गः॥८७॥

तां कथामैलसंबद्धां रामेण समुदीरिताम् । लक्ष्मणो भरतश्चैव श्रुत्वा

---

त्या सुरश्रेष्ठापासून दुसरा वर मागून घेणें रुचलें नाहीं २१. तदनंतर मोठ्या शोकानें ग्रस्त झालेला तो राजा मन अगदीं एकाग्र करून व शैलराजकन्या उमा देवीला प्रणिपात करून ह्मणाला २२ " हे वराधिष्ठात्रि, हे वर दे, त्रैलोक्यामध्यें स्त्री ह्मणून तूंच आहेस व, हे देवि, तुझें दर्शन व्यर्थ जाणारें नाहीं. ह्यास्तव, तूं माझ्यावर कृपादृष्टि कर " २३. अशी राजानें प्रार्थना केली असतां रुद्राला संमत असलेल्या त्या देवीनें त्या राजर्षीचें हृद्गत जाणिलें आणि ती सौम्य शब्दांनीं शंकराचे सन्निध त्याला ह्मणाली २४ " तुला अर्धा वर देणारा देव असून अर्धा वर देणारी मी आहें. तस्मात्, आह्मां स्त्रीपुरुषांपासून तूं आपल्या इच्छेप्रमाणें अर्धा अर्धा वर मागून घे " २५. देवीचा हा अनुपम व अद्भुत वर श्रवण करून राजाच्या मनाला हर्ष झाला आणि तो ह्मणाला २६ " हे देवि, माझ्यावर जर तूं प्रसन्न झाली आहेस आणि पृथ्वीमध्यें जर तूं रूपानें अप्रतिम आहेस तर एक महिना मी तुझ्याप्रमाणेंच स्त्री होऊन पुनरपि एक महिना पुरुष व्हावें " २७. अशी त्याची इच्छा जाणून मनोहर मुद्रेनें युक्त असलेली देवी पार्वती शुभ शब्दांनीं त्याला ह्मणाली " तुझ्या ह्मणण्याप्रमाणेंच होईल २८; आणि, हे राजा, पुरुष झाल्यावर तुला स्त्रीत्व स्मरणार नाहीं व स्त्री झाल्यावर दुसरा महिना लोटेपर्यंत तुला पुरुषत्वाची आठवण राहणार नाहीं " २९. ह्याप्रमाणें तो कर्दमपुत्र इल राजा एक महिना पुरुष होत असे आणि नंतर एक महिना इला ह्मणून त्रैलोक्यसुंदरी स्त्री होत असे ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं सत्यांयशींवा सर्ग समाप्त झाला ॥ ८७ ॥

परमविस्मितौ १ तौ रामं प्राञ्जली भूत्वा तस्य राज्ञो महात्मनः । विस्तरं तस्य भावस्य तदा पप्रच्छतुः पुनः २ कथं स राजा स्त्रीभूतो वर्तयामास दुर्गतिः । पुरुषः स यदा भूतः कां वृत्तिं वर्तयत्यसौ ३ तयोस्तद्भाषितं श्रुत्वा कौतूहलसमन्वितम् । कथयामास काकुत्स्थस्तस्य राज्ञो यथागमम् ४ तमेव प्रथमं मासं स्त्री भूत्वा लोकसुन्दरी । ताभिः परिवृता स्त्रीभिर्येऽस्य पूर्वं पदानुगाः ५ तत्काननं विगाह्याशु विजह्रे लोकसुन्दरी । द्रुमगुल्मलताकीर्णं पद्भ्यां पद्मदलेक्षणा ६ वाहनानि च सर्वाणि संत्यक्त्वा वै समन्ततः । पर्वताभोगविवरे तस्मिन्रेमे इला तदा ७ अथ तस्मिन्वनोद्देशे पर्वतस्याविदूरतः । सरः सुरुचिरप्रख्यं नानापक्षिगणायुतम् ८ ददर्श सा इला तस्मिन्बुधं सोमसुतं तदा । ज्वलन्तं स्वेन वपुषा पूर्णं सोममिवोदितम् ९ तपन्तं च तपस्तीव्रमम्भोमध्ये दुरासदम् । यशस्करं कामकरं कारुण्ये पर्यवस्थितम् १० सा तं जलाशयं सर्वं क्षोभयामास विस्मिता । सह तैः पूर्वपुरुषैः स्त्रीभूतै रघुनन्दन ११ बुधस्तु तां समीक्ष्यैव कामबाणवशं-

---

रामानें सांगितलेली ती इलसंबंधी कथा श्रवण करून लक्ष्मण व भरत हे अतिशय विस्मित झाले १ आणि हात जोडून त्या महात्म्या इलराज्याच्या त्या स्त्रीपुरुषत्वाची सविस्तर हकीकत त्यांनीं रामाला पुनरपि विचारिली २. ( ते ह्मणाले ) " स्त्री झाल्यामुळें दुःस्थितीस पोंचलेला तो राजा कसा वागत असे ? आणि तो पुरुष झाल्यावर आपलें वर्तन कसें ठेवीत असे ? " ३. हें त्यांचें उत्कंठेनें युक्त असलेलें भाषण श्रवण करून ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें त्या राजाचा इत्थंभूत वृत्तांत त्यांना कळविला ४. (तो ह्मणाला) " त्या पहिल्याच महिन्यामध्यें भुवनसुंदरी स्त्री होऊन स्त्रीरूप झालेल्या त्या पूर्वीच्या अनुयायांनीं परिवेष्टित झाली ५. नंतर कमलपत्रांप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी ती त्रैलोक्यसुंदरी वृक्ष, झुडपें व लता ह्यांनीं व्याप्त झालेल्या त्या वनामध्यें सत्वर प्रवेश करून पायांनींच संचार करूं लागली ६. बरोबर असलेलीं सर्व वाहनें सभोंवतीं सोडून देऊन विस्तीर्ण पर्वतांच्या मध्यभागीं ती इला त्यावेळीं क्रीडा करूं लागली ७. त्या वनामध्यें पर्वताचे समीपच नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं युक्त आणि अत्यंत मनोहर असें एक सरोवर होतें ८. त्या सरोवराचे ठिकाणीं सोमपुत्र बुध त्या इलेच्या दृष्टीं पडला. तो बुध उदय पावलेल्या पूर्ण चंद्राप्रमाणें आपल्या देहानें झळकत होता ९; उदकामध्यें तो तीव्र तपश्चर्या करीत होता; तो अजिंक्य होता आणि तो यशस्वी, यथेष्ट वागणारा व दयाळु होता १०. हे रघुनंदना, स्त्रीरूप झालेल्या त्या प्राचीन पुरुषांसहवर्तमान ती इला विस्मित होऊन क्रीडेच्या योगानें तें सर्व सरोवर क्षुब्ध करून टाकीत होती ११. ती दृष्टीं पडल्याबरोबर बुध मदनबाणांच्या अधीन होऊन गेला त्यावेळें मनत्याला अधूरेना झालें

गतः । नोपलेभे तदात्मानं स, चचाल तदाम्भसि १२ इलां निरीक्षमा-
णस्तु त्रैलोक्यादधिकां शुभाम् । चित्तं समभ्यतिक्रामत्का न्वियं देवता-
धिका १३ न देवीषु न नागीषु नासुरीष्वप्सरःसु च । दृष्टपूर्वा मया
काचिद्रूपेणानेन शोभिता १४ सदृशीयं मम भवेद्यदि नान्यपरिग्रहः ।
इति बुद्धिं समास्थाय जलात्कूलमुपागमत् १५ आश्रमं समुपागम्य
ततस्ताः प्रमदोत्तमाः । शब्दापयत धर्मात्मा ताश्चैनं च ववन्दिरे १६ स ताः
पप्रच्छ धर्मात्मा कस्यैषा लोकसुन्दरी । किमर्थमागता चैव सर्वमाख्यात
मा चिरम् १७ शुभं तु तस्य तद्वाक्यं मधुरं मधुराक्षरम् । श्रुत्वा स्त्रियश्च
ताः सर्वा ऊचुर्मधुरया गिरा १८ अस्माकमेषा सुश्रोणी प्रभुत्वे वर्तते सदा ।
अपतिः काननान्तेषु सहास्माभिश्चरत्यसौ १९ तद्वाक्यमव्यक्तपदं तासां
स्त्रीणां निशम्य च । विद्यामावर्तनीं पुण्यामावर्तयति स द्विजः २० सोऽर्थं
विदित्वा सकलं तस्य राज्ञो यथा तथा । सर्वा एव स्त्रियस्ताश्च बभाषे
मुनिपुंगवः २१ अत्र किंपुरुषीर्भूत्वा शैलरोधसि वत्स्यथ । आवासस्तु
गिरावस्मिञ्शीघ्रमेव विधीयताम् २२ मूलपत्रफलैः सर्वा वर्तयिष्यथ

---

आणि उदकामध्यें त्याची वृत्ति पालटली १२. त्रैलोक्यांतील स्त्रियांपेक्षांही अधिक मनोहर असलेल्या त्या इलेकडे तो पाहूं लागला असतां त्याच्या अंतःकरणामध्यें तिच्यासंबंधानें विचार उत्पन्न झाला. " देवतांहूनहीं अधिक अशी ही स्त्री कोण बरें असावी ! १३. देवांगना, नागकन्या, दैत्यांगना आणि अप्सरा ह्यांमध्येंही आजपर्यंत अशा रूपानें सुशोभित असलेली कोणीही स्त्री माझ्या दृष्टीं पडली नाहीं १४. दुसऱ्यानें जर हिचा स्वीकार केला नसेल तर ही स्त्री मला योग्य होईल " असा विचार मनामध्यें आणून तो उदकांतून निघून तीरावर आला १५. तदनंतर आश्रमामध्यें आल्यावर त्या धर्मात्म्यानें त्या उत्कृष्ट तरुणी स्त्रियांना आह्वान केलें असतां त्यांनीं त्याला वंदन केलें १६. तेव्हां " ही लोकसुंदरी कोणाची आहे ? व ही येथें कशाकरितां आली आहे ? हें सर्व तुह्मी मला सत्वर कथन करा " असें त्या धर्मात्म्यानें त्यांना विचारिलें असतां १७ मधुर शब्दांनीं युक्त असलेला तो मधुर व शुभ प्रश्न श्रवण करून त्या सर्व स्त्रिया मधुर वाणीनें त्याला ह्मणाल्या १८ " ही सुंदरी सर्वदा आमची स्वामिनी आहे; आणि ही अविवाहित असून आह्मांसहवर्तमान वनांत संचार करीत असते " १९. स्पष्ट शब्दांनीं युक्त असें त्या स्त्रियांचें हें भाषण श्रवण केल्यानंतर पवित्र संवर्त विद्येचा त्यानें जप केला २०. तेव्हां त्या राजाचा तो संपूर्ण वृत्तांत इत्थंभूत समजून आल्यावर तो मुनिश्रेष्ठ बुध इलेच्या त्या सर्व स्त्री प सख्यांना ह्मणाला २१ " येथें पर्वततटाकावर तुह्मी किंनर स्त्रिया होऊन रहा; ह्या पर्वताचे ठिकाणीं

निस्यदा । स्त्रियः किंपुरुषान्नाम भर्तॄन्समुपलप्स्यथ २३ ताः श्रुत्वा सोमपुत्रस्य स्त्रियः किंपुरुषीकृताः । उपासांचक्रिरे शैलं वध्वस्ता बहुलास्तदा २४ [ ३५८५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डेऽष्टाशीतितमः सर्गः ॥ ८८ ॥

श्रुत्वा किंपुरुषोत्पत्तिं लक्ष्मणो भरतस्तथा । आश्चर्यमिति चाब्रूतामुभौ रामं जनेश्वरम् १ अथ रामः कथामेतां भूय एव महायशाः । कथयामास धर्मात्मा प्रजापतिसुतस्य वै २ सर्वास्ता विद्रुता दृष्ट्वा किन्नरीर्ऋषिसत्तमः । उवाच रूपसंपन्नां तां स्त्रियं प्रहसन्निव ३ सोमस्याहं सुदयितः सुतः सुरुचिरानने । भजस्व मां वरारोहे भक्त्या स्निग्धेन चक्षुषा ४ तस्य तद्वचनं श्रुत्वा शून्ये स्वजनवर्जिते । इला सुरुचिरप्रख्यं प्रत्युवाच महाग्रहम् ५ अहं कामचरी सौम्य तवास्मि वशवर्तिनी । प्रशाधि मां सोमसुत यथेच्छसि तथा कुरु ६ तस्यास्तदद्भुतप्रख्यं श्रुत्वा हर्षमुपागतः । स वै कामी सह तया रेमे चन्द्रमसः सुतः ७ बुधस्य माधवो मासस्तामिलां रुचिराननाम् । गतो रमयतोऽत्यर्थं क्षणवत्तस्य कामिनः ८ अथ मासे तु संपूर्णे

---

तुह्मी आपलें वसतिस्थान सत्वर तयार करा २२. मुळें, पत्रें व फलें ह्यांवर तुह्मी सर्व स्त्रिया नित्य उपजीविका करीत जा आणि किंपुरुषनामक भर्त्यांचा तुह्मी स्वीकार करा " २३. हें सोमपुत्र बुधाचें भाषण श्रवण केल्यानंतर त्या स्त्रिया बुधाच्या योगसामर्थ्यामुळें किन्नरी झाल्या आणि त्या असंख्य स्त्रिया त्या पर्वतासमीप वास्तव्य करूं लागल्या २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं अठ्यांयशीवा सर्ग समाप्त झाला ॥८८॥

स्त्रियांना किन्नरीत्व प्राप्त झाल्याचें श्रवण केल्यावर लक्ष्मण व भरत हे उभयतां " आश्चर्य आश्चर्य " ह्मणून प्रजाधिपति रामाला ह्मणाले १. नंतर महायशस्वी धर्मात्म्या रामानें कर्दम प्रजाधिपतीचा पुत्र जो इल त्याचीही कथा पुनरपि त्यांना कथन केली २. ( तो ह्मणाला ) त्या सर्व किन्नरी दुसरीकडे गेल्या असें पाहून त्या रुपवती इला स्त्रीला तो ऋषिश्रेष्ठ बुध हंसत हंसत ह्मणाला ३ " हे सुंदरि, तुझें मुख अत्यंत मनोहर आहे व मी चंद्राचा अतिशय प्रिय पुत्र आहे. ह्यास्तव, सप्रेम दृष्टीनें व भक्तीनें तूं माझा स्वीकार कर " ४. स्वजनरहित अशा एकांतस्थलामध्यें त्याचें भाषण श्रवण करून इला त्या अत्यंत मनोहर बुधाला ह्मणाली ५ " हे सौम्य, मी स्वतंत्र असून आपल्या अधीन आहें; ह्यास्तव, हे सोमनंदन, मला आपण आज्ञा करा आणि इच्छेस येईल त्याप्रमाणें आपण माझ्याशीं वागा " ६. तिचें हें अद्भुत भाषण श्रवण केल्यानंतर चंद्रपुत्र बुधाला हर्ष झाला व तो कामी चंद्रपुत्र तिच्याशीं रममाण होऊं लागला ७. तेव्हां मनोहर मद्रेनें युक्त अशा त्या इलेशीं अत्यंत रममाण होत

पूर्णेन्दुसदृशाननः । प्रजापतिसुतः श्रीमाञ्शयने प्रत्यबुध्यत ९ सोऽपश्य-त्सोमजं तत्र तपन्तं सलिलाशये । ऊर्ध्वबाहुं निरालम्बं तं राजा प्रत्यभा-षत १० भगवन्पर्वतं दुर्गं प्रविष्टोऽस्मि सहानुगः । न च पश्यामि तत्सैन्यं क्व नु ते मामका गताः ११ तच्छ्रुत्वा तस्य राजर्षेर्नष्टसंज्ञस्य भाषितम् । प्रत्युवाच शुभं वाक्यं सान्त्वयन्परया गिरा १२ अश्मवर्षेण महता भृत्यास्ते विनिपातिताः । त्वं चाश्रमपदे सुप्तो वातवर्षभयार्दितः १३ समाश्वसिहि भद्रं ते निर्भयो विगतज्वरः । फलमूलाशनो वीर निवसेह यथासुखम् १४ स राजा तेन वाक्येन प्रत्याश्वस्तो महामतिः । प्रत्युवाच शुभं वाक्यं दीनो भृत्यजनक्षयात् १५ त्यक्ष्याम्यहं स्वकं राज्यं नाहं भृत्यैर्विनाकृतः । वर्तयेयं क्षणं ब्रह्मन्समनुज्ञातुमर्हसि १६ सुतो धर्मपरो ब्रह्मञ्ज्येष्ठो मम महा-यशाः । शशबिन्दुरिति ख्यातः स मे राज्यं प्रपत्स्यते १७ न हि शक्ष्या-म्यहं हित्वा भृत्यदारान्सुखान्वितान् । प्रतिवक्तुं महातेजः किंचिदप्यशुभं वचः १८ तथा ब्रुवति राजेन्द्रे बुधः परममद्भुतम् । सान्त्वपूर्वमथोवाच

---

असलेल्या त्या कामीं बुधाचा वैशाख मास एका क्षणाप्रमाणें निघून गेला ८. ह्याप्रमाणें महिना पूर्ण झाली असतां पूर्णचंद्राप्रमाणें ज्याचें मुख आल्हादकारक आहे असा तो कर्दम प्रजापतीचा पुत्र इल शय्येवर निद्रिस्थ असतांना जागा झाला ९; तों सरोवरामध्यें वर हात करून व आधाररहित राहून सोमपुत्र बुध तपश्चर्या करीत असल्याचें त्याच्या दृष्टीं पडलें व तो इल राजा त्याला ह्मणाला १० " हे भगवन्, अनुयायांसहवर्तमान मी दुर्गम पर्वतावर आलों; परंतु, तें सैन्य माझ्या दृष्टीं पडत नाहीं. ते माझे अनुयायी कोणी-कडे बरें गेले " ११. स्त्रीत्वाची ज्याला आठवण नाहीं अशा त्या राजर्षीचें तें शुभ भाषण ऐकून घेऊन मनोहर वाणीनें सांत्वन करीत करीत तो बुध त्याला ह्मणाला १२ "प्रचंड पाषाणवृष्टीमुळें त्या तुझ्या सेवकांचा निःपात झाला असून वायु व पर्जन्य ह्यांच्या भीतीनें व्याकुल झाल्या कारणानें तूं आश्रमामध्यें निजून राहिला होतास १३. तुझें देव बरें करो, तूं आतां धीर धर; निर्भय व निश्चिंत हो आणि, हे वीरा, फलमूलें भक्षण करून तूं खुशाल ह्या ठिकाणीं रहा" १४. ह्या बुधाच्या भाषणानें त्याला धीर आला; परंतु, सेवक जनांचा क्षय झाल्यामुळें तो दीन झालेला राजा शुभ शब्दांनीं त्याला ह्मणाला १५" हे ब्रह्मन्, मी आपल्या राज्याचा त्याग करितों. कारण, भृत्यांवांचून क्षणभरही राहण्यास मी समर्थ नाहीं. ह्यास्तव, आपण मला जाण्याची अनुज्ञा द्यावी १६. हे ब्रह्मन्, धर्मनिष्ठ व महायशस्वी असा माझा ज्येष्ठ पुत्र शशबिंदु ह्मणून प्रख्यात आहे; त्याला माझें राज्य मिळेल. सुखाचा उपभोग घेत असलेले राज्यांतील सेवक व भार्या ह्यांना सोडून रहाण्यास मी समर्थ नाहीं. ह्यास्तव,

वासस्त्व इह रोचताम् १९ न सन्तापस्त्वया कार्यः कार्दमेय महाबल । संवत्सरोषितस्याद्य कारयिष्यामि ते हितम् २० तस्य तद्वचनं श्रुत्वा बुधस्याक्लिष्टकर्मणः । वासाय विदधे बुद्धिं यदुक्तं ब्रह्मवादिना २१ मासं स स्त्री तदा भूत्वा रमयत्यनिशं सदा । मासं पुरुषभावेन धर्मबुद्धिं चकार सः २२ ततः सा नवमे मासि इला सोमसुतात्सुतम् । जनयामास सुश्रोणी पुरूरवसमूर्जितम् २३ जातमात्रे तु सुश्रोणी पितुर्हस्ते न्यवेशयत् । बुधस्य समवर्णं च इला पुत्रं महाबलम् २४ बुधस्तु पुरुषीभूतं स वै संवत्सरान्तरम् । कथाभी रमयामास धर्मयुक्ताभिरात्मवान् २५ [ ३६१० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोननवतितमः सर्गः ॥ ८९ ॥

तथोक्तवति रामे तु तस्य जन्म तदद्भुतम् । उवाच लक्ष्मणो भूयो भरतश्च महायशाः १ इला सा सोमपुत्रस्य संवत्सरमथोषिता । अकरोत्किं नरश्रेष्ठ तत्त्वं शंसितुमर्हसि २ तयोस्तद्वाक्यमाधुर्यं निशम्य परिपृच्छतोः । रामः पुनरुवाचेदं प्रजापतिसुते कथाम् ३ पुरुषत्वं गते शूरे बुधः परम-

---

हे महातेजस्वी मुने, आपण माझ्या इच्छेविरुद्ध कांहींएक भाषण करूं नका" १८. ह्याप्रमाणें तो राजाधिराज इल अत्यंत आश्चर्यकारक भाषण करूं लागला असतां बुध सांत्वनपूर्वक त्याला ह्मणाला "येथें वास्तव्य करण्याचें तूं मनामध्यें आण १९. हे महाबलाढ्य कर्दमपुत्रा, तूं काळजी करूं नको. आजपासून एक संवत्सरपर्यंत तूं येथें रहा; ह्मणजे मी तुझें हित करीन" २०. पवित्र कर्म करणाऱ्या त्या बुधाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर त्या ब्रह्मवेत्त्यांनीं सांगितल्याप्रमाणें त्यानें तेथें वास्तव्य करण्याचें मनामध्यें आणिलें २१. महिनाभर स्त्री होऊन तो इल बुधाशीं एकसारिखा अतिशय रममाण होत असे आणि एक महिना पुरुष होऊन आपलें चित्त धर्माकडे लावीत असे २२. तदनंतर त्या सुंदरी इलेला नवव्या महिन्यांत सोमपुत्र बुधापासून पुरुरवस् ह्मणून एक भव्य पुत्र झाला २३. तो पुत्र उत्पन्न होतांक्षणीं त्या सुंदरी इलेनें तो महाबलाढ्य व कांतीनें बुधासारिखा असलेला पुत्र त्याच्या पित्याचे हातीं दिला २४ आणि नंतर संवत्सरापैकीं अवशिष्ट राहिलेल्या ज्या दिवसांमध्यें तो इल पुरुष झाला ते दिवस संपूर्ण होईपर्यंत बुधानें जितेंद्रिय राहून धर्मयुक्त कथांच्या योगानें त्याचें मन रमविलें २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकूणनवदावा सर्ग समाप्त झाला ॥ ८९ ॥

ह्याप्रमाणें त्या पुरूरव्याची ती अद्भुत उत्पत्ति रामानें कथन केली असतां महायशस्वी भरत व लक्ष्मण पुनरपि त्याला ह्मणाले १ "हे पुरुषश्रेष्ठा, संवत्सरपर्यंत चंद्रपुत्रासमीप राहिल्यानंतर त्या इलेनें काय केलें हें आपण कथन करा" २. ह्याप्रमाणें प्रश्न करणाऱ्या त्या भरतल-

बुद्धिमान् । संवर्तं परमोदारमाजुहाव महायशाः ४ च्यवनं भृगुपुत्रं च मुनिं
चारिष्टनेमिनम् । प्रमोदनं मोदकरं ततो दुर्वाससं मुनिम् ५ एतान्सर्वान्समा-
नीय वाक्यज्ञस्तत्त्वदर्शनः । उवाच सर्वान्सुहृदो धैर्येण सुसमाहितान् ६
अयं राजा महाबाहुः कर्दमस्य इलः सुतः । जानीतैनं यथाभूतं श्रेयो ह्यत्र
विधीयताम् ७ तेषां संवदतामेव द्विजैः सह महात्मभिः । कर्दमस्तु महा-
तेजास्तदाश्रममुपागमत् ८ पुलस्त्यश्च क्रतुश्चैव वषट्कारस्तथैव च । ओङ्का-
रश्च महातेजास्तदाश्रममुपागमन् ९ ते सर्वे हृष्टमनसः परस्परसमागमे ।
हितैषिणो बाह्लिपतेः पृथग्वाक्यान्यथाब्रुवन् १० कर्दमस्त्वब्रवीद्वाक्यं सुतार्थं
परमं हितम् । द्विजाः शृणुत मद्वाक्यं यच्छ्रेयः पार्थिवस्य हि ॥ नान्यं
पश्यामि भैषज्यमन्तरा वृषभध्वजम् ११ नाश्वमेधात्परो यज्ञः प्रियश्चैव महा-
त्मना । तस्माद्यजामहे सर्वे पार्थिवार्थे दुरासदम् १२ कर्दमेनैवमुक्तास्तु
सर्व एव द्विजर्षभाः । रोचयन्ति स्म तं यज्ञं रुद्रस्याराधनं प्रति १३ संव-
र्तस्य तु राजर्षिः शिष्यः परपुरञ्जयः । मरुत्त इति विख्यातस्तं यज्ञं समु-

---

क्ष्मणांचें तें मधुर वाक्य ऐकून कर्दमप्रजापतीच्या संबंधानें पुढला वृत्तांत कथन करण्याकरितां राम त्यांना ह्मणाला ३ "शूर इल एकदां पुरुष झाल्यानंतर महाबुद्धिमान् व महायशस्वी बुधानें परम उदार संवर्त, भृगुपुत्र च्यवनमुनि, अरिष्टनेमि, प्रमोदन, मोदकर व दुर्वास मुनि ह्यांना निमंत्रण केलें ४,५. संभाषणज्ञ व तत्ववेत्त्या बुधानें ह्या सर्व स्वकार्यदक्ष मित्रांना बोलाविलें आणि धैर्यानें तो त्यांना ह्मणाला ६ "हा महापराक्रमी राजा इल कर्दम प्रजापतीचा पुत्र होय. ह्याची अवस्था काय झाली आहे हें तुह्मी ऐकून घ्या आणि ती अवस्था निवृत्त होण्यास कल्याणकारक उपाय कोणता तो तुह्मी योजा" ७. ह्याप्रमाणें महात्म्या द्विजांसहवर्तमान त्यांचा संवाद चालला आहे तोंच महातेजस्वी कर्दम त्या आश्रमाला प्राप्त झाला ८ आणि नंतर पुलस्त्य, क्रतु व मूर्तिमान् वषट्कार आणि महातेजस्वी प्रणव हेही त्या आश्रमामध्यें आले ९. ह्याप्रमाणें परस्परांचा समागम झाला असतां ते सर्वेही मनामध्यें आनंदित झाले आणि बाल्हीकदेशाधिपतीचें हित व्हावें ह्या उद्देशानें ते पृथक् पृथक् भाषण करूं लागले १०. प्रथमतः पुत्राकरितां अत्यंत हितकारक भाषण कर्दमानें केलें. (तो ह्मणाला) "हे द्विजहो, राजाचें कल्याण कोणत्या उपायानें होईल ह्याविषयीं माझें भाषण आपण श्रवण करा. वृषध्वज शंकरावांचून ह्या राजाचा दुःस्थितिरूप रोग निवृत्त होण्यास दुसरें औषध नाहीं ११. सारांश, महात्म्या शंकराला प्रिय जो अश्वमेध क्रतु त्यापेक्षां ब्रह्महत्येचें पातक निवृत्त करणारा दुसरा यज्ञ नाहीं. तस्मात्, आपण सर्वांनीं राजाकरितां दुर्घट अश्वमेध करावा" १२. ह्याप्रमाणें कर्दमानें सांगितलें असतां रुद्राच्या आराधनेकरितां तो यज्ञ करण्याचें सर्व

पाहरत् १४ ततो यज्ञो महानासीद्बुधाश्रमसमीपतः । रुद्रश्च परमं तोष-
माजगाम महायशाः १५ अथ यज्ञे समाप्ते तु प्रीतः परमया मुदा । उमा-
पतिर्द्विजान्सर्वानुवाच इलसंनिधौ १६ प्रीतोऽस्मि हयमेधेन भक्त्या च
द्विजसत्तमाः । अस्य बाह्लिपतेश्चैव किं करोमि प्रियं शुभम् १७ तथा
वदति देवेशे द्विजास्ते सुसमाहिताः । प्रसादयन्ति देवेशं यथा स्यात्पुरुष-
स्त्विला १८ ततः प्रीतो महादेवः पुरुषत्वं ददौ पुनः । इलायै सुमहातेजा
दत्त्वा चान्तरधीयत १९ निवृत्ते हयमेधे च गते चादर्शनं हरे । यथागतं
द्विजाः सर्वे तेऽगच्छन्दीर्घदर्शिनः २० राजा तु बाह्लिमुत्सृज्य मध्यदेशे
ह्यनुत्तमम् । निवेशयामास पुरं प्रतिष्ठानं यशस्करम् २१ शशबिन्दुश्च राज-
र्षिर्बाह्लिं परपुरंजयः । प्रतिष्ठाने इलो राजा प्रजापतिसुतो बली २२ स
काले प्राप्तवाल्लोँकमिलो ब्राह्ममनुत्तमम् । ऐलः पुरूरवा राजा प्रतिष्ठानम-
वाप्तवान् २३ ईदृशो ह्यश्वमेधस्य प्रभावः पुरुषर्षभ । स्त्रीपूर्वः पौरुषं लेभे
यच्चान्यदपि दुर्लभम् २४ [ ३६३४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये
आदिकाव्ये उत्तरकाण्डे नवतितमः सर्गः ॥ ९० ॥

---

द्विजश्रेष्ठांनीं मनामध्यें आणिलें १३. संवर्ताचा एक मरुत्त ह्मणून प्रख्यात असलेला व शत्रुसमुदायाचाही पराजय करणारा जो राजर्षि शिष्य होता त्यानें तो यज्ञ केला १४. तो महायज्ञ बुधाश्रमासमीप झाला व त्याच्या योगानें महायशस्वी रुद्र अतिशय संतुष्ट झाला १५. ह्याप्रमाणें यज्ञ समाप्त झाला असतां संतुष्ट झालेला उमापति शंकर इल राजाचे संनिध मोठ्या आनंदानें त्या सर्व द्विजांना ह्मणाला १६ " हे द्विजश्रेष्ठ हो, मी भक्तिपुरःसर केलेल्या अश्वमेधामुळें प्रसन्न झालों आहें. ह्यास्तव, ह्या बाल्हीक राजाला प्रिय असलेली अशी कोणती शुभ गोष्ट मी करूं ?" १७. ह्याप्रमाणें तो सुरश्रेष्ठ बोलूं लागला असतां ते स्वकार्यदक्ष द्विज इला पुरुष होण्याविषयीं त्या सुरश्रेष्ठाची प्रार्थना करूं लागले १८. तदनंतर महादेवानें प्रसन्न होऊन पुनरपि इलेला पुरुषत्व दिलें आणि पुरुषत्व दिल्यानतर तो महातेजस्वी शंकर अंतर्धान पावला १९. ह्याप्रमाणें अश्वमेध संपूर्ण होऊन शंकर अदृश्य झाला असतां ते सर्व दूरदर्शी द्विज आल्यामार्गानें परत गेले २०. नंतर इल राजानें बाल्हीक देश सोडून दिला आणि मध्यदेशांत एक प्रतिष्ठान ह्मणून यशस्वी व उत्कृष्ट नगर त्यानें वसविलें २१. शत्रुसमूह जिंकणारा शशबिंदु राजर्षि बाल्हीक देशामध्यें राहू लागला आणि कर्दम प्रजापतीचा पुत्र बलाढ्य इल राजा प्रतिष्ठान नगरामध्यें वास्तव्य करूं लागला २२. त्या इलाला योग्य वेळीं अनुपम ब्रह्मलोक प्राप्त झाला व त्याचा पुत्र राजा पुरूरवा प्रतिष्ठान नगरामध्यें राज्य करूं लागला २३. हे पुरुषश्रेष्ठा, अशाप्रकारचा अश्वमेधाचा प्रभाव आहे. पूर्वीं स्त्री अस-

एतदाख्याय काकुत्स्थो भ्रातृभ्याममितप्रभः। लक्ष्मणं पुनरेवाह धर्मयुक्तमिदं वचः १ वसिष्ठं वामदेवं च जाबालिमथ कश्यपम्। द्विजांश्च सर्वप्रवरानश्वमेधपुरस्कृतान् २ एतान्सर्वान्समानीय मन्त्रयित्वा च लक्ष्मण। हयं लक्षणसंपन्नं विमोक्ष्यामि समाधिना ३ तद्वाक्यं राघवेणोक्तं श्रुत्वा त्वरितविक्रमः। द्विजान्सर्वान्समाहूय दर्शयामास राघवम् ४ ते दृष्ट्वा देवसंकाशं कृतपादाभिवन्दनम्। राघवं सुदुराधर्षमाशीर्भिः समपूजयन् ५ प्राञ्जलिः स तदा भूत्वा राघवो द्विजसत्तमान्। उवाच धर्मसंयुक्तमश्वमेधाश्रितं वचः ६ तेऽपि रामस्य तच्छ्रुत्वा नमस्कृत्वा वृषध्वजम्। अश्वमेधं द्विजाः सर्वे पूजयन्ति स्म सर्वशः ७ स तेषां द्विजमुख्यानां वाक्यमद्भुतदर्शनम्। अश्वमेधाश्रितं श्रुत्वा भृशं प्रीतोऽभवत्तदा ८ विज्ञाय कर्म तत्तेषां रामो लक्ष्मणमब्रवीत्। प्रेषयस्व महाबाहो सुग्रीवाय महात्मने ९ यथा महद्भिर्हरिभिर्बहुभिश्च वनौकसाम्। सार्धमागच्छ भद्रं ते अनुभोक्तुं महोत्सवम् १० विभीषणश्च रक्षोभिः कामगैर्बहुभिर्वृतः। अश्वमेधं महा-

---

लेल्या इल राजाला अश्वमेधाच्या योगानें पुरुषत्व प्राप्त झालें आहे आणि इतरही दुर्लभ गोष्टी ह्या यज्ञाच्या योगानें अनेक लोकांना प्राप्त झाल्या आहेत २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं नव्वदावा सर्ग समाप्त झाला॥ ९० ॥

हें भ्रात्यांना कथन केल्यानंतर ककुत्स्थकुलोत्पन्न महातेजस्वी राम पुनरपि लक्ष्मणाशीं धर्मयुक्त भाषण करूं लागला १. (तो ह्मणाला) " हे लक्ष्मणा, वसिष्ठ, वामदेव, जाबालि, कश्यप व सर्वविद्येंत निपुण आणि अश्वमेधांतील अग्रगण्य द्विज २ ह्या सर्वांना निमंत्रण करून आणून सावधपणानें अश्वमेधाकरितां एक सुलक्षणी अश्व सोडण्याचें माझ्या मनांत आहे " ३. रामानें केलेलें हें भाषण श्रवण केल्यानंतर शीघ्रगति लक्ष्मणानें सर्व द्विजांना आह्वान करून रामाला भेटविलें ४. तेव्हां पादाभिवंदन केलेल्या त्या देवतुल्य अजिंक्य रामाला अवलोकन करून त्यांनीं त्याला आशीर्वाद दिले असतां ५ त्या रघुवंशज रामानें हात जोडिले आणि धर्माला अनुसरून अश्वमेधासंबंधानें त्या द्विजश्रेष्ठांशीं त्यानें भाषण केलें ६. तेव्हां रामाचें तें भाषण श्रवण केल्यावर त्या सर्व द्विजांनीं शंकराला नमस्कार केला आणि अश्वमेधाची सर्वप्रकारें प्रशंसा केली ७. अद्भुत अर्थानें युक्त असें अश्वमेधसंबंधीं त्या श्रेष्ठ द्विजांचें भाषण श्रवण करून तो राम अतिशय संतुष्ट झाला ८ आणि त्यांनीं तें अनुष्ठान करण्याचें कबूल केलें असें समजून तो लक्ष्मणाला ह्मणाला " हे महापराक्रमी लक्ष्मणा, महात्म्या सुग्रीवाकडे तूं—मोठे वानर आणि अनुयायी वानरांचे अनेक समुदाय बरोबर घेऊन, तुझें देव बरें करो, महोत्सव पहाण्या करितां तूं ये—असा निरोप

बलमायात्वतुलविक्रमः ११ राजानश्च महाभागा ये मे प्रियचिकीर्षवः । सानुगाः क्षिप्रमायान्तु यज्ञभूमिनिरीक्षकाः १२ देशान्तरगता ये च द्विजा धर्मसमाहिताः । आमन्त्रयस्व तान्सर्वानश्वमेधाय लक्ष्मण १३ ऋषयश्च महाबाहो आहूयन्तां तपोधनाः। देशान्तरगताः सर्वे सदाराश्च द्विजातयः १४ तथैव तालावचरास्तथैव नटनर्तकाः । यज्ञवाटश्च सुमहान्गोमत्या नैमिषे वने १५ आज्ञाप्यतां महाबाहो तद्धि पुण्यमनुत्तमम् । शान्तयश्च महाबाहो प्रवर्तन्तां समन्ततः १६ शतशश्चापि धर्मज्ञाः क्रतुमुख्यमनुत्तमम् । अनुभूय महायज्ञं नैमिषे रघुनन्दन १७ तुष्टः पुष्टश्च सर्वोऽसौ मानितश्च यथाविधि। प्रतियास्यति धर्मज्ञ शीघ्रमामन्त्र्यतां जनः १८ शतं वाहसहस्राणां तण्डुलानां वपुष्मताम् । अयुतं तिलमुद्गस्य प्रयात्वग्रे महाबल १९ चणकानां कुलित्थानां माषाणां लवणस्य च । अतोऽनुरूपं स्नेहं च गन्धं संक्षिप्तमेव च २० सुवर्णकोट्यो बहुला हिरण्यस्य शतोत्तराः । अग्रतो भरतः कृत्वा गच्छत्वग्रे समाधिना २१ अन्तरापणवीथ्यश्च सर्वे च नटनर्तकाः । सूदा

---

पाठीव ९,१०. इच्छेप्रमाणें संचार करणाऱ्या अनेक राक्षसांसहवर्तमान अतुलपराक्रमी बिभीषणही यज्ञास आला पाहिजे ११ आणि माझ्या मनाप्रमाणें वागणारे जे महाभाग्यवान् राजे तेही यज्ञभूमि अवलोकन करण्याकरितां अनुयायांसहवर्तमान सत्वर येणें अवश्य आहे १२. हे लक्ष्मणा, लक्ष्यपूर्वक अनुष्ठान करणारे असे जे द्विज दुसऱ्या देशांत असतील त्याही सर्वांना तूं अश्वमेधाकरितां निमंत्रण कर १३. हे महापराक्रमी लक्ष्मणा, तपोधन ऋषि आणि अन्य देशांतील सर्व द्विज ह्यांना तूं सपत्नीक येण्याविषयीं निमंत्रण कर १४ आणि ताल धरणारे नट व नर्तक ह्यांनाही तूं निमंत्रण कर. हे महापराक्रमी लक्ष्मणा, नैमिषारण्यामध्यें गोमतीनदीचे तिरीं विशाल यज्ञमंडप तयार करण्याविषयीं तूं आज्ञा कर. कारण, तें नैमिषारण्य पवित्र व उत्कृष्ट आहे. हे महाबाहो,सर्व ठिकाणीं शांति सुरू होवोत १५,१६ आणि, हे रघुनंदना लक्ष्मणा, शेकडों धर्मवेत्ते हा क्रतूंमध्यें श्रेष्ठ असलेला महायज्ञ अवलोकन करून कृतार्थ होवोत १७. हे धर्मज्ञ लक्ष्मणा, राष्ट्रांतील लोकांना तूं सत्वर आमंत्रण कर. ते सर्वही लोक तुष्ट व पुष्ट होतील आणि रीतीप्रमाणें मानमान्यता झाल्यावर परत जातील १८. ज्यांत कूट नाहीं अशा तांदुळांचे एक लक्ष पशु, तीळ, मूग, हरबरे, हुलगे व उडीद ह्यांचें दहा दहा हजार पशु आणि ह्याचमानानें मीठ, तूप, तेल व चंदनाचीं खोडें इतकें सामान, हे महाबलाढ्य लक्ष्मणा, पुढें जाऊंदे १९, २०. अनेक कोटी मोहोरापुतळ्या व त्यांचे शेकडोपट रुप्याचें नाणें बरोबर घेऊन भरतानें सावधपणानें पुढें जावें २१. मार्गामध्येंही जागो जागीं

नार्यश्च बहवो नित्यं यौवनशालिनः २२ भरतेन तु सार्धं ते यान्तु सैन्यानि चाग्रतः । नैगमान्बालवृद्धांश्च द्विजांश्च सुसमाहिताः २३ कर्मान्तिकान्वर्धकिनःकोशाध्यक्षांश्च नैगमान् । मम मातॄस्तथा सर्वाः कुमारान्तःपुराणि च २४ काञ्चनीं मम पत्नीं च दीक्षायां ज्ञांश्च कर्मणि । अग्रतो भरतः कृत्वा गच्छत्वग्रे महायशाः २५ उपकार्या महार्हाश्च पार्थिवानां महौजसाम् । सानुगानां नरश्रेष्ठो व्यादिदेश महाबलः २६ अन्नपानानि वस्त्राणि अनुगानां महात्मनाम् । भरतः स तदा यातः शत्रुघ्नसहितस्तदा २७ वानराश्च महात्मानः सुग्रीवसहितास्तदा । विप्राणां प्रवराः सर्वे चक्रुश्च परिवेषणम् २८ विभीषणश्च रक्षोभिः स्त्रीभिश्च बहुभिर्वृतः । ऋषीणामुग्रतपसां पूजां चक्रे महात्मनाम् २९ [६६६३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकनवतितमः सर्गः ॥ ९१ ॥

तत्सर्वमखिलेनाशु प्रस्थाप्य भरताग्रजः । हयं लक्षणसंपन्नं कृष्णसारं मुमोच ह १ ऋत्विग्भिर्लक्ष्मणं सार्धमश्वे च विनियुज्य च । ततोऽभ्यगच्छत्काकुत्स्थः सह सैन्येन नैमिषम् २ यज्ञवाटं महाबाहुर्दृष्ट्वा परममद्भुतम् ।

---

दुकानें घालणारे व्यापारी, सर्व प्रकारचे नट व नर्तक, अचारी आणि नित्य तरुणावस्थेंत असलेल्या अनेक स्त्रिया ह्यांनीं २२ भरताबरोबर जावें; सैन्यें पुढें जावीं आणि व्यापारी, लहान लहान मुलें, वृद्ध माणसें व द्विज ह्यांना घेऊन सैनिकांनीं सावधपणानें जावें २३; मजूर, सुतार, सराफ, माझ्या सर्व माता, राजकुमारांचीं अंतःपुरें २४, दीक्षेकरितां माझी सुवर्णाची पत्नी आणि कर्मवेत्ते ऋषि ह्यांना बरोबर घेऊन महायशस्वी भरतानें पुढें जावें २५. मोठ्या मोठ्या मूल्यवान् डेरेराहुट्या आणि भक्ष्य व पेय पदार्थ महाबलाढ्य राजांकरितां व त्यांच्या मोठ्या अनुयायांकरितां पुढें पाठवून देण्याविषयीं महाबलाढ्य पुरुषश्रेष्ठ रामानें आज्ञा केली. तेव्हां शत्रुघ्नासहवर्तमान भरत निघून गेला २६,२७; महात्मे वानर सुग्रीवाबरोबर गेले; सर्व श्रेष्ठ विप्रांनीं वाढण्याचें काम पतकरिलें २८ आणि अनेक राक्षसांनीं व राक्षसस्त्रियांनीं परिवेष्टित असलेल्या बिभीषणानें महातपस्वी व महात्म्या ऋषींचें आदरातिथ्य करण्याचें काम आपल्याकडे घेतलें २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एक्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९१ ॥

ती सर्व यज्ञसामग्री पूर्णपणें पुढें पाठविल्यानंतर भरताग्रज रामानें लक्षणसंपन्न, कृष्णवर्ण व सर्व यज्ञपशूंमध्यें श्रेष्ठ असा अश्व सोडिला १; अश्वा ( च्या संरक्षणा ) कडे ऋत्विजांसहवर्तमान लक्ष्मणाची त्यानें योजना केली आणि नंतर तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम सैन्य

प्रहर्षमतुलं लेभे श्रीमानिति च सोऽब्रवीत् ३ नैमिषे वसतस्तस्य सर्व एव नराधिपाः। आनिन्युरुपहारांश्च तान्रामः प्रत्यपूजयत् ४ अन्नपानादि वस्त्राणि सर्वोपकरणानि च। भरतः सहशत्रुघ्नो नियुक्तो राजपूजने ५ वानराश्च महात्मानः सुग्रीवसहितास्तदा। परिवेषणं च विप्राणां प्रयताः संप्रचक्रिरे ६ विभीषणश्च रक्षोभिर्बहुभिः सुसमाहितः। ऋषीणामुग्रतपसां किङ्करः समपद्यत ७ उपकार्या महार्हाश्च पार्थिवानां महात्मनाम्। सानुगानां नरश्रेष्ठो व्यादिदेश महाबलः ८ एवं सुविहितो यज्ञो ह्यश्वमेधो ह्यवर्तत। लक्ष्मणेन सुगुप्ता सा हयचर्या प्रवर्तत ९ ईदृशं राजसिंहस्य यज्ञप्रवरमुत्तमम्। नान्यः शब्दोऽभवत्तत्र हयमेधे महात्मनः १० छन्दन्तो देहि विस्रब्धो यावत्तुष्यन्ति याचकाः ११ तावत्सर्वाणि दत्तानि क्रतुमुख्ये महात्मनः। विविधानि च गौडानि खाण्डवानि तथैव च १२ न निःसृतं भवत्योष्ठाद्वचनं यावदर्थिनाम्। तावद्वानररक्षोभिर्दत्तमेवाभ्यदृश्यत १३ न कश्चिन्मलिनो वापि दीनो वाप्यथवा कृशः। तस्मिन्यज्ञवरे राज्ञो हृष्टपुष्टजनावृते १४ ये च तत्र महा-

---

बरोबर घेऊन नैमिषारण्यांत गेला २. तेथें गेल्यावर मोठा अद्भुत यज्ञमंडप दृष्टीं पडला असतां महापराक्रमी रामाला अतुल हर्ष झाला आणि "हा भव्य आहे" असें तो ह्मणाला ३. तो नैमिषारण्यामध्यें वास्तव्य करूं लागला असतां सर्व भूपतींनीं त्याच्याकडे नजराणे आणिले व त्या भूपतींचा रामानेंही उलट सत्कार केला ४; ह्मणजे अन्न, पान वगैरे (सेवन करण्यास योग्य असलेले पदार्थ), वस्त्रें आणि सर्व उपकरणें त्यांना त्यानें अर्पण केलीं. राजांच्या आदरसत्काराकडे शत्रुघ्नासहवर्तमान भरताची योजना झाली होती ५; सुग्रीवासहवर्तमान महात्मे वानर शुद्ध राहून ब्राह्मणांना वाढीत होते ६; अनेक राक्षसांसहवर्तमान बिभीषण अतिशय तत्पर राहून महातपस्वी ऋषींची शुश्रूषा करीत होता ७ आणि महाबलाढ्य पुरुषश्रेष्ठ राम महात्मे राजे व त्यांचे अनुयायी ह्यांच्या डेरेराहुट्यांविषयीं आज्ञा करीत होता ८. ह्याप्रमाणें सर्व कामांची चांगली व्यवस्था लागली असतां अश्वमेध याग सुरू झाला आणि लक्ष्मण रक्षण करीत असतांना अश्वसंचारालाही आरंभ झाला ९. असो. अशा प्रकारचा त्या नृपश्रेष्ठ रामाचा उत्कृष्ट यज्ञ सुरू झाला असतां "याचक संतुष्ट होईपर्यंत कोणाचेंही भय न बाळगितां इच्छेप्रमाणें त्यांना हवें तें तूं दे" ह्या शब्दांशिवाय दुसऱ्या तऱ्हेचा (निषेधवाचक) शब्द त्या महात्म्याच्या अश्वमेधामध्यें कोणाच्या मुखांतून निघालाच नाहीं १०, ११; व हे शब्द निघताक्षणीं नानाप्रकारचीं शर्करायुक्त पक्वान्नें व इतरही सर्व अपेक्षित वस्तु हीं याचकांना मिळाल्याशिवाय राहिलींच नाहींच १२. कारण, याचकांच्या ओठाबाहेर शब्द निघाला नाहीं तोंच वानरांनीं व राक्षसांनीं ती ती वस्तु त्यांना अर्पण केले-

त्मानो मुनयश्चिरजीविनः । नास्मरंस्तादृशं यज्ञं दानौघसमलंकृतम् १५ यः कृत्यवान्सुवर्णेन सुवर्णं लभते स्म सः । वित्तार्थी लभते वित्तं रत्नार्थी रत्नमेव च १६ हिरण्यानां सुवर्णानां रत्नानामथ वाससाम् । अनिशं दीयमानानां राशिः समुपदृश्यते १७ न शक्रस्य न सोमस्य यमस्य वरुणस्य च । ईदृशो दृष्टपूर्वो न एवमूचुस्तपोधनाः १८ सर्वत्र वानरास्तस्थुः सर्वत्रैव च राक्षसाः । वासोधनान्नकामेभ्यः पूर्णहस्ता ददुर्भृशम् १९ ईदृशो राजसिंहस्य यज्ञः सर्वगुणान्वितः । संवत्सरमथो साग्रं वर्धते न च हीयते २० [ ३६८६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्विनवतितमः सर्गः ॥ ९२ ॥

वर्तमाने तथाभूते यज्ञे च परमाद्भुते । सशिष्य आजगामाशु वाल्मीकिर्भगवानृषिः १ स दृष्ट्वा दिव्यसंकाशं यज्ञमद्भुतदर्शनम् । एकान्त ऋषिसंघातश्चकार उटजाञ्शुभान् २ शकटांश्च बहून्पूर्णान्फलमूलांश्च शोभनान् । वाल्मीकिवाटे रुचिरे स्थापयन्नविदूरतः ३ स शिष्यावब्रवीद्धृष्टौ युवां गत्वा

---

लीच दृष्टीं पडत असे १३. राजाच्या त्या—तुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त झालेल्या—श्रेष्ठ यज्ञांत मलिन, दीन अथवा कृश कोणीच नव्हता १४. जे महात्मे चिरजीवी मुनि त्या ठिकाणीं आले होते त्यांच्याही स्मरणांत दानसमुदायांनीं अलंकृत झालेला तशाप्रकारचा यज्ञ नव्हता १५. ज्याला सुवर्णाची अपेक्षा असें त्याला सुवर्ण मिळत असें; ज्याला द्रव्याची इच्छा असें त्याला द्रव्यलाभ होत असे आणि रत्नार्थी पुरुषाला रत्नप्राप्ति होत असे १६. रुपें, सोनें, रत्नें व वस्त्रें ह्यांचें दान एकसारिखें चालल्यामुळें त्यांचे ढीगच तेथें दृष्टीं पडत होते १७. " इंद्र, चंद्र, यम व वरुण ह्यांपैकीं सुद्धां अशाप्रकारचा यज्ञ पूर्वी कोणाच्या हातून झाल्याचें आह्मीं पाहिलें नाहीं " असें तपस्वी ह्मणूं लागले १८. हातांमध्यें पदार्थ घेऊन वानर व राक्षस सर्व ठिकाणीं उभे होते; आणि वस्त्रें, धन व अन्न मागणाऱ्या याचकांना ते एकसारिखें देत होते १९. असो. ह्याप्रमाणें त्या नृपश्रेष्ठ रामाचा सर्वगुणसंपन्न अश्वमेध यज्ञ पूर्ण संवत्सर लोटे पर्यंत कमी न होतां उत्तरोत्तर चांगल्या रीतीनेंच चालला होता २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं ब्यांणवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९२ ॥

तशा प्रकारचा तो अत्यंत अद्भुत यज्ञ सुरू झाला असतां भगवान् वाल्मीकि ऋषि त्वरेत्वरेनें तेथें आले १; अद्भुत दिसणारा तो दिव्य यज्ञ अवलोकन केल्यावर त्यांच्या बरोबर असलेल्या ऋषिगणांनीं एकांतामध्यें ( एका बाजूला ) पवित्र झोपड्या तयार केल्या २; आणि अन्नादिकांनीं भरलेले अनेक गाडे व उत्कृष्ट फळें आणि मूळें हीं वाल्मीकिमह-

समाहितो । कृत्स्नं रामायणं काव्यं गायतां परया मुदा ४ ऋषिवाटेषु पुण्येषु ब्राह्मणावसथेषु च । रथ्यासु राजमार्गेषु पार्थिवानां गृहेषु च ५ रामस्य भवनद्वारि यत्र कर्म च कुर्वते । ऋत्विजामग्रतश्चैव तत्र गेयं विशेषतः ६ इमानि च फलान्यत्र स्वादूनि विविधानि च । जातानि पर्वताग्रेषु आस्वाद्यास्वाद्य गायताम् ७ न यास्यथः श्रमं वत्सौ भक्षयित्वा फलान्यथ । मूलानि च सुमृष्टानि न रागात्परिहास्यथः ८ यदि शब्दापयद्रामः श्रवणाय महीपतिः । ऋषीणामुपविष्टानां यथायोगं प्रवर्तताम् ९ दिवसे विंशतिः सर्गा गेया मधुरया गिरा । प्रमाणैर्बहुभिस्तत्र यथोद्दिष्टं मया पुरा १० लोभश्चापि न कर्तव्यः स्वल्पेऽपि धनवाञ्छया । किं धनेनाश्रमस्थानां फलमूलाशिनां सदा ११ यदि पृच्छेत्स काकुत्स्थो युवां कस्येति दारकौ । वाल्मीकेरथ शिष्यौ द्वौ ब्रूतमेवं नराधिपम् १२ इमास्तन्त्रीः सुमधुराः स्थानं वाऽपूर्वदर्शनम् । मूर्छयित्वा सुमधुरं गायतां विगतज्वरौ १३ आदिप्रभृति गेयं स्यान्न चावज्ञाय पार्थिवम् । पिता हि सर्वभू-

---

र्षींच्या मनोहर मार्गासंनिध जवळच त्यांनीं आणून ठेविलीं ३. तेव्हां ते वाल्मीकि आपल्या आनंदित झालेल्या दोन शिष्यांना ह्मणाले " तुह्मी जा आणि अवधान देऊन मोठ्या आनंदानें संपूर्ण रामायणकाव्य तुह्मी गा ४.— ऋषींचीं पवित्र स्थानें ब्राह्मणांचीं वसतिस्थलें, उपमार्ग, राजमार्ग, राजांचीं गृहें ५, रामाचें निवासस्थान आणि जेथें अनुष्ठान चाललें आहे तेथें ऋत्विजांसमोर— इतक्या ठिकाणीं तुह्मी विशेषतः गायन करीत जा ६. पर्वतशिखरांवर उत्पन्न झालेलीं हीं नानाप्रकारचीं स्वादिष्ट फलें सेवन करून तुह्मी गायन करीत जा ७. हे वत्सहो, फलें व निर्मल मूलें सेवन केल्यानें तुह्मांला श्रम होणार नाहींत व तुमच्या स्वरालाही कमीपणा येणार नाहीं ८. ऋषि बसले असतांना जर भूपति रामानें तुमचें गायन ऐकण्याकरितां तुह्मांला बोलाविलें तर तुह्मी उभयतां मेळ बसवून गात जा ९. नानाप्रकारच्या श्लोकसंख्यांनीं युक्त असे जे रामायणांतील सर्ग मीं पूर्वीं तुह्मांला सांगितले आहेत त्यांपैकीं वीस सर्ग तुह्मी प्रत्येक दिवशीं मधुर वाणीनें गातजा १०. परंतु, धनाचा अभिलाष धरून यत्किंचित्‌ही लोभ दाखवूं नका. कारण, सर्वदां फलमूलांवर उपजीविका करणाऱ्या आश्रमवासी जनांना धनाशीं काय कर्तव्य आहे ? ११. " तुह्मी कोणाचे मुलगे " असा जर त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें तुह्मांला प्रश्न केला तर " वाल्मीकीचे दोन शिष्य " ह्याप्रमाणें तुह्मी त्या राजाला उत्तर द्या १२. मधुर स्वर काढणाऱ्या ह्या तारा आणि अपूर्व स्वर ज्याठिकाणीं निघत असतात असें तारांना आधारभूत असलेलें स्थान ह्या दोन्ही ठिकाणीं नाद काढून

तानां राजा भवति धर्मतः १४ तद्युवां हृष्टमनसौ श्वः प्रभाते समाहितौ। गायतं मधुरं गेयं तन्त्रीलयसमन्वितम् १५ इति संदिश्य बहुशो मुनिः प्राचेतसस्तदा । वाल्मीकिः परमोदारस्तूष्णीमासीन्महामुनिः १६ संदिष्टौ मुनिना तेन तावुभौ मैथिलीसुतौ । तथैव करवावेति निर्जग्मतुररिन्दमौ १७ तामद्भुतां तौ हृदये कुमारौ निवेश्य वाणीमृषिभाषितां तदा । समुत्सुकौ तौ सुखमूषतुर्निशां यथाश्विनौ भार्गवनीतिसंहिताम् १८ [ ३७०१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे त्रिनवतितमः सर्गः ॥९३॥

तौ रजन्यां प्रभातायां स्नातौ हुतहुताशनौ । यथोक्तमृषिणा पूर्वं सर्वं तत्रोपगायताम् १ तां स शुश्राव काकुत्स्थः पूर्वाचार्यविनिर्मिताम् । अपूर्वां पाठ्यजातिं च गेयेन समलंकृताम् २ प्रमाणैर्बहुभिर्बद्धां तन्त्रीलयसमन्विताम् । बालाभ्यां राघवः श्रुत्वा कौतूहलपरोऽभवत् ३ अथ कर्मान्तरे राजा समाहूय महामुनीन् । पार्थिवांश्च नरव्याघ्रः पण्डितान्नैगमांस्तथा ४

---

तुह्मी निःशंकपणें अत्यंत मधुर गायन करीत जा १३. आरंभापासून तुह्मी गा; परंतु, राजा ( समीप असतांनाही दुसऱ्या ठिकाणीं असल्याप्रमाणें हातापायांचे वगैरे यथेष्ट चाळे करून त्या ) चा अवमान तुह्मी करूं नका. कारण, धर्मदृष्टीनें पाहूं गेलें असतां राजा सर्व प्राण्यांचा पिता आहे १४. ह्यास्तव, तुह्मी उद्यींक प्रभात कालीं स्वरांचा मेळ बसेल अशा रीतीनें उल्हासपूर्वक स्वस्थ चित्तानें मधुर गायन करा १५. ह्याप्रमाणें प्राचेतस मुनींनीं वारंवार त्यांना बजाविलें आणि नंतर ते परम उदार वाल्मीकि महर्षि स्वस्थ बसले १६. तेव्हां मैथिलीच्या पुत्रांना त्या मुनींनीं अशी आज्ञा केली असतां " आह्मी असें करूं " इतकें सांगून शत्रूंचें दमन करणारे ते उभयतां सीताकुमार ( पर्णकुटिकेंतून ) बाहेर पडले १७. सारांश, शुक्राचार्यांनीं पढविलेली नीतिसंहिता लक्ष्यांत ठेवणारे अश्विनीकुमारच कीं काय अशा त्या उभयतां कुमारांनीं ऋषींनीं उच्चारिलेली ती अद्भुत वाणी लक्ष्यांत ठेविली आणि गायनाविषयीं अतिशय उत्सुक होऊन त्यांनीं ती रात्र आनंदांत काढिली १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं त्र्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९३ ॥

रात्र उजाडल्यानंतर त्या उभयतां कुमारांनीं स्नान करून अग्नीमध्यें होम दिला आणि वाल्मीकिमुनींनीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्याठिकाणीं त्यांनीं तें सर्व गाऊन दाखविलें १ प्राचीन आचार्यांनीं जी निर्माण केली आहे, जी पूर्वी कधीं ऐकण्यांत आलेली नाहीं गायनधर्मानें जी अलंकृत आहे, अनेकप्रमाणांनीं जी बद्ध आहे व स्वरांचें ज्यामध्यें संमेलन आहे अशी ती गायनपद्धति बालकांपासून श्रवण केल्यानंतर रामाला उत्सुकता प्रा

पौराणिकाञ्शब्दविदो ये वृद्धाश्च द्विजातयः । स्वराणां लक्षणज्ञांश्च उत्सुकान्द्विजसत्तमान् ५ लक्षणज्ञांश्च गान्धर्वान्नैगमांश्च विशेषतः । पादाक्षरसमासज्ञांश्छन्दःसु परिनिष्ठितान् ६ कलामात्राविशेषज्ञाञ्ज्योतिषे च परं गतान् । क्रियाकल्पविदश्चैव तथा कार्यविशारदान् ७ हेतूपचारकुशलान्हैतुकांश्च बहुश्रुतान् । छन्दोविदः पुराणज्ञान्वैदिकान्द्विजसत्तमान् ८ चित्रज्ञान्वृत्तसूत्रज्ञान्गीतनृत्यविशारदान् । एतान्सर्वान्समानीय गातारौ समवेशयत् ९ तेषां संवदतां तत्र श्रोतॄणां हर्षवर्धनम् । गेयं प्रचक्रतुस्तत्र तावुभौ मुनिदारकौ १० ततः प्रवृत्तं मधुरं गान्धर्वमतिमानुषम् । न च तृप्तिं ययुः सर्वे श्रोतारो गेयसंपदा ११ हृष्टा मुनिगणाः सर्वे पार्थिवाश्च महौजसः । पिबन्त इव चक्षुर्भिः पश्यन्ति स्म मुहुर्मुहुः १२ ऊचुः परस्परं चेदं सर्व एव समाहिताः । उभौ रामस्य सदृशौ बिम्बाद्बिम्बमिवोद्धृतौ १३ जटिलौ यदि न स्यातां न वल्कलधरौ यदि । विशेषं नाधिगच्छामो गायतो राघवस्य च १४

---

झाली २,३. नंतर अनुष्ठानामध्यें वेळ सांपडला असतां पुरुषश्रेष्ठ राम राजानें महर्षि, राजे व वेदवेत्ते पंडित ह्यांना बोलावून आणिलें ४ आणि त्याचप्रमाणें पौराणिक, शब्दवेत्ते वृद्ध द्विज, स्वरलक्षणें जाणणारे उत्सुक द्विजश्रेष्ठ ५, सामुद्रिक जाणणारे, संगीतशास्त्रवेत्ते, विशेषतः पौरजन, चरणांतील अक्षरांचा संबंध जाणणारे, छंदःशास्त्रामध्यें निपुण ६, स्वरमात्रांचे विभाग जाणणारे, ज्योतिःशास्त्रपारंगत, अनुष्ठान व कल्पसूत्र जाणणारे, अनुष्ठानांतील कमजास्तपणा जाणणारे ७, व्यवहारामध्यें युक्ति योजण्याविषयीं कुशल, तार्किक, बहुश्रुत, वेदवेत्ते, पुराणज्ञ, वैदिक द्विजश्रेष्ठ ८, आश्चर्यकारक श्लोककरण्यामध्यें निपुण, धर्मशास्त्रवेत्ते आणि गायनांत व नृत्यांत निपुण ह्या सर्वांना त्यानें बोलावून आणिलें व त्यांमध्यें ते गवई त्यानें बसविले ९. त्या श्रोत्यांचा त्या ठिकाणीं संवाद चालला असतांना त्यांना हर्ष उत्पन्न करणारें असें गायन त्या उभयतां मुनिकुमारांनीं तेथें केलें १०. सारांश, ( श्रोते येऊन बसल्या ) नंतर मनुष्यलोकीं ज्याचा अभाव आहे असें मधुर गायन सुरू झालें असतां त्यांतील गुणसमृद्धीमुळें कोणत्याही श्रोत्याला तें पुरेसें झालें नाहीं ११. सर्व मुनिगण आणि महाबलाढ्य राजे आनंदित झाले आणि नेत्रांनीं त्या कुमारांना प्राशन करूनच टाकीत आहेत कीं काय इतक्या उत्सुकतेनें ते एकसारिखे त्यांच्याकडे पाहूं लागले १२. नंतर लक्ष्य लावून ऐकत बसलेले ते सर्वही श्रोते आपआपसांत ह्मणूं लागले "बिंबापासून काढिलेलें बिंबच कीं काय असे हे उभयतां कुमार अगदीं रामासारिखे दिसत आहेत १३. फार कशाला ? ह्या गाणाऱ्या कुमारांनीं जर जटावल्कलें धारण केलीं नसतीं तर रामांत आणि ह्या गाणाऱ्या कुमारांत आह्मांला कांहीं एक भेद आढळून आला नसता" १४.

एवं प्रभाषमाणेषु पौरजानपदेषु च । प्रवृत्तमादितः पूर्वसर्गं नारददर्शितम् १५ ततः प्रभृति सर्गांश्च यावद्विंशत्यगायताम् । ततोऽपराह्णसमये राघवः समभाषत १६ श्रुत्वा विंशतिसर्गांस्तान्भ्रातरं भ्रातृवत्सलः । अष्टादश सहस्राणि सुवर्णस्य महात्मनोः १७ प्रयच्छ शीघ्रं काकुत्स्थ यदन्यदभिकाङ्क्षितम् । ददौ स शीघ्रं काकुत्स्थो बालयोर्वै पृथक्पृथक् १८ दीयमानं सुवर्णं तु नागृह्णीतां कुशीलवौ । ऊचतुश्च महात्मानौ किमनेनेति विस्मितौ १९ वन्येन फलमूलेन निरतौ वनवासिनौ । सुवर्णेन हिरण्येन किं करिष्यावहे वने २० तथा तयोः प्रब्रुवतोः कौतूहलसमन्विताः । श्रोतारश्चैव रामश्च सर्व एव सुविस्मिताः २१ तस्य चैवागमं रामः काव्यस्य श्रोतुमुत्सुकः । पप्रच्छ तौ महातेजास्तावुभौ मुनिदारकौ २२ किंप्रमाणमिदं काव्यं का प्रतिष्ठा महात्मनः । कर्ता काव्यस्य महतः क्व चासौ मुनिपुङ्गवः २३ पृच्छन्तं राघवं वाक्यमूचतुर्मुनिदारकौ । वाल्मीकिर्भगवान्कर्ता संप्राप्तो यज्ञसंविधम् ॥ येनेदं चरितं तुभ्यमशेषं संप्रदर्शितम् २४ संनिबद्धं हि श्लोकानां चतुर्विंशत्सहस्रकम् । उपाख्या-

---

ह्याप्रमाणें नगरांतील व देशांतील लोकांचें आपआपसांत संभाषण चाललें आहे तोंच नारदमुनींनीं दर्शविलेला सर्ग प्रथम ह्मणून तेथून १५ वीस ही संख्या होईपर्यंत त्यांनीं अनुक्रमानें सर्ग गाऊन दाखविले. असो. ते वीस सर्ग श्रवण केल्यानंतर अपराण्हकाल झाला असतां भ्रातृवत्सल राम भ्रात्याला ह्मणाला "हे काकुत्स्था, अठरा हजार मोहोरा ह्या महात्म्यांना तूं सत्वर दे आणि दुसरेंही जें त्यांना हवें असेल तें तूं दे ". ही रामाची आज्ञा होताक्षणीं त्या काकुत्स्थानें त्या बालकांपैकीं प्रत्येकाला तितकें द्रव्य सत्वर दिलें १६,१७,१८. तथापि, तो सुवर्ण देऊं लागला असतां कुशलवांनीं तें स्वीकारिलें नाहीं; इतकेंच नव्हे परंतु, विस्मयचकित होऊन ते महात्मे ह्मणाले " ह्याचा आह्मांला उपयोग काय ? १९. वनांतील फलें व मूलें ह्यांवर उपजीविका करण्याविषयीं तत्पर असून वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या आह्मांला ह्या सुवर्णरूप द्रव्याचा वनांत उपयोग काय आहे ?२० "ह्याप्रमाणें ते भाषण करीत असतांना उत्सुकतेनें श्रवण करीत असलेले ते सर्वही श्रोते रामासुद्धां अतिशय विस्मित झाले २१ आणि तें काव्य त्यांना कसें प्राप्त झालें हें ऐकण्याविषयीं उत्सुक झालेला तो महातेजस्वी राम त्यांना ह्मणजे त्या उभयतां मुनिकुमारांना ह्मणाला २२ " हें काव्य किती आहे ? हें रचणाऱ्या महात्म्या कवीचें निवासस्थान कोणतें? ह्या महाकाव्याचा कर्ता कोण आहे ? आणि तो मुनिश्रेष्ठ सांप्रत कोठें आहे?" २३. असें राम विचारूं लागला असतां मुनिकुमार त्याला ह्मणाले " ज्या काव्यांत तुझें हें चरित्र पूर्ण दर्शविलें आहे त्या ह्या काव्याचे कर्ते भगवान् वाल्मीकि-

वर्शत चैव भार्गवेण तपस्विना २५ आदिप्रभृति वै राजन्पञ्चसर्गशतानि च । काण्डानि षट् कृतानीह सोत्तराणि महात्मना २६ कृतानि गुरुणास्माकमृषिणा चरितं तव । प्रतिष्ठा जीवितं यावत्तावत्सर्वस्य वर्तते २७ यदि बुद्धिः कृता राजञ्छ्रवणाय महारथ । कर्मान्तरे क्षणीभूतस्तच्छृणुष्व सहानुजः २८ बाढमित्यब्रवीद्रामस्तौ चानुज्ञाप्य राघवौ । प्रहृष्टौ जग्मतुः स्थानं यत्रास्ते मुनिपुङ्गवः २९ रामोऽपि मुनिभिः सार्धं पार्थिवैश्च महात्मभिः । श्रुत्वा तद्गीतिमाधुर्यं कर्मशालामुपागमत् ३० शुश्राव तत्ताललयोपपन्नं सर्गान्वितं सुस्वरशब्दयुक्तम् । तन्त्रीलयव्यञ्जनयोगयुक्तं कुशीलवाभ्यां परिगीयमानम् ३१ [ ३७३२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे चतुर्नवतितमः सर्गः ॥ ९४ ॥

रामो बहून्यहान्येव तद्गीतं परमं शुभम् । शुश्राव मुनिभिः सार्धं पार्थिवैः सह वानरैः १ तस्मिन्गीते तु विज्ञाय सीतापुत्रौ कुशीलवौ । तस्याः परिषदो मध्ये रामो वचनमब्रवीत् २ दूताञ्शुद्धसमाचारानाहूयात्ममनीषया।

---

मुनींकडे असून ते यज्ञभूमीमध्यें आले आहेत २४. त्या तपस्वी कवीनें चोवीस हजार श्लोक ग्रथिले असून शंभर उपाख्यानें ह्या काव्यांत ग्रथिलीं आहेत २५. हे राजा, आमचा गुरु जो ऋषि त्या महात्म्यानें तुझ्या चरित्राला उद्देशून प्रथमपासून सहा कांडें सातव्या उत्तरकांडासहवर्तमान रचिलीं आहेत व एकंदर पांचशें सर्ग केले आहेत आणि तुझ्या आयुष्यांतील सर्व गोष्टी ह्या काव्यामध्यें ग्रथित केल्या आहेत २६, २७. "हे महारथी राजा, हें श्रवण करण्याची जर तुला इच्छा झाली असेल तर कर्मविरामसमयीं तूं कनिष्ठभ्रात्यांसहवर्तमान स्वस्थ मनानें हें ऐकून घे " २८. ह्यावर " होय " असें रामानें ह्मटलें असतां त्या रघुवंशजांनीं रामाची अनुज्ञा घेतली आणि मुनिश्रेष्ठ वाल्मीकि ज्या ठिकाणीं होते त्या ठिकाणीं ते आनंदित होऊन गेले २९; व तें मधुर गायन श्रवण केल्यानंतर रामही मुनि व महात्मे राजे ह्यांसहवर्तमान कर्मशालेमध्यें गेला ३०. तात्पर्य, ताल, स्वर व अक्षरें ह्यांचा ज्यामध्यें मेळ आहे, सुस्वर शब्द ज्यामध्यें आहेत व सर्गामध्यें जें ग्रथित केलें आहे असें तें काव्य कुशलव गात असतांना रामानें श्रवण केलें ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं चौऱ्यांणवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९४ ॥

रामानें अनेकदिवस पर्यंत मुनि, राजे व वानर ह्यांसहवर्तमान तें उत्कृष्ट शुभ गीत श्रवण केलें १ आणि तें गीत चाललें असतांना कुशलव सीतेचे पुत्र आहेत असें समजल्यावर रामानें त्या सभेमध्यें त्यांसंबधानें भाषण केलें २. प्रथमतः आपल्याच बुद्धीनें तो राम

मद्वचो ब्रूत गच्छध्वमितो भगवतोऽन्तिके ३ यदि शुद्धसमाचारा यदि वा वीतकल्मषा । करोत्विहात्मनः शुद्धिमनुमान्य महामुनिम् ४ छन्दं मुनेश्च विज्ञाय सीतायाश्च मनोगतम् । प्रत्ययं दातुकामायास्ततः शंसत मे लघु ५ श्वः प्रभाते तु शपथं मैथिली जनकात्मजा । करोतु परिषन्मध्ये शोधनार्थं ममैव च ६ श्रुत्वा तु राघवस्यैतद्वचः परममद्भुतम् । दूताः संप्रययुर्वाटं यत्र वै मुनिपुंगवः ७ ते प्रणम्य महात्मानं ज्वलन्तममितप्रभम् । ऊचुस्ते रामवाक्यानि मृदूनि मधुराणि च ८ तेषां तद्भाषितं श्रुत्वा रामस्य च मनोगतम् । विज्ञाय सुमहातेजा मुनिर्वाक्यमथाब्रवीत् ९ एवं भवतु भद्रं वो यथा वदति राघवः । तथा करिष्यते सीता दैवतं हि पतिः स्त्रियः १० तथोक्ता मुनिना सर्वे राजदूता महौजसः । प्रत्येत्य राघवं सर्वं मुनिवाक्यं बभाषिरे ११ ततः प्रहृष्टः काकुत्स्थः श्रुत्वा वाक्यं महात्मनः । ऋषींस्तत्र समेतांश्च राज्ञश्चैवाभ्यभाषत १२ भगवन्तः सशिष्या वै सानुगाश्च नराधिपाः । पश्यन्तु सीताशपथं यश्चैवान्योऽपि काङ्क्षते १३ तस्य तद्वचनं

---

आचरणानें शुद्ध असलेले दूत बोलावून त्यांना ह्मणाला "तुह्मी येथून भगवान् वाल्मीकिमुनींकडे जा आणि त्यांना माझा असा निरोप कळवा ३ 'सीतेचें आचरण जर स्वाभाविकच शुद्ध असेल अथवा (आश्रमांत वास्तव्य केल्यामुळें) ती जर निर्दोष झाली असेल तर महर्षींची अनुज्ञा घेऊन तिनें आपल्या शुद्धीविषयीं येथें शपथ करावी' ४. असा भगवान् वाल्मीकिमुनींना निरोप कळवून मुनींचा व सीतेचा अभिप्राय तुह्मी समजून घ्या आणि ती जर आपल्या आचरणाविषयीं खात्री करून देण्यास तयार असेल तर तसें मला लवकर येऊन कळवा ५. उद्यींक प्रभातकाळीं जनककन्या मैथिलीनें सभेमध्यें स्वतःवरील व माझ्यावरील अपवाद दूर करण्याकरितां शपथ करावी" ६. रामाचें हें अत्यंत अद्भुत भाषण श्रवण केल्यानंतर दूत "आज्ञा" असें ह्मणाले आणि मुनिश्रेष्ठ वाल्मीकींकडे गेले ७. तेथें गेल्यानंतर त्या महातेजस्वी, उज्ज्वल व महात्म्या वाल्मीकिमुनींना त्यांनीं प्रणाम केला आणि रामाचे सौम्य व मधुर शब्द त्यांनीं त्यांना सांगितले ८. तेव्हां त्यांचें तें भाषण श्रवण करून व रामाचा अभिप्राय जाणून ते महातेजस्वी मुनि ह्मणाले ९ "तुमचें दैव बरें करो, असें होईल. राम जसें ह्मणत आहे तसें सीता करील. कारण, पति हें स्त्रीचें दैवत होय" १०. ह्याप्रमाणें वाल्मीकिमुनींनीं सांगितलें असतां ते सर्व महावेगवान् दूत रामाकडे आले व त्यांनीं तें मुनींचें सर्व भाषण रामाला कळविलें ११. तेव्हां महात्म्या वाल्मीकिमहर्षींचें ह्मणणें श्रवण केल्यानंतर ककुत्स्थकुलोत्पन्न राम आनंदित झाला आणि तेथें जुळलेल्या ऋषींना व राजांना अनुलक्षून तो ह्मणाला १२ "शिष्यांसहवर्तमान आपण भगवानांनीं, अनुयायांसहवर्तमान राजांनीं व दुसऱ्या कोणाला इच्छा असल्यास त्यानेंही सीतेची शपथ पहावी" १३. महात्म्य

श्रुत्वा राघवस्य महात्मनः। सर्वेषामृषिमुख्यानां साधुवादो महानभूत् १४
राजानश्च महात्मानः प्रशंसन्ति स्म राघवम्। उपपन्नं नरश्रेष्ठ त्वय्येव भुवि
नान्यतः १५ एवं विनिश्चयं कृत्वा श्वोभूत इति राघवः। विसर्जयामास
तदा सर्वांस्तांछत्रुसूदनः १६ इति संप्रविचार्य राजसिंहः श्वोभूते भव-
यस्य निश्चयम्। विससर्ज मुनीनृपांश्च सर्वान्स महात्मा महतो महानु-
भावः १७ [ ३७४१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये
उत्तरकाण्डे पञ्चनवतितमः सर्गः॥ ९५॥

तस्यां रजन्यां व्युष्टायां यज्ञवाटं गतो नृपः। ऋषीन्सर्वान्महातेजाः
शब्दापयति राघवः १ वसिष्ठो वामदेवश्च जाबालिरथ काश्यपः। विश्वा-
मित्रो दीर्घतमा दुर्वासाश्च महातपाः २ पुलस्त्योऽपि तथा शक्तिर्भार्ग-
वश्चैव वामनः। मार्कण्डेयश्च दीर्घायुर्मौद्गल्यश्च महायशाः ३ गर्गश्च च्यव-
नश्चैव शतानन्दश्च धर्मवित्। भरद्वाजश्च तेजस्वी अग्निपुत्रश्च सुप्रभः ४
नारदः पर्वतश्चैव गौतमश्च महायशाः। एते चान्ये च बहवो मुनयः संशि-
तव्रताः ५ कौतूहलसमाविष्टाः सर्व एव समागताः। राक्षसाश्च महा-
वीर्या वानराश्च महाबलाः ६ सर्व एव समाजग्मुर्महात्मानः कुतूहलात्।

---

राघवाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर " उत्तम उत्तम " असे शब्द सर्व श्रेष्ठ ऋषींच्या मुखांतून उच्च स्वरानें निघाले १४ आणि " हे पुरुषश्रेष्ठा, पृथ्वीमध्यें तुझ्याच ठिकाणीं हें संभवनीय आहे; इतराच्या ठिकाणीं हें संभवनीय नाहीं " असें ह्मणून ते महात्मे राजे रामाची प्रशंसा करूं लागले १५. ह्याप्रमाणें निश्चय केल्यानंतर " उद्यीक ही गोष्ट घडेल " असें सांगून शत्रुनाशक रामाने त्या सर्वांना जाण्याविषयीं निरोप दिला १६. सारांश, " उद्यीक शपथेचा निर्णय होईल असा विचार करून त्या महापराक्रमी व महात्म्या नृपश्रेष्ठ रामानें त्या सर्व महात्म्या मुनींना व राजांना ( जाण्याविषयीं ) निरोप दिला १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं पंच्यांणवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९५ ॥

ती रात्र उजाडल्यानंतर राजा यज्ञमंडपामध्यें गेला आणि त्या महातेजस्वी रामानें सर्व ऋषींना बोलावून आणिलें १. तेव्हां वसिष्ठ, वामदेव, जाबालि, काश्यप, विश्वामित्र, दीर्घतमा, महातपस्वी दुर्वास २, पुलस्त्य, शक्ति, भार्गव, वामन, दीर्घायु मार्कंडेय, महायशस्वी मौद्गल्य ३, गर्ग, च्यवन, धर्मवेत्ता शतानंद, तेजस्वी भरद्वाज, अग्निपुत्र सुप्रभ ४, नारद, पर्वत व महायशस्वी गौतम हे आणि इतरही उज्ज्वल तपश्चर्या करणारे मुनि ५ उत्सुकता उत्पन्न झाल्यामुळें सर्वही तेथें आले; महावीर्यवान् राक्षस व महाबलाढ्य वानर ६ हेही सर्व महात्मे

क्षत्रिया ये च शूद्राश्च वैश्याश्चैव सहस्रशः ७ नानादेशगताश्चैव ब्राह्मणाः संशितव्रताः । सीताशपथवीक्षार्थं सर्व एव समागताः ८ तदा समागतं सर्वमश्मभूतमिवाचलम् । श्रुत्वा मुनिवरस्तूर्णं ससीतः समुपागमत् ९ तमृषिं पृष्ठतः सीता अन्वगच्छदवाङ्मुखी । कृताञ्जलिर्बाष्पकला कृत्वा रामं मनोगतम् १० तां दृष्ट्वा श्रुतिमायान्तीं ब्रह्माणमनुगामिनीम् । वाल्मीकेः पृष्ठतः सीतां साधुवादो महानभूत् ११ ततो हलहलाशब्दः सर्वेषामेवमाबभौ । दुःखजन्मविशालेन शोकेनाकुलितात्मनाम् १२ साधु रामेति केचित्तु साधु सीतेति चापरे । उभावेव च तत्रान्ये प्रेक्षकाः संप्रचुक्रुशुः १३ ततो मध्ये जनौघस्य प्रविश्य मुनिपुंगवः । सीतासहायो वाल्मीकिरिति होवाच राघवम् १४ इयं दाशरथे सीता सुव्रता धर्मचारिणी । अपवादात्परित्यक्ता ममाश्रमसमीपतः १५ लोकापवादभीतस्य तव राम महाव्रत । प्रत्ययं दास्यते सीता तामनुज्ञातुमर्हसि १६ इमौ तु जानकीपुत्रावुभौ च यमजातकौ । सुतौ तवैव दुर्धर्षौ सत्यमेतद्ब्रवीमि ते १७ प्रचेतसोऽहं दशमः पुत्रो राघवनन्दन । न स्मराम्यनृतं वाक्यमिमौ तु तव

---

उत्सुकतेनें तेथें आले आणि त्याचप्रमाणें हजारों क्षत्रिय, वैश्य, शूद्र ७ व अनेक देशांहून आलेले सदाचरणसंपन्न ब्राह्मण हेही सर्व सीतेची शपथ अवलोकन करण्याकरितां तेथें आले ८. तेव्हां सर्व समाज येऊन पाषाणाप्रमाणें स्तब्ध बसला आहे असें श्रवण केल्यावर मुनिश्रेष्ठ वाल्मीकि सीतेसहवर्तमान सत्वर तेथें आले ९. सीता रामाची मूर्ति मनांत आणून, हात जोडून व मान खालीं घालून त्या ऋषींच्या मागून येत होती व त्यावेळीं तिच्या नेत्रांतून अश्रु चालले होते १०. ब्रह्मदेवाच्या मागोमाग जाणाऱ्या श्रुतीप्रमाणें वाल्मीकिमुनींच्या मागून येत असलेली सीता दृष्टी पडतांक्षणीं "शाबास शाबास" असा शब्द उच्चस्वरानें जिकडे तिकडे होऊं लागला ११ व नंतर दुःखाच्या उत्पत्तीमुळें वृद्धिंगत झालेल्या शोकानें सर्वांचें मन व्याकुल होऊन गेल्यामुळें सर्वांच्याच मुखांतून "हायहाय! अरेरे!" असे उद्गार निघूं लागले १२. "शाबास रामा!" असें कांहीं जण ह्मणूं लागले; "शाबास सीते!" असेही शब्द कांहीं लोक उच्चारूं लागले आणि कांहीं प्रेक्षक उभयतांचीही उच्च स्वरानें प्रशंसा करूं लागले १३ तदनंतर मुनिश्रेष्ठ वाल्मीकि सीतेला बरोबर घेऊन त्या जनसमूहामध्यें प्रविष्ट झाले आणि रामाला ह्मणाले १४ "हे दाशरथे, लोकापवादाकरितां माझ्या आश्रमासमीप जिचा तूं त्याग केलास ती ही धर्मानें वागणारी पतिव्रता सीता १५. हे महातपस्वी रामा, लोकापवादाची भीति बाळगणाऱ्या तुझी खात्री करण्यास ही सीता तयार आहे. तूं तिला अनुज्ञा दे १६. जुळे झालेले हे उभयतां जानकीनंदन तुझेच अजिंक्य पुत्र आहेत हें मी तुला

पुत्रको १८ बहुवर्षसहस्राणि तपश्चर्या मया कृता। नोपाश्नीयां फलं
तस्या दुष्टेयं यदि मैथिली १९ मनसा कर्मणा वाचा भूतपूर्वं न किल्बि-
षम् । तस्याहं फलमश्नामि अपापा मैथिली यदि २० अहं पञ्चसु भूतेषु
मनःषष्ठेषु राघव । विचिन्त्य सीता शुद्धेति जग्राह वननिर्झरे २१ इयं
शुद्धसमाचारा अपापा पतिदेवता । लोकापवादभीतस्य प्रत्ययं तव
दास्यति २२ तस्मादियं नरवरात्मज शुद्धभावा दिव्येन दृष्टिविषयेण मया
प्रदिष्टा । लोकापवादकलुषीकृतचेतसा या त्यक्ता त्वया प्रियतमा विदि-
ताऽपि शुद्धा २३ [ ३७७२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-
काव्य उत्तरकाण्डे षण्णवतितमः सर्गः ॥ ९६ ॥

वाल्मीकिनैवमुक्तस्तु राघवः प्रत्यभाषत । प्राञ्जलिर्जगतो मध्ये दृष्ट्वा
तां वरवर्णिनीम् १ एवमेतन्महाभाग यथा वदसि धर्मवित् । प्रत्ययस्तु मम
ब्रह्मंस्तव वाक्यैरकल्मषैः २ प्रत्ययश्च पुरा वृत्तो वैदेह्याः सुरसंनिधौ ।
शपथश्च कृतस्तत्र तेन वेश्म प्रवेशिता ३ लोकापवादो बलवान्येन त्यक्ता

---

सत्य सांगतों १७. हे रघुवंशजा, मी प्रचेतसाचा दहावा पुत्र आहें. अनृत भाषण केल्याचें मला कधीं स्मरत नाहीं. हे पुत्र तुझे आहेत १८. ही मैथिली जर दोषयुक्त असेल तर अनेक सहस्रवर्षेंपर्यंत जी मीं तपश्चर्या केली आहे तिचें फल मला प्राप्त होणार नाहीं १९. मैथिली जर पापरहित असेल तरच आजपर्यंत जें कायिक, वाचिक व मानसिक पातक माझ्या हातून घडलें नाहीं त्याचें फल मला प्राप्त होईल २०. हे राघवा, सीता शुद्ध आहे असा पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन ह्यांच्या योगानें माझा निश्चय झाल्यावर वनांतील जलप्रवाहा-समीप मीं हीचा स्वीकार केला २१. ह्या सीतेचें आचरण शुद्ध आहे; ही पापरहित आहे आणि पति हेंच हिचें दैवत आहे. लोकापवादाला भ्यालेल्या तुझी खात्री ही करून देईल २२. सारांश, हे राजपुत्रा, ही सीता अंतःकरणानेंही शुद्ध आहे असें दिव्य ज्ञानानें मला कळून आलें आहे व ही प्रियतमा शुद्ध आहे असें तुला समजलें असूनही लोकापवादामुळें तुझें अंतःकरण कलुषित झाल्याकारणानें तूं हिचा त्याग केला आहेस २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं शहाण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९६ ॥

वाल्मीकिमुनींनीं असें सांगितलें असतां जनसमूहामध्यें असलेली ती श्रेष्ठ स्त्री सीता अवलोकन करून रामानें हात जोडिले व तो ह्मणाला, १ "हे महाभाग्यवान् धर्मज्ञ मुने, हें आपलें ह्मणणें बरोबर आहे. हे ब्रह्मन्, आपल्या निष्कलंक शब्दांनीं माझी खात्री झाली आहे २. पूर्वीं देवांचे संनिध सीतेची शपथ होऊन माझी खात्री झाली व नंतर मीं तिला

हि मैथिली ४ सेयं, लोकभयाद्ब्रह्मन्पापेत्यभिजानता । परित्यक्ता मया सीता तद्भवान्क्षन्तुमर्हति ५ जानामि चेमौ पुत्रौ मे यमजातौ कुशीलवौ । शुद्धायां जगतो मध्ये मैथिल्यां प्रीतिरस्तु मे ६ अभिप्रायं तु विज्ञाय रामस्य सुरसत्तमाः । सीतायाः शपथे तस्मिन्सर्व एव समागताः ७ पितामहं पुरस्कृत्य सर्व एव समागताः । आदित्या वसवो रुद्रा विश्वेदेवा मरुद्गणाः ८ साध्याश्च देवाः सर्वे ते सर्वे च परमर्षयः । नागाः सुपर्णाः सिद्धाश्च ते सर्वे हृष्टमानसाः ९ दृष्ट्वा देवानृषींश्चैव राघवः पुनरब्रवीत् । प्रत्ययो मे नरश्रेष्ठ ऋषिवाक्यैरकल्मषैः १० शुद्धायां जगतो मध्ये वैदेह्यां प्रीतिरस्तु मे । सीताशपथसंभ्रान्ताः सर्व एव समागताः ११ ततो वायुः शुभः पुण्यो दिव्यगन्धो मनोरमः । तं जनौघं सुरश्रेष्ठो ह्लादयामास सर्वतः १२ तदद्भुतमिवाचिन्त्यं निरैक्षन्त समाहिताः । मानवाः सर्वराष्ट्रेभ्यः पूर्वं कृतयुगे यथा १३ सर्वान्समागतान्दृष्ट्वा सीता काषायवासिनी । अब्रवीत्प्राञ्जलिर्वाक्यमधोदृष्टिरवाङ्मुखी १४ यथाहं राघवादन्यं मनसाऽपि न चिन्तये ।

---

परत येण्याची अनुज्ञा दिली ३. परंतु, लोकापवाद दुस्तर आहे असें समजून मीं मैथिलीचा त्याग केला ४. हे ब्रह्मन्, तीही मिथिलकन्या सीता निष्पाप आहे असें विदित असून लोकापवादाच्या भयामुळें मीं हिचा त्याग केला. ह्यास्तव, ह्या अपराधाबद्दल आपण मला क्षमा करावी ५. जुळे झालेले हे पुत्र कुशलव माझे आहेत हेंही मी जाणून आहें. ह्यास्तव, जगतामध्यें शुद्ध ठरलेल्या सीतेचे ठिकाणीं माझें प्रेम असों " ६. रामाचा अभिप्राय जाणून सीतेच्या त्या शपथप्रसंगीं सर्वही सुरश्रेष्ठ तेथें आले ७. ब्रह्मदेवाला पुढें करून आदित्य, वसु, रुद्र, विश्वेदेव आणि मरुद्गण हे सर्व तेथें आले ८ आणि सर्व साध्य देव, सर्व महर्षि, नाग, सुवर्ण आणि सिद्ध हेही सर्व मनामध्यें आनंदित होऊन तेथें आले ९. देव आणि ऋषि ह्यांना अवलोकन करून पुरुषश्रेष्ठ राम पुनरपि, ह्मणाला " निष्कलंक ऋषिवचनांवरून माझी खात्री झाली आहे १०. ह्यास्तव, जगतांमध्यें शुद्ध ठरलेल्या वैदेहीचे ठिकाणीं माझें प्रेम असो. हें रामाचें भाषण झाल्यानंतर तेथें आलेले देवप्रभृति सर्व प्राणी सीतेच्या शपथसमयीं आश्चर्यचकित झाले ११. तदनंतर दिव्य गंधानें युक्त, शुभ, पवित्र, मनोहर व सुरश्रेष्ठ वायूनें त्या सर्व जनसमुदायाला सर्व प्रकारें आनंद दिला १२. तेव्हां पूर्वीं कृतयुगाप्रमाणें तें दिव्य वायूचें अद्भुत व अचिंत्य वाहणें सर्व राष्ट्रांपासून आलेले लोक लक्ष्यपूर्वक अनुभवूं लागले १३. ( चतुर्दश भुवनांतील ) सर्व लोक एकत्र जुळलेले अवलोकन करून काषायवस्त्र परिधान केलेल्या सीतेनें हात जोडिले आणि दृष्टि व मान खालीं

तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति १५ मनसा कर्मणा वाचा यथा रामं समर्चये । तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति १६ यथैतत्सत्यमुक्तं मे वेद्मि रामात्परं न च । तथा मे माधवी देवी विवरं दातुमर्हति १७ तथा शपन्त्यां वैदेह्यां प्रादुरासीत्तदद्भुतम् । भूतलादुत्थितं दिव्यं सिंहासनमनुत्तमम् १८ ध्रियमाणं शिरोभिस्तु नागैरमितविक्रमैः । दिव्यं दिव्येन वपुषा दिव्यरत्नविभूषितैः १९ तस्मिंस्तु धरणी देवी बाहुभ्यां गृह्य मैथिलीम् । स्वागतेनाभिनन्द्यैनामासने चोपवेशयत् २० तामासनगतां दृष्ट्वा प्रविशन्तीं रसातलम् । पुष्पवृष्टिरविच्छिन्ना दिव्या सीतामवाकिरत् २१ साधुकारश्च सुमहान्देवानां सहसोत्थितः । साधु साध्विति वै सीते यस्यास्ते शीलमीदृशम् २२ एवं बहुविधा वाचो ह्यन्तरिक्षगताः सुराः । व्याजह्रुर्हृष्टमनसो दृष्ट्वा सीताप्रवेशनम् २३ यज्ञवाटगताश्चापि मुनयः सर्व एव ते । राजानश्च नरव्याघ्रा विस्मयान्नोपरेमिरे २४ अन्तरिक्षे च भूमौ च सर्वे स्थावरजङ्गमाः । दानवाश्च महाकायाः पाताले पन्नगाधिपाः २५

---

करून ती ह्मणाली १४ "रामाशिवाय मी जर इतर पुरुष मनामध्यें आणिला नसेल तर ही विष्णुपत्नी भूदेवी मला विवर देईल १५. मनानें, कायेनें व वाचेनें जर मी रामाचेंच आराधन करीत असेन तर ही विष्णुपत्नी भूमाता मला द्वार देईल १६. रामाशिवाय दुसऱ्या पुरुषाची मला ओळखही नाहीं; हें जर माझें ह्मणणें सत्य असेल तर ह्या विष्णुपत्नी भूमीनें मला प्रवेश करण्यास मार्ग द्यावा" १७. ह्याप्रमाणें सीता शपथ करूं लागली असतां भूतलापासून निघालेलें एक दिव्य, अनुपम व अद्भुत सिंहासन तेथें दृष्टीं पडूं लागलें १८. तें दिव्य सिंहासन दिव्य देह धारण केलेल्या व दिव्य रत्नांनीं अलंकृत झालेल्या अमितपराक्रमी नागांनीं मस्तकांवर धारण केलें होतें १९. त्या सिंहासनावर प्रत्यक्ष भूदेवी होती; तिनें सीतेला हातांनीं उचलून घेतलें आणि तिचें अभिनंदन करून तिला सिंहासनावर बसविलें २०. नंतर ती सीता सिंहासनावर बसून रसातलामध्यें प्रवेश करीत आहे असें दृष्टीं पडतांक्षणीं एकसारखी दिव्य पुष्पांची वृष्टि सीतेवर झाली २१. देवांमध्यें "शाबास ! शाबास !" असा फारच मोठा शब्द एकाएकीं निघाला आणि, हे सीते, ज्या तुझें आचरण अशा प्रकारचें आहे त्या तुझी धन्य असो ! धन्य असो !" २२ असे नानाप्रकारचे शब्द, सीतेचा प्रवेश अवलोकन करितांक्षणीं अंतरिक्षांत असलेल्या देवांनीं हर्षयुक्त मनानें मुखांतून काढिले २३. यज्ञमंडपामध्यें असलेले ते सर्वही मुनि व पुरुषश्रेष्ठ राजे न थांबतां एकसारिखें आश्चर्यच करीत राहिले २४. अंतरिक्षामध्यें व भूमीवर असलेले सर्वही चराचर प्राणी, महादेहधारी दानव आणि

केचिद्विनेदुः संहृष्टाः केचिद्ध्यानपरायणाः । केचिद्रामं निरीक्षन्ते केचि-
त्सीतामचेतसः २६ सीताप्रवेशनं दृष्ट्वा तेषामासीत्समागमः । तन्मुहूर्तमि-
वात्यर्थं सर्वं संमोहितं जगत् २७ [३७११] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-
कीये आदिकाव्ये उत्तरकाण्डे सप्तनवतितमः सर्गः ॥ ९७ ॥

रसातलं प्रविष्टायां वैदेह्यां सर्ववानराः । चुक्रुशुः साधु साध्वीति मुनयो
रामसंनिधौ १ दण्डकाष्ठमवष्टभ्य बाष्पव्याकुलितेक्षणः । अवाक्शिरा
दीनमना रामो ह्यासीत्सुदुःखितः २ स रुदित्वा चिरं कालं बहुशो बाष्पमु-
त्सृजन् । क्रोधशोकसमाविष्टो रामो वचनमब्रवीत् ३ अभूतपूर्वं शोकं
मे मनः स्प्रष्टुमिवेच्छति । पश्यतो मे यथा नष्टा सीता श्रीरिव रूपिणी ४
साऽदर्शनं पुरा सीता लङ्कां पारे महोदधेः । ततश्चापि मयाऽऽनीता किं पुन-
र्वसुधातलात् ५ वसुंधे देवि भवति सीता निर्यात्यतां मम । दर्शयिष्यामि
वा रोषं यथा मामवगच्छसि ६ कामं श्वश्रूर्ममैव त्वं त्वत्सकाशात्तु मैथिली ।

---

पातालामध्यें वास्तव्य करणारे नागराज हेही सर्व आश्चर्यच करीत राहिले २५. कांहीं
लोक आनंदानें गर्जना करूं लागले; कांहींजण विचारच करीत बसले; कांहीं रामाकडेच
पाहूं लागले आणि कांहींची मति गुंग होऊन गेल्यामुळें ते सीतेसंबंधानेंच विचार करीत
राहिले २६. सीतेचा प्रवेश अवलोकन केल्यानंतर मुनिप्रभृतींचा जो तेथें परस्परसमागम
झाला त्याच्या योगानें सर्वही जगत् एक मुहूर्तपर्यंत मोहितच झाल्यासारिखें दिसूं लागलें २७.
ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं
सत्त्यांणवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९७ ॥

विदेहराजकन्या सीता रसातलामध्यें प्रविष्ट झाली असतां " हे साध्वि, शाबास !
शाबास ! " ह्मणून सर्व वानर आणि मुनि रामाचे संनिध आक्रोश करूं लागले १. तेव्हां
दंडरूप काष्ठावर रेलून रामानें मस्तक खालीं घातलें; त्याचें मन खिन्न झालें आणि अत्यंत
दुःख झाल्यामुळें नेत्रही अश्रूंनीं भरून आले २. पुढें एकसारिखें अश्रु ढाळीत ढाळीत पुष्क-
ळ वेळपर्यंत रुदन केल्यानंतर क्रोध व शोक ह्यांनीं व्याप्त झालेला तो राम ह्मणाला ३" ज्याअर्थी
मूर्तिमती श्रीच असलेली सीता माझ्या समक्ष नाहींशी झाली आहे त्याअर्थी पूर्वी कधींही
न अनुभविलेल्या शोकसागरामध्यें माझें मन जसें कांहीं मग्न होऊन जाणार आहे ४. पूर्वी
महासागराचे परतीरीं लंकेमध्यें रावणानें नेऊन ठेविल्यामुळें माझ्या दृष्टीआड झालेली सीता
तेथूनही जर मी आणिली आहे तर भूतलापासून तिला परत आणणें मला काय कठीण आहे! ५.
हे भूदेवि, माझी सीता तूं परत दे; नाहींतर तूं मला जाणून आहेस त्याप्रमाणें मी तुला
क्रोध दाखवीन ६. खरोखर तूं माझी सासू आहेस; कारण, नांगराचा फाळ चेऊन जनक

वर्तिता काकुत्स्थेन जनकेनोद्धृता पुरा ७ तस्मान्निर्यात्यतां सीता विवरं वा प्रयच्छ मे । पाताले नाकपृष्ठे वा वसेयं सहितस्तया ८ आनय त्वं हि तां सीतां मत्तोऽहं मैथिलीकृते । न मे दास्यसि चेत्सीतां यथारूपां महीतले ९ सपर्वतवनां कृत्स्नां व्यथयिष्यामि ते स्थितिम् । नाशयिष्याम्यहं भूमिं सर्वमापो भवन्त्विह १० एवं ब्रुवाणे काकुत्स्थे क्रोधशोकसमन्विते । ब्रह्मा सुरगणैः सार्धमुवाच रघुनन्दनम् ११ राम राम न संतापं कर्तुमर्हसि सुव्रत । स्मर त्वं पूर्वकं भावं मन्त्रं चामित्रकर्शन १२ न खलु त्वां महाबाहो स्मारयेयमनुत्तमम् । इमं मुहूर्तं दुर्धर्ष स्मर त्वं जन्म वैष्णवम् १३ सीता हि विमला साध्वी तव पूर्वपरायणा । नागलोकं सुखं प्राया त्वदाश्रयतपोबलात् १४ स्वर्गे ते संगमा भूयो भविष्यति न संशयः । अस्यास्तु परिषन्मध्ये यद्ब्रवीमि निबोध तत् १५ एतदेव हि काव्यं ते काव्यानामुत्तमं श्रुतम् । सर्वं विस्तरतो राम व्याख्यास्यति न संशयः १६ जन्मप्रभृति ते वीर सुखदुःखोपसेवनम् । भविष्यदुत्तरं चेह सर्वं वाल्मीकिना कृतम् १७

---

पूर्वी नांगरीत असतांना त्यानें तिला तुझ्यापासून बाहेर काढिलें ७. तस्मात्, सीता तरी मला परत दे; किंवा तिच्याप्रमाणें तूं मलाही प्रवेश करण्यास मार्ग दे. ती पातालामध्यें असो किंवा स्वर्गामध्यें जावो; मी तिच्यासहवर्तमान वास्तव्य करणार ८. त्या सीतेला तूं आणून दे; मैथिलीकरितां सांप्रत मी मत्त झालों आहें. हे भूदेवि, माझी जशी होती तशी सीता तूं जर मला परत न देशील ९ तर पर्वत व वनें ह्यांसहवर्तमान तुझ्या सपूर्ण रूपाला मी पीडा देईन. मी भूमीचा नाश करून टाकीन; येथें सर्वत्र उदकच झालें तरीं चिंता नाहीं" १०. ह्याप्रमाणें क्रोध व शोक ह्यांनीं व्याप्त झालेला ककुत्स्थकुलोत्पन्न राम बोलूं लागला असतां देवगणांसहवर्तमान ब्रह्मदेव रघुनंदन रामाला ह्मणाला ११ "हे रामा, हे सुव्रता रामा, तूं क्रोध करूं नको; हे शत्रुनाशका, पूर्वींचें स्वरूप आणि ठरलेला विचार तूं लक्ष्यांत आण १२. हे महापराक्रमी रामा, मीं तुला स्मरण केलें पाहिजे असें नाहीं. ह्या बिकट प्रसंगीं आपल्या वैष्णव अवताराची तूं आठवण कर १३. पूर्वीं तुला आश्रयभूत असलेली साध्वी सीता निर्मल आहे आणि तुझा आश्रय करून राहणें हेंच जें तप त्या तपाच्या सामर्थ्यानें ती सुखानें नागलोकीं गेली आहे १४. स्वर्गामध्यें हिचा तुझ्याशीं पुनरपि समागम होईल ह्यांत संशय नाहीं. ह्या सभेमध्यें मी जें सांगत आहें तें तूं लक्ष्यांत ठेव १५. काव्यामध्यें उत्कृष्ट असें हेंच तूं श्रवण केलेलें काव्य असून, हे रामा, ह्या काव्यानेंच तुझ्या सर्व चरित्राचें स्पष्टीकरण होईल ह्यांत संशय नाहीं १६. हे वीरा, जन्मापासून जें कांहीं तुला सुख व दुःख सोसावें लागलें आहे व पुढें तुझ्या चरित्रामध्यें जें कांहीं घडून

आदिकाव्यमिदं राम त्वयि सर्वं प्रतिष्ठितम् । न ह्यन्योऽर्हति काव्यानां यशोभाग्राघवादृते १८ श्रुतं ते पूर्वमेतद्धि मया सर्वं सुरैः सह । दिव्यमद्भुतरूपं च सत्यवाक्यमनावृतम् १९ स त्वं पुरुषशार्दूल धर्मेण सुसमाहितः । शेषं भविष्यं काकुत्स्थ काव्यं रामायणं शृणु २० उत्तरं नाम काव्यस्य शेषमत्र महायशः । तच्छृणुष्व महातेज ऋषिभिः सार्धमुत्तमम् २१ न खल्वन्येन काकुत्स्थ श्रोतव्यमिदमुत्तमम् । परमऋषिणा वीर त्वयैव रघुनन्दन २२ एतावदुक्त्वा वचनं ब्रह्मा त्रिभुवनेश्वरः । जगाम त्रिदिवं देवो देवैः सह सबान्धवैः २३ ये च तत्र महात्मान ऋषयो ब्राह्मलौकिकाः । ब्रह्मणा समनुज्ञाता न्यवर्तन्त महौजसः २४ उत्तरं श्रोतुमनसो भविष्यं यच्च राघवे । ततो रामः शुभां वाणीं देवदेवस्य भाषिताम् २५ श्रुत्वा परमतेजस्वी वाल्मीकिमिदमब्रवीत् । भगवञ्श्रोतुमनस ऋषयो ब्राह्मलौकिकाः २६ भविष्यदुत्तरं यन्मे श्वोभूते संप्रवर्तताम् । एवं विनिश्चयं कृत्वा संप्रगृह्य कुशीलवौ २७ तं जनौघं विसृज्याथ पर्णशालामुपागमत् ।

---

येणार आहे, तें सर्व वाल्मीकिमुनींनें ह्या काव्यांत ग्रथित केलें आहे १७. हे रामा, हें आदिकाव्य सर्व तुझ्याच आधारावर आहे. कारण, काव्यांमध्यें ज्याची कीर्ति होणें योग्य आहे असा रघुवंशज रामावांचून दुसरा कोणी नाहीं १८. देवांसहवर्तमान मीं पूर्वी तुझें सर्व दिव्य, अद्भुत व निष्कपट सत्य भाषण श्रवण केलें आहे १९. हे पुरुषश्रेष्ठा रामा, धर्माकडे लक्ष्य देऊन तूं स्वस्थ हो आणि, हे काकुत्स्था, अवशिष्ट राहिलेलें भविष्यकाव्य रामायण तूं श्रवण कर २०. हे महायशस्वी व महातेजस्वी रामा, उत्तर ह्मणून जो ह्या काव्याचा उत्कृष्ट शेष राहिला आहे तो तूं ऋषींसहवर्तमान श्रवण कर २१. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, हे उत्कृष्ट काव्य इतरानें श्रवण करणें योग्य नाहीं. हे रघुनंदना वीरा, महर्षिप्रमाणें असलेल्या तुलाच हें श्रवण केलें पाहिजे " २२. इतकें सांगून त्रैलोक्याधिपति ब्रह्मदेव बांधवांसहवर्तमान देवांना बरोबर घेऊन स्वर्ग लोकीं गेला २३. परंतु, ब्रह्मलोकीं वास्तव्य करणारे जे महात्मे व तेजस्वी ब्रह्मर्षि त्या ठिकाणीं होते ते ब्रह्मदेवाची अनुज्ञा घेऊन रामसंबंधीं भविष्य ऐकण्याकरितां ह्मणजे अवशिष्ट राहिलेलें रामायण श्रवण करण्याकरितां परत आले. तदनंतर देवाधिदेव ब्रह्मदेवानें उच्चारिलेली शुभवाणी श्रवण करून महातेजस्वी राम वाल्मीकि महर्षींना " ह्मणाला " हे भगवन्, ब्रह्मलोकीं वास्तव्य करणाऱ्या ऋषींना माझें पुढलें चरित्र ह्मणजे उत्तर रामायण श्रवण करण्याची इच्छा आहे. यास्तव, उद्यीक त्या भागाला आरंभ व्हावा. " ह्याप्रमाणें ठरवून त्यानें कुशलवांचा अंगीकार केला २४,२५,२६,२७; त्या जनसमाजाला जाण्याची अनुज्ञा

तामेव शोचतः सीतां सा व्यतीता च शर्वरी २८ [ ३७७५* ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये उत्तरकाण्डेऽष्टनवतितमः सर्गः ॥ ९८ ॥

रजन्यां तु प्रभातायां समानीय महामुनीन् । गीयतामविशङ्काभ्यां रामः पुत्रावुवाच ह १ ततः समुपविष्टेषु महर्षिषु महात्मसु । भविष्यदुत्तरं काव्यं जगतुस्तौ कुशीलवौ २ प्रविष्टायां तु सीतायां भूतलं सत्यसंपदा । तस्यावसाने यज्ञस्य रामः परमदुर्मनाः ३ अपश्यमानो वैदेहीं मेने शून्यमिदं जगत् । शोकेन परमायस्तो न शान्तिं मनसाऽगमत् ४ विसृज्य पार्थिवान्सर्वानृक्षवानरराक्षसान् । जनौघं विप्रमुख्यानां वित्तपूर्वं विसृज्य च ५ ततो विसृज्य तान्सर्वान्रामो राजीवलोचनः । हृदि कृत्वा तदा सीतामयोध्यां प्रविवेश ह ६ न सीतायाः परां भार्यां वव्रे स रघुनन्दनः । यज्ञे यज्ञे च पत्न्यर्थं जानकी काञ्चनी भवत् ७ दशवर्षसहस्राणि वाजिमेधानथाकरोत् । वाजपेयान्दशगुणांस्तथा बहुसुवर्णकान् ८ अग्निष्टोमातिरात्राभ्यां गोसवैश्च महाधनैः । ईजे क्रतुभिरन्यैश्च स श्रीमानाप्तदक्षिणैः ९ एवं स कालः सुमहान्राज्यस्थस्य महात्मनः । धर्मे प्रयतमानस्य व्यती-

---

देऊन तो पुत्रांसहवर्तमान वाल्मीकिमुनींच्या पर्णकुटिकेमध्यें गेला आणि त्या सीतेच्या शोकामध्येंच त्यानें ती रात्र घालविली २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं अठ्यांणवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९८ ॥

रात्र उजाडल्यावर महर्षींना बोलावून आणिल्यानंतर "तुह्मी निःशंकपणें गा" असें रामानें पुत्रांना सांगितलें १. तदनंतर महात्मे महर्षि बसले असतांना उत्तर ह्मणून प्रसिद्ध असलेलें भविष्य काव्य त्या कुशलवांनीं गाइलें २. तो यज्ञ समाप्त झाल्यावर, सत्याच्या सामर्थ्यानें सीता भूतलांत प्रविष्ट झाली असतां, रामाचें मन अतिशय खिन्न झालें ३; वैदेही दृष्टीआड झाल्यामुळें त्याला हें सर्व जगत् शून्य दिसूं लागलें; आणि तो अतिशयच शोकाकुल झाल्यामुळें त्याचें मन अस्वस्थ झालें ४. सर्व राजे, ऋक्ष, वानर, व राक्षस ह्यांना निरोप देऊन श्रेष्ठ ब्राह्मणांच्या समाजालाही त्यानें द्रव्यदानपूर्वक जाण्याची अनुज्ञा दिली ५; आणि त्या सर्वांना अनुज्ञा दिल्यानंतर कमलनयन राम, मनामध्यें सीतेचें चिंतन करीत करीत, अयोध्येंत प्रविष्ट झाला ६. त्या रघुनंदनानें जानकीशिवाय दुसऱ्या भार्येचा स्वीकार केला नाहीं; प्रत्येक यज्ञाचे प्रसंगीं पत्नीकरितां तो सुवर्णाची सीता करीत असे ७. दहा हजार वर्षेंपर्यंत तो अश्वमेध करीत राहिला आणि विपुलसुवर्णदानपूर्वक त्यानें वाजपेय क्रतु, अश्वमेध क्रतूंच्या दसपट, केले ८. अग्निष्टोम, अतिरात्र व महादक्षिणायुक्त गोसव यज्ञही त्यानें केले आणि विपुल दक्षिणेनें

---

* प्र० ३, ७० व ९९ ह्या सर्गांचे शवटीं चुकीनें पडलेले बेरीज दुरुस्त करून ही संख्या नक्की ठरते.

यज्ञकाम्य च १० ऋक्षवानररक्षांसि स्थिता रामस्य शासने । अनुरञ्जन्ति राजानो ह्यहन्यहनि राघवम् ११ काले वर्षति पर्जन्यः सुभिक्षं विमला दिशः । हृष्टपुष्टजनाकीर्णं पुरं जनपदास्तथा १२ नाकाले म्रियते कश्चिन्न व्याधिः प्राणिनां तथा । नानर्थो विद्यते कश्चिद् रामे राज्यं प्रशासति १३ अथ दीर्घस्य कालस्य राममाता यशस्विनी । पुत्रपौत्रैः परिवृता कालधर्ममुपागमत् १४ अन्वियाय सुमित्रा च कैकेयी च यशस्विनी । धर्मं कृत्वा बहुविधं त्रिदिवे पर्यवस्थिता १५ सर्वाः प्रमुदिताः स्वर्गे राज्ञा दशरथेन च । समागता महाभागाः सर्वधर्मं च लेभिरे १६ तासां रामो महादानं काले काले प्रयच्छति । मातृृणामविशेषेण ब्राह्मणेषु तपस्विषु १७ पित्र्याणि बहुरत्नानि यज्ञान्परमदुस्तरान् । चकार रामो धर्मात्मा पितृन्देवान्विवर्धयन् १८ एवं वर्षसहस्राणि बहून्यथ ययुः सुखम् । यज्ञैर्बहुविधं धर्मं वर्धयानस्य सर्वदा १९ [२७१९४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोनशततमः सर्गः ॥ ९९ ॥

---

युक्त असे इतर क्रतुही त्यानें केले ९. ह्याप्रमाणें धर्मानें वागून राज्य करीत असतांना त्या महात्म्या रामाचा फारच मोठा काळ लोटला १०. ऋक्ष, वानर व राक्षस हे रामाच्या आज्ञेमध्यें होते आणि इतर राजेही प्रत्यहीं त्याला आनंद देत असत ११. पर्जन्यवृष्टि वेळेवर होत असे; जिकडे तिकडे सुबत्ता असे; दिशा निर्मल असत; नगरें व प्रांत हीं तुष्ट व पुष्ट प्रजाजनांनीं व्याप्त झालेलीं असत १२; अकालीं मृत्यु कोणालाही येत नसे; प्राण्यांना कोणत्याहीप्रकारचा रोग होत नसे आणि राम राज्य करीत असतांना कोणताही अनर्थ गुजरत नसे १३. असें होतां होतां बराच काळ लोटल्यानंतर पुत्रपौत्रांनीं परिवेष्टित असलेली यशस्विनी राममाता कौसल्या परलोकीं गेली १४; तिच्या मागोमाग सुमित्रा व यशस्विनी कैकेयी ह्याही नानाप्रकारचीं धर्मकृत्यें करून स्वर्गवासी झाल्या १५; स्वर्गलोकीं राजा दशरथासह वर्तमान त्या सर्व महाभाग्यवती स्त्रियांची भेट होऊन त्या आनंदानें राहिल्या आणि सर्व प्रकारच्या धर्मांच्या योगानें मिळणाऱ्या सुखाचा त्या तेथें उपभोग घेऊं लागल्या १६. राम वेळोवेळीं विशेष प्रकार न करितां त्या सर्व मातांना उद्देशून तपस्वी ब्राह्मणांना मोठीं मोठीं दानें देत असे १७. पितरांना उद्देशून ब्राह्मणांना देण्यास योग्य अशा उत्कृष्ट वस्तु तो अर्पण करीत असे; आणि देवांना व पितरांना संतुष्ट करण्याकरितां तो धर्मात्मा राम अत्यंत दुस्तर यज्ञ करीत असे १८. ह्याप्रमाणें यज्ञांच्या योगानें नानाप्रकारचें पुण्य सर्वदा संपादन करणाऱ्या त्या रामाचीं अनेक वर्षें सुखानें गेलीं १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं नव्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९९ ॥

कस्यचित्त्वथ कालस्य युधाजित्केकयो नृपः। स्वगुरुं प्रेषयामास राघवाय महात्मने १ गार्ग्यमाङ्गिरसः पुत्रं ब्रह्मर्षिममितप्रभम्। दश चाश्वसहस्राणि प्रीतिदानमनुत्तमम् २ कम्बलानि च रत्नानि चित्रवस्त्रमथोत्तमम्। रामाय प्रददौ राजा शुभान्याभरणानि च ३ श्रुत्वा तु राघवो धीमान्महर्षिं गार्ग्यमागतम्। मातुलस्याश्वपतिनः प्रहितं तन्महाधनम् ४ प्रत्युद्गम्य च काकुत्स्थः क्रोशमात्रं महाभुजः। गार्ग्यं संपूजयामास यथा शक्रो बृहस्पतिम् ५ तथा संपूज्य तमृषिं तद्धनं प्रतिगृह्य च। पृष्ट्वा प्रतिपदं सर्वं कुशलं मातुलस्य च॥ उपविष्टं महाभागं रामः प्रष्टुं प्रचक्रमे ६ किमाह मातुलो वाक्यं यदर्थं भगवानिह। प्राप्तो वाक्यविदां श्रेष्ठः साक्षादिव बृहस्पतिः ७ रामस्य भाषितं श्रुत्वा महर्षिः कार्यविस्तरम्। वक्तुमद्भुतसंकाशं राघवायोपचक्रमे ८ मातुलस्ते महाबाहो वाक्यमाह नरर्षभः। युधाजित्प्रीतिसंयुक्तं श्रूयतां यदि रोचते ९ अयं गन्धर्वविषयः फलमूलोपशोभितः। सिन्धोरुभयतः पार्श्वे देशः परमशोभनः १० तं च रक्षन्ति गन्धर्वाः सायुधा युद्धकोविदाः। शैलूषस्य सुता वीर तिस्रः कोट्यो महाबलाः ११ तान्विनिर्जित्य काकुत्स्थ गन्धर्वनगरं शुभम्। निवे-

---

कांहीं काल लोटल्यानंतर केकयदेशाधिपति युधाजित् राजानें महात्म्या रामाकडे आपला गुरु जो अंगिरसमुनींचा पुत्र महातेजस्वी गार्ग्य मुनि त्याला पाठविलें आणि दहा हजार अश्व, ऊर्णावस्त्रें, रत्नें, उत्कृष्ट प्रकारचें अद्भुत कापड व शुभ भूषणें असा अनुपम नजराणा त्यानें प्रेमपूर्वक रामाकडे पाठविला १, २, ३. महर्षि गार्ग्य, मातुल अश्वपतीनें पाठविलेलें, तें महाधन घेऊन आले आहेत असें श्रवण करितांक्षणीं विचारी ककुत्स्थकुलोत्पन्न राम कनिष्ठ भ्रात्यांसहवर्तमान एक कोसपर्यंत त्यांना सामोरा गेला आणि बृहस्पतीचें पूजन करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्यानें त्या गार्ग्य मुनींचें पूजन केलें ४, ५. ह्याप्रमाणें त्या ऋषींचें पूजन करून त्या द्रव्याचा त्यानें स्वीकार केला; मातुलाचें सर्व प्रकारें प्रत्येक कुशलवृत्त त्यानें विचारिलें आणि ते भाग्यवान् मुनि बसल्यानंतर राम त्यांना ह्मणाला ६ "साक्षात् बृहस्पतीप्रमाणें वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असे आपण भगवान् जें कळविण्याकरितां येथें आला आहां असें तें मातुलाचें ह्मणणें तरी काय आहे?" ७. रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर आपलें अद्भुत कार्य सविस्तर कथन करण्याकरितां ते महर्षि रामाला ह्मणाले ८ "हे महापराक्रमी रामा, तुझा मातुल जो युधाजित् त्यानें तुला उद्देशून प्रेमानें काय सांगितलें आहे हें तुझी मर्जी असल्यास तूं ऐक ९. सिंधुनदाच्या दोन्ही बाजूंस अतिशय सुशोभित व फलमूलांनी भरलेला हा गंधर्व प्रदेश आहे १०; व, हे वीरा, शैलूषाचे महाबलाढ्य व युद्धनिपुण असे तीन कोटि गंधर्वपुत्र आयुधें घेऊन

१४ महाबाहो स्वे पुरे सुसमाहिते १२ अन्यस्य न गतिस्तत्र देशः परमशोभनः । रोचतां ते महाबाहो नाहं त्वामहितं वदे १३ तच्छ्रुत्वा राघवः प्रीतो महर्षेर्मातुलस्य च । उवाच बाढमित्येव भरतं चान्ववैक्षत १४ सोऽब्रवीद्राघवः प्रीतः साञ्जलिप्रग्रहो द्विजम् । इमौ कुमारौ तं देशं ब्रह्मर्षे विचरिष्यतः १५ भरतस्यात्मजौ वीरौ तक्षः पुष्कल एव च । मातुलेन सुगुप्तौ तु धर्मेण सुसमाहितौ १६ भरतं चाग्रतः कृत्वा कुमारौ सबलानुगौ । निहत्य गन्धर्वसुतान्द्वे पुरे विभजिष्यतः १७ निवेश्य ते पुरवरे आत्मजौ संनिवेश्य च । आगमिष्यति मे भूयः सकाशमतिधार्मिकः १८ ब्रह्मर्षिमेवमुक्त्वा तु भरतं सबलानुगम् । आज्ञापयामास तदा कुमारौ चाभ्यषेचयत् १९ नक्षत्रेण च सौम्येन पुरस्कृत्याङ्गिरःसुतम् । भरतः सह सैन्येन कुमाराभ्यां विनिर्ययौ २० सा सेना शक्रयुक्तेव नगरान्निर्ययावथ । राघवानुगता दूरं दुराधर्षा सुरैरपि २१ मांसाशिनश्च ये सत्त्वा रक्षांसि सुमहान्ति च । अनुजग्मुर्हि भरतं रुधिरस्य पिपासया २२ भूतग्रामाश्च बहवो

---

त्याचें रक्षण करीत आहेत ११. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्या गंधर्वांचा पराजय करून तें शुभ गंधर्वनगरही तूं जिंकून घे; आणि, हे महापराक्रमी रामा, त्या देशामध्यें तूं आपली दोन नगरें सुव्यवस्थित बशीव १२. हे महापराक्रमी रामा, त्या ठिकाणीं दुसऱ्याची गति नाहीं; व तो देश तर फार उत्तम आहे. ह्यास्तव, असें करण्याचें तूं मनामध्यें आण. मी ही तुला अहिताची गोष्ट सांगत नाहीं" १३. मातुलाचें व महर्षींचें तें भाषण श्रवण केल्यानंतर राम संतुष्ट झाला; आणि "ठीक आहे" असें ह्मणून त्यानें भरताकडे पाहिलें १४. नंतर, संतुष्ट झालेला तो राम हात जोडून त्या द्विजाला ह्मणाला "हे ब्रह्मर्षे, हे उभयतां कुमार त्या देशामध्यें जातील १५. हे उभयतां वीर, तक्ष व पुष्कल, भरताचे पुत्र होत. अत्यंत धर्मनिष्ठ असलेल्या ह्या पुत्रांचें संरक्षण करण्यास भरतमातुल युधाजित् सिद्ध असल्यास १६ भरताला पुढें करून सैन्य व अनुयायी ह्यांसहवर्तमान हे पुत्र गंधर्वपुत्रांचा वध करून दोन नगरें तेथें स्थापितील १७; आणि तीं श्रेष्ठ नगरें वसवून त्यांचे ठिकाणीं पुत्रांची स्थापना केल्यानंतर अतिधार्मिक भरत पुनरपि माझ्याकडे परत येईल" १८. ह्याप्रमाणें गार्ग्यब्रह्मर्षींना सांगितल्यानंतर सैन्य व अनुयायी ह्यांसहवर्तमान भरताला जाण्याची आज्ञा देऊन रामानें त्या उभयतां कुमारांनाही अभिषेक केला १९. तेव्हां सौम्य नक्षत्रावर गार्ग्यमुनींना पुढें करून सैन्य व कुमार ह्यांसहवर्तमान भरत बाहेर पडला २०. रघुवंशज राम जिला पोंचविण्याकरितां लांबपर्यंत गेला अशी ती देवांनाही अजिंक्य असलेली सेना नगरांतून बाहेर पडली असतां इंद्रयुक्त देवसेनेप्रमाणें दिसूं लागली २१. मोठे मोठे राक्षस व इतरही मांसभक्षक प्राणी

मांसभक्षाः सुदारुणाः । गन्धर्वपुत्रमांसानि भोक्तुकामाः सहस्रशः २३
सिंहव्याघ्रवराहाणां खेचराणां च पक्षिणाम् । बहूनि वै सहस्राणि सेनाया
ययुरग्रतः २४ अध्यर्धमासमुषिता पथि सेना निरामया । हृष्टपुष्टजना-
कीर्णा केकयं समुपागमत् २५ [ ३८१९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-
कीय आदिकाव्य उत्तरकाण्डे शततमः सर्गः ॥ १०० ॥

श्रुत्वा सेनापतिं प्राप्तं भरतं केकयाधिपः । युधाजिद्गर्गसहितं परां प्रीति-
मुपागमत् १ स निर्ययौ जनौघेन महता केकयाधिपः । त्वरमाणोऽभिच-
क्राम गन्धर्वान्केकयाधिपः २ भरतश्च युधाजिच्च समेतौ लघुविक्रमैः ।
गन्धर्वनगरं प्राप्तौ सबलौ सपदानुगौ ३ श्रुत्वा तु भरतं प्राप्तं गन्धर्वास्ते
समागताः । योद्धुकामा महावीर्या व्यनदंस्ते समन्ततः ४ ततः समभव-
द्युद्धं तुमुलं लोमहर्षणम् । सप्तरात्रं महाभीमं न चान्यतरयोर्जयः ५ खड्ग-
शक्तिधनुर्ग्राहा नद्यः शोणितसंस्रवाः । नृकलेवरवाहिन्यः प्रवृत्ताः सर्वतो-
दिशम् ६ ततो रामानुजः क्रुद्धः कालस्यास्त्रं सुदारुणम् । संवर्तं नाम
भरतो गन्धर्वेष्वभ्यचोदयत् ७ ते बद्धाः कालपाशेन संवर्तेन विदारिताः ।

---

रक्तप्राशनाच्या इच्छेनें भरताच्या मागोमाग गेले २२; गंधर्वपुत्रांचें मांस भक्षण करण्याच्या उद्देशानें अति दारुण असे मांसभक्षक प्राणी हजार हजार जमून असंख्य निघाले २३; आणि सिंह, व्याघ्र, वराह व आकाशांत संचार करणारे पक्षी हेही सेनेच्या पुढें हजारों जाऊं लागले २४. असो. त्या सेनेचे, दीड महिना लोटेपर्यंत कांहीएक व्याधि वगैरे न होतां, मार्गामध्यें मुक्काम झाले आणि तुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त असलेली ती सेना दीड महिना लोटल्यानंतर केकय देशाला गेली २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडांपैकीं शंभरावा सर्ग समाप्त झाला ॥ १०० ॥

सेनापति भरत गर्गमुनींसहवर्तमान आल्याचें श्रवण करून केकयदेशाधिपति युधाजिताला पराकाष्ठेचा आनंद झाला १ व तो केकयराज प्रचंड जनसमूह बरोबर घेऊन त्वरेनें गंधर्वांवर निघाला २. भरत व युधाजित् शीघ्र गमन करणाऱ्या योद्धयांना बरोबर घेऊन सैन्य व अनुयायी ह्यांसहवर्तमान गंधर्वनगराप्रत आले ३; व भरत प्राप्त झाल्याचें श्रवण केल्यानंतर ते महावीर्यवान् गंधर्वही युद्धाकरितां एकत्र जमून सर्व बाजूंनीं गर्जना करूं लागले ४. तदनंतर शरीरावर रोमांच उठविणारें तुमल युद्ध सुरू झालें; परंतु, तें महाभयंकर युद्ध सात दिवस सुरू राहिलें तरी उभयतांपैकीं कोणाचाच जय झाला नाहीं ५. शोणितरूप द्रवानें युक्त असलेल्या नद्या चोहोंकडे वाहूं लागल्या; नरदेह त्यांतून वाहून जाऊं लागले आणि खड्ग, शक्ति व चाप हे मकर त्यांमध्यें संचार करूं लागले ६. तदनंतर रामा-

क्षणेनाभिहतास्तेन तिस्रः कोट्यो महात्मना ८ तद्युद्धं तादृशं घोरं न स्मरन्ति दिवौकसः । निमेषान्तरमात्रेण तादृशानां महात्मनाम् ९ हतेषु तेषु सर्वेषु भरतः केकयीसुतः । निवेशयामास तदा समृद्धे द्वे पुरोत्तमे १० तक्षं तक्षशिलायां तु पुष्कलं पुष्कलावते । गन्धर्वदेशे रुचिरे गान्धारविषये च सः ११ धनरत्नौघसंकीर्णे काननैरुपशोभिते । अन्योन्यसंघर्षकृते स्पर्धया गुणविस्तरैः १२ उभे सुरुचिरप्रख्ये व्यवहारैरकिल्बिषैः । उद्यानयानसंपूर्णे सुविभक्तान्तरापणे १३ उभे पुरवरे रम्ये विस्तरैरुपशोभिते । गृहमुख्यैः सुरुचिरैर्विमानैर्बहुभिर्वृते १४ शोभिते शोभनीयैश्च देवायतनविस्तरैः । तालैस्तमालैस्तिलकैर्बकुलैरुपशोभिते १५ निवेश्य पञ्चभिर्वर्षैर्भरतो राघवानुजः । पुनरायान्महाबाहुरयोध्यां केकयीसुतः १६ सोऽभिवाद्य महात्मानं साक्षाद्धर्ममिवापरम् । राघवं भरतः श्रीमान्ब्रह्माणमिव वासवः १७

---

नुज भरत क्रुद्ध झाला व कालाचें संवर्त ह्मणून अतिभयंकर अस्त्र त्यानें गंधर्वांवर सोडिलें ७ तेव्हां संवर्तनामक कालपाशानें बद्ध व विदीर्ण झालेल्या त्या तीन कोटि गंधर्वांचा एका क्षणांत त्या महात्म्या भरतानें वध केला ८. तशाप्रकारचे महात्मे तीन कोटि गंधर्व ज्यामध्यें एका क्षणांत वध पावले तसें भयंकर युद्ध पूर्वी कधीं अवलोकन केल्याचें देवांना स्मरलेंही नाहीं ९. ह्याप्रमाणें त्या सर्वांचा वध झाला असतां केकयीपुत्र भरतानें त्या ठिकाणीं धनधान्यांनीं समृद्ध व उत्कृष्ट अशीं दोन पुरें वसविलीं १०; व मनोहर गंधर्वदेशांतील तक्षशिला नगरीमध्यें आपल्या तक्षसंज्ञक पुत्राची स्थापना करून गांधार देशांतील पुष्कलावत नगरामध्यें त्यानें आपल्या पुष्कलनामक पुत्राची स्थापना केली ११. तीं दोन्हीं नगरें धनांच्या व रत्नांच्या राशींनीं भरलेलीं होतीं; वनांच्या योगानें त्यांना शोभा आलेली होती; प्रत्येकाचे ठिकाणीं पुष्कळच चांगल्या चांगल्या गोष्टी असल्यामुळें स्पर्धेनें तीं नगरें एकमेकांवर ताणच करीत आहेत कीं काय असा भास होत होता १२; तीं दोन्हीं नगरें निष्कपट व्यवहारामुळें फारच मनोहर भासूं लागलीं होतीं; उपवनें व वाहनें ह्यांनीं तीं गजबजून गेलेलीं होतीं; त्यांतील दुकानें एकमेकांपासून चांगलीं विलग होतीं १३; तीं दोन्हीं श्रेष्ठ नगरें मोठीं रम्य असून असंख्य उत्कृष्ट वस्तूंनीं सुशोभित होतीं; अत्यंत मनोहर अशा अनेक सात सात मजली उत्कृष्ट इमारतींनीं तीं व्याप्त झालेलीं होतीं १४; शोभा आणणाऱ्या विशाल देवालयांनींही तीं सुशोभित झालेलीं होतीं; आणि ताल, तमाल व बकुल ह्या वृक्षांनींही तीं रमणीय दिसत होतीं १५. अशीं नगरें पांच वर्षांमध्यें वसवून तो रामानुज व केकयीपुत्र महापराक्रमी भरत पुनरपि अयोध्येला परत आला १६; आल्यानतर ब्रह्मदेवाला वंदन करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्या श्रीमान् भरतानें प्रत्यक्ष दुसरा मूर्तिमान् धर्मच कीं काय अशा त्या महात्म्या रामाला

शशंस च यथावृत्तं गन्धर्ववधमुत्तमम् । निवेशनं च देशस्य श्रुत्वा प्रीतोऽस्य राघवः १८ [ ३८३७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकोत्तरशततमः सर्गः ॥ १०१ ॥

तच्छ्रुत्वा हर्षमापेदे राघवो भ्रातृभिः सह । वाक्यं चाद्भुतसंकाशं भ्रातॄंश्चोवाच राघवः १ इमौ कुमारौ सौमित्रे तव धर्मविशारदौ । अङ्गदश्चन्द्रकेतुश्च राज्यार्थे दृढविक्रमौ २ इमौ राज्येऽभिषेक्ष्यामि देशः साधु विधीयताम् । रमणीयो ह्यसंबाधो रमेतां यत्र धन्विनौ ३ न राज्ञां यत्र पीडा स्यान्नाश्रमाणां विनाशनम् । स देशो दृश्यतां सौम्य नापराध्यामहे यथा ४ तथोक्तवति रामे तु भरतः प्रत्युवाच ह । अयं कारुपथो देशो रमणीयो निरामयः ५ निवेश्यतां तत्र पुरमङ्गदस्य महात्मनः । चन्द्रकेतोः सुरुचिरं चन्द्रकान्तं निरामयम् ६ तद्वाक्यं भरतेनोक्तं प्रतिजग्राह राघवः । तं च कृत्वा वशे देशमङ्गदस्य न्यवेशयत् ७ अङ्गदीया पुरी रम्याऽप्यङ्गदस्य निवेशिता । रमणीया सुगुप्ता च रामेणाक्लिष्टकर्मणा ८ चन्द्रकेतोश्च मल्लस्य

अभिवंदन केलें १७; गंधर्वाचा अनुपम वध व देशांमध्यें नगरांची स्थापना ह्या संबंधानें इत्थंभूत वर्तमान त्यानें त्याला कळविलें व तें श्रवण करून राम त्याच्यावर प्रसन्न झाला १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशेंपहिला सर्ग समाप्त झाला ॥ १०१ ॥

तें अद्भुत भाषण भ्रात्यांसहवर्तमान श्रवण केल्यानंतर रामाला हर्ष झाला आणि भ्रात्यांना तो ह्मणाला १ " हे सुमित्रानंदन लक्ष्मणा, हे तुझे पुत्र अंगद व चंद्रकेतु धर्मशास्त्रामध्यें निपुण व महापराक्रमी असून राज्य चालविण्यास योग्य आहेत २. मी ह्यांना राज्याभिषेक करितों. ह्यांना योग्य असा देश तूं चांगला पहा. तो रमणीय असावा आणि त्यांत कसलीही पीडा नसावी; ह्मणजे हे धनुर्धारी त्या ठिकाणीं सुखानें राहतील ३. ज्या ठिकाणीं राजांना उपसर्ग लागणार नाहीं व आश्रमांचा नाश होणार नाहीं, ह्मणजे कोणाही कसल्याही प्रकारचा उपसर्ग ज्या ठिकाणीं आपल्या पासून न पोंचेल असा प्रदेश, हे सौम्य लक्ष्मणा, तूं पहा ४. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां भरत ह्मणाला " हा कारुपथसंज्ञक देश रमणीय असून व्याधिरहित आहे ५. ह्या ठिकाणीं महात्म्या अंगदाकरितां एक नगर वसवावें आणि चंद्रकेतूकरितां आरोग्यसंपन्न व मनोहर असें चंद्रकांत नगर वसवावें " ६. हें भरताचें ह्मणणें रामानें मान्य केलें व तो देश स्वाधीन करून घेतल्यावर अंगदाकरितां तेथें त्यानें नगर वसविलें ७. सारांश, निर्मल आचरण करणाऱ्या रामानें रमणीय व स्वभावतःच सुरक्षित अशी अंगदीया ह्मणून रम्य नगरी अंगदाकरितां वसः

मल्लभूम्यां विशेषिता । चन्द्रकान्तेति विख्याता दिव्या स्वर्गपुरी यथा ९
ततो रामः परां प्रीतिं लक्ष्मणो भरतस्तथा । ययुर्युद्धे दुराधर्षा अभिषेकं
च चक्रिरे १० अभिषिच्य कुमारौ द्वौ प्रस्थाप्य सुसमाहितौ । अङ्गदं
पश्चिमां भूमिं चन्द्रकेतुमुदङ्मुखम् ११ अङ्गदं चापि सौमित्रिर्लक्ष्मणोऽ-
नुजगाम ह । चन्द्रकेतोस्तु भरतः पार्ष्णिग्राहो बभूव ह १२ लक्ष्मणस्त्व-
ङ्गदीयायां संवत्सरमथोषितः । पुत्रे स्थिते दुराधर्षे अयोध्यां पुनरागमत् १३
भरतोऽपि तथैवोष्य संवत्सरमतोऽधिकम् । अयोध्यां पुनरागम्य रामपा-
दावुपास्त सः १४ उभौ सौमित्रिभरतौ रामपादावनुव्रतौ । कालं गत-
मपि स्नेहान्न जज्ञातेऽतिधार्मिकौ १५ एवं वर्षसहस्राणि दश तेषां ययु-
स्तदा । धर्मे प्रयतमानानां पौरकार्येषु नित्यदा १६ विहृत्य कालं परिपूर्ण-
मानसाः श्रिया वृता धर्मपुरे च संस्थिताः । त्रयः समिद्धाहुतिदीप्ततेजसो
हुताग्नयः साधु महाध्वरे त्रयः १७ [ ३८५४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे
वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे द्व्युत्तरशततमः सर्गः ॥ १०२ ॥

---

विली ८ आणि शरीरानें दृढ असलेल्या चंद्रकेतूकरितां दिव्य अमरावती नगरीच कीं काय अशी चंद्रकांता ह्मणून विख्यात असलेली नगरी त्यानें मल्लभूमीमध्यें वसविली ९. तदनंतर युद्धामध्यें हार न जाणाऱ्या रामाला, लक्ष्मणाला व भरताला अतिशय आनंद झाला आणि त्यांनीं त्या उभयतांना राज्याभिषेक केला १०; उभयतां कुमारांना राज्याभिषेक करून त्यांनीं त्या विचारी कुमारांपैकीं अंगदाला पश्चिम प्रदेशाकडे व चंद्रकेतूला उत्तर प्रदेशाकडे पाठविलें ११. सुमित्रानंदन लक्ष्मण अंगदाच्या मागोमाग गेला आणि भरत चंद्रकेतूचे मागून गेला १२. लक्ष्मण अंगदीया नगरीमध्यें एक वर्ष राहिला व आपल्या अजिंक्य पुत्र अंगदाचें स्थिर-स्थावर झाल्यानंतर तो अयोध्येला परत आला १३. त्याचप्रमाणें भरतही चंद्रकेतूसमीप आणखी एक वर्ष राहिला व पुनरपि अयोध्येला येऊन तो रामचरणांची सेवा करूं लागला १४. रामचरणांची शुश्रूषा करण्याविषयीं तत्पर असलेल्या उभयतां अतिधर्मनिष्ठ लक्ष्मणभरतांना दीर्घकाल लोटलेलाही प्रेमामुळें अल्प भासूं लागला १५. ह्याप्रमाणें धर्म व लोककार्य ह्यांविषयीं सर्वदा तत्पर असलेल्या त्या भ्रात्यांचीं दहा हजार वर्षें लोटलीं १६. सारांश, अयोध्यारूप धर्मनगरींमध्यें चिरकाल क्रीडा करून कृतकृत्य झालेले ते वैभवसंपन्न त्रिवर्ग भ्राते इंधनयुक्त, आहुतीमुळें उज्वल तेज प्राप्त झालेल्या व द्रव्यांनीं युक्त झालेल्या महायज्ञांतील तीन अग्नींप्रमाणें उत्कृष्ट रीतीनें शोभूं लागले १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशें दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ १०२ ॥

कस्यचित्त्वथ कालस्य रामे धर्मपरे स्थिते । कालस्तापसरूपेण राज-
द्वारमुपागमत् १ दूतो ह्यतिबलस्याहं महर्षेरमितौजसः । रामं दिदृक्षुरा-
यातः कार्येण हि महाबलः २ तस्य तद्वचनं श्रुत्वा सौमित्रिस्त्वरयान्वितः ।
न्यवेदयत रामाय तापसं तं समागतम् ३ जयस्व राजधर्मेण उभौ लोकौ
महाद्युते । दूतस्त्वां द्रष्टुमायातस्तपसा भास्करप्रभः ४ तद्वाक्यं लक्ष्मणोक्तं
वै श्रुत्वा राम उवाच ह । प्रवेश्यतां मुनिस्तात महौजास्तस्य वाक्य-
धृक् ५ सौमित्रिस्तु तथेत्युक्त्वा प्रावेशयत तं मुनिम् । ज्वलन्तमिव तेजोभिः
प्रदहन्तमिवांशुभिः ६ सोऽभिगम्य रघुश्रेष्ठं दीप्यमानं स्वतेजसा । ऋषि-
र्मधुरया वाचा वर्धस्वेत्याह राघवम् ७ तस्मै रामो महातेजाः पूजाम-
र्घ्यपुरोगमाम् । ददौ कुशलमव्यग्रं प्रष्टुं चैवोपचक्रमे ८ पृष्टश्च कुशलं
तेन रामेण वदतां वरः । आसने काञ्चने दिव्ये निषसाद महायशाः ९
तमुवाच ततो रामः स्वागतं ते महामते । प्रापयास्य च वाक्यानि यतो
दूतस्त्वमागतः १० चोदितो राजसिंहेन मुनिर्वाक्यमभाषत । द्वन्द्वे ह्येत-

राम धर्माविषयीं तत्पर होऊन वागत असतांना इतका काळ लोटल्यानंतर काल तप-स्व्याच्या रूपानें राजद्वारासमीप आला (आणि ह्मणाला) १ "मी अतिबलाढ्य व महातेजस्वी महर्षीचा महाबलाढ्य दूत कांहीं कार्याच्या उद्देशानें रामाची भेट घेण्याक-रितां येथें आलों आहें" २. त्याचें भाषण श्रवण करून सुमित्रापुत्र लक्ष्मणानें तो तापस आल्याचें रामाला सत्वर निवेदन केलें ३. (तो ह्मणाला) "हे महातेजस्वी रामा, राज-नीतीमुळें तूं दोन्हीं लोक संपादन कर. सांप्रत तपश्चर्येच्या योगानें सूर्यतुल्य तेजस्वी असा एक दूत आपली भेट घेण्याकरितां आला आहे" ४. हें लक्ष्मणाचें भाषण श्रवण केल्या-नंतर "त्या महातेजस्वी मुनीला आंत येऊं दे" असें रामानें सांगितलें असतां त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या ५ लक्ष्मणानें "होय" असें ह्मणून त्या मुनीला आंत आणिलें. किरणांनीं ताप देत असलेल्या सूर्याप्रमाणें तो मुनि तेजाच्या योगानें जसा कांहीं प्रज्वलि-तच दिसत होता ६. आपल्या तेजानें झळकत असलेल्या रघुवंशजश्रेष्ठ रामाकडे तो मुनि आला आणि "तुझा अभ्युदय असो" असें मधुरवाणीनें रामाला ह्मणाला ७. तेव्हां महातेजस्वी रामानें त्याचें अर्घ्यपूर्वक पूजन करून निष्प्रतिबंध कुशल आहेना? ह्मणून त्याला विचारिलें ८. ह्याप्रमाणें त्या रामानें कुशल प्रश्न केला असतां वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो महायशस्वी मुनि सुवर्णनिर्मित दिव्य सिंहासनावर बसला ९. तेव्हां राम त्याला ह्मणाला "हे महा-मते, आपलें स्वागत असो. ज्यांच्याकडून आपण दूत ह्या नात्यानें आला आहां त्यांचें ह्मणणें मला कळवा" १०. ह्याप्रमाणें नृपश्रेष्ठ रामानें निरोप कळविण्याविषयीं विनंति

यत्र वक्तव्यं हितं वै यद्यवेक्षसे ११ यः शृणोति निरीक्षेद्वा स वध्यो भविता तव । भवेद्वै मुनिमुख्यस्य वचनं यद्यवेक्षसे १२ तथेति च प्रतिज्ञाय रामो लक्ष्मणमब्रवीत् । द्वारि तिष्ठ महाबाहो प्रतिहारं विसर्जय १३ स मे वध्यः खलु भवेद्वाचं द्वन्द्वसमीरितम् । ऋषेर्मम च सौमित्रे पश्येद्वा शृणुयाच्च यः १४ ततो निक्षिप्य काकुत्स्थो लक्ष्मणं द्वारि संग्रहम् । तमुवाच मुने वाक्यं कथयस्वेति राघवः १५ तत्ते मनीषितं वाक्यं येन वासि समाहितः । कथयस्वाविशङ्कस्त्वं ममापि हृदि वर्तते १६ [३८७०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे त्र्युत्तरशततमः सर्गः ॥१०३॥

शृणु राजन्महासत्त्व यदर्थमहमागतः । पितामहेन देवेन प्रेषितोऽस्मि महाबल १ तवाहं पूर्वके भावे पुत्रः परपुरञ्जय । मायासंभावितो वीर कालः सर्वसमाहरः २ पितामहश्च भगवानाह लोकपतिः प्रभुः । समयस्ते कृतः सौम्य लोकान्संपरिरक्षितुम् ३ संक्षिप्य हि पुरा लोकान्मायया स्वय-

---

केली असतां तो मुनि ह्मणाला " तुला जर हित होण्याची इच्छा असेल तर तूं आणि मी असे दोघेच असतांना (एकांतामध्यें) हा निरोप सांगावयाचा आहे ११. जो कोणी आपलें भाषण श्रवण करील अथवा आपल्याकडे पाहील त्याचा तुझ्या हातून वध झाला पाहिजे. हें जर तुला कबूल असेल तर त्या श्रेष्ठ मुनींचें ह्मणणें तुला विदित होईल " १२. ह्यावर "ठीक आहे" असें सांगून राम लक्ष्मणाला ह्मणाला "हे महापराक्रमी लक्ष्मणा, द्वारपाल दूर करून तूं द्वाराशीं उभा रहा १३. हे लक्ष्मणा, ऋषि व मी ह्या उभयतांचें भाषण चाललें असतांना जो श्रवण करील अथवा अवलोकन करील त्याचा खरोखर मी वध करीन " १४. ह्याप्रमाणें आज्ञेला अनुसरून वागणाऱ्या लक्ष्मणाची द्वाराचे ठिकाणीं योजना केल्यानंतर ककुत्स्थकुलोत्पन्न राम त्याला ह्मणाला "हे मुने, आपण काय तें कथन करावें १५. ज्यांनीं आपणांला पाठविलें आहे त्यांचा इष्ट निरोप ऐकण्याची इच्छा माझ्याही मनांत उत्पन्न झाली आहे. ह्यास्तव, आपण काय असेल तें निःशंकपणें कथन करावें " १६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशें तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ १०३ ॥

हे महाशय राजा, मी कशाकरितां आलों आहें हें तूं ऐक. हे महाबलाढ्य, पितामह ब्रह्मदेवानें मला पाठविलें आहे १. हे शत्रुसमूह जिंकणाऱ्या वीरा, तुझ्या पूर्वावस्थेंतील मी तुझा पुत्र आहें व सर्वांचा संहार करणारा मी काल मायेच्या योगानें उत्पन्न झालों आहें २. त्रैलोक्याधिपति प्रभु ब्रह्मदेवाचा तुला निरोप आहे तो येणें प्रमाणें:—हे सौम्य, लोकांचें रक्षण करण्याकरितां भूलोकीं वास्तव्य करण्याविषयीं आपण केलेलीं कालमर्यादा

मेव हि। महार्णवे शयानोऽप्सु मां त्वं पूर्वमजीजनः ४ भोगवन्तं ततो नागमनन्तमुदकेशयम्। मायया जनयित्वा त्वं द्वौ च सत्त्वौ महाबलौ५मधुं च कैटभं चैव ययोरस्थिचयैर्वृता। इयं पर्वमतंबाधा मेदिनी चाभवत्तदा ६पद्मे दिव्येऽर्कसंकाशे नाभ्यामुत्पाद्य मामपि। प्राजापत्यं त्वया कर्म मयि सर्वं निवेशितम्७ सोऽहं संन्यस्तभारो हि त्वामुपास्ये जगत्पतिम्। रक्षां विधत्स्व भूतेषु मम तेजस्करो भवान् ८ ततस्त्वमसि दुर्धर्षात्तस्माद्भावात्सनातनात्। रक्षां विधास्यन्भूतानां विष्णुत्वमुपजग्मिवान् ९ अदित्यां वीर्यवान्पुत्रो भ्रातॄणां वीर्यवर्धनः। समुत्पन्नेषु कृत्येषु तेषां साह्याय कल्पसे १० स त्वमुज्जास्यमानासु प्रजासु जगतोवर। रावणस्य वधाकाङ्क्षी मानुषेषु मनोऽदधाः ११ दश वर्षसहस्राणि दश वर्षशतानि च। कृत्वा वासस्य नियमं स्वयमेवात्मना पुरा १२ स त्वं मनोमयः पुत्रः पूर्णायुर्मानुषेष्विह। कालो नरवरश्रेष्ठ समीपमुपवर्तितुम् १३ यदि भूयो महाराज प्रजा इच्छस्युपासितुम्। वस

---

समाप्त झालेली आहे ३. पूर्वी मायेच्या योगानें लोकांचा संहार करून आपण महासागरामध्यें निद्रिस्थ असतांना मला उत्पन्न केलें आहे ४. प्रथमतः भव्य फणांनीं युक्त व उदकामध्यें शमन करणारा तो अनंत नाग आपण मायेनें उत्पन्न केल्यानंतर मधु व कैटभ असे दोन महाबलाढ्य प्राणी आपण उत्पन्न केले; त्यांच्या अस्थिराशींनीं ही भूमि व्याप्त झाली आणि ही पर्वतांनीं व्याप्त होऊन मेदिनी ह्या संज्ञेस पात्र झाली ५,६. नाभीपासून उत्पन्न केलेल्या सूर्यतुल्य दिव्य कमलांचे ठिकाणीं मला उत्पन्न करून सृष्टि उत्पन्न करण्याचें सर्व काम आपण माझ्यावर सोंपविलें ७. ह्याप्रमाणें आपण माझ्यावर सृष्टीचा भार टाकिला असतां आपणा जगदीशापाशीं मी आलों आणि "ज्याअर्थी मला तेज आपण दिलें आहे त्याअर्थी भूतांचें रक्षण आपण करा." अशी मीं आपली प्रार्थना केली ८. तेव्हां त्या सनातन असह्य रूपापासून तुह्मीं भूतांचें रक्षण करण्याकरितां विष्णुत्व स्वीकारिलें ९; आणि भ्रात्यांचें वीर्य वृद्धिंगत करणारे आपण अदितीचे ठिकाणीं वीर्यवान् पुत्राच्या रूपानें उत्पन्न झाला असून समय उपस्थित झाल्यास त्या भ्रात्यांना साहाय्यही करीत असतां १०. हे जगद्वामध्यें श्रेष्ठ, प्रजा उच्छिन्न होऊं लागल्यामुळें रावणाचा वध करण्याच्या उद्देशानें आपण मानवांमध्यें अवतीर्ण होण्याचें मनामध्यें आणिलें ११. सारांश, पूर्वी स्वतःच अकरा हजार वर्षेपर्यंत मनुष्यांमध्यें वास्तव्य करण्याचा निश्चय करून तुह्मीं मनुष्यांमध्यें अवतीर्ण होण्याचें ठरविलें १२. त्याप्रमाणें आपल्या इच्छेला अनुसरून आपण मनुष्यांमध्यें येथें पुत्रत्व स्वीकारिलें आणि आपल्या संकल्पाप्रमाणें आपली आयुर्मर्यादाही पूर्ण झाली. आतां, हे नृपश्रेष्ठ, देवांसमीप आपण येण्याचा समय प्राप्त झाला आहे १३. (इतर्के

वा वीर भद्रं ते एवमाह पितामहः १४ अथ वा विजिगीषा ते सुरलोकाय राघव । सनाथा विष्णुना देवा भवन्तु विगतज्वराः १५ श्रुत्वा पितामहेनोक्तं वाक्यं कालसमीरितम् । राघवः प्रहसन्वाक्यं सर्वसंहारमब्रवीत् १६ श्रुत्वा मे देवदेवस्य वाक्यं परममद्भुतम् । प्रीतिर्हि महती जाता तवागमनसंभवा १७ त्रयाणामपि लोकानां कार्यार्थं मम संभवः । भद्रं तेऽस्तु गमिष्यामि यत एवाहमागतः १८ हृद्गतो ह्यसि संप्राप्तो न मे तत्र विचारणा १९ मया हि सर्वकृत्येषु देवानां वशवर्तिनाम् । स्थातव्यं सर्वसंहार यथा ह्याह पितामहः २० [३८९०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे चतुरधिकशततमः सर्गः ॥ १०४ ॥

तथा तयोः संवदतोर्दुर्वासा भगवानृषिः । रामस्य दर्शनाकाङ्क्षी राजद्वारमुपागमत् १ सोऽभिगम्य तु सौमित्रिमुवाच ऋषिसत्तमः । रामं दर्शय मे शीघ्रं पुरा मेऽर्थोऽतिवर्तते २ मुनेस्तु भाषितं श्रुत्वा लक्ष्मणः परवीरहा । अभिवाद्य महात्मानं वाक्यमेतदुवाच ह ३ किं कार्यं ब्रूहि भग-

---

सुचविणें हें आमचें कर्तव्य आहे.) आतां हे महाराज, येथें राहून प्रजेचें रक्षण करण्याची जर अजूनही आपली इच्छा असेल तर आपलें देव बरें करों, हे वीर, आपण येथेंच वास्तव्य करावें; अथवा देवलोकीं येण्याची जर आपली इच्छा असेल तर विष्णुरूप नाथ प्राप्त झाल्यामुळें देव सनाथ होऊन निश्चिंत होतील" १४,१५. असा ब्रह्मदेवानें आपणांस निरोप सांगितला आहे. ब्रह्मदेवाचा कालानें सांगितलेला हा निरोप श्रवण केल्यानंतर राम त्या सर्वनाशक कालाला हंसत हंसत ह्मणाला १६ "देवाधिदेव ब्रह्मदेवाचें अत्यंत अद्भुत भाषण श्रवण केल्यामुळें आणि तुझें आगमन झाल्यामुळें मला मोठा आनंद झाला आहे १७. तिन्हीं लोकांच्या कार्याकरितां ज्याअर्थीं माझा अवतार आहे त्याअर्थीं, तुझें देव बरें करो, मी जेथून आलों तेथें जाण्यास आतां तयार आहें १८. तुझें आगमन मीं मनामध्यें चिंतिलेलेंच होतें; त्यासंबंधानें मला आतां विचार करण्याचें कारण नाहीं १९. हे सर्वनाशककाला, माझ्या अधीन असलेल्या देवांच्या सर्व कृत्यांमध्यें मी असणें अवश्य आहें. ह्यास्तव, ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें मी तिकडे येतों २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशें चवथा सर्ग समाप्त झाला ॥ १०४ ॥

ह्याप्रमाणें त्यांचा संवाद चालला असतांना रामाच्या दर्शनाकरितां दुर्वासमुनि राजद्वाराशीं आले १; आणि "माझ्या कार्याचें अतिक्रमण होऊं नये एतदर्थ रामाची व माझी तूं सत्वर भेट कर" असें तें ऋषिश्रेष्ठ सुमित्रापुत्र लक्ष्मणासमीप जाऊन त्याला ह्मणाले २. दुर्वासमुनींचें हें भाषण श्रवण केल्यावर परवीरनाशक लक्ष्मण त्या महात्म्यांना अभिवंदन

कार्ये सर्वथा किं करोम्यहम्। व्यग्रो हि राघवो ब्रह्मन्मुहूर्तं परिपाल्य-
ताम् ४ तच्छ्रुत्वा ऋषिशार्दूलः क्रोधेन कलुषीकृतः। उवाच लक्ष्मणं
वाक्यं निर्दहन्निव चक्षुषा ५ अस्मिन्क्षणे मां सौमित्रे रामाय प्रतिवेदय।
विषयं त्वां पुरं चैव शपिष्ये राघवं तथा ६ भरतं चैव सौमित्रे युष्माकं
या च संततिः। न हि शक्ष्याम्यहं भूयो मन्युं धारयितुं हृदि ७ तच्छ्रुत्वा
घोरसंकाशं वाक्यं तस्य महात्मनः। चिन्तयामास मनसा तस्य वाक्यस्य
निश्चयम् ८ एकस्य मरणं मेऽस्तु मा भूत्सर्वविनाशनम्। इति बुद्ध्या विनि-
श्चित्य राघवाय न्यवेदयत् ९ लक्ष्मणस्य वचः श्रुत्वा रामः कालं विसृज्य
च। निःसृत्य त्वरितो राजा अत्रेः पुत्रं ददर्श ह १० सोऽभिवाद्य महा-
त्मानं ज्वलन्तमिव तेजसा। किं कार्यमिति काकुत्स्थः कृताञ्जलिरभा-
षत ११ तद्वाक्यं राघवेणोक्तं श्रुत्वा मुनिवरः प्रभुः। प्रत्याह रामं दुर्वासाः
श्रूयतां धर्मवत्सल १२ अद्य वर्षसहस्रस्य समाप्तिर्मम राघव। सोऽहं
भोजनमिच्छामि यथासिद्धं तवानघ १३ तच्छ्रुत्वा वचनं राजा राघवः

---

करून ह्मणाला ३ " हे भगवन्, आपलें काय कार्य आहे तें सांगावें. कोणतें कार्य कर-
ण्याविषयीं मला आपली आज्ञा आहे ? हे ब्रह्मन्, राम कांहीं कार्यामध्यें व्यग्र आहे.
ह्यास्तव, आपण एक मुहूर्तपर्यंत वाट पहावी " ४. हें श्रवण करितांक्षणीं ऋषिश्रेष्ठ दुर्वास
मुनींची मुद्रा क्रोधानें कलुषित झाली आणि दृष्टीनें दग्धच करीत आहेत कीं काय अशा
रीतीनें ( लक्ष्मणावर डोळे वटारून )ते त्याला ह्मणाले ५ " हे सुमित्रानंदना, ह्याक्षणीं मी
आल्याचें तूं रामाला निवेदन कर. नाहीं तर तुला, अयोध्या नगरीला, ह्या देशाला आणि रामा-
लाही मी शाप देईन ६. इतकेंच नव्हे परंतु, हे लक्ष्मणा, भरताला व तुमच्या संततीलाही मी शाप
देईन मी मनामध्यें क्रोध दाबून ठेवण्यास समर्थ नाहीं " ७. त्या महात्म्याचें हें भयंकर भाषण
श्रवण करून त्याचा परिणाम लक्ष्मणानें मनामध्यें आणिला ८, आणि "मला एकाला मरण आलें
तरी चिंता नाहीं; परंतु, सर्वांचा नाश होणें उचित नव्हे" असा मनानें निश्चय करून त्यानें ते मुनि
आल्याचें रामाला निवेदन केलें ९. लक्ष्मणाचें भाषण श्रवण करितांक्षणीं रामानें कालाला
जाण्याची अनुज्ञा दिली आणि त्वरे त्वरेनें बाहेर येऊन अत्रिपुत्र मुनींचें त्या राजानें दर्शन
घेतलें १०. नंतर तेजानें झळकत असलेल्या त्या महात्म्यांना अभिवंदन करून व हात
जोडून " काय आज्ञा आहे ?" असा ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें प्रश्न केला ११. तेव्हां रामानें
केलेला तो प्रश्न श्रवण करून मुनिश्रेष्ठ समर्थ दुर्वास रामाला ह्मणाले " हे धर्मवत्सला
रामा १२, हे राघवा, हजार वर्षेपर्यंत मीं स्वीकारलेल्या अनशनरूप व्रताची आज समाप्ति
झाली आहे. ह्यास्तव, हे निष्पापा, जें तयार असेल तें भोजन स्वीकारण्याची माझी इच्छा

प्रीतमानसः । भोजनं मुनिमुख्याय यथासिद्धमुपाहरत् १४ स तु भुक्त्वा मुनिश्रेष्ठस्तदन्नममृतोपमम् । साधु रामेति संभाष्य स्वमाश्रममुपागमत् ॥ संस्मृत्य कालवाक्यानि ततो दुःखमुपागमत् १५ दुःखेन च सुसंतप्तः स्मृत्वा तद्घोरदर्शनम् । अवाङ्मुखो दीनमना व्याहर्तुं न शशाक ह १६ ततो बुद्ध्या विनिश्चित्य कालवाक्यानि राघवः । नैतदस्तीति निश्चित्य तूष्णीमासीन्महायशाः १७ [३९०७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे पञ्चोत्तरशततमः सर्गः ॥ १०५ ॥

अवाङ्मुखमथो दीनं दृष्ट्वा सोममिवाप्लुतम् । राघवं लक्ष्मणो वाक्यं हृष्टो मधुरमब्रवीत् १ न संतापं महाबाहो मदर्थं कर्तुमर्हसि । पूर्वनिर्माणबद्धा हि कालस्य गतिरीदृशी २ जहि मां सौम्य विस्रब्धं प्रतिज्ञां परिपालय । हीनप्रतिज्ञाः काकुत्स्थ प्रयान्ति नरकं नराः ३ यदि प्रीतिर्महाराज यद्यनुग्राह्यता मयि । जहि मां निर्विशङ्कस्त्वं धर्मं वर्धय राघव ४ लक्ष्मणेन तथोक्तस्तु रामः प्रचलितेन्द्रियः । मन्त्रिणः समुपानीय तथैव

---

आहे " १३. हें भाषण श्रवण केल्यानंतर रामाच्या मनाला संतोष झाला; त्यानें त्या मुनिश्रेष्ठांना सिद्ध असलेलें अन्न भोजनार्थ अर्पण केलें १४; आणि तें अमृततुल्य अन्न भक्षण केल्यानंतर " रामा, तुझी धन्य आहे " इतकें बोलून ते मुनि आपल्या आश्रमाला परत गेले; परंतु, कालानें उच्चारिलेल्या शब्दांचें स्मरण झाल्यामुळें रामाला मात्र दुःख झालें १५; दुःखानें अतिशय संतप्त होऊन त्यानें त्या शब्दांचा घोर परिणाम लक्ष्यांत आणिला; मनामध्यें खिन्न होऊन तो अधोमुख झाला व त्याच्या तोंडातून शब्दही निघेनासा झाला १६. तदनंतर कालानें उच्चारिलेल्या शब्दांचा परिणाम त्यानें पुनरपि मनामध्यें आणिला आणि " हें सर्व नाहींसें होणार " असा मनांत निश्चय करून तो महायशस्वी राम स्वस्थ उभा राहिला १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशें पांचवा सर्ग समाप्त झाला ॥ १०५ ॥

राहूनें ग्रस्त केलेल्या चंद्राप्रमाणें दीन व अधोमुख झालेल्या रामाला अवलोकन करून लक्ष्मण आनंदित झाला आणि मधुर स्वरानें रामाला ह्मणाला १ " हे महापराक्रमी रामा, माझ्याकरितां आपण काळजी करूं नका; अशा प्रकारची कालगति पूर्वसंचितानें ठरलेलीच आहे २. हे सौम्य, माझा निःशकपणें वध करून तूं प्रतिज्ञेचें परिपालन कर. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, भ्रष्टप्रतिज्ञ पुरुष नरकामध्यें पडतात ३. हे महाराज राघवा, माझे ठिकाणीं जर आपलें प्रेम असेल व माझ्यावर जर आपली कृपादृष्टि असेल तर निःशंकपणें माझा वध करून आपण धर्माचें रक्षण करावें " ४. लक्ष्मणानें ह्याप्रमाणें भाषण केलें असतां

च पुरोधसः ५ अब्रवीच्च तदा वृत्तं तेषां मध्ये स राघवः । दुर्वासोऽभिगमं चैव प्रतिज्ञां तापसस्य च ६ तच्छ्रुत्वा मन्त्रिणः सर्वे सोपाध्यायाः समासत । वसिष्ठस्तु महातेजा वाक्यमेतदुवाच ह ७ दृष्टमेतन्महाबाहो क्षयं ते रोमहर्षणम् । लक्ष्मणेन वियोगश्च तव राम महायशः ८ त्यजैनं बलवान्कालो मा प्रतिज्ञां वृथा कृथाः । प्रतिज्ञायां हि नष्टायां धर्मो हि विलयं व्रजत् ९ ततो धर्मे विनष्टे तु त्रैलोक्यं सचराचरम् । सदेवर्षिगणं सर्वं विनश्येत्तु न संशयः १० स त्वं पुरुषशार्दूल त्रैलोक्यस्याभिपालनात् । लक्ष्मणेन विना चाद्य जगत्स्वस्थं कुरुष्व ह ११ तेषां तत्समवेतानां वाक्यं धर्मार्थसंहितम् । श्रुत्वा परिषदो मध्ये रामो लक्ष्मणमब्रवीत् १२ विसर्जये त्वां सौमित्रे मा भूद्धर्मविपर्ययः । त्यागो वधो वा विहितः साधूनां ह्युभयं समम् १३ रामेण भाषिते वाक्ये बाष्पव्याकुलितेन्द्रियः । लक्ष्मणस्त्वरितः प्रायात्स्वगृहं न विवेश ह १४ स गत्वा सरयूतीरमुपस्पृश्य कृताञ्जलिः । निगृह्य सर्वस्रोतांसि निःश्वासं न मुमोच ह १५ अनिःश्वसन्तं युक्तं तं सशक्राः साप्सरोगणाः । देवाः सर्षिगणाः सर्वे पुष्पैरभ्यकिरंस्तदा १६

---

रामाचें मन क्षुब्ध झालें आणि मंत्री व पुरोहित ह्यांना बोलावून आणून ५ त्या रामानें दुर्वास मुनींचें आगमन व आपण तपस्व्याशीं केलेली प्रतिज्ञा हें वर्तमान त्यांना कथन केलें ६. हें श्रवण करून उपाध्यायांसहवर्तमान सर्व मंत्री स्वस्थ बसले; परंतु, महातेजस्वी वसिष्ठ ह्मणाले ७ " हे महापराक्रमी व महायशस्वी रामा, हा शरीरावर रोमांच उठविणारा क्षय होणार असून लक्ष्मणाशीं तुझा वियोग होणार हें मला समजून चुकलें आहे ८. ह्यास्तव, काल अनुल्लंघनीय असल्यामुळें तूं ह्या लक्ष्मणाचा त्याग कर: आपली प्रतिज्ञा व्यर्थ करूं नको. कारण, प्रतिज्ञा भ्रष्ट झाल्यास धर्माचा लय होईल ९; आणि धर्माचा लय झाला असतां देवगण व ऋषिगण ह्यांसहवर्तमान सर्व स्थावरजंगमात्मक त्रैलोक्याचा नाश होईल १०. ह्यास्तव, हे पुरुषश्रेष्ठा, लक्ष्मणाच्या वियोगानें त्रैलोक्याचें रक्षण करून तूं आज जगत् स्वस्थ कर " ११. ह्याप्रमाणें एकत्र जुळलेल्या त्या सभासदाचें धर्म व अर्थ ह्यांना अनुसरून असलेलें भाषण श्रवण करून राम सभेमध्यें लक्ष्मणाला ह्मणाला १२ " हे लक्ष्मणा, धर्महानि होऊं नये एतदर्थ मी तुझा त्याग करितों. कारण, त्याग आणि वध हीं दोन्ही साधूंनीं सारखींच मानिलीं आहेत " १३. रामानें असें भाषण करितांक्षणीं लक्ष्मणाचें नेत्र अश्रूंनीं व्याकुल झालें व तो स्वगृहां न जातां त्वरेत्वरेनें सरयूचें तीरीं गेला १४. सरयूनदीचे तीरीं गेल्यानंतर त्यानें स्नान केलें; हात जोडून सर्व इंद्रियांचें संयमन केलें व तो श्वासही सोडिनासा झाला. ह्याप्रमाणें श्वासोच्छ्वास न सोडितां समाधि लावून बस-

अदृश्यं सर्वमनुजैः सशरीरं महाबलम्। प्रगृह्य लक्ष्मणं शक्रो दिवं संवि-
वेश ह ॥ १७ ततो विष्णोश्चतुर्भागमागतं सुरसत्तमाः। हृष्टाः प्रमुदिताः सर्वे
पूजयन्ति स्म राघवम् ॥ १८ [३९२९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय
आदिकाव्य उत्तरकाण्डे षडुत्तरशततमः सर्गः ॥ १०६ ॥

विसृज्य लक्ष्मणं रामो दुःखशोकसमन्वितः ॥ पुरोधसं मन्त्रिणश्च नैग-
मांश्चेदमब्रवीत् १ अद्य राज्येऽभिषेक्ष्यामि भरतं धर्मवत्सलम् । अयो-
ध्यायाः पतिं वीरं ततो यास्याम्यहं वनम् २ प्रवेशयत संभारान्मा भूत्का-
लात्ययो यथा । अद्यैवाहं गमिष्यामि लक्ष्मणेन गतां गतिम् ३ तच्छ्रुत्वा
राघवेणोक्तं सर्वाः प्रकृतयो भृशम् । मूर्धभिः प्रणता भूमौ गतसत्त्वा इवा-
भवन् ४ भरतश्च विसंज्ञोऽभूच्छ्रुत्वा राघवभाषितम् । राज्यं विगर्हयामास
वचनं चेदमब्रवीत् ५ सत्येनाहं शपे राजन्स्वर्गभोगेन चैव हि । न कामये
यथा राज्यं त्वां विना रघुनन्दन ६ इमौ कुशलवौ राजन्नभिषिञ्च नरा-
धिप । कोशलेषु कुशं वीरमुत्तरेषु तथा लवम् ७ शत्रुघ्नस्य च गच्छन्तु
दूतास्त्वरितविक्रमाः । इदं गमनमस्माकं शीघ्रमाख्यातु मा चिरम् ८

---

लेल्या त्या लक्ष्मणावर इंद्र, अप्सरांचे समुदाय व ऋषिगण ह्यासहवर्तमान सर्व देवांनीं पुष्पवृष्टि केली १६; कोणत्याही मनुष्याच्या दृष्टोत्पत्तीस न येतां देहासहवर्तमान् महाबलाढ्य लक्ष्मणाला घेऊन इंद्र स्वर्गलोकीं गेला १७; विष्णूचा चतुर्थांश परत आल्याचें पाहून सुरश्रेष्ठांना आनंद व हर्ष झाला आणि ते सर्व राघवाची प्रशंसा करूं लागले १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशें सहावा सर्ग समाप्त झाला ॥ १०८ ॥

लक्ष्मणाचा त्याग केल्यानंतर दुःख व शोक ह्यांनीं व्याप्त झालेला राम पुरोहित, मंत्री व पौरजन ह्यांना ह्मणाला १ " धर्मवत्सल वीर भरताला मी आज अयोध्याधिपति ह्मणून राज्याभिषेक करीन आणि नंतर वनामध्यें जाईन २. ह्यास्तव, तुह्मी राज्याभिषेकाला लागणारें साहित्य विलंब न करितां घेऊन या. लक्ष्मणानें स्वीकारिलेल्या मार्गाचें मी आजच अवलंबन करणार आहें. " रामानें केलेलें हें भाषण श्रवण करून सर्व प्रजाजनांनीं आपलीं मस्तकें भूमीवर अतिशय नम्र केलीं आणि गतप्राण झाल्याप्रमाणें ते निश्चेष्ट झाले ४. भरतालाही रामाचें भाषण श्रवण करून कांहीं एक सुचेनासें झालें आणि राज्याची निंदा करून तो ह्मणाला ५ " हे राजा, हे रघुनंदना, तुला सोडून राज्याची अथवा स्वर्गसुखाची मला अपेक्षा नाहीं हें मी शपथपूर्वक सत्य सांगतों ६. हे प्रजाधिपते राजा, कोशल देशामध्यें वीर कुश आणि उत्तर कोशलामध्यें लव ह्याप्रमाणें ह्या कुशलवांना आपण राज्याभिषेक

तच्छ्रुत्वा भरतेनोक्तं दृष्ट्वा चापि ह्यधोमुखान् । पौरान्दुःखेन संतप्तान्वसिष्ठो
वाक्यमब्रवीत् ९ वत्स राम इमाः पश्य धरणीं प्रकृतीर्गताः । ज्ञात्वैषा-
मीप्सितं कार्यं मा चैषां विप्रियं कृथाः १० वसिष्ठस्य तु वाक्येन उत्थाप्य
प्रकृतीजनान् । किं करोमीति काकुत्स्थः सर्वान्वचनमब्रवीत् ११ ततः सर्वाः
प्रकृतयो रामं वचनमब्रुवन् । गच्छन्तमनुगच्छामो यत्र राम गमिष्यसि १२
पौरेषु यदि ते प्रीतिर्यदि स्नेहो ह्यनुत्तमः । सपुत्रदाराः काकुत्स्थ समं
गच्छाम सत्पथम् १३ तपोवनं वा दुर्गं वा नदीमम्भोनिधिं तथा । वयं ते
यदि न त्याज्याः सर्वान्नो नय ईश्वर १४ एषा नः परमा प्रीतिरेष नः परमो
वरः । हृद्गता नः सदा प्रीतिस्तवानुगमने नृप १५ पौराणां दृढभक्तिं च
बाढमित्येव सोऽब्रवीत् । स्वकृतान्तं चान्ववेक्ष्य तस्मिन्नहनि राघवः १६
कोशलेषु कुशं वीरमुत्तरेषु तथा लवम् । अभिषिच्य महात्मानावुभौ रामः
कुशीलवौ १७ अभिषिक्तौ सुतावङ्के प्रतिष्ठाप्य पुरे ततः । रथानां तु सह-
स्राणि नागानामयुतानि च १८ दश चाश्वसहस्राणि एकैकस्य धनं

---

करा आणि शीघ्र गमन करणाऱ्या दूतांनीं शत्रुघ्नाकडे जाऊन ह्या आपल्या गमनाविषयीं विलंब न करितां त्याला सत्वर कळवूं द्या " ८. हें भरतानें केलेलें भाषण श्रवण करून व प्रजाजन दुःखानें संतप्त झाल्यामुळें अधोमुख झालें आहेत असें पाहून वसिष्ठ मुनि ह्मणाले ९ " हे वत्सा रामा, भूमीवर पडलेल्या ह्या प्रजाजनांकडे लक्ष्य दे आणि ह्यांना कोणतें कार्य इष्ट आहे तें समजून घेऊन तूं कर. तूं ह्यांच्या इच्छेचा विघात करूं नको " १०. ह्या वसिष्ठ मुनींच्या भाषणावरून रामानें प्रजाजनांना उठविलें आणि " मीं काय करूं ? " असा त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें प्रश्न केला असतां ११ सर्व प्रजाजन रामाला ह्मणाले " हे रामा, तूं जिकडे जाशील तिकडे तुझ्या मागोमाग आह्मी येऊं १२. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, प्रजाजनांवर जर तुझी प्रीति असेल, ह्यांच्यावर तुझें जर अनुपम प्रेम असेल आणि आमचा जर तुला त्याग करावयाचा नसेल तर पुत्र व भार्या ह्यांसहवर्तमान आह्मी स्वर्ग, तपोवन, दुर्गम अरण्य, नदी आणि सागर ह्यांपैकीं जिकडे तूं जाशील तिकडे तुझ्या बरोबरच येऊं. हे ईश्वरा, तूं आह्मां सर्वांना घेऊन चल १३. ह्यांत आह्मांला पराकाष्ठेचा आनंद होणार असून हाच आमचा मुख्य वर आहे. सारांश, हे राजा, तुझ्याबरोबर येण्याविषयीं सर्वदा आमच्या मनाला आनंद वाटत आहे " १५, १६. आसो. प्रजाजनांचीही दृढ भक्ति अवलोकन करून आपल्या कर्तव्याचा परिणामही त्यानें लक्ष्यांत आणिला. त्याच दिवशीं त्या रघुवंशज १६ रामानें कोसलदेशामध्यें वीर कुश व उत्तर कोसलदेशामध्यें लव ह्याप्रमाणें त्या उभयतां महात्म्या कुशलवांना राज्याभिषेक केला १७. अभिषेक केल्यानंतर

ददौ १९ बहुरत्नौ बहुधनौ हृष्टपुष्टजनाश्रयौ । स्वे पुरे प्रेषयामास भ्रातरौ तौ कुशीलवौ २० अभिषिच्य ततो वीरौ प्रस्थाप्य स्वपुरे तदा । दूतान्संप्रेषयामास शत्रुघ्नाय महात्मने २१ [ ३९४६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे सप्तोत्तरशततमः सर्गः ॥ १०७ ॥

ते दूता रामवाक्येन चोदिता लघुविक्रमाः। प्रजग्मुर्मधुरां शीघ्रं चक्रुर्वासं न चाध्वनि, १ ततस्त्रिभिरहोरात्रैः संप्राप्य मधुरामथ । शत्रुघ्नाय यथातत्त्वमाचख्युः सर्वं एव तत् २ लक्ष्मणस्य परित्यागं प्रतिज्ञां राघवस्य च । पुत्रयोरभिषेकं च पौरानुगमनं तथा ३ कुशस्य नगरी रम्या विन्ध्यपर्वतरोधसि । कुशावतीति नाम्ना सा कृता रामेण धीमता ४ श्रावस्तीति पुरी रम्या श्राविता च लवस्य ह । अयोध्यां विजनां कृत्वा राघवो भरतस्तथा ५ स्वर्गस्य गमनोद्योगं कृतवन्तौ महारथौ । एवं सर्वं निवेद्याशु शत्रुघ्नाय महात्मने ॥ विरेमुस्ते ततो दूतास्त्वर राजेति चाब्रुवन् ६ तच्छ्रुत्वा घोरसंकाशं कुलक्षयमुपस्थितम् । प्रकृतीस्तु समानीय काञ्चनं

---

उभयतां पुत्र त्यानें आपल्या अंकावर बसविलें आणि नंतर हजारों रथ, दहा दहा हजार गजांचे समुदाय व दहा हजार अश्व इतकें धन प्रत्येकाला देऊन त्या उभयतांना त्यानें त्यांच्या नगराकडे पाठविलें १८,१९. सारांश, असंख्य रत्नें व विपुल धन ह्यांनीं युक्त आणि तुष्ट व पुष्ट जनांना आश्रयभूत अशा त्या भ्रात्या कुशलवांना त्यानें आपल्या नगरामध्यें पाठविलें २०. आणि ह्याप्रमाणें त्या वीरांना आपआपल्या नगरामध्यें पाठविल्यानंतर महात्म्या शत्रुघ्नाकडे त्यानें दूत रवाना केले २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडपैकीं एकशें सातवा सर्ग समाप्त झाला ॥१०७॥

रामाची आज्ञा झालेले ते शीघ्रगामी दूत मार्गामध्यें वास्तव्य न करितां सत्वर मधुरानगरीं मध्यें गेले १ आणि ह्याप्रमाणें तीन अहोरात्रांत मधुरानगरीला गेल्यानंतर त्या सर्व दूतांनीं शत्रुघ्नाला तें इत्थंभूत वर्तमान कळविलें २. लक्ष्मणाचा परित्याग, रामाची प्रतिज्ञा, पुत्रांना झालेला अभिषेक व मागोमाग जाण्यासंबंधानें प्रजाजनांची दृढभक्ति निवेदन करून ते ह्मणाले ३ " विंध्य पर्वतासमीप कुशावती ह्मणून विचारी रामानें कुशाकरितां रम्य नगरी केली आहे ४; श्रावस्ती ह्मणून एक रम्य नगरीं लवाकरितां तयार करून त्यानें विख्यात केली आहे आणि अयोध्या जनरहित करून महारथि राम व भरत स्वर्गगमनाच्या उद्योगाला लागले आहेत. " ह्याप्रमाणें महात्म्या शत्रुघ्नाला सर्व निवेदन करून ५ ते दूत स्वस्थ राहिले आणि " हे राजा, त्वरा कर " असें ते पुनरपि ह्मणाले ६. उपस्थित झालेल्या घोर कुलक्षयासंबंधानें दूतांनीं केलेलें तें भाषण श्रवण करून रघुनंदन शत्रुघ्नानें

च पुरोधसम् ७ तेषां सर्वं यथावृत्तमब्रवीद्रघुनन्दनः। आत्मनश्च विपर्यासं भविष्यं भ्रातृभिः सह ८ ततः पुत्रद्वयं वीरः सोऽभ्यषिञ्चन्नराधिपः। सुबाहुर्मधुरां लेभे शत्रुघाती च वैदिशम् ९ द्विधा कृत्वा तु तां सेनां माधुरीं पुत्रयोर्द्वयोः। धनं च युक्तं कृत्वा वै स्थापयामास पार्थिवः १० सुबाहुं मधुरायां च वैदिशे शत्रुघातिनम्। ययौ स्थाप्य तदायोध्यां रथेनैकेन राघवः ११ स ददर्श महात्मानं ज्वलन्तमिव पावकम्। सूक्ष्मक्षौमाम्बरधरं मुनिभिः सार्धमक्षयैः १२ सोऽभिवाद्य ततो रामं प्राञ्जलिः प्रयतेन्द्रियः। उवाच वाक्यं धर्मज्ञं धर्ममेवानुचिन्तयन् १३ कृत्वाभिषेकं सुतयोर्द्वयो राघवनन्दन। तवानुगमने राजन्विद्धि मां कृतनिश्चयम् १४ न चान्यदद्य वक्तव्यमतो वीर न शासनम्। विहन्यमानमिच्छामि मद्विधेन विशेषतः १५ तस्य तां बुद्धिमक्लीबां विज्ञाय रघुनन्दनः। बाढमित्येव शत्रुघ्नं रामो वाक्यमुवाच ह १६ तस्य वाक्यस्य वाक्यान्ते वानराः कामरूपिणः। ऋक्षराक्षससङ्घाश्च समापेतुरनेकशः १७ सुग्रीवं ते पुर-

मंत्री व कांचननामक पुरोहित ह्यांना बोलावून आणिलें आणि भ्रात्यांसहवर्तमान आपल्या देहाचा होणारा वियोग व इतरही सर्व इत्थंभूत वर्तमान त्यानें त्यांना कळविलें ७,८. तदनंतर त्या प्रजाधिपति वीर शत्रुघ्नानें आपल्या दोन पुत्रांना राज्याभिषेक केला. तेव्हां सुबाहूला मधुरा नगरी मिळाली व शत्रुघातीला वैदिश नगर प्राप्त झालें, ९. असो. पुत्रांना राज्याभिषेक केल्यानंतर शत्रुघ्नानें मधुरानगरीमध्यें असलेली ती सेना दोन भाग करून दोन पुत्रांना वाटून दिली; धनाचाही योग्य विभाग करून, त्या राजानें त्यांची स्थापना केली १० आणि मधुरेमध्यें सुबाहूला व वैदिशनगरामध्यें शत्रुघातीला स्थापिल्यानंतर तो रघुवंशज शत्रुघ्न फक्त एक रथ बरोबर घेऊन अयोध्येला गेला ११ तों अग्नीप्रमाणें उज्वल आणि बारीक रेशमी वस्त्र धारण केलेला महात्मा राम सनातन मुनीसहवर्तमान बसलेला त्याच्या दृष्टीं पडला १२. नंतर रामाला त्यानें अभिवंदन केलें आणि धर्माचें चिंतन करीत असलेला तो जितेंद्रिय शत्रुघ्न हात जोडून त्या धर्मवेत्त्या रामाला ह्मणाला १३ ' हे रघुनंदना राजा, दोन पुत्रांना राज्याभिषेक करून आपल्या बरोबर येण्याविषयीं मीं निश्चय केला आहे असें आपण समजा १४. बरोबर येण्याशिवाय मला आज आपण दुसरी कांहींएक आज्ञा करूं नका. हे वीर, विशेषतः माझ्यासारख्याच्या हातून आपल्या आज्ञेचा भंग व्हावा अशी माझी इच्छा नाहीं " १५. तो त्याचा यथार्थ निश्चय जाणून रघुनंदन राम " ठीक आहे " असें शत्रुघ्नाला ह्मणाला १६. ते रामाचें भाषण संपल्यानंतर यथेष्ट रूप करणारे वानर आणि ऋक्ष व राक्षस ह्यांचे अनेक गण तेथें उड्या टाकीत आले १७.

स्कृत्य सर्व एव समागताः । तं रामं द्रष्टुमनसः स्वर्गायाभिमुखं स्थितम् १८
देवपुत्रा ऋषिसुता गन्धर्वाणां सुतास्तथा । रामक्षयं विदित्वा ते सर्व एव
समागताः १९ तवानुगमने राजन्संप्राप्ताः स्म समागताः २० यदि राम विना-
स्माभिर्गच्छेस्त्वं पुरुषोत्तम । यमदण्डमिवोद्यम्य त्वया स्म विनिपातिताः २१
एतस्मिन्नन्तरे रामं सुग्रीवोऽपि महाबलः । प्रणम्य विधिवद्वीरं विज्ञापयितुमु-
द्यतः २२ अभिषिच्याङ्गदं वीरमागतोऽस्मि नरेश्वर । तवानुगमने राजन्विद्धि
मां कृतनिश्चयम् २३ तैरेवमुक्तः काकुत्स्थो बाढमित्यब्रवीत्स्मयन् । विभी-
षणमथोवाच राक्षसेन्द्रं महायशाः २४ यावत्प्रजा धरिष्यन्ति तावत्त्वं वै
विभीषण । राक्षसेन्द्र महावीर्य लङ्कास्थः स्वं धरिष्यसि २५ यावच्चन्द्रश्च
सूर्यश्च यावत्तिष्ठति मेदिनी । यावच्च मत्कथा लोके तावद्राज्यं तवास्त्विह २६
शासितश्च सखित्वेन कार्यं ते मम शासनम् । प्रजाः संरक्ष धर्मेण नोत्तरं
वक्तुमर्हसि ॥ किंचान्यद्वक्तुमिच्छामि राक्षसेन्द्र महाबल २७ आराधय
जगन्नाथमिक्ष्वाकुकुलदैवतम् । आराधनीयमनिशं देवैरपि सवासवैः २८

---

स्वर्गलोकीं गमन करण्यास, सिद्ध असलेल्या रामाचें दर्शन घेण्याकरितां सुग्रीवाला पुढें करून ते सर्व वानर आले १८. नंतर रामाचे भूतलावरील वास्तव्य संपूर्ण झालें असें समजल्यावर देवपुत्र, ऋषिकुमार व गंधर्वनंदन हे सर्व तेथें आले आणि ह्मणाले १९ "हे राजा, तुझ्याबरोबर जाण्याकरितां आह्मी जुळून येथें आलों आहों २०. हे पुरुषोत्तमा रामा, आह्मांला सोडून जर तूं जाशील तर यमदंड उगारून तूं आमचा वधच केल्यासारिखें होईल" २१. हें त्यांचें बोलणें चाललें आहे तों महाबलाढ्य सुग्रीवही रीतीप्रमाणें त्या वीरांना वंदन करून प्रार्थना करण्यास तयार झाला २२. (तो ह्मणाला) "हे प्रजाधिपते, वीर अंगदाला अभिषेक करून मी आलों आहें. हे राजा, तुझ्याबरोबर येण्याविषयीं माझा निश्चय झाला आहे असें तूं समज." ह्याप्रमाणें त्यानें विनंति केली असतां ककुत्स्थकुलोत्पन्न राम "ठीक आहे" असें हंसत हंसत ह्मणाला आणि नंतर राक्षसराज बिभीषणाला तो महायशस्वी राम ह्मणाला २४ "हे बिभीषणा, हे महावीर्यवान् राक्षसाधिपते, जोंपर्यंत भूतलावर प्रजा आहे तोंपर्यंत लंकेमध्यें राहून तूं आपला देह धारण कर २५ सूर्य, चंद्र व पृथ्वी हीं जोंपर्यंत आहेत आणि जोंपर्यंत जगतामध्यें माझी कथा प्रचलित आहे तोंपर्यंत येथें तुझें राज्य असो २६. मित्रत्वानें मीं तुला आज्ञा केली आहे व तूं माझ्या आज्ञेप्रमाणें वागणें अवश्य आहे. तूं धर्मानें प्रजेचें रक्षण कर. ह्यावर कांहीं एक उत्तर करूं नकोस. शिवाय, "हे महाबलाढ्य राक्षसराज, इक्ष्वाकूंचें कुलदैवत जो जगन्नाथ त्याचें तूं आराधन कर; इंद्रासहवर्तमान देवही ज्याचें नेहेमीं आराधन करीत

तथेति प्रतिजग्राह रामवाक्यं विभीषणः । राजा राक्षसमुख्यानां राघवाज्ञामनुस्मरन् २९ तमेवमुक्त्वा काकुत्स्थो हनूमन्तमथाब्रवीत् । जीविते कृतबुद्धिस्त्वं मा प्रतिज्ञां वृथा कृथाः ३० मत्कथाः प्रचरिष्यन्ति यावल्लोके हरीश्वर । तावद्रमस्व सुप्रीतो मद्वाक्यमनुपालयन् ३१ एवमुक्तस्तु हनुमान्राघवेण महात्मना । वाक्यं विज्ञापयामास परं हर्षमवाप च ३२ यावत्तव कथा लोके विचरिष्यति पावनी । तावत्स्थास्यामि मेदिन्यां तवाज्ञामनुपालयन् ३३ जाम्बवन्तं तथोक्त्वा तु वृद्धं ब्रह्मसुतं तदा । मैन्दं च द्विविदं चैव पञ्च जाम्बवता सह ३४ यावत्कलिश्च संप्राप्तस्तावज्जीवत सर्वदा ३५ तमेवमुक्त्वा काकुत्स्थः सर्वांस्तानृक्षवानरान् । उवाच बाढं गच्छध्वं मया सार्धं यथोदितम् ३६ [ ३९८२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डेऽष्टोत्तरशततमः सर्गः ॥ १०८ ॥

प्रभातायां तु शर्वर्यां पृथुवक्षा महायशाः । रामः कमलपत्राक्षः पुरोधसमथाब्रवीत् १ अग्निहोत्रं व्रजत्वग्रे दीप्यमानं सह द्विजैः । वाजपेया-

---

असतात; इतकेंच तुला सांगून ठेवण्याचें माझ्या मनांत आहे " २७,२८. ह्यानंतर ह्या रामाच्या आज्ञेकडे लक्ष्य देऊन राक्षसश्रेष्ठांचा राजा जो बिभीषण त्यानें " आज्ञा " असें ह्मणून रामाचें ह्मणणें मान्य केलें २९. ह्याप्रमाणें बिभीषणाला सांगितल्यानंतर ककुत्स्थकुलोत्पन्न राम हनुमानाला ह्मणाला " जिवंत राहण्याविषयीं तूं निश्चय केला आहेस. ह्यास्तव, तूं आपली प्रतिज्ञा व्यर्थ करूं नकोस ३०. हे वानराधिपते, जोंपर्यंत जगतामध्यें माझ्या कथा प्रचलित राहतील तोंपर्यंत माझ्या आज्ञेचें परिशालन करून तूं सुप्रसन्न मनानें भूतलावर स्वस्थ रहा " ३१. ह्याप्रमाणें महात्म्या रामानें हनुमानाला सांगितलें असतां त्याला मोठा हर्ष झाला आणि तो ह्मणाला ३२ "जोंपर्यंत जगतामध्यें तुझी कथा प्रचलित राहील तोंपर्यंत तुझ्या आज्ञेचें परिपालन करून मी भूतलावर राहीन " ३३. नंतर वृद्ध ब्रह्मपुत्र जांबवान्, मैंद व द्विविद ह्यांनाही रामानें तसेंच सांगितलें आणि जांबवान्, हनुमान्, बिभीषण, मैंद व द्विविद ह्या पांचांना तो ह्मणाला "जोंपर्यंत कलियुग आहे तोंपर्यंत तुह्मी जीवंत रहा " ३४,३५. असें त्यांना सांगितल्यानंतर "ठीक आहे. तुमच्या इच्छेप्रमाणें तुह्मी माझ्याबरोबर चला " ह्मणून त्या सर्व ऋक्ष व वानरांना त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें सांगितलें ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशें आठवा सर्ग समाप्त झाला ॥ १०८ ॥

रात्र उजाडल्यानंतर विशाल वक्षःस्थल आणि कमलपत्रतुल्य नेत्र ह्यांनीं युक्त असलेला महायशस्वी राम पुरोहितांना ह्मणाला १ " अग्निहोत्रसंबंधी प्रदीप्त अग्नि व राजमार्गामध्यें

तपत्रं च शोभमानं महापथे २ ततो वसिष्ठस्तेजस्वी सर्वं निरवशेषतः ।
चकार विधिवद्धर्मं महाप्रास्थानिकं विधिम् ३ ततः सूक्ष्माम्बरधरो ब्रह्म-
मावर्तयन्परम् । कुशान्गृहीत्वा पाणिभ्यां सरयूं प्रययावथ ४ अव्याहर-
न्कचित्किंचिन्निश्चेष्टो निःसुखः पथि । निर्जगाम गृहात्तस्माद्दीप्यमानो
यथांशुमान् ५ रामस्य दक्षिणे पार्श्वे पद्मा श्रीः समुपाश्रिता । सव्येऽपि
च मही देवी व्यवसायस्तथाग्रतः ६ शरा नानाविधाश्चापि धनुरायतमु-
त्तमम् । तथाऽऽयुधाश्च ते सर्वे ययुः पुरुषविग्रहाः ७ वेदा ब्राह्मणरूपेण
गायत्री सर्वरक्षिणी । ओंकारोऽथ वषट्कारः सर्वे राममनुव्रताः ८
ऋषयश्च महात्मानः सर्व एव महीसुराः । अन्वगच्छन्महात्मानं स्वर्ग-
द्वारमपावृतम् ९ तं यान्तमनुगच्छन्ति ह्यन्तःपुरचराः स्त्रियः । सवृद्ध-
बालदासीकाः सवर्षवरकिंकराः १० सान्तःपुरश्च भरतः शत्रुघ्नसहितो
ययौ । रामं गतिमुपागम्य साग्निहोत्रमनुव्रतः ११ ते च सर्वे महा-
त्मानः साग्निहोत्राः समागताः । सपुत्रदाराः काकुत्स्थमनुजग्मुर्महाम-
तिम् १२ मन्त्रिणो भृत्यवर्गाश्च सपुत्रपशुबान्धवाः । सर्वे सहानुगा राम-

---

शोभणारे वाजपेययागसंबंधीं छत्र हीं द्विजांसहवर्तमान पुढें जाऊं द्या " २. तदनंतर तेजस्वी वसिष्ठमुनींनीं परलोकगमनसंबंधानें असलेल्या विधीला उद्देशून कर्तव्य जें धर्मकृत्य तें सर्व निःशेष केलें ३; व नंतर हातामध्यें दर्भ घेऊन परब्रह्माचें चिंतन करीत करीत सूक्ष्मवस्त्र परिधान केलेला राम सरयू नदीकडे निघाला ४. सारांश, कांहींएक भाषण कोठेंही न करितां, कोणताही इंद्रियव्यापार न करितां आणि पादत्राणादिकांनीं होणाऱ्या सुखाची अपेक्षा न करितां सूर्याप्रमाणें झळकत असलेला तो राम घरांतून बाहेर पडला ५. रामाच्या उजव्या बाजूला पद्महस्ता लक्ष्मी होती; डाव्या बाजूला भूदेवी चालली होती आणि संहारशक्ति पुढें जात होती ६. नानाप्रकारचे बाण, अधीन असलेलें उत्कृष्ट धनुष्य आणि इतरही सर्व आयुधें हीं सर्व मनुष्यदेह धारण करून बरोबर चाललीं होतीं ७. ब्राह्मणरूपानें वेद, सर्वांचें रक्षण करणारी गायत्री, प्रणव आणि वषट्कार हेही सर्व रामाबरोबर चालले होते ८. महात्मे ऋषि आणि सर्व विप्र रामाबरोबर प्रतिबंधरहित असलेल्या स्वर्गलोकाकडे चालले ९. अंतःपुरांतील स्त्रिया—वृद्ध, बाल, दासी, षंढ आणि सेवक ह्यांसहवर्तमान—त्या ब्रह्मलोकीं जात असलेल्या रामाच्या मागोमाग गेल्या १०. सर्व लोकांना आश्रयभूत असलेला राम अग्निहोत्रासहवर्तमान जात असतांना शुश्रूषेविषयीं तत्पर असलेला भरत अंतःपुर बरोबर घेऊन शत्रुघ्नासहवर्तमान त्याच्या बरोबर चालला ११. त्याचप्रमाणें अग्निहोत्रें, पुत्र व भार्या ह्यांसहवर्तमान आलेले जे महात्मे ब्राह्मण तेही सर्व महाविचारी

मन्वगच्छन्प्रहृष्टवत् १३ ततः सर्वाः प्रकृतयो हृष्टपुष्टजनावृताः । गच्छ-
न्तमनुगच्छन्ति राघवं गुणरञ्जिताः १४ ततः सस्त्रीपुमांसस्ते सपक्षिपशु-
बान्धवाः । राघवस्यानुगाः सर्वे हृष्टा विगतकल्मषाः १५ स्नाताः प्रमुदिताः
सर्वे हृष्टपुष्टाश्च वानराः । दृढं किलकिलाशब्दैः सर्वं राममनुव्रतम् १६
न तत्र कश्चिद्दीनो वा व्रीडितो वाऽपि दुःखितः । हृष्टं समुदितं सर्वं बभूव
परमाद्भुतम् १७ द्रष्टुकामोऽथ निर्यान्तं रामं जानपदो जनः । यः प्राप्तः
सोऽपि दृष्ट्वैव स्वर्गायानुगतो जनः १८ ऋक्षवानररक्षांसि जनाश्च पुरवा-
सिनः । आगच्छन्परया भक्त्या पृष्ठतः सुसमाहिताः १९ यानि भूतानि
नगरेऽप्यन्तर्धानगतानि च । राघवं तान्यनुययुः स्वर्गाय समुपस्थितम् २०
यानि पश्यन्ति काकुत्स्थं स्थावराणि चराणि च । सर्वाणि रामगमने अनु-
जग्मुर्हि तान्यपि २१ नोच्छ्वसत्तदयोध्यायां सुसूक्ष्ममपि दृश्यते । तिर्यग्यो-
निगताश्चैव सर्वे राममनुव्रताः २२ [४००४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-
कीय आदिकाव्य उत्तरकाण्डे नवाधिकशततमः सर्गः ॥ १०९ ॥

---

रामाच्या मागोमाग चालले १२. मंत्री व सेवकवर्ग हेही सर्व पुत्र, पशु, बांधव आणि अनुयायी ह्यांसहवर्तमान आनंदानें रामाबरोबर निघाले १३. नंतर रामाच्या गुणांनीं सुखी झालेले सर्व हुद्देदार तुष्ट व पुष्ट प्रजाजनांना बरोबर घेऊन रामाच्या मागोमाग निघाले १४. नंतर निष्पाप व आनंदित असे रामाचे ते सर्व अनुयायी भार्या, पुत्र, पती, पशु व बांधव ह्यांसहवर्तमान रामाबरोबर निघाले १५; व संतुष्ट व पुष्ट असे सर्वही वानर स्नान करून आनंदानें रामाबरोबर चालले. सारांश, किलकिलाटांनीं ज्यांचा रामाबरोबर जाण्याचा निश्चय दिसून येत आहे असे तें सर्वही वानरसैन्य रामाबरोबर जाऊं लागलें १६. त्यांपैकीं दैन्ययुक्त, लज्जायुक्त अथवा दुःखित असा कोणीही नसून सर्वही वानरसैन्य हर्षयुक्त व आनंदित असल्यामुळें फारच आश्चर्यकारक दिसत होतें १७. नंतर राम निघाला असतां जे देशांतील लोक पहाण्याकरितां आले होते तेही त्याला पहातांक्षणीं त्याच्या मागोमाग स्वर्गाला चालले १८. ऋक्ष, वानर, राक्षस आणि नागरिक जन हे अतिशय तत्पर राहून मोठ्या भक्तीनें रामाच्या मागून निघाले १९. नगरांमध्यें मानवांना अदृश्य असे जे प्राणी होते तेही स्वर्गाला निघालेल्या रामाच्या मागोमाग निघाले २०. सारांश, स्थावर व जंगम अशा ज्या ह्मणून प्राण्यांनीं रामाला अवलोकन केलें ते सर्व रामाच्या मागोमाग गेले २१. असो. अयोध्येमध्यें त्यावेळीं श्वासोच्छ्वास करणारा असा कोणीही प्राणी राहिला नाहीं. कारण, तिर्यग्योनीमध्यें उत्पन्न झालेले हे सर्व प्राणी रामाच्या मागोमाग गेले २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणनामक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशें नववा सर्ग समाप्त झाला ॥ १०९ ॥

अध्यर्धयोजनं गत्वा नदीं पश्चान्मुखाश्रिताम् । सरयूं पुण्यसलिलां
ददर्श रघुनन्दनः १ तां नदीमाकुलावर्तां सर्वत्रानुसरन्नृपः । आगतः सप्रजो
रामस्तं देशं रघुनन्दनः २ अथ तस्मिन्मुहूर्ते तु ब्रह्मा लोकपितामहः ।
सर्वैः परिवृतो देवैर्भूषितैश्च महात्मभिः ३ आययौ यत्र काकुत्स्थः स्वर्गाय
समुपस्थितः । विमानशतकोटीभिर्दिव्याभिरभिसंवृतः ४ दिव्यतेजोवृतं
व्योम ज्योतिर्भूतमनुत्तमम् । स्वयंप्रभैः स्वतेजोभिः स्वर्गिभिः पुण्यक-
र्मभिः ५ पुण्या वाता ववुश्चैव गन्धवन्तः सुखप्रदाः । पपात पुष्पवृष्टिश्च
देवैर्मुक्ता महौघवत् ६ तस्मिंस्तूर्यशतैः कीर्णे गन्धर्वाप्सरसंकुले । सरयू-
सलिलं रामः पद्भ्यां समुपचक्रमे ७ ततः पितामहो वाणीं त्वन्तरिक्षा-
दभाषत । आगच्छ विष्णो भद्रं ते दिष्ट्या प्राप्तोऽसि राघव ८ भ्रातृभिः
सह देवाभैः प्रविशस्व स्विकां तनुम् । यामिच्छसि महाबाहो तां तनुं
प्रविश स्विकाम् ९ वैष्णवीं तां महातेजो यद्वाकाशं सनातनम् । त्वं हि
लोकगतिर्देव न त्वां केचित्प्रजानते १० ऋते मायां विशालाक्षीं तव पूर्व-
परिग्रहाम् । त्वामचिन्त्यं महद्भूतमक्षयं चाजरं तथा ११ यामिच्छसि महा-

---

अयोध्येपासून सुमारें दीड योजन गेल्यानंतर पवित्र उदकांनीं युक्त अशी पश्चिमवाहिनी सरयूनदी रघुनंदन रामाच्या दृष्टीं पडली १. भोंवऱ्यांनीं व्याप्त झालेल्या त्या नदीमध्यें सर्वत्र संचार करीत करीत रघुनंदन रामराजा प्रजाजनांसहवर्तमान त्या स्वर्गाला नेऊन पोंचविणाऱ्या ठिकाणापाशीं आला २. तेव्हां त्याचवेळीं लोकांचा पूर्वज ब्रह्मदेव उदार अंतःकरणानें युक्त असलेल्या सर्व देवांसहवर्तमान, जेथें ककुत्स्थ कुलोत्पन्न राम स्वर्गाला जाण्यास सिद्ध झाला होता तेथें आला. तेव्हां शेंकडों कोट दिव्य विमानें त्याच्या बरोबर होतीं ३,४. स्वतःच्या किरणांमुळें स्वयंप्रकाश असलेले जे पुण्यवान् स्वर्गनिवासी प्राणी त्यांच्या दिव्य तेजानें आकाश व्याप्त होऊन गेल्यामुळें तें प्रकाशमय आणि ह्मणूनच अनुपम दिसूं लागलें ५. गंधयुक्त आणि ह्मणूनच सुखप्रद असे पवित्र वारे वाहूं लागले आणि देवांनीं केलेली पुष्पवृष्टि मोठ्या प्रवाहाप्रमाणें होऊं लागली ६. ह्याप्रमाणें गंधर्व व अप्सरा ह्यांनीं तें आकाश गजबजून जाऊन शेंकडों तूर्यवाद्यांनीं व्याप्त होऊन गेलें असतां राम पायांनींच सरयूच्या उदकामध्यें उतरूं लागला ७. तेव्हां अंतरिक्षांतून ब्रह्मदेव ह्मणाला "हे विष्णो, ये. हे राघवा, तुझें कल्याण असो. तूं स्वर्गलोकीं येण्यास तयार झाला आहेस ही फारच आनंदाची गोष्ट आहे ८. देवतुल्य भ्रात्यांसहवर्तमान, हे महापराक्रमी रामा, तूं इच्छेस येईल त्या आपल्या तनूमध्यें प्रवेश कर ९. हे महातेजस्वी रामा, तूं वैष्णवी तनूचें अवलंबन कर अथवा आकाशरूप सनातन तनूमध्यें प्रवेश कर. हे देव, लोकांना आश्रय तूंच असून तुला कोणीही ओळखीत नाहींत १०. फक्त

तेजस्तां तनुं प्रविश स्वयम् ११ पितामहवचः श्रुत्वा विनिश्चित्य महा-
मतिः । विवेश वैष्णवं तेजः सशरीरः सहानुजः १२ ततो विष्णुमयं देवं
पूजयन्ति स्म देवताः । साध्या मरुद्गणाश्चैव सेन्द्राः साग्निपुरोगमाः १३
ये च दिव्या ऋषिगणा गन्धर्वाप्सरसश्च याः । सुपर्णनागयक्षाश्च दैत्यदा-
नवराक्षसाः १४ सर्वं पुष्टं प्रमुदितं सुसंपूर्णमनोरथम् । साधु साध्विति तैर्दे-
वैस्त्रिदिवं गतकल्मषम् १५ अथ विष्णुर्महातेजाः पितामहमुवाच ह । एषां
लोकं जनौघानां दातुमर्हसि सुव्रत १६ इमे हि सर्वे स्नेहान्मामनुयाता यश-
स्विनः । भक्ता हि भजितव्याश्च त्यक्तात्मानश्च मत्कृते १७ तच्छ्रुत्वा विष्णु-
वचनं ब्रह्मा लोकगुरुः प्रभुः । लोकान्संतानकान्नाम यास्यन्तीमे समागताः १८
यच्च तिर्यग्गतं किंचित्त्वामेवमनुचिन्तयत् । प्राणांस्त्यक्ष्यति भक्त्या तत्सं-
तानेषु निवत्स्यति १९ सर्वैर्ब्रह्मगुणैर्युक्ते ब्रह्मलोकादनन्तरे । वानराश्च स्विकां
योनिमृक्षाश्चैव तथा ययुः २० येभ्यो विनिःसृताः सर्वे सुरेभ्यः सुरसं-

---

विशाल नेत्रांनीं युक्त व तूं पूर्वी स्वीकारिलेली माया मात्र अचिंत्य, अजर, अमर व महद्भूत अशा तुला जाणीत आहे. ह्यास्तव, हे महातेजस्वी रामा, इच्छेस येईल त्या तनूमध्यें तूं प्रवेश कर " ११. ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण केल्यानंतर महामति रामानें विचार केला आणि स्वतःचें शरीर व कनिष्ठ भ्राते ह्यांसहवर्तमान त्यानें वैष्णव तेजामध्यें प्रवेश केला १२. तदनंतर साध्य, मरुद्गण, आणि इंद्राग्निप्रभृति देव ह्यांनीं त्या विष्णुस्वरूप देवाचें पूजन केलें १३ आणि दिव्य ऋषिगण, गंधर्व, अप्सरा, सुपर्ण, नाग, यक्ष, दैत्य, दानव आणि राक्षस ह्यांनींही त्याची प्रशंसा केली १४. सारांश, " तूं आल्यामुळें सर्व स्वर्ग लोक पुष्ट, हर्षयुक्त, कृतकृत्य आणि पापरहित झाला आहे; ह्यास्तव, तुझी धन्य आहे ! धन्य आहे !" असें ते देव त्याला ह्मणाले १५. तदनंतर महातेजस्वी विष्णु ब्रह्मदेवाला ह्मणाला " हे सुव्रता, ह्या जनसमुदायांना वास्तव्य करण्यास तूं योग्य स्थान दे १६. हे सर्वही यशस्वी जनसमूह प्रेमामुळें माझ्याबरोबर आले आहेत. हे माझे भक्त असल्यामुळें व माझ्याकरितां त्यांनीं प्राणांचीही पर्वा केली नसल्यामुळें मलाही ह्यांचा स्वीकार केला पाहिजे " १७. हें विष्णूचें भाषण श्रवण करून जगद्गुरु प्रभु ब्रह्मदेव ह्मणाला " ह्या येथें आलेल्या जनसमुदायांना संतानसंज्ञक लोक प्राप्त होतील १८. तिर्यग्योनीमध्यें उत्पन्न झालेले जे कोणी प्राणी भक्तीनें तुझें चिंतन करीत करीत प्राण सोडितील तेही संतानसंज्ञक लोकामध्यें वास्तव्य करितील १९. ब्रह्मलोकांतील सर्व उत्कृष्ट गुणांनीं युक्त आणि ब्रह्मलोकासमीप असलेला जो संतानक लोक त्यामध्यें वानरें व ऋक्ष आपआपली देवयोनि स्वीकारून राहिले २०. सारांश, ज्या देवां-

भवाः । तेषु प्रविविशे चैव सुग्रीवः सूर्यमण्डलम् २१ पश्यतां सर्वदेवानां स्वान्पितॄन्प्रतिपेदिरे । तथा ब्रुवति देवेशे गोप्रतारमुपागताः २२ भेजिरे सरयूं सर्वे हर्षपूर्णाश्रुविक्लवाः । अवगाह्याप्सु यो यो वै प्राणांस्त्यक्त्वा प्रहृष्टवत् २३ मानुषं देहमुत्सृज्य विमानं सोऽध्यरोहत । तिर्यग्योनिगतानां च शतानि सरयूजलम् २४ संप्राप्य त्रिदिवं जग्मुः प्रभासुरवपूंषि तु । दिव्या दिव्येन वपुषा देवा दीप्ता इवाभवन् २५ गत्वा तु सरयूतोयं स्थावराणि चराणि च । प्राप्य तत्तोयविक्लेदं देवलोकमुपागमन् २६ तस्मिन्येऽपि समापन्ना ऋक्षवानरराक्षसाः । तेऽपि स्वर्गं प्रविविशुर्देहान्निक्षिप्य चाम्भसि २७ ततः समागतान्सर्वान्स्थाप्य लोकगुरुर्दिवि । हृष्टैः प्रमुदितैर्देवैर्जगाम त्रिदिवं महत् २८ [ ४०३२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्डे दशाधिकशततमः सर्गः ॥ ११० ।

एतावदेतदाख्यानं सोत्तरं ब्रह्मपूजितम् । रामायणमिति ख्यातं मुख्यं वाल्मीकिना कृतम् १ ततः प्रतिष्ठितो विष्णुः स्वर्गलोके यथा पुरा । येन व्याप्त-

---

पासून जे उत्पन्न झाले होते ते सर्व देवपुत्र त्या त्या देवांचे ठिकाणीं प्रविष्ट झाले व सुग्रीव सूर्यमंडलामध्यें प्रविष्ट झाला २१. सारांश, इतर सर्व देव पहात असतांना सुग्रीवप्रभृति रामाचे अनुयायी आपल्या पितरांच्या स्वरूपाचे ठिकाणीं मिळून गेले. असो. " आपल्या तनूमध्यें तूं प्रवेश कर " असें देवाधिपति ब्रह्मदेव रामाशीं भाषण करूं लागला असतां गोप्रतार तीर्थासमीप येऊन २२ सर्वही रामानुयायी सरयूमध्यें शिरले व त्यावेळीं त्यांचे नेत्र आनंदाश्रूनीं भरून आले. ह्याप्रमाणें सरयूच्या उदकांमध्यें प्रवेश करून जो जो आनंदानें प्राणत्याग करीत असे तो तो २३ मनुष्यदेहाचा त्याग करून विमानामध्यें बसत असे. तिर्यग्योनीमध्यें जन्मास आलेले जे शेंकडों प्राणी सरयूच्या उदकामध्यें २४ शिरले ते उज्ज्वल देह धारण करून स्वर्गाला गेले आणि स्वर्गामध्यें गेल्यानंतर दिव्य देहाच्या योगानें ते देवांप्रमाणें झळकूं लागले २५. सरयूचे उदकासमीप येऊन त्या उदकानें शरीर आर्द्र झाल्यामुळें स्थावर व जंगम असे सर्व प्राणी देवलोकीं गेले २६. त्या सरयूच्या उदकामध्यें ज्या ऋक्षांनीं, वानरांनीं व राक्षसांनीं उड्या घातल्या तेही उदकामध्येंच देह ठेवून स्वर्गलोकीं चालते झाले २७; आणि ह्याप्रमाणें रामाबरोबर आलेल्या सर्व प्राण्यांना त्यांना योग्य अशा स्वर्गस्थानामध्यें ठेवून जगद्गुरु ब्रह्मदेव आनंदित झालेल्या देवांसहवर्तमान मुख्य स्वर्गलोकामध्यें गेला २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील उत्तरकांडापैकीं एकशें दहावा सर्ग समाप्त झाला ॥ ११० ॥

उत्तरकांडासहवर्तमान हें आख्यान इतकें आहे; ब्रह्मदेवालाही हें मान्य आहे; रामायण

मिदं सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् २ ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । नित्यं शृण्वन्ति संहृष्टाः काव्यं रामायणं दिवि ३ इदमाख्यानमायुष्यं सौभाग्यं पापनाशनम् । रामायणं वेदसमं श्राद्धेषु श्रावयेद्बुधः ४ अपुत्रो लभते पुत्रमधनो लभते धनम् । सर्वपापैः प्रमुच्येत पादमप्यस्य यः पठेत् ५ पापान्यपि च यः कुर्यादहन्यहनि मानवः । पठत्येकमपि श्लोकं पापात्स परिमुच्यते ६ वाचकाय च दातव्यं वस्त्रं धेनुर्हिरण्यकम् । वाचके परितुष्टे तु तुष्टाः स्युः सर्वदेवताः ७ एतदाख्यानमायुष्यं पठन्रामायणं नरः । सपुत्रपौत्रो लोकेऽस्मिन्प्रेत्य चेह महीयते ८ रामायणं गोविसर्गे मध्याह्ने वा समाहितः । सायाह्ने वाऽपराह्णे च वाचयन्नावसीदति ९ अयोध्याऽपि पुरी रम्या शून्या वर्षगणान्बहून् । ऋषभं प्राप्य राजानं निवासमुपयास्यति १० एतदाख्यानमायुष्यं सभविष्यं सहोत्तरम् । कृतवान्प्रचेतसः पुत्रस्तद्ब्रह्माप्यन्वमन्यत ११ [४०४३] [२४३३५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्य उत्तरकाण्ड एकादशोत्तरशततमः सर्गः ॥१११॥

॥ इति श्रीरामायणस्योत्तरकाण्डं समाप्तम् ॥

---

ह्मणून हें प्रसिद्ध आहे आणि हें मुख्य काव्य वाल्मीकि महर्षींनीं ग्रथित केलें आहे १. असो. भक्त जनांना स्वर्गलोकीं नेल्यानंतर विष्णु पूर्वीप्रमाणें स्वर्गलोकीं राहिला. त्या विष्णूनें हें सर्व त्रैलोक्य चराचर प्राण्यांसहवर्तमान व्यापिलें आहे २. राम स्वर्गलोकीं गेल्यापासून देव, गंधर्व, सिद्ध व महर्षि, स्वर्गामध्यें नित्य आनंदानें, हें रामायण काव्य श्रवण करीत असतात ३. आयुर्वर्धक, सौभाग्यदायक, पापनाशक आणि वेदतुल्य असें हें रामायण आख्यान श्राद्धसमयीं प्राज्ञ पुरुषानें ब्राह्मणांना ऐकवावें ४. ह्या आख्यानांतील एकचतुर्थांश श्लोकाचाही पाठ ज्याच्या हातून घडेल तो निपुत्रिक असल्यास पुत्रवान् होईल; निर्धन असल्यास धनसंपन्न होईल आणि सर्व पापापासून मुक्त होईल ५. प्रत्यहीं अनेक पातकें करणारा परंतु एक तरी श्लोक पठण करणारा जर कोणी मानव असेल तर तोही पातकापासून मुक्त होईल ६. हें रामायण वाचणाऱ्याला वस्त्र, धेनु व सुवर्ण यांचें दान द्यावें. कारण, वाचक संतुष्ट झाल्यास सर्व देवता संतुष्ट होतात ७. हें आयुर्वर्धक रामायणसंज्ञक आख्यान पठण करणारा पुरुष पुत्रपौत्रांसहवर्तमान इहलोकीं मान्य होतो आणि देहत्यागानंतर परलोकींही पूज्य होतो ८. गाई सोडण्याचे वेळीं, मध्यान्हसमयीं, सायंकाळीं अथवा अपराह्णसमयीं रामायण पठण करणारा पुरुष नाश पावत नाहीं ९. असो. अयोध्यानामक रम्य नगरी जरी आजपासून अनेक संवत्सर समुदाय लोटेपर्यंत शून्य होणार आहे तरी ऋषभ राजा तेथें प्राप्त झाल्यावर त्या नगरीमध्यें लोकांचें वास्तव्य होईल १०. भाविष्य आणि उत्तर

वांसाठ वर्तमान हें आयुर्वर्धक श्रीरामाख्यान, प्रचेतसुत वाल्मीकि महर्षींनीं ग्रथित केलें असून मन्वंतरांनीही तें मान्य केलें आहे ११. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आर्षकाव्यांतील उत्तरकांडांतील एकशें अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ १११ ॥

ह्याठिकाणीं उत्तरकांड संपूर्ण होऊन श्रीरामायणही संपूर्ण झालें.

रामाय रामभद्राय रामचन्द्राय वेधसे ।
रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ॥
कूजन्तं राम रामेति मधुरं मधुराक्षरम् ।
आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम् ॥
यथा रथ्योदकं गङ्गां प्राप्य शुद्धिं समृच्छति ।
तथा रामगुणान्प्राप्य मम वाक्शुद्धिमाप्नुयात् ॥
इति संचिन्त्य मनसा वामनाल्लब्धजन्मना ।
काशीनाथेन लेलेन काव्ये रामायणे शुभे ॥
साहसं महदारुह्य कृता टीका सुबोधिनी ।
महाराष्ट्रीयभाषायां सीतादुर्गेशयोर्मुदे ॥

शके १८१८ श्रावण शुद्ध पंचमी ह्या दिवशीं ह्या टीकेला आरंभ होऊन शके १८२२ माघ वद्य पंचमी शुक्रवार ह्या दिवशीं परमेश्वराच्या कृपेनें ही टीका संपूर्ण झाली.

॥ श्रीरामः प्रसन्नोस्तु ॥

